मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय – मराठी संशोधन मंडळ ह्यांच्या सहकार्याने

# मराठी वाङ्मयकोश

## खंड पहिला

### मराठी ग्रंथकार : विभाग पहिला

[इ. स. १०५० – १८५७]

: संपादक :

गंगाधर देवराव खानोलकर




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई
१९७७

प्रकाशक :
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ
५ वा मजला, मंत्रालय, मुंबई – ४०० ०३२

मुद्रक :
केशवराव चौधरी
निदेशक, आंतरभारती मुद्रणालय
४२, आंबेकर मार्ग, वडाळा, मुंबई – ४०० ०३१
अरुण नाईक
अक्षर प्रतिरूप प्रा. लि.
४२, आंबेकर मार्ग, वडाळा, मुंबई – ४०० ०३१

जुळणी व छपाई :
अक्षर प्रतिरूप प्रा. लि.

वेष्टन :
ग. आ. गांगल

प्रथम प्रकाशन : ऑगस्ट १९७७

# महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचा संकल्पित कार्यक्रम

महाराष्ट्र राज्याचे पहिले व माजी मुख्यमंत्री श्री यशवंतराव चव्हाण ह्यांनी महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेच्या वेळी राज्यकारभारासंबंधीची, मूलभूत धोरण सूचित करणारी काही सूत्रे सांगितली. त्या सूत्रांनुसार मराठी भाषा व साहित्य ह्यांच्या अभिवृद्ध्यर्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाची स्थापना दिनांक १९ नोव्हेंबर १९६० रोजी झाली. या मंडळाने प्रारंभीच खालील कार्यक्रम हाती घेतला असून तो कार्यान्वितही केला जात आहे. हा कार्यक्रम असा :

१ मराठीमध्ये *एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका*प्रमाणे सर्वसंग्राहक विश्वकोश संपादित करून प्रकाशित करणे. या विश्वकोशाचे *ब्रिटानिका*च्या आकाराचे प्रत्येकी १,००० पृष्ठांचे २० खंड (परिभाषासंग्रह धरून) संकल्पित केले आहेत.

२ अद्यावत उपलब्ध कागदपत्रांचा उपयोग करून अंदाजे प्रत्येकी ५०० पृष्ठांच्या ४ खंडांत महाराष्ट्राच्या इतिहासाचे संपादन आणि प्रकाशन करणे.

३ मराठी बोलभाषांचा शास्त्रीय अभ्यास करून त्या बाबतीत माहिती प्रकाशित करणे.

४ अन्य भारतीय आणि प्रमुख परदेशी भाषांच्या अभ्यासाची साधने, द्वैभाषिक शब्दकोश, भाषाप्रवेश आणि साहित्यपरिचय या त्रिविध स्वरूपांत मराठी भाषिकांना उपलब्ध करून देणे.

५ मराठीत अन्य भाषांतील उत्कृष्ट ग्रंथांची भाषान्तरे प्रकाशित करून मराठी वाङ्मयाच्या समृद्धीस मदत करणे.

६ शास्त्रीय आणि तांत्रिक विषयांवर त्याचप्रमाणे सामाजिक शास्त्रे आणि मानव्यविद्या ह्या विषयांवर विचारपूर्ण पण सुटसुटीत ग्रंथांची निर्मिती करणे.

७ विद्वान लेखक व प्रतिष्ठित संशोधनसंस्था ह्यांचे लेखन वा संशोधन प्रकाशित करण्यासाठी अनुदान देणे.

प्रारंभी सुरू केलेल्या या कार्यक्रमाखेरीज साहित्य संस्कृति मंडळाने मराठी शब्दकोश, मराठी वाङ्मयकोश, ललित कला संशोधन इत्यादी नव्या कार्यक्रमांचीही आखणी करून कार्यवाही सुरू केली.

# पु र स्का र

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळातर्फे मराठी वाङ्मयकोश चार खंडांमध्ये प्रकाशित व्हावयाचा आहे. त्यातील हा प्रथम खंड आहे. ह्या मंडळाच्या मराठी भाषेच्या अभिवृद्धीच्या कार्यक्रमात जे अत्यंत मूलभूत प्रकल्प समाविष्ट केले आहेत त्यांपैकीच 'मराठी वाङ्मयकोश' हाही प्रकल्प आहे. मराठी विश्वकोश, आंतरभारती, शास्त्रीय आणि तांत्रिक विषयांवरील त्याचप्रमाणे सामाजिक शास्त्रे आणि मानव्यविद्या ह्यांसंबंधीच्या विषयांवरील ग्रंथ, अन्य भाषांतील उत्कृष्ट ग्रंथांची भाषान्तरे किंवा सारग्रंथ, मराठी शब्दकोश, ललितकलाविषयक संशोधनाचे निबंध, इत्यादी गोष्टींचा ह्या संकल्पित प्रकल्पांमध्ये समावेश आहे.

मराठी वाङ्मयकोशास मराठी भाषेच्या अभिवृद्धीच्या दृष्टीने मूलभूत महत्त्व आहे. गेली आठशे ते नऊशे वर्षे मराठी साहित्याची निर्मिती होत आहे. ब्रिटिश राजच्या स्थापनेच्या पूर्वी मराठी साहित्यातील उत्कृष्ट साहित्य प्रामुख्याने धार्मिक व आध्यात्मिक विषयांवर निर्माण झाले आहे. ब्रिटिश राज्य स्थापन झाल्याबरोबर धार्मिक व आध्यात्मिक विषयांबरोबरच ऐहिक मानवी जीवनाशी संबद्ध असलेले ऐहिक विषयांवरील साहित्य विस्तार पावू लागले. इंग्रजी शिक्षण घेतलेले उच्चविद्याविभूषित लोक पश्चिमी साहित्याच्या प्रभावाखाली आधुनिक पद्धतीचे ललित व वैचारिक साहित्य निर्माण करू लागले. ललित साहित्याचा वा वैचारिक साहित्याचा आशय व आकृतिबंध ब्रिटिशपूर्व साहित्यापेक्षा वेगळा बनला. ब्रिटिशपूर्व साहित्यात पद्यसाहित्याला प्राधान्य होते व गद्य साहित्य अगदी जुजबी होते. आधुनिक मराठी साहित्यातील कविता सोडल्यास बाकीचे बहुतेक साहित्य गद्यमय बनले. त्यामुळे विचार अभिव्यक्त करण्याचे मराठी भाषेचे सामर्थ्यही विकसित झाले. ह्याचे प्रत्यंतर जॉन स्टुअर्ट मिल, हर्बर्ट स्पेन्सर इत्यादिकांच्या ग्रंथांची भाषान्तरे वा अनुवाद ह्यांमध्ये आणि *गीतारहस्य*, *नीतिशास्त्रप्रवेश* इत्यादिकांमध्ये चांगल्या रीतीने मिळते. इतिहास, भूगोल, वैचारिक निबंध, वैज्ञानिक विषयांवरील पुस्तके, कविता, नाटके, कादंबऱ्या, लघुकथा इत्यादी विविध वाङ्मयशाखा गेल्या दीडशे वर्षांत निर्माण झाल्या आहेत. भाषाध्ययनाची व्याकरण, कोश, वाक्यमीमांसा इत्यादी साधने ब्रिटिशपूर्व काळात निर्माण झाली नव्हती तीही निर्माण झाली आहेत. त्याचप्रमाणे गेल्या दीडशे वर्षांत नियतकालिकांची निर्मितीही फार मोठ्या प्रमाणात झाली आहे.

ह्या सर्व प्राचीन व अर्वाचीन साहित्याचा सहायक संदर्भग्रंथ म्हणून हा 'मराठी वाङ्मयकोश' तयार होत आहे. मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्याचे प्रयत्नही आतापर्यंत झाले आहेत. ब्रिटिशपूर्व मराठी वाङ्मयाचा इतिहास अनेकांनी लिहिला आहे. परंतु लहान, मध्यम किंवा मोठ्या अशा सर्वप्रकारच्या मराठी साहित्याची व साहित्यकारांची व्यवस्थित दखल घेऊन एकत्र नोंदी सापडतील आणि त्या त्या विषयाच्या, लेखनाच्या किंवा लेखकाच्या संबंधी व्यवस्थित निश्चित माहिती मिळेल असा हा पहिलाच प्रयत्न आहे आणि तो बऱ्याच प्रमाणात यशस्वी होत आहे. पहिल्या दोन खंडांचा विषय 'मराठी ग्रंथकार' हा आहे. तिसऱ्या खंडाचा विषय 'मराठी ग्रंथपरिचय' हा आहे; पण त्या खंडात महत्त्वाच्या निवडक ग्रंथांचाच परिचय करून दिला आहे. ज्या ग्रंथांचा परिचय तिसऱ्या खंडात होत नाही त्यांचा विस्तृत परिचय [उदा. नवरसनारायण, परशराम (शाहीर), बहिणाबाई], संक्षिप्त परिचय किंवा नामनिर्देश पहिल्या दोन खंडांमध्ये केलेला आहे.

प्रारंभीची काही वर्षे ह्या प्रकल्पाचे स्वरूप निश्चित व्हायला घालवावी लागली. मराठी वाङ्मयकोशाचे कार्यकारी संपादक व ह्या खंडाचे संपादक श्री गं. दे. खानोलकर हे मोठे साक्षेपी गृहस्थ आहेत. त्यांच्या मराठी वाङ्मयाच्या व्यासंगाचा व्याप एकार्थी अमाप आहे. ह्या प्रकल्पाच्या संदर्भात अनेक नामवंत साहित्यकार आले व सोडून गेले; मात्र श्री खानोलकर कायम स्थिरावले. अलीकडे मराठीचे प्रथितयश समीक्षक प्रा. वा. ल. कुळकर्णी, अध्यक्ष, मराठी वाङ्मयकोश संपादक मंडळ, ह्यांची शक्तीही ह्या कामाला उपलब्ध झाली आहे.

त्याचप्रमाणे प्रकल्पाच्या कार्यवाहीकरिता चोखंदळ साहित्यिक प्रा. म. वा. धोंड, संपादक, खंड ४, ह्यांचेही साहाय्य प्राप्त झाले आहे. त्यामुळे हा प्रकल्प यशस्वी रीतीने पार पडेल अशी आशा आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१ ऑगस्ट १९७७

# प्र स्ता व ना

मराठी वाङ्मयकोश रचण्याचा विचार १९६८ साली मनात आला व त्याची योजना 'मराठी संशोधन मंडळा'चे त्यावेळचे संचालक डॉ. स. गं. मालशे व मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचे भूतपूर्व प्रमुख कार्यवाह श्री वा. वि. भट ह्यांच्याशी चर्चा करून आखण्यात आली. मुंबईतील काही प्रमुख साहित्यिकांच्या भेटीगाठी घेऊन 'कोशाचे उद्देश व स्वरूप' ह्याविषयी विचारविनिमय केला. त्यानंतर त्याचा मसुदा पक्का करून (हा प्रस्तुत खंडात पृ. ८ वर दिला आहे) मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या 'मराठी संशोधन मंडळा'स त्याने ही योजना स्वीकारून ती प्रत्यक्ष कार्यवाहीत आणावी असे सुचविण्यात आले. 'संशोधन मंडळा'ने ही सूचना मान्य केली. त्याने आपल्या कार्यकारी मंडळाची संमती घेऊन प्रा. रा. भि. जोशी, प्रा. वा. ल. कुळकर्णी, श्री गं. दे. खानोलकर व डॉ. स. गं. मालशे अशा चौघाजणांचे संपादकमंडळ नेमून १ ऑगस्ट १९६८ रोजी 'मंडळा'चे अध्यक्ष प्रा. अनंत काणेकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली मंडळाच्या सभासदांची सभा भरवून 'कोश'रचनेच्या कार्याचा मुहूर्त केला.

'कोश'रचनेच्या कार्याचा प्रारंभ प्रकटपणे १९६८ साली झाला असला तरी त्याची पूर्वतयारी तत्पूर्वी बरीच वर्षे चाललेली होती. 'कोशा'ला अनुदानरूपाने आर्थिक साहाय्य मिळावे ह्यासाठी संशोधन मंडळाच्या संचालकांनी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळास दि. २० मार्च १९६८ रोजी जो विनंती-अर्ज धाडला, त्यात त्यांनी ह्याविषयी म्हटले आहे: "अशा स्वरूपाच्या वाङ्मयीन कोशाची रचना हाती घेण्यापूर्वी त्यात उपयोजावयाची परिभाषा व संज्ञा ह्यांची निश्चिती व्हावी लागते. साहित्यविषयक कल्पनांच्या व्याख्या तयार व्हाव्या लागतात. आमच्या संपादक मंडळापैकी एक श्री गं. दे. खानोलकर ह्यांनी गेली पंधरा वर्षे परिश्रम करून जवळ जवळ दहा ते बारा हजार वाङ्मयीन संज्ञांचा एक परिभाषा कोश आधीच पुरा केलेला आहे. मराठीतील साहित्यविचाराची परिभाषा बरीच समृद्ध आहे. यथार्थ व्यक्तीकरण, सहजगम्यता आणि श्रवणसुभगता ह्या कसोट्यांवर टिकण्याजोगा पूर्वपरंपरेतील ग्राह्यांश कायम ठेवून अडेल तेथे मराठीच्या सहजप्रकृतीशी जुळेल अशी नवी परिभाषाही घडविण्यात आलेली आहे. ह्या परिभाषेची सिद्धता करीत असतानाच श्री खानोलकर ह्यांस प्रस्तुत वाङ्मयकोशाची कल्पना सुचली आणि तदनुसार त्यांनी प्रस्तुत कोशात द्यावयाच्या नोंदींची बृहत्सूची तयार करण्याचे कार्यही गेली पाच-सहा वर्षे केलेले आहे. ह्या कोशाला पोषक आणि पूरक ठरणारे विविध ज्ञानशाखांतील संदर्भ आणि टिपणेही त्यांनी तयार केली आहेत. अशा रीतीने ह्या कोशाची उभारणी सुव्यवस्थित पायावर होण्यास लागणारी पूर्वतयारी जवळ जवळ पूर्ण झालेली असल्यामुळे ह्या ग्रंथसंपादनाचे कार्य हाती घेण्याची योजना 'मराठी संशोधन मंडळा'च्या वतीने आखण्यात आली आहे."

कोशकार्याला सुरुवात होऊन एक वर्ष लोटल्यावर साहित्य संस्कृति मंडळाने त्याची पाहणी करून त्याला दि. ९ ऑक्टोबर १९६९ रोजी मान्यता दिली व अनुदानाचीही व्यवस्था केली. तेव्हापासून, कोशरचनेचे कार्य हे साहित्य संस्कृति मंडळाचेच आहे असे ठरवून व त्याची सर्व प्रकारची जबाबदारी तर्कतीर्थ श्री लक्ष्मणशास्त्री जोशी ह्यांच्या अध्यक्षतेखाली एक वाङ्मयकोश समिती नेमून साहित्य संस्कृति मंडळाने आपल्याकडे घेतली. त्यापुढे, मराठी संशोधन मंडळाने 'साहित्य संस्कृति मंडळा'च्या वतीने, नियोजित वाङ्मयकोश समितीच्या मार्गदर्शनानुसार, कोश-रचनेचे कार्य चालवावे असा आदेश दिला.

'साहित्य संस्कृति मंडळा'ने नियुक्त केलेली 'वाङ्मयकोश समिती' अस्तित्वात आल्यावर कोशरचनेचा पुन्हा एकदा तपशीलवार विचार करण्यात आला व त्याचे उद्देश व त्याचे स्वरूप (पृ. ८ वर दिल्याप्रमाणे) निश्चित करण्यात आले.

'मराठी वाङ्मयकोश' हा चार खंडांत (एकूण पृष्ठे २५००) प्रसिद्ध व्हावयाचा असून त्याचा प्रथम खंड आज प्रसिद्ध होत आहे. ह्या खंडात इ. स. १०५०–१८५७ ह्या काळात होऊन गेलेल्या मराठी ग्रंथकारांचा व त्यांच्या वाङ्मयीन कार्याचा परिचय करून देण्यात आला आहे. ग्रंथकाराच्या वैयक्तिक जीवनपरिचयापेक्षा त्याच्या वाङ्मयीन जीवनाचा व कार्याचा परिचय करून देण्याकडे त्यात अधिक लक्ष पुरविले आहे.

मराठी भाषेतील ग्रंथलेखनाचा प्रारंभ बाराव्या शतकातील मुकुंदराजांपासून झाला असे आतापर्यंत मानण्यात येत असे. परंतु, त्यांच्याहीपूर्वी, अकराव्या शतकात, श्रीपतिभट्ट ह्यांचा *ज्योतिषरत्नमाला* हा ग्रंथ (इ. स. १०५०) मराठीत अनुवादरूपाने प्रसिद्ध झाल्याचे आढळते. ते लक्षात घेऊन इ. स. १०५० हे मराठी ग्रंथलेखनाचे प्रारंभवर्ष असे आम्ही मानले आहे. १८५७ हे वर्ष, युरोपीय विद्यापीठांचा आदर्श पुढे ठेवून, महाराष्ट्रात उच्च विद्येच्या शिक्षण-प्रसारासाठी निघालेल्या मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेचे आहे. ह्या विद्यापीठातून शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या मंडळीकडून त्यानंतर जे ग्रंथलेखन झाले, ते स्वरूप, आशय, अभिव्यक्ती व घाट ह्या दृष्टीने, अगदी वेगळ्या स्वरूपाचे होत राहिले. पाश्चात्त्य वाङ्मयाचा फार मोठा प्रभाव त्याच्यावर पडलेला आढळतो. ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन प्रस्तुत पहिला खंड इ. स. १८५७ पर्यंतच पूर्ण करण्यात आला आहे. त्यानंतरच्या (इ. स. १८५८–१९७५) काळातील ग्रंथकारांविषयीचा मजकूर दुसऱ्या खंडात येईल.

प्रस्तुत खंडाचे बव्हंश लेखन संपादक व त्यांचे दोन साहाय्यक ह्यांनी केलेले आहे. ह्यांतील ३५ नोंदी बाहेरच्या १२ लेखकांकडून लिहून घेतल्या आहेत. कार्यालयात नोंदी लिहिल्या जात असता तज्ज्ञांकडून ज्या तपासून घेणे आवश्यक वाटे त्या तपासून घेतल्या जात व सुचविले गेलेले फेरफार विचारात घेऊन त्यांचे पुनर्लेखन केले जाई. कोशाचे संपूर्ण हस्तलिखित तयार झाल्यावर तेही कोशसमितीच्या आदेशानुसार प्रा. रमेश तेंडूलकर, प्रा. वसंत दावतर, प्रा. सु. आ. गावस्कर अशा तीन समीक्षकांकडून बारकाईने समीक्षित करून घेतले व त्यांनी सुचविलेल्या अनेक महत्त्वाच्या सुधारणांचा स्वीकार करून त्याचे पुनर्लेखन केले. प्रारंभीचे वेगवेगळ्या नोंदींचे तज्ज्ञ तपासनीस (ह्यांची नावे अन्यत्र दिली आहेत) व हे तीन खास समीक्षक ह्यांचे उपर्युल्लिखित साहाय्य निःसंशय मोलाचे आहे. ह्या विद्वान मंडळीने आपल्या व्यासंगाचा व अनुभवाचा लाभ कोशाला करून दिला ह्याबद्दल त्यांचे जेवढे आभार मानावे तेवढे थोडेच. त्यांच्याप्रमाणेच वाङमयकोश समितीच्या सभासदांनी वेळोवेळी चर्चेच्या द्वारा बहुमोल असे जे मार्ग-दर्शन केले त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. ह्या सर्व मंडळीप्रमाणेच मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय व मराठी संशोधन मंडळ ह्या दोन संस्थांनी त्यांच्या प्रचंड ग्रंथसंग्रहाचा जो मुक्तपणे वापर करू दिला, त्याचप्रमाणे कोशकार्यालयासाठी सर्व सोयींनी युक्त अशा जागेची जी आपलेपणाने व्यवस्था केली, त्याबद्दल संपादक त्यांचाही नेहमीच ऋणी राहील.

**गं. दे. खानोलकर**
संपादक

वाङ्मयकोश कार्यालय, मुंबई ४०० ०१४
१ ऑगस्ट १९७७

# मराठी वाङ्मयकोश : उद्देश व स्वरूप

मराठीमध्ये संदर्भ-साहित्याची विपुलता नसली तरी विविधता आहे; आणि संदर्भ-साहित्य-निर्मितीचा महाराष्ट्राचा इतिहास अभिमानास्पद आहे. महाराष्ट्रीय ज्ञानकोश, मराठी ग्रंथ-सूची, मराठी व्युत्पत्तिकोश, मराठी शब्दकोश, मराठी वाक्संप्रदायकोश, भारतवर्षीय चरित्रकोश, भारतीय संस्कृति-कोश, ज्ञानेश्वरीचे शब्दकोश, अर्वाचीन मराठी वाङ्मय-सेवक, मराठी नियतकालिकांची सूची, मराठी लेखकांसंबंधीची सूची, मराठी तत्त्वज्ञान-महाकोश, शास्त्रीय परिभाषा कोश, वैज्ञानिक पारिभाषिक संज्ञाकोश, स्थापत्य शिल्पकोश इत्यादी विविध संदर्भ-साहित्य मराठीत उपलब्ध आहे. ह्यात आणखी कितीतरी भर पडायला हवी आहे. पण जे आहे त्यामुळेही वाचकांची आणि अभ्यासकांची पुष्कळच सोय झालेली आहे ह्यात शंका नाही. अलिकडेच महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाने विश्वकोश तयार करण्याचे काम हाती घेतले आहे. पण केवळ वाङ्मयाच्या अभ्यासकाला, अध्यापकाला आणि वाङ्मयासंबंधी जिज्ञासा असणाऱ्याला, वाङ्मय-विषयक अशी सर्व प्रकारची माहिती ज्यात मिळू शकेल असा कोश मराठीत नाही, ही फार मोठी उणीव आहे.

राज्यांची भाषावार पुनर्रचना झाल्यानंतर प्रादेशिक भाषांचे महत्त्व झपाट्याने वाढत चालले आहे. राज्य-कारभाराच्या सर्व क्षेत्रांत आणि सर्व पातळ्यांवर हळूहळू मराठीचा वापर होऊ लागला आहे. गेल्या दहा-पंधरा वर्षांत महाराष्ट्रात महाविद्यालयांची आणि विद्यापीठांची संख्या पुष्कळच वाढली आहे. विद्यापीठांतल्या शिक्षणाचे माध्यम म्हणून मराठीचा वापर वाढत्या प्रमाणात होऊ लागला आहे. काही विद्यापीठे खाजगी रीतीने अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना आपल्या परीक्षांना बसू देतात. काही साहित्य-संस्थांच्या साहित्यविषयक परीक्षा आहेत. त्यांना बसणाऱ्या विद्यार्थ्यांचीही संख्या वाढली आहे आणि वाढत आहे; ह्यातला बराच मोठा वाचकवर्ग मराठी वाङ्मयाचा विद्यार्थी नाही, पण वाचक आहे. अशी परिस्थिती असल्यामुळे मराठी वाङ्मयाविषयी त्याचप्रमाणे साहित्यशास्त्र, साहित्यविषयक संज्ञा व समीक्षा ह्यांच्या संदर्भातील माहिती ज्यात मिळू शकेल अशा एखाद्या कोशाची आवश्यकता तीव्रतेने जाणवू लागली आहे. वाचकांची, जिज्ञासूंची, आणि अभ्यासकांची ही गरज भागवावयाची ह्या उद्देशाने प्रस्तुत 'वाङ्मयकोश' रचावयास घेतला आहे. प्रस्तुत वाङ्मयकोशाची खालीलप्रमाणे चार खंडांत विभागणी केली आहे :

| | पृष्ठे |
|---|---|
| **खंड पहिला** : मराठी ग्रंथकार : विभाग पहिला : इ. स. १०५०--१८५७ | ५०० |
| **खंड दुसरा** : मराठी ग्रंथकार : **विभाग दुसरा** : इ. स. १८५८--१९७५ | ७५० |
| **खंड तिसरा** : मराठी ग्रंथपरिचय | ७५० |
| **खंड चौथा** : साहित्य-समीक्षा | ५०० |
| | एकूण २५०० |

वाङ्मयकोशाचे स्वरूप सामान्यतः इंग्रजी भाषेतील ***द ऑक्सफर्ड कंपॅनियन टु इंग्लिश लिटरेचर, ए डिक्शनरी ऑफ लिटरेचर इन द इंग्लिश लँग्वेज, एन्सायक्लोपीडिआ ऑफ पोएट्री अँड पोएटिक्स, डिक्शनरी ऑफ वर्ल्ड लिटररी टर्म्स, एव्हरीमॅन्स डिक्शनरी ऑफ लिटररी बायॉग्रफी*** ह्या संदर्भग्रंथांसारखे आहे. हे सर्व संदर्भग्रंथ जरी वाङ्मयविषयक असले, तरी त्यांतील प्रत्येकाला स्वतःचे असे काही वैशिष्ट्य राखण्याचे धोरण असल्यामुळे, साहजिकच त्यांतील विषयांच्या निवडीला मर्यादा पडलेल्या आहेत. आम्ही रचावयास घेतलेल्या 'वाङ्मयकोशा'लाही त्यांच्याप्रमाणेच ग्रंथकार, ग्रंथपरिचय, साहित्य आणि समीक्षा एवढ्यापुरतेच विवेचनाचे क्षेत्र मर्यादित करून घ्यावे लागले आहे.

'वाङ्मयकोशा'ला उत्कृष्ट प्रमाणग्रंथाचा दर्जा प्राप्त व्हावा अशी संयोजकांची मनीषा आहे. ती पूर्ण व्हावयाची तर त्यासाठी महाराष्ट्रातील विद्वानांचे व व्यासंगी वाङ्मयाभ्यासकांचे सहकार्य अत्यावश्यक आहे. तसे ते मिळालेही आहे. आपापल्या विषयात पारंगत अशा २०० हून अधिक लेखकांचे लेखनसाहाय्य 'कोशा'ला लाभले आहे.

'कोशा'त ज्या नोंदी आल्या आहेत त्यांमागील धोरण कोणते आहे ते येथे खंडानुक्रमे स्पष्ट करतो. :

**खंड पहिला :** ह्यात इ. स. १८५७ पर्यंतच्या सर्व ज्ञात लेखकांचा समावेश करण्यात आला आहे. कालमर्यादेचे अखेरचे वर्ष १८५७ हे ठरविण्याचे कारण, त्या वर्षी मुंबई विद्यापीठाची स्थापना झाली आणि त्यानंतर नवशिक्षित लेखकांची पिढी उदयास येऊ लागून साहित्यास नवे वळण लागले. ह्यांपैकी अनेकांची नावापलिकडे माहिती मिळत नाही; कित्येकांची रचना विपुल प्रमाणात झालेली असली तरी चरित्रविषयक माहिती फारशी आढळत नाही; फारच थोड्यांची समग्र रचना उपलब्ध आहे; आणि उपलब्ध रचनेत शंकास्पद रचना नाही असे नाही. अशा परिस्थितीत, जितका शोध करता येणे शक्य आहे तितका करून जेवढी माहिती देता येईल तेवढी द्यावयाची, कोणाही ज्ञात रचनाकाराचे नाव

गाळावयाचे नाही, असे ठरविले आहे. ह्या माहितीत वाङ्मयसंशोधकांकडून, अधिक शोध होऊन, पुढील काळात, विपुल भर पडावी अशी आमची अपेक्षा आहे.

**खंड दुसरा :** प्रस्तुत खंडात इ. स. १८५८–१९७५ ह्या काळातील सर्वच ग्रंथकारांचा समावेश न करता, वाङ्मयाच्या भिन्न भिन्न शाखांतील निवडक ग्रंथकारांचा समावेश केला आहे. ही निवड सामान्यतः प्रातिनिधिक स्वरूप लक्षात घेऊन, ऐतिहासिक, सांस्कृतिक व वैचारिक महत्त्वाच्या दृष्टीने निरखून व वाङ्मयीन वैशिष्ट्य लक्षात घेऊन केलेली आहे.

वरीलपैकी पहिल्या खंडातील नोंदींखाली **'रचना', 'चरित्र, चर्चा, अभ्यास'** ह्या शीर्षकांखाली विस्तृत सूचना दिल्या आहेत. एका ग्रंथकाराचा स्वतंत्र अभ्यास करणाऱ्या अभ्यासकांस, त्याचप्रमाणे वाङ्मयेतिहासकारांस, साधनसाहित्याचे दिग्दर्शन घडविण्याच्या बाबतीत त्या उपयुक्त ठराव्या अशी अपेक्षा आहे. दुसऱ्या खंडात अर्वाचीन काळातील ग्रंथकारांच्या ग्रंथांच्या सूच्या स्वतंत्रपणे प्रकाशित झालेल्या असल्याने, प्रत्येक ग्रंथकाराच्या ग्रंथांची संपूर्ण यादी न देता त्याच्या वाङ्मयाच्या आलोचनाच्या ओघात त्याच्या निवडक ग्रंथांचाच फक्त उल्लेख केला असून, नोंदीच्या शेवटी 'चरित्र, चर्चा, अभ्यास' ह्या शीर्षकाखाली अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरावे असे निवडक संदर्भ दिले आहेत.

**खंड तिसरा :** गेल्या आठशे वर्षांत मराठी भाषेत जे वाङ्मय निर्माण झाले त्यातील प्रातिनिधिक त्याचप्रमाणे साहित्येतिहासाच्या, साहित्यकलेच्या व विचारेतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाच्या निवडक ग्रंथांचा ह्या खंडात परिचय करून देण्यात आला आहे.

**खंड चौथा :** मराठी वाचकाला साहित्यशास्त्र व समीक्षा ह्या विषयांवरील लेखन वाचताना ज्या संज्ञाविषयक शंका येतील त्यांचे समाधान करण्याचा प्रयत्न ह्या खंडात केला जाईल. मराठीत ह्या विषयांवरील लेखन मुख्यतः इंग्रजीतील व संस्कृतातील साहित्यशास्त्र व समीक्षा ह्यांसंबंधीच्या ग्रंथांच्या आधारे होत असते. ह्या भाषांतील साहित्यसमीक्षेसंबंधीच्या ज्या संकल्पना व संज्ञा मराठीत आल्या आहेत किंवा येणे इष्ट आहे त्यांचाच समावेश ह्या खंडात होईल. इंग्रजी व संस्कृत साहित्य-समीक्षेचा संपूर्ण परिचय करून देण्याचे आमचे धोरण नाही. ह्याव्यतिरिक्त मराठीत साहित्य-समीक्षा ह्या विषयी स्वतंत्र असे जे थोडेफार लेखन झाले आहे त्यांतील काही संज्ञांवरूनही काही नोंदी येतील. उदा., केळकरांची 'सविकल्प समाधी', मर्ढेकरांची 'भावनानिष्ठ समतानता' इत्यादी.

सामान्यतः ह्या खंडात पुढील गोष्टी येतील :

१. वाङ्मयप्रकार (प्राचीन व अर्वाचीन मराठी साहित्यातील).
२. समीक्षापद्धती.
३. वाद / मुव्हमेंट्स (उदा., रोमॅण्टिसिझम, क्लासिसिझम).
४. संप्रदाय / पंथ (उदा., वारकरी, महानुभाव).
५. इंग्रजी साहित्यशास्त्रातील संकल्पना व संज्ञा (उदा., कॅथार्सिस, स्टाइल).
६. संस्कृत साहित्यशास्त्रातील संकल्पना व संज्ञा (उदा., रस, ध्वनी).
७. साहित्यक्षेत्रातील तात्त्विक वाद (उदा., कला व नीती).
८. अलंकार.
९. काव्यदोष.
१०. मराठी छंद (काही विशेष प्रकार; उदा., दिंडी, साकी).

मराठी वाङ्मयकोशाचे खंडशः संपादक खालीलप्रमाणे :

| | |
|---|---|
| **खंड पहिला :** | गं. दे. खानोलकर |
| **खंड दुसरा :** | गं. दे. खानोलकर<br>वा. ल. कुळकर्णी |
| **खंड तिसरा :** | गं. दे. खानोलकर<br>वा. ल. कुळकर्णी |
| **खंड चौथा :** | वा. ल. कुळकर्णी<br>म. वा. धोंड |

**गं. दे. खानोलकर**
कार्यकारी संपादक

# खंड पहिला : रचनापद्धती व वैशिष्ट्ये

१. **कोशातील नोंदी :** अकारविल्हेप्रमाणे ह्या नोंदी दिलेल्या आहेत. हा क्रम 'दाते ग्रंथसूची'ला अनुसरून घेतला आहे. (ह्यामध्ये अनुस्वाराचे स्वतंत्र अस्तित्व लक्षात घेतलेले नाही. उदा., अनुचर, अंबाबाई, अंबी, अंबुदास, अब्दुल, अभयकीर्ती इ.)

२. **नोंदींची शीर्षके :** ही शक्यतो मुळाप्रमाणेच ठेवलेली आहेत. ज्या नावाने ग्रंथकार प्रसिद्ध आहे तेच नाव नोंदीचे शीर्षक म्हणून घेतले आहे (उदा., तुकाराम, ज्ञानदेव, अखंडदास, विठाबाई, व्यंकट कवि इ.). काही नोंदींची शीर्षके ही त्या त्या व्यक्तींची संपूर्ण नावे आहेत. नोंदीचा प्रारंभ उपनावाने न करता ग्रंथकाराच्या पहिल्याच नावाने केला आहे (उदा., बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर, सरफोजी भोसले, सी. जी. बार्थ, आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर). उपनावाने आरंभ होणारी नावे पोकळ शून्याच्या नोंदी म्हणून अकारविल्हे क्रमाप्रमाणे त्या त्या ठिकाणी आलेली आहेत (उदा., ० जांभेकर, बाळ गंगाधरशास्त्री – पहा बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर).

३. **नोंदींची संख्या :** ह्या खंडात मूळ नोंदी २७५० आलेल्या आहेत. अगदी लहानसान लेखकांपासून (उदा., एखादेच पद, पोवाडा, किंवा आरती रचणारा) ते विपुल ग्रंथरचना करणाऱ्या ग्रंथकारांपर्यंत (उदा., शिवरामस्वामी कल्याणीकर, वामन पंडित इ.) सर्वांचा समावेश करावयाचा असे धोरण ठेवलेले आहे. वाङ्मयेतिहासाचे सर्व ग्रंथ, मुद्रित व अमुद्रित साहित्याची नोंद करणाऱ्या सर्व सूच्या, नवी-जुनी नियतकालिके व ह्या कालखंडातील ग्रंथकारांचा व त्यांच्या वाङ्मयाचा विचार करणारे उपलब्ध असलेले ग्रंथ, ह्यांतील संदर्भांवरून ग्रंथकारांच्या नोंदी तयार करण्यात आल्या आहेत.

४. **नोंदींचे स्वरूप :** नोंदीचे शीर्षक हे त्या ग्रंथकाराचे अधिक प्रचारात असलेले नाव, त्यापुढे त्याची उपलब्ध होणारी इतर टोपणनावे, जन्मकाळ, समाधिकाळ (अगोदर शक व नंतर इ. स.) देऊन नंतर ग्रंथकार कोण आहे (कवी, टीकाकार, पदकार इ.) ते दर्शविले आहे. ग्रंथकाराचा जन्मशक किंवा समाधिशक निर्देशित करताना पौष, माघ, फाल्गुन ह्या महिन्यांतील तिथी जेव्हा येते तेव्हा शकावरून सन निश्चित करताना शकात ७८ न मिळविता पौष महिन्यात नव्या इंग्रजी वर्षाची सुरुवात झाल्यावर ७९ मिळवावे लागतात.

ह्यानंतर चरित्रविषयक माहिती येते. तिचा क्रम पुढीलप्रमाणे आहे. जन्मस्थळ, वंशविषयक माहिती, व्यक्तिजीवन, कौटुंबिक जीवन, व्यवसाय, संप्रदाय, गुरुपरंपरा (फार दीर्घ असल्यास फक्त महत्त्वाच्या व्यक्तींचा किंवा ग्रंथकारापूर्वीच्या चार पिढ्यांचा निर्देश करण्याची पद्धती ठेवली आहे), समाधिशक व समाधिस्थळ.

ग्रंथसंपदेची माहिती देताना लेखकाच्या ग्रंथांची नावे, रचनाकाळ, ग्रंथसंख्या व ग्रंथांचे स्वरूप (विषय, आशय, अभिव्यक्ती ह्या दृष्टीने) ह्या गोष्टी वर्णिल्या आहेत. ग्रंथरचनेची प्रेरणा, प्रयोजन (शक्यतो ग्रंथकाराच्याच वचनाधारे), त्या विशिष्ट कालखंडाचा त्याच्या साहित्यावरील प्रभाव, पूर्वकालीन, समकालीन व उत्तरकालीन ग्रंथकारांच्या साहित्याशी असलेला लेखकाचा संबंध, हेही मुद्दे विचारात घेतले आहेत. त्याचप्रमाणे ग्रंथकाराचे काही वेगळेपण असल्यास ते लक्षात घेऊन त्याच्या प्रभावी प्रतिभेने साहित्याला काही नवीन वळण लावले आहे का ह्याचाही विचार केला आहे.

वाङ्मयाच्या अभ्यासकांकडून व संशोधकांकडून ग्रंथकाराच्या वाङ्मयाचा जो परामर्श घेण्यात आला त्यातील महत्त्वाचा विचार आणि वादस्थळे थोडक्यात निर्देशित केली आहेत. विवेचनाच्या ओघात ग्रंथकाराच्या साहित्याच्या गुणदोषांचे दिग्दर्शन येते. अखेरीस लेखकाचे जीवितकार्य व तदनुषंगिक साहित्य ह्याविषयी मूल्यमापनात्मक विचार थोडक्यात मांडून नोंदीची समाप्ती करण्यात आली आहे. तिसऱ्या खंडात परिचय करून दिल्या जाणाऱ्या ग्रंथांचा निर्देश नोंदीत ग्रंथकाराची माहिती देताना अवश्य तेथे केला आहे.

५. **रचना व चरित्र, चर्चा, अभ्यास :** ही प्रथम खंडातील नोंदींच्या अखेरीस येणारी सदरे प्राचीन साहित्याचा विचार करताना महत्त्वाची ठरतात.

(१) *रचना :* ह्या सदरात मुद्रित, अमुद्रित व शंकास्पद असे तीन भाग पाडलेले आहेत. ग्रंथकाराची ज्ञात असलेली शक्यतो सर्व रचना (ग्रंथ वा स्फुट) कसून शोध घेऊन नोंदण्याचा प्रयत्न केलेला आहे. मुद्रित ग्रंथांची – संपादन, रचना-स्थळ, रचना-काळ, प्रकाशन-स्थळ, प्रकाशन-काळ इ. – माहिती व हस्तलिखित ग्रंथांचे प्राप्तिस्थळ ह्यांचा आवर्जून उल्लेख केला आहे.

(२) *चरित्र, चर्चा, अभ्यास :* लेखकाविषयी सर्व तऱ्हेची माहिती देणाऱ्या व अभ्यासकांच्या दृष्टीने उपयुक्त व अत्यंत महत्त्वाच्या अशा संदर्भग्रंथांची किंवा लेखांची सूची त्या त्या लेखकांच्या उपनावांच्या आद्याक्षरानुसार दिलेली आहे.

६. **संक्षेप :** नोंदीच्या पोटात तसेच *रचना व चरित्र, चर्चा, अभ्यास* ह्या ठिकाणी जे संक्षेप योजलेले आहेत (उदा., मआ. = मराठी आरती किंवा प्रामजैसा. = प्राचीन मराठी जैन साहित्य इ.) त्या सर्व संक्षेपांची स्पष्टीकरणात्मक यादी कोशाच्या प्रारंभी जोडण्यात आलेली आहे.

७. **शुद्धलेखन :** नोंदींचे लेखन शुद्धलेखनाच्या नवीन नियमांनुसार केलेले आहे. पण ग्रंथकारांची नावे, ग्रंथांची नावे, *रचना व चरित्र, चर्चा, अभ्यास* ह्या सदरांतील ग्रंथांची वा लेखांची शीर्षके आणि नोंदींच्या पोटात येणारी अवतरणे ह्या ठिकाणी शुद्धलेखन जसे मुळात आढळते तसेच ठेवलेले आहे.

८. **चिन्हे :** पोकळ शून्य (०) व बाण (➪) अशी दोनच चिन्हे कोशात वापरली आहेत. एकाच ग्रंथकाराची जेव्हा एकापेक्षा अधिक टोपणनावे आढळतात तेव्हा मुख्य नोंदीपुढे ह्या सर्व टोपणनावांचा निर्देश त्यांच्या मागे पोकळ शून्य दाखवून केलेला आहे. इतरत्र अकारविल्हेप्रमाणे जेथे जेथे ही नावे येतात त्या त्या ठिकाणी ह्या नावांमागे पोकळ शून्य जोडून नंतर मुख्य नोंदीचा निर्देश केलेला आहे (उदा., ० **आणोबास** – पहा : **आनेराज व्यास;** किंवा ० **अचळ स्विबास** – पहा **गुर्जर शिवव्यास** इ.) ज्ञानदेवांच्या नावावर मोडणाऱ्या शंकास्पद ग्रंथांच्या सूचीत मूळ ग्रंथ एकच पण नावे अनेक अशी स्थिती असलेल्या ग्रंथांच्या नावामागे ० चिन्हाचा उपयोग केला आहे. (उदा., लेखणी / ० कल्याणपत्र / ० कल्याणपत्रिका / ० लेखन / ० लिखित; ० कल्याणपत्रिका – पहा : लेखणी.)

ह्याच वाङ्मयकोशाच्या दुसऱ्या, तिसऱ्या किंवा चौथ्या खंडांतील विशिष्ट नोंदीचा पहिल्या खंडाशी असलेला संबंध स्पष्ट करण्यासाठी बाणचिन्ह (➪) उपयोगात आणले आहे. पहिल्या खंडातील ग्रंथकारांच्या महत्त्वाच्या अशा काही ग्रंथांचा तिसऱ्या खंडात विस्तृत परिचय करून दिला जाणार आहे. त्यामुळे अशा ग्रंथांवर प्रथम खंडातील नोंदीमध्ये थोडक्यात विवेचन करून, नोंदीच्या पोटात त्या ग्रंथापुढे किंवा तत्संबंधी विवेचन पूर्ण झाल्यानंतर [➪३] हा कंस टाकलेला असतो. त्याचा अर्थ 'ह्या ग्रंथाचा विस्तृत परिचय खंड ३ मध्ये पाहावा' असा आहे.

९. **परिशिष्टे :** ह्या खंडास 'पंथप्रवर्तक व इतर काही व्यक्ती' आणि 'अनाम' अशी दोन परिशिष्टे जोडली आहेत.

**पंथप्रवर्तक व इतर काही व्यक्ती :** काही पंथप्रवर्तकांच्या हातून ग्रंथरचना झालेली नाही. असे असूनही त्यांचा प्रभावी तत्त्वविचार, त्यांचे व्यक्तिमत्त्व व जीवितकार्य ह्यामुळे अनेक ग्रंथकारांना स्फूर्ती आणि प्रेरणा लाभली. अशा ग्रंथकारांच्या कृतींचा विचार करताना त्यांना स्फूर्ती देणाऱ्या, त्यांच्या विचारांवर प्रभाव पाडणाऱ्या ह्या व्यक्तींचा व त्यांच्या तत्त्वसरणीचा परिचय असणे अत्यंत आवश्यक आहे. उदा., चक्रधर (महानुभाव पंथाचे संस्थापक), नागदेवाचार्य (महानुभाव पंथाचे आद्याचार्य), वडवाळसिद्ध नागनाथ (नागेशसंप्रदायाचे प्रवर्तक) इ. पंथप्रवर्तक वगळता इतरही काही महत्त्वाच्या व्यक्ती शिल्लक राहतात. उदा., चांदबोधले, शहादत्त अलमा प्रभु, चिदंबर दीक्षित इ. ह्यांची ग्रंथरचना उपलब्ध नसल्याने ह्यांचा परिचय मुख्य ग्रंथात करून देता आलेला नाही. अशांचा परिचय स्वतंत्रपणे परिशिष्टात करून दिला आहे.

**अनाम :** जिचा कर्ता ज्ञात नाही अशी रचना जुन्या मराठी वाङ्मयात बरीच आढळते. ग्रंथसूच्यांतून वा इतरत्र उपलब्ध झालेल्या अनाम ग्रंथकारांच्या विविध विषयांवरील ग्रंथांची व स्फुटांची नोंद करून त्यांची एक यादी स्वतंत्र प्रस्तुत खंडाच्या अखेरीस अभ्यासकांकरिता दिली आहे.

१०. **कोशसंहिता शुद्धी :** कोशात काही मुद्रण-दोष राहिले आहेत. (१) अनवधानाने काही पोकळ शून्याच्या नोंदी नमूद करण्याचे राहून गेले आहे. काही वेळा पोकळ शून्ये जेथे नकोत तेथे पडली आहेत, तर काही ठिकाणी जेथे हवी तेथें पडलेली नाहीत. (२) एक-दोन स्थळी काही मजकूर गळला आहे. (३) क्वचित अकारीचा क्रम चुकला आहे. (४) 'एल्हणसुत' व 'येल्हणसुत मंडळीक' ह्या दोन नोंदी एकाच व्यक्तीविषयी आहेत. अनवधानाने त्या भिन्न आहेत असे दर्शविले गेले आहे. ह्या दोन नोंदींखाली आलेला मजकूर थोड्याफार फरकाने एकच आहे. ह्या ज्या काही उणीवा दृष्टोत्पत्तीस आल्या त्या दाखविणारे **शुद्धिपत्र** कोशाच्या अखेरीस जोडले आहे. त्यात दर्शविलेल्या सर्व सुधारणा कृपया करून घ्याव्या.

**संपादक**

# महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ

**अध्यक्ष**

*तर्कतीर्थ श्री लक्ष्मणशास्त्री जोशी, वाई*

**सदस्य – आजी [१–६–७७ – ३०–५–८०]**

श्री गो. वा. बेडेकर, मुंबई
प्रा. अ. भि. शहा, पुणे
प्रा. अनंत काणेकर, मुंबई
श्री ग. दि. माडगूळकर, पुणे
प्रा. मे. पुं. रेगे, मुंबई
प्रा. देवदत्त अ. दाभोलकर, पुणे
श्री देवीसिंग चौहान, उस्मानाबाद
डॉ. सरोजिनी बाबर, पुणे
श्री दे. य. गोहोकर, नागपूर
डॉ. चित्रा नाईक, पुणे
डॉ. म. ना. वानखडे, मुंबई
डॉ. स. ह. देशपांडे, मुंबई
प्रा. सुमती पाटील, कोल्हापूर
डॉ. यू. म. पठाण, औरंगाबाद
प्रा. मो. वा. वनमाळी, मुंबई
प्रा. भास्कर भोळे, नागपूर
श्री बापूराव नाईक, मुंबई
डॉ. गो. मा. पवार, औरंगाबाद
श्री सर्जेराव घोरपडे, पुणे

**सचिव**

श्री द. य. राजाध्यक्ष, मुंबई

**सदस्य – माजी [१९६५–१९७७]**

प्रा. न. र. फाटक, मुंबई
म. म. वा. वि. मिराशी, नागपूर
कै. प्रा. गो. ध. पारीख, मुंबई
डॉ. ना. गो. कालेलकर, पुणे
श्री आ. रा. देशपांडे, नागपूर
डॉ. वि. भि. कोलते, नागपूर
श्री पु. ल. देशपांडे, मुंबई
श्री सेतुमाधवराव पगडी, मुंबई
प्रा. वा. ल. कुळकर्णी, मुंबई
श्री पां. ज. चिन्मुलगुंद, पुणे
श्रीमती दुर्गा भागवत, मुंबई
श्री आसफ ए. ए. फैजी, मुंबई
श्री दि. धों. कर्वे, पुणे
डॉ. रा. ना. दांडेकर, पुणे
डॉ. पु. मं. जोशी, मुंबई
डॉ. अ. मा. घाटगे, पुणे
डॉ. जे. डब्ल्यू. आयरन, सातारा
डॉ. वा. ना. पंडित, मुंबई
डॉ. पु. का. केळकर, मुंबई
श्री वि. ह. केळकर, सांगली
प्रा. भगवंतराव ग. देशमुख, औरंगाबाद
श्री स. आ. सप्रे, मुंबई
डॉ. ज. गो. काणे

# मराठी संशोधन मंडळ : कार्यकारी समिती

अध्यक्ष

श्री धनंजय कीर

सदस्य

श्री गं. दे. खानोलकर

प्रा. वि. ह. कुळकर्णी

डॉ. कृ. भि. कुळकर्णी

प्रा. वसंत दावतर

डॉ. श्री. दि. परचुरे

श्री बा. वि. सुंबरे

श्री श्री. पं. कपोते

संचालक व कार्यवाह

प्रा. सु. आ. गावस्कर

# मराठी वाङ्मयकोश समिति

अध्यक्ष

*तर्कतीर्थ श्री लक्ष्मणशास्त्री जोशी*

सदस्य

प्रा. अनंत काणेकर

डॉ. ना. गो. कालेलकर

श्री पु. ल. देशपांडे

श्री बापूराव नाईक

प्रा. मं. वि. राजाध्यक्ष

श्री गं. दे. खानोलकर

प्रा. म. वा. धोंड

प्रा. सु. आ. गावस्कर

सचिव

श्री द. य. राजाध्यक्ष

# मराठी वाङ्मयकोश संपादक मंडळ

# मराठी वाङ्मयकोश : खंड पहिला

## लेखक व समीक्षक

### लेखक :

**श्री ज. बा. कुळकर्णी,** बी. ए., शासनाचे कार्यासन अधिकारी.

**प्रा. व. दा. कुळकर्णी,** एम्. ए., प्राध्यापक मराठी विभाग, उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद.

**डॉ. वि. रा. करंदीकर,** एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, मराठी विभाग, फर्ग्यूसन महाविद्यालय, पुणे.

**प्रा. वि. ह. कुळकर्णी,** एम्. ए., समीक्षक व सेवानिवृत्त प्राध्यापक, इंग्रजी विभाग, रुइया महाविद्यालय, माटुंगा, मुंबई.

**श्री द. ग. गोडसे,** बी. ए., चित्रकार, कलासमीक्षक व इतिहास-संशोधक; सेवानिवृत्त प्राध्यापक, महाराजा सयाजी विद्यापीठ, बडोदे.

**श्री दे. वा. घारपुरे,** एम्. ए. (पीएच्. डी. चे विद्यार्थी).

**प्रा. म. रा. जोशी,** एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, मराठी विभाग, नागपूर विद्यापीठ, नागपूर.

**तर्कतीर्थ श्री लक्ष्मणशास्त्री जोशी,** प्रमुख संपादक, मराठी विश्वकोश; अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ.

**श्री वसंत देवधर,** एम्. ए., बी. एड्. (पीएच्. डी. चे विद्यार्थी), मराठी संशोधन मंडळ, दादर, मुंबई.

**डॉ. व. वि. पारखे,** एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, मराठी विभाग, तलरेजा महाविद्यालय, उल्हासनगर, जि. ठाणे.

**डॉ. श्री. म. पिंगे,** एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, मराठी विभाग प्रमुख, मिलिंद महाविद्यालय, औरंगाबाद.

**डॉ. स. गं. मालशे,** एम्. ए., पीएच्. डी., मराठी विभाग प्रमुख, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई.

### समीक्षक :

**प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर,** एम्. ए., प्राध्यापक, संस्कृत विभाग, स. प. महाविद्यालय, पुणे.

**डॉ. वि. रा. करंदीकर,** एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, मराठी विभाग, फर्ग्यूसन महाविद्यालय, पुणे.

**डॉ. अशोक कामत,** एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, हिंदी विभाग, एम्. ई. एस्. महाविद्यालय, पुणे.

**डॉ. कृ. भि. कुळकर्णी,** एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, माजी मराठी विभाग प्रमुख, मथुरादास विसनजी महाविद्यालय, अंधेरी, मुंबई; प्रपाठक, मराठी संशोधन मंडळ, दादर, मुंबई.

**प्रा. पां. ना. कुळकर्णी,** एम्. ए., प्राध्यापक, मराठी विभाग, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर.

**प्रा. व. दा. कुळकर्णी,** एम्. ए., प्राध्यापक, मराठी विभाग, उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद.

**प्रा. श्री. मा. कुळकर्णी,** एम्. ए., प्राध्यापक, मराठी विभाग प्रमुख, सिटी महाविद्यालय, नागपूर.

**डॉ. श्री. रं. कुळकर्णी,** एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, मराठी विभाग प्रमुख, उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद.

**प्रा. सु. आ. गावस्कर,** एम्. ए., प्राध्यापक, मराठी विभाग प्रमुख, खालसा महाविद्यालय, माटुंगा, मुंबई; संचालक, मराठी संशोधन मंडळ, दादर, मुंबई.

**श्री ना. ब. जोशी,** प्राचीन मराठी वाङ्मयाचे अभ्यासक, संशोधक व हस्तलिखितांचे संग्राहक, विजापूर.

**डॉ. ग. वा. तगारे,** एम्. ए., पीएच्. डी., सेवानिवृत्त प्राध्यापक; शिक्षणाधिकारी, महाराष्ट्र राज्य शिक्षणसेवा; प्राकृत आणि अपभ्रंश भाषांचे अभ्यासक व संशोधक.

**प्रा. रमेश तेंडुलकर,** एम्. ए., प्राध्यापक, मराठी विभाग प्रमुख, कीर्ती महाविद्यालय, दादर, मुंबई.

**प्रा. वसंत दावतर,** एम्. ए., प्राध्यापक, मराठी विभाग प्रमुख, सोमैय्या महाविद्यालय, विद्याविहार, मुंबई,; 'आलोचना' मासिकाचे संपादक.

**श्री वसंत देवधर,** एम्. ए., बी. एड्. (पीएच्. डी. चे विद्यार्थी), मराठी संशोधन मंडळ, दादर, मुंबई.

**कै. श्री वा. ना. देशपांडे,** कवी, साहित्य-समीक्षक व महानुभाव वाङ्मयाचे संशोधक.

**प्रा. भगवंत देशमुख,** एम्. ए., प्राचार्य, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर.

**प्रा. म. वा. धोंड,** एम्. ए., एल्एल्. बी., प्राध्यापक, माजी मराठी विभाग प्रमुख, एल्फिन्स्टन महाविद्यालय; माजी संचालक, मराठी संशोधन मंडळ, मुंबई; संपादक, मराठी वाङ्मयकोश, खंड चौथा.

**श्री बापूराव नाईक,** बी. ए., फेलो, इन्डियन स्टॅन्डर्ड्स इन्स्टिटयूशन; मुद्रणतज्ज्ञ; मुद्रणशास्त्रावरील ग्रंथांचे लेखक; माजी नियंत्रक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ.

**प्रा. कृ. ब. निकुंब,** एम्. ए., प्राध्यापक, मराठी विभाग, लिंगराज महाविद्यालय, बेळगाव.

**डॉ. यू. म. पठाण,** एम्. ए., पीएच्. डी., मराठी विभाग प्रमुख, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.

**डॉ. व. वि. पारखे,** एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक मराठी विभाग, तलरेजा महाविद्यालय, उल्हासनगर, जि. ठाणे.

# संक्षेपांचे स्पष्टीकरण

अ. अध्याय
अं. अंक
अकलकामा. अनेककविकृत लघुकाव्यमाला; भाग १, २ : संपा. वा. दा. ओक; मुंबई, १८९५, १८९६; भाग ३ : संपा. ना. चिं. केळकर; मुंबई, १९०२; भाग ४ : संपा. ना. चिं. केळकर, दा. के. ओक; मुंबई, १९०३
अनु. अनुक्रमे
अमवा. अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक; खंड १ ते ७ : संपा. गं. दे. खानोलकर; मुंबई, १९२८ ते १९६७
अमु अमुद्रित
आ. आवृत्ती
ओ. सं. ओवी संख्या
इ. स. इसवी सन
उविहै. उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद (हस्तलिखित संग्रह)
ऐतिपो. ऐतिहासिक पोवाडे अथवा मराठ्यांचा काव्यमय इतिहास, खंड १, २, ३ : संपा. य. न. केळकर; पुणे, १९२८, १९४४, १९६९
औंहसं. श्रीभवानी चित्रसंग्रहालय व ग्रंथालय, औंध (हस्तलिखित ग्रंथसंग्रह)
का. अनु. काळ अनुपलब्ध
काइसं. काव्येतिहाससंग्रह मासिक; संपा. ज. बा. मोडक, का. ना. साने; पुणे, जाने. १८७८ ते डिसें. १८८८
कासं. काव्यसंग्रह मासिक; संपा. ज. बा. मोडक; मुंबई, जाने. १८९० ते जून १९०७ (अंक १६२)
केत्रिहसं. केरळ युनिव्हर्सिटी, त्रिवेंद्रम (हस्तलिखित संग्रह)
खं. खंड
गोचप. श्रीगुरु गोरक्षनाथ चरित्र आणि परंपरा – नाथ संप्रदायाचा इतिहास; रा. चिं. ढेरे; पुणे, १९५९
गोपीग्रसं. महंत गोपीराज महाराज ग्रंथसंग्रह; ऋद्धिपूर
गोमका. गोमंतकीय मराठी काव्य; संपा. ना. भा. नायक; रिवण, गोवा, १९६९
ग्रं. सं. ग्रंथसंख्या
ग्वाहसं. ग्वाल्हेर हस्तलिखित संग्रह
चित्रज. चित्रमयजगत् मासिक; संपा. त्र्यं. र. देवगिरीकर व रा. प्र. कानिटकर इत्यादी; प्रथमांक : जाने. १९१०; चित्रशाळा, पुणे
जि. जिल्हा
जुवानसं. जुने वाङ्मय नवीन संशोधन, डॉ. पंडित आवळीकर, धारवाड, १९६४
तंसम. तंजावर सरस्वतीमहाल ग्रंथसंग्रह
तंसम. हस्त. यादी तंजावर सरस्वतीमहाल ग्रंथालयातील हस्तलिखितांच्या याद्या, क्रमांक १, २, ३, ४, तंजावर, १९२९, १९३२, १९३८, १९६२
त्रु. पो. त्रुटित पोथी
त्रैमा. त्रैमासिक
दत्तग्रसं. दत्तलक्षराज महानुभाव हस्तलिखित ग्रंथसंग्रह, माहूर
दीअं. दीपावली अंक
द्विआ. द्वितीयावृत्ती
द्वैमा. द्वैमासिक
न. प्र. का. नक्कल प्रत काल
नभामा. नवभारत मासिक; प्रका. प्राज्ञपाठशाळा, वाई; प्रथमांक : ऑक्टो. १९४७; पुढे चालू
नाविग्रं. नागपूर विद्यापीठ ग्रंथसंग्रह
पदसंग्रह अनेककविकृत पदे, कटाव, लावण्या वगैरे; संपा. वा. दा. ओक; भाग १, २, ३; मुंबई, १८९४, १८९६, १९०१
परी. परीक्षण
प्र. प्रसंग
प्रआ. प्रथमावृत्ती
प्रक. प्रकरण
प्र. ले. का. श. प्रत लेखन काल शके
प्रस्ता. प्रस्तावना
प्रामक. प्राचीन मराठी कविता; खंड १ ते ७; संपा. ज. शा. देशपांडे; मुंबई, १९६२–१९७३
प्रामजैसा. प्राचीन मराठी जैन साहित्य; डॉ. सुभाषचंद्र अक्कोळे, नागपूर–पुणे, १९६८
प्रामनधा. प्राचीन मराठीच्या नवधारा; रा. चिं. ढेरे; कोल्हापूर, १९७२
प्रामवाइ. प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास; संपा. अ. ना. देशपांडे; भाग १, पूर्वार्ध, पुणे, १९६६; भाग १, उत्तरार्ध, पुणे, १९६९; भा. २, पुणे, १९७३
प्रामसंक. प्राचीन मराठी संतकवि; ज. र. आजगांवकर; मुंबई, १९५७
प्रा. स्थ. प्राप्तिस्थळ
पृ. पृष्ठ
बा. बाड, बाडांक इ.
ब्रि. म्यु. ला. कॅ. ब्रिटिश म्युझियम लायब्ररी कॅटलॉग; जे. एफ. ब्लूमहार्ट; लंडन, १८९२
भा. भाग
भाइसंमं. भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे
भाइसंमंइति. भारत इतिहास संशोधक मंडळ, वार्षिक इतिवृत्त
भाइसंमंत्रै. भारत इतिहास संशोधक मंडळ, त्रैमासिक
भाइसंमंसंवृ. भारत इतिहास संशोधक मंडळ, (प्र. द्वि. तृ. च. पं. ष. स.) संमेलन वृत्त
भाइसंमं. हस्त. सू. भारत इतिहास संशोधक मंडळस्थ हस्तलिखित ग्रंथानुक्रमणिका; संपा. ग. ह. खरे; पुणे, १९६०
भासंको. भारतीय संस्कृति कोश; संपा. : महादेवशास्त्री जोशी, पद्मजा होडारकर; खंड १ ते ८; पुणे, १९६२ ते १९७४
मआ. मराठी आरती; संपा. म. वि. गोखले; पुणे, १९६७
मइसा. मराठ्यांच्या इतिहासाची साधने; राजवाडे संशोधन मंडळ ग्रंथमाला प्रका., धुळे
मकच. महाराष्ट्र कविचरित्र; संपा. ज. र. आजगांवकर; खंड १ ते ६; मुंबई, १९०७ ते १९२४
मचको. मध्ययुगीन चरित्र कोश; संपा. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव; पुणे, १९३७
मब. मराठी बखर; संपा. र. वि. हेरवाडकर; पुणे, १९५७; द्विआ. १९७५
मभामवा. मध्यभारतातील मराठी वाङ्मय; कृ. गं. कवचाळे; इंदोर, १९३९

| | |
|---|---|
| ममग्रंककासू. | महानुभाव महाराष्ट्र ग्रंथावली कविकाव्यसूचि; संपा. वि. ल. भावे; ठाणे, १९२४ |
| ममवा. | महानुभावीय मराठी वाङ्मय; संपा. य. खु. देशपांडे; यवतमाळ, १९२५; द्विआ. : पुणे, १९६० |
| मवाइ. | मराठी वाङ्मयाचा इतिहास : (१) संपा. ल. रा. पांगारकर; खंड १, मुंबई, १९३२; खं. २, पुणे, १९३५; खं. ३; मुंबई, १९३९; द्विआ. खं. १, २, पुणे, १९७२; (२) संपा. रा. श्री. जोग; खंड ३, ४, ५, मसाप. प्रकाशन, पुणे, १९७३; खं. ४, प्रआ. १९६५. |
| मवाको. | मराठी वाङ्मयकोश |
| मसंक. | महाराष्ट्र संतकवयित्री; संपा. ज. र. आजगांवकर; मुंबई, १९३० |
| मसंप. | मराठी संशोधनपत्रिका त्रैमा.; मराठी संशोधन मंडळ प्रका.; मुंबई; प्रथमांक : ऑक्टो. १९५३ |
| मसंमं. | मराठी संशोधन मंडळ; मुंबई |
| मसा. | महाराष्ट्र सारस्वत, आ. ४ थी, पुणे, १९५१; आ. ५ वी, पुणे, १९६३ |
| मसाप. | महाराष्ट्र साहित्य पत्रिका, त्रैमासिक; महाराष्ट्र साहित्य परिषद प्रका., पुणे; प्रथमांक : एप्रि. १९२८ |
| मस्वासंप. | मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिका; उस्मानिया विद्यापीठ, हैदाबाद : मराठी विभाग – वार्षिक; प्रथमांक : मार्च १९६६ |
| महा. कवि | महाराष्ट्र कवि मासिक; संपा. वि. ल. भावे; प्रथमांक आश्विन श. १८२५ (इ. स. १९०३); मराठी ग्रंथसंग्रहालय ठाणे प्रका.; व. १ ते ५ |
| महानु. | महानुभाव मासिक, अखिल भारतीय महानुभाव परिषद, औरंगाबाद; प्रथमांक : एप्रि. १९४९; पुढे चालू |
| मुमसंक. | मुसलमान मराठी संतकवि; रा. चिं. ढेरे; पुणे, १९६७ |
| मौरासं. | मौनीनाथांचा राममंदिरातील संग्रह |
| युमअसे. | युरोपियनांचा मराठी भाषेचा अभ्यास व सेवा; श्री. म. पिंगे; मुंबई, १९६० |
| र. का. श. | रचनाकाल शके |
| र. श. | रचना शक |
| रासं. | रामदासी संशोधन; खंड १, २; संपा. शं. श्री. देव; धुळे, १९३३, १९३८ |
| रासंमं. | राजवाडे संशोधन मंदिर, धुळे |
| रासंमं. हस्त. सू. | राजवाडे संशोधन मंदिरातील मराठी हस्त. ग्रंथ व दुर्मिळ ग्रंथांची सूची; संपा. द. रा. भट; धुळे |
| लो. शि. | लोकशिक्षण मासिक (जुने), संपा. ग. वि. ओक; तळेगांव, पुणे, १९१२ ते १९१८; (नवे), संपा. ग. गं. जांभेकर; पुणे, जाने. १९२८ ते १९४१ |
| व. | वर्ष |
| विसंमंवा. | विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक; नागपूर; प्रथमांक : १९५८; पुढे चालू |
| विज्ञावि. | विविधज्ञानविस्तार मासिक; पहिले संपा. : रा. भि. गुंजीकर; मुंबई, जुलै १८६७ ते डिसें. १९३७ |
| वेंकॉसं. | वेंगुर्ला कॉलेज ग्रंथालय – ग्रंथसंग्रह |
| श. | शके |
| शंका. | शंकास्पद |
| श्रीससंगा. | श्रीसकलसंतगाथा; संपा. का. अ. जोशी; पुणे, १९६७; प्रआ. : पुणे, १९२३ |
| श्रीसांप्रविवि. | श्रीसांप्रदायिक विविध विषय, खंड १, २; संपा. शं. श्री. देव; धुळे, १९१७, १९२० |
| श्लो. सं. | श्लोक संख्या |
| सं. | संख्या |
| संककासू. | महाराष्ट्रीय संत-कवि-काव्य-सूची, गो. का. चांदोरकर; पुणे, १९१५ |
| संकास. | संतकाव्य समालोचन; गं. ब. ग्रामोपाध्ये; पुणे, १९३९ |
| संग्रा. | संग्राहक |
| संपा. | संपादक, संपादन |
| समा. | समाधी |
| संलेसं. | संशोधन लेखसंग्रह, भाग १, २; ह. ना. नेने; नागपूर, १९५७ |
| सवामं. | समर्थवाग्देवतामंदिर, धुळे |
| सवामं. हस्त. सू. | समर्थवाग्देवतामंदिरातील हस्तलिखितांची सूची; श्री रामदासी संशोधन, खंड १, २; धुळे, १९३३, १९३८ |
| सशगोबो. | सतराव्या शतकातील गोमंतकी बोली; डॉ. वि. बा. प्रभुदेसाई; मुंबई, १९६३ |
| साहा. | साहाय्यक |
| स्मृ. स्थ. | स्मृतिस्थळ / नागदेवाचार्य चरित्र |
| हवदा. | हरिवरदा |
| हवना. | मराठी संशोधन मंडळातील हस्तलिखितांची वर्णनात्मक नामावली; संपा. सु. आ. गावस्कर; मुंबई, १९७२ |
| हस्त. | हस्तलिखित |
| हस्त. सं. | हस्तलिखितसंग्रह |
| हिंमसंदे. | हिन्दी को मराठी संतों की देन; विनयमोहन शर्मा; पाटना, १९५७ |
| ज्ञाने. त्रैमा. | ज्ञानेश्वर त्रैमासिक |
| IOLCMM | Catalogue of Marathi Manuscripts in the India Office Library, J. F. Blumhardt, S. G. Kanhere, Oxford, 1950 |
| UCOM | Catalogue of Oriental Manuscripts Library, Ujjain, Part II, Gwalior, 1941 |
| SOI | Sindia Oriental Institute, Ujjain |

# मराठी वाङ्मयकोश

## खंड पहिला



**अखंडदास / ० त्रिमलाचा अखंडदास** [का. अनु.] कवी. गुरू : त्रिमल. त्रिमलाचा अखंडदास असा उल्लेख काही कवितांखाली ह्यांनी केलेला आढळतो. परंतु हे त्रिमल म्हणजे शिवकल्याण ह्यांचे वडील व गुरू त्रिमल ऊर्फ नित्यानंद की स्वतःस वामनशिष्य म्हणविणारे *ज्ञानदर्पण*कार (र. श. १६१७ / इ. स. १६९५) त्रिमल [–१] हे निश्चितपणे ज्ञात नाही.

**रचना : अमु.** – १. महाशिवरात्री कथा व पुराण; ओ. सं. २२०; शिवभक्तीचा महिमा वर्णन करणारी कथा; २. पार्वतीस्वयंवर (अभंगात्मक); ३. रामकृष्णाचे भांडण, विश्वनाथस्तवन, साधूलक्षण, ज्ञानपर, ज्ञानीलक्षण (श्लोकात्मक); ४. मल्हारिची आरती; ५. क्षराक्षरविचार (हिंदी पदे); तंसम. हस्त. यादी, क्र. १, २, ३.

**अखड माधव** [का. अनु.] पदकार. ह्यांची 'माझ्या रामाला आणा कोणि जा गे' व 'क्यों करता मगरूरी काफर' (हिंदी) अशी दोन पदे, वा. दा. ओक संपादित *पदसंग्रह, भा. ३* (मुंबई १९०१) मध्ये मुद्रित (पृ. १७५, १८०).

**अखंडानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**अखंडाश्रम यति** [अंदाजे श. १६०५ / इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध] टीकाग्रंथकार.

**रचना : मु.** – शंकराचार्यांच्या 'लघुवाक्यवृत्ति' ग्रंथावर टीका (शिवरामस्वामी व अखंडाश्रम यति); कडवी १८; पृ. सं. २५; शिळाछाप; पुणे, १८८३; ब्लूमहार्ट, जे. एफ. : कॅटॅलॉग ऑफ मराठी अँड गुजराती प्रिन्टेड बुक्स; ब्रिटिश म्युझियम; लंडन, १८९२.

**अगंध्या शाहीर** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] पोवाडेकार. ह्यांचा *जयराम सावंताचा पोवाडा* सावंतवाडीकर जयराम सावंत ह्यांच्या आज्ञेवरून लिहिला गेला आहे. जयराम सावंत ह्यांनी इ. स. १७५० मध्ये कुडाळ येथे तुकोजी आंग्र्यांबरोबर झालेल्या लढाईत जो विजय मिळविला त्या पराक्रमाचे वर्णन ह्या पोवाड्यात येते. "पानपतच्या लढाईपूर्वी जे पोवाडे निर्माण झाले त्यांत पद्धतीच्या दृष्टीनें दोनच पोवाडे महत्त्वाचे आहेत. एक अज्ञानदासाचा व दुसरा अगंध्या शाहिराचा." – मा. के. काटदरे : अगंध्या शाहिराचा पोवाडा; *नवजीवन* मासिक, ऑग. १९३४, पृ. ५–१०. अज्ञानदासाच्या पोवाड्याप्रमाणेच ह्याही पोवाड्याची बांधणी डफाच्या तालावर म्हणता येण्यासारखी गद्य अशी आहे. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* (पुणे, १९६९) मध्ये समाविष्ट (पृ. ४७३–४८६).

**अग्निदास / ० अज्ञानदास / ० आगीनदास** [इ. स. चे १७ वे शतक] शिवकालीन शाहीर. पुण्याचा राहणारा. ह्याचा *अफझलखानाचा पोवाडा* सध्या उपलब्ध असलेला सर्वांत जुना पोवाडा होय. अफझलखानवधाच्या प्रसंगानंतर लवकरच जिजामातेच्या सांगण्यावरून हा लिहिला गेला व दरबारात गायिला गेला. एकूण ३७ चौक असलेल्या या विस्तृत पोवाड्यास पद्य म्हटले गेले तरी वस्तुतः ह्याची रचना 'एकतारी तुणतुण्यावर सहज सुराने म्हणता येईल अशी गद्याचीच आहे' (मसा., आ. ५, पृ. ५४९). पोवाड्याचा हा प्रारंभकालीन नमुना होय. ह्या प्रकारच्या रचनाबंधास त्या काळी कटिबंध किंवा कडाका म्हणण्याचा प्रघात दिसतो. उदा., 'आगीनदास कवीश्वर। त्याने कडाका गाईला.' पोवाड्याचे प्रथम मुद्रण शं. तु. शाळिग्राम ह्यांनी *थोर पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे – पूर्वार्ध* ह्या पुस्तकाच्या द्वारा (पुणे, १८७९) केले.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** माधव : शाहीर अज्ञानदास; मासिक मनोरंजन, ऑक्टो. १९३०, पृ. २६६–२७६.

**अग्रदास विठ्ठल** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – द्वापारीं हनुमंत भेट; प्र. २, ओ. सं. २२५; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अचल चैतन्य** [का. अनु.] कवी. गुरू : चिद्घन.

**रचना : अमु.** – रासक्रीडा; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. २.

**अचळ मुरारीबास / ० मुरारीबास** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक, उत्तरार्ध] महानुभाव ग्रंथकार व शास्त्रवेत्ते. गुरुपरंपरा : नागदेव > कवीश्वर (भास्करभट्ट बोरीकर) > परशराम > हरिराज > अचळ (मुरारीबास) > सीवराज (गुर्जर शिवव्यास) – मुनि दामोदरकृत *बाळक्रीडे*च्या शेवटी येणारी सीवराजांची परंपरा. ह्या परंपरेतील परशरामांचे शिष्य हरिराज म्हणजे पेटे हरिबास व त्यांचे शिष्य अचळ म्हणजे अचळ मुरारीबास. वा. ना. देशपांडे ह्यांनी उद्धृत केलेल्या *स्मृतिसमुच्चया*च्या *वृद्धाचारा*तील ४३ व्या आख्यायिकेवरून "मुरारीबास हे आधी वामनबासाचे शिष्य (ज्ञानी) असून नंतर ते पेटे हरिबासाचे (त्यांच्याजवळ दीक्षा घेऊन) शिष्य झाले असावे, असे दिसते. मुरारीबासांना नंतर अचळ ही उपाधी का मिळाली ते सांगता येत नाही. हरिबास व सोंगोबास ह्यांच्या *अन्वय-*

*स्थळात* सिद्धांते हरिबास आणि गुजर सिवबास ह्यांनी तिन्ही स्थळांची बांधणी करताना ' उभी रेषा आन दोहीकडे आडवीया रेषा तो स्तंभ पेटे हारीबासाचा : अचळ सिद्धांत म्हणौनि ' मांडला. यावरून गुजर सिवबासांचे गुरू मुरारीबास हे आपले गुरू पेटे हारीबास यांच्या सिद्धांताला ' अचळ सिद्धांत ' म्हणत असावे. त्यामुळे मुरारीबास यांना अचळ ही उपाधी लावून त्यांना अचळ मुरारीबास म्हणत असावे असे वाटते. " – डॉ. वि. भि. कोलते; प्रस्ता., *ज्ञानप्रबोध*, मलकापूर, १९७३; पृ. १२. मुरारीबास स्वतः उत्तम धर्मशास्त्र जाणणारे होते. अधून मधून आपल्या शिष्यांस हे शास्त्रनिरूपणही करीत असत. आपले शास्त्रशोधनाचे कार्य आपल्या पाठीमागे ह्यांनी आपले शिष्य गुर्जर शिवब्यास ह्यांच्याकडे सोपविले. ह्यांच्या नावावर *सुदामचरित्र* (ग्रं. सं. १२८) नावाची एक रचना नमूद केलेली आढळते. *सुदामचरित्रा*मध्ये श्रीकृष्णसखा भक्त सुदामा ह्याची कथा रंगविली आहे. मुद्रण : *महानुभाव* मासिकात (मार्च–एप्रिल १९६०).

**अचळसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – मुद्राप्रकाश / मुद्राप्रकरण; संककासू., पृ. २.

**० अचळ सिवबास** – पहा **गुर्जर शिवब्यास.**

**अच्युत–१** [का. अनु.] गद्यलेखक व पदकार.

**रचना : मु.** – एक शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. १२. **अमु.** – कृष्णपर ओव्या; पक्षीलक्षणचिकित्सा (गद्य) व पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अच्युत–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे व अभंग; सवामं. हस्त. सू., खं. १.

**अच्युत–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – गोपाळचैतन्याष्टक; संककासू., पृ. १२२.

**० अच्युतसुत** – पहा **रामकवि–३.**

**अच्युतस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बोधपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अच्युताश्रम–१** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक] आनंदसंप्रदायी कवी. गुरू : सहजानंद [–१] (काल : श. १४६० / इ. स. १५३८). ह्यांच्या *वैरागर* ग्रंथातील, " श्री शिव सहजानंद सद्गुरु । ब्रह्म विस्तारलें अगोचरु । भुवनत्रयाचा जाल्प विस्तारु । कैसा साकारु आकारला ॥ १.१ ॥ " ह्या प्रारंभीच्या गुरुवंदनाच्या ओवीवरून हे स्पष्ट होते. सहजानंदांचा काल लक्षात घेता अच्युताश्रम हे एकनाथकालीन ठरतात. ग्रंथाच्या भाषेवरूनही तसेच वाटते.

*वैरागर* हा ओवीबद्ध ग्रंथ शं. श्री. देव ह्यांना अपूर्णावस्थेत आपचंद मठात सापडला. मिळालेल्या प्रतीत १० प्रकरणे पूर्ण व ११ वे अर्धवट आहे (ओ. सं. १३२४). ९ व्या प्रकरणारंभी, ' संपलें शेरीरार्ध पूर्व । आतां सांगावें उत्तरार्ध अपूर्व ॥ ' असे कवी म्हणतो; त्यावरून ग्रंथाची सोळा प्रकरणे असावीत असे अनुमान निघते. ग्रंथात गुरुलक्षणे, शिष्यलक्षणे, स्थूलदेह, लिंगदेह, कारणदेह, महाकारणदेह, ब्रह्मांडाची उभारणी, गुरुरूप, गुणस्वरूप, ब्रह्मस्वरूप इत्यादी विषय आले आहेत. वरील ग्रंथाशिवाय ह्यांची अभंगरचना (*ज्ञानशत* – १४४ कडवी) व पदे समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील बाडांत सापडतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : अच्युताश्रमांचा ' वैरागर ग्रंथ '; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. १६५–१६८.

**अच्युताश्रम–२** [अंदाजे श. १४७० / इ. स. १५४८ – श. १५३५ / इ. स. १६१३] कवी व टीकाकार. गुरू : चिदानंद. 'चिदानंदानुचर' असा हे स्वतःचा उल्लेख करतात. गुरुपरंपरा : व्यास > शुक > गौडपाद > गोविंद > शंकराचार्य > चिदानंद > अच्युताश्रम. ह्यांचा आध्यात्मिक अधिकार फार मोठा होता. अंबरहुसेनांच्या *गीताटीके*त (श. १५७५ / इ. स. १६५३) अच्युताश्रमांना वंदन केलेले आहे. उपलब्ध बहुतेक सर्व संतनामावळ्यांतून ह्यांचा आदरपूर्वक उल्लेख करून त्यांना वंदन केलेले दिसते. गोपाळ याज्ञवल्की हे ह्यांचे शिष्य अच्युताश्रमशिष्य ह्या नावाने प्रसिद्ध आहेत.

ह्यांनी भगवद्गीतेवर *बालबोधिनी* नावाची एक गद्यपद्यमिश्रित टीका रचली आहे. शांकरपरंपरेतील श्रीधर ह्या संस्कृत ग्रंथकाराच्या टीकेचा तिच्यावर बराच प्रभाव पडलेला आढळतो. अच्युताश्रम हे रामोपासक होते. ह्यांनी *श्रीरामवोवियां* नावाचे १२० ओव्यांचे एक लहानसे प्रकरण रचले आहे. अशीच इतरही काही अध्यात्मपर, वेदान्तपर ओवीबद्ध प्रकरणे ह्यांनी रचली आहेत.

**रचना : मु.** – भगवद्गीता – बालबोधिनी टीका; अ. १ ला; ओ. सं. ११७; नाईक-आजगांवकर-आंबेवाडी-संपादित श्रीमद्भगवद्गीता; भा. १, अ. १; बेळगाव, १९३१. **अमु.** – १. ब्रह्मकथा (निर्देश : संककासू., पृ. ३). २. भगवद्गीता – बालबोधिनी टीका; अ. १–१८; ओ. सं. ३०१५; ३. श्रीरामवोवियां; ओ. सं. १२०; ४. ओवीबद्ध प्रकरणे – (१) अध्यात्मनिरूपण, (२) अध्यात्मविवरण, (३) उपदेशपर पद्धति, (४) उपदेशशतक, (५) बोधपर, प्र. १–२, (६) वेदान्तपर, (७) ज्ञानपर, ओ. सं. १२५; ५. नमनपर संस्कृत श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. १ २, ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : अच्युताश्रम : काही मराठी सारस्वत उपासक; विसंमंवा., नागपूर, १९७१; पृ. १३४–१३५.

**अच्युताश्रम–३ / ० अच्युताश्रमस्वामी** [ ? – समा. श. १७४५, श्रावण शु. १२ / इ. स. १८२३] कवी. मराठवाड्याच्या आंबडगोंदी परिसरातील प्रसिद्ध संपादणीकार रामानंद [–३] हे ह्यांचे गुरू. रामानंद हे अच्युताश्रमांचे संन्यासाश्रमातील गुरू. ह्यांचे संन्यासपूर्व परमार्थगुरू समर्थसंप्रदायी रघुनाथस्वामी किंवा राघवस्वामी हे होते.

ह्यांचा पोवाडा कोण्या रघुनाथ पाथरू ह्या त्यांच्या शिष्याने रचला आहे. त्याची सुरुवात 'अंबापुरचे श्रीस्वामी अच्युत दयेक्षमेचे तरु । ' अशी आहे. हे अंबापूर म्हणजे मराठवाड्यातील आंबड हेच गाव असावे. तेथे रामदासी संप्रदायापैकी एक मठ आहे. या मठाची परंपरा : श्रीसमर्थ > कल्याण > जगन्नाथ > यादव > राघव > अच्युताश्रमस्वामी, अशी शं. श्री. देव ह्यांनी दिली आहे (रासं., खं. २, पृ. ६३). अच्युताश्रमांनीच ह्या मठाची स्थापना केली असे ते म्हणतात. चौदाव्या वर्षीच रघुनाथस्वामींना शरण गेल्यानंतर ह्यांनी प्रदीर्घ परमार्थसाधना केली. पुढे वासुदेवस्वामी आणि रामाश्रमस्वामी (रामानंदांचे पूर्वाश्रमीचे नाव) ह्यांच्या संपर्कात आल्यानंतर अच्युतस्वामींनी रामानंदांकडून संन्यासदीक्षा घेऊन अच्युताश्रम असे नाव धारण केले, असा चरित्रक्रम वर निर्दिष्ट केलेल्या पोवाड्यात पाहण्यास सापडतो. – रा. चिं. ढेरे; *इंद्रायणी*, जाने.–फेब्रु. १९६४, पृ. ४१–४२. रामानंद व अच्युताश्रम ह्यांचा शिष्यपरिवार बराच मोठा होता. आजही अच्युताश्रमांची परंपरा आंबड (जि. औरंगाबाद) येथे विद्यमान आहे. राम व हनुमंत ह्यांची उपासना त्यांच्या संप्रदायात प्रामुख्याने रूढ होती. गोंदी येथे साजरा होणारा रामनवमीचा उत्सव व आंबड येथे साजरा होणारा हनुमानजयंतीचा उत्सव ही त्याची प्रतीके होत. अच्युताश्रमांचा निर्याणकाल पाथरू ह्याने श. १७४५ श्रावण शुद्ध द्वादशी असा दिला आहे.

अच्युताश्रमांनी आपले गुरू श्रीरामानंदस्वामी ह्यांच्याप्रमाणे संपादण्या व रामानंदस्वामींचा ८ कडव्यांचा एक पोवाडाही रचला आहे. बाह्यतः एकनाथी भारुडाप्रमाणे वाटणारा, ' संपादणी ' हा एक विशिष्ट काव्यप्रकार रामानंदांनी रूढ केला. दोघाही गुरुशिष्यांनी ह्या संपादण्या मराठवाड्याच्या आंबडगोंदी परिसरात अत्यंत लोकप्रिय केल्या आहेत. आंधळा, वासुदेव, पांगुळ, बैरागी, वाघ्या, मुरळी

ह्यांसारख्या समाजाच्या सर्व थरांतून वावरणाऱ्या व्यक्ती 'संपादण्यां'-तून त्यांनी उभ्या केल्या आहेत. ती ती सोंगे सजविणाऱ्या ह्या व्यक्तींचा सर्व प्रापंचिकांशी नित्य संबंध येतो. त्यामुळे परमार्थविचार सर्वसामान्य जनतेच्या गळी उतरविण्यास हे माध्यम फारच प्रभावी ठरते. परमार्थाकडे जाण्याचा मार्ग सुलभ करण्यासाठी हे अध्यात्मविषयक ज्ञान अतिशय सोप्या अशा शब्दांत व बोली-भाषेत मोठ्या खुबीने 'संपादण्यां'तून सांगितलेले दिसते. 'संपादणी', म्हणजे सोंग वठविणे, ही संज्ञा ललितातून आली आहे. 'भारूड' ही विशिष्ट रचना म्हटली, तर 'संपादणी' ही त्या रचनेच्या प्रयोगाची संज्ञा आहे. प्रयोगक्षमता हा 'संपादण्यां'चा एक विशेष आहे.

अच्युताश्रमांच्या एकूण ८६ 'संपादण्या' *प्रतिष्ठान* ह्या मासिकातून (ऑग. १९६३ ते नोव्हें.–डिसें. १९६३) प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांपैकी काही हिंदी भाषेत आहेत. ह्या 'संपादण्यां'तून गणपती, शिव-गौरी, विष्णू, राम अशा वेगवेगळ्या देवतांचे स्तवन करून त्यांना नमन केले आहे. रामकथेवर दोन मोठ्या 'संपादण्या' अच्युताश्रमांनी रचल्या आहेत. ह्या रचनेवरून अच्युताश्रमांचा आध्यात्मिक अधिकार बराच मोठा होता हे कळून येते. त्याचप्रमाणे ह्यांच्या कवित्वशक्तीचीही कल्पना येते. त्यावेळी मराठवाड्यात दक्खनी हिंदीचा प्रसार बराच असल्यामुळे रामानंद व अच्युताश्रम ह्यांनी तिच्यात रचना केली. पण ह्या रचनेवर मराठी रचनेचाच ठसा आणि प्रभाव विशेष आढळतो.

**रचना : मु.** – १. रामानंदस्वामींचा पोवाडा; प्रतिष्ठान, एप्रि.–मे १९६३; पृ. ५२–५३. २. संपादण्या, ८६; संपा. पठाण, यू. म.; प्रतिष्ठान, ऑग. १९६३ ते नोव्हें.–डिसें. १९६३, क्रमशः.

**अच्युताश्रमशिष्य /० गोपाळ याज्ञवल्की** [अंदाजे श. १५५७/इ. स. १६३५] कवी. गुरू : *बालबोधिनी*कार अच्युताश्रम [–२]. ह्यांचे नाव गोपाळ याज्ञवल्की. *कथाकल्पतरु*कार कृष्ण याज्ञवल्कींचे हे पुत्र. गोपाळ याज्ञवल्की हे शिवकल्याणांचे समकालीन असल्याचा उल्लेख *महाराष्ट्र-सारस्वत*कार करतात.

**रचना : अमु.** – १. रामस्तुति, २. शतकज्ञान, ३. शिवस्तुति, ४. शिवरामस्तुति, ही प्रकरणे; संककासू., पृ. ३.

**० अच्युताश्रमस्वामी** – पहा **अच्युताश्रम–३.**

**० अजमा** – पहा **आजम.**

**अंताजी माणकेश्वर** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] बखरकार. अंताजी माणकेश्वराने पानिपतच्या लढाईचे वृत्त लिहिल्याचे *काव्येतिहाससंग्रह*कारांनी नमूद केले आहे. ह्या बखरीचे नाव *अंताजी माणकेश्वराची बखर* असे हस्तलिखितात नमूद केले असून, तिची सुरुवात 'राजमुद्राविराजित राज्यमान्य राजश्री श्री बाळाजी बाजीराव पंतप्रधान... माधवराव व नारायणराव पेशवे महाराज यांचे सेवेशी आज्ञाधारक अंताजी माणकेश्वर तख्त हस्तनापूर दोनी कर जोडून शिरसाष्टांग नमस्कार' अशी आहे. ज्याअर्थी ही बखर नारायणराव पेशवे (इ. स. १७७२–७३) ह्यांस उद्देशून लिहिली आहे त्याअर्थी ह्याच काळात केव्हा तरी तिचे लेखन झाले असावे.

सदर बखरीचा लेखक दिल्ली दरबारात पेशव्यांचे वकील असलेले प्रसिद्ध सरदार अंताजी माणकेश्वर गंधे नसून कोणी सामान्य कारकून असावा, असे मत इतिहाससंशोधक मो. रा. जोशी व्यक्त करतात. कारण अंताजीपंतांची नेहमीच्या पद्धतीची म्हणजे पत्रांची भाषा ह्यात नाही. अंताजी माणकेश्वर गंधे हे पानपतच्या लढाईच्या वेळी जखमी झाल्याने लगेचच जाटांच्या मुलुखात वारले. हे बातमीपत्रे लिहिण्याचे काम करीत.

**रचना : अमु.** – अंताजी माणकेश्वराची बखर (पानपतची बखर); र. का. : इ. स. १७७२–१७७३; र. स्थ. : हस्तनापूर; रासमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हेरवाडकर, र. वि. : अंताजी माणकेश्वराची बखर; मब., पुणे, १९५७; पृ. ८३–८४.

**० अतीत** – पहा **अतीतानंद.**

**अतीतानंद / ० अतीत** [का. अनु.] कवी. ह्यांचे गुरू शिवानंद असावेत.

**रचना : अमु.** – योगवासिष्ठ; संककासू., पृ. ३.

**अंतु / ० अनंत सोनार** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – कोल्हाटखेळ; संककासू., पृ. ४.

**अथर्वण गंगाधर** [का. अनु.] कवी. गुरू : रामेश्वर. निंबराजाचे दैठण (जि. औरंगाबाद) गावी सापडलेल्या बाडांपैकी सखाराम-बोवांच्या बाडात (क्र. १४) प्रस्तुत कवीचे शिवरात्रीकथा (श्लो. सं. ४२) हे प्रकरण सापडते. रचनेवरून कवी शिवभक्त दिसतो. कथेला आधार *स्कंदपुराण* व *लिंगपुराण* ह्यांतील इतिहासाचा आहे असे स्वतः कवीच सांगतो (श्लो. ४१). प्रकरणात कवीच्या कालस्थलांसंबंधांत निर्णायक उल्लेख नाही. काव्यातील शेवटच्या श्लोकांचे दोन चरण पुढीलप्रमाणे आहेत : "प्रत्यक्ष कळीमलनाशनु जगजीवन स्वामि हा रामेश्वरु। चरणकमळ त्याचे अहर्णिसी ध्याय मानसी अथर्वण गंगाधरु ॥ ४२ ॥" ह्यावरून कवीचा गुरू कोणी रामेश्वर असावा असे वाटते. समर्थवाग्देवतामंदिर, धुळे, येथील बाडांत ह्या कवीच्या नावावर *शिवरात्रीकथा* (श्लो. सं. ४५, बा. १२४४) व *शंकरमहिमा* (श्लो. सं. ४२, बा. १०७) ही दोन प्रकरणे आढळतात; तंजावर येथील 'सरस्वती महाल ग्रंथालय' सूचीत (यादी, क्र. ३) *शिवरात्रीकथा*, ओव्या, पदे, लावणी अशी रचना नोंदलेली आढळते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : अथर्वण गंगाधर; भाइसमंइति., श. १८३७, पृ. २९५–२९६.

**अंदु गोविंदा** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर.

**रचना : अमु.** – 'प्रतापसिंह ऊर्फ बुवासाहेबांचा पोवाडा' : ऐतिपो. खं. ३, पृ. ७०–७१.

**अद्वयबोध** [इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध] कवी. मुडलगीच्या 'स्वामी' परंपरेतील. अद्वयबोधांचे वास्तव्य बेळगाव जिल्ह्यातील गोकाकजवळील मुडलगी गावी झाले. पित्याचे नाव रंगबोध व मातेचे नाव लक्ष्मीबाई. ह्यांच्या घराण्याचे मूळ पुरुष कोनेरीबोध. हे गोदातीरी टाकळी गावी राहात असत. तेथेच मठ करून राहिलेले सहजबोधस्वामी हे त्यांचे गुरू होते. कोनेरीबोधांचे पुत्र रंगबोध ह्यांना सहजबोधस्वामींनी उपदेश देऊन दक्षिणेत जाऊन लोकोद्धार करण्याची आज्ञा केली. गुरूंच्या पादुका घेऊन रंगबोध दक्षिणेकडे निघाले. वाटेने जाताना मुडलगी येथे गुरूने रेवणसिद्धांच्या रूपात त्यांस दर्शन दिल्याने, तोच आदेश समजून तेथेच हे घर व मठ करून राहिले. परंपरेत स्थान मिळाले ते मात्र रंगबोधांना. कोनेरीबोधांचे नाव परंपरेत येत नाही. रंगबोध हे विठ्ठलभक्त होते व पंढरीची वारी नियमाने करीत. ह्यांचे पुत्र अद्वयबोध हेच त्यांचे शिष्य होत. ह्यांचे मूळचे नाव विठ्ठल असावे. पूर्णबोध हे अद्वयबोधांचे धाकटे बंधू. अद्वयबोधांच्या पत्नीचे नाव राधाबाई. हिचा आध्यात्मिक अधिकार फार मोठा होता. ही कविताही करीत असे. अद्वयबोधांचे पुत्र शिवबोध (पहिले) हे त्यांचे शिष्य व परंपरेचे वारस. ही सर्व माहिती मुडलगीच्या स्वामींची चरित्रे लिहिणाऱ्या गुरुनाथाने आपल्या *देशिकचरित्रा*त लिहून ठेवलेली सापडते.

मुडलगीची ही स्वामीपरंपरा म्हणजे आद्य मराठी कवी मुकुंदराज ह्यांचीच परंपरा होय. *देशिकचरित्र*काराने दिलेली परंपरा पुढीलप्रमाणे : मुकुंदमुनि > जगन्नाथ > सहजबोध > रंगबोध > अद्वयबोध > शिवबोध > रंगबोध > शिवबोध–२ > संगबोध. ह्या परंपरेला

मुडलगी शिष्यपरिवारातील ज्ञानबोध, हरिबोध, धुंडिराजेश्वर ह्यांनी त्यांच्या परंपरास्तोत्रांतून दुजोरा दिलेला आढळतो.

अद्वयबोधांचे जन्ममृत्युशक उपलब्ध नाहीत. ह्यांचे वडील रंगबोध हे श. १५८१ / इ. स. १६५९ व पुत्र शिवबोध–१ हे श. १६२८ / इ. स. १७०६ मध्ये समाधिस्थ झाल्याचे उल्लेख सापडतात. त्यावरून ह्या दोहोंच्या मधला कोणतातरी शक अद्वयबोधांचा निर्याणशक असावा. अद्वयबोध व त्यांची पत्नी राधाबाई ह्या दोघांच्याही समाध्या मुडलगी मठात आहेत.

*देशिकचरित्र*काराने अद्वयबोधांच्या फक्त *अद्वयशतका*चाच उल्लेख केला आहे; इतर रचनेचा नाही. कवीच्या रचनेपैकी *अद्वयशतक*, *श्रीरंगश्रीविलास* ही दोन प्रकरणे व काही पदे एवढेच वाङ्मय आज उपलब्ध आहे.

*अद्वयशतका*त अद्वैतकल्पना मांडलेली आहे. रंगबोधांचा उपदेश पंथीय तत्त्वज्ञानाचे सार ह्या रूपात तेथे येतो. उपनिषदे आणि वेदशास्त्र ह्यांचा मथितार्थच ह्यात सांगितला आहे. *अद्वयशतका*वर *विवेकसिंधू*ची छाप पडलेली स्पष्ट दिसून येते. [ ➪ ३. ]

*श्रीरंगश्रीविलास* ही ३२ श्लोकांची रचना स्तोत्रस्वरूपाची आहे. श्रीरंग म्हणजे श्रीकृष्ण आणि गुरू अशा श्लिष्ट अर्थाने तो शब्द वापरला आहे. ह्या स्तोत्रातील 'पुरुष आणि प्रकृति' ह्यांच्या रूपकात्मक वर्णनातून रंगविलेली मधुराभक्ती म्हणजे अद्वयबोधांचा सुंदर प्रतिभाविलास होय. [ ➪ ३. ]

ह्यांची स्फुट कविता विपुल असून ह्यांची एकूण ८६ पदे डॉ. आवळीकर ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत. पदांतून गुरुविषयक आदर, ब्रह्मानंदानुभव, भक्ती व नाममहिमा असे विषय येतात. एके ठिकाणी "मज लागलें तयाचें पिसें । अहं सोहं हरूनि तोची बसे ॥ हृदंबरी सहज स्वप्रकाशे । अद्वयवेशे रंगनाथु ॥" असे गुरूबद्दलचे भावोद्गार कवीने काढलेले आहेत. रामनामाचे ध्यान करा असे कवी आवर्जून सांगताना दिसतो. उदा., "अनुदिन रामस्मरण करि रे । तामसपण हे मनातिल टाकुनि रामस्मरण करि रे ॥" काही पदांतून शृंगारिक रूपके उपयोजून मधुराभक्तीचे दर्शन कवी घडवितो. उदा., 'मी पतिव्रता नारी', 'श्रीरंग अंग संगे गे', 'थोर माझा सोहळा संयोग तुझा झाला'. अद्वयबोधांची सर्वच पदे भावोत्कट आहेत.

**रचना : मु.** – १. अद्वयशतक; २. श्रीरंगश्रीविलास : स्तोत्र; श्लो. सं. ३२; ३. पदे; सं. ८६; संपा. आवळीकर, पंडित : मुडलगीचे स्वामी; पुणे, १९७१; पृ. ३३–८६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : अद्वयबोधांची कविता (पृ. १७२–१८३), देशिक-चरित्र (परिचय) (पृ. ११६–१३३); जुवानसं.; धारवाड, १९६४. २. आवळीकर, पंडित : प्रस्ता., मुडलगीचे स्वामी; पुणे, १९७१; पृ. १–५८.

**अद्वयरंगी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अद्वैतानंद / ० अद्वैतानंद यती** [?–समा. श. १६८७ / इ. स. १७६५] वेदान्तग्रंथकार. हे मूळचे महाराष्ट्रीय विद्वान ब्राह्मण संन्यासी. काशी क्षेत्रात हे गुरुस्वामी ह्या नावाने प्रसिद्ध होते. मध्वमुनीश्वर व कटावकार अमृतराय हे ह्यांचे शिष्य होते असे म्हटले जाते. ज. र. आजगांवकर ह्यांच्या मते दुसऱ्या एखाद्या अमृतरायाचे अद्वैतानंद हे उपदेशक असावेत, कटावकार अमृतरायांचे नव्हत (मकच., भा. १, पृ. ३५४). ह्यांच्या ग्रंथांवर शंकराचार्यांच्या मताचा प्रभाव दिसतो. – मचको., पृ. १३.

**रचना : अमु.** – १. प्रबोधसुधाकर (त्रुटित मराठी पोथी); २. ब्रह्मविद्याभरण (संस्कृत); ३. सदानंदकृत वेदान्तसारावर टीका (संस्कृत); भाइसंम.

**० अद्वैतानंद यती** – पहा अद्वैतानंद.

**अनंत–१** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. गुरू : जयरामस्वामी वडगावकर. जयरामस्वामींचे आणखी एक शिष्य गोपाळ (समाधिशक १६१२) ह्या नावाचे होते. दोघा शिष्यांनी मिळून काव्यरचना केली आहे.

**रचना : अमु.** – १. ब्रह्मस्तुति; र. का. : श. १६१२ / इ. स. १६९०; २. माधवगुण; ३. रुक्मिणीस्वयंवर (गो. का. चांदोरकर संग्रह); ४. रुद्रयामल (वि. ल. भावे संग्रह); संककासू., पृ. ४.

**अनंत–२ / अनंत कवी–२ / ० अनंत गोसावी मेथवडकर / ० अनंतभट** [इ. स. १७ व्या शतकाचा उत्तरार्ध व १८ व्या शतकाचा पूर्वार्ध] कवी. मूळचे सातारा जिल्ह्यातील मेथवड गावचे राहणारे. गुरू : रामदास. ह्यांस निलंगाबादेस (जि. उस्मानाबाद, मराठवाडा) रामदासांनी मठ बांधून दिला होता. तेथेच हे राहात असत. हे आनंदतनय अरणीकरांचे समकालीन. रामदासीसंप्रदायी असूनही हे विठ्ठलभक्त होते व नियमाने पंढरीची वारी करीत.

कवीची सर्वच कविता आख्यानपर स्वरूपाची असून ती पंडितकवींच्या संप्रदायात बसणारी, अक्षरगणवृत्तात्मक श्लोकबद्ध अशी आहे. प्रसंगपरत्वे दिंडी, सवाई, घनाक्षरी, अभंग ह्या मराठी आद्यवृत्तांचाही हे उपयोग करताना दिसतात. कवितेची भाषा शुद्ध आणि सोपी असून तिच्यात उर्दू व फारसी ह्या भाषांतील शब्द फारसे आढळत नाहीत. कवी रामभक्त असल्याने रामचरित्रातील *सीतास्वयंवर*, *सुलोचना-गहिवर*, *कुशलवाख्यान* ह्यांसारखी आख्याने रचताना ह्यांच्या लेखणीला स्फुरण चढलेले दिसते. वीर, करुण आणि भयानक रसांनी युक्त असलेले *सुलोचना-गहिवर* [ ➪ ३ ] हे काव्य ह्यांच्या कवितेत अधिक प्रत्ययकारी आहे. अनुप्रासांची कवीला आवड असून समर्पक अशा अलंकारांचा उपयोग करून आपल्या काव्यातील आशय ह्यांनी खुलविला आहे. वीररसाचा आविष्कार करण्यात ह्यांचा हातखंडा दिसतो. ह्या दृष्टीने *सुरथसुधन्वाख्याना*तले युद्धवर्णन पाहण्यासारखे आहे.

ह्याच कवीची *भामाविलास* आणि *सुदामचरित्र* अशी दोन काव्ये सरदार मिरीकरांना एका जुन्या हस्तलिखित बाडात उपलब्ध झाली. ती भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रही आहेत. – भाइसंमत्रै., व. २३, अं. ४, पृ. ९९.

अनंतकविकृत कवितासंग्रहात छापलेली *सुरथसुधन्वा* व *बभ्रुवाहन* ही दोन आख्याने एका मोठ्या काव्यग्रंथाची (*अश्वमेध* ग्रंथ) प्रकरणे असावीत असे मत संपादक वा. दा. ओक ह्यांनी व्यक्त केले आहे (प्रस्ता., पृ. २). रचनेवरून आपली काव्ये ह्यांनी कीर्तनकारांसाठी रचली असावीत असे वाटते. अनंतांची रचना मुक्तेश्वर, वामनपंडित ह्यांच्या तोडीची नसली तरी मनाची पकड घेऊ शकेल इतकी ती आकर्षक निश्चितपणे आहे.

**रचना : मु.** – १. अहिमह्याख्यान; १०१; २. कुशलवाख्यान; प्र. १ व २; १७३; ३. गजगौरीव्रताख्यान; ४४; ४. गरुडगर्वपरिहाराख्यान; ५९; ५. गोपीगीत; २४; ६. द्रौपदीस्वयंवर; ९६; ७. निर्वाणषट्क; ६; ८. बभ्रुवाहनाख्यान; प्र. १; १००; ९. श्रीयाळचरित्र; २६; १०. सिंहध्वजाख्यान; ८; ११. सीतास्वयंवर; ११३; १२. सुरथसुधन्वाख्यान; प्र. १ व २; २००; १३. सुलोचनाख्यान; ७४; समाप्ती श. १६४५; १४. सुलोचनागहिवर; प्र. १–५; ३६३; समाप्ती श. १६४३; १५. पदे, पाळणे, भूपाळ्या; २५; महाराष्ट्र कवि अनंतकृत कवितासंग्रह; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६. **अमु.** – १. भामाविलास; ७२; २. सुदामचरित्र; ६९; – भाइसंम. ३. ताम्रध्वजाख्यान; ४. मयूरध्वज. ५. हनुमंतभेट; – अनुपलब्ध. **शंका.** – १. अश्वमेध.

२. बोधराजाचें चरित्र; ४९.

**अनंत–३** / ० **अनंत कवी–१** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] संत-चरित्रकार व कवी. वास्तव्य : परभणी (मराठवाडा). वडिलांचा धंदा सेटेपणाचा म्हणजेच कापडविक्रीचा. जातीने विश्वकर्मा सोनार. गुरू : रामानंद. हे रामानंद पुसद नदीच्या वाळवंटात खेचरी मुद्रा लावून बसले असता अनंतकवींना त्यांचे दर्शन घडले व त्यांनी ह्यांना उपदेश केला. रामानंद हे थोर ज्ञानी व योगी होते. अनंतकवींचा मृत्यू दारव्हा (विदर्भ) येथे झाला. तेथेच त्यांची समाधी आहे. *भक्त-रहस्य* ह्या आपल्या ग्रंथात श्रीपांडुरंगाला ह्यांनी जे नमन केले आहे त्यावरून हे विठ्ठलभक्त असावेत असे वाटते.

अनंतकविकृत पाच ग्रंथ यवतमाळ येथील शारदाश्रमाच्या हस्तलिखित संग्रहात आहेत. त्यांपैकी *भक्तरहस्य* ग्रंथाचे ३२ अध्याय व ४८५५ ओव्या आहेत. ह्यामध्ये २३ ज्ञात संतांची चरित्रे आली आहेत. तसेच ब्राह्मण, कुणबी, सोनार, महार, अस्पृश्य अशा अनेक जातींतील अप्रसिद्ध संतांची चरित्रे प्रथमच वाचावयास मिळतात. ग्रंथाचा शेवट असा आहे : "भक्तरहस्य कथा समाप्त ॥ शके १७११ शौम्यनाम सवसरे । श्रावणमासे शुक्लपक्षे द्वितीयेस ग्रंथ समाप्त ॥ हस्ताक्षर चरेन । विसाजी भीकदेव वैद, पातुरशेरबाबूचे । संपूर्णमस्तु । श्रीकृष्णार्पणमस्तु श्लोक येकुन ४८५५।" या ग्रंथाखेरीज *जीवन्मुक्त*, *माधवदासी*, *शिल्पशास्त्र*, *फाल्गुनमाहात्म्य* असे आणखी चार ग्रंथ कवीने रचले आहेत. *जीवन्मुक्त* ग्रंथ वेदान्तपर असून त्यात जीवन्मुक्ताची लक्षणे व जीवनदर्शन घडविले आहे. त्याचे दहा अध्याय असून तो त्रुटित आहे. ग्रंथात लेखकाचा उल्लेख येत नाही. *माधवदासी* ग्रंथाचे ५ अध्याय असून त्यात माधवाला जे प्रश्न विचारले त्यांची उत्तरे ओवीबद्ध केली आहेत. *शिल्पशास्त्र* ग्रंथाचे १३ अध्याय असून ग्रंथ अपूर्ण आहे. ह्यात ब्रह्माने मायेच्या लीलेने जे हे ब्रह्मांड निर्माण केले ते कलात्मक आहे, हे वेदान्ततत्त्व शिवपार्वतीप्रश्नोत्तररूपाने काव्यमय स्वरूपात वर्णिले आहे. *फाल्गुनमाहात्म्य* ग्रंथाच्या ७०९ ओव्या असून त्याच्या ७ अध्यायांपैकी अध्याय पहिला गहाळ. परमात्मा व माया ह्यांच्या फाल्गुनातील रंग वगैरे लीलांचे वर्णन ह्यात येते. – महाजन, द. बा., शारदाश्रम, यवतमाळ, ह्यांनी पाठविलेल्या हस्तलिखितांच्या माहितीवरून.

**अनंत–४** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. सरस्वतीच्या तीरावर वसलेल्या श्रीपूर क्षेत्राचे रहिवासी. ह्यांनी *गर्भगीताटीकाप्रकरण* (ओ. सं. १४२; र. श. १६८७ / इ. स. १७६५) रचले आहे. ग्रंथात गुरूचा नामनिर्देश नाही. ग्रंथरचनाकाल व आपले अनंत हे नाव कवीने ग्रंथात दिले आहे. प्रस्तुत ग्रंथाचे हस्तलिखित भाइसंमं. पोथीशाळेतील सखारामबोवा दैठणकर ह्यांच्या संग्रहापैकी क्रमांक २६ च्या बाडात सापडले. हा ग्रंथ अजून प्रकाशित झालेला नाही. टीकेच्या दोन ओव्या रचनेचा नमुना म्हणून पाहाव्या. "तेव्हा तो पृथेचा नंदन । बोलिला श्रीकृष्णालागुन । गर्भवासादि दुःखदारुण । किमर्थ आपण भोगिति नर ॥ आसंख्य गर्भोदरि जनन । घेवोनि पावती मरण । ऐसा नाना विपरीतीकारणें । कोण्या गुणें सोसिति ते ॥"

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : अनंतकृत गर्भगीता टीका; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २८५–२८६.

**अनंत–५** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर] कवी. गुरू : *दासविश्रामधाम*कार आत्मारामबोवा. भालकी मठपती नरसोबांचे हे गुरुबंधू. भालकी येथील रामदासी मठात ह्यांनी लिहिलेला *वरप्रसाद* नावाचा लहानसा ओवीबद्ध ग्रंथ उपलब्ध आहे. तो अजून प्रसिद्ध झालेला नाही. सत्‌शिष्यलक्षणे सांगताना अनंतकवी म्हणतात : "गुरुआश्रमीं पादरक्षा घालों नये । सैरावैरा फिरों नये । फिरों नये म्हणोन स्वस्थ बसों नये । काही श्रवण करावें ॥" (मसा., आ. ५, पृ. ९८४–८५).

**अनंत–६** / ० **अनंतकवी–३** [का. अनु.] कवी. गुरू : रामदास. *श्रीसमर्थप्रताप*ात "अनंतकवी सह्याद्रिशिखरीं । समर्थप्रताप वाणी वैखरी" असे ज्यांचे वर्णन आहे, तेच हे अनंत होत, असे शं. श्री. देव ह्यांनी आपले मत मांडले आहे (रासं., खं. १, पृ. ३२२).

ह्या अनंत कवींच्या कवितेपैकी समर्थस्तवनपर सहा श्लोकच तेवढे प्रसिद्ध आहेत (*महाराष्ट्रकवि अनंतकृत कवितासंग्रह*; मुंबई, १८९६; पृ. १०८–१०९). *रामदासी संशोधन, खंड १* मध्ये (पृ. ३२२) कवीचे एक १३ श्लोकांचे महत्त्वाचे प्रकरण शं. श्री. देव ह्यांनी छापले आहे. त्यामध्ये अंबादेवीच्या नवरात्रोत्सवाचे वर्णन आले आहे. त्यातील शेवटचा श्लोक असा : "अंबा शिवासहित शोभतसे तुरंगीं । होती सवेग जप अद्भुत अंतरंगीं । नृत्यांगना सुरस नाचति रागरंगीं । प्रेमा अनंतकविचा रघुराजरंगीं ॥" अनंतांच्या आरत्या, पदे, श्लोक इत्यादी रचना समर्थवाग्देवतामंदिरातील एका बाडात (३८४) सापडते (हस्त. सू., खं. १). ती अद्यापि प्रकाशित झालेली नाही.

**अनंत–७** [का. अनु.] पदकार. हे रंगनाथस्वामींच्या शिष्यांपैकी कोणी असावेत. ह्यांनी पदे रचली आहेत (संककासू., पृ. ४).

**अनंत–८** [का. अनु.] रामदासी कवी. शं. श्री. देवांच्या मतानुसार हे बहुधा पांधरी मठाचे असावेत (सवामं. बा. २४२, हस्त. सू., खं. १). ह्यांच्या एका पदात मैलार येथील खंडोबाचा व दुसऱ्या एका पदात कृष्णातटाकी वसलेल्या बदरीग्रामाचा उल्लेख आहे.

० **अनंत–९** – पहा **अनंतमौनी**.

० **अनंत आयमुनी** – पहा **आएमुनी कारंजकर**.

**अनंतकविसुत** [का. अनु.] पदकार. ह्यांचे एक पद वा. दा. ओक संपादित *पदसंग्रह, भाग ३* (मुंबई, १९०१) मध्ये मुद्रित (पृ. ११०).

० **अनंत कवी–१** – पहा **अनंत–३**.

० **अनंत कवी–२** – पहा **अनंत–२**.

० **अनंत कवी–३** – पहा **अनंत–६**.

**अनंतकीर्ती** [अंदाजे इ. स. १७७५] जैन कवी. हे लातूर (जि. उस्मानाबाद) येथील बलात्कारगण पीठाच्या शिष्यवर्गामधील एक. गुरू : चंद्रकीर्ती. चंद्रकीर्ती हे लातूर पीठावर गुणकीर्तिनंतर भट्टारक होते. ब्रह्मजिनदासकृत गुजराती रासकथेवरून अनंतकीर्तींनी *दशलाक्षणिक व्रतकथा* (ओ. सं. १८८) रुपासा नेवा ह्यांच्या विनंतीवरून मराठीत आणली. कथेच्या प्रशस्तीत ह्या गोष्टी कवीने स्पष्ट सांगितल्या आहेत : "ब्रह्मजिनदास रासकथा । तयाचा पाहोनि केला उलथा । भाशा मऱ्हाष्ट कथा । रचिलि पैं ॥ १८० ॥ . . . जैसिंगपैठ विख्यते । तो आदिनाथ साक्षांते । ते माझे कुलदैवते । प्रसादु त्याचा ॥ १८६ ॥ नेवा रुपासा याचे निरोपने । आह्मा मऱ्हाष्ट करोनि सांगने । मग पडले कारन । तयासाटि ॥ १८७ ॥" ही कथा जैसिंगपेठ येथील आदिनाथ मंदिरात श. १६९७ मध्ये लिहिली.

नयनपूरचा राजा प्रियंकर व राणी प्रियंकरा ह्यांची कन्या कमळसेना हिने वनात मुनीस दशलाक्षणिक व्रताचा विधी विचारला होता. प्रस्तुत कथा ह्या काव्याचा प्रतिपाद्य विषय आहे. ह्या कथेत दश-लाक्षणिक व्रताचा विधी, तो पाळण्याने मिळणारे फळ आणि हे व्रत ज्यांनी मुळात केले त्यांच्या कथा सांगितल्या आहेत. भाद्रपद मासातील शुक्लपंचमीपासून ह्या व्रताचा आरंभ होतो व ते अनंतचतुर्दशीला संपते. ह्या व्रतकथेचे हस्तलिखित शिरड येथील जैन ग्रंथसंग्रहात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : अनंतकीर्ती;

प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ९३–९४.

**अनंत केशव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अनंतगिरी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अनंत गोपाळ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. कृष्णाची आरती; २. कृष्णपर, बोधपर, भक्तिपर, नामपर व रामाचा रथ ह्या विषयांवरील पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अनंत गोपाळदास** [का. अनु.] आरतीकार. ह्यांची *येकनाथांची आरती* टाकळी मठातील बाडात (क्र. ३७) एका पृष्ठावर सापडली. ती भारत इतिहास संशोधक मंडळाच्या श. १८३८ च्या इतिवृत्तात छापली आहे (पृ. ५९–६०). तिची तीन कडवी आहेत. कवी म्हणतो : "येकनाथ नाम घेतां । सौख्य वाटतें चित्ता ॥ अनंत गोपाळदास । धणी न पुरे गातां ॥३॥" हीच आरती थोड्याफार फरकाने *मराठी आरती* संग्रहात मुद्रित (पृ. ३३४).

**० अनंत गोसावी मनेरगुडीकर** – पहा **अनंतमौनी.**

**० अनंत गोसावी मेथवडकर** – पहा **अनंत–२.**

**अनंततनय–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**अनंततनय–२ / ० अनंतसुत त्र्यंबक–१ / ० अनंतात्मज त्र्यंबक / ० त्र्यंबक–१** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. महाभारतावर रचना करणाऱ्यांपैकी एक. ह्यांचे मूळ नाव त्र्यंबक असे ह्यांच्या *उद्योगपर्वा*तील पुढील उल्लेखावरून दिसते : "ही त्र्यंबकें आपुली वाणी ॥ वाग्पुष्पांची गुंफिली श्रेणी । अर्पिली असे श्रीकृष्णचरणीं । अर्थ सुगंधें घमघमीत ॥" ह्यांनी *महाभारता*ची दोन-चार पर्वे रचली असावीत. पण त्यातील फक्त '*उद्योगपर्व*'च उपलब्ध आहे.

"हा आपला ग्रंथ व्यासकृतीवरून फार काळजीपूर्वक लिहितो; व आपल्या प्रत्येक अध्यायाचे शेवटी त्यात मूळ भारताच्या किती व कोणत्या अध्यायांतील कथाभागांचा समावेश केला आहे हेंहि सांगतो." – वि. ल. भावे, मसा., आ. ४, पृ. ६९०. ह्या काव्याचे प्रयोजन सांगताना कवी लिहितो : "पूर्वीं मुक्तेश्वरें । अनेक कवींच्या ईश्वरें । आरंभिलें भारत सारें । भाषाधारें रचावया ॥ परी तें न गेलें समाप्ती । ऐसें तर्कुनि सर्व मती । चतुर्थानंतरें पंचमीं प्रीती । 'उद्योगीं' मती संचरली ॥" *उद्योगपर्वा*तर्गत *कृष्णशिष्टाई*, *कर्णभेदप्रयत्न*, *विदुलाख्यान* इत्यादी आख्याने ह्यांनी चांगली गायिली आहेत.

**रचना : अमु.** – उद्योगपर्व, अ. ४६ ; ग्रं. सं. अंदाजे ६०००; वि. ल. भावे संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** भावे, वि. ल. : अनंतसुत त्र्यंबक; भाइसंमंतृसंवृ., पृ. १०२–१०६.

**अनंतदास–१ / ० गोपाळअनंत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – आरती व पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**अनंतदास–२ / ० अनंतदासप्रभु** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – रामपर दोन पदे; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ३४–३५. **अमु.** – १. अभंग; २. आरती – विष्णूची; ३. ओव्या – सीताशुद्धी; ४. जोगी; ५. पदे – अहिल्योद्धार-कथाभाग, काशीयात्रा, कृष्णपर, भगवत्पर, मारुतिपर, रामपर, सीताशुद्धिपर, शिवपर, हनुमत्पर. – तंसम. हस्त, यादी, क्र. ३.

**अनंतदास–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – वेताळपंचविशी; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १२३.

**० अनंतदासप्रभु** – पहा **अनंतदास–२.**

**अनंतदेव** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. गोपालकाला; २. विठ्ठलचरित्र; श्लो. सं. ४१; ३. पांडुरंगमाहात्म्य ; अ. १२ ; ओवीबद्ध; र. का. : धातुनाम संवत्सरीं । आश्विन शुद्ध नवरात्री । मूळ ग्रंथाची ते वरी । टीका संपूर्ण जाहली ॥ १२. ६२ ॥; ४. रुद्रयामळ ; संस्कृत श्लोक व टीका ओव्या; १६०; ५. आरती व पदपदांतरे. – तंसम. हस्त. यादी, क्र. १, २, ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**अनंतदेवगुरूचा बालक** [का. अनु.] कवी व चरित्रकार.

**रचना : अमु.** – विसोबा नाईकांचे चरित्र; अभंग १८; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अनंतदेवमुनि** [का. अनु.] महानुभाव कवी.

चांगदेव राऊळांचे एक अनुग्रहित. ह्यांची *कमळाउसाचे मंगळार्ती* एवढी एकच रचना आढळते; ममग्रंककासू., पृ. १.

**अनंतनंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**अनंतपंडित–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रघुवंशाच्या पहिल्या सर्गावरील मराठी टीका; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २३२.

**अनंतपंडित–२** [अंदाजे इ. स. चे सतरावे शतक] कवी. हे स्वतःला 'कविकुलालंकार' उपाधी लावतात. स्वतःसंबंधी ह्यांनी अशी माहिती दिली आहे : "पुण्यस्तंभपुरी सुखाब्धिलहरी विद्वज्जनी साजिरी। तेथें त्र्यंबक पंडितात्मज वसे; प्रेमा धरी शंकरीं।" भानुदासकृत संस्कृत *रसमंजरी*चे ह्यांनी *महाराष्ट्रसंजीविनी* व *शृंगारकल्लोलिनी* असे दोन अनुवाद केले असावेत, असे *महाराष्ट्रसारस्वत*कार ह्यांना पुढील काव्यपंक्तीवरून वाटते. "आज्ञा त्या प्रभुची असे म्हणुनिया 'महाराष्ट्र-संजीविनी' । तैसी हे दुसरी वरी करितसे 'शृंगार-कल्लोलिनी' ॥" 'अनंतांचे भाषांतर तितके बरोबर नाही' (वि. ल. भावे; मसा., आ. ४, पृ. ५०१).

**० अनंतपंडित–३** – पहा **आनेराज व्यास.**

**अनंतपंडितसुत साबाजी / ० साबाजी अनंत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० अनंतपुत्र** – पहा **केशिराजदास–१.**

**अनंतप्रभु** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**अनंतफंदी** [इ. स. १७४४ – १८१९] शाहीर व कीर्तनकार. पेशवाई-कालीन सर्व शाहिरांत वयाने हे वडील. ह्यांचे उपनाव घोलप. यजुर्वेदी कौंडिण्यगोत्री ब्राह्मण. ह्यांच्या पित्याच्या नावाचा उल्लेख कोठे आढळत नाही. मातोश्रींचे नाव राऊबाई. वसतिस्थान अहमदनगर जिल्ह्यातील संगमनेर. ह्यांच्या पूर्वजांचा व्यवसाय सराफीचा. हे पिढीजाद वृत्त्यंशी, देवीचे गोंधळ घालणारे. अनंतफंदींचा पिता ह्यांच्या लहानपणीच निवर्तला. त्यामुळे ह्यांच्यावर दाब असा राहिला नाही. गावात उनाडक्या करीत फिरण्यात ह्यांचा काळ जाऊ लागला. तरुणपणी हे आपला सर्व वेळ तमासगिरांच्या फडांत घालवू लागले. तिथेच कवितारचनेचा छंद जडला. शीघ्रकवित्व व समयसूचकता ह्या गुणांचे ह्यांना वरदान होते. तमासगिरांसाठी हे लावण्या रचून देत. पुढे ह्या कलेच्या जोरावर ह्यांनी आपला तमाशाचा फड निर्माण केला आणि राजरोस रीतीने लावण्या रचून त्या म्हणण्याचा किंवा म्हणविण्याचा उद्योग करून ह्यांनी चरितार्थाची सोय केली. ह्या कामातील त्यांचे मुख्य साथीदार मलकफंदी, रतनफंदी व राघवफंदी असे तिघेजण असत, असे त्यांच्या लावण्यांवरून दिसते. ह्या तिघांच्या सहवासामुळे लोक अनंतालाही फंदी म्हणू लागले असावे.

आपल्या उमेदीत फंदीबोवांनी निरनिराळ्या प्रांतांत अनेक वेळा मुलुखगिऱ्या केल्या व उमाप पैसा जोडला. प्रौढ वयात वयोमानानुरूप त्यांनी शृंगारिक ग्राम्य लावण्या रचण्याचे टाकून देऊन आपली वाणी परमार्थाकडे वळविली व कीर्तनकाराचा पेशा स्वीकारला. हा पेशा त्यांनी अहिल्याबाई होळकर हिच्या उपदेशावरून स्वीकारला अशी आख्यायिका आहे. उत्तरवयात पुणे प्रांतात ह्यांचा अत्यंत बोलबाला झाला. अनंतफंदी पुण्यास प्रथम केव्हा आले हे कळण्यास मार्ग नाही. परंतु इ. स. १७९५ मध्ये खर्ड्याच्या स्वारीच्या वेळी पुण्यास त्यांचे वास्तव्य असून दरबारात त्यांचा परामर्श घेण्यात आला होता हे नक्की. कारण *खर्ड्याच्या लढाईवरील* पोवाड्याच्या शेवटी असा स्पष्ट उल्लेख केलेला आहे की 'फंदी अनंत कटिबंध छंद ललकारी श्रीमंतांचे दरबारी'. सवाई माधवरावानंतर रावबाजींच्या कारकीर्दीत तर अनंतफंदींचा फारच गौरव झाला. खुद्द बाजीरावाची त्यांच्यावर बहाल मर्जी बसून गेली, इतकी की आपल्या पत्रव्यवहारावरून स्वतःच्या राज्यारोहणाच्या राजकारणाची सर्व हकीकत लिहून देऊन त्याने फंदीबोवांकडून *माधवनिधन* काव्य लिहून घेवविले.

शाहीर होनाजी बाळाने फंदीबोवांना "फंदी अनंत कवनाचा सागर । अजिंक्य ज्याचा हातखंडा । चमत्कार चहुंकडे चालतो। पृथ्वीवर ज्याचा झेंडा" ह्या शब्दांत गौरविले आहे. त्यावरून ह्यांनी विपुल कवने रचली असावीत असे वाटते. परंतु, आज मात्र उपलब्ध असलेली त्यांची कविता अगदीच अल्प आहे. ह्यांनी कटाव, पोवाडे, लावण्या, फटके, क्वचित श्लोक, आर्या, पदे ही कीर्तनात म्हणण्यासाठी केली. [ ⇨ ३. ] फंदीबोवांना हिंदी भाषा चांगली अवगत होती. ह्यांचा *नाना फडणिसाचा पोवाडा* व काही लावण्या हिंदीत आहेत. *माधवनिधन* ह्या ओवीबद्ध आख्यानाची फंदीबोवांनी दुसरी एक विविधवृत्तात्मक प्रत तयार केली होती. तिचा उपयोग हे कीर्तनाचे प्रसंगी करीत.

अनंतफंदींचे जे काही थोडे पोवाडे उपलब्ध आहेत त्यात *खर्ड्याच्या लढाईवरील* ह्यांचा पोवाडा विशेष वाखाणला जातो. नाना फडणीस, यशवंतराव होळकर, फत्तेसिंग गायकवाड, चिंतामणराव पटवर्धन, बाळासाहेब पटवर्धन इत्यादी ऐतिहासिक पुरुषांवर ह्यांनी पोवाडे रचले आहेत. त्यांत ह्यांनी त्या त्या पुरुषांच्या स्तुतीबरोबरच थोड्याशा व्यंजनेने त्यांच्या दुर्गुणांचे व दुष्कृत्यांचेही दिग्दर्शन केले आहे. उदा., दुसऱ्या बाजीरावाची त्यांनी उडविलेली टर.

फंदीबोवांच्या लावण्या सुमारच आहेत. रचनेचे वैशिष्ट्य त्यांत फारसे आढळत नाही. ह्यांची उपदेशपर कवने किंवा फटके मात्र वैशिष्ट्यपूर्ण आहेत. हे कथा उत्तम करीत असत. कीर्तनाकरिता रचलेल्या ह्या फटक्यांमुळेच कवी म्हणून त्यांची कीर्ती आजपर्यंत टिकून राहिली आहे. ह्या फटक्यांतून साध्या व्यवहारज्ञानाचा उपदेश निर्भीडपणे स्पष्ट शब्दांत केलेला आहे. 'लंडे गुंडे हिरसे तट्टू यांची संगत धरू नको' किंवा 'नरदेहामधि येउनि नर हो साधन ऐसें करा।' हे दोन प्रसिद्ध फटके म्हणजे प्रापंचिकांच्या व्यवहाराचा आदर्श ठरतील. सूक्ष्मावलोकन, व्यवहारचातुर्य आणि त्याचबरोबर व्यक्तिविशेषामुळे आलेला परखडपणा ही ह्यांच्या फटक्यांची वैशिष्ट्ये आहेत. ह्यांचे कवित्व उत्स्फूर्त असून बहुश्रुतता, वक्तृत्व ह्यांमुळे ह्यांची कविता ठसठशीतपणे नजरेत भरते. 'फटका ज्याचा लावी चटका' असे ह्यांच्या फटक्यांचे लक्ष्मणशास्त्री लेले ह्यांनी वर्णन केले आहे.

**रचना : मु.** – १. अनंतफंदीकृत कविता अथवा लावण्या; संग्रा. शाळिग्राम, शं. तु.; भा. १, आ. २ री; पुणे, १८७९. २. ५ लावण्या; अंधारातील लावण्या; संपा. केळकर, य. न.; पुणे, १९५६; पृ. १८९–१९५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : अनंतफंदी; मकच., खं. २; मुंबई, १९१३; पृ. १२२–१४८. २. केळकर, य. न. : तंतकवि तथा शाहीर; पुणे, १९५२; पृ. ५५–६४. ३. फंदी, अ. ग. : शाहीर कवि अनंतफंदी ; मनोहर, फेब्रु. १९६१ ; पृ. २९–३३. ४. वर्दे, श्री. म. : अनंतफंदी ; मराठी कवितेचा उषःकाल किंवा मराठी शाहीर; आ. २ री; मुंबई, १९३०; पृ. ९८–१२३.

**अनंतबोध** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. मुडलगी (गोकाक, कर्नाटक) परंपरेतील पहिले शिवबोध हे ह्यांचे गुरू. गुरुपरंपरा : मुकुंदराज > नृसिंहभारती > जगन्नाथ > सहजबोध > रंगबोध > अद्वयबोध > शिवबोध–१ > अनंतबोध. हे स्वतःस शिवाद्वय असे संबोधून घेत असत. कवीने ह्याच नावाने गुरूचा उल्लेख सर्वत्र केला आहे.

अनंतबोधांचा *वाक्यसुधा* ग्रंथ (शंकराचार्यांच्या *वाक्यसुधेवरील* मराठी टीका) व सहा पदे (सवामं. बा. ५८२; मुद्रण : *इंद्रायणी*, मे १९६३, पृ. ६६–६८) एवढीच रचना आजमितीस उपलब्ध आहे. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या हस्तलिखित ग्रंथसूचीत (क्र. २१, ११८) *वाक्यसुधा* हा ग्रंथ, त्याच्या अखेरच्या समर्पणात 'श्रीमुकुंदराज' असा निर्देश असल्यामुळे सूचीकारांकडून अनवधानाने मुकुंदराजांच्याच नावावर नोंदविला गेला आहे. डॉ. पंडित आवळीकर ह्यांनी उजेडात आणलेल्या मुडलगी मठातील मुकुंदराजपरंपरा लक्षात घेता ह्या ग्रंथाचा कर्ता त्याच परंपरेतील शिवबोधशिष्य अनंतबोध हा असल्याचे रा. चिं. ढेरे ह्यांनी दाखवून दिले आहे. ग्रंथाच्या अखेरच्या ओवीचा ते ह्या संदर्भात आधार देतात : "आतां श्री वासुदेव परात्पर निरतिशय । जो का सच्चित्सुख शिवाद्वय । तयें बोधीं रंगोनि तन्मय । **अनंतबोध** ॥ १०३१॥". ह्या टीकेची ओवीसंख्या १०३१ आहे. ग्रंथ मराठी संशोधन मंडळातही उपलब्ध आहे (हवना., पृ. ५–६).

उपलब्ध सहा पदांपैकी गणेशवंदनाचे एक पद सोडले तर इतर पाचही पदांची रचना रूपकात्मक असून त्यांवर अद्वयबोधांच्या रचनेचा ठसा उमटलेला दिसतो. नमुन्यादाखल पदातील काही पंक्ती पाहाव्या : "देह जाणावें हें क्षेत्र पंढरी। आत्मा विठ्ठल हा तेथे राज्य करी ॥ १ ॥ शुद्ध शांति तेचि रखुमाई नारी। दया क्षमा आदि गोपी सुंदरी ॥ २॥ बाप पांडुरंग स्वामी शिवाद्वय। तोडी भक्तांचें जो सर्व भवभय ॥ ६ ॥ पूर्ण कृपाळू जे साधकाची माय। सहज अनंतबोधासी लावी सोय ॥ ७ ॥"

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : अनंतबोध; मुडलगीचे स्वामी; पुणे, १९७१; पृ. ५२. २. ढेरे, रा. चिं.: अनंतबोधांची कविता; इंद्रायणी, मे १९६३; पृ. ६३–६८.

० **अनंतभट** – पहा **अनंत–२**.

० **अनंतमुनी** – पहा **आनेराज व्यास**.

० **अनंतमुनी कारंजकर** – पहा **आएमुनी कारंजकर**.

० **अनंतमुनी चोरयाचक** – पहा **मल्ले चोरयाचक**.

**अनंतमुनी (तळेगावकर)** / ० **रुक्मिणीसुत अनंत** [अंदाजे इ. स. १७ व्या शतकाचा उत्तरार्ध व १८ व्या शतकाची सुरुवात]. महानुभाव कवी. श्रीकृष्ण-बाळक्रीडेवर रचना करणाऱ्या ह्या कवीची नोंद *महाराष्ट्र-सारस्वतकार* वि. ल. भावे ह्यांच्या सूचीत व य. खु. देशपांडे ह्यांच्या *महानुभावीय मराठी वाङ्मय* ह्या पुस्तकात नाही. कवीने स्वतःच पुरविलेल्या माहितीवरून हे पारमांडल्य आम्नायाच्या तळेगावकर शाखेतील आहेत असे स्पष्ट होते. ह्यांच्या ग्रंथातील 'आता सर्वभावी। नमू गोपीनाथा। त्रयोदश शते। देईजे जो।' ह्या ओवीवरून गोपीनाथ ह्यांचा गुरू होता किंवा काय हे नीटसे समजत नाही. कारण गोपीनाथ हे कृष्णाचेही एक नाव आहे. ग्रंथकाराने आपल्या गुरुपरंपरेची सविस्तर माहिती दिलेली नाही. *पारिमांडल्य आम्नाय*

*मंजरी* (*महानुभाव* मासिक, जून–जुलै १९६९) किंवा *अन्वयस्थळांत* ह्यांचा नामोल्लेख नाही. कदाचित ग्रंथकाराचे नाव इतरांना फारसे माहीत नसावे. ग्रंथाची समाप्ती कार्तिक शु. ५ श. १६२८ / इ. स. १७०६ मधील आहे. त्यावरून कवीचा काळ निश्चितपणे समजत असला तरी 'तडाग संवज्ञा । पुर नाम' ह्या ग्रंथांतर्गत निर्देशावरून त्याच्या ठिकाणाचा बोध होत नाही. तळेगाव (जि. उमरावती) हे ते स्थळ असावे असे अनुमान करण्यात येते.

रुक्मिणीसुत अनंतांनी १३१५ ओव्यांत श्रीकृष्णचरित्रपर *बाळक्रीडा* मोठ्या भक्तिभावाने गायिली आहे. ह्या अनंतमुनींच्या अगोदर प्रस्तुत विषयावर मुरारीमल्ल, एल्हणसुत विद्वांस, आएमुनी कारंजकर इत्यादी अनेक कवींनी रचना केली होती. त्याही अगोदरचे दामोदर पंडितांचे *वछाहरण* इत्यादी अनेक ग्रंथांपासून स्फूर्ती घेऊन कवीने हा ग्रंथ रचला असावा. कवीच्या ग्रंथाची प्रत महंत गोपीराज ग्रंथालयात (रिद्धपूर) उपलब्ध आहे.

म. रा. जोशी

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : अनंतमुनीकृत बाळक्रीडा; गंगाजळी; पुणे, १९७२; पृ. ९१–९२.

**अनंतमुनी लासूरकर** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – १. श्रीकृष्णविजय; अ. ३६; ओ. सं. ४३००; २. गीतातात्पर्यार्थ श्लोक; ममग्रंककासू., पृ. १.

**अनंतमुनी शिवराज** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – रुक्मिणीस्वयंवर; ओ. सं. २१८; माहूर मठ हस्त. सं.

**अनंतमूर्ति** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रामवनागमन ओव्या; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अनंतमौनी / ० अनंत गोसावी मनेरगुडीकर / ० अनंतस्वामी** [? – समा. श. १६१५, भाद्र. वद्य ९ / इ. स. १६९३] कवी. हे समर्थांचे शिष्य होते. तंजावर प्रांतात मन्नारगुडी येथे अनंतमौनी व त्यांचे शिष्य मेरुस्वामी ह्यांचा मठ आजही पाहण्यास सापडतो. हे अत्रिगोत्री देशस्थ ब्राह्मण, वेदान्तवक्ते व षट्शास्त्रज्ञ होते. मेरुस्वामींची व ह्यांची गाठ पडल्यानंतर मेरुस्वामींस आपल्याजवळ ठेवून घेऊन अनंतस्वामींनी त्यांना संप्रदायाची दीक्षा देऊन चांगला बोध केला. ह्यानंतर मन्नारगुडीस मठस्थापना केली. श. १६१५ च्या भाद्रपद वद्य नवमीस ह्यांनी मन्नारगुडी येथे समाधी घेतली. ह्यांची शिष्यपरंपरा अनंतमौनी > मेरुस्वामी > सेतुराम अशी आहे. अनंतमौनींची रचना अध्यात्मपर आहे. ती अप्रकाशित असून तंजावर सरस्वती महाल ग्रंथालयात आढळते.

**रचना : अमु.** – १. पंचीकरण (ओवीबद्ध); २. भगवद्गीता; अ. ४; ओ. सं. ८४०; ३. महावाक्यविवरण (गद्य); ४. पदे, श्लोक इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २, ३.

**० अनंतमौनी मेरु** – पहा **मेरुस्वामी.**

**० अनंत राघवदासी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदे, श्लोक, आरत्या इत्यादी; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० अनंतराज व्यास** – पहा **आनेराज व्यास.**

**अनंत रामचंद्र बडवे** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध] कवी. श्रीज्ञानेश्वरांच्या *अमृतानुभवाचे* संस्कृतात रूपांतर करणारे प्रल्हाद शिवाजी बडवे ह्यांचे हे नातू. वास्तव्य पंढरपूर. प्रल्हादबुवांचे गुरुबंधू गोपाळ, हे ह्यांचे गुरू. त्यांच्यावर *गोपाळाष्टक* नावाचे गुरुस्तवनपर कवन ह्यांनी रचले आहे. आपल्या आजोबांपासून ह्यांनी कवित्वशक्ती उचललेली दिसते.

**रचना : अम.** – १. प्रदोषमाहात्म्य; ओ. सं. ७५; २. भरताख्यान; ओ. सं. १०२; (भागवतातील ब्रह्मोत्तर खंडाच्या आधारे); ३. मल्लारिमाहात्म्य; ओ. सं. १३८; ४. शिवरात्रीमाहात्म्य; ओ. सं. ७३. ५. पदपदांतरे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : अनंत बडवे; मकच., भा. १ ; मुंबई १९०७; प्रआ., पृ. ३१५–३१६.

**अनंत शिवसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – ओवीबद्ध श्रीकृष्णकथा; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अनंतशिष्य** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – गजगौरीवोवसा; श्लो. सं. ४६; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अनंतश्यामसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – यारिदीचरित्र; श्लो. सं. १४१; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अनंतसुत–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. मार्कंडेय चरित्र; श्लो. सं. ४२; सवामं. हस्त. सू., खं. २. २. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**० अनंतसुत–२** – पहा **अनंतसुत मुद्गल.**

**अनंतसुत–३** [का. अनु.] रामदासी कवी. डोमगाव मठातील संग्रहात ह्यांची काही कविता आढळते. त्यापैकी एक *श्लोकबद्ध पत्र* (२७) आहे. हरीने आपल्यावर कृपा करावी असा या पत्राचा भाव आहे. – शं. श्री. देव; रासं., खं. १; धुळे, १९३३; बा. ७४, पृ. १२८.

**अनंतसुत–४** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – गौरीरमण-त्रिपुरारीची आरती; मआ., पृ. २९.

**अनंतसुत–५** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रुक्मिणीस्वयंवर; भाइसंमंतृसंवृ., पृ. १०२–१०३.

**अनंतसुत–६** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – काळेयामर्दन; भाइसंमंतृसंवृ., पृ. १०२–१०३.

**अनंतसुत तुकदेव /० संत पुरोहित** [अंदाजे श. १६४८ / इ.स.१७२६] कवी. अथर्ववेदी, कौशिकगोत्री ब्राह्मण. गुरुपरंपरा : पुरुषोत्तम > विनायक > अनंत > तुकदेव. हीच ह्यांची वंशपरंपराही आहे. पाबळ (जि. पुणे) येथे *स्वात्मानुभवतरंगिणी* ह्या ग्रंथाची कवीने स्वहस्ते लिहिलेली संपूर्ण पोथी उपलब्ध झाली आहे. कवी तंजावरकडील असावा असे ग्रंथरचनास्थळावरून म्हणता येते.

ह्यांनी लिहिलेला *स्वात्मानुभवतरंगिणी* ग्रंथ वेदान्तपर असून तो श्रीशंकराचार्यकृत *अपरोक्षानुभूतीच्या* आधारे रचला आहे. त्याचे सात तरंग व ८६१ ओव्या आहेत. कवी सांगतो : ग्रंथाचा आरंभ श्रीरंगपट्टणी करून 'हरापुरनामे भास्कर क्षेत्री' ग्रंथाची समाप्ती केली. पोथीच्या अखेरीस 'स्वस्ति श्री शक १६४८ वर्षे पराभव संवत्सरे चैत्र शुद्ध ५ इंदुवासरे अथर्वणवेदिना तुकदेवेन लिखितमिदं पुस्तकं शुभं भवतु ॥' असा उल्लेख येतो. ग्रंथाचे हस्तलिखित भारत इतिहास संशोधक मंडळाकडे आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पटवर्धन, पां. न. : अनंतसुत संत पुरोहित तुकदेव; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. १६१–१६३.

**० अनंतसुत त्र्यंबक–१** – पहा **अनंततनय–२.**

**अनंतसुतप्रभु (गिरिधरनागर)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त., सू., खं. १.

**अनंतसुत मुद्गल / ० अनंतसुत–२ / ० अनंतात्मज–२ / ० आनंदसुत मुद्गल** [ ? – समा. श. १५२० / इ. स. १५९८] कवी. सूचीकार गो. का. चांदोरकरांनी महिपतीबोवांच्या सांगण्याप्रमाणे हे नाथांपूर्वी एक वर्ष समाधिस्थ झाले असे सांगून ह्यांचा समाधि-

शक १५२० दिला आहे. कवीच्या नावावर *कालियामर्दन, रामायण* व *रुक्मिणीस्वयंवर* अशा तीन ग्रंथांचा सूचीत निर्देश केला आहे (संककासू., पृ. ५). सतरा-श्लोकी *रुक्मिणीस्वयंवर* हे काव्य *लघुकाव्यमाले*च्या २ ऱ्या खंडात छापले आहे (पृ. २८–३१). त्यात कवी 'आनंतूसुत मुद्गलू' असा स्वतःचा उल्लेख करतो. ह्याच खंडात छापलेली *विठ्ठलस्तुति* (श्लो. सं. ७, पृ. ११०–१११) रचणारा अनंतात्मज हा अनंतसुत मुद्गल असावा असे मत *लघुकाव्यमाले*चे संपा. वा. दा. ओक ह्यांनी व्यक्त केले आहे (पृ. २८, तळटीप ४). *कालियामर्दन* हे काव्यही स्वतंत्र छापलेले आहे असे चांदोरकर म्हणतात; कुठे, ह्याचा मात्र निर्देश करीत नाहीत. अनंतसुत मुद्गलाच्या नावावरील *रामायण* हे कृष्णदास मुद्गलाचे असेल असे त्यांना वाटते. तेव्हा हेच कृष्णदास मुद्गल की काय अशी त्यांनी शंका व्यक्त केली आहे.

**० अनंतसुत राम** – पहा **केशिराजदास–१.**

**अनंतसुत विठ्ठल–१** [अंदाजे इ. स. चे सतरावे शतक] कवी.

**रचना : अमु.** – १. गजगौरीव्रत, २. गरुडहनुमंतभेट, ३. ताटकावध, ४. वस्त्रहरण (र. का. : श. १५९४), ५. सुधन्वाख्यान, अशी आख्यानपर प्रकरणे; गं. ना. मुजुमदार संग्रह व गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ५.

**अनंतसुत विठ्ठल–२ / ० विठ्ठल अनंतसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. कालियामर्दन; ओ. सं. ४०. २. सद्गुरुस्तवन, अपूर्ण; ग्रं. सं. १५६; तंसम. हस्त यादी, क्र. १, २.

**अनंतसुत शंकर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदे; संककासू., पृ. ५.

**अनंतसूरि** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. कवीच्या कवितेची हस्तलिखित वही राजवाडे संशोधन मंदिर, धुळे येथे आहे. हे स्वतःला एकनाथांचा शिष्य म्हणवितात. पण हे एकनाथकालीन नाहीत एवढे निश्चित. ह्यांनी रचलेल्या *शंकरस्तुती*वर पंतांच्या *केकावली*ची छाप पडलेली दिसते. ह्यावरून मोरोपंतकालात किंवा त्यानंतर लागलीच हे होऊन गेले असावेत. ह्यांनी रचलेली स्फुट कविता बरीच आहे. तिच्यात १५९ अभंग, ४१ हिंदी पदे, १२ मराठी पदे व एक संस्कृत पद अशी रचना व अनेकवृत्तात्मक श्लोकबद्ध प्रकरणे अशी कविता प्रामुख्याने आढळते. त्यांत *नाथचरित्र, राधाभुजंग, कालियामर्दन, मनोबोध, चिरंजीव पत्र* अशी कितीतरी आख्याने दिसतात. अनंतसूरि प्रसिद्ध नसल्याने हे संत होते किंवा नाही ते सांगता येत नाही. पण हे पूर्ण भाविक होते असे ह्यांची रचना पाहून निश्चितपणे म्हणता येते. ह्यांच्या रचनेत ऱ्हस्वदीर्घांची ओढाताण व उर्दू शब्दांचा भरणा बराच आढळतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, मो. रा.; अनंतसूरि : एक अज्ञात कवी; संशोधक, व. १९, १–२; धुळे, १९५०; पृ. १७४–१७६.

**० अनंत सोनार** – पहा **अंतु.**

**० अनंतस्वामी** – पहा **अनंतमौनी.**

**अनंतात्मज–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. चेंडुफळी; २. विठ्ठलस्तुति; भाइसंमंतूसंवृ., पृ. १०२–१०३.

**० अनंतात्मज–२** – पहा **अनंतसुत मुद्गल.**

**० अनंतात्मज त्र्यंबक** – पहा **अनंततनय–२.**

**अनंतानंदतीर्थ** [का. अनु.] ग्रंथकार. गुरू : पूर्णानंद.

**रचना : अमु.** – १. महावाक्योपदेश; ओ. सं. ९०; २. स्वात्मानुभवप्रकाश; ओ. सं. ७६; मसमं., हवना., पृ. ६.

**अनंतानुचर** [अंदाजे इ. स. च्या १७ व्या शतकाची अखेर व १८ व्या शतकाचा प्रथम पाद] गद्यलेखक. *सुगमबोध* ह्या गद्य वेदान्तपर प्रकरणाचा कर्ता. प्रस्तुत ग्रंथाच्या पोथीत लेखकाचे मूळ नाव, ग्रंथरचनाकाल किंवा प्रतलेखनकाल ह्याविषयी काहीच माहिती आढळत नाही. समाप्तिलेखात आपण समर्थसंप्रदायी असल्याचा निर्देश लेखक करतो. गुरूचे अनंत असे नाव तो सांगतो. अनंतानुचरांच्या ह्या ग्रंथाचे संपादन डॉ. श्री. रं. कुळकर्णी ह्यांनी केले आहे. त्यांच्या मते कवीचे गुरू अनंत म्हणजे दक्षिणेतील मन्यारगुडी येथील रामदासी मठाचे अधिपती अनंतमौनी हेच असावेत. अनंतमौनीचे शिष्य मेरुस्वामी ह्यांच्या *रामसोहळा* ग्रंथातील विवेचनाचे अनंतानुचरांच्या *सुगमबोध* ग्रंथातील विवेचनाशी विशेष साम्य आढळते. ह्यावरून मेरुस्वामींनीच अनंतानुचर नावाने हा ग्रंथ रचला असावा असे अनुमानही डॉ. कुळकर्णी करतात.

*सुगमबोधात* 'तत्त्वमसि' ह्या त्रिपदात्मक महावाक्याचे विवरण व त्या अनुषंगाने पंचीकरणाचे तत्त्वज्ञान विशद करून सांगितले आहे. ब्रह्मात्मैक्याच्या उपदेशावर त्यात भर आहे. लेखक मुळातले आधार सोडून बोलत नाही; त्यातल्या त्यात उपनिषदे व आद्य शंकराचार्यांचे स्फुट ग्रंथ ह्यांवर लेखकाचा जास्त भर आहे. हा गहन विषय सहज समजेल अशा भाषेत, फारसा विस्तार न करता, सांगण्याचे कौशल्य लेखकाच्या लेखणीत आहे. संस्कृत ग्रंथांच्या अध्ययनाच्या प्रभावाने कित्येकदा भाषा संस्कृतप्रचुर झाली आहे. तरीही १७ व्या शतकातल्या वैशिष्ट्यपूर्ण मराठीचे दर्शन *सुगमबोधात* घडते. ग्रंथाची एकमेव हस्तलिखित प्रत उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद येथील ग्रंथसंग्रहात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कुळकर्णी, श्री. रं.; अनंतानुचरविरचित सुगमबोध; हैद्राबाद, १९७१; पृ. १–१२.

**अनन्यदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बोधपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अनाजी रंगनाथ मलकरे** [इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] बखरकार. शिवछत्रपतींच्या *एक्याण्णवकलमी बखरी*चा कर्ता म्हणून दत्ताजी त्रिमल वाकेनवीस ह्यांच्याबरोबर ह्यांचाही उल्लेख होतो (मसा., आ. ५, पृ. ९७४). शिवाजीने पुरंधर गड घेतल्यावर त्या गडावर अनाजी रंगनाथ मलकरे ह्यांस सवनीस नेमले. पुढे ते सेनापतीकडील मुजुमदार झाले. शिवाजीच्या राजकारणातील ही एक महत्त्वाची व्यक्ती होती. *एक्याण्णवकलमी बखरी*तील मजकूर हा दत्ताजी त्रिमल वाकेनवीसाने लिहिलेल्या मजकुराची अनाजी रंगनाथ मलकरे ह्यांचे पुत्र खंडो अनाजी मलकरे ह्यांनी केलेली नक्कल होय, असा मजकूर बखरीच्या शेवटी आढळतो. त्यावरून कथा दत्ताजीपंत वाकेनवीस ह्यांनी तपशीलवार लिहिली हे स्पष्ट होते. बखरीचा मूळ कर्ता दत्ताजी त्रिमल होय असे डॉ. र. वि. हेरवाडकर म्हणतात (मब., प्र. आ., पृ. ५६–५७). शिवकालीन राजकारणाचा साक्षात परिचय असलेल्या लेखकाने ही बखर लिहिली म्हणून ती ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाची होय. 'वाकेनिशी बखर' ह्या नावानेच ती प्रसिद्ध आहे. [ ⇨ ३. ] हिचे प्रथम मुद्रण *अरुणोदय* पत्रात व नंतर *भारतवर्ष* मासिकातून झाले.

**अनाथ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अनाथ शिवरामाचा किंकर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अनादिचिद्घन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**अनुचर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदे, आरत्या; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० अनोवास** – पहा **आनेराज व्यास.**

**अंबरनाथ** [अंदाजे इ. स. १५९९ नंतर] कवी. कायस्थ. कऱ्हाडजवळील कुंभारगाव येथील राहणारे. अमणापुरी येथे ह्यांचा मठ होता. हे चैतन्यसंप्रदायातील. काळ एकनाथांनंतरचा. ह्यांनी जिवंत समाधी

घेतली. पदांच्या विषयांवरून हे विठ्ठलभक्त असावेत असे वाटते (संककासू., पृ. ८).

**रचना : मु.** – अर्जुनगर्वपरिहाराख्यान; ग्रं. सं. २०; अकलकामा., भा. ४; संपा. : केळकर, ना. चिं. व ओक, दा. के.; मुंबई, १९०३; पृ. ७६–७८. **अमु.** – १. गुरुशिष्यसंवाद, ग्रं. सं. ११ (अकलकामा., भा. ४, पृ. ७६ तळटीप); २. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**० अंबरहुसेन** – पहा **हुसेन अंबरखान.**

**आंबाई / ० आंबाई** [का. अनु.] कवयित्री.

**रचना : अमु.** – अभंग व पदे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**अंबाजी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे : कृष्णपर, बोधपर, शारदापर पदे व लावणी; तंसम. हस्त. यादी, क्र. ३, सवामं. हस्त. सू., खं. १.

**अंबाजी पंडित** [अंदाजे इ. स. १८२६] कवी. भागवतावर रचना करणारा हा कवी तंजावरच्या प्रतापसिंहपुत्र तुळजाराजे ह्यांचा आश्रित होता. महाभारतावर रचना करणारे माधवस्वामी हे ह्या कवीचे पितामह म्हणजे आईचे वडील. 'अंबिका ज्याचें कुलदैवत। म्हणोनि नाम अंबाजी पंडित ॥' असे आपल्या नामाभिधानाचे कारण कवीने दिले आहे. कवीचे वडील तंजावरजवळील तिमगुडीस राहात असत. श्रीसमर्थसंप्रदायी कोनूरमठाधिपती राघवदास हे ह्यांचे गुरू.

ह्या कवीने माधवस्वामींचे नातू कृष्णतनय (वासुदेव पंडित, कवीचे मामेभाऊ) ह्यांच्या मदतीने *भागवत अष्टमस्कंध* रचला. वासुदेवांनी अध्याय १–६ रचले आणि अंबाजी पंडितांनी ७ ते २४ अध्यायांची रचना केली (ओ. सं. सुमारे १२००).

**रचना : अमु.** – भागवत अष्टमस्कंध; अ. १–२४; ग्रं. सं. २४००; र. का. : श. १७४८ / इ. स. १८२६; तंसम., बा. १४३८, हस्त. यादी, क्र. २.

**अंबादास–१ / ० दास–४** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – 'महालक्ष्मीचे चरित्र – म्हाळसेचे लग्न'; श्लो. सं. १९०; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अंबाबाई / ० अंबिकाबाई / ० अंबी** [इ. स. चे १७ वे शतक] कवयित्री. समर्थरामदास-शिष्या. रामदासी संशोधकांनी वाळवे मठाची जी परंपरा सांगितली आहे (सवामं., बा. १७५३) ती लक्षात घेता अंबिकाबाई ह्या त्या मठाच्या मुख्याधिकारी होत्या असे दिसते. पण *समर्थप्रतापा*वरून पाहता अंबिकाबाई मूळच्या विजापूरकडच्या असून पुढील काळात त्या करवीर प्रांती मठ करून राहिल्या अशी माहिती मिळते. बाईंचा मठ कोल्हापूर जिल्ह्यात राशिवड्यास आहे. तेथे त्यांची कविता मात्र उपलब्ध होत नाही. 'मी सद्गुरुघरची सैरी शोभत्ये बरी' हे त्यांचे एक पद (कडवी ५) श. १८३३ च्या भारत इतिहास संशोधक मंडळाच्या इतिवृत्तात (पृ. ९४) मुद्रित झाले, आहे. त्यातील शेवटच्या दोन पंक्ती अशा : "रामदासाश्रय म्या केला। म्हणउनि विलास सर्व हि जाला । अंबी न विसरे गुरुपदाला । प्रतिज्ञा खरी ॥ ५ ॥" बाईंनी रचलेली पदे समर्थवाग्देवतामंदिर, धुळे, येथील संग्रहातील हस्तलिखित बाडांत आढळतात.

**० अंबिकाबाई** – पहा **अंबाबाई.**

**० अंबी** – पहा **अंबाबाई.**

**अंबुदास (संन्यासी)** [का. अनु.] पदकार. ह्यांनी मराठीत पदरचना केली असून संस्कृतातही *भक्तिज्ञानवैराग्यनिरूपण* नावाचे एक प्रकरण रचले आहे (संककासू., पृ. ८, १२३).

**अब्दुल** [का. अनु.] मुसलमान कवी. हा कागवाडचा (जि. सांगली) राहणारा. ह्याने मराठी रिवायतींची म्हणजे मोहरमच्या सणात म्हणावयाच्या गीतांची रचना केली आहे. एकंदरीत रिवायतींचा विषय महंमद पैगंबरांचे नातू हसन–हुसेन व त्यांचे यजिदाशी युद्ध हा असला, तरी त्यांच्यावर हिंदू संस्कृतीचा व धर्माचा प्रभाव मोठ्या प्रमाणात दिसतो. यजिदाच्या बाणाने तहानलेल्या हुसेनाचा प्राण घेतल्यावर त्याच्या मातेने जो शोक केला त्याचे हृदयद्रावक वर्णन अब्दुलने केले आहे. ह्याची रचना खास शाहिरी पठडीतील दिसते (रा. चिं. ढेरे; मुमसंक.; पुणे, १९६७; पृ. १७८–७९).

**अभयकीर्ती** [अंदाजे इ. स. १६१६] जैन कवी. गुरू : अजितकीर्ती. ह्यांची परंपरा श्रीमूलसंघातील 'बलात्कारगणाची'. अनंतचतुर्दशीच्या दिवशी अनंतव्रत करण्याचा प्रघात हिंदूंप्रमाणे जैनांतही आहे. त्या व्रताचा विधी व कथा अभयकीर्तीने त्याच्या *अनंतव्रतकथा* ह्या ग्रंथात सांगितली आहे. ह्यासंबंधी कवी लिहितो : "मग माझा जन्मु सफल जाले । अजितकीर्ति भेटले । भवसागरीं तारिले ॥ २४२ ॥ संवत्सरु पंधरासे अडतिसु । ग्रंथ केला श्रावण मास । ग्रंथु केला सोत्तर जाला संस । दिन शुक्रवार ॥ २५२ ॥ दीवसि चांदने तिथ पंचमिचि । कथा संपली अनंताची । भावना पुरली भक्ताची । म्हणे अभयकीर्ति ॥ २५३ ॥" ग्रंथाच्या ओव्या २५५ असून र. का. श. १५३८ असा आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : अभयकीर्ती; प्रामजैसा., नागपूर-पुणे, १९६८; पृ. ४३–४४.

**अमरदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अमरनाथ** [अंदाजे इ. स. चे १३ वे शतक, उत्तरार्ध] नाथपंथीय ग्रंथकार. गोरक्षनाथशिष्य. हे गहिनीनाथांचे गुरुबंधू असे म्हटले जाते. रा. चिं. ढेरे ह्यांनी महाराष्ट्रीय नाथपरंपरेचा एक आलेख दिला असून त्यात गहिनीनाथ व अमरनाथ हे गोरक्षनाथांचे शिष्य म्हणून दर्शविले आहेत. परंतु डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी ह्यांनी नाथसंप्रदायाच्या ज्या अनेक परंपरा दिल्या आहेत, त्यांत कोठेच अमरनाथांचे नाव नाही, फक्त एके ठिकाणी अमरनाथांची उपशाखा असल्याचे ते नमूद करतात. अमरनाथांशी संबंधित अशी एकही महाराष्ट्रीय परंपरा सापडत नाही. त्यामुळे ग्रंथकर्त्याच्या काळाचा अंदाज लागत नाही. *गोरक्ष-अमर-संवाद* ऊर्फ *विवेकदर्पण* ह्या अमरनाथाच्या ग्रंथातील भाषेच्या मोडणीवरून ग्रंथकार इ. स. च्या १३ व्या शतकाच्या उत्तरकालात होऊन गेला असावा असे दिसते.

ह्या ग्रंथाची त्रुटित प्रत राजवाडे संशोधन मंदिर, धुळे येथे असून गो. का. चांदोरकरांनी प्रथम ह्या ग्रंथावर परिचयात्मक टिपण लिहिले (भाइसमंइति., श. १८३७, पृ. ३२–३६). ह्या ग्रंथाची '*भक्तिरत्नावली* ऊर्फ *अमरनाथ-संवाद*, कर्ता गोरक्षनाथ' अशी नोंद सापडल्याने गोरक्षनाथास ग्रंथकर्ता असे समजण्यात आले. पुढे म. रा. जोशी ह्यांनी हा त्रुटित ग्रंथ प्रस्तावनेसह छापला (विसमंवा., १९६९, पृ. १६०–१७४). ते म्हणतात की, ग्रंथस्वरूपावरून ह्याची रचना अमरनाथांनी केली असे दिसते. आपल्या 'गोरक्षगुरूचा उपदेश ग्रंथात समाविष्ट करून हा ग्रंथ' अमरनाथांनी शिष्यांना दिला असावा.

अलिकडेच प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांना प्रस्तुत ग्रंथाची संपूर्ण प्रत मिळाल्याने काही शंका दूर झाल्या आहेत. हा ग्रंथ प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांनी प्रसिद्धही केला आहे (मस्वासंप., १९७१, पृ. ८९–१२८). ह्या ग्रंथाची प्रत महंत गोपीराज महानुभाव ग्रंथालय, रिद्धपूर येथून प्राप्त झाली असून हा नाथसंप्रदायी ग्रंथ महानुभाव सांकेतिक लिपीत लिहिलेला आहे. ग्रंथसमाप्तिलेखात 'इती श्री गोरक्षनाथवचनीं आमरनाथ कथयेंती वीवेक दर्पण ग्रंथु संपूर्ण सुभंभवतु : ॥' असा निर्देश असल्याने *गोरक्ष-अमर-संवाद* ह्या नावाने ज्ञात असलेल्या ह्या ग्रंथाचे नाव *विवेकदर्पण* हे निश्चित होते. ह्या ग्रंथावर महानुभावी संस्करण झाले असल्याचे स्पष्टपणे दिसते. कित्येकदा ग्रंथातील परिभाषा नाथसंप्रदायाशी विसंगत आहे असेही दिसून येते.

त्यामुळे प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांनी संपादनाकरिता आधारास घेतलेली ही प्रत अस्सल व विश्वसनीय मानता येणार नाही, असे मत प्रा. म. रा. जोशी व्यक्त करतात (*'गोरक्ष-अमरनाथ-संवाद* ग्रंथाचा कर्ता, अमरनाथ होय', मसाप.; जाने.–फेब्रु.–मार्च १९७५, पृ. ८३–८६).

नाथसंप्रदायाचे स्वरूप, साधन, तत्त्वविचार ह्यांचे निरूपण करण्याच्या उद्देशाने ग्रंथाची रचना झाली आहे. हा ग्रंथ गद्य असून ग्रंथाची एकूण प्रकरणे २१ आहेत. गुरुशिष्यसंवादरूपी पारंपरिक पद्धतीने ग्रंथ लिहिला आहे. बांधणी सूत्रात्मक शैलीत केली आहे. ग्रंथातील आत्मज्ञान, सायुज्यतालक्षण, राजयोगलक्षण, ज्ञानविवेकु इत्यादी प्रकरणांतून योग, कर्म, ज्ञान ह्यांचे विवेचन येते. वेदान्ताप्रमाणे वैशेषिक, न्याय, मीमांसाभास्कर, पातंजलदर्शनविचार, योगशास्त्रातील नाड्या, कुंडलिनी, पंचप्राण ह्यांचेही विवरण केलेले आहे. संज्ञांनी सूत्रमय व्याख्या, संक्षेपाने प्रतिपाद्य विषयाची उकल, अनेक संस्कृत ग्रंथांचे आधार घेऊन सुबोध मराठीत केलेले प्रतिपादन, सुटसुटीत वाक्यरचना व प्रसन्न शैली हे ह्या ग्रंथाचे विशेष आहेत. सामान्य साधकासाठी क्लिष्ट आणि दुर्गम असे अद्वैततत्त्वज्ञान लेखकाने सोपे करून सांगितले आहे. प्राचीन मराठी गद्याच्या उज्ज्वल परंपरेत या *विवेकदर्पण* ग्रंथाने मोलाची भर घातली आहे. नाथसंप्रदायासंबंधी स्वतंत्रपणे विवेचन करणारा हा ग्रंथ महत्त्वपूर्ण आहे, असे या ग्रंथासंबंधीचे मत डॉ. श्री. रं. कुळकर्णी ह्यांनी व्यक्त केले आहे (*प्राचीन मराठी गद्य : प्रेरणा आणि परंपरा*, पृ. २१).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, व. दा. : नाथपरंपरेतील गद्य ग्रंथ : विवेक-दर्पण; मस्वासंप., हैद्राबाद, १९७१, पृ. १४–२६, ८५–८८. २. ढेरे, रा. चिं. : अमरनाथ; गोचप., पुणे, १९५९, पृ. १३६–३८, १८४–८५.

**अमृत–१** [का. अनु.] कवी. गुरू : निरंजन.

**रचना : अमु.** – सिद्धान्तबोध; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १२३.

**अमृत–२** [अंदाजे इ. स. १७९५] कवी. गुरू : चिन्मय कृष्ण. त्यांनाच 'गणेशभारती' ह्या नावाने संबोधीत असत.

**रचना : अमु.** – तुरजास्तवराज; र. का. : श. १७१७ / इ. स. १७९५; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ५.

**अमृत–३** – पहा **देवदास–३.**

**अमृत–४** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० अमृत–५** – पहा **अमृतराय.**

**अमृत–६ / ० अमृतानंद–२** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. *संतकविकाव्यसूची*कार ह्यांच्या नावावरील *योगराजतिलक* व *स्वरूपनिर्णय* (ओ. सं. ९५) ह्या दोन ग्रंथांचा उल्लेख करतात (पृ. ७). परंतु अ. का. प्रियोळकरांच्या मते *योगराज-टिळका*चा कर्ता अमृतानंद व *स्वरूपनिर्णय*कार अमृतकवी हे दोघे भिन्न आहेत. अमृतकवीने आपली जी परंपरा ग्रंथात दिली आहे ती श्रीआदिनाथांपासून सुरू होते. नृसिंह > माधवेंद्र > अमृतानंद > गगनेंद्र > माधव > विठ्ठल > अंबिका > अमृत अशी ती आहे. अमृतकवीचे *स्वरूपनिर्णय* प्रकरण (अमु.) समर्थवाग्देवतामंदिरामधील बाडात (क्र. १०७१) संग्रहित केलेले आहे. मुंबई येथील मराठी संशोधन मंडळातही प्रस्तुत ग्रंथाची पोथी उपलब्ध आहे.

**अमृतकवी–१ / ० अमृतेश्वर–१** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. महाभारतावर रचना. मुकुंदराज-परंपरेच्या मुडलगी येथील स्वामी-परंपरेतील रंगबोधांचे हे गुरुबंधू. ह्या कवीची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : आदिनाथ > हरिनाथ > रघुनाथ > मुकुंदराज > नृसिंहभारती > जगन्नाथ > सहजबोध > अमृत. ह्यांनी *उद्योगपर्व* रचले आहे. प्रस्तुत *उद्योगपर्वा*चे हस्तलिखित उज्जयिनी येथील 'सिंदिया ओरिएण्टल इन्स्टिटयूट'च्या पोथीसंग्रहात आहे. ह्या हस्तलिखितासंबंधांत डॉ. स. ल. कात्रे ह्यांनी *चित्रमयजगत्*च्या मे १९४७ च्या अंकात जो एक लेख लिहिला आहे त्यावरून हे *उद्योगपर्व* प्रसिद्ध पदकार अमृतराय ह्यांचे ठरते. परंतु *उद्योगपर्व*कार अमृतकवीने गुरू म्हणून सहजबोधांचा उल्लेख केला आहे. कटावकार अमृतरायांचे गुरू सहजबोध असे ऐकिवात नाही. ह्यावरून रा. चिं. ढेरे म्हणतात, "प्रस्तुत *उद्योगपर्व*कार अमृतकवी, अमृतनामधारी कवींत नव्यानेच ज्ञात होतो आहे, असे मानले पाहिजे."

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : उद्योगपर्वकार अमृतकवी; इंद्रायणी, मे १९६३, पृ. ५८–६०.

**० अमृत कवी–२** – पहा **अमृतराय.**

**अमृतजयानंद / ० अमृतजयो आनंद** [इ. स. चे १७ वे शतक] कवी. *कर्मविपाक* ह्या संस्कृत ग्रंथाचा तर्जुमा आपण केल्याचे हा कवी सांगतो. प्रस्तुत ग्रंथ मुंबईत इ. स. १८९४ मध्ये बा. ल. पाठक ह्यांनी छापून प्रसिद्ध केला होता. त्याच्या २४८ ओव्या असून ग्रंथकर्त्याचे नाव मात्र दिलेले नव्हते. द. वा. पोतदार ह्यांना ह्या ग्रंथाचा शेवटचा निम्माअधिक भाग एका बाडात आढळला. छापील प्रतीत नसलेल्या शेवटच्या ११ ओव्या ह्या बाडात असून कर्त्याचे नाव अमृतजयानंद असे दिलेले आढळते. कवी म्हणतो, "संस्कृताचे महाष्ट्र करितां । काणा मात्रा गेला असेल अवचिता । कर जोडुनी प्रणिपात करितों आतां । हें मज करावें क्षमा ॥ २२५ ॥ हरीहर संवाद । शिव उपदेशी गोविंद । म्हणे अमृत जयानंद । महाष्ट्र करुनियां ॥ २२८ ॥" शं. श्री. देव ह्यांनी ह्याच *कर्मविपाका*ची ओ. सं. २०५५ दिली आहे (सवामं., बा. ३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पोतदार, द. वा. : 'कर्मविपाका'चा कर्ता अमृतजयानंद; भाइसंमंइति., श. १८३४, पृ. ६२–६३.

**० अमृतजयो आनंद** – पहा **अमृतजयानंद.**

**अमृतप्रभु** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अमृतफळे** [का. अनु.] बखरकार. महादजी शिंद्यांचे सेनापती सुभेदार खंडेराव हरि ह्यांचे आतेबंधू रावजी अमृतफळे ह्यांचे हे नातू. ह्यांनी *पानिपतची बखर* लिहिली आहे (कृ. गं. कवचाळे : मभामवा.; इंदूर, १९३९, पृ. ३९).

**अमृत फाजलखां** [इ. स. चे १८ वे शतक, अखेर] शाहीर. हा सगनभाऊचा शिष्य. ह्याने आपल्या गुरूच्या रचनेचे अनुकरण केले आहे. एका लावणीच्या शेवटी तो आपल्या गुरूचा उल्लेख करताना लिहितो : 'अमृत फाजलखां कवि रंगेला । आठवितो हृदयीं सगन भाऊला ॥' (मसा., आ. ५, पृ. ५८४).

**० अमृतराज** – पहा **अमृतराय.**

**अमृतराय / ० अमृत–५ / ० अमृतकवी–२ / ० अमृतराज / ० अमृतेश्वर–३ / ० रायजी** [श. १६२०, बहुधान्य संवत्सर / इ. स. १६९८ – समा. श. १६७५, श्रीमुखनाम संवत्सर, चैत्र शु. ६ / इ. स. १७५२] कवी व कीर्तनकार. 'कटाव' ह्या काव्यप्रकाराचे जनक व प्रवर्तक. बुलढाणा जिल्ह्यातील मेहेकर तालुक्यातील साखरखेडुले किंवा साखरखर्डे (हलीचे फत्तेखर्डे) ह्या गावचे हे रहिवासी. ह्यांच्या वडिलांचे नाव शंकर, आईचे नाव उमा. देशस्थ, आश्वलायनशाखी, ऋग्वेदी ब्राह्मण. अमृतेश्वर शिव व अमृतांबा देवी ही ह्यांची कुलदैवते. प्रसिद्ध संतकवी मध्वमुनीश्वर हे ह्यांचे पहिले मंत्रगुरू. मध्वमुनीश्वरांनी श. १६५३ / इ. स. १७३१ मध्ये समाधी घेतल्यावर ह्यांनी स्वतःस मोक्षज्ञान व्हावे ह्यासाठी सहजानंद परंपरेतले ज्ञानानंद ह्यांस गुरू केले असे सांगण्यात येते. अमृतरायांनी श. १६६६ / इ. स. १७४४ मध्ये संन्यास घेतला व पुढील काल हरिचिंतनात

पूर्णपणे व्यतीत केला. ह्यांनी श. १६७५ मध्ये पैठण येथे चक्रतीर्थी समाधी घेतली.

अमृतराय हे पूर्ववयात औरंगाबाद येथील निजामाचे एक अधिकारी विसा मोरो ह्यांजकडे त्यांचे दप्तरदार म्हणून काम करीत असत. ह्यांनी खूप ऐश्वर्य भोगले. हे स्वभावाने फटकळ, कुचाळखोर व थट्टेखोर होते. एकदा मध्वमुनीश्वर औरंगाबादेस विसा मोरोंकडे आले असता अमृतरायांनी त्यांची थट्टा केली. ती ऐकून, मध्वमुनीश्वरांनी अगदी शांतपणे त्यांस म्हटले : 'बापा, तुला परमेश्वराने अमृतासारखी वाणी दिली आहे, शिवाय आईबापांनीही तुझे नाव अमृतराय असे ठेवले आहे, असे असता त्या वाणीचा तू असा उपयोग करावास हे योग्य नाही. ईश्वरस्तुतीकडे तिचा उपयोग करशील तर त्याच्या कृपेची जोड तुला मिळेल. तुझे जीवित धन्य होईल.' ह्या बोलण्याचा अमृतरायांच्या भावनाप्रधान मनावर तात्काळ परिणाम झाला व त्यांची वृत्ती पालटली. त्यांनी नोकरीचा त्याग केला. ते कीर्तनकार बनले व कीर्तनाला उपयुक्त अशी पद्यरचना करू लागले. एक रसाळ कीर्तनकार व कवनकार म्हणून ह्यांची महाराष्ट्रात फार मोठी ख्याती झाली. कवी मोरोपंत ह्यांनी आपल्या *सन्मणिमालेत* "कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा । भलत्या मुखांतुनि अशी सुरसखनि निघेल काय जी वाचा ॥" असे उद्गार काढले आहेत. त्यावरून ह्यांची लोकप्रियता व तत्कालीन कविमंडळातील मान्यता लक्षात येते.

अमृतरायांची पद्यरचना बऱ्याच प्रमाणात 'कटाव' वृत्तात आहे. वर्णने रंगदार व ढंगदार बनविण्यास ह्या वृत्ताचे चांगलेच साहाय्य होत असल्याने, अमृतरायांनी आपल्या कीर्तनासाठी रचलेली कविता प्रामुख्याने या वृत्तातच केली. कटावांनी कीर्तनात असा अपूर्व रंग भरतो हे अनुभवास आल्यामुळे त्यानंतर ह्यांचे अनुकरण अनेक कवी करू लागले. गजल हा फारसी काव्यरचनाप्रकार मराठीत ह्यांनीच पहिल्याने रूढ केला.

"अमृतरायांची सबंध आख्याने फार थोडी आहेत. वर्णनपर कविता फार आहे. कटिबंधांपैकी *शुकचरित्र*, *ध्रुवचरित्र*, *सुदामचरित्र* हे फार मोठे आहेत. *दामाजीचरित्र* हे प्रकरणही बरेच मोठे आहे. वर्णनपर कटाव बरेच आहेत. पदे अनेक विषयांवर आहेत. काही भक्तिपर, काही उपदेशपर, काही प्रासंगिक आहेत.

"ह्यांची कविता प्रासप्रचुर असल्यामुळे ती नुसती ऐकणारासही गोड वाटते. त्यांच्या वर्णनास अनेक स्थळी दिलदारपणा व झोकदारपणा आला आहे. त्यांच्या काव्यात प्रसादगुण विशेष आहे. भक्तिरस ओतप्रोत भरला आहे. प्रसंगविशेषी शृंगार, वीर, हास्य, बीभत्स इत्यादी रसही अंगभूत आहेत." (*महाराष्ट्रकवि अमृतरायकृत कवितासंग्रह*, प्रस्ता., पृ. ३–५). [⇨ ३.]

मराठी भाषेप्रमाणे हिंदी भाषेवरही त्यांचे चांगलेच प्रभुत्व होते. तिच्यातही ह्यांनी अनेक सरस कवने रचली आहेत.

**रचना : मु.** – १. अमृतरायके पद (१४ रचना) : संपा. शर्मा, विनयमोहन; हिंमसंदे.; पटणा, १९५७; पृ. ३९५–४०७. २. महाराष्ट्रकवि अमृतरायकृत कवितासंग्रह; संपा. मोडक, ज. बा. आणि ओक, वा. दा.; मुंबई, १८९२; द्वि. आ., १९१०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : अमृतराय; मकच., भा. १; आ. १, मुंबई, १९०७; पृ. ३५२–३७६. २. करंदीकर, म. अ. : अमृतकवीचे उद्योगपर्व; मसंप., ऑक्टो. १९६२; पृ. १०–२२. ३. कात्रे, स. ल. : अमृतरायाचे उद्योगपर्व; चित्रज., मे १९४७; पृ. २५७–२६१. ४. सोनटक्के, अंबुजा : अमृतराय आणि त्यांची कविता; नभामा., जाने. १९७०; पृ. १–१०.

**अमृतराव ओक** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. वऱ्हाडातील मलकापूर ह्या गावी राहात असत. ह्यांनी मुक्तेश्वरांच्या *शतमुखरावणवध* ह्या आख्यान-काव्यातील प्रत्येक ओवीस एक गीती ह्याप्रमाणे टीकारूप काव्य रचले आहे (मसा., आ. ५, पृ. ६२६).

**अमृतविदेही** [का. अनु.] कवी. ह्यांचे पंचीकरणाचे व इतर अभंग समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात सापडतात (बा. १८०१).

**अमृत सिद्धेश्वर** [का. अनु.] गद्यलेखक. ह्यांनी लिहिलेली *सत्यनारायणकथा* उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे : मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४३).

**अमृतानंद–१ / ० अमृतानंद योगेश्वर / ० अमृतानंदु** [अंदाजे इ. स. चे १५ वे शतक, उत्तरार्ध] श्रीदत्तसंप्रदायी कवी. कवीची चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. रोम येथील दप्तरखान्यात ह्या कवीच्या *योगराज-टिळक* ह्या ग्रंथाचे पोर्तुगीज भाषांतर सापडते. त्यावरून तेथील विद्वान संशोधक जे. व्हिकी ह्यांनी विचारणा केल्यावरून ह्या ग्रंथाचा प्रथम प्रियोळकरांनी इकडे शोध केला, तेव्हा त्यांना धुळे, तंजावर व बडोदे येथे ग्रंथाच्या तीन हस्तलिखित प्रती प्राप्त झाल्या. ग्रंथात कवीची नावे अमृतनंद योगेश्वर (धुळे प्रत), अमृतानंद, अमृतानंदु अशी सापडतात.

अमृतकवीच्या नावावरील *स्वरूपनिर्णय* (ओ. ९५) ग्रंथात (सवामं., बा. १०७१) कवीने जी गुरुपरंपरा दिली आहे त्यात अमृतानंदांचे नाव सापडते. ही परंपरा अशी : नृसिंहसरस्वती > माधवेंद्र > अमृतानंद > गगनेंद्र > माधवसरस्वती > विठ्ठलसरस्वती > अंबिकासरस्वती > अमृत अशी दिली आहे. प्रियोळकरांच्या मते *योगराज-टिळक*कार हा नृसिंहसरस्वतीचा प्रशिष्य व *स्वरूपनिर्णय*कार हा ह्याच परंपरेतील अखेरचा अमृतकवी असावा. परंतु अमृतानंद हाच वरील *योगराज-टिळका*चा कर्ता ह्या विधानास रा. चिं. ढेरे ह्यांचा आक्षेप आहे. त्यांच्या मते समर्थवाग्देवतामंदिरातील बाडामध्ये (क्र. ११७८) *उद्योगपर्व*कार चंद्रात्मजाची जी गुरुपरंपरा दिली आहे ती दत्तात्रेयापासून सुरू होणारी आहे व त्यातही एका अमृतानंदाचे नाव येते. त्यामुळे ग्रंथकर्तृत्व कोणत्या अमृतानंदांचे हा वादाचा मुद्दा ठरतो (रा. चिं. ढेरे, *योगराज-टिळक* व *अमृतानंद*; मसंप., जाने. १९५९; पृ. ११८–१२२). अनेक मराठी ग्रंथांची पोर्तुगीजमध्ये भाषांतरे इ. स. १५६० च्या सुमारास झाली त्यांत वरील *योगराज-टिळका*चा समावेश आहे. त्यावरून कवीचा काळ इ. स. १५ व्या शतकाचा उत्तरकाल असावा असे अनुमान काढता येते.

तंजावर प्रतीतील त्या ग्रंथाची शेवटची ओवी "गुरुशिष्याचा येकांतु। जो अनुवादता श्रीदत्तु । ते अमृतानंदु सांगतु । योगराज तिलकु ॥" अशी आहे. पोर्तुगीज भाषेतील अनुवादात शेवटी "गुरु दत्तात्रेयाच्या तत्त्वज्ञानाचा मोठ्या हौसेने अमृतानंदाने स्वीकार केला व ते त्याच्या स्मरणात राहिले. येथे अमृतानंदशिष्याला दत्तात्रेयाने केलेले जे प्रवचन असा *योगराज-तिलक* नावाचा ग्रंथ संपतो" असा मजकूर आहे. ह्या ग्रंथाला *दत्तात्रेयाचा ग्रंथ* असे रूढ नाव पोर्तुगीज भाषेत पडले असून त्याचे भाषांतर फ्रान्सिस्क रोइझ ह्या पाद्रयाने केले होते. ग्रंथाच्या ओव्या ३३० असून ग्रंथाचे संपादन व मुद्रण इ. स. १९५६ साली अ. का. प्रियोळकर ह्यांनी केले (मराठी संशोधन मंडळ प्रकाशन). ग्रंथाची हस्त. प्रत श. १६३० / इ. स. १७०८ विरोधीनाम संवत्सर आषाढ वद्य नवमीची असून नकलकार दत्तो आपाजी असा आहे.

"हा ग्रंथ आध्यात्मिक स्वरूपाचा असून त्यात योगाबरोबर भक्तीचाही पुरस्कार केलेला आढळतो. प्रस्तुत काव्यात वर्णिलेली 'शून्या'ची महती साक्षात्कारमार्गीच्या दृष्टीने विशेष महत्त्वाची असून श्रीज्ञानेश्वरांच्या बिंदुल्याशी ह्या शून्याची तुलना करता येण्याजोगी आहे (ओ. ५०–५४). हे काव्य आकाराने लहान असले तरी गुणांनी मोठे आहे. ख्रिस्ती धर्मप्रचारकांनासुद्धा ह्या काव्याचे महत्त्व वाटावे

व त्यांनी त्याचा अनुवाद आपल्या भाषेत करावा ही एकच गोष्ट ह्या ग्रंथाचे महत्त्व सिद्ध करण्यास पुरेशी आहे."–रा. द. रानडे, *योगिराज-टिळक* : पुरस्कार. [➪ ३.]

शिवशक्तिसमावेशन, पिंडब्रह्मांडसमरसीकरण विवरणारे ग्रंथाचे अंतरंग पाहिल्यानंतर तो नाथसंप्रदायाच्या पठडीतला असावा असे वाटते. ग्रंथावर नाथसंप्रदायी परिभाषेचा पगडा दिसतो. ग्रंथाची भाषा अशुद्ध असली तरी रोजच्या जीवनात आणि व्यवहारात अनुभवास येणारे दृष्टान्त सांगून विषय सोपा करण्याचे कवीचे कसब वाखाणण्याजोगे आहे.

**० अमृतानंद–२** – पहा **अमृत–६.**

**० अमृतनंद योगेश्वर** – पहा **अमृतानंद–१.**

**० अमृतानंदु** – पहा **अमृतानंद–१.**

**० अमृतेश्वर–१** – पहा **अमृत कवी–१.**

**अमृतेश्वर–२** [? – समा. श. १६९२, ज्येष्ठ व. १३, गुरुवार / इ. स. १७७०] रामदासी कवी. हे मर्ढे मठाचे (जि. सातारा) संस्थापक. ह्यांचे शके १७५१ / इ. स. १८२९ मध्ये लिहिलेले एक संस्कृत चरित्र उपलब्ध आहे. त्यावरून ह्या कवीची माहिती मिळते ती अशी : करवीराजवळ कदंबक गावी सिद्धामृत कुलातील रुद्र आणि भवानी या दांपत्याच्या पोटी अमृतेश्वरांचा जन्म झाला. आईवडील लहानपणीच वारले. भावावर रुसून ह्यांनी घर सोडले व मढर्यास जाऊन तपश्चर्या केली. ह्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : श्रीसमर्थ > वासुदेव > विदेह > अमृतेश्वर. ह्यांचे शिष्य पावन होत (सवामं. बा. ६१४).

ह्यांची *आत्मबोध, उपासना, गणेशगीता, तत्त्वझाडा, तत्त्वबत्तिशी* अशी ग्रंथरचना समर्थवाग्देवतामंदिर संग्रहात आहे (बा. १८२१). अमृतेश्वरकृत *पीयूषरामायणात आदिकांड* (१९ अ.), *बाळकांड* (३९ अ.), *अयोध्याकांड* (३२ अ.), *अरण्यकांड* (३० अ.), *किष्किंधाकांड* (२२अ.), *सुंदरकांड* (५५ अ.) ही कांडे असून *युद्धकांड* तेवढे उपलब्ध नाही. ह्या पोथ्यांचे लेखन श. १७०७/इ. स. १७८५च्या सुमाराचे असल्याचे निर्देश सापडतात (बा. ६२०).

डॉ. म. अ. करंदीकर ह्यांनी उज्जयिनी येथील सिंदिया ओरिएंटल इन्स्टिटयूटच्या हस्तलिखित संग्रहातील अमृत कवीच्या नावावरील *उद्योगपर्व* मर्ढे मठपती अमृतेश्वराच्या नावावर घातले आहे. पण हे *उद्योगपर्व* त्यांचे नसून नवीन संशोधनाप्रमाणे ते मुडलगी परंपरेतील सहजबोधशिष्य अमृत कवीचे आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. करंदीकर, म. अ.; अमृतकवीचे उद्योगपर्व; मसंप., ऑक्टो. १९६२; पृ. १०–२२. २. ढेरे, रा. चिं.; उद्योगपर्वकार अमृतकवि; इंद्रायणी, मे १९६३; पृ. ५८.

**० अमृतेश्वर–३** – पहा **अमृतराय.**

**अमृतेश्वर चिन्मय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**अमृतेश्वरब्र ह्मानंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – 'सुदामचरित्र'; कटाव; र. स्थ. : खंडोबाची पाली; रासमं.

**० अरणीचा शिपाई** – पहा **आनंदतनय.**

**० अरणीबाबा** – पहा **आनंदतनय.**

**० अरुणाद्रि** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अर्जुनसुत सोयरा** [इ. स. १७४६ चा सुमार] जैन कवी. गुरू : भट्टारक सेन गणातील समंतभद्र. हे देऊळ गावचे राहणारे. जातीने बघेरवाल. चवरिया हे ह्यांचे गोत्र. ही माहिती कवीच्या ग्रंथातूनच मिळते.

ह्या कवीने *कर्माष्टमी कथा* नावाचे व्रतकथा-काव्य लिहिले आहे. कन्नड भाषेतील कथेवरून ही कथा मराठीत आणल्याचे कवीने सांगितले आहे. ह्यात ११७ ओव्या आहेत. कवी म्हणतो : ऐसी कथा अपूर्व कानडे भासी। होती सुंदर करनाटक देसि । ते म्या सायासि मऱ्हाष्ट्र भासी । लघुबुधी केली असे पैं ॥ ११२ ॥ संवत अठराणे दोन । आषाड सुध अष्टमी जान । कथा केली परिपूर्ण । सारजा प्रसन्न जाली पैं ॥ ११७ ॥ असा काळाचा उल्लेख शेवटच्या ओवीत कवीने केला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : अर्जुनसुत सोयरा: प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ८७.

**अलखनिरंजन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**ॲलन ग्रेव्हज** / **० ग्रेव्हज ॲलन** [? – मृ. ३० डिसें. १८४३] ख्रिस्तीधर्मप्रचारक व लेखक. हे इ. स. १८१८ मध्ये हिंदुस्थानात आले. अहमदनगर येथे अमेरिकन मिशनने ता. २० डिसेंबर १८३१ रोजी फेरीबागमध्ये आपली एक शाखा स्थापन केली. त्यावेळेस जे तीन ख्रिस्ती प्रचारक तेथे स्थायिक होण्यासाठी गेले त्यांपैकी हे एक. ह्यांचा मृत्यू महाबळेश्वरी झाला.

ॲलन ग्रेव्हजनी मराठी भाषेचा अभ्यास केल्यानंतर बायबलच्या भाषांतराचे कार्य अंगावर घेतले. इ. स. १८२६ मध्ये बायबलचे जे मराठी भाषांतर झाले ते करणाऱ्या पाच मिशनऱ्यांपैकी हे एक होते. १८३० मध्ये बायबलच्या नव्या कराराची सुधारून वाढविलेली आवृत्ती बायबल सोसायटीकरिता ॲलन ग्रेव्हज ह्यांनी तयार केली. *नव्या कराराप्रमाणे जुन्या कराराचा एक्झोडस* (इ. स. १८३३) हा भागही ह्यांनी भाषांतरित केला. *जुन्या कराराचे लेव्हिटिस* व *नंबर्स* (इ. स. १८३६) हे दोन भाग लिहिले. परंतु बायबल सोसायटीने त्यांत फार बदल सुचविल्यामुळे ह्यांनी ५०० प्रतींची आवृत्ती स्वतःच छापून प्रसिद्ध केली. *नंबर्स, डिटरॉनॉमि, जोसुआ, जजेस* व *रूथ* (इ. स. १८३८) ह्या भागांचे ह्यांनी भाषांतर केले व अमेरिकन मिशनने ते प्रसिद्ध केले. *दि साम्स* (इ. स. १८३८) हा भाग ग्रेव्हज व डिक्सन ह्या दोघांनी मिळून भाषांतरित केला. इ. स. १८४२ मध्ये *क्रॉनिकल्सच्या* पहिल्या पुस्तकाचे ग्रेव्हजनी भाषांतर केले. अशा रीतीने ग्रेव्हज ह्यांनी बायबलच्या *जुन्या कराराची* बरीच प्रकरणे लिहिली.

ग्रेव्हज ह्यांनी बायबलच्या भाषांतराखेरीज (१) *जोशुआवरील प्रवचनें,* (२) *इस्त्राएलास हितोपदेश* (१८३३), (३) *गीतांचें नवीन पुस्तक* (१८३३) अशी पुस्तके लिहिली. ग्रेव्हज ह्यांनी ह्यांतील शेवटचे पुस्तक तयार करून मिशनच्या मराठी पद्यवाङ्मयाचा प्रारंभ केला.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म.; युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा; मुंबई, १९६०; पृ. २३५–२५२.

**अलमखान** / **० आलमखान** / **० अल्लप्रभू** [अंदाजे इ. स. च्या १४ व्या शतकाची अखेर] नागेशपंथीय मुसलमान संतकवी. नागेशसंप्रदायी भानजी त्रिंबक देशपांडेकृत *नागेशलीलामृत* (श. १७७० / इ. स. १८४८) ग्रंथाच्या ३९ व्या अध्यायात 'अलंखान आख्यान' येते. त्यात 'विंध्याद्रीपैलप्रदेशीं । अलंखान महापूरवासी।' असा ह्यांच्या गावाचा उल्लेख आला आहे. कांही कारणाने मन उद्विग्न होऊन गृहत्याग करून हे गाव सोडून दक्षिणेकडील बनात कंदमुळे भक्षण करून साधना करू लागले. त्या ठिकाणीच मृगयेसाठी आलेल्या कल्याणीच्या (महाराष्ट्र–कर्नाटक सीमेवरील) रामनृपतीवरील शत्रूचा हल्ला ह्यांनी परतविला. त्यामुळे कृतज्ञतापूर्वक मोठ्या सन्मानाने राजाने ह्यांना आपल्याजवळ ठेवून घेतले. कल्याणी येथे राहात असतानाच नागेशांनी संन्यासवेशात अलमखानांना दर्शन दिले. त्यानंतर लगेच हे वडवाळक्षेत्री गेले. संपूर्ण संगरहित बनून ह्यांनी स्वामींचे

अखंड ध्यान चालू ठेविले. अखेर त्याच वेशात नागनाथांनी परत दर्शन दिले. ह्यांची परतत्त्वज्ञानसाधनेसंबंधीची उत्कट तळमळ पाहून नागनाथांनी त्यांस शिष्यत्व देऊन परमार्थबोध केला, व मुगळी येथे जाण्याची आज्ञा केली. (हे मुगळी सध्या 'जाजरमुगळी' या नावाने ओळखले जाते. हे उमरगा–हुमणाबाद रस्त्यावर आहे. जि. उस्मानाबाद.) ह्यांचे भजन पाहून ज्ञातिबांधव ह्यांची निंदा करू लागले. 'महत्त्वयोगें उपाधि परम' हे जाणून अलमखानांनी समाधी घेण्याचे ठरविले. मुगळीकरांनी समाधीसाठी जागा देण्यास विलंब लाविल्याने तेथूनच जवळ असलेल्या करळी-कारळे (उमरग्यापासून ६ मैलांवर हे गाव आहे) ह्यांनी समाधी घेतली. ती आजही तेथे पाहण्यास सापडते. पुढे मुगळी येथील भक्तांनी ह्यांची प्रसाद-समाधी बांधली.

अलमखानांनी मराठीत पदे, अभंग अशी रचना केली आहे. मुगळी-कारळे भागातील नागेशपंथीयांच्या संग्रहात ह्यांच्या पदांचे गायन होत असते. धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिर, पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळ, सोलापूर येथील शं. ना. मोहोळकर ह्यांचा संग्रह येथे ह्यांची काही रचना उपलब्ध आहे. ह्यापैकी सहा पदे अ. का. प्रियोळकर ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत (मसंप., एप्रिल १९६३, पृ. १७–२०). रा. चिं. ढेरे ह्यांना अलंखानांची एकूण पंधरा पदे उपलब्ध झाली आहेत.

अलमखानांचा अध्यात्मविषयक अनुभव त्यांच्या पदांतून व्यक्त झाला आहे. स्वतःला लाभलेल्या 'निर्लेप' अवस्थेला हे नागेशप्रसादाची खूण समजतात. गुरुविषयक आत्यंतिक प्रेमादर ह्यांच्या कितीतरी पदांतून व्यक्त होताना दिसतो. ते म्हणतात : "ज्ञानांजनें केला नयनीं प्रकाश स्वयंज्योती । अंतर्बाह्य लखलखाटीं उजळल्या दीप्ती ॥" ह्या ज्ञानांजनाने जी आगळी अनुभूती प्राप्त झाली त्यात गुरूने 'कूर्मदृष्टीं करितां अवलोकन । तेणें गेलें मनाचें मनपण । . . . . स्वानंदाचा भरपूर लोट झाला । तत्क्षणीं अलमखान बुडाला ॥" अशा प्रकारची सहजसुंदर पदरचना ह्यांनी केली आहे. मराठी आध्यात्मिक जीवनाशी एकरूप झालेल्या ह्या परधर्मीय संताने आपल्या थोर साधनेच्या योगे महाराष्ट्राच्या आध्यात्मिक लौकिकात भर घातली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : कवि अलमखान : थोडी चरित्रपर माहिती; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. २५१–२६०. २. ढेरे, रा. चिं.; अलमखान; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. ५१–६५.

**० अलंप्रभु** – पहा **अलमखान.**

**अली फकीर** [का. अनु.] शाहीर. ह्याने ऐकीव माहितीवरून रचलेला '*भरतपुरच्या लढाईचा पोवाडा*' *ऐतिहासिक पोवाडे, खं. ३* मध्ये संग्रहित केलेला आहे (पृ. ५४).

**अवचितसुत काशी** / **० काशीकवी–३** / **० काशीदास** / **० काशीराज–१** [इ. स. चे सतरावे शतक, उत्तरार्ध] आख्यानकवी. सोमवंशीय मराठा क्षत्रिय. कुळ सोळंखी. पित्याचे नाव अवचितराव; आईचे नाव अन्नपूर्णा. हे घराणे देशमुखांचे. ह्यांच्या वडिलांनी नाशिक जिल्ह्यात भारम हे गाव वसविले. हे विठ्ठलभक्त होते. ह्यांनी आपल्या वाड्यात विठ्ठलाची मूर्ती स्थापन केली होती. आषाढातील महाएकादशीच्या दिवशी तेथे फार मोठी यात्रा भरत असे. अवचितरावास त्रिंबक व काशी (काशीराम) असे दोन मुलगे होते. शिपाईगिरीचा पेशा असल्यामुळे ते लढायांत अनेकदा भाग घेत असत. अशाच एका प्रसंगी भारमजवळील एक गड हस्तगत करून ह्यांनी त्याला 'गोपाळगिरी' हे नाव ठेवले व तेथे ते कुटुंबासह राहू लागले. तीन महिन्यांनंतर गोपाळगिरीवर मोगली सैन्याची धाड आली व बादशहाच्या हुकुमावरून अवचितराव काशी ह्यांस कैद करून दिल्लीस नेण्यात आले. तेथे अवचितरावांचे तुरुंगात निधन झाले. त्यानंतर काही दिवसांनी काशींना बंधमुक्त करण्यात आले. काशी स्वगृही परत आले.

काशीकवींनी दिल्लीहून भारमला परत आल्यावर द्रौपदीस्वयंवरावर काव्य रचावयास घेतले. ह्या विषयावर काशींनी श्लोकबद्ध व ओवीबद्ध अशा दोन भिन्न भिन्न रचना केल्या आहेत. पहिली श. १५८३ (इ. स. १६६१) व दुसरी श. १६१८/१९ (इ. स. १६९६/९७) ह्या साली पूर्ण केली असे दिसते. श्लोकबद्ध १४-अध्यायी *द्रौपदीस्वयंवरा*चे प्रथम मुद्रण कानडे ह्यांनी सोलापूर येथे केले. ओवीबद्ध *स्वयंवरा*ची पोथी निर्णयसागर छापखाना, मुंबई येथे इ. स. १८९२ त प्रथम छापली (*दाते सूची*, पृ. ४८९).

*द्रौपदीस्वयंवर* हे काव्य काशीकवींनी *महाभारताचे आदिपर्व* व *कथाकल्पतरू*चा स्तबक ५, अध्याय ११–१२ ह्यांच्या आधारे प्रामुख्याने रचले आहे. स्वभावोक्तिपूर्ण वर्णनांनी हे काव्य युक्त असून, त्यात उपमा-उत्प्रेक्षा-रूपकादी ठळक ठळक अर्थालंकार, कमलबंध, रारायंत्रबंध, माळाबंध, हारबंध, चक्रबंध, शेषबंध अशा स्वरूपाच्या चित्ररचनेची कलाकुसर व वृत्तांची विविधता आहे. [ ⇨ ३. ]

ह्यांच्या ओवीबद्ध *स्वयंवरा*वर मुक्तेश्वर कवीच्या भाषेचा बराच प्रभाव पडलेला आढळतो. कवित्व, शब्दसौष्ठव, कल्पनाविलास व रसपरिपाक ह्या दृष्टींनी हे ओवीबद्ध 'स्वयंवर' सरस उतरले आहे. [ ⇨ ३. ] ह्यांनी ह्या दोन काव्यांखेरीज *यक्षदेव-आम्नाय-मंजरी* ह्या नावाचे एक प्रकरण रचले आहे. हे प्रकरण विचारात घेता काशी कवी हे आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात *द्रौपदीस्वयंवर* रचल्यानंतरच्या काळात महानुभावपंथीय बनले असावे असा काही विद्वानांचा तर्क आहे.

**रचना : मु.** – १. द्रौपदीस्वयंवर – श्लोकबद्ध; अ. १४; श्लो. सं. १००४; र. श. १५८३ (इ. स. १६६१); संपा. गोखले, डॉ. वा. दा.; विस्तृत, विवेचक प्रस्ता.; पुणे, १९६१; २. द्रौपदीस्वयंवर – ओवीबद्ध; प्रसंग २९; ओ. सं. ३५४८; र. श. १६१८/१९ (इ. स. १६९६/९७); मुंबई, १८९२; ३. यक्षदेव-आम्नाय-मंजरी (स्तोत्र); विविधवृत्तात्मक; श्लो. सं. १०२; महानु.; सप्टें. १९६८; पृ. १–२२.

**अवधूत–१** / **० अवधूत गोविंदा** / **० अवधूत निरंजन** [इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] कवी. हे मूळ पैठणचे. ह्यांचे मूळ पुरुष जे चितोत्पत्ती ते चितेतून जिवंत निघाले, अशी आख्यायिका कवी स्वतःच सांगतो. पुढील पितृपरंपरा अशी : सिद्धेश्वर > विश्वेश्वर > श्रीधर > शामराज > अवधूत. गोत्र अत्री. हे नाथसंप्रदायी असावेत असे वाटते. आपले गुरू कोणी गोविंद होते असे हे सांगतात. ह्या अवधूतांचे स्थळ व काळ गोविंद नरहरि ह्या खडकी ग्रामी (जि. औरंगाबाद) राहणाऱ्या एका मोठ्या ग्रंथकारांच्या स्थळकाळाशी जुळणारा आहे. ह्यावरून हे गोविंद नरहरि कवीचे गुरू असावेत (रा. शं. नगरकर : गोविंद नरहरि; भाइसंमंत्रैमा., व. ४४, अ. १–४; पृ. ४१).

ह्यांनी *कपिलगीते*वर टीका रचली आहे. ह्या ग्रंथरचनेचा स्थलकाल पुढीलप्रमाणे आहे : "शालीवाहन शके महिमा । सोळासे तीस वरुष नामा ॥ सर्वधारी संवत्छर प्रेमा । वसंतसंभ्रमा चैत्र मासु ॥ १३८५ ॥ पर्वतामाजी देवगिरी । खडकीग्राम बाईजीपुरी । केशवाचिया मंदिरी । ग्रंथ निर्धारीं संपविला ॥ १३८८ ॥" मूळ २४० श्लोकांवरील टीकेच्या ओव्या १४१० आहेत (रासं., खं. २, पृ. २४५). हा ग्रंथ मुंबईच्या मराठी संशोधन मंडळातही उपलब्ध आहे. कवीच्या *मूलस्तंभ* ह्या छापील ग्रंथाची (कासं.) नोंद सूचीकारांनी केली आहे (संककासू., पृ. ७).

वर उल्लेखिलेल्या *कपिलगीताटीके*खेरीज *गोपीचंदचरित्र* (हिंदी), *गोपीचंदाची कथा* (१४४ ओव्या), *स्वात्मानुबोध* (२७६ ओव्या) व पदपदांतरे अशी अमुद्रित रचना अवधूतांच्या नावावर *रामदासी संशोधन, खं. २* मध्ये दिली आहे.

**अवधूत–२** [इ. स. १८२८ चा सुमार] भागवत-टीकाकार. मूळ गाव कोल्हापूर. परंतु कवीचे वडील ज्ञानेश्वरी बापाजी हे तंजावर येथे स्थायिक झाले. आपली गुरुपरंपरा सांगताना हे म्हणतात: "श्रीदत्तात्रेयाचे अनुचर । प्रख्यात जोगाई अंबेकर । गोसावी दास दिगंबर । ब्रह्मविद थोर महानुभाव ॥ १५७ ॥ त्यांचे पारंपर्य वंशस्थ ॥ शिष्यकुळासि गुरु समस्त । आमुचे सप्तगोत्रेंसी नेमस्त । पूज्य प्रशस्त सद्गुरुत्व ते ॥ १५९ ॥" ग्रंथकार दत्तात्रेयांचा परम भक्त असून *भागवत चतुर्थ स्कंधात* दत्तात्रेयजन्मकथाभाग आल्याने आपण चतुर्थ स्कंधावर टीका लिहितो असे कवीने म्हटले आहे.

अवधूतकृत *भागवत चतुर्थ स्कंधा*च्या एकूण तीन हस्तलिखित प्रती तंजावर सरस्वती ग्रंथालयात आहेत. ३२ अध्यायांवर एकूण ३३०८ ओव्यांचे भाष्य व एक चूर्णिका आहे. ग्रंथलेखनकाल 'वैशाख शुक्ल ७, बुधवार, सर्वधारी संवत्सर, श. १७५०' (इ. स. १८२८) असा दिला आहे. ग्रंथाला लेखक *भाषाप्रबंध* असे संबोधितो. ग्रंथास प्रारंभ व्यय संवत्सरी १७४८ त झाला अशी माहिती कवी देतो. कवी एकनाथभक्त असून श्रीखंड्याच्या वेशाने भगवान श्रीकृष्णांनी एकनाथांची सेवा केली ती कथा त्याने ह्या ग्रंथात विस्ताराने सांगितली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : काही अज्ञात सारस्वत उपासक; तंजावर सरस्वती महाल; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २४–२५.

**अवधूत–३ / ० अवधूत मल्यावृत्ति / ० निवृत्ति अवधूत–१** [का. अनु.] कवी. ह्यांचे गुरू अनंतचैतन्य असावे असे *पवनप्रकाश* ग्रंथाच्या शेवटी आलेल्या उल्लेखावरून म्हणता येते. 'श्री गुरू अनंत चैतन्य प्रसादे ॥ वाचा प्रकाशली स्वानंदे ॥ म्हणोनि आत्मसुख अनुवादे ॥ परात्पर अनुपम्य जें ॥' शं. श्री. देव ह्यांनी दत्तात्रय-तुकेश-परमानंद-चैतन्य-अवधूत अशी कवीची गुरुपरंपरा दिली आहे (रासं., खं. २, बा. क्र. १२०७).

कवीच्या *पवनप्रकाश* ग्रंथाच्या १०० ओव्या असून त्याची हस्तलिखित प्रत तंजावर सरस्वती ग्रंथालयात आहे. त्यातील प्रारंभीचे एक पृष्ठ गहाळ झाले आहे. *आत्मानुभव* म्हणजेच *तारकब्रह्म* (ओ. सं. ३१०) ह्या दुसऱ्या ग्रंथाच्या शेवटी लेखनकाल दिला आहे तो असा : 'प्लव स(वंत्सर मा)र्गशीर्ष कृष्ण प्रतिपत्तिथी'. निश्चित सांगता येत नाही, पण श. १६४३ असावा (शं. श्री. देव). अवधूतांचे *परमप्रकाश* (पवनप्रकाश), *वृत्तिबोध* व *दशनाम टीका* हे ग्रंथ *काव्यसंग्रहा*तून प्रकाशित झाले आहेत.

**अवधूत–४ / ० अवधूत अनंत** [का. अनु.] पदकार. कवी नागपुराकडील राहणारा असावा असे दिसते, कारण ह्याची *पदसंग्रहा*तील मुद्रित पदे नागपुराकडील पोथ्यांतूनच मिळाली आहेत. ह्या कवीच्या पित्याचे नाव अनंत असावे (वा. दा. ओक : *पदसंग्रह, भाग २*; मुंबई, १८९६; पृ. ६२ टीप). कवीची आठ पदे मुद्रित (तत्रैव, पृ. ६२–६५) त्यांत सद्गुरुपर व राम, कृष्ण, शिव, गणेश ह्यांच्यावरील पदे आहेत.

**अवधूत–५** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – 'शुकरंभा' कटाव; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० अवधूत अनंत** – पहा **अवधूत–४.**

**० अवधूत कवी** – पहा **अवधूत पुसदेकर.**

**अवधूत कृष्ण** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० अवधूत गोविंद** – पहा **अवधूत–१.**

**अवधूतदास** [का. अनु.] चरित्रकार.

**रचना : अमु.** – नृसिंहचरित्र; वि. ल. भावे संग्रह (संककासू., पृ. ७).

**अवधूत नागेश** [का. अनु.] कवी. गुरू : नागेश. ह्यांचा *तत्त्वबोध* नावाचा ग्रंथ कृष्णार्जुनसंवादात्मक आहे. "कृष्णे अर्जुनासि कथिले। ईश्वरे पार्वतीसी उपदेशिले। अनंत सिद्धासी निरोपीले। आदिनाथे॥" ग्रंथाच्या १९२ ओव्या असून ग्रंथसमय 'भाद्रपद शु. २, शार्वरी संवत्सर', शके १५८२ / इ. स. १६६० असावा. हस्तलिखित तंजावर सरस्वती महाल ग्रंथसंग्रहात उपलब्ध.

डॉ. आवळीकर ह्यांनी अज्ञानसिद्धाचा म्हणून ह्या ग्रंथाची नोंद करून माहिती दिली आहे (जुवानसं., पृ. ९–१०).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : अवधूत नागेश; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २५.

**० अवधूत निरंजन** – पहा **अवधूत–१ (निरंजन).**

**अवधूत पतंग का बाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – आरत्या व ज्ञानपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अवधूत पुसदेकर / ० अवधूत कवी** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – रुक्मिणीस्वयंवर (अ. १८), आरत्या व पदपदांतरे; ममग्रंककासू., पृ. २.

**अवधूत बाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – वेदान्तपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० अवधूत मल्यावृत्ति** – पहा **अवधूत–३.**

**अवधूत मुनी** [का. अनु.] महानुभाव भाष्यकार.

**रचना : अमु.** – ब्रह्मविद्या रत्नाकर टीका; ममग्रंककासू., पृ. २.

**० अवधूत वरद** – पहा **दत्तवरद विठ्ठल.**

**अवधूतसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – गणपतिजन्म; कासं. (संककासू., पृ. ८).

**अवधूतस्वामीचा किंकर माधवेंद्र** [अंदाजे इ. स. १८००] कवी. गुरू : अवधूत. ह्यांची दत्तावर बरीच कविता आहे. हे दशनाम पंथापैकी पुरी-संप्रदायी होते. एका अष्टकाच्या शेवटी "अवधूत सद्गुरु पूर्ण भेटला । संकटामधून दास सोडिला" असा आपल्या गुरूचा ते स्पष्ट निर्देश करतात. ह्यांची समाधी खानदेशात शिरूड गावी आहे. ह्या माधवेंद्र कवीच्या कवितेचा शोध पां. मा. चांदोरकर ह्यांच्याजवळील हस्तलिखित बाडात लागला. अष्टके, भूपाळ्या, आरत्या, अभंग अशी स्फुट रचनाच प्रामुख्याने सापडते. त्यात श्रीकृष्णावरील एक आरती आहे. अवधूतस्वामीचा किंकर माधवेंद्र असा कवीने स्वत:चा उल्लेख केला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : अवधूतस्वामीचा किंकर माधवेंद्र; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. १०९.

**अवधूत ज्ञानसागर / ० ज्ञानसागरेंद्र सरस्वती** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] चैतन्यसंप्रदायी कवी. सातारा जिल्ह्यातील विटे गावचे हे कुळकर्णी. ह्यांचे मूळ नाव भैरव. मातापित्यांची नावे यमुना व ज्योतिर्लिंग. गोत्र विश्वामित्र. आडनाव ज्ञानसागर. ह्यांची गुरुपरंपरा : कृष्णचैतन्य > तुळशी > अद्वय > चिद्घन (हे अद्वयांचे पुत्र व शिष्य) > नागेश (पुत्र व शिष्य) > अवधूत (शिवलिंगांचा दत्तक पुत्र व शिष्य) अशी आहे. ह्या कवींचे कुलदैवत क्षेत्रपाल. ह्यांनी श. १७३४ (इ. स. १८१२) मध्ये *ज्ञानसागर* व श. १७६४ (इ. स. १८४०) मध्ये *ज्ञानसागरानंद* असे ग्रंथ रचले (संककासू., पृ. १२३).

**अवधूताचा बाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अवधूतात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३, सवामं. हस्त. सू., खं. १.

**अवधूतात्मज गोविंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – भक्तिपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**अवधूतात्मज बाळ** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**अवधूतात्मज सुहृद** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; नीलंगे मठातील संग्रह.

**अविनाश दत्तात्रेय** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] दत्तसंप्रदायी कवी. ह्यांनी *पिंडब्रह्मांडज्ञान* (ओ. सं. १६२) ह्या नावाचे गुरु-शिष्य-संवादात्मक एक प्रकरण लिहिले. ह्या ग्रंथात मन, पवन, प्राण, निरंजन, जीव, शिव आणि ॐकारमहिमा हे विषय आले असून प्रकरणाची भाषा हिंदी-मराठी-मिश्रित आहे. ग्रंथाची हस्तलिखित प्रत तंजावर सरस्वती महाल ग्रंथालयात उपलब्ध (हस्त. यादी, क्र. १). ह्यांनी काही चूर्णिकाही रचल्या आहेत.

o **अज्ञान कवि** – पहा **अज्ञानसिद्ध नागनाथ.**

o **अज्ञान कृष्णदास** – पहा **कृष्णदास (गोविंद).**

o **अज्ञानदास** – पहा **अग्निदास.**

o **अज्ञान नागनाथ** – पहा **अज्ञानसिद्ध नागनाथ.**

**अज्ञान यमाजी** [अंदाजे इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध] शाहीर. ह्यांनी *दत्ताजी जाधवाचा पोवाडा* रचला आहे. पोवाड्याचा नायक दत्ताजी हा सुप्रसिद्ध लखुजी जाधवाचा वंशज होय. मोगलाची मनसबदारी ह्यांना लखुजीच्या मृत्यूनंतर मिळाली. जयसिंग व दिलेरखान ह्यांनी पुरंदर गड सर केल्यानंतर ते विजापूरकर शाहाच्या मुलुखावर चाल करून जातात, ह्या चकमकीत विजापूरचा सरदार सरजाखान व दत्ताजी यांची निकराची झुंज होऊन दत्ताजीला वीरमरण येते, दिलेरखान मोठ्या सन्मानाने त्याचा दहनविधी करतो, असा कथाभाग पोवाड्यात येतो.

शिवकालातले जे काही थोडे पोवाडे उपलब्ध आहेत त्यांपैकी एक म्हणून हा पोवाडा महत्त्वाचा आहे. याचे ४० चौक आहेत. भाषा व रचना शिवकालीन पोवाड्यांसारखीच आहे. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड २ मध्ये संग्रहित* (पृ. १७–३६) (य. न. केळकर, ऐतिपो., खं. २, पृ. १–१६).

o **अज्ञानसिद्ध** – पहा **अज्ञानसिद्ध नागनाथ.**

**अज्ञानसिद्ध नागनाथ** / o **अज्ञान कवि** / o **अज्ञान नागनाथ** / o **अज्ञानसिद्ध** / o **अज्ञानसिद्ध नागेश** [अंदाजे श. १२८० / इ. स. १३५८ – श. १३४० / स. १४१८] नागेशसंप्रदायी कवी. नागेशपंथाच्या तत्त्वज्ञानाचे भाष्यकार व ग्रंथप्रवर्तक. वडवाळसिद्ध नागेश ह्या शिवोपासक सिद्धपुरुषाचे मोहोळ (जि. सोलापूर) येथील एक शिष्य हेगरस ह्यांच्या अहिल्या नावाच्या मुलीचे हे चिरंजीव. मसूर हे ह्यांचे कुलग्राम. जामदग्न्यगोत्री ब्राह्मण. ह्यांना विदेहसिद्ध व नरेंद्रसिद्ध असे दोघे भाऊ होते. *नागेशलीलामृत* ह्या नागेशपंथीय ग्रंथात 'अज्ञानपणीं सिद्ध स्थिती । म्हणूनी अज्ञानसिद्ध म्हणती ।।' असे ह्यांच्याविषयी म्हटले आहे. सर्वसामान्य मुलांहून अज्ञानसिद्धांची दिसणारी वेगळी व काहीशी विपरीत अशी वागणूक पाहून, ह्यांना ह्यांच्या आईने वडवाळ येथील सिद्धपुरुष नागनाथ ऊर्फ नागेश ह्यांच्या चरणांवर घातले व त्यांनीच ह्यांचा पुढील काळात सांभाळ करावा असे विनविले. वडवाळसिद्ध नागेशांनी त्यांचा स्वीकार केला.

प्रस्तुत कवीचे अज्ञानसिद्ध हे जन्मनाम, गुरुदत्त नाम की लेखनीनाम आहे अशा शंका काही संशोधकांकडून व्यक्त करण्यात आल्या आहेत. अज्ञानसिद्धरचित *अकालज्ञान* ह्या प्रकरणात आलेल्या "तो पुरातन श्रीगुरु ।। अनंतसिद्धाचा दातारु ।। परात्पर शिव नागेश्वरु ।। पुरातन जो ।। ५२ ।।" ह्या किंवा "यालागि सर्वकाळ अक्षयसुख ।। ते सिधांत ब्रम्हविद्या चोख ।। अनंतसिद्धा पावले देख ।। मनोभावें समाधीनी ।। १२१ ।।" ह्या ओव्यांवरून ह्यांचे मूळचे नाव अनंतसिद्ध असावे असे डॉ. व. वि. पारखे (अज्ञानदासकृत *अकालज्ञान*, भाइसंमत्रै., व. ४९, अं. १–४, पृ. २३) हे सुचवितात, तर प्रा. म. रा. जोशी हे *काळज्ञान* ह्या हस्तलिखितातील "म्हणे रे प्रेमनंदना । संतोषलो तुझिया वचना ।। तरी सावधान करी कामना । आनंदनिधि ।।" ह्या नोंदीचा उल्लेख (कवि अज्ञानसिद्धकृत *स्वरूपनिर्वाण*; मसंप., जाने. १९७२; पृ. ७३) करून ते प्रेमनंदन असावे असे म्हणतात.

अज्ञानसिद्ध ह्यांस वडवाळसिद्ध नागेश ह्यांजकडून श. १३१३ / इ. स. १३९१ मध्ये सांप्रदायिक उपदेश मिळाला. आपल्या गुरूला उद्देशून अज्ञानसिद्धांनी रचलेल्या (अज्ञानसिद्धकृत *संकटहरणी*, प्रका. शं. ना. मोहोळकर, सोलापूर, १९४९, पृ. २९) *करुणाष्टकात* 'परात्पर गुरु सिद्ध तूं फणींद्रा । तूं दाविसी खेचरी सिद्ध मुद्रा ।। शीघ्रासन घालूनी बैसवीला ।। म्हणे सिद्धलिंग हें दाखविलें मजला ।। ८ ।।" असे ह्या प्रसंगाचे वर्णन केले आहे.

अज्ञानसिद्ध हे वडवाळ येथे गुरूंच्या सांनिध्यात बराच काळ राहिले व त्यांजकडून त्यांचे आध्यात्मिक विचार ह्यांनी समजावून घेतले. त्यांच्या नजरेखाली ह्यांनी प्रखर साधनाही केली. तदनंतर, नागेशांचा अलंखान (अलंप्रभु) नावाचा एक मुसलमान शिष्य कोल्हापूर जिल्ह्यातील हातकणंगले ह्या तालुक्यातील नरंदे (नरेंद्रपुरी) ह्या गावी राहात असे तेथे "..... तुवां नरेंद्रपुरीं जाउन । समाधान विचरिजे ।। ४७ ।। अलंप्रभू वसे भावें । तेथ तुवांही असावें । ... ।। ४८ ।।" *नागेशलीलामृत*, अ. ३४) अशी नागेशांनी त्यांस आज्ञा केल्यावरून हे तेथे गेले. येथील वास्तव्यात ह्यांनी आपल्या गुरूच्या तत्त्वज्ञानाचे विवरण करणारी ग्रंथरचना केली व प्रत्यक्ष उपदेशद्वारा पंथानुयायांची संख्याही वाढविली. महागाव, बरवंड, किलारी, नरंदे ही ठिकाणे ह्यांच्या शिष्यांची प्रमुख केंद्रे बनली व तेथून महाराष्ट्राच्या अनेक भागांत नागेशसंप्रदायाचा प्रसार होत राहिला. दत्तचैतन्य ह्या नावाचे ह्यांचे एक प्रमुख शिष्य नरंदे येथे ह्यांच्या सांनिध्यात असत; त्यांनी अज्ञानसिद्धांच्या अवसानानंतर ह्यांची तेथे समाधी बांधून तिची व नागेशपंथाची सेवा बहुत केली.

वडवाळसिद्ध नागेश ह्यांनी उपदेशिलेले व अज्ञानसिद्ध आणि त्यांचे इतर शिष्य ह्यांनी प्रवर्तिलेले आध्यात्मिक तत्त्वज्ञान हे कोणत्या संप्रदायाचे अनुसरण करते ह्यासंबंधी वाङ्मयविवेचकांकडून भिन्न भिन्न मते व्यक्त केली गेली आहेत. काहीजणांनी ते शुद्ध शैव पंथाचे, तर काहीजणांनी ते नाथ पंथाचे, तर काहीजणांनी ते चैतन्यसंप्रदायाचे अनुसरण करणारे आहे, असे प्रतिपादिले आहे. परंतु नागेशसंप्रदायाचा अज्ञानसिद्धकृत *वरदनागेश* हा जो गुरुशिष्यसंवादात्मक प्रमुख प्रमाणग्रंथ आहे, त्यावरून भक्ती, अद्वैतवेदान्त, अष्टांग योग व शैवमत ह्या सर्वांचा ह्या संप्रदायाच्या तत्त्वसरणीत समन्वय झाल्याचे आढळते. स्वतः अज्ञानसिद्ध आपल्या ह्या *वरदनागेश* ग्रंथात "जो जै साधनीं रतू । होऊनि हरि अर्पण करितू । धरूनि निज ज्ञानाचा हेतू । तया अनंतू तेंचि देता ।।" (अ. २. २८) असे सांगतात. परब्रह्माचे स्वरूप सद्गुरूकडून समजून घेऊन, त्याने उपदेशिलेल्या साधनमार्गाचा अवलंब करून त्याचा अनुभव घ्यावा; त्यायोगे चित्त शांत होऊन चिरसुख प्राप्त होईलच होईल असे अज्ञानसिद्ध आश्वासन देतात. नागेशसंप्रदायप्रेरित साधनेचे अंतिम उद्दिष्ट, व्यक्तीने स्वचित्ताचा ब्रह्मचैतन्याशी योग साधणे (स्वतःस जोडून घेणे) हेच आहे. ह्या संप्रदायाने अनुसरलेल्या साधनप्रक्रियेचे स्वरूप पाहता, अशी सिद्धी प्राप्त करून घेण्यास पोषक असेच ते आहे. ह्या योगाला 'चितचैतन्ययोग' असे नाव दिल्यास ते अयथार्थ ठरणार नाही, असे वाटते. हा चितचैतन्ययोग साधणे हे नागेशपंथीयांचे अंतिम उद्दिष्ट आहे, हे लक्षात घेतल्यास 'ते नाथसंप्रदायी की चैतन्यसंप्रदायी' हा वादही व्यर्थ ठरतो. नागेशपंथ हा कोणत्याही एका विशिष्ट संप्रदायाचे अनुसरण करणारा पंथ नसून, अंतिम उद्दिष्ट व ते साधण्याचा मार्ग ह्याविषयी वडवाळसिद्ध नागेश

व अज्ञानसिद्ध ह्यांनी स्वतंत्रपणे विचार करून जी वाट दाखविली त्या वाटेने जाणारा हा स्वतंत्र पंथ आहे, असेच म्हणावेसे वाटते.

अज्ञानसिद्ध हे भक्तिशास्त्र, अष्टांगयोग व वेदान्त ह्यांत पारंगत असून ते स्वतंत्र विचाराचे साक्षात्कारी सत्पुरुष होते, असे ह्यांच्या *वरदनागेश* ह्या ग्रंथावरून व *अकालज्ञान, स्वरूपनिर्वाण, पृच्छापत्र* ह्या प्रकरणांवरून स्पष्ट प्रचीतीस येते.

**रचना : मु.** – १. अकालज्ञान; ओ. सं. १३७; संपा. पारखे, व. वि.; भाइसंमंत्रै., व. १२, अं. १–४ (इ. स. १९६९), पृ. २५–३०; (हस्त. न. का. : श. १७९३; भानजी त्र्यंबक). २. पृच्छापत्र (प्रकरण); ओ. सं. २०१; भाइसंमंत्रै., व. ४६, अं. १–४, पृ. ४०–४८; (हस्त. न. का. : श. १७९३; नक्कलकार भानजी त्र्यंबक, मोहोळ). ३. वरदनागेश; अ. १२; ओ. सं. २१२५; संपा. पठाण, यू. म.; औरंगाबाद, १९७०. ४. संकटहरणी; अ. ७; ओ. सं. १३८; संपा. मोहोळकर, शं. ना.; सोलापूर, १९४९. ५. स्वरूपनिर्वाण; ओ. सं. १९९; संपा. जोशी, म. रा.; मसंप., जाने. १९७२, पृ. ७६–९१ (पृ. ७३ ते ७५, प्रास्ताविक). ६. अज्ञानसिद्धविरचित पोवाडा; श्रीगुरुप्रताप; संपा. मोरजे, गंगाधर; दोन पोवाडे; मसंप.; ऑक्टो. १९६८; पृ. ११०–११९. **अमु.** – १. काळज्ञान; ओ. सं. ५११. २. जीवब्रह्माभेदलक्षण; ओ. सं. ५०२. ३. तत्त्वबोध; ओ. सं. २०१. ४. वासुदेव. ५. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. २. **शंका.** – १. गुरुशिष्यसंवाद. २. पंचीकरण प्रमेय.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : कवि अज्ञानसिद्ध; जुवानसं., धारवाड, १९६४; पृ. १–१४. २. कुळकर्णी, पां. ना. : अज्ञानसिद्ध नागेश आणि त्यांचें 'नागेशमाहात्म्य'; पुढारी, दीअं. १९७३; पृ. ७७–८४. ३. चांदोरकर, पां. मा. : वरदनागेश; भाइसंमंषसंवृ., श. १८४०; पृ. २२२–२२६. ४. जोशी, म. रा. : स्वरूपनिर्वाण; मसंप., जाने. १९७२; पृ. ७३–७५. ५. ढेरे, रा. चिं. : नागेश संप्रदाय (डॉ. पठाण ह्यांच्या पुस्तिकेचे परीक्षण); इंद्रायणी, मार्च–एप्रिल १९६४; पृ. २९–३२. ६. पठाण, यू. म. : अज्ञानसिद्धविरचित 'वरदनागेश'; नभामा., एप्रि. १९७०, पृ. ५०–५९. ७. पारखे, व. वि. : अज्ञानदासकृत अकालज्ञान; भाइसंमंत्रै., श. १८९१; पृ. २२–२५. ८. पारखे, व. वि. : अज्ञानसिद्ध कवीची अप्रकाशित काव्यरचना – पृच्छापत्र ; भाइसंमंत्रै., श. १८८९, पृ. ३६–४८. ९. मोरजे, गंगाधर : दोन पोवाडे; मसंप., ऑक्टो. १९६८, पृ. १०१–११०.

**० अज्ञानसिद्ध नागेश** – पहा **अज्ञानसिद्ध नागनाथ.**

**आएमुनी कारंजकर / ० अनंत आयमुनी / ० अनंतमुनी कारंजकर** [अंदाजे श. १५८४ / इ. स. १६६२] महानुभाव कवी. हे कवीश्वर आम्नायातील कमलाकर ऊर्फ कोमराज कारंजेकर (इ. स. चे १६ वे शतक) ह्यांचे शिष्य. ह्या कोमराजांचा उल्लेख कृष्णमुनीकृत *वृद्धाचारात* (र. श. १५९२ / इ. स. १६६०; संपा. ज. शा. देशपांडे; महानु., सप्टें.–ऑक्टो. १९७२) येतो तो असा : "सिक्ष बायांबासी । होते जे विदेशी । ते कोमराजासी । निर्वाळती ॥ ३९० ॥" ह्या *वृद्धाचारात* मुनिव्यासशिष्य कमळाकरमुनींपासून जी कारंजेकर पिढी सुरू झाली त्यांच्या वंशाची माहिती येते. आएमुनींच्या नावाचा निर्देश मात्र तेथे केलेला नाही. आएमुनींचे गुरू कमलाकर हे १३ व्या शतकाच्या अखेरीस होऊन गेलेल्या कमळाकरमुनींहून वेगळे होत. कोमराज ऊर्फ कमलाकर ह्यांचे निर्याण श. १५३० / इ. स. १६०८ मध्ये झाल्याचा निर्देश कवीने रचलेल्या कोमराजांच्या *अन्त्यवर्णनाच्या* ओव्यांत आढळतो (मवाइ., खं. २; संपा. ल. रा. पांगारकर; पुणे, १९७२; पृ. ५७५).

कवीची रचना बरीच असून वि. ल. भावे ह्यांच्या महानुभाव ग्रंथकारांच्या सूचीत (पृ. २) तिचा निर्देश येतो. ह्या ग्रंथाची हस्तलिखिते महंत गोपीराज ह्यांच्या मठातील ग्रंथसंग्रहात (रिद्धपूर) उपलब्ध आहेत. वर निर्देशित केलेले *कोमराज-अन्त्यवर्णन* काव्य भावे ग्रंथसूचीत दत्तराज चोरमागे व आएमुनी अशा दोन्ही कवींच्या नावांवर दिलेले आहे पण मूळ रचना आएमुनींची असून दत्तराज कवीने तिची नक्कल केली असावी असे दिसते. ही सर्व कविता ओवीबद्ध प्रकरणात्मक स्वरूपाची असून ती श. १५८४ च्या सुमाराची आहे (कवीच्या *बाळक्रीडा* ग्रंथाच्या अखेरीस श. १५८४ हा र. श. दिलेला आहे). स्वतःचा उल्लेख कवी आएमुनी, कमलसुतेशा, कमलाख्यसुतु, कमलाख्य डिंभु अशा नावांनी करतो.

कवीचे *श्रीकृष्ण-बाळक्रीडा* हे १८७ ओव्यांचे काव्य भक्तिभावनेच्या आर्द्रतेने ओथंबले आहे. थोडक्या शब्दांत समर्पकपणे प्रसंगचित्र रेखाटणे हे कवीच्या प्रतिभेचे वैशिष्ट्य होय. आएमुनींच्या कवितेवर अभिप्राय देताना प्रा. व. दा. कुळकर्णी म्हणतात : "त्याचे प्रत्येक काव्य उत्कट भक्तिकाव्य आहे. वरवर पाहता काव्यातून रचनेची खटपट आणि कृत्रिमता दिसून येईल. परंतु काव्याच्या अंतरंगात शिरताच ती उत्स्फूर्त, अकृत्रिम, सहजसुलभ आणि ओघवती असल्याचे प्रत्ययास येते."

म. रा. जोशी

**रचना : अमु.** – १. ईशप्रार्थना; अभंग २८ (ज्ञ आद्यंताक्षरी); २. पंचकृष्णनाममाळा / माहिंभट भेटी (श्रीचक्रधरमहिंद्रोपदेश); अभंग ५६; ३. पंचकृष्णमूर्तिवर्णन; अभंग ३५ (कृ आद्याक्षरी); ४. वासुदेव-विवाह / श्रीकृष्ण-जन्म; अभंग २७ (ट–ठ आद्यंताक्षरी); ५. श्रीकृष्ण-बाळक्रीडा / मुरारी-बाळलीला; अभंग १८७ (ल आद्याक्षरी); र. श. १५८४, शुभकृत् संवत्सर, आषाढ शु. पौर्णिमा; ६. श्रीकृष्ण-रुक्मिणी-सैंवर; अभंग ६३ (भ आद्याक्षरी); र. श. १६०२, बुधवार, कार्तिक शु. १५, रौद्र संवत्सर (डॉ. कोलते प्रत); ७. श्रीचक्रधर-नागार्जुन भेटीग्रामनाममाळा (स्थानपोथीच्या आधारे); अभंग ५२; ८. ज्ञाननाममाळा; अभंग ५२. **शंका.** – कोमराज अन्त्यवर्णन.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कुळकर्णी, व. दा. : आएमुनी कारंजकर आणि त्याचे काव्य – एक परिचय; महानु., सप्टें. १९७५, पृ. १–१८.

**आऊबाई** [इ. स. चे १३ वे शतक, उत्तरार्ध] कवयित्री. नामदेवांची बहीण. "एक कोटी अभंग । लक्ष वरती सोळा । प्रेमरस जिव्हाळा । आऊबाईचा ॥" असे तुकारामांनी म्हटले असले तरी ह्यांचा आज केवळ एकच अभंग उपलब्ध आहे (*नामदेव गाथा*; मुंबई, १९७०; पृ. ८७६).

**० आगीनदास** – पहा **अग्निदास.**

**आचार्यसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ८.

**आजम / ० अजमा** [इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] मुसलमान कवी. गुरू : शेख महंमदबाबा श्रीगोंदेकर. आजमकवींची, शेख महंमदांची (गुरूवरील) एकच आरती उपलब्ध असून ती वा. सी. बेंद्रे संपादित *शेखमहंमद ह्यांच्या कवितासंग्रहात* छापली आहे (पृ. १२६). ह्यांच्या नावावरील काही अभंग व पदे अशी रचना समर्थवाग्देवतामंदिर-बाडांतून सापडते (बा. १४४९).

**० आजीउ लींग नागनाथ** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**० आणोबास** – पहा **आनेराज व्यास.**

**आणाप्पा / ० आनंद–४ / ० आनंदमूर्ति / ० आनंदस्वामी–१** [इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] रामदासी कवी. समर्थशिष्य आणाप्पा ह्यांचा मठ नीलंगे (जि. उस्मानाबाद, मराठवाडा) येथे होता. हे

मूळचे साताऱ्याकडील बत्तीस शिराळ्याचे कौंडिण्यगोत्री ब्राह्मण. वयाच्या अठराव्या वर्षीच ह्यांनी समर्थसंप्रदायाची दीक्षा घेतली (*पादुकाख्यान*, आण्णाप्पाशिष्यकृत त्रुटित चरित्र). दीक्षा दिल्यानंतर समर्थांनी ह्यांचे नाव आनंद ठेविले. पुढे नीलंगे मठाचे अधिपती म्हणून ह्यांची योजना केली. नंतर लोक त्यांना आनंदमूर्ति / आनंदस्वामी असे म्हणू लागले. ह्यांचे पट्टशिष्य जयराम व मठपरंपरा पुढीलप्रमाणे : श्रीसमर्थ > आण्णाप्पा > जयराम > रामाजी > हरि > मनोहर > कोनेर. आण्णाप्पांची समाधी नीलंगे गावाच्या उत्तरेकडील शेतात पूर्वाभिमुख आहे. पुण्यतिथीचा दिवस मार्गशीर्ष वद्य तृतीया. शक उपलब्ध नाही.

ह्यांच्या नावावर १२ ओव्यांचे *स्वप्नमंदोदरी*, १८ कडव्यांचे *हनुमंतजन्म* अशी दोन प्रकरणे व एकच पद उपलब्ध आहे. पद गुरुपर असून त्यातील दोन पंक्ती अशा : "सत्स्वरूपीं मन उन्मन जालें। निरसुनिया सविकाया रे ॥ आनंदस्वामी परात्परदाता। केलि कृपेची छाया रे ॥"

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : श्रीसमर्थशिष्य आण्णाप्पा (मठ नीलंगे) : परंपरा, ग्रंथसंग्रह, कवन वगैरे; श्रीसांप्रविवि., खं. २; पृ. १०५–११२.

**आंताजीपंत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सुभाषित श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**(पाद्री) आंतोनियु-द-सॉलदांज / ० सालदांज (पाद्री), आंतोनियु व** [इ. स. १५९८ – १५ डिसें. १६६३] पोर्तुगीज ग्रंथकार व कवी. ह्यांचा जन्म आफ्रिकेतील माझागावच्या किल्ल्यात झाला. ह्यांचे वडील पोर्तुगीज व आई इटालियन होती. सैनिकी पेशा स्वीकारून शौर्य गाजविण्यासाठी हे वयाच्या सोळाव्या वर्षी हिंदुस्थानात आले. पण काही कारणाने ह्यांचा हा मूळचा बेत तसाच राहून इ. स. १६१५ साली हे जेजुइट पंथात शिरले. तेथील प्रशिक्षण संपल्यावर ह्यांची सासष्टीच्या (गोवे) मिशनमध्ये धर्मोपदेशक म्हणून नेमणूक झाली. तेथे ह्यांनी सतत चाळीस वर्षे धर्मप्रसाराचे काम केले. मिशनमध्ये असताना ह्यांनी गोमंतकी बोलीत प्रावीण्य मिळविले व त्या बोलीत ग्रंथनिर्मिती केली. ह्यांचा ग्रांथिक मराठीचाही व्यासंग दांडगा होता.

*सांतु आंतोनीची अचर्या* (चमत्कार) हा सालदांजांचा ग्रंथ अन्य कोणत्यातरी भाषेतील (बहुधा पोर्तुगीजमधील) ग्रंथावरून भाषांतरित किंवा रूपांतरित केलेला आहे. सांतु आंतोनी ह्या संताने केलेल्या चमत्कारांचे वर्णन ह्या ग्रंथातील दोन खंडांत केले आहे. विषयाचे प्रतिपादन केव्हा केव्हा उपमादृष्टान्तादिकांनी सुस्पष्ट केले आहे. मराठीत रूढ असलेले अनेक वाक्प्रचार, विशिष्ट शब्दप्रयोग व ग्रांथिक मराठीत न आढळणारे पण हल्ली गोमंतकी बोलीत प्रचारात असलेले शब्द ह्या ग्रंथात वैपुल्याने आढळतात. हा ग्रंथ इ. स. १६५१ त रायतूर येथे मुद्रित झाला असावा असे मत डॉ. वि. बा. प्रभुदेसाई ह्यांनी व्यक्त केले आहे. *सांतु आंतोनीची जीवित्वकथा* ह्या ओवीबद्ध चरित्राचा विषय अगोदरच्या ग्रंथाप्रमाणेच आहे. ह्या ग्रंथास पुराण असे म्हटले असून तो ग्रांथिक मराठीत रचला आहे. हे ओवीबद्ध चरित्र इ. स. १६५५ साली रोमन लिपीत प्रसिद्ध झाले. त्याचे प्रा. प्रियोळकर ह्यांनी देवनागरीत लिप्यंतर करून इ. स. १९५४ साली ते मराठी संशोधन मंडळ, मुंबई ह्या संस्थेतर्फे प्रकाशित केले. [⇨ ३.] *जीवितवृक्षाचीं फळें* हा तिसरा ग्रंथ बोली व ग्रांथिक अशा दोन्ही प्रकारच्या भाषेत रचला आहे. ह्या ग्रंथाचे गोमंतकी बोलीतील नाव *जिवित्वरुख्याचीं अमृता फळां, आमंच्या आत्म्या, वा कुडीक सासायेवंत* असे आहे. हा छापलेला मात्र दिसत नाही. ह्याच्या हस्तलिखिताची मायक्रोफिल्म मराठी संशोधन मंडळ, मुंबई येथे आहे. *कोंकणीचा कोश* व आणखी काही ग्रंथ ह्यांच्या नावावर नमूद केलेले आढळतात. पण ते आज तरी उपलब्ध नाहीत.

**रचना : मु.** – १. सांतु आंतोनीची अचर्या (चमत्कार); रायतूर, १६५१. २. सांतु आंतोनीची जीवित्वकथा; मुंबई, १९५४. **अमु.** – १. जीवितवृक्षाचीं फळें; स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज, लंडन, येथे उपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. डॉ. प्रभुदेसाई, वि. बा. : पाद्री आंतोनियु द सालदांज : जीवन आणि वाङ्मय; सशगोबो., मुंबई, १९६३; पृ. ७२, २२०–२४३. २. प्रियोळकर, अ. का. : 'सांतु आंतोनीची अचर्या' या ग्रंथाची भाषा; मसंप., जुलै १९६३; पृ. १–१६. ३. प्रियोळकर, अ. का. : प्रस्ता., सांतु आंतोनीची जीवित्वकथा; मसंप., ऑक्टो. १९५४; पृ. १–१६.

**आत्मगोपाळ** [का. अनु.] पदकार. ह्या कवीची दहावीस मराठी पदे व काही हिंदी रचना चाफळ खोऱ्यातील संग्रहात शं. श्री. देव ह्यांना उपलब्ध झाली. ह्यांचे एक पद श्री देव ह्यांनी छापले आहे (रासं., खं. १, पृ. ३१४). त्यातील काही ओळी अशा : "काय देईल मनुष्य देणें। नैश्वर्य खोटें नाणें ॥ धृ.॥ गुरु दाता देवाधिदेव। आम्हा नाही आन उपाव ॥४॥ आत्मगोपाळपणें मुरावें। हेंचि धालेपण जाणावें॥ ५॥"

**आत्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**आत्मनाथ** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – औटपीठ मूळवळणी : गोंधळ पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. २१.

**आत्मबोध** [अंदाजे श. १७६० / इ. स. १८३८] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – ज्ञानदर्पण; ओ. सं. ४५७; र. का. : श. १७६०; मसंमं., हवना., पृ. २.

**आत्मलिङ्ग (सिद्ध)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – वेदान्त मिश्रभाषा पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**आत्मानंद** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] आनंदसंप्रदायी कवी. आत्मानंदांची विशेष अशी माहिती त्यांच्या ग्रंथातून सापडत नाही. आत्मानंदांनी त्यांच्या *गुरुगीता टीका* ग्रंथात जी गुरुपरंपरा दिली आहे ती कल्याणीचे सुप्रसिद्ध संत पूर्णानंद ह्यांची आहे. आपल्या गुरूस कवी 'रामचंद्र ऋषि', 'राम', 'आत्माराम' अशा नावांनी संबोधतो. एकंदर परंपरेचा विचार केल्यास कवीने ग्रंथाची रचना श. १६५० / इ. स. १७२८ च्या सुमारास केली असावी असे मत ना. ब. जोशी ह्यांनी मांडले आहे.

ह्या ग्रंथाची पोथी ना. ब. जोशी ह्यांना सिंदगी (जि. विजापूर) येथे उपलब्ध झाली. मूळ स्कंदपुराणांतर्गत १३७ श्लोकांच्या *गुरुगीते*वर कवीने एकूण १००४ टीकेच्या ओव्या रचल्या आहेत. ग्रंथाच्या भाषेवर कानडीची बरीच छाया पडली आहे. ग्रंथरचनेचा हेतू मुमुक्षूंना मोक्षप्राप्ती व्हावी असा सांगितला आहे. कवीने ही टीका लक्ष्मीनारायण म्हणजेच पूर्णानंद ह्यांना अर्पण केली आहे. हा ग्रंथ अद्यापि अप्रकाशित आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, ना. ब. : आत्मानंदकृत गुरुगीता टीका; इंद्रायणी, मार्च १९६३, पृ. ५०–५६.

**आत्मानंदशिष्य** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**आत्माराम–१** – पहा **आत्मारामस्वामी एकेहाळीकर.**

**आत्माराम–२** [का. अनु.] कवी. ह्यांच्या *अपरोक्षानुभूति* ग्रंथाचा उल्लेख गो. का. चांदोरकरांनी केला आहे. ह्यांनी पदपदांतरे व लावण्या रचल्या आहेत अशी माहिती ते देतात (संककासू., पृ. १२४).

**आत्माराम–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. गोपीचंदाख्यान; ग्रं. सं. ४००. २. गुरुपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. २, ३.

० **आत्माराम–४** – पहा **आत्मारामस्वामी सिंदखेडकर.**

**आत्माराम–५** [का. अनु.] शाहीर. ह्यांची एक लावणी *अंधारातील लावण्या* ह्या संग्रहात मुद्रित (पृ. २१०–२११).

**आत्माराम–६** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – चार पदे; कासं. ८, क्र. ९१; पृ. ७५–७७.

**आत्माराम साळी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**आत्मारामस्वामी येक्केहाळीकर** [ ? – समा. श. १७४२, चैत्र व. ७, बुधवार / इ. स. १८२०] रामदासी कवी. मूळ नाव तिपण्णा. वडील निर्वाणीपंत; माता उमा. राहणारे नाघोरचे. योगायोगाने आपचंद मठपती रामचंद्रबुवा ह्यांच्याशी गाठ पडल्यानंतर ह्यांनी समर्थसंप्रदायाची दीक्षा घेतली. ह्यांची गुरुपरंपरा : श्रीसमर्थ > कल्याणस्वामी > शिवराम > रामचंद्र > आत्माराम अशी आहे. बेदर जिल्ह्यातील येक्केहाळीस (हल्लीच्या आंध्रप्रदेशात) ह्यांचा मठ आहे. आत्माराम महाराज हे गृहस्थाश्रमी होते. पण त्यांना संतती नव्हती. रंक नावाच्या ह्यांच्या शिष्याने लिहिलेल्या *आत्मलीला* (त्रुटित) ह्या ग्रंथात हे चरित्र सापडते. कुंडलवाडीचा रामदासी मठ ह्यांनीच स्थापला होता. ह्यांचे काळप्पा नावाचे एक शिष्य होते. ह्यांचे दुसरे एक शिष्य नरसोबा ह्यांचा मठ भालकी ह्या गावी होता. आत्मारामस्वामींची समाधी येक्केहाळीस आहे.

आत्मारामस्वामींचा *दासविश्रामधाम* हा समर्थचरित्रविषयक ग्रंथ प्रचंड असून त्याचे १२१ अध्याय व १६३०२ एवढी ओवीसंख्या आहे. ह्यात समर्थचरित्राच्या तुरळक धाग्यांबरोबर ह्यांची सुमारे ११०० पदे, ह्यांचे शिष्य रंक ह्यांची पदे, समर्थांची तसेच इतर अनेक कवींची असंख्य कविता, संतांची वचने व संप्रदायविषयक माहिती संकलित केलेली दिसते. ह्या ग्रंथाचा रचनाकाळ अंदाजे इ. स. १८०३ ते १८०८ असा आहे. आर्त जनांसाठी रचलेल्या ह्या ग्रंथाचा साधकांनी उपयोग करून घ्यावा असेही लेखकाने सांगितले आहे. ग्रंथ ओवीबद्ध असला तरी ओवी गद्यप्राय व साधी आहे. ह्या ग्रंथाचे सर्वव्यापी स्वरूप पाहून ह्या ग्रंथास 'एन्सायक्लोपीडिया रामदासिका' (रामदासी संप्रदायाचा विश्वकोश) अशा शब्दांत शं. श्री. देव ह्यांनी गौरविले आहे (प्रस्ता., *दासविश्रामधाम*, पृ. २). ग्रंथाच्या दोन हस्तलिखित प्रती येक्केहाळी मठात आहेत. धुळे सत्कार्योत्तेजक सभेने हा ग्रंथ चार खंडांत छापून काढला आहे. [➪ ३.] ह्या ग्रंथाशिवाय अनेक पदपदांतरे, अभंग, प्रकरणे अशी विपुल रचना कवीने केली असून समर्थांवरील त्यांची पाच पदे देवांनी छापली आहेत (रासं., खं. २, पृ. २६२–६३). ह्यांचे ६८ कलमांचे दीर्घ मथळ्याचे एक प्रकरण असून त्याची माहिती देव ह्यांनी दिली आहे (रासं., खं. २, पृ. २५६). ह्यात परब्रह्मवस्तूपासून आरंभ करून भरतखंडातील अनेक क्षेत्रांचा, देवतांचा, संतसज्जनांचा, त्यांच्या स्थानांचा, आपल्या परंपरेचा, चाफळ, सज्जनगड, डोमगाव, आपचंद इत्यादी अनेक स्थळांचा स्मरणपूर्वक उल्लेख केला आहे. ह्या उल्लेखांत भाविकाला परमार्थ दिसेल तसाच चिकित्सकाला इतिहासही आढळेल. – शं. श्री. देव; रासं., पृ. २५६.

**रचना : मु.** – १. दासविश्रामधाम (समर्थचरित्र); अ. १२१; ओ. सं. १६३०२; संपा. देव, शं. श्री.; रामदासी ग्रंथमाला, भा. ७, खं. १ ते ४ (मुद्रण १९१२ ते १९२३ च्या दरम्यान). २. वंशावळी तारकप्रशांश, अभंग; कडवी १५; रासं., खं. २; पृ. २४९. ३. श्रीरामदास पंथक्रमसार; ओ. सं. ५४८; रामदासी ग्रंथमाला, भाग १२; धुळे; १९१८ चा सुमार. **अमु.** – १. अक्षरमालिका; ओ. सं. ८०; श्लो. १०; अभंग १; पद १; अष्टाक्षरी ९; २. आत्महित; ओ. सं. १५०; ३. अभंग, आरत्या, पदपदांतरे; ४. चिंतनस्मरण प्रकरण; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, कृ. पां. : आत्मारामकृत 'दासविश्रामधाम'; सज्जनगड; फेब्रु.–मार्च–एप्रि. १९६५; पृ. २४–३३. २. देव, शं. श्री. : आत्मारामस्वामीकृत 'दासविश्रामधाम'; श्रीरामदास आणि रामदासी, भा. ७, धुळे, १९२३.

**आत्मारामस्वामी सिंदखेडकर** / ० **आत्माराम–४** [ ? – समा. अंदाजे श. १६५३, माघ शु. १५ / इ. स. १७३१] आनंदसंप्रदायी कवी. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. पूर्वाश्रमी खानदेशातील चाळिसगावी वास्तव्य. हे ब्रह्मचारी होते. वृद्धावस्थेत श्रीनिर्मलानंद परमहंस स्वामींपासून ह्यांनी संन्यासदीक्षा घेतली व आनंद संप्रदायाप्रमाणे आपला मठ सिद्धपूर (हल्लीचे शिरपूर, तालुका वाशीम) येथे स्थापन केला, असे ह्यांच्या सदानंद ह्या शिष्याने रचलेल्या एका पदावरून कळते (पदाचे मुद्रण : मकच., खं. ४, पृ. ६६). सिंदखेड येथे ह्यांची समाधी आहे. ह्यांची परंपरा आज तरी सिंदखेड येथे आढळत नाही. चोपडे येथे मात्र ह्यांचे शिष्य सदानंदस्वामी ह्यांचा मठ आढळतो.

श्री आत्मारामस्वामी ह्यांनी श्रीक्षेत्र माहूर येथे उग्र तपश्चर्या केल्यानंतर ह्यांना दत्तात्रेयप्रभूंचा साक्षात्कार झाला. ह्यानंतरच निर्मलानंदांकडून ह्यांनी उपदेश घेतला. खानदेश-वऱ्हाडकडील बाजूस आनंद संप्रदाय प्रसिद्ध करून मुसलमानी सत्तेपासून हिंदुधर्माचे रक्षण करण्याचे कार्य ह्या साधुपुरुषाने केले. श्रीरंगपट्टण येथे *टीकेसह नीलांबरी* हा ह्यांचा ग्रंथ उपलब्ध आहे. ह्यांनी संस्कृतात अनेक प्रकरणे रचली. आत्मारामस्वामींचा आध्यात्मिक अधिकार फार मोठा होता, असे ह्यांच्या एकंदर चरित्रावरून आणि ग्रंथरचनेवरून दिसते. ह्या अध्यात्मज्ञानाचेच विवरण आपल्या संस्कृत आणि मराठी (प्राकृत) रचनेमधून ह्यांनी साधकांसाठी केलेले आहे. हिंदी, गुजराती, तेलुगू, कानडी, फारसी वगैरे भाषांतही ह्यांची स्फुट कविता पुष्कळ आहे.

**रचना : अमु. – मराठी ग्रंथ :** १. आत्मबोध; २. उत्तरअजपा; ३. चतुर्दश चक्रावळी; ४. नीलांबरशास्त्र; ५. परज्ञानसागर; ६. महार्णव चित्प्रकाश; ७. मन, स्वरूप, जीव, शिव, निर्वाणगीता-तत्त्वसार, योगशास्त्र आदी व संप्रदाय ग्रंथ; ८. मुसलमानांचे निमाज; ९. स्फुट पदे, स्तोत्रे इ. **संस्कृत ग्रंथ :** १. अनीलपुराणज्ञान; २. खेचरीमुद्रा : त्रिविधप्रकार, वेदवच. ३. चित्प्रकाश; ४. देहचतुष्टय; ५. वचनसमुद्र; ६. हंसलक्ष्मी.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : आत्मारामस्वामी सिंदखेडकर; मकच., खं. ४; मुंबई, १९१६; पृ. ६५–८४.

**आत्मारामानंदनाथ** [का. अनु.] गोमंतकीय कवी. संत नायकस्वामी ऊर्फ प्रकाशानंदनाथ ह्यांचे गुरू. निवासस्थान : अंत्रूज. *सुभाषितरत्नावलि* हा ह्यांचा पहिला ग्रंथ असून त्याशिवाय ह्यांची चार-पाच किरकोळ पुस्तके आहेत. ह्यांचे अनेक स्फुट अभंग *संतकाव्यसंग्रहात* प्रसिद्ध झाले आहेत (ना. भा. नायक; गोमका.; रिवण, गोवा, १९६९; पृ. २२).

**आत्यारामस्वामी** – पहा **आत्यास्वामी.**

**आत्यास्वामी** / ० **आत्यारामस्वामी** / ० **विठ्ठल रंगमूर्ति** [ ? – समा. श. १६२६, पार्थिव, श्रावण व. ८ / इ. स. १७०४) कवी. रंगनाथस्वामी निगडीकरांचे धाकटे बंधू. मूळ नाव विठ्ठल. हे श्रीधरकवींच्या वंशातले. श्रीधरांचे आजोबा व ह्या दोघांचे वडील हे सख्खे बंधू. परंपरेने ह्यांच्या वंशात विद्वत्त्व आणि काव्यकर्तृत्व चालत आलेले दिसते. ह्यांनी आपल्या थोरल्या बंधूंच्या नावे बरीच रचना केल्याने कोणाची कोणती हे ओळखणे कठीण होऊन बसले आहे.

**रचना : अमु.** – १. नारदचरित्र; २. रामदासस्वामीचरित्र; ३. नारदाची लावणी; ४. पदपदांतरे (संककासू., पृ. ९).

**आदिनाथ–१** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**आदिनाथ–२** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] शाहीर. नागेश ह्या शाहीराचा शिष्य. लावण्यांना "निरनिराळ्या रागांतल्या चाली लावून, अनेक रागांमध्ये गाता येण्यासारखी कवने रचण्याचा प्रघात नागेशाच्या आदिनाथ वगैरे शिष्यांनी सुरू केला. आदिनाथांचे शिष्य गोविंदनाथ, सिद्धनाथ हे आदिनाथांवरून आपल्या रचनेस 'राउळाचे गाणे' असे म्हणू लागले." (मसा., आ. ४, पृ० ७२६).

**आदिनाथ भैरव** [ ? – समा. श. १७६७, वैशाख व. ११ / इ. स. १८४५] नाथसंप्रदायी कवी. निघोजे (तालुका खेड, जिल्हा पुणे) ह्या गावचे. येथे भैरवनाथाचे मंदिर आहे. ह्यांचे घराणे गुरवाचे. पिढ्यानपिढ्या भैरवनाथांच्या उपासनेत असलेले. आदिनाथांच्या पित्याचे नाव भैरवनाथ. आदिनाथांस संप्रदायदीक्षा त्यांच्याकडूनच मिळाली. ह्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : आदिनाथ (शंकर) > मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ > गहिनीनाथ > प्रकाशनाथ > चिद्रंजननाथ > उत्पत्तिनाथ > प्रवृत्तिनाथ > हंसनाथ > निरंजननाथ > सिद्धनाथ > भैरवनाथ > आदिनाथ. आदिनाथांचे निधन नाशिक येथे झाले.

"आदिनाथ शिवाच्या परंपरेतील वाङ्मयाप्रमाणेच, आदिनारायण विष्णूच्या परंपरेतील वाङ्मयाचाहि आदिनाथ भैरवांनी व्यासंग केलेला दिसतो. प्राचीन मराठी संत-पंत-वाङ्मयाचे त्यांनी केलेले आलोडन *नाथलीलामृता*च्या [ ⇨ ३ ] ओवीओवीतून ओसंडत आहे." (रा. चिं. ढेरे; प्रस्ता., श्री *नाथलीलामृत,* तृतीय संस्कारित मुद्रण, पुणे, १९७२).

*नाथलीलामृत* हा ग्रंथ (२८; ५४९३) आदिनाथ भैरव ह्यांनी सातारा जिल्ह्यातील विटे ह्या गावी श. १७५६ (इ. स. १८३४) मध्ये लिहून समाप्त केला. ह्या ग्रंथाचे पहिले मुद्रण इ. स. १८६९ साली झाले. तदनंतर इ. स. १८९८ व इ. स. १७७२ साली ह्यांच्या पुनर्मुद्रित आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या.

आदिनाथ भैरव हे जसे विद्याव्यासंगी तसेच साक्षात्कारी नाथयोगी होते. *नाथलीलामृत* ह्या ग्रंथाव्यतिरिक्त ह्यांनी आणखीही काही रचना केली असावी.

**आदिनारायण** [का. अनु.] पदकार. ह्या कवीची १६ पदे वा. दा. ओक संपादित *पदसंग्रह, भाग ३* (मुंबई, १९०१) मध्ये मुद्रित झाली असून इतर पदरचना समर्थवाग्देवतामंदिर व तंजावर येथील सरस्वती महाल ग्रंथालयातील हस्तलिखित संग्रहात आढळते.

**आदेश / ० आदेशि** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामपर ४ पदे; पदगुच्छ, तंजावर, १९६९, पृ. ३२–३३. **अमु.** – भक्तिज्ञानबोधपर पद व 'पिंगळा फकीर', हिंदी पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० आदेशि** – पहा **आदेश.**

**आनंद–१** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – 'साधुसंतविषयक' एक आरती (मआ., पृ. ३६३). **अमु.** – श्लोकबद्ध उत्तरकांड (सर्ग दोन), व पदे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**आनंद–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**आनंद–३** [का. अनु.] कवी. ह्यांचे *सूर्यविजय* काव्य असल्याचा उल्लेख चित्रावशास्त्री करतात. ते वि. ल. भावे ह्यांच्या संग्रहात असल्याचा गो. का. चांदोरकरांनी उल्लेख केला आहे (मचको., पृ. १०४, संककासू., पृ. ९).

**आनंद–४** – पहा **आण्णाप्पा.**

**आनंदचिन्मय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० आनंदचैतन्य** – पहा **तुकेशसुत चैतन्यनाथ.**

**आनंदतनय / ० अरणीचा शिपाई / ० अरणीबाबा / ० आनंदनंदन / ० आनंदसुत / ० आनंदाख्यतनय / ० आनंदाचा बाळ / ० आनंदात्मज / ० आनंदात्मजपरमानंद** [का. अनु.] आख्यानकवी. कर्नाटकातील अरणी ह्या गावी ह्यांचे तीर्थरूप आनंदराव देशपांडे ह्यांचे वास्तव्य असे. घराणे भारद्वाजगोत्री, आश्वलायनशाखी, ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणाचे. कवीचे मूळ नाव गोपाळ. परंतु स्वतःचा उल्लेख कवी आनंदतनय, आनंदनंदन, आनंदसुत अशा विविध टोपणनावांनी करताना दिसतो. ह्यावरून कवीचे गुरू त्याचे वडील आनंदराव हेच असावेत असे वाटते. हे रामोपासक होते. शहाजीराजांचे गुरू म्हणून आनंदतनयांचे नाव घेतले जाते. गोसावीनंदन व रघुनाथपंडित ह्यांचे हे समकालीन असावेत असा तर्क केला जातो (वा. दा. ओक : *आनंदतनयांची कविता,* प्रस्ता.).

काव्यरचना प्रामुख्याने आख्यानपर स्वरूपाची व *भारत, भागवत, रामायण* ह्या ग्रंथांतील कथांच्या आधारे केलेली आहे. *शबर्याख्यान, सीतास्वयंवर, ताटकावध, सुदामचरित्र, उमारमासंवाद, कृष्णचरित्र, सेतुबंध, विश्वामित्राभिगमन, मार्कंडेयाख्यान* अशी एकूण वीस आख्यानकाव्ये व १७० पदे *काव्यसंग्रह* मासिकातून व मोडक आणि ओक संपादित *कवितासंग्रहा*तून मुद्रित झाली आहेत. शब्दालंकारनिष्ठ चित्रकाव्यरचनेकडे कवीचा ओढा दिसतो. विविध वृत्तरचनेबरोबरच सवाई, दिंड्या हे छंद व चूर्णिकागद्य ह्यांचाही अवलंब कवीने केला आहे.

एकंदरीत कविता रसाविष्कारी, आणि रचना प्रौढ व सुबोध आहे. "त्यांची कविता गेली २५० वर्षे हरिदासांच्या आणि रसिक श्रोत्यांच्या सप्रेम आदरास, समाधानास आणि मनोरंजनास साधनीभूत झाली आहे. अक्षरगणवृत्ते महाराष्ट्रभाषेत उतरण्याच्या संबंधाने अग्रपूजेचा मान आनंदतनयासच दिला पाहिजे." असे वा. दा. ओक ह्यांनी म्हटले आहे (*आनंदतनयांची कविता,* प्रस्ता.).

ह्यांनी रचलेली पदेही बरीच असून ती अर्थवाही आणि परिणामकारक आहेत. काव्यसंग्रहात प्रसिद्ध झालेल्या कवितेशिवाय *गर्भगीता,* पदे व आख्याने अशी ह्यांची आणखी काही अप्रसिद्ध कविताही उपलब्ध झाली आहे.

**रचना : मु.** – १. 'महाराष्ट्र कवि आनंदतनयकृत कवितासंग्रह'; संपा. मोडक, ज. बा. आणि ओक, वा. दा. (प्रस्तावनेसह); मुंबई, १८९१. **अमु.** – १. एणीचे चरित्र; २. गर्भगीता; ३. चेंडुफळी; ४. नौकागायन; ५. नौकाचरित्र; ६. यज्ञसंरक्षण; ७. राधाकृष्णविलास; ८. राधाविलास; ९. रामशबरी; १०. विरागपंचक; ११. विवेकपंचक; १२. शिवरात्रीचरित्र; १३. श्रीकृष्णनाटक; १४. सत्यभामाविलास; १५. सासुसुनेचे नाटक; १६. हरिणीचरित्र; इ. आख्याने व पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : आनंदतनय; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ३८३–३९४. २. पांगारकर, ल. रा. : आनंदतनयांची कविता; मुमुक्षु, जुलै १९२६; पृ. १९–२३. ३. राजाराम प्रासादी; भक्तमंजरीमाला, खं. ३; श. १८५४; पृ. ६७१–६७९.

**आनंदतनय त्रिमलसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**आनंदतनयसुत** [का. अन.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० आनंदनंदन** – पहा **आनंदतनय.**

**आनंदनाथ / ० आनंदबाबा** [ ? – समा. श. १७२५, माघ व. १२ / इ. स. १८०३] कवी. हे मूळ कुरोळीचे. कन्हाडास येऊन ह्यांनी जगदंबेची आराधना केली व तेथेच मठ स्थापन केला. शिष्य : प्रल्हादबाबा. ह्यांचा *भक्तमंजरी* ह्या नावाचा एक ग्रंथ (अमु.; वि. ल. भावे संग्रह) गो. का. चांदोरकर ह्यांनी नमूद केला आहे (संककासू., पृ. १०).

**आनंदपुरी** [का. अनु.] पदकार. ह्यांची पदे बीड येथील मठातील रामदासी संग्रहात उपलब्ध आहेत (सवामं. हस्त. सू., खं. २).

**० आनंदबाबा** – पहा **आनंदनाथ.**

**आनंदब्रह्मगुरुमूर्ति** [का. अनु.] कवी.

रचना : अमु. – शिवपार्वतीवर्णन; भाइसंमं.

**० आनंदमूर्ति** – पहा **आण्णाप्पा.**

**आनंदमूर्ती ब्रह्मनाळकर** [अंदाजे श. १५५० / इ. स. १६२८ – समा. श. १६१८, वैकुंठचतुर्दशी, कार्तिक शु. १४ / इ. स. १६९६] कवी. रामदासपंचायतनातील वयाने सर्वांत धाकटे. गो. का. चांदोरकर ह्यांनी ह्यांच्यासंबंधी *संतकविकाव्यसूची* (पृ. १०) मध्ये राजाराम प्रासादींच्या *भक्तमंजरी*वरून जी माहिती दिली आहे ती चुकीची आहे, असे ग. ह. खरे ह्यांनी म्हटले आहे (भाइसंमंत्रै., व. १०, अं. ३, पृ. १३७). ब्रह्मनाळ येथील आनंदमूर्तींच्या मठातील कुळकट व इतर कागदपत्रांतून उपलब्ध झालेल्या माहितीप्रमाणे ह्यांच्या वडिलांचे नाव बाळंभट बिन भातभट. ब्रह्मदेवभट हे ह्यांचे बंधू व सावित्री ही भावजय. कसबे ढालगाव हे यांचे वास्तव्याचे ठिकाण. ह्यांचे वडील विद्वान ब्राह्मण असून त्यांची जोशीपणाची वृत्ती होती. रंगनाथ मोगरेकरांच्या परंपरेतील रघुनाथस्वामी हे आनंदमूर्तींचे गुरू. रघुनाथस्वामी नाशिकक्षेत्रानजीक वाघरे येथे राहात असत. गुरुसेवेकरिता वयाच्या १७ व्या वर्षीच आनंदमूर्तींनी गृहत्याग केला. ह्यांच्या उत्कट गुरुभक्तीचे वर्णन *समर्थप्रतापात* (स. १७०९) गिरिधरांनी केले आहे. आनंदमूर्तींची गुरुपरंपरा श्रीशंकराचार्य > वासुदेवानंद > परमानंद > वैकुंठानंद > कृष्णानंद > रंगनाथस्वामी > काशिराजस्वामी > रघुनाथस्वामी > आनंदमूर्ती अशी आहे (सवामं., बा. ६२६). आनंदमूर्ती हे गृहस्थाश्रमी होते.

रघुनाथस्वामींकडून ब्रह्मज्ञानोपदेश घेऊन स्वतः सिद्ध पुरुष झाल्यानंतर ह्यांची ख्याती सर्वत्र पसरली. केशवस्वामी, जयरामस्वामी, श्रीसमर्थ अशा सत्पुरुषांची ह्यांच्याकडे येजा सुरू झाली. ह्यांचा शिष्यपरिवार बराच मोठा होता. अनेक राजकारणी पुरुषांनीही ह्यांचे शिष्यत्व पत्करले होते. रघुनाथस्वामींची समाधी व आनंदमूर्तींची समाधी कृष्णातीरी ब्रह्मनाळ (जि. सांगली) येथे आहेत. ह्यांची परंपरा पुढे ह्यांचे पुत्र कृष्णमूर्ती ह्यांनी चालविली.

आनंदमूर्तींची फारच थोडी कविता उपलब्ध आहे. ह्यांच्या सहा भूपाळ्या व सात वारांची पदे फक्त सांप्रदायिकांतच प्रसिद्ध व प्रचलित आहेत. ह्यांच्या नावावरील *रामचरित्रा*चा उल्लेख सूचीकारांनी केला आहे (संककासू., पृ. १०). राजाराम प्रासादी हे ह्यांना गीताकार म्हणतात. पण ही गीताटीका अजून उपलब्ध झालेली नाही (मसा., आ. ५, पृ. ८६१). ४७ चरणांचा *करुणामृत अभंग, दशावताराचा उद्गो* व पदपदांतरे इत्यादी रचना धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिरात व तंजावर येथील हस्तलिखित ग्रंथसंग्रहात उपलब्ध आहे. आनंदमूर्ती हे उत्तम कीर्तनकार होते. ह्यांची पदे प्रसिद्ध आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. खरे, ग. ह. : ब्रह्मनाळकर आनंदमूर्ती दप्तरांतील माहिती; भाइसंमंत्रै., व. १०, अं. ३, पृ. १३४–३८. २. देव, शं. श्री. (प्रस्ता.) : आनंदचरितामृत; गोपाळात्मज; सांगली, १९२५.

**आनंदराम** [का. अनु.] पदकार.

रचना : मु. – दधि व्यापार; लोकगीतसंग्रह; तंजावर, १९५०; पृ. ३७. अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १.

**आनंदसागर** [का. अनु.] कवी. तंजावर प्रांतातील झोळीरामबावाच्या मठात आनंदसागरांचा *रामचैतन्य* हा ग्रंथ सापडला अशी शं. श्री. देव ह्यांनी नोंद करून ठेवली आहे. तो मुद्रित झालेला नाही (सवामं., बा. १२००).

**० आनंदसुत** – पहा **आनंदतनय.**

**० आनंदसुत मुद्गल** – पहा **अनंतसुत मुद्गल.**

**० आनंदस्वामी–१** – पहा **आण्णाप्पा.**

**आनंदस्वामी–२** [का. अनु.] कवी. *भवभ्रमहारक भजनानंदलहरी*चा कर्ता, अशी माहिती *संतकविकाव्यसूची*कार देतात. ही रचना वि. ल. भावे ह्यांच्या हस्तलिखित पोथ्यांच्या संग्रहात आहे (पृ. १०).

**आनंदांकित** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० आनंदाख्यतनय** – पहा **आनंदतनय.**

**० आनंदाचा बाळ** – पहा **आनंदतनय.**

**० आनंदात्मज** – पहा **आनंदतनय.**

**० आनंदात्मजपरमानंद** – पहा **आनंदतनय.**

**आनेराज व्यास / ० अनंत पंडित–३ / ० अनंतमुनी / ० अनंतराव व्यास / ० अनोबास / ० आणोबास / ० गोपाळपंडित–१** [इ. स. १२६८–१३४०] महानुभाव ग्रंथकार. व्युत्पन्न व धर्मस्वरूपनिर्णयात पारंगत. पार(रि)मांडल्य आम्नायाचे (परंपरेचे) प्रवर्तक. आनेराजांचे मूळ नाव गोपाळपंडित. ह्यांच्या वडिलांचे नाव चक्रपाणी. मूळचे पैठणजवळील वरखेडवाडे येथील राहणारे. ह्यांचे आजे अनंतभट्ट हे कन्हरदेव यादवांचे कोषाधिकारी बनल्यापासून ह्यांच्या कुटुंबातील मंडळी देवगिरीस राहू लागली.

आनेराज व्यास हे जसे व्युत्पन्न व सैद्धान्तिक होते, तसेच प्रवचनकार होते. हे रामदेवराव यादवांची धाकटी राणी कामाइसा हिचे कारभारी व पुराणिक होते. रामदेवरावाच्या राजसभेत, एक थोर विद्वान व वादकुशल वक्ता म्हणून त्यांना बहुमानाने वागविण्यात येई. श्रीचक्रधरांशी भेट झाल्यानंतर ते महानुभाव पंथाकडे अधिकाधिक ओढले जाऊ लागले. चक्रधरांच्या निर्याणानंतर त्यांनी नागदेवाचार्यांकडून उपदेश घेतला, व पुढे पत्नी मृत्यू पावल्यावर व नागदेवाचार्यांच्या निधनानंतर, वैराग्य तीव्र होऊन ह्यांनी संन्यास घेतला व हे पंथात कायमचे प्रविष्ट झाले. तेव्हापासून हे अनंतमुनी किंवा आनेराज व्यास / आनोबास ह्या नावाने संबोधले जाऊ लागले असावे.

आनेराज व्यास ह्यांच्या नावावर *सुभाषितांताक्षरी, चौपद्या, दृष्टान्तव्याख्या, दृष्टान्तलक्षण, सूत्रपाठ* (वर्धित), *निर्वचनस्तोत्र* व *लक्षणरत्नाकर* ही रचना मोडते. त्यापैकी *लक्षणरत्नाकर* हा संस्कृत भाषेत रचलेला ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. महानुभाव पंथाचे आद्य प्रणेते श्रीसर्वज्ञ चक्रधर ह्यांच्या सकृद्दर्शनी संदिग्ध व परस्परविरोधी भासणाऱ्या वचनांचा अर्थनिर्णय करून त्यांतील सुसंगतपणा व्यक्त करण्यासाठी आनेराजपंडित ह्यांनी हा प्रबंध रचला. त्याच्यात वर्णिलेली बत्तीस लक्षणे, अथवा अर्थविनिश्चयासाठी लागणाऱ्या निरनिराळ्या बत्तीस युक्त्या अथवा तंत्रे, ह्यांचा वारसा श्रीसर्वज्ञ चक्रधरांकडून प्रथमतः म्हाइंभट्ट ह्या महानुभावीय पंडितांना मिळालेला होता. श्रीचक्रधरांच्या निर्याणानंतर (श. ११९४ / इ. स. १२७२ : सांप्रदायिक काल) नागदेवाचार्यांच्या नजरेखाली (श. ११९४ / इ.स. १२७२ – श. १२३४–३५ / इ.स. १३१२–१३) महानु-

भावीय वाङ्मयाची जी उभारणी झाली, त्यामध्ये, आनेराजबासांनी ह्या बत्तीस लक्षणांच्या व्याख्या बांधून व त्यांचे पोटभेद दाखवून आणि चक्रधरांच्या वचनांतील उदाहरणे घेऊन, ती लक्षणे लावून दाखविणारा हा संस्कृत प्रबंध तयार केला (ह. ना. नेने; *लक्षणरत्नाकर*, प्रस्ता., पृ. १–२). ह्या बत्तीस लक्षणांवर महानुभाव पंडित शारंगधर पुसदेकर ह्यांचा एक मराठीतील टीपग्रंथ उपलब्ध आहे. तसेच *बत्तीस लक्षणांची टीप* ह्या नावान एक विस्तृत भाष्यही लिहिलेले आढळते. हा टीपग्रंथ *पंचवार्षिक*कर्त्या भीष्माचार्यांचा असावा असे काहींचे म्हणणे आहे.

**रचना : मु.** – १. लक्षणरत्नाकर (अर्थनिर्णयशास्त्रावरील संस्कृत प्रबंध); र. श. १२१८ / इ. स. १२९६; संपा. नेने, ह. ना. (विस्तृत प्रस्तावना); नागपूर, १९३७. २. सुभाषित-अंताक्षरी; श्लो. सं. ३३. **अमु.** – १. चौपद्या. २. दृष्टान्तलक्षण; गद्य. ३. दृष्टान्त व्याख्या; गद्य. ४. निर्वचन स्तोत्र; गद्य. ५. सूत्रपाठ (केशवराजसूरींनी तयार केलेल्या श्रीचक्रधरनिरूपित 'सूत्रपाठा'त आणखी भर घालून तयार केलेला).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, य. खु. : केशव व्यास व आनेराज व्यास; ममवा., पुणे, १९६०; पृ. १५. २. नेने, ह. ना. : लक्षणरत्नाकर; संलेसं., भा. १; नागपूर, १९५७; पृ. १–१८.

**आपदेवसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रामायणकथाभाग; अपूर्ण; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**आपरंगात्मज / ० आपारंगात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**आपा अमृता** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा उत्तरार्ध] शाहीर.

**रचना : अमु.** – बडोदा-नरेश मल्हारराव गायकवाड ह्यांच्यावरील पोवाडा, ऐतिपो., खं. ३, पृ. १९५.

**आपा तांबोळी** [का. अनु.] शाहीर. कुशाबाच्या *कलगीतुऱ्याचे लगीन* ह्या लावणीत त्या काळच्या ज्या शाहीर मंडळींची नावे गोविली आहेत त्यातील एक (मसा. आ. ५, पृ. ५८६).

**आपा यशवंत** [का. अनु.] शाहीर. राहणारा कडेगावचा असावा असे त्याच्याच कवितेतील उल्लेखावरून वाटते. "गोष्ट सांगतों कैफाची। कवी आपा यशवंताची। मार पेंचा कविबांका ॥ कडेगांवकराचा डंका॥ लावी कलगीवरता ठेका ॥११॥" ह्याने *खडर्याच्या लढाईचा, पुण्याचा* आणि *हिंदुपद बादशाहीच्या समाप्तीचा* असे तीन पोवाडे रचले आहेत. *खडर्याच्या लढाईचा पोवाडा* सगनभाऊच्या जोरकस रचनेची आठवण करून देतो. उरलेले दोन पोवाडे मराठी राज्याच्या अस्तकालावरील आहेत.

**रचना : अमु.** – १. खडर्याच्या लढाईचा पोवाडा – दुसरा; ऐतिपो., खं. १; पुणे, १९२८; पृ. २३०–२३७. २. पुण्याचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. ६१–६२. ३. हिंदुपद बादशाहीच्या समाप्तीचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. ६५–६६; संपा. केळकर, य. न.; पुणे, १९६९. ४. दोन लावण्या – 'अंधारातील लावण्या'; पुणे, १९५६; पृ. २१९–२२०.

**आपारंगात्मज** – पहा **आपरंगात्मज.**

**आबाकुमर** [का. अनु.] महानुभाव आरतीकार.

**रचना : मु.** – चक्रधरांची आरती; मआ., पृ. २८६.

**आबालाल** [का. अनु.] मुसलमान कवी. रिवायतींची रचना (रा. चिं. ढेरे; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १७८).

**आमण्णा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**आराध्ये गोविंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – जगद्गुरुनागेश्वरस्तुति; भाइसंमं.

**० आलमखान** – पहा **अलमखान.**

**आह्निक्यबोध (स्वात्मबोध सिद्धदास)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**ईश** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १०.

**ईशसुत / ० ईशात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**० ईशात्मज** – पहा **ईशसुत.**

**० उगाऊकर, जगन्नाथ बाळकृष्ण** – पहा **जगन्नाथ बाळकृष्ण उगाऊकर.**

**० उटके, गोविंदाचार्य** – पहा **गोविंदाचार्य उटके.**

**उत्तम पुरुष** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**उत्तमश्लोक / ० कृष्णदयार्णवशिष्य / ० कृष्णदयार्णवांकित** [अंदाजे श. १६३१ / इ. स. १७०९ – समा. श. १७०८, चैत्र शु. ४ / २ एप्रिल १७८६] कवी. मूळ नाव माधवराव व्यापारी. ह्यांच्या पश्चात ह्यांचे वंशज मुनी हे उपनाव लावू लागले. सध्या तेच रूढ आहे. ह्यांचे जन्मग्राम बीड. व्यवसाय दुकानदारीचा. ह्यांच्या घराण्यात श्रीगोपाळकृष्णांची उपासना परंपरेने चालू होती. ह्यांना वयाच्या विसाव्या वर्षी श्रीकृष्णदयार्णवांचे प्रथम दर्शन झाले. त्यांजबरोबर हे पैठण येथे गेले. ह्या ठिकाणी श्रीकृष्णदयार्णवांनी ह्यांना श्रीगोपाळकृष्णांची उपासना विधिपूर्वक समंत्र देऊन ह्यांचे 'श्रीउत्तमश्लोकानुचर' असे नामाभिधान केले. (श्रीउत्तमश्लोक हे भगवान गोपालकृष्णाचे नाव *श्रीमद्भागवतात* अनेक ठिकाणी आले आहे.)

उत्तमश्लोकांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : आदिनारायण > ब्रह्मदेव > नारद > दत्तात्रेय > जनार्दन > एकनाथ > सच्चिदानंद > स्वानंद > गोविंद > श्रीकृष्णदयार्णव > उत्तमश्लोक. हा संप्रदाय आनंद संप्रदाय म्हणून ओळखला जातो.

उत्तमश्लोकांच्या घराण्यात श्रीकृष्णाच्या आराधनेबरोबरच श्रीएकवीरा रेणुका हिचीही आराधना अनेक पिढ्यांपासून चालू होती. ती ह्यांची कुलदेवता. हिच्या दर्शनार्थ माहूरला जाताना वाटेत उंबरखेड (उमरखेड) येथील मुक्कामात आईनाथमहाराज नावाच्या योगी संन्याशाशी परिचय होऊन त्याची कृपा लाभण्याचा योग ह्यांस आला. आईनाथांनी ह्यांस उंबरखेड येथे मठ बांधून राहावे असे सांगितले, त्यावरून श. १६९५ / इ. स. १७७३ मध्ये ह्यांनी तेथे मठ बांधला. तत्पूर्वी ह्यांनी पैठण येथे आपले गुरू श्रीकृष्णदयार्णव ह्यांच्या नावाने एक भव्य मठ बांधला होता. हे तेथे काही दिवस व आपल्या पूर्वजांच्या बीडमधील घरी काही दिवस असे राहात असत. उंबरखेडास मठ बांधल्यावर आयुष्याच्या अखेरपर्यंत हे तेथेच राहिले. ह्यांनी विदर्भ व मराठवाडा ह्या भागात आपल्या संप्रदायाचा बहुत प्रचार केला व शिष्यशाखाही वाढविली. श. १७०८, चैत्र शुक्ल चतुर्थी ह्या दिवशी ह्यांची जीवनज्योती ब्रह्मज्योतीत विलीन झाली.

श्रीकृष्णदयार्णवांनी आपल्या वयाच्या ५४ व्या वर्षी जेव्हा *हरिवरदा* हा ग्रंथ रचावयास घेतला तेव्हा त्याच्या लेखनाचे काम उत्तमश्लोकांकडे आले. गुरुमुखातून निघालेल्या बेचाळीस हजार ओव्या त्यांनी कागदावर लिहिल्या. हे लेखनाचे काम बारा वर्षे चालले होते. ह्या काळात गुरुशिष्यांची तीर्थयात्रा भारताच्या उत्तर-दक्षिण, पूर्व-पश्चिम भागांत चालू होती. *हरिवरदा* ग्रंथाची रचना चालू असता जी अनेक विषयांची चर्चा चाले तिचा फायदा उत्तमश्लोकांस सहजच उत्तम प्रकारे मिळाला. ह्यांना अध्यात्मविद्या गुरुमुखाने सुलभपणे प्राप्त झाली व ग्रंथलेखनामुळे काव्यरचनेचे कसबही अवगत झाले.

श. १६६२ / इ. स. १७४० मध्ये श्रीकृष्णदयार्णवांचे देहावसान झाले. त्यांनी रचावयास घेतलेल्या *हरिवरदा* ग्रंथाचे लेखन अपूर्ण राहिले. ८७ व्या अध्यायाच्या २३ व्या श्लोकापर्यंत त्यांजकडून व्याख्यान झाले. गुरूंनी अंतकाळी 'तूच तो आता पूर्ण कर' अशी ह्यांना आज्ञा केली होती; परंतु आपल्याकडून ग्रंथपूर्तीचे काम समर्थपणे होऊ शकेल असा ह्यांना विश्वास वाटत नव्हता. ग्रंथपूर्ती व्हावी असा ध्यास मात्र ह्यांच्या मनाला लागला होता. श्रीकृष्णदयार्णवांच्या निर्याणानंतर दोन महिन्यांनी एके रात्री श्रीकृष्णदयार्णव उत्तमश्लोकांच्या स्वप्नात आले व त्यांनी ह्यांस *हरिवरदे*ची शेषरचना हाती घेण्याचा आदेश दिला. उत्तमश्लोक सांगतात : "त्यावरि सगुणवियोगखेद । करुनि जाहलों मतिमंद । द्विमासांनंतर पुन्हा विशद । स्वप्नि अनुवाद हा केला ॥ मज संबोखूनि बहुता तरी । म्हणती असो तुज अंतरीं । प्रज्ञा स्फुरेल शंका न धरीं । ग्रंथ पुढारीं चालविणें ॥ ऐसी सद्गुरूची समर्थ आज्ञा । विशेष संमत सकळां सुज्ञां । एरव्हीं सामर्थ्य मज अल्पज्ञा । कंचे प्रज्ञारहितासी ॥" (*हरिवरदा*, अ. ८८, ३६–३८).

सद्गुरूंची आज्ञा प्रमाण मानून व त्यांजवर सर्व भार टाकून, उत्तमश्लोकांनी पुढील रचनेचे काम हाती घेतले व श. १६६६ मध्ये, गुरूंच्या चौथ्या पुण्यतिथीच्या दिवशी (मार्गशीर्ष शु. ५), पैठणात, विश्रांतिमठातील पादुकांजवळ बसून ते पूर्ण केले. ह्या ग्रंथातील श्रीकृष्णदयार्णवरचित भाग व उत्तमश्लोकरचित शेष भाग ह्यांची बेमालूम सांधेजोड झाली आहे. भाषा, विषयमांडणी, प्रतिपादनपद्धती श्रीकृष्णदयार्णवांसारखीच. शिष्याने गुरूशी साधलेल्या एकरूपतेचा येथे उत्तम प्रत्यय येतो.

*हरिवरदे*चे शेष अध्याय पूर्ण केल्यावर *प्रबोधसार, प्राकृत सप्तशती, दत्तजननोत्साहवर्णन* असे तीन ग्रंथ उत्तमश्लोकांनी रचले. त्यांपैकी पहिला ग्रंथ स्वतंत्र आहे; पण तो आज उपलब्ध नाही. दुसरा ग्रंथ हा संस्कृत भाषेतील *सप्तशती* ग्रंथावरील तेरा-अध्यायी टीका आहे. *दत्तजननोत्साहवर्णन* हे दत्तजन्माख्यानावरील विदग्ध व रसाळ असे प्रकरण आहे.

एकनाथांच्या शैलीची छाप त्यांच्यावर पुष्कळच आहे. *ज्ञानेश्वरी*पेक्षा वामनपंडितांच्या *यथार्थदीपिके*सारख्या प्रतिपादनाकडे त्यांचा ओढा अधिक आहे. ते बहुधा मुळातील प्रत्येक पदास धरून अर्थ करतात; संस्कृत टीकाकारांप्रमाणे पदच्छेद करूनच अन्वयपूर्वक विवरण करताना दिसतात. अनेक ठिकाणी, विशेषत: *सप्तशतीत*, शब्दांची व्याकरणशास्त्राच्या दृष्टीने व्युत्पत्ती देतात व अर्थ स्पष्ट करतात. भाषा प्रौढ, संस्कृतप्रचुर, पंडिती थाटाची असून प्रतिपादनाचा ओघ संथ गतीने गंभीर आहे. ठिकठिकाणी अनेक रसांचा उत्कर्ष झालेला असून त्या त्या प्रसंगानुरूप अनेक उपमादृष्टांतादी अलंकारांचा उपयोग केलेला आहे (ग. अं. जोशी : उत्तमश्लोक : चरित्र आणि काव्यविवेचन).

**रचना : मु.** – १. प्राकृत सप्तशती (पद्यात्मक टीका – मूळ संस्कृतवरून); ओ. सं. ५१९२; र. का. : श. १६६० / इ. स. १७३८; बडोदे; १९२४. २. श्रीदत्तजननोत्साहवर्णन; ओ. सं. १२६; मीनांजली, सप्टें.–नोव्हें. १९६५. **अमु.** – १. प्रबोधसार; र. का. १६८२; ९ अंश, ४३ पोथी पत्रे; ओ. सं. ३२१; (गं. ना. मुजुमदार यांचे संग्रही असल्याचे समजते). २. हरिवरदा (८७ व्या अध्यायाच्या २४ व्या श्लोकापासून ९० व्या अध्यायाच्या अखेरपर्यंतचे साडेतीन अध्याय पूर्ण केले). ३. अष्टके, कृष्णदयार्णवांची आरती व पदे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : उत्तमश्लोक; मकच., खं. ६; मुंबई, १९२४; पृ. १६३–८२. २. ढेरे, रा. चिं. : श्रीदत्तजननोत्साहवर्णन : थोडा परिचय; मीनांजली, सप्टें.–नोव्हें. १९६५; पृ. २१–३२. ३. जोशी, ग. अं.; उत्तमश्लोक (चरित्र आणि काव्यविवेचन); उंबरखेड, १९६६; ४. मुजुमदार, गं. ना.; उत्तमश्लोकविरचित प्रबोधसार; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ४, पृ. १५४–५७.

**उत्तरनाथ** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – विठ्ठलाची आरती; भाइसंमंत्रै., व. १९, अं. ३; पृ. ९१–९२.

**उदंडनाथ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**उदासदास** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – 'महाबळभटचरित्र'; श्लो. सं. १८; अकलकामा., भा. २, मुंबई, १८९६; पृ. १११–११२.

**उद्धव–१ / ० उद्धवस्वामी / ० शिवराम–१** [अंदाजे श. १५४९ / इ. स. १६२७ – समा. श. १६३२, फाल्गुन शु. १, बुधवार / इ. स. १७१०] रामदासी कवी. हे श्रीसमर्थांचे पहिले शिष्य होत. नाशिकजवळील दशकपंचक हे ह्यांचे मूळ गाव. उपनाव दशपुत्रे. आई उमाबाई व पिता सदाशिव. बालवयापासूनच उद्धव समर्थांच्या सहवासात राहिले. पुढे संप्रदायाची दीक्षा ह्यांनी समर्थांकडून घेतली. समर्थांचा ह्यांच्यावर फार लोभ होता. गोदावरीच्या पूर्वेस टाकळी येथे असलेल्या श्रींच्या आश्रमठाचे आधिपत्य उद्धवांकडे होते. तसेच इंदुरबोधन (मनमाड-हैद्राबाद रस्त्यावरील हल्लीचे निजामाबाद) मठही स्थापना केल्यानंतर समर्थांनी ह्यांच्याच ताब्यात दिला. ह्या दोनही मठांत ह्यांच्या परंपरा सापडतात. परंपरा ब्रह्मचाऱ्यांची आहे. इंदुरबोधन मठातील बाडात ह्यांच्या पुण्यतिथीसंबंधात एक श्लोक सापडतो तो असा : "बुधी पाडवा फाल्गुनी शुद्ध पक्षी। अरूणोदईं भास्कराचेनि साक्षी। सके चेंद्रके त्यावरी बत्तिसासी। देहे पूर्ण हो स्वामिचा विकृतीसी॥" चेंद्रके म्हणजे चंद्राच्या सोळा कला. ह्यावरून ह्यांचा समाधिशक १६३२ (इ. स. १७१०) असा मानतात. ह्यांची मुख्य समाधी टाकळीस असून इंदुरबोधन मठात नित्यपूजेसाठी दुसरी समाधी बांधली आहे.

उद्धवांची उपलब्ध रचना ही प्रामुख्याने पदे, प्रकरणे अशी स्फुट स्वरूपाची आहे. शिवराम ह्या नावाने आपली बरीच कवने उद्धवांनी रचली आहेत. रामदासी मठांतून सापडलेल्या बाडांची माहिती देताना ह्यांची काही पदे व काही छोटी प्रकरणे शं. श्री. देव ह्यांनी छापली आहेत, त्यांमधून कवीची गुरूवरील निष्ठा, संप्रदायाचा अभिमान आणि तरून जाण्याची तळमळ दिसून येते. समर्थांच्या मागे उद्धवांना सांप्रदायिकांनी फार त्रास दिला त्याचे पडसादही त्यांच्या वाणीतून उमटलेले दिसतात.

उद्धवांची कविता मनाला चटका लावणारी आहे. उद्धवांची गुरुभक्ती अत्यंत उत्कट होती. स्वामींच्या चरणी विरघळून जावे असे त्यांना वाटे. समर्थांनीच आम्हांला घडविले असे ते सांगतात. ते म्हणतात : "आम्ही हि पाषाण श्रीनें कमावीलों। शिवराम जालों। पावन चि ॥" (रासं., खं. १, पृ. ९२). ह्यांनी समर्थचरित्र लिहिल्याचे उल्लेख ग्रंथांतरी सापडतात. पण हा ग्रंथ अद्याप उपलब्ध नाही (मसा., आ. ५, पृ. ८८०).

**रचना : अमु.** – पदपदांतरे, प्रकरणे, श्लोक इत्यादी; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : श्रीसमर्थशिष्य उद्धवस्वामी; मठ इंदुरबोधन (लेखांक ३२), मठ टाकळी (लेखांक ३८); श्रीसांप्रविवि., खं. १; धुळे, १९१७; पृ. १८५–२००, २२८–२४०.

**उद्धव–२** [का. अनु.] रामदासी कवी. केज ह्या गावी ह्यांचा मठ असून तेथेच, गावाचे ईशान्य बाजूस, ह्यांची समाधी आहे.

**रचना : अमु.** – तीन गोपीगीते अनुक्रमे ३५, २३, ९ कडवी; सवामं. बाडांक ९३७ व ९४५.

**उद्धव-३** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] रामदासी कवी. गुरू : गिरिधर.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**उद्धव-४** [इ. स. १८ व्या शतकाचा पूर्वार्ध] ग्रंथकार. जातीने ब्राह्मण. तंजावरच्या शाहूमहाराजांचे आश्रित असून त्यांच्याच आज्ञेवरून ह्यांनी आपल्या *पक्षीसंजीवनी* ह्या ग्रंथाची रचना केली. *दौलतनामा* किंवा *बाजनामा* ह्या पशुपक्षीविद्याविषयक मूळ फारसी ग्रंथाचा हा मराठी तर्जुमा आहे. आरंभीच 'उद्धवाख्य द्विजें केली टीका' असे म्हणून त्याला *पक्षीसंजीवनी* हे नाव आपण दिले आहे असे ग्रंथकार सांगतो. ह्या ग्रंथाची पाठपोट फक्त चारच पृष्ठे उपलब्ध झाली असून अनुक्रमणिकेवरून त्याची पन्नास प्रकरणे असावीत असे दिसते. अध्यात्मा-खेरीज इतर विषयावरील रचना म्हणून ह्या ग्रंथास महत्त्व आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आचार्य, कृ. वि.; बाजनामा ऊर्फ पक्षी-संजीवनी; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ४; पृ. १८१.

**उद्धव अवचित** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शुकाख्यान; गो. का. चांदोरकर संग्रह, संककासू., पृ. १२.

**उद्धवचिद्घन / ० उधोबाबा / ० उद्धव (चैतन्य)** [अंदाजे इ. स. १६५३–१६९८] पदरचनाकार व संतचरित्रकार. उद्धवचिद्घन ह्या जोड-नावातील उद्धव हे कवीचे व चिद्घन हे त्यांच्या गुरूचे नाव आहे. ह्यांचे आडनाव कोकिळ. हे बीड जिल्ह्यातील धारूर गावचे राहणारे. हे तुकोबांच्या चैतन्य संप्रदायापैकी होते. ह्यांस श. १६११ / इ. स. १६८९ नंतर गुरुपदेश झाला (कवी माधवदासकृत *अलक्ष्यनिधान* ग्रंथ, मसा., आ. ५, पृ. ४७७). ह्यांची गुरुपरंपरा अशी : श्रीदत्त > शिव-चैतन्य > गोपाळचैतन्य > आत्मारामचैतन्य > तुळशीचैतन्य > कृष्ण-चैतन्य > अद्वयचैतन्य > चिद्घनचैतन्य > उद्धवचैतन्य. आपल्या *अनुभवशतक* ह्या ग्रंथाचे शेवटी उद्धवचिद्घनांनी स्वतःच ही परंपरा स्पष्टपणे सांगितली आहे. नागेशांच्या शिष्यपरंपरेतही उद्धवचिद्घनांचा उल्लेख नेहमी केला जातो. ह्यांची समाधी मौजे धारूर येथे आहे.

उद्धवचिद्घनांनी साकी वृत्तात अनेक चरित्रे रचली आहेत. प्रत्येक चरित्राच्या आरंभी 'बरवीं संत-चरित्रें हो । पावन परम पवित्रें हो ॥' असे ध्रुपद आढळते. ज्ञानेश्वर (र. का. : श. १६१५ / इ. स. १६९३), नागनाथ व त्यांचे शिष्य हेगरस, बहिरंभट, मृत्युंजय, गोराकुंभार इत्यादिकांची चरित्रे उद्धवचिद्घनांनी गायिली आहेत. ह्यांनी रचलेले *ज्ञानेश्वरचरित्र* ज्ञात वा उपलब्ध चरित्रांहून भिन्न अशी माहिती देत असल्यामुळे विशेष महत्त्वाचे आहे. ह्या चरित्रांच्या आधारे महिपतीने पुढे *भक्तविजय* ग्रंथ लिहिला. श्लोकबद्ध *अनुभवशतक*, सवाई वृत्तातील *गीतार्थमंजरी*, दिंडी वृत्तातील *शुकरंभासंवाद* ही प्रकरणे उद्धवचिद्घनांच्या नावावर सापडतात. संशोधनांती *ध्रुवाख्यान* [ ⇨ ३. ] ह्यांनीच लिहिल्याचे सिद्ध झाले आहे. *श्रियाळ-आख्यान* व हिंदीत रचलेले *त्रिलोचनचरित्र* ह्या कवीच्या नावावर उपलब्ध आहेत. ना. ब. जोशी ह्यांना विजापुरात सापडलेल्या एका बाडात *काव्यसंग्रहात* मुद्रित न झालेली उद्धवचिद्घनांची पुढील कविता सापडली आहे : (१) अद्वैतबोध, (२) गुरुप्रशस्ति, (३) पदे, (४) बोधकलिका, (५) भिल्लीनाटक, (६) मंत्रमाला, (७) मोहिनी-विलास, (८) विवेकदर्पण, (९) शिवरात्रिव्रत, (१०) हरिदर्शन, (११) हरिश्चंद्राख्यान इ. ज्या *भक्तिसारामृत* ह्या ग्रंथामुळे उद्धवचिद्घन प्रसिद्ध आहेत तो मात्र उपलब्ध नाही.

*गीतार्थमंजरी* व *अनुभवशतक* ह्या रचना साध्या पण भक्तिरसपूर्ण आहेत. कवीचा रोख काव्यापेक्षा अर्थबोधाकडे जास्त आहे. *अनुभव-शतकात* गुरू, संत व भक्त यांचा महिमा जिव्हाळ्याने गायिला आहे. उद्धवचिद्घनांची पदे, निवेदनातील जिव्हाळा व गोडवा ह्यांमुळे परिणामतः सरस वाटतात. संतचरित्रकार म्हणून उद्धवचिद्घनांना मराठी वाङ्मयात गौरवाचे स्थान मिळाले आहे.

**रचना : मु.** – १ महाराष्ट्रकवी उद्धवचिद्घनकृत कवितासंग्रह : संपा. केळकर, ना. चिं.; मुंबई, १९०२; २. श्रीज्ञानदेवचरित्र; ग्रं. सं. ७९; मसंप., एप्रि. १९७२; पृ. १०५–११५; ३. सान्वय-सार्थ-सटीक श्रीमद्भगवद्गीता, उद्धवचिद्घनांच्या सवाया (पद्यमय अर्थ व श्लोकसूची); मुंबई, १९३०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : उद्धवचिद्घन; मकच., खं. १; मुंबई, १९१४; पृ. ११२–१२६. २. ओक, दा. के.; दिंडी वृत्तातील ध्रुवाख्यानाचा खरा कर्ता उद्धवचिद्घन; प्रतिभा, १५ फेब्रु. १९३५; पृ. २१–२३. ३. जोशी, ना. ब.; 'उद्धवचिद्घनांची काही अप्रकाशित कविता'; साहित्य संशोधन मंजिरी; बेळगाव, १९७३; पृ. १६३–१६९. ४. पठाण, यू. म. : संतचरित्रकार उद्धवचिद्घन; नभामा., जुलै १९५२; पृ. ५०. ५. प्रियोळकर, अ. का. : ध्रुवाख्यानाचा खरा कर्ता उद्धवचिद्घन; (नवे) लोशि., जाने. १९३२; पृ. १०–२७. ६. वाबगांवकर, म. शं.; प्राचीन मराठीतील ज्ञानेश्वरांचे एक अज्ञात चरित्र; मसंप., एप्रि. १९७२; पृ. १९३–२१५.

**० उद्धव (चैतन्य)** – पहा **उद्धवचिद्घन.**

**उद्धवदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १३. उद्धव मुल्हेरकरांच्या नावावरचा 'संतमाळ' ग्रंथ त्यांचा नसून तो ह्या उद्धवदासांचा आहे असे वि. ल. भावे म्हणतात (संककासू., पृ. १२४).

**उद्धवनारायण** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – करुणापर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**उद्धव (मुल्हेरकर) / ० शिबवा** [अंदाजे शके १५४० / इ. स. १६१८ – श. १६०० / इ. स. १६७८] कवी. हे रामानुजसंप्रदायी व कृष्णो-पासक होते. पिता लक्ष्मण. माता भागीरथी. मूळ नाव शिबवा. मुल्हेर (जि. नाशिक) येथे ह्यांचे संस्थान आहे. गुरू : काशिराज. ही गुरुपरंपरा रामानंद > अनंताचार्य > कृष्णानंद > अग्रानंद > अमरानंद > गोवर्धनस्वामी > काशीराज > उद्धव अशी दिलेली आहे (संककासू., पृ. १८). ह्यांच्या नावावरील *संतमाळ* ग्रंथ उद्धवदासांचा म्हणून वि. ल. भावे ह्यांनी उल्लेखिला आहे (संककासू., पृ. १२४).

**रचना : अमु.** – १. उद्धवबोध; २. बोधरहस्य; ३. संतमाळ; ४. स्वरूपानुभव; ५. अभंग व पदपदांतरे (गो. का. चांदोरकर संग्रह); संककासू., पृ. ११.

**उद्धवराजस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**उद्धवलिंग** [का. अनु.] वीरशैव कवी.

**रचना : मु.** – हरिहराची आरती; गंगाजळी; ढेरे, रा. चिं.; पुणे, १९७२; पृ. ८. **अमु.** – दोन अध्यात्मपर पदे., सवामं. बा. ७९३, १२५४. दोन आरत्या : शेंदुरवाडीच्या गणपतीवरील व भगवद्गीतेवरील; संककासू., पृ. १३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : वीरशैव कवी उद्धवलिंग; प्रामनधा., कोल्हापूर, १९७२; पृ. ६१-६२.

**उद्धवसुत** [अंदाजे इ. स. १८ वे शतक, उत्तरार्ध] रामदासी कवी. हे वऱ्हाडातील सुर्जी अंजनगावचे राहणारे. गोत्र अगस्ती. ह्यांची वंशपरंपरा त्र्यंबक > मल्हारी > उद्धव अशी आहे. ह्यांचे वडील मल्हारपंत ह्यांस समर्थांचा अनुग्रह होता. पित्याचे समर्थ-प्रेम ह्यांच्यात उतरले. ह्यांची गुरुपरंपरा : रामदास > माधव > केशव > उद्धव अशी आहे. स्वतःस हे उद्धवसुत का म्हणवून घेतात ते मात्र समजत नाही. ह्यांनी ओवीबद्ध *समर्थचरित्र* लिहिले आहे. ते श. १६९६ / इ. स.

१७७४ पूर्वीचे असावे असे अनुमान शं. श्री. देव करतात (सवामं., बा. १६५७). ह्याच्या शेवटच्या दोन अध्यायांत ह्यांनी आपले थोडेसे आत्मचरित्र दिले आहे. ह्याशिवाय उद्धवाची काही पदे व आरत्या अशी रचना आहे (मसा., आ. ५, पृ. ९४२).

**रचना : मु.** – १. श्रीसमर्थ रामदासस्वामींचें चरित्र; अ. ५१; र. का. : अंदाजे श. १६९६; मुंबई, १८९१; २. संतमालिका; महाराष्ट्र कवी, व. १, अं. ४; पृ. १२–१३. **अमु.** – आरत्या, पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**० उद्धवस्वामी** – पहा **उद्धव–१.**

**० उद्बोध** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**उद्बोधनाथ** [ ? – समा. श. १६०९, वैशाख व. ९ / इ. स. १६८७] कवी. ह्यांचे संपूर्ण नाव उद्धव मल्हारी ठिपसे. यजुर्वेदी वाजसेनीयशाखी ब्राह्मण. मूळ गाव राशीन. ह्यांचे गुरू गुप्तनाथ. गुप्तनाथ ऊर्फ गंगाबाई ह्यांच्या प्रासादिक वाणीने उद्धवांस उपरती झाली व ते गुप्तनाथांसमवेत काशीयात्रेस गेले. वाटेत गंगाबाईंना गैबीनाथ ह्या नाथपंथी सत्पुरुषाने उपदेशदीक्षा दिली व त्यांचे नाव गुप्तनाथ ठेवले. ह्याच गुप्तनाथांनी नंतर आपल्याबरोबर आलेल्या उद्धव नाइकांस 'मंत्रोपदेश' देऊन त्यांचे नाव उद्बोध असे ठेवले. उद्बोधनाथांची गुरुपरंपरा : गैबीनाथ > गुप्तनाथ (गंगाबाई) > उद्बोधनाथ. ह्यांचे शिष्य केसरीनाथ व शिवदिननाथ. केसरीनाथांनंतर परंपरेच्या दोन शाखा झाल्या. त्यांपैकी एक राशीन येथे राहिली तर दुसरी पैठण येथे वाढली. उद्बोधनाथांची समाधी राशीन, जिल्हा अहमदनगर येथे गुप्तनाथांच्या समाधीजवळच आहे.

ह्यांची अभंग, पदे अशी रचना आहे. योगमार्गावरील बरीच पदे ह्यांनी रचली आहेत. त्यांपैकी 'का मज लखलख दिसते' हे तात्त्विक पद प्रसिद्ध असून ह्यात आपल्या गुरूचा 'गुप्तगंगा' असा उल्लेख हे करतात (मसा., आ. ५, पृ. ४४९). कवीचा *ज्ञानेश्वरचरित्रा*वरील १० चरणांचा शिवदिनकेसरींच्या पैठण येथील मठात सापडलेला एक अभंग गो. का. चांदोरकर ह्यांनी प्रसिद्ध केला आहे (भाइसंमंइति., श. १८३४, पृ. २५). ह्यांचे काही अभंग *महाराष्ट्र कवी* व *सुबोधपत्रिका* ह्यांमधून मुद्रित झाले आहेत. काही पदरचना समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात उपलब्ध.

**उधव खेडकर** [अंदाजे श. १६२६ / इ. स. १७०४] कवी.

**रचना : अमु.** – एकादशीमाहात्म्य; अपूर्ण; ओ. सं. २५७; र. का. : श. १६२६; सवामं. हस्त. सू., खं. २.

**उधो** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**उधोदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त सू., खं. २.

**० उधोबाबा** – पहा **उद्धवचिद्घन.**

**उधो शाम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**उमा** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – अंबादेवीच्या बोडणाची आरती; मआ., पृ. ३२८.

**उमाइसा / ० उमांबा / ० उमै** [इ. स. चे १६ वे शतक, उत्तरार्ध] महानुभाव कवयित्री. नागदेवाचार्यांची विधवा बहीण. हिच्या नावावर एक चौपदी मोडते. ही चौपदी हिने पैठणास गायिली होती. ती हिंदीमिश्रित गुजराती भाषेतील आहे (ममवा., आ. २, पृ. १–२).

**उमाजी आबा खोलकुटे** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. हे नागपूर प्रांतातील धापेवाडा येथे राहणारे भक्तकवी होते (मसा., आ. ५, पृ. १००१).

**० उमांबा** – पहा **उमाइसा.**

**उमारमावल्लभदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – उमारमासंवाद; ओव्या; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**उमेशानंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० उमै** – पहा **उमाइसा.**

**एकनाथ–१ (पैठणकर) / ० एकाजनार्दन–१** [अंदाजे श. १४५४ / इ. स. १५३२ – समा. श. १५२१, फाल्गुन व. ६ / इ. स. १५९९] संतकवी; भागवत धर्माचे विशेषतः वारकरी संप्रदायाचे आचार्य. एकनाथ हे आपल्या साहित्यात स्वतःचा 'एका जनार्दन' असा वारंवार किंवा 'एका' असाही निर्देश करतात. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण; गोत्र विश्वामित्र; सूत्र आश्वलायन; कुलदेवता एकवीरा.

एकनाथांचा जन्म पैठण येथे झाला. त्यांची जन्मतिथी ज्ञात नाही. जन्मवर्ष श. १४५४ (इ. स. १५३२) मानतात. एकनाथांनी स्वतःसंबंधी जी अत्यल्प माहिती दिली आहे, ती अशी : हरिभक्तीने धन्य झालेल्या वंशात मी जन्मलो. जनार्दनाला म्हणजे कृष्णाला प्रिय असा हा माझा वंश पितामहाचा पिता भानुदास ह्यापासून सुरू होतो (*श्रीशुकाष्टक*); म्हणजे हा ह्या वंशातील पहिला भगवद्भक्त पुरुष होय. सूर्याची म्हणजेच भानूची उपासना भानुदासांनी बाळपणीच केली; मान-अभिमान जिंकला; भगवंतांनी पावन केले; एका रात्री श्री विठ्ठलमूर्ती जगज्ज्योती, कानी कुंडल असलेली पाहिली; म्हणजे साक्षात्कार झाला. भानुदासाला सुलक्षणी सुत चक्रपाणीनामक झाला. चक्रपाणीला पुत्र झाला; स्वतःचे उपास्य जो सूर्य तेच त्याचे नाव ठेवून भानुदासांनी देह ठेवला. सूर्यप्रेमेमध्येच रुक्मिणी, साक्षात रखुमाई मला प्रसवली. माझ्या भाग्याची लीला धन्य आहे, कारण वैष्णव कुळात मी जन्मलो. ग्रंथारंभी म्हणजे *भागवता*च्या उपोद्घातात अशा रीतीने पूर्वजांना नाथांनी वंदिले आहे. सूर्य किंवा सूर्यनारायण, नाथांचे जनक, ह्यांचा जन्म शके १४३५ च्या सुमारास झाला असावा, असे ल. रा. पांगारकर ह्यांनी म्हटले आहे. स्वतःचा जन्म मूळ नक्षत्रावर झाला व माझे मायबाप बालपणीच निवर्तले, त्यामुळे आजे चक्रपाणी ह्यांच्यावर पालनपोषणाचा भार पडला, असे एका अभंगात नाथ म्हणतात. एकनाथांची आई पहिल्या वर्षी आणि वडील तिसऱ्या वर्षी निवर्तले, असे चरित्रकार सांगतात. नाथांचे वडील सूर्यपंडित हेच दलपती नामक धर्मशास्त्रज्ञाचे गुरू असावे असे अनुमान डॉ. पां. वा. काणे ह्यांनी केले आहे. हे अनुमान काहींना मान्य नाही. *नृसिंहप्रसाद* (इ. स. १४९०–१५१२) हा धर्मशास्त्रावरील महानिबंध दलपतीने लिहिला आहे. दलपती हा देवगिरीच्या यवनाधिपतीचा मोठा अधिकारी होता व त्याने ह्या ग्रंथात सूर्यपंडित ह्या गुरूचा आदराने निर्देश केला आहे.

एकनाथ प्रथम अक्षरलेखन, वाचन, गणित, संस्कृत, मराठी व फारसी शिकले. सातव्या वर्षी त्यांचे उपनयन झाले. एकनाथ बारा वर्षांचे झाले तेव्हा त्यांचे आजोबा चक्रपाणी ह्यांनी वृद्धापकाळामुळे देहाचा भरवसा वाटेनासा झाल्यामुळे देवगिरी गडावरील पंडित व संत जनार्दनस्वामी ह्यांच्याकडे नाथांना अध्ययनार्थ व अनुग्रहार्थ पाठविले. जनार्दनस्वामी हे तत्कालीन यवन पातशाहाचे एक मुख्याधिकारी होते. एकनाथांची व जनार्दनस्वामींची भेट श. १४६७, फाल्गुन वद्य ६ रोजी रविवारी सुप्रभाती देवगिरी येथे झाली. *भक्तलीलामृत*कार महिपती थोडी निराळी हकीकत सांगतात : सद्गुरुभेटीची आर्तता उत्पन्न होऊन सद्गुरूच्या भेटीचा त्यांना ध्यास लागला; 'श्रीदत्ताचे दर्शन व अनुग्रह झालेल्या जनार्दनस्वामींस भेट', अशी अशरीरिणी वाणी ऐकू आली; म्हणून

आजा व आजी ह्यांस न विचारताच एकनाथ एकटेच जनार्दनस्वामींकडे जाऊन त्यांस शरण गेले. एकनाथ जनार्दनस्वामींच्या सहवासात १२ वर्षे राहिले.

एकनाथांची गुरुपरंपरा : नारायण > विधि > अत्रि > दत्तात्रेय > जनार्दन > एकनाथ. शेख महंमदबाबा श्रीगोंदेकरकृत *योगसंग्राम* आणि श्रीकृष्णदास ह्यांचे *प्रतिष्ठानचरित्र* ह्या ग्रंथांवरून वा. सी. बेंद्रे व रा. चिं. ढेरे असे म्हणतात की, सूफी संप्रदायातील चांद बोधले किंवा चांदसाहेब कादरी हा मलंग-वेशधारी साधूच दत्तात्रेय होय व त्याचाच अनुग्रह जनार्दनस्वामींना झाला; परंतु एकनाथांनी *भागवता*च्या नवव्या अध्यायात 'सहस्रार्जुनाचा गुरू जो दत्तात्रेय, त्याने कलियुगात जनार्दनाला साक्षात दर्शन दिले, मस्तकावर हात ठेवून अनुग्रह केला व शिष्य केले', असे स्पष्ट म्हटले आहे. त्यामुळे सय्यद चांदसाहेब किंवा चांद बोधले ह्यांच्याबद्दलची हकीकत एकनाथ गृहीत धरीत नाहीत, हे निश्चित होते. गृहस्थाश्रमात राहूनच परमार्थप्राप्ती करून घेण्याची वारकरी संप्रदायाची ज्ञानदेवांनी उपदेशिलेली परिपाठी साक्षात दत्तात्रेयांनी जनार्दनस्वामींनाही उपदेशिली आणि तीच एकनाथांनी स्वतः आचरून वारकरी संप्रदायात दृढमूल केली.

गुरुगृहवासाच्या प्रारंभीच्या अवस्थेत एकनाथ गुरूचा हिशेब-जमाखर्च नित्य ठेवीत. एकदा पैची चूक झालेली लक्षात आली परंतु चूक दुरुस्त करण्याकरिता त्यांना सबंध रात्र जागून काढावी लागली. गुरूंच्या लक्षात आले की, इतकी एकाग्रता सहज साधत असल्यामुळे परमार्थाची समाधी साधण्यास ह्याला वेळ लागणार नाही. एकनाथ जनार्दनस्वामींच्या शुश्रूषेत नित्य गढून जात. स्वामींनी एकनाथांचा अधिकार जाणला आणि स्वतःचे गुरू दत्तात्रेय ह्यांचेच दर्शन त्यांस घडविले. एकनाथांनी साक्षात्काराच्या स्थैर्याकरिता देवगिरीच्या संनिध असलेल्या वनात ध्यानयोगाचीही तपश्चर्या केली. एकदा स्वामी स्वतःच्या आन्हिकात गढलेले होते. तोच किल्ल्यावर हल्ला झाला. एकनाथांनी कार्यमग्न गुरूंना न सांगताच गुरूंचा सैनिक वेष चढवून शत्रूचा हल्ला धाडसाने परतविला.

जनार्दनस्वामींच्या सहवासात एकनाथ बारा वर्षे राहिले. वेदशास्त्रांचे, *भारत*, *रामायण* आणि *भागवता*दी पुराणे, विशेषतः *शांकर प्रस्थानत्रयी*, ह्यांचे, आणि त्याचप्रमाणे *ज्ञानेश्वरी*, *अनभवामृत* इत्यादी मराठी साहित्याचे जनार्दनस्वामींपाशी त्यांनी अध्ययन केले. पांडित्य आणि परमार्थाचा अधिकार ह्या दोन्ही गोष्टींचा एकनाथांमध्ये संगम झाला. त्यांच्या *भागवता*स [*भागवत एकादश स्कंध*] वाराणसीमधील संस्कृत पंडितांमध्ये मान्यता मिळाली व ख्याती झाली, ह्यावरून एकनाथांच्या गुरूपाशी झालेल्या आध्यात्मिक प्रगतीचे स्वरूप लक्षात येते. शास्त्रविद्या आणि परमार्थमार्ग ह्यांच्यातील एकनाथांची प्रगती पाहून जनार्दनस्वामींनी त्यांना स्वतःच्या बरोबर घेऊन नासिक, पंचवटी, त्र्यंबकेश्वर इत्यादी तीर्थांना भेटी दिल्या. नासिकजवळील चंद्रगिरीच्या पायथ्याशी असलेली चंद्रावती (म्हणजे चांदवड) येथील चंद्रभट ह्या भगवद्भक्त पुरुषाची भेट घेतली व तेथे मुक्काम केला. चंद्रभटांची *चतुःश्लोकी भागवता*वरील (*भागवत स्कंध* २, अध्याय ९, श्लोक ३२ ते ३५) प्रवचने ऐकली. ती प्रवचने ऐकल्यावर जनार्दनस्वामींनी एकनाथांस आज्ञा केली की, 'तूही *चतुःश्लोकी भागवता*वर मराठीमध्ये रचना कर.' ही आज्ञा त्यांनी शिरसावंद्य मानली. पंचवटी व त्र्यंबकेश्वर ह्या ठिकाणी मुक्काम केला व ग्रंथ लिहून पुरा केला. हा ग्रंथ लिहीत असताना झालेल्या स्फूर्तीचा प्रत्यय एकनाथांनी आपल्या प्रसन्न भाषेत वर्णिला आहे. ते म्हणतात : 'जागृती, स्वप्न व सुषुप्ती ह्या तिन्ही अवस्थांना ह्या स्फूर्तीने घेरून टाकले. नित्यकर्म करीत असता स्नानसंध्यासमयी माझ्या दृष्टीसमोर ग्रंथार्थ खेळू लागले. नवीन नवीन गुह्यज्ञान दाटीने प्रकट होऊ लागले. गुरूच्या आज्ञेचे सामर्थ्य, प्रताप वा तेज असे असते.'

नासिक-त्र्यंबकेश्वराची यात्रा आटोपल्यावर गुरुशिष्य देवगिरीस परतले. गुरूंनी प्रदीर्घ तीर्थयात्रेची आज्ञा केली. त्याप्रमाणे उत्तर भारताची यात्रा त्यांनी पुरी केली. दक्षिणेचे द्वार असलेल्या पैठण येथे येऊन एका देवळात त्यांनी मुक्काम केला, स्वतःचे घर हेतुपुरस्सर टाळले; परंतु आजोबा चक्रपाणी ह्यांस त्यांच्या आगमनाची बातमी कळल्याशिवाय राहिली नाही. त्यांनी अगोदरच एकनाथांनी विवाहबद्ध होण्यासंबंधीचे जनार्दनस्वामींचे आज्ञापत्र आणून ठेवले होते. त्या आज्ञापत्राप्रमाणे पैठण येथे श. १४७९ (इ. स. १५५७) च्या सुमारास एकनाथ विवाहबद्ध झाले. वधू वैजापूर येथील होती की दौलताबाद येथील होती ह्याबद्दल, त्याचप्रमाणे विवाह पैठण येथे की दौलताबाद येथे साजरा झाला ह्याबद्दलही, दोन मते आढळतात. वधूचे नाव गिरजा हे ठेवले.

गिरजाबाई पतिव्रता व समंजस होती. एकनाथांशी पूर्णपणे समरस होऊन तिने प्रपंच आणि परमार्थ ह्यांमध्ये सहकार्य केले. उद्धव व श्रीखंड्या ह्या दोन सेवकांचीही निरलस सेवा त्यांना लाभली. उद्धव हा त्यांचा नातलग होता. श्रीखंड्या हा परदेशी ब्राह्मण होता, असे *भक्तविजया*त म्हटले आहे. श्रीखंड्याच्या रूपाने साक्षात विष्णूच सेवा करीत होता. गृहस्थाश्रमाची रीती जनार्दनस्वामींनी स्वतःच्या आचरणाने व प्रत्यक्ष उपदेशाने दाखवून दिली होती. इंद्रियदमन, समाधियोग, स्वधर्माचरण, सर्वांभूती समता व एकात्मभाव, सर्वस्वार्पण, क्षुधित अतिथींना अन्नदान, देवार्चन, कीर्तन, सर्वकाल नामस्मरण, भजन, लेखन, नित्यस्वाध्याय इत्यादी कार्यक्रम सतत चालू झाला; त्यात कधी खंड पडला नाही. नाथांचा गृहस्थाश्रम दया-क्षमा-शांती ह्यांचे माहेरघरच बनला.

एकनाथांना एकूण तीन अपत्ये झाली : गोदा किंवा लीला व गंगा ह्या दोन मुली व हरिपंडित हा मुलगा. मोठी मुलगी गोदा किंवा लीला ही पैठणास मुद्गलांच्या घराण्यात चिंतामणी ह्यास दिली होती. कवी मुक्तेश्वर ह्यांचा जन्म हिच्या पोटी झाला. धाकटी मुलगी गंगा (सासरचे नाव गोदा) ही गदगजवळील डंबळ येथे बाळकृष्णपंत चंद्रकेत ह्यांस दिली होती. हिची लक्ष्मी नावाची मुलगी कलबुर्गे प्रांतातील महागाव येथील ग्रामजोशी तिमणभट ह्यांचे चिरंजीव नारायण दीक्षित (पूर्णानंद) ह्यांस दिली होती. तिच्या पोटी शिवरामस्वामी (कल्याणीकर) ह्यांचा जन्म झाला. *गीताचंद्रिका* ह्या ग्रंथाचे हे कर्ते होत. एकनाथांचे पुत्र हरिपंडित हे विद्वान म्हणून चमकले; परंतु ते कर्मठ होते, त्यामुळे ते नाथांशी समरस झाले नाहीत.

समत्वबुद्धी ठेवून जनांशी एकात्मता अनुभवीत सगळा संसार ईश्वरमय करून, एकनाथांनी, संपूर्ण जीवन म्हणजे 'बोलतीचालती समाधी अवस्था' होय, जीवन हीच 'परम समाधी' होय, असा अनुभव घेतला. हा अनुभव त्यांनी *चतुःश्लोकी भागवता*त वर्णिला आहे. ज्ञानदेवांनी *भगवद्गीते*च्या द्वारे सामान्यजनांच्या जीवनात मराठीमध्ये परमार्थविचार आणून रुजविला. ज्ञानदेवांचे जे उद्दिष्ट तेच उद्दिष्ट मनाशी बाळगून एकनाथांनी *भागवता*च्या एकादश स्कंधावर विस्तृत ओवीबद्ध प्रबंध लिहून सिद्ध केले. 'भोळीभाळी कैसी तरती', किंवा वेदशास्त्रव्युत्पत्ती नसलेल्या अज्ञ जनांना निजात्मप्राप्ती कशी होईल, कर्मकांडाच्या विधिविधानांच्या अवडंबरात पुरोहितवर्ग गर्क होता व सामान्यजनही त्यात गुरफटत होते त्यातून सुटका होऊन सुखोपायाने स्त्रीशूद्रादी आघवे प्रयासेवीण परतीराला कसे जातील, ह्याचा उपाय म्हणजे

भागवतधर्म होय, हे जाणून त्यांनी *भागवता*वर प्रबंध लिहिण्यास प्रारंभ केला. शके १४९२ च्या सुमारास (इ. स. १५७०) त्यांनी लेखनास प्रारंभ केला. संतसज्जनांचा आग्रह होताच; परंतु गुरूंचीही आज्ञा झाली. पहिले पाच अध्याय लिहून झाल्यावर गुरूंनी ते वाचले व संतुष्ट झाले. गुरूंनी सांगितले की, ही मराठी टीका लाठी आहे; म्हणजे तिच्यात ज्ञानाचे मोठे सामर्थ्य भरले आहे. हे ऐकून आत्मविश्वास दृढावला. काशीस प्रयाण केले. शके १४९५ अखेरपर्यंत काशीतच ग्रंथ पूर्ण केला. हा 'ज्ञानग्रंथ चिद्रत्न' ठरला. काशीतील विद्वानांनी मराठीमध्ये संस्कृतमधील व्यापक परमार्थविद्या सांगू नये म्हणून एकनाथांस विरोध केला; परंतु हा विरोध एकनाथांची भजने, कीर्तने व प्रवचने ऐकून पूर्ण मावळला. त्यांच्या विभूतिमत्त्वाबद्दल लोकांना असीम आदर वाटू लागला. अनेक विद्वान त्यांचे शिष्य बनले. *हरिवरदा*कार श्रीकृष्णदयार्णव हेही त्यांचे शिष्य बनले. त्याच सुमारास, *रुक्मिणी-स्वयंवर* हे काव्य श. १४९३ (इ. स. १५७१), चैत्र शु. ९, ह्या दिवशी त्यांनी मणिकर्णिकेच्या घाटावर लिहून पूर्ण केले. *रुक्मिणी-स्वयंवरा*वर ह्यापूर्वी अनेक काव्ये झाली होती. एकनाथांचे *रुक्मिणी-स्वयंवर* कालक्रमानुसार सातवे होय. एकनाथांनंतरही मराठीत रुक्मिणी-स्वयंवरावर अनेक काव्ये झाली आहेत. जिवाशिवांची शाश्वत विरहव्यथा जावी व जिवाशिवांचे लग्न व्हावे, हा उद्देश सफल होण्याकरिता हे स्वयंवरकाव्य त्यांनी लिहिले.

काशीहून पैठणास परतल्यावर एकनाथांनी आळंदी येथील ज्ञानेश्वरांच्या समाधीचा जीर्णोद्धार केला. दीर्घकाल उपेक्षा झाल्यामुळे *ज्ञानेश्वरी*ची शुद्ध प्रत मिळेना; त्याकरिता *ज्ञानेश्वरी*ची शुद्ध प्रत त्यांनी तयार केली. एकनाथ आळंदीस गेले असता तेथील मुक्कामात त्यांना स्वप्न पडले की, ज्ञानदेवांच्या गळ्याला अजानवृक्षाच्या मुळीचा वेढा पडला आहे. जागे झाल्यानंतर एकनाथांनी ती अजानवृक्षाची मुळी ज्ञानदेवांच्या गळ्यातून बाजूला केली. ही स्वप्नाची आख्यायिका, एकनाथांनी *ज्ञानेश्वरी*ची प्रत शुद्ध करून पुन्हा *ज्ञानेश्वरी* प्रचारात आणली ह्या घटनेची सूचक आहे. अजानवृक्ष म्हणजे *ज्ञानेश्वरी*बद्दलचे जनतेत पसरलेले अज्ञान होय. आज जी *ज्ञानेश्वरी* उपलब्ध आहे, तिच्यात उपसंहाराच्या शेवटी एकनाथांच्या ओव्या आहेत. त्यात म्हटले आहे की, आधीच शुद्ध असलेली प्रत अशुद्ध वा अबद्ध झाली, म्हणून शुद्ध पाठ कोणते आणि अशुद्ध पाठ कोणते हे ठरवून, स्वमताने शुद्ध अशी प्रत लिहून काढली. ही एकनाथांनी शुद्ध केलेली मूळची प्रत आज उपलब्ध नाही. तिच्या नकला मात्र उपलब्ध आहेत. *ज्ञानेश्वरी*चे विविध पाठ असलेल्या अनेक लिखित पोथ्या आढळतात. इतिहाससंशोधक वि. का. राजवाडे, रा. वि. माडगावकर इत्यादिकांच्या प्रकाशित पोथ्या एकनाथपूर्वकालीन आहेत, असे मानण्यात येते; कारण त्यांमध्ये एकनाथांच्या उपसंहारातील ओव्या मिळत नाहीत.

कर्मठतेतून सुटका करावी व जनतेला नामस्मरण, भजन, कीर्तन, परोपकार व सदाचरण अशा शुद्ध भक्तिमार्गाला लावावे म्हणून नाथांनी *भागवता*ची रचना केली; त्याचप्रमाणे अवतारकथा, देवदेवतांची आख्याने, भक्तचरित्रे, सुबोध व गोड भाषेत लिहिली. एकनाथांची आध्यात्मिक स्वरूपाची स्फुट प्रकरणे पुष्कळ आहेत. शंकराचार्यांचे संस्कृतमधील *हस्तामलक* स्तोत्र, संस्कृतमधील *शुकाष्टक* ह्यांवर त्यांनी विस्तृत मराठी टीका लिहिली आहे. *स्वात्मसुख, चिरंजीवपद* व *आनंदलहरी* ह्याही त्यांच्या मराठी ओवीबद्ध रचना प्रसिद्ध आहेत. *तुळशीमाहात्म्य, सीतामंदोदरीची एकात्मता, हळदुळी, कृष्णधाम, कदर्यु आख्यान,* इत्यादी त्यांचे कथात्मक वाङ्मय प्रसिद्ध आहे. सामान्यजनांना रंजविणाऱ्या नाट्यपूर्ण रचनाही त्यांनी केल्या आहेत; त्यांस भारुडे असे म्हणतात. सुमारे ३०० भारुडे त्यांनी रचली. गोंधळी, भराडी, वासुदेव, डोंबारी, बाळसंतोष, महार वगैरे अत्यंत खालच्या मानलेल्या जमातींना आवडतील अशी ही भारुडे आहेत. [ ➪ ३.] *भावार्थ रामायण* ही त्यांची अखेरची रचना. रामायणावर मराठीत प्रथम एकनाथ ह्यांनीच विस्तृत रचना केली. *वाल्मीकी रामायण, अध्यात्म रामायण, आनंद रामायण, योगवासिष्ठ* इत्यादी संस्कृत ग्रंथ आधारास घेऊन त्यांनी *भावार्थ रामायणा*ची रचना केली आहे. बाल, अयोध्या, अरण्य, किष्किंधा, सुंदर ही पहिली पाच कांडे आणि सहाव्या युद्धकांडाचे ४४ अध्याय लिहून झाल्यानंतर नाथांनी देह ठेवला. त्यापुढील भाग गावबा नावाच्या नाथांच्या शिष्याने पूर्ण केला, असे परंपरेने सांगण्यात येते; परंतु ह्यासंबंधी अलीकडे अधिक संशोधन चालू आहे. नाथांनी स्वेच्छेने देहत्याग केला असे अनेक चरित्रकार सांगतात. महिपतींनी म्हटले आहे की, नाथांनी गोदेच्या पात्रात कंबरभर पाण्यात उभे राहून देहत्याग केला. नंतर लोकांनी त्यांच्या देहास अग्निसंस्कार केला. शके १५२१, विकारी संवत्सर, फाल्गुन वद्य ६, रविवार हा नाथांचा निधनदिवस होय. नाथांचे मुख्यतः १२ ग्रंथ प्रसिद्ध आहेत : १. *चतुश्लोकी भागवत टीका,* २. *एकनाथी भागवत* [ ➪ ३ ], ३. *रुक्मिणी स्वयंवर* [ ➪ ३ ], ४. *भावार्थ रामायण* [ ➪ ३ ], ५. *शुकाष्टकावर टीका,* ६. *आनंदलहरी,* ७. *गीतासार,* ८. *आनंदानुभव,* ९. *हस्तामलक,* १०. *स्वात्मसुख,* ११. *प्रल्हादविजय,* १२. *एकनाथी गाथा* (पदे, अभंग वगैरे) [ ➪ ३ ].

इतर साधुसंतांप्रमाणेच एकनाथांच्या अनेक चमत्कारकथा प्रसिद्ध आहेत. नाथ हे उच्चनीचभेद मानीत नसत; नाथ हे शांतिब्रह्म होते; कामक्रोधलोभ त्यांच्या जिवाला कधीही शिवले नाहीत; नाथांच्या समदृष्टीला द्विज-शूद्र, हिंदू-मुसलमान, स्पृश्य-अस्पृश्य, साव व चोर हे सारखेच दिसत होते; निंदा व छळ होताना त्यांची शांती ढळली नाही. ह्याचीच उदाहरणे ह्या कथांमध्ये दिसतात; त्यांतील चमत्कार वा अद्भुत भाग वगळावा. एकदा पैठण येथील एक मुसलमान माजुरेपणे, एकनाथांवर, ते गंगेवर स्नानास जात असता, अनेक वेळा थुंकला, त्यामुळे नाथांना चार-पाच वेळा एकाच दिवशी गंगेचे स्नान करावे लागले. शेवटी त्या मुसलमानाला पश्चात्ताप झाला. आपण मशिदीत जाऊन नमाज पढतो, क्षमा करा, असे तो म्हणाला. नाथांनी त्याला सांगितले, 'केवळ मशिदीतच अल्ला उभा नाही. तो जमिनीत व आसमानात भरला आहे.' नाथांना क्रोध माहीत नव्हता; त्यांना क्रोध आणण्याकरिता कुटाळ लोक प्रयत्न करीत. नाथ देवपूजेस बसले असताना एक कुटाळ ब्राह्मण देवघरात शिरून त्यांच्या मांडीवर जाऊन बसला. त्यांच्या अंगावर कपडे व पडशी तशीच होती. नाथांनी त्याच्या पाठीवर हात ठेवून प्रेमाने म्हटले, 'तुमच्या भेटीने मला फार आनंद झाला. आता भोजन करूनच जावे.' गिरजाबाईंनी भोजन वाढले.

नाथांच्या घरी वडिलांचे श्राद्ध होते; स्वयंपाक सिद्ध झाला होता; तोच दाराशी चार-पाच भुकेलेले महार आले. गिरजाबाईंनी त्यांना घरात बोलावून ब्राह्मणांप्रमाणे पूजा करून जेवण घातले. नंतर ते महार जेवून गेल्यावर श्राद्धाच्या ब्राह्मणांकरिता पुन्हा स्वयंपाक केला. ब्राह्मणांनी बहिष्कार घातला; परंतु स्वर्गीचे पितर उतरले; पितरांनी श्राद्धाचे भोजन घेतले व ते तृप्त होऊन आशीर्वाद देऊन गेले. ही कथा मोरोपंतांनी आपल्या *आर्याचरित्रा*त सांगितली आहे. राण्या नामक महाराने नाथांना घरी जेवावयास बोलावले. राण्या आणि त्याची बायको वारकरी संप्रदायाची होती. नाथांनी भोजनास जाण्याचे कबूल केले. राण्या महाराने सपत्नीक

पूजा करून नाथांना जेवू घातले. एके दिवशी नाथ मध्यान्हसंध्येला गंगेवर चालले होते. वाटेत एक महाराचे पोर आईच्या मागे धावत असता अडखळून पडले. नाथांनी कडक उन्हाने हैराण झालेले ते ठेचाळलेले पोर उचलून कडेवर घेतले, उपरण्याखाली झाकून महारवाड्यात पोहोचते केले. एक चोऱ्या करणारा महार शिक्षा होऊन कैदेत पडला होता. कैदेत असताना उपासमारीने तो जर्जर झाला होता. अनेक महिन्यांनी कैदेतून सुटला व नाथांच्या दारी येऊन विव्हळत पडला. नाथांनी खीर तयार करून त्याला खाऊ घातली. औषधपाण्यासाठी घरी ठेवून घेतले. तीन महिने शुश्रूषा केली. तो पहिल्यासारखा खडखडीत बरा झाल्यावर, त्याने वारकरी पंथाची दीक्षा घेतली व घरी परतला.

नाथांचे पुत्र हरिपंडित गंगेची कावड घेऊन काशीहून पैठणास परत येत आहेत अशी वार्ता कळल्यावर एकनाथ व अनेक नागरिक हरिपंडितांस वेशीवर सामोरे गेले. कडक उन्हाळा भासत होता. जवळच एक गाढव तहानेने धापा टाकत उभे होते. हरिपंडितांजवळची गंगेच्या कावडीतील घागर उचलून नाथांनी ते गंगेचे पाणी त्या गाढवाला पाजले. इतर नागरिक व हरिपंडितही रागावले. त्यावर नाथांनी उत्तर दिले, 'त्या गाढवाला गंगेचे पाणी पाजल्याने तुम्हा सर्वांना गंगेचे तीर्थ प्राशन केल्याचे पुण्य लाभले आहे.' ह्या कथा खऱ्या असोत वा नसोत, नाथचरित्राच्या संदर्भात भागवतधर्माला नवीन नैतिक आशय प्राप्त झाला, ही गोष्ट त्यामुळे सूचित होते.

लक्ष्मणशास्त्री जोशी

**रचना : मु.** – १. अनुभवामृत टीका; काही ओव्या (भय्याकाका किबे यांच्या 'ज्योत्स्ना' या अनुभवामृतावरील टीकेत समाविष्ट. पहिल्या पाच संस्कृत श्लोकांवरील एकनाथी मराठी टीका, ओ. सं. ३४). २. आनंदलहरी (स्तोत्रे व स्फुट कविता); संपा. पांगारकर, ल. रा.; वैद्यकपत्रिका; पुणे, १९२०. ३. आनंदानुभव ऊर्फ अनुभवानंद; सुबोधप्रकाश, मुंबई, १८८८. ४. (१) एकनाथी भागवत; संपा. जोग, वि. न.; पुणे, १९११ (आनंदलहरी, स्वात्मसुख, हस्तामलक, शुकाष्टक व चतुःश्लोकी भागवत यांसह). (२) एकनाथी भागवत : संपा. पांगारकर, ल. रा.; मुंबई, १९१०. (३) सार्थ श्री एकनाथी भागवत : संपा. आठल्ये, कृ. ना.; मुंबई, १९२६. (४) श्रीएकनाथी भागवत : महाराष्ट्र शासकीय प्रकाशन; मुंबई, मार्च १९७१. ५. (१) चतुःश्लोकी भागवत; शिळाछाप पोथी. (२) एकनाथमहाराजकृत चतुःश्लोकी भागवत, चिरंजीवपद व नानक; श्रीराम तत्त्वप्रकाश; बेळगाव. ६. प्रबोधसद्वृत्तिसंवाद; ओ. सं. ६२; संपा. देव, शं. श्री.; रामदास आणि रामदासी : मासिक पुस्तक, व. २४, अं. २८१; धुळे, १९४५; पृ. ६५–७० (प्रस्तुतची प्रत अति-जीर्ण आणि ठिकठिकाणी फाटलेली आहे). ७. प्रल्हादचरित्र; श्रीससंगा., खं. २; संपा. जोशी, का. अ.; पुणे, १९६७; पृ. ३७६–३७७. ८. भारुडे : श्रीएकनाथमहाराजांची भारुडे (सविवरण); संपा. बडवे, ना. वि.; औरंगाबाद, १९६८. ९. भावार्थरामायण (युद्धकांड ४४ अध्यायापर्यंत) : (१) महासाधु श्रीएकनाथ महाराज विरचित श्रीमत् भावार्थ रामायण; संपा. देव, ग. चिं.; मुंबई, १९१० (बाल, अयोध्या, अरण्य, युद्ध, उत्तर, किष्किंधा, सुंदर). १०. रुक्मिणीस्वयंवर : (१) श्रीएकनाथकृत रुक्मिणी-स्वयंवर; संपा. देशमुख, मा. कृ.; आ. २; पुणे, १९२५. (२) श्रीएकनाथकृत रुक्मिणी-स्वयंवर; संपा. जोशी, न. ग.; मुंबई, १९३३. ११. शुकाष्टक; 'एकनाथी भागवत', संपा. जोग, वि. न. व देशमुख, मा. कृ., पुणे, १९११, या ग्रंथात समाविष्ट. १२. स्वात्मसुख : 'एकनाथी भागवत', संपा. जोग, वि. न. व देशमुख, मा. कृ., पुणे, १९११, ह्या ग्रंथात समाविष्ट. १३. हस्तामलकटीका; 'एकनाथी भागवत', संपा. जोग, वि. न. व देशमुख, मा. कृ., पुणे, १९११, या ग्रंथात समाविष्ट. १४. **स्फुट :** (१) एकनाथी गाथा : संपा. गोंधळेकर, रा. श्री. (साहा. गोडबोले, पां. वि.); पुणे, १८९३. (२) श्रीएकनाथ महाराजांच्या अभंगांची गाथा; संपा. तुकाराम तात्या; मुंबई, १९०३. (३) श्रीएकनाथमहाराज यांच्या अभंगांची गाथा; संपा. आवटे, त्र्यं. ह.; मुंबई, १९०८. (४) श्रीएकनाथस्वामीकृत अभंगांची गाथा; इंदुप्रकाश; भा. १ व २; मुंबई, १९०६. (५) श्रीसंतएकनाथमहाराज यांची अभंगांची गाथा; अभंगसंख्या ४०२९; संशोधक : आपटे, अ. द. व किंजवडेकर शास्त्री, रा. द.; प्रका., चित्रशाळा; पुणे, १९३०, १९५६. **संशोधन** – १५. ज्ञानेश्वरी. **शंका.** – १६. आरती (तुलसीची). १७. आरती (दशावताराची). १८. कौसल्या-स्वयंवर. १९. गीतामहिमा. २०. गीतासार. २१. गोवर्धनोद्धरण. २२. नाममहिमा. २३. नामसार. २४. बालक्रीडा; म. सा. २१४. २५. भिक्षुगीत. २६. मुद्राविलास. २७. रामगीता. २८. सीतामंदोदरीसंवाद.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : एकनाथ; परिचयात्मक; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. २८०–३३२. २. आजगांवकर, ज. र. : श्रीएकनाथ महाराज यांचें चरित्र; मुंबई, १९२५; पृ. १९५. ३. आवळीकर, पंडित : एकनाथी अहिरावणाख्यान; प्रतिष्ठान, डिसें. १९५७. ४. आवळीकर, पंडित : भावार्थ रामायणाचें 'युद्धकांड'; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. ५८–८९. ५. कानोले, वि. अं. : भावार्थ रामायणाचें अज्ञात उत्तरकांड; श्रीएकनाथदर्शन, खं. १; १९५२; पृ. २९०–३२६. ६. कारखानीस, ग. गो. : भावार्थ रामायणासंबंधी काही विचार; रामदास आणि रामदासी; ७ वा सुमनहार; व. २२, अं. २५७–५८–५९; पृ. ५४–९४. ४. कुळकर्णी, पां. ना. : भावार्थ रामायणाचें तिसरें उत्तरकांड; संशोधनधारा; पुणे, १९६७; पृ. ७८–९८. ८. कुळकर्णी, व्र. दि. : एकनाथांच्या काव्यातील निसर्ग; मसाप.; जुलै–डिसें. १९६३; पृ. ११. ९. कुळकर्णी, वा. ल. : एकनाथी भारुडे : काही विचार; डॉ. कोलते गौरव ग्रंथ (१९६९); पृ. ६८–७५. १०. कुळकर्णी, श्रीधरराव : नाथांचा भागवतधर्म; एकनाथ संशोधन मंदिर, औरंगाबाद. ११. केतकर, द. वें. : नाथ-ज्ञानेश्वरीची लोकमान्य नक्कल झालीच नाही; नभामा., ऑक्टो. १९५८; पृ. ४०–४४. १२. केशव : एकनाथचरित्र; अ. १–५; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ३४२. १३. ग्रामोपाध्ये, गं. ब. : एकनाथकृत 'चतुःश्लोकी भागवत'; नभामा., एप्रि. १९६६; पृ. १७. १४. ग्रामोपाध्ये, गं. ब. : एकनाथकृत 'चतुःश्लोकी भागवत'; वाङ्मयविचार; १९६८; पृ. ३५–६०. १५. ग्रामोपाध्ये, गं. ब. : एकनाथ : व्यक्तिदर्शन; वाङ्मयविचार; पुणे, १९६८; पृ. २७–३४. १६. संपा. घाटे, ब. गि. : एकनाथ दर्शन, खं. १ व २; औरंगाबाद, १९५२ व १९६१. १७. घाटे, ब. गि. व जोशी, म. द. : श्रीनाथभावांजलि; औरंगाबाद, १९७३. १८. घारपुरे, वा. ह. : भावार्थ रामायण (संक्षेप); औरंगाबाद, १९६२. १९. चतुर्वेदी, पं. जगमोहनलाल : एकनाथ और तुलसीदास; एकनाथ संशोधन मंदिर; औरंगाबाद. २०. जोशी, ना. ब. : गीताचंद्रिका व एकनाथप्रतिशुद्ध ज्ञानेश्वरीसंबंधी विचार; साहित्य संशोधन मंजिरी; बेळगाव, १९७३; पृ. २१. २१. जोशी, ना. ब. : दलपतीचे

गुरु सूर्यपंडित व एकनाथांचे वडील; साहित्य संशोधन मंजिरी; बेळगाव, १९७३; पृ. २०३. २२. जोशी, ना. ब. : नाथ-ज्ञानेश्वरीच्या दोन प्रती; साहित्य संशोधन मंजिरी; बेळगाव, १९७३; पृ. १३. २३. जोशी, ना. ब.: नाथांचें रुक्मिणी-स्वयंवर (काही विचार); साहित्य संशोधन मंजिरी; पृ. ८७. २४. जोशी, ना. ब. : माधवस्वामीकाल व नाथसंबंध विचार; साहित्य संशोधन मंजिरी; पृ. ५३. २५. जोशी, ना. ब.: श्री एकनाथ महाराज व तिरुवेळंदूरचे माधवस्वामी; साहित्य संशोधन मंजिरी; पृ. ४३. २६. जोशी, म. रा.: एकनाथ संशोधन व शिवराम पूर्णानंद; प्रसाद, फेब्रु. १९७०; पृ. २२. २७. जोशी, व. स. : भावार्थ रामायणाचे चौथे अज्ञात उत्तरकांड; नभामा., जून १९६६; पृ. ३१. २८. जोशी, व. स. : श्रीएकनाथकृत 'भावार्थ रामायणा'तील चंद्रसेनाख्यानाचा अप्रसिद्ध अध्याय; मसाप., ऑक्टो.-डिसें. १९५७; पृ. ९–१८. २९. जोशी, स. कृ. : नाथांनी रंगविलेली कृष्णकथा; वसंत, एप्रि. १९६२; पृ. ४०. ३०. डोळके, सुरेश : एकनाथांचें रुक्मिणी-स्वयंवर; युगवाणी, दिवाळी अंक, १९६०; पृ. २८५–२९६. ३१. ढेरे, रा. चिं. : एकनाथांची गुरुपरंपरा; इंद्रायणी, जून १९६३; पृ. ४६–४७. ३२. ढेरे, रा. चिं. : एकाजनार्दनी : नाथांचें पैठण; मुंबई, १९५८; पृ. ३२. ३३. ढेरे, रा. चिं. : नाथांच्या जांवयाचें आडनांव; इंद्रायणी, डिसें. १९६२; पृ. ४६. ३४. ढेरे, रा. चिं. : महाराष्ट्र महोदयाचा अग्रदूत : एकनाथ; वसंत, दिवाळी अंक, नोव्हें. १९६२; पृ. ३३–४४. ३५. ढेरे, रा. चिं. : श्रीएकनाथ चरित्राची थोडी पहाणी; इंद्रायणी, मार्च–एप्रि. १९६४. ३६. ढेरे, रा. चिं. : श्रीसंत एकनाथांची भारुडे; तरुणभारत; पुणे, मार्च १९६६. ३७. तुळपुळे, शं. गो. : एकनाथ; पांच संतकवि; पुणे, १९४८. ३८. देशपांडे, अ. ना. : महदंबेचे धवळे आणि नाथांचें रुक्मिणी-स्वयंवर; युगवाणी, मार्च १९४९. ३९. देशपांडे, ब्रह्मानंद : श्रीएकनाथमहाराजांची गुरुपरंपरा; युगवाणी; मे–जून १९६९; पृ. २–१३. ४०. देशमुख, भगवंत : श्रीएकनाथकृत ज्ञानेश्वरी परिभाषा; प्रतिष्ठान, नोव्हें. १९५८; पृ. ४–४६. ४१. नांदापूरकर, ना. गो. : नाथांच्या चरणीं; प्रतिष्ठान, एप्रि. १९५६; पृ. ९–१४. ४२. पटवर्धन, पां. न. : श्रीएकनाथांचा वंशवृक्ष; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १५७–१५९. ४३. पांगारकर, ल. रा. : श्रीएकनाथ महाराजांचें संक्षिप्त चरित्र; पुणे, १९११ (नवी आवृत्ती, १९६७). ४४. पुरोहित, व. शि. : भावार्थदीपिका आणि एकाकार टीका; युगवाणी, जुलै १९६३; पृ. १५–२१. ४५. पेंडसे, शं. दा. : भागवतोत्तम संत श्री एकनाथ; नागपूर, १९७१. ४६. प्रियोळकर, अ. का. : भागवताचा एकनाथी दशमस्कंध; मसंप., जाने. १९६१; पृ. १८७–१९८. ४७. फाटक, न. र. : श्रीएकनाथ : वाङ्मय आणि कार्य; मुंबई, १९५०, १९६३. ४८. बडवे, ना. वि. : श्रीएकनाथ-महाराजांची भारुडे; औरंगाबाद, १९६८. ४९. बहिरट, भा. पं. : एकनाथांचा भागवत धर्म; नाथांचा प्रसाद; १९६१; पृ. २९–४५. ५०. बहिरट, भा. पं. : नाथांचा वासुदेव; प्रसाद, ऑगस्ट १९६१; पृ. १७–२४. ५१. बेलसरे, के. वि. : भावार्थ रामायण (संक्षेप); प्रसाद प्रकाशन; पुणे. ५२. भागवत, रा. कृ. : एकनाथांचें चरित्र; मुंबई, १८९०, १९६१. ५३. भुसारी, र. म. : श्रीएकनाथ व नरेंद्र पंडित; साहित्य आणि संशोधन; १९५१; पृ. ९३–१२७. ५४. मराठे, कृ. बा. : एकनाथी भारूड; नभामा., डिसें. १९५४; पृ. १–१४. ५५. महिपती; महिपतीकृत श्रीएकनाथ-तुकाराम चरित्र; (संपा. आजगांवकर, ज. र.); मुंबई, १९४४. ५६. माटे, श्री. म. : भक्तिमार्गाचा नवा पुरस्कर्ता : एकनाथ : संत, पंत व तंत; १९५७; पृ. १०९–१२६. ५७. मुजुमदार, गं. ना. : माधवसुत आणि रुक्मिणीस्वयंवर; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ३, पौष १८५२; पृ. १३०. ५८. राजवाडे, वि. का. : एकनाथ, आणि देवदास; इतिहास आणि ऐतिहासिक; व. ३, अं. २६–२७; पौष व माघ शु. १, शके १८४०; पृ. ६४. ५९. राजवाडे, वि. का. : एकनाथकृत हस्तामलक; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. ५५. ६०. रानडे, रा. द. : संतवचनामृत, प्रस्ता., १९२७; पृ. ६२; व एकनाथ वचनामृत; १९५५, पृ. ६५. ६१. लागू, रा. कृ. : एकनाथांची भाषाशैली; श्रीएकनाथदर्शन, खं. १; १९५२; पृ. ३२७–३४५. ६२. शर्मा, विनयमोहन : संत एकनाथ; हिंमसंदे.; पटना, १९५७. ६३. श्रीएकनाथदर्शन, खं. १ व २; प्रकाशक : श्रीएकनाथ संशोधन मंदिर, औरंगाबाद; अनुक्रमे इ. स. १९५२ व १९६१. ६४. श्रीकृष्णदास जगदानंदनंदन : प्रतिष्ठान चरित्र; ओवीबद्ध; (श्रीएकनाथांचें चरित्र). ६५. सत्यान्वेषी : एकनाथी भागवतांतील अपपाठ; विज्ञावि., व. ६२, अं. ३–५; पृ. १९३१. ६६. सरदार, गं. बा. : एकनाथ आणि रामदास; रामदास आणि रामदासी, रौप्य महोत्सव ग्रंथ; धुळे, १९४७; पृ. १११. ६७. सहस्रबुद्धे, धों. बा. : पैठण येथील सुप्रसिद्ध साधु, कवि व तत्त्ववेत्ते श्रीएकनाथ महाराज यांचें चरित्र व त्यांची वेदान्तपर आणि नीतिपर कविता – पूर्वार्ध व उत्तरार्ध; मुंबई, १८८३. ६८. सावळापूरकर, पां. कृ. : एकनाथप्रणीत रुक्मिणी-स्वयंवर; युगवाणी, एप्रि. १९५९; पृ. ७–९. **इंग्रजी संदर्भग्रंथ :** ६९. Abbott, Justin E. : Eknath (The Poet Saints of Maharashtra, No. 2); 1927, pp. 240–270. ७०. Deming, W. S. : Eknath : A Maratha Bhakta; Karnatak Printing Press, Bombay, 1931.

**एकनाथ–२** [अंदाजे इ. स. १६०३ ते १६५८] दत्तसंप्रदायी कवी. वेदान्तपर ग्रंथाचे लेखक. हे गोदातीरावर मंजरथ ह्या गावी होऊन गेले. गुरुपरंपरा : श्रीनरसिंहसरस्वती > माधवसरस्वती > अमृतेंद्रसरस्वती > गगनेंद्रसरस्वती > माधवेंद्रसरस्वती > एकनाथ. ह्यांनी वेदान्ताचे प्रतिपादन करणारा *वेदान्तगर्भसुगमसार* ह्या नावाचा एक ग्रंथ रचला आहे. हा ग्रंथ *वेदगर्भसुगमसार* ह्याही नावाने प्रसिद्ध आहे. ग्रंथाची २१ प्रकरणे आहेत. ह्याची हस्तलिखित प्रत एकनाथ संशोधन मंदिर, औरंगाबाद येथे आहे (जोशी, म. रा. : माधवेंद्रशिष्य एकनाथ; विसंमंवा., १९७१, पृ. १४१–१४३).

**एकनाथ–३ (बीडकर)** / ० एका जनार्दन–२ [ अंदाजे श. १५०० / इ. स. १५७८ – श. १५७० / इ. स. १६४८ ] कवी. गणेशोपासक. वसतिस्थान : बीड (मराठवाडा). बीड येथील एक रहिवासी व थोर गाणपत्य जनीजनार्दन हे ह्यांचे गुरू. हे परंपरेने नाथपंथी होते. बीडकर एकनाथ हे जसे जनीजनार्दनांचे शिष्य तसेच आप्तही होते. जनीजनार्दनांचे विसाजीपंत ह्या नावाचे एक मामेभाऊ होते. त्यांच्या तीन मुलींपैकी एक मुलगी ह्या बीडकर एकनाथांना दिलेली होती. दुसऱ्या दोन मुली रेणुका व गंगा ह्या अनुक्रमे सूर्याजीपंत (रामदासांचे वडील) व कमळाकर (कऱ्हाडजवळील शहापूरचे) ह्यांस दिल्या होत्या. ह्या एकनाथांची उमा नावाची मुलगी तंजावरकडील नागनाथ ह्या गृहस्थांस दिली होती. *महाभारत* रचणारे माधवस्वामी हे उमा-नागनाथ दांपत्याचे चिरंजीव. आजपर्यंत माधवस्वामी हे पैठणकर एकनाथांचे नातू असे समजले जाई; पण ते त्यांचे नातू नसून ह्या बीडकर एकनाथांचे नातू

होत, असे संशोधनान्ती सिद्ध झाले आहे. रामदासी परंपरेतील भीमस्वामींचे शिष्य गोविंदबाळस्वामी ह्यांच्या मठात सापडलेल्या टिपणांवरून भीमस्वामी, माधवस्वामी, समर्थ व हे बीडकर एकनाथ ह्यांचा परस्परांशी नात्याचा संबंध होता असे स्पष्टपणे आढळून येते. समर्थांच्या बारशाला हे एकनाथ उपस्थित होते असेही ह्या टिपणाधारे समजते (म. रा. जोशी : *ज्ञानेश्वरी संशोधन*; नागपूर, १९७३, पृ. ७४–७६).

पैठणकर एकनाथ व बीडकर एकनाथ ह्या दोघांनीही 'एका जनार्दन' अशी एकच नाममुद्रा घेऊन रचना केल्याने बीडकर एकनाथांची रचना एकनाथांच्या नावावरील शंकास्पद ग्रंथांत आजवर समाविष्ट केली जात असे. बीडकर एकनाथांचे गुरू जनीजनार्दन ह्यांचे बीड येथील स्थान 'पाटांगण' देवस्थान म्हणून प्रसिद्ध आहे. ह्या 'पाटांगण' देवस्थानाच्या ग्रंथसंग्रहात बीडकर एकनाथांचे *भागवत दशमस्कंध टीका, भागवत एकादश स्कंध टीका, गणेशविलास, निर्विकल्प, चौरिकलीला ऊर्फ बाळक्रीडा* हे ग्रंथ उपलब्ध झाल्याने ती रचना पैठणकर एकनाथांची नाही हे आता सिद्ध झाले आहे.

ह्या रचनेपैकी *निर्विकल्प* ग्रंथ (ओ. ७२६) जनीजनार्दनांच्या नावावर दिलेला आढळतो. पण आज 'पाटांगण' देवस्थानात त्याचे कर्तृत्व जनीजनार्दनशिष्य एकनाथांकडे देण्यात येते. ग्रंथातील शेवटच्या ओवीवरूनही ही गोष्ट स्पष्ट होते. उदा., "हा निर्विकल्प ग्रंथ। असे गीतेचा मतितार्थ। जनीजनार्दन एकनाथ। बोलिले असे।।" ग्रंथ कृष्णार्जुनसंवादरूप व अध्यात्मपर आहे. *चौरिकलीला* हे प्रकरणही ह्या एकनाथांचेच असून *भागवत दशमा*च्या टीकेचा तो एक भाग आहे. आपल्या ग्रंथांतून हे स्वतःचा नामनिर्देश 'जनार्दनाचा किंकर एका', 'जनार्दनसद्गुरूचा रंक', 'एका जनार्दन', 'एका जनार्दना शरण' असा करीत असतात. ह्यांची काही स्फुट रचनाही असल्याचे समजते. परंतु ती अद्याप उपलब्ध झालेली नाही.

जनार्दनशिष्य एकनाथ ह्यांच्या ग्रंथांची माहिती झाल्यामुळे ज्ञानेश्वरी संशोधनातील काही रहस्यांचा उलगडा होतो, असे प्रा. म. रा. जोशी म्हणतात. "*ज्ञानदेवी*च्या प्राचीन प्रतींपैकी राजवाडे ह्यांना बीड 'पाटांगण' देवस्थानात उपलब्ध झालेली प्रत महत्त्वाची आहे. त्याचप्रमाणे फाटक प्रत म्हणून अभ्यासक ज्या *ज्ञानदेवी*चा निर्देश करतात, ती प्रतदेखील बीड 'पाटांगण'मधीलच आहे. (बीडकर) एकनाथांच्या दशम टीकेतील जनार्दनांचे उल्लेख, नमन व अर्पणपत्रिका आणि फाटक प्रतीवरील जनीजनार्दनांचे उल्लेख, नमन शब्दशः सारखे असून त्यांच्यात एकरूपता आहे. 'श्रीजनार्दन गुरु' असा उल्लेख जनीजनार्दनांचा आहे. फाटक प्रतीवरील उल्लेख श्री पैठणकर एकनाथांचे गुरू श्रीजनार्दनांचे नसून बीड येथील गाणपत्य जनार्दनांचे आहेत. फाटक व विशेषतः राजवाडे प्रतीवर 'श्रीमहागणपतये नमः' असे नमन आढळते. फाटक प्रतीचा लेखक एकनाथांच्या ओव्याही न देता 'श्रीमज्जनार्दनार्पणमस्तु' असा संशोधकाच्या गुरूचाच तेवढा निर्देश करतो. *दशमस्कंधटीका*कार एकनाथ प्रस्तुत प्रतीचा लेखक असण्याची शक्यता आहे." असे नवे संशोधन, प्रा. म. रा. जोशी ह्यांनी ह्या संदर्भात केले आहे. ह्यापुढे ते असेही म्हणतात की, फाटक प्रतीचे पाठ भिन्न आहेत, ह्या प्रतीवर नाथांचा उल्लेख नाही, त्यांच्या संशोधनाच्या ओव्याही नाहीत व एकनाथगुरू जनार्दनस्वामींचा निर्देश नाही. म्हणून फाटक प्रत एकनाथकालीन किंवा त्यांनी संशोधिलेल्या प्रतीची नक्कल प्रत आहे असे म्हणता येणार नाही (*ज्ञानेश्वरी संशोधन* : पाटांगण परंपरा : एकनाथकृत *दशमस्कंध* व *ज्ञानदेवी*ची फाटक प्रत : एक अध्ययन; पृ. ६१–६४).

**रचना : मु.** – १. चौरिकलीला ऊर्फ बाळक्रीडा; ओ. सं. ८२; संपा. देशपांडे, ज. शा.; मसंप., ऑक्टो. १९६४; पृ. १२२–१२७. २. निर्विकल्प; ओ. सं. ७१६; स्फुट प्रकरणे, भाग १, भाइसमं. प्रका., पुणे, १९१४. **अमु.** – १. भागवत दशमस्कंध टीका; अ. ३७; ओ. सं. ३३९७; पाटांगण देवस्थान. २. भागवत एकादश स्कंध टीका; उत्तरार्ध ।। श्लोक ७२७ ।। उत्तरार्ध टीका ।। ।। ९२०६ ।। एवं संख्या पूर्वार्ध उत्तरार्ध ग्रंथ ।। श्लोक १३७० ।। टीका १८५०० श्रीमज्जनार्दनार्पणमस्तु ।। सवामं., बा. ७२९; रासं., खं. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, म. रा. : (१) एकनाथकृत दशमस्कंध व ज्ञानदेवीची फाटक प्रत; (२) एकनाथ आणि माधवस्वामी; ज्ञानेश्वरी संशोधन : पाटांगण परंपरा : एक अध्ययन; नागपूर, १९७३, पृ. ५५–७७. २. प्रियोळकर, अ. का. : भागवताचा एकनाथी दशमस्कंध, मसंप., जाने. १९६१; पृ. १८७–१९८.

**एकनाथ–४** [का. अनु.] महानुभावीय कवी. *बाळक्रीडा* नावाचा पैठणकर एकनाथांच्या नावावर मोडला जाणारा ग्रंथ, संशोधनान्ती, ह्या कवीचा असल्याचे मानण्यात येत आहे (मसा., आ. ५, पृ. २१४).

**एकसुतात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – एक रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ३५. **अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**एका गोविंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **एकाजनार्दन–१** – पहा **एकनाथ–१ (पैठणकर)**.

० **एका जनार्दन–२** – पहा **एकनाथ–३ (बीडकर)**.

**एकादास** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध] आरतीकार. ह्यांनी *गीतेची आरती* (कडवी ४) केली आहे. तसेच रत्नाकरी *गीताटीके*ची (र. श. १६२१ / इ. स. १६९९) ह्यांनी प्रत केलेली सापडते (श. १६८५ / इ. स. १७६३) (सवामं., बा. ४३६; हस्त. सू., खं. १).

**एका रंक** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**एका शामनाथ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**एका शिवराम (येका शिवराम)** [अंदाजे इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध व १८ व्या शतकाचा पूर्वार्ध] पदकार. पैठणकर एकनाथांच्या परंपरेतील. हे जुन्नर येथे राहणारे असावे, असे ह्यांच्याच एका पदावरून वाटते. ह्यांची गुरुपरंपरा : दत्तात्रेय > जनार्दन > एकनाथ > नरहरी > निंबराज > शिवराम > एका अशी आहे. ही परंपरा कवीने त्याच्या *गुरुमालिका* नामक दीर्घ पदात दिली आहे. कृष्णदयार्णवांच्या *हरिवरदा* ग्रंथाच्या शुभारंभाच्या प्रसंगी (नाथषष्ठी, श. १६४९ / इ. स. १७२७) जे अनेक संत श्रोते हजर असल्याचा उल्लेख कृष्णदयार्णवांनी केला आहे, त्यांत 'एका शिवरामां'चे नाव येते.

हे दत्तसंप्रदायी असले तरी ह्यांचा ओढा मात्र शिवभक्तीकडे होता. ह्यांच्या उपलब्ध पदांत शिवस्तुतिपर पदे अधिक आहेत. ह्यांच्या पदांतून साधक आणि सिद्ध अशा ह्यांच्या दोन अवस्था स्पष्टपणे दिसतात. देव आणि भक्त ह्यांचे मीलन होण्यासाठी सद्भावनांची कास धरणे आवश्यक आहे, असा 'एका शिवरामां'चा स्वानुभव दिसतो.

कवीची पदपदांतरे समर्थवाग्देवतामंदिर आणि भारत इतिहास संशोधक मंडळ ह्यांच्या हस्तलिखित संग्रहांतून विखुरलेली आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नगरकर, रा. शं. : एका शिवराम;

ज्ञात्रैमा. (पुनरुज्जीवन); एप्रि. १९६९, पृ. ११–१५.

**एकोजी (दुसरे) भोसले / ० एकोजी नृप / ० एकोजी राजे** [इ. स. १६९५–१७३६] नाटककार व कवी. व्यंकोजीचे पुत्र शहाजी राजे (इ. स. १६८२–१७११) ह्यांच्यानंतर त्यांचे धाकटे बंधू सरफोजी हे गादीवर आले. सरफोजीनंतर तुकोजी (तुळाजी) व त्यानंतर त्यांचे पुत्र एकोजी गादीवर बसले. हे फक्त एकच वर्ष गादीवर होते (इ. स. १७३६). ह्यांनी मराठी भाषेत तीन व तेलुगू भाषेत एक अशी चार नाटके रचली असल्याची माहिती डॉ. य. ग. लेले ह्यांनी *मराठी रंगभूमीचा इतिहास* ह्या पुस्तकात दिली आहे (पृ. ३०). कवीने रचलेल्या एका शिवपर पदाचे मुद्रण झालेले आहे (पदगुच्छ, तंजावर, १९६९, पृ. १५).

**रचना : अमु.** – १. अनुसुया उपाख्यान; ग्रं. सं. ८००. २. कमलांबा-त्यागेशपरिणय; ग्रं. सं. २५०. ३. पतिव्रतोपाख्यान – गद्य मराठी; ग्रं. सं. १८१. ४. शकुंतलापरिणय; ग्रं. सं. २६०. ५. विघ्नेश्वरकल्याण (तेलुगू नाटक). ६. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** शेंडे, स. ना. : मराठी नाटकांची नांदी; मसंप., ऑक्टो. १९६९; पृ. १–१३.

**० एकोजी नृप** – पहा **एकोजी भोसले.**

**० एकोजी राजे** – पहा **एकोजी भोसले.**

**एकोदेव पंत** [का. अनु.] महानुभाव कवी. पारमांडल्य-आम्नायातील चक्रपाणी भटाचे शिष्य.

**रचना : अमु.** – चक्रपाणीपाठ; देशपांडे, य. खु.; परिशिष्ट : पारमांडल्य आम्नाय वंशवृक्ष; ममवा., पुणे, १९६०.

**एतियन-द-ला क्रुवा / ० क्रुवा, एतियन-द-ला** (पाद्री) [ज. इ. स. १५७९ – मृ. २४ सप्टें. १६४३] कवी. गोमंतकीय जेजुइट मिशनरी. ह्यांचा जन्म फ्रान्समध्ये झाला. १६०२ मध्ये जेजुइट संघातर्फे हे हिंदुस्थानात आले. स्टीफन्सनंतर रायतूरच्या कॉलेजचे हे प्रमुख झाले.

ह्यांनी *सेंट पीटरचे पुराण* ह्या ग्रंथाची रचना केली. सेंट पीटर हा ख्रिस्ताच्या बारा शिष्यांपैकी त्याचा मुख्य प्रेषित. कोकणातील हिंदूंच्या जुन्या धर्माचे खंडन करून त्यांना ख्रिस्ती धर्मात सेंट पीटरने आणले असे ह्या पुराणात दाखविले आहे. ग्रंथरचनेचा उद्देश मुख्यत्वेकरून ख्रिस्ती धर्मप्रचाराचाच आहे. हिंदुधर्म त्याज्य कसा हे विविध प्रकारांनी ग्रंथकार वर्णन करून सांगतो.

ग्रंथाचे तीन भाग असून ओवी-संख्या सुमारे १५००० च्या घरात जाईल. ख्रिस्ती धर्माचा मोठेपणा ठसविताना हिंदू धर्मातील सर्व देवदेवतांची विलक्षण थट्टा व उपहास ह्यांनी केला होता. अनेक जुन्या मराठी हिंदू धर्मग्रंथांचे वाचन ह्यांनी केले होते. ठिकठिकाणी पुराव्यादाखल ह्यांनी ह्या ग्रंथांतील ओव्या उद्धृत केलेल्या आहेत. प्रस्तुत ग्रंथाच्या आदि-अंतीची पृष्ठे गहाळ झालेली एक प्रत (मु.) पणजीच्या मध्यवर्ती ग्रंथसंग्रहालयात व दुसरी प्रत लिस्बन (पोर्तुगाल) येथील सरकारी ग्रंथालयात, अशा दोन प्रती उपलब्ध झाल्या आहेत. ह्या दोन्ही प्रती मिळून एक संपूर्ण प्रत होते. ह्या संपूर्ण प्रतीची सूक्ष्मपट नक्कल (मायक्रोफिल्म) अ. का. प्रियोळकरांनी मराठी संशोधन मंडळ, मुंबई ह्यांच्याकरिता करून घेतली. ती मंडळाच्या संग्रही आहे. प्रस्तुत ग्रंथ गोव्यात १६२९ साली छापला. त्याला प्रसिद्धी परवाना मात्र १६३४ त मिळाला.

ग्रंथाला विस्तृत गद्य प्रस्तावना पाद्री क्रुवा ह्यांनी जोडली आहे. ग्रंथातील विषयासंबंधाने त्यात विवेचन येते. ग्रंथाचे स्वरूप कसे आहे ह्याची कल्पना यावी ह्याकरिता अ. का. प्रियोळकर ह्यांनी ग्रंथाच्या पहिल्या पुराणाचे पहिले, दुसऱ्या पुराणाचे मधले व तिसऱ्या पुराणाचे अखेरचे अशी तीन कांडे छापून प्रसिद्ध केली आहेत (मसंप., व. १०, अं. १, २, ३). इ. स. १९४० त प्रियोळकरांनी संपादिलेले *ख्रिस्ताचे वधस्तंभारोहण* हे काव्य ह्या क्रुवा पाद्र्यांचेच असावे असा अंदाज त्यांनी व्यक्त केला आहे. कारण ॲलेक्स द ऱ्होडेस हा फ्रेंच भाषेत लिहिलेल्या आपल्या प्रवासवर्णनात (इ. स. १६२१) क्रुवाच्या ख्रिस्तासंबंधी रचलेल्या सुंदर करुणागीताचा उल्लेख करतो (फ्रेंच कवीने लिहिलेले मराठी पुराण; मसंप., ऑक्टो. १९६२; पृ. २).

भाषेच्या दृष्टीने विचार करता स्टीफन्सच्या *ख्रिस्तपुराणा*इतके हे पुराण सरस वाटत नाही. शब्दांचा, विचारांचा व वर्णनांचा तोचतोपणा ठिकठिकाणी जाणवतो. तरीही मराठी भाषेत एवढी प्रचंड ग्रंथरचना करणारा परदेशीय कवी म्हणून महाराष्ट्र कवि-मंडळात ह्यांनी विशिष्ट असे स्थान स्वतःकरिता निर्माण केले आहे.

**रचना : मु.** – १. सेंट पीटर पुराण; गोवा, १६३४; पुराण १, कांड १, ओ. १५४; पुराण २, कांड १, ओ. १४५; पुराण ३, कांड १, ओ. २६१; संपा. प्रियोळकर, अ. का.; मसंप., अनुक्रमे ऑक्टो. १९६२, जाने. १९६३ व एप्रि. १९६३. २. ख्रिस्ताचें वधस्तंभारोहण; संपा. प्रियोळकर, अ. का.; युनिव्हर्सिटी जर्नल, खं. ९, भा. २; मुंबई १९४०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. नायक, ना. भा. : फा. क्रुवा; गोमका.; गोवा (रिवण), १९६९; पृ. १५–१६. २. प्रभुदेसाई, वि. बा. : पाद्री एतिएन-द-ला क्रुवा; सशगोबो.; मुंबई, १९६३; पृ. ७८. ३. प्रियोळकर, अ. का. : फ्रेंच कवीने लिहिलेले मराठी पुराण : सेंट पीटरचे पुराण; मसंप., ऑक्टो. १९६२, पृ. १; जाने. १९६३, पृ. १७–३२; एप्रि. १९६३, पृ. ३३–५२.

**एल्हण–१ / ० येल्हण / ० एल्हणा कवी** [अंदाजे श. चे १४ वे किंवा १५ वे शतक / इ. स. चे १५ वे किंवा १६ वे शतक] महानुभाव कवी. कवीचा काळ व चरित्र ह्यांविषयीची माहिती उपलब्ध नाही. *महाराष्ट्र-सारस्वत*-कार भावे आणि *महानुभाव वाङ्मयेतिहास*कार य. खु. देशपांडे ह्यांनी प्रस्तुत कवीच्या *अष्टविवाह* काव्याची माहिती दिली आहे. कवीच्या काळाबद्दल अभ्यासकांचे एकमत नाही.

एल्हण कवीचे *अष्टनायिका विवाह (आठैं सैंवरें)* हे काव्य (प्रसंग १०, ओ. ८०१) प्रा. र. म. भुसारी ह्यांनी सिद्धपूर येथील महानुभावीय ग्रंथसंग्रहातून प्राप्त झालेल्या सकळा लिपीतील पोथीवरून संपादित केले आहे (हैद्रा., १९६७). *महाराष्ट्रसारस्वता*त भावे ह्यांनी वर्णन केलेल्या पोथीतील बारा प्रसंगांपैकी पहिला 'रुक्मिणीहरणाचा' व शेवटचा 'वसंतक्रीडेचा' असे दोन प्रसंग भुसारी ह्यांनी छापलेल्या ह्या प्रतीत नाहीत.

ह्या काव्याला भागवताच्या दशम स्कंधाचा आधार असून कथा-परिपोषासाठी *पद्मपुराणा*चाही उपयोग केला आहे, असे कवी सांगतो. महानुभावपंथीयांचे आराध्य-दैवत श्रीकृष्ण ह्याच्या आठी विवाहांचे वर्णन ह्या आख्यान-काव्यात केले आहे. मूळ भागवतकथेत सोयीप्रमाणे कवीने बदल करून स्वतंत्र अशी रचना केली आहे. स्वयंवरांचा भागवतातील क्रम कवीने पाळलेला नाही. जांबुवती, सत्यभामा, लक्ष्मणा इत्यादी नायिकांना कवीने प्रमुख स्थान दिले आहे. *रुक्मिणीस्वयंवरा*चा ओझरताच उल्लेख ह्यात येतो.

एल्हणाने आपल्या काव्यात शृंगाराला गौण स्थान देऊन वीर, रौद्र, भयानक ह्या रसांना प्रमुख स्थान दिले आहे. वर्णनचातुर्य, रसालंकारांची समुचित योजना व भाषाशैली ह्या बाबतींत नरेंद्रपंडित, दामोदरपंडित ह्यांच्या काव्याच्या परंपरेशी जवळीक साधणारे हे काव्य आहे असे मत प्रस्तुत काव्याचे संपादक प्रा. भुसारी ह्यांनी व्यक्त केले आहे. [ ⇨ ३. ]

**रचना : मु.** – अष्टनायिका-विवाह (आठैं सैंवरें); प्रसंग १०; ओ. सं. ८०१; संपा. भुसारी, र. म.; हैद्राबाद, १९६७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आचार्य, मा. ना. : महानुभाव कवी एल्हण विरचित अष्टनायिकाविवाह (संपा. भुसारी); परी., सत्यकथा, फेब्रु. १९७०; पृ. ६७–६८, ७१. २. पारखे, व. वि. : अष्टनायिकाविवाह (आठैं सैंवरें); परी., सा. सह., एप्रि. १९६८, पृ. ४६–४७.

**० एल्हण–२** – पहा **एल्हणसुत.**

**एल्हणसुत / ० एल्हण–२ / ० एल्हणसुत विद्वांस / ० मंडळीक एल्हण** [अंदाजे इ. स. १७ व्या शतकाचा उत्तरार्ध] महानुभाव कवी. कवीश्वर आम्नायातील *प्रमेयगीताभाष्यकार* मुरारीमल्ल विद्वांस (समा. श. १५२७ / इ. स. १६०५) ह्यांचे हे नातू. हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. वास्तव्य मराठवाड्यातील परभणी जिल्ह्यात. (ग्रंथरचनास्थळ म्हणून परभणी प्रांतातील विडळीये गावाचा कवीने निर्देश केला आहे.) एल्हणकविकृत *बाळक्रीडे*ची नोंद य. खु. देशपांडे ह्यांच्या *महानुभावीय मराठीवाङ्मय* ह्या ग्रंथात केलेली आहे (पृ. ५७). ह्याच कवीची ल. रा. पांगारकर संपादित *मराठी वाङ्मयाच्या इतिहासात* 'कवि मंडळीक एल्हन' ह्या शीर्षकाखाली ते आणखी माहिती देतात (मवाइ., खं. २, पृ. ७७३–७४). कवीचे नाव एल्हण नसून आपला उल्लेख हे 'एल्हणसुत' असा आपल्या काव्यग्रंथात करतात. ग्रंथातील नमनात कवीने आपले दीक्षागुरू येल्हण ह्यांचा 'मुरारीमल्ल कुमरु' असा निर्देश केला आहे. महानुभाव पंथात एल्हण ह्या नावाचे अनेक ग्रंथकार होऊन गेले आहेत त्यांपैकी हे कोणत्या एल्हणाचे पुत्र हे निश्चित झालेले नाही. 'कवीची वंशपरंपरा व गुरुपरंपरा एकच आहे, अस वाटतें. परंतु तसेंच असेल, असें निश्चयानें सांगतां येत नाहीं', असेही एक मत ह्या कवीची माहिती देताना रा. चिं. ढेरे ह्यांनी नोंदविले आहे (*गंगाजळी*, पृ. ९४). 'येल्हणसुत विद्वांस कवी', 'येल्हन नंदन' 'विद्वांस कवी कुमरु एल्हणाचा' असा आपला नामनिर्देश कवीने काव्यात केला आहे.

कवीच्या *बाळक्रीडे*चे २५ प्रसंग व ३२०७ ओव्या आहेत. ग्रंथाचा मूलाधार म्हणून *भागवत दशम स्कंध* व *हरिवंश* ह्यांचा निर्देश कवी करतो. असे असले तरी ह्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या मुरारीमल्ल कवीची *बाळक्रीडा*च त्याच्या काव्यग्रंथास प्रेरक ठरली असावी; काव्य रचताना मुरारीमल्लाचे ऋण बऱ्याच प्रमाणात ह्या कवीने स्वीकारले आहे असे मत रा. चिं. ढेरे ह्यांनी व्यक्त केले आहे (*गंगाजळी*, पृ. ९७). कवीने दिलेला ग्रंथरचनेच्या स्थलकालाविषयीचा तपशील असा आहे : शके पंधरासे येसी । विलंबी संवत्सर श्रीवणमासीं । शुद्ध पंचमीये पडतूर देशी । विडळीये सिद्ध जाला ग्रंथ ॥ २५.१७० ॥

**रचना : मु.** – येल्हणसुत मंडळीककृत बाळक्रीडा; प्र. २५, ओ. सं. ३२०७; र. श. १५८० (इ. स. १६५८); संपा. आव्हाड, ल. ना.; ढकांबे, जि. नाशिक; १९५६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : येल्हणसुताची बाळक्रीडा; गंगाजळी, पुणे, १९७२, पृ. ९१–९९. २. भुसारी, र. म. : येल्हनसुत विद्वांसकृत बाळक्रीडा; मस्वासंप., १९६७; पृ. ३९–४८.

**एल्हणसुत विद्वांस** – पहा **एल्हणसुत.**

**० एल्हणा कवी** – पहा **एल्हण–१.**

**० ओंकार** – पहा **मंडळीक एल्हण.**

**ओंकार (वाकू)** [अंदाजे इ. स. १६७३] महानुभाव कवी. ह्याने रचलेला *लीळानिधी* हा ग्रंथ ओवीबद्ध असून ह्याचे १०० अध्याय आहेत. रचना श. १५९५ / इ. स. १६७४ मधली असून परंडपट्टण ह्या गावी झाली (ममवा., आ. २, पृ. ६३).

**ओंकारकवी** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – 'दत्तस्तवन स्तोत्र' व 'दत्त विनंती' (ममग्रंककासू., पृ. १).

**ओंकार कवी दिवाकर** [का. अनु.] महानुभाव आरतीकार (ममग्रंककासू., पृ. १).

**ओंकार दत्तराज** [का. अनु.] महानुभाव आरतीकार (ममग्रंककासू., पृ. १).

**ओंकारदास कवी** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – मूळस्तंभ; प्र. ९, ओ. सं. ४५१; ममग्रंककासू., पृ. १.

**ओंकारमुनी गोपीराज कपाटे** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – दुर्बळ-शिष्य-संवाद असे २२-अक्षरी ७० ओव्यांचे प्रकरण; ममग्रंककासू., पृ. १.

**ओंकारमुनी चोरमागे** [अंदाजे श. १६३० / इ. स. १७०८] महानुभाव छंदरचनाप्रवीण चित्रकवी. पळसी ह्या गावी राहणाऱ्या पहाडसिंग ह्या धनिकाचा आश्रित असलेल्या ओंकार चोरमागे ह्या कवीची व रचनेची माहिती *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी दिली आहे (मसा., आ. ५, पृ. ३८५). ओंकारमुनींची परंपरा सांप्रदायिक रीत्या मानली जाते ती अशी : गुर्जर शिवबास (श. १३२५ / इ. स. १४०३) > वैद्यदत्तोबास > नागोव्यास > खामनीकर > ओंकारमुनी चोरमागे. ही परंपरा महात्मा मुरलीधर जयत्कर्ण ह्या महानुभाव महंतांनी सांगितली आहे (कुळकर्णी, व. दा.; मस्वासंप., हैद्रा., १९७२, पृ. ३६). चित्ररचना करणाऱ्या विठ्ठलकवींचे हे समकालीन होत.

कवीने *लक्ष्मणा-स्वयंवर* ह्या काव्याची रचना केली असून त्याचे सात सर्ग व ४२२ पद्ये आहेत. विविध वृत्तांतील रचना व चमत्कृतिपूर्ण चित्रबंधांची योजना हे ह्या काव्याचे वैशिष्ट्य आहे. अनेक हिंदी छंद, दक्षामकर, ललिता अशी नवी अक्षरवृत्ते, तसेच कमलदलबंध, गोमूत्रिका-बंध, वापिबंध ह्यांसारख्या परिचित चित्राकृतिबंधांबरोबरच नवरसबंध, मंडपबंध, नवग्रहबंध असे अपरिचित व नवीन चित्राकृतिबंध कवीने योजलेले दिसतात. ह्या प्रकारच्या रचनेचा हव्यास हा त्या विशिष्ट कालखंडाचा प्रभाव म्हणता येईल.

महानुभावांचे आराध्यदैवत श्रीकृष्ण ह्याच्या चरित्रामधील कथाभाग काव्यविषय म्हणून कवीने निवडला असला तरी महानुभाव तत्त्वज्ञान मात्र काव्यात कोठेही आलेले नाही. काव्याच्या रचनाकालाचा कवीने जो निर्देश केला आहे (७.३४२) त्यानुसार हा शक १६३० (इ. स. १७०८) येतो. ह्या आख्यान-काव्याशिवाय *दत्तात्रेय स्तोत्रे* (श्लोक ९ व श्लोक १४ अशा दोन रचना) आणि *संकष्ट वज्र पिंजर गद्य* असे साहित्य ह्यांच्या नावावर आढळते (ममग्रंककासू., पृ. १). ह्यांनी रचलेला एक ओवीबद्ध *वृद्धाचार* उपलब्ध (गोपीराज ग्रंथालय, रिद्धपूर) आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कुळकर्णी, व. दा.; मराठी काव्यातील चित्राकृतिबंध; मस्वासंप., हैद्रा., १९७२, पृ. ३१–४४.

**० ओंकारमुनि तळेग्रामकर** – पहा **ओंकारविद्वांस तळेगांवकर.**

**ओंकारमुनि / दिनकरगुरु-पुणतांबेकर** [का. अनु.] महानुभाव आरतीकार (ममग्रंककासू., पृ. १).

**ओंकार मुनी विराट** [का. अनु.] महानुभाव पदकार. ह्यांच्या नावावर *शहुकारोपदेश मित्र पद* अशी रचना दिलेली आढळते (ममग्रंककासू., पृ. १).

**ओंकारराजव्यास** [का. अनु.] महानुभाव ग्रंथकार.

**रचना : अमु.** – महाराष्ट्री खंडान्वयें (४० वर टीका); ममग्रंककासू., पृ. १.

**ओंकारविद्वांस तळेगांवकर / ० ओंकारमुनि तळेग्रामकर** [का. अनु.] महानुभाव कवी. ह्यांनी अवहरणी चालीसारख्या स्तोत्रावर खंडान्वये मराठी टीका केली आहे. *महाराष्ट्र सुबोधनी* अशी आणखी एक रचनाही कवीच्या नावावर आढळते (ममग्रंककासू., पृ. १).

**ओंकारव्यास (बास) धाराशिवकर** [अंदाजे इ. स. च्या १४ व्या शतकाचा मध्य] महानुभाव लेखक. उपाध्य आम्नायातील हर्दमुनिव्यासांचे शिष्य. ह्यांनी *स्मृति* लिहिल्या आणि *वृद्धाचारा*च्या *आदि* टाचल्या (म्हणजेच *स्मृतीं*ना मथळे दिले) (ममग्रंककासू., पृ. १).

**ओंकारव्यास पातूरकर** [का. अनु.] महानुभाव कवी. *नौ प्रकरण वचनसंबंध* अशी रचना ह्यांच्या नावावर उपलब्ध आहे (ममग्रंककासू., पृ. १).

**० औरंगाबादकर विनायकराव** – पहा **विनायकराव औरंगाबादकर.**

**कचेश्वर सिद्धेश्वर ब्रह्मे** [अंदाजे श. १५६२ / इ. स. १६४० – समा. श. १६५३, फाल्गुन शु. २ / इ. स. १७२१] कवी. ह्यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील चाकण ह्या गावी एका वैदिक देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण घराण्यात झाला. ह्यांची पितृपरंपरा त्र्यंबक खेडकर > शंकर > मेघनाथ > सिद्धेश्वर अशी आहे. कचेश्वरांचे पूर्वज वेदपारंगत व कर्मठ होते. मेघनाथांकडे शिवाजीमहाराजांकडील 'ब्रह्मत्वा'चा अधिकार होता. शाहूमहाराज व शाहूमहाराजांची पत्नीवजा एक दासी विरुबाई ह्यांनी कचेश्वरांचा अनुग्रह घेतला होता. तेव्हापासून ह्यांचे 'राजगुरु' असे उपनाव पडले. त्यामुळे ह्या कवीच्या घराण्याला अनेक इनामे मिळाली.

कचेश्वरांनी लिहिलेल्या *आदि बावाची* ह्या आत्मचरित्रावरून असे दिसते की, ते तरुणपणी उनाड व भटके होते. परंतु पुढे जुन्नर येथे एका सत्पुरुषाची गाठ पडून ह्यांची ही वृत्ती पालटली. त्यानंतर ह्यांना विषबाधा झाली. ह्या संकटाने हे भगवद्भजनी लागले. खेड येथे तुकाराममहाराजांचे एक भक्त अंबाजी ह्यांच्या सहवासात असता कचेश्वरांना तुकोबांचा स्वप्नानुग्रह झाला व त्यांनाच ते गुरू मानीत आले. ह्या साक्षात्कारात तुकोबांचे कीर्तन पाहून "कर्दळी हेलावे जैसी चंड वातें। तैसें तुकोबातें देखियलें" व "वर्तुळ दोंद पोट, नेत्र नासिक नीट। दंतपंक्ती लघु आरक्त ओठ" हे तुकोबांच्या देहयष्टीचे त्यांनी केलेले वर्णन महत्त्वाचे व लक्षणीय आहे. आयुष्याच्या उत्तरार्धात कृष्णातीरी उंब्रज येथे हरिभक्ती करीत असता ह्यांचे देहावसान झाले. ह्यांची समाधी कृष्णा-वेणी संगमी माहुली येथे आहे.

कचेश्वरांची काव्यरचना विविधवृत्तात्मक व बरीचशी आख्यानपर स्वरूपाची आहे. तुकारामांवरील ह्यांच्या आरत्या वैशिष्ट्यपूर्ण आहेत. नादमाधुर्य हा ह्यांच्या रचनेचा विशेष गुण दिसतो.

**रचना : मु.** – आदि बावाची (आत्मचरित्र); अभंग-ओव्या १११; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. २४३–२४६. २. गजेंद्रमोक्ष; श्लो. सं. ९५; अकलकामा., भा. १; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९५; पृ. १७–२६. ३. सुदामचरित्र; श्लो. सं. १०३; र. का. : श. १७२१, सिद्धार्थी, वैशाख शु. १; अकलकामा., भा. ३; संपा. केळकर, ना. चिं.; मुंबई, १९०२, पृ. ७–२०. **अमु.** – आरत्या, पदे इत्यादी; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : कचेश्वर; मकच., खं. ३; मुंबई, १९१४; पृ. १३७–१५८. २. पटवर्धन, पां. न. : कचेश्वर – आत्मचरित्र; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. २४१–२४६. ३. पटवर्धन, पां. न. : कचेश्वराच्या तुकारामावर आरत्या; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. २५५–२५६. ४. बेंद्रे, वा. सी. : कचेश्वर; तुकाराम महाराज यांचे संतसांगाती; मुंबई, १९५८; पृ. १८४–१९३. ५. राजवाडे, वि. का. : कचेश्वर; श्रीसरस्वतीमंदिर द्वैमा., व. ८, अं. २. ६. राजवाडे, वि. का. : चाकण ब्रह्मे (कचेश्वर); मइसा., खं. १५, पृ. ४६२–४८८.

**कडु / ० कडुबावा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – नामदेव चरित्र; त्रु. पो.; ओ. सं. ८ ते ६४; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० कडुबावा** – पहा **कडु.**

**कनवाळु** [का. अनु.] शाहीर.

**रचना : अमु.** – विषयपर लावणी; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० कपाटे दिवाकर** – पहा **दिवाकर कपाटे.**

**कमलाकर / ० नित्यानंदस्वामी / ० मुकुंदसुत** [श. १७१३, पौष शु. ५ / इ. स. १७९१ – समा. श. १७७३, ज्येष्ठ. शु. ७ / इ. स. १८५१] संतकवी. ह्यांचे नाव गोविंद श्रीनिवास देशपांडे. हे मराठवाड्यातील नांदेडचे राहणारे. मूळचे गरीब घराण्यातील, पण दैववशात सरदेशपांड्यांच्या कुलात ह्यांना दत्तक घेण्यात आले. मुकुंदराव आणि मथुराबाई ही ह्यांच्या दत्तक मातापित्यांची नावे. उपास्य दैवत रामचंद्र. वसमतकर शुकानंदांनी (समा. श. १७४९ / इ. स. १८२७) ह्यांना स्वप्नात येऊन अनुग्रह दिला. वृद्धापकाळी संन्यास घेताना 'नित्यानंदस्वामी' असे नाव ह्यांनी धारण केले.

हे, कमलाकर किंवा मुकुंदसुत ह्या नावाने रचना करीत. ह्यांना फारसी भाषा चांगली अवगत होती. उर्दूतही ह्यांची काही रचना सापडते. स्वतःच्या वंशावर ओवी छंदात ह्यांनी *बखर* लिहिली आहे. मात्र हा ग्रंथ उपलब्ध नाही. ह्यांची थोडीफार उपलब्ध झालेली स्फुट कविता पदे, आरती, भूपाळी, धावे अशा स्वरूपाची असून ज. र. आजगांवकर ह्यांनी ती छापली आहे (मकच., खं. ६, पृ. २५१–२६०). ह्या भक्तिकरुणापर रचनेत भक्ताच्या अंतःकरणाची आर्तता व तळमळ आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : मुकुंदसुत; मकच., खं. ६; ठाणे, १९२४; पृ. २४६–२६०.

**कमळदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**कमळाइसा** [अंदाजे इ. स. चे १३ वे शतक, पूर्वार्ध] महानुभाव कवयित्री. महात्मा चक्रधराची पूर्वाश्रमीची भडोच येथील प्रथम पत्नी. हिची *कमळाइसाचा धावा* ही रचना लोकगीतसदृश आहे. ह्यात विरहव्यथेने व्याकुळ झालेल्या 'कमळाइसेचा धावा'च केवळ नसून महानुभाव संप्रदायाचे प्रवर्तक श्रीचक्रधरस्वामी ह्यांच्या पूर्वायुष्यातील अनेक महत्त्वपूर्ण प्रसंग त्यात वर्णिले आहेत. यादवकालीन भाषेचे मूळरूप बऱ्याच अंशी ह्या रचनेत कायम राहिले आहे ह्याची साक्ष 'पडीभरु', 'निरंतरु', 'पहुड', 'नेदी', 'उछाव' असे अनेक शब्द देतात.

**रचना : मु.** – कमळाइसाचा धावा; ओ. सं. १२६; संपा. आणि प्रास्ताविक लेखक : पठाण, यू. म.; मसंप., जाने. १९७१; पृ. ४९–६१.

**० कमळाकर अयाचित कोठी** – पहा **मुनिव्यास.**

**कमळाकरमुनी (कारंजेकर)** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक, पूर्वार्ध] महानुभाव कवी. कवीश्वर आम्नायातील मुनिव्यास नांदेडकरांचे शिष्य. परंपरा : नागदेवाचार्य > कवीश्वरबास > नागांबा > मुनिव्यास > कमळाकरमुनी. *वृद्धाचारा*वरून हे कमळाकरमुनी बेदरच्या बादशहाचे मोठे अधिकारी होते असे दिसते. ह्यांचे गुरू मुनिव्यास ह्यांचा आश्रम नांदेडला होता. नांदेडला गंगातटाकी मुनिव्यास आपल्या शिष्यपरिवारास धर्माचे निरूपण करीत असता कमळाकरांची त्यांच्याशी गाठ पडली. कमळाकरांच्या काही शंकांचे मुनिव्यासांनी निरसन केले तेव्हा तेथेच ह्यांना उपरती झाली आणि मुनीबासांजवळ दीक्षा घेऊन ह्यांनी महानुभाव पंथात प्रवेश केला. लवकरच हे ब्रह्मविद्याशास्त्रपारंगत झाले. विरक्त वृत्तीमुळे मार्गात ह्यांची श्रेष्ठता वाढली. अटन-विजन करून ह्यांनी अनेक शिष्य जोडले व अनेकांना बोध केला.

कवीश्वर आम्नायाच्या गादीवर मुनिव्यासांनंतर (नांदेडकर) मुनी कमळाकर ह्यांची स्थापना झाली. ह्यांच्या शिष्यांची संख्या सुमारे १५० होती. त्यांतील १३ प्रमुख शिष्य होते. मुनिव्यासांनी कमळाकरमुनींस कारंजा येथे राहण्याची परवानगी दिली होती. तेव्हापासून

कमळाकरमुनी कारंजेकर असे ह्यांचे नाव पडले. येथूनच पुढे कवीश्वर आम्नायातील ही कारंजेकर पिढी सुरू झाली.

कमळाकरांची आरत्या, पदे वगैरे बरीच रचना असल्याचा निर्देश आढळतो (मसा., आ. ५, पृ. १५६ टीप). त्यापैकी कोणताच भाग अद्यापि मुद्रित झालेला नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** डॉ. कोलते, वि. वि.; ज्ञानप्रबोध, प्रस्ता.; नागपूर, १९७३; पृ. १३–१५.

**करपुतला रत्नाकर** [का. अनु.] ग्रंथकार. *स्त्रीपुरुषांचें सारासार लक्षण* (ओ. सं. ३४२) हा कामशास्त्रविषयक ग्रंथ ह्यांनी लिहिला आहे. तो तंजावर येथील हस्तलिखितसंग्रहात उपलब्ध (तंसम. यादी, क्र. २, बा. १९२५/२६) आहे.

**करमळदेव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १६.

**करीम** [का. अनु.] पदकार. रिवायतींची मराठीत रचना करणाऱ्या मुसलमान कवींपैकी एक म्हणून ह्यांचा निर्देश रा. चि. ढेरे ह्यांनी केला आहे (मुमसंक., पृ. १७८).

**० कॅरे, डॉ. विल्यम** – पहा **(डॉ.) विल्यम कॅरे.**

**कर्ममेळा / ० कर्मामेळा** [इ. स. चे चौदावे शतक] संतकवी. जातीने महार. मंगळवेढ्यास राहणाऱ्या संत चोखामेळ्यांचे पुत्र. आईचे नाव सोयराबाई. नामदेव > चोखोबा > कर्ममेळा अशी ह्यांची गुरुपरंपरा आहे.

आपण हीन जातीत जन्माला आलो ही दुःख देणारी जाणीव ह्यांच्या बऱ्याच अभंगांत दिसून येते. एका अभंगात कवी म्हणतो : "आमुची केली हीन याती । तुज कां न कळे श्रीपती ॥ जन्म गेला उष्टें खातां । लाज न ये तुमच्या चित्ता ॥" विठ्ठलाशी कवीचा लडिवाळ संवाद चालला आहे. ह्या सुखसंवादातून आविष्कृत होणारी भक्ताच्या अंतःकरणाची आर्तता व पारलौकिकाची लागलेली ओढ हे संतांच्या कवितेचे विशेष ह्यांच्याही रचनेत आढळतात.

**रचना : मु.** – अभंग : २७; श्रीससंगा.; संपा. जोशी, का. अ.; द्वि. आ.; पुणे, १९६७; पृ. १५५–१५७.

**कर्माबाई** [का. अनु.] कवयित्री. महिपतीकृत *भक्तविजयात* (अ. ३४) ह्यांचा उल्लेख आला आहे. ह्या जगन्नाथच्या राहणाऱ्या. ह्यांची पदरचना व अभंग उपलब्ध आहेत (संककासू., पृ. १६).

**० कर्मामेळा** – पहा **कर्ममेळा.**

**कल्याण / ० अंबाजी / ० कल्याणस्वामी** [अंदाजे श. १५४० / इ. स. १६१८ – समा. श. १६३६, अधिक आषाढ शु. १३ / इ. स. १७१४] रामदासी कवी. समर्थांचे पट्टशिष्य. कल्याणांचे मूळ नाव अंबाजी होते. गोदातीरावरील बाभुळगावच्या कृष्णाजीपंत कुळकर्ण्यांचे हे पुत्र. आईचे नाव रखुमाबाई. घराणे कौशिकगोत्री, देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणाचे. असे सांगतात की, हे लहान असतानाच कोल्हापूर मुक्कामी समर्थ रामदासांनी ह्यांना पाहिले. अंबाजीची टापटीप, कर्तव्यतत्परता व सुंदर हस्ताक्षर पाहून समर्थांनी ह्यांना आपल्याजवळ ठेवून घेतले. पुढे त्यांनी ह्यांना संप्रदायाची दीक्षा दिली (श. १५६७ / इ. स. १६४५ चा सुमार) व ह्यांचे कल्याण असे नाव ठेवले. श. १६०० च्या सुमारास समर्थांच्या आज्ञेने हे डोमगावी (ता. परांडा, जि. उस्मानाबाद) राहण्यास गेले. तेथे ह्यांचा मठ आजही पाहण्यास सापडतो.

कल्याणांची प्रतिष्ठा त्यांच्या एकनिष्ठ गुरुभक्तीमुळे वाढली आहे. समर्थांच्या ग्रंथांचे हे लेखन करीत असत. कल्याणांचे गुरुबंधू अनंत कवी लिहितात : 'स्वामींचा कवितासमुद्र अवघा कल्याण लिहितसे ।' आपली सारी हयात ह्यांनी गुरुसेवेत आणि पंथाच्या प्रसारकार्यात घालविली. कल्याणांचे देहावसान परांड्यास झाले पण त्यांची समाधी डोमगावी आहे. कल्याणांची शिष्यपरंपरा खूप मोठी आहे. सामराज, हरि, शाम, दिगंबर, नरहरि, जगन्नाथ, केशव व पट्टशिष्य मुद्गल असे त्यांचे अनेक शिष्य होते. ह्या शिष्यांचीही काही कविता उपलब्ध झाली आहे.

कल्याणांची आजपर्यंत उपलब्ध झालेली सर्व कविता ग. शं. देव ह्यांनी *श्रीसमर्थशिष्य कल्याण* (धुळे, १९४५) ह्या पुस्तकात छापून प्रसिद्ध केली आहे. ह्यांचे *महावाक्य पंचीकरण* (ग्रं. सं. ७७१) हे अध्यात्मतत्त्वज्ञान विशद करणारे अभंगबद्ध प्रकरण असून त्याखेरीज *सोलीवसुख* (५०), *श्रीशुकाख्यान* (१८), *ध्रुवाख्यान* (१४), *संतमाळा* (१०), *श्रीरामदास* (८), *रुक्मिणी-स्वयंवर* (हिंदी) (३४), अशी आणखी सहा प्रकरणे ह्यांनी रचली आहेत. श्लोक ५, आरत्या ८, पदे ९७, भूपाळ्या ३, चौचरणी ओव्या ८२, अशा अवांतर रचनेतून समर्थ, मारुती व इतर देवतांचे स्तवन, नाममहिमा, गुरुकृपा इत्यादी विषय येतात. ह्यांच्या जीवित-कार्याचा आनुषंगिक भाग म्हणून ही रचना झाली आहे. वाङ्मय-दृष्ट्या ती फारशी महत्त्वाची नाही. समर्थ आणि त्यांचे धर्मजागृतीचे कार्य ह्या एका गोष्टीव्यतिरिक्त दुसऱ्या कशाचाच कल्याणांनी विचार केला नाही. समर्थसंघटनेत समर्थांच्या खालोखाल कल्याणांचे स्थान व अधिकार मोठा होता तो त्याचमुळे.

**रचना : मु.** – श्रीकल्याण कवन : संपा. देव, ग. शं. : श्रीसमर्थशिष्य कल्याण; धुळे, १९४५; पृ. ९–१२३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** डोळे, धेनुदास : कल्याणचरित्र, भा. १; पुणे, १९३९. २. देव, ग. शं. : श्रीसमर्थशिष्य कल्याण; धुळे, १९४५; पृ. १२७–२५६ व परिशिष्ट पृ. १–३२. ३. सहस्रबुद्धे, रा. शि. : समर्थांचे शिष्यवर श्रीकल्याणस्वामी यांचे चरित्र, पुणे, १९६४.

**कल्याणशिष्य** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० कल्याणस्वामी** – पहा **कल्याण.**

**कल्याणस्वामीदासी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे व बनशंकरीची आरती; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**कवि–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – वाल्मिकचरित्र; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० कवि–२** – पहा **रामदास.**

**कवि किंकर / ० कविदास किंकर** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] कवी. ह्यांनी रचलेली अनेकवृत्तात्मक श्लोकबद्ध चार आख्याने *काव्येतिहाससंग्रहा*तून मुद्रित झाली आहेत. रचना प्रौढ आणि विद्वज्जड स्वरूपाची आहे. प्रत्येक आख्यानाच्या शेवटी रचना-शकाचा काटेकोर निर्देश कवी करतो.

**रचना : मु.** – १. गरुडगर्वविमोचन; ओ. सं. ६८; र. श. १६६०. २. द्रौपदीवस्त्रहरण; ओ. सं. ९२; र. श. १६३७. ३. शुकरंभासंवाद; ओ. सं. ५०; र. श. १६३६. ४. सुदामचरित्र; ओ. सं. १०७; र. श. १६३९; संपा. मोडक, ज. बा. : अनेककविकृत कविता, भा. २; पुणे, १८८६; पृ. ४८–६६ व ८०–८७.

**कवि कृष्ण** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – व्यंकटगिरीस्वामींवर पद; सवामं. हस्त. सू., खं. २.

**कवि कोकिळ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रामनाममहिमा; सवामं. हस्त. सू., खं. २.

**कवि गोविंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० कवि डिंभ** – पहा **डिंभमुनि कृष्णदास.**

**० कविदास** – पहा **मुकुंदराज–२.**

**० कविदास किंकर** – पहा **कवि किंकर.**

**० कवि दुपट्टी** – पहा **रंगनाथ–२.**

**कविनंदन / ० कविश्वरसुत / ० वैद्याचा सुत** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, पूर्वार्ध] कवी. *उषाहरन-कथा* ह्या आख्यान-काव्याचा कर्ता. प्रस्तुत काव्यात 'कविनंदन', 'कविश्वरसुत', 'वैद्याचा सुत' असे कविनाम-निर्देश अनेक ठिकाणी आले आहेत. ही तीनही ह्या कवींची टोपणनावे असून ह्यांचे खरे नाव व कुलवृत्तान्त अज्ञातच आहे.

*उषाहरन-कथा* (९.९७३) हे काव्य नागपूर विद्यापीठाच्या हस्तलिखित संग्रहातील एका प्रतीवरून वि. बा. प्रभुदेसाई ह्यांनी संपादित केले आहे (मुंबई, १९६५). काव्याची रचना वा ते नकलून घेतल्याचा कालनिर्देश काव्यात कोठेही आढळत नाही; पण चोंभा कवीचे (काळ अंदाजे श. १३०० ते १४०० च्या दरम्यान) *उखाहरण* काव्य व ही *उषाहरन-कथा* ह्यांत भाषा आणि वर्णन ह्यांची साम्यस्थळे बरीच आढळतात. काही स्थळी नरेंद्र कवीचा प्रभावही जाणवतो. ह्यावरून हा कवी नरेंद्र वा चोंभा ह्यांच्या नंतरच्या काळातला असावा असे मत वि. बा. प्रभुदेसाई ह्यांनी व्यक्त केले आहे (प्रस्ता., पृ. ७). कविनंदनाच्या *उषाहरन-कथे*चा रचनाकाळ ठरविताना देवीसिंग चौहान ह्यांनी ह्या काव्याच्या भाषेचा पुरावा हेच गमक मानले आहे. ते लक्षात घेता कविनंदन हा कवी महानुभावीय व एकनाथी भाषेच्या संधिकालातील कवी असून त्याची भाषा एकनाथांपेक्षा चोंभा कवीलाच अधिक जवळची वाटते. "कविनंदनाची ही *उषाहरण-कथा* श. १४५० (इ. स. १५२८) च्या आगेमागे लिहिली गेली असावी" असे मत चौहान ह्यांनी ह्या संदर्भात व्यक्त केले आहे (*उखाहरणा*चा काळ, मसंप., एप्रि. १९६७, पृ. १७७ व १७९).

ह्या काव्यात *भागवता*तील उषाहरणाची कथा जशीच्या तशी न घेता कवीने तपशिलात फरक केलेला आहे. अनिरुद्धाच्या बोटातील पंचगरुडाच्या अंगठीमुळे बाणासुराच्या शस्त्रास्त्रांचा त्याच्यावर काहीच परिणाम न होणे, नारदाने रहस्यस्फोट केल्यावर अंगठी आणण्यासाठी उषेची अनिरुद्धाकडे पाठवणी, अर्जुनश्रेष्ठत्व, त्याने महेशाशी लढून त्याला हरविणे, उग्रसेनाने बाणासुराच्या पक्षातील देवांबरोबर युद्ध करणे, असे कितीतरी *भागवतात* नसलेले प्रसंग ह्या काव्यात कविनंदनाने वर्णन केले आहेत. हे काव्य शृंगार आणि वीर ह्या रसांचा परिपोष करणारे आहे. बाणासुराचा गर्व, शिवाकडून वरप्राप्ती झाल्यानंतरचे त्याचे स्वस्त्रीशी झालेले संभाषण, चित्ररेखेने देशोदेशींच्या राजांचे चित्रमाध्यमातून घडविलेले दर्शन, इत्यादी अनेक प्रसंग रचनाकौशल्याच्या दृष्टीने उल्लेखनीय म्हणून निर्देशित करता येतील. कळलाव्या नारदाचे शब्दचित्रही वैशिष्ट्यपूर्ण आहे. युद्धाची वर्णने उठावदार झाली आहेत.

काव्यात कवीने कृष्णभक्तीचा महिमा गायिला आहे. 'इतर देवतांचा क्षुद्रपणा वारंवार दाखवून श्रीकृष्णाचे श्रेष्ठत्व ठिकठिकाणी प्रतिपादन करणारा हा कवि महानुभाव असावा असा तर्क करायला खूपच जागा आहे' असे प्रा. प्रभुदेसाई ह्यांना वाटते (प्रस्ता., पृ. ६). ह्या ग्रंथाच्या भाषेवर वऱ्हाडातील बोलीभाषेचा झालेला परिणाम स्पष्टपणे दृग्गोचर होतो असेही ते म्हणतात (प्रस्ता., पृ. १२).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा. (संपा.) : उषाहरन-कथा, प्रस्ता. व टीपा; मुंबई, १९६५; मसंम. प्रका.

**कवि बापू** [का. अनु.] शाहीर.

**रचना : अमु.** – वेदान्तपर लावण्यांची रचना; सवामं. हस्त. सू., खं. २.

**कवि माणकेश्वर** [का. अनु.] स्तोत्रकार.

**रचना : अमु.** – मारुतिस्तोत्र; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० कवि मालो** – पहा **मालोबास.**

**कवि यशवंत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कविराजोबा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – शरभेंद्रस्तुतिपर श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० कविराम** – पहा **रामकवि–२.**

**० कविराय** – पहा **रामजोशी.**

**कवि वरदात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – सवामं. हस्त. सू., खं. २.

**कवि वासुदेव** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अयोध्याकांडकथाभाग (श्लोक); तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० कविश्वरसुत** – पहा **कविनंदन.**

**कवींद्र** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] महानुभाव कवी. आनेराज व्यासांचे हे शिष्य.

**रचना : अमु.** – गोपीविरहपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कवींद्रसेवक** [अंदाजे इ. स. १८१० च्या पूर्वी] जैन कवी. ह्यांच्या नावावर काही अभंग आढळतात. प्रत्येक अभंगाच्या शेवटी 'कवींद्रसेवक म्हणे' असा उल्लेख येतो. चिमनापंडितांचे अपूर्ण राहिलेले *उनावळी*चे २६४ अभंग पूर्ण केल्याचा महत्त्वाचा निर्देश हिंगोली येथील कवींद्रसेवकांच्या अभंगांच्या हस्तलिखित पोथीत सापडतो. मात्र त्यात चिमनापंडितांचे अभंग उपलब्ध झाले नाहीत. कवींद्रसेवकांचे ५४५ अभंग उपलब्ध आहेत (हिंगोली जैन हस्त. संग्रह, क्र. ८). *महतीसागरा*चे व *कवींद्रसेवकाचे अभंग* असे एक पुस्तक १९२२ साली हिं. ने. दोशी ह्यांनी प्रकाशित केले होते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : कवींद्रसेवक; ग्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ५८, १११, २५०.

**कवीश्वर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० कवीश्वरबास** – पहा **भास्करभट्ट बोरीकर.**

**कस्मळदेव** [का. अनु.] पदकार. ह्यांनी पदरचना केल्याचा निर्देश आढळतो (संककासू., पृ. १६).

**० कळपूरकर विठ्ठल** – पहा **विठ्ठल कळपूरकर.**

**काकंभट्ट** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रामार्या (स्तवपदार्थदीपिका); भाइसंमं. हस्त. सू., पृ. २४१.

**काकात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**काजी महमद** [का. अनु.] कवी. ह्यांनी पदरचना केल्याचा निर्देश आढळतो (संककासू., पृ. १६).

**० कानउदय (पंडित)** – पहा **कानडदेव पंडित.**

**कानडदेव पंडित / ० कानउदय (पंडित)** [इ. स. चे १५ वे शतक] महानुभाव भाष्यकार.

**रचना : अमु.** – एकादश प्रकरण सूत्रभाष्य (आचार-विचार-लक्षण त्रयीवर); गद्य; ममग्रंककासू., पृ. ३.

**० कानडिया विठ्ठल** – पहा **विठू कानडचा.**

**० कानफाडे, वैजनाथ शिवराम** – पहा **वैजनाथ शिवराम कानफाडे.**

**० कानोबा** – पहा **कान्होबा.**

**कान्हया–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सीतास्वयंवर ओव्या; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० कान्हया–२** – पहा **हरिदास कान्हा.**

**कान्हा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**कान्हा / न्हो त्रिमलदास / ० त्रिमलदास कान्हा / ० कान्हो पाठक–२** [अंदाजे इ. स. चे १५ वे शतक, पूर्वार्ध] कवी. कान्हा त्रिमलदास आपले आजेगुरू म्हणून वडवाळसिद्ध नागनाथांचा उल्लेख करतात. *पाताळकांड रामायणा*त सापडणारी कान्हा त्रिमलदासांची परंपरा अशी : नागनाथ >

पिला पाठक > त्रिमलु > कान्हो. परंपरेवरून 'पिला पाठकाचे प्रशिष्य अथवा शिष्य कान्हो होते ह्यात संशय नाही. कदाचित ते पाठकांचे वंशज असतील, म्हणजे ते स्वतः पाठककुलोत्पन्नहि असतील' असे गो. का. चांदोरकरांना वाटते (भाइसमंइति., श. १८३६, पृ. ९१). ज्ञानेश्वर-समकालीन कान्हो पाठक हे त्रिमलदास कान्हांहून वेगळे, असे वि. ल. भावे मानतात. वडवाळसिद्ध नागेशांवरून (काल अंदाजे श. १२९० ते १३४०) कवीचा काळ शा. श. १४ व्या शतकाचा उत्तरार्ध मानला जातो.

कान्हो त्रिमलदासांच्या *पाताळकांड रामायणा*ची पोथी (पूर्वीच्या) खानदेशात उपलब्ध झाली. ही नक्कल प्रत असून तिचा काल 'श. १६२६, तारण संवत्सर, समाप्ती आषाढ शु. १५ (इ. स. १७०४)' असा दिला आहे. हे काव्य ओवीबद्ध असून ग्रं. सं. ९७१ आहे. ह्यात रामाने बिभीषणास लंकेचे राज्य दिल्याची रामकथेतील हकीकत आली आहे. कथेचा मूलाधार कवी स्पष्ट करीत नाही. हा जंगम (वीरशैव) असावा असे ग्रंथातील उल्लेखांवरून वाटते. ह्या रामकथेची छाया पुढे श. १७०० / इ. स. १७७८ च्या सुमारास रचल्या गेलेल्या विठ्ठलकिंकराच्या *पाताळकांडा*वर पडली आहे.

ह्या कवीने *पुंडलीकचरित्र* (ओ. २२२) ह्या आख्यानाचीही रचना केली आहे. तंजावर प्रतीच्या आधारे प्रा. माणिक धनपलवार ह्यांनी ह्या काव्याचे संपादन केले आहे. ह्या ग्रंथात आपली परंपरा देताना स्वतःच्या नावाचा उल्लेख ह्यांनी एकलिंग असा केला आहे : "आतां नमू दिगांबरु। वडवालसिध अवतारु। एकलिंगाचा दातारु। सिधरूपें ॥१८॥" म्हणजेच वडवाळसिद्ध नागेश > दिगंबर > एकलिंग अशी परंपरा ठरते.

ह्या आख्यानातील पुंडलीककथा ही इतर आख्यानांतून आलेल्या कथांपेक्षा वेगळी आहे. हिरण्याक्ष नावाचा अकरा विष्णूंपैकी एक विष्णू चंद्रसेन दैत्याचा वध करण्यासाठी मृत्युलोकात येतो. त्याला मुक्ती हवी असते. पण पितृभक्तीशिवाय मुक्ती नाही असे नारद त्याला सांगतात. तेव्हा तो पुत्रासाठी तप करणाऱ्या कुंडलीक व गंगा ह्या दांपत्याच्या पोटी जन्म घेतो व तोच पुढे भक्त पुंडलीक म्हणून प्रसिद्धीस येतो. *पद्मपुराण*, *स्कंदपुराण* ह्यांचा आधार काव्यास असल्याचे कवी सांगतो. (शिवविष्णु-संघर्षाचे चित्रण प्रथमच ह्या काव्यात पाहण्यास सापडते.) शैव परंपरेतील एका कवीने विठ्ठलभक्तीचे माहात्म्य ह्या काव्याद्वारे ठसविले आहे; म्हणून हे काव्य इतर सांप्रदायिक पुंडलीक-आख्यानांहून वेगळे ठरते. धनपलवार-संपादित ह्या चरित्रावर अभिप्राय देताना डॉ. आय. एम. पी. रिसाइड (लंडन) ह्यांनी म्हटले आहे की, प्रस्तुत *पुंडलीकचरित्रा*त नेहमीप्रमाणेच काळाचा निर्देश केलेला नाही. त्यातील कथेचा काही भाग व अर्वाचीन भाषा ह्यांवरून हे आख्यान हा अगदी अलिकडचा प्रयत्न दिसतो (*पुंडलीकचरित्र* : एक टिपण; मस्वासंप., अं. ८, १९७३, पृ. १२).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : कान्हो त्रिमलदास; भाइसमंइति., श. १८३६; पृ. ८९–९३. २. धनपलवार, माणिक : संपा.; पुंडलीकचरित्र, प्रस्ता. व काव्य; हैद्राबाद, १९७२.

**० कान्हुपात्रा** – पहा **कान्होपात्रा.**

**कान्हैया हरिदास** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – पंढरपूरक्षेत्रवर्णनपर आरती; मआ., पृ. ३१४.

**कान्हो** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर. सगनभाऊच्या बैठकीत बसणाऱ्यांपैकी एक (मआ., आ. ५, पृ. ५८३).

**कान्हो पाठक-१** [अंदाजे श. १२१२ / इ. स. १८९०] ज्ञानेश्वरसमकालीन कवी. केंदूर पाबळचे (ता. शिरूर, जि. पुणे) रहिवासी. त्या गावचे जोशीपण ह्यांच्या कुटुंबाकडे होते. वडवाळसिद्ध नागनाथ आपले गुरू असे ह्यांनी म्हटले आहे. *चंद्रहासकथा* लिहिणाऱ्या नामा पाठकाचे हे आजे. कान्हो पाठक > हरि पाठक > नामा पाठक अशी ह्यांची परंपरा आढळते. कान्हो पाठकांचे काही अभंग (सं. ६; मु. : श्रीससंगा., खं. १, द्वि. आ., पुणे, १९६७, पृ. १७३) व *गीतासार* नावाचे एक लहानसे प्रकरण उपलब्ध आहे (मसा., आ. ५, पृ. १८७).

**कान्हो पाठक-२** – पहा **कान्हा त्रिमलदास.**

**कान्होपात्रा / ० कान्हुपात्रा** [अंदाजे श. १३९० / इ. स. १४६८] संतकवयित्री. मंगळवेढे (जि. सोलापूर) ह्या गावी राहणाऱ्या शामा नायकिणीची मुलगी. ही मोठी भगवद्भक्त होती. विठ्ठलाच्या ध्यासाने एके दिवशी भजन करीत जाणाऱ्या लोकांबरोबर ही पंढरपुरास गेली. तेथे बेदरच्या पातशहाचे धरणे येताच आपला देह हिने विठ्ठलचरणी अर्पण केला. विठ्ठलमंदिरात दक्षिणद्वारी हिची समाधी आहे.

कान्होपात्रारचित अभंगांपैकी एकूण २३ अभंग *सकलसंतगाथे*त छापलेले आहेत. त्यात तिच्या करुणरम्य जीवनाचे प्रतिबिंब उमटले आहे. ती म्हणते : "दीन पतित अन्यायी। शरण आल्यें विठाबाई॥ मी तो आहे यातीहीन। न कळे कांहीं आचरण॥" (श्रीससंगा., पृ. ८९.१०). ह्या पतित जीवाचा उद्धार करण्यास विठ्ठलचरणांचा आसरा हे एकच निधान असा हिचा दृढ विश्वास आहे. आपण उद्धरून जावे ह्या एकाच निदिध्यासातून हिचे विठ्ठलचरणी आत्मसमर्पण साकार झालेले आहे. 'उभा असे विटेवरी। वाटी प्रेमाची सीदोरी॥' किंवा 'ऐशी नाम माळा। कान्होपात्रा त्याली गळा॥' अशा समर्पक शब्दांत हिचे अभंग हिच्या अंतःकरणाचे खरे स्वरूप उघड करून दाखवितात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : कान्होपात्रा; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. २३२–३७. २. ग्रामोपाध्ये, गं. ब.; संकास., पुणे, १९३९; पृ. १७७–२००.

**कान्होबा / ० कानोबा / ० तुकयाबंधु** [इ. स. चे १७ वे शतक] कवी. तुकाराममहाराजांचे धाकटे बंधू. बुवांच्या कीर्तनात हे ध्रुपद धरीत. ह्यांनी तुकयाबंधु ह्या नावाने आपली अभंगरचना केली आहे. ह्यांनी काही नाटाचे अभंग रचले आहेत. तुकोबांच्या निर्याणामुळे झालेल्या वियोगदुःखाने विठोबाशी केलेले कठोर भाषण, ह्या विषयावर कान्होबांचे ४२–४३ अभंग आहेत. 'भक्ति, मुक्ति तुझें जळो ब्रह्मज्ञान। दे माझ्या आणोन भावा वेगीं" असे उद्गार त्या दुःखावेगात ह्यांनी काढले असले तरी एरव्ही 'न गमे न गमे न गमे हरिविण। नाठवे भूक तान विकळ जाले मन' असे लडिवाळपणे पांडुरंगाशी हे हितगुज करताना दिसतात (मु. : श्रीससंगा., खं. २; पृ. ४०२–४०८). ह्यांची काही हिंदी रचनाही आढळते. ह्यांच्या तीन आरत्या व दोन पदे (पैकी एक हिंदी) मुद्रित (मआ.; पृ. २४३, ३८५, ४३४; कासं. क्र. ४६, पृ. १००).

**कामराज** [इ. स. च्या १६ व्या शतकाचा आरंभ] जैन कवी. ब्रह्मशांतिदासाचे शिष्य. *यशोधरचरित्र*कर्त्या मेघराजांचे गुरुबंधू. गुजरातेतील ईडर पीठाच्या परंपरेतील. मूलसंघाचा व दिगंबर आम्नायाचा हे मोठ्या अभिमानाने उल्लेख करतात. मूळचे गुजराती. पण विदर्भातील मराठीभाषिक जैनांसाठी ह्यांनी मराठीतून रचना केली. ह्यांचे *सुदर्शनचरित्र* हे आख्यानकाव्य प्रसिद्ध आहे. ब्रह्मजिनदासाच्या *सुदर्शनरासा*च्या आधारे ह्यांनी प्रस्तुत ग्रंथाची रचना केली. ग्रंथाचे १४ अधिकार व ९९७ ओव्या असून त्यात जैन आचारधर्म व तत्त्वज्ञान सांगितले आहे. ह्यांची *चैतन्यफाग* (१४ कडवी) व *धर्मफाग* (१३ कडवी) अशी दोन स्फुट काव्ये *मराठी संशोधन पत्रिके*त मुद्रित झाली आहेत (ना. ग. जोशी, मसंप., एप्रि. १९६६, पृ. ३३–३६). राजस्थानी गुजरातीत ह्यांनी बरीच रचना केली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : कामराज; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ३५–३८.

**कारंजकर कवी** [का. अनु.] महानुभाव कवी. ह्यांची *पूजावस्वर* ही रचना उपलब्ध आहे. चक्रधरांच्या मूर्तीचे वर्णन व भक्तांकडून त्याचा चालणारा पूजाविधी ह्यांचे वर्णन प्रस्तुत काव्यात आहे.

**रचना :** **अमु.** – पूजावस्वर; ओ. सं. १२८; संपा. पठाण, यू. म.; महानु., मार्च १९७३; पृ. १७–२७.

**काशिराज** [अंदाजे श. १४९० / इ. स. १५६८ – श. १५७० / इ. स. १६४८] कवी. हे शंकराचार्य-परंपरेतील असून गाणपत्य होते. रंगनाथ मोगरेकरांचे गुरुबंधू. ह्यांच्या निरंजन नावाच्या शिष्याने शके १५५४ / इ. स. १६३२ मध्ये *गणेशगीताटीका* रचली, त्यात तो स्वतःचा उल्लेख काशिराजसुत गणेशदास असा करतो. भगवान कवीने लिहिलेल्या निरंजनांच्या गद्यचरित्रात काशिराजस्वामींचे उल्लेख आले आहेत. त्यात ह्यांचे वास्तव्य पैठणला होते असे म्हटले आहे. ह्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : शंकराचार्य > वासुदेवानंद > परमानंद > वैकुंठानंद > कृष्णानंद > काशिराज. काशिराजांचा समय रंगनाथ मोगरेकर आणि निरंजन ह्यांच्या दरम्यान म्हणजे शके १४९०–१५७० च्या सुमारास येतो (म. रा. जोशी : काशिराज; विसंमंवा., १९७१; पृ. १३५–१३७.

**रचना :** **अमु.** – १. पवनविजय; ओ. सं. ३९८; प्र. ले. का. : १७४३. २. रंगनाथस्तव; संककासू., पृ. १२५.

**काशिराम** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – वेदान्तप्रकरण (त्रुटि.); भाइसंमं. हस्त. सू., पृ. २६९.

**काशी कवी–१** [का. अनु.] कवी. ह्यांच्या नावावर *किंचित् रामायण* ग्रंथ सापडतो. हा ग्रंथ वि. ल. भावे ह्यांच्या संग्रहात असल्याची नोंद सूचीकार गो. का. चांदोरकर करतात (संककासू., पृ. १८).

**काशी कवी–२** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. मोरोपंतांचा समकालीन. "ह्या कवीने मोरोपंतांची सबंध शब्दवटिका घेऊन तीत थोडी पदरची भर घालून आणि तिची जरा निराळी मांडणी करून आपल्या काही पद्यमणिमाला तयार केल्या आहेत." (वि. ल. भावे, मसा., आ. ५, पृ. ५३९). काशी कवींच्या शब्दांची मांडणी मृदू व मोहक दिसते. रचना साधी, अर्थसुबोध आणि रसाळ आहे. उदा., 'भीमकबाळा म्हणे नृपाळा त्या शिशुपाळा मी न वरीं' हे आणि 'हरिची भगिनी म्हणे सुभद्रा रुक्मिणिवहिनी दया करा' ही दोन कवने (मु. : *पद्संग्रह भा.* ९, मुंबई, १९०१; पृ. ५–९). ही दोनही पदे महाराष्ट्रात लोकप्रिय आहेत.

**० काशी कवी–३** – पहा **अवचितसुतकाशी.**

**० काशीदास** – पहा **अवचितसुतकाशी.**

**काशी (दासी)** [का. अनु.] कवयित्री.

**रचना :** **अमु.** – आत्माराम सद्गुरूंची आरती; सवामं. हस्त. सू., खं. १.

**काशीनाथ** [? – समा. श. १६९८, दुर्मुख संवत्सर / इ. स. १७७६] कवी. हे काशीनाथ कृष्णदयार्णवांचे नातू होत. ह्यांची समाधी पैठण येथील कृष्णदयार्णवांच्या मठात असून तिच्यावर पुण्यतिथीचा श्लोक कोरलेला आहे. ह्यांची पदरचना समर्थवाग्देवतामंदिरातील हस्तलिखित संग्रहात उपलब्ध आहे (हस्त. सू., खं. २).

**काशीनाथ अनंत पाध्ये / ० बाबा पाध्ये** [इ. स. १७९०–१८०६] कवी व भाषांतरकार. हे मोरोपंतांचे व्याही. ह्यांची रचना मुख्यतः संस्कृतात आहे. धर्मशास्त्रावरील *धर्मसिंधुसार* ह्या त्यांच्या मूळ संस्कृत ग्रंथाचे मराठी भाषांतर *धर्मसिंधु* (र. का. : श. १७९१ / इ. स. १८६९) ह्या नावाने प्रसिद्ध आहे. मोरोपंतांच्या धर्तीवर ह्यांनी एक *रुक्मिणी-पत्रिका* लिहिली आहे (मसा., आ. ५, पृ. ५२७). दोन्हीही रचना अप्रकाशित आहेत (मचको., पृ. २२९–२३०).

**काशीनाथपंत** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**काशीनाथस्वामी** [अंदाजे इ. स. १८३०] गीताटीकाकार. हे कारवार जिल्ह्यातील जीवन्मुक्त ह्या साक्षात्कारी सत्पुरुषांचे शिष्य. हे जातीने ब्राह्मण असून वेदान्तशास्त्रात निपुण होते. ह्यांनी *जीवन्मुक्ति* नावाची *भगवद्गीतेवरील* मराठी टीका लिहिली आहे. आपल्या गुरूच्या स्मरणार्थ ह्या ग्रंथाची रचना कवीने केलेली दिसते. गीतेच्या प्रत्येक श्लोकाचा भावार्थ प्रथम एका श्लोकात मराठीत सांगून नंतर तोच भावार्थ पद, अभंग किंवा दिंडी ह्या वृत्तांत विशद करून सांगितला आहे. कवीची वाणी गोड असून रचना सोपी व भक्तिपूर्ण आहे. ग्रंथकाराने *ज्ञानेश्वरीचे* बऱ्याच ठिकाणी अनुकरण केलेले दिसते.

**रचना :** **अमु.** – जीवन्मुक्ति भगवद्गीता; पद सं. १६२२; इ. स. १८८७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : काशिनाथस्वामी; मकव., खं. २; मुंबई, १९१३; पृ. १९७–२०१.

**काशी महिपती** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर. सगनभाऊ शाहीरांच्या बैठकीतील एक शाहीर (मसा., आ. ५, पृ. ५८३).

**० काशीराज–१** – पहा **अवचितसुत काशी.**

**० काशीराज–२** – पहा **विठ्ठल (काशीराज).**

**काशीराजस्वामी** [अंदाजे श. १५५० / इ. स. १६२८] कवी. भागानगरच्या केशवस्वामींचे हे गुरू, अशी वा. दा. ओक ह्यांनी *पद्संग्रहात* (भा. १) माहिती दिली आहे. ह्यांची समाधी गुलबर्ग्यास (कर्नाटक) आहे.

**रचना :** **अमु.** – १. एकादशीचरित्र, ओवीबद्ध. २. अभंग. ३. पदे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** गोडे, प. कृ.; स्टडीज इन इंडियन कल्चरल हिस्टरी; पुणे, १९६०; पृ. १६२, तळटीप.

**काशीराम–१** [का. अनु.] कवी. काशीरामकृत *शांतिरसनाटक* ग्रंथ ओवीबद्ध असून विषय वेदान्त व महावाक्यादी विवरण हे आहेत. भाषा जुनाट असून नाथकालीन दिसते. ग्रंथाची त्रुटित पोथी भारत इतिहास संशोधक मंडळात उपलब्ध (हस्त. सू., पृ. १८) (स. म. दिवेकर : *कासिरामकृत शांतिरसनाटक*; भाइसंमंइति., श. १८३७, पृ. १७७).

**काशीराम–२ / ० काशीराम** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर. सगनभाऊच्या बैठकीतील. ह्यांनी महादजी शिंद्यांवर पोवाडा रचला आहे. महादजींचे प्रत्ययकारी शब्दचित्र ह्या लहानशा पोवाड्यात काशीराम शाहीरांनी नीटसपणे रेखाटले आहे. त्यांच्या शौर्याचे 'दखण नवखंडांत बादली शूरत्वाची बीरद' असे पोवाडेकार वर्णन करतो (मु. : ऐतिपो., खं. २, पृ. १०२–१०५). ह्याखेरीज ह्यांची 'कोणी घ्या गे मुरली करिंची' अशी एक गौळण (मवाइ., खं. ३; संपा. रा. श्री. जोग; पृ. ३३६) व *अंधारातील लावण्या* संग्रहात एक शृंगारिक लावणी (पृ. २०८) मुद्रित झालेली आहे.

**० काशिरामा** – पहा **काशीराम–२.**

**काशीराव राजेश्वर गुप्ते** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार. नागपूरकर भोसल्यांच्या सरदारांपैकी विनायकराव गुप्ते ह्यांचे वंशज व बळवंतराव महिपत गुप्ते ह्यांचे पुतण्ये. *नागपूरकर भोसल्यांच्या बखरीचा* कर्ता (लेखन : शक १७४४ / इ. स. १८२२). नागपूरचे रेसिडेंट रिचर्ड जेन्किन्स ह्यांच्या आज्ञेने ह्या बखरीचे लेखन झाले. हिच्यात भोसले घराण्याच्या नागपूरकर शाखेचा इतिहास आहे. बखरीत ह्या शाखेच्या आरंभापासून ते दुसऱ्या रघोजीच्या मृत्यूपर्यंतची हकीकत दिलेली असून परसोजी ऊर्फ बाळासाहेब व मुधोजी ऊर्फ आपासाहेब ह्यांच्या कारकिर्दीचे वर्णन आहे. कैफियतीची सुरुवात मुधोजी व रुपाजी ह्या दोघा बंधूंपासून होते. आपासाहेबांचे पलायन व त्यांच्या जागी बाजीबा गुरव ह्यांची तिसरा रघोजी म्हणून स्थापना (इ. स. १८१८) ह्या घटनेपर्यंतची हकीकत या कैफियतीत आलेली आहे.

ही बखर म्हणजे प्रतीवरून तयार केलेली प्रत असा उपोद्घातात उल्लेख असून लेखकाचे चुलते बळवंत महिपत गुप्ते ह्यांनी लिहिलेला नागपूरकर भोसले घराण्याचा इतिहास बखरकारांच्या पाहण्यात असावा. अस्सल कागदपत्रांचा आधार असल्याने ही बखर विश्वसनीय ठरते.

हिचे मुद्रण इ. स. १८८५ त वा. दा. ओक ह्यांनी *काव्येतिहाससंग्रहातून* (पुस्तक क्र. १६) केले व का. ना. साने ह्यांनी *नागपूरकर भोसल्यांची बखर* असे हिचे नामकरण केले.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. काळे, या. मा. (संपा.) : नागपूरकर भोसल्यांची बखर; प्रस्ता., पृ. ६–११; उपोद्घात, पृ. १–३; नागपूर, १९३६. २. हेरवाडकर, र. वि. : मब., पुणे, १९५७; पृ. ७४–७५.

**काशी शिवराम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**काश्यपी नागोजीभट्ट** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – चांगदेवपासष्टी; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ९५.

**कासम** [का. अनु.] मुसलमान कवी. कासम ह्या रिवायतकाराचा उल्लेख रा. चिं. ढेरे ह्यांनी केला आहे (मुमसंक., पृ. १७८).

**० कासी** – पहा **कासीराज.**

**कासी(शी)राज / ० कासी / ० कासी सुंदर** [अंदाजे श. १७४२ / इ. स. १८२०] कवी. *अध्यात्मानुभव* (ओ. सं. २९७) हा ग्रंथ ह्याने रचला आहे. त्याचे स्वरूप गुरुशिष्यसंवादरूप आहे. प्रकरणाचा कर्ता म्हणून कासी, कासीसुंदर व कासीराज असे नामोल्लेख येतात. ग्रंथाचा समाप्तिकाळ 'श. १७४२, पौष कृ. १३, बुधवार, हस्तनक्षत्र' असा दिला आहे. प्रस्तुत ग्रंथाची पोथी भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रही आहे (ग. ह. खरे : कासीराजकृत अध्यात्मानुभव; भाइसंमंत्रै., व. १३, अं. १, आषाढ १८५४, पृ. १९–२१).

**० कासी सुंदर** – पहा **कासी(शी)राज.**

**काळेरावआप्पा** [का. अनु.] कोशकार. ह्यांचा *अकारादि प्राकृत भाषेचा निघंटु* (ग्रं. सं. ३,०००) हा गद्यग्रंथ तंजावर सरस्वती महाल ग्रंथालयात उपलब्ध आहे (अमु.). श्रीवराहप्पय्यांच्या जुन्या यादीच्या रोख्यावरून प्रस्तुत ग्रंथ काळेरावआप्पाकृत म्हणून कळते. प्रत्यक्ष ग्रंथात ह्यांचा नामनिर्देश नाही (तंसम. बा. १८६९, हस्त. यादी, क्र. २).

**किंकर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. रामभुजंगस्तोत्र; २. सत्यार्थचरित्र; श्लो. सं. २५; ३. सीतास्वयंवराच्या सवाया; ४. आरत्या व पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**किन्नरी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० कीर्तिवंत** – पहा **रामदास.**

**कुंडलीश / ० कोंडू** [अंदाजे इ. स. १७९१] कवी. हा सातार्‍याकडील असावा. पिता : धुंडिराज. ह्याने *आत्मबोध* व *आत्मसुख* अशा दोन अध्यात्मपर प्रकरणांची रचना केली आहे (मसा., आ. ५, पृ. ९५८).

**रचना : अमु.** – १. आत्मबोध; प्रकरणे १८; ओ. सं. ६१२; र. का. : श. १७१३, फा. शु. ७; २. आत्मसुख; प्रकरणे ५; ओ. सं. २००; र. स्थ. : सातारा.

**कुबेरात्मज सिद्धपाल** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – मल्लारिमाहात्म्य; त्रु. पो.; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २०७.

**कुशाबा / ० कुशा माळी / ० कुसाजी शाहीर** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर. ह्यांच्या बहुतेक लावण्या वेदान्तपर असून त्या भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रही आहेत. कूटात्मक रचना करावी आणि ऐकणारास हे कोडे उलगडण्यास सांगावे, अशा रचनेची ह्यांना हौस दिसते. ह्यांच्या 'कलगीतुर्‍याचे लगीन' ह्या प्रसिद्ध लावणीत तत्कालीन अनेक शाहीरांची नावे गोवलेली असल्याने ती महत्त्वाची ठरते. ह्यांचा 'खडर्याच्या लढाईचा पोवाडा' *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये संग्रहित (पृ. २४०–४५).

**० कुशा माळी** – पहा **कुशाबा.**

**० कुसाजी शाहीर** – पहा **कुशाबा.**

**कूर्मदास** [अंदाजे इ. स. १३०८] संतकवी. नामदेवसमकालीन. पैठणचे रहिवासी. हे जन्मापासून पांगळे होते. लहुळ येथे समाधी घेतली. ह्यांची अभंग, पदे इत्यादी स्फुट कविता उपलब्ध आहे. काही रचना तंजावर सरस्वती ग्रंथालय संग्रहात सापडते (मसा., आ. ५, पृ. १४८, ७४५).

**कृष्ण** [का. अनु.] आरतीकार. ह्यांची *द्वादश ज्योतिर्लिंगावरची, शंकरावरची* व *भुवनसुंदराची* अशा तीन आरत्या *मराठी आरती* संग्रहात (पृ. ३१६, ३२४ व ३८४) मुद्रित झाल्या आहेत. रचनेवरून कवी शिवभक्त असावा असे वाटते.

**कृष्ण अवधूत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदे व श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कृष्ण (उदास)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – ओव्या, पदपदांतरे; संककासू., पृ. २०.

**कृष्णकवी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. नवग्रहलीलामृत; २. श्रीत्रिंबकमाहात्म्य; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. २०.

**कृष्ण किंकर–१** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] रामदासी कवी व टीकाकार. बारामती येथील रामजीदादांचे मठात शं. श्री. देव ह्यांना *निर्वाणसार* ग्रंथाचे हस्तलिखित पाहावयास सापडले. आपल्या ह्या टीकाग्रंथात कल्याणांच्या सामराज्याचा गुरू म्हणून कवीने उल्लेख केला आहे, तो असा : "त्या श्री सामराज्यकल्याणें। कृष्णाचिया अंतरीं वास्तव्य करून। आचार्यस्वामींचे श्लोक निर्वाण। दशकी तेणें केली टीका॥" ह्यांची गुरुपरंपरा श्रीसमर्थ > कल्याण > साम्राज्य > कृष्ण किंकर अशी आहे (सवामं., बा. १७५१; रासं., खं. २). हे कृष्ण कोण, कोठले, ही माहिती उपलब्ध नाही.

*निर्वाणदशक* ह्या शंकराचार्यांच्या दहा श्लोकांच्या स्तोत्रावरील ६५२ ओव्यांची टीका, असे ह्या *निर्वाणसार* ग्रंथाचे स्वरूप आहे. ह्या ग्रंथाचे सहा अध्याय असून पहिल्या पाचांत दोन दोन श्लोकांवरील टीका व सहाव्यात कवीचे स्वमतप्रतिपादन ही आलेली आहेत. 'हे [प्रतिपादन] फारच बहारीने केलेले आहे' असे शं. श्री. देव ह्यांचे मत आहे. (शं. श्री. देव : श्रीसांप्रदायिक विविध विषय, खं. २, लेखांक १०३, पृ. १५३–१६०).

**कृष्णकिंकर–२** [का. अनु.] पदकार. गीते, पदपदांतरे व धावे अशी रचना. 'भक्तजना सांभाळि सांवळ्या' हे कृष्णकिंकरांचे प्रसिद्ध भजन व इतर तीन पदे वा. दा. ओक संपादित *पदसंग्रह, भा. २* (मुंबई, १८९६) मध्ये मुद्रित (पृ. ५८–६२).

**कृष्णकेशव** [का. अनु.] पदकार. 'ऊठि गोपालजी जाइं धेनूकडे' ही ह्याने रचलेली भूपाळी लोकप्रिय आहे. ही भूपाळी खास उत्तरेकडील पंचमात्रक आवर्तनी लयीची व झपतालात बांधलेली आहे (मवाइ., खं. ३; संपा. रा. श्री. जोग; पृ. ३०७). ह्यांची पदपदांतरे समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात उपलब्ध आहेत (हस्त. सू., खं. १, २).

**कृष्ण गोपाळ** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – रामचंद्राची आरती; मआ., पृ. ४२५.

**कृष्ण गोसावी** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. रमावल्लभदासांच्या बालमित्रांपैकी हे एक असून ह्यांची काही किरकोळ कविता उपलब्ध आहे (मसा., आ. ५, पृ. ८०१).

**० कृष्णडिंभ विराट** – पहा **डिंभमुनि कृष्णदास.**

**कृष्णतनय** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० कृष्णतनय वासुदेव** – पहा **कृष्णात्मज–१.**

**कृष्णदयार्णव** [श. १५९६, आनंद संवत्सर, वैशाख शु. ३ / इ. स. १६७४ – समा. श. १६६२, रौद्र संवत्सर, मार्गशीर्ष शु. ५ / इ. स. १७४०] कवी. सातारा जिल्ह्यातील कृष्णानदीच्या काठावरील कोपर्डे हे ह्यांचे मूळ गाव. ह्यांचे घराणे ह्या गावचे वतनदार जोशी-कुळकर्ण्यांचे होते. गोत्र गौतम व शाखा माध्यंदिन. पित्याचे नाव नारायण. मातेचे नाव बहिणाबाई. कवीचे मूळ नाव नरहरी. ह्यांच्या पारमार्थिक गुरूचे नाव श्रीगोविंद. आनंद संप्रदाय. गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : आदिनाथ > दत्तात्रेय (मातापुर) > जनार्दन (देवगिरी) > एकनाथ (पैठण) > चिदानंद (वाराणशी) > स्वानंद (चिमणगाव, सातारा) > गोविंद.

नरहरी दोन वर्षांचे असताना त्यांची आई वारली. वयाच्या पाचव्या वर्षी त्यांचे मौजीबंधन होऊन वडिलांच्या प्रत्यक्ष नजरेखाली त्यांच्या शिक्षणास प्रारंभ झाला. ह्यांचे आजोबा व वडील फार मोठ्या विद्वानांत मोडत असत. नरहरींचा विवाह त्यांच्या वयाच्या आठव्या वर्षी करून देण्यात आला. त्यानंतर चार वर्षांनी त्यांचे वडील वारले. नरहरी पोरके बनले. संसाराचा सारा भार त्यांच्या अंगावर येऊन पडला. महाराष्ट्रात त्या वेळेस शिवपुत्र संभाजीची कारकीर्द सुरू होती. मराठी राज्य बुडविण्याचा निश्चय करून औरंगजेब बादशहा महाराष्ट्रात उतरला होता. कवीने ह्या वेळेचे "शिवभूपती पावतां मुक्ति। दक्षिणे येवोनी ताम्रपती। केली विजयपुरा समाप्ती। महाविपत्ती राष्ट्रातें ॥" असे वर्णन केले आहे. ह्या विपत्तीत सापडल्यामुळे आपल्या कुटुंबासह स्वग्रामत्याग करून सुरक्षितपणासाठी भटकत असता जोगाईचे अंबे (आंबेजोगाई) ह्या गावी हे आले. तेथे श्रीगोविंद ह्या आनंदसंप्रदायी सत्पुरुषाचे ह्यांना दर्शन घडले व लवकरच श. १६१७ / इ. स. १६९५ मध्ये श्रीकृष्णजन्माष्टमीच्या सुमुहूर्तावर त्यांजकडून ह्यांस श्रीकृष्णोपासनदीक्षामंत्र मिळाला. गुरूंनी 'करूनि निरपेक्ष कोरान्न। कृष्णदयार्णवनामस्मरण। स्नानसंध्या गीतापठण। पारायण ज्ञानेश्वरी ॥' (हवदा. १. ३८) अशी आज्ञा केली. तिला अनुसरून भिक्षेकरिता हे जेव्हा फिरत तेव्हा कोणाच्या दारी गेले असता 'जय ! श्रीकृष्णदयार्णव !' अशी ललकारी देत. ह्या ललकारीवरून लोक त्यांस पुढील काळात कृष्णदयार्णव ह्या नावाने संबोधू लागले. गुरूंनी त्यांना ठेवलेले सांप्रदायिक नाव 'श्रीकृष्णदयार्णवानुचर' हे होते.

कृष्णदयार्णवांचे गुरू श्रीगोविंद ह्यांचे उपनाव दीक्षित चौधरी. हे अहमदनगर जिल्ह्यातील कोपरगाव (कर्पूरग्राम) येथील राहणारे. *महाभारताचे* प्रसिद्ध भाष्यकार नीलकंठ चतुर्धर (चौधरी) ह्यांचे हे पुत्र. हे गोविंद म्हणजे नीलकंठ चतुर्धरांचे वडील गोविंद दीक्षित चौधरी असावेत असे अनुमान रा. चिं. ढेरे ह्यांनी केले आहे (*इंद्रायणी*, व. १, अं. १, ऑक्टो. १९६२; पृ. ६३–६४). डॉ. प. कृ. गोडे ह्यांनी 'स्टडीज इन इंडियन लिटररी हिस्टरी' (व्हॉ. २) मध्ये लिहिलेल्या एका लेखात (पृ. ४७६–४८६) *महाभारताचे* भाष्यकार नीलकंठ चतुर्धर ह्यांची त्यांच्या वडिलांपासून आजतागायतची जी वंशावळ पुराव्यानिशी दाखविली आहे ती लक्षात घेता ढेरे ह्यांचे हे अनुमान चुकीचे ठरते. गोडे ह्यांनी नीलकंठ चतुर्धरांचा काळ श. १५७२ ते १६२२ असा नोंदविला आहे. त्यांचे वडील गोविंद चौधरी हे श. १५४७ पर्यंत हयात होते असे दाखविले आहे. कृष्णदयार्णव सांगतात की, श. १६४९ मध्ये प्रारंभ केलेल्या *हरिवरदा* ग्रंथाचे लेखन चालू असता श. १६५१ त सद्गुरु गोविंदांनी समाधी घेतली. नीलकंठ चतुर्धर व त्यांचे वडील गोविंद ह्यांचा गोडे ह्यांनी निश्चित केलेला काळ पाहता हेच स्पष्ट होते की नीलकंठ चौधरींचा पिता गोविंद हा कृष्णदयार्णवांचा गुरू नव्हे.

नीलकंठ चतुर्धरांना गोविंद नावाचे एक पुत्र होते आणि हेच कृष्णदयार्णवांचे गुरू होत. नीलकंठ चतुर्धरांनी पित्याचे गोविंदसूरी असे नाव त्यांच्या ग्रंथात दिले आहे. त्यांचे नातू गोविंदपुत्र शिवदीक्षित ह्यांनी श. १६६८ त पैठण मुक्कामी रचलेल्या *धर्मतत्त्वप्रकाश* ग्रंथात गोविंद > नीलकंठ > गोविंद > शिव (जन्म वाराणशी) अशी वंशावळ दिली आहे. कृष्णदयार्णवांनीही सद्गुरू गोविंदांचे पुत्र शिवदीक्षित ह्यांचा 'वेदार्थवक्ता' आणि 'मंत्रभागवतव्याख्याता' असा गौरव *हरिवरदेच्या* उत्तरार्धाच्या प्रारंभी केला आहे. गोडे ह्यांनी नीलकंठपुत्र गोविंद व गोविंदपुत्र शिव ह्यांचा जो काल दिला आहे तोच कृष्णदयार्णवांच्या काळाशी बरोबर जुळणारा आहे. त्यामुळे नीलकंठ चतुर्धरांचे पुत्र गोविंद हेच कृष्णदयार्णवांचे गुरू ह्याविषयी शंका उरत नाही.

कवी मध्वमुनीश्वर ह्यांनी आपल्या एका कवनात 'महाभारताचा अर्थ केला विशद। चौधरी गोविंद दीक्षित जी ॥' असा उल्लेख केला आहे. त्यावरून *महाभारतावर* गोविंदगुरूंनी रचना केली असावी असे दिसते. तसेच गुरुपुत्र शिवदीक्षितांनी *मंत्रभागवतावर* आख्यान केल्याचे *हरिवरदाकार* सांगतात. हे ग्रंथ सध्या उपलब्ध नाहीत अशी *वाङ्मयेतिहासकार* माहिती देतात. ह्यावर प्रा. म. रा. जोशी ह्यांनी जे मत व्यक्त केले आहे त्याप्रमाणे मध्वमुनीश्वर किंवा कृष्णदयार्णव ह्यांच्या उद्गारांवरून अशी संभवनीयता दिसते की सद्गुरू गोविंद व त्यांचे पुत्र शिवदीक्षित ह्यांचे *महाभारतावर* व *मंत्रभागवतावर* मराठी वा संस्कृत ग्रंथ नसावेत. नीलकंठ चतुर्धरांच्या *भारत भावदीप टीका* व *भागवत मंत्ररहस्यप्रकाशिका* ह्या ग्रंथांवर ते प्रवचने करीत असावेत. ह्या दृष्टीने 'महाभारताचा अर्थ केला विशद' किंवा 'मंत्रभागवतव्याख्याता' हे उल्लेख सूचक वाटतात.

अशा ह्या विद्वान व अध्यात्मविद्यानिपुण गुरूंच्या सांनिध्यात कृष्णदयार्णवांचे शास्त्राध्ययन, विशेषतः श्रीमद्भागवताचे अध्ययन, अध्यात्मचिंतन व तीर्थपर्यटन बहुत झाले. श. १६२९ / इ. स. १७०७ मध्ये तीर्थयात्रा आटोपून कृष्णदयार्णव आंबेजोगाईस परत आले. मोगलांच्या वारंवार होणाऱ्या धाडींमुळे हे स्थळ उद्ध्वस्त झालेले होते. त्याची ती अवकळा पाहून कृष्णदयार्णव बीडजवळील पिंपळनेर ह्या गावी गेले व तेथे त्यांनी बरीच वर्षे रहिवास केला. येथील काही काळ सुखात गेल्यावर, एकाएकी रक्तपितीच्या व्याधीने पछाडल्याने हे चिंताक्रांत झाले. तशा त्या स्थितीत असता एके रात्री त्यांच्या स्वप्नात श्रीएकनाथमहाराज (पैठणकर) आले आणि त्यांनी ह्यांस 'श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधाचे विवरण लिही, त्यायोगे तुला जडलेली व्याधी नष्ट होईल; तेच ह्या व्याधीवर एकमेव दिव्य औषध,' असे आश्वासनपूर्वक सांगितले. पूर्वी, गयाक्षेत्री गोविंदगुरूंसह मुक्काम असता, स्वप्नात असे विवरण करण्याबद्दल प्रभूकडून आदेश मिळाला होता, पण त्या वेळेस, तसे ते करण्याएवढी आपल्यात पात्रता नाही असे वाटत असल्यामुळे, त्याच्याकडे ह्यांनी लक्ष दिले नाही. ते स्वतः सांगतात : "पुढतीं तेंचि एकनाथीं। भेषजार्थीं अनुग्रहिलें ॥ ५० ॥ निगमकल्पतरूचें फळ। विशेष शुकमुखसुधेचा मेळ। श्रीमद्भागवत परम रसाळ। दशमीं प्रांजळ हरिलीला ॥ ५१ ॥ हें सेवितां दिव्य औषध। तोडील अशेष रोग विरुद्ध। ऐसा प्रभूचा स्वप्नानुवाद। कथिला विशद संतांसी ॥ ५२ ॥ रोगें शरीर झालें क्षीण। त्यासी औषध भगवद्गुण। श्रीमद्भागवतव्याख्यान। अमृतपूर्ण प्रभुवरें ॥ ५८ ॥" (हवदा., अ. १). स्वप्नातील ह्या आदेशानंतर कृष्णदयार्णव श. १६४९ / इ. स. १७२७ मध्ये श्रीएकनाथांच्या समाधि-वृंदावनाच्या दर्शनास गेले. त्या वेळी पैठणातील कांही संतसज्जनांस ह्या आदेशाची हकीकत सांगून त्यांचा त्यांनी विचार घेतला. गोविंदसद्गुरूंनी तर ह्यापूर्वीच – गयाक्षेत्री – ह्यासंबंधी त्यांस आज्ञा केली होती. सद्गुरू व संतसज्जन ह्यांच्याकडून असे हे प्रोत्साहन मिळाल्यावर कृष्णदयार्णवांनी पैठणजवळील मुंगी ह्या गावी मुक्काम करून ग्रंथलेखनास प्रारंभ केला. ह्या वेळेस ह्यांचे चौपन्न वर्षांचे वय होते. सहा-सात वर्षांच्या काळात बावीस हजार सातशे एकूणऐंशी ओव्या रचून श. १६५६ / इ. स. १७२७ मधील गोकुळाष्टमीच्या दिवशी दशमस्कंधाचा पूर्वार्ध "गोदावरीदक्षिणतीरीं। पिपीलिनामकक्षेत्रीं। प्रतिष्ठानापासूनि दुरी। ऐंद्राग्निमध्यग त्रिकोणीं ॥" ह्यांनी पूर्ण केला,

त्यामुळे ह्यांच्या शरीराची रक्तपितीची व्यथाही पार नष्ट झाली असे म्हणतात. ग्रंथाचे लेखन एकाच गावी झालेले नाही. ग्रंथलेखनकालात तीर्थयात्रा करीत ते हिंडत असत. त्यामुळे ते विविध स्थळी झालेले आहे. ह्या स्थळांचा निर्देश बहुतेक अध्यायांच्या शेवटी आलेला आहे. ही तीर्थयात्रा भारताच्या सर्व भागांत अगदी बद्रिकेदार-हरिद्वारपासून दक्षिणेत थेट वेंकटगिरी, तिरुपती, कांची, म्हैसूर, रामेश्वर येथपर्यंत उत्तर-दक्षिण, आणि जगन्नाथपुरीपासून द्वारकेपर्यंत पूर्व-पश्चिम, अशी झालेली आहे. हे ज्या भागात जात तेथे आपला श्रीकृष्णोपासनेचा प्रचार व प्रसार करीत असत. भजनपूजननामस्मरणपूर्वक आपल्या संप्रदायाची वृद्धी करीत असताना ह्यांनी अनेक ठिकाणी स्वतः श्रीकृष्णचरित्रावर प्रवचने व पुराणे केली, ठिकठिकाणी आपल्या संप्रदायाचे मठ स्थापन करून त्यांवर त्या त्या ठिकाणच्या अधिकारी शिष्यांची स्थापना केली व आपला संप्रदाय अखंडपणे परंपरेने चालू ठेवण्याची व्यवस्था केली. (श्रीकृष्ण-दयार्णवांनी स्थापिलेले) सोळा मठ व (त्यांचे अधिपती) शिष्य पुढील-प्रमाणे होते : १. उंबरखेड (वऱ्हाड) – उत्तमश्लोक; २. मथुरा – वैजयंत; ३. तिरुपतीचा व्यंकटगिरी – शेषाद्री; ४. अवंतिका – चक्रपाणी; ५. द्वारका – शारंगधर; ६. बद्रिकेदार – पद्मनाभ; ७. हरिद्वार – मेघ-श्याम; ८. कांची – मधुसूदन; ९. तुंगभद्रातीर – हलधर; १०. म्हैसूर – श्रीधर; ११. मुंगी – सनातन; १२. औदुंबर – कौमुद; १३. जगन्नाथ-पुरी – गोवर्धन; १४. रामेश्वर – कंबुकंठ; १५. बीड – कौस्तुभ; १६. जामखेड – श्रीवत्स (ग. अं. जोशी : उत्तमश्लोकचरित्र; पृ. १७८–१८०). ह्या तीर्थयात्रेच्या काळात त्यांच्याबरोबर त्यांचा प्रमुख शिष्य उत्तमश्लोक (माधव बाळाजी व्यापारी) असे. त्यांच्या सेवेबरोबरच, लेखकाचे कामही तोच करी.

*हरिवरदा* ग्रंथाचा पूर्वभाग लिहून पूर्ण झाला त्यावेळी कृष्णदयार्णवांच्या वयाची साठी उलटून गेली होती. उत्तरार्धाची रचना करणे कितपत शक्य होईल ह्याबद्दल त्यांना शंका वाटू लागली. काही काळ ते स्वस्थच राहिले. परंतु, गुरुपुत्र शिवदीक्षित चौधरी ह्यांच्या अत्याग्रहा-वरून व आवडता शिष्य उत्तमश्लोक ह्याने फार हट्ट धरल्यामुळे, त्याच वर्षी कार्तिक महिन्यात पुन्हा रचनेला प्रारंभ झाला. उत्तरार्धाचे ३७ अध्याय म्हणजे एकंदर ग्रंथाचे ८६ अध्याय व ८७ व्या (वेदस्तुतीच्या) २३ श्लोकांवरील व्याख्यान एवढे पूर्ण झाले. तोच पैठण येथे मार्गशीर्ष शु. ५, श. १६६२ / इ. स. १७४० ह्या दिवशी कृष्णदयार्णवांचे देहावसान झाले. *हरिवरदा*चा राहिलेला तीन अध्यायांचा भाग उत्तमश्लोक ह्यांनी लिहून गुरूंनी आरंभिलेली ग्रंथरचना त्यांच्या पुण्यतिथीच्या प्रसंगी (श. १६६६/ इ. स. १७४४) शेवटास नेली. ह्या *हरिवरदा* टीकेबद्दल स्वतः कृष्ण-दयार्णवांनी 'जाणोनि एथींच्या विवेका। वाखाणिलें मुळींच्या श्लोका। सूत्रप्राय रसभूमिका। ते हे टीका हरिवरदा ॥' (अ. ११.१९४) असे सार्थ उद्गार काढले आहेत. [⇨ ३.]

*हरिवरदा* ह्या ग्रंथाखेरीज *तन्मयानंदबोध*, *चिन्मयानंदबोध*, *विचार-चंद्रिका*, *सारांशात्मक गीता*, *सिद्धान्तसार*, *शिवरात्रिकथा* असे काही लघु-ग्रंथ व बरीचशी स्फुट कविता कृष्णदयार्णवांनी रचल्याचे आढळते. ह्यांचे एक ज्योतिषविषयक प्रकरणही आहे. कृष्णदयार्णव हे गाढे पंडित व मोठे ग्रंथकार, पण ओवीबद्ध ग्रंथरचना करणारे, म्हणून मुख्यतः विख्यात आहेत. ओवीप्रमाणेच स्रग्धरा, मदिरा, शिखरिणी, मालिनी, वसंततिलका, द्रुतविलंबित, साकी, शुद्धकामदा, स्वागत, भुजंगप्रयात, इंद्रवज्रा, आरती इत्यादी निरनिराळ्या वृत्तांचाही वापर त्यांनी केला आहे. *हरिवरदा* ग्रंथाव्यतिरिक्त त्यांची मुद्रित अशी रचना म्हणजे श. १८५६ मध्ये भारत इतिहास संशोधक मंडळ पुरस्कृत ग्रंथमालेतून प्रसिद्ध झालेली *स्फुट कविता*. तीही पूर्ण नाही. ह्यांची काही अमुद्रित रचना पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळ, धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिर, आणि मुंगी व उंबरखेड येथील ह्यांच्या संप्रदायाचे मठ अशा चार ठिकाणी संग्रहित केलेली आहे.

**रचना : मु.** – १. हरिवरदा : श्रीमद्भागवत दशमस्कंधावरील टीका; अ. ९०; ओ. सं. ४२४८७; प्रारंभ श. १६४९; ग्रंथसमाप्ती श. १६६५/६६, मार्गशीर्ष शु. ५, गुरुवार; प्रथम मुद्रण बाबाजी हरि तेंडोलकर; पोथी दुर्मिळ; मुंबई, १८९१; खंड १ : संपा. जोशी, शं. ना.; खंड २–३ : संपा. राहूरकर, व. ग., पुणे, १९५५; खंड ४–५–६ : संपा. ढेरे, रा. चिं., पुणे, १९५८; खंड ७–८ : संपा. ढेरे, रा. चिं., पुणे, १९६०, १९६१ (प्रत्येक खंडास विस्तृत व विवेचकी प्रस्तावना जोडलेल्या आहेत). २. श्रीकृष्णदयार्णवकृत वेदस्तुति आणि स्फुट कविता; संपा. काटे, रा. गो.; भाइसंमं. पुरस्कृत ग्रंथमाला; क्रमांक ३२; पुणे, १९३४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. करंदीकर, म. अ. : दयार्णवांची भक्ति-कल्पना; इंद्रायणी, दी. अं. १९६२; पृ. ३२–३५. २. देशपांडे, ना. ग. : श्रीकृष्णदयार्णवांची अप्रकाशित स्फुट कविता; प्रसाद, सप्टें. १९६५, पृ. १७–२०; ऑक्टो. १९६५, पृ. २१–२६; डिसें. १९६५, पृ. ३०–३५. ३. ढेरे, रा. चिं. : उपेक्षित भक्तकवि कृष्ण-दयार्णव; साप्ताहिक स्वराज्य; १७, २४ मे १९५८. ४. ढेरे, रा. चिं. : कृष्णदयार्णवांचे गुरु गोविंदस्वामी (गोविंद दीक्षित चौधरी); इंद्रायणी, दी. अं. १९६२; पृ. ६२–६४. ५. ढेरे, रा. चिं. : दयार्णवांचे गुरु गोविंदस्वामी यांचें समाधिस्थान; इंद्रायणी, मार्च–एप्रि. १९६४; पृ. ४९–५०. ६. ढेरे, रा. चिं. : श्रीकृष्णदयार्णवांचें वाग्वैभव; महाराष्ट्र टाइम्स; ३, ४ एप्रि. १९६३. ७. ढेरे, रा. चिं. : हरि-वरदेच्या उत्तरार्धाचे आरंभस्थान; इंद्रायणी, मे १९६३; पृ. ६०–६२. ८. पांगारकर, ल. रा. : श्रीकृष्णदयार्णव; मुमुक्षु, फेब्रु. १९२६; पृ. २४–३०.

**० कृष्णदयार्णवशिष्य** – पहा **उत्तमश्लोक.**

**० कृष्णदयार्णवांकित** – पहा **उत्तमश्लोक.**

**कृष्णदास–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अश्वमेध; ओ. सं. ३४८; अपूर्ण पोथी; मसंमं., हवना., पृ. २४–२५.

**कृष्णदास–२** [का. अनु.] पंतसमकालीन कवी. *सुदामचरित्र* ह्या काव्यात ह्याने अधूनमधून आर्यावृत्ताची योजना केली आहे (मसा., आ. ५, पृ. ५३८).

**कृष्णदास–३** [का. अनु.] कवी. ह्याच्या *मार्कंडेय-आख्याना*चा उल्लेख गो. का. चांदोरकरांनी केला आहे. ग्रंथ गं. ना. मुजुमदार संग्रहात उप-लब्ध (संककासू., पृ. १२५).

**कृष्णदास–४ / ० कृष्णदासताना** [का. अनु.] महानुभाव कवी. ह्या कवीने *बाळक्रीडा* काव्य (९९० ओव्या) रचले आहे. ज. शा. देशपांडे ह्यांनी तंजावर सरस्वती ग्रंथालयातल्या (क्र. १४३४) पोथीवरून ह्या काव्याची संहिता सिद्ध केली आहे. काव्याचे नमन, प्रथम प्रसंगातील ओव्या व काव्याची धाटणी ह्यावरून हे काव्य महानुभावीय असल्याचे स्पष्ट दिसते. ह्याच नावाचे व ह्या काव्याशी साम्य असलेले एक काव्य *प्रतिष्ठान* मासिकातून (जाने. ते एप्रि. १९५८) प्रकाशित झाले आहे, त्यात कवीचे नाव कृष्णदास मुद्गल असल्याचे नमूद केले आहे. पण ह्या काव्याची भाषा, कृष्णदास मुद्गलाच्या *रामायणयुद्धकांडा*सारखी वाटत नाही. प्रस्तुत *बाळक्रीडा* काव्याचा कर्ता कृष्णदास ह्याची विश्वसनीय माहिती मिळवून देणारी साधने उपलब्ध नाहीत.

ह्या काव्याची हस्तलिखित प्रत इ. स. १६५१ मधली आहे. भाषेचे स्वरूप लक्षात घेता हे काव्य नाथपूर्वकालीन वाटते. शेवटी 'इति श्रीमद्भागवते महापुराणे दशम स्कंदे ॥ बाळक्रिडा संपूर्ण समाप्ते ॥ ९९० ॥' असे कवी म्हणतो. ह्यावरून हे काव्य भागवत दशमाच्या टीकेचा भाग असावा असे दिसते. भारत इतिहास संशोधक मंडळातील *माबळ-*

*भटचरित्र* हे आख्यान प्रस्तुत काव्यातील प्रसंग ६ व ७ ह्यांच्याशी थोडे-फार जुळते. *महाबळभटकथन* हे *बाळक्रीडे*तील एक प्रकरण असावे. ह्या आख्यानाच्या ५९ ओव्या आहेत. शेवटच्या ओवीत आपला उल्लेख 'कृष्णदास तानो' असा कवीने केला आहे. शेवटी "इति श्री भागवते महापुराणे । परमहंससंहितायां श्री दशमस्कंदे । महाबळभट कथननाम शोडशोऽध्यायः" . . . असा निर्देश आहे. त्यावरून ह्या दोनही रचनांचा कर्ता कृष्णदास असावा असे वाटते. "आगा तुं अविनासु अपरांपरू ॥ तुझेंया रुपाचा नकळे निर्धारू ॥ रूसी मुनी दिगांबरू ॥ निर्धार नेणतीची पैं ॥ ५७६ ॥" अशा प्रकारची प्रासबद्ध, नादमधुर रचना कवीने केली आहे. श्रीकृष्णाच्या बाळलीलांचे वर्णन करताना कविप्रतिभा बहरास आलेली दिसते.

**रचना : अमु.** – १. बाळक्रीडा; प्रसंग ११; ओ. सं.९९०. २. माबळभटचरित्र; ओ. सं. ५९; संपा. देशपांडे, ज. शा. (माहिती व विवेचन यांसह); प्रामक., खं. ३; मुंबई, १९६६; पृ. १–५४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, गो. का. : कृष्णदासतानाकृत महाबळभटकथन; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २००–२०३.

**कृष्णदास–५** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कृष्णदास–६** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. कामवैरी. २. कृष्णजन्म. ३. पदपदांतरे. ४. मंगलाष्टक; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**कृष्णदास–७** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. हे पंढरीचे वारकरी होते. *काव्यसंग्रहात* ह्या कवीची २० पदे मुद्रित झाली आहेत (वा. दा. ओक संपादित *पद्संग्रह, भा. १*, मुंबई, १८९६; पृ. ११–१२). त्यांत माहूरची दत्तमाउली, पंढरीचा विठोबा, श्रीकृष्ण ह्या दैवतांना संसार-तापातून मुक्त करण्यासाठी कवीने आर्त होऊन आळविलेले दिसते. ह्यांचे 'बाजिराव महाराज अर्जी ऐकतो बायकांची । चल गडे ! जाऊं पुण्याशी, हौस मोठी माझ्या मनाची' हे मौजेचे पद प्रसिद्ध आहे.

**कृष्णदास–८** – पहा **कृष्णदास जयराम.**

**कृष्णदास–९** – पहा **विप्र विश्वनाथ.**

**कृष्णदास–१०** [का. अनु.] महानुभाव कवी. महानुभावीय ग्रंथसूचीत ह्यांच्या नावावर *दत्तविजय* असा ग्रंथ आढळून येतो (ज. शा. देशपांडे, प्रामक., खं. ३; मुंबई, १९६६; पृ. ७).

**कृष्णदास–११** [का. अनु.] आरतीकार. ह्यांची 'रामाची आरती' व 'कृष्णाची आरती' अशा दोन आरत्या मुद्रित (मआ., पृ. ३१७–४०८).

**कृष्णदास–१२ (शाहीर)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संग्रहित, वेचले येथील पदांचे बाड; श. १८२३ त उतरलेले; भाइसंमं.

**कृष्णदास कवि धावंडेकर दत्तराज गुरु** [का. अनु.] महानुभाव कवी. *गुरुपरंपरा, अंतीमाक्षरी* व *गुंफितमाला* (अभंग) अशी ग्रंथरचना ह्यांच्या नावावर वि. ल. भावे ह्यांच्या *महानुभाव ग्रंथावलि कविकाव्यसूचीत* नमूद केली आहे (पृ. ६).

**कृष्णदास (गोविंद)** / ० **अज्ञान कृष्णदास** [इ. स. १७५८–१८०८] आख्यानकार कवी. हे स्वतःला 'अज्ञान कृष्णदास' म्हणवितात. गुरुपरंपरा : हरिदास > कान्हा > कृष्णदास (गोविंद). ह्यांचे *शिवरात्रीचरित्र* हे आख्यान मुद्रित झाले आहे. *गणेशपुराणा*तील व्याध आणि मृगाच्या मूळ कथाभागावरून कवीने ही रचना केली आहे अशी माहिती (संपा.) वा. दा. ओक ह्यांनी तळटीपेत दिलेली आहे. पदे, श्लोक, दिंडी, ओवी, साकी, गीतिवृत्त अशा विविध छंदांत हे काव्य गुंफले आहे.

**रचना : मु.** – १. शिवरात्रीचरित्र; ग्रं. सं. ५६; अकलकामा., भा. ३; पृ. १–७. **अमु.** – १. अंबास्तुति; २. अश्वमेधपर्व; ३. कृष्णजन्म (शं. श्री. देव संग्रह); ४. गरुडगर्वपरिहार; ५. बाळक्रीडा (वि. ल. भावे संग्रह); ६. भस्मासुरवध; ७. रासक्रीडा; ८. रुक्मिणी-स्वयंवर (वि. ल. भावे संग्रह); संककासू., पृ. २१.

**कृष्णदास जगदानंदनंदन** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] एकनाथचरित्रकार. ग्रंथकाराच्या स्थलकालाबद्दल निर्णायक माहिती सापडत नाही. *प्रतिष्ठान-चरित्र* ह्या शीर्षकाखाली कवीने श्रीएकनाथांचे ओवीबद्ध चरित्र लिहिले आहे. ह्यांचे गुरू श्रीउद्धव (कोटणीस-संपादित *प्रतिष्ठान-चरित्र*, उपोद्घात, पृ. ३). प्रस्तुत ग्रंथाची प्रत वाठार मठातून (जि. कोल्हापूर) उपलब्ध झाली. ह्या ग्रंथाचा नक्कलकार स्वतःचा निर्देश 'शामभटात्मज रामभटेन लिखितं' असा करतो. ही प्रत उद्धवात्मज शामजी गोसावी वठारकर ह्यांच्याकरिता तयार केली (श. १७१७ / इ. स. १७९५). ग्रंथाचा मूळ लेखक मात्र प्रत्येक अध्यायाच्या शेवटी "म्हणे कृष्णदास जगदानंद। नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद स्वयें झाला ॥" असा आपला निर्देश करतो. उद्धवात्मज शामजी हे एकनाथांच्या वंशातील त्यांच्यापासून सहावे पुरुष. प्रत्येक पिढी सुमारे तीस वर्षांची धरल्यास उद्धवात्मज शामजींचा काळ अंदाजे श. १६७० / इ. स. १७४८ च्या सुमारास येतो. ह्या वेळेस नक्कल करून घेण्याइतकी मान्यता पावलेला हा ग्रंथ अगोदर ५० वर्षे तरी रचला गेला असावा. ह्यावरून ह्या ग्रंथाचा रचनाकाल अंदाजे श. १६२० / इ. स. १६९८ च्या सुमारास किंवा त्याहूनही थोडा अगोदरचाच मानणे योग्य होईल, असे मत राजकवी साधुदास ह्यांनी प्रस्तुत चरित्रास लिहिलेल्या प्रस्तावनेत व्यक्त केले आहे (पृ. ४–५).

हे चरित्र केशव (श. १६८२ / इ. स. १७२०) व महिपती (श. १६८४ / इ. स. १७६२) ह्यांच्या एकनाथांवरील चरित्रग्रंथांहून प्राचीन असावे, असे बाह्य आणि अंतर्गत पुराव्यावरून निश्चितपणे वाटते. ह्या चरित्रातील नाथांच्या मातापित्यांचा मृत्यू व आजीआजोबांनी त्यांचा केलेला सांभाळ एवढ्याच गोष्टी इतर चरित्रांतील माहितीशी समान आहेत. नाथांच्या व्रतबंधानंतर त्यांचे आजे चक्रपाणी हे त्यांना जनार्दन-स्वामींकडे अध्ययनासाठी पाठवितात (अ. १.२५–३२) ह्या माहितीवरून, नाथ घरातून जनार्दनस्वामींकडे पळून गेले हा इतर चरित्रांत दिलेला तपशील विकृत स्वरूपाचा दिसतो. नाथांची गुरुसेवा, ती पाहून संतुष्ट झालेले जनार्दनस्वामी, हेच पुढे नाथांसाठी वधू निश्चित करून, त्यांच्या आजाआजीला बोलावून दौलताबादेस त्यांचा विवाह करून देतात, ह्या घटना चरित्रकार आवर्जून सांगतो. कृष्णदासांच्या माहिती-प्रमाणे नाथांची स्वामींकडे पाठवणी झाली तेव्हा त्यांचा स्वतःचा निवास अहमदनगरास होता. त्या वेळेस हे यवन पातशहाच्या चाकरीस होते. विवाहानंतर परिवारासह नाथ जेव्हा पैठणास जातात, तेव्हा त्यांची बदली दौलताबादेस होते.

नाथांचा गृहस्थाश्रमातील दिनक्रम लेखक बिस्ताराने देतो. परंतु त्यांच्या काशीयात्रेचा उल्लेख त्यात नाही, ज्ञानेश्वरसमाधीच्या जीर्णोद्धाराचाही नाही, इतकेच नव्हे तर नाथसमकालीन पुरुष दासोपंत ह्यांची व नाथांची भेट ही प्रसिद्ध घटनाही ह्यांनी वगळली आहे. नाथांच्या ग्रंथरचनेची दखल चरित्रकार घेत नाही. नाथांच्या जीवनातील ठळक चमत्कारांचे वर्णन जरी चरित्रकर्त्यांनी केले असले तरी चमत्कारांवर फारसा भर न देता कोणत्या तपश्चर्येने नाथ जगन्मान्य झाले हे सांगण्याकडे चरित्रकाराचा कल दिसतो. ह्या चरित्रातील, नाथ गृहस्थाश्रम स्वीकारीपर्यंतचे वृत्त वेगळे आहे; तसेच नाथांचे गुरू जनार्दनस्वामी ह्यांच्याविषयीची ह्या काव्यात आलेली हकीकतही लक्षात घेण्याजोगी आहे.

तपशिलातील बारकाव्यांवरून नाथांच्या पश्चात थोडक्या कालावधीतच ग्रंथरचना केली गेली असावी असे वाटते. नाथांच्या वास्तव्याने

पैठणला आलेले महत्त्व लक्षात घेऊन चरित्रकर्त्याने *प्रतिष्ठान-चरित्र* असे दिलेले नाव औचित्यपूर्ण वाटते. ग्रंथाची भाषा सुबोध आणि प्रवाही आहे. एकनाथांच्या चरित्राची ऐतिहासिक चिकित्सा करताना कृष्णदासांचे हे *प्रतिष्ठान-चरित्र* खूपच उपयोगी पडण्यासारखे आहे. एकनाथांचे आद्य चरित्र म्हणून ह्या ग्रंथाचे महत्त्व आहे.

**रचना : मु.** – प्रतिष्ठान-चरित्र; अ. ११, ओ. सं. ११३०; संपा. कोटणीस, र. ह.; उपोद्घात : टाकी, म. रा.; प्रस्ता., राजकवी साधुदास; मुंबई, १९४७–४८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : महाराष्ट्रमहोदयाचा अग्रदूत; विविधा.; पुणे, १९६७; पृ. १२३–२४.

**कृष्णदास जयराम–१ / ० कृष्णदास** [का. अनु.] महानुभाव कवी. ह्यांनी आपल्या काव्यात कृष्णलीला वर्णिल्या आहेत. कृष्णदासांचे खरे नाव जयराम होते, असे त्यांच्या कवनातील उल्लेखावरून समजते. कृष्णदासांची *कंदुकक्रीडा*, *रुक्मिणी*हरण व पदे अशी रचना आढळते. 'अजि अजी, अहीवर शयन, मधुर त्याची गयन ' असे *कंदुकक्री*डेतील ह्यांचे पद प्रसिद्ध आहे (मसा., आ. ५, पृ. ६२३–६२४).

**० कृष्णदास जयराम–२** – पहा **जयरामस्वामी वडगावकर.**

**० कृष्णदास ताना–३** – पहा **कृष्णदास–४.**

**कृष्णदास दामा / ० दामा** [का. अनु.] कवी. ह्याने *महाभारता*च्या *आदिपर्वा*ची रचना केली आहे. त्याचे ५८ अध्याय व ६७६५ ओव्या आहेत. ही *आदिपर्वा*ची प्रत मुळाची नक्कल आहे (इ.स. १७०६). ग्रंथात कोठेही कवीने आपल्या वास्तव्यस्थानाचा किंवा काळाचा निर्देश केलेला नाही. भारतकार नाम्यास हा कवी नमन करतो, पण मुक्तेश्वरांचा मात्र उल्लेख करीत नाही. ह्यावरून त्याचा काळ विष्णुदास नाम्यानंतर व मुक्तेश्वराच्या अगोदरचा असावा असे अनुमान काढण्यास जागा राहते.

कथानक मुळापेक्षा बरेच स्वतंत्र असून रचना प्रासादिक वाटते. तिच्यामध्ये परकीय शब्द क्वचितच आढळतात. ह्या *आदिपर्वा*तील काही वेचे ज. शा. देशपांडे ह्यांनी *नवे नवनीत* ह्या ग्रंथात छापले आहेत (प्र. आ., १९५९; पृ. ११३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पाटील, ना. घ. : मराठी महाभारतकार – कृष्णदास दामा; नभामा., जुलै १९५८; पृ. २०–२३.

**कृष्णदास (दिवाकरशिष्य)** [का. अनु.] महानुभाव कवी. महाभारताच्या आदि, अरण्य व थाली पर्वांवर रचना. *थालीपर्वा*चे ६ अध्याय व ८५८ ओव्या आहेत (ममग्रंककासू., पृ. ६).

**कृष्णदास धर्माधिकारी / ० कृष्णदास बैरागी** [इ.स.चे १८ वे शतक] भागवत-टीकाकार. ह्यांच्या पित्याचे नाव एकनाथ, उपनाव धर्माधिकारी. गुरू : केशवचैतन्य. *चैतन्यविजय*कार निरंजनदास ह्यांना कृष्णदास बैरागी असे म्हणतात, पण कवींनी स्वतः आपला तसा कोठेही उल्लेख केलेला आढळत नाही. ह्यांची समाधी ओतूर गावी ह्यांच्या गुरूच्या समाधीजवळ आहे. ह्यांनी 'चतुःश्लोकी भागवता'वर केलेले निरूपण *चैतन्यलीला* ह्या नावाने ज्ञात आहे.

*चैतन्यलीला* ग्रंथात भागवती निरूपणाबरोबर राघवचैतन्य, केशवचैतन्य ह्या तुकारामांच्या गुरुपरंपरेतील सत्पुरुषांची माहिती येते. तसेच लोहगडच्या राजर्षी घराण्यातील कर्त्या पुरुषांचा इतिहास दिलेला आहे. ग्रंथाचे एकूण २१ अध्याय व ३३८१ ओव्या आहेत. ह्या टीकाग्रंथाची रचना इ. स. १७५३ ते ५८ च्या दरम्यान झाली. *तुकारामचरित्रा*चे संशोधक वा. सी. बेंद्रे ह्यांनी ह्या ग्रंथाचा एकपंचमांश भाग *चतुःश्लोकी भागवतावरील निरूपण* म्हणून प्रसिद्ध केला आहे (श्रीगाडगेमहाराज सेवासंघ प्रकाशन, क्र. १०) (मवाइ., खं. ३, संपा. रा. श्री. जोग, पृ. ४६–४७).

**कृष्णदास नामा** [का. अनु.] कवी. *सुदामचरित्र* (ओ. १०६) ह्या काव्याचा कर्ता. हे काव्य तंजावर सरस्वती महाल संग्रहातील एका हस्तलिखित प्रतीवरून ज. शा. देशपांडे ह्यांनी छापले आहे (मसंप., जुलै १९६६, पृ. ६५–७१). ह्या काव्याची प्रत श. १६०२ (इ. स. १६८०), रौद्रनाम संवत्सर, पौष वद्य चतुर्दशीची आहे. प्रतीच्या काळावरून 'हे काव्य निदान एकनाथकालीन आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं ' असे ज. शा. देशपांडे हे म्हणतात.

महाभारतकार विष्णुदास नामा व प्रस्तुत कृष्णदास नामा हे दोन कवी एकच की भिन्न, असा प्रश्न त्यांच्या काव्यातील नाममुद्रेवरून उपस्थित होतो. विष्णुदास नाम्याच्या *चक्रव्यूह*कथेत कवी कधी कृष्णदास तर कधी कृष्ण असे स्वनाम गोवतो. *विराटपर्वा*च्या एका त्रुटित प्रतीत सर्वत्र कविनाम कृष्णदास नामा असे येते. एका *कर्णपर्वा*च्या प्रतीत काही अध्यायांत कवीचे नाव कृष्णदास नामा तर काही ठिकाणी विष्णुदास नामा असे येते. *महाराष्ट्रसारस्वता*त कृष्णदास कवीच्या नावावर दिलेले *सुदामचरित्र* (मसा., आ. ५, पृ. ५३८) ह्या काव्याहून वेगळे आहे.

**कृष्णदास पंडित** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – 'कथासारामृत ' ग्रंथ (ओ. सं. १३५) व पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. २ व ३.

**कृष्णदास प्रभु** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कृष्णदास बैरागी** – पहा **कृष्णदास धर्माधिकारी.**

**कृष्णदास मुद्गल / ० कृष्णदास लोळया / ० मुद्गल कृष्णदास** [इ. स. चे १६ वे शतक, उत्तरार्ध] कवी. रामायणावर रचना करणारा एक महत्त्वाचा कवी. एकनाथसमकालीन. वास्तव्य पैठणास. पित्याचे नाव नृसिंह. अत्रिगोत्रोत्पन्न देशस्थ ब्राह्मण. उपनाव मुद्गल. ह्यांच्या गुरूचे नाव किंवा गुरुपरंपरा मात्र ह्यांच्या ग्रंथावरून निश्चितपणे समजू शकत नाही. कवींनी रचलेल्या *युद्धकांड-रामायणा*ची लोकप्रियता एवढी होती की महाराष्ट्रात घरोघर ह्या ग्रंथाचे वाचन होई, असे *महाराष्ट्रसारस्वत*कार भावे सांगतात. *संतनामावळी*त ह्यांचे उल्लेख 'कृष्णदास लोळ्या', 'लोळ्या मुद्गल', 'कृष्णदास मुद्गल ' असे आढळतात. ह्यांच्या पदांतून देखील कृष्णदास वा लोळ्या अशी नाममुद्रा सापडते.

कृष्णदास मुद्गल व एकनाथ ह्यांच्या भेटीचा वृत्तान्त नाथचरित्रकार केशवांनी त्यांच्या *एकनाथ-चरित्रा*त कथन केला आहे. कृष्णदासांचा ग्रंथ एकनाथांनी पाहिल्याचे महिपती सांगतात. कविरचित *युद्धकांडा*च्या हस्तलिखित प्रती ठिकठिकाणी सापडतात. भावेसंग्रहात व धुळे आणि तंजावर ह्या ठिकाणी असणाऱ्या वेगवेगळ्या प्रतींतून प्रसंग व ओवीसंख्या ह्यांत एकवाक्यता दिसून येत नाही. तंजावर येथे प्रस्तुत ग्रंथाच्या ३ पूर्ण प्रती आहेत (बा. क्र. १११४–१५–१६). त्यांत ८० प्रसंग व १०८८२/१०९२६ ओव्या दिसतात. इ. स. १९०७ मध्ये भावे ह्यांनी *महाराष्ट्र कवी* ग्रंथमालेतून ह्या ग्रंथाचे मुद्रण केले होते. त्यांत ८७ प्रसंग व ८७५९ ओव्या आहेत.

आपल्या ग्रंथाचा मूलाधार सांगताना मूळ *वाल्मिकी रामायणा*बरोबर *अध्यात्मरामायण* व *अग्निपुराण* ह्यांचाही कवीने उल्लेख केला आहे. *शिवपुराणा*तील रामकथांचा समावेश कृष्णदास मुद्गलांपासूनच रामायणकथेत होण्यास सुरुवात झाली.

*युद्धकांडा*चा पहिला अध्याय म्हणजे जणू सबंध ग्रंथाची प्रस्तावना आहे. मराठी भाषा आणि महाराष्ट्र-कवित्व ह्यांविषयी मोठ्या अभिमानाने कवीने पुढील गौरवोद्गार काढले आहेत : "नाना, संस्कृत हे चंद्रमंडळ । महाराष्ट्र चंद्रिका केवळ । संस्कृत स्वातीचे जळ । मराठी मुक्ताफळें ।। १.१०१ ।। जैसें दधीचें मंथन केलें । त्यांतुन नवनीत निवडिले । तैसे संस्कृतापासोनि जाहलें । महाराष्ट्र कवित्व ।। १.१०२ ।।"

सबंध रामायणात *युद्धकांड* अत्यंत रसाळ व अपूर्व आहे अशी कवी त्याची स्तुती करतो. रामायणातल्या कोणत्याही एका कांडावर एवढी विस्तृत रचना असलेला अन्य ग्रंथ मराठीत उपलब्ध नाही. कवीच्या

वैशिष्ट्यपूर्ण शैलीचा प्रत्ययही ह्या काव्यात येतो. अभिजात अशा प्राचीन मराठी काव्यग्रंथांत ह्या *युद्धकांडा*ची गणना होते. [ ➪ ३. ] वरील ग्रंथाखेरीज *सुलोचनाख्यान* किंवा *सुलोचना-अग्निप्रवेश, अंगद-शिष्टाई, बिभीषणभेटी, रावण-अंतकाल* ह्यांसारखी स्फुट आख्यानपर रचना वेगळ्या स्वरूपात दिसून येते. पण वास्तविक पाहता ती आख्याने ह्या *युद्धकांडा*तीलच असून त्यांच्या लोकप्रियतेमुळे व रसिकांच्या उपयुक्ततेच्या दृष्टीनेही ती वेगळी सुटी केलेली असावीत असे मानले जाते. कृष्णदास मुद्गलांचे २५६ ओव्यांचे *बाळक्रीडा* काव्य न. शे. पोहनेरकर ह्यांनी *प्रतिष्ठान* (मार्च १९५८, पृ. ५३–५७; एप्रि. १९५८, पृ. ५३–५६) मासिकातून प्रसिद्ध केले आहे. कवीच्या पदांची, समर्थवाग्देवतामंदिर त्याचप्रमाणे तंजावर सरस्वती महाल येथे हस्तलिखित संग्रहाच्या सूचीत नोंद केलेली आढळते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : कृष्णदास मुद्गल; प्रामसंक., खं. १, मुंबई, १९५७; पृ. ३३२–३३७. २. जोशी, म. रा. : कृष्णदास मुद्गल : एक अध्ययन; मसंप., एप्रि. १९७१; पृ. २०३–२१६. ३. जोशी, वसंत स. : कृष्णदास मुद्गलकृत रामायण : युद्धकांड, अध्याय पहिला; नभामा., जुलै १९७३; पृ. ६१–७३. ४. धनपलवार, माणिक : कृष्णदास मुद्गलकृत अंगद-शिष्टाई; मस्वासंप., मार्च १९७१; पृ. ४३–५२.

**० कृष्णदास (लोळ्या)** – पहा **कृष्णदास मुद्गल.**

**० कृष्णदास शामराज** – पहा **कृष्णदास शामा.**

**कृष्णदास शामा / ० कृष्णदास शामराज / ० कृष्णदासु सामा** [अंदाजे इ. स. १५२६] गोमंतकीय कवी. मूळ नाव शामराज. गोव्यातील केळोशी गावच्या कौशिकगोत्रोत्पन्न रामराजांचे पुत्र. शांतादुर्गा देवीचे हे भक्त होते. ह्यांच्या गुरूंचे नाव गोविंद असून ते पंढरपूरनिवासी होते. ह्यांनी *श्रीकृष्णचरित्रकथा* ह्या नावाची *भागवता*च्या दशमावरील टीका लिहिली आहे.

सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक डॉ. पां. स. पिसुर्लेकर ह्यांना ब्राग (पोर्तुगाल) येथील सार्वजनिक ग्रंथालयातील जुन्या हस्तलिखितांच्या बाडांत रोमन लिपीतील ह्या *कृष्णचरित्रकथे*ची प्रत आढळली व त्यांनी प्रथम ह्या ग्रंथाकडे गोव्यातील *भारतमित्र* मासिकातून लक्ष वेधून घेतले. ह्यानंतर थोड्याच दिवसांनी ह्या ग्रंथाची देवनागरीतील एक प्रत डॉ. वि. बा. प्रभुदेसाई ह्यांना ना. वि. प्रभुगावकर (गोमंतक प्रांत) ह्यांच्या खाजगी ग्रंथसंग्रहात मिळाली.

प्रस्तुत टीकाग्रंथ एकनाथपूर्वकालीन असून कवी 'कृष्णदास शामा' किंवा 'कृष्णदासु सामा' असा स्वतःचा नामोल्लेख करताना दिसतो. काव्याचा निर्देश *श्रीकृष्णचरित्रकथा* किंवा *कृष्णचरित्र* असा केलेला आढळतो. ग्रंथाचे १९ प्रसंग व ३१३५ ओव्या आहेत. टीकालेखनास श. १४४८, वैशाख शु. १३ (इ. स. १५२६) रोजी आरंभ केला असे कवीने म्हटले आहे. ह्या ग्रंथाखेरीज *अश्वमेध* व इतर आख्यानांची ह्यांनी मराठीत रचना केली असावी व नंतर त्याचे कोकणीत भाषांतर केले गेले असावे. ही कोकणीतील आख्याने डॉ. पिसुर्लेकर ह्यांनी पाहिलेल्या रोमन लिपीतील हस्तलिखित बाडांत उपलब्ध आहेत. ग्रंथाचा १९ वा अध्याय (ओ. सं. २७३) रोमन लिपीतील प्रतीवरून भाषांतरित करून पिसुर्लेकर ह्यांनी छापून प्रसिद्ध केला आहे. मूळ भागवत दशमाच्या पूर्वार्धाच्या पंचेचाळीस अध्यायांतील कंसवधापर्यंतचा भाग ह्या टीकेच्या १९ अध्यायांत शामराजांनी वर्णन केला आहे. कवीची नैसर्गिक काव्यलेखनस्फूर्ती व प्रत्ययकारी वर्णनशैली ह्यांमुळे त्याची काव्यरचना सरस झालेली आहे. भक्तिप्रेमाने ओथंबलेली अशी ही रचना आहे. [ ➪ ३. ]

दशम स्कंधावरील पहिली मराठी टीका ही बहिरा जातवेद ह्यांची श. १३०० (इ. स. १३७८) च्या सुमाराची आहे. इतर अधिकांश टीका ह्या श. १६ व्या शतकातील आहेत. ह्या मधल्या काळातील उपलब्ध झालेली *भागवता*वरील टीका म्हणून कृष्णदास शामाच्या ह्या टीकेस विशेष महत्त्व आहे.

**रचना : अमु.** – श्रीकृष्णचरित्रकथा; अ. १९; ओ. सं. ३१३५; र. स्थ. : शांतादुर्गा मंदिर (कवळे, गोवा); संपा. प्रभुदेसाई, वि. बा. व मुंडी, बा. ना.; मुंबई, १९७५; प्रस्ता., पृ. १–४५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. नायक, ना. भा. : कृष्णदास शामा; गोमका.; गोवे, १९६९; पृ. ३–४. २. पिसुर्लेकर, पां. स. : कृष्णदास शामाचा शोध, श्रीशांतादुर्गा चतुःशताब्दी महोत्सव ग्रंथ; मुंबई, १९६६; पृ. ६४–७८. ३. प्रभुदेसाई, वि. बा. : शामराजाची भागवतावरील मराठी टीका; विसंमंवा., १९६७, पृ. १११–१२३.

**कृष्णदासु शामा** – पहा **कृष्णदास शामा.**

**कृष्णदासानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**कृष्णनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – राऊळपुराण; पुणे, श. १८३६ / इ. स. १९१४; भाइसमं. ग्रंथमाला.

**कृष्ण (नारायणात्मज) / ० केशवसुत–१** [का. अनु.] कवी. स्वतःस केशवसुत म्हणवितात, ह्यावरून केशव गुरू असावेत.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १९.

**कृष्ण पंडित / ० माधवनंदन–२ / ० माधवात्मज** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध] कवी. भागवत-टीकाकार. तंजावर येथील सुप्रसिद्ध महाभारतकार माधवस्वामींच्या दोन पुत्रांपैकी राम पंडित हे वडील आणि कृष्ण पंडित हे कनिष्ठ. हे आश्वलायनशाखी, अत्रिगोत्री देशस्थ ब्राह्मण. उपनाव अद्वैती. माधवस्वामींनी समर्थसंप्रदायी राघवस्वामींचा अनुग्रह घेतला होता. त्यांचे वास्तव्य गौरीमायोर क्षेत्रानजीक कावेरीतीरी त्रिवंदूर येथे असे. ह्यांच्या कुटुंबाला तंजावर दरबारात मान्यता होती, तसाच राजाश्रयही होता. कृष्ण पंडित हे तर्क, व्याकरण, मीमांसा आणि सांख्यशास्त्र ह्यांचे पंडित होते अशी माहिती त्यांचे भाचे (बहिणीचे पुत्र) अंबाजी पंडित देतात (तंसम. हस्त. यादी, क्र. २, बा. १४३८, पृ. ५३९). कवित्वशक्तीचा पिढीजाद वारसा कृष्ण पंडितांकडेही चालत आला होता.

कृष्ण पंडित ह्यांनी माधवात्मज नावाने भागवती प्रथम स्कंधावर केलेली रचना तंजावर ग्रंथसंग्रहात उपलब्ध आहे (तंसम. हस्त. यादी, बा. १४८५). *प्रथम स्कंधा*चे १९ अध्याय व ४००० ओव्या असून, त्याची समाप्ती श. १६९० (इ. स. १७६८) सर्वधारी वर्ष, ज्येष्ठमास, सौम्यवासर, कृष्ण पक्ष अष्टमीस झाल्याचे नमूद केले आहे. वरील १९ अध्यायांपैकी अध्याय १ ते ७ *तंजावर सरस्वती महाल* त्रैमासिकातून (संपा. गो. नागराजराव, १९५८ ते १९६०, क्रमशः) मुद्रित झाले आहेत. माधवात्मजांची भारत, पुराणे ह्यांमधील स्फुट रचनाही असल्याचे *प्रथम-स्कंधा*चे संपादक गो. नागराजराव म्हणतात (प्रस्ता., पृ. २).

*भागवतात* समाविष्ट झालेल्या वेदान्ततत्त्वज्ञानाचे विवरण ह्या टीकेत माधवात्मज कवींनी सोपे करून सांगितले आहे. तंजावर हस्तलिखित यादीत माधवात्मजांच्या नावावर दिलेली *दशम स्कंधा*ची रचना ही कृष्ण पंडितांची नसून माधवसुत म्हणजे राम पंडित ह्या त्यांच्या ज्येष्ठ बंधूंची आहे (तंसम. हस्त. यादी, क्र. २, बा. १४३८–३९).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नागराजराव, गो. (संपा.) : प्रस्ता., भागवत प्रथम स्कंध, भा. १; माधवात्मजकृत मराठी भाषांतर; तंजावर, १९६०; त्रैमा., व्हॉ. १४, क्र. २, १९६०.

**कृष्णप्पास्वामी** [ ? – समा. श. १५४५, रुधिरोद्गारी संवत्सर, माघ शु. १५ / इ. स. १६२३] पदकार. वडगाव (जि. सातारा) येथील शांतलिंगप्पास्वामी (जंगम) हे ह्यांचे गुरू. कृष्णप्पास्वामी

मूळचे उरण वहे (अथवा उरण बाहे) चे कुळकर्णी. काश्यपगोत्री आश्वलायनशाखी ब्राह्मण. हे काही दिवस कृष्णातीरी राहात असत. ह्यांनी श. १५०४ / इ. स. १५८२ मध्ये वडगाव येथे येऊन मठाची स्थापना केली व आपला शिष्यसंप्रदाय वाढविला. ह्यांनी वडगावीच समाधी घेतली. प्रसिद्ध संत जयरामस्वामी वडगावकर हे ह्यांचेच शिष्य होत. ह्यांची काही पदे उपलब्ध आहेत (मसा., आ. ५, पृ. ३३७).

**कृष्ण माधोदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**कृष्णमुनि–१ / ० डिंभ कवी–३** [अंदाजे श. १४०० / इ. स. १४७८] महानुभाव कवी. उपाध्य आम्नायातील. दामेराजसुत सीवराज > बल्लाळ > डिंभ अशी कृष्णमुनीने आपली गुरुपरंपरा दिली आहे. ह. ना. नेने ह्यांच्या मते हे श. १४०० / इ. स. १४७८ च्या सुमारास होऊन गेले.

ह्या कृष्णमुनींचे ओवीबद्ध *अन्वयस्थळ* वाङ्मयेतिहासदृष्ट्या महत्त्वाचे आहे. महानुभावीय पंथाच्या वाङ्मयाची व ज्ञानपरंपरेची माहिती २९८ ओव्यांत ह्यामध्ये थोडक्यात वर्णिली आहे. हे प्रकरण जुन्या महानुभाव हस्तलिखित पोथ्यांच्या संग्रहात सापडले. ग्रंथारंभीच कवीने आपली परंपरा सांगितली आहे (ओ. ११–२०). आरंभी महानुभाव पंचकृष्णांना कवी वंदन करतो. कमळंबा योगिनी (उपाध्य आम्नाय), धारासिवकर वंकेराज ह्यांच्याबरोबर दामेराजसुत सीवराज, सीवराजसुत बल्लाळ ह्यांनाही कवीने 'प्रणिपात' केला आहे. गुरुकृपेने (बल्लाळप्रसादे) आपण हा ग्रंथ रचत आहो असे कवी म्हणतो.

परमार्गातील पुरुषांना प्रमाण कोणते हे सांगताना कवीने श्रुती, स्मृती, वृद्धाचार, मार्गरूढी ह्यांचे विवेचन केले आहे. गुर्जरशिवबासांनंतरचा महानुभाव पंथातील 'मतामतांचा गलबला' कवीने वर्णिला आहे. गुर्जरशिवबास व सिद्धांते हरिव्यास ह्यांनी चोवीस पक्षांची मते लक्षात घेऊन शास्त्रांचा जो समन्वय केला (श. १३२५ / इ. स. १४०३) त्याचे वर्णन करून 'यावेगळें शास्त्र : अर्थ अर्थादिक : नव्हे प्रमाणीक : अवीहीत :' असा दंडक कृष्णमुनीने घातला. ह्याप्रमाणे शास्त्रान्वय सांगितल्यानंतर ह्यासंबंधी प्रमाणभूत ग्रंथ कोणी केले ह्याचे वर्णन करताना *वछाहरण*कर्ते दामोदरपंडित, *लीळाचरित्र*कार म्हाइंभट्ट, *सूत्रपाठ* करणारे केशिराजव्यास, *उद्धवगीता*कर्ते भानुभट बोरीकर, *लक्षणरत्नाकरा*चे निर्माते आनेराज, *गद्यराज*कार हयग्रीवाचार्य, *ज्ञानप्रबोध* रचणारा विश्वनाथ, सांकेतिक लिपीचे कल्पक रवळोबास अशा अनेक ग्रंथकारांची माहिती दिलेली आढळते (ओ. १५७–२५०).

महानुभावांचे प्रमाणग्रंथ, प्रमाणव्यक्ती, शाखोपशाखा, शास्त्रीय वादविवादांतील पक्षकार व त्यांच्या खुणा, ग्रंथांवर दिलेले अभिप्राय इत्यादी महत्त्वाच्या माहितीमुळे ह्या प्रकरणाचे महत्त्व महानुभाव पंथीयांच्या दृष्टीने विशेष आहे.

**रचना : मु.** – १. अन्वयमाळिका; ओ. सं. २९८; संलेसं. भा. १, पृ. १५४–१६७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नेने, ह. ना. : कृष्णमुनीचे अन्वयस्थळ : संलेसं., भा. १, नागपूर, १९५७, पृ. १४७–१५४.

**कृष्णमुनि–२** [अंदाजे श. १४३२ / इ. स. १५१०] महानुभाव कवी. कवीश्वर आम्नायातील. ह्याने *ब्रह्मांडगोळक* ग्रंथाची रचना श. १४३२ / इ. स. १५१० च्या सुमारास केली. कृष्णाने अर्जुनास अष्टादशाध्यायी गीता सांगितल्यानंतर ज्या शंका उरल्या त्यांचे निरसन करण्यासाठी प्रस्तुत १९ वा अध्याय कृष्णाने सांगितला अशी कल्पना करून हा ग्रंथ सजविला आहे (य. खु. देशपांडे; मवाइ., खं. २, आ. १; संपा. ल. रा. पांगारकर; पृ. ७५१–५३).

**कृष्णमुनि–३** – पहा **डिंभमुनि कृष्णदास.**

**कृष्णमुनि पंजाबी / ० ख्यालीबहादुर** [इ. स. चे १८ वे शतक] महानुभाव कवी. हे कवीश्वर आम्नायातील दीक्षित पंडित दिवाकर मुनी ह्यांचे शिष्य. मूळचे पंजाब प्रांतातील. हे जळगाव जिल्ह्यातील चाळीसगावजवळील खेरडी येथे राहात असत. ह्यांना फारसी, हिंदी, मराठी, अहिराणी, संस्कृत, बागलानी, तेलुगू, कन्नड वगैरे ११ भाषा येत होत्या. हे शीघ्रकवी होते. ह्यांचा कलगीतुऱ्याचा आखाडा होता. ह्यांचे छंद, तुरके, ख्याल, गजल निरनिराळ्या भाषांत आहेत. ह्यांचे ख्याल इतके प्रसिद्ध होते की त्यावरूनच ह्यांस 'ख्यालीबहादुर' ही पदवी प्राप्त झाली. ह्यांची रचना हिंदी भाषेत अधिक आहे (ममवा., पृ. ८२–८३).

**रचना : अमु.** – १. सुदामचरित्रकथा; चौपद्या १९२; र. का. : फसली सन ११६६. २. रूक्मिणी-स्वयंवर; छंद ७२; हिंदी. ३. श्रीकृष्ण-जन्माष्टमी; हिंदी कथा; छंद १२३; फसली सन ११८३.

**कृष्णमुनि (वनुलीकर)** [अंदाजे श. १५९२ / इ. स. १६७०] महानुभाव कवी. ह्यांचे वनुली गाव यावल तालुक्यात (जि. जळगाव) आहे. कृष्णमुनीचा *वृद्धाचार* (र. श. १५९२ / इ. स. १६७०) महानुभाव लिपीत लिहिलेला आहे व तो हयग्रीवाचार्यकृत *गद्यराजा*च्या पोथीतच आढळतो.

पारमांडल्य, कवीश्वर व उपाध्य आम्नाय, तसेच कमलाकर परंपरा, अचळांची परंपरा, कपाटे कुळाची माहिती, कारंजकर वंश व स्वतःच्या महादेव शाखेची परंपरा ह्यांची सविस्तर माहिती ह्या *वृद्धाचारा*त कवी सांगतो. *स्मृतिस्थळां*त आढळणारी बहुतेक नावे तेथे सापडतात. पंथीय इतिहासाच्या दृष्टीने हा *वृद्धाचार* महत्त्वाचा आहे. *वृद्धाचारा*च्या शेवटी समाप्तिशतक व कविनाम ह्यांचा निर्देश येतो तो असा : "पंधराशे शके । ब्याणीणव अधिके । परमार्थ साधके । नमीएले ॥ ४४० ॥ सौम्य संवत्सरे । पाळिये जांभोरे । अधिक मासांतरे । बंध जाला ॥ ४४१ ॥ प्रतिपदां वदी । शुक्र दीन तधी । पूर्ण नाम नीधी । ग्रंथ जाला ॥ ४४२ ॥ कृष्ण मुनीवरे परमार्गपरे । स्मरण सादरे । याचिलागि ॥ ४४३ ॥ ऐसी मार्गवेली । वोबीबंधी कथीली । उपनाम वनुली । कर त्याचे ॥ ४४४ ॥

**रचना : मु.** – कृष्णमुनिकृत वृद्धाचार; ओ. सं. ४४४; संपा. देशपांडे, ज. शा.; महानु., सप्टें.–ऑक्टो. १९७२; पृ. २४–५० व २१–३४.

**कृष्णमूर्ति** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. आनंदमूर्ति ब्रह्मनाळकरांचे पुत्र. गुरुपरंपरा : दत्त > दासोपंत > अवधूत > विश्वंभर > कृष्णमूर्ति.

**रचना : अमु.** – १. समश्लोकी गीता. २. सुलभवेदान्त; ले. का. : श. १६८० / इ. स. १७५८; संककासू., पृ. २२. ३. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कृष्ण याज्ञवल्की / ० कृष्ण याज्ञवल्क्य** [अंदाजे श. १४७० / इ. स. १५४८ – श. १५३५ / इ. स. १६१३] कवी. एकनाथसमकालीन. कौंडिण्यगोत्री त्रिप्रवरी ब्राह्मण. ह्यांची माता कमळजा व पिता अंबरीष. गुरूचे नाव अनंत. ही माहिती कवी स्वतःच आपल्या ग्रंथांत देतो. ह्यांचे पुत्र गोपाळ याज्ञवल्की. ह्यांच्या विनंतीवरून शिवकल्याणांनी ज्ञानेश्वरांच्या *अमृतानुभव* ग्रंथावर *नित्यानंददीपिका* हा आपला टीकाग्रंथ लिहिला. त्याचा काल श. १५५७ / इ. स. १६३५ असा दिलेला आहे. कृष्ण याज्ञवल्कींच्या *कथाकल्पतरु* ह्या ग्रंथाचा उत्तरार्ध कृष्णकवींच्या पश्चात त्यांचा शिष्य मधुकर कवी ह्याने श. १५४५ / इ. स. १६२६ मध्ये पूर्ण केला असा निर्देश येतो. ह्यावरून ल. रा. पांगारकर ह्यांनी श. १४७०–१५३५ (इ. स. १५४८–१६१३) हा कवीचा काल निश्चित केला आहे.

कृष्ण याज्ञवल्कींचा *कथाकल्पतरु* हा प्रचंड पौराणिक ग्रंथ आहे. हा ग्रंथ कवीने नाशिक क्षेत्री लिहिला. त्याच्या पूर्वार्धाचे ७ स्तबक (ओ. २०,०६८) कवीने स्वतः रचले तर उत्तरार्धाचे सात स्तबक (ओ. १८,७००) त्यांच्या मधुकर ह्या शिष्याने रचून ग्रंथ श. १५४५ / इ. स. १६२३ त पूर्ण केला. ग्रंथात भारत, भागवत, पुराणे ह्यांमधील अनेक कथा जशा आठवतील तशा कवीने सांगितलेल्या दिसतात. परंतु प्रचलित कथांपेक्षा ह्यांच्यामध्ये फरक आढळतो. ह्या कथांखेरीज भूगोलवर्णन, सूर्याच्या गती, चार वर्ण, सर्व जातींची उत्पत्ती असे सहजी न येणारे

विषयही ग्रंथात कवीने वर्णिलेले आहेत. ह्यांतील मनसोक्तपणे सांगितलेल्या कथा पाहिल्या की हा ग्रंथ खरोखरीच कल्पतरू आहे असे वाटू लागते. [ ⇨ ३. ] ह्या ग्रंथाखेरीज कवीने काही आख्यानांचीही रचना केली आहे.

**रचना : मु.** – १. कथाकल्पतरु; ओ. सं. ३८७६८; मुंबई, श. १८१५/इ. स. १८९३ (हस्त. प्रती : भाइसंमं., सवामं.). **अमु.** – १. एकादशी कथा; उपलब्ध ओव्या ९ ते १७०; सवामं. २. ज्योतिषप्रकरण (१ पूर्ण व ५ त्रु. पो.). ३. दमयंतीवियोगनगरप्रवेश. ४. दानव्रत. ओ. सं. १२२; तंसम. ५. देवीमाहात्म्य. ६. द्वादशीकथा. ७. नलदमयंतीस्वयंवर; ओव्या. ८. रुक्मांगद आख्यान. ९. राज्यप्राप्ती; तंसम., भाइसंमं., मसंमं., सवामं. हस्तलिखित संग्रहांत उपलब्ध.

**० कृष्णयाज्ञवल्क्य** – पहा **कृष्णयाज्ञवल्की.**

**कृष्णराज–१** [का. अनु.] कथाकार.

**रचना : अमु.** – 'पंचोपाख्यान'; प्रसंग १५; ग्रं.सं. ९८६; त्रु.पो.; मसंमं.; हवना., पृ. २३; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १५२.

**० कृष्णराज–२** – पहा **कृष्णराव खटावकर.**

**कृष्णराज वडियार** [इ. स. १७९५–१८६८] ग्रंथकार. हे म्हैसूर संस्थानचे (सध्याच्या कर्नाटक राज्यात अंतर्भूत) अधिपती तिसरे कृष्णराज वडियार होत. इंग्रजांनी श्रीरंगपट्टणच्या वेढ्यात टिपूचा पराभव केला. तो दि. ४ मे १७९९ रोजी गोळी लागून ठार झाला. ह्यानंतर इंग्रजांनी म्हैसूरच्या गादीवर पूर्वीच्या हिंदू राजघराण्यातील एका अल्पवयीन वंशजाची ३० जून १७९९ रोजी स्थापना केली. तेच हे कृष्णराज वडियार होत. पुढे त्यांनी १८२१ साली राज्यसूत्रे हाती घेतली.

मराठी, कानडी आणि हिंदुस्तानी ह्या भाषांत ते पारंगत होते. संस्कृत, फारसी, इंग्रजी ह्या भाषा त्यांस अवगत होत्या. विद्येचे ते मोठे आश्रयदाते होते. हस्तलिखित ग्रंथांचा त्यांनी मोठा संग्रह केला होता. वयाच्या ७४ व्या वर्षी हे दिवंगत झाले.

तिसऱ्या कृष्णराजांनी इ. स. १८४६ मध्ये *संख्यारत्नकोश* हा बुद्धिबळ खेळण्यास उपयुक्त असा ग्रंथ लिहिला. ग्रंथासंबंधी पुढील माहिती मिळते : "श्रीकृष्णराज महाराजकंठीरव याणीं रचिलेला चतुरंगसारसर्वस्व ग्रंथ जो त्यांत प्रतिपादिलेल्या १४४ घरांचा आणि ६४ घरांचा ही बुधबळपटांत अनेक प्रकारें अश्वगति चालविली त्यांत आश्चर्यकर असायाचीं कितेक मुख्य चक्रें शालीवाहन शके १७७४ नंतर परिधावि संवत्सर कार्तिक शुध्द १५ शुक्रवारीं आपल्या संस्थानच्या छापखान्यांत छापविलीं आहेत." (म्हणजेच हे पुस्तक इ. स. १८५२ साली संस्थानच्या छापखान्यात छापवून म्हैसूरमध्ये प्रसिद्ध केले.)

तिसरे कृष्णराज वडियार ह्यांच्या नावावर असलेल्या ग्रंथांची संख्या ५१ आहे. त्यांपैकी एक संस्कृत *श्रीतत्त्वनिधि* व इतर ग्रंथ कानडी आहेत. ह्यांतील काही ग्रंथ मुद्रित झाले आहेत. *संख्यारत्नकोशा*पूर्वी *चतुरंगसारसर्वस्व* ह्या ग्रंथाचे लेखन कृष्णराजांनी प्रथम कन्नड भाषेत केले, त्यातील निवडक मुख्यचक्रे *संख्यारत्नकोश* ह्या मराठी ग्रंथात वाचकांच्या पुढे ठेवली असावीत, असे प्रसिद्ध संशोधक अ. का. प्रियोळकर ह्यांचे मत आहे. *संख्यारत्नकोश* हा मूळ संस्कृत ग्रंथ असून त्याची संहिता पहिल्या १३ पृष्ठांत दिली आहे. त्यावर आधारलेली चक्रे मराठी भाषेत इतर पृष्ठांत आहेत. कृष्णराजांनी आणखीही काही मराठी ग्रंथ रचले असावेत, असा प्रियोळकरांचा अंदाज आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रियोळकर, अ. का. : म्हैसूरचा तिसरा कृष्णराज व त्याचा मराठी ग्रंथ : संख्यारत्नकोश; मसंप., ऑक्टो. १९६६; पृ. १–३२.

**कृष्णराम** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – समर्थांवर पद; सवामं. हस्त. सू., खं. १.

**कृष्ण (राय)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – श्रीयाळचरित्र; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. २०.

**कृष्णराव खटावकर / ० कृष्णराज–२** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. कृष्णराव हे शाहूमहाराजांच्या काळातले एक मुत्सद्दी व शूर शिपाई होते. ह्यांनी *विष्णुसहस्रनामावरील टीका* लिहिली आहे. ती वि. ल. भावे ह्यांच्या संग्रहात उपलब्ध (मसा., आ. ५, पृ. ४१४).

**कृष्ण वासुदेवात्मज** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी.

**रचना : अमु.** – संतोषवल्ली चुडालोपाख्यान : योगवासिष्ठांतर्गत १०० ओव्यांची ६ शतके; र. स्थ. : केरी (गोमंतक); र. का. : श. १७५० / इ. स. १८२८; मसंमं.; हवना., पृ. २१.

**कृष्ण (श्रीधरशिष्य)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं.

**कृष्णसिंग** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध] शाहीर.

**रचना : मु.** – भिर्डीच्या लढाईचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. २५–२६.

**कृष्णसुत–१ / ० कृष्णात्मज–२** [इ. स. चे १७ वे शतक] कवी.

**रचना : अमु.** – शिवरात्रीकथा; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. २२.

**कृष्णसुत–२** – पहा **लक्ष्मण.**

**कृष्णस्वामी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – संस्कृत व प्राकृत आर्या व श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कृष्णांकित–१** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० कृष्णांकित–२** – पहा **विजय–२.**

**कृष्णा गुरवाचा बापा** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – शहाजी महाराज ऊर्फ बुवासाहेब ह्यांजवर पाचवा पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. ११३.

**कृष्णाजी अनंत सभासद / ० सभासद, कृष्णाजी अनंत** [इ. स. चे १७ वे शतक] बखरकार. उपनाव हिरेपारखी. काश्यपगोत्री ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्यांचे घराणे साताऱ्यानजीक बसंतगडचे. कृष्णाजी अनंत हे जुन्नरकर देशपांडे ह्यांचे आप्त असावेत. शिवाजीपासून राजारामापर्यंतच्या काळात हे दरबारातील अधिकारी पुरुष 'सभासद' असावेत. 'सभासद' ही एक पदवी आहे. राजदरबारी, सभेत सल्लामसलत करतो तो 'सभासद' होय. कृष्णाजी अनंत हे 'सभासद राजमंडळ' आहेत. त्यावरूनच ह्यांचे सभासद हे नाव प्रचारात आले. छत्रपती राजाराम कर्नाटकात जिंजीस जाताना जी मंडळी त्यांच्याबरोबर होती त्यांत कृष्णाजी अनंतही होते. त्यावेळी हे प्रल्हाद निराजींच्या पदरी होते. प्रल्हाद निराजींसारख्या अनुभवी आणि मातबर अधिकाऱ्याबरोबर बरेच दिवस राहिल्याने त्यांस कर्नाटक प्रांताची माहिती चांगलीच होती. म्हणूनच राजाराममहाराजांनी त्यांना आपल्याबरोबर घेतले होते. त्यांच्या आज्ञेवरून ह्यांनी शिवचरित्राचे लेखन केले. 'जुन्या राज्यातील माहितगार' असा राजारामांनी ह्यांचा उल्लेख केला आहे. केशवपंडितांनी आपल्या *राजारामचरित्रा*त सभासदांचा 'महामति' असा उल्लेख केला आहे. पाँडिचरीचे फ्रेंच गव्हर्नर 'The second minister and the third personage in the government' असे ह्यांच्याविषयी उद्गार काढतात. ह्यांनी लिहिलेली बखर *शिवप्रभूचे चरित्र* किंवा *सभासदाची बखर* म्हणून प्रसिद्ध आहे.

शिवछत्रपतींचे चरित्र सांगणारी ही बखर शिवरायांच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांनी, म्हणजे श. १६१६ / इ. स. १६९४ साली लिहिली गेली. बखरकार हा समकालीन असल्यामुळे त्यांच्या आयुष्यात घडलेल्या घटनांचा तो साक्षीदार आहे. ह्यामुळेच विभूतिमत्त्वाच्या कल्पनेने

भारावून न जाता तो रास्त परिस्थितीचे व सत्य घटनांचे निवेदन करतो. त्यामुळे शिवाजीच्या पराक्रमांचे बखरकाराने केलेले वर्णन ठसठशीत व लक्षात राहण्याजोगे झाले आहे. चरित्रनायकासंबंधीची आत्मीयतेची भावना बखरकाराच्या ठिकाणी असल्याने लेखन सहजस्फूर्त झाले आहे. अनेक घटनांच्या काळांचा उल्लेख काटेकोरपणे केला गेला नाही हा बखरीचा एक मोठा दोष मानला जाईल. तरीही तिच्यातील अस्सलपणामुळे आणि शिवाजीचे आद्यचरित्र म्हणून शिवचरित्रविषयक साहित्यात ही बखर महत्त्वाची ठरते. शिवचरित्रावरील पुढील अनेक बखरींचे ही बखर स्फूर्तिस्थान ठरली आहे. [ ⇨ ३. ]

द. ग. गोडसे

**रचना : मु.** – १. शिवछत्रपतीचे चरित्र; र. का. : श. १६१६/ इ. स. १६९४; र. स्थ. : चंदी; संपा. साने, का. ना.; काइसं., क्र. ४; पुणे, १८८१; २. छत्रपति श्रीशिवाजी राजे यांची बखर; संपा. जोशी, शं. ना.; पुणे, १९६०; ३. श्रीशिवप्रभूचें चरित्र; संपा. वाकसकर, वि. स.; पुणे, १९६०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, भीमराव : सभासद बखर : वाङ्मयीन रसास्वाद; पुणे, १९६५; पृ. ३७–५०. २. हेरवाडकर, र. वि. : मब.; पुणे, १९५७; पृ. ४९–५१, १०७–११६.

**कृष्णाजीपंत** [का. अनु. ] पदकार.

**रचना : अमु.** – संप्रदायपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कृष्णाजी रामचंद्र** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार.

**रचना : अमु.** – अश्वमेध बखर; (नकल) हस्ताक्षर : केशव त्रिंबक अभ्यंकर; र. का. : श. १७७० / इ. स. १८४८; र. स्थ. : कान्हूर, पाराशरक्षेत्र.

**कृष्णाजी विनायक सोहनी** [इ. स. १७८४–८५ – इ. स. १८५४–५५ चा सुमार] बखरकार. हे मूळचे कोकणातील रत्नागिरीनजीकच्या सोमेश्वर गावचे राहणारे. तेथून ते पुण्यास आले. पेशव्यांचे कारभारी चितोपंत देशमुख पावसकर हे ह्यांचे आप्त. पेशवाईत कृष्णाजीपंत कर्तबगारीने सुभेदारीपर्यंत चढले. पेशवाई गेल्यानंतर त्यांची स्थिती खालावली. त्यांनी संसार सोडून कुलाबा जिल्ह्यातील कर्जत तालुक्यातील भिवपुरी–वैजनाथ येथे पुढील आयुष्य तपस्व्याप्रमाणे ईश्वरोपासनेत घालविले. तेथेच त्यांनी *पेशव्यांची बखर* तोंडी सांगितली व तेथील रहिवाशांनी ही माहिती आदरपूर्वक लिहून ठेवली. बखरीत ज्याचे नाव येते तो नारो मेघश्याम हा कृष्णाजीपंतांनी तोंडी सांगितलेली हकीकत आदराने लिहून घेणाऱ्यांपैकीच एक होय. बखरीचे लेखन श. १७४० (इ. स. १८१८) च्या सुमारास झाले असावे. तिचे मुद्रण इ. स. १८७८–७९ त *काव्येतिहाससंग्रहा*तून झाले. *काव्येतिहाससंग्रह*कार ह्यांचा मृत्युशक अंदाजे इ. स. १८५४–५५ असा देतात. त्यावेळी ह्यांचे वय ७० वर्षांचे होते.

ह्या बखरीत पेशवे घराण्याचा संपूर्ण इतिहास दिला आहे. बखरकार हा चांगलाच माहितगार असून पेशव्यांचा इत्थंभूत कुलवृत्तान्त, त्यांच्या राज्यातील महत्त्वपूर्ण घडामोडी व कर्त्या पुरुषांचे पराक्रम ह्यांसह त्यास अवगत असावा असे दिसते. तिथी, वार, शक ह्यांचे उल्लेख मात्र हा करीत नाही.

बखरीत थोरले बाळाजीपंत नाना (बाळाजी विश्वनाथ भट) ह्यांनी श्रीवर्धन गाव सोडल्यापासून ते पुण्याच्या शनिवारवाड्यावर इंग्रजांचा बावटा फडकेपर्यंतची समग्र हकीकत आली आहे. काल आणि व्यक्ती ह्यांच्या विपर्यासाच्या दोषामुळे इतिहासदृष्ट्या ही बखर प्रमाण मानता येणार नाही. परंतु हिच्यातील वर्णने चांगली आहेत. उदा., रंगाच्या समारंभाचे वर्णन, सवाई माधवरावांच्या लग्नसोहळ्याचे वर्णन. बारीकसारीक वर्णने मोठ्या आवडीने करण्याच्या बखरकाराच्या कसबामुळे अनेक व्यक्ती व प्रसंग डोळ्यांसमोर जिवंत उभे राहतात. चटकदार अशा निवेदनामुळे व भावनेच्या जिव्हाळ्यामुळे बखर वाचनीय झाली आहे. [ ⇨ ३. ]

द. ग. गोडसे

**रचना : मु.** – पेशव्यांची बखर; र. का. : अंदाजे श. १७४०; प्रत-लेखक : नारो मेघश्याम; र. स्थ. : भिवपुरी–वैजनाथ; १. संपा. साने, का. ना.; काइसं., क्र. १; पुणे, १८७९; पुणे, १८९० (आ. ३ री); २. संपा. हेरवाडकर, र. वि.; पुणे, १९७५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, भीमराव : पेशव्यांची बखर : वाङ्मयीन रसास्वाद; पुणे, १९६५; पृ. ५१–६९. २. ग्रामोपाध्ये, गं. ब. : पेशव्यांची बखर; मवाइ., खं. ३ (संपा. जोग) ; पुणे, १९७३; पृ. ५४७–५४८. ३. हेरवाडकर, र. वि. : मब.; प्र. आ., पुणे, १९५७; पृ. ६९–७०, १७५–१७९.

**कृष्णाजी शामराव** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध] बखरकार. *भाऊसाहेबांच्या बखरी*चा कर्ता. ही बखर कृष्णाजी शामरावांच्या नावावर मोडते, परंतु तिचे कर्तृत्व संशयित आहे. *भाऊसाहेबांच्या बखरी*चे मूळ हस्तलिखित अजून उपलब्ध झालेले नाही. फक्त नकलाच उपलब्ध आहेत. त्यामुळे हिच्या मूळ लेखकाबद्दल वाद आहेत. ह्या बखरीचे संपादक का. ना. साने, ह्या बखरीचा कर्ता म्हणून कृष्णाजी शामरावांचे नाव घेतात. पण ह्या बखरीच्या आपल्या प्रास्ताविकात ते 'जुन्या बखरी कोणी, कधी व कोठे लिहिल्या वगैरे माहिती मिळावी तशी मिळत नाही' असे म्हणतात, आणि 'पृच्छक व निवेदक हेही विद्यमान की काल्पनिक असावेत ह्याविषयीही शंका घेण्यास जागा आहे' असे मत व्यक्त करतात. *भाऊसाहेबांच्या बखरी*च्या एका प्रतीत चिंतामणी गोविंद असा लेखकाच्या नावाचा उल्लेख येतो. *शिंदेशाहीच्या इतिहासाची साधने* ह्या ग्रंथाचे संपादक आनंदराव फाळके ह्यांच्या मते शिंद्यांच्या दरबारातील फडणीस 'चितो कृष्ण वळे' हाच ह्या बखरीचा लेखक असावा. ह्या मतास प्रा. शेजवलकर ह्यांनी दुजोरा दिला आहे. हा कर्ता शिंद्यांचा पक्षपाती असावा असे बखरीचा एकंदर थाट पाहून वाटते. परंतु निश्चित लेखक कोण हे ह्यावरून कळत नाही. ह्या बखरीच्या लेखकासंबंधी अद्याप निर्णय लागलेला नाही.

इ. स. १७५३ ते १७६१ या काळातील मराठ्यांच्या उत्तर हिंदुस्थानातील अनेक राजकीय घडामोडींचे सूक्ष्म चित्र बखरकाराने ह्या बखरीत रेखाटले आहे. बखरीचे सरळ दोन भाग पडतात. एक कुंभेरी प्रकरणी शिंदे-होळकरांचा बेबनाव झाल्यापासून दत्ताजी ह्यांच्या वीरमरणापर्यंत, तर दुसरा शिंदे-होळकरांच्या इच्छेविरुद्ध भाऊसाहेबाने अबदालीचे पारिपत्य करण्यास येणे व पानिपतच्या युद्धातील त्याचा दणदणीत पराभव. नजीबखान रोहिल्याच्या कुटिल कारस्थानांमुळे पानिपतावरचे हे भीषण शोकनाट्य कसे घडले ह्याची साद्यंत हकीकत म्हणजे *भाऊसाहेबांची बखर* होय.

बखरीत वर्णिलेल्या घटना बखरकाराने समक्ष पाहिलेल्या असाव्यात किंवा त्यांची खात्रीलायक माहिती त्याला समजलेली असली पाहिजे, अशा रीतीने ह्या ऐतिहासिक घटनांची विस्तृत हकीकत लिहिलेली दिसते. प्रस्तुत बखरकाराची निवेदनाची एक खास शैली आहे. भावपूर्ण रसाविष्कार आणि आवेशपूर्ण वक्तृत्व असे गुण ह्या शैलीचे वैशिष्ट्य दाखवतात. त्यामुळे निवेदन प्रत्ययकारी होते. बखरीत आढळणाऱ्या वाङ्मयीन गुणांमुळे केवळ जुन्या मराठी गद्याचा नमुना एवढेच तिचे स्वरूप राहिलेले नाही तर ही बखर मराठी सारस्वताचे बहुमोल असे एक लेणे झाली आहे. [ ⇨ ३. ]

द. ग. गोडसे

**रचना : मु.** – १. भाऊसाहेबांची बखर; र. का. : अंदाजे श. १६८४–८५ / इ. स. १७६२–६३; र. स्थ. : इंद्रप्रस्थ; संपा. साने, का. ना.; काइसं., क्र. १; पुणे, १८७९. २. भाऊसाहेबांची बखर; जोशी, शं. ना.; सोलापूर, १९५९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, भीमराव : प्रस्ता., भाऊसाहेबांची बखर, पुणे, १९६५. २. पंगु. द. सी. : भाऊसाहेबांची बखर; सह्याद्रि, डिसें. १९४८; पृ. ७०७. ३. वैतुले, माणिक के. : भाऊसाहेबांच्या बखरीतून व्यक्त होणारे भारतीयांचे स्वभावविशेष; युगवाणी, मे १९६०; पृ. ५८–६४. ४. सामंत, बा. ग. : भाऊसाहेबांची बखर म्हणजे मराठी गद्याचे एक बहुमोल लेणे; प्रसाद, दी. अं., १९५३; पृ. ८३.

**० कृष्णात्मज–१** – पहा **वासुदेव पंडित.**

**० कृष्णात्मज–२** – पहा **कृष्णसुत–१.**

**कृष्णात्मज–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अभंग व पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**कृष्णानंद** [इ. स. चे १७ वे शतक] कवी. रंगनाथस्वामी मोगरेकरांचे गुरू. हे श्रीशंकराचार्य-परंपरेतील होते. आनंदमूर्तींच्या ब्रह्मनाळ येथील मठातून जी परंपरा समजली ती अशी : श्रीशंकराचार्य > वासुदेवानंद > परमानंद > वैकुंठानंद > कृष्णानंद > रंगनाथस्वामी > काशीराजस्वामी > रघुनाथस्वामी > आनंदमूर्ति (रासं., खं. २, पृ. ६१). ह्यांनी रचलेली काही पदे सवामं. हस्तलिखित बाडात आढळतात (हस्त. सू., खं. १, २).

**कृष्णानंद निमग्न** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. हे हुबेहूब मोरोपंतांसारखी आर्यारचना करीत. ह्यांचे हे कौशल्य त्यांच्या *राधाविलास* ग्रंथात पाहण्यास सापडते. *काव्यसंग्रहा*तून प्रस्तुत काव्य मुद्रित झाले आहे (अकलकामा., भा. २, पृ. ५१–५९). ह्याच कवीचे *कृष्णचरित्र* वि. ल. भावे संग्रहात व पदपदांतरे सवामं. बाडात आढळतात (संककासू., पृ. २२).

**कृष्णानंद निरंजन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**कृष्णारण्य** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**कृष्णावधूत** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. ह्यांची गुरुपरंपरा दत्तसंप्रदायातली. ती ग्रंथाच्या शेवटी दिलेली आढळते. ही परंपरा अशी : दत्तात्रेय > पतंग अवधूत > बाल अवधूत > कृष्ण अवधूत. ह्यांची वंशपरंपराही हीच. ह्यांनी रचलेला *गुरुगोप्यप्रकथासार* हा ग्रंथ योग आणि वेदान्ततत्त्वज्ञान सांगणारा असून गुरूचा उपदेश कवी आपल्या मुखाने बोलत आहे, असे ग्रंथाचे स्वरूप आहे (तंसम. हस्त. यादी., क्र. १, बा. ४९२).

**रचना : अमु.** – गुरुगोप्यप्रकाश; प्रकरणे ८; ओ. सं. ४३५; समाप्ती श. १७०३ / इ. स. १७८१; आषाढ शु. ७, गुरुवारी संपूर्ण.

**कृष्णा वाघ्या** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.**– सामानगडचा आठवा पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. २३८.

**केदार** [का. अनु.] कवी. गुरू : रुद्रनाथ. ह्यांच्या नावावरील अभंगरचनेचा निर्देश आढळतो (संककासू., पृ. १२३).

**० केनेडी, व्हान्स रॉबर्ट** – पहा **रॉबर्ट व्हान्स केनेडी.**

**केमा कृष्णदास** [का. अनु.] कवी. ह्या कवीची माहिती महानुभावीय ग्रंथांतून मिळते. ह्यांच्या *स्यमंतक-वर्णन* (ओ. १८२–८९९) ह्या ग्रंथाच्या शेवटी 'ग्रंथु संपुर्ण १४५४ नंदननाम संवत्सरे' असे कवीने म्हटले आहे. परंतु हा उल्लेख प्रतलेखनाचा की ग्रंथसमाप्तीचा ते नीटसे लक्षात येत नाही. *स्मृतिस्थळां*त नामदेव-दामोदरपंडितांच्या भेटीसंबंधी जी 'स्मृति' सांगितली आहे तेथे ह्या नामदेवाबरोबर केमदेव नावाचा कवी होता असा उल्लेख आढळतो. हा केमदेव म्हणजेच केमा कृष्णदास असेल तर त्याचा काळ श. १२३५ / इ. स. १३१३ च्या आसपास येतो. दामोदरपंडितांच्या भेटीनंतर त्याने महानुभाव पंथाचा स्वीकार केल्याने त्याचे *स्यमंतक-वर्णन* हे काव्य त्या पंथात मान्यता पावले असावे, अशी ह्या कवीची माहिती डॉ. कोलते देतात (*रुक्मिणीस्वयंवर*, द्वि. आ.; पृ. ४५–४६).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : काही मराठी सारस्वत उपासक; विसंमंवा., १९७१; पृ. १३२.

**केशव–१ / ० केशवबुवा** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] एकनाथचरित्रकार. गुरुपरंपरा : जनार्दन > एकनाथ > राघव > माधव > राघव > त्र्यंबक > केशव. राघव–१ हे एकनाथांचे पुत्र हरिपंडित ह्यांचे धाकटे चिरंजीव. माधवपुत्र दुसऱ्या राघवांचे शिष्य त्र्यंबक हे केशव ह्यांचे वडील त्याचप्रमाणे गुरू होत. म्हणजे केशवांच्या वडिलांपर्यंत पोहोचलेली बोधपरंपरा ही एकनाथांच्या वंशजांच्या द्वारा आलेली आहे. केशव ह्यांनी ही परंपरा चरित्रग्रंथाच्या समाप्तीच्या १२ ओव्यांत दिलेली आहे. छापील ग्रंथात ह्या ओव्या गाळल्या गेल्या आहेत, परंतु हस्तलिखित प्रतीत त्या आढळतात. ह्याच ओव्यांत देवगिरीवरील सूर्यकुंडात आपण स्नानासाठी गेलो असता एकनाथ प्रत्यक्ष प्रकट होऊन त्यांनी आपणास 'अभेदभावार्था'चा बोध केला, असे ते सांगतात.

हे *एकनाथचरित्र* श. १६८२ (इ. स. १७६०) च्या आश्विन कृष्ण त्रयोदशीस लिहून पूर्ण झाले, अशी नोंद रा. चिं. ढेरे, शं. श्री. देव व गो. का. चांदोरकर ह्यांनी केली आहे. म. रा. जोशी ह्यांना हा काळ नकल प्रतीचा असावा असे वाटते. कारण एकनाथांचे वंशज गणपतिबुवा नाथवाले (पैठण) ह्यांच्याजवळील *एकनाथचरित्रा*च्या प्रतीवर श. १६४२ / इ. स. १७२० हा रचनाशक दिला असून ग्रंथ नाशिकजवळील टाकळी मुक्कामी लिहिला गेला असे म्हटले आहे. ह्या रचनाकालाला *महाराष्ट्र-सारस्वत-पुरवणी*कार डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांची मान्यता आहे.

ह्या चरित्रात परंपरेने चालत आलेले एकनाथांचे समग्र जीवनवृत्त, बहुतांशी कालक्रम सांभाळून, दिलेले आहे. अधूनमधून त्यांच्या जीवनातील चमत्कार-कथांचाही समावेश लेखक करतो. हे चरित्र पुराणपद्धतीने लिहिले असले तरी नाथांच्या जीवनाचा बहुतांशी संपूर्ण चित्रपट त्यातील घटना-प्रसंगांमुळे नजरेसमोर उभा राहतो. पुढील सर्व नाथ-चरित्रकारांनी ह्या चरित्राचाच आधार घेतला आहे.

**रचना : मु.**– श्री एकनाथचरित्र; अ. सं. ३१; ह्यांपैकी पहिला अध्याय श्लोकबद्ध, श्लो. सं. २९; अ. २–३१, ओ. सं. २६१६; र. का. : श. १६८२, आश्विन कृ. १३; संपा. रानडे, वि. वि.; पुणे, १८८३; तुकाराम तात्या संपादित एकनाथ गाथ्यात समाविष्ट; मुंबई, १९०३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, म. रा. : काही मराठी सारस्वत उपासक : विसंमंवा., १९७१; पृ. १४५–१४६. २. ढेरे, रा. चिं. : जुने चरित्रग्रंथ : महाराष्ट्र महोदयाचा अग्रदूत : विविधा.; पुणे, १९६७; पृ. १२०–१२२.

**केशव–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – मोक्षधर्मद्वितीयसहस्र; वेदान्तग्रंथ; श्लोकबद्ध; ग्रं. सं. २२१; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**केशव–३ / ० केशवबाबा उंब्रजकर** (इ.स. चे १८ वे शतक, आरंभकाल) पदकार. रामदाससंप्रदायी. श्रीसमर्थांच्या कल्याणांचे हे शिष्य. उंब्रज (जि. सातारा) येथे ह्यांचा मठ होता. येथे ह्यांच्या हातची एक *दासबोधा*ची प्रत (शके १६२४ आषाढ वद्य ९) सापडते. ह्यांची समाधी उंब्रज येथे कृष्णाकाठी आहे. भाद्रपद वद्य ३० अशी निर्वाणाची तिथी दिली आहे. शक उपलब्ध नाही.

ह्यांची दोन पदे मुद्रित (रासं., खं. १, पृ. १०४–५). ती कवीचा अध्यात्मविषयक अनुभव व्यक्त करतात. ह्यांची 'कल्याण तो स्वामी प्राप्त होये कैसा। जरी घडे ऐसा भक्तीभाव।' अशी ११ कडव्यांची कल्याणस्वामींवरची एक आरतीही उपलब्ध आहे (मु. : श्रीसांप्रविवि., खं. २, लेखांक ७३, पृ. ९५–९६).

**केशव–४** [का. अनु.] आरतीकार. दोन 'सद्गुरुपर' व एक 'गोपतीची' अशा तीन आरत्या मुद्रित (मआ., पृ. ३२१, ३५५, ४३१).

**केशव–५** [का. अनु.] पदकार. स्वतःला हरिसुत म्हणवितात.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**केशव–६** [का. अनु.] पदकार. कोण्या केशवकवीची चार रामपर पदे *पदगुच्छा*तील (तंजावर, १९६९) रामपर पदांच्या भागात मुद्रित झाली आहेत.

**केशव–७** [का. अनु.] पदकार. ह्यांची 'नथ', 'नांगर' 'प्रेमदोरी', 'भोजन', 'रंगारीपद' अशी आध्यात्मिक परिभाषेतील पदे *लोकगीत* संग्रहात (तंजावर, १९५०) मुद्रित झाली आहेत. "वैराग्ये पापड भजन भाजी ॥ निष्काम लोणचें सेविले आजी । स्वबोध भात स्वानंद कढि ॥ जेविता तव तव गोडि ॥" (भोजन). आध्यात्मिक रूपकांच्या धाग्यांतून अध्यात्मज्ञानाचा प्रसार करण्याची रूढ पद्धत कवीने योजिली आहे.

**केशव–८** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] टीकाग्रंथकार. गुरुपरंपरा : ज्ञानेश्वर > सोपान > मुक्ताबाई > चांगदेव > केशव. ह्यांच्या सटीक *रामगीते*ची पोथी मराठी संशोधन मंडळ, मुंबई येथे उपलब्ध आहे. एकूण ओव्या २०८३ असून अध्याय क्रमांक दिलेले नाहीत. प्र. ले. का. : श. १७५३ / इ. स. १८३० असा दिला आहे (हवना., पृ. २३).

**केशव चिद्घन** [का. अनु.] कवी. ह्यांच्या नावावरील सुमारे २५० स्फुट श्लोक श्रीसमर्थवाग्देवतामंदिरातील बाडात सापडतात (बा. १५०९; हस्त. सू., खं. २).

**केशवचैतन्य** [अंदाजे इ. स. १५२४ – समा. श. १४९३, वैशाख व. १२ / २० मे १५७१] कवी. चैतन्यपरंपरेतील. पूर्वाश्रमीचे नाव विश्वनाथ. उपनाव राजर्षी. गुरु : राघवचैतन्य (समा. : आळंद, जि. गुलबर्गा, कर्नाटक). ह्यांचा पिता नरसिंह आदिलशाही सैन्याच्या त्रासास कंटाळून तिनवेलीहून पुणेवाडीस (पुणे) येऊन राहिला. तेथेच इ. स. १५२४ / २५ च्या सुमारास केशवचैतन्यांचा जन्म झाला. इ. स. १५४२ त विश्वनाथांना लोहगड येथील त्यांच्या वंशाकडे असलेली हवालदारी परत मिळाली व पुण्याहून हे तेथे गेले. पुढे एकदा निजामशहा व अदिलशहा ह्यांच्या तंट्यात बाजू अंगावर आल्याने ह्यांनी तेथून पळ काढला व हे जुन्नरजवळच्या ओतुर गावी आले. येथेच राघवचैतन्य ह्या सत्पुरुषाशी ह्यांची गाठ पडली. हे त्यांची सेवा करू लागले व ह्यांना विरक्ती प्राप्त झाली. पुढे राघवचैतन्यांकडून ह्यांनी संन्यासदीक्षा घेतली. राघवचैतन्यांनी ह्यांचे नाव केशवचैतन्य असे ठेवले. दत्तात्रेय > राघवचैतन्य > केशवचैतन्य अशी ही परंपरा आहे. उपदेश घेतल्यानंतर गुरूसमवेत ह्यांनी तीर्थयात्रा केली. आळंद येथे दीड वर्ष हे गुरूंच्या सांनिध्यात राहिले. मग ओतुरास येऊन ह्यांनी मठस्थापना केली. ह्यांची समाधी ओतुरासच आहे.

तुकारामांनी स्वतः सांगितलेली व बहिणाबाईने दिलेली तुकारामांची गुरुपरंपरा पाहिली तर केशवचैतन्य तुकारामांचे आजेगुरू ठरतात. ही परंपरा अशी : ज्ञानेश्वर > सच्चिदानंद > विश्वंभर > राघवचैतन्य > बाळाजीचैतन्य > तुकाराम. बाबाजी हे केशवचैतन्यांचे ब्रह्मचारी शिष्य. राघवचैतन्यांच्या संप्रदायापैकी मान्यहाळी (जि. गुलबर्गा, कर्नाटक) मठ केशवचैतन्यांनी स्थापला व ह्या मठाची व्यवस्था पाहण्याचे काम केशवचैतन्यांनी बाबाजीकडे सोपविले, अशी माहिती वा. सी. बेंद्रेकृत *संततुकाराम चरित्रा*त दिलेली आहे (पृ. ६८–६९).

केशवचैतन्यांनी *भक्तिप्रकाश, वैकुंठपद, वासनामय देह, गीताभागवतसार* आणि *परमार्थविचार* असे पाच ग्रंथ रचले. ह्यांची काही पदे धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिर संग्रहात उपलब्ध आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. थावरे, दा. का. : तुकारामांच्या सद्गुरूची कथा : तुकोबाचा चैतन्य सांप्रदाय; महाद्वार, एप्रिल–मे १९६७; पृ. १७. २. बेंद्रे, वा. सी. : तुकाराम महाराज ह्यांची गुरुपरंपरा; मुंबई, १९६०. ३. बेंद्रे, वा. सी. : संत तुकाराम; दिल्ली, १९६३; पृ. ६८. ४. लाड, पु. मं. : तुकारामाला गुरूपदेश; मसंप., जाने. १९५८; पृ. १–३२.

**केशव जयराम** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी.

**रचना : मु.** – भक्तिरहस्य (र. श. १७७९ / इ. स. १८५७); सुरेश डोळके संग्रह; देशपांडे, अ. ना.; प्रामवाइ., पूर्वार्ध, भा. १, पृ. २८४–३०१).

**केशवदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम., हस्त. यादी, क्र. ३.

**केशवदाय तळेग्रामकर** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] महानुभाव कवी. पारमांडल्य आम्नायातील. डॉ. कोलते ह्यांच्या मते तळेग्रामकर केशवदायाने मूळ १८ ओव्यांचा नरेंद्रकविकृत *रुक्मिणीस्वयंवर* ग्रंथ स्वतःच्या रचनेची भर घालून २९३६ ओव्यांपर्यंत वाढविला (श. १६७७ / इ. स. १७५५ चा सुमार). प्रा. सुरेश डोळके ह्यांच्या मते हे समग्र काव्य नरेंद्रकवीच्याच हातचे आहे. तळेग्रामकर हा नक्कल प्रतीचा लेखक असावा.

प्रस्तुत २९३६ ओव्यांच्या *रुक्मिणीस्वयंवर* काव्याची संपादित प्रतही प्रा. डोळके ह्यांनी प्रसिद्ध केली आहे (नागपूर, १९७१). काव्याच्या समाप्तिलेखात "विद्यानगरीहुनि ग्रंथ आणिला : तळेग्रामकर केशवदायें प्रगट केला : म्हणौनि या देशासि आला : हा नरींद्द : ॥ १ ॥ शके १६७७ ॥ युवा नाम संवत्सरे पुस मासे कृष्णपक्षे वद्य तृतिया सोमदिने प्रथम प्रहरे श्रीरुक्मिणीस्वयेंवर नरींद्द संपुर्ण समाप्ति : ॥" ह्याप्रमाणे निर्देश केलेला आढळतो. प्रा. डोळके म्हणतात की, श. १६७७ पूर्वी हे काव्य संपूर्ण स्वरूपात कोणाला ठाऊक नव्हते. काव्यगुणांचा विचार करता ते नरेंद्राचेच असावे असे वाटते.

पंथीय साहित्याचा इतिहास पाहता मात्र असे दिसते की, नरेंद्रकृत *रुक्मिणी-स्वयंवरा*च्या अनेक प्रतींमध्ये ८७९ ओव्याच आढळतात. प्रस्तुत काव्य १८०० ओव्यांचे होते असे परंपरा सांगते. *स्मृतिस्थळ*कर्ता व *टीप*कार ह्यांच्यात ह्याविषयी एकवाक्यता आहे. मग २९३६ ओव्यांच्या एकुलत्या एका प्रतीतील ह्या जास्तीच्या ओव्या कुठून आल्या? त्या प्रक्षिप्त की नरेंद्रांनी स्वतःच वाढविलेल्या? खुद्द कवीनेच ग्रंथ वाढविण्याचा उल्लेख कोणत्याही *अन्वयस्थळात, वृद्धाचारात* किंवा *स्मृतिस्थळा*तही नाही. त्यावरून निदान आज तरी हा ग्रंथविस्तार कवीनेच केला असावा असे मानता येत नाही. अर्थात ही वाढ जर नरेंद्राची नाही तर ती इतर कोणाची तरी म्हणजे प्रक्षिप्त असावी. १८०० ते २९३६ ओव्यांत जी पुनरुक्ती व जो ढिसाळपणा आढळतो त्यावरून ह्या ओव्या प्रक्षिप्त असल्या पाहिजेत असे डॉ. कोलते ह्यांना वाटते (*रुक्मिणीस्वयंवर*, प्रस्ता.; पृ. ११–१३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कोलते, वि. भि. : नरेंद्रकविकृत रुक्मिणी-स्वयंवर, प्रस्ता.; द्वि. आ.; मलकापूर, पृ. १०–१५. २. डोळके, ग. (सुरेश) म. : नरींद्रविरचित रुक्मिणी-स्वयंवर, प्रस्ता.; नागपूर, १९७१; पृ. १–७२.

**केशव दैवज्ञ** [का. अनु] कवी. केशवकृत *ताजकपद्धति / जातकपद्धति* (श्लो. २५), असे एक हस्तलिखित श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील बाडात आहे (बा. ८९४, हस्त. सू., खं. २).

० **केशवनाथ** – पहा **केशवस्वामी–३.**

० **केशव पंडित** – पहा **केशिराजबास.**

**केशव प्रवरासंगमकर** [का. अनु.] पदकार. हे शिंद्यांचे सेनापती होते. ह्यांची भजनाची बाडे उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४३).

**केशव बाजी परचुरेकर चोंडेकर** [अंदाजे श. १७६० / इ. स. १८३८] भाषांतरकार. ह्याने भर्तृहरीच्या *नीतिशतका*चा गद्यात अनुवाद केला आहे. ग्रंथसमाप्ती करताना लेखक लिहितो : "शके १७६० ॥ विलंबी नाम संवत्सरे याचे ठायीं केशव बाजी परचुरेकर चोंडेकरूं यांणीं याजवर प्राकृत अर्थ सर्व ग्रहस्त लोकांस ज्ञान होण्याकरितां मुंबई मुक्कामी लिहिला ॥"

**रचना : अमु.** – भर्तृहरीचें नीतिशतक (गद्य); मसंमं., हवना., पृ. २३, २४.

**० केशवबाबा उंब्रजकर** – पहा **केशव–३.**

**० केशवबुवा** – पहा **केशव–१.**

**केशव ब्रह्मानंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं., हस्त. सू., खं. २.

**केशवयोगी** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – सद्गुरूची आरती; मआ., पृ. ३६८.

**केशवराज–१** [अंदाजे श. १४५० / इ. स. १५२८] कवी. हे शिवकल्याणांच्या गुरुपरंपरेतील असावेत. शिवकल्याणांनी त्यांच्या *अनुभवामृता*वरील टीकेत आपली गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे दिली आहे : विश्वेश्वर > केशवराज > हरिदास > परमानंद > नित्यानंद > शिवकल्याण (श. १५५७). तेच हे केशवराज असल्यास ह्यांचा काळ श. १४५० चा सुमार (संककासू., पृ. २३).

**रचना : अमु.** – रामायण; वि. ल. भावे संग्रह.

**केशवराज–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – १. दोन रामपर पदे; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ३७. २. दोन कूट पदे; फुगडी व विटीदांडु; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ५९–६०, ७१–७२. **अमु.** – बोधपर, भगवत्पर, भक्तिपर, वेदान्तपर व हिंदी पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**केशवराज–३** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – 'रामाची आरती'; मआ., पृ. ३३६.

**० केशवराज सूरी** – पहा **केशिराजबास.**

**केशवराव / ० मोघमकवी** [का. अनु.] कवी. ह्यांच्या अंदाजे ६०० श्लोकांचे एक बाड समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात आहे. त्यात गुरुभक्ती, ज्ञानबोध, मोक्षवर्म असे विषय आलेले दिसतात. अनेकदा आपला उल्लेख हे 'मोघमकवी' असा करतात (सवामं. बा., क्र. ९८६, हस्त. सू., खं. २).

**केशवसंत** [का. अनु.] शाहीर, लावणीकार. ह्यांची एक लावणी *अंधारातील लावण्या* (पुणे, १९५६) संग्रहात प्रसिद्ध (पृ. २२०–२२३).

**० केशवसुत–१** – पहा **कृष्ण नारायणात्मज.**

**केशवसुत–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – 'नवल पद'; आध्यात्मिक परिभाषेतील एक कूटपद; 'लोकगीत' संग्रह, तंजावर, १९५०, पृ. ४३.

**केशवसुत शाहाजी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – शिवपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० केशवस्वामी–१** – पहा **केशवस्वामी भागानगरकर.**

**केशवस्वामी–२** [अंदाजे इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध] कवी. ह्यांनी आपली गुरुपरंपरा : सिद्धेश्वर > नारायण > केशव अशी दिलेली आहे. केशवांनी ५५० श्लोकांचे एक 'गुरुस्तुतिपर' प्रकरण रचले आहे. ह्यांचे गुरू नारायण हेही काव्यरचना करीत असत (मसा., आ. ५, पृ. ४१३–४१४).

**केशवस्वामी–३ / ० केशवनाथ** / [अंदाजे इ. स. १६९८] कवी. गुरू: मारकीनाथ. ह्यांचे *गर्भगीता* नावाचे (र. श. १६२० / इ. स. १६९८) लहानसे प्रकरण प्रसिद्ध आहे (मसा., आ. ५, पृ. ३४२). ह्यांच्या नावावरील *गुरुगीते*चा (र. श. १६२३, भाद्रपद व. १० / इ. स. १७०१) निर्देश गो. का. चांदोरकर ह्यांच्या *संतकविकाव्यसूची*त केलेला आढळतो (पृ. २३).

**केशवस्वामी (भागानगरकर) / ० केशवस्वामी–१** [अंदाजे श. १५३० / इ. स. १६०८ – समा. श. १६०४ / इ. स. १६८२] संतकवी. प्रख्यात रामदास पंचायतनातील एक. उपनाव भागानगरकर. ह्यांच्या वडिलांचे नाव आत्मारामपंत. आईचे नाव गंगाबाई. घराणे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणाचे. आत्मारामपंत हे मूळचे कल्याणीचे (सध्याच्या कर्नाटक राज्यातील नीलंग्याजवळील). ह्यांना उतारवयापर्यंत संतान नव्हते. शेवटी ईशकृपेने केशव नावाचा मुलगा झाला. पण पाच वर्षेपर्यंत त्याला बोलता येत नव्हते. पुढे श्रीमद् आचार्यांच्या कृपेने तो बोलू लागला असे *भक्तमंजरीमाला*कार राजाराम प्रासादी लिहितात : "शंकराचार्यें रूपें येउनी घरा । बोलिले तया केशवकुमारा । मस्तकीं ठेवूनी वरद करा । कर्णी मंत्रा उपदेशिलासे ॥ २५.२७ ॥" भागानगरच्याच तानाशा नावाच्या एका श्रीमान जमीनदाराचे हे कारभारी होते.

केशवस्वामींचे खरे गुरू कोण हा आजवरचा एक वादाचा मुद्दा होता. खुद्द केशवस्वामींची पदे पाहिल्यास त्यात पूर्णानंद, सहजानंद, नित्यानंद अशा आनंदसंप्रदायातील तिघांचा उल्लेख भिन्न ठिकाणी गुरू म्हणून येतो. आत्मारामस्वामींच्या *दासविश्रामधामा*त हे मुकुंदराजाच्या परंपरेतील असल्याचे म्हटले आहे (८७.१४). ल. रा. पांगारकर व *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांच्या मते केशवस्वामींनी काशिराज महाराजांचा उपदेश घेतला होता. प्रत्यक्ष पांडुरंगच श्रीमद् आचार्यांच्या रूपाने मंत्रोपदेश करते झाले म्हणून केशवांचे गुरू श्रीपांडुरंग होत, असे न. स. जोशी (खरशीकरशास्त्री) ह्यांचे मत आहे. डॉ. पंडित आवळीकर ह्यांनी मुडलगी मठातील जी परंपरा प्रकाशात आणली आहे तिच्या आधारे केशवस्वामींचे गुरू रंगबोधच असे सांगितले आहे (*मुडलगीचे स्वामी*, पुणे, १९७१, पृ. ४४). रंगबोधांचे शिष्य भागानगरकर केशवस्वामीच होत ह्याला पुरावा केशवस्वामींच्या संतराज नामक शिष्याच्या *चिंतानिवारण* (मु. : *काव्यसंग्रह*, क्र. ४६; मुंबई, १९०३) ग्रंथात सापडतो असे रा. चिं. ढेरे म्हणतात. ह्या ग्रंथात संतराजाने दिलेली आपली गुरुपरंपरा (५. २६-३४) ही मुडलगी मठाच्या मुकुंदराज-परंपरेशी जुळणारी आहे (*इंद्रायणी*, जाने. १९६३, पृ. ६३–६५). त्यावरून केशवस्वामींची गुरुपरंपरा ह्याप्रमाणे सांगता येते : हरिनाथ > रघुनाथ (रामचंद्रमुनि) > मुकुंदराज > नृसिंहभारती > जगन्नाथ > सहजबोध > रंगबोध > केशव. मुडलगीच्या स्वामींची चरित्रे वर्णन करणाऱ्या गुरुनाथकृत *देशिकचरित्र* ग्रंथातील मंगलाचरणामधील एका ओवीत (१.१९) 'रंगबोधाचा निश्चित । छात्र अद्भुत केशवस्वामी ॥' असे म्हटलेले आहे.

केशवस्वामी गृहस्थाश्रमी असूनही विरक्त, निःस्पृह आणि अंतर्निष्ठ होते. त्यांनी मुकुंदराजांच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसाराचे कार्य, मराठवाड्यात खूपच प्रभावीपणे केले. ह्यांचा शिष्यसंप्रदाय रंगारी लोकांत विशेष होता. ते श. १६०४ / इ. १६८२ मध्ये समाधिस्थ झाले असे *भक्तमंजरीमाला*कार म्हणतात, पण ह्यांचे शिष्य संतराज हे त्यांचा समाधिशक १६०८ (इ. स. १६८६) असा देतात. केशवस्वामींची समाधी हैद्राबाद येथे (भागानगरास, रंग्रेज गुड्यात मुसा नदीच्या काठी एका शेतात आहे.

केशवस्वामींची कविता प्रासादिक आहे. कीर्तन व भजन ह्यांकरिता त्यांनी बरीच पदे रचली. त्यांची पदे भक्तिरसपूर्ण आहेत. त्यांत देवाविषयी प्रेम, विरह, दर्शनाची आर्तता आणि ज्ञानोत्तर भक्तीचा प्रेमभाव दिसून येतो. अपूर्व रसवत्ता आणि परतत्त्वस्पर्श हे त्यांच्या रचनेचे वैशिष्ट्य आहे. ही पदे अनेक रागरागिण्यांत गाता येतात. ह्यांनी वेदान्त विषयावर श्लोकरचना केली आहे. ह्यांनी हिंदी भाषेतही काही रचना केली आहे. केशवस्वामींच्या प्रसिद्ध झालेल्या कवितेपेक्षा अधिक असा अप्रकाशित कवितेचा फार मोठा संग्रह धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिरात आहे. [⇨ ३.]

**रचना : मु.** – १. श्रीकेशवस्वामीकृत अभंग, अंक १ ला; अभंग ४६; पुणे, १८८८. २. श्रीकेशवस्वामीकृत अभंग व पदे (१७७ + ७२); मुंबई, १८८९. ३. श्रीकेशवस्वामींची कविता (नव्याने उपलब्ध झालेली ८४७ पदे, ४५ सवाया व २१८ श्लोक); संपा. जोशी, न. स., ऊर्फ खरशीकरशास्त्री; हैद्राबाद, १९४१

४. श्रीकेशवस्वामीचे श्लोक (५५०; व ५ पदे); बेळगाव, १९००. ५. पदे; ४३८ मराठी व २८ हिंदी; पदसंग्रह, भा. १; संपा. ओक, बा. दा.; मुंबई, १८९४; पृ. १४३-२९०. ६. हिंदी पदे; सं. ४३; हिंमसंदे.; संपा. शर्मा, विनयमोहन; पटणा, १९५७; पृ. ३६१-३७४. **अमु.** – १. आत्म्याचें अनुचिंतन; अपूर्ण; गद्यपद्य; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. २. २. एकादशी चरित्र (ओवीबद्ध) रचल्याचा प्रवाद आहे. ३. पदपदांतरे व श्लोक; सवामं.; भाइसंमं.; पंढरपूर श्रीधरस्वामींचा मठ; विसंमं. व इतरत्र.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ओक, दा. के. : रामदास पंचायतनातील केशवस्वामी भागानगरकर; सत्कार्योत्तेजक सभा सुवर्णमहोत्सव ग्रंथ; धुळे, १९४३; पृ. २४७–२६७. २. ढेरे, रा. चिं. : मुकुंदराज-संप्रदायी केशवस्वामी; इंद्रायणी, जाने. १९६३; पृ. ६३–६५. ३. राजाराम प्रासादी : भक्तमंजरीमाला; संपा. देव, शं. श्री.; खं. १, पृ. २४०–२६०.

**० केशवाचा नामा** – पहा **नामदेव.**

**० केशवाचार्य–१** – पहा **केशिराजबास.**

**केशवाचार्य–२** [अंदाजे श. १३७० / इ. स. १४४८] बखरकार. *महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर* हिच्यामधील प्रकरण दोन व तीन ह्यांचा कर्ता. ही बखर म्हणजे एक सलग ग्रंथ नसून अनेक गद्यपद्य प्रकरणांचा समाहार आहे. गद्य, पद्य, निवाडे, हकीकती, वंशावळी इत्यादी अनेक प्रकार त्यांत आहेत. एकूण सहा प्रकरणे असून ती स्वतंत्रपणे वेगळी लिहिली जाऊन मग एकत्र गुंफली गेली. अर्थात ती ती प्रकरणे रचल्याचे वेगवेगळे काळही दिलेले आहेत. ह्या सर्वांचे एकत्रीकरण दोनअडीचशे वर्षांपूर्वी झाले असावे. ह्या ग्रंथातील सर्वांत जुना भाग म्हणजे दुसरे प्रकरण होय. ते श. १३७० (इ. स. १४४८) मध्ये लिहिले. केशवाचार्य हा ह्या बखरीच्या अनेक लेखकांपैकी एक व कालदृष्ट्या सर्वांत प्राचीन आहे.

केशवाचार्यरचित प्रकरण दुसरे '(राज-) वंशावळी' हे असून ते श. १३७० (इ. स. १४४८) मध्ये रचले गेले असे समाप्तिकालावरून दिसते. प्रकरण तीनमध्ये निवाडे व हकीकती असून दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटी 'ह्या प्रतीवर तेहि प्रत चढेल' असा तिसऱ्यासंबंधीचा उल्लेख येतो. तेव्हा तिसऱ्या प्रकरणाचा कर्ता केशवाचार्य व काल श. १३७० (इ. स. १४४८) हे ओघानेच स्पष्ट होते. प्रकरण पहिले व प्रकरण चौथे ('श्रीचिंतामणि-कौस्तुभपुराण'; ओवीबद्ध; अध्याय संख्या ४) ह्यांचा कर्ता भगवान दत्त (र. का. : श. १५१६ / इ. स. १५९४ चा सुमार); प्रकरण ५ चा कर्ता अज्ञात (र. का. : श. १४६० / इ. स. १५३८ चा सुमार); प्रकरण ६ चे कर्ते आबाजी नायक व रघुनाथपंत कावळे (र. का. : श. १४०० / इ. स. १४७८). भगवान दत्ताने प्रकरण २ व ३ ह्या गद्य प्रकरणांना प्रकरण १ हे पद्य प्रकरण जोडले. तसेच प्रकरण ५ व ६ ह्यांना प्रकरण ४ जोडून दोन स्वतंत्र बखरी तयार केल्या. नंतरच्या एका संहिताकारास पहिली बखर दुसरीचा धागा चालविणारी असे वाटून त्याने ह्या एकत्र जोडल्या.

राजवाड्यांनी छापिलेल्या ह्या बखरीची नक्कल प्रत श. १७४१ (इ. स. १८९८) 'प्रमाथिनाम संवत्सरे माहे वैशाख शुद्ध प्रतिपदा रविवासरे' ह्या दिवशीची असून हस्ताक्षर वालजी पाटील, वसई ह्यांचे आहे. माहीम प्रांताचा इतिहास ती सांगते म्हणून *महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर* असे अन्वर्थक नाव राजवाड्यांनी तिला दिले. कर्त्याचे नाव देताना 'केशवाचार्यादि' असे ते म्हणतात.

हिच्यामधील सर्वांत जुन्या प्रकरणाचे लेखक केशवाचार्य म्हणतात की, आपणास मालाडचा देसला नायकोराव ह्याने सन्मानाने बोलावून हे वंशपद्धतीचे कर्म ऊर्फ *महिकावतीची बखर* लिहवून घेतली. नायकोरावाने कुळस्वामिनीच्या आदेशाप्रमाणे सर्व ज्ञातीच्या लोकांस एकत्र जमवून महाराष्ट्रधर्माचे त्यांच्या हातून रक्षण व्हावे म्हणून प्रस्तुत बखरीच्या द्वारे वंशपद्धतीचे कथन करून मालाड ऊर्फ म्हालजापूर येथील देवळात त्या सर्वांना महाराष्ट्रधर्म सांगितला.

माहीम प्रांताचा म्हणजेच ठाणे-कोकणचा अज्ञात इतिहास ह्या बखरीने पुढे आणला हे तिचे वैशिष्ट्य म्हणता येईल. श. १०६० (इ. स. ११३८) मधील बिंबराजे, नागरशाही राजे, बिंबदेवादी यादव राजे, नायते राजे, दिल्लीचे मलिक, अमदाबादचे मलिक व फिरंगी अशा सात राजवटींचा इतिहास बखरीत निवेदन केला आहे. तिच्यातले कालनिर्देश हे काटेकोरपणाने केलेले दिसतात. म्हणून इतिहासदृष्ट्या ही बखर महत्त्वाची ठरली आहे.

कालदृष्ट्या जुनी व सर्वांत पहिली म्हणून ह्या बखरीचा विचार केला तर हिच्यामधले गद्य हे पद्याइतकेच सरस आहे असे दिसते. वाङ्मयदृष्ट्या केशवाचार्यांची प्रकरणे स्मरणात राहतील अशी आहेत. बखरीतील स्थलवर्णने वाचत असता लेखकाच्या सूक्ष्म दृष्टीचा प्रत्यय येतो. उदा., वालुकेश्वर, महिकावती, दवण इत्यादींची वर्णने. आकर्षक निवेदन-कौशल्य हे बखरीचे एक वैशिष्ट्य ठरते. [ ⇨ ३.]

द. ग. गोडसे

**रचना : मु.** – महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर; प्रकरणे सहा; र. का. : अंदाजे श. १३७०–१६००; संपा. राजवाडे, वि. का. (विवेचक प्रस्तावनेसह; पृ. १–११०); पुणे, १९२४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हेरवाडकर, र. वि. : महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर; मब., प्र. आ., पुणे, १९५७; पृ. ८८–९३.

**केशा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**केशिराज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – मीराबाई चरित्र; ओ. सं. १०६; तंसम. हस्त. यादी, क्र. २.

**केशिराजदास–१ / ० अनंतपुत्र / ० अनंतसुतराम / ० दासानुदास–१ ० राम–१** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, प्रारंभकाल] कवी. हे तंजावर प्रांतातील कावेरीकाठचे राहणारे. *ज्ञानसंन्यास* ह्या टीकाग्रंथात कवीने "आनंत पुत्रें निजनाम रामें। या गौतमु गोत्र कुलोद्भवानें। या केशिराजें निजदासरंका। मुखप्रवाही वदवी तदाकां॥" अशी आपली माहिती दिली आहे. हा ग्रंथ म्हणजे शंकराचार्यांच्या *ज्ञानसंन्यास* ह्या ग्रंथावरील टीका होय. ह्यांनी आपली सर्व रचना श्रीरंगपट्टणाजवळील होसपूर, कुळघाण, देवपट्टण, मुक्ततीती ह्या चार गावी आळीपाळीने वास्तव्य करून श. १६२२–३१ / इ. स. १७००–१७०९ च्या सुमारास केली. ग्रंथांची हस्तलिखिते तंजावर सरस्वती महाल ग्रंथालयाच्या संग्रहात आहेत.

**रचना : अमु.** – १. कायाकाशी आख्यान (गुरुगीताश्लोकटीका); ओ. सं. ३५०; र. श. १६२३ / इ. स. १७०१; २. कायाजीवाचें लग्न; ग्रं. सं. ६००; र. श. १६२२ (वैशाख शु. ८) / इ. स. १७००; ३. गर्भगीता; ओ. सं. ५६४; र. श. १६२३; ४. नारदोपाख्यान; ओव्या व पदे; ५. विज्ञानामृत; ओ. सं. ४१२; र. श. १६२२; ६. श्रीशुकज्ञानबोधटीका; ओ. सं. ४००; र. श. १६३१ / इ. स. १७०९ (आश्विन व. तृतीया); ७. सिद्धानुभव; ओ. सं. २५५; र. श. १६२० / इ. स. १६९८; ८. ज्ञानसंन्यास; ओव्या १६३५; र. श. १६२६ / इ. स. १७०४; ९. ज्ञानसागर; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**केशिराजबास / ० केशव पंडित / केशवराज सूरी / ० केशवाचार्य–१ केशिराजमुनि / ० केसोबास** [अंदाजे इ. स. १३ वे शतक, उत्तरार्ध] महानुभाव ग्रंथकार. केशिराजबास किंवा केसोबास हे नागदेवाचार्यांच्या प्रमुख शिष्यांपैकी एक होते. विद्वान पंडित म्हणून पंथीयांत त्यांना फार मान होता. परंपरेने चालत आलेल्या माहितीवरून असे समजते की, हे पैठणजवळील वरखेडवाडे येथील चक्रपाणीभटांचे धाकटे चिरंजीव. गोपाळ

पंडित ऊर्फ आनेराज व्यास हे ह्यांचे थोरले बंधू. नागदेवाचार्यांजवळ पंथाची दीक्षा घेऊन ह्यांनी पंथस्वीकार केला.

महानुभाव पंथाचा स्वीकार करण्यासाठी ह्यांनी पत्नीचा व संसाराचा त्याग केला. ह्यांनी संसारात परत यावे म्हणून ह्यांच्या आप्तांनी ह्यांचे मन बरेच वळविले, पत्नीचीही त्यांच्याकडे पाठवणी केली. परंतु ह्यांचा वैराग्याचा निर्धार ढळला नाही. हे पाहून ह्यांच्या पत्नीनेही ह्यांना पंथात जाण्यास मान्यता दिली. केसोबासांचे कडकडीत वैराग्य पाहून 'माझा केशव शुकयोगींद्र कि गा :' (स्मृ. स्थ. १३) असे प्रशंसोद्गार भटोबासांनी काढले आहेत. आपले वैयक्तिक आचरण आणि पंथाचे निष्कलंकत्व अबाधित राखण्यासाठी हे फार काळजी घेत असत.

धर्मविषयावरील चर्चेची ह्यांना अत्यंत आवड होती. दामोदरपंडित व केसोबास ह्यांच्यामधील धर्मविषयक चर्चा आणि वादविवाद नेहमीच रंगत असत. ह्या चर्चेतल्या फोलपणाचे महत्त्व नागदेवाचार्यांनी एकदा ह्यांच्या लक्षात आणून दिले आणि 'श्रवण : मनन : नीदीध्यासन : जो कां संशयो तो अधिकरणाते पुसावा : कां आपणाहुनि ज्ञात तयाते पुसावा :' असा उपदेश केला. तेव्हापासून ह्यांचा शास्त्रचर्चेचा हव्यास कमी झाला. ह्यांचे संस्कृत भाषेवरील प्रभुत्व आणि तिच्यामध्ये रचना करण्याची आवड पाहून नागदेवाचार्यांनी वेळीच त्यांना सावध करून 'पंडिता : केशवदेया : तुमचा अस्मात्-कस्मात् मीं नेणें मज श्रीचक्रधरें निरूपिली मऱ्हाटी : तियाचि पुसा :' (स्मृ. ६६) असे सांगितले. तेव्हापासून केशिराजांनी संस्कृतात रचना करण्याचे सोडून दिले (स्मृ. स्थ. १५).

केसोबासांच्या निर्वाणशकासंबंधी अभ्यासकांचे एकमत नाही. *वृद्धाचार अन्वयस्थळात* हा शक १२३८ (इ. स. १३१६) दिल्याचे ह. ना. नेने ह्यांनी *दृष्टान्तपाठाच्या* प्रस्तावनेत नमूद केले आहे. पंथीय परंपरेतून उपलब्ध होणाऱ्या माहितीनुसार आपले जिवलग मित्र दामोदर पंडित ह्यांच्यावरील कोण्या दुष्टाचा पडलेला घाला केसोबासांनी त्यांना वाचविण्याकरता आपल्यावर ओढवून घेतल्याने ह्यांचे देहावसान झाले, असे सांगण्यात येते. दामोदरपंडितांचा सांप्रदायिक निर्वाणशक १२२८(इ. स. १३०६) मानला जातो. त्याअगोदर केसोबासांचे निधन झाले असे मानले तर हा श. १२२६ (इ. स. १३०४) मानावा लागेल. डॉ. कोलते ह्यांनी दामोदरपंडितांचा निर्वाणशक १२३८ मानला आहे म्हणून श. १२३६ चा सुमार हा केसोबासांचा निर्वाणकाळ ते मानतात (प्रस्ता., *मूर्तिप्रकाश*; नागपूर, १९६२; पृ. ३९-४०).

महानुभाव पंथाचे आचार-तत्त्वज्ञान आणि चक्रधरस्वामींचे शास्त्र केसोबासांना उत्तम रीतीने अवगत झालेले होते. आचार्यांच्या अनुमतीने ह्या शास्त्राची व्यवस्था लावण्यासाठी केसोबासांनी *सूत्रपाठ* व *दृष्टान्तपाठ* असे दोन ग्रंथ रचले व पुढे हे ग्रंथ संप्रदायात अत्यंत मान्यता पावले. पंथीय परंपरेनुसार ही रचना अंदाजे श. १२०२-१२०८ / इ. स. १२८०-१२८६ च्या सुमाराची आहे. *सूत्रपाठात* श्रीचक्रधरांची वचने गोविलेली असून त्याची ११ प्रकरणे आहेत. म्हाइंभट्टांच्या *लीळाचरित्रा*तून सर्वज्ञांची सर्व तात्त्विक वचने एकत्र करून त्यांचा लक्षण, आचार व विचार ह्याप्रमाणे त्रिविध *सूत्रपाठ* केसोबासांनी तयार केला. ही सूत्रे क्रमवार आलेली आहेत. त्यांतील ७८२ केसोबासांनी निवडलेली, २४० परशुराम व २१८ रामेश्वर ह्यांची आणि १५ इतरांची, अशी एकूण १२५५ सूत्रे ह्या ग्रंथात येतात. पंथीयांस उपदेश हाच संकलनाचा मुख्य उद्देश दिसतो. त्यामुळे हा ग्रंथ महानुभावांच्या नित्यपाठाचा ग्रंथ झाला आहे. हा ग्रंथ महानुभावांच्या संकेतात बांधलेला असल्याने ग्रंथाची गद्य भाषा त्या काळी जशी होती तशीच ठेवली गेली आहे. [ ➪ ३. ]

*सूत्रपाठाचे* संकलन केल्यानंतर केसोबासांनी *दृष्टान्तपाठ* ग्रंथ तयार केला. श्रीचक्रधरांनी तत्त्वस्पष्टीकरणार्थ वेळोवेळी सांगितलेले ११४ दृष्टान्त वेगळे काढून, प्रत्येक दृष्टान्तावर दार्ष्टान्तिक लिहून त्यांनी प्रस्तुत ग्रंथ सिद्ध केला आहे. दार्ष्टान्तिकांची रचना श्रीचक्रधरांच्या पश्चात व श्रीगोविंदप्रभूंच्या निर्वाणाअगोदर श. १२०७ / इ. स. १२८५ च्या सुमारास झाली असावी. *दृष्टान्तपाठ* म्हणजे चक्रधरोक्त *सूत्रपाठातील* 'उद्धरण' प्रकरणावर केशिराजांनी केलेले भाष्य होय. समर्पक दृष्टान्त व मार्मिक शब्दयोजना ह्यांमुळे सूत्रांतील उपदेश सहजरीत्या सामान्यांना समजेल असा झाला आहे. हे दृष्टान्त त्यांतील बोधगर्भ कथांनी रोचक झाले आहेत. पण कथानिवेदन हे परमार्थनिरूपणाचे परिणामकारक साधन म्हणून तेथे वापरले आहे. [ ➪ ३. ] ह्या *दृष्टान्तपाठाचे* 'लापणिक'ही ह्यांनी तयार केले आहे. 'लापणिक' म्हणजे दृष्टान्तपाठांची विषयवारीने केलेली 'अनुमाणिका' होय (मु. : मवाळकर-नेने संपादित *दृष्टान्तपाठ*, पुणे, १९३७; परिशिष्ट २). महानुभाव तत्त्वज्ञानाचे विवरण करणाऱ्या *सूत्रपाठ* ह्या ग्रंथावर उत्तरकालात अनेक भाष्यग्रंथ (*स्थळ-प्रमेयादी*) रचले गेले. महानुभावपंथीयांचे जे साहित्य निर्माण झाले त्यालाही हेच पंथीय प्रमाणग्रंथ आधारभूत व प्रेरक ठरले आहेत.

संकलनकार्याबरोबरच स्वतंत्र ग्रंथनिर्मिती म्हणून *मूर्तिप्रकाश* ग्रंथाची माहिती करून घ्यावी लागेल. महानुभावीय ग्रंथकारांची नोंद करून ठेवणाऱ्या *स्मृतिस्थळ, वृद्धाचार* व *वृद्धान्वय* ग्रंथांतून प्रस्तुत ग्रंथ केसोबासांचा नसून भास्करभट्टांचे पूर्वाश्रमीचे गुरू केशवाचार्य ह्यांचा आहे असा स्पष्ट उल्लेख सापडतो. *मूर्तिप्रकाशाच्या* ज्या पोथ्या डॉ. कोलते ह्यांना उपलब्ध झाल्या आहेत त्या सर्वांच्या शेवटी *मूर्तिप्रकाश, अवस्थाभूत गीत*, आणि *रत्नमाळा* ह्या तिन्ही ग्रंथांना सुरुवात केसोबासांनी त्यांना 'वेव्हारासि धरुनि नेले' (स्मृ. स्थ. १३) त्या दिवशी म्हणजे 'फाल्गुन शुद्ध १०, श. १२१० (इ. स. १२८९)' रोजी केली असा निर्देश आहे. ह्याचा अर्थ एवढाच की श. १२१० / इ. स. १२८९ च्या सुमारास काव्यरचनेस कवीने आरंभ केला. ग्रंथात 'मुनि केशिराजा 'चा ठिकठिकाणी येणारा उल्लेख ह्या ग्रंथांतरीच्या पुराव्यावरूनही *मूर्तिप्रकाशाचे* कर्तृत्व निःसंशयपणे केशिराजांकडे जाते. ह्या पोथ्यांवर केशवाचार्यांच्या कर्तृत्वाचा नामनिर्देश नाही (प्रस्ता., *मूर्तिप्रकाश*; पृ. १८-२६).

*मूर्तिप्रकाशाचा* लेखनकाल ल. रा. पांगारकर व य. खु. देशपांडे ह्यांनी श. १२०६ / इ. स. १२८४ दिला आहे. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणे ग्रंथारंभ श. १२१० च्या फाल्गुन मासात आणि समाप्ती ओघानेच श. १२११ त झाली असावी असे डॉ. कोलते म्हणतात. कोलत्यांनी श. १२११ / इ. स. १२८९ हा *मूर्तिप्रकाशाचा* लेखनकाल निश्चित केला आहे. ह्या ग्रंथात श्रीचक्रधरांच्या मूर्तीचे वर्णन आहे. ग्रंथ ओवीबद्ध असून त्याच्या ३०५१ ओव्या आहेत. चक्रधरमूर्तीच्या वर्णनासाठी डोमेग्राम येथील पूजावसराचा प्रसंग कवीने आधारास घेतला आहे. चक्रधरांच्या अनेक अलौकिक लीळांचे कवी स्मरण करतो. चक्रधरांच्या एकेक अवयवाचे वर्णन करीत असता त्या अनुषंगाने मोठ्या कुशलतेने महानुभावांच्या धार्मिक तत्त्वज्ञानाच्या धाग्यांची गुंफण कवीने केली आहे. चक्रधरस्वामींनी उत्तरापंथे बीजें केल्यानंतर नागार्जुनांची जी विकल अवस्था झाली व त्यांनी जो शोक केला तो ह्या काव्याचा शेवटचा भाग असून तितकाच भावपूर्ण प्रसंग आहे. हे काव्य कथाकाव्य नाही. तरीही आपल्या कल्पकतेने आणि भावोत्कट अशा प्रसंगांनी त्यात कथाकाव्याची गोडी कवीने निर्माण केलेली दिसते. [ ➪ ३. ]

केशिराजांच्या इतर रचनेपैकी *अवस्थाभूत गीत* आणि *गुढे* (गद्य) ही स्वतंत्र मराठी रचना आहे. *गुढे* ग्रंथांत गुरू नागदेवाचार्यांचा उपदेश मनात आणून त्याचा मथितार्थ सांगितला आहे, असे *महाराष्ट्र-सारस्वत*कार भावे म्हणतात (आ. ५, पृ. ९०) तर 'ह्यात *सूत्रपाठ* ग्रंथातील नऊ प्रकरणांची स्पष्टता केली आहे' अशी पुरवणी डॉ. तुळपुळे ह्यांनी जोडली आहे (मसा., आ. ५, पृ. ५९३). ह्यांनी *रत्नमाला स्तोत्र* (१८००), र. श. १२०६ / इ. स. १२८४; *दृष्टान्त स्तोत्र* (१५४); *ज्ञानकलानिधि स्तोत्र* (१८३); *श्रीबिंगुळिका स्तोत्र*

(१६) अशी संस्कृत रचनाही केली आहे.

केसोबासांची एकंदर ग्रंथरचना पाहता ते एक कुशल संकलक, प्रतिभावान कवी व विद्वान ग्रंथकार होते हे दिसून येते. महानुभाव पंथ व मराठी भाषा ह्यांची सेवा करण्यात आपली सारी हयात त्यांनी खर्च केली.

**रचना : मु.** – १. दृष्टान्तपाठ; दृष्टान्त ११४ व त्यावरील दार्ष्टान्तिक; र. श. : अंदाजे १२०७–८; (१) श्रीसर्वज्ञ चक्रधर निरूपित दृष्टान्तपाठ; संपा. भवाळकर, नी. ब. व नेने, ह. ना.; नागपूर, १९३७; (२) केशिराज संकलित दृष्टान्तपाठ; संपा. तुळपुळे, शं. गो. व धारपुरे, कुमुदिनी (प्रस्तावनेसह); पुणे, १९६४. २. मूर्तिप्रकाश; ओ. सं. ३०५१; र. श. १२११; संपा. कोलते, वि. भि. (विस्तृत प्रस्तावनेसह); नागपूर, १९६२. ३. सिद्धान्त सूत्रपाठ; सूत्रे १२५५; (१) श्रीचक्रधर सिद्धान्त सूत्रे, भा. १; संपा. भवाळकर, नी. ब. व नेने, ह. ना.; लक्षणान्वय सूत्रपाठ; नागपूर, १९३१; (२) श्रीचक्रधरोक्त सूत्रपाठ; संपा. नेने, ह. ना.; नागपूर, १९३५, १९३६. (३) श्रीचक्रधरोक्त सूत्रपाठ; संपा. अखिल भारतीय महानुभाव परिषद, नागपूर, १९५९. (४) सार्थ सूत्रपाठ, भा. १, संपा. आराध्य, मुरलीधरशास्त्री; फैजपूर, १९६४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : परी., 'मूर्तिप्रकाश'; संपा. कोलते, वि. भि.; मसाप., एप्रि. १९६३, पृ. ६१. २. देशपांडे, ज. शा. : परी., दृष्टान्तपाठ; (भवाळकर-नेने प्रत); विहंगम, ऑग. १९३७; पृ. ६२७, ६३१. ३. देशपांडे, वा. ना. : महानुभावांचा वेद; विचार समीक्षा; पुणे, १९६५; पृ. १८–५६. ४. पाटील, श्री. म. : महानुभाव वाङ्मयातील कोहिनूर : दृष्टान्तपाठ; जीवनविकास, ऑग. १९६९, पृ. ३१९.

**० केशिराजमुनि** – पहा **केशिराजबास.**

**केसरिस्वामी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**केसरी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**केसरी उद्धवनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० केसरी उद्बोध** – पहा **केसरीनाथ.**

**केसरीनाथ / ० केसरी उद्बोध** [मार्ग. शु. ५, श. १५८५ / इ. स. १६६३ – समा. मार्ग. शु. २, श. १६४६ / इ. स. १७२४] कवी. आदिनाथ-गोरक्षनाथप्रणीत नाथपरंपरेच्या ज्ञानदेव शाखेतील एक प्रमुख व्यक्ती म्हणून केसरीनाथांचे नाव घेतले जाते. कवीचे मूळ नाव केसोपंत, उपनाव बऱ्हाटे. वसिष्ठगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण. राशीन येथे मामलतीच्या हुद्द्यावर होते (शिवदीन केसरी कृत *ज्ञानप्रदीप*, ९७७–९८०). उद्बोधनाथांच्या *ज्ञानेश्वरी*-प्रवचनांचा परिणाम झाल्याने ह्यांनी नोकरी सोडून गुरुमंत्र घेतला. केसरीनाथांनी *सिद्धान्तसार* ह्या आपल्या ग्रंथात गुरुपरंपरा दिली आहे ती अशी : आदिनाथ > मच्छिंद्रनाथ > गोरक्षनाथ > गैनीनाथ > निवृत्तिनाथ > ज्ञाननाथ > सत्यामळनाथ > गैबीनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ > शिवदीननाथ (अ. १०). ह्यांच्या नाथपरंपरेतील मठ राशीनलाच होता. त्या मठाचे आधिपत्य केसरीनाथांकडे होते. केसरीनाथांचा शिष्यपरिवार बराच मोठा होता. त्यापैकी मल्हारीनाथ (उद्बोधनाथपुत्र), शिवदीननाथ, महीपतिनाथ व बालमुकुंद असे चार शिष्य ज्ञात आहेत. मल्हारीनाथांची परंपरा राशीन येथे व शिवदीनकेसरींची पैठणास नांदली. ह्यांनी मार्गशीर्ष शु. २, श. १६४६त आळंदीस ज्ञानेश्वरचरणांजवळ समाधी घेतली.

ह्यांची रचना विपुल असावी. परंतु तिच्यापैकी *सिद्धान्तसार* (अमु.) हा ग्रंथ व स्फुट पदे एवढीच आजमितीस उपलब्ध आहेत. ग्रंथाचे १० अध्याय असून ओवीसंख्या २८२४ आहे. तो गुरुशिष्यसंवादरूप आहे. ग्रंथ श. १६३८ / इ. स. १७१६ त पूर्ण झाला, असे लेखकाने स्वतःच म्हटले आहे. ग्रंथाची भाषा प्रौढ, परंतु अर्थवाही आहे. सोप्या व प्रासादिक भाषेत समर्पक असे उपमा, दृष्टान्त वापरून स्पष्टीकरण करण्याची कवीची धाटणी लक्षणीय आहे. 'हे वेदांत मते प्रतीपादन – आन्य मत्ताते शोधून – सद्गुरूमुखे निरूपण – आनुभविले जे' त्याच्या आधारावर वरील ग्रंथ तयार केला. सिद्धान्त जरी जुने व सर्वपरिचित असले तरी कवीची व्युत्पन्नता, अनुभव, बहुश्रुतता व व्यापक दृष्टिकोण ह्यांचा जागोजागी प्रत्यय येत राहतो. त्यामुळे अध्यात्मपर ग्रंथांतील ह्या ग्रंथाचे वैशिष्ट्य मान्य करावे लागते. मराठी संशोधन मंडळ, मुंबई ह्यांच्या संग्रहात ग्रंथाची हस्त. प्रत उपलब्ध (हवना., पृ. २४, १२४).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. मुंडी, बा. ना.; श्री केसरी उद्बोधविरचित सिद्धान्तसार; प्रसाद, डिसें. १९६६; पृ. १८–२५.

**० केसोबास** – पहा **केशिराजबास.**

**कोकिलस्वामी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – भगवत्स्तवनपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कोकिळ** [का. अनु.] कवी. ह्यांनी *रामगीते*च्या मूळ संस्कृत ६२ श्लोकांवर लिहिलेल्या टीकेची (ओ. सं. ७००) प्रत श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील बाडात सापडते (बा. २६८). ह्या ठिकाणीच त्यांची बरीच पदेही उपलब्ध आहेत. पैकी एक पद मुद्रित (वा. दा. ओक संपादित *पदसंग्रह, भा. ३*; मुंबई, १९०१; पृ. ८८).

**० कोकिळ (गंगाधर)** – पहा **गंगाधर कोकिळ.**

**कोकिळ ब्रह्मानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदरचना; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० कोंडू** – पहा **कुंडलीश.**

**० कोनेर गंगाजी** – पहा **कोनेर गंगाधर.**

**कोनेर गंगाधर / ० कोनेर गंगाजी / ० कोनेरनंदन–१ / ० कोनेरीनंदन (गंगाधर) / ० कोन्हेरनंदन गंगाधर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. कृष्णचरित्र; २. संतमालिका, कडवी २७; ३. हालास्यमाहात्म्य : आर्या, चूर्णिका, दिंड्या, पदे, श्लोक इत्यादी मिळून ग्रं. सं. २९; ४. पदपदांतरे; सवामं., हस्त. सू., खं. १, २.

**० कोनेरतनय** – पहा **कोनेरात्मज.**

**० कोनेरनंदन–१** – पहा **कोनेर गंगाधर.**

**० कोनेरनंदन–२** – पहा **कोनेरात्मज.**

**कोनेर नरसिंह** [का. अनु.] कवी. ह्यांच्या नावावर तंजावर सरस्वती महाल ग्रंथसंग्रहालयात *वेळूर शिवालय माहात्म्य* (अमु.) नावाचा ग्रंथ सापडतो (बा. ६१८; हस्त. यादी, क्र. १). समाप्तीच्या अध्यायात 'इति श्रीस्कंद पुराणे सिंहाद्रीखंडे शिवालय माहात्म्ये कोनेर नरसिंह ग्रंथ कृत ॥' असा कवीने उल्लेख केला. ह्याचे २० अध्याय व अंदाजे १९०० ओव्या आहेत. ह्यांच्या पदरचनेचा निर्देश गो. का. चांदोरकरांनी केला आहे (संककासू., पृ. २५).

**० कोनेरनाथ** – पहा **कोनेरीनाथ.**

**कोनेर(री) नारायण** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; आरती; सवामं., हस्त. सू., खं. २.

**कोनेर रंगनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. २५.

**कोनेर रघुनाथ** [अंदाजे श. १६१३ / इ. स. १६९१] कवी.

**रचना : मु.** – 'मुमुक्षु कौस्तुभ'; कासं. **अमु.** – विचारामृत; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. २५.

**कोनेरात्मज / ० कोनेरनंदन–२ / ० कोनेरतनय** [अंदाजे इ. स. १८२५] चरित्रकार. *श्रीसत्यसंधविजय* ह्या संतचरित्रपर ग्रंथाचा लेखक. ह्या ग्रंथाच्या प्रत्येक अध्यायाच्या अंती 'राजकवी कोनेरात्मज', 'कोनेर-

नंदन', 'कोनेरतनय' कृत अशी कविनाममुद्रा आढळते. ह्या ओवीबद्ध ग्रंथात माध्वसंप्रदायी यतींची चरित्रे वर्णन केली आहेत.

ग्रंथारंभीचे श्रीगणेश-शारदा-वंदन व गुरुस्तवन झाल्यावर माध्व-संप्रदाय संस्थापक श्रीमन्मध्वाचार्य ह्यांच्या चरित्रवर्णनापासून ग्रंथास आरंभ होतो. द्वितीयाध्यायात श्रीजयतीर्थांचे चरित्र सांगितले आहे. अक्षोभ्यतीर्थांनंतर हे उत्तरादी मठाचे अधिपती होऊन मध्वाचार्यांच्या बहुतेक ग्रंथांचे टीकाकार झाले. चवथ्या अध्यायात सत्यबोधांचे चरित्र येते. हे प्रभुरामचंद्राचे परम भक्त. त्यांच्या अद्भुत चमत्कारांचे कवीने मोठ्या आवडीने वर्णन केले आहे.

अध्याय ५ ते १० सत्यसंधांचे चरित्र आहे. त्यांची गंगायात्रा, वृद्ध-विप्ररूपी पांडुरंगांशी यतीची भेट इत्यादी घटना वर्णन केल्यानंतर श. १७१४ त दक्षिणदेशी यात्रा करीत आलेल्या यतीचे तंजावरचे राजे स्वागत करतात तो कथाभाग (अ. ८) येतो. शेवटच्या अध्यायात ग्रंथ-लेखकाने राजवाड्यात वास्तव्य करून रामप्रभूंची उपासना व रामनवमी-उत्सव राजे उत्तम तऱ्हेने कसा चालवीत ह्याची माहिती दिली आहे. मध्वाचार्यांपासून सत्यसंधांपर्यंतची उत्तरादी मठाची माध्वसंप्रदायी यतींची परंपरा ह्या ग्रंथात सांगितल्याने ग्रंथाला महत्त्व आले आहे.

**रचना : मु.** – 'श्रीसत्यसंध विजय' अ. १० ; ओ. सं. १००८ ; ग्रंथारंभ व समाप्ती : "पार्थिवीं पुष्यमासीं ग्रंथ आरंभिला ॥ व्यय संवत्सरीं जेष्ठशुद्धीं त्रितीये भला ॥ सत्यसंधविजय संपूर्ण झाला ॥ १०.१३२ ॥" संपा., श्रीनिवासाचार्य, वे.; तंजावर, १९५१.

**कोनेरी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – आरत्या व पदे ; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कोनेरी तिमयाकी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णपर पद ; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**कोनेरीदास / ० कोन्हेरीदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. शिवगीता ; संककासू., पृ. २५. २. स्फुटकविता ; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० कोनेरीनंदन (गंगाधर)** – पहा **कोनेर गंगाधर.**

**कोनेरीनाथ / ० कोनेरनाथ / ० कोनेरीबाबा** [अंदाजे श. १६०७ / इ. स. १६८५] कवी. ह्यांची 'गीतामाहात्म्य', 'शिवरात्रीकथा' ह्या विषयांवरील ओव्या, स्फुट पदे, श्लोक इ. व सद्गुरुपर पद अशी रचना उपलब्ध (तंसम. हस्त. यादी, क्र. ३). शिवरामस्वामी कल्याणीकर ह्यांच्या *अध्यात्मरामायण* ह्या टीकाग्रंथाचे लेखन ह्यांनी केले आहे. ग्रंथसमाप्तीच्या ओव्यांत तसा निर्देश येतो. उदा., "शके १६०७ सोळाशहे सातोत्तर । तै टीका केली शिवरामेश्वर । कोनेरी बावा सादरें । जाला विचारलेखकु ॥ ६५ : ११२ ॥" (सवामं., बा. १०२७).

**कोनेरी नारायण** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे ; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० कोनेरीबाबा** – पहा **कोनेरीनाथ.**

**कोनेरीराम** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे ; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० कोनेरीसुतशेष** – पहा **शेष.**

**० कोन्हेरनंदन (गंगाधर)** – पहा **कोनेर गंगाधर.**

**० कोन्हेरीदास** – पहा **कोनेरीदास.**

**कौंडण्यात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे ; सवामं. हस्त. सू., खं. २.

**कौंडण्यात्मज हरिहर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे ; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० क्रमवंत, जगन्नाथशास्त्री** – पहा **जगन्नाथशास्त्री क्रमवंत.**

**क्रिस्तोवा द जीजस् (पाद्री)** [अंदाजे इ. स. चे सतरावे शतक] गोमंतकीय मिशनरी व्याकरणकार. डॉ. वि. बा. प्रभुदेसाई ह्यांनी क्रिस्तोवाच्या *कोंकणीचें व्याकरण* ह्या ग्रंथाची माहिती प्रथम उजेडात आणली. ह्यांनी इ. स. १६३५ साली लिहिलेल्या गोमंतकी बोलीच्या व्याकरणाचे हस्तलिखित 'लंडन येथील स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज'-मध्ये आहे. ह्या ग्रंथाची सूक्ष्मपट-नक्कल मुंबईच्या मराठी संशोधन मंडळात संग्रहित केलेली आहे. त्यातील हस्ताक्षर स्पष्ट नसल्याने नीट अर्थबोध होत नाही (वि. बा. प्रभुदेसाई ; सशगोबो., मुंबई, १९६३ ; पृ. ३१३).

**खंडु भोजु** [का. अनु.] शाहीर.

**रचना : अमु.** – शिवनेरी किल्ल्यावर पोवाडा ; संककासू., पृ. १२६.

**खंडू नारायण** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर. 'सगन-भाऊच्या बैठकीतले' असा ह्यांचा निर्देश *महाराष्ट्रसारस्वतकार* भावे करतात (मसा., आ. ५, पृ. ५८३).

**खंडू संतू** [इ. स. चे १८ वे शतक, अखेर] शाहीर. हा पुण्याचाच राहणारा असे पोवाड्यावरून दिसते. ह्याने रचलेला *सवाई माधवरावाच्या जन्माचा पोवाडा* लहानसाच असला तरी त्यातील माहिती ऐतिहासिक कसोटीला पूर्णपणे उतरणारी आहे (मु. : ऐतिपो., खं. १, पृ. १७६–१७८).

**खंडेराय** [ ? – समा. श. १६८८ / इ. स. १७६६] कवी, संतचरित्रकार. गुरुपरंपरा : आत्माराम > गोपाळनाथ > खंडेराय. ह्यांनी श. १६८८ / इ. स. १७६६ त समाधी घेतली. ह्यांचे एकनाथ, नामदेव, तुकाराम ह्यांच्यावरील चरित्रग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**रचना : अमु.** – १. एकनाथ चरित्र ; ओ. सं. २८ ; अकलकामा., भा. १ ; संपा. ओक, वा. दा. ; मुंबई, १८९५ ; पृ. १५८–१६१. २. तुकाराम चरित्र ; ओ. सं. ४०. ३. नामदेव चरित्र ; ओ. सं. २५ ; अकलकामा., भा. ४ ; संपा. ओक, दा. के. व केळकर, ना. चिं. ; मुंबई, १९०३ ; पृ. १३०–१३१, १९७–१९८.

**खंडो अर्जुन** [का. अनु.] कवी. ह्यांचे *दुंदुभीवध* हे काव्य *काव्येतिहास-संग्रहा*तून प्रसिद्ध झाले आहे. ह्यांनी काही पदेही रचली आहेत (संककासू., पृ. २५, १२६).

**खंडो बल्लाळ चिटणीस** [इ. स. १६६८–१७२६] बखरकार. *श्रीशिव-दिग्विजय* ह्या शिवचरित्रावरील विस्तृत बखरीचे कर्ते म्हणून *महाराष्ट्र-सारस्वत*कार खंडो बल्लाळांचे नाव देतात. पण ह्या ग्रंथाच्या लेखका-विषयी निर्णयात्मक अशी माहिती मिळत नाही. हे शिवाजीचे सुप्रसिद्ध चिटणीस बाळाजी आवजी ह्यांचे द्वितीय चिरंजीव. येसूबाईमुळे ह्यांना चिटणीसपद प्राप्त झाले. राजाराममहाराजांचा एक विश्वासू आणि स्वामिभक्त सेवक म्हणून ह्यांची विशेष प्रसिद्धी आहे. राजाराममहा-राजांनी ह्यांना दाभोळ प्रांताची सरदेशमुखी दिली होती. राजाराम-महाराजांकरिता ह्यांनी अनेक संकटे सोसली. बखरीतील अनेक प्रसंगांच्या हकीकतीवरून बखरकाराने हे प्रसंग समक्ष पाहिले असावेत असे वाटते. हे चरित्र शिवाजीराजांच्या मृत्यूनंतर ३७/३८ वर्षांनी लिहिले असावे असा अंदाज व्यक्त केला गेला आहे.

हस्तलिखित प्रतीत बखरीचा लेखनकाल श. १६४० (इ. स. १७१८) व लेखनस्थळ 'नर्मदादक्षिणतटे' असे उल्लेख केले आहेत. वि. का. राज-वाडे ह्यांच्या मते, हा श. १६४० नसून श. १७४० आहे, असे संवत व संवत्सराच्या उल्लेखावरून सिद्ध होते. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथ उत्तर पेशवाईत इ. स. १८१८ त लिहिला गेला व त्याचा कर्ता खंडो बल्लाळ असणे शक्य नाही. चिटणीसांच्या बडोदे घराण्यापैकी कोणीतरी ही बखर नकलून घेतली असावी किंवा जुळवाजुळव करून लिहिली असावी. खंडो बल्लाळांनी केलेले टिपण पेशवेकालीन एखाद्या लेखकास मिळाले असावे व त्यावरून *शिवदिग्विजय* ग्रंथ सजविला गेला असावा, असे ग्रंथाचे भाषिक स्वरूप व इतर उल्लेख ह्यांवरून निश्चित वाटते. बखरकार आपण बारनिशी, दाखलेपत्रे, जुने ग्रंथ ह्यांचा आधार घेऊन लिहीत आहो असे वारंवार म्हणतो (पृ. १४८, १८८ व २८१). ह्या ऐतिहासिक दृष्टीचा प्रत्यय ही बखर वाचताना येतो. परंतु बखरकाराने दिलेल्या

वंशावळी व कालनिर्देश बहुतांशी चुकीचे आहेत; त्यामुळे इतिहासाच्या दृष्टीने ते प्रमाण मानता येणार नाहीत.

लेखक स्वतः आपल्या ग्रंथास बखर म्हणत नाही. 'शककर्ते शिवाजी राजे यांच्या कर्तृत्वाचा तपशीलवार झाडा' असे त्याने आपल्या ग्रंथाचे वर्णन केले आहे. *श्रीशिवदिग्विजय – श्रीशिवाजी महाराजांची बखर* हे नाव संपादकांनी दिलेले आहे. ते मूळ लेखकाने दिलेले नाही. बखरीची भाषा प्रौढ व संस्कृत वळणाची असून वर्ण्य विषयाशी तादात्म्य आणि अर्थ व्यक्त करण्याची परिणामकारक धाटणी ह्यांमुळे बखरीचा वाङ्मयीन दर्जा उंचावला आहे. [ ➪ ३.]

द. ग. गोडसे

**रचना : मु.** – श्रीशिवदिग्विजय; र. श. १६४०; संपा. नंदुरबारकर, पां. रा. आणि दांडेकर, ल. ना.; बडोदे, १८९५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. राजवाडे, वि. का. : मइसा., खं. ४; पुणे, १९००. २. हेरवाडकर, र. वि. : श्रीशिवदिग्विजय; मब., प्र. आ., पुणे, १९५७; पृ. १२८–१३२.

**खंडो भगवंत परभू** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार. नागपूरच्या गंगाधर माधवराव चिटणीस ह्यांच्या हाताखालील नायब चिटणीस. नागपूरकर भोसल्यांच्या काही बखरींपैकी एक ह्यांनी लिहिली. हिचा लेखनकाल ज्ञात नाही. ती प्रकाशितही झालेली नाही (र. वि. हेरवाडकर; मब., प्र. आ., पुणे, १९५७; पृ. ७५).

**खुशालचंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदरचना; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० खेचर विसा** – पहा **विसोबा खेचर.**

**खेमपुरीसुत – हिरापुरी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पंचरत्नस्तोत्र सटीक; पोथी – पत्रे ७; सवामं. हस्त. सू., खं. २.

**खेमाजी** [का. अनु.] शाहीर. ह्याने *आबासाहेब छत्रपती वधाचा पोवाडा* रचला आहे. प्रस्तुत पोवाड्यात खेमाजीने स्वतःविषयी अशी माहिती दिली आहे : "पवाडा केला शाईर भला खेमाजी बाळ गुणवंत ॥ तिपाजी बावाचा पुत ॥ कागवाड लावणी झोड गाण्याचा आखाडा तिथ ॥ परसन गुरू नागनाथ ॥" (मु. : ऐतिपो., खं. ३, पृ. ९२–९४).

**खेसू ओमू** [का. अनु] शाहीर. ह्याने *पट्टणकुडी व कोल्हापूरचे लढाईचा पोवाडा* रचला आहे. इ. स. १७९९ त परशुरामभाऊ पटवर्धनांची करवीरकरांशी पट्टणकुडी येथे जी लढाई झाली त्यात परशुरामभाऊंचा करुण असा शेवट झाला. ह्यामुळे ह्या पराजयाचा आणि मानहानीचा सूड उगवण्याचा पैजेचा विडा उचलून त्यांचे पुत्र रामचंद्र आप्पा कोल्हापूरकरांना जेरीस आणतात, असा कथाभाग पोवाड्यात आलेला आहे. पोवाड्याचे आठ चौक असून रचना ऐतिहासिक सत्याला धरून आहे (मु. : ऐतिपो., खं. १, पृ. ३४०–३४७; ऐति. माहिती : तत्रैव पृ. ३२७–३३०).

**० ख्यालीबहादुर** – पहा **कृष्णमुनि पंजाबी.**

**गंगाजी कोनेर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – कूटात्म पद; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० गंगाण्णा** – पहा **गंगाधर–२ (रुक्मनंदन).**

**गंगात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गंगादास–१** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गंगादास–२** [अंदाजे इ. स. १६९०] जैन कवी. गुरू : कारंजा येथील बलात्कारगण पीठाचे भट्टारक धर्मचंद्र. गंगादास हे मूळचे गुजराती. केवळ गुरूची आज्ञा म्हणून ह्यांनी मराठीत रचना केली. ह्यांच्या *पार्श्वनाथ-भवांतर* (कडवी ४७) (र. श. १६१२ / इ. स. १६९०) व *चक्रवर्तीचा पाळणा* (कडवी २१) अशा दोन रचनांचा उल्लेख डॉ. अक्कोळे ह्यांनी केला आहे. *पार्श्वनाथ-भवांतर* ही रचना डफगाण्याच्या चालीवर म्हणता येण्यासारखी आहे. आपल्या रचनेस कवी कीर्तन असे म्हणतो. उदा., "जिनगुणाचे कीर्तन । भवांतर केले डफगाणी । कवित्व केले गंगादासाने । तुम्ही आयका चित्त देऊन ॥ ४७ ॥" डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांनी गंगादासाने श. १६१२ / इ. स. १६९० त रचलेल्या *यशोधरचरित्रा*चा उल्लेख केला आहे (मसा., आ. ५, पृ. ९१३) तो चुकीचा आहे. कारण डॉ. अक्कोळे ह्यांना कारंजा येथील जैन हस्तलिखित संग्रहात प्रस्तुत *यशोधरचरित्र* हा पंडित मेघांचा ग्रंथ चुकून गंगादासाच्या नावावर टाकला गेला असे आढळले. कवीची मराठी भाषा गुजराती शब्दांनी युक्त आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अक्कोळे, सुभाषचंद्र : गंगादास; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ६७–६८, २४६. २. अक्कोळे, सुभाषचंद्र : पं. मेघाकृत यशोधरचरित्र; नभामा., ऑग. १९५७; पृ. २५-३०.

**गंगाधर–१** [का. अनु.] पदकार व चरित्रकार.

**रचना : अमु.** – १. श्रीरामदास गुणार्णव चरित्र; र. का. : श. १७९२ / इ. स. १८७०. २. श्रीसमर्थांवरील अष्टक. ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**गंगाधर–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – १. शिवरात्री चरित्र. २. बोधपर, विरहपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गंगाधर–३ (रुक्मनंदन) / ० गंगाधर मेदिनी / ० गंगाण्णा / ० रुक्म गंगाधर** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध] कवी. तंजावरच्या तुळजेंद्र भूपाचे हे आश्रित होते. आराध्यदैवत श्रीराम. शिवरामेंद्र असे आपल्या गुरूचे नाव ह्यांनी *भागवतटीके*ची समाप्ती करताना दिले आहे. तंजावरातील प्रसिद्ध मध्यस्थ वेंकोबांच्या घराण्याचे हे पूर्वज. ह्यांचे शिष्य कृष्णशास्त्री यती. संस्कृत आणि मराठी अशा दोन्ही भाषांवर कवीचे प्रभुत्व होते. ह्यांची विपुल अशी ग्रंथरचना तंजावर येथील सरस्वती महाल ग्रंथालयाच्या संग्रहात सापडते. त्यापैकी *भागवतटीका* प्रसिद्ध असून, भागवताच्या अकराव्या स्कंधावरील एकनाथी टीका प्रख्यात आहे म्हणून तो स्कंध सोडून १–१० व १२ अशा स्कंधांवर ह्यांनी टीका केली आहे. पैकी दशमाची ग्रंथसंख्या १६८०० असून इतर स्कंधांवर ह्यांची २०५२८ ओव्यांची रचना आहे. श. १६८८ (इ. स. १७५६), मार्गशीर्ष शुक्ल १२, शनिवार ह्या दिवशी टीकालेखनास आरंभ करून व अनेक अडचणींतून पार पडून श. १६९४ (इ. स. १७७२), भाद्रपद कृ. अष्टमीस ह्यांनी ती संपविली. तंजावर नगरीतील प्रसन्न वेंकटेशाच्या देवळाच्या परिसरात ग्रंथाचे लेखन झाले. ह्यांच्या *हरिवंश भारता*ची पोथी *शेषधर्म* (अ. १–३३, ओ. सं. २१७७) ह्या नावाने मराठी संशोधन मंडळ, मुंबई येथे उपलब्ध आहे (हवना., पृ. २५) (तंसम. हस्त. यादी, क्र. २, बा. १४६३, १४८२).

**रचना : अमु.** – १. उमासंहिता भावप्रकाश टीका; अ. ६–१२; ग्रं. सं. १३०१. २. कामतंत्रसार; ओ. सं. ३००. ३. काशी माहात्म्य; अ. १–१३; ओ. सं. १०६०. ४. गो सावित्री टीका; ओ. सं. २०. ५. नृसिंहपुराण; अ. १–६; ओ. सं. ७००; अ. १३–२८; ओ. सं. ६००. ६. भागवत : ओवीबद्ध; स्कंध १–१० व १२ पैकी २, ३, ५, ७, ९, १० व १२ उपलब्ध (स्कंध १, ४, ८ अनुपलब्ध); ओ. सं. ३७३२; र. का. : श. १६८८–१६९४. ७. मल्लारिमाहात्म्य; अ. १–२२; ओ. सं. १२५०. ८. श्रीरंगनाथ महिमा : ओवीबद्ध; अ. १–१०; ओ. सं. ६७०; ब्रह्मांडपुराणांतर्गत. ९. सूतसंहिता : स्कंदपुराणांतर्गत : (१) शिवमाहात्म्य खंड; अ. १–१३; ओ. सं. १०४०; (२) ज्ञानयोग खंड; अ. १–२०; ओ. सं. ५००; (३) यज्ञवैभव खंड; अ. १–२; ओ. सं. १००; (४) मुक्तिखंड; अ. १–९; ओ. सं. १८०. १०. हरिभक्ति सुधोदय; अ. १–१८; ओ. सं. २०००. ११. हरिवंश

भारत; अ. १–३३; ओ. सं. ३०००; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २; मसमं.

**गंगाधर–४** [का. अनु.] शाहीर. राम जोश्यांप्रमाणेच हे संस्कृत थाटाची सुंदर झोकदार लावणी करीत असत (मसा., आ. ५, पृ. ५४१).

**गंगाधर–५** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – अशौचनिर्णय (अशौचगंगाधरी); गो. का. चांदोरकरसंग्रह; संककासू., पृ. ३१.

**गंगाधर–६** [का. अनु.] पदकार. ह्यांची दोन पदे मुद्रित झाली आहेत : पैकी एक हिंदी (वा. दा. ओक संपादित *पद्संग्रह, भा. ३*; मुंबई, १९०३; पृ. ७७–७८).

**गंगाधर कृष्ण** [इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] कवी. ह्यांच्या *आदित्यहृदय* (र. श. १६३८ / इ. स. १७१६) ह्या पोथीचे फक्त एकच पृष्ठ शं. श्री. देवांना सापडले आहे (सवामं., बा. ११३, हस्त. सू., खं. १).

**गंगाधर कोकिळ / ० कोकिळ गंगाधर** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. वास्तव्य नृसिंहक्षेत्री, गोदातीरी, सायखेडे (जि. औरंगाबाद) येथे. नृहरिसुतकृत *मुकुंदराजचरित्र* (सवामं., बा. ६७९) ह्या ग्रंथावरून मुकुंदराजांचे गुरू कोकिळ होते, असे दिसते. कोकिळशिष्य मुकुंदराजांनी आपल्या गुरूच्या पश्चात श. १६९७ (इ. स. १७७५) त पैठणला समाधी घेतली अशी माहिती मिळते. त्यावरून कोकिळांचा काळ अंदाजे श. १७ व्या शतकाचा उत्तरार्ध ठरतो. गंगाधर हे एक योगी पुरुष होते. ह्यांची परंपरा पुढीलप्रमाणे आहे : गंगाधर कोकिळ > महादेव आबा > त्रिंबकराजभाऊ > सीतारामअण्णा > उद्धव. ह्यांचे विद्यमान वंशज धारूरपासून पश्चिमेस सहा कोसांवरील विडे ह्या गावी राहतात. गंगाधरांची समाधी सायखेड्यास आहे. ह्यांची शे-दीडशे कवने (पदे, अभंग इ.) समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात सापडतात. रचनेमध्ये आपल्या नावाचा उल्लेख हे कोकिळ किंवा गंगाधर कोकिळ असा करतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देव, शं. श्री. : हे कोकिळ कोण? ; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. १३–१४.

**गंगाधरनंदन** [का. अनु.] कवी. ह्यांनी *कुंडांकुश* हा कुंडपद्धतीवर लिहिलेला ओवीबद्ध मराठी ग्रंथ उपलब्ध असून, ह्यांची पदपदांतरे समर्थवाग्देवतामंदिरातील बाडांत आढळतात (मचको., पृ. ३०६).

**गंगाधरनाथ / ० गंगानाथ–२** [इ. स. चे १८ वे शतक, अखेर] टीकाग्रंथकार. सोपान (ज्ञानदेवबंधू) परंपरेतील जनार्दनांचे शिष्य रघुनाथ व त्यांचे शिष्य हे गंगाधरनाथ वा गंगानाथ होत. ह्या गंगाधरनाथांनी *गोरक्षगीता-निरूपण* (ओ. सं. १२१, र. श. १७२१ / इ. स. १७९९) हा टीकाग्रंथ रचला. गहिनीनाथांच्या मूळ *गोरक्षगीते*वरील ही लघु टीका आहे, असे 'श्रीगोरक्षें उपदेशिला। योग गहिनीनाथें अनुभविला॥' ह्या अंतर्गत उल्लेखावरून दिसते. ग्रंथात यौगिक प्रक्रिया, योगसिद्धी आणि गुरुमहिमान ह्यांचे वर्णन येते. हे *गोरक्षगीता-निरूपण श्रीकेशवगोविंदमाहात्म्य* (पां. श्री. आपटे व दा. गो. पाटील) ह्या पुस्तकात छापले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : गोचप.; पुणे, १९५९; पृ. १५८.

**गंगाधरपंत खानवलकर गुलसरायवाले ऊर्फ विष्णु** [का. अनु.] कवी. ह्यांनी रचलेल्या बऱ्याच आर्या उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४३).

**गंगाधरबावा** (श्रेष्ठ) / **० रामीरामदास–२** [श. १५२७ / इ. स. १६०५ – समा. श. १५९९ / इ. स. १६७७]. कवी. रामदासस्वामींचे ज्येष्ठ बंधू. ह्यांचा जन्म जांब गावी (जि. नाशिक) झाला. ह्यांचे पाळण्यातले नाव गंगाधर. ह्यांचा विवाह फारच लवकर झाला. आंबेडकर देशमुखांची कन्या ह्यांची पत्नी. समर्थसंप्रदायी लोक ह्यांना श्रेष्ठ असे म्हणत. बालवयातच ह्या दोघा बंधूंस श्रीरामाचा अनुग्रह झाला होता असे म्हणतात. आपले सर्व आयुष्य ह्यांनी रामोपासनेसाठी वेचले. गंगाधर ऊर्फ श्रेष्ठ हे आपणास रामीरामदास म्हणवीत व आपल्या रचनेत शेवटी ह्याच नावाने स्वतःचा उल्लेख करीत. समर्थांनीही ह्या टोपणनावाने रचना केली आहे. 'रामीरामदास' हे टोपणनाव श्रेष्ठांचे की समर्थांचे ह्याचा स्पष्ट निर्णय अजूनही लागलेला नाही. श्रेष्ठांनी दहीफळ (तालुका परतुर, जिल्हा परभणी) ह्या गावी समाधी घेतली. तेथे त्यांचे वृंदावन पाहण्यास सापडते.

*भक्तिरहस्य* व *सुगमोपाय* हे श्रेष्ठांचे प्रमुख उपलब्ध ग्रंथ. *भक्तिरहस्या*त भक्तिमहिमा व नाममाहात्म्य सांगितले आहे. *सुगमोपाय* ही *भक्तिरहस्या*ची पुरवणी म्हणावी लागेल. आपले ग्रंथ लिहिताना 'श्रुति, स्मृति आणि पुराणे ह्यांचा मथितार्थ काढून आपण तो श्रोत्यांस सादर केला आहे', असे ह्यांनी एके ठिकाणी म्हटले आहे.

*भक्तिरहस्या*त शैव आणि वैष्णव ह्या दोघांच्याही व्रतकथा सांगितल्या असून हरिहरांचा पूर्ण अभेद मानला आहे. भगवद्भक्तांच्या प्रेमळ कथा सांगताना श्रेष्ठ रंगून जातात. *सुगमोपाया*तही सगुणोपासना, भक्त आणि भगवन्नामस्मरण हीच तरणोपायाची साधने असल्याचे श्रेष्ठांनी सांगितले आहे. श्रेष्ठांची कविता रसवती किंवा अलौकिक नाही. भक्तिमार्गाचा प्रसार करण्याच्या उद्देशाने त्यांनी ही कविता रचली व मुमुक्षूंना परमार्थमार्ग दाखविला.

**रचना : मु.** – १. भक्तिरहस्य; प्रक. ७७; ओ. ५८१९; र. श. १५९०. २. सुगमोपाय, प्रक. १०; ओ. ११३९. ३. रामीरामदासांची कविता; संपा. देव, शं. श्री.; धुळे, श. १८३१ (इ. स. १९०९). **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २. **शंका.** – कृतनिर्वाण ग्रंथ.

**गंगाधर माधवराव चिटणीस** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार. सातारकर भोसल्यांप्रमाणेच नागपूरकर भोसल्यांच्या संबंधी अनेक बखरी व कैफियती लिहिल्या गेल्या. गंगाधर माधवराव चिटणीस ह्या गृहस्थाने नागपूरकर भोसल्यांची एक बखर लिहिली आहे. ही फसली सन १२३० म्हणजे इ. स. १८२० मध्ये रेसिडेंट जेंकिन्स ह्यांच्या विनंतीवरून रचली.

काशीराव राजेश्वर गुप्ते ह्यांनी लिहिलेली *नागपूरकर भोसल्यांची बखर* ह्या बखरीवरूनच लिहिली गेली असावी. कारण त्यांचे काका बळवंत महिपत हे नागपूरकर रघूजी भोसले ह्यांच्या राजमंडळातील सरदार मंडळीपैकी एक होते. त्यांनी गंगाधर माधवराव चिटणीस ह्यांच्या सांगण्यावरून नागपूरकर भोसले घराण्याची हकीकत लिहिली होती अशी माहिती प्रा. र. वि. हेरवाडकर ह्यांनी *मराठी बखर* ह्या पुस्तकात दिली आहे (द्वि. आ. १९७५; पृ. ६६).

**गंगाधरमुनी** [इ. स. चे १६ वे शतक] महानुभाव आरतीकार. 'जय देव जय देव जय जी गोपाळा : सद्भावे आरती – निजभावे आरती यादवकुळपाळा' ही बाळकृष्णावरची व दुसरी श्रीमूर्तीच्या रूपाचे वर्णन करणारी, अशा दोन आरत्या ह्यांनी रचल्या आहेत (मु. : महानु., फेब्रु. १९७२, पृ. ४–५). ह्यांनी *गंगाधरी* ही ओवीबद्ध गीता-टीका रचली असल्याचे समजते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : गंगाधरमुनीविरचित श्रीकृष्णाच्या दोन आरत्या; महानु., फेब्रु. १९७२, पृ. २–५.

**० गंगाधर मेदिनी** – पहा **गंगाधर–३.**

**गंगाधर रखमाजी पंडित** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – स्फुट ओव्या; तंसम., हस्त. यादी, क्र. ३.

**गंगाधर (शंकरशिष्य)** [का. अनु.] गद्यलेखक. ह्यांनी लिहिलेले *श्रीकृष्णचरित्र* उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९, पृ. ४३).

**गंगाधरशास्त्री** [का. अनु.] कवी. पिता विठ्ठल. आई रुक्मिणी. गुरू : विश्वनाथ. *भामाविलास* व *रसकल्लोळ* असे दोन ग्रंथ ह्यांनी रचले

आहेत. पहिला *काव्यसंग्रहा*तून व दुसरा *काव्येतिहाससंग्रहा*तून मुद्रित झाला आहे (संककासू., पृ. ३२).

**गंगाधरशास्त्री पटवर्धन** [अंदाजे इ. स. १७७५ – २० जुलै १८१५]. मुत्सद्दी आणि राजकारणी. आत्मवृत्तलेखक. ह्यांचे वास्तव्य, पूर्वायुष्यात, सातारा जिल्ह्यातील वाईजवळील मेणवली गावी होते. वडील कृष्णाजीपंत पटवर्धन. नाना फडणीसांच्या भीतीने ह्यांचे वडील बडोद्यास गेले. गंगाधरशास्त्री ह्यांनी वाईला आपल्या वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत शास्त्राभ्यास केला. नंतर तेही बडोद्यास गेले. तेथे गायकवाडांचे दिवाण म्हणून ते काम पाहू लागले.

बडोद्याचा रेसिडेंट वॉकर ह्याने दि. २ फेब्रुवारी १८०३ रोजी रेसिडेंटाशी बोलणे करण्यासाठी गायकवाड सरकारचा दरबार वकील म्हणून ह्यांची नेमणूक केली. मेजर वॉकर व जेम्स कारनॅक ह्या दोघांचेही हे मुख्य सल्लागार होते. बडोद्यास इंग्रजांचे बस्तान बसविण्यात ह्यांची त्यांना बरीच मदत झाली. ह्यांना संस्कृत भाषेचे तर चांगले ज्ञान होतेच, पण इंग्रजी भाषेचीही थोडी ओळख ह्यांनी करून घेतली होती. 'गंगाधरशास्त्री हा मोठा धूर्त व बुद्धिमान आहे' असा मार्मिक अभिप्राय एल्फिन्स्टनसाहेबाने त्यांच्याबद्दल दिला होता. ह्यांचे बुद्धिचातुर्य, खटपटी व साहसी स्वभाव ह्यांचा इंग्रजांनी चांगलाच उपयोग करून घेतला. पेशवे व गायकवाड ह्यांच्यामधील देण्याघेण्याच्या बाबींचा गायकवाडाच्या नावाने कायमचा इजारा (मक्ता) करून घेण्यासाठी इ. स. १८१४ मध्ये ह्यांना पुण्यास पाठविण्यात आले. इंग्रजांचे पाठबळ असल्याने हे पेशव्यांशी चढेलपणाने वागत, त्यांना मूर्ख म्हणत. हे जुन्या पद्धतीचे शास्त्री असले तरी राहणीत थेट इंग्रजाप्रमाणे ऐट करीत. बोलताना मधून मधून इंग्रजी शब्द घुसडण्याची ह्यांना सवय होती. दुसऱ्या बाजीरावाबरोबर हे पंढरपुरास गेले असता तेथे ह्यांचा २० जुलै १८१५ रोजी खून झाला.

ह्यांनी आत्मचरित्र लिहिले आहे. हे लिहिण्याचे कारण ग्रंथारंभी पुढीलप्रमाणे नमूद करून ठेवले आहे : "मेजर वॉकर रेसिडेंट गुजराथ याणी आज्ञा केली की, तुम्ही पुणेयास असताना बदचाल चालला म्हणोन गवरनर जनराल साहेब बहादूर यास माहीत जाहाले आहे सबब तेथे जे वृत्त जाहाले असेल त्याची कची माहितगारी व्हावी सबब जसा जसा वेव्हार जाहाला असेल तो सत्य लिहून द्यावा त्याजवरून स्मरणात जो सत्यव्यवहार आहे तो लिहून देतो. . ." ह्यात गंगाधरशास्त्र्यांनी आपल्या वयाच्या आठव्या वर्षापासूनची हकीकत सांगितली आहे. तिचे स्वरूप साहजिकपणे स्वतःची बाजू मांडण्याचे झाले आहे. चरित्राची भाषा घरगुती वळणाची आहे. संयमगुणाच्या दृष्टीने चरित्र उल्लेखनीय वाटते.

सदरहू आत्मचरित्र पुणे येथील शास्त्रीपटवर्धन घराण्यातून प्रसिद्ध इतिहाससंशोधक पांडोबा पटवर्धन ह्यांनी मिळविले व इ. स. १९२६ साली ते त्यांनी भारत इतिहास संशोधक मंडळापुढे वाचले. बाजीरावी (दुसऱ्या) धडामोडीतील गंगाधरशास्त्री हे एक प्रमुख पात्र आहे; व त्यांनी लिहिलेला हा इतिहास म्हणजे त्यांच्या स्वभावाचा व सूक्ष्म माहितीचा एक चित्रपटच होय. चरित्रलेखकाच्या व्यक्तिमत्त्वाच्या अनेक बाजू ह्यात प्रकट झालेल्या आहेत. म्हणून इतिहास व चरित्र ह्या दोन्ही दृष्टींनी प्रस्तुत आत्मचरित्रपर बखरीचे स्वतंत्र स्थान मान्य करावे लागते. हे चरित्र अपूर्ण आहे.

द. ग. गोडसे

**रचना :** मु. – गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचें आत्मचरित्र; र. का. : इ. स. १८०४; संपा. पटवर्धन, पां. न.; भाइसमंत्रै., व. ३, अं. १, आषाढ, शके १८४४; पृ. १७–४१.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हेरवाडकर, र. वि. : गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचें आत्मचरित्र; मवं.; प्र. आ., पुणे, १९५७; पृ. ६५–६७, १७४–७५.

**गंगाधरशास्त्री आपाशास्त्री फडके** / ० फडके, गंगाधरशास्त्री

[इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध]. व्याकरणकार, कोशकार व हिंदुधर्मतत्त्वविवेचक. अष्टागर प्रांतातील नागाव हे ह्यांचे मूळ गाव. गंगाधरशास्त्री हे इंग्रजांच्या अव्वल अमदानीतील शिक्षणखात्यातील एक वजनदार व विद्वान अधिकारी होते. इ. स. १८२२ च्या ऑगस्टमध्ये देशी लोकांच्या शिक्षणासाठी 'धि बॉम्बे नेटिव स्कूल अँण्ड स्कूलबुकसोसैटी' ('हैंद शाळा व शाळापुस्तकमंडळी') इंग्रज सरकारने स्थापन केली. ह्या 'सोसैटी'त अध्यापनाचे व ग्रंथलेखनाचे काम करणाऱ्या चार प्रमुख पंडितांपैकी (फडके ह्यांच्या व्यतिरिक्त जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बाळशास्त्री घगवे व रामचंद्रशास्त्री जन्हवेकर असे तिघे पंडित होते) हे एक होते. अर्वाचीन मराठी भाषेचे आद्य व्याकरण रचण्याचा मान फडके व त्यांचे सहकारी क्रमवंत व घगवे ह्यांजकडे जातो. हे व्याकरण "संस्कृत भाषेच्या व्याकरणाच्या आश्रयानें पुणें प्रांतींची मराठी मुख्य धरून, गुरुशिष्यसंवादरूपानें" त्यांनी लिहिले. इ. स. १८२५ च्या सुमारास हे लिहिले गेले असावे, असे मानले जाते. ह्याचे हस्तलिखित लंडन येथील इंडिया ऑफिस लायब्ररीतील मराठी हस्तलिखितांच्या संग्रहात पाहावयास मिळते. प्रा. अ. का. प्रियोळकर हे *महाराष्ट्र भाषेचें व्याकरण* (१९५४) ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत (पृ. १२, १४) लिहितात : "प्रस्तुत मराठी व्याकरणाच्या मूळ हस्तलिखिताचीं एकंदर १५३ पृष्ठें असून आकार १२½ × ७½ आहे. . . ह्या हस्तलिखितावरून अर्वाचीन मराठीच्या अगदी सुरुवातीला जॉर्ज जर्विससारख्या इंग्रजाच्या देखरेखीखालीं पंडितमंडळानें लेखनपद्धति कोणती स्वीकारली होती त्याची कल्पना करतां येते. . . . इंग्रजी व्याकरणाचा ज्याच्यावर परिणाम झालेला नाहीं, असें हें मराठी भाषेचें आद्य व्याकरण आहे." हे व्याकरण लिहिले गेल्यावर, सुमारे अकरा वर्षांनी, गंगाधरशास्त्री ह्यांनी *महाराष्ट्र भाषेचें व्याकरण* ह्याच नावाने स्वतःच्या नावावर एक व्याकरण प्रसिद्ध (१ जानेवारी १८३६) केले. क्रमवंत, फडके व घगवे ह्यांचे पहिले हस्तलिखित व्याकरण व रामचंद्रशास्त्री जन्हवेकर आणि 'जार्विससाहेबाच्या हाताखालचे एक दोन पंडित यांहीं मिळून रचिलेले हस्तलिखित स्वरूपातील प्रश्नोत्तररूप व्याकरण' ह्यांचा उपयोग करून घेऊन गुरुशिष्यसंवादरूपाने हे लिहिले आहे. पुढे तिसऱ्या आवृत्तीच्या वेळी त्यात बऱ्याच सुधारणा करण्यात आल्या. इ. स. १८५० मध्ये प्रसिद्ध झालेल्या चौथ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत गंगाधरशास्त्री लिहितात :

"नित्यशः व्याकरण पढविण्याचा योगाने मूळचा व्याकरणांतील ग्राह्यांश किती व त्याज्यांश किती, व नवीन विषय कोणते पाहिजेत यांचा विचार करून गुरुशिष्यसंवादरूप व्याकरण तयार करून सन १८३६ सांत छापिलें. . . तिसरी आवृत्ति छापण्याचा प्रसंग आला; तेव्हां लाघवार्थ गुरुशिष्यसंवाद काढून नवीन जे व्याकरणांत अवश्य विषय पाहिजेत त्या सर्वांचा संग्रह करून हें व्याकरण सिद्ध केलें. याजवर सुमारें दहा महिने श्रम केला आणि हा ग्रंथ वेदशास्त्रसंपन्न महादेवशास्त्री कोल्हटकर तथा सखारामशास्त्री काळे तथा नारायणशास्त्री पुराणिक तथा राजश्री भिकाजी भास्कर शिंत्रे तथा विष्णु गंगाधर फडके यां सर्वांचा विचाराने ठरवून छापिला त्या प्रती समाप्त झाल्यावरून चौथी आवृत्ति छापली आहे."

ह्या व्याकरणाच्या प्रस्तावनेत (आवृत्ती पहिली) गंगाधरशास्त्री फडके ह्यांनी ह्या आद्य मराठी व्याकरणाच्या रचनेची हकीकत दिली आहे. व्याकरणरचनेच्या इतिहासाच्या दृष्टीने तिला महत्त्व असल्यामुळे ती जशीच्या तशी खाली उद्धृत करीत आहो :

"संस्कृतादि कित्येक भाषांचीं व्याकरणें आहेत त्या योगानें त्या भाषा शिकणारांस त्यांचा किती उपयोग आहे पहा. जर त्या भाषांवर व्याकरणें नसलीं तर त्या भाषांची व्युत्पत्ति कधींहि होणार नाहीं. कारण अनुगम समजल्यावांचून व्युत्पत्ति कशी होईल. याजकरितां सर्व भाषांस व्याकरण असल्याच्या योगानें पढणारांस फारच ती भाषा सुगम होत्ये.

त्याचें कारण एक देव शब्द अकारांत त्यास अमुकरीतीने विभक्ति, लिंगें, वचनें, लागतात. अशा रीती समजल्यावांचून सर्व भाषागत अज्ञान जाऊन शुद्ध भाषा येणे परम कठीण आहे. कोणी म्हणतील कीं जी जांची जन्मभाषा त्यांस व्याकरणाचा काय उपयोग. त्यांचाही व्यवहार निर्वाह होतो. असें म्हणणारे त्यांस उत्तर इतकेंच कीं मातबरांचा प्रापंचिक व्यवहार चालतो तसाच दरिद्र्यांचाही भीकटूक मागून दिवस लोटतो. तसें व्याकरण जांस येतें त्यांचा वाग्व्यवहारांत आणि नाहीं येत त्यांचा वाग्व्यवहारांत बरोबरी नाही. बरें हालीं जें महाराष्ट्र भाषेचें व्याकरण झालें आहे एणेंकरून या भाषेचा अनुगम व ह्या भाषेंतील विषय समजण्यानें संस्कृतादिकांत प्रवेश करावयाची जांची इच्छा त्यांस फार उपयोग घडेल. तो असा. या भाषेंतील प्रकृति, प्रत्यय, विभक्ति, विभक्त्यर्थ, नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, पुरुष, सकर्मक, अकर्मक, भावी, शब्दसाधित शब्द, धातुसाधित शब्द, वर्तमानकाळ, भूतकाळ, भविष्यकाळ, तीन लिंगें, विभक्ति, अव्ययें, हे पदार्थ अर्थसुद्धां सलक्षण समजण्यांत आल्यावर संस्कृतादिक भाषा शिकण्यास केवढें साधन होईल पहा बरें. याकरितां महाराष्ट्रादि भाषांचीं व्याकरणें आवश्यक आहेत.

"याकरितां या सोसैटीचे ('धि बॉम्बे नेटिव स्कूल अँण्ड बुक सोसायटी') अधिकारी जार्ज जारवीस साहेब झाले तेव्हा त्यानीं या कारखान्यांत (पुस्तकें लिहवून तयार करण्याच्या) चार पंडित नवे ठेविले. एक जगन्नाथशास्त्री (क्रमवंत), दुसरे रामचंद्रशास्त्री (जन्हवेकर), तिसरे गंगाधरशास्त्री (फडके), चवथे बाळशास्त्री घगवे. त्यांत रामचंद्रशास्त्री यांजकडे अत्रत्य शाळांच्या चौकशीचें काम होतें त्या कामास ते गुंतले. पुढें आम्हां तीन पंडितांस प्रथमतः मराठी भाषेचें व्याकरण करण्याविषयीं आज्ञा झाली. तेव्हां आम्हा सर्वांस विचार पडला कि महाराष्ट्र भाषेचें व्याकरण कसें करावें. तेव्हां विचार करतां असें मनांत आलें कि ही भाषा संस्कृताश्रित होय तेव्हां संस्कृतांत जसा प्रकृति प्रत्यय भाव विचार असाच या भाषेंतही आहे. मग संस्कृत व्याकरणाध्ययनबलेंकरून महाराष्ट्रव्याकरणास आरंभ केला. विभक्ति लिंगें वचनें इत्यादि सर्व विषय प्रायः संस्कृताप्रमाणेंच मिळूं लागले. मग अनुगम कल्पना करून एक वर्षांत व्याकरण सरासरी बरेंच झालें. आतां ती प्रथम आवृत्ति यामुळें सर्व विषयांचें यथास्थित आकलन झालें नाहीं. तथापि तें राहिल्ये विषयांस सूचक झालें. आजपर्यंत जितके पंतोजी व मुलें तयार झालीं तितकींही याच व्याकरणावरून. याचा प्रती दूर देशीं जितके पंतोजी गेले त्याणीं एक एक लिहून नेली. पुढें प्रश्नोत्तर व्याकरण म्हणून रामचंद्रशास्त्री याणी याच व्याकरणाचा लहानसा संक्षेप मुलांसाठीं केला त्याचा प्रती हातचा मुलांजवळ बहुत आहेत. या रीतीनें या व्याकरणावरून आज बारा वर्षें काम चाललें परंतु छापण्याचा उद्योग झाला नाहीं. याजकरितां प्रतींची न्यूनता यामुळें फार अडचण पडूं लागली तेव्हां सर्व लहान थोरांच्या मनांत आलें कि व्याकरण सुधारून छापेल तर बरें. त्याजवरून मला छापण्याविषयीं ईश्वरें बुद्धि दिली. मग आजपर्यंत व्याकरण पढविण्याचा योगानें मूळचा व्याकरणांतील त्याज्यांश व ग्राह्यांश यांचें विवेचन झालें व नवीन विषय कोणकोणते पाहिजेत तेंही समजलें. मग मी ह्या सर्व विषयांचें आकलन करून हा नवीन ग्रंथ फार संक्षिप्त केला. यांत कुशाग्रबुद्धि असे जे बाळशास्त्री जांभेकर यांसही जा एतदुपयोगी युक्ति सुचल्या त्यांचा संग्रह करून व मी जो लेख सिद्ध केला तो त्यांस दाखवून हा ग्रंथ छापिला. हा छापण्याचा संस्कार प्रथमच आहे. आतां या ग्रंथांत पुणे प्रांतींची भाषा मुख्य धरून तदनुसार प्रकृति प्रत्यय भाव विचार केला आहे. यामुळें सर्व जातीय लोकांस आनंद जनन अथवा सर्वभाषागत अज्ञान निरसन या ग्रंथानें होईल असें केवळ नाहीं. तथापि यांतील जे गुणलेश असतील ते सज्जनांनीं आदरावे. हा ग्रंथ फार संक्षिप्त झाला आहे. यामुळें बारीक विषय तसेच राहिले आहेत व तादृश यांत अनुगमही नाहीं म्हणून या ग्रंथास दोष लावूं नये. ग्रंथावर दोष देणें आणि मोठी इमारत फोडणें या दोन गोष्टींस विशेष श्रम नाहीं. तेव्हां हीं कामें सिद्ध करण्याचे श्रम मनांत आणून दोष देणारानीं प्रवृत्त व्हावें. आतां आणखी अनुगम किंवा यांतील बारकावे जे राहिले आहेत ते यास मिळवून या ग्रंथाचें भूषण करणें हे दुसरे पंडितांचें काम. संस्कृत व्याकरण होऊन किती काळ झाला याचा थांग नाहीं तथापि त्याचा मंडनार्थ अद्यापि नवीन ग्रंथ होत चालिले आहेत. याच रीतीनें आजवरही तसें प्रवृत्त होऊन या ग्रंथाचें मंडन करितील अशी आशा आहे. या भाषेचा व्याकरणाचा आश्रयानें महाराष्ट्रभाषा समकक्ष जा गुजराती आणि हिंदुस्थानी भाषा यांचीं व्याकरणें सहज होतील. आतां हें व्याकरण मुलांस सुसद्बोधार्थ गुरुशिष्यसंवादरूपानें केलें आहे. हे सर्वांनीं ऋजुबुद्धिनें कृपा करून आदरावें."

गंगाधरशास्त्री ह्यांनी आपल्या प्रस्तावनेच्या शेवटी 'या भाषेचा व्याकरणाचा आश्रयानें महाराष्ट्रभाषा समकक्ष जा गुजराती व हिंदुस्थानी भाषा यांचीं व्याकरणें सहज होतील,' असे जे म्हटले आहे त्याप्रमाणे गुजरातीत इ. स. १८४० मध्ये एक व्याकरण प्रसिद्ध झालेही. ते त्यांच्याच व्याकरणाचे निव्वळ भाषांतर होते. त्यानंतर टी. सी. होप ह्यांचे *गुजराती भाषानुं व्याकरण* (१८५८), नर्मदाशंकर ह्यांचे *नर्मव्याकरण* (१८६५), शापुरजी एदलजी ह्यांचे *ए ग्रामर ऑफ गुजराती लँग्वेज* (१८६७), जे. एस. टेलरकृत *गुजराती भाषानुं व्याकरण* (१८६७) अशी व्याकरणपुस्तके प्रसिद्ध झाली.

मराठी भाषेचे व्याकरण तयार करण्याचे प्रयत्न गंगाधरशास्त्री व त्यांचे सहकारी ह्यांच्याही पूर्वी, तेराव्या-चौदाव्या शतकांत, झालेले होते. महानुभाव पंथातील केशवसूरी, आनोबास, भास्कर कवीश्वर, भीष्माचार्य व दामोदरपंडित ह्यांनी जुन्या मराठीत, त्याचप्रमाणे फादर स्टीफन्स (सतराव्या शतकाचा प्रारंभकाळ), विल्यम कॅरे (इ. स. १८०५) ह्यांनी इंग्रजीत व्याकरणे तयार केली होती. त्यांची माहिती गंगाधरशास्त्र्यांना नसावी. ती असती तर त्यांनी त्यांचा उपयोग आपल्या व्याकरणपुस्तकाच्या रचनेच्या कामी करून घेतला असता. पंडितमंडळ व गंगाधरशास्त्री ह्यांच्यानंतर महंमद इब्राहिम मक्बाह (इंग्रजीत, इ. स. १८२५), स्टीव्हन्सन (इंग्रजीत, १८३३), बाळशास्त्री जांभेकर (१८३६), दादोबा पांडुरंग तर्खडकर (१८३६), जे. बॅलेंटाइन (इंग्रजीत, १८३९), ई. बर्जेस (इंग्रजीत, १८५४), गंगाधरशास्त्री टिळक (१८५८), कृष्णशास्त्री गोडबोले (१८६७) इत्यादींची व्याकरणे प्रसिद्ध झाली. हे लक्षात घेता अर्वाचीन मराठी भाषेचे आद्यव्याकरणकार गंगाधरशास्त्री फडके होत, असे म्हणावे लागेल. त्यांच्या व्याकरणाच्या इ. स. १८५० पर्यंत चार आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या. पण पुढे दादोबा पांडुरंग तर्खडकर ह्यांचे मोठे व छोटे व्याकरण अधिक प्रमाण मानले जाऊन त्याचा बराच मोठा प्रचार होऊ लागल्यामुळे गंगाधरशास्त्र्यांचे व्याकरण मागे पडले.

गंगाधरशास्त्री ह्यांची व्याकरणरचनाविषयक कामगिरीइतकीच मराठी शब्दकोशविषयक कामगिरीही महत्त्वाची आहे. भाषेच्या संवर्धनाला व्याकरणाइतकेच शब्दकोशाचे साह्य होत राहणे अत्यंत आवश्यक असते. विद्येच्या वाढीबरोबरच शब्दकोशाचा वाढविस्तार होत राहिलेला असतो. इंग्रज सरकारने एतद्देशीय मंडळीत विद्येचा प्रसार व्हावा ह्या हेतूने जेव्हा 'हैंदशाळा व शाळापुस्तकमंडळी' स्थापन केली तेव्हा व्याकरणग्रंथाप्रमाणेच मराठी भाषेत 'एकभाषिक' कोश रचण्याची योजना आखली व जगन्नाथशास्त्री क्रमवंत ह्यांच्या नेतृत्वाखाली लगेच कामासही सुरुवात केली. जगन्नाथशास्त्र्यांचे मुंबईतील कित्येक बहुश्रुत इंग्रजांशी बरेच संघटन असल्याकारणाने इंग्रजी, लॅटिन, ग्रीक वगैरे कोश कसे तयार केले गेले ह्याची त्यांना माहिती होती. त्यांनी काही विद्वानांचे साह्य घेऊन कोशरचनेचा उद्योग आरंभला. ह्या विद्वान मंडळीपैकी गंगाधरशास्त्री फडके हे एक होते. हा कोश *महाराष्ट्र भाषेचा कोश* ह्या नावाने ओळखला जातो. इ. स. १८२९–१८३१ ह्या काळात हा प्रसिद्ध झाला.

व्याकरण व कोश ह्या ग्रंथांच्या रचनेइतकीच गंगाधरशास्त्री ह्यांची दुसरी एक रचना महत्त्वाची आहे. ती म्हणजे *हिंदुधर्मतत्त्व* ह्या ग्रंथाची होय. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धाच्या अखेरीअखेरीस ख्रिस्ती मिशनऱ्यांनी महाराष्ट्रात हिंदुधर्माविरुद्ध जी प्रखर व विघातक चळवळ सुरू केली होती तिच्या विरुद्ध मुकाबला करण्यास जे काही थोडे विचारवंत शास्त्री पुढे सरसावले त्यांपैकी गंगाधरशास्त्री एक होत. रे. विल्सन, रे. निस्बित, रे. मरे मिचेल ह्यांसारख्या मंडळीने हिंदूंचा धर्म व त्यांचे तत्त्वज्ञान नवशिक्षितांपुढे विकृत स्वरूपात मांडून त्यांची मने स्वधर्माविरुद्ध कलुषित व ख्रिस्तीधर्माकडे आकर्षित करण्याची जी जोराची मोहीम सुरू केली होती तिला तोंड देण्यासाठी हिंदुधर्माचे यथोचित ज्ञान करून देणारी ग्रंथरचना करण्याची तीव्र जरुरी हिंदुधर्माभिमानी पुढाऱ्यांस भासू लागली. इ. स. १८४३ मध्ये त्यासाठी मोरभट दांडेकर ह्यांनी मुंबईत *उपदेशचंद्रिका* नावाचे मासिक सुरू केले. कृष्णशास्त्री साठे ह्या नावाच्या वादपटू विद्वानाने मिशनऱ्यांच्या खोडसाळ प्रचाराला जशास तसे उत्तर देण्यासाठी, ख्रिस्तीमताचा धुव्वा उडविण्यासाठी, १८५० च्या सुमारास, मुंबईत वादसभांचे सत्र सुरू केले; तर तिकडे पुण्यात १८५२ साली कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी 'केवळ सत्यावर लक्ष ठेऊन शांतपणानें क्रिस्तमताचें खंडण, प्रमाणें करून ज्या मार्गानें होईल त्याच मार्गास अनुसरणारें' *विचारलहरी* नावाचे पाक्षिक सुरू केले. हिंदु पुढाऱ्यांनी ही जी प्रतिकाराची मोहीम सुरू केली तिला प्रामुख्याने सक्रिय पाठिंबा देणाऱ्या मंडळीत गंगाधरशास्त्री फडके हे मोडत. त्यांनी इ. स. १८५२ मध्ये *हिंदुधर्मतत्त्व* ह्या नावाचा ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला. हा ग्रंथ आपण का लिहिला हे प्रस्तावनेत सांगताना ते म्हणतात :

"हा माझा ग्रंथ माझ्या बरोबरीने व मजपेक्षां कमी समजुतीचे व लहान मुलें याणीं वाचला असतां, त्यांस हिंदुधर्मांतील मला जितक्या गोष्टी माहीत आहेत तितक्यांचें तरी ज्ञान होईल, तेणेंकरून एकाएकीं स्वधर्मत्याग करणार नाहीं अशी मला आशा आहे. . . मला हा ग्रंथ करण्याचें कारण दुसरें असें आहे कीं, हिंदुधर्माचे समग्र तत्त्ववेत्ते असे जे मोठे विद्वान, वेदशास्त्रादि समस्त विद्यापारावारीण गोपीनाथ शास्त्रीबावा आगाशे, त्र्यंबकशास्त्रीबावा शालग्राम, मयूरेश्वरशास्त्री (मोरशास्त्री) साठे, असे असतां सर्वांस गुरुस्थान, परंतु ते आपले हिंदुस्वधर्माचा अज्ञानानें परधर्मांत जातात हें प्रत्यक्ष पाहात असतां, हिंदुधर्म सर्वांनी समजावयाजोगा ग्रंथ मराठींत करीत नाहींत. परंतु त्याणी हा माझा लहानसा अणुपरिमाणस्वरूप ग्रंथ पाहिला म्हणजे त्यांसहि उत्तेजन येऊन यांत जें खोटें असेल तें काढून, न्यून असेल तें परिपूर्ण करून नवा ग्रंथ करितील व तेणेंकरून हिंदुधर्म रक्षितील अशी माझी पूर्ण खात्री आहे."

*हिंदुधर्मतत्त्व* हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर ख्रिस्ती मिशनऱ्यांचा जळफळाट झाला. त्यांच्या *ज्ञानोदय* व *ओरिएंटल ख्रिश्चन स्पेक्टेटर* ह्या पत्रांतून गंगाधरशास्त्र्यांवर कडवट टीकेचा भडिमार सुरू झाला. *ज्ञानोदय* पत्रात (१ मे १८५२) जे परीक्षण प्रसिद्ध झाले आहे व १ जुलै १८५२ च्या अंकात जो संपादकीय लेख आला आहे तो वाचल्यास मिशनऱ्यांची मने कशी क्षुब्ध होऊन गेली होती ह्याचा प्रत्यय येईल. सरकारी शिक्षणखात्यातील एका अधिकाऱ्याने *हिंदुधर्मतत्त्व* ह्यासारखा शास्त्राधारित व बिनतोड कोटिक्रमाने युक्त असा ग्रंथ लिहिण्यास पुढे व्हावे, हिंदुधर्मतत्त्वाविरुद्ध आपण जे प्रतिपादन करीत असतो ते अप्रत्यक्षपणे खोडून काढण्यास त्याने उद्युक्त व्हावे, हे पाहून, मिशनऱ्यांचे पित्त खवळून जाणे साहजिकच होते. हिंदुधर्मरक्षणार्थ झटणाऱ्या त्यावेळच्या महाराष्ट्रीय नेत्यांना हा ग्रंथ योग्य वेळी प्रसिद्ध झाला ह्याबद्दल आनंद तर झालाच पण आपली फळी दमदार करण्यास ते अधिकाधिक उत्साहाने झटू लागले; ख्रिस्तीधर्मस्वीकाराकडे झुकू लागलेली नवशिक्षित पिढी अंतर्मुख बनून आपली विचारसरणी तपासून पाहू लागली व अर्वाचीन प्रत्यक्षज्ञानाच्या कसोटीवर हिंदुधर्माची तत्त्वे घासून त्यांची ग्राह्याग्राह्यता ठरवू लागली.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. प्रियोळकर, अ. का. : प्रस्ता. 'महाराष्ट्र भाषेचें व्याकरण'; १९५४; पृ. १२–१४. २. ज्ञानोदय; परी., 'हिंदुधर्मतत्त्व'; १ मे १८५२. ३. ज्ञानोदय; संपादकीय, हिंदुधर्मतत्त्व पुस्तकासंबंधी; १ जुलै १८५२.

o **गंगाधरसुत–१** – पहा **रखमाजी पंडित.**

**गंगाधरसुत–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – विठ्ठलाची आरती; मआ., पृ. ३९२. **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गंगाधरात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – एक पद; संपा. ओक, वा. दा.; पदसंग्रह, भा. ३; मुंबई, १९०३; पृ. १०७.

**गंगानंदन** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सहधर्मचरीलक्षण; ग्रं. सं. १५०; अष्टावक्र-सुप्रभा विवाहकथा वर्णन; तंसम. हस्त. यादी, क्र. १.

**गंगानाथ–१** [अंदाजे श. १६७१ / इ. स. १७४९ – ? ] नाथपंथी कवी. त्रिपुटीच्या गोपाळनाथांच्या परमहंस नामक शिष्यांच्या परंपरेतील. जन्म धनगर समाजात. आडनाव कोथमिरे. वडिलांचे नाव येसाजीबुवा. राहणारे पुण्याचे. घरचा व्यवसाय मेंढपाळीचा. गावाबाहेरील सहजनाथ ह्यांच्या मठात सहजनाथ > सुभाननाथ > गोपाळनाथ ही गुरु-शिष्य-प्रशिष्यांची त्रयी निवास करीत होती, तेथे हे जाऊ लागले. मठात येणाऱ्या गंगारामास सहजनाथांनी आपल्या प्रशिष्याकरवी दीक्षा देऊन त्यांचे नाव गंगानाथ ठेविले. गंगानाथांचा मठ स्वारगेट, पुणे येथे असून मठात सापडलेली त्यांची गुरुपरंपरा अशी : श्रीदत्तात्रेय > चांदबोधले > जनार्दन > एकनाथ > नित्यानंद > कृष्णानंद > विसोबानंद > मुरारनाथ > रंगनाथ > गोपाळनाथ > परमहंस > सहजनाथ > सुभाननाथ > गोपाळनाथ > गंगानाथ. गंगानाथ विठ्ठलभक्त होते. ते नेमाने पंढरीची वारी करीत. गंगानाथ गृहस्थाश्रमी होते. त्यांचा शिष्यपरिवार व मठपरंपरा मोठी होती. पण त्या संबंधात फारशी माहिती आज तरी उपलब्ध नाही. पुणे येथील त्यांच्या मठात वंशपरंपरेने अधिकार चालत आला आहे.

गंगानाथांनी कीर्तन करता करता अनेक पदे, आख्याने व अभंग रचले आहेत. त्यांच्या रचनेपैकी २५ ते ४० पदेच काय ती आज उपलब्ध आहेत. त्यांतील पाच पदे रा. चिं. ढेरे ह्यांनी छापली आहेत (*इंद्रायणी*, व. १, अं. ११–१२, पृ. ४७–४९). ह्या पदांतून कवीने गंगा, गंगाराम, गंगानंदन, गंगानाथ अशा नाममुद्रा वापरल्या आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : श्रीसंत गंगानाथ आणि त्यांची कविता; इंद्रायणी, सप्टें.–ऑक्टो. १९६३, पृ. ४२–५०.

o **गंगानाथ–२** – पहा **गंगाधरनाथ.**

**गंगाबाई / o गुप्तनाथ** [इ. स. १५९९–१६६५] कवयित्री. नाथपंथीय. राशीन (जि. अहमदनगर) येथील एका ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणाची मुलगी. ह्यांना अल्पवयातच वैधव्य प्राप्त झाले. तेव्हापासून परमार्थप्रवण होऊन आपला सारा वेळ त्या भजन-कीर्तन-प्रवचनात घालवू लागल्या. पुढे, काशीयात्रेस जात असता वाटेत थोर नाथपंथीय साधू गैबीनाथ ह्यांची गाठ पडून त्यांनी गंगाबाईंना सांप्रदायिक मंत्रदीक्षा दिली व 'गुप्तनाथ' असे त्यांचे नाव ठेवले. ह्यांच्याबरोबर काशीयात्रेस निघालेले राशीनचे उद्धव ठिपशे ह्यांस पुढे त्यांनी गुरुमंत्र दिला. तेव्हापासून ते उद्धवाचे उद्बोधनाथ झाले. ह्यांची गुरुपरंपरा : सत्यामलनाथ > गैबीनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ > शिवदीननाथ अशी आहे. ज्ञानदेवांच्या नंतरच्या नाथपरंपरेच्या अनेक शाखांपैकी ही एक महत्त्वाची शाखा मानली जाते. गुप्तनाथांची समाधी राशीन येथे आहे. त्यांच्या नावावर काही अभंगरचना आढळते.

**रचना : मु.** – अभंग; सुबोधपत्रिका; महाराष्ट्र कवि चरित्र; मसा., आ. ५, पृ. ४४९.

**गंगाबाई–२** [का. अनु.] कवयित्री. हिचा एकच अभंग उपलब्ध झाला आहे. त्यावरून गंगाबाईच्या कालाचा किंवा गुरूचा बोध होत नाही.

अभंगाची घडण 'भक्तीचें ऊखळ : भावार्थी मूसळ : सडीले तांदुळ : विवेकाचे ॥. . . गुरूचें शेशात्नीं : बैसली गंगाबाई : आम्हासी प्राप्ति ही कैसी होय ॥' अशी आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा.; गंगाबाईचे सिद्धान्त; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४, चैत्र १८६५; पृ. ५४.

**गंगाराम–१** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – अभंग व पदे; संककासू., पृ. ३२.

**गंगाराम–२** [का. अनु.] ज्योतिर्विद.

**रचना : अमु.** – शकुनफासावली; ज्योतिष-ग्रंथ; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २७५.

**गंगूहैबती** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा पहिला पाद] शाहीर. पेशवाई-अखेरच्या काळातील. हे पुण्याचे राहणारे. गंगूहैबती, महादेव व प्रभाकर ही सर्व शाहीर-मंडळी एकाच फडातली. हे तिघेही लावण्या करीत. गंगूहैबतींच्या गुणांवर मोहित होऊन महादेव, प्रभाकर ह्या ब्राह्मण मंडळींनी ह्यांचे शिष्यत्व पत्करले. ह्यांची अनेक पौराणिक कवने आहेत. त्यांतील श्रीकृष्णावरची बहुतेक कवने गाजलेली आहेत. 'रडतांना हृषीकेशी बाई माझा राहिना' हे ह्यांचे एक पद प्रसिद्ध आहे. ह्यांच्या कवितेबद्दल 'गंगूहैबतिचा आहे लौकिक जगभर गाण्याचा' असे उद्गार प्रभाकरांनी काढले आहेत. गंगूहैबतींच्या दहा लावण्या *अंधारातील लावण्या* (संपा. य. न. केळकर; पुणे, १९५६) ह्या संग्रहात मुद्रित (पृ. १७२–१८८) (मसा., आ. ५, पृ. ५७०, ५८५).

**गजानन** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – १. ८ लावण्या : संपा. केळकर, य. न.; पुणे, १९५६; पृ. २६३–२६९. २. दुसऱ्या बाजीरावावरील पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. ५२–५३.

**गजाननदैवज्ञ कऱ्हाडकर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – ओवीबद्ध गीता; पोथी–पत्रे १२९; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गणकात्मज** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – १. अनंतव्रताची आरती. २. श्रीकृष्णाची आरती; मआ., पृ. ३०९, ३४३.

**गणपतराव गोविंद बरवे** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार. *मराठी साम्राज्याची छोटी बखर* ह्या बखरीचे कर्ते. ह्या बखरीच्या प्रतीत शेवटी 'ही बखरेची नक्कल गणपतराव गोविंद बरवे याचे बखरेवरून केली असे' असा लेख आहे. त्यावरून बखरीचा कर्ता हाच असावा असे *काव्येतिहाससंग्रह*कर्त्यांनी म्हटले आहे. इतिहाससंशोधक शं. ना. जोशी हेही बर्वे हाच ह्या बखरीचा कर्ता असल्याचे नमूद करतात (मसा., आ. ४, १९५१, पृ. १०–५३). बखरीचे संपादक बाळाजी जनार्दन मोडक म्हणतात : "मल्हार रामराव चिटणीसांनी लिहिलेली बखर मोठी असल्यामुळे हिला आम्ही छोटी बखर असे म्हटले आहे." बखरीचे लेखन कार्तिक शु. ८, श. १७३९ (इ. स. १८१७) रोजी पूर्ण झाले.

ह्या बखरीत भोसल्यांचे मूळ पुरुष बाबाजी ह्यांचे पुत्र मालोजी ह्यांच्यापासून ते शेवटचे छत्रपती प्रतापसिंह ह्यांच्यापर्यंत, भोसल्यांच्या कुलवंशविस्ताराचा वृत्तान्त कथन केला आहे. शाहू छत्रपतींनंतरच्या निवेदनात पेशव्यांच्या हकीकतींना महत्त्व दिले आहे. हिच्यात 'पेशव्यांचे राज्य व दौलत कुल इंग्रजाने घेतली' तोपर्यंतची हकीकत येते.

बखरकाराने बखरीतील हकीकत कुठून घेतली ह्याचा उल्लेख केलेला नाही. ह्या बखरीतील शिवाजी व संभाजी ह्यांच्याविषयीच्या वृत्तान्तात सभासदी व चिटणीशी बखरीपेक्षा फेर आढळतो. जिजाबाई व शिवाजी ह्यांचा शहाजीने केलेला त्याग, दादोजी कोंडदेवांचे विषसेवन, सोयराबाईने स्वतःला लावून घेतलेला गळफास, संभाजीला चिणून टाकणे वगैरे हकीकत अगदीच नवी आणि अश्रुतपूर्व आढळते. मराठी साम्राज्याचा ३०० वर्षांचा इतिहास प्रस्तुत बखरीत थोडक्यात (छापील ११२ पृष्ठे) कथन केला आहे, हे तिचे वैशिष्ट्य होय.

**रचना : मु.** – १. मराठी साम्राज्याची छोटी बखर; र. श. १७३९; काइसं., एप्रि. १८८८ (व. ११, अं. ४) ते ऑक्टो. १८८८ (व. ११, अं. १०).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आपटे, गो. वि. : बरवे घराण्याचा इतिहास; १९१६. २. ग्रामोपाध्ये, गं. ब. : मवाइ., खं. ३; संपा. जोग, रा. श्री.; पुणे, १९७३, पृ. ५४०–४२.

**गणपतराव चव्हाण** [का. अनु.] आख्यानकार. ह्यांनी रचलेली स्फुट आख्याने उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४३).

**गणपति–१** [का. अनु.] पदकार. *पदसंग्रहा*वरून (पृ. १९८) हे नीळकंठ ह्यांचे शिष्य होते असे दिसते. एक पद मुद्रित. बा. दा. ओक संपादित *पदसंग्रह, भा. ३*; मुंबई, १९०३; पृ. ७८.

**गणपति–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १२६.

**गणपतिसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे व भूपाळी; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गणू महादू** [का. अनु.] शाहीर; लावणीकार. *अंधारातील लावण्या* (पुणे, १९५६) ह्या संग्रहात एक लावणी मुद्रित (पृ. २७४–७५).

**गणू यशवंत** [का. अनु.] शाहीर; पदकार. *शिवनेरी किल्ल्यावरील पोवाडा व पदे* अशा रचनेचा निर्देश (संककासू., पृ. २६, १२६).

**गणेश** [का. अनु.] आरतीकार व पदकार. अच्युताश्रमांच्या आंबड मठाच्या परंपरेतील. अच्युताश्रम > त्र्यंबक > जीवन > गणेश > रंगनाथ अशी ही परंपरा आहे. ह्यांनी रचलेली रामदासांची आरती व पद-पदांतरे अशी स्फुट कविता समर्थवाग्देवतामंदिरातील बाडात संग्रहित (हस्त. सू., खं. ३).

**गणेश उदंड** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गणेश कवि** [का. अनु.] कवी. सदाशिव उपाध्यायांचे पुत्र. उपनाव माष्टि किंवा माष्टे. यजुर्वेदी माध्यंदिनशाखी ब्राह्मण. काशीस वास्तव्य. ह्यांच्या *शौरिसु (र) तरंगिणी* ह्या काव्याचे तिसरा व चौथा असे दोन तरंग उपलब्ध आहेत (नागपूर विद्यापीठ हस्तलिखित संग्रह). हे काव्य श्रीकृष्णविषयक आहे. त्याची भाषा जरी मराठी असली तरी कवींनी त्यात मधूनमधून हिंदी, संस्कृत, गुजराती श्लोक, श्लोकार्ध किंवा चरण आणले आहेत. त्यावरून कवी बहुभाषाभिज्ञ आहेत हे दिसून येते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** करंबेळकर, वि. बा. : गणेशकविकृत शौरिसु(र) तरंगिणी; मसाप., एप्रि.–जून १९४८; पृ. २–१२.

**गणेशदास–१** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० गणेशदास–२ – पहा निरंजन–१ (कऱ्हाडकर).**

**गणेशदास–३** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – सद्गुरूची आरती; मआ., पृ. ४१८.

**गणेश देवांग** [अंदाजे १६२७ / इ. स. १७०५] वीरशैव कवी. हे कर्नाटकातून येऊन महाराष्ट्रात स्थायिक झालेल्या देवांग कोष्टी समाजातील. औरंगाबाद–जालना–देऊळगाव ह्या भागात देवांग कोष्टी जमात बरीच आहे. शिवाय ह्यांच्या ग्रंथाचे हस्तलिखितही ह्याच टापूत प्रा. गऊळकर ह्यांना सापडले. त्यावरून गणेश देवांग ह्याच परिसरातील असावेत असे मत प्रा. गऊळकर ह्यांनी व्यक्त केले आहे.

आपल्या *निजात्मसार* (ओ. २७५) ग्रंथाच्या अखेरीस कवीने

आपली गुरुपरंपरा दिली आहे. ही पुढीलप्रमाणे : काशीपती नीलकंठ > कलप्रभू > शिवानंद प्रभुलिंग > चन्नबसवप्रभु > नागेश > गणेश देवांग. कवी स्वतःचा उल्लेख गणेश देवांग असाच करतो. ग्रंथाचे प्रथम मुद्रण इ. स. १९२७ साली मुंबईस झाले. इ. स. १९६५ मध्ये *प्रतिष्ठान* मासिकातून प्रा. शिवाजी गऊळकर ह्यांनी ग्रंथाचे पुनर्मुद्रण केले.

*निजात्मसार* ग्रंथावर अभिप्राय देताना रा. चिं. ढेरे म्हणतात की, ग्रंथकार वीरशैव असला तरी त्या पंथाच्या तत्त्वज्ञानाचे म्हणावे तसे निरूपण ह्या ग्रंथात येत नाही. संतकवितेतील सुपरिचित अद्वैतविचारच तेथे मांडलेला आहे. प्रा. गऊळकर ह्यांचे मत अगदी ह्याच्या उलट आहे. ते म्हणतात : मराठी संतांच्या परंपरेने प्रभावित झालेल्या ह्या ग्रंथकाराने वीरशैवांचेच सांप्रदायिक तत्त्वज्ञान आपल्या ग्रंथातून मांडले आहे. ते असे : वीरशैवांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे शिव आणि आत्मा ह्यांत द्वैत नाही (ओ. ५४). दोन्ही शक्तियुक्त असून आत्मा आणि परमात्मा (शिव) ह्यांचे अद्वैत शक्तीमुळेच आहे. आत्मा हा शिवाचा अंश असून अविद्येमुळे तो स्वतःला शिवापासून भिन्न समजतो (ओ. ३९). आत्म्याचा आरंभ शिवापासून होतो. तो चैतन्य-ग्रहण शिवापासून करतो व शिवाच्याच ठायी विलीन होतो. हे ज्ञान प्राप्त होण्यासाठी 'सकळ साधनांचे अधिष्ठान' (ओ. १०५) जो सद्गुरू त्याची कृपा हवी. ह्या मार्गातील भक्त, महेश, प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य अशा ज्या सहा साधनेच्या पायऱ्या त्याही ह्या ठिकाणी स्पष्ट केल्या आहेत. वीरशैवांचे साहित्य संख्येने अल्प असल्याने हा ग्रंथ विशेष महत्त्वाचा ठरतो.

**रचना : मु.** – १. निजात्मसार; ओ. सं. २७५; र. श. १६२७, माघ शु. १४, गुरुवार; संपा. प्रा. शिवाजी गऊळकर (प्रस्तावनेसह); प्रतिष्ठान, जाने.–मार्च, जुलै–ऑग., सप्टें.–ऑक्टो. १९६५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : गणेश देवांग; प्रामनधा.; पुणे, १९७२; पृ. ५३–५६.

**गणेशनंदन** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा पूर्वार्ध] कवी. अंबेजोगाई येथील. कुलदैवत आंब्याची योगेश्वरी. गणेशनंदनांच्या कवितेचे बाड बी. लक्ष्मीकांत ह्यांना परभणी येथील साधुबुवांच्या संग्रहात मिळाले. ही काव्यरचना श. १६७६ ते १६९५ / इ. स. १७५४ ते १७७३ ह्या काळातील आहे, असे बाडात नमूद केलेले आहे.

ह्यांच्या नावावर चार प्रकरणे, पदे, स्तोत्रे, आरत्या अशी स्फुट रचना सापडते. *शिवरात्रीकथा* हे सर्वांत मोठे प्रकरण करुणरसाचा आविष्कार करणारे आहे तर अनेकवृत्तात्मक *भीलनीआख्यानात* शृंगाररस प्रामुख्याने आढळतो.

**रचना : अमु.** – १. गजगौरीव्रतकथा; ३९ कडवी; र. श. १६८० / इ. स. १७५८; २. गोपीआख्यान; ३. भीलनीआख्यान; ८३ श्लोक; र. श. १६७६ / इ. स. १७५४; ४. वैद्यनाथस्तोत्र; ५. शामाबाई आख्यान; श्लोक ४४; ६. सीवरात्र कथा; ओ. सं. २३७; र. श. १६९५ (इ.स. १७७३); ७. आरती योगेश्वरीची, पदे, स्तोत्रे इ.; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** बी. लक्ष्मीकांत : गणेशनंदन; प्रतिष्ठान, फेब्रु. १९५४; पृ. १९–२२.

**गणेशनाथ** [का. अनु.] पदकार. *भक्तमंजरी*कार व महिपतीबुवा हे ह्यांना समर्थकालीन लेखतात. ह्यांचे राहण्याचे मूळ ठिकाण सारसी उज्जैनी. शिष्य : विठ्ठलनाथ. कवीची पदपदांतरे समर्थवाग्देवतामंदिर संग्रहात उपलब्ध आहेत (हस्त. सू., खं. १, २).

**गणेशनामा किंकर** [का. अनु.] पदकार. 'उठा उठा हो मुरारी' ह्या लोकप्रिय प्रसिद्ध भूपाळीचा कर्ता (मवाइ., खं. ३; संपा. रा. श्री. जोग); पृ. ३०७.

**गणेशयोगी** [अंदाजे इ. स. १७८७] कवी. हे महागाणपत्य होते. ह्यांची समाधी मोरगावी (जि. पुणे) आहे. ह्यांचा शिष्यपरिवार मोठा होता. *गणेशविजय* हा ह्यांचा सर्वांत मोठा ग्रंथ असून त्यामध्ये गणेशगौरव केलेला आहे. 'यास्तव सार्वभौम। गणेश कळावा परम ॥ हाचि निश्चय वर्म। गणेशयोगी म्हणे ॥' ह्या ग्रंथाच्या अखेरीस येणाऱ्या ओवीवरून ग्रंथरचनेचा हेतू कळतो. ग्रंथरचनाकाळ श. १७०९ (इ. स. १७८७), प्लवंग संवत्सर, श्रावण शुद्ध त्रयोदशी असा नमूद केला आहे.

**रचना : अमु.** – १. गणेशगीताटीका; संस्कृत व प्राकृत समओवी टीका; २. गणेशगुह्यस्तोत्र; ओ. सं. २०१; ३. गणेशविजय; अ. २२; ओ. सं. ४५२२; र. श. १७०९ / इ. स. १७८७. ४. मयूरेशचरित्र; त्रुटित; ५. ललिताची व इतर अनेक पदे, अभंग, श्लोक, ब्रह्मणस्पतीवर आरती इ.; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : गणेशयोगीकृत गणेशविजय; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ४, चैत्र १८५४; पृ. १५३–१५४.

**गबा** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, अखेर] कवी. वडील अनंत. जमदग्निगोत्री ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. कुलगुरू : रंगनाथ. विद्यागुरू : कृष्णनाथ. गुरुपरंपरा : आदिमाया > गणेशानंद > सुवर्णानंद > कृष्णानंद > जनार्दन > पूर्णानंद > गबा. कवीच्या *भीममाहात्म्य* (र. श. १७२२ / इ. स. १८००) ह्या ग्रंथाचा गो. का. चांदोरकर ह्यांनी उल्लेख केला आहे (संककासू., पृ. १२६).

**गंभीरनाथ** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – पंचीकरण : तत्त्वज्ञानपर ग्रंथ; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ३२.

**गंभीरसुत / ० जयराम–२** [का.अनु.] कवी. ह्यांचे मूळ नाव जयराम असून हे स्वतःस गंभीरसुत असे म्हणवीत असत. ह्यांचे *दानलीला* व *राधाविनोद* असे दोन ग्रंथ गं. ना. मुजुमदार ह्यांच्या संग्रही असल्याची नोंद आहे (संककासू., पृ. ३२).

**० गयनीनाथ** – पहा **गहिनीनाथ.**

**गरीब** [का. अनु.] पदकार. चौंडशंकराच्या *स्वानंदसिंधु* प्रकरणात शेवटी कवीने दिलेल्या आपल्या परंपरेत एका गरीब कवीचे नाव येते. ती अशी : आदिनाथ > उमानाथ > ब्रह्मनाथ > चौरंगी > गणपति > नागनाथ > मच्छेंद्र > गोरक्ष > अवघड जालंदर > गुलाब > गरीब > चिद्रूप > चौंडनाथ > चिदांबरी > विश्वनाथ > बाळनाथ शंकरानंद (सवामं., बा. १२२८).

ह्यांनी रचलेली पदे समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात आढळतात (हस्त. सू., खं. २.).

**गरीब आवदुल** [का. अनु.] मुसलमान कवी. कोणा राजे भास्कराचे आश्रित. ह्यांचे गुरू शाह हुसेन होते असा उल्लेख त्यांच्या मराठी रिवायतीमध्ये केलेले सापडतात. ह्यांची फकीरी नाथपंथी जोग्याच्या वळणाची दिसते. ह्यांच्या दोन रिवायती उपलब्ध आहेत : एक सलामीची व दुसरी हुसेन ह्याच्या आईचा पुत्रशोक व्यक्त करणारी (मु. : मसा., आ. ५, ८३४) (रा. चिं. ढेरे; मुमसंक., पृ. १७८–१७९).

**गरीब परमानंद** [का. अनु.] पदकार. वेंचले येथे श. १८२३ / इ. स. १९०१ त नकललेल्या पदांच्या हस्तलिखित बाडात ह्यांची पदे संग्रहित (भाइसंमं.).

**गरुड** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदरचना; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गर्गाचार्य** [का. अनु.] ज्योतिर्विद.

**रचना : अमु.** – संवत्सरकालसंग्रह : ज्योतिष-ग्रंथ; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ३०१.

**० गहिनी** – पहा **गहिनीनाथ.**

**गहिनीनाथ / ० गयनीनाथ / ० गहिनी / ० गैनी** [अंदाजे श. ११२२ / इ. स. १२०० – श. १२१० / इ. स. १२८८] ग्रंथकार. गोरक्षशिष्य गहिनीनाथ हे महाराष्ट्रातील नाथपरंपरेचे मूळ पुरुष व प्रवर्तक. नरहरी धुंडिराज मालोकृत *नवनाथभक्तिसारातील* दहाव्या

अध्यायात गहिनीनाथांची अद्भुत जन्मकथा दिली आहे. "कनकग्रामांत बाल गोरक्ष गुरुदेवांबरोबर विचरण करीत असतां एकदां त्यानें मुलांच्या बरोबर मातीच्या मूर्ति बनविण्याचा खेळ आरंभिला. गुरूनें दिलेल्या मंत्राच्या सहजोच्चारणानें त्याच्या हातांतील मातीच्या पुतळ्यांत चैतन्य संचारलें. तोच गहिनीनाथ होय." ह्या ग्रंथात गहिनीला करभंजन नारायणाचा अवतार मानला आहे. ह्या अयोनिसंभव बालकाचा सांभाळ मत्स्येंद्रनाथाच्या आज्ञेने गावातील मधु नामक ब्राह्मण व त्याची पत्नी गंगा ह्यांनी केला. ह्या अद्भुत वर्णनाखेरीज गहिनीनाथांच्या जीवनाविषयी अधिक काही माहिती मिळू शकत नाही.

अमरनाथ हे गहिनीनाथांचे गुरुबंधू होत. शके १२१० / इ. स. १२८८ च्या सुमारास ब्रह्मगिरीवर ह्यांनी निवृत्तिनाथांना उपदेश दिला. निवृत्तिनाथांच्या आजाआजीलाही (गोविंदपंत–निराई) ह्यांचा उपदेश होता, असे नामदेवाने आपल्या *आदीत* म्हटले आहे. ह्याशिवाय प्रकाशनाथ नावाचा आणखी एक शिष्य ह्यांना होता, असे आदिनाथ भैरवकृत *नाथलीलामृता*वरून समजते.

गहिनीनाथांच्या नावावर *गहिनी-प्रताप* व *गोरक्षगीता* हे दोन ग्रंथ दिले जातात. *गोरक्षगीता* ग्रंथात ह्यांनी "हे गोरक्षगीता । गहिनीनाथ संवादु ॥" असे आरंभीच म्हटले आहे. तरीदेखील हा ग्रंथ गहिनीनाथांचा नसावा अशी शंका व्यक्त केली जाते. "ह्यांत योगाभ्यासाचें व त्यांत येणाऱ्या अनुभवांचें वर्णन आहे. ह्या ग्रंथाचा प्रभाव उत्तरकालीन साधुसंतांवर बराच पडला असावा, असें वाटतें. कारण ह्यांतील योगविवेचनाचें *ज्ञानेश्वरी*तील ६ व्या अध्यायांतील योगविवेचनाशीं साम्य असून सांप्रदायिक वातावरणांत त्या ग्रंथाचें प्रतिलेखन व अध्ययन सतत होत राहिलें आहे." –रा. चिं. ढेरे : गोचप., पृ. १४१. सोपानपरंपरेतील गंगाधरनाथ नामक नाथपंथीयाने *गोरक्षगीता-निरूपण* ह्या नावाची एक टीकाही ह्या ग्रंथावर लिहिली आहे. पांगारकरांनी *ज्ञानेश्वरांची प्रभावळ* (पृ. २७९–२८०) ह्या ग्रंथात गहिनीनाथांचे तीन अभंग संकलित केले आहेत. त्यांपैकी एकात 'आत्मनिष्ठेचा निर्धार', दुसऱ्यात 'गुरुदत्त गूढ तत्त्वरहस्य' व तिसऱ्यात 'कळिकाळाला जिंकण्याचा मार्ग' ते निवृत्तिनाथांना सांगतात. ही पदे हिंदीमिश्रित मराठीत आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : गहिनीनाथ : गोचप., पृ. १३८–१४२.

० **गाण** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

० **गॉमिश सिमाव** – पहा **सिमाव गॉमिश** (पाद्री).

**(रेव्ह.) गॉर्डन हॉल** [? २० मार्च १८२६ ]. अमेरिकन ख्रिस्तीधर्मप्रचारक व लेखक. अमेरिकेतील ब्रॅडफोर्ड ह्या गावी इ. स. १८१० साली काही तरुणांनी आशियातील लोकांना नैतिक अंधकारातून बाहेर काढण्यासाठी एक संघटना निर्माण केली. 'अमेरिकन बोर्ड ऑफ कमिशनर्स फॉर फॉरेन मिशन्स' हे तिचे नाव. ह्या बोर्डाच्या विद्यमाने इ. स. १८१३ च्या फेब्रुवारीत रेव्हरंड गॉर्डन हॉल व सॅम्युएल नॉट हे पहिले दोन कार्यकर्ते मुंबईस आले. पुढे १८१५ साली प्रकृती बिघडल्यामुळे सॅम्युएल नॉट अमेरिकेस परत गेले

गॉर्डन हॉल व सॅम्युअल नॉट हे मुंबईस येण्यापूर्वी पहिल्याने कलकत्त्यास ८ ऑगस्ट रोजी उतरले होते. पण तेथील ईस्ट इंडिया कंपनीच्या सरकाराने त्यांस तेथे मुक्काम करण्यास प्रतिबंध केला. त्यावेळेस मुंबईचा गव्हर्नर इव्हान्स नेपियन हा होता. मिशनऱ्यांबद्दल त्याला सहानुभूती वाटे. तो आपणांस मुंबईत राहू देण्याच्या विरुद्ध बहुधा जाणार नाही असे ह्या दोघांस वाटून ते कलकत्ता सोडून तेथे आले. पण त्यांचा तो अंदाज चुकीचा ठरला. ह्या प्रकरणी *ज्ञानोदय* मासिकात (सप्टेंबर, ऑक्टोबर १८५२ व एप्रिल १८५३) पुढीलप्रमाणे हकीकत प्रसिद्ध झालेली आहे : "त्यांनीं आपल्या पोहोंचण्याची बातमी व इकडे येण्याचा उद्योग कोणता व काय, हें सर्व सरकारास कळविलें. आणि त्याला अशी विनंति केली कीं, आम्हास येथें सुखवस्तु राहूं देण्यास परवानगी असावी. त्यावेळीं मुंबई इलाख्याचा गवरनर सर यवन्स निपियन होता. त्यानें ह्या उपदेशकांविरुद्ध बातमी ऐकिली होती म्हणून त्यांची विनंती न ऐकता त्यांस असें सांगितलें कीं, येथें राहण्यास तुम्हाला परवानगी मिळणार नाहीं. तेव्हां आपल्याविषयीं गवरनर साहेबांच्या मनांत जो संशय आला आहे, तो जावा आणि आम्ही ज्या कामाकरितां इकडे आलों, तें काम चालविण्यास कोणापासून कांहीं प्रतिबंध न व्हावा, म्हणून त्यांनीं सर यवन्स यांस एक पत्र लिहिलें आणि त्यांत कलकत्ता मुक्कामीं असतां आपल्या संबंधीं जें सर्व घडून आलें त्याचें इत्थंभूत निरूपण केलें. ह्या पत्राच्या योगानें गवरनर साहेबांची तर अशी खात्री झाली कीं, त्यानें त्यांस इकडे राहूं दिलें एवढेंच नाहीं, परंतु लार्ड मिन्टो म्हणून सर्व हिंदुस्थानावर त्यावेळीं जो राज्य करीत होता, त्यास अशी अर्जी केली कीं, त्या उपदेशकांस इकडे सुखवस्तु चौघांप्रमाणें राहूं देण्यास कांहीं हरकत नसावी. ते इकडच्या लोकांचें कल्याणच इच्छितात आणि जेणेंकरून त्यांचें कल्याण होईल, त्यांत आपलें आयुष्य घालवावें, असा त्यांचा निश्चय आहे. ही अर्जी लार्ड मिन्टो यानें मान्य केली असती, परंतु मध्येंच एक अरिष्ट उत्पन्न झालें. तेणेंकरून त्या बिचाऱ्या उपदेशकांस हाकनाक फार दुःख व क्लेश भोगावे लागले.

"त्यावेळीं अमेरिका व इंग्लंड ह्या देशांत लढाई चालली होती. तशांत अमेरिकेहून अरेकान म्हणून ब्रम्हदेशांत एक शहर आहे, तेथें जाण्याकरितां एक जहाज आलें. रस्त्यानें तुफान झाल्यामुळें तें कलकत्त्यास लागलें. इंग्लिश सरकारनें त्या जहाजाला अटकाव केला. त्यास असा वहमा झाला कीं, इंग्लिश सरकारासंबंधीं आपणास कांहीं बातमी लागावी म्हणून अमेरिकन लोकांनीं तें जहाज पाठविलें आहे. ह्या वहम्यामुळें तें जहाज धरिलें आणि त्यांतील खलाशी कैद करून इंग्लंडास पाठविले. मिस्तर हाल व मिस्तर नाट हेहि अमेरिकेहून आले म्हणून कदाचित् उपदेशकाच्या मिषानें कांहीं लढाईविषयीं बातमी आपल्या देशांत पाठवावी हा हेतु त्यांचा असेल, असा वहमा त्या उपदेशकांविषयीं कलकत्त्यांतील गवरनरानें धरिला आणि मुंबईचा जो गवरनर त्यास हुकुम केला कीं त्या उपदेशकांस इंग्लंड देशास पाठवावें.

"ह्या वहम्यामुळें हुजुर सरकारांतून जो हुकुम आला, त्याप्रमाणें मिस्तर हाल व मिस्तर नाट ह्यांस कैद करून इंग्लंडास पाठविण्यास मुंबई सरकारानें तयारी केली. अशा प्रसंगीं इकडे राहण्याकरितां त्यांच्यानें जितके उपाय करविले, तितके त्यांनीं केले. कोणी कोणी ईश्वरीभक्त येथें होते, त्यांनींहि आपल्याकडून जेवढें साह्य होईल तेवढें केलें. त्यावेळीं मिस्तर मनी (ज्यावरून राबर्ट मनी शाळा असें नांव पडलें आहे) म्हणून सरकारी मुख्य सकरतारी होता, त्यानें त्याविषयीं फार मेहनत केली. परंतु ते सर्व उपाय निष्फळ झाले, असें दिसण्यांत आलें.

"एक दोन दिवसांनीं त्यांस इंग्लंडास पाठविणार इतक्यांत लेफ्टनंट जान वेड म्हणून कोणी धार्मिक मनुष्य होता त्यानें त्यांस अशी बातमी दिली कीं, एक जहाज येथून कोचीनला जाणार आहे. आक्टोबर महिन्याच्या १८ वे तारखेस ते मुंबई सोडून कोचिनास गवरनरास न कळवितां गेले. तेथें गेल्यानंतर त्यांनीं यहुदी व सिरियन ख्रिस्ती लोक जे शेंकडों वर्षांपासून त्या प्रांतांत राहतात त्यांविषयीं पुष्कळ शोध केला आणि त्यानंतर ते सिंगलद्वीपास जाणार तों तेथल्या माजिस्ट्रेटास मुंबईहून असा हुकूम आला कीं, त्या मिशनरी लोकांस ताबडतोब परत पाठवून द्यावें.

"मिस्तर हाल व मिस्तर नाट, कोचीनहून इकडे परत आल्यावर पाहतात तों गवरनर साहेबाची मर्जी आपल्यावर फार खप्पा झाली आहे. त्यांना सरकारनें ज्या तारवांत ते आले त्यांतच दहा दिवस कैद करून ठेविलें. नंतर त्यांना पोलिस ऑफिसांत आणून सांगितलें कीं,

तुह्मी सरकारास असा मुकदमा लिहून द्यावा कीं, आह्मी तुमच्या परवानगीखेरीज कोठें जाणार नाहीं आणि गेल्यास चार हजार रुपये दंड देऊं; अशी कबुलात करण्यास ते उपदेशक राजी झाले नाहींत, यास्तव त्यांना तेथेंच कैद राहावें लागलें. जेव्हां त्यांनीं पाहिलें कीं, आह्मास विलायतेस पाठविल्यावांचून हे लोक राहणार नाहींत तेव्हां त्यांनीं सर यवन नेपियन याची या कामांत वर्तणूक ईश्वरासमोर व त्याच्या लोकांच्या नजरेंत कशी काय आहे हें स्पष्ट निर्भयतेनें पत्रद्वारें कळविलें. तें पत्र गवरनरसाहेबानीं आपल्या कौन्सलदारांस दाखविलें व हुजुर सरकारांतून हुकूम येईतोंपर्यंत त्यांस राहूं दिलें.

"सन १८१३ त इंग्लिश सरकारनीं ईस्ट इंडिया कंपनीस नवी सनद करून दिली. त्या सनदेंत असें एक कलम होतें कीं ज्या मिशनेरी लोकांची इकडे उपदेश करण्याच्या कामाकरितां येण्याची इच्छा असेल त्या लोकांस प्रतिबंध करूं नये. ह्या कलमावरून मिस्तर हाल व मिस्तर नाट यांस इकडे राहण्याची परवानगी मिळाली, एवढेंच नाहीं; परंतु सर्व उपदेशकांपुढें धोपट मार्ग उघडल्याप्रमाणें झालें." (*ज्ञानोदयाचीं पहिलीं शंभर वर्षें*; ग्रंथ पहिला; संपा. रेव्ह. हिवाळे; मुंबई, १९४२; पृ. ७–८).

मुंबईस आलेल्या वरील दोन अमेरिकन ख्रिस्ती उपदेशकांस मुंबईत राहण्याची परवानगी नोव्हेंबर १८१५ मध्ये मिळाली. ती मिळेपर्यंतच्या काळात त्यांनी मराठी भाषेचा अभ्यास, एका ब्राह्मणाचे साह्य घेऊन चांगल्या प्रकारे केला. मराठीत भाषण व लेखन करता येण्याइतकी त्यांची तयारी झाली. तशी ती झाल्यावर ते बाजारात किंवा चव्हाट्याच्या ठिकाणी उभे राहून ख्रिस्ताचा संदेश मराठीतून सांगू लागले, त्याचप्रमाणे लहान लहान पुस्तिका लिहून प्रसारित करू लागले. ह्या काळात मराठी मुद्रण करण्याची सोय मुंबईत नव्हती. त्यामुळे ह्या पुस्तिकांच्या हस्तलिखित प्रती काढून वाटण्यात येत किंवा मोठ्या समुदायात त्यांतील उपदेशपर मजकूर वाचून दाखविण्यात येई. ह्या वाचनामुळे त्यांना एक महत्त्वाचा फायदा होई. लेखनात, रचना व संप्रदाय ह्या दृष्टीने, काही चुका झाल्या असल्यास श्रोत्यांकडून त्यांच्या लक्षात त्या प्रसंगी आणून दिल्या जात.

गॉर्डन हॉल ह्यांनी, पुढे, होरेशियो बाल्डवेल (१८१६, नोव्हेंबर) ह्यांच्या सहकार्याने अमेरिकन मिशनसाठी छापखान्याची उभारणी केली. ह्या छापखान्यात पहिल्यानेच मुद्रित होऊन २० मार्च १८१७ रोजी जी आठ पृष्ठांची एक मराठी धर्मोपदेशपत्रिका बाहेर पडली, तिचे लेखन गॉर्डन हॉल ह्यांनीच केले होते (पहा *मेमोरियल पेपर्स ऑफ दि अमेरिकन मराठी मिशन*, पृ. ९६) असे रेव्ह. ब्रूस ह्यांनी म्हटले आहे. ही धर्मोपदेशपत्रिका हेच मराठीतील पहिले मुद्रित. छापखान्याच्या उभारणीनंतर गॉर्डन हॉल ह्यांनी एतद्देशियांसाठी, मिशनच्या विद्यमाने, मुंबई व त्याच्या आसपासचा प्रदेश ह्यांत ठिकठिकाणी शिक्षणप्रसारासाठी शाळा स्थापण्याचा उद्योग सुरू केला. इ. स. १८२० मध्ये मुंबईत ७, माहीमच्या भागात ७, ठाण्यात २ व मुंबईबाहेर ५ अशा २१ शाळा निघाल्या. त्यांत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या १०५० होती (*ए सेंचरी इन इंडिया : अमेरिकन मराठी मिशन फ्रॉम १८१३ टू १९१३*; पृ. ११). ह्या शाळांसाठी पाठ्यपुस्तके तयार करणे क्रमप्राप्तच होते. गॉर्डन हॉल ह्यांनी पाठ्यपुस्तके तयार करण्याचा उपक्रम स्वतःच सुरू केला. *लेंकरांची पहिली पोथी* (१८१८), *इंग्लिश भाषणाचें ज्ञान मिळविण्यासाठीं साह्यकारि* (१८१९), *खगोलविद्या* (१८१९) अशी तीन पुस्तके लिहून प्रसिद्ध केली. पाठ्यपुस्तकांप्रमाणेच *प्रश्नोत्तरावली* (१८१९), *त्रिभुवनांची गोष्ट* (१८२२), *देवाच्या दहा आज्ञा* (१८२५), *होणार क्रोध* (१८२५), *शुभवर्तमान* (१८२५) अशी ख्रिस्तीधर्मप्रचारास पोषक होणारी छोटी-छोटी पुस्तके लिहिली.

गॉर्डन हॉल हे एक महान उद्योगी व चिकाटीचे धर्मप्रचारक होते. पुणे व नाशिक ह्या भागांत त्यांचे झंझावाती प्रचारकार्य सुरू असे. हे प्रचारकार्य करीत असतानाच हे होडी दापूर (जि. नाशिक) येथे ख्रिस्तवासी झाले.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म. : अमेरिकन मिशनचे मराठी वाङ्मय; युमअसे., मुंबई, १९६०; पृ. २३१–२४३.

**गावबा / ० नित्यानंद** [अंदाजे १५२१ / इ. स. १५९९] कवी. पैठणकर एकनाथांचे शिष्य. एकनाथांचे अपुरे *भावार्थ-रामायण* ह्यांनी पूर्ण केले. एकनाथांच्या *भावार्थ-रामायणा*ची रचना चालू असता ती अर्धवट सोडूनच नाथांनी देह ठेवला. ह्यावेळी *रामायणा*ची पहिली पाच कांडे व सहाव्या युद्धकांडाचे ४४ अध्याय वाचून झाले होते. ग्रंथाची पुढील रचना नाथांनी आपल्या गावबा ह्या एकनिष्ठ शिष्याकडे सोपविली व त्यांनी ग्रंथपूर्ती केली, अशी माहिती नाथांचे चरित्रकार देतात. गावबांनी सहाव्याचे उरलेले ४८ अध्याय व सातवे उत्तरकांड पूर्ण केले. ग्रंथाचे एकूण २९७ अध्याय व ४०,००० ओव्या आहेत त्यांपैकी १७२ अध्याय व २५,००० ओव्या नाथकृत आणि पुढील १२५ अध्याय व १५,००० ओव्या गावबाकृत आहेत असा समज प्रचलित आहे. 'युद्धकांडाची पूर्णता। आणि उत्तरकांड तत्त्वता। गावजी सिद्धीस नेईल आता। यासी अन्यथा असेना ॥' असे महिपतींनी म्हटले आहे (*भक्तलीलामृत* ॥२४.८६॥). ह्यानंतर नाथांनी हा ग्रंथ पूर्ण करण्यासाठी आपली लेखणी गावबांच्या हाती दिली व त्यांच्या मस्तकावर आपल्या कृपेचा वरदहस्त ठेविला असेही ते सांगतात. गावबांची ही कथा सत्य असावी असे मत वि. अं. कानोले ह्यांनी व्यक्त केले आहे (*श्रीएकनाथदर्शन, खं. १*, पृ. २९१). वि. ल. भावे, ल. रा. पांगारकर व ज. र. आजगांवकर ह्यांनीही गावबांची हकीकत जशीच्या तशी मान्य केली आहे.

एकनाथांनी ग्रंथ अर्धवट सोडल्याचा व तो दुसऱ्या कोणीतरी पूर्ण केल्याचा पुरावा ग्रंथांतरी सापडतो. उदा., "यापरी मी अनाथ। होतों भवदरिद्रें पीडित। एकाजनार्दनीं येथ। केला सनाथ त्रिजगतीं॥" (युद्ध. ४५.१८७ ॥) हे बोल नाथांचे नाहीत. ते गावबांचे अस्तित्व प्रकट करणारे असण्याची शक्यता आहे. गावबांनी आपले नाव ग्रंथात कोठेही आणलेले नाही. 'एका जनार्दन' ह्या नाममुद्रेखाली केलेली ही रचना तिचे भिन्नत्व ओळखू न येण्याइतपत मूळ कृतीशी एकरूप झालेली दिसते.

*भावार्थ-रामायणा*चा शेवटचा भाग एकट्या गावबांनीच पूर्ण केला की अन्य काही लेखकांनी त्यास जोड दिली, हाही एक महत्त्वाचा प्रश्न आहे. उदा., मुद्रित *भावार्थ-रामायणा*च्या युद्धकांडातील जयरामसुत कवीचे *अहिमहि आख्यान* (अ. ५१–५४).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कानोले, वि. अं. : भावार्थ-रामायणाचे अज्ञात उत्तरकांड; श्रीएकनाथदर्शन, खं. १; औरंगाबाद, १९५२; पृ. २९०–३२६.

**गास्पार द सा. मिगेल (पाद्री)** [इ. स. च्या १७ व्या शतकाचा मध्य] फ्रान्सिस्कन मिशनरी कवी. देशी भाषेत ग्रंथनिर्मिती करणाऱ्या फ्रान्सिस्कन पाद्र्यात अग्रेसर. ह्यांनी आपले सर्व ग्रंथ पोर्तुगालचा राजा चौथा फिलिप ह्याला अर्पण करून त्यांपैकी काही राजाश्रयाने छापवून घेण्याची तजवीज केली होती.

मिगेलनी बऱ्याच ग्रंथांची रचना केली अशी माहिती आढळते. त्यांपैकी काही ग्रंथ स्थानिक बोलीत व काही ग्रांथिक मराठीत आहेत. प्रत्यक्षात मात्र *स्टीफन्स प्रशस्ती* असे १४ ओव्यांचे काव्य सोडल्यास इतर रचना पाहण्यास सापडत नाही. Das Estações etc. हा ह्यांचा महत्त्वाचा ग्रंथ. हा काव्यबद्ध असून ख्रिस्ती प्रचारकांनी भक्तगणाला करावयाच्या उपदेशाची माहिती त्यात दिलेली आढळते. प्रस्तुत ग्रंथ छापण्यात आला होता. ह्या काव्यातच *चार अंतिम उद्दिष्टांसंबंधीचे* (*Quatro Novissimos*) विवेचन करण्यात आले होते अशी माहिती एका ठिकाणी आढळते; तर हे दोन वेगळे ग्रंथ आहेत असे सिल्व्ह रेगोच्या ग्रंथात नमूद केलेले आहे (सशगोबो., पृ. ३१३). ख्रिस्तीधर्म-

प्रचाराखातर ह्यांनी केलेल्या इतर महत्त्वाच्या रचनेमध्ये साधुसंतां-विषयीच्या धर्मोपदेशाचे चार खंड, काही भाषांतरे, *ख्रिस्ताचें यातनागीत, धर्मसूत्रसंग्रहाचें स्पष्टीकरण, प्रेषितांचे जीवन* असे अनेक ग्रंथ समाविष्ट होतात. ह्याखेरीज *कोंकणीचें व्याकरण* व *कोंकणी पोर्तुगीज कोश* ह्यांच्या नावावर आहेत. – *बिब्लीयॉतॅक लुझितान* (१७४१) ग्रंथात दिलेल्या माहितीनुसार.

**रचना : मु.** – १. कोंकणी पोर्तुगीज कोश. २. कोंकणीचें व्याकरण. ३. ख्रिस्ताचें यातनागीत; ओ. सं. ३०००. ४. धर्माचें प्रतीक : भाषांतर Fr. Luiz de Granada कृत Symbolo de Fé वरून. ५. धर्मसूत्रसंग्रहाचे स्पष्टीकरण. ६. प्रेषिताचें जीवन. ७. विवेक-माला; ओ. सं. ६०००. ८. स्टीफन्स प्रशस्ती; ओ. १४ (मु. : ख्रिस्तपुराण, चौथी आवृत्ती, १९०७ मध्ये). ९. Das Estações etc. १०. Symbolo ह्या कार्दिनाल बालार्मीनच्या ग्रंथाचे भाषांतर.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पिंगे, श्री. म. : फ्रान्सिस्कन पंथीयांचे मराठी वाङ्मय; युमअसे.; मुंबई, १९६०; पृ. २८. २. प्रभुदेसाई, वि. बा. : गास्पार द सा. मिगेल (पाद्री); सशगोबो., मुंबई, १९६३; पृ. ३१३–३१४.

**गिजरागिरिभट्ट / ० गिरिभट्टगिजरा** [का. अनु.] नाथसंप्रदायी कवी. कोणी नवनाथ सिद्धयोगी ह्यांच्या कृपेने *गोपीचंदाची कथा* लिहिली गेली असे कवी म्हणतो (तंसम. बा. १५८०, माहिती). त्याअर्थी हा नवनाथ सिद्धयोगी ह्यांचा गुरू असावा. ह्याने रचलेली *गोपीचंदाची कथा* (ओ. १४०), तसेच *अनुसूया निरूपण, गजगौरीव्रत* (श्लो.), *त्रिपुरसंहार* (श्लो.) अशा रचना तंजावर येथील हस्तलिखितांच्या संग्रहात उपलब्ध. (हस्त. यादी, क्र. ३).

**० गिरमाजीबुवा** – पहा गिरिधर–१.

**गिरि / ० गिरि विप्र** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – एक रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९, पृ. ३८. **अमु.** – १पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गिरि आत्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – वेंकटाष्टकस्तोत्रदशक; ले. का. : श. १६५८ / इ. स. १७३६; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. २७.

**गिरिजावल्लभप्रभुसुत श्रीधर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गिरिदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – एक रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९, पृ. ३८. **अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गिरिधर–१ / ० गिरमाजीबुवा / ० गिरिधर गोसावी / ० वेणीगिरिधर** [अंदाजे श. १५७५ / इ. स. १६५३ – समा. श. १६५१, वैशाख शुद्ध अष्टमी, शुक्रवार / इ. स. १७२९] रामदासी कवी. हे मूळचे मिरज-तासगावकडचे राहणारे. ह्यांची गुरुपरंपरा श्रीसमर्थ > वेणाबाई > बाइयाबाई > गिरिधर अशी ते देतात. वेणाबाईच्या पश्चात मिरज येथील त्यांचा मठ काही काळ बाइयाबाईंच्या ताब्यात होता. गिरिधर व त्यांचे बंधू त्रिंबक, यशवंत, भीम ह्या सर्वांनीच बाइयाबाईंचा उपदेश घेतला होता. गुरूच्या आज्ञेमुळे पुढे ह्यांस बीडपासून सात-आठ कोस दूर असलेल्या ईट गावी वास्तव्य करावे लागल्याने तेथेच ह्यांनी त्यांच्या मठाची स्थापना केली. गिरिधर हे गृहस्थाश्रमी होते. त्यांना एकच कन्या तेवढी होती. बीड येथे जे दोन मठ आहेत त्यांपैकी एक गिरिधरांच्या कन्येच्या वंशजांचा व दुसरा त्यांचे बंधू भीम ह्यांच्या वंशजांचा आहे. गिरिधरांनी आपली सर्व हयात श्रीगुरू व श्रीराम ह्यांच्या भजनात व ग्रंथरचनेत घालविली. ह्यांनी बीड येथे समाधी घेतली. ती बीड येथे गावाबाहेर, नदीकाठी आहे.

*समर्थप्रतापा*सह एकूण चाळीस ग्रंथ व बरीचशी स्फुट स्वरूपाची कविता, एवढी प्रचंड ग्रंथरचना गिरिधरांनी केली आहे. एकंदर कविता-संख्या २४,००० पेक्षा अधिक आहे. सांप्रदायिकांच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरतील असे *गुरुमार्ग, श्रीगुरुआज्ञा, श्रीगुरुरस, शिष्यशासन, गुरुदीक्षा, श्रीस्वामीदर्शन* इत्यादी अनेक ग्रंथ ह्यांनी रचलेले आहेत. त्यात गुरु-शिष्यसंबंधाचे उपदेशात्मक विवेचन येते. *ग्रन्थभावार्थ, ग्रन्थान्वय, ग्रन्थ-भावार्थराज, आत्मानुभव* ही चार गिरिधरकृत प्रकरणे दासबोधाचे रहस्य व्यक्त करणारी आहेत. ती *श्रीमत् दासबोधाची किल्ली* (संपा. शं. श्री. देव, *रामदास आणि रामदासी, भाग २०,* शके १८४२) ह्या नावाखाली प्रसिद्ध झालेली आहेत.

*समर्थप्रतापात* श्रीसमर्थांचे समग्र जीवनचरित्र मोठ्या भक्तिभावाने वर्णिले आहे. त्यांचे बोलणे चालणे ह्याविषयी समकालीन कवीने दिलेली दुर्मिळ माहिती ह्या चरित्रात सापडते. त्यांचे रूपवर्णन, त्यांच्या आहार व निद्रेच्या सवयी, त्यांचे भ्रमण, त्यांचा एकांतवास इत्यादी गोष्टींसंबंधात चरित्रकाराने दिलेल्या माहितीत बारकावा आहे. समर्थांच्या परि-वारातील साधुसंतांची विस्तृत नामावळी लेखक देतो. भीमस्वामींच्या *समर्थचरित्रा*प्रमाणेच समर्थांवरील एक जुना आणि विश्वसनीय चरित्र-ग्रंथ म्हणून ह्या ग्रंथाचे विशेष मोल आहे. गिरिधरांची भाषा सोपी व प्रसंगी रसाळही आहे. [ ⇨ ३. ]

आपले उपास्यदैवत राम ह्याचे चरित्र गाण्यासाठी ह्यांनी रामा-यणावर रचना केली. निरनिराळी रामायणे लिहिण्याची कल्पना मूळची ह्याच कवींची. ह्यांनी सात रामायणे रचल्याचा उल्लेख *समर्थप्रतापात* येतो (१९. ६२). पण *अब्द, मंगल, सुंदर, छंद* आणि *संकेत* अशी त्यांची पाच रामायणे सध्या उपलब्ध आहेत. ह्यांपैकी *संकेतरामायण* (सर्ग १८८) हे सर्वांत मोठे व ओवीबद्ध आहे. गिरिधरांनी मूळ कथेचा अधिक विस्तार किंवा अतिसंक्षेप केलेला नाही. ह्यांच्या श्लोकबद्ध रामायणापेक्षा ह्या ओवीबद्ध रामायणाची रचना अधिक चांगली आहे असे ल. रा. पांगारकर ह्यांचे मत आहे. ह्याची पहिली सहा कांडे वेणाबाईंची असावीत असे शं. श्री. देव ह्यांना वाटते (*समर्थप्रताप,* प्रस्ता., पृ. ५).

ह्यांचा *निवृत्तिराम* हा ग्रंथ अध्यात्मविषयक आहे. त्यात भक्ती, ज्ञान, वैराग्य, माया, ब्रह्म अशा अनेक विषयांचे निरूपण करून शेवटी 'निखिळ परब्रह्म केवळ निर्गुण' कसे उरते हे स्पष्ट करून दाखविले आहे. निवृत्त होण्याच्या साधनात भक्तिमार्गाची विशेष योग्यता आहे हे कवी आवर्जून सांगतो. ग्रंथाच्या प्रत्येक समासात शेवटी 'निवृत्तिवेणी' असे कवीचे वेगळेच नाव येते. पण हा ग्रंथ गिरिधरांनी रचल्याचा स्पष्ट निर्देश त्यांच्याच *समर्थप्रतापात* आहे. हा ग्रंथ गिरिधरांच्या सर्व ग्रंथांत, काव्य आणि रचना ह्या दृष्टीने, लक्षणीय आहे.

गिरिधरांची कविता थेट रामदासी पद्धतीची असून तिच्यामध्ये एक प्रकारचा जिवंतपणा आहे, असे ल. रा. पांगारकर म्हणतात. बरीचशी रचना अनेकवृत्तात्मक आहे. मात्र ह्या श्लोकबद्ध रचनेपेक्षा ह्यांची ओवीबद्ध रचना अधिक सरस वाटते. रचनेपाठीमागच्या तळमळीमुळे ह्यांची कविता काही वेळा निश्चितपणे परिणामकारक झाली आहे. गिरिधरांच्या प्रचंड ग्रंथरचनेचे महत्त्व सांप्रदायिकांच्या दृष्टीने जसे आहे तसेच वाङ्मयीन दृष्टिकोनातूनही काही प्रमाणात आहे. (ल. रा. पांगारकर (संपा.); मवाइ., खं. ३; मुंबई, १९३९; पृ. ७१५-७४१.)

**रचना : मु.** – १. अब्दरामायण; श्लो. १८३; धुळे, १९४१. २. काशीखंड; अभंग ३९४८; धुळे, १९४७. ३. काशीयात्राकथन; अभंग १०६; धुळे, १९४१. ४. ग्रंथान्वय; अभंग २४५. ५. छंदोरामायण; श्लो. १५५६; र. श. १६१९; धुळे, १९३९. ६. निवृत्तिराम; समास २२; ओ. सं. २०१६; र. श. १६३५; धुळे, १८९३ व १९१६. ७. मंगलरामायण; श्लो. १६१९; धुळे, १९३९.

८. श्रीआत्मानुभव; समास १२; ओ. सं. ६९७. ९. श्रीग्रंथभावार्थ; श्लो. २३०. १०. श्रीदासबोध ग्रंथराज भावार्थ; श्लो. २७. ११. श्रीहकीकतवाके : शिष्यशासन ८२; गुरुदीक्षा १७८; श्रीस्वामीदर्शन १२९; श्रीदेवदर्शन ११८ ही प्रकरणे समाविष्ट. १२. श्रीसमर्थप्रताप; समास २१; ओ. सं. १३३२; र. श. १६४४ ते १६५१; धुळे, १९१२. १३. संकेतरामायण; सर्ग १८८; ओ. सं. १३३२; र. श. १६४४; धुळे, १९२३. १४. सुंदर रामायण; श्लो. ७४९; धुळे, १९४७. **अमु.** – १. गुरुगीतार्थ; अभंग २३४. २. गुरुमार्ग; अभंग ७६. ३. गुरुवाक्यमाला; श्लो. १६१. ४. दीक्षासंवाद; अभंग १५४. ५. देवसंवाद; श्लो. ७१. ६. नानापंथ (पदे); कडवी ५०. ७. प्राणनाथ; अभंग ५२. ८. योगीराज; अभंग ५०. ९. लोकस्वभाव; ओव्या २५. १०. शिष्यभावार्थ; अभंग ५३. ११. श्रीकरुणाराम; श्लो. १८२. १२. श्रीकरुणारुद्र; श्लो. १२१. १३. श्रीकृष्णकथातरंग; ओव्या १७३. १४. श्रीगुरुआज्ञा; अभंग ७८. १५. श्रीगुरुदेवनमन; ओव्या १२८. १६. श्रीगुरुरस; अभंग १०५. १७. श्रीरामरूप; अभंग ५२. १८. श्रीशिवरहस्य; श्लो. १०२. १९. श्रीसमर्थकरुणा; श्लो. १०९. २०. श्रीसीतारूप; अभंग ५४. २१. साधुसंवाद; अभंग ४५. २२. हरिलीला; श्लो. ४५४. २३. स्फुट कविता : श्लोक, पदे इ., सुमारे १५००.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र.; गिरिधर; मकच., खं. ५; मुंबई, १९२०; पृ. ४३–६९. २. देव, शं. श्री. : श्रीसमर्थप्रताप; प्रस्ता. : श्रीगिरिधर आणि त्यांची कविता; श्रीरामदास आणि रामदासी, भाग ८ वा; धुळे, १९१२; पृ. १–६४.

**गिरिधर–२** [अंदाजे इ. स. १६९६ नंतर] पदकार. गुरू : दिगंबर श्रीपाद. परमहंसदीक्षा. ह्यांनी अभंग व पदे रचली आहेत. (मचको., पृ. ३१६).

**गिरिधर अंकित** [का. अनु.] पदकार. कृष्णपर सहा व रामपर एक अशी सात पदे मुद्रित (वा. दा. ओक संपादित *पद्यसंग्रह, भा. १*, मुंबई १८९६, पृ. ६५–६६).

**गिरिधरकवि** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पंढरीमाहात्म्य; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गिरिधर गोविंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**० गिरिधर गोसावी** – पहा **गिरिधर–१.**

**गिरिधरदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गिरिधरनागर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गिरिधरप्रभु** [का. अनु.] कवी व पदकार. हे *समर्थप्रताप*कार गिरिधरांहून वेगळे. ह्यांनी रचलेल्या *व्यंकटेशनवरात्रोत्सव* ह्या प्रकरणात ओव्या, श्लोक, पदे असा रचनेचा क्रम दिसतो. क्रम फक्त ओव्यांचाच दिलेला असून त्यांची संख्या ४२ आहे. ह्यातील सर्व पदे गिरिधरांची नाहीत. प्रसंगानुरूप वीरेश्वरसुत, उद्धवचिद्धन, केशवस्वामी, गोपाळसुत, आनंदनंदन, लोलिंबराज अशा अनेकांची पदे समाविष्ट केली आहेत (सवामं. बा. ४६५). ह्यांच्या *सुदामचरित्रा*चा निर्देश *संत-कवि-काव्य-सूचीत* आढळतो (पृ. १२७). ह्यांनी रचलेली बरीच पदे समर्थवाग्देवता-मंदिर, धुळे येथील बाडातून आढळतात.

**गिरिनाथ** [का. अनु.] ग्रंथकार. अच्युतनाथ हे ह्यांचे गुरू असावेत असे पोथी-समाप्तीतील उल्लेखावरून वाटते.

**रचना : अमु.** – तत्वमसिमहावाक्यपंचीकरण; गद्य; पोथ्या – प्रती २; प्रतलेखक : गोविंद केशव; प्र. ले. का. : श. १७०१ / इ. स. १७७९; मसंमं.; हवना., पृ. २६.

**गिरिपरमानंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गिरिपुरी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. २७.

**गिरिभट्ट** [का. अनु.] कवी. ह्यांची *शरसेतुभंग, हनुमदर्जुन संवाद*, श्लोक आणि पदपदांतरे अशी स्फुट कविता तंजावर येथील हस्तलिखित संग्रहात आढळते (यादी क्र. ३).

**० गिरिभट्टगिजरा** – पहा **गिजरागिरिभट्ट.**

**गिरि वसिष्ट** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० गिरि विप्र** – पहा **गिरि.**

**गिरीसुत (ठकाप्पा)** [अंदाजे श. १७७२ / इ. स. १८५०] कवी. प्राचीन मराठी जैन वाङ्मयाच्या परंपरेतील आज ज्ञात असलेला शेवटचा कवी. कागलजवळील कोगनोळी (कर्नाटक प्रांत) येथील गिन्याप्पा मगदुम ह्यांचा ठकाप्पा हा मुलगा. *उपदेशरत्नमाला* व *पुण्यास्रव* लिहिणारे जिनसेन हे ह्यांचे गुरू. ह्यांनी मराठीत *पांडवपुराणा*ची रचना केली आहे. त्यात जैन पांडवपुराणाची कथा सांगितली आहे. कानडी भाषेत कवी नागराजेंद्र ह्यांनी *हरिवंश* ग्रंथ लिहिला आहे. त्याच्याच आधारे मराठीत सदरहू ग्रंथ केला असल्याचे कवीने सांगितले आहे. "पांडवपुराण ग्रंथ सुंदर । कर्नाटक भाषा हरिवंश आधार ॥ त्यांतील निवडून सारासार । प्रथम अध्याय कथिलें ॥" अशी ओवी प्रत्येक अध्यायाच्या शेवटी येते.

**रचना : मु.** – पांडवपुराण; अ. ३२; र. श. १७७२, वसंत ऋतूत वैशाख मासात, शु. द्वादशीस, भौमवासरी पूर्ण.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : गिरीसुत (ठकाप्पा); प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. १०८.

**० गुंडम राऊळ** – पहा **गोविंदप्रभु.**

**गुंडाकवि** [का. अनु.] रामदासी कवी. केशवस्वामी भागानगरकर ह्यांचे हे शिष्य. हे विठ्ठलोपासक दिसतात. इंदुरबोधन मठातील बाडात ह्यांचे नाव अनेकदा येते. ह्यांचे ३००–४०० अभंग समर्थवाग्देवता-मंदिराच्या धुळे येथील बाडात उपलब्ध. विठ्ठलाची एक आरती मुद्रित (मआ., पृ. ३८१).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : गुंडाकवि; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. ११–१३.

**गुंडा केशव** [अंदाजे श. १७५२ / इ. स. १८३०] विदर्भातील प्रसिद्ध संतकवी. नाथसंप्रदायी. यवतमाळ जिल्ह्यातील विडूल गावचे राहणारे. त्यांची समाधी विडूल ग्रामीच आहे. डोमगाव येथील मठात ह्यांची काही अप्रकाशित कविता उपलब्ध. ह्यांनी हिंदी व मराठी पदे रचली आहेत (सवामं., हस्त. सू., खं. १).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** शर्मा, विनयमोहन : गुंडा केशव; हिंमसंदे., पटणा, १९५७; पृ. २२०–२२१; ४६३–४६७.

**गुंडाकेशरी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गुंडिराम** [अंदाजे श. १४०० / इ. स. १४७८] कवी. ह्यांच्या *आत्मशोध* ग्रंथात शेवटी दिलेल्या परंपरेच्या ओव्या अशा : "सद्गुरु अगाध। वडवानळ सिद्ध। परब्रह्म प्रसिद्ध। नागनाथ॥ ५५२॥ तयाचा अनंत। योगी हा विख्यात । तया नादसुत । धोंडिराम ॥ ५५३॥ त्याचे चरणसरोजीं । संतचरणरजीं। सहजासहजी । गुंडिराम ॥ ५५४॥ ह्यावरून नागनाथ > अनंत > धोंडिराम > गुंडिराम अशी गुरुपरंपरा सांगता येते. नागनाथांचा काळ श. १३०० (इ. स. १३७८) चा सुमार मानल्यास गुंडिरामांचा काळ अंदाजे श. १४०० (इ. स. १४७८) च्या आसपास येईल (शं. श्री. देव, सवामं., बा. २१७).

*आत्मशोध* ग्रंथ ओवीबद्ध असून ह्या ग्रंथातील साडेतीन चरणांची ओवी अती डौलदार आहे. नमुना पहा : "माझी मज भेटी । केली उठाउठी । सबाह्यता मिठी । अखंडित ॥ ४०१ ॥ वाचे मने काये । व्हावे उतराये । तिहींचा उपाये । न चले तेथें ॥ ४०२ ॥ तनु तेथ जड । मन तेथ मूढ । वाचे मौन पडे । अनिर्वाच्य ॥ ४०३ ॥

**रचना : अमु.** – आत्मशोध; ओ. सं. ५५५; प्रत १ : ले. का. : श. १७५२ (इ. स. १८३०), पौष शु. ३; सवामं. हस्त. सू., खं. १; प्रत २ : मसंमं., हवना., पृ. २६–२७ (ह्या प्रतीत ५६० ओव्या आहेत).

**० गुंडोबा** – पहा **गोविंदप्रभु.**

**गुणकीर्ती** [इ. स. १४५० ते १५००] जैन कवी. ब्रह्मगुणदासांच्या (मराठीतला पहिला ज्ञात जैन कवी) समकालीन असे हे एक जैन पंथातले श्रेष्ठ आचार्य होऊन गेले. *रुक्मिणीहरण* ह्या रचनेतील शेवटच्या कडव्यात 'जेसवाला कुलमति । मुनि उपनले गुणकीर्ति ।' असा आपल्या कुळाचा उल्लेख कवी करतो. *धर्मामृत* ह्या त्यांच्याच ग्रंथाच्या लिपिकाराने ह्यांचा उल्लेख आचार्य म्हणून केला आहे. मूलसंघाच्या बलात्कारगण शाखेतील भुवनकीर्ती हे ह्यांचे गुरू. ह्या परंपरेचा मठ उत्तर गुजरातेतील ईडर ह्या गावी आहे.

गुणकीर्तींची बरीच ग्रंथरचना सापडते. त्यापैकी *धर्मामृत* हा ग्रंथ गद्य असून जैनधर्माचे आचार व तत्त्वज्ञान समजून घेण्याच्या दृष्टीने तो महत्त्वाचा आहे. जैनधर्मीय आदर्श गृहस्थाने कोणत्या धर्माचारांचे पालन करावे व कोणते अधर्माचरण वर्ज्य करावे, हेच ह्यात प्रामुख्याने सांगितले आहे. ह्यांची उपलब्ध असलेली सर्वांत जुनी 'केळवद प्रत' ही इ. स. १६४९ मधील आहे. ग्रंथाच्या अखेरीस 'अइसे कविश्वरू गुणकीर्ती म्हणतु असे ॥' असा कवी स्वतःचा उल्लेख करतो. एका गुजराती विद्वानाने लिहिलेला मराठी धर्मग्रंथ म्हणूनही ह्याचे महत्त्व आहे. [⇨ ३.]

ह्यांच्या *पद्मपुराण* ग्रंथाचे ४३ अध्याय व १५००० ओव्या असून त्यांपैकी फक्त २८ अध्यायांची रचनाच कवीने केली आहे. ह्यानंतरचे ३५ पर्यंतचे सात अध्याय ब्रह्मचिंतामणी कवीने व ३६ ते ४३ हे आठ अध्याय ब्रह्मपुण्यसागर कवीने पूर्ण केले आहेत. *पद्मपुराणातील अनुप्रेक्षा* ह्या ओवीबद्ध प्रकरणातील बारा अनुप्रेक्षांत वैराग्यभावना विशेषत्वाने वर्णिलेली दिसते. अनुप्रेक्षा म्हणजे चिंतन करणे. वैराग्यासाठी ह्या चिंतनाचा साधकाला उपयोग होतो.

*रुक्मिणीहरण, नेमिनाथ पाळणा, नेमिनाथ-विवाह, नेमिनाथ जिनदीक्षा* अशा काही रचना, गुजराती 'गौलणी भास' ह्या काव्यप्रकाराच्या थाटाच्या आहेत. भाषादेखील गुजराती शब्दांनी युक्त आहे. *रामचंद्रफाग* ह्या ३१ कडव्यांच्या रचनेत वसंताचे वर्णन केले आहे. वरील रचनांखेरीज समन्तभद्रविरचित *रत्नकरंडक* ह्या संस्कृत ग्रंथावर *रत्नकरंड श्रावकाचार मराठी टीका* असा एक ग्रंथ सापडतो. ग्रंथात कर्त्याचा उल्लेख नाही. पण ग्रंथाची भाषा व स्वरूप ह्यांवरून तो गुणकीर्तींचा असावा असे डॉ. अकोळे ह्यांना वाटते (प्रामजैसा., पृ. २५). *धर्मामृत* हा ग्रंथ कवीच्या सखोल धर्मज्ञानाची व इतर गीतरचना त्याच्या काव्यशक्तीची साक्ष पटविते.

**रचना : मु.** – धर्मामृत; गद्य ग्रंथ (प्रथम मुद्रण, कुरुंदवाड, १९०४) द्वि. आ.; संपा. जोहरापूरकर, डॉ. विद्याधर; सोलापूर, १९६०; प्रस्ता., पृ. १–३९. २. पद्मपुराण; भाग ५; अध्याय ४३; ओ. सं. १५०००; संपा. श्रावणे, जयचंद्र; वर्धा, १९०२ ३. पद्मपुरागातील अनुप्रेक्षा; ओ. सं. ३४५; सन्मती; ऑग.-सप्टें. १९६०. ४. नेमिनाथ जिनदीक्षा; ४५ कडवी. ५. नेमिनाथ पाळणा; १९ कडवी. ६. नेमिनाथ-विवाह; ४४ कडवी; धर्मामृत परिशिष्ट २; १–२–३. **अमु.** – १. धंदागीत; ६ कडवी. २. रामचंद्रफाग; ३१ कडवी. ३. रुक्मिणीहरण; ६४ कडवी. **चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, डॉ. सुभाषचंद्र : गुणकीर्ती; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. १८–२६.

**० गुणदास** – पहा **ब्रह्मगुणदास.**

**गुणनंदी** [इ. स. १५८१ चा सुमार] जैन कवी. मूलसंघ बलात्कारगणातील धर्मभूषण हे गुणनंदीचे गुरू होते. ह्यांनी *जशोधरपुराण* ह्या ग्रंथाची रचना केली आहे. *यशोधरचरित्रा*वर ह्यापूर्वी जैन कवी मेघराज व नागोआया ह्यांच्या रचना होत्या. ह्याच विषयावरील मराठीतली ही तिसरी रचना. ह्या काव्याचे ८ संधी व १२१३ ओव्या आहेत. ग्रंथ कोठे रचला ह्याविषयीचा उल्लेख कवीने ग्रंथात केला आहे. कवी म्हणतो, " हे रचिलें मोरंबपुर स्थानीं । माळातीर्थ चैताल्यभुवनीं । श्री मूळसंग बलात्कारगनी । धर्मभूषण श्री गुरु ॥ ८. २०० ॥ त्याचा गुणनंदी गुणसागर । जिनदेव गुरु भक्ति निर्भर । या जशोधर रायाची कथा सुंदर । संपूर्ण केलि ॥ ८. २०१ ॥ " आचार्य सकलकीर्ती ह्यांच्या संस्कृत *यशोधर-चरित्रा*च्या आधारे ही मराठी रचना केली आहे. हा ग्रंथ *जशोधरपुराण* ह्या नावाने श्रावकांच्या उपयोगासाठी कुरुंदवाड येथे छापला होता. छापील पुराणाची पृष्ठे ९४ आहेत. ग्रंथाच्या पुष्पिकेत प्रस्तुत ग्रंथ श. १६९५ (इ. स. १७७३) च्या हस्तलिखित प्रतीवरून छापल्याचे म्हटले आहे (अकोळे, सुभाषचंद्र; प्रामजैसा., पृ. ४१–४२).

**० गुणाई** – पहा **गोणाई.**

**० गुणाबाई** – पहा **गोणाई.**

**० गुणादिन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. २७.

**० गुप्तनाथ** – पहा **गंगाबाई.**

**गुप्तानंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. २७.

**गुरुदास–१** [का. अनु.] कवी. गुरू नागनाथ असा रचनेत एके ठिकाणी उल्लेख येतो.

**रचना : अमु.** – १. कालियामर्दन; ग्रं. सं. ४३. २. कृष्णजन्म. ३. गजाननावतार. ४. दशरथ-विवाह. ५. विघ्नराज-चरित्र. ६. व्याघ्रचरित्र. ७. सीताकल्याण. ८. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गुरुदास–२** [का. अनु.] कवी. ह्यांचे गुरू पूर्णानंद. हे शिवरामस्वामींचे गुरुबंधू. ह्यांच्या अनेक ग्रंथांतून "श्रीराम समर्थ भवभीम ॥ जाणोनि परंपरा हे उत्तम ॥ वंदितां श्रीस्वामीचे पदपद्म ॥ पावलों नाम गुरुदास ऐसें ॥ " अशी ओवी सापडते. ह्यांची ग्रंथरचना तंजावर हस्तलिखित संग्रहात उपलब्ध (संककासू., पृ. २७).

**रचना : अमु.**– १. कृष्णदर्शनविलास; ओवीबद्ध. २. गुरुबोधपंचक / तारकबोध; पंचक १ गद्यळ; ओ. सं. २२५०. ३. देवभक्तानुवाद; ओवीबद्ध; ग्रं. सं. ९६. ४. पांडुरंगचरित्र; ओवीबद्ध; ग्रं. सं. ३६०. ५. पांडुरंगमाहात्म्य; ओव्या, अभंग इ.; ग्रं. सं. ३६०. ६. प्रल्हादचरित्र; पदबद्ध; ग्रं. सं. ११५. ७. महावाक्यविवरण (श्रीनाथद्वादशमहावाक्यविलास); ओवी व श्लोकबद्ध; ग्रं. सं. ३२०. ८. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**गुरुदास–३** [का. अनु.] स्तोत्रकार.

**रचना : अमु.** – सरस्वतीस्तोत्र; ओ. सं. ७३; मसंमं.; हवना., पृ. २७.

**गुरुदास अनुचर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सुदामचरित्र; प्रसंग पाचवा उपलब्ध, ओ. सं. १२०; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गुरुदाससदाशिव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० गुरुनागनाथ** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**० गुरुनागनाथदेव** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**गुरुनाथ / ० गुरुनाथ शिवराम** [इ. स. चे १८ वे शतक] संतचरित्रकार. हे बेळगाव जिल्ह्यातील गोकाक तालुक्यातील मुडलगीच्या स्वामी-परंपरेतील कवी. ह्यांचे वास्तव्य जंबगी परगण्यातील घटप्रभेच्या तीरावरील मुत्यापूर गावी असे. शिवराम व गिरिजाबाई ही ह्यांची मातापितरे. पितामह तुकदेव. फडणीस आणि खासनीस ही ह्यांची आडनावे. माहूरची देवी आणि बेदरचा खंडोबा ही कुलदैवते. आराध्यगुरू : नृसिंहसरस्वती (संदर्भ : कवीच्या ग्रंथातील आत्मनिवेदनपर ओव्या). आपली गुरुपरंपरा कवी *विवेकसिंधु*कार मुकुंदराजांपर्यंत नेऊन भिडवितो. शिवबोध (दुसरे) हे कवीचे गुरू होत.

ह्यांचा *देशिकचरित्र* (अमु.; अ. ७, ओ. ८९६) हा संतचरित्रपर ग्रंथ आहे. 'देशिक' म्हणजे आत्मज्ञानोपदेशक सद्गुरू. मुडलगी येथे १५ व्या शतकापासून सुरू झालेल्या बोधपरंपरेतील सहजबोधशिष्य रंगबोध, अद्वयबोध, शिवबोध, रंगबोध (दुसरे) व शिवबोध (दुसरे) ह्या पाच आत्मज्ञानी अधिकारी सत्पुरुषांची चरित्रे वर्णन करणे हा ह्या ग्रंथाचा विषय आहे. पहिल्या रंगबोधांचे वडील कोनेरीबोध ह्यांच्यापासून चरित्रास आरंभ होतो. कोनेरीबोधपुत्र व सहजबोधांचे शिष्य रंगबोध हे गुरूची आज्ञा झाल्याने आपले टाकळी गाव सोडून दक्षिणेकडे लोकोद्धाराच्या कार्यास निघाले. वाटेत मुडलगी येथे रेवणसिद्धांचा आदेश झाल्यावरून हे तेथेच स्थायिक झाले. त्यामुळे तेथेच ह्यांची परंपरा निर्माण झाली. ग्रंथकर्ता गुरुनाथ ह्याच परंपरेतील शिवबोधांचा शिष्य आहे. म्हणजे एका दृष्टीने हा ग्रंथ गुरुचरित्रासारखाच आहे. कारण कवीने ह्यात आपल्या गुरुघराण्याचे चरित्र सांगितले आहे. ग्रंथ शिवबोधगुरूंनीच आपल्याकडून लिहवून घेतला असे कवी म्हणतो. ग्रंथाचे लेखन कवीने आत्मविश्वासाने केलेले दिसते. कवीची बहुश्रुतता व शास्त्रे, पुराणे, रामायण-महाभारतादी महाकाव्ये ह्यांचे अध्ययन ह्यांचा चरित्र वाचताना चांगलाच प्रत्यय येतो. परचक्राच्या उपद्रवामुळे प्रस्तुत ग्रंथ कवीने श. १७०७ (इ. स. १७८५), चैत्र शु. पौर्णिमेस हुकेरी येथे पूर्ण केला. ग्रंथाची प्रत श. १७०९ (इ. स. १७८७) मधली असून तिचे लेखन ह्याच परंपरेतील शिवबोध (दुसरे) ह्यांचे शिष्य असलेल्या संगबोधांनी केलेले आहे.

ह्या चरित्रामध्ये कालनिर्देश सर्वत्र केलेले नसले तरी चरित्रे मात्र बरीच विस्ताराने व श्रद्धेने सांगितली आहेत. स्वतः कवी हाही एक अधिकारी पुरुष आहे असे पुढील गुरुस्तवनावरून वाटते : "पूर्ण कृपेची नाव । त्यांत घालोनिया अभिनव । पार करूनि जीवभाव । तात्काळ वाव केला तुवां ॥ ७.१७ ॥ मग सावध होऊनि पाहतां । हा भवसमुद्र कोरडाच होता । तो लाजूनियां तत्त्वता । आश्चर्यता पावलो ॥ ७.१८ ॥" जुन्या ज्ञात चरित्रवाङ्मयात एक नवी भर, तसेच कर्नाटकातील अज्ञात अशा मराठी संतकवींच्या परंपरेचा परिचय करून देणारा म्हणून ह्या चरित्रग्रंथास वाङ्मयाच्या इतिहासात महत्त्वाचे स्थान आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : देशिकचरित्र; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. ११६–१३३.

**० गुरुनाथ शिवराम** – पहा **गुरुनाथ.**

**गुरुराज** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – गारुडी पद; 'लोकगीत' संग्रह, तंजावर, १९५०, पृ. २०.

**गुर्जर शिवव्यास / ० अचळ सिवबास** [इ. स. १५ वे शतक, पूर्वार्ध] महानुभाव भाष्यकार. कवीश्वर आम्नायातील. गुर्जर शिवव्यास हे श्रीचक्रधरस्वामींच्या वंशातले. त्यांच्या घराण्याचे मूळ पुरुष सोमदेव. ह्या सोमदेवांपासून ते शिवबासांचे पुतण्ये संगपाळ ह्यांच्यापर्यंतची वंशावळी डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी दिली आहे (ममवा., पृ. ४२). श्री राजधरबाबा महानुभाव (संवत्सर; जि. नगर) ह्यांच्या संग्रहातील *स्मृतिवृद्धाचारा*च्या पोथीत गुर्जर शिवव्यासांची सविस्तर माहिती दिली आहे तिची डॉ. कोलते ह्यांनी नोंद करून ठेवली आहे (*ज्ञानप्रबोध* : प्रस्ता., पृ. १५–१६). ह्या माहितीनुसार गुजरातेतील भरवस गावच्या धर्मपाळ ह्या नागर ब्राह्मणाचे हे धाकटे चिरंजीव. नाव शिवपाळ. व्यापाराच्या धंद्याने ह्यांच्या कुटुंबाचा देवगिरीशी संबंध येई. शिवपाळ १८ वर्षांचे असतानाच ह्यांच्या कुटुंबाची वाताहत झाली. ह्यानंतर आपला पुतण्या संगपाळ ह्याला घेऊन शिवपाळ देवगिरीस राहू लागले. कामाच्या निमित्ताने एकदा पैठणास मुक्काम असताना अचळ मुरारीबासांशी ह्यांची गाठ पडली. त्यामुळे परमेश्वरमार्गाकडे (महानुभाव पंथ) ह्यांचे अंतःकरण वेधले. ब्रह्मविद्येचा नाद लागल्याने ह्यांनी शास्त्राध्ययन करण्यास सुरुवात केली. श्रीचक्रधरस्वामी हे भरवस येथील परमेश्वरावतार असे समजल्यावर ह्या मार्गावर त्यांची विशेषच दृढ श्रद्धा बसली. पुढे सर्वसंगपरित्याग करून पाथरी मुक्कामी मुरारीबासांकडून ह्यांनी पंथाची दीक्षा घेतली. हे शिवपाळ म्हणजेच शिवबास होत. अचळ मुरारीबासांचे शिष्य म्हणून त्यांना अचळ शिवबास म्हणू लागले. पण ते मूळचे गुजरातेतील म्हणून पुढे त्यांना गुर्जर शिवबास असे नाव पडले.

ह्या वृत्तांतात हे भरवस (भडोच) येथील नागर ब्राह्मण असे नमूद केले असले तरी य. खु. देशपांडे म्हणतात त्याप्रमाणे हे श्रीचक्रधरांच्या वंशातील असे मात्र ह्या पोथीत स्पष्टपणे म्हटलेले नाही. डॉ. कोलते ह्यांच्या पाहण्यात ही परंपरा नसल्याचे ते सांगतात.

ओंकारमुनी चोरमागेकृत *वृद्धाचारा*त (गोपीराज ग्रंथालय, रिद्धपूर) दिलेली गुर्जरशिवव्यासांची पूर्वपीठिका उपरिनिर्दिष्ट वृत्तांताहून वेगळी आहे. त्यावरून असे कळते की, हे गुजरातेतील खंबायत गावचे. जन्म वैश्यवर्णी कुळातील. मोक्षप्राप्तीकरिता ह्यांनी विंझासिनी देवीची उपासना केली. तिने ह्यांची अचळ मुरारीबासांशी गाठ घालून दिली. ह्या दोघांत वादविवाद झाला. त्यात शिवराजांचा मुरारीबासांनी पराभव केला. त्यानंतर हे मुरारीबासांना शरण गेले व त्यांचे शिष्य झाले. ह्या वृत्तांताला दुजोरा देणारा इतर पुरावा आज तरी आढळत नाही, असे मत डॉ. कोलते व्यक्त करतात (*ज्ञानप्रबोध* : प्रस्ता., पृ. १७).

मुनि दामोदरकृत *बाळक्रीडे*च्या शेवटी सिवराजांची जी गुरुपरंपरा दिलेली आढळते ती अशी : 'नागार्जुनें परोपकार केला । कवीराज पट्टीं प्रतेष्ठिला । तेहीं परशरामा दाखवीला । स्वरूपनिर्णए ॥ तयांसि जोडला हरिराजु । तो ज्ञानयुगें जाला पुज्यु । मग अचला लाधलें नीज । सीद्धान्तसार ॥ सीवराजु तयापासूनि । तो परपद्धति वाखाणी । तेचि उपदेसीली ब्राह्मवाणी । दत्तराजाप्रति ॥' म्हणजे ही परंपरा नागदेवाचार्य > कवीश्वर > परशराम > हरिराज > अचळ मुरारीबास > सीवराज > दत्तराज अशी आहे. दीक्षा घेण्यापूर्वीच शिवबासांनी आपल्या शास्त्राध्ययनास सुरुवात केली होती. ह्यांची शास्त्राध्ययनाची तळमळ पाहून, शिवबासांना मुरारीबासांनी आपले गुरुबंधू कमळाकरमुनी ह्यांच्या स्वाधीन केले. त्यांच्याजवळ अध्ययन करून शिवबासांनी शास्त्रज्ञानात प्रावीण्य प्राप्त केले. पुढे दीक्षा घेतल्यावर अटन-विजन करीत, भिक्षान्नाचा स्वीकार करून, अध्यात्मचिंतन व परमेश्वराचे नामस्मरण ह्यांत ते काळ घालवू लागले.

गुरूंच्या निर्वाणसमयी हे त्यांच्या संनिध नव्हते. आपले शास्त्रशोधनाचे अर्धवट राहिलेले काम शिवबासांनी पूर्ण करावे, अशी मालोबासांकरवी अचळ मुरारीबासांनी आज्ञा केल्यावरून हे शास्त्रशोधनाचे उर्वरित कार्य त्यांनी हाती घेतले. हे कार्य चालू असता त्यांनी काही शिष्य जोडले. आपला पुतण्या संगपाळ ह्याला त्यांनी दीक्षा दिली. त्याच-

प्रमाणे विश्वनाथबासांना बेदर येथील लाड कामराजांच्या कैदेतून मुक्त करून दीक्षा दिली. आपले शास्त्रशोधनाचे कार्य आपल्या पश्चात दत्तराजाकडे सोपवावे असे संगपाळास त्यांनी सांगितले व मग देह ठेवला.

हरिबास-सोंगोबास ह्यांच्या व कृष्णमुनींच्या *अन्वयस्थळात* ह्यांच्या ग्रंथकर्तृत्वाची नोंद पुढीलप्रमाणे आढळते : १. *महावाक्यप्रमेय*. २. *अस्तीपरी*. ३. *पाचा पूर्वीचे मूर्तिज्ञान* (सूत्रपाठातील ' पूर्वी ' प्रकरणात वर्णिलेले पंचकृष्णमूर्तींचें वर्णन). ४. *थोरली प्रसादसेवा*. ५. *स्वमाति संसरण*. ६. *लीळाचरित्रा*चा दुसरा पिढीपाठ.

चक्रधरस्वामींच्या *लीळाचरित्रा*चे व शास्त्राचे प्रयत्नपूर्वक संशोधन करून त्याची व्यवस्थित मांडणी करण्याचे श्रेय ह्यांच्याकडे जाते. ह्या प्रयत्नांतूनच *लीळाचरित्रा*चा दुसरा पिढीपाठ तयार झाला. हा तयार करताना *लीळाचरित्रा*चे जे विविध पाठ प्रचलित होते त्यांचा शोध घेऊन शिवबासांनी *लीळाचरित्रा*चे पुन्हा संपादन केले. हिराइसेच्या पहिल्या पिढीपाठाइतकीच ह्या दुसऱ्या पिढीपाठासही पंथात मान्यता आहे. ' कवीश्वरी ' ही सांकेतिक लिपी ह्यांनी शोधून काढलेली आहे.

चक्रधरोक्त *सूत्रपाठ* लक्षण, आचार, विचार अशा तीन भागांत आहे. ह्यांतील सूत्रांचे पूर्वीच्या शास्त्रवेत्त्यांनी निरनिराळ्या रीतीने विवेचन केले होते. ते सर्व लक्षात घेऊन, गुर्जर शिवबास ह्यांनी, उपाध्य आम्नायातील ओंकारव्यास धाराशिवकरांचे शिष्य सिद्धान्ते हरिबास ह्यांच्या सहकार्याने त्यातील प्रत्येक सूत्रावर भाष्य लिहून *लक्षण-स्थळ*, *आचारस्थळ* व *विचारस्थळ* असे तीन ग्रंथ बांधले. ह्या भाष्याची रचना श. १३२५ (इ. स. १४०३) च्या सुमारास झाली. त्यालाच 'तिन्ही स्थळे' किंवा 'स्थळपोथी' असे म्हणतात. ह्यात एकूण २४ शास्त्रज्ञांच्या टाचणांचा उपयोग केला आहे. ग्रंथात ब्रह्मविद्या शास्त्रातील व्युपत्तिव्युत्पन्नतेचे काम मोठ्या कौशल्याने पार पाडले आहे. " ऐसा चौवीसा पक्षी तिन्ही स्थळाचा बंध : सीद्धान्ते हरिबासा आन गुजर सीवबासा मिळोनी पाथरीसी केला " असा उल्लेख हरिबास-सोंगोबास ह्यांच्या *अन्वयस्थळां*त येतो. [ ⇨ ३.]

गुर्जर शिवव्यासांची रचना ही प्रामुख्याने पंथानुसरण करणाऱ्या साधकांसाठीच झालेली आहे. पंथावरील दृढ निश्चिंचा प्रत्यय त्यांच्या जीवितकार्यातून व ग्रंथरचनेच्या खटाटोपातून येतो. म्हणून पंथीयांच्या दृष्टिकोनातून ह्या रचनेला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झालेले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कोलते, वि. भि. : ज्ञानप्रबोध, प्रस्ता., मलकापूर, १९७३; पृ. १२–१३, १६, २१. २. देशपांडे, य. खु. : ममवा., द्वि. आ.; पुणे, १९६०; पृ. ४२–४४.

**गुलनयन** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० गैनी** – पहा **गहिनीनाथ.**

**गैबीनाथ** [श. १५२० / इ. स. १५९८ – श. १५८० / इ. स. १६५८] कवी. नाथपरंपरेतील सत्यामलनाथांचे शिष्य. ह्यांची चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. गुप्तनाथ ऊर्फ गंगाबाई ही ह्यांची शिष्या. ज्ञानेश्वरोत्तर परंपरेतील नाथसंप्रदायाची ही मुख्य शाखा होय. ही परंपरा अशी : निवृत्ति > ज्ञानदेव > सत्यामलनाथ > गैबीनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ > शिवदीननाथ. शिवदीननाथांनंतरही ती चालू राहिली. गैबीनाथांची काही स्फुट रचना सापडते. *पंचीकृतविवेक* (र. श. १५७६ / इ. स. १६५४) हा अध्यात्मग्रंथ आणि कांही अभंग व पदे त्यांनी केली आहेत. कोकणातील प्रसिद्ध संतकवी सोहिरोबा आंबिये ह्यांस पुढे ह्यांनी साक्षात्कारपूर्वक उपदेश दिला अशी आख्यायिका सांगण्यात येते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : गैबीनाथ; गोचप.; पुणे, १९५९; पृ. १७२.

**गोटभट खेडकर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शिवरात्री कथा; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गोणाई / ० गुणाई / ० गुणाबाई / ० गोणाबाई** [इ. स. चे १३ वे शतक] कवयित्री. कल्याणी (जि. परभणी) येथील गोविंदशेट सदावर्ते ह्यांची मुलगी व प्रसिद्ध संत नामदेव ह्यांची आई. " तीन कोटी अभंग । गोणाईचा वाद । स्वात्मसुखबोध । सुखाचा तो ॥ " असे तुकारामांनी म्हटले असले तरी हिची स्वतंत्र अभंगरचना आढळत नाही. ती नामदेवांच्या आत्मचरित्रपर अभंगांत संवादरूपाने समाविष्ट. हिची एक आरती व काही पदे तंजावर सरस्वती महाल व समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील हस्तलिखित संग्रहात सापडतात (*श्री नामदेव गाथा*, महाराष्ट्रशासन प्रका.; मुंबई, १९७०).

**० गोणाबाई** – पहा **गोणाई.**

**गोंदा / ० गोविंद–२ / ० नामयाचा गोंदा** [का. अनु.] कवी. नामदेवांच्या चार पुत्रांपैकी एक. नामदेवांप्रमाणे हा विठ्ठलभक्त होता. ह्याने काही अभंगांची रचना केली आहे. त्यात ह्याच्या भगवद्भक्तीचा प्रत्यय येतो. आपला पिता नामदेव ह्याच्या पांडुरंगभक्तीने व्यापिलेल्या जीवनाचे कितीतरी भावपूर्ण उल्लेख ह्याने सहजगत्या केलेले ह्या अभंगांत आढळतात.

त्याच्या कुटुंबाने स्वीकारलेल्या विठ्ठलभक्तीच्या व्रताशी हा पूर्ण एकरूप झालेला दिसतो. ह्याची काही हिंदी रचना पण उपलब्ध आहे. ' मसंमं 'त काही अभंग उपलब्ध.

**रचना : मु.** – अभंग १८; श्री नामदेव गाथा, महाराष्ट्र शासन प्रकाशन; मुंबई, १९७०; पृ. ८८८–८९५.

**गोपवछ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. कर्णपंचक, २. नेत्रपंचक, ३. मनपंचक, ४. वाणीपंचक (श्लो. सं. २०) व पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० गोपाळ–१** – पहा **गोपाळ कवी.**

**गोपाळ–२ / ० गोपाळकवी** [का. अनु.] महानुभाव कवी. शाहिरी काव्याच्या धर्तीवर गोपाळमुनीने *लंकारवादस्थळ* (४६) ह्या ओव्यांची रचना केली आहे. ' ल ' शब्द तयार कसा झाला ह्याबद्दलचे व्याकरण-विषयक विवेचन ह्यात येते. लंकारपद कसे तयार केले ह्यावर कवीने प्रश्नाचा भर दिलेला दिसतो. हा प्रश्न वस्तुतः जटिल व एक प्रकारे गूढ आहे. ह्या शब्दाच्या सिद्धी विचारून कवीने वादीवर मात केली आहे. वाचणाऱ्याच्या दृष्टीने ही रचना क्लिष्ट आहे. ह्या ओव्यांच्या उत्तरात्मक ओव्या सापडल्या नाहीत. ओव्यांची पोथी औरंगाबाद यथील महंत नागराज ह्यांच्याकडून मिळाली.

**रचना : मु.** – लंकार वादस्थळ ओव्या (४६); संपा. आराध्य, मुरलीधरशास्त्री; महानु., जुलै, १९७१; पृ. २१–२५.

**० गोपाळ–३** – पहा **गोपाळदास–३.**

**गोपाळ–४** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**गोपाळ–५** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – आर्यादुर्गेची आरती; मआ., पृ. ३१८.

**गोपाळ–६** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – एक लावणी; अंधारातील लावण्या; पुणे, १९५६; पृ. २०६–२०७.

**गोपाळ–७** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० गोपाळ अनंत** – पहा **अनंतदास–१.**

**गोपाळकवी–१** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, उत्तरार्ध] महानुभाव कवी. *रुक्मिणीस्वयंवर* काव्याचा कर्ता (निर्देश : ममग्रंककासू.,

पृ. ९ – गोपालदास ह्या नावाखाली). कवीची वैयक्तिक माहिती किंवा गुरुपरंपरा ह्यांचा बोध त्याच्या काव्यग्रंथावरून होत नाही. इतरत्रही कोठे ही माहिती उपलब्ध नाही. महंत गोपीराज ह्यांच्या रिद्धपूर येथील *महानुभाव पोथीसंग्रहा*तील (क्र. १३८) *रुक्मिणी-स्वयंवरा*च्या (प्र. ५, ओ. ६४६) प्रतीवरून प्रस्तुत काव्याचा परिचय ह. ना. नेने ह्यांनी करून दिला आहे. कवीचा काळ 'श. १५०६ (इ. स. १५८४) चा सुमार', असा ते देतात. कवीच्या *दृष्टान्तबोध* ह्या दुसऱ्या रचनेचा उल्लेख डॉ. मा. गो. देशमुख ह्यांनी केला आहे. गोपीराज ग्रंथालयातील गोपाळकवीच्या *रुक्मिणीस्वयंवरा*च्या दुसऱ्या एका पोथीत (क्र. १४२) हा ग्रंथ समाविष्ट केलेला त्यांनी पाहिला (*मराठीचे साहित्यशास्त्र*, पुणे, १९६७, पृ. २९७).

कवीच्या *रुक्मिणी-स्वयंवर* काव्याचे २५ अध्याय व ३००० ओव्या आहेत असे सांगितले जाते. पण ह. ना. नेने ह्यांच्या पाहण्यात आलेल्या सर्व पोथ्यांत पाचच प्रसंग असल्याचे दिसते. श्रीकृष्णसेवा हे कवीच्या कुळाचे व्रत असल्याने व पूर्वीच्या कवींनी जो कथाभाग गाळला आहे त्यावर रचना करावी ह्या हेतूने *रुक्मिणी-स्वयंवरा*सारख्या जुन्याच विषयावर रचना केली असे काव्य-प्रयोजन कवी बोलून दाखवितो. प्रास्ताविक (गुरुस्तवनाचा) अध्याय लहान पण मोठ्या थाटाने लिहिला आहे. दुसऱ्या प्रसंगात मराठी भाषेची महती वर्णन केली आहे. संस्कृताहून मराठीच थोर कशी हे सांगताना मोठे गंमतीचे युक्तिवाद कवीने केले आहेत. ह्या संदर्भात 'मऱ्हाटी' ह्या शब्दाची अभिनव व्युत्पत्तीही कवी सादर करतो; ती अशी : "सर्व सिद्धांताची कसवटी। महाअर्थींची रहाटी। म्हणौनि नांव मऱ्हाटी। प्रसीद्ध जगीं ॥ ६२ ॥" ह्यापुढील दहा श्लोकांत काव्यमुद्रिकेची पंचवीस तत्त्वे कवीने सांगितली आहेत.

ही स्वयंवरकथा *भागवता*त येते. त्यामुळे *भागवत* कोणी कोणाला सांगितले ही पूर्वपीठिका कवी तिसऱ्या प्रसंगात सांगतो. ह्याच प्रसंगात वसुदेवाची कथा व त्याच्या विवाहाची माहिती येते. पुढे कृष्णजन्म, गोकुळात कृष्णाचे आगमन व ५ व्या प्रसंगात कंसाची कुलकथा, द्वारकामाहात्म्य इत्यादी प्रसंग येतात. *रुक्मिणी-स्वयंवरा*च्या कथाभागाला मात्र सुरुवात होत नाही. मोठ्या काव्याचा एक भाग म्हणून ह्या ५ प्रसंगांचा विचार केल्यास कवीची बहुश्रुतता व योग्यता तेव्हाच समजून येते. कोणाचीही पूर्वपीठिका सांगण्याची कवीला हौस दिसते. प्रसंगी शाब्दिक कोट्या करण्याची संधी तो सोडीत नाही. मात्र कोणती कथा किती द्यावी आणि कथानुसंधान कसे राखावे ह्याचा तितकासा विवेक ह्या गोष्टीवेल्हाळ कवीला राहात नाही.

डॉ. मा. गो. देशमुख ह्यांनी मराठीच्या काव्यशास्त्राचे विवेचन करताना प्रस्तुत कवीच्या काव्यमुद्रिकेतील २५ तत्त्वांचा आवर्जून विचार करून त्याची काव्यविषयक जाणीव स्पष्ट करून दाखवली आहे. नवरसांव्यतिरिक्त लळीत, गौरव, साहीत (साहित्य), संगीत, शृंगार, पद, सिद्धान्त, भाव, दृष्टान्त, न्याय, उपमा, श्लोक, वर्णकु, प्रचय, उचित, प्रकरण अशा आणखी सोळा काव्यमुद्रा कवीने सांगितल्या आहेत. त्या सांगताना कवीच्यापुढे एखादा साहित्यशास्त्राचा ग्रंथ होता किंवा काय ते समजण्यास साधन नाही. पण ही सोळा अंगांची कल्पना अभिनव व उद्बोधक आहे, असे डॉ. मा. गो. देशमुख म्हणतात. ह्या सोळा मुद्रा म्हणजे पदलालित्य, अर्थगौरव, बाह्यशोभा, गेयता, रेखीवपणा इत्यादी काव्याची प्रमुख अंगेच होत असा तर्क करता येतो. एका प्रतिभासंपन्न भाषाप्रभू कवीची ओळख ह्या अपूर्ण ग्रंथाने करून दिली आहे असे म्हणता येईल.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. डॉ. देशमुख, मा. गो. : मराठीच्या साहित्यशास्त्रावर प्रकाश; मराठीचे साहित्यशास्त्र; तृ. आ.; पुणे, १९६७; पृ. १८७–३०३. २. नेने, ह. ना. : गोपाळकविकृत रुक्मिणीस्वयंवर; संलेसं., भा. १; नागपूर, १९५७; पृ. १८४–१९५.

**गोपाळ कवी** / ० गोपाळ–१ [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] अठरापर्वे *महाभारत* रचणारा कवी. गोपाळकवींनी *अनुशासनपर्वा*त स्वतःविषयी जी माहिती दिली आहे त्यावरून ह्यांनी *भारता*ची रचना श. १६९० / इ. स. १७६८ च्या सुमारास नेवासे मुक्कामी केली असे दिसते. हे तेथेच राहणारे असावेत. गो. का. चांदोरकर ह्यांनी ह्यांचे गाव ओतुर (ता. जुन्नर, जि. पुणे) असे म्हटले आहे (संककासू., पृ २८). अनंत नावाचे कोणी सत्पुरुष कवीचे गुरू होते. *उद्योगपर्वा*त 'अनंतकृपेच्या पाल्हाळें । भारत वर्णिजे गोपाळें' असा कवीच्या गुरूचा उल्लेख येतो. ह्यांची कुलस्वामिनी मातापुरवासिनी देवी.

गोपाळकवींचे *ओवीबद्ध भारत* ल. रा. पांगारकर ह्यांना पंढरपूर येथे उपलब्ध झाले. त्यात पहिली चार व *सौप्तिक* आणि *स्त्री* ही पर्वे नाहीत. उरलेल्या १२ पर्वांची ग्रंथसंख्या अंदाजे ४२,००० आहे. ह्यावरून कवीने समग्र भारत रचले असावे असे अनुमानिता येते. मूळ भारत रचणाऱ्या व्यास महर्षींची कवीने यथायोग्य स्तुती केली आहे. *मुक्तेश्वरी भारता*चाही ह्यांनी अभ्यास केला असावा. कारण मुक्तेश्वरी वळणाची उपमा-रूपके ह्यांच्या कवितेत अनेकदा येतात. मुक्तेश्वरांच्या *भारत*रचनेमधून प्रेरणा घेऊन रचलेले ह्या कवीचे *भारत* तत्कालीन रसिक जनांत चांगलेच लोकप्रिय होते असे कवीच्याच उद्गारांवरून समजते. कवी म्हणतो : "प्रफु[ल्लि]त साहित्य कमळें। घमघमीत अर्थपरिमळें। सज्जनभ्रमर भक्तिमेळें आमोद घेती आवडीनें ॥ १ ॥ येणें परमानंद निरंतर। विसरले। [त्र]य व्यवहार। सार्वकाळ प्रेमें उद्धार। हरिहर स्मरणाचे ॥ २ ॥" ([अनु]शासन, अ. १).

*शांति* व *अनुशासन पर्वां*चा कवीने फारच विस्तार केला आहे. *भीष्मपर्वा*तील *समश्लोकी गीता* व *अनुशासन पर्वा*तील *विष्णुसहस्रनामा*वरील विस्तृत टीका (भाइसंमं. हस्त. सू., पृ. २६३). ही प्रकरणे विशेष उल्लेखनीय आहेत. *भारता*व्यतिरिक्त कवीची इतरही काही ग्रंथरचना सापडते. त्यापैकी *पंढरीमाहात्म्य* हे प्रकरण मुद्रित झाले आहे (कविचरित्र).

**रचना : अमु.** – १. मल्हारीमाहात्म्य; अ. ८. २. महाभारत – १२ पर्वे, ग्रं. सं. ४२२१४; र. का. : अंदाजे श. १६९० चा सुमार, प्रत श. १७२०. ३. महालयामाहात्म्य; अ. २०. ४. व्यंकटेशमाहात्म्य; अ. १०; पांगारकर हस्त. संग्रह. ५. तिथिसार; प्र. ले. श. १७५९; गो. का. चांदोरकर संग्रह. ६. शिवरात्रीकथा; गं. ना. मुजुमदार संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : गोपाळ; मकच., खं. २; मुंबई, १९१३; पृ. १०२–१०८. २. पांगारकर, ल. रा. : गोपाळकविकृत महाभारत (इ. स. १७६८), कविवर्य मुक्तेश्वर; पुणे, १९२१; पृ. १३७–१४१.

**गोपाळ टोळोजी** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – बचाजी जिवाजी बापटांवरील पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. ५९–६०.

**गोपाळतनय** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शाहराजावर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोपाळदास–१ (दर्यापूरकर)** / ० **गोपालमुनि दर्यापूरकर** / ० **बाबेंद्र गोपाळदास** [अंदाजे इ. स. च्या १६ व्या शतकाचा उत्तरार्ध व १७ व्या शतकाचा पूर्वार्ध] महानुभाव टीकाकार व कवी. कवीश्वर आम्नायातील दीक्षित पंडित. हे वऱ्हाडातील दर्यापूर (जि. अमरावती) ह्या गावचे. गुरू : चाहेव्यास. ह्यांची भगवद्गीतेवरील *गोपाळदासी* टीका उपलब्ध आहे. ही टीका मुख्यतः शब्दांचे अर्थ घेण्यापुरतीच मर्यादित

दिसते. (मु. : संपा. महंत दत्तराज, लाहोर १९००). *बाळक्रीडे*वर १४०९ ओव्यांची रचना ह्या कवीने केल्याची नोंद वि. ल. भावे कृत *महानुभावकविकाव्यसूची*त सापडते (पृ.९). *निष्कलंकाध्याय ब्रह्मांड-गोलक* हा कवीने रचलेला मोठा ग्रंथ. ह्या ग्रंथाची पूर्वपीठिका कवीने आपल्या ग्रंथात दिली आहे. मुळात *निष्कलंकाध्याय* हा १२५ ओव्यांचा ग्रंथ पुरुषोत्तममुनींचा होता. १८-अध्यायी गीतानिरूपणानंतरही पार्थाच्या ज्या शंका उरल्या त्यांचे निरसन करण्यासाठी हा ग्रंथ झाला. पुढे देवदास कवीने त्यात प्रकरणोचित स्पष्टार्थदर्शक ओव्यांची भर घालून तो २७५ ओव्यांचा करून त्याचे नाव *ब्रह्मांडगोलक* असे ठेवले. ह्यानंतर गोपाळदास दर्यापूरकराने त्यात स्पष्टार्थदर्शक आणखी २०० ओव्या वाढविल्या. तेवढ्यानेही मध्यमप्रतीच्या लोकांचे शंकासमाधान होणार नाही असे वाटल्याने, पूर्वोक्त दोन्ही ग्रंथांसह ११११२ ओव्यांत ह्या ग्रंथाचा कवीने विस्तार केला. ह्या ग्रंथाचे *गीतासार* असे नाव तंजावर सरस्वती महाल ग्रंथालयाच्या हस्तलिखित ग्रंथांच्या यादीत दिले आहे (बा. १०७, यादी क्र. १).

अनेक महानुभावीय ग्रंथांचे शोधन करण्याचे फार महत्त्वाचे कार्य ह्यांनी केले. त्या त्या ग्रंथाच्या शेवटी तसे उल्लेख आढळतात. लक्ष-धीर कवीचा *मार्गप्रभाकर*, *महाराष्ट्र काव्यदीपिका*, दिवाकर कपाटे कृत *मतिप्रबंध* असे काही त्यांपैकी प्रमुख ग्रंथ होत. लक्षधीर कवी, दिवाकर कपाटे आणि गोपाळदास हे जवळ जवळ समकालीन होत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, य. खु. : १. गोपाळदासी; ममवा., द्वि. आ., पुणे, १९६०, पृ. ४९–५०. २. निष्कलंकाध्याय ब्रह्मांड-गोलक; मवाइ., खं. २; संपा. ल. रा. पांगारकर; पुणे, १९३५; पृ. ७५४–५५.

**गोपाळदास–२** [का. अनु.] महानुभाव कवी. विराटदेशोपनामालंकृत गोपाळदास हे उपाध्य आम्नायातील, एवढीच ह्यांच्यासंबंधी माहिती मिळते. विराटदेशोपनामालंकृत कृष्णमुनी कवी डिंभ ह्यांनी श. १५७४ (इ. स. १६५२) त लिहिलेल्या *स्वप्नव्द्याचारप्रबंधा*त ह्या गोपाळदासांची माहिती नाही. त्याअर्थी हे त्यानंतरच्या काळात झाले असावेत. ह्या कवींच्या *चंद्रावळी-आख्यान* काव्याचे संपादक डॉ. श्री. रं. कुळकर्णी ह्यांच्या मते हे पेशवाईपूर्वकालातील असावेत. कवीचे *सुदामचरित्र* हे आख्यान प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांना अलिकडेच प्राप्त झाले आहे. ह्या काव्याचा उल्लेख *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी किंवा य. खु. देशपांड्यांनीही केलेला नाही.

गोपाळदास किंवा गोपाळमुनी ह्या नावाचे अनेक महानुभाव कवी होऊन गेल्याने त्यांचे भिन्नत्व दाखविताना अभ्यासकांचे एकमत होत नाही. *महाराष्ट्रसारस्वतपुरवणी*कार डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांना गोपाळमुनी दर्यापूरकर व *चंद्रावळी-आख्यान*कर्ता गोपाळदास हे दोघे एकच वाटतात; तर संतोषमुनी कृष्णदासाचे *रुक्मिणीस्वयंवर* वाढवून लिहिणारे पौसदाख्य गोपाळमुनी व हे गोपाळदास एकच असे प्राचीन मराठी कवितेचे एक संशोधक ज. शा. देशपांडे म्हणतात. ह्यांपैकी दर्यापूरकर गोपाळदास हे कवीश्वर आम्नायातील व *चंद्रावळी-आख्यान*कार हे उपाध्य आम्नायातील आहेत. त्यामुळे त्यांचे भिन्नत्व स्पष्ट होते. पौसदाख्य गोपाळमुनी श. १६४१ (इ. स. १७१९) त विद्यमान होते. ते व हे गोपाळदास ह्यांच्यामधील काळाचे अंतर लक्षात घेतल्यास हे दोघेही भिन्न असल्याचे स्पष्ट होते.

*सुदामचरित्र* काव्याच्या ज्या तीन पोथ्या गोपीराज ग्रंथालयातून व. दा. कुळकर्णी ह्यांना उपलब्ध झाल्या त्यांपैकी दोन पोथ्यांत प्रस्तुत काव्य *काव्यरत्नाकर* ह्या बृहत्काव्याचे पंचविसावे प्रकरण असल्याचा उल्लेख समाप्तिलेखात येतो तो असा : "इति श्री महा आम्नाया वीराट-देशमुनी मार्गीक नाम गोपाळदासें कथिलें काव्यरत्नाकरासि प्रकर्ण पचीसावें असे संपलें सुदामचरित्र." असाच समाप्तिलेख व *काव्य-रत्नाकरा*चे प्रकरण असल्याचा उल्लेख डॉ. श्री. रं. कुळकर्णी संपादित *चंद्रावळी-आख्याना*च्या शेवटीही येतो. त्यावरून ही दोनही काव्ये *काव्यरत्नाकरा*ची प्रकरणे होत हे स्पष्ट होते. काव्याची वर्णनशैली व भाषा ह्यांवरूनही वरील विधानास पुष्टी मिळते. ह्याच प्रकारचा शेवट असणारे *ज्ञानप्रभाकर* नावाचे *काव्यरत्नाकरा*चे दहावे प्रकरण ठरणारे ह्या गोपाळदासांचे काव्य तंजावर येथील हस्तलिखित संग्रहात उपलब्ध आहे (बा. १५३८, यादी क्र. २); परंतु अद्यापि ह्या काव्याचे संशोधन झालेले नाही.

ही आख्यानकाव्ये विविध वृत्तांत रचलेली आहेत. नित्य परिचित अशा वृत्तांबरोबर वज्रनामा, शार्दुक, चंदनवळी, वसंतनामा असे नवे अपरिचित छंद कवीने योजले आहेत. शिथिल शब्दयोजना व वृत्तांसाठी केलेली शब्दांची ओढाताण असे काही दोष सोडल्यास ही आख्याने रसाविष्कारी झाली आहेत. रेखीव व्यक्तिदर्शन हा ह्यांच्या रचनेचा विशेष दिसतो. कवीची काही रचना असल्याचे आज तरी माहीत नाही.

**रचना : मु.** – १. चंद्रावळी-आख्यान; श्लो. सं. १७३; संपा. डॉ. कुळकर्णी, श्री. रं. (प्रस्ता.); हैद्राबाद, १९६४. **अमु.** – १. सुदाम-चरित्र; श्लो. सं. २५०; श्री गोपीराज ग्रंथालय, रिद्धपूर. २. ज्ञानप्रभाकर; ओ. सं. ३३४; तंसम. हस्त. यादी, क्र. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, व. दा. : महानुभाव कवि गोपाळदास : एक टिपण; मसंप., जाने. १९७३; पृ. ५१–५५. २. देशपांडे, ज. शा. : काही अप्रकाशित महानुभावीय काव्ये; महानु. डिसें. १९७१; पृ. ६–७.

**गोपाळदास–३ / ० गोपाळ–३ / ० गोपाळस्वामी** [? – समा. श. १६१२, आश्विन व. १ / इ. स. १६९०] कवी. श्रीसमर्थपंचायतनातील वडगावच्या जयरामस्वामींचे शिष्य. कृष्णप्पा > जयरामस्वामी > गोपाळस्वामी > विठ्ठलस्वामी > मुनेश्वर ऊर्फ रुद्रमुनी > महादेव-स्वामी, अशी ही ब्रह्मचाऱ्यांची परंपरा आहे (रासं., खं. २, पृ. ४). कवीची आरत्या, पाळणा, भूपाळी, कृष्णलीलेवरची पदे, बोधपर व गुरुपर पदे अशी रचना तंजावर ग्रंथालयात उपलब्ध (हस्त. यादी, क्र. ३). ह्या कवीच्या नावावर गो. का. चांदोरकर ह्यांनी *भगवद्गीता-टीका* (र. श. १६१६/१७, वि. ल. भावे संग्रह) व *कथाकल्पतरु* (गो. का. चांदोरकर संग्रह) असे दोन ग्रंथ दिले आहेत (संककासू., पृ. २७).

**गोपाळदास–४** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] कवी. *शाहू छत्रपती व बाळाजी विश्वनाथ प्रशस्ति* ह्या ओवीबद्ध प्रकरणाचा कर्ता. 'माझा संप्रदाय बोधळा' असा आपल्या संप्रदायाचा उल्लेख कवी करतो. प्रकरणात उल्लेखिलेल्या धामनी गावाच्या परिसरातच ह्यांचे वास्तव्य झाले असावे.

मोगल सैन्याची दक्षिणेत धाड आली असता पाबळ तर्फेतील धामनी गावच्या एका देवालयातील रामाच्या सुंदर मूर्ती एका रामभक्त बैराग्याने तेथेच पुरून ठेवल्या होत्या. देहूकर तुकारामांचे पुत्र नारायणबोवा ह्यांनी कचेश्वरांची भेट घेऊन, ह्या मूर्ती बाहेर काढून शाहूमहाराजांना त्यांची देवालयात परत स्थापना करण्याची विनंती करावी असा सल्ला गोपाळदास ह्यांना दिला. त्याप्रमाणे ७८ ओव्यांचे काव्य लिहून त्यात वरील हकीकत निर्दिष्ट करून शाहूमहाराजांना गोपाळदासांनी ही विनंती केलेली दिसते.

ह्यातील पहिल्या ४४ ओव्या शाहू (शिवाजी) व बाळाजी विश्वनाथ (प्रधान) ह्यांच्या प्रशस्तिपर आहेत. बाकीच्या ओव्यांत (४४ ते ७८) वरील हकीकत कथन केली आहे. औरंगजेब दक्षिणेत चाल करून आला तेव्हा त्याने अनेक देवदेवस्थाने उद्ध्वस्त केल्याची माहिती ऐतिहासिक दप्तरांत सापडते. ह्या प्रकरणाचा कर्ता गोपाळदास ह्याने कथन केलेली हकीकत तत्कालीन इतिहासाशी संपूर्णतया सुसंगत

आहे. ह्या काव्यात शाहूराजे व बाळाजी ह्या दोघांची प्रशंसा येते त्याअर्थी १८ व्या शतकाच्या दुसऱ्या पादात हे प्रकरण रचले गेले असावे.

एकंदर हकीकतीवरून, रामाच्या मूर्तीच्या उद्धाराची तळमळ बाळगणारा हा गोपाळदास वडगावच्या जयरामस्वामींचा शिष्य गोपाळस्वामी असावा असे धुळ्याचे भास्कर वामन भट जे अनुमान करतात ते मात्र बरोबर वाटत नाही; कारण ह्या गोपाळांचा समाधिशक १६१२ (इ. स. १६९०), आश्विन व. १ असा दिलेला आहे (रासं., खं.२, पृ. ४). प्रस्तुत काव्याची रचना ही उत्तरकालातील आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** भट, भा. वा. : शाहू छत्रपती व बाळाजी विश्वनाथ प्रशस्ति; संशोधक, व. ३, अं. २; पृ. २०८–२१३.

**गोपाळदास–५** / ० **गोपीनाथ–१** [का. अनु.] महानुभाव कवी. *शुकदेव-चरित्र* ह्या ग्रंथाचा कर्ता. *सारस्वतपुरवणी*कार डॉ. तुळपुळे ह्यांनी *शुकदेव-चरित्र* ग्रंथ गोपीभास्कर कवीच्या नावावर टाकला आहे (मआ., आ. ५, पृ. ८११). डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी गोपीभास्कराच्या नावावर जे ग्रंथ दिले आहेत (ममवा., पृ. ६०–६१) त्यात ह्या चरित्राचा उल्लेख नाही. डॉ. यू. म. पठाण ह्यांना गोपाळचावडी (जि. नांदेड) येथील महानुभाव मठातून उपलब्ध झालेल्या *शुकदेवचरित्रा*च्या (तीन-अध्यायी) पोथीत गोपाळदासकृत असा निर्देश येतो. डॉ. पठाणांच्या मते हा गोपाळदास कवी मुरारमल्ल कवी विद्वांसांचा शिष्य गोपीभास्कर ऊर्फ गोपीदास विद्वांस ह्या कवीपेक्षा भिन्न आहे. *शुकदेवचरित्राच्या* दुसऱ्या एका १४-अध्यायी (खिर्डी) प्रतीत गोपीनाथ असे कवीचे नाव येते. कवीच्या काळाचा वा चरित्राचा अंदाज लागत नाही.

चौदा-अध्यायी *शुकदेवचरित्राचे* संपादन खिर्डी (ता. रावेर, जि. जळगाव) येथील महानुभाव श्रीधरबुवा मराठे ह्यांनी केले आहे. डॉ. पठाण ह्यांना उपलब्ध झालेल्या पोथीचे मुळात ५ अध्याय होते पण त्यांतील तीनच अध्याय पोथीत सापडतात. खिर्डी प्रतीच्या १४ अध्यायांतील विस्तृत कथा गोपाळचावडीच्या प्रतलेखकाने संक्षेपचातुर्याने ५ अध्यायांत आणली असावी, असे डॉ. पठाण ह्यांचे मत आहे.

*शुकदेवचरित्र*-लेखनामागची प्रेरणा सांप्रदायिक स्वरूपाची, प्रामुख्याने पंथीय तत्त्वज्ञानाच्या निरूपणाचीच दिसते. ह्यासाठी प्रस्तुत विषयाची कवीने केलेली योजना औचित्यपूर्ण वाटते. कथेतील अन्य तपशिलापेक्षा कथानुषंगाने येणारे तत्त्वविवरण हे महत्त्वाचे आहे. ह्या ग्रंथाच्या खिर्डी प्रतीच्या दहाव्या अध्यायात जी भारतीय दर्शनपरंपरा येते ती महत्त्वाची असून त्यामधून महानुभाव पंथाचा वेदांकडे व अन्य दर्शनांकडे पाहण्याचा दृष्टिकोन समजून येतो.

डॉ. पठाण संपादित तीन-अध्यायी प्रतीत हा पंथीय तत्त्वज्ञानाच्या विवरणाचा भागच प्रामुख्याने समाविष्ट झालेला आहे.

**रचना : मु.** – १ शुकदेवचरित्र; अ. ३; संपा. पठाण, यू. म.; (प्रस्तावनेसह); मराठवाडा विद्यापीठ पत्रिका, व. ५, अं. १, १९६४. २. शुकदेवचरित्र; अ. १४; संपा. मराठे, श्रीधरबुवा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पठाण, यू. म. : शुकदेवचरित्र, नवे संशोधन; नभामा., ऑग. १९६६; पृ. १६–२०.

**गोपाळदास–६** [का. अनु.] महानुभाव कवी. ह्यांची *तत्त्वसारोपनिषत्* (अमु.) ही रचना उपलब्ध (संककासू., पृ. १२७).

**गोपाळदास–७** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोपाळनाथ–१** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. बोधलेबुवांचे शिष्य. ह्यांची काही स्फुट रचना आढळते (मसा., आ. ५, पृ. ८०५).

**गोपाळनाथ–२** [अंदाजे इ. स. १७०० – समा. श. १६८८ / इ. स. १७६६] नाथसंप्रदायी कवी. ज्ञानेश्वरांशी प्रत्यक्षात संबंध नसलेल्या पण थेट दत्तात्रेयांशी संबंध जोडणाऱ्या एकनाथोत्तर परंपरेतील एक सत्पुरुष. गोपाळनाथ हे औरंगाबाद जिल्ह्यातील सलाबतपूर येथे राहणारे शुक्लयजुर्वेदी कौंडिण्यगोत्री ब्राह्मण. उपनाव घोलप. पित्याचे नाव गोविंद, मातेचे आनंदीबाई. गोविंदपंत घोलप हे कीर्तनकार होते व कीर्तन करीत असतानाच वैकुंठवासी झाले. गोपाळनाथांचे वडील बंधू रामचंद्र व धाकटे बंधू नानासाहेब. पैकी थोरले बंधू गृहस्थाश्रमी होते. धाकटे दोघे आजन्म ब्रह्मचारीच राहिले. पित्याचे देहावसान झाल्यानंतर गोपाळनाथ विरक्त बनून अरण्यात जाऊन तपश्चर्या करीत असताना बाभुळगावी रंगनाथ नावाच्या एका योग्याचे त्यांना दर्शन घडले. त्यांनी ह्यास योगमार्गाची दीक्षा दिली. पुढे काशीक्षेत्री अधिक तपश्चर्येसाठी गेले असताना सातारकर शाहू छत्रपतींच्या परिवारापैकी राणोजी कुंभार ह्यांच्याशी गाठ पडून त्यांच्याबरोबर गोपाळनाथ साताऱ्यास आले. तेथे त्रिपुटी (ता. पाटण, जि. सातारा) येथील एक सरदार केसरकर हे त्यांचे भक्त बनले व त्यांनी ह्यांस आग्रह करून त्रिपुटीस नेले. ह्यांचे ह्यापुढील सर्व आयुष्य ह्याच ठिकाणी गेले व त्रिपुटी ही संतांची एक पेठच बनली.

गोपाळनाथांची प्रसिद्ध गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे आहे : नृसिंहसरस्वती > जनार्दनस्वामी > एकनाथ > गावबा > कृष्णानंद > विसोबानंद > मुरारनाथ > रंगनाथ > गोपाळनाथ > गोविंदनाथ > देवनाथ > दयाळनाथ. गोपाळनाथांनी श. १६८८ च्या श्रावण वद्य अमावास्येला त्रिपुटी (जि. सातारा) येथे जिवंत समाधी घेतली. श्रीक्षेत्र त्रिपुटी येथे श्रीगोपाळनाथांचे समाधिमंदिर असून दरवर्षी तेथे श्रावण वद्य अष्टमीपासून भाद्रपद शुद्ध द्वितीयेपर्यंत गोपाळनाथांचा पुण्यतिथी-उत्सव साजरा होत असतो. गोपाळनाथांचे त्रिपुटी येथील सध्याचे वंशज हे त्यांचे गृहस्थाश्रमी बंधू रामचंद्र ह्यांच्या परंपरेतील आहेत. ह्यांचे धाकटे बंधू नानासाहेब ह्यांनी गोपाळनाथांचे लिहिलेले ओवीबद्ध चरित्र (अ. ३२, ओ. सं. ७५००) उपलब्ध आहे (मूळ प्रत बागणीचे जहागिरदार मंत्री ह्यांजकडे). गोपाळनाथांचा शिष्यपरिवार फार मोठा होता. त्यांच्यापैकी परमहंस, गोविंदनाथ, शेख सुलतान, गोपाळभट हे शिष्य प्रख्यात आहेत. ह्यांच्या परंपरेतील मठ पुणे (स्वारगेटजवळ), नागपूर, कऱ्हाड, भांडवली, बुध, पाठखळ (जि. सातारा) इत्यादी ठिकाणी आहेत.

गोपाळनाथांच्या नावावर *गुरुगीताटीका, शिरोमणी, समाधिबोध, अभंगपदादी स्फुट कविता* अशी रचना आढळते. ह्या रचनेचे स्वरूप प्रामुख्याने अध्यात्मपर आहे. *शिरोमणी* ग्रंथाचे ५ व ६ असे दोन अध्याय रा. चिं. ढेरे ह्यांनी पाहिले आहेत. त्यांत मायानिरास, ब्रह्मस्वरूपवर्णन, जीवाचे स्वरूप, ब्रह्मप्राप्तीचा मार्ग ह्यांवर विवेचन केलेले आहे. सुलभ दृष्टान्तांच्या साहाय्याने सुबोध आणि स्पष्ट विवेचन करणारी लेखनशैली लेखकाने आत्मसात केली आहे असे ह्या दोन अध्यायांवरून दिसते. ह्यांच्या कृष्णलीलापर १६३ अभंगांचे बाड संशोधक कृ. वि. आचार्य ह्यांच्या पाहण्यात आले होते. ह्यातील प्रत्येक अभंगाच्या शेवटी 'श्रीनाथ गोपाळ' अशी मुद्रा कवीने वापरली आहे. अभंगांच्या काव्यांगाविषयी लिहिताना कृ. वि. आचार्य म्हणतात : 'कवीची वर्णनशैली हृदयभेदक असून रसाळ आहे.' गोपाळनाथांच्या 'सद्गुरुरायें नवल केलें आज' व 'वैधें गुण केलाना' ह्यांसारखी पदेही सर्वपरिचित आहेत.

**रचना : मु.** – १. गुरुगीताटीका. २. समाधिबोध; ओ. सं. १००; संपा. घोलप, वि. भा.; त्रिपुटी मठ (जि. सातारा). ३. चार पदे; संपा. ओक, वा. दा.; पदसंग्रह, भा. ३; मुंबई, १९०१; पृ. ७२-७३.

**अमु.** – १. शिरोमणी; अ. १८, ओ. सं. ९२०९; र. का. : श. १६६८ (इ. स. १७४६), ज्येष्ठ व. ७, शुक्रवार; र. स्थ. : गोपाळचावडी (कृष्णातारळी संगमावरील); प्रत : श. १८१५ (इ. स.

१८९३), त्रिपुटी मठ. २. अभंग व पदे; भाइसमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आचार्य, कृ. वि. : गोपाळनाथांचे कृष्णलीलेचे अभंग; भाइसमंइति., श. १८३७; पृ. १६५–६६. २. ढेरे, रा. चिं. : गोपाळनाथ; गोचप.; नाथसंप्रदायाचा इतिहास; पुणे, १९५९; पृ. १७७–८०. ३. दिवाकर, ग. अ. : परब्रह्म श्रीगोपाळनाथ; ज्ञानेश्वर त्रैमा., नोव्हें. १९७४, पृ. ३८–३९. ४. पटवर्धन, पां. ना. : त्रिपुरीचे गोपाळनाथ; भाइसमंइति.; श. १८३७; पृ. २१८–१९.

**गोपाळनाथ–३** [का. अनु.] कवी. गुरू : आत्माराम. ह्यांनी अनेक पदे रचली आहेत. ह्यांची 'दासी झाल्यें मी श्रीगुरुची', 'साजणि! त्वरितगति जा तूं', 'वदति गोपिका बरी हरीला आवडली कुब्जा' अशी काही पदे लोकांना विशेष परिचित आहेत. पदसंग्रहात प्रसिद्ध झालेल्या तेरा पदांपैकी ४ पदे ह्या गोपाळनाथांची नाहीत.

**रचना : मु.** – पदे; संपा. ओक, वा. दा. : पदसंग्रह, भा. ३; मुंबई, १९०१; पृ. ७१–७५. **अमु.** – वेदान्तरहस्य; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. २९.

**गोपाळनाथ–४** [ ?– समा. श. १७२७, ज्येष्ठ व. ३०, गुरुवार/ इ. स. १८०५] नाथसंप्रदायी कवी. हे त्रिपुटीच्या गोपाळनाथांच्या परमहंस नामक शिष्याच्या परंपरेतील. गोपाळनाथ परंपरेतील मठ पुण्यास स्वारगट येथे होता. ही परंपरा गोपाळनाथ (त्रिपुटीचे) > परमहंस (समा. पाठखळ, जि. सातारा) > सहजनाथ > सुभाननाथ > गोपाळनाथ अशी आहे. ह्यांचे चरित्रवृत्त ज्ञात नाही. गोपाळनाथ हे ब्रह्मचारी असून सिद्धावस्थेस पोचलेले योगी होते. ह्यांचा समाधिकाळ एका अभंगात त्यांचे शिष्य गंगानाथ ह्यांनी नोंदविलेला सापडतो. स्वारगेटनजीकच्या ह्यांच्या मठाच्या जागी आज व्यंकटेशाचे मंदिर असून त्यामध्ये सहजनाथ > सुभाननाथ > गोपाळनाथ ह्या तिघांच्या समाधिशिला आहेत.

गंगानाथ मठातील बाडात उपलब्ध झालेली ह्यांची चार पदे रा. चिं. ढेरे ह्यांनी *इंद्रायणी* (सप्टें.–ऑक्टो. १९६३, पृ. ४५–४७) मासिकात छापली आहेत. त्यामध्ये गुरुमहिमा, योगानुभव आणि आत्मसुखप्राप्तीची तळमळ दिसते. "अवघड वाट असे येक मुंगीलागी रीग नसे कदा। त्या मार्गें सद्गुरुनें मजला नेलें निजवस्तुच्या सुदा ॥ सांगुं मी काई नवल बाई अगठित दाविली लीळा। चाल सये गडे जाउं पाहुं सद्गुरुच्या चरणकमळा ॥ घेउं विसावा अक्षयी उघडुं डोळियाचा डोळा ॥" ह्यासारखी त्यांची पदे नाथसंप्रदायी परंपरेचा वारसाच चालविताना दिसतात.

**गोपाळनाथ–५** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**गोपाळनाथ मळगावकर / ० गोपाळबोध / ० गोपाळबोध गोसावी / ० बोध गोपाळ** [इ. स. १६६०–१७४०] संतकवी. रत्नागिरी जिल्ह्यात मालवणपासून तीन कोसांवर असलेल्या परुळे गावी ह्यांचा जन्म झाला. जातीने कुडाळदेशकर गौड ब्राह्मण. उपनाव सामंत. कुलदेवता आदिनारायण. दुष्काळात पित्याचा मृत्यू झाल्यानंतर फारच कठीण दिवस आल्याने गावातून पंढरपूरला जाणाऱ्या दिंडीबरोबर हे आईसह पंढरपुरास गेले. तेथे माणकोजी बोधले ह्या सत्पुरुषांची गाठ पडल्यानंतर त्यांनी ह्या दोघांना आपल्याबरोबर धामणगावी नेले. काही काळानंतर नाथसंप्रदायाप्रमाणे ह्यांस उपदेश केला. पुढे गुरूच्या आज्ञेप्रमाणे हे विठ्ठलाच्या पादुका व पालखी घेऊन कोकणात सावंतवाडीस आले. सावंतवाडीच्या राजांनी ह्यांना तेथूनच जवळ असलेल्या माळगावी इनाम उत्पन्न करून दिले. तेथे एक पांडुरंगाचे देवालय बांधून गोपाळनाथांनी कीर्तन आणि कविता ह्यांच्या द्वारे हरिभक्तीचा प्रसार केला. वयाच्या ८० व्या वर्षी मळगावीच ह्यांनी समाधी घेतली. ह्यात असेपर्यंत पंढरीची वारी मात्र ह्यांनी कधीच चुकवली नाही. ह्यांच्या वंशजांची घरे आजही मळगावात आहेत.

गोपाळनाथांच्या नावावर स्कंदपुराणांतर्गत *पांडुरंगमाहात्म्य* (अ. ५, ओ. सुमारे ६००), *प्रकाशबोध* नावाचा एक वेदान्तपर ग्रंथ (ओ. सं. २०२.), *बालक्रीडा* (२५०) व पदे, अभंग, भूपाळ्या अशी बरीच स्फुट कविता आढळते. ह्यांनी 'गोपाळबोध' किंवा 'बोधगोपाळ' ह्या नावाने आपला व आपल्या गुरूचा उल्लेख केला आहे.

*पांडुरंगमाहात्म्य* ह्या ग्रंथामध्ये अनेक विषय आले आहेत. खऱ्या तीर्थयात्रेची व्याख्या करताना हे म्हणतात : "सर्व भूतीं समदया। अन्नदान घडे जया ॥ घरीं तीर्थें त्याचीया। विसाविया येतील ॥ ३.५७ ॥" जोपर्यंत मन हाती आले नाही तोवर इतर जपतपादी कर्मे व्यर्थ होत असेही ते सांगतात. "हाता आलें नाहीं निजमन। वरपांग करिती ध्यान। तें ध्यानची झालें विघ्न ॥ होय नागवण स्वहितासी ॥ ६.३० ॥"

पंढरीच्या माहात्म्यासंबंधात नाथ म्हणतात : "हे मुक्तिची नगरी। अनुपम महिवरी। निर्माण केली साजिरी। तारक पंढरी तिहीं लोकीं ॥ ५.५४ ॥"

नाथ हे पूर्ण अद्वैतमतवादी होते. *प्रकाशबोध* ह्या ग्रंथात खरा परमेश्वर हा ब्रह्मा, विष्णू व शंकर यांच्याही पलिकडे आहे असे मत हे मांडतात. आपल्या गुरूच्या आदेशाप्रमाणे भक्ती, अध्यात्म ह्यांचा प्रसार करण्यात आपली सर्व ह्यात गोपाळनाथांनी घालविली. ह्या उद्दिष्टानुसार केलेली काव्यरचना भक्तिपूर्ण, स्वानुभवपूर्ण आणि प्रासादिक झालेली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : गोपाळनाथ मळगावकर; मकच., भा. १; मुंबई, १९०७; पृ. २४९–२६१.

**गोपाळपंडित–१** – पहा आनेराज व्यास.

**गोपाळ पंडित–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोपाळबाबा खासगीवाले** [का. अनु.] बखरकार. हे होळकरांच्या पदरी होते. ह्यांनी लिहिलेली *होळकरांची कैफियत* उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४०).

**गोपाळ बाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोपाळबावा देहूकर** [इ. स. चे १८ वे शतक] आख्यानकार कवी. हे तुकाराममहाराजांचे पणतू, नारायणबोवांचे नातू. हे कीर्तनकार होते. तुकाराममहाराजांच्या चरित्रावर ह्यांनी बरीच आख्याने रचली आहेत. एक-दोन आख्याने नारायणबोवांवरही आहेत. ह्यांच्या आख्यानात ऐतिहासिक माहितीपेक्षा काल्पनिक चित्रणच बरेच वेळा आढळते. ह्या आख्यानांतून तुकारामसंबंधित अनेक व्यक्तींच्या चरित्रांतील काही प्रसंग मधून मधून येतात. अशा काही प्रसंगवर्णनांतून मोरया गोसावी व चिंतामणी देव ह्यांना तर बुवाबाजी करणाऱ्या संताळ्यांप्रत आणून ठेवले आहे, असे वा. सी. बेंद्रे ह्यांचे मत आहे (*तुकाराममहाराज यांचे संतसांगाती*, पृ. १३०). हे पेशाने कीर्तनकार असल्यामुळे श्रोतृवर्गाचे रंजन करण्यासाठी ह्यांना प्रचलित दंतकथांचा वापर करून कथा खुलविणे सोयीचे वाटले असावे. ह्यामुळेच सत्य वस्तुस्थितीची चिकित्सा केलेली फारशी आढळत नाही. ह्यांच्याच आख्यानांच्या आधारे महिपतीबावांनी इ. स. १७६२ त लिहिलेल्या *भक्तविजयात* भर टाकून *भक्तलीलामृतातील* कथानक अतिरंजित केले.

**रचना : मु.** – ओवीबद्ध आख्याने; र. श. : इ. स. १७५० ते १७७०; 'जनताजनार्दन' मासिक : मार्च, एप्रिल, ऑक्टो., डिसें. १९५५ व जाने. १९५६, क्रमशः.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** बेंद्रे, वा. सी. : गोपाळबावा; 'तुकाराम-

महाराज यांचे संतसांगाती'; मुंबई, १९५८; नामस्थलसूची, पृ. २४६.

**० गोपाळबोध** – पहा **गोपाळनाथ माळगावकर.**

**० गोपाळबोध गोसावी** – पहा **गोपाळनाथ मळगावकर.**

**गोपाळमुनि / ० डिंभ कवी–२** [का. अनु.] महानुभाव कवी. गुरु-परंपरा : अनंतराजमुनी > दत्तराज > गोपाळमुनी.

**रचना : मु.** – १. ज्ञानगारुड; ओ. सं. १४; महानु., जाने. १९६५; पृ. २९. **अमु.** – १. ज्ञानगारुड. २. श्रीकृष्ण-बाळलीला. ३. पंचधावे; गोपीराज ग्रंथालय, रिद्धपूर.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अडसोड अण्णासाहेब : गोपाळमुनि कवि डिंभ; महानु., डिसें. १९७२; पृ. ११.

**० गोपाळमुनि दर्यापूरकर** – पहा **गोपाळदास–१ (दर्यापूरकर).**

**० गोपाळ याज्ञवल्की** – पहा **अच्युताश्रमशिष्य.**

**गोपाळ रघुनाथ** [का. अनु.] कवी. ह्यांनी काही प्रकरणे रचली आहेत.

**रचना : मु.** – एक अध्यात्मपर पद : पिंगा; 'लोकगीत', तंजावर, १९५०; पृ. ५८–५९. **अमु.** – १. गर्भगीताटीका; ओ. सं. १४०; तंसम. बा. ९९–१००, हस्त. यादी, क्र. २. १. डांकुलता. ३. दिवटा; र. श. : १६२०, बहुधान्य संवत्सर, अधिक वद्य ८. ४. पिंगळा; सवामं. हस्त. सू., खं. १. ५. पदपदांतरे, तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोपाळसुत / ० गोपाळसूनु** [का. अनु.] कवी. ह्यांनी आपल्या *भगवद्गीता* ग्रंथात 'कर्नाटक विठ्ठल ह्याच्या प्रसादाने' असा विठ्ठलाचा उल्लेख केला आहे. ह्यांची *सटीक भगवद्गीता* व पदपदांतरे सवामं. बाडांतून आढळतात (बा. ४६५, ८७९, हस्त. सू., खं. १, २).

**गोपाळस्वामी** – पहा **गोपाळदास–३.**

**गोपाळात्मज–१** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] वैदर्भीय कवी व आरतीकार. नागपूर जिल्ह्यातील सावनेर तालुक्यातल्या केळवद गावचा. उपनाव मोरोणे. कुलदैवत श्रीलक्ष्मी-व्यंकटेश.

गोपाळात्मजांनी बऱ्याच आरत्या रचल्या आहेत. आरत्यांखेरीज *वटसावित्री*, *अनंतचतुर्दशी* इत्यादी संस्कृत व्रतकथांचे ह्यांनी मराठीत भाषांतर केले आहे (कल्याणराव : गोपाळात्मज; *इंद्रायणी*, जुलै १९६३; पृ. ४७).

**गोपाळात्मज–२** [इ. स. चे १८ वे शतक, अखेर] कवी. हे पेशवाई-अखेरच्या काळात होऊन गेले. *सारस्वत*कारांनी विनोदी कवनांचा कर्ता म्हणून गोपाळात्मजांचा उल्लेख केला आहे. "कुठें तुम्ही गेलां होतां क्रीडेला । मुखचंद्र बहुत कोमला । आरक्त लोचनें दिसतीं नीलतमाला । राव रंग कुठें उडविला ? ॥" अशा खव्याळ प्रश्नोत्तरांतून राधा-कृष्णाचा शृंगार कवीने रंगविला आहे. आरतीकार गोपाळात्मज व हा विनोदकार हे दोघे एकच की भिन्न ते समजण्यास मार्ग नाही (मसा., आ. ५, पृ. ६२४).

**गोपाळात्मज–३** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – ४ पदे; पदसंग्रह, भा. ३; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १९०१; पृ. ९९–१०० व १८५–१८६.

**गोपाळात्मज बापानंद** [का. अनु.] चरित्रकार. ह्यांनी आनंदमूर्ती ब्रह्मनाळकरांचे ओवीबद्ध चरित्र लिहिले आहे. ह्या *आनंदचरित्रामृता*चे १६ अध्याय असून मूळ चरित्र ब्रह्मनाळ येथे आहे. त्याची एक नक्कल *दासविश्रामधामा*च्या परंपरेतील श्रीधरपंतांच्या हातची आहे (सवामं. बा. ६२७).

**रचना : मु.** – आनंदचरित्रामृत; अ. १६; संपा. कुळकर्णी, वि. गो.; सांगली, १९३५.

**गोपाळाश्रम स्वामी** [अंदाजे श. १५८२ / इ. स. १६६०] *ज्ञानेश्वरी*-संशोधक. हे मूळचे पंढरपूरचे. पांडुरंगभक्त. काशीक्षेत्री राहून ह्यांनी *ज्ञानेश्वरी*संशोधनाचा प्रयत्न केला. *ज्ञानेश्वरी*संशोधनाची भूमिका सांगताना गोपाळाश्रम लिहितात : "ग्रंथ आधींच बहु चांगला । परि लिहिणारीं भिन्न केला । तो प्रति मेळउनि शोधिला । पाठ घातला पूर्वींचा ॥ २ ॥" गोपाळाश्रमस्वामींची ही शुद्धीकृत *ज्ञानेश्वरी* एकनाथोत्तर असली तरी तिच्यातील पाठ एकनाथपूर्वकालीन असल्याने *ज्ञानेश्वरी*च्या पाठसंशोधनात तिचे विशेष महत्त्व प्रस्थापित झाले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : ज्ञानेश्वरीचे प्राचीन संशोधक; विविधा.; पुणे, १९६७; पृ. ९१–९३.

**० गोपाळसूनु** – पहा **गोपाळसुत.**

**गोपिराजदैवज्ञसुत रामकृष्ण** [का. अनु.] ज्योतिर्विद.

**रचना : अमु.** – गोत्रनिर्णय प्रकरण; सवामं. बा. ९०१; हस्त. सू., खं. २.

**० गोपीकवी** – पहा **गोपाळ–२.**

**गोपीनाथ** – पहा **गोपाळदास–४.**

**गोपीनाथ–२** [का. अनु.] शाहीर. गुरु : शिवदीन. वैराग्यपर कटाव, पोवाडे व लावण्या ही ह्यांची रचना. लावण्यांतून वेदान्त सांगण्याची ह्यांना आवड दिसते. गोपीनाथाच्या *नारळीप्रसाद* ह्या छोव्याशा कवनाची ओळख द. वा. पोतदारांनी करून दिली आहे (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २७०).

**गोपीनाथ–३** [का. अनु.] ज्योतिर्विद.

**रचना : अमु.** – ज्योतिषकलोदय; त्रु. पो.; ले. का. : श. १७२३ / इ. स. १८०१, माघ शु. १३, रवि.; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १०६.

**गोपीभास्कर** [अंदाजे श. १५१५ / इ. स. १५९३ – श. १६०० / इ. स. १६७८] महानुभाव ग्रंथकार व भाष्यकार. कवीश्वर आम्नायातील प्रमेयभाष्यकार मुरारीमल्ल विद्वांसांचे हे शिष्य. वडील मुधोपंत देशपांडे. वास्तव्य : तगर. वडिलांनी बालपणीच ह्यांना गुरूस अर्पण केले होते.

गोपीभास्करांनी रचलेल्या सात-आठ ग्रंथांची नोंद वि. ल. भावे ह्यांनी त्यांच्या *महानुभाव ग्रंथसूची*त केली आहे (पृ. ९). त्यांपैकी *प्रश्नार्णव* व भगवद्गीतेवरील टीका *भास्करी* ह्या एकदोन ग्रंथांची थोडीफार माहिती उपलब्ध आहे. *प्रश्नार्णव* ग्रंथाची पोथी रिद्धपूर येथील महानुभाव महंत गोपीराज ह्यांच्या संग्रहात सापडली असून ती सकळा लिपीतील श. १६८५ / इ. स. १७६३ ची प्रत आहे. ह्या ग्रंथात एकंदर १५०० पेक्षा अधिक प्रश्न असून, श्रीसर्वज्ञ चक्रधरांच्या निरूपणाच्या पद्धतीत निरनिराळे प्रश्न व संदेह ह्यांचा परिहार कसा केला जातो त्याचे वर्णन येते. ह्या ग्रंथाला 'स्थळ' म्हणजे साधकबाधक चर्चा करणारा ग्रंथ असे म्हटले जाते. ग्रंथसमाप्तीच्या काही ओव्या अशा आहेत : "बत्तीस लक्षणें शास्त्राचीं ॥ आशंका आक्षेप संशयाचीं । लक्षुनीया अर्थ गर्भीची । आनुवर्तवीली ॥ पाहुनि शास्त्र सर्वळा । हे बोलिली प्रश्नमाळा । सौपान सखोला लीळा । उपन्यास ॥ . . . इति प्रश्नार्णव आपार । आन्वयेकार गोपीभास्कर. . . ॥" शास्त्राभ्यास म्हणजे काय व तो कसा करावा, ज्ञानदृष्टी म्हणजे काय, कसोट्या कोणत्या, स्पष्टीकरण किती प्रकारे होते, संशय-आशंकादिकांचे परिहरण इत्यादी अनेक गोष्टींचे ज्ञान ह्या ग्रंथाने व्हावे असा ग्रंथकाराचा हेतू दिसतो. मराठी शब्दांचा सूक्ष्मपणा, वेचकपणा व सयुक्तिकता इत्यादी बाबींकडे महानुभाव ग्रंथकारांनी मोठ्या आस्थेने लक्ष पुरविल्याचे ह्या ग्रंथावरून दिसते.

गोपीभास्करांची भगवद्गीतेवरील टीका *भास्करी* ह्या नावाने प्रसिद्ध आहे. संस्कृतातील *भिंगारकरी टीके*चा हा अनुवाद असून मूळ

टीका ज्ञानधेनू म्हटली तर ही *भास्करी टीका* तिचे वत्स होय, असे कवी म्हणतो. आपल्या पूर्वीच्या *गंगाधरी, लक्ष्मीधरी, रामदेवी* अशा गीताटीकांचा तो उल्लेख करतो. ह्याच्या नावावर डॉ. तुळपुळे ह्यांनी *महाराष्ट्रसारस्वता*च्या पुरवणीत उल्लेखलेले *शुकदेवचरित्र* ह्यांचे नसून गोपाळदास ऊर्फ गोपीनाथ कवीचे आहे असे अलिकडच्या संशोधनाने सिद्ध झाले आहे.

**रचना : अमु.** – १ आचार महाभाष्य. २. त्रिबंध महाभाष्य. ३. प्रश्नार्णव, गद्य ग्रंथाच्या अखेरीस १५ ओव्या. ४. भास्करी : श्रीमद्भगवद्गीता टीका; र. श. १५७२ / इ. स. १६५०. ५. वस्तुचंद्रिका स्थळ. ६. वासुदेवचरित्र, पृ. ७; ओ. सं. ८४८. ७ विद्यासारभाष्य. ८. सिद्धान्तराजभद्र; र. श. १६०० / इ. स. १६७८. ९. सिद्धान्त-साखळी; ममग्रंककासू.; पृ. ९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, य. खु. : गोपीभास्कर; ममवा., द्वि. आ., पुणे, १९६०; पृ. ६०–६१. २. नेने, ह. ना. : प्रश्नार्णव; संलेसं., भा. १; नागपूर, १९५७; पृ. १९६–२०४.

**गोपीसुत** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – आरत्या; ममग्रंककासू., पृ. ९.

**गोरखअवधूत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोरक्षनाथ** [अंदाजे इ. स. १०५०–११५०] नाथपंथाचे गतिमान प्रभावी प्रवर्तक. भारतीय जनमानसात गोरक्षनाथ व त्यांचे गुरू मत्स्येंद्रनाथ ह्या जोडीविषयी कमालीचा आदर आहे. भारतीय साधनेच्या आणि नाथसंप्रदायाच्या इतिहासात युगकार म्हणून गोरक्षनाथ ह्यांचे महत्त्व आहे. महाराष्ट्राच्या पारमार्थिक वाङ्मयावर श्रीशंकराचार्यांच्या खालोखाल ह्यांच्याच विचारसरणीचा प्रभाव विशेष पडलेला आढळतो.

गोरक्षनाथांचा निश्चित काळ कोणता ह्याचा अजूनही संशोधकांना नीटसा तपास लागलेला नाही. संशोधकांची मते गोरक्षनाथांना आठव्या शतकापासून ते चौदाव्या शतकापर्यंत मागेपुढे खेचीत आहेत.

चक्रधरांच्या *लीळाचरित्रा*त नाथसंप्रदायाचे अनेक उल्लेख आढळतात. चक्रधरांचे गुरू भुंडम राउळ हेही एक नाथसिद्धच होते. चक्रधरांचा जन्मकाल इ. स. ११७५ च्या सुमाराचा. ह्या सर्व प्रमाणांवरून गोरक्षनाथांचा काल अंदाजे इ. स. १०५० ते ११५० च्या दरम्यानचा असे अनुमान केले जाते.

गोरक्षप्रणीत नाथसंप्रदायाचा उदय श्रीशैलावर झाला. गोरक्षनाथांचे कार्यक्षेत्र प्रारंभी दक्षिण भारतात होते. ह्या कार्यारंभाशी गोदातीरावरील चंद्रगिरी स्थलाचा निर्देश परंपरामान्य आहे. नाशिक-त्र्यंबकेश्वराचा परिसर नाथसंप्रदायाच्या प्रभावस्मृतींनी भारावलेला आहे.

डॉ. मोहनसिंगांच्या मते गोरक्षनाथ हे समाजाच्या खालच्या थरात जन्म घेऊन आपल्या कर्तृत्वाने क्रांती करणारे महापुरुष ठरले आहेत. डॉ. द्विवेदी मात्र ह्यांना ब्राह्मण कुळातील मानतात. रा. चिं. ढेरे ह्यांच्या मताप्रमाणे ते दक्षिणेत स्थायिक झालेल्या काश्मिरी ब्राह्मण पंडिताच्या कुळात जन्मले असावेत.

लहान वयातच योगी-जीवनाचा स्वीकार करून ह्यांनी आजन्म ब्रह्मचर्य व्रत पाळले. ह्यांच्या वाणीतून ह्यांच्या ब्रह्मचर्यवृत्तीचे आणि विषयपराङ्मुखतेचे दर्शन घडते. ह्यांचा देह कांतिमान होता ह्याबद्दल *लीळाचरित्रा*त "कैसा सौंदरु जोगी : साक्षात गोरक्षनाथ कीं गा :" असे वर्णन येते. जवळजवळ सर्व भारतीय भाषांतून गोरक्षनाथांविषयीचे ग्रंथ व उल्लेख सापडतात. पंथाच्या तत्त्वज्ञानाच्या सार्वत्रिक प्रसारासाठी त्यांनी भारतभर भ्रमण केले असावे. निष्कलंक चारित्र्य, प्रभावी व्यक्तित्व आणि हृदयस्पर्शी वाणी ह्या व्यक्तिवैशिष्ट्यांनी पंथीय तत्त्वज्ञानाच्या प्रसाराचा उच्चांक त्यांनी गाठला. त्यांचा शिष्यपरिवार फार मोठा असून तो सर्व प्रांतांत पसरलेला होता. ह्या पंथाने पतंजलीची योगपद्धती व माधवाचार्यांनी उपदेशिलेली शैव तत्त्वे ह्यांचा आपल्या तत्त्वज्ञानात प्रामुख्याने समावेश केला आहे.

पंथप्रवर्तक गोरक्षनाथांच्या ग्रंथांचा पसारा बराच मोठा आहे. त्यांचे बरेचसे लेखन संस्कृतात झाले असले तरी लोकभाषेचा ह्यांनी मोठ्या हिरीरीने पुरस्कार केला. आपल्या प्रखर विचारांचा प्रसार ह्यांनी लोकभाषांतूनच केला व करविला. त्यांनी स्वतः संस्कृताखेरीज केवळ हिंदी भाषेचाच वापर केलेला दिसतो. गोरक्षमुद्रांकित ग्रंथसंभारात त्यांचे कोणते व त्यांच्या नावावर खपविले जाणारे इतरांचे ग्रंथ कोणते ह्याचा मात्र अद्यापि निर्णय होऊ शकलेला नाही. नाथपंथामध्ये योगमार्गाला फार महत्त्व आहे. ह्या योगमार्गाचे विवरण करणारे अनेक ग्रंथ गोरक्षनाथांनी संस्कृतमधून रचले आहेत. पंथीय तत्त्वज्ञानाचा प्रसार करण्यासाठी त्यांनी हिंदीमध्ये अनेक ग्रंथांची व पदांची रचना केली. मराठीत त्यांच्या नावावर जे एक-दोन ग्रंथ मोडतात ते *गोरक्ष-अमरनाथ-संवाद* व *गोरक्षगीता* हे होत. ह्यांपैकी *गोरक्ष-अमरनाथ-संवाद* हा ग्रंथ अमरनाथांचा असे नव्या संशोधनांती सिद्ध झाले आहे (व. दा. कुळकर्णी : नाथपरंपरेतील गद्य ग्रंथ *विवेकदर्पण*; *गोरख-अमरनाथ संवाद*; मस्वासंप., हैद्राबाद, १९७१; पृ. १५–२६). ह्यांनी पदे रचल्याचा उल्लेख भावे ह्यांनी *महाराष्ट्रसारस्वतात* केला आहे (मसा., पृ. ३१). *गोरक्षगीता* संस्कृतात असल्याचा उल्लेख सापडतो. मराठी रचनेबद्दल निश्चितपणे काहीच कळत नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं.; गोचप. (नाथसंप्रदायाचा इतिहास); पुणे, १९५९; पृ. ६७–११४.

**गोरा कुंभार** [अंदाजे इ. स. १२६७–१३१७] संतकवी. पंढरपूरच्या विठ्ठलाचे भक्त. संतमंडळीत वयाने सर्वांहून वडील. हे पंढरपुराहून ५०–६० मैल दूर असलेल्या तेरढोकी ह्या गावी राहात. ह्यांना संती आणि रामी अशा दोन बायका होत्या. गृहस्थाश्रमी असले तरी वृत्तीने ते विरक्तच राहिले. ह्यांचा आध्यात्मिक अधिकारही मोठा होता. नामदेव परमार्थात कच्चे की पक्के हे ठरविताना गोरोबाकाकांचाच शब्द प्रमाण मानला गेला. ह्यांची समाधी तेरढोकीस आहे.

गोरोबांची उपलब्ध काव्यरचना अगदीच अल्प आहे. ह्यांचे २० अभंग *सकलसंतगाथेत* आवटे ह्यांनी छापले आहेत. काही पदरचना समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील बाडांतून सापडते. गोरोबांना अद्वैताचा साक्षात्कार सहजतेने घडे. हा जो त्यांना पारमार्थिक परमलाभ झाला होता, त्याचे स्वानुभवपूर्ण वर्णन ते आपल्या अभंगांतून घडवितात. उदा. "निर्गुणाचे भेटी आलों सगुणासंगें। तंव झालों प्रसंगीं गुणातीत। मज रूप नाहीं नांव सांगूं काई। झाला बाई काई बोलूं नये॥" ह्या साक्षात्कारानुभूतीचे वर्णन त्यांनी नामदेवांजवळ एका अभंगरूपाने केले आहे. ते म्हणतात : "अंतरीचें गुज बोलूं ऐसें कांहीं। वर्ण व्यक्त नाहीं शब्द शून्य॥ जयजय झनकूट जयजय झनकूट। अनुहात जंगट नाद गर्जे॥ परतल्या श्रुती म्हणती नेती नेती। त्याही नादा अंतीं स्थिर राहे॥ म्हणे गोरा कुंभार सत्रावीचें नीर। सेवी निरंतर नामदेवा॥" विदेह मुक्तस्थिती ती हीच. तिच्यामध्ये परमेश्वराच्या सर्वसाक्षित्वाची प्रचीती येते. वरील अभंगांतील 'अनुहात नाद' व 'सत्रावीचें नीर' ह्या योगविषयक खुणा लक्षणीय आहेत.

गोरोबांच्या काव्यात विषयांचे किंवा भाव-भावनांचे वैविध्य फारसे नाही. अद्वैत साक्षात्काराची अनुभूतीच केवळ त्यांच्या अभंगातून प्रकट झाली आहे. त्यामुळे ह्या अभंगातील आशय थोडा दुर्बोध होतो, पण ज्ञानेश्वरांनी प्रतिपादलेला ज्ञानोत्तर भक्तीचा मार्गच गोरोबांनी स्वीकारलेला असल्याने त्यांच्या अभंगावरील हे अध्यात्माचे आवरण किंचित दूर केल्यानंतर त्यांच्या काव्याचे खरे दर्शन घडते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. २६–३३. २. ग्रामोपाध्ये, गं. ब. :

गोराकुंभार; संकास.; पुणे, १९३९; पृ. २१–४०. ३. शुक्ल स. अ. : गोराकुंभार; मुंबई, १९६२.

**गोपाळशिष्य** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – ज्ञानसिंधु; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ३०.

**गोविंद–१** [का. अनु.] कवी. 'मेस्तक' किंवा 'लेखनपद्धति'-विषयक रचना. त्यास तोही 'शेणवाईपणाचें मेस्तक' असे म्हणतो. प्रस्तुत मेस्तकात ह्याने लिहिल्याप्रमाणे देवगिरीच्या रामदेवरावाचे कारभारी हेमाडपंत ह्यांनी कामराजाला 'शेणवाई पद्धतीचें' मेस्तक रचण्याची आज्ञा केली. कामराजानेही स्वबुद्धीला अनुसरून मेस्तक तयार केले. ते उपलब्ध न झाल्याने त्यातील ४० ओव्यांच्या प्राप्त झालेल्या वेच्यावरून 'गोविंदें स्वयुक्ति करुनी। इतकें किंचित विस्तारुनी। सांगितलें असे' असे गोविंद कवी म्हणतो. उपरिनिर्दिष्ट मूळ ग्रंथ सापडल्यास प्राचीन मराठीचे स्वरूप कळण्यास साह्य होईल (मसा., आ. ५, पृ. ४२).

**० गोविंद–२** – पहा **गोंदा.**

**गोविंद–३** [ ? – समा. श. १७०४ / इ. स. १७८२] कवी. *शिवभारत*कार परमानंद कवींचे नातू. पित्याचे नाव दत्तात्रय. शाहूराजे व त्यांची राणी सकवारबाई ह्यांचे हे आश्रित होते. शाहूराजे निवर्तल्यावर ह्यांनी श. १७०४ मध्ये जलसमाधी घेतली.

ह्यांनी *श्रीशाहुराज कीर्तिप्रभामंजरी* (रचना श. १६६७ / इ. स. १७४५ च्या सुमाराची) हे राजस्तुतिवर्णनपर काव्य लिहिले आहे. ते प्रहर्षिणी वृत्तात असून त्याचा प्रथम सर्ग (श्लोक १००) उपलब्ध आहे. शाहूराजांवर मोठे काव्य रचावयाचे होते असे ह्या सर्गाच्या शेवटच्या श्लोकावरून वाटते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** सरदेसाई, गो. स. : श्री शाहुराज कीर्तिप्रभामंजरी; प्रा. द. वा. पोतदार स्मारकग्रंथ; पुणे, १९५०; पृ. ८–१८.

**गोविंद–४** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] पदकार. हे वऱ्हाडात वणी येथे होऊन गेले. गुरू : नरहरी. ह्यांनी पदे, धावे, आरत्या अशी स्फुट रचना केली आहे. 'ते पद दावीं मजलागुनि सीताकांता रे!', 'किति अंत पाहसिल माझा रे! गुणवंता!' ह्या ह्यांच्या दोन धाव्यांचा प्रसिद्ध आणि लोकप्रिय म्हणून उल्लेख केला जातो. ह्यांची १५० पदे, वा. दा. ओक संपादित *पदसंग्रह, भाग* २ (मुंबई, १८९६, पृ. ७५–१५१) मध्ये छापली आहेत. ही पदे मधुर आणि चटका लावणारी अशी आहेत.

**गोविंद–५** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] नाथपंथीय कवी. नगर जिल्ह्यातील 'बायजाईचे जेऊर' ह्या गावी सापडलेल्या हस्तलिखित बाडावरून ज्या काही नाथपंथीय मराठी कवींचा परिचय झाला आहे त्यांपैकी मुक्तिनाथशिष्य गोविंद हे एक आहेत. हे मुक्तिनाथ कोण, त्यांचे शिष्य गोविंद कोण, आणि त्यांचा काळ कोणता ह्याबद्दल माहिती उपलब्ध नाही.

कवीच्या असंगरचनेवरून त्याचा आध्यात्मिक अधिकार मोठा असल्याचे समजते. नाथपंथी तत्त्वज्ञानाच्या खुणा ह्या रचनेत भरपूर सापडतात. रचनेमधील तात्त्विक भाग समजून घेण्यास थोडा कठीण वाटतो. उदा., "फार कासिया बोलावें। मूळ अपुलें शोधावें ॥ १ ॥ मसुरे येवढें बिंदुलें। त्यांत त्रिभुवन सांठलें ॥ २ ॥ हरिहराच्या मूर्ति। बिंदुल्यांत होतो जाती ॥ ३ ॥ त्यांत देखिला आणिक। अनुगाभ्याहुनि बारिक ॥ ४ ॥ त्याचा पाहुं जातां अंत। वेदशास्त्रही थकीत ॥ ५ ॥"

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, सुरेश : एक नाथपंथीय बाड व त्यातील काही अज्ञात कवि; इंद्रायणी, जुलै १९६३, पृ. ५६–५७.

**गोविंद–६** [का. अनु.] महानुभाव कवी. कवीचा काळ निश्चितपणे ज्ञात नाही. ज्या महानुभाव पोथीत गोविंदकवीचे *अर्जदास्त* हे भारूड उपलब्ध झाले, तिचा कागद व तिच्यातील लेखनपद्धती ह्यांवरून ती सोळाव्या किंवा सतराव्या शतकातील असावी असे वाटते.

एकनाथांनी जी उपदेशपर रूपके किंवा भारुडे लिहिली त्यांत 'अर्जदास्त' असा एक प्रकार सापडतो. 'अर्जदास्त' म्हणजे जीवाने परमेश्वरास लिहिलेले पत्र. एकनाथांच्या विविध रूपकांतील अनेकविध कल्पनांचा संकर ह्या कवीच्या भारुडात झाला आहे. भारुडाच्या उत्तरार्धात जीवाने जड भवसागर तरून जाण्यासाठी कृष्णाची भक्ती आणि नामस्मरण करावे असे वारंवार सांगितले आहे.

महानुभाव साहित्यात अशा प्रकारची स्फुट रचना फारशी उपलब्ध नसल्याने ह्या भारुडास एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान प्राप्त होते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पठाण, डॉ. यू. म. : एक महानुभाव अर्जदास्त; नभामा., एप्रि. १९६९; पृ. १८–२२.

**गोविंद–७** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – यमकांचे रामायण व पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० गोविंद उटके** – पहा **गोविंदाचार्य उटके.**

**गोविंद कवि–१ / ० गोविंदमुनि–२ / ० गोविंद विध्वंश** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, पूर्वार्ध] महानुभाव कवी. कवीश्वर आम्नाय शाखेतील. गुरू : दत्तराज. *भक्तिप्रबोध* (ओ. ३५४) ह्या काव्याचा कर्ता. डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी प्रस्तुत कवीचा उल्लेख केला आहे तो बळाळशिष्य गोविंद म्हणून (ममवा., पृ. ४९). परंतु हे दत्तराजांचे शिष्य असल्याचे उल्लेख ह्या काव्यात आढळतात.

प्रस्तुत काव्याची संहिता औरंगाबाद येथील महानुभाव आश्रमाच्या संग्रहातील पोथीवरून ऋषिराजशास्त्री कपाटे ह्यांनी सिद्ध केली आहे (मु. : महानु., फेब्रु. ते मे १९७३, क्रमशः). पोथीच्या समाप्तिलेखात श. १५६१ / इ. स. १६३९, असा पुस्तक संपूर्ण झाल्याचा काळ दिला आहे.

काव्यात पंचकृष्णावतारांची चरित्रे कवीने वर्णन केली आहेत. चक्रधरांच्या मूर्तिवर्णनाकरिता १३० ओव्या खर्ची घातल्या आहेत. संसाराची असारता, परमेश्वर-अवताराचे कार्य, ईशस्मरणाचा महिमा ह्यांच्या अनुषंगाने महानुभाव-तत्त्वज्ञानाच्या ग्रंथात सर्वत्र विखुरलेले दिसते. सोप्या भाषेत रचलेले व माफक अलंकारांनी सजविलेले काव्य इतर भक्तकवींच्या काव्यपरंपरेत बसणारे आहे. ह्या कवीची ईश्वरस्तुतिपर कवनेही बरीच आहेत.

**गोविंद कवि–२** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. तंजावरकडील शरभेंद्रनृपतीचा आश्रित. गुरू 'पूर्णानंद' असा निर्देश *शिवरात्रीमाहात्म्या*च्या १२८ व्या ओवीत आढळतो. उदा., "गोविंद पूर्णानंदाशन ॥ त्याचा अनुग्रहेंकरून ॥ शिवरात्रि माहात्म्यवर्णन ॥ यथाशक्ति करुनि पैं केले ॥" असे कवी म्हणतो.

**रचना : अमु.** – १. तुलाकावेरी माहात्म्य; अ. ३०; ओ. सं. ४०००; र. श. १७४७ / इ. स. १८२५. २. धनुर्मास माहात्म्य; अ. ३०; ओ. सं. १८००; र. श. १७४८ / इ. स. १८२६. ३. पंचनदमाहात्म्य; सहलेखक विरूपाक्ष; अ. १ ते ४२, ४३ अपूर्ण; ओ. सं. अंदाजे ३०००; अध्याय ४३ पैकी १–१५ गोविंदकृत व उरलेले विरूपाक्षकृत. ४. महाशिवरात्रीकथा; ओ. सं. १५०. ५. वैशाखमाहात्म्य; अ. १–३०; ग्रं. सं. १८००. ६. श्लोकबद्ध हरिभजन; ओ. सं. ८७; तंसम. हस्त. यादी, क्र. १–२.

**गोविंदकवी–३** – पहा **गोविंदाचार्य उटके.**

**गोविंदकवी–४** [का. अनु.] कवी. तंजावर येथील तेलुगू राज्यकर्त्यांच्या काळात ह्या कवीचा उदय झाला. *इंदुमती-परिणय* नावाचे एक नाटक ह्याने लिहिले आहे. द्रविडदेशातील पुष्कळशा देवालयांचा वर्णनात्मक इतिहास ह्याने लिहिला आहे (मचको., पृ. ३३३).

**गोविंद** (कृष्णदास) [श. १६८० / इ. स. १७५८ – श. १७३० / इ. स. १८०८] कवी. गुरुपरंपरा : हरिदास > कान्हा (कृष्ण) > गोविंद.

**रचना : अमु.** – हरिश्चंद्राख्यान; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ३०.

**गोविंद खंडेराव चिटणीस** [इ. स. १७१६–१७८४] बखरकार. खंडो बल्लाळ चिटणीसांचे पुत्र. शाहू छत्रपतींचे चिटणीस. शाहू महाराजांच्या अत्यंत विश्वासातले होते. महाराज ह्यांचा सल्ला मानीत असत. ह्यांनी शाहूराजांच्या जीवनावर बखर लिहिली आहे. ही बखर *भारतवर्ष* मासिकातून *श्रीशाहूमहाराज ह्यांची बखर* ह्या नावाने प्रसिद्ध झाली. बखरीच्या लेखनासंबंधी तिच्यातच पुढील उल्लेख सापडतो : "ही व्यवस्था कैलासवासी गोविंद खंडेराव चिटणीस ह्यांनी सांगितल्यावरून लिहिली असे. त्याची नकल बाबाजी जनार्दन ह्यांनी करून घेतली. त्यावरून ही नकल केली असे. मित्ती आषाढ वद्य ५ शके १७९८ (इ. स. १८७६) सर्वधारीनाम संवत्सरे संवत् १९३३ मुक्काम छावणी इंदूर. हस्तअक्षर सखाराम महादेव." म्हणजेच गोविंद खंडेरावांनी तोंडी सांगितल्यावरून लिहिल्या गेलेल्या बखरीची ही नकल होय. हिच्यामध्ये ज्याअर्थी शाहूराजांच्या मृत्यूपर्यंतची हकीकत सविस्तर आलेली आहे, त्याअर्थी शाहूमहाराजांच्या निधनानंतर (इ. स. १७४९) ह्या बखरीचे लेखन झाले असावे. हिची भाषा १८ व्या शतकातली दिसते.

ह्या बखरीत सुरुवातीस छत्रपती संभाजी व राजाराम ह्यांची त्रोटक हकीकत येते. शाहूमहाराजांची हकीकत तिच्यात साद्यंत वर्णिलेली आहे. त्यांचे दिल्लीतील वास्तव्य; पातशहांचा त्यांच्यावरील लोभ, पातशहांच्या मृत्यूनंतर बेगमेने दक्षिण देशात केलेली त्यांची रवानगी; ताराबाईने त्यांना तोतया मानून त्यांच्याशी केलेले भांडण; अशा अनेक घटना-प्रसंगांच्या माध्यमातून बखरकाराने पूर्वार्धात शाहूची व्यक्तिरेखा ठसठशीत केली आहे. उत्तरार्धात महाराजांचे पेशवे बाळाजी विश्वनाथ व बाळाजी बाजीराव ह्यांच्या हकीकतींना महत्त्व येते. बखरकार संवादांचा उपयोग करून प्रसंग रंगवून सांगतो. त्याची निवेदनकुशलता वाखाणण्याजोगी आहे. चिटणीसासारख्या माहितगार माणसाने ही बखर लिहिली असल्याने ऐतिहासिक दृष्ट्या ती बरीच विश्वसनीय मानता येते.

**रचना : मु.** – श्रीशाहूमहाराज यांची बखर; ले. का. : इ. स. १७४९ नंतर; भारतवर्ष, फेब्रु.–मार्च १९०० (व. २, अं. ११–१२); पृ. १–८८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ग्रामोपाध्ये, गं. ब. : श्रीशाहूमहाराज यांची बखर; मवाइ., खं. ३; संपा. जोग, रा. श्री.; पुणे, १९७३; पृ. ५२३–५२४. २. राजवाडे, वि. का. : मइसा., खं. ४. ३. हेरवाडकर, र. वि. : श्री शाहूमहाराज यांची बखर; मब., प्र. आ., पुणे, १९५७; पृ. ५२–५३, १४८–१५१.

**गोविंद गोपति** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – एक रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ३८–३९. **अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोविंद चिंतामणी** [का. अनु.] कवी. आख्यानाच्या शेवटच्या दोन ओळींत कवीच्या नावाचा निर्देश येतो. "पूर्वी वालिमक हे चरित्रकथनीं विस्तारिली मेदिनी । ते हे रामकथा निवेदन करी गोविंद चिंतामणी ॥ ७८ ॥"

**रचना : अमु.** – सुलोचनागहिवर; श्लो. सं. ७८; सवामं. बा. ९८३, हस्त. सू. खं., २.

**गोविंद चिन्मयानंद / ० ब्रह्मानंद गोविंदराज चिन्मयानंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – श्रीकृष्णजन्मकथा; श्लोक, पदे इ. व आरत्या; सवामं. बा. ११५८, हस्त. सू., खं. २.

**गोविंद जिवाजी** [का. अनु.] शाहीर. ह्यांचा *सामानगडावरील पोवाडा* उपलब्ध आहे. कोल्हापूरकर छत्रपतींशी केलेल्या तहाप्रमाणे सामानगडावर इंग्रजांनी नेमून दिलेला कारभारी ठेवला गेला. त्याने ज्या सुधारणा केल्या त्यांमुळे छत्रपती, त्यांचे मानकरी व गडकरी असंतुष्ट झाले. सामानगड व भूदरगड येथील असंतुष्ट गडकऱ्यांनी बंड पुकारले व त्याचा वणवा सर्वत्र पेटला. ह्या सामानगडच्या बंडावर अनेक शाहीरांनी पोवाडे रचले. त्यांपैकी गोविंद जिवाजी ह्यांचा हा ११-चौकी पोवाडा *सामानगडचा तिसरा पोवाडा* ह्या नावाने *ऐतिहासिक पोवाडे, खं. ३* मध्ये संग्रहित करण्यात आला आहे (पृ. २१७–२२२).

**गोविंद जोशी** [का. अनु.] कवी. ह्यांची *कृष्णाचा पाळणा*, बोधपर पदे, श्लोक व आणखी काही स्फुट कविता (अमु.) तंजावर सरस्वती महाल संग्रहात उपलब्ध आहे (हस्त. यादी, क्र. ३). त्यांपैकी १४ कडव्यांचे *सासुसुनांचे भांडण* असे एक गमतीचे पद *लोकगीत* (तंजावर, १९५०) ह्या संग्रहात (पृ. ७३–७६) प्रसिद्ध केले गेले आहे.

**गोविंदतनय–१** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – 'शेशाद्रि सिंहासनी तुम्ही' ही व्यंकटेशावरील आरती; मआ., पृ. ४२१.

**गोविंददास–१** [का. अनु.] टीकाग्रंथकार.

**रचना : अमु.** – गर्भगीता – सटीक; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ७९.

**गोविंददास–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – उद्धवगोपीसंवाद; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ३१.

**गोविंददास–३** [का. अनु.] कवी. गुरु : शिवदास. अभंग आणि *शिवदासाची आरती* अशी रचना आढळते (संककासू., पृ. १२८).

**गोविंददास–४** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – गोपीप्रेमपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोविंददास–५** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गोविंदनंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. २.

**गोविंद नरहरि** [इ. स. चे सतरावे शतक] *महाभारत* व *भागवत* टीकाकार. ह्यांचे मूळ गाव आकोला (अगस्ति क्षेत्र, जि. अहमदनगर); परंतु आयुष्याच्या उत्तरार्धातील जवळजवळ छत्तीस वर्षे ह्यांचे वास्तव्य औरंगाबादजवळ खडकी ग्रामी झाले. ह्यांच्या पित्याचे नाव नरहरि व मातेचे नाव निरा. गोत्र भारद्वाज. शिव हे ह्यांचे गुरू व उपास्य दैवत. ह्यांची शिवभक्ती इतकी उत्कट होती की, ह्यांच्या सर्वच रचनांची सांगता चतुर्दशीला म्हणजे शिवरात्रीच्या दिवशी अथवा सोमवारी केलेली आहे. *कपिलगीता*कर्ते अवधूत हे ह्यांचे शिष्य असावेत असे त्यांच्या ग्रंथरचनेच्या स्थलकालोल्लेखावरून वाटते (निर्देश : सवामं. बा. ११३३). गोविंद नरहरींनी *भागवताच्या* दुसऱ्या, तिसऱ्या, सातव्या व अकराव्या स्कंधावरील टीका, श्रीधरी टीकेच्या आधारे लिहिली. दुसऱ्या स्कंधावर मुळातल्या ३०९ श्लोकांवर २४२० ओव्यांची व तिसऱ्या स्कंधाच्या मुळातल्या १८१४ श्लोकांवर ७४९२ ओव्यांची टीका आहे. ह्या कवींची *महाभारत-टीका*ही उपलब्ध आहे.

आपल्या रचनेला हे 'टिपण' असे म्हणतात. संस्कृत श्लोकांचा अनुवाद करण्यात ह्यांचा विशेष हातखंडा दिसतो. ह्यांची सर्वच ओवीरचना बंधनातीत आहे. मात्रा, चरण, यमक ह्यांचे कसलेच बंधन ते मानीत नाहीत. एकंदरीत रचनेत कवित्वाचा भाग फारच कमी असे दिसते.

**रचना : अमु.** – १. भागवत टीका; स्कंध २; ओ. सं. २४२०;

र. श. १५७१ / इ. स. १६४९, विकारी संवत्सरी भाद्रपद कृष्णपक्ष, सोमवार, शिवचतुर्दशी; र. स्थ. : पंढरपूर (प्रत श. १७१२). २. भागवत टीका; स्कंध ३; ओ. सं. ७४९२; र. का. : श. १५८२ / इ. स. १६६०, शार्वरी संवत्सरे, आश्विन व. ११ (प्रत श. १७१४); सवामं. बा. १६४८, हस्त. सू., खं. १. ३. भागवत टीका; स्कंध ७ व ११; ह्यांच्या प्रती के. ना. वैद्य ह्यांना नगर जिल्ह्यातील कोतुक ह्या गावी मिळाल्या. तपशील उपलब्ध नाही., ४. महाभारत टीका : (अ) उद्योगपर्व; अ. सं. १९५; र. श. १६१६ / इ. स. १६९४, युवा (भाष) संवत्सर, कार्तिक शु. ६, सोमवार; र. स्थ. : खडकी; (आ) शांतिपर्व; अ. सं. ३६२; श्लो. सं. १४०००; ओ. सं. ३७१६०; र. श. १६१६ / इ. स. १६९४, शु. संवत्सरी, मार्गशीर्ष मासी, चतुर्दशीच्या दिवशी; ले. स्थ. : खडकी; (इ) सौतिक पर्व; अपूर्ण; (ई) स्त्रीपर्व; र. श. १६१७ / इ. स. १६९५, युवासंवत्सरी, श्रावण वद्यात, मंगळवारी, शिवरात्रीचे दिवशी; र. स्थ. : खडकी.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, म. रा. : गोविंद नरहरि; विसंमंवा.; नागपूर, १९७१; पृ. १४०–१४१. २. नगरकर, रा. शं. : गोविंद नरहरि : प्राचीन मराठीतील एक प्रचंड ग्रंथकार; भाइसंमंत्रै., व. ४४, अं. १–४; श. १८८८; पृ. ३७–४१.

**गोविंदनाथ–१** [श. १६४३ / इ. स. १७२१ – समा. श. १७३३ / इ. स. १८११] नाथसंप्रदायी कवी. त्रिपुटीच्या गोपाळनाथांचे शिष्य. हे पूर्वाश्रमीचे गोविंदराव. रत्नागिरीकडील राहणारे. उपनाव परांजपे. कोकणस्थ चित्पावन ब्राह्मण. सूरजी मठाचे अधिपती भालचंद्रनाथ हे त्यांजविषयी अशी माहिती देतात, तर गोविंदनाथांच्या बऱ्हाणपूर मठातील भगवंतनाथांच्या मते ह्यांचा जन्म चिचवडच्या देव घराण्यातील आहे. एकनिष्ठ गुरुभक्तीमुळे संतमंडळीत हे महत्पदास चढले. ह्यांची गुरुपरंपरा जनार्दनस्वामी > एकनाथ > गावबा > कृष्णनाथ > विश्वंभरनाथ > मुरारनाथ > रंगनाथ > गोपाळनाथ > गोविंदनाथ अशी आहे.

हे नेहमी तीर्थाटन करीत असत. तीर्थाटन करीत असताना वऱ्हाडात सूरजी अंजनगाव येथे देवनाथ ह्या आपल्या शिष्यास त्यांनी उपदेश केला व अकोले तालुक्यातील घूसर गावी विठ्ठलाची मूर्ती स्थापन करून ते राहिले. पुढे बऱ्हाणपूर येथील मठाचीही ह्यांनी स्थापना केली. आपल्या प्रदीर्घ जीवनकालात शिष्य देवनाथ व प्रशिष्य दयाळनाथ ह्या दोघांचीही कारकीर्द त्यांनी पाहिली. ह्यांनी रचलेले सर्व उपनिषदांचे सार असे ५००० अभंग व इतर पद्यसंग्रह बऱ्हाणपूर येथील मठात अच्युत सीताराम साठे ह्यांच्या पाहण्यात आला होता. 'नाथ कवींमध्ये ओवी एकनाथांची, अभंग गोविंदनाथांचे व पदे देवनाथांची ही सरसपणे मनावर बिंबतात', असे मत साठे ह्यांनी व्यक्त केले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** साठे, अ. सी., पांडे, सुं. नि., अग्निहोत्री, पां. स. : श्रीदेवनाथमहाराजांची कविता; वैदर्भकाव्यसंग्रह, गुच्छ २; बुलढाणा, १९९५.

**गोविंदनाथ–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – विठ्ठलविजय–पुराण; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २५८.

**गोविंद नानक** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**गोविंद पूर्णानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गोविंदप्रभु** – पहा **परिशिष्ट.**

**गोविंद बरवे** [इ. स. चे सतरावे शतक, उत्तरार्ध] *ज्ञानेश्वरी पदपद्धती*चे प्रवर्तक. कोकणस्थ चित्पावन ब्राह्मण. मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील सांगवे ह्या गावचे रहिवासी. पहिल्या बाजीरावांच्या कारकीर्दीपासून ह्यांचे घराणे विशेष प्रसिद्धीस आले. 'शाहूमहाराजांच्या परमप्रीतीस पात्र' झालेले पेशवाईतील प्रसिद्ध कवी निरंजन माधव ह्यांचे दत्तात्रेयादी परंपरेतील गुरू जे लक्ष्मीधर ते ह्या कवीचे चिरंजीव. कांहीजण म्हणतात की, ते ह्यांचे पुतण्ये. ह्यांनी *ज्ञानेश्वरी पदपद्धति* हा ग्रंथ शके १६१३ / इ. स. १६९१ मध्ये तयार केला. ह्यांनी संपादिलेली *ज्ञानेश्वरी*, *एकनाथी ज्ञानेश्वरी*शी बऱ्याच अंशी जुळती आहे. काही काही पाठ मात्र अगदीच वेगळे असतात. *पदपद्धति* हे ह्या *ज्ञानेश्वरी*चे मुख्य लक्षण. गीतेच्या श्लोकांतील पदे, त्या पदांची व्याख्या करणाऱ्या *ज्ञानेश्वरी*तील ओव्यांच्या अगोदर घालून देणे ह्याचे नाव 'पदपद्धति'. ह्या पद्धतीचा स्वीकार केलेल्या बरवे परंपरेतील प्रत्येक पोथीच्या शेवटी "शके सोळा शतें तेरोत्तरें । तैं पदपद्धती केली ज्ञानेश्वरें। गोविंदबरवामुखान्तरें। जगज्जीवन लेखक॥" अशी ओवी असते. *ज्ञानेश्वरी*कार ज्ञानेश्वरांनी ही पदपद्धती मजकडून वदविली' असे ह्यात गोविंद बरवे सुचवितात.

"गीतेंतील श्लोकाच्या ज्या पदावर किंवा पदांवर ज्ञानदेवांची भावार्थदीपिका असेल तीं पदें वेगळीं तांबडया शाईनें लिहिण्याची पद्धती ज्ञानेश्वरीच्या कित्येक पोथ्यांत आढळते. ही पद्धती एकनाथांच्या कालीं नव्हती. ही प्रथम गोविंद बरवा ह्या नांवाच्या गृहस्थानें शके १६१३ त पाडिली," असे वि. का. राजवाडे लिहितात (भाइसंमंइति., श. १८३४, पृ. १४५).

गोविंद बरवे ह्यांनी *ज्ञानेश्वरी*च्या अनुरोधाने पदपद्धती रचली. उदा., पहिल्याच श्लोकातील धर्मक्षेत्रे – समवेताः – किमिति, असा क्रम आहे. पण ज्ञानदेवांनी धर्मक्षेत्रे – मामकाः – समवेताः – किमिति, असा क्रम घेऊन व्याख्यान केले आहे. अर्थात त्या अनुरोधानेच बरवे ह्यांनी पदपद्धती नमूद केली आहे.

श्रीज्ञानदेवांनी आपल्या गीताटीकेला अनुलक्षून अठराव्या अध्यायाच्या शेवटी 'देशीकार बंध', 'देशीकार लेणें' असे शब्द वापरलेले आहेत. गोविंद बरवे ह्यांनी श. १६१३ मध्ये *ज्ञानेश्वरी*ला *भावार्थदीपिका* असे नाव दिले. ह्यापूर्वीच्या पोथ्यांत हे नाव आढळत नाही. वामनपंडितांनी आपल्या गीताटीकेला (रचना अंदाजे श. १६०० / इ. स. १६७८) *यथार्थदीपिका* असे नाव दिले होते. त्यावरून गोविंद बरवे ह्यांस *भावार्थदीपिका* हे नाव सुचून त्यांनी ते *ज्ञानेश्वरी*ला दिले असावे असे वाटते.

*श्रीशिवराज्याभिषेककल्पतरु* हा ग्रंथ शिवछत्रपतींचा तांत्रिक पद्धतीने राज्याभिषेक करण्याच्या हेतूने रचला गेला. त्याचा कर्ता कोणी गोविंद नारायण बरवे नावाचा गृहस्थ होता. हा बर्वे व *ज्ञानेश्वरी पदपद्धती*कार बरवे हे एकच असण्याची शक्यता आहे. तसे असल्यास शाक्तपंथीय तांत्रिक निश्चळपुरीचे अनुयायी गोविंद नारायण बरवे आणि हे एकच असे म्हणावे लागेल.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : ज्ञानेश्वरीचे प्राचीन संशोधक; विविधा.; पुणे, १९६७; पृ. ९६–१००. २. राजवाडे, वि. का. : ज्ञानेश्वरी पद्धती; भाइसंमंइति. श. १८३४; पृ. १४५–१४७.

**गोविंदबावा** [अंदाजे श. १७५८ / इ. स. १८३६] रामदासी कवी. राहणारे आंबेजोगाईचे. ह्यांची पदे समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात (बा. १४४९) उपलब्ध आहेत. ह्यांच्या हातची हनुमंतस्वामीकृत श्रीसमर्थांच्या बखरीची श. १७५८ त झालेली प्रत जोगाई येथील मठात सापडली आहे.

**गोविंदबाळ / ० गोविंदबाळस्वामी** [का. अनु.] रामदासी कवी. तंजावर येथे वास्तव्य. पित्याचे नाव बाळाजीपंत. गुरुपरंपरा : श्रीसमर्थ > भीमस्वामी > गोविंदबाळ. भीमस्वामींचे कुटुंब व गोविंदबाळांची

आई ह्या बहिणी-बहिणी. झोळीरामबावा व अण्णाजीबावा हे गुरुबंधू. तंजावरच्या अमरसिंहाच्या पदरी असलेले शेषकवी हे ह्या गोविंदबाळांचे शिष्य.

ह्यांनी रचलेले *भक्तमालिका* किंवा *भक्तरत्नमालिका* (ग्रं. सं. ३८) नावाचे स्तोत्र उपलब्ध आहे (तंसम. बा. १८२९, हस्त. यादी, क्र. २).

**० गोविंदबाळस्वामी** – पहा **गोविंदबाळ.**

**गोविंदबुवा** [का. अनु.] पदकार. 'असा धरि छंद जाइ तुटोनिया भवबंध' ह्या प्रसिद्ध पदाचा कर्ता (मवाइ., खं. ३; संपा. रा. श्री. जोग; पृ. ३१४).

**गोविंदबुवा नाशिककर** [का. अनु.] पदकार. ह्यांची 'हरि मजला चालवेना', 'एकदां नेत्र भरुनि पाहीं । मधुर तरि बोल सख्या कांहीं' अशी भक्तिपर पदे उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे, मभामवा., इंदूर, १९३१; पृ. ४४).

**गोविंदमुनि–१** [इ. स. चे १५ वे शतक] महानुभाव भाष्यकार. पारमांडल्य आम्नायातील शिवमुनींचे शिष्य. श्रीचक्रधरोक्त वचनांचे यथार्थ ज्ञान पंथानुसरण करणाऱ्यांना व्हावे म्हणून ह्यांनी *लक्षणरत्नाकरा*वर एक भाष्य रचले आहे (ममवा. परिशिष्ट : पारमांडल्य आम्नाय वंशवृक्ष).

**० गोविंदमुनि–२** – पहा **गोविंदकवि–१.**

**गोविंदमुनि जामोदकर** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर व १९ व्या शतकाचा प्रारंभकाल] महानुभाव कवी. मदलसा आम्नायातील. ह्यांनी *भगवद्गीते*वरील *कैवल्यसंजीवनी* नावाची टीका लिहिली आहे. ही गद्य असून तिचे फक्त ७ ते १२ एवढेच अध्याय डॉ. य. खु. देशपांडे ह्यांना उपलब्ध झाले आहेत. ह्यात संस्कृत श्लोकांचा अन्वय देऊन त्या अन्वयापुढेच त्याचा सरलार्थ दिलेला आहे, हे ह्या टीकेचे वैशिष्ट्य होय (य. खु. देशपांडे; ममवा., द्वि. आ., पुणे, १९६०; पृ. ८४–८५).

**गोविंदराज–१** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोविंदराज–२ / ० गोविंद (विप्र, वैद्य)** [का. अनु.] कवी. ह्या कवीचे *रसविलास आणि कथासारचंपू* हे दोन काव्यग्रंथ गो. का. चांदोरकरांच्या संग्रहात आहेत (संककासू., पृ. ३१).

**गोविंद रामाजी** [का. अनु.] प्रभू ज्ञातीच्या करीण्याचा लेखक. हा व रंगो आत्माजी ह्या दोघा प्रभू ज्ञातीतील, कानद खोऱ्याच्या देशकुळकर्ण्यांनी इ. स. १७२८ च्या सुमारास बडोद्याच्या दिवाणास आपली कुळकथा निवेदन केली. ह्या करीण्यात, कायस्थांच्या मूळ वसतिस्थानापासून हकीकतींला प्रारंभ होतो. वाडवडिलांच्या कीर्तीचा करीणा लिहून ठेवायचा ह्या हेतूनेच करीण्याचे लेखन झाले आहे. ही माहिती अस्सल कागदपत्रांवरून आणि वडील माणसांनी स्वमुखे सांगितली त्यावरून घेतली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कुळकर्णी, अ. रा. : ऐतिहासिक पत्रव्यवहार; मवाइ., खं. ३; (संपा.) जोग, रा. श्री. पुणे, १९७३; पृ. ५९९.

**गोविंदराव दास** [का. अनु.] शाहीर.

रचना : अमु. – नानासाहेब कागलकर यांचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. १३८–१३९.

**गोविंद लक्ष्मण खरंगटे** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] नाटककार. पारोडे (गोवे) येथील राहणारे. घरची शेती, बागायती संभाळून ह्यांनी यथाशक्ती नाट्यसेवा केली. इ. स. १८५० साली ह्यांनी *सीताहरण* नाटक रचले व आपल्या समक्ष त्याचा प्रयोगही करवून घेतला. ह्या नाटकाची रचना दशावतारी पद्धतीची असली तरी त्यात गद्य संवाद, दिंड्या, साक्या असा प्रकार होता.

**गोविंद विध्वंश** – पहा **गोविंदकवि–१.**

**गोविंद (विप्र, वैद्य)** – पहा **गोविंदराज–२.**

**गोविंद (साळी)** [का. अनु.] कवी. ह्यांच्या पदांचा गो. का. चांदोरकर ह्यांनी निर्देश केला आहे (संककासू., पृ. ३१).

**गोविंदसुत–१** [का. अनु.] महानुभाव कवी. गोविंदसुताच्या *डांगवी आख्यानां*ची हस्तलिखित पोथी राजवाडे संशोधन मंदिरातील संग्रहात सापडली. ह्याचे ५ प्रसंग व ४१८ ओव्या आहेत. गणश, सरस्वती, गुरु, कुलदेवता ह्यांच्या नमनानंतरची पहिली ओवी पुढीलप्रमाणे आहे : "उर्वसीचा उधारेती । वंदुं गणेशा सरस्वती । कुळदेवत माहानुभाव महती । सद्गुरुचे चेरणी विनंती । जे ज्ञान विल्पती दायिका ॥ १ ॥" ह्यातील तिसऱ्या चरणावरून कवी मानभाव पंथाचा असावा असे वाटते. समाप्तीच्या ४१७ व्या ओवीत 'गोविंदसूत वदतु' असा कविनामोल्लेख सापडतो. *महाभारता*तील सुरस कथेवरून प्राकृत रचना केली असे कवी म्हणतो. पोथीत कालनिर्देश सापडत नाही. पोथी मूळ की मुळाची नक्कल हेही कळत नाही. ह्या आख्यानाची भाषा बरीच अशुद्ध आहे. ह्या *डांगवी आख्याना*त उर्वशीच्या उद्धाराची कथा आहे (मो. रा. जोशी : श्रीडांगवी आख्यान; संशोधक, व. २२. अं. १–४; पृ. २०१–२०६.)

**गोविंदसुत–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. रुक्मिणीस्वयंवर; गो. का. चांदोरकर संग्रह. २. त्रिमलाची आरती. ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २. ४. गोपीविलास (हिंदी); संककासू., पृ. ३१, १२८.

**गोविंदसुत मल्लिनाथ** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – नवरत्नमाला (मंत्रतंत्र व वैद्यक); ग्रु. पो.; नकल श. १७२० / इ. स. १७९८, कालयुक्त अधिक श्रावण शु. १३; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १३६.

**गोविंदसुतात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**गोविंदस्वामी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोविंदस्वामी कवीश्वर** [का. अनु.] कवी. पेशवाईअखेरच्या काळातील. नागपूर प्रांतातील भक्तकवी म्हणून ह्या कवीचा *महाराष्ट्र-सारस्वत-पुरवणी*कारांनी उल्लेख केला आहे (मसा., आ. ५, पृ. १००१).

**गोविंदाचार्य उटके / ० उटके गोविंदाचार्य / ० गोविंद उटके / ० गोविंद कवि–३** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध व १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] कवी. तंजावरच्या शरभेंद्र राजाचे आश्रित. यासंबंधीचा उल्लेख ह्यांच्या *उमारमासंवाद* काव्याच्या शेवटच्या आर्येत आढळतो तो असा : "श्रीमत्तंजानगरीं न्यायें जो शरभभूप राज्य करी । त्याचा आश्रित उटके गोविंदाभिध असे करी चुटके ॥ २९ ॥" शरभेंद्रनृपाच्या स्तुतिपर संस्कृत, प्राकृत श्लोकांची रचना ह्यांनी केली आहे. गोविंद उटके रचित *रामाजननिरूपण* ओव्या व *श्रीउमारमावाद-निरूपण, श्रीपार्वतीपरिणयनिरूपण, श्रीहरिलीला-निरूपण* ही आख्यानपर प्रकरणे तंजावर सरस्वती महाल त्रैमासिकातून छापली आहेत. रचना पदे, अभंग, दिंडी, लावणी, सवाई, दोहरा अशी मिश्र स्वरूपाची आहे. ह्यांनी रचलेले *शिवचरित्र* व *स्फुट पदे* ह्यांची नोंद समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित सूचीत (वाड क्र. १४०२) केली आहे.

*नाट्यशास्त्रसंग्रह, खंड १ व २* हा गोविंदाचार्यांचा ग्रंथ तंजावर येथून प्रसिद्ध झाला आहे. ग्रंथाच्या पहिल्या भागात नृत्यकलेच्या अंगप्रत्यंगांचे आणि दुसऱ्या भागात स्थानक, चारी आणि इतर नाट्यांगांचे विवरण केले आहे आणि तिसऱ्या भागात (अमु.) करण आणि अंगहाराचे विवरण असेल. पहिला भाग *संगीतरत्नाकर* ग्रंथाच्या नृत्ताध्यायाच्या आधारे रचल्याचे आढळून येते. देवेंद्राचार्यांचा *संगीत*

*मुक्तावली*, भल्लाटांचा *शृंगारशतक*, दामोदरविरचित *संगीत दर्पण*, वेदसूरींचा *संगीत मकरंद* इत्यादी ग्रंथांचे संप्रदाय एकत्र करून दुसऱ्या भागात वर्णिले आहेत.

ग्रंथात संस्कृत श्लोक, त्याचे इंग्रजी भाषांतर, मराठी रचना (गद्य) व त्याचे तामीळ भाषांतर क्रमाने येते. नाट्यकला आणि नृत्यकला ह्यातच संगीत, पार्श्वसंगीत, संभाषण आणि हावभाव इत्यादींचा समावेश होत असल्याने तत्संबंधी अनेक अंगोपांगांची चर्चा ह्या ठिकाणी अभिप्रेत आहे. त्यामुळेच *नाट्य-शास्त्रसंग्रह* असे ग्रंथास नाव दिले आहे. भरताचे *नाट्यशास्त्र* हा ह्या ग्रंथाचा मूलाधार. त्यातील नाट्योत्पत्ती, नाट्यप्रशंसा, नाट्यनृत्य, नृत्तविवेक, लोकधर्मी, नाट्यधर्मी, अंगे, प्रत्यंगे, उपांगे, स्थानक आणि चारी अशा अनेक विषयांची माहिती ह्या *नाट्यशास्त्रसंग्रहात* दिली आहे. भाषांतर बऱ्यापैकी असले तरी ह्या विषयाचे शास्त्रीय विवेचन हे सर्वसामान्य वाचकाला सहज समजण्यासारखे नाही.

**रचना : मु.** – १. नाट्यशास्त्रसंग्रह, खं. १ व २ (र. का. आरंभ अंदाजे इ. स. १७५०); संपा. वासुदेवशास्त्री, महाडिक, कृष्णस्वामी, नागराजराव गो.; तंजावर, १९५३, १९६१. २. रामजनन-निरूपण; ओ. सं. ५६; अपूर्ण; तंसम. त्रैमा. १९७३; क्र. १, पृ. १–८. ३. श्रीउमारमावादनिरूपण; ग्रं. सं. २९. ४. श्रीपार्वतीपरिणयनिरूपण; ग्र. सं. ३१. ५. श्रीहरिलीलानिरूपण; ग्रं. सं. ४४; तंसम. त्रैमा., १९७५; क्र. १–२–३; पृ. १–१६.

**गोविंदा जोशी** [का. अनु.] कवी. पेशवाईअखेरच्या कालातील. ह्यांच्या रचनेत दत्तात्रेयस्तवनपर पदांचा भरणा अधिक आहे (मसा., आ. ५, पृ. ६२६).

**गोविंदात्मज** [का. अनु.] आरतीकार. 'श्रीपति तुझिया योगें श्रीहरिला' ही महालक्ष्मीवरील आरती मुद्रित (मआ., पृ. ४२४). ह्यांची बरीच पदे समर्थ वाग्देवतामंदिरातील हस्तलिखित बाडात आढळतात; हस्त. सू., खं. १, २.

**गोविंदात्मज प्रल्हाद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – 'नरसिंपुर सामराज नरहरि' वर दोन पदे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**गोविंदानंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० गोविंदा भिवाजी भागवत – पहा गोविंदा शाहीर.**

**गोविंदा शाहीर – गोविंदा भिवाजी भागवत** [का. अनु.] शाहीर. ह्याचा आजा गणोजी आणि वडील भिवाजी भागवत हे दोघे विद्वान व साधुपुरुष होते. त्यांच्या समाध्या अनुक्रमे ओतुर व जुन्नर गावी आहेत. गोविंदाची कवने जुन्नर भागात चांगली प्रसिद्ध आहेत. बहिरू न्हावी हा ह्याचा साथीदार. हा स्वतः कवने रची व गोविंदाची कवने गातही असे. ह्याच्या लावण्यांना 'गोविंदरामी लावणी' असे म्हटले जाते. ह्याच्या सहा लावण्या मुद्रित (*अंधारातील लावण्या*; पुणे, १९५६; पृ. २७६–२८५; मसा., आ. ५, पृ. ५८७–५८८.

**गोसावी–१** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गोसावी–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – गणपतिस्तुतिपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**गोसावी केशव** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गोसावीदास** [का. अनु.] टीकाग्रंथकार. आपल्या ग्रंथाच्या शेवटी लेखकाने दिलेली स्वतःची गुरुपरंपरा अशी : श्रीसर्वेश्वर नारायण > ब्रह्मदेव > अत्रि > श्रीदत्तात्रेय > जनार्दन > एकनाथ > ठाकुरदास > गोसावीदास. गोसावीदासांनी शंकराचार्यांच्या *वेदान्तकेसरी* ऊर्फ *शतश्लोकी* ह्या प्रकरणावर ओवीबद्ध टीका केली आहे. प्रस्तुत ग्रंथाची प्रत श. १७९१ (इ. स. १८६९) मध्ये तयार झाली.

ग्रंथारंभी श्रीशंकराचार्यांस नमन, आचार्यांचे संक्षिप्त चरित्र, नंतर टीका, अखेरीस गुरुपरंपरा व समाप्ती असा क्रम ह्या टीकेत आहे. टीकेच्या शेवटी 'श. १७६८, पिंगल संवत्सर, पौष कृ. ३.' असा रचनाकाल दिलेला आहे. ना. य. मिरीकरांच्या मते हा शक चुकीचा आहे. कारण त्या शतकात पिंगल संवत्सर येत नाही. शक १५९९ त पिंगल संवत्सर येते. हा कवी एकनाथांच्या ठाकुरदास ह्या शिष्यांचा शिष्य असल्याने श. १५९९ हाच त्यांचा काळ सयुक्तिक वाटतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मिरीकर, ना. य. : गोसावीदासांची शतश्लोकी टीका; भाइसमंत्रै., व. ५१, अं. १–४, इ. स. १९७०; पृ. १६–१९.

**गोसावीनंदन / ० गोसावीसुत–१ / ० वासुदेवकवी** [अंदाजे श. १५८० / इ. स. १६५८ – श. १६५० / इ. स. १७२८] कवी. गाणपत्य. मूळ नाव वासुदेव. पूर्वज मुरारीपंडित हे मूळचे बीड येथील राहणारे. मोरगावी गणेशाची तपश्चर्यापूर्वक उपासना केल्यानंतर त्याचीच प्रेरणा समजून गणेशांनी प्रसन्न होऊन त्यांना सिंदखेडी जाऊन राहण्याचा आदेश दिला. नंतर ह्यांचे घराणे विदर्भातील सिंदखेडास आले. तेथे ह्यांनी एक गणेशमंदिर बांधले. रेणुका ही ह्या घराण्याची कुलदेवता. कवीची पितृपरंपरा अशी : मुरारी पंडित > विनायक पंडित > गोसावी पंडित > वासुदेव ऊर्फ गोसावीनंदन. कवीचे गुरू गोपाळाश्रम (समर्थकालीन) आणि उपास्य दैवत गणेश. गोसावीनंदन गृहस्थाश्रमी असून त्यांना एक कन्या होती. त्यांची समाधी श्रीक्षेत्र पैठणजवळ कावरून येथे गोदेच्या दक्षिणतीरावर आहे. ह्यांची पुण्यतिथी फाल्गुन शु. ५ ला येते.

गोसावीनंदनांच्या नावावर *ज्ञानमोदक*, *गीतास्वयंवर* ह्या ग्रंथांप्रमाणे अभंग, अष्टके, पदे, आरत्या इत्यादी स्फुट कविताही विपुल आहे. ह्यांची गणेशभक्ती आणि उच्च दर्जाचे आध्यात्मिक अनुभव ह्यांचा प्रत्यय ह्यांच्या स्फुट लेखनात पदोपदी येतो. ह्यांनी रचलेली अष्टके साधी व रसाळ आहेत. *ज्ञानेश्वरी* आणि *दासबोध* ह्या ग्रंथांचा कवीच्या लेखनशैलीवर चांगलाच प्रभाव पडला आहे. ह्यांनी रचलेल्या गणपतीच्या दोन, सद्गुरूवरची, शंकराची व तुळशीची प्रत्येकी एकेक अशा पाच आरत्या *मराठी आरती संग्रहात* प्रसिद्ध झाल्या आहेत. "नेत्रीं दोन हिरे प्रकाश पसरे अत्यंत ते साजिरे। माथां शेंदुर पाझरे वरि बरे दूर्वांकुराचे तुरे। माझें चित्त विरे मनोरथ पुरे देखोनि चिंता हरे। गोसावीसुत वासुदेवकवि रे त्या मोरयाला स्मरे।।' हा गोसावीनंदनांचा श्लोक महाराष्ट्रातील अनेक गणपतिभक्तांच्या नित्यपठणातला आहे. मोठ्या ग्रंथांपेक्षा ह्या कवीची स्फुट रचनाच अधिक भक्तिरसपूर्ण व गोड वाटते. ह्यांची काही पदे व अष्टके, *पदसंग्रह* आणि *काव्यसंग्रह* ह्यांतून मुद्रित झाली आहेत.

**रचना : मु.** – १. ज्ञानमोदक (गणेश-गोसावी-संवादपर); प्रक. १२; ओ. सं. १२८८; पुणे, १८८७. २. सीतास्वयंवर; ग्रं. सं. ९; अकलकामा., भा. २; मुंबई, १८९६; पृ. १३४–१३६. ३. गणपतिविषयक ७ पदे व शिवपर २ पदे; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ५ ते ७ व १६–१७. **अमु.** – १. ताटिकावधचूर्णिका (काही भाग). २. रामायण, काही कथाभाग; त्रु. पो. : सवामं. ३. सुदामचरित्र. ४. सीतामुद्रिका संवाद; भाइसमं. ५. अष्टके, आरत्या, चूर्णिका, पदे, श्लोक, स्तोत्र अशी स्फुट रचना; तंसम. हस्त. यादी, क्र. ३. मसंमं., हवना., बा. ३८६, सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** (संग्रा.) जोशी, म. रा.; (संपा.) अमरेंद्र गाडगीळ : गोसावीनंदन; श्रीगणेशकोश, खं. ७; १९६८; पृ. ३१.

**गोसावीवामन** [का. अनु.] कवी.
 **रचना : अमु.** – एक पद; सवामं. हस्त. सू., खं. २.

**गोसावीसुत–१** – पहा **गोसावीनंदन.**

**गोसावीसुत–२** [का. अनु.] ग्रंथकार.
 **रचना : अमु.** – उपनिषदार्थ २२ वा अध्याय; नु. पो.; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ३९.

**गोसावीसुत–३** [का. अनु.] कवी.
 **रचना : अमु.** – स्फुट कविता; मसंमं., हवना., पृ. ११७.

**ग्रेव्ह्ज अॅलन** – पहा **अॅलन ग्रेव्ह्ज.**

**० घगवे, बाळशास्त्री** – पहा **बाळशास्त्री घगवे.**

**घनश्याम** [इ. स. १७०० – ?] तंजावर प्रांतातील एक बहुभाषा-कोविद मराठी पंडित. तंजावरकर तुकोजीराजे (पहिले) भोसले ह्यांचे हे एक मंत्री होते. ह्यांना सात-आठ भाषा अवगत होत्या. ह्यांनी संस्कृत भाषेत ६४, महाराष्ट्री प्राकृतात २० व इतर भाषांत २० ग्रंथ लिहिले. नाटक, काव्य, चम्पू, व्याकरण, अलंकार, तत्त्वज्ञान वगैरे प्रकारांत ते मोडतात. महाराष्ट्री प्राकृतात त्यांनी लिहिलेली *आनन्दसुंदरी* व *वैकुण्ठचरित* ही दोन सट्टके (संगीत व नृत्य असलेल्या एकांकिका) प्रसिद्ध आहेत. ह्या सट्टकांत पुष्कळ मराठी शब्द व धातू वापरलेले आढळतात. ह्या सट्टकांवर भट्टनाथ नावाच्या पंडिताने संस्कृतात टीका लिहिली आहे. ह्यांनी मराठीतही पद्यात्मक रचना केली आहे. तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात ती संरक्षून ठेविली आहे (डॉ. जगदीशचंद्र जैनकृत *प्राकृत साहित्य का इतिहास*, वाराणसी, १९६१; पृ. ६३२–३३).
 **रचना : अमु.** – षण्मुख लीलापदे; ज्ञानपर पदे व श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र ३.

**घनश्यामबावा** [का. अनु.] महानुभाव कवी. ओंकार विराट ह्यांचे शिष्य. ह्यांची *शाहुकारोपदेश पदे* अशी रचना आढळते; ममग्रंककासू., पृ. ९

**घनानंद** [का. अनु.] कवी.
 **रचना : अमु.** – गर्भगीता (स्तोत्र); भाइसंमं. हस्त. सू., पृ. ७९.

**चक्रपाणी–१** – पहा परिशिष्ट : **चांगदेव राऊळ.**

**चक्रपाणी–२** [का. अनु.] महानुभाव स्तोत्रकार. कृष्णमुनी ह्यांचा शिष्य.
 **रचना : अमु.** – पूजनमाला स्तोत्र; श्लो. ६७; ममग्रंककासू., पृ. ९.

**चक्रपाणी–३** – पहा **चक्रपाणीव्यास वर्धनस्थ.**

**चक्रपाणी–४** [का. अनु.] कवी.
 **रचना : अमु.** – गोराकुंभारकथा व पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चक्रपाणी–५** – पहा **चांगदेव.**

**चक्रपाणी पारमांडल्य** [अंदाजे इ. स. चे १५ वे शतक] महानुभाव ग्रंथकार. पारमांडल्य आम्नायातील.
 **रचना : अमु.** – सिद्धान्त भागवत (देशपांडे, य. खु. : पारमांडल्य आम्नाय वंशवृक्ष; ममवा., १९६०; परिशिष्ठ).

**चक्रपाणी बागुडे** – पहा **चाहेव्यास बागुडे.**

**चक्रपाणी व्यास वर्धनस्थ– / ० चक्रपाणी–३ / ० चाल्हणपंडित–२** [ ? – समा. श. १५६५ / इ. स. १६४३] महानुभाव कवि. पूर्वाश्रमीचे चाल्हणपंडित. राजपुतान्यातील रहिवासी. शके १५०५ / इ. स. १५८३ मध्ये उपाध्य आम्नायातील संतराज वर्धनस्थ (बीडकर) ह्यांजकडून वऱ्हाडात महानुभावपंथाची दीक्षा घेतली व ते ब्रह्मविद्या शास्त्रात व्युत्पन्न झाले. ह्यांचे वास्तव्य बहुधा रिद्धपुरी असे. तेथेच ह्यांनी बीडकर शाखा स्थापन केली. शके १५६५ त श्रीऋद्धपूर क्षेत्री ते समाधिस्थ झाले. ह्यांनी संस्कृत, मराठी व हिंदी ह्या भाषांतून ग्रंथरचना केली आहे. समुदाय सूत्रपाठ, पाठांच्या लापिका, सरवळे, दृष्टान्तस्थळ, दोन्ही मालिकेच्या टीका इत्यादी संस्कृत रचना असून *नित्यदिनी लीळास्तोत्र* (श्लो. ६०). ओव्या, श्लोक अशी मराठी रचना आहे. वि. ल. भावे ह्यांनी 'संतोषाचार्य शिष्य' असा त्यांचा निर्देश केला आहे (ममग्रंककासू., पृ. ९).
 **चरित्र, चर्चा, अभ्यास** : देशपांडे, य. खु.: चक्रपाणी व्यास वर्धनस्थ; ममवा., द्वि. आ., पुणे, १९६०; पृ. ५५.

**चक्रपाणी मुनि येळंबकर** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] महानुभाव कवी. हे स्वतःस कृष्णसुत म्हणवीत असत. येळंब हे कवीच्या गावाचे नाव. मराठवाड्यातील बीड जिल्ह्यातील केज तालुक्यात हे गाव आहे. ह्या गावी कवीचा मठही आहे. आपल्या तिस्सा नामक हिंदी काव्यांच्या योगाने मोठमोठ्या नबाबांनाही हे प्रसन्न करून टाकत असत, अशी ह्यांच्याविषयी महंत गोपीराजबाबा माहिती देतात.
 ह्यांची रचना अनेकवृत्तात्मक आहे. चक्रपाणी येळंबकृत पूजा-अवस्वर-स्तोत्र *महानुभाव* मासिकात प्रसिद्ध झाले आहे. ही रचना विविध वृत्तांत केलेली आहे. ह्यांनी रचलेले हिंदुस्थानी *रुक्मिणी-स्वयंवर* चुकीने समर्थशिष्य कल्याणांचे समजले जात असे. महानुभावीय हिंदी कवितेत ह्या चक्रपाणी येळंबकरांची रचना महत्त्वाची आहे.
 **रचना : मु.** – पूजाअवस्वरस्तोत्र; श्लोक. ५२; महानु., मार्च १९६६; पृ. ११–१३. **अमु.** – १. प्रसाद मालिका; २. भरवस मालिका; ३. रासक्रीडा तिस्सा; ४. रुक्मिणीहरण तिस्सा; ५. वैराग्य-तिस्सा; हिंदी श्लोक.
 **चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कामत, अशोक : एक महानुभावीय हिंदी रचना (चक्रपाणीविरचित) रुक्मिणीस्वयंवर; महानु., डिसें. १९६७; पृ. १४–१८. २. देशपांडे, य. खु. : ममवा., द्वि. आ., पुणे, १९६०; पृ. ६९.

**चक्रपाणी व्यास बीडकर** – पहा **चक्रपाणी व्यास वर्धनस्थ.**

**चक्रेश्वर** [का. अनु.] पदकार.
 **रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चकोदा जामोदकर** [का. अनु.] महानुभाव कवी.
 **रचना : अमु.** – आरत्या व पदे; ममग्रंककासू., पृ. ९.

**चतुर साबाजी / ० साबाजी** [का. अनु.] कवी. ह्यांच्या वडिलांचे नाव विश्वनाथ. साबाजीराव चतुर असल्यामुळे लोक ह्यांस 'चतुर साबाजी' असे म्हणू लागले. हे पुण्यास पेशव्यांच्या पदरी होते असे *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे म्हणतात पण *पुरवणी*कार शं. गो. तुळपुळे ह्यांच्या मते बहेरू कवीबरोबर ज्या चतुर साबाजीचा उल्लेख *महाराष्ट्रसारस्वत*कार करतात, तो पुरुष पेशव्यांच्या नोकरीत नसून मलिकंबरकडील मुत्सद्दी म्हणून प्रसिद्ध असल्याने हा साबाजी कवी अगदी निराळा मानावा लागतो. उतारवयात कवीची दृष्टी मंद झाल्यानंतर त्यांनी ईश्वरचरित्रविषयक आख्याने व पदे वगैरे पुष्कळ कविता लिहून ठेविली. श्लोक, साकी, दिंडी व आर्या वृत्तांतून ह्यांनी अनेक प्रकरणे लिहिली आहेत.
 **रचना : मु.** – १. बलिदानकथा; श्लो. सं. २९. २. रावणगर्वपरिहार; कासं. **अमु.** – १. दानावर्त; २. हस्तामलकटीका; ३. पदपदांतरे व श्लोक (मसा., आ. ५, पृ. ६२२–२३ व ९८४).

**चत्रभुज** [का. अनु.] कवी.
 **रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ३२.

**चंदसखी** [का. अनु.] पदकार.
 **रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**चंद्रकीर्ती** [अंदाजे इ. स. १८१६] जैन कवी. चंद्रकीर्तींनी *संमेदशिखरमाहात्म्य* व *पद्मावती शृंगार* अशा दोन रचना केल्या आहेत. जैनांच्या चोवीस तीर्थंकरांपैकी वीस तीर्थंकरांचे निर्वाण संमेदशिखर ह्या जैन क्षेत्री झाले आहे. अशा पूज्य स्थानाचे माहात्म्य

कवीने आपल्या काव्यात वर्णिले आहे. दुसरे काव्य हे पद्मावतीच्या शृंगाराचे गीत आहे. ह्यात तिची अलंकारजडित नयनमनोहर मूर्ती व तिचे आवडते खाद्यपदार्थ ह्यांचे वर्णन येते.

**रचना :** अमु. – १. पद्मावती शृंगार; ओ. सं. ६४; र. श. १७३८ (जिंतुर हस्त. संग्रह). २. संमेदशिखरमाहात्म्य; श्लो. सं. २४; र. श. १७३७ (शिरड हस्त. संग्रह).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र; चंद्रकीर्ती; प्रामजैसा., नागपूर–पुणे; १९६८; पृ. १०१–१०२.

**चंद्रचूड** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ३५.

**० चंद्रतनय** – पहा **चंद्रात्मज रुद्र.**

**० चंद्रनंदन** – पहा **चंद्रात्मज रुद्र.**

**० चंद्रभट** – पहा **चांद बोधले.**

**० चंद्रसुत** – पहा **चंद्रात्मज रुद्र.**

**० चंद्रात्मज कवी** – पहा **चंद्रात्मज रुद्र.**

**० चंद्रात्मज प्रभू** – पहा **चंद्रात्मज रुद्र.**

**चंद्रात्मज रुद्र / ० चंद्रतनय / ० चंद्रनंदन / ० चंद्रसुत / ० चंद्रात्मज कवी / ० चंद्रात्मज प्रभू / ० रुद्र–२** [अंदाजे श. १६४० / इ. स. १७१८ – श. १७०० / इ. स. १७७८] कवी. महाभारती पर्वांवर रचना. ह्या कवीच्या *उद्योगपर्वा*ची हस्तलिखित प्रत समर्थवाग्देवतामंदिर संग्रह, धुळे येथे आहे (बा. ११७८). हिच्या १२ व्या अध्यायातील काही ओव्यांवरून चंद्रात्मज कवी हे वसिष्ठगोत्री, देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून ह्यांची माता वाराणसी, पिता चंद्र, कवीचे नाव रुद्र आणि गुरू व्यंकटेश असल्याची माहिती मिळते. कवीची गुरुपरंपरा शं. श्री. देव आणि गो. का. चांदोरकर थोड्याफार फरकाने पुढीलप्रमाणे देतात : दत्तात्रेय > अद्वैतानंद > परमात्मानंद > योगेश्वरानंद > हंसानंद > अमृतानंद > ब्रह्मानंद > विमलानंद > चिदानंद > प्रसन्नानंद > रामानंद > व्यंकटेश > चंद्रात्मज.

मुडलगी मठात उपलब्ध झालेल्या गुरुनाथाच्या *देशिकचरित्रा*तील (र. श. १७०७ / इ. स. १७८५) एका ओवीने ह्या कवीच्या चरित्रावर नवा प्रकाश टाकला आहे. ती ओवी येणेप्रमाणे : " शिवबोधाचा चुलतबंधु । चंद्रात्मज रुद्रमुनी प्रसिद्ध । ज्यांची लीला अगाधु । श्रवण विवेकसिंधु निरंतर ॥ १.२० ॥ " हे शिवबोध म्हणजे दुसरे शिवबोध होत. कारण पहिले शिवबोध हे भारद्वाजगोत्री होते व दुसऱ्या शिवबोधांचे गोत्र वासिष्ठ आहे. चंद्रात्मजाचे निश्चित स्थळ कोणते व त्यांचे गुरू व्यंकटेश हे कोण व कोठले ह्यासंबंधी नीटसा उलगडा होत नाही. मुडलगी परंपरेतील दुसऱ्या शिवबोधांवरून चंद्रात्मजांचा काल सुमारे श. १६४० ते १७०० (इ. स. १७१८–१७७८) च्या दरम्यानचा असावा असा निष्कर्ष डॉ. पंडित आवळीकर ह्यांनी काढला आहे (जुवानसं., पृ. १८९–१९३).

ह्या कवीने महाभारताची *उद्योग* व *भीष्म* ही दोन पर्वे, *चंद्रावळी* हे लघुकाव्य, *गोकर्णमाहात्म्य* आणि *श्रीखंड्याचे चरित्र* इत्यादी आख्यानकाव्ये रचली आहेत. कवीने मुक्तेश्वरांविषयी 'साहित्यरत्नाचे भांडागार' अशा शब्दांत आदर व्यक्त केला आहे. ह्यांच्या कवितेचा थाट मुक्तेश्वरी झोकाचा दिसत असला तरी *भारत*रचना करताना ह्यांचे स्फूर्तिस्थान कर्नाटक व कवी कुमारव्यास असल्याचे पुढील ओवीवरून स्पष्ट होते : " मज संस्कृति नाहीं अभ्यास । कर्नाटक कवि कुमार व्यास । त्याचेनि आधारें ग्रंथविलास । प्रारंभिला हा हेतु ॥ भीष्मपर्व ५५ ॥ " कवीचे *भीष्मपर्व* ज. र. आजगांवकरांच्या पाहण्यात होते. चंद्रात्मजांची दोन कन्नड त्रुटित प्रकरणे (देवनागरीत लिहिलेली) प्रा. पंडित आवळीकरांना मुडलगी मठात पाहण्यास सापडली. कवीची दोन पदे डॉ. पंडित आवळीकरांनी प्रसिद्ध केली आहेत (जुवानसं., पृ. १९६–१९७).

ह्या कवीची सर्वच रचना प्रासादिक आहे. संवादात्मक रचनेतील शब्दयोजना समर्पक असून भाषणे मार्मिक व वर्णनस्थळे आकर्षक आहेत. ही रचना अद्यापि अप्रकाशित आहे.

**रचना :** मु. – १. उद्योगपर्व; अ. १२, ग्रं. सं. सुमारे २०००, प्र. ले. का. : श. १६८७ (इ. स. १७६५); कार्तिक शु. १०; सवामं. २. गोकर्ण माहात्म्य; श्लो. सं. ६४; र. श. १६८७ (इ. स. १७६५); संककासू., पृ. ३५. ३. चंद्रावळी; श्लो. सं. १०३; सवामं. बा. १२०१. ४. भीष्मपर्व (अनुपलब्ध); ओ. सं. अंदाजे ११००. ५. श्रीखंड्याचे चरित्र; मसा., आ. ५, पृ. ८८४. ६. पदपदांतरे व श्लो.; मुडलगी मठ.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : चंद्रात्मज रुद्र; मकच., खं. २; मुंबई, १९१३; पृ. ३६–४५. २. आवळीकर, पंडित : चंद्रात्मज रुद्र; जुवानसं.; धारवाड, १९६४ ; पृ. १८४–१९९.

**चांगदेव / ० चक्रपाणी / ० चांगावटेश्वर / ० वटेश चांगा** [ ? – समा. अंदाजे श. १२१८ / इ. स. १२९६, माघ व. त्रयोदशी] नाथपंथी कवी आणि योगी पुरुष. ज्ञानेश्वर-मुक्ताबाई ह्यांचे अनुयायी. ह्यांचे खात्रीलायक चरित्र ज्ञात नाही. चांगदेवांच्या चरित्रातील चार-दोन ढोबळ घटना ज्ञात झाल्या आहेत. त्या अशा : तापी पयोष्णी तीरावरील चांगदेव ह्या गावी हे प्रथम लोकांच्या नजरेस पडले. चांगदेवपुरीनजीकच्या वनात हे चर्मचक्षू झाकून तपश्चर्या करून योगी पुरुष झाले होते. ह्यांच्या चांगल्या रूपावरून त्यांना लोक चांगदेव असे म्हणू लागले. दीर्घ तपाने ह्यांना अनेक सिद्धी प्राप्त झाल्या होत्या. त्यांचा शिष्यपरिवारही हळू हळू वाढू लागला. पण ह्या वेळेपर्यंत त्यांना गुरुबोध झाला नव्हता. ज्ञानदेवांच्या योगसामर्थ्याची कीर्ती ऐकून ह्यांनी ज्ञानेश्वरांना एक पत्र लिहिण्याचे योजिले. परंतु ज्ञानेशांना नमस्कार लिहावा की आशीर्वाद लिहावा ह्या संभ्रमात पडल्यामुळे ह्यांनी पत्र कोरेच पाठविले. त्यावर ज्ञानेश्वरभगिनी मुक्ताबाईने चांगदेव अजून 'कोराच' आहे असा अभिप्राय दिला. पुढे ज्ञानेशांनी गुरू निवृत्तिनाथांच्या आज्ञेने 'तत्त्वमसि' ह्या महावाक्याचा बोध उत्तरात्मक पत्रात केला. हे पत्र म्हणजेच *चांगदेव पासष्टी* होय. चांगदेव मोठ्या अहंकाराने आपल्या शिष्यसमुदायासह व्याघ्रावर आरूढ होऊन हातात सर्पाचा चाबूक घेऊन ज्ञानदेवांच्या भेटीस गेले. ज्ञानदेवादी भावंडेही भिंतीवर बसून भिंत चालवीत चांगदेवांच्या समाचारास आली. ज्ञानदेवांचे मोठेपण चांगदेवांच्या प्रत्ययास येऊन आपला अहंकार टाकून ते त्यांना शरण गेले, व त्यांच्याच परिवारात राहू लागले. पुढे मुक्ताबाईने त्यांना विश्रांतिवटाखाली *चांगदेवपासष्टी*चा अर्थ समजावून सांगितला व ब्रह्मज्ञानोपदेश करून परमपदाचे अधिकारी बनविले (महिपतीकृत *भक्तविजय*, *भक्तलीलामृत*, *नामदेव गाथ्या*तील 'समाधी-प्रकरण').

मुक्ताबाई ही चांगदेवांची गुरू असल्याचा उल्लेख चांगदेवांच्या *तत्त्वसार* ग्रंथात व त्यांच्या अभंगांतही येतो. गुरुपरंपरा : आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ > गहिनीनाथ > निवृत्तिनाथ > मुक्ताई > चांगा वटेश्वर अशी आहे. चांगदेवांचा संप्रदाय वटेश्वर संप्रदाय म्हणून प्रसिद्धी पावला आहे.

चांगदेव हे चांगा वटेश्वर म्हणून प्रसिद्ध आहेत. ही वटेश्वर व्यक्ती कोण ह्याविषयी अभ्यासकात बरेच मतभेद निर्माण झाले आहेत. वटेश्वर म्हणजे चांगदेवांच्या अंतर्यामी प्रकाशणारे ईश्वरस्वरूप. मुक्ताबाईने विश्रांतिवटाखाली *चांगदेवपासष्टी*चा अर्थ चांगदेवांस समजावून सांगितला, म्हणजेच वटाखाली स्वतःच्या ईश्वरस्वरूपाशी चांगदेव एकजीव झाले म्हणून वटेश चांगा असे हे स्वतःला

म्हणवून घेऊ लागले असतील, असे एक मत *तत्त्वसार* ग्रंथाचे संपादक डॉ. ह. रा. दिवेकर ह्यांनी मांडले आहे, तर *चांगदेव-चरित्रा*च्या संदर्भात तरी वटेश्वर हे शिवाचेच नाव आहे असे मत रा. चिं. ढेरे ह्यांनी प्रतिपादले आहे. त्यांच्या मते वटेश्वर हे ह्यांचे उपास्य दैवत होते. चांगदेवांनी चांगदेवपुरी येथे वटेश्वराची उपासना केली होती. हे वटेश्वराचे स्थान खानदेशात तापी-पयोष्णी संगमावर आजही पाहण्यास सापडते. ह्याच गावी त्यांची समाधी असून तेथे माघात चांगदेवांची प्रतिवर्षी यात्राही भरत असते. सासवड (जि. पुणे) येथेही वटेश्वराचे एक भव्य शिवमंदिर आहे. वटेश्वर ह्या नावाने अनेक ठिकाणी शिवस्थाने सापडतात. वेळापूर येथील व भुजंगाचे वडनेर येथील वटेश्वर मंदिरे यादवकाळात उल्लेखिली गेली आहेत. चांगदेवांनी वटेश्वरावर रचलेली आरती पाहिल्यास वटेश्वर हे चांगदेवांचे गुरू नसून उपास्य दैवत होते हे सत्य ध्यानात येते. त्या आरतीच्या काही ओळी अशा आहेत : " तटीतीरी देव प्रगट झाला. . .। प्रगटली मूर्ति आनंद जाला ॥ १ ॥ जय जय आरती जय वटेश्वरा। निराकार साकार तूंचि शंकरा ॥ सद्भावे आरती तुज परात्परा। भक्त तारावया कर्पूरगौरा ॥ धृ. ॥" आरतीच्या शेवटी 'मुक्ताईप्रसादे चांगा वटेश्वरी ऐक्य ओवाळित आरती चांगया लक्ष लक्ष।' असा गुरुकृपेने प्राप्त झालेल्या शिवैक्याचा उल्लेख चांगदेव कृतार्थपणे करतात. ह्याव्यतिरिक्त वटेश्वराचे शिवत्व निःसंदिग्धपणे व्यक्त करणारे अनेक उल्लेख सापडतात.

चांगदेवांनी ज्ञानेश्वर-सोपानांच्या नंतर तात्काळ श. १२१८ (इ. स. १२९६) च्या माघ वद्य त्रयोदशीस पुणतांबे येथे समाधी घेतल्याचा उल्लेख संतमंडळी करतात (*नामदेव गाथा* : समाधी प्रक.). ल. रा. पांगारकरांनी हा शक १२२० (इ. स. १२९८) दिला आहे. महिपती तो श. १२२७ (इ. स. १३०५) देतात. ज. र. आजगांवकर, रा. द. रानडे व डॉ. शं. गो. तुळपुळे हे महिपतींनाच प्रमाण मानतात. रा. चिं. ढेऱ्यांच्या मते पुणतांबे येथील चांगदेवांची समाधी ही त्यांचे प्रशिष्य चांगा मुधेश ह्यांची असून (शामजी मरुद्गणकृत *चांगदेवचरित्र*) चांगा वटेश्वरांनी श. १२३४ (इ. स. १३१२) त *तत्त्वसार* ग्रंथाची रचना करून श. १२४७ (इ. स. १३२५), क्रोधन संवत्सरी, माघमासी, तापी-पयोष्णी तीरावर चांगदेव (जि. जळगाव : एदलाबादहून चार मैल दूर) ह्या गावी समाधी घेतली.

*ज्ञानदेव-गाथे*तील सुमारे ७७ अभंग, *तत्त्वसार* हा आध्यात्मिक ग्रंथ व काही पदे अशी रचना चांगदेवांच्या नावावर सापडते. *तत्त्वसार* ग्रंथाचे ह्यांच्या नावावरील कर्तृत्व, ग्रंथाचा श. १२३४ हा रचनाकाल पाहता, शंकास्पद वाटते, असे मत 'पांडुरंगशर्मा' ह्यांनी व्यक्त केले आहे. ग्रंथाच्या एकूण १०३६ पैकी फक्त ४०४ च ओव्या उपलब्ध आहेत. ग्रंथाचा रचनाकाल व स्थल ह्यांचा तपशील ग्रंथात सापडतो. श. १२३४ (इ. स. १३१२), परिधावी संवत्सर, मार्गशीर्ष शु. ३ ह्या दिवशी हरिश्चंद्रगडावर (जिल्हा नगर, ता. अकोला) ग्रंथ पूर्ण झाला. "*चांगदेवपासष्टी*च्या द्वारा ज्ञानेश्वरांनी दिलेल्या ज्ञानाचे ह्यात प्रतिबिंब आहे." असे ह्या ग्रंथाच्या अंतरंगाचे डॉ. शं. दा. पेंडसे ह्यांनी वर्णन केले आहे. सद्गुरूने आपले जे निजस्वरूप शिष्यास समजाविले, ते पूर्णपणे समजून शिष्य व गुरू हा द्वैतभाव सुटून दोघेही एकच ब्रह्मस्वरूप झाले की सर्व तत्त्वांचे सार प्राप्त झाले हाच खरा *तत्त्वसारा*चा गर्भितार्थ. [ ⇨ ३. ]

चांगदेवांच्या अभंगात कूटात्मकता व चमत्कृतिपूर्णता अधिक आहे. योगीपुरुषाला घडलेला अद्वैताचा साक्षात्कार हाच त्यांच्या अभंगांचा गाभा आहे. त्यांच्या अभंगांची परिभाषा समजण्यास कठीण आहे. मुक्ताबाईने उपदेशिलेल्या ब्रह्मज्ञानाचे प्रतिबिंब ह्या अभंगांतून पडलेले दिसते. उदा., "स्वरूप ना छाया त्रिगुणरहित। ज्योतिस्वरूप हें पा नित्य ॥ १ ॥ जाणें येणें नाहीं निर्गुण पाही चैतन्य होई शुद्धबुद्ध ॥ २ ॥ मुक्ताई म्हणे चांगया वटेश्वरा। निरुता पाहे स्वयें साकारा ॥ ३ ॥"

**रचना : मु.** – १. चांगदेव वटेश्वरकृत तत्त्वसार; ओ. सं. ४०४; अपूर्ण; संपा. दिवेकर, ह. रा. (प्रस्तावनेसह); ग्वाल्हेर, १९३६. २. अभंग : ७७; गाथापंचक; गाथा १ ली; 'श्रीचांगदेव महाराज यांची गाथा', (श्रीज्ञानदेव महाराज ह्यांच्या अभंगांत अंतर्भूत); संपा. आवटे, त्र्यं. ह.; पुणे, १९०८; पृ. ३२५–३३५. **अमु.** – १. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३. २. स्वानुभव-उत्तर पत्रिका; ओवीबद्ध; ग्रं. सं. २६; तंसम. बा. ४४८–४४९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. आजगांवकर, ज. र. : चांगदेव; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. १८०–१८२. २. करमळकर, विनायकराव : योगी चांगदेवाचा 'तत्त्वसार'; मसाप., जुलै १९६६; पृ. २२. ३. कात्रे, स. ल. : चांगदेव वटेश्वरकृत तत्त्वसाराची समाप्ति-तिथी; विसंमंवा.; १९६८; पृ. ९९–१०४. ४. काळे, द. ग. : चांगदेवाचा 'तत्त्वसार'; केसरी, १० जाने. १९५६. ५. चांदोरकर, गो. का. : चांगा वटेश्वराची समाधि; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ९९. ६. ढेरे, रा. चिं. : वटेश्वर : आणखी एक अध्ययन; मसंप., जाने. १९७०; पृ. १३३–१३७. ७. ढेरे, रा. चिं. : श्रीचांगा वटेश्वर; सह्याद्रि, पूर्वार्ध, डिसें. १९७०; पृ. २–८; उत्तरार्ध, जाने. १९७१; पृ. ४२. ८. धावरे, दा. का. : संतश्रेष्ठ चांगदेवांच्या सहवासांत; माउली, जाने. १९६३; पृ. ९–१७. ९. पांडुरंगशर्मा : स्वस्ति श्रीवटेशु (चर्चा); सह्याद्रि, एप्रि. १९५०; पृ. २२०. १०. भावे, वि. ल. (संपा.) : शामजी गोसावी मरुद्गणकृत चांगदेव चरित्र; मुंबई, १९०४. ११. मुंडी, बा. ना. : वटेश्वर – एक अध्ययन; मसंप., एप्रि. १९६७; पृ. १४९–१६५.

**चांगदेव राऊळ / ० चक्रपाणी–१** – पहा **परिशिष्ट.**

**० चांगा केशवदास** – पहा **चांगा मुधेश.**

**चांगा मुधेश / ० चांगा केशवदास** – पहा **परिशिष्ट.**

**० चांगा वटेश्वर** – पहा **चांगदेव.**

**चांदबोधले / ० चंद्रभट / ० चंद्रशेखर / ० सैय्यद चांदसाहेब कादरी** – पहा **परिशिष्ट.**

**(रे.) चार्लस पिनहार्न फरार / ० फरार, (रे.) चार्लस पिनहार्न** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] ख्रिस्ती मिशनरी लेखक. नाशिक येथील 'चर्च मिशनरी सोसायटी' चे धर्मप्रचारक. इ. स. १८३२ त ते महाराष्ट्रात आले व येथे पंधरा वर्षे राहून इ. स. १८४७ त विलायतेत परत गेले. ह्यांनी मराठी *किस्से, बालोपदेश, ईश्वराचें पवित्रत्व* व *न्याय्यत्व यांचें प्रदर्शन* (१८३४); *शास्त्रांतील गोष्टी* (१८-३५); *द्राविडाची गीतें* अशी लहान लहान पुस्तके लिहून प्रसिद्ध केली.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : पिंगे, श्री. म.; रे. चार्लस पिनहॉर्न फरार; युमअसे; मुंबई, १९६०; पृ. ३२२–३२४.

**चाल्हण पंडित–१ / ० चाल्हनमुनी / ० चाल्हेराज–१** [का. अनु.] महानुभाव टीकाग्रंथकार. कवीश्वर आम्नायातील. गुरुपरंपरा : कवीश्वर > नागांबा > कमळाकर > सीतांबा > चाल्हण पंडित.

**रचना : अमु.** – १. रजतम सत्त्वानुवाद; ओ. ३४४. २. शास्त्रसंबोधनी टीका; ममग्रंककासू., पृ. १०. ३. ज्ञानप्रकाश : ममवा., पृ. ४६.

**० चाल्हण पंडित–२** – पहा **चक्रपाणी व्यास वर्धनस्थ.**

**० चाल्हनमुनी** – पहा **चाल्हण पंडित–१.**

**० चाल्हेराज–१** – पहा **चाल्हण पंडित–१.**

**चाल्हेराज–२** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.**– श्रीकृष्ण बाळक्रीडा; अभंग ६९३; ममग्रंककासू., पृ. १०.

**चाहेव्यास (बागुडे)** / ० **चक्रपाणी बागुडे** [का. अनु.] महानुभाव टीपकार. विनायक व्यास तळेगावकर ह्यांचे शिष्य. *साती-ग्रंथावर* ह्यांनी टीप लिहिली असल्याचे सांगतात. आज मात्र हा ग्रंथ उपलब्ध नाही. *गद्यराज परेश लीला स्तोत्र* (श्लो. २६०), *तोंडयाचे अन्वय* आणि *देवगीता* अशी आणखी काही रचना वि. ल. भावे ह्यांच्या *महानुभाव ग्रंथसूची*मध्ये ह्यांच्या नावावर नमूद करून ठेवलेली आढळते (पृ. १०).

० **चिटणीस, मल्हार रामराव** – पहा **मल्लारि / मल्हारी रामराव चिटणीस.**

**चिंतामणराव अप्पासाहेब पटवर्धन (सांगलीकर)** [इ. स. १७७४ – १५ जुलै १८५१] दिनचर्या-लेखक. ह्यांची पितृपरंपरा हरभटबाबा पटवर्धन > बाळंभट > हरभट > गोविंदपंत नाना > पांडुरंग तात्या > चिंतामणराव अशी आहे. ह्या पटवर्धन घराण्याकडे मौजे कोतवाड्याची ग्रामोपाध्येपणाची वृत्ती होती. मूळ पुरुष हरभटबाबा हे तपस्वी वरदपुरुष होते. त्यांची समाधी पुण्यास ओंकारेश्वरावर आहे. हरभटबाबांपासून चौथे पुरुष गोविंदराव नाना ह्यांनी पेशव्यांच्या कारकीर्दीत पाग्यापासून ते पथक्यापर्यंत उत्कर्ष करून घेतला. पुढे पेशव्यांनी त्यांना ८००० स्वार पदरी बाळगण्यासाठी २५ लाखांचा मुलूख सरंजाम दिला. ह्यांच्यानंतर त्यांचे पुत्र पांडुरंगराव ह्यांना सरदारीची वस्त्रे मिळाली. पांडुरंगरावांच्या पश्चात चिंतामणरावांचे थोरले बंधू हरिहरराव सरदार झाले. पण ते श. १७०२ (इ. स. १७८०) मध्ये मृत्युमुखी पडल्याने श. १७०४ (इ. स. १७८२) मध्ये चिंतामणरावांना ही सरदारी मिळाली. ह्यांचा जन्म मिरज किल्ल्यात श. १६९६ (इ. स. १७७४)त पौष शु. चतुर्थीस झाला. वयाच्या ७७ व्या वर्षी ह्यांचे देहावसान झाले.

कुटुंबातील कलहामुळे इ. स. १८०८ साली मिरज येथील पटवर्धनांच्या जहागिरीतील वाटणीचा निम्मा हिस्सा घेऊन चिंतामणराव सांगलीस येऊन राहिले. हेच महाराष्ट्रातील सांगली संस्थानाचे आद्य संस्थापक. ह्यांनी बुडती पेशवाई व उगवती आंग्लाई ह्या दोन्ही सत्ता पाहिल्या. प्रथम प्रथम परंपरागत स्वामिनिष्ठा व स्वाभिमान ह्यांमुळे ब्रिटिशांची हुकमत त्यांना मान्य नव्हती. एल्फिन्स्टनसारख्या अधिकाऱ्यालाही चिंतामणरावांनी सहजासहजी दाद दिली नाही. पण पुढे काळाची पावले ओळखून मुंबईचे दुसरे गव्हर्नर सर जॉन माल्कम ह्यांच्याशी त्यांनी मैत्री केली व इंग्रजांना आवश्यक ते साह्य दिले.

ह्यांनी लिहिलेला *दिनचर्या* हा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. डिसेंबर १८४६ ते जुलै १८५१ या कालातील बरीचशी सामाजिक, राजकीय माहिती ही *दिनचर्या* देते. हिच्यामध्ये राजकारण कमी, चरित्रनायकाच्या गौरवाचा भाग अल्प व सामाजिक इतिहासास उपयुक्त अशी माहिती विपुल सापडते. प्रतापसिंहाची ब्रिटिशांनी केलेली पदच्युती, साताऱ्याचे दत्तकप्रकरण इत्यादी घटनांमधून प्रतापसिंह, सेनापती बाळासाहेब आणि आप्पासाहेब, ह्यांच्या स्वभावविशेषांवर प्रकाश पडतो. इंग्रजी राजवटीत चहूकडचा पाहुणचार झोडणारे साताऱ्चे दिवाण बाळाजीपंत नातू, ह्यांच्या मतलबी आर्थिक व्यवहारांचे चित्रही ह्या ठिकाणी पाहण्यास सापडते.

ह्या *दिनचर्येत* चरित्रनायकाच्या स्वभावाचे जे दर्शन घडते त्यामधून खाशांचा जिज्ञासूपणा, दिलदार वृत्ती, धार्मिकता, इतिहासाची आवड, रसिकता इत्यादी विविध गुणांचा प्रत्यय येतो. तसेच ऐतिहासिक कागदपत्रे जमविणे, ऐतिहासिक तसबिरींचा साठा करणे, जुन्या मंडळींकडून माहिती गोळा करणे, गोंधळ्यांकडून पोवाडे जमविणे असे सांगलीकरांचे छंद ज्ञात होतात.

इंग्रजांचे आचारविचार, त्यांची जेवण्याची पद्धत, एकाकी साहेबाची दुःखे इत्यादी गोष्टीही *दिनचर्येत* आढळतात. तत्कालीन लोकभ्रम, समजुती, करमणुकीची साधने, जारकर्मासारख्या सामाजिक गुन्ह्याची गंभीर दखल अशा अनेक गोष्टींचे दर्शन ह्या *दिनचर्येत* होते. ह्या रोजनिशीत तारीखवार माहिती नोंदविली असल्याने निवेदनातली सलगता प्रत्ययास येत नाही, निवेदन आकर्षकही नाही. हा असा दोष असला तरी भारताच्या बदलत्या राजकीय आणि सामाजिक जीवनाचे ह्या *दिनचर्येत*, अंशतः का होईना, जे दर्शन घडते तेही महत्त्वाचे आहे.

**रचना : मु.** – दिनचर्या : श्रीमंत चिंतामणराव पटवर्धन : निवडक भाग;– खं. १ (१८ डिसेंबर १८४६ ते ३ जून १८४८ पर्यंत); संपा. आणि प्रस्तावना : केळकर, य. न.; भाइसंमं., व. ४५, अं. १–४; पृ. १–१०९;– खं. २ (११ जून १८४८ ते ३१ जुलै १८५१); संपा. केळकर, य. न., व जोशी, ना. के.; प्रास्ताविक : ओतुरकर, रा. वि.; दिनचर्या परामर्श : कुळकर्णी, अ. रा.; भाइसंमंत्रै., व. ५०, अं. १–४, १९७०; पृ. १–१०३.

**चिंतामणिनाथ** / ० **चिंतामणि–२** [अंदाजे श. १६८२ / इ. स. १७६०] नाथसंप्रदायी कवी. नाथसंप्रदायाच्या ज्ञानेश्वरप्रेरित परंपरेतील शिवदीननाथांचे शिष्य. गुरुपरंपरा : ज्ञाननाथ > सत्यामलनाथ > गैबीनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ > शिवदीननाथ > चिंतामणिनाथ. कवीच्या नावावर *ज्ञानकैवल्य* हा ग्रंथ व *श्रीशिवदीनाष्टक* हे स्फुट काव्य एवढी रचना आढळते.

ह्यांनी आपल्या *ज्ञानकैवल्य* ग्रंथाची रचना गुरू शिवदीनकेसरी विद्यमान असतानाच केली. शके १६८२, मार्गशीर्ष शु. १४, रविवार ह्या दिवशी ग्रंथसमाप्ती झाल्याचा निर्देश येतो. ह्यात समग्र गुरुपरंपरेचे *लीळाचरित्र* कवीने संक्षेपाने, पण परम श्रद्धेने, गायिले आहे. नाथपंथीय तत्त्वज्ञानापेक्षा नाथपंथीय आचारधर्माचा तपशील ग्रंथात अधिक येतो.

ग्रंथाची पहिली पाच प्रकरणे गुरुसेवेचा विधी विस्ताराने समजावून देतात. ह्यानंतरच्या भागात उद्बोधनाथ, केसरीनाथ, शिवदीननाथ ह्यांच्या चरित्रकथा येतात. आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ ह्या परंपरेतील अनेक सिद्धांची चरित्रवृत्ते देताना ग्रंथकार काही वेगळे संदर्भ देतो. उदा., गैबीनाथांच्या जन्माचे वेगळेच वृत्त ह्या ठिकाणी दिले आहे (६.५३–६५). पैठणच्या विप्रांनी ज्ञानेश्वरादी भावंडांचे अलौकिकत्व मान्य करून शरणागती पत्करल्यानंतरही ह्या भावंडांना वर्णव्यवस्थेत स्थान देण्याची सोय विप्रांना त्यांच्या प्रमाण ग्रंथांत आढळली नाही, म्हणून निवृत्तिनाथ-ज्ञानेश्वरांनी नाथपंथाचा स्वीकार केला, असे चिंतामणिनाथ सांगतात. उदा., "चातुर्वर्णाचा शोधला आचार। म्हणती, यांत होईल अनाचार। यास्तव सिद्धनाथपंथ साचार। सर्वोत्कृष्ट मानला॥ ६.९०॥" ह्या ग्रंथात सत्यामलनाथांच्या चरित्राबरोबरच गुप्तनाथ व उद्बोधनाथ ह्यांच्या सिंहस्थयात्रेच्या गंगास्नानाचे वर्णन येते.

सत्यामलनाथ हे ज्ञानेश्वरांचे साक्षात शिष्य नव्हते असे, उभयतांमधील काळाचे अंतर लक्षात घेता, अनुमान केले जाते. त्यास *ज्ञानकैवल्य* ह्या ग्रंथातील (६.९६) ह्या ओवीवरून चांगलाच आधार सापडतो.

ज्ञानेश्वरांना नवस केल्याने झालेला सत्यामलनाथ हा पुत्र त्याच्या मातापित्यांनी त्यांनाच शिष्य म्हणून अर्पण केला, असे ग्रंथकार सांगतो (६.९५).

गुरुभक्तीचे माहात्म्य आणि नाथसिद्धांची चरित्रगाथा म्हणून *ज्ञानकैवल्य* हा ग्रंथ अभ्यसनीय ठरतो. त्याचप्रमाणे नाथसंप्रदायाच्या इतिहासाचा एक साधनग्रंथ ह्या दृष्टीनेही ह्या ग्रंथास फार महत्त्व आहे. प्रस्तुत ग्रंथाचे मुद्रण स्वरूपानंद (गोडबोले) ह्यांनी पैठण येथील शिवदीनकेसरींच्या मठातील जुन्या प्रतीवरून नकललेल्या पोथीवरून झाले आहे. 'ध्यातसे निज अंतरीं गुरुमाउली करुणाघना' अशी

सुरुवात असणाऱ्या *शिवदीनाष्टका*तून आपली अनन्य गुरुभक्ती कवीने व्यक्त केली आहे.

**रचना : मु.** – १. श्रीचिंतामणिनाथविरचित ज्ञानकैवल्य; प्रक. ९; ओ. सं. ७३६; संपा. ढेरे, रा. चिं. व वाळिंबे, मो. मा.; पावस, रत्नागिरी, १९७३ ; ढेरे ह्यांची विस्तृत प्रस्तावना; पृ. ११–२६. २. श्रीशिवदीनाष्टक; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १९५–१९६.

**चिंतामणि पंडित** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – दशावतारजयंती; श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चिंतामणी–१** [का. अनु.] कवी. पेशवाईअखेरच्या काळातील. हे नरहरिभक्त असून ह्यांच्या घरची वृत्ती ज्योतिषाची असावी. *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी ह्यांच्या *गोपीचंदाख्यान* [ ⇨ ३ ] व *सीतास्वयंवर* ह्या आर्याबद्ध आख्यानांचा उल्लेख केला आहे. ह्यांनी गणपतीवर आर्या रचल्या आहेत असेही ते सांगतात (मसा., आ. ५, पृ. ५२६). चिंतामणी कवीच्या नावावर मोडणाऱ्या *ध्रुवाख्याना*चा खरा कर्ता उद्धवचिद्धन होय, असे उद्धवचिद्धनांच्या दुसऱ्या दोन दिंडी वृत्तातील आख्यानांशी तुलना करून अ. का. प्रियोळकरांनी सप्रमाण सिद्ध करून दाखविले आहे. ही कविरचित दोनही आख्याने आर्याबद्ध असून त्यात मोरोपंतांचे अनुकरण स्पष्ट आहे. त्यात अनेकाक्षरी यमकांवर कवीने भर दिलेला आहे. चिंतामणी कवीची 'जमदग्निकुलभूषण मुक्ताफळदशना' ही परशुरामावरील आरती प्रसिद्ध आहे. कवीने पदांचीही रचना केली आहे. 'पावन तूझे नीर गंगे हो पावन' ह्या पदाचा कर्ता म्हणून प्रस्तुत चिंतामणी कवीचा रा. ग. हर्षे निर्देश करतात. *चिंतामणी रत्नाकर* ह्या ज्योतिषविषयक ग्रंथाची रचनाही ह्यांनी केली आहे.

**रचना : मु.** – गोपीचंदाख्यान; प्र. ४; आर्या १८२; कासं. १०, पृ. ११६; पृ. ५–१९. २. सीतास्वयंवर; आर्या ९०; अकलकामा., भा. २; पृ. ३६–४५. ३. तीन आरत्या; मआ.; पृ. ३५६, ३६३, ३८६. **अमु.** – १. मंत्र गजानन; आर्या ११६६; २. अष्टके, पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २. **शंका.** – ध्रुवाख्यान (मु.).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, व. स.; सीतास्वयंवर – चिंतामणी; नभामा., जुलै १९७३; पृ. ५२. २. प्रियोळकर, अ. का.; ध्रुवाख्यानाचा खरा कर्ता उद्धवचिद्धन; लोशि. १९३२. ३. हर्षे, रा. ग.; काही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांची पदे : 'चिंतामणि कवि'; भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४, चैत्र १८६८; पृ. ३७-४९.

**० चिंतामणी–२** – पहा **चिंतामणिनाथ.**

**चिंतामणी–३** [का. अनु.] कवी. ह्याने *मल्हारिमाहात्म्य* (अ. ५, ओ. सं. ५००) ह्या ग्रंथाची रचना केली आहे. प्रत्येक अध्यायाच्या शेवटी चिंतामणी असा कवीच्या नावाचा उल्लेख येतो. पोथीच्या शेवटी श. १७४०, बहुधान्य संवत्सर, कार्तिक शु. ९ असा काल निर्दिष्ट केलेला आहे. हा रचनाकाल आहे का प्रतलेखनकाल ते समजत नाही (सवामं. बा. ९८, हस्त. सू., खं. १).

**चिंतामणी महाराज चिंचवडकर / ० चिंतामणी देव** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] पदकार. गणेशभक्त मोरया गोसावींचे पुत्र. उपनाव देव. वास्तव्य चिंचवड (जि. पुणे) येथे. हे गृहस्थाश्रमी असून ह्यांना चार पुत्र होते. चिंतामणी विरक्तपणे राहात. मोरया गोसावी हेच त्यांचे पारमार्थिक गुरू होते. मलिक अंबराने मोरोबांना मोरगावी जमीन इनाम दिली होती. ह्यांचे कुटुंब कित्येक वर्षे मोरगावीच होते. पुढे पवना नदीत मोरेश्वरमूर्ती सापडल्यानंतर तिची त्याच गावी म्हणजे चिंचवडास स्थापना करून मोरया गोसावी मोरगाव सोडून चिंचवडास राहण्यास गेले. ह्यांचे देव हे आडनावही, मोरोबांनी समाधी घेतल्यानंतर त्यांच्या समाधीमंदिराला लोक मोरोबा देव, चिंचवडकर देव असे संबोधू लागल्याने पडले आहे.

चिंतामणी गोसावींच्या पदांत मोरयांची गुरुकृपा झाल्याचा निर्देश येतो; तसेच भाद्रपद शु. चतुर्थीस मोरेश्वराच्या यात्रेला जायचे असेही चारपाच पदांत म्हटलेले आहे. वंशपरंपरेने चालत आलेल्या गणेशोपासनेचाच प्रभाव ह्या पदांवर आहे.

**रचना : मु.** – पदपदांतरे; सद्गुरु श्री मोरया गोसावी, श्री चिंतामणी महाराज, श्री नारायण महाराज, श्री धरणीधर महाराज यांच्या पदांची गाथा; श्रीदेव संस्थान; चिंचवड, १९५९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** बेंद्रे, वा. सी. : चिंतामणी देव चिंचवडकर : तुकाराम महाराज यांचे संतसांगाती; मुंबई, १९५८; पृ. १०९, १३१.

**चिंतामणीसुत–१ / ० त्रिमल / ० नित्यानंद** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, उत्तरार्ध व १७ वे शतक, प्रारंभकाल] कवी. शिवकल्याणांचे वडील. ह्यांचे मूळ नाव त्रिमल. संन्यासोत्तर नाव नित्यानंद. ह्यांच्या पितृपरंपरेबद्दल पुढील माहिती मिळते : नित्यानंद (अंबानगरीचे) > कमलाकर (पयोष्णीतीरीचे) > चिंतामणी > त्रिमल (नित्यानंद) > शिवकल्याण. ह्यांची गुरुपरंपरा शिवकल्याणांनी आपल्या *नित्यानंददीपिका* ह्या *अनुभवामृता*वरील टीकेत दिली आहे ती अशी : आदिनाथ > मच्छेंद्र > गोरक्ष > मुक्तनाथ > वटेश्वर > चक्रपाणी > विमलानंद > चांगा (केशवदास) > जनकराज > नृसिंह > हृदयानंद > विश्वेश्वर > केशवराज > हरिदास > परमानंद > नित्यानंद. ह्यांची रचना भक्तिपर आहे. *सोमवारव्रतावरील कथा* (ओ. सं. ११८) आणि पदपदांतरे अशी रचना समर्थवाग्देवतामंदिर आणि तंजावर सरस्वती महाल येथील हस्तलिखित संग्रहात उपलब्ध आहे.

**चिंतामणीसुत–२** [का. अनु.] पदकार. 'उद्धवा म्हणति गोपिका हरिशि आणा' हे लावणीच्या चालीवरील पद अक्रूराने कृष्णाला मथुरेला नेल्यानंतर गोकुळात जो हाहाःकार उडाला त्या करुण प्रसंगावर कवीने रचले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग. : चिंतामणीसुत : काही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांची पदे; भाइसमंत्रै., व. २६, अं. ४; पृ. ३२–४०.

**० चिंतामणीसुत मुद्गल** – पहा **मुक्तेश्वर.**

**चिंतो कृष्ण वळे** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] बखरकार. *भाऊसाहेबांची बखर* ह्या पानिपतच्या रणसंग्रामावरील उत्कृष्ट गद्य ग्रंथाचा कर्ता म्हणून कृष्णाजी शामरावाबरोबर चिंतो कृष्ण वळे ह्यांचेही नाव घेतले जाते. बखरीचे प्रथम मुद्रण (इ. स १८७९) करण्यापूर्वी संपादक का. ना. साने ह्यांना ज्या हस्तलिखित प्रती उपलब्ध झाल्या होत्या त्यांपैकी धोपेश्वर (जि. रत्नागिरी) आणि तुंगार (ता. वसई, जि. ठाणे) ह्या ठिकाणी उपलब्ध झालेल्या प्रतींत पृच्छक आणि निवेदक ह्यांच्या भिन्न जोड्या आढळतात. ह्यांपैकी पहिलीचा पोष्य कृष्णाजी शामराव, मुक्काम दिल्ली इंद्रप्रस्थ, ह्याने ही बखर रा. रा. व्यंकाप्पा नाईक दिंडोरे कसबा वेळापूर स्वामींचे करिता लिहिली असे दिसते; तर तुंगार प्रतीत पोष्य चिंतामण गोविंद, मुक्काम दिल्ली इंद्रप्रस्थ, ह्याने रा. रा. गणेशपंत स्वामींचे सेवेशी बखर लिहून अर्पण केल्याचा निर्देश येतो.

का. ना. साने संपादित बखरीच्या सर्व आवृत्त्यांत अधिकृतपणे कृष्णाजी शामराव असाच पाठ स्वीकारल्याने ही बखर कृष्णाजी शामरावाची असा तिचा उल्लेख होत असे. परंतु तुंगार प्रतीतील चिंतामण गोविंद ह्या पाठावरून प्रस्तुत बखरीचा लेखक शिंद्यांचा दिवाण 'चिंतो कृष्ण वळे' हाच असावा असे मत आनंदराव फाळके ह्यांनी आग्रहाने मांडले आहे. ह्या बखरीसही ते 'शिंदेशाहीची बखर' म्हणतात (*शिंदेशाहीच्या इतिहासाची साधने, भा.* ३, १९३७, प्रस्ता., पृ. ६–८).

'भाऊसाहेबांची बखर लिहिणारा कोणी असो; तो शिंद्यांचा

पक्षपाती भासतो' असे मत काशीनाथपंत साने ह्यांनीही बखरीच्या प्रस्तावनेत मांडले आहे. ते लक्षात घेतले तर फाळके मांडतात ती मते विचार करण्याजोगी आहेत असे वाटते. शिंद्यांचे फडणीस चिंतो कृष्ण वळे ह्यांनी 'चिंतामण गोविंद' असे टोपणनाव घेऊन बखर रचली असावी असे फाळके म्हणतात. बखरीतील शिंद्यांबद्दलचा आदरभाव, होळकरांचा उपहास इत्यादी गोष्टी पाहता बखरकार शिंद्यांचा अभिमानी होता हे स्पष्टपणे जाणवते. अशा एखाद्या गृहस्थाने ही बखर लिहून काढली असे अनुमान केल्यास ते वस्तुस्थितीशी विसंगत ठरणार नाही.

ह्या संबंधात *भाऊसाहेबांच्या बखरी*चे एक साक्षेपी संपादक प्रा. भीमराव कुळकर्णी वेगळेच मत व्यक्त करतात. बखरकार हा शिंदेशाहीचा अभिमानी होता असा तर्क साने ह्यांनी केला तेव्हा पेशवे दप्तरातील निवडक कागद, *शिंदेशाहीच्या इतिहासाची साधने*, पुरंदरे दप्तर हे महत्त्वाचे अस्सल कागदपत्र उपलब्ध नव्हते. बखरकार हा शिंदेशाहीचा पक्षपाती म्हणण्यापेक्षा ऐतिहासिक घटनांची पूर्ण माहिती असणारा वा करून घेणारा जाणकार आहे. पानिपतची हकीकत लिहिताना त्या संदर्भात शिंद्यांच्या हालचालींना महत्त्व असल्याने तेवढ्याच तो वर्णन करतो. म्हणून ही 'शिंदेशाहीची बखर' नसून 'भाऊसाहेबांचीच बखर' होय असे प्रा. कुळकर्णी म्हणतात.

बखरीचा लेखक चांगला माहितगार व समकालीन असल्याने बखर बरीच विश्वसनीय ठरते. [ ➪ ३. ]

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** (संपा.) कुळकर्णी, भीमराव: प्रस्ता., भाऊसाहेबांची बखर ; पुणे, १९६५ ; पृ. १–३०.

**चिंतोराम** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – ध्रुवचरित्र; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ३३.

**० चित्रगुप्त** – पहा **रघुनाथ यादव चित्रे.**

**चिंदडगुरु / ० चिंदडसद्गुरु** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० चिंदडनाथ** – पहा **चिंदवडनाथ.**

**० चिंदडशंकर** – पहा **चिंदवडशंकर.**

**० चिंदडसद्गुरु** – पहा **चिंदडगुरु.**

**चिदंबर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – गोपीचंदाख्यान – पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० चिदंबरदास राजाराम** – पहा **राजाराम–१.**

**चिदंबर दीक्षित / चिदंबर स्वामी** – पहा **परिशिष्ट.**

**चिदंबरशिष्य** [का. अनु.] पदकार. ह्यांची स्फुट पदरचना उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४३).

**चिंदवडनाथ / ० चिंदडनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चिंदवडशंकर / ० चिंदडशंकर** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा मध्य] नाथपंथी कवी. तंजावरकडचे राहणारे. जातीने मराठा. मूळ नाव शंकर. चिंदवडनाथ हे ह्यांचे गुरू. हे चिंदवडनाथ व्यंकोजीपुत्र शहाजी (इ. स. १६८०–१७१०) ह्यांच्या कारकीर्दीत तंजावर येथे मठ करून होते. ह्यांच्या मठास 'मराठ्यांचा मठ' किंवा चिंदवडनाथाचे आंडनाव गरुड होते म्हणून 'गरुड मठ' किंवा मठाच्या रामदासी संप्रदायावरून 'राम मठ' असे म्हणतात. चिं. ग. कर्वे हे ह्यांची गुरुपरंपरा *स्वानंद-सिंधु* ह्या त्यांच्याच ग्रंथावरून पुढीलप्रमाणे देतात : आदिनाथ > उमानाथ > ब्रह्मनाथ > विष्णुनाथ > चौरंगी > गणपति > अवघट > जालंदर > गुलाब > गरीब > चिद्रूप > चिंदडनाथ चिदांबरी > विश्वनाथ > बालनाथ > शंकरानंद. डॉ. रा. ग. हर्षे ह्यांच्या मते, परंपरा लक्षात घेता, हे चिंदवडनाथांचे साक्षात शिष्य नसून त्यांच्या प्रशिष्याचे शिष्य असावेत असा बोध होतो. ह्यांचे शिष्य अवधूत व प्रशिष्य रामशंकर हेही कवित्व करीत (*माउली*, पुणे १; ४, भाद्रपद, श. १८७८).

चिंदवडशंकरांच्या रचनेत *गोरक्ष-दत्तात्रेय संवाद, मनाचे श्लोक, स्वानंद-सिंधु* ह्या ग्रंथांचा समावेश होतो. ही रचना श. १६७५–८० (इ. स. १७५३–५८) च्या दरम्यानची आहे. ह्यांच्या काव्यात व्यंकोजींची पट्टराणी दीपांबा हिची बऱ्याच प्रमाणावर प्रशस्ती आहे. तंजावरकडच्या युद्धप्रसंगांवरही ह्यांनी काव्यरचना केली आहे.

ह्यांची कविता कीर्तनोपयोगी असून ती रामदासी परंपरेतील दिसते. 'गुरुचा नफर मी नफर मी' हे पारंपरिक धाटणीचे चिंदवडशंकरांचे पद प्रसिद्ध आहे. "देह पंढरीचे पुरीं। विठो नाद तो श्रीहरी ॥ उन्मनी ते चंद्रभागा। नित्य वाहातसे गंगा ॥ बोध पुंडलीक भक्त। स्वयें नांदतो विरक्त ॥ नाथ चिंदड विठोबा। शंकर गगनाचा गाभा ॥" ह्यासारख्या रचनेत नाथपंथीयांचे संस्कार पदोपदी व्यक्त होतात. ह्या कवीने काही हिंदी पदरचनाही केली आहे.

**रचना : अमु.** – १. गोरक्ष-दत्तात्रेय संवाद; कडवी २३. २. मनाचे श्लोक; श्लो. सं. १२८; र. का.: 'चिंदडबाळ शंकरनाथ विरचिते संपूर्णमस्तु। इवनाम सवछर मागमास सष्टींचे दीवसी समाप्त' (ईव = युवा श. १६७७). ३. पारधीची कथा. ४. विंचवाचा मंत्र. ५. स्वानंदसिंधु; ओ. सं. १४१; रचना शक १६७९; सवामं. बा. १२२८. ६. ओव्या, अभंग, पदपदांतरे, श्लोक, हिंदी पदे इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; हस्त. सू., खं. १२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कर्वे, चिं. ग. : तंजावरकडील शिवकालीन कवी चिंदवडशंकर; भाइसंमंत्रै., व. २०, अं. १; पृ. २१-२५. २. ढेरे, रा. चिं. : चिंदवडशंकर; गोचप.; पुणे, १९५९; पृ. १८६–१८७.

**चिदानंद–१ / ० चिदानंदस्वामी** [अंदाजे श. १६३०–१७१० / इ. स. १७०८–१७८८] संतकवी. पूर्वाश्रमीचे नाव रुद्राजी बाळकृष्ण प्रभु मतकरी. कुडाळदेशस्थ गौड ब्राह्मण. गोत्र भारद्वाज. आईचे नाव रमाबाई. मूळ गाव आजगाव (सावंतवाडी). वयाच्या दहाव्या वर्षी ह्यांचे वडील निवर्तले. घरची गरिबी. घरात भाऊबंदकी सुरू झाल्याने तिला कंटाळून ह्यांची आई माहेरी वेतोरे ह्या गावी राहावयास गेली. तेथे राहात असता खडेसल नावाच्या जंगलात गुरे चारताना एका व्याघ्रासह एक तेजस्वी संन्यासी रुद्राजींच्या दृष्टीस पडले, व त्यांच्याकडून रुद्राजींनी ब्रह्मोपदेश घेतला. ह्या सिद्धपुरुषाने ह्यांचे नाव चिदानंद असे ठेवले. चिदानंदांवर अनुग्रह करणाऱ्या ह्या सिद्धपुरुषाचे नाव पूर्णानंद असे होते. त्यांच्या सांनिध्यात चिदानंदांनी उत्तर व दक्षिण भारतात बराच काळपर्यंत यात्रा केली व अध्यात्मविद्या संपादिली. पुढे पूर्णानंदांनी ह्यांना गृहस्थाश्रम स्वीकारावयास लावून कालांतराने संन्यासाश्रमाची दीक्षा देऊन दाभोली (वेंगुर्ल्याजीक) येथील त्यांच्या ज्ञातीच्या मठाचे अधिपती केले. चिदानंदांनी दिलेली त्यांची गुरुपरंपरा अशी आहे : चिदानंद (बैलूर मठ) > विमलानंद > विश्वानंद > पूर्णानंद > चिदानंद.

चिदानंद हे योगाभ्यासी व एकांतप्रिय असल्यामुळे वेंगुर्ले शहरापासून पाच-सहा मैलांवर असलेल्या बागलांची राई ह्या नावाच्या वनवेष्ठित स्थळी मठ बांधून राहू लागले. दाभोली मठात ते कार्यपरत्वे मधून मधून जात. ह्यांची भव्य समाधी बागलांची राई येथेच आहे.

चिदानंदांनी *योगरहस्य, देवी भागवत, ब्रह्मसूत्रावली* व *स्वानंदलहरी* असे टीकात्मक ग्रंथ रचले. काही स्फुट कविताही लिहिली. ह्यांपैकी पहिले तीन ग्रंथ आज उपलब्ध नाहीत. निपाणी येथील त्यांच्या काही शिष्यांच्या मठात ही ग्रंथसंपदा होती. पण ह्या मठास आग लागल्यामुळे ती नष्ट झाली. *स्वानंदलहरी* हा ग्रंथ बागलांची राई येथे

होता, तो तेवढा वाचला. *स्वानंदलहरी* ही संस्कृत *गुरुगीते*वरील एक हजार ओव्यांची टीका आहे. ही टीका स्वानुभवयुक्त व प्रासादिक अशी आहे.

लोकशिक्षणाच्या हेतूने चिदानंदांनी बरीच अध्यात्मपर गीते रचली. कोकणातील मराठे लोकांच्या लग्नकार्यात बायका एकत्र जमून *धाणा* व *आंबा* नावाची गाणी म्हणतात, तशा प्रकारची गूढार्थपूर्ण गाणीही त्यांनी रचली आहेत.

**रचना :** मु. – स्वानंदलहरी टीका; ओ. सं. १०००; ग्रंथसमाप्ती : १६७४, अंगिरा संवत्सर, पौषमासी, शुक्लपक्ष एकादशी, इंदुवार, दोन प्रहर माध्यान्ही झाली; संपा. रांगणेकर, आ. बा., १९११.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : चिदानंद-स्वामी; मकच., खं. ३; १९१४; पृ. १२७–१३६. २. श्रीमठ दाभोली येथील संस्थानचा संक्षिप्त इतिहास; १९१४; पृ. ४३–४९.

**चिदानंद–२** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चिदानंद–३** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – १. अध्यात्मविद्या – पद. २. गोपीप्रेम – पदे. ३. कृष्णाचा पाळणा. ४. स्फुट श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० चिदानंदस्वामी** – पहा **चिदानंद–१.**

**० चिदानंदानुचर** – पहा **अच्युताश्रम–२.**

**चिदानंदि** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – अभंग; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चिद्धन–१** [का. अनु.] पदकार.

**रचना :** मु. – फुगडी पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ६१. अमु. – अभंग, पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चिद्धन–२ / ० चिद्धनस्वामी चिद्धनानंद** [इ. स. चे १७ वे शतक] कवी. उद्धवस्वामींचे मामा व गुरु चिद्धनस्वामी ह्यांनी रचलेली एक भूपाळी मुद्रित (ज. र. आजगांवकर; मकच., खं. ३; पृ. १२६).

**० चिद्धनस्वामी चिद्धनानंद** – पहा **चिद्धन–२.**

**चिन्मय–१** [ का. अनु. ] पदकार.

**रचना :** अमु. – विश्वनाथाची आरती व पदे; तंसम., हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० चिन्मय–२** – पहा **चिन्मयदत्त.**

**चिन्मयदत्त / ० चिन्मय–२** [का. अनु.] कवी व टीकाकार. ह्यांनी *योगवासिष्ठा*वर ओवीबद्ध टीका लिहिली आहे. *योगवासिष्ठा*तील श्लोकांचा अभिप्राय व्यक्त करून सांगण्यात चिन्मयदत्तांनी अर्थाची सूक्ष्म चिकित्सा करण्याच्या भरीस न पडता भावार्थ सांगण्याच्या दृष्टीने आपली टीका लिहिली आहे. संपूर्ण *योगवासिष्ठा*चा म्हणजे ३२००० श्लोकांचा अभिप्राय एकंदर ९६ सर्गांत व अजमासे १९७६ ओव्यांत संक्षेपाने केला आहे.

ही टीका करताना *योगवासिष्ठा*च्या अर्थाचा सांगोपांग विचार केला आहे व तत्त्वविचाराची सांगड ज्ञानयोगाशी घालताना मुळात असलेल्या विषयांची हानी न होऊ देण्याची दक्षता बाळगली आहे, असे दिसून येते. वेदान्तासारखा सामान्य जनांस रूक्ष वाटणारा विषय अनेकविध कथानकांनी व कल्पनामय दृष्टान्तांनी चिन्मयदत्तांनी अत्यंत मनोरम करून ज्ञानमार्गाचा सुलभ उपाय महाराष्ट्रास सहजसाध्य करून दिला आहे. टीकेची हस्तलिखित प्रत समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथे आढळते (बा. १८१२). ग्रंथ अद्यापि अप्रकाशितच आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** परांजपे, य. वि. : योगवासिष्ठ आणि संतवाङ्मय; पुणे, १९५५, पृ. ३५५–५६.

**चिन्मयनन्दन** [का. अनु.] पदकार.

**रचना :** मु. – पदे; बा. दा. ओक संपादित पदसंग्रह, भा. २; मुंबई, १८९६; पृ. ७२–७५. अमु. – बोधपर, रामपर व ज्ञानपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चिन्मय नरहरी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**चिन्मय माधव** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चिन्मयसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**चिन्मयस्वामी** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना :** अमु. – सिद्धान्तकल्पलता ग्रंथ; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ३४.

**चिन्मयानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चिन्मयानंद स्वरूपानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**चिमणकवी** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. रामदासी परंपरेतील. परंड्याच्या (जि. उस्मानाबाद, मराठवाडा) हंसराजस्वामींचे शिष्य. हंसराजस्वामींनी आपल्या चिमणकवी व संजीवन ह्या दोन शिष्यांस आज्ञा करून आपल्या गुरुपरंपरेचा इतिहास लिहून ठेवण्यास सांगितले होते. त्याप्रमाणे त्यांनी *हंसपद्धती* हा ग्रंथ तयार केला. त्यात श्रीसमर्थ रामदासस्वामींपासून ते हंसराजांपर्यंत जे सात अधिकारी महापुरुष निर्माण झाले त्यांच्या चरित्राची माहिती येते. ग्रंथाच्या सातव्या अष्टकात हंसराजस्वामींचे चरित्र येते. प्रस्तुत ग्रंथ परंडा येथील हंसमंडळाने १९४३ मध्ये प्रसिद्ध केला आहे (कल्याण काळे : परंड्याचे हंसराजस्वामी; मराठवाडा संशो. मंडळ वार्षिक, १९७४; पृ. ४१).

**० चिमणा** – पहा **चिमनापंडित.**

**चिमनापंडित / ० चिमणा** [इ. स. १६५१ च्या नंतर] जैन कवी. हे पैठणचे राहणारे. गुरुपरंपरा : धर्मभूषण > अजितकीर्ती > चिमनापंडित. ह्यांचे गुरू अजितकीर्ती हे लातूर येथील भट्टारक पीठाचे पहिले अधिपती होते. तीर्थयात्रा व शास्त्राभ्यास ह्यांमुळे बहुश्रुत झालेला पंडित अशी ख्याती होऊनच ह्यांचे चिमनापंडित हे नाव पडले.

*अनंतव्रतकथा* हे आख्यानक काव्य आणि आरत्या, पदे, गीते अशी स्फुट स्वरूपाची रचना ह्यांनी केली आहे. ह्यांनी एकनाथांप्रमाणे भारूडसदृश रूपकात्मक रचना केल्या आणि शास्त्रीय संगीतातील रागदारीत बद्ध असलेली गीतेही रचली. ह्यांपैकी काही रचना डॉ. सुभाषचंद्र अक्कोळे ह्यांनी *मराठी संशोधन पत्रिके*च्या (ऑक्टो. १९७१) अंकात प्रसिद्ध केल्या आहेत.

**रचना :** मु. – १. छटी, झंपा, टिपरी, पिंगा, फुगडी, लयलाखोटा-खेल, ज्ञानचेंडुफली इत्यादी भारूडसदृश रचना. २. रागदारीतील गीते : १३; मसंप., ऑक्टो. १९७१; पृ. १९–२८. अमु. – १. अनंतव्रतकथा (५८ कडवी). २. तीर्थवंदना; श्लो. सं. ३६. ३. त्रिकाळतीर्थंकरपूजा; ४. मातेची सोळा स्वप्ने (६ कडवी). ५. मुनिसुव्रत विनंती. ६. आरत्या, उनावळीचे अभंग (२६४, अनुपलब्ध); पदे, पाळणा, स्तोत्रे इ.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अक्कोळे, सुभाषचंद्र : चिमनापंडितकृत काही रचना; मसंप., ऑक्टो. १९७१; पृ. १७–३०. २. चिमनापंडित; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ५४–६०.

**चिमा** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवयित्री. भारत इतिहास संशोधक मंडळातील एका बाडात चिमा ह्या नावावर लिहिलेले

काही अभंग आढळले. अभंगांतील भाषेवरून ही सतराव्या शतकातील रचना असावी असा अंदाज पां. मा. चांदोरकर करतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : भक्त चिमा; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. ४६–४७.

**चेटोहरदेव** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – गीतगोविंद ह्या काव्याचे प्राकृत समश्लोकी भाषांतर; पुणे, १८८८; दाते सू., पृ. ५७२.

**चैतन्य** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चैतन्यनाथ (तुकेशसुत)** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – स्वरूपविवरण; अध्यात्मपर ग्रंथ; गं. ना. मुजुमदार संग्रह; संककासू., पृ. ३४.

० **चैतन्यसिद्ध** – पहा **सिद्धचैतन्य.**

० **चैतन्यस्वामी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पांडवकथासार; वि. ल. भावेसंग्रह. २. पदे व अभंग; संककासू., पृ. ३४.

**चोखामेळा / ० चोखोबा** [ ? इ. स. १३३८] संतकवी. जातीने महार. महीपतींनी दिलेल्या माहितीप्रमाणे चोखोबा मूळचे पंढरपूरचे. *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांना पंढरपुरापासून दक्षिणेस १४ मैलांवर वसलेल्या मंगळवेढ्याचे समजतात. डॉ. आंबेडकरांच्या मते ते मूळ वऱ्हाड प्रांतातील असावेत. चोखोबांचे मेहुणे बंका ह्यांच्या एका अभंगावरून चोखोबांची गुरुपरंपरा सांगता येते ती अशी : आदिनाथ > मच्छिंद्रनाथ > गोरक्षनाथ > गहिनीनाथ > निवृत्तिनाथ > ज्ञानदेव > विसोबा खेचर > नामदेव > चोखामेळा.

चोखामेळ्यांचे संपूर्ण कुटुंब भगवद्भक्त होते. पंढरपुरांतील मेहूणपुरीस राहणारी त्यांची बहीण निर्मळा, पत्नी सोयराबाई, तिचा भाऊ बंका, मुलगा कर्ममेळा ही सर्व विठ्ठलाची उपासना करीत. देवळात जाऊन पांडुरंगाचे दर्शन घेता येत नाही ह्या अस्पृश्यांवरील अन्यायाची बोच ह्यांच्या पुढील अभंगात व्यक्त होते : 'हीन याती माझी देवा । कैसी घडे तुझी सेवा ॥ मज दूर दूर हो म्हणती । तुज भेटू कवण्या रीति ॥ ' चोखामेळ्यांच्या अनेक अभंगांत उपेक्षितांचे हे दुःख जाणवते आणि म्हणूनच 'ऊस डोंगा परी रस नव्हे डोंगा । काय भुललासी वरलीया रंगा ॥ ' असे परखड उद्गार ह्यांच्या मुखातून निघून जातात. पांडुरंगाच्या गळ्यातील हार चोखोबांनी नेला असा आरोप करून पंढरपूरच्या बडव्यांनी ह्यांना मारहाण केली, ह्या प्रसंगाचा उल्लेख करून त्यांनी पांडुरंगास आर्ततेने हाक मारली आहे. 'धांव घाली विठु आतां चालू नको मंद । बडवे मज मारिती ऐसा कांहीं तरी अपराध ॥ ' 'या महाराने देव बाटविला', असाही आरोप ब्राह्मणवर्गाने ह्यांच्यावर केला होता.

चोखोबांना नामदेवांकडून अद्वैताचा बोध झाला. त्यानंतर " मुळींच सोंवळा कोठें तो वोवळा । पाहतां पाहाणें डोळा जयापरी ॥ सोंवळयांचे ठायी सोंवळा आहे । वोवळ्याच्या ठाईं वोवळा कां न राहे ॥ चोखा म्हणे देव दोहींच्या वेगळा । तोचि म्यां देखिला दृष्टीभरी ॥ " अशी जाणीव चोखोबांची वाणी सहज प्रकट करू लागली.

चोखोबांच्या अभंगात भक्तहृदयातील कारुण्य आहे, आर्तता आहे, उत्कटतेचे सामर्थ्य आहे; त्यांची रचना प्रासादिक असून तिजमध्ये संतधर्माचे सार ओतप्रोत भरलेले आहे. सारीच अभंगरचना प्रवाही व चैतन्यमय आहे. त्यातील उदात्त विचार आणि भाषाप्रभुत्व ही आश्चर्यकारक आहेत. 'श्रीमुख चांगलें कांसे पीतांबर । वैजयंती हार रुळे कंठीं ॥ १ ॥ तो माझा जीवींचा जिवलग सांवळा । भेटवा हो डोळां संतजन ॥ २ ॥ ' अशी चित्रोपम देखणी रचना चोखोबा करतात. काही ठिकाणी तुकाराम, रामदास ह्या उत्तरकालीन लोकप्रिय कवींच्या रचनांची आठवण व्हावी असे अभंग त्यांनी रचले आहेत. 'जोहार' हा तर त्यांच्या रचनेचा एक खास विशेष आहे. चोखोबांच्या कवितेचे सारसर्वस्व ह्या जोहारात पाहून घ्यावे. एकनाथांच्या भारुडांचा हा एकपरीने पूर्वावतार वाटतो. चोखोबांच्या जोहारात वास्तवता आणि प्रतीकात्मकता प्रतिमारूपाने प्रकट होते. जुन्या मराठी कवितेचा हा एक मौलिक असा ठेवा आहे (आलो., डिसें. १९७०, पृ. २७–२८). हीन म्हणून समजल्या गेलेल्या जातीत जन्मलेला एक सामान्य मनुष्य प्रगाढ भक्तिसाधनेच्या द्वारा परमोच्च अशा द्वंद्वातीत अवस्थेप्रत कसा पोचू शकतो ह्याचा आलेख चोखोबांच्या अभंगात पाहावयास मिळतो.

**रचना : मु.** – अभंग; ३४९; श्रीसंत चोखामेळा महाराज यांचे चरित्र व अभंगगाथा; संपा. कदम, स. भा.; मुंबई, १९६९ (प्रथम मुद्रण आवटे गाथा, पुणे, १९२३); **अमु.** – पदपदांतरे; विवेकदर्पण प्रकरण; तंसम., सवामं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : चोखामेळा; प्रामसंक., खं. १; पुणे, १९५७; पृ. १९५–२११. २. करंदीकर, ना. स. : संत चोखामेळा; स्वराज्य; ३–५–१९६९; पृ. १३. ३. ग्रामोपाध्ये, गं. ब. : चोखामेळा; संकास.; पुणे, १९३९; पृ. ११०–१४४. ४. सरदार, गं. बा. : चोखामेळा संत भला; डॉ. कोलते गौरव ग्रंथ; १९६९; पृ. ७६–८९.

० **चोख्याची महारी** – पहा **सोयराबाई.**

**चोंभा** [अंदाजे इ. स. १४००–१५००] वैष्णवपंथी कवी. रंगनाथस्वामी निगडीकर, रमावल्लभदास आणि शेख महंमद वगैरे कवींनी *संतनामावळीत* ह्या कवीला नमन केले आहे. ह्या कवीचे *उखाहरण* नावाचे काव्य समर्थभक्त शं. श्री. देव ह्यांना नगर जिल्ह्यातील तिसगावच्या दिनकर रामदासी ह्यांच्या मठात उपलब्ध झाले आहे. पोथी संपूर्ण नसून त्रुटित आहे. ह्याच प्रतीचे संपादन वि. का. राजवाडे ह्यांनी केले आहे. हा ग्रंथ ओवीबद्ध असून अंदाजे अडीच हजार ओव्यांचा तरी असावा. त्यातील फक्त चौथा भागच आज उपलब्ध झाला आहे, असे मत राजवाडे ह्यांनी व्यक्त केले आहे. ह्या काव्यातील ओवीच्या पहिल्या, दुसऱ्या व चौथ्या चरणाच्या शेवटी यमक येते व तिसरा चरण निर्यमक असतो. तसेच चौथा चरण तोकडा नसून पूर्ण लांबीचा आहे. उदा., 'गीताचेन नादें । चरों वीसरलीं स्वापदें । हरणीं वोडवीले कर्ण । तीथें राहोलीं नादबोधें ॥ " ओव्यांच्या अनेक प्रकारांपैकी जात्यावरील ओवीत अशी रचना प्रामुख्याने दिसते. त्यामुळे चोंभा कवीचे *उखाहरण* काव्य हे एक प्रकारचे स्त्रीगीत आहे असे य. ग. फफे ह्यांनी म्हटले आहे (भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४, पृ. १४). वि. का. राजवाडे म्हणतात त्याप्रमाणे ही रचना विचित्र नसून अगदी नियमबद्ध अशी आहे.

बाणासुराची कन्या उषा आणि श्रीकृष्णाचा नातू अनिरुद्ध ह्यांची प्रणयकथा ह्या काव्यात वर्णन केली आहे. हे आख्यान *भागवत दशम स्कंध* (अ. ६२–६३) व *हरिवंश* ह्यांवर आधारित असून त्यात शृंगार, वीर आणि करुण रसांचा उत्कर्ष साधला आहे. कथेतील अध्यात्माचा धागा सुटू न देता चोंभा कवीने हे सर्व साधले आहे. [ ⇨ ३.].

कवीची भाषा शुद्ध मराठी आहे. फारसी भाषेचा तिच्यावर यत्किंचितही परिणाम झालेला नाही. 'पोवाडे', 'कोमाइला,' 'दळवाडे', 'झळंबले', 'निसाणा घावो दिधला', असे यादवकाळांत प्रचारात असलेले शब्द व वाक्प्रयोग ह्या काव्यात विपुलतेने आढळतात. महाराष्ट्री व अपभ्रंश प्राकृत ह्यांतील शेकडो शब्दांची रूपेही तेथे आढळतात. ज्ञानेश्वर-नामदेवांच्या नंतर एकनाथांपर्यंतच्या दीर्घ काल-

खंडातील भाषेचा एक दुवा ह्या काव्याच्या रूपाने सापडला आहे.

**रचना : मु.** – उखाहरण / श्री चोंभाकृत उषाहरण ; ओवीबद्ध; त्रुटित, ओव्या ५७५; र. का. : इ. स. १३७८ चा सुमार; संपा. राजवाडे, वि. का.; भाइसंमंइति., श. १८३३ ; पृ. १–५४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देव, शं. श्री. : चोंभाकवि व संत; भाइसंमंइति; श. १८३५; पृ. १००–१०१. २. देशपांडे, ज. शा. : चोंभा कवीचे उषाहरण; मसाप., ३४, १३७; जून १९६१; पृ. १६. ३. फफे, य. ग. : चोंभा कवीचे उषाहरण; भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४ ; पृ. ११–३६.

**चोरु मागा** [का. अनु.] महानुभाव आरतीकार.

**रचना : अमु.** – १. नामहंसाची आरती. २. दत्ताची आरती.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : चोरु मागाकृत नामहंसाची आरती; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. १०८.

**छत्रपति प्रतापसिंह भोसले (सातारकर)** [इ. स. १७९२–१८४७] बखरकार. साताऱ्याच्या छत्रपती घराण्यातील धाकव्या शाहूचे वडील पुत्र. ह्यांनी रावबाजीविरुद्ध इंग्रजांची मदत मागितली व ती एल्फिन्स्टनसाहेबाने आनंदाने दिली. अष्टी येथे इंग्रजांची व पेशव्यांची लढाई झाली. इंग्रजांनी सातारा घेतले व पुढील जाहीरनामा काढला : "बाजीराव राज्याचे उपयोगी नाहीत. थोडके दिवसात त्यांचा ठिकाणा नाही असे होऊन छत्रपति सातारकर, बाजीरावसाहेब यांचे कैदेत आहेत त्यांस सोडवून त्यांचे राज्य त्यांजकडे चालेल. ते दौलतीचे खावंद मुखत्यार आहेत. जो मुलूख महाराजाकडे होईल त्यात न्याय इन्साफ, हुकमत व अंमल करतील. गेले ते राज्य पेशव्यांचे, महाराजांचे राज्य अबाधितच आहे." ह्यानुसार १२ लक्षांचा मुलूख व १४ पेव्यांचे जहागिरदार प्रतापसिंह झाले. प्रतापसिंहांनी साताऱ्यास इ. स. १८२२ साली एक नवीन राजवाडा बांधला व युवतेश्वराहून नळ आणून सातारा शहरात पाणी खेळविले.

पुढे इंग्रज आपल्याला निर्माल्यवत मानतात हे प्रतापसिंहांच्या लक्षात आले व त्यांनी त्यांजविरुद्ध खटपटी सुरू केल्या. इंग्रजांनी ह्यांस पदच्युत करून, प्रथम निंवास व नंतर कराचीस नेऊन ठेवले. तेथेच हालअपेष्टेत ह्यांना मृत्यू आला.

प्रतापसिंह महाराजांनी रेसिडेंट जनरल ब्रिग्ज ह्यांच्या माहितीकरिता इ. स. १८२७ च्या सुमारास सातारा जिल्ह्यातील जहागिरदार, प्रमुख सरदार व थोर लोक ह्यांच्या घराण्यांची संक्षिप्त हकीकत तयार केली. ह्या बखरीस महाराष्ट्र मंडळाची बखर असे नाव *भारतवर्ष*कारांनी दिले. बखरीतील कित्येक प्रख्यात घराण्यांच्या हकीकतीचे बंद आज गहाळ झाले आहेत. मुसलमानी अंमल, साताऱ्च्या छत्रपतींचा अमल, आणि पेशव्यांचा अमल ह्यांत उदयास आलेल्या घराण्यांचा इतिहास वाचकांना ह्या बखरीच्या आधारे समजतो.

**रचना : मु.** – महाराष्ट्र मंडळाची बखर; संपा. पारसनीस, द. ब.; र. का. : इ. स. १८२७ सुमारे; भारतवर्ष, मे १८९९; पृ. १–१६.

**० छत्रे, सदाशिव काशिनाथ** – पहा **सदाशिव काशिनाथ छत्रे.**

**छबील** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – भक्तिपर पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**जक्कप्पय्या** [अंदाजे इ. स. १६५३ / इ. स. १७३१] ज्ञानेश्वर परंपरेतील कानडी संतकवी. वडिलांचे नाव भीमाशंकर. मातेचे नाव गिरिजाबाई. हे घराणे ऋग्वेदी देशस्थ स्मार्त. गोत्र विश्वामित्र. कुलदेवता बदामीची बनशंकरी. कुलदेव सिंदगीचा संगमेश्वर. सिंदगीचे कुळकर्णीपण ह्यांच्या घराण्याकडे होते. वडीलच ह्यांचे पारमार्थिक गुरू होते. जक्कप्पय्यांची आध्यात्मिक प्रगती पाहून भीमाशंकरांनी स्वतः समाधी घेण्यापूर्वी ह्यांना श. १६५३ (इ. स. १७३१) मध्ये आश्विन पौर्णिमेस पीठावर बसविले. भीमाशंकरांचा मठ व त्यांची शिष्यपरंपरा ही ज्ञानदेवांच्या नाथसंप्रदायापैकी आहे. परंपरा पुढीलप्रमाणे : निवृत्ति > ज्ञानदेव > सोपान > मुकुंदनाथ > अलक्ष्यनाथ > अचिंत्यनाथ > अव्यक्तनाथ > भिक्षुकनाथ > रामनाथ > सद्गुरुनाथ (गुरुपैय्या) > भीमाशंकर > जक्कप्पय्या. गुरुपैय्यांचे गुरू रामनाथ तथा बसवेश्वर हे *ज्ञानेश्वरी*चे निरूपण करीत असत.

'भीमाशंकर व जक्कप्पय्या यांनी कानडीप्रमाणेच मराठीतही पद्यरचना केली आहे.' अशी माहिती ना. ब. जोशी देतात (*इंद्रायणी*, एप्रि. १९६३, पृ. २७). "आदिगुरु आदिनाथ मूल संतती" ही भीमाशंकर विरचित सिंदगी येथील मठात नित्य म्हटली जाणारी परंपरेची आरती जक्कप्पय्यांनी रचली असावी असे ना. ब. जोशी ह्यांना वाटते. त्यांच्या मते त्या आरतीत सद्गुरुनाथांच्या नंतर श्रीगुरुनाथांचा उल्लेख येतो. श्रीगुरुनाथ म्हणजे भीमाशंकर. ते स्वतःच स्वतःला ओवाळून घेतील हे योग्य वाटत नाही. तेव्हा ही आरती जक्कप्पय्यांनी रचलेली असावी. 'भीमाशंकर' ही नाममुद्रा भीमाशंकरांप्रमाणे जक्कप्पय्यांचीही होती व जक्कप्पयांनीही बरीच पद्यरचना केली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, ना. ब. : विजापूर जिल्ह्यातील एक ज्ञानेश्वर परंपरा; इंद्रायणी, एप्रि. १९६३; पृ. २७–३१. २. जोशी, ना. ब. : ज्ञानेश्वर परंपरेतील कानडी संत भीमाशंकर; इंद्रायणी, जून १९६३; पृ. ५१–५६.

**जगजीवन–१** [का. अनु.] कवी. अश्वमेधावर ज्या अनेक कवींच्या रचना सापडतात त्यांपैकी जगजीवन हा एक रचनाकार असल्याचा उल्लेख *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी केला आहे (मसा., आ. ५; पृ. १८७, टीप).

**जगजीवन–२** [का. अनु.] कवी. मोरोपंतसमकालीन. मोरोपंतांच्या आर्यांचे अनुकरण करून त्यांच्या पश्चात ज्या अनेक कवींनी रचना केली, त्यांपैकी हे एक (मसा., आ. ५, पृ. ५३८).

**जगजीवन–३** [अंदाजे श. १६३७/ इ. स. १७१५] कवी. औरंगाबादजवळील राजपूर येथील राहणारे. गुरू : परमानंद. नागपूर विद्यापीठ (हस्त.) संग्रहात महालिंगदास, नाभा गोपाळ व जगजीवन अशा तीन कवींनी *सिंहासनबत्तिशी*चे केलेले स्वैरानुवाद सापडतात. ह्यांपैकी जगजीवनांच्या पोथीच्या शेवटी "सके १६६१ सीध्धार्थ नामं संवत्सरे : उत्तरायणे चैत्रं शुद्ध द्वादसी" असा शकोल्लेख व प्रतलेखक म्हणून माहादाजी सोयेरदेव ह्याचे नाव येते. ग्रंथाच्या ३२ पुतळ्या व ३८८५ ओव्या आहेत. *सिंहासनबत्तिशी* किंवा बत्तीस पुतळ्यांच्या गोष्टी ह्या महाराष्ट्रात फार पूर्वीपासून प्रसिद्ध आहेत. त्यांचा विक्रमराजाशी संबंध येत असल्याने त्यांचे *विक्रमबत्तिशी* असेही नाव रूढ झालेले दिसते. कवी जगजीवनाने विक्रमराजाच्या पूर्वजन्माचा इतिहास विस्ताराने सांगितला आहे. ह्याची भाषा आलंकारिक आणि वर्णने स्वाभाविक व मार्मिक आहेत. *सिंहासनबत्तिशी*तील इतर पोथ्यांप्रमाणे संस्कृत श्लोक वा सुभाषिते ह्यांचा वापर तो करीत नाही. ह्या ग्रंथाशिवाय *रामायण*, *श्रीपानस्नानसंज्ञा*, *ज्ञानमूळ*, *ज्ञानगीता*, *नरबोध*, स्फुट पदे अशी इतर रचनाही ह्याच्या नावावर गो. का. चांदोरकर ह्यांनी दिली आहे. ह्यांपैकी काही रचना शं. श्री. देव ह्यांच्या संग्रही असल्याचे नमूद केले आहे (संककासू., पृ. ३५).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चौधरी, पुष्पा वा. : सिंहासनबत्तिशी : काही स्वैरानुवाद : साम्य-भेद-वैशिष्ट्ये; विसंमंवा.; नागपूर, १९६६; पृ. ११६–१३५.

**जगजीवनात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – 'नमः श्रीपदारविंदा' – कटाव; वा. दा. ओक संपादित पदसंग्रह, भा. ३; मुंबई, १९०१; पृ. १४१. **अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ३६.

**जगज्जीवन** / ० **जगज्जीवन श्रीप्रभु** / ० **जगन्नाथ–३ (रामदासी)** ० **जगन्नाथ बावा** / ० **जगन्नाथ महाराज** [ ? – समा. श. १६७०, पौष व. २ / इ. स. १७४८] कवी. कल्याणस्वामींच्या प्रमुख शिष्यांपैकी एक. मूळ नाव जगन्नाथ. सातारा जिल्ह्यातील निनाम गावच्या कुळकर्ण्यांच्या वंशात जन्म. बालवयातच हे समर्थांच्या आश्रयास आले. समर्थांनी कल्याणांकरवी ह्यांना मंत्रोपदेश दिला. ग्रंथावलोकन, ग्रंथाभ्यास व गुरुसेवा अशा खडतर तपस्येचे व्रत ह्यांनी चाफळास अंगिकारले. कल्याणस्वामींच्या प्रेरणेवरून हे पुढे बार्शी परिसरातील तडवळे ग्रामी आले व तेथें त्यांनी मठस्थापना करून शिष्यपरंपरा वाढविली. ही परंपरा अशी : रामदास > श्रीकल्याण > जगन्नाथ > गजानन > रंगनाथ ऊर्फ तात्याबा > सखाराम > दत्तात्रय > कल्याण. तडवळे गावीच त्यांनी समाधी घेतली.

जगज्जीवनांची काव्यरचना प्रचंड असून ती समर्थसंप्रदायात मान्यता पावली आहे. हे स्वतः उत्तम कीर्तने करीत असत. रामचरित्रातल्या अनेक कथा त्यांनी रामजन्मोत्सवात कीर्तन करण्यासाठी रचल्या. ह्यांची रामायणातील स्फुट प्रकरणे, पौराणिक कथा व आख्याने ही रचना त्या काळात फार लोकप्रिय होती. *दासबोधा*च्या शेवटी श्रीसमर्थांचा म्हणून जो धावा दिला आहे, तो ह्यांचाच होय. ह्यांची एकंदर ग्रंथसंख्या अंदाजे ३००० च्या वर असून हे सारे काव्य कीर्तनासाठी निर्माण झालेले असल्याने त्यात छंद व वृत्ते ह्यांची विविधता दिसून येते. रचनेची धाटणी रामदासी पद्धतीची व रसपूर्ण अशी आहे. ह्या रचनेपैकी बहुतांश रचना अद्याप अप्रकाशित आहे.

**रचना : मु.** – १. रामदासजन्मकथा प्रकरण : श्लोक, पदे, ओव्या, सवाया; श्री रामदासीग्रंथमाला १५ : ४७; पृ. २८२–२८८. २. रामपर २ पदे; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४०. **अमु.** – १ उत्तरकांड. २. उपमन्यु आख्यान. ३. कथा सावजाची. ४. कल्याणनमन. ५. कुंभकर्णवध; प्रसं. ३; ओ. सं. १८१. ६. कौसल्येचे लग्न. ७. कौसल्येच्या डोहळ्याची कथा. ८. खंडेरावाची आदि. ९. गणपति-आख्यान; ओ. सं. ६०. १०. गोहकाख्यान. ११. जटायु-आख्यान. १२. जयद्रथवध. १३. जांभूळ-आख्यान. १४. ध्रुवाख्यान; ओ. सं. ६४. १५. बलरामदशरथसंवाद – नवकथा. १६. पेटीची कथा. १७. बालकांड; त्रुटित; ७५ ते १८६ ओव्या. १८. भीमजन्मकाळ; ओ. सं. ३२. १९. मंदोदरी-आदि. २०. माधवदास व गिरिधरलाल यांची कथा. २१. मोरेश्वराख्यान. २२. रामकथा; प्रसंग १–३; ओ. सं. १६४. २३. रामचरित्र. २४. रामनवमीच्या कथा. २५. रामायण; श्लो. सं. ५२. २६. रामेश्वरकथा. २७. रावणमृत्युकथा. २८. शतमुखरावणवध; ओ. सं. १६४. २९. श्रीरामअंजनीसंवाद; ओ. सं. १६४. ३०. श्रीराम समर्थ डोहळे. ३१. सवाया : ६०. ३२. साधू महिमा; ४० ते ९५ ओव्या. ३३. सीतात्रिजटासंवाद. ३४. सीताबिभीषणसंवाद; प्रसंग १–३; ओ. सं. १७१. ३५. सुग्रीवकुंभकर्णसंवाद; प्रसंग १–३; ओ. सं. १८१. ३६. सुग्रीवे कुंभकर्ण श्रोत्रहीन केला ते कथा. ३७. हयग्रीवाख्यान. ३८. हरिश्चंद्राख्यान; ओ. सं. २३०. ३९. पदपदांतरे व अभंग; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** दंडवते, गो. हे. : गुरुस्वरूप जगज्जीवन; सज्जनगड, जाने. १९६८; पृ. ५–८.

**जगज्जीवन केशवचैतन्य** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

० **जगज्जीवन श्रीप्रभु** – पहा **जगज्जीवन.**

**जगदीश** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – १. पंचसमासी / पंचीकरण; र. श. १७४० / इ. स. १८१८; गो. का. चांदोरकर संग्रह. २. गोपीचंदाख्यान (गुजराती); संककासू., पृ. ३६.

**जगन्नाथ–१** [का. अनु.] कवी. जातीचे कोष्टी. हे मध्यप्रांतातील वर्धा जिल्ह्यातील पालकवाडी येथे राहणारे होते. लावणी छंदात ह्यांनी संपूर्ण महाभारत रचले आहे. श्रीधरांचा *रामविजय* पाहून कवीला काव्यरचनेची स्फूर्ती झाली असे कवी स्वतःच सांगतो. ह्यांचे *मारुतिजननवर्णन* (श्लो. १४) *काव्यसंग्रहा*त छापले आहे (कासं., क्र. १२०, पृ. ६८–७०). ह्यांनी रचलेल्या *द्रोणपर्वा*चे दोन चौक *काव्यसंग्रह*कारांच्या संग्रही असल्याचे ते लिहितात (संककासू., पृ. ३६).

**जगन्नाथ–२** [अंदाजे इ. स. १७४७] कवी व टीकाग्रंथकार. गुरू : ऋषीश्वर. *अखंड सहजावस्था* ह्या ग्रंथात कवीने त्यांचा उल्लेख केला आहे. उदा., "ऐसें दुर्लभ अखंडानंद । जें दर्शनें करी निर्द्वंद्व । जो जगन्नाथाचा गुरु विशद । ऋषीश्वर नाम ज्याचें ॥"

जगन्नाथ कवी हे त्यांच्या *शशिसेनाख्यान* ह्या रचनेमुळे अधिक प्रसिद्धीस आले आहेत. ह्या प्रदीर्घ काव्यात राजकन्या व प्रधानपुत्र ह्यांच्या विवाहाची रम्य कथा आहे. शशिसेना काव्याचे कथानक आधारित नसून ते कवीने स्वकल्पनेने रचलेले आहे. त्या कालखंडातील हल्ली उपलब्ध असलेली स्वतंत्र कथानक कल्पून केलेली रचना म्हणून ह्या कवीचे व त्याच्या काव्याचे महत्त्व मोठे आहे. [ ⇨ ३. ] ह्या काव्याखेरीज वेदान्तविषयावरील *बोधवैभव*, *ज्ञानबत्तिशी*, *वाक्यसुधे*वरील व *भगवद्गीते*वरील टीका, *सहजावस्था*, *महावाक्यभाष्यार्थ*, *तत्त्वविवेक* असे अनेक ग्रंथ ह्यांनी रचले आहेत.

**रचना : मु.** – बोधवैभव; र. का. : श. १६६९ (इ. स. १७४७); श्लो. सं. ३७८; महा. कवि., क्र. ५१ (श. १८२९, आश्विन); पृ. १–२४. **अमु.** – १. तत्त्वविवेक. २. दृक्‌दृश्यविवेक. ३. पंचदशी-आख्यान. ४. भगवद्गीता टीका (समश्लोकी); र. का. : श. १६७३ (इ. स. १७५१). ५. महावाक्यभाष्यार्थ (गद्यपद्य); भाइसंमं. ६. वाक्यसुधाटीका. ७. शशिसेना काव्य; श्लो. सं. ५८१. ८. श्रुत्युपदेश. ९. साम्राज्यपद व अखंड सहजावस्था; मसंमं. १०. ज्ञानबत्तिशी; मसंमं.; संककासू., पृ. ३६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पोतदार, द. वा. : जगन्नाथकृत महावाक्यभाष्यार्थ : गद्यपद्य; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. २.

० **जगन्नाथ–३ (रामदासी)** – पहा **जगज्जीवन.**

**(शिव) जगन्नाथ–४** [इ. स. १७७९ – ?] कवी. सोलापूर जिल्ह्यातील करमाळ्याच्या निंबाजी व्यंकटेश नामक वसिष्ठगोत्री वैष्णव ब्राह्मणाचा मुलगा. नातेपुते येथील सत्पुरुष चिन्मयस्वामी ह्यांचा अनुग्रह कवीने वयाच्या पंधराव्या वर्षी घेतला व ते समाधिस्थ होईपर्यंत (इ. स. १८०६) त्याने त्यांची सेवा केली.

कवीच्या *श्रीगुरुचिन्मयमाहात्म्य*, *भक्तिपंथ* (इ. स. १८१३), *रामनामामृत* (इ. स. १८१८) व *नारायणामृत* (इ. स. १८१९) अशा चार ग्रंथांच्या हस्त. प्रती श्री ग. वा. तगारे ह्यांस भोर येथील फडणीसांकडे मिळाल्या. त्यांपैकी *चिन्मयमाहात्म्य* हा संस्कृत ग्रंथ असून बाकीचे मराठी आहेत. कवीने *गुरुमाहात्म्य*, *हरिहरविलास*, *हनुमंतविजय* इत्यादी ग्रंथ लिहिल्याची माहितीही डॉ. तगारे देतात. एकूण ग्रंथरचना बरीच सरस आहे. ग्रंथात ठिकठिकाणी उपनिषदे, गीता, पुराणे ह्यांतील अवतरणे देऊन विवरण नीट केलेले आहे. भाषा प्रौढ, दृष्टान्तप्रयुक्त पण सोपी आहे. परंपरेने चालत आलेला भक्तिमार्ग व नाममाहात्म्य ह्यांचाच पुरस्कार कवीने केला आहे (ग. वा. तगारे; एक अज्ञात कवि; सह्याद्रि, मे १९४६; पृ. ३७९).

**जगन्नाथ कवी** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. तंजावरच्या प्रतापसिंह नृपतीचा आश्रित. विश्वामित्रगोत्री ब्राह्मण.

कविरचित *शंकरचंपूविलास* (इ. स. १७५७) ह्या चंपूकाव्याची प्रत प. कृ. गोडे ह्यांस पेशवे दप्तराच्या विश्रामबाग संग्रहात उपलब्ध झाली.

हे काव्य त्याने नानासाहेब पेशव्यांच्या आज्ञेवरून लिहिले, असे दिसते. पेशवे दप्तरावरून ज्याची माहिती मिळाली त्या जगन्नाथ कवीचा *आत्मबोधविवरण* असा एक ग्रंथ तंजावर येथील हस्तलिखित संग्रहात आढळतो. कारण ह्या *आत्मबोधविवरण* ग्रंथाच्या अखेरीस ' विश्वामित्रगोत्र संभवे ' असा कवीने स्वतःचा निर्देश केला आहे.

**रचना : अमु.** – १. आत्मबोधविवरण; ग्रं. सं. २५०; तंसम. बा. ५६ ते ६१. २. शंकरचंपूविलास; र. का. : इ. स. १७५७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** गोडे, प. कृ. : नोट्स ऑन द पोएट्स ऑफ द पेशवे पिरियड; भाइसमंत्रै., व. १८, अं. २; पृ. ४६–४९.

**जगन्नाथ पंडित** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – आत्मविचार; प्र. ले. का. : श. १७५३, खर, भाद्रपद शु. ५, रवि. / इ. स. १८३१; भाइसमं. हस्त.सू., पृ. ६३.

**० जगन्नाथबावा** – पहा **जगज्जीवन.**

**जगन्नाथ बाळकृष्ण उगाऊकर / ० उगाऊकर, जगन्नाथ बाळकृष्ण** [अंदाजे श. १६६९ / इ. स. १७४७] कोशकार. *ज्ञानेश्वरी-टिपण* (ज्ञानेश्वरीचा प्राचीन शब्दकोश) ह्या ग्रंथाचा कर्ता. ग्रंथाच्या अखेरीला " तैं हे ज्ञानेश्वरी शब्दाचें विवरण ॥ उगाऊकर जगन्नाथ बाळकृष्ण ॥ केलें यथामति ॥" असा निर्देश सोडल्यास पोथीत अन्यत्र कोशकारासंबंधी कोणतीच माहिती दिलेली नाही. लेखनकाल ' शके सोळाशेंसत्तर येक उणे ' असा कोशकाराने दिला आहे.

प्रस्तुत कोशाच्या हस्तलिखित प्रती तंजावर, धुळे, विजापूर येथून उपलब्ध झाल्या असून ह्या सर्व प्रतींचा तौलनिक अभ्यास करून ह्या टिपणाची एक पाठचिकित्सायुक्त अशी आवृत्ती मु. श्री. कानडे व सु. बा. कुळकर्णी ह्यांनी संपादित केली आहे (पुणे, १९६८).

*ज्ञानेश्वरी-टिपण* ह्या कोशातील शब्द अकारविल्हे दिले असून त्यात अध्यायांचा अनुक्रम सांभाळलेला आहे. ओवीच्या आकड्यांचाही निर्देश कोशकार करतो. शब्दांच्या सुबोध अर्थाबरोबर *ज्ञानेश्वरी*च्या संदर्भात त्या शब्दाचा अर्थ कोणता हे सांगितल्यानंतर त्या शब्दाचे आणखी कोणते अर्थ होऊ शकतात हेही तो सांगतो.

संस्कृतातील कोशरचनेचा ग्रंथकारावरील प्रभाव कित्येक ठिकाणी जाणवतो. काही शब्दांचे अर्थ तो मराठीपेक्षा दुर्बोध अशा समासप्रचुर संस्कृत शब्दांत देतो. उदा., अव्यंग ॥ अन्यून ॥ ८.९० ॥; खोडें ॥ काष्ठशृंखळा ॥ १८.८९७ ॥ किंवा निराळा ॥ अवाग्विषय ॥ ५.१४१ ॥ संस्कृतात मूळ शब्द संदिग्ध असेल तेव्हा त्याला पूरक असलेला शब्द पुढे ठेवून, अर्थपूर्ण करण्यासाठी ' इतिशेष ' असे शब्द योजतात. कोशकाराने सात वेळा ह्याप्रमाणे अर्थ दिला आहे. ' काकु ' ह्या संस्कृतातील आलंकारिक संज्ञेचा जगन्नाथाने ४६ ठिकाणी उपयोग केला आहे. काही ठिकाणी सहज समजण्याजोग्या साध्या शब्दांचे अर्थही कोशकार अकारण विद्वत्तापूर्ण संस्कृतात देतो.

*ज्ञानेश्वरी*तील काव्यगत न्याय कोशकार समजावून सांगतो. शब्दांचे अर्थ अधिक सुलभ करण्याच्या प्रयत्नात आवश्यक तेथे इतर तपशीलही ग्रंथकाराने दिला आहे. उदा., तत्त्वज्ञानविषयक तपशील, रूपकाचा उलगडा करणे, आशय समजावून सांगणे किंवा वैशिष्ट्यपूर्ण नवे अर्थ सांगणे, इ. काही ठिकाणी दुर्बोध शब्दांची नोंद केली आहे, पण अर्थ द्यायचे राहून गेले आहेत.

रामकवीकृत (अंदाजे इ. स. १८ व्या शतकाची अखेर) *भाषाप्रकाश* ह्या शब्दकोशाच्या ' नानार्थवर्गा 'तील शब्दांची ह्या टिपणातील त्याच तऱ्हेच्या शब्दांशी तुलना केल्यास आश्चर्यकारक असे साम्य जाणवते. ह्या टिपणाकरिता कोशकाराने *ज्ञानेश्वरी*ची कोणती प्रत समोर ठेवली होती ह्याची निश्चिती करणे कठीण आहे. पण ओवीसंख्या व शब्दांची रूपे ह्यांवरून ती एकनाथोत्तरकालीन असावी असे वाटते (संपा. प्रस्ता., पृ. ५२). सुमारे सव्वादोनशे वर्षांपूर्वी झालेला कोशरचनेचा प्रयत्न, ह्या दृष्टीने ही कोशकृती महत्त्वाची आहे. [ ➪ ३. ]

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** (संपा.) कानडे, मु. श्री. व कुळकर्णी, सु. बा. : ज्ञानेश्वरी टिपण; प्रस्ता.; पुणे, १९६८; पृ. १–५२ व ५३–१६२.

**० जगन्नाथ महाराज** – पहा **जगज्जीवन.**

**जगन्नाथशास्त्री क्रमवंत / ० क्रमवंत जगन्नाथशास्त्री** [ ? – इ. स. १८२९ ] कोशकार व व्याकरणकार. ह्यांचे पूर्ण नाव जगन्नाथ बापूभट्ट क्रमवंत नागावकर. हे कुलाबा जिल्ह्यातील नागाव (चेऊल प्रांत) येथील राहणारे. १८१७ साली हे तेथील आपले घर विकून मुंबईस स्थायिक झाले. गिरगाव बॅकरोडवरील गणेशवाडीत त्यांचे स्वतःचे तिमजली घर होते. उत्तम पुराणिक व व हिंदुधर्मशास्त्रज्ञ म्हणून त्यांचा लौकिक होता. " हे कुलाबा व ठाणें ह्या जिल्ह्यांचे जज्जास हिंदुधर्मशास्त्रांत साहाय्य करणारे शास्त्री होते. ते मुंबईतील सारस्वतपंचायतीकडील भुलेश्वराचे देवळांत पुराणिकही होते. ह्यांच्या ' सप्त्या 'ची (सप्ताह) संभावना मोठी होत असे. त्यांस धंगाळ धंगाळ रुपये मिळत असत. त्यांस पालखीचे वैभव लाभत असे. " जगन्नाथशास्त्री हे मुंबईस आल्यावर त्यांनी सरकारी शिक्षणखात्यात नोकरी धरली. त्यांची तेथे ' मुक्तसर 'च्या जागी (हल्लीचा एज्युकेशन इन्स्पेक्टर) नेमणूक झाली होती. जगन्नाथशास्त्र्यांस ग्रंथसंग्रहाचा फार नाद होता. ते स्वहस्ताने पुष्कळ ग्रंथ लिहून संग्रही ठेवीत.

१८१७ साली पेशवाईचा अस्त होऊन आंग्लाईचा उदय झाला. आपल्या राजवटीला साहाय्यक असा नोकरवर्ग निर्माण करण्याची आवश्यकता भासू लागली. त्या दृष्टीने नवीन मंडळीस शिक्षण देऊन तयार करण्यासाठी तारीख २१ ऑगस्ट १८२२ रोजी 'बाँबे नेटिव्ह स्कूल बुक अँण्ड स्कूल सोसायटी ' नावाची शिक्षामंडळी स्थापली गेली. याचे पहिले ' सक्रतार ' (सेक्रेटरी – चिटणीस) कॅप्टन जॉर्ज जर्व्हिस हे होते. ह्यांचा पेशा इंजिनिअरचा होता. त्यांचे साधारणपणे ' पब्लिक वर्क्स '; ' सर्व्हे ' व ' रेव्हेन्यू ' ह्या खात्यांसाठी उपयुक्त होतील असे नोकर तयार करावयाचे असे धोरण होते. त्या धोरणानुसार त्यांनी १८३३ साली ' एंजिनिअर इन्स्टिट्यूशन ' ह्या नावाची स्थापत्यविद्या शिकविणारी शाळा सुरू केली व त्या शाळेतील विद्यार्थ्यांस जे शिक्षण द्यावयाचे ते मराठी भाषेतूनच देणे प्राप्त असल्यामुळे त्यासाठी पाठ्यपुस्तके तयार करण्याची जबाबदारी ओघानेच त्यांच्यावर आली. त्यांनी ह्या कामी जगन्नाथशास्त्री ह्यांस साह्यास घेऊन गणितशास्त्रावर काही पुस्तके लिहून प्रसिद्ध केली. ' विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष या विषयांचे वाद ' हे पुस्तक त्यांपैकी एक होय.

जगन्नाथशास्त्री ह्यांची प्रमुख कामगिरी म्हणजे त्यांनी गंगाधरशास्त्री फडके व बाळशास्त्री घगवे ह्यांच्या सहकार्याने तयार केलेले *मराठी भाषेचें व्याकरण* व *महाराष्ट्र भाषेचा कोश* ह्यांचे घगवे, फडके, जन्हवेकर, जोशी, शुक्ल ह्यांच्याबरोबर केलेले संपादन ही होय.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, कृ. भि. : क्रमवंत जगन्नाथशास्त्री : आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती; मुंबई, १९५६. २. मोने, मो. स. : मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरणप्रबंधकार; पुणे, १९३७.

**० जगन्नाथस्वामी** (कल्याणशिष्य) – पहा **जगज्जीवन.**

**जगमित्र / ० नागा जगमैत्र / ० जगमैत्रगया** [ ? – समा. श. १२५२, कार्तिक शु. ११ / इ. स. १३३० ] संतकवी. सावता माळी, गोरा कुंभार, चोखामेळा, ज्ञानदेव, नामदेव ह्या सर्व संतांत जगमित्र नागा हे वयाने धाकटे अशी समजूत आहे. मराठवाड्यातील परळी वैजनाथ येथे वास्तव्य. महिपती व भीमस्वामी रामदासी ह्यांनी ह्यांचे चरित्र वर्णिले आहे, परंतु कालनिर्देश मात्र केलेला नाही. ह्यांचे उपनाव जगमित्र किंवा जगमैत्र असून मुठे खोऱ्यातील मौजे पिरंगूट येथील

कुळकर्णपण ह्यांच्या वंशाकडे होते अशी माहिती सापडली आहे. प्रतिष्ठान क्षेत्री द्रव्याचा व्यवसाय करणारे हे एक धनवान गृहस्थ होते. कालांतराने ग्रह फिरले आणि विपरीत काळ आला तेव्हा जगमित्रांनी आपले मन संसारातून काढून ईश्वरभजनी लावले व ते भिक्षावृत्तीने राहू लागले. पुढे नागस्वामी नावाच्या कोण्या सत्पुरुषाचा उपदेश घेतल्यानंतर ते स्वतःस जगमित्र नागा असे म्हणवून घेऊ लागले. ते कीर्तन चांगले करीत असत. वि. का. राजवाडे ह्यांनी ह्यांचा समाधिकाळ श. १२५२ असा दिला आहे. समाधी जोगाईच्या आंब्या-जवळ परळी वैजनाथ येथे आहे.

जगमित्र नागांची काही अभंग व पदे अशी स्फुट रचना उपलब्ध आहे. पुराणातील उदाहरणे देऊन एखादा सिद्धान्त विशद करण्याची ह्यांची हातोटी परिणामकारक आहे. ह्यांचे अभंग वारकरी लोकांत विशेष प्रसिद्ध आहेत.

**रचना : मु.** – अभंग (१२) ; प्रामसंक., खं. १, मुंबई, १९५७; पृ. १८८–१९०. **अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३, सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : जगमित्र नागा ; प्रामसंक., मुंबई, १९५७; पृ. १८६–१८८.

**० जगमैत्रगया** – पहा **जगमित्र नागा.**

**जंगली फकीर (सैद हुसेन) / ० सय्यद हुसेन** [शा. श. चे १४ वे शतक / इ. स. चे १५ वे शतक] कवी. जंगली फकीर हे ह्यांचे टोपणनाव असून सय्यद हुसेन हे ह्यांचे खरे नाव. ह्या दोन्ही नावांचा उल्लेख कवीने केला आहे. गुरू : वडवाळसिद्ध नागेश. म्हणजेच अलम-खानांचे हे गुरुबंधू. आपल्या गुरूचा कवी वारंवार उल्लेख करताना दिसतो. ह्याची पौराणिक कथेवरील प्रदीर्घ स्वरूपाची रचना समर्थ-वाग्देवतामंदिर संग्रहात आहे (बा. १६३७). ओवी अनघड स्वरूपाची असून त्यांना क्रमांक नाहीत. कार्तिकेयजन्म, गणेशजन्म, दुंदुभी व गजासुर ह्यांच्याशी शिवाचे युद्ध, तारकासुरवध अशा अनेक कथा ह्यात आल्या आहेत. सर्व कथा-प्रसंग नारद कृष्णार्जुनांना सांगतो आहे असा निवेदनाचा थाट आहे. वर्णने रोचक. कथाकथनाचे स्वरूप अगदी साधे.

**रचना :अमु.** – पुराणकथा; ओवीबद्ध; सवामं. हस्त. सू., खं. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : जंगली फकीर सय्यद हुसेन; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १४२–१४५.

**जंगू भीम** [इ. स. चे १८ वे शतक, अखेर] शाहीर. सवाई माधव-रावांच्या कारकीर्दीत हा हयात होता. ह्याने रचलेला *खडर्याच्या लढाईचा पोवाडा* उपलब्ध आहे. खडर्याच्या लढाईवर गेलेला नवरा यश मिळवून कसा परत आला हा कथाभाग नायिकेच्या तोंडून वदविला आहे. *खडर्याच्या लढाईचा दुसरा पोवाडा* ह्या नावाने *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये संग्रहित (पृ. ३६–३७).

**जनजसवंत** [?– समा. श. १५३९, फाल्गुन शु. ८ / इ. स. १६१७] कवी. कोण्या रघुनाथदासाने ह्यांचे ओवीबद्ध चरित्र श. १७८४ / इ. स. १८६२ त लिहिले आहे. इतरत्रही ह्यांची काही चरित्रविषयक माहिती सापडते. पित्याचे नाव जनार्दन. हे देशस्थ यजुर्वेदी वाजसनेय शांडिल्यगोत्री ब्राह्मण. हे प्रतापशा नावाच्या बागलाणच्या राजाचे (श. १५३० / इ. स. १६०८) पुरोहित होते. ह्यांचा पुत्र जसवंत. जसवंतांस लहानपणापासूनच साधुसेवेचा छंद होता. पंचवटीस जाऊन त्यांनी पुरश्चरण केले. तेव्हा त्यांना श्रीरामाचे दर्शन घडले. पुढे त्यांच्याच आज्ञेवरून काशीयात्रेस जाऊन ह्यांनी *रामचरित्रमानस*कार संत तुलसीदासांचा अनुग्रह घेतला. नंतर काही काळ गुरूची सेवा करून गुरुरायांनी दिलेली श्रीमारुतिरायांची मूर्ती घेऊन ते स्वदेशी जाण्यास निघाले. वाटेत ह्यांना साधूंचा मेळा भेटला. त्यांच्याबरोबर हे गुजरात, सौराष्ट्र ह्या भागांत यात्रा करीत असता वाटेत निर्जल अरण्य लागले. तेथे पाण्यावाचून साधूंचे हाल होऊ लागले. तेव्हा त्यांच्यासाठी जसवंतांनी विहीर निर्माण केली. अशा प्रकारे साधूंकरिता जल निर्माण केले म्हणून ते साधू ह्यांना 'जलजसवंत' म्हणू लागले. पुढे 'जल'चे 'जन' होऊन जनजसवंत हे नाव रूढ झाले असावे. ह्यांनी आपले उत्तर आयुष्य तापीतीरावरील बोरटे (जि. जळगाव) गावी घालविले. तापीतीरावरच ह्यांनी समाधी घेतली.

ह्यांची बहुतांश रचना हिंदुस्थानीत असून महात्मा गांधीजींच्या आश्रमभजनावलीतले 'कोई वंदो कोई निंदो' हे त्यांचे पद प्रसिद्ध आहे. काही मराठी रचना समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील बाडात सापडते. पदे भक्तिपर असून ती त्यांचे उपास्य दैवत जो राम त्याच्या स्तुतिपर आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देव, शं. श्री. : जनजसवंत; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. १–१०. २. पंडित, द. न. : संत जनजसवंत अर्थात तुळशीदासांचे महाराष्ट्रीय शिष्य; प्रसाद, डिसें. १९५२; पृ. २५. ३. शर्मा, विनयमोहन : जनजसवंत; पाटणा; हिमसंदे.; १९५७; पृ. १४८–१५५.

**जनदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – ज्ञानपर अभंग; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**जननाभा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ३७.

**जनपंडित / ० पंडित–१** [अंदाजे श. १५८४ / इ. स. १६६२] कवी. तंजावरकडील असावेत. तंजावर सरस्वती महाल येथील हस्त-लिखित संग्रहात 'पंडित' ह्या नावाखाली ह्यांची रचना सापडते. *विक्रमचरित्र* ह्या ग्रंथात आपल्या गुरूचे नाव बाबा गोसावी असे हे सांगतात. कुलदैवत मल्लारी. वास्तव्य कावेरीतीरी. हा ग्रंथ कावेरीतीरी पूर्ण झाल्याचा उल्लेख सापडतो.

*भागवत दशम स्कंध* किंवा *लीलाभागवत* आणि *विक्रमचरित्र* हे कवीचे दोन मोठे ग्रंथ. त्यांपैकी *लीलाभागवत* हा ग्रंथ अनेकवृत्तात्मक असून तो कवीच्या पंडिती बाण्याची साक्ष देतो. उस्मानिया विद्यापीठ, मराठवाडा साहित्य परिषद व भारत इतिहास संशोधक मंडळ ह्यांच्या हस्तलिखित संग्रहांत ह्या ग्रंथाच्या प्रती अनुक्रमे त्रुटित, पूर्ण व फुटकळ पृष्ठे अशा स्वरूपात आढळतात. ग्रंथात हे स्वतःचा उल्लेख पंडित वा जन-पंडित असा करताना दिसतात. ह्यांनी केलेल्या 'श्रीकृष्णाच्या आरती'त शेवटी "जनपंडित शरणागत गाये हरिगूण" असे आपले नाव घातले आहे. *लीलाभागवता*चा पूर्वार्ध *प्रतिष्ठान* मासिकातून क्रमशः छापला गेला आहे. ह्या ग्रंथात *भागवता*च्या *दशमा*तील श्रीकृष्णाच्या लीला व गोपगोपींच्या क्रीडांचे कवीने समरसून वर्णन केलेले आहे. रचना अनुप्रासयुक्त आहे.

*विक्रमचरित्र* ग्रंथात 'राया विक्रमाची पवित्र कथा' सांगितली आहे. समातीच्या काही ओव्यांतील कवीचे निवेदन पाहण्यासारखे आहे. "हे कथा अति सरस। येथें बोलिलों मी नवरस॥ ऐकतां गमे श्रोतयांस। पुण्य आणि विश्रांति ॥ ९३ ॥ ये कथेचा तात्पर्यार्थ। विचारें आइकतां समस्त। ज्ञान वैराग्य भक्ति येथ। संपूर्ण असे ॥ ९४ ॥ नीति आणि व्यवहार। चातुर्य उपदेश विचार। दैव पुरुषार्थ सविस्तार। येथ असे ॥ ९५ ॥"

कृष्णचरित्राचे कविप्रतिभेला आकर्षण दिसते. कृष्णाच्या जीवनातल्या विविध प्रसंगांवर कवीने पदे व स्फुट प्रकरणपर रचना केली आहे. गोपीगीते, गोपीविरह, रासक्रीडा, वेणुवादन, गोपक्रीडा, बालक्रीडा ह्या कृष्णचरित्रातील परिचित आणि आवडणाऱ्या विषयांबरोबर पूतनामोक्ष, कंसवध, केशीवध, प्रलंबवध, कालियामर्दन, आरिष्टवध हे विषयदेखील गाळलेले दिसत नाहीत. ह्यांच्या गणपती व श्रीकृष्ण ह्यांवरील आरत्या मुद्रित (मआ., पृ. ३१४, ३३९).

**रचना : मु.** – १. लीलाभागवत; पूर्वार्ध; अ. १७, श्लो. ८८१; संपा. डॉ. नांदापूरकर, ना. गो., माढेकर, रा. ब. व पोहनेरकर, न. शे.; प्रतिष्ठान, मार्च ते डिसें. १९५६ व जाने. १९५७, क्रमशः. **अमु.** – १. भागवत – लीलाभागवत; अ. ३०, ग्रं. स. ३०००; बा. १४८४. २. विक्रमचरित्र; प्रसंग ११, ग्रं. सं. ३६०० ; र. का.: श. १५८४; शुभकृत् संवत्सर, शु. चतुर्दशी, नृसिंह जयन्ती; तंसम. बा. १७७७–७८. ३. पदे, भूपाळ्या, आरत्या, श्लोक इ. स्फुट कविता; तंसम., हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मिरीकर, ना. य. : पंडितकृत लीला-भागवत ; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४, चैत्र १८६५ ; पृ. ९८.

**० जनभट** – पहा **जनुभट.**

**जनाबाई / ० नामयाची जनी** [?– समा. श. १२७२, आषाढ कृ. १३ / इ. स. १३५०] संतकवयित्री. परभणी जिल्ह्यातील गोदातीरा-वरील गंगाखेडच्या दमा नावाच्या एका शूद्राची मुलगी. दमा व त्याची पत्नी करुंड ही दोघेही पंढरीची वारी नित्यनेमाने करीत असत. दमा हा मोठा भगवद्भक्त होता. विवाहानंतर बऱ्याच काळाने विठ्ठलाच्या प्रसादाने त्यांना एक कन्यारत्न झाले. तिचे नाव जनी असे ठेवून, त्यांनी (पांडुरंगाच्या आदेशाप्रमाणे) तिला लहान वयातच नामदेवांचे वडील दामाशेट शिंपी ह्यांच्या पदरात टाकले. तेव्हापासून जनाबाई नामदेव कुटुंबाचा एक घटक बनली. ती स्वतःला 'नामयाची जनी दासी' असे मोठ्या अभिमानाने म्हणवून घेत असे.

नामदेवांच्या सहवासात हिनेही पांडुरंगभक्तीचा ध्यास घेतला होता. नामदेव हेच तिचे पारमार्थिक गुरू होते. गुरुपरंपरा : श्रीज्ञानदेव > विसोबा खेचर > नामदेव > जनाबाई. ज्ञानदेव, नामदेव, विसोबा खेचर, चोखामेळा, सावता माळी इत्यादी समकालीन संतांच्या भेटीगाठीचे जे अनेक प्रसंग हिने प्रत्यक्ष पाहिले व जे पारमार्थिक वातावरण अनुभविले, त्याचे वर्णन समर्पक शब्दांत तिने 'विठो माझा लेकुरवाळा' ह्या प्रसिद्ध अभंगात केले आहे. संतसहवासाचा महिमा ती जाणून होती. म्हणून एके ठिकाणी ती म्हणते : "संताचे चरणीं, लोळे नाचे दासी जनी ।।" ज्ञानेश्वरांविषयीचा तिचा भक्तिभाव तर ठिकठिकाणी व्यक्त झालेला आढळतो. "मायेहूनि माय मानी। करी जिवाची ओवाळणी ।। १।। परलोकींचें तारूं। म्हणे माझा ज्ञानेश्वरू ।। २ ।।" असे उद्गार तिने ज्ञानेश्वरांविषयी काढले आहेत. जनीच्या अभंगांचे लेखन प्रत्यक्ष परमेश्वरच करीत असे, ह्या उक्तीतील अतिशयोक्ती सोडल्यास तत्कालीन संतमंडळात तिची योग्यता काय होती हे सहज समजू शकते. हिची समाधी पंढरपुरास महाद्वारी आहे.

जनाबाईच्या नावावर *सकलसंतगाथे*तून सुमारे ३५० अभंग मुद्रित झाले आहेत. ह्याशिवाय *कृष्णजन्म, थालीपाक, प्रल्हादचरित्र, बालक्रीडा* व *हरिश्चंद्राख्यान* अशा आख्यानांचीही तिने रचना केली आहे, असे *महाराष्ट्रसारस्वत*कार म्हणतात (मसा., आ. ५, पृ. १३९). 'जनाबाई आणि मुक्तेश्वर' ह्या लेखात (प्रो. पोतदार स्मारक ग्रंथ; पृ. १०९ ते ११६) डॉ. नांदापूरकरांनी म्हटले आहे की, "जना-बाईच्या *थालीपाक* आणि *द्रौपदीस्वयंवर* ह्या भावमधुर आख्यानांनी मुक्तेश्वरासारख्या महाकवीला देखील स्फूर्ति दिली आहे." जनाबाईच्या आज प्रत्यक्षात उपलब्ध असलेल्या रचनेपेक्षा कितीतरी अधिक रचना असणार हे निश्चित. पण काळाच्या ओघात जनाबाईच्या नावावर वर उल्लेखिली आहे तेवढीच रचना शिल्लक उरली आहे. तिच्या नावावर प्रसिद्ध झालेल्या ३५० अभंगांतीलही कित्येक अभंग प्रक्षिप्त असावेत असे अभ्यासकांचे मत आहे.

तुकारामशिष्या बहिणाबाई व समर्थशिष्या वेणाबाई ह्यांनीही विपुल कवितारचना केली आहे. पण जनाबाईच्या भावकवितेइतके लोकप्रिय व सर्वतोमुखी होण्याचे भाग्य त्यांच्या कवितेस लाभलेले नाही. जनाबाईची कविता तिच्या भगवद्भक्तीने ओतप्रोत भरलेल्या जीवनाचा सहजाविष्कार आहे. तिचे प्रेमळ, हळुवार व विशुद्ध अंतःकरण ह्या कवितेत सर्वत्र प्रतिबिंबित झालेले दिसते.

'सर्वठायी विठ्ठल दिसावा' ह्या एकाच निदिध्यासापासून हिच्या अभंगांनी शब्दरूप घेतलेले दिसते. "हेचि देई हृषिकेशी । तुझें नाम अहर्निशीं ।। २ ।। रूप न्याहाळिन डोळां । पुढें नाचेन वेळो-वेळां ।। ४ ।।" एवढेच तिचे देवाजवळ मागणे आहे. संसार आणि परमार्थ हे द्वंद्व तिच्या मनात कोठेच नाही. पूर्ण निष्काम होऊन लौकिक ऐहिक भावना विसरूनच ती देवाला शरण गेली आहे. आत्मज्ञानाचा साक्षात्कार घडण्यापूर्वीच ती निर्विकार झाली आहे. तिचे मन एकरंगी आणि एकपोती आहे. तिच्या मर्यादित जीवनातल्या अनंत अनुभूती तन्मयतेने रेखाटल्या गेल्याने रचनेचा साधेपणा नकळत तेथे आलेला आहे. "नामदेवांवरील प्रेमभाव, ज्ञानेशांच्या दिव्य विभूति-मत्त्वाची पूजा, यातिहीन चोख्याच्या भावसामर्थ्याचें अनुसरण, आणि प्राप्त सुखदुःखाची एका अलौकिक एकतानतेंत परिसमाप्ती, असे तिच्या हृदयाचे अनेक पैलू तिच्या अभंगांत स्पष्ट झालेले दिसतात. वात्सल्य, कोमलता, सहनशीलता व सर्वस्वसमर्पणाची त्यागवृत्ति ही स्त्रीहृदयाची आकर्षक पृथगात्मता तिच्या अभंगवाणीचे वैशिष्ट्य आहे." असे रा. चिं. ढेरे ह्यांनी *जनाबाईच्या कवितेचे* मूल्यमापन करताना म्हटले आहे (प्रसाद, मार्च १९५६, पृ. १२–१४). [ ➪ ३.]

**रचना : मु.** – अभंग ३३९; नामदेव गाथा, मुंबई, १९७०; पृ. ९२१–१०१२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : जनी; मसंक., मुंबई, १९३९; पृ. ४७–६५. २. गोडबोले, मा. श्री. : संत जनाबाईच्या ओव्या : अभंग व चरित्र; पंढरपूर, १९६२. ३. ढेरे, रा. चिं. : जनाबाईची कविता; प्रसाद, मार्च १९५५; पृ. १२–१४. ४. ढेरे, रा. चिं. : जनाबाईची साधना; प्रसाद, जून १९५५; पृ. २५–२९. ५. ढेरे, रा. चिं. : नामयाची जनी; प्रसाद, जून १९५३; पृ. २१–२५. ६. दासगणू : ह. भ. प. संतकवि श्रीदासगणू महाराजकृत संतश्रेष्ठ श्रीजनाबाईचें चरित्र, पुणे, १९३७. ७. देशमुख, शारदा मो. : दासी 'जनी' चे एक दर्शन; युगवाणी, ऑक्टो. १९६८; पृ. १४४–१४७. ८. धोंगे, ह. चं. : नामयाची जनी; युगवाणी, मे–जून १९७२; पृ. १०४. ९. नांदापूरकर, ना. गो. : जनाबाई आणि मुक्तेश्वर; प्रो. पोतदार स्मारक ग्रंथ; पुणे, १९५०; पृ. १०९–११६. १०. माटे, श्री. म. : दासी जनीचे यथारूप दर्शन; संत, पंत व तंत; १९५७; पृ. ९४–१०८.

**० जनार्दन–१** – पहा **जनार्दनस्वामी**–१.

**जनार्दन–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – आरत्या व पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**जनार्दन–३** [का. अनु.] कवी. रामदासी-संप्रदायी गिरिधरांच्या शिष्यपरिवारापैकी एक. ह्यांनी केलेल्या १४ श्लोकांच्या *बंधमोचन* स्तोत्रातील शेवटचे सहा श्लोक छापले आहेत (सवामं. हस्त. सू., खं. २, पृ. ८३).

**जनार्दन–४ / ० जनाबाबा** [का. अनु.] कवी. समर्थांच्या कल्याणांचे शिष्य. कल्याणांचा शिष्यपरिवार बराच मोठा असून त्यांचे शिष्य जना ऊर्फ जनार्दन ह्यांचीही काही कविता सापडली आहे. ह्यांची दोन पदे (कल्याणविषयक) शं. श्री. देवांनी प्रसिद्ध केली आहेत (श्रीसांप्रविवि., खं. २, लेखांक ७३).

**जनार्दन–५** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. मोरोपंतांचे समकालीन. *महाभारता*वर रचना करणारे अनेक लहानमोठे कवी ह्या काळात होऊन गेले. बहुतेकांनी अधल्यामधल्या पर्वांवर रचना केल्या.

ह्या जनार्दनाने *व्यासाश्रम* पर्व रचल्याचा उल्लेख वि. ल. भाव्यांनी केला आहे (मसा., आ. ५, पृ. ५३१).

**जनार्दन–६** [इ. स. चे १८ वे शतक] पंतसमकालीन कवी. ह्यांनी मोरोपंती थाटाची रचना करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो (मसा., आ. ५, पृ. ५२४).

**रचना : मु.** – १. दामाजीपंतचरित्र (गीतिबद्ध, ग्रं. सं. २४); अकलकामा., भा. २; मुंबई, १८९६; पृ. १०६–१०९. २. रामस्तुती (श्लो. सं. ९); अकलकामा., भा. २; पृ. ७३–७४. **अमु.** – १. दानावर्ताख्यान. २. हस्तामलकटीका (निर्देश : अकलकामा., भा. २; पृ. १०६, टीप ४). ३. पदपदांतरे (वा. दा. ओक ह्यांचा संग्रह).

**जनार्दन–७** [अंदाजे श. १७३२ / इ. स. १८१०] टीकाग्रंथकार. *विवेकचूडामणि* ह्या गद्य ग्रंथाची रचना. ग्रंथाचा विषय उपनिषदांच्या अर्थाचे महासार असा आहे. ह्याची १६ प्रकरणे आहेत. रचनाकाल श. १७३२ असा दिला आहे (मसंम., हवना., पृ. ३०).

**जनार्दन–८** [अंदाजे इ. स. १७७५] जैन कवी. हा शेतवाळ ज्ञातीतील होता. तो स्वतःला श्रावक म्हणवतो. *श्रेणिकचरित्र* ह्या ग्रंथाच्या प्रशस्तीत कवीने स्वतःची व आपल्या गुरुपरंपरेची विस्ताराने माहिती दिली आहे. लातूर पीठावरील भट्टारक चंद्रकीर्ती हे कवीचे गुरू. ग्रंथात स्वतःचा उल्लेख कवीने शांतिसुत, संतसुत असा केला आहे.

कवीने आपला *श्रेणिकचरित्र* हा ग्रंथ वासिमजवळील नहसी तालुक्यात शर्कराग्राम येथे श. १६९७ / इ. स. १७७५ मध्ये पूर्ण केला. ब्रह्मगुणदासाच्या १५ व्या शतकातल्या *श्रेणिकचरित्रा*च्या आधारे ह्या ग्रंथाची रचना केल्याचे कवी सांगतो. ह्याचे ४० अध्याय व २७८ ओव्या असून अनेक आख्यानोपाख्यानांनी हे चरित्र भरले आहे. ग्रंथात कवीने केलेली मराठीची तरफदारी पाहण्यासारखी आहे (२४ : २००). पूर्वकालातील कविताग्रंथादी वाचनाने त्याच्या रचनेस प्रौढता आली आहे. नवरसांच्या अभिव्यक्तीची दृष्टी कवीजवळ असल्याने केवळ धार्मिक ग्रंथ म्हणूनच नव्हे तर प्रतिभेचा आविष्कार ह्या दृष्टीने हा ग्रंथ श्रेष्ठ आहे. जिनदास चवडे ह्यांनी इ. स. १९०४ साली वर्धा येथून प्रस्तुत ग्रंथ श्रावकांसाठी छापला होता.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : जनार्दन; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ९४–९६.

**जनार्दन–९** [का. अनु.] शाहीर. पेशवाईचा ऐन अंमल जनार्दन शाहीराने पाहिलेला होता. थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दीवर ह्याची कवने सापडतात (मसा., आ. ५, पृ. ५५५).

**जनार्दन–१०** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – महालक्ष्मीची आरती; मआ., पृ. ३२३.

**जनार्दनचरण** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – स्फुट कविता; सवामं. हस्त. सू., खं. १.

**जनार्दननंदन** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; वेंचले येथील शक १८२३ / इ. स. १९०१ त नकलून घेतलेल्या पदांच्या बाडात ह्या कवीची पदे समाविष्ट; भाइसंमं.

**० जनार्दनपंत** – पहा **जनार्दनस्वामी.**

**जनार्दनसुत** [अंदाजे शं. १६४० / इ. स. १७१८] कवी. ह. भ. प. सखारामबोवा दैठणकर ह्यांजकडील श. १६४० च्या एका बाडात जनार्दनसुत कवीचे 'जय मैराळा मार्तंडा ॥ लावण्यसिंधु प्रचंडा' हे एक पद आहे (भाइसंमं.). समर्थवाग्देवतामंदिराच्या हस्तलिखित बाडातही ह्यांची काही पदे सापडतात (हस्त. सू., खं. २).

**जनार्दनसुततनय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**जनार्दनस्वामी–१ / ० जनार्दन–१ / ० जनार्दनपंत** [श. १४२६, रक्ताक्षी संवत्सर / इ. स. १५०४ – समा. अंदाजे श. १४९७ / इ. स. १५७५] संतकवी. ह्यांचे घराणे मूळचे चाळीसगावचे. यजुर्वेदी आश्वलायनशाखी देशस्थ ब्राह्मण. तेथले हे वतनदार देशपांडे. जन्म चाळीसगाव येथे झाला. हे मुत्सद्दी व राजकारणी होते. हे देवगिरी (दौलताबाद) येथे यवन किल्लेदाराच्या कारभारीपणाचे काम पाहात असत. आपले काम संभाळून ईश्वरोपासनेत मग्न असत. ह्यांना प्रत्यक्ष दत्तात्रेयांचाच अनुग्रह झाला होता असे सांगतात. दत्तात्रेय हेच त्यांचे गुरू. ह्या दत्तात्रेयांचा साक्षात्कार त्यांनी आपले शिष्य पैठणकर एकनाथ ह्यांनाही घडविला. *ज्ञानेश्वरी* आणि *अनुभवामृत* ह्यांवर ते निरूपण करीत. जनार्दनस्वामींची समाधी दौलताबाद येथे आहे.

जनार्दनस्वामींचे गुरू म्हणून नृसिंहसरस्वतींचा उल्लेख केला जातो. शहादत्त अलमाप्रभू ह्यांचाही जनार्दनांचे गुरू म्हणून क्वचित उल्लेख केलेला आढळतो. ह्यांचे गुरू सूफी पंथातील एक सत्पुरुष चांद बोधले असावेत असे रा. चिं. ढेरे व वा. सी. बेंद्रे ह्यांनी प्रतिपादन केले आहे.

वा. सी. बेंद्रे ह्यांनी *शेख महंमदबाबा श्रीगोंदेकर ह्यांचा कवितासंग्रह* व *योगसंग्राम* ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. ह्या *योगसंग्राम* ग्रंथातील पंधराव्या प्रसंगाच्या आरंभीची ओवी " ॐ नमो जी श्रीसद्गुरु चांद बोधले। त्यांनीं जनोपंता अंगीकारिलें । जानोबानें एका उपदेशिलें। दास्यत्वगुणें ॥ १५ : १ ॥" अशी आहे. हिचा आधार घेऊन शेख महंमदांचे गुरू चांद बोधले हेच जनार्दनस्वामींचेही गुरू ठरतात असे मत बेंद्रे ह्यांनी मांडले आहे; तर रा. चिं. ढेरे ह्यांनी " चांद बोधले म्हणजे चंद्रगिरीचे चंद्रभट असावेत. आपल्या उत्तर आयुष्यात सूफी पंथाची दीक्षा घेऊन मलंगवेशाने भ्रमण चालू केले असावे, प्रथमपासूनच त्यांच्याविषयी पूज्यभाव बाळगणाऱ्या जनार्दनस्वामींनी त्यांचे शिष्यत्व पत्करले असावे" असे मत मांडले आहे (*नृसिंहसरस्वती-चरित्र : दत्तसंप्रदायाचा इतिहास*, पृ. १३१) परंतु नाथांना श्रीदत्तात्रेयांचा साक्षात्कार करवून दिल्यानंतर एकाजनार्दनांची जोडी तीर्थयात्रेस निघाली असता मलंगवेशातील चंद्रभट्टांची भेट झालेली असल्याने जनार्दनांनी पुन्हा त्या सत्पुरुषाचे शिष्यत्व पत्करले असावे ह्या विधानास काहीच अर्थ उरत नाही, असे ह्या संबंधात न. शे. पोहनेरकर प्रतिपादन करतात. केवळ *योगसंग्रामा*तल्या वरील ओवीचा निर्देश सोडल्यास ग्रंथात इतर अनेक ठिकाणी जे गुरुमाहात्म्य शेखमहंमदाने वर्णन केले आहे त्यात चांद बोधले ह्यांचा उल्लेख कोठेच नाही. आपल्या ग्रंथात जनार्दनांचा मात्र शेखमहंमदाने कित्येकदा उल्लेख केलेला दिसतो. *योगसंग्रामा*तील १४ व्या प्रसंगातील पुढील ओवी : 'शेख म्हणजे सेवकपणें । महंमद स्वयें जनार्दन। दोन्ही नांवांचें मिश्रण। अभंगीं चालतसे ॥ ९० ॥' व स्फुट कवितेतील काही उल्लेख जनार्दनस्वामी व शेखमहंमद ह्यांच्यातील गुरुशिष्यसंबंधच सूचित करतात असे वाटू लागते. ह्याशिवाय इ. स. १९१५ त लिहिल्या गेलेल्या बशीरुद्दीन देहलवी ह्यांच्या एका प्रचंड उर्दू इतिहासग्रंथात विजापूरकरांच्या अधिकारकक्षेतल्या प्रत्येक प्रमुख स्थानाची व तेथील धर्मपुरुषांची माहिती सापडते. त्यातील दौलताबादच्या माहितीत जनार्दन ह्या संन्याशाचा उल्लेख सापडतो. मग त्यांचे गुरुपद भूषविणाऱ्या शाह चांद बोधले ह्यांची माहिती का मिळू नये ? ढेरे ह्यांच्या नव्या संशोधनाने अभ्यासकांची दिशाभूल होण्याचीच जास्त शक्यता आहे, असे साधार विवेचन करून पोहनेरकर ह्यांनी बेंद्रे व ढेरे ह्यांचे मत खोडून काढले आहे.

जनार्दनस्वामींनी अभंग, पदे, आरत्या व श्लोक अशी स्फुट कविता रचली आहे. ह्यांच्या *आत्मानात्मविवेकसार* किंवा *पंचीकरण* ह्या ओवीबद्ध ग्रंथाच्या हस्तलिखिताची गुंडाळी द. वा. पोतदार ह्यांना पैठणास मिळाली. ही ह्या ग्रंथाची नक्कल आहे (श. १६५३ / इ. स.

१७३१). मूळ प्रतिपादन जनार्दनांचे आहे व हे जनार्दन म्हणजे एकनाथांचे गुरू जनार्दनस्वामी असावेत असे द. वा. पोतदारांना वाटते. ग्रंथ गुरुशिष्यसंवादरूप असून त्यात पंचीकरणाचा विषय, उतारे व कोष्टके ह्यांच्या साहाय्याने विस्तारपूर्वक करून सांगितला आहे. *भक्तिभाष्य* ही गीताटीका ह्यांची असल्याचे वि. वा. जोशी (कन्नडकर) ह्यांनी नमूद केले आहे. *उपदेश, श्रीदत्तस्तुती* व *समाधिप्रकरण* अशी रचना गो. का. चांदोरकरांनी ह्यांच्या नावावर दिली आहे. ग्रंथरचनेपेक्षा ह्यांच्या शिष्यपरिवारानेच जनार्दनस्वामींना अजरामर केले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : जनार्दनस्वामी; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. २७१–२७६. २. गोसावी, मो. स. : दत्तभक्तीचा आदर्श : श्रीसंत जनार्दनस्वामी; भालचंद्र, डिसें. १९६६; पृ. ४०. ३. पोतदार, द. वा. : जनार्दनांचे पंचीकरण; भाइसंमंत्रै., व. १२, अं. १; पृ. ५९–६२. ४. पोहनेरकर, न. शे. : श्रीजनार्दनस्वामींचे गुरू कोण ?; मराठवाडा, दीअं. १९६५; पृ. १२९–१३६. ५. भागवत, शेषराव : संत एकनाथांचे गुरू जनार्दनस्वामी; मराठा, १६–१२–१९६८; पृ. २.

० **जनार्दनस्वामी–२** – पहा जनीजनार्दन.

० **जनावाबाबा** – पहा जनार्दन–४.

**जनीजनार्दन / ० जनार्दनस्वामी–२** [अंदाजे श. १४४२ / इ. स. १५२० – समा. श. १५२३, श्रावण व. ७ / इ. स. १६०१] संतकवी. नाथपंचकापैकी एक. परंपरेने चालत आलेल्या माहितीव्यतिरिक्त ह्यांच्या चरित्राची विश्वसनीय साधने उपलब्ध नाहीत. ह्यांचे नाव जनार्दन. उपनाव गोसावी. देशस्थ ऋग्वेदी, वासिष्ठगोत्री ब्राह्मण. कुलदेवता माहूरची रेणुका. पित्याचे नाव वसुदेव. आईचे माहेरचे नाव जनी व सासरचे देवकी. ही भूमच्या देशमुखांची कन्या. ह्यांचा जन्म कृष्णाष्टमीस झाला. आपल्या मातेच्या नावावरून पुढे हे स्वतःला जनीजनार्दन असे म्हणवून घेऊ लागले. ह्यांचे वडील विजापूरच्या पातशाहीत कमावीसदार होते. त्यांच्यामागे जनीजनार्दनांनीही पातशहाची चाकरी पत्करली. दुष्काळी परिस्थितीत पातशहाच्या नोकरीला कंटाळून ह्यांनी दिवाणपद सोडले. तेथून पंढरीला जात असता वाटेत गोदावरीच्या पात्रात ह्यांना एक गणेशमूर्ती सापडली. ती घेऊनच ते पंढरपूरला आले. तेथे दीर्घकाळ विठ्ठलाच्या साधनेत घालविल्यानंतर ह्यांना पांडुरंगाचा दृष्टान्त झाला : 'गंगामसले (ता. माजलगाव, जि. बीड) येथे जाऊन तूं गणेशाची उपासना कर.' ह्या आदेशाप्रमाणे गंगामसल्यास मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करून ह्यांनी बारा वर्षे गणेशोपासना केली. नंतर काशीस जाऊन संन्यास घेतला. त्यानंतर हे बीड येथे आले व तेथेच स्थायिक झाले. बीड येथील त्यांच्या निवासस्थानास पाटांगण असे म्हणतात. आजही बीड येथील पाटांगणकर हे त्यांचे वंशज विद्यमान आहेत. ह्यांच्या दोन समाध्या आहेत. पैकी मुख्य सरदाराचे भूम ह्या गावी आहे व दुसरी प्रतीक समाधी बीड येथील थोरल्या पाटांगणात आहे.

जनार्दनस्वामी हे जनीजनार्दनांचे गुरू अशी आजपर्यंतची रूढ समजूत होती. पण रा. चिं. ढेरे ह्यांनी मात्र एक वेगळीच गुरुपरंपरा दिली आहे. ते म्हणतात : जनीजनार्दनांचे खरे नाव जनार्दन असून त्यांचा उल्लेख 'धुंडि जनार्दन' असाही आढळतो. उत्तमश्लोकांच्या *प्राकृत सप्तशतीत* 'पूर्वी धुंडिपुत्र जनार्दनस्वामी । बीडनगरीं विख्यात नामीं ॥ १३. ३८६ ॥' असा जनीजनार्दनांचा उल्लेख येतो. ह्यातील 'धुंडिपुत्र' हे विशेषण ज्ञानदेवांनी स्वतःला लावलेल्या 'निवृत्तिनाथसुत' ह्या विशेषणाप्रमाणे शिष्यत्वसूचक आहे. 'ढुंढि' किंवा 'ढुंढिराज' म्हणजे गणेश हे जनीजनार्दनांचे उपास्य दैवत होते. तसेच त्यांच्या गुरूचेही नाव धुंडिराज असेच होते. ह्यांची गुरुपरंपरा : आदिनाथ > कंथडीनाथ > धुंडिराज > जनार्दन अशी आहे. ह्यांपैकी कंथडीनाथ हे ह्यांच्या वडिलांचे गुरु होते. बीड पाटांगणातील नित्योपासनेत 'आदिनाथ जय कंथडीनाथ । धुंडि जनार्दन आदिनाथ ॥' असा परंपरेचा घोष चालतो. तसेच गुरुपरंपरानिदर्शक पुढील श्लोक प्रचलित आहे : "आदिनाथं गुरुं वन्दे 'कंथडीं ज्ञानसागरम् । धुंडिराजं प्रणम्यादौ निर्गुणं च जनार्दनम् ॥"

आपली गुरुपरंपरा नाथपंथी आहे हे प्रत्यक्ष जनीजनार्दनांनीच एका हिंदी पदात स्पष्टपणे सांगितले आहे. त्यावरून ह्यांच्या गुरुपरंपरेविषयी सर्व संदेह मावळतात. कच्छप्रांतात कंथडीनाथांचा एक मठ आहे. तेथे कंथडीनाथांचा जप करतात व गणेशाचीही उपासना करतात. जनीजनार्दनांची गणेशोपासना ही त्यांच्या गुरुपरंपरेतून आलेली दिसते. महाराष्ट्रात ह्या संप्रदायाची गादी खानदेशात तोरणमाळे येथे आहे असे सांगतात (रा. चिं. ढेरे : *गंगाजळी*, पृ. ३२). जनीजनार्दनांच्या परंपरेतील कंथडीनाथ व धुंडिराज ह्यांच्याविषयी काहीच माहिती उपलब्ध नाही.

जनीजनार्दनांच्या नावावर *उद्धवबोध* किंवा *निर्विकल्प, जानकीसैंवर* किंवा *सीतास्वयंवराख्यान, महावाक्यनिवारण* असे ग्रंथ, *चौरिकलीला* किंवा *बाळक्रीडा* हे काव्य आणि मराठी व हिंदी पदे अशी रचना मोडते. पैकी *महावाक्यनिवारण* (की विवरण) हा ग्रंथ उपलब्ध नाही. *निर्विकल्प* ग्रंथ व *चौरिकलीला* ह्या दोन रचना जनीजनार्दनांच्या नसून त्या त्यांचे शिष्य एकनाथ ह्यांच्या आहेत.

*जानकीसैंवर* ही प्रदीर्घ स्वरूपाची आख्यानात्मक रचना असून ह्या ग्रंथाचे एकूण ३५ प्रसंग व ३८४० ओव्या आहेत. ह्या काव्यामागची प्रेरणा पारमार्थिक आहे. रामचरित्राच्या ह्या कथेतूनच भक्तिरसाचा आविष्कार झाला आहे. काव्याची शैली प्रसन्न आणि प्रासादिक आहे. ह्यातील वर्णने कवीच्या बहुश्रुततेची व कवित्वाची साक्ष पटवितात. [ ⇨ ३. ]

ह्यांची सुमारे १५० पदे असल्याचा वि. का. राजवाडे ह्यांनी उल्लेख केला आहे. सध्या तरी ह्यांची ३० ते ३५ पदेच काय ती हाताशी लागतात. ह्या पदांतून गणेश, राम, विठ्ठल, शिव आणि कृष्ण ह्या सर्वांना कवीने एकाच भावाने आळविले आहे. तरीही कृष्णावताराविषयी त्यांच्या ठिकाणी विशेष आवड असल्याचे दिसते. काही पदे पारमार्थिक अनुभव ग्रथित करतात, तर काही सहजसमाधीची कल्पना विशद करतात.

**रचना : मु.** – १. जानकीसैंवर; प्रसंग ३५; ओ. सं. ३८४०; संपा. भट, द. रा.; संशोधक, व. २७, अं. १–४; धुळे; फेब्रु. १९६१. २. स्फुट पदे; २ पदे, राजवाडे ग्रंथमाला; १४ पदे, चपळगावकर, नरेंद्र; प्रतिष्ठान, जाने. १९६२; १६ पदे, पोहनेरकर, न. शे., प्रतिभा, जून–जुलै, १९४८. **अमु.** – अभंग व पदपदांतरे; भाइसमं.; सवामं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : जनीजनार्दन; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ३३८–३४१. २. ढेरे, रा. चिं. : जनीजनार्दन; गंगाजळी; पुणे, १९७२; पृ. २६–४५. ३. देव, शं. श्री. : जनीजनार्दनांचा थोडासा परिचय; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ५४–५९. ४. भुसारी, र. म. : जनीजनार्दन; प्रतिष्ठान, जाने. १९५७ ; पृ. ३४.

**जनुभट / ० जनभट** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, मध्यकाल] कवी. जमालशहा ह्या सत्पुरुषाचा हा शिष्य. जनुभटाचा हा गुरू सूफी परंपरेतला असून साक्षात श्रीदत्तात्रेयांचा त्याला अनुग्रह होता. जनुभटाची काही हिंदी रचना, मराठी पदे, अभंग व *गंगापार्वतीभांडण* हे काव्य अशी रचना समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात आढळते (हस्त सू., खं. १). – म. रा. जोशी : विसंमंवा., नागपूर, १९७१; पृ. १३३–१३४.

**जमालशहा** [अंदाजे श. १४५० / इ. स. १५२८ – श. १५०० / इ. स. १५७८] कवी. ह्याचे मूळ नाव विश्वनाथ. दत्तात्रेयांनी मलंगवेशाने ह्याला अनुग्रह दिला (संककासू., पृ. ३८). तेव्हापासून हा फकीरवेशाने राहू लागला. त्यानंतरच हा जमालशा ह्या नावाने प्रसिद्धी पावला. अशीच हकीकत *एकनाथचरित्रात*सुद्धा सापडते. हा सूफी पंथातला होता असे म्हणतात. काही सूफी संत व दत्तात्रेय परंपरेतील संतपुरुष ह्यांचे परस्परांशी संबंध असावेत असे अभ्यासकांना वाटते. जमालशहाने पदांची रचना केली आहे (सवामं. हस्त. सू., खं. २).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा.; जनुभट व जमालशा; विसंमंवा.; नागपूर, १९७१; पृ. १३३–१३४.

**जयंतिका** [अंदाजे श. १५५० / इ. स. १६२८ – श. १५७५ / इ. स. १६५३] कवयित्री. लक्षधीर कवींची कन्या. एका पदात हिने तसा उल्लेख केला आहे. उदा., ' प्रथम गुरु लक्षधीर त्याची मी कुमरी : गुरुराज भीष्मु तेणें रक्षिलें परात्परीं '. हिचे *सासुरवासिनी* असे एकच रूपकपर पद असून ते ल. रा. पांगारकरांनी छापले आहे (मवाइ., खं. २; आ. २ री, पृ. ५७८).

**जयदेव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त.सू. , खं. १, २.

**जयदेव (महेश्वर)** [का. अनु.] टीकाकार.

**रचना : अमु.** – गीतगोविंद (सटीक); भाइसंमं. हस्त. सू., पृ. ८२.

**० जयराम–१** – पहा **जयरामस्वामी वडगावकर.**

**० जयराम–२** – पहा **गंभीरसुत.**

**जयराम–३** [का. अनु.] कवी. गुरू : सर्वानंद.

**रचना : अमु.** –एकादशी आख्यान; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ३९.

**जयराम–४** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर व १९ व्या शतकाचा प्रथम पाद] कवी. नाथसंप्रदायी. जयरामांनी आपली गुरुपरंपरा : आदिनाथ > आदिशक्ति > मच्छेंद्रनाथ > गोरक्षनाथ > गैनीनाथ > निवृत्तिनाथ > श्रीज्ञानेश्वर > सदाशिवनाथ > गणेशनाथ > उद्धवनाथ > केशवनाथ > बाळनाथ > दीनानाथ > मयोरेश्वर > जयराम, अशी *जयबोध* ह्या ग्रंथाच्या शेवटी दिली आहे. पूर्ववयात हे व्यापारधंदा करीत असावेत. संसाराचा बराच अनुभव घेतल्यानंतर अनुताप होऊन स्वामींस उपरती झाली असावी असे त्यांच्या ग्रंथावरून दिसते. *जयबोध* (*दासबोधा*वरील टीका) हा ग्रंथ जयरामांनी श. १७०१ आश्विन वद्य चतुर्थीस आळंदीस संपूर्ण केला. *जयबोध* हा एक विस्तृत असा *दासबोध*च आहे असे गो. का. चांदोरकर म्हणतात. *श्रीमत् दासबोधा*च्या ७७५१ ओव्यांचा जयरामांनी ह्या ग्रंथात १९०७४ ओव्यात विस्तार केला आहे. *दासबोधा*चे २० दशक तर *जयबोधा*चे २० अध्याय. ह्यात *दासबोधा*तील बऱ्याच ओव्या जशाच्या तशाच *जयबोधात* घेतलेल्या आहेत तर आणखी काही थोडाफार फरक करून घातल्या आहेत. *दासबोधा*च्या २० दशकात जे जे विषय विवेचिले आहेत ते तेच विषय जयरामांनी विवेचिले आहेत. *दासबोधा*तील कठीण स्थळांचा अर्थ लावण्यास ह्या ग्रंथाचा बराच उपयोग होऊ शकेल.

आपण *दासबोध* ग्रंथाधारे लिहीत आहोत, किंवा *दासबोधा*ची टीका लिहीत आहोत असे मात्र चुकून सुद्धा कोठे, सबंध ग्रंथात, जयरामांनी म्हटलेले नाही. हा ग्रंथ लिहीत असता *दासबोध* ग्रंथाची प्रत जयरामांच्या हाताशी सारखी होती, असली पाहिजे, असे वाटते. ग्रंथातील ओवीची बांधणी विस्कळीत आहे. प्रामुख्याने *दासबोधा*चा अनुवाद असेच ह्या ग्रंथाचे स्वरूप दिसते.

ग्रंथाचा पहिला अध्याय श. १६९१ (इ. स. १७६९) मध्ये रचला गेला; दुसऱ्या अध्यायाच्या शेवटी रचनाकाळ दिलेला नाही; पण तिसऱ्या अध्यायापासून तो विसाव्यापर्यंत सर्व ग्रंथ श. १७०१ (इ. स. १७७९) च्या वैशाखापासून तो आश्विनापर्यंतच्या सहा महिन्यांतच रचला गेला असे दिसते. शंकर श्रीकृष्ण देव ह्यांना चांदोरकरांकडून प्राप्त झालेली प्रस्तुत ग्रंथाची आळंदी येथील प्रत ही खुद्द ग्रंथकाराच्या हातची आहे. ग्रंथाचे मुद्रण अद्यापि झालेले नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : दासबोध व जयबोध; श्रीसरस्वतीमंदिर, व. ५, अं. १, चैत्र श. १८२७; पृ. १–१६. २. देव, शं. श्री. : श्रीसमर्थवाग्देवतामंदिरातील एक अपूर्व ग्रंथ; रामदास आणि रामदासी; पाचवा सुमनहार; व. २०, अं. २२९, श. १८६३; पृ. ४९–६६.

**जयराम–५** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**जयराम–६** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** –आरत्या, पदे, सवाया, स्तोत्रे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**जयराम अनंत वाबळे / ० जयरामनाना / ० जयरामकवि** [श. १६८७ / इ. स. १७६५ – श. १७८४, माघ शु. ७/ इ.स. १८६३] कवी. नगरच्या वाबळे देशमुखांच्या घराण्यातील. शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण. वडिलांचे नाव अनंत व आईचे नाव मुक्ताबाई. चैतन्यसंप्रदायातील कोणी विठ्ठल ह्यांचे गुरू. त्यांचा उपदेश घेतल्यानंतर हे भजनकीर्तन व *गीता* आणि *भागवत* ह्यांवर निरूपण करू लागले. ह्यांनी *भागवत दशम स्कंधा*वरील एक ओवीबद्ध टीका रचली आहे. अभंग, सौऱ्या व अनेक पदेही ह्यांनी केली आहेत. नगर शहराचे उत्तर बाजूला असलेल्या त्यांच्या राधेगोविंद मठात आजही त्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव माघ शु. सप्तमीस साजरा होत असतो (ज. र. आजगांवकर : जयरामनाना; मकच., खं. ५, पृ. २२२–२३३).

**० जयराम कवि** – पहा **जयराम अनंत वाबळे.**

**जयराम काशी** [का. अनु] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**जयराम कृष्णदास–१** [का. अनु.] कवी. ह्यांची *गोपाळकाला* (श्लो. ११), अभंग व पदपदांतरे अशी स्फुट रचना समर्थवाग्देवतामंदिर संग्रहात उपलब्ध (हस्त. सू., खं. १, २).

**० जयराम कृष्णदास–२** –पहा **जयरामस्वामी वडगावकर.**

**जयरामजजांकित / ० जयरामजसुतअंकित** [अंदाजे इ. स. १८०६] कवी. दुसऱ्या बाजीराव पेशव्यांचे समकालीन. गुरू : चिदंबरस्वामी (गुलंहोसूरकर). ह्यांचा उल्लेख *साधुमाहात्म्य* प्रकरणात कवीने केला आहे तो असा : ' शिवअवतार चिदंबरस्वामी तत्पदपंकजीं रत जालों मी । ' कवीने ' जयरामजसुतअंकित ' किंवा ' जयरामजसुतदास ' असा स्वतःचा उल्लेख कवितेत केलेला आहे.

ह्यांच्या कवितेची दोन हस्तलिखित बाडे उपलब्ध आहेत. धुळे येथील बाडात सुमारे ३०० पदे आहेत. हरिभक्ती हा कवितेचा एकच विषय असला तरी ह्यांची कविता रसाविष्कारी आहे. कवीने रुक्मिणीस्वयंवर, विरहिणी, गौळणी, गोपींची कृष्णाची गाऱ्हाणी, मुरली अशा विविध विषयांवर व प्रसंगांवर पदे केलेली दिसतात. पैकी पाच पदे शं. श्री. देव ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत. कवीची *साधुलक्षण, साधुमाहात्म्य, पतिव्रतास्तुती, होरी, फाग, धावे* इत्यादी प्रकरणे भारत इतिहास संशोधक मंडळाच्या बाडांत सापडतात. ह्यांनी *पंतप्रधानस्तुति* नावाचे एक काव्यही लिहिले आहे. हे दुसऱ्या बाजीरावाच्या स्तुतिपर असून ' दुसरे बाजीराव हे शूर, धीर, बुद्धिमान व साक्षात धर्माचे अवतार असे म्हणून ह्या भक्तकवीने सर्व इतिहास लटका पाडला आहे ' असे ह्या काव्याविषयीचे मत द. वा. पोतदार ह्यांनी व्यक्त केले आहे (भाइसंमंत्रै., व., ३, अं. १, पृ. ४७).

**रचना :** अमु. – १. आशीर्वादपर (ग्रं. सं. ३९०). २. धावा द्रौपदीचा (ग्रं. सं. ३८७). ३. धावा रुक्मिणीचा (ग्रं. सं. ३८२). ४. धावा सीतेचा (ग्रं. सं. ३८८). ५. पतिव्रतास्तुति (ग्रं. सं. ३८१). ६. साधुमाहात्म्य (ग्रं. सं. ३८९). ७. साधुलक्षण (ग्रं. सं. ३८०). ८. होरी–फाग (ग्रं. सं. २९६). ९. पदपदांतरे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देव, शं. श्री. : जयरामजजांकित कवी; भाइसंमंपंसवृ., श. १८३९; पृ. ३१–३५. २. पोतदार, द. वा. : जयरामजजांकित व दुसरे बाजीराव पेशवे; भाइसंमंत्रै., व. ३, अं. १, आषाढ, श. १८४४; पृ. ४६–४७.

**० जयरामजसुतअंकित** – पहा **जयरामजजांकित.**

**जयरामतनय** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – यशोदाप्रलाप (ग्रं. सं. १२६); सवामं. बा. १४५०.

**० जयराम नामा** – पहा **जयराम अनंत बाबळे.**

**जयरामपंत** [का. अनु.] कवी.

रचना : अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**जयराम पिंड्ये** [अंदाजे श. १५७५ / इ. स. १६५३ – श. १५८० / इ. स. १६५८] कवी. तंजावरच्या शहाजीराजे भोसले नृपतीचे आश्रित. मातेचे नाव गंगावा. पित्याचे नाव गंभीरराव. उपनाव पिंड्ये. गोत्र जामदग्नि वत्स. नाशिक जिल्ह्यातील सप्तशृंगीच्या परिसरात राहणारे. मार्कंडेयपर्वतापासून अहिवंतपर्वतापर्यंत जे सात किल्ले आहेत त्यांची किल्लेदारी गंभीरराव ह्यांजकडे होती. अहमदनगरच्या बहिरी-निजामशाहाच्या राज्याचे पुनरुज्जीवन शहाजी आपल्या पूर्ववयात करीत असता ह्या गंभीररावांशी त्यांचा सहजच परिचय झालेला होता. शहाजीराजांनी बंगळूरप्रांती राज्यस्थापना केल्यावर 'कवि जयराम पिंड्ये' त्यांच्या आश्रयार्थ तिकडे गेले. हे अनेक भाषा जाणणारे विद्वान पंडित होते. ह्यांनी *राधामाधवविलासचंपू* हे काव्य शहाजीराजांच्या सांगण्यावरून लिहिले.

हे चंपूकाव्य संस्कृतात रचले असून त्याचे अकरा उल्लास आहेत. समग्र ग्रंथाच्या एक तृतीयांश भागात राधाकृष्णवर्णन व उरलेल्या दोन तृतीयांश भागात शहाजीराजांची प्रशंसा भरली आहे. ह्यापैकी अकराव्या उल्लासात प्राकृत भाषांतील कवित्व समाविष्ट केलेले आहे. ह्या उल्लासाचे स्वरूप ग्रंथाच्या पहिल्या दहा उल्लासांहून वेगळे असल्याने त्यास 'परिशिष्ट खंड' असे वि. का. राजवाडे ह्यांनी म्हटले आहे. ग्रंथातील निवेदनाचा एक तृतीयांश भाग ह्यात समाविष्ट होतो.

अकराव्या उल्लासात बारा देशी भाषांत कवीने जे कवित्व केले आहे त्यातील काही भाग (श्लो. ३०–४६) महाराष्ट्रभाषेत रचला आहे. ह्याकरिता ओवी, श्लोक, दोहा, अनुष्टुभ अशी विविध वृत्ते वापरली आहेत. जयराम कवींना फारसी, उर्दू, व्रज, गुजराती, बागलाणी, पंजाबी, कानडी अशा अनेक भाषा उत्तम अवगत होत्या. हा चंपूग्रंथ शिवकालात नकललेल्या एका पोथीवरून (अंदाजे श. १६०० / इ. स. १६७८) वि. का राजवाडे ह्यांनी प्रसिद्ध केला आहे.

*राधामाधवविलास* ह्या चंपूला काव्य व इतिहास ह्या दृष्टीने महत्त्व आहे. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे ह्या कवीच्या व त्याने रचलेल्या काव्याच्या संदर्भात आपल्या प्रस्तावनेत (पृ. ६) लिहितात : "जयराम हा बोलून चालून कवि आहे, नीरस इतिहासकार नाहीं. तेव्हां उत्प्रेक्षा, उपमा इत्यादि अलंकारांनीं त्याची वाणी नटली असल्यास नवल नाही. परंतु अलंकार घालावयाचे तेहि कवीनें बेताबातानेंच घातले आहेत. जयरामाची मुख्य दृष्टि अलंकार करण्याकडे असूनहि त्यानें नायकाचें पराक्रमवर्णन थोडेंबहुत केलें आहे. आणि येथेंच इतिहासाभ्यासकांना खाद्य मिळण्यासारखें आहे; व अलंकाराचें अवगुंठन एकीकडे सारून ऐतिहासिक सत्य सांपडण्याची खात्री आहे."

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** संपा. राजवाडे, वि. का. : प्रस्ता., राधामाधवविलासचंपू; जयराम पिंड्येकृत; पुणे, १९२२; पृ. १–२५.

**जयरामबावा** [का. अनु.] रामदासी कवी. दायादांनी फसविल्यामुळे ह्यांचे मन संसारातून निवृत्त झाले. पुढे गुरूचा उपदेश घेतल्यानंतर हे विरक्तवृत्तीने राहू लागले, असा उल्लेख ह्यांच्या अभंगात सापडतो. ह्यांनी अभंग, पदे, श्लोक अशी विविध आणि विपुल रचना केली आहे. रामचंद्र व पंढरीचा विठ्ठल ह्या दोन्ही दैवतांवर रचना आढळते. ह्यांनी अभंगांतून *दासबोध* ग्रंथाची स्तुती केली आहे. 'या जयरामबावाच्या वाणीत मनोहर असा एक साधेपणा आहे' असे *महाराष्ट्रसारस्वत*कार आपले मत देतात (म. सा., आ. ५, पृ. ३९१–३९२).

**जयराम विठ्ठल** [का. अनु.] कवी. ह्यांचे *कूटस्थदीप* हे प्रकरण वि. का. राजवाडे ह्यांस सापडले. त्याच्या एकंदर ओव्या ३५ असून 'जयरामे विठ्ठलगुरूचे वचन । केले निवेदन शीष्या लागी ॥ ३६ ॥' अशी शेवटची ओवी आहे (वि. का. राजवाडे : जयराम विठ्ठलकृत कूटस्थदीप अभंग; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. ५६).

**जयरामसुत–१ / ० जयरामात्मज–१** [का. अनु.] कवी. एकनाथांच्या *भावार्थ-रामायणा*च्या युद्धकांडातील *अहिरावण-महिरावणाख्याना*चा (अ. ५१–५४) कर्ता म्हणून जयरामसुताचे नाव घेतले जाते. मुळात एकनाथांनी हे आख्यान लिहिले नव्हते. जयरामसुताने ते रचून घातले असावे असे ५४ व्या अध्यायातील जयरामसुत कवीच्या निवेदनावरून वाटते. ह्या ओव्या अशा : "एकनाथी रामायण । केलें सप्तकांड कथन। त्यांत अहिरावणाख्यान। काय म्हणोन विसरलें ॥ ३३३ ॥ परंतु झाले बहुत दिवस । मुखीं पाळितां ग्रंथास । गाहाळिलें ह्या अध्यायास । तिहीं तयास काय कीजे ॥ ३३५ ॥ मग साक्षेपें जयरामसुतें । करोनि घातलें अध्यायातें । हृदयीं रिघोनि एकनाथें । हें मजहातें करविलें ॥ ३३६ ॥" ह्यावरून असे कळते की मुळात एकनाथांनी हे आख्यान रचले होते पण ह्या आख्यानाचा ५४ वा अध्याय गहाळ झाल्याने जयरामसुताने तेवढाच रचून ग्रंथात घातला असे डॉ. पंडित आवळीकर ह्यांनी आपले मत मांडले आहे. डॉ. आवळीकर ह्यांना धारवाडनजीक कलघटगी (कर्नाटक) येथे *भावार्थ-रामायण युद्धकांडा*ची एक हस्तलिखित प्रत मिळाली. ह्या प्रतीतील ५१, ५२, ५३ हे अध्याय मुद्रित प्रतीप्रमाणे आहेत. ५४ वा अध्याय (१८६ ओ.) मात्र अगदी वेगळा आहे. तेव्हा *महिरावणाख्यान* एकनाथांनी लिहिले होते. फक्त *अहिरावणाख्यान* म्हणजे ५४ वा अध्यायच तेवढा गहाळ झाला होता असे दिसते व तेवढाच ह्या कवीने घातला. ज. स. करंदीकर; न. र. फाटक व डॉ. तुळपुळे म्हणतात त्याप्रमाणे ५१–५४ हे चारी अध्याय जयरामसुताचे नाहीत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : भावार्थरामायणाचे युद्धकांड; जुवानसं., धारवाड, १९६४, पृ. ५८–८९.

**जयरामसुत–२ / ० जयरामात्मज–२** [अंदाजे इ. स. १७००] कवी. ह्या जयरामसुतांची *संतमालिका* भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकात प्रसिद्ध झाली आहे (व. २३, अं. ४, पृ. २५–९७). त्यावरून कोणी श्रीधर ह्यांचा गुरू असावा असे अनुमान भालेराव ह्यांनी काढले आहे. परंतु *महाराष्ट्र कवि* मासिकात छापलेल्या त्याच संतमालिकेवरून वरील अनुमानास आधार सापडत नाही. ह्यांचे जयरामात्मज असे टोपणनाव गो. का. चांदोरकरांनी दिले आहे (संककासू., पृ. ३९). ह्यांचे गुरू गोपाळ असावे असे ते म्हणतात. कवीची आरत्या, धावे, पदे, स्तोत्रे अशी अवांतर स्फुट रचना बरीच असून ती समर्थवाग्देवतामंदिर येथील हस्तलिखित बाडांत आढळते. ह्याशिवाय *द्रौपदीवस्त्रहरण, गीतापुष्प*

अशा रचनाही आढळतात. रचनेचे स्वरूप भक्तिपर आहे.

**रचना : मु.** – १. संतमालिका : (१) संपा. भालेराव, भा. रा.; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४; पृ. ९५–९७. (२) संपा. भावे, वि. ल. : महा. कवी; स्फुट संग्रह; पृ. ७–८. २. गीतेवरील आरती; मआ., पृ. ४१६. **अमु.** – १. गीतापुष्प; श्लो. सं. २२५; (कॅटलॉग ऑफ मराठी मॅन्युस्क्रिप्ट्स, ब्लूमहार्ट आणि कान्हेरे). २. द्रौपदीवस्त्रहरण; ३. वस्त्राभरण; ४. स्फुट अभंग, आरत्या, धावे, पदे, स्तोत्रे इ.; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**जयरामसुतसुत** / ० *जयरामाचा* **कुमरसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रामचरित्रपर व कृष्णचरित्रपर दोन मोठी पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**जयरामस्वामी (वडगावकर)** / ० **जयराम–१** / ० **कृष्णदास** *जयराम*–२ / *जयराम* **कृष्णदास–२** [श. १५२१, श्रावण व. ८ / इ. स. १५९९ – समा. श. १५९४, भाद्र. व. ४ / इ. स. १६७२] कवी. श्रीरामदासपंचायतनापैकी एक. सातारा जिल्ह्यात खटाव तालुक्यात मौजे वडगावी ह्यांचा मठ होता, त्यामुळे वडगावकर जयरामस्वामी म्हणून प्रसिद्ध. कात्राबाज मांडवगडचे हे देशपांडे. उपनाव कसरे. देशस्थ, ऋग्वेदी आश्वलायनशाखी ब्राह्मण. वडिलांचे नाव भिकाजीपंत व आईचे नाव कृष्णाबाई. ह्यांचा जन्म गोकुळअष्टमीस झाला. घरच्या गरिबीमुळे व लहान वयातच वडील निवर्तल्यामुळे काही काळ पंचवटी व जोगाईचे आंबे येथे ह्यांनी अनुष्ठान व अध्ययन केले. नंतर तेथून ते पंढरपुरास गेले. माधुकरी मागून विद्याभ्यास पूर्ण केल्यानंतर ते वडगावी कृष्णाप्पास्वामींजवळ येऊन राहिले. पुढे ह्याच कृष्णाप्पास्वामींकडून जयरामांनी उपदेश घेतला. वडगाव येथील गादीची मूळ स्थापना शांतलिंगप्पा ऊर्फ शांतेश्वर महाराज ह्यांनी केली. हे जंगम (शैव) होते. शैव आणि वैष्णव ह्यांच्यामधील तंटे मिटवून त्यांच्यात ऐक्य घडविण्याचे कार्य ह्यांनी केले. ह्यांचे कृष्णाप्पा हे शिष्य व ह्या कृष्णाप्पांचे शिष्य जयरामस्वामी. कृष्णाप्पास्वामींच्यानंतर वडगावच्या मठात जयरामस्वामींची शिष्यपरंपरा चालू राहिली ती ब्रह्मचाऱ्यांची आहे. स्वामींनी आपली सर्व ग्रंथरचना वडगाव मुक्कामीच केली. त्यांची समाधी वडगाव येथेच आहे.

जयरामस्वामींच्या नावावर *भागवतदशमस्कंध, अपरोक्षानुभव, प्रबोधसुधाकर* असे टीकाग्रंथ, *ज्ञानीभक्तसंवाद* हे आध्यात्मिक प्रकरण, *सीतास्वयंवर* व *रुक्मिणीहरण* ही काव्ये आणि अभंग व पदे अशी स्फुट रचना आढळते. ह्यांचा *अपरोक्षानुभव* हा ग्रंथ शंकराचार्यांच्या *अपरोक्षानुभूति* ह्या ग्रंथावरील टीका आहे. साधनचतुष्टय, आत्मानात्मविवेक, ज्ञानाचे स्वरूप, मिथ्याभाव, जगाची ब्रह्मरूपता, ब्रह्माची सर्वात्मकता इत्यादी विषय ह्या ग्रंथात आले असून ते सर्वसामान्य जनांस आकलन होतील इतक्या सुलभतेने सांगितले आहेत. ग्रंथात स्वामी अनेकवार म्हणतात : " रोकडी अनुभवप्रतीति । म्हणोनि नाम अपरोक्षानुभूति । " [⇨ ३.] *ज्ञानीभक्तसंवादात* ज्ञान व भक्ती ह्यांची एकरूपता दाखविली आहे. 'ज्ञानहीन भक्त तो आंधळा । भक्तिहीन ज्ञानी तो पांगळा ॥' म्हणून ज्ञानभक्ती किंवा अभेदभक्ती हीच सर्वश्रेष्ठ होय असे स्वामी सांगतात. *शांतिपंचीकरण* हा ग्रंथ म्हणजे दशरथ शांत ह्या वीरशैव कवीचे *शांतिप्रकरण* होय. *शांतिपंचीकरण* ह्या चुकीच्या शीर्षकाने जयरामस्वामींच्या नावावर तो दोन वेळा छापला गेला. पण ग्रंथाच्या कर्त्याचे उल्लेख ग्रंथात जागोजागी आढळतात (रा. चिं. ढेरे : *प्राचीन मराठीच्या नवधारा*, पृ. ५०). ह्यांच्या *सीतास्वयंवर* ग्रंथाचे हस्तलिखित वि. ल. भावे ह्यांच्यापाशी होते. राजवाडे संग्रहातील एका त्रुटित प्रतीवरून प्रस्तुत ग्रंथावर पुढील अभिप्राय द. वा. पोतदार देतात: 'रामायणी कथा वर्णन करितांना तिच्यांत रहस्यरूपानें अध्यात्मसिद्धान्त विवरिले आहेत. सर्वत्र वर्णन अध्यात्मदृष्टि डोळ्यापुढे ठेवून लिहिले आहे. या ग्रंथाचा दुसरा विशेष म्हटला म्हणजे त्यातील कथावैचित्र्य. वेदान्तविषय सोपा करून सांगण्याची हातोटी जयरामस्वामींजवळ आहे.' आख्याने व पदेही ह्यांच्या गोड वाणीतून सरस उतरली आहेत.

**रचना : मु.** – १. अपरोक्षानुभव; प्रक. १२; ओ. सं. १७८०; मूळ १४४ व गीतेतील २३ अशा एकूण १६७ संस्कृत श्लोकांवरील टीका; र. श. १५९१ / इ. स. १६६९; संपा. भावे, वि. ल.; मुंबई, १९०५. **अमु.** – १. प्रबोधसुधाकरटीका (मूळ ग्रंथ शंकराचार्यांचा); प्रक. १५; ओ. सं. ३००; तंसम. (वा. २३२–२३३); २. भागवतदशमस्कंधटीका; अ. ४९; ग्रं. सं. ९९५९; ३. रुक्मिणीहरण / रुक्मिणीस्वयंवर; ग्रं. सं. ४०००; र. श. १५७६ / इ. स. १६५४; ४. सीतास्वयंवर; ग्रं. सं. २०४९; र. श. १५७० / इ. स. १६४८); ५. ज्ञानीभक्तसंवाद; ओ. सं. २३८; सवामं.; ६. अभंग व पदपदांतरे; चार बाडे, सवामं. हस्त. संग्रह; वडगाव मठातील संग्रह; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आचार्य कृ. वि. : वडगाव मठाची परंपरा; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ११८–१२२; २. पोतदार, द. वा. : कृष्णदास जयरामाचे सीतास्वयंवर; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. ७३–७६; ३. महाडेश्वर, वि. बा. : जयरामस्वामी; मुमुक्षु, जाने. १९२७; पृ. १५–२१; ४. (संपा.) मोडक, ज. बा. : जयरामस्वामी वडगावकर यांच्या चरित्राची बखर; काइसं., पृ. २७, इ. स. १८८९.

**० जयरामाचा कुमरसुत** – पहा **जयरामसुतसुत.**

**० जयरामात्मज–१** – पहा **जयरामसुत–१.**

**० जयरामात्मज–२** – पहा **जयरामसुत–२.**

**० जयरामात्मज–३** – पहा **बस्वलिंग.**

**जयरामात्मज अंकित** / ० **जयरामात्मजतनय** / ० **जयरामात्मजसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदे आणि कटाव; सवामं., हस्त. सू., खं. १, २.

**० जयरामात्मजतनय** – पहा **जयरामात्मजअंकित.**

**० जयरामात्मजसुत** – पहा **जयरामात्मजअंकित.**

**० जयवंत** – पहा **रामदास.**

**जयानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० जर्व्हिस, जॉर्ज** – पहा **जॉर्ज रित्सो जर्व्हिस.**

**जसवंत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू. खं., १, २.

**जसवंतसुत** – [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**जळकोट रामभट्ट** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**जळकोट विठ्ठलभट्ट** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० जाखदेव** – पहा **यक्षदेव.**

**जाणकी** [का. अनु.] कवयित्री.

**रचना : अमु.** – पदपदांतरे : वेंचले येथील शक १८२३ (इ. स. १९०१) त नकलून घेतलेल्या पदांच्या बाडात ह्या कवयित्रीची कविता समाविष्ट (भाइसमं.).

**(डॉ.) जॉन टेलर** / ० **टेलर, (डॉ.) जॉन** [ ? – अंदाजे इ. स. १८२२] सेंट *मॅथ्यूच्या गॉस्पेल*चे मराठी भाषान्तरकार. मुंबई सरकारने स्थापिलेल्या पाठ्यपुस्तक मंडळाचे पहिले इंग्रज कार्यवाह. मुंबई प्रांतात खिळ्यांचा उपयोग करून मुद्रित (१८२२; कूरिअर प्रेस) केलेल्या *पंचोपाख्यान* ह्या पहिल्या मराठी बोधकथात्मक पुस्तकाच्या

प्रकाशनाची तजवीज ह्यांनीच केली.

डॉ. टेलर हे १८०७ च्या सुमारास ' लंडन मिशनरी सोसायटी '-च्या वतीने मुंबई प्रांतात ख्रिस्ताचे शुभवर्तमान पसरविण्याच्या उद्देशाने आले. परंतु त्यावेळचे सरकार असा उपक्रम सुरू करण्याच्या विरुद्ध असल्यामुळे, आपला तो उद्देश सोडून देऊन त्यांनी सरकारी शिक्षण-खात्यात नोकरी धरली. त्यांच्या आगमनानंतर लवकरच काही अमेरिकन मिशनरी मुंबईत आले. प्रारंभी डॉ. टेलरनीच त्यांना आश्रय दिला व मराठी भाषा शिकण्याची सोय करून दिली. ह्या मिशनऱ्यांस मराठी भाषा अवगत झाल्यावर ते ख्रिस्तीधर्मोपदेशाच्या कार्यास लागले. " १८१६ सालीं ह्या मिशननें मुंबईस आपला छापखाना उघडून ह्या बाजूला छापण्यांत आलेल्या पहिल्या ख्रिस्ती छापील वाङ्मयाचा पाया घातला. त्यांनीं त्यासाठी मूळ मराठी टाईप आणला तो श्रीरामपूर (बंगाल) येथून. पण हळूहळू ते स्वतःच आपला टाईप पाडूं लागले. ह्या सुमारास छापखान्याच्या कामाची माहिती असलेला रेव्ह. होरेशिओ बार्ड्वेल नांवाचा एक पाद्री मुंबईस आला होता. त्यास सिलोनला जावयाचें होतें. पण तिकडे त्यास जाऊं न देतां मुंबईतील मिशनऱ्यांनीं त्यास आपल्याकडेच ठेवून घेतलें व त्याजकडे छापखान्याची व्यवस्था सोंपविली. मराठी अक्षरांची व भाषेची नीट ओळख झाल्यावर त्यानें छपाईच्या कामास सुरुवात केली. ह्याच मिशनाला *मत्तयाचें* (सेंट मॅथ्यूचें) *शुभवर्तमान* महाराष्ट्रांत प्रथम छापल्याचा मान मिळतो. तें *शुभवर्तमान* मिशनच्या छापखान्यांतून इ. स. १८१७ सालीं (१० मार्च) बाहेर पडलें. आरंभीं आरंभीं ह्या बाबतींत ह्या मिशनरींनीं श्रीरामपूरचा *नवा करार* (बायबलचा) आपल्या भाषान्तराच्या कामीं आदर्श म्हणून पुढें ठेवला होता. परंतु लौकरच त्यांची खात्री झाली कीं, ह्या कामीं त्या भाषान्तराचा कांहीं उपयोग होण्यासारखा नाहीं. त्यांनीं आपल्या भाषान्तरासाठीं नवी पद्धत अवलंबिली; ती म्हणजे मूळ ग्रीकवरून भाषान्तर करणें. अशा रीतीनें त्यांनीं प्रथम *मत्तयाचें मराठी शुभवर्तमान* तयार केलें." (दे. ना. टिळक : *मराठी बायबलचे भाषान्तर* : विहंगमावलोकन; मुंबई, १९५७ ; पृ. ८ ).

अमेरिकन मिशनऱ्यांनी केलेले *सेंट मॅथ्यूच्या गॉस्पेल*चे मराठी भाषान्तर डॉ. टेलर ह्यांस तितकेसे पसंत पडले नाही. त्यांनी लगेच स्वतंत्रपणे स्वतःच त्याचे भाषान्तर करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे ते पूर्ण झाल्यावर, प्रकाशनार्थ, लंडनच्या ' बायबल सोसायटी 'च्या स्वाधीन केले. तिने ते काही काळाने प्रसिद्ध केले. ह्या पुस्तकाखरीज *शुभवर्तमानदर्शक व चर्चसंबंधीं नानाविध संग्रह, करिंथिकरांस पहिल्या पत्राच्या प्रोफेसर लायसक्रुत टीकेचें मराठी भाषान्तर, एक्लेसियेसाठीं गीतें* अशी तीन पुस्तके ह्यांनी लिहून प्रसिद्ध केली.

**(रेव्ह.) जॉन डिक्सन** / ० डिक्सन (रेव्ह.) जॉन [ ? – इ. स. १८४६] भाषान्तरकार. चर्च मिशनरी सोसायटीच्या वतीने महाराष्ट्रात आलेले हे पहिले ख्रिस्तीधर्मप्रचारक. इ. स. १८२९ मध्ये हे इकडे आले. इ. स. १८३२ मध्ये ह्यांनी नाशिक येथे मिशन स्थापन केले. ह्यांना संस्कृत व मराठी ह्या भाषा चांगल्या अवगत होत्या. ह्यांनी *जुन्या करारातील क्रॉनिकल्स, एझरा, नेमिया* आणि *इस्थर, जॉब, प्रॉव्हर्ब्स, एक्लेसिॲस्ट, सालोमन साँग, इशिया, जेरेमिया* ही प्रकरणे मराठीत भाषान्तरित केली. *साधारण प्रार्थना* (१८३५) ह्या नावाचेही एक अनुवादित पुस्तक ह्यांच्या नावावर आढळते. हे पुस्तक सध्या उपलब्ध नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म. : रे. जॉन डिक्सन; युमअसे.; मुंबई, १९६०; पृ. ३२२–३२३.

**(डॉ.) जॉन मॅकलेनॉन** [इ. स. १८२८–१८५३] शास्त्रीय ग्रंथांचे लेखक. अव्वल इंग्रजी कालखंडात वेगवेगळ्या शास्त्रांवरील पाठ्यपुस्तके तयार करण्याचे प्रयत्न कॅ. जॉर्ज जर्व्हिस, जॉन मॅकलेनॉन, हरि केशवजी, गो. ना. माडगावकर अशा अनेक विद्वानांनी केले व मराठीत विशिष्ट परिभाषेत शास्त्रीय ग्रंथलेखन अवघड नाही हे सिद्ध करून दाखविले. औषधिविद्या शिकविण्याच्या प्रयत्नात जॉन मॅकलेनॉन ह्यांची कामगिरी महत्त्वाची ठरते.

हे बॉम्बे एस्टॅब्लिशमेंटचे ॲसिस्टंट सर्जन व नेटिव्ह मेडिकल स्कूलचे सुपरिंटेंडंट होते. पुढे १८४४–४५ मध्ये जॉग्रफिकल सोसायटीचे हे रेसिडेंट मेंबर झाले. १८५० मध्ये बोर्ड ऑफ एज्युकेशनवर ह्यांची नेमणूक झाली. ह्यांच्याच प्रयत्नाने १८२६ मध्ये मुंबईला ' मेडिकल स्कूल फॉर धि नेटिव्ह प्रॅक्टिशनर्स ' सुरू झाले. ह्या स्कूल-मधील विद्यार्थ्यांसाठी ह्यांनी *औषधकल्पनाविधि* (१८२८) नावाचा एक भाषान्तरित वैद्यकग्रंथ लिहिला. ह्या पुस्तकात १. औषधकल्पना-विधी, २. धातु औषधोत्पत्ती व ३. वनस्पति औषधोत्पत्ती अशा तीन विषयांचे विवरण केले आहे. ह्यात औषध म्हणजे काय ते सांगून त्यांनी पाश्चात्त्य व पौर्वात्य औषधांची माहिती दिली आहे. लॅटिन, इंग्रजी, प्राकृत, संस्कृत, हिंदी, फारसी व अरबी एवढ्या भाषांतून औषधांची नावे दिली आहेत. तसेच निरनिराळ्या रोगांच्या जाती व त्यांची लक्षणे सांगून त्यांवर उपाय सुचविले आहेत. १८२८ त त्यांनी *निदान* (पहिली आवृत्ती) असा दुसरा एक ग्रंथ लिहिला. तोच पुढे १८५२ मध्ये *रोगनिदान* ह्या नावाने प्रसिद्ध झाला. *शारीर* (१८५२) नावाचा जो एक ग्रंथ ह्यांनी भाषान्तरित केला त्यांत शरीराच्या रचनेचे शास्त्र विवरिले आहे. वैद्यकशाळेतील विद्यार्थ्यांसाठी निरनिराळी आम्ले व विषे ह्यांचे वर्णन व परिणाम सांगणारा *विषविद्या* (१८५२) हा ग्रंथही त्यांनी लिहिला होता. *आघातादिजन्य अस्थिविकार* असा एक ग्रंथ त्यांनी १८५३ त तयार केला. वरील रचना भाषान्तरित स्वरूपाची असून मुंबईस इ. स. १८३८ त स्थापन झालेल्या ग्रँट मेडिकल कॉलेजात इंग्रजी वैद्यक मराठीतून शिकविण्यासाठी ती केली गेली. ही सर्व रचना मुंबई येथे मुद्रित झालेली आहे (मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात हे ग्रंथ उपलब्ध).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. संपा. जोग, रा. श्री. : मॅकलेनान, जॉन; मवाइ., खं. ४; पुणे, १९७३; पृ. १२३, १३७. २. पिंगे, श्री. म. : डॉ. मॅकलेनान; युमअसे., मुंबई, १९६०; पृ. ३७१–३७४. ३. सरदार, गं. बा. : मॅकलेनान, जॉन; अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका; पुणे, १९७१; पृ. १७, १७१.

**जानराज** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**(रे. डॉ.) जॉन स्टीव्हन्सन** / ० स्टीव्हन्सन, रे. डॉ. जॉन [ ३ नोव्हेंबर १७९८ – ११ ऑगस्ट १८५८] स्कॉटिश ख्रिस्ती धर्मप्रचारक, मराठी भाषेचे व्याकरणकार, व्याकरणप्रबंधकार व पुरातत्त्वसंशोधक. ह्यांचे उच्च शिक्षण ग्लॅसगो व एडिंबरो ह्या विद्यापीठात झाले. स्कॉटिश मिशनतर्फे धर्मप्रचाराकरिता इ. स. १८२४ मध्ये हे मुंबईस आले. १८३४ पर्यंत हर्णै (कोकण) व पुणे येथे त्यांचे वास्तव्य होते. १८३२ साली पुण्यास ह्यांनी पहिली इंग्रजी शाळा स्थापन केली. ती पुढे सरकारने आपल्या ताब्यात घेऊन चालविली. ह्यांनी मराठीत धार्मिक व शैक्षणिक विषयांवर पुस्तके लिहिली. १८५४ मध्ये हे स्वदेशी परतले.

डॉ. स्टीव्हन्सन ह्यांचा मराठी, संस्कृत व मागधी ह्या भाषांचा चांगला अभ्यास होता. *धि प्रिन्सिपल्स ऑफ मराठी ग्रामर* हे व्याकरण त्यांनी १८३३ त रचले. ते तयार करण्याच्या कामात परशुरामतात्या गोडबोले व दाजीशास्त्री शुक्ल ह्यांचे त्यांस साहाय्य झाले. हे रचण्याची त्यांना गरज का भासली ह्याचे प्रस्तावनेत त्यांनी निवेदन केले आहे. मराठी भाषेचा स्टीव्हन्सन स्वतः अभ्यास करीत असता

ह्या भाषेच्या व्याकरणाविषयी त्यांना ज्या शंका उपस्थित झाल्या, व ज्यांचे स्पष्टीकरण पूर्णतया होऊ शकले नाही, त्या शंका दूर व्हाव्या म्हणून त्यासंबंधीची टिपणे करून ठेवून पुढे हे व्याकरण त्यांनी रचले. आठ वर्षे चाललेल्या ह्या खटाटोपाचे फळ पुढील काळातील मराठीच्या विद्यार्थ्यांना अनायासेच मिळाले.

भाषाशास्त्र व मराठी भाषा ह्यांच्यासंबंधात काही महत्त्वपूर्ण विचार व्यक्त करणारे अनेक लेख डॉ. स्टीव्हन्सननी लिहिले. *बॉम्बे एशियाटिक सोसायटीच्या जर्नल*मधील (जाने. १८४२) एका लेखात हिंदुस्थानातील विविध भाषांच्या व्याकरणविषयक घडणीतले साम्य डॉ. स्टीव्हन्सन ह्यांनी दाखवून दिले आहे. इंग्लिश व मराठी भाषांतील साम्य व भेद स्पष्ट करणारा त्यांचा एक लेख थॉमस कँडीच्या *इंग्लिश-मराठी डिक्शनरी* (१८४७ ची आवृत्ती) ह्या ग्रंथात आला आहे.

मराठी भाषेचे अर्थव्यक्तीचे सामर्थ्य फार मोठे आहे. शास्त्र आणि साहित्य ह्यांतील कोणताही विषय ही भाषा सहजपणे व्यक्त करू शकेल, असे ह्या परभाषिक अभ्यासकाने एका लेखात काढलेले उद्गार मराठीच्या संदर्भात लक्षात घेण्याजोगे ठरतात.

ह्यांनी संस्कृतातील *ऋग्वेदसंहिता* (१८३३), *सामवेदसंहिता* (१८४३), त्याचप्रमाणे मागधीतील *कल्पसूत्र* व *नवतत्त्व* हे जैन ग्रंथ (१८४८) इंग्रजीत अनुवादित करून प्रसिद्ध केले. कान्हेरी, नाशिक येथील व सह्याद्रीतील लेण्यातील लेखांवर त्यांनी अनेक शोधलेख लिहिले.

**रचना : मु.** – १. इंग्लिश भाषेच्या व्याकरणाची मूळपीठिका; मुंबई, १८३१. २. ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेचीं प्रमाणें; मुंबई, १८२८. ३. काल्पनीक विज्ञानविषयींचें संक्षेपेंकरून कथन; मुंबई, १८५२. ४. पुराण आणि ख्रीशास्त्र यांच्या पुरातन कथांचें बरोबर पहाणें; मुंबई, १८४५. ५. शुभवर्तमानासंबंधीं प्रश्नावली; मुंबई, १८४५; ६. संभाषणें : कित्येक ब्राह्मण, मराठी इत्यादि आणि ख्रिस्तदास यांमध्यें हिंदुधर्म आणि ख्रिस्तीधर्म याविषयीं; मुंबई, १८२९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, कृ. भि. : जॉन स्टीव्हन्सन; आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती; मुंबई, १९५६. २. पिंगे, श्री. म. : डॉ. स्टीव्हन्सन; युमअसे.; मुंबई, १९६०; पृ. २९४–३०३. ३. मोने, मो. स. : मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरणप्रबंधकार; पुणे, १९२७.

**जॉर्ज रित्सो जर्व्हिस** / ० जर्व्हिस, जॉर्ज [६ ऑक्टोबर १७९४ – १४ आक्टोबर १८५१] ग्रंथकार. अर्वाचीन मराठी वाङ्मयात गणितविषयक ग्रंथांची निर्मिती करणारे हे पहिले. महाराष्ट्रात देशी भाषांतील ग्रंथांचे मुद्रण व प्रकाशन ह्यांचे प्रवर्तन करणारे हे एक युरोपियन विद्यासेवक. वुलिच येथील रॉयल मिलिटरी अॅकेडेमीमध्ये कॅडेट म्हणून इ. स. १८०८ मध्ये त्यांना निवडण्यात आले. पुढे कॅडेट ऑफ इंजिनियर्समध्ये त्यांची नेमणूक झाली. ईस्ट इंडिया कंपनीच्या सेमिनरीमध्ये १० जून १८११ मध्ये उत्तीर्ण होऊन ते ६ सप्टेंबर १८११ मध्ये हिंदुस्थानात आले. १८१८ मध्ये पेंढाऱ्यांच्या युद्धात त्यांनी भाग घेतला व तेथून ते तीन वर्षे इंग्लंडला रजेवर गेले. रजा संपल्यानंतर जर्व्हिस २८ जानेवारी १८२२ ला परत हिंदुस्थानात आले. त्यावेळेस चीफ इंजिनियरचे असिस्टंट म्हणून त्यांची नेमणूक झाली. पुढे ह्या जागेचा त्यांनी राजीनामा दिला. काही काळानंतर पुणे विभागाचे इन्स्पेक्टिंग इंजिनियर म्हणून ते काम पाहू लागले. इ. स. १८३९ मध्ये त्यांची आजारीपणाची रजा मंजूर होऊन ते इंग्लंडला गेले. इंग्लंडला तीन वर्षे राहून ते ता. १४ मार्च १८४२ रोजी मुंबईस परत आले. येथे आल्यानंतर दक्षिण व उत्तर प्रांत ह्या विभागांचे सुपरिंटेंडिंग इंजिनियर म्हणून त्यांची नेमणूक झाली. पुढे बोर्ड ऑफ एज्युकेशनचे सभासद म्हणूनही त्यांना नेमण्यात आले. जर्व्हिस ह्यांनी एतद्देशीय लोकांच्या शिक्षणासाठी व विशेषतः सरकारच्या शास्त्रीय खात्यासाठी शिक्षण देऊन एतद्देशीय नोकरवर्ग तयार केला. त्यांची ही दीर्घकालीन व उत्कृष्ट सेवा कोर्ट ऑफ डायरेक्टर्स ह्यांच्या निदर्शनास आणण्यात आली. पुढे त्यांना युरोपला जाण्यासाठी फर्लो रजा देण्यात आली. तेथे बुलोन ह्या ठिकाणी ते मरण पावले.

जर्व्हिस ह्यांच्या कार्याची माहिती करून घेण्यासाठी आपणास 'नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी 'ची माहिती करून घेतली पाहिजे. हिची स्थापना २१ ऑगस्ट १८२२ रोजी मुंबई येथे झाली. तिचे अध्यक्ष माउंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन हे होते.

महाराष्ट्र देशातील लोकांना स्वभाषेचे पूर्ण ज्ञान व्हावे व इंग्रजी विद्या पूर्ण होण्याची साधने निर्माण करून ठेवावीत हा मुख्य हेतू ही सोसायटी स्थापन करण्याच्या मुळाशी होता. अर्थात ही साधने, म्हणजेच निरनिराळ्या विषयांवरील निरनिराळे ग्रंथ, निर्माण केल्यानेच तो साध्य होणार होता. ही सोसायटी स्थापन झाल्यानंतर हिचे सेक्रेटरी जर्व्हिस (कारकीर्द इ. स. १८२२–१८३०) ह्यांनी हा हेतू सिद्धीस जावा ह्यासाठी मुंबईहून ८ एप्रिल १८२५ रोजी ग्रंथांची भाषान्तरे किंवा नवीन ग्रंथ करणारास बक्षिसाविषयीचे एक प्रसिद्धिपत्रक काढले. ह्या पत्रकातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे :

"ही मंडळी सर्वांस विदित करित्ये कीं, जो कोणी बाळबोध ग्रंथ अथवा प्रौढ ग्रंथ यांचीं मराठी किंवा गुजराती बोलींत चांगलीं भाषांतरे करुन आणील अथवा या दोहों भाषांत मान्य पडे असा आपल्ये कल्पनेनें नवीन ग्रंथ रचील किंवा पुढे सांगीतले प्रकाराचे ग्रंथ हिंदुस्थानी भाषेंत करील त्यास बक्षीस देण्याविषयीं गवरनर कौंशल यांहीं उदार होऊन या मंडळीस समर्थ केलें आहे.

"बक्षीस देण्याचा प्रकार असा आहे कीं बाळबोध ग्रंथांचीं भाषांतरें करणारांस अथवा नवीन बाळबोध ग्रंथांचे करणारांस शंभर रुपयांपासून चारशें रुपयांपर्यंत प्रतिपुस्तकीं बक्षीस मिळेल आणि प्रौढ ग्रंथांचीं भाषांतरें करणारांस अथवा नवीन प्रौढ ग्रंथांचे करणारांस दोन हजार रुपयांपासून पांच हजार रुपयेपर्यंत बक्षीस मिळेल."

ह्या प्रसिद्धिपत्रकात कोणत्या विषयांवर पुस्तके पाहिजेत व ती कोणत्या भाषेत पाहिजेत ह्याचीही माहिती दिलेली होती. त्यात कोश व व्याकरणांची पुस्तके, गणित, ज्योतिष, सिद्ध, कृत्रिम आणि यांत्रिक पदार्थांचे विज्ञान, रसायन, शारीर, वैद्यक, देशवृत्तान्त आणि राजनीती इत्यादी विषयांची मराठी, गुजराती व हिंदुस्तानी भाषेत पुस्तके मागविली होती. गणित ह्या विषयावर डॉक्टर हटन ह्याचे बीजगणित, ला क्रुवा ह्याचे मूळ अंकसंख्या गणित, मूळ बीजगणित, मूळ भूमिती, मूळ त्रिकोणमिती इत्यादी ग्रंथांची मराठी व गुजराती भाषान्तरे मागविली होती. जर्व्हिस ह्यांनी मराठी भाषेत जी गणितविषयक पुस्तके भाषान्तरित केली (डॉ. चार्लस हटन, ड मॉर्गन वगैरेंच्या ग्रंथांची केलेली भाषान्तरे) त्याला हे प्रसिद्धिपत्र अशा रीतीने कारणीभूत झाले असावे. कदाचित गणित ह्या विषयावर सोसायटीकडे कोणाची भाषान्तरे न आल्यामुळे ही गणिताची पुस्तके जर्व्हिस ह्यांनाच लिहावी लागली असावी.

हे काम करीत असताना जर्व्हिस दुसरेही एक काम करीत होते, ते म्हणजे पुस्तके छापण्यासाठी जो छापखाना सरकारने काढला होता त्यावर देखरेख करून पुस्तके छापणे हे होय. १८२६-मध्ये *गणितमार्ग* हे हिंदुस्थानातील पहिले शिलामुद्रित पुस्तक ह्या छापखान्यात जर्व्हिस ह्यांनी छापले. जर्व्हिस पुण्याला गेले तरी त्यांना देशी ग्रंथ छापण्याकरिता लिथोग्राफिक प्रेस तिकडे नेण्याची परवानगी देण्यात आली (१८३१). ह्या छापखान्यात जर्व्हिस

ह्यांनी अनेक पुस्तके छापून घेतली. *महाराष्ट्र भाषेचा कोश* ह्या छापखान्यातून बाहेर पडला. आपले स्वतःचे गणितविषयक ग्रंथ ह्यांनी तेथेच छापून घेतले. एवढेच नव्हे तर सदाशिव काशिनाथ छत्रे व जगन्नाथशास्त्री (क्रमवंत) ह्यांस मराठी शाळेचे काम तपासण्यास नेमून आणि त्यांच्या हाताखाली दुसरे काही शास्त्री नेमून *बाळमित्र, इसापनीतिकथा* अशांसारखे शालोपयोगी पुष्कळ ग्रंथ तयार करविले मराठी भाषेत छापलेली ही पहिली पुस्तके पाहिली तर छापखाने व जव्हिस ह्यांच्या कार्याचे महत्त्व वाचकांस सहज पटेल (संक्षेप : कॅप्टन जव्हिसचे गणितविषयक ग्रंथ; श्री. म. पिंगे; युमअसे., मुंबई, १९६०).

**रचना : मु.** – १. अंकगणिताची मूळपीठिका; मुंबई, १८५०. २. आदिकरण भूमिति (शिक्षामालेतील पुनर्मुद्रित); मुंबई, १८४९. ३. कर्तव्यभूमिति; मुंबई, १८२६. ४. गणितकृति अथवा गणितमार्ग; मुंबई, १८२६. ५. गणित, दुसरा भाग, अपूर्णांक; मुंबई, १८२६. ६. ग्रंथांची भाषांतरे किंवा नवीन ग्रंथ करणारास बक्षिसाविषयीचे प्रसिद्धिपत्र; मुंबई, १८२५. ७. बीजगणित; पुणे, १८४३. ८. बीजगणित मूळपीठिका; पुणे, १८४८. ९. विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष (हे पुस्तक सातारचे श्रीमन्महाराज प्रतापसिंह राजे छत्रपति ह्यांना जव्हिस ह्यांनी अर्पण केले आहे); मुंबई, १८२९. १०. शिक्षामाला; मुंबई, १८२७, १८२८.

**जाफर नरसू** [अंदाजे इ. स. १८५०] शाहीर.

**रचना : मु.** – चिंतामणराव पटवर्धनावरील पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. १७०–७१.

**जावाजी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – हनुमंताची आरती; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० जिंदा फकीर** – पहा **जिंदो फकीर**.

**जिंदो फकीर / ० जिंदा फकीर** [का. अनु.] मुसलमान कवी. ह्या कवीने काही पदे रचली आहेत (संककासू., पृ. ४०).

**जिनदास / ० ब्रह्मजिनदास** [इ. स. च्या १५ व्या शतकाचा उत्तरार्ध] जैन कवी. जिनदास हे देवगिरीकर उज्जंतकीर्ती आचार्यांचे शिष्य. गुजरातमधील ईडर पीठाचे भट्टारक भुवनकीर्ती ह्यांनी देवगिरीस उज्जंतकीर्तींना स्वतंत्र पीठ स्थापून दिले होते. जिनदासांना त्यांच्या गुरूने काव्य, व्याकरण व धर्मशास्त्र शिकवून तयार केले (जिनदासकृत *हरिवंशपुराण*).

हे कवी व्युत्पन्न असून ह्यांनी *हरिवंशपुराण* ह्या काव्यग्रंथाची रचना मराठीत केली आहे. ग्रंथरचनेसाठी कोणत्या संस्कृत किंवा गुजराती हरिवंशरचनेचा आधार घेतला हे त्यांनी सांगितलेले नाही. संवत १५२० मध्ये ब्रह्मजिनदासांनी गुजरातीत *हरिवंशरास* ग्रंथ रचला होता. त्याची मदत ह्यांना झाली असावी. ह्यांची ही एकच कृती उपलब्ध असून तीही ते पूर्ण करू शकले नाहीत. ग्रंथाचे एकंदर ६७ अध्याय आहेत; पैकी जिनदासांनी ५५ अध्याय लिहिले, पुढील भाग पुण्यसागराने लिहून ग्रंथ पूर्ण केला. ओ. सं. सुमारे ११००० आहे. ग्रंथात श्रीकृष्ण व नेमिनाथप्रभू ह्यांचे चरित्र प्रामुख्याने येते व तदनुषंगाने बलराम, कौरव, पांडव ह्यांच्या कथा येतात. जिनदास *हरिवंशपुराणा*च्या हस्तलिखित प्रती पुष्कळ ठिकाणी आढळतात. हा ग्रंथ अद्यापि अप्रकाशितच आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : जिनदास; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. २६–२७.

**जिनसागर** [इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] जैन कवी. जिनसागरांचे गुरू देवेंद्रकीर्ती हे कारंजा येथील पीठाचे भट्टारक होते. त्यांचे वास्तव्य काही वेळा मराठवाड्यातील शिरड येथेही असे. जिनसागरांच्याही काही रचना कारंजास तर काही शिरड येथे केलेल्या दिसतात. ह्यांचे संस्कृत व हिंदी भाषांवर प्रभुत्व होते. जिनसागरांचा प्रभाव एखाद्या भट्टारकाप्रमाणे होता. त्यांच्या शिष्यपरंपरेत विजापुराकडील लोक होते. इ. स. १७२४ ते १७४४ च्या दरम्यान त्यांच्या ग्रंथरचनेचे उल्लेख सापडतात. ह्यांनी विपुल आणि विविध स्वरूपाचे लेखन केले असून १८ व्या शतकातील जैन ग्रंथकारांत स्वतःकरिता वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्माण केले.

ह्यांच्या साहित्यात व्रतकथा, आख्याने, स्तोत्रे, आरत्या व पुराण इत्यादी साहित्यप्रकारांचा समावेश होतो. ह्यांनी *आदित्यव्रतकथा* श. १६४६ (इ. स. १७२४) चैत्र कृष्ण ५ ला पूर्ण केली. ही त्यांची पहिली कृती असावी. *जीवंधरपुराणा*ची रचना इ. स. १७४४ त केली. हीच त्यांची अखेरची कृती. ह्यावरून, ह्यांनी सतत वीस वर्षे अव्याहत लेखन केले असे दिसते.

आदित्य, अनंत, निर्दोषसप्तमी, पुष्पांजली, कलशदशमी, सुगंधदशमी अशा सहा व्रतांच्या कथा कवीने लिहिल्या आहेत. फार विस्तार नाही व अतिसंकोचही नाही अशी ही ठाकठिकीची रचना दिसते.

*लहुअंकुशकथा*, *पद्मावतीकथा* आणि *जिनागमकथा* ह्या तीन कथांत पहिली काव्यगुणांच्या दृष्टीने सरस आहे. स्तोत्रे, आरत्या इत्यादी स्फुटरचना भक्तिपर व नादमधुर अशी आहे. ह्यांच्या सर्व कृतींत *जीवंधरपुराण* ही रचना कालक्रमाने शेवटची व विस्ताराने मोठी आहे. ग्रंथाचे १० अध्याय व १५३० ओव्या आहेत. ब्रह्मजिनदासांच्या *जीवंधररास* व गुणभद्राचार्यांच्या *उत्तरपुराण* ह्या ग्रंथांचा आधार घेऊन वरील पुराणाची रचना केली. कथेत शृंगार आणि वीररस प्रामुख्याने आविष्कृत झाला आहे. १८ व्या शतकातील एक समृद्ध जैन ग्रंथकार म्हणून जिनसागरांचे नाव घेता येते.

**रचना : मु.** – जिनसागर यांची समग्र कविता; संपा. जोहरापूरकर, विद्याधर; जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : जिनसागर; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ८३–८५.

**जिनसेन** [अंदाजे इ. स. १८५१] जैन कवी. हे कोल्हापूर भागातील होते. ह्यांचा संबंध कोल्हापूर-नांदणी येथील भट्टारक पीठाशी आला. *जंबुस्वामी पुराणात* ह्यांनी आपली परंपरा विद्यासागर > जिनसेन > जिनसेन अशी सांगितली आहे, पण स्वतःच्या नावाचा निर्देश मात्र केलेला नाही. *उपदेशरत्नमाले*तही गुरुपरंपरेतली तीच तीच नावे पुन्हा येतात. त्यामुळे नीट उलगडा होत नाही.. परंतु इतर ग्रंथांवरून ह्यांचे नाव जिनसेनच होते हे सिद्ध होते.

कवीने *जंबुस्वामीपुराण, उपदेशरत्नमाला* व *पुण्यास्रवपुराण* अशा तीन ग्रंथांची रचना केली आहे. त्यांपैकी पहिला ग्रंथ भट्टारक सकलकीर्तींच्या *जंबुस्वामीचरित्र* ह्या संस्कृत रचनेच्या आधारे लिहिला. ग्रंथाची रचना प्रौढ व श्रेष्ठ दर्जाची वाटते. *उपदेशरत्नमाला* हा दुसरा ग्रंथ सकलभूषणाचार्यांच्या मूळ संस्कृत ग्रंथाचे ओवीबद्ध भाषान्तर आहे. ग्रंथाचा विषय तात्त्विक असून कथनपद्धतीने कवीने तो आकर्षक केला आहे. नांदणी येथील आदिनाथ मंदिरात ग्रंथ पूर्ण केला, असे कवी सांगतो. ह्यात नांदणी गावाचे वर्णनही कवीने प्रत्ययदायी केले आहे.

*पुण्यास्रवपुराण* हे कन्नडग्रंथाधारे मराठीत आणले असे ग्रंथकार सांगतो. श. १५२३ (इ. स. १६०१) त नागराज नामक कवीने कानडीत *पुण्यास्रवकथा* लिहिली होती. कदाचित तिचा आधार कवीने घेतला असेल. ग्रंथाच्या ७९ अध्यायांपैकी पहिले ९ अध्याय ह्या प्रतीत नाहीत. जैन पुराणातील प्रचलित अशा सर्व कथा ह्या ग्रंथात एकत्रित केल्या आहेत. प्रत्येक कथेला आख्यान असे म्हटले आहे.

**रचना : मु.** – १. उपदेशरत्नमाला; अ. २३; ओवीबद्ध; र. श. १७४३ / इ. स. १८२१; संपा. चौगुले, रा. र.; चिकोडी.

२. जंबूस्वामी पुराण; अ. ११; संपा. उपाध्याय, क. ने.; नांदणी (कोल्हापूर); १९०४. **अमु.** – १. पुण्यास्रवपुराण; अ. ७९; र. श. १७५१ / इ. स. १८२९; हस्त. जैन ग्रंथसंग्रह, बाहुबली.
**चरित्र, चर्चा अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : जिनसेन; प्राम-जैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. १०२–१०७.

**जिवतनय** [का. अनु.] पदकार.
**रचना :** मु. – एक पद व एक कटिबंध (हिंदी); संपा., ओक, वा. दा.; पदसंग्रह, भा. ३; पृ. ९६–९८.

**जिवा** [का. अनु.] कवी.
**रचना :** अमु. – सूर्यनामावळी ग्रंथ; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ४०.

**जिवाजी पांचाळ** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, अखेर] शाहीर. इ. स. १७८५–८६ च्या सुमारास करवीरकर आणि पेशवे ह्यांच्या-मध्ये अळते येथे जी लढाई झाली तिचे वर्णन ह्या शाहीराने *अळत्याच्या लढाईवरील पोवाड्यात* बरेच तपशीलवार केले आहे (मु. : ऐतिपो., खं. १; पृ. ४४३–४४८).

**जिवाशिवा** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. जिवाशिवा ह्या *महाभारत*काराचा निर्देश प्रथमतः ल. रा. पांगारकरांनी एका लेखात केला ('महाभारताचे मराठी अवतार', *सरस्वतीमंदिर*, त्रैमा., १८२६). ह्याने लिहिलेली मराठी *महाभारता*ची काही पर्वे द. वा. पोतदार ह्यांना उपलब्ध झाली. कवीच्या ह्या ग्रंथातून त्याने आपली माहिती दिली आहे ती अशी : पंढरपूरच्या उत्तरेस चार योजने दूर असलेले क्षेमावती क्षेत्र हे कवीचे मूळ ठिकाण. हे काश्यपगोत्री ब्राह्मण असून तेथे ह्यांच्या घराण्याची जोशीपणाची अगर कुळकर्णीपणाची वृत्ती असावी. 'शिवराम नामा ताता। उमादेवी सत्यमाता॥ गुरुशिव योगित्राता। तत्पदि माथा जिवाचा॥' अशी मातापिता व गुरू ह्यांची नावे कवी सांगतो. ह्यावरून 'जिवाशिवा'-मधील शिवा हे नाम गुरुभक्तिसूचक आहे असे दिसते. ह्याचा गुरू चैतन्यसंप्रदायी होता. ह्या चैतन्यसंप्रदायाचा उल्लेख कवीने आपल्या ग्रंथात केला आहे.

कवीच्या *महाभारता*ची पोथी (भाइसंमं. हस्त. संग्रह) नक्कल प्रत असून तिच्याखाली 'श. १७८८ (इ. स. १८६६) आश्विन कृष्ण ३' असा काळ दिला आहे. प्रस्थानपर्वातील कवीच्या निवेदनावरून, मुक्तेश्वरी चार पर्वे, गोपाळाचे ५ वे *उद्योगपर्व* आणि श्रीधरकवीचा *अश्वमेध* हे पूर्वीचे ग्रंथ जमेस धरून उरलेल्या बारा पर्वांची रचना असे समग्र भारत जिवाने केले, असा मथितार्थ निघतो. "मुक्तेश्वराचें अपूर्ण भारत पूर्ण करण्याची खटपट विष्णुदास नामा, मोरेश्वर, चंद्रात्मज रुद्र, नरहरि मोरेश्वर, नवरस नारायण, पद्मनाभ, शंभुदास इत्यादि पुष्कळ कवींनीं केली आहे. जिवाशिवाचा प्रयत्न त्यांपैकींच एक आहे. जिवाशिवा हा साधारणपैकींच एक कथानकी कवी आहे." असे द. वा. पोतदार म्हणतात (भाइसंमंत्रै., व. ११, अं. १, पृ. २५).
**रचना :** अमु. – महाभारत : भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य, गदा, शांति, ऐषिक, विशोक, सौप्तिक, आश्रमवासी, स्त्री, महाप्रस्थानिक अशी बारा पर्वे; ओ. सं. सुमारे १०६१९; भाइसंमं.
**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पोतदार, द. वा. : जिवाशिवाचे मराठी महाभारत; भाइसंमंत्रै., व. ११, अं. १, मार्च–जून १९३०; पृ. २१–२५ व ५१.

**जीव कवि (शळग.वक.र) / ० जीवराम** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. ह्या जीव कवीने त्याच्या ग्रंथात तंजावरच्या शरभेंद्र-राजाचा अनेकदा उल्लेख केला आहे. तंजावर येथे दोन शरभेंद्र राजे होऊन गेले त्यांपैकी दुसरे शरभेंद्र (इ. स. १७९८ ते १८३२) हे विद्वानांचे चाहते होते. त्या काळात हा कवी विद्यमान असावा. ह्याच्या *भिल्लचरित्र* आणि *कचोपाख्यान* (श्लो. ४३) ह्या दोन रचनांची हस्तलिखिते समर्थवाग्देवतामंदिरातील बाडांत आढळतात (बा. १२५४). ह्याने पदेही रचली आहेत (सवामं. हस्त. सू., खं. १, २).

**जीवन–१** [का. अनु.] कवी. ह्याने आपला गुरू मुकुंद व गाव नांदेड असे म्हटले आहे. ह्या जीवन कवीची अष्टके, स्तोत्रे अशी स्फुट स्वरूपाची रचना आहे (मसा., आ. ५, पृ. ४६०).

**जीवन–२** [का. अनु.] कवी. *अनुभवलहरी* ह्या प्रबंधाचा कर्ता म्हणून हा कवी ज्ञात आहे. प्रबंधाचे चार प्रसंग असून विषय घरगुती स्वरूपाचा आहे. प्रपंचामधील दैनंदिन संघर्षाचे चित्रण कवीने केले आहे. कदाचित हे कवीचे स्वतःचे अनुभव असतील किंवा कल्पनेनेही हे कथानक त्याने रचले असण्याचा संभव आहे. त्या वेळची समाजस्थिती दाखविणारे व घरगुती मनोविकार सरळ भाषेत सांगणारे 'गोड प्रकरण' असा वि. ल. भावे ह्याचा उल्लेख करतात. रचना मुद्रित झालेली नाही (मसा., आ. ५, पृ. ४६०).

**जीवनगडी** [का. अनु.] पदकार.
**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**जीवनदास** [इ. स. चे १८ वे शतक] मोरोपंतकालीन कवी. ह्यांनी पंतांचे अनुकरण करून *मयशक्तिचरित्र* ह्या आर्याबद्ध ग्रंथाची रचना केली आहे (मसा., आ. ५, पृ. ५३९).

**जीवनप्रभू** [का. अनु.] कवी. गुरू : शहाअली. ह्यांनी पदांची रचना केली आहे (संककासू., पृ. ४०).

**जीवन्मुक्त / ० जीवन्मुक्तेश्वर** [ ? – समा. श. १६९० / इ. स. १७६८] कवी. ह्यांचे संपूर्ण नाव विठ्ठलपंत देशपांडे. मूळ गाव करंबक (ता. पंढरपूर). ह्यांचा मठ बीदरजवळील अंतवार नावाच्या गावी आहे. कारवारकडे ह्यांची शिष्यपरंपरा आढळते. हैद्राबादच्या निजामाचे प्रसिद्ध मुत्सद्दी विठ्ठल सुंदर हेही ह्यांच्या शिष्यशाखेतील होत. मैलार (बीदरजवळील) व पंढरपूरजवळील करंबक येथेही ह्यांचे मठ आहेत. ह्यांच्या *जीवन्मुक्ती* गीताटीकेच्या श. १८१३ (इ. स. १८९१) मधील हस्तलिखिताच्या शेवटी जीवनांचा समाधिकाळ श. १७९० (इ. स. १७६८) असा दिला आहे. बीदर प्रांतात जीवन्मुक्तेश्वर असे नाव ऐकू येते.

ह्यांची *जीवन्मुक्ती* किंवा *गीताप्रभाकर* (सवामं. बा. १०३२) ही गीतेवरील टीका, *जीवन्मुक्तीवाक्य* हा वेदान्तग्रंथ आणि अभंग व पदे अशी ग्रंथरचना सापडते. मूळ गीतेचा मराठी श्लोकबद्ध अनुवाद व नंतर मराठी श्लोकांचे स्पष्टीकरण करणारी पदे असे *जीवन्मुक्ती* टीकेचे स्वरूप आहे. ह्या दोन्ही रचना एकाच कवीच्या नसाव्यात असे वाटते. कारण पदांमध्ये 'गुरु जीवन्मुक्त' असा वारंवार उल्लेख येतो. त्यावरून मराठी श्लोकबद्ध अनुवाद जीवन्मुक्तांचा, पदे मात्र त्यांच्या शिष्याने रचलेली, अशी वस्तुस्थिती असावी. *लघुभक्तविजय* ह्या ब्रह्मानंद-स्वामींच्या ग्रंथाधारे (मुद्रण : हैद्राबाद, १९३५) मिळणाऱ्या माहिती-प्रमाणे ह्या गीताटीकेचे पहिले पाच अध्याय जीवन्मुक्तांच्या ज्येष्ठ पुत्राने त्यांच्या आज्ञेने रचले, ६ ते १२ असे ७ अध्याय त्यांच्या विठ्ठल ह्या दुसऱ्या पुत्राने रचले, व काशिनाथ ह्या त्यांच्या तिसऱ्या पुत्राने उरलेले अध्याय त्यांच्या समाधीनंतर पूर्ण केले. म्हणजेच ह्या ग्रंथाचे कर्तृत्व त्यांच्या पुत्रांकडे जाते (मस्वासंप., अं. ५, १९७०, पृ. १८). प्रस्तुत टीकेचे हस्तलिखित हैद्राबादच्या *भारतगुणवर्धक* ग्रंथालयात आहे. *जीवन्मुक्ती-वाक्य* ग्रंथात वेदान्तातील अनेक विषयांचे सोप्या भाषेत निरूपण केले आहे. हा ग्रंथ गद्य असून त्यात कोठेच ग्रंथकाराचे नाव आलेले नाही. मुखपृष्ठावरील ग्रंथाच्या नावावरून तो जीवन्मुक्तांचाच असेल असे वाटते (सवामं., बा. १०३३).
**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, श्री. रं. : बीदरच्या परिसरा-

तील एक गीता-टीका; मस्वासंप., अं. ५; हैद्राबाद, १९७०; पृ. १७–१८. २. जोशी, म. रा. : जीवन्मुक्त; विसंमंवा., नागपूर, १९७१; पृ. १४३. ३. देव, शं. श्री. : येथेहाळो येथील श्रीरामदासी विद्यापीठ; भाइसंमंप्रसंवृ., श. १८३५; पृ. ३५–३७.

**० जीवन्मुक्तेश्वर** – पहा **जीवन्मुक्त.**

**जीवनसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**जीवराजसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**जीवराम** – पहा **जीव कवि (शेळगावकर).**

**जुवांव-द-पेद्रोझ (पाद्री)** [इ. स. १६१६ – १० मे १६७२] गोमंतकीय जेजुइट ग्रंथकार. ह्यांचा जन्म पोर्तुगालमधील कोइंब्र शहरी इ. स. १६१६ त झाला. १६३२ मध्ये ह्यांनी जेजुइट पंथात प्रवेश केला. नंतर हे धर्मप्रसाराच्या कार्यासाठी गोव्यात आले. पुढे तेथील रायतूर कॉलेजचे ते रेक्टर झाले. गोव्यातील स्थानिक भाषेचा अभ्यास करून ह्यांनी कोकणीत ग्रंथरचना केली. १० मे १६७२ रोजी हे गोव्यातच मृत्यू पावले.

ह्यांनी *सोलिलॉकियुश दिव्हिनुश* (Soliloquious Divinos) ह्या मूळ स्पॅनिश भाषेत लिहिलेल्या ग्रंथाचे (कर्ता : बेनार्दीनु-द-व्हिल्येगश) कोकणीत भाषान्तर केले आहे. ह्या भाषान्तराला *देवांची येकांत्र बोलणी* असे नाव ग्रंथकर्त्यानेच दिले आहे. ग्रंथाचे आठ भाग असून त्यातील पोर्तुगीज शब्दांचे प्रमाण इतर ग्रंथकारांच्या मानाने फार कमी आहे. ग्रंथकाराची शैली आलंकारिक असून जुन्या मराठी कथापुराणांशी लेखक एकरूप झालेला दिसतो. कारण सुरुवातीची अर्पणपत्रिका व ग्रंथसमाप्तीची पद्धती ही ह्या कथापुराणांसारखी आहे. इ. स. १६६० मध्ये सेंट झेवियर छापखान्यात हा ग्रंथ छापला गेला. ह्यांच्या नावावरील आणखी एका ग्रंथाचा उल्लेख बार्बोझाने लिहिलेल्या जेजुइट ग्रंथकारांच्या चरित्र-कोशात सापडतो. त्याची माहिती मात्र उपलब्ध नाही. हे मिशनरी ग्रंथकार सतराव्या शतकातील गोमंतकी बोलीच्या जेजुइट ग्रंथकारांचा अखेरचा दुवा ठरतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा.; जुवांव-द-पेद्रोझ (पाद्री); सशगोबो., मुंबई, १९६३; पृ. २६७–२७९.

**(रे.) जेम्स मिचेल / ० मिचेल, (रे.) जेम्स** [का. अनु.] ग्रंथकार व भाषान्तरकार. हे ख्रिस्ती धर्मोपदेशक होते. २३ जुलै १८२३ मध्ये हे हिंदुस्थानात आले. बाणकोट येथे ह्यांनी एक शिळाछापखाना घातला होता व एक शाळाही चालविली होती. २३ डिसेंबर १८५३ मध्ये हे स्वदेशी परतले.

बायबलच्या 'Epistles to the Corinthians' ह्या भागाचे त्यांनी मराठीत भाषान्तर केले. *उद्धाराचा उपाय* व *ख्रिस्ती धर्माच्या मुख्य सिद्धान्तातील लहान प्रश्नोत्तरावळी* अशा दोन छोट्या पुस्तिकाही ह्यांनी लिहिल्या आहेत.

**रचना : मु.** – १. उद्धाराचा उपाय (शिळाछाप); मुंबई, १८३३. २. मुलांसाठी प्रश्नोत्तरावळी (ख्रिस्ती धर्माची प्रश्नोत्तर-रूपाने माहिती); १८२८. ३. ख्रिस्ती धर्माच्या मुख्य सिद्धान्तातील लहान प्रश्नोत्तरावळी (Catechism on the Lord's prayer व The Ten Commandments ह्यांवर आधारित); अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, १८४१.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** खानोलकर, गं. दे. : अमवा.; खं. ५; पुणे, १९६२; पृ. १७६–१७७. २. पिंगे, श्री. म. : रे. जेम्स मिचेल; युमअसे., मुंबई, १९६०; पृ. २९३–२९४.

**जोगनाडी** [इ. स. चे १७ वे शतक] कवी. रमावल्लभदासांचे प्रशिष्य. ह्यांची काही कविता उपलब्ध आहे (मसा., आ. ५, पृ. ८०१).

**जोगा परमानंद** [ ? – समा. श. १२६०, मार्गशीर्ष व. ४ / इ. स. १३३८] संतकवी. महिपतींनी *भक्तविजयात* जोगा परमानंदांची माहिती दिली आहे. "जोगा परमानंद भक्त। बारसी ग्रामांत होता रहात। अखंड उदास आणि विरक्त। वैराग्यभरित सर्वदा ॥" हे जातीने शूद्र होते असे महिपतीबावा म्हणतात. पण ते तेली असल्याचे काही उल्लेख सापडतात. ह्यांचे गुरू परमानंद. बार्शीच्या भगवंताचे व पंढरीच्या पांडुरंगाचे हे एकनिष्ठ उपासक होते. साधुत्व आणि कडकडीत वैराग्य ह्यांविषयी त्यांची प्रसिद्धी होती. बारसी येथे त्यांची समाधी असून मार्गशीर्ष वद्य चतुर्थीस तेथे अजूनही ह्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव साजरा होतो.

ह्यांनी अभंग, आरत्या व पदे अशी रचना केली आहे. 'बैसोनि संतांघरीं हो। घेतली गुरगुडी हो।' हे त्यांचे *गुरगुडी* नावाचे रूपकात्मक पद फार प्रसिद्ध आहे. ह्यांचे कवित्व भक्तिभावाने टवटवीत आहे. ह्यांची काही पदे व अभंग ज. र. आजगांवकर ह्यांनी आपल्या *प्राचीन मराठी संतकवी* ह्या पुस्तकात विवेचनाच्या ओघात उद्धृत केले आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : जोगा परमानंद; प्रामसंक., खं. १, मुंबई, १९५७; पृ. १९१–१९४.

**० जोगार नागेश** – पहा **पूर्णब्रह्म.**

**जोतिरानंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**जोती नागा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**जोव्हारशा** [का. अनु.] मुसलमान कवी. ह्याने मराठी शाहीरां-प्रमाणेच मोहरमाच्या सणातील 'करबल' मधून (मेळ्यातून) म्हणण्या-करिता 'रिवायती' (एक प्रकारची गाणी) रचलेल्या आहेत (रा. चिं. ढेरे; मुमसंक.; पुणे, १९६७; पृ. १७८).

**ज्यालणास्वामी** [का. अनु.] कवी. पेशवाईअखेरच्या काळात हा कवी होऊन गेला. ह्या काळात लावण्यांप्रमाणे निरनिराळ्या प्रकारचे शृंगारिक प्रसंग कल्पून त्यांवर गमतीदार रचना केलेल्या दिसतात. अशाच प्रकारच्या एका विनोदाची रचना ज्यालणास्वामी ह्या कवीने केली आहे. त्यांच्या 'भामासखीसंवाद' ह्या विनोदात, सत्यभामेने कृष्णाकडे काही निरोप घेऊन पाठवलेल्या आपल्या सखीला ती परत आल्यानंतर जे बात्रट प्रश्न विचारले त्याला तिनेही तशीच उत्तरे दिली असे वर्णन येते (मसा., आ. ५, पृ. ६२४–६२५).

**ज्योतिनाथ** [का. अनु.] ग्रंथकार. *पंचीकृतविवेक* ह्या गद्यपद्यमिश्रित ग्रंथाचे कर्ते. प्रस्तुत ग्रंथ वि. का. राजवाडे ह्यांनी १९४७ मध्ये गरीबनाथ कवीच्या नावावर प्रसिद्ध केला होता. परंतु तो गरीब-नाथस्वामींचा नसून ज्योतिनाथांचा आहे. परंपरेप्रमाणे गरीबनाथ हे त्यांचे आजेगुरू ठरतात. ज्योतिनाथांची गुरुपरंपरा अशी : आदिनाथ > हरिनाथ > विश्वंभरनाथ > गरीबनाथ > आत्मनाथ > ज्योतिनाथ.

ज्योतिनाथ ह्यांच्या *पंचीकृतविवेक* ह्या ग्रंथाचे विशेष महत्त्व आहे. मुकुंदराजांचा महानुभाव पंथाशी काहीतरी आप्तसंबंध असावा, ह्या आपल्या अनुमानाला पोषक पुरावे शोधताना रा. चिं. ढेरे ह्यांनी हरिनाथांच्या परंपरेतील ह्या ग्रंथाचा निर्देश केला आहे. ह्या ग्रंथात एक संस्कृत *पंचावतारस्तोत्र* समाविष्ट आहे. त्यात महानुभावीयांच्या *पंचकृष्णनामावळी*चा एक पर्याय आहे. कलियुगातील अवतार म्हणून त्यात चक्रधरांचीच गणना केली आहे. तसेच त्यात आलेल्या ८४ सिद्धांच्या नामावळीत चक्रधरांचे गुरू गुंडम राऊळ ह्यांचेही एक नाव आहे. ह्या गुरुपरंपरा स्तोत्रात हरिनाथांच्या प्रमुख शिष्यांपैकी नागदेव

नावाचा एक शिष्य होता ही ज्योतिनाथांनी केलेली नोंद ह्या संदर्भात महत्त्वाची ठरते, असे रा. चिं. ढेरे म्हणतात ('मुकुंदराजांची गुरुपरंपरा'; *इंद्रायणी*, जुलै १९६३, पृ. ३१–३२).

ज्योतिनाथांचा *पंचीकृतविवेक* हा ग्रंथ अध्यात्मज्ञान विशद करणारा गुरुशिष्यसंवादपर ग्रंथ आहे. ह्यात मूळ संस्कृत विवेचनाच्या आधारे विविध शास्त्रे, गीता व वेदान्त ह्यांतील ब्रह्मज्ञानाचे स्वरूप स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्यात *विवेकसिंधू*तील ओव्या जागोजाग उद्धृत केल्या आहेत. सुरुवातीस औट मात्रांची कोष्टके आली आहेत. आकाश, वायू, अग्नी, आप, पृथ्वी ह्या पंचकाशी संबंधित असलेल्या अंतःकरण, प्राण, ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये व विषय ह्या पंचकाचा विचार ग्रंथकारांनी केला आहे. उपनिषदांतील तत्त्वज्ञानाची परंपरा येथे पाहण्यास सापडते.

**रचना : मु.** – पंचीकृतविवेक; गद्यपद्यमिश्र; १७० ओव्या; संपा. राजवाडे, वि. का.; संशोधक, व. ८, अं. १, मार्च १९३९; पृ. १–१५.

**ज्योतिपंत महाभागवत** [श. १६३८/ इ. स. १७१६ – समा. श. १७१०, मार्ग. कृष्ण १३ / इ.स. १७८८] कवी आणि *भागवत*-टीकाकार. घराणे मूळचे सातारा जिल्ह्यातील खटावचे. ह्यांचा पूर्वज कोणी गंगाधर नावाचा पुरुष विजापूरदरबारी अधिकारावर होता. त्यांच्या मुलास मात्र माण तालुक्यात मलवाडी येथील देशपांडेपण मिळाले. तेव्हापासून ह्यांचे कुटुंब मलवाडी प्रांतात राहू लागले. ज्योतिपंतांचा पिता गोपाळ हा गंगाधरापासून सातवा पुरुष. ह्यांचे उपनाव भाळवणे. अथर्ववेदी, उपमन्युगोत्री देशस्थ ब्राह्मण. ह्यांच्या आईचे नाव गोदावरी. ज्योतिपंतांचा जन्म बुधमलवडी येथे झाला. हे पुण्यास पेशव्यांच्या पदरी कारकून होते. ह्यांची बुद्धिमत्ता लक्षात येऊन पुढे श्रीमंतांनी त्यांस पुरंदरच्या फडणिशीवर आणि तदनंतर इ. स. १७५८ च्या सुमारास उत्तरेकडील कामगिरीवर नेमले. इ. स. १७७३ पर्यंत ह्यांनी अंतर्वेदीत पेशव्यांची नोकरी केली. कारकुनी राजकारण करीत असता एकाएकी काही दृष्टान्त होऊन ह्यांचे मन परमेश्वराकडे वळले. नोकरीचा राजिनामा देऊन ते काशीक्षेत्री आले. तेथे दोन वर्षे वास्तव्य केले व नंतर ते दक्षिणेकडे परतले. काशीक्षेत्री त्यांना *श्रीमद्भागवता*ची पोथी प्राप्त झाली होती. तेव्हापासून त्यांनी ह्या ग्रंथाच्या अभ्यासास सुरुवात केली असे ते स्वतःच म्हणतात. 'करी नित्य भागवतगायन । कांहीं दुजें साधन नाहीं । एक भागवतगान पाहीं ॥' ह्याच *भागवता*वर त्यांनी प्राकृत टीका लिहिली. असे सांगतात की ह्या *भागवता*वरील टीकेमुळेच लोक ह्यांना 'महाभागवत' असे म्हणू लागले. आपले उर्वरित आयुष्य ज्योतिपंतांनी महाराष्ट्रात भागवत धर्माच्या प्रसारार्थ वेचले. ते परमविठ्ठलभक्त होते व पंढरीची वारी नेमाने करीत असत. विठ्ठलापुढे, 'तुझी १४०० मंदिरे बांधीन,' असा संकल्प त्यांनी सोडला होता. त्याप्रमाणे त्यांनी शेकडो मंदिरेही मोठ्या श्रमाने, महाराष्ट्रात ठिकठिकाणी बांधून घेतली. मार्गशीर्ष कृष्ण त्रयोदशीला चिंचणेर (जि. सातारा) येथे त्यांनी समाधी घेतली.

ह्यांनी समग्र *भागवता*वर टीका रचल्याचे सांगण्यात येते. ही टीका ओवी व अभंग अशा दोन छंदांत रचली आहे. मात्र, आज प्रत्यक्षात तिचा फारच थोडा भाग उपलब्ध आहे. रहिमतपूर मठातील *भागवत-टीके*चे पहिले दोन स्कंध, *वेदस्तुतिप्रकरणावरील टीका*, *प्रवृत्ति-निवृत्ति ऐक्यता रत्नावलि* हा गद्यग्रंथ, अभंग व पदे अशी ह्यांची रचना आज उपलब्ध आहे. ह्या कवीची पद्यरचना फार साधी आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : ज्योतिपंत महाभागवत; मकच., खं. ५; मुंबई, १९२०; पृ. ८६–१४०. २. चांदोरकर, गो. का. : ज्योतिपंत महाभागवत; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. ४६-५१. ३. पटवर्धन, पां. न. : ज्योतिपंत महाभागवत; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. ७४–७९.

**ज्योतिबावा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**ज्योती** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**ज्योतीराम–१** [इ. स. १७ व्या शतकाची अखेर किंवा १८ व्या शतकाचा प्रारंभकाल] कवी व लावणीकार. ह्यांनी माणकोजी बोधला असे आपल्या गुरूचे नाव दिले आहे. शिवरामसुताने लिहिलेल्या *बोधलेबोवांच्या चरित्रा*त (श. १७७३ / इ. स. १८५१) त्यांचा शिष्य ज्योतीराम ह्याचा उल्लेख नाही. एक तर हे फार काळ धामणगावी राहिले नसावे किंवा बोधलेबुवांची कीर्ती ऐकून ह्यांनी त्यांचे शिष्यत्व पत्करले असावे. ज्योतीरामांनीही बोधलेबुवांचे चरित्र लिहिले आहे. ह्या *बोधराज आख्याना*चे लहान लहान अकरा अध्याय आहेत. *बोधकीर्ति* हे स्तुतिपर काव्यही ह्यांनी लिहिले आहे. अभंग, लावण्या, कटाव, पदे अशी रचना ते करीत असत अशी राजवाडे ह्यांनी त्यांच्यासंबंधी माहिती दिली आहे. त्यांच्या आठ लावण्या व वरील गुरुस्तुतिपर प्रकरणे भारत इतिहास संशोधक मंडळातील बाडांत उपलब्ध आहेत (क्र. २८३). लावण्या गुरुस्तुतिपर व आध्यात्मिक असून 'पतितपावन' जातीमध्ये रचलेल्या आहेत. लावण्यांचे विषय हे परंपरेने चालत आलेले असेच आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. मोरजे, गंगाधर : लावणीकार ज्योतिराम; मसंप., जाने. १९६७; पृ. १०५. २. राजवाडे, वि. का : ज्योतिरामकृत माणकोजी बोधला ह्याचें चरित्र; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १३–१४.

**ज्योतीराम–२** [का. अनु.] शाहीर. इ. स. १७९९ चे सुमारास पट्टणकुडी येथे झालेल्या करवीरकर आणि परशुरामभाऊ ह्यांच्यातील युद्धप्रसंगावर कवीने पोवाडा रचला आहे. ऐतिहासिक दृष्ट्या ह्यातील माहिती विश्वसनीय असून काव्याच्या दृष्टीने ती उत्कृष्ट आहे. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खं. १* मध्ये संग्रहित केला आहे (पृ. ३३१–३३९).

**झाडकवी** [का. अनु.] कवी. ह्या कवीचा उल्लेख हरिदास कान्हाने आपल्या *भीष्मपर्वा*त केला आहे (१.५२). झाडकवीने *आरण्येकांडाचे पाल्हाळ* केले असे तो म्हणतो (बी. लक्ष्मीकांत : हरिदास कान्हाकृत *भीष्मपर्व; प्रतिष्ठान*, एप्रि. १९५४; पृ. १५).

**झोळीरामशिष्य** [का. अनु.] कवी. तंजावरकडील. परंपरा : श्रीसमर्थ > भीम > झोळोराम > झोळीरामशिष्य. ह्यांनी रचलेली *श्रीगुरुगीता* (ओ. सं. २२५) समर्थवाग्देवतामंदिरातील हस्तलिखितांच्या संग्रहात आहे (बा. १३५८). निजगुरू म्हणून झोळीरामांचा उल्लेख कवी ग्रंथात करतो. गुरूविषयीचा आत्मभाव आणि ग्रंथप्रयोजन पुढील दोन ओव्यांत कवीने व्यक्त केले आहे ते असे : "जेणें गुरुदीक्षा जागविली। निस्पृहत्वें झोळी वागविली। शिष्या हातीं त्यागविली। निजोपदेशें अविद्या॥ १५॥ ऐशिया श्रीगुरुचीं पाउलें। चित्तीं स्थापोनियां निर्मलें। गुरुगीता कथावया वहिलें। चित्त उतावेळ होतसे ॥ १६ ॥"

**टिमया** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – रमाहरीची आरती; मआ., पृ. ३१५.

**टॉमस स्टीफन्स / ० तोमास इश्तेवं / ० स्टीफन्स, फादर** [इ. स. १५४९–१६१९] जन्माने इंग्रज असलेले जेजुइतपंथीय मराठी कवी. जन्मगाव इंग्लंडच्या वुल्टशायर परगण्यातील बुस्टन. घराणे कॅथलिकपंथीय. वडील टॉमस स्टीफन्स व्यापाराच्या निमित्ताने लंडन येथे स्थायिक. स्टीफन्स ह्यांचा वा यशाखेचा व ग्रीक आणि लॅटिन भाषांचा अभ्यास तेथेच खाजगी रीतीने झाला असावा. राणी एलिझाबेथच्या राजवटीत कॅथलिकांचा छळ सुरू झाला. त्याच्या प्रतिकारार्थ टॉमस

पौंडच्या नेतृत्वाखाली गुप्त चळवळ झाली. तीत स्टीफन्स सामील होते. पण त्यांना परागंदा व्हावे लागून ते रोमला आले. तेथे १५७५ मध्ये त्यांनी जेजुइतपंथाची दीक्षा घेऊन ख्रिस्ती धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान ह्यांचे अध्ययन केले. त्यांनी पोर्तुगीज भाषा अवगत करून घेतली. सेंट झेवियरच्या भारतातील धर्मप्रचारापासून स्फूर्ती घेऊन पोर्तुगीज मिशनमधून ते १५७९ मध्ये गोव्याला आले. १६११ च्या सुमारास वर्षभर त्यांनी वसईच्या प्रचारकेंद्रात 'मराठीचा प्राध्यापक' म्हणून काम केले, तेवढा काळ वगळता, इ. स. १६१९ मध्ये ते ख्रिस्तवासी होईपर्यंत, म्हणजे सुमारे चाळीस वर्षे, त्यांनी गोव्याच्या 'सासष्ट' प्रांतात धर्मप्रचार केला. १५९० ते १५९४ पर्यंत ते रायतूरच्या जेजुइट कॉलिजचे रेक्टर होते.

ह्या काळात आप्तांस व वरिष्ठांस लिहिलेली स्टीफन्स ह्यांची चार पत्रे उपलब्ध आहेत. त्यावरून, गोव्यास येताच त्यांनी तेथील बोली कोकणी व ग्रंथभाषा मराठी ह्यांचा अभ्यास कसा सुरू केला, भारतीय व युरोपीय भाषांमधील रचनासाम्याचा महत्त्वपूर्ण विचार त्यांना कसा सुचला व आपले ग्रंथ देवनागरी लिपीत मुद्रित व्हावेत अशी त्यांची कशी उत्कट इच्छा होती, ह्या गोष्टी स्पष्ट होतात व गोव्यातील तत्कालीन धार्मिक व सामाजिक परिस्थिती कळते. शिवाय ही पत्रे लंडनमधील लोकांचे भारतविषयक व्यापारी कुतूहल जागृत करण्यासही पर्यायाने कारणीभूत झाली असावी. समकालीन प्रवासवर्णनांतील उल्लेखांवरून, पोर्तुगीज सत्ताधाऱ्यांचा रोष पत्करूनसुद्धा, संकटग्रस्तांच्या मदतीस धावून जाण्याच्या स्टीफन्स ह्यांच्या परोपकारी वृत्तीवर प्रकाश पडतो. आपल्या धर्मप्रचाराचे साधन म्हणून स्टीफन्स ह्यांनी त्रिविध ग्रंथरचना केलेली आहे. ती अशी :

(१) *कोकणीचे व्याकरण : आर्ति द लिंग्व कानारीं* (किनाऱ्यावरील बोलीचे व्याकरण) असे ह्याचे नाव असून ते मराठीच्या गोमंतकी बोलीचे व्याकरण आहे. परकीय मिशनऱ्यांच्या उपयोगासाठी रचलेले असल्याने ते पोर्तुगीजमध्ये आहे. १६१० पासून ते हस्तलिखित स्वरूपात प्रचारात होते. त्यात भर घालून दियोगु रिबेरू प्रभृती धर्मप्रचारकांनी १६४० मध्ये ते रायतूरला छापले. देशी भाषांपैकी मुद्रित झालेले हे पहिलेच व्याकरण. पुढे १८५८ मध्ये त्याची दुसरी आवृत्ती निघाली होती.

(२) *दौत्रीन क्रिश्तां* : क्रिस्ती धर्मतत्त्वे संक्षेपाने सांगणारी कोकणी प्रश्नोत्तरी. ही १६०६ पासून हस्तलिखित स्वरूपात प्रचारात होती. १६२२ मध्ये ती रोमन टंकांत रायतूरला प्रथम मुद्रित झाली. हिची नागरी आवृत्ती १९६५ मध्ये अ. का. प्रियोळकरांनी संपादून पुणे विद्यापीठामार्फत प्रसिद्ध केली आहे.

(३) *क्रिस्तपुराण* : मूळ शीर्षक 'दिष्कुर्सु सोब्रि अ व्हिन्द द जेजू क्रिश्तु नॉस्सु साल्वादोर द मुन्दु'. ह्या पुराणाचे अवस्वर म्हणजे अध्याय ९५ (पैले पुराण ३६ + दुसरे पुराण ५९) व ओवीसंख्या १०,९६२ असून भाषा मराठी आहे. इ. स. १६१४ मध्ये त्याची रचना पूर्ण झाली व १६१६ मध्ये त्याची प्रथमावृत्ती रायतूरला (साष्टी, गोवे) रोमन टंकांत मुद्रित झाली. मराठी भाषेतील पण रोमन टंकांत मुद्रित झालेला हा पहिला ग्रंथ होय. इ. स. १६४९ व १६५४ मध्ये त्याच्या आणखी दोन आवृत्त्या निघाल्या. पण ह्या मुद्रित प्रती आज तरी उपलब्ध नाहीत. स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज, लंडन ह्या संस्थेतील मार्सडेन संग्रहात ह्याची एक जुनी नागरी लिपीतील प्रत आढळते. गोमंतकात व इतरत्र ख्रिस्तपुराणाची जी अनेक हस्तलिखिते आजही उपलब्ध होतात त्यांपैकी (१) श. १६१६ च्या आवृत्तीची रोमन लिपीतील नक्कल (क्रेमेंट सालडान्हा), (२) फक्त दुसरा भाग : पहिल्या आवृत्तीची नक्कल (जे. ए. सालडान्हा), व (३) १९०७ मधील रोमन लिपीतील मुद्रित प्रत (जोसेफ सालडान्हा), अशा प्रती मंगळूर येथे आढळतात. दुसरी एक प्रत वेर्णे (गोवा) येथील स्थानिक चर्चमध्ये उपलब्ध आहे. श. १६४९ च्या मूळ दुसऱ्या आवृत्तीवरून हे हस्तलिखित नकललेले आहे. नक्कलकाराने ही प्रत ११ फेब्रुवारी १९०७, बुधवार दुपारी २ वाजता संपादिल्याचा निर्देश प्रतीत येतो. कर्त्याचे नाव मात्र कागदाची हानी झाल्याने सापडत नाही. १६५४ मधल्या मुद्रित प्रतीची एक नक्कलप्रत गोवे सरकारच्या मध्यवर्ती ग्रंथालयामध्ये आहे. ही रोमन लिपीत असून ती सचित्र आहे. तिजमध्ये नक्कलकार अनवेल साल्व्हादोर रिबेलो, मडगाव ह्याने स्वतःच्या ओव्या अधूनमधून घुसडल्या आहेत तसेच प्रतीतील चित्रेही त्याच्याच हातची आहेत. चालू शतकात जे. एल. साल्डाना संपादित पाठशुद्ध रोमन आवृत्ती (मंगळूर, १९०७) व शांताराम बंडेलू संपादित नागरी आवृत्ती (प्रसाद प्रकाशन, पुणे १९५६) अशा दोन आवृत्त्या निघाल्या आहेत.

१५१० मध्ये गोवे पोर्तुगीजांच्या ताब्यात गेले व तेथील प्रजेच्या छळाला प्रारंभ झाला. तेथे मोठ्या प्रमाणावर ख्रिस्तीकरण सुरू झाले. मनू असा पालटला तरी नवक्रिश्चनांचे मन पालटण्यासारखे नव्हते, ह्या गोष्टीच्या खुणा ख्रिस्तपुराणातच आढळतात : "तेचि परी आमांमाजि येक हाति। हिंदुवांचे देसीं जे राटती। ते वेगां न संडती। कुडी भजना॥ परमशास्त्र आधारलेआ उपरीं । पुणती जेंतियांचे रितु घरीं। करिताति निरांतरीं। गुप्तपणे॥" (१.१९.५२–५३). "तंव येकु विप्र म्हणे हे बुधिहिन। जैसे हे येथिल जनु। जे उधराकारणें क्रिस्तांवपण। अंगिकारिती॥" (२.३२.४९). ह्या परिस्थितीत फेर पडावा म्हणून १५८५ मध्ये गोव्यात भरलेल्या क्रिस्ती धर्मगुरूंच्या परिषदेने देशी भाषांतून रचना करण्याचा आदेश दिला. तदनुसार स्टीफन्स ह्यांनी *दौत्रीन क्रिश्तां* ही आपली प्रश्नोत्तरी कोकणीत रचली. परंतु तिनेही नवक्रिस्ती लोकांचे समाधान झाले नाही. पुराणरचनेची मागणी करताना *क्रिस्तपुराणा*तील पृच्छक श्रोत्याने म्हटले आहे : "तुम्ही आमच्या पूर्वीच्या पुराणांवर बंदी घातलीत, पण त्यांना 'प्रतिपुस्तके' तयार केली नाहीत. तुम्ही मराठी भाषेतली कथारसयुक्त प्रतिपुस्तके द्याल तर लोकांचा मनोरथ पूर्ण होईल." (१.१.१४०–१४५). *क्रिस्तपुराण* अशा 'प्रतिपुस्तका'च्या गरजेपोटीच रचले गेले.

*क्रिस्तपुराणा*ची रचना करताना हे भान स्टीफन्स ह्यांनी सतत बाळगलेले आहे. काव्याचा प्रारंभच : "वो नमो विस्वभरिता। देवा बापा सर्व समरथा। परमेस्वरा सत्येवंता। स्वर्गप्रथुविचेआ रचणारा॥" (१.१.१) असा 'ॐ नमो जी आद्या' ह्या ज्ञानेश्वरीच्या काव्यारंभाचे स्मरण करून देणारा आहे. काव्याचा 'अभंगु' किंवा शेवट ह्या 'क्रिस्तदासा' ने "जेजुस्वामी भक्तांचा कैवारी। जदीं जन्मु घेतला संसारीं। वरुसें सोळा सेतें चौतर्दसवेरि। तैं लागोनि जाहालीं॥ तो संखु चालते वरुसीं। वसंतकाळीं वैसाखमासीं। देवग्रंथु मराठियेसि। अभंगु केला॥ या दों पुराणांभितुरि। कांहीं चुकि देखाल जरि। तरि खेमा करोनि माजेवरि। न किजे कोपु॥ आणी बरवें देखाल जें। तेआचा उपेगु देवासि मानिजे। कथा-अम्रुत-रसु सेविजे। देवकुस्तीं॥ ऐसी कथेची वित्पति। आइका जें सांगितलें अल्पमती। तें क्रिस्तदासु करी विनंति। खेमा किजे अग्न्यानायें॥" (२. ५९. ११९–१२३) असा कविविनयासह केला आहे.

पुराणाच्या पूर्वार्धात म्हणजे *पैल्या पुराणा*त ज्यू लोकांच्या इतिहासातील कथाभाग *दुसऱ्या पुराणा*तील विस्तृत क्रिस्तचरित्राची पार्श्वभूमी म्हणून आलेला आहे. त्यातील सद्वर्तनी महापुरुषांना क्रिस्ताचे पूर्वावतार ठरवून व वारंवार क्रिस्तावताराचे भविष्य वर्तवून दोन्ही भागांचे एकपिंडत्व राखण्यात आले आहे. *पैल्या पुराणा*तील देवदूतांचे उपाख्यान व भविष्यवादिनींची कथा तसेच *दुसऱ्या पुराणा*तील मेरीचे जीवनचरित्र *बायबल*बाह्य असून ते तोतया (ॲपॉक्रिफल) लोकवाङ्मयातून घेतलेले आहे. मूळ कथाभागातील व्यक्तींशिवाय

कवीने निवेदक पाद्री व पृच्छक श्रोता ह्यांच्या भूमिका भरीस घालून त्यांच्या प्रश्नोत्तरातून क्रिस्तीधर्माचे मंडण व हिंदुधर्माचे खंडण साधले आहे. असा प्रचारकीपणा मधून मधून डोकावत असला तरी एकंदरीत कथाशिल्पाचा तोल ढळलेला नाही. देवदूतांचे अधःपतन, आदाम व ईव्ह ह्यांची भयचकित अवस्था, हेरोद राजाचा उन्मत्तपणा, सालोमनची गजान्तलक्ष्मी व त्याचा अधःपात, मेरीची आदर्श दिनचर्या व वात्सल्यभक्ती, मग्दनेल मेरीची अनन्य गुरुभक्ती, पेद्रूचा पश्चात्ताप, क्रिस्ताचे बाल्य, त्याचा उपदेश व त्याने केलेले चमत्कार, त्याच्या बलिदानाची पार्श्वभूमी व बलिदान आणि त्याचे एकूण परमकारुणिक व धीरोदात्त व्यक्तिमत्त्व हा भाग सरस उतरलेला आहे. वर्णनशैलीच्या दृष्टीने मराठीची स्तुती (१.१.१२२–२५), कविविज्ञप्ती (१.१.१७२–१८०), प्रळयवर्णन (१.७.४७–१०४), युद्धवर्णन (१.२३.२३–३८), नगरविध्वंस (१.३३.९–१७) हा भाग विशेष लक्षणीय आहे.

"जैसी हरळांमाजि रत्नकिळा। कि रत्नामाजि हिरा निळा। तैसी भासांमाजि चोखाळ। भासा मराठी॥ जैसी पुस्पांमाजि पुस्पमोगरी। कि परिमळांमाजि कस्तुरि। तैसी भासांमाजि साजिरी। मराठिया॥ पखियांमधें मयोरू। वृखिआंमधें कल्पतरू। भासांमधें मानु थोरू। मराठियेसि॥ तारांमधें बारा रासी। सप्त वारांमधें रवी-ससी। यां दिपिचेआं भासांमधें तैसी। बोली मराठिया॥" (१.१.१२२–२५) ही मराठी भाषेची स्तुती सर्वप्रसिद्धच आहे. [ ⇨ ३. ]

सालोमनच्या अंतावर मराठी संतकवींप्रमाणे स्टीफन्स ह्यांनी प्रासादिक वाणीने भाष्य केले आहे : "काळाचे स्वामित्व नाही चुकलें। काळु न पाहे आपुलें पैलें। लानुथोर जेतुलें। तेतुकें घेउनि जाए॥ काळासि संपति-धन। दिसे दगडासामान्य। आणि अग्न्यानियाचें मतिग्न्यान। बाळमति दिसे॥ रायाची संपति वाखागितां। काळु तेयायें हांस्ये करित। काळाचें स्वामित्व मोडितां। भक्तीविण न मोडवे॥" (१.२७.५८–६०). क्रिस्ताच्या मृत्युंजय कुडीचे वर्णन : "नां अग्निचेनि जाळिजे। नां उदकाचेनि भिजविजे। नां वायुचेनि सोखिजे। ऐसी हो कुडी उतमि॥" (२.५२–६६) असे गीतेतील 'नैनं छिन्दन्ति' ह्या सुप्रसिद्ध श्लोकाचा पडसाद उमटवीत केले आहे. भक्ति-अध्यात्माची मराठी संतकवींची परिभाषा ह्या *क्रिस्तपुराण*काराने आत्मसात केलेली होती. रिधिसिधीचा दातार, मुक्तीचे दारवंठे, विभुतीचे उधळण, अडलेयां सारथी, पापाचा कंद उपडणे, महापातकाचा खता लागणे, मेरुशिखर, मळयानिल, सप्तसागर, वैकुंठस्थान, सप्त टाळियांचा ठाणदिपु, नवखंड पृथ्वी, पंचविषय एकवटणे, काळाचे सांगणेकर, हेळामात्रे ह्यांसारखे वाक्प्रयोग पुराणकार ठायीठायी योजतो. पोर्तुगीज भाषेतील धार्मिक परिभाषा नवक्रिश्चनांत आधीच रुळलेली असल्याने तिचा उपयोग पुराणकाराने केला आहे, तसेच कोकणी बोलीच्या काही लकबी शब्दरूपांतून आढळतात. एरवी मराठी संतकवींशी जवळिकेचे नाते जोडणारीच शब्दकळा कवीने सर्वत्र उपयोजिली आहे. त्याने केलेली मराठी भाषेची स्तुती हा तथाकथित ज्ञानदेवाच्या *योगवासिष्ठा*तील मराठीच्या स्तुतीचा अनुकार आहे. ह्या तथाकथित ज्ञानदेवाच्या व विष्णुदास नामा ह्या कवीच्या रचनेचा *क्रिस्तपुराणा*च्या शैलीवर खास ठसा दिसून येतो. पुराणाची शैली *ज्ञानेश्वरी*सारखी अर्थसघन वा *मुक्तेश्वरी भारता*सारखी काव्यात्म नसली, तरी रसालंकारांच्या यथोचित आविष्कारात ती उणी पडत नाही. *क्रिस्तपुराणा*तील कथावस्तूचा सांगाडा बायबली असला, तरी त्यावरील वेलविस्तार अस्सल मराठमोळा आहे.

स. गं. मालशे

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. तुळपुळे, शं. गो. : मराठीचा ख्रिस्ती पुराणिक; प्रवास, पुणे, १९६४; पृ. १३४–१४६. २. प्रभुदेसाई, वि. बा. : फादर स्टीफन्स; चरित्र आणि गोमंतकी बोलीची सेवा; सशगोबो., मुंबई, १९६३; पृ. १२२–१८१. ३. बंडेलू, शां. प. : फादर स्टीफन्स यांचें जीवनचरित्र आणि वाङ्मय; अहमदनगर. १९५४. ४. मालशे. स. गं. : फा. स्टीफन्स यांचें चरित्र आणि ग्रंथरचना; मसंप., जुलै १९६३; पृ. १–२४. ५. प्रियोळकर, अ. का. : स्टीफन्सकृत मराठी बोलीचें व्याकरण; (नवे) लोशि., डिसें. १९३६; पृ. ४४१-४६१.

**टीकाराम** / ० **टीकारामनाथ** [श. १६८२, चैत्र शु. १२ / इ. स. १७६० – श. १७६७ / इ. स. १८४५] नाथपंथी कवी. सोमवंशीय रजपूत क्षत्रिय. जन्म मौजे डोंगराळे (ता. मालेगाव, जि. नाशिक) येथे झाला. वडिलांचे नाव परमानंद व आईचे नाव लालमती. टीकारामांचा बालवयापासूनच परमार्थाकडे ओढा होता. ह्यांची गुरुपरंपरा अशी : आदिनाथ शिव > शक्ती > मच्छिंद्र > गोरक्ष > गहिनी > निवृत्ति > ज्ञानराज > मुक्ता > त्रिलोचन > देवदत्त > परमानंद > टीकाराम.

दत्तावतार व योगिराज त्रिलोचन ह्यांनी टीकारामास भेट दिली; व गुरुकृपेची खूण सांगून योगमार्ग सुलभ केला. ह्यानंतर टीकाराम तापीतीरी पेशव्याचे सरदार बांडे ह्यांच्याकडे तोरखेडे ह्या ठिकाणी नोकरीसाठी राहिले. ह्या काळात त्यांनी *ज्ञानेश्वरी*वर पुराण व कीर्तने केली. पुढे पेशव्यांची चाकरी सोडून हे आळंदीस आले. श्रीज्ञानदेवांनी स्वप्नात गीता देऊन भागवतधर्माचा प्रसार करण्याची त्यांस अनुज्ञा दिली. टीकारामांनीही *ज्ञानेश्वरी* व *भागवता*वर परमार्थपर काव्ये करण्यास तात्काळ सुरुवात केली. टीकाराम ह्यांनी श्रीज्ञानेश्वरमंदिरे स्थापन करून कार्तिक व. १३ च्या पुण्यतिथीचे उत्सव सुरू केले. ह्यांचे शिष्य कोणी वामन पुरुषोत्तम नावाचे होते. ह्यांच्या ग्रंथाच्या प्रती ह्या शिष्यानेच तयार केलेल्या आहेत. ह्यांनी धुळे येथे समाधी घेतली.

टीकाराम हे साक्षात्कारानुभवी संत होते. ह्यांनी डोंगराळे, धुळे, कन्नड, पारोळे (जि. धुळे) ह्या ठिकाणी राहून धार्मिक ग्रंथांची रचना केली. *परमानंदवैभव* हा त्यांचा पहिला स्वतंत्र व मोठा ग्रंथ. ह्यांची उपलब्ध कविता अंदाजे दहा हजारांहून अधिक आहे. ती पारमार्थिक आणि वेदान्तपर आहे. काही हिंदी रचनाही ह्यांनी केली आहे. भक्ती, ज्ञान, वैराग्य, उपदेश, वेदान्त इत्यादी विषय त्यांच्या कवितेत येतात.

**रचना :** अप्र. – १. कपिलगीता; प्रत श. १७४८ / इ. स. १८२६. २. गोपीचंदचरित्र. ३. टीकारामविलास. ४. नाथमाहात्म्य. अभंगसंख्या १०००. ५. परमानंदवैभव. अ. ३१; ओ. सं. ३१००; प्रत श. १७४९ / इ. स. १८२७; ६. मच्छिंद्राख्यान. ७. श्रियाळचरित्र. ८. वेदान्तपदप्रबंध आनंदलहरी; ९. हिंदी गीता – कुंडलीया छंद; गीतेचे पद्यमय भाषांतर; १०. आर्या, छंद, दोहे, पदपदांतरे, श्लोक, स्तोत्रे; सवामं. हस्तलिखित सू., खं. २ आणि वि. बा. जोशी संग्रह, ता. कन्नड, जि. औरंगाबाद.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, वि. बा. : कांहीं ऐतिहासिक संतकवींची माहिती; विद्यासेवक; जून १९२८; पृ. १७.

**० टीकारामनाथ** – पहा टीकाराम.

**० (डॉ.) टेलर जॉन** – पहा जॉन टेलर.

**ठाकुरदास बाबा** / ० **ठाकुरदासबुवा** [? – समा. श. १७५२, वैशाख शु. ३ / इ. स. १८३०] कवी. ह्यांचे मूळ गाव उत्तरभारतात भागीरथीतीरी वसलेले गुसाईका शिवराजपूर. ह्यांचे नाव बालाप्रसाद. उपनाव त्रिवेदी, गोत्र काश्यप. ह्यांची पितृपरंपरा अशी : मकरंद > खड्गेश्वर > नीलकंठ > बालाप्रसाद. वयाच्या सोळाव्या वर्षी हे जगन्नाथपुरीला गेले व तेथून तीर्थयात्रा करीत करीत पंढरपुरास आले. पंढरपुरास असताना स्वप्नात एका ब्राह्मणाने "नारायण विधि अत्रीनाथ

दत्त जनार्दन एकनाथ" अशी आपली गुरुपरंपरा सांगून ह्यांना आज्ञा केली की, 'कीर्तन करीत जा'. पैठणकर एकनाथांच्या सांगण्याप्रमाणे ते कीर्तन करू लागले. तळेगावच्या दाभाडेबाई, पेशव्यांचे सेनापती बापू गोखले हे ह्यांच्या शिष्यांपैकी होत. सातारा जिल्ह्यातील तारगावचे उत्पन्न बापू गोखल्यांच्या साहाय्याने बुवांस मिळाले. पेशव्यांनीही त्यांना पुष्कळ वैभव दिले. पेशवाईच्या अंतानंतर हे साताऱ्यास गेले. तेथे प्रतापसिंहांनी त्यांची व्यवस्था उत्तम प्रकारे ठेवली. कोल्हापूरकरांचे पराक्रमी सरदार आप्पासाहेब निपाणकर ह्यांचाही बुवांवर लोभ जडला व त्यांनी आटाळी गाव बुवांस इनाम दिले.

ठाकुरदासबाबांचा पहिला शरीरसंबंध जुन्नर येथील तिवारी घराण्यातील मुलीशी व दुसरा शुक्रवराण्यातील मुलीशी झाला. पहिल्या कुटुंबापासून दोन व दुसऱ्या कुटुंबापासून दोन अशी चार अपत्ये ह्यांना झाली. साताऱ्यासच ह्यांचे देहावसान झाले. ह्यांच्या जेष्ठ चिरंजिवांनी ह्यांची "भावनेची समाधी" तारगावी बांधली.

ठाकुरदासबाबांची बहुतेक रचना तारगावी झाली. त्यांची कविता साधी व भक्तिपर आहे. मातृभाषा हिंदी असूनही त्यांनी मराठी भाषेचे उत्कृष्ट ज्ञान संपादन करून तिजमध्ये ग्रंथरचना केली हे विशेष होय. अध्यात्मासारखा गहन विषयही ते अस्खलित भाषेत वर्णन करू शकत. त्यांची अभंगपदाची स्फुट कविता विपुल आहे.

**रचना : मु.** – १. श्रीमद्भगवद्गीतेवरील टीका; अभंगसंख्या ३८९; मुंबई, १८९७. २. सहजबोध; प्र. ९, ओ. सं. २५६; मुंबई, १८७१, १८९७. ३. दत्ताची आरती; मआ., पृ. ३१३. **अमु.** – १. वेदस्तुतिपर अभंग. २. श्रीमद्भागवत द्वितीय स्कंधावर टीका; ओ. सं. २०२०. ३. श्रीमत् शंकराचार्यकृत सप्तश्लोकीवर अभंग. ४. अभंग व पदपदांतरे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : ठाकुरदास; मकच., खं. ६; मुंबई, १९२४; पृ. २१३–२२२.

**० ठाकुरदास बुवा** – पहा **ठाकुरदास बाबा.**

**० डिक्सन (रेव्ह.) जॉन** – पहा **(रेव्ह.) जॉन डिक्सन.**

**डिंभ कवी–१ (रामदेव)** [अंदाजे श. ११८९ / इ. स. १२६७] चक्रधरसमकालीन महानुभाव कवी. हे डिंभ कविकुळाचे मूळ पुरुष. ह्यांचे नाव रामदेव. हे चिचखेड ह्या गावचे राहणारे. हे उत्कृष्ट कीर्तनकार व प्रवचनकार असून चक्रधरस्वामींचे निःसीम भक्त होते. त्यांची व स्वामींची भेट 'चांगदेवपुरी' ह्या गावी झाल्याचा उल्लेख *लीळाचरित्र*, *स्थानपोथी* इत्यादी ग्रंथांत सापडतो. हे द्वारावतीकार चांगदेव राउळांचे प्रशिष्य व धुंडी राऊळ ह्यांचे शिष्य होत असे भीष्माचार्यकृत *निरुक्तशेषा*तील उल्लेखावरून समजते. *लीळाचरित्रा*वरून ह्यांनी स्वामींसमोर पाच पदे गायिली व काही श्लोकही रचून गायिले अशी माहिती कळते. कवी ही पदवी डिंभ रामदेवास स्वामींनीच प्रदान केली असावी किंवा स्वामींच्या काळात कवि डिंभ असे ते संबोधले जात असावेत.

कवि डिंभ रामदेव हा स्वामींच्या प्रेमी भक्तजनांपैकी एक होता. डिंभ हे एखाद्या व्यक्तीचे नाव नसून कविकुळाचे आहे व हे डिंभ कविकुळ चक्रधरांच्या काळापासून अस्तित्वात होते असे ह्यावरून म्हणता येते. डिंभ कविकुळात पुढे कृष्णमुनी डिंभ, केशव डिंभ, गोपाळ डिंभ असे कित्येक कवी होऊन गेले.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अडसोड अण्णासाहेब : डिंभ कवी; महानु., फेब्रु. १९६७, पृ. १ व डिसें. १९७२, पृ. ९. २. कानोले, वि. अं. : डिंभ कविकुळाचा मूळ पुरुष; महानु.; एप्रि.–मे–जून १९७४; पृ. ८६–९०.

**० डिंभ कवी–२** – पहा **गोपाळमुनी.**

**० डिंभ कवी–३** – पहा **कृष्णमुनी–१.**

**० डिंभ कवी–४** – पहा **डिंभ मुनि कृष्णदास.**

**डिंभ केशव** [का. अनु.] प्रबंधकार महानुभाव कवी. बरेचसे काव्य प्रकाशित (स्तोत्रसंग्रहातील प्रबंध) (महानु., फेब्रु. १९६७, पृ. १ व डिसें. १९७२, पृ. ९).

**डिंभ मुनि कृष्णदास / ० कृष्णडिंभ विराट / ० कृष्णमुनि–३ / ० डिंभ कवी–४** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] महानुभाव कवी. डिंभमुनी कृष्णदास हे अन्वयमाळिकाकार कृष्णमुनी डिंभ कवीहून वेगळे असून ते उपाध्य आम्नायातील दीक्षित विराटदेशोपनामाळंकृत मयंकराजाचे शिष्य होत. 'उपाध्य आम्नायात दोन मयंकराज होऊन गेले आहेत. डिंभकवी हा बहुधा पहिल्या मयंकराजाचा शिष्य असावा.' (य. खु. देशपांडे, मवाइ., खं. २; संपा. पांगारकर, ल. रा.; पृ. ७६५). वाईदेशकर शाखेचे हे एक आचार्य होते. कवीने बऱ्याच ग्रंथांची निर्मिती केली आहे. ह्यांच्या नावावर जवळ जवळ २५ ग्रंथ (स्तोत्रे वगैरेसह) आढळतात. कवी डिंभ, कृष्णमुनी डिंभ, मुनिकृष्णया, कृष्णया, कृष्णदास अशी विविध नावे आपल्या काव्यातून कवीने स्वतःचा निर्देश करण्यासाठी उपयोजली आहेत. ह्यांच्या ग्रंथरचनेपैकी *नवखंड रुक्मिणीस्वयंवर, ऋद्धिपुर माहात्म्य, चेंडुफळी, लक्ष्मणा-स्वयंवर, कृष्णजन्माष्टमी व्रताख्यान, साधनामृत स्तोत्र* अशी काही काव्ये प्रसिद्ध झाली आहेत व ती महत्त्वाची आहेत. ह्यांची जवळजवळ दोनतृतीयांश रचना अद्यापि मुद्रित झालेली नाही. प्रत्येक काव्याच्या समाप्तिलेखात 'इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षित विराटदेशोपनामाळंकृत मयंकराजशिष्य कृष्णमुनिना विरचिते' अशी मुद्रा वापरल्याने ह्या कवीची रचना सहज ओळखता येते

कवीचे *ऋद्धिपुरमाहात्म्य* व *फलटणमाहात्म्य* हे दोन ग्रंथ *सह्याद्रिखंडा*तर्गत असून पहिल्याचे १० प्रसंग व ७१५ ओव्या आहेत. डॉ. यु. म. पठाण ह्यांनी त्यांना उपलब्ध झालेल्या पाच पोथ्या व भक्तराजबाबा महानुभाव ह्यांनी छापलेले *ऋद्धिपुर माहात्म्य* ह्यांच्या आधारे प्रस्तुत काव्याची पाठचिकित्सायुक्त संपादित आवृत्ती तयार केली. हा ग्रंथ लिहिण्यामागे खास पंथीय प्रेरणाच कारण आहे. त्यातील महानुभाव तत्त्वज्ञानाच्या निरूपणावरून व ग्रंथाच्या विषयावरूनही हे स्पष्ट होते. पुराण आणि काव्य ह्यांचा सुयोग्य समन्वय ह्या काव्यात झालेला दिसतो. ऋद्धिपुराचे महत्त्व एक महानुभाव पवित्र तीर्थ म्हणून कसे अधिक आहे हे पटविण्याचा ग्रंथकाराचा उद्देश आहे. नृसिंह, रुचिक, परशुराम ह्या परंपरागत पौराणिक आख्यानांसाठी काव्यातील चार प्रसंग दिले आहेत. उरलेले सहा महानुभाव पंथाचे माहात्म्य सांगण्यासाठी उपयोजिले आहेत. ऋद्धिपुराशी ज्या ज्या लक्षणीय विभूतींचा संबंध आला त्यांचा उल्लेख आदराने करून ज्या गोविंदप्रभूंच्या वास्तव्याने ऋद्धिपुराचे माहात्म्य वाढले त्यांचे चरित्रवर्णन करण्यासाठी कवीने ९ आणि १० असे दोन प्रसंग खर्ची घातले आहेत. गोविंदप्रभूंनीच ऋद्धिपुरास तीर्थक्षेत्राचे माहात्म्य प्राप्त करून दिले. ह्या क्षेत्राच्या तीर्थयात्रेचे फळ काय तर "जो ऋद्धिपुरासी जाये। पदोपदी अश्वमेध फळ लाहे। जो आनिका पाठवी तयासि होये। अच्युतपद ॥ ३.६५॥" असे कवी सांगतो. ह्याच विषयावरील नारोव्यासांच्या *ऋद्धिपुरवर्णन* ह्या ग्रंथात वर्णनात्मक तपशील अधिक आहे. असे असले तरी, कृष्णमुनींच्या ग्रंथात कथा, प्रसंग, संवाद आणि वर्णने ह्यांचा जो सुंदर मिलाफ झालेला आढळून येतो ते त्यांचे वैशिष्ट्य होय. [⇨ ३.] हे दोन्हीही काव्यग्रंथ आपआपल्या परीने श्रेष्ठ आणि पंथीय दृष्टिकोनातून महत्त्वाचे आहेत असे मत डॉ. पठाण ह्यांनी ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत व्यक्त केले आहे. दुसऱ्या *फलटणमाहात्म्य* ग्रंथात कवीने चक्रपाणी-चरित्र वर्णन केले आहे. ग्रंथाचे एकूण १३ अध्याय आहेत. ह्या कवीची *लक्ष्मणा-स्वयंवर* आणि *रुक्मिणी-स्वयंवर* ही दोन मोठी काव्ये रा. ब. माढेकर ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत. *रुक्मिणीस्वयंवर* काव्य अनेकवृत्तात्मक श्लोकबद्ध असून त्याचे नऊ खंड आहेत (श्लो. सं. ७२०). मराठीमध्ये प्रचलित नसलेल्या अनेक अक्षरगणवृत्तांचा आणि मात्रावृत्तांचा वापर कवीने ह्या काव्यात केला असून

त्यामधून त्याची छंदःशास्त्रनिपुणता प्रत्ययास येते. *रुक्मिणी-स्वयंवरात* कविप्रतिभेने प्रौढरूप धारण केले आहे. रम्य अशा वर्णनशैलीने रसाविष्कार चांगला साधला आहे. नरेंद्राच्या काव्याची छाप ह्या काव्यावर पडली आहे. नरेंद्राच्या काव्यातले *किन्नरोपाख्यान* ह्यानेही आपल्या कथेत घातले आहे. प्रस्तुत काव्याचा रचनाकाळ प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांनी इ. स. १६५२ दिला आहे. संशोधक ना. ब. जोशी ह्यांनी संतोषमुनी कृष्णदासाच्या *रुक्मिणीस्वयंवराच्या* प्रस्तावनेत हा रचनाकाळ इ. स. १६०२ असा दिला आहे. [⇨ ३.]

२७ प्रसंगांची ३१३० ओव्यांची लक्ष्मणेच्या विवाहाची कथा विस्तृत वर्णनांचा थाट उडवून देऊन कवीने सजविली आहे. कवीची विनयशीलता व तो हे काव्य लिहिण्यास का प्रवृत्त झाला ह्यासंबंधीचे निवेदन त्याच्याच शब्दांत पाहण्याजोगे आहे. तो लिहितो : "तैसे सामर्थ्य महाकवीचे : मज मंदा प्राकृता कैंचे : परि यथाशक्ति स्तवन सुंदराचे : करीन मी ॥ का जे करिता ते त्याचे नामोच्चरण : पवित्र होती मनरसनाश्रवण : म्हणौनि करीत असे श्रीकृष्णवर्णन : कथानुसंधाने ॥" कवितेला शोभा आणणारे छत्तीस अलंकार आहेत असे कवी म्हणतो. ह्या अलंकारांचे साहाय्य घेऊन कवीने काव्याला कल्पनावैभव प्राप्त करून दिले आहे.

कवीच्या इतर रचनेपैकी *श्रीकृष्णजन्माष्टमीव्रताख्यान*, *स्ववृद्धाचारप्रबंध*, *आत्मतीर्थप्रकाश* व *साधनामृतस्तोत्र* अशी चार काव्ये प्रकाशित झाली आहेत (आध्यात्मिक साहित्यप्रकाशन, हैद्राबाद). ह्या रचनांच्या अखेर कवीने 'विराटदेशोपनामाळंकृत मयंकराजशिष्य' असा आपला उल्लेख केला आहे. कृष्णव्रतकथा आत्मपुराणात भास्कराने याज्ञवल्कीस सांगितल्याचा आधार कवी देतो. काव्याचा थाट संपूर्ण हरिदासी पद्धतीचा असून हे एक भक्तिकाव्य असल्याने तत्त्वज्ञान तेथे अनुषंगाने येते. जन्माष्टमीचे माहात्म्य पटवून देण्यासाठी हे लिहिले असून त्यासाठी हरिश्चंद्रकथेचा आश्रय कवीने घेतला आहे. सर्व व्रतांत हे जन्माष्टमीव्रत श्रेष्ठ असल्याचे कवी सांगतो.

७६ श्लोकांचे *साधनामृत स्तोत्र* ऋद्धिपूर ग्रंथालयातील एकमेव प्रतीवरून प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांनी छापले आहे. (हैद्राबाद, १९७२). ह्यापूर्वी *महानुभावीय छंद वाङ्मय* (महानु. परिषद, १९४८) ह्या ग्रंथात छापलेल्या प्रस्तुत स्तोत्राची एकूण श्लोकसंख्या १७५ होती. वि. ल. भावे, ज. शा. देशपांडे, कृष्णदास महानुभाव ह्यांनी ती ८३ दाखविली आहे. हे स्तोत्र एक उत्कट भक्तिकाव्य असून श्रीचक्रधरांच्या लीळांचे स्मरण व स्तवन ह्यात केलेले आहे. हे आत्मोद्धाराचे साधन असल्याने कवीने ह्यास *साधनामृतस्तोत्र* असे म्हटले आहे. आपल्या दोषांची जाणीव ठेवून, स्वतःकडे अमानित्व घेऊन, आत्मोद्धाराच्या तळमळीने आर्त करुणा भाकीत असलेला भक्त तेथे पाहण्यास सापडतो. पंथीय रूक्ष तत्त्वज्ञानापेक्षा काव्यात्मता आणि गीतात्मकता ह्यांचा प्रत्यय येथे अधिक येतो. शैली प्रसन्न आणि ओघवती आहे. *आत्मतीर्थप्रकाश* ह्या ६९६ ओव्यांच्या ग्रंथात श्रीदत्तात्रेयांच्या चरित्रातील आत्मतीर्थ कसे प्रकट झाले तो कथाभाग आला आहे. दत्त हा महानुभाव पंचकृष्णांपैकी एक असल्याने दत्तात्रेयविषयक वाङ्मय पंथानुयायांनी निर्माण केले आहे. ग्रंथ ओवीवृत्तात असून तो कवीने आत्मीयतेने लिहिला आहे. ग्रंथ पारमार्थिक दृष्टीने लिहिलेला असला तरी कथन लालित्यपूर्ण व रोचक असल्याने पंथीयांव्यतिरिक्त इतरांनाही तो हृद्य वाटण्याजोगा आहे. तीर्थस्थानी चालणाऱ्या तामस वृत्तीच्या लोकांचे अनाचार कवीने वर्णन केले आहेत. त्यावर तत्कालीन समाजस्थितीचा प्रभाव पडलेला दिसतो. [⇨ ३.] *स्ववृद्धाचारप्रबंध* (१९० ओ.) ग्रंथात कवीने आपल्या गुरुपरंपरेची साद्यंत माहिती दिली आहे. कविरचित १६ श्लोकांचे एक छोटेसे प्रार्थनास्तोत्र *महानुभाव* मासिकातून मुद्रित झाले आहे (जून १९७३, पृ. २९–३०). *चेंडुफळी* हे एक छोटेसे पण रमणीय कथाकाव्य श्रीकृष्णभक्तीतूनच स्फुरलेले आहे. ह्यामध्ये कालियामर्दनाची कथा कवीने २०६ ओव्यात रंगविली आहे.

कवीच्या अन्य रचनेमध्ये, *पांचाळेश्वर माहात्म्य*, *वाकी माहात्म्य*, *तीर्थमालिका*, आरत्या, स्तोत्रे, धावे अशी विपुल रचना आढळते. इ. स. च्या १७ व्या शतकात भरीव साहित्यनिर्मिती करणारा प्रतिभावंत महानुभाव कवी म्हणून कृष्णमुनी कवी डिंभाचे नाव प्रख्यात आहे. प्राचीन मराठीतील एक श्रेष्ठ रससिद्ध पंडित कवी असा डिंभमुनींचा गौरव अ. ना. देशपांडे करतात (प्रामवाङ्., भा. २, पुणे, १९७३; पृ. ३२२). हा पंथाचा श्रेष्ठ दर्शनकार आहे. तो परमेश्वराचा निस्सीम भक्त आहे आणि कल्पनाविलासाचा रम्य आविष्कार करू शकणारा कुशल कवीही आहे.

**रचना : अमु.** – १. आत्मतीर्थप्रकाश; प्रसंग १२, ओ. सं. ६९६; र. श. १५८१ (इ. स. १६५९); संपा. कृष्णदास महानुभाव; हैद्राबाद, १९६३. २. ऋद्धिपूर माहात्म्य; प्रसंग १०, ओ. सं. ७१५; (अ) संपा. भक्तराजबाबा महानुभाव, १९११; (ब) संपा. डॉ. पठाण, यू. म. (प्रस्तावनेसह); सोलापूर, १९६७. ३. चेंडुफळी; ओ. सं. २०६; संपा. पोहनेरकर, न. शे.; प्रति., फेब्रु. १९६६, पृ. ४३–५८. ४. रुक्मिणीस्वयंवर, खं. ९; श्लो. सं. ७२०; र. श. १५७४ (इ. स. १६५२); संपा. माढेकर, रा. ब.; हैद्राबाद. ५. लक्ष्मणास्वयंवर; प्रसंग २७, ओ. सं. ३१३०; संपा. माढेकर, रा. ब.; हैद्राबाद. ६. वाकीमाहात्म्य; अ. ५, ओ. सं. ३२३; संपा. नागराजबाबा महानुभाव; महानु., जून, जुलै, ऑग., सप्टें. १९७२ (क्रमशः). ७. श्रीकृष्णजन्माष्टमीव्रताख्यान; प्रसंग ३, ओ. सं. २०७; न. प्र. का. : श. १६८२ (इ. स. १७६०); संपा. कुळकर्णी, व. दा. (प्रस्तावनेसह); हैद्राबाद, १९७२. ८. स्ववृद्धाचारप्रबंध; ओ. सं. १९०; संपा. कृष्णदास महानुभाव; हैद्राबाद, १९६३. **अमु.** – १. आत्मपुराण. २. आरत्यांचा दशक (भुवनसुंदराची आरती, बेलापूर आरती, वाकेश्वरार्ति व एकांकवर्णनार्ति इ.). ३. छिन्नपापवर्णन – अभंग (बोटा, गूढा, छिन्नस्थळी वर्णन). ४. तीर्थमालिका; श्लो. सं. ४८. ५. डोमेग्रामवर्णन. ६. पंचधावे. ७. पंचावतार स्तोत्रे. ८. पांचाळेश्वरमाहात्म्य; अ. १२, ओ. सं. ६७७. ९. प्रसादविरह – स्तोत्र. १०. फलटण (फलस्थपूर) माहात्म्य; अ. १३, ओ. सं. १००५. ११. भुर्ड / भरड (भरड नावाचे काव्य). १२. मृगपाशविमोचन. १३. रंडिकास्तोत्र. १४. वणीताप्रमाद – स्तोत्र. १५. विवेक-विलास. १६. संख्या-संवाद. १७. साधनजीवनामृत – स्तोत्र; ओ. सं. १५७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. देशपांडे, अ. ना. : कवी डिंभ व त्याची ग्रंथरचना; प्रामवाङ्., भा. २; पुणे, १९७३; पृ. २५५–२६१, २८५–२९२, ३१५–३२२. २. देशपांडे, य. खु. : श्रीऋद्धपूर माहात्म्य; ममवा., पुणे, १९६०; पृ. ७९–८०. ३. पांगारकर, ल. रा. (संपा.) : कवि कृष्णडिंभ विराट; मवाङ्., खं. २, नाशिक, १९३५; पृ. ७६२–७६५. ४. माढेकर, रा. ब. : आणखी एक रुक्मिणीस्वयंवर; प्रतिष्ठान, जुलै १९५४; पृ. ३५-३८, ४२.

**डौरेकेशवनाथ** [का. अनु.] गद्यपद्यलेखक. ह्या लेखकाचे *बिकट* अथवा *नकल्या*, गद्यपद्य, ग्रं. सं. ९००, हे हस्तलिखित तंजावर सरस्वती महाल ग्रंथसंग्रहात आहे.

**ढुंढिराज / धुंडिराज लक्ष्मण व्यास / ० व्यास, धुंडिराज लक्ष्मण** [का. अनु.] कोशकार. अ. का. प्रियोळकरांच्या मते *राजव्यवहारकोशाचा* कर्ता कवी रघुनाथपंडित किंवा रघुनाथ नारायण हणमंते ह्यांपैकी कोणीच नसून *मुद्राराक्षस* ह्या नाटकावर संस्कृत टीका लिहिणारा धुंडिराज व्यास हा वरील कोशाचा कर्ता होय. तंजावर येथील ह्या कोशाच्या प्रतीतून आढळणाऱ्या समाप्तीच्या मजकुरावरून त्यांचे असे मत झाले आहे (अ. का. प्रियोळकर : प्रस्ता., दमयन्ती-स्वयंवर; द्वि. आ.; मुंबई, १९५९).

**तड्ड मल्लारि** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**तन्मयानंद** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – 'अद्यापि' ज्ञानबोध; संककासू., पृ. ४१.

**तात्या कवीश्वर** [का. अनु.] शाहीर. बडोद्याचे राजे मल्हारराव गायकवाड ह्यांचे दिवाण गोपाळराव मैराळ ह्यांच्यावर तात्या कवीश्वर शाहीराने केलेले स्तुतिपर कवन *मैराळभाऊंचा पोवाडा* म्हणून प्रसिद्ध आहे (मु. : ऐतिपो., खं. ३, पृ. २०१–२).

**तात्या गडकर** [अंदाजे इ. स. च्या १९ व्या शतकाचा पहिला पाद] शाहीर. राहणार वाखरड (जि. सातारा). शाहीर हैबतीच्या परंपरेतील. ह्यांच्या कवनापैकी सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधीचे कवन महत्त्वाचे आहे (संपा. थिटे, राजाभाऊ : शाहीर हैबती; पुणे, १९६५; पृ. ३३).

**तात्याजी महीपति / ० महीपति तात्याबा** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध] कवी. *शनैश्चरचरित्र* किंवा *शनिमाहात्म्य* ह्या ग्रंथाचा कर्ता. मुळातील गुजराती भाषेतील नवग्रहांच्या कथेवरून ही कथा तात्याजी महीपति ह्यांनी मराठी भाषेत सांगितली. उदा., 'गुजरात भाषेची कथा। नवग्रहांची तत्त्वता ॥ ४ ॥' असा निर्देश कर्त्याने केला आहे (ओ. क्र. ४). ह्या ग्रंथाच्या पठणाने 'संकटव्यथा न बाधति' असे कवीने म्हटले आहे. 'अर्थाविषयी नाही न्यूनता' असेही कवी आत्मविश्वासाने सांगतो साक्षात शनैश्वरच आपल्या मुखातून बोलत असल्याचे सांगून अद्भुत घटना आणि चमत्कारवर्णने ह्यांनी नटलेली ही कथा कवी निवेदन करतो. विक्रम राजाच्या दरबारात नवग्रहांत श्रेष्ठ कोण अशी चर्चा चालू असता नवव्या पंडिताने शनिदेवाची श्रेष्ठता वर्णिली अशी ह्या ग्रंथाची निवेदनपद्धती आहे. देवदेवता, ग्रह, लोकोत्तर व्यक्तित्वाचे सत्पुरुष ह्यांच्या चरित्रकथा निवेदन करून भाविक जनांच्या प्रापंचिक अडचणी दूर होतील असा दिलासा त्यांना देणाऱ्या कवितेचा एक स्वतंत्र प्रवाहच प्राचीन मराठी सारस्वताच्या इतिहासात तयार झालेला दिसतो. सरस्वती गंगाधरांचे *गुरुचरित्र*, श्रीधरांचे *शिवलीलामृत*, देवीदासांचे *व्यंकटेशस्तोत्र*, वेगवेगळ्या व्रतांच्या कथा, असे अनेक काव्यग्रंथ हे केवळ सांसारिकांच्या मनोकामना पूर्ण व्हाव्यात ह्या उद्देशानेच रचले गेले आहेत. पठण करणारा विशिष्ट हेतू मनात धरून ग्रंथाचे वाचन करीत असल्याने फलश्रुतीला ह्या ग्रंथांत अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त होते. ह्या दृष्टीने *शनिमाहात्म्या*ची फलश्रुती पाहण्यासारखी आहे. "हा ग्रंथ करिता श्रवण। सकळ विघ्ने जाती निरसून। ग्रहपीडा अतिदारुण। न बाधे कदा कल्पांती ॥ ३८२ ॥ श्रवणपठणी निदिध्यास। लेखक पाठक सर्वांस। ग्रंथ संरक्षी तयास। क्लेश विघ्ने न बाधती कदा ॥ ३८४॥" ह्या ग्रंथाचे पठण व पारायण शनीची पीडा दूर व्हावी ह्या श्रद्धेने व अनन्यभावाने महाराष्ट्रातील जनता करीत असते.

**रचना : मु.** शनिमाहात्म्य / श्रीशनैश्चरस्तोत्र; ओ. सं. ३८८; पुणे, श. १८६३; मुंबई, द्वि. आ., श. १८६७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नासिराबादकर, ल. रा. : प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास; कोल्हापूर, १९७२; पृ. २०५.

**तानाजी** – पहा *तानाजी देशमुख.*

**तानाजी देशमुख / ० तानाजी / ० तान्हाजी–१** [अंदाजे श. १५१२ / इ. स. १५९० – श. १५६० / इ. स. १६३८] एकनाथकालीन कवी. हे अंबड (मराठवाडा) ह्या भागातील राहणारे असावेत. अंबा हे त्यांचे उपास्य दैवत होते असे त्यांच्या कवितेत येणाऱ्या उल्लेखांवरून वाटते. ह्या कवीचे *सासुरवास* हे स्फुट काव्य सु. बा. कुळकर्णी ह्यांनी प्रसिद्ध केले आहे (मसंप., जाने. १९६८). काव्याचे मूळ हस्तलिखित तंजावर सरस्वती महाल येथील आहे. काव्याचा विषय सामाजिक आहे. एका सधन घरच्या मुलीस साधारण परिस्थिती असलेल्या सासरच्या घरी जो जाच होतो, त्यामुळे झालेली तिची असहाय अवस्था कवीने ह्या काव्यात वर्णन केली आहे. प्रस्तुत काव्यात रचनाशैथिल्य व कवित्वगुणांचा अभाव हे दोषही जाणवतात. विषयाचे नावीन्य एवढाच त्याचा विशेष.

**रचना : मु.** – १. सासुरवास; ओ. सं. १०१; र. श. १५५१ (इ. स. १६२९), मार्ग. शु. ११; मसंप., जाने. १९६८; पृ. ८–११. २. महादेवाची आरती; मआ., पृ. ४००. **अमु.** – १. अंगदशिष्टाई; श्लो. ४३. २. कृष्णचरित्र; श्लो. १०. ३. तुळजादेवी अष्टक, अंबास्तव, रेणुकादेवीचे पद, तुळशीची आरती व पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, सु. बा. : सासुरवास; मसंप.; जाने. १९६८; पृ. ११–२०. २. जोशी, म. रा. : तानाजी देशमुख; विसंमंवा.; नागपूर, १९७१; पृ. १४०.

**तानाजीनंदन** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – एक पद; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. २०. **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**तानूपंडित** [इ. स. १७५१ नंतर] जैन कवी. ह्यांनी आपल्या एका हिंदी रचनेत कारंजाच्या भट्टारक पीठावरील शांतिसेनांचा उल्लेख केला आहे. हे शांतिसेन श. १६७३ (इ. स. १७५१) च्या सुमारास झाले असावेत. ह्यांच्या नावावर तीन आरत्या उपलब्ध आहेत. *पार्श्वनाथ आरती*च्या अखेरीस आपला उल्लेख कवीने 'तानो पंडित' असा केला आहे. पहा : 'संसारसिंधू भरियला उन्मतू। नाम तुझ तारावया समर्थु। तानो पंडित यइल शरणांगतु। चरणि सेवा मागे अखंडितु ॥ ५ ॥' (पार्श्व. आ.).

**रचना : अमु.** – १. पार्श्वनाथ आरती (शिरड मठ हस्त. सं.). २. समवसरण आरती. ३. क्षेत्रपाळ आरती (सोलापूर मठ हस्त. सं.).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : तानूपंडित; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ८८.

**० तान्हाजी–१** – पहा *तानाजी देशमुख.*

**तान्हाजी–२** [अंदाजे इ. स. १६५०–१७५०] कवी. *अश्वपरीक्षा* ह्या श्लोकबद्ध प्रकरणाचा कर्ता. तान्हाजीच्या ह्या ग्रंथाचा निर्देश गो. का. चांदोरकर ह्यांच्या सूचीत आढळतो (संककासू., पृ. २९).

'तान्हाजी' ह्या कविनामनिर्देशाखेरीज कवीची अन्य माहिती उपलब्ध नाही. तान्हाजीकृत एक शिवपर पद वि. का. राजवाडे ह्यांनी प्रसिद्ध केले आहे (मु. : भाइसंमंइति., श. १८३३, पृ. ९६). *अश्वपरीक्षा* काव्याशी असलेले ह्या पदाचे रचनासाम्य लक्षात घेता हे ह्याच कवीचे असावे असे मत *अश्वपरीक्षा* काव्याचे संपादक बाळकृष्ण दाभाडे ह्यांनी व्यक्त केले आहे.

काव्य रचताना कवीपुढे कोणता तरी संस्कृत ग्रंथ असावा असे पहिल्या श्लोकावरून स्पष्ट होते. 'संक्षिप्त भाव कथीला' ह्या कवीच्या उद्गारावरून हे काव्य म्हणजे मूळ संस्कृत ग्रंथाचे भाषांतर नसून मुळातील भावार्थ तेवढाच ह्या काव्यात आणण्याचा प्रयत्न कवीने केलेला दिसतो. कवी अश्वशास्त्राचा चांगला जाणकार असावा.

ह्या काव्याचा लेखनकाल निश्चितपणे सांगता येत नाही. भिन्न भिन्न वृत्तांचा कवीने केलेला वापर व त्याकरिता केलेली ऱ्हस्वदीर्घाची ओढाताण हे काव्याचे विशेष लक्षात घेता ही रचना इ. स. च्या १८ व्या शतकाच्या पूर्वार्धातील असावी असे अनुमान करता येते.

*शालिहोत्रा*सारखे अश्वशास्त्रावरील बरेच ग्रंथ संस्कृतात असल्याने अश्वपरीक्षाविषयक अगम्य झालेले ज्ञान सर्वसामान्यांना सहजसुलभ करून द्यावे ह्या उद्देशाने प्रस्तुत मराठी प्रकरण रचले गेले असावे.

**रचना : मु.** – अश्वपरीक्षा; श्लो. सं. ७४ (श्लो. क्र. १५ पोथीतच गळलेला आहे); संपा. दाभाडे, बा. मा.; मलकापूर, १९६९ (प्रस्ता., पृ. १–१२).

**तारकपंडित** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० तिमय्या विप्र** – पहा **तिम्म विप्र.**

**तिम्म विप्र / ० तिमय्या विप्र** [का. अनु.] तंजावरकडील कवी. हा रामदासी परंपरेतील असावा. कवी रामोपासक आहे. ह्याने *सुंदरकांड* कथाभाग व *रामायणा*वर स्फुट स्वरूपाची रचना, पदे वगैरे केली आहेत. कवीची रचना तंजावर ग्रंथसंग्रहात सापडते (हस्त. यादी, क्र. ३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : तिम्म विप्र; काही अज्ञात सारस्वत उपासक; नभामा., ऑक्टो. १९६९, पृ. २१.

**तिर्मख** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं., हस्त. सू., खं. २.

**तुकनगिरी** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – एक लावणी; अंधारातील लावण्या; पुणे, १९५६; पृ. २६९–७०.

**तुकयादासी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अभंग; संककासू., पृ. ४२.

**० तुकया बंधु (कान्होबा)** – पहा **कान्होबा.**

**० तुका (दास)** – पहा **तुकानंद.**

**तुकानंद / ० तुका (दास)** [का. अनु.] टीकाग्रंथकार. ह्यांच्या *गीताख्यान* ह्या ग्रंथाची नोंद गो. का. चांदोरकर ह्यांनी केली आहे (संककासू., पृ. ४२).

**० तुका नागनाथ** – पहा **तुका ब्रह्मानंद.**

**० तुका नागेश** – पहा **तुका ब्रह्मानंद.**

**तुका पांडुरंगदास** [अंदाजे श. १६४२ / इ. स. १७२० – समा. श. १६७४, अंगिरा संवत्सर, चैत्र व. ११, सोमवार / इ. स. १७५२] कवी. गीतानुवादकर्ते. हे शाहूकालांत विद्यमान होते. तुका पांडुरंगदास मूळचे सातारा जिल्ह्यातील खटाव तालुक्यातील अडगूण-कडगूण ह्या गावचे. अथर्ववेदी ब्राह्मण. उपनाव पुरंदरे. पित्याचे नाव भास्कर. बालवयातच हे दत्ताची व देवीची उपासना करू लागले. ह्या उपासनावेडाखातर त्यांच्या वडिलांनी ह्यांना घराबाहेर काढले. ह्यानंतर खर्ड्यीजवळील बेलेश्वरी (जि. उस्मानाबाद) येथे ह्यांनी अनुष्ठान केले. अनुष्ठानामुळे त्यांना दत्तदर्शन घडले. ह्यांचे गुरू पांडुरंग हे मोहरीच्या क्षीरसागर घराण्यातील. वयाच्या अवघ्या ३२ व्या वर्षी ह्यांनी बेलेश्वर येथे समाधी घेतली. तेथेच त्यांच्या उपासनेतील देवी व षड्भुज एकमुखी दत्त पाहण्यास सापडतात. पांडुरंगदासांची शिष्यपरंपरा पखरुड, वडगावनळी, परांडा, बार्शी इत्यादी गावी पसरलेली आढळते.

ह्यांच्या नावावरील अभंगात्मक *गीतानुवाद* हा ग्रंथ इ. स. १८४२ मध्ये प्रथम मुद्रित झाला. आज ह्या *गीतानुवादा*च्या कर्त्यासंबंधाने वाद निर्माण झाला आहे. वा. सी. बेंद्रे ह्यांनी *मंत्रगीता* ह्या नावाने प्रस्तुत ग्रंथाची इ. स. १९५० मध्ये संशोधित आवृत्ती प्रसिद्ध केली आहे. त्यांच्या मते हा अनुवाद देहूकर तुकारामांचाच आहे. हे सिद्ध करण्याकरिता ह्या ग्रंथाला ११५ पृष्ठांची प्रदीर्घ प्रस्तावना त्यांनी जोडली आहे. गाथेतील व *गीतानुवादा*तील अभंगांचे चरण, विचारप्रवाह ह्यांत सारखेपणा दिसतो. तसेच बहिणाबाईच्या अभंगात स्वप्नात प्रसाद म्हणून *मंत्रगीता* मिळाल्याचा उल्लेख सापडतो (*बहिणाबाईचा गाथा*, आत्मचरित्रात्मक, अभंग क्र. २५). ह्यावरून ह्या ग्रंथाचा कर्ता देहूवासी तुकारामच होय असे ठाम प्रतिपादन वा. सी. बेंद्रे करतात. रा. चिं. ढेरे मात्र ह्या त्यांच्या मताशी सहमत नाहीत. त्यांच्या मते *मंत्रगीता* ह्या नावाखाली प्रसिद्ध केलेला हा गीतानुवाद मंत्रात्मक रचना-वैशिष्ट्यांनी युक्त नाही. 'तुका म्हणे' या सर्वपरिचित नाममुद्रेचा ग्रंथात ठिकठिकाणी वापर केल्याने हा तुकारामांचा ग्रंथ असा चुकीचा समज होतो. *गीतानुवाद* कर्ता तुका हा पांडुरंगशिष्य असून स्वतःला पांडुरंगदास असे म्हणवितो. तसे निर्देश अनेकवार ग्रंथात आलेले आढळतात. हे पांडुरंगदास देहूकर तुकारामांपेक्षा वेगळे आहेत. तसेच तुका विप्र ह्या कवीहूनही ते भिन्न असून त्यांची वर दिलेली चरित्रविषयक खात्रीलायक माहिती खर्डे, बेलेश्वर आणि मोहरी (जि. उस्मानाबाद) ह्या जवळ जवळ असलेल्या गावी हिंडून रा. चिं. ढेरे ह्यांनी समक्ष जाऊन गोळा केलेली आहे.

ह्या *गीतानुवादा*चे ७२४ अभंग आहेत. हे अभंग म्हणजे मुळाचे केवळ शब्दशः भाषान्तर नाही. भावार्थ आणि तत्त्वार्थ ह्या दोनही दृष्टिकोनांतून स्वतंत्रपणे विषयाची मांडणी केलेली आहे. मूळ गीतेचा उल्लेख अनुवादात ठिकठिकाणी येतो. उदा., "श्रीकृष्णवचन प्राण हा वेदांचा । तुका म्हणे साचा अनुभव ॥ ३ ॥" गीतेच्या श्रवणपठणावर कवीने भर दिलेला दिसतो. तत्त्वनिवेदनातूनही भक्तीचे श्रेष्ठपण तुका पांडुरंगदास सांगतात. [⇨ ३.]

**रचना : मु.** – १. गीतानुवाद (अभंगात्मक); अभंग सं. ७१२; संपा. सातारकर, सदाशिवशास्त्री; जोशी पावसकर, पांडुरंग; शिळाछाप; मुंबई, इ. स. १८४२; २. श्रीमद्भगवद्गीतेचा अभंगात्मक अनुवाद अथवा मंत्रगीता; संपा. बेंद्रे, वा. सी.; अभंग ७२४; पाठभेदाचे ४; पुणे, १९५०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : तथाकथित 'मंत्रगीते'चा कर्ता : तुका पांडुरंगदास; भाइसमंत्रै., व. ४३, अं. १–४, १९६५; पृ. ८९–९८. २. बेंद्रे, वा. सी. : प्रस्ता., श्री संतश्रेष्ठ तुकाराम महाराजकृत श्रीमद्भगवद्गीतेचा अभंगात्मक अनुवाद अथवा मंत्रगीता; पुणे, १९५०; पृ. १ ते ११५.

**तुका ब्रह्मानंद / ० तुका नागनाथ / ० तुका नागेश** [अंदाजे इ. स. १६२० -१६८०] कवी. हे शिवछत्रपतींच्या काळात होऊन गेले. सातारा येथे राहणारे. पित्याचे नाव नागनाथ. उपनाव कर्मार. दैवज्ञ-ब्राह्मण जातीत ह्यांचा जन्म झाला. गुरू : ब्रह्मानंदस्वामी. ह्यांचे वडील नागनाथपंत हे सरकारदरबारी खजिनदाराचे काम पाहात असत. उपनयन होताच वडिलांनी ह्यांच्याकडून वेदाध्ययन आणि संस्कृत व्याकरण व देवशिल्प अलंकारशास्त्र ह्या विषयांचा अभ्यास करवून घेतला. कालिकादेवीचे हे उपासक होते. वडील निवर्तल्यानंतर त्यांचा व्यवसाय परंपरेने पुत्राकडे चालत आला. काही वर्षे त्यांनी पोतदारीचेही सरकारी काम केले. पण नोकरीत व प्रपंचात राहून परमार्थसाधनेत व्यत्यय येऊ लागला हे पाहिल्यानंतर ह्यांनी श्री ब्रह्मानंदस्वामींना गुरू करून त्यांच्याकडून अनुग्रह व संन्यासदीक्षा घेतली. तेव्हापासून हे तुका ब्रह्मानंद ह्या नावाने ओळखले जाऊ लागले. ह्या चतुर्थाश्रमात त्यांनी हठयोगाचे परिपूर्ण अध्ययन केले व *प्रस्थानत्रयी* आदी वेदान्तग्रंथांचे परिशीलन केले. साताऱ्यानजीक कृष्णा-वेणा संगमावरील माहुली येथे त्यांची समाधी दाखवतात.

ह्यांनी भर्तृहरीच्या *शतकत्रया*वर समश्लोकी टीका केली आहे. शिवाय *वेदान्तरहस्य, शांकरभाष्य टीका, सप्तशतीची टीका, गीतगोविंदावरील समश्लोकी, विश्वकर्ममाहात्म्य, प्रणवाष्टक, नाटकरामायण* असे अनेक ग्रंथ त्यांचे विद्वत्त्व आणि कवित्व ह्यांचे साक्षी ठरतात. कवीची वाणी रसवती असून ह्यांचा वेदान्तविषयाचा व योगविद्येचा व्यासंग चांगला होता असे ह्यांच्या रचनेवरून दिसून येते.

**रचना : मु.** – १. गीतगोविंद (समश्लोकी). २. प्रणवाष्टक; मकच., खं. ५, पृ. ७६. ३. स्तोत्रे – स्तोत्ररत्नमाला; पुणे. **अमु.** – १. नाटकरामायण. २. विश्वकर्ममाहात्म्य; ३. वेदान्त-रहस्य. ४. शतकत्रय समश्लोकी; मसंप. (हवना., बा. १०५). ५. शांकरभाष्य टीका. ६. सप्तशतीची टीका (क्षीरसागर, वे. शा. सं. बाळशास्त्री रावजीशास्त्री, पुणे, ह्यांचा खाजगी ग्रंथसंग्रह).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : तुका ब्रह्मानंद; मकच., खं. ५; मुंबई, १९२०; पृ. ७०–८१. २. राजवाडे, वि.

का. : ब्रह्मानंदकृत किंवा तुकाकृत भर्तृहरिशतक टीका; भाइ-संमंइति., श. १८३६; पृ. ३३–३४.

**तुकाराम (वाणी)** [श. १५३० / इ. स. १६०८ – समा. श. १५७१, फाल्गुन व. २ / इ. स. ९ मार्च १६५०] वारकरी संप्रदायाच्या ज्ञानदेवादी चार श्रेष्ठ संतांपैकी अखेरचे संतकवी. पिता बोल्होबा किंवा बाळोबाबावा, माता कनकाई; कुलनाम मोरे, उपनाव अंबिले किंवा आंबले. तुकाराममहाराजांपासून 'गोसावी' हे उपनाव प्राप्त झाले; त्याचे कारण, तुकाराम स्वतः योगी होते. तुकारामांपासून त्यांचे घराणे वारकरी संप्रदायाचे एक धर्मपीठ बनले. कनकाई ही लोहगावच्या मोझे घराण्यातील होती. पुण्याहून रेल्वेने मुंबईस जाताना देहूरोड रेल्वेस्थानक लागते; त्या स्थानकापासून तीन-चार मैलांच्या अंतरावर देहू हा गाव आहे. इ. स. १६०८ (शके १५३०) मध्ये तुकाराममहाराजांचा जन्म झाला. तुकाराम-महाराज आपल्या जातीचा शूद्र किंवा कुणबी असा उल्लेख करतात; कित्येक वेळा स्वतःचा यातिहीन, म्हणजे कोणतीही जात नसलेला किंवा हीन जातीचा, असा निर्देश करतात. मोरेकुळ हे मराठा क्षत्रिय; तुकाराम हे मराठे क्षत्रिय असूनही स्वतःला शूद्र म्हणतात ह्याचे कारण वेदपठणाचा अधिकार नव्हता हे होय. मराठ्यांच्या कुळात अनेक पिढ्या वेदाधिकाराच्या प्राप्त्यर्थ आवश्यक असलेल्या द्विजत्वाच्या संस्काराचा लोप झाला होता. तुकाराममहाराजांचा वंशपरंपरागत व्यवसाय वैश्याचा म्हणजे वाण्याचा होता; वर्णाने क्षत्रिय वा वैश्य असले, तरी संस्कारलोपामुळे वेदाधिकार राहिला नव्हता. ह्या घराण्याकडे पूर्वापार महाजनकीची वृत्ती होती. महाजन म्हणजे बाजार-पेठेच्या व्यापारव्यवहारांतील वजनेमापे, मालाची देवघेव इ. गोष्टींवर देखरेख ठेवणारा आणि व्यापारी कर वसूल करणारा अधिकारी. महाजनकीशिवाय मालकीची व इनामाची शेती, वाण्याचे दुकान व सावकारी होती. सुखवस्तू व प्रतिष्ठित असे हे घराणे होते. बाजार-पेठेत एक व नदीकाठावर दोन अशी तीन घरे देहूत होती. वाडवडिलांची विठ्ठलभक्तीचीही मिरास होती, असे स्वतः तुकाराम-महाराज सांगतात. आठ पिढ्यांची पांडुरंगाची चरणसेवा, एकादशीचा उपवास व पारणे ह्याचा दारवंटा म्हणजे नियम आणि पंढरीची आषाढी-कार्तिकीची वारी होती. असे वंशपरंपरागत देवदास्य माझ्या-पर्यंत आले आहे, असे तुकाराममहाराज म्हणतात. इतिहाससंशोधकां-मध्ये तुकाराममहाराजांच्या जन्मशकाबद्दल वाद होता. वि. का. राजवाडे जन्मशक १४९० / इ. स. १५६८ व निर्वाणशक १५७१ / इ. स. १६५० मानत होते. म्हणजे एकूण तुकाराममहाराजांचा आयुर्दाय त्यांनी ८१ वर्षांचा ठरविला होता. ह्या निर्णयाला मान्यता देणे कठीण आहे. मुख्य अडचण म्हणजे तुकाराममहाराजांच्या निर्याणाच्या वेळी पत्नी जिजाबाई गरोदर होती, ही वस्तुस्थिती विसंगत ठरते; कारण राजवाडे ह्यांच्या मतास अनुसरले तर ह्या वेळी जिजाबाईची साठी उलटून गेली, असे मानावे लागते. दुसरे प्रमाण म्हणजे *भक्तलीलामृत*कार महिपतीबावांनी तुकाराममहाराजांच्या पहिल्या २१ वर्षांची क्रमवार हकीकत देऊन तेथे पूर्वार्ध संपले असे म्हटले आहे, हे राजवाडे ह्यांच्या संशोधनाशी जुळत नाही. महिपतीबावांच्या चरित्रात दिलेले इतर अनेक प्रसंग व व्यक्तिविषयक उल्लेख जरी कालविसंगत ठरले, तरी त्यांतील कालक्रमाचे महत्त्व नाकारून चालत नाही.

तुकाराममहाराजांच्या पूर्वीच्या आठ पिढ्यांची माहिती मिळते. ह्यांच्या पूर्वीचे आठव्या पिढीचे कुटुंबप्रमुख विश्वंभर हे पंढरीचे वारकरी होते. विश्वंभरांना एका शेतात विठ्ठलरखुमाईच्या मूर्ती सापडल्या. नदीकाठावरील एका घरात त्या मूर्तींची त्यांनी प्रतिष्ठापना केली. त्या घरास पूर्वी देऊळवाडा म्हणत. तुकाराममहाराजांची वंशावळ पुढीलप्रमाणे : विश्वंभर > हरी > विठोबा > पदाजी > शंकर > कान्होबा > बोल्होबा > तुकाराममहाराज चैतन्य. तुकाराममहाराजांच्या आईला म्हणजे कनकाईला सावजी, तुकाराम व कान्होबा असे तीन मुलगे झाले. तिला दोन मुलीही झाल्या होत्या, असे काही संशोधक सांगतात.

तुकाराममहाराज हे स्वतःचा उल्लेख 'तुका' असा आपल्या अभंगांत सर्वत्र करतात. त्यांचे शिष्य रामेश्वरभट वाघोलीकर व बहिणाबाई सिऊरकर त्यांस तुकाराम ह्या नावाने संबोधतात. सबंध नाव तुकारामच; परंतु 'तुका' हा नामैकदेशाचा उल्लेख दिसतो. जसे चांगदेव 'चांगा', नामदेव 'नामा', एकनाथ 'एका', त्याचप्रमाणे 'तुका' हा उल्लेख आहे. तसेच गणपतीचा 'गणू', रामचंद्राचा 'रामू', मधुकराचा 'मधू' इत्यादी संक्षिप्त निर्देश हल्लीही प्रचलित आहेत.

तुकाराममहाराजांचे शिक्षण तत्कालीन प्रतिष्ठित व सुसंस्कृत घराण्यातील व्यक्तीप्रमाणे झाले होते, असे अनुमान निश्चितपणे करता येते. तुकाराममहाराजांच्या साहित्यात त्यांच्या व्यापक अशा संस्कृत व प्राकृत ग्रंथांच्या अध्ययनाची व खोल व्यासंगाची शेकडो प्रमाणे मिळतात. त्या अध्ययनाचा पाया लहानपणी रचला गेला. महाजनकी, सावकारी आणि वाण्याचा व्यवसाय ह्यांस लेखन, वाचन व जमाखर्च ह्यांचे शिक्षण आवश्यक असते. मालकीचे पांडुरंग-मंदिर असल्याने त्यात नित्य व नैमित्तिक भजने, कीर्तने, पुराणे ह्यांच्या परिपाठामुळे पहिल्या वयातच बहुश्रुतपणा आला होता. स्वतःच्या अनुभवावरून तुकाराममहाराज म्हणतात की, "कुळीं कन्यापुत्र होतीं जीं सात्विक। तयाचा हरिख वाटे देवा ॥ गीता भागवत करिती श्रवण। आणीक चिंतन विठोबाचें ॥" (*तुकाराम-बावांच्या अभंगांची गाथा*, संपा. पु. मं. लाड, ३४). 'वेदाध्ययनाचा अधिकार मी यातिहीन असल्यामुळे मला नाही' ह्याची खंत तुकारामांना फार होती. "घोकाया अक्षर। मज नाहीं अधिकार ॥ सर्वभावें दीन। तुका म्हणे यातिहीन ॥" (कित्ता – २७६६). गीतेमध्ये सर्व वेद सामावले आहेत; किंबहुना गीता हेच वेदांचे मूळ आहे. गीता हाच मानवमात्रांना उच्चनीचभेद न मानणारा उपलब्ध झालेला वेद आहे; चारी वेद गीतेत गतार्थ झाले आहेत; असे ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायाच्या उपसंहारात स्पष्ट म्हटले असले तरी, तुकारामांना उपरती झाल्यानंतर प्रथम आपण मूळ वेदांपासून आचवलो आहोत, ह्याबद्दलचा विषाद काही काळ वाटत होता. म्हणून एकदा विनयानेही ते म्हणतात, "काय जाणों वेद। आम्ही आगमाचे भेद ॥" (कित्ता –२११३५). ज्ञान, भक्ती, वैराग्य ह्यांच्या परिपक्वतेच्या काळात त्यांच्या लक्षात आले की, आपण गीता, भागवत, अठरा पुराणे, दर्शने आणि ज्ञानदेवादी संतांचे साहित्य आत्मसात केले असल्यामुळे वेदरहस्यच आपल्या वाणीवर कवित्वाच्या रूपाने प्रकट झाले आहे. त्यामुळे ते म्हणू लागले की, "वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा। येरांनीं वाहावा भार माथां ॥" (कित्ता – २२६६). वेदपाठकांना वेदाचे गव्हर म्हणजे रहस्य कळत नाही (कित्ता – ३१५).

लहानपणी तुकाराममहाराज लेखन, वाचन, पाठान्तर, जमाखर्च इ. शिकले; त्याबरोबर नाना प्रकारचे खेळही खेळले. त्यांच्या विविध क्रीडाविषयक अभंगांवरून असे अनुमान निघते की, त्यांनी मुलींच्या फुगड्या, हमामा, टिपऱ्या इत्यादी खेळ जसे खूप रस घेऊन पाहिले त्याचप्रमाणे मुलांचेही चेंडुफळी, हुंबरी, हाल, हुतुतू, टिपऱ्या, विटीदांडू, मृदंगपाट्या इत्यादी खेळ ते खेळले; त्यांत रमले. इतर संतांच्या गाथांमध्ये हमामा, फुगड्या इत्यादी खेळांची रूपके असली, तरी तुकाराम-महाराजांच्या गाथेइतके खेळांचे वैविध्य त्यांत आढळत नाही.

वयाच्या चौदाव्या वर्षी आईबापांनी तुकाराममहाराजांच्या गळ्यात संसार अडकविला. त्या वेळच्या बालविवाहाच्या प्रथेप्रमाणे तुकाराम-

महाराजांचे लग्न वयाच्या सुमारे चौदाव्या वर्षी झाले. त्यांची पहिली बायको रखमाबाई; ती अशक्त व आजारी असल्यामुळे दुसरे लग्न पुणे जिल्ह्यातील खेड येथील आप्पाजी गुळवे ह्यांच्या अवलाई ह्या मुलीशी झाले. तिचे जिजा असे नाव ठेवण्यात आले. कित्येक चरित्रकारांच्या मते हे दुसरे लग्न पहिली बायको वारल्यानंतर झाले. पहिली बायको दुष्काळात उपासमारीने मेली, असे तुकाराम आत्मचरित्रपर अभंगात (कित्ता – १३३३) म्हणतात. तुकाराममहाराजांचे वडील बंधू सावजी त्यांची पत्नी वारल्यानंतर विरक्त बनून गृहत्याग करून तीर्थाटनास निघून गेले; पुन्हा परतले नाहीत. वयाच्या सतराव्या वर्षी व्यवसायासह सर्व प्रपंचाचा भार एकट्या तुकाराममहाराजांवर येऊन पडला. शेती, सावकारी, महाजनकी व दुकानदारी ते चालवू लागले.

इ. स. १६३०–३१ साली महाराष्ट्रात व अन्यत्र भारतात भीषण दुष्काळ पडला. अगोदरच आईबाप व वडील भावजय वारली होती. ह्या दुष्काळातच पहिली बायको व मुलगा मेला. भांडवल आणि दुकानातील माल संपला, द्रव्य पार आटले. व्यवहारात तूट आली. दिवाळे निघाले. सर्वत्र जनांची अन्नान्नदशा होऊन हाहा:कार उडाला. त्यामुळे प्रपंचातील सुख जवापाडे आणि दु:ख पर्वताएवढे असते ह्याचा प्रत्यय आला. संसार वमनासारखा वाटू लागला. दिवाळे निघाल्यामुळे जनातील मान गेला, अपमान होऊ लागला. त्यामुळे अनन्यगती होऊन देवाला शरण गेले. नवा जीवनमार्ग स्पष्ट दिसू लागला. होते नव्हते ते खर्च करून भंगलेले देऊळ पुन्हा बांधले. प्रथमपासून कीर्तन करीत होतेच; परंतु आता लहानपणापासून झालेले अध्यात्मविद्येचे संस्कार जागृत होऊन उपरती झाली. देवाचा सतत ध्यास लागला (कित्ता – १३३३).

दुष्काळापूर्वीच्या जीवनपद्धतीला कलाटणी मिळाली. पहिल्यांदा अभ्यासात चित्त नव्हते, आता अभ्यासाची ओढ लागली. एकांतवासात मन रमू लागले. देहूच्या निसर्गरम्य परिसरात सह्याद्रीचे अनेक उंचउंच रम्य पहाड आहेत. त्यांवर जाऊन वाचन-भजन-चिंतनात गढून जाऊ लागले. विशेषतः देहूच्या उत्तरेस सहा मैलांवर असलेल्या भामनाथ किंवा भामचंद्र डोंगरावरील लेण्यांमध्ये जाऊन बसू लागले. ह्या ठिकाणी तत्त्वचिंतन, मानसपूजा व योगसाधना केली. त्यासंबंधीचा भव्य अनुभव त्यांनी वर्णिला आहे. एकांताचा वास रुचू लागला. रुचण्याचे कारण ते सांगतात : येथील वृक्षवल्ली आणि वनचरे ही आमची सोयरी बनली आहेत; पक्षी आम्हांला सुस्वराने आळवितात; जनांतिकात गुणदोष अंगी येतात, ते येथे येत नाहीत; पृथ्वीच्या आसनावर आकाशाच्या मंडपाखाली मन रमत क्रीडा करते; मनाचा मनाशीच संवाद चालतो; आपणाशीच आपण वाद घालतो. हरिकथेच्या भोजनाने तृप्ती होते; कथा आणि कमंडलू हे देहाचे उपचार पुरेसे वाटतात (कित्ता – २४८१). ह्याच ठिकाणी तुकारामांनी *गीता*, *भागवत*, *दृर्शन*, *ज्ञानेश्वरी*, *एकनाथी भागवत*, नामदेवादिकांच्या गाथा, इतिहासपुराणांच्या कथा, *योगवासिष्ठ*, *रामायण* इत्यादिकांचा व्यासंग केला. संस्कृताची आवड होतीच. ज्ञानदेव-नामदेवादी संतांची वचने आदराने आणि श्रद्धेने पाठ केली. *विष्णुसहस्रनामादी* स्तोत्रेही पाठ केली. पर्वतावरून उतरल्यावर, गावामध्ये संतांची कीर्तने आणि भजने चालत, धृपद धरून शुद्ध भावनेने त्यांच्याबरोबर नि:संकोच गात व नाचत (कित्ता – १३३३). प्रिया, पुत्र, बंधू ह्यांचा संबंध मनातून तुटला. दुकानात बसून देहधारणा व कुटुंबधारणा ह्यांपुरते जेवढे प्राप्त होईल, तेवढ्यावर संतोष मानू लागले (कित्ता – १४८६). मित्रमंडळी सांगू लागली : प्रपंचामध्ये जास्त लक्ष घाला, हा बैरागी-गोसाव्याचा मार्ग धरू नका; परंतु समूळ प्रपंचाचा वीट आला त्यामुळे लोकांचे मत मानले नाही (कित्ता – १३३३).

उपरती झाल्यावर, साधनेच्या ह्या पहिल्या अवस्थेत लक्षात आले की, इंद्रियांवर व वासनांवर विवेकाचा ताबा नीट चालत नाही; मन स्थिर राहात नाही; इंद्रिये विषयांकडे धावतात; शांती वा निवृत्ती जवळ येतच नाही; आशा, तृष्णा आणि कल्पना ह्या पापिणी घात करीत आहेत; कामक्रोधांचे पर्वत आडवे पडले आहेत व अनंत त्यापलीकडे राहिला आहे. तेव्हा देवाला म्हणू लागले की, आता मी वाया जात आहे; भवसागरातून पैलतीरी जाण्याची आशा राहिली नाही; पतन अटळ आहे; आता तुला जे कळेल ते कर; तारायचे असेल तर तार, मारायचे असेल तर मार. अशा आत्यंतिक निराशेत तुकाराममहाराजांचे मन पार बुडून गेले (कित्ता – ६२६; ४०५३). मनाचे व इंद्रियांचे विकार, पापताप, कामक्रोध, ह्यांच्यावर ताबा मिळविणे, हे माणसाच्या हाती नसून देवाच्याच हातात आहे; म्हणून देवाला शरण गेल्याशिवाय शांतीचा मार्ग उपलब्ध होणार नाही, असा अनुभव आला (कित्ता – ४४३८). युक्तीही सापडली : "तरावया एक युक्ती असे। तुका नामनावेमधी बैसे ।।" परंतु तरी तो देव दिसत नाही आणि बोलत नाही; तो लपला आहे. 'नारायणा, माझ्याशी काही बोल ! विश्वाच्या जीवना, मौन का धरलेस ? पूर्वपुण्य, सत्कर्म, स्वधर्म, नित्यनेम हे कुठे आहेत, असे विचारशील; पण आम्हा पतितांची तूच चिंता वाहावयास पाहिजे. तूच पूर्वपुण्य, सत्कर्म, स्वधर्म, नित्यनेम आहेस. हे कृपेच्या सागरा, काय म्हणून अडला आहेस ? ' (कित्ता – ६२६, ४२२८, ४४२१). ह्या आध्यात्मिक अस्वस्थ स्थितीत संतांचा, हरिभक्तांचा सहवास वाढत गेला; नवे जिवलग सोयरे मिळाले. 'संतांचिये गावी प्रेमाचा सुकाळ' अनुभवाला आला. भजनामध्ये टाळमृदंग ह्यांच्या घोषात नाचताना काया ब्रह्ममय होते, जीवशिवाचे ऐक्य होते, ह्याचा प्रत्यय येऊ लागला. एकांताचा ओढा कमी झाला. "कासया एकांत सेऊ तया वना। आनंद या जनांमाजी असे ।।" कर्ममार्ग, ज्ञानमार्ग, योगमार्ग आणि भक्तिमार्ग ह्यांतील भक्तिमार्ग हाच विहंगममार्ग म्हणून अनुभवास येऊ लागला. "पक्षियासी नाहीं मारगीं अडताळा। अंतरिक्षीं फळासी चि पावे ।।" (कित्ता – १३३९).

*ज्ञानेश्वरीत* व *एकनाथी भागवतात* सद्गुरूचे परमार्थातील मार्गदर्शन अत्यंत मोलाचे मानले आहे. ह्या ग्रंथांचा हा संस्कार तुकाराममहाराजांच्या हृदयावर खोल उमटला होता. तरी गुरूचा शोध घेत तीर्थे धुंडाळावी, अशी प्रवृत्ती नव्हती. "ठायीच बैसोनी करा एका चित्त। आवडी अनंत आळवावा।।" असे सांगत. क्वचित तीर्थयात्रेला जात; पंढरीचीही नित्य वारी चुकविली नाही; तरी गुरूकरता हिंडले नाहीत. ज्ञानदेव आणि एकनाथ ह्यांच्या समग्र साहित्यात अगणित वेळा गुरूचे प्रत्यक्ष ईश्वर म्हणून स्तवन केलेले आढळते, तसे तुकाराममहाराजांच्या गाथेत फारसे सापडत नाही. गुरू हा परमेश्वरच अशी ज्ञानदेव-एकनाथांची श्रद्धा; उलट पांडुरंग गुरू, अशी तुकारामांची भावना. स्वामी, मातापिता, गुरू, बंधू, देह व आत्मा हे पांडुरंगच आहे, अशी भावना त्यांच्या गाथेत नितांत भरून राहिली आहे. परंतु परंपरेचाही संस्कार फार बळकट; त्यामुळे एके रात्री सद्गुरुरायाने कृपा केली (कित्ता – ३६८). गंगास्नानास जाताना वाटेत सद्गुरूंनी गाठले; मस्तकी हात ठेवला; भोजनाकरता पावशेर तूप मागितले; पण हे सर्व स्वप्नच होते; त्यामुळे तूप देण्याचा विसर पडला. गुरूंनी राघवचैतन्य, केशवचैतन्य ही गुरुपरंपरा सांगितली; स्वत:चे नाव बाबाजी म्हणून सांगितले; 'रामकृष्णहरी' हा नेहमीच्या आवडीचा सोपा मंत्र सांगितला. त्यात गहन आणि गूढ असे काही नाही. हा उपदेशाचा दिवस माघ शुद्ध दशमी, गुरुवार होता. ल. रा. पांगारकर शके १५५४ (इ. स. १६३२) हे वर्ष उपदेशाचे मानतात (*श्रीतुकारामचरित्र*, प्रथम आवृत्ती, पृ. ४६). परंतु वा. सी. बेंद्रे म्हणतात की, हा सद्गुरूंच्या भेटीचा योग २३ जानेवारी १६४० रोजी

आला. उपदेशाचा गाव देहू की ओतूर याबद्दलही वाद आहे. वा. सी. बेंद्रे म्हणतात की ओतूरच असावे; कारण तेथे इंद्रायणी दक्षिण-वाहिनी असल्यामुळे तिला शास्त्राप्रमाणे 'गंगा' असे म्हणता येते; अशी गंगा देहूला नाही. बाबाजी चैतन्य ह्या सद्गुरूंची गाठ त्यांचे गुरू केशवचैतन्य ह्यांच्या समाधीजवळ ओतुरास गंगावाटेवर झाली, हे म्हणणे अधिक सुसंगत होय. परंतु ह्या वादाचा निकाल लागणे कठीण आहे; कारण गंगा ही संज्ञा तीर्थविषयक धर्मशास्त्रात फार लवचिक अर्थानेसुद्धा वापरलेली आढळते. सर्व महानद्या गंगा होत, असे एके ठिकाणी म्हटले आहे. काशीची भागीरथी किंवा जान्हवी सोडून यमुना, नर्मदा, तापी, गोदावरी, कावेरी, कृष्णा, वेण्णा इत्यादी नद्यांनाही गंगा या पदास पात्र ठरविले आहे. वेण्णा नदीला जे धर्मशास्त्र गंगा ठरविते, ते धर्मशास्त्र इंद्रायणीलाही गंगा म्हणू शकते. म्हणून तुकाराममहाराजांच्या गाथेतील देहूवर्णनात (कित्ता – ७८९) "शोभे गंगानीर इंद्रायणी" किंवा "शोभे गंगातीर इंद्रायणी" असे म्हटले आहे. हा अभंग प्रक्षिप्त आहे, असे बेंद्रे म्हणतात; परंतु प्रक्षेपकाळी २०० वर्षांपूर्वी 'गंगा' ही अतिपवित्र संज्ञा इंद्रायणीलाही प्राप्त झाली होती, हे निश्चित. ह्याचे कारण धर्मशास्त्रातील गंगापद-विषयक लवचिकपणा हे होय. लवचिकपणाचे कारण, धर्मशास्त्रद्रष्ट्या मुनींचा वास जेथे ते पुण्यस्थळ, ती पवित्र गंगा नदी; किंबहुना सर्वच जलाशय पुण्यमयच होत.

बाबाजी चैतन्य उपदेशकाळी हयात नव्हते म्हणून स्वप्नातच उपदेश झाला असे म्हणता येते; परंतु बेंद्रे ह्यांनी बाबाजी चैतन्य त्या वेळी हयात होते, असे सिद्ध केले आहे (*तुकाराममहाराज ह्यांची गुरुपरंपरा*). ह्या संदर्भात 'चैतन्य' ह्या संज्ञेवरून बंगाली वैष्णव संत श्रीकृष्ण-चैतन्य अर्थात गौरांगप्रभू ह्यांच्या संप्रदायाचे बाबाजी चैतन्य होते, असे काहींनी अनुमान काढले आहे; परंतु अशा अनुमानास काही अडचणी येतात. एक म्हणजे, श्रीकृष्णचैतन्य गौरांगप्रभू ह्यांचे तत्त्व-ज्ञान व तुकाराममहाराजांचे तत्त्वज्ञान भिन्न आहे. श्रीकृष्णचैतन्यांचे तत्त्वज्ञान शांकर-मायावादास वगळणारा 'अचिंत्यभेदाभेदवाद' होय; तर तुकाराममहाराजांचे तत्त्वज्ञान ज्ञानदेव-एकनाथांचा शांकर-माया-वाद समाविष्ट करणारा अद्वैतवाद होय. दुसरे असे की, श्रीकृष्ण-चैतन्यांचा संप्रदाय हा विशेषेकरून मधुराभक्ती हा आहे. भक्त हा गोपीभाव वा राधाभाव धारण करून देवाची पती किंवा प्रियकर म्हणून भक्ती करतो. तुकाराममहाराजांच्या वारकरी संप्रदायात ईश्वर हा पिता, माता किंवा आत्मा अशा स्वरूपातील भक्ति आहे; मधुरा-भक्तीची छटा विराण्यांसारख्या गीतांमध्येच क्वचित दिसते. तिसरी गोष्ट अशी की महाराष्ट्रात बंगाली चैतन्य संप्रदाय तुकाराममहाराजां-पूर्वी, त्यांच्या वेळी अथवा नंतर केव्हाही, कोठेही दिसत नाही.

गुरुशिष्य हे नाते गुरूंच्या ठिकाणी अहंता वाढविते म्हणून तुका-रामांना विशेषसे मान्य नाही. मेघवृष्टीप्रमाणे उपदेश करावा, जेथे बीज व योग्य भूमी असेल तेथे तो उपदेश वाढीस लागतो (कित्ता – १५२५). शिष्यसेवा घेऊ नये, असाही त्यांचा आग्रह आहे; दक्षिणा घेणे तर पापच होय, असे ते मानतात. त्यामुळे पावशेर तूपही बाबाजींना मिळाले नाही. जो उपदेश झाला, तो स्वप्नात म्हणजे तुर्येत किंवा उन्मनीत झाला. तुर्या किंवा उन्मनी म्हणजे आत्मा होय. *माण्डूक्य* उपनिषदात शांत, शिव, अद्वैत व स्वयंप्रकाश आत्मा हे तिचे स्वरूप सांगितले आहे. जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तिन्ही अवस्थांना ती व्यापते आणि पलीकडेही राहते; तुकाराममहाराजांनी 'स्वप्न' या संज्ञेने तुर्या वा उन्मनी ह्यांचा निर्देश केला असणे अत्यंत शक्य आहे. ह्यासंबंधी बेंद्रे ह्यांच्याशी सहमत होता येते.

गुरूपदेश झाल्यानंतर कवित्वाची स्फूर्ती झाली (कित्ता – १३३३). संत नामदेवांनी पांडुरंगासह येऊन स्वप्नात जागे केले. काम सांगितले, की कवित्व कर; काही तरी निमित्त करून टाळाटाळ करू नकोस. पांडुरंगाने पाठीवर थाप देऊन सांगितले की, नामदेवांची शतकोटी अभंगांची संख्या अपुरी राहिली आहे, ती पुरी कर (कित्ता – १३२०, १३२१). संसाराच्या व परमार्थाच्या सर्व अनुभवांतून निष्पन्न झालेला विचार प्रसन्न शैलीमध्ये रम्य शब्दरूप घेऊ लागला. [ ⇨ ३. ] ते म्हणतात की, आम्ही राजवैभवी आहोत; शब्दांची रत्ने आणि शब्दांची शस्त्रे आमच्या घरी साठलेली आहेत; स्वतःच्या शैलीचे हे सूत्र आहे. तुकाराममहाराजांच्या गाथेत शब्दांची रत्ने जशी भरलेली दिसतात त्याप्रमाणे मधून मधून चमत्कार दाखविणारे बाबालोक, भविष्य वा शकुन सांगणारे, त्यांचे अपधर्म, पाखंड, धार्मिक कर्मकांड वा थोतांड इत्यादिकांचे खंडन करणारी शब्दशस्त्रेही आढळतात. 'शब्दच देव व शब्दाचीच पूजा' (कित्ता – ३३९६). "आनंदाच्या कोटी। सांटवल्या आम्हां पोटीं॥" (कित्ता – १९७८). "प्रेमअमृतें माझी रसना ओलावली॥" (कित्ता – २०३५). त्यामुळे संतसज्जन तृप्त होऊन स्तुतीचा वर्षाव करू लागले. झडलेला अहंकार पुन्हा जडेल की काय, अशी भीती वाटायला लागली. म्हणून संतसज्जनांना व लोकांना विनंती करू लागले, "न करावी स्तुति माझी संतजनीं।" (कित्ता – १०५२). लोक साक्षात पांडुरंगच तुकोबांच्या रूपाने अवतरला आहे, असे म्हणू लागले.

"लोक म्हणती मज देव। हा तों अधर्म उपाव॥" (कित्ता – २९२१). जनप्रशंसेला तुकाराममहाराजांचे मन भ्यायले; पाप होत आहे, असे वाटू लागले. अधिकार नाही तरी लोक माझी पूजा करतात; देवा मायबापा, ह्या पापातून सोडव, अशी करुणा भाकली; परंतु लोक स्वस्थ बसेनात. भांबगिरीच्या पठारावर पुनः वसती केली. वृत्ती स्थिरावली. पंधरा दिवसात विठोबा निराकार भेटला. मन ध्याननिमग्न झाले. सर्प, विंचू, व्याघ्र अंगाला झोंबले तरी कळले नाही. अज्ञानरूपी देह परमेश्वराच्या स्वरूपात मिळून गेला. चित्त स्वरूपी राहिले. अंतरी ज्ञानज्योती प्रकट झाली (कित्ता – १३५४, १३५५).

सगुण साक्षात्कार आणि निर्गुण साक्षात्कार ह्यांच्यामध्ये तुकाराम-महाराज भेद मानत नाहीत. सगुण व निर्गुण हे एकाच आध्यात्मिक साक्षात्कारांचे पैलू आहेत. वासना संपूर्ण विलीन होऊन पूर्ण व अविचल समाधानस्थिती अनुभवणे, हे साक्षात्कारांचे फलित आहे. शत्रुमित्र ह्यांच्याशी समभावाचा अनुभव येतो. विश्व विष्णुमय दिसू लागते. सगुण साक्षात्काराबद्दल तुकाराममहाराज म्हणतात : "धांवोनियां आलों पहावया मुख। गेलें माझें दुःखजन्मांतरिचें॥ ऐकिलें ही होतें तैसें चि पाहिलें। मन स्थिरावलें तुझ्या पायीं॥ तुका म्हणे माझी इच्छा पूर्ण जाली। कांहीं न राहिली वासना हे॥" (कित्ता – ४१७६). "पांडुरंगें सत्य केला अनुग्रह। निरसोनि संदेह बुद्धिभेद॥ जीवशिवा सेज रचिली आनंदें। आउठावे पदीं आरोहण॥ निजीं निजरूपीं निजविला तुका। अनुहाते बाळका हलरु गाती॥" (कित्ता – ४३२७). ह्या अभंगातील अनुभव हा सगुण-निर्गुणाच्या एकमेकांत मिसळलेल्या स्वरूपाचा आहे. तशाच प्रकारचा पुढीलही अभंग आहे : "स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण। अंतरींची खुण पावूनियां॥ पुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मीळित। कंठ सद्गदित रोमांच आले॥ चित्त चाकाटलें स्वरूपा माझारी। न निघे बाहेरी सुखावलों॥ सुनीळ प्रकाश उदैजला दिन। अमृताचें पान जीवनकळा॥ शशिसूर्या जाली जीवें ओंवाळणी। आनंदा दाटणी आनंदाची॥ तुका म्हणे सुखें प्रेमासी डुलत। वीरालों निश्चित निश्चितीनें॥" (कित्ता – ४१५९). तुकाराममहाराजांना भक्तिमार्गात असतानाच पातंजल योगमार्गाचाही बोध झाला होता, असे बेंद्रे म्हणतात. त्याचे प्रत्यंतर काही अभंगांमध्ये मिळते. उदा., "रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न। चिन्मय अंजन सुदलें डोळां॥ तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टि जाली। कल्पना निवाली द्वैताद्वैत॥ देशकालवस्तुभेद मावळला। आत्मा

निर्वाळला विश्वाकार ।। न जाला प्रपंच आहे परब्रह्म । अहंसोहं ब्रह्म आकळलें ।। तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग । तें चि जाला अंगें तुका आतां ।। " (कित्ता – ४३१३). ह्यात योगमार्गाने अजातवादास तुकाराममहाराज पोचले आहेत. ही स्थिती अद्वैतब्रह्मसाक्षात्काराची आहे.

नंतर लक्षात आले की "बोलिलों जैसें बोलविलें देवें ।" (कित्ता – २०१४). स्वतःच्या कवित्वाबद्दल लोकांना सांगू लागले की, "नव्हती माझे बोल जाणां हा निर्धार । मी आहें मजूर विठोबाचा ।" (कित्ता – २६८५). "संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हें ।। " (कित्ता – ९१९). "करितों कवित्व म्हणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ।। माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ।। " (कित्ता – १००७).

परमार्थाचा अनुभव दृढ झाला; जीवन्मुक्तावस्था पूर्ण स्थिरावली; जीवनाचा अंतिम उद्देश "धर्म रक्षावया साठीं । करणें आटी आम्हांसि ।।" (कित्ता – २६०, २६१) अथवा "आम्ही वैकुंठवासी । आलों या चि कारणासी ।। " (कित्ता – ५२०, ५२१) अशा प्रकारे उद्घोषित केला. जनांमध्येच आनंद वाटू लागून अखेर जग अवघे देवरूप दिसू लागले (कित्ता – १३६८).

धर्मरक्षणाचा मुख्य गाभा परमार्थमार्गातील उच्चनीचजातिभेदाचा निरास. समाजातील जातपात, उच्चनीचभेद नाकारून उपदेश करू लागले. "उंच निंच कांहीं नेणें हा भगवंत । तिष्ठे भाव भक्त देखोनियां ।। "(कित्ता – २८२०). हा विचार जनमनात रुजविण्याचा प्रयत्न केला. त्याकरिता पुराणातील व इतिहासातील दाखले वारंवार देऊ लागले. उदा., दासीपुत्र विदुर, दैत्य प्रल्हाद, रोहिदास चांभार, विणकर कबीर, सजन कसाई, सावता माळी, नरहरी सोनार, चोखामेळा महार, दासी जनी, गोरा कुंभार इत्यादी उदाहरणे पुनःपुन्हा सांगू लागले. पवित्र कुळ आणि पवित्र देश म्हणजे जेथें विष्णुदास जन्म घेतात तो; जातपातभेद वा वर्णधर्म विष्णुदासांना नसतात; जो अंत्यज देवाचे नामसंकीर्तन करतो, देवाचे रूप आठवतो आणि शांती-क्षमा-दया अंगी बाणवतो, तोच ब्राह्मण होय. कुळ म्हणजे मूळ पाहू नये, फळ पाहावे (कित्ता – १२३५). अशा प्रकारे परमार्थमार्गातील गुणमाहात्म्य दृढ करण्याचा प्रयत्न केला.

धर्मरक्षणाचे जीवितकार्य लक्षात आले ह्याचे कारण प्रचलित धार्मिक परंपरेची अवनती लक्षात भरली, हे होय. खरा धर्म हा जाऊन अपधर्मानेच धर्माचे रूप घेतले होते. तुकाराममहाराज आध्यात्मिक दृष्ट्या प्रौढावस्थेस आले तेव्हा एकनाथमहाराज जाऊन ३०–३५ वर्षे झाली होती. तुकाराममहाराजांचा जन्म झाला त्यापूर्वी नऊ वर्षेच (इ. स. १५९९) एकनाथमहाराज समाधिस्थ झाले होते. नामदेव-एकनाथांचे कार्य पुढे चालवावयास पाहिजे, हे लक्षात आले. तुकाराममहाराजांनी कीर्तनांतून वारंवार डांगोरा पिटण्यास सुरुवात केली की सामान्य लोकांना उचित साधनमार्ग दिसत नाही. आत्मोन्नतीकडे नेणाऱ्या संतांनी सिद्ध केलेल्या अवघ्या वाटा क्षीण झाल्या आहेत. ह्या कलियुगात योग्य साधन आणि उचित विधिविधान कळेनासे झाले आहे. अत्यंत सोपा भक्तिपंथ मोक्षाकडे नेतो, हे कळत नाही. शास्त्रांच्या विचारात घटपटाची खटपट म्हणजे कुतर्क वाढला आहे (कित्ता – २२९९).

भुताखेतांची देखील साधना महत्त्व पावू लागली आहे. जटाभार वाढवणाऱ्या, राख फासणाऱ्या ढोंग्यांचे स्तोम माजत आहे. शकुन सांगणाऱ्या भविष्यवाद्यांची चलती आहे. टिळा, तुळशीमाळा इत्यादी बाह्य वेशावर लोकांना पुंड झुलवीत आहेत (कित्ता – ७७६). शास्त्रांचा बोज राहिला नाही. यमनियमांची किंवा योगाची धारणा राहिली नाही, वैराग्य लोपले आहे, परमात्मदैवतेचे महत्त्व न जाणता क्षुद्रदेवतांचा (उदा., खंडोबा, बहिरोबा, वेताळ, जाखाई-जोखाई ह्यांचा) महिमा व त्यांच्या उपासनांचे थोतांड माजले आहे. ह्या अधःपातापासून "सावध करी तुका । म्हणे निजले हो आइका ।। "

शुद्ध परमार्थधर्माच्या स्थापनेचे कार्य ह्या जगातून अदृश्य होईपर्यंत तुकाराममहाराजांनी चालू ठेवले. त्यांच्या अलौकिक प्रतिभेतून निर्माण झालेल्या अमृतवाणीने सामान्य जनांचा आणि प्रतिष्ठित सुसंस्कृत लोकांचा समाज आकर्षित होऊ लागला; परंतु सद्धर्म स्थापताना मठस्थापना करून शिष्यशाखा निर्माण करण्याचे त्यांनी सावधपणे टाळले. भगवंताने कृपा करावी आणि निपुण ब्रह्मज्ञानी व भक्तिप्रेमाचा पुतळा, वैराग्याचे अधिष्ठान असलेला असा शिष्य द्यावा, त्याने माझे व्रत चालवावे, अशी देवापाशी याचना त्यांनी दोन अभंगांमध्ये केली आहे (कित्ता – ५१७, ८११). परंतु त्यांनी प्रत्यक्ष शिष्य केलाच नाही. जे स्वतःला शिष्य म्हणवतात त्यांनी म्हणजे समकालीन रामेश्वरभट वाघोलीकर किंवा बहिणाबाई सिऊरकर आणि नंतर झालेले कचेश्वरभट ब्रह्मे चाकणकर, निळोबाराय पिंपळनेरकर किंवा महिपतीबावा ताहाराबादकर ह्यांनी त्यांना गुरू मानले आहे हे खरे, तथापि रामेश्वरभट सोडल्यास बाकीच्यांना स्वप्नात येऊन तुकारामांनी दीक्षा दिली. वा. सी. बेंद्रे ह्यांनी तुकारामचरित्राचे संशोधन बारकाईने करून हे ऐतिहासिक सत्य उजेडात आणले आहे. शिवाजीमहाराज आणि तुकाराम ह्यांच्या भेटीबद्दलही ऐतिहासिक पुरावा मिळत नाही ही गोष्ट त्यांनी दाखवून दिली आहे. शिवाजीमहाराजांनी तुकाराममहाराजांच्या सन्मानार्थ हत्ती, घोडे, अब्दागिरी, द्रव्य इत्यादी नजराणा पाठविला; शिवाजीमहाराज लोहगावी त्यांच्या कीर्तनात उपस्थित असता मुसलमानांचे परचक्र आले, त्यावेळी तुकाराममहाराजांनी पांडुरंगांचा धावा करून त्याचे निवारण केले, इत्यादी संबंधातील अभंग बेंद्रे ह्यांनी प्रक्षिप्त ठरविले आहेत.

तुकाराममहाराजांची ब्रह्मसाक्षात्कारी महान संतकवी म्हणून त्यांच्या साहित्यासह कीर्ती महाराष्ट्रात त्यांच्या हयातीतच वाऱ्यासारखी पसरली होती. लोक त्यांना साक्षात पांडुरंग म्हणून संबोधू लागले. देशोदेशी त्यांची कीर्ती त्यांच्या देखत अफाट पसरली होती. ते म्हणतात, "कोण सांगायास । गेलें होतें देशोदेश ।। नेलें वाऱ्या हातीं माप । समर्थ माझा बाप ।। " (कित्ता – ६९५). परंतु त्याबरोबरच त्यांचा हेवा व द्वेष करणारे दुर्जनही वाढत होते. सालोमालो हे गृहस्थ कीर्तन करीत, त्यात तुकाराममहाराजांच्या अभंगांचे चौर्य करून घेतलेले अभंगही स्वतःच्या नावावर दडपून देत. देहूगावचा पाटील व त्या गावात नवीन येऊन राहिलेले मंबाजीबुवा तुकाराममहाराजांची सारखी निंदानालस्ती करीत. पहिल्यापहिल्यांदा पुण्याजवळील वाघोलीचे रामेश्वरभटही मत्सराने पेटून म्हणत की 'तुकारामाला देशोधडीला पाठवावा; कारण तुकाराम भजनकीर्तनात वेदशास्त्रांचे विचार सांगतो; तो शूद्र आहे; त्याला असा उपदेश करण्याचा व वेदान्तपर कवित्व करण्याचा अधिकार नाही.' परंतु हे विचार रामेश्वरभटाचे नसून ते मंबाजीबुवाचे आहेत, हे समकालीन शिष्या बहिणाबाईच्या अभंगांवरून लक्षात येते. तुकारामांच्या अभंगांच्या वह्या बुडविण्यात रामेश्वरभटांचा हात नव्हता; ती कल्पित कथा आहे. रामेश्वरभटांनी तुकारामांचा द्वेष कधीच केला नाही; ते त्यांचे प्रथमपासूनच भक्त बनले होते.

गावचा पाटील व त्याचे साथीदार ह्यांनी विद्रोह माजवून एकदा सगळा देहूगाव, लोकांना धाक दाखवून, तुकाराममहाराजांच्यावर उलटविला. पूर्ण बहिष्कार पाडावयास लावला. ह्या परिस्थितीचे वर्णन महाराजांनी असे केले आहे : "आतां काय खावें कोणीकडे जावें । गावांत रहावें कोण्या बळें ।। कोपला पाटील ये गावींच्या लोकां । आतां मज भिका कोण घाली ।। आतां येणें चवी सांडिली म्हणती । निवाडा करिती दिवाणांत ।। भल्या लोकीं यासी सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ।। तुका म्हणे याचा संग नव्हे भला । शोधीत विठ्ठला जाऊं आतां ।। " (कित्ता – ३८८१).

पाटील द्वेष करू लागला ह्याचे कारण असे अनुमानता येते की तुकाराममहाराजांचा महाजनकीचा वारसा पाटलाच्या पोटात दुखत असे; कारण पाटलापेक्षा गावामध्ये पूर्वी महाजनाचा अधिकार जास्त चालत असे; कारण बाजारपेठेवर त्याची हुकमत असे. एका अभंगात तर (कित्ता – ४१७७) तुकाराममहाराज म्हणतात की, माझ्या तोंडास काळे फासूनही गावात मला एकदा फिरविले; "तोंड काळें केलें फिरविलें मज। नाहीं धरिली लाज पांडुरंगा।। काय तुजपासीं सांगों हें गाऱ्हाणें। मग काय जिणें तुझें माझें।।" ह्या अभंगावरून असे दिसते की, तुकाराममहाराजांच्या कीर्तनातून होणाऱ्या सद्धर्माच्या प्रचारामुळेच क्षुद्रदेवतांच्या पूजाप्रकारास महत्त्व देऊन त्यावर जगणारा, मंत्रतंत्रजादूटोणा इत्यादिकांवर, चमत्कारावर व विशेषतः कथाकीर्तनावर पोट भरणारा वर्ग आणि त्यांच्या नादी लागणारा जनसमुदायच तुकाराममहाराजांवर उलटलेला दिसतो. "मग काय जिणें तुझें माझें" असे महाराज पांडुरंगास काकुळतीने सांगत आहेत, ह्यावरून हे स्पष्ट सूचित होते. पांडुरंगास हे सांगताना तुकाराममहाराजांना संकोच वाटतो.

तुकोबांच्या भव्य व्यक्तिमत्त्वावर सुंदर नारीही भाळत असत. त्यांच्या कीर्तनांत रंगून गेल्यामुळे ते व्यक्तिमत्त्व अधिकच उजळून दिसत असे. कीर्तनात बसलेला जनसमुदाय मोहित होत असे. एका अभंगात एक लावण्यवती महिला त्यांच्यावर भाळल्याचे वर्णन आहे. भागवतात वर्णिलेल्या लावण्यवती रुक्मिणीप्रमाणे ती दिसत होती. तिने महाराजांपाशी प्रणययाचना केली. कीर्तनातच तिला अनुलक्षून रचलेल्या अभंगात त्यांनी म्हटले की, पराविया नारी माउली रखमाईसमानच मला दिसते. तो अभंग असा : "पराविया नारी रखुमाईसमान। हें गेलें नेमून ठायींचें चि। जाई वो तूं माते न करीं सायास। आम्ही विष्णुदास नव्हों तैसे।। न साहावे मज तुझें हें पतन। नको हें वचन दुष्ट वदों।। तुका म्हणे तुज पाहिजे भ्रतार। तरी काय नर थोडे जाले।।" (कित्ता – ५२४). मनाशी म्हणाले की, "स्त्रियांचा तो संग नको नारायणा। काष्ठा या पाषाणामृत्तिकेच्या।।" (कित्ता – ५२३). आणखी असेही म्हटले की, "मृत्युलोकीं आम्हां आवडती परी। नाहीं एका हरिनामें विण।। विटलें हें चित्त प्रपंचापासूनि। वमन हें मनीं बैसलेंसे।। सोनें रुपें आम्हां मृत्तिके समान। माणिकें पाषाण खडे तैसे।। तुका म्हणे तैशा दिसतील नारी। रिसाचियापरी आम्हांपुढें।।" (कित्ता – ५२२).

जनांत मिसळल्यामुळे होणाऱ्या भानगडी टाळण्याकरिता तुकोबा सत्संग व भजनरंग वगळून कोणाच्याही घरी जात नसत. ते म्हणतात की, "दुजियाचा संग लागों नेदीं वारा। नाहीं जात घरा आणिकांच्या।।" (कित्ता – ५२७). भलभलते आरोप येत असल्यामुळे कित्येक वेळा प्रतिष्ठित लोकांना भिऊन सामान्य लोकही बाजूला राहात; म्हणून देवापाशी कृपादान मागतात – "भक्तिप्रतिपाळे दीन वो वत्सळे। विठ्ठले कृपाळे होसी माये।। पडिला विसर माझा काय गुणें। कपाळ हें उणें काय करूं। तुका म्हणे माझें जाळूनि संचित। करीं वो उचित भेट देई।" (कित्ता – ५२५).

ह्या व अशा सर्व अभंगांवरून असे अनुमान होते की, पाटलाने व इतर मंबाजीबुवांसारख्या मत्सरग्रस्त ग्रामस्थांनी दिवाणात म्हणजे ग्रामपंचायतीत जे अनेक आरोप तुकोबांवर केले त्यांत मुख्यतः दोन आरोप होते : एक म्हणजे, तुकोबा शूद्र असून अधिकार नसताना वेदान्तोपदेश करतो आणि दुसरा, तो महिलांना नादी लावतो. तोंडाला काळे फासून गावात फिरविले, ही अभंगात सांगितलेली हकीकत या स्त्रीविषयक आरोपाचीच सूचक ठरते. ह्याच सुमारास तुकारामांचे समवयस्क स्वामी रामदास ह्यांनी ग्रामण्यांनी लोक पिडले आहेत, असे जे सामाजिक परिस्थितीचे वर्णन केले आहे, त्याचे समर्पक असे हे उदाहरण होय. तुकाराममहाराजांच्या अभंगांच्या वह्याही ह्याच लोकांनी इंद्रायणीत बुडविल्या. ह्या प्रसंगाचे थोडक्यात वर्णन तुकाराममहाराजांनी आपल्या आत्मचरित्रपर अभंगांत (कित्ता – १३३३) पुढीलप्रमाणे केले आहे : "निषेधाचा कांहीं पडिला आघात। तेणें मध्यें चित्त दुखविलें।। बुडविल्या वह्या बैसलों धरणें। केलें नारायणें समाधान।।" हा निषेधाचा आघात म्हणजे वर वर्णिलेला गावचा बहिष्कार होय. वह्या बुडविल्या, पण त्या वाचल्या; या संबंधाचा निर्देश *तुकारामगाथे*मध्ये आणखी दोन ठिकाणी आला आहे. वा. सी. बेंद्रे ह्या संबंधात *संत तुकाराम* या पुस्तकात म्हणतात की, ह्या वह्या इतर अभंगांच्या नव्हेत; तर तुकाराममहाराजांनी रचलेली अभंगात्मक *मंत्रगीता*च होय; परंतु *मंत्रगीता* देहूकर तुकारामांची मिळत नाही, जी मिळते ती शाहूकालीन 'तुका पांडुरंगदास' या साधूचीच मिळते, असे रा. चिं. ढेरे ह्यांनी सिद्ध केले आहे (*मंत्रगीते*चा कर्ता; *गंगाजळी*). वेदांचा म्हणजे उपनिषदांचा अर्थ प्रगल्भपणे प्रतिपादन करणाऱ्या 'तत्त्वमसि' हे वेदवाक्य किंवा त्याचा अर्थ ग्रथित केलेल्या अभंगांच्याच वह्या बुडविल्या, असे अनुमान करण्यास हरकत नसावी. ह्या वह्या नष्ट होऊ नयेत म्हणून तुकाराममहाराजांनी इंद्रायणीतीरी बसून देवापुढे तेरा दिवस धरणे धरून देवाला साकडे टाकले; अखेर वह्या कोरड्याच बाहेर निघाल्या, ह्या चमत्काराची हकीकत महाराष्ट्रात लगेच वाऱ्यासारखी पसरली. ही हकीकत कोल्हापुरातही पोचली. तेथील जयराम नावाच्या संताने कोल्हापुरात आणखी पसरविली. ती बहिणाबाईच्या श्रवणपथावर आली. बहिणाबाईंना तुकाराममहाराजांच्या दर्शनाचा ध्यास लागला; स्वप्नात दर्शन झाले आणि त्या पतीसह देहूस आल्या; तेथेच तुकाराममहाराजांच्या सांनिध्यात राहून त्यांच्या मेघवृष्टीप्रमाणे चाललेल्या कीर्तनरंगात रंगून राहू लागल्या. ही हकीकत बहिणाबाईंनी स्वतःच्या अभंगांत सांगितली आहे. मंबाजी गोसाव्याची हकीकतही बहिणाबाईंनी आपल्या अभंगांत सांगितली आहे. मंबाजीबुवा हा तुकारामांचा हेवा व द्वेष करीत होता आणि तुकाराम शूद्र आहे, म्हणून त्याला वेदान्ताचा उपदेश करण्याचा अधिकार नाही, अशी त्याची तक्रार होती. ही तक्रार मंबाजीबुवाने पुण्यात राहणाऱ्या विख्यात राजयोगी आपाजी गोसावी यांस पत्र पाठवून कळविली. त्या पत्रात असे म्हटले की, ब्राह्मण, सोनार, कुळकर्णी इत्यादी जनसमुदाय ह्या शूद्र वाणी तुकारामाचे स्वतःस शिष्य म्हणवितो; अतियोगी रामेश्वरभटही त्याला नमस्कार घालतात; द्विज त्याच्या पाया पडतात. हे पत्र वाचून आपाजी गोसाव्याला क्रोध आला. शूद्राचा अनुग्रह ब्राह्मण घेतात, त्यामुळे पूर्ण भ्रष्टाकार होतो. त्या शूद्रास शिक्षा देण्यात दोष नाही, शिक्षा दिलीच पाहिजे; असा आपाजी गोसावी ह्याने निश्चय केला. बहिणाबाईंनी लिहिलेली हकीकत अशी आहे.

वह्या कोरड्या निघाल्यानंतर जग चकित झाले. चमत्काराशिवाय नमस्कार मिळत नाही, ही म्हण खरी ठरली. अभंगांच्या वह्या व *मंत्रगीता* हे सर्व साहित्य, शिष्यांची सेवा घ्यावयाची नाही ह्या बाण्याप्रमाणे तुकाराममहाराजांनी स्वतःच खुरमांडी घालून लिहिले. त्यांचे हस्ताक्षर उपलब्ध आहे; ते सुवाच्य आहे. लिहिले त्याच्यापेक्षा कितीतरी पटीने स्वयंस्फूर्तीने गायिले गेले असेल, ह्यात शंका नाही; कारण नामदेवांची शतकोटीची प्रतिज्ञा पुरी करण्याचे कर्तव्य बजावायचे होते (कित्ता – १३२०, १३२१). गंगाधर मवाळ व संताजी तेली जगनाडे हे त्यांचे लेखक होते असे *भक्तलीलामृतात* चरित्रकार महिपतीबावा सांगतात व तसेच वा. सी. बेंद्रे ह्यांच्या अगोदरचे चरित्रलेखक आणि कथेकरी सांगत आले आहेत. परंतु वा. सी. बेंद्रे ह्यांनी संशोधन करून गंगाधर मवाळ ह्यांचा जन्मच मुळी इ. स. १६५० नंतरचा व संताजी तेली जगनाडे ह्याचा त्याच सुमाराचा ठरविला (*तुकाराममहाराज यांचे संतसांगाती*, पृ. १३८–१५८). ह्या दोघांची तुकाराममहाराजांच्या टाळकऱ्यांतही गणना करतात, ते अर्थात असिद्ध ठरते.

दुष्काळ वगळला, तर तुकारामांचे गृहस्थी जीवन सुखासमाधानाचे होते. दुकान स्वतःच नीट चालवीत. चरितार्थापुरते मिळत होते.

त्यांचे धाकटे बंधू कान्होबा हेही भक्तिमार्गी होते. त्यांची लहानशी अभंगगाथा प्रसिद्ध आहे. पत्नी जिजाई 'कर्कशा' म्हणजे तिखट स्वभावाच्या होत्या, असे गाथेतील एका अभंगाच्या निर्देशावरून लक्षात येते. परंतु तुकाराममहाराजांचे जिजाईवर प्रेमही अगाध होते. त्याशिवाय का विरक्त स्थिती संपूर्ण अनुभवत असताना तुकारामांना निर्याणापर्यंत संतती होत राहिली ? निर्याणाच्या वेळी जिजाई गरोदर होत्या; त्या निर्याणाच्या वेळी बरोबर गेल्या नाहीत; ह्याची कारणे उघड आहेत. त्यांना तीन मुलगे व तीन मुली अशी सहा अपत्ये होती. महादेव, विठोबा आणि नारायण असे तीन मुलगे आणि काशी, भागीरथी आणि गंगा ह्या तीन मुली. ह्या तिन्ही मुली मोझे, गाडे व चांभुलीकर या प्रतिष्ठित घराण्यांत दिल्या होत्या.

तुकाराममहाराजांची चाळिशी उलटली तेव्हा त्यांच्या मनात आले की, आता हे जग सोडावे. लक्षात आले की, आता 'जरा' डोकावू लागली आहे. कानामागचे केस पांढरे होऊ लागले. सांगायचे ते सांगून झाले. ऐहिक प्रपंचाबद्दल औदासीन्य वाढले. उन्मनी अवस्था सतत टिकू लागली; मन मुरून गेले. भक्तिभाग्याचा प्रेमा अनुभवला व जगाला अनुभवावयास दिला. ब्रह्मस्वरूपात वास अखंड होऊ लागला. ब्रह्मरसात जीव विरून गेला. काया ब्रह्मरूप झाली (कित्ता – १५८६, १५९०).

शिवाजीमहाराजांचा स्वराज्यस्थापनेचा प्रयत्न नुकताच ह्याच सुमारास सुरू झाला होता; परंतु तो खरोखर फलद्रूप होत आहे असा भरवसा वाटण्याइतकी लक्षणे तोपर्यंत दिसत नव्हती. तुकारामांना सर्व आयुष्यभर बेबंदशाहीच माजलेली दिसली. देशातील मुसलमान पातशाह्या सारख्या आपसांत लढत होत्या; त्यामुळे जनतेस राजकीय स्वास्थ्याचा अनेक वर्षे लाभ होऊ शकला नाही. अस्वास्थ्य व असुरक्षितता माजली होती. दुष्काळही मधूनमधून दक्षिणेत पडतच होते. कुटुंबवत्सल लोक कसे जगावे ह्या चिंतेने ग्रस्त झाले होते. ह्याचे एका वाक्यात निर्याणावेळच्या अभंगात महाराजांनी वर्णन केले आहे : "न घडे यावरि न धरवे धीर। पीडतां राष्ट्र देखोनि जग॥ तुका म्हणे तुम्ही दिसे मोकलिलें। काय आतां आलें जीवित्वाचें॥" (कित्ता – १६०४). विठ्ठलाच्या भक्तीमुळेच हे दुःख दिसेनासे झाले (कित्ता – १६०८). निर्याणाचा निश्चय झाला. वैकुंठाहून पैलतीरावर आलेल्या हरीचे दर्शन झाले. हरी निजधामाकडे येण्याकरिता खुणावत होता; ह्याचा अर्थ, ह्या निर्याणाच्या वेळी तुकाराममहाराजांना पुनः सगुण साक्षात्कार झाला. ते म्हणतात की, घरी वैकुंठपीठ आले म्हणून जीव संतुष्ट झाला (कित्ता – १५९६). भजन करीत स्वारी निघाली, अदृश्य झाली. निरोप मागे पाठविला की, "वाराणसीपर्यंत असों सुखरूप। सांगावा निरोप संतांसी हा॥ येथूनियां आम्हां जाणें निजधामा। सवें असे आम्हां गरुड हा॥ कृपा असों द्यावी मज दीनावरी। जातसों माहेरीं तुका म्हणे॥" (कित्ता – १६०९).

जाताना सर्वांच्या चरणी मस्तक ठेवून निरोप घेतला, असे एका *तुकारामगाथे*च्या प्रतीत म्हटले आहे. "आम्ही जातों आपुल्या गांवा। आमुचा रामराम घ्यावा॥" (कित्ता – ४४७१). असा आरंभ असलेलाही एक अभंग आहे. तुकाराममहाराजांच्या नातवाने लिहिलेल्या एका टिपणात ते तीर्थास निघून गेले, असे म्हटले आहे. ते वरील अभंगाशी सुसंगत आहे. त्यांचे पुत्र नारायणबुवा ह्यांच्या शिवाजीमहाराजांना लिहिलेल्या एका कागदात ते कथा करीत असता अदृश्य झाले, असे लिहिले आहे. तुकाराममहाराज विमानात बसून सदेह वैकुंठास गेले, असे चरित्रग्रंथांत व कथाकीर्तनांत सांगितले जाते; त्यालाही *तुकाराममहाराजांच्या* गाथेत आधार आहे; परंतु हे वाच्यार्थाने घ्यावयाचे नाही. देहच ब्रह्मरूप बनला त्यामुळे सदेह वैकुंठास गेले, असे ध्वन्यर्थाने म्हणता येते. तुकाराममहाराजांचा निर्याणदिवस शके १५७१ फाल्गुन वद्य द्वितीया (९ मार्च १६५०) मानतात. परंतु वा. सी. बेंद्रे ह्यांच्या मते, शके १५७१, विरोधी संवत्सर, फाल्गुन वद्य पंचमी, सोमवार, हा होय; कारण त्यांचे पुत्रपौत्र फाल्गुन वद्य पंचमीसच पुण्यतिथी साजरी करीत. इ. स. १७७५ नंतर द्वितीया ते पंचमीपर्यंत उत्सव होऊ लागला. अर्थातच द्वितीयेचे उल्लेख उत्तरकालीन लेखनात येऊ लागले; मात्र पंचमीची द्वितीया करताना सोमवारचा शनिवार करणे राहून गेले (*देहूदर्शन*, वा. सी. बेंद्रे, पृ. २०–२१).

रामेश्वरभट तुकाराममहाराजांबद्दल म्हणतात, "भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा। ऐसा नाहीं डोळां देखियेला। गुरु परब्रह्म देवाचा तो देव। त्यासी तो मानव म्हणू नये॥" (*देहूदर्शन*, पृ. २०).

लक्ष्मणशास्त्री जोशी

रचना : मु. – १. तुकारामकृत अभंगांची गाथा; अभंग ४५७५ + ७; त्र्यं. ह. आवटे; पुणे, १९०१; आ. २ री, १९०८; आ. ३ री, १९२३; आ. ४ थी, १९२७; २. तुकारामबावा आणि त्यांचे शिष्य यांच्या अभंगांचा गाथा, भा. १ व २; अभंग ८४४१; तुकाराम तात्या; मुंबई, १८८९; ३. तुकारामबावाची गाथा; भा. १ व २; अभंग ४५००; गणपत कृष्णाजी; मुंबई, १८६७; ४. तुकारामबुवांचा अस्सल गाथा, भा. १ व २; अभंग १३२३; वि. ल. भावे; पुणे, १९१९–२०; ५. तुकारामाची गाथा : भा. १ व २; अभंग ४५८५; दामोदर सावळाराम आणि मंडळी; भा. ३; बडोदे १९०२; भा. २; मुंबई १९०३; ६. श्रीतुकाराम महाराजांची सार्थ गाथा : भा. १ व २; अभंग ४१४९ – क्षेपक ४०७; वि. न. जोग; पुणे, १९०९; आ. २ री; मुंबई, १९२६; ७. श्रीसाधुवर्य तुकाराममहाराज यांच्या ५००० अभंगांची गाथा; भा. १ व २ एकत्र; चाफेकर, देसाई आणि मंडळी; मुंबई, १९०५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : तुकाराम महाराजांचा धर्म : विश्वबंधुत्वाचा धर्म; धनुर्धारी, ४ मार्च १९५०; २. आवळीकर, पंडित : तुकारामबोवांवरील एक निबंध; नभामा., नोव्हें. १९६२; पृ. ५०; ३. आवळीकर, पंडित; तुकारामाची कविता, प्रतिष्ठान, जाने. १९७०; पृ. २९–३८; ४. इनामदार, हे. वि. : ज्ञानेश्वर, नामदेव आणि तुकाराम; नामदेव हितवर्धक; नोव्हें. १९३६; पृ. १५; ५. एडवर्ड्स, जे. एफ. : तुकारामबोवांचे धर्मविचार; पुणे, १९२२; ६. कामत, अशोक : संत तुकाराम महाराजांची हिंदी वाणी; मांडवी, मे १९६९; पृ. १९; ७. कारखानीस, काकासाहेब : श्रीतुकाराम महाराजांचे सामाजिक विचार; इंद्रायणी, एप्रिल १९६३; पृ. ३२–४२; ८. काशीकर, श्री. गो. : संत तुकारामांचे राजकीय विचार; युगवाणी, ऑक्टो. १९६३; पृ. २३–२८ व ३५; ९. काशीकर, श्री. गो. : संत तुकारामांचे राजकीय विचार; स्वाती, जुलै १९६६; पृ. १५; १०. कुळकर्णी, पां. ज्ञा. : श्री ज्ञानेश्वर व तुकाराम यांच्या पालख्या; चित्रज., जुलै १९१०; पृ. १११; ११. कुळकर्णी वा. ल. : तुकाराम : काही टिपणे; मराठवाडा विद्यापीठ पत्रिका; ऑक्टो. १९६३; पृ. ३३; १२. कुळकर्णी, सुधा : तुकारामाच्या अभंगांतून 'स्त्री' दर्शन; अनुराधा, जून १९६१; पृ. ४८; १३. कोलते, वि. भि. : तुकारामांचे अभंग; प्राचीन मराठी साहित्य-संशोधन; पृ. ९१–११०; १४. खापर्डे, व. ग. : तुकारामांची गुरुपरंपरा; युगवाणी, व. ७, अं. ४; १५. गद्रे, ना. कृ. : तुकारामाची प्रयाणतिथी; विज्ञावि., जाने. १९२१; पृ., १२; १६. गोरे, नेहेम्या (नीलकंठ) : तुकारामाचे धर्मविषयी ज्ञान; मुंबई, १८९२; १७. जहागिरदार, गि. अ. : श्री तुकारामाचा कर्मत्यागाकडे कल किती होता ?; प्रभात, एप्रि. १९१७; पृ. २६४; १८. जाधव, रा. ग. : तुकाराम : व्यक्तित्व आणि कविता; इंद्रायणी, मार्च १९६३; पृ. २९–३८; १९. जाधव, रा. ग. : तुकारामाचा आध्यात्मिक विकास; अजिंठा, दीअं. १९६२; पृ. १३; २०. जाधव, रा. ग. : तुकारामाची कविता : आशय आणि अभिव्यक्ती; प्रतिष्ठान, मार्च १९६१;

पृ. ११–२१; २१. जाधव, रा. ग. : तुकारामाची प्रतिमासृष्टी; प्रतिष्ठान, जून १९६१; पृ. १८–२९; जुलै १९६१; पृ. ७–१९; २२. जाधव, रा. ग. : तुकारामाच्या अभिव्यक्तीचे दोन विशेष; प्रतिष्ठान; डिसें. १९६०; पृ. ३४–४३; २३. जाधव, रा. ग. : तुकारामाच्या कवितेची अन्वर्थकता; प्रतिष्ठान, एप्रि. १९७३; पृ. ७–१३; २४. जाधव, रा. ग. : तुकारामाच्या कवितेतील अवतरणक्षमता; नभामा., ऑग. १९६२; पृ. ४६; २५. जोगळेकर, न. चि. : कबीर व तुकाराम ह्यांची ब्रह्मविषयक धारणा; इंद्रायणी, मार्च–एप्रि. १९६४; पृ. ५२; २६. जोशी, श्री. बा. : रविंद्रनाथ आणि तुकाराम; दीअं. १९६१; पृ. ३२–३६; २७. टिपणीस, गो. गो. : तुकारामकालीन समाजस्थिती; मसाप., मे १९२३; पृ. ३२१–३३२; २८. ढेरे, रा. चि. : तुका आकाशा एवढा; तरुण भारत; पुणे, ६ मार्च १९६६; २९. ढेरे, रा. चि. : मंत्रगीतेचा कर्ता; 'गंगाजळी', पुणे, १९७२; पृ. ७३–८४; ३०. तुळपुळे, ग. वि. : पीक पिकले धुमरी; इंद्रायणी, मार्च १९६३; पृ. ५–११, एप्रि. १९६३; पृ. ४३–४९; ३१. तुळपुळे ग. वि. : शेवटचा दिवस गोड व्हावा : संतांच्या सहवासात; पुणे, १९६१; पृ. ३८–४९; ३२. तुळपुळे, ग. वि. साक्षात्कारपथावर तुकाराम; पुणे, १९५४; ३३. तुळपुळे, शं. गो. : तुकाराम आणि रामदास; केसरी, तुकाराम-बीज अंक; १ मार्च १९५३; पृ. ७–८; ३४. दांडेकर, शं. वा. : तुकारामाच्या अभंगांचा अर्थ लावण्याची एक दिशा; प्रसाद, डिसें. १९४७; पृ. ७७; ३५. दांडेकर, शं. वा. (परीक्षण) : तुकारामाच्या अभंगांची चर्चा (संपा. पटवर्धन, वा. ब.); रत्नाकर, मार्च १९२८; पृ. १८९–१९५. ३६. दांडेकर, शं. वा. : तुकोबांचा संदेश; केसरी, तुकाराम-बीज अंक; १ मार्च १९५३; पृ. ९–१०; ३७. दांडेकर, शं. वा : श्रीतुकोबांची शिकवणूक; प्रसाद, मार्च १९५०; पृ. ४; ३८. देगलुरकर, धुंडामहाराज : श्रीतुकाराम महाराजांच्या गौळणीच्या अभंगातील अध्यात्म व साहित्य; प्रसाद, सप्टें. १९५८; पृ. ४८–५४; ३९. देशपांडे, दा. गो. : तुकारामाच्या व्यक्तिविकासातील अवस्था; प्रसाद, जाने. १९५४; पृ. २८; ४०. देशपांडे, वा. ना. : तुकारामांचे निर्याण; नभामा., नोव्हें. १९६७; पृ. ४६; ४१. देशपांडे, वा. ना. : तुकारामाचे निर्याण व बहिणाबाई; नभामा., मार्च १९६८; पृ. ४३; ४२. देसाई, शां. अ. : तुकारामाच्या अभंगरत्नांचे हार; मुंबई, १९१०; ४३. नासिराबादकर, ल. रा. : तुकोबांच्या अभंगवाणीतील कथा आणि व्यक्तिचित्रे; नभामा., एप्रि. १९६९; पृ. ४६–५१; ४४. नांदापूरकर, ना. गो. : तुका झालासे कळस; प्रतिष्ठान, जुलै १९५६; पृ. २०–२४; ४५. निकुंब, कृ. ब. : तुकाराम : काही विचार; तरुणभारत, बेळगाव, दीअं. १९६४; पृ. ११–१६; ४६. नेऊरगावकर, स. के. : तुकाराम : एक अध्ययन; मीनांजली, नोव्हें. १९६५, पृ. ११–१४; डिसें. १९६५, पृ. १२–१४; जाने. १९६६, पृ. १३–१६; मार्च १९६६, पृ. १३–१५; ४७. पटवर्धन, द. वा. : तुकाराम : पूर्वसूरींचे ऋण आणि त्यांची ग्रंथरचना; ज्ञानदूत; ऑक्टो. १९६३; पृ. १७; ४८. पटवर्धन, द. वा. : तुकारामबुवांचे काव्य : पद्धति आणि गुण; जीवनविकास, सप्टें. १९६८; पृ. ४६७; ४९. पटवर्धन, द. वा. : तुकाराम महाराजांनी काढलेली शब्दचित्रे; सांगाति, ऑग.–ऑक्टो. १९६८; पृ. ३५; ५०. पटवर्धन, द. वा. : तुकारामांची प्रातिभिक योग्यता; जीवनविकास, मे १९६६; पृ. १५४; ५१. पटवर्धन, द. वा. : तुकारामांची भक्तिगाथा; ज्ञानदूत, दि. अं. १९६८; पृ. १७; ५२. पटवर्धन, द. वा. : तुकारामांचे भक्तितत्त्वज्ञान; ज्ञानदूत; दि. अं. १९६७; पृ. १३; ५३. पटवर्धन, द. वा. : तुकारामावर घेण्यात आलेले आक्षेप आणि त्यांचे निराकरण; ज्ञानदूत, दीअं. १९६६; पृ. २४; ५४. पटवर्धन, वा. ब. (संपा.) : तुकारामाच्या अभंगांची चर्चा; खं. १, पुणे, १९२७; खं. २, पुणे, १९२८; ५५. पंडित, भ. श्री. : तुकाराम व कबीर; संतसमागम; अमरावती, १९६१; पृ. ३४–५२; ५६. पंडित, भ. श्री. : शिवशाहीतील दोन संत; मांडवी, मे १९६९; पृ. २६; ५७. पांगारकर, ल. रा. : श्रीतुकाराम चरित्र; पुणे, १९२०; ५८. पाटील, अ. वि. : 'तुका म्हणे'; केसरी; तुकाराम-बीज अंक, १ मार्च १९५३; पृ. १०; ५९. (डॉ.) पाटील, मालती तु.; तुकारामांची प्रतिमानसृष्टी व त्यांच्या काव्यात्मशक्तीचे मूल्यमापन; नागपूर, १९७४; ६०. पाध्ये, गो. वा. : तुकोबांचे काव्य आणि समाज : संस्कृति; यशवंत, मार्च १९५०; पृ. ४; ६१. पेंडसे, शं. दा. : साक्षात्कारी संत तुकाराम; पुणे, १९७२; ६२. प्रियोळकर, अ. का. : तुकारामाच्या 'पंडिती' गाथेची पाठनिश्चिती; नभामा., जाने. १९६९; पृ. ४६–६२; ६३. प्रियोळकर, अ. का. (संपा.) : मुद्रित तुकाराम वाङ्मय सूचि; मुंबई, १९५६; ६४. फाटक, न. र. : तुकोबांचे जीवनकार्य; यशवंत, मार्च १९५०; पृ. २. ६५ फाटक, न. र. : श्री संत तुकोबा व त्यांचें वाङ्मय; धनुर्धारी, दीअं. १९६२; पृ. ४; ६६. फाटक, न. र. : संशोधित तुकाराम; आलमगीर, दि. अं. १९६२; पृ. १०; ६७. बहिरट, भा. पं. : तुकाराम व बहिणाबाई (पत्र); नभामा., फेब्रु. १९६८; पृ. ५५; ६८. पृ. बहिरट, भा. पं. : तुकारामकृत गीतानुवाद; मसाप., जाने.–मार्च १९६५; पृ. ३२–३४; ६९. बहिरट, भा. पं. : तुकोबांचा आध्यात्मिक विकास; संतवाणीचा अमृतकलश; पंढरपूर, १९५५; पृ. १७४–१८६; ७०. बहिरट, भा. पं.; तुकोबांची प्रेमसाधना; नाथांचा प्रसाद; पंढरपूर, १९६१; पृ. ४६–५६; ७१. बेंद्रे, वा. सी. : प्रकरण ४, 'तुकाराम महाराज यांचे संतसांगाती'; मुंबई, १९५८; पृ. ५०–८२; ७२. बेंद्रे, वा. सी. : तुकाराम महाराजांची गुरुपरंपरा; मुंबई, १९६०; ७३. बेंद्रे, वा. सी. : संत तुकाराम : चरित्र, कवित्व व तत्त्वज्ञान; दिल्ली, १९६३; ७४. बेलसरे, के. वि. : श्रीतुकाराम महाराजांच्या साधनावस्था; प्रसाद, ऑग. १९५२; पृ. २१, दीअं. १९५२, पृ. ८१, जानेवारी १९५३; पृ. १३; ७५. भावे, विनोबा : तुकारामाची भजने; पवनार (वर्धा), १९७३; ७६. भावे, विनोबा : संतांचा प्रसाद : तुकारामांचे काही निवडक अभंग; आ. २, वर्धा १९५२; ७७. भिडे, बा. अ. (परीक्षण) : पांगारकरकृत 'श्रीतुकारामचरित्र'; विज्ञावि., मार्च १९१०; पृ. २५–३६; ७८. माटे, श्री. म. : तुकारामबुवांच्या मनाचे सामाजिक दुखणे; संत, पंत व तंत; पुणे, १९५७; पृ. १४६–१६१; ७९. माटे, श्री. म. : तुकाराम महाराजांची सुळावरची पोळी; संत, पंत व तंत; पुणे, १९५७; पृ. १६२–१७१; ८०. माडगावकर, रा. वि. : तुकारामाचे चरित्र; मुंबई, १९६४; ८१. रानडे, रा. द. : मराठी संतवाङ्मयातील परमार्थमार्ग; खं. २, अनुवादक : प्रा. कृ. वें. गजेंद्रगडकर, मुंबई, १९६५; ८२. लाड, पु. मं. : तुकाराम चरित्र (पूर्वार्ध); मुंबई, १९५७; ८३. लाड, पु. मं. : तुकारामाला गुरूपदेश; मसंप.; जाने. १९५८; पृ. १–३२; ८४. वर्दे, मोहिनी : भावगीतकार तुकाराम; कलायुग, ऑक्टो. १९६२; पृ. ३२; ८५. शर्मा, विनयमोहन : हिंदीको मराठी संतोंकी देन; पाटणा, १९५७; पृ. १५६–१७७; ८६. शिरवाडकर, वि.वा. : तुकाराम : वाङ्मयातील व्यक्ती, नवयुग, दीअं. १९४५; पृ. ३५–४१; ८७. सरदार, गं. बा. : तुकाराम – 'महाराष्ट्रीय संत : वाङ्मय व जीवन'; १९५२; पृ. ८७–९४; ८८. हर्षे, रा. ग. : तुकाराम (चरित्रात्मक आणि विवेचनात्मक प्रबंध); पुणे, १९६३.

**इंग्रजी संदर्भग्रंथ :** 1. Ajgaonkar, J.R.: *Tukaram:* Bombay

1948 (रा. रा. वि. मतकरी ह्यांनी केलेले इंग्रजी भाषांतर). 2. Apte, Chintamani: "Tukaram's Conception of God", *Aryan Path*, Vol. XI No. 12, 1940. 3. Bhandarkar, P.R.: *Two Masters: Jesus and Tukaram;* Bombay, 1903. 4. Edwards, J.F.: *Encyclopaedia of Religion and Ethics* (Ed. James Hastings), ("Tukaram", Vol. XII, 466-469). London, 1921. 5. Fraser, Nelson J. and Edwards, J.F.: *The Life and Teachings of Tukaram;* Madras, 1922. 6. Grant, Alexander: "Tukaram, a Study of Hinduism"; *The Bombay Educational Record*, March 1867; pp. 51–65. 7. Mitchell, J. Murray: *In Western India: Recollections of My Early Missionary Life* ("Marathi Poetry – Tukaram", chap. XVI, p. 165); Edinburgh, 1899. 8. Mitchell, J. Murray: "Pundharpur", *Indian Antiquary*, Vol. XI, June 1882, pp. 149-156. 9. Mitchell, J. Murray: "Tukaram", *Indian Antiquary*, Vol. XI, 1882, pp. 57-66. 10. Patwardhan, W. B.: "Tukaram – Wilson Philological Lectures VI"; *The Fergusson College Magazine*, Vol. IX, No. 3, Dec. 1918; pp. 139–143. 11. Patwardhan, W.B.: "Some Abhangas of Tukaram"; *The Fergusson College Magazine*, Vol. 1, No. 3, Sept. 1910, pp. 16. 12. Sharma, S.R.; *Tukaram: From a Fresh Angle;* 1962. 13. *Tukaram: A sketch of His Life and Teachings, Madras,* 1917.

**तुकारामबाबा वर्दे / ० तुका वर्दे** [अंदाजे श. १५७२ / इ. स. १६५० – ? ] कवी व भाषांतरकार. हे गोमंतकातील जुवें नावाच्या खेड्यातील रहिवासी होते. जातीने सारस्वत ब्राह्मण. ह्यांच्या वडिलांचे नाव अमृतराव. कवळे येथील श्रीशांतादुर्गा ही ह्यांची कुलदेवता. बालपणापासून बाबांची वृत्ती परमार्थप्रवण होती. ह्यांच्या वयाच्या बाविसाव्या वर्षी आईवडील व नंतर पत्नी ही एकामागून एक मरण पावली. ह्या कौटुंबिक आपत्तीने बाबांचे चित्त संसारांतून निवृत्त झाले व ते कवळें येथे आपली कुलस्वामिनी श्रीशांतादुर्गा हिच्या सेवेस जाऊन राहिले. तेथे असतानाच वयाच्या ३८ व्या वर्षी म्हणजे इ. स. १६१० त ह्यांना काव्यस्फूर्ती झाली. वयाच्या ६३ व्या वर्षापर्यंत बाबा कवळें येथेच होते. नंतर उतार वयात ते काशीयात्रेस गेले व अखेरपर्यंत तेथेच राहिले.

बाबांची कविता प्रासादिक आहे. गोमंतकात आजही ती सर्वतोमुखी आहे. त्यांच्या कवितेपैकी उपलब्ध झालेले काव्य म्हणजे *सुभाषितरत्नावलि*. भर्तृहरीच्या शतकत्रयाचे हे समश्लोकी मराठी भाषान्तर आहे. ह्या समश्लोकीत मूळ संस्कृतातील आशय जशाचा तसा उतरला आहे. ह्यांच्या कित्येक स्फुट कविता कुंभारजुवें (गोवें) येथून प्रसिद्ध होणाऱ्या *सत्संग* ह्या मासिकात आल्या आहेत.

**रचना : मु.** – सुभाषितरत्नावलि अर्थात भगवद्भक्त तुकाराम वर्देकृत भर्तृहरीच्या शतकत्रयाची मराठी समश्लोकी; संपा. कापडी, स. ल.; प्रस्ता. प्रियोळकर, अ. का.; मुंबई, १९४०. **अमु.** – अभंग, पदे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. आजगांवकर, ज. र.; तुकारामबाबा वर्दे; मकच., खं. १, पृ. २२७–२३६. २. सरदेसाई, य. सू. : महाराष्ट्र सारस्वताविषयी गोमंतकस्थांचे प्रयत्न; कै. यशवंतराव सूर्यराव सरदेसाई स्मारक ग्रंथ; मुंबई, १९६५; पृ. २८६.

**तुकाविप्र / ० विप्र तुका** [अंदाजे श. १६५१ / इ. स. १७२९ – समा. श. १७१४, पौष व. १४ / इ. स. १७९३] भागवतसंप्रदायी कवी. संपूर्ण नाव तुकाराम भगवंत विपट. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. सातारा जिल्ह्यातील रहिमतपूर गावचे हे कुळकर्णी. तपश्चर्येसाठी हे कृष्णाकाठच्या तारगावच्या बोरवनात बसत असत. ह्यावरून त्यांच्या वंशजांस बोरवनकर असे उपनाव पडले. तुकाविप्रांच्या आईचे नाव चिमणाबाई. गुरू : विप्रनाथ. हे ह्यांच्या मातोश्रीचे वडील. तुकाविप्रांचा संबंध त्यांच्या मातृवंशाकडून एकनाथांपर्यंत पोचतो. एकनाथांचे भागवत-संप्रदायी वारस व त्यांच्या चुलत घराण्यातील पुतण्याचे चिरंजीव जे अनंतबोवा त्यांच्या वंशातील विप्रनाथ हे एक सत्पुरुष. ह्यांची गुरुपरंपरा अशी : एकनाथ > अनंत > विठ्ठल > विप्रनाथ > तुकाविप्र. विप्रनाथ हे ह्यांचे गुरू असल्याने हे स्वतःचा नामनिर्देश तुकाविप्र असा करीत.

रोज कीर्तन करण्याचा तुकाविप्रांचा संकल्प असे. ह्याकरिता अखिल महाराष्ट्रभर त्यांचा संचार होई व भगवद्भक्तीचा प्रचार चाले. ह्यांना सातारकर छत्रपती, श्रीमंत नानासाहेब व भाऊसाहेब पेशवे फार मानीत असत. मोठेमोठे सरदार-जहागिरदार ह्यांच्या शिष्यमंडळात होते. देशावर आणि कोकणात ह्यांना मठासाठी अनेक इनामे मिळाली होती. ते विरक्तवृत्तीने राहात. त्यांच्याजवळ शीघ्रकवित्व होते. नामदेवांची शतकोटी अभंगांची प्रतिज्ञा पुरी करण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

तुकाविप्रांची समाधी खर्ड्यापासून १० मैलांवर गोदातीरी अंजनवतीस आहे. त्यांचा समाधिकाल राजारामप्रासादीकृत *भक्तमंजरीमाले*वरून वि. का. राजवाडे श. १६९० / इ. स. १७६८ असा देतात. पण श. १७१० / इ. स. १७८८ त (हा शक ज्योतिपंतशिष्यकृत *स्वयंज्योतिकथामृत* ग्रंथात दिला आहे) मृत्यू पावलेल्या ज्योतिपंत महाभागवतांचा उल्लेख तुकाविप्रांनी एका अभंगात केला आहे तो असा : 'ज्योतीमाजी ज्योती मिळाला देखून। करीत गायन तुकाविप्र ॥' (प्रस्तुत अभंग राजापूर येथील रहिवासी गोविंद मोतीरामशेट सापळे ह्यांच्याजवळील बाडात सापडला). ह्यावरून तुकाविप्रांचे निधन श. १७१० (इ. स. १७८८) नंतर झाले असावे हे निश्चित. ग्वाल्हेर-मठपती आबामहाराज ह्यांच्या चिरंजिवांनी ह्यांचे एक चरित्र लिहिले आहे. ह्या *श्रीचरित्रात* आबामहाराजांचे आजेसासरे तुकाविप्र व त्यांचे गुरू ह्यांविषयी माहिती दिली आहे. तेथे त्यांचा समाधी संवत १८४४, परिधावी संवत्सर, पौष वद्य चतुर्दशी असा दिला आहे. म्हणजेच श. १७१४, पौष वद्य १४ (इ. स. १७९३) हा त्यांचा निर्याणशक ठरतो, अशी माहिती संशोधक भा. रा. भालेराव (ग्वाल्हेर) हे देतात.

ह्यांनी अभंग, आरत्या, पदे, स्तोत्रे अशी बरीच रचना केलेली आहे. कवीचे *ज्ञानेश्वरचरित्राख्यान* (ओवीबद्ध) रा. ग. हर्षे ह्यांनी प्रसिद्ध केले आहे. ज्ञानदेवांच्या जीवनातील सर्वपरिचित अशा घटनांची ढोबळ स्वरूपातली नोंद चरित्रात दिसते. चरित्र विस्तृत नसल्याने काही महत्त्वाचा तपशील त्यात आलेला नाही. ग्रंथाच्या शेवटी कवीने स्वतःची गुरुपरंपरा दिली आहे. भाइसंमं. त्रैमासिकातून छापल्या गेलेल्या ह्यांच्या काही कवितेवरून रचना सर्वसामान्य व सदोष वाटते. गो. का. चांदोरकर ह्यांनी तुकाविप्रांच्या नावावर *आत्मसिंधू, सुदामचरित्र, भानुदासचरित्र, कालियामर्दन* ह्या रचनांचा उल्लेख केला आहे (संककासू., पृ. ४३).

**रचना : मु.** – १. ज्ञानेश्वरचरित्राख्यान; ओ. सं. २५०; र. श. १६९२, र. स्थ. ब्रह्मपूर; संपा. हर्षे, रा. ग.; भाइसंमंत्रै., व. ४६, अं. १–४, पृ. २५–३६; २. द्रौपदीचा धावा, अभंग १५, भक्तिपर श्लोक, सं. ११; संग्रा. जगदळे, रा. तु.; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४, पृ. ६५–६७; ३. अभंग; सं. २०; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ४, पृ. १६३–१६५. **अमु.** – १. आत्मसिंधु – वि. ल. भावे संग्रह; २. कालियामर्दन; गं. ना. मुजुमदार संग्रह; ३. भानुदासचरित्र; गो. का. चांदोरकर संग्रह; ४. सुदामचरित्र; वि. ल. भावे संग्रह; ५. अभंग, पदे, स्तोत्रे इ. रचना.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. आचार्य, कृ. वि. : तुकाविप्रकृत अभंग कालनिर्णय; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ४; पृ. १६०–१६५. २. पट-

वर्धन, पां. न. : तुकाविप्राचा प्रयाणकाळ कोणता ?; भाइसंमं-इति., श. १८३४; पृ. ७९–८०. ३. भालेराव, भा. रा. : तुकाविप्र व त्याचा वंश; मुमुक्षु (नवें), मार्च १९२२; पृ. १७. ४. हर्षे, रा. ग. : प्रास्ताविक विवेचन श्रीभगवद्गीता-व्याख्यान; ज्ञानदेवी (चिकित्सक व भाषाशास्त्रीय आवृत्ती), पुणे, १९४७; पृ. २९.

**तुका सुंदरदास** / ० **सुंदरदास तुका** [अंदाजे श. १५९९ / इ. स. १६७७] कवी. *नासिकेतोपाख्यान* ह्या काव्यग्रंथाचा कर्ता. तुका सुंदरदास असा कविनामनिर्देश काव्यात येतो. ग्रंथपूर्तीचा काळ श. १५९९ दिला आहे. ग्रंथारंभीच 'तो सद्गुरु श्यामसुंदर भारती । जो परमानंदाची ओतीव मूर्ति ॥' असा गुरूचा उल्लेख कवीने केला आहे.

भारती इतिहासातली नासिकेताच्या उपाख्यानातली कथा कवीने ह्या काव्यात सांगितली आहे. ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. कवीच्या उक्तीप्रमाणे "मुनी बोलिला ग्रंथ अपार ॥ तितुका धरिला नाही सविस्तर।। मुख्यार्थ चि संक्षेपाकार। सत्य साचार निरोपिला ।। २१.६६ ।।" असे ह्या ग्रंथाचे स्वरूप आहे.

**रचना : मु.** – नासिकेतोपाख्यान; अ. २१, ओ. सं. १७२५; र. श. १५९९, दुर्मती संवत्सर, श्रावण शु. १०; मुंबई, १८७३; १८८८. **अमु.** – १. उपमन्युचरित्र; कडवी ३१, सवामं. बा. १५३७; २. अभंग; संककासू., पृ. ४३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : तुका सुंदरदास; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ४, पृ. १७४–१७८.

**तुकुजी सोमवंशी** [का. अनु.] जैन कवी. हा जातीने कासारबोगार असावा. ह्याची *कीतकी* नावाची एकच किरकोळ रचना सापडते. ह्या गीतात ५ कडवी असून *पद्मावती गीत* असेही ह्या रचनेचे नाव दिले आहे. शिरडशहापूर येथील हस्तलिखित क्र. १ मध्ये ही रचना सापडते. तिच्यात कालाचा निर्देश नाही (डॉ. सुभाषचंद्र अकोळे; प्रामजैसा., पृ. ११०).

**तुकेशसुत चैतन्यनाथ** / ० **आनंद चैतन्य** [का. अनु.] कवी. तुकेश ह्या आनंदसंप्रदायी सत्पुरुषांचे शिष्य. ह्या चैतन्यनाथांचे शिष्य प्रेमानंद चैतन्य हे होते. कवीने रचलेल्या *स्वरूपविवरण* ग्रंथात त्यांच्या काळाचा निर्देश येत नाही.

आपल्या *स्वरूपविवरण* ह्या ग्रंथात तुकेशांनी चैतन्यनाथांना उपदेश दिल्यानंतर शिष्याला स्वरूपाचा अनुभव कसा आला तो सविस्तर सांगितला आहे. गुरूने आज्ञा केली : "तरि तुवा उपकार करावा । महंतासि उपदेश सांगावा ॥ हा संप्रदाय चालवावा। जडजिव तारावया ॥ १० ॥" ह्याप्रमाणे आपला अनुभव सांगितल्यानंतर कवी म्हणतो, "ऐसा हा परमार्थु । त्यासि आधिपते दत्तात्रै अवधुतु । म्हणे चैतन्यसुतु । तुकेशाचा ॥ २३७ ॥" असा हा ग्रंथ श्रीदत्तात्रेयांची परंपरा चालविण्यासाठी कवीने रचला.

**रचना : अमु.** – स्वरूपविवरण; ओ. सं. २४०; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : तुकेशसुतचैतन्यनाथविरचित स्वरूपविवरण; भाइसंमंइति., श. १८३७, पृ. ४१–४३.

**तुकोजी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – बहुलाकथा चूर्णिका; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

० **तुकोद्धव** – पहा सदाशिव–१.

० **तुकोद्धव चेला** – पहा **सदाशिव–१.**

० **तुकोद्धवदास** – पहा **सदाशिव–१.**

० **तुकोद्धवार्भक** – पहा **सदाशिव–१.**

**तुळसीदास** [का. अनु.] शाहीर. ह्याने *तानाजी मालुसऱ्यावरील पोवाडा* रचला आहे. पोवाड्यातील अखेरच्या चौकातील उल्लेखावरून हा पुण्याच्या मंडईच्या बाजारात राहात होता, अशी माहिती मिळते. हा शाहीर शिवकालीन की पेशवेकालीन ह्याबद्दल वाद आहे. पंतोजीकाकाने राजगडी बोलावून घेऊन आपल्याकडून हा पोवाडा रचून घेतला अशी पोवाडेकार स्वतःच माहिती पुरवितो. त्यावरून पोवाडेकार समकालीन असावा असा सर्वत्र समज आहे. शाहीर पेशवेकालीन असावा असा निवाडा पोवाड्याचे अंतरंग तपासून द. वा. पोतदार ह्यांनी दिला आहे. त्यांच्या मते, शाहीराचा काळ ठरविण्याची इतर कोणतीच साधने उपलब्ध नसल्याने पोवाड्यात येणारे काही विशिष्ट उल्लेख प्रमाण मानावे लागतात. पोवाड्यातील मंडईच्या बाजाराचा, पर्वतीचा व चांदवडी रुपयाचा उल्लेख हे बाजीराव व नानासाहेब ह्या पेशव्यांचा भरभराटीचा काल दाखवितात. तेव्हा तुळशीदास शाहीर हा शिवकालीन नसून पेशवेकालीनच असावा (भाइसंमंत्रै., व. १९, अं. १, पृ. १३–१६).

तानाजीच्या सिंहगड मोहिमेचा वृत्तांत कवीने ह्या कवनात वर्णिला आहे. विस्तृत असा हा पोवाडा काव्यरचनेच्या दृष्टीने अत्यंत ठाकठिकीचा आहे. कथानक, प्रसंगाची मांडणी आणि जिजाई, तानाजी, शेलारमामा व शिवाजी यांची वास्तव स्वभावचित्रणे, त्यातून होणारा रसाविष्कार ही सारीच अंगे लक्षात राहण्याजोगी आहेत. प्रस्तुत पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये समाविष्ट करण्यात आला आहे (पृ. ३१–६३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. केळकर, य. न.; तानाजीचा पोवाडा : ऐतिहासिक माहिती व रसग्रहण; ऐतिपो., खं. १, पुणे, १९२८; पृ. २४–३०. २. पोतदार, द. वा. : सिंहगड पोवाडा समकालीन नसावा; भाइसंमंत्रै., व. १९, अं. १, पृ. १३–१६.

**तोडरमल** [का. अनु.] पदकार. ह्यांची पदरचना उपलब्ध आहे (संककासू., पृ. ४३).

**तोडीदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ४४.

० **तोमास इश्तेव** – पहा **टॉमस स्टीफन्स (पाद्री).**

**त्यागकुमरसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – भक्तिपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**त्यागनटेश** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – नर्मशृंगारपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**त्यागेश** / ० **त्यागेशस्वामी** [का. अनु.] कवी. ह्यांनी *सुभद्रापरिणय* हे नाटक व पदपदांतरे रचली आहेत. बोधपर, नीतिपर, वैराग्यपर, शृंगारपर, भक्तिपर, दैवतपर अशा विविध विषयांवरील पदांची कवीने रचना केली आहे. शिव या दैवतावर बरीच पदे आहेत त्यावरून कवी शिवोपासक असावा असे वाटते. तंजावर सरस्वती महाल हस्तलिखित संग्रहात ही रचना उपलब्ध (यादी क्र. ३).

० **त्यागेशस्वामी** – पहा **त्यागेश.**

**त्रिंबक–१** / ० **त्र्यंबक–२** [अंदाजे श. १५५७ / इ. स. १६३५] कवी. एकनाथांचे शिष्य. ह्यांनी श्लोकबद्ध *रुक्मिणीस्वयंवर* रचले आहे. त्याचा फक्त तिसराच उल्लास उपलब्ध आहे. काव्यात 'श्रीमद्देशिकयेकनाथ' असा आपल्या गुरूचा निर्देश कवी करतो. ह्यांनी रचलेली काही पदे प्रसिद्ध झाली आहेत.

**रचना : अमु.** – रुक्मिणी-स्वयंवर, उल्लास तिसरा; ग्रं. सं. २३४ तंसम. बा. १५३०; हस्त. यादी, क्र. २; सवामं. बा. १३७६, हस्त. सू., खं. २.

**त्रिंबक–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – निर्वाणसारसंग्रह, ओवी व आर्या मिळून ९८; सवामं. बा. ५७८, हस्त. सू., खं. २.

**त्रिंबक–३** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – १. चिंतामणीची आरती; २. जगदंबेची आरती; मआ., पृ. ३५१, ४३५. **अमु.** – आरत्या व पदपदांतरे; सवामं.

हस्त. सू., खं. १ व २.

**त्रिंबक-४** [का. अनु.] पदकार. ह्याचे एक रामपर पद *पदगुच्छात* (तंजावर, १९६९) मुद्रित (पृ. ४१). त्यात शेवटी "मध्वमुनेश्वर दीनदयाळा। राखे ब्रीद आजी ॥ त्रिंबक विनवी भावे तुजला। बोध सुधारस पाजी ॥" असे चरण येतात.

**० त्रिंबक गोसावी** – पहा **त्रिंबकराज.**

**० त्रिंबकतनय** – पहा **त्रिंबकसुत–१.**

**० त्रिंबकतनुज** – पहा **त्रिंबकसुत–२.**

**० त्रिंबकनंदन** – पहा **त्रिंबकसुत / त्र्यंबकसुत–१.**

**त्रिंबक (नाईक)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – बारामासी (राधाविलास); गो. का. चांदोरकर संग्रह, संककासू., पृ. ४४.

**त्रिंबकप्रभु** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**त्रिंबकबावा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**त्रिंबक भानुदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – 'हरिलीला' नामक २९ श्लोकांची रचना; सवामं. हस्त. सू., खं. २.

**त्रिंबकराज / ० त्रिंबक गोसावी / ० त्र्यंबकराय** [का. अनु.] रामदासी कवी. श्रीसमर्थांचे शिष्य व ह्या परंपरेतील भालगाव (जि. औरंगाबाद) मठाचे अधिपती. ह्यांनी भालगावीच समाधी घेतली. शिष्य हरिहर.

ह्यांची स्फुट कविता समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रह, धुळे येथे उपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : श्रीसमर्थशिष्य त्रिंबकराज – मठ भालगाव; श्रीसांप्रविवि., खं. १; धुळे, १९१७; पृ. ८७–९६.

**० त्रिंबकराय** – पहा **त्र्यंबकराज.**

**त्रिंबक सदाशिव पुरंदरे / ० नाना पुरंदरे** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] बखरकार. हा अंबाजी पुरंदरे ह्यांचा पुतण्या असून माधवरावांबरोबर कर्नाटकाच्या स्वारीत होता. पेशवा व ताराबाई ह्यांचे भांडण असल्यामुळे त्रिंबक सदाशिव ह्यास पेशव्यांनी साताऱ्याच्या व्यवस्थेकरिता ठेवले. त्र्यंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंदरे पानपतावरून आल्यावर पेशव्यांस भेटला. पेशव्यांना त्याच्याकडून बरीचशी खरी हकीकत कळली. हा पेशव्यांशी एकनिष्ठ होता. श्रीमंत भाऊसाहेब ह्यांची कैफियत ह्यानेच लिहिली असावी असा तर्क रियासतकार गो. स. सरदेसाई करतात. *काव्येतिहाससंग्रह*कार मात्र, ह्या बखरसदृश कैफियतीचे लेखन कोणी केले ह्याचा निर्णय करवत नाही, असे सांगतात. पानिपतच्या युद्धानंतर लागलीच एक-दोन वर्षांतच ह्या बखरीचे लेखन झाले असावे. कारण लेखक चांगला माहितगार दिसतो.

प्रस्तुत कैफियतीचा नायक सदाशिवभाऊ हे पानपतच्या अनर्थाला सर्वस्वी जबाबदार असे अन्यत्र म्हटलेले आढळते ते चुकीचे आहे, अशी भाऊंची बाजू मांडण्याचे काम ह्या कैफियतकाराने चोख बजावले आहे. मराठीतील बखरलेखनाच्या परंपरेशी व प्रवृत्तीशी बखरकार परिचित आहे. भाऊंला तो साक्षात ईश्वराचा अवतार मानतो. भाऊंचे करुणरम्य चित्र रेखाटून ही कैफियत ह्याने यशस्वीपणे सादर केली आहे. बखरीचे मुद्रण *काव्येतिहाससंग्रहा*तून (क्र. १९, इ. स. १८८७) झाले.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ग्रामोपाध्ये, गं. ब. : श्रीमंत भाऊसाहेब यांची कैफियत; मवाइ., खं. ३. (संपा. रा. श्री. जोग), पुणे, १९७३; पृ. ५४९–५५१. २. हेरवाडकर, र. वि. : श्रीमंत भाऊसाहेब यांची कैफियत; मब., प्र.आ., पुणे, १९५७; पृ. ६२–६४, १७२–१७४.

**त्रिंबक साळी** [का. अनु.] शाहीर. हा श्रीगोंद्याचा राहणारा. ह्याने *पहिल्या बाजीरावावरील पोवाडा* रचला आहे. प्रस्तुत पोवाडा एकाखडी पोवाडा म्हणजे प्रत्येक बाराखडीतले आद्याक्षर घेऊन केला असल्याची माहिती शेवटच्या दोन ओळींत कवीने स्वतःच पुरवली आहे. श्रीमंत पहिले बाजीराव पेशवे ह्यांच्यावरील एकही पोवाडा उपलब्ध नसल्याने ह्या एका पोवाड्याला महत्त्व प्राप्त झाले आहे (मु. : ऐतिपो., खं. १, पृ. ९२–९३).

**त्रिंबकसुत / त्र्यंबकसुत–१ / ० त्रिंबकतनय / ० त्रिंबकनंदन / ० त्रिंबकात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे व सुभाषिते; सवामं. हस्त. सू., खं. १ व २.

**त्रिंबकसुत / त्र्यंबकसुत–२ / ० त्रिंबकतनुज** [का. अनु.] कवी. पालीमठपती रंगनाथस्वामी ह्यांचे शिष्य. ह्यांची अंबाबाई व महादेव ह्यांच्यावरील पदे व इतर स्फुट कविता समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात सापडते (बा. ३८२, हस्त. सू., खं. १).

**त्रिंबकसुत परशराम** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अपराधस्तोत्र (श्लो. १७); सवामं. हस्त. सू., खं. १.

**० त्रिंबकात्मज** – पहा **त्रिंबकसुत–१.**

**त्रिमल–१** [अंदाजे श. १६१७ / इ. स. १६९५] कवी. वामनांचे शिष्य. ह्यांनी *ज्ञानदर्पण* ग्रंथाची रचना केली आहे. सदरहू ग्रंथाची हस्तलिखित प्रत भारत इतिहास मंडळ, पुणे येथे असून तिचा लेखनकाल श. १६४६ (इ. स. १७२४) असा दिला आहे. चौथ्या अध्यायात ह्यांनी गुरूचा उल्लेख केला आहे तो असा : " कर्ता जगद्गुरु वामनु । निमित्यें त्रिमल भाविजनु । सुवर्णा म्हणिजे काकणु । जयापरि ॥ ४ : १४७ ॥" असा हा ग्रंथराज गुरूला अर्पण केला असून श्रोता आणि वक्ता सद्गुरूच आहे असे कवी म्हणतो.

**रचना : अमु.** – ज्ञानदर्पण; अ. ४, ओ. सं. ७९२; र. श. १६१७, श्रावा नाम संवत्सर, मार्ग शु. ७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : जगद्गुरू वामनशिष्य त्रिमलविरचित ज्ञानदर्पण; भाइसंमत्रै., व. २३, अं. ४, पृ. १००.

**त्रिमल–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**त्रिमल जनार्दन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**त्रिमलदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० त्रिमलदासकान्हा** – पहा **कान्हा/न्हो त्रिमलदास.**

**त्रिमलनंदन** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रागमाळिका; ग्रं. सं. ३०; सवामं. हस्त. सू., खं. २.

**त्रिमलसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० त्रिमलाचा अखंडदास** – पहा **अखंडदास.**

**० त्रिमल्ल** – पहा **त्रिमल्ल अद्वयी.**

**० त्रिमल्लअद्वयी / ० त्रिमल्ल** [का. अनु.] कवी. ह्या कवीचा *उपनिषत्सार* हा ग्रंथ शंकराचार्यांच्या मूळ संस्कृत श्लोकांवरून केलेला विस्तार आहे. ह्याच्या ७५६ ओव्या आहेत. प्रस्तुत ग्रंथाची पोथी तंजावर सरस्वती महाल येथील हस्तलिखितांच्या संग्रहात आहे (तंसम. बा. ९१). ह्यांनी पदेही रचली आहेत (संककासू., पृ. ४५; तंसम. हस्त. यादी, क्र. ३). शिवकल्याणांचे वडील व गुरू जे त्रिमल्ल ऊर्फ नित्यानंद तेच हे किंवा काय ते समजण्यास साधन नाही.

**त्रिविक्रम वाळ / बाळु** [का. अनु.] कवी. गुरु : गोवर्धनपुरी.

**रचना : अमु.** – १. निजबोध; गो. का. चांदोरकर संग्रह. २. भक्तियोग – पोथी पत्रे १८ ते ३४; अपूर्ण; सवामं. हस्त. सू.,

खं. २.

० **त्र्यंबक-१** – पहा **अनंततनय-२.**

० **त्र्यंबक-२ (एकनाथशिष्य)** – पहा **त्रिंबक-१.**

**त्र्यंबक-३** [का. अनु.] कवी. *अभिमन्युविवाह* ह्या आख्यानात स्वतः-विषयी कवीने जी माहिती दिली आहे तिच्यावरून हे वसई प्रांतातील चिंचणी (जि. ठाणे) ह्या गावचे रहिवासी असे कळते. यजुर्वेदी, त्रिप्रवरी ब्राह्मण. गो. का. चांदोरकर ह्यांनी प्रस्तुत कवीचा त्रिंबक-द्विज असा उल्लेख करून त्यांच्या नावावर *विदुरनीति, प्रल्हादचरित्र* अशी आणखी दोन काव्ये दिली आहेत (संककासू., पृ. ४४). *अभिमन्युविवाह* हे आख्यान *अनेककविकृत लघुकाव्यमाले*च्या चौथ्या भागात छापले आहे. मालेच्या संपादकांच्या संग्रही ह्या कवीच्या *विदुरनीति* नामक ओवीबद्ध रसाळ काव्याची त्रुटित प्रत असल्याचे संपादकांनी तळटीपेत म्हटले आहे. *प्रल्हादचरित्र* हा ग्रंथ ह्या त्र्यंबकांचा नसावा असे *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी दिलेल्या माहितीवरून वाटते (मसा., आ. ५, पृ. ६६–६७).

*अभिमन्युविवाहाख्यान* अनेक वृत्तांत रचलेले असून त्यात बलरामकन्या वत्सला हिच्या हरणाची कथा येते.

**रचना : मु.** – अभिमन्युविवाह; प्र. ३, श्लो. सं. १७९; संपा. केळकर, ना. चिं. व ओक, दा. के.; अकलकामा., भा. ४, मुंबई, १९०३; पृ. २३६–२४७. **अमु.** – विदुरनीति; अ. ५, ग्रं. सं. ६००; **शंका.** – प्रल्हादचरित्र.

**त्र्यंबक – ४** [का. अनु.] कवी. *प्रल्हादचरित्र* काव्याचा कर्ता. 'नाशिक ऊर्फ जनस्थान' येथे राहणारे. ग्रंथारंभी कवीने "जनस्थानीं नांदे द्विजवर सदा त्र्यंबक कवी। तयानें हे केली सरस कवितापद्धति नवी ॥" असा स्वतःविषयी उल्लेख केला आहे. हा त्र्यंबक मध्वमुनींचा शिष्य असावा असे शेवटच्या काही पंक्तींवरून वाटते. उदा., "तया प्रल्हादानें हृदयकमलीं देव नमिला। म्हणे स्वामी स्थापीं चरणकमलीं मध्वमुनिला ॥" ह्या आख्यानाचे फक्त ३२ श्लोक पाहण्यास सापडतात. रचनेवरून प्रस्तुत आख्यान मध्वमुनींचेही असण्याची शक्यता आहे असे अभ्यासकांना वाटते. साधार पुराव्याच्या अभावी तूर्त तरी हे काव्य कोणाचे ते निश्चितपणे सांगता येत नाही.

**रचना : मु.** – प्रल्हादचरित्र; संपा. भावे, वि. ल. : महा. कवि, अं. १५; पृ. ९२–९६ (मसा., आ. ५, पृ. ४६६–४६७).

० **त्र्यंबक-५** – पहा **त्र्यंबकराज.**

**त्र्यंबक (अंकोळकर)** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. ह्याचा निर्देश कवी म्हणून *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी केला आहे. पण त्याची रचना मात्र दिलेली नाही (मसा., आ. ५, पृ. ३८९).

**त्र्यंबक अनंत ऊर्फ दादा नाईक भिडे** [ ? – इ. स. १८५२] कवी. नित्युंदनगोत्री चित्पावन ब्राह्मण. मूळ गाव रत्नागिरी जिल्ह्यातील गणपतिपुळे. हे नाईक भिडे कुटुंब पेशव्यांच्या अमदानीत बरेच प्रसिद्धीस आले व पुण्यास स्थायिक झाले. कवीचे वडील अंताजी बल्लाळ ह्यांचा पुणे येथे सावकारीचा धंदा होता. त्रिंबकांचा ओढा परमार्थाकडे असल्याने त्यांचे वडिलांशी पटले नाही व ते पुणे सोडून ग्वाल्हेरास आपल्या भगिनीकडे येऊन राहिले. हे पैठणकर एकनाथांचे भक्त होते. स्वप्नात दीक्षा मिळाल्यावरून एकनाथांस हे गुरू मानू लागले. ह्यांच्या अनेक पदांत नाथांचा उल्लेख येतो. हे गृहस्थाश्रमी होते. तीन पुत्र व तीन कन्या असा ह्यांचा परिवार होता. ग्वाल्हेरास ह्यांनी संस्कृत, फारसी, हिंदी, ह्या भाषांचा व गायनकलेचा अभ्यास केला. काव्यस्फूर्तीही ह्यांना येथेच झाली. घरची पिढीजाद श्रीमंती असल्याने जीवनकलहार्थ ह्यांना काहीही उद्योग करावा लागला नाही. त्यामुळे आपला सर्व वेळ ह्यांनी ईश्वरभजनात घालविला. आयुष्याची शेवटची अठरा वर्षे ह्यांनी पंढरपुरास विठ्ठलसेवेत घालविली व पंढरीसच देहत्याग केला.

ह्यांची बरीच काव्यरचना असावी. पण त्यातील फारच थोडी (काही पदे) आज उपलब्ध आहे. त्यापैकी काही पदे *काव्यसंग्रहा*त व काही *महाराष्ट्रकविचरित्र, खंड ६* ह्यामध्ये छापली आहेत. पदांमध्ये 'एका जनार्दनांचा' गुरू म्हणून वारंवार उल्लेख येतो. प्रपंचात राहून परमार्थ करणाऱ्या मुमुक्षूंसाठी त्यांनी नाममहिमा, जन्ममृत्युजराभय, गुरुप्रेम, नरदेहाचे सार्थक्य इत्यादी अनेक विषय ह्या कवितेत चर्चिले आहेत. ही पदे रागदारीत रचली आहेत. त्यांतील भक्ती व जिव्हाळा उल्लेखनीय आहे. नमुन्यादाखल त्यांचे हे एक पद पहा : "टाकुनि मजला कुठें तरि गेला, सांवळा माधव बाई ॥ १ ॥ वियोगदुःखें व्याकुळ केलें स्मरण तनुचेंहि नाहीं ॥ २ ॥ वृक्षा पाषाणासि पुसतसे, तूं कधीं देखिला कीं काई ॥ ३ ॥ खग नग मृग हो तुम्हि तरि सांगा होत्ये जिवाची या लाही ॥ ४ ॥ जो व्यापक बाह्यांतरिं त्र्यंबक एका जनार्दना सुखदाई ॥ ५ ॥" मराठी कवितेप्रमाणे ह्यांची हिंदी रचनाही दर्जेदार आहे.

**रचना : मु.** – १. पदे – ७; संपा. ओक, वा. दा.; कासं. ४४; पृ. ६५–६९; २. पदे ९; संपा. ओक, वा. दा.; पदसंग्रह, भा. १, पृ. ६१–६५; ३. पदे – १७ (पैकी ५ हिंदी); संपा. भालेराव, भा. रा.; मकच. खं. ६, पृ. २४०–२४६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** संपा. आजगांवकर, ज. र. : संग्रा. भालेराव, भा. रा. : त्र्यंबक अनंत; मकच. खं. ६, मुंबई, १९२४; पृ. २३६–२४६.

**त्र्यंबक कविसुत** [का. अनु.] कवी. ह्यांचे एक गुरुपर पद वा. दा. ओक संपादित *पदसंग्रहा*त (भा. ३) मुद्रित (पृ. १०७).

**त्र्यंबक कांटे** [का. अनु.] कवी. *प्रल्हादचरित्रा*चा कर्ता. हा त्र्यंबक कवी मध्वमुनि-शिष्य *प्रल्हादचरित्र*कर्त्या त्र्यंबकाहून वेगळा आहे. ग्रंथात कवीची जी चरित्रविषयक माहिती सापडते त्यावरून कवीचे नाव त्रिंबक व उपनाव कांटे. हे कौशिकगोत्री, ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्यांच्या घराण्याकडे मांडवगडचे देशपांडेपण होते. गोपाळकृष्ण हे ह्यांचे कुलदैवत. गोपाळ हे ह्यांचे गुरू, असे कळते. हे कवी माध्वसंप्रदायी होते असे म्हणण्यास त्यांच्या काही कन्नड पदांतून आधार सापडतात. ग्रंथाची रचना गुरूच्या सांगण्यावरून केली असे कवी म्हणतो. काव्यातील कवीच्या उद्गारांवरून हा कीर्तनकार कवी आहे असे दिसते. डॉ. पंडित आवळीकर ह्यांना उपलब्ध झालेल्या कवीच्या *प्रल्हादचरित्रा*तील कित्येक पाने गहाळ झाल्याने ग्रंथात अपुरेपणा आला आहे. अखेरचा भाग उपलब्ध नसल्याने लेखनकाल समजू शकत नाही. त्यामुळे कवीच्या काळाचा अंदाज लागत नाही.

त्र्यंबकांचे *प्रल्हादचरित्र* बरेच मोठे असून त्याचे २००० हून अधिक श्लोक आहेत. आख्यानात उपाख्याने असा रचनेचा हरदासी थाट दिसतो. नृसिंहाच्या गर्जनेचे कवीने जे वर्णन केले आहे त्यावरून त्याच्या ठिकाणी असलेल्या श्रेष्ठ दर्जाच्या कवित्वशक्तीची साक्ष पटते. कशी ते पहा : "खचिति अचल मेरू विंध्य मांदार धोत्रें । रविशशि भुलले हो वाट व्योमांस कैसे ॥ तुटति तटतटां त्या दिव्य नक्षत्रमाळा। रिचविति क्षितिगर्भी ज्यापरी पावसाळा ॥ ८७७ ॥" 'कांहितरि तरावया गावें' असा काव्यरचनेचा हेतू असला तरी काव्यात रसालंकाराचे हृद्य स्वरूप दिसते. त्र्यंबकाच्या काव्यावर वामनपंडितांच्या शैलीची छाप पडली आहे. पाल्हाळ, औचित्याचा अभाव असे काही दोष सोडल्यास कवीची रसनिर्मितिक्षमता फारच चांगली आहे, असे जाणवते. कन्नड, हिंदी ह्या भाषांवर प्रभुत्व असून देखील ह्यांची मराठी कविता शुद्ध आहे. वरील आख्यानांखेरीज ह्यांनी *द्रौपदी-दुर्वास आख्यान, श्रीकृष्ण-उद्धव आख्यान,* कानडी व हिंदी पदे अशी रचना केली आहे. ही सर्व रचना अप्रकाशितच आहे.

चरित्र, चर्चा, अभ्यास : आवळीकर, पंडित : त्र्यंबककृत 'प्रल्हाद-चरित्र'; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. २८५–३०२.

**त्र्यंबक चौंडाजी** [का. अनु.] कवी. कवीचा पिता गंगाधर हा तंजावरच्या व्यंकोजी राजाचा मुख्यप्रधान व प्रख्यात कवी होता. पित्याप्रमाणेच त्र्यंबक चौंडाजींचे संस्कृत व मराठी ह्या भाषांवर प्रभुत्व होते. ह्यांची *प्रातः स्मरामि नामावळी* (ओ. ७५) अशी एक रचना प्रसिद्ध झाली आहे. भक्ताने प्रातःकाळी उठल्याबरोबर कोणकोणत्या देवदेवतांचे, तीर्थांचे, महापुरुषांचे स्मरण करावे ते ह्यात सांगितले आहे. ह्या ईश्वरस्मरणाने होणारा आध्यात्मिक लाभ कोणता हेही कवी भाविकपणे सांगतो.

**रचना :** मु. – प्रातः स्मरामि नामावळी; ओ. सं. ७५; संपा. भीमराव, टी. आर.; तंसम. त्रैमा. १९६६ : १, पृ. १-७.

**त्र्यंबक ज्योतिर्विद** [इ. स. च्या १७ व्या शतकाची अखेर] तंजावरकडील नाटककार. व्यंकोजीचे विद्वान पुत्र शहाजी राजे ह्यांचा हा आश्रित होता. ह्याने शहाजीराजांच्या जीवनावर *राजकन्यापरिणय* (ग्रं. सं. २२४) असे नाटक लिहिले आहे. तंजावरकडे विपुल नाटकांची निर्मिती झाली. भरताच्या नाट्यशास्त्रात सांगितल्याप्रमाणे ह्या नाटकांतून संगीत, नृत्य व नृत्त अशा तीन प्रकारांचे संमीलन आढळते. *राजकन्यापरिणय* हे नाटकही वरील प्रकृतीचेच असावे. ते अद्यापि मुद्रित झालेले नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** शेंडे, सरोजिनी नारायण : मराठी नाटकांची नांदी; मसंप., ऑक्टो. १९६९; पृ. १–१३.

**त्र्यंबकदास** [का. अनु.] आरतीकार. देवीची आरती (संककासू., पृ. ४५).

**त्र्यंबक पुराणिक** [का. अनु.] ग्रंथकार. कामशास्त्रावरील ग्रंथाचा कर्ता. ह्यांचा *रसिकरंजनी* नावाचा ४०८ ओव्यांचा कामशास्त्रावरील ग्रंथ तंजावर सरस्वती महाल हस्तलिखित संग्रहात सापडतो (बा. १९२३; हस्त. यादी, क्र. २).

**त्र्यंबकबुवा** [का. अनु.] कवी. रमावल्लभदासांचे नातू. ह्यांची काही किरकोळ कविता सापडते असा निर्देश *महाराष्ट्रसारस्वता*च्या पुरवणीत केला आहे (मसा., आ. ५, पृ. ८०१).

० **त्र्यंबक भंगी** – पहा भंगी.

**त्र्यंबक भट्ट** [का. अनु.] तंजावरस्थ कवी. तंजावरच्या प्रतापनृपतीने कळीच्या लीळा पाहून, "आज्ञापिला स्वपुराणिक । जो जाणत असे लौकिक वैदिक ॥ प्रसिद्ध त्र्यंबक लोकांमाजि ॥ २० ॥" म्हणून ह्या कवीने *कलिधर्मप्रशंसा* ग्रंथाची रचना केली. *विष्णुपुराण, महाभारत, कूर्मपुराण, भागवत, रामायण* ह्यांचा आधार घेऊन ग्रंथातील अभिप्राय विशद केला, असे कवी सांगतो.

**रचना :** अमु. – कलिधर्मप्रशंसा; ओ. सं. ७४०; तंसम. बा. ८९२; हस्त. यादी, क्र. १.

**त्र्यंबक-भूपति** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – देवीपर, तुळजाभवानीपर श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**त्र्यंबकमहादेव** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – नासिक त्र्यंबक; गद्य; तंसम. यादी, क्र. ३.

**त्र्यंबकराज** / ० **त्रिंबकराय** / ० **त्र्यंबक–५** / ० **त्र्यंबकस्वामी** [१५ व्या शा. शकाच्या शतकाची अखेर / इ. स. १६ व्या शतकाचा उत्तरार्ध] कवी व प्रणवोपासनाप्रधान पराविद्येचे प्रवक्ते. सिद्धेश्वर संप्रदायाचे संस्थापक. हे सांतत्यगोत्री माध्यंदिनशाखीय यजुर्वेदी ब्राह्मण. घराणे अंबेचे उपासक. ह्यांचे मूळ गाव कोल्हापूर. ह्यांच्या वसतिस्थानाबद्दल निश्चित माहिती मिळत नाही. ते मुल्हेरीस (जि. नाशिक) राहात अशी आख्यायिका आहे. ह्यांच्या पित्याचे नाव भैरव, आईचे नाव अंबावती. भैरव ह्यांना तुळजाभवानीच्या कृपेने नृसिंह, त्र्यंबक व कौंडण्य असे तीन पुत्र लाभले. त्र्यंबकांच्या जन्माची हकीकत चमत्कारपूर्ण अशी आहे. भैरवांस बराच काळपर्यंत संततिलाभ झाला नाही. ह्यास्तव त्यांनी तुळजापूर येथे जाऊन भवानी देवीपाशी मंत्रजपपूर्वक अनुष्ठान केले. नवव्या रात्री भवानीने प्रसन्न होऊन, प्रसाद म्हणून त्यांच्या हातात एकामागून एक अशी तीन फळे ठेविली. 'ह्यांचे सेवन केल्याने तुला तीन पुत्रांची प्राप्ती होईल', असा तिने त्यांना वर दिला. दुसरे फळ त्यांच्या हातात ठेवीत असता ती म्हणाली, "हे फळ शुधांशु । याचा मानि तुं विश्वासु । शोभा पावैल वंसु । येणें फळें ॥ २७ ॥ पुत्र जालेयां केवळ । करी देखसी त्रीशूळ । ते ज्ञानगर्भ महाफळ । माझें वरद ॥ २८ ॥ यांवरि मौन्य धरुनि । तिजें वोपीलें पाणि । पुनरपी प्रसन्नवदनी । अंबा बोले ॥ २९ ॥ तिहिं फळां एक रसु । मधील तो माझा अंशु । याचा गर्भि प्रकाशु । योगनिधीचा ॥ ३० ॥" पुढे, यथासमयी, त्र्यंबकाचा जन्म झाला. त्यावेळी, भवानीमातेने 'त्रिशुळाची' सांगितलेली खूण खरोखरीच आहे किंवा काय ह्याचा पडताळा पाहण्यासाठी भैरवांनी त्याच्या हाताचे तळवे पाहिले, तो खरोखरीच 'तिन्ही रेखा विसाळें । ऐसें देखीलें त्रीशूळें । दोहिं करु ॥ ३७ ॥' होते. भैरव व त्यांची पत्नी अंबावती ह्यांनी ताडले की, हा आपला द्वितीय पुत्र पूर्वजन्मींचा कोणी तरी योगी असावा. त्र्यंबकराजांनी ही सारी हकीकत स्वतःच आपल्या *बालबोध* ह्या ग्रंथात (खं. ३, २२–२७) सांगितली आहे.

त्र्यंबकराजांच्या वडिलांनी, आपला हा पुत्र योगी बनणार असा विचार करून, त्यांच्या शिक्षणाकडे विशेषसे लक्ष दिले नाही; इतकेच काय पण त्याचा, यौवनकाळ प्राप्त झाल्यावर, विवाहही करून दिला नाही. पुढे भैरवांच्या मृत्यूनंतर त्र्यंबकराजांनी स्वतःच स्वावलंबनाने थोडेबहुत विद्यासाधन केले व विवाह करून 'गृहस्थधर्म' विस्तारला. आपल्या आई-वडिलांना योगी कोणाला म्हणतात ह्याचा उमग नीट न पडल्यामुळे दोघेही भ्याली, हे सांगून (*बालबोध*, खं. ३. ५६) ते म्हणतात : "जीवा ईश्वरा संयोगु । द्वैतभेदाचा त्यागु । यासी बोलिजे राजयोगु । हा स्मरु त्या नाहीं ॥" श्रीज्ञानदेवांच्या कालापासून, पराविद्येच्या साधनेसंबंधीची जी एक नवीन तत्त्वसरणी महाराष्ट्रात उदयास आली तिचे दर्शक असे हे त्र्यंबकराजांचे उद्गार आहेत. साधनेसाठी गृहप्रपंचाचा त्याग करून श्रीशंकराचार्यप्रणीत संन्यासयोगाचा आश्रय करण्याचे कारण नाही; भक्ती, ज्ञान व कर्म ह्यांचा समन्वय साधून वृत्ती निरासक्त बनवून आत्मोन्नती व ईश्वरप्राप्ती करून घेता येते, ही विचारधारा ह्या काळी महाराष्ट्रीय संतांत दृढमूल व प्रभावी झालेली होती. त्र्यंबकराज ह्याच विचारधारेचे अनुसरण करणारे राजयोगी होते.

त्र्यंबकराजांचे प्रापंचिक जीवन सुरू झाल्यावर, आत्मकल्याणार्थ पराविद्येचे ज्ञान होणे आवश्यक आहे असे त्यांस वाटू लागले. उपनिषदादी ग्रंथांचा अभ्यास त्यांनी सुरू केला. आपला विद्वान ज्येष्ठ बंधू नृसिंह ह्याजकडून त्यांनी मंत्रोपदेश घेतला व पुढे कोणा कमळाकर नावाच्या ज्ञानी पुरुषाकडून ज्ञानोपदेशही घेतला. अनेक संत-सज्जनांच्या त्यांनी भेटीगाठी घेतल्या व ज्ञानसंवादही केले. परंतु त्यांच्या चित्ताला जेवढे समाधान मिळावे तेवढे मिळेना. कोणाच्याच सांगण्यावर त्यांचा विश्वास बसेना. तेव्हा त्यांनी चंडीची उपासना सुरू केली. ती सुरू केल्यापासून सोळावे रात्री "वरुशां पांचाची कुमारी । मिरवली सर्वे शृंगारीं । भासली डोळां ॥ ७० ॥ ते प्रसन्नवदन दक्षिणभागीं । उभी राहोन बोले वेगीं । तुझें फल आहे सप्तशृंगी । लाहासी तेथें ॥ ७१ ॥" (*बालबोध*, खं. ३). ही सूचना मिळाल्यावर त्र्यंबकराज सप्तशृंगीस गेले. "तेथे माहामायेचा रहिवासु । म्हणौनि नांदे श्रीसीधेशु । येणे द्वारें सर्वसु । उधरे जगु ॥ ७३ ॥ तें जालयां प्राप्त स्थान । नेमस्त ठालों धरुनि ध्यान । तंव

तृतीयेचि रात्री प्रसन्न । जालि अंबा ।। ७४ ।। पूर्विची वरु होता कांहीं। येथ संदेहो न पडेचि पांहि । ते महीशमर्द्दिनीहि । प्रसन्न जाली ।। ७५ ।। ते कृपावछळ भवानि । करें स्पर्शलें वदनि । मति उठलि तेथुनि । अकस्मात ।। ७६ ।। माग म्हणौनि देवी बोले । तों ब्रह्मज्ञान स्मरलें । तत्समई तेंचि मागीतलें । जगन्माते ।। ७७ ।। पाठि ब्रह्म शुचिकें स्थळें । अंबे निरोपीली सकळें । आणिकहि तये वेळे । आश्चर्य जालें ।। ७८ ।। जो ब्रह्ममूर्ति आकारु । तोहि प्रसन्न जाला सिधेश्वरु । मस्तकिं ठेविला करु । द्विजवेषें ।। ७९ ।। तेणें देवें त्रीलोचनें । मज उपदेशीलीं पांच वचनें ।।' (*बालबोध*, खं. ३). सिद्धेश्वरांनी उपदेशिलेल्या ह्या पाच वचनांचे, अनेक ग्रंथांच्या आधारे, विस्तारपूर्वक विवेचन करणारा *बालबोध* हा ५२४० ओव्यांचा ग्रंथ, जगदंबेच्या आज्ञेवरून, त्र्यंबकराजांनी पुढे रचला.

शाश्वत सुखाचा आणि आनंदाचा लाभ होऊन जीवनात अखंड शांती नांदत राहावी ह्याविषयीची आस अनेक जीवांना लागलेली असते. ही शांती जीवात्मा आणि परमात्मा ह्यांचे ऐक्य घडल्यानेच प्राप्त होईल, असे, तिची प्राप्ती ज्यांना घडली ते सिद्धपुरुष आजवर सांगत आले आहेत. हे ऐक्य कोणत्या मार्गाचा अवलंब केला असता साधता येईल ? ह्या साहजिकच विचारल्या जाणाऱ्या प्रश्नाला ह्या सिद्धपुरुषांनी, स्वानुभवाच्या आधारे, निश्चित उत्तरेही दिली आहेत. त्यांनी, प्रामुख्याने, दोन उपासनामार्ग सुचविले आहेत. एक सगुणोपासनेचा व दुसरा निर्गुणोपासनेचा. त्यातील पहिला हा अलीकडील असून, दुसरा अतिपूर्वकालापासूनचा – उपनिषत्कालापासूनचा – आहे. ह्या दोन मार्गांचा समन्वय साधून आणखी तिसराही एक मार्ग सुचविण्यात आला. हा मार्ग म्हणजे 'प्रणवोपासने' चा.

ह्या उपासनेला ओंकारोपासना अथवा नादोपासना असेही म्हणतात. ह्या उपासनेत सगुण व निर्गुण ह्या दोन्ही उपासनांचे गुण आहेत. त्रिंबकराज ह्याच उपासनामार्गाचे पुरस्कर्ते व प्रवर्तक होते. 'स्वतः सिद्धेश्वराने (श्रीशंकराने) ह्या मार्गाचे ज्ञान आपल्याला दिले; तेच आपले गुरू,' असे हे सांगतात. ह्या मार्गाचा अवलंब केल्याने "संसारातला स्वाद घेत असतांनाही सर्वेंद्रियांत ब्रह्मानंद भरून वोसंडतो. ' फुल फळपणें सरे । आमोदु सन्मंधी उरे । तेवीं आजन्मपर्यंत बा रे । सुखचि सर्व ।" असे ते सांगतात. ह्या सिद्धेश्वरोपदिष्ट मार्गाचा प्रसार करून, ' जे अन्यथाज्ञानें वर्त्तत । सर्वभावीं ब्रह्मरहित ' अशा प्रौढ असूनही सत् ज्ञानाच्या अभावी 'बाळ' असणाऱ्या लोकांस बोध करून प्रबोधन घडवून आणण्यासाठी, सिद्धेश्वराच्या व जगदंबेच्या आदेशानुसार, त्र्यंबकराजांनी *बालबोध* अथवा बाल*वबोध* ह्या ग्रंथाची रचना, श. १४९४–१५०२ / इ. स. १५१७–१५८० ह्या काळात केली. [ ⇨३.] त्यात विवेचिलेली तत्त्वसरणी अनेकांना मान्य होऊन, पुढील दीडदोनशे वर्षांच्या काळात, निरंजन माधवांसारखे अनेक प्रबुद्ध साधक निर्माण झाले. हा साधकवर्ग, महाराष्ट्रात, 'सिद्धेशमतसंप्रदायी' म्हणून ओळखला जाऊ लागला.

ह्या प्रमुख ग्रंथाशिवाय *त्र्यंबकी* नावाचा आणखी एक ग्रंथ त्र्यंबकराजांच्या नावावर उल्लेखिला जातो. *त्र्यंबकी* नावाचा १२९ रोगांवर औषधोपचार सांगणारा जो एक प्राचीन श्लोकबद्ध मराठी वैद्यक-ग्रंथ प्रसिद्ध आहे तो ह्या त्र्यंबकराजांचाच असावा असे काहींचे म्हणणे पडते. *बालबोध*कार त्र्यंबकराजांप्रमाणेच ह्या ग्रंथाचाही कर्ता कोल्हापुरनिवासीच आहे. आपल्या ग्रंथाच्या शेवटी त्याने "केलें वैद्यकशास्त्र सुंदर बरें ग्रामीं पयोष्णीतिरीं ।। बोले त्र्यंबकराजराजित सदालंकार कोल्हापुरीं ।। " असे म्हटले आहे.

ह्या संदर्भात अधिक विवेचन करताना प्रा. म. रा. जोशी म्हणतात : वैद्यकीवरील त्र्यंबकाचा ग्रंथ प्रसिद्ध असून त्याच्या प्रती महाराष्ट्रात ठिकठिकाणी आढळतात. ह्या *त्र्यंबकी* ग्रंथाचे दुसरे नाव *वैद्यजीवन* असे आहे. हा ग्रंथ रचणारा *त्र्यंबक*, सिद्धेश्वर संप्रदायाचा प्रवर्तक व *बालबोध* ग्रंथाचा कर्ता त्र्यंबकराज होय. *बालबोधा*नंतर त्यांनी ह्या ग्रंथाची रचना केली (र. श. अंदाजे १५०२–१५०५ / इ. स. १५८०–१५८३). *वैद्यजीवन*कर्ते लोलिंबराज हे ह्यांच्या शिष्यपरंपरेतील असावेत असेही मत प्रा. जोशी व्यक्त करतात (विसंमंवा., १९७४, पृ. २०६–२०७).

**रचना : मु.** – १ बालबोध; खं. ३, कथने ४५; ग्रं. सं. ५२४०; र. श. : १४९४ ते १५०२; संग्रा. चांदोरकर, गो. का.; धुळे, १९१३; २. त्र्यंबकी – वैद्यक-ग्रंथ; श्लोक १३२; ग्रंथसमाप्ती : चैत्र शु. प्रतिपदा, शके १५००; संपा. केमकर, मु. ए.; मुंबई, १८९१; ३. स्फुट : अंबेची आरती; मआ., पृ. ३६६–३६७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, म. रा. : त्र्यंबकशिष्य लोलिंबराज; विसंमंवा., १९७४; पृ. २०४–२०९. २. पांगारकर, ल. रा. (संपा.) : बालबोधकर्ते त्र्यंबकराज; मवाइ., खं. २; नाशिक, १९३५; पृ. ५०५–५१८. ३. पोतदार, द. वा. : महानुभाव व बालबोधकर्ते त्रिंबकराज; भाइसंमंत्रै., व. १३, अं. २, सप्टें. १९३२; पृ. ६०–६३.

**त्र्यंबकसुतनंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ४५.

**० त्र्यंबकस्वामी** – पहा **त्र्यंबकराज.**

**त्र्यंबकात्मतनय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – भगवत्पर व शंकरपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० थेओतोनियु जुजे (पाद्री)** – पहा **थेओतोनियु जोसेफ.**

**थेओतोनियु जोसेफ / ० थेओतोनियु जुजे (पाद्री)** [का. अनु.] गोमंतकातील मिशनरी ग्रंथकार. ह्यांचा काळ निर्दिष्ट केलेला नाही. गोमंतकी बोलीत ह्यांनी 'ख्रिस्ती दौत्रीन' तयार केली होती. तिचा उपयोग लहान मुलांना शिकविण्यासाठी करीत. ह्या दौत्रीनीचे तीन अध्याय आहेत. त्यांपैकी पहिल्यात ख्रिस्ती दौत्रीनीची माहिती, दुसऱ्यात खऱ्या अर्थाने ख्रिश्चन होण्यास कोणते गुण अंगात बाणवावे लागतात ह्याची चर्चा करून तिसऱ्यात ख्रिश्चन धर्माची प्रमुख तत्त्वे, पापोच्चाटन, अशा गहन विषयांचे स्पष्टीकरण येते. ह्या तीन अध्यायांपैकी फक्त पहिलाच तेवढा गोमंतकी बोलीत असून बाकीचे दोन पोर्तुगीज भाषेत आहेत. ह्या ग्रंथाची एखादी देखील प्रत उपलब्ध नसल्याने कुंज रिव्हार ह्यांनी कोंकणी भाषेच्या इतिहासावरील त्यांच्या पुस्तकातून (गोवे, १८५८) जी काही थोडीशी माहिती पुरविली आहे त्यावरच विसंबून राहावे लागते. इ. स. १७५८ च्या सुमारास ग्रंथ मुद्रित झाला असावा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा. : थेओतोनियु जोसेफ; सशगोबो., मुंबई, १९६३; पृ. ७७.

**दगडो शिवदास** [का. अनु.] नागेशसंप्रदायी कवी. शिवदास ह्या त्यांच्या विशेषणावरून हे शिवोपासक असावेत असे वाटते. गुरू : तापीनाथ. ह्यांच्या *निर्वाणसार* ग्रंथाच्या बाराव्या प्रसंगाच्या अखेरीस आलेल्या उल्लेखावरून हे स्पष्ट होते. उदा., " ऐसें श्रीरामें प्रबोधिलें लक्षेमना। ऐक्यें जालें दोघां जनां । तैसा तापीनाथाचिया चरणां । येक दगडोजी शिवदासु ।। १२. ३२ ।।" दगडोजींचे नागेशपंथीयत्व त्यांनी मंगलाचरणात केलेल्या नागेशनमनावरून उघड होते (ओ. क्र. ४).

ह्यांचा *निर्वाणसार* हा ग्रंथ ओवीबद्ध व अध्यात्मपर आहे. त्याचे बारा प्रसंग आहेत. ह्या ग्रंथात राम व लक्ष्मण ह्यांच्या संवादातून सर्व कथन केले आहे. ग्रंथात पिंडोत्पत्तिकथन, ब्रह्मस्वरूपनिरूपण, वैराटस्वरूपवर्णन, पंचप्रळयनिरूपण, आत्मस्वरूपदृढीकरण, राजयोगनिरूपण, समाधिस्थितिकथन, इत्यादी महत्त्वपूर्ण विषयांचे विवेचन आले आहे. " जयासी घडे गुरुसंगति । तयासी नाहीं पुनरावृत्ति । येर ते नाना योनि भ्रमति ।

कर्मद्वारें।। ६.६३ ।। " असा स्पष्ट इशारा कवी देतो. ग्रंथात गुरुभक्तीचे सूत्र कवीने कोठेही सुटू दिलेले नाही. ग्रंथ त्रुटित स्वरूपात रा. चिं. ढेरे ह्यांच्या संग्रही आहे. गो. का. चांदोरकर ह्यांच्या संग्रही असलेल्या ह्याच ग्रंथाच्या नक्कलप्रतीचा काळ श. १६९१ (इ. स. १७६९) असा दिला आहे (संककासू., पृ. ४५).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : दगडोजी शिवदास, निर्वाण-सार; ग्रामनद्या., कोल्हापूर, १९७२; पृ. १४७–१४८.

**दत्त–१** [अंदाजे श. १७३० / इ. स. १८०८] कवी. हे स्वतःस एकनाथसुत म्हणवितात.

**रचना : अमु.** – १. गुरुचरित्र (र. श. १७३०); वि. ल. भावे संग्रह; २. चिलयाचरित्र; अ. ३४; ३. निरंजनाष्टक (सासवड मठ) व स्फुट श्लोक; संककासू., पृ. ४५.

**दत्त–२** [इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध व १८ व्या शतकाचा पूर्वार्ध] रामदासी कवी. भारत इतिहास संशोधक मंडळातील क्र. ४५७ चे बाड फक्त ह्या एकाच कवीचे आहे. बाडातील कविरचित आत्मचरित्रपर पदांवरून ह्यांची वैयक्तिक माहिती मिळते. हे सातारा जिल्ह्यातील अतीत नामक गावचे ऋग्वेदी, विश्वामित्रगोत्री ब्राह्मण. पित्याचे नाव जनार्दन व मातेचे नाव गिरिजा. ह्यांनी आपल्या गुरूचे नाव विठ्ठलदास असल्याचे आपल्या एका पदात नमूद केले आहे. 'निरालंब सुखस्वामी विठ्ठलदास । दत्ताचा विश्वास तये ठायीं ॥' श्रीसमर्थ > विठ्ठलदास > दत्त अशी ह्यांची परंपरा आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या बाडात सुमारे १६४ स्फुट रचना – पदे व अभंग – आहेत. साधकाची आर्तता, तसेच अनुरागाच्या भूमिकेतून देवाची केलेली आळवणी व त्यातून प्रकट होणारी उत्कंठा, उत्कटता, विकलता आणि जीवशिव ह्यांच्या मीलनप्रसंगी घडणारे मानसिक स्थित्यंतर, ह्यांचे दर्शन त्यांच्या कवितेतून घडते.

'बाई ये गे । राघवापायी गुंतला माझा हेत । आनु बैसेना कोठे चित्त।' अशा स्थितीत असताना बोधाचा उजाळा लवकरच प्राप्त झाला. " रूप पाहतां रूपा नये । ऐसें जालें मी सांगों काये ॥ दत्त विस्मित मनीं जाला । दास विठ्ठलीं विराला ॥" असा साक्षात्काराचाही अनुभव कवी शब्दांकित करतो. गुरुमहिमा व नामस्मरण ह्यांचे महत्त्व त्याने विशद केले आहे. रामदासांचे प्रशिष्य असल्याने त्यांच्या विचारांचा प्रभाव ह्यांच्यावर पडलेला आहे. रामचरित्राप्रमाणे कृष्णचरित्राचेही गुणगान तितक्याच समर्थपणे हा कवी करतो. ह्यांच्या वाणीला अलंकारांचा हव्यास नाही. ती सोपी, प्रासादिक आणि भक्तिरसाने ओथंबलेली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नगरकर, रा. शं. : समर्थ संप्रदायातील एक अज्ञात कवि दत्त; भाइसमंत्रै., व. ४६, अं. १–४, १९६८; पृ. ४८–५४.

**० दत्त अवधूत** – पहा दत्तात्रेय–३.

**दत्त कवी** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. ह्याने वसंततिलका वृत्तात गुंफून एक कल्पित गोष्ट सांगितली आहे. त्यातील काही भाग प्रसिद्ध झाला असून कथा मनाने कल्पून लिहिली असल्याने, ह्या रचनेचे महत्त्व आहे (मसा., आ. ५, पृ. ४६३).

**० दत्तचिन्मय** – पहा चिन्मय–२.

**दत्तचैतन्य** [श. १४ व्या शतकाचा पूर्वार्ध / इ. स. च्या १४ व्या शतकाची अखेर] नागेशसंप्रदायी कवी. गुरू : अज्ञानसिद्ध नागेश. ह्यांचे वास्तव्य नरंदे (जि. कोल्हापूर) ग्रामी असे. ह्यांनीच अज्ञानसिद्धांची समाधी बांधली. हे पदपदांतरे रचीत अशी माहिती भानजी (भास्कर) त्र्यंबक देशपांडेकृत *नागेशलीलामृता*वरून मिळते. उदा., "दत्तचैतन्य समर्थ थोर। तयांनी करोनी पदपदांतर । स्तवनी स्तविला नागेश्वर । पटता पार जन होती ॥ ३४. ९३ ॥ " ही माहिती डॉ. पंडित आवळीकर ह्यांनी *नागेशलीलामृत* ह्या प्रसिद्ध ग्रंथाधारे दिली आहे (जुवानसं., धारवाड, १९६४, पृ. ६).

**दत्तदास–१** [अंदाजे श. १७७९ / इ. स. १८५७] कवी. हे पैठणच्या उत्तरेस दोन योजने दूर असलेल्या पिंपरी गावच्या कुळकर्ण्यांच्या घराण्यातील. ह्यांनी आपला *सीतास्वयंवर* ग्रंथ (अ. १८) श. १७७९ च्या आश्विन शु. दशमीस लिहून पूर्ण केला (सवामं. बा. ४२२).

**दत्तदास–२** [का. अनु.] महानुभाव कवी. *महानुभावीयांच्या ओव्या* असे शीर्षक देऊन दत्तदास कवीने रचलेल्या १५२ ओव्या डॉ. यू. म. पठाण ह्यांनी प्रसिद्ध केल्या आहेत. जात्यावर दळणाऱ्या दोन स्त्रियांचा संवाद ह्या ओव्यांतून रंगविलेला आहे. प्रारंभी महानुभावीय पंचकृष्णांना कवीने वंदन केले आहे. कवीचा गुरुविषयक आदर अनेक ओव्यांतून व्यक्त झाला आहे. "ज्ञान आणि भक्ती। विचार निगुती। दोघी जनी गाती । निपुण त्या ॥ ५९ ॥ " असे गुरुभक्तीचे गाणे त्या दोघी गात आहेत. १०९ क्रमांकाच्या ओवीत "गुरुची महिमा । नकळे जीवाशी । तया शारंगधराशी । दंडवत ॥ " असे कवी म्हणतो. हे शारंगधर कोण ते निश्चितपणे कळत नाही. गुरूच्या कृपेनेच परमार्गाचे हे स्तोत्र आपण गायिले, असे शेवटच्या ओवीत कवीने निवेदन केले आहे.

**रचना : मु.** – महानुभावीयांच्या ओव्या : दोघींचा संवाद; ओ. सं. १५२; संपा. पठाण, यू. म.; महानु., फेब्रु.–मार्च १९७२, पृ. ३१–३४, २६–३६.

**दत्त-दिगंबर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ४६.

**दत्तनाथ उज्जनीकर** [ ? – समा. श. १७७१, आश्विन शु. ९ / इ. स. १८४९] नाथपंथीय कवी. राक्षसभुवन येथे राहणारे. भारद्वाजगोत्री, माध्यंदिनशाखी यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. उपनाव कापसे. वडिलांचे नाव नारायण. हे दत्तोपासक होते. आईचे नाव लक्ष्मीबाई. हिने पुत्रप्राप्तीसाठी राक्षसभुवन येथील नाथपंथी साधू अनंतनाथ ह्यांची सेवा केली. त्यांच्या कृपेने तिला पुढे जो पुत्र झाला तो तिने अंतोबा-दादांस अर्पण केला. हेच प्रसिद्ध कवी दत्तनाथ होत. ह्यांनी २४ वर्षे अनंतनाथांजवळ राहून कडकडीत ब्रह्मचर्य पाळून योगविद्येत प्रावीण्य मिळविले. ह्यांची परंपरा निर्दिष्ट करणारी बरीच पदे ह्यांच्या अप्रसिद्ध कवितेत आढळतात. त्यावरून पैठणच्या जनार्दनस्वामी व एकनाथ ह्यांच्याच परंपरेशी त्यांचा संबंध आहे असे दिसून येते. हे गृहस्थाश्रमी होते. गुरू अनंतनाथ समाधिस्थ झाल्यानंतर दत्तनाथ तीर्थाटन करण्यास निघाले. फिरता फिरता ते उज्जनी मुक्कामी आले. रोज कीर्तन करण्याचा ह्यांचा प्रघात होता. ह्या कीर्तनामुळेच महादजी शिंदे ह्यांचा त्यांच्यावर लोभ जडला. हे महादजींबरोबर उत्तर हिंदुस्थानात गेले होते. पाथरगडच्या लढाईत ते महादजी शिंद्यांबरोबर हजर होते. तेथून ह्यांनी आणलेले ढोल अद्यापि उज्जनी येथील त्यांच्या मठात आहेत. पुढे उज्जनीस मठ बांधून हे तेथेच वास्तव्य करून राहिले. हे मोठे सिद्धपुरुष व भविष्य वर्तविणारे होते. महादजींकडून ह्यांच्या मठाला वार्षिक उत्पन्न होते. पुत्र नसल्याने मठाची परंपरा ह्यांनी आपल्या मुलीच्या वंशाकडे सोपविली. हे दीर्घायुषी होते. वयाच्या १३६ व्या वर्षी ह्यांनी उज्जनी क्षेत्री समाधी घेतली, असे सांगितले जाते.

ग्वाल्हेरचे प्रसिद्ध साधुपुरुष महीपतिनाथ ढोलीबुवा ह्यांचा व दत्तनाथांचा स्नेहसंबंध होता. ग्वाल्हेरला स्थायिक होण्यापूर्वी हे कित्येक वर्षे उज्जनीला दत्तनाथांजवळच होते. महीपतिनाथांचा ग्वाल्हेरचा मठ ढोलीबुवांचा मठ म्हणून प्रसिद्ध आहे. दत्तनाथांच्या कवितेची कित्येक बाडे उज्जनी येथील त्यांच्या परंपरेच्या मठात व ग्वाल्हेर येथील ढोलीबुवांच्या मठात आहेत. उज्जनी मठातील काही बाड त्यांच्या स्वतःच्या हस्ताक्षरातील आहेत. स्फुट पदे, पोवाडा, लावणी,

गौळणी, धावा, अभंग, ओव्या, श्लोक अशी विविध स्वरूपाची ही रचना आहे. त्यात नाथसांप्रदायिकांप्रमाणे गुरुभक्ती, गुरुवर्णन, गुरुकृपा, योगमार्गाचे वर्णन, समाधिस्थितीतील अनिर्वचनीय अनुभूतीचा अनुभव, ह्यांचे वर्णन येते. पारमार्थिक रचनेमधला तोचतोपणा, विषयवैचित्र्याचा अभाव आणि ठराविक साच्याचे अलंकरण ह्या कवितेत दिसते. अशाच स्वरूपाच्या इतर रचनांत आढळणारी प्रासादिकता ह्यांच्याही कवनात आढळते.

दत्तनाथांच्या *घनानंद वृत्ति* (र. श. १७६६ / इ. स. १८४४) व *आनंद वृत्त – कथासार* (र. श. १७४३ / इ. स. १८२१) अशा दोन ग्रंथात्मक रचना असल्याचे बा. ना. मुंडी निर्देशित करतात (मराठ. संशो. मं. बा. १९७४, पृ. ६०). ह्यांची काही पदे ज. र. आजगांवकर ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत (मकच., खं. ६, पृ. २३१–२३५).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : दत्तनाथ; मकच., खं. ६, मुंबई, १९२४; पृ. २२३–२३५. २. भालेराव, भा. रा. : दत्तनाथ उज्जनीकर; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. १०२–१०३. ३. मुंडी, बा. ना. : मूळ पैठणचे एक संत श्री दत्तनाथ उज्जनीकर : व्यक्ती आणि साहित्य; मराठवाडा संशोधन मंडळ वार्षिक, १९७४; पृ. ५६–६४.

**दत्तप्रसिद्ध** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ४६.

**दत्तमुकुंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. रामायण उत्तरकांड, पोथीपत्रे ९५; २. रामायण : सुंदरकांड, पोथीपत्रे २००; श्लोकबद्ध; सवामं. बा. १८१८; हस्त. सू., खं. २.

**दत्तराज पातूरकर** [का. अनु.] महानुभाव कवी. ह्यांनी रचलेल्या *गुरुद्रोह्याच्या ओव्या* ह्या प्रकरणात शेवटी आपला नामोल्लेख केला आहे. त्या ओव्या अशा : "पातुर उपनाम । आळवी समस्त । योगिया महंत । नमीएलें ॥ ८० ॥ ऐसे हे आख्यान । द्रोहीयाचे जाण । नेणता दत्तुने । वर्णिएलें ॥ ८१ ॥"

गुरुद्रोह कधीच करू नये, कारण गुरुद्रोह्याकडे परमेश्वर नेहमीच पाठ फिरवितो. अधम व्यक्तीला गुरुमहिमा न समजल्याने तिचे अज्ञान केव्हाही दूर होत नाही. असे विचार कवीने ह्या प्रकरणात व्यक्त केले आहेत.

**रचना : अमु.** – गुरुद्रोह्याच्या ओव्या; संख्या ८१; संग्रा. देशपांडे, ज. शा. : महानु., ऑक्टो. १९७३; पृ. २२–२८.

**दत्तराज मराठे** [का. अनु.] महानुभाव टीपग्रंथकार (कोशकार). महानुभावीय ज्या *साती ग्रंथांना* पूज्य मानतात त्या *साती ग्रंथांतील* कठीण शब्दांचा कोश ह्यांनी तयार केला आहे. हा कोश अकारविल्हे रचलेला नाही. त्या त्या ग्रंथात ज्या ज्या क्रमाने शब्द आले त्याच क्रमाने त्यांचा अर्थ विशद केलेला आहे. अशा कोशग्रंथास महानुभावपंथीय टीपग्रंथ म्हणतात. असे सहा महानुभाव टीपकार होऊन गेल्याचे गोपीराज महानुभाव सांगतात : (१) विश्वनाथबास बीडकर, (२) भीष्माचार्य (कोणते ते अनिश्चित), (३) चाहेव्यास बागुडे (विनायकव्यास तळेगावकरांचा शिष्य), (४) अनंतमुनी किंवा मल्लेचोरयाचक, (५) हरिंद्रमुनी पुसदेकर, (६) दत्तराज मराठे. ह्यांपैकी मल्लेचोरयाचक पहिल्या शोधनीच्या, हरिंद्रमुनी पुसदेकर दुसऱ्या शोधनीच्या व दत्तराज मराठे तिसऱ्या शोधनीच्या टीपांचे कर्ते आहेत. आज तरी शेवटच्या दोघांच्याच संपूर्ण कृती उपलब्ध आहेत. दत्तराज मराठे ह्यांचा तृतीय शोधनीचा टीप श. १६९० (इ. स. १७६८) मधील असून त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या चोरयाचक, हरिराज पुसदेकर प्रभृति टीपकारांचा त्यांनी उल्लेख केला आहे.

*सह्याद्रिवर्णनाच्या* (डॉ. वि. भि. कोलते संपादित) दत्तराज मराठे कृत टीपग्रंथाच्या समाप्तिलेखातील चार संस्कृत श्लोकांत त्यांनी आपल्या टीप-ग्रंथाची पूर्वपीठिका दिली आहे. त्यावरून 'मल्ले' घराण्यातील चोरयाचकाने तीन ग्रंथांवर व्याख्यान केले होते, ते जुने झाल्याने त्या अन्वयानुरोधाने आणि हरिराज पुसदेकर ह्यांचे व्याख्यान ऐकून त्यांचा शिष्य दत्तमुनी ह्याने सातही (साती) ग्रंथांचे व्याख्यान केले आहे, हे समजते.

डॉ. वि. भि. कोलते ह्यांच्या मते हा तिसऱ्या शोधनीचा उत्तरावस्थेचा टीप म्हणजे हरिराज पुसदेकरांच्या टीपांची वाढविलेली आवृत्ती होय. ह्या टीपांचे महत्त्वाचे वैशिष्ट्य असे की, त्यात प्रत्येक काव्याच्या आरंभी त्या काव्याच्या निर्मितीसंबंधीची *स्मृति, वृद्धाचार* ह्यांमध्ये आढळणारी किंवा परंपरागत आख्यायिका 'मूळ पीठिका' म्हणून दिलेली आहे. हरिराजाचा सप्तकाव्यांचा क्रम दत्तराजांनी बदलला आहे. *सह्याद्रिवर्णनावरील* दत्तराजांचा टीपग्रंथ डॉ. वि. भि. कोलते ह्यांनी ह्या काव्यास जोडूनच प्रसिद्ध केला आहे.

दत्तराजांचा *ऋद्धिपुरवर्णनाचा* टीप डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांनी त्याच ग्रंथास जोडून छापला आहे. ह्या दोनही टीपग्रंथांवरून प्रस्तुत टीपकार हा महानुभाव वाङ्मयात व तत्त्वज्ञानात चांगला मुरलेला व बऱ्यापैकी व्युत्पन्न असावा असे दिसते. "मूळ काव्याची पार्श्वभूमी, त्याच्या कर्त्याचे हृद्गत व त्यातील तत्त्वज्ञान समजण्याच्या दृष्टीने दत्तराज मराठे यांचा टीप निःसंशय उपयुक्त आहे." असे मत डॉ. तुळपुळे ह्यांनी व्यक्त केले आहे. ह्या *ऋद्धिपुरवर्णनाच्या* टीपग्रंथाची पोथी डॉ. तुळपुळे ह्यांना सांगवी (जि. पुणे) येथील महानुभाव मठाचे महंत श्रीकान्हेराजबुवा ह्यांच्याकडून प्राप्त झाली. ही पोथी सांकेतिक लिपीत असून ह्या पोथीत *साती ग्रंथांवरील* दत्तराज मराठे ह्यांचा टीप उतरविला आहे. प्रारंभी *वछाहरणावरील* टीप असून अखेरीस *शिशुपालवध* ग्रंथावरील टीप आहे. मूळ काव्यातील अनेक विषयांचे स्पष्टीकरण करताना टीपकाराचा व्यासंग, बहुश्रुतता, तसेच परिश्रम विशेष दिसून येतात. महानुभावीय तत्त्वार्थ स्पष्ट करताना टीपकाराने वापरलेली टीकापद्धती ही केवळ अन्वयमुखाने व्याख्यान करणारी स्पष्टीकरणात्मक पद्धती होय, रसग्रहणात्मक नव्हे, हे सहजच लक्षात येते. पंथीयेतर वाचकांना ही विशेषच उपयोगी पडते. साहित्यशास्त्रीय अभ्यासाच्या दृष्टीनेही ह्या टीपग्रंथाचे कार्य महत्त्वाचे आहे. दत्तराजांनी आपला हा ग्रंथ गिरणा नदीच्या काठी कानसी गावी श. १६९० / इ. स. १७६८ मध्ये लिहून पूर्ण केला (बा. ना. देशपांडे : *विमर्शिनी*, पृ. ५–८). डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी ह्या कोशकाराचा काल इ. स. १६ वे शतक असा दिला आहे. तेव्हा श. १६९० हा प्रतलेखनकाल की मूळ ग्रंथाचा रचना-शक ते समजण्यास साधन नाही.

*लक्षणबंध-महाभाष्य* हा दत्तराजांचा दुसरा ग्रंथ. केशवराजांच्या *लक्षणान्वय सूत्रपाठावरील* हे भाष्य होय. परमेश्वरस्वरूपाचे प्रत्यभिज्ञान देणारी चक्रधरांची १२५५ सूत्रे आहेत. श्रीमुखींच्या ह्या सूत्रांचे स्वरूप अविचलित असे आजपर्यंत अबाधितपणे कायम ठेवण्यात आले आहे. ह्यास दत्तराज मराठे ह्यांच्या *लक्षणबंध-महाभाष्यात* सांप्रदायिक पुरावा सापडतो.

**रचना : मु** – १. ऋद्धिपूरवर्णनाचा तृतीय शोधनीचा टीप; ऋद्धिपूरवर्णन; संपा. तुळपुळे, शं. गो.; पुणे–नागपूर, १९६७; पृ. १–६२; २. सह्याद्रिवर्णन तृतीय शोधनीचा टीप : सह्याद्रिवर्णन; संपा. कोलते, वि. भि.; पुणे, १९६४; पृ. १३३–१७६. **अमु.** – इतर टीपग्रंथ; २. लक्षणबंध-महाभाष्य.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कोलते, वि. भि. : टीपग्रंथ; प्रस्ता., शिशुपालवध; मलकापूर, १९६०; पृ. ७–८. २. कोलते, वि. भि. : टीपग्रंथ : त्यांचे स्वरूप; प्रस्ता., सह्याद्रिवर्णन; पुणे, १९६८; पृ. ३७–४६. ३. तुळपुळे, शं. गो. : टीपग्रंथ : दत्तराज मराठे याचा तृतीय शोधनीचा उत्तरावस्थेचा टीप; प्रस्ता., ऋद्धिपूरवर्णन; पुणे,

१९६७; पृ. ४०–४५. ४. देशपांडे, य. खु. : कोशकार दत्तराज; ममवा., पुणे, १९६०; पृ. ५१; ५. भवाळकर, नी. ब. व नेने, ह. ना. : लक्षणबंधमहाभाष्य; प्रस्ता., श्रीचक्रधर सिद्धान्तसूत्रे; नागपूर, १९३१, पृ. ५–१०.

**दत्तवरद विठ्ठल / ० अवधूतवरद / ० दत्तात्रयवरद / ० विठ्ठल–४** [अंदाजे इ. स. १७४८–१७९८] कवी. हे श्रीमंत नानासाहेब व माधवराव पेशवे ह्यांच्या कारकीर्दीत विद्यमान होते. मूळचे नगर जिल्ह्यातील अकोले गावचे राहणारे. यजुर्वेदी कात्यायनी ब्राह्मण. कवीचे उपास्य दैवत दत्तात्रेय होते. ह्या दत्तात्रेयाचे एक मंदिर आजही अकोले गावी पाहण्यास सापडते.

ह्या अप्रसिद्ध कवीची प्रचंड कविता पुणे विद्यापीठाच्या जयकर ग्रंथालयाला प्राप्त करून देण्याचे श्रेय पुण्याचे एक व्यासंगी गृहस्थ काशिनाथ पांडुरंगशास्त्री पारखी ह्यांना द्यायला हवे. सदरहू कवीचे सहाव्या पिढीतील वंशज काशिनाथ अण्णा (मु. अकोले, जि. नगर) ह्यांच्याकडून पारखी ह्यांनी कवीच्या कवितेचे हस्तलिखित बाड प्राप्त करून घेतले. ह्या बाडातील कवितेची ग्रंथसंख्या अंदाजे ६६००० एवढी आहे. काही ग्रंथांच्या अखेरीस जे शकांचे उल्लेख सापडतात त्यांवरून ही रचना श. १६६४ (इ. स. १७४२) पासून श. १७०९ (इ. स. १७८७) पर्यंत झाली असावी असे दिसते. ह्यांनी उपनिषदे, गीता आणि वेदान्तग्रंथ ह्यांचा सखोल अभ्यास केला असावा असे ह्यांच्या ग्रंथरचनेवरून वाटते. हे संस्कृतभाषाप्रभू असून ह्यांनी अनेक अष्टके व स्तोत्रे संस्कृतमध्ये रचली आहेत. *महाभारत*, *भागवत*, *रामायण* ह्यांच्यावरील प्रदीर्घ स्वरूपाच्या रचनेबरोबर *गीता (समश्लोकी)*, *गीतासार*, *ध्यानचौऱ्हासी*, *नृहरिचरित्र*, *पंढरीमाहात्म्य*, *मल्हारीमाहात्म्य*, *वामनचरित्र*, *शांडिल्योपाख्यान*, *सह्याद्रिखंड*, *हनुमंतजन्मकथा* अशा मध्यम स्वरूपाच्या रचना व त्याचबरोबर पदे, स्तोत्रे, अष्टके, टीका अशी स्फुट रचना ह्या कवीने केलेली आहे. कविता वरवर चाळली असता कवीच्या अनुप्रासयुक्त रसवती वाणीचा प्रत्यय येतो.

**रचना : अमु.** – १. अध्यात्मरामायण – बालकांड; अध्याय ८; ओ. सं. ३०४०; २. पांडुरंगचरित्र; अ. १–१२; ओ. सं. १४६०; ३. प्रबोधप्रभाकरोदय; सर्ग १८; ओ. सं. १८७५; ४. भागवत चतुर्थ स्कंध; अ. ३१; ओ. सं. ६३७७; र. का. : श. १६८२; ५. पंचम स्कंध; ओ. सं. ४०३३; र. का. : श. १६८२ / इ. स. १७६०; ६. सप्तमस्कंध; अ. १५; ओ. सं. १७३२; ७. महाभारत – **आदिपर्व** : ७००; **सभापर्व** : श्लोक, पदे, सवाया, कडाके, घनाक्षऱ्या, चूर्णिका मिळून १४०; **वनपर्व** : अ. ८; **विराटपर्व** : अ. ३; ओ. सं. १११; **उद्योगपर्व** : अ. ९; ओ. सं. ६५८; **भीष्मपर्व** : अ. ८; ओ. सं. ५८६; **कर्णपर्व** : अ. ३; ओ. सं. २२०; ८. रामायण : **बालकांड** : अ. २ ते १००; अ. १०१ ते १३८; ओ. सं. ६७३०; **किष्किंधाकांड** : अ. १–७७; ओ. सं. १३११७; र. श. १६६४, इ. स. १७४२; **युद्धकांड** : अ. १०१ ते २१८; ओ. सं. ११२०१; ९. अष्टके, पदे, प्राकृत टीका, स्तोत्रे इ.; पुणे विद्यापीठ हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. पेठे, म. प. आणि येरवडेकर, शांता : १८ व्या शतकातील एक अप्रसिद्ध कवि : दत्तवरद विठ्ठल; मसंप., जाने. १९७०, पृ. १४८.

**दत्तविठ्ठलसुत** [अंदाजे श. १६१३ / इ. स. १६९१] कवी. ह्याने सुदामचरित्रावर रचना केली आहे. ग्रंथात हा स्वतःस 'हरिदासाचा शरणांगत' म्हणवतो.

**रचना : अमु.** – सुदामचरित्र; ओ. सं. ३००; र. श. १६१३ / इ. स. १६९१; भाद्रपद शु. पंचमी, प्रजोत्पत्ति संवत्सर.

**दत्तशिष्य** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. सुंदरकांड; २. पदपदांतरे; संककासू., पृ. ४६.

**दत्तसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दत्तस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दत्ताजी त्रिमल वाकेनवीस** [इ. स. चे १७ वे शतक] बखरकार. हे राजकारणी पुरुष होते. शिवाजीमहाराजांच्या अष्टप्रधानांत मंत्री असून त्यांच्या विश्वासातील एक अधिकारी असा ह्यांचा लौकिक होता. राजांच्याबरोबर ते आग्र्यास व भागानगरास गेले होते. प्रथम हे पागेवरचे अधिकारी होते. ते मोहिमांवरही जात असत. पुढे शिवाजीराजांचे हे खाजगी चिटणीस झालेले दिसतात. महाराजांविषयी रोजची जी काही खास हकीकत घडून येई ती लिहून ठेवण्याचे व खाजगी खात्यांवर देखरेख करण्याचे काम ह्यांच्याकडे होते. राज्याभिषेकाच्या वेळी ह्यांस अष्टप्रधानांत मंत्रिपद देण्यात आले. दरबारात ह्यांचे स्थान सिंहासनाच्या उजवीकडे असे. ह्यांनी समर्थांचा गुरूपदेश घेतला होता. शाहूराजांच्या दक्षिणेतील आगमनापर्यंत हे मंत्रिपदावर होते. शाहूराजांनी इ. स. १७१३ त नारोराम शेणव्याला मंत्रिपद देईपर्यंत हे त्या पदावर होते. हे केव्हा निवर्तले ह्याची माहिती मिळत नाही. पण इ. स. १७१३ नंतर ह्यांनी फार दिवस काढले नसावेत.

दत्ताजी त्रिमल व अनाजी रंगनाथ मलकरे असे दोघे शिवछत्रपतींच्या *एक्याण्णव कलमी बखरी*चे लेखक आहेत असे *महाराष्ट्रसारस्वता*च्या *पुरवणी*कारांनी म्हटले आहे (मसा., आ. ४, पृ. १०५३). परंतु *एक्याण्णव कलमी* बखरीत 'खंडो अनाजी मलकरे ह्यांचे वडिली संग्रह केला होता' असा एक उल्लेख सापडतो. तसेच बखरीच्या शेवटी 'अनाजी रंगनाथ मलकरे यांचे पुत्र खंडो अनाजी मलकरे याणी हस्ताक्षरे तालिक लिहिली असे' असा शेरा आहे. ह्या उल्लेखावरून, शिवाय वेगवेगळ्या प्रतींचे शेवट पाहून ह्या बखरीचा मूळ कर्ता दत्ताजी त्रिमल हाच होय, असे निश्चित मत डॉ. र. वि. हेरवाडकर ह्यांनी व्यक्त केले आहे (*मराठी बखर*, आ. १, पृ. ५६–५७) व ते योग्य वाटते.

दत्ताजीपंताने ह्या ९१ कलमी ग्रंथाचे लेखन इ. स. १७१३ पूर्वी आणि शिवाजीराजांच्या मृत्यूनंतर केव्हातरी केले असावे असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. ह्या बखरीस 'वाकेनिशी बखर' असेही म्हणतात. बखरीची भाषा इ. स. च्या १८ व्या शतकातली वाटते. ही बखर बरीच जुनी आहे असे *सारस्वत*कार म्हणत असले, तरी कालदृष्ट्या 'सभासदाची बखर' हीच अगोदरची ठरते. कलमवार लेखन, आटोपशीरपणा हा बखरीचा विशेष आहे. प्रथम हिचे मुद्रण *अरुणोदय* वृत्तपत्रातून व नंतर *भारतवर्ष* मासिकातून झाले.

द. ग. गोडसे

**रचना : मु.** – १. शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर; र. का. : इ. स. १६८० ते १७१३ पर्यंत; भारतवर्ष, भाद्रपद–आश्विन; श. १८१९ / इ. स. १८९७; २. श्री शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर आणि भोसले घराण्याची चरितावली (प्रस्तावनेसह); संपा. वाकसकर, वि. स.; पुणे, १९६२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : हेरवाडकर, र. वि. : मब., पुणे, १९५७; पृ. ५६–५७.

**दत्तात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दत्तात्रयदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० दत्तात्रयवरद** – पहा **दत्तवरद विठ्ठल**.

**दत्तात्रयविप्र** [का. अनु.] ग्रंथकार. ह्याने आपल्या शिष्यांकरिता रचलेल्या *सर्वोद्धार* (अमु.) ग्रंथाची दोनच पत्रे उपलब्ध; सबामं. हस्त. सू., खं. २.

**दत्तात्री** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सबामं. हस्त. सू., खं. १.

**दत्तात्रेय–१** [ ? – समा. श. १६३८, दुर्मुख संवत्सर, फाल्गुन व. १० / इ. स. १७१७] कवी. रामदासी परंपरेतील शिरगाव मठाचे अधिपती. हे कल्याणांचे धाकटे बंधू. कल्याणांप्रमाणे ह्यांनाही समर्थांचा अनुग्रह होता. हे गृहस्थाश्रमी होते. दत्तात्रेय > राघव > यशवंत अशी ह्यांची पुत्रपरंपरा आहे. कल्याण व दत्तात्रेय ह्या दोघा बंधूंचे वास्तव्य बरेच वेळा शिरगावी असे. त्यांचा लेखनव्यवसायही तेथेच चालत असे. दत्तात्रेयांनी शिरगावी समाधी घेतली.

**रचना :** अमु. – १. पंचीकरण; २. मूलस्तंभातर्गत गर्भावळी; ३. पदपदांतरे; सबामं. हस्त. सू., खं. १, २.

**दत्तात्रेय–२** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. श्रीधरांचे पुत्र. ह्यांनी रचलेल्या आरत्या व पदे ह्यांच्या वंशजांकडील बाडांत आहेत. ह्यांनी रचलेल्या एका आरतीत श्रीधरांचा समाधिशक १६५१ (इ. स. १७२९) दिला आहे व स्थळ पंढरपूर क्षेत्र असे म्हटले आहे. दत्तात्रेयांची रचना फारशी नाही व जी आहे ती सामान्य प्रतीची आहे. दत्तात्रेयांची कृष्णावरील एक आरती मुद्रित (मआ., पृ. ३६८). – मसा., आ. ५, पृ. ४३९.

**दत्तात्रेय–३ / ० दत्त अवधूत** [इ. स. चे १७ वे शतक, पूर्वार्ध] कवी. *ज्ञानामृत* ग्रंथाचा कर्ता. ह्या ग्रंथाच्या दोन हस्तलिखित प्रती उपलब्ध आहेत. ग्रंथात कवीने दिलेली गुरुपरंपरा ह्याप्रमाणे : नारायण > कमलासन > नारद > व्यास > शुक > गौडपादाचार्य > गोविंदाश्रम > चिदानंदाश्रम > अच्युताश्रम > दत्तात्रेय. *बालबोधिनी*कारांचा हा शिष्य त्यांच्याच काळात विद्यमान होता.

आपल्या *ज्ञानामृत* ग्रंथात कवीने वेदान्ततत्त्वज्ञानाचे प्रतिपादन केले आहे. ह्या ओवीबद्ध ग्रंथाची पाच प्रकरणे असून त्यात ब्रह्माचे विवरण, अखंडार्थ निरूपण, जीवत्व आख्यान, वेद महत्त्व व निर्वाण स्वतः सिद्ध स्वरूप, असे विषय येतात. पाचव्यात अच्युताश्रमांचा गौरव आहे. ग्रंथाची भाषा जुनी असून तिच्यात प्राचीन भाषेचे विशेष आढळतात. ह्या ग्रंथाखेरीज *भक्तिफळ* ह्या दुसऱ्या ग्रंथाचा उल्लेख *ज्ञानामृत* ग्रंथाच्या अखेरीस कवीने केलेला आढळतो : " आणिक एक ग्रंथ केला ॥ 'भक्तिफळ ' नामें भला ॥ त्यांत चिद्विविलासू प्रतिपादिला ॥ १३७ ॥ " . . . इत्यादी. ह्यांच्या *शिवबोध* ग्रंथाचा गो. का. चांदोरकरांनी उल्लेख केला आहे (संककासू., पृ. ४६).

**रचना :** अमु. – १. ज्ञानामृत; प्रक. ५; ओ. सं. १०००; तंसम. बा. ४७९–८०; २. भक्तिफळ; ३. शिवबोध (शंका.).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : दत्तात्रेय : काही अज्ञात मराठी सारस्वत उपासक; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २५.

**दत्तात्रेय–४** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. अमृतार्णव; २. गर्भावलि; संककासू., पृ. ४६, १३०.

**दत्तात्रेय अवधूत** [का. अनु.] कवी. ह्यांनी ईश्वरपार्वतीसंवादात्मक *मूळस्तंभ* ग्रंथाचा अनुवाद केला आहे. ग्रंथाचे अध्याय ७ असून ओव्या एकूण ५१५ आहेत. ह्या ग्रंथाचा लेखनकाल दिला आहे तो असा : "दुंदुभी नामा संवत्सर। फाल्गुन शुद्ध पंचमी गुरुवार। ते दिनीं ग्रंथ समाप्त दोनी प्रहर।" हा *मूळस्तंभ* ग्रंथ कवी मुकुंदराजाच्या नावावर दाखविला जातो. प्रा. कृ. पां. कुळकर्णी ह्यांच्या मते हा ग्रंथ मुकुंदराजांचा नसून तो दत्तात्रेय अवधूतांचा आहे. कारण ह्या ग्रंथाचे अंतर्बाह्य स्वरूप मुकुंदराजांच्या *विवेकसिंधू*हून अगदी वेगळे आहे. शिवाय भाषेच्या दृष्टीने तो उत्तरकालीन वाटतो.

पिंडब्रह्मांडाची स्थिती, विश्वोत्पत्ती, आधानकालापासून जन्मकालापर्यंत पिंडवृद्धी कशी होते आणि संततीस निरनिराळे गुण का प्राप्त होतात इत्यादी माहिती विषयानुरोधाने या ग्रंथात दिली आहे. षट्चक्रे, त्रिगुण, दशपवन, त्यांची स्थाने, दशदेह, चंद्राच्या कला, पाच मुद्रा, सप्तसागर, देहातील अष्टाचल, सप्तपाताळे व एकवीस स्वर्ग ह्यांची योगशास्त्रविषयाशी संबंधित अशी माहिती त्यात आलेली आहे.

ह्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती, पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळ, धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिर, तंजावर सरस्वती ग्रंथालय व मराठी संशोधन मंडळ, मुंबई येथे आहेत. ग्रंथाचे मुद्रण अद्याप झालेले नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कुळकर्णी, कृ. पां., श्रीमुकुंदराजकृत विवेकसिंधु; पुणे, १९५७; परिशिष्ट २.

**दत्तात्रेय योगी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – कोडे पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दत्तानंद** [का. अनु.] कवी. श्रीधरांचे आजे. आनंद-संप्रदायी. श्रीधरांनी आपल्या सर्व ग्रंथातून जी गुरुपरंपरा दिली आहे ती अशी : रामानंद > अमलानंद > सहजानंद > पूर्णानंद > दत्तानंद > ब्रह्मानंद > श्रीधर. ह्या परंपरेवरून दत्तानंद हे श्रीधरांचे परमगुरू ठरतात. दत्तानंदांनी अनेक पदांची रचना केली आहे (चिं. नी. जोशी, *श्रीधरचरित्र आणि काव्यविवेचन*, पृ. ११८).

**दत्तोबास तळेगावकर** [अंदाजे इ. स. चे १५ वे शतक] महानुभाव कवी. पारमांडल्य आम्नायातील हरिबासांचे शिष्य. पारमांडल्य आम्नायाच्या *वृद्धाचारात* ह्यांची परंपरा दिली आहे ती ह्याप्रमाणे : आनेराजव्यास > बाणाइसा > हरिबास > दत्तोबास > भानुपंडित > चाहेव्यास > विनायकव्यास. ह्यांनी हिराइसा, परशुराम, रामेश्वर ह्यांची मतमतांतरे लक्षात घेऊन, हिरांबा पाठ प्रधान मानून श्रीकृष्णचरित्र, गोविंदप्रभुचरित्र व चक्रधरचरित्र ह्यांचा मिळून एक चरित्रग्रंथ प्रसिद्ध केला. ह्यांनी लीळांच्या 'आदि ' तयार केल्या (म्हणजेच शीर्षकांची नोंद केली). ह्यांनी काही प्रमेयग्रंथही रचले आहेत. डोमेग्रामच्या तिन्ही पूजावसरांचा अन्वय ह्यांनी लावला. केसोबासांच्या *दृष्टान्तस्तोत्रा*वरून त्या ११४ दृष्टान्तांचा अन्वय लावला. आणोबासांनी निवडलेल्या वचनपाठांत ह्यांनी प्रमाणांचे व्याख्यान केले होते. त्यांपैकी त्यागभेद, अनुसरण, संबंध आणि साधन अशी चार स्थळे कल्पून ह्या वचनपाठांचा दत्तोबासांनी अन्वय लावला. ह्या चारी स्थळांच्या अर्थाची साधके (पाठवचने) जेथे एकवटली तो ग्रंथ म्हणजे दत्तोबासांचा *मुक्तपाठ* होय. ही सर्व माहिती पारमांडल्य आम्नायाच्या *अन्वयस्थळा*द्वारे प्राप्त झाली आहे. पंथीय तत्त्वज्ञान पंथीयांसाठीच अधिक सुलभ करून देण्याचे दत्तोबासांचे हे कार्य महत्त्वाचे ठरते.

**रचना :** अमु. – १. चहुं पदार्थांचे ज्ञान (प्रमेय); २. चरित्रे (महानुभावांची); ३. चतुर्विधस्मरण (प्रमेय); ४. मुक्तपाठ (सूत्रपाठावरील टीप); ५. मुंडज्ञान (प्रमेय).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नेने, ह. ना. : अन्वयस्थळ व वृद्धाचार (पारमांडल्य आम्नायाचा); संलेसं., भा. १, नागपूर, १९५७; पृ. १४३, १४५–१४६.

**दमाजी** [का. अनु.] शाहीर. पाबळीचा राहणारा. कुशाबाच्या कलगीतुऱ्याच्या लावणीत त्या काळच्या अनेक शाहीरांचा उल्लेख आहे. त्यात ह्याचाही उल्लेख आहे (मसा., आ. ५, पृ. ५८६).

**दया** [का. अनु.] पदकार. चाफळखोऱ्यातील बाळनाथांची शिष्या. हिचा एक अभंग मुद्रित (रासं., खं. १, पृ. २८५–२८६).

**दयानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ४६.

**दयाराम** [अंदाजे इ. स. १८००] वैष्णव कवी. हे गुजरातेतील प्रसिद्ध व लोकप्रिय कवी होत. ह्यांच्या काळात बडोदा नरेश गायकवाडांच्या दरबारात मराठी कीर्तनकार व लावणीकार ह्यांची ये-जा असे. त्यांच्या तोंडून मराठीतील कृष्णगोपीविषयक रचना ऐकून बहुधा त्यासारख्याच चार रचना दयारामांनी केल्या आहेत. ह्या पदरचनेला रागदारीचा ठेका असून त्यातून कृष्णदेवाची आळवणी केलेली दिसते. गुजरातीचा तितकासा परिणाम कवीच्या रचनेवर झालेला दिसत नाही. नमुन्यादाखल एका पदातील चार ओळी पाहाव्या : "दासत्व अनन्य-भाव निजाश्रय परिपूर्ण । प्रपंचविस्मरण, करी दुःसंग चूर्ण ।। सकळ वेदाने सांगितला सर्वोत्कर्ष गोविंद । तैसाचि थोर भक्ति माला त्यासाठी छंद ।।"

**रचना : मु.** – चार भक्तिपर रचना (पदे); मसंप., एप्रि. १९६६; पृ. ३७–४२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, ना. ग. : गुजराती कवींची मराठी पद्यें; मसंप., एप्रि. १९६६; पृ. ३३–३७.

**दयार्णव** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दयार्णवानुचर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शिवरात्रीकथा; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ४६.

**दयासागर–१ / ० दयाभूषण** [का. अनु.] जैन कवी. हे इक्ष्वाकु-वंशातील, वैश्यकुलोत्पन्न, नंदिगोत्रस्थ व सोहेरवाल ज्ञातीतील होत. ह्या महत्त्वाच्या उलेखाची ओवी त्यांच्या *भविष्यदत्त बंधुदत्त पुराण* ह्या ग्रंथात सापडते. कवीचे गुरू भानूकीर्ती. त्यांचा उल्लेख कवीच्या ग्रंथात सर्वत्र येतो. *धर्मामृतपुराणात* कवीने म्हटले आहे : "भानूकीर्ति भट्टारक महान। त्याचा शिष्य दयासागर जाण। त्याने महाराष्ट्र केली अजान। धर्मामृत कथा ही ।। १०.६२ ।।" दयासागरांचेच दुसरे नाव दयाभूषण ठेवण्यात आले असे त्यांच्या *सम्यक्त्वकौमुदी* ग्रंथातील एका ओवीवरून दिसते : 'हे कथा केली ब्रह्मपणीं दयासागरीं। मग नांव ठेविलं दयाभूषण सुपरी ।। ११.१७२ ।।' *भविष्यदत्त बंधुदत्त पुराणात* तर कवीने आपल्या दयाभूषण ह्याच नावाचा उलेख केला आहे.

ह्या कवीने *सम्यक्त्वकौमुदी, भविष्यदत्त बंधुदत्त पुराण* व *धर्मामृत-पुराण* अशा तीन ओवीबद्ध ग्रंथांची रचना केली आहे. जैन धर्मतत्त्वावर दृढ विश्वास असणे म्हणजे सम्यक्त्व. हा विश्वास दृढ होण्यासाठी ह्या ग्रंथात अनेक लोककथा, चातुर्यकथा व उपदेशकथा एकत्रित करण्यात आल्या आहेत. 'कथा होती संस्कृत ते म्या मऱ्हाष्ट केली' असे कवी म्हणतो. दुसरा ग्रंथ *भविष्यदत्त बंधुदत्त पुराण*. ह्या काव्यात व्यापारासाठी रत्नद्वीपास गेलेल्या भविष्यदत्त-बंधुदत्त ह्या द्वयाची कथा सांगितली आहे. त्या दोघांतील भविष्यदत्त हा जैन धर्माचे यथायोग्य पालन करतो म्हणून त्याचे अखेरीस कल्याण होते असे दाखवले आहे. तिसरा ग्रंथ *धर्मामृतपुराण* हा होय. हा मूळ संस्कृतवरून मराठीत आणल्याचे कवीने सांगितले आहे (१०.५८). ग्रंथाचे १० अध्याय आहेत. हा कथाग्रंथ असून त्यातील कथा रोचक आहेत. भाषा आणि वर्णनशैली ह्यांच्या दृष्टिकोनातून पाहिल्यास ग्रंथाचा दर्जा बराच वरचा ठरतो.

**रचना : मु.** – १. धर्मामृतपुराण; अ. १०; संपा. चवडे, जिनदास : वर्धा; २. सम्यक्त्वकौमुदी; अधिकार ११; ओ. सं. २३८०; वर्धा. **अमु.** – भविष्यदत्त बंधुदत्त पुराण; अधिकार १०; ओ. सं. २३८०; हिंगोली हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : दयासागर; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ५१–५४.

**दयासागर–२** [अंदाजे इ. स. १८१३] जैन कवी. ह्या दयासागरांचे गुरू कोण होते हे समजत नाही. ह्यांचा *हनुमानपुराण* नावाचा एकच ग्रंथ उपलब्ध आहे. ह्या ग्रंथाचे सात अध्याय असून ब्रह्मजिनदासांच्या *हनुमंतरास* (गुजराती ग्रंथ असावा) ह्या ग्रंथावरून मराठीत रचना केल्याचे कवीने सांगितले आहे. "शके सत्राशे पस्तीस । फाल्गुन वद्य बीजेस । सुवेळ मंगळवार दिवस । सात अध्यायी ग्रंथ पूर्ण ।। ७.८९ ।।" असा समाप्तिशक कवी देतो. *पद्मपुराणा*तील कथेच्या आधारे हनु-मंताचे पराक्रम-वर्णन ह्यात केले आहे.

**रचना : मु.** – हनुमानपुराण; अ. ७; ओ. सं. ७९५; संपा. श्रावणे, जयचंद्र; वर्धा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : दयासागर; प्राम-जैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. १००.

**दयाळनाथ–१** [श. १७१०, कार्तिक शु. १४ / इ. स. १७८८ – समा. श. १७५८ / इ. स. १८३६] कवी आणि कीर्तनकार. वऱ्हाडातील मूर्तिजापूर येथील राहणारे. घराणे मौनसगोत्री यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मणाचे. ह्यांच्या पित्याची संतती अल्पायुषी निपजल्याने हरि ह्या आपल्या अपत्यास तो पाच वर्षांचा असतानाच त्यांनी देवनाथ ह्या सत्पुरुषाच्या चरणी वाहिले. देवनाथ हे वऱ्हाडातील सूरजी अंजनगाव येथील प्रसिद्ध संत होत. ह्यांनीच पुढे हरीला गुरुमंत्र दिला. दयाळनाथांचे आजे गुरू गोविंद हे त्यांना 'दयाळ्या' असे त्यांच्या दयाळू अंतःकरणावरून संबोधीत असत. ह्या दयाळ्याचेच पुढे ते दयाळनाथ झाले. दयाळनाथांची गुरुपरंपरा : रंगनाथ > गोपाळनाथ > गोविंदनाथ > देवनाथ > दयाळनाथ अशी आहे. ही परंपरा जनार्दनस्वामी > एकनाथ ह्यांच्यापासून सुरू होते. ह्या परंपरेतील दयाळनाथ हे चौदावे पुरुष ठरतात. दयाळनाथ गृहस्थाश्रमी होते. ह्यांच्या पत्नीचे नाव राधाबाई. देवनाथांच्या सूरजी अंजनगाव मठाची परंपरा त्यांच्या पश्चात ह्यांच्याकडेच आली. ह्यांनी भागानगर (हैदराबाद) येथे समाधी घेतली.

दयाळनाथांचे मराठी, हिंदी व उर्दू ह्या तीनही भाषांवर प्रभुत्व होते. त्यांचे जुन्या ग्रंथांचे परिशीलन दांडगे होते. विपुल पाठांतर, शीघ्र-कवित्व आणि गोड गळा ह्यांमुळे ते उत्तम कीर्तनकार झाले. ह्यांच्या काव्यरचनेची सुरुवातही कीर्तनाच्या निमित्ताने झाली. ह्यांची शेदीडशे पदे, धावे, गौळणी व आख्याने अशी रचना आहे. ह्यापैकी ८५ पदे (पैकी २९ हिंदी) व *रामजन्म आख्यान* एवढ्या रचनेचे मुद्रण अ. सी. साठे ह्यांनी *दयाळनाथांची कविता* ह्या संग्रहाच्या रूपाने केले आहे. अनेक देवदेवतांवर ह्यांनी कवने रचलेली दिसतात. त्यांतल्या त्यात कृष्ण-चरित्राची आवड ह्यांना विशेष होती. देवनाथांच्या वाणीतील स्वानु-भवाचा अधिकार दयाळनाथांच्या कवितेत नसला तरी पारमार्थिक कळकळ तेथे आहे. हे एक श्रेष्ठ दर्जाचे आख्यानकवी असून अनेक नव्या आणि सुंदर कल्पनांना ह्यांच्या प्रतिभेने जन्म दिला आहे. पदलालित्य, शब्दसौष्ठव आणि अर्थगांभीर्य ह्या काव्यगुणांनी ह्यांच्या कवितेला विशिष्ट असा दर्जा प्राप्त करून दिला आहे.

**रचना : मु.** – १. श्रीदयाळनाथांची कविता (८५ पदे व रामजन्मा-ख्यान); संपा. साठे, अ. सी.; पांडे व अग्निहोत्री (प्रस्तावनेसह); मुंबई, १९१३; २. राधाविलास; ग्रं. सं. १२; अकलकामा., भा. ४, पृ. १७८–१८१; ३. द्रौपदीचा धावा; निबंधमाला, अं. ४७, पृ. २८–३०. **अमु.** – आख्याने व पदे; सूरजी अंजनगाव मठसंग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : दयाळनाथ; मकच., खं. ५, मुंबई, १९२०; पृ. १५९–१७५. २. ढेरे, रा. चिं. : दयाळनाथ; गोचप., पुणे, १९५९; पृ. १८१–१८३. ३. शर्मा, विनयमोहन : दयाळनाथ; हिंमसंदे.; पाटणा, १९७५; पृ. २१३–२१५.

**दर्याकवि** [का. अनु.] महानुभाव कवी. एका जुन्या बाडात ह्यांचे पुढील काव्य सापडले. "दासा तारक भक्ता पाळक मर्दक वीघ्नासी ।। किंकर दर्या वीनवि करुणा संक (ट) दुःख नासी ।। ६ ।।" (*संशोधक*,

व. १२, अं. १–४, पृ. १५९).

**दशरथ शांत** [ ? – समा. श. १७५८, आश्विन व. ८ / इ. स. १८३६] वीरशैव ग्रंथकार. *शांतिप्रकरण* ह्या ग्रंथाचा कर्ता. गुरुपरंपरा : शांतलिंग > कृष्ण > जयराम > निरंजन > शांतबोध > शांतेश्वर > बस्वलिंग > शांतलिंग > दशरथ शांत. *शांतिप्रकरणा*च्या कर्त्याची आद्य शांतलिंगस्वामींपासूनची ही परंपरा आहे. ' जगीं वाढविलें शांतिमहत्त्व' म्हणून ह्या परंपरेला 'शांत' असे अभिधान प्राप्त झाले आहे.

दशरथ शांतांचा *शांतिप्रकरण* हा ग्रंथ *शांतिपंचीकरण* ह्या चुकीच्या नावाने जयरामस्वामी वडगावकरांच्या नावावर दोन वेळा प्रकाशित झाला आहे (इ. स. १८७४ व इ. स. १९०१, मुंबई). त्यामुळे ह्या ग्रंथाचे कर्तृत्व वाङ्मयेतिहासकारांनी जयरामस्वामींकडेच दिले. परंतु ह्या ग्रंथाचे कर्ते दशरथ शांत हे असून ग्रंथात जागोजागी त्यांचे उल्लेख येतात. उदा., " पुढें शिष्य विनवणी । करावया इच्छी मनीं । तें ऐकिजे श्रोतेजनीं । दशरथ शांत नमनी प्रवर्ते ॥ ९.५२ ॥ " किंवा " अनुभव हा दशरथ शांताचा । झाला पदाचा अधिकारी ॥ १५.६८ ॥ " इ. करवीरक्षेत्राचे (कोल्हापूर) दक्षिणद्वारी असलेल्या संकेश्वर क्षेत्रात श. १७३५ / इ. स. १८१३ मध्ये ह्या ग्रंथाची रचना झाली. ह्याची एकूण ३५ प्रकरणे असून ओ. सं. २०३४ आहे. रचना गुरुशिष्यसंवादात्मक आहे. पहिल्या प्रकरणातील मंगलाचरण संपल्यानंतर देवपंचपदा-गायत्री, पिंडोत्पत्ती, जन्मविवरण, मनुष्यप्रश्नादिलक्षणविवरण, शिववंश-हरिवंश-गणपतिशारदाविवाहवर्णन, कर्मविपाक, दानप्रकरण, कीर्तनवर्णन, गुरुसंगतिवर्णन, काषायवस्त्र-भस्म-रुद्राक्ष-उत्पत्तिनिर्णय, मठाम्नायवर्णन इत्यादी अनेक विषय ग्रंथात आले आहेत. शेवटच्या प्रकरणातील शांत परंपरेचे वर्णन महत्त्वाचे आहे. दशरथ शांत हे दत्तात्रेयाचे अवतार म्हणून शांत परंपरेत प्रसिद्ध आहेत. " शांतीविना सर्व न्यून । देव भक्त शांतीअधीन । शांति हेंचि समाधिभुवन । जीवशिवा समाधान हे शांती ॥ १.३० ॥ " असे शांतीचे महिमान दशरथ शांतांनी गाजविले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : प्रामनधा., पुणे, १९७२; पृ. ४९–५२.

**० दाइंबा** – पहा **दायंबा.**

**दाऊ बहुरूपी** [इ. स. १७७७–१८४८] शाहीर. औंधच्या भवानराव प्रतिनिधींचे चिरंजीव. ह्यांनी रचलेला *परशुरामपंत प्रतिनिधींचा पोवाडा* उपलब्ध (मुद्रण : इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे : संपा. ॲक्वर्थ व शाळिग्राम; मुंबई, १८९१; पृ. २५२–५३).

**दाजी कवी / ० दाजीबा गोळे** [इ. स. १७८० – समा. इ. स. १८५१] कवी. कवीचे संपूर्ण नाव व्यंकटराव माधवराव गोळे. ह्यांच्या घराण्याचे मूळ पुरुष मोरो गोपाळ हे पेशव्यांच्या नात्यातले होते. दाजीकवींचे वडील माधवराव ह्यांस कवित्वाचा नाद होता. पेशव्यांच्या कारकीर्दीत दाजीकवी मामलतीच्या हुद्द्यावर होते. पुढे पेशवाईस उतरती कळा लागल्यानंतर हे सातारा जिल्ह्यातील मर्ढे ह्या आपल्या इनाम गावी जाऊन राहिले व व्यापारधंदा करू लागले. पंढरीची वारी ही त्यांच्या घरात नित्याचीच होती. त्यात पाठांतराची भर पडल्याने ह्यांचे कवित्व जागृत होऊन हे अभंगामागून अभंग रचू लागले. इ. स. १८१४ मध्ये ह्यांनी संन्यास घेतला तेव्हापासून हे दाजीमहाराज म्हणून ओळखले जाऊ लागले. इ. स. १८५१ त ह्यांनी समाधी घेतली. ह्यांची समाधी सातान्याजवळ कृष्णाकाठी बोरखळ येथे आहे.

ह्यांच्या कवितेची साठ बाडे त्यांच्या सातारा येथील विद्यमान वंशजांकडे असून कविता अंदाजे ५० ते ६० हजार एवढी प्रचंड आहे. त्यात अभंगांची संख्या जास्त असून श्लोक, आरत्या, पदे, भूपाळ्या, दिंड्या, साक्या अशी अनेकविध रचना आहे. मनाचे श्लोक १३०० असून त्यांपैकी २८१ *काव्यसंग्रहात* (नोव्हें. १९०३) प्रसिद्ध झाले आहेत. ही रचना इ. स. १८३१ च्या सुमारास झाल्याचा उल्लेख सापडतो. रामदासांच्याच वाणीचे व विचारांचे अनुकरण करून मूळच्या २०५ मनाच्या श्लोकांचा कवीने १३०० श्लोक एवढा विस्तार केला आहे. बाकी इतर कविता अप्रकाशित आहे. एकंदरीत कविता भक्तिरसप्रधान असली तरी तिच्यात रचनेचा गोडवा किंवा प्रसाद ह्या गुणांचा फारसा प्रत्यय येत नाही; मात्र संख्येने ती इतकी अवाढव्य आहे की त्यामुळेच हा कवी कटाक्षाने ध्यानात राहतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : दाजी कवि; मकच., खं. ५; मुंबई, १९२०; पृ. १४०–१४५. २. केळकर, ना. चिं. (संपा.) : प्रस्ता. अनेककविकृत भक्तिपरमार्थपर कविता; काव्यसंग्रह; नोव्हें. १९०३; पृ. १.

**० दाजीबा गोळे** – पहा **दाजी कवी.**

**दाजीबा जोशीराव / ० दाजीबा पुजारी** [अंदाजे इ. स. १८०० – १८५५] ग्रंथकार, कवी व ज्योतिषशास्त्रज्ञ. चित्पावन ब्राह्मण. ह्यांचे पूर्वज बल्लाळराव हे रत्नागिरी जिल्ह्यातील संगमेश्वरचे राहणारे. शिवाजीराजांच्या कारकीर्दीत उदरनिर्वाहासाठी ते कोकण सोडून देशावर आले. ह्यांचे ज्योतिर्विदत्व व इतर गुण पाहून छत्रपतींनी त्यांना आपल्या आश्रयास ठेवून घेतले. पुढे ताराबाईच्या कारकीर्दीत हे जोशीराव कुटुंब कोल्हापुरास गेले. कोल्हापूरच्या राजांनी आपल्या राजवाड्याच्या पिछाडीस एक मोठा वाडा ह्यांना बांधून दिला. तेव्हापासून ह्या घराण्यातील लोक तेथेच राहात आले आहेत. कवी दाजीबा जोशीराव ह्यांचे वास्तव्यही तेथेच झाले.

दाजीबा कवी हे संस्कृतज्ञ व उत्तम ज्योतिषी होते. ह्यांनी संस्कृतात केलेल्या विपुल अशा ग्रंथरचनेवरून ह्यांच्या विद्वत्तेची आणि विद्याव्यासंगाची कल्पना येते. संस्कृतप्रमाणे ह्यांच्या नावावर २५ मराठी ग्रंथांची यादी ह्यांच्या घराण्याच्या ग्रंथसंग्रहात केलेली आढळते. परंतु आजमितीला त्यांपैकी फक्त सातच ग्रंथ उपलब्ध आहेत. दोन मोठ्या ग्रंथांपैकी *वीरभद्रोपाख्यानात* (अ. १०; ओ. ७७४; र. इ. स. १८२९) वीरभद्रावताराच्या पौराणिक गोष्टी सांगितल्या आहेत. *करवीरमाहात्म्य* (८०००, र. इ. स. १८५०) ह्या ओवीबद्ध ग्रंथामध्ये करवीरक्षेत्राची उत्पत्ती व माहात्म्य ह्यांसंबंधी पौराणिक माहिती दिली आहे. याशिवाय *वीरभद्रमाहात्म्य* (४१६); *अद्भुतरामायण* (अंदाजे ७०१); *केदारमाहात्म्य* (५०); *कार्तिकमाहात्म्य* (७९); *लहुकुशाख्यान* (३३१) (आर्याबद्ध) असे एकूण सात ग्रंथ आहेत. ओवीपेक्षा ह्यांची आर्यारचना अधिक सरस वाटते. ह्या उपलब्ध रचनेखेरीज *एकादशीमाहात्म्य* (३००), *चंद्रहासचरित्र* (१३४), *मयूरध्वजाख्यान* (७५), *श्रीयाळाख्यान* (४९), *सीताजन्म* (४४), *सुलोचनाख्यान* (१००) अशी कितीतरी आख्याने कवीने रचली आहेत, अशी उल्लेखाने माहिती सापडते. ही रचना पाहण्यात आलेली नाही. अनेक ग्रंथांच्या रचनेवरून कवीचे संस्कृतभाषाप्रावीण्य आणि त्याची विद्वत्ता नजरेत भरत असली तरी काव्यगुणांचा विचार करता कवीच्या रचनेत तितकासा अस्सलपणा वा मार्मिकता दिसून येत नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : दाजीबा जोशीराव; मकच., खं. १, मुंबई, १९०७; पृ. ४५१–४६२.

**० दाजीबा पुजारी** – पहा **दाजीबा जोशीराव.**

**दाजी रामा** [का. अनु.] शाहीर. *सदाशिवरावभाऊचा पोवाडा* असे ह्यांच्या पोवाड्याचे नाव असले तरी तो सदाशिवराव भाऊ पेशव्यांवरील पोवाडा नाही. पानपतावर युद्धास गेलेल्या कोण्या सरदाराच्या पत्नीची मनोव्यथा ह्यात चित्रित केली आहे. पोवाड्याच्या शेवटच्या

पंक्तीत पोवाडेकाराने 'दाजी रामा' असा आपल्या नावाचा उल्लेख केला आहे. प्रस्तुत पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खं. ३* मध्ये संग्रहित.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : सदाशिवरावभाऊ पेशव्यांचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पुणे, १९६९; पृ. १५, ३४२.

**दादा आतार** [का. अनु.] मुसलमान कवी. *रिवायतीं*ची (मोहरमच्या सणाची गीते) रचना करणाऱ्या ह्या कवीचा निर्देश रा. चिं. ढेरे ह्यांनी केला आहे (रा. चिं. ढेरे; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १७८).

**दादा वीर** [इ. स. चे १९ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर. जातीने ब्राह्मण. पेशवाईत जी काही ब्राह्मण मंडळी लावण्या व पोवाडे रचू लागली होती त्यांपैकी एक (मसा., आ. ५; पृ. ५५९, ५६८).

**दादा व्यास** [का. अनु.] कवी. सरफोजी राजे ह्यांचे आश्रित.

**रचना : अमु.** – सीतास्वयंवर; त्रुटित; श्लो. १४–३१; सवामं. बा. १२१२.

**दादासाहेब** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – मोईनजाबता; र. का. : श. साधारण संवत्सर, निजभाद्रपद शु. ५, आदित्यवार इ. (मोडीलिपी); तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दादु** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**दादु पिंजारी** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] मुसलमान कवी. ह्यांनी मराठी संतकवींचे अनुकरण करून मराठीत काही रचना केली आहे (मसा., आ. ५, पृ. ८३३).

**दादू** [शाहूमहाराजांच्या काळातील] शाहीर.

**रचना : मु.** – *शाहूमहाराज ह्यांचा मृत्यु* हा पोवाडा; ऐतिपो., खं. १, पृ. ९४–९५.

**दादू गोपाळ** [का. अनु.] शाहीर. ह्यांची एक लावणी *अंधारातील लावण्या* (केळकर, य. न., पुणे, १९५६) ह्या संग्रहात मुद्रित (पृ. १९६–२०१). लावणीत चंद्रवदनी गवळणीची कथा गुंफली आहे. शेवटच्या कडव्यात कविनामनिर्देश येतो.

**दादो रंगनाथ** [का. अनु.] स्तोत्रकार.

**रचना : अमु.** – मल्हारीस्तोत्र; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ४७.

**दादोसुत मुद्गल** / ० **मुद्गल दादोसुत** [अंदाजे श. १५०० / इ. स. १५७८] *अश्वमेध* ह्या मराठी काव्यग्रंथाचा कर्ता. दादोसुत मुद्गलांनी आपल्या गुरूचे नाव नृसिंह असे दिले आहे. त्यांच्या आईचे नाव काशी. गुरुकृपेचा लाभ मातेमुळेच आपणास झाला अशी कवीने कृतज्ञतापूर्वक नोंद केली आहे. *सारस्वत*कारांनी दादोसुत मुद्गलांच्या *अश्वमेध* ग्रंथाचा उल्लेख केला आहे (मसा., आ. ५, पृ. १८६, टीप).

तंजावरात व इतरत्र कवीचे केवळ *कुशलवोपाख्यान*च उपलब्ध असल्याने ह्यांनी फक्त *जैमिनी अश्वमेधा*तील रामाश्वमेधाचाच भाग लिहिला असावा अशी सर्वत्र समजूत दिसते. ग्रंथांतर्गत अनेक उल्लेखांवरून कवीने संपूर्ण संस्कृत *जैमिनी अश्वमेध* अनुवादित केला असावा हे निश्चित. प्रस्तुत ग्रंथाच्या त्रुटित प्रती मुंबई येथील मराठी संशोधन मंडळ, धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिर, नांदेड येथील गोदातीर संशोधन मंदिर, ह्या ठिकाणी आहेत. पण संपूर्ण प्रत मात्र आजतागायत उपलब्ध झालेली नाही. तंजावर येथे उपलब्ध असलेल्या *अश्वमेधी कुशलवोपाख्याना*चे २८ प्रसंग असून, ओवीसंख्या एकूण ३७७६ एवढी आहे. हा ग्रंथ शके १५०० त पूर्ण झाल्याचा कालोल्लेख पुढीलप्रमाणे सापडतो : "सौभाग्य येणे नाम नगरी । पुण्यतीर्थे मुचकुंदेच्या तीरी । शके पंधरासे निर्धारी । ग्रंथ संपविला ॥ १५१ ॥" *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी मात्र ही शकनिर्देश करणारी ओवी वेगळीच दिली आहे. तीत 'पंधराशें सतरीं । सर्वधारीनाम संवत्सरी' ग्रंथ पूर्ण झाला असे म्हटले आहे (मसा., आ. ५, पृ. १८६, टीप). दादोसुतांच्या काव्यावर एकनाथ आणि कृष्णदास मुद्गलांच्या रचनेची छाप पडलेली दिसते. मराठीची तरफदारी करताना कवी म्हणतो : 'म्हणाल संस्कृत वाणी सुरांची । तऱ्ही मऱ्हाष्ट्र भाषा नव्हे तस्कराची ॥' ह्या ठिकाणी एकनाथाच्या 'गीर्वाणवाणी देवे केली' ह्या प्रसिद्ध उक्तीची आठवण होते.

*जैमिनी* काव्यातील कथेचा मूळ सांगाडा कवीने बदलला नाही. मुळातील अनेक उपमा, दृष्टान्त व कल्पना कवीने जशाच्या तशा उचलल्या आहेत. कवीचे प्रसिद्ध *कुशलवोपाख्यान* हे वीररसाचा आविष्कार करणारे काव्य आहे. कवीला प्रामुख्याने ह्याच रसाची गोडी असून त्याचा पिंड वीररसानुकूल आहे. युद्धवर्णने करताना त्याची प्रतिभा बहरते. कुशाने लक्ष्मणावर अभिमंत्रित पंचबाण सोडले त्यावेळचे कवीने केलेले वर्णन ह्या दृष्टीने पाहण्यासारखे आहे : "शर निघाले सुसाट घोषें । प्रभा सांडिते जाले आवेशें । तेणे दिग्मंडल शोभलें कैसें । अंतकाल महा प्रलईचें ॥ १२१ ॥ बाणमुखी निघती चंडज्वाला । दग्ध करूं लागल्या नभमंडला । तेणे आहालोनि नक्षत्रमाला । चेवल्या जाल्या महिवरी ॥ १२२ ॥" पौराणिक कथांमधील दृष्टान्त देण्याचा दांडगा हव्यास कवीला दिसतो. दृष्टान्त, उत्प्रेक्षा, रूपक इत्यादी अलंकारांची मालिका वापरून रसनिर्मिती करीत असता अनेकदा अनौचित्यपूर्ण वर्णनांनी हास्यास्पदता निर्माण होते व रसभंगही होतो, तो सोडल्यास दादोसुतांनी रंगविलेली शब्दचित्रे व प्रसंगचित्रे जिवंत वाटण्याइतकी स्वाभाविक असतात (उदा., रणांगणावर मूच्छित पडलेल्या लक्ष्मण-शत्रुघ्नांचे शब्दचित्र). ग्रंथाची भाषा जुन्या वळणाची व अभ्यसनीय आहे. उदा. कोपानले, धाविनले, विस्मोक, वोडंवर, उतावेल, आव्रतणे, धनुवाडा (धनुर्धारी), धायवट (घबराट) इत्यादी काव्यात दिसणारे शब्द. सामासिक शब्द वापरण्याचीही कवीची आवड दिसून येते. उदा. : रावणांतक, धरणीजावरु, पद्माक्षीरमण ह्यांसारखे वापरलेले शब्द.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कानोले, विद्याधर वि. : दादोसुत मुद्गलकृत जैमिनी अश्वमेध; प्रतिष्ठान, जाने. १९७२; पृ. ११-१७. २. जोशी, वसंत स. : अश्वमेधी कुशलवोपाख्यान; नभामा., १० जुलै १९७३; पृ. ५१-५२.

**दामदेव** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **दामा** – पहा **कृष्णदास दामा.**

**दामा कोंडदेव** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक] कवी. सिद्धनाथ व केसरीनाथ ह्यांच्याप्रमाणे दामा कोंडदेवांनीही *सिद्धान्तसार* ग्रंथाची रचना केली आहे. ग्रंथावरून ह्यांचा काळ समजत नाही. पण भाषेवरून तो इ. स. च्या १६ व्या शतकातला असावा असे अनुमान करिता येते. ग्रंथाचा विषय योग (हठयोग) असून ओवी साडेचार-चरणी आहे. भाषा उकारप्रयुक्त आहे व तिच्यावर ज्ञानेश्वरीची छाया पडलेली दिसते. ग्रंथाचा शेवट खालीलप्रमाणे आहे : "हा सिद्धांतु ईश्वरे उमेप्रति निरोपिला । तेथुनियां सिद्धपंथ कैसा चालीला । तो तुं सांगें पां वाहिला । दामया कोंडदेवा ॥ ११३ ॥ ..येकांताचें निरोपण । सिद्धि परिसावी जी गुणरत्न । जें कां सदा मोक्षदायन । केवीं भक्तिवीण लाभती ॥ १२१ ॥" ग्रंथाचे हस्तलिखित भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रही आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. भा. : दामा कोंडदेवकृत सिद्धान्तसार; भाइसंमत्रै., व. २३, अं. ४, एप्रि. १९४३; पृ. ५१-५२.

० **दामाजी** – पहा **दामा पंडित.**

**दामाजीपंत** [अंदाजे इ. स. चे १५ वे शतक] एक मराठी संत. हे

बेदरच्या पातशहाच्या राज्यात सोलापूर जिल्ह्यातील मंगळवेढे येथे ठाणेदार होते. त्यावेळी पडलेल्या दुर्गादेवीच्या दुष्काळात दामाजी-पंतांनी परवानगीवाचून सरकारी धान्याची कोठारे लुटवली व हजारोंचे प्राण वाचविले. पण ह्या गोष्टीमुळे पातशहाची त्यांच्यावर गैरमर्जी झाली व महिन्याच्या आत धान्याच्या किमतीची रक्कम सरकारी खजिन्यात भरण्याची आज्ञा त्यांना केली गेली. दामाजीपंतांना ती गोष्ट अशक्य होती; पण ते विठ्ठलाचे भक्त असल्यामुळे पांडुरंगाने विठ्या महाराच्या रूपात बेदरला जाऊन सर्व रक्कम भरली. अशी कथा महिपतीकृत *भक्तविजयात* (अ. ४०) आहे. ह्या प्रसंगावरचे दामाजीपंतांचे 'हरहर विठ्ठल जगदुद्धर । जाहला महार मजसाठी ।' हे पद प्रसिद्ध झाले आहे (पहा : *भारतीय संस्कृतिकोश, खंड ४*, पृ. ३४४). मंगळवेढे येथेच दामाजीपंताची समाधी आहे (मसा., आ. ५, पृ. ७५५).

**दामा पंडित / ० दामाजी** [श. १५७२ / इ. स. १६५० – श. १६१५ / इ. स. १६९३] जैन कवी. गुरु : धर्मभूषण. त्यांचे उल्लेख कारंजा भट्टारकपीठ बलात्कारगणात श. १५७२ ते १५९७ पर्यंत पाहावयास सापडतात. ह्यांनी लिहिलेल्या *जंबुस्वामीचरित्र* व *दानशीलतपभावना* ह्या ग्रंथांच्या नव्या प्रती जैन कवी रत्नसाने श. १६१५ / इ. स. १६९३ त बनविल्या. ह्यावरून कवीचा काळ अंदाजे श. १५७२ ते श. १६१५ दरम्यानचा असावा.

ह्यांच्या *जंबुस्वामीचरित्राचे* १६ अधिकार व १९१५ ओव्या आहेत. जैन तीर्थंकर महावीर ह्यांच्यानंतर जी आचार्यपरंपरा झाली त्यातील जंबूस्वामी हे तिसरे आचार्य इ. स. पूर्व ५ व्या शतकात झाले. संस्कृतच्या आधारे ही चरित्रकथा मराठीत दामा पंडिताने रचली असे तोच सांगतो (ओ. १९१३). तरुण वयातच वैराग्य येऊन असार अशा संसारातून सुटका करून घेण्यासाठी जंबूस्वामींनी मुनिदीक्षा घेतली हा कथाभाग मार्मिक अशा लहान लहान कथांमधून सांगितला आहे. श. १६१५ त बराच फेरफार करून ह्या ग्रंथाची नवी प्रत रत्नसाने तयार केली (अ. २४, ओ. सं. २६२१).

*दानशीलतपभावना* ग्रंथाचे ४ अधिकार व ४६८ ओव्या आहेत. ह्यात दान, शील, तप आणि भावना ह्या चौघांत मोठे कोण ह्याबद्दल चाललेला वाद रंगवून शेवटी भावशुद्धीचा मोठेपणा व्यक्त केला आहे. हे दोनही ग्रंथ पोथीरूपात जिंतूर येथील जैन (हस्त.) संग्रहात सापडतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अकोळे, सुभाषचंद्र : दामा पंडित; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ४७–५०. २. जोहरापूरकर, वि. पा. : दामाजी व साबाजी; प्रतिष्ठान, मे १९६०; पृ. ३१–३५.

**दामाशेटी** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] कवी. संत नामदेवांचे वडील. ह्यांच्या नावावर स्वतंत्र अशी रचना नाही. त्यांचे काही अभंग नामदेवांच्या आत्मचरित्रविषयक अभंगांत समाविष्ट झाल्याचे आढळून येते. दामाशेटीच्या नावावर दिले जाणारे अभंग त्यांचेच किंवा दुसऱ्या कोणाचे हे निश्चितपणे सांगता येत नाही (*नामदेव गाथा*, मुंबई, १९७०).

**दामोदर–१** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – प्राकृत दामोदरी, वैद्यक-ग्रंथ; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १७१.

**दामोदर–२ / ० दामोदर योगी** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – लिंगमाला, श्लो. सं. १३; अकलकामा., भा. ३; पृ. १४१–१४२. **अमु.** – बोधचौसष्टी; संककासू., पृ. ४७.

**दामोदर–३** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – कोकिलाव्रताची आरती; मआ., पृ. ३४८; सूर्यनारायणाची आरती; मआ., पृ. ३७७.

**दामोदरदास** [का. अनु.] कवी. ह्यांनी पदे रचली आहेत असा निर्देश आढळतो (संककासू., पृ. ४७).

**दामोदर धाराशिवकर** [का. अनु.] महानुभाव कवी. वसमत येथील राहणारे.

**रचना : अमु.** – १. लीला-अमृत-सिंधु, अ. ७६, ओ. सं. २००००; २. संकष्टहरणस्तोत्र, ओ. सं. ११२; ३. दामोदरी गीताटीका, ओ. सं. ७६४; ममग्रंककासू., पृ. १३.

**दामोदर पंडित–१** [ ? – समा. अंदाजे श. १२२८ / इ. स. १३०६ (सांप्रदायिक शक)] महानुभाव पंथातील एक व्युत्पन्न कवी. पंथीयां-मध्ये हे केवळ पंडित म्हणून प्रसिद्ध होते. दामोदर पंडित व केशी-राजबास ह्या दोघांना नागदेवाचार्यांनी आपले 'डोळे' मानले होते. ते म्हणतात, 'माझें शास्त्र म्हाइंभट्ट लक्ष्मीधरभटाचेनि नुजळेचि । ते पंडिता केशवदेयासि चर्चा करीता उजळले' (स्मृ. स्थ., ६८). पंथीय तत्त्वज्ञानाचा जाणकार शास्त्रवेत्ता म्हणून ह्यांना मान दिला जात असे.

ह्यांचे मूळ गाव कोणते ह्याबद्दल माहिती उपलब्ध नाही. पंडितांच्या पत्नीचे नाव हिराइसा. ह्या दोघांनाही नागदेवाचार्यांकडून श्रवण घडले होते. संसाराचा त्याग करून पंडितांच्या अगोदर हिराइसेने संन्यासदीक्षा घेऊन पंथात प्रवेश केला. नागदेवाचार्य हिला साक्षात 'विरक्ताची कसवटी 'च मानत. पंडित मात्र पुत्रविवाहादी लौकिक संसारात रमले. काही वर्षे वाट पाहूनही संसारत्याग करण्याची पंडितांना इच्छा होत नाही हे बघितल्यानंतर तिने त्यांना कडकडीत निरोप धाडला : 'जिये चुलीची खीरि खादली । तिये चुलीची काइ राख खाल ।' ह्यानंतर पंडितांनी नागदेवाचार्यांकडून 'भीक्षा' करविली व पंथस्वीकार केला (स्मृ. स्थ., ५८). (हा काळ अंदाजे श. १२०९ / इ. स. १२८७, श्री गोविंदप्रभूंच्या निर्याणापूर्वीचा, समजला जातो.)

पंथीय तत्त्वज्ञानाचे अध्ययन ह्यांनी नागदेवाचार्यांजवळ केले. पंडितांच्या शास्त्रप्रावीण्यामुळे मठात आलेल्या अन्यमार्गीयांबरोबर चर्चा करण्यासाठी केसोबासांप्रमाणे आचार्य ह्यांनाही पाठवीत. मुनि केशिराज आणि दामोदर पंडित हे दोघे जीवश्च कंठश्च मित्र होते. दोघांनीही आपापल्या ग्रंथांत परस्परांची नावे घातली. पंडित उत्तम गायक होते. 'गीत बीखो' असे म्हणून आचार्यांनी पंडितांना गायनास बंदी केली होती. पण पुढे एकदा पंडितांनी अंतःकरणाच्या उमाळ्यांतून स्रवलेले व निर्वेदपूर्वक गायिलेले गीत ऐकून आचार्यांचे अंतःकरण द्रवले व त्यांनी पंडितांना परत गीतगायनास अनुज्ञा दिली (स्मृ. स्थ., ८९–९०). 'पंडितांचें गीत तें माझें हाकारें गा ।' असे आचार्य मानीत. नागदेवाचार्यांच्या निर्वाणानंतर अत्यंत आर्ततेने त्यांनी "श्रीप्रभूंचे चरण सेविले । तेणें तनुमन चोखाळलें । त्रिभुवन केलें जेणें पावन । आईका तयाचीया संगती । बोधु पातले नेणु कीती । सहजानंदे स्थीती । तो खेले ए क्षीती अवधूतु ।" असा पाच कडव्यांचा वियोगधुवा गायिला (स्मृ. स्थ., २६१). ह्यानंतर गंगातीरी राहण्यात स्वारस्य न वाटल्याने ते लाजी वैरागडाकडे गेले. तेथे काही कालावधीतच श. १२२८ (सांप्रदायिक शक) च्या सुमारास त्यांचे देहावसान झाले. डॉ. वि. भि. कोलते ह्यांनी हा शक १२३८/३९ मानला आहे (*वछाहरण*, प्रस्ता., पृ. ३२–३६).

दामोदर पंडितांच्या काव्यरचनेपैकी *वछाहरण* हे आख्यानकाव्य प्रमुख होय. श्रीकृष्णभक्तीची ग्रंथाला लाभलेली पार्श्वभूमी व महानुभाव पंथाचे काव्यात येणारे तत्त्वज्ञान ह्यामुळे ह्या ग्रंथाचा महानुभावांच्या *साती ग्रंथांत* समावेश करण्यात आला आहे. "स्मरतां ईश्वराचे गुण । आनंदे विकासु जाला मना । तो अनुवादु करितसे रसना । वर्णु कवण जाणे ? ॥ ७ ॥" अशी ह्या रचनेपाठीमागची आपली भूमिका कवीने स्पष्ट केली आहे. ब्रह्मदेवाने वत्स आणि गोप ह्यांचे केलेले हरण आणि अघासुरवध ह्या भागवती कथाभागावर आधारित ५०३ ओव्यांचे हे छोटेसे काव्य भक्तिरसाने ओथंबलेले असे मराठीतले एक

अपूर्व काव्य आहे. ह्या भावाविष्कारात एक प्रकारचे गांभीर्य आहे व त्यामधून शांतरस निर्माण झाल्याचा प्रत्यय येतो. [⇨ ३.]

*वछाहरणा*खेरीज चौपद्या, पदे, अष्टके, ओव्या, धुवे अशी रचना पंडितांच्या नावावर आढळते (मसा., आ. ५, पृ. ६९२). अशा प्रकारची उत्स्फूर्त रचना ते करीत असावेत असे *स्मृतिस्थळां*तील उल्लेखावरूनही वाटते (स्मृ. स्थ., ८८). ह्यापैकी काही रचनेचा उल्लेख *स्मृतिस्थळां*तून सापडतो. ह्यांच्या एकूण साठ चौपद्यांपैकी ३५ मराठी व २५ हिंदी आहेत. ह्या विविध रागांमध्ये रचलेल्या असून नाथ-जोग्यांच्या मताचे खंडन व महानुभाव तत्त्वज्ञानाचे मंडन, हा ह्या चौपद्यांचा प्रमुख विषय होय. ह्या चौपद्यांची भाषा मराठीमिश्रित हिंदी आहे. नाथपंथ व महानुभाव-पंथ ह्यांच्या अनुबंधात त्यांचे रहस्य साठविले आहे. नाथपंथीय तत्त्वज्ञानाचे खंडन करीत असता ह्या पंथाविषयी कोठेही अनुदार उद्गार पंडितांनी काढलेले नाहीत. *मराठी संशोधन पत्रिके*तून ह्या ६० चौपद्यांची संहिता म. प. पेठे आणि वि. ग. पोंक्षे ह्यांनी (पुणे विद्यापीठ जयकर ग्रंथालयातील हस्तलिखित प्रत आणि महानुभाव आश्रम औरंगाबाद येथील एक हस्तलिखित प्रत ह्यांवरून) सिद्ध केली आहे (मसंम. प्रका., मुंबई, १९७५). पंथीय तत्त्वज्ञानाचा 'गेला ठेला अर्थ' दामोदर पंडितांच्या 'वोवी चौपदीएसि पाहावा' एवढी 'परम प्रमाण स्मृतिरूप' म्हणून मान्यता त्यांना पंथात होती. ह्या चौपद्यांवर उत्तरकालात पंडित भीष्माचार्य, विश्वनाथबास बीडकर, शार्ङ्गधर पुसदेकर आणि एक अज्ञात अशा चार भाष्यकारांनी भाष्ये लिहिली. [⇨ ३.] चौपद्यांच्या हस्तलिखित प्रती हैद्राबाद व ऋद्धिपूर येथील महानुभाव मठांत संग्रहित. ह्यांच्या नावावर असलेल्या *गीताटीका* व *संकटहरणस्तोत्र* इत्यादी रचनेबाबत संशोधकांत एकमत आढळत नाही.

व. दा. कुळकर्णी

**रचना : मु.** – १. चौपद्या, संख्या ६०; (१) संपा. कुळकर्णी, व. दा. : प्रथम प्रकरण, १–१५ चौपद्या; मस्वासंप., १९६६; संहिताविभाग, पृ. १–१५; (२) संपा. पेठे, म. प. व पोंक्षे, वि. ग. : चौपद्या १–६०; मसंप., जुलै १९७४, ऑक्टो. १९७४; क्रमशः; पृ. ५–३२. २. वछाहरण; प्रसंग ४७, ओ. सं. ५०३; (१) संपा. कोलते, वि. भि.; मलकापूर, १९५३; (२) संपा. पंगु, द. सी.; कोल्हापूर, १९२७; (३) संपा. भावे, वि. ल.; ठाणे, १९२४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, व. दा : हिंदी भाषेचे भक्तिकालातील आद्यकवी : गायनाचार्य दामोदर पंडित; महानु., ऑक्टो. १९७०; पृ. ५–१२; २. देशपांडे अ. ना. : प्रामवाङ्., पूर्वार्ध, भा. २, पुणे १९६६; पृ. ४६१–४७३; ३. देशपांडे, य. खु. : ममवा., पुणे, १९६०; पृ. १८–२० व ३८–३९; ३. देशपांडे, वा. ना. (संपा.) : स्मृतिस्थळ, पुणे, १९६८.

**दामोदर पंडित–२** [इ. स. चे १६ वे शतक] महानुभाव कवी. हे *वछाहरण*कर्त्या दामोदर पंडितांपेक्षा भिन्न. नरेंद्रकवीच्या डॉ. कोलते संपादित *रुक्मिणी-स्वयंवरा*च्या प्रस्तावनेत (आ. २, पृ. २५) प्रस्तुत कवीच्या *पद्मपुराणा*चा (मराठी पोथी) उल्लेख करून, हा उपाध्य आम्नायातील सेवलेकर वंशातील असून तो शा. श. च्या १५ व्या शतकात होऊन गेला असावा, उपाध्य आम्नायातील नवव्या पिढीचा हा आचार्य होता, अशी माहिती महंत यक्षदेव महानुभाव ह्यांच्या संग्रहातील एका *वृद्धान्वया*वरून डॉ. कोलते ह्यांनी दिलेली आढळते. दत्तराज हा ह्यांचा गुरू असावा. ह्यांचे जन्ममृत्युशक, वास्तव्याचे ठिकाण किंवा गुरुपरंपरा इत्यादी माहिती उपलब्ध नाही.

डॉ. प्रभाकर मांडे ह्यांनी बीडजवळील राजूरा नवगण येथील महानुभाव मठात सापडलेल्या एका हस्तलिखित पोथीवरून ह्या कवीच्या *पद्मपुराणा*चे संपादन केले आहे. ही प्रत डॉ. कोलते ह्यांनी गोपीराज ग्रंथालयात पाहिलेल्या प्रतीपेक्षा भिन्न आहे. पुराणाचे एकूण १६ प्रसंग व २७५१ ओव्या आहेत. प्रतीच्या अखेरीस स्थल-काल-निर्देश नाही. प्रस्तुत ग्रंथात दत्तराजाचा दोन वेळा आदरपूर्वक उल्लेख आला आहे. नमनात दत्तराजाचे नाव येते. उदा., 'ऐसा मज गुरुचा उपकारु। वरी दत्तरावे मज उदारु। म्हणे कवी दामोदरु। श्रोतयांसी ॥ १.५९ ॥' ह्यावरून दत्तराज हा कवीचा गुरू असावा असे म्हणण्यास आधार सापडतो. तरी ठामपणे मात्र तसे सांगता येत नाही.

हे *पद्मपुराण* पंडितांनी कोणत्या तरी संस्कृत *पद्मपुराणा*धारे (?) लिहिले आहे. हे पूर्वी दत्तात्रेयाने पद्म ऋषीला सांगितले असून पद्म ऋषी ते मांधाता राजाला सांगत आहे अशी कथानकाची रचना आहे. कवी वारंवार संस्कृत भाषेची कठिणता स्पष्ट करून म्हणतो : "संस्कृत आचाट। उचारिता खष्ट। पर मऱ्हाटीया वाचा नीट। सांगेन मी ॥ १७६६ ॥"

कोणा महानुभावीयाने संस्कृतमध्ये रचलेल्या *पद्मपुराणा*वरून हे पुराण रचले गेले असावे, असा तर्क संपा. डॉ. मांडे करतात (*पद्मपुराण* : प्रस्ता., पृ. १२). कारण ह्या *पद्मपुराणा*त महानुभावीय तत्त्वज्ञानाला पोषक अशा कथा सांगितल्या आहेत. सुप्रसिद्ध संस्कृत *पद्मपुराण* व ह्या कवीने रचलेले पुराण ह्यांत कोणतेही साम्य नाही.

*पद्मपुराणा*ची महती सांगताना ह्यातूनच सविस्तर *भागवत*कथा व *हरिवंश* निर्माण झाले असे कवी म्हणतो. दत्तात्रेयांनी 'युगीयुगी' सांगितलेली पुराणेही तेथे एकत्र सापडतात. आपण मूळ *पद्मपुराणा*चा भाव न सोडता मराठीत सांगितला आहे, असे म्हणणाऱ्या ह्या कवीने निरनिराळ्या पुराणांचे संदर्भ देऊन सविस्तर वर्णन तेथे पाहा असे म्हटले आहे.

कवी महानुभाव आहे असे ग्रंथांतर्गत येणाऱ्या महानुभाव पंथा-संबंधातील उल्लेखावरून स्पष्ट होते. उदा., प्रारंभीच्या नमनातील हंस, दत्त, चक्रपाणी, चक्रेश्वर, नागार्जुन व दत्तराज ह्यांचा कवीने केलेला निर्देश, तसेच निरनिराळ्या युगांत ब्रह्मज्ञान कोणत्या परंपरेने आले हे सांगताना कवीने केलेला भटमार्गाचा उल्लेख, ह्यांवरून हे पुराण त्याने महानुभाव पंथाच्या प्रसारासाठी लिहिले आहे असे दिसून येते.

*पद्मपुराणाच्या* १६ प्रसंगांत तीन भाग पडलेले दिसतात. त्यात भुवनकोशवर्णन, अवतारकथा, अविद्येचा नाश करणारी ब्रह्मविद्या व तिची परंपरा ह्यांसंबंधी विवेचन आले आहे. कलियुगात दत्तात्रेयाने चक्रपाणीचा अवतार घेतला आणि त्याच्यापासून भटमार्गाला – महानुभाव पंथाला – सुरुवात झाली असे पंडित दामोदर म्हणतात. महानुभावांनी दत्तात्रेयांचे स्वीकारलेले पौराणिक चरित्र ह्या पुराणात वर्णन केले आहे. महानुभावांच्या देवताविषयक तत्त्वज्ञानाला व अवतारविषयक कल्पनेला अनुसरून आपल्या पुराणाच्या कथाभागामध्ये व इतर वर्णनामध्ये कवीने बदल केले आहेत. मोक्षप्राप्तीसाठी देवताचक्राच्या उपासनेची आवश्यकता नाही, तर सर्वश्रेष्ठ असा जो श्रीकृष्ण परमेश्वर त्याची अनन्यभक्ती करावयास हवी, असे कवी सांगतो.

ग्रंथावरून कवीची विद्वत्ता प्रकट होत नसली तरी संक्षेप-विस्ताराच्या धोरणावरून कवी बहुश्रुत आहे असे दिसते. ह्या पुराणात अनेक कथा संग्रहित केल्याने स्वभावचित्रणाला तितकासा वाव उरला नाही. वर्णन-कौशल्यास जेथे जेथे वाव आहे तेथे तेथे कवीने आपली रसिकता व काव्यशक्ती प्रकट केली आहे. भुवनकोशवर्णनातील जंबुद्वीपाचे व मेरूचे वर्णन बहारीचे आहे. नगरे, निसर्ग ह्यांच्या वर्णनाप्रमाणे प्रसंगवर्णनातले रचनाचातुर्यही अनेक ठिकाणी दिसून येते. कथांमागून कथा निवेदन करीत असता त्यांच्यामधील अनुसंधान कायम ठेवून कवीला अशी वर्णने करावी लागतात. दामोदर पंडितांनी तशी संधी सहसा सोडल्याचे दिसत नाही. प्रसंगी आशय स्पष्ट करून सांगत असता उपमा, दृष्टान्त, उत्प्रेक्षा, रूपक इत्यादी अलंकारांचा उपयोग करून काव्याची गोडी

वाढविलेली दिसते.

ग्रंथरचनेचे एकूण स्वरूप पाहता ग्रंथकाराची भूमिका ही साहित्य-निर्मिती करणाऱ्या कलावंताची नसून निष्ठावान ग्रंथप्रचारकाची दिसते व ती सफल झाली आहे असे म्हणता येईल.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मांडे, प्रभाकर भानुदास : पंडित दामोदर विरचित महानुभावीय पद्मपुराण (विस्तृत प्रस्तावनेसह); औरंगाबाद, १९७०.

**० दामोदरयोगी** – पहा **दामोदर–२.**

**दायंबा / ० दाइंबा / ० दायंब्यास** [अंदाजे श. १३०० / इ. स. १३७८] महानुभाव कवी. ह्या कवीच्या *निर्वेदस्तोत्रा*चा ल. रा. पांगारकर ह्यांच्या *मराठी वाङ्मयाच्या इतिहासात* (खं. २, पृ. ७३८) उल्लेख आढळतो. डॉ. कोलते संपादित *वच्छाहरणा*च्या प्रस्तावनेत (पृ. ३) *वच्छाहरणा*च्या एका हस्तलिखित (द) प्रतीत दायंबाकृत *निर्वेदस्तोत्र* असल्याचा निर्देश डॉ. कोलते ह्यांनी केला आहे. कृष्णमुनीच्या *अन्वयमालिके*त आणि *चरित्रआचार* ह्या महानुभावीय ग्रंथातही वरील रचनेचा उल्लेख आहे. कवीची वैयक्तिक माहिती उपलब्ध नाही.

कांचनमाला हरमळकर ह्यांनी *मराठी संशोधन पत्रिके*तून (जाने. १९७२, पृ. ६३–७२) १२५ ओव्यांचे दायंबाकृत *निर्वेदस्तोत्र* प्रसिद्ध केले आहे. हैद्राबाद व अमृतसर येथे उपलब्ध झालेल्या महानुभावीय हस्तलिखित पोथ्यांच्या आधारे त्यांनी ह्या स्तोत्राची संहिता सिद्ध केली आहे.

संसारातील व्यापास पूर्ण विटून गेल्यानंतर कवीने हे स्तोत्र लिहिले असावे, असे काव्यातील कवीच्या उद्गारांवरून वाटते. *निर्वेदस्तोत्रा*च्या रचनेपाठीमागची कवीची भूमिका तत्त्वचिंतकाची आहे. नरदेहाबद्दल, वस्तुजाताबद्दल औदासीन्य आणि अंतःकरणात शांतवृत्तीचा प्रादुर्भाव असे *निर्वेदा*चे सामान्य स्वरूप कवीने वर्णिले आहे. ज्याचे अज्ञान नाहीसे होऊन, ज्याला चहू पदार्थांचे ज्ञान झाले आहे, तो निर्वेद झाला असे कवी म्हणतो. महानुभावांच्या तत्त्वप्रणालीनुसार परमेश्वर सर्वोच्च. परमेश्वराला अनन्यभावे शरण गेले असता तोच केवळ ह्या संसारतापातून सुटका करतो. निर्वेदस्थितीला गेल्यावाचून ईश्वरप्राप्ती होत नाही, असे कवी सांगतो. "विकास कुरवंडी सांडावा। अनुसरनाचा विडा ओळगावा। मग निर्वेदमंत्र म्हणावा। प्रतिदिनीं॥ ५३॥"

ह्या भक्तिकाव्यात कवीचा चक्रधरविषयक प्रेमभाव आणि परमेश्वरप्राप्तीची कवीला लागलेली ओढ प्रकर्षाने व्यक्त झालेली आहे. तत्त्वज्ञान आणि काव्य ह्यांचा सुंदर मेळ कवीने घातलेला दिसतो. कल्पनासौंदर्य आणि समर्थ रचनाशैली ही ह्या स्तोत्राची वैशिष्ट्ये ठरतात. ह्या स्तोत्ररचनेमुळे दायंबा हा शा. श. च्या १४ व्या शतकाच्या पूर्वार्धातील एक श्रेष्ठ महानुभाव कवी ठरतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. हरमळकर, कांचनमाला : दायंबाकृत निर्वेदस्तोत्र; मसंप., जाने. १९७२; पृ. ५७–६३.

**० दायंब्यास** – पहा **दायंबा.**

**दारा** [का. अनु.] मुसलमान कवी. ह्याने *रिवायतीं*ची रचना केली आहे (रा. चिं. ढेरे; मुमसंक., पृ. १७८).

**दावलजी** [का. अनु.] मुसलमान कवी. शेखमहंमदांचे पुत्र व शिष्य. वंशपरंपरा : राजे महंमद > शेख महंमद > दावलजी > हाकीम > बालाबावा > मलंगबावा. दावलजी आणि हाकीम ह्यांनी शेख महंमदांवर आरत्या रचल्या आहेत. 'शेख महंमद गुरु माझा तो सती' असा आपल्या आरतीत दावलजी उल्लेख करतात (मुद्रण : शेख *महंमदबाबा यांचा कवितासंग्रह*, आ. २, संपा. वा. सी. बेंद्रे, पृ. १२७). पित्याचा पारमार्थिक वारसाच ह्यांनी पुढे चालविला. ह्यांनी काही स्फुट कविताही केली असावी (रा. चिं. ढेरे; मुमसंक., पृ. ९५–९७).

**दास–१** [का. अनु.] कवी. ह्यांनी लिहिलेल्या *गुरुगीते*ची श. १७५६ / इ. स. १८३४ मधली हस्तलिखित प्रत उपलब्ध झाली आहे. ह्याचा अर्थ असा की, ग्रंथाचे लेखन श. १७५६ पूर्वी झाले. *गुरुगीता* ग्रंथाची (हस्त.) पोथी भारत इतिहास संशोधक मंडळात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : दासकृत गुरुगीता; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १७२–१७३.

**दास–२** – पहा **रामदास.**

**दास–३** [का. अनु.] कवी. ह्यांची स्फुट कविता समर्थवाग्देवता-मंदिर हस्त. संग्रहात सापडते. श्रीसमर्थ हेही स्वतःस दास म्हणवून घेत असल्याने हे दास कवी कोण ते निश्चितपणे समजत नाही, असे शं. श्री. देव म्हणतात.

**रचना : अमु.** – १. अहिरावणमहिरावणाख्यान, श्लो. १००; २. दामाजीपंत, कडवी ७५; ३. महाकाळीची आरती; ४. पाळणा; ५. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**० दास–४** – पहा **अंबादास–१.**

**दास अनंत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सुदामचरित्र; गो. का. चांदोरकर संग्रह; अंककासू., पृ. ४७.



**दास आनंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दासकल्याण** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**दासकवि–१** [का. अनु.] कवी. ह्यांनी संत सखूच्या कथेवरील एक प्रकरण रचले आहे. ह्याच कथाभागावरील मध्वमुनिकृत आणि विठ्ठलकृत अशी दोन चरित्रे उपलब्ध असून ती अनुक्रमे *सर्वसंग्रह* व *काव्यसंग्रह* ह्या मासिकांतून प्रकाशित झाली आहेत.

दासकवीचे *सखुचरित्र* (अभंगात्मक) मुद्रित झाले आहे (भाइसंमंत्रै.). पण हे दासकवी नक्की कोण, त्यांचा काळ कोणता ह्या गोष्टी ज्ञात नाहीत. *सखुचरित्र* प्रकरणाच्या शेवटच्या चरणात कवीने दास असा आपल्या नावाचा उल्लेख केला आहे. मुळातच गोड असलेले संत-सखूचे आख्यान घरगुती व सोप्या भाषेत कवीने रसाळ केले आहे. दास कवीची आरत्या, स्तोत्रे अशी रचनाही उपलब्ध आहे.

**रचना : मु.** – १. सखुचरित्र; ग्रं. सं. ४७; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४; पृ. २२–२३. **अमु.** – आरत्या, स्तोत्रे; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आतार, शि. ला. : दासकविकृत सखुचरित्र; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४, चैत्र १८६५; पृ. २२–२३.

**दासकिंकर** [का. अनु.] कवी. ह्यांनी रचलेल्या दोन पदांचा निर्देश शं. श्री. देव करतात (सवामं. बा. ४७०). पैकी एक रामपर पद मुद्रित (रासं., खं. १, पृ. ३७४).

**दासकृष्ण** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामपर एक पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४१–४२.

**दासकेशव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दासगुंडि** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दास गुलाब** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दास जयराम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं.

हस्त. सू., खं. १.

**दास तुका** [का. अनु.] पदकार. ह्यांची कृष्णावरील एक आरती महाराष्ट्रात विशेष परिचित आहे. तिची सुरुवात अशी : 'अवतार गोकुळीं हो। जन तारावयासी। लावण्य रूपडें हो। तेज:पुंजाळ राशी।... जयदेवा कृष्णनाथा।' इ. शेवटच्या ओळीत 'दास तुका' असे कविनाम येते. ही रचना लालित्यपूर्ण अशी आहे. ह्यांची अप्रसिद्ध रचना (पदे) समर्थवाग्देवतामंदिर हस्त. ग्रंथसंग्रह, धुळे ह्या ठिकाणी उपलब्ध (सवामं. हस्त. सू., खं. १, २).

**दास दास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**दास दास परमानंद** [का. अनु.] पदकार. गुरू : हरिदास.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ४८.

**दास निजानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – १. रामाची आरती; २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दासनिरंजन / ० निरंजनदास** [का. अनु.] कवी. निरंजन हे ह्यांचे गुरू असावेत.

**रचना :** अमु. – स्थालीपर्व; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ४८.

**दासप्रेमळ** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दासफकीर** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दासबाळ / ० दासबाळा** [का. अनु.] कवी. समर्थवाग्देवतामंदिरातील हस्तलिखित बाडांत ह्यांच्या नावावर काही पदरचना सापडते (सू., खं. १ व २). ह्या दासबाळा कवीची *कबीर-आख्यान* (ओव्या ५९) आणि *उपमन्युकथा* (ओव्या १८) अशा दोन रचनांची हस्तलिखिते भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रही आहेत. *कबीर-आख्याना*तील शेवटच्या ओवीत 'दासबाळा म्हणे संदेह फीटला। सोयरा जोडीला पांडुरंगा ॥ ५९ ॥' ह्याप्रमाणे कवीचे नाव येते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : दासबाळाकृत कबीर-आख्यान; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २६३.

**दास (बाळकृष्णशिष्य)** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. ईश्वरविवाह; २. बुधबावन्नी; ३. पदपदांतरे; ह्यांपैकी *बुधबावन्नी* हा ग्रंथ समर्थांचा असावा असे गो. का. चांदोरकर ह्यांना वाटते; संककासू., पृ. १३०.

**० दासबाळसुत** – पहा **दास मल्हारी.**

**० दासबाळा** – पहा **दासबाळ.**

**दास ब्रह्मानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दासमनोहर** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दासमल्हारी / ० दासबाळसुत** [का. अनु.] कवी. ह्यांचे शुकरंभासंवाद हे आख्यान संपूर्ण असून त्याची ओ. सं. ९३ आहे (सवामं. बा. ३७५). कवीने *शुकरंभाख्याना*ची फलश्रुती सांगितली आहे ती अशी : "हे उत्तम शुक आख्यान। दिवसरात्री करितां श्रवण। संपूर्ण तुटे भवबंधन। म्हणे दास बाळसुत ॥ ९१ ॥"

**दास महीपति** [का. अनु.] चरित्रकार. उद्धवचिद्घनांच्या धर्तीवर *केशवस्वामींचें चरित्र* दासमहीपतीने लिहिले आहे. त्याची एक हस्तलिखित प्रत धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिरात आहे (बा. ८४६).

**दास माळू** [अंदाजे इ. स. च्या १९ व्या शतकाचा प्रारंभकाल] शाहीर. हे सगनभाऊंच्या बैठकीतील असून त्यांना गुरू मानीत असत. ह्यांची लेखणी पौराणिक कथाभागापेक्षा प्रापंचिक आणि व्यावहारिक जीवनाचे चित्रण करण्यात रंगून जाते. कोणी एक मराठा सरदार मुलुखगिरीवर गेला असता त्याच्या भेटीला फार दिवस अंतरलेली त्याची पतिव्रता कशी खंत करते ह्याचे सुंदर चित्र 'स्वामीभेटीचे चिन्ह सांगा, सख्यांनो डोळे झाले पाझरू' ह्या लावणीत कवीने काढले आहे (मसा., आ. ५, पृ. ५८४).

**दासमुकुंद** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – नारसिंहचरित्र; श्लो. सं. ५८; सवामं. बा. ४७३.

**दास मुद्गल** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दास राम** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दासरुद्राजी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दासलाल / ० वेंकटेशसुत राघो** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – सोमवारव्रतकथा; र. का. : श. १६९१, विरोधी, कार्तिक व. ११ / इ. स. १७६९; भाइसमं. हस्त. सू., पृ. ३२६.

**दासविठा** [का. अनु.] पदकार व आरतीकार.

**रचना :** अमु. – तुकारामांवरील आरती; मआ., पृ. ३६४. अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**दास विठ्ठल** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पाळणा व पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**दास विठ्ठल गुरु गोविंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दासविनायक** [का. अनु.] आरतीकार.

**रचना :** मु. – गणपतीची आरती; मआ., पृ. ३४९.

**दासविष्णु** [का. अनु.] पदकार.

**रचना :** मु. – दळण – पद; 'लोकगीत', तंजावर, १९५०; पृ. ३९. अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दासवीरा** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दास शिवाचा** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दास श्याम** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दास श्रीगुरु** [इ. स. चे १६ वे शतक] महानुभाव कवी. *निष्कलंकाध्याय* (ओ. सं. २८३) ह्या ग्रंथाची रचना कवीने केली आहे. ह्या ग्रंथाचा अंतर्भाव गोपाळदासांच्या *निष्कलंकब्रह्मांड-गोळका*त थोड्या फार फरकाने झाला आहे (संपा. पांगारकर, ल. रा.; मवाइ., खं. २; पृ. ७५५).

**दास सखाराम** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दासहरि** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० दासानुदास–१** – पहा **केशिराजदास–१.**

**दासानुदास–२** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. –१. भीष्मप्रतिज्ञा; श्लो. सं. ५३; सवामं. बा. १२३२. २. रामदास चरित्र; ओव्या व संस्कृत श्लोक; तंसम. बा. १६३०. ३. प्रार्थनापर, विठ्ठलपर, हनुमतपर इ. पदे व रामपर हिंदी पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दासानुदास रंक** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दासोत्तम** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दासो दिगंबर / ० दिगंबर–१** [अंदाजे इ. स. च्या सतराव्या शतकाचा उत्तरार्ध] कवी. संतचरित्रपर ग्रंथांचा कर्ता. दासो दिगंबर हे जुन्नर प्रांतातले राहणारे. एकनाथसमकालीन दासोपंत ह्या ग्रंथकाराहून वेगळे. दासो दिगंबरांनी आपली कोणतीही माहिती किंवा ग्रंथरचनेचा काल आपल्या ग्रंथात दिलेला नाही. ह्यांच्या *संतविजय* ग्रंथाची ३४ प्रकरणे असून त्यात अनेक संतांची माहिती दिलेली आहे. कवीने नाभाजींच्या ग्रंथाचा उल्लेख केलेला असून त्याचा उपयोगही आपल्या ग्रंथासाठी करून घेतलेला आहे. *संतविजयात* दासो दिगंबरांनी अनेक नव्या गोष्टी व आख्यायिका सांगितल्या आहेत. ही माहिती साक्षेपाने मिळवून लिहिलेली मात्र दिसत नाही. महिपतीबोवांनी हा चरित्रग्रंथ पाहिला असावा. *भक्तविजय* (मसा., आ. ५, पृ. १४२) ह्या ग्रंथाचीही रचना कवीने केली आहे.

गो. का. चांदोरकर ह्यांनी *संतविजय*कर्त्या दिगंबरांचा उल्लेख केला आहे (संककासू., पृ. १३०). हे जुन्नरजवळील आर्वी गावचे राहणारे, अशी माहिती देऊन त्यांची गुरुपरंपराही ते पुढीलप्रमाणे देतात : दत्त > सदानंद > नारायण > सुंदर > काशिराज > दिगंबर (ग्रंथ त्यांच्याच खाजगी संग्रहात असल्याचा निर्देश).

*महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांच्याखेरीज ह्या ग्रंथकाराची माहिती दुसऱ्या कोणत्याही वाङ्मयेतिहासकारांनी दिलेली नाही. पुढील काही ग्रंथांत लेखकांनी ह्याच माहितीचे अनुसरण, मुळाचा शोध न घेता, केलेले दिसते. *पुरवणी*कार डॉ. तुळपुळे ह्यांनी दासो दिगंबरांचा उल्लेख गाळलेला आहे. ह्यांचे हे दोन्हीही ग्रंथ अप्रसिद्ध असून हस्तलिखितांच्या उपलब्ध सूच्यांतून ह्या ग्रंथांचा तपास लागत नाही (मसा., आ. ५, पृ. ४७८).

**० दासो दिगंबर देशपांडे** – पहा **दासोपंत.**

**दासोपंत / ० दासो दिगंबर देशपांडे / ० दिगंबरानुचर** [श. १४७३, भाद्रपद कृष्ण ८, सोमवार / इ. स. १५५१ – समा. श. १५३७, माघ व. ६ / इ. स. १६१६] गीताटीकाकार, वेदान्तग्रंथकार व कवी. दासोपंतांच्या चरित्रावरून उपलब्ध होणाऱ्या माहितीप्रमाणे दासोपंतांचे वडील दिगंबरपंत हे बेदरच्या बाहामनीशाहीतील नारायणपेठ गावचे राहणारे. उपनाव देशपांडे. ह्यांचे घराणे गालवगोत्री, देशस्थ ब्राह्मणाचे. पिता दिगंबरपंत, माता पार्वतीबाई. श. १४७३ परिधावी संवत्सरी भाद्रपद वद्य अष्टमीस सोमवारी मध्यरात्री दासोपंतांचा जन्म झाला. दासोपंतांचे वडील हे नारायणपेठ महालाचे देशपांडे असल्याने, त्या महालातील वसूल गोळा करण्याचे काम त्यांजकडे असे. एके वर्षी राज्यात फार मोठा दुष्काळ पडल्याने वसूल झाला नाही. तेव्हा बादशहाने त्यांचा मुलगा दासोपंत ह्यास कैद करून आपल्याबरोबर नेले. ठराविक मुदतीत पैसे सरकारजमा न झाल्यास तुमच्या पुत्रास मुसलमान करू, अशीही धमकी दिली. मुदत भरण्यापूर्वी एक दिवस अगोदर श्रीदत्तात्रेयांनी दत्ताजी पाडेवाराचे रूप घेऊन सर्व हिशेब चुकता केला. हे पाहून परमेश्वरच ह्या मुलाचा पाठीराखा आहे असे वाटल्याने मोठ्या सन्मानपूर्वक दासोपंतांना बादशहाने पालखीत घालून, नारायणपेठला, त्यांच्या आईवडिलांकडे पोचते केले. पुत्र परत आलेला पाहून आनंदित झालेल्या दासोपंतांच्या मातापित्यांनी मनोमन परमेश्वराची (श्रीदत्तात्रेयांची) कृपा जाणली. ह्यानंतर त्यांनी मुलाचा विवाह करून दिला. पण पूर्वोल्लिखित घटनेमुळे म्हणा किंवा इतर कशाने म्हणा, दासोपंतांचे मन संसारात रमेना. 'गजान्त लक्ष्मी त्याचे घरीं। सर्वलक्षणयुक्त भार्यासुंदरी।' असे वैभव असताना नश्वरतेची जाणीव वाढू लागल्याने परमेश्वरभेटीची त्यांना तळमळ लागून एके दिवशी मध्यरात्री त्यांनी गृहत्याग केला. मातापूर (माहूर, जि. नांदेड) क्षेत्री जाऊन दत्तोपासना करण्याचे त्यांच्या मनात होते. हिलालपूर, डाकोळगी ह्या मार्गाने प्रेमपुरास येऊन त्यांनी आपल्या कुलदेवतेचे दर्शन घेतले. गोदामातेच्या नाभिस्थानी असणाऱ्या नंदिग्रामास (नांदेडास) काही काळ वास्तव्य करून ते मातापुरास आले. पर्वतशिखरावर जाऊन त्यांनी त्रिपुरसुंदरीची षोडशोपचारे पूजा केली. पाच दिवसांनी त्यांना जगदंबेचा साक्षात्कार झाला. नंतर सह्याद्री पर्वतावर जाऊन प्रथम दत्तजननी अनसूयेचे त्यांनी दर्शन घेतले. बारा वर्षे उग्र अनुष्ठान केल्यानंतर श्रीदत्तात्रेयांचा त्यांना 'गोदातीरी राक्षसभुवनास जाऊन वाळवंटातील पादुकांचे पूजन करावे म्हणजे साक्षात्कार होईल' असा दृष्टान्त झाला. त्याप्रमाणे त्या पादुकांची आणखी काही वर्षे सेवा केल्यानंतर दत्तात्रेयांनी सगुणरूपाने दर्शन देऊन त्यांना उपदेश केला. काही दिवसांनी आंबेजोगाई (जि. बीड) येथे जाण्याचा त्यांना आदेश मिळाला. तेव्हा नारायणपेठ सोडून कुटुंबियांसह ते आंबेजोगाईस आले. आपले उर्वरित आयुष्य त्यांनी स्वस्थपणे आंबेजोगाईसच व्यतीत केले. आंबेजोगाईचे सीतोपंत देशपांडे हे त्यांचे पहिले व प्रमुख शिष्य होत. त्यांनीच आपल्या गुरूची सर्व व्यवस्था लावली. दासोपंतांची सर्व ग्रंथरचना त्यांच्या आयुष्यात स्वास्थ्य व स्थैर्य प्राप्त झाल्यानंतरच झालेली आहे. श. १५३७ माघ वद्य षष्ठीला वयाच्या ६५ व्या वर्षी हे ब्रह्मस्वरूपी विलीन झाले. आंबेजोगाईस नृसिंहतीर्थावर दासोपंतांची प्रशस्त समाधी आहे. दासोपंतांच्या शिष्यपरंपरेतील देशपांडे घराणे आजही आंबेजोगाईस आहे. ह्यांच्या दोन पुत्रांत त्यांच्या पश्चात वाटणी झाल्याने घराचे दोन भाग झाले. आंबेजोगाईचे त्यांचे घर, थोरले देवघर व धाकटे देवघर म्हणून प्रसिद्ध आहे. दासोपंतांच्या वंशजांच्या दोन शाखा, बावगी (बेदरप्रांत, आंध्र) व चंद्रपूर / चांदा (नागपूर) येथे आहेत.

दासोपंतांचा विस्तृत परिचय प्रथमतः वि. का. राजवाडे ह्यांनी *ग्रंथमाला* ह्या मासिकातून (इ. स. १९०२) करून दिला. *भक्तलीलामृतात* महिपतीने दत्तानुग्रही म्हणून ह्यांचा उल्लेख केला आहे. जयरामसुत व गिरिधर ह्या समर्थसंप्रदायी कवींनी दासोपंतांचा व त्यांच्या *गीतार्णव* ग्रंथाचा निर्देश केला आहे. केशवकवीने *एकनाथचरित्रात* दासोपंत व एकनाथ ह्यांच्या आंबेजोगाईच्या भेटीचा व पैठणच्या प्रतिभेटीचा तपशील दिला आहे. श. १७१७ (इ. स. १७९५) त रचलेल्या *भक्तमंजरी* ग्रंथात दिनकरकवीने एका अध्यायात दासोपंतांचे जीवनचरित्र दिले आहे. परंतु दासोपंतांचे समग्र जीवनचरित्र समजून घेण्याचे एकमेव प्रमुख साधन म्हणजे *महाराष्ट्र कवि* मासिकात वि. ल. भावे ह्यांनी छापलेले *दासोपंत चरित्र* हे होय (ओ. सं. ७७८). हे ओवीबद्ध आणि विस्तृत असून, तेच ॲबट ह्यांनी प्रत्येक ओवीचे इंग्रजी भाषान्तर करून व टीपा देऊन इ. स. १९२७ त प्रसिद्ध केले (*द पोएट सेंट्स ऑफ महाराष्ट्र*, व्हॉ. ४). ह्या चरित्रात कुठेही अध्याय वा प्रकरणे नाहीत, तसेच कर्त्याचाही निर्देश येत नाही. पुढे ह्याच चरित्राची २११ ओव्या अधिक असलेली एक प्रत बावगी (बेदर) येथील दासोपंतांच्या वंशजाकडे न. शे. पोहनेरकर ह्यांस मिळाली. तीही अपूर्ण आहे. मात्र हनुमदात्मज असे कर्त्याचे नाव प्रत्येक अध्यायात आलेले आहे. ह्या चरित्रात दासोपंतांच्या बालपणापासून ते दत्तप्रसाद होऊन ते आंबेजोगाईस स्थायिक होईपर्यंतचा भाग येतो. वरील दोनही चरित्रे अपूर्ण असली तरी ल. रा. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणे ती अविश्वसनीय किंवा बनावट नसून दासोपंतांच्या जीवनचरित्राची वर आलेली बरीचशी माहिती त्यांतून सापडते.

चरित्रविषयक माहितीप्रमाणे दासोपंतांचे जन्मस्थान म्हणून उल्लेखिलेले नारायणपेठ हे गाव कोणते व नक्की कोणत्या जिल्ह्यातील हे निश्चितपणे सांगता येत नाही.

दासोपंतांच्या चरित्रातून उपलब्ध होणाऱ्या जन्मतिथीवर डॉ. स. ल.

कात्रे ह्यांनी नवा प्रकाश टाकला आहे. त्यांच्या मते दासोपंतांची सर्वज्ञात असलेली श. १४७३, भाद्रपद कृ. ८, सोमवार, ही जन्मतिथी त्या शकाच्या अधिकभाद्रपद महिन्यातील आहे, असे दिसते. भारतीय शक, तिथी, वार ह्यांच्या जंत्रीनुसार श. १४७३ मध्ये अधिकभाद्रपद व निजभाद्रपद असे दोन महिने येतात. त्यांपैकी वरील तिथी, वार ह्यांचा तपशील अधिकभाद्रपदातील कृष्ण अष्टमीशी जुळणारा आहे. कारण निजभाद्रपदातील हा वार बुधवार येतो, अधिकातच तो सोमवार आहे. तसेच श. १४७३ हा परिधावी संवत्सर नसून विरोधकृत् संवत्सर होता, अशीही नवी माहिती डॉ. कात्रे ह्यांनी दिली आहे ('दासोपंतांचा जन्मदिवस'; विसंमंवा., १९६८; पृ. १०६–१०७).

दासोपंतांनी 'दिगंबरानुचर' असा आपला निर्देश ग्रंथरचनेत ठिकठिकाणी केला आहे. म्हणजेच दिगंबर हे त्यांचे गुरू होत. हे दिगंबर म्हणजे दत्तात्रेय (कारण दासोपंत दत्तोपासक होते) की कोणी मानवी व्यक्ती, ह्याचा उलगडा मात्र त्यांच्या चरित्रकारांनी किंवा त्यांच्या अभ्यासकांनी स्पष्टपणे केलेला नाही. ज. र. आजगांवकर, ल. रा. पांगारकर ह्यांच्या मते दिगंबर म्हणजे दत्तात्रेय हेच त्यांचे गुरू. अर्थात त्यांचे अनुचर ते दिगंबरानुचर हा अर्थ उघडच आहे. 'दासो दिगंबर' असेही दासोपंतांचे एक नाव रूढ आहे. प्रा. म. रा. जोशी म्हणतात की ह्या नावातील दिगंबर हे मानवी गुरूचे नाव असावे. दासोपंतांच्या *उपनिषद्-भाष्या*वर ह्याप्रमाणे नोंद आहे. 'श्रीमदादिगुरु दत्तात्रेय दिगंबरानुचर विरचिते...' इ. ह्यावरून श्रीदत्तात्रेय > दिगंबर > दासोपंत अशी परंपरा स्पष्ट होते. जोशी ह्यांच्या मते बेदर येथे वास्तव्य असता दासोपंतांचा कोण्या दत्तोपासक दिगंबरांशी संबंध आला असावा. दिगंबर नावाचे एक श्रीपाद दत्तपरंपरेच्या आनंद शाखेतील सत्पुरुष होते. त्यांच्या साधुत्वाचा प्रभाव कल्याणी, नारायणपूर, बेदर ह्या कृष्णाकाठच्या परिसरावर बराच होता. हेच दिगंबर दासोपंतांचे गुरू असण्याचा संभव आहे असे अनुमान ते काढतात. पण ह्या बाबतीत अधिक सबळ पुराव्याची गरज आहे असेही म. रा. जोशी ह्यांनी म्हटले आहे (*युगवाणी*, मे–जून १९७२, पृ. १०–११).

दासोपंतांचे आराध्यदैवत श्रीदत्तात्रेय होते. कुलपरंपरेतील दत्तभक्तीचे दासोपंतांवर दृढ संस्कार होते. श्रीदत्तात्रेयांनी बादशहाच्या कैदेतून केलेली सुटका, माहूरगडावर जाऊन दासोपंतांनी केलेले अनुष्ठान आणि नंतर त्यांना झालेली प्रसादप्राप्ती, ह्या सर्व घटनांतून दत्तभक्तीचाच प्रवाह प्रामुख्याने वाहताना दिसतो. ग्रंथरचनेत दत्तगुरूंना केलेले नमन, *पदार्णवा*तील दत्तस्तवनपर पद्ये, *दत्तमाहात्म्य* व *सिद्धराजसमागम* (संस्कृत ग्रंथ) हा दत्तोपासनेतील उपासनातंत्रविषयक विस्तृत ग्रंथ अवलोकिल्यानंतर तर ह्याबद्दल शंकाच राहात नाही. *दासोपंतांच्या पासोडी*चे संपादक न. शे. पोहनेरकर ह्यांनी दासोपंतांना दत्तात्रेयाच्या जोडीने कमलनयन श्रीशंकराचेही उपासक असे म्हटले आहे. ते म्हणतात : "त्यांच्या पूजेंत होत्या त्या केवळ पादुकाच. दत्तात्रेयाची मूर्ति नव्हती. श्रीपादुका व कमलनयन श्रीशंकर हेंच त्यांचें उपास्य दैवत होतें." (*दासोपंतांची पासोडी*, प्रस्ता., पृ. १४). डॉ. स. ल. कात्रे ह्यांनी हे मत खोडून काढले आहे. ते म्हणतात की, दासोपंतांच्या ग्रंथातील प्रारंभीची नमने ही दत्तात्रेयांच्या बरोबरीने शंकरास केलेली असल्याने पोहनेरकरांच्या वरील मताचे समर्थन कदाचित होऊ शकेल. पण जुन्या संस्कृत साहित्यात, इतिहास-पुराणात अगर उपासनासंबंधित तंत्रवाङ्मयात कमलनयन हे विशेषण शंकरास जोडलेले प्रायः आढळत नाही. चांदा येथे असलेले दासोपंतांचे विद्यमान वंशज अण्णाजी गोसावी ह्यांना त्यांच्या घराण्यात परंपरेने चालत आलेल्या उपासनापद्धतीची चांगली माहिती आहे. पंतांच्या *सिद्धराजसमागम* ह्या दत्तोपासनातंत्रविषयक प्रचंड टीकेच्या परिशीलनाने जी एकमेव गोष्ट सिद्ध झाली आहे, ती म्हणजे दत्तात्रेय व त्याची विविध तांत्रिक रूपे किंवा अवतार हेच दासोपंतांचे एकमेव आराध्यदैवत होते. ही तांत्रिक रूपे म्हणजेच दत्तसंप्रदायात मानले जाणारे दत्ताचे सोळा अवतार होत. दासोपंतांच्या वरील टीकाग्रंथात व *दत्तमाहात्म्य* ग्रंथातही सोळाव्या अवताराचे 'कृष्णश्याम कमलनयन' असे अनेकदा निर्देश केलेले दिसतात. पोहनेरकर म्हणतात त्याप्रमाणे कृष्णश्याम असा संक्षेप नसून 'कृष्णश्याम कमलनयन' असे पूर्ण नावच येते. दत्तात्रेयांच्या ह्या सोळा अवतारांच्या मूर्ती आंबेजोगाई येथील त्यांच्या घरातील देव्हाऱ्यात आहेत. पोहनेरकरांनी निर्देशित केलेली कमलनयन श्रीशंकराची देवघरातील मूर्ती ही दत्ताच्या सोळाव्या अवताराची आहे. *ग्रंथराजा*तील कमलनयनाचा उल्लेख ह्या दत्तात्रेयाच्या अवतारसंदर्भातच झाला आहे. मराठी व संस्कृत *दत्तमाहात्म्यात* शिवाला केलेले नमन शंकराचा दत्तात्रेयांशी अभेद स्पष्टपणे दाखवते. बहुधा दत्तात्रेयांच्या १३ व्या शिवरूप अवताराचा संदर्भ ह्या नमनातून असावा. अशा कोणत्याही स्थळी कमलनयन असे विशेषण शंकरास लावलेले दिसत नाही. त्यामुळे कमलनयन शंकर ह्या उपास्यदैवताविषयी पोहनेरकर ह्यांचे विवेचन पटण्यासारखे नाही. ('दासोपंतांचे आराध्यदैवत : केवळ दत्तात्रेय'; मसंप., एप्रि. १९६९; पृ. १७७–१७९).

दासोपंतांच्या दत्तसंप्रदायात दत्ताचे सोळा अवतार मानलेले आहेत व त्यांच्या उत्सवांच्या वेगवेगळ्या तिथीही ठरलेल्या आहेत. आपली परंपरा सातत्याने टिकून राहावी आणि तिच्यात एकसूत्रीपणा यावा म्हणून दासोपंतांनी संप्रदायवैशिष्ट्यांची उत्तम बांधणी करून दिली आहे. नित्यपाठासाठी दशनाम, सहस्रनाम, स्तवराज, माहात्म्ये तयार करून ठेवली. ह्याचबरोबर उत्सवपद्धती, सेवा, अर्चन, उत्तरार्चन ह्यांची देखील शिस्त त्यांनीच घातलेली आहे. प्रत्येक दिवशीचा उपासनाविधी, सात वारांची वेगळी भजने, पर्वकाळ आणि उत्सव ह्यांची विशेष भजने, पदे, आरत्या, स्तोत्रे, अष्टके हे सर्व रचून व आखून ठेवले आहे. आपल्या मागे आपला उपासनासंप्रदाय टिकावा आणि भाविकांच्या भक्तीला योग्य ते वळण लावावे ह्यासाठी केवढा मोठा खटाटोप त्यांनी केला. ह्यावरून त्यांची संप्रदायावरील निष्ठा आणि तळमळ ही प्रत्ययास येतात.

दासोपंतांचे जीवनचरित्र आणि उपासनासंप्रदाय ही अभ्यासल्यानंतर प्रचंड अशा त्यांच्या ग्रंथरचनेचे उद्दिष्ट समजून घेणे आणि तिचे मूल्यमापन करणे महत्त्वाचे ठरते. त्यांच्या संस्कृत आणि प्राकृत रचनेपैकी आंबेजोगाई येथील त्यांच्या विद्यमान वंशजाकडे जे ग्रंथ सापडले त्यांवरून समर्थभक्त शं. श्री. देव आणि *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांनी याद्या केल्या आहेत. त्यांत ४८ ग्रंथांची नोंद सापडते. हा आकडा दिसण्यात मोठा दिसला तरी प्रत्यक्षात मात्र तेवढे ग्रंथ आज उपलब्ध नाहीत. वरील याद्यांतील निम्म्याहून अधिक नावे स्तोत्रे, नामावल्या, कवचे इत्यादिकांचीच आहेत. साहित्यिक किंवा तत्त्वविचारात्मक मूल्यांपेक्षा ह्या रचनेचे सांप्रदायिक महत्त्वच अधिक आहे. अलिकडे दासोपंताच्या देवघरात शोध केला असता, १. *गीतार्णव*, २. *गीतार्थचंद्रिका*, ३. *प्रबोधोदय*, ४. *ग्रंथराज*, ५. *पदार्णव*, ६. *उपनिषद्-भाष्य* व ७. *पासोडी-पंचीकरण* एवढेच साहित्य हाताशी लागते. ह्यांतील संस्कृत उपनिषद-भाष्ये सोडल्यास उपलब्ध ग्रंथरचनेची ओवीसंख्या अंदाजे पावणेदोन लाखांपर्यंत जाते. उपलब्ध नसणाऱ्या रचनेचा शोध अजूनही चालू आहे. *पदार्णवा*पैकी सुमारे ३०५० पदे, *गीतार्णव* १८ अध्यायांपैकी १, २, १२, १३ असे चार अध्याय, *गीतार्थबोधचंद्रिका* (पहिले ४ अध्याय), *ग्रंथराज* व *पासोडी* एवढे अल्प साहित्य मुद्रित झाले आहे. त्यावरून दासोपंतांची प्रगाढ विद्वत्ता, अखंड व्यासंग व सूक्ष्म निरीक्षण ह्यांचा प्रत्यय येतो व त्याचबरोबर रचनेचे विविध प्रकार, भाषाप्रभुत्व आणि पल्लेदार प्रतिभा ह्यांचेही दर्शन घडते.

दासोपंतांचे संस्कृत भाषेचे ज्ञान उत्तम होते हे त्यांनी रचलेल्या अनेक संस्कृत ग्रंथांवरून सहज लक्षात येते. ते संस्कृतचे पंडित होते तसे मराठीचेही

नितान्त अभिमानी होते. जुन्या कविमंडळात दासोपंतांचा उल्लेख *गीतार्णव* ह्या सुप्रसिद्ध गीताटीकेच्या संबंधात केला जातो. *भगवद्गीते*वरील उपलब्ध टीकांमध्ये विस्ताराच्या दृष्टीने १। लक्ष ओवीसंख्या असणाऱ्या *गीतार्णवा*ची बरोबरी करू शकेल अशी एकही टीका नाही. मुद्रित झालेल्या ४ अध्यायांची ओ. सं. १३०५५ एवढी आहे. *एकाध्यायी गीता* म्हणून ज्ञानेश्वरांनी ज्यास संबोधले त्या १८ व्या अध्यायावर दासोपंतांनी १८००० ओव्या रचल्या आहेत.

*गीतार्णव* टीकेच्या प्रारंभी दत्तात्रेयांना नमन करून त्यांनी ग्रंथारंभ केला आहे. ही टीका स्वतंत्र प्रज्ञेने स्वानुभवाधारे रचल्याचे दासोपंत नमूद करतात. 'स्वमती चालिला अर्थु' हे त्यांचे ह्या बाबतीत मुख्य सूत्र आहे. ग्रंथग्रंथांतरांचे अनेक आधार ते कित्येकदा देत असले तरी ज्ञानेश्वरांप्रमाणे कुणालाही वाट पुसत जाण्याचे धोरण दासोपंतांचे दिसत नाही.

त्या काळात विद्वत्सभेत संस्कृत भाषेला मान्यता होती. मराठीसारख्या प्राकृत बोलीला शास्त्रीय विचार पेलणार नाहीत असे मत प्रचलित होते. दासोपंतांना तर आपले विचार बहुजनसमाजापर्यंत पोहोचवायचे होते. त्यामुळे केवळ संस्कृतचा अभिमान आणि आग्रह धरणे ही प्रवृत्ती घातक आहे असे त्यांना वाटे. ह्या संदर्भात ते म्हणतात : 'यया संस्कृताचा अभिमानु । तेणेंचि नाशिला हा जनु ।' ह्याच्याही पुढे जाऊन "प्राकृत म्हणौनि दूषिती । तेचि यया ज्ञाना वंचती । भाषाचि केवळ भजती । ते मूर्ख की ना ॥ १.१२३ ॥" असा ते आपला मातृभाषाभिमान व्यक्त करतात.

ही टीका आपण आत्मसंतोषाखातर केली असून "न पाहें श्रोतयांचें वदन । न करीं भाषाधारें विवरण । स्वस्वानुभवें हें मन । न म्हणौनि संपादीं ॥ १.११९ ॥ आइकैल तेणें आइकावें । मानैल तेणें घ्यावें । नावडे तेणें नेघावें । दोहीं श्रवणीं ॥ १.१२० ॥" ह्या भूमिकेमुळे प्रचलित अशा कोणत्याही मताचा अभिनिवेश त्यांच्या टीकेत नाही. आपले विवेचन हे गीताग्रंथाचे स्वतंत्र मनन असून त्यात कोणत्याही पूर्वसूरींचा आवर्जून अधिक्षेप नाही किंवा अनुसरणही नाही असे ते सांगतात.

*गीतार्णव* ग्रंथ खरोखरीच अर्णव आहे. त्यात केवळ गीतेचाच भावार्थ दिला आहे असे नव्हे तर इतर अगणित विषयांचा त्यांत परामर्श घेण्यात आला आहे. कौरव आणि पांडव ह्यांच्या कथेवर वेदान्ताचे रूपक बसवून विषयाची सविस्तर मांडणी केली आहे. प्रथमाध्यायापासून हे वेदान्तविषयक विवेचन संथपणे चालू होते. श्लोकांतील पदांचे परमार्थपर वेगवेगळे अर्थ सांगून एवढा विस्तार केला आहे की त्यात पृष्ठेच्या पृष्ठे खर्ची पडली आहेत.

दासोपंतांनी आपले अध्ययन, बहुश्रुतता, व्यवहारज्ञान ह्या सर्वांचा उपयोग करण्याची एकही संधी ह्या ग्रंथात वाया दवडली नाही. आपल्याला असलेले सर्व ज्ञान वाचकांना देण्याच्या प्रयत्नात त्यांनी केलेली वर्णने विस्तृत आणि सूक्ष्म झालेली असली तरी कंटाळवाणी होतात. हे पठडीचे वेदान्ती असल्याने वेदान्तातील कल्पना व सिद्धान्त ह्यांचा वारेझोड वर्षाव ते करतात. त्यांच्या लेखणीला कोणतेही बंधन नाही आणि काव्यसौंदर्य व्यक्त करण्यासाठी आवश्यक तो संयमही नाही. मात्र विवेचनात एक सहजतेचा ओघ असल्याने वाचणारा आकर्षित होतो इतकेच. [ ➪ ३. ] अशी ही प्रचंड रचना पाहून मन स्तिमित होते, पण समाधान पावत नाही.

*गीतार्णवा*नंतर *गीतार्थचंद्रिका* ह्या गीतेवरील लघुटीकेची रचना दासोपंतांनी केली. तिचे प्रयोजन सांगताना दासोपंत म्हणतात : "मागां गीतार्णव रचिलें । तें समुद्रचि होउनि गेलें । न वचेचि कवणा उलंघिलें । शब्दार्णव ॥ १.२४ ॥" म्हणून भगवद्गीतेचा केवळ अर्थ सांगणारी ही लघुटीका रचली. तसेच 'तो परमार्थु ज्ञानयोगें । उमगितां सहसा न उमगे ।' म्हणून केलेली ही टीका देखील जवळपास *ज्ञानेश्वरी*एवढी आहे (ओ. ८८८९). आपली विस्तारप्रिय लेखणी आवरता न आल्याने केवळ शब्दार्थापेक्षा पुष्कळच अधिक विवरण ह्या टीकेत आले आहे फक्त मोठ्या टीकेइतकी ती स्वैर नाही एवढेच. ह्याही टीकेसाठी उदार श्रोत्यांची संपादणी ते करतात.

ह्या टीकेचा विशेष असा की, संस्कृतातील टीकापद्धतीचा अवलंब करून ती लिहिण्यात आली आहे. प्रथम संस्कृत टीका व त्यानंतर गीताश्लोकांतील प्रत्येक पद अन्वयार्थानुसार क्रमाने घेऊन त्यावर ओवीबद्ध मराठी टीका रचिली आहे. त्यामुळे पुनरुक्ती होऊन, संस्कृत टीकेतील विवरण मराठीत विस्ताराने येते. दासोपंत कर्मसंन्यास मानीत नाहीत. सामान्य माणसाने विहित कर्मे करावीत तशी ती ज्ञानी माणसानेही करावीत असे ते आवर्जून प्रतिपादतात. कारण "कर्महीन जो नरु । त्याचा पृथ्वी मानी भारु । ह्या कारणें पामरु । व्यर्थचि जिये ॥ यया कारणें तूं कर्म करी । नियत विहित बरव्या परी । कर्माची न पवे थोरी । अकर्म तें ॥" सामान्य जनांच्या दृष्टीने कर्मयोग हाच उत्कृष्ट असल्याने ज्ञानी माणसांनी त्यांना योग्य ते मार्गदर्शन करावे, असे ते सांगतात. निष्कर्मत्वप्राप्ती ज्ञानमार्गात कशी होईल तर "कर्मपासाव सुटणें । म्हणिजे केला कर्मी न लिपणें । न करणया ऐसें करणें । तें करणें नव्हे ॥" येथपर्यंत श्रीकृष्णवचनाचा मथितार्थ सांगून शेवटी ते म्हणतात : "आमुचें हेंचि सांगणें । जें अपुला स्वधर्मु न सांडणें । तैसेनसीं योगु करणें । ब्रह्मज्ञानाचा ॥"

ह्या लघुटीकेतील विवेचन सुटसुटीत तर आहेच, पण तिची भाषाशैलीही प्रौढ, भारदस्त आणि ओघवती अशी आहे. त्यामुळे ती गीतेवरील टीका असली तरी रूक्ष न होता आकर्षक झाली आहे. टीकेच्या पहिल्या चार अध्यायांचा खंड 'मराठवाडा साहित्य परिषदे'ने प्रकाशित केला आहे. (प्रस्तुत ग्रंथाची हस्तलिखित प्रत आंबेजोगाईच्या दासोपंतांचे वंशज दिगंबरस्वामी ह्यांच्याकडून प्राप्त झाली. मात्र ह्या प्रतीतील पहिले चार अध्याय गहाळ झाल्याने, पोहनेरकर ह्यांनी केलेल्या वासुदेवात्मजाच्या दुसऱ्याच एका उत्तरकालीन प्रतीच्या नकलेवरून मुद्रण केले गेले आहे.)

दासोपंतांच्या *ग्रंथराज* ह्या ग्रंथाची आठ प्रकरणे असून त्याचे संपादन शं. श्री. देव ह्यांनी केले आहे. हा ग्रंथ कवीच्या तत्त्वज्ञानाचे सार आहे. नामस्मरणाने परमेश्वरप्राप्ती होते, हे ह्या ग्रंथाचे मुख्य प्रतिपाद्य. जो रोकडा ब्रह्मसाक्षात्कार करून देतो तो गुरू, अशी गुरूची महती दासोपंत सांगतात. पहिल्या प्रकरणात असद्गुरू, शिष्य, मूर्ख व सच्छिष्य ह्यांची लक्षणे सांगितली आहेत. दुसऱ्या प्रकरणात बंध, बंधमोक्ष, संसार, जन्ममरण, अवस्था, जीव ह्यांचे निरूपण उपनिषदाधारे केले आहे. प्रकरण तीन गुरुस्तुतिपर. प्रकरण चारमध्ये महावाक्याचे विवरण वेदान्ती पद्धतीने कवी करतात. नंतर प्रपंच, देहावस्था, प्रकृतिगुण, उपाधी, कर्मेंद्रिये, योगसिद्धी, सहजस्थिती अशा अनेक विषयांचे प्रतिपादन करून आठव्या प्रकरणात जीवन्मुक्ती, विक्षेप, समाधी इत्यादी बाबी देतात. दासोपंत म्हणतात : 'नाना शास्त्रे होती । परंतु अद्वैतशास्त्रा सरी न पवती ॥' ग्रंथ लहान पण सुटसुटीत व रेखीव आहे. भाषा साधी, समर्पक व रोखठोक आहे. हा ग्रंथ वाचताना *दासबोधा*ची आठवण येते. देवांनी *ग्रंथराज* व *दासबोध* ह्या दोन्ही ग्रंथांची तुलना करून साम्यस्थळे दाखविली आहेत.

दासोपंतांचा नव्याने ज्ञात झालेला आणखी एक ग्रंथ म्हणजे *ग्रंथसंग्रह* हा होय. म. रा. जोशी ह्यांना हा त्यांच्याच संग्रहातील एका हस्तलिखित बाडात सापडला. प्रस्तुत ३१५ ओव्यांचा ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केला आहे (दासोपंतांचा एक अज्ञात ग्रंथ : *ग्रंथसंग्रह* ग्रंथ, *युगवाणी*, मे–जून १९७२, पृ. ११–१९). ह्या ग्रंथाची चार प्रकरणे आहेत. नमनपर ओव्यांत दासोपंतांनी आपले गुरू दिगंबर ह्यांना वंदन केले आहे. 'श्रीमद्दिगंबरानुचर' अशी नाममुद्रा पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या प्रकरणांत वापरली आहे. दिगंबरानुचर ह्या नावाने दासोपंतांची

अन्य ग्रंथरचनाही सापडते. त्यावरून हा ग्रंथ त्यांचाच हे स्पष्ट होते.

ग्रंथाचे *ग्रंथसंग्रह* हे नाव कवीनेच दिलेले असून प्रत्येक अध्यायाच्या पुष्पिकेत त्याचा उल्लेख येतो. या ग्रंथाची नोंद देव, पांगारकर, आजगांवकर ह्यांनी केलेल्या दासोपंतांच्या ग्रंथांच्या याद्यांत नाही. सर्वसामान्य जनांना अगदी सोप्या भाषेत सांख्यमतानुसारी वेदान्त समजावून देणे असा ह्या ग्रंथाचा विषय आहे. पहिल्याच प्रकरणात गुरुशिष्यलक्षणे सांगून सांख्यमत कथन केले आहे. दुसऱ्या प्रकरणात समाधीचा विचार येतो. व्यवहारलक्षण हे तिसरे व परीक्षालक्षण असे चौथे प्रकरण आहे. गुरूचा महिमा ठिकठिकाणी कवीने वर्णिला आहे. ग्रंथातील विवेचन सुबोध आहे.

दासोपंतांचा ५४८ ओव्यांचा *दत्तमाहात्म्य* हा ग्रंथ डॉ. कात्रे ह्यांनी *मराठी संशोधन पत्रिकेतून* (मसंप., जुलै १९७२ ते जाने. १९७४) क्रमशः प्रसिद्ध केला. गुरुशिष्यसंवादरूपाने दत्तजन्मकथा सविस्तर व समाहात्म्य ह्यात गुंफली आहे. ओवी साडेचार-चरणी असून भूपाळीच्या सुपरिचित चालीची तालबद्ध गेयता ह्या ओवीत आहे. हे काव्य मूलतः कीर्तनोपयोगी गेय आख्यान म्हणून कवीने रचले असावे. योगिराज दत्ताचे हे आख्यान म्हणजे सशरीर पण निष्कलंक, सगुण पण त्रिगुणास थारा न देणाऱ्या, परब्रह्माचे ज्ञाननिरूपण होय, अशा उपक्रमाने आख्यानास प्रारंभ होतो. *दत्तमाहात्म्यातील* विशिष्ट प्रसंगांस *ब्रह्मवैवर्त, ब्रह्मांड, भागवत* आणि *मार्कंडेय* ह्या पुराणांचे ते आधार देतात. ह्यामध्ये दत्तावताराचे वैशिष्ट्य आणि सार गुरूने शिष्यास समजावून सांगितले आहे. ह्या काव्यात आख्यान सांगोपांग येऊनही संक्षेपाकडे दृष्टी ठेवल्याने आटोपशीरपणा आला आहे. काव्यातील वर्णनांत आणि संवादांत अत्री, अनसूया, नारद, बृहस्पती, देवगण, कौशिक, कौशिकपत्नी, गुरू, शिष्य इ. सर्व पात्रांची स्वभावचित्रणे उत्तम साधली आहेत, प्रसंगही मनोवेधक झाले आहेत. त्यांच्या इतर ग्रंथांप्रमाणे ह्याही आख्यानाची भाषा साधीसुधी व जिव्हाळ्याची आहे. दासोपंतांच्या समग्र वाङ्मयात दत्तावतार श्रीपाद श्रीवल्लभ, नृसिंह-सरस्वती किंवा *गुरुचरित्र* ग्रंथ ह्यांचा ओझरताही निर्देश सापडू नये ह्या एका गोष्टीचे मात्र फार आश्चर्य वाटते, असे मत डॉ. कात्रे व्यक्त करतात ('दत्तमाहात्म्य : एक अभ्यास'; मसंप., एप्रि. १९७४, पृ. ९२).

वरील ग्रंथाशिवाय *अवधूतराज, वाक्यवृत्ति, प्रबोधोदय*, असे अनेक ग्रंथ व पदे, स्तोत्रे इत्यादी स्फुट कविता असंख्य आहे. मात्र आजमितीस ही सर्व कविता उपलब्ध नाही. अलिकडेच *दासोपंतांची पासोडी* हा दासोपंतांचा पंचीकरणावरील वेदान्ततत्त्वज्ञानाचे निरूपण करणारा ग्रंथ न. शे. पोहनेरकर ह्यांनी प्रसिद्ध केला आहे. ४ फूट रुंद व ४० फूट लांबीच्या कापडावर हे निरूपण उतरले आहे. म्हणूनच ह्या कापडाला 'पासोडी' असे म्हटले आहे. लेखन त्रोरूच्या लेखणीने केलेले ठसठशीत व स्पष्ट असल्याने ते सहज वाचता येते. पंचीकरण हा स्वतंत्र विषय घेऊन त्यावर एवढ्या विस्ताराने विवेचन ह्या कवीवाचून दुसऱ्या कोणीही केलेले नाही. हे विवरण पासोडीवर लिहून काढण्याची कल्पना अत्यंत अभिनव असल्याने, *पासोडीला* आगळे वैशिष्ट्य प्राप्त झाले आहे.

पासोडीवरील हा मजकूर १३ विभागांत असून वेगवेगळ्या चित्राकृतींच्या चौकटीत तो बसविला आहे. अनेक आकृतींच्या साहाय्याने विवेचनाची फोड करायची ही कल्पना त्यांना आल्यानंतर आकृती आणि विवेचन ह्यांची सांगड घालण्यासाठी कागदाहून कापड अधिक सोयीचे, भक्कम आणि टिकाऊ म्हणून पासोडीवर रचना केली. [ ⇨ ३. ] मूळ पासोडी ४०० वर्षांहून अधिक काळ लोटल्याने जीर्ण झाली होती. जुन्याबरहुकूम *पासोडीची* नवी नक्कल प्रत तयार करण्यात आली आहे (नक्कलकार राम कुळकर्णी व शं. वि. चौसाळकर, श. १८६१ / इ. स. १९३९).

दासोपंतांच्या सव्वा लक्ष पदांपैकी १३९४ *महाराष्ट्रसारस्वत* मासिकातून व १६०५ लेले ह्यांच्या संग्रहातून मुद्रित झाली आहेत. त्यांच्या ह्या *पदार्णवापैकी* २० ते ३० हजारापर्यंत रचना उपलब्ध होण्यासारखी आहे. एकनाथांप्रमाणे वेदान्तपर रूपके, भारुडे, गवळणी, गोंधळी, विराण्या व तत्सदृश अनेक रचनाप्रकार दासोपंतांनीही हाताळले आहेत व हे दालन समृद्ध केले आहे. अशा सुमारे ४८–४९ रचना, 'ललिताची पदे' ह्या नावाखाली, पोहनेरकरांनी *प्रतिष्ठान* मासिकातून छापल्या आहेत. अन्योक्ती काव्यप्रकारातही ह्यांनी रचना केली आहे. आरत्या, शेजारत्या, भूपाळ्या, पाळणे, टिपऱ्या, स्तोत्रे असे विविध रचनाप्रकार तेथे आढळतात. ग्रंथातून आत्मविश्वासाने व विद्वत्तेच्या अधिकाराने तत्त्वचर्चा करणारे दासोपंत कर्मयोगी भगवद्भक्त होऊन, बहुजनसमाजाशी एकरूप होऊन त्याला रुचेल अशा मार्गाने पदांतून परमेश्वराची आळवणी करतात. ही पदे म्हणजे विविधरसाविष्कारी रचना असून ती प्रासादिक व गेय आहेत. ह्या पदांतूनही त्यांची अद्वैतवादी विचारसरणी व्यक्त होते. प्रेमळ असे त्यांचे भक्तहृदय ह्या पदांमधून प्रस्फुरित झाले आहे. "हृदयीं वो। आठवे सगुण कृष्णश्याम कमळनयन। तेथे माझे गुंतले चेतन। रूप ययाचें मनसमोहन।" किंवा "बहुता जन्माचा जिवलग जीविचा विसावा अवधूता। तू माउली भेटसी केव्हा" अशा साध्यासुध्या रचनेत सामान्य संसारी माणसांची तरून जाण्याची तळमळ जाणवते. अशीच पदे कानडी, तेलुगू भाषेतही रचलेली आढळतात. काही वेळा संस्कृत, कानडी, मराठी, तेलुगू व हिंदी अशा पाचही भाषांचे मिश्रण करून रचना केल्या आहेत. कित्येक पदे विविध रागांतून केलेली आहेत. त्यावरून ह्यांचा शास्त्रीय संगीताचा व्यासंग चांगलाच होता असे दिसते. स्वर आणि ताल ह्यांच्या मुळाक्षरांची काही पद्ये त्यांनी बांधलेली आहेत. [ ⇨ ३. ]

दासोपंतांच्या मराठी साहित्यरचनेइतकाच दुर्लक्षित असा त्यांच्या संस्कृतरचनेचा विभागही महत्त्वपूर्ण आहे. *जाबालोपनिषदर्थप्रकाश, दत्तात्रेयमाहात्म्य, पुरुषसूक्तव्याख्या, प्रणवव्याख्या, बोधप्रक्रिया* ह्या पाच रचनांचा अनुक्रमे कीलहॉर्न, ऑफ्र्ट आणि औफ्रेक्ट ह्यांच्या हस्तलिखितांच्या सूच्यांतून 'दिगंबरानुचर' ह्या नावाखाली उल्लेख आढळतो. ह्याव्यतिरिक्त दासोपंतांची इतरही संस्कृत रचना कितीतरी आहे. *पुरुषसूक्तार्थप्रकाशामध्ये* ऋग्वेदकालीन संहितेतील पुरुषसूक्तावर विद्वत्ताप्रचुर, विस्तृत भाष्य असून *उपनिषदर्थप्रकाश* म्हणजे उपनिषदांवर लिहिलेली भाष्ये होत. *दत्तात्रेयसहस्रनामभाष्य* हे शंकराचार्यांच्या *विष्णुसहस्रनामभाष्याच्या* धर्तीवर आहे. *दत्तात्रेयमाहात्म्याच्या* ५२ अध्यायांत दत्तात्रेयांच्या अवतारकार्याची महती विशद केली आहे. दत्ताच्या सोळा अवतारांची विशिष्ट कार्ये ह्यांचे सविस्तर वर्णन तेथे येते. *सिद्धराजसमागम* हा दत्तोपासनातंत्रविषयक सटीक ग्रंथ विस्तृत पण दुष्प्राप्य असा आहे. तो नागपूर येथील त्यांच्या वंशजांच्या संग्रही आहे. *अद्वैतश्रुतिसारात* दत्तसंप्रदायाच्या दार्शनिक सिद्धान्ताचे उत्कृष्ट विवेचन येते. *गीतार्थबोध* हे *भगवद्गीतेवरील* मोठे संस्कृत भाष्य व त्यावरील *गीतार्थचंद्रिका* ही मराठी टीका होय. ह्याशिवाय अनेक स्तोत्रेही त्यांनी रचली आहेत. वरील प्रचंड रचनेवरून दासोपंतांचे अद्वैतवेदान्तादी दर्शने, तंत्रशास्त्र, भक्ती, पुराणमाहात्म्य इत्यादी विविध विषयांवर संस्कृत टीकाग्रंथ लिहिणाऱ्यांच्या संसदेत केवढे अधिकाराचे आणि मानाचे स्थान होते ते सहजच कळून येते. मातृभाषेवरील प्रेमामुळे मराठीच्या प्रांतात विहार करणारी त्यांची लेखणी तितक्याच सहजतेने संस्कृतातही रचना करू शकते हे पाहिल्यानंतर मन आश्चर्याने थक्क होऊन जाते.

अद्वैतवेदान्ताचे अनेक टीकाग्रंथांतून अधिकाराने निरूपण करणारे दासोपंत आणि बहुजनसमाजाच्या उद्धाराकरिता पदरूप लोकवाङ्मयाची रचना करणारे दासोपंत अशी त्यांची दोन रूपे त्यांच्या साहित्याने आपल्यापुढे उभी केली आहेत. दासोपंतांच्या वाङ्मयाचा

साकल्याने विचार केला असता त्यांचा पिंड हा निष्ठावंत भक्ताचा आहे, असे दिसते. अद्वैताच्या अनुभवाने भक्तिप्रेमाचा येणारा अनुभव जर नाहीसा होणार असेल तर अशा ज्ञानाला आणि अनुभवाला ते दुरूनच नमस्कार करू इच्छितात. ते म्हणतात : " ज्याच्या हृदयीं प्रेमरक्षु। तेणें पाल्हाइला संतोषु । संसारश्रमातें विनाशु । करुनी निववी ॥ तुझ्या ठायीं चित्रतुरे । ऐसें कें देखेन साकारें । तुझेनि रूपें सुंदरें। सार्वकाळ ।। तुझी प्रेम कीर्तन नवाळी । करिता निजदास राउळी । प वित्रु होईन तिया धुळी । आंगावरी घेता ॥. . .मरणकाळीं निर्वाणी । मातें नाठवो तुजवांचूनी । माझें मीपण तुझ्या चरणीं । ज्ञान सामावो ।" त्यांच्या अंतःकरणातील भगवत्प्रेम हे वरील ओव्यांतून ओसंडून वाहताना दिसते. भक्तिप्रेमावाचून असलेली विद्वत्ता ही व्यवहारात स्वार्थाकडेच पाहते. त्यामुळे तिचे महत्त्व त्यांना वाटत नाही. नाशवंत अशा प्रपंचातील कोणतीही गोष्ट ईश्वरी प्रेमाशी तोलून पाहता येत नाही असे ते सांगतात. भक्ती हेच साधन आणि साध्य सांगताना त्यांचे हळुवार अंतःकरण देवाला अपराधांची क्षमा कर असे सांगण्यास तयार नाही. परमेश्वराच्या सर्वतंत्र व स्वतंत्र इच्छेला ते प्रमाण मानतात. त्याची जी इच्छा असेल ते तो करील अशी भक्ताची विलोभनीय भूमिका ते घेतात. त्यांच्या प्रेमानंदाचे बळ कसे आहे तर "तृणतुल्य स्वर्गु जेणे । निर्गुणानंदाचें पुरें पारणें । मोक्षातें आणि उणें। हे सगुण प्रेम ॥" दासोपंतांच्या भक्तीची पायरी ही अशी वैशिष्ट्यपूर्ण आहे. ह्याच भावनेतून त्यांच्या साहित्यकृती निर्माण झालेल्या आहेत अखंड परतत्त्वाचे ध्यान करण्यासाठीच ज्यांचे वाङ्मय निर्माण झाले आहे, ते साहित्याच्या कोणत्या कसोट्यांवर घासून पाहायचे ?

दासोपंतांच्या रचनाशैलीवर ज्ञानेश्वरांच्या प्रासादिक वाणीचा परिणाम झाला आहे. दासोपंतांची ओवी, अनेक शब्द व प्रयोग, तसेच कल्पना, अशा अनेक स्थळी ज्ञानेश्वरांचा प्रभाव पडलेला सहज लक्षात येतो. मराठवाड्यात तत्काळी प्रचलित असलेल्या भाषेचेही अनेक विशेष दासोपंतांच्या प्रकाशित रचनेत पाहण्यास सापडतात. दासोपंतांचा काळ हा महाराष्ट्रातील अध्यात्मग्रंथांच्या भरभराटीचा काळ होता. ह्या काळातील बहुसंख्य कवींचा भर अध्यात्मावर होता. *एकनाथी भागवत*, *हस्तामलक*, माधवकृत *योगवासिष्ठ*, रंगनाथ मोगरेकरकृत *चित्सदानंदलहरी*, त्र्यंबकराजांचा *बालबोध*, शिवकल्याणाची *अमृतानुभवावरील टीका*, *दशमस्कंध* आणि दासोपंतांचे अनेक ग्रंथ इत्यादी रचना हा त्या विशिष्ट काळाचाच प्रभाव.

विद्वान अशा ह्या पुरुषाच्या व्यासंगात साहित्य, संगीत आणि कला ह्या तीनही अंगांचे सुरेख संमेलन झालेले आहे. अनेक रागांत त्यांनी बांधलेली पदे व विविध चित्राकृतींच्या साहाय्याने सजविलेली *पासोडी* ह्या रचना त्याची साक्ष देतात.

दासोपंतांची अफाट ग्रंथरचना ही त्यांच्या जीवननिष्ठेचा सहजाविष्कार आहे. तिला पूर्णता यावी म्हणून वेदान्तासह अनेक विषयांचे सखोल अध्ययन त्यांनी केले. ह्या व्यासंगामुळे त्यांच्या वाङ्मयकृतींना अनेकदा विद्वज्जड व्याख्यानांचे स्वरूप येते. तरी त्यांतून प्रत्ययास येणारी दत्तोपासना, दत्तसंप्रदायावरील निष्ठा आणि त्यांनी घेतलेली प्रेमळ भक्ताची भूमिका ह्यांमुळे एक प्रकारचे सहजसौंदर्य त्यांच्या रचनेत आले आहे, ही गोष्ट त्यांच्या साहित्यकृतींचा विचार करता लक्षणीय ठरते.

**रचना : मु.** – १. गीतार्णव : अध्याय पहिला; ओ. सं. ३१३३; महा. कवि, क्र. ८; अध्याय दुसरा; ओ. सं. ५६५५; महा. कवि, क्र. १०; ठाणे, १९०६; अध्याय बारा (पूर्ण); ओ. सं ९९७; अध्याय तेरावा (अपूर्ण); ओ. सं. ३२७० पर्यंत; महा. कवि, ठाणे, १९०७. २. गीतार्थबोधचंद्रिका; अध्याय ४; ओ. सं. ८८९; संपा. देशमुख, भगवंत; औरंगाबाद, १९६२. ३. ग्रंथराज; ओ. सं. १२०९; संपा. देव, शं. श्री.; पुणे, १९१४ (प्रस्तावनेसह). ४. दत्तमाहात्म्य; ओ. सं. ५४८; अ. ६; र. का. : अंदाजे इ. स. १५९०; संपा. कात्रे, स. ल.; मराठी संशोधन मंडळ प्रका., मुंबई, १९७५. ५. दासोपंतांची पासोडी; ओ. सं. १६००; संपा. पोहनेरकर, न. शे.; विस्तृत आणि विवेचक प्रस्तावनेसह; हैद्राबाद. ६. पदार्णव – (१) १३९४ पदे, महाराष्ट्र-सारस्वत मासिक, ठाणे. (२) दासोपंतकृत ललितांची पदे – ४९; संपा. पोहनेरकर, न. शे.; प्रतिष्ठान, सप्टें., ऑक्टो., डिसें. १९६१ (संहिता क्रमशः). ३. श्रीदासोपंतांची पदे –१६०५; संपा. लेले, का. वा.; वाई. **अमु.** – १. अनुगीता. २. अवधूतगीता. ३. अवधूतराज; अ. २२; ओ. सं. ५०००. ४. गीतार्थचंद्रिका; ५ ते १८ अध्याय ५. प्रबोधोदय; ओवीबद्ध. ६. वाक्यवृत्ति; गद्य व पद्य (शंकराचार्यांच्या वाक्यवृत्तीवरील टीका). ७. वेदान्तव्यवहार-सारसंग्रह (तेलुगूतील भाषान्तर उपलब्ध : मद्रास तेलुगू हस्त. सू.; वेदान्त २५८८). ८. स्थूलगीता. **स्फुट** – दत्तात्रेयावरील व इतर अनेक पदे, स्तोत्रे, कवने, नामावळ्या, पूजाविधी इ. अवांतर रचना.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. आजगांवकर, ज. र. : दासोपंत; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ३४२–३५९. २. करंदीकर, म. अ. : दासोपंत : महाराष्ट्रीय संत : वाङ्मय व जीवन; मुंबई, १९५२; पृ. १३९–१५२. ३. कात्रे, स. ल. : दत्तमाहात्म्य : एक अभ्यास; मसंप., एप्रि. १९७४; पृ. ७३–९४. ४. कात्रे, स. ल. : दासोपंत : चरित्र आणि वाङ्मय; मसंप., ऑक्टो. १९७४; पृ. १–२१. ५. कात्रे, स. ल. : दासोपंतांचा जन्मदिवस : किंचित नवा प्रकाश; विसंमंवा., नागपूर, १९६८; पृ. १०४–१११. ६. कात्रे, स. ल. : दासोपंतांची ग्रंथरचना आणि दत्तोपासना; तरुण भारत, नागपूर, दि. १३–१२–१९६४. ७. कात्रे स. ल. : दासोपंतांचे आराध्य दैवत : केवळ दत्तात्रेय; मसंप., एप्रि. १९६९; पृ. १७६–१८२. ८. कात्रे, स. ल. : दासोपंतांच्या संस्कृत रचना; विसंमंवा., नागपूर, १९६७; पृ. १६१–१७७. ९. कुळकर्णी, वा. ल. : रसाळ सुधीर : दासोपंतविरचित एक स्वतंत्र कथा; मराठवाडा विद्यापीठ पत्रिका, १९६१. १०. ढेरे, रा. चिं. : मराठी दत्तोपासनेची तेलगु धारा; मसाप., डिसें. १९६३; पृ. ४३–४७. ११. तगारे, ग. वा. : दासोपंत गीतार्णव : अध्याय अकरावा; नभामा., मार्च १९६२; पृ. २०–२४. १२. देव, शं. श्री. : दासोपंतांविषयी आणखी माहिती; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. ९–१०. १३. हनुमदात्मज : श्रीदासोपंतचरित्र; संपा. भावे, वि. ल.; ठाणे, १९०३ (इंग्रजी भाषांतर : जस्टिन ई. अॅबट, इ. स. १९२७). **इंग्रजी संदर्भग्रंथ** – १४. Abbot, Justin E. : Dasopant Digambar, 1928 (The Poet Saints of Maharashtra, 4).

**दासोभास्कर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० दिगंबर–१** – पहा **दासो दिगंबर.**

**दिगंबर–२** [का. अनु.] पदकार. कल्याणस्वामींचे शिष्य.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**दिगंबर–३** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बोधपर, भक्तिपर, ज्ञानपर पदे व श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० दिगंबरानुचर** – पहा **दासोपंत.**

**दिनकर–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रुक्मिणीस्वयंवर; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ४९.

**दिनकर–२** [का. अनु.] कवी. ह्यांनी भागवतांतर्गत दशमस्कंधातील *भ्रमरगीताध्याया*चे केलेले मराठी पद्यात्मक रूपांतर उपलब्ध आहे. (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९, पृ. ४३).

**दिनकरकवी** [अंदाजे श. १७१७ / इ. स. १७९५] चरित्रकार. ह्याने

संतचरित्रे वर्णन करणारा *भक्तमंजरी* हा ग्रंथ रचला आहे (र. श. १७१७) (निर्देश : न. शे. पोहनेरकर : प्रस्ता., दासोपंतांची पासोडी; हैद्राबाद, पृ. ३).

**दिनकर गोसावी** / ० **दिनकरस्वामी** / ० **बहिणाजी** [अंदाजे श. १५५० / इ. स. १६२८ – श. १६२५ / इ. स. १७०३] कवी. श्रीसमर्थ रामदास ह्यांच्या प्रमुख शिष्यांपैकी एक. ह्यांचे मूळचे नाव बहिणंभट ऊर्फ बहिणाजी. अहमदनगरजवळील भिंगार गावी, जोशीपणाची वृत्ती करून राहणाऱ्या पाठक उपनावाच्या यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मणाच्या कुळात ह्यांचा जन्म झाला. ह्या घराण्याचे मूळ उपनाव मुळे; परंतु ज्योतिषाच्या व्यासंगामुळे पाठक हे उपनाव रूढ झाले. जेजुरीचा खंडोबा हे ह्यांचे कुलदैवत व मातापूरची देवी ही कुलस्वामिनी. वडिलांचे नाव **नरहरी.** आईचे नाव द्वारकाबाई. बहिणाजी ह्यांचे संस्कृत व मराठी भाषेचे अध्ययन त्यांच्या वडिलांपाशी झाले. बहिणाजींनी पूर्वकालीन त्याचप्रमाणे समकालीन कवींची कविता, स्वतः संग्रह करून, चांगली वाचली होती.

बहिणाजी हे लहानपणापासून विरक्त वृत्तीचे होते. त्यांची ही वृत्ती विवाहोत्तर अधिकाधिक वाढत गेली. एक दिवस ते गृहत्याग करून भिंगारच्या पूर्वेस १३-१४ कोसांवर डोंगरात वृद्धेश्वर (म्हातारदेव) नावाचे एक पुराणप्रसिद्ध स्वयंभू शिवलिंग आहे तेथे जाऊन राहिले. ह्या शिवलिंगासंनिध त्यांनी बारा वर्षे योगसाधनेत व्यतीत केली. साधनेच्या अखेरच्या काळात (श. १५७५, फाल्गुन पौर्णिमा) श्रीसमर्थांनी त्यांस स्वप्नात दर्शन देऊन त्यांच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेविला. पुढे एक वर्षाने (श. १५७६, फाल्गुन पौर्णिमा, रविवार / इ. स. १६५४) समर्थांनी ह्यांस प्रत्यक्ष सांप्रदायिक उपदेश देऊन त्यांचे नाव दिनकर असे ठेविले. 'विप्रकुलोत्तम कर्म करावें। रामउपासन चित्ति धरावें ।।' असे सांगून दोन तसू उंचीची तांब्याची श्रीराममूर्ती त्यांनी ह्यांस पुजेसाठी दिली. श्रीसमर्थांकडून अनुग्रहप्राप्ती झाल्यावर दिनकर भिंगारास परत न जाता तिसगाव ह्या ठिकाणी मूर्तीची स्थापना करून मठ करून कायमचे राहिले. रामदाससंप्रदायी १४ प्रमुख मठांत तिसगावचा हा मोठा मठ मोडतो.

"दिनकर ह्यांनीं *स्वानुभवदिनकर* नांवाचा एक मोठा ओवीबद्ध ग्रंथ व बरीचशी स्फुट कविता रचली आहे. *स्वानुभवदिनकरा*चे १६ कलाप असून ८१ किरणें आहेत व ओवीसंख्या ६७५० आहे. ह्या ग्रंथांत वेदान्त व भक्तिमार्ग ह्यांचें विवेचन फार उत्तम प्रकारें केलें आहे. [⇨ ३.] ह्या सर्व कवितांचे मुख्य विषय भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि असून त्यांचें पर्यवसान श्रीरामोपासनेंत झालें आहे. . .एकंदर कविता अस्सल रामदासी थाटाची आहे; रामदासस्वामींच्याच शिकवणीचा अनुवाद दिनकरांनीं सर्वत्र केला आहे. . .मात्र त्यांचा स्वतःचा अधिकार ह्या कवितेंत प्रतीत झाल्याशिवाय राहात नाहीं." (ल. रा. पांगारकर; मवाइ., खं. ३, पृ. ६८२–८३). आध्यात्मिक अनुभवाच्या आधारावर ज्या काही व्यक्तींकडून लेखन घडून मराठी पारमार्थिक वाङ्मयात मोलाची भर पडली त्यांपैकी दिनकर गोसावी हे एक होत.

**रचना : मु.** – १. श्रीस्वानुभवदिनकर (प्रस्तावनेसह); संपा. देव, शं. श्री.; धुळे, १९११. २. श्रीदिनकरांची स्फुट कविता; अभंग, श्लोक, पदे, सवाया, घनाक्षरी वगैरे; संपा. देव, शं. श्री ; धुळे, १९१७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : दिनकर गोसावी रामदासी; मकच., खं. १; मुंबई, १९१४; पृ. ८०–१००. २. पांगारकर, ल. रा. : दिनकर गोसावी रामदासी; मवाइ., खं. ३; मुंबई, १९३९; पृ. ६७८–९४.

**दिनकरतनय (रामचंद्र)** / ० **दिवाकरात्मज रामचंद्र** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दिनकरराव** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरकाल] कवी. बहुधा ब्राह्मणेतर शाहीर वर्गापैकी असावा. वि. का. राजवाडे ह्यांच्या मते हा कवी श. १६८० / इ. स. १७५८ नंतरचा आहे. ह्याने रचलेल्या *शिवरात्रीकथे*त अनेकचरणी साक्या व पदे मिळून पद्यसंख्या १९ आहे. काव्य रसाळ आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : दिनकररावकृत शिवरात्रीकथा; भाइसंमंइति. श. १८३६; पृ. १७८.

**दिनकर व्यंकटेश** [का. अनु.] कवी. गुरू : विश्वंभर. ह्यांचे लेखन अशुद्ध असून लेखकाने आपले व गुरूचे नाव पोथीत शेवटी दिले आहे.

**रचना : अमु.** – श्लोक मनाचे, २०५, आरतीसह; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दिनकरसुत** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – भागवत ग्रंथाची आरती; मआ., पृ. ३९५.

० **दिनकरस्वामी** – पहा **दिनकर गोसावी.**

**दिनाजी कोयाळ** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. हे श्रीमंत नानासाहेब पेशव्यांकडे चाकरीस होते. ह्यांची *सरकारास विनंति* (ग्रं. सं. ९) ही रचना म्हणजे पद्यात लिहिलेला एक रजेचा अर्ज आहे. हे कवन वैशिष्ट्यपूर्ण असून त्यातील रोजमोरा, कर्जदारी, विदा करणे हे अरबी व फारसी प्रयोग लक्ष वेधून घेतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा. : मराठेशाहीतील एक पद्यमय अर्ज : सरकारास विनंति (लावणी); मसंप., एप्रि. १९६७; पृ. १६६–६७.

**दिनासा** [अंदाजे इ. स. १७७०] जैन कवी. हे बघेरवाल ज्ञातीतील होते व श. १६९२ / इ. स. १७७० च्या सुमारास झाले. ह्यांच्या *बारमासी* व *चिंती रे माझ्या मना* अशा दोन मराठी रचना आहेत. हिंदी व गुजरातीतील *बारमासी* हे एक आवडते लोकगीत समजले जाते. त्यात विरहिणीच्या अवस्थेचे वर्णन केलेले असते. नेमिनाथांनी विवाहापूर्वीच त्याग केलेल्या राजीमतीच्या विरहाच्या यातना दिनासाने आपल्या *बारमासी*त व्यक्त केल्या आहेत. *चिंती रे माझ्या मना* ह्या पदात वैराग्यभावना व्यक्त केली आहे.

**रचना : मु.** – बारमासी; ओ. सं. १३; सुषमा, एप्रि.–मे १९६०. **अमु.** – चिंती रे माझ्या मना : गीत; कडवी ६; शिरड संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : दिनासा; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८, पृ. ९१–९२.

**दियोगु रिबैरु (पाद्री)** / ० **(फा.) रिबैरो** [इ. स. १५६० – १८ जून १६३३] गोमंतकीय मिशनरी ग्रंथकार व व्याकरणकार. ह्यांचा जन्म लिस्बन (पोर्तुगाल) येथे झाला. इ. स. १५८० त वयाच्या विसाव्या वर्षी जेजुइट पंथात प्रवेश करून हे गोव्याला आले. रिबैरूंना सासष्टीच्या मिशनचा 'ख्रिस्ताचा प्रेषित' असे म्हणण्यात येते. ह्यावरून धर्मप्रचाराचे त्यांनी केलेले कार्य केवढे महत्त्वाचे होते हे समजू शकते. धर्मप्रचाराचे कार्य सुकर व्हावे म्हणून ह्यांनी स्थानिक गोमंतकी बोलीत रचना केली. रायतूर (गोवा) येथे ह्यांचे देहावसान झाले.

ह्यांचा सर्वात महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे ह्यांनी तयार केलेली *क्रिस्ती दौत्रीन* (ख्रिस्तीधर्मतत्त्वावरील प्रश्नोत्तरी). ह्या ग्रंथाला लेखकानेच *क्रिस्तांवाचे दौक्त्रिनिचो अर्थु* असे नाव दिले आहे. ह्याशिवाय सासष्टीच्या मिशनमधील निरनिराळ्या पाद्र्यांनी तयार केलेल्या 'कानारी' कोकणी भाषेच्या कोशात महत्त्वाची भर घालून इ. स. १६२६ त रिबैरूंनी तो वाढविला. तसेच स्टीफन्सनी भाषान्तरित केलेल्या *क्रिस्ती दौत्रीनी*त आणि त्यांच्या गोमंतकी बोलीच्या व्याकरणातही रिबैरूंनी भर घातली.

रिबैरूंनी आपली 'दौत्रीन' कार्देआल रॉबर्त बॅलार्मिन आणि इतर लेखकांच्या ग्रंथांवरून रचली असल्याचे मुखपृष्ठावरच नमूद केलेले

आढळते. या दौत्रीनीची एक प्रत लिस्बन येथील सरकारी वाचनालयात आहे. तिची मायक्रोफिल्म मराठी संशोधन मंडळ, मुंबई येथे आहे. दौत्रीनीची एकूण १०५ पृष्ठे आहेत. शिष्याने उपस्थित केलेल्या शंकांचे गुरू निरसन करतो असे तिचे स्वरूप आहे. प्रतिपाद्य विषय परिणामकारक व्हावा म्हणून दृष्टान्तरूपकादी अलंकारांचा समयोचित उपयोग लेखकाने केला आहे, तसेच *ख्रिस्ती पुराणा*तील अनेक प्रसिद्ध साधुसंतांच्या कथाही सांगितलेल्या दिसतात. ख्रिस्ती धर्माचा प्रचार करणे हा मुख्य उद्देश असल्याने हिंदूंच्या धार्मिक चालीरीतींवर, देवदेवतांवर त्यांनी हल्ला चढवला आहे. लेखकाने पोर्तुगीज व लॅटिन शब्द बरेच वापरलेले दिसतात. तसे असले तरीही जुन्या ग्रांथिक मराठीशी ह्या ख्रिस्ती ग्रंथातील भाषेची घडण एकरूप झालेली आहे ह्याचा प्रत्यय ग्रंथ वाचून येतो.

*कानारी कोशा*ची एकंदर २६९ पाने (फोलियो) असून त्यात सुरुवातीला 'कोकणी' भाषेतील शब्द व नंतर पोर्तुगीजमध्ये अर्थ दिलेला आढळतो. जुन्या ग्रांथिक मराठीतील शब्दांचा त्यात फार मोठा भरणा आहे. बोलीतील निरनिराळ्या लकबांची उदाहरणे देऊन हा कोश रिबैरूंनी अद्ययावत करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो.

**रचना : मु.** – क्रिस्ती दौत्रीन; पृ. सं. १०५; रायतूर–गोवा, १६३२.
**अमु.** – कानारी कोश; पृ. सं. २६९; र. इ. स. १६९६; हस्त. प्रत; नवा गोवा सरकारी वाचनालय.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा. : (पाद्री) दियोगु रिबैरु; सशगोबो., मुंबई, १९६३; पृ. १८२–२१९.

**दिलसुख** [अंदाजे इ. स. १८२३] जैन कवी. ह्याने आपल्या *स्वात्मविचार* ग्रंथाच्या शेवटी स्वतःचे नाव व गुरुनाम ह्यांचा उल्लेख केला आहे. 'इति स्वात्मविचारे श्रीमज्जिनेंद्रप्रणीत सिद्धान्तानुसारे श्री भट्टारक पद्मनंदी प्रिय शिष्य दिलसुख विरचिते भूलोकभाषान्वय विचार संपूर्णमस्तु.' ह्यावरून कवीचे गुरू पद्मनंदी होते असे दिसते. कारंजाच्या बलात्कारगणाच्या भट्टारक पीठावर हे संवत १८५० ते १८७९ च्या दरम्यान होते. त्यांचा शिष्य दिलसुख कवी हाही त्यांच्या कारकीर्दीतच विद्यमान असावा.

कवीचा *स्वात्मविचार* ग्रंथ न्यायपद्धतीचा आहे. आत्म्याचे अस्तित्व जैन दर्शनात कसे मानले जाते हे इतर दर्शनांचे खंडन करून सांगितले आहे. हा ग्रंथ अनुवादित नसून मराठीत स्वतंत्र ग्रंथनिर्मिती करण्यासाठी रचला गेला. ह्या ग्रंथात संस्कृत उतारे अधूनमधून येतात. ग्रंथकर्त्याचा संस्कृत भाषेचा अभ्यास चांगला असावा. त्याची मराठी भाषाही संस्कृत वाक्यरचनेच्या वळणाची वाटते.

**रचना : अमु.** – स्वात्मविचार; कारंजा, जैन हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : दिलसुख; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. १०७–८.

**दिवाकर कपाटे** [अंदाजे श. १५१९ / इ. स. १५९७] महानुभाव कवी. कवीश्वर आम्नायातील नागींद्रशिष्य मुरारीमल्ल हे ह्यांचे गुरू. ह्या कवीने सुमारे आठशे ओव्यांचा *मतिरत्नाकर* हा प्रबंधग्रंथ लिहिला आहे. महानुभावपंथीयांचे तत्त्वज्ञान समजून घेण्याच्या दृष्टीने हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त आहे. ग्रंथ गुरुशिष्यसंवादपद्धतीने लिहिला आहे. ग्रंथसमाप्तिनिर्देशाची ओवी ह्याप्रमाणे : "शके पंधरासें वर्षे एकुनविस अवधारी । हेमलंब संवत्सरी पूर्णावलीनगरी । भाद्रपद शुद्ध द्वादशी गुरवारी । ग्रंथ संपूर्ण जाला ॥"

पेशावर येथील कृष्णमंदिरातून डॉ. य. खु. देशपांडे ह्यांना ह्या ग्रंथाची जी एक पोथी उपलब्ध झाली त्यातील एका ओवीवरून प्रस्तुत ग्रंथ कोणा समकालीन गोपाळदासाने शोधून 'आगळा' वाढविला असे स्पष्ट होते. ती ओवी अशी : "दिवाकर कपाटीयें मतप्रबन्धू केला ॥ तो गोपाळदासें सोधीला ॥ आगळाही वाढविला ॥ संख्या नवशते शतश्लोक ॥ ग्रंथकाराने ह्या ग्रंथाचे स्वरूप सांगताना म्हटले आहे की हा गुणीजनांना निर्मळ उपदेश करणारा, कुतर्क करणारांना अंकुश घालणारा आणि वादविवाद करणारांना त्रासदायक वाटणारा असा ग्रंथ आहे.

ह्या ग्रंथात शंकराचार्यांच्या अद्वैतमताचे खंडन, महानुभावांच्या विशिष्ट पद्धतीने केले आहे. अन्य मतखंडनासाठी ग्रंथकाराने श्रुति-स्मृति-गीता-भागवतादी ग्रंथांचा आधार घेतला आहे. तसेच भारतीय तत्त्वज्ञानातील षड्दर्शनांचाही परामर्श घेतला आहे. अहिंसावादी जैन, शिवभक्त लिंगायत, नाथपंथ इत्यादिकांच्या मताचे खंडन करून ह्यांनी यथार्थ निर्णय कोणता हे पुढील ओव्यांत सांगितले आहे : "यथार्थ निर्णय आइका आता । ब्रह्म ते जीव नव्हे सर्वथा । तयासी संसारबाधा बोलता । दूषण असे ॥ जीव अज्ञान अविद्यायुक्त सबळ । ईश्वर शुद्ध बुद्ध नित्य मुक्त केवळ । आनंद पूर्ण देऊनि करी निर्मळ । जीवात्मयाते ॥" असे विचार व्यक्त करून ब्रह्मविद्या हीच एकमेव तारक विद्या आहे असे कवी ठासून सांगतो.

महानुभावांच्या मते श्रीकृष्णचरित्र हेच फक्त मोक्षदायक असल्याने विशेषतः कृष्णभक्तीचेच वर्णन ह्या ग्रंथात केले आहे. [ ⇨ ३.]

**रचना : मु.** – मतिरत्नाकर अथवा मतिप्रबंध; ओ. सं. ८१८; र. श. १५१९ / इ. स. १५९७; पुणे, १९०१.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, अ. ना. : मतिरत्नाकर; प्रामवाइ., भा. २; पुणे, १९७३; पृ. ३२२–२७. २. देशपांडे, य. खु. : दिवाकर कपाटेकृत मतिरत्नाकर; ममवा., १९६०; पृ. ७०–७२. ३. देशपांडे, य. खु. : दिवाकर कपाटेकृत मतिरत्नाकर; मवाइ., खं. २ (संपा. पांगारकर, ल. रा.); नाशिक, १९३५; पृ. ७६०–७६१.

**दिवाकरनंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त यादी, क्र. ३.

**० दिवाकरबाबा (वर्धनस्थ)** – पहा **दिवाकरमुनी.**

**दिवाकरमुनी / ० दिवाकरबाबा (वर्धनस्थ)** [अंदाजे श. १२३० / इ. स. १३०८]. महानुभाव गीताटीकाकार. कवीश्वर आम्नायातील. कवीश्वर आम्नायाच्या वंशवृक्षाप्रमाणे ह्या कवीची परंपरा भास्कर कवीश्वर > नागांबा (श. १२००) > मुनि दिवाकर (श. १२३०) अशी आहे. (डॉ. य. खु. देशपांडे : शिष्यपरंपरा आणि वंशवृक्ष परिशिष्ट; ममवा., पुणे, १९६०). वि. ल. भावे ह्यांनी *दिवाकरी गीताटीके*चा कर्ता म्हणून दिवाकरबाबा वर्धनस्थ ह्यांचा निर्देश केला आहे (ममग्रंककासू., पृ.१४). महानुभावपंथीयांत प्रसिद्ध असलेल्या *दिवाकरी गीताटीके*चा कर्ता हा श. १२३० मध्ये विद्यमान असलेला दिवाकरमुनीच होय, कारण पंथीयांत दुसऱ्या कोणत्याही दिवाकराने गीताटीका लिहिल्याचा उल्लेख नाही, असे मत प्रा. व. दा. कुळकर्णी व्यक्त करतात (मस्वासंप., १९७१, पृ. ५०). ग्रंथातील भाषेच्या प्राचीन स्वरूपावरून हा समज दृढ होतो, असेही ते सांगतात.

महानुभावपंथीयांच्या ग्रंथसूच्यांतून ह्या टीकेचे उल्लेख सापडत असले तरी आजपर्यंत ती अज्ञातच होती. प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांनी प्रसिद्ध केलेल्या ह्या टीकेच्या १५व्या अध्यायाच्या निमित्ताने ती प्रथमच प्रकाशात येत आहे. ह्या टीकेच्या प्रत्येक अध्यायाच्या अखेरीस 'टीका-दीवाकरी' असा निर्देश कवी करतो. गीतेतील मूळ संस्कृत श्लोक देऊन त्या श्लोकांतील प्रत्येक पदावर गद्य टीका केली आहे. पदपदार्थाचा झाडा देणारी ही वैशिष्ट्यपूर्ण टीका आहे. अर्थविश्लेषणाबरोबर महानुभावपंथीय तत्त्वज्ञानानुसार प्रत्येक पदाच्या अर्थाचे स्पष्टीकरण टीकाकाराने केले आहे. उदा., '*अधःशाखा* म्हणजे खाली आहेत यक्षनिपर्यंत शाखा :' (श्लो. १), '*ईश्वर* म्हणजे दत्तसामर्थ्यरूप जो जीव तो' (श्लो. ८), '*योगिन* म्हणजे योगी जें महानुभाव ते' (श्लो. ११), किंवा '*क्षर* म्हणजे प्रपंचु तो', '*कूटस्थ* तो जीव दार्थु तो अक्षरु' (श्लो. ११) ह्या

सर्व महानुभाव तत्त्वज्ञानातील संज्ञा आहेत. त्यानुसारे अर्थाचे स्पष्टीकरण केले आहे. ह्या गीताटीकेची (हस्त.) प्रत हैदराबाद येथील 'श्रीगीता-आश्रमात' आहे.

**रचना : मु.** – दीवाकरी : गद्य गीताटीका; अ. १५ वा; संपा. : कुळकर्णी, व. दा.; मस्वासंप., हैद्राबाद, १९७१; पृ. ५१–५५; माहिती पृ. ४९–५०.

**० दिवाकरात्मज रामचंद्र** – पहा **दिनकरतनय**.

**दीनकवि / ० बहिणाशिष्य** [अंदाजे श. १६५२ / इ. स. १७३०] कवी. तुकारामांच्या अनुग्रहित बहिणाबाई ह्यांचे शिष्य. दीनकविकृत *पंचीकरण* ग्रंथ ओवीबद्ध असून त्याची १८ प्रकरणे आहेत. १८ व्या प्रकरणात ह्यांनी आपली गुरुपरंपरा दिली आहे. त्यापैकी एक महत्त्वाची ओवी पुढीलप्रमाणे : "नमो ज्ञाननाथ ज्ञानरुपा। नमो पांडुरंगा सस्वरुपा। नमो बहेणाबायी सद्गुरुबापा। वचन अक्षेपा चीत दीजे ॥ ५४॥"

समाप्तीच्या ओव्यांत 'कृष्णेच्या उत्तरतीरी गुरुकृपेने ग्रंथाचे लेखन श. १६५२ मध्ये पूर्ण झाले' अशी माहिती सापडते. ग्रंथ गुरुशिष्यसंवाद-रूप आहे. कवीने परंपरेत ज्या सत्पुरुषांचा उल्लेख केला आहे त्यावरून नाथसंप्रदायप्रणीत भागवतधर्माचा तो अनुयायी दिसतो. कवीच्या कवितेचा पुढील नमुना पाहा : "नमो साधु सज्जनासी। जे परब्रह्मीचे मीरासी। जे कैवल्यसुखाची रासी। नमन पायांसी तयांच्या ॥ १३॥ जे निर्विकल्पाचे सागर। जे वीवेकाचे आगर। जे अनाथाचे माहेर। पूर्णपणे जे ॥ १४॥ जे कारुण्याचे वोतले। जे भूतदयाघन संचले। जे अहिंसेसी जाले। माहियेर ॥ १५॥" ग्रंथाची हस्तलिखित प्रत भारत इतिहास संशोधक मंडळात आहे. दीनकवीच्या नावावर पदपदांतरेही आढळतात (सवामं. हस्त. सू., खं. २); पण *पंचीकरण*कर्ता व हा पदकार एकच की भिन्न ते समजण्यास मात्र साधन नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पोतदार, द. वा. : दीनकविकृत पंचीकरण; भाइसमंइति., श. १८३७; पृ. २७८. २. पोतदार, द. वा. : बहिणाबाईची गुरुपरंपरा; भाइसमंइति., श. १८३७; पृ. २७१–७४.

**दीन कृष्ण** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० दीनदत्तपदांकित मुकुंद** – पहा **मुकुंद–३**.

**दीन दास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू, खं. २.

**दीननारायण** [अंदाजे इ. स. चे. १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. पुणे जिल्ह्याच्या, खेड तालुक्यातील पौड ह्या गावचे राहणारे. ह्यांच्या 'लक्ष्मी-कांता', 'शेषाद्रि', 'व्यंकटरमण' व 'श्रीगुरूची' अशा चार आरत्या व एक भूपाळी ही रचना ल. रा. पांगारकर ह्यांनी *मुमुक्षु* मासिकात प्रसिद्ध केली आहे. रचना चित्तवेधक आहे. ह्या कवीचा कवितासंग्रह पांगारकरांच्या संग्रही होता अशी माहितीही मिळते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पांगारकर, ल. रा. : दीननारायण; मुमुक्षु, जुलै, १९२४; पृ. ३१–३३.

**दीन नारायण (विठ्ठल)** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – वैद्यकसार; ले. श. १५९९/इ. स. १६७७; संककासू., पृ. ४९.

**दीन यादव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**दीन राघव** [का. अनु.] पदकार. शिरगाव येथील रामदासी मठाच्या परंपरेतील.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दीन शिव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दीन श्याम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदे, श्लोक, इ.; सवामं. हस्त. सू., खं. २.

**दीन सदाशिव** [अंदाजे इ. स. १७२९ नंतर] कवी. समर्थवाग्देवता-मंदिरातील ४१६ क्रमांकाचे बाड दीन सदाशिव कवीचे आहे. हे कोण होते, केव्हा होऊन गेले, त्यांचे गुरू कोण ह्याचा थांग बाडातील ग्रंथरचनेवरून लागत नाही. हे बाड बहुधा कवीच्या स्वतःच्या हस्ताक्षरातील असावे. त्यात ह्यांची ४०–५० पदे, *द्रौपदीचा धावा* (३८ श्लोक), *गंधमादनपर्वत भारती कथा* (३९ श्लोक) व *अहिल्योद्धार* (२२ श्लोक), अशी तीन प्रकरणे आहेत. ह्यांच्या पदांत *ज्ञानेश्वरी*, *विवेकसिंधु*, *नाथभागवत*, *दासबोध* ह्या ग्रंथांबरोबर *रामविजय*, *हरिविजय* ह्या ग्रंथांचाही मोठ्या आदराने उल्लेख केलेला सापडतो. त्यावरून हे सदाशिव श्रीधरानंतर होऊन गेले असावेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : दीन सदाशिव; रासं., खं. १; धुळे, १९३३; पृ. ३४२–३४३.

**दीनात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**दीनानाथ–१** [श. १६४७ / इ. स. १७२५ – श. १७४० / इ. स. १८१८] कवी. हा वऱ्हाडातील आहे. पित्याचे नाव सक्राजीपंत. हे दही-हांड्याचे कुळकर्णी होते. पुढे तेथून ते कारंजास आले. कारंजासच दीना-नाथांचा जन्म झाला. कौंडिण्यपूरचे सदाराम महाराज हे त्यांचे गुरू होत. दीनानाथ अभंगरचना करीत असत. त्यांचे अभंग पाहिल्यानंतर वऱ्हाडात त्यांनी विठ्ठलभक्तीचा प्रसार केला आहे असे दिसून येते. गो. का. चांदोरकरांनी ह्यांच्या नावावर स्फुट रचनेखेरीज *प्रल्हादचरित्र* हा ग्रंथ दिलेला आढळतो (संककासू., पृ. ५०). ह्यांची स्फुट कविता प्रा. सुरेश जोशी ह्यांच्या पाहण्यात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, सुरेश; दीनानाथांचे अभंग; अहमदनगर कॉलेज वार्षिक; खं. ११ ; १९५७–५८.

**दीनानाथ–२ / ० दीनेश गिरिधर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे ; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**दीनानाथ गोपाळ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – ज्ञानेश्वरांची आरती; संककासू., पृ. ५०.

**० दीनेश गिरिधर** – पहा **दीनानाथ–२**.

**दीपराज राघव** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – वछळासैंवर; प्रसंग १३, ओ. सं. १०२९; प्र. ले. का. : श. १६०९ / इ. स. १६८७; हस्त. प्रत रिद्धपूर येथील गोपीराज ग्रंथालयात; मसंम., हवना., पृ. १२७.

**दीक्षित** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – ध्रुवचरित्र; सवामं. बा. १४५०, हस्त. सू., खं. २.

**दृष्टांतकवी** [का. अनु.] महानुभावकवी. ह्याने अद्वैतमतखंडन करण्यासाठी *दृष्टांतप्रबोध* नावाचा ग्रंथ लिहिला आहे. ग्रंथाचे सात प्रसंग असून एकंदर ओवीसंख्या ४१७ आहे. कवीने ग्रंथात स्वतःविषयी, आपल्या गुरूविषयी किंवा काळाचा, कोणताच उल्लेख केलेला नाही. ग्रंथाची भाषा नाथकालीन वाटते.

ग्रंथारंभीच दत्तात्रेयांना नमन करून 'तुमच्या कृपेने ज्ञानअज्ञानभेद सांगेन ॥ १६॥' असे कवी म्हणतो. ब्रह्मज्ञानाचा गड्डा काय तो आपल्याच हाती लागलेला आहे व इतर सर्व मूर्ख आहेत, अशी ह्याची दृढ भावना आहे. म्हणूनच तो 'स्वर्गी बृहस्पतीसारिखा पंडित। परि नेणे ब्रह्मज्ञान-सिद्धान्त ॥' किंवा 'तैसा नव्हे ब्रह्मज्ञ कविता। रसाळ बोले सांडौनि सिद्धान्ता।' अशा प्रकारचे उद्गार गर्वाने काढताना दिसतो.

दृष्टांतकवी इतरांचा असा उपहास करीत असला तरी त्याने स्वतः मात्र अगदी पोरकटपणाने अद्वैतमतखंडन केले आहे. उदा., "ही बहु असो वित्पत्ती। जीवीं किंचित् ब्रह्म साजात्य (?) असती। तरी अद्वैतार्थ मानितो अति प्रीती। म्हणे दृष्टांत कवि।" हे अद्वैतवादखंडन

करताना वाचेने अन्यथा ज्ञान उच्चारल्याने त्याचे प्रायश्चित्त घेण्यासाठी आता भगवंताचे स्तवन करतो असे कवी म्हणतो. शेवटच्या १३ ओव्यांत भगवंताचे स्तवन करून वरील महापातकाचे कवीने प्रायश्चित्तही घेतले आहे. विभिन्न पंथीयांमधील वादांना कसे विकृत स्वरूप प्राप्त होत असे त्याचे निदर्शन ह्या ग्रंथात पाहण्यास सापडते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : दृष्टांतकविकृत दृष्टांत-प्रबोध; भाइसंमंइति. श., १८३८; पृ. ४२-४४.

**देमाइसा** [का. अनु.] महानुभावीय कवयित्री. हिने काही पदे रचली आहेत (अ. ना. देशपांडे; प्रामवाइ., भा. १, पूर्वार्ध, पृ. ५०४).

**देवकर माधवराय** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – बोधपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**देवदत्त** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना :** अमु. – सिद्धान्त अजपा; गो. का. चांदोरकर संग्रह, संककासू., पृ. ५०.

**देवदास–१** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक] महानुभाव कवी. *ब्रह्मांडगोलक* ग्रंथाचा कर्ता. पुरुषोत्तममुनीने मूळ *निष्कलंकाध्याय* हा ग्रंथ १२५ ओव्यांचा रचला होता. त्या ग्रंथात प्रकरणोचित स्पष्टार्थदर्शक भर ह्या कवीने घालून तो २७५ ओव्यांचा केला व ह्या ग्रंथाचे नाव *ब्रह्मांडगोलक* ठेवले. पुढे गोपाळदास दर्यापूरकराने स्पष्टार्थदर्शक आणखी २०० ओव्या घातल्या. पण तेवढ्याने त्याचे समाधान होईना म्हणून त्यात स्पष्टतार्थ आणखी ओव्या घालून, २७५ ओव्यांचा वरील ग्रंथ आणि दासश्रीगुरूचा २८३ ओव्यांचा *निष्कलंकाध्याय* ह्यांचा थोड्याफार फरकाने अंतर्भाव करून १११२ ओव्यांचा *निष्कलंकब्रह्मांडगोलक* ग्रंथ तयार केला. ही माहिती त्यानेच आपल्या *निष्कलंकाध्याय-ब्रह्मांडगोलक* ह्या ग्रंथाच्या पूर्वपीठिकेत दिली आहे (ओ. १०९९ ते ११११).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, य. खु. : मवाइ., खं. २; संपा. पांगारकर, ल. रा.; नाशिक, १९३५; पृ. ७५५.

**देवदास–२ (दादेगावकर) / ० देवाजी** [अंदाजे श. १५३० / इ. स. १६०८ – श. १५७० / इ. स. १६४८] कवी. समर्थांचे शिष्य. दादेगाव (जि. नगर) मठाचे अधिपती व मूळ संस्थापक. *व्यंकटेशस्तोत्र*कर्त्या देवदासांहून हे वेगळे आहेत. ह्यांची शिष्यपरंपरा देवदास > कृष्णाजी > जनार्दन > दाजी > आत्माराम > नारायण अशी असून गादी ब्रह्मचाऱ्यांची आहे. ह्यांचा समाधिशक उपलब्ध नाही. माघ तृतीयेस ह्यांची पुण्यतिथी येते.

देवदासांची रचलेली पदे, स्तोत्रे, अष्टके, श्लोक व प्रकरणे अशी स्फुट कविता विपुल आढळते. ह्यांनी हिंदी पदरचनाही बरीच केली आहे. हिंदी पदांतून मुसलमानी सत्तेवर ह्यांनी कडाडून हल्ले चढविले आहेत. 'कविता प्रेमळ व भक्तिभावाने ओथंबलेली आहे', असे शं. श्री. देव म्हणतात (सवामं. बा. ७७९).

**रचना :** अमु. – १. कृष्णावतारी हनुमंत भेट (श्लो. ३२); २. गजेंद्रमोक्ष; श्लोक २४; ३. गोपीचंदाख्यान; ४. स्फुट कविता; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**देवदास–३ / ० देवीदास / ० देवीदास चैतन्य** [का. अनु.] चैतन्यसंप्रदायी कवी. ह्यांचे कुलदैवत गिरीचा व्यंकटेश. ह्या देवदासांचा काळ मात्र निश्चितपणे सांगता येत नाही. व्यंकटेश ह्या दैवताच्या स्तुतिपर रचलेले देवदासांचे *व्यंकटेशस्तोत्र* महाराष्ट्रातील आबालवृद्धांच्या नित्यपाठातील अत्यंत लोकप्रिय असे स्तोत्र आहे.

समर्थांचे शिष्य दादेगावकर (मठपती) देवदास (श. १५३० ते १५७० चा सुमार) हे ह्या देवदासांहून भिन्न होत. ह्या दोन देवदासांच्या रचनेची सरमिसळ धुळे समर्थवाग्देवतामंदिराच्या व तंजावर सरस्वती महाल येथील हस्तलिखित संग्रहाच्या सूच्यांत झालेली दिसते.

*व्यंकटेशस्तोत्र*कर्ते देवदास हे चैतन्यांचे अंकित असल्याचे निर्देश त्यांच्या ग्रंथांत सापडतात. *व्यंकटेशस्तोत्रा*च्या १०१ क्रमांकाच्या ओवीत 'श्री चैतन्यकृपा अलौलिक । संतोषोनि वैकुंठनायक ।' असा चैतन्यकृपेचा उल्लेख कवीने केला आहे. ह्यांच्या *संतमालिके*चा शेवट "ईति श्री करुणामृत चैतन्यांकित देवीदासकृत संतमालिका ग्रंथ संपूर्णमस्तु ॥" असा आहे. ह्या दोनही ठिकाणचा चैतन्य हा शब्द गुरुवाचक आहे. ही चैतन्यपरंपरा कोणती हे समजण्यास साधन नाही. *व्यंकटेशस्तोत्रा*ची चिकित्सक संपादित आवृत्ती प्रसिद्ध करणारे डॉ. ह. रा. दिवेकर ह्यांनी कवीचा काळ इ. स. १५२८ ते १६२८ असा मानला आहे. वि. का. राजवाडे ह्यांनी *संतमालिके*च्या अखेर येणाऱ्या शकाच्या उल्लेखावरून श. १६०८ / इ. स. १६८६ हा ह्या रचनेचा काळ निश्चित केला आहे. हा शक व समर्थसंप्रदायी दादेगावकर देवराजांचा काळ लक्षात घेऊन चैतन्यशिष्य देवदासांचा काळ द. बा. पोतदार ह्यांनी सुमारे श. १५८० ते १६२० असा दिला आहे. कवीचे 'देवीदास' हेच नाव विशेषेकरून प्रचलित आहे.

*व्यंकटेशस्तोत्रा*च्या आजपर्यंत अनेक आवृत्त्या छापून निघाल्या आहेत. १०८ ओव्यांचे हे स्तोत्र उत्कट भक्तिभावाने ओतप्रोत भरलेले आहे. कवीने आपल्या ह्या रचनेस *प्रार्थनाशतक* असे म्हटले आहे. ह्याचे कारण ह्यातील पहिल्या पाच ओव्या ह्या नमनाच्या व शेवटच्या तीन ओव्या उपसंहाराच्या आहेत. खरा ग्रंथ 'जयजयाजी व्यंकटरमणा' ह्या ६ व्या ओवीपासून सुरू होतो व 'त्याचे चरणी ठेवोनिया भाव । वरप्रसाद मागावा' (ओ. १०५) ह्या ओवीअखेर पूर्ण होतो. ह्या *प्रार्थनाशतका*चेच पुढे स्तोत्रपाठकांनी *व्यंकटेशस्तोत्र* असे नामकरण केले व तेव्हापासून हेच नाव रूढ झाले.

प्रस्तावनेपासून उपसंहारापर्यंतची ह्या स्तोत्राची रचना अत्यंत बांधेसूद, रेखीव व तितकीच प्रत्ययकारी आहे. स्वोद्धारार्थ परमेश्वराची आळवणी करीत असता आपल्या क्षुद्रत्वाची जाणीव ठेवूनही देवाशी माता-पुत्र असे नाते कवीने जोडले आहे. 'पुत्राचे सहस्र अपराध । माता काय मानी तयांचा खेद ।' असा बिनतोड युक्तिवादही कवी करतो. ईश्वराचे आणि भक्ताचे नाते कसे आहे ह्याचे अनेक दृष्टान्तांनी परोपरीने स्पष्टीकरण करून भक्तीच्या अधिकारात देवाला जाबही विचारण्यास कवी कचरत नाही. पहा : 'अन्नासाठी दाही दिशा । आम्हा फिरविशी जगदीशा ।' किंवा 'लक्ष्मी तुझे पायातळी । आम्ही भिक्षेसि घालू झोळी । येणें तुझी बिरुदावळी । कैशी राहील गोविंदा ॥ १९ ॥" असे उफराटे पण भक्तीच्या तर्कशास्त्रात चपखल बसणारे चित्र ह्या व अशाच ओव्यांतून सुंदर तऱ्हेने उभे राहते. अनेक पौराणिक कथांचे दाखले कवी सहजतेने देतो, त्यामुळे स्तोत्राची परिणामकारकता वाढते. ह्या संदर्भातच देवीदासांनी केलेले व्यंकटेशाच्या स्वरूपाचे वर्णन (ओ. ५८–७३) काव्यसौंदर्याच्या दृष्टीने विचार करता अविस्मरणीय ठरते.

अत्यंत परिचित अशा एखाद्या काव्यकृतीत उत्तम काव्यगुण असावेत हा सुवर्णयोग *व्यंकटेशस्तोत्रा*त साधला आहे. " ह्या स्तोत्राचें यश आहे तें अगदीं साध्या परिचयाच्या दृष्टान्तांतून, मराठमोळ म्हणून सामान्यांतल्या सामान्याच्याही अंतःकरणाला भिडणाऱ्या मराठी भाषेंतून देवीदास सामान्यांच्याच भक्तिभावाचें गीत गातो आहे, हे आहे." (माधव आचवल; मौज, दीअं. १९७४, पृ. ६५.)

*संतमालिके*ची रचना कवीने श. १६०८ / इ. स. १६८६ मध्ये केली. अशी कालनिश्चिती *संतमालिके*च्या अखेरच्या ओवीवरून वि. का. राजवाडे ह्यांनी केली आहे. ह्यासच *करुणरसामृत* किंवा *हरिगुणनामामृत कथा* असेही संबोधले जाते. देवदास ह्यांची काही पदरचनाही सापडते. ह्यांचे *भामावर्णन* नावाचे एक पद आणि *पिंगळा* व *नांद्या* अशी आणखी दोन अध्यात्मपर पदे प्रसिद्ध झाली आहेत. कवीचे खास वैशिष्ट्य मात्र त्यांच्या *व्यंकटेशस्तोत्रा*तच पाहावयास मिळते.

**रचना :** मु. – १. श्रीव्यंकटेशस्तोत्र; १०८ ओव्या; मुंबई, १९२८;

२. संतमालिका; १४५ ओव्या; संपा. पोतदार, द. वा.; पुणे, १९१३. ३. नांद्या व ४. पिंगळा; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ४७–५० व ५३–५५. ५. भामावर्णन; राजवाडे, वि. का.; भाइसंमंइति., श. १८३३, पृ. ९९. अमु. – प्रकरणे, पदे, स्तोत्रे इ.स्फुट कविता; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आचवल, माधव : श्रीव्यंकटेशस्तोत्र; मौज, दीअं. १९७४; पृ. ५९–६५; २. (संपा.) दिवेकर, ह. रा. : प्रस्ता., श्रीव्यंकटेशस्तोत्र; इंदूर, १९३९; पृ. १–१९; ३. पांगारकर, ल. रा. : देवदास; मुमुक्षु (जुना), व. २०, अं. १; सप्टें. १९२६; पृ. ६–१०; ४. पोतदार, द. वा. : दोन देवदास; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. ६३–६६.

**देवदास सदाशिव** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – गर्भगीता – एका पदात; सवामं. हस्त. सू., खं. १.

**देवदासांकित** [अंदाजे श. १५६०/इ. स. १६३८ – श. १६२०/इ. स. १६९८] कवी. समर्थशिष्य दादेगावकर देवदासांचे हे शिष्य. ह्यांनी *रामायण युद्धकांड* (ओवीबद्ध) रचले आहे. ह्यांचे हे काव्य अपूर्ण असून भाषा बरीच अशुद्ध आहे. हे शके १५६०–१६२० दरम्यानचे असावेत, असे प्रा. म. रा. जोशी म्हणतात. तंजावर येथील हस्तलिखित संग्रहात कवीची २८ पदे व हा ओवीबद्ध ग्रंथ आहे (हस्त. यादी, क्र. ३). काही स्फुट कविता समर्थवाग्देवतामंदिर बाडांतून सापडते (हस्त. सू., खं. २).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : काही अज्ञात सारस्वत उपासक; तंजावर सरस्वती महाल; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २४.

**देवदासाचा दास श्रीपती** [का. अनु.] कवी. ह्या कवीचे एक सुंदर पद शं. श्री. देवांना आढळले (सवामं. बा. ४८४). ह्या पदात अनेक साधुसंतांचा उल्लेख आल्याने ऐतिहासिक दृष्ट्या ते महत्त्वाचे ठरते. ह्या पदाचा काही भाग बाडाची माहिती देताना देव ह्यांनी छापला आहे. ह्याची सुरुवात 'पतितपावन देव दयाघन करुणासागरमूर्ति' अशी असून 'देवदासाचा दास श्रीपती' असा कविनामोल्लेख येतो.

**देवनाथ** [श. १६७६/इ. स. १७५४ – समा. श. १७४३/इ. स. १८२१] कवी. पेशवाईअखेर जे अनेक कवी होऊन गेले त्यांत देवनाथ महाराजांची ख्याती विशेष आहे. हे वऱ्हाडातील अमरावती जिल्ह्यातील सूरजी-अंजनगावचे. देवनाथांचा जन्म शाहणूर नदीतीरी असलेल्या सूरजी येथे श. १६७६ मध्ये झाला. (हा जन्मशक त्यांचे शिष्य मल्हारनाथ ह्यांनी गुरूची जी आरती केली आहे तिच्यात सांपडतो.) ह्यांच्या वडिलांचे नाव राजोपंत. हे देशस्थ ऋग्वेदी वसिष्ठगोत्री ब्राह्मण. ते सूरजी गावचे कमाविसदार होते. देवनाथांचे मूळ नाव देवराव असे होते. बालवयापासूनच हनुमंताची हे कडक निष्ठेने उपासना करीत. पुढे गोविंदनाथांकडून गुरुमंत्र घेतल्यानंतर ते देवरावांचे देवनाथ झाले. गोविंदनाथ हे नाथपंथी सत्पुरुष होते. अकोला जिल्ह्यातील घुसर येथे त्यांचा मठ होता. आपल्या उपास्य दैवताच्या आज्ञेवरूनच देवनाथांनी गोविंदनाथांना गुरू केले. देवनाथांची गुरुपरंपरा : जनार्दनस्वामी > एकनाथ > गावबा ऊर्फ नित्यानंद > कृष्णनाथ > विश्वंभरनाथ > मुरारनाथ > रंगनाथ > गोपाळनाथ > गोविंदनाथ > देवनाथ. दयाळनाथ हे ह्यांचे पट्टशिष्य. ह्या परंपरेतील जवळ जवळ सर्व पुरुषांनी ग्रंथरचना केलेली आहे. देवनाथांना कीर्तन करण्याचा नाद होता, त्यामुळेच हे लोकांत विशेष प्रसिद्धी पावले. ग्वाल्हेर मुक्कामी कीर्तन करीत असतानाच ह्यांचा देहपात झाला. ह्यांची समाधी ग्वाल्हेरास आहे. देवनाथांची शिष्यपरंपरा फार मोठी होती.

अनुग्रह घेतल्यानंतर गावोगावी कीर्तन करीत हिंडणे व फावल्या वेळात प्रबंधरचना करणे हा देवनाथांचा आयुष्यक्रम असे. ह्यांनी काव्यरचना विपुल केली. त्यापैकी काही *देवनाथमहाराजांची कविता* ह्या पुस्तकात वा. दा. ओक ह्यांनी व *वैदर्भकाव्यसंग्रह* (*गुच्छ २ रा*) ह्या पुस्तकात अ. सी. साठे ह्यांनी संग्रहित केली आहे. त्यात *श्रावणाख्यान*, *कृष्णजन्माख्यान*, *अहीमहीआख्यान* अशी आख्याने, अनेक सुरस कटाव, अभंग, स्तोत्रे, धावे, पदे अशी विविधस्वरूपी स्फुट रचना आढळते. ती सर्व सूरजी येथील मठात उपलब्ध झाली. देवनाथांच्या नावावरील *चतुर्मंत्र रामायण* हा ग्रंथ *काव्येतिहाससंग्रहा*तून प्रसिद्ध झाला आहे. (निर्देश : संककासू., पृ. १३१).

देवस्तुतिपर कटिबंधांत व पदांत सर्व देवतांची स्तुती केलेली असली तरी त्यांतील रामाच्या व कृष्णाच्या वर्णनाची पदे वैशिष्ट्यपूर्ण व अतिसुंदर आहेत. त्यातल्या त्यात कवीचा कृष्णचरित्राकडे विशेष ओढा दिसतो. पदे, लावणी ह्या गीतप्रकाराची असून त्यांना ठेका आहे. पदांप्रमाणेच नाथांचा कवी म्हणून लौकिक त्यांच्या धाव्यांनी वाढविला आहे. ह्या कवीच्या वाणीत एक प्रकारची मोहकता असून साधे प्रसंगदेखील चित्तवेधक रीतीने सांगण्याची कला त्यांना उत्तम साधली आहे. ते शीघ्रकवी होते. सहजस्फूर्तीने तत्काल कविता रचण्यात त्यांचा हातखंडा दिसतो. सुखोपभोगालाच जीवनाचे अंतिम उद्दिष्ट ठरविणाऱ्या चैनी आणि विलासी लोकांच्या जीवनावर ह्यांच्या लेखणीने कसे कोरडे ओढले आहेत ते पहा : "भोगीतो विषय धडफुटा। अति समय कठिण पुढे कुडा। वाजवी काळ चौघडा॥" हे जग सोडायची वेळ आली तरी ज्यांचे नेत्र उघडत नाहीत अशांना कवी उपदेश करतो : "नश्वर देह शाश्वत मानुनी। वय गमविसी व्यर्थ फुकाचें। तूं नाम जपसी रे। देवाचें। भय नाहीं मग काळाचें।" अशा प्रकारच्या पदरचनेत जो आवेश अनुभवास येतो त्यावरून कवीची निर्भीड वृत्ती स्पष्टपणे प्रत्ययास येते. ह्या कडकडीतपणाबरोबरच मेणाहून मऊ अशा त्यांच्या प्रेमळ अंतःकरणाचा साक्षात्कार ते परमेश्वराची आळवणी करू लागले की होतो. उदा., "ये गे। ये गे। सावळिये। माझे आई। कृष्णाबाई॥ बुडतों मी भवडोहीं। ये लवलाहीं।" ही आळवणी करीत असता देवनाथांनी एकापेक्षा एक सरस असे रचलेले धावे हे त्यांच्या कवितेचा प्राणच ठरले आहेत.

ईशस्तुतिपर, भक्तिपर व उपदेशपर पदांबरोबर वेदान्तपर पदांचीही रचना ह्यांनी केली आहे. आत्मस्वरूपाची कवीला पटलेली खरी ओळख 'उघडी केली आत्मत्वे अनुभव दिठीं। दृष्टिमाजी हरपली सकळही सृष्टी। सर्व त्स्वरूपीं समरसें पडली मिठी। बोलो विसरे द्वैताचि सर्वही गोष्टी।' ह्या प्रकारची आहे. कवीने हिंदी रचनाही बरीच केलेली आहे. शब्दसौष्ठव व अर्थलालित्य ह्यांमुळे निर्माण होणारे काव्यसौंदर्य देवनाथांच्या कवितेत ओतप्रोत भरून राहिले आहे. [ ⇨ ३.]

**रचना : मु.** – १. महाराष्ट्र कवि देवनाथमहाराजकृत कवितासंग्रह (विस्तृत चरित्रवजा प्रस्तावनेसह); संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६. २. श्रीदेवनाथमहाराजांची कविता (प्रस्तावना, टीप, सूची व कोश यांसह); संपा. : साठे, अ. सि., पांडे, सुं. नि. व अग्निहोत्री, पां. स.; वैदर्भकाव्यसंग्रह, गुच्छ दुसरा; बुलढाणा, १९१५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. केसकर, यशवंत गोविंद : देवनाथ महाराज यांचे चरित्र; उमरावती, १९०५; २. तांदळे, व. पं. : श्री देवनाथ महाराजांचें चरित्र; वर्धा, १९३२; ३. पांगारकर, ल. रा. : देवनाथ; मुमुक्षु, व. २१, मार्च १९२८; पृ. ७१६; ४. शर्मा, विनयमोहन : देवनाथ महाराज; हिंमसंदे., पटणा, १९५७; पृ. २०९–१३.

**देवमुरारी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – मुराररामायण; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ५१.

**देवराज** [का. अनु.] शाहीर. ह्यांची एक लावणी *अंधारातील लावण्या* (पुणे, १९५६) ह्या संग्रहात य. न. केळकर ह्यांनी प्रसिद्ध केली आहे (पृ. २७३–७४) त्यात सरदारी मिळालेल्या फाकड्या शिपाईगड्याचे आणि त्याच्या वैभवाचे वर्णन ह्या देवराज शाहीराने केले आहे.

**देवराय** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – एक पद; काव्यसंग्रह ८; क्र. ९१, पृ. ७७.

अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**देवरायवामन** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. २.

o **देवाजी** – पहा **देवदास–२.**

**देवानंद** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ५१.

o **देवीदास** – पहा **देवदास–३.**

o **देवीदास चैतन्य** – पहा **देवदास–२.**

**देवेंद्र** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ५१.

**देवेंद्रकीर्ती** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाचा प्रारंभ] जैन कवी. गुरू : भट्टारक महीचंद्र. देवेंद्रकीर्ती हे त्यांच्या काळातील एक प्रमुख जैन ग्रंथकार होते. ह्यांचे गुरू महीचंद्र हे इ. स. १६९६ च्या सुमारास होऊन गेले. त्यावरून देवेंद्रकीर्तींचा काळ समजतो.

देवेंद्रकीर्तींनी *कालिकापुराण* ह्या ग्रंथाची रचना केली आहे. त्याचे ४८ अध्याय व ७००० च्या वर ओवीसंख्या आहे. कालिका म्हणजे पद्मावती. तिचे माहात्म्य ह्या ग्रंथात सांगितले आहे. ग्रंथाचा मूलाधार सांगताना कवी म्हणतो : "माहापद्मपुराण गीर्वाणवाणी। बाळ गोपाळा न कळे म्हणोनि। ब्रह्माजिनदास केली ठेवणी। रासभाषे पैं॥ १.४॥ विशाळकीर्तिच्या कृपेण। देवेंद्रकीर्ति रास पाहोन। हे मन्हाष्ट केलें पुराण। श्रावण देश भाषा पैं॥ १.५॥"

अनेक पौराणिक, ऐतिहासिक व सामाजिक आख्यानांचे व घटनांचे एकत्रीकरण ह्या पुराणात करण्यात आले आहे. *सम्यक्त्वकौमुदी अनंतव्रतकथा* ह्या जैनांच्या धार्मिक ग्रंथांतील अनेक कथा प्रस्तुत ग्रंथात समाविष्ट करून घेण्यात आल्या आहेत. मध्ययुगीन जैन समाजाच्या स्थित्यंतराचा इतिहास ह्यात येतो. लिंगायत व जैन समाज ह्यांच्यामधले झगडे, तसेच मुसलमान राज्यकर्त्यांच्या दक्षिण देशावरील आधिपत्याचा जैन समाजावर झालेला परिणाम ह्या संदर्भात *कालिकापुराणा*चा अभ्यास महत्त्वाचा ठरतो. शिरड शहापूर येथील मल्लिनाथ जैन मंदिर ग्रंथसंग्रहात ह्या ग्रंथाची हस्तलिखित प्रत आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : देवेंद्रकीर्ती; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ७६–७८.

**देवेंद्रकीर्तिशिष्य** [का. अनु.] जैन कवी. हे स्वतःस देवेंद्रकीर्तिशिष्य असे म्हणवून घेत असत. कवीची १८ कडव्यांची *पद्मावतीपाळणा* अशी एकच रचना उपलब्ध आहे. ह्यांनी श. १६९३ मधील दक्षिणदेशातील जयसिंगनगर येथील पद्मावतीच्या उत्सवाचा उल्लेख केला आहे. स्वतःचे नाव न सांगता 'देवेंद्रकीर्तीचा प्रियशिष्ये। पाळणा चालवी हरुषे।' एवढाच आपला उल्लेख ते करतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : देवेंद्रकीर्तिशिष्य; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ११२.

o **देशपांडे, रामचंद्र भोजराव** – पहा **रामचंद्र भोजराव देशपांडे.**

**देशिकदास** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – भजनपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**दों फ्रान्सिस्कु गार्सिय (पाद्री)** [इ. स. १५८० – ३ सप्टेंबर १६५९] भाषान्तरकार. गोमंतकीय जेजुइट पाद्री. ह्यांचा जन्म पोर्तुगालमध्ये झाला. ह्यांच्या वडिलांचे नाव जुवांव गार्सिय व आईचे नाव कातारिन गॉमिस होते. इ. स. १५९८ च्या जूनमध्ये हे जेजुइट पंथात शिरले व १६०२ साली हिंदुस्थानात गोव्याला आले. १६०५ मध्ये मुख्य धर्मोपदेशक म्हणून ते गोव्यात काम करू लागले. तत्त्वज्ञान आणि धर्मशास्त्र हे त्यांचे अभ्यासाचे विषय होते. १६०६ साली दक्षिणेत पुनिकाल येथे त्यांची बदली झाली. १६०९ साली कोचीन येथे तत्त्वज्ञानाचे अध्यापक म्हणून त्यांची बदली केली गेली. १६१३–१४ ह्या दोन वर्षांत ठाणा, बांद्रे, बसई ह्या भागात मुख्य धर्माधिकारी म्हणून ह्यांनी काम केले. पुढे १६२० त रायतूर येथील चर्चचे अधिकारी म्हणून ह्यांची नेमणूक झाली. १६३७ साली क्रांगानोर येथे आर्चबिशपचे मदतनीस म्हणून ते कामावर रुजू झाले. १६४१ त ही आर्चबिशपची जागा त्यांनाच देण्यात आली. ह्या जागेवर त्यांच्या आयुष्याच्या अखेरपर्यंत (३ सप्टें. १६५९) त्यांनी काम केले.

फ्रान्सिस्कु गार्सिय ह्यांनी केलेल्या मराठी ग्रंथाच्या रोमन लिपीतील पोर्तुगीज भाषान्तरांचा खंड रोम येथील फादर विकी ह्यांनी विस्तृत प्रस्तावना व टीपा ह्यांसह तयार करून प्रसिद्ध केला आहे (लिस्बन, १९५८). त्यात विष्णुदासनामाकृत *हरिश्चंद्राची कथा, सिंहासनबत्तिशी* किंवा *विक्रमादित्याचे आख्यान,* आणि *ब्राह्मणांच्या ग्रंथांतील निवडक कथा* ही पोर्तुगीज भाषान्तरे सापडतात. ह्याशिवाय हिंदुधर्माची माहिती देणारा लॅटिन भाषेतील मजकूरही ह्या खंडाच्या शेवटी जोडलेला आहे. ग्रंथाचे मूळ हस्तलिखित रोम येथील जेजुइट मंडळींच्या दप्तरखान्यात आहे. वरील मराठी ग्रंथाचे भाषान्तर ज्या मूळ ग्रंथांवरून झाले त्या हस्तलिखितांचा शोध घेण्याचा प्रयत्न अ. का. प्रियोळकर ह्यांनी केला, पण तो त्यांना लागला नाही.

गार्सिय ह्यांनी मराठी, तामिळ व मल्याळी अशा तीन भाषा आत्मसात केल्या होत्या. क्रांगानोर येथे आर्चबिशप असताना १६५७ च्या सुमारास इन्क्विझिशनला पाठविलेल्या एका पत्रात आपल्या भाषिक अभ्यासाची माहिती ह्यांनी पुरविली आहे. त्यातच *मलबार (मल्याळी)-पोर्तुगीज* व *पोर्तुगीज-मलबारी* असे कोश रचल्याची माहिती हे देतात. त्याचबरोबर पुरेशा साधनांच्या अभावी ह्या कोशांचे काम पूर्ण करता आले नाही असेही त्यांनी नमूद करून ठेवले आहे. गोव्यातील स्थानिक भाषेचे व तेथे प्रचारात असणाऱ्या मोडी, देवनागरी, कानडी ह्या लिप्यांचे आपणास उत्तम ज्ञान आहे, असेही ते सांगतात. ह्यामुळेच भाषान्तराचे हे काम गार्सिय सहजपणे करू शकले.

**रचना : मु.** – १. ब्राह्मणांच्या ग्रंथांतील निवडक कथा, ४५; पृ. १६१–३०६; २. सिंहासनबत्तिशी; पृ. ६३–१६०; ३. हरिश्चंद्राची कथा; पृ. १–६३; पोर्तु. भाषान्तरे; संपा. फा. जे. विकी; लिस्बन (पोर्तुगाल); १९५८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रियोळकर, अ. का. : जुन्या मराठी ग्रंथांची पोर्तुगीज भाषान्तरे; मसंप., जाने. १९६०, पृ. १५१–१५५.

**दोमिंगांस द साओ बेर्नादिनो (पाद्री)** [का. अनु.] फ्रान्सिस्कन मिशनरी ग्रंथकार. हा जन्माने भारतीय होता व बार्देश प्रांतात (गोवे) इन्क्विझिशनचा एक अधिकारी म्हणून काम पाहात असे. देशी भाषेवर ह्याचे चांगलेच प्रभुत्व असून हा अध्यापनाचेही काम करीत असे. ह्याने *धर्ममार्ग* व *खिस्तनिष्ठा* ह्यांचे स्पष्टीकरण करणारी पुस्तके स्थानिक बोलीत लिहिली. त्यांची हस्तलिखिते सापडतात (वि. वा. प्रभुदेसाई; सशगोबो., मुंबई, १९६३; पृ. ३२१–१३).

**द्विज नाभा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – विक्रमचरित्रकथा; त्रु. पो.; भाइसमं. हस्त. सू., पृ. २५८.

**धणु बापू** [का. अनु.] शाहीर. खर्ड्यांच्या लढाईचे समग्र वृत्त कवीने आपल्या पोवाड्यात दिले आहे. बराचसा तपशील इतिहासाला धरून आहे. हा 'खर्ड्यांच्या लढाईचा पोवाडा' *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये समाविष्ट (पृ. ३१–३३).

o **धनाबाई** – पहा **धानाइसा.**

o **धाकुटे सोंगोबास (महानुभाव)** – पहा **सोंगोबास.**

**धानाइसा / o धनाबाई** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, पूर्वार्ध] महानुभाव कवयित्री. हिने रचलेल्या *हंसांबिका स्वयंवर* (१३४ अभंग)

ह्या काव्याचा निर्देश वि. ल. भावे ह्यांनी केला आहे (ममग्रंककासू., पृ. १४). ही कवयित्री कोण, कोठली, केव्हा होऊन गेली ह्यासंबंधी निश्चयात्मक माहिती उपलब्ध नाही. काव्याच्या भाषेवरून व त्यातील शब्दप्रयोगांवरून हे काव्य शकाच्या सोळाव्या शतकात रचले गेले असावे असा अंदाज डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी व्यक्त केला आहे.

बिडकर आम्नायाच्या *वृद्धाचारा*च्या पोथीत उपाध्य आम्नायातील तीन धानाइसांचा उल्लेख येतो. ह्यांपैकी दोन संतराजांच्या शिष्यिणी होत्या. एक वाकीकर व दुसरी विंचुरकर. तिसरी धानाइसा शारंगधर भोजने ह्यांची शिष्या आहे. ह्या काव्याची कर्ती निश्चितपणे कोणती धानाइसा ते समजण्यास साधन नाही.

डॉ. य. खु. देशपांडे ह्यांना प्रस्तुत काव्याची १२८ अभंगांची पोथी देवदेवेश्वर संस्थान माहूर येथील महानुभाव संग्रहातून प्राप्त झाली होती तीवरूनच ह्या काव्याची संहिता त्यांनी सिद्ध केली आहे. काव्याचा विषय चक्रधरांनी वरंगळ येथे साजरे केलेले हंसांबा-स्वयंवर हा आहे. काव्य छोटेसे पण आकर्षक आहे.

**रचना :** **मु.** – हंसांबा स्वयंवर; ओ. सं. १२५; महानु., मे १९६६; पृ. ४–८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, य. खु. : हंसांबा-स्वयंवर; विशेष माहिती : महानु., मे १९६६; पृ. ३–८.

**धुंडि** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे ; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**धुंडिकुमार–१** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – कृष्णलीला; मसा., आ. ५, पृ. २७७.

**धुंडिकुमार–२** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – ज्ञानलहरी; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १२१.

**धुंडिदास** [का. अनु.] कवी. ह्यांच्या *चिंतामणिविजय* (अ. ४३, ओ. सं. ९६२३; र. श. १८१३ / इ. स. १८९१). ग्रंथाची नोंद तंजावर हस्तलिखित यादीत सापडते. ग्रंथ थेऊर येथून गणेशभक्तांसाठी छापला गला होता (तंसम. बा. ९७०). ह्यांची गणपतीची एक आरती मुद्रित (मआ., पृ. ३२२).

**रचना :** **मु.** – श्रीचिंतामणिविजय अर्थात् श्रीमत् प्राकृत गणेशपुराण; संपा. पोफळे, धों. ल.; पुणे; दाते सू., पृ. ५४१.

**धुंडिराज** [का. अनु.] कवी. पंतसमकालीन. मोरोपंतांचे अनुकरण करून कवीने रचलेला *प्रल्हादचरित्र* हा आर्याबद्ध ग्रंथ *लघुकाव्यमाले*तून प्रसिद्ध झाला आहे. ह्या ग्रंथाखेरीज कवीच्या अन्य रचनेचा निर्देश ग्रंथसूच्यांतून आढळतो.

**रचना :** **मु.** – १. प्रल्हादचरित्र, आर्या ५७; अकलकामा., भा. १, मुंबई, १८९५; पृ. ४३–४८. २. नारदाची लावणी; कासं. **अमु.** – १. रासक्रीडा (वि. ल. भावे संग्रह); २. स्वातमबोध; संककासू., पृ. ५१; ३. पदपदांतरे; मसंमं., हवना., पृ. ५; सवामं. हस्त. सू., खं. १.

**धुंडिराजभट्टसुत शिव** [अंदाजे इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध]. कवी. तंजावरच्या शरभेंद्रनृपाचे आश्रित ह्यांनी *शरभेंद्रतीर्थावळी / शरभेंद्रतीर्थयात्रा* (अ. १–१४; ग्रं. सं. १३००) हा ग्रंथ रचला आहे. शरभेंद्रराजांनी श्रीरंगापासून कारेकालपावेतो जी यात्रा केली तिचे वर्णन ह्या ग्रंथात येते. इतिहास व काव्य ह्या दृष्टींनी हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. ग्रंथाचा दोन पूर्ण प्रती उपलब्ध (तंसम. बा. १५८९–९०, हस्त. यादी., क्र. २).

**धुंडिराजेश्वर** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. मुडलगीच्या स्वामी परंपरेतील. दुसऱ्या रंगबोधांची कन्या आऊबाई हिचे हे पुत्र. हे बालपणापासून तोतरे होते. पण रंगबोधांच्या कृपेने ह्यांना वाचेचा आणि कवित्वाचाही लाभ झाला, असा कथाभाग गुरुनाथकृत *देशिकचरित्रा*त येतो. धुंडिराज हे गुरुनाथांचे समकालीन होते व त्यांची कवने मुडलगी मठाच्या भक्तगणात प्रचलित होती, असे *देशिकचरित्रा*तील उल्लेखावरून म्हणता येते.

धुंडिराजांची कविता स्तोत्रांच्या जातीची आहे. तिच्यातून मुडलगी परंपरेतील स्त्रीपुरुषांची तपशीलवार माहिती ते देतात. ह्या परंपरेतील सर्वांनाच धुंडिराज सिद्ध म्हणतात. मुडलगी पीठ हे 'सिद्धसिंहासन' आहे. ही त्यांनी दिलेली माहिती मोलाची आहे. दुसरे शिवबोध व त्यांचे पुत्र संगबोध ह्यांचे निर्याणशक ह्यांनी दिले आहेत. संगबोधांचे पुत्र लिंगबोध हेही स्तोत्रविषय झालेले दिसतात. ह्यावरून लिंगबोधांच्या काळापर्यंत धुंडिराजेश्वर हयात होते हे स्पष्ट होते. ह्यांना 'पंढरीकर' म्हणण्यात आले आहे. ह्यांच्या मातापित्यांचे वास्तव्य पंढरपुरास असावे. कवीच्या स्तोत्रवजा, पदवजा एकूण २० रचना *मुडलगीचे स्वामी* ह्या पुस्तकात डॉ. पंडित आवळीकर ह्यांनी छापल्या आहेत. मुडलगी परंपरेचा इतिहास समजून घेण्याच्या दृष्टीने ही रचना महत्त्वाची आहे.

**रचना :** **मु.** – पदे व स्तोत्रे, २०; मुडलगीचे स्वामी : संपा. आवळीकर, पंडित; पुणे, १९७१; पृ. १२०–१३१; धुंडिराजेश्वर : माहिती, पृ. ५०–५१.

**धुंडिसुत** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – शकुंतला आख्यान; श्लो. सं. १२०; सवामं. हस्त. सू., खं. १.

० **धुंडिसुतमालो नरहरि** – पहा **नरहरिधुंडिराजमालु.**

**धोंगडा** [का. अनु.] कवी. संताजी जगनाडे ह्यांच्या वहीत धोंगडा, शिवदास कुंडेश, पर्णोभो विश्वनाथ वगैरे विठ्ठलभक्तांची कविता आढळते; परंतु त्यांची माहिती मात्र मिळत नाही (मसा., आ. ५, पृ. ८०६).

**धोंडभट्ट अप्पा** [का. अनु.] गद्यलेखक.

**रचना :** **अमु.** – भोजनकुतूहल वैद्यक गद्य; ग्रं. सं. ३००; तंसम. हस्त. यादी, क्र. २. (ग्रंथाच्या दोन प्रती असून ग्रंथास बखर असे म्हटले आहे.)

**धोंडाजी सुत** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**धोंडी** [का. अनु.] शाहीर. हा सोलापूरचा राहणारा. ह्याचा तुऱ्याचा फड होता. नागेशांशी सामना देण्याकरिता प्रसिद्ध शाहीर रामजोशी हे धोंडिबांच्या फडास लावण्या रचून देत असत. धोंडिबाच्या नावावर राम जोशींनी बऱ्याच लावण्या रचलेल्या आहेत (मसा., आ. ५, पृ. ५६०). ह्याच्या व कविराय रामजोशी ह्यांच्या लावण्यांचे एक बाड समर्थवाग्देवतामंदिर, धुळे ह्यांच्या हस्तलिखित संग्रहात आढळते (बा. १८१०).

**धोंडीजी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**धोंडी नारायण** [का. अनु.] शाहीर. महादजी शिंद्यांनी पुण्यामध्ये जो रंगपंचमीचा सोहळा साजरा केला, त्याचे वर्णन कवीने आपल्या पोवाड्यात केले आहे. खुद्द श्रीमंत पेशवे व नाना फडणीस, हरिपंततात्या हे त्यांचे मुत्सद्दीही ह्या खेळात सामील झाले असे कवी सांगतो. ह्या पोवाड्याचे *रंगाचा पोवाडा* ह्या नावाने *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये मुद्रण झाले आहे ( पृ. १६ ).

**धोंडी बापू** [का. अनु.] शाहीर. ह्यांच्या पाच शृंगारपर लावण्या य. न. केळकर ह्यांनी *अंधारातील लावण्या* (पुणे, १९५६) संग्रहात छापल्या आहेत (पृ. २६१–२६३).

**धोंडो मोरेश्वर राजे** [का. अनु.] बखरकार. ह्यांनी लिहिलेली *इंदूर संस्थानची बखर* उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे, मभामवा., इंदूर, १९३९, पृ. ४०).

**नगाजी** / ० **नगाजी महाराज** [श. १६७६, कार्तिक शुद्ध ५ / इ. स. १७५४ – समा. श. १७६६, आश्विन व. २ / इ. स. १८४४]. वैदर्भीय संतकवी. ह्यांच्या वडिलांचे नाव विठ्ठल सटवाजी न्हावी. मातेचे नाव रुक्मिणी. हे नापिक दांपत्य मूळ वऱ्हाडातील मेहेकर येथे राहणारे. वऱ्हाडात दुष्काळ पडला, म्हणून हे कुटुंब नागपुरास जावयास निघाले; पण वाटेत पारडी (ता. हिंगणघाट, जि. वर्धा) येथील मालगुजार श्रीमंत रावजी पाटील ह्यांनी आपल्या आश्रयाने तेथेच कायमचे वास्तव्य करण्याचा विठोबांना आग्रह केला. नगाजींचे लग्न वयाच्या १५ व्या वर्षी अलीपूर येथील वेणू नावाच्या मुलीशी झाले. नगाजी प्रापंचिक असले तरी संसाराविषयी उदासीन असत. ह्यांनी आपल्या चित्तवृत्ती हरिचरणी पूर्णपणे वाहिल्या होत्या. चातुर्मासात आळंदीस व तेथून पुढे कार्तिकीस पंढरपुरास जात असत व परत आल्यावर पारडीस ज्ञानेश्वर पुण्यतिथी करीत. नगाजी हे शके १७६६ त समाधिस्थ झाले (सीतारामकृत *भक्तिमाहिमामृत*). न्हावी समाजातील अनेकजण नगाजींचे शिष्य असून त्यांची पुण्यतिथी विदर्भात सर्वत्र साजरी होत असते.

ह्यांच्या कवितेचे स्फुट स्वरूप अभंगात्मक असून पारडी येथील मंदिरातून व त्यांच्या शिष्यसंप्रदायाकडून ही रचना प्रा. सुरेश डोळके ह्यांना उपलब्ध झाली आहे. ह्यांचे अभंग त्यांच्या पारमार्थिक प्रगतीची साक्ष देतात. शेती व शेतकऱ्याचे रूपक वापरून ह्यांनी गुरुकृपेचा महिमा सांगणारा एक सुंदर अभंग रचला आहे. सावता माळी किंवा सेना न्हावी ह्यांच्या विशिष्ट अभंगांप्रमाणेच ह्या अभंगाने नगाजींची काव्यप्रतिष्ठा वाढविली आहे. परमेश्वराचा ध्यास, त्याची आळवणी, गुरुकृपेचे सामर्थ्य, ईश्वरी लीलेची अद्भुतता, इत्यादी संतांच्या भाव-जीवनाच्या जिव्हाळ्याचे अनेक विषय समर्पक रूपके व दृष्टान्त ह्यांच्या साहाय्याने कवीने खुलविले आहेत. भक्तिरसाविष्कार हा त्यांच्या कवितेचा गाभा होय. वेद आणि गीता ह्यांमधील तात्त्विक चर्चेपेक्षा परमेश्वराचे नामस्मरण श्रेष्ठ, असेच नगाजी महाराज सांगतात. उदा., "नगा म्हणे आम्हा । सोपा ऐसा भाव । रामकृष्ण नाम । वाचे घेऊ ॥" सद्गुरुकृपा, संतांची संगती आणि परमेश्वराचे नाम हीच त्रयी ह्या संसारातून तारून नेते असे नगाजींचे सांगणे आहे. नगाजींचे बरेचसे अभंग प्रा. डोळके ह्यांनी त्यांच्या कवित्वाचा परिचय करून देताना छापले आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : नगाजी; मकच. खं., २; मुंबई, १९१३; पृ. १७०–८०; २. डोळके, सुरेश म. : विदर्भातील एक संत-कवि : श्री नगाजी महाराज; विसंमंवा., नागपूर, १९६२ ; पृ. १६५–१८०.

० **नगाजी महाराज** – पहा **नगाजी**.

**नंददास** [का. अनु.] कोशकार व पदकार.

**रचना : अमु.** – नाममाला; कोश; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १३८; २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २; ३. भ्रमरगीत; संककासू., पृ. ६१.

**नंदनंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ६१.

**नबी महंमद** [का. अनु.] मुसलमान कवी. ह्यांनी मोहरममध्ये म्हटल्या जाणाऱ्या रिवायतींची रचना केली आहे (रा. चिं. ढेरे; मुमसंक., पृ. १७८).

**नयनप्रभु** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ५१.

**नयनात्मजसुत (केसरी)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रामजन्म; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ५२.

**नरशिंगराय** [का. अनु.] शाहीर. ह्याने *बदामीच्या लढाईचा पोवाडा* रचला आहे. ह्यात उपलब्ध विश्वसनीय ऐतिहासिक हकीकतीपेक्षा वेगळाच तपशील पोवाडेकार देतो. बदामीच्या लढाईचे नेतृत्व परशुरामभाऊ पटवर्धनांकडे होते. मराठ्यांच्या अनेक सरदारांपैकी बीडचा निंबाळकर म्हणून कोणी कोवळ्या वयाचा तरुण सरदार ह्या युद्धात कामास आला. किल्ला नंतर सर झाला. निंबाळकराच्या अनपेक्षित मृत्यूने त्याच्या पतिव्रता स्त्रीवर झालेल्या कठोर आघाताचे चित्र कवीने सुंदर काढले आहे. निंबाळकराची पतिव्रता स्त्री नंतर सती जाते. ह्या सतीचाच पोवाडा नरशिंगरायाने केला असे तो आवर्जून सांगतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : बदामीच्या लढाईचा पोवाडा : ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. ३; पुणे, १९६९; पृ. ३५७–३६१.

**नरसा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं., हस्त. सू., खं. २.

**नरसिंग सदाशिव नेवाळकर** [का. अनु.] बखरकार. ह्यांनी 'गोहद' प्रकरणावर लिहिलेली बखर उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे, मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४०).

० **नरसिंह–१** – पहा **नृसिंह–१**.

० **नरसिंह–२** – पहा **नृसिंह–२**.

**नरसिंह–३** [का. अनु.] महानुभाव कवी. उपनाव गजांकुश.

**रचना : अमु.** – वच्छलाभिमन्युविवाह; प्रसंग ३, कड्या १३०; ममग्रंककासू., पृ. १४.

**नरसिंह–४** [का. अनु.] रामदासी कवी. रामदासी परंपरेतील इंदूर (मराठवाडा) मठाचे एक अधिपती. ह्यांची परंपरा : श्रीरामदास > उद्धव > माधव > गोविंद > अनंत > नरसिंह अशी. ह्यांच्या रचनेत अष्टके, पदपदांतरे ह्यांचा समावेश आहे (सवामं. हस्त. सू., खं. १).

**नरसिंह–५** / ० **नरसिंह दैवज्ञ** [इ. स. चे सतरावे शतक] सामुद्रिक. हे पैठणजवळील गोळेगावचे राहणारे. ह्यांनी ओवी छंदात सामुद्रिकाची लक्षणे लिहिली. ज्योतिषशास्त्राचा इतिहास लिहिणारे शं. बा. दीक्षित ह्यांचा जन्म श. १५०८ / इ. स. १५८६ देतात. त्यावरून वि. का. राजवाडे त्यांच्या ह्या कृतीचा काळ अंदाजे श. १५४०–५० असा देतात. ग्रंथाच्या २४७ ओव्या आहेत. हा ग्रंथ *मानसोल्लास* व *रत्नकोक* किंवा *कोकरत्न* ह्या दोन संस्कृत ग्रंथांच्या आधारे लिहिला असे ग्रंथकार स्पष्ट लिहितो. ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती तंजावर सरस्वती महाल ग्रंथालय (बा. १९२४) व भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे येथे आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : नरसिंहकृत 'सामुद्रिक' ओवीबद्ध; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १६–१७.

० **नरसिंह–६** – पहा **नृसिंह–४**.

**नरसिंह किंकर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – विश्वेश्वराची आरती; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**नरसिंहदास** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. ह्यांचे गुरू नरसिंह असावेत. नरसिंहदासांनी *भागवताच्या दशमस्कंधाचा* अनुवाद केला आहे. ह्या ग्रंथात प्रकरणे नाहीत. ग्रंथ सलग असून २६१५ ओव्या आहेत. ग्रंथकार अद्वयराम व सच्चित्सुखबोध ह्यांना आरंभी नमन करून अंबिकेचीही प्रार्थना करतो. ग्रंथाची भाषा प्रवाही आहे. पण तामिळ भाषाप्रभावामुळे ती अशुद्ध झाली आहे. हा माधवस्वामींचा समकालीन असावा. ग्रंथाचे हस्तलिखित तंजावर ग्रंथसंग्रहात आढळून येते (बा. १४८३).

**रचना : अमु.** – भागवत दशमस्कंध; ओ. सं. २६१५; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : नरसिंहदास; नभामा., व. २३, अं. १, ऑक्टो. १९६९; पृ. २३–२४.

० **नरसिंह दैवज्ञ** – पहा **नरसिंह–५**.

० **नरसिंहनंदन** – पहा **वीरेश्वर दीक्षित**.

**नरसिंह भाएदेव** [अंदाजे इ. स. १५५०–१६००] महानुभाव कवी. ह्या कवीच्या *वृद्धावली* ह्या ३२२ ओव्यांच्या काव्यात पारमांडल्य आम्नायातील आनेराजांपासून अकरा पिढ्यांचे वर्णन येते. आनेराज > नागांबा > हरिराज > दत्तराज > गोविंदराज अथवा गोमेराज > चाल्हेराज > विनोबास > देमेराज(दीक्षित) > तुबेराज > भाएराज > गोपीराज अशा त्या पिढ्या होत. *वृद्धावली*कर्ता नरसिंह स्वतःस भाएदेवनंदन असे म्हणवतो (ओ. क्र. ३२२). तोही अकराव्या पिढीचा असल्याने *वृद्धावली* सुमारे इ. स. १५५७ ते १६०० ह्या कालातली ठरते. हे काव्य *महानुभाव* मासिकातून (डिसें. १९७४) मुद्रित झाले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, ज. शा. : नरसिंहकृत वृद्धावली; महानु., डिसें. १९७४; पृ. २९.

**नरसिंहसुत** / ० नृसिंहसुत [का. अनु.] कवी. ह्यांनी रामायणातील सुंदरकांडावर रचना केली आहे. ह्या काव्याचे फक्त १२–१६ असे पाचच प्रसंग असून ह्या पाच प्रसंगांच्या ओव्या ३५५ आहेत, अशी माहिती शं. श्री. देव ह्यांनी दिली आहे (सवामं. बा. ३३). कवीची परंपरा किंवा काळ ह्यांचा अंदाज लागत नाही. कवीने पदेही रचली आहेत (सवामं. हस्त. सू., खं. २).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : नृसिंहसुताचे रामायण; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. ५८–५९.

**नरसी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – १. पदपदांतरे; २. रासमंडळ; संककासू., पृ. ५२.

**नरसू** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नरसोबा** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. समर्थसंप्रदायी. जातीने मराठा. हल्याळी गावच्या पाटलांचे चिरंजीव. गुरू : *श्रीदास-विश्रामधाम*कर्ते आत्माराम महाराज. भालकी ह्या गावी (जि. नांदेड) नरसोबांचा मठ आहे. ह्यांची गुरुपरंपरा अशी : श्रीसमर्थ > कल्याण-स्वामी (मठ डोमगाव) > शिवराम (आपचंद मठ) > रामचंद्र (आपचंद मठ) > आत्माराम (मठ येकेहाळी) > नरसोबा (मठ भालकी). शिष्यपरंपरा : महादेव > ज्ञानदेव > गणपतीबोवा > माणिकबोवा > भीमबोवा ह्याप्रमाणे आहे. नरसोबांच्या जन्ममृत्यूंचे शक उपलब्ध नाहीत. त्यांची पुण्यतिथी श्रावण वद्य प्रतिपदेस येते. ह्या मठाची गादी ब्रह्मचाऱ्यांची आहे.

ह्यांच्या अभंगाची एक वही त्यांच्या मठात शं. श्री. देव ह्यांना प्राप्त झाली. त्यात नरसोबांचे चौचरणी ७७ व द्विचरणी ७९ मिळून १५६ अभंग आहेत. ह्या अभंगांवरून नरसोबा हे अधिकारी गुरुभक्त होते ह्याची पूर्ण साक्ष पटते. नरसोबांचे तेरा अभंग समर्थभक्त देव ह्यांनी छापले आहेत. त्यावरून त्यांची तळमळ, गुरुभक्ती, आतुरता, एकनिष्ठ अंतःकरण व रामोपासना प्रत्ययास येते. संतकवितेतील वाणीचा प्रेमळपणा तेथे आढळतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : नरसोबा (आत्मारामशिष्य); श्रीसांप्रविवि., खं. २; धुळे, क्र. ७८–७९; पृ. ११५–१२० व १२१–१२४.

**नरस्यांकित** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० नरहरदेव गिजरे** – पहा **नरहरि गिजरे.**

**नरहरसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नरहरि–१** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – शकुनवंति; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ५३.

**नरहरि–२** – पहा **नरहरिव्यास.**

**नरहरि–३** / ० नरहरि मोरेश्वर देशपांडे [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. महाभारतीय पर्वांवर रचना. कवीचे वास्तव्य बीड जिल्ह्यातील ईट गावी असे. ह्यांना बचाजी असेही म्हणत. वडिलांचे नाव मोरेश्वर नरहरि देशपांडे व आईचे नाव भवानी. तुळजाभवानी ही ह्यांची कुलदेवता (संदर्भ : कविरचित *द्रोणपर्व* – उपसंहाराच्या ओव्या). गुरू : रामदासीसंप्रदायी भीमस्वामी. नरहरींच्या समकालीन रामदासी पंथांत चार भीमस्वामी होऊन गेले : १. डोमगाव मठपरं-परेतील भीमराज ऊर्फ भीवाजी ; २. शिरगाव मठपरंपरेतील *भक्त-लीलामृत*कर्ते ; ३. कान्हेर मठ – भिमाजीबुवा; ४. तंजावर मठ – भीमस्वामी. ह्यांपैकी डोमगाव परंपरेतील भीवाजी ऊर्फ भीमराज (समा. श. १७१०) हे ह्यांचे गुरू असा तर्क ज. र. आजगांवकर करतात. पां. न. पटवर्धन ह्यांच्या मताप्रमाणे *समर्थप्रताप*कार गिरि-धरांचे धाकटे बंधू भीमस्वामी किंवा भीवाजीबावा हे ह्यांचे गुरू. ह्या भीवाजीबावांचा मठ बीड येथे होता. नरहरींचे बीड हे वसतिस्थान व त्यांच्या ग्रंथरचनेचा काल लक्षांत घेता श. १६९२-९३ च्या सुमारास समाधिस्थ झालेले भीमस्वामी हेच नरहरींचे गुरू होत.

नरहरींनी महाभारताची चार पर्वे रचली असे त्यांच्याच *कर्णपर्वा*-तील उल्लेखावरून समजते. उदा., " उद्योग, भीष्म, द्रोण, कर्ण । चत्वारि पर्वे गुणैकरत्नें । नरहरिमुखें सिंहासनें । प्रकट केली श्रवणार्थ्यां ॥ " (अ. १६ : २७). कवीचे *द्रोणपर्व काव्यसंग्रहा*तून मुद्रित झाले आहे. ही रचना श. १६९० (इ. स. १७६८) मध्ये ईट मुक्कामी पूर्ण झाल्याचे कवी सांगतो. *द्रोणपर्वा*ची श. १७०८ (इ. स. १७८६) मध्ये उतरलेली एक प्रत अक्कलकोट येथे सापडली आहे. ह्या *द्रोणपर्वा*चे ३५ अध्याय व ४८७५ ओव्या आहेत. कवीच्या *उद्योगपर्वा*चा रचना-शक १६८१ (इ. स. १७५९) असा दिलेला असून *कर्णपर्व* आणि *उद्योगपर्व* ही दोन्ही पर्वे भारत इतिहास मंडळ, पुणे, ह्यांच्याकडे आहेत. भीष्मपर्वाची प्रत उपलब्ध नाही.

भारतरचनेचे कवीचे स्फूर्तिस्थान मुक्तेश्वर कवी आहेत. मुक्तेश्वरांचे अनुकरण करण्यात कवी चांगलाच यशस्वी झाला आहे. हे अनुकरण करताना मुक्तेश्वरांच्या कवितेतले कित्येक चरणखंड कवीने जसेच्या तसे उचललेले दिसतात. मूळ भारतात नसलेल्या गोष्टींचे वर्णन कर-णाऱ्या कवींचा मुक्तेश्वरांप्रमाणे नरहरिदेखील निषेध करतात. उपलब्ध पर्वांत वीररसाचा आविष्कार झाला आहे. *द्रोणपर्वा*वरून कवीची कवित्वशक्ती व रचनाचातुर्य लक्षात येते. काव्याची भाषा भारदस्त आणि प्रौढ आहे. ' कवित्वलतिका वाढे जनीं ' ह्या कवीच्या उक्तीवरून त्याच्या हयातीतच तो लोकप्रिय झाला होता असे दिसते.

**रचना : मु.** – द्रोणपर्व; अ. ३५; ओ. सं. ४८७५; कासं. क्र. १४२–१५४; पृ. १–२८९. **अमु.** – १. उद्योगपर्व; २. कर्णपर्व; भाइसंमं.; ३. भीष्मपर्व (अनुपलब्ध).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : नरहरि मोरेश्वर; मकच., खं. २; मुंबई, १९१३; पृ. २६; २. ओक, दा. के. : नर-हरि मोरेश्वर कृत महाभारत–द्रोणपर्व; प्रस्ता.; कासं. ५७; मुंबई, १९०६; ३. दिवेकर, स. म. : नरहरि मोरेश्वरांचें उद्योगपर्व; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १८६–१८८; ४. पटवर्धन, पां. न. : नरहरि मोरेश्वराचा गुरु कोण ?; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ३५८–३५९.

**नरहरि–४** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, अखेर] कवी. ह्यांचा काळ अगर वैयक्तिक माहिती उपलब्ध नाही. ह्यांच्या रचनेवर वामनांच्या रचनेची छाप आहे. कदाचित हे त्यांच्या शिष्यपरंपरेतील असावेत असा तर्क आहे. *गंगारत्नमाला* (१८४) हे ह्या कवीचे काव्य प्रथम *काव्ये-तिहाससंग्रहा*तून प्रसिद्ध झाले (इ. स. १८८९). पुढे ते *नवनीतात* संग्रहित करण्यात आले. रामलक्ष्मणाने विश्वामित्रांना गंगेच्या जन्माची

कथा विचारल्यावरून हा कथाभाग सांगण्यास विश्वामित्र सुरुवात करतात. अशा तऱ्हेने गंगाचरित्राची ही रत्नमाला कवीने तयार केली आहे. कवीची वर्णनशैली चित्रदर्शी आणि कथानक प्रवाही आहे. हे काव्य अनेकवृत्तात्मक, श्लोकबद्ध आणि रसाळ असून भाषा प्रौढ आणि रचना नादमधुर अशी आहे. [ ⇨ ३.] कवीने आणखीही काही आख्याने रचली आहेत. नरहरि कवींची १६ पदे व दुर्गेची आरती (महिषासुरमर्दिनीची) *पदसंग्रह, भाग २* मध्ये बा. दा. ओक ह्यांनी छापली आहेत. तो नरहरि हाच किंवा काय ते निश्चित पुराव्याच्या अभावी सांगता येत नाही.

**रचना : मु.** – १. कात्यायनीव्रत; २. गंगारत्नमाला; श्लो. १८४; नवनीत, मुंबई, १९५७ (१८ वी आवृत्ती); पृ. ४७५–४९५. दानव्रत; श्लो. १६७; अकलकामा., भा. ३; संपा. ओक, बा. दा. : पृ. ५८–७८. ४. नौकानयन; ५. ब्रह्मबोध; श्लो. ५०; अकलकामा., भा. ३; पृ. ९६–१००.

**नरहरि–५ / ० नरहरि कवी** [का. अनु.] कवी. तंजावर सरस्वती महाल ग्रंथालय व समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील हस्तलिखित बाडांत नरहरि कवीच्या नावावर विपुल स्फुट कविता आढळते. ही रचना पदपदांतरे, श्लोक, आरत्या, प्रकरणे अशी विविध स्वरूपाची आहे. नरहरि कवीची काही पदे अणि महिषासुरमर्दिनीची महाराष्ट्रवासीयांच्या नित्यपाठातील लोकप्रिय आरती पदसंग्रहात (भा. २) प्रसिद्ध झाली आहेत. ही कविता रचणारा नरहरि कवी व ह्याच नावाचे अन्य कवी एकच की भिन्न हे निश्चित आधार सापडल्याखेरीज सांगणे कठीण आहे.

**रचना : मु.** – १. पदे, १७; संपा. बा. दा. ओक : पदसंग्रह, भा. २; मुंबई, १९०१; पृ. ५८–६६, १८४–१८५. २. अंबेची, खंडोबाची व दुर्गेची अशा तीन आरत्या; मआ., पृ. ३६०, ३६९, ३७५. ३. एक रामपर पद (हिं.) व एक शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४२, १७. अमु. – १. अनुभवी रामायण. २. अपरोक्षानुभूति; त्रु.; मू. श्लो. १४२; ओ. सं. १०२०; संमति श्लोक ४८; र. श. : कीलक संवत्सर आश्विनमासी विजयादशमी (ओ. १०१९); सवामं. हस्त. सू., खं. २. ३. कृष्णजनन – भागवतांतर्गत; ओ. सं. ६३; तंसम. बा. १४२५. ४. स्फुट : पदपदांतरे, श्लोक, आरत्या इत्यादी; सवामं. हस्त सू., खं. १, २; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**नरहरि–६** [का. अनु.] पदकार. कल्याणस्वामींचे शिष्य.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**नरहरि–७** [का. अनु.] पदकार. हे स्वतःस माधवात्मतनय म्हणवितात.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**नरहरि–८** [का. अनु.] कवी. ह्यांनी रंगनाथ ह्या आपल्या पित्याकडून गुरूपदेश घेतला. ह्यांची वंशपरंपरा : केशव > हनुमंत > रंगनाथ > नरहरि अशी. गोत्र अत्री. आडनाव नामदे. मातोश्री राधा. ह्यांचे विद्यागुरू त्यांचेच मामा माधव हे होत. बंधू वामन.

**रचना : मु.** – रामलीलामृत; स्वतंत्र छापलेला; संककासू., पृ. १३१.

**नरहरि–९** [का. अनु.] भाषान्तरकार. ह्यांचे पूर्वज कोकणातील राजापूरजवळच्या सौंदळ प्रांती राहणारे. ह्यांचे गोत्र अत्री व आडनाव नाफडे. आईचे नाव जानकी. वडील राघव. श्रीमहालक्ष्मीच ह्यांना गुरुस्वरूप होती. नरहरीने *समश्लोकी गीता* लिहिली आहे. तिचा हा नमुना : ' समानवृत्त हे टीका पदार्था यमकांदिकां । पाहावी हे देशवाणी गुणज्ञतोषकारिणी ॥ ' *समश्लोकी*च्या पद्यांच्या उपसंहारात कवीबद्दलची वरील चरित्रात्मक माहिती सापडते.

**रचना : अमु.** – समश्लोकी गीता; " श. १६९५ (इ. स. १७७३) विजयसंवत्सरे कार्तिकायां धवलपक्षे सप्तम्यायां भृगुवासरे दिवागत घटि २६ एतत्समये लेखन समाप्त" झालेली एक प्रत कविवर्य मोरोपंतांच्या दप्तरात आहे, असे गो. का. चांदोरकर लिहितात; संककासू., पृ. १३१–३२.

**नरहरि गिजरे / ० नरहरदेव गिजरे** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक, उत्तरार्ध] महानुभाव कवी. यक्षदेव आम्नायातील. नागदेवाचार्यांचे शिष्य यक्षदेव ह्यांनी प्रवर्तिलेला आम्नाय यक्षदेव आम्नाय म्हणून ओळखला जातो. मुरारी यक्षदेवांनी रचलेल्या *नरहरदेव गिजरे यांचे त्यागानुसर्ण* (श्लो. ६९) (मु. : महानु., नोव्हें. १९६८; पृ. २१–३२). ह्या प्रकरणात कवीची काही माहिती सापडते. कवीच्या पित्याचे नाव रामेश्वर. हे आश्वलायनशाखी ब्राह्मण. पित्याच्या अनपेक्षित मृत्यूने वैराग्य प्राप्त होऊन नरहरी कवी तीर्थयात्रेस निघाले. यात्रा करीत पैठण क्षेत्री आले असता, महानुभाव संन्यासिनी कमळांबा (यक्षदेव आम्नाय महंत भीमसेनाची नात) हिच्याशी गाठ पडून तिच्या उपदेशाने प्रभावित होऊन त्यांनी ' महात्मा ' पंथाची दीक्षा घेतली. हे *दीक्षोपदेशप्रकरण*च मुरारी यक्षदेवांनी वर्णन केले आहे; ह्या दीक्षेचा काळ अंदाजे श. १३१५ / इ. स. १३९३ दिला आहे. नरहरी गिजरे कालांतराने यक्षदेव आम्नायाचे प्रमुख महंत झाले. ही परंपरा अशी : यक्षदेव > भानुदेव > भीमदेव > नरहर गिजरे. विद्यानगरच्या राजघराण्याशी ह्या परंपरेचा संबंध पोहोचतो.

*कवीश्वराचार्यांची आरती* (मु. : महानु., नोव्हें. १९६८, पृ. १४–१५) व *श्रीमगवद्गीतादर्पण ग्रंथ* अशी ह्यांची रचना आढळते. गीतानुवादाचे फक्त दोनच अध्याय *महानुभाव* मासिकाच्या अंकांतून चंद्रकांत निंभोरकर ह्यांनी प्रसिद्ध केले आहेत. ज्या पोथीवरून ह्या काव्याची संहिता छापली आहे ती पोथी अंदाजे ३०० वर्षांपूर्वीची श. १५९३ (इ. स. १६७१) मधली आहे. प्रस्तुत गीताटीका ही महानुभावीय कवींच्या कृतीमधील एक वैशिष्ट्यपूर्ण अशी रचना असून ती अनेकवृत्तात्मक आहे. मूळ संस्कृत श्लोकावरून त्याचे सुबोध मराठीत भाषान्तर केले आहे. उदा., ' योगस्थः कुरु कर्माणि ' ह्या श्लोकाचे भाषान्तर पहा : " योगरत होउनि करीं मग कर्म सारें। संगाभिमान त्यजुनी फल हें तुवा रे॥ सिद्धी समान कृतनिश्चय मा असिद्धी । यासीच योग म्हणती विजया सुबोधीं॥ ४८॥" ह्या ग्रंथाचा पुढील भाग मात्र अद्यापपर्यंत प्रसिद्ध होऊ शकलेला नाही.

**रचना : मु.** – श्रीमद्भगवद्गीतादर्पण; अ. २, श्लो. सं. १२५; संपा. निंभोरकर, चंद्रकांत; महानु., डिसें. १९६५; पृ. १–४; फेब्रु.-मार्च १९६६; पृ. १–७.

**नरहरि चिन्मय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नरहरितनय** [का. अनु.] कवी. ह्यांनी रचलेल्या *ध्रुवचरित्र* आणि *मार्कंडेयचरित्र* ह्या आख्यानांची रचना कटाव पद्धतीची व अनुप्रासयुक्त आहे.

**रचना : मु.** – १. ध्रुवचरित्र; पद्ये ५. २. मार्कंडेयचरित्र, पद्ये ७; महा. कवि, क्र. २३, २४, २५; श. १८२७; पृ. १५३–१६०.

**अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नरहरिदास** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. रामदासी संप्रदायातील. ग्रंथकर्ता अव्वल इंग्रजी काळात कोरेगाव व संगममाहुली येथे राहात असे. ह्यांच्या *अभंगरामायणा*ची शे-दोनशे पृष्ठे भारत इतिहास संशोधक मंडळाच्या हस्तलिखित संग्रहात सापडतात. ग्रंथावरून मिळणारी परंपरा पुढीलप्रमाणे : रामदास > अनंत > मेरु > श्वेतगोविंद > नागेश > राजाराम > महादेव > हरि > नरहरि. ह्यांनी समर्थचरित्र वर्णिल्याचा निर्देश शं. श्री. देव करतात (सवामं. बा. १६४९). 'नरहरिदास' असा कवी पदातून आपला उल्लेख करतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : नरहरिदासकृत अभंग

रामायण; भाइसमंइति., श. १८३४; पृ. १४७–१४८.

**नरहरि धुंडिराज माळू / ० धुंडिसुत मालो नरहरि / ० मालो धुंडिसुत / ० माळू(ळो) नरहरि** [का. अनु.] संतचरित्रकार. हे जातीने सोनार. ह्यांची गुरुपरंपरा उपलब्ध नाही. ह्यांनी अनेक संतांची चरित्रे विस्ताराने वर्णिली आहेत. ह्यांचे *भक्तिकथामृत, नवनाथभक्तिसार* (र. श. १७४१/इ. स. १८१९) व *मालुतारण* हे भलेमोठे ग्रंथ अद्भुत चमत्कारकथांनी भरलेले असून तत्कालीन सर्वतोमुखी असलेल्या गोष्टी. सोडल्यास इतरही कल्पित भाग त्यांत बराच आहे. गोरखनाथांच्या परंपरेतील ८४ सिद्धांच्या विचित्र कथा *नवनाथभक्तिसारात* येतात. ऐतिहासिक दृष्ट्या हे ग्रंथ निरुपयोगी आहेत. अंधश्रद्धेने आणि भाविकपणे कवीने ह्या ग्रंथांची रचना केलेली दिसते. ह्यांनी पदे व अभंगही रचले आहेत (मसा., आ. ५, पृ. ४९०, ९२९).

**रचना : मु.** – १. नवनाथभक्तिसार; अ. ४०; मुंबई, १९०४, १९३४. **अमु.** – १. भक्तिकथामृत; अ. ६४; ओ. सं. १२७००. २. मालुतारण. ३. अभंग, आरत्या, पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**नरहरिनाथ** [इ. स. च्या अठराव्या शतकाचा उत्तरार्ध] पदकार. हे पैठणवासी नाथपरंपरेतील प्रसिद्ध संतकवी शिवदीननाथांचे पुत्र व शिष्य होत. परंपरा : ज्ञाननाथ > सत्यामलनाथ > गैबीनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ > शिवदीननाथ > नरहरिनाथ. ह्या नरहरिनाथांचे दोन शिष्य बरेच प्रसिद्ध आहेत. एक लक्ष्मण व दुसरा महीपती. त्यांपैकी लक्ष्मण हा नरहरिनाथांचा मुलगा. ह्यांनी अनेक पदे रचली आहेत. " गुरुरायें बरवें केलें । माझें मीपण हरुनी नेलें ॥ " हे त्यांचे पद विशेष परिचित आहे. ह्यांनी हिंदी भाषेतही रचना केली आहे (मसा., आ. ५, पृ. ४५२–५३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** शर्मा, विनयमोहन : नरहरिनाथ; हिंमसंदे., पटणा, १९५७; पृ. २०६.

**० नरहरिपंडितसुत** – पहा हरि दीक्षित.

**० नरहरि मोरेश्वर देशपांडे** – पहा नरहरि–३.

**नरहरि व्यास / ० नरहरि–२ / ० नृहरिव्यास** [का. अनु.] कवी, भाषान्तरकार. अंबापूर येथे राहणारे. वामनाच्या खालोखाल भर्तृहरीच्या शतकांचे भाषान्तर ह्या कवीने केले आहे, असे ह्या कवीबद्दल वि. ल. भावे ह्यांनी आपले मत दिले आहे (मसा., आ., पृ. ३६७ टी.)

**रचना : अमु.** – भर्तृहरी नीतिशतक; श्लोकटीका; ग्रं. सं. २२५. २. भर्तृहरीच्या वैराग्य-नीति-शतकाची समश्लोकी टीका; ग्रं. सं. ६७५; अपूर्ण. ३. भर्तृहरी शृंगारशतक; समश्लोकी टीका; ग्रं. सं. २२२; तंसम., बा. १६७९–१६८२.

**नरहरि शिंपी** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. *सप्तकांड स्वानुभव रामायण* ग्रंथाचे कर्ते. कवीने आपल्या *रामायण* ग्रंथात अयोध्याकांडाच्या आरंभी तसेच जवळ जवळ प्रत्येक कांडाच्या शेवटी आपली गुरुपरंपरा दिली आहे ती अशी : शांतलिंग > कृष्णलिंग > जयरामस्वामी वडगावकर > महारुद्र > नरहरि. महाभारतावर रचना करणाऱ्या नरहरि मोरेश्वराहून हे भिन्न होत. कवीने आपल्या ग्रंथात सर्वत्र शिंपी नरहरि अशी नाममुद्रा वापरली आहे. परंतु एके ठिकाणी 'शिंपी नरहरिदास दीन' (अ. ६ : १०९) व दुसरीकडे " तैसा संतचरणीं मग्न जाण । नरसिंह नामा परियसा ॥ " (अ. ९ : ७०) असाही स्वतःचा निर्देश तो करतो. कवीच्या ग्रंथाचे हस्तलिखित उज्जयिनी येथील प्राच्यग्रंथसंग्रहालयात आहे (हस्त., क्र. ७८१).

ह्या कवीच्या *सप्तकांड स्वानुभव रामायण* ग्रंथाची उत्तरकांडापर्यंतची सात कांडेच उपलब्ध असून त्यातील प्रसंग ७२ व ओवीसंख्या ४५२६ आहे. प्रत्यक्षात मात्र हस्तलिखितातली काही पाने गहाळ झाल्याने ओव्या कमी भरतात. ग्रंथातील उल्लेखावरून कवीने *पाताळकांडही* रचले असावे असे वाटते. ग्रंथ श. १६८६ (इ. स. १७६४) तारण संवत्सरामध्ये रासभक्षेत्री नृसिंहतीर्थासमीप पूर्ण झाला. ग्रंथात आषाढ वद्य पंचमीस आरंभ करून तो श्रावण वद्य सप्तमीस समाप्त केला असे कवीनेच ग्रंथाच्या शेवटी म्हटले आहे. ग्रंथाचे पाच प्रतलेखक व हस्तदोष पाहून ही प्रत गिरिबाबांनी शुद्ध केली असा उल्लेख हस्तलिखितात केलेला आहे.

कवीने रचलेल्या सात कांडांत विविध रसांना पोषक अशा रामचरित्रातल्या अनेक घटना व प्रसंग असून कविप्रतिभेच्या आविष्कारास मुक्त वाव आहे. विस्तारभयास्तव ह्या कथावारूला निर्बंध घालून संयम राखण्याचा प्रयत्न कवीने जागोजागी केला आहे. समर्पक उपमादृष्टान्तादी अलंकारांचा उपयोग, सरळ व प्रवाही भाषा, इत्यादी काव्यगुणांनी रचना अनेक ठिकाणी उत्कृष्ट साधलेली आहे. त्यामुळे ग्रंथ वाचनीय झाला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. भालेराव, भा. रा. : नरहरिदासकृत स्वानुभवरामायण (अप्रसिद्ध कवि माला); मुमुक्षु (नवा), व. १, अं. १२, डिसें. १९२१; पृ. १४–१८. २ मुंडी, बा. ना. : शिंपी नरहरिकृत स्वानुभवरामायण; प्रसाद; मार्च १९६९; पृ. २४–२७.

**नरहरिसुत / ० नृहरिसुत** [का. अनु.] चरित्रकार व पदकार. ह्यांनी *मुकुंदराजमुनिचरित्र* (ओवीबद्ध) लिहिले आहे. हे आद्य मुकुंदराज नव्हेत. नृसिंहक्षेत्रीचे योगनिष्ठ सत्पुरुष कोकीळ हे ह्यांचे गुरू. ह्या मुकुंदमुनींनी श. १६९७ मन्मथसंवत्सरी वैशाख कृष्ण प्रतिपदेस जलसमाधी घेतली. प्रस्तुत चरित्र नृहरिसुतांनी नृसिंहक्षेत्राजवळच असलेल्या चक्राभिधान गावी मन्मथ संवत्सरीच ज्येष्ठ महिन्याच्या शुक्ल पक्षात लिहिले अशी हकीकत ह्या चरित्रात आहे (सवामं. बा. ६७६). ह्यांनी पदेही रचली आहेत.

**रचना : अमु.** – १. परशरामचरित्र; श्लो. ३३. २. मुकुंदराजमुनिचरित्र; ओ. सं. १०३. ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नरहरि सोनार** [? – समा. श. १२३५, माघ कृ. १ / इ. स. १३१३] संतकवी. ह्यांचे वडील दीनानाथ हे प्रथम देवगिरीस राहात असत. तेथे त्यांचा सराफीचा धंदा होता. परंतु पुढे नरहरि पंढरपुरास येऊन राहिले. 'गुरु गैबीनाथ । नरहरी दास हा अंकित ॥' असा एका अभंगात गुरूचा उल्लेख सापडतो. 'गैबीनाथ' बद्दल 'गैनीनाथ' हा पाठही प्रचलित आहे. नरहरी हे मूळचे कट्टे शैव होते. विठ्ठलाचे दर्शनही ते त्याज्य मानीत. पण ज्ञानेश्वर व तत्कालीन इतर संतमंडळीच्या सहवासात 'शिव आणि विष्णु एकचि प्रतिमा' असा अनुभव येऊन ते भागवतधर्माचे अनुयायी झाले. ह्यांची समाधी पंढरपूर येथे आहे.

*सकलसंतगाथेत* (पुणे, १९६७) ह्यांचे ३४ अभंग छापलेले आहेत. त्यांत नरहरिदास (रामदासी कवी) व नरहरि धुंडिराज मालो ह्या दोघांचे अभंग मिसळले आहेत. ते वजा जाता ह्यांच्या नावावर आठदहाच रचना उरतात (मसा., आ. ५, पृ. ७४२). 'देवा तुझा मी सोनार। तुझ्या नामाचा व्यवहार॥' ह्या अभंगात सोनाराच्या व्यवहारातील रूपक समर्पकपणे व समर्थपणे कवीने उभे केले आहे. भक्तिमार्गाचा स्वीकार केल्यानंतर हळूहळू निजस्वरूपाची ओळख पटून आत्मज्ञान झाले, तत्पूर्वीच्या उन्मनी अवस्थेतील साक्षात्कारी अनुभव व्यक्त करणारे काही अभंग नरहरींनी रचिले आहेत. ज्ञानी भक्ताने देखील 'नाम अमृत हें सार। हृदयीं जपा निरंतर॥' हा मंत्र सोडता कामा नये असे सांगतात. तत्कालीन भक्तिपरंपरेचा वारसाच कवीने चालविला असला तरी उत्स्फूर्त कवित्वाभावी त्यांच्या कवितेत तितकीशी उत्कटता प्रत्ययास येत नाही. कवीची मुद्रित न झालेली काही अभंगरचना समर्थवाग्देवतामंदिर, धुळे व मराठी संशोधन मंडळ, मुंबई ह्यांच्या हस्तलिखित बाडांत संग्रहित.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : नरहरि सोनार;

प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. २१७–२२३. २. ग्रामोपाध्ये, गं. ब. : नरहरि सोनार; संकास., पुणे, १९३९; पृ. १४५–१५८.

० **नरींद्र** – पहा **नरेंद्र.**

० **नरींद्रबास** – पहा **नरेंद्र.**

**नरेंद्र / ० नरींद्र / ० नरींद्रबास / ० नरेंद्र पंडित** [अंदाजे तेरावे शतक, उत्तरार्ध] महानुभाव कवी. महानुभावांच्या *साती काव्य*ग्रंथांतील *रुक्मिणी-स्वयंवर* ह्या अपूर्व काव्यग्रंथाचा कर्ता. ह्यांची चरित्रविषयक माहिती फारशी उपलब्ध नाही. *स्मृतिस्थळात* नागदेवसमकालीन पंडितांची हकीकत येते. ह्यांतील ११३ व्या स्मृतीत नरेंद्राने पंथाची दीक्षा कशी व कोणत्या निमित्ताने घेतली त्याची माहिती दिलेली आहे. *रुक्मिणी-स्वयंवरा*च्या टीपग्रंथाच्या आरंभीच्या मूळ पीठिकेत येणारी माहिती *स्मृतिस्थळा*हून थोडी वेगळी आहे. *स्मृतिस्थळा*तील माहितीप्रमाणे नरेंद्रकवी, नृसिंहकवी आणि साळकवी असे तिघे भाऊ देवगिरीच्या रामदेवराव यादवराजाच्या दरबाराचे मानकरी होते. नृसिंहकवीने *नलोपाख्यान* केले व साळकवीने *रामायण* रचले. हे दोन्ही ग्रंथ दरबारात राजापुढे त्यांनी वाचले. ह्यावेळी नरेंद्र त्या दोघांस म्हणाले की, द्वारकेच्या राजाच्या म्हणजेच श्रीकृष्णाच्या गुणवर्णनपर काही रचना केली असती तर आपल्या पापाचे तरी क्षालन झाले असते. ह्यावर आपण अशा प्रकारचे कवित्व करून दाखवावे असे त्यांच्या बंधूंनी त्यांना म्हटले. तेव्हा नरेंद्र कवींनी १८०० ओव्यांच्या *रुक्मिणी-स्वयंवरा*ची रचना करुन राजसभेत ते काव्य वाचले. ग्रंथाची ३१२ वी ओवी पूर्ण होताच राजाने नरेंद्रांना थांबवले आणि ग्रंथाचा अभंगु (कर्तृत्व) स्वतःला अर्पण करण्यास सांगितले व त्यासाठी ग्रंथाच्या ओव्यांएवढ्या सुवर्णमोहरा देण्याचे कबूल केले. ही गोष्ट कविराजांना अर्थातच पटली नाही. त्यांनी सांगितले की, असे झाल्यास आमच्या कविकुळास कलंक लागेल. ह्या उत्तराने राजाचे गर्वहरण झाले. नरेंद्र हा ग्रंथ घेऊन त्याच पावली भटोबासांपाशी (नागदेवाचार्य) आले. त्यांनी भिक्षा केली व हा ग्रंथ पंथास अर्पण केला.

चरित्रवजा टिपणापैकी एवढाच भाग *स्मृतिस्थळात* येतो. टीपग्रंथाच्या मूळ पीठिकेत ह्यापुढील माहिती येते ती अशी : कविवर्यांनी ग्रंथ अर्पण करण्यास नकार दिल्याने राजाने तो ग्रंथ त्याच्या संग्रही ठेवण्यासाठी मागितला. ह्यावर " हा ग्रंथ आशोधी असे : तरि याचें शोधन करू : मग आपुला दप्तरी ठेवा :" असे नरेंद्रबासांनी म्हटले व ग्रंथ बरोबर घेतला. रात्रभर जागरण करून तिघा भावांनी तीनतीनशे करून नऊशे ओव्या लिहून काढल्या. एवढ्यात सकाळ झाली व राजाने आपले सेवक पाठवून ग्रंथ नेला. ह्यामुळे उद्विग्न होऊन म्हणा किंवा दुसऱ्या कोणत्या कारणाने म्हणा, हा नवशत *रुक्मिणी-स्वयंवर* ग्रंथ घेऊन नरेंद्र पंडित नागदेवाचार्यांजवळ आले आणि त्यांनी पंथाची दीक्षा घेतली.

पारमांडल्य *अन्वयस्थळात* " पूर्वी नरेंद्रबासी रुक्मिणीसैंवर केलें : आन सातसे स्मृति जैसिया वर्तल्या तैस्याचि लिहिल्या " असा निर्देश येतो. एवढ्या चरित्रविषयक साधनांवरून ह्यांची कुलपरंपरा, मूळ गाव, ह्यांचे अध्ययन, पंथप्रवेशापूर्वीचे ह्यांचे जीवन किंवा इतर कोणतीच माहिती सापडू शकत नाही. त्यामुळे ह्यांच्या व्यक्तित्वासंबंधीचे काही आडाखे हे ह्यांच्या ग्रंथावरूनच काढावे लागतात. नरेंद्र हे विद्वान पंडित होते. वेद, स्मृती, पुराणे, काव्य, नाटके, कथा, आख्याने, प्रबंध, चित्रगाथा ह्या सर्वांचा रसिकतेने व सूक्ष्मपणे ह्यांनी अभ्यास केला असावा असे त्यांच्या काव्याच्या १६ व १७ ह्या क्रमांकांच्या ओव्यांवरून जाणवते. किन्नराच्या उपाख्यानाकरिता संगीताची जी पार्श्वभूमी नरेंद्रांनी उभी केली आहे त्यावरून संगीतकलेचेही उत्तम ज्ञान ह्यांना असावे. स्वर, श्रुती, ताळ, प्रबंध, वोडव, जाति, मूर्छना, राग, रागांग, उपांग, देशांग, धृपद, धृपदांग, साळांग, वर्ण, गमक, रूपक, गानसुड असे संगीतातले निरनिराळे पारिभाषिक शब्द नरेंद्र वापरतात. भीमकाच्या सभेत किन्नराने धनाश्री, मल्हार, श्रीराग, गौडी, असे अनेक राग गायल्याचे ते नमूद करतात (ओ. क्र. १७४-१८८).

महानुभाव पंथाची दीक्षा ह्यांनी प्रौढ वयात घेतली असावी. *स्वयंवर*-ग्रंथाचे लेखन त्याअगोदर झाले होते, असे आख्यायिकेवरून म्हणता येते. दामोदर पंडित, केशिराजबास किंवा महींद्रभट्ट ह्या पंडितांच्या पंथातील लोकप्रियतेच्या किंवा नागदेवांच्या आणि त्यांच्या वार्तालापाच्या जशा अनेक आख्यायिका सापडतात तशा नरेंद्र पंडितांच्या हे त्यांचे समकालीन असूनही सापडत नाहीत. त्यामुळे नरेंद्रकवींची मूर्ती, व्यक्ती म्हणून आपल्या नजरेसमोर उभी राहू शकत नाही. पंथप्रवेशानंतर पंथाकरिता पंडितांनी कोणते कार्य केले किंवा *रुक्मिणी-स्वयंवर* ग्रंथाखेरीज इतर कोणत्या ग्रंथांची रचना केली, ह्या संबंधात रसिक वाचक अजून अंधारातच आहेत. नरेंद्रांची जीवितयात्रा केव्हा संपली हे ठाऊक नाही. पंथीयांमध्ये त्यांचे स्थान कोणते हेही समजत नसल्याने *रुक्मिणी-स्वयंवरा*तून प्रत्ययास येणारे कवीचे वाङ्मयीन व्यक्तित्व हेच आज तरी महत्त्वाचे ठरले आहे.

*रुक्मिणी-स्वयंवर* ग्रंथात स्वतःचा उल्लेख कवी 'नरींद्र' असा करताना आढळतो. काव्याच्या वीस प्रसंगांत हा उल्लेख ह्यांनी 'नरींद्र' असाच केला आहे. 'नरेंद्र' असा उल्लेख काव्यात तरी अपवादात्मकच आहे. महानुभाव वाङ्मयात मात्र नरींद्र व नरेंद्र ह्या दोनही नावांनी कवीचा निर्देश येतो. हरिबास सोंगोबास ह्यांच्या *अन्वयस्थळात* नरेंद्र/नरेंद्रबास असा उल्लेख आढळतो. *रुक्मिणी-स्वयंवर* हा ग्रंथ *नरींद्र* ह्या ग्रंथनामानेही पंथीयांत ज्ञात आहे. उदा., "नरींद्रबासाही। ग्रंथ व्यवहारी। केला देवगीरी। **नरींद्र** तो ॥ १८२ ॥" (कृष्णमुनीचे *अन्वयस्थळ*). कृष्णराजदादा पारमांडल्य ह्यांच्याकडील पोथीवरून प्रा. सुरेश डोळके ह्यांनी प्रसिद्ध केलेल्या संपूर्ण *रुक्मिणीस्वयंवरा*च्या पोथीच्या शेवटी *नरींद्र* असे ग्रंथनाम येते. प्रा. डोळके ह्यांनी नरींद्र हेच कवीचे नाव प्रमाण मानले आहे.

*रुक्मिणीस्वयंवरा*च्या ८७९ ओव्यांच्या अनेक पोथ्या महानुभाव संग्रहातून आढळतात. हा ८७९ ओव्यांचा ग्रंथ अर्थातच अपूर्ण आहे. (डॉ. कोलते ह्यांनी ८७९ ओव्यांचीच संहिता प्रसिद्ध केली आहे.) कारण *स्मृतिस्थळा*तील आख्यायिका हा ग्रंथ १८०० ओव्यांचा असल्याचे सांगते. *टीपग्रंथा*ची व *स्मृतिस्थळा*ची ह्या बाबतीत एकवाक्यता दिसते. ह्याचा अर्थ महानुभावीय पोथ्यांत संपूर्ण काव्य उपलब्ध होत नाही असा होतो. प्रा. डोळके ह्यांनी १९७१ मध्ये प्रसिद्ध केलेले २९३६ ओव्यांचे नरींद्राचे *रुक्मिणीस्वयंवर* कृष्णराज पारमांडल्य ह्यांच्याकडे असलेल्या ह्या काव्याच्या एकमेव हस्तलिखितावरून प्रसिद्ध केले आहे. ह्या पोथीचा ले. श. १६७७ (इ. स. १७५५) आहे. आता ८७९, १८०० आणि २९३६ ही एकाच काव्याची आढळणारी निरनिराळी ओवीसंख्या, त्याची संगती कशी लावणार ? हा भाग खुद्द कवीनेच वाढविला असे म्हटले तर त्याचा उल्लेख *स्मृती*, *वृद्धाचार*, *अन्वयस्थळ* ह्यांत कुठेतरी निश्चितपणे यायला हवा. निदान *टीप*काराने तरी त्याचा निर्देश करायला हवा होता. तेही घडत नाही. त्यामुळे ही वाढ नरेंद्राची नसून अन्य कोणाची असावी असे वाटते. ह्या ओव्या प्रक्षिप्त आहेत व २९३६ ओव्यांच्या *स्वयंवरा*च्या पोथीचा कर्ता केशवदेव तळेग्रामकर ह्याच्याच त्या असण्याची शक्यता अधिक संभवते, असे मत डॉ. कोलते ह्यांनी *रुक्मिणीस्वयंवर* ग्रंथाच्या प्रस्तावनेत स्पष्टपणे मांडले आहे (प्रस्ता., पृ. १२). अगदी अलिकडेच डॉ. कोलते ह्यांना १८८५ व १९१२ तसेच १५०० ओव्या असलेल्या अशा ह्या काव्यग्रंथाच्या तीन प्रती मिळाल्या आहेत. त्यांचा अभ्यास केल्यानंतर त्यांतील अनेक ओव्यांचे कर्तृत्व नरेंद्रांचे नसावे असे त्यांना वाटते.

काव्याचा लेखनकाल (*ऋद्धिपूरवर्णना*च्या प्रस्तावनेत) डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी श. १२१३ दिला आहे. श्री वा. ना. देशपांडे तो १२१३–१४ असाच देतात. तळेग्रामकराच्या पोथीतील समाप्तिकालाच्या ओवीवरून – "शके द्वादशोत्तरशतें तेरोत्तरें। नंदन नाम संवत्सरे। ग्रंथ केला एकसरें । माघ वदी चौथी ॥ २९३५॥" – हा शक श. १२१३ नंदन नाम संवत्सर माघ वद्य चतुर्थी असा येतो. डॉ. कोलते म्हणतात, श. १२१३ ला खरोखरी नंदन संवत्सर येत नाही. पण गतशकलेखनाच्या पद्धतीप्रमाणे शक-संवत्सराचा मेळ बरोबर पडतो. अनेक मराठी पोथ्यांतून गतशकलेखनाची पद्धती आढळते. वास्तविक नंदन संवत्सर श. १२१४ ला येतो. त्याच वर्षी काव्यग्रंथ रचला गेला. पण नंदन संवत्सराचा उल्लेख करून गतशक १२१३ द्यायला हवा म्हणून पोथीत तो तसा नमूद केला आहे. म्हणून श. १२१४ (इ. स. १२९२) हा *स्वयंवरा*चा लेखनकाल डॉ. कोलते निश्चित करतात. प्रा. डोळके ह्यांनी पिल्लै जंत्रीप्रमाणे व इतर अनेक संवत्सरांच्या कालगणनांचा विचार करून हा काल श. १२१५ (इ. स. १२९३) ठरविला आहे.

*रुक्मिणीस्वयंवरा*ची कथा मुळात *भागवत* आणि *पद्मपुराण* ह्यांतून घेतली असे कवी सांगतो (ओ. ७५) "श्रीकृष्णाचा गुणीं जीविनला। माझा जिउ श्रीचक्रधरा विनटला। तो आंतुल आनंदु वोसंडला। कवितेचेनि मिसें ॥ ३५॥" अशी भावभक्तिपूर्ण भूमिका कवीने घेतलेली आहे. १७ व्या ओवीत कवी म्हणतो : काव्ये, नाटके, आख्याने, प्रबंध, चित्र-गाथा ह्यांना देवाच्या पवाड्यांची सर येणार नाही. म्हणून ही पवित्र श्रीकृष्णकथाच कवीने आपल्या काव्याचा विषय केली आहे.

नरेंद्र हे ज्ञानेश्वरसमकालीन कवी आहेत. मराठी भाषेच्या संपन्नतेच्या खुणा ज्ञानेश्वरांप्रमाणे नरेंद्रांच्या ग्रंथांतूनही स्पष्टपणे जाणवतात. नरेंद्रांनी काव्य रचताना महाकवीची भूमिका जाणीवपूर्वक घेतलेली दिसते. *ऋक्मिणस्वियंवरा*त काव्याच्या आत्मतत्त्वाबद्दल जे विचार कवी मांडतो त्यांवरून त्याची काव्यविषयक जाणीव किती प्रगल्भ स्वरूपाची होती हे समजून येते. ज्ञानेश्वरांप्रमाणे मराठीचा अभिमान नरेंद्र व्यक्त करतात. तिला 'रसांचे जीवन' असे कवी म्हणतो. 'ते मऱ्हाटे बोल रसिक। वरि दावीन देशियेचे बिक (शोभा)'– हे भाषेचे सौंदर्य त्यांच्या ग्रंथांतून ठिकठिकाणी प्रकट झालेले आहे. रसानुकूल नादमधुर आणि तितक्याच उचित अशा शब्दांची योजना, अभिनव कल्पना व रसाविष्कार आणि औचित्यविषयक जाणीव इत्यादी उत्कृष्ट काव्याच्या अनेक अंगोपांगांची जाणीव कवीला आहे. "कुंकुमाची वेलि लांबी। तिया मुक्ताफळांचिया तुरंबी। तैसिया अक्षेरांचिया लोंबी। कविता लते ॥ २२॥" ह्या ओवीत शब्दांचे सौंदर्य कवी व्यक्त करतो, तर दुसऱ्या एका ओवीत रसाविष्काराचे सामर्थ्य सांगतो : "कविता कामिनीयेचा धरुनि हातु। भावो दोहीं आंगीं मलपतु। चाले साहित्य साबरेया आंतु। रस खेडकुळिये॥ २६॥" उत्कृष्ट काव्याच्या वाचनाने प्राप्त होणारा आनंद, मनाची शांती ह्यांचीही कल्पना 'कैसी कवितेची रेख' ते सांगताना कवी स्पष्ट करतो (ओ. १४). हे आख्यान सांगणारा कवी हा पुराणिक नसून एक मोठा कवी आहे याचे प्रत्यंतर नरेंद्रांनी लिहिलेल्या ओव्याओव्यांतून येते. भीमकाची सभा, सख्यांसह रुक्मिणीचे तेथे आगमन, नंतर भीमक राजाला पडलेली चिंता इत्यादी घटना विस्ताराने सांगितल्या आहेत. रुक्मिणीची विरहावस्था, त्यावरील उपचार, सायंकाळ, चंद्रोदय, वनोपवने, समुद्र, द्वारका, इत्यादिकांची वर्णनेही कवीची महाकाव्यविषयक भूमिका स्पष्ट करतात. कल्याणकीर्ती भाट व किन्नराचे उपाख्यान तसेच नरेंद्राने वर्णिलेली रुक्मिणीची भावपूर्ण अशी प्रणय-पत्रिका हे नरेंद्रांच्या स्वतंत्र प्रतिभाविलासाचे आविष्कार म्हणता येतील. नरेंद्रांची निसर्गवर्णने अंतर्मुख दृष्टीने केलेली असल्याने वैशिष्ट्यपूर्ण झाली आहेत. हे कथाकाव्य रूक्ष होऊ नये म्हणून कवीने प्रथमपासून अखेरपर्यंत रसिक अक्षरांची गुंफण केलेली आहे. समयोचित अलंकारांचा वापर करून उत्कट असा भावाविष्कार साधल्याने काव्यात एक प्रकारची सहज-सुंदरता आली आहे. [ ⇨ ३.]

नरेंद्रांच्या काव्यग्रंथास महानुभावांच्या *साती ग्रंथां*त आद्यस्थान मिळाले आहे. तरीही प्रस्तुत काव्यात महानुभाव तत्त्वज्ञान आहे किंवा नाही ह्यासंबंधी वाद आहे. नरेंद्रांच्या *रुक्मिणीस्वयंवरा*त इतर महानुभावीय काव्यांप्रमाणे पंचकृष्णांना वंदन नाही. हे काव्य नरेंद्रांनी पंथात प्रवेश करण्यापूर्वी रचले होते. अशा काही स्थळांकडे ह्या प्रश्नाचा विचार करताना बोट दाखवले जाते. डॉ. कोलते म्हणतात की, ह्या संबंधात *टीप*कार हे पंथीय तत्त्वज्ञानाच्या पक्षास अनुकूल आहेत, पण महानुभाव तत्त्वज्ञानसापेक्ष अर्थ कवीस अभिप्रेत नाही. ह्याउलट, *रुक्मिणीस्वयंवर* काव्याची बैठक महानुभावीय नसली तरी त्यावर महानुभावीय कल्पनाविचारांचा प्रभाव आहे असे मत रा. चिं. ढेरे ह्यांनी मांडले आहे. नरेंद्रविरचित *रुक्मिणीस्वयंवरा*चे संपादक डॉ. द. भि. कुळकर्णी ह्यांच्या मते (प्रस्ता., पृ. १४) ह्या काव्यात पंथीय तत्त्वज्ञानाच्या तपशिलास महत्त्व नसून काव्यलेखनामागील पंथीय प्रेरणेस महत्त्व आहे, आणि ही प्रेरणा पूर्णपणे महानुभावपंथानुकूल नव्हे तर महानुभावपंथनिष्ठ आहे ('मराठीतील आद्य महाकाव्य', *युगवाणी*, नोव्हें. १९६८, पृ. १६३).

भक्तिभावनेने प्रेरित होऊन नरेंद्रांनी काव्यरचना केली आहे ह्याचा पुरावा ग्रंथातील अनेक ओव्यांतून सापडतो (उदा., ओ. क्र. १५, १६, १७, ३५, ३६, ३७ इ.). परंतु भक्तिप्रेरणेपेक्षा कविप्रेरणा ही बलवत्तर ठरल्याने विदग्ध कविवृत्ती आणि कृष्णभक्ती ह्यांच्या संमीलनातून हे सुंदर काव्य निर्माण झाले आहे.

नरेंद्रांच्या ह्या काव्याचा परिणाम *संतोषमुनी कृष्णदास, गोपाळदास, नरसिंह* इत्यादी उत्तरकालीन महानुभाव कवींवर झालेला दिसतो. नरेंद्रांनी योजिलेले कल्याणकीर्ती भाट व किन्नराचे उपाख्यान ह्या बहुतेकांनी उचलले आहे. श्रेष्ठ अशा ह्या कवीच्या काव्यकल्पनेचे ऋण पुढील कवींनी नकळत स्वीकारले आहे. एकनाथ, सामराज, विठ्ठल, श्रीधर, मोरोपंत इत्यादी महानुभावीयेतर कवींच्या पाहण्यात हे काव्य होते किंवा नाही ते समजण्यास काहीच साधन नाही. ह्यांच्यापैकी कोणीही कल्याणकीर्ती व किन्नर ह्यांचा उल्लेख केलेला आढळत नाही. ह्यांपैकी प्रत्येक कवीने आपल्या स्वतंत्र धाटणीने हे आख्यान सजविले आहे. ह्या स्वयंवरकथांमधील नाथांचे *ऋक्मिणीस्वयंवर* महाराष्ट्रात अत्यंत लोकप्रिय होते. एकनाथ नरेंद्रांनंतर दोन शतके उलटून गेल्यानंतरच्या काळात विद्यमान होते. 'नित्य नूतन इची गोडी' अशा ह्या कथेवर रचना करणाऱ्या नाथांची भूमिका ही आत्मज्ञानाची जाणीव करून देणाऱ्या तत्त्वज्ञ कवीची आहे. "ये ग्रंथीचें निरूपण। जीवा-शिवा होतसे लग्न। अर्थ पाहतां सावधान। समाधान सात्त्विका॥" ही भूमिका जशी भक्ताची तशी उपदेशकाची होती असे वाटते. अध्यात्मज्ञान विशद करण्यासाठीच ग्रंथाची रचना नाथांनी केल्याने त्यांच्या रचनेत मुळाला सोडून विषयांतर किंवा पाल्हाळ नाही. तरीही नरेंद्रांनी निर्माण केलेले काव्यसौंदर्य व अभिजात कल्पनाशक्ती ह्यांचा प्रत्यय नाथांच्या काव्यात येत नाही.

नरेंद्र ज्ञानेश्वरांचे समकालीन आहेत. पण ते ज्ञानेश्वरांप्रमाणे तत्त्वचिंतक नाहीत. त्यांचे काव्य *ज्ञानेश्वरी*शी तुलना करता लहान असले तरी ह्या काव्यातील रसानुकूल व नादमधुर असे शब्दसौंदर्य, अभिनव कल्पना व उत्कट भावाविष्कार इत्यादी काव्यकलेची अंगे ही *ज्ञानेश्वरी*च्या तोडीची आहेत असे मत *ज्ञानेश्वरी*चे एक गाढे अभ्यासक डॉ. शं. दा. पेंडसे ह्यांनी ज्ञानेश्वर आणि नरेंद्र ह्या आपल्या लेखांत व्यक्त केले आहे (*काव्य आणि कर्मयोग*, पुणे, १९६१, पृ. १०८). *रुक्मिणीस्वयंवर* ग्रंथाचा अभ्यास केल्यानंतर ह्याविषयी कोणताही संदेह

मनात उरत नाही.

*स्मृतिस्थळां*तील (नागदेवचरित्राच्या) सातशे स्मृती नरेंद्रबासांनी लिहिल्या अशी माहिती पंथीय वाङ्मयकर्तृत्वात सापडते (पारमांडल्य *अन्वयस्थळ, स्मृतिस्थळा*च्या लेखनकतृत्वासंबंधात वाद आहेत. *स्मृतिस्थळा*चे एक संपादक वा. ना. देशपांडे हे म्हणतात की, नरेंद्र व परशराम हे मूळ लेखक किंवा स्मृतिकार असून मालोबास, गुर्जर शिवबास हे संस्करणकार असे मानण्यास पंथीय परंपरेत आधार सापडतात. ह्या संबंधात मत व्यक्त करताना डॉ. व. वि. पारखे म्हणतात : पारमांडल्य *अन्वयस्थळा*तील वर निर्दिष्ट केलेल्या उल्लेखावरून नरेंद्रानेही *स्मृतिस्थळ* रचले असले पाहिजे असे वाटते. परंतु या माहितीस अन्यत्र दुजोरा मिळत नाही. प्रत्यक्ष *स्मृतिस्थळा*त नरेंद्रांच्या *रुक्मिणीस्वयंवर* ग्रंथाचा उल्लेख होतो, स्मृतींचा येत नाही (स्मृ. ११३). *साळकर अन्वयस्थळा*त स्मृतींचे संकलक म्हणून परशरामबासांचेच नाव येते, नरेद्राचे नव्हे. अतएव सर्व उपलब्ध पुरावे पाहता नरेंद्रांनी स्मृतिसंकलन केले नसावे (*स्मृतिस्थळ* : संपा. डॉ. व. वि. पारखे; डोंबिवली, १९७०, प्रस्ता., पृ. १४–१५). डॉ. पठाण ह्यांनी एका महत्त्वाच्या पोथीवरून *स्मृतिस्थळ* ग्रंथाचे संपादन केले आहे. *स्मृतिस्थळा*तील स्मृ. क्र. ६४ व ११३ च्या आधारे नरेंद्र हा *स्मृतिस्थळा*चा कर्ता नसावा असे मत ह्यांनी मांडले आहे. नरेंद्रविरचित स्मृती आज कोणत्याच पाठात उपलब्ध नाहीत. [⇨ ३.]

**रचना : मु.** – १. रुक्मिणी-स्वयंवर; प्रसंग ९४; ओ. सं. ८७९; संपा. कोलते, वि. भि.; मलकापूर, १९४० (विस्तृत प्रस्तावना, पृ. १–४३). २. रुक्मिणी-स्वयंवर; प्रसंग ३८५; ओ. सं. २९३६; संपा. डोळके, ग. म. ऊर्फ सुरेश; नागपूर, १९७१ (महत्त्वाची प्रस्तावना, पृ. १–७२).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, द. भि. : मराठींतील आद्य महाकाव्य; युगवाणी, नोव्हें. १९६८; पृ. १६१–१६७. २. कोलते वि. भि. : 'नरेंद्र पंधरसे' : नरेंद्राचे आणखी एक रुक्मिणीस्वयंवर; 'महानुभाव' रौप्यमहोत्सवी विशेषांक, एप्रि., मे, जून १९७४; पृ. ६१–७०. ३. डोळके, सुरेश : नरीन्द्राचा प्रतिभाविलास; मसाप., मे, जून १९५६; पृ. २०–२५. ४. ढेरे, रा. चिं. (संपा.) : नरेंद्रविरचित रुक्मिणीस्वयंवर; औरंगाबाद, १९६५. ५. देशमुख, उषा : कृष्ण-रुक्मिणी-स्वयंवरकथा : महदंबा आणि नरेंद्र; नभामा., ऑग. १९७६; पृ. ५७-६६. ६. नेने, ह. ना. : नरेंद्रकवीच्या रुक्मिणीस्वयंवरावर अधिक प्रकाश; संलेसं., भा. १; नागपूर, १९५७; पृ. ८२–१०५. ७ पटवर्धन, द. वा. : महाराष्ट्राचा प्रतिभासंपन्न कवि – नरेंद्र; जीवनविकास, ऑग. १९६७; पृ. ३२६. ८. देंडसे, शं. दा. : ज्ञानेश्वर आणि नरेंद्र; मराठी संत : काव्य आणि कर्मयोग; पुणे, १९६१; पृ. ८४–१०८. ९. भुसारी, र. म. : श्री एकनाथ आणि नरेंद्र पंडित; साहित्य आणि संशोधन; हैद्राबाद, १९५१; पृ. ९३–१२७.

**० नरेंद्र पंडित** – पहा **नरेंद्र**.

**नवरस नारायण** [अंदाजे इ. स. चे १५ वे शतक] महानुभाव कवी. *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे आणि डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी ह्या कवीचा व त्याच्या काव्याचा उल्लेख केला आहे (अनु. : मसा., आ. ५, पृ. १७७; ममवा., पृ. ४६). त्यांच्या मते 'या कवीचे खरे नाव शार्ङ्गधर पंडित व उपनाव भोजने, परंतु आपल्या ग्रंथात हा स्वतःचा उल्लेख नवरसनारायण असा करतो.' भावे व देशपांडे ह्यांनी दिलेली ही माहिती चुकीची आहे, असे डॉ. यू. म. पठाण लिहितात (नवरसनारायणविरचित *शल्यपर्व*, प्रस्ता., पृ. १८५). त्यांनी उपलब्ध झालेल्या *शल्यपर्वा*च्या अनेक पोथ्यांच्या आधारे हा कवी उपाध्याय आम्नायातील व भोजने कुळातील असून *तीर्थमालिका*कार शारंगधर भोजने ह्यांचा हा शिष्य होय, असा निष्कर्ष डॉ. पठाण ह्यांनी काढला आहे. ते म्हणतात : *शल्यपर्वा*तील बहुतेक सर्व अध्यायांच्या शेवटी आढळणाऱ्या एका ओवीवरून शारंगधर हे कवीचे गुरू ही गोष्ट स्पष्ट होते. ती ओवी अशी : 'कृष्ण धनुस्ये नाम सारंगधरु। अद्भुत-ज्ञानशक्तीचा मेरु। शत करूनि नमस्कारु । म्हणे नवरसनारायेन ॥" कोणताही कवी स्वतःलाच नमस्कार करणे अशक्य. त्यामुळे नवरसनारायण म्हणजे शारंगधर भोजने हे पत पटण्याजोगे नाही.

नवरसनारायणांची *शल्यपर्वा*च्या हस्तलिखित पोथ्यांत आढळणारी गुरुपरंपरा अशी : श्रीदत्त > मौन्यदेव योगेश्वर > नागार्जुन > कवीश्वर > पटवर्धन योगेश्वर > जनार्दनभोज > मुकुंदराज > सारंगराज > मुनिवेल्हण > नवरसनारायण, ही परंपरा डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांनी दिलेल्या परंपरेशी बव्हंशी जुळणारी आहे (मसा., आ. ५, पृ. ७६०). डॉ. य. खु. देशपांड्यांनी उपाध्य आम्नायाचा जो वंशवृक्ष दिला आहे (ममवा., परिशिष्ट) त्यात शारंगधर व त्यांचे गुरू मुकुंदव्यास ह्यांची नावे येतात. आता फक्त ह्या गुरुपरंपरेतील येल्हन किंवा मुनि वेल्हण ह्याचा व नवरसनारायणांचा संबंध काय ह्या मुद्द्याचा उलगडा होत नाही. *शल्यपर्वा*च्या श. १६६७ (इ. स. १७४५) मधील एका पोथीत शार्ङ्गधराचा शिष्य मुनि येल्हण व वेल्हणाचा 'अनोजबंधु' जो नारायण 'तो नवरसनारायेण बोलिजे' असे कवीने म्हटले आहे.

नवरसनारायण कवीच्या *शल्यपर्वा*चे डॉ. यू. म. पठाण ह्यांनी संपादन केले आहे. त्यांना उपलब्ध झालेल्या ह्या पर्वाच्या पाच हस्तलिखितांपैकी हैद्राबाद येथे उपलब्ध झालेली श. १६१५/इ. स. १६९३ मधली प्रत त्यांनी प्रमाण मानली आहे व इतर प्रतीतील पाठभेद तिच्या संहितेखाली नमूद केले आहेत.

*शल्यपर्वा*च्या शेवटच्या अध्यायात ही संपूर्ण महाभारतकथा व्यासांच्या संस्कृत भारताच्या आधारे रचली, असे कवी सांगतो. कदाचित कवीने संपूर्ण भारत रचले असावे. आज मात्र त्याचे *शल्यपर्व* तेवढेच उपलब्ध आहे. महाभारताचा आधार घेऊनही *शल्यपर्वा*ची वेगळीच कथा कवीने सांगितली आहे. मूळ महाभारती कथेशी सुसंगती राखण्याचे कवीने हेतुपुरःसर टाळले असावे कारण एरवी *शल्यपर्वा*च्या कथावस्तूत एवढा मोठा बदल त्याने केला नसता. काव्य रचताना मुळातील कथांचा अनुक्रम कवीने चुकविला आहे. एवढेच नव्हे तर भारताच्या सौप्तिक, स्त्री आणि मौसल पर्वातील तसेच रामायण व इतर पुराणांतील कथा *शल्यपर्वा*त कवीने घुसडल्या आहेत.

कथेतील विविध प्रसंगांच्या सुसूत्र आराखड्याबरोबर कोणत्या प्रसंगाचा विशेष विस्तार करावयाचा व कोठे संक्षेपात्मक विवरण करावयाचे ह्याविषयीही कवीने आपल्या मनाशी खूणगाठ बांधली असली पाहिजे, असे साधार सांगता येते. अठरा प्रसंगांत आपला कथाप्रपंच थाटताना विविध आख्याने-उपाख्याने ह्यांचा केवळ नामनिर्देश करून कवी पुढे जातो, कारण 'सांगता ग्रंथधारण। वीस्तार होईल ॥' अशी जाणीव त्यास पदोपदी होते. अनावश्यक किंवा पाल्हाळवजा तपशील कवी मोठ्या कौशल्याने टाळतो. उदा., सोळाव्या प्रसंगात धर्मास 'राज्यीं स्थापण्या'च्या समारंभासाठी जे 'शाहान्नवकुळीचे भुपती' येतात त्यांच्या नावांची यादी कशी द्यावयाची ? कारण 'बहुत कुळीचे राजे। सांगता ग्रंथ प्रसारु होये ।' असे म्हणून कवीने विस्तार केलेला नाही. कवी कथा-प्रसंगांशी समरसून कथा-वस्तूचे निवेदन करतो. *शल्यपर्वा*च्या सर्वच प्रसंगांत कवीच्या प्रवाही वाणीचा प्रत्यय येतो. वाचकांच्या मनांत पुढील कथेविषयी कुतूहल निर्माण व्हावे म्हणून कवीने पराकाष्ठेची दक्षता घेतली आहे. आधीच्या प्रसंगाची सुप्त बीजे पेरून कवी वाचकांस त्याची प्रकट जाणीवही देतो.

वर्णनकौशल्य हा नवरसनारायणाच्या प्रतिभेचा एक पैलू आहे. स्थल आणि व्यक्ती ह्यांच्या वर्णनांपेक्षा ह्याची प्रसंगवर्णने उठावदार झाली

आहेत. युद्धवर्णनात कविप्रतिभा विशेषेकरून रमते म्हणून *शल्यपर्वा*च्या १८ प्रसंगांतील १२ प्रसंगांत प्रत्यक्ष युद्धाचे तरी वर्णन केलेले आढळते किंवा युद्ध होण्यास अनुकूल असे परिपोषक वातावरण तरी निर्माण केल्याचे आढळते. आठ प्रसंग तर संपूर्णतया युद्धवर्णनासच वाहिलेले आहेत.

चित्रमयता हा त्यांच्या शैलीचा आणखी एक विशेष आहे. पहिल्या प्रसंगात 'सीहाद्रीगिरीचा दत्तक्षीतीवर' प्रकटला त्यावेळच्या दत्तसभेच्या वर्णनापासून श्रीकृष्णास निरोप देण्याच्या शेवटच्या प्रसंगापर्यंत जी जी वर्णने कवीने केली आहेत त्यांत ह्या विशेषाचा उत्कटत्वाने प्रत्यय येतो. *शल्यपर्वा*त कवीने रेखाटलेली भीम, शल्य, दुर्योधन, बलराम, धर्म, अश्वत्थामा ह्यांची स्वभावचित्रे उल्लेखनीय आहेत. ह्या पर्वात वीररसाचाच आविष्कार प्रामुख्याने झाला आहे. ह्या काव्यात शांतरसाला आपण प्रमुख स्थान दिले आहे, असे कवी म्हणत असला तरी प्रत्यक्ष काव्याचे अवलोकन केल्यास वीररसालाच त्याने ते स्थान दिले आहे, असे प्रत्ययास येते. कथानकाचा विचार करता ते यथोचित वाटते. प्रसंगपरत्वे बीभत्स, करुण, अद्भूत वगैरे रसांचा आविष्कारही कवी घडवितो.

उपमा व अतिशयोक्ती हे नवरसनारायणाचे अत्यंत आवडीचे अलंकार आहेत. ह्यांच्या साहाय्याने कवीच्या सुंदर कल्पनाविश्वाचे दर्शन घडते. कथेच्या अनुषंगाने पंथीय तत्त्वज्ञानाची बैठक, क्लिष्टता न आणता, कवीने काव्याला दिली आहे. तत्त्वज्ञान सुलभ करून सांगण्याची कवीची हातोटीही चटकन नजरेत भरण्यासारखी आहे. दत्त आणि श्रीकृष्ण ह्या महानुभावांच्या परमेश्वर-अवतारांविषयी भक्तिभावपूर्ण विवरण कवीने केले आहे (अनु., प्र. ११, प्र. १७–१८). चक्रधर, नागार्जुन ह्यांचे उल्लेख, प्रपंच, परमेश्वर, जीव आणि देवता ह्या चतुःसूत्रीवर आधारलेल्या महानुभावीय द्वैतवादी विचारसरणीचा काव्यावर पडलेला प्रभाव, ह्या गोष्टी नवरसनारायणाचे महानुभावीयत्व सिद्ध करतात. भाषिक दृष्ट्या काव्य यादवकालीन मराठीच्या वैशिष्ट्यांकडे झुकणारे आहे.

**रचना : मु.** – महानुभाव कवी नवरसनारायणविरचित शल्यपर्व; प्रसंग १८; ओ. सं. २३६५; संपा. पठाण, यू. म.; विस्तृत प्रस्ता., पृ. १–६८; औरंगाबाद, १९६४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : महानुभावकवि नवरसनारायण; जुवानसं., धारवाड; १९६४; पृ. ३१–४६. २. चांदोरकर, गो. का. : नवरसनारायण मानभाव होते काय?; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ११३–११४. ३. देशपांडे, य. खु. : नवरसनारायणाचे महाभारत; ममवा., पुणे, १९६०; पृ. ४६; मवाइ., खं. २; संपा. पांगारकर, ल. रा.; नाशिक, १९३५; पृ. ७६९–७७०.

**नवलदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ५३.

**० नाईक सनतिदास** – पहा **नायकसनतिदास.**

**० नाईकस्वामी** – पहा **पूर्णप्रकाशानंदनाथ.**

**० नागकवि** – पहा **नागेश–१.**

**० नागज** – पहा **नागसुत.**

**० नागजोशी** – पहा **नागेश–१.**

**नागतनय** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नागदेव–१** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – नवकुण्डविधान, धर्मशास्त्रावरील ग्रंथ; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १३५.

**नागदेवाचार्य** / ० **भटोबास** – पहा **परिशिष्ट.**

**नागनंदन** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे व देशिकरामाची आरती; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नागनरु** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] शाहीर. 'अप्पा देसाई निपाणकर' ह्या हिंमतबहाद्दरावरील विस्तृत पोवाडा (१८ चौकी) नागनरूने रचला आहे. अप्पा देसायाचे खरे नाव शिधोजीराव नाईक निंबाळकर. शिधोजीरावांच्या घराण्याकडे आदिलशाही कारकीर्दीपासून निपाणी व शिरगुप्पी ह्या गावांची इनामदारी होती. परशुरामभाऊ पटवर्धनांनी ह्याला आपल्या सैन्यात सरदारी दिली होती. हा मोठा धाडसी आणि शूर होता. पण तितकाच क्रूर व निर्दय होता. ह्याचे स्वाभाविक चित्र पोवाडेकाराने उभे केले आहे. पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड २* मध्ये संग्रहित (पृ. १७३–२०२).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : अप्पा देसाई निपाणकराचा पोवाडा : ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. २; पुणे, १९४४; पृ. १६५–१७२.

**नागनाथ–१** [का. अनु.] महानुभाव कवी. आनेराज व्यासांचे शिष्य.

**रचना : अमु.** – चरित्र सर्वज्ञ नाथप्रबंध; डॉ. देशपांडे, य. खु.; पारमांडल्य आम्नाय वंशवृक्ष; ममवा., परिशिष्ट.

**नागनाथ–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**नागनाथ–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. जांबुवंतश्रीरामभेटी; त्रु. १ ते १११ ओव्या; २. श्रीरामस्वर्गारोहण; त्रु. १०–१११ ओव्या; सवामं. बा. ४१८; हस्त. सू., खं. १. ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नागनाथ–४** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – बालक्रीडा; प्र. ११, ओ. सं. १३५०; भागवत दशमस्कंधांतर्गत; प्रत ले. का. : श. १५७३ / इ. स. १६५१; तंसम. बा. १४३४, हस्त. यादी, क्र. २.

**नागनाथ अंकित** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० नागनाथ नीरंजन** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**नागय्या** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – तत्त्वबोध; ओव्या; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**नागराज** / ० **नागेंद्र–१** [इ. स. चे १७ वे शतक] महानुभाव कवी. हे शालिवाहनाच्या १६ व्या शतकात होऊन गेले. कवीच्या नावावर वि. ल. भावे ह्यांच्या *महानुभाव ग्रंथसूचीत* (पृ. १५) सात-आठ रचना सापडतात. नागराजांचे *प्रतिष्ठान वर्णन* हे स्थानमाहात्म्य सांगणारे एकच काव्य छापले गेले आहे.

आपल्या काव्यग्रंथाच्या आरंभी कवीने महानुभाव पंचकृष्णांना तसेच परविद्या देणाऱ्या नागदेवाचार्यांना आदरपूर्वक वंदन केले आहे. *प्रतिष्ठान वर्णन* काव्याचा संबंध श्रीचक्रधरप्रभूंच्या क्रीडांशी आहे. श्रीचक्रधरांचा प्रतिष्ठानातल्या (पैठणातील) ज्या ज्या स्थानांशी संबंध आला, त्या पवित्र स्थानांच्या स्फूर्तिप्रद दर्शनाने कवीचे भावविश्व उचंबळून आले आहे. ह्या भावनांना दिलेले शब्दरूप म्हणजेच हे काव्य होय. ८१२ व्या ओवीत 'स्तविला श्रीचक्रधरु। मीषें ओवियेचेनि ।' असे कवीने स्पष्टपणे म्हटलेच आहे.

महानुभाव तत्त्वज्ञान कवीने पूर्णतया आत्मसात केलेले दिसते. 'जे परमार्गियां जीवन। वर्णीन प्रभुक्रीडाख्यान।' ह्या श्रद्धेने आणि 'पापांचा क्षय होण्यासाठी' ह्या काव्याची रचना झाली आहे. प्रभूंच्या कृपाप्रसादामुळे प्राप्त होणाऱ्या परमार्थज्ञानाची कवीला अनावर ओढ लागलेली दिसते. काव्य प्रासादिक असून कवीच्या वाणीत एकप्रकारचे सामर्थ्य आहे, व त्याची कवीला जाणीव असल्याचे दिसते. तो म्हणतो : "शब्दसमुद्री निरुते । चढविन प्रमेयांचे भरिते । दावीन साहित्य तरंगाते ।

श्रोतया पुढा ॥ ६६ ॥ बोलेन मऱ्हाटी आरूष । परि प्रभूक्रिडारसें सुरस । करीन योगियांचें मानस । अती प्रेमरूप ॥ ६७ ॥ " ह्या आत्मविश्वास अनाठायी नसल्याचे काव्यात प्रत्ययास येते. संप्रदायावरील निष्ठेतून निर्माण झालेल्या ह्या काव्यातील तत्त्वज्ञान हे आशयाशी एकजीव झालेले आहे. काव्यातील भावाविष्कार रसिक अन्तःकरणाची पकड घेणारा असा आहे. डॉ. शं. गो. तुळपुळे म्हणतात : नारोव्यास बहाळीये ह्यांच्या *ऋद्धिपूरवर्णना*ची बरीच छाया ह्या काव्यावर पडल्यासारखी वाटते. एकंदरीत महानुभाव परंपरेतील एक वरच्या दर्जाची रचना म्हणून हे काव्य उल्लेखनीय ठरते.

**रचना : मु.** – १. (नागराजकृत) प्रतिष्ठान वर्णन; ओ. सं. ८२९; संपा. भुसारी, र. म. व माळेकर, रा. ब.; हैद्राबाद, १९५७. **अमु.** – १. अन्वयस्तोत्र; २. आचारपरप्रकरण व्याप्ति; ३. उत्तरखंड; ४. निस्क्रममहावाक्य; ५. वज्रलिपी; ६. संकलित लिपी; ७. संध्यागायत्री विवर्ण; ८. सप्तअहोरात्री निरूपण; ममग्रंककासू., पृ. १५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, अ. ना. : प्रतिष्ठान वर्णन; प्रामवाङ्., भा. २; पुणे, १९७३; पृ. २९७–२९८.

**नागरी / ० नागी** [इ. स. चे १४ वे शतक, पूर्वार्ध] संतकवयित्री. हिचा उल्लेख नामदेवपुत्र गोंदा ह्याने आपल्या एका अभंगात केला आहे, तो असा : " नामयाची दासी नागी, दुसरी जनी । त्यांनी सेवा करुनी (वश) केला देवा ॥ " जनाबाईच्या सांनिध्यामुळे व संत नामदेवांच्या प्रभावामुळे हिचीही वाणी बहरली. नागरीने अभंगरूपाने आत्मकथन केले आहे. नागी हे तिच्या नावाचे संक्षिप्त रूप असून अभंगांत 'नागरी' अशी नाममुद्रा आढळते. 'नागरी' ही नामदेवांची पुतणी होती. नामदेवांचा मुलगा 'जनी आणि नागी' ह्या दोघींनाही 'नामयाच्या दासी' म्हणून उल्लेखितो तो शिष्या ह्या अर्थाने.

आत्मकथनात हिने आपल्या वडिलांचा उल्लेख केलेला आहे : " रामयाची कन्या गोरटी गोवळी । बापें बोळविली सासुरिया ॥ " नामदेवांप्रमाणे त्यांचा भाऊ रामय्या हाही विठ्ठलाचा भक्त होता. आपल्या मुलीचे वयाच्या योग्य कालात त्याने लग्न करून दिले. परमेश्वरप्रेमाने रंगलेले माहेरचे वातावरण सासरी न आढळल्यामुळे नागरीचा अपेक्षाभंग झाला. एकादशीच्या यात्रेला तिला पंढरपूरला जाण्याची इच्छा असते. पण सासरची मंडळी तिला कोंडून ठेवतात. शरीराने सासरच्या घरी व मनाने विठ्ठलाच्या चरणांशी अशी तिची अवस्था होते. तिच्या विव्हल मनाचा अशा तऱ्हेने विलाप चालू असताना काही अघटित घडून ती विठ्ठलाच्या महाद्वारी येते.

द्वादशीच्या दिवशी सकाळी पांडुरंगदर्शनासाठी आलेला तिचा बाप तिला पाहतो. सासर सोडून यात्रेला यावे हे त्याच्या गृहस्थधर्मी वृत्तीला आवडत नाही व तो तिच्यावर संतापतो. पण नागरी ही उन्मनी अवस्थेत असून तिचे मन केशवाच्या ठायी कसे गुंतले आहे, हे नामदेव त्याला समजावून सांगतात. नंतर आपण हा मार्ग का पत्करला हेही ती पित्याला सांगते. विठ्ठलचरणांपाशी ठाव मिळाल्यामुळे आपल्याला काही साधावयाचे राहिले नाही, अशी ग्वाही देऊन तिने आपले आत्मकथन संपविले आहे.

'नागरी'च्या कवितेचे हे बाड सासवड (जि. पुणे) येथील 'सोपानदेवां'च्या मठात होते. ते सोपानदेवांचे पुजारी चिंतामणिबावा गोसावी ह्यांनी संशोधक रा. चिं. ढेरे ह्यांस दिले. 'नागरी'चे सर्व अभंग रा. चिं. ढेरे ह्यांच्या संग्रहात असून, ते अद्याप प्रकाशित झालेले नाहीत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं.; नागरी परदेशी वाट पाहे !; केसरी, पुणे, रविवार, २० जुलै १९७५, शहर आवृत्ति; पृ. ३.

**नागसुत / ० नागज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. गोपालकाल्याचें निरोपण; श्लोक, आर्या मिळून १५०; तंसम. हस्त. यादी, क्र. २. २. ध्रुवचरित्र. ३. रमेशमहिमा; श्लो. ४३. ४. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० नागाइसा–१** – पहा **नागांबिका.**

**नागाइसा–२** [अंदाजे इ. स. च्या १३ व्या शतकाची अखेर व १४ व्याचा प्रारंभकाल] महानुभाव कवयित्री. कवीश्वर भास्करभट्ट बोरीकरांची ही पुतणी व शिष्या. आपल्या चुलत्याप्रमाणेच ही विद्यासंपन्न असून ग्रंथकर्ती होती. नागदेवाचार्यांची नात व महेश्वर पंडितांची कन्या नागांबिका ऊर्फ नागाइसा ही ह्या नागाइसेहून भिन्न आहे.

नागाइसेला बालवयातच वैधव्य प्राप्त झाल्याने विरक्ती उत्पन्न होऊन तिने कवीश्वरबासांकडून पंथाची दीक्षा घेतली व ग्रंथप्रवेश केला. तिच्या ग्रंथरचनेविषयी सोंगोबासांच्या *अन्वयस्थळा*त पुढील उल्लेख सापडतो : " कवीश्वराचा नागाइसीं दुसरीं लक्षणें, आनिका माळिका, आन सय्यापालना श्चान दुर्भगा हे च्यारी प्रमए केलीं । त्यांत माळीका दायीभागवतीं दवडीलिया ॥ " प्रमेयग्रंथाची रचना करणाऱ्या ह्या कवयित्रीला महानुभाव तत्त्वज्ञान उत्तम रीतीने अवगत असावे. चरित्रग्रंथाच्या अनेक पाठांपैकी 'मुनीबा पाठा'चा जनक मुनी राघोबास हा या नागाइसेचा शिष्य (भाइसमंत्रै., व. १३, अं. २; पृ. ५३). *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी नागाइसेच्या उद्धरणपट (गद्य) ग्रंथाचा निर्देश केला आहे (मसा., आ. ५, पृ. ५९४).

**रचना : अमु.** – १. दुर्भगा-प्रमेय. २. दुसरी लक्षणे. ३. शय्यापालना दृष्टान्त व्याख्या. ४. सूत्रमालिका. **शंका.** – उद्धरणपट.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कोलते, वि. भि. : नागाइसा (प्रस्ता.); भास्करभट्ट बोरीकर चरित्र आणि काव्यविवेचन; अमरावती, १९३५; पृ. २७–२८.

**० नागा जगमैत्र** – पहा **जगमित्रनागा.**

**० नागांबा** – पहा **नागांबिका.**

**नागाबाई** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – करुणापर श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**नागांबिका / ० नागांबा / ० नागाइसा–१** [इ. स. चे १३ वे शतक] महानुभाव कवयित्री. नागदेवाचार्यांची नात व महेश्वर पंडितांची कन्या. श्रीचक्रधरांच्या मठात सडासंमार्जन, स्वयंपाक, पूजासाहित्य वगैरेची तरतूद करण्याचे काम नागांबिकेकडे असे. हिने नागदेवाचार्यांकडून पंथाची दीक्षा घेतली होती. हिचे आचरण कडकडीत असे. हिच्या नावावर वि. ल. भावे ह्यांनी महानुभाव ग्रंथसूचीत '६० उपपत्ती' अशी रचना दिली आहे (पृ. १५). हिच्या अन्य ग्रंथकर्तृत्वाबद्दल माहिती उपलब्ध नाही.

**० नागा भुजंग** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**नागा योगी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नागार्जुन** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] गद्य ग्रंथकार. ज्ञानेश्वरांच्या नंतर एक-दोन शतकांच्या अवधीत रचल्या गेलेल्या गद्य प्रकरणांपैकी काही आज उपलब्ध आहेत. नागार्जुनांचा जारणमारणावर *योगरत्नमाला* नावाचा ग्रंथ आहे. ह्याच्या आधारे लिहिल्या गेलेल्या एका ग्रंथाची काही पृष्ठे प्रसिद्ध झाली आहेत (मसा., आ. ५, पृ. ५९७).

**० नागी** – पहा **नागरी.**

**० नागेंद्र–१** – पहा **नागराज.**

**नागेंद्र–२** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – रामाचा धावा, श्रीकृष्णाचा धावा; तंसम. हस्त.

यादी, क्र. २.

**नागेंद्र–३** – पहा **नागेश–१.**

**नागेंद्र नागनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ५४.

**नागेन्द्र याज्ञवल्कि** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. वनपर्वातील काही प्रकरणे; श्लो. सं. ५७; सवामं. बा. १५७५. २. विवेकभास्कर; वि. ल. भावे संग्रह. ३. स्फुट प्रकरणे; संककासू., पृ. ५४.

**नागेश–१ / ० नागकवि / ० नागजोशी / ० नागेंद्र–३ / ० नागेश जोशी भिंगारकर** [इ. स. च्या १७ व्या शतकाचा पूर्वार्ध] कवी. हे स्वतःचा उल्लेख, आपल्या कवितेत, निरनिराळ्या ठिकाणी नागेश, नागदेव, नागजोशी, नागराज, नागेश्वर, नागेंद्र, नागभट्ट असा करताना आढळतात. अहमदनगर जिल्ह्यातील भिंगार ह्या गावचे हे राहणारे. उपनाव मुळे. ह्यांच्या वडिलांचे नाव मोरजोशी व आईचे नाव जानकी. ह्यांच्या घराण्याची वृत्ती ग्रामजोशाची व ग्रामलेखकाची. विद्यासाधनाकडेही त्यांची मूळपासून प्रवृत्ती असावी असे दिसते. हे वत्सगोत्री माध्यंदिन शाखेचे यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. त्रिभांडेश्वर हे ह्यांच्या घराण्याचे आराध्यदैवत.

नागेशांचे वडील मोरजोशी हे ज्योतिर्विद्येत प्रवीण होते. ते स्वतः पंचांग वर्तवीत असत. यशवंतराव कोकाटे नावाच्या मराठी सरदाराचे ते पुरोहित होते. काव्यरचनेचाही त्यांना नाद होता. त्यांना मल्हारी, त्र्यंबक व नागेश असे तीन मुलगे होते. त्यांपैकी हे सर्वांत धाकटे.

नागेश हे उत्तम संस्कृतज्ञ असून बहुश्रुत होते. त्यांचे लोकव्यवहारनिरीक्षणही सूक्ष्म होते. ते मोठे चौकस व आपल्या भोवतालच्या सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक वातावरणाची वस्तुनिष्ठ दृष्टीने माहिती मिळविण्याच्या बाबतीत दक्ष असलेले दिसतात. छन्दःशास्त्र व अलंकार ह्यांचा अभ्यास त्यांनी चांगला केला असून काव्ये, नाटके, पुराणे आणि कामसूत्र, रतिरहस्य, अनंगरंग, रतिमंजरी, रतिचंद्रिका ह्यांसारखे कामशास्त्रविषयक ग्रंथ चोखंदळपणे वाचले होते असे दिसते. त्यांना ग्रंथसंग्रह करण्याची आवड असावी. ह्यांनी स्वहस्ते अनेक ग्रंथ उतरून घेतले होते. ह्यांच्या घरी सापडलेल्या पोथ्यांत त्यांच्या हातची 'स्वप्नफला'संबंधीची एक सचित्र पोथी आहे. तिजवरून त्यांना चित्रे रेखाटण्याचीही कला अवगत असावी असे दिसते. रंगरेषेच्या माध्यमाप्रमाणेच शब्दांच्या माध्यमाच्या द्वारा आपल्या काव्यात ह्यांनी अनेक व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत. स्थलवर्णनांपेक्षा ही व्यक्तिवर्णने मार्मिक व बहारदार वठली आहेत. गीतिकाव्यरचनेपेक्षा चित्रकाव्यरचनेकडे त्यांचा विशेष ओढा आढळतो, त्याचेही कारण बहुधा हेच असावे. विनोदी लेखनाकडेही ह्यांची विशेष प्रवृत्ती दिसते. प्राचीन मराठी कवींत तिचा तितकासा आढळ होत नाही. त्या दृष्टीने नागेशांच्या काव्यात आलेला विनोद लक्षणीय आहे. "त्यांचा विनोद बहुतांशीं मानवी स्वभावांतील विरोध व असंबद्धतादर्शनावर आधारला असल्याचें दिसून येईल. असा स्वभावनिष्ठ विनोद, विनोदाच्या इतर जातींपेक्षां उच्च दर्जाचा समजला जात असून, तो उत्पन्न करणाऱ्याच्या अंगीं मार्मिकता व सूक्ष्मता असल्याशिवाय त्याची निर्मिति बहुधा होत नाहीं. सर्वच प्राचीन मराठी कवींवर जडत्वाचा व परतंत्रतेचा आरोप करणारांनी, नागेशाची विनोदीवृत्ति व वर्णनें लक्षांत घेतलीं असतां, विनोदाचा धवधवा वाहविण्याचा अभिनिवेश बाळगणाऱ्या कोणत्याही आधुनिक मराठी विनोदी लेखकापेक्षां, तो सरस असल्याचें कबूल करावें लागेल." (प्रा. द. सी. पंगु : *प्राचीन मराठी कविपंचक*; पृ. ६४–६५).

नागेशांची ज्ञात काव्यरचना पुढीलप्रमाणे : *चंद्रावळीवर्णन*, *सीतास्वयंवर*, *रुक्मिणीस्वयंवर*, *रसमंजरी*, *शारदाविनोद*, *आर्याटीका*. ह्यांपैकी पहिली दोन काव्ये आज मुद्रित स्वरूपात उपलब्ध आहेत. *चंद्रावळीवर्णन* [⇨ ३] हे ३२२ श्लोकांचे असून *सीतास्वयंवर* [⇨ ३] हे ४१५ श्लोकांचे काव्य आहे. *रुक्मिणीस्वयंवरा*चे हस्तलिखित *काव्यसंग्रह*कार वामन दाजी ओक ह्यांस पाहावयास मिळाले होते असे सांगण्यात येते. पण आज ते कोठेच संग्रहित केलेले नाही. *रसमंजरी* व *शारदाविनोद* ह्या काव्यांची काही पाने मात्र आपण पाहिली असे *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे हे लिहितात (मसा., आ. ५, पृ. ३७६). गो. का. चांदोरकर ह्यांनी आपल्या *महाराष्ट्रीय संतकविकाव्यसूची*मध्ये *आर्याटीका* ह्या ग्रंथाचा उल्लेख केला आहे (पृ. ५४). *रुक्मिणीस्वयंवरा*प्रमाणेच तोही कोठेही पाहावयास मिळत नाही. ह्यांनी रचलेले विनोदी श्लोक त्या काळी हरदास व रसिक लोक ह्यांच्यामध्ये विशेष प्रिय झालेले होते.

नागेश ह्यांनी आपल्या श्लोकात्मक काव्यांत अनेक वृत्तांचा उपयोग केलेला आहे. शब्दचमत्कृतीचा, यमक त्याचप्रमाणे चित्रबंध साधण्याचा, सोस त्यांना फार दिसतो. वर्णनप्रसंगी अनेक वेळा आपल्याकडून अश्लील व बीभत्स शब्दयोजना होत आहे ह्याचे भान त्यांना राहात नाही. विशुद्ध सौंदर्याची हानी करणारी अतिरिक्त शृंगारात्मक वर्णने, कालविपर्यास, ऐतिहासिक वास्तवाचे भान नसणे ही ह्यांच्या काव्यातील वैगुण्ये जागोजाग जाणवतात. अशी ही वैगुण्ये असली तरी, कल्पनेचा व भावनेचा विकास, रसपूर्ण शब्दयोजना हे गुणही त्यांच्या कवितेत वैपुल्याने असल्यामुळे ती सरस व चटकदार उतरली आहे.

**रचना : मु.** – १. चंद्रावळीवर्णन; ग्रं. सं. ३२२; अकलकामा., भा. २; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६; पृ. १३६–१६५. २. सीतास्वयंवर; श्लो. सं. ४१५; संपा. भावे, वि. ल.; महा. कवि क्र. १, १९०३; पृ. १–३८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : नागेश; प्रामसंक., खं. १, मुंबई, १९५७; पृ. ४२९–४४१. २. कानिटकर, प्र. धों. : नागेश कवीची काव्ये; विज्ञावि., मे १९२९; पृ. १२९. ३. जोग, रा. श्री. : वामन आणि नागेश : काव्यदृष्टी; लोशि., फेब्रु. १९३८; पृ. ५९४. ४. जोग, रा. श्री. : वामन आणि नागेश : वृत्तप्रभुत्व; (नवें) लोशि., जाने. १९३८; पृ. ५००. ५. देशमुख, मा. गो. (संपा.) : नागेशकृत सीतास्वयंवर; नागपूर, १९४१. ६. पंगु, द. सी. : नागेश : प्राचीन मराठी कविपंचक; कोल्हापूर, १९४४. ७. पंगु, द. सी. (संपा.) : नागेशकविकृत सीतास्वयंवर (प्रस्ता.); कोल्हापूर, १९३७. ८. भावे, वि. ल. : नागेश कवीचा काल; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. ५८–५९.

**नागेश–२ (वेडिया)** [अंदाजे इ. स. १६३८–१६९८] कवी. नरहरीशिष्य निंबराज दैठणकर ह्यांचा हा कवी शिष्य दिसतो. कारण आपल्या ग्रंथाच्या शेवटच्या ओवीत 'निंबराजें सांगावें । पहावें वेडिया नाग्यानें' असे कवीने म्हटले आहे. कवीच्या *मानसपूजा* ह्या ग्रंथाची त्रुटित पोथी भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे ह्यांच्या संग्रही आहे.

परंपरेला अनुसरून ग्रंथात दत्तात्रेयांचे पूजन, स्तवन आलेले दिसते. ग्रंथात अगदी सहजगत्या नीवाभाट, जनजसवंत, कनकदास, भानुदास, कूर्मदास, अच्युताश्रम, कान्हो पाठक, अज्ञानसिद्ध, रमावल्लभदास अशा अनेक संतांचा कवीने उल्लेख केला आहे. ग्रंथाची भाषा सोळाव्या शतकातली असून नाथांच्या साडेचार-चरणी ओवीचा प्रभाव ह्यांच्या ग्रंथावर पडलेला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : नागेशवेडियाकृत मानसपूजा; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ३, पृ. १३१–१३५.

**नागेश–३** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. गुरू : देवदास.

**रचना : अमु.** – सपत्नीकलह; र. श. १६८७ / इ. स. १७६५; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ५४.

**नागेश–४** / ० **नागेश्वर महादेव मटंगे** [श. १७२३ / इ. स. १८०१ – श. १७५५ / इ. स. १८३३ ] कवी. ह्यांचा जन्म सातारा शहरी झाला. ह्यांच्या गुरूचे नाव परशुराम होते. ह्यांनी लहान वयात उत्तम विद्या संपादन केली. वंशपरंपरेने ह्यांची वृत्ती कीर्तनकाराची होती. पुराणादी ग्रंथांचा ह्यांचा अभ्यास चांगलाच होता. ह्या कवीची प्रकृती अशक्त होती. ह्यांचे पहिले कुटुंब लहानपणीच वारले. ह्यांनी पुन्हा लग्न न करता वेदान्तविषयाच्या अभ्यासात पुढील सर्व काळ घालविला. शेवटी हे नरसोबाच्या वाडीस जाऊन राहिले व वयाच्या अवघ्या ३२ व्या वर्षी तेथेच चतुर्थाश्रम घेऊन समाधिस्थ झाले.

ह्यांना कीर्तने करण्याची फार आवड होती. त्यासाठी अभंग, साक्या, पदे, गीती वगैरे वृत्तांत सुरस रचना करून ते आख्याने तयार करीत. मोरोपंतांचे अनुकरण करून *भविष्योत्तर* पुराणाच्या आधारे ह्यांनी *नंदिकेश्वरजननाख्याना*वर आर्या रचल्या व पुणे येथील विद्वज्जनसभेपुढे गाऊन दाखविल्या. ह्या आख्यानाची कथा नावीन्यपूर्ण आहे. काव्याची भाषा शुद्ध असून उपमा, दृष्टान्त, यमक, प्रास, अनुप्रास इत्यादी अलंकारांनी मंडित आहे. संस्कृत शब्दांचा भरणा काव्यात खूप आहे. ह्या काव्यातील काव्यगुणांमुळे नागेशांना मोठा मान मिळाला.

**रचना : मु.** – नंदिकेश्वरजननाख्यान; आर्याबद्ध; अ. ४; ग्रं. सं. १८५; र. श. १७४३ / इ. स. १८२१; संपा. केळकर, ना. चिं. व ओक, दा. के.; अकलकामा., भा. ४; मुंबई, १९०३; पृ. १०१– १०८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : नागेश महादेव मटंगे; मकच., खं. २, मुंबई, १९१३; पृ. १६५–१६९.

**नागेश–५** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – कविवर्णन; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १३२.

**नागेश–६** [इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर] शाहीर. सोलापूर येथे वास्तव्य. हे कलगीवाले होते. ह्यांनी कलगीच्या अध्यात्मपर लावण्या रचल्या आहेत असे सांगण्यात येते. त्या काळच्या प्रसिद्ध तुरेवाल्या धोंडिबा शाहीराच्या फडाशी ह्यांच्या फडाचा वारंवार सामना होई. धोंडिबाच्या फडात सुप्रसिद्ध शाहीर राम जोशी हे असत. नागेशांच्या लावण्या प्रत्यक्षात कोठे उपलब्ध आहेत हे मात्र कळत नाही (मसा., आ. ५, पृ. ५६०).

**नागेशकेत** [का. अनु.] कवी. ह्यांचे तिमाजीपंत केत हे मूळ पुरुष असावेत व काळाग्निरुद्र हे गुरू अथवा उपास्य दैवत असावे असे *करुणारसस्तोत्रा*वरून वाटते.

**रचना : अमु.** – १. करुणारसस्तोत्र; शं. श्री. देव संग्रह. २. सीतास्वयंवर; गो. का. चांदोरकर संग्रह. ३. **स्फुट** – दोहरे, साक्या, पदे इ.; संककासू., पृ. ५४, १३२.

० **नागेश जोशी (भिंगारकर)** – पहा **नागेश–१.**

० **नागेश श्रीगुरु** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

० **नागेशसुत** – पहा **नागेशात्मज विठ्ठल.**

० **नागेशात्मज** – पहा **नागेशात्मज विठ्ठल.**

**नागेशात्मज विठ्ठल** / ० **नागेशसुत** / ० **नागेशात्मज** [अंदाजे श. १६९० / इ. स. १७६८] पदकार. वामनपंडितांचा शिष्य. ह्या कवीने आपल्या एका मुद्रित पदात 'नागेशात्मज विठ्ठल' असा उल्लेख करून वामनाचे स्मरण केले आहे : 'नागेशात्मज विठ्ठल ध्यातो श्रीगुरुवामन-पाय रे ॥' वामनाच्या *समश्लोकी गीते*ची नागेशात्मज विठ्ठल लिखित श. १६९० मधील प्रत उपलब्ध झाली आहे. समाप्तीच्या दोन ओव्यांत कवीने स्वतःचा निर्देश केला आहे, तो असा : 'नागेशसुत निजभक्त । जाणोनि वामन ग्रंथ निर्मित । दृढ देखोनि भावार्थ । कृपा करित सद्गुरु ॥'

**रचना : मु.** – एक शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. १७. **अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३, सवामं. हस्त. सू., खं. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आठवले, रा. म. : वामनी समश्लोकी गीतेची नागेशात्मज विठ्ठल लिखित प्रत; भाइसमंत्रै., व. १७, अं. ३, पौष १८५८; पृ. ११३–११६.

० **नागेश्वर** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

० **नागेश्वर महादेव मटंगे** – पहा **नागेश–४.**

**नागो आया** [अंदाजे इ. स. १५४०] जैन कवी. कारंजा येथील जैन पीठावरील सेनगणांपैकी माणिकसेन (इ. स. १५४०) हे ह्यांचे गुरू. ह्यांच्या कृपेने कोटनगर (अकोला जिल्ह्यातील आकोट) येथे ह्या कवीने *यशोधरचरित्र* हा ग्रंथ लिहिला, अशी ह्या कवीनेच माहिती दिली आहे (ओ. क्र. २८६–८७).

यशोधर-चंद्रमती कथानक हा ग्रंथाचा विषय आहे. ग्रंथाच्या फक्त २९२ ओव्या आहेत. हा ग्रंथ वादिराजसूरींच्या संस्कृत *यशोधरचरितम्*-वरून केला आहे (पृ. ३२). ह्या ग्रंथातील ओव्यांना 'गायत्री' छंदातील ओव्या असे म्हणतात. भाषा, छंद आणि विषय ह्या दृष्टीने हा लहानसा ग्रंथ महत्त्वाचा ठरतो. वऱ्हाडी बोलीच्या अभ्यासास तो उपयुक्त आहे.

**रचना : मु.** – यशोधरचरित्र; अधिकारसंख्या ५; ओ. सं. २९२ (जसोधर-रास परिशिष्ट) ; सोलापूर.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : नागोआया; प्राम-जैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ४०.

**नागोजीपंत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रामायांची टीका; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नागोराम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नातू (गणपतिसुत)** [का. अनु.] शाहीर. चिंतामणराव पटवर्धनांवर ह्याने रचलेल्या पोवाड्यात हा स्वतःचा उल्लेख पुढीलप्रमाणे करितो : 'अन्नद जनकासमान ऐसे लक्षुनिया नाते । नातू गणपतिसुत कवि ऐकवि सुजना कवनातें ॥ ७ ॥ ' हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये संग्रहित (पृ. १७२).

**नाथगोपाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **नाथगोपाळ सुलतान** – पहा **सुलतान (नाथ).**

० **नाथदास** – पहा **श्रीपतिदास.**

**नाथनिरंजन** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. २.

**नाथभुजंग** [अंदाजे इ. स. १८३०] पदकार. जातीने डवरी. परांडे (जि. उस्मानाबाद) हे ह्यांचे वसतिस्थान. ह्यांनी दैवते, स्थानदेवता व वेदान्त ह्या विषयांवर बरीच पदे व अभंग ह्यांची रचना केली आहे. ही पदे मराठी व हिंदुस्थानी भाषेत आहेत. कवीची वाणी प्रासादिक व रसाळ आहे. 'वद वद वद रसने शिव सांब सांब सांब' व 'तोम तननन वाजवि वेणू' ही ह्या कवीची पदे तर महाराष्ट्रात सर्वतोमुखी आहेत. तीन-चार छापील पदे सोडल्यास बाकीची रचना अप्रकाशित आहे. ही कविता समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील हस्त-लिखित संग्रहात उपलब्ध (सवामं. हस्त. सू., खं. १, २).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : नाथभुजंग; मकच., खं. ५, मुंबई, १९२०; पृ. १७५–१७७.

**नाथभुजंगसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नाथ रामाचा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नाथात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – १. शुकरंभासंवाद. २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**नानाजोशी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – स्फुट श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**नाना** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – श्रीरामेश्वरचें कवन; मसंम., हवना., पृ. १.

**० नाना गर्दे** – पहा **सखाराम त्र्यंबक गर्दे.**

**नानाजी** – पहा **पुरुषोत्तम श्रीनिवास.**

**नानाजी-नंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे ; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नाना दाते** [का. अनु.] शाहीर. ह्याने बापू गोखल्यांचा सरदार नाना काळे ह्याच्यावर पोवाडा केला आहे. नाना फडणीसांच्या मृत्यूनंतर परशुरामपंत प्रतिनिधींचा बंदोबस्त लावण्याचे कामी नाना काळ्यांनी फार महत्त्वाची कामगिरी केली. ह्याची तपशीलवार माहिती पोवाडेकाराने दिली आहे. ती सर्वस्वी नवी असल्याने ह्या पोवाड्याचे ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्व वाढले आहे. पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये संग्रहित (पृ. ५५).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : ऐतिहासिक माहिती, टीका व टिप्पण्या; ऐतिपो., खं. ३, पुणे, १९६९; पृ. ४०६–४०८.

**नाना नारायण** [का. अनु.] भाषान्तरकार. ह्यांनी इंग्लंड *देशाचे वर्णन* लिहिले असून ग्रंथाच्या प्रस्तावनेत ज्ञानापासून मिळणाऱ्या फायद्यांचा विचार केला आहे. सदर पुस्तक Miss Bird हिच्या *England Delineated, being a description of England* ह्या पुस्तकाचे भाषान्तर आहे. इंग्लंडची भौगोलिक, राजकीय, धार्मिक परिस्थिती व लोकव्यवहार ह्यांची सर्वांगीण माहिती ह्या पुस्तकात दिली आहे.

**रचना : मु.** – इंग्लंड देशाचे वर्णन; शिळा., १८३५; तृ. आ., मुंबई, १८४८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** गावस्कर, सु. आ. : नाना नारायण; मराठी दोलामुद्रिते; द्वि. आ., मुंबई, १९६१; पृ. ८, २७.

**० नाना पुरंदरे** – पहा **त्रिंबक सदाशिव पुरंदरे.**

**नाना फडणीस / ० बाळाजी जनार्दन भानू** [१२ फेब्रु. १७४२–१३ मार्च १८००] आत्मचरित्रकार. उत्तर पेशवाईतील एक धुरंधर मुत्सद्दी पुरुष. ह्यांचे नाव बाळाजी जनार्दन भानु, पण नाना फडणीस ह्या नावाने हे प्रसिद्ध होते. ह्यांच्या आईचे नाव राधाबाई. नानांचा जन्म सातारा येथे झाला (श. १६७३, माघ कृष्ण ४, शुक्रवार). वयाच्या चौदाव्या वर्षी, दि. २९ डिसेंबर १७५६ रोजी, ह्यांना फडणिशीची वस्त्रे मिळाली. त्यानंतर भाऊसाहेबांबरोबर कर्नाटकात व नंतर तीर्थक्षेत्रे पाहण्याच्या निमित्ताने ते पानपताकडे गेले. पण पानपतच्या स्वारीत मराठ्यांची 'पळापळ' झाल्यावर 'शुद्ध लंगोटी लावून', 'गवतात लपून' व 'बोरीचा पाला खाऊन' प्रवास करीत चौदा महिन्यांनी ते जुलै १७६१ मध्ये पुण्यास परतले. ह्या पळापळीचे व परतीच्या प्रवासाचे वृत्त अनेक रोमहर्षक प्रसंगांचे वर्णन करून नानांनी आपल्या आत्मवृत्तात दिले आहे. नारायणरावाच्या मृत्यूनंतर माधवरावांच्या वंशाला गादीवर आणण्यासाठी उभारलेले 'बारभाईचे कारस्थान' यशस्वी झाले व त्यानंतर नाना प्रमुखपणे कारभार पाहू लागले.

इंग्रजांशी पुरंदरचा तह (१७७६), हैदर आणि कोल्हापूरकर ह्यांचा बंदोबस्त (१७७७), कटवाल्या मोरबा फडणीसास कैद, अंतर्गत वैमनस्याचा गैरफायदा घेणाऱ्या इंग्रजांचा तळेगावी पूर्ण पराभव (१७७८–१७८२), दिल्लीच्या बादशाहीचा ताबा (१७९२) आणि खड्यांच्या लढाईत निजामावरील मराठ्यांचा जय (१७९५, मार्च) ह्या नानांच्या आयुष्यातील महत्त्वाच्या घटना. शेवटी दौलतराव शिंद्याने नानांस मेजवानीस बोलावून कैद केले व नगरच्या किल्ल्यात ठेवले. राघोबा आणि दुसरा बाजीराव हे नानांस सतत विरोध करीत होते. त्यांच्या स्वार्थी कारवायांमुळे मराठ्यांचे स्वराज्य नष्ट झाले. अखेरीस ज्वरविकाराने १३ मार्च १८०० रोजी नानांचे देहावसान झाले.

नानांनी लिहिलेले आत्मचरित्र पूर्ण नाही. कारण नानांच्या ह्या आत्मचरित्रात इ. स. १७६१ पर्यंतचा म्हणजे थोरल्या माधवरावांना पेशवाईची वस्त्रे मिळेपर्यंतचा वृत्तान्त येतो. नानांच्या आयुष्यातील कर्तबगारीची वर्षे ही ह्यानंतरचीच आहेत.

पानिपतच्या प्रसिद्ध लढाईच्या वेळी नाना मराठा सैन्याचे सेनापती सदाशिवरावभाऊ ह्यांच्याबरोबर उत्तरेस गेले होते. त्यावेळी त्यांचे वय अठरा वर्षांचे होते. ह्या युद्धात मराठी सैन्याचा मोड झाल्यानंतर साऱ्यांचीच पांगापांग झाली. वाट मिळेल त्या दिशेने सैन्याबरोबरचे लोक पळाले. नानाही असेच पळून स्वदेशी परतले. ह्या पळापळीचे व परतीच्या प्रवासाचे वृत्त अनेक रोमहर्षक प्रसंगांचे वर्णन करून नानांनी ह्या आत्मवृत्तात दिले आहे. प्रथम बाळपणीची, स्वतःच्या लग्नाची, आपल्या प्रकृतीसंबंधीची माहिती देऊन नंतर पानिपतच्या भीषण संग्रामाचे वर्णन केले आहे. हे आत्मचरित्र ह्यांनी निःसंकोचपणे लिहिले आहे. त्यामध्ये नानांच्या गुणांचे तसेच अवगुणांचे आणि अन्तःस्थितीचेही सूक्ष्म चित्र पाहण्यास सापडते. [ ⇨ ३.]

**रचना : मु.**– नाना फडणिसाचे आत्मचरित्र; र. का. : इ. स. १७६१ नंतर; काइसं., क्र. ३१; १८८९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. खरे, वा. वा. : नाना फडनविसांचें चरित्र; पुणे, १८९२. २. जोशी, के. बी. (संपा.) : मंत्र्युत्तम नाना फडणवीस उत्सवपत्रासी व शकावली; संग्रा. व शकावली कर्ते – शं. ना. जोशी; मुंबई, १९५०. ३. देव, बा. ना. : नाना फडनवीस; मुंबई, १९०४. ४. धनुर्धारी : फडणीसनाना; मुंबई, १८९३. ५. मॅक्डोनल्ड, ए. (भाषां.) : नाना फडनवीस यांची बखर; मुंबई, १८५२; ह्याच लेखकाचा *Memoirs of the life of the late Nana Farnuvees* नावाचा इंग्रजी ग्रंथ अमेरिकन प्रेस (मुंबई) येथे १८५१ साली मुद्रित झाला होता, त्याचे हे भाषान्तर (गावस्कर, सु. आ. : मराठी दोलामुद्रिते; मुंबई, १९६१, पृ. ४३).

**नानास्वामी (भीमराज)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नाभा गोपाळ** [का. अनु.] कवी. पिता गोपाळ. हे यजुर्वेदी माध्यंदिनशाखी वासिष्ठगोत्री ब्राह्मण. ह्यांनी *सिंहासनबत्तिशी* म्हणजे बत्तीस पुतळ्यांच्या गोष्टी लिहिल्या आहेत. मूळ संस्कृत भाषेत असलेल्या ह्या कथांचा त्यांनी मराठीत पद्यानुवाद केला आहे. ते आपल्या ग्रंथास *मऱ्हाष्ट्रटीका* किंवा *ग्रंथटीका* असे म्हणतात.

नाभा गोपाळांनी प्रत्येक कथेत पुतळीचे नाव सांगितले आहे. ही टीका त्यांनी बऱ्हाणपूरनजीक असलेल्या परोवर नदीच्या तीरावरील हत्यालय नामक गावात लिहिली. लेखन नाभाजीचा कनिष्ठ पुत्र विनायक ह्याने केले आहे. प्रास्ताविक निवेदनात ही महत्त्वाची माहिती कवीने ग्रथित केली असली तरी ग्रंथरचनाकाल मात्र नमूद केलेला नाही. ह्या *सिंहासनबत्तिशी*चे इतर जे स्वैर अनुवाद नागपूर विद्यापीठ हस्तलिखित संग्रहात उपलब्ध आहेत, त्यांपैकी महालिंगदास व जगजीवन ह्यांच्या अनुवादापेक्षा नाभाच्या ह्या अनुवादाची भाषा अधिक सरस आहे. ग्रंथविस्ताराच्या भयाची सुबुद्ध उचित जाणीव नाभा गोपाळांनी ठिकठिकाणी प्रकट केली आहे. त्यांच्या विस्तारप्रियतेला अनुसरून ग्रंथाचे ४८ अध्याय त्यांनी गुंफले आहेत.

अधूनमधून त्यांनी सुभाषितांचा वापरही केलेला आहे. ह्या ग्रंथाचे हस्तलिखित नागपूर विद्यापीठ ग्रंथालयात उपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चौधरी, पुष्पा वा. : सिंहासनबत्तिशी : काही स्वैरानुवाद : साम्यभेद वैशिष्ट्ये; विसंमंवा., नागपूर, १९६६; पृ. ११६–१३५.

**नामदेव–१ / ० नामया / ० नामास्वामी / ० नामयास्वामी / ० नामा केशवाचा / ० विष्णुदास नामा** [२६ ऑक्टो. १२७० – ३ जुलै १३५०] कवी, संत, भागवतधर्म-प्रचारक. पंढरपूर येथील विठ्ठलभक्तिसंप्रदायाचा महाराष्ट्रात व बाहेरही प्रसार करून तो बद्धमूल करण्यात अग्रणी. नामा किंवा नामदेव हे नाव धारण करणाऱ्या ह्या नामदेवाखेरीज महाराष्ट्रात आणखी पाच नामदेव निरनिराळ्या काळी होऊन गेल्याचे आढळते. ते पुढीलप्रमाणे होत : १. नामदेव (ज्ञानदेवसमकालीन महानुभाव कवी); २. नामा पाठक (इ. स. १४५० व १५७० ह्या कालातील); ३. विष्णुदास नामा (इ. स. १५९५ चा सुमार) ४. नामा शिंपी (इ. स. चे अठरावे शतक); ५. नामा यशवंत (इ. स. १६२८–१६८८ च्या दरम्यान). प्रस्तुत चरित्र हे आद्य नामदेवरायांचे, नाथ संप्रदायाची दीक्षा घेऊन भगवद्भक्ती आणि नाथ तत्त्वांचा प्रचार करणाऱ्या ज्ञानेश्वर-समकालीन नामदेवांचे होय.

इ. स. १९०९ साली प्रकाशित झालेल्या *श्रीनामदेव* मासिकात नामदेवांची पितृपरंपरा पुढीलप्रमाणे दिली आहे. तो वंशवृक्ष असा : यदुशेट > हरीशेट > गोपाळशेट > गोविंदशेट (बंधू रघुशेट) > नरहरशेट (बंधू जिवाजीशेट) > दामोदर (पत्नी गोणाई) > नामदेव (पत्नी राजाई). नामदेवांच्या पूर्वजांचे मूळ गाव नरसी (जि. परभणी). मूळ पुरुष यदुशेट ह्यांचा काल इ. स. ८०० ते ८५० च्या सुमाराचा असावा. ते विठ्ठलभक्त होते. हरीशेट हे चंद्रभागेत स्नान करून एकादशीच्या दिवशी पांडुरंगाच्या मंदिरात गेले असताना मृत्यू पावले. ह्यांच्या घराण्यातील सर्वांचाच दरवर्षी श्रद्धेने आषाढी व कार्तिकी यात्रेस पंढरपुरास जाण्याचा नेम होता.

पंढरीचा पांडुरंग हे नामदेवांच्या कुळातील आराध्यदैवत होते, आणि ग्रामदेव नरसिंह हे कुलदैवत होते. नामदेवांचे वडील दामाशेटी हे भगवद्भक्त होत. त्यांचे लग्न कल्याणी येथील गोमाशेटींची कन्या गोणाबाई हिजबरोबर झाले. उभयतांची गोत्रे अनुक्रमे भारद्वाज व गाधिज होती. कऱ्हाडनजीक कृष्णातीरावर असलेले नरसिंगपूर हे नामदेवांच्या पूर्वजांचे गाव होय, असे एक मत व्यक्त केले जाते; पण ते बरोबर नाही. कारण परभणी जिल्ह्यातील नरसीच्या परिसरातील नामदेवांचे आजोळ जे कल्याणी (काणणी) ते बामणीपासून तीन कोसांवर आहे. ज्या गावी नामदेवांना गुरूपदेश झाला ते आवंढ्या नागनाथ नरसीपासून आठ-दहा कोसांवर आहे. त्याप्रमाणेच नामदेवांच्या जीवनाशी निगडित असलेली गावे कऱ्हाडनजीक (सातारा जिल्हा) असलेल्या नरसिंगपुराचे परिसरात दाखविता येत नाहीत. ह्या नरसी गावी दामाशेटीस प्रथम आऊबाई नावाची कन्या झाली. पुढे बरीच वर्षे पुत्रसंतान नाही म्हणून दामाशेटींनी नरसी गाव सोडले व ते पंढरपूर येथे स्थायिक होऊन तेथील केशिराजाची व विठ्ठलाची भक्ती करू लागले. गोणाईने पुत्रप्राप्तीसाठी नवस केला. नामदेवांच्या दासी जनाबाईंनी ह्या संदर्भात दिलेली माहिती पुढीलप्रमाणे आहे : "लोलो लागला अंबेचा। विठाबाई आनंदीचा। आदि ठाणें पंढरपूर। नांदे कान्हाई सुंदर ॥ गोणाईनें नवस केला । देवा पुत्र देईं मला। शुद्ध देखोनियां भाव। पोटीं आले नामदेव ॥ दामाशेटी हरुषला। दासी जनीस आनंद झाला ॥" ('जनाबाईचे अभंग', क्र. २७४). या नामदेवांचा जन्म पंढरपुरी झाला. मराठवाड्यातील इतिहासकारांच्या मते नामदेवांचे जन्मस्थळ पंढरपूर नसून वरील परभणी जिल्ह्यातील कयाधु / वयाड नदीच्या काठी वसलेले 'नरसी' होय. परंतु एकनाथमहाराजांनी लिहिलेल्या नामदेवांच्या जन्मस्थळासंबंधी सांगितलेल्या कथेत नरसी-बामणीचा उल्लेख नाही. विष्णुदासनाम्याने *नामदेवाच्या आदीत*, "नामा तोचि उद्धव द्वापारी। कलयुगीं प्रत्यक्ष नामा अवधारी। भक्तीकारणे निरंतरीं। पंढरपुरी जन्मला ॥ २४॥" अशी माहिती दिली आहे (ज. शा. देशपांडे : विष्णुदासनामाकृत तीन आख्याने; मसंप., जुलै १९७३, पृ. ७४–८०). ह्याव्यतिरिक्त पंजाबात बंसी पठाना येथील 'नामदेवगुरुद्वारा'त (नामदेवमंदिरात) जी आरती म्हणतात, तीतही 'पंढरपुर नगरीमे जनम दिओ माता' असा एक चरण येतो. '*नामदेव परिचयी*'कार श्री अनंतदास ह्यांनी पंढरपूर हे नामदेवाचे जन्मस्थान मानले आहे. ह्यावरून नामदेवांचे जन्मस्थळ पंढरपूर हे निश्चित होते.

नामदेवांनी आपला जन्मकाळ "माझे जन्मपत्र बाबाजी ब्राह्मणें" ह्या अभंगात "अधिक ब्याण्णव गणित अकरा शतें। उगवतां आदित्य तेजोराशी ॥ शुक्र एकादशी कार्तिकी रविवार। प्रभव संवत्सर शालिवाहन शक ॥" ह्या चरणात स्पष्ट केलेला आहे. परंतु हा जन्मशक भारद्वाज ह्यांना मान्य नाही. त्यांच्या मते शके १३०९ ला प्रभव संवत्सर येतो म्हणून नामदेवांचा जन्मकाल १३०९ आहे. परंतु भारद्वाजांनी दिलेल्या शके १३०९ ला जंत्रीप्रमाणे कार्तिक शुद्ध एकादशीस रविवार येत नाही. ही गोष्ट श्रीपतिबोवा भिंगारकर ह्यांनी केसरी पत्रात जे उत्तर दिले त्यात स्पष्ट केली आहे. शके ११९२ला महिना : कार्तिक, पक्ष : शुक्ल, मिति : एकादशी, वार : रविवार ही सर्व जुळतात. जुन्या वारकरी सांप्रदायिकांच्या पाठात 'प्रभव' पाठ नसून 'प्रमोद' असा आहे. नकलकारांच्या चुकीमुळे 'प्रभव' असा पाठ वरील अभंगात आला आहे. वरील 'प्रमोद' संवत्सर ग्राह्य धरून पंडित पांडुरंगशर्मा, ल. रा. पांगारकर, शं. वा. दांडेकर, रा. द. रानडे, डॉ. शं. गो. तुळपुळे वगैरे विद्वानांनी शके ११९२ कार्तिक शुद्ध ११ म्हणजेच ९ नोव्हेंबर इ. स. १२७० हा जन्मकाल मान्य केलेला आहे.

नामदेवांच्या घराण्यात विठ्ठलभक्ती पूर्वापार चालत आली असल्यामुळे अगदी बालपणापासून विठ्ठलभक्तीचे संस्कार नामदेवांच्या मनावर घडले. ह्या बालभक्ताच्या प्रेमपाशात गोवलेल्या विठ्ठलाने पाषाणाची खोळ टाकून नामदेवाच्या हातचा नैवेद्य स्वीकारला अशी त्यांच्या उत्कट भक्तीविषयी एक आख्यायिका आहे. वयाच्या अकराव्या वर्षी गोविंदशेट सदावर्ते ह्यांच्या राजाई नावाच्या कन्येशी नामदेवांचा विवाह झाला. तिच्यापासून नारायण, महादेव, गोविंद आणि विठ्ठल हे चार मुलगे व लिंबाई नावाची एक मुलगी अशी पाच अपत्ये त्यांना झाली. अशा प्रकारे नामदेवांचा संसार व त्याचबरोबर कुटुंबाच्या गरजा वाढत चालल्या. ह्याउलट नामदेव संसाराविषयी विरक्त व भगवद्भजनी आसक्त होत चालले. नामदेवांची माता गोणाई हिला नामदेवांचे वाढत चाललेले विठ्ठलचिंतन पसंत नव्हते. नामदेवांनी चारचौघांप्रमाणे पैसे मिळवावेत, कुटुंबाच्या पालनपोषणाकडे प्रथम लक्ष द्यावे आणि नंतर विठ्ठलभक्ती करावी, असे तिला वाटे; ती नामदेवांना ह्या बाबतीत कठोर शब्दांत बोले; परंतु ह्या बोलण्याचा त्यांच्या मनावर किंचितसुद्धा परिणाम झाला नाही. त्यांची विठ्ठलावरील श्रद्धा अविचल राहिली. नामदेव ह्यावर आईला म्हणतात : "नामा म्हणे माते ऐक वो वचना। मी गेलों दर्शना नागनाथा ॥ १॥ आवंढ्या देउळीं जाहला संसार। पारुषला धीर या देहाचा ॥ तेंहूनि तुज मज तुटला संबंधु। विठ्ठलाचा छंदु घेतला जीवीं ॥ लौकिक व्यवहार नाठवेचि कांहीं। कल्पना ते देहीं आथीचना ॥ टाळ दिंडी घेऊनि नाचतो रंगणीं। तेणें माझ्या मनीं सुख वाटे ॥ या देहघरसंसाराचा आलासे कंटाळा। म्हणोनि गोपाळा शरण आलों ॥" (*नामदेव गाथा*, सरकारी प्रत, अभंग १२५४.१–६).

मुलगा आपले काहीच ऐकत नाही हे पाहून, गोणाईने ज्याचा नाद आपल्या मुलाला लागला त्या पांडुरंगाकडेच गाऱ्हाणे नेले. ती म्हणते : "माझा नामा जंव नांवरूपा आला। जंव म्हणों लागला घरदार ॥

तंव कैसें विघ्न उठिलें गे माये। नामा पंढरिरायें भुलविला ॥ सांग बा विठ्ठला म्यां काय केलें। नामया कां भुलविलें कवण्या गुणें ॥" (अभंग १२६३.१–३). ह्यानंतर ती म्हणते : "तूं अनाथा गोसावी दीनाचा कैवारी। तें ब्रीद श्रीहरी काय जालें ॥ बिघडलें पाडस करी एके ठायीं। विनविते गोणाई केशिराजा ॥" (तत्रैव १०–११). आपल्या मुलाला वेड लावणाऱ्या पांडुरंगाला तिने दोष दिला. परंतु पांडुरंगाकडून जरी तिने नामदेवांना परत आणले तरी त्यांची पांडुरंगचिंतनात जी एकनिष्ठा होती ती यत्किंचितही ढासळली नाही. नामदेवांनी प्रपंचात लक्ष घालावे म्हणून त्यांची पत्नी खूप प्रयत्न करी. ती मोठ्या उद्वेगाने म्हणते : "तुमची आई तुम्हांला शिकवते ते तुम्ही ऐकत नाही. तुम्हांला लौकिकाची भीती व लाज वाटत नाही. लंगोटी लावून गोसावी झालात खरे, पण आमची उठाठेव कोण करणार ?" (अ. १३०१.१–२). ह्यापुढे मेसाईला उद्देशून ती संतापून म्हणते :"धरधनियाणीं केला गुरु। बाई मी आता काय करूं। असोनि नाहींसा संसारू। चमत्कार कृपेचा ॥ धांवे पावे गे मेसाई ॥" (अ. १३०२.१). ह्यानंतर ती म्हणते : माझी सासू तर भोळीभावडी. त्यांनी पांढऱ्या स्फटिकासारख्या माझ्या पतिरायाला जन्म दिला. 'त्यानें जोडिला शेषशायी। आता मी काय करू ?' असे राजाई विचारते (अ. १३०२.६).

वडील दामाशेटी ह्यांना नामदेवाचा हा नित्याचा विठ्ठलछंद पसंत नव्हता. ते नामदेवांना उपरोधाने व काहीशा निर्भर्त्सनेने म्हणत : "नामदेवा, शिवण्याटिपण्याचा व्यवसाय करून प्रपंच चालविणे हा आपला कुलधर्म. गणगोतात तू चांगलाच लौकिक कमावलास; अरे तुला ही कसली भूल पडली ? विठ्ठलाच्या ठिकाणी तुला एवढे कसले सुख सापडले ? तुझा देव पाहावा तर धडफुडा आणि तूं त्याचा निधडा भक्त. खरोखरी एकमेकांना तुम्ही चांगले शोभता ! तुझ्याविषयी केवढ्या आशा मी उराशी बाळगल्या होत्या ! माझे आयुष्य आता संपत आले आहे. थोडेच दिवस उरले आहेत. आमच्या पश्चात तू आमचा नावलौकिक राखशील असे वाटले होते, पण तू तर चांगले दैव काढलेस. खांद्यावर भोपळा काय घेतोस ? रामकृष्णाचा जप काय करतोस ? अरे नाम्या, तू सर्व लोकलज्जा सोडलीस आणि कुळाला कलंक लावलास." (अ. १२८९. १–११). घरी दारी नामदेवांचा उपहास होऊ लागला. दासी जनीने त्यांच्या मनःस्थितीचे, 'जनाची निंदणी माशांची घोंगणी। सोशी अंतःकरणीं नामदेव' असे ह्या कालातील चित्र उभे केले आहे. घरातील अशा प्रतिकूल परिस्थितीत नामदेवांनी विठ्ठलभक्ती अपार निष्ठेने चालू ठेवली. परिणामतः नामदेवांच्या विठ्ठलभक्तीला विरोध करणारे हे संपूर्ण कुटुंब त्यांच्या प्रभावाने विठ्ठलाच्या भक्तिप्रेमात पुढे पूर्णपणे रंगून गेले. नामदेवांनी स्वीकारलेल्या भक्तिमार्गाचे हे फार मोठे यश.

नामदेवांच्या चरित्राविषयी अत्यंत गैरसमज निर्माण केला असेल तर तो "नरसी ब्रह्मणीचा दामाशेट शिंपी । केशिराजरूपीं मग्न असे" ह्या शंकास्पद अभंगाने. नामदेव हे आपल्या तरुणपणी दरोडेखोर होते, इतकेच नव्हे तर ते गरीब ब्राह्मण यात्रेकरूंना जिवे मारीत असत, अनुतापाने ते पुढे भक्तिमार्गाकडे वळले; असे त्यात म्हटले आहे. ह्या अभंगाने नामदेवांच्या पूर्वचरित्रासंबंधी गैरसमज निर्माण झाला.

डॉ. रा. द. रानडे ह्यांनी *संतवचनामृत*, ग्रंथांक २ मध्ये प्रस्तावनेत पान १६ वर श्री नामदेव चरित्र दिले असून दरोडेखोरीच्या भागासंबंधी संशय व्यक्त केला आहे. डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांनी *पाच संत-कवि* (१९४८) ग्रंथात "दरवडेखोरीचा भाग" त्याज्य ठरविला आहे. '*श्री संत शिरोमणी बालभक्त श्री नामदेव महाराज हे दरोडेखोर होते काय ?*' ह्या पुस्तकात वै. पं. ना. पाटसकर ह्यांनी, "नरसी ब्रह्मणीचा दामशेटी शिंपी. . ." हा अभंग बनावट असल्याचे सप्रमाण सिद्ध केले आहे. डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांनी पाटसकरांचे म्हणणे मान्य केले असून *कविचरित्र*कार ज. र. आजगांवकर ह्यांनी तर तो दरोडेखोरीचा भाग त्यांनी लिहिलेल्या *संतशिरोमणि श्री नामदेव* ह्या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीत (पृ. ४१) ठेवला नाही. साहित्य अकादमी, नवी दिल्ली ह्या संस्थेमार्फत नामदेवांच्या सप्तशताब्दीनिमित्त १९७० साली डॉ. मा. गो. देशमुख ह्यांचा *भारतीय साहित्याचे निर्माते : नामदेव* हा प्रबंध प्रसिद्ध झाला. त्यात ते ह्या संदर्भात लिहितात, ". . . परंतु ह्या प्रवासाचा मुख्य आधार म्हणून जो अभंग नामदेवांचा म्हणून सांगितला जातो तो खरोखरी अस्सल नसून नामदेवांच्या चरित्रात काही अद्भुताचा रंग भरावा म्हणून कुणीतरी त्यांच्या गाथेत बनावटीने घालून दिला आहे. कारण नामदेवांच्या इतरत्र मिळणाऱ्या चरित्रात ते कधीकाळी दरवडेखोर असावे अशी शंका घेण्याला सुद्धा जागा नाही. संबंधित अभंग अविश्वसनीय असून त्या आधारे झालेले विवेचन नामदेवांवर अन्याय करणारे आहे.

"महानुभावांच्या *लीळाचरित्र* ह्या ग्रंथात *विठ्ठलवीरुकथन* म्हणून एक प्रकरण आहे. त्यात नेमदेव नावाचा एक कोळी वाटमारी करणारा एक लुटारू होता असा उल्लेख आहे. हा नेमदेव विठ्ठल नावाच्या ब्राह्मणाचा आणि म्हाया गुरवाचा सोबती होता व हे तिघे चोर होते असे सांगितले आहे. बहुधा ह्या हकीकतीवरून नेमदेव म्हणजेच नामदेव असा अपसमज निर्माण झाला. कोळ्याचा शिंपी झाला आणि जो साव होता तो चोर ठरला. परंतु नेमदेव कोळी आणि नामदेव शिंपी ह्यांचे एकत्व सिद्ध होऊ शकत नाही."

वरील *विठ्ठलवीरुकथन* येथे अधिक माहितीकरिता उद्धृत करीत आहे : "महादाइसी पुसिले : जी : जी : वीठ्ठल वीरू श्रीकृष्ण चक्रवर्तीचा अवतारु बोलताती : हे काइ जी : सर्वज्ञे (चक्रधराने) म्हणीतले : बाइ : बीठलु तो म्हतारी एकीचा पुत्र : तो ब्राह्मणु : आणि नेमदेव तो कोळी : म्हायां गुरु : हे तीघ चोर : वळणिया घेति : घोडेयाचे वळघे करिति : बोरपे : कोळी : दरवडे घेति : एकु घेणे घेऊनि जाति : दोघे लागु सावरिति : ते मंगळवेढाचे : तीहीं एके ठाई वळघा केला : तो माइंदरणा गाई घेऊनि गेला : तंव लागु पडिला : तो नेमदेव कोळी धाइ पडिल : . . . पाठी तिए पांढरीवरि बीठलु पडिला : तेयाचे पुत्र आले : तेंही तेथ भडखंबा केला : मातालिंग स्थापन केली : तेथे देवता अभिमानु घेतला : लोकांचे मनोर्थ पुरउ लागला : तेयाचिये स्त्रिये नांव लाखाई : एकी वासना लखमाई : तेयाचे पुत्र जाति पदें करिति : ते वीठो रुक्मिणी अभंगी घालीति। तो लोकामध्ये उपाधीतें पावला : तो हा विठ्ठलु :" (*लीळाचरित्र*, उत्तराध, लीळा ४२३, संपा. ह. ना. नेने). ह्या कथेत सांगितलेले नेमदेव हे नामदेव नव्हत तसेच दरोडेखोर विठ्ठल म्हणजे नामदेवांचा विठ्ठल नव्हे हे सांगणे जरूर आहे.

ह्या *विठ्ठलवीरुकथन* प्रकरणावर डॉ. शं. दा. पेंडसे ह्यांनी केलेले भाष्य ह्या दरोडेखोरीच्या भागावर प्रकाश पाडणारे असल्याने ते उद्धृत करीत आहे : "चक्रधरांच्या मताप्रमाणे विठ्ठल हा एका म्हातारीचा मुलगा होता. त्याच्या बापाचे नाव दिलेले नाही. ह्यावरून म्हातारीचा पुत्र म्हणण्यातील ध्वन्यर्थ लक्षात येईल. हा ब्राह्मण होता व दरोडेखोर होता. विठ्ठलाला ब्राह्मण बनविणे 'ब्राह्मणत्व सर्वाधमत्व' म्हणणाऱ्या चक्रधरांना अवश्यच होते. हा दरोडेखोर विठ्ठल ब्राह्मण पांढरीवर पडला, ते पंढरपूर. त्याच्या मुलांनी तो जेथे पडला तेथे त्याचे स्मारक करून त्यावर लिंगस्थापना केली. देवतांनी त्या स्थानाचा अभिमान घेतल्यामुळे लोकांच्या नवसांना तो पावू लागला. विठ्ठलाच्या बायकोचे नाव लाखाई किंवा लखमाई होते. या विठ्ठलाच्या पुत्रांनी त्याच्यावरील पदांत व अभंगांत विठ्ठल-रुक्मिणीची नावे घातल्यामळे त्याची प्रसिद्धि झाली. तो हा विठ्ठल. नामदेव आणि विठ्ठल या दोन दरोडेखोरांचा तिसरा साथी म्हाया गुरव होता. लीळेमध्ये शिवलिंगाचा उल्लेख आहे. गुरव हे शैव आणि शिवपूजक असत. ह्या गुरवाचे महादेव ह्या नावाचे म्हाद्या – म्हाया असे रूप झालेले दिसते.

"वेद, ब्राह्मण, विठ्ठल आणि पंढरपूर या विषयी चक्रधरांची ही मते होती." (*ज्ञानदेव आणि नामदेव*, पृ. २७६).

नामदेव तरुणपणी वाटमारे व दरोडेखोर होते ह्या मताचा वि. ल. भावे, प्रा. वा. ब. पटवर्धन व ज. र. आजगांवकर ह्यांनी पुरस्कार केला होता म्हणून ह्या विवाद्य विषयासंबंधी थोडे विस्ताराने लिहिले.

नामदेवांच्या जीवनात अत्यंत महत्त्वाची घटना म्हणजे ज्ञानदेवादी भावंडांची घडलेली भेट. ह्या भेटीचा काळ ज्ञानदेवांच्या परंपरेतील चवथे उद्बोधनाथ ह्यांनी लिहिलेल्या *ज्ञानदेवचरित्रा*तील भिंत चालविल्याच्या प्रसंगाच्या कालनिर्देशावरून करता येतो : भानू शत भानूरची ज्ञानेश्वरी । विकृत संवत्सरी ज्ञानरूप ।। त्याच शकीं रिपु म्हैसा बोळविला । चालवि भिंतीला बसू माजी ।। ह्यावरून शके १२१२ च्या कार्तिक महिन्यात निर्जीव भिंतीस चालवून तापीतीरनिवासी सिद्ध चांगदेवास सामोरे जाण्याची आज्ञा ज्ञानदेवांनी त्या भिंतीस केली असे मानावे लागते. त्यानंतर चांगा वटेश्वरांनी ज्ञानदेवांच्या प्रेरणेने मुक्ताबाईचा अनुग्रह घेतला. ह्या अनुग्रहानंतर नामदेव व ज्ञानदेव ह्यांची भेट झाली, असे निवृत्तिनाथादी संत व मुक्ताबाई ह्यांच्यात झालेल्या संवादावरून म्हणता येते. ह्या भेटीच्या वेळी नामदेव वीस वर्षांचे होते. ही भेट शके १२१२ (इ. स. १२९०) च्या कार्तिक महिन्यानंतर आळंदी येथे झाली असावी. ह्या भेटीत, गुरूपदेश घेतल्यानेच आपल्या भक्तीला परिपूर्णता येईल हे नामदेवांना कळून चुकले. त्यानुसार त्यांनी आवंढ्या नागनाथ ह्या गावी विसोबा खेचर ह्या थोर पारमार्थिक अधिकारी पुरुषाचे दर्शन घेऊन गुरुबोध व निर्गुणानुभूती घेतली : "श्रवणी सांगितली मात । मस्तकीं ठेवियेला हात । पदपिंड विवर्जित । नामा केला ।। " ह्या आत्मबोधानंतर सर्वांभूती साक्षात्कार होताच, "नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ।। " अशा निश्चयाने नामदेव पंढरपुरास आले. येथे एक गोष्ट स्पष्ट करावीशी वाटते ती ही की, 'निर्दिष्ट विसोबा खेचर हे ज्ञानदेवाकडून अद्वैतबोध प्राप्त झालेले विसोबा खेचर नव्हते. खेचरीमुद्रेचे ज्ञान असलेले ते मच्छिंद्रनाथ होत.' ह्या संदर्भात प्रा. ह. च. घोंगे लिहितात : "मच्छिंद्रांना खेचरी मुद्रेचे ज्ञान असून ती त्यांनी साध्य करून घेतली होती व ह्या मुद्रेतच त्यांच्या दीर्घायु जीवनाचे रहस्य होते. मच्छिंद्र हे विष्णुस्वामी खेचर असावेत व त्यांनाच विसोबा खेचर संबोधिले असण्याची शक्यता आहे. विसोबा हे विसू वा विष्णु ह्या नामाभिधानाचे अपभ्रष्ट रूप आहे. त्यावरून विसोबाच्या जीवनावर नवे भाष्य करण्यास अवसर प्राप्त होतो. विसोबाच्या चरणाचा दास म्हणवून घेण्यात नामदेव स्वतःला धन्य समजतात. विसोबासंबंधी असीम श्रद्धा त्यांच्या अभंगांतून ठायी ठायी प्रगट होते. . ." ('विष्णुदास नामा म्हणे'; *तरुण भारत*, नागपूर, दि. २–८–१९७०).

शके १२१२ मध्ये *गीताभाष्य-भावार्थदीपिका* लिहून झाल्यानंतर ज्ञानदेवांच्या मनात तीर्थयात्रा करावी असे आले. त्यानुसार ते निवृत्तिनाथादी भावंडांसह पंढरपुरास श्रीविठ्ठलाच्या दर्शनास आले. तीर्थयात्रेत संतांचा समागम लाभल्यास आनंद लुटावयास मिळेल म्हणून ते नामदेवांच्या भेटीस आले. नामदेवांनी ज्ञानदेवांच्या पायावर लोटांगण घातले व त्यांना प्रेमपुरःसर आलिंगन दिले. " नामदेव म्हणे सुफळ माझें जिणें । स्वामीच्या दर्शनें धन्य जालों ।।" अशा शब्दांत ज्ञानदेवांचे त्यांनी गौरवपूर्ण स्वागत केले. ह्यानंतर योगी ज्ञानदेवांनी आपल्याबरोबर तीर्थयात्रेस येण्याचा मनोदय व्यक्त केला. मग हे उभय संत 'एकांती बैसोनी सहज' अंतरीचे गुज बोलू लागले (अ. ९०५. ५). ज्ञानदेव म्हणाले, " जीवन्मुक्त ज्ञानी जरी जाले पावन । तरी देवतीर्थभजन न संडिती ।। (अ. ९०५.६), म्हणून देशातील पवित्र तीर्थे प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहावी, तुझ्या समागमसुखाचा लाभ घ्यावा आणि जीवन सार्थक करावे अशी उत्कंठा लागल्यामुळे मी तुला तीर्थयात्रेला नेण्याकरिता आलो आहे. तरी माझे मनोरथ पूर्ण कर." (अ. ९०५). त्यावर नामदेव ज्ञानदेवास म्हणाले, "माझे सारे सुख ह्या पांडुरंगाच्या पायाशी आहे. मग अन्य तीर्थयात्रा करावयास जाण्याची गरजच काय ? मला पुरुषार्थ नकोत. चारी मुक्तीही नकोत. मी पंढरीचा भिकारी होऊन पांडुरंगाच्या महाद्वारात पडून राहीन." शेवटी *नामदेवांनी* पांडुरंगाच्या अनुज्ञेचा हवाला दिला, त्यावर "प्रत्यक्ष परब्रह्म मूर्ति ज्ञानेश्वर । करीतसे आदर संगतीचा ।। ऐसें भाग्य जेणें सर्वस्वें साधावें । तरीच जन्मा यावें विष्णुदासा ।। जावें स्वस्ति क्षेम यावें शीघ्रवत। करावें स्वहित कळेल तैसें ।। " (ना. गा., अ. ९०८.२–४) अशी आज्ञा मिळताच भक्तीचे अध्वर्यू प्रेमळ भक्त नामदेव मोठ्या कष्टाने तीर्थयात्रेला निघाले. नामदेव-ज्ञानदेवांचे तीर्थाटण म्हणजे भक्तिज्ञानाचा संगम म्हटला जावा. तीर्थावळीच्या अभंगात, "ऐसे सुखरूप दोघे चालताती मार्गी" (अ. ९१२.१) ह्या प्रारंभीच्या उल्लेखावरून गोराकुंभार, सावता माळी, चोखामेळा इत्यादी संत तीर्थयात्रेत मागाहून सामील झाले असावेत असे दिसते. पंढरपूर सोडल्यानंतर यात्रेच्या वाटेवर ज्ञानेश्वर-नामदेव ह्या दोन आत्मज्ञानसंपन्न साक्षात्कारी सत्पुरुषांत जी उदंड आत्मचर्चा झाली ती अत्यंत उद्बोधक आहे. यात्रामार्गात नामदेवांना विठ्ठलाची आठवण वारंवार होऊन त्याचा विरह सहन होईना. ते पाहून, त्यांना धीर देण्यासाठी, ज्ञानदेव म्हणत : "हे विष्णुदासा, भगवत्प्रेमाचा जिव्हाळा तुझ्या अंतःकरणात भरपूर आहे. मग उगाच का खंत करतोस ? हे भक्तराया, तुझ्या हृदयातच स्वानंदस्वरूप परमात्मा साठविलेला आहे." नामदेवांच्या एकविधनिष्ठावंत प्रकृतीला हे पटले नाही. ते उद्गारले, "ज्ञानदेवा, मी ज्ञानी नाही किंवा योगीही नाही. एका पंढरीनाथाशिवाय मला अन्य विश्रांतिस्थान नाही. माझा सर्व भाव त्याच्याच ठायी आहे." ह्यावर ज्ञानदेव म्हणाले : "नामदेवा, तू ही द्वैत भावना सोडून ते सर्वव्यापी स्वानंदस्वरूप मनात आठव. तुझा पांडुरंग एकदेशी नसून सर्व देश-अवकाश भरून राहिला आहे. . . . तो परमात्मा सर्व विश्व व्यापून आहे. मग तू अकारण कष्टी का होतोस?" सगुणोपासक नामदेवांना ह्या ज्ञानापासून समाधान मिळाले नाही. नामदेव उद्गारले, "आपले हे म्हणणे खोटे नाही; परंतु पृथ्वीवर सर्वत्र पाणीच पाणी असूनही, चातक पक्षी तिकडे ढुंकूनही पाहात नाही, तो मेघाकडेच टक लावून आपली चोच वासून, मेघातून पडणाऱ्या पाण्याच्या थेंबाचीच वाट पाहतो, त्याप्रमाणे माझे मन विठ्ठलाचेच चिंतन करते. तोच माझा जीवनमेघ आहे." (अ. ९१३. १७–१८). नामदेवांचा हा एकविधभाव पाहून ज्ञानदेवांना आनंद झाला. स्वानंदपूर्ण अंतःकरणाने हे दोघे वाटचाल करीत होते. दोघेही स्वहिताच्या गोष्टी करीत, अनुभवाची कसोटी दाखवीत होते. कधी कधी ज्ञानदेव स्वतःकडे लघुत्व घेऊन नामदेवांना म्हणत की, "हे अविनाशी भक्तिभाग्य तू कसे जोडलेस ? तुझा भक्तिमार्ग मला सांग. तुझा तो भजनविधी कसा साधावा ? सत्त्वशील सत्त्वगुणयुक्त नमनाचा प्रकार मला सांग. निर्विकार ध्यानाचा प्रकार समजावून दे." नंतर ते म्हणत : "बहु उत्कंठित या सुखा कारणें । तें मज पारणें करवीं आजी ।।" (अ. ९१४.१०). फारच आग्रह केल्यामुळे नामदेवांनी "ऐसीं ऐकुनिया उत्तरें प्रेमा आला पोटीं" ह्या अभंगात व्यक्त केलेला अनुभव थोडक्यात निवेदन केला. "मीतूपणा मावळून सर्व भूतमात्राच्या ठिकाणी दयाकरुणा वाटू लागणे, ह्याला भजन म्हणणे मला इष्ट वाटते. ह्या भजनाशिवाय इतर साधने व्यर्थ व कष्टप्रद होत. अंतःकरणात आनंदाचा प्रकाश धारण करून म्हणजे मन निर्मल करून, प्रसन्न ठेवून, कोणाचेही गुणदोष न पाहता, सर्वांशी नम्रतेने व्यवहार करणे हे नमन होय. ह्याहून इतर प्रकारची नम्रता दांभिक समजावी. ज्यामध्ये सर्व विश्वात एकमात्र विठ्ठल प्रतीत होतो आणि ज्या ध्यानात त्याचेच अखंड स्मरण होत राहते, तेच निर्विकार ध्यान होय. हरिणी ज्याप्रमाणे

गानलहरीवर लुब्ध होऊन देहभान पूर्णपणे विसरते त्याप्रमाणे भगवंताच्या स्मरणात मन तल्लीन होऊन त्यातच मन दृढ केले जाते. तेच खरे प्रेमयुक्त श्रवण होय. स्वहिताचा सातत्याने अखंड विचार करीत राहणे हेच सात्त्विक मनन होय. कोषकीटक भिंगुरटीचे चिंतन करता करता स्वतः भिंगुरटीच होऊन जातो, त्याप्रमाणे भगवंताच्या चरणाचे दृढ अनुसंधान राखून भगवत्स्वरूप होणे हे निदिध्यासन होय. सर्वभावे एका विठ्ठलाचेच ध्यान, सर्वभूतांच्या ठिकाणी त्याच्याच स्वप्राचे दर्शन, रजतमरहित तिन्ही गुणांच्या बंधनातून मुक्त होऊन केवळ ईश्वरप्रेमाचाच आनंद भोगणे ह्याचे नाव भक्ती. स्थिरबुद्धि होऊन, अनासक्तपणे वैराग्ययुक्त अंतःकरणाने भगवत्प्रेमात तल्लीन होऊन देहभान हरपणे व प्रारब्धभोग तक्रार न करता भोगणे ह्यालाच मी श्रुती मानतो. एकांतावस्थेतील ध्यान हीच खरी विश्रांती होय. ह्याहून दुसरे विश्रांतीचे लक्षण नाही. ज्ञानदेवा, माझ्या भगवत्प्रेमाचा हा कायिक, वाचिक आणि मानसिक असा त्रिविध अनुभव त्या परम उदार आणि सर्वज्ञ पांडुरंगाकडून वदविला आहे."

भजनप्रेमापासून विश्रांतीपर्यंत भक्तिरहस्य प्रकट करणारी नामदेवांची ही दिव्य वाणी श्रवण केल्यावर ज्ञानदेवांचे अंतःकरण हेलावून गेले. ते म्हणाले, "भक्त-भागवत पुष्कळ ऐकले, पूर्वी असंख्य झाले, पुढेही होतील, पण नामदेवांची सर इतरांना येणार नाही. नामदेवांचे बोलणे हे केवळ कवित्व नाही, तर त्यात काही निराळाच निरुपम रस भरलेला आहे. त्या बोलण्यात जी सुखविश्रांती लाभते, ती अन्यत्र कल्पांती लाभणार नाही. संतांनी विचार करून पाहावा."

पंढरपुराहून निघून कऱ्हाड-तऱ्हेगावच्या मार्गाने हा वैष्णवमेळा तापी-नर्मदातीरी आला. तेथून त्यांनी पश्चिम प्रभासपट्टण, सोमनाथतीर्थ, द्वारका, मथुरा, गया, वाराणसी, कुरुक्षेत्र इत्यादी तीर्थांच्या यात्रा केल्या व राजस्थानात असलेल्या बिकानेरनजीकच्या कोलाद ह्या गावी ते आले. तेथून ५० मैलांच्या अंतरावर असलेल्या वालुकामय प्रदेशात वाटचाल करीत असता दोघेही तहानेने व्याकुळ झाले. लघिमा सिद्धीचा अवलंब करून सूक्ष्म देह धारण करून ज्ञानदेव तेथील एका विहिरीत उतरले आणि त्यांनी आपली तहान शांत केली. ज्ञानदेवांनी नामदेवांसाठी योगसिद्धीने पाणी आणून देण्याची तयारी दाखविली. परंतु नामदेवांनी त्या गोष्टीला नकार देऊन आपले नेत्र झाकले आणि मनात विठ्ठलाचे स्मरण केले. त्याबरोबर, "तंव गडगडीत कूप उदकें वोसंडला। कल्पांती खवळला सिंधू जैसा ॥" असे म्हणतात. त्या निर्जल प्रदेशात ती विहीर एक तीर्थस्थान बनली. 'नामदेव कुवा' ह्या नावाने ती आज प्रसिद्ध आहे.

ह्यानंतर हा वैष्णवमेळा काशीस शक १२१६ (इ.स. १२९४) मध्ये जाऊन पोहोचला, असे "ज्ञानोबांची काशीयात्रा, शक १२१६" ह्या दे. व्यं. चौहान ह्यांनी लिहिलेल्या लेखावरून म्हणता येते. त्यात त्यांनी काशीत दशाश्वमेध घाटावर असलेल्या ज्ञानेश्वर मठाची माहिती दिली आहे. ह्या मठात ऐतिहासिक महत्त्वाची खूण म्हणजे अंगणात उभा केलेला एक शिलास्तंभ होय. हा स्तंभ दुसऱ्या एका शिलामय चबुतरेवजा दगडात उभा केलेला आहे. पायाचा दगड काळा आहे; त्याचा आकार ४ फूट चौरस असून त्यावर लहानमोठ्या आकाराची आठ-नऊ शिवलिंगे आहेत. स्तंभाचे मुख मठातील द्वाराच्या दिशेकडे आहे. चौकोनी प्रस्तरावर असलेल्या ह्या स्तंभाची उंची ७ फूट आहे. ह्या स्तंभाच्या चारी बाजूंस एकूण आठ मूर्ती खोदलेल्या आहेत. ह्या प्रस्तर-स्तंभाच्या वरच्या बाजूस टोकाजवळ "सं. १३५१" अशी संख्या कोरलेली आहे. त्याच्या ५–६ इंच खाली "ज्ञानोबा" हा शब्द कोरलेला आहे. ह्यावरून ज्ञानेश्वर-नामदेवांच्या अपूर्व काशीयात्रेचे वर्ष निश्चित होते. ह्या १३५१ संख्येतून १३५ ही संख्या वजा केली असता १२१६ वर्ष हा शक मिळतो ("दक्खिनी हिंदीतील इतिहास व इतर लेख", मुंबई, श. १८९५, पृ. २३९–२४०). [वर उद्धृत केलेला श. १२१६ हा विवादास्पद वाटतो. कारण ज्ञानदेवांचा समाधिशक १२१५ मानला जातो.] नंतर हा वैष्णवमेळा उत्तरेकडून दक्षिणेकडे आवंढ्या नागनाथ येथे आला. तेथे नागनाथाच्या देवळासमोर नामदेवांचे कीर्तन चालले होते. देवळातील कर्मठ ब्राह्मणांना ते न आवडून त्यांनी नामदेवांना देवळासमोरून हाकलून दिले. ते देवळाच्या पिछाडीस गेले. त्यांच्याबरोबर भजनमंडळी देवळाच्या मागच्या बाजूस आली. नामदेव ब्रह्मानंदी तल्लीन झाले होते. परंतु कीर्तनात रंग भरेना म्हणून नामदेव कळवळून म्हणाले : "आतां कां निष्ठुर अंतरी। न येसी लवकरी विठ्ठला ॥ मजकडेस करुन पाठी। राउळीं बैसला धूर्जटी ॥ आता पाहूनि कृपादृष्टी। पाव जगजेठी मजलागी ॥" नामदेवांच्या मुखातून ही वाणी पडताच पूर्वाभिमुख असलेले देऊळ फिरले व ते पश्चिमाभिमुख झाले, अशी कथा सांगितली जाते. आजही नागनाथाचे मंदिर पश्चिमाभिमुख आहे. ह्या चमत्कारातील प्रतीकात्मकता समजून घेणे नामदेवांचे चरित्र समजून घेण्याच्या दृष्टीने आवश्यक आहे. पंजाबमार्गे परत येताना नामदेवांच्या दैवी सामर्थ्यावर लुब्ध झालेला जाल्हण ऊर्फ जाल्हो सुतार नावाचा त्यांचा एकनिष्ठ शिष्य ह्या वैष्णवमेळ्याबरोबर पंढरीस आला होता. शके १२१७ म्हणजे इ. स. १२९५ मध्ये हा वैष्णवमेळा आपल्या मायभूमीस–महाराष्ट्रात–परत आला. पंढरपुरास येताच नामदेवांनी राउळात जाऊन पांडुरंगास प्रेमपूर्वक आलिंगन दिले. काशीयात्रेचे मावंदेही त्यांनी मोठ्या थाटात केले. ह्याच साली वरील तीर्थयात्रेत सहभागी झालेले अरणगावकर सावतामाळी समाधिस्थ झाले.

आपले इहलोकीचे कार्य संपले असे समजून ज्ञानदेवांनी पांडुरंगचरणी समाधीची परवानगी घेतली. ज्ञानदेवांचे आळंदी येथील समाधिस्थान निश्चित करण्यात आले. ज्ञानदेव समाधी घेणार हे ऐकून नामदेवांस फार वाईट वाटले. निवृत्तिनाथांचा कंठ दाटून आला. सोपानमुक्ताबाईंस रडू कोसळले. हा समाधीचा प्रसंग नामदेवांनी करुणापूर्ण शब्दांत वर्णिला आहे. ज्ञानदेवांच्या संजीवन-समाधीचा प्रसंग शके १२१५ कार्तिक वद्य त्रयोदशीस माध्यान्हकाली झाला. त्यांच्या समाधिसोहळ्यानंतर पुढील आठ महिन्यांतच बाकीच्या भावंडांनी समाधी घेतल्या. सोपानदेव शके १२१५ मार्गशीर्ष वद्य १३ स सासवड येथे, मुक्ताबाई शके १२१६ वैशाख वद्य १२ मेहुण येथे, निवृत्तिनाथ शके १२१६ ज्येष्ठ व. ११ स त्र्यंबकेश्वर येथे समाधिस्थ झाले. ह्या समाधिप्रसंगांची जी प्रकरणे त्यांनी लिहिली ती अगदी साध्यासुध्या अभंग छंदात. हृदयाला पीळ पाडणारे असे हे अभंग आहेत. [नामदेव गाथा ⇨ ३.]

ज्ञानदेवांनंतर नामदेवांना चौपन्न वर्षे आयुष्य लाभले. ह्या चौपन्न वर्षांच्या दीर्घ कालात त्यांनी कन्याकुमारी ते हिमालय अनेक पदयात्रा केल्या. त्या काळच्या असहाय, भयाण, अंधकारमय परिस्थितीत चाचपडणाऱ्या जनतेला अभय देणारा हा महापुरुष भिवरेच्या तटावरून उत्तरेस गेला. त्याने समाज संघटित व जागृत केला, देवाधर्माविषयी खऱ्या तत्त्वांचा पुरस्कार केला व समाजभावनेची स्फूर्ती पुढे नेली.

ह्या कालात आर्यावर्ताचे स्वातंत्र्य नष्ट झाले. मुसलमानी सत्तेची उत्तरेकडून दक्षिण दिशेने पसरत चाललेली लाट देवगिरीपर्यंत येऊन थडकली. शके १२४० मध्ये शंकरदेवांनी तिचा प्रतिकार करीत स्वातंत्र्यरक्षणार्थ देह ठेवला. त्याबरोबर महाराष्ट्राचे स्वातंत्र्य गेले. धर्मावर व समाजावर एक घोर संकट आले. जनता किंकर्तव्यमूढ बनली. परचक्राच्या आक्रमणाखाली प्राचीन कालापासून लोकांच्या मनात रुजलेली देवाची व धर्माची आस्था नाहीशी होऊ लागली.

नामदेवांनी दुसरी पदयात्रा दक्षिण भारतात केल्याची माहिती नवीन मिळालेल्या तीर्थयात्रेतील गावांच्या नावांवरून मिळते. श्रीशैलशिखर, मल्लिकार्जुन, अरुणाचल, चिदांबर, विष्णुकांची, रामेश्वर, ताम्रपर्णिका, आळुवा, कन्याकुमारी, हरिहरेश्वर, जनार्दन ह्या तीर्थांच्या

ठिकाणी शके १२२० नंतर जाऊन नामदेवांनी भागवतधर्माचा, मानवधर्माचा प्रचार केला. त्यामुळे दक्षिण भारतातील राज्यांतून विखुरलेला दर्जी, छिप्पिगा लोकांचा अल्पसंख्य भाग आपणास तेव्हापासून "नामदेव" म्हणून उल्लेखू लागला व मद्रास राज्यातील भूसागर व मळाया ज्ञाती "नामदेव" हे सुद्धा आपल्या ज्ञातीचे समानार्थक नाव आहे असे मानू लागले.

त्यानंतर नामदेवांच्या तिसऱ्या पदयात्रेची कल्पना देणारा पुरावा म्हणजे इतिहासाचार्य वि. का. राजवाडे ह्यांनी शके १८४६ मध्ये प्रसिद्ध केलेली *महिकावतीची ऊर्फ माहिमची बखर* होय. मलिका बहादूर ऊर्फ मलिक गाझी बेग ऊर्फ गिआसुद्दिन तुघलक हा त्यावेळी दौलताबादेचा अधिकारी म्हणजे सुलतान होता. त्याची आणि नामदेवांची भेट इ. स. १३२१ ते १३२६ (शके १२४६ ते १२४८) च्या काळात केव्हा तरी झाली असावी.

ह्या तिसऱ्या पदयात्रेत नामदेवांनी कीर्तन-भजनाच्या द्वारा विठ्ठलनामाचा आणि ईश्वरभक्तीचा एवढा प्रचार केला की त्याचा प्रभाव सौराष्ट्र व उत्तर भारत ह्यांच्या साहित्यावर झाल्याशिवाय राहिला नाही. नदी कोरडी पडली तरी तिच्या पात्रात थोडेसे उकरताच जसा पाण्याचा प्रवाह झुळझुळताना दिसतो, त्याप्रमाणे नामदेवांच्या प्रभावाचे परिणाम त्यांच्या नंतर होऊन गेलेल्या सौराष्ट्र व उत्तर भारत ह्या प्रदेशातील संतकवींवर झालेला आढळतात हे नामदेवानंतर पन्नास वर्षांनी होऊन गेलेल्या भक्तकवी नरसी मेहतांच्या (शके १३३४–१४००) नामदेवांसंबंधी *काव्यसंग्रहा*तील गौरवपर उद्गारांवरून दिसून येईल : १. नामा हाथ ते दूध पीला . . . नामानुं छापरुं आलु छाई (नामदेवाच्या हातचे जो दूध प्याला, ज्याने नामदेवांची झोपडी दुरुस्त केली); २. पंढरपूर नगर छे एक, तेमां नामा साई विशेक, नामदेवनुं हरिसी प्रीत (पंढरपूर नामक एका नगरात विशेष हरिप्रीती असलेले नामदेव राहात).

नामदेवांनी पुढे राजस्थानकडे संचार केला. ठिकठिकाणच्या मुक्कामांत त्यांनी भजन-कीर्तनाची झोड उठवली. त्यामुळे राजस्थानच्या जीवनावर अनंतकाल संस्कार करणारे परिणाम झाले. जयपूर, भरतपूर, जोधपूर, बिकानेर आणि अलवार येथील नामदेवांची सार्वजनिक मंदिरे ही त्यांच्या कार्याची आजही साक्ष देतात. सामाजिक दृष्ट्या नामदेवांच्या पदयात्रेचा दुसरा असा परिणाम झाला की ह्या भागातील शिंपी तेव्हापासून स्वतःस 'नामदेववंशी छिप्पा दर्जी' असे म्हणवू लागले. राजस्थानात ह्या जमातीची संख्या हल्ली मोठ्या प्रमाणात आहे.

राजपुतान्यानंतर नामदेव वैष्णवमंडळासह भक्तिमार्गाचा प्रचार करीत प्रयाग, वाराणसी, गया इत्यादी क्षेत्रांच्या ठिकाणी गेले. ह्यावेळी उत्तरभारतात मुसलमानी सत्तेचे एकछत्र झाले होते. भारतीय समाज त्यामुळे दुभंगून गेला होता. नामदेवांनी हिंदीभाषिकांच्या ह्या प्रदेशात कीर्तनसंस्थेच्या प्राचीन व्यासपीठावरून एकेश्वरवादाचा, विशुद्ध भक्तीचा, जातिवर्णनिरपेक्ष मानवधर्माचा आणि सदाचारपूर्ण जीवनाचा संदेश हिंदी भाषेत दिला, हिंदू-मुसलमानांच्या ऐक्याचे प्रयत्न केले आणि मानवी समतेचा पुरस्कार केला. दक्षिण भारतातून उत्तरेकडे जाऊन रामानंदाने (शके १३२२ ते १३७०) हेच कार्य रामभक्तीचा प्रचार करून पुढे चालविले.

डॉ. जे. एन. फर्कुहार म्हणतात की, "प्रस्तुत, शीखांच्या ग्रंथात त्यांची (नामदेवांची) कित्येक पदे आहेत. आणि रामानंदाच्या आगमनापूर्वी ज्या थोड्या भक्तांनी त्याचा मार्ग तयार करून ठेवला होता त्यांपैकी नामदेव हे एक होत (*An Outline of Religious Literature of India*; J. N. Farquhar, 1920, पृष्ठ २९८). रामानंदाचे शिष्य कबीरदास (शके १३२२ ते १४४१) ह्यांनी नामदेवांसंबंधी अनेक प्रशंसापर उद्गार काढले आहेत. बानगी म्हणून – १. गुरुपरसादि जै देवो नामा भगति कै प्रभु इनहि जाना (*आदि श्रीगुरु ग्रंथ साहबजी*, पृ. ११०७), २. कालि जागे नामा जै देव (तत्रैव, पृ. ५०७), ही उदाहरणे पुरेशी आहेत. कबीरदासांना नामदेवांनी विचारस्फूर्ती दिली. हिंदू व मुसलमान ह्यांना समान धर्माची शिकवण नामदेवांप्रमाणे कबीराने दिली. हिंदू व मुसलमान धर्मांतील खोट्या पृथक्तेबद्दल दुःख प्रकट केले. दोनही धर्मांतील रूढींचा व विशिष्ट आचारधर्माचा निषेध केला व एका सर्वसंग्राहक व व्यापक धर्माची, मानवधर्माची, दिशा दाखवून दिली.

कबीरदासांच्या काव्यावर पडलेली नामदेवांच्या विचारांची आणि अभिव्यक्तीची छाया तिच्या प्रकटीकरणात आणि व्यक्त केलेल्या आशयात वारंवार दिसते. ह्या बाबतीत डॉ. मोहनसिंग दिवाना लिहितात : "रामानंदापेक्षाही गोरक्षनाथ, जयदेव आणि नामदेव ह्या त्रयींचा कबीरावर जास्त प्रभाव पडला होता. विशेषतः नामदेवाच्या मोठ्या प्रमाणांत पडलेल्या प्रभावाचे सहज आकलन होऊ शकते." (*कबीर और भक्ति आंदोलन*, पृ. १८). वरील विवेचनावरून, वाराणसीच्या परिसरात नामदेवांचे वास्तव्य अनेक वर्षे होते. त्यांच्या तेथील पायाभूत कामगिरीने पुढील भारतीय कवींना प्रभावित केले व त्यांच्या भागवतधर्माच्या शिकवणीमुळे त्यांचे आध्यात्मिक पोषण झाले. शिवाय, ह्या काळात हिंदी काव्यरचना करून हिंदी साहित्यातही त्यांनी स्वतःला मानाचे चिरंतन स्थान मिळवून ठेवले आहे. नामदेवांची ही पदयात्रा शके १२५९ च्या सुमारास संपली.

शके १२६० वैशाख वद्य ५ ह्या दिवशी नामदेवांचे शिष्य चोखामेळा मंगळवेढे येथे घराचे छप्पर कोसळून त्यात गाडले गेले. चोखोबांच्या निधनाची बातमी समजताच नामदेव मंगळवेढ्यास गेले. तेथे चोखोबांच्या अस्थी गोळा केल्या आणि त्या पंढरपुरात आणून देवाच्या महाद्वारी शके १२६० वैशाख वद्य १३ रोजी ह्या हरिजन संताचे निरंतर स्मारक उभे केले. देशाच्या विकासात अडथळा निर्माण करणारी अस्पृश्यता ही आजच्या प्रमाणे त्या कालात एक समस्या होती. नामदेवांनी हरिजनांचीही सेवा करून अस्पृश्योद्धारावरील श्रद्धा व त्याचे महत्त्व पटवून दिले. सामाजिक विषमता दूर करण्याचे त्यांनी जे प्रयत्न केले त्यांपैकी हा एक प्रयत्न होता.

शके १२६१ च्या सुमारास पुन्हा नामदेव उत्तरेकडे गेले असे *जन्मसाखी* व इतर पंजाबी साहित्यावरून म्हणता येते. त्यात दिलेल्या हकीकतीवरून नामदेव हे एकटेच द्वारका, मारवाड, हरद्वारमार्गे पंजाबात गेले. प्रथम ते हरद्वारजवळ वसलेल्या शहरानपूर जिल्ह्यातील ज्वालापूर येथे गेले. तेथून अमृतसरमार्गे गुरुदासपूरला गेले. ह्या पदयात्रेत गुरुदासपूर जिल्हा ही त्यांची कर्मभूमीच बनली. भूतविंड, मरड, भट्टिवाल, घुमान इत्यादी गावी नामदेवांची स्मृति-मंदिरे आजही उभी आहेत. ते अमृतसर जिल्ह्यातील भूतविंड ह्या गावी येऊन भागवतधर्माचा परिचय खेडोपाडीच्या लोकांना करू लागले. त्या गावी अडोली नावाची एक विधवा होती. ती मोलमजुरी करून राहात असे. तिला एकुलता एक मुलगा होता. त्याला नामदेवांनी मरता मरता वाचविले व अनुग्रह दिला. हाच मुलगा पुढे नामदेवांचा पंजाबातील पट्टशिष्य बहोरदास म्हणून प्रसिद्धीस आला. नामदेवांच्या घुमान येथील देवालयाची व्यवस्था अद्यापि बहोरदासाच्या वंशजांकडेच आहे.

भूतविंड ह्या गावाचा निरोप घेऊन गुरुदासपूर जिल्ह्यातील मरड ह्या गावी गेले. तेथून पुढे पाण्याचा दुष्काळ असलेल्या भट्टिवाल ह्या गावी नामदेव गेले असता, त्यांच्या सांगण्यावरून एका विशिष्ट जागी तलाव खणण्यात आला. त्याला चवदार व विपुल असे पाणी लागले. लोकांनी नामदेवांच्या स्मरणार्थ त्याचे 'नामियाना' असे नाव ठेवले. भट्टिवाल येथे जाल्हो व लद्धा ह्या नावाचे दोन शिष्य नामदेवांना मिळाले. ह्यांपैकी जाल्हो उर्फ जाल्हण हा व्यवसायाने सुतार

होता. पहिल्या तीर्थयात्रेत तो नामदेवांच्या बरोबर आला होता असे पुढील अभंग-चरणावरून कळून येते : " निवृत्ती, ज्ञानेश्वर, जनमित्र, सोपान, सावंत जाल्हन घेऊनी सरिसे." तो मूळचा ह्या भट्टिवाल गावचा. पंढरपूरची तो वारी करीत असे. भट्टिवाल येथे त्याचे स्मारक आहे. नामदेवांचा दुसरा शिष्य लद्धा हा घुमानजवळच्या सखोवाल गावचा खत्री होता. तो गावात व्यवसाय करून नामदेवांच्या शिकवणीचा प्रचार करी.

त्यानंतर नामदेव अमृतसरनजीक २५ मैलांवर गुरुदासपूर जिल्ह्यातील एका जंगलातील रमणीय तलावाजवळ वस्तीत येऊन राहिले. नामदेवांच्या सांनिध्यात ह्या जंगलाचा संपूर्ण कायापालट झाला. तेथे एक गावच वसले. फिरत फिरत ह्या ठिकाणी नामदेव गेले म्हणून त्यांनी त्या वस्तीस ' घुमान ' असे नाव दिले. ह्या गावाला निसर्गाचा वरदहस्त पुरेपूर लाभलेला आहे. भोवतालची वृक्षराजी, त्यावर असणारे मोर, पोपट, मैना, चक्रवाक इत्यादी पक्षी प्रवाशांचे लक्ष चटकन वेधून घेतात. ह्या घुमान गावालगत तीन मोठे पाण्याचे तलाव आहे. त्या तळ्यांचाही नामदेवांच्या तेथील वास्तव्यात इतिहास बनला आहे. तेथे नामदेवांच्या शिष्यांमध्ये प्रसिद्ध असलेला केशो हा त्यांना मिळाला. केशो अविवाहित होता त्यामुळे त्यास केसो कलंधर असेही म्हणत. तारा नामक गावचा तो खत्री. महारोग झाल्याकारणाने जिवास कंटाळून तो आत्महत्या करण्याच्या विचारात होता. ह्यावेळी कोणी त्यास श्रीस्वामी नामदेवांजवळ जाण्यास सांगितले. त्याप्रमाणे घुमान येथे जाऊन नामदेवांच्या चरणी तो लागला. नामदेवांना त्याची दया येऊन त्यास मनोमन देवाचे स्मरण करून त्या तळ्यात स्नान करण्यास त्यांनी सांगितले. त्याप्रमाणे त्या तळ्यात स्नान करीत राहिल्यामुळे त्याचा महारोग संपूर्ण बरा झाला. ह्यापुढे तो नामदेवांच्या सेवेला राहू लागला. एकदा सहज नामदेवांनी विचारले, " बेटा, तुला रोज भजनास येण्यास का वेळ होतो ? " त्या शिष्याने त्यांना आपणास स्नानास पाणी मिळण्यास फार अडचण पडत असते असे सांगितले. शिष्याचे म्हणणे नामदेवांना पटले व त्यांनी आपल्या बैठकीच्या मागच्या बाजूस आणखी एक तलाव खणला व सर्व शिष्यवर्गाची कायमची सोय केली. केसो कलंधर हा भावलपूर संस्थानात भागवतधर्माची शिकवण देत असे. भावलपूर येथे त्याचा आश्रम असून त्याची समाधीही तेथे आहे. त्याचा आश्रम ' कलधारीकी गद्दी ' ह्या नावाने ओळखला जातो. भावलपूर विभाजनाच्या वेळी पाकिस्तानात गेले.

हिंदी-भाषिकांच्या ह्या प्रदेशात नामदेवानी कीर्तनद्वारे भागवतधर्माचा प्रसार हिंदी भाषेत केला. ह्या काळात भागवतधर्माचा राजाश्रय तुटला होता. देश म्लेंछांकित झाला होता. अशा परिस्थितीत " सभु गोविंदु है सभु गोविंद है, गोविंद बिनु संसार नही कोई " हा एकेश्वरवादाचा संदेश ह्या संताने देऊन भागवतधर्माची ज्योत पुनरुज्ज्वलित करण्याचे, बहुजनसमाजात विशुद्ध मानवताप्रेमाची व समतेची जाणीव निर्माण करण्याचे महान कार्य केले. नामदेवांच्या शिकवणीने प्रभावित होऊन त्यांनी दाखवून दिलेल्या परमार्थमार्गाचे अनुसरण करणारा एक बराच मोठा वर्ग पंजाब प्रांतात निर्माण झाला व वाढता राहिला. हा वर्ग नामदेवपंथीय म्हणून तिकडे ओळखला जातो. महाराष्ट्राच्या श्रीविठ्ठल ह्या समदृष्टी प्रमुख आराध्यदेवतेचा व त्याच्या माहात्म्याचा पहिला परिचय करून देणारे संत ह्या दृष्टीने महाराष्ट्राच्या धार्मिक इतिहासात नामदेवांना फार मोठे स्थान द्यावे लागेल. कबीर, दादूदयाळ, रेदास, रज्जबजी, स्वामी सुंदरदास, नानक, मीराबाई, नरसी मेहता इत्यादी उत्तरकालीन संतांनी नामदेवांचा उल्लेख मोठ्या आदराने केला आहे.

घुमान येथे श्रीनामदेवांचे वास्तव्य सुमारे १० वर्षे म्हणजे शके १२७१ पर्यंत होते. पंढरपुरास जाण्याकरिता घुमानहून मकरसंक्रांतीच्या दिवशी नामदेवांनी प्रयाण केले म्हणून तेथे प्रतिवर्षी माघ शुद्ध २ रोजी महायात्रा भरत असते. पंढरपुरास शके १२७२ मध्ये येऊन विकृत संवत्सरी आषाढ वद्य १३ रोजी पांडुरंगाचे चरणाजवळ त्यांनी आपली जीवनज्योत परमज्योतीत विलीन केली. अशा प्रकारे ह्या मध्ययुगीन भारताच्या थोर व क्रियाशील भक्ताची त्या ठिकाणी अवतारसमाप्ती झाली.

" शतकोटी तुझे करीन अभंग " असे एक नामदेवांचे प्रतिज्ञावाक्य आहे. मात्र त्यांचे उपलब्ध मराठी अभंग २,३३७ व हिंदी पदसंख्या ३१५ आहे. ' पंढरीक्षेत्र, चंद्रभागातीर्थ, जो विटेवरी उभा नाही तो मी देवच मानीत नाही ' अशी त्यांची एकांतिक भक्ती शके १२१२ पूर्वीच्या साधनेच्या पूर्वावस्थेतील अभंगांत दिसून येते. तीर्थावळीचे अभंग शके १२१३–१७ ह्या काळातील. नंतरची रचना *बालक्रीडा* व *कृष्णलीला* ह्या प्रकरणांची, ती *गुरुबोधा*नंतर केली असावी, असे त्यांतील गुरुवंदनेवरून दिसून येते. ज्ञानदेवांची *आदि* आणि ज्ञानदेवादी भावंडांची समाधि-प्रकरणे (शके १२१८ ते १२१९ ह्या कालातील), नामस्मरण, नामसंकीर्तन, सत्संगती, ईश्वर आणि भक्ती, संकल्प व मागणे, दर्शनानुभव ह्यांवरील स्फुट रचना श. १२२० नंतरची असावी. हिंदी रचना शके १२२० ते १२७१ पर्यंत महाराष्ट्राबाहेर नामदेवांनी ज्या पदयात्रा केल्या त्या काळातील होय. लेखनप्रेरणेच्या विशिष्ट काळाची संगती अंतर्गत प्रमाणावरून लावता येते ती वरीलप्रमाणे.

शिखांच्या *आदिग्रंथात* नामदेवांची ६१ पदे आहेत. ही पदरचना ज्ञानेश्वरसमकालीन आद्य नामदेवांनी केली असे एक मत आहे, तर नामदेव हे नाव धारण करणाऱ्या त्यांच्या परंपरेतील एका किंवा एकापेक्षा अधिक माणसांनी केली असे दुसरे मत आहे. प्रा. अ. का. प्रियोळकर ह्यांचे जे म्हणणे आहे (विज्ञावि., नोव्हें. १९३७) त्याला श्री मा. गो. बारटक्के ह्यांनी विस्ताराने उत्तर देऊन त्यांचे मत खोडून टाकले (*लोकशिक्षण,* मे व ऑक्टोबर १९४० आणि जानेवारी १९४१). मराठी काव्यात ' सिंपीयाचे कुळी जन्म मज जाला ' असे नामदेवांनी म्हटले आहे. *आदिग्रंथात* किंवा शिखांच्या *श्रीगुरुग्रंथसाहेबात* नामदेवांची म्हणून जी पदे समाविष्ट केली आहेत त्यात ' छीपेके घरि जनमु दैला ' (शिष्याच्या घरी मला जन्म दिला) असे नामदेव म्हणतात. नामदेवांच्या मराठी आत्मवृत्तात शिंपी जातीच्या धंद्यास लागणाऱ्या उपकरणांचा उल्लेख " सुई आगुथळी कात्री गज दोरा । मांडिला पसारा सदाशिवी ॥ " असा आढळतो. *आदिग्रंथा*तील एका पद्यात, " माझे मन हा माझा गज आणि जिव्हा ही माझी कातर. ह्यांच्या साहाय्याने काळाचे पाश मोजून मापून मी कापतो. . .कपडे रंगवीत असता आणि शिवीत असता रामनाम घेत असतो. . .माझी सुई सोन्याची आहे व धागा रुप्याचा आहे. " ह्यासारखी शिंप्याच्या धंद्यास अनुलक्षिणारी उपमा-रूपके त्यांच्या हिंदी लेखनात आढळतात.

मराठी रचनेत राजस आणि तामस प्रकारच्या गायनाचे वर्णन करताना नामदेवांनी म्हटले होते : ' राजसी तामसी जें गान । तोडी ताल मोडी मान ॥ १ ॥ ख्याल गाये कंपस्वर । रिझवी दात्याचें अंतर ॥ २ ॥ " (१८१७.१–२). हे उद्गार नामदेवांचे समकालीन अमीर खुश्रू ह्यांच्या (शके १२४७–हिजरी ७२५) ख्यालगायकीबद्दलचे आहेत. तेराव्या शतकात ख्यालगायकी प्रथमावस्थेत होती. त्यामुळे नामदेवांनी वरीलप्रमाणे अभिप्राय व्यक्त करणे साहजिक आहे. गोपाल नायक व दामोदर पंडित ह्यांच्याप्रमाणे नामदेवही संगीतज्ञ होते. हे लक्षात घेता शिखांच्या *आदिग्रंथा*तील नामदेवांच्या हिंदी रचनेच्या वाटिकेतील पुढील सतरा रागांची कल्पना येण्यास हरकत नसावी. आसावरी, कानडा, गुजरी, गोंड, गौडीचेती, टोडी, तिलंग, धनासरी, प्रभाती, बिलावलु, भैरऊ, मलार, मारु, माली, गउड, रामकली, सारंगु, सोरटी.

ह्याशिवाय नामदेवांचे जुने-नवे चरित्रकार ज्या अलौकिक घटनांचा निर्देश करतात त्या घटना, उदा., नामदेवाहाती देव दूध प्याल्याचे वर्णन, देवाने घर शाकारून दिल्याची हकीकत, देऊळ फिरल्याचा प्रसंग, अर्धमृत गाय जिवंत केल्याचा उल्लेख, हरिकीर्तनाच्या निमित्ताने उत्तर भारतात संचार करणारा नामदेव व महाराष्ट्रातील ज्ञानदेवसमकालीन नामदेव ह्यांच्या जीवनगाथेत प्रायशः एकाच प्रकारचे आढळतात. नामदेवांच्या हिंदी व मराठी ह्या दोन्ही रचनांवर नाथपंथानुमत योगधारांचा प्रभाव स्पष्ट आहे. ह्या प्रमाणावरून शिखांच्या *आदि-ग्रंथा*तील पदांचा लेखक नामदेवांच्या परंपरेतील नामदेव हे नाव धारण करणारा कोणी शिष्य अगर प्रशिष्य नसून तेराव्या शतकातील महाराष्ट्रातील आद्य नामदेव (इ. स. १२७०–१३५०) हेच शिखांच्या गुरुंना अभिप्रेत असलेले ह्या पदाचे लेखक होत.

नामदेवांच्या रचनेत आजच्या वाङ्मयाचे अनेक प्रवाह बीजरूपाने आढळतात. [ ⇨ ३. ]

**रचना : मु.** – १. नामदेवांची आणि त्यांच्या कुटुंबातील व समकालीन साधूंच्या अभंगांची गाथा; तुकाराम तात्या; मुंबई, १८९४. २. नामदेवांची गाथा; संशोधक : गोंधळेकर, रा. श्री. व गोडबोले, पां. वि.; द्विआ.; पुणे, १८९६. ३. नामदेवरायांची सार्थ गाथा; (संपा. सुबंध, प्र. सी.; खं. १ ते ६; पुणे, १९४६, १९५१, १९५४, १९५८, १९६०. ४. भक्त शिरोमणि नामदेव की नईजीवनी; नई पदावली; मोहनसिंग दिवाना; दिल्ली, १९४९. ५. श्रीनामदेव गाथा; मुंबई, १९७० (शासन प्रत). ६. श्रीनामदेव महाराज यांच्या अभंगांची गाथा (जनाबाई यांच्या अभंगांसह); आवटे, त्र्यं. ह.; पुणे, १९०८ (गाथा-पंचकापैकी गाथा २ री). ७. सकलसंतगाथा भा. १–२; संपा. जोशी, का. अ.; पुणे, १९६४. ८. संत नामदेव की हिंदी पदावली; मिश्र, भगीरथ व मौर्य, राज नारायण; पुणे, १९६४.

***चरित्र, चर्चा, अभ्यास :*** १. आजगांवकर, ज. र. : संतशिरोमणि नामदेव महाराज आणि त्यांचे समकालीन संत ; बडोदे, १९४१. २. इनामदार, हे. वि. : संत नामदेव ; पुणे, १९७०. ३. कविटकर, ग. वि. व इतर; श्रीनामदेव (चरित्र, काव्य आणि कार्य); मुंबई, १९७०. ४. चतुर्वेदी, परशुराम : उत्तरभारत की संत परंपरा : महाराष्ट्र संत नामदेव; पृ. १०६–१२३. ५. चौहान, दे. व्यं. : नामदेव-ज्ञानदेवांचे समकालीनत्व; युगवाणी, व. ३१, अ. ९–१०, डिसें. १९७५-जाने. १९७६; पृ. ३२१-३२६. ६. जोशी, शं. पु. : पंजाबातील नामदेव; मुंबई, १९४०. ७. देशपांडे, अ. ना. : प्रामवाइ., खं. १, उत्तरार्ध; पुणे, १९६२; पृ. १–११५. ८. पटवर्धन, बा. ब. : नामदेव : वुइल्सन फायलॉलॉजिकल लेक्चर्स, व्याख्यान चवथे; फर्ग्युसन कॉलेज मॅगझीन; सप्टें. १९१८. ९. परांजपे, भा. श्री. : नामदेव गाथ्यांत डोकावणारा बहिरंभट; नभामा., नोव्हें. १९७६, पृ. ५३-६४. १०. पेंडसे, शं. दा. : ज्ञानदेव आणि नामदेव; पुणे, १९६९. ११. पांगारकर, ल. रा. : मवाइ., खं. १; नाशिक, १९३२; पृ. ७९७–८११. १२. बाबा पुरणदास : जनमसाखी श्रीनामदेवजी, भा. १; १८८८. १३. महिपती : भक्तलीलामृत; मुंबई, १९०४. १४. महिपती : भक्तविजय; मुंबई, १९५०. १५. मुळे, भा. आ. : श्रीनामदेवचरित्र; प्रस्ता. व समी. : भाळुंकर, रं. ह. : पुणे, पुनर्मु. १९५२. १६. ढेरे, रा. चिं. व कामत, अ. प्र. : श्रीनामदेव – एक विजययात्रा; पुणे, १९७०. १७. संपा. : रेळेकर, नि. ना., इनामदार, हे. वि., मिरजकर, नि. ना. : श्रीनामदेवदर्शन, लेखसंग्रह; पुणे, १९७०.

**नामदेव–२ / ० विष्णुदास नामदेव–१** [अंदाजे इ. स. १५०० च्या पूर्वी] कवी. *अनादीपुराण* ग्रंथाचा कर्ता. ह्यांचे नाव, गाव, काळ, स्थळ इत्यादी माहिती ज्ञात नाही. ह्यांचा *अनादीपुराण* हा ग्रंथ इ. स. १५५८ साली गोव्यामध्ये लोकप्रिय होता व त्याचे वाचन प्रतिष्ठित हिंदूंच्या घरात होत असे. ह्या पुराणाचा निर्देश पाद्री पेद्रु द आल्मेद ह्याने इ. स. १५५८ च्या २६ डिसेंबरला जुने गोवे येथून जे पत्र धाडले त्यात केला आहे. ह्या ग्रंथात मंगेश, शांतादुर्गा, म्हाळसा, सप्तनाथ, कामाक्षी इत्यादी गोव्यांतील कित्येक दैवतांचा उल्लेख आढळतो, अशीही माहिती ह्या पाद्र्याने दिली आहे. पुराणाचा कर्ता नामदेव असल्याचे अनेक समकालीन पोर्तुगीज लेखांमध्ये म्हटले आहे. हा कवी गोव्यातील असावा असा अंदाज डॉ. पां. स. पिसुर्लेकर ह्यांनी व्यक्त केला आहे. परंतु *शुकाख्यान*कर्त्या विष्णुदासनाम्याहून हा कवी भिन्न असून ह्याचा काळ निराळा असावा असेही ते म्हणतात.

इ. स. च्या १७ व्या शतकाच्या सुरुवातीस विष्णुदास नाम्याच्या पौराणिक मराठी कथांचे कोकणी बोलीत व रोमन लिपीत अनुवाद झालेले आहेत. हे अनुवाद पोर्तुगालमधील ब्राग ग्रंथालयातील क्र. ७७१–७२–७३ अशा तीन हस्तलिखित पुस्तकांत संग्रहित केले आहेत. कोकणीत अनुवाद झालेल्यांपैकी *विदुराच्या कथे*चा लेखक वरील नामदेव असावा असे डॉ. पिसुर्लेकरांना वाटते. ह्या कथेतील एका अध्यायाचे मुद्रण नमुन्यादाखल त्यांनी केले आहे.

***चरित्र, चर्चा, अभ्यास :*** १. नायक, ना. भा. : नामदेव; गोमका.; रिवण (गोवा), १९६९; पृ. ७–८. २. पिसुर्लेकर, पां. स.; विष्णुदास नाम्याच्या पौराणिक कथांचा शिवपूर्वकालीन अनुवाद; मांडवी, जून-जुलै १९६९; पृ. २–६.

**० नामया** – पहा **नामदेव–१.**

**० नामयाचा गोंदा** – पहा **गोंदा.**

**० नामयाचा महादा** – पहा **महादा.**

**० नामयाचा विठा** – पहा **विठा–१.**

**० नामयाची जनी** – पहा **जनाबाई.**

**नामया शिवदास** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – शंकराची आरती; मआ., पृ. ३७९–८०. **अमु.** – १. बारा ज्योतिर्लिंग स्तोत्र; २. आरती, पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० नामया स्वामी** – पहा **नामदेव–१.**

**नामया हरि** [का. अनु.] कवी. ह्यांनी *द्रौपदीवस्त्रहरण* हे काव्य लिहिले आहे. ह्यांच्या रचनेवर मुक्तेश्वरांचा विशेष प्रभाव आहे. कवीने ग्रंथात राही-रुक्मिणीचा उल्लेख केला आहे. ह्यावरून तो विठ्ठलभक्त असावा असे वाटते.

**रचना : अमु.** – द्रौपदीवस्त्रहरण; प्र. ३, ओ. सं. १९०; तंसम. बा. २१२०८, हस्त. यादी, क्र. २.

***चरित्र, चर्चा, अभ्यास :*** जोशी, वसंत स. : नामयाहरि; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २२.

**नामा** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – सासुरवास; अध्यात्मपर पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ७७–७८.

**० नामा केशवाचा** – पहा **नामदेव–१.**

**नामानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नामा पाठक / ० नामा पाठक किंकर / ० पाठक नामा** [अंदाजे श. १४०० / इ. स. १४०८ चा सुमार] कवी. अश्वमेधावर रचना. पुणे जिल्ह्यातील केंदूर गावी (ता. खेड) पाठक घराण्यात कवीचा जन्म झाला. पितृपरंपरा : कान्हो पाठक > हरि पाठक > नामा पाठक अशी. कवीचे मूळ उपनाव राजपाठक. कान्हो पाठक हे देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण. केंदूर येथील पाठक घराण्याच विद्यमान वंशज रामचंद्र हरी ह्यांनी दिलेल्या माहितीप्रमाणे नागेशशिष्य कान्हो पाठक ह्यांचे नामा पाठक हे नातू.

परंपरेनुसार कान्हो पाठक हे वडवाळसिद्ध नागेशांचे (काळ अंदाजे श. १२९० / इ. स. १३६८–श. १३४० / इ. स.१४१८) शिष्य समजले जातात. अज्ञानसिद्धांना नागनाथांकडून श. १३१३ त गुरूपदेश झाल्याचा निर्देश आढळतो (अज्ञानसिद्धकृत *संकटहरणी*; मु.; ओ. क्र. ८). "जर कान्हो पाठक हा श. १३१३ त ह्यात असलेल्या वडवाळसिद्ध नागेशाचा शिष्य असेल तर, साधारणत: शके १४०० चा काल हा नामापाठकाचा समजावा लागतो." असे डॉ. व. वि. पारखे म्हणतात (भाइसंमंत्रै., व. ४३, अं. १, पृ. ७१).

कान्हो पाठक हे नागनाथशिष्य आहेत असा पाठक घराण्यातील पूर्वापार चालत आलेल्या एका अभंगातून निर्देश सापडतो. तो चरण असा : 'कान्हो पाठक आनंदला। सद्गुरु नागेश भेटला।' अर्थात हे नागनाथशिष्य मानले तर ज्ञानेश्वरसमकालीन जे एक कान्हो पाठक होते असा समज आहे ते हे असू शकणार नाहीत. ह्यावरून कान्होंचे नातू नामा पाठक हे ज्ञानेश्वरोत्तरकालीन ठरतात. श्रीएकनाथांच्या एका संतमालिकापर अभंगात नामा पाठकांचा उल्लेख येतो. म्हणून परंपरा ह्यांना एकनाथपूर्वकालीन मानते. पण ही संतमालिका एकनाथांनी रचलेली नसावी असे मत डॉ. पारखे व नामा पाठकाच्या काव्याचे संपादक ज. शा. देशपांडे ह्यांनी व्यक्त केले आहे.

नामा पाठकांच्या नावावरील *सीतास्वयंवर* काव्याचे हस्तलिखित नांदेड जिल्ह्यात (मराठवाडा) वि. वि. कानोले ह्यांस उपलब्ध झाले आहे. काव्य वाचल्यानंतर एकनाथांच्या *भावार्थरामायणा*तील सीतास्वयंवर कथाभागाशी व त्यातील कल्पनांशी ह्या नामा पाठकाच्या काव्याचे विलक्षण साम्य कानोले ह्यांना आढळते. डॉ. पारखे ह्यांनी नामा पाठकांच्या *द्रौपदीवस्त्रहरणाख्याना*वर जो लेख लिहिला आहे त्यात मुक्तेश्वरांच्या काव्यातील कल्पनांशी नामा पाठकाच्या काव्यातील कल्पना कशा जुळतात हे सोदाहरण दाखवून दिले आहे. हा मुद्दा विचारात घेऊन नामा पाठक नाथसमकालीन असावेत व नाथांचा *भावार्थरामायण* ग्रंथ त्यांच्या पाहण्यात असावा असे मत कानोले व्यक्त करतात. नामा पाठकांच्या चरित्रासंबंधात जोपर्यंत खात्रीलायक पुरावा सापडत नाही तोपर्यंत अशा प्रकारच्या अनुमानांवर विसंबून राहावे लागेल, असेही ते म्हणतात.

नामा पाठकांच्या उपलब्ध कृतीत *अश्वमेध* हा एकच काय तो विस्तृत ग्रंथ आहे. इतर सर्व रचना स्फुट स्वरूपाची आहे. तंजावर सरस्वती महाल आणि समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील हस्तलिखित बाडांतून उपलब्ध झालेल्या नामा पाठकांच्या कवितेपैकी *अश्वमेध ग्रंथ* व त्यांची उपलब्ध सर्व स्फुट *काव्ये* ज. शा. देशपांडे ह्यांनी संपादित केली आहेत (पहा : *प्राचीन मराठी कविता*, खं. १, २ व ७).

*अश्वमेध* ग्रंथाच्या हस्तलिखिताच्या चार पूर्ण प्रती उपलब्ध असून अनेक त्रुटित प्रती जागोजागी आढळतात. पूर्ण प्रती अनुक्रमे, तंजावर प्रत (ओ. ४६००), धुळे प्रत (ओ. ६७००), उदापूरचे कुळकर्णी ह्यांजकडील प्रत (ओ. १०,०००) व म. रा. जोशी प्रत (ओ.१५,०००), नागपूर, अशा आहेत. ओवीसंख्या पाहता ह्या प्रतींमध्ये एकवाक्यता आढळून येत नाही. ह्यासंबंधात ३५ व्या प्रसंगात नामा पाठकांनी स्वत:च केलेले निवेदन महत्त्वाचे ठरते. त्या ओव्या अशा : नामा पाठक सांगे श्रोतयासि । अश्वमेधु कथिला घोरा प्रयासी । मज वास्तव्य दक्षिणेसी । तिकडे संस्कृत मना आणिलें ॥ १९२ ॥ तेथें कथन थोडेंचि सांपडले । मग पश्चिमेसी येणे केलें । द्वारकातीर्थ केलें । तेथें राहिलों वरुषे पांच ॥ १९३ ॥ तेथें संस्कृत मनासी आणीलें। त्यावरुन मऱ्हाटें कथीले। पूर्वार्धं उत्तरार्ध यकत्र केलें। तें देशी साधीले अर्धमर्ध ॥ १९४ ॥ तेथुनी उत्तरेसी। अवघ्या केलिया तीर्थविधीसी। मग राहिलो भागिरथीसी। वरुषें दहापर्यंत ॥ १९५ ॥ तें देसी घातलें ठाउकें। मेळविलें संस्कृतातें। कथिले प्राकृतातें। व्यासवचनीचें ॥ १९६ ॥ तेथें अश्वमेधु ग्रंथ साधीला। प्राकृत कथीला। पूर्ण ग्रंथ केला। मग वाचिला श्रोतयापासी ॥ १९७ ॥ मग गेलो पूर्वेसी। तेथील केले तीर्थासी। राहिलो ते देसी। वरुषे तीनपर्यंत ॥ १९८ ॥ तेथें संस्कृत पाहिलें। थोडेंच सांपडलें। तेही कथिलें। मेळविलें अश्वमेधासी ॥ १९९ ॥ यैसा ग्रंथ पूर्ण केला। स्रोती परिसीला। अडपडा ग्रंथ वाचीला। स्राप असे व्यासाचा ॥ २०५ ॥ विस वर्षे तीर्थ विधी। तेथे अश्वमेध नेला सिद्धी। संस्कृतावरुन व्यासबुधी। प्राकृत सिद्धी पाववीलें ॥ २०१ ॥ (ओ. १९२–२०१; भाइसंम., त्रु. पो., क्र. १५/२२८). ह्याच ठिकाणी तीर्थयात्रेच्या निमित्ताने देशाच्या दक्षिण, पश्चिम, उत्तर व पूर्व भागांत भ्रमण केल्याचेही नामा पाठकांनी सांगितले आहे (ओ. २०१). ह्या ओव्यांत *अश्वमेधा*च्या लेखकानेच लिहिलेल्या ग्रंथाच्या चार प्रती होत्या असे दिसून येते. नामा पाठकांच्या *दुंदुभी आख्याना*तही अशाच प्रकारची माहिती आढळते (ओ. ८७). डॉ. पारखे ह्यांच्या मते " नामा पाठकाचा अश्वमेध हा जैमिनी अश्वमेध किंवा श्रीव्यास अश्वमेध पर्व यांचा केवळ अनुवाद नसून अश्वमेधावर संस्कृत व तेलंगी भाषेत जी रचना केली ती मिळवून तयार केलेला संपादित ग्रंथ होय." (पारखे, डॉ. व. वि. : श्रीमद् व्यास महाभारताचे मराठी आविष्कार; अप्रकाशित प्रबंध; मुंबई, १९६३; पृ. ८०). मधुकर कवीच्या *कथाकल्पतरू*च्या (र. श. १५४५ / इ. स. १६२३) १४ व्या स्तबकातील काही ओव्यांत जी माहिती दिली आहे, त्यामध्ये पारमाचल प्रांतातील तेलंगी लिपीतील संस्कृत *अश्वमेध* ग्रंथ नामा पाठकांनी अभ्यासला असे मधुकर कवी सांगतो (१४.१.१९–२३) स्वत: नामा पाठकांनीही अशीच माहिती दिली आहे (*अश्वमेध* : ओ. २८७–२८९, भाइसंम., २५ / २२८ पोथी). ह्यावरून तीर्थयात्रेच्या निमित्ताने ठिकठिकाणी उपलब्ध झालेल्या *अश्वमेधा*च्या प्रतींवरून आपला ग्रंथ नामा पाठकांनी सिद्ध केला आहे असे दिसते.

ज. शा. देशपांडे ह्यांनी छापलेल्या *अश्वमेध* ग्रंथात वर निर्दिष्ट केलेल्या ओव्या नाहीत. पण ज. शा. देशपांडे ह्यांच्याजवळील हस्तलिखित प्रतीत तसेच म. रा. जोशी प्रतीतही ह्या ओव्या आढळतात.

तंजावर येथील पूर्ण प्रतीवरून ज. शा. देशपांडे ह्यांनी नामा पाठकांच्या *अश्वमेधा*ची संहिता तयार केली आहे (प्रामक., खं. ७, मुंबई, १९७३) त्याचे ३९ प्रसंग व ४७०९ ओव्या आहेत. मूळ संस्कृतातील *अश्वमेध* ग्रंथ प्राचीन असून *अश्वमेधा*वरील मराठी रचनेची सुरुवात नामा पाठकांपासून झालेली आहे. *अश्वमेध*कार श्रीधर, *चंद्रहास्यकथा*कार रामसुतात्मज विश्वनाथ ह्यांच्यासमोर नामा पाठकांची रचना होती असे त्यांतील साम्यस्थळांवरून म्हणता येते. १७ व्या शतकातल्या विप्रनारायणाच्या *अश्वमेधा*तही नामा पाठकांच्या अनेक ओव्यांची नक्कल केलेली आढळते. *कथाकल्पतरु*कार मधुकर कवीने आपला ग्रंथ रचण्यापूर्वी *अश्वमेध*प्रबंध मोठ्या प्रयासाने मिळविल्याचे म्हटले आहे. एकंदरीत नामा पाठकांचा *अश्वमेध* हा लोकप्रिय ग्रंथ होता असे दिसते.

मूळ संस्कृत ग्रंथाशी मात्र हा *अश्वमेध* जुळत नाही. कारण मुळाचा तो अनुवाद नाही. ह्याचे एक कारण असे सांगता येते की, *अश्वमेध पर्वा*तील कथा जेथे जेथे आढळल्या असे *भारत*, *जैमिनी अश्वमेध* आणि अठरा पुराणे ह्यांचा आधार आपला ग्रंथ सजविताना कवीने घेतला आहे. त्यामुळे ही भिन्नता आली. कवीचा पिंड आख्यानकाराचा असल्याने ह्या ग्रंथातील हंसध्वज, बभ्रुवाहन, रामकथांतील रामाश्वमेधाचा व लवकुशांचे राम-लक्ष्मण-भरत ह्यांच्याबरोबर जे युद्ध झाले तो कथाभाग, मयूरध्वजकथा, सिंहध्वजकथा, चंद्रहासकथा, वीरवर्मा, अभिराहो इत्यादी आख्यानांच्या पसाऱ्यात कवी रंगलेला दिसतो. किंबहुना कविप्रकृतीला पेलणारी आणि मानवणारी अशी *अश्वमेध*कथा निवडण्यात कवीची योजकता दिसून येते. संपूर्ण *अश्वमेधा*ची कथा वीररसाविष्कारी आहे. कवीच्या ओघवती वाणीने व सहजसुंदर रचनेमुळे ह्या

वीररसाला उठाव आणला आहे. [ ⇨ ३. ]

कवीच्या स्फुट रचनेत आख्यानेच अधिक आहेत. पदरचना फारशी नाही. चंद्रहासकथा *अश्वमेध* ग्रंथात अंतर्भूत असली तरी तिची स्वतंत्र हस्तलिखिते जागोजागी आढळतात. *हनुमंत-गरुडाख्यान* हे काव्य धुळे प्रतीत विष्णुदास नाम्याच्या नावावर आढळते पण ते ह्या कवीचेच आहे. *भरतभेट* हे भाषेच्या दृष्टीने बरेचसे जुन्या स्वरूपात राहिलेले एकमेव काव्य होय. हे प्रकरण युद्धकांडाचा एक भाग होता असे दिसते (तंसम., बा. १०१२). *द्रौपदीचे वीरडे, वस्त्रहरण* इत्यादी काव्ये *महाभारता*-च्या प्रकरणांपैकी काही भाग असावेत. 'काव्ये नामा पाठक' हे प्रकरणही एखाद्या आख्यानाचा भाग आहे असे वाटते. ह्यांच्या सर्वच कवितेचे थोडेफार अर्वाचीनीकरण झाल्यासारखे वाटते. अलिकडे वि. वि. कानोले ह्यांना नामापाठकांचे *सीतास्वयंवर* हे काव्य सापडले आहे. ह्याचे १० प्रसंग व ९४० ओव्या असून प्रत्येक प्रसंगाच्या शेवटी ग्रंथकर्त्याचा उल्लेख येतो. काव्याचा प्रारंभ सीतेच्या जन्मकथेपासून व शेवट श्रीरामजानकीविवाहानंतर अयोध्याप्रवेशाने होतो. एकनाथांच्या *भावार्थरामायणा*च्या बालकांडातील सीतास्वयंवराची कथा व हे काव्य ह्यांत कल्पनांचे बरेच साम्य आढळते. नामा पाठकांचे *दुंदुभी आख्यान*ही उपलब्ध आहे. भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे, राजवाडे संशोधन मंदिर, धुळे, व सरकारी वाचनालय, औंध येथे *अश्वमेधा*च्या ज्या त्रुटित प्रती आढळतात त्यांत हे आख्यान आहे.

*द्रौपदीवस्त्रहरणाख्यान* ह्या काव्यातील बराचसा भाग प्रामुख्याने श्रीकृष्णस्तवनपर आहे. श्रीकृष्णमूर्तीचे सौंदर्य, त्याच्या योगनिद्रेचे वर्णन, त्याची भक्तवत्सलता, अशी कृष्णाची वेगवेगळी रूपे कवी वर्णन करतो. कवीच्या ह्या आख्यानाची मुक्तेश्वरांवर छाप पडली असावी. नामा पाठकांची स्फुट काव्ये रसाळ आहेत. त्यातल्या त्यात *चंद्रहास्याख्यान* बरेच लोकप्रिय झलेले दिसते.

साधी निरलंकृत भाषा आणि ओघवती व चैतन्यपूर्ण रचना हा नामापाठकांच्या काव्याचा विशेष ठरतो. उदा., *भरतभेट* काव्याची सुरुवात पाहावी : " मंडपीं सभा घनवटली। अर्धांगी जानकी सोभली। देवी आनंदे पुस्पवृष्ट केली। जयेजयेकार प्रवर्तला॥ २॥ वीमानीं दावीती सुरवर। आनंदे नाचति वानर। प्रेमे करूनि देती भुभुकार। आनंदे अंबर गर्जत असे॥ ३॥ ऐसा बहुत उछावो जाला " . . . इत्यादी. अशा तऱ्हेची चित्रदर्शी रचना कवी सहजतेने करतो. कवीने केलेली प्रसंगाला अनुरूप अशी उपमा-उत्प्रेक्षा-वर्णने देखील हृद्य आणि आकर्षक आहेत. कृष्णमूर्तीचे वर्णन करताना कवी म्हणतो : " तनु सावळी मनोहर॥ चरणी वांकी आनी तोडर॥ चतुर्वेद श्रुतीसर॥ वाकी रसे गर्जती॥ २८१॥ जैसे सुनीळा ब्रह्म॥ ते नेत्रद्वय शुभ्रशाम॥ तेथे वींबले हे सकलव्योम॥ चंद्र सुर्य नामे प्रकासे॥ २८९॥ " (*द्रौपदीवस्त्रहरणाख्यान*).

भाषिक दृष्टचा विचार केला तर ह्यांच्या रचनेत यादवकालीन भाषेतले बरेचसे वाक्प्रचार व शब्दप्रयोग आढळतात. उदा., बीजे करणे, राऊळगण, पाळाणीले, कुडे रचणे, धाविनले, देषला (देखला) इत्यादी. ही भाषा एकनाथपूर्वकाळातली आहे असे स्पष्ट दिसते. *अश्वमेधा*वर रचना करणाऱ्या इतर कवींचे स्फूर्तिस्थान म्हणून नामा माठकांचाच निर्देश करावा लागतो.

**रचना : मु.** – १. अश्वमेध; प्रसंग ३९; ओ. सं. ४७०९; प्रामक., खं. ७. २. काव्ये नामा पाठक; ओ. २८. ३. चंद्रहास्यकथा; ओ. ५१८; प्रामक., खं. १. ४. चंद्रहास्याख्यान; ओ. १९३. ५. चेंडुफळी; ओ. ३१. ६. द्रौपदीचें बीरडें; ओ. ३७. ७. नामरत्नमाला; ओ. १११. ८. भरतभेट; ओ. ३३५. ९. वस्त्रहरण; ओ. ३१३. १०. वस्त्रहरण; पदे, ओ. ६२. ११. सुदामचरित्र; ओ. ९७. १२. हनुमंत गरुड आख्यान; ओ. ३५६. १३. स्फुट पदे : नामा पाठकाचे स्फुट काव्य : प्रामक., खं. २; संपा. देशपांडे, ज. शा. : प्रामक. खं., १, २, ७; मुंबई, १९६२, १९६४, १९७३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : नामापाठक; प्रामसंक., खं. १; १९५७; पृ. २५१–२५२. २. आवळीकर, पंडित : एक चंद्रहासाख्यान; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. ४७–५७. ३. कानोले, वि. वि. : नामा पाठकाचे अज्ञात व रसाळ काव्य : सीतास्वयंवर; नभामा., डिसें. १९६५; पृ. १७–२२. ४. कुळकर्णी, पां. ना. : नामा पाठकाचे अश्वमेधपर्व; संशोधन-धारा, पुणे, १९६७; पृ. ६२–७७. ५. जोशी, वसंत स. : भरतभेटी : नामा पाठक; नभामा., जुलै १९७३; पृ. ५३–५५. ६. देशपांडे, ज. शा. : नामा पाठकांचा अश्वमेध; मसंप., व. १३, अं. ३, एप्रि. १९६६; पृ. ४२–४८. ७. देशपांडे, ज. शा. : नामा पाठकाचे काव्य; मसाप., जाने. १९६२; पृ. ४२. ८. पारखे, वसंत वि. : नामा पाठककृत द्रौपदीवस्त्रहरणाख्यान; भाइसंमत्रै., व. ४३, अं. १–४, श. १८८७; पृ. ७१–८८. ९. पोतदार, द. वा. : एका मराठी अश्वमेधाची काही जीर्ण पाने; भाइसंमत्रै., व. १७, अं. ३; पृ. ९५–९८.

**नामा यशवंत** [अंदाजे श. १५५० / इ. स. १६२८ – श. १६१० / इ. स. १६८८] कवी. सोलापूर जिल्ह्यातील करमाळे गावी राहणारे. हे विठ्ठलभक्त असून वारकरी होते. विठ्ठलाकडे आकर्षित झालेल्या भवलाली ह्या मुसलमान संतांच्या हे विशेष लोभातले होते. भवलाली हे बेदरच्या परिसरातील, तर नामा यशवंत हे सोलापूर जिल्ह्यातील. ते विठ्ठलोपासनेबरोबर देवीचीही उपासना करीत. ह्यांच्या काव्यात बहामनी सुलतानाचा उल्लेख येतो; आणि त्याच काळात ज्ञानदेव व नामदेव ह्यांच्यासंबंधी ज्या दंतकथा निर्माण झाल्या होत्या त्यांचाही उल्लेख येतो. ज्ञानदेवसमकालीन नामदेवांचे हे भक्त होते.

**रचना : मु.** – १. नामदेवाचे लग्न; अ. १; ओ. सं. १२४. २. अभंग; प्रा. म. रा. जोशी ह्यांच्या संग्रहात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : नामदेव आणि नामा यशवंत; नामदेव प्रदीप, मे व जून १९७०; पृ. ११, १२.

**० नामा विष्णुदास** – पहा **विष्णुदास नामा.**

**नायकसनतिदास** / **० नाइक सनतिवास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० नायकस्वामी** – पहा **पूर्णप्रकाशानंदनाथ.**

**नारा–१** / **० नारायण–१** / **० नारोबा** [का. अनु.] कवी. संत नामदेवांच्या चार मुलांपैकी हा एक. ज्ञानदेवांच्या समाधीच्या काली नामदेवांची चारही मुले आपल्या वडिलांबरोबर आळंदीस आली होती, असा उल्लेख नामदेवांच्या अभंगात आढळतो.

ह्यांनी रचलेले काही अभंग (१३) *नामदेव गाथे*त समाविष्ट झालेले आहेत (*श्रीनामदेवगाथा*, इ. स. १९७०; पृ. ८८५–८८). हे 'नामयाचा नारा' असा आपला उल्लेख अभंगाच्या शेवटी करतात.

**नारा–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – 'व्यापार' – अध्यात्मपर; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ७२.

**० नारायण–१** – पहा **नारा–१.**

**नारायण–२** [का. अनु.] पदकार. हा कवी रामभक्त असून कल्याणस्वामींचा प्रशिष्य जो गदाधर त्याचा मुलगा असावा असे रा. ग. हर्षे लिहितात. ह्यांचा मठ जोगाईच्या आंब्यास आहे. ' कैसी गत माझी होयिल रामा ' हे ह्यांचे पद हर्ष्यांनी उद्धृत केले आहे ("कांही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांचीं पदें"; रा. ग. हर्षे; भाइसंमत्रै., व. २६, अं. ४, १९४६; पृ. ३९–४०). ह्यांनी रचलेली सद्गुरूची व रामाची अशा दोन आरत्या मुद्रित (मआ., पृ. ३९९, ३७४). कवीची

अमुद्रित पदरचना समर्थवाग्देवतामंदिर संग्रह, धुळे येथे सापडते.

**नारायण–३** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, अखेर] कवी. ह्याने *कबीरकथा* व *शिवमोहिनी* ही दोन आख्याने आर्यागीती वृत्तात रचली आहेत. हा कवी आपल्या काव्यात मोरोपंतांचे अनुकरण कल्पना व शब्दांसहित करतो. तसेच इतर ओजस्वी कवींच्या काव्यांतील कल्पना व शब्दांचेही अनुकरण करतो. ह्यांचे *शिवमोहिनी* हे प्रकरण सरस उतरले आहे. ह्या कवीचा विशेष हा की मोरोपंतांचे अनुकरण करूनही त्यांचा कृतज्ञतेने तो कोठेही उल्लेख करीत नाही (मसा., आ. ५, पृ. ५२५–२६).

**रचना : मु.** – १. कबीरकथा; ग्रं. सं. १००; अकलकामा., भा. ३; संपा. ओक, वा. दा.; पृ. १३३–१३९. २. शिवमोहिन्याख्यान; ग्रं. सं. ३७; अकलकामा., भा. ४; संपा. केळकर, ना. चिं. व ओक, दा. के.; मुंबई, १९०३; पृ. २३३–२३६.

**नारायण–४** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – गजेंद्रमोक्ष; श्लो. २००; ग्रु. पो.; तंसम. बा. ९५४, हस्त. यादी, क्र. १.

**नारायण–५** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] कवी. गुरुपरंपरा : सिद्धेश्वर > नारायण > केशव. ह्यांची एक *दामाजीची रसद* आहे. ह्या काव्यात हे आपणास 'सिद्धेश्वरनंदन नारायण पंडित' असे म्हणवितात (मसा., आ. ५, पृ. ४१४).

**नारायण–६** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – मदनविनोद; र. श. १५६८, फाल्गुन / इ. स. १६४६; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ५७.

**नारायण–७** [का. अनु.] ज्योतिर्विद. ह्याने *मुहूर्तमार्तंड* ग्रंथावर मराठीत सार्थ टीका लिहिली आहे. प्रस्तुत टीकेच्या दोन त्रुटित प्रती भारत इतिहास संशोधक मंडळात आहेत (हस्त. सू., पृ. २२२–२२३). त्यांपैकी एका प्रतीचा काल 'श. १७०५ (इ. स. १७८३) शोभकृत [शोभन ?] आषाढ व. १२' असा दिलेला आहे. नारायणांच्याच *मुहूर्तमार्तंड सटीक* ह्या संस्कृत ग्रंथाची (र. श. १४९३) काही हस्तलिखितेही भारत इतिहास मंडळाकडे आहेत. ह्यावरून लेखकाचा काल श. १४९३ (इ. स. १५७१) पूर्वीचा असावा असे म्हणता येते. *मुहूर्तमार्तंड* ह्या संस्कृत ग्रंथाचे एक भाषान्तर महादेवशास्त्री जोशी ह्यांनी केलेले आढळते (मु. : शिळा., रत्नागिरी, १८५७). त्याचा कर्ता नारायण अनंत हरी हा असून र. श. १५७१ दिला आहे. तो व हा नारायण हे दोघे एकच की भिन्न, ते समजण्यास साधन नाही (*दोलामुद्रिते*, मुंबई, १९६१; पृ. ६५–६६).

**नारायण–८** [का. अनु.] कवी. *गजेंद्रमोक्ष* काव्याचा कर्ता. हे काव्य *महाराष्ट्र कवि* मासिकामधून मुद्रित झाले आहे. श्लोकबद्ध *गजेंद्रमोक्ष* रचणाऱ्या नारायणापेक्षा हा कवी वेगळा आहे. प्रस्तुत काव्य कीर्तनकारांसाठी लिहिले आहे असे स्पष्टपणे दिसते. पदे, चूर्णिका व शेवटची आरती मिळून ग्रंथसंख्या ११० होते. अनेक पदांतून 'नारायणविभु' असा कवीने स्वतःचा उल्लेख केला आहे.

गजेंद्राने विष्णूचा केलेला धावा म्हणजे पर्यायाने भवसागरातून तरून जाण्यासाठी कवीने केलेली परमेश्वराची आळवणी होय. 'देवा पावें वेगीं मजला ॥ धृ. ॥ तारक तूं मायबाप म्हणोनी शरण आलो तुजला ॥ १ ॥', 'रामनाम जप रे सखया', 'हरिभजनी मन लावा केवळ' किंवा 'श्रीवर तो पाहिला आजि डोळां' अशी विविध चालीत रचलेली अनुप्रासप्रचुर मधुर पदे, ह्या आख्यानाचे वैशिष्ट्य आहेत.

**रचना : अमु.** – गजेंद्रमोक्ष; ग्रं. सं. ११०; संपा. भावे, वि. ल. : महा. कवि, क्र. ३२–३३–३४, श. १८२८; पृ. २६–४३.

**नारायण–९** [का. अनु.] पदकार. कवी देवनाथांच्या ग्वाल्हेरकडील परंपरेतील. परंपरा : देवनाथ > वामननाथ > नारायण. ह्यांची स्फुट कविता व छोटेखानी पद्यग्रंथ उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे, मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४३).

**नारायण–१०** [का. अनु.] कवी. मुकुंदराजांच्या मुडलगी (कर्नाटक) परंपरेतील. हे रंगबोधांचे शिष्य असावेत. शिवबोधांच्या *निर्याणपत्रिके*त ज्या नारायणांचा उल्लेख आहे ते हेच असतील तर ते दुसऱ्या रंगबोधांचे शिष्य ठरतील.

ह्यांच्या २ आरत्या *मुडलगीचे स्वामी* ह्या ग्रंथात डॉ. पंडित आवळीकर ह्यांनी छापल्या आहेत (पृ. ११५–११६). त्यांतील एक आरती रंगबोधांची व दुसरी स्वात्मानुभव व्यक्त करणारी आहे. त्यांतही रंगबोधांविषयीचा आत्मभाव व्यक्त झाला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : नारायण : मुडलगीचे स्वामी; पुणे–कर्नाटक, १९७१; पृ. ४७–४८.

**नारायण–११** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अमृतसार; ओ. सं. ४२; मसंम., हवना., पृ. ३६.

**नारायण–१२** [का. अनु.] आरतीकार. कृष्णाची व हरितालिकेची '*हर अर्धांगी वससी*' अशा दोन आरत्या मुद्रित (मआ., पृ. ३९१, ४४४).

**नारायण–१३** [का. अनु.] शाहीर. ह्यांनी रचलेले ख्याल, टप्पे, ठुमऱ्या, छक्कड उपलब्ध आहेत. सर्व रचना शृंगाररसपूर्ण आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४४).

**नारायणकेसरी / ० नारायणनाथ** [अंदाजे इ. स. १७००–१७७५] भागवत-टीकाकार कवी. हे मूळचे बीडकडील उंब्रेड गावचे. वाजसनीयशाखी यजुर्वेदी ब्राह्मण. उपनाव हेलवडे. ह्यांची पितृपरंपरा : सोमेश्वर > त्रिंबक > हरि नारायण, अशी. नारायणनाथ हे जरी मूळ उंब्रेड गावचे असले तरी त्यांचा निवास मात्र देऊळगाव राजा (ता. चिखली, जि. बुलढाणा) येथे असे. नारायण हे केसरीनाथांचे शिष्य आणि शिवदीननाथांचे गुरुबंधू होत. ह्यांची गुरुपरंपरा : आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ > गैनीनाथ > ज्ञाननाथ > सत्यामलनाथ > गैबीनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ > नारायणनाथ अशी. नारायणांनी आपल्या ग्रंथात गुरुकृपेचा वारंवार गौरव केला आहे. उदा., "धरिता दृढ केसरी चरण । मुक्तिनिधान पावले ।' (९०.२६३).

ह्यांनी *भागवता*च्या *दशम स्कंधा*वर टीका रचिली आहे. हा ग्रंथ उंब्रेडजवळील वांगीबुद्रुक ह्या गावी काशी पाटलाच्या घरी रचला. 'नारायणांकित' हरिहरेश्वरचे विश्वनाथ बहिरंभट मेहेंदळे ह्यांच्या आग्रहाखातर प्रस्तुत ग्रंथाची ह्यांनी रचना केली. त्याच्या रचनेपैकी *संतमाळे*च्या ९२ ते ११९ एवढ्या २८ ओव्याच गो. का. चांदोरकरांना उपलब्ध झाल्या. ह्या ग्रंथाची एक प्रत मराठी संशोधन मंडळ, मुंबई ह्यांच्या हस्तलिखितसंग्रहात उपलब्ध आहे. ह्यांची काही हिंदी रचनाही सापडते.

ह्यांच्या *भागवत-दशमा*वरील टीकेच्या दोन त्रुटित पोथ्या उपलब्ध असून त्यांपैकी एक रा. चिं. ढेरे ह्यांच्याजवळ व दुसरी भारत इतिहास संशोधक मंडळात आहे. नारायणनाथांनी *भागवत दशमस्कंधा*-वरील टीकेला *बल्लरसाळ कृष्णकथा* असे म्हटले आहे. ती त्यांनी तन्मयतेने आळविली आहे. श्रीकृष्णाच्या गुणसंकीर्तनाने आंतरिक भावनेचा परिपोष व्हावा आणि 'जन्मांतरीची खेप' चुकावी असा हेतू धरून त्यांनी हे काव्य लिहिले आहे.

ह्या कथेत एकनाथी पद्धतीची आध्यात्मिक रूपके आहेत, प्रत्ययकारी वर्णन आहे, परमार्थविचार आहे. 'नरदेहासारखें गोमटें । न दिसे त्रिभुवनीं कांहीं मोठें ।' अशा शब्दांत परमार्थसाधक होणाऱ्या नरदेहाचे माहात्म्य नारायणकेसरींनी गायिले आहे. त्यांनी अध्यात्माची बैठक काव्यात कोठेही ढळू दिलेली नाही. ते म्हणतात : 'भागवत गंगेत करिता स्नान । ते जीवन्मुक्त होती जाण ।' अनेक प्रकारची परमार्थ-

साधने व विविध पारमार्थिक विषयांवर आपले अनुभवसंपन्न विचार त्यांनी व्यक्त केले आहेत. प्रसंगपरत्वे देवतांची वर्णने करताना, विवाहसोहळ्याचे चित्र रंगविताना व इतरही अनेक ठिकाणी त्या विशिष्ट काळाचे प्रतिबिंब पडल्याने कालविपर्यासाचा दोष ह्यांच्या कवितेत निर्माण झाला आहे. ह्या कवीच्या रचनेवर अनेक ठिकाणी बीड येथील 'जनी जनार्दन' व त्यांचे शिष्य एकनाथ (बीडकर) ह्यांच्या कृष्णकाव्यांतील कल्पनांचा प्रभाव जाणवतो. उदा., दह्यादुधाची चोरी करण्यास निघालेल्या कृष्णाचे वर्णन *चोरिकलीलेतील* (कर्ता एकनाथ) वर्णनाबरहुकूम आहे. नारायणकेसरीनाथांची भाषा प्रासादिक आहे.

**रचना : अमु.** – १. भागवत दशम स्कंध; दोन त्रुटित पोथ्यांतील उपलब्ध भागाची; ओ. सं. ३०३१; र. का. : श. १६६९ (इ. स. १७४७), प्रभवनामसंवत्सर, वैशाख शु. १०, गुरुवार; र. स्थ. : वांगीबुद्रुक. २. संतमाळ; र. का. : श. १६५७ (इ. स. १७३५) राक्षसनामसंवत्सर, आषाढ शु. ११; र. स्थ. : प्रतिष्ठान क्षेत्र; मंसम. प्रत, ओ. ११९, मधली काही पाने कोरी; हवना., पृ. ३. ३. हिंदी पदे; ढेरे, रा. चिं. ह्यांचा ग्रंथसंग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : नाथ-नारायणांची संतमाळ; भाइसमंइति., श. १८३७, पृ. १७४; २. ढेरे, रा. चिं. : नारायण केसरीची ब्रह्मरसाळ कृष्णकथा; विविधा., पुणे, १९६७; पृ. १६७–१७९.

**नारायण खंडेराव डबीर** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, प्रथम पाद] बखरकार. *आंगरे यांची हकिगत* नारायण खंडेराव डबीर ह्यांनी लिहिली असा ह्या हकीकतीच्या पुरवणीत उल्लेख येतो. ह्या बखरीचा सध्याच्या स्वरूपातील शेवट जेथे झाला आहे त्या ठिकाणी ही पुरवणी जोडली असून पुरवणीअगोदर पुढीलप्रमाणे टीप आहे : "वरील बखरी-पुढील हकिगत आंगरे ह्यांचे कारभारी नारायण खंडेराव डबीर यांनी इंग्रज सरकारास अर्ज करण्याचा एक मसुदा केला आहे, त्यावरून काही समजण्यासारखी असल्यामुळे ती येथे देतो." ह्यावरून, वंशपरंपरेने आंग्रे ह्यांचे चाकर असलेले नारायण खंडेराव डबीर ह्यांनीच ही बखर केली, असे ती प्रथम प्रसिद्ध करणाऱ्या *इतिहाससंग्रह*कारांना वाटते. बखरीचा पहिला बंद गहाळ झाला आहे. तिचा लेखनकाल श. १७४० / इ. स. १८१८ असावा. हिचे नामकरणही संपादकांनीच केले आहे.

ही बखर अनेक दृष्टींनी बोधपर असल्यामुळे ती *इतिहाससंग्रहा*द्वारे प्रसिद्ध करण्यात येत आहे, असे म्हटले आहे. "कान्होजी आंगरे छत्रपति शाहूमहाराज यांजकडे सातारियास जाऊन 'सरखेल' असा मरातब घेऊन कुलाबियास आले" येथपासूनची हकीकत ह्यात आहे. आंगरे आणि पेशवे ह्यांच्या संबंधाची माहिती ह्यातून समजते. थोरले बाजीराव, नानासाहेब, भाऊसाहेबाचा तोतया, दादासाहेब, नाना फडणीस, सवाई माधवराव अशा अनेकांची हकीकत ह्या बखरीत येत असल्याने ती अतिशय धावती झाली आहे. पेशवाईच्या अखेरीपर्यंतची हकीकत अवघ्या ३२ पृष्ठांत येथे आली आहे. ह्या 'हकीकती'ला वाङ्मयीन महत्त्वापेक्षा ऐतिहासिक महत्त्व अधिक आहे.

**रचना : मु.** – आंगरे यांची हकिगत; र. का. : श. १७४०; संपा. पारसनीस, द. ब. : इतिहाससंग्रह; सातारा, जुलै, १९०९, पु. १, अं. १२, पृ. १–१६; ऑग. १९०९, पु. २, अं. १, पृ. १७–३२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढबू, दा. गो. : कुलाबाकर आंग्रे सरखेल; अलिबाग, १९३९.

**० नारायणतीर्थ** – पहा **हंसराजस्वामी.**

**नारायणदास** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – मारुतीची व विठ्ठलाची आरती; मआ., पृ. ४०४, ३८१.

**० नारायणनाथ** – पहा **नारायण केसरी.**

**० नारायण पंडित बहाळे** – पहा **नारायणव्यास.**

**नारायण बाहेकर** [का. अनु.] कवी. कल्याणस्वामींचे शिष्य. ह्यांची काही स्फुटरचना उपलब्ध आहे. (संपा. ग. शं. देव : श्रीसमर्थशिष्य कल्याण; धुळे, १९४५; पृ. २३९).

**नारायण महाराज** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] पदकार. गाणपत्य. प्रख्यात गणेशभक्त मोरया गोसावीहे ह्यांचे आजोबा. मोरया गोसावी > चिंतामणी > नारायण अशी ह्यांची पितृपरंपरा आहे. धरणीधर हे ह्यांचे पुत्र. ह्यांचे मूळ गाव मोरगाव (जि. पुणे); पण ह्यांचे वास्तव्य मात्र मोरगाव व चिंचवड ह्या दोनही ठिकाणी असे. ह्यांचे मूळचे उपनाव शाळिग्राम. मोरया आणि त्यांचे पुत्र चिंतामणी ह्यांच्या उपासनेमुळे हे घराणे देवपदाला पोचल्याने ह्यांचे आडनाव पुढे 'देव' पडले. नारायण महाराजांच्या काळात चिंचवड देवस्थानाचे समृद्ध संस्थानात रूपान्तर झाले. वरील चौघा गणेशभक्तांच्या पदांची गाथा प्रसिद्ध झाली आहे. त्यात नारायण देवांची पदरचना समाविष्ट केली आहे.

**रचना : मु.** – पदपदांतरे; सद्गुरु श्री मोरया गोसावी, श्री चिंतामणी महाराज, श्री नारायण महाराज, श्री धरणीधर महाराज यांच्या पदांची गाथा, देव संस्थान, चिंचवड, १९५९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : मोरया गोसावी आणि त्यांची परंपरा; ग्रामनधा.; पुणे, १९७२; पृ. ९८–१०५.

**नारायण महिपत** [का. अनु.] ग्रंथकार. हे महलूर येथील राहणारे. दौलतराव शिंदे ह्यांचे जामात बापूसाहेब दाभाडे सेनापति तळेगावकर ह्यांच्या प्रेरणेने *बुद्धिबळाचा खेळ* हा ग्रंथ ह्यांनी लिहिला. ह्यात काही संस्कृत पद्यभागही आहे (क्रु. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४१).

**नारायण माळो** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नारायण वाल्होजी हारपळे** [अंदाजे इ. स. १७७८] कवी. ह्यांच्या मातापित्यांची नावे अनुक्रमे संताई व वाल्होजी. उपनाव हारपळे. हे पुण्यानजीक फुरसुंगी येथील राहणारे. ह्यांनी *भक्तप्रताप* नावाचा ओवीबद्ध ग्रंथ रचला आहे. कवी म्हणतो : "ग्रंथा नाम भक्तप्रताप। शूरत्व-भक्तीचा निजदीप। प्रेमळभक्ति करोन साक्षेप। अनुभव दीप लावावा॥"

**रचना : अमु.** – भक्तप्रताप; त्रु. पो.; अ. १६ (अध्याय ७, ८, १० नाहीत); र. का. : श. १६९९, माघ शु. १०, भृगुवारी (इ. स. १७७८, फेब्रु. ६).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पोतदार, द. वा. : भक्तप्रताप; भाइसमंत्रै., व. २१, अं. २, आश्विन १८६२; पृ. ४९–५०.

**० नारायण विप्र** – पहा **विप्रनारायण.**

**नारायण व्यास /० नारोबास (बाहाळिये) /० नारायण पंडित बहाळे** [अंदाजे श. १३०० / इ. स. १३७८ – श. १३५० / इ. स. १४२८] महानुभाव कवी. कवीश्वर आम्नायातील. महानुभावांच्या *साती ग्रंथां*पैकी *ऋद्धिपूरवर्णन* ह्या काव्याचे कर्ते. हे राहणारे मूळचे खानदेशातील बाहाळ (जि. धुळे) गावचे. त्यामुळे 'बाहाळिये' ह्या आडनावाने ओळखले जातात.

दत्तराज मराठेकृत *ऋद्धिपूरवर्णन* ग्रंथाच्या तृतीय शोधनीच्या टीपेआरंभी जी मूळ पीठिका दिली आहे तिच्यामध्ये कविचरित्रासंबंधी माहिती मिळते. नारोबासांचे वडील खानदेशातील बाहाळ गावच्या राजाचे पुरोहित होते. ह्यांचा पिता उत्तम ज्योतिषी असल्याने राजाच्या मर्जीतला होता. नारोबासांच्या जन्माअगोदरच दायादांच्या मत्सरामुळे नारोबासांच्या पित्यावर राजाची अवकृपा झाली व त्यांना प्राणास मुकावे लागले. जाणते झाल्यानंतर हा वृत्तान्त त्यांना मातेकडून समजला.

आपल्या पित्याच्या हत्येचा सूड उगविण्याच्या हेतूने बंगालदेशात जाऊन नारोबासांनी मंत्रतंत्रविद्या आत्मसात केली. पुढे त्या दुष्ट दायादाला राजासमक्ष त्यांनी धडा शिकविला. प्रस्तुत काव्याच्या सातव्या प्रकरणातील 'स्वात्मनिरोपणा' च्या काही ओव्यांवरून (ओ. ३१ ते ४३) मूळपीठिकेत येणारे कविचरित्राशी संबंधित असे हे निरूपण काही प्रमाणात खरे वाटते. कालांतराने हिंसाचाराने मलीन झालेले आपले पूर्वायुष्य आठवून त्याचे परिमार्जन करावे ह्या हेतूने अचळ मालोबास ह्यांना शरण जाऊन नारोबासांनी महानुभाव पंथाची दीक्षा घेतली. ह्यांची गुरुपरंपरा : श्रीचक्रधर > नागदेवाचार्य > भास्कर कवीश्वर > परशरामबास > पेटे हरिबास > अचळ मुरारी मल्ल > मालोबास > नारोव्यास बाहाळीये अशी आहे (डॉ. कोलते : *ज्ञानबोध*, प्रस्ता., पृ. १३).

पश्चात्ताप होऊन परमार्गाची दीक्षा घेतल्यानंतर अटन करीत ऋद्धिपुराहून हे सस्ति वाडेगावास आले. तेथे गुर्जर शिवबासांचे शिष्य विश्वनाथदास ह्यांना भेटले. दोघांनाही परस्परभेटीने परमसंतोष झाला. सुखाने संभाषण करीत दिवस जात असता विसोबांना नारोबासांच्या कवित्वशक्तीचा प्रत्यय आला. मग विसोबास म्हणाले : "तुम्हासी कवीत्वकरणी आधीकार असे । तरि काही स्वामीची स्तुतपुर्वक कवीत्व करा." तवं नारोबासीं म्हणितले : "तुम्हीही काही देवाची स्तुत करा।" मग तेही 'हो' म्हणौनि मान दीधला, नंतर दोघांनीही सस्ति वाडेगावी राहून काव्ये लिहिली, इत्यादी माहिती तृतीय शोधनीचा टीपग्रंथाच्या पूर्वपीठिकेत सापडते. नारोबासांनी *रुद्धिपूरवर्णन* (ओ. ६४२) व विश्वनाथबासांनी गीतेचे चार-पाच श्लोक प्रधान करून *ज्ञानप्रबोध* (ओ. १२०३) असे ग्रंथ रचले. *रुद्धिपूरवर्णन* ह्या काव्याचा रचनाकाळ 'श. १२५३ (इ. स. १३३१) भीतरी' असा पोथीत दिलेला आहे. य. खु. देशपांडे ह्यांनी छापलेल्या *रुद्धिपूरवर्णना*तील शकनिदर्शक ओवीत (क्र. ६४१) तो श. १२८५ (इ. स. १३६३) येतो. टीपग्रंथाच्या मूळपीठिकेवरून तसेच हरिबास सोंगोबास ह्यांच्या *अन्वयस्थळा*त येणाऱ्या उल्लेखावरून एक गोष्ट स्पष्ट होते ती अशी की *रुद्धिपूरवर्णन* आणि *ज्ञानप्रबोध* ही दोनही काव्ये एकाच वेळी लिहिली गेली. या दोनही काव्यांचा रचनाकाळ श. १२५३ चा सुमार असावा असे मत वा. ना. देशपांडे ह्यांनी व्यक्त केले आहे (*विमर्शिनी*, पृ. ३–४). *ज्ञानप्रबोधा*च्या प्रस्तावनेत गुरुपरंपरेच्या पिढीनुसारे कालमापन करून डॉ. कोलते ह्यांनी *ज्ञानप्रबोधा*चा लेखनकाल स्थूलमानाने श. १३३५ (इ. स. १४१३) 'ठरवण्यास हरकत नसावी' असे म्हटले आहे (प्रस्ता., पृ. ३१). विश्वनाथबास व नारोबास ह्यांनी परस्परांच्या प्रेरणेने ग्रंथरचना केली. साहजिकच दोघांच्याही ग्रंथांवर परस्परांच्या विचाराचा व कल्पनांचा परिणाम झाला असण्याची शक्यता आहे. दोनही ग्रंथांच्या कथावस्तू भिन्न असल्या तरी स्वरूप काहीसे आत्मनिवेदनपर आहे.

काव्य वाचल्यानंतर कवीची व्युत्पन्नता व संस्कृत काव्यशास्त्राचा अभ्यास सहज लक्षात येतो. कवीची प्रगल्भ अशी काव्यविषयक जाणीवही काही ओव्यांतून स्पष्ट होते. "तन्ही आळंकारेंवीण । न मिरवे काव्यलक्षण" असा अलंकार आणि रस ह्यांच्यामधला कार्यकारणभाव कवी मान्य करतो. त्याहीपुढे जाऊन तो म्हणतो : "भरौनि शब्दरत्नां सोहोज्वळा । जाउनि साहित्याचिआ वेलाउळा । भरौनि आणै खोळा । उन्मेषांचेआ ॥ ३८२ ॥ ग्रंथ सुवर्णमुद्रिके खेवणु भावमाणीके । . . . ॥ ३८३ ॥" आणि खरोखरीच कवीने आपल्या ग्रंथरूपी सुवर्णमुद्रिकेवर भावरूपी माणकांचे खेवणे बसविल्याचा प्रत्यय ग्रंथात पदोपदी येतो.

नारोबासांच्या रचनेतील *ऋद्धिपूरवर्णन* हा काव्यग्रंथ अत्यंत महत्त्वाचा (मु. : यवतमाळ, १९२९; संपा. डॉ. य. खु. देशपांडे). ऋद्धिपूर हे महानुभावपंथीयांचे मोठे क्षेत्र असून ते पंथीयांना अत्यंत वंद्य आहे. आर्तजनांच्या संसारश्रमांचे विसंवणे. ते ऋद्धिपूर कसे तर "सासुरवासे शीणली । तिये भेटे जेवि माउली । असो हे तैसे परी जाली । श्रीऋद्धिपूर देखिलेआ ॥ ४८ ॥" असे ह्याचे वर्णन कवीने केले आहे. ऋद्धिपुरांतील अनेक स्थळांची वर्णने, उदा., हाट-चौहाट, मढमंडप, येजा करणारे भट महात्मे, महाद्वार, राजमठ, मर्दनास्थान, आरोगणास्थान, प्रभुमंचक, प्रभुमूर्ति इत्यादी, काव्यात सविस्तर येतात. ती सूक्ष्म व रम्य आहेत. तरीही हे काव्य केवळ स्थलवर्णनपर आहे असे म्हणता येणार नाही. तपशिलाच्या अनुषंगाने काव्यात उभे केलेले श्रीप्रभूंचे चित्र, काव्यविषयाच्या आत्मीयतेने सहजगत्या होणारे भावप्रकटीकरण आणि स्वैर कल्पनाविलास ह्यांमुळे ते विशेषच हृद्य झाले आहे. कवीच्या स्वतंत्र प्रतिभेने ह्या काव्याला जन्म दिला असल्याने नारोबासांच्या ठिकाणी असलेले श्रेष्ठ दर्जाचे अनेक कवित्वगुण ह्या ठिकाणी प्रत्ययास येतात. [ ⇨ ३. ]

ह्या एकमेव काव्यग्रंथाशिवाय काही स्फुट कवने व डंक हे छोटेसे काव्य अशी नारायणव्यासांची रचना छापली गेली आहे. स्फुट कवनांपैकी तीन पदे ज. शा. देशपांडे ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत (महानु., मार्च १९७१, पृ. २६–२८) त्यांपैकी दोन पदे अभंगवजा ओवीत व तिसरे ढवळ्याच्या चालीवर आहे. आणखी एका २९ ओव्यांच्या दीर्घ कवनातील विषय अध्यात्मपर आहे. ह्या कवनांची भाषा प्राचीन असून नारायणस्वामी असा कवीने स्वतःचा नामनिर्देश केला आहे (मु. : महानु., जुलै १९७१, पृ. २५–२८). डंक हे १६ पदांचे कथात्मक प्रकरण आहे (मु. : महानु., नोव्हें. १९७०, पृ. २०–२३). संसारास भुजंगाची उपमा देऊन संसारार्त स्थितीस डंकाची – दंशाची – उपमा ह्या काव्यात दिली आहे. ही कथा पांडवकालातली आहे. भर दुपारच्या उन्हात प्रवास करणारे एक जोडपे पायाला चटके बसल्याने झाडाच्या सावलीत विश्रांती घेण्यासाठी बसले असता, पती सर्पदंशाने मरण पावतो. साहजिकच पत्नी शोकग्रस्त होते. एवढ्यात अशी आकाशवाणी होते की, धर्मराजाच्या राजसूय यज्ञाकरिता जमलेल्या सुरवरपन्नगांपैकी जो ब्रह्मचारी असेल तो ह्या मृत माणसास जिवंत करील. त्याप्रमाणे ती तेथे जाते. परंतु तिच्या मृत पतीला जिवंत करण्याइतकी पुण्याई कोणाजवळच नसते. अखेरशेवटी श्रीकृष्णाचा स्पर्श प्रभावी ठरतो. असे दाखवून त्या सर्वसाक्षी परमेश्वराचा, पर्यायाने महानुभावांचे अधिदैवत असणाऱ्या श्रीकृष्णावताराचा, कवीने जयजयकार केला आहे. हे भक्तिपर काव्य मोठे मनोरंजक आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या मुद्रित रचनेखेरीज वि. ल. भावे ह्यांच्या *महानुभाव ग्रंथावली*त (पृ. १५) कवीच्या नावावर *गीत, अनवेल पद, वनजारा, आरत्या, रुक्मिणीपत्रिका, अवाका, रुक्मिणीस्वयंवर* अशी रचना दिलेली आढळते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. कोलते, वि. भि. : नारोबास व विश्वनाथबास ह्यांची भेट; प्रस्ता., ज्ञानप्रबोध; मलकापूर, १९७३; पृ. २४–२५. २. देशपांडे, अ. ना. : नारायण पंडित; प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास (?) प्रामवाङ., खं. १, पूर्वार्ध, पृ. ४८२–४८७ व खं. २, पृ. २९९. ३. (संपा.) देशपांडे, य. खु : प्रस्ता., टीप व परिशिष्ट यांसह श्रीऋद्धिपूरवर्णन; यवतमाळ, १९२९. ४. (संपा.) तुळपुळे, शं. गो. : ऋद्धिपूरवर्णन : टीपग्रंथ व प्रस्ता., पुणे, १९६७; पृ. १–४५. ५. मराठे, दत्तराज : 'रुद्धिपूरवर्णना'चा तृतीय शोधनीचा टीप – मूळपीठिका (श्रीऋद्धिपूरवर्णन; संपा. तुळपुळे, शं. गो.; ग्रंथास जोडून); पृ. १–१०२.

**नारायण श्रीरंग** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – म्हातारीचें आख्यान काव्य; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २२६.

**नारायण सदाशिव हिरवे** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नारायण सहजानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नारायणसुत** [का. अनु.] कवी. *शिवरात्रीकथा* ह्या आख्यानाचा कर्ता. हे आख्यान श्लोकबद्ध आहे. शिवरात्रीच्या दिवशी शिकार न मिळाल्याने उपवास घडलेल्या भिल्लाची, मृगयोनी प्राप्त झालेल्या एका राजाची आणि एका चोराची अशा तीन कथा आख्यानात एकात एक गुंफल्या आहेत. काव्यात वृत्तशैथिल्य व संधिनियमांकडे दुर्लक्ष, असे काही दोष जाणवतात. प्रत्येक प्रसंगाच्या अखेरीस कवीने, नारायणसुत, असा आपला उल्लेख केला आहे.

**रचना :** मु. – शिवरात्रीकथा; प्र. २; श्लो. सं. १०७; संपा. ओक, वा. दा.; अकलकामा., भा. १; मुंबई, १८९५; पृ. १३१–१४७. अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**नारायणात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**० नारायणेंद्र सरस्वती** – पहा **मौनीस्वामी.**

**नारोजी पंडित** [का. अनु.] कवी. विश्वनाथ पंडित पुत्र असा हा ग्रंथाच्या शेवटी आपला उल्लेख करतो.

**रचना :** अमु. – १. गुरुराजस्तवन; श्लो. सं. ६०. २. विज्ञापनाशतक; श्लो. सं. १४०; तंसम. हस्त. यादी, क्र. २.

**नारो त्रिंबक** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] शाहीर. *परशुरामभाऊंच्या कर्नाटकावरील स्वारीचा पोवाडा* ह्याने रचला आहे. परशरामभाऊ पटवर्धनांवर कर्नाटकच्या स्वारीची जबाबदारी नाना फडणिसांनी टाकली. ह्या मोहिमेच्या पूर्वार्धात टिपूच्या मुलुखातील धारवाडचा भक्कम किल्ला भाऊंनी शर्थीने सर केला व किल्लेदारास जिवंत कैद केले. ह्या लढाईचा तपशील नारो त्रिंबकाने प्रस्तुत पोवाड्यात दिलेला आहे. परशुरामभाऊंचे शौर्य व्यक्त करताना कवी म्हणतो : "पटवर्धनकुळीं फत्ते तलवार परशुरामभाऊची। म्हणवून दिली वस्त्रें स्वारी नेमिली कर्नाटकची।" पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये संग्रहित (पृ. १८९–१९२).

**नारोपंत भडगावकर** [का. अनु.] गद्य ग्रंथकार.

**रचना :** अमु. – समाधिप्रकरण (योगमार्गावरील गद्य ग्रंथ); प्र. ले. का. : श. १७८० / इ. स. १८५८; मसंमं., हवना., पृ. ३७.

**० नारोबा** – पहा **नारा–१.**

**० नारोबास (बहाळिये)** – पहा **नारायणव्यास.**

**० नारो भिकाजी रत्नपारखी** – पहा **मौनीस्वामी.**

**नारो सखाराम** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार.

**रचना :** अमु. – पानिपतची बखर (नकल); हस्ताक्षर, राजाराम आपाजी जामदार; र. का. : श. १७६४ / इ. स. १८४२; रासंमं. हस्त. सू., पृ. ८१.

**निजगुणशिवयोगी** [अंदाजे श. १४०० / इ. स. १४७८ – श. १५०० / इ. स. १५७८] वीरशैव कानडी संतकवी. हे कावेरी नदीच्या तीरावर कोळेगल तालुक्यातील 'शंभुलिंगन बेट्ट' ह्या डोंगरावरील शंभुलिंगाच्या देवळात राहात असत. शंभुलिंग हे निजगुणांचे आराध्यदैवत होते.

निजगुण हे कोणत्या जातीत जन्मले ते निश्चितपणे ज्ञात नाही. ह्यांची सर्व रचना कानडीत व संस्कृत भाषेत झालेली असली तरी मराठीत अनुवाद झालेल्या त्यांच्या *विवेकचिंतामणी* (कत शांतलिंग) ग्रंथाचा महाराष्ट्रातील वीरशैव पंथाच्या तत्त्वविचारावर फार मोठा परिणाम झालेला आढळतो.

निजगुण प्रत्येक ग्रंथाच्या आरंभी व सर्व प्रकरणांच्या सुरुवातीस शंभुलिंगास वंदन करतात. त्यावरून त्यांच्या गुरूचे नाव शंभुलिंग असावे असे वाटते. ह्यांच्या गुरूविषयी भिन्न भिन्न तर्क केले जातात. चन्नसदाशिव व भुजलिंग ह्यांचा त्यांचे गुरू म्हणून निर्देश केला जातो. पण निजगुणांनी आपल्या ग्रंथात त्यांचा उल्लेख केलेला नाही. त्यामुळे शंभुलिंग हेच त्यांचे गुरू असावेत असा ना. ब. जोशी जो तर्क करतात तो योग्य वाटतो.

निजगुणांच्या कालासंबंधी अनेक मते आहेत. ह्यांचा काल १२ व्या शतकापासून ते १७ व्या शतकापर्यंत मानण्याची प्रवृत्ती संशोधकांत आहे. त्यांची कालनिश्चिती करणारा महत्त्वाचा पुरावा म्हणजे *विवेकचिंतामणी*चा मराठी अनुवाद. हा अनुवाद इ. स. १६०४ मध्ये झाला. कन्नडमधून मराठीत ह्या ग्रंथाचे भाषान्तर होण्याइतकी लोकप्रियता मूळ ग्रंथास मिळण्यास निदान १०० वर्षांचा तरी काळ लागला असावा. ह्यावरून इ. स. १५०४ पूर्वी ते होऊन गेले असावेत असे मत प्रा. पंडित आवळीकर ह्यांनी व्यक्त केले आहे.

कोईमतूर जिल्ह्यातील कोळेगल तालुक्यातील 'शंभुलिंगन बेट्ट' येथे निजगुण तपश्चर्या करून राहात असत. येथेच त्यांना साक्षात्कार झाला व ते ग्रंथलेखन करू लागले. त्यांनी कन्नड भाषेत सात व संस्कृत भाषेत दोन ग्रंथ लिहिले. त्यांपैकी *विवेकचिंतामणी* ह्या त्यांच्या ग्रंथाचे मराठीत भाषान्तर झाल्याने मराठी साहित्याच्या दृष्टिकोनातून हा ग्रंथ महत्त्वाचा ठरतो. हा ग्रंथ वीरशैव संप्रदायाचा ज्ञानकोश मानला जातो. ह्यात पंथाशी संबंधित ७५० पेक्षा अधिक विषयांवर माहिती आली असून त्यात निजगुणांच्या विद्वत्तेची साक्ष पटते. ह्यांच्या अन्य रचनेत अद्वैतवेदान्त, योगशास्त्र, योगवासिष्ठ, वीरशैव संतांची चरित्रपर स्तोत्रे असे विषय समाविष्ट होतात.

निजगुणांनी लिहिलेल्या मूळ कानडी *विवेकचिंतामणी* ग्रंथाचा मराठी अनुवाद 'शांतलिंगशिवयोगी' किंवा 'शांतेश्वर' ह्यांनी केला. वीरशैव पंथाच्या आचारविचारविषयक बाबींचा समावेश ह्या ग्रंथात प्रामुख्याने झाला आहे. ग्रंथाचे दहा परिच्छेद व ३८९३ ओव्या असून त्यांपैकी पहिले दोन परिच्छेद वीरशैव आचारधर्माच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरतात. वीरशैवांच्या मराठी वाङ्मयाची सुरुवात शांतलिंगस्वामींच्या ग्रंथरचनेतूनच सुरू झाली आहे. द्वितीय परिच्छेदात शिवसिद्धान्त आहे. प्रथम परिच्छेदातील तत्त्वज्ञानाचे स्वरूप संकलनात्मक आहे. 'शिवसिद्धान्त' हा शब्द अनेक अर्थांनी ते वापरत असावेत असे वाटते. आगमशास्त्रात वा शैवागमात असलेल्या सर्व शैवमतांसाठी हा शब्द ते वापरतात. म्हणूनच शिवसिद्धान्त सांगताना अनेक प्रकारच्या शैवांची लक्षणे व आचार ह्यांचे वर्णन केले आहे. चपखल दृष्टान्तांच्या साह्याने निजगुणांनी वेदान्त व षड्दर्शने ह्यांचा प्रपंच सोपा करून सांगितला आहे. विचारांचा स्वच्छपणा हा ह्या ग्रंथाचा विशेष आहे. साहित्य, संगीत, शास्त्रे, खेळ इत्यादी आणखी काही विषय ग्रंथभर पसरले आहेत. ह्या ग्रंथाची रचना काहीशी शिथिल आहे. सामान्यतः ओवी तीन-चरणी आहे. पण काही ठिकाणी तिची लांबी कमीअधिक दिसते. मराठी अनुवाद करताना शांतलिंग मूळ कृतीपासून थोडेदेखील दूर जात नाहीत. मराठी-कानडीच्या सांस्कृतिक अनुबंधाची साक्ष देणारा हा ग्रंथ आहे. [ ⇨ ३.] ह्या ग्रंथाचा मराठीखेरीज तमिळमध्ये अनुवाद झालेला आहे. शिवप्रकाशस्वामी नावाच्या लेखकाने १७ व्या शतकात ह्याचा दुसरा परिच्छेद अनुवादिला आहे. तो *वेदान्तचूडामणि* ह्या नावाने प्रसिद्ध आहे. संस्कृतमध्ये निर्वाणमंत्री (इ. स. १७२५) व लिंगराज (इ. स. १७७५ ते १८२०) ह्या दोघांनी अनुवाद करण्याचा प्रयत्न केला.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित (संपा.) : निजगुणशिवयोगी : विवेकचिंतामणि; पुणे, १९६३. २. जोशी, ना. ब. : निजगुणशिवयोगी : काल व कार्य; परमानुभवबोध; गदग, १९६०. ३. जोशी, ना. ब. व ढेरे, रा. चिं. : निजगुणशिवयोगीकृत विवेकचिंतामणि; इंद्रायणी, मार्च १९६४; पृ. १९.

**निजदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४२. **अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**निजरंग** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**निजलिंग** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**निजानंद-१** [श. १५०० / इ. स. १५७८ – समा. श. १५६४, मार्गशीर्ष / इ. स. १६४२] आनंदसंप्रदायी कवी. ह्यांचे पूर्वाश्रमीचे नाव बोपाजी. उपनाव खडके. हे माध्यंदिन शाखेचे वासिष्ठगोत्री ब्राह्मण. राघोपंत > दत्तात्रय > रंगोपंत > बोपाजीपंत अशी ह्यांची पितृपरंपरा आहे. बयाबाई ह्यांच्या पत्नी. पत्नीच्या मृत्यूनंतर ह्यांनी चतुर्थाश्रम स्वीकारला. ह्यांचे वास्तव्य कृष्णातीरी कऱ्हाडास असे. निजानंदांचे गुरू कल्याणीचे पूर्णानंद नारायण होते. ह्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : नारायण > दत्त > सदानंद > रामानंद > अमलानंद > गंभीरानंद > ब्रह्मानंद > सहजानंद > पूर्णानंद > निजानंद. रामदासपंचायतनातील थोर साधू रंगनाथ निगडीकर (जन्म श. १५३४) हे निजानंदांचे पुत्र व परंपरेने शिष्य. निजानंदांनी श. १५६४ च्या मार्गशीर्ष महिन्यात समाधी घेतली असे वि. ल. भावे लिहितात (मसा., आ. ५, पृ. ३४०).

कवीने रचलेली एक *संतमालिका*, *बद्धमोक्षविवरण* अशी आणखी एक रचना व १६ पदे वि. ल. भावे ह्यांनी छापली आहेत (मु. : महा. कवि). *संतमालिकेत* 'पूर्णानंद गुरुवर्य' असे म्हणून कवीने त्याची गुरुपरंपरा निर्देशिलेली आहे. ज्ञानेश्वर, मुक्ताबाई, निवृत्तिनाथ ह्यांपासून सुरुवात करून वारकरी संप्रदायातील अनेक संतांचा उल्लेख करून अज्ञानसिद्ध नागेश, वडवाळसिद्ध, निरंजनस्वामी अशा कितीतरी सिद्ध सत्पुरुषांचे स्मरण केले आहे. निजानंदांची अप्रसिद्ध पदपदांतरादी स्फुट कविताही उपलब्ध आहे.

**रचना : मु.** – १. संतमालिका; ग्रं. सं. ५६, महा. कवि, क्र. ४; पौष १८२५, पृ. १०–१२. २. बद्धमोक्षविवरण; ओ. सं. २५. ३. १६ पदे; महा. कवि, क्र. १५; कार्तिक १८२८; पृ. ४२–४८. **अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३, सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**निजानंद-२** [अंदाजे श. १६३० / इ. स. १७०८] कवी. निजानंदकृत *ज्ञानाब्धितरंग* ह्या ग्रंथाचा परिचय वि. का. राजवाडे ह्यांनी करून दिला आहे. ग्रंथात सापडणाऱ्या कवीच्या परंपरेवरून हा कवी नृसिंहसरस्वतींच्या दत्तसंप्रदायातील दिसतो. ती परंपरा अशी : श्रीनृसिंहसरस्वती > माधवेंद्रसरस्वती > अमृतेंद्रसरस्वती > गगनेंद्रसरस्वती > माधवेंद्रसरस्वती (गोदातट, मंजरथचे) > एकनाथ > श्रीकृष्ण (श. १५६२) > निजानंद (श. १६३०).

निजानंदाचा *ज्ञानाब्धितरंग* ग्रंथ वेदान्ताच्या अद्वैतमताचे प्रतिपादन करणारा आहे. ग्रंथाचे ११ तरंग व १६३० ओव्या असून ग्रंथाची प्रत बरीच अलिकडची व अशुद्ध आहे. ग्रंथाची समाप्ती श. १६३० मधील 'सर्वधारी संवत्सर। दक्षिणायन मार्गेश्वर ॥ वद्य दशमी गुरुवार।' ह्या दिवशीची आहे. प्रस्तुत ग्रंथाचे हस्तलिखित भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे ह्यांच्या हस्तलिखित संग्रहात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : निजानंदकृत ज्ञानाब्धितरंग; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ४३–४४.

**निजानंदी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – वेदान्तपद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

० **नित्यानंद** – पहा गावबा.

० **नित्यानंदसुत** – पहा शिवकल्याण.

० **नित्यानंदस्वामी** – पहा कमलाकर.

**निपट** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**निपट निरंजन** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**निंबराज दैठणकर** [? – समा. माघ वद्य ३, श. १६०० / इ. स. १६७८] कवी. हे वासिष्ठगोत्री ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्यांचे वडील मुरारपंत देशपांडे. ह्यांचे वंशज मूळचे नीरानरसिंगपूरचे. मुरारपंतांना वृद्धावस्था होईपर्यंत पुत्रसंतती झाली नाही. त्यामुळे ह्यांनी पुत्रप्राप्त्यर्थ निंबाचा पाला खाऊन तप केले. पुढे त्यांना पुत्रप्राप्ती झाली. आपल्या मुलाचे नाव ह्यांनी निंबाजी असे ठेवले. ह्यांनाच पुढे निंबराज म्हणू लागले. हे दैठण (जि. औरंगाबाद) येथे राहात म्हणून त्यांना दैठणकर असे म्हणू लागले. तीर्थयात्रेच्या निमित्ताने निंबराजांनी भारतभर भ्रमण केले. पांडुरंगाचा कृपाप्रसाद झाला, पण गुरुकृपाप्रसाद होईना. ह्यानंतर एकनाथांचे शिष्य नरहरि व निंबराज ह्यांची गाठ पडली. हे अनन्यभावे त्यांस शरण गेले. नरहरीने निंबराजांना अनुग्रह देऊन कृतार्थ केले. ह्यांची गुरुपरंपरा अशी : एकनाथ > नरहरि > निंबराज. ह्यांनी पदे व अभंग ह्यांच्याबरोबरच *ज्ञानबोध* ऊर्फ *निंबराजनरहरिसंवाद* (ओ. सं. २८२) व *जपमाळ* ही प्रकरणे रचली आहेत. *जपमाळेतील* एकेक मणी म्हणजे एकेका संताचे गुणगान आहे. ह्याशिवाय *वाल्मीकचरित्र*, *कान्होपात्राचरित्र*, *चोखामेळाचरित्र* अशी प्रकरणे केली आहेत. ह्यांनी *रामकथा* नावाचा एक ग्रंथ केला असावा असे *वाल्मीकचरित्राच्या* शेवटी येणाऱ्या उल्लेखावरून वाटते. पण हा ग्रंथ उपलब्ध नाही. ही सर्व रचना अप्रकाशित आहे. ह्यांचे एक पद *पदसंग्रह*, *भा. ३* मध्ये मुद्रित (पृ. ९२).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : श्रीनिंबराज दैठणकर; भाइसंमंपसंवृ., श. १८३९; पृ. ११०–११३.

**निंबा** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४३. **अमु.** – बोधपर, ज्ञानपर, भक्तिपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**निंबाजी** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर. खर्ड्यांच्या लढाईपूर्वी रघूजी भोसले व पेशवे ह्यांची जी भेट झाली त्या प्रसंगावर ह्या शाहीराने पोवाडा रचलेला आहे. खर्ड्याच्या लढाईत भोसल्यांच्या सेनेने चांगलीच कामगिरी केली. त्यापूर्वी मसलती करताना सेनासाहेब सुभा ऊर्फ रघूजी भोसले ह्यांना 'मोंगलांना जेर करावे' असा आपला मानस असल्याचे नाना फडणिसांनी सांगून त्यांच्या साहाय्याची मागणी केली होती. ह्यासाठीच पेशवे व भोसले ह्यांची भेट घडवून आणली होती. हा शाहीर समकालीन असल्याने पोवाड्यातील ऐतिहासिक माहितीच्या तपशिलाला महत्त्व आहे. ह्यातील बरीचशी माहिती बिनचूक आहे, असे मत इतिहासाची उपलब्ध अस्सल साधने पाहून य. न. केळकर ह्यांनी व्यक्त केले आहे. पेशवे-भोसले भेटीचा हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड २* मध्ये संग्रहित (पृ. २७१–७४)

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : पेशवे-भोसले भेटीचा पोवाडा; ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. २; पुणे, १९४४; पृ. २६६–२७०.

**निंबा निर्दोश** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**निरंजन-१** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. हे पूर्णानंदाचे शिष्य व शिवरामाचे गुरुबंधू होते. ह्यांनी लिहिलेली *मननमाला* (ओ. सं. ४०००) अत्यंत सोप्या, सरस भाषेत लिहिली आहे. ह्यांनी अनेक ग्रंथ रचले आहेत (मसा., आ. ५, पृ. ३९५ व टीप).

**निरंजन-२** [का. अनु.] कवी. ह्यांच्या विविध रचनेत पारमार्थिक *सप्तव्यसन* व *पदपदांतरे* ह्यांचा समावेश होतो (सवामं. हस्त. सू.,

खं. १, २).

**निरंजन कऱ्हाडकर / ० गणेशदास / ० निरंजन पंढरपूरकर / ० निरंजनस्वामी–१** [श. १५५९ / इ.स. १६३७ – समा. श. १६४३ / इ.स. १७२१] कवी. हे महान गणेशभक्त होते. हे कऱ्हाड येथील पाठक घराण्यातील. मूळ नाव येल्होबा. तुका पाठक > नरसिंह पाठक > > येल्होबा पाठक अशी ह्यांची कुलपरंपरा आहे. आईचे नाव कृष्णाबाई. गणेशकृपेने नरसिंह पाठक व कृष्णाबाई ह्यांच्या घरात माघ शु. चतुर्थीस निरंजनांचा जन्म झाला. बालपणापासूनच ह्यांना गणेशभक्तीचे वेड होते. निरंजनांनी पैठणच्या काशीराजस्वामी ह्या गणेशोपासकांकडून अनुग्रह घेतला होता. त्यांची गुरुपरंपरा त्यांच्या *गणेशगीता* ग्रंथात सापडते. ती अशी : शंकराचार्य > हस्तामलक > भास्कराचार्य > लयानंद > सहजसिद्ध > लक्षानंद > परमानंद > काशिराज > निरंजनस्वामी. निरंजनस्वामी हे गृहस्थाश्रमी होते. निष्कांचन अवस्थेत ह्यांनी काशीयात्रा केली. अनेक गणेशक्षेत्रांना भेटी दिल्या व कित्येकांना गणेशभक्तीची दीक्षा दिली. त्यांचा पारमार्थिक अधिकार फार मोठा होता. त्यांचे एक शिष्य निरंजनदास बल्लाळ ह्यांनी त्यांच्या *गणेशगीतेत* गुरूचे जे स्तवन केले आहे त्यात ते म्हणतात : 'नमू सद्गुरु निरंजन । आचार्यान्वय शिखारत्न । मानवाकृति धरून । ब्रह्म सनातन अवतरला ॥ १.१३ ॥ कर्म उपासना ज्ञान । त्रिकांड वेदाधिष्ठान । सदाचारक्रिया दावून । तारिले जन भवपुरी ॥ १.२५ ॥' अमलाश्रमक्षेत्र ह्या नावाने गाणपत्यांना प्रिय असलेल्या कऱ्हाडजवळील नामल गावी निरंजनांनी समाधी घेतली. समाधीचा शक १६४३. हा शक त्यांचे नातू भगवान पाठक ह्यांनी निरंजनांचे जे चरित्र लिहिले त्यात दिला आहे. गो. का. चांदोरकरांनी हाच शक १६४९ असा दिला आहे (संककासू., पृ. ५९).

निरंजनस्वामींनी *गणेशगीतेवरील* टीका, अभंग, पदे, अष्टके इत्यादी रचना केली आहे. *गणेशगीता-टीका* रचताना गणेशदास असा आपला निर्देश त्यांनी केला आहे. *गणेशपुराणात* गणेश-वरेण्य-संवादरूप गणेशगीता असून त्यावरूनच हा ग्रंथ कवीने रचला आहे. टीकेचे अकरा अध्याय असून ती ओवीबद्ध व सुबोध अशी आहे. विस्ताराच्या भरीस न पडता कवीने ही टीका स्पष्टार्थबोधिनी केली आहे. मूळ श्लोकांतला आशय ग्रंथकाराने समर्थपणे व्यक्त केला आहे. ह्या टीकेच्या रचनेचा स्थलकालादी तपशील निरंजनांनी दिला आहे. 'अंगिरा नाम संवत्सर । श्रावण शुद्ध भौमवार । एकादशी द्वितीय प्रहर । स्वातीसार नक्षत्र ॥ सिद्धयोग पंढरपुरीं । गीता महाराष्ट्र भाष्येवरी । '. . . इ. म्हणजेच हा ग्रंथ श्रावण शु. ११, श. १६१४ (इ. स. १६९२) ह्या दिवशी पंढरपूर मुक्कामी रचून पूर्ण केला. ह्या टीकाग्रंथाच्या रचनेचा शक प्रा. म. रा. जोशी व गं. ना. मुजुमदार ह्या दोघांनी निरंजन कवीवर त्यांनी लिहिलेल्या टिपणांत (पहा : **च. च. अ.**) श. १५५४ / इ. स. १६३२ असा दिला आहे. निरंजनांचे नातू भगवानकवी ह्यांनी दिलेल्या चरित्रविषयक माहितीप्रमाणे (*निरंजनचरित्र* – गद्य; र. श. १६८३). प्रस्तुत टीकेचा काळ श. १६१४ च असला पाहिजे असे वि. का. राजवाडे ह्यांनीही मान्य केले आहे.

*गणेशगीता* ग्रंथाखेरीज, *गणेशचरित्र, गणेश-उपनिषदे, गणेशपुराण, गणेशस्तवराज* व *भूचंद्राख्यान काव्य* अशी रचना प्रा. म. रा. जोशी ह्यांनी निरंजनांच्या नावावर दिली आहे (विसंमंवा., १९७१, पृ. १३८).

निरंजनस्वामींची स्फुट कविताही वेधक आहे. त्यांची सर्वच कविता गणेशभक्तीने अंतर्बाह्य व्यापलेली आहे. गणेशगुणसंकीर्तनात रमणारी त्यांची वाणी प्रसादमधुर अशी आहे.

**रचना : मु.** – निरंजनस्वामीकृत गणेशगीता-टीका; र. श. १६१४ / इ.स. १६९२; र. स्थ. : पंढरपूर; प्रका. : सुभेदार, कृ. बा.; पुणे. **असु.** – गणेशगीता-टीकेच्या हस्तलिखित प्रती व काही स्फुट कविता; भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे ह्यांच्या हस्तलिखित संग्रहात उपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : निरंजनस्वामी कऱ्हाडकर : गणेशोपासकाचे वाङ्मय; प्रामनधा.; पुणे, १९७२; पृ. ८३–८७. २. जोशी, म. रा. : निरंजनदेव; विसंमंवा.; नागपूर, १९७१; पृ. १३७–१३८. ३. कऱ्हाडकर, भगवानकवि : निरंजनचरित्र – गद्य; र. श. १६८३ / इ. स. १७६१; भाइसमं. ४. मुजुमदार, गं. ना. : काशीराजसुत गणेशदासकृत गणेशगीता-टीका; भाइसमंइति., श. १८३७; पृ. ४७–४९. ५. राजवाडे, वि. का. : निरंजन पंढरपूरकर; भाइसमंइति., श. १८३२; पृ. ३४. ६. राजवाडे, वि. का. : भगवानकवि कऱ्हाडकर; भाइसमंइति., श. १८३६; पृ. १५७–१६०.

**निरंजनजन** [का. अनु.] पदकार.

**रचना : असु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० निरंजनदास–१** – पहा **निरंजनदास बल्लाळ.**

**निरंजनदास–२** [का. अनु.] कवी.

**रचना : असु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० निरंजन पंढरपूरकर** – पहा **निरंजन कऱ्हाडकर.**

**निरंजनदास बल्लाळ** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] कवी व गणेशभक्त. निरंजनस्वामी कऱ्हाडकरांचे शिष्य. कवी भगवंत ह्यांनी लिहिलेल्या निरंजनांच्या गद्य चरित्रात (र. श. १६८३) ह्या कवीची माहिती मिळते. निरंजनदास बल्लाळ हे मूळचे बीडचे. त्यांचे मूळ नाव बाळाजीपंत. ह्यांची दोन कुटुंबे होती. ती दोन्ही अकाली निवर्तली. त्यामुळे हे संसाराविषयी उदासीन झाले. अशा मनःस्थितीत ह्यांनी निरंजनस्वामींना गुरू केले. ह्यानंतरच्या काळात निरंजनदासांचे वास्तव्य कऱ्हाड, नामलगाव ह्या ठिकाणी गुरुसंनिधच असे.

गुरूच्या आज्ञेवरूनच ह्यांनी *गणेशगीतेवर* टीका लिहिली (र. श. १६५१ / इ. स. १७२९). ती ओवीबद्ध आहे. ग्रंथाची सांगता करताना गणेशाजवळ ज्ञानदेवांप्रमाणे विश्वकल्याणाचे पसायदान कवीने मागितले आहे. प्रसादगुणामुळे ही टीका गणेशभक्तांत अत्यंत लोकप्रिय आहे.

निरंजनदास बल्लाळ ह्यांच्या नावावरील *गणेशपुराणाचाही* उल्लेख केला जातो. ह्या ग्रंथाची एक त्रुटित प्रत रा. चिं. ढेरे ह्यांच्या संग्रही आहे. *गणेशपुराणाचा* अवतार *गणेशगीतेअगोदर* तीन वर्षे झाला (र. श. १६४८ / इ. स. १७२६). कवीच्या मार्मिक तत्त्वकथनाचा अनुभव ह्या टीकेत येतो.

**रचना : मु.** – निरंजनदास बल्लाळकृत गणेशगीताटीका; अ. ११, मूळ श्लोक ४१०; टीका ओव्या ६३२३; र. श. १६५१, ज्येष्ठ कृ. च.; र. स्थ. : अमलाश्रम (नामलगाव); प्रका. : गोंधळेकर, रा. श्री.; पुणे, १८८७. **असु.** – गणेशपुराण; त्रु. पो.; र. श. १६४८, आषाढ शु. प्रतिपदा / इ. स. १७२६; र. स्थ. : भार्गवक्षेत्र (कऱ्हाडजवळील); प्रत श. १६९१ / इ. स. १७६९ मधली.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : निरंजनदास बल्लाळ; गणेशोपासकांचे वाङ्मय; प्रामनधा., पुणे, १९७२; पृ. ८८–९२.

**निरंजननाथ** [का. अनु.] कवी. गुरू : गोविंद. शिष्य : विश्वंभरनाथ. विश्वंभरांच्या *गोपीचंदाख्यानात* गुरू म्हणून निरंजननाथांचा उल्लेख येतो. 'अमोल काया जाइल वाया' ह्या निरंजननाथांच्या पदात ह्यांच्या गुरूचा उल्लेख येतो. ह्यांनी पदांची रचना केली आहे (संककासू., पृ. ६०).

**निरंजनपुरी** [का. अनु.] पदकार.

**रचना : असु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**निरंजनप्रभु** [का. अनु.] कवी.

रचना : अमु. – निरालंबप्रकाशबोध; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ६०.

**निरंजनबुवा** / ० निरंजन रघुनाथ / ० निरंजनस्वामी–२ [कार्तिक शु. ८, श. १७०४ / इ. स. १७८२ – समा. भाद्रपद शु. ११, श. १७७७ / इ. स. १८५५] संतकवी व गीताटीकाकार. ह्यांचे पूर्वाश्रमीचे नाव अवधूत असे होते. हे कौशिकगोत्री आश्वलायनशाखी देशस्थ ब्राह्मण. ह्यांच्या वडिलांचे नाव श्रीधरपंत श्रोत्री. ते परळीवैजनाथजवळील बालाघाट प्रांतातील वंजरा नदीच्या तीरावर वसलेल्या कळंब गावचे कुळकर्णी. ह्या कवीच्या मातोश्रीचे नाव लक्ष्मी. कुलदैवत भाहुरगडची महिषासुरमर्दिनी जगदंबा. बालवयात वडील वारले. घरची गरिबी म्हणून हे पुण्यास आले व नष्टे नावाच्या हुंडेकऱ्याच्या दुकानी त्यांनी कारकुनाची नोकरी पत्करली. पुणे येथील बेलबागेत त्यांना ठाकूरदासबावा नामक हरदासाची भावपूर्ण कीर्तने ऐकावयास मिळाली आणि त्यांच्या वृत्तीत पालट झाला. त्यांच्यात एकदम विरक्ती उत्पन्न झाली. पुढे पुणे सोडून ते देहूस आले. तेथे इंद्रायणीचे पाणी हातात घेऊन "आजपासून एक वर्ष सात दिवसांत सगुणसाक्षात्कार झाला नाही तर प्राणत्याग करीन" अशी प्रतिज्ञा भाद्रपद वद्य ४, श. १७३३ (इ. स. १८११) रोजी करून त्यांनी देहू गाव सोडले. पुढे तीर्थयात्रेस निघाले. फिरत फिरत ते नाशिक मुक्कामी आले. तेथे रघुनाथ भटजी ह्या सत्पुरुषाची श. १७३३, कार्तिक वद्य ३० (इ. स. १८११) रोजी गाठ पडली. त्यांनी ह्यांना आत्म्याचा अपरोक्ष साक्षात्कार करून दिला, व निरंजन नाव ठेविले. ह्यानंतर निरंजनांची दत्तात्रेयदर्शनाची तळमळ वाढू लागली. सद्गुरूंची आज्ञा घेऊन त्यांनी नाशिक सोडले. काट्याकुट्यातून व रानावनातून मार्ग काढीत शके १७३७ च्या भाद्रपद वद्य ८ (इ. स. १८१२) रोजी गिरनार पर्वतावर दत्तमहाराजांच्या पादुकांपुढे त्यांनी धरणे धरले. सगुणदर्शनाची मुदत संपत आली असे पाहून त्यांनी आत्यंतिक निराशेने आपले कपाळ आपटले तोच त्यांच्यापुढे दत्तात्रेय सगुणरूपाने उभे आहेत असे त्यांना दिसून आले. ह्या घटनेची खूण म्हणून निरंजनस्वामींच्या कपाळावर 'केशापर्यंत भिवयाहून' एक वण अखेरपर्यंत होता असे सांगतात. हे तेथून परत नाशिक येथे गुरुदर्शनासाठी आले. येथेच *स्वात्मप्रचीति* व *साक्षात्कार* ही प्रकरणे लिहून त्यांनी गुरूस अर्पण केली. तेथून जुन्नरमार्गे आपले गुरुबंधू वासुदेवपंडित ऊर्फ भाऊमहाराज ह्यांचेजवळ कोल्हापूरजवळील वळवडे गावी ते सहकुटुंब जाऊन राहिले. त्यांच्या ओळखीने श्रीमंत गंगाधरराव बाळासाहेब पटवर्धन (त्यावेळचे मिरजसंस्थानाधिपती) ह्यांनी त्यांना मिरजेस आणविले व श्रीमंतांनी त्यांचा अनुग्रह घेतला. स्वामींची विरक्त वृत्ती पाहून श्रीमंतांनी स्वामींचे चिरंजीव योगिराज ह्यांना मठ बांधून दिला व इनाम जमिनीची सनद करून दिली. हा काल श. १७६७ (इ. स. १८४५) च्या सुमाराचा आहे. येथे त्यांची शिष्यशाखा बरीच वाढली. स्वामी स्वमुखाने ग्रंथ सांगत व त्यांचे शिष्य रा. गोखले तो उतरून घेत. *ज्ञानेश्वरीटीका*, *अनुभवामृता*वरील टीका, पदपदांतरे इत्यादी रचना मिरज येथे झाली. स्वामींनी प्रपंच व परमार्थ यथोचित साधला. पुढे श. १७७७ त (इ. स. १८५५) ह्यांनी संन्यास घेतला व त्याच वर्षी भाद्रपद शु. एकादशीस कृष्णेच्या प्रवाहात जलसमाधी घेतली.

निरंजनांनी *अनुभवामृतपदबोधिनी* हा गद्यटीकाग्रंथ लिहून ज्ञानराजांच्या *अनुभवामृत* ह्या आध्यात्मिक ग्रंथाचे अर्थ-विवरण केले आहे. ह्या ग्रंथाच्या शेवटी निरंजन रघुनाथांनी 'श्रीअलंकापुरीं जाऊन लेकरासारखे रडून प्रार्थना ज्ञानेश्वरपदीं केली, त्याजवरून ग्रंथावरील टीका करण्याविषयी स्वप्नात प्रसाद जाला. अस्तु, आपण आपणास अर्थ कळावयासाठी लिहिता जालो' असे म्हटले आहे. हा ग्रंथ लिहिताना ह्यांनी अनुभवात्मक दृष्टान्तांचा उपयोग केला आहे. ह्या टीकेतील प्रकरणांतून चालू ओवीत मागील ओवीवरील शंकांचे निरसन केले आहे; आणि ठिकठिकाणी प्रकरणसंगतीही नीट लावली आहे. निरंजनस्वामींनी हा ग्रंथ अद्वैतपर दृष्टीने विवेचिला आहे. *अनुभवामृता*वरील ही सविस्तर गद्य टीका आहे. *केनोपनिषद टीका* व *आत्मबोधप्रकाशिनी* ही त्यांची प्रकरणे वेदान्तपर व अर्थसूचक आहेत. *केनोपनिषदा*वरील गद्यटीका शंकराचार्यांच्या भाष्यानुसार असल्याचे ग्रंथाच्या शेवटी म्हटले आहे. ग्रंथाचे स्वरूप गुरुशिष्यसंवादात्मक आहे. मधून मधून श्रुतिवचनांचे आधारही घेतले आहेत. *आत्मबोधप्रकाशिनी* ही शंकराचार्यांच्या *आत्मबोध* ह्या संस्कृत ग्रंथावरील श्लोकबद्ध टीका आहे. ग्रंथाच्या अखेरीस 'वडुभ ग्रामि कृष्णा तिरि। शके सत्राशे अडतीस धात्र संवत्सरि। श्रावण वद्य एकादसि इंदुवारी॥" असा लेखनकाल दिला आहे. गुर्वाज्ञेने ही टीका लिहिली असेही त्यांनी म्हटले आहे. शंकराचार्यांच्या *आत्मबोधा*त आलेल्या देहाचे मिथ्यात्व, आत्म्याचे अविनाशित्व, विश्वस्वरूप, ब्रह्म, विद्या-अविद्या, अन्वय-व्यतिरेक इत्यादी विषयांचे विवेचन घरगुती व सुगम दृष्टान्त देऊन ह्या टीकाग्रंथात केले आहे. ह्या ग्रंथावर *ज्ञानेश्वरी*चा प्रभाव स्पष्ट दिसतो. *स्वात्मप्रचीती* व *साक्षात्कार* ही प्रकरणे आत्मगत म्हणता येतील. त्यांत विशिष्ट प्रसंगांची वर्णने सरळ व सुबोध भाषेत सांगितली आहेत. *श्रीरघुनाथचरित्र* हे स्वामींच्या गुरूचे चरित्र आहे. *केशवचैतन्यकथाकल्पतरु* ह्या प्रकरणात कवीने तुकाराममहाराजांच्या सद्गुरूचे वर्णन केले आहे. हा ग्रंथ त्यांनी कृष्णदास बैरागी ह्यांच्या *चैतन्यलीला* (र. श. १७०९ / इ. स. १७८७) ग्रंथाधारे लिहिला. ह्या ग्रंथात कवीने दिलेल्या माहितीत बराच विपर्यास झालेला असल्याने त्याचे ऐतिहासिक महत्त्व नष्ट झाले आहे, असे मत वा. सी. बेंद्रे व्यक्त करतात (*तुकारामांचा गुरुपरंपरा*, पृ. १५–१६). ह्याखेरीज *पतिव्रताख्यान* व *गोंधळी* अशी दोन प्रकरणे ह्यांनी लिहिली आहेत. निरंजनांची सर्वच रचना सुबोध व रसाळ भाषेत आहे. त्यात पराकाष्ठेचा प्रेमळपणा आणि अनुभवाचा जिव्हाळा आहे. ह्यांचे पद्य व गद्य लेखन पुराणस्वरूपात असूनही आकर्षक आहे.

**रचना : मु.** – १. अनुभवामृत-पदबोधिनी; गद्यटीका; प्रथम मुद्रण (शिळाछाप), पुणे, १८८२. २. आत्मबोधप्रकाशिनी; ओ. सं. ८०५. ३. केनोपनिषत्-टीका; गद्यग्रंथ. ४. केशवचैतन्यकथाकल्पतरु; अ. ६, ओ. सं. ७६०. ५. गोंधळी; कडवी. ६. पतिव्रताख्यान; ओ. सं. ४३. ७. श्री रघुनाथचरित्र; ओ. सं. ३९६. ८. साक्षात्कार; अ. ७, ओ. सं. ७१०. ९. स्वात्मप्रचीति; अ. ५, ओ. सं. ५६५. १० स्फुट – (१) कटिबंध, (२) पदपदांतरे (मराठी), (३) पदपदांतरे (हिंदी); (संपा.) कोल्हटकर, य. व्यं.; श्रीनिरंजन रघुनाथाचे ग्रंथ, सांगली, १९३५. **अमु.** – १. गीतेच्या शांकरभाष्यावरील टीका (पद्यात्मक). २. मांडूक्योपनिषदावरील टीका (गद्य). ३. ज्ञानेश्वरीवर टीका (गद्य); अनुपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : निरंजनबुवा; मकच., खं. ५; मुंबई, १९२०; पृ. १७८–१८४. २. केळकर, ना. चिं. (संपा.) : प्रस्ता., अनेककविकृत भक्तिपरमार्थपर कविता; कासं., नोव्हें. १९०३; पृ. २. ३. केळकर, ना. चिं. : निरंजनबुवाकृत केशवचैतन्यकथा कल्पतरु; कासं., नोव्हें. १९०३; पृ. २३४–२६८. ५. ढेरे, रा. चिं. : पदबोधिनी : एक गीताटीका; गंगाजळी; पुणे, १९७२; पृ. ८५–९०. ६. बेंद्रे, वा. सी. : तुकाराममहाराजांची गुरुपरंपरा; पुणे, १९६०; पृ. १५–१६.

**निरंजन माधव** / ० बनाजी [इ. स. १७०२–१७९०] कवी, व्युत्पन्न पंडित, कुशल राजकारणी पुरुष. गोदावरी नदीच्या दक्षिणेस व पैठणच्या पश्चिमेस असलेल्या वरखेडच्या शिवेवर रामडोह नावाचा जो गाव आहे तो ह्यांच्या पूर्वजांचा मूळ गाव. ग्रामलेखकाची वृत्ती त्यांजकडे होती.

ह्यांचे उपनाव एकबोटे. देशस्थ ऋग्वेदी, विश्वामित्रगोत्री ब्राह्मण. ह्यांची कुलदेवता भगवती व कुलदेव गिरीचा व्यंकटेश. निरंजन माधव ह्यांनी दत्त संप्रदाय, सिद्धेश्वर संप्रदाय व रामोपासना संप्रदाय अशा तीन संप्रदायांतील पुरुषांकडून वेगवेगळ्या वेळी मंत्रदीक्षा घेतली होती. ह्या गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : दत्तसंप्रदायी परंपरा : दत्तात्रेय > विमलानंद > अमृतानंद > ब्रह्मानंद > विमलानंद > सच्चिदानंद > ब्रह्मानंद > लक्ष्मीधर > निरंजन; सिद्धेश्वरसंप्रदायी परंपरा : त्र्यंबकराज > परानंद > विज्ञानानंद > कमळानंद > शिवानंद > चिन्मयानंद > महामौळी (बापजी पंडित) > निरंजन; रामोपासना-संप्रदायी परंपरा : आपण्णा पंडित > निरंजन.

निरंजन माधवांचे पणजे महादो बनाजी हे ग्रामलेखकाची वृत्ती सोडून विजापुरास, स्वतःचा भाग्योदय करून घेण्याच्या आकांक्षेने, गेले. तेथे बादशहाचे सेवक बनून धन, मान व प्रतिष्ठा ह्यांचा लाभ त्यांनी करून घेतला. आपले अखेरचे आयुष्य त्यांनी तीर्थयात्रेत व हरिभजनात घालविले. पुढे मोंगलांनी विजापूर ताब्यात घेतले तेव्हा त्यांचे पुत्र तिमाजीपंत ह्यांनी विजापूर सोडले व ते व्यंकटेशगिरी येथे राहावयास गेले. त्यांना भीमराव, वेंकटराव, माधवराव व हणमंतराव असे चार पुत्र व भगवती नावाची एक कन्या अशी अपत्ये होती. त्यांपैकी माधवराव हे निरंजन माधव ह्यांचे जनक होत. माधवरावांच्या पत्नीचे नाव भागीरथी.

निरंजन माधव ह्यांचा जन्म कंची प्रांती वेगवती नदीच्या तीरी पक्षितीर्थासमीप झाला. ह्यांचे मूळ नाव बनाजी. 'निरंजन माधव' हे त्यांचे कविनाम. आपल्या कवितेत ते ह्या नावाप्रमाणेच 'बनाजी', 'माधवनंदन', 'निरंजन', 'निरंजनयोगी' असाही स्वतःचा उल्लेख अनेकदा करतात.

बनाजी आपल्या वडिलांच्या मृत्यूनंतर, शाहू छत्रपतींच्या कारकीर्दीत, कंची प्रांत सोडून आपल्या ज्येष्ठ बंधूंसह सातार्‍यास आले. तेथे उभय बंधूंस थोरले बाजीराव पेशवे ह्यांनी आपल्या पदरी ठेवून घेतले. सातारा येथे रहिवास करू लागल्यावर बनाजी ह्यांस संस्कृताचे अध्ययन करण्याची इच्छा झाली. योग्य विद्यागुरूच्या शोधात असता त्यांस ज्ञानेश्वरीची *पदपद्धती* करणारे प्रसिद्ध *गोविंद बरवे* ह्यांचे पुतण्ये लक्ष्मीधर ऊर्फ बापूभट्ट बरवे ह्या सकलकलानिपुण विद्वानाचे नाव सुचविण्यात आले. हे संस्कृतविद्येप्रमाणेच 'श्रीविद्ये'चे अधिकारी व मंत्रशास्त्रात केवळ 'दक्षिणामूर्ति' होते. "यांचें पुण्यकारक नांव बनाजीच्या कानीं पडून तो त्यांच्याकडे गेला व त्यांनीही अतिशय संतोषानें त्याला संस्कृत शिकविण्याचें कबूल केलें. पहिल्या प्रथम 'सिद्धान्तकौमुदी' नें बनाजीच्या शिक्षणास प्रारंभ झाला, व पुढें सहा महिन्यांत वाढलेल्या या गुरुशिष्यांच्या संघट्टणांत परस्परांबद्दल अपूर्व प्रेम उत्पन्न झालें. (लक्ष्मीधर हे सकलकलानिपुण असून ज्ञानकलेंत तर व्यास-वशिष्ठ-वाल्मीकींसारखा त्यांचा अधिकार होता.) वक्तृत्वात ते बृहस्पति असून रूपानें सुद्धां ते मदनसुंदर होते; वीणावादनांत व गायनकलेंतही ते प्रवीण असून ज्ञानेश्वरींतील ओव्या ते गोड स्वरांत म्हणत. त्यांची काव्यरचना पाहून त्यांचे गुरु ब्रह्मानंदस्वामी ह्यांनी लक्ष्मीधर कालिदास असें त्यांचें सार्थ नामाभिधान ठेविलें होतें. अशा गुरूंच्या कृपेनें बनाजीला एके दिवशीं उषःकालीं स्वप्नांत साक्षात् चित्कलेचे (ज्ञानदेवीचे) दर्शन घडून, तिच्या संभाषणसुखाचाही लाभ घडला व पुढें गुरूंनीं त्याला महाविद्या, पंचाम्नाय, गुरुसांप्रदायपूर्वक वासुदेव-विद्या, गुरुपादुका व महावाक्यचतुष्टय इत्यादिकांचा उपदेश केला." (द. सी. पंगु : निरंजन माधव : पांगारकर-स्मारक-ग्रंथ–१; पृ. १६१–६२). ह्यावेळी बनाजींचे वय बावीस वर्षांचे होते. ह्याच सुमारास बाजीराव पेशवे ह्यांनी त्यांस वकिलातीच्या कामगिरीवर तंजावरास धाडून दिले. तंजावरास बनाजींचे तीन वर्षे वास्तव्य होते. ह्या काळात त्यांना राजदरबारी कामाचा अनुभव तर मिळालाच पण त्याबरोबरच अनेक विद्वान लोकांशी परिचय व सहवास घडून ललितकला व साहित्य ह्यांच्याशीही त्यांचा चांगलाच परिचय घडून आला.

बनाजी इ. स. १७२७ साली तंजावरहून सातार्‍यास परत आले. त्यावेळेस त्यांना कळले की, त्यांचे गुरू लक्ष्मीधर बर्वे हे परलोकवासी झाले आहेत. ती वार्ता ऐकून त्यांना अतिशय दुःख झाले. आपल्या पारमार्थिक मार्गात आपल्याला ह्यापुढे आपल्या गुरूप्रमाणे समर्थपणे कोण मार्गदर्शन करील ह्याची घोर चिंता त्यांना लागून राहिली. अशा अवस्थेत असता एके रात्री स्वप्नात त्यांचे गुरू लक्ष्मीधर आले व 'शोक करण्याचें कारण नाहीं; आजपासून सातवे दिवशीं आमची विभूति भेटेल' असे त्यांनी ह्यांस आश्वासन दिले. "या स्वप्नावर बनाजींचा प्रथम विश्वास बसला नाहीं; पण योगायोग असा आला कीं, बापजी पंडित म्हणून बाजीरावसाहेबांचे कोणी स्नेही असून तेही वकिलातीच्या कामीं फार कुशल होते. बनाजींच्या वडील बंधूंचा व त्यांचाही स्नेह बराच असल्यामुळें, ते पुण्याच्या मुक्कामांत त्यांच्याकडेच उतरत. हे त्रिंबकराजांच्या सिद्धेश्वर संप्रदायाचे अनुयायी होते. अशा पुरुषाच्या सहज परिचयानें बनाजींचें त्यांच्याशी संघट्टण घडून, बाजीरावानें त्या दोघांच्या एकाच कामीं केलेल्या नेमणुकीचीही त्यांत भर पडली. उभयतांच्या ह्या समागमांत ज्ञानकलेची अभिनव गोष्ट जी समाधि अवस्था, ती बनाजीस प्राप्त झाली. बापजी पंडित पातंजल योगांत निष्णात असल्यामुळें, त्यांनीं आपल्या नूतन शिष्यास त्या शास्त्रांत पारंगत केलें. त्यांच्या सहवासांत *बालावबोध* (बालबोध), *कपिलगीता*, *पंचीकरण* इत्यादींचें ज्ञान तर बनाजीस घडलेंच, पण त्यांतूनही कोटी जन्मांत जें साधणार नाहीं, तें बनाजीस पंडितांनीं एका पळांत असें साधून दिलें कीं त्याचें लक्ष नादानुसंधानीं लागून अर्ध क्षणांत तो मुक्त झाला. पूर्वी मंत्रमार्गांत दत्त-संप्रदायी लक्ष्मीधर बरवे गुरु होते, तर त्यांच्या मृत्यूनंतर ज्ञानमार्गांत त्यांस सिद्धेश्वरसंप्रदायी बापजी पंडितांचा लाभ घडला. त्यानंतरच बनाजीनें 'निरंजन' असें मोक्षसिद्धिदर्शक पारमार्थिक नांव धारण केलें असावें." (द. सी. पंगु, पांगा. स्मा. ग्रं. १; पृ. १६३–६४).

निरंजन माधवांना अध्यात्मसाधनेत, बापदेवांकडून सुमारे दहा-बारा वर्षे मार्गदर्शन घडल्यावर त्यांचे देहावसान झाले असावे. त्यानंतर श. १६६८/इ. स. १७४६ च्या सुमारास निरंजन माधवांना आणखी एका गुरूचा लाभ झाला. ह्या गुरूचे नाव आपण्णा पंडित. हे रामोपासक होते. त्यांजकडून ह्यांनी राममंत्र घेतला. "राममंत्र षडाक्षर। तो उपदेशिला महत्तर। रामरहस्य समग्र। प्रकट दाविलें महंतें ।।" सांप्रदा. ३०३.

निरंजन माधवांच्या काव्याचा विचार करताना, जे राजकारणी व पारमार्थिक जीवन ते जगले ते नीट समजून घेणे आवश्यक आहे. तसे न केल्यास त्यांच्या कवितेचे वेगळेपण लक्षात येणार नाही.

बनाजींचे, त्यांच्या वयाच्या बाविसाव्या वर्षापासून छप्पन्नाव्या वर्षापर्यंतचे (इ. स. १७२४–१७५८) आयुष्य, पहिले बाजीराव व नानासाहेब ह्या दोन पेशव्यांच्या कारकीर्दीत, त्यांचे वकील म्हणून, तंजावरकर सर्फोजीराजे भोसले, पोर्तुगीज, म्हैसूरचा राजा हैदरअल्ली वगैरेंच्या दरबारांत गेले. राजकारण-प्रकरणींचा त्यांचा व त्यांचा उल्लेख असलेला बराचसा पत्रव्यवहार पेशवे दप्तर भाग २२, २६, २८ ह्यांत आढळतो. मध्यंतरी काही काळ नानासाहेब पेशव्यांची बनाजींवर गैरमर्जी झाली होती. ती दूर होईपर्यंतचा काळ, बनाजींनी राजकारणापासून अलिप्त राहून, दक्षिण भारतातील तीर्थक्षेत्रांची यात्रा करण्यात, पारमार्थिक साधनेत आणि प्रवचने व कीर्तने करण्यात व्यतीत केला. पुढे नानासाहेबांचे त्यांच्याविषयीचे प्रतिकूल ग्रह दूर

झाल्यावर त्यांनी त्यांस यथापूर्व आपल्या वकिलातीचे अधिकार त्याचप्रमाणे ' शिबिकादि सकळसंपदा ' देऊन त्यांची श्रीरंगपट्टण येथे नेमणूक केली.

बनाजी हे मार्मिक राजकीय बातमीपत्रे लिहिण्यात – विशेषतः घटना जशा घडल्या तशा हुबेहूब वर्णन करण्यात – मोठे पटाईत होते. ते औरंगाबादेस वकिलातीचे कामावर असता दमाजी गायकवाडाने चालविलेल्या धामधुमीच्या संदर्भात नानासाहेब पेशवे यांस तेथून दि. २४-२-१७५१ रोजी त्यांनी लिहिलेले खालील पत्र पहा :

" श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवेसी – विनंती सेवक बनाजी माधवराऊ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ ८ माहे रबिलाखर मंदवार पावेतों कृपावलोकनें जाणून स्वानंदातिशय लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. छ ३ माहे मिनहूस सोमवारी दो प्रहरा राजश्री बापूजी बाजीराव यांचें व दमाजी गायेकवाड यांचें युध झालें. खानदेशांतूनहि पत्र आलें. बजिनस नसिजंगाचे हरकारेही बातमीचे पाहून आले, त्यांनीं जुबानी सांगितलें. सेवक दरबारी आसतां साता कोसाचे अंतर होतें. बापू बहादुरपुऱ्यावर होते. गायेकवाड गांधेलीवर होते तेही चालून आले. हे ही गेले. दरम्यान चौ कोसावर लढाई जाली. जुज मोठे जालें. सोनजी भापकर व त्याचा भाऊ त्याचें नाव जासुदास विदित नाहीं, ऐसे उभयतां कामास आले. आधीं भाऊ कामास आला त्यास काढावयास सोनजी उभा राहिला तोही कामास आला. जंगाचा प्रसंग असा जाला कीं जगजीवन पवार यानें तरतूद केली. जितके आराबा व कांहीं जेजायेला वगैरे दारूचें सामान खराबा करून त्याचा थाट मार्गे रचिला, त्याजमागें रचिला, त्याजमागें फौज उभी केली, आपण दोनी हजारानसीं पुढें आला. दिखाई दिल्ही. थोडी फौज आहे म्हणून, आमचेही फौजेनें चालून घेतलें. काढावा काढून आपण त्या आराबिया मागें जाऊन राहिला. बापूच्या फौजेत मार आराबियाची फार जाली. तेथेंच हा प्रसंग उभयतांचा जाला. मग सरमिसल जाली. दादूखान कोण्हीकडे गेले ठिकाण लागत नाहीं. इतकियांत महिपतराव कवडे यांजकडे खंडेराव गायकवाडानें चालून घेतलें तेथेंही झोंटधरणी बरीच जाली, मोठी फौजेचें जोरें यांस उचललेंच होतें, परंतु स्वामीचे पुण्य प्रताप त्याचे मस्तकीं, म्हणून खंडेराव गायकवाडास जखमा तरवारेच्या भारी लागल्या. येक खांद्यावरही भारीच आहे. दुसरी पाठीवर. दोन्ही घाव मातबरच, याजमुळें पालखींत घालून नेऊन जखमा सेखिल्या. वांचणें कठिण आहे, यैसे जासूद सांगत होते. तेव्हा माघारे आमची फौज बहादुरपुऱ्यास आली. दमाजीही गोंधळीवर गेला. दोघेही कायम राहिले. आणखी येक जुज होईल यैसेंही म्हणत होते. आज आम्हांकडीलहि जोड्या येतील. सविस्तर लिहून पाठऊं. तूर्त आलें वर्तमान लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

एका राजकारणी पुरुषाचे पत्र ह्या दृष्टीने ह्या पत्राला जसे ऐतिहासिक महत्त्व आहे, तसेच विद्याव्यासंगी संस्कृतभाषाकोविद व्यक्तीने सुटसुटीत, सहजसुंदर मराठीत अल्पाक्षरी अन् अर्थपूर्ण लिहिलेले पत्र ह्या दृष्टीनेही ते लक्षणीय आहे. मराठी गद्यशैलीच्या विकासाचा अभ्यास करणाऱ्या भाषापंडितांनाही, अठराव्या शतकाच्या उत्तरार्धातील मराठी गद्यलेखनाचा हा नमुना लक्षात घ्यावासा वाटेल. लेखक दरबारी मुत्सद्दी व फारसी भाषेचा ज्ञाता असूनही, तत्कालीन इतर पत्रलेखकाप्रमाणे फारसी शब्दांची बेसुमार पेरणी न करता आवश्यक तेथेच त्याचा वापर करताना तो आढळतो. बनाजींना संस्कृत व फारसी भाषांव्यतिरिक्त कानडी व गुजराती ह्या भाषाही चांगल्या अवगत होत्या. पण त्यांचा प्रभाव आपल्या भाषासरणीवर पडू न देता त्यांनी तिचे अस्सल मराठी वळण अबाधित ठेवले आहे.

बनाजी दरबारी सेवेतून इ. स. १७५८ च्या सुमारास निवृत्त झाले असावे. आपले उर्वरित आयुष्य हरिभक्ती, अध्यात्मचिंतन व काव्यलेखन ह्यांतच पूर्णपणे व्यतीत करण्याचे त्यांनी ठरविलेले दिसते. ' परि मुख्य विश्रांति या मना । अध्यात्मचिंतन हरिभक्ति ॥ ' असे ते म्हणू लागले होते.

श्रीमंत पेशवे ह्यांच्या सेवेत असता, राजकारणाच्या त्याचप्रमाणे यात्रेच्या निमित्ताने निरनिराळ्या प्रांतांत बनाजींना प्रवास करावा लागला त्यामुळे त्यांच्या लौकिक ज्ञानात भर पडत जाऊन त्यांचे ' चातुर्य ' जसे वाढले, तशीच त्यांची ब्रह्मविद्येची साधनाही प्रगत होत राहिली. *संप्रदाय-परिमळ* ग्रंथात, ह्या संदर्भात बनाजींच्या मुखातून पुढील हकीकत कवी निरंजनदास ह्याने वदविली आहे : " नाना देश संचार करितां । नाना स्थळीं फिरतां । नानापरिचे सत्पुरुष संता । पाहोनि झालों कृतार्थ ॥ २४५ ॥ भिन्न भिन्न ज्ञान कळाकुसरी । अभिनव बोध चमत्कारी । डोलती आनंद निर्भरीं । परिपूर्ण अंतरीं अनुभवें ॥ २४६ ॥ कोणी राजयोगी हठयोगी । कोणी मंत्रयोगी लययोगी । कोणी देखिले शिवयोगी । धुरंधर जे शिवमया ॥ २४७ ॥ निस्पृह कोणी निराभिमानी । कोणी ब्रह्मविद्ये साभिमानी । कोणी प्रपंची असोनि । पद्मपत्र समान ॥ २४८ ॥ कोणी लक्ष साधनी दक्ष । कोणी विहंगम मार्ग । कोणी लंबिकायोगी दक्ष । प्राशन करिती सुधेचें ॥ २४९ ॥ मंत्र तंत्र साधनीं । ते तो अनंतानंत देखिले नयनीं । तयातें दुरोनि वंदोनि । सेविले पूर्वील सत्पुरुष ॥ २५० ॥ याची एक एक कळा । विशेषात्कारें पडली डोळां । त्यांची कृपा संपादोनि निर्मळा । संग्रह केला त्या विद्येचा ॥ २५१ ॥ "

वरील कथनावरून जी एक गोष्ट ठळकपणे लक्षात येते ती ही की, बनाजींनी वेगवेगळ्या वेळी लक्ष्मीधर, बापजी पंडित ऊर्फ महामौळी, व आपण्णा पंडित असे तीन भिन्न संप्रदायांतील भिन्न मार्गांचे अवलंबन करणारे तीन भिन्न पुरुष जरी गुरू केले असले तरी त्या तिघांचेही लक्ष्य एकच होते, व आपलेही तेच आहे, हे पक्केपणे जाणले. त्यांनी ह्या तिघांच्याही शिकवणुकीचा समन्वय साधून आपली पारमार्थिक साधना जोराने पुढे चालू ठेविली. त्यांचे प्रारंभीचे गुरू लक्ष्मीधर दत्तसंप्रदायी असून तंत्रप्रधान श्रीविद्येचे मोठे अधिकारी पुरुष होते. ते ज्या दत्तसंप्रदायी धारेचे अनुसरण करीत तिच्यात त्रिपुरादेवीची आराधना, मंत्रविद्या व श्रीचक्रपूजा अंतर्भूत होती. (दृश्य विश्व हे आदिशक्तीच्या इच्छेमुळे निर्माण होत असते. योगमाया, ब्रह्ममयी, त्रिपुरा अशा नावांनी ती संबोधिली जाते. ती त्रिगुणात्मक आहे. ब्रह्मतत्त्वाचा पराबिंदू, अमरबिंदू व शक्तीचे बिंदू, बीज, नाद हे तीन भाग ह्या सर्वांचे प्रतीकात्मक चिन्ह जे त्रिकोण △ त्याला त्रिपुराधाम असे म्हणतात. श्रीचक्र ह्याच चिन्हावर आधारित आहे. ह्या सर्वांची माहिती जे ज्ञान करून देते त्याला 'श्रीविद्या म्हणतात.) 'श्रीविद्या' म्हणजे श्रेष्ठविद्या, ब्रह्मविद्या. श्रीविद्या ही आत्मशक्ती आहे. तिच्या उपासनेचे ज्ञान अधिकारी गुरूकडून प्राप्त झाल्यास कर्मकांडादी कष्टमय मार्गांचे अवलंबन करावे न लागता, गृहप्रपंचाचा त्याग करावा न लागता, साधकास आत्मज्ञानप्राप्ती लवकर होऊ शकते. हे आत्मज्ञानप्राप्तीचे तंत्र व त्याचा मंत्र बनाजींना लक्ष्मीधरांकडून प्राप्त झाला. परंतु लक्ष्मीधर दिवंगत झाल्यामुळे, योग्य मार्गदर्शनाच्या अभावी आपली आध्यात्मिक प्रगती करून घेण्यास त्याचा त्यांना उपयोग करून घेता येईना. अनेक पट्टीच्या वेदान्त्यांच्या तोंडून ' प्रज्ञानं ब्रह्म ', ' अहं ब्रह्मास्मि ', ' तत् त्वमसि ', ' अयमात्मा ब्रह्म ' ह्या महावाक्यांवरील विवेचने त्यांनी ऐकिली होती. परंतु सद्गुरूच्या साह्याशिवाय हे येणे कठिण हे त्यांनी जाणले होते. गुरू लक्ष्मीधर परलोकी गेले, आता कोण आपल्याला साह्य करील अशी चिंता त्यांना लागली. अशा वेळी बापजी पंडित ह्या थोर ज्ञानी पुरुषाशी त्यांचा संबंध जुळून आला. शाब्दिक ज्ञानाच्या पलीकडील जे ब्रह्म, त्या ब्रह्माच्या ठिकाणी ज्याने पूर्णपणे आश्रय केला आहे असा हा सत्पुरुष होता. " करितां सर्व व्यवहार । समाधि जयाची सुस्थिर ।

तुर्येमाजि मानस स्थिर । अमनस्कपणें अखण्ड ॥ ५६ ॥ जितेंद्रियता शुकवत । कपिलासमान योगवंत । करतळामळकवत । सांख्य सिद्धान्त जयातें ॥ ५७ ॥ शांतीची घडली मूर्ति । सहजनिर्विकला स्थिति । बोधनसामर्थ्ये बृहस्पती । तात्काळ शिष्यांसि प्रबोध ॥ ५८ ॥ " असे बापजी पंडितांचे वर्णन निरंजनदास ह्याने *सांप्रदायपरिमळ* ग्रंथात (उद्गार ४) केले आहे. त्याच 'उद्गारा'त बापजींनी बनाजींस जे प्रतीतिपूर्ण आत्मज्ञान हवे होते ते कसे दिले ते पुढीलप्रमाणे निरंजनदास सांगतो : " बाळबोध कपिलगीता । प्रणवार्थ बोधिला यथार्थता । पंचीकरण महावाक्य सर्वथा । बोधिला समर्पक व्यक्तार्थें ॥ ६५ ॥ षण्मुखी खेचरी मुद्रा दोनी । दावोनि लक्ष नादानुसंधानीं । मुक्त केलें अर्ध क्षणीं । कोटिजन्मीं जें साधिजे ॥ ६६ ॥ ते एका पळांतरीं । देवोनि कृतार्थ केलें परीं । तारक होवोनि संसारीं । तारिलें कृपाकटाक्षें ॥ ६७ ॥ "

बनाजींना बापदेवांचा बराच काळ सहवास घडून त्यांचे आध्यात्मिक जीवन समृद्ध झाले. ज्या महावाक्यांचा स्पष्ट बोध होऊन आत्मानुभव यावा ह्यासाठी त्यांची अनेक वर्षे धडपड सुरू होती ती फळाला आली. इ. स. १७४५ च्या सुमारास बापदेव समाधिस्थ झाले असावे. तदनंतर इ. स. १७४६ मध्ये केव्हातरी आपण्णापंडित ऊर्फ रामब्रह्मानंद ह्या रामोपासकाच्या भेटीचा लाभ ह्यांना घडला. ह्यावेळी ते *चिद्बोधरामायण* नावाची *अध्यात्मरामायणा*ची टीका लिहिण्यात मग्न होते. ह्या ग्रंथाच्या लेखनाला प्रारंभ त्यांनी श्रीरंगपट्टण येथे केला. त्यांचे सुंदरकांड लिहून पूर्ण झाले त्याच सुमारास आपण्णांच्या भेटीचा हा योग आला. त्यांनी बनाजींस षडक्षर राममंत्राचा उपदेश करून रामरहस्य समजावून सांगितले. हे तिसरे गुरू देहाने पूर्वगुरूंहून भिन्न असले तरी तत्वविचाराच्या दृष्टीने अभिन्नच आहेत ह्याची प्रचीती आल्यामुळे, लक्ष्मीधर व बापदेव ह्यांचेच ते अवतार आहेत अशी बनाजींची भावना पक्की झाली होती. रामतत्त्वाचा आपल्याला नीट बोध व्हावा ह्यासाठीच त्यांनी आपण्णांना माध्यम बनवून आपल्याला उपकृत केले, अशी त्यांची मनोधारणा होती. ते मूळचे कृष्णोपासक वैष्णव व पुढेही वैष्णवच राहिले. पण त्यांचा हा वैष्णवधर्म समन्वयात्मक व व्यापक स्वरूपाचा बनला होता. तंत्रसाधना, मंत्रसाधना, भक्तिसाधना, ज्ञानसाधना, योगसाधना ह्यांचा विशुद्ध समन्वय साधून ह्यांनी आपल्या आध्यात्मिक जीवनाला अपरूप असा घाट दिला. ह्यांत जशी त्यांची पृथगात्मता तशीच त्यांची वैचारिक स्वतंत्र व्यक्तिमत्ता ठळकपणे नजरेस येते.

बनाजी ऊर्फ निरंजन माधव ह्यांची ज्ञात रचना पुढीलप्रमाणे : (१) *कृष्णानंदसिंधु*; (२) *चिद्बोधरामायण*; (३) *ज्ञानेश्वरविजय*; (४) *ज्ञानसुधा*; (५) *सुभद्राचंपू* (सुभद्रास्वयंवर); (६) *रामकर्णामृतादि* वीस स्तोत्रे व पदे; (७) स्फुट प्रकरणे : *श्रीभार्गवरामजन्मचारित्र* (ओव्या); *अद्वैतबोध* (श्लोक;) *यतिनृपतिसंवाद* (श्लोक); *अद्वैतभावतापंचदशी* (श्लोक); *वशिष्ठसुशर्मासंवाद* (श्लोक); (८) *बोधप्रदीपिका*; (९) *अद्वैतामृत*; (१०) *चिद्रत्न*; (११) *सद्वृत्तमुक्तावली*; (१२) *वृत्तावतस*; (१३) *प्रयागवर्णन*. ह्याखेरीज *सांप्रदायपरिमळ* [ ⇨ ३ ] हा ग्रंथ त्यांच्या नावावर मोडतो. पण त्याच्या कर्तृत्वाबद्दल दुमत आहे. हा निरंजन माधवांनी लिहिला नसून 'निरंजनदास' असे स्वतःस म्हणविणाऱ्या त्यांच्या कोणा शिष्याने 'आत्मवृत्ता'चा आभास निर्माण करून रचलेला तो संवादात्मक ग्रंथ आहे, असे बऱ्याच विद्वानांनी आपले मत व्यक्त केले आहे. ह्या ग्रंथाप्रमाणेच वर उल्लेखिलेला *प्रयागवर्णन* हा ग्रंथही निरंजन माधवांचा नसून कोणा नृसिंहाच्या माधव नामक शिष्याने तो रचिला असावा असे काहींचे म्हणणे आहे.

निरंजन माधवांची जी रचना निर्विवाद आहे तिचे (१) स्तोत्रे, (२) चरित्र, (३) काव्य, (४) गद्यटीका, (५) स्फुट प्रकरणे, (६) वृत्तविषयक, असे भाग पडतात. त्यातील *स्तोत्रसंग्रह*, *श्रीज्ञानेश्वरविजय*, *चिद्बोधरामायण*, *सुभद्राचंपू* ह्या कृती विशेष उल्लेखनीय. ह्या सर्वांचा परिचय अन्यत्र [ ⇨ ३ ] विस्ताराने करून दिला आहे. ह्या रचनेव्यतिरिक्त श्रीशंकराचार्यांच्या *वाक्यसुधा*, *स्वात्मनिरूपण* ह्या ग्रंथांवरील व तीन वेगळ्या श्लोकांवरील *बोधप्रदीपिका*, *अद्वैतामृत* व *चिद्रत्न* असे तीन गद्य टीकाग्रंथ लिहिले आहेत. निरंजन माधवांचा छन्दःशास्त्राचा अभ्यास चांगला होता. ते स्वतःच स्वतःला 'छन्दःशास्त्रविशारद' म्हणवितात. ह्यांनी *सद्वृत्तमुक्तावली* व *वृत्तावतंस* असे दोन एतद्विषयक ग्रंथ लिहिले आहेत. पहिला ग्रंथ हा १५० श्लोकांचा आहे. ह्या ग्रंथाबद्दल डॉ. माधवराव पटवर्धन लिहितात : "निरंजन माधव हा वृत्ताला 'व्यक्ति' म्हणतो आणि 'जातिव्यक्तिरूपामध्यें छन्दःशास्त्र विरूढलें' असें सांगतो. मराठींत लगत्वभेदातीत जी पद्यरचना रूढ आहे, तिचा विसर त्याला व्हायला नको होता. परंतु एकंदरीनें पाहतां छन्दावर लिहिणारांची प्रवृत्ति स्वतंत्र दिसतच नाहीं. नवीं नवीं नांवें देण्यामध्यें असेल तें स्वातंत्र्य व्ययित होई. कनकप्रभा, विबुधप्रिया, इत्यादि वृत्तांना निरंजन माधव मत्तहासिनी, मल्लिका हीं नांवें देतो, पण आधार देत नाहीं. एखाद्या दाक्षिणात्य छन्दःशास्त्रकाराचा त्याला आधार असावा; कारण विबुधप्रिया वृत्ताला नागवर्म मल्लिकामाला म्हणतो आणि *मन्दारमरन्दचम्पू*चा कर्ता कृष्णकवि हा मल्लिका म्हणतो. पण अमृतध्वनि वृत्ताला *मन्दारमरन्दचम्पू*कार मत्तेभ म्हणत असतांहि निरंजन माधव कल्पलतिका हें नांव देतो. मधुमती, कमला, भामिनी, सहदळा (?), कनकलता, मदनसायक, हेमकला, कामकला व सुधा हीं नऊ वृत्तें तो नवीनच देतो; पण आधार सांगत नाहीं." (छंदोरचना, पृ. ५५९ – ५६०). निरंजन माधवांचा हा ग्रंथ वि. ल. भावे ह्यांनी आपल्या *महाराष्ट्र कवि* मासिकात (अंक ३५–३६–३७) १९०६ साली प्रसिद्ध केला. त्यांचा *वृत्तावतंस* हा दुसरा ग्रंथ आज उपलब्ध नाही.

निरंजन माधव हे वृत्तप्रभू व रसज्ञ होते. रसानुकूल विविध प्रकारची वृत्ते वापरण्यात त्यांचा हातखंडा दिसतो. काव्यकलेच्या दृष्टीने त्यांची काव्यरचना सर्वसामान्य वाचकाचे अंतःकरण तितकेसे आकर्षून घेत नाही; परंतु परमार्थमार्गातील साधकाच्या चित्ताची पकड मात्र ती अवश्य घेते. निरंजन माधवांचा आत्मा कलावंताचा नव्हता; तो परमार्थसाधकाचा होता. त्यामुळेच त्यांच्या कवितेचे रूप व तिचा आत्मा ही त्याला अनुरूप अशीच घडणे स्वाभाविक होते.

**रचना : मु.** – १. निरंजन माधवाचा कवितासंग्रह; भा. १ (स्तोत्रसंग्रह व सांप्रदायपरिमळासह); अष्टके, पदे, स्तोत्रे इत्यादी मिळून संख्या २१; ग्रं. सं. ७२३; सांप्रदायपरिमळ; ५ उद्गार; ओ. सं. ९९२; र. का. : श. १६८५; संपा. पांगारकर, ल. रा.; पुणे, १९१९. २. निरंजनमाधवाचा कवितासंग्रह; भा. २; (ज्ञानेश्वरविजय, चिद्बोधरामायण यांसह)–(१) ज्ञानेश्वरविजय, पूर्वखंड, उत्तरखंड; अध्याय १७, श्लो. सं. ८१९; र. का. : श. १६८७ (इ. स. १७६५), पार्थिव संवत्सर, फाल्गुन शुक्ल ५, शुक्रवार. (२) चिद्बोधरामायण (बालकांड) सर्ग ७; श्लो. सं. ४२२; र. का. : श. १६८०; (३) स्फुट प्रकरणे; संख्या ५; ओ. सं. १५३; (४) सुभद्राचंपू; सर्ग ७; ग्रं. सं. ३८०; संपा. पांगारकर, ल. रा.; पुणे, १९२७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ग्रामोपाध्ये, गं. ब. : निरंजन माधव कृत 'सुभद्राचंपू' : वाङ्मयविचार; पुणे, १९६८; पृ. ६१–७९. २. चांदोरकर, गो. का. : निरंजन माधव कृत चिद्रत्न; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ६५. ३. जोशी, चिं. नी. : निरंजन माधवाच्या स्तोत्रसंग्रहावर टीकात्मक निबंध; पुणे, १९३५; पृ. ५६. ४. जोशी, चिं. नी. : सांप्रदायपरिमळाचा कर्ता कोण ?; पांगारकर स्मा.

ग्रंथ; पुणे, १९५०. ५. ढेरे, रा. चिं. : निरंजन माधव : व्यक्ति व वाङ्मय; निरंजन माधव विरचित 'सुभद्रास्वयंवर' (संपा. : ढेरे, रा. चिं.) १९६७; पृ. ३–५८. ६. निफाडकर, नाथ : सांप्रदायपरिमल कोणाचा ? ; मसाप.; जाने. १९३१; पृ. २१५–२२, ३३९–४६. ७. पंगु, द. सी. : निरंजन माधव : प्राचीन मराठी कविपंचक; कोल्हापूर, १९४४. ८. पंगु, द. सी.; पेशवाईतील एक राजकारणी कवि : निरंजन माधवराव ऊर्फ बनाजी माधव; प्रतिभा, १४ सप्टें. १९३४; पृ. १६. ९. पंगु, द. सी. : सांप्रदायपरिमळाचे कर्तृत्व – चर्चा; विज्ञावि.; सप्टें. १९३१; पृ. ३२८. १०. पांगारकर, ल. रा. (संपा.) : निरंजनमाधवांचा कवितासंग्रह; पुणे, १९१९, १९२७. ११. पोतदार, द. वा. : सांप्रदायपरिमळ ग्रंथ कोणाचा : निरंजनाचा की निरंजनदासाचा ?; मसाप., मार्च १९२८, पृ. ३–४. १२. पोतदार, द. वा. : सांप्रदायपरिमलाचा कर्ता; मसाप., व. १, श. १८५०; पृ. ८९. १३. महाजन, ज. भ. : सुभद्राचंपू : एक अभ्यास; सत्यकथा, मार्च १९५७; पृ. ३१. १४. सबनीस, पां. जि. : निरंजनमाधव : चरित्र व काव्यविवेचन; विज्ञावि.; ऑग. १९२८; पृ. ३३०–३३९.

**निरंजनमाधवदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० निरंजन रघुनाथ** – पहा **निरंजनबुवा.**

**निरंजनशिष्य मरळसिद्ध** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – निरंजन भेदुशास्त्र; ओ. सं. ९०; रासमं. हस्त. सू., पृ. ३८.

**निरंजनशिष्य शिवलिंग** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शिवलिंग कथन; ओ. सं. ४८; प्र. ले. का. : श. १७३१ / इ. स. १८०९; रासमं. हस्त. सू., पृ. ३९.

**० निरंजनस्वामी** – पहा **निरंजन कऱ्हाडकर.**

**० निरंजनस्वामी–२** – पहा **निरंजनबुवा.**

**निरंजनस्वामी** [का. अनु.] पदकार. वेंचले येथील श. १८२३ / इ. स. १९०१ मध्ये नकललेल्या पदांच्या बाडात ह्या कवीची पदे संग्रहित (भाइसंमं.).

**निर्मळ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**निर्मळ आनंदी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**निर्मळ गोसावी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – ब्रह्मज्ञान, ओवीबद्ध प्रकरण, ओ. सं. अंदाजे ७४ (शेवटच्या ओवीत 'निर्मळ गोसावी म्हणे' असा कवीचा उल्लेख); सवामं. हस्त. सू., खं. २.

**निर्मळदास** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – कोल्हापूरच्या महालक्ष्मीवर आरती; मआ., पृ. ३२७.

**निर्मळ पाठक** [अंदाजे शा. श. चे चौदावे शतक / इ. स. १५ वे शतक] कवी. ह्यांनी विष्णुशर्माकृत *पंचतंत्रा*चे मराठी भाषान्तर 'ओवीशृंखला' म्हणजे पद्यरूप करून लिहिले. पशुपक्ष्यांच्या माध्यमातून सांगण्यात आलेल्या ह्या कहाण्यांचे स्वरूप कवीच्या मते "मनुष्याचिया काहाण्या । स्वापदावरी घालूनिया । राज्यनीति मार्ग तया । विष्णुशर्मे जी ॥" ह्या प्रकारचे आहे. ग्रंथरचनेचा आधार सांगताना कवी म्हणतो, "पहिली प्रति होती हो मोकळी, तें वोवीबद्धें साकळली, महासंक्षेपें निषजविली, कवि निर्मळ पाठकें ॥" ह्यावरून कवीच्या पुढे *पंचतंत्रा*ची गद्यरचना होती असे दिसते. ह्याचसाठी संक्षेपाची व ओवीबद्ध रचनेची नोंद कवी करतो.

ह्या ग्रंथास भाषान्तर म्हणण्यापेक्षा अनुवाद म्हणणे बरे पडेल. निर्मळ पाठक कथा सांगण्यात रंगला म्हणजे त्याची लेखणी सहजपणे चालते. निर्मळ पाठकाच्या ह्या पंचतंत्रात प्राचीन शब्दांचा भरणा आहे. फारसी व उर्दू शब्द मात्र फारसे आढळत नाहीत.

**रचना : अमु.** – पंचोपाख्यान; ओ. सं. २७०७; मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद; त्रु. पो., मराठी संशोधन मंडळ, मुंबई; हवता., पृ. ३८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पोहनेरकर, न. शं. : निर्मळ पाठकाचें पंचोपाख्यान; प्रतिष्ठान, जाने. १९५९; पृ. ३७–४१.

**निर्मळ शाम** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**निर्मलसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**निर्मळा** [इ. स. चे तेरावे शतक] संतकवयित्री. ह्या संत चोखोबांच्या धाकट्या भगिनी होत. त्या मेहुणपूर गावी राहात असत. हे गाव बहुधा मंगळवेढ्याजवळच असावे. चोखोबांकडून ह्यांनी उपदेश घेतला होता. *सकलसंतगाथेत* ह्यांचे २४ अभंग मुद्रित झाले आहेत. पंढरीच्या विठोबाची सेवा अहर्निश घडावी अशी ह्यांना ओढ आहे. परमार्थाची गोडी लागल्याने "संसाराचा छंद नकोसा हा झाला" अशी ह्यांची अवस्था झाली. ह्या म्हणतात : "सांपडलें संधी संसाराचे संगीं । सोडवी लगबगीं मायबापा ॥" ह्या अवस्थेतून बाहेर पडल्यानंतर नाममंत्रजपाचे सोपे साधन त्यांच्या हाताशी आले. संतसहवासातील परमार्थ हाच आयुष्यातील ठेवा झाल्याचा प्रत्यय ह्यांच्या अभंगांतून येतो. ह्या अभंगांपैकी प्रत्यक्ष ह्यांचे किती व प्रक्षिप्त किती हा एक अभ्यासविषयच ठरावा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : निर्मळा; मसंक., मुंबई, १९३९; पृ. २१२–२१४.

**० निवृत्ति** – पहा **निवृत्तिनाथ.**

**० निवृत्ति अवधूत–१** – पहा **अवधूत–३.**

**निवृत्ति अवधूत–२ / ० निवृत्तिनाथ अवधूत** [अंदाजे इ. स. चें अठरावे शतक] कवी. गुरू : आनंद चैतन्य किंवा अनंत चैतन्य. आपल्या *परमप्रकाश* प्रकरणात आनंद गुरूचा व स्वतःच्या नावाचा कवीने निर्देश केला आहे. उदा., "तंव गुरुनें शिष्य आलिंगिला । शिष्य आनंदे प्रबोधिला । ते ज्ञान अनुवादला । *निवृत्ति अवधूत* ॥ ८४ ॥ सद्गुरु आनंद प्रसादे । वाचा प्रकाशे आनंद । तें सुख अनुवादे । निवृत्तिनाथ अवधूत ॥ ८५ ॥"

*परमप्रकाश* ह्या प्रकरणात वेदान्ततत्त्वज्ञानाचे निरूपण आले आहे. *अनेककविकृत लघुकाव्यमालेत* (खं. १) प्रस्तुत प्रकरण वा. दा. ओक ह्यांनी छापले आहे. ओकांच्या मते हे प्रकरण ज्ञानेश्वरबंधू निवृत्तिनाथांचे आहे. पण विषय व भाषा ह्यांवरून ते 'निवृत्तिनाथां'चे नसून 'निवृत्ति अवधूत' / 'निवृत्तिनाथ अवधूत' हे नाव धारण करणाऱ्या अन्य कवीचे आहे, असे दिसते (शं. श्री. देव; सवामं. बा. ४२०). ह्या ग्रंथाची समर्थवाग्देवतामंदिरातील प्रत श. १६८७ (इ. स. १७६५) मधील आहे (सवामं. बा. ११४७). निवृत्ति अवधूतांनी रचलेल्या *दशनामविधान* (ओव्या ८२) ग्रंथात तीर्थ, आश्रम, अरण्य, सागर, गिरि, सरस्वती असे जे दहा गोसावी आहेत त्यांचा निर्देश येतो.

**रचना : मु.** – १. दशनामटीका / दशनामविधान; ले. श. १६९९; कासं. २. परमप्रकाश; ओ. सं. ८५; संपा. ओक, वा. दा.; अकलकामा., भा. १, मुंबई, १८९५; पृ. १२२–१३१. ३. वृत्तिबोध; कासं. **अमु.** – १. परमहंस (पोथी – पत्रे ७); सवामं. २. परमहंस पद्धति; सवामं. हस्त. सू., खं. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : निवृत्ति अवधूतकृत दशनामविधान; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १८०.

**निवृत्तिदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**० निवृत्तिदेव–१** – पहा **निवृत्तिनाथ–१.**

**निवृत्तिदेव–२** [अंदाजे श. १५०० / इ. स. १५७८ – श. १५५० / इ. स. १६२८] भगवद्गीताटीकाकार. ज्ञानेश्वरांचे गुरू व चित्सूर्य म्हणून गौरविल्या जाणाऱ्या निवृत्तिनाथांहून हे भिन्न आहेत. ह्यांनी *भगवद्गीते*वर श्रीधरास अनुसरून समओवी टीका लिहिली. शके १५७५ मध्ये लिहिलेल्या *हुसेन अंबरी* ह्या गीताटीकेत अच्युताश्रमांबरोबर निवृत्तिदेवांचा उल्लेख आलेला आहे. निवृत्तिदेव ह्यांच्या नावावरील समओवी गीताटीकेची एक त्रुटित प्रत भारत इतिहास संशोधक मंडळात आहे.

समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथे निवृत्तिदेवकृत *भगवद्गीते*च्या तीन प्रती आहेत. ह्यांपैकी बाड क्रमांक २१९७ मधील प्रत संपूर्ण आहे. तिच्यामध्ये १८ अध्यायी टीका आहे. ह्या प्रतीचा लेखनशक १७३२ (इ. स. १८१०) असा आहे. ओव्या साडेतीनचरणी आहेत. ह्या प्रतींची परस्परांशी तुलना करता त्यांत बराच फरक आहे असे दिसून येते. ह्या तीनही हस्तलिखितांत एकवाक्यता नसली तरी त्यांची एखादी समान परंपरा असावी. मूळ टीका ज्या निवृत्तिनाथाने रचली त्याच्या प्रतीत इतरांनी बरीच भर घालून मूळ ग्रंथ अपपाठ व प्रक्षिप्त ओव्यांनी विकृत केला असावा असे अनुमान करता येते. ह्या तीनही टीकांचा कर्ता निवृत्तिनाथ कोण हा अद्यापही विवाद्य प्रश्न आहे. पोर्तुगालमध्ये ब्राग ग्रंथसंग्रहालयातील जी *निवृत्तेश्वरीची* प्रत आहे तिचे धुळे प्रतीशी (बाडांक २१९७ शी) साम्य आहे. ह्यावरून हा निवृत्तिनाथ बहुधा पंधराव्या-सोळाव्या शतकातील असावा असे अनुमान करावेसे वाटते.

रेणुका क्षेत्रापासून दोन कोस असलेल्या बदरीग्रामी नकललेल्या गीताटीकेची एक प्रत उपलब्ध आहे (श. १७५८). ह्या प्रतीच्या समाप्तिमुद्रेवरून ही समओवी टीका निवृत्तिदेवांची असावी असे वाटते. विदर्भात मूर्तिझापूर येथे निवृत्तिदेवविरचित गीताटीकेची एक त्रुटित प्रत उपलब्ध झाली आहे. ह्या प्रतीमधील ओव्या चार चरणांच्या असून सदर टीकेत इ. स. च्या सतराव्या शतकातील भाषिक रूपे विपुल आहेत. ह्या समओवीची तंजावर बाडांक १७४ शी तुलना करता असे दिसून आले की, प्रस्तुत समओवी सर्वस्वी नवीन आहे. अशा भिन्न भिन्न संहिता दृष्टीस पडल्यानंतर *भगवद्गीते*वर समओवी टीका रचणारे निवृत्तिनाथ नावाचे चार-पाच ग्रंथकार होऊन गेले असावे असा निष्कर्ष निघतो.

ग्रंथस्वरूपावरून हा ग्रंथ यादवकालीन ज्ञानेश्वरबंधू निवृत्तिनाथांचा नसून दुसऱ्याच कोणा निवृत्तिनाथाचा आहे असे म्हणावेसे वाटते. ह्या ग्रंथाची भाषा एकनाथ-मुक्तेश्वरांच्या ग्रंथांतील भाषेसारखी आहे. ग्रंथकाराने स्वतःविषयी मौन बाळगले असले तरी अन्य पुष्टिप्रद पुराव्यावरून त्याचा स्थलकाल ठरविता येतो.

हुसेन अंबरखानाने आपल्या *गीताटीके*त (र. श. १५७५) अच्युताश्रमांबरोबर निवृत्तिनाथांचाही उल्लेख केल्याने असा तर्क संभवतो की, हा निवृत्तिनाथ मराठवाड्यातील आंबेजोगाई-दौलताबाद परिसरातील असावा. श. १४९५ त रचलेल्या पैठणकर एकनाथांच्या *भागवतटीके*त ह्या निवृत्तिनाथांचा उल्लेख नसून यादवकालीन निवृत्तिनाथांचा आहे. मात्र, एकनाथांचा नातू मुक्तेश्वर ह्याने प्रस्तुत निवृत्तिनाथांच्या *गीताटीके*ची नक्कलप्रत तयार केली. मुक्तेश्वरांच्या नावावरील गीताटीका मूळची निवृत्तिनाथांची आहे, हे अंतर्गत साम्यावरून स्पष्ट होते.

ह्यावरून हा निवृत्तिदेव एकनाथांचा कनिष्ठ व समकालीन असून त्याचा समय शके १५००–१५५० दरम्यानचा आहे.

**रचना : अमु.** – भगवद्गीतेची समओवी टीका; ओ. सं. १७२९ (गीताश्लोक ७०१); तंसम. हस्त. यादी, क्र. १ (बा. १७४–१७५).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, म. रा. : निवृत्तिदेव; नभामा., व. २३, अं. १, ऑक्टो. १९६९; पृ. १९. २. मुजुमदार, गं. ना. : निवृत्तिदेवकृत भगवद्गीते समश्रोवी टीका; भाइसंमंइति श. १८३८; पृ. १२२–१२४.

म. रा. जोशी

**० निवृत्तिदेव वाठोडेकर** – पहा **यक्षदेव.**

**निवृत्तिनंदन** [का. अनु.] कवी. गो. का. चांदोरकरांच्या मते हे महानुभाव असावेत. ह्यांच्या *पांडवगीता* ग्रंथाचा ते उल्लेख करतात. तो कोठे उपलब्ध आहे ह्याची माहिती सापडत नाही (संककासू., पृ. ६१).

**निवृत्तिनाथ–१ / ० निवृत्ति / ० निवृत्तिदेव–१** [माघ वद्य १, श. ११९० / इ. स. १२६९ – समा. श. १२१८ / इ. स. १२९६] सर्वयोगविशारद व व्यापक दृष्टीचे संतकवी. ज्ञानदेव-भावंडांतील ज्येष्ठपदाचा मान श्रीनिवृत्तिनाथांकडे असला तरी त्यांच्याविषयी फार थोडी माहिती उपलब्ध आहे. हे मूळचे पैठणपासून आठ मैलांवर गोदावरीकाठी वसलेल्या आपेगाव येथील कुळकर्णी घराण्यातले. ह्यांचा जन्म आळंदीस झाला. रुक्मिणी व विठ्ठलपंत ही निवृत्तिनाथांच्या मातापित्यांची नावे. त्यांच्या जन्मशकाविषयी अभ्यासकांचे एकमत नाही. तत्कालीन पद्धतीनुसार व्रतबंधाचे वय झाल्यावर विठ्ठलपंतांनी निवृत्तीचा व्रतबंध करण्याचे ठरविले. परंतु आळंदीच्या ब्रह्मवृंदसभेने संन्याशाच्या पुत्रास व्रतबंध करण्याचा शास्त्रार्थ उपलब्ध नसल्याने, त्यांचा व्रतबंध करण्याचे नाकारले. ह्यानंतर वडिलांनी त्यांना त्र्यंबकेश्वर परिसरातील गहिनीनाथांच्या हवाली केले. गहिनीनाथांचा संबंध ह्या कुटुंबाशी तीन पिढ्यांचा होता. गहिनीनाथांनी ह्यांना नाथपंथाची दीक्षा देऊन तांत्रिक कुंडलिनी योगाची साधना करण्याचे धडे दिले. त्याचप्रमाणे श्रीकृष्णोपासना व भक्तिसाधना ह्यांचा लाभही निवृत्तिनाथांना झाला.

ह्यांची गुरुपरंपरा अशी : आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ > गहिनीनाथ > निवृत्तिनाथ. निवृत्तिनाथांनी त्र्यंबकेश्वरी समाधी घेतली. निवृत्तिनाथ गहिनीनाथांच्या सहवासात शके ११९६–१२०० पर्यंत असावेत. गहिनीनाथांच्या सहवासात असताना निवृत्तींनी नाथसंप्रदायाचे, अद्वयानंदवैभवाचे ज्ञान समजावून घेतले. तेथेच हठयोगाप्रमाणे राजयोगाची साधना केली व नंतर तांत्रिक कुंडलिनीउत्थापनाची प्रक्रिया गुरूकडून समजावून घेतली. तांत्रिक योगाप्रमाणेच कृष्णनामाचे रहस्यही गुरूपासून अवगत केले. श्रीकृष्ण ह्याच विठ्ठलरूपाने पंढरीस भक्तजनार्थ उभा आहे, हे परमरहस्य गहिनीनाथांनी त्यांना कथन केले. निवृत्तिनाथ म्हणतात : " जनासी तारक विठ्ठलचि एक । केलासे विवेक सनकादिकी ।। ते रूप वोळले पंढरीस देखा । द्वैताची पै शाखा तोडियेली ।। उगवले बिंब अद्वैत स्वयंभ । नाम सुलभ विठ्ठलराज।। निवृत्तीचे गुज विठ्ठल सहज । गयनीराजे मज सांगीतले ।। "

विठ्ठलनामभक्ती व " नाथसंकेतींचा दंशु " घेऊन निवृत्तिनाथ शके १२०१ च्या प्रारंभी आपेगावी आपल्या आईवडिलांकडे आले. ह्या ठिकाणी त्यांचे वास्तव्य बरीच वर्षे असावे असे दिसते. शके १२०१ च्या मार्गशीर्ष महिन्यात निवृत्तिनाथांनी ज्ञानदेवादी भावंडांना, आपले पूर्वज त्र्यंबकपंत ह्यांच्या समाधीजवळ नाथपंथाची दीक्षा व अनुग्रह देऊन कुंडलिनीयोगसाधना करण्यास मार्गदर्शन केले. ह्याच परंपरेतील गुप्तनाथांच्या अभंगात ही तिथी मार्ग. शु. १५, पौर्णिमा अशी दिली आहे. ही साधना तांत्रिक असल्याने ती करण्यास शांत वातावरणाबरोबरच साधकाची देखभाल करणाऱ्या व्यक्तींची आवश्यकता असते. आपेगावी आईवडिलांच्या मार्गदर्शनाखालीच निवृत्तिनाथांनी ज्ञानेश्वरादी भावंडांना योगसाधनेचे धडे दिले. ' ब्रह्म तेंच हरि, हरि तोच सृष्टी, चराचर भूतमात्र – म्हणजे येथून तेथून आब्रह्मस्तंभपर्यंत '

सर्वत्र एकच एक, अद्वैत ब्रह्मच नांदत आहे, हरि सगुण असून निर्गुणही आहे – हे आपले तत्त्वज्ञान त्यांच्या मनावर त्यांनी पक्के बिंबविले. पुढे परिपूर्ण सिद्धावस्था प्राप्त झालेल्या निवृत्तिनाथांवर ज्ञानेश्वरादी भावंडांचा प्रतिपाळ करण्याची जबाबदारी सोपवून विठ्ठलपंतांनी व रुक्मिणीमातेने त्यांचा शके १२०८ च्या सुमारास कायमचा निरोप घेतला.

ह्या भावंडांची साधकावस्था संपल्यानंतर निवृत्तिनाथांनी त्यांच्यासह पैठणला प्रयाण केले. त्यावेळी महाराष्ट्राची काशी व विद्वज्जनांचे माहेरघर म्हणून पैठण प्रसिद्ध होते. आपले बंधू ज्ञानेश्वर ह्यांना हाताशी धरून पैठणमध्ये निवृत्तिनाथांनी श्रीकृष्णभक्तीचा पुरस्कार केला. त्यानंतर निवृत्तिनाथ नेवासे मुक्कामी ज्ञानेश्वरांच्या गीताप्रवचनाच्या वेळी उपस्थित होते. *ज्ञानेश्वरी*तील गुरुशिष्यसंवादात निवृत्तींचे विलोभनीय चित्र रेखाटले गेले आहे. त्यातील काही ओव्या त्यांच्या स्तवनपर असल्या तरी काही ओव्यांत त्यांच्या स्वभावाचे पैलू दिसतात. विस्ताराऐवजी संक्षेप व अन्वयार्थाकडे त्यांचा ओढा असल्याने त्यांनी ज्ञानेश्वरांना वारंवार मूळ विषयाकडे लक्ष देण्यास सुचविले आहे.

*ज्ञानेश्वरीत* ठिकठिकाणी निवृत्तिनाथांचा आदरपूर्वक उल्लेख आढळतो. *ज्ञानेश्वरी*च्या अकराव्या अध्यायात "तीरें संस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाठिया शब्दसोपानें । रचिलीं धर्मनिधानें । निवृत्तिदेवें ॥ ९ ॥" ह्या ओवीवरून निवृत्तिनाथांनी गीतेवर रचना केली असावी असे दिसते. त्यांच्या *गीतासारा*चा निर्देश नामदेवांनी केला असून एकनाथांनी *भागवता*च्या पहिल्या अध्यायात निवृत्तिनाथांचा कवीश्वर म्हणून उल्लेख केला आहे. इ. स. च्या पंधराव्या शतकातील महानुभावपंथीय नृसिंहाच्या *संकेतगीतेत* निवृत्ती, ज्ञानेश्वर व सोपान ह्यांचा कवीश्वर म्हणून उल्लेख येतो. नामदेव, नृसिंह व एकनाथ ह्यांनी यादवकालीन ज्ञानेश्वरबंधू निवृत्तिनाथांचा ग्रंथकार म्हणून उल्लेख केला असला तरी अद्यापपर्यंत निवृत्तिनाथांचे अभंग सोडल्यास इतर ग्रंथ उपलब्ध झालेले नाहीत. मराठी वाङ्मयेतिहासकारांनी निवृत्तिनाथांच्या नावावर काही ग्रंथ नोंदविले आहेत. *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांनी त्यांच्या नावावर *निवृत्तिसारा*ची नोंद केली असून *निवृत्तिदेवी* अथवा *निवृत्तेश्वरी*चा उल्लेख केला आहे (आ. ५, पृ. ११८). पुरवणीकार डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांनी वरील ग्रंथाबरोबर त्यांच्या *उत्तरगीते*चा उल्लेख केला आहे (आ. ५, पृ. ७२७). पांगारकरांनी केवळ ह्यांच्या अभंगरचनेचाच निर्देश केला आहे. गो. का. चांदोरकरांनी *उत्तरगीता* व *निवृत्तिबोध* ह्या रचनेची नोंद केलेली आहे (संककासू., पृ. ६१). भारत इतिहास संशोधक मंडळाच्या हस्तलिखित सूचीत *निवृत्तिटीका* व *निवृत्तिबोध* हे ग्रंथ दिलेले आहेत. तंजावर सरस्वती महाल ग्रंथसंग्रहालयात *निवृत्तेश्वरी*ची एक प्रत आहे. समर्थवाग्देवतामंदिरात क्र. २१९७ व ३५० ही बाडे निवृत्तिनाथांच्या गीताटीकेची आहेत. *समाधिबोध* नावाचे एक प्रकरणही ह्यांच्या नावावर आढळते. *निवृत्तिदेवी*, *निवृत्तेश्वरी* ह्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या गीताटीका ह्या निवृत्तिनाथांच्या नसून त्या निवृत्तिनाथांनंतर बऱ्याच काळाने होऊन गेलेल्या कवीच्या आहेत, असे अभ्यासकांचे मत आहे (पहा : **निवृत्तिदेव–२**).

ज्ञानेश्वरबंधू निवृत्तिनाथांचे ३५७ अभंग *सकलसंतगाथेत* छापले आहेत. ही अभंगरचना रसाळ व उत्कट आहे. ज्ञानदेवांच्या प्रतिभासृष्टीचे 'चित्सूर्य' असलेल्या निवृत्तिनाथांच्या अभंगांत रमणीय काव्यकल्पना आहेत. त्यांच्या काही अभंगांवर गहिनीनाथांच्या विचारांचा प्रभाव पडलेला आहे. गुरुकृपा झाल्यानंतर रचलेले बरेचसे अभंग शके ११९७–१२०० दरम्यानचे आहेत. काही अभंग त्यांनी वारकरी संतांच्या मेळाव्यात लिहिले असावेत. निवृत्तिनाथ श्रीकृष्णाचे परमभक्त होते. त्यांच्या कृष्णभक्तीचे सर्वच अभंग हृद्य आहेत. त्यांच्या अभंगांचे पंढरीमाहात्म्य, बालक्रीडा आणि ज्ञानपर असे भाग पाडता येतात. बालक्रीडेच्या अभंगांत सगुण-निर्गुण रूपांचे वर्णन आहे. उदा., 'निरालंब सार निर्गुण विचार । सगुण आकार प्रगटला ॥ ते रूप सुंदर शंखचक्रांकित । शोभे अनंत यमुना तटीं ॥' वारकरी संप्रदायातील योगमार्गी निवृत्तिनाथांच्या अभंगांची योग्यता, त्यातील अद्वयानंदवैभव, योगानुभव व कृष्णभक्ती ह्यांमुळे निःसंशय मोठी आहे. त्यांच्या अभंगांतील अनेक शब्द, कल्पना व विचार *ज्ञानेश्वरीत* आढळतात.

निवृत्तिनाथांचे अध्ययन खोल, व्यापक व सूक्ष्म असावे. *योगशास्त्र*, *षड्दर्शने*, *ब्रह्मसूत्रभाष्य*, दशोपनिषदे, गीता, नाथपंथाचे तांत्रिक ग्रंथ ह्यांचे अध्ययन त्यांनी केले होते. आपल्या भावंडांप्रमाणेच त्यांनी विसोबा खेचर, चांगदेव व नामदेव ह्यांना प्रेरणा देऊन वारकरी पंथाची संघटना उभारली.

म. रा. जोशी

**रचना : मु.** – अभंग ३५७; संपा. जोशी, का. अ.; श्रीससंगा., आ. २; पुणे, १९६७; पृ. १२६–१५८. **अमु.** – १. उत्तरगीता (अनुपलब्ध). २. निवृत्तिदेवी / निवृत्तेश्वरी; सबामं. ३. निवृत्तिसार (अनुपलब्ध). ४. समाधिबोध. **स्फुट** – अभंग व पदपदांतरे; सबामं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, पां. ज्ञा. : निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर व त्यांचें तत्त्वज्ञान; चित्रज., व. १३, अं. ९, सप्टें. १९२२; पृ. ३४५–३४८. २. चित्रे, प. दि. : श्रीनिवृत्ति-ज्ञानेश्वरांचा जयजयकार; मुंबई, १९५२. ३. जोशी, म. रा. : संत-निवृत्तिनाथ; ज्ञाने. त्रैमा., व. ६, अं. १; पृ. २६. ४. टाकी, रा. शं. : सोपान ज्ञानेश निवृत्तिनाथ : श्रीज्ञानेश्वर महाराज सद्भक्त विजय; पृ. १. ५. तुळपुळे, ग. वि. : निवृत्तिनाथाची अभंगवाणी; जीवनविकास, नोव्हें. १९६८; पृ. ५५७. ६. देशपांडे, ज. शा. : निवृत्तिनाथांची स्फुट प्रकरणे व ग्रंथ; भाइसंमत्रै., व. ४६, अं. १–४; पृ. ८४–८९. ७. देशपांडे, स. रा. : श्रीनिवृत्तिनाथ चरित्र; धुळे, १९३३. ८. पंडित पांडुरंगशर्मा : सत्याचे आविष्करण; चित्रज., नोव्हें. १९२२; पृ. ४३३–४३७.

○ **निवृत्तिनाथ अवधूत** – पहा **निवृत्ति अवधूत–२**.
○ **निवृत्ति यक्षदेव** – पहा **यक्षदेव**.
○ **निस्बिट, रेव्ह. रॉबर्ट** – पहा (**रेव्ह.**) **रॉबर्ट निस्बिट**.
○ **निळा** – पहा **निळोबा पिंपळनेरकर**.

**निळोबा पिंपळनेरकर** / ○ **निळा** [ ? – समा. अंदाजे श. १६७५ / इ. स. १७५३ ] संतकवी. ह्यांचा जन्म शिरूर (जि. पुणे) येथे झाला. वडिलांचे नाव मुकुंद. हे आश्वलायनशाखीय देशस्थ ब्राह्मण. उपनाव मकासरे. निळोबांच्या पत्नीचे नाव मैनाबाई. विवाह झाल्यानंतर लवकरच निळोबांची मातापितरे निवर्तली. त्यामुळे वंशपरंपरागत जोस-कुलकर्णपणाच्या कामाची जबाबदारी त्यांच्यावर पडली. ह्यांची बालपणापासूनच परमार्थाकडे प्रवृत्ती असल्यामुळे कुळकर्ण चालविणे पुढे पुढे त्यांस शक्य होईनासे झाले. स्वतःच्या प्रवृत्तीला न मानवणारे हे काम (आपला हक्क राखून ठेवून) आपल्या घराण्यातील दुसऱ्या एका शाखेकडे त्यांनी सोपविले. त्यानंतर आपला सारा काळ पारमार्थिक ग्रंथांचे वाचन, हरिचिंतन व भजन ह्यांत ते घालवू लागले. त्यांनी तीर्थयात्राही बरीच केली. ह्या यात्रेच्या काळात ते पंढरपुरास आले असता तुकाराममहाराजांची कीर्ती त्यांच्या कानावर आली. तिचा त्यांच्या मनावर प्रभाव पडून, देहू क्षेत्राचे व तुकाराममहाराजांचे दर्शन घडावे असा त्यांना ध्यास लागला. वास्तविक तुकाराममहाराजांचे निर्वाण होऊन ह्या सुमारास वीस-पंचवीस वर्षे लोटली होती. पंढरपुराहून निळोबा देहूस आले. श्रीविठ्ठलाच्या ओवरीत तुकाराममहाराजांचे दर्शन घडावे ह्यासाठी त्यांनी अत्यंत आर्ततेने प्रार्थना चालविली. ती प्रार्थना सफळ झाली. तुकोबांचे त्यांना दर्शन घडले. निळोबा स्वतःच सांगतात : "येऊनिया कृपावंतें । तुकयास्वामी सद्गुरु-

नाथें ॥ हात ठेविला मस्तकीं । देऊनि प्रसाद केलें सुखी ॥ ८७८ ॥" (*निळोबामहाराजांचे अभंग*, श्रीससंगा., पृ. १०५).

तुकाराममहाराजांच्या अभंगांच्या अभ्यासानेच निळोबांना पुढे काव्यरचनेची प्रेरणा मिळाली. त्यांचे 'मन विश्रांति पावलें । गुरुचरणीं स्थिरावलें ॥ ८८६ ॥' (तत्रैव, पृ. १०७).

निळोबा, पुढे, शिरूर येथे न राहता अहमदनगर जिल्ह्यातील पिंपळनेर ह्या गावी (हे पिंपळ शिरूरच्या रस्त्यापासून दीड मैल दूर आहे. ते टेकडाळ प्रदेशात, प्रवरा नदीच्या काठावर वसलेले आहे.) स्थायिक झाले. तेथील त्यांच्या रहिवासामुळे ते पुढील काळात निळोबा पिंपळनेरकर ह्या नावाने ओळखले जाऊ लागले. पिंपळनेर येथे त्यांनी एक विठ्ठलमंदिर बांधले व तुकाराममहाराजांच्या वाणीचे चिंतनमनन करून भक्तियोगाची परमोच्च पायरी गाठली. महिपतीबाबा ताहराबादकर ह्यांनी आपल्या *भक्तविजय* ग्रंथात (अ. ५६) "नेणे मान दांभिकपण। सद्भावें करी हरिकीर्तन । पुरातन संतांचीं वचनें बोलोन । संतचरित्रें वर्णावीं ॥ १४९ ॥ मुलें लेंकुरें सर्व असती । परि माझीं हीं हें नाठवे चित्तीं। सहज मिळेल जें अयाचितवृत्ती । त्यांतही अतिथि पूजावा ॥ १५० ॥" असे त्यांच्या ह्या वेळच्या आयुष्यक्रमाबद्दल लिहिले आहे. निळोबांनी तुकोबांचा भजनीसंप्रदाय व त्यांची कीर्तनपरंपरा मोठ्या उत्साहाने व निष्ठेने यावज्जीव चालविली. श. १६७५ / इ. स. १७५३ च्या सुमारास प्रवरा नदीच्या काठी त्यांनी आपला देह ठेवला. त्यांची पुण्यतिथी फाल्गुन शु. प्रतिपदेस साजरी होत असते.

निळोबांनी अभंग रचले आहेत. ही अभंगसंख्या जवळजवळ १३०० भरेल. निळोबांच्या आध्यात्मिक प्रगतीचा आलेख ह्यात स्पष्टपणे आढळतो. त्यांच्या अभंगवाणीत भक्ती, ज्ञान व वैराग्य ह्यांचा सुरेख संगम झालेला आहे. त्यांची वाणी स्वात्मानुभवसंपन्न आहे; ती सरल, सुबोध व उत्कट आहे. [ ⇨ ३.]

निळोबा हे स्वरूपसाक्षात्कार साधलेले, वारकरी पंथातील शेवटचे अधिकारी संतकवी होत.

**रचना : मु.** – १. तुकारामबोवांचे शिष्य निळोबा यांची गाथा; (शुद्ध करणार : गोडबोले, पां. वि.; संपा. सप्तर्षि, शं. वि.; पुणे, १८९६. २. निळोबाची गाथा; संग्रा. जोग, वि. न.; संपा. जोशी, शं. न.; पुणे, १९३६. ३. श्रीनिळोबारायकृत अभंगांचा गाथा; संपा. रानडे, वि. वि.; आ. १; पुणे, १८८३. ४. श्रीनिळोबामहाराज यांच्या अभंगांची गाथा : संपा. आवटे, त्र्यं.ह.; पुणे, १९०८ (गाथापंचकातील गाथा ५ वी). ५. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम ह्यांच्यावरील आरत्या; मआ., अनुक्रमे पृ. ४४५, ३९६, ३८७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : निळोबा; मकच., खं. ३; मुंबई, १९१४; पृ. ६८–८०. २. पांगारकर, ल. रा. : निळोबाराय पिंपळनेरकर; मवाइ., खं. ३; मुंबई, १९३९; पृ. ४१–५४. ३. बेंद्रे, वा. सी. : तुकाराममहाराज ह्यांचे संतसांगाती; मुंबई, १९५८; पृ. २११–२४०.

० **नीत्यलींग** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**नींबा** [का. अनु.] जैन कवी. ह्यांच्या कालाचा निश्चित बोध होत नाही. ह्यांचे ५ कडव्यांचे एक *अहिराणि* स्त्रीगीत उपलब्ध असून *नेमीश्वर मऱ्हाटी गीत* (कडवी ३) अशी आणखी एक रचना सापडते. *अहिराणि* गीत हे स्त्रियांनी सामुदायिक रीतीने गाण्याचे आहे (मु. : प्रामजैसा., पृ. १११). ह्या रचना ज्या प्रतीत आढळतात ती प्रत श. १६४८ (इ. स. १७२६) मधील आहे. कवीचा काळ ह्याअगोदरचा असावा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र; प्रामजैसा.; नागपूरपुणे, १९६८; पृ. १०९–११०.

**नीलकंठ** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – एक शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. १८. **अमु.** – शिवस्तुतिपर, गोपिकाहरणपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३, सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**नीलग्रीव** [का. अनु.] कथाकार. ह्याने *वेताळपंचविशी*तील २५ कथांपैकी दोन कथा ओवी वृत्तांत रचल्या, बाकीच्या शिवदासाने रचून ग्रंथ पूर्ण केला. नीलग्रीव व शिवदास हे गुरुशिष्य असावेत असे इतिहाससंशोधक वि. का. राजवाडे ह्यांचे मत आहे. हा बाडवजा ग्रंथ कऱ्हाडास सापडला. ह्यातील पहिल्या कथेतील काही ओव्या गहाळ झालेल्या आहेत. ग्रंथाची प्रत जंजिरे, रत्नागिरी येथे श. १६८१ त केलेली आहे. त्यावरून ग्रंथकार त्यापूर्वीच्या काळात होऊन गेला असावा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : नीलग्रीव व शिवदास ह्यांनी रचलेली वेताळपंचविशी; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १८१.

**नीळकंठ दाजी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – परंपरेतील श्लोक; सवामं. हस्त. सू., खं. १.

**नीळकंठ मोरेश्वर पिंगळे** [ ? – इ. स. १७०८, जाने.] आज्ञापत्राचे लेखक. हे शिवरायांचे प्रमुख अमात्य मोरोपंत पिंगळे ह्यांचे पुत्र. राजारामास गादीवर बसविण्याच्या खटपटीत हे आहेत, असा ग्रह होऊन संभाजीमहाराजांनी ह्यांना कैदेत ठेवले होते. संभाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर ह्यांची सुटका करण्यात आली. ह्यांनी राजाराममहाराजांस ते जिंजीस असता मोठी मदत करून मराठी राज्याचे रक्षण केले. म्हणून ह्यांना पेशवेपद देण्यात आले. इ. स. १७०७ मध्ये शाहू व ताराबाईचा झगडा चालू असताना हे ताराबाईचे प्रधान होते.

शिवरायांची राजनीती ज्यात आली आहे त्या आज्ञापत्राच्या कर्त्याच्या वादात ह्यांचे नाव येते. *आज्ञापत्र* [ ⇨ ३ ] ह्या प्रसिद्ध राजनीतिविषयक ग्रंथाचे लेखन ह्यांनी केले असावे असे एक मत मांडले जाते.

**रचना : मु.** – **शंका.** – आज्ञापत्र; प्र. १–९; संपा. कुळकर्णी, श्री. मा.; नागपूर, १९४९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कोलते, वि. भि. : राजनीति अमात्यांची कशी ? : आज्ञापत्र (संपा. कुळकर्णी, श्री. मा.); नागपूर, १९४९; पृ. १२–३२. २. बनहट्टी, श्री. ना. (संपा.) : आज्ञापत्र; नागपूरपुणे, १९६५.

**नीळकंठसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – प्रार्थनापद (हे पद म्हणजे अहिल्योद्धार करणाऱ्या रामचंद्रांची कवीने केलेली प्रार्थना होय); 'लोकगीत', तंजावर, १९५०; पृ. १. **अमु.** – रामपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. १.

**नृसिंह–१ / ० नरसिंह–१** [इ. स. चे १४ वे शतक] महानुभाव कवी. उपनाव अयाचित. नरेंद्रपंडित व त्यांचे दोघे बंधू नृसिंह व शैल्य हे तिघेही विद्वान कवी रामदेवराव यादवांचे आश्रित होते. नृसिंहांनी *नलोपाख्यान* हा ग्रंथ रचला असल्याची माहिती मिळते. पण प्रस्तुत ग्रंथ आजतरी उपलब्ध नाही (देशपांडे, य. खु.; ममवा., पृ. २०).

**नृसिंह–२ / ० नरसिंह–२ / ० नृसिंह पंडित** [इ. स. १४ व्या शतकाचा प्रारंभ] महानुभाव कवी. हे कवीश्वर आम्नायाच्या कारंजेकर वंशावळीतले. विदर्भातील चिखली गावचे राहणारे. कवीश्वर आम्नायातील विद्वान भाष्यकार चाल्हेराज ऊर्फ चाल्हण ह्यांचे नृसिंह हे पुत्र व शिष्य होत. ह्या माहितीस कवीच्या ग्रंथातून आधार सापडतात. *रुक्मिणीस्वयंवरा*च्या पहिल्या प्रसंगात कवीने आपली गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे दिली आहे : नागदेवाचार्य > भास्कर कवीश्वर > नागांबा > रामसिद्ध > कमलाकर मुनी > जनकतनया ऊर्फ सीतांबा > चाल्हण > नृसिंह.

नृसिंह पंडितांनी *संकेतगीता* व *रुक्मिणीस्वयंवर* असे दोन काव्यग्रंथ रचले आहेत. *संकेतगीता* आपल्या गुरूच्या नावाने ह्यांनी लिहिली म्हणून तिला *चाल्हनसंकेतनी* असेही म्हटले जाते. १३४९ ओव्यांची ही टीका *महानुभाव* मासिकातून प्रसिद्ध झाली आहे. गीताटीकेचे

प्रयोजन सांगताना कवी म्हणतो : ' 'पहिलिया समस्ताहि टीका । परी शब्दार्थुचि नेटका । सिद्धांतभेदु आवांका । तो दिसेचिना ॥ ' ह्यानंतर कवीने पंथातील व पंथाबाहेरील टीकाकारांचा उल्लेख केला आहे. त्यांत भूषण, भास्कर ह्यांच्याबरोबर निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान ह्यांचाही उल्लेख येतो.

पंडितांच्या *रुक्मिणीस्वयंवर* ग्रंथाचे १५ प्रसंग व २३१६ ओव्या असून ज. शा. देशपांडे व कृष्णदास महानुभाव ह्यांनी रिद्धपूर येथील दोन महानुभावीय पोथ्यांच्या आधारे प्रस्तुत काव्याची संहिता सिद्ध केली आहे (१९६८). *रुक्मिणीस्वयंवरा*च्या वरील दोन प्रतींशिवाय तिसऱ्याच एका प्रतीत 'शरपक्ष रामचंद्र सुभानुनामा । शकारंभा मधुरीत्तमा । ' असा लेखनकालाचा निर्देश येतो. म्हणजेच श. १३२५ (इ. स. १४०३) हा काव्याचा लेखनकाल ठरतो.

मोक्षदायिकत्व हे काव्याचे प्रयोजन आहे. उदा., "जे पठण करिती सदा । तयां होए भुक्ति-मुक्तिप्रदा । श्रवणमात्रे भवबंधा । छेदु होए ॥ २२८४ ॥ " रुक्मिणीविवाहाची ही लोकप्रिय कथा रंगविताना रुक्मिणी, भीमक, रुक्मी, श्रीकृष्ण, बलराम, सुदेव, शिशुपाल, जरासंघ, लग्नाला जमलेले राजे व त्यांच्या मनांतील भावतरंग ह्यांची बरीच उठावदार चित्रे कवीने रेखाटली आहेत. *रुक्मिणीस्वयंवर* कथेत सहसा न आढळणारा रामपरशुरामयुद्धाचा प्रसंग कल्याणकीर्ती भाटाच्या नवखंडातील राजांच्या वर्णनातून रंगविला आहे. ह्या प्रसंगातून सुदर्शन चक्रधारी श्रीकृष्णाचे माहात्म्य ठसविण्याचा प्रयत्न केला आहे.

ह्या काव्यावर कृष्णदास महानुभाव ह्यांनी अर्थपूर्ण अभिप्राय दिला आहे. तो असा : नाना प्रसंगांची चित्रणे करण्यात नृसिंह कवी कुशल असल्याने त्याची वर्णने सजीव होतात. सौम्य शृंगाररसाने काव्य रोचक होते. भक्तिपूर्ण अंतःकरणाने ह्या काव्याची रचना कवीने केली आहे. त्याच श्रद्धेने महानुभाव तत्त्वज्ञानाचे निरूपण प्रसंगोपात्त कवी करतो. अ. ना. देशपांडे म्हणतात : 'मोक्ष हे ह्या कथाकाव्याचे प्रयोजन असले तरी आपले काव्य तत्त्वज्ञानजड होऊ न देण्याची दक्षता कवीने बाळगली आहे.'

एकंदरीत रचना ओघवती आणि प्रासादिक आहे. काव्याची भाषा १४ व्या शतकातली प्राचीन असून तिच्यामध्ये एक प्रकारचे माधुर्य आहे. भाषिक दृष्ट्या हे काव्य महत्त्वाचे आहे. नृसिंहापूर्वी ह्याच विषयावर नरेंद्रकवीने रचना केली होती. नृसिंहानंतर संतोषमुनीने *रुक्मिणीस्वयंवर* रचले. त्या दोघांच्या काव्यांची तत्कालीन लोकप्रियता लक्षात घेता हा कवी बराच मागे पडलेला आढळतो.

**रचना : मु.** – १. रुक्मिणीस्वयंवर, प्रसंग १५, ओ. सं. २३१६; र. श. अंदाजे १३२५; संपा. देशपांडे, ज. शा. व कृष्णदास महानुभाव; प्रामक., खं. ६, मुंबई, १९६८; प्रस्ता., पृ. १–९. २. संकेतगीता; ओ. सं. १३४९; महानु. मासिक.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, य. खु. : नृसिंह पंडित; ममवा., पुणे, १९६०; पृ. ४६–४७. २. देशपांडे, य. खु. : संकेतगीता; मवाइ., खं. ३ (पांगारकर); नाशिक, १९३५; पृ. ७४५–७४६. ३. देशपांडे, अ. ना. : नृसिंह; प्रामवाइ., भा. १, पुणे, १९७३; पृ. २३७–२४५. ४. प्रभुदेसाई, वि. बा. : देशपांडे, ज. शा. (संपा.); नृसिंहकृत रुक्मिणीस्वयंवर; परी.; प्रामक., खं. ६; युगवाणी, नोव्हें.-डिसें. १९७१; पृ. ३४४–३४७.

**नृसिंह–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – जनकयोगिनी संवाद; संककासू., पृ. ६१.

**नृसिंह–४** / ० नरसिंह–६ [का. अनु.] वीरशैव कवी. गुरुपरंपरा : शांतलिंग > कृष्णप्पा अथवा श्रीकृष्ण > जयरामस्वामी वडगावकर > आत्माराम > नृसिंह. ह्या कवीने *हृदयनिवास* नावाचे एक प्रकरण लिहिले आहे. ते ओवीबद्ध असून त्याची पाच प्रकरणे आहेत. त्यांतील पहिल्या प्रकरणात शिष्याने जीव, शिव, मीपणा ह्यांच्यासंबंधी प्रश्न केला. त्यासंबंधीच्या उत्तराची पाचही प्रकरणे आहेत. नाद, बिंदू, कला इत्यादींचे त्यात विवरण आले आहे. शेवटी परमपुरुषविवरण आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, गो. का. : नृसिंहकृत हृदयनिवास; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ३३–३४.

**नृसिंहकवी** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – १. शुकदेवचरित्र; ओ. सं. ४४७. २. सामुद्रिक; ओ. सं. २३७; ममग्रंककासू., पृ. १६.

**० नृसिंहदास महादेव** – पहा महादेव –३.

**नृसिंहदेव दिवाकरमुनी विराट** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – निबंधसार गजकेसरी; अध्याय ७, ओ. सं. १०३८; श्लोक २६९; ममग्रंककासू., पृ. १६.

**नृसिंह नरहरि** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – ज्ञानलहरी; ओ.सं. १२७००; ममग्रंककासू., पृ. १६.

**नृसिंह पंडित** – पहा नृसिंह–२.

**नृसिंह शिवदेवशिष्य** [का. अनु.] महानुभाव स्तोत्रकार.

**रचना : अमु.** – स्तोत्रे; ममग्रंककासू., पृ. १६.

**० नृसिंहसरस्वती** – पहा परिशिष्ट.

**० नृसिंहसुत** – पहा नरसिंहसुत.

**नृसिंहात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रामायणी कथा (अपूर्ण, ओ. सं. ९३); सवामं. हस्त. सु., खं. २.

**० नृहरिव्यास** – पहा नरहरिव्यास.

**० नृहरिसुत** – पहा नरहरिसुत.

**नृहरिसुत वीरेश्वर** [का. अनु.] कवी. समर्थवाग्देवतामंदिरातील १२८४ क्रमांकाच्या बाडात वीरेश्वर कवीची बरीच कविता आहे. त्यात पदपदांतरांबरोबर काही प्रकरणेही सापडतात.

**रचना : अमु.** – १. कौसल्येचे डोहळे (श्लो. २१). २. गणपती, राम व भगवद्गीता ह्यांच्यावरील आरत्या. ३. पंचाक्षरी-माहात्म्य (आर्या ३६). ४. श्रीरामाष्टक (आर्या). ५. श्रीवेंकटेशदशक (श्लोक). ६. सीताकल्याण (श्लो. ४७); सवामं. हस्त. सु., खं. २.

**न्यायबास** / **० न्यायंबास** / **० न्याययोगी** / **० न्यायव्यास वाइंदेशकर** / **० न्यायाबा** / **० न्यायोबास** [अंदाजे इ. स. च्या १४ व्या शतकाचा मध्य] महानुभाव गद्य ग्रंथकार. न्यायबास हे उपाध्य आम्नायातील पोमाइसाचे शिष्य. ह्यांची गुरुपरंपरा अशी : नागदेवाचार्य > कमळाइसा > पोमाइसा > न्यायव्यास. हयग्रीवाचार्यकृत *गद्यराज* (श. १२४६ / इ. स. १३२४) ग्रंथात न्यायबासांचा उल्लेख येतो. त्यावरून श. १२४६ पूर्वी हे पंथात प्रविष्ट झाले असावेत. *पंचवार्तिक* ग्रंथाचे कर्ते पंडित भीष्माचार्य ह्यांचे दीक्षागुरू न्यायव्यास होते. न्यायबासांच्या समकालीनांत *गद्यराज*कार हयग्रीवाचार्य, पंडित विश्वनाथ बाळापूरकर (*ज्ञानप्रबोध*, श. १२५३), मुनिव्यास (पूर्वाश्रमीचे कमलाकर अयाचित; *स्थानपोथी*, श. १२७५) व बहाळे नारोव्यास (*ऋद्धिपूरवर्णन*, श. १२८५) ह्या व्यक्ती आढळतात. मुरारीव्यासांचा नातू *सिद्धान्तसारवळी*कार मेघदेव / शारंगदेव / सोंगदेव, *अन्वयस्तोत्र* व *वाइंदेशकर वृद्धाचार* लिहिणारा मुद्गल मुनी (न्यायव्यास *वृद्धाचार*कर्ता) व दामोदर मुनी वाइंदेशकर ही पंथीय मंडळी न्यायबासांच्या शिष्यपरिवारात मोडतात. न्यायबासांचा उल्लेख 'न्यायव्यास वाइंदेशकर', 'हेतुकार', 'न्याययोगी', 'न्यायाबा' अशा निरनिराळ्या नावांनी आलेला आहे. हयग्रीवाचार्यांच्या *गद्यराजात* 'न्यायाख्य' असा त्यांचा उल्लेख आढळतो.

न्यायबासांनी *हेतुस्थळ*, *सिद्धान्तस्थळ*, *दानपट*, *मुक्तमालिका*

इत्यादी बरेच ग्रंथ रचल्याची नोंद वि. ल. भावे ह्यांच्या महानुभाव ग्रंथकारांच्या सूचीत केलेली आढळते (पृ. १५–१६). न्यायबासांच्या एवढ्या ग्रंथसंपदेपैकी एकही ग्रंथ अद्यापि प्रकाशित झालेला नाही.

न्यायबासांचा उल्लेखनीय व महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे हेतुस्थळ (र. श. १२७५ / इ. स. १३५३) हा गद्य ग्रंथ आहे. तो *लीळाचरित्रा*वर आधारित आहे. त्यामध्ये श्रीचक्रधरांनी निरनिराळी सूत्रे कोणत्या प्रसंगी व काय हेतूने सांगितली ह्याचे विवरण येते. म्हणून त्यास *हेतुस्थळ* म्हणतात.

न्यायबासांनी *हेतुस्थळा*त श्रीचक्रधरांचे केलेले वर्णन अतिशय प्रत्ययकारी आहे. श्रीप्रभूंचे हे तपशीलवार वर्णन कशासाठी तर 'एवं मूर्तिज्ञान : स्मरण' असे लेखक म्हणतो. सर्वज्ञांचे मूर्तिवर्णन करताना त्यांच्या भक्तांच्या स्फूर्तीला उधाण न आले तरच नवल. केशिराजांच्या *मूर्तिप्रकाशा*तही असे वर्णन येते. न्यायबास ह्यांनी मात्र आपल्या गद्य रचनेतूनही श्रीचक्रधरांचे शब्दचित्र मूर्तिप्रकाशाइतकेच यथार्थतेने उतरविले आहे. वर्णनाचा गोडवा आणि सूक्ष्म निरीक्षण ह्या लेखकाच्या गुणांनी चक्रधरांची व्यक्तिरेखा सुस्पष्ट व ठसठशीत काढली आहे, असे मत *हेतुस्थळ* ग्रंथाचे एक अभ्यासक डॉ. व. वि. पारखे व्यक्त करतात (महानु., रौप्य महोत्सव विशेषांक, १९७४, पृ. ४५–४६).

*हेतुस्थळ* ग्रंथ साहित्याभ्यासकांना अजून अपरिचितच राहिलेला आहे. ग्रंथाच्या हस्तलिखिताची प्राप्तीही सहज होऊ शकत नाही. डॉ. पारखे ह्यांना *हेतुस्थळा*ची एक पोथी (हस्तलिपी वाइंदेशकर पाठ) प्राप्त झाली आहे. ह्याही पोथीची प्रारंभीची काही पाने गहाळ झाली आहेत.

श्रीचक्रधर कृष्णाचा अवतार खराच परंतु तो गर्भिचा अवतार नसून पतितावतार आहे हे दाखविण्यासाठी प्रधान पुत्राचे पूर– मायापूर – स्वामींनी स्वीकारले. ह्या घटनेचे न्यायबासांनी वर्णन केले आहे. अतएव श्रींनी प्रधानपुत्राचे पूर स्वीकारल्यानंतर त्या देहाची लक्षणे जी वर्णन केली आहेत तीच सर्वज्ञांच्या मूर्तीची लक्षणे मानली गेली पाहिजेत. दिव्य स्पर्शाने आमूलाग्र बदलल्या गेलेल्या देहात खुद्द परमेश्वराचे वास्तव्य झाल्याने दिव्यत्व लाभलेल्या ह्या चक्रधरांच्या मायापुराचे वर्णन न्यायबास सहजतेने करतात आणि शेवटी म्हणतात : "ऐसी श्रीचक्रधररायाची श्रीमूर्ति : बत्तीस लक्षण आठवावी : स्मरावी : एवं मूर्तिज्ञान :" श्रीप्रभूंचे प्रयाण जरी ११९५–९६ च्या सुमारास झाले असले तरी त्यांची वाङ्मयीन मूर्ती न्यायबासांच्या *हेतुस्थळा*तून पुन्हा प्रकट होताना दिसते [ ⇨ ३. ]

न्यायबासांनी संस्कृत रचना केल्याचा उल्लेखही डॉ. य. खु. देशपांडे करतात (ममवा., पृ. ३२). त्यांच्या ग्रंथांच्या लांबलचक यादीवरून व त्यांतील विषयांवरून हे चांगल्यापैकी संस्कृत पंडित असावे असे म्हणता येते. ह्या विपुल रचनेपैकी फारच थोडी रचना महानुभाव ग्रंथसंग्रहात उपलब्ध आहे. ह्या ग्रंथकर्तृत्वाखेरीज 'सुंदरी ह्या सांकेतिक' लिपीची त्यांनी केलेली निर्मिती ही पंथीयांच्या दृष्टीने महत्त्वाची ठरते (श. १२८५ / इ. स. १३६३). सकळा लिपीनंतर अधिक प्रचारात आलेली लिपी म्हणजे सुंदरी लिपीच होय. सुंदरी लिपीप्रमाणे वज्र-लिपीचेही कर्तृत्व न्यायबासांकडे देण्यात येते.

**रचना : अमु.** – १. लीळा-प्रयुक्ति / चेष्टा-प्रयुक्ति. २. सिद्धान्तस्थळ. ३. स्मृतिवृद्धाचार. ४. हेतुस्थळ (श. १२७५).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पारखे, व. वि. : ऐसी श्रीचक्रधररायाची श्रीमूर्ति : आठवावी : स्मरावी; महानु., एप्रि.–मे–जून, १९७४; पृ. ४५–४९.

० **न्याययोगी** – पहा न्यायबास.

० **न्यायव्यास वाइंदेशकर** – पहा न्यायबास.

० **न्यायाबा** – पहा न्यायबास.

० **न्यायोबास** – पहा न्यायबास.

० **पंडित–१** – पहा जनपंडित.

**पंडित–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. कृष्णजन्म किंवा सुभद्राकल्याणी. २. गजेंद्रमोक्ष. ३. हरितालिकाव्रत. ४. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**पंडित आनंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पंडितकवी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पंडिततनुबाळी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**पंडितप्रभु** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – बाळकृष्णावरील आरती; मआ., पृ. ४१३.

**पंडित मेघा / ० मेघराज** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, प्रारंभकाल] जैन कवी. गुरुपरंपरा : ब्रह्मजिनदास > ब्रह्मशांतिदास > पंडित मेघराज. ब्रह्मजिनदासाचा काळ इ. स. १४५१–१४६३ म्हणून मेघ-राजांचा काळ अंदाजे इ. स. १६ व्या शतकाचा प्रारंभ मानता येतो. तीर्थयात्रादी करून हे बहुश्रुत झाले होते. मराठी व गुजराती ह्या दोनही भाषांमध्ये ह्यांनी रचना केली आहे. मराठी रचनेत स्वतःचे नाव मेघा असे दिले असले तरी गुजराती रचनेत हे स्वतःचा मेघराज असा उल्लेख करताना आढळतात.

*जसोधररास* हा ह्यांचा मोठा ग्रंथ. इतर रचना स्फुट स्वरूपाची आहे. *जसोधररास* ग्रंथात यशोधराचे चरित्र आले असून त्याच्या ११६४ ओव्या आहेत. अहिंसा व ब्रह्मचर्य ह्या व्रतांचे महत्त्व यशोधर-चंद्रमती ह्यांच्या ह्या कथानकात वर्णन केले आहे. यशोधराच्या बलि-दानाचीही कथा त्यात येते. ह्या अनुषंगाने जैन तत्त्वज्ञान व आचार-धर्म ह्यांचे वर्णनही ह्या ग्रंथात येते. [ ⇨ ३. ] वरील ग्रंथाखेरीज कवीच्या *पार्श्वनाथ भवांतर, कृष्णगीत, रामायणीकथा, गुजरी मऱ्हाटीगीत, गोमटस्वामीगीत, तीर्थवंदना* अशा लहानमोठ्या रचना उपलब्ध आहेत. ही सर्व रचना जैनांच्या हस्तलिखित संग्रहात उपलब्ध.

कवीच्या मराठी भाषेवर गुजरातीचा प्रभाव पडलेला दिसतो. कवी व्युत्पन्न पंडित असून त्याची मराठी भाषा सौंदर्यसंपन्न आहे. वऱ्हाडा-तील जैनधर्मीयांसाठी ह्यांनी मराठीतून रचना केली.

**रचना : मु.** – जसोधररास; अधिकार ५, ओ. सं. ११६४; संपा. अक्कोळे, सुभाषचंद्र; सोलापूर, १९५९. **अमु.** – १. कृष्णगीत; ७६ कडवी. २. गुजरी मऱ्हाटीगीत; १३ कडवी. ३. गोमट-स्वामीगीत; ३. कडवी. ४. पार्श्वनाथ भवांतर; ४७ कडवी. ५. रामायणी कथा; चार गीते. **गुजराती रचना** – १. तीर्थवंदना. २. शांतिनाथचरित्र; वाशीम आणि शिरड जैन हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : पंडित मेघा; प्रामजैसा., पुणे–नागपूर, १९६८; पृ. २९–३५.

**पंडितराम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; भूपाळी इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. २.

**पंडितराम शिरसाळकर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु** – १. शिवरात्री कथा, २. अष्टपदी, ३. मनाचे श्लोक, इत्यादी रचनेचे त्रुटित भाग; सवामं. हस्त. सू., खं. २ (बा. ९९७).

**पंडितरामसुतनारायण** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पंडित रामात्मज** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – गणपतीची आरती; मआ., पृ. ३६५.

**पंडितराय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – अयोध्याकांडसीतारामसंवादपद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पतंगराव गोपाळराव** [अंदाजे श. १८०४ / इ. स. १८८२ ] गद्य ग्रंथकार. तंजावरच्या सरफोजी नृपतींचा आश्रित. त्यांच्या आज्ञेने पतंगरावाने *पक्षीलक्षण आणि चिकित्सा* असा वैद्यकावरील भाषान्तरित ग्रंथ तयार केला.

मुळातील *बाजनामा* किंवा तत्सदृश आरबी किंवा फारसी भाषेमध्ये उपलब्ध असलेल्या ग्रंथाधारे हे भाषान्तर करण्यात आले आहे. हे ग्रंथ सरफोजी राजांच्या संग्रही होते. त्यावरून श. १८०४ मध्ये सरफोजींनी ह्या ग्रंथ तयार करवून घेतला.

पाळीव पक्षी व रानपक्षी ह्यांच्या शरीररचनेप्रमाणे त्यांचे आरोग्य चांगले राहावे ह्या दृष्टीने त्यांना होणाऱ्या विशिष्ट रोगांवरील आयुर्वेदिक औषधे ह्या ग्रंथात सांगितली आहेत. ही औषधे तयार करण्याच्या रीती, द्यावयाचे प्रमाण व त्यावेळच्या आहाराची चिकित्सा ह्या ग्रंथात केलेली आढळते. ही औषधे सहज उपलब्ध असणाऱ्या विविध वनस्पतींपासून तयार करता येणारी व अनपायकारी आहेत असे स्पष्ट म्हटले आहे.

ग्रंथाच्या भाषेवरून तत्कालीन बोलीभाषेची कल्पना येते. ग्रंथ इ. स. १९५२ मध्ये तंजावर सरस्वती महाल ग्रंथालय प्रकाशनाने प्रसिद्ध केला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** संपा. महाडिक, कृष्णस्वामी : प्रस्ता., गजशास्त्र सार, पक्षीलक्षण आणि चिकित्सा (बाजनामा) व चित्ता वहागास चिकित्सा (यूजनामा); तंजावर, १९५२; पृ. ११–१४.

**पतंगाचा बाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** –पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पद्मकीर्ती** [अंदाजे इ. स. १६७९] जैन कवी. पद्मकीर्ती ह्या नावाचे भट्टारक लातूर पीठावर होते. ते लातूरच्याच दुसऱ्या शाखेतील विशालकीर्तीचे शिष्य. ह्या पद्मकीर्तींनी श. १६०१ व १६०७ मध्ये काही मूर्ती स्थापन केल्या आहेत. ह्यांची फक्त ५ कडव्यांची *पार्श्वनाथ आरती* उपलब्ध आहे. तीमध्ये पार्श्वनाथांचा 'चिंतामणि' म्हणून उल्लेख केला आहे. चक्रपूरनगरच्या पार्श्वनाथ चैत्यालयाचा उल्लेखही आरतीत आला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र, पद्मकीर्ती; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ६६.

**पद्मनाथ यतींद्र** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदे, अभंग (दत्तपाठाचे); संककासू., पृ. ६२.

**पद्मनाभ** [का. अनु.] कवी. *महाभारत*-रचनाकार. ह्या कवीच्या *उद्योगपर्वा*चा उल्लेख गो. का. चांदोरकरांनी केला आहे (संककासू., पृ. ६१). कवीचे स्थळ किंवा चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. 'एक उपेक्षित महाभारतकार : पद्मनाभ ऊर्फ बाळकृष्णनाथ' ह्या लेखाने कवीच्या *उद्योगपर्वा*चा (अ. ९०, ओ. सुमारे ९०००) प्रथम परिचय डॉ. व. वि. पारखे ह्यांनी करून दिला (मसाप., ऑक्टो. १९६१, पृ. ३९–४०). *उद्योगपर्वा*तील शेवटच्या ९० व्या अध्यायातील २१ ते २८ ओव्यांत पद्मनाभाने स्वतःविषयी माहिती दिली आहे तिचाही ते निर्देश करतात. ह्या माहितीवरून पद्मनाभ विदर्भातील जळगाव येथील रहिवासी होते. आश्वलायन शाखेतील राजुरकर घराण्यात राधा व वामन ह्या दांपत्याच्या उदरी पद्मनाभाचा जन्म झाला असे समजते.

डॉ. बा. ना. मुंडी ह्यांच्या मते बाळकृष्णनाथ व पद्मनाभ ह्या दोन भिन्न व्यक्ती आहेत. उज्जैन येथील प्राच्य ग्रंथ संग्रहालयातील ज्या हस्तलिखितावरून (क्र. ७७७) पद्मनाभांच्या *उद्योगपर्वा*ची डॉ. पारखे माहिती देतात, त्या हस्तलिखिताचा परिचय देताना तत्कालीन ग्रंथकाराने जे टिपण लिहिले आहे त्याबरोबरच्या कागदात "बाळकृष्णनाथ राजुरकर यांचे उद्योगपर्व" असे लिहिले आहे. म्हणून ह्या दोघांना डॉ. पारखे ह्यांनी एक मानले असावे.

बाळकृष्णनाथ राजुरकरांनी *केदारकल्प*, *मार्तंडविजय* आणि *कार्तिकमाहात्म्य* असे तीन ग्रंथ रचले असून त्यांत आपली कुलपरंपरा, गुरुपरंपरा, स्थळ, काळ ह्यांबद्दल परिचयात्मक सविस्तर माहिती दिलेली आहे. पद्मनाभाने किंवा तथाकथित बाळकृष्णाने मात्र स्वतःचा जीवनपरिचय ह्या *उद्योगपर्वा*त (अ. ९० सोडल्यास) इतरत्र कोठेच दिलेला नाही.

९० व्या अध्यायातील ओ. क्र. १८८ पासून सुरू होणाऱ्या परिचयलेखात मध्वाचार्य > श्रीधराचार्य > पद्मनाभ > बाळकृष्ण अशी अवतारांची कथा झालेली आहे. ह्या कथेवरून पद्मनाभ व बाळकृष्ण एकच ठरत नाहीत तर केवळ दुसरा व तिसरा अवतार मात्र ठरतात. प्रत्येक अवताराचे माता-पिता दिलेले आहेत. रमा-नृसिंहाचार्यांच्या पोटी श्रीधराचार्य, रुक्मिणी-विठोबांच्या पोटी पद्मनाभ, राधा-वामनांच्या पोटी बाळकृष्ण.

पद्मनाभांच्या *उद्योगपर्वा*तही बाळकृष्णनाथ ह्यांना पद्मनाभ म्हटले नसून श्रीधराचा अवतार असे मानले आहे. पद्मनाभांनी बहुतेक अध्यायांच्या शेवटी 'कवि पद्मनाभाची वाणी। जे व्यासमार्गे चमके धरणी' अशीच मुद्रा दिली आहे. पद्मनाभ म्हणजे बाळकृष्णनाथ असे दर्शविणारी मुद्रा कोठेही नाही. ग्रंथसमाप्तीनंतरच्या परिचयलेखातील अवतारांच्या वर्णनानुसार पद्मनाभ व बाळकृष्णनाथ हे श्रीधराचार्यांचे अवतार असाच ग्रह होतो. श्रीधराचार्यांची भारतकथावर्णनाची अपूर्ण इच्छा पद्मनाभांनी व डॉ. मुंडी म्हणतात त्याप्रमाणे बाळकृष्णनाथांनीही *भारत* रचून पुरी केली असावी.

बाळकृष्णनाथांची यथावश्यक माहिती उपलब्ध आहे. त्यांचा *भारत* ग्रंथ जर उपलब्ध झाला तर पद्मनाभांशी त्यांचा असलेला संबंध सहज स्पष्ट होईल. किंवा पद्मनाभ कोण आहेत हा प्रश्न सोडविणारी सामग्री तरी प्राप्त व्हावयास हवी. तोपर्यंत हे दोघेही ग्रंथकार वेगळे आहेत, असेच समजायला हवे.

पद्मनाभांच्या ९०-अध्यायी *उद्योगपर्वा*च्या उज्जैन येथील पोथीतल्या ६०, ७९, ८०, ८१, ८२, ८३ ह्या सहा अध्यायांत माधव अशी कविनाममुद्रा येते. मूळ प्रतीतील हे अध्याय गहाळ झाल्याने त्या जागी *महाभारत*कार माधवस्वामींचे अध्याय ग्रंथपूरणार्थ घातले असावेत, असे डॉ. पारखे ह्यांचे मत आहे.

**रचना : अमु.** – उद्योगपर्व; अध्याय ९०, ओ. सं. ८८९१; प्राच्य ग्रंथ संग्रहालय, उज्जयिनी; र. श. १५२०, तारण संवत्सर; ग्रंथारंभ : आश्विन शु. ३; ग्रंथसमाप्ती : फाल्गुन शु. ६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पारखे, व. वि. : एक उपेक्षित महाभारतकार : पद्मनाभ ऊर्फ बाळकृष्णनाथ; मसाप., ऑक्टो. १९६१, पृ. ३९–४०. २. पारखे, व. वि. : बाळकृष्णनाथकृत उद्योगपर्व, लेखांक १; मसंप., जुलै, १९६९; पृ. २०४–८. ३. मुंडी, बा. ना. : पद्मनाभ तथा बाळकृष्णनाथकृत उद्योगपर्वासंबंधी; मसंप., जाने. १९६८. ४. मुंडी, बा. ना. : बाळकृष्णनाथकृत उद्योगपर्व, लेखांक–२ (पारखे ह्यांच्या लेखास उत्तर); मसंप., जुलै, १९६९; पृ. २०८–१२.

**पद्माजी बाबाजी** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – शांतादुर्गेवरील आरती; मआ., पृ. ३९७.

**पद्मानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**परमदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**परमहंस** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**परमहंसगुरुबोधनंदन** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – बोधपर व कृष्णपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**परमहंस परिव्राजकाचार्य** [का. अनु.] गद्य ग्रंथकार.

**रचना :** अमु. – सप्तचक्रविवरण (गद्य); ग्रं. सं. ३००; तंसम. हस्त. यादी, क्र. १ (बा. ५१८).

**परमहंस स्वच्छंदानंद** [का. अनु.] कवी. गुरू : गोपाळनाथ.

**रचना :** अमु. – देवीविजय; संककासू., पृ. ६२.

**परमानंद–१** [का. अनु.] कवी. दासपंचायतनातील आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर ह्यांच्या गुरुपरंपरेतील. ही परंपरा अशी : श्रीशंकराचार्य > वासुदेवानंद > परमानंद > वैकुंठानंद > कृष्णानंद > रंगनाथस्वामी > काशीराजस्वामी > रघुनाथस्वामी > आनंदस्वामी (मूर्ति). परमानंदांनी पदे रचली आहेत (संककासू., पृ. ६२).

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**परमानंद–२ / ० प्रेमानंद–२** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, अखेर] संतकवी. ह्यांच्या स्थलकालाबद्दल प्रमाणभूत माहिती उपलब्ध नाही. ऐकीव माहितीवरून ते औरंगाबाद जिल्ह्यातील गंगापूरच्या परिसरात उत्तरपेशवाई कालात होऊन गेले असावेत.

ह्यांनी लिहिलेले काही अभंग (सुमारे ६५) उपलब्ध आहेत. ह्या अभंगांचे स्वरूप संवादात्मक आहे. संसाराचे असारत्व, नरदेहाचा यथायोग्य विनियोग, आणि जीवाचे साफल्य हे पारंपरिक विषय तेथे येतात. पूर्वसूरींचा भक्तीचा वारसाच परमानंदांनी पुढे चालविला आहे. वृथा कर्मकांडाचा निषेध, दुर्जनविषयक संताप आणि सत्संगाचे माहात्म्य हे त्यांच्या अभंगवाणीचे विशेष होत. संतसमागमामुळे ज्ञानाचा उदय होतो, साधकास 'नीट हरिपंथ' गवसतो. पुढे ज्ञानवैभवाच्या अपूर्वाईने साधकच साध्य होऊन जातो. त्रिविध तापांतून मुक्त करण्यास एक सद्गुरू संतच समर्थ असतो. म्हणून 'तेथ सोडविना कोणी एका सद्गुरूवाचुनी' असे परमानंद म्हणतात. अभंगसंख्या मर्यादित खरी पण त्या अभंगांतून हे संतमन प्रभावीपणे अनुभूतीच्या अनेक पदरांसह प्रकट झाले आहे.

अंतिम अवस्थेचे आत्मानुभूतीचे साक्षात्कारी स्वरूप परमानंद कसे व्यक्त करतात पहा : "ओंकार हा वृक्ष। वाडला आप्रोक्ष। आमीत्य भूवनी। वुभारीला॥ प्रेमफुल कळला। आमोद दाटला। अमितेभुवनी। निजतेजे॥ ४३॥ स्थुळ नोहे साचा। सूक्ष्म तो कयचा। सप्त धातुचा मी। नोहे तेथें॥ ते ते म्हनसी कायी। आक्षयता पाही। आदी आनंती पाही। निजरूप॥ १४७॥" ह्या अवस्थेचा ते 'प्रेमपद' म्हणून निर्देश करतात. परमानंदांच्या वाणीस अलंकारांचा सोस नाही. ती प्रासादिक आहे. कवीची रचना अद्यापि स्वतंत्र रीत्या मुद्रित झालेली नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पठाण, यू. म. : परमानंदाचे अभंग; प्रतिष्ठान, नोव्हें. १९६७; पृ. २१–२६. २. स्वामी परमानंदाची अभंगवाणी; सत्संग, जून १९६७; पृ. २६.

**परमानंद–३** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना :** अमु. – प्रकाशदीप; भाइसमं. हस्त. सू., पृ. १६४.

**परमानंद चैतन्य / ० प्रेमानंद–३** [का. अनु.] कवी. ह्यांनी *तारकब्रह्म* ग्रंथात आपल्या गुरुपरंपरेचा उल्लेख केला आहे तो असा : तुकेश > आनंदचैतन्य > परमानंद चैतन्य. निवृत्ति अवधूतानेही आपल्या ग्रंथात गुरू म्हणून अनंतचैतन्याचा उल्लेख केला आहे. तेव्हा हे दोघे गुरुबंधू असावेत (संककासू., पृ. ६०). ह्यांच्या कालाचा निश्चित उल्लेख सापडत नाही. परमानंद चैतन्यांनी *तारकब्रह्म* किंवा *आत्मानुभव* ह्या ग्रंथाची रचना केली आहे. *तारकब्रह्मा*त 'आत्मा अनुभवा प्रतिची। जे बोलिले गोरक्ष जती। ते सांग पा स्थिती। आत्मयाची॥ ९॥ ऐसी आज्ञा श्रीगुरूची जाहली।' असा ग्रंथरचनेच्या प्रेरणेचा व प्रयोजनाचा उल्लेख परमानंद चैतन्याने केला आहे.

ग्रंथाच्या ३१२ ओव्या असून त्याचे हस्तलिखित तंजावर ग्रंथसंग्रहात सापडते (बा. १३९) (भाइसमंइति., श. १८३५, पृ. ६–७).

**परमानंदजोगा** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**परमानंदन** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**परमानंदसदाशिव** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – कर्मविपाक ओव्या; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**परमानंदसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**परमानंदसुत टीकाराम** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**परशराम (ढवळे)–१ / ० परशुराम–१** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] ग्रंथकार. 'रामात्मज जो बबाजी' त्यांचा हा पुत्र एवढी माहिती ह्यांच्या ग्रंथावरून मिळते. उपनाव ढवळे. हा कवी स्वतःस 'रामात्मजपुत्र' (*गुरुचरित्र*, अ. १३–९१), 'रामात्मजसुत' (अ. १५–१४४), 'बच्याजितनय' (अ. २२–१३५), 'परशुराम' (अ. २४–६७), 'बच्याजिसुत परशुराम' (अ. २५–८३) असेही म्हणवितो. नरसोबाची वाडी येथील कृ. न. नरहर वाडीकर ह्यांच्याकडे असलेल्या *गुरुचरित्रा*च्या अस्सल हस्तलिखित प्रतीवर पुढील शेरा आहे : 'ह्या गुरुचरित्र आर्या परशुराम बबाजी ढवळे वास्तव्य वेळवंड तर्फ हातखंबे तालुके रत्नागिरी यांणीं करून गुरुदेवदत्त अर्पणार्थ वाडी नरसोबाची येथें आपले चिरंजीव बाळकृष्ण ह्यांजबरोबर पाठविल्या व त्या पुजाऱ्यामार्फत श्रीस अर्पण केल्या. पोथीवरील मिती वैशाख शुद्ध पौर्णिमा शके संतराशे एक्यांशीं सिद्धार्थी नाम संवत्सर।' (इ. स. १८५९) अशी आहे.

कवीने *गुरुचरित्र*, *गुरुचरित्रसार* (र. श. १७७५ / इ. स. १८५३) व *आनंदमूर्तिवर्णन* इत्यादी ग्रंथांची रचना केली आहे. परशुराम कवीने लिहिलेले *गुरुचरित्र काव्यसंग्रह*कार नारायण चिंतामण केळकर ह्यांनी टीपा देऊन इ. स. १९०३ मध्ये निर्णयसागर छापखान्यात प्रसिद्ध केले. ह्याचे ३५ अध्याय व ३७८० ओव्या आहेत. कवीला मोरोपंतांविषयी अत्यंत पूज्यभाव वाटत होता हे *गुरुचरित्रा*तील उल्लेखावरून (अ. १, गीती २५) दिसते. *गुरुचरित्रा*तील कविता सोपी आहे. ह्यांतील यमकरचनेवर मोरोपंती रचनेची दाट छाया आहे. कवितेत यमकासाठी शब्दांची ओढाताण केलेली आढळते.

कविरचित *गुरुचरित्रसार* (श्लो. ५२) हे एक छोटे प्रकरण *काव्यसंग्रहा*तून मुद्रित झाले आहे. कवीच्या *आनंदमूर्तिवर्णन* व पदे अशा (अमु.) रचनेचा उल्लेख सूचीकार गो. का. चांदोरकर करतात (संककासू., पृ. ६२).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, ना. चिं. : प्रस्ता., परशुराम कवीचे गुरुचरित्र; मुंबई, १९०३; पृ. २.

**परशराम–२ / ० परशुराम–२** [श. १६७६ / इ. स. १७५४ – श. १७६६, श्रावण शु. १२ / इ. स. १८४४] शाहीर व लावणीकार. गोदातटाकी गंगथडीत ह्यांचा फार लौकिक होता. हे नाशिक जिल्ह्यातील सिन्नर तालुक्यातील वावी किंवा राजाची वावी ह्या गावचे राहणारे. जातीने शिंपी. हे वडिलोपार्जित शिंप्याचाच धंदा करीत असत. १५/१६ वर्षांचे असताना गावानजीकच्या विठोबाच्या पडक्या देवळात परशरामांनी कडक उपवास करून *ज्ञानेश्वरी*चे पारायण केले तेव्हा त्यांना विठोबाचा साक्षात्कार झाला, अशी एक आख्यायिका सांगतात. ह्यानंतरच ते कवित्व करू लागले. परशरामांचे

गुरू म्हणून देवपूरकर बाबा भागवतांचा उल्लेख शाळिग्रामांनी केला आहे. परशरामाच्या कवनात स्वतःच्या नावापूर्वी 'नामी विठ्ठल' किंवा 'वरदी विठ्ठल' असा जो निर्देश येतो त्याबद्दल असे सांगितले जाते की, विठोबा खत्री नावाचा कोणी इसम ह्यांचा मोक्षगुरू होता व त्यानेच ह्यांना लावण्या, पोवाडे रचून नामसेवा करण्याचा आदेश दिला होता. परशरामांनी रचलेल्या धार्मिक व आध्यात्मिक कवनांमुळे त्यांना तमासगिरांत वरदी पुरुषाचा मान होता.

परशरामांचे संतकवितेचे वाचन चांगले होते. *भारत, भागवत, हरिविजय, रामविजय* इत्यादी ग्रंथ त्यांनी वाचले व ऐकले असावेत. उतारवयात *ज्ञानेश्वरी*चे नित्यपठण ते करीत. शिंप्याचा धंदा करीत असता परशरामांनी स्वतःचा तमाशाचा फड उभा केला. ते स्वतः लावण्या रचून वीणेच्या तालावर गोड सुरात म्हणत असत. पुढे त्यांना अनेक साथीदारही मिळाले. एकदा बाजीराव पेशव्यांची स्वारी कोपरगावी आली असता सगनभाऊ, होनाजी इत्यादी शाहीर त्यांच्या स्वारीबरोबर होते. त्यावेळी त्र्यंबकजी डेंगळे ह्यांनी वावी येथे जासूद पाठवून परशरामांनाही बोलावून घेतले. तमाशाची सुरुवात झाल्यावर होनाजीने गंगेवर रचलेले कवन म्हटले. पुढे परशरामांची पाळी आल्यानंतर त्यांनी नवीन रचलेली गंगेची लावणी 'पश्चिमवाहिनी गोदा, प्रतिमूळ गंगा' ही म्हणून दाखविली. तिच्यामध्ये गोदावरीच्या धार्मिक माहात्म्याचे वर्णन करून राघोबादादा व बाजीराव ह्यांनी बांधलेल्या वाड्यांचे व देवालयाचे उल्लेख करून राघोबाच्या मृत्यूनंतर बाजीराव (दुसरे) ह्यांनी बांधलेल्या छत्राचाही उल्लेख केला आहे. ती स्तुती बाजीरावांना आवडून त्यांनी परशरामांना काही जहागीर देऊ केली पण ती त्यांनी नाकारली.

"पोट भराया उभारिला ना तमाशाचा धंदा। रुची मनाची गायन करुनी अळवावे गोविंदा।" पोटापुरते मिळवून देण्यास आमचा सुईदोरा भक्कम आहे, असा धंद्याचा अभिमान त्यांनी व्यक्त केला आहे. असे असूनही द्रव्यार्जन करण्यासाठी फड घेऊन ह्यांना दूरदेशी भटकावे लागलेच. भवानी तेली ऊर्फ बाकेराव हा त्यांच्या तमाशाच्या फडातील गाणारा साथीदार पेशवाईत बराच प्रसिद्धीस आला होता. ह्यांच्या इतर साथीदारांत बाबा सातभाई, मलुराम, नारायण सका शिंपी, बापू रामा कुंभार, गोविंद सोनार, बाबाजी शिंपी, येसू, कृष्णा, महादू इत्यादिकांचा समावेश होतो. इ. स. १८०८ साली पुणे दरबारातून बाकेरावाच्या फडास ५०० आणि १५०० रुपयांची बिदागी दिल्याची नोंद पेशवे दप्तरातील कागदपत्रांतून सापडते. पेशवाईचा अस्त झाल्यानंतर बडोदे, इंदूर, ग्वाल्हेर इकडे मोहिमा करून परशरामांनी द्रव्याची जोडणी केली. पोटासाठी अशी भ्रमंती करीत असता वृद्धावस्थेने विकल झाल्याने अखेर आपल्या जन्मग्रामी येऊन ह्यांनी राहिलेले दिवस ईश्वरभजनात घालविले. परशरामांना इच्छामरण आले, असे सांगण्यात येते. 'आजपासून आमचे मरण चार दिवसांनी आहे, गंगेच्या काठी मंजुरास मरण्यास जातो' असे सांगून आपल्या साथीदारांकडून त्यांनी कवने म्हणून घेतली व त्यांचा निरोप घेतल्यानंतर चौथ्या दिवशी मंजुरा येथे वयाच्या नव्वदाव्या वर्षी देह ठेविला.

परशरामांच्या उपलब्ध कवितेपैकी ११ पोवाडे व सुमारे १२० लावण्या शाळिग्रामांनी प्रसिद्ध केल्या आहेत. शाहीरांच्यामध्ये कलगीवाले आणि तुरेवाले असे दोन पक्ष पूर्वापार चालत आले आहेत. हे दोन पक्ष, लावण्यांमध्ये येणाऱ्या वेदान्तचर्चेत प्रकृति-पुरुष, जीव-शिव ह्या अध्यात्मातील द्वंद्वांसंबंधीची कोडी परस्परांना घालून ती सोडविण्याचे आव्हान देत असतात. ह्या दोन पंथांपैकी परशराम हे कलगीवाले होते.

परशरामांनी मल्हारराव होळकर, फत्तेसिंगमहाराज गायकवाड, खंडेरावमहाराज, इंग्रज ह्यांच्यावर आणि तत्कालीन देशस्थितीचे वर्णन करणारे पोवाडे रचले आहेत. पेशवाईचा अस्त झाल्यानंतर इंग्रजी सत्ता आल्याने जे स्थित्यंतर घडले त्याची जाणीव परशरामांना विशेषत्वाने झालेली दिसून येते. इंग्रजी सत्ता कशी, तर 'शककर्ता अवतार कलीमध्ये हीच भासली नवी मुद्रा' असे वर्णन करून विलायत तर कोणी पाहिली नाही, तरी तेथील लोकांनी येथे जरब कशी काय बसविली ह्या गोष्टीचे आश्चर्य कवीने व्यक्त केले आहे. वरील पोवाड्यांचे स्वरूप लावणीवजाच आहे.

अध्यात्मपर, देवतावर्णनपर, बोधपर किंवा उपदेशपर, समाजस्थितिवर्णनपर, शृंगारिक इत्यादी अनेक विषयांवरील कवने ह्यांनी केलेली आहेत. ह्यांच्या पारमार्थिक लावण्यांतून वेदान्ताची परिभाषा येते. परशरामांचे अध्ययन फारसे नसले तरी ते बहुश्रुत असावेत असे त्यांच्या कलगीच्या लावण्यांवरून दिसते. पंचीकरणाची तत्त्वे हे सहजतेने सांगतात. 'नाही सगुणविण मनःशांति' असे सगुणोपासनेचे श्रेष्ठत्व वर्णन करतात. अर्थातच लावण्यांतील हा वेदान्त वरवरचाच असतो. कूटात्मक रचना करून पौराणिक कथांच्या द्वारे सर्वसामान्य जनतेचे मनोविनोदन करण्यात सर्वच शाहीरांना गंमत वाटे. शृंगारिक वर्णनाधारे अनेकदा परमार्थपर तत्त्वोपदेश ह्या लावण्यांतून केलेला असतो. अशा प्रकारची रचना परशुरामांनीही केलेली आहे. सवतीसवतींची भांडणे, नवराबायकोचा कलह, निपुत्रिकेची खंत इत्यादी चिरपरिचित विषय त्यांनी आवडीने रंगविले आहेत. कृष्णलीलेवरच्या ह्यांच्या लावण्या हृद्य आहेत. कित्येकदा विनोदी कहाण्यांचीही गुंफण ते लावण्यांतून करतात.

मर्दानी पुरुषाला लावण्यवती स्त्रीविषयी वाटणारे आकर्षण व्यक्त करताना शृंगारिक कवनांमधून स्त्रीसौंदर्याचे मुक्त वर्णन परशरामांनी केले आहे. "दुमदार कुणाची छान। नवती भरज्वान पुसा रे आली कुठून। स्वरुपाचे तुटती तारे कडाकड विजवा पडतिल तुटून।" असे एका लावण्यखनीचे तर "थाट नवे नीट होट लाल करी खाऊन सदा। असल शहरची राहणेवाली करी झुरक्यांतून अदा" असे दुसऱ्या एका शहरसुंदरीचे मार्मिक वर्णन त्यांनी केले आहे. त्यांच्या उपमा गावरान असतात. उदा., 'गोरे गाल जसा नरम खवा' किंवा 'लाल अंगावर शाल शोभली मशाल जैशी राजसभेत' इ. ह्या उपमांतून एक प्रकारचे नावीन्य आणि सौंदर्य प्रतीत होते. 'गगनांत चांदणी ठळक, मारशी झळक, उभी ग अंगणीं। किती नटुन थटून मारशील छनाछन् नैनांच्या संगिणी' किंवा 'निर्मळ मुखडा चंद्राकार, सरळ नाकाची शोभते धार।' ह्या प्रकारचे कवितेत येणारे प्रतिभावर्णन हे नैसर्गिक वाटते. लेखणीच्या एकदोन फटकाऱ्यांनी सुबक शब्दचित्र काढण्याची त्यांची कलाही ह्या ठिकाणी दिसून येते.

दोनचार वेचक वाक्यात टर उडविण्याची किमयाही त्यांना लीलया साधते. विनोदी लेखनाची धाटणी इतर शाहीरांपेक्षा परशरामांत अधिक दिसते. त्यांच्या विनोदी आणि उपहासपर लावण्या बऱ्याच आहेत. शेंदाड शिपायाच्या फजितीच्या कथेवरील ह्यांची लावणी शुद्ध विनोदाचे दर्शन घडविणारी आणि नाट्यात्मक म्हणून लक्षात राहण्याजोगी आहे.

परशरामांची वाणी आणि रचनाशैलीही प्रासादिक आणि प्रभावी आहे. सुभाषिते, वाक्प्रचार व म्हणी ह्यांच्या उपयोगाने ती आवेशपूर्ण झाली आहे. ह्यांच्या काव्यरचनेचे खास वैशिष्ट्य म्हणजे ह्यांच्या लावण्यांची अक्कड कडवी किंवा ध्रुपदे होत. ही अगदी ठसठशीत आणि लक्षात राहण्याजोगी असतात. उदा., "अंधार नगरी बेबंद राजा न्याय नीत कैची ? ठाक ठोके ठगाई करुनी जो राहिल पत त्याची."

परशराम शाहीर खेड्यात राहात असल्याने, त्यांच्या लावण्यांतून सामान्य जनतेची राहणी, त्यांच्या चालीरीती, समजुती, नवसांचे

प्रकार ह्यांची विपुल माहिती सापडते. तत्कालीन सांस्कृतिक, सामाजिक आणि ऐतिहासिक स्थितीचेही दर्शन त्यांच्या लावण्यांतून घडते. उत्स्फूर्त रचनेच्या आवेगात त्यांच्या प्रतिभेने अनेक सुंदर कल्पनांना जन्म दिला आहे. एकंदरीत काव्यरचना ठसकेबाज आणि अर्थगौरवयुक्त आहे.

**रचना : मु. –** १. परशरामकवीच्या लावण्या; संग्रा. : शाळिग्राम, शं. तु.; पुणे, १९०७; द्विआ. : जोशी, शं. न.; पुणे, १९२४; प्रस्ता., पृ. १–१६. २. परशरामी लावण्या, भाग १, २, ३; संग्रा. कोल्हारकर, वि. ना.; मुंबई, १९२४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. केळकर, य. न. : परशराम : तंतकवि तथा शाहीर; पुणे, १९५२; पृ. १८–३७. २. बंधुमाधव : शाहीर परशरामाची रसाळ लावणी; महाराष्ट्र मासिक, मार्च १९६६; पृ. १८. ३. मोरजे, गं. ना. : परशराम : शाहिरी वाङ्मय : लावणी; मवाइ., खं. ३; पुणे, १९७३; पृ. ४६७–६८. ४. वर्दे, श्री. म. : परशराम : मराठी शाहीर; मुंबई, १९३०; पृ. २१०–२२५.

**परशरामबास** [इ. स. १४ वे शतक, प्रारंभकाल] महानुभाव प्रमेयकार, चरित्रकार व महात्मा पंथाचे शेवटचे आचार्य. भास्करभट्ट बोरीकरांचे हे समर्पित झालेले शिष्य. कवीश्वर आम्नायाचे अनुयायी. बळहेग्राम येथील खेइदेव पंडित व त्यांची पत्नी जोमाइसा ही परशरामबासांची मातापितरे. ह्या दांपत्यास बरेच दिवस अपत्यप्राप्ती झाली नाही. पुढे पंचाळेश्वरास चक्रधरस्वामींची भेट घडल्यानंतर त्यांच्या प्रसादाने खेइदेव पंडितांना एक कन्या व दोन पुत्र अशी संतती झाली. परशरामबास व रामेश्वरबास हेच ते दोन पुत्र. हे बाइदेवबासांचे भाचे. ह्या दोघांनाही पंथाची दीक्षा प्रथम बाइदेवबासांकडूनच मिळाली. (डॉ. कोलते, *महानुभाव संशोधन–१*, पृ. १३१). डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी कवीश्वर आम्नायाचा वंशवृक्ष देताना नागदेवाचार्य > भास्करभट्ट > परशरामबास अशी परंपरा दिली आहे. पंथाचे तृतीय व शेवटचे आचार्य म्हणून परशरामबासांचा उल्लेख केला आहे (ममवा., पृ. २२). डॉ. वि. भि. कोलते ह्यांच्या मते 'परशरामबास व रामेश्वरबास हे भास्करभट्टांचे दीक्षित शिष्य नाहीत. बाइदेवबासांपासून त्यांनी संन्यासदीक्षा घेतली होती, आणि त्यामुळे बाइदेवबासांचे शिष्य म्हणून ते ओळखले जात (वृ. ३९). परंतु पुढे मृत्युसमयी बाइदेवाने ह्या दोघांनाही भास्करभट्टांना दत्तक दिले. तेव्हापासून ते भास्कराचे शिष्य म्हणून ओळखले जाऊ लागले असे कळते.' (*भास्करभट्ट : चरित्र आणि काव्यविवेचन*, पृ. ४२–४३). कवीश्वराचार्यानंतर परशरामबास आचार्यपदी आले. परशरामांच्या उत्तरावस्थेत शिष्यवर्गात मतभेद झाल्याने आचार्यांच्या संमतीनेच मुख्य अधिकरणाच्या तेरा शाखा किंवा कुळी अस्तित्वात आल्या. हेच महानुभाव पंथाचे तेरा आम्नाय होत. त्यांनाही पुढे उपशाखा फुटल्या. ह्या तेरा आम्नायांपैकी उपाध्य आणि कवीश्वर हे दोनच आम्नाय प्रमुख मानले जातात. परशरामबास आचार्यपदी असताना कवीश्वर आम्नायाच्या शिष्यशाखेचा विस्तार खूपच झाला.

परशरामबास हे तीक्ष्ण बुद्धीचे होते. एकदा त्यांनी केलेली धर्मवार्ता ऐकून आणोबास एवढे खुश झाले की त्यांनी 'परशरामाचे बोलणें तें गगना गवसणी की' ह्या शब्दांत त्यांचा गौरव केला. त्यांची पठणशक्तीही तीव्र होती. आपल्या बुद्धिमत्तेला साजेल अशीच ग्रंथरचना परशरामांनी केल्याचे *वृद्धाचारात* निर्देश सापडतात. "परशरामबासी नीर्वचन : नीर्वचनाची असति परि केली : दोही स्थळाचेया पुढीलाप्रमाणा अन्वयो लावीला : आदि करुनि वेगळीया टांचीलीया : उद्धरण : चैतन्यमृत्तिका बोलीले : दृष्टान्त प्रमेये बोलीली : ऐसा साम्नान्वयो लावीला (वृ. ४५). याशिवाय धाकटे *आचारस्थळ* व *विचारस्थळ* ह्यांनी केलेले असून (वृ. ४१) *नागदेवाचार्य चरित्र* किंवा *स्मृतिस्थळ* ग्रंथाचे कर्तेही विरोधी पुराव्यांच्या अभावी हेच असावेत असे दिसते." (डॉ. कोलते : *भास्करभट्ट बोरीकर : चरित्र आणि काव्यविवेचन*, पृ. ४३).

परशरामांच्या नावावर मोडणारा *नागदेवचरित्र* ऊर्फ *स्मृतिस्थळ* हा ग्रंथ पंथीयांमध्ये पूज्य व महत्त्वाचा समजला जातो. हा ग्रंथ म्हणजे पंथाचे आद्याचार्य नागदेव ह्यांचे चरित्र होय. पण त्यामध्ये फक्त नागदेवाचार्यांच्या स्मृतीच नाहीत तर आचार्य आणि त्यांची प्रभावळ ह्यांच्या संबंधातील अनेक बारीकसारीक गोष्टींचेही तपशील दिलेले आहेत. नागदेवांच्या चरित्रकथनाच्या अनुषंगाने येणारा पंथाचा इतिहास, झालेली धार्मिक चर्चा व पंथीय दृष्टिकोनातून विशेष महत्त्व असणाऱ्या घटना ह्यामुळे ह्या ग्रंथाचे महत्त्व विशेष वाढले आहे. *स्मृतिस्थळा*चा कर्ता आणि काळ ह्या संबंधात विवेचन करताना *स्मृतिस्थळ* ग्रंथाचे एक संपादक वा. ना. देशपांडे म्हणतात : "सध्याचे 'स्मृ. स्थ.' कुणा एका लेखकाचे नसून त्यांत अनेकांच्या पाठांतील कमीअधिक मजकूर मिसळला गेला असावा." (प्रस्ता., पृ. ७). स्मृतींचे विविध पाठ झाल्याची प्राचीन ग्रंथ साक्ष देतात. उदा., *पारमांडल्य अन्वयस्थळात* नरेंद्रबासाने सातशे स्मृती लिहिल्याचा आणि कवी मालोबासाने पाचशे *स्मृति* व सवाशे *वृद्धाचार* अन्वयी लाविल्याचा निर्देश येतो. 'दुसरा बंध ('अन्वयस्थळ सुमुर्ती' चा) परशरामबासी केला' असे *साळकर अन्वयस्थळात* म्हटले आहे. 'सीउबासीं. . .श्रुति स्मृति – लीळा : न्यायें वृद्धाचारें : शोधूनि तेंचि प्रमाणत्वें मानीलें :' असा 'अन्वयस्थळाची परी' मध्ये उल्लेख सापडतो.

प्रत्यक्ष *स्मृतिस्थळाचे* स्वरूप पाहिल्यानंतर त्याचा मूळ लेखक हा समकालीनाखेरीज दुसरा असणे शक्य नाही ह्याची खात्री पटते. त्यामुळे मूळ कर्ते म्हणून मालोबास, धाराशिवकर ओंकारबास इत्यादिकांची नावे पुढे येतात, तेव्हा ती अन्वयकार किंवा संस्करणकार ह्यांचीच मानली पाहिजेत. उपर्युक्त अवतरणावरून परशराम व नरेंद्र हे *स्मृतां*चे मूळ लेखक व मालोबास, गुर्जर शिवबास हे संस्करणकार वाटतात. आम्नायाभिमानाने ह्या व अशा इतर अनेक शोधकारांनी आपआपले स्वतंत्र पाठ बनविले असावेत, असे मत वा. ना. देशपांडे ह्यांनी व्यक्त केले आहे (स्मृ. स्थ., प्रस्ता., पृ. ३–८). महादोबा साळकर व राघवमुनि (*चरित्रआबाब*कर्ता) हे दोघे मात्र *स्मृतीं*चे कर्तृत्व परशरामांकडे देतात.

*स्मृतीं*चे मूळ लेखक म्हणून नरेंद्रांचे नाव घेतले जाते. पारमांडल्य *अन्वयस्थळात* तसा निर्देश आढळतो. परंतु ह्या माहितीस पंथीय परंपरेत अन्यत्र दुजोरा मिळत नाही त्यामुळे ह्या *स्मृतीं*चे संकलक नरेंद्र नसावेत असे मत *स्मृतिस्थळाचे* दुसरे संपादक डॉ. व. वि. पारखे व डॉ. यू. म. पठाण ह्यांनी मांडले आहे. एकंदरीत हा मुद्दा वादग्रस्त असला तरी *स्मृतिस्थळ* ग्रंथातील परशरामाच्या कर्तृत्वाचा काही भाग मान्य करावा लागतो.

ह्या ग्रंथाचे कर्तेपण एकाच व्यक्तीकडे जात नसल्याने ग्रंथाचा नेमका काळ ठरविणे कठीण झाले आहे. पण त्यामधील तपशील पाहिल्यास ह्या *स्मृती* नागदेवाचार्यांच्या मृत्यूनंतर थोडक्या अवधीत म्हणजे श. १२३५ / इ. स. १३१३ नंतरच्या काळात लिहिल्या गेल्या असाव्यात असे जाणवते. [ ⇨ ३.]

*लीळाचरित्रा*चा पिढीपाठ परशरामबासांनी केल्यासंबंधी एक आख्यायिका सांगितली जाते. नागदेवाचार्यांच्या निधनानंतर देवगिरीवर मुसलमानांच्या धाडी येऊ लागल्या. भास्करभट्ट आचार्यपदी असताना अशाच एका धाडीच्या वेळी (श. १२२९–३०, इ. स. १३०७–०८ चा सुमार) *लीळाचरित्र* व केसोबासविरचित *सिद्धान्त सूत्रपाठ* हे ग्रंथ घेऊन आपल्या परिवारासह कोकणच्या दिशेने गेले असता वाटेत लूटमार झाली तेव्हा हे पंथाचे प्रमाण-ग्रंथ गहाळ झाले. पुढे स्थैर्य प्राप्त झाल्यानंतर महानुभाव महंतांनी घोकलेल्या लीळांच्या आधारे

*लीळाचरित्रा*ची पुनर्बांधणी केली. हिराइसेला चक्रधरांचे संपूर्ण चरित्र मुखोद्गत होते. तिच्या तसेच इतर मंडळींच्या पाठांतरावरून सर्वांच्या ' वासना ' किंवा मते एकत्र करून परशरामांनी ह्या चरित्रग्रंथाचा एक पाठ तयार केला, तोच *पिढीपाठ* होय (अंदाजे श. १२३५ चा सुमार). ह्या संशोधनकार्याविषयीची माहिती *अन्वयस्थळ*कार कृष्णमुनीने दिली आहे (*अन्वयस्थळ* : ओव्या १३७–१४३, *संशोधन लेखसंग्रह, भा. १*, पृ. १५९–६०). मात्र हे कार्य एवढ्यानेच संपले नाही. पुढे अचळमुरारीचे शिष्य शिवबास ह्यांनी चरित्राची शोधनी करून ह्या पिढीपाठाची नवी संहिता तयार केली. पारमांडल्य आम्नायातील नागनाथबासांनीही एक असाच पाठ तयार केला. ह्या दोनही पाठांना पंथात प्रामाण्य मिळाले. हे पाठ म्हणजे परशरामबासांच्या मूळ पिढीपाठाचेच संशोधित अवतार होत. *लीळाचरित्रा*प्रमाणे *सूत्रपाठा*चेही संकलन भास्करभट्ट, रामेश्वरबास, परशरामबास ह्या तिघांनी मिळून केले. हाच *सूत्रपाठ* नंतर कवीश्वर शाखेत सर्वमान्य झाला.

परशरामबासांनी चक्रधरप्रभूंच्या *दुर्भगा दृष्टान्ता*वर स्वतंत्र प्रमेय रचल्याचे *महानुभावीय ग्रंथसूची*वरून दिसून येते. ह्या प्रमेयाच्या उपलब्ध झालेल्या एका पोथीत कोठेही काळ, स्थळ किंवा कविनाम ह्यांचा उल्लेख येत नाही. प्रस्तुत प्रमेय मुरारीमल्ल ह्यांच्या *दुर्भगा प्रमेया*पेक्षा भाषा व वर्णनशैलीने पूर्वीचे असावे असे दिसते. त्यामुळे ते परशरामबासांचे असावे असे ह. ना. नेने ह्यांना वाटते (*संशोधन लेखसंग्रह, भा.* २, पृ. १३४). दुर्भगेच्या दृष्टान्ताला अनुलक्षून विचार व्यक्त करताना भक्तांनी अनुचित वागल्याने त्यांना दुहवपण कसे येते ह्याची फोड प्रमेयकाराने केली आहे. पतीची अवकृपा झाल्याने पतिप्रेमाला वंचित झालेली एक स्त्री दुर्भगा म्हणजे दुहव (नावडती) झाली, तरीही पतीचे घर सोडून न जाता हालअपेष्टा सहन करीत तेथेच राहिली. तिची भक्ती पाहून पुढे पतीचे प्रेम तिला परत मिळाले. असा दृष्टान्त घेऊन चक्रधरांनी परमेश्वराच्या ठिकाणची अनन्य भक्तीच भक्ताला तारून नेते, असे सांगितले आहे. हीच गोष्ट *लीळाचरित्रा*तील परमेश्वरकृपाप्रसादाचे वर्णन अनेक आख्यायिका व प्रसंग सांगून प्रमेयकारांनी स्पष्ट केली आहे.

परशरामांच्या रचनेतील *प्रकर्णवस* हा ग्रंथ पंथीय तत्त्वज्ञान समजावून घेण्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. *प्रकर्णवस* ग्रंथात आनेराजांनी अन्वयिलेल्या सूत्रांच्या प्रसंगांचे स्पष्टीकरण परशरामांनी केले आहे. *सूत्रपाठा*तील सूत्राचा ससंदर्भ (स्थळ, काळ, व्यक्ती) अर्थ लावल्याखेरीज सूत्रांची उकल होत नाही, ह्या हेतूने प्रस्तुत ग्रंथाची रचना परशरामबासांनी केली, अशी माहिती पंथीय परंपरा देते. ग्रंथाच्या आरंभी केलेल्या निवेदनावरून ग्रंथकाराचे उद्दिष्ट ध्यानात येते. परशरामबास म्हणतात : ' अर्थ तो प्रकर्णवसे : प्रकर्णे अर्थ विनयोजक : तेच प्रकर्ण बहुता प्रकारी : एक प्रस्तावनेनुरूप : एक पुसीलेया : एक निरूपण प्रसंगे : एक कथा सादृस्य : ऐसा बहुत प्रकर्णवस असे : तो आता सांगता असीजे ' असे म्हणून स्वामींच्या वचनांचा सांगोपांग, सुसूत्र, तर्कशुद्ध, सहजसोपा व सुस्पष्ट अर्थ ह्या ग्रंथात परशरामबासांनी विशद केला आहे. प्रस्तुत ग्रंथ महानुभाव संशोधकांनी छापला आहे (अमरावती, १९६८).

परशरामबासांचे *झोळीगुढी* हे आध्यात्मिक प्रकरण डॉ. यू. म. पठाण ह्यांनी *महानुभाव* मासिकातून प्रसिद्ध केले आहे (महानु., एप्रि. १९७३). हाती झोळी घेऊन भिक्षावृत्तीने राहण्याची श्रीचक्रधरस्वामींची सर्व शिष्यांस आज्ञा असे. झोळीशिवाय साधननिष्पत्ती होत नाही असे स्वामी म्हणत. पंथीय दृष्टिकोनातून झोळीचे माहात्म्य ह्या *झोळीगुढ्यात* परशरामांनी स्पष्ट केले आहे. झोळी ईश्वराचे संनिधान प्राप्त करून देते. म्हणून ' भिक्षा साधन न सांडवे : हे परशरामबासी बोलले असे : येथे विस्तारे सांगितले : याते झोळियेचा गुढा बोलिजे : ' असे आचार्य म्हणतात.

परशरामबासांची ग्रंथरचना पाहिल्यानंतर एक गोष्ट स्पष्टपणे कळते ती ही की कवित्व करावे म्हणून ही साहित्यनिर्मिती झालेली नाही. चक्रधरांच्या पंथीय तत्त्वज्ञानाचा प्रसार करून अधिकाधिक अनुयायी मिळवावयाचे अशी दृष्टी ठेवून त्यांचे लेखनाचे प्रयत्न झाले आहेत. कवीश्वरबासांनी त्यांची आचार्यपदी नियुक्ती केली ह्यावरून त्यांचा अधिकार पंथीयांमध्ये मोठा होता हे दिसून येते. *लीळाचरित्रा*ची पुनर्रचना व नागदेवाचार्यांच्या स्मृतीचे संकलन ही त्यांच्या आयुष्यातली फार मोठी कार्ये होत. परशरामांची विद्वत्ता भास्करभट्ट किंवा केसोबास ह्यांच्याप्रमाणे सर्वविख्यात नाही. पंथावरील अविचल अशा निष्ठेने ह्यांनी आचार्यपदाची धुरा वाहून पंथाच्या तत्त्वज्ञानाचे स्पष्टीकरण करण्यासाठी प्रमेय, निर्वचन, उद्धरण अशा प्रकारची जी काही रचना केली आहे तिचे पंथीय दृष्टिकोनातून असलेले महत्त्व नाकारता येणार नाही.

**रचना : मु.** – १. झोळीगुढा; गद्य प्रकरण; संपा. पठाण, यू. म.; महानु., एप्रि. १९७३; पृ. १७–२४. २. प्रकर्णवस / प्रकरणवस / श; संपा. पंजाबी, माधवराव; अमरावती, १९६८ (प्रास्ताविक, पृ. १–१२). ३. स्मृतिस्थळ नागदेवचरित्र – गद्य : (१) संपा. देशपांडे, वा. ना.; पुणे, १९६८ (प्रस्ता.), (२) डॉ. तुळपुळे, शं. गो.; पुणे, १९६९ (प्रस्ता.), (३) डॉ. पठाण, यू. म.; औरंगाबाद; (प्रस्ता.), (४) डॉ. पारखे, व. वि; डोंबिवली, १९७० (प्रस्ता.).

**अमु. – गद्य** : १. अस्ति-परी-प्रमेय. २. उद्धरण. ३. चैतन्यमृत्तिका. ४. दुर्भगा-प्रमेय. ५. दृष्टान्त-प्रमेय. ६. निर्वचन-प्रमेय. ७. निर्वचन-लक्षण. ८. महावाक्य-प्रमेय. ९. वृद्धाचार. १०. सिद्धिपाठ. ११. स्मृतिसमुच्चय (नागदेवाचार्यचरित्र).

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. कोलते, वि. भि. : परशरामबास : भास्करभट्ट बोरीकर : चरित्र आणि काव्यविवेचन; अमरावती, १९३५; प्रस्ता., पृ. ४२–४३. २. कोलते, वि. भि. : ' महानुभावांचे दोन आम्नाय '; महानुभाव संशोधन–१; मलकापूर, १९६२; पृ. १२५–१२७. ३. देशपांडे, य. खु. : परशरामआचार्यांचे नागदेवाचार्य चरित्र; ममवा., पुणे, १९६०; पृ. २२. ४. नेने, ह. ना. : दुर्भगा प्रमेय; संलेसं., भा. २; नागपूर, १९५७; पृ. १३३–१४९. ५. भवाळकर, नी. ब. व नेने, ह. ना.; प्रकरणवश/स चक्रधरसिद्धान्तसूत्र, लक्षणान्वय सूत्रपाठ, १; नागपूर, १९३१ (प्रस्ता., पृ. ६–७).

० **परशुराम**–१ – पहा **परशुराम (ढवळे)**–१.

० **परशुराम–२** – पहा **परशराम–२**.

**परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि** [इ. स. १६६० – इ. स. १७१८] कवी. सातारा जिल्ह्यातील वर्धनगडाखालच्या किन्हई गावचे हे कुळकर्णी होते. वडिलांचे नाव त्र्यंबकपंत. आईचे नाव लक्ष्मीबाई. ह्यांचा जन्म इ. स. १६६० मध्ये झाला. हे औंध संस्थानचे मूळ संस्थापक होत. आनंदमूर्ति ब्रह्मनाळकरांचे हे शिष्य. ह्यांनी वयाच्या १४ व्या वर्षी कुळकर्णपण सोडून विशाळगडी निळो सोनदेव अमात्य ह्यांच्याकडे नोकरी पत्करली. ह्यांचे शौर्य आणि हुशारी पाहून राजाराममहाराजांनी इ. स. १६९९ त ह्यांना तात्पुरते प्रतिनिधिपद बहाल केले. पुढे शाहूमहाराजांनी त्यांच्या एकनिष्ठपणाची बक्षिसी म्हणून हे पद वंशपरंपरेने वतनी करून दिले. ह्यांचा मृत्यू इ. स. १७१८ त सातारा येथे झाला.

परशुराम त्र्यंबक हे संस्कृत भाषेचे चांगले ज्ञाते असून ते कीर्तन व त्याला उपयोगी पडणारी कविताही करीत. ह्यांच्या नावावर ' शिवपार्वतीचा धावा ' व काही आरत्या अशी कविता आढळते.

**रचना : मु.** –१. परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि ह्यांच्या कविता; संपा. गोलिवडेकर, ना. वि.; औंध, १९२४. २. आदिशक्तीच्या

दोन आरत्या; मआ., पृ. ३०८, ३७८.

**परशुरामपंडित** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना :** अमु. – भूपालवल्लभ (सटीक); त्रु. पो.; नीति. प्र. ले. का. : श. १६७७ (इ. स. १७५५), मार्गशीर्ष ब. २; भाइसमं. हस्त. सू., पृ. १९८.

**परशुराम ब्राह्मण** [का. अनु.] आरतीकार.

**रचना :** अमु. – वेंकोबाची आरती; सवामं. हस्त. सू., खं. २.

**परशुराम हरिराज** [इ. स. चे १७ वे शतक] महानुभाव भाष्यकार. हे उपाध्य आम्नायातील.

**रचना :** अमु. – आचारविचार, लक्षणवचन संबंध, लक्षणावर महाभाष्य; देशपांडे, य. खु.; ममवा., पुणे, १९६०; उपाध्य आम्नाय वंशवृक्ष, परिशिष्ट.

**परसदास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू, पृ. ६३.

**परिसा भागवत** [इ. स. चे तेरावे शतक] संतकवी. हे पंढरपूर येथे राहणारे एक विद्वान ब्राह्मण होते. नामदेवांचा पारमार्थिक अधिकार जाणून त्यांना परिसा भागवतांनी गुरू केले. नामदेवांचे शिष्यत्व पत्करल्यानंतर पुढे ह्यांनी आपले आयुष्य विरक्तपणाने घालविले. *भक्तविजया*तील कथेप्रमाणे ह्यांच्याजवळ देवीने दिलेला परीस होता. त्यावरून ह्यांचे नाव परिसा भागवत असे पडले असावे किंवा लोकांना हे 'परिसा भागवत' असा उपदेश करीत म्हणून त्याच नावाने ते प्रसिद्ध झाले. हे भागवतावर पुराण सांगत असत. ह्यांचे खरे नाव 'परसो भाग्यवंत' असावे असे संताजी जगनाड्यांच्या वहीतील परिसाकृत आरतीच्या पाठावरून वाटते. नामदेवांचे हे पहिलेच शिष्य. ह्यांनी वारकरी परंपरेला अनुसरून अभंगरचना केली आहे.

ह्यांचे १९ अभंग *श्रीसकलसंतगाथे*त प्रसिद्ध झाले आहेत. त्यांतले अर्ध्याहून अधिक नामदेवांबद्दलच्या स्नेहभावानेच भरलेले दिसतात. वैष्णवांची काशी म्हणून संबोधिल्या जाणाऱ्या पंढरीचे वर्णन ह्या कवीच्या अभंगांत सापडते. 'अणुमाजी राम वेणुमाजी राम। तृणकाष्ठीं राम वर्ततसे' असे साक्षात्कारस्वरूपी अनुभवाचे वर्णन कवी करतो. 'परसा म्हणे येर अवघी उपाधी। नाम गातां सिद्धि होईल रोकडी' असे नाममाहात्म्य कवीने सांगितले आहे. अभंगांची भाषा सोपी आणि शुद्ध वाटते.

**रचना :** मु. – अभंग; श्रीससंगा., खं. १; संपा. जोशी, अ. का.; पुणे, १९६७; पृ. ४८०–४८५. अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : परिसा भागवत; मकच., खं. ३, मुंबई, १९१४; पृ. १६–१९.

**पर्णाभी विश्वनाथ** [का. अनु.] कवी. संताजी जगनाडे ह्यांच्या वहीत कवीची रचना आढळते. हे विठ्ठलभक्त होते (मसा., आ. ५, पृ. ८०६).

**० पाठक नामा** – पहा **नामा पाठक.**

**पाठक महादेव** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – संतपर अभंग व ज्ञानपर पदे; तंसम. हस्त, यादी, क्र. ३.

**पाठकसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० पाठारे, हरि केशवजी** – पहा **हरि केशवजी.**

**० पांडबा** – पहा पांडुरंग–१.

**पांडुरंग–१ / ० पांडबा / ० पांडोबा कैसरे** [इ. स. १८ व्या शतकाची अखेर] गोमंतकस्थ कवी. ह्यांचे संपूर्ण नाव पांडुरंग दादाजी कैसरे. फोंडा-गोवा येथील रहिवासी. जुन्या परंपरेतील संस्काराने युक्त व विशेष चटका लावून सोडणारे (ह्यांचे) एक काव्य म्हणजे *द्रौपदी-स्वयंवर* हे होय. पांडोबांची कविता रसवंती असून, समर्पक शब्दयोजना, निरनिराळ्या वृत्तांची शुद्ध ठेवण, प्रास-अनुप्रास, प्रसादगुण, वर्णनशैली, विषयाशी तदाकार वृत्ती इत्यादी कोणत्याही दृष्टीने तिचे निरीक्षण केले असतां जुन्या सन्मान्य कवितांच्या पंक्तीस ती सहज जाऊन हक्काने बसण्यासारखी आहे. ". . .एकाकाळी गोमंतकात हे (*द्रौपदी-स्वयंवर*) आख्यान फार लोकप्रिय होते व त्यावर कीर्तन करण्याविषयी नारायणबुवा साखरदांडे ह्या सुप्रसिद्ध विनोदी हरिदासाला मोठमोठ्यांकडून आग्रह होई. *स्वयंवरा*शिवाय *पार्थहनुमंतसंवाद, शिवनिशाख्यान, थालिपाक (स्थालिपाक)* वगैरे ह्यांची स्फुट काव्ये आहेत. गोमंतकात धुमटांच्या (गोमंतकातील एक वाद्यप्रकार) वाद्यावर सुरवातीसच जी 'पांडवभाग्यकळा, हे वर्णितां शेषही तो विकला ॥ध्रु.॥ त्रैलोक्याचा नाथ जयांते। भावबळें विकला॥ हे वर्णितां ॥१॥ ब्रह्मांडी न समाय हरी तो। पार्थरथीं टिकला॥ हे वर्णितां ॥२॥ मुख्य हरि जयां वश्य तयांतें। सौख्यनिधी पिकला॥ हे वर्णितां ॥३॥' म्हणून जी 'चंद्रावळ' वाजवितात ती ह्यांचीच होय." (य. सू. सरदेसाई स्मारक ग्रंथ, पृ. २८७–८८.)

*महाराष्ट्रीय संतकविकाव्यसूची*मध्ये (पृ. ६३) 'पांडुरंग' व 'पांडोबा' ह्या दोन नावांखाली ज्या ग्रंथांची नोंद झालेली आहे ती बरीचशी सरमिसळीची आहे. इ. स. च्या १८ व्या शतकाच्या अखेरीस 'पांडुरंग' ह्या नावाने पद्यरचना करणारे दोन कवी होऊन गेले. एक प्रस्तुत पांडुरंग दादाजी कैसरे व दुसरे अलिबागकडील पांडुरंग अनंत पेंडसे (पहा : **पांडुरंग–२**). त्यामुळे एकाची रचना दुसऱ्याच्या नावावर नोंदण्याचा प्रकार घडला आहे. *अनेककविकृत लघुकाव्यमाले*च्या तिसऱ्या खंडात पांडुरंग कवीची कविता छापली आहे तिच्यामध्येही हाच प्रकार घडलेला दिसून येतो.

**रचना :** मु. – १. गयगंधर्वाख्यान; अनेकवृत्तात्मक; ग्रं. सं. १२५; अकलकामा., भा. १, मुंबई, १८९५; पृ. ५३–७२. २. थालिपाक (स्थालिपाककथा); ग्रं. सं. ५१; अकलकामा., भा. २; मुंबई, १८९६; पृ. १२१–१३०. ३. द्रौपदी-स्वयंवर; ग्रं. सं. ६७; अकलकामा., भा. १; मुंबई; पृ. १–१७. ४. शिवनिशाख्यान; श्लोक, चूर्णिका, पदे मिळून ग्रं. सं. ५४; अकलकामा., भा. ३; पृ. १००–१०७. ५. पार्थहनुमंतसंवाद / पार्थाभिमान; सवाई, श्लोक, छंद मिळून; अकलकामा., भा. ३; पृ. २५–२९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** सरदेसाई, य. सू. : महाराष्ट्र सारस्वताविषयी गोमंतकस्थांचे प्रयत्न; य. सू. सरदेसाई स्मारक ग्रंथ १९६५; पृ. २८७–८८.

**पांडुरंग–२ / ० पांडुरंग अनंत पेंडसे / ० पांडोबा पेंडशे** [इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर] कवी. ह्यांचे पूर्ण नाव पांडुरंग अनंत पेंडसे. चित्पावन ब्राह्मण कुटुंबात ह्यांचा जन्म झाला. हे कुलाबा जिल्ह्यात अलिबाग येथे होऊन गेले. ह्यांचे गुरू रामकृष्ण म्हणून कोणी होते. ह्यांच्या कवितेचे एक बाड रामदासी अभ्यासकांस उपलब्ध झाले असून त्यामध्ये त्यांची अनेक स्फुट लघुकाव्ये एकत्रित केलेली दिसतात. *रामगौरव* (मु.), *गोवर्धनोद्धारण, पार्वतीविवाह, विनायकजन्म, त्रिपुरवध, सीतास्वयंवर* अशी ह्यातील नावे होत. *रामगौरवा*च्या टीपेत 'नारायणराव-पेशवे-वध' काव्याचा उल्लेख आहे. नारायणरावाच्या वधाचा पद्यात्मक वृत्तान्त कवीने काव्यात लिहिला आहे. २३६ ओव्या असलेले हे काव्य *काव्येतिहाससंग्रह* (मार्च १९१०, पु. २, अं. ८, पृ. १–१६) मध्ये प्रसिद्ध झाले होते. हे ऐतिहासिक काव्य श. १७३० म्हणजे इ. स. १८०८ मध्ये पुणे मुक्कामी समाप्त केल्याचा उल्लेख सापडतो. *नारायणराव पेशवे चरित* व *रामगौरव* (श्लो. १००, र. श. १७२९; अकलकामा., खं. २) अशी मुद्रित रचना सोडल्यास ह्या कवीची अन्य रचना अप्रकाशित आहे.

पांडुरंग कवींची कविता बव्हंशी श्लोकबद्ध आहे. मोरोपंतांच्या कवितेची कवीवरील छाप व भक्तिरसपूर्णता ह्यांची कल्पना *रामगौरवा*तील कवीच्या पुढील श्लोकांवरून होईल : " कांहीं पुण्य उभारितां अवचटें आलों नृदेहाप्रती । आता जन्म पुन्हा नको रघुपते ! दे मुक्ति कीं शीघ्र ती ॥ २ ॥ बालत्व हें अज्ञदशेंत गेलें । तारुण्यकाळीं हित नाहिं केलें॥ वार्धक्य आलें क्षिण होय शक्ति। सारांश रामा ! घडली न भक्ति ॥ ३ ॥"

**रचना :** अमु. – १. अश्विन्याख्यान; ग्रं. सं. १५१. २. गोवर्धनोद्धारण; श्लो. सं. ३०. ३. चतुर्विंशतिमूर्तिध्यानानि; श्लो. सं. २५. ४. त्रिपुरवध; श्लो. सं. ३३. ५. दक्षयज्ञमंथन; श्लो. सं. ३९. ६. पार्वतीविवाह; श्लो. सं. ४४. ७. पूतनामर्दन; श्लो. सं. ३०. ८. रामदुर्गापरीक्षा; श्लो. सं. ४७; र. का.: श. १७२७. ९. विनायकजन्म; श्लो. सं. ३३; र. का. : श. १७३१. १०. शूर्पणखाविडंबन; श्लो. सं. ५३. ११. सांबक्रीडा; श्लो. सं. ४६. १२. सीतास्वयंवर; श्लो. सं. १०१; र. का. : श. १७२८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री.; पांडुरंग कवि, एक कोकणस्थ कवि; रामदास आणि रामदासी, व. ४, अं. ४१; श्रीसांप्रदायिक वृत्त, चर्चा; पृ. ४५–४८.

**० पांडुरंग अनंत पेंडसे** – पहा **पांडुरंग–२.**

**पांडुरंगकवि** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. कौलमार्ग (बहुधा याचा). २. तुकारामचरित्र; कडवी २५. ३. पदपदांतरे, सवामं. हस्त. सू., खं. २.

**पांडुरंग केशव दाढी** [अंदाजे श. १७४७ / इ. स. १८२५] कवी. जन्म नागपूर येथे. पितृपरंपरा : विठ्ठल > केशव > पांडुरंग. गोत्र भारद्वाज, कुलदैवत जेजुरीचा खंडोबा. कवीचा काळ निश्चितपणे ज्ञात नाही. पण त्याच्या *अद्भुतरामायण* ह्या ग्रंथाच्या समाप्तिकालावरून हा (श. १७४७) इ. स. १८२५ च्या सुमारास होऊन गेला असे म्हणता येते. ह्यांनी लिहिलेला *अद्भुतरामायण* हा १४ अध्यायांचा व २११६ ओव्यांचा एकच ग्रंथ उपलब्ध आहे. हा दिंडी आणि ओवी छंदांत रचला असून ग्रंथसमाप्ती उमरेड गावी श. १७४७ च्या श्रावण महिन्यातील एकादशीस झाल्याचे कवीने म्हटले आहे.

*अद्भुतरामायणा*ची मूळ संस्कृत कथा वाल्मिकींनी भारद्वाज ऋषीस सांगितली आहे. तिचा संक्षेप करून ती १४ अध्यायांत पांडुरंग दाढी ह्यांनी वर्णन केली आहे. चंचल व संशयी मनास विषयसुखापासून परावृत्त करण्याच्या उद्देशाने ह्या ग्रंथाची रचना केली आहे. ग्रंथारंभी कवीने ज्ञानदेव, निवृत्तिनाथ, एकनाथ, वामनपंडित, तुकाराम, चोखामेळा, श्रीधर, मुक्तेश्वर, महिपती, मोरोपंत ह्या थोर कवींना वंदन केले आहे. *अद्भुतरामायणा*वरील एवढी एकच रचना मराठीत सापडते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : पांडुरंग केशव दाढी; मकच., खं. २, १९१३; पृ. २०२–२१२.

**पांडुरंग बापू (जोशी) पावसकर / ० पावसकर, (जोशी) पांडुरंग बापू** [इ. स. चे १९ वे शतक, प्रथमार्ध] प्राचीन मराठी कवितेचे पहिले संपादक व प्रकाशक. हे 'धि बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी'-च्या मराठी शाळेत शिक्षक होते. वरच्या वर्गांना गणित शिकवायचे काम ह्यांच्याकडे होते. ही शाळा इ. स. १८४० पर्यंत चालली. त्यानंतर ह्यांनी प्राचीन मराठी कवितेच्या प्रकाशनाचे कार्य हाती घेतले.

श. १७६२ (इ. स. १८४०) च्या कार्तिक महिन्यात ह्यांनी *श्री ज्ञानचंद्रोदय* नावाचे मासिक सुरू केले. ह्या मासिकात येणाऱ्या मजकुरासंबंधीचे संपादकांचे स्पष्टीकरण असे : " एके कागदांत (='अंकांत'. त्या काळीं आजच्याप्रमाणे 'अंक' न म्हणतां 'कागद' असे म्हणण्याचा रिवाज होता.) संस्कृत व प्राकृत ग्रंथांचे रहस्य व रहस्यप्रतिपादक श्लोक व आर्या व ओव्या व अभंग इत्यादि लिहिले जातील व दुसरे राहिलेले कागदांत प्राकृत ग्रंथ व आख्याने इत्यादि लिहिले जातील. प्राचीन साधूंनी केलेले चरित्रभाग येतील."

ह्या मासिकात वामनपंडितकृत *गीतार्थबोधिनी*, रघुनाथपंडितकृत *नळदमयंती आख्यान*, ज्ञानदेवकृत *हरिपाठ*, मोरोपंतकृत *केकावलि*, एकनाथकृत *आनंदलहरी* इत्यादी महत्त्वाच्या कविता छापल्या गेल्या आहेत. हे मासिक पुस्तक इ. स. १८४४ पर्यंत चालून पुढे बंद पडले असावे (गं. दे. खानोलकर; अमवा., तृतीय खंड, मुंबई, १९४९; पृ. ९९–१०२).

**पांडोबा–१** [का. अनु.] कवी. *संतकविकाव्यसूची*त (पृ. ६३) ह्या कवीच्या नावावरील ग्रंथांची बरीच मोठी यादी दिली आहे. *अनेककविकृत लघुकाव्यमाले*तून प्रसिद्ध झालेली पांडुरंग कवीची कविता ह्या कवीच्या रचनेहून वेगळी आहे. त्यामुळे हा पांडोबा कवी पांडुरंग (क्र. १) ह्या कवीपेक्षा वेगळा असावा.

**रचना :** अमु. –१. अमृतसंजीवनीकथा. २. डंगपुराण. ३. द्रौपदीस्वयंवर. ४. परशुरामजन्म. ५. पुंडलिकप्रताप. ६. पुलोमाकथा. ७. ब्राह्मणमाहात्म्य. ८. मुरलीमाहात्म्य. ९. रामदासचरित्र. १०. रुक्मिणीस्वयंवर. ११. व्यंकटेशमाहात्म्य. १२. सुदामचरित्र. १३. सुयोधनवध; वि. ल. भावे संग्रह.

**पांडोबा–२** [का. अनु.] शाहीर. हा नारायणगावचा राहणारा. गोविंद ह्या प्रसिद्ध शाहीराचा एक शिष्य दत्तानुयायी घौशा. ह्या घौशाचे शिष्य पांडोबा व मोतीराम असे दोघे होते. पांडोबाच्या कवनात गुरूचे नाव वारंवार येते. "गुरू राघो घौशा श्री दत्ताचा वरदी । कवि पांडुरंग शाहीर तुरेकर फंदी ।" ह्यावरून हा तुरेवाल्यांच्या फडापैकी होता असे दिसते (मसा., आ. ५, पृ. ५८८).

**० पांडोबा कैसरे** – पहा **पांडुरंग–१.**

**० पांडोबा पेंडशे** – पहा **पांडुरंग–२.**

**पामर** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**पार्वतीबाई (स्वामी)** [इ. स. चे १७ वे शतक] कवयित्री. मुकुंदराज परंपरेतील. मुडलगीच्या स्वामी घराण्यातील पहिल्या शिवबोधांच्या पत्नी. ह्या पार्वतीबाईंची दोनच पदे उपलब्ध झाली आहेत. पहिल्या पदात संत-सज्जनांना लोटांगण घालण्यासाठी बरोबरच्यांना आवाहन केलेले दिसते. दुसऱ्या पदात, आपल्या पतीला म्हणजेच गुरूला 'चरणछाया' देण्याची कळकळीची विनंती केली आहे. वरील दोन पदांवरून कवयित्रीचा आध्यात्मिक अधिकार समजून येतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : स्वामी घराण्यातील दोन कवयित्री; मुडलगीचे स्वामी; पुणे, १९७१; पृ. ४०–४२.

**पार्वतीशिवसुत** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पावल** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० पावसकर (जोशी), पांडुरंग बापू** – पहा **पांडुरंग बापू (जोशी) पावसकर.**

**पास्कोल गोम्स द फारिआ (पाद्री)** [अंदाजे इ. स. १७२२] गोमंतकस्थ (पाद्री) ग्रंथकार. गोव्यातील बाठी गावच्या पास्कोल गोम्स द फारिआ ह्या पाद्रयाने इ. स. १७२२ साली फादर स्टीफन्सच्या *ख्रिस्तपुराणाला* २३७ ओव्या स्वत: रचून जोडल्या अशी माहिती सापडते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रियोळकर, अ. का. : प्रस्ता., ख्रिस्ताचे यातनागीत; मुंबई, १९५९; पृ. ४.

**पाहेराज** [का. अनु.] महानुभाव कवी. हा कवीश्वर आम्नायातील. गुरुपरंपरा : मुरारमल्ल > भास्कर > भानेराज > बल्लाळ > पाहेराज.

**रचना :** अमु. – १. प्रबोधार्णवी; गीताटीका; ओ. १९०१, श्लो. २. २. संकष्टहरणी ७-श्लोकी टीका उपलब्ध आहे (ममग्रंककासू., पृ. १६).

**पिराजी** [का. अनु.] शाहीर. इंग्रजांचे राज्य आल्यानंतर त्यांच्या हिकमतीने साताऱ्याच्या गादीचा ताबा मिळविणारे छत्रपती शहाजी राजे ह्यांच्यावर ह्या शाहीराने पोवाडा रचला आहे. हे छत्रपती झाल्यानंतरच्या सोहळ्याचे वर्णन ह्या पोवाड्यात येते. छत्रपतींच्या सहवासातल्या वेगवेगळ्या व्यक्तींची शब्दचित्रे दोन दोन ओळीत रेखाटली आहेत.

**रचना : मु.** – आप्पासाहेब ऊर्फ शहाजी राजे यांचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. ८३–८४.

**पुंडलिक भट्ट वैद्य / ० पुंडलीक भट** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. रामदुर्ग येथील रहिवासी. वडिलांचे नाव पांडुरंग. वत्सगोत्री. मोरोपंतसमकालीन. ह्यांची पूतनाख्यान (मु.) ही रचना उपलब्ध आहे. मोरोपंतांच्या रचनेच्या प्रभावामुळे पंतसमकालीन कविमंडळात आर्या योजण्याची वृत्ती आढळते. हा विशेष ह्याही कवींच्या प्रस्तुत रचनेत जाणवतो.

**रचना : मु.** – पूतनाख्यान; श्लो. सं. २५, कास., क्र. १२५, पृ. १५०–१५३. **अमु.** – १. तुलसीचरित्र. २. प्रद्युम्नाख्यान. ३. व्यास-भुजास्तंभन. ४. शबर्याख्यान. ५. **संस्कृत :** (१) कल्पद्रुम. (२) वैद्यसिद्धांत; कासं., क्र. १२५; पृ. १५०.

**पुंडलीक** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**पुंडलीक भट** – पहा पुंडलिक भट्ट वैद्य.

**० पुंडलीक वेदाजीसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – व्याकार-चरित्र; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पुण्यसागर–१** [अंदाजे इ. स. १६५८ नंतर] जैन कवी. लातूर येथील भट्टारक पीठाच्या परंपरेतील भट्टारक अजितकीर्ती हे ह्यांचे गुरू. आपल्या *हरिवंशपुराण* ग्रंथात ह्यांनी आपली गुरुपरंपरा दिली आहे.

देवगिरीच्या जिनदासांचा अपूर्ण ग्रंथ *हरिवंशपुराण* (अमु.) ह्यांनी पूर्ण केला. ह्या ग्रंथातील अखेरचे ५६ ते ६७ अध्याय पुण्यसागरांनी लिहिले आहेत. ब्रह्मजिनदासाच्या *हरिवंशरास* ह्या ग्रंथाचा आधार घेऊन कवीने ही रचना पूर्ण केली. ह्याशिवाय *आदित्यवारकथा* (अमु.) ही ३३२ ओव्यांची व्रतकथा ह्यांनी रचली आहे. कथेचे प्रयोजन पुढील-प्रमाणे सांगितले आहे : "कथा पुण्य बहु काहो पावन। परम रविव्रत सुनिधान। संसारी तारावया तारु जाण। भवसागरि रे॥ ३२२॥" कवीचे ग्रंथ हिंगोली येथील जैन हस्तलिखित संग्रहात उपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : ब्रह्मपुण्यसागर; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ६०–६१.

**पुण्यसागर–२** [अंदाजे श. १६१५ / इ.स. १६९३ – श. १६५० / इ. स. १७२८] जैन कवी. हे पुण्यसागर औरंगाबाद भट्टारक पीठावर झाले. पुण्यसागरांनी ग्रंथाच्या शेवटी जी परंपरा दिली आहे त्यावरून हे आनंदसागरांचे शिष्य असे दिसते. ही परंपरा अशी : भानुकीर्ती > दयाभूषण > विजयकीर्ती > भुवनकीर्ती > आनंदसागर > पुण्यसागर. भुवनकीर्तीच्या कारकीर्दीत ह्यांनी गुणकीर्तीचा *पद्मपुराण* हा ग्रंथ पूर्ण केला.

गुणकीर्तीच्या *पद्मपुराण* ह्या ग्रंथाच्या ४४ अध्यायांपैकी शेवटचे आठ अध्याय पुण्यसागरांनी लिहिले. "महाराष्ट्र ग्रंथ रामायण। खंडित होता जाण। गुरु आज्ञा झाली म्हणून। पूर्ण केला॥" पद्मपुराण ३६. २५२॥ असे ग्रंथरचनेचे प्रयोजन कवी सांगतो. ह्यात शत्रुघ्नभवांतर, सीताकलंक, लहुअंकुशजन्म, राम-सीताभेट, लक्ष्मणमृत्यू, रामनिर्वाण असे अनेक विषय आले आहेत.

**रचना : मु.** – पद्मपुराण (कर्ता गुणकीर्ती), ३६ ते ४४ अध्याय ह्या भागाचे लेखन; संपा. श्रावणे, जयचंद्र; वर्धा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : पुण्यसागर; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ७४–७५.

**० पुरंदरदास** – पहा पुरंदर विठ्ठल.

**पुरंदर विठ्ठल / ० पुरंदरदास** [अंदाजे इ. स. १४८४ – १५६४] कर्नाटकातील थोर संतकवी व विठ्ठलभक्त. ह्यांनी कानडी भाषेतील रचनेबरोबरच मराठीतही काही रचना केलेली आढळते.

ह्यांचे जन्मस्थान पुरंदरगड. हा महाराष्ट्रातील सासवड (जि. पुणे) येथील की कर्नाटकातील हंपीजवळचा, ह्याबद्दल पंडितांमध्ये वाद आहे. हे वासिष्ठगोत्री, यजुर्वेदी ब्राह्मण. पिता वरदप्पा. माता कमलांबा. ह्यांचा पिढीजाद व्यवसाय सराफीचा. पुरंदरदासांचे पूर्वाश्रमीचे नाव तिम्मप्पा. बालपणी काही विद्वान आचार्यांजवळ ह्यांनी संस्कृत व कन्नड भाषेचे अध्ययन केले. हे संगीताचेही उत्तम जाणकार होते. पित्याच्या मागे त्यांचाच सराफीचा धंदा तिम्मप्पांनी पुढे चालविला. त्यात त्यांनी करोडो रुपये मिळविले. पण वृत्तीने अत्यंत कंजूष असल्याने हे धन ते खर्च करीत नसत. त्यांच्यासंबंधीची पुढील एक दंतकथा सांगितली जाते : ह्यांच्या दातृत्वाची एकदा प्रत्यक्ष पांडुरंगानेच कसोटी घेण्याचे ठरविले. ह्या कसोटीस मात्र ते उतरले नाहीत. ही गोष्ट जेव्हा त्यांच्या लक्षात आली तेव्हा ते मनातल्या मनात अत्यंत खजील झाले. त्याच क्षणी ह्यांनी आपली सर्व संपत्ती दानरूपाने वाटून टाकली व स्वत: भिक्षेची झोळी स्वीकारली. पुढे विठ्ठलाच्या आदेशाप्रमाणे विजयनगरच्या व्यासरायांकडून [हे व्यासराय माध्वसंप्रदायी असून विजयनगरच्या राजघराण्याचे गुरू होते (इ. स. १४४७ ते १५३९).] त्यांनी वैष्णव-पंथाची दीक्षा घेतली (इ. स. १५२५). व्यासरायांनी ह्यांचे पुरंदर विठ्ठल असे नाव ठेवले. त्यांच्या मठातील मंडळी ह्यांना पुरंदरदास म्हणू लागली व तेच नाव पुढे रूढ झाले.

हे स्वत: पदे रचीत व गात. थोड्याच काळात त्यांची रसाळ व हृदयस्पर्शी भक्तिगीते कर्नाटकात लोकप्रिय व सर्वतोमुखी झाली. ह्यांच्या कवित्वाची कीर्ती ऐकून विजयनगरचा राजा कृष्णदेवरायही ह्यांचा भक्त बनला.

पुरंदरदासांनी भारतातील सर्व तीर्थक्षेत्रांची यात्रा केली. पंढरपुरास तर त्यांनी दीर्घ काळपर्यंत वास्तव्य केले. मराठी कविता त्यांनी बहुधा ह्याच काळात रचली असावी.

कन्नड भाषेत ह्यांनी विपुल काव्यरचना केली आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम वगैरे संतांनी ज्याप्रमाणे महाराष्ट्रात वारकरी संप्रदायाच्या माध्यमातून भक्तिमार्गाचा प्रसार केला त्याप्रमाणेच कर्नाटकात भक्तिमार्गाची ध्वजा फडकविणारे पुरंदरदास हे अग्रगण्य साक्षात्कारी सत्पुरुष झाले. ह्यांची पदे म्हणजे उपनिषदे व पुराणे ह्यांतील धार्मिक विचारांचे सार होय. त्यांच्या पदसंग्रहाला 'पुरंदरोपनिषद' अशा शब्दांत व्यासरायांनी गौरविले आहे. ह्यात माध्वसंप्रदायाच्या द्वैततत्त्वज्ञानाचे विवरणही पुरंदरदासांनी केले आहे. पुरंदरदासांचे नाव व त्यांची पदे कर्नाटकात सर्वतोमुखी आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, महादेवशास्त्री व होडारकर, पद्मजा : भासंको., खं. ५; पुणे, १९६८; पृ. ५९२–५९४.

**पुरुषोत्तम–१** [का. अनु.] कवी. रामदासी परंपरेतील कल्याण-स्वामींचे शिष्य. ह्यांचे *भरतगीत* भक्तिरसपूर्ण असे प्रेमळ काव्य आहे (शं. श्री. देव; सवामं. बा. १५६).

**रचना : अमु.** – कल्याणस्वामीवरील आरती. २. भरतगीत; ओ. सं. ३७६. ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**पुरुषोत्तम–२** [का. अनु.] कवी. गुरू : नारायण. हा कवी कोण, कोठला ह्याबद्दल जशी माहिती सापडत नाही, तसेच ह्यांचे गुरू नारायण हे कोण ह्याचाही नक्की तपास लागत नाही. ह्या कवीची *निजगुजसप्तक* असे शीर्षक असलेली रचना उपलब्ध झाली आहे. ह्या सप्तकात ७ ऐवजी ६ च अभंग आहेत असे दिसून येते. ह्या प्रकरणात वेदान्तातले आत्मज्ञान विशद करण्याचा कवीने प्रयत्न केलेला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : चांदोरकर, पां. मा. : पुरुषोत्तमकृत निजगुजसप्तक; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ४, चैत्र १८५४; पृ. १६७.

० **पुरुषोत्तम एकनाथ** – पहा **पुरुषोत्तमानंद**.

**पुरुषोत्तम महाराज जडी** [श. १६६२ / इ. स. १७४० –श. १७४२ / इ. स. १८२०] कवी. राहणारे विदर्भातील काटोलचे. भक्तकवी म्हणून ज्या अनेक कवींची नावे नागपूर प्रांतात ऐकू येतात, त्यांपैकी हे एक प्रसिद्ध होते (मसा., आ. ५, पृ. १०००).

**पुरुषोत्तम मुनि** [इ. स. चे १६ वे शतक] महानुभाव कवी. वादींद्र गोपाळदासांच्या *निष्कळंकाध्याय ब्रह्मांडगोलक* ग्रंथाच्या पूर्वपीठिकेत पुरुषोत्तममुनीचे नाव येते. त्या ओव्या येणेप्रमाणे : " ब्रह्मविद्येचेनि विवरें । दोन्ही अर्थाप्रती आधारें ॥ ग्रंथु निर्मिला मुनिश्वरें । पूर्वी पुरुषोत्तमें ॥ ११०० ॥ अन्यव्यावृत्तीचेनि क्रमें । गीता भागवतोक्तसंभ्रमें ॥ नाम ठेविलें पुरुषोत्तमें। निष्कळंकाध्याय ॥ ११०१ ॥ " मूळ *निष्कळंकाध्याय* ग्रंथ १२५ ओव्यांचा होता व तो पुरुषोत्तममुनीने केला होता. त्यात पुढे देवदास व दर्यापूरकर ह्यांनी भर घातलेली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : देशपांडे, य. खु. : निष्कलंकाध्याय, २; महानुभाव वा य; मवाइ., खं. २ (पांगारकर); नाशिक, १९३५; पृ. १७४–१७५.

**पुरुषोत्तम श्रीनिवास** / ० **नानाजी** [अंदाजे इ. स. च्या १९ व्या शतकाचा मध्य] बखरकार.

**रचना : अमु.** – रामचंद्राची बखर; र. का. : श. १७७० (इ. स. १८४८) कीलकनामसंवत्सर, भाद्रपद शु. १, भौमवासर; हस्ताक्षर : आण्णाजी नरसिंह शिरगावकर; शके १७७१, तडसर, सातारा; रासंमं. हस्त. सू., पृ. ८४.

**पुरुषोत्तमस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पुरुषोत्तमानंद** /० **पुरुषोत्तम एकनाथ** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक] संतकवी. हे मुक्ताबाईच्या परंपरेतील. गुरुपरंपरा : आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ > मुक्ताबाई > चांगा वटेश्वर > विमलानंद > चांगा केशवदास > जनकानंद > नृसिंहानंद > पुरुषोत्तमानंद > मुक्तानंद > एकानंद > पुरुषोत्तमानंद. ह्यांचे शिष्य सिद्धानंद व सिद्धानंदांचे शिष्य रामानंद होत. " ह्या रामानंदांनीच शिवकालात निवृत्तिनाथ, ज्ञानदेव आणि सोपानदेव ह्यांच्या समाधिस्थानांची व्यवस्था लावून दिली. रामानंदांचे एक शिष्य रत्नाकर ह्यांनी *दीपरत्नाकर* इत्यादी अनेक ग्रंथांची रचना केलेली आहे. रामानंदांचे दुसरे शिष्य यादोबा गोसावी ऊर्फ सिद्धानंद हे सासवड येथे सोपानदेव समाधिमंदिरात सेवा करीत असत. पुरुषोत्तमानंद हे ह्या शिवकालीन रामानंदांचे परमगुरु असल्यामुळे एकनाथसमकालीन ठरतात. " (ढेरे, रा. चिं. : पुरुषोत्तमानंदांची रचना; *ज्ञानेश्वर*, दीअं., नोव्हेंबर १९७४; पृ. ३४–३५).

रा. चिं. ढेरे ह्यांना (श्री चिंतोपंत गोसावी सासवड ह्यांजकडून) मिळालेल्या बाडामध्ये पुरुषोत्तमानंदांची ३ स्फुटे व १४ ओव्या उपलब्ध झाल्या आहेत. ह्या स्फुटांना मूळ हस्तलिखितांमध्ये *पुरुषोत्तम एकनाथ, अभंग पुरुषोत्तमानंद, अभंग पुरुषोत्तम एकनाथ* आणि *पुरुषोत्तम एकनाथी ओव्या* अशी शीर्षके आहेत. धुळ्याच्या समर्थवाग्देवतामंदिरातही (क्र. ६७९ च्या बाडात) पुरुषोत्तम एकनाथांची पदपदांतरे अंतर्भूत आहेत.

ह्यांच्या उपलब्ध अल्परचनेतून ह्यांचा आध्यात्मिक अधिकार केवढा होता हे कळते. ' आकाशकूपाआंत जीवाचे जीवन । सेंदितां हे खूण विरळा जाणे ॥ ' अशी चिदाकाशाच्या कूपातील जळात बुडून समरस होण्याचा विलक्षण अनुभव व्यक्त करणारी रूपकात्मक अभंगरचना ते करतात. ' माग ना मूस जळाचा स्थळाचा । बुडूनि बुडण्याचा आदि ना अंत । ' असे आत्मस्थितीचे वर्णन करतात आणि ' सावळी सुनील प्रभा । कोटी तरणी शोभा । ' ह्या स्वरूपात त्यांची उत्कट कृष्णभक्ती प्रकट होते.

**रचना : मु.** – पद १, अभंग ३, ओव्या १४; ज्ञानेश्वर त्रैमासिक, व. ६, अं. ४, नोव्हें. १९७४; पृ. ३५–३७.

० **पूर्णधन नागेश** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ**.

**पूर्ण निजरंग** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**पूर्णनिजानंदी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पूर्णप्रकाशानंदनाथ** /० **नायकस्वामी** /० **मंगीश** /० **मंगेश कवी** [इ. स. च्या १७ व्या शतकाची अखेर व १८ व्या शतकाचा प्रारंभ] कवी. नायकस्वामी म्हणून गोमंतकात हे ओळखले जातात. हे साक्षात्कारी सत्पुरुष मूळचे कारवारमधील कुमठा तालुक्यातील आंत्रवल्ली गावचे राहणारे. ह्यांचे मूळ नाव शंकर मंगेश नाईक (नायक) करंडे देसाई. श्रीमंगेश हे ह्यांचे कुलदैवत. त्याच्या दर्शनास जात असता जंगलात ह्यांची व ह्यांच्या कुटुंबाची चुकामूक झाली. त्यावेळी हताश होऊन हे बसले असता एका अवधूतवेशी पुरुषाचे ह्यांस दर्शन झाले. त्याने केलेल्या उपदेशाने ह्यांस तात्काळ उपरती होऊन हे अवधूतांच्या चरणी लागले. ह्यानंतर रानांत अंतरलेल्या त्यांच्या कुटुंबाची व त्यांची गाठ पडली. पूर्वसंकल्पानुसार श्रीमंगेशाचे दर्शन त्यांनी घेतले. ह्यानंतर त्यांनी संसाराचा त्याग करून श्रीमंगेशी येथे, श्रीमंगेशाच्या सांनिध्यातच आपले, उर्वरित आयुष्य परमेश्वराच्या भजनात व परमार्थचिंतनात घालविले (*श्रीमंगेशदेवस्थानचा संक्षिप्त इतिहास*, पृ. १९–२०). कवीची गुरुपरंपरा ह्याप्रमाणे : ईश्वरनाथ > पूर्णानंदनाथ > कुळेश्वरानंदनाथ > सहजानंदनाथ > ब्रह्मानंद > पूर्णप्रकाशानंदनाथ. कवीने *शिवगीते*त व *पूर्णप्रबोधचंद्रोदया*त स्वतःचा ' मंगेश ' असा उल्लेख केला आहे, तर *राधाविलास* काव्यात हे स्वतःस 'मंगीश' असे म्हणवून घेतात.

कवीच्या व्यंकट नावाच्या एका प्रशिष्याच्या ग्रंथात पूर्णप्रकाशानंदांचे मंगेश असे लौकिक नाव दिलेले आहे. ह्या व्यंकटाचे गुरू आत्माराम ह्यांचे पूर्णप्रकाशानंद हे गुरू होते. *पंचपंथानुभव* ह्या व्यंकटकवीच्या ग्रंथाचा काल त्याने श. १६८९ (इ. स. १७६७) असा दिला आहे. त्यावरून नायकस्वामींचा काल समजतो. नायकस्वामींची समाधी गोमंतकात श्रीमंगेश देवस्थानानजीक (प्रियोळ येथे) आहे.

ह्यांनी *शिवदर्पण, पूर्णप्रबोधचंद्रोदय, राधाविलास* अशा काव्यग्रंथांची रचना केली आहे. *पूर्णप्रबोधचंद्रोदया*चे ९ अध्याय व १८४७ ओव्या आहेत. हा ग्रंथ अन्वय व व्यतिरेक अशा दोन भागांत आहे. कवी ह्या ग्रंथाच्या प्रयोजनाविषयी म्हणतो : " पूर्णप्रबोधचंद्रोदय । ग्रंथ तत्त्वार्थ-निर्णय ॥ करिजेल दावोनि प्रमेय । निगमागमीचे ॥ २ ॥ " ह्या ग्रंथात त्वंपद, असिपद, तत्पद, दृश्यत्रयानुवाद, क्रियोपास्या, समाधिउद्बोध, परंपराविध अशा तत्त्वज्ञानविषयक अनेक गूढ विषयांचे विवेचन आले आहे.

*शिवदर्पण* ही मूळ संस्कृत *शिवगीते*वरील समश्लोकी टीका आहे. हा ग्रंथ अनुष्टुभ छंदात रचला आहे. ह्या मराठी समश्लोकीचा कर्ता आपले नाव मंगेश असे ग्रंथात ठिकठिकाणी नमूद करतो. प्रस्तुत मंगेशकृत *शिवगीते*च्या मराठी समश्लोकीचे मुंबईमध्ये श. १७७८ साली (इ. स. १८७६) मुद्रण झाले होते. अ. का. प्रियोळकर ह्यांनी *श्रीशिवगीते*च्या मूळ संस्कृत टीकेचे मंगेशांच्या मराठी समश्लोकी टीकांसहित संपादन केले आहे (१९६८). प्रस्तुत ग्रंथाचे हस्तलिखित त्यांना मुंबई विद्यापीठाच्या हस्तलिखित संग्रहात मिळाले (क्र. १२६२). टीकेची छापील प्रतही उपलब्ध होती. त्यावरून ह्या ग्रंथाची संहिता त्यांनी तयार केली.

*राधाविलास* काव्यातील शेवटच्या श्लोकावरून तो ग्रंथ मंगीश किंवा मंगेश कवींचा असावा असे वाटते. शृंगाराला वैराग्यरसाचे स्वरूप देण्याचा प्रयत्न केल्याने हे काव्य क्लिष्ट झाले आहे. श्रीमंगेशाच्या शिबिकोत्सवात म्हणण्यात येणाऱ्या झुलव्यांची [देवाच्या पालखीपुढे कलावंतिणींनी गावयाची पदे] रचना ह्यांचीच आहे. ही वेदान्तपर गाणी असून नर्तिका (कलावंतिणी) ती गातात. ह्यांतील शेवटच्या कडव्यात कवीने आपले नाव नमूद केले आहे ते पुढीलप्रमाणे : "अवस्थाते ब्रह्मारंध्र शेष । करुणा, चक्रभ, गुरुपाद रक्ष । धरितां परशिव तत्वय शेषारक्ष । पूर्ण झाला श्रीमंगेशी मंगेश ।।' कवीच्या भाषेवर ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांचा परिणाम झालेला दिसून येतो.

**रचना :** मु. – १. राधाविलास; श्लो. सं. १७०; संपा. ओक, वा. दा.; अकलकामा., भा. ३, मुंबई १९०२; पृ. ३७-५७. २. शिवदर्पण अर्थात पद्मपुराणातील श्रीशिवगीतेची मूळ संस्कृतासह मराठी समश्लोकी; अ. १६; संपा. प्रियोळकर, अ. का.; मुंबई, १९६८; **अमु.** – पूर्णप्रबोधचंद्रोदय; अ. ९, ओ. सं. १८४७; संझगिरी ह्यांचा खाजगी संग्रह : गोवा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. नायक ना. भा. : संत नायकस्वामी; गोमका., रिवण (गोवा), १९६९; पृ. ९–१०. २. प्रियोळकर, अ. का. : श्रीपूर्णप्रकाशानंदनाथ तथा नायकस्वामी; मसंप., ऑक्टो. १९५७; पृ. २५–४४. ३. प्रियोळकर, अ. का. : श्रीमंगेशकविकृत 'शिवदर्पण'; मुंबई, १९६८; प्रस्ता., पृ. ५–१६. ४. (प्रकाशक) वागळे, श्री. व्यं. : श्रीमंगेश देवस्थानचा संक्षिप्त इतिहास; श. १८२९; पृ. १९–२०.

**पूर्णबोध** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] कवी. पूर्णबोध हे मुकुंदराजांच्या मुडलगी परंपरेतील, रंगबोधांचे द्वितीय पुत्र. अद्वयबोधांचे धाकटे भाऊ. पूर्णबोधांचे एकच पद सध्या उपलब्ध आहे व तेही हिंदी आहे. पूर्णबोधांच्या गुरुभक्तीची झलक तेथे दिसते. त्यांनी मराठीतही काही रचना केली असावी. तिचा शोध अजून लागलेला नाही. ह्यांचे वास्तव्य मुडलगीत थोडा काळच असावे. नंतर ते संचारासाठी मराठवाड्यात गेले असावेत, असे त्यांच्या तेथील शिष्यशाखेवरून दिसते. मराठवाड्यातील *संपादणी*कार रामानंद हे ह्यांचेच शिष्य.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : पूर्णबोध : मुडलगीचे स्वामी; कर्नाटक – पुणे १९७१; पृ. ४२.

**पूर्णब्रह्म जोजार / ० जोजार नागेश** [का. अनु.] वैद्यक-ग्रंथकार. जोजार नागेशकृत *आरोग्यपीयूष* ग्रंथाचा निर्देश गो. का. चांदोरकर ह्यांनी केला आहे (संककासू., पृ. १२९). गं. ना. मुजुमदार ह्यांच्या मते हा ग्रंथ जोजार नागेशाचा नसून त्याचा पुत्र पूर्णब्रह्म ह्याचा दिसतो. ग्रंथातील चौथ्या प्रकरणाच्या शेवटी येणाऱ्या एका ओवीवरून हे सिद्ध होते. ती ओवी अशी : "जोजार नागेशज पूर्णब्रह्मे । पाहून सद्वैद्य समस्त कर्मे । माहाराष्ट्र भाषाश्रित ग्रंथ केला । आरोग्यपीयूष सुनाम याला ।। ८ ।।" ह्याच ग्रंथाचे *आरोग्यामृत* असे दुसरे नावही आहे.

प्रस्तुत ग्रंथाची श. १७५५ मधली प्रत न. शे. पोहनेरकर ह्यांस उपलब्ध झाली आहे. त्यावरून ग्रंथाची माहिती ते देतात. ग्रंथाची पाच प्रकरणे आहेत. ग्रंथाच्या प्रथमाध्यायात नाडीलक्षण-परीक्षा, कफ-पित्त-वात अशी त्रिदोषान्वित शरीरप्रकृती, ह्यांचे वर्णन कवीने केले आहे. तेथेच सर्व प्रकारच्या ज्वरांची माहिती दिली आहे. दुसऱ्यात स्त्रीरोग-चिकित्सा, तिसऱ्यात उदरगुल्म-चिकित्सा व त्यावरील औषधोपचारही सांगितले आहेत. ह्यांच्या घराण्याचा धंदा वैद्यकीचाच असावा कारण त्यावाचून प्रत्येक रोगाविषयी माहिती, त्यावरील औषधयोजना व ती तयार करण्याच्या रीती त्यांस सांगता येणे शक्य नव्हते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पोहनेरकर, न. शे. : जोजार नागेशकृत आरोग्यामृत; प्रतिष्ठान, फेब्रु. १९७५; पृ. ३३–३७. २. मुजुमदार, गं. ना. : पूर्णब्रह्मकृत आरोग्यपीयुष; भाइसमंत्रै., व. २३, अं. ४, चैत्र १८६५; पृ. ९९.

**पूर्णरंग** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पूर्णानंद–१ / ० पूर्णानंद अवधूत** [अंदाजे श. १५३२ / इ. स. १६१०] कवी. पूर्वाश्रमीचे नाव नारायण. पित्याचे नाव तिमण्णा दीक्षित. हे काश्यपगोत्री, आश्वलायनशाखी, ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. हे कलबुर्गे प्रांतात महागावी राहात असत. त्यांचा पुत्र नारायण ऊर्फ पूर्णानंद हा ग्रामजोशाची वृत्ती सांभाळून राही. तिमण्णा हे वृद्धापकाळात श्रीक्षेत्र वाराणसी येथे राहात असत. तेथे नारायण त्यांस भेटण्यास गेले असता त्यांची आनंद-परंपरेतील ब्रह्मानंदस्वामींशी गाठ पडली. नारायणांनी त्यांच्याकडून उपदेशदीक्षा घेतली. ब्रह्मानंदांनी शिष्याचे नाव पूर्णानंद ठेविले. ह्यांची परंपरा : सदानंद > रामानंद > गंभीरानंद > ब्रह्मानंद > सहजानंद > पूर्णानंद > निजानंद, चिदानंद अशी आहे. पूर्णानंदांचा शिष्यसंप्रदाय बराच मोठा होता. चिदानंद, निजानंद, सदानंद, शिवराम हे सारे ह्यांचेच शिष्य होत. त्यांपैकी शिवराम हा ह्यांचा पुत्र असून आपल्या मुलासही ह्यांनी मंत्रोपदेश दिला होता.

ह्यांनी *अवधूतगीते*वर टीका लिहिली आहे. ही श. १५३२ (इ. स. १६१०), साधारण संवत्सरी, माघ मासी, शुद्ध पंचमीस पूर्ण केली. ही टीका आपला शिष्य चिदानंद ह्याला बोध व्हावा ह्या हेतूने रचली, असे कवीने म्हटले आहे. टीका सुबोध आहे. तिचे स्वरूप संवादात्मक असून, स्वतःच्या मनास केलेला तो बोध आहे. कवीची दुसरी रचना *शिवपार्वतीपरिणय* ही असून त्यात पौराणिक कथाभाग घेऊन तो अध्यात्मपर लाविला आहे. ह्या ग्रंथाचे स्वरूप नाथांच्या *रुक्मिणीस्वयंवरा*प्रमाणे आहे. ह्या ग्रंथात खंडोबा हा शिवाचा अवतार व पांडुरंग हा विष्णूचा अवतार असल्याचे वर्णन येते. ग्रंथ आटोपशीर आहे. ह्याशिवाय *गीतासार* हे स्फुटप्रकरण ह्यांनी रचले आहे. कवीची *गुरुगीता* ही *गुरुगीते*वरील ओवीबद्ध टीका, शिलामुद्रित स्वरूपात ढेरे ह्यांना उपलब्ध झाली आहे. हिच्यावर *विवेकसिंधू*चा फार प्रभाव पडलेला आढळतो (इंद्रा. १ : ३ : ६६–६७). कवीची जवळ जवळ सर्व रचना गो. का. चांदोरकर ह्यांच्या हस्तलिखित संग्रहात आढळते.

**रचना :** अमु. – १. अवधूतगीताटीका; अ. ७; ओ. सं. १०६३; र. का. : श. १५३२ (इ. स. १६१०); र. स्थ. : सह्याद्रिपर्वत निश्चित : नाटल नगर आत्मकुंड तीर्थ प्रसिद्ध. २. गीतासार; स्फुट प्रकरण. ३. गुरुगीता; ग्रं. सं. १४४; तंसम. बा. १०८. ४. शिवपार्वतीपरिणय; भाइसमं.. ५. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : पूर्णानंद; भाइसमंइति., श. १८३५; पृ. १२८–१३१. २. चांदोरकर, गो. का. : शंकरदास पूर्णानंदकृत शिवपार्वतीपरिणय; भाइसमंइति., श. १८३६; पृ. ६६–६८.

**० पूर्णानंद अवधूत** – पहा **पूर्णानंद.**

**पूर्णानंद जयदेव** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**पूर्णानंद परमहंस** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना :** अमु. – सोलीव सार; गद्य ग्रंथ; सवामं. बा. १७२४; हस्त. सू., खं. २.

**पूर्णानंदानुचर** – पहा **शिवरामस्वामी.**

**पूर्णानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**पेटे हरिबास** [श. १२६७ / इ. स. १३४५ चा सुमार] महानुभाव ग्रंथकार. कवीश्वर आम्नायातील परशरामबासांचे शिष्य. परंपरा : नागदेव > कवीश्वर > परशराम > पेटे हरिबास. पेटे हरिबासांचे शिष्य अचळ मुरारीबास. मुरारीबासांचे शिष्य गुर्जर शिवबास. ह्यांनी व सिद्धान्ते हरिबासांनी तिन्ही स्थळांची बांधणी करताना पेटे हरिबासांचा अचळ सिद्धान्त मांडल्याचा उल्लेख सापडतो (हरिबास व सोंगोबास ह्यांचे *अन्वयस्थळ*). पेटे हरिबासांचा अचळ सिद्धान्त हा मुरारीबासांकडून गुर्जर शिवबासांकडे आला असावा. पेटे हरिबासांनी *दृष्टान्तविधायक* ग्रंथ (र. श. १२६७ / इ. स. १३४५) केल्याचा निर्देश य. खु. देशपांडे ह्यांनी कवीश्वर आम्नायाचा जो वंशवृक्ष दिला आहे त्यात येतो (ममवा., पुणे १९६०, परिशिष्ट).

दृष्टान्तपाठावर *दृष्टान्तमालिका, दृष्टान्त-अन्वय, दृष्टान्त-स्थळ, विधायक दृष्टान्त* अशी विविध प्रकारची भाष्ये-महाभाष्ये लिहिली गेली आहेत. *महानुभाव* मासिकाच्या (ऑग.सप्टें. १९७०) अंकांतून छापलेले *दृष्टान्त-विधायक* हे भाष्य बहुधा पेटे हरिबासांचे असावे असे *महानुभावाचे* त्यावेळचे संपा. बीडकरशास्त्री ह्यांनी आपले मत व्यक्त केले आहे. ज्या दृष्टान्तनिरूपणातून चक्रधरस्वामींनी सिद्धान्तप्रतिपादन केले, त्याचा गर्भितार्थ समजावून देण्यासाठीच *दृष्टान्त-विधायक* ग्रंथाची रचना झाली आहे. दृष्टान्तांवर सोप्या शब्दांत भाष्य करून मुमुक्षू भक्तांना महानुभावपंथीयांचा मोक्षमार्ग समजावून दिलेला आहे. ज्या पोथीवरून प्रस्तुत ग्रंथ छापला ती पोथी जुनी असून एकूण १०० दृष्टान्तांवर त्यात विवेचन आले आहे.

**रचना : अमु.** – दृष्टान्त-विधायक; महानु., ऑग.-सप्टें. १९७० (क्रमशः).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कोलते, वि. भि. : ज्ञानप्रबोध, प्रस्ता.; मलकापूर, १९७३; पृ. १२.

**पोमाइसा / ० पोमांबिका** [इ. स. चे १४ वे शतक, पूर्वार्ध] महानुभाव कवयित्री. उपाध्य आम्नायातील. उपाध्य आम्नायाची प्रवर्तिका कमळाइसा हिची ही शिष्या. हिने *गर्भकांड* ग्रंथाची रचना केल्याची नोंद डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी केली आहे (उपाध्य आम्नाय वंशवृक्ष; ममवा., पुणे, १९६०; परिशिष्ट).

**० पोमांबिका** – पहा **पोमाइसा**.

**पौसदाख्य गोपालमुनी** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा प्रारंभकाल] महानुभाव कवी. पौसदाख्य गोपाळाने शके १६४१ (इ. स. १७१९) मध्ये संतोषमुनी कृष्णदासकृत *रुक्मिणीस्वैंवरा*ची प्रत शुद्ध केल्याची नोंद केली आहे. ' शके सोळासे येकेचाळीस : विकार नाम संवत्सरी. . . .तेथे पौसदाख्ये मुनी गोपाळे वास्तव्ये करुनी : ग्रंथ शोधला तये स्थानीं ' इत्यादी. ह्या गोपालमुनीने आपल्या आम्नायाचा उल्लेख केलेला नाही.

वरील *रुक्मिणीस्वयंवर* ग्रंथ 'वरदीग्रंथ' (वरदायी) म्हणून अत्यंत लोकप्रिय होता. अनेकांनी हाताळल्याने तो अशुद्ध बनला. हा शुद्ध करण्यासाठी वरील खटाटोप करून ह्या गोपालमुनीने मूळ ३२०५ ओव्यांचा ग्रंथ ३७४० ओव्यांपर्यंत वाढविला.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, ना. ब. (संपा.) : संतोषमुनि कृष्णदासकृत रुक्मिणीस्वमंवर, प्रस्ता.; हैद्राबाद, १९६४.

**प्रतापराम / ० प्रतापरामस्वामी** [का. अनु.] कवी. तंजावर येथील हस्तलिखित बाडामध्ये ह्यांची बरीच ग्रंथरचना सापडते. कवीने *गोपीवस्त्रहरण* ह्या काव्यात केलेला गुरूचा उल्लेख सापडतो तो असा : ' त्या वंदितो धरित जो गुरु सेतुनामां ॥ ' *तुळसीमाहात्म्य, चंद्रहासकथा, रासक्रीडा, गोपींचे वस्त्रहरण* अशा अनेक पौराणिक कथांवर ह्यांनी रचना केली आहे.

**रचना : अमु.** – १. गोपींचे वस्त्रहरण; श्लोक, पदे इ.; ग्रं. सं. १३०. २. चंद्रहासकथा; ओ. सं. ९६. ३. तुळसीमाहात्म्य; अ. ३; ग्रं. सं. १९४. ४. रासक्रीडा; पदे इ; ग्रं. सं १५०. ५. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. २; सवामं. हस्त. सू., खं. २.

**प्रतापराम केसरी** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४४२.

**अमु.** – विरहपर पद व शौरि; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० प्रतापरामस्वामी** – पहा **प्रतापराम**.

**प्रतापसिंग / प्रतापसिंह भोसले तंजावरकर / ० प्रतापसिंह नृप / ० प्रतापसिंह महीपति / ० प्रतापसिंह राजेंद्र / ० प्रतापसिंहेंद्र** [ ? – १६ डिसें. १७६३] कवी, नाटककार. हे तंजावरचे राजे होते. शहाजीराजे (दुसरे) ह्यांचे धाकटे बंधू तुकोजीराजे ह्यांचे पुत्र. पितृपरंपरा : शहाजी भोसले (पहिले) > व्यंकोजी (एकोजी) > तुकोजी > प्रतापसिंग. रामदासी संप्रदायातील मेरुस्वामी हे ह्यांचे परमार्थगुरू. हे राजे प्रजेवर अपत्यवत् प्रेम करणारे व तिच्या उन्नतीकरता झटणारे सुसंस्कृत व विद्याप्रिय राजे होते. *उमासंहिता* ह्या तंजावर येथील हस्तलिखितात (प्रत क्र. ५४२, मराठी विभाग, सरस्वतीमहाल) ह्यांच्या अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाचे वर्णन कवीने पुढील शब्दांत केले आहे : " जो ज्ञानयोगी सनक ॥ अथवा राजर्षि जनक ॥ ज्यासी तुल्य लोहकनक ॥ जो जाण मूळ धर्मवृक्षाचें ॥ जो कृपालताल ॥ आणि औदार्याचें विहारस्थल ॥ तेवीच शौर्याचा राउळ ॥ जो शांतीचें निजघर ॥ आणि क्षमेचें माहेर ॥ जेथें भक्ति झाली स्थिर ॥ जो सुंदर मदनाहुनी ॥ " तंजावरप्रांती इ. स. १७३९–१७६३ ह्या काळात ह्यांनी राज्य केले.

राजे प्रतापसिंह हे संस्कृत साहित्यशास्त्र, संगीतशास्त्र, धर्मशास्त्र व वेदान्त ह्यांत पारंगत असून त्यांचा संस्कृत व मराठी भाषांव्यतिरिक्त हिंदी, गुजराती, तामिळ व तेलुगू ह्या भाषांशी चांगला परिचय होता. ह्यांनी मराठी भाषेत जी रचना केली आहे तिचे स्थूलमानाने पाच विभाग पडतात : नाटके, नाट्यकथा, पौराणिक आख्याने, माहात्म्ये, काव्यप्रकरणे.

**नाटके :** राजे प्रतापसिंह ह्यांनी १७ नाटके रचल्याची नोंद आढळते. काहींचे म्हणणे ही संख्या २० असावी. आज उपलब्ध असलेली नाटके पुढीलप्रमाणे : १. *सीताकल्याण*, २, *उषाकल्याण*, ३. *लक्ष्मणापरिचय*, ४. *कृष्णजनन*, ५. *ध्रुवचरित्र*, ६. *पारिजातापहरण*, ७. *पार्वतीकल्याण*, ८. *मायावतीपरिणय*, ९. *प्रबोधचंद्रोदय*, १०. *मित्रविंदापरिणय*, ११. *ययातिचरित्र*, १२. *श्रीकोरवंझी अर्थात् जानकीसुखोल्लास*, १३. *प्रभावतीकल्याण*, १४. *अनसया उपाख्यान*, १५. *रुक्मांगद नाटक*, १६ *रुक्मिणीकल्याण*, १७. *स्यमंतकोपाख्यान*. ह्यांपैकी *पार्वतीकल्याण, रुक्मांगद नाटक, रुक्मिणीकल्याण* व *स्यमंतकोपाख्यान* ही चार नाटके फक्त तेलुगू लिपीतच आढळतात. त्यांपैकी *पार्वतीकल्याणा*ची देवनागरीत प्रत तयार करून घेऊन प्रा. माया सरदेसाई ह्यांनी मुंबईच्या *मराठी संशोधन पत्रिकेत* (जाने., एप्रि. १९६९) ती प्रसिद्ध केली आहे. [ ➪ ३. ]

" राजा प्रतापसिंहाचीं नाटकें भरताच्या नाट्यशास्त्राशीं मिळतीं जुळतीं असून राजांची त्या शास्त्रांतील व्युत्पन्नता त्यांच्या नाटकांवरून दिसून येते. त्यांचीं सर्व नाटकें एकांकी असून तीं दाक्षिणात्य यक्षगानपद्धतीची म्हणजे नृत्य-नाटकें आहेत. यक्षगानपद्धतीच्या नाटकांत अंगाभिनयाला म्हणजे नृत्यात्मक मुद्राभिनयाला अधिक प्राधान्य असतें. भरतानें नाट्यशास्त्रांत जे चार प्रकारचे अभिनय सांगितले आहेत त्यांत आंगिकाभिनय हा महत्त्वाचा घटक आहे. आंगिकाभिनयाच्या सदराखालीं भरतानें नृत्याभिनयाचें विस्तृत विवेचन केलें आहे. भरताच्या काळीं नृत्य हा नाटकांतील अभिनयाचा अविभाज्य घटक होता. नाटकाची व्याख्याच भरतानें पुढीलप्रमाणें केलेली आहे :

'यो यः स्वभावो लोकस्य नानावस्थान्तरान्तकम् सांगाभिनयसंयुक्तो नाट्यमित्यभिधीयते ।' (*भारतीय नाट्यशास्त्र*, अ. २१.१२३). ह्यावरून भरताच्या काळीं नाटकांत अंगाभिनयाला केवढें महत्त्व होतें हें कळून यावें. हल्लीं ज्याला आपण नृत्यनाटक म्हणतों तो पाश्चात्य रंगभूमीचा वारसा नसून त्याचें मूळ भारतीय नाट्यपरंपरेंतच आहे, हें तंजावरच्या मराठी नाटकांवरून आढळून येईल. राजा प्रतापसिंहांचीं नाटकें हीं अशा प्रकारचीं नृत्यनाटकें आहेत.

"(भरताच्या व्याख्येप्रमाणें) गीत, वाद्य व नृत्य हीं नाट्यप्रयोगाचीं प्रधान अंगें ठरतात. राजा प्रतापसिंह ह्यांचीं नाटकें ह्याच परंपरेंतून उदयाला आलेलीं आहेत. हीं नाटकें एकांकी असलीं तरी तीं संस्कृतमधील 'अंक' ह्या रूपकप्रकाराहून भिन्न आहेत. प्रतापसिंहांचीं सर्वच नाटकें पौराणिक असून तीं उत्सवप्रसंगीं सादर झालेलीं आहेत. शृंगाराबरोबर भक्तिरसाची सांगड घालण्यांत प्रतापसिंह कुशल होते. पण ह्या भक्तिरसालाही अद्वैत तत्त्वज्ञानाची डूब दिल्यानें ही भक्ति डोळस झाली आहे. स्वतः प्रतापसिंह भारतीय तत्त्वज्ञानांत व्युत्पन्न असल्यानें त्यांच्या प्रत्येक नाटकांत हें तत्वज्ञान थोड्याफार प्रमाणांत आलें आहे. ह्यामुळेंच त्यांच्या नाटकांची प्रकृति गंभीर आहे. ह्या प्रकृतीला विनोद मानवतच नाहीं. विदूषक, नारद, भटभिक्षुक हे त्यांच्या नाटकांत कामचलाऊ विनोद करतात.

"भारतीय नाट्यशास्त्रपरंपरेप्रमाणें प्रतापसिंहांच्या नाटकांत प्रथम इष्टदेवतास्तुति म्हणजे नांदी असते. त्यानंतर सूत्रधार व पारिपार्श्वक ह्यांच्या संवादांतून कवीची स्तुति, सभास्तुति, नाट्यवस्तूची ओळख करून देणारा श्लोक, येतात. सूत्रधार व पारिपार्श्वक ह्यांच्या संवादांतून स्वाभाविकपणें नाट्यारंभ केला जातो. ह्या नाटकांत स्थळ, काल व पात्र ह्यांचें बंधन नाहीं. रचना रेखीव. मुख, प्रतिमुख, गर्भ, विमर्श व निर्वहण ह्या संस्कृत नाट्यशास्त्राच्या अंकविभागणीप्रमाणें कथावस्तूचा विकासक्रम निरनिराळ्या प्रवेशांतून साधलेला असतो. नृत्यनाटकांतील नाट्यवस्तूचा विकास गद्यापेक्षां पद्यभागांतूनच अधिक होत असल्यानें ह्या नाटकांत गीतांना अनन्यसाधारण महत्त्व असतें. कथेचें अनुसंधान राखून नाटक व्यवस्थित सादर करण्याची जबाबदारी सूत्रधारावरच असते. त्यामुळे रंगभूमीवर येणाऱ्या पात्राची ओळख करून देणें, त्याच्या आगमनाचें प्रयोजन सांगणें, त्याच्या निर्गमनाच्या सूचना देणें, कथेचें अनुसंधान साधणें, 'दरु' म्हणजे नाट्यगीत म्हणणें इत्यादि महत्त्वाचीं कामें त्यालाच करावीं लागतात. त्याच्या साथीला वाद्यवृंद असतो. हा वृंद आंतल्या बाजूस बसलेला असून सूत्रधार तेवढा रंगभूमीवर बाजूलाच उभा असतो.

"प्रतापसिंहांच्या नाटकांतील पात्रें पौराणिक असलीं तरी 'नाट्यभावानुकीर्तनम्' ह्या न्यायानें मानवी मनाशीं तीं इतकीं एकरूप झालेलीं असतात कीं, त्यांचें देवत्वाचें वलय गळून पडतें. . . राजा प्रतापसिंहांच्या नाटकांचा शेवट भरतवाक्यानें झालेला असतो." (माया सरदेसाई; प्रस्तावना, *श्रीपार्वतीकल्याण* नाटक

प्रतापसिंहांच्या नाटकांच्या स्वरूपाविषयी माया सरदेसाई ह्यांनी वर जे विवेचन केले आहे त्यातील काही विधाने भारतीय नाट्यशास्त्राच्या अनेक जाणकारांना विवाद्य वाटण्याचा बराच संभव आहे. ह्यापूर्वीही डॉ. व्ही. राघवन् ह्यांच्यासारख्या भारतीय साहित्यशास्त्राच्या श्रेष्ठ चिकित्सक विवेचकाला अशा तऱ्हेची – विशेषतः यक्षगानाच्या संदर्भातील – इतर लेखकांनी केलेली विधाने विवाद्य वाटलेली आहेत. *त्रिवेणी* ह्या मासिकात (व. ७, अं. २, सप्टें.–ऑक्टो. १९३४, पृ. १८६–२००) *यक्षगान* ह्या शीर्षकाखाली इंग्रजीत जो एक विस्तृत निबंध त्यांनी प्रसिद्ध केला त्यात ह्या नृत्यनाट्यप्रकाराचा ऊहापोह करून आपल्याला अशा प्रकारची विधाने विवाद्य का वाटतात हे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात : "'यक्षगान' ही संज्ञा संस्कृत असली तरी ती संस्कृत भाषेंतील 'नाट्य' व 'संगीत' ह्या विषयांवरील कोणत्याही ग्रंथांत आढळत नाहीं. तंजावर येथें इ. स. १६२८ मध्यें गोविंद दीक्षित ह्यांनी लिहिलेल्या *संगीतसुधा* ह्या ग्रंथांत त्यांनीं आंजनेय नांवाच्या ग्रंथकारानें ह्या यक्षांच्या गानप्रकाराची दखल घेतली आहे ('यक्षौघगीतम् अपि गानशैलीम्'), असें म्हटलें आहे. एवढाच काय तो अपवाद. तामीळ नाट्यवाङ्मयांत नाना नांवांचे नाट्यप्रकार आढळतात पण 'यक्षगान' हें नांव धारण करणारा एकही प्रकार आढळत नाहीं. आंध्र प्रांताचा विचार करतां, मद्रास येथील हस्तलिखितसंग्रहांतील एक तेलुगु पंडित ब्रह्मश्री वेतुरी प्रभाकरशास्त्री कळवितात कीं, गुंतूरच्या आसपास स्वतःला 'यक्ष' अथवा 'झकुल्' म्हणविणाऱ्या एका जातीची वसति आहे. ह्यांचा नृत्य व गीतगायन हाच मुख्य व्यवसाय. ते करीत असलेल्या नृत्य-नाट्यावरून पुढें कांहींशा तशाच स्वरूपाच्या असलेल्या नाट्यप्रकारास 'यक्षगान' हें नांव रूढ झालें असावें. प्रभाकरशास्त्र्यांनी काव्यशास्त्रावरील तेलुगु भाषेंतील एका ग्रंथांतील 'यक्षगाना'संबंधींचा संदर्भ सांगितला आहे. ह्या ग्रंथाचा कर्ता अप्पकवीयम् हा असून त्यानें तो तीनशें वर्षांपूर्वी रचिला. त्यानें त्यांत 'रगद' (कानडी : रगळे) ह्या छन्दाविषयीं लिहितांना, तो यक्षगानांतील पद्यें रचतांना उपयोगिला जातो, असें म्हटलें आहे. 'रगद' प्रकार फार प्राचीन असून त्याचें पूर्वीचें नांव 'रगदी' असे आहे. शारंगदेव (इ. स. १२१०–१२४७) ह्यांनीं आपल्या *संगीतरत्नाकर* ह्या ग्रंथांत त्याचें विवेचन केलें असून वीररसाला तो फारच पोषक आहे, असें म्हटलें आहे.

"'यक्षगान' ह्या दक्षिणभारतीय नांवाशीं सदृश असें नेपाळी साहित्यांतही एक नांव आढळतें. नेपाळमधील अशाच स्वरूपाच्या नाटकास 'गंधर्वगान' असें संबोधण्यात येतें. नेपाळचा राजा जगज्ज्योतिर्मल्ल (इ. स. १६१७–३३) ह्यानें ह्या नृत्यनाट्यप्रकाराला प्रोत्साहन देऊन तो नेपाळांत प्रचलित व लोकप्रिय केला."

डॉ. राघवन् ह्यांचे वरील म्हणणे लक्षात घेता, 'यक्षगान' ह्या नावाने ओळखला जाणारा नृत्य-नाट्यप्रकार सर्वसामान्य जनतेच्या प्रतिभेतून निर्माण झालेला दृश्य प्रकार असून तो विकासावस्थेत असता त्यावर संस्कृत नाट्याचे – बहुधा प्राचीन काळी प्रचलित पण पुढे लुप्त झालेल्या एखाद्या उपरूपकासारख्या प्रकाराचे – काही संस्कार झाले असावे. 'यक्षगाना'चे मूळ भरताच्या *नाट्यशास्त्रात* शोधण्यापेक्षा ते देशी परंपरागत नाट्यप्रवृत्तीतच शोधावे लागेल. तसा शोध लावण्याचा प्रयत्न, 'यक्षगाना' चे पुनरुज्जीवन व प्रवर्तन करण्याच्या उद्योगास आपले सारे आयुष्य वाहणारे कर्नाटकप्रांतीय नाटककार के. शिवराम कारंथ ह्यांनी आपल्या *यक्षगान* ह्या ग्रंथाच्या द्वारे (हा ग्रंथ कानडीत लिहिला असून, १९७३ साली तो हिंदी भाषेत रूपान्तरित होऊन प्रसिद्ध झाला आहे) केला आहे. 'यक्षगाना'ची आजची उत्क्रांती कर्नाटकातील दक्षिण कानडा प्रांतातील मंडळींनी केली. 'यक्षगाना'ला पूर्वी 'भागवत-मेळा' असे दुसरे एक पर्यायी नाव अठराव्या व एकोणिसाव्या शतकात रूढ होते. महाराष्ट्रात एकोणिसाव्या शतकाच्या प्रथमार्धात ह्या 'भागवत-मेळ्या' च्या नाटकांवरून स्फूर्ती घेऊन सांगलीचे विष्णु अमृत भावे ह्यांनी आपली प्रारंभीची नाटके रचली व ती मराठी रंगभूमीवर आणली.

प्रतापसिंहांनी 'यक्षगान' पद्धतीच्या नाटकाप्रमाणे तमिळमधील कोरवंझी हा प्राचीन नाट्यप्रकार मराठीत आणला. *लक्ष्मणाकल्याण* (अपूर्ण) व *जानकीसुखोल्लास* ही त्यांची दोन नाटके ह्या प्रकारात मोडतात. "यक्षगान नाटकाप्रमाणेंच हेंही एक नृत्यनाटकच आहे. मात्र ह्यांत मोजकींच पात्रें असून ह्या नाटकाची रचना विशिष्ट प्रकारची असते. भविष्य सांगणारी कैकाडीण किंवा बुरुड जातीची स्त्री ही ह्यांत प्रमुख असून ती रंगभूमीवर बुरुडांच्या पद्धतीनें नृत्य करते व नायिकेला

अनुकूल भविष्य सांगून आनंदित करते. नायिका तिला भारी कपडे व अलंकार देऊन खूष करते. नंतर नायिकेला इष्टार्थप्राप्ति होते. ह्यांत प्रारंभीं विप्रलंभ शृंगार असतो. . .आरंभाला (हा नाट्यप्रकार सुरू झाला तेव्हां) कोरवंझी ह्या नाट्यप्रकारांत भक्तिरसालाच प्राधान्य होतें. जीवाला परमेश्वराच्या भेटीची लागलेली ओढ हाच ह्या नाटकाचा विषय होता. मात्र ही भक्ति मधुराभक्ति होती. जीव प्रेयसी व परमात्मा प्रियकर असें नातें कल्पून भक्ति व शृंगार ह्या दोन रसांचें अपूर्व मीलन प्रारंभींच्या नाटकांत आढळतें. . . .पण कालांतरानें परमेश्वराच्या जागीं राजे व भक्तांच्या जागीं राजाची प्रेयसी अशी मांडणी होऊन ह्या नाटकाचा थाट दरबारी बनला व राजेलोकांना खूष करण्याचें तें एक साधन बनलें." (माया सरदेसाई, प्रस्तावना, *जानकीसुखोल्लास*). राजे प्रतापसिंह भोसले हे किती प्रयोगशील होते व मराठी रंगभूमीवर नवीन नवीन प्रकारची नाटके आणण्याच्या बाबतीत किती प्रयत्नशील होते, हे ह्यावरून दिसून येते.

**नाट्यकथा :** प्रतापसिंहांनी *मुद्राराक्षसनाट्यकथा* नावाचा एक ओवीबद्ध ग्रंथ रचला आहे. संस्कृत नाटकांच्या कथा मराठीत लिहिण्याचा हा पहिलाच उपक्रम असावा.

**पौराणिक आख्याने, माहात्म्ये व काव्यप्रकरणे :** *१. रामदिनचर्या, २. इंद्रियजय, ३. उमासंहिता, ४. तुलसीमाहात्म्य, ५. अनंत-चतुर्दशी-व्रत-कथा, ६. चंद्रहासकथा, ७. रासक्रीडा, ८ गोपीवस्त्रहरण, ९. रासक्रीडा.* ह्यांव्यतिरिक्त *श्रीकृष्णमंजिरी* व *पंचभाषामणी* अशी दोन काव्येही राजांनी लिहिली आहेत. पूर्वोक्त काव्य भागवताधारे वेगवेगळ्या वृत्तांत रचले असून उत्तरोक्त काव्य श्रीकृष्ण-गोपी ह्यांच्या लीलांवर हिंदी, गुजराती, मराठी, द्राविड व तेलुगू ह्या पाच भाषांचा उपयोग करून (प्रत्येक भाषेचा एक चरण असे पाच चरणांचे एक कडवे बनविले आहे) रचले आहे. ह्याशिवाय *मदनसंजीवन* ह्या नावाचा कामशास्त्रावरील एक ग्रंथ प्रतापसिंहांनी लिहिला असल्याची नोंद आढळते.

तंजावरकर भोसले घराण्यातील प्रतापसिंहादी ज्या राजपुरुषांनी मराठी, संस्कृत, हिंदी ह्या भाषांत ग्रंथरचना केली ती त्यांनी स्वतः केली की आपल्या पदरी असलेल्या पंडितांकडून करवून घेऊन केवळ आपली नाममुद्रा त्यावर ठोकली, अशी शंका काही वाङ्मयेतिहासकार व साहित्यसमीक्षक व्यक्त करीत असतात. परंतु, भोसले राजघराण्यातील मंडळीची साहित्य, संगीत, कला, धर्म व विविध शास्त्रे ह्यांचे ज्ञान मिळवून स्वतःला विद्यावंत व सर्वप्रकारे सुसंस्कृत बनविण्याकडील प्रवृत्ती पाहिली म्हणजे अशी शंका वास्तविक उद्भवू नये. ग्रंथरचनेच्या कार्यात त्यांनी आपल्या पदरीच्या पंडितांची, आवश्यक तेव्हा, मदत घेतलीही असेल. पण त्यामुळे त्यांच्या ग्रंथकर्तृत्वास बाध येऊ शकत नाही.

**रचना : मु.** – १. जानकीसुखोल्लास (श्री कोरवंझी नाटक); संपा. सरदेसाई, माया; मस्वासंप., अं. ७; हैद्राबाद, १९७२. २. पारिजातापहरण नाटक; संपा. सरदेसाई, माया; मस्वासंप., अं. ४; हैद्राबाद, १९६९. ३. श्री पार्वतीकल्याण यक्षगान नाटक; संपा. सरदेसाई, माया; मसंप., जाने., एप्रि. १९६९.

**० प्रतापसिंह नृप** – पहा **प्रतापसिंह भोसले.**

**० प्रतापसिंह महीपति** – पहा **प्रतापसिंह भोसले.**

**० प्रतापसिंह राजेंद्र** – पहा **प्रतापसिंह भोसले.**

**० प्रतापसिंहेन्द्र** – पहा **प्रतापसिंह भोसले.**

**प्रभाकर** [श. १६७७ / इ. स. १७५५ च्या आसपास – श. १७६५ / इ. स. १८४३]. शाहीर. पूर्ण नाव प्रभाकर जनार्दनपंत दातार. हे मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील हर्णेनजीकच्या मुरूड ह्या गावचे. प्रभाकरांचे आजोबा किंवा वडील जनार्दनपंत ह्यांनी रोजगारासाठी मुरूड गाव सोडले व नाशिक जिल्ह्यातील गंगापूर ह्या गावी ते येऊन राहिले. पुढे ह्यांचे वडील जनार्दनपंत पुण्यास पेशव्यांच्या फडात कारकून म्हणून लागले गंगापूर गावी प्रभाकरांचा जन्म झाला. त्यांच्या जन्मकालासंबंधी मतभेद आहेत. पोवाडेसंग्राहक य. न. केळकर हे ह्यांचा जन्म इ. स. १७५५ च्या सुमारास झाला असावा असे मानतात. पुणे येथील चित्रशाळेने संपादित केलेल्या *प्रभाकरकृत कविता* ह्या काव्यसंग्रहात त्यांचा जन्म सन १७६९ असा दिला आहे. हे दुसरे मत *महाराष्ट्रसारस्वत*कार व *मराठी शाहीर* कर्ते श्री. म. वर्दे ह्यांना मान्य आहे. परंतु प्रभाकरांच्या लावण्यांतील अंतःस्थ पुराव्यावरून हे मत मान्य करता येत नाही, असे प्रतिपादन य. न. केळकर करतात. ह्याला प्रमाण म्हणून प्रभाकरांच्या कवितासंग्रहातील २१, २२, २३, २४ ह्या लावण्यांचा आधार ते देतात. या चारही लावण्यांतील विषय थोरले माधवराव पेशवे ह्यांनी इ. स. १७७० च्या आगेमागे केलेल्या हैदरवरील मोहिमांस अनुलक्षून आहे. ह्या कवनांतील गंगू-हैबतीचे उल्लेखही लक्षणीय ठरतात. थोरले माधवराव ह्यांच्या कारकीर्दीत गंगू-हैबतीचा फड गाजत होता व ह्या फडात सामील झालेल्या प्रभाकराचे वय १७७० च्या सुमारास कमीत कमी पंधरा-सोळा वर्षांचे तरी असावे. ह्यावरून श. १७५५ हाच जन्मकाळ योग्यवाटतो. प्रभाकरांचे पहिले लग्न गंगापुरी झाले. हे पहिले कुटुंब वारल्यानंतर त्यांचे दुसरे लग्न ठाणे जिल्ह्यातील मुरबाड येथील साठे घराण्यातील मुलीशी झाले.

प्रभाकरांनी वयाच्या वीस-बाविसाव्या वर्षी गंगापूर सोडले व ते पुण्यात स्थायिक झाले. तेथे खंडेराव रास्ते ह्यांच्या पदरी ते शागीर्द पेशात कारकून म्हणून राहिले. पुणे येथे असताना त्यांचा परिचय शाहीर गंगूहैबतीच्या फडातील गुणीराज, महादबा इत्यादी शाहीर कलावंतांशी झाला. गंगूहैबती हे प्रभाकरांचे व महादेवांचे गुरू. ह्या तमासगिरांच्या फडातील कलाकारांची मने प्रभाकरांनी आपल्या प्रतिभासामर्थ्याने जिंकली. तमासगिराच्या फडाचा कवी म्हणून ह्यांनी कवने करावीत आणि वरील कलाकारांनी ती गावीत, 'प्रभाकराचें कवन पसरलें सहज शतावधि नगरांत ।' किंवा 'प्रभाकराचें कवन प्रतिष्ठित सभेंत गायाला ।' अशी स्थिती ह्यांनी निर्माण केली. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत ह्यांची कीर्ती कळसास पोहोचली होती. रावबाजीच्या विलासवर्णनांची हुबेहूब चित्रे हे आपल्या लावण्यांतून डोळ्यासमोर उभी करतात. बाजीरावाचा त्यांना मोठा आधार होता. रावबाजीवर कोसळलेल्या आपत्तीची प्रभाकरांनी केलेली वर्णने अत्यंत हृदयस्पर्शी व करुणरसाने ओथंबलेली आहेत. त्यांत त्यावेळच्या राजकीय व सामाजिक परिस्थितीचे प्रतिबिंब आहे. 'यशस्वी झाले श्रीमंत पहिले सवें लढायाला । आतांच आलें अपेश कोठुन बाजीरावाला ॥' पेशवाई बुडाली आणि प्रभाकरांचा आधार तुटला. पोटासाठी लाचार होऊन त्यांना दारोदार फिरावे लागले. शंकरशेट, पेस्तनजी वगैरे धनिकांना खूष करण्यासाठी कवने रचावी लागली. इंग्रज अमदानीत ठाण्याच्या कचेरीचेही त्यांनी आपल्या काव्यात वर्णन केले आहे. अशा ह्या दारिद्र्यपीडित अवस्थेत त्यांचा इ. स. १८४३ साली अंत झाला

प्रभाकरांनी पेशवाईचा उत्कर्ष व अपकर्ष हे दोन्ही पाहिले होते व त्यांचे रेखाटन त्यांनी आपल्या कवनात केले आहे. त्यांचे खर्ड्यांच्या लढाईचे वर्णन इतर कलाकारांच्या त्याच विषयावरील चित्रणांपेक्षा उठून दिसते. सवाई माधवरावांच्या कारकीर्दीवरील रंगाच्या पोवाड्यात पेशवाईच्या वैभवाचे चित्तवेधक वर्णन ते करतात. सवाई माधवरावांचा मृत्यू आणि रावबाजीची शरणागती ह्या त्यांच्या रचनेत पेशवाईच्या अंतकाळातील दारुण दुर्दिनाचे दृश्य उमटलेले आहे. पहिल्या पोवाड्यातील यशोदाबाईचा शोक अंतःकरणाला पीळ पाडतो. ह्यांच्या लावण्यांत नायक-नायिकांची विविध व मनोहर चित्रे आढळतात. 'कधीं प्राणसखे भेटती ?' अशी पतिविरहाने तळमळणारी व 'नका जाउं दूर देशीं घरीं काय धनद्रव्याला कमी । आली वर्षाची नागपंचमी ।' अशी नवऱ्याची विनवणी करून त्याला घरी राहण्याचा आग्रह करणारी अशा स्त्रियांची

चित्रे प्रभाकरांनी रेखाटली आहेत. रावबाजीच्या विलासी जीवनाचा परिणाम त्यांच्यावर फार झाला होता. त्यामुळे त्यांच्या लावण्यांत अश्लील, उत्तान, उन्मादक आणि भडक शृंगाराची चित्रे पदोपदी दृष्टीस पडतात. प्रभाकरांनी कित्येक लावण्या देवादिकांवर रचलेल्या, असल्या तरी त्यांत आध्यात्मिक विचार किंवा वैराग्यपर उपदेश मुळीच नाही. [➪ ३.]

**रचना :** **मु.** – प्रभाकरकृत कविता, पदे, पोवाडे व लावण्या; शं. न. जोशी; पुणे, १९२०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. माने, य. द. : लोकशाहीर प्रभाकर अर्थात् शाहीरांचा सम्राट; कोल्हापूर, १९६३. २. वर्दे, श्री. म. : मराठी कवितेचा उषःकाल किंवा मराठी शाहीर; द्विआ.; मुंबई, १९३०.

**प्रभुनंदन** [अंदाजे श. १६६३/इ. स. १७४१] कवी.

**रचना :** **अमु.** – श्रीखंड्याचे चरित्र; ओवीबद्ध; र. का. : श. १६६३, माघ शु. १५; सवामं. हस्त. सू., खं. २.

**प्रभुलक्षण** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – बिंबाख्यान; त्रु. पो.; प्र. ले. का. : श. १७६७ (पंचांगाप्रमाणे १७६९), प्लव, अधिक ज्येष्ठ शु. ९; भाइसमं. हस्त. सू., पृ. १७७.

**प्रल्हाद–१** [का. अनु.] ज्योतिष-ग्रंथकार.

**रचना :** **अमु.** – शकुनवचन; भाइसमं. हस्त. सू., पृ. २७५.

**प्रल्हाद–२** [का. अनु.] पदकार. समर्थांचे शिष्य. कारंजाच्या (विदर्भ) दोन रामदासी मठांपैकी एक समर्थशिष्य प्रल्हादांचा होता. प्रल्हाद हे मूळचे कारंजापासून सहा कोसांवरील धामनी नावाच्या खेड्यात राहणारे. उपनाव भट. हे गृहस्थाश्रमी होते. ह्यांनी आपल्या पुत्रालाच संप्रदायाची दीक्षा दिली. प्रल्हादांनी रचलेली स्फुट पदे व स्तोत्रे समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील बाडात संग्रहित केलेली आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : समर्थशिष्य प्रल्हाद (कारंजे मठ), श्रीसांप्रविवि., खं. २, लेखांक ८५, पृ. १६१–१६८.

**०प्रल्हाद–३** – पहा **प्रल्हादबाबा बडवे.**

**प्रल्हादबाबा बडवे /० प्रल्हाद–३ /० प्रल्हादबुवा बडवे** [?–समा. श. १६४०, माघ व. ११/ इ. स. १७१९]. कवी. कन्हाडजवळील तांबवे गावचे. उपनाव बडवे. पिता : नृसिंह. माता : लक्ष्मी. बाळशास्त्री हुपरीकर ह्यांनी प्रल्हादबाबांची एक गुरुपरंपरा दिली आहे ती कालानुक्रमाशी विसंगत आहे. राम बडवे ह्यांनी दिलेल्या दुसऱ्या गुरुपरंपरेत प्रल्हादबाबांचे गुरु सच्चिदानंद असे म्हटले आहे. ह्या गुरुपरंपरा एकमेकींशी जुळत नाहीत. स्वतः प्रल्हादबुवा आपल्या गुरूचे नाव 'राघव' असे देतात. आपल्या गुरूचा अपार कीर्तनरंग सांगताना ते म्हणतात, "तो गुरु राघव ध्यायिं मना रे । कीर्तनरंग अपार जयाचा । त्यांतहि सौरस तो नटनाचा ।" पंढरीच्या पांडुरंगावर ह्यांची आत्यंतिक निष्ठा होती. ह्यांनी बडवे घराण्यातील आपल्या वंशजांनी पंढरी सोडून काशीयात्रेस जाण्याचे कारण नाही असा दंडक घालून दिला. हे कीर्तन करीत व ह्यांचे शिष्य गोपाळ आणि सदाशिव हे दोघे मागे राहून साथ देत. ह्यांचा काळ राजकीय अस्वस्थतेचा होता. शिवाजीमहाराजांनंतर औरंगजेबाने महाराष्ट्रात कहर केला. तेव्हा त्यास पंढरपूरच्या विठोबाचा उच्छेद करण्याची बुद्धी झाली. प्रल्हादबुवांच्या काळात पंढरपूरजवळ ब्रह्मपुरीस औरंगजेबाची छावणी पाच वर्षे होती. ह्या संकटकालात पांडुरंगाच्या मूर्तीस उपसर्ग पोहोचू नये म्हणून त्यांनी ती घरी आणून बळदात लपवून ठेविली होती; आणि ती त्यांच्या घरी पाच-सात वर्षे होती (बहिरट, भा. पं. : संतवाणीचा अमृत-कलश; पृ. १८९). औरंगजेबाच्या मृत्यूनंतर म्हणजे इ. स. १७०७ नंतर पांडुरंगमूर्तीची पुन्हा पंढरपूरच्या मंदिरात प्रतिष्ठापना झाली, ती आजतागायत तेथे अढळ आहे. शके १६४० माघ वद्य ११ स ह्यांनी आपला देह ठेविला.

प्रल्हादबुवांनी *स्कंदपुराणा*च्या आधारे *पांडुरंगमाहात्म्या*ची रचना केली आहे. *पांडुरंगमाहात्म्या*तील विटेवरील बालमूर्तीचे वर्णन पदलालित्यपूर्ण व अनुप्रासयुक्त रचना करणाऱ्या जयदेव कवीची आठवण करून देणारे आहे. पहा : 'पंचवर्षारविंदनयन । सरळ नासा सुहास्यवदन। कुंद कुड्मल सुशोभन । सूक्ष्म दर्शन विराजती ॥ '

कोणा एका ब्राह्मणाच्या आग्रहावरून *अमृतानुभवा*च्या प्रत्येक ओवीस एक संस्कृत श्लोक ह्याप्रमाणे संपूर्ण *अमृतानुभवा*चे सुगम संस्कृत रूपान्तर त्यांनी केले. ह्यानंतर त्यांनी १६ श्लोकांत *अमृतानुभवामृत*-तात्पर्य दिले आहे. *प्रमाणलक्षण* ह्या ह्यांनी लिहिलेल्या प्रकरणात प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द ह्यांचा सुगम अर्थ दिला आहे व प्रतिज्ञा, हेतु, उदाहरण, उपनय आणि निगमन ह्या पंचावयवांचे स्पष्टीकरण केले आहे. याखेरीज सद्गुरू, संत, नामस्मरण, इत्यादी विषयांवर ह्यांनी श्लोक व आरती इत्यादी स्फुट रचना केली. स्फुट आख्यानेही त्यांनी रचली आहेत. ही काव्ये प्रासादिक आहेत.

**रचना :** **मु.** – अमृतानुभव : ज्ञानदेवांच्या अमृतानुभवाची संस्कृत समश्लोकी. **अमु.** – १. अमृतानुभव तात्पर्य; २. अहिल्योद्धार; ओ. सं. ४६; ३. पांडुरंग माहात्म्य, ओ. सं. १७९; ४. प्रमाणलक्षण; ५. सीतास्वयंवर; ओ. सं. ७६. ६. स्फुट – आरत्या, श्लोक व पदे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. गर्दे, खं. कृ. ऊर्फ बाबा (संपा.) : श्रीअमृतानुभव समआर्या टीका व प्रल्हादपंत बडवे ह्यांची संस्कृत समश्लोकी; मुंबई, १९२९. २. बहिरट, भा. प. : प्रल्हादमहाराज – चरित्र व कविता; संतवाणीचा अमृतकलश, १९५५; पृ. १८७–२०७.

**० प्रल्हादबुवा बडवे** – पहा **प्रल्हादबाबा बडवे.**

**प्रल्हादात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **मु.** – गणेशपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४.

**प्रल्हादानुचर रामचंद्र** [का. अनु.] रामदासी कवी. कारंजे मठपती प्रल्हाद ह्यांचे पुत्र व शिष्य. ह्यांचे नाव रामचंद्र. प्रल्हादानुचर रामचंद्र म्हणून सांप्रदायिकांत हे ज्ञात आहेत. ह्यांनी समर्थांवर रचलेले एक पद शं. श्री. देव ह्यांनी प्रसिद्ध केले आहे (श्रीसांप्रविवि., खं. २, पृ. १६८).

**प्रसन्न वेंकटेश** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – शृंगारपर, गोपीविरहपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**प्राण** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना :** **अमु.** – बावनीछंद; संककासू., पृ. ६४.

**प्राण गोपाळ** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – १. नामयाचा नैवेद्य; २. बारामासी; ३. भवानीस्तुति; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ६४.

**प्रेमदास–१** [अंदाजे इ. स. च्या १७ व्या शतकाची अखेर] कवी. ह्या कवीचा काळ व त्याची गुरुपरंपरा ह्यांबद्दल मतभेद आहेत. एकनाथकालीन कोणा कृष्णगोपाळ ज्ञानदासाचा हा शिष्य होता असे *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे सांगतात (मसा., आ. २, पृ. १३०). प्रा. म. रा. जोशी म्हणतात की, हा एकनाथकालीन असावा असे जे भावे आणि तुळपुळे ह्यांना वाटते ते मत चुकीचे असून तो उत्तरकालीन आहे असे त्याच्या गुरुपरंपरेवरून सांगता येते. कृष्ण, गोपाळ, ज्ञानदास ही तीन वेगवेगळ्या व्यक्तींची नावे आहेत. ह्यांपैकी कृष्ण म्हणजे कृष्ण याज्ञवल्की; त्यांचे पुत्र गोपाळ व गोपाळांचे शिष्य ज्ञानदास; ह्या ज्ञानदासांचे शिष्य प्रेमदास. अशी ही परंपरा ठरते.

गोपाळ याज्ञवल्की हे शिवकल्याणांच्या वेळी श. १५५७ (इ. स. १६३५) त विद्यमान होते. हे लक्षात घेता त्यांचा प्रशिष्य असलेला हा प्रेमदास श. १६०० (इ. स. १६७८) च्या सुमाराचा ठरेल.

ह्याने *मूळस्तंभ* ग्रंथाची रचना केली असून तो गद्यपद्यमिश्रित व शिवपार्वतीसंवादरूप आहे. त्यातील निरूपणात योगावर विशेष भर दिलेला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : प्रेमदास; विसंमंवा., १९७१; पृ. १४४–१४५.

**प्रेमदास–२ (विप्र)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – अंबाबाईच्या नवरात्रावरील एक पद; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० प्रेमाई** – पहा **प्रेमाबाई.**

**प्रेमानंद–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – उषाहरण; त्रु. पो.; भाइसमं. हस्त. सू., पृ. ४०.

**० प्रेमानंद–२** – पहा **परमानंद–२.**

**० प्रेमानंद–३** – पहा **परमानंदचैतन्य** (तुकेशसुत चैतन्याचा शिष्य).

**प्रेमाबाई / ० प्रेमाई** [अंदाजे श. १५८० / इ. स. १६५८] संतकवयित्री. महिपतीने ह्या साध्वी स्त्रीचे चरित्र *भक्तलीलामृता*च्या ४२ व्या अध्यायात वर्णन केले आहे. प्रेमाबाई ही एक विधवा स्त्री गोदाकाठी राहात असे. ती मोठी साध्वी होती. गंगास्नान, नामस्मरण, भागवतश्रवण करणे आणि घरी येणाऱ्या साधुसंतांची मनोभावे सेवा करणे असा तिचा नित्यक्रम असे. तिचा काळ श. १५८० / इ. स. १६५८ च्या सुमाराचा असावा असे वि. का. राजवाडे म्हणतात. पण तिच्या पदांची भाषा मात्र बरीच अर्वाचीन वाटते.

प्रेमाबाईची फक्त पाच-सहा पदेच उपलब्ध आहेत. ह्यांपैकी तीन ज. र. आजगांवकर ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत. त्यांतून कृष्णचरित्राविषयीची हिची आवड व्यक्त होते. एका अशिक्षित पण अत्यंत भाविक आणि प्रेमळ अशा स्त्रीमनाचे साधेपण तिच्या पदांतून प्रकट झाले आहे. 'माझा भरत देखिला काय। कुणितरि सांगा।।', 'गड्यांनो अपुल्या कृष्णाला। अक्रुर नेतो मथुरेला।' किंवा 'गडे हो कृष्णगडी अपुला। राजा मथुरेचा झाला।।' ही प्रेमाबाईची पदे विशेष परिचित आहेत. 'जाउनि सांगा श्रीहरिला। एकदां भेट सुदाम्याला।।' हे पदही तिचेच असावे असे वाटते. कृष्णचरित्रावर हिने बरीच पदे रचिली असावीत. ह्या पदांच्या चाली वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : प्रेमाबाई; मसंक., मुंबई, १९३९; पृ. ८६–९४.

**प्रेमा माळी** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – 'कोल्हापूरकर आबा महाराज यांस सयाजी मोहित्याने मारले' त्या प्रसंगावरील पोवाडा; **पोवाडेसंग्रह** (संपा. ॲकवर्थ, शाळिग्राम); मुंबई, १८९१; पृ. ७०–७४.

**० फकीर** – पहा **रामदास.**

**० फडके, गंगाधरशास्त्री** – पहा **गंगाधरशास्त्री फडके.**

**फणिसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – उपदेशपर व ज्ञानपर श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**फतनजी** [अंदाजे इ. स. १७००] शाहीर. ह्याने *अफजलखानवधाचा पोवाडा* रचला आहे. आजपर्यंत ह्या प्रसंगावरील अज्ञानदास शाहीराचा फक्त एकच पोवाडा ठाऊक होता. त्याच प्रसंगावरील दुसरा एक जुना पोवाडा म्हणून ह्याचे महत्त्व आहे. अफजलखानवधानंतर नक्की किती वर्षांनी पोवाड्याचे लेखन झाले हे कळण्यास प्रत्यक्ष साधन नाही तरी भाषेवरून तो इ. स. १७०० च्या आगेमागे लिहिला गेला असणे शक्य आहे, असे अनुमान करता येते.

*वीरमाल सीवाजीचा* असेही ह्या पोवाड्याला नाव दिले आहे. त्याचे पंधरा चौक आहेत. शिवाजी व अफजलखान ह्यांची भेट व त्यांच्यामधला संवाद कवीने साक्षेपाने रंगविला आहे. शिवाजीची दूरदृष्टी, धोरणीपणा व प्रसंगावधान हे व्यक्तिविशेष मार्मिकपणे रेखाटले आहेत. प्रस्तुत पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये संग्रहित (पृ. १–९).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. केळकर, य. न. : अफजलखानवधाचा पोवाडा; ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. ३, पुणे, १९६९; पृ. ३२१–३२८. २. जोशी, ना. ब. : वीरमाल सीवाजीचा; भाइसमंत्रै., व. ४४, अं. १–४; श. १८८८; पृ. ९–१८.

**फतिशा** [का. अनु.] मुसलमान कवी.

**रचना : अमु.** – रिवायती; ढेरे, रा. चिं.; मुमसंक., पृ. १७८.

**० फरार (रे.) चार्ल्स पिनहार्न** – पहा **(रे.) चार्लस पिनहार्न.**

**(मिसेस) फरार** [१९ व्या शतकाचा पूर्वार्ध] नाशिक येथील 'चर्च मिशनरी सोसायटी'ची एक ख्रिस्तोधर्मप्रचारिका. ह्यांनी *चमत्कारिक गोष्टी* (१८३४), *हेनरी आणि त्याचा संभाळणारा गडी संभू ह्यांची गोष्ट* (१८३५), *प्राण्यांच्या कथा* (१८३५), *कुटुंबप्रवर्तननीति* (१८३५), *बाळबोध गोष्टी* (१८३६), *यात्रेकऱ्याचा वृत्तान्त* अशी पुस्तके लिहिली. इंग्रजी पुस्तकांची ही मराठी रूपान्तरे आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म. : मिसेस फरार; युमअसे.; मुंबई, १९६०; पृ. ३२५–२६.

**फिरंगु नाना** [अंदाजे इ. स. १७४९–५०] शाहीर. *शाहूमहाराजांचा मृत्यू* ह्या पोवाड्याची रचना ह्याने केली आहे. सौम्य स्वभावामुळे लोकप्रिय झालेल्या शाहू छत्रपतींविषयी "छत्रपती पुण्यपावन । रयत रक्षिली आबादान । जैसें रामानें केलें राज। तैं पद पावले महाराज।। काय वर्णु तयाचें तेज। फिरंगु नाना बोले सहज ।।" असे उद्गार कवीने काढले आहेत. अशा परोपकारी दात्याला, निधनामुळे त्याची प्रजा पारखी झाली म्हणून हळहळही व्यक्त केली आहे (मु. : ऐतिपो., खं. १, पृ. ९७–९८).

**फ्रान्सिवास द गमारिस (पाद्री)** [का. अनु.] गोमंतकीय मिशनरी ग्रंथकार. फ्रान्सिवास द गमारिस ह्या एका गृहस्थाने *बैबल* ऊर्फ *शुभवर्तमाना*चा कथाभाग घेऊन तो सारांशरूपाने लिहिला होता. हा ग्रंथ फादर स्टीफन्स ह्यांच्या पूर्वीचा असावा. ख्रिस्ती धर्मप्रसाराकरिता लिहिल्या गेलेल्या काही ग्रंथांचा थोडासा पत्ता अजून लागू शकतो. त्यांपैकीच फादर गमारिसचा *बायबल*चे कथासार हा एक ग्रंथ असावा (मसा., आ. ५, पृ. २८१).

**फ्रान्सिस्क रोइज (पाद्री)** [का. अनु.] भाषान्तरकार. हिंदूंच्या धर्मग्रंथांची पोर्तुगीजमध्ये भाषान्तरे झाल्याचे बरेच उल्लेख सापडतात. ह्याने दत्तात्रयाच्या ग्रंथाचे (*योगराज टिळक*; कर्ता अमृतानंद) भाषान्तर केल्याचे दि. ८–१२–१५५० मधील एका पत्रात नमूद आहे, अशी माहिती डॉ. पिसुर्लेकर ह्यांनी पोर्तुगाल येथे जाऊन शोध घेतल्यानंतर अ. का. प्रियोळकर ह्यांना कळविली.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म. : युमअसे., मुंबई, १९६०; प्रस्ता., पृ. ८.

**फ्रान्सिस्कु वाज-द-गिमाराइस (पाद्री)** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] मिशनरी ग्रंथकार. दक्षिण कोकण किंवा गोवे येथील जेजुइटांप्रमाणे उत्तर कोकणातील म्हणजेच मुंबई-वसई भागातील जेजुइट, फ्रान्सिस्कन किंवा अन्य विदेशी पाद्र्यांनीही काही ग्रंथनिर्मिती केलेली आहे. त्यांपैकी फ्रान्सिस्कु गिमाराइस ह्यांनी एक गद्य व कथारूप ख्रिस्तपुराण लिहिले आहे. हे पुराण उत्तर-कोकणी बोलीत असून ते प्रथम इ. स. १६५९ मध्ये रोमन लिपीत लिस्बन येथे प्रसिद्ध झाले. त्यानंतर ह्या पुराणाच्या मूळ हस्तलिखितावरून इ. स. १८४५ मध्ये

मुंबईत ह्याच्या काही आवृत्त्या छापण्यात आल्या. ह्या पुराणाच्या एकूण ३६ कथा (भाग) असून मजकूर १६००० ओळींचा आहे. ह्या रोमन लिपीतील पुराणाचे देवनागरीत लिप्यन्तर करून ते इ. स. १९२३ मध्ये प्रसिद्ध करण्यात आले. पुराणाची भाषा मराठी असली तरी प्रत्येक कथेचे शीर्षक मात्र पोर्तुगीज भाषेत आहे. अंतर्गत पुराव्यावरून ग्रंथाची रचना शिवकालात झाली असावी असे अनुमान करता येते. कारण अकराव्या कथेत शिवाजीचा उल्लेख येतो. ह्यातील मराठी भाषा शुद्ध नसून तिजमध्ये गुजराती व हिंदी शब्दांची भेसळ झाली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : पिंगे, श्री. म. : उत्तर-कोकणातील जेजुइट वाङ्मय; युमअसे., मुंबई, १९६०; पृ. २९.

**बकाजी रंगनाथ** [अंदाजे श. १७२८ / इ. स. १८०६] कवी. मुकुंदराजांच्या परंपरेतील. बकाजी रंगनाथ हे गोदाकाठी नांदेड येथे राहणारे. ह्यांनी *विवेकसिंधूच्या* धर्तीवर श. १७२८ मध्ये *विवेकभास्कर* हा तत्त्वज्ञानपर ग्रंथ लिहिला. भोसल्यांच्या कारकीर्दीत बकाजी रंगनाथ आपल्या काही शिष्यांसह नागपुरास गेले. त्यानंतरच नागपूरच्या आसपास असलेल्या मुकुंदराजांच्या परंपरेतील मठांचा व्याप आकारास आला.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : देशपांडे, अ. ना. : प्रामवाइ., भा. १, पूर्वार्ध, नागपूर, १९६६; पृ. २९३.

**बंका महार** [? – श. १२४०, माघ शु. १५ / इ. स. १३१९] संतकवी. तेराव्या शतकात जे अनेक भगवद्भक्त संतकवी होऊन गेले त्यांपैकी बंका महार हे एक होत. ते मंगळवेढ्यास राहात असत. चोखामेळा ह्यांची बहीण निर्मळा ही बंका महारांची बायको. एका अभंगात ह्यांनी आपली गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे दिली आहे : निवृत्ति > ज्ञानदेव > विसोबा खेचर > नामदेव > चोखामेळा > बंका महार. ' बंका म्हणे माझी चोखा गुरुमाउली। तियेचे पाउली लोटांगण ' असा गुरू म्हणून चोख्याचा भक्तिभावाने उल्लेखही त्यांनी केला आहे. चोखोबांच्या चरित्राचा काही भाग ह्यांनी रचलेल्या अभंगात समाविष्ट होतो.

पंढरीच्या पांडुरंगाच्या सावळ्या मूर्तीचे साजिरे वर्णन, चोखामेळा आणि त्याच्या कुटुंबाबद्दलचा आदरभाव, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्ती मिळावी ह्यासाठी विठ्ठलाची केलेली आळवणी, अशा विविध भावनांचे तरंग बंकांच्या अभंगांतून उमटलेले दिसतील. हीन यातीत जन्माला आल्याबद्दलची खंत ते व्यक्त करतात : ' हीन याती दीन पतीत आगळा। म्हणोनि कळवळा नये माझा ॥ बंका म्हणे अहो पंढरिनिवासा। तुजवीण आशा दुजी नाहीं ॥ ' भवसागरातून पार पडण्यासाठी जडजीवांचा सहजी उद्धार करणारे नामच कसे चांगले हे सांगताना 'नाम निजनौका संतांची संगती। हेची श्रीपती द्यावी मज ॥ नकळे योग याग तपादि साधनें। नेणेंची लक्षण याचें कांहीं ॥ ' असे प्रथम सांगून नंतर "सुलभ सोपारे नाम आठविता ॥ न पडेची गुंता कर्म धर्म ॥ बंका म्हणे मज नामाचा आधार। उतरेन पार भवनदी ॥ " अशी परमेश्वराच्या नामाची महती ते वर्णन करतात. साध्या आणि सोप्या शब्दांत भक्तीच्या आवडीने मोठ्या प्रेमभराने ह्यांनी आपल्या वैयक्तिक भावना अभंगवाणीतून व्यक्त केल्या आहेत.

**रचना : मु.** – अभंग; ३९; श्रीससंगा., खं. १; संपा. जोशी, का. अ.; पुणे, १९६७; पृ. १४९–१५२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : आजगांवकर, ज. र. : चोखामेळा; ह्या लेखात बंका महाराची काही माहिती समाविष्ट; प्रामसंक., मुंबई, १९५७; पृ. २०७–२१०.

**बचु फंदी** / ० बच्याजी दिवटे [अंदाजे इ. स. १९ वे शतक, पूर्वार्ध] शाहीर. हा प्रभाकराचा समकालीन होता. बचु फंदी हा अनंत फंदीचा कोणी नातलग नसून त्याचे उपनाव दिवटे असे होते. घरादाराची पर्वा न करता सारा वेळ तमाशे करावे आणि खुशालचेंडू वृत्तीने काळ घालवावा असा ह्याचा क्रम असे. हा कवने रचीत असे व डफ घेऊन ती म्हणतही असे असा त्याच्याविषयीचा उल्लेख वि. ल. भावे ह्यांनी केला आहे (मसा., आ. ५, पृ. ६६९–७०).

**० बच्याजी दिवटे** – पहा **बचु फंदी.**

**बद्रु मल्लारि** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० बंदे** – पहा **रामदास.**

**० बनाजी** – पहा **निरंजनमाधव.**

**० बया** – पहा **बयाबाई.**

**बयाबाई ऊर्फ बाईयाबाई** / ० बया [का. अनु.] संत कवयित्री. बयाबाई ही श्रीसमर्थ रामदासांच्या शिष्यपरंपरेतील एक होय. गिरिधरांनी *समर्थप्रतापाच्या* अकराव्या समासात वेणाबाईची शिष्या व आपली स्वतःची गुरू म्हणून एका बयाबाईची माहिती दिली आहे. ह्या माहितीत बयाबाईचे जन्मस्थान, सासरचे गाव, जन्मकाल, मृत्युकाल, ह्यासंबंधी कशाचाच उल्लेख नाही. बालवयापासून ती रामोपासक होती, मिरजेतील वेणाबाईच्या मठाचे अधिकार तिच्याकडे होते, वयाची ८४ वर्षे तिने परमार्थात घालवून अनेक जडमूढांचा उद्धार केला, ह्या स्वरूपाची माहिती गिरिधरांनी दिली आहे. रामदासी बयाबाई म्हणून प्रसिद्ध असलेल्या बयाबाईने एका पदात 'या गुरुने मज वेडचि लाविलें। अहो मन हे तत्पदीं तन्मय झालें ॥ सावळी सूरत नयनांत बैसली। पाहतां पाहणें समूळचि गेलें। ... रामदास कृपेनें दास बया हें मीपण गेलें ॥ १ ॥' असा श्रीसमर्थ रामदास आपले गुरू असल्याचा निर्देश करून आपला गुरुविषयक भक्तिभाव व्यक्त केला आहे. वेणाबाईचा उल्लेख येथे वा अन्यत्र कोठेच नाही. त्यामुळे रामदासशिष्यपरंपरेत बयाबाई दोन होत्या की काय असा प्रश्न निर्माण होतो व त्याचे उत्तर मिळालेले नाही.

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या शके १८३३ (इ. स. १९११) च्या इतिवृत्तात समर्थशिष्या बयाबाईच्या नावे काही कविता मुद्रित झालेली आहे. ही कविता रामदासी थाटाची वा घाटणीची नाही; ती वेगळी व स्वतंत्र घाटणीची आहे. हिच्या नावावरील अनेक उर्दू पदेही प्रसिद्ध झालेली आहेत.

**रचना : मु.** – स्फुट कविता : पदे वगैरे (१५ रचना); भाइसमं-इति., श. १८३३; पृ. ९०–९४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. आजगांवकर, ज. र. : बयाबाई; मसंक., मुंबई, १९३९; पृ. २०४–२१२. २. शर्मा, विनयमोहन : बयाबाई; हिंमसंदे., पटणा, १९५७; पृ. १९०–१९३.

**बलराम** [का. अनु.] शाहीर, लावणीकार.

**रचना : अमु.** – लावण्या; भाइसमं. हस्त. सू., पृ. २५०.

**बलवंत** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – शनीची आरती; मआ., पृ. ३६२. **अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ६५.

**ब ल्लु** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – एक पद; संपा. ओक, वा. दा.; पदसंग्रह, भा. ३; पृ. ८६. **अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ६५.

**० बल्लाळ** – पहा **निरंजनदास बल्लाळ.**

**बल्लाळ कवी** [का. अनु.] महानुभाव कवी. *श्रीकृष्ण बाळक्रीडा* काव्याचा कर्ता. नागराज महानुभाव औरंगाबाद ह्यांच्या अनुग्रहाने मिळालेल्या प्राचीन पोथ्यांत बल्लाळ कवीच्या *बाळक्रीडा* ग्रंथाची पोथी आहे (ओ. ३७०). वि. ल. भावे ह्यांच्या *महानुभाव ग्रंथसूचीत* मुरारीमल्ल, भिक्षुमुनि, वादींद्र गोपाळदास, चाल्हेराज ह्या कवींच्या *बाळक्रीडां*चा उल्लेख आहे. पण प्रस्तुत *बाळक्रीडे*चा नाही.

वर निर्दिष्ट केलेल्या पोथीच्या आधारे ह्या काव्याचे मुद्रण *महानुभाव*

मासिकातून झाले आहे. बाळकृष्णाच्या लीला वर्णन करणे हा महानुभाव कवींचा आवडीचा विषय आहे. बल्लाळ कवीनेही मोठ्या भक्तिभावाने ही कथा चित्तवेधक केली आहे.

**रचना : मु.** – श्रीकृष्ण बाळक्रीडा; ओ. सं. ७०; संपा. आराध्य, मुरलीधरशास्त्री; महानु., जुलै, नोव्हें., डिसें., १९७१; क्रमशः.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आराध्य, मुरलीधरशास्त्री; श्रीबल्लाळ-कवीची श्रीकृष्ण बाळक्रीडा; महानु., जुलै १९७१; पृ. ३१.

**बल्लाळनंदन** / ० **बल्लाळपुत्र** / ० **बल्लाळसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **बल्लाळपुत्र** – पहा **बल्लाळनंदन.**

० **बल्लाळसुत** – पहा **बल्लाळनंदन.**

० **बसवलिंग–१** – पहा **बस्वलिंग.**

**बसवलिंग–२** [का. अनु.] वीरशैव कवी. मन्मथस्वामींच्या शिष्य-परंपरेतील. ही शिष्यशाखा लिंगेश्वर > बसवलिंग > लक्ष्मण अशी असून अभंगरचनेसाठी तिची विशेष ख्याती आहे. ह्यांनी कपिलधार-क्षेत्राचा महिमा आपल्या अभंगांतून वर्णिला आहे. ह्या अभंगांतून गीतेतील वचनांचा हे दाखला देताना आढळतात, हे विशेष होय. ह्यांची समाधी कपिलधार क्षेत्रीच आहे.

० **बंसीधर** – पहा **बेनीरामजो.**

**बस्वलिंग** / ० **जयरामात्मज–३** / ० **बसवलिंग–१** [अंदाजे श. १६००/ इ. स. १६७८] कवी. महिपतीने ह्यांची माहिती दिली आहे. ह्यांनी स्वतःस जयरामात्मज म्हणविलेले आढळते. हे तुकारामांचे समकालीन असे त्यांच्या *संतमालिके*त आलेल्या संतांच्या उल्लेखावरून दिसते. कारण तुकारामांपर्यंतच्याच संतांचा निर्देश तेथे आलेला आहे. ह्यावरून ह्यांचा काल शके १६०० च्या आसपासचा असावा.

ह्या कवीने *गजगौरीव्रत, उमामहेशसंवाद, श्वानोद्धार, मुरलीचरित्र, पांडवचरित्र, कान्होपात्राचरित्र, श्रीखंडयाख्यान* अशी बरीच आख्याने रचली आहेत. ह्यांची *संतमालिका* इतिहास मंडळाच्या त्रैमासिकात छापली आहे. अनेकदा हा कवी अनेकवृत्तात्मक आणि अनेकभाषात्मक अशी मिश्र रचनाही करताना दिसतो.

**रचना : मु.** – १. गजगौरीव्रत आख्यान; काइसं., खं. ८, अं. ५ : १२; श. १८७८. २. संतमालिका; ग्रं. सं. २७; भाइसंमत्रै., व. २२, अं. ४, पृ. २४–२५. ३. दळण – पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ४१. **अमु.** – १. उमामहेशसंवाद; २. कान्होपात्रा-चरित्र; ३५ कडवी; ३. पांडवचरित्र; ४. भामाविलास; ५. मुरली-चरित्र; ६. रुक्मिणीभावार्थ; ७. श्रीखंड्याख्यान; ८. श्वानोद्धार; ९. पदपदांतरे; संककासू., पृ. ६५.

**बस्वेश्वर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. २.

**बहादर बाबा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – गुलहाजी ग्रंथ; संककासू., पृ. ६५.

० **बहिणाजी** – पहा **दिनकर गोसावी.**

**बहिणाबाई** / ० **बहिणी** / ० **बहेणी** [श. १५५० / इ. स. १६२८ – समा. श. १६२२, आश्विन शु. १, बुधवार/इ. स. १७००] संत कवयित्री. देहूकर तुकारामांच्या शिष्या. आपल्या कवितेत बहिणाबाईंनी जे बिस्तृत असे आत्मवृत्त दिले आहे त्यावरून त्यांच्या चरित्रावर बराच प्रकाश पडतो. बाईंचा जन्म वेरूळच्या पश्चिमेस असलेल्या देवगावी (ता. वैजापूर) झाला. पित्याचे नाव आऊदेव. मातेचे नाव जानकी. उपनाव कुळकर्णी. हे वाजसनेयशाखी, मौनसगोत्री, यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्या पाच वर्षांच्या असतानाच त्यांचे लग्न ३० वर्षांच्या बिजवराशी झाले. त्यांचे पती शिवपूर ऊर्फ शिरूर येथील एक ज्योतिषी होते. त्यांचे आडनाव पाठक व गोत्र गौतम. पती व माहेरची कुटुंबीय मंडळी ह्यांच्यासमवेत केलेल्या यात्रेचे उल्लेख बाईंच्या कवितेत सापडतात. शिंगणापूर, पंढरपूर, रहिमतपूर अशी यात्रा करीत अखेर हे कुटुंब कोल्हापुरास हिरंभट म्हणून कोणी वेदान्ती ब्राह्मण होता त्याच्या आश्रयाने राहू लागले. बालवयापासूनच परमार्थाकडे ओढा असल्याने हरिकथाश्रवण करणे हा बहिणाबाईंच्या नित्यक्रमातला आवडीचा छंद होता. कोल्हापूर मुक्कामी जयरामस्वामी वडगावकरांच्या कीर्तनात तुकारामांचे अभंग ऐकून त्यांना त्यांचा ध्यास लागला. संचित नाहीसे करणारा सद्गुरूवाचून दुसरा कोणीच समर्थ नाही हे परंपराज्ञान असल्यामुळे सद्गुरू तुकोबा केव्हा भेटतील अशी उत्कंठा त्यांना लागून राहिली. असे असता कार्तिक वद्य पंचमी, रविवारी (श. १५६२ की १५६९ हा वादाचा मुद्दा आहे) कोल्हापूर मुक्कामी त्यांना तुकोबांनी स्वप्नात येऊन दृष्टान्त दिला. आपली पत्नी तुकोबांच्या मागे लागली हे त्यांच्या भ्रतारास रुचले नाही. त्यांनी ह्यांचा बराच छळ केला. परंतु पुढे ह्यांच्या अधिकाराची प्रचीती येऊन ह्यांच्याविषयीचा द्वेषभाव त्यांनी टाकून दिला.

बहिणाबाईंनी आपले गुरू म्हणून तुकारामबोवांचा उल्लेख ठिकठिकाणी अभंगांत केला आहे : 'बहिणी म्हणे तुका सद्गुरू सहोदर। भेटता अपार सुख होय॥', 'तुकाराम भेटला धन्य जिणे माझे। कृतकृत्य झाले सहजचि॥' इत्यादी. असे असले तरी त्या वारकरी की रामदासी असा प्रश्न त्यांच्यासंबंधात अकारण उपस्थित केला गेला आहे. बहिणा-शिष्य दीनकवीने आपल्या ओवीबद्ध पंचीकरणाच्या १८ व्या अध्या-यात जी गुरुपरंपरा दिली आहे ती सच्चिदानंदबाबा > विश्वंभर > राघवचैतन्य > केशवचैतन्य > बाबाजी चैतन्य > तुकाराम > बहिणा-बाई अशी असून तिच्यात रामदासांचे नाव कोठेच येत नाही. ह्यावरून बहिणाबाई वारकरी संप्रदायाचाच वारसा चालवीत होत्या हे स्पष्ट होते. शिवाय तुकारामांच्या वाणीचा ठसाही त्यांच्या ह्या शिष्येच्या वाणीवर अभंगांतून पडलेला दिसतो. वयाच्या ७२ व्या वर्षी आश्विन शुद्ध प्रतिपदेस बहिणाबाईंनी समाधी घेतली. अखेरच्या क्षणापर्यंत त्यांचे अभंगरचनेचे कार्य चालूच होते.

बाईंच्या कवितेचा संग्रह (भा. १) प्रथम धों. वि. उमरखाने ह्यांनी प्रसिद्ध केला (पुणे, १९१३). त्यांत अभंग, ओव्या, श्लोक, आरत्या इत्यादी मिळून ४६८ कविता समाविष्ट झाली आहे. वि. ना. कोल्हार-कर ह्यांनी प्रसिद्ध केलेल्या *संत बहिणाबाईंच्या गाथेत* (पुणे, १९२६) हीच संख्या ८४० आहे. बहिणाबाईंची एक *संतनामावळी*ही प्रसिद्ध झाली आहे.

बाईंची सर्वच कविता स्वतःस्फूर्त आहे. ती सोपी असून तिच्यात अपरिचित जुने शब्द फारसे नाहीत. भक्तिभावाचा आविष्कार आणि त्याचबरोबर वेदान्ताचे प्रतिपादन ही दोन्ही ह्या कवितेत आढळतात. निर्वाणपर अभंगात कवयित्रीने आपल्या तेरा जन्मांचा पूर्वेतिहास पुत्रास कथन केला आहे. जडदेहातून आत्मा मुक्त होण्याचे क्षण जवळ येऊन ठेपले : "आपलें आपण देखिलें मरण। तो झाला शकुन स्वानंदेसी॥ उभारिली गुढी मनाच्या शेवटी। झाली मज भेटी आत्मारामी॥"... 'सरलें संचित आयुष्य देहाचे' असे त्यांनी ह्या क्षणाचे वर्णन केलेले आहे. आध्यात्मिक प्रगतीच्या अखेरच्या टप्प्याचा अनुभव घेईपर्यंत बहिणाबाई जागृत होत्या, असाही उल्लेख ह्या अभंगात आहे. अनेक अभ्यासकांनी असे मत व्यक्त केले आहे की, ह्या अभंगाची रचना त्यांचा पुत्र विठ्ठल ह्याने बाईंच्याच निवेदनावरून त्यांच्या मृत्यूनंतर केली असावी.

पारमार्थिक जीवनाच्या पूर्णत्वाचा जो अनुभव पायरीपायरीने त्यांनी घेतला त्याचा सुस्पष्ट आलेख त्यांच्या अभंगांतून रेखलेला आढळतो. खरा ब्राह्मण कोण हे सांगताना ब्रह्मनिर्वाणपर अभंगात त्या म्हणतात : "तृष्णा मोह दंभ गेला अहंकार। वृत्ति निर्विकार सर्व

कर्मी। बहिणी म्हणे ज्याची निमालि वासना। ब्राह्मण तो जाणा ब्रह्मनिष्ठ।" मूळ *वज्रसूचिकोपनिषदा*त जन्मजात ब्राह्मण्यावर कठोर हल्ला चढविलेला आहे. *वज्रसूचिकोपनिषद* हे अर्वाचीन असून ह्याचा रचनाकार कोण ते समजण्यास साधन नाही. नेपाळात उपलब्ध झालेल्या परंपरेप्रमाणे ह्याचा कर्ता अश्वघोष (इ. स. चे २ रे शतक) आहे. हे उपनिषद आद्य शंकराचार्यांनी रचले अशी महाराष्ट्रात समजूत आढळते. 'ब्राह्मण कोण ?' हा ह्या उपनिषदाचा प्रतिपाद्य विषय आहे. ब्राह्मणत्व हे जीव, देह, जाती, ज्ञान, कर्म वा धर्म ह्यांनी सिद्ध होत नसून, केवळ अद्वितीय आत्म्याच्या साक्षात्कारानेच ते सिद्ध होते, असा ह्या उपनिषदाचा मथितार्थ आहे. बहिणाबाईंच्या ब्रह्मकर्मपर ४९ अभंगांपैकी सुमारे अठरा अभंगांत *वज्रसूचिकोपनिषदा*तली विचारसरणीच मांडलेली दिसते असे मत रा. चिं. ढेरे ह्यांनी व्यक्त केले आहे (संत बहिणाबाईंचे *वज्रसूचकोपनिषद्भाष्य, प्रतिष्ठान*, नोव्हें. १९६६, पृ. ३२–३३). ब्राह्मणत्व हे जाती, ज्ञान, कर्म व धर्म ह्यांनी सिद्ध होत नसून " ब्रह्मभाव देहीं सदासर्वकाळ। ब्राह्मण केवळ तोचि एक॥ बहिणी म्हणे ब्रह्मीं नांदे तो ब्राह्मण। यातीशी प्रमाण नसे तेथें॥" असे बहिणाबाई सांगतात. हे विवेचन म्हणजे बहिणाबाईंची एक विवेकनिष्ठ वाङ्मयकृतीच आहे.

भक्तीचे माहात्म्यही त्यांनी मार्मिकपणे वर्णिले आहे : " भक्ति हे कारण साधन वरिष्ठ। रोकडें वैकुंठ हातीं वसे॥ भक्तिपाशी ज्ञान वैराग्य आंदणें। सर्वही साधनें लया जाती। बहेणी म्हणे भक्ति विरक्तीचें मूळ। चित्त हें निश्चळु करी का रे॥" आत्मसाक्षात्काराचा अनुभव व्यक्त करताना त्या म्हणतात : 'तें सुख सांगता वाचे पडे मौन'. तरीही ह्या अनुभवाला त्या शब्दरूप देण्याचा प्रयत्न करतात. "झालासे आनंद इंद्रियांचे द्वारीं। बैसलें शेजारीं चैतन्याचे॥ घट हा बुडावा जैसा डोहा आंत। न फुटतां ओतप्रोत पाणी॥ बहिणी म्हणे, तैसें झालें माझे मना। तुकाराम खुणा ओळखी त्या॥" आत्मज्ञान झाल्यानंतर बहिणाबाईंनी केलेली रचना प्रौढ, भारदस्त व तितकीच प्रासादिक आहे. ज्ञानपर, ब्रह्मकर्मपर व इतर कितीतरी अभंगांतून बहिणाबाईंनी व्यक्त केलेले वेदान्तविषयक अध्यात्मज्ञान केवळ अलौकिक आहे. आपले अनुभव समर्पक शब्दांत वेचक उपमा-दृष्टान्तादी अलंकारांचे साहाय्य घेऊन त्यांनी शब्दांकित केले आहेत.

आपली समग्र जीवनगाथा अशा रीतीने त्यांनी अभंगबद्ध केली आहे. विविध प्रकारच्या समृद्ध अशा आध्यात्मिक अनुभवांनी बहिणाबाईंची कविता संपन्न झाली आहे. तुकोबांच्या प्रभावळीत राहून त्यांनी कवयित्री म्हणून आपली स्वयंतेजस्विता प्रकट केली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : बहिणाबाई; मसंक.; मुंबई, १९३९; पृ. ९५–१७०. २. कारखानीस, गं. गो. : संत बहिणाबाई वारकरी की रामदासी ?; रामदास-रामदासी; (७ वा सुमनहार); व. २२, अं. २५९; पृ. १०४–११०. ३. खेरडे सुनंदा : तुकारामशिष्या संत बहिणाबाई; नभामा., डिसें. १९६९; पृ. ९–१३. ४. ढेरे, रा. चिं. : भक्तिवेडी बहिणा; मुंबई, १९५९; पृ. ३२. ५. ढेरे, रा. चिं. : बहिणाबाईचे वज्रसूचिकोपनिषद्भाष्य; विविधा., पुणे, १९६७; पृ. १५९–१६६. ६. पोतदार, द. वा. : बहिणाबाईची गुरुपरंपरा; भाइसमंइति., श. १८३७; पृ. २७१–२७४. ७. बेंद्रे, वा. सी. : बहिणाबाई सिऊरकर; तुकारामांचे संतसांगाती; मुंबई, १९५८; पृ. ८१–१०८. ८. मुजुमदार, गं. ना. : बहिणाबाईची संतनामावली; भाइसमंइति., श. १८३८; पृ. ७६–७७. ९. शर्मा, विनयमोहन : बहिणाबाई; हिंमसंदे.; पटणा, १९५७; पृ. १८६–१९०.

o **बहिणाशिष्य** – पहा दीनकवी.

o **बहिणी** – पहा बहिणाबाई.

o **बहिरंभट** – पहा बहिरा जातवेद.

o **बहिरा** – पहा बहिरा जातवेद.

**बहिरा जातवेद / o बहिरंभट / o बहिरा / o बहिरा पिसा** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] कवी व भागवतटीकाकार. हे स्वतःला 'बहिरा' म्हणवितात व आपले आडनाव जातवेद सांगतात : 'या देहा बहिरउ नाम। जातवेद उपनाम।' (*बहिरवी*, ९०, २४८). महिपतीने कवीचे नाव 'बहिरंभट' असे दिले आहे. ह्यांना मोरोपंत व महिपती 'बहिरा पिसा' असेही म्हणतात. कवीच्या पित्याचे नाव अनंत व गोत्र कौंडिण्य असा निर्देश त्यांच्या टीकाग्रंथात येतो (ओ. १.७६). कवीच्या आईचे नाव अंबिका होते आणि तिने पुत्रप्राप्तीसाठी लक्ष्मीनायकाची उपासना केली होती, असे कवीनेच सांगितले आहे. उदा., " धन्य ते जननि अंबिका। जे भजिनलि लक्ष्मीनायका। धरुनि पुत्रकामना लक्ष्या। मग हा देहो निर्माण॥ ९.२४७॥"

बहिरंभट पैठण येथे राहणारे विद्वान दशग्रंथी ब्राह्मण व षट्शास्त्री निपुण वेदोनारायण होते अशी महिपतीने *भक्तविजया*च्या ४४ व्या अध्यायात माहिती दिली आहे. बहिरा जातवेद हे वडवाळ नागेशांचे शिष्य असे मानले जाते. हे वडवळ क्षेत्र परळीच्या जवळ आहे. त्यावरून हे परळी-वैजनाथ ह्या ज्योतिर्लिंग क्षेत्राचे रहिवासी होते असे *भरतखंडाचा अर्वाचीन कोश*कर्ते र. भा. गोडबोले म्हणतात. 'घोगरग्राम गोदातीरीं। पंचाक्रोशा म्हाळसा क्षेत्रीं' आपली भागवतटीका 'बहिरवी' निर्माण झाल्याचे कवीने सांगितले आहे. ह्यावरून कवी घोगरगाव (जि. अहमदनगर, तालुका नेवासे) येथील रहिवासी होता आणि नेवाशाची म्हालसा हे त्याचे कुलदैवत असले पाहिजे, असेही एक मत व्यक्त केले जाते. महिपतीने वर्णिलेल्या चरित्रात कवीच्या वरील कुलदेवतेचा उल्लेख नाही. कवीने रचलेल्या *दशमस्कंधा*वरील मराठी टीकेत (अ. ९०) ह्या संदर्भात पुढीलप्रमाणे उल्लेख सापडतो : " हे टिका दशमस्कंधाचि। भाषा महाराष्ट्र देशिचि। अंतर्वेदि गोदेप्रवरेचि। ते प्रदेशि निर्माण॥ २४९॥ घोगरग्राम गोदातीरीं। पंचक्रोशा म्हालसा क्षेत्रीं। ते निधिवास कुलेश्वरी। जे विष्णुमूर्ति॥ २५०॥ ऐसा कुलदेवता गोविंदु। तोचि श्रीगुरु तोचि साधु। तेणेसि बहिरा जातवेदु। आनंदतु आनंदें॥ २५१॥"

कवीच्या गुरूसंबंधीही असाच वाद आहे. महिपतीने बहिरंभटांचे गुरू 'वळवाळसिद्ध नागनाथ' असे म्हटले आहे. स्वतः कवीने आपल्या गुरूचे नाव 'चिंतामणि' असे दिले आहे. उदा., 'जें जें मनें चिंतावें। तें तें गुरु चिंतामणीनें द्यावें॥ ४९.१३०॥' तळेगावी उपलब्ध झालेल्या जगनाडे वह्यांत ह्यांचे जे एक *संतस्मरण* उतरले आहे त्यात ह्यांचे गुरू 'चिंतामणि' असल्याचे सांगितले आहे. हे चिंतामणि कोणा परशुरामाचे आत्मज असून ते अत्रिगोत्री होते, असे *बहिरवी टीके*च्या शेवटी कवीने म्हटले आहे. आणि ह्या गुरूच्या कृपेनेच *भागवताच्या दशमस्कंधा*चे गायन केले असेही कृतज्ञतापूर्ण उद्गार कवीने आपल्या गुरूविषयी काढले आहेत : " त्या चिंतामणिचेनी प्रसादें। दशमस्कंध वोविप्रबंधें॥ बहिरेनि जातवेदें। गायन केलें॥ १.७४॥" बहिरा जातवेद ऊर्फ बहिरा पिसा ह्यांचा एक पोवाडा उपलब्ध आहे. त्या पोवाड्यात आपला गुरू नागनाथ असल्याचे हे सांगतात. *बहिरवी टीका* करणाऱ्या बहिरा जातवेदाचे गुरू चिंतामणि असल्याचे स्पष्ट झाले आहे. तेव्हा नागनाथांचे शिष्यत्व पत्करलेला, हा बहिरा पिसा नावाचा कुणी अन्य संत तर नसावा ना अशी शंका डॉ. यू. म. पठाण ह्यांनी व्यक्त केली आहे (मसंप., ऑक्टो. १९६८; पृ. १०५). मात्र बहिरा जातवेद व बहिरा पिसा हे अभिन्नच होत असा समज बहिरवी टीकेच्या वाचनाने दृढ होतो.

अनेक धर्मग्रंथांचा अभ्यास करूनही बहिरा जातवेदांच्या मनाचे समाधान झाले नाही. तेव्हा मुसलमानांचा धर्म स्वीकारून बहिरा जातवेदांनी कुराणाचा अभ्यास केला. तरीही त्यांच्या मनास शांती मिळेना,

तेव्हा त्यांनी पुन्हा हिंदुधर्म स्वीकारला. ह्या अस्थिर मनोवृत्तीमुळे त्यांना लोक 'बहिरा पिसा' म्हणू लागले, असे एक मत आख्यायिकेच्या आधारे परंपरेने चालत आले आहे. एकनाथांनी संतमालिकेत 'बहिरा पिसा' ह्याचा उल्लेख केला आहे. त्यावरून हे एकनाथपूर्वकालात होऊन गेले असावेत.

कवीने *भागवताच्या दशमस्कंधावर भैरवी–बहिरवी* ही जी प्राकृत टीका लिहिली ती विस्तृत असून सुप्रसिद्ध टीकाकार श्रीधर ह्यांच्या मूळ संस्कृत टीकेच्या *भागवतपुराणा*वरील *भावार्थदीपिका* नावाच्या टीकेच्या आधारे रचली आहे. 'आतां कृपाळु तुम्ही श्रोते। चित्त द्यावें श्रीकृष्ण कथे। मी श्रीधराच्या मागातें। पाहोनि चाले॥ एरवी आपला अधिकार काय' ह्याची जाणीव कवीला आहे. कवी म्हणतो, "नेणे साहित्य संगीत। निपट न कळे संस्कृत। ऐसिया मज बोलवीत। तुम्हां संतांची कृपा॥" टीकेची ओवीसंख्या हा मतभेदाचा एक विषय असून भिन्न भिन्न प्रतींत ती २५ हजारांपासून पाऊण लाखापर्यंत सापडते. ह्या ग्रंथाची ओवीसंख्या पाऊण लाखाच्या घरात जाईल असे र. भा. गोडबोले *अर्वाचीन कोशात* नमूद करतात. *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांच्या मते ही संख्या ३५९४५ असावी. दत्तो वामन पोतदारांचा अंदाज ओवीसंख्या ३६००० असा आहे. डॉ. द. गं. कोपरकरांजवळील दोन्ही प्रतींत ही संख्या अनुक्रमे ३०३२९ व २६००१ आहे. ह्या टीकेची ९०-अध्यायी प्रत प्रा. श्री. मा. कुळकर्णी ह्यांस उपलब्ध झाली असून तिची ओवीसंख्या २५८०६ इतकी आहे. ही प्रत नागपूरप्रत म्हणून ओळखली जाते. ह्या टीकेच्या पहिल्या अध्यायाचा काही भाग *मराठी संशोधन पत्रिकेत* प्रसिद्ध झालेला आहे (मसंप., जाने. १९५५, पृ. १७–२४). प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभी त्या अध्यायाचा सारांश व नंतर श्रीधराचार्यांच्या टीकेतील श्लोक व त्यानंतर त्यावर टीका, असे ह्या *भैरवी टीके*चे स्वरूप आहे. मूळ *भागवत* व *श्रीधरी टीका* ह्यांना सोडून अनेक ठिकाणी स्वतःच्या प्रतिभेचा प्रपंच कवीने केला आहे. *रुक्मिणी-स्वयंवरा*तील तीन अध्यायातील कथाभाग कवीने अंदाजे अडीच हजार ओव्यांत वर्णिला आहे. ह्यात ब्राह्मणांचे वादविवाद, त्यांची दक्षिणाप्रियता, आपसातील कलह, वऱ्हाडिणीचा साजशृंगार इत्यादी विषयांचे वर्णन चटकदार आहे. भीमकाच्या सभेत नारदाला आणण्यात बहिरा जातवेदाने मोठी मार्मिकता दाखविली आहे. रुक्मिणी-हरणानंतर झालेल्या युद्धात रुक्मी पराजित झाला. त्यामुळे रुक्मिणी खिन्न झाली. बळिराम एकीकडे तिचे सांत्वन करीत असताना तिचा गौरवही करतो. ह्या प्रसंगाचे वर्णन कवीने पुढीलप्रमाणे केले आहे : "अवो कृष्ण चंद्र तूं कळा। कृष्ण हेम तूं अळंकारु मेळा। कृष्ण रत्न तूं किळा। शोभसी माये॥ ३४४॥ कृष्ण भानु तूं प्रकाश। कृष्ण गगन तूं अवकाशु। कृष्ण वायु तूं स्पर्शु। नित्य पाही॥ ३४५॥ . . . कृष्ण देह तूं अवेव। कृष्ण मन तूं स्वभाव। कृष्ण ब्रह्म तूं माया सर्व। हे वैदर्भीये सत्य ॥ ५४ : ३३९॥" रुक्मिणीच्या सौंदर्याचे वर्णन, पुरांगनांच्या शृंगाराचे वर्णन, गोपिकांची वर्णने ह्यांमधून कवीच्या काव्यशक्तीची चमक दृष्टीस पडते. श्रीकृष्णाचा विरह होणार ह्या जाणिवेने कोंबड्यांच्या आरवण्याची कृष्णसख्यांची प्रतिक्रिया कवीने मोठ्या कुशलतेने वर्णिली आहे. महिपतीने ह्या ग्रंथाचे स्वरूप वर्णन करताना 'सप्रेम ओव्या अमोलिका। ऐकता भाविका निजसुख' देणाऱ्या आहेत असे म्हटले आहे. एकंदरीत ही टीका रसाळ अशी आहे.

प्रस्तुत टीका इ. स. १३५० च्या आसपास रचली गेली असावी असे अभ्यासकांना वाटते. *भागवत दशमा*वर म्हणजेच कृष्णचरित्रावर जी ग्रंथरचना झाली त्यापैकी बहिरा पिसा ह्यांची ही टीका काल-क्रमाने पहिली असे मानले जाते. *दशमस्कंधा*खेरीज कवीने *एकादश स्कंधा*वरील टीका व पदपदांतरे रचली आहेत. बहिरा पिसा ह्यांचा एक पोवाडा प्रा. गंगाधर मोरजे ह्यांनी *मराठी संशोधन पत्रिके*तून प्रसिद्ध केला आहे (व. १६, अं. १, पृ. १२०–१२३). गुरू नागनाथांनी 'बहिरा पिसा' ह्याला आत्मज्ञानाची वाट दाखवून संसारातून कसे मुक्त केले ते निवेदन ह्या पोवाड्यात येते.

**रचना : अमु.** – १. भैरवी / बहिरवी : भागवताच्या दशमावरील प्राकृत टीका; ओ. सं. अंदाजे २५८०६ पर्यंत; भाइसमं.; २. भागवताच्या एकादशस्कंधावर टीका; ३. अभंग, पदे, संतस्मरण; तंसम., सवामं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : बहिरा जातवेद; प्रामसंक., खं. १, मुंबई, १९५७; पृ. २४३–२४९. २. कुळकर्णी, श्री. मा. : जातवेद व बहिरवी टीका; चिंतन-लहरी; पृ. ५१–७५. ३. देशपांडे, ज. शा. : बहिरंभट : एक प्राचीन थोर कवि; नवशक्ति, मुंबई, ११–१–१९५९. ४. पोतदार, द. वा. : बहिरा जातवेद; भाइसमंइति., श. १८३४; पृ. ६६–७०. ५. पोहनेरकर, न. शे. : मराठवाड्यातील एक संत : बहिरापिसा; प्रतिष्ठान, फेब्रु., १९७२; पृ. १९. ६. भैरवी – बहिरा जातवेदविरचित श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधावर मराठी टीका : काव्य व प्रस्ता.; मसंप., जाने. १९५५; पृ. १७–२४. ८. मोरजे, गंगाधर : चवदाव्या शतकांतील अज्ञानसिद्ध व बहिरापिसा विरचित दोन पोवाडे; मसंप., ऑक्टो., १९६८; पृ. १०१–१२३.

**० बहिरा पिसा** – पहा **बहिरा जातवेद.**

**बहिरू न्हावी** [का. अनु.] शाहीर, लावणीकार. जुन्नर प्रांतात प्रसिद्धी पावलेल्या गोविंदा शाहीराचा हा साथीदार होता. बहिरू स्वतः कवने करीत असे व गोविंदाची कवनेही मोठ्या आवडीने म्हणत असे (मसा., आ. ५, पृ. ५८७ : टीप).

**बहिरू मल्हारी** [का. अनु.] शाहीर, लावणीकार.

**रचना : मु.** – प्रसिद्ध जुन्नरकर तमासगीर बहिरू मल्हारीकृत फडाच्या व बैठकीच्या सुरस लावण्या; संग्रा. : गोविंद मोरोबा कार्लेकर; मुंबई, १९०६ (*दाते सूची*, पृ. ५३०).

**बहिरेबावा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बहिरोबा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – भक्तिपर पदे व अभंग; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**बहुरंगी** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, प्रारंभकाल] शाहीर. श्रीमंत सवाई माधवराव पेशवे ह्यांच्या कारकीर्दीत झालेल्या खर्ड्याच्या लढाईत निजामाचा पेशव्यांनी पराभव केला. त्या प्रसंगावरील पोवाडा ह्याने केला आहे. पेशव्यांच्या फौजेने निजामाला कसे जेरीस आणले ते सांगून पेशव्यांचे जागोजागी असणारे मातबर सरदार आणि त्यांच्या फौजांचा पराक्रम ह्यांचे दोन-दोन तीन-तीन ओळीत मोजक्या शब्दांत कवी वर्णन करतो. हा *खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा, ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये संग्रहित (पृ. २८१–८४).

**० बहेणी** – पहा **बहिणाबाई.**

**बहेरू** [का. अनु.] कवी. ह्या कवीचे सुमारे ६०/६५ अभंग रामदासी परंपरेतील टाकळी मठात शं. श्री. देव ह्यांना सापडले (बा. १० व १४). वृद्धापकाळात एकुलता एक पुत्र निवर्तल्याने जे दुःख झाले, त्या शोकाच्या संतापात कवीने देवाची बरीच निर्भर्त्सना त्याच्या अभंगांतून केलेली आहे. नंतर उपरती होऊन कवी म्हणतो : "करीतो प्रार्थना। येतो लोटांगणी। परिसा संतजेनीं। विनंती माझी॥ १॥ आम्ही तो पतीत। स्वामी तो पावन। तारावया दीना। ब्रीद बांधी॥ ४॥ बोलियेलों आम्हीं। दुःखाच्या संतापें। संतजेनीं कोप न धरी याचा॥ ६॥ बहेरू म्हणे यानें। गांजियेलें मज। नव्हतें कांहीं काज। बोलायाचें॥ ७॥" रचना अशी साधी आणि सुबोध आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री : बहेरू कवि; भाइसमंइति., श. १८३८; पृ. ७२–७३.

**बळवंतराव मल्हारराव चिटणीस** [ ? – इ. स. १८४३] बखरकार. साताराचे छत्रपती प्रतापसिंह ह्यांचे चिटणीस. त्यांच्या अत्यंत विश्वासातील व्यक्तींपैकी एक. ग्रँट डफला मराठ्यांचा इतिहास लिहिण्यास ह्यांनी साधनसामग्री पुरविली. ह्यांचे घराणे बखरकार व चिटणिशीत वाकबगार म्हणून प्रसिद्ध. ते श्रीशिवछत्रपती व त्यांचे वंशज ह्यांच्याशी अखेरपर्यंत निष्ठेने वागले. ह्यांची वंशपरंपरा पुढीलप्रमाणे : बाळाजी आवजी > खंडो बल्लाळ > जिवाजी खंडोजी > रामराव जिवाजी > मल्हार रामराव > बळवंतराव मल्हार.

बळवंतराव मल्हार हे छत्रपती प्रतापसिंह ह्यांचे इ. स. १८२३ ते १८४३ पर्यंत चिटणीस होते. घराण्यातील इतर कर्त्या पुरुषांप्रमाणेच 'राजकारणाचे महत्त्वाचे कागदपत्र तयार करण्यास जी कुशाग्रबुद्धि, जे कौशल्य व जी चतुरस्रता असावी लागते ती सर्व पूर्णपणे ह्यांच्याजवळ होती.' छत्रपती प्रतापसिंह ह्यांनी त्यांस एकदा "विद्या व उत्तम गुण प्रकटी होत, असे तऱ्हेची नीतिलक्षणे लिहून आणून दाखवावी", अशी आज्ञा केल्यावरून त्यांनी १०८ लक्षणांची एक यादी तयार केली होती. ही यादी नित्य व्यवहारात उत्तम मार्गदर्शन करणारी आहे. हिचे लेखन त्यांनी १३ ऑगस्ट १८३६ रोजी पूर्ण केले. *छत्रपति प्रतापसिंह यांची लेखी तसबीर* ह्या नावाची एक पुस्तिकाही ह्यांनी लिहून प्रसिद्ध केली होती. तिचे पुनःप्रकाशन डॉ. स. गं. मालशे ह्यांनी १९७३ मध्ये *ना. दा. ठा. म. विद्यापीठ जर्नल*च्या चौथ्या खंडात केले आहे. ह्या पुस्तिकेचे महत्त्व सांगताना ते लिहितात : "राजा प्रतापसिंहाचे हे शब्दचित्र आहे. त्यात त्याच्या चेहेऱ्याचे, एकंदर शारीरिक ठेवणीचे बारकाईने वर्णन आहे. शिवाय त्यात लेखनवाचनादी अभ्यास, अश्वपरीक्षा, अश्वारोहण, गायनवादन, रोगपरीक्षा, शौर्य, आतिथ्य, राज्यकारभारकौशल्य, न्यायप्रियता, निर्व्यसनीपणा, माणसाची पारख इत्यादी प्रतापसिंहाच्या आंगच्या गुणांचे सविस्तर वर्णन आहे.

"स्थल-काल-कर्ता इत्यादी निर्देशाबाबत संदिग्धतेला येथे वाव नाही. लेखनकाल तर शक, शिवशक, फारशीशक व इंग्रजी सन असा चतुर्विध दिलेला आहे. बखरीसारखा येथे सांगोवांगीचा प्रकार नाही. कारण शब्दचित्राचा नायक आणि लेखक यांचा सेव्यसेवकसंबंध साक्षात होता. बखरकारघराण्यातील हा पिढीजाद लेखक असल्याने याची निवेदनशैली व भाषाविशेष यांचे नाते जुन्या बखरीच्या भाषेशी जुळते. अशी शैली पौराणिक वा हरदासी पद्धतीने अघळपघळ विषयविस्तार करणारी असते. तरीसुद्धा या आटोपशीर शब्दचित्रात मुद्देसूदपणा आहे. स्वामिनिष्ठा हाच लेखनहेतू असल्यामुळे चरित्रनायकाच्या माहात्म्यवर्णनाकडे कल आहे.

"ह्या पुस्तिकेचे महत्त्व तिहेरी आहे. तिच्यामुळे ऐतिहासिक माहिती मिळते, ही एक गोष्ट; १९ व्या शतकाच्या प्रथम पादातील मराठी भाषेची ठेवण कळण्याला हा गद्याचा नमुना उपयुक्त ठरणारा आहे, ही दुसरी गोष्ट; आणि व्यक्तिचित्ररेखाटनाचा जुना प्रयत्न म्हणूनही त्याला एक खास महत्त्व आहे."

**रचना : मु.** – छत्रपति प्रतापसिंह यांची लेखी तसबीर; लेखन पूर्ण झाले तारीख १५ ऑगस्ट १८२८; लिपी मोडी; शिळेवर छापले; महाराष्ट्र साहित्य परिषद् ग्रंथसंग्रह, पुणे; श्रीसमर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रह, धुळे. **संशोधित आवृत्ती** – १. संपा. मालशे, स. गं.; श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ जर्नल, खंड ४; पृ. ७३–९८; १९७३. २. बळवंतराव मल्हारकृत अष्टोत्तरशत नीतिलक्षणे; बोरगावचे चिटणीस घराणे; पृ. २१–३९; संपा. गोगटे, गोपाळ रावजी; रामदास आणि रामदासी मासिक; ब. २५, अं. २९४; नोव्हें. १९४६.

**बळवंतराव माणकेश्वर चाफळकर** [अंदाजे श. १७२४/इ. स. १८०२] कवी. रामदाससंप्रदायी. ह्यांनी शंभर ओव्यांचे प्राकृत *योगवासिष्ठसार* लिहिले आहे. ग्रंथाचे लेखन श. १७२४ (इ. स. १८०२) च्या चैत्र महिन्यात वटपूरग्रामी पूर्ण झाले असे ग्रंथात म्हटले आहे. कवी रामदासांना शरण गेल्याचा उल्लेखही ग्रंथात सापडतो. ग्रंथ ओवीबद्ध आहे.

**रचना : अमु.** – योगवासिष्ठसार (मराठी); १०१ ओव्या; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : बळवंतकृत योगवासिष्ठसार; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १२६–२८.

**बाइदेवबास / ० भावे देवव्यास / ० भावेबास** [इ. स. च्या १३ व्या शतकाचा उत्तरार्ध व १४ व्या शतकाचा प्रारंभकाल] ग्रंथकार. हे महानुभाव पंथाचे नागदेवाचार्यांच्या नंतरचे दुसरे मोठे आचार्य. हे चक्रधरांचे शिष्य व कवीश्वर भास्कराचार्यांचे ज्येष्ठ गुरुबंधू. गोदावरीतीरावरील नेवासे प्रांतात राहणारे. ज्ञानी व विरक्त असल्याने पंथात हे एक मोठी आदरणीय व्यक्ती म्हणून गणले जात असत. ह्यांनी भास्करभट्टाच्या शृंगाररसप्रधान *शिशुपालवध* ह्या काव्यग्रंथावर अभिप्राय देताना म्हटले होते : 'हा ग्रंथु निका जाला असे परि शृंगारिया प्रवृत्तां जोगा जाला असे : 'म्हणून भास्करभट्टांनी 'निवृत्तांजोगा' *एकादशस्कंध* पुढे लिहिला. ह्यावरून बाइदेवबासांच्या वैराग्यासक्तीची कल्पना येते. गोविंदप्रभूंच्या ठिकाणी त्यांची भक्ती होती. पंथहितासाठी ते नित्य जागरूक राहात. ह्यांचे देहावसान श. १२३१ (इ. स. १३०९) मध्ये झाले, असे *महाराष्ट्रसारस्वत*कार मानतात. *महानुभाव : इतिहास प्रकर्ण* ग्रंथात ह्यांच्या मृत्यूचा काळ श. १२२५/इ. स. १३०३ असा दिला आहे.

बाइदेवबासांनी पाच गद्य ग्रंथ लिहिले, त्यात *पूजावसर* हा ग्रंथ विशेष महत्त्वाचा आहे. ह्यात त्यांनी श्रीचक्रधरांची जी दिनचर्या जवळून पाहिली होती तिचे वर्णन केले आहे. त्या काळच्या सामान्य माणसांच्या राहणीचे चित्र त्यात चांगले उमटले आहे. ह्यातली भाषा घरगुती आहे.

**रचना : अमु.** – १. नामाचे दहा ठाये (गद्य). २. पांचा पुरांचें मूर्तिज्ञान (गद्य). ३. पूजावसर. ४. प्रश्नावली (गद्य). ५. साठीं प्रश्नें.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : भावे व्यास; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ३४–३५. २. पांगारकर, ल. रा. : पूजावसर–१; मवाइ., खं. १; नाशिक, १९३२; पृ. ४५२–४५४.

**बाका कुंभार** [का. अनु.] संत कवयित्री. राका कुंभार ह्यांची पत्नी. ही कडकडीत वैराग्यवृत्तीने राहात असे व परमेश्वरचिंतनात काळ घालवी. हिने अभंगरचना केली आहे (मसा., आ. ५, पृ. १४४).

**० बाजी अंबाजी** – पहा **बाळाजी अंबाजी.**

**बाजी एसू** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – सामानगडचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. २४८–२४९; 'बाजी एसूने कटाव केला ॥ जिउबा रामा असे बोलिला ॥' ह्या शब्दांत शाहिराने स्वतःचा उल्लेख केला आहे.

**बाजी गोपाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**बाजीद पठाण** [का. अनु.] मुसलमान संतकवी. हे केशवस्वामी भागानगरकरांचे शिष्य. उद्धवचिद्घन, जयरामसुत इत्यादिकांनी आपल्या संतमालिकांत ह्यांचे नाव गुंफलेले आहे. मोरोपंतांनीही ह्यांचा गौरव केला आहे. महिपतीने ह्यांचे अल्प चरित्र दिले आहे (*भक्तलीलामृत* : ४१ : ६१–८७). त्या माहितीप्रमाणे

बाजीद पठाण हे विजापूरच्या आदिलशाहीत एका सुभ्याचे अधिकारी होते. त्यांच्या दिमतीस पंचवीस हजार सैन्य होते. अशा प्रकारे मोठ्या वैभवात काळ जात असता देहाच्या नश्वरतेचा उत्कट प्रत्यय आल्याने ह्यांच्या चित्तात अनुतापाची वेल अंकुरली. तिचे रूपांतर सर्वसंगपरित्यागात होऊन केशवस्वामींचा उपदेश त्यांनी घेतला. केशवस्वामींनी रामोपासनेचा मंत्र त्यांना दिला. ह्यांनी मराठीत पदरचना केली असून हिंदी साक्याही बऱ्याच रचल्या आहेत. बाजीदांनी गुरूच्या नावात आपल्या नावाचा विलोप केल्यामुळे त्यांच्या पदांचा शोध घेणे अशक्य झाले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : केशवस्वामींचे तीन मुसलमान शिष्य; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १३८–१४०.

० **बापविठ्ठलसुत** – पहा **ज्ञानदेव–१**.

**बापू–१** [का. अनु.] शाहीर. हा मराठा शेतकरी होता.

**रचना : मु.** – नागपूरकर आप्पासाहेब भोसले ह्यांचा पोवाडा; पोवाडे संग्रह; संपा. शाळिग्राम, ॲकवर्थ; मुंबई, १८९१; पृ. २३०–२३८. (पोवाड्याचा रचनाकाळ इ. स. १७३१ नंतरचा असावा, कारण भोसल्यांस नागपूरचे राज्य इ. स. १७३१ च्या सुमारास मिळाले.)

**बापू–२** [का. अनु.] शाहीर. ह्याची एक लावणी *अंधारातील लावण्या* ह्या संग्रहात (पुणे, १९५६) मुद्रित (पृ. २२३–२२४).

**बापू कान्हो खांडेकर** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] आत्मचरित्रकार. हे मुत्सद्दी व राजकारणी होते. ह्यांचे पणजोबा गोपाळ महादेव खांडेकर हे कोकणात राहात असत. हबशांच्या त्रासास कंटाळून ते साताऱ्यास आले. ते छत्रपती शिवाजी व संभाजी ह्यांजपाशी हुजूरसेवा करीत होते. बापू कान्हो हे धाकट्या शाहूंकडे होते व नानांच्या सल्ल्याने वागत. दुसरे शाहूमहाराज ह्यांचे बंधू चतुरसिंग राजे ह्यांच्याबरोबर एकनिष्ठ राहून बापू कान्हो ह्यांनी उत्तरपेशवाईत अनेक राजकारणे केली. चतुरसिंगांबरोबरच परागंदा होऊन बिकट प्रसंगांचे अनुभव घेतले. साताऱ्याच्या छत्रपतींस पेशव्यांच्या बंदिवासातून सोडविण्यासाठी चतुरसिंग व बापू कान्हो ह्यांनी बरीच खटपट केली परंतु त्यांस यश आले नाही. शेवटी इ. स. १८१२ त ह्यांना चतुरसिंगांबरोबर त्रिंबकजी डेंगळे ह्याने दग्याने भालेगावी कैद केले. चतुरसिंगांस रायगडी व बापू कान्होंस गोवर्धनच्या किल्ल्यात ठेवण्यात आले. पुढे पेशवाईचा अस्त झाल्यानंतर इंग्रजांच्या ताब्यात सर्व किल्ले आले तेव्हा ह्यांची सुटका झाली. चतुरसिंगांस ह्यापूर्वीच मृत्यू आला होता.

बापू कान्हो ह्यांची मुक्तता झाल्यानंतर, इंग्रजांच्या शिफारसीने, त्यांना छत्रपती प्रतापसिंहांकडून फडणिशीची वस्त्रे मिळाली. ग्रँट डफ साताऱ्यास रेसिडेंट असताना बापू कान्हो हे छत्रपतींच्या दरबारातील एक प्रमुख वजनदार गृहस्थ होते. ग्रँट डफ ह्यांची त्यांच्यावर मेहरबानी होती. त्यांच्या सांगण्यावरून बापू कान्होंनी आपले आत्मवृत्त इ. स. १८२१ त तयार केले. ह्यातील माहितीचा उपयोग ग्रँट डफला इतिहासलेखनाच्या कामात बराच झाला.

ह्या आत्मवृत्तात सवाई माधवरावांच्या लग्नापासून तो दुसऱ्या बाजीरावाला पेशवाईची वस्त्रे मिळेपर्यंतच्या अनेक कारवायांचा इतिहास आला आहे. स्वतःच्या वृत्तान्तापेक्षा तत्कालीन राजकीय घडामोडींचे त्यांमागच्या डावपेचांसकट वर्णन ह्या आत्मवृत्तात आहे. ह्या आत्मवृत्तात चरित्रकाराचे व्यक्तित्व प्रभावी झालेले दिसत नाही. त्यामुळे आत्मचरित्र म्हणून ह्या ग्रंथाचा वाङ्मयीन दृष्टीने विचार करणे उचित नाही. राजकीय घडामोडींत स्वतः भाग घेतलेल्या एका मुत्सद्द्याने लिहिलेले पेशवाईअखेरच्या उलाढालीचे राजकीय वृत्त म्हणून हा ग्रंथ विचारार्ह आहे. बापू कान्होंचे आत्मवृत्त ग्रँट डफने मुंबई येथील लिटररी सोसायटीच्या स्वाधीन केले; त्याचे पुढे काय झाले ते कळत नाही. सध्या उपलब्ध असलेली आत्मवृत्ताची प्रत अशुद्ध असून तीच *इतिहाससंग्रहकर्त्यांनी* *बापू कान्हो ह्यांचे आत्मवृत्त* असे नाव देऊन फेब्रु. १९१५ च्या *इतिहाससंग्रह* ह्या मासिकामध्ये प्रसिद्ध केली. आत्मवृत्ताची भाषा साधी व सोपी आहे.

द. ग. गोडसे

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ग्रामोपाध्ये, गं. ब. : बापू कान्हो यांचे आत्मवृत्त; बखर वाङ्मय; मवाइ., खं. ३; संपा. जोग, रा. श्री.; पुणे, १९७३; पृ. ५२९–३०. २. हेरवाडकर, र. वि. : बापू कान्हो ह्यांचे आत्मवृत्त; मब., मुंबई, १९५७; पृ. ७३–७४.

**बापू कोन्हेर** [का. अनु.] शाहीर. वरिष्ठ ब्राह्मणवर्गातील व्युत्पन्न अशा रचनाकारांपैकी एक (मसा., आ. ५, पृ. ५५९).

**बापू खंदेसी** [का. अनु.] शाहीर. ह्याने पेशव्यांच्या आरमारातला एक खासदार डामाजी नाईक ह्याच्यावर पोवाडा रचला आहे. हा डामाजी धुळपांच्या पदरी होता. समशेरजंग हे लढाऊ जहाज त्याच्या ताब्यात होते. इंग्रजांना धडा शिकविण्यासाठी ह्याने पराक्रमाची शर्थ केली. पोवाडेकार म्हणतो : 'डामाजी नाईक धन्य ! केले हलाल धन्याचें अन्न! या पेशव्यांच्या राज्यांत फार अमर। पर कोणी जळून नाही मेला असा सरदार।' डामाजी नाईक व त्याने केलेली लढाई ह्यांची माहिती *ऐतिहासिक साधनांत* मिळत नाही. त्यामुळे ह्या पोवाड्यास महत्त्व आहे. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड* २ मध्ये संग्रहित (पृ. २१०–१३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : डामाजी नाईकाचा पोवाडा; ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. २; पुणे, १९४४; पृ. २०३–२०९.

**बापू गीरकर** [का. अनु.] शाहीर. बापू गीरकर हा धुळपांच्या दरबारातील शाहीर होता. हे धुळप मराठ्यांचे आरमार सांभाळणाऱ्या आंग्र्यांच्या पदरी होते. पेशव्यांनी आंग्र्यांचा पराभव केल्यानंतर आंग्र्यांच्या पदरी असलेली पराक्रमी धुळप मंडळी पेशव्यांची चाकरी करू लागली. आनंदराव धुळप हा कित्येक वर्षेपर्यंत पेशव्यांच्या आरमाराचा मुख्य सुभेदार होता. हरबाजी त्याचा चुलतभाऊ. सवाई जानराव हा हरबाजीचा पुत्र. ह्या धुळपांची स्तुतिस्तोत्रे बापू गीरकराने गायली आहेत.

हरबाजीरावाच्या पोवाड्यात त्याच्या चेहऱ्यामोहऱ्याचे, स्वभावाचे आणि पराक्रमाचे शब्दचित्र कवीने "हटी मूर्त गोमटी भोळेशंकर बोलण्यांत ॥ वक्त्र भयासूर पाहतां कंप भरे शरीरांत ॥ धुंद कैफमें बुद्धी अकडबाज शोभिवंत ॥ दिसे सावळी तनू दोंद गणपतीचे दिसण्यात।" ह्या शब्दांत तत्कालीन शाहिरी पद्धतीने रेखाटले आहे. हरबाजीरावाच्या मृत्यूचा काळ पोवाडेकाराने तिथी, मिती आणि वारासुद्धा तपशीलवार दिला आहे.

सवाई जानरावाचे वर्णन करताना 'हरबाजीरावाचे कुळी दीप लागला असे जी' असे म्हणून "सवाई जानराव धुळप मोहरा विजयदुर्गाला जी ॥ नित्य वाजतो चौघडा खाशा वाड्याला जी ॥" असा त्याचा मोठेपणा पोवाडेकार सांगतो. पोवाड्यातली ऐतिहासिक माहिती बारकाईने पाहिल्यास विश्वसनीय आहे.

**रचना : मु.** – १. हरबाजीराव धुळपांचा पोवाडा; २. सवाई जानराव धुळपांचा पोवाडा; संपा. केळकर, य. न. : ऐतिपो., खं. २; पृ. २३७–३९ व २४१–४२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : धुळपांचे पोवाडे; ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. २; पुणे १९४४; पृ. २३४–३६.

**बापूजी गोविंद गोखले** [अंदाजे श. १७१६ / इ. स. १७९४] कथाग्रंथकार. प्रस्तुत ग्रंथकाराचा *सारिकाशतक* नावाचा ग्रंथ *सिंहासनबत्तिशी, शुकबहात्तरी* ह्या ग्रंथांच्या धर्तीवरच लिहिलेला आहे. ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत.

दोन्हींत मिळून १०० नीतिविषयक कथा आलेल्या आहेत.

*सारिकाशतक* ग्रंथाचे प्रतलेखक जनार्दन गोविंद साने हे पिंपळ-वंडी येथे राहणारे असून सार्ष्टी येथे पेशवे सरकारच्या पदरी कारकुनी नोकरीत होते. ग्रंथाचे शेवटी 'हस्त अक्षर जनार्दन गोविंद कारकुन निसबत सरकार' असे म्हटले आहे. साने ह्यांनी पेशवे सरकारच्या आज्ञेने सदर ग्रंथ, ग्रंथरचना करणारे 'बापूजी गोविंद गोखले' ह्यांजपासून सरकारकरिता लिहून घेतला असावा. हा ग्रंथ श्रीमंत सवाई माधवराव पेशवे ह्यांच्या शिक्षणासाठी लिहिला असे लेखकाच्या निवेदनावरून स्पष्टपणे दिसते. ग्रंथाचा रचनाकाल श. १७१६ (इ. स. १७९४), आनंदनाम संवत्सर असा दिला आहे.

ग्रंथकार स्वतःसंबंधाने म्हणतो, "शके १७१६ आनंदनाम संवत्सर मध्ये चरणारविंद सेवक गोखला उपनामक बापूजी गोविंद विदुरादि नीतीच्या आधारे नवीन अद्भुत कथा वर्णन करीत आहे." उत्तरार्धाचे शेवटीही लेखकाने चरणोपासक बापूजी गोविंद असा स्वतःच्या नावाचा उल्लेख केला आहे.

कोण्या एका राजाच्या मूर्ख मुलाला शहाणा करण्यासाठी चतुर सारिकेच्या तोंडून निरनिराळ्या १०० गोष्टी सांगून जो नीतिविषयक उपदेश केला गेला त्यावरून ह्या ग्रंथास *सारिकाशतक* असे नाव दिले. ग्रंथ 'सुरस व बोधपर' असून अधूनमधून संस्कृतप्राकृत सुभाषितांचा उपयोग केलेला आढळतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** साने, का. प. : सारिकाशतक; भाइसंमंत्रै., व. ९, अं. ३, आश्विन ते मार्ग., श. १८५०; पृ. १६–१९.

**बापूराम** [का. अनु.] कवी. समर्थसंप्रदायी रोकडारामांचे शिष्य.

**रचना : अमु.** – गुरुपरंपरेवरील सहा श्लोक; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बापू वामन** [अंदाजे श. १५९५ / इ. स. १६७३] कवी. हा सातार-प्रांतीचा राहणारा असे ऐकीव माहितीवरून समजते. ह्याने रचलेले १७० श्लोकांचे *सुदामचरित्र* हे काव्य *महाराष्ट्र काव्यग्रंथा*च्या स्फुटसंग्रह (क्र. ९) मालिकेतून वि. ल. भावे ह्यांनी छापले आहे (पृ. २६–३९). पहिल्याच ओळीत 'वंदूनियां प्रथम सद्गुरु वामनाला' असा गुरूचा उल्लेख कवी करतो. हरिकृपेची प्रसादप्राप्ती असे काव्याचे पारमार्थिक प्रयोजन आहे. कृष्ण आणि त्याचा बालवयातला गुरु-आश्रमातला मित्र सुदामा ह्यांच्या भेटीचा सोहळा कवीने रंगविला आहे. रचना वामनपंडितांप्रमाणे प्रौढ आणि ठाकठिकीची आहे.

**बापू शामराज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अभंग; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बापू शिरसाट** [का. अनु.] शाहीर. ह्यांनी रचलेले ख्याल, टप्पे, ठुमऱ्या, छक्कड उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे, मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४४).

**बाबन** [का. अनु.] मुसलमान कवी.

**रचना :** अमु. – मराठी रिवायती; ढेरे, रा. चिं.; मुमसंक., पृ. १७८.

**बाबा जाईल** [का. अनु.] कवी. हे शुभरायबुवांचे शिष्य. हे वेदान्ती असून कीर्तन करीत. ह्यांनी *चतुःश्लोकी भागवत, वेणुगीत, पंचकोश* इत्यादी प्रकरणांवर अभंगरचना केली आहे. *ब्रह्मीभूताख्यान* नामक शुभरायबाबांचे ओवीबद्ध चरित्र ह्यांनी लिहिले आहे. हे मोठे विद्वान होते. ह्यांची पदे *काव्यसंग्रह*ात प्रसिद्ध झाली आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : श्रीशुभराय महाराज; मकच., भा. २; मुंबई, १९१३; पृ. ९६–९७.

**बाबाजी** [का. अनु.] शाहीर. आपले गाव नातेपोते असे हा सांगतो. शाहूमहाराजांच्या निधनानंतर सातारा छत्रपतींच्या राज्यात इंग्रजांनी जी फंदफितुरी केली त्याचे वर्णन बाबाजीने *प्रतापसिंहाच्या पदच्युतीच्या पोवाड्या*त केले आहे. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये संग्रहित (पृ. ८१–८२).

**बाबाजी रघुनाथ** [? – १७ एप्रिल १८३३] ख्रिस्ती कवी व धर्मप्रचारक. मूळचे मुंबईचे रहिवासी व धर्मान्तरापूर्वी जातीने ब्राह्मण. मुंबईच्या अमेरिकन मिशनकडून ह्यांनी २० नोव्हेंबर १८३१ रोजी बाप्तिस्मा घेतला. त्यानंतर मिशनकडून ह्यांची अहमदनगर येथे धर्मप्रचारक म्हणून नेमणूक झाली. ह्यांनी त्यावेळेस धर्मप्रचाराच्या कामी – विशेषतः उपासनेच्या प्रसंगी – उपयोगी पडावी ह्या हेतूने मराठी पद्यरचना केली. प्रॉटेस्टंट मराठी ख्रिस्त्याने केलेली ही पहिलीच पद्यरचना होय. मराठी ख्रिस्ती मंडळीला ती प्रियही झाली होती. पण पुढे रेव्ह. हेन्री बॅलंटाइन व डॉ. सॅम्युएल फेअरबँक हे दोन मिशनरी, अनुक्रमे इ. स. १८३५ व १८४६ ह्या वर्षी, मुंबईच्या मिशन-संस्थेत काम करावयास आले तेव्हा त्यांनी ही कविता एतद्देशीय वृत्त-छंदात असल्यामुळे नवख्रिस्ती समाजाला त्यांच्या पूर्वधर्माची आठवण होईल म्हणून वर्ज्य ठरविली. ह्या दोघांनी ह्या नवीन जन्मलेल्या मराठी कवितेस एक निराळे वळण लावले.

*मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास* (१९३१, पुणे) ह्यात शा. द. उजगरे हे लिहितात : "या मिशनरींची तेव्हां – सकारण म्हणा अथवा निष्कारण म्हणा – अशी समजूत झाली कीं, देशी वृत्त-छन्दां-मध्यें ख्रिस्तीधर्मपर पद्यरचना झाली तर त्या वृत्तछन्दांमुळे उपासकांस पूर्वधर्माची आठवण क्षणोक्षणीं होत राहणार. या कारणास्तव त्यांनी बाबाजी रघुनाथांची कविता वर्ज्य ठरविली आणि स्वतः उद्योग करून प्रसिद्ध इंग्रजी भजनांचीं विलायती संगीतांतील वृत्तांवर मराठी भाषान्तरें करून तीं महाराष्ट्रीय ख्रिस्ती लोकांमध्यें रूढ करविलीं." (पृ. ५५). बॅलंटाइन व फेअरबँक ह्यांच्या पद्यांचे संग्रह अनुक्रमे *गीतांचें नवीन पुस्तक* व *गीतसंग्रह* ह्या नावांनी प्रसिद्ध आहेत. पण बाबाजी रघुनाथ ह्यांची कविता मात्र उपलब्ध नाही.

**० बाबा पाध्ये – पहा काशिनाथ अनंत पाध्ये.**

**बाबासाहेब** [का. अनु.] मुसलमान कवी.

**रचना : अमु.** – मराठी रिवायती; ढेरे, रा. चिं.; मुमसंक., पृ. १७८.

**बाबूनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – श्लोकसंग्रह; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २९९.

**बाबुराय** [इ. स. चे १९ वे शतक, प्रारंभ] बखरकार. हे काश्यपगोत्री आश्वलायनशाखी ऋग्वेदी ब्राह्मण. बाबुराय हे शरफोजी राजांचे निज-सेवक चिटणीस. तंजावरच्या बृहदीश्वराच्या देवळातील भिंतीवर खोदलेल्या *भोसल-वंश-चरित्रा*चे [ ⇨ ३ ] लेखक. ह्या शिला-लेखाच्या शेवटी लेखकाच्या नावाची नोंद पुढीलप्रमाणे आहे : 'प्रथमवर्ण (ब्राह्मण) महाराष्ट्र जाती भगवंतरायाचे पौत्र विठ्ठलरायाचे पुत्र प्रस्तुत चोळदेशाधिपती श्रीमंत राजेश्री महाराज छत्रपती शरफोजी राजेसाहेब यांचे निज सेवक चिटनीस बाबुराय यांकडून लिहिजेले.' ह्यांनी शरफोजीच्या आज्ञेवरून लिहिलेला प्रस्तुत शिलालेख ता. १३ डिसेंबर १८०३ रोजी पूर्ण झाला.

प्रस्तुत बखरीचे प्रकाशन प्रथम वि. का. राजवाडे ह्यांनी केले (*प्रभात* मासिक, धुळे; संपा. गो. का. चांदोरकर; १९०६). तंजावर येथील टी. सांबमूर्तिराव ह्यांनी नंतर ग्रंथाचे स्वतंत्र पुस्तकरूपाने प्रकाशन केले (तंजावर, १९०७).

महाराष्ट्रात लिहिल्या गेलेल्या भोसलेवंशाच्या चरित्रात्मक बखरीत न येणारी व्यंकोजीच्या जीवनातील इतर माहिती तसेच त्याच्या वंशजांचे चरित्र देणे हा ह्या बखरीचा उद्देश आहे. बखरीत भोसल-वंशाचा मूलपुरुष श्रीमन्नारायण ह्यापासून सूर्यनारायण, मनू, इक्ष्वाकू इत्यादी पौराणिक सूर्यवंशीय परंपरेची संज्ञा सांगून पुढे श्रीशिवाजी-महाराजांच्या अगोदरच्या चौदा पिढ्यांची माहिती दिली आहे. शिवाजीराजांचे आजे मालोजी ह्यांच्या कारकीर्दीपासून विशेष माहिती

व त्या त्या गोष्टी घडलेल्या कालाचे शक व संवत्सर दिले आहेत. बखरीचा अर्धा भाग महाराष्ट्रातील भोसल्यांच्या कार्यकर्तृत्वाने व उरलेला अर्धा व्यंकोजी ते सरफोजीपर्यंतच्या (म्हणजे इ. स. १६७४ ते १८०४ पर्यंतच्या) राजांच्या हकीकतीने व्यापला आहे.

तंजावरच्या राजघराण्याशी संबधित अनेक तपशील की जे अन्यत्र आढळत नाहीत ते बखरकार सालवार देतो. बखर पौराणिक पद्धतीने सजविलेली आहे व चमत्कारकथांनी ती अद्भुतरम्यही झाली आहे. वास्तवातील तपशीलही बखरकार पुष्कळ देतो. बखरीची भाषा संस्कृतप्राकृतमिश्रित असून तिच्यावर द्राविडी भाषेचाही प्रभाव पडलेला आहे. त्यामुळे वाक्यरचना अनेकदा अपरिचित वाटते. तरीही वर्णने नेटकी आहेत. शिलालिखित हा ह्या बखरीचा खास विशेष होय.

**रचना : मु.** – १. भोसलवंशचरित्र; समाविष्ट : 'तंजावरचे मराठी राजे'; वाकसकर, वि. स.; मुंबई, १९३३; परिशिष्ट १; पृ. १६३–२९३; २. भोंसलवंशचरित्र; संपा. गोपालन, एस.; तंजावर, १९५१.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ग्रामोपाध्ये, गं. ब. : भोसलवंशचरित्र : बखरवाङ्मय; मवाइ., खं. ३; संपा. जोग, रा. श्री.; पुणे, १९७३; पृ. ५३८–५४०. २. हेरवाडकर, र. वि. : भोंसलवंशचरित्र; मब.; पुणे, १९५७; पृ. ६४–६५, ११६–१२०.

**बाबु सवाई रामापाई / ० रामा** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, अखेर] शाहीर. बाबु सवाई रामा ह्या शाहिराने *कर्नाटकाच्या स्वारीवरील पोवाडा* रचला आहे. ही मोहीम इ. स. १७२५ ते १७२६ ह्या काळात कर्नाटक प्रांती मराठ्यांनी केली. त्या मोहिमेचे, तसेच ह्या स्वारीत सैन्याचे कसे हाल झाले त्याचेही वर्णन कवीने केले आहे. पोवाडा अपूर्ण आहे (मु. : ऐतिपो., खं. १, पृ. ७२–७४). ह्याची एक शृंगारिक लावणी *अंधारातील लावण्या* ह्या संग्रहात (पुणे, १९५६) मुद्रित झाली आहे (पृ. २१८).

**बाबुसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – गोमाउ ब्राह्मणीचे चरित्र; ओ. २९; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाया शंकर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त सू., खं. १.

**बाया सराफ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाल** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बालक** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामपर एक पद; पदगुच्छ, तंजावर, १९६१; पृ. ४४.

**अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**बालकदास / ० बाळकदास** [का. अनु.] पदकार. ह्याचा निर्देश *संतकविकाव्यसूचीत* (पृ. ६७) व *रामदासी संशोधन खंड* २ मध्ये सापडतो. ह्याची 'मुरलि ग नोव्हे बरी' व 'अजिच्या दिवसीचा मोठा लाभ जाला आगे बाई' अशी दोन पदे विशेष परिचित आहेत. ह्यांपैकी दुसऱ्या पदात 'बालकदासा कृपा केली ॥ मोति पायासी राहियेला' या अन्त्योल्लेखावरून हा कवी मोतीरामाचा शिष्य असावा (रा. ग. हर्षे : कांहीं अप्रसिद्ध मराठी पद्यकार व पदे; भाइसंमत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४०).

**० बालकराम** – पहा बाळकराम.

**बालगोपाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाल्मुकुंद–१** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : अमु.** – धावे आणि आरत्या; समग्रंककासू., पृ. १७.

**बालमुकुंद–२ / ० बालमुकुंद केसरी** [का. अनु.] कवी. केसरीनाथांचा शिष्य. ह्याचा *अलकामाहात्म्य* नामक ग्रंथ अंशतः (७–८ पाने) भारत इतिहास संशोधक मंडळात उपलब्ध आहे. नमनाच्या श्लोकात कवीने दिलेल्या गुरुपरंपरेप्रमाणे ज्ञाननाथ > सत्यामलनाथ > गैबीनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ अशी नाथसंप्रदायी परंपरा आहे. 'पुरानांतरे सिंहाद्रिखंडे गुरुशिष्यसंवादे' अशा *अलकामाहात्म्य* ग्रंथाची रचना केल्याचे कवी सांगतो.

ग्रंथाच्या उपलब्ध पृष्ठांत आळंदीचा उल्लेख अलका, आनंदवन, अलकावती, अलंका अशा नावांनी येतो. इंद्रायणीस 'कौबेराख्य महानदी' असे म्हटले आहे. ग्रंथ त्रुटित असल्याने कवीचे कवित्व किंवा त्याचा ग्रंथव्यासंग ह्यासंबंधी ग्रंथातर्गत पुराव्याने माहिती देता येत नाही. ह्यांच्या पदांचा उल्लेख गो. का. चांदोरकर करतात (संककासू., पृ. ६७).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोग, श्री. बा. : अलकामाहात्म्य; भाइसंमत्रै., व. २०, अं. २, पृ. ७८–८०. २. ढेरे, रा. चिं. : बालमुकुंद; गोचप; पुणे, १९५९; पृ. १७४–१७५.

**० बालमुकुंद केसरी** – पहा बालमुकुंद–२.

**बालशंकर अवधुतनाथ** [का. अनु.] नाथपंथी कवी. ह्यांची गुरुपरंपरा : ज्ञानदेव > विसाखेचर > केसरीनाथ > गुलाबनाथ > चिद्‌डनाथ > बाळनाथ > बालशंकराचा अवधुतनाथ.

**रचना : अमु.** – आत्मरत्न; ग्रं. सं. ५१; मसंम.; हवना., पृ. ४३.

**बालात्मज** [का. अनु.] कवी

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० बावडेकर रामचंद्रपंत अमात्य** – पहा रामचंद्रपंत नीळकंठ अमात्य बावडेकर.

**बावाजमाल / ० बावामहंमद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शिवभक्तकथा; ओवीबद्ध, अपूर्ण; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० बावामहंमद** – पहा बावाजमाल.

**बाळ–१ (अवधूतात्मज)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाळ–२ (मुद्गलांकित)** [अंदाजे इ. स. १७९० नंतर] ग्रंथकार. ह्याने महिपतीस नमन केले आहे. तेव्हा ह्याचा काळ महिपतीबोवांच्या (इ. स. १७१५–१७९०) नंतरचा असावा. गुरू : पद्मनाभ.

**रचना : अमु.** – शक्तिविजय; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ६७.

**० बाळकदास** – पहा बालकदास.

**बाळकबाळा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाळकराम / ० बालकराम** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] रामदासी कवी. वऱ्हाड प्रांतातील अकोला जिल्ह्यातील कारंजा येथे दोन रामदासी मठ आहेत. त्यांपैकी एक बाळकरामांच्या परंपरेतील आहे. हे बाळकराम समर्थांचे शिष्य. ह्यांचे उपनाव कळवे. यजुर्वेदी माध्यंदिनशाखी देशस्थ ब्राह्मण. बल्लाळ > केशव > गणेशप्रसादपुत्र > बाळकराम अशी ह्यांची पितृपरंपरा आहे. कुलदैवत तुळजापूरची भवानी. हे एके ठिकाणी फार काळ वास्तव्य करून राहिल्याचे दिसत नाही. आष्टी, शिंदखेड, पुसगाव, त्रिपुरापूर अशी गावे हिंडत अखेर ते कारंजा येथे मठ बांधून स्थायिक झाले. बाळकरामांचे पुत्र रोकडाराम हेच त्यांचे शिष्य. ते मात्र कायमचे कारंजास राहिल्याने ह्या मठाची गुरु-शिष्यपरंपरा उपलब्ध झाली आहे. बाळकरामांचा जन्ममृत्युकाल किंवा इतर माहिती उपलब्ध नाही.

बाळकरामांची विपुल स्फुट कविता कारंजा येथील मठात शं. श्री.

देव ह्यांना सापडली. त्यांत *प्रल्हाद, वामन, कबीर* ह्यांची चरित्रे, *गोपीचंद, हरिश्चंद्र* इत्यादी आख्याने, *हनुमंतभेटी, दामाजीची रसद, चेंडुफळी, गजगौरीव्रत, शंकरविवाह, पार्वतीस्वयंवर, एकादशी-श्लोक, कथाकल्पकेदार* ह्या विषयांवरील स्फुट रचना ह्यांचा समावेश होतो. रचना बहुतांशी श्लोकबद्ध आहे. ह्या रचनेव्यतिरिक्त अभंग, आरत्या, पदे, श्लोक अशी कविताही त्यात बरीच आहे. ह्यांची कविता साधी व सुबोध आहे. कवितेत रामदासांविषयीचे आदरयुक्त उल्लेख जागोजागी आढळतात. ' मूळरूपीं रंगलें मन माझें रे। दिसे चैतन्यघन सदोदित रे। चंचळाचें न दिसे कांहीं भान रे । निश्चळासी पाहतो आहे कोण रे ॥ ', ' मनीं कल्पना राम होऊनि गेली। गुरूच्या पदीं वासना लुब्ध जाली। तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥ ' ह्या पंक्तीवरून बाळकरामांच्या कवितेच्या स्वरूपाची कल्पना करता येईल. ह्यांची सवाया, श्लोक अशी हिंदी रचनासुद्धा आहे. ही सर्व रचना अजून अप्रकाशित आहे.

**रचना : अमु.** – १. अंगदशिष्टाई; श्लोक, ओव्या, सवाया, पदे इ. मिळून पद्यसंख्या ३००; २. एकादशी; श्लोक ११२; ३. कथाकल्पकेदार; श्लोक १०८; ४. कबीरचरित्र; ओ. सं. ५९; ५. गजगौरीव्रत; ग्रं. सं. ५०; ६. गोपीचंद-आख्यान; प्रसंग ६; पद्ये २१६; ७. चंद्रहास्यकथा; ओवीबद्ध; अपूर्ण; ८. चेंडुफळी; श्लोक ५५; ९. दामाजीची रसद; १२ कडवी; १०. पार्वती-लक्ष्मी संवाद; श्लोक ३७; ११. पार्वतीस्वयंवर; श्लोक १००; १२. प्रल्हादचरित्र; श्लोक १५५; १३. बीरडे द्रौपदीचे; श्लोक ३५; १४. रेणुकामाहात्म्य; श्लोक ९४; १५. वामन-चरित्र; श्लोक सुमारे १००; १६. शंकरविवाह; ओ. सं. ८२; १७. श्रीसद्गुरूपदेश; श्लोक ५४; १८. सवाया १५१; १९. सुदाम-रत्र; चश्लोक ५८; २०. हनुमंतभेटी; ओव्या, श्लोक, सवाया, पदे मिळून सुमारे ३००; २१. हरिश्चंद्र-आख्यान; श्लोक ७२; २२. पदसंग्रह ७०; २३. स्फुट आरत्या, अभंग, श्लोक इ. प्रा. स्थ. सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पांगारकर, ल. रा. : बाळकराम; मवाइ., खं. ३; मुंबई, १९३९; पृ. ७४१–७४७.

**बाळकृष्ण–१** [का. अनु.] रामदासी कवी. समर्थशिष्य दिनकर गोसावींचे बंधू शामराज ह्यांचे बाळकृष्ण गोसावी हे पुत्र व ह्यांचे पुत्र मेघश्याम. हे दोघेही पितापुत्र काव्यरचना करीत असत. ह्यांनी *सीताविलाप* नावाचे एक प्रकरण लिहिले आहे. पदपदांतरेही पुष्कळ रचलेली आहेत. ही रचना धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिर संग्रह (हस्त. सू., खं. २) व तंजावर येथील सरस्वती महाल ग्रंथसंग्रह (हस्त. यादी, क्र. ३) ह्या ठिकाणी उपलब्ध.

**बाळकृष्ण–२** [का. अनु.] कवी. गुरू : विश्वनाथ. संस्कृतग्रंथाधारे ह्या बाळकृष्णाने दोन प्रकरणे प्राकृतात उतरल्याचा उल्लेख सापडतो. (सवामं. बा. क्र. १८३). ती दोन प्रकरणे म्हणजे *महावाक्यार्थसार* व *वाक्यार्थभवसार* अशी आहेत (संककासू., पृ. ६७). रचना श्लोकबद्ध असून तीमध्ये वेदान्ततत्त्वज्ञानाचे निरूपण आले आहे. *वाक्यार्थभवसार* काव्याच्या अखेरीस कवीने आपला व गुरू विश्वनाथ ह्यांचा उल्लेख केला आहे.

**रचना : मु.** – १. महावाक्यार्थसार; कास.; २. वाक्यार्थभवसार; ग्रं. सं. २१; संपा. ओक, वा. दा.; अकलकामा., भा. ३, पृ. १२७–१२९.

**० बाळकृष्ण अण्णा** – पहा **बाळकृष्ण हरिहर पटवर्धन (आंबेकर).**

**बाळकृष्ण कवी** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना : मु.** – दत्तात्रेयाची आरती; मआ., पृ. ३६१; **अमु.** – १. रुक्मिणीस्वयंवर; अ. २० (श्लोकबद्ध); २. दत्तात्रेय स्तोत्र; ३. पदे, अभंग, आरत्या इ.; समग्रंककासू., पृ. १७.

**बाळकृष्णदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाळकृष्णनाथ राजुरकर** [अंदाजे श. १७५९ / इ. स. १८३७] संतकवी. स्वतःच्याच ग्रंथातून ह्यांनी आपली वैयक्तिक माहिती दिली आहे. ती अशी : कुलस्वामी मच्छिंद्र, माता-पिता राधा-वामन, गुरू देवनाथ, कृपागुरू पूर्णदास. *केदारकल्प* ग्रंथाच्या शेवटी आपले नाव, गाव, कुलपरंपरा ह्यांचा सविस्तर परिचय हे करून देतात, त्यावरून ह्यांचे उपनाव राजुरकर असल्याचे समजते. " विदर्भदेशी जलग्रामी । आश्वलायन राजुर्करोपनामी । श्रीराधा-वामनाच्या संगमी । बाळकृष्ण नामी उद्भव माझा ॥ १४ : ७९ ॥ " असा *केदारकल्पात* निर्देश येतो. पुढे ८१ क्रमांकाच्या ओवीत जळगाव-जामोद असा वास्तव्य-स्थळाचा उल्लेख परत केला आहे. ह्याच ठिकाणी शेवटी कवीने आपली गुरुपरंपरा दिली आहे ती अशी : दत्त > चंद्रबोध > जनार्दन > एका > नित्यानंद > कृष्णानंद > विसोबानंद > मुरारनाथ > रंगनाथ > गोपाळनाथ > गोविंदनाथ > देवनाथ > बाळकृष्णनाथ. वरील परंपरेतील गोपाळनाथ हे त्रिपुटीत व देवनाथ ग्वाल्हेरीस समाधिस्थ झाल्याची माहितीही दिलेली आहे.

*मार्तंडविजय* ग्रंथात मच्छिंद्रनाथ, गोरक्षनाथ, देवनाथ, मुकुंदराज ह्यांच्याबरोबर पद्मनाभ, माधव, कवेश्वर इत्यादिकांना वंदन केले आहे. उज्जयिनी येथील प्राच्य विद्या ग्रंथालयात बाळकृष्णनाथ राजुरकर ह्यांच्या नावावरील *उद्योगपर्वा*ची एक प्रत सापडते (ओ. अंदाजे ९०००). त्यामध्ये सर्व अध्यायांतून पद्मनाभ अशी कविनाममुद्रा वापरली आहे. हा पद्मनाभ व बाळकृष्ण एकच की भिन्न ह्याबद्दल अभ्यासकांत मतभेद आहेत. ह्या पद्मनाभाचा परिचय 'एक उपेक्षित महाभारतकार पद्मनाभ ऊर्फ बाळकृष्णनाथ राजुरकर' ह्या नावाने डॉ. व. वि. पारखे ह्यांनी करून दिला आहे (मसाप., ऑक्टो. १९६१, पृ. ३९–४०). ह्या पोथीतील ९० व्या अध्यायात आढळणाऱ्या 'विदर्भदेशी जलग्रामी' इत्यादी *केदारकल्पा*तील कविपरिचयाशी सदृश अशा ओव्या आणि 'कवी बाळकृष्णाची वाणी। जे व्यास पंथे जाले धारणी' ह्या बाळकृष्णांच्या ग्रंथातील वाक्यरचनेशी-तंतोतंत जुळणारी *उद्योगपर्वा*तील 'कवि पद्मनाभाची वाणी । जे व्यास-मार्गे चमके धरणी।' ही शब्दावली, ह्यावरून पद्मनाभ व बाळकृष्णनाथ ह्यांना डॉ. पारखे ह्यांनी एकच मानले आहे. डॉ. बा. ना. मुंडी ह्यांच्या मते *मार्तंडविजयात* पद्मनाभांना केलेले नमन सोडल्यास बाळकृष्ण-नाथांच्या ग्रंथामधून पद्मनाभ ह्या व्यक्तीशी दूरान्वयानेही संबंध येत नाही. *उद्योगपर्वा*तील पद्मनाभ ही कविनाममुद्रा घोटाळ्यात पाडणारी आहे. जोपर्यंत ह्यासंबंधात खात्रीचा पुरावा उपलब्ध होत नाही तोपर्यंत पद्मनाभ आणि बाळकृष्णनाथ ह्या दोन भिन्न व्यक्ती आहेत असेच मानावे लागेल.

बाळकृष्णनाथ हे उत्तम कीर्तनकार होते. कृपागुरू पूर्णदासांचा उल्लेख आपल्या तीनही ग्रंथांत बाळकृष्णांनी वारंवार मोठ्या आदराने केला आहे. पण हे पूर्णदास कोण, कोठले ह्याचा नीट शोध लागलेला नाही. बाळकृष्णनाथांचे शेवटचे दिवस ग्वाल्हेरला दौलतराव शिंद्यांचे पुत्र जनकोजी ह्यांच्या व नंतर जयाजींच्या कारकीर्दीत गेले. ह्यांचे एक राममंदिर ग्वाल्हेरास आहे. ह्यांची समाधी ग्वाल्हेरासच आहे.

कवीच्या काव्यरचनेपैकी *मार्तंडविजय* (अ. १–१४; अपूर्ण), *कार्तिकमाहात्म्य* (पृ. सं. ७९; अपूर्ण) व *केदारकल्प* (अ. १–१४) असे तीन हस्तलिखित ग्रंथ डॉ. बा. ना. मुंडी ह्यांच्या संग्रहात आहेत. *केदारकल्प* ग्रंथ *नंदीपुराणां*तर्गत कथेवर आधारित असून श. १७५९ (इ. स. १८३७) कीलक संवत्सरी, वैशाख मासी, ग्वाल्हेर मुक्कामी समाप्त झाल्याची ग्रंथात नोंद केली आहे. ग्रंथाचे लेखन देवनाथांच्या कृपेने पूर्ण झाल्याचे सांगून तो त्यांनी केदारेश्वरास अर्पण केला आहे. वरील

रचनेखेरीज *सिद्धलीलार्णव* ग्रंथ, स्फुट कविता, आख्यानांची अनेक बाडे व जनकोजी शिंदे ह्यांना केलेला *नीतिबोध* इत्यादी ह्या कवीचे साहित्य उपलब्ध असल्याची माहिती कृ. गं. कवचाळे ह्यांनी त्यांच्या *मध्य-भारतीय मराठी वाङ्मय* (प्राचीन पद्य) ह्या पुस्तकात दिली आहे (पृ. ४३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १ पारखे, व. वि. : एक उपेक्षित मराठी महाभारतकार : पद्मनाभ ऊर्फ बाळकृष्णनाथ; मसाप., ऑक्टो. १९६१; पृ. ३९–४०. २. पारखे, व. वि. : बाळकृष्णनाथकृत उद्योगपर्व (१); मसंप., जुलै १९६९; पृ. ३०२–३१०. ३. मुंडी बा. ना. : पद्मनाभ तथा बाळकृष्णनाथ कृत उद्योगपर्वासंबंधी; मसप., जाने. १९६८; पृ. २१–२७. ४. मुंडी, बा. ना. : बाळकृष्ण-नाथकृत उद्योगपर्व (२); मुंडींचे पारखे ह्यांना उत्तर; मसंप., जुलै, १९६९; पृ. ३०२–३१०. ५. मुंडी, बा. ना. : विदर्भातील एक संत कवी : श्री बाळकृष्ण राजुरकर; युगवाणी, ऑक्टो.–डिसें. १९६७; पृ. २१७–२२१.

**बाळकृष्ण निजानंद** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – नाममहिमापर पद; तंसम. हस्त. सू., यादी, क्र. ३.

**बाळकृष्णराव हरिहर पटवर्धन (आंबेकर) / ० बाळकृष्ण अण्णा** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] बखरकार. बखरकाराचा जन्म पटवर्धन कुलात झाला. ह्यांच्या घराण्याचे मूळपुरुष हरभट पटवर्धन. बाळकृष्णरावांनी लिहिलेल्या बखरीत हरभटांपासून पुढील वंशावळ दिली आहे. बखरकार आपला उल्लेख 'बाळकृष्ण अण्णा' असा करतो. प्रस्तुत हकीकतीस संपादकांनी (वासुदेवशास्त्री खरे) *हरिवंशाची बखर अथवा पटवर्धन सरदारांच्या हकीकती* असे नाव दिले आहे.

ही बखर म्हणजे पटवर्धन घराण्याचा इतिहास होय. ह्या बखरीचे लेखन 'शके १७६४ (इ. स. १८४२), शुभकृन्नामसंवत्सरे, वैशाख शु. ५, इंदुवारी, मु. आंबेनजीक श्रीक्षेत्र पंढरपूर' येथे झाले. बखरीत पटवर्धन घराण्यातील कर्तबगार पुरुष पुरुषोत्तम कृष्ण ऊर्फ दाजी ह्यांची विस्तृत हकीकत येते. हे पेशव्यांचे अत्यंत विश्वासू आणि निष्ठावंत सेवक होते. त्यांचा ज्या ज्या व्यक्तींशी त्याचप्रमाणे राजकारणाशी जो जो संबंध आला त्या निमित्ताने पेशवाईच्या इतिहासाच्या एका विशिष्ट भागाचे ह्या बखरीत दर्शन घडते. बखर ऐकीव व परंपरागत हकीकतीवरून लिहिलेली असली तरी तिचा लेखक चांगल्यापैकी माहितगार आहे. त्यामुळे इतिहासकार व अभ्यासक ह्या ग्रंथातील माहिती विश्वसनीय मानतात.

वर्णनाचा सरळपणा, उठावदार व्यक्तिचित्रण आणि वर्ण्य विषयाचे जिव्हाळ्याने केलेले आकलन हे ह्या बखरीचे वाङ्मयीन गुणविशेष ठरतात.

द. ग. गोडसे

**रचना :** मु. – हरिवंशाची बखर अथवा पटवर्धन सरदारांच्या हकीकती; संपा. खरे, वासुदेवशास्त्री; पुणे, १९०९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ग्रामोपाध्ये, गं. ब. : हरिवंशाची बखर; मवाइ., खं. ३; संपा. जोग, रा. श्री.; पुणे, १९७३; पृ. ५४२–५४४. २. हेरवाडकर, र. वि. : हरिवंशाची बखर; मब.; प्रआ. : मुंबई, १९५७; पृ. ८० व १८६–१८९.

**बाळकृष्ण विठ्ठल** [का. अनु.] आरतीकार.

**रचना :** मु. – १. श्रीकृष्णावरील आरती; २. दत्ताची आरती; मआ., पृ. ३५१, ३११.

**बाळकृष्ण स्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; वेचले येथील शक १८२३ त उतरलेल्या पदांच्या बाडांत संग्रहित; भाइसंमं.

**बाळकृष्णाचा वडा दास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाळ केशव** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर** [इ. स. १८१२ – १७ मे १८४६] अव्वल इंग्रजी कालखंडातील पहिले मराठी वृत्तपत्रकार, निबंधकार, भाषान्तरकर्ते, गणितज्ञ, प्राध्यापक व एक शिक्षणतज्ज्ञ. ह्यांचा जन्म पोंभुर्ले (जि. रत्नागिरी) ह्या गावी इ. स. १८१२ साली झाला. जांभेकर हे ऋग्वेदी, कौशिकगोत्री, कऱ्हाडे ब्राह्मण. गोमंतकातील म्हाडदोळची म्हाळसा हे ह्यांचे कुलदैवत. आईचे नाव सगुणा. ह्यांचे वडील गंगाधरशास्त्री हे एक व्युत्पन्न पुराणिक होते. ते भिक्षुकीचा व्यवसाय करीत. मुंबईचे सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे ह्यांच्या सांगण्यावरून त्यांनी आपल्या मुलास त्यांजकडे इंग्रजी शिकण्यासाठी (बहुधा इ. स. १८२५ च्या अखेरीस) पाठविले. नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या इंग्रजी शाळेत बाळशास्त्र्यांचा इ. स. १८२६ मध्ये प्रवेश झाला असावा. चार-पाच वर्षांत तेथील सर्व अभ्यासक्रम ह्यांनी पूर्ण केला. बापूशास्त्री शुक्ल ह्यांच्या पाठशाळेत हे संस्कृत शिकत असत. संस्कृत, इंग्रजी व मराठी अशा तीनही भाषांचे ह्यांनी चांगले अध्ययन केले. गणितविषय व इतिहास ह्यांतही त्यांनी प्रावीण्य मिळविले. पण त्यांना शास्त्रीय विषयांचीच विशेषेकरून आवड होती. ज्योतिषशास्त्र, पदार्थविज्ञान, भूगर्भशास्त्र, रसायनशास्त्र, मानसशास्त्र अशा शास्त्रांवर त्यांची विशेष भक्ती होती. गणितशास्त्रात फार निष्णात म्हणून १८२९ साली एल्फिन्स्टन विद्यालयात गणितशास्त्राचे अध्यापक प्रा. ऑलिबार ह्यांच्या हाताखाली उपाध्यापकाची जागा ह्यांना देण्यात आली. वयाच्या विशीतच इ. स. १८३० मध्ये बापू छत्र्यांच्या जागेवर नेटिव्ह सेक्रेटरी म्हणून हे काम पाहू लागले. दरम्यान अक्कलकोटच्या बाल-महाराजांचे शिक्षक म्हणून सरकारने ह्यांस अक्कलकोटला पाठविले. हे गुरुत्व ह्यांनी २० महिने केले. पुढे १८३४ च्या नोव्हेंबरमध्ये 'एल्फिन्स्टन स्कूल' मध्ये असिस्टंट प्रोफेसर म्हणून ह्यांची नेमणूक झाली. मार्च १८३५ मध्ये प्रा. ऑलिबार हे गणित आणि विज्ञानशाखेचे मुख्य अध्यापक म्हणून कामावर रुजू झाले. त्यांच्याजवळ पाश्चात्त्य गणित-ज्योतिषादी शास्त्रांचा दृढ व्यासंग करून बाळशास्त्र्यांनी त्यांत लवकरच उत्कृष्ट प्रावीण्य संपादन केले.

मराठी, संस्कृत, इंग्रजी ह्यांप्रमाणे बंगाली, गुजराती, कन्नड, तेलुगू, फारसी, फ्रेंच, लॅटिन इत्यादी भाषाही त्यांनी सहज आत्मसात केल्या होत्या. प्राचीन लिप्यांचाही त्यांचा अभ्यास सूक्ष्म होता. त्याचा उपयोग, कोकणप्रांतातील काही शिलालेख व ताम्रपट ह्यांचा शोध करून त्यांचे वाचन व लेखन ह्याकरिता त्यांनी केला. ह्या विषयाच्या संदर्भात त्यांनी लिहिलेले इंग्रजी शोधनिबंध 'बॉम्बे रॉयल एशियाटिक सोसायटी'च्या नियतकालिकात प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांपैकी खारेपाटण (जि. रत्नागिरी) येथे सापडलेल्या ब्राह्मी लिपीतील ताम्रपटासंबंधीचा ह्यांचा निबंध बराच गाजला. कोरीव लेखांचा अभ्यास व तद्विषयक ऐतिहासिक विवेचने पद्धतशीर लिहिण्याची शिस्त लावून घेऊन ती इंग्रजीत प्रसिद्ध करणारे बाळशास्त्री हे पहिलेच महाराष्ट्रीय विद्वान होते.

पुढे प्रो. ऑलिबार व हॉकिन्स ह्यांनी मुंबईच्या कोटात (फोर्टमध्ये) एक स्वतंत्र ज्यूनिअर कॉलेज स्कूल सुरू केले व बाळशास्त्र्यांना त्याचे प्रमुख नेमले. बाळ गंगाधरशास्त्री हे अष्टपैलू विद्वान असल्याने महाविद्यालयात वाङ्मय व विज्ञान ह्या दोनही शाखांतील विषय शिकवीत. पुढे १८४२ साली प्रो. ऑलिबार आजारी पडून विलायतेस रजेवर गेले असता त्या जागी ॲक्टिंग प्रोफेसर म्हणून बाळशास्त्र्यांचीच नेमणूक झाली. ह्यानंतर सरकारने १८४५ त नॉर्मल स्कूल स्थापन केले. त्याचे हे अध्यक्ष झाले. ह्यांच्या विद्यार्थिवर्गात दादाभाई नौरोजी, केरूनाना छत्रे ह्यांसारखी, पुढील काळात प्रसिद्धीस आलेली, मंडळी होती. बाळशास्त्र्यांच्या शिकविण्याच्या हातोटीचे दादा-

भाई नौरोजी ह्यांनी आपल्या वयाच्या सत्तर वर्षांनंतरही स्मरण केलेले आहे. ते म्हणतात की, 'ज्ञान व बुद्धी असलेल्या सर्वच शिक्षकांत अशी हातोटी नसते. त्याहूनही विशेष म्हणजे त्यांचे सौजन्य व विद्यार्थिवर्गाबद्दलचा आपलेपणा.

ज्ञानप्रसार आणि लोकसुधारणेचे प्रमुख साधन वृत्तपत्र होय, हे जाणून भाऊ महाजनांच्या सहकार्याने त्यांनी १८३२ साली *दर्पण* हे पत्र सुरू केले. नव्या ज्ञानाच्या प्रचंड शक्तीचा साक्षात्कार आणि त्याच्या प्रचारासाठी अविरतपणे चाललेला प्रयत्न, हा बाळशास्त्र्यांच्या जीवनाचा स्थायीभाव ठरला. हे ज्ञान आत्मसात करण्याची, तसेच त्याचे इतरांस दान करण्याची धडपड आणि तळमळ ह्यांच्या जीवनकार्यात व लेखनात प्रतिबिंबित झालेली दिसते. बाळशास्त्र्यांचे वैयक्तिक गुण पाहून त्यांस मुंबईचे जे. पी. नेमून सरकारने त्यांचा बहुमान केला. चौरस आणि अष्टपैलू व्यक्तित्वाचा हा पुरुष १७ मे १८४६ रोजी वयाच्या अवघ्या ३५ व्या वर्षी आपले ज्ञानप्रसाराचे कार्य अर्धवट टाकून ह्या लोकातून निघून गेला. ह्यांच्या मृत्यूनंतर सर आर्स्किन पेरी ह्या मुंबईच्या न्यायालयाच्या मुख्य न्यायाधिशाने जे उद्गार काढले आहेत, ते पाहिल्यास बाळशास्त्र्यांचे महाराष्ट्रीय समाजात स्थान कोणते होते हे चांगलेच लक्षात येते. ते म्हणतात : 'बाळशास्त्र्यांच्या मृत्यूमुळें पश्चिम हिंदुस्थानची हानि झाली आहे, तशी हानि युरोपीय वा हिंदी दुसऱ्या कोणत्याही माणसाच्या मृत्यूनें झाली नसती.'

बाळशास्त्र्यांचे ग्रंथकर्तृत्व हे प्रामुख्याने त्यांच्या शिक्षणक्षेत्रातील कार्याशी संबंधित आहे. *नीतिकथा* (आ. ३ री, मुंबई, १८३८), *सारसंग्रह* (आ. २ री, मुंबई, १८३७), *इंग्लंड देशाची बखर, भा. १, २* (पुणे, १८३२ व मुंबई, १८३४), *भूगोलविद्या* (मुंबई, १८३६), *गणितभाग* (मुंबई, १८३६) ही पाठ्यपुस्तकस्वरूपाची रचना इ. स. १८३६ पूर्वी त्यांजकडून झाली. नंतर त्यांनी *बालव्याकरणाची* (मुंबई, १८३८), रचना केली. ह्याशिवाय *भूगोलविद्येची मूलतत्त्वे* (मुंबई, १८३६), *मरे याच्या इंग्रजी व्याकरणाचा संक्षेप, शब्दसिद्धिनिबंध* ही पुस्तके रचण्यास ह्यांनी इतरांस साहाय्य केले. त्यांनी *ज्योतिर्गणितातील समीकरणाविषयींची टिपणे, शून्यलब्धि गणित व मूलपरिणति गणित* हे ग्रंथ रचले. *हिंदुस्थानचा इतिहास* (एल्फिन्स्टनच्या नवीन ग्रंथावरून) (आ. १ ली, मुंबई, १८४६) व इतर अनेक ग्रंथांधारे *हिंदुस्थानातील इंग्लिशांच्या राज्याचा इतिहास* (मुंबई, १८४९) असे दोन इतिहासग्रंथ व *मानसशक्तीविषयींचे शोध* (अपूर्ण) हा मानसशास्त्रावरील ग्रंथ डॉ. अॅबरक्रॉंबीच्या प्रसिद्ध ग्रंथाधारे त्यांनी लिहिला. ह्याशिवाय ह्यांनी एक *इंग्रजी-मराठी धातुकोश* पूर्ण केला होता. तसेच शून्यलब्धिमूलपरिणति गणितावर एक विस्तृत ग्रंथ अर्धाअधिक रचला होता. खेदाची गोष्ट ही की, हे दोनही ग्रंथ आज उपलब्ध नाहीत. पाठभेदयुक्त *ज्ञानेश्वरीचे* इ. स. १८४५ त त्यांनी केलेले प्रकाशन हे ह्या मौलिक काव्यग्रंथाचे आद्य मुद्रित प्रकाशन होय.

*नीतिकथा* हा ग्रंथ पूर्वी बंगाली भाषेत होता. त्याचा प्रथम भाग *बोधकथा* ह्या नावाने मुंबईत छापला होता. दुसरा भाग *नीतिकथा* ह्या नावाने महाराष्ट्रभाषेत भाषान्तर करून छापला. शाळेत शिकणाऱ्या मुलास नीतिज्ञान व्हावे असा ह्या पुस्तकामागील उद्देश आहे. बंगालीपेक्षा कितीतरी अधिक कथा ह्यात आलेल्या आहेत.

शिक्षणाच्या प्रसारासाठी ब्रिटिश सरकारने मुंबई इलाख्यात ठिकठिकाणी अनेक मराठी शाळा काढल्या. शाळांतील लहान मुलांस प्रथम व्याकरणातील मुख्य विषयांचे सहज ज्ञान व्हावे या बुद्धीने *बालव्याकरण* मुलांस नजर केले आहे. साहा सात वर्षांच्या मुलासही कळावे म्हणून हे सुलभ शब्दांनी लिहिले आहे, असे प्रस्तावनेत ग्रंथलेखक म्हणतो.

मुलांना सर्व शास्त्रांचे मूळ स्वरूपाचे ज्ञान व्हावे, पुढे ती शिकण्यास त्यांना प्रेरणा मिळावी ह्या हेतूने विविध विद्या व कला ह्यांचे स्वरूप संक्षेपाने वर्णन करणारा *सारसंग्रह* ग्रंथ बाळशास्त्र्यांनी केला.

*भूगोलविद्या* ग्रंथ मराठी शाळेत शिकणाऱ्या दहा ते बारा वर्षांच्या मुलास भूगोलविद्येच्या मूळ तत्वांचे ज्ञान व्हावे म्हणून प्रश्नोत्तररूपाने संक्षेपाने लिहिला आहे.

पंतोजीने शाळेतील मुलांस शिकविताना कोणते धोरण ठेवावे व कशा तऱ्हेने शिकवावे ह्याकरिता *शिक्षारीती* नावाचे एक पुस्तक लिहिले (मुंबई १८३६).

*हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास* (मुसलमानी अंमल) शास्त्रीबोवांनी लिहिला होता व तो शाळांच्या अभ्यासक्रमात दाखल झाला होता.

अवघ्या ३४ ते ३५ वर्षांच्या अल्पायुषी अशा आयुर्मर्यादेत अनेक जबाबदारीची कामे सांभाळून अर्वाचीन मराठी गद्याच्या आरंभकालात केवढा व्यापक आणि प्रचंड उद्योग त्यांनी केला हे पाहिले की त्यांच्या अष्टपैलू प्रतिभेचा व लोकोपकारक जीवननिष्ठेचा चांगलाच प्रत्यय येतो.

इ. स. १८३२ त *दर्पण* हे वृत्तपत्र त्यांनी इंग्रजी व मराठी भाषांत सुरू केले. मुंबई इलाख्यातील हे पहिले देशी वर्तमानपत्र. वृत्तपत्र हे व्यवसाय म्हणून चालविण्यापेक्षा व्रत म्हणून चालविण्याचा त्यांचा बाणा होता. तत्कालीन एकंदर परिस्थितीत वृत्तपत्राचा प्रसार करण्यास ह्यांना फार कष्ट पडले. पण विशुद्ध ज्ञानप्रसाराच्या कल्पनेने ते भारावून गेले होते. *दर्पणा*चा उद्देश ते पुढील शब्दांत सांगतात :

'एतद्देशीय लोकांत विलायतेंतील विद्यांचा अभ्यास व्हावा आणि या देशाची समृद्धि व येथील लोकांचें कल्याण याविषयीं स्वतंत्रतेनें व उघड रीतीनें विचार करण्यास स्थळ व्हावें, ह्या हेतूनें दर्पणाचा जन्म झाला.' ह्यातील इंग्रजी मजकूर स्वत: शास्त्रीबुवा लिहीत व त्यावरून मराठी भाषान्तर भाऊ महाजन करीत असत. मराठी वृत्तपत्रसृष्टीच्या जनकत्वाचा मान बाळशास्त्र्यांकडे जातो. पुढे १८४० च्या मे महिन्यात शास्त्रीय विषयांस वाहिलेले *दिग्दर्शन* नावाचे एक मासिक शास्त्रीबोवांच्या प्रोत्साहनाने मुंबईत सुरू झाले. मराठी भाषेतील हे पहिलेच मासिक. ह्याचे जनक व संपादक आचार्य बाळशास्त्री हे होते अशी जी माहिती 'जांभेकर गौरव ग्रंथा'त दिली आहे (संपा. ग. गं. जांभेकर), ती मात्र बरोबर नाही. ह्या मासिकाचे संपादक शास्त्रीबोवांचे एक विद्याव्यासंगी स्नेही राघोबा जनार्दन [⇨ २] ह्या नावाचे गृहस्थ होते. आधुनिक पाश्चात्त्य ज्ञानाशी स्वभाषीयांचा परिचय व्हावा व त्यांना नवी दृष्टी प्राप्त व्हावी ह्या हेतूने १८३९ च्या जानेवारीच्या १० तारखेच्या *दर्पण* साप्ताहिकात *दिग्दर्शन* नावाचे मासिक सुरू करण्याची योजना ह्यांनी प्रसिद्ध केली होती. ह्या मासिकासाठी बाळशास्त्री, भाऊ महाजन, हरि केशवजी, प्रो. अर्लिबार हे विविध विषयांवर लेख तयार करून देत. पण हे बोधपर व ज्ञानपर लेखन फारसे लोकप्रिय झालेले दिसत नाही. लोकांत अशा प्रकारच्या लेखनाविषयी अभिरुची निर्माण व्हावी असा बाळशास्त्री आदी मंडळीचा जो उच्च हेतू त्यापाठीमागे दिसतो तो उल्लेखनीय आहे. शास्त्रीबोवांची भाषासरणी सरळ, स्वाभाविक व सुबोध अशी आहे. त्यांची टीका विचारपूर्ण व समतोल असे. कोणत्याही विषयाचे विवेचन ते सखोल व मार्मिकपणे करीत.

विशुद्ध साहित्यविषयक दृष्टिकोनातून विचार केल्यास बाळशास्त्र्यांची वाङ्मयीन कामगिरी तितकीशी भरीव स्वरूपाची नाही, हे मान्य करावे लागते. तरीदेखील त्यांचा विशिष्ट कालखंड व तत्कालीन परिस्थिती ह्यांचा विचार, त्यांचे कार्य लक्षात घेताना, महत्त्वाचा ठरतो. एतद्देशीय विद्वान आणि लोकमान्य सार्वजनिक पुढारी म्हणून एतद्देशीयांसंबंधाने हरएक प्रश्नात सरकार बाळशास्त्र्यांचे मत अधिकृत मानत असे, ही एकच गोष्ट नजरेपुढे आणल्यास त्यांच्या प्रतिभेने जे

कार्य केले ते निश्चितपणे गौरवास्पदच आहे असे म्हणता येते.

११ मे १८८५ च्या *इंदुप्रकाश* वर्तमानपत्रात 'पोलिटिकल ऋषी ह्या टोपणनावाने 'सामाजिक व धार्मिक सुधारणा' ह्या विषयावर जो एक इंग्रजी लेख प्रसिद्ध झाला आहे, त्यामध्ये लेखकाने 'बाळशास्त्र्यांच्या निधनामुळे बुद्धिवादी व तारतम्ययुक्त अशा धार्मिक व सामाजिक सुधारणेच्या कार्याला जो धक्का बसला त्यातून त्याने पुन्हा कधीही आपले डोके वर काढले नाही' असे उद्गार काढले आहेत. शास्त्रीबोवांच्या सार्वजनिक कार्याचे महत्त्व ह्यावरून लक्षात येण्यासारखे आहे. त्यांनी 'शास्त्रज्ञान, भाषाज्ञान व लोकज्ञान अशी तिन्ही अंगे शक्य तितकी आत्मसात केली व आपल्या ज्ञानाचा व गुणांचा उपयोग समाजाच्या सर्वांगीण प्रगतीस व्हावा असा हव्यास धरला' हेच त्यांचे व्यक्तिवैशिष्ट्य.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. खानोलकर, गं. दे. : जांभेकर बाळशास्त्री; अमवा., खं. १; मुंबई, १९२८; पृ. २८०–२८४; राघोबा जनार्दन; अमवा., खं. ६; पुणे, १९६३; पृ. ७१–८१. २. जांभेकर, गणेश गंगाधर : आचार्य बाळशास्त्री जांभेकर; शताब्दी स्मारक ग्रंथ, खं. १, २, ३; पुणे, १९५०. ३. जावडेकर, शं. द. : महाराष्ट्रातील आद्य सुधारक; ध्रुव मासिक, ऑक्टो. १९३८; पृ. ४५५–४५८, ४६९. ४. जोग, रा. श्री. (संपा.) : मवाइ., खं. ४; पुणे, १९६५; पृ. ३७–३९, १८४. ५. देव, बा. ना. : कै. वा. बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांचे चरित्र; मुंबई, १८९२. ६. पोतदार, द. वा. : मराठी गद्याचा इंग्रजी अवतार; पुणे, १९२२. ७. शेजवलकर, त्र्यं. श. : आचार्य बाळशास्त्री जांभेकर ग्रंथाचे परीक्षण, शेजवलकरांचे लेख, पुस्तक २ रे; मुंबई, १९५९; पृ. १०७–१२१. ८. सरदार, गं. बा.; अर्वाचीन मराठी गद्य वाङ्मयाची पूर्वपीठिका; पुणे, १९३७.

**बाळदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. अनंतव्रत; २. ताटिकावधचूर्णिका; गोसावीनंदन, आनंदतनय व बाळदास मिळून लिहिलेले; ३. पद्मनाभचरित्र; श्लो. ८१; ४. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाळंभट ऊर्फ यादव काजळे** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. नगरचे राहणारे. मोरोपंतांच्या काव्याची ह्यांना आवड होती. ह्यांनी आर्यावृत्तात थोडीफार काव्यरचना केलेली आहे. मोरोपंतांना ह्यांनी पाठवलेली पत्रे उपलब्ध आहेत (मसा., आ. ५, पृ. ९५२).

**बाळशास्त्री घगवे / ० घगवे, बाळशास्त्री** [इ. स. १७९६–१८३२] कोशकार व कवी. "ते संस्कृतामध्यें मोठे व्युत्पन्न आणि कवी होते. त्यांणीं मुख्यत्वें काव्य-नाटकांचा फार अभ्यास केला होता. ते सन १८२४ त मुंबईचे शिक्षामंडळीचे चाकरीस राहिले आणि त्या मंडळीसाठीं त्यांणीं दुसरे पंडितांचे साहाय्यानें मराठी भाषेचा कोश केला. मरायाचे पूर्वी त्यांणीं हट्टणसाहेबाचा भूमितीचा ग्रंथ संस्कृत श्लोकांत करावयास आरंभिला होता आणि तद्देशीय लोकांचे विद्याभ्यासाचे कामांत त्यांचे बुद्धीपासून व मदतीपासून फार बरें होईल, आसी आशा होती. ते ३६ वे वर्षीं मृत्यु पावले. त्यांचेबरोबर एतद्देशीय लोकांचे विद्याभ्यासाचें एक मुख्य भूषण आणि आश्रय गेला." (*दर्पण*, ता. २२ जून १८३२).

"ते संस्कृतांत प्रवीण असून, इतर संस्कृतज्ञांप्रमाणे प्राकृत भाषेला तुच्छ मानीत नसत" व "यांचीं तर स्वतःचीं प्राकृत कवनें मोठ्या मान्यतेचीं आहेत" असे दादोबा पांडुरंग ह्यांनी आपल्या *व्याकरणाच्या* (१८३६) प्रस्तावनेत म्हटले आहे.

घगवेशास्त्री मृत्युसमयी पुणे येथे कॅप्टन जॉर्ज जर्व्हिस ह्यांच्या नेतृत्वाखाली चाललेल्या सरकारी शिल्पशाळेत मुख्य शास्त्री म्हणून काम करीत असत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : कुळकर्णी, कृ. भि. : घगवे बाळशास्त्री; आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति; मुंबई, १९५६.

**बाळसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – भीमस्वामींवरील पद व इतर पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाळा–१** [का. अनु.] रामदासी कवी.

**रचना : अमु.** – अनुभवसिद्धि (ले. श. १६८६ / इ. स. १७६४); गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ६७.

**० बाळा–२** – पहा **बाळा बहिरू.**

**बाळा–३** [का. अनु.] शाहीर. ह्यांनी रचलेले ख्याल, टप्पे, ठुमऱ्या, छक्कड उपलब्ध आहेत. रचना शृंगाररसपूर्ण आहे (कृ. गं. कवचाळे, मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४४).

**बाळाचार्य** [अंदाजे इ. स. १८००] कवी. मराठी *रसभंजरी* ग्रंथाचा कर्ता. बाळाचार्य पंडित हे पैठणकर होते. पैठणच्या कोणा विद्वान घराण्यातील परंपरेत गोविंदाचार्यांचे बंधू श्रीनिवासाचार्य ह्यांचे पुत्र बाळाचार्य हे होऊन गेले. प्रस्तुत कवीच्या *रसमंजिरी* ह्या मराठी टीकेची दोन पृष्ठे वि. अं. कानोले ह्यांस उपलब्ध झाली आहेत. त्यावरून बाळाचार्यांनी साहित्यशास्त्रातील शृंगाररसप्रधान *रसमंजिरी* ह्या संस्कृत ग्रंथावर मराठीत टीका लिहिली एवढाच शोध लागतो. ही टीका समानार्थ, समवृत्त व समश्लोकी आहे. एका पृष्ठावर कवीने बाळाचार्य असे स्वतःचे नाव दिले आहे.

संस्कृत ग्रंथाचा बाळबोध व सामान्य जनांना उपयोग व्हावा म्हणून मराठीत गद्य किंवा पद्य अनुवाद करण्याचा प्रघात पेशवाईअखेर पडला. तेव्हा हाच कवीचा काळ असावा. *रसमंजिरी*तील गद्य विवरण भाषादृष्ट्या बरेच अर्वाचीन वाटते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : कानोले, वि. अं. : प्रतिष्ठानची दोन पाने : बाळाचार्यकृत 'रसमंजिरी' वरील मराठी गद्य टीका; प्रतिष्ठान, जाने. १९५४; पृ. १२-१३.

**बाळाजी अंबाजी / ० बाजी अंबाजी** [अंदाजे / इ. स. चे १७ वे शतक, पूर्वार्ध] भाषान्तरकार. लक्ष्मेश्वरचे रहिवासी. गुरू : बाळकृष्णानंद सरस्वतीस्वामी. श्रीवासुदेवस्वामी यतींद्र ह्यांनी संस्कृत भाषेत जो *विवेकसार*नामक गद्य ग्रंथ रचला, त्याचे बाळाजी अंबाजींनी मराठीत *मननग्रंथ* म्हणून भाषान्तर केले आहे. प्रथम वासुदेवस्वामींनी आपले शिष्य रघुनाथेन्द्रस्वामी ह्यांच्याकडून प्रस्तुत *विवेकसार* ग्रंथाचे तैलंगभाषेत भाषान्तर करवून घेतले होते. तैलंग भाषेतील ग्रंथाचेच नाव *मननग्रंथ* असे आहे. पुढे श्रीबाळकृष्णानंदसरस्वतीस्वामी ह्यांनी हा ग्रंथ मराठीभाषिकांस समजावा म्हणून आपले वेदान्तनिष्ठ शिष्य बाळाजी अंबाजी ह्यांना त्याचे मराठीत भाषान्तर करण्यास सांगितले. त्याप्रमाणे तो बाळाजींनी 'यथा तैलंग महाराष्ट्र केला'. ही सर्व माहिती ग्रंथाच्या शेवटी दिलेली आहे. ग्रंथाचा रचनाकाळ ग्रंथात निर्देशित केलेला नाही व करण्याची साधनेही उपलब्ध नाहीत. रामदासी मठात ह्या ग्रंथाच्या ज्या नकला आढळतात त्यांपैकी एक श. १६४४ मधली व दुसरी श. १६००–१६२५ दरम्यानची आहे. ग्रंथाची योग्यता पटून तो वेगवेगळ्या मठांतील संग्रहात शिरण्यास जो कालावधी लागेल तो जमेस धरता ह्याचे मराठी रूपान्तर श. १५५० ते १५६० ह्या दरम्यानचे असावे असे ह्या ग्रंथाचे संपादक गो. रा. गोगटे ह्यांचे अनुमान आहे. ग्रंथाच्या भाषेवरून ह्या अनुमानास बळकटी येते.

मूळ संस्कृत *विवेकसारा*शी ताडून पाहता असे लक्षात येते की हा ग्रंथ त्याचे शब्दशः भाषान्तर नाही. लेखकाने मूळ विषय आपल्या पद्धतीने उदाहरणे, दृष्टान्त वगैरे देऊन समजावून स्पष्ट केला आहे.

*विवेकसारा*प्रमाणे *मननग्रंथा*चे १६ वर्णक आहेत; परंतु दोहोंतील क्रम सारखा नाही. *मननग्रंथा*च्या सुरुवातीस त्या त्या वर्णकातील विषयाचे सूचक व शेवटी प्रकरणातील सारांश थोडक्यात ठसविणारे जे संस्कृत श्लोक आहेत ते *विवेकसारा*त नाहीत. ह्या श्लोकांची रचना तैलंग ग्रंथकारांची की मराठी ग्रंथकारांची हे सांगता येत नाही. *विवेकसार* ग्रंथात प्रत्येक प्रकरणात शेवटी 'संग्रहश्च' म्हणून इतर ग्रंथांतील विषयाला पोषक अशी वचने दिलेली आहेत, ती मराठी ग्रंथात आलेली नाहीत. तसेच *विवेकसार* ग्रंथ *मननग्रंथा*पेक्षा दीडपटीने मोठा आहे.

गहन अशा वेदान्त विषयाचे मुमुक्षूंना मनन करता यावे म्हणून निरनिराळ्या विषयांचे निरूपण ह्या ग्रंथात केले आहे. ते विषय असे : साधनचतुष्टय, अज्ञानाचे स्वरूप, तापत्रय, पंचकोश, अवस्थात्रय, आत्मानात्मविचार, 'सत्', 'चित्', 'आनंद' ह्या पदांचा व 'तत्त्वमसि' ह्या वाक्याचा अर्थ इत्यादी विषय दृष्टान्तांनी खुलवून सांगितले आहेत. उदा., 'चित्तनिरोध महा कठीण' असे सांगताना ते म्हणतात : "मन जे तें महा चंचळ ।। एका ठाई राहाण्याचें नव्हें । . . . . अत्यंत वेगवंत वायू जो तो जैसा स्थिर करावयास शक्य नव्हे । लंगराते तोडून जाणार जो मस्त हस्ती तो जैसा स्थिर न करवे । तैसे मन ही स्थिर करावया करणे शक्य नव्हे ।" ह्या ग्रंथकर्त्याचा वा रूपान्तरकर्त्याचा संबंध समर्थांच्या मठाशी नसताना तेथे ह्या ग्रंथाच्या प्रती सापडतात. ह्यावरून हा ग्रंथ संग्रही ठेवण्याच्या योग्यतेचा होता, हे स्पष्ट आहे.

**रचना : मु.** – विवेकसार ऊर्फ मननग्रंथ ('विवेकसार' ह्या संस्कृत ग्रंथाचे तैलंग भाषेतील भाषान्तर 'मननग्रंथ', त्याचे हे मराठी भाषान्तर); गद्य; प्रक. १६; संपा. गोगटे, गो. रा.; धुळे, १९३८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. गोगटे, गो. रा. (संपा.) : प्रस्ता., 'विवेकसार ऊर्फ मननग्रंथ'; संशोधक, व. ६, अं. ३; ऑक्टो. १९३७; पृ. १–१०. २. पोतदार, द. वा. : विवेकसार; भाइसंमत्रै., व. ११, अं. २, पृ. २४–२७.

**बाळाजी गणेश कारकून** [अंदाजे श. १७०४ / इ. स. १७८२] बखरकार. ह्याची वैयक्तिक माहिती उपलब्ध नाही. पेशव्यांच्या पदरी असलेल्या चिटणीसांचा हा कारकून होता, एवढेच समजते. नाना फडणीसांच्या आज्ञेने व प्रेरणेने रचल्या गेलेल्या एका ग्रंथाचा नेहमी उल्लेख केला जातो, तो ग्रंथ म्हणजे श्रीमंत सवाई माधवराव साहेबांसाठी मुद्दाम लिहविलेली *पेशव्यांची बखर* हा होय. ही बखर चिटणीसांकडील चांगला माहितगार कारकून बाळाजी गणेश ह्यांचेकडून लिहून घेतली. हिच्यामध्ये मालोजी भोसल्यांपासून ते सवाई माधवराव पेशव्यांपर्यंतची हकीकत थोडक्यात येते. मराठ्यांच्या बहुतेक ठळक मसलतींची माहिती बखरीत दिली आहे. 'बखर श. १७०४ शुभकृन्नामसंवत्सरी' [इ. स. १७८३] तयार केली.

ही बखर, राजवाड्यांच्या मते, एकदोन क्षुल्लक अपवाद वगळले असता, पूर्णपणे विश्वसनीय आहे. तिच्यात कालाचा, स्थलाचा किंवा प्रसंगाचा विपर्यास अगदी क्वचित सापडतो. ह्या बखरीच्या पाच प्रती राजवाड्यांना उपलब्ध झाल्या. सवाई माधवराव आठ वर्षांचे असताना त्यांच्याकरिता ही बखर लिहिली असल्यामुळे, अर्थातच ती अत्यंत त्रोटक आहे. ह्या बखरीतील बरेच प्रसंग बखरकाराने स्वतः पाहिले आहेत. बखरकाराप्रमाणेच ह्या घटनांचे साक्षी असणाऱ्या नानांच्या आज्ञेवरून सजविली असल्यामुळे, ही बखर विश्वासपात्र आहे. इतिहासाचे एक साधन म्हणून बखर उपयुक्त ठरते; वाङ्मयीन दृष्ट्या ती विचारार्ह नाही. बखरीची भाषा साधी, सरळ, सुबोध आहे.

द. ग. गोडसे

**रचना : मु.** – पेशव्यांची बखर; ले. का. : श. १७०४ (इ. स. १७८२); संपा. राजवाडे, वि. का.; मइसा., खं. ४ (इ. स. १९००); पृ. २३–६९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ग्रामोपाध्ये, गं. ब. : शके १७०५ पर्यंतची पेशव्यांची बखर; मवाइ., खं. ३; संपा. जोग, रा. श्री.; पुणे, १९७३; पृ. ५३७–५३८.

**० बाळाजी जनार्दन भानू** – पहा **नाना फडणीस.**

**बाळाजीपंत** [का. अनु.] कवी. रामदाससंप्रदायी. श्रीसमर्थांचे तंजावर येथील शिष्य भीमस्वामी हे बाळाजीपंतांचे साडू. बाळाजीपंतांचे चिरंजीव गोविंदबाळ ह्यांना भीमस्वामींचा अनुग्रह होता. बाळाजीपंतांनी रचलेले *भक्तमालिका* (ग्रं. सं. ३०) हे प्रकरण तंजावर येथील ग्रंथसंग्रहात उपलब्ध आहे. प्रत गोविंदबाळांच्या कोणा शिष्याने केली आहे असे पहिल्या श्लोकावरून वाटते. शेवटच्या श्लोकात 'बाळा' असा कवीने आपला निर्देश केला आहे. सरस्वती महाल तंजावर हस्त. यादीत हा ग्रंथ गोविंदबाळस्वामींच्या नावावर नमूद केला आहे (बा. १८२९). – शं. श्री. देव; भाइसंमंइति., श. १८३५, पृ. ३१–३३.

**बाळाजीपंत पराडकर** [का. अनु.] कवी. मोरोपंतांचे पुतण्ये बाळाजीपंत हेही कविता रचीत असत अशी त्यांच्याबद्दल *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी माहिती दिली आहे (मसा., आ. ५, पृ. ५२३ टीप).

**बाळात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बाळा बहिरू / ० बाळा–२** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर] शाहीर व लावणीकार. सुप्रसिद्ध लावणीकार होनाजीचा हा काका. ह्याच्या बापाचे नाव साताप्पा. उपनाव शेलारखाने. जातीने नंदगवळी. ह्या साताप्पाचे पुत्र तीन. त्यांपैकी वडील बाळा, मधला कुशाबा व धाकटा सयाजी. ह्या सयाजीचा मुलगा होनाजी. बाळा हा बाळा बहिरू ह्या नावाने शाहीरांत प्रसिद्ध आहे. तमासगिराचा धंदा ह्यांच्या घराण्यात पिढीजाद होता. साताप्पाचीच धाटणी त्याचा मुलगा 'बाळा' व नातू होनाजी ह्यांनी उचलली. बहिरू रंगारी हा बाळाचा साथीदार असून त्याची कवने तो तमाशात म्हणत असे. त्यामुळे बाळा हा बाळा बहिरू म्हणून प्रसिद्धीस आला. बाळा बहिरू सासवडास राहात असे व तेथेच तो निवर्तला. त्याची म्हणून एक समाधी तेथे दाखविली जाते.

ह्याचा नाना फडणीसांवर लिहिलेला एकच पोवाडा उपलब्ध असून तो गोंधळी हमखास म्हणतात. ह्या पोवाड्यात नानाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे : 'श्रीमंतमहाराज सवाई रावसाहेब मोतीदाणा। खूप युक्तीनें राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ।। भले बुद्धीचे सागर नाना ऐसे नाहीं होणार। मर्दानें हो राज्य राखिलें मनसोबीच्या तलवार ।।' हा पोवाडा य. न. केळकर संपादित *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये समाविष्ट आहे (पृ. ४३९–४०). बाळाची एक शृंगारिक लावणी य. न. केळकर संपादित *अंधारातील लावण्या* (पुणे, १९५६) संग्रहात प्रसिद्ध झाली आहे (पृ. १७०–७१). *होनाजी बाळाकृत लावण्या* (आ. ३, १९२४) मध्ये बाळा बहिरूची सात-आठ कवने शाळिग्रामांनी (संपा.) होनाजींच्या नावावर छापली आहेत. 'अग्नी प्रलयंगता, तुझी ग बुध नाहीं कामाची । आम्हांस आलीं पत्रें धन्याची जलदी करण्याची' ही सुप्रसिद्ध लावणी बाळा बहिरूचीच आहे, असे य. न. केळकर ह्यांचे मत आहे. थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दीपासून बाळा बहिरूचा फड पुण्यात गाजत असावा. सवाई माधवरावांची जवळ जवळ सर्व कारकीर्द बाळाने पाहिली होती, असे वरील लावणीत वर्णिलेल्या कर्नाटक स्वारीच्या प्रसंगावरून व इतर उल्लेखांवरून दिसते. बाळा बहिरूला सहजस्फूर्त अशा कवित्वाची देणगी लाभलेली होती. त्यामुळे त्याची कवने रसाळ झाली आहेत. बाळा बहिरूने बैठकीच्या म्हणजे शांत सुराच्या लावण्याही रचल्या होत्या. हे वळण परंपरेने

आलेले. ह्याचाच वारसा पुढे होनाजीस मिळाला.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : प्रस्ता., होनाजी बाळाकृत लावण्या (संपा. व संग्रा. शाळिग्राम, शं. तु.); आ. ३ री; पुणे, १९२४; पृ. १–१६.

**बाळा राघु** [का. अनु.] शाहीर. सगनभाऊच्या बैठकीतील (मसा., आ. ५, पृ. ५८३).

**बाळा लक्ष्मण** [का. अनु.] शाहीर. ह्याच्या नावावर शं. तु. शाळिग्रामांनी *खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा* दिला आहे. पण ह्या पोवाड्याचा कर्ता बाळा लक्ष्मण नसावा, अशी शंका य. न. केळकर ह्यांनी व्यक्त केली आहे (केळकर, य. न. ऐतिपो., खं. १, पृ. २५४).

'श्रीमंत महाराज पेशवे अमोलिक सुरती मोती । सवाई माधवराव स्वारी निघाली नबाबावरती ॥' असे पेशव्यांचे वर्णन करून पेशव्यांचे अनेक सरदार, तसेच नाना, हरिपंत फडके, सखारामबापू इत्यादी मुत्सद्दी कारभारी ह्यांनी एकजूट करून निजामाचा कसा पाडाव केला त्याचे साद्यंत वर्णन कवीने केले आहे. हा पोवाडा *खर्ड्याच्या लढाईचा पाचवा व सहावा पोवाडा* म्हणून *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये संग्रहित (पृ. २५५, २६४).

**बाळा शेकू** [का. अनु.] शाहीर. *खंडेराव गायकवाडांचा पोवाडा* ह्या शाहीराने केला आहे. 'सत्वधीर गंभीर उपमा हरिश्चंद्र राजे' असे खंडेरावांच्या दानशूरतेचे वर्णन हा शाहीर करतो. काही नव्या आणि चांगल्या कल्पना, वर्णनाच्या ओघात, कवनात आल्या आहेत. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये संग्रहित (पृ. १९३–१९४).

**बाळा सुलतान** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – शहाजी महाराज ऊर्फ बुवासाहेब ह्यांचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. ११०.

**बाळू नारू** [का. अनु.] शाहीर. ह्याची 'तूं नार बत्तीसलक्षणी' ही शृंगारिक लावणी *अंधारातील लावण्या* ह्या संग्रहात (पुणे, १९५६) छापली आहे (पृ. २२४–२२६). नित्य नवा शृंगार करून मर्द गड्याचे चित्त विद्ध करणाऱ्या सुंदरीचे चित्र कवीने ह्या लावणीत रेखाटले आहे.

**बिकनदास हैबती** [का. अनु.] शाहीर. ह्यांचा *फलटणचे निंबाळकर* ह्यांच्यावरील पोवाडा उपलब्ध आहे. त्यात मुधोजीराव व त्यांची पत्नी सगुणाबाई व त्यांच्यानंतर फलटणच्या गादीवर बसलेल्या निंबाळकरांचे वर्णन आले आहे (मु. : *पोवाडेसंग्रह*; संपा. शाळिग्राम, अंकवर्ष; मुंबई, १८९१; पृ. २५३–२५७).

**बिबन** [का. अनु.] शाहीर. सगनभाऊच्या बैठकीतील. हा माहुलीचा राहणारा. ह्याची रचना अनुप्रासप्रचुर असून *जेजुरीच्या खंडोबाचे वर्णन* व *गणपतीचा धावा* अशी कवने ह्याने रचली आहेत. पौराणिक कथा समजावून सांगण्याची हातोटी बिबन ह्यास छान साधली आहे (मसा., आ. ५, पृ. ५८३–८४).

**बिंबा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पाळणा; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**बिरोबा** [का. अनु.] शाहीर. ह्या कवीच्या दोन लावण्या मुद्रित (*अंधारातील लावण्या*; पुणे, १९५६; पृ. २१४–१५).

**बुधमनोहर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**बुबयाकृष्णदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शुकदेवचरित्र; प्रसंग ४; ओ. सं. ४४७; तंसम. (बा. ८७५) हस्त. यादी, क्र. १.

**बुऱ्हानशा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**बनीरामजी / ० बंसीधर** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध] एक विद्वान रामभक्त साधू. जातीने कान्यकुब्ज ब्राह्मण. ह्यांचे पूर्वज उत्तर भारतातून नेमाड प्रांतात स्थायिक झाले व तेथील लोकांत त्यांनी मोठी मानमान्यता संपादन केली. बेनीरामजी ह्यांची मातृभाषा हिंदी होती; तथापि त्यांस संस्कृत, पंजाबी आणि मराठी ह्या भाषा चांगल्या अवगत होत्या, व त्यांत त्यांनी ग्रंथही लिहिले आहेत. खांडवा येथे ह्यांनी एक राममंदिर स्थापन केले. ह्यांनी मराठीत साकी वृत्तात *अध्यात्मरामायण* (र. का. : संवत् १८४९; इ. स. १७९४) रचले आहे. ह्यातील कथा नऊ 'अनुसंधानां'त निवेदिली आहे. भाषा ओघवती आणि प्रसादपूर्ण आहे.

बेनीरामजी ऊर्फ बंसीधर ह्यांनी आपल्या *अध्यात्मरामायण* ह्या ग्रंथातील शेवटच्या 'अनुसंधाना'त आपली गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे वर्णिली आहे : आदिगुरु शंकर > दत्तात्रेय > जनार्दनस्वामी > एकनाथ > बालकृष्ण > रघुनाथ > रामानंद > गदाधर (तापीतटी निवास) > हरिनाथ (तापीतीरी वास) > बंसीधर. ह्यावरून बेनीरामजी ऊर्फ बंसीधर हे पैठणकर एकनाथांच्या शिष्यपरंपरेतील आहेत हे स्पष्ट होते. एकनाथांच्या ज्या शिष्याच्या परंपरेतील ते आहेत त्या शिष्याविषयी त्यांनी पुरविलेली पुढील माहिती अत्यंत महत्त्वाची आहे : "जनार्दनाचा शिष्य अनुभवी एकनाथ गुणवान असे । गुरुकृपेने ध्यानीं रतला, निजस्वरूपीं वर्ततसे ॥ बाळकृष्ण द्विज शिष्य तयाचा, गंध उगाळुनि देत असे । यास्तव स्वामी एकनाथ 'श्रीखंड्या' त्यातें म्हणत असे । तो 'श्रीखंड्या' श्रीनारायण मनुष्यवेशें वर्ततसे । धोत्रें धुउनी उदक आणितो, परि सर्वांशीं कळत नसे ॥" (अ. रा. ९०२१–२३).

बंसीधर ह्यांच्या वरील कथनावरून असे दिसते की, नाथांच्या चरित्रकथेत 'श्रीखंड्या' ह्या नावाने वावरणारी व्यक्ती केवळ कल्पित नसून, ऐतिहासिक होती; त्या व्यक्तीचे खरे नाव बाळकृष्ण असे होते; हे बाळकृष्ण एकनाथांचे शिष्य होते. 'श्रीखंड्या' ह्या उपनामाने ख्यात असलेल्या ह्या नाथशिष्य बाळकृष्णांनी आपल्याला लाभलेले गुरुक्रमागत बोधवैभव रघुनाथ नामक शिष्याला देऊन एकनाथांच्या परंपरेचे सातत्यही राखलेले होते. बेनीरामजी ह्यांच्या ग्रंथातील हे निवेदन ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : नाथांची एक अज्ञात शिष्यपरंपरा आणि श्रीखंड्याची ऐतिहासिकता; मसाप.; एप्रि.–जून, १९७६; पृ. ६३–६५.

**बैकारुगोपाळु** [का. अनु.] ग्रंथकार. ह्याने *दत्त-रामसंवाद* अशा एका ग्रंथाची रचना केली आहे. त्याची हस्तलिखित पोथी तंजावर सरस्वती महाल ग्रंथालयात उपलब्ध आहे (बा. १४२). पोथीत अखेरीस 'इति श्रीस्कांदपुराणे रेणुकामहात्म्ये सिंहाद्रिखंडे दत्त (परशु)-रामसंवादे प्रकरण संपूर्णम् ॥' असे म्हटले आहे. ग्रंथाची २ प्रकरणे असून त्यांतील एकूण ओवीसंख्या १९८ आहे.

**० बोध गोपाळ** – पहा **गोपाळनाथ मळगांवकर.**

**बोधराज** [का. अनु] कवी.

**रचना : अमु.** – अभंग; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० बोधलेबुवा** – पहा **माणकोजी बोधला.**

**बोप** [का. अनु.] जैन कवी. गुरू म्हणून हा दयाळकीर्तींचा उल्लेख करतो. हे दयाळकीर्ती कोण ते समजत नाही. ह्याने रचलेली *तीर्थंकराची भूपाळी* (कडवी १६) हिंगोली येथील जैन हस्तलिखित संग्रहात पाहण्यास सापडते.

**ब्रह्म** [का. अनु.] सामुद्रिक ग्रंथाचा लेखक. हा केव्हा व कोठे होऊन गेला ते कळण्यास साधन उपलब्ध नाही. ब्रह्मकृत *सामुद्रिक लक्षणे* ह्या ग्रंथाच्या एकंदर ११० ओव्या आहेत. पोथी २५० वर्षांची जुनी आहे, असे राजवाडे म्हणतात. ग्रंथाची भाषा कुणबाऊ आहे, अर्थात लिहिणारा खेडवळ आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : ब्रह्मकृत सामुद्रिक

लक्षणे; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १७५.

**ब्रह्मगिरी** [का. अनु.] कवी. हे अमृतराय-शिष्य म्हणून प्रसिद्ध आहेत. अमृतरायांची धाटणी उचलून ह्यांनी *दामाजीचरित्र* (सवामं. बा. ८०, १४५०) किंवा *दामाजीची रसद* (मसा., आ. ५, पृ. ४७१) ह्या काव्याची रचना केली आहे. ह्यांनी काही पदेही रचलेली आहेत. प्रस्तुत *दामाजीचरित्र* हे काव्य छापले गेले आहे (कासं.; संककासू., पृ. ६८).

**ब्रह्मगुणदास / ० गुणदास** [इ. स. चे १५ वे शतक] जैन कवी. काळाचा विचार केल्यास ब्रह्मगुणदास किंवा गुणदास हे पहिले मराठी जैन ग्रंथकार ठरतात. ब्रह्मजिनदास ह्या आपल्या गुरूचा त्यांनी *श्रेणिकचरित्रात* व अन्यत्रही उल्लेख केला आहे. हे ब्रह्मचारी असून ईडरच्या भट्टारकांच्या शिष्यपरंपरेतील होते. जिनदासांच्या इ. स. १४५१ व इ. स. १४६३ मध्ये रचलेल्या *रामायणरास* व *हरिवंशरास* ह्या ग्रंथांत गुणदासांचा उल्लेख सापडतो. ह्यांच्या नावावर *श्रेणिकचरित्र* हे मोठे काव्य व *क्षमागीत, विंचूगीत, गान्हाणे, रामचंद्र हळदुली* अशा स्फुट रचना आढळतात.

वरीलपैकी *श्रेणिकचरित्र* हा विस्तृत काव्यग्रंथ असून त्याचे ४ अधिकार व २३७० ओव्या आहेत. श्रेणिक हा महावीराच्या काळात मगध देशाचा सम्राट होता. त्याचा महावीराच्या चरित्राशी बराच संबंध येतो. अनेक कथा व उपकथा गुंफून हे चरित्र मनोरंजक व बोधपर केले आहे. ते ललितरम्य अशा भाषेत लिहिले आहे. हे काव्य ब्रह्मगुणदासाने आपले गुरू ब्रह्मजिनदास ह्यांच्या *श्रेणिकरास* ह्या गुजराती ग्रंथाच्या आधारे लिहिले असावे. ह्या आख्यानकाव्यातील प्रसंग आणि वर्णन ह्यांत कवीचे काव्यगुण प्रकर्षाने दिसून येतात. काव्याची प्राचीन मराठी भाषा, साधेपणा आणि सौंदर्य ह्यायोगे, विलोभनीय वाटते. [ ⇨ ३.] ह्या ग्रंथाशिवाय वर उल्लेखिलेल्या स्फुट रचनांचे स्वरूप अध्यात्मज्ञान विशद करणारे आहे.

**रचना : अमु.** – १. श्रेणिकचरित्र; ५ अधिकार; ओ. सं. २३७०; नकल प्रत श. १६११; सेनगण मंदिर, नागपूर; संपा. अक्कोळे, सुभाषचंद्र; सोलापूर, १९६४. २. गान्हाणे; गीत; सन्मति; जून–जुलै १९६०. ३. रामचंद्र हळदुली; सन्मति; नोव्हें.–डिसें. १९५९. **अमु.** – १. विंचूगीत; कारंजा हस्त. संग्रह. २. क्षमागीत; वासीम हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अक्कोळे, सुभाषचंद्र : ब्रह्मगुणदास; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. १५–१८. २. आगाशे, य. र. : ब्रह्मगुणदासविरचित श्रेणिकचरित्र; परी.; संपा. अक्कोळे, सुभाषचंद्र; मसाप., जाने.–मार्च १९६६; पृ. ६६–६७.

**ब्रह्मचिंतामणी** [का. अनु.] जैन कवी. गुणकीर्तींच्या हातून अपूर्ण राहिलेल्या *पद्मपुराण* ग्रंथाच्या २८ व्या अध्यायापासून ३५ व्या अध्यायापर्यंतचा भाग ह्यांनी रचला आहे. ह्या ग्रंथाची हस्तलिखिते अत्यंत दुर्मिळ आहेत.

**रचना : मु.** – पद्मपुराण; अ. ४३; ओ. सं. १५०००; संपा. श्रावणे, जयचंद्र; मुंबई, १९०२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. २०.

**ब्रह्मचैतन्य** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – नामस्मरणपर २५ ते ३० ओव्या; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० ब्रह्मजिनदास** – पहा जिनदास.

**ब्रह्मदास** [इ. स. चे १८ वे शतक] वीरशैव कवी. 'मदीय जनिता मामसहालिंग । गिरजा माउली पवित्र आंगें । जन्म पावलो युग्मसंभोगें', असा आपल्या मातापित्यांचा कवीने उल्लेख केला आहे. हे शृंगेरीमठ संप्रदायातील गाणगापूरवासी नृसिंहसरस्वतींच्या दत्तसंप्रदायी गुरुपरंपरेतील होते. ब्रह्मदासांनी *ज्ञानाब्धितरंग* ह्या आपल्या ग्रंथात गुरुपरंपरा दिली आहे ती अशी : नरसिंहसरस्वती > माधवेंद्रसरस्वती > अमृतेंद्रसरस्वती > गगनेंद्रसरस्वती > माधवेंद्रसरस्वती > एकनाथ > श्रीकृष्णदास > ब्रह्मदास.

लीलाविश्वंभर हे ह्याचे ओवीबद्ध काव्य म्हणजे चामरस कवीच्या (इ. स. १४४६–१४६७) *प्रभुलिंगलीले* (इ. स. १४६०) ह्या कानडी ग्रंथाचा मराठी अनुवाद होय. वीरशैव पंथाचे संस्थापक बसव ह्यांचे सहकारी श्री प्रभुलिंग ह्यांचे चरित्र हा ग्रंथाचा विषय आहे. ग्रंथ मराठीत अनुवादण्याचा उद्देश शिवभक्तीचा उद्धार व वीरशैव पंथाचा प्रसार हा आहे. (हा अनुवादित काव्यग्रंथ शके १६४४ / इ. स. १७२२, शुभकृत् संवत्सरे, चैत्र शु. ७, सोमवार ह्या दिवशी लिहून समाप्त केला.) हा कानडी ग्रंथ मराठीत ओवीबद्ध करताना ब्रह्मदासांनी ग्रंथविषयात कोणताच बदल केलेला नाही. आध्यात्मिक अनुभवकथनाबरोबर ह्या ग्रंथात रम्य कथा व शृंगार वर्णिला आहे.

श्रीधरस्वामींनी (इ. स. १६७८–१७२८) *शिवलीलामृत* हा प्रासादिक ग्रंथ श. १६४० (इ. स. १७१८) मध्ये लिहिला. त्यानंतर चार वर्षांनी ब्रह्मदासांनी प्रस्तुत *लीलाविश्वंभर* हा काव्यग्रंथ रचला. श्रीधर व वामन पंडित (इ. स. १६३३–१६९७) ह्यांचे समकालीन असूनही ब्रह्मदासांच्या काव्यरचनेवर मुक्तेश्वरांची छाप आहे. ह्यांच्या काही काव्यपंक्ती पाहिल्यास त्याचा कसा प्रत्यय येतो तो पहा : 'किशोरलीला रससरोवरीं । मज्जन करिती पुरुषनारी । सप्रमोत्फुल्लकल्हारी । पराग मधुकरी पैं जाल्या ।' तसेच पाचव्या अध्यायातील सूर्योदयाचे वर्णन मुक्तेश्वरांच्या रूपकात्मक शृंगारिक भाषाशैलीची आठवण करून दिल्याशिवाय राहात नाही. ते म्हणतात : "प्रबोधसूर्य पाहतां गगनीं । अस्तु पावली मोहरजनी ।" काव्यातील कथा व प्रसंग आकर्षक व नाट्यपूर्ण असून त्यांमधील उचित अशा रसाविष्कारामुळे सौंदर्यशोध व परमार्थबोध ह्या दृष्टीने हा काव्यग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण आहे. ह्या काव्यग्रंथातून ब्रह्मदासांच्या स्वतंत्र प्रतिभेची चमक दिसून येते. "स्वानंदसरोवरीं प्रेमकमळणी । स्वाचारगुणी विकाशल्या ॥ स्वधर्मी पाहाळी पहाट । स्वानंदाची मोकळी वाट । स्वसुखाची भरलीं पेठ । समयो वरिष्ठ साधला ॥ विचारद्वारें उघडलीं । साधकमांदी सिद्ध जाली । पक्षिकुळें गगनीं भरलीं । निडो कंटाळलीं वासनेच्या ॥" अशा प्रकारच्या मुक्तेश्वरी शैलीचा थाट काव्यात जागोजागी दिसून येतो. ह्यावरून ब्रह्मदासांनी आपल्यापूर्वी नुकतेच होऊन गेलेल्या मुक्तेश्वरांच्या काव्याचा विशेष अभ्यास केला असावा असे दिसते.

ब्रह्मदासांनी *ज्ञानाब्धितरंग* हा ग्रंथ कृष्णातीरी मुक्तावली नावाच्या गावी शके १६३० (इ. स. १७०८) मध्ये लिहिला. हा ग्रंथ वेदान्तविवेचनपर आहे. त्यात अद्वैततत्त्वज्ञानाचे सूक्ष्म सोदाहरण विवेचन आहे. प्रत्येक अध्यायाच्या शेवटी 'इतिश्री वेदगर्भसुगमसारे गुरुशिष्यसंवादे ज्ञानाब्धितरंगे' असे म्हटले आहे. एकनाथी ओवी कौशल्याने हाताळण्यात लेखकाचे भाषासौष्ठव दिसून येते. मायाब्रह्माचे स्वरूप वेदान्ताप्रमाणे विशद करून सांगितले आहे. परंपरेच्या ओव्या अशा : "तो श्रीनृसिंहसरस्वती । आनंदगर्भ अकलंकमूर्ति । परमात्म परंज्योति । ज्याची कीर्ति अनिवार॥ . . . माधवेंद्र पदारविंद । पूर्ण स्वरूपानुभव अमोद । सेउन धाला षट्पद । जगी प्रसिद्ध एकनाथु । निरपेक्षतेचे माहेर । शांति माधुर्य ढवळार । दयाक्षमानिवृत्ति विचार । जोडुनि कर तिष्ठति ॥ तो परमगुरु एकनाथ । परब्रह्म मूर्तिमंत । निजानंदपूर्ण भरित । तत्पदाब्जयुगाते वंदिले ॥"

**रचना : मु.** – १. लीलाविश्वंभर; कानडी प्रभलिंगलीलेचा मराठी अनुवाद; अध्याय २५; ओ. सं. ३८५७; र. का. : श. १६४४

शुभकृन्नामसंवत्सरे, चैत्र शु. ७, सोमवार; संपा. सार्दळ, शं. धों.; बेळगाव, १९६४. अमु. – १. ज्ञानाब्धितरंग; अध्याय ११; ओ. सं. १८५८; र. का. : श. १६३०, सर्वधारी संवत्सर; कृष्णातीरी मुक्तावळी नाम नगरीत लिहून पूर्ण केला.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, वि. म. : ब्रह्मदासकृत ज्ञानाब्धितरंग; इंद्रायणी, जुलै १९६३; पृ. ४५–४७. २. प्रियोळकर, अ. का. : लीलाविश्वंभर; प्रस्ता., मसंप., जुलै १९५४; प. १–८. ३. सार्दळ, शं. धों. : प्रस्ता., लीलाविश्वंभर; बेळगाव, १९६४; पृ. ६–२४.

**ब्रह्मपुण्यसागर** [का. अनु.] जैन कवी. ह्यांनी गुणकीर्तींच्या हातून अपूर्ण राहिलेल्या *पद्मपुराणा*तील ३६ ते ४३ अध्याय लिहून पूर्ण केले. ह्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती अत्यंत दुर्मिळ आहेत.

**रचना :** मु. – पद्मपुराण; अ. ४३; ओ. सं. १५०००; श्रावणे, जयचंद्र; मुंबई, १९०२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : गुणकीर्ती; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. २०.

**ब्रह्म यादो** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**ब्रह्मसिंधुमीन मुनि** [का. अनु.] कवी.

**रचना :** मु. – वाक्यसुधा; कासं.; संककासू., पृ. ६८.

**ब्रह्मानंद–१** [अंदाजे श. १५७८ / इ. स. १६५६] टीकाकार. ह्याने *सटीक गुरुगीता* ह्या ग्रंथाची रचना केली आहे. मूळ संस्कृत श्लोक १४६ व टीका ओवीसंख्या १०८३ आहे. आनंदसंप्रदायात ह्या ग्रंथ विशेष मान्यता पावलेला होता. ह्यावरून कवी आनंदसंप्रदायी असावा.

ब्रह्मानंदांचे गुरू शिव व शिवांना अनुग्रह प्रत्यक्ष श्रीगोपालकृष्णांचा. ब्रह्मानंद म्हणतात : "गोपाळें शिवाचे माथां। ठेविला हस्तु ॥ १०३२॥ तया शिवपदीं शरण। ब्रह्मानंद रजरेण। जैसा सैंधवाचा कण। सागरामाजि ॥ १०३५॥" ह्यांच्या *गुरुगीते*ची एक हस्तलिखित प्रत (ग्रं. सं. १०६५) मराठी संशोधन मंडळ, मुंबई ह्यांच्या संग्रहात आहे (हवना., पृ. ४४).

ग्रंथाचा रचनाकाल व फलश्रुती देताना कवी म्हणतो : "शके पंधरा ते अष्टाहातरि। हेमलंबी संवत्सरीं। श्रावण मास अष्टमी बरी। शुक्रपक्षीं ॥ १०८१॥ गुरुवारीं गुरुगीता। गुरुकृपेनें समाप्तता। श्रवणें पठणें गुरुभक्तां। गुरुकृपा चि आतुडे ॥ १०८२॥" (सवामं. बा. ५३७).

**रचना :** अमु. – १. गुरुगीता (सटीक); ओ. सं. १०८३; २. जोहार (कडवी ३१); ३. पिंजरा; ४. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**ब्रह्मानंद–२** [का. अनु.] कवी. हे सहजानंदशिष्य होत. गुरुपरंपरेवरून हे आनंदसंप्रदायी ठरतात. ब्रह्मानंदांनी *प्रणवविवरण* आणि *ब्रह्मांडविवरण* असे दोन वेदान्तविषयावरील ग्रंथ रचले आहेत. *ब्रह्मांडविवरण* ग्रंथात लेखकाने 'सहजानंदाचा बाळ। ब्रह्मानंद वेल्हाळ' असा आपला नामोल्लेख केला आहे. वर उल्लेखिलेले दोन्ही ग्रंथ ओवीसंख्या पाहता अपूर्ण असावेत असे वाटते (मसा., आ. ५, पृ. ८०७).

**रचना :** अमु. – १. प्रणवविवरण; ओ. सं. ६५; तंसम. बा. २३१. २. ब्रह्मांडाचे विवरण; ओ. सं. १७; तंसम. बा. २५६.

**ब्रह्मानंद–३** [? – समा. श. १६१५, श्रीमुख संवत्सर, मार्गशीर्ष शु. द्वितीया / इ. स. १६९३] कवी. लोकप्रिय कवी श्रीधर (नाझरेकर) ह्यांचे हे वडील. पित्याने पुत्रास गुरूपदेश देऊन मंत्र सांगावा ही परंपरा ह्या कुटुंबात आहे. श्रीधरांचे वडील ब्रह्मानंद ह्यांस श्रीधरांचे आजे दत्तानंद ह्यांजकडून उपदेश मिळाला होता. श्रीधरांच्या ग्रंथात जी गुरुपरंपरा पाहण्यास सापडते ती अशी : रामानंद > अमलानंद > सहजानंद > पूर्णानंद > दत्तानंद > ब्रह्मानंद > श्रीधर. श्रीधरांचे आजे दत्तानंद व पिता ब्रह्मानंद ह्या दोघांचे ग्रंथ त्यांच्या वंशजांकडे आहेत. नाझरे गावी ह्यांच्या कुटुंबाच्या चार-पाच पिढ्यांचे वास्तव्य झाले. तेथले कुळकर्णीपण ह्यांच्याकडे असल्याने ते नाझरेकर म्हणून ओळखले जाऊ लागले. श. १६०० च्या सुमारास नाझरे गाव सोडून ह्यांनी पंढरपुरास जाऊन संन्यासग्रहण केले. श. १६०४ मध्ये लिहिलेल्या *आत्मप्रकाश* ग्रंथात ह्यांनी स्वतःचा उल्लेख 'ब्रह्मानंद यति-स्वामी' असा केला आहे.

ब्रह्मानंदांनी श. १६१५ साली पंढरपूर येथे समाधी घेतली. ह्याविषयी खुद्द श्रीधरांनी केलेला श्लोक त्यांच्या वंशजांच्या दप्तरात आढळला. त्यामध्ये मार्गशीर्ष शुद्ध द्वितीया अशी ब्रह्मानंदांची निर्वाणतिथी दिली आहे.

ब्रह्मानंदांची काही पदे व *आत्मप्रकाश* नावाचा एक ओवीबद्ध ग्रंथ उपलब्ध आहे. ग्रंथाची चौदा प्रकरणे व १००० ओव्या असून तो वेदान्तपर आहे. हा श्रीधरांना अनुलक्षून लिहिला असावा असे त्यातील पुढील ओव्या सांगतात : "हा ग्रंथ व्हावयास कारण। श्रीधरें केले होते प्रश्न। मज जें केलें निरोपण। तैसाचि ग्रंथ पूर्ण लिहिजे जी॥ पुर्वाश्रमींचा निजपुत्र। सत् शिष्यहि परम चतुर। त्या श्रीधराचेन प्रश्न समग्र। 'आत्मप्रकाश' प्रकाशिला ॥" ग्रंथाच्या भाषेवर *ज्ञानेश्वरी*चा प्रभाव पडलेला आहे. ब्रह्मानंदांची रचना अद्याप प्रकाशित झालेली नाही (मसा., आ. ५, पृ. ४३८, ९२०–२२).

**ब्रह्मानंद–४** [अंदाजे श. १७०० / इ. स. १७७८ नंतर] पदकार. मूळ नाव गणेश. म्हसवडचे राहणारे. गोत्र विश्वामित्र. हे राजाराम प्रासादींचे समकालीन असावेत, कारण *भक्तमंजरीमाला*कारांची व ह्यांची भिलाडीस भेट झाल्याचा उल्लेख सापडतो. ह्यांची समाधी ब्रह्मनाळ येथे आहे. ह्यांनी पदे रचली आहेत.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ६९.

**ब्रह्मानंद–५** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – शतकत्रय (समश्लोकी); त्रृ. पो.; भाइसमं. हस्त. सू., पृ. २७५.

**ब्रह्मानंद–६** [का. अनु.] पदकार.

**रचना :** मु. – चेंडु (अध्यात्मपर पद); लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ३२.

**ब्रह्मानंद गोविंद** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना :** अमु. – श्रीकृष्णजन्मकथा; संककासू., पृ. १३४.

**ब्रह्मानंद गोविंदराज – चिन्मयानंद** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**ब्रह्मानंदी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

० **ब्रह्मी मुंतोजी** – पहा मृत्युंजय.

**ब्रह्मेंद्रयति** [अंदाजे श. १६३२ / इ. स. १७१०] गीताटीकाकार. गुरू : उद्धव. ह्यांनी *प्रबोधचंद्रिका* नावाची गीतेवरील टीका रचली आहे. ह्या टीकेचे वर्णन करताना शं. श्री. देव म्हणतात की ही टीका पदपदार्थबोधिनी आहे. टीका सुंदर व उपयुक्त आहे; परंतु हिचे फक्त तीनच अध्याय उपलब्ध आहेत (सवामं. बा. १०४०). ह्याच टीकेची अ. वि. पंडित ह्यांनी श. १७३८ त नकललेली दुसरी हस्तलिखित प्रत भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे येथे आहे.

**भगवंत–१** [श. १६२३ / इ. स. १७०१ – श. १६३२ / इ. स. १७१०] कवी. हे कावेरीकाठच्या परिसरातील पट्टणाजवळील 'मुक्तातीती' गावचे राहणारे. गुरूचे नाव सच्चिदानंद. भगवंत कवींनी वेदान्तज्ञानाचे निरूपण करणारे ग्रंथ लिहिले आहेत.

**रचना :** अमु. – १. चिदानंदसिंधुदशक टीका; ओ. सं. ५२२; र. का. :

श. १६२३, खर संवत्सर, अधिक भाद्र. व. ५, गुरुवार; मुक्तातीती ग्रामी संपूर्ण; २. निजसुख; ओ. सं. ९६; र. का. : श. १६३२, विकृति संवत्सर, ज्येष्ठ शु. १; श्रीरंगपट्टण येथे पूर्ण; ३. सच्चिदानंद-विलासटीका; ओ. सं. ३७०; र. का. : श. १६३२, फाल्गुन शु. १५; मुक्तातीती ग्रामी संपूर्ण; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**भगवंत–२** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, पूर्वार्ध] कवी. रुक्मांगद पंडितांचे शिष्य. ह्यांनी वेदान्तावरील एका ग्रंथाची रचना केली आहे, असा उल्लेख *महाराष्ट्रसारस्वतपुरवणी*कारांनी केला आहे. रुक्मांगद पंडितांच्या काळावरून (अंदाजे श. १५३२ ते १६३२) ह्यांचा काळ ठरवायचा म्हटल्यास तो शा. श. च्या १६ व्या शतकाचा उत्तरार्ध असा अनुमानाने ठरवावा लागेल (मसा., आ. ५, पृ. ८६४).

**भगवंतराव यादवराव मुनशी** [अंदाजे श. १६८२ / इ. स. १७६०] कवी. हे देशस्थ आपस्तंबशाखी ब्राह्मण. आडनाव पठाडे दवने वेरूळकर. भगवंतराव स्वतः तरवारबहाद्दर होते. ह्यांचे पुत्र त्र्यंबक हे पेशव्यांच्या पदरी चाकरीस असावे. ते खडर्याच्या लढाईत कामास आले. ह्यांनी रचलेले ५४ श्लोकांचे काव्य पेशव्यांचे स्तुतिस्तोत्र असून ते नानासाहेब पेशव्यांस अर्पण केलेले आहे.

**रचना : मु.** – पेशव्यांच्या स्तुतिपर काव्य; श्लोक ५४; र. का. : श. १६८२; संपा. पटवर्धन, पां. न.; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १४७–१५४.

**भगवंतसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**भगवंतात्मज** [का. अनु.] संतकवी. हे मूळचे बडोद्याकडचे. तेथे हे सरकारी अधिकारी होते. वडिलांचे नाव भगवंत. काही कारणाने ह्यांच्यावर मोठा आरोप आल्याने ह्यांना देशदेशांतर करावे लागले. अनेक देश फिरत हे विदर्भातील वर्धा जिल्ह्यात येऊन पोचले. तेथे सोनगाव मुक्कामी वास्तव्य करणाऱ्या समर्थ सद्गुरुनाथ श्रीआबाजीमहाराज ह्यांची कीर्ती ऐकून हे त्यांना शरण गेले. गुरूने 'पुण्यभूमि देवळी' येथे राहून मारुतीची उपासना करण्यास त्यांना सांगितले. ह्यानंतरच त्यांना प्रचीतीचे ज्ञान व कवित्वशक्ती प्राप्त झाली.

ह्यांची ५–६ पदे (मकच., खं. ४, पृ. ११७–११८) ज. र. आजगांवकर ह्यांनी छापली आहेत. रचना चालीवर म्हणता येण्याजोगी अशी आहे. नमुन्यादाखल एक पद पहा : "कोणी कांहीं म्हणा मन जडलें ॥ ध्रु. ॥ गुरुरंगानें रंगुनि गेलों ॥ न घडावें तें घडलें ॥ १ ॥ पृथ्वीचें जळ आकाशपंथीं । न चढावें तें चढलें ॥ २ ॥ भगवंतात्मज म्हणे गुरु पातक ॥ न झडावें तें झडलें ॥ ३ ॥"

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, म. रा. : भगवंतात्मज; मकच., खं. ४; संपा. आजगांवकर, ज. र.; मुंबई, १९१६; पृ. ११२–११९.

**भगवान / ० भगा** [का. अनु.] अभंगकार. डॉ. रा. ग. हर्षे ह्यांना सापडलेल्या एका हस्तलिखित बाडात मुकुंदराजशिष्य भगवान ऊर्फ भगा ह्याचे ५ अभंग आढळतात. ह्या साऱ्या बाडाचा विशेष असा की त्यातील पदे, अभंग, श्लोक व प्रकरणे ही योगविषयक गूढगुंजनाच्या परिभाषेत लिहिलेली आहेत.

'औट हाताचे हो तळीं' ह्या अभंगात 'मुकुंदराज दावी खुण । भगा वंदितो चरण' असे स्पष्ट म्हटले आहे. मुकुंदमुनिकृत *गुह्यसप्तका*ची ह्या अभंगांशी तुलना केल्यास मुकुंदमुनी व भगवान ह्यांचे गुरु-शिष्यत्व सहज मान्य करता येईल. ह्याच बाडात मुकुंदमुनिकृत *गुह्यसप्तक* हेही प्रकरण आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग. : मुकुंदमुनीचे गुह्यसप्तक; मसाप., जाने.–फेब्रु.–मार्च १९५६; पृ. २२–२७.

**भगवानकवि (कन्हाडकर) / ० भगवान पाठक** [अंदाजे श. १६७३ / इ. स. १७५२] कवी. मूळ गाव कन्हाड. उपनाव कन्हाडकर. *गणेशगीता*कार निरंजन कन्हाडकर हे ह्यांचे आजे. ह्या निरंजनांचे पुत्र रत्नाकर व रत्नाकरांचे पुत्र भगवान कवी. निरंजनांना पैठणच्या काशीराज ह्या सत्पुरुषांचा अनुग्रह होता. भगवानकवींचा पिता रत्नाकर ह्यांनीही काही ग्रंथरचना केलेली आढळते. भगवानांनी *निरंजनांचे चरित्र* लिहिले आहे (मु. : *महाराष्ट्रसारस्वत* मासिक, १८३६) त्यात ह्यांनी आपले आजे निरंजन ह्यांचा निर्याणशक १६४३ (इ. स. १७२१) असा दिला आहे. ह्यावरून भगवानकवींचा काळ अंदाजे शा. श. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध मानता येतो.

भगवानकवींनी अनेक आख्यानांची रचना केली आहे. त्यांपैकी *विनायकमाहात्म्य* हा ग्रंथ मोठा असून त्याचा रचनाकाल श. १६७३ (इ. स. १७५२), माघ शुद्ध चतुर्थी असा कवीने निर्देशिला आहे. ग्रंथाच्या सुमारे ३००० ओव्या आहेत. ह्यांनी रचलेल्या *निरंजन-चरित्रा*वरून चरित्रलेखनाचे प्रयत्न त्या काळात कसे होत होते ते लक्षात येते.

ह्या दोन ग्रंथांखेरीज *वक्रतुंडाख्यान, सिंदुरासुराख्यान, चिंतामणि अवतार, प्रातः स्मरामि, भृशुंडी आख्यान, गणपतिजन्म* अशी प्रकरणे कवीने केली आहेत. गणपती हे कवीचे उपास्यदैवत आहे असे वरील रचनेवरून ठरते. गणपतीवर ह्यांनी सुमारे सव्वातीनशे पदे रचली आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. राजवाडे, वि. का. : भगवानकवि कन्हाडकर; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १५७–१६०. २. राजवाडे, वि. का. : भगवानकृत निरंजनस्वामींचे चरित्र; भाइसंमं. ग्रंथमाला.

**भगवान दत्त** [अंदाजे श. १५०० / इ. स. १५७८] बखरकार. हे कोण, कोठले ह्याविषयी काही माहिती उपलब्ध नाही.

*महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर* ह्या सहा प्रकरणांच्या बखरीतील पहिल्या व चौथ्या प्रकरणाचा हा कर्ता होय. पहिल्या प्रकरणाचे नाव 'पूर्वपरंपरा–वंशउत्पत्ती–वर्णावर्ण–व्याख्या' (अ. २, ओ. सं. ३६९) आणि चौथ्या प्रकरणाचे नाव 'श्रीचिंतामणि कौस्तुभपुराण' (अ. ४, ओ. सं. ३२६). ही दोन्ही प्रकरणे शक १५०० च्या सुमारास लिहिली गेली असावी असे बखरीचे संपादक वि. का. राजवाडे ह्यांचे मत आहे.

माहीमची वंशपद्धती लिहवून घेण्यासाठी मालाडचा तत्कालीन देसला नायकोराव ह्याने केशवाचार्यांकडून शक १३७० मध्ये प्रस्तुत बखर लिहवून घेतली. शक १३७० तील ह्या दोन प्रकरणांनंतर (दुसरे व तिसरे प्रकरण) शक १४०० त सहावे प्रकरण व त्यानंतर सुमारे साठ वर्षांनी (श. १४६०) पाचवे प्रकरण लिहिले गेले. ही प्रकरणे गद्य स्वरूपात आहेत. शक १५०० च्या सुमारास ही चार प्रकरणे भगवान दत्त ह्यांच्या हाती गेली. प्रकरण दुसरे व तिसरे ही एक स्वतंत्र हकीकत म्हणजे महिकावतीच्या राज्यातील सर्व कुळांची श. १०६० पासूनची वंशपद्धती, आणि प्रकरण पाचवे व सहावे मिळून दुसरी स्वतंत्र हकीकत म्हणजे प्रामुख्येकरून पाठारे प्रभूंची वंशपद्धती आहे असे त्यांस दिसून आले. प्रत्येक हकीकतीस एकेक पद्य उपोद्घात भगवान दत्तांनी जोडला व मूळची चार गद्यप्रकरणे एकत्र केली.

भगवान दत्तांच्या एका प्रकरणातून पौराणिक राजांच्या वंशावळी येतात. राजकारणापेक्षा उत्तरकोकणातील सविताबंशी, सोमवंशी व शेषवंशी कुळांची पूर्वपीठिका काय होती हे जाणून घेण्याची भगवान दत्तांची इच्छा होती. ह्या लेखनापाठीमागचा त्यांचा सामाजिक व धार्मिक हेतू स्पष्टपणे दिसून येतो. पद्यभागावरून ह्यांना कविता करण्याचा नाद होता असे दिसते. भगवान दत्तांनी रचलेल्या पद्यभागातील भाषेचे वळण एकनाथी भाषेप्रमाणे आहे. छापील प्रतीची

भाषा मात्र बरीच अर्वाचीन वाटते.

पहिल्या प्रकरणाच्या अखेरीस कर्ता भगवान दत्त असे नाव येते. चौथ्या प्रकरणाच्या प्रारंभीही भगवान नंददत्त हे नाव आले आहे. उपलब्ध बखरीची नकल (राजवाडे ह्यांनी छापलेली प्रत) 'शक १७४१ (इ. स. १८१९), प्रमाथिनाम संवत्सरे, माहे वैशाख शुद्ध प्रतिपदा, रविवासरे 'ची असून 'राजश्री हीराजी रामजी राऊत सिंघे शेषवंशि वसइ बाहादरपुरा' हा मालक असल्याचा उल्लेख आहे. भगवान दत्ताने दिलेल्या वंशावळी एतिहासिक दृष्ट्या विश्वसनीय मानता येण्यासारख्या नाहीत, इतकी विसंगती त्यात दिसून येते, असे मत बखरीला जोडलेल्या प्रस्तावनेत राजवाडे ह्यांनी व्यक्त केले आहे (*महिकावतीची बखर*, पृ. ७४). [➪ ३.]

**रचना : मु.** – केशवाचार्यादिकृत महिकावतीची बखर (माहीमची बखर); प्रकरणे ६, पृ. १–१०८; संपा. राजवाडे, वि. का.; पुणे, १९२४; विस्तृत आणि विवेचक प्रस्ता.; पृ. १–११०.

**० भगवान पाठक** – पहा **भगवानकवि कऱ्हाडकर.**

**० भगा** – पहा **भगवान.**

**भंगी / ० त्र्यंबक भंगी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ७१, १२९.

**भट गोपाळ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – आठ कडव्यांचे एक पद उपलब्ध; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० भटोबास** – पहा **नागदेवाचार्य.**

**भट्टज शिवराम** [का. अनु.] ग्रंथकार. भट्टज शिवराम विरचित गद्य *योगवासिष्ठसारप्रकाश* ग्रंथाची हस्तलिखित पोथी समर्थवाग्देवता-मंदिर येथील संग्रहात असून तिची अधलीमधली काही पत्रे गहाळ झाली आहेत. ग्रंथाचा शेवट करताना शिवराम म्हणतात, "अरे वैराग्यादिकसाधनचतुष्टयसंपन्न परमगुरुभक्त पुरुष जे त्यास हा ग्रंथ जो तो सिकवावा अन्य अनाधिकारी जे त्यास न सिकवावा या ग्रंथाचा जो अभ्यास करील त्यास दृढ ज्ञान होईल संशय नाही." (सवामं. बा. ४९६; हस्त. सू., खं. १).

**० भट्टभट्टात्मज** – पहा **शिवराम अकोलकर.**

**भट्टि** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – चित्रसेनकथाप्रसंग; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**भद्राचल गोपाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १.

**भवानी गंगु** [का. अनु.] कवी. समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहातील क्र. १७५ चे बाड भवानी गंगु ह्यांच्या कवितेचे आहे. नावावरून स्त्री किंवा पुरुष ह्याचा बोध होत नाही. कविता साधी आहे (सवामं. हस्त. सू., खं. १).

**भवानीभट जोशी** [का. अनु.] स्तोत्रकार. लिंबगावचे राहणारे.

**रचना : अमु.** – गंगास्तोत्र; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भवानी साळी** [का. अनु.] शाहीर. हा जुन्नरचा राहणारा असा लावणीत उल्लेख येतो. ह्याने रचलेली आख्यानवजा स्वरूपाची एक लावणी य. न. केळकर संपादित *अंधारातील लावण्या* ह्या संग्रहात (पुणे १९५६) मुद्रित झाली आहे (पृ. २११–२१४). चंपावती नगरीच्या शिवभक्त वामन ब्राह्मणाची आणि त्याच्या पत्नीची कथा ह्या विस्तृत लावणीत कवीने रंगविली आहे.

**भाऊ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – अभंग; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भागीरथी** [का. अनु.] कवयित्री.

**रचना : अमु.** – अभंग व पदे; संककासू., पृ. ७०.

**भागु** [का. अनु.] कवयित्री. महार जातीत जन्म. 'तुज असतां मज गांजिती जन' व 'आलों तुझ्या दर्शनासी . . .' अशा दोन अभंगांचे मुद्रण झाले आहे (*प्राचीन गीतभांडार*; संपा. ना. ग. जोशी). तुकारामांची (अभंग लिहिणारी) भागु नावाची मुलगी होती ती हिच्यापेक्षा वेगळी होय.

**भागुबाई** [का. अनु.] कवयित्री. ही संत तुकाराम ह्यांची मुलगी. ही वडिलांचे अभंग लिहून घेत असे. हिच्या नावावर 'मी रे अपराधी मोठी। मज घालावें बा पोटीं' व 'साधूंचा संग धरीं रे' असे दोन अभंग 'तुकारामबोवांचे बंधु कान्होबा, मुलगी भागुबाई आणि शिष्य निळोबा' ह्यांच्या अभंगांच्या तुकाराम तात्या ह्यांनी प्रकाशित केलेल्या गाथेत (इ. स. १८९१, पृ. २५) सापडतात.

**भाताळी** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – जगदंबेची आरती; मआ., पृ. ३५४.

**० भानजी त्रिंबक** – पहा **भास्कर ऊर्फ भानजी त्रिंबक देशपांडे.**

**भानभट्ट** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भानुकवि** [का. अनु.] ग्रंथकार. भानुकविकृत *रसमंजरी* (गद्य) ह्या कामशास्त्रावरील ग्रंथाचे हस्तलिखित तंजावर येथील ग्रंथसंग्रहात आहे. ग्रंथाची एकूण ८७ पृष्ठे आहेत. शेवटच्या पृष्ठावर कवीने स्वत:बद्दल पुढीलप्रमाणे उल्लेख केला आहे : 'माझा बाप ॥ त्याचें नाव गणेश्वर ॥ ज्याचा देश विदर्भ ॥ गंगातरंगमिश्रित ॥ कवीचे नाव भानु म्हणौन . . . . ॥ ३८ ॥" ग्रंथ संख्या ९०५ आहे (तंसम. बा. १९२२, हस्त. यादी, क्र. २).

**भानुकीर्ती** [अंदाजे इ. स. १६७६] जैन कवी. हे औरंगाबाद येथील जैन पीठावरील दुसरे भट्टारक होते. कारंजा पीठाचे धर्मभूषण भट्टारक ह्यांचे गुरू. ते इ. स. १६५०–१६७५ ह्या काळात होऊन गेले. त्यावरून भानुकीर्ती हे धर्मभूषणांचे समकालीन ठरतात. भानुकीर्ती ह्यांची स्वतंत्र अशी ग्रंथरचना फारशी नाही. पण दामा पंडितांचा *दानशील-तपभावना* हा अपूर्ण ग्रंथ ह्यांनी पूर्ण केला. काही किरकोळ स्वरूपाची स्फुट रचना ह्यांनी केल्याची नोंद दामा पंडितांच्या अमरसागर नावाच्या शिष्याने करून ठेवली आहे.

**रचना : अमु.** – १. दानशीलतपभावना – ओव्या २८६–४६८; जिंतुर हस्त. सं. २. स्फुट कविता.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : भानुकीर्ती; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ५०-५१.

**भानुदास** [इ. स. १४४५–१५१३] संतकवी. हे एकनाथांचे प्रपितामह होत. हे दामाजीपंतांचे समकालीन. ह्यांनी श. १३९० ते १३९७ (इ. स. १४६८–१४७५) ह्या काळातील दुर्गाडीचा दुष्काळ पाहिला होता. भानुदासांचे कुटुंब पैठणास वास्तव्य करून होते. हे आश्वलायनसूत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. 'आमुचिये कुळीं पंढरीचा नेम। मुखीं सदा नाम विठोबाचें' ह्या भानुदासांच्या उद्गारांवरून पंढरीच्या विठ्ठलाची भक्ती त्यांच्या कुळात पूर्वापार चालत आलेली होती. वयाच्या १० व्या वर्षी सूर्योपासना करीत असता सूर्यनारायणाचा साक्षात्कार झाला तेव्हापासूनच त्यांचे भानुदास असे नाव पडले. लग्न होऊन मुलेबाळे झाली. नातेवाइकांनी भांडवल देऊन कापडविक्रीचा धंदा त्यांना उघडून दिला. भानुदास हा व्यापार अत्यंत सचोटीने करीत. व्यापारातील त्यांच्या सत्यनिष्ठेची व सरळपणाची ख्याती सर्वदूर पसरली होती. पंढरीच्या विठ्ठलाचे ते निष्ठावंत भक्त होते.

विजयनगरचा राजा कृष्णराय ह्याने विठ्ठलाची मूर्ती पंढरपुराहून आपल्या राजधानीत नेली होती, ती भानुदास ह्यांनी महत्प्रयत्नाने पंढरपुरास परत आणली अशी एक आख्यायिका आहे. मुसलमान शासकांपासून कृष्णरायाने ही मूर्ती नेली असावी. कृष्णरायाची कारकीर्द इ. स.

१५०९ पासून १५३० पर्यंत झाली. ह्या काळात केव्हातरी ही घटना घडली असावी. कृष्णरायाने ह्या मूर्तीची प्रतिष्ठापना एक भव्य मंदिर बांधून त्यात केली. हे मंदिर विठ्ठलस्वामीचे मंदिर म्हणून ओळखले जाते. खोदकामाचा एक अद्वितीय नमुना म्हणून ह्या मंदिराची ख्याती आहे. त्याची बरोबरी करील असे एकही देऊळ दक्षिण भारतात नाही, असे शिल्पशास्त्रज्ञ म्हणतात. ह्या मंदिराचे बांधकाम अनेक वर्षे चालले होते, पण ते पूर्ण झाले नाही. विजयनगरचे साम्राज्य इ. स. १५६५ मध्ये समूळ नष्ट झाले, त्यामुळेही ते अपूर्ण राहिले असावे. काहींचे म्हणणे आहे की मंदिर पूर्ण न झाल्यामुळे तेथे विठ्ठलमूर्तीची स्थापनाही झाली नाही. परंतु ग. ह. खरे हे *विजयनगर स्मारक ग्रंथा*तील आपल्या लेखात (पृ. १०६) म्हणतात : "मंदिरांतील शिलालेखावरून आपणांला अगदीं निराळीच माहिती मिळते. हे लेख इ. स. १५३३ ते १५६४ ह्या कालांतील आहेत. ह्या लेखांवरून मंदिरांत विठ्ठलमूर्ती होती व तिची पूजाअर्चा मोठ्या थाटानें होत असे ही गोष्ट निश्चितपणे ठरते. मग मंदिराचें बांधकाम पुरें झालें असो वा नसो. उदाहरणार्थ, शके १४३६ तील शिलालेखांत असें म्हटलें आहे कीं, कृष्णदेवराय व त्याच्या दोन राण्या ह्यांनी ९९१ पगोडा किंमतीचें सोनें, २५ चांदीचे दिवे, २०० गाई व ४ गांवें विठ्ठलदेवाच्या पूजेला अर्पण केलीं. १४७६ च्या शिलालेखांत उदयगिरी तिम्मराजाचें ६०० पगोडा वसुलाचें तिरुमलापुरम् हें गांव मंडपउभारणीसाठी दिलें. हे निवडक शिलालेखांचे सारांश वरील अनुमान वाचकांच्या मनांत दृढ करतील ह्यांत शंका नाहीं." भानुदासांनी पंढरपुरास आणलेली विठ्ठलमूर्ती ही मूळची की कृष्णदेवरायांनी विठ्ठलस्वामीच्या मंदिरात स्थापिलेल्या मूर्तीची ती प्रतिकृती, असा एक प्रश्न संशोधकांनी उपस्थित केला आहे. काही वर्षांपूर्वी डॉ. सी. नारायणराव ह्यांस ह्या मंदिराच्या परिसरात भग्नावस्थेत पडलेली एक विठ्ठलमूर्ती आढळली. ग. ह. खरे ह्यांनाही ती पाहावयास मिळाली. ते *विजयनगर स्मारक ग्रंथा*तील आपल्या लेखास (पृ. १०५–१०७) जोडलेल्या 'पुरवणी'त (पृ. ३५५–३५६) लिहितात : "या भग्न मूर्तीच्या सध्यांच्या स्वरूपावरून. . . .हाताचें द्वित्व व ते कमरेवर ठेवण्याची पद्धत यावरून ही मूर्ति विठ्ठलाची असल्याबद्दल खात्री होते. असें असलें तरी पंढरपुराहून विजयनगरास आणली गेली तीच ही आहे कीं काय हा महत्त्वाचा प्रश्न आहे व तो सोडविण्याजोगें आपणांजवळ साधन नाहीं." ऐतिहासिक सत्य काहीही असो, विठ्ठलमूर्ती (मूळची किंवा तिची प्रतिकृती) विजयनगराहून पंढरपुरास आणून तिची देवळात पुनःस्थापना केल्याचे फार मोठे श्रेय भानुदासांस मिळाले व एक थोर विठ्ठलभक्त म्हणून त्यांची कीर्ती अनेक शतके गाजत राहिली, हे मात्र प्रत्यक्ष सत्य आहे. वारकरी पंथाच्या दृष्टीने वरील अत्यंत मोलाची कामगिरी भानुदासांनी केली असल्यामुळे महाराष्ट्रसंतमंडळात त्यांचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यात त्यांच्या भक्तीचा गौरव आहे, त्यांच्या भक्तिप्रेमाची कसोटी आहे.

तुंगभद्रेच्या तीरी विजयनगर–हंपी येथे आजही 'विजय विठ्ठला'चे मंदिर उभे आहे. मात्र त्या मंदिरात विठ्ठलाची मूर्ती नाही. ह्या मंदिराचे शिल्प कौतुकास्पद आहे. तेथे पूजाअर्चा चालते. शेजारतीला गाणी व पदे म्हटली जातात. या पदांपैकी 'देवा तुम्ही मंदिरीं कधीं तरी याल' हे एक आहे. भानुदासांच्या चरित्रातील वरील आख्यायिकेला हा एक ऐतिहासिक आधार आहे.

भानुदासांची अभंग-रचना ही एकनाथांच्या गाथेतच समाविष्ट केलेली आहे. ही त्यांची काव्यरचना साधी, सरळ व भक्तिप्रेमाने ओथंबलेली आहे. विजयनगरच्या राजाने भानुदासांस सुळावर चढविण्याचा हुकूम केला होता; त्या प्रसंगी सुळाजवळ येताक्षणी त्यांनी विठ्ठलास उद्देशून जे उद्गार काढले त्यांत त्यांची एकविध निष्ठा, त्यांच्या भक्तिप्रेमाचे सामर्थ्य व त्यांच्या वृत्तीतील निर्धार ह्यांचा प्रत्यय आल्यावाचून राहात नाही. तो अभंग असा : "जैं आकाश कडकडों पाहे। ब्रह्मगोल भंगा जाये॥ वडवानळ त्रिभुवन खाये। तैं मी तुझीच वास पाहें गा विठोबा॥ १॥ सप्तहि समुद्र समरस होती। जैं हे विरुनि जाय क्षिती। पंचमहाभूतें प्रळय पावती। तरि मी तुझाचि सांगाती गा विठोबा॥ २॥" नामदेवादी संतांनी व नंतर नाथ, तुकाराम, निळोबा ह्यांनी भागवत-धर्माची जी वैशिष्ट्ये सांगितली व प्रचारिली तीच वैशिष्ट्ये भानुदासांनी आपल्या अभंगरचनेत प्रतिपादिली आहेत. ह्या संदर्भात, "नको फिरूं रानींवनीं तूं दुर्घट। सोपी आहे वाट पंढरीची॥" हा अभंग पाहण्यासारखा आहे. ह्या अभंगात अरण्यसेवन, मनाच्या हव्यासाने होणारे तप-तीर्थाटन, शरीरास कष्टविणारी अष्टांगयोगसाधना, नानाविध धातूंच्या प्रतिमांचे पूजन इत्यादी बाह्य साधनांचा निषेध करून 'भक्तांचा सगुण विटेवरी' असे भानुदासांनी म्हटले आहे. ह्या दृष्टीने पाहता वारकरी पंथाची वैशिष्ट्ये पुन:पुन्हा आवर्जून सांगणारे भानुदास म्हणजे पूर्वकालीन ज्ञानदेव-नामदेव व उत्तरकालीन एकनाथ-तुकाराम ह्यांना सांधणारा महत्त्वाचा सेतू आहे. पूर्वकालीन संतांनी पंढरीमाहात्म्य, विठ्ठलमाहात्म्य, नाममाहात्म्य, मुमुक्षूस बोध, अद्वैत, बालक्रीडा, गौळण असे विविध विषय गायिले तेच भानुदासांच्या अभंगांचे विषय आहेत. ह्या त्यांच्या रचनेचे स्वरूप प्रौढ असून त्यात अंत:करणातील भावनेचा हळुवारपणा आहे. "देखतांचि रूप विटेवरी गोजिरें। पाहतां साजिरें चरणकमळ॥ १॥ पाहतां पाहतां दृष्टी धाये जेणें। वैकुंठीचें पेणें सहज हातीं॥ २॥ भानुदास म्हणे लावण्य पुतळा। देखियेला डोळा पांडुरंग॥ ३॥" ह्या स्वरूपाचा भाव त्यांनी अभंगांतून व्यक्त केला आहे.

*मामळभट* म्हणून भानुदासांनी चाळीस अभंगांची रचना केली, त्यात ते म्हणतात, 'पंढरीरायाच्या कृपेनें हा विनोद गायिला.' ही त्यांची रचना त्यांनी म्हटल्याप्रमाणे विनोदपूर्ण आहे.

**रचना : अमु.** – अभंग ९४; श्रीससंगा.; संपा. जोशी, का. अ.; पुणे, १९२३; पृ. १–१५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : भानुदास; प्रासंक., खं. १, मुंबई, १९५७; पृ. २५९–२७०. २. आठवले, रा. म. : तुकारामकृत भानुदास-चरित्र; भाइसंमंत्रै., एप्रि. १९४३; पृ. १–९. ३. शर्मा, विनयमोहन : भानुदास; हिंमसंदे., पटणा, १९५७; पृ. १३३–१३४.

**० भानुभट बोरीकर** – पहा **भास्करभट्ट बोरीकर**.

**भानुसुत** [का. अनु.] कवी. ह्यांची बरीच स्फुट कविता तंजावर येथील हस्तलिखित संग्रहात आढळते.

**रचना : मु.** – १. चेंडु – अध्यात्मपर पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ३१. २. गणपतिपर पाच पदे; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. २–५. **अमु.** – गुरुपर, उपदेशपर, भक्तिपर, ज्ञानपर पदे, शिव, कृष्ण, गणेश, रेणुका इत्यादी देवदेवतांवरील पदे, आरत्या, भूपाळ्या व श्लोक इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**भानेराजशिष्य विद्वांस महानुभाव** [का. अनु.] महानुभाव कवी. भानेराजशिष्य विद्वांस महानुभावकृत *श्रीनागिंद्राचार्य महापूजावर्णन* असे ओवीबद्ध प्रकरण प्रसिद्ध झाले आहे. प्रस्तुत काव्याच्या ४६८ ओव्या आहेत. प्रकाशित प्रकरणाची हस्तलिखित पोथी गोपीराज महानुभाव, रिद्धपूर, ह्यांच्या संग्रहातील आहे.

काव्यातील प्रथमच्या ११ ओव्यांत नित्यस्मरणीय चक्रधरमूर्तिवर्णन, त्यानंतर चक्रधरांच्या निर्गमनापर्यंतचा भाग व नंतर श्रीनागदेवाचार्यांच्या विरहव्यथेचे वर्णन (ओव्या १३९ ते २६०) येते. पुढे रूपांबा नागदेवाचार्यांना रिद्धपुरी गोविंदप्रभूंकडे घेऊन येते. गोविंदप्रभू निजधामास गेल्यानंतर तीर्थस्थाने धुंडाळीत हे गंगातीरी आचार्यपदी

असत अशी माहिती सांगितलेली आहे. त्यांच्या अनेक शिष्यांत भास्कराचार्य प्रमुख होते. ३३४ ते ४४७ ओव्यांपर्यंत कवीश्वराने नागदेवाचार्यांच्या पूजेचे केलेले वर्णन येते. एकूण तीन वर्षे हे दोघे एकमेकांच्या सहवासात होते असे ४४८ व्या ओवीत म्हटले आहे. ४४९ ते ४६७ ओव्यांपर्यंत श्रीचक्रधरस्वामी व नागदेवाचार्य ह्यांच्यासंबंधी महत्त्वाचे निवेदन येते. शके १२२४ (इ. स. १३०२), शुभकृत् संवत्सर, भाद्रपद वद्य द्वादशीस नागदेवाचार्य निजधामास गेल्याचे लेखकाने नमूद केले आहे. पंथीय इतिहास व नागदेवाचार्यांचे चरित्र ह्या दृष्टीने हा भानेराजसुताचा ओवीप्रबंध महत्त्वाचा आहे.

**रचना : मु.** – श्रीनागिंद्राचार्य महापूजा वर्णन; ओ. सं. ४६८; महानु., एप्रि. १९६९.

**भारती विश्वनाथ** [का. अनु.] कवी. जातीने न्हावी. ह्यांचा *नाभिकपुराण* हा ग्रंथ उपलब्ध आहे. त्यात न्हावी जातीची उत्पत्ती कशी झाली ते सांगितले आहे. ह्यांचा मूळ पुरुष नाभिक. म्हणून ग्रंथास *नाभिकपुराण* असे नाव कवी देतो. ग्रंथात ह्या जातीचे पौराणिक काळातील महत्त्व कसे होते ते सांगितले आहे. वर्तन शुद्ध राखण्यासाठी त्यांच्या जातीने मद्यपान व मांसभक्षण न करण्याची बंधने पाळणे कसे आवश्यक आहे, त्याचेही प्रतिपादन ग्रंथात येते. गाणगापूरवासी दत्ताने आदेश दिला म्हणून प्रस्तुत ग्रंथाची रचना झाली असे कवी सांगतो. रचना *आदिपुराणा*च्या आधारे केली आहे व माहिती विस्तृतपणे दिलेली आहे. न्हावी जातीच्या लोकांचे आचरण शुद्ध असावे असा कवीचा कटाक्ष आहे. या दृष्टीने कवीने ग्रंथात उपदेश केला आहे.

ग्रंथाची भाषा सोपी, शुद्ध आणि अर्वाचीन आहे त्यामुळे ग्रंथाच्या शेवटी आलेला र. का. श. १२६० (इ. स. १३३८) हा निर्देश चुकीचा असावा, असे ज. र. आजगांवकर ह्यांना वाटते. त्यांच्या मते हा शक १७६० (इ. स. १८३८) वा फार तर शक १६६० (इ. स. १७३८) असा असावा (मकच., भा. २, पृ. ११०). प्रस्तुत ग्रंथातील एक अध्याय हिंदीत लिहिलेला आहे. ग्रंथ मुद्रित असून त्याचे १३ अध्याय व १६३४ ओव्या आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : मकच., खं. २, मुंबई, १९१३; पृ. १०८–११६.

**भार्गवसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भार्गवस्वामि** [ ? – समा. अंदाजे श. १६८८ / इ. स. १७६६] कवी. वऱ्हाडातील दुधेवाडीच्या जन्मदश्री व रेणुका ह्यांचे पुत्र. राजोरीस अनुष्ठान. गुरू : ज्ञानेंद्रयती. समाधी धावडशी येथे श. १६८८ च्या सुमारास.

**रचना : अमु.** – अभंग; संककासू., पृ. ७०.

**० भावे देवव्यास (बास)** – पहा **बाइदेवबास.**

**० भावे बास** – पहा **बाइदेवबास.**

**भास्कर–१** [अंदाजे श. १४५० / इ. स. १५२८ – श. १५०० / इ. स. १५७८] भागवतटीकाकार. कन्नड येथील संग्रहात *दशमस्कंधा*वर भास्करांनी केलेल्या टीकेची ८७ पृष्ठे गो. का. चांदोरकर ह्यांना मिळाली. टीकेचा आरंभ २८ व्या प्रकरणापासून आहे, तर शेवटी ६७ वे प्रकरण येते. ग्रंथाचा आरंभ व अखेर उपलब्ध झालेली नाहीत. पृष्ठे सुद्धा काही जुनी तर काही आधुनिक दिसतात. भाषेवरून आणि संस्कृत सामासिक शब्दांवरून भास्कर हे श्रीएकनाथांच्या पूर्वी होऊन गेले असावेत असे वाटते. भाषेवरून त्यांचा काल अंदाजे श. १४५० ते १५०० ठरतो. ग्रंथाची हस्तलिखित प्रत भारत इतिहास संशोधक मंडळात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, गो. का. : भागवतकार भास्कर; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ७३–७५.

**भास्कर–२** [का. अनु.] *ज्ञानेश्वरी*चे जीर्णोद्धारक. ह्या ज्ञानेश्वरी-संशोधकाचा परिचय ल. रा. पांगारकर ह्यांनी १९०८ च्या मेमध्ये पुणे येथे भरलेल्या ग्रंथकार संमेलनात व्याख्यानरूपाने प्रथम करून दिला (संग्रहित : *मुमुक्षु*, व. २, अं. १८).

हे भास्कर नगर जिल्ह्यातील रहिवासी. वडवाळसिद्धांच्या संप्रदायातील रघुनाथांचे शिष्य. गुरूच्या आज्ञेने *ज्ञानेश्वरी*चा जीर्णोद्धार करण्याचा खटाटोप काशीक्षेत्री राहून ह्यांनी श. १५३२ (इ. स. १६१०) त केला. एकनाथांनी श. १५०६ (इ. स. १५८४) त *ज्ञानेश्वरी*ची पाठशुद्ध प्रत तयार केली. ह्यानंतर २५ वर्षांनीच श. १५३२ मध्ये भास्करांनी *ज्ञानेश्वरी*चा जीर्णोद्धार केला. ह्या कालोल्लेखावरून भास्कर हे एकनाथांचे समकालीन ठरतात असे म्हणायला हरकत नाही. रा. चिं. ढेरे ह्यांच्या मते भास्करांच्या ह्या संशोधनकार्याचा पांगारकरांनी ठरविलेला काळ शके १५३२ (इ. स. १६१०) हा बरोबर नाही. कारण ज्ञानदेवांच्या समाधिशकानंतर (श. १२१८) तीनशे-अठरा वर्षांनी म्हणजे श. १५३६ (इ. स. १६१४) मध्ये भास्करांनी हे जीर्णोद्धाराचे कार्य पुरे केले, असा भास्कर स्वतःच ग्रंथात निर्देश करतात (*पुरवणी*, ओ. १९०).

*ज्ञानेश्वरी*त एकूण दहा सहस्र पन्नास ओव्या होत्या त्यांपैकी ढळून गेलेल्या १०५५ ओव्या शोधून जेथल्या तेथे बसविल्या असे भास्करांनी म्हटले आहे. आपल्या *ज्ञानेश्वरी* प्रतीला ह्यांनी ४०० ओव्यांची पुरवणी जोडली आहे. तिजवरून बऱ्याच गोष्टींचा उलगडा होतो. भास्करपूर्व *ज्ञानेश्वरी*च्या प्रतीत ८९९५ ओव्या होत्या असेही स्पष्ट होते. भास्करांनी ४०० ओव्यांची जी पुरवणी ग्रंथाला जोडली आहे तिच्यात गीतेची त्याचबरोबर ज्ञानदेवांनी प्राकृत भाषेत केलेल्या गीताटीकेची महती वर्णन केली आहे.

*ज्ञानेश्वरी*च्या मूळ १००५० ओव्यांतून काही ढळल्या व पोथ्या अशुद्ध सापडू लागल्या. याचे कारण सांगताना भास्कर सांगतात : "अर्थवेली ढळलिया। मात्रका निधोनि गेलिया। वोविया अशुद्ध जालिया। लेखकयोगें ॥ १९२ ॥. . प्रती जालिया बहुतीं । जेहीं लिहिलें बाळमती । त्यांचिया आल्या युक्ती। म्हणोनि अर्थ ढांसळला॥ १९९॥" एकनाथांप्रमाणेच *ज्ञानेश्वरी*शोधनाचे हे काम भास्करांनीही आस्थेने केले असे दिसते.

**रचना : अमु.** – ज्ञानेश्वरी-पुरवणी; र. का. : श. १५३२ किंवा १५३६; ओ. सं. ४००.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : ज्ञानेश्वरीचे प्राचीन संशोधक; विविधा., पुणे, १९६७; पृ. ९३–९६.

**भास्कर–३** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. हा मोरोपंतांच्या काळात विद्यमान होता. ह्याने रचलेले *गणपतिस्वयंवर* हे आख्यान *गणेशपुराणां*तर्गत असून श्लोकबद्ध व अनेकवृत्तात्मक आहे.

**रचना : मु.** – गणपतिस्वयंवर; श्लो. सं. २१०; संपा. केळकर, ना. चिं. व ओक, दा. के.; अकलकामा., भा. ४; मुंबई, १९०३; पृ. १९८–२२६.

**भास्कर–४** [का. अनु.] पदकार. गुरू : गिरिधर.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भास्कर ऊर्फ भानजी त्रिंबक देशपांडे / ० भानजी त्र्यंबक** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा मध्य] नागेश-संप्रदायी कवी. ह्यांचे घराणे सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ ह्या गावचे. परंपरागत वृत्ती देशकुलकर्णपणाची. भानजीची पितृपरंपरा भास्कर > निराजी > भास्कर ऊर्फ भानजी > त्रिंबक > भास्कर (भानजी) अशी आहे (*नागेशलीलामृत*, अ. ४०).

भानजींच्या घराण्यातील भास्कर निराजी ह्यांना नागेशपरंपरेतील नागोजीबावांचा उपदेश लाभला होता. भानजींच्या पित्याचा जन्म नागेशकृपेने झाला होता. त्यांना भानजींनी नागेशदास असे म्हटले

आहे. अशा प्रकारे वंशपरंपरेने आणि गुरुपरंपरेने नागेशसंप्रदायाचे हे वारस होते. ह्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणं : अज्ञानसिद्ध > सिद्धलिंग > नागोजीबाबा > भुजंग > शिवराम > नागेश > भानजी त्रिंबक (रा. चिं. ढेरे, प्रामनधा., पृ. १५४).

एकोणिसाव्या शतकात भानजींनी *नागेशलीलामृत* हा सांप्रदायिक ग्रंथ रचला. प्रस्तुत ग्रंथाच्या दोन महत्त्वाच्या हस्तलिखित प्रती उपलब्ध आहेत. एक मोहोळकर प्रत (भानजींच्या वंशजांकडील) व दुसरी कुरडे महाराज प्रत (डॉ. यू. म. पठाण ह्यांच्याजवळील). मोहोळकर प्रतीत ग्रंथसमाप्तिकालाची ओवी सापडते ती अशी: "पांच प्रकर्ण पूर्ण जाली। ग्रंथरचना स्थिरावली। सत्रासे सत्तर वहनशाली। श्रावणी जाहली पूर्ण कथा॥ ४० : ६२॥" ह्यावरून ग्रंथ श. १७७० / इ. स. १८४८ साली पूर्ण झाला. कुरडे महाराज प्रतीत ग्रंथसमाप्तिशक १२७० असा आहे. नागेश व अज्ञानसिद्ध ह्यांच्या काळाचा विचार करता हा शक अर्थातच चुकीचा पडला आहे हे स्पष्ट होते. वा. सी. बेंद्रे ह्यांनी महागाव प्रतीवरून (मोहोळकर प्रतीची नक्कल) ह्या ग्रंथाचा काळ श. १८५६ प्रजापति संवत्सर म्हणजेच इ. स. १९३४ असा निर्दिष्ट केला आहे (*तुकाराममहाराज ह्यांची गुरुपरंपरा*, पृ. २०–२१). भारत इतिहास संशोधक मंडळात नागेशपरंपरेतील १४ ग्रंथ उतरलेले आढळतात. त्यांपैकी १३ ग्रंथांच्या नकला भानजी त्रिंबक ह्यांनी श. १७९३ (इ. स. १८७१) त स्वहस्ते केलेल्या आहेत. तेथे लेखनसमाप्तीची तिथी व महिनाही नोंदविला आहे. त्यावरून भानजींच्या काळाचा त्वरित उलगडा होतो. म्हणून वा. सी. बेंद्रे ह्यांनी नोंदविलेला तसेच कुरडे महाराज प्रतीत आढळणारा ग्रंथाचा रचनाशक हे दोन्हीही चुकीचे ठरतात.

नागेशसंप्रदायाचा एकमेव आधारभूत साधनग्रंथ म्हणून ह्या ग्रंथास महत्त्व आहे. या ग्रंथात ग्रंथकाराने नागेशसंप्रदायाचा इतिहास श्रद्धेच्या धाग्यांनी गुंफिला आहे. ग्रंथाची अध्यायसंख्या ४० व ओवीसंख्या भारत इतिहास संशोधक मंडळाच्या प्रतीनुसार ५३३४ आहे. पहिल्या २७ अध्यायांना कवीने पूर्वार्ध म्हटले आहे. २८ ते ४० हे उत्तरार्धाचे अध्याय आहेत. त्यांत नागेशसंप्रदायाचे प्रवर्तक गूढचरित नागनाथ ह्यांच्या नाना अद्भुत लीलांचे वर्णन येते. त्यांनी दिव्य दर्शन देऊन प्रबोधिलेल्या शिष्यांच्या चरित्रकथा त्यांत आहेत, ह्या शिष्यांनी प्रवर्तिलेल्या परंपरांचा वृत्तान्त आहे, संप्रदायसंबद्ध स्थानांचा महिमा आहे आणि संप्रदायाच्या तात्त्विक भूमिकेची चर्चाही आहे. म्हणजेच पंथाचे तत्त्वज्ञान, आचारधर्म, पंथाच्या निरनिराळ्या शाखा, नागेशांचे अवतारकार्य, इतर संप्रदायांशी असलेला संबंध इत्यादी अनेक गोष्टींचे विवेचन ग्रंथात केले आहे.

नागनाथप्रवर्तित संप्रदाय हा त्यातील 'नाथ' ह्या पदावरून नाथसंप्रदाय वाटण्याचा संभव आहे; परंतु तो नाथसंप्रदाय नसून चैतन्यसंप्रदाय आहे, असे स्पष्टीकरण भानजींनी दिले आहे. ग्रंथारंभीच्या मंगलाचरणातही ते म्हणतात : "स्वरूप प्रकाशानंद पाहे। चौथा चैतन्य संप्रदाय। चैतन्यातें प्रकाशक आहे। योगेश्वरराय नागनाथ।" स्वरूप, प्रकाश, आनंद आणि चैतन्य या चार संप्रदायांपैकी नागेशांचा संप्रदाय हा चैतन्यसंप्रदाय होय, असे भानजी त्रिंबकांचे म्हणणे आहे. हे विधान त्यांनी आपल्या ग्रंथात वारंवार केले आहे. परंतु नागनाथांचा संप्रदाय हा चैतन्यसंप्रदाय कसा, ते भानजींच्या विवेचनातून पुरेसे स्पष्ट होत नाही. मात्र 'नागनाथ' शब्दातील 'नाथ' ह्या पदावरून त्यांचा संप्रदाय ठरविण्याच्या भरीस पडू नये असे लेखक आवर्जून सांगतो. संप्रदायाची गंगोत्री सांगताना "चैतन्य संप्रदाय यातून। विलसे नागनाथासी सुपूर्ण" असा खुलासा लेखकाने केला आहे. 'चैतन्य सत्य येकचि' अशा सूत्रमय वाक्यांनी चैतन्य-संप्रदायाचा ठसा येथे उमटला आहे. ग्रंथात थोडाफार विस्कळितपणा व काही दोष आहेत पण तरीही ही माहिती बरीच संक्षेपाने दिली आहे.

ग्रंथाच्या उभारणीसाठी अनंत व क्षेळ रामलिंग, उद्धवचिद्धन आणि महिपती ह्यांच्याकडून आपण माहिती घेतली असे लेखक सांगतो. त्यावरून त्याच्या दृष्टीचा आवाका, चिकित्सापद्धती ह्यांची कल्पना येते. संप्रदायाचा प्रसार कसा झाला हे १७ व्या अध्यायात सांगितले आहे. तसेच वडवळ, मोहोळ, माणूर, मार्डी इत्यादी स्थानांचे सांप्रदायिकांच्या दृष्टीने असलेले माहात्म्य लेखकाने वर्णन केले आहे. अशा तऱ्हेने भानजींनी हा ग्रंथ लिहून संप्रदायाचा इतिहास निर्माण केला, तत्त्वज्ञान सांगितले, आचारधर्म प्रतिपादला, श्रद्धा-केंद्रांची उभारणी केली आणि सामान्य माणसाला आवश्यक असलेले उपासना-वाङ्मय दिले. दत्तसंप्रदायात *गुरुचरित्राला*, वारकरी पंथात *ज्ञानेश्वरीला* किंवा *नाथभागवताला* जे स्थान आहे तेच स्थान नागेशसंप्रदायात ह्या ग्रंथाला आहे. 'नागेशसंप्रदायाचा संजीवक' ह्या शब्दांत रा. शं. नगरकर ह्यांचा गौरव करतात.

सर्वसामान्य जनांसाठी नागेशासंबंधीचे उपासना-वाङ्मय ह्या कवीने मराठीत व संस्कृतात तयार केले. भानजींनी नकललेले सांप्रदायिक ग्रंथ व सर्व रचना भारत इतिहास संशोधक मंडळाच्या पोथीशाळेतील बाडांत सुरक्षित आहे. ह्या बाडांत नागेशांची *सहस्रनामावळी*, *अष्टोत्तरशतनामावळी* आणि *द्वादशनामावळी* अशा तीन संस्कृत नामावळ्या संग्रहित केलेल्या असून, भानजींनी रचलेल्या नऊ सांप्रदायिक आरत्याही आहेत. *पैमाषींदु* हा जमीनमोजणीविषयक ग्रंथ भास्कर देशलेखक ह्यांच्या नावावर भारत इतिहास संशोधक मंडळाच्या सूचीत निर्देशित केला आहे (भाइसंमं. हस्त. सू., पृ. १६३) तो ह्यांचाच असे रा. चिं. ढेरे म्हणतात (प्रामनधा., पृ. १५५).

**रचना :** अमु. – १. नागेशलीलामृत; अ. ४०; ग्रं. सं. ५३३४; र. का. : श. १७७० (इ. स. १८४८); शं. ना. मोहोळकर ह्यांचा हस्तलिखित संग्रह; सोलापूर व भाइसंमं.; २. आरत्या; उपासना-वाङ्मय इ. स्फुट रचना. **शंका.** – पैमाषींदु (जमीनमोजणीविषयक ग्रंथ).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : प्रामनधा., पृ. १५३–१५६. २. नगरकर, रा. शं. : नागेशसंप्रदायाचा संजीवक; सह्याद्रि, मार्च १९६९; पृ. ३६–३९. ३. पठाण, यू. म.; नागेशसंप्रदाय; औरंगाबाद, १९६३.

**० भास्कर कवीश्वर** – पहा **भास्करभट्ट बोरीकर.**

**भास्करतनय गोपाळ** [का. अनु.] कवी. *राधाविलास* काव्याचा कर्ता. काव्यात शेवटी कवीने भास्करतनय गोपाळ असा स्वतःचा निर्देश केला आहे (श्लो. ८०).

**रचना :** अमु. – राधाविलास; श्लो. सं. ८१; सवामं. बा. ३६४, हस्त. सू., खं. १.

**भास्करदास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**भास्करनंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भास्कर बाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भास्करभट्ट बोरीकर / ० कवीश्वरबास / ० भानुभट बोरीकर / ० भास्कर कवीश्वर** [अंदाजे इ. स. च्या १३ व्या शतकाचा उत्तरार्ध व चौदाव्या शतकाचा प्रारंभकाल] महानुभाव कवी. भास्करभट्ट हे महानुभाव पंथाचे तिसरे आचार्य व कवीश्वर आम्नायाचे प्रवर्तक. हे विद्वान पंडित होते. त्यांच्या चरित्रविषयक माहितीची उपलब्ध साधने म्हणजे *स्मृतिस्थळ*, *वृद्धाचार*, महानुभाव चरित्रग्रंथातील *इतिहासप्रकरण* व *तृतीयशोधनी*च्या *टीपग्रंथा*च्या पूर्वपीठिकेत येणारी माहिती ही होत. त्यावरून

भास्करभट्टांच्या चरित्राचे रेखांकन डॉ. वि. भि. कोलते व इतर अभ्यासक ह्यांनी पुढीलप्रमाणे केले आहे : भास्कराचार्यांचे मूळ नाव भानुभट. हे परभणी जिल्ह्यातील (मराठवाडा) बोरी किंवा कासारबोरी ह्या गावचे राहणारे. भास्करांचे पंथीय अनुसरणापूर्वीचे आयुष्य, ह्यांची कुलपरंपरा अगर बाल्य ह्यासंबंधी खात्रीची माहिती आज तरी उपलब्ध नाही. *भानुविजय* ह्या भास्करांच्या चरित्रविषयक ग्रंथात दिलेला भास्करांचा पूर्ववृत्तान्त, त्यांचा विवाह, काशीयात्रा, कारागृहवास आणि चक्रधरकृपेने झालेली सुटका व देवदेवेश्वरांची प्राप्ती इत्यादी माहिती किंवा *स्मृतिस्थळा*च्या वा. ना. देशपांडे ह्यांना उपलब्ध झालेल्या एका पोथीमधील कवीश्वरबासांचे बाल्य व कुलपरंपरा सांगणारी आख्यायिका बनावट असल्याचे सिद्ध करता येते, असे मत डॉ. कोलते व्यक्त करतात (*भास्करभट्ट – चरित्र आणि काव्यविवेचन*, पृ. ८–९). *नागदेवाचार्यचरित्रा*च्या कोणत्याच पोथीत वरील सविस्तर वृत्तान्त देणारी आख्यायिका सापडत नाही त्यामुळे ह्या पुराव्याच्या आधारे वा. ना. देशपांडे व डॉ. वि. भि. कोलते ह्यांनी भास्कराच्या चरित्रावर जे लेखन केले (विज्ञावि., ऑक्टो. १९२८, ऑग. १९३२) ते अर्थातच चुकीचे ठरते; नागाइसा नावाची ह्यांची एक पुतणी ही 'कवीश्वरांची शिष्या' व 'ग्रंथकर्ती' असल्याचा निर्देश सोगोंबासांच्या *अन्वयस्थळा*त येतो.

महानुभाव पंथात शिरण्यापूर्वी एक वैदिक पंडित केशवाचार्य हे ह्यांचे गुरू होते. भास्करांच्या अनुसरणासंबंधी *स्मृतिस्थळा*त आलेला उल्लेख असा : " बोरीकरा भानुभट्टा अनुसरण : ऐक वेळ बोरीकरा भानुभट्टा श्रीनागदेवाचार्या दर्शण जाले : कवणीं परी जालें तें नेणीजें : " (स्मृ स्थ. ६५). ह्यावरून नागदेवाचार्यांचे दर्शन घडल्यानंतर त्यांना गुरू करून हे पंथात प्रविष्ट झाले असे दिसते.

भास्कराचार्य रूपाने देखणे होते. त्यांच्या ह्या रूपसौंदर्याला तीव्र बुद्धिमत्तेची जोड मिळाली होती. हे संस्कृतप्रेमी व शीघ्रकवी होते. हे विद्वान पंडित असून आपल्या वादविवादपटुत्वाने ह्यांनी आपले पूर्वाश्रमीचे गुरू केशवाचार्य ह्यांना अनेकदा निरुत्तर केले होते. तसेच पैठणच्या अनेक विद्वानांचाही ह्यांनी वादांत पराभव केला होता. वादविवाद करतेवेळी ह्यांना एकप्रकारचा आवेश चढत असे. नागदेवांबरोबर धर्मचर्चाही हे कित्येकदा आवेशपूर्वक करीत असत. विद्वत्ता, रसिकता आणि वक्तृत्व अशा अनेक गुणांचा समन्वय ह्यांच्या व्यक्तित्वात झाला होता. आचार्यांच्या हयातीतच हे कवित्व करू लागले होते. शृंगारपर रचनेची ह्यांची धाटणी पाहून 'शृंघारिया कवी की गा।' म्हणून नागदेवाचार्यांनी ह्यांना गौरविले. ह्यांचे संस्कृतप्रेम व संस्कृतरचनेमधील शीघ्रकवित्व पाहून 'कवीश्वर' अशी पदवी ह्यांना भटोबासांनीच दिली.

हे कडक वैराग्य पाळीत असत व गुरूचा शब्द प्रमाण मानीत. नागदेवाचार्य आणि बाइदेवव्यास ह्यांच्यानंतर पंथाच्या आचार्यपदी कवीश्वरांची जी नियुक्ती झाली, ती विद्वत्ता, कवित्व, विनम्र वृत्ती आणि पंथनिष्ठा ह्या त्यांच्या ठिकाणी असलेल्या गुणांमुळेच झाली असावी. भास्कराचार्यांचे अध्ययन किती आणि कोठे झाले होते ह्याची माहिती जरी उपलब्ध नसली, तरी गीताभागवतादी ग्रंथांवर व्याख्यान करणारा हा कवी चांगल्यापैकी संस्कृत पंडित असावा हे निश्चित. कवीच्या *शिशुपालवध* काव्यावर पडलेल्या माघ कवीच्या प्रभावावरून संस्कृत महाकाव्यांचा त्यांनी अभ्यास केला असावा असे जाणवते. *उद्धवगीते*तील 'ज्ञानाज्ञान' प्रकरणावरून श्रीमच्छंकराचार्यांचे *ब्रह्मसूत्रा*वरील भाष्यही भास्करांनी अभ्यासिले होते असे म्हणता येते. महानुभाव पंथात प्रवेश केल्यानंतर त्यांनी *लीळाचरित्र, सिद्धान्तसूत्रपाठ*, नरेंद्राचे *रुक्मिणीस्वयंवर*, केशिराजांचा *मूर्तिप्रकाश* इत्यादी ग्रंथांचे परिशीलन केले असावे असे ह्या ग्रंथांचा जो ठसा काही प्रमाणात भास्करभट्टांच्या रचनेवर पडला आहे त्यावरून वाटते.

भास्कराचार्यांच्या आयुष्यातले शेवटचे दिवस परिभ्रमणात गेले असावेत. मुसलमान राजांच्या धाडीमुळे (इ. स. १३०८) उद्भवलेला उपद्रव टाळण्यासाठी कवीश्वरबास आपल्या शिष्यांसह कोकण प्रांतात गेल्याचा उल्लेख चरित्रग्रंथाच्या *इतिहासप्रकरणा*त येतो. तिकडे जात असता वाटेत ह्यांच्याजवळील चीजवस्तूची लूटमार झाली. या लूटमारीत परशरामबासांजवळची पंथीय प्रमाणग्रंथांची झोळीच हरवली. पुढे सर्वत्र शांतता प्रस्थापित झाल्यानंतर इतस्ततः पांगले गेलेले सर्व पंथीय परत मूळ ठिकाणी आले. पंथीयांच्या जीवनाची वरील धाडीमुळे वाताहत झाली, त्यांची श्रद्धाही डळमळीत होण्याची वेळ आली, प्रमाणग्रंथही नाहीसे झाले होते. अशा वेळी भास्कराचार्यांनी आचार्यपदावरून पंथीय अनुयायांना उत्तम मार्गदर्शन केले. भास्करभट्टांचे शिष्य परशराम व रामेश्वर ह्यांनी *सूत्रपाठा*तील द्वादश प्रकरणांचा अन्वय पुन्हा लावला. हा अन्वय लावण्यात आचार्यच प्रमुख होते. स्वामींच्या लीळांचा घोक इतरांप्रमाणेच भास्करभट्टांनाही होता. चरित्रग्रंथ नाहीसा झाल्यावर त्यांच्या शिष्यांनी मुखोद्गत लीळांवरून *लीळाचरित्र* ग्रंथाची पुनर्बांधणी केली. श्रीमुखींच्या वचनांचा अर्थ लावण्याचे महत्त्वाचे कार्यही भास्करभट्टांकडून झाले होते. केसोबासांच्या सूत्रपाठाला 'पूर्वी' आणि 'पंचकृष्ण' अशी प्रकरणे भास्करभट्टांनी जोडल्याचा उल्लेख दुतोंडे मुनींच्या *अन्वयस्थळा*त आहे. आपल्या आयुष्याचे अखेरीचे काही दिवस ह्यांनी नगर जिल्ह्यातील कडाथी गावी काढले असे मानण्यास जागा आहे (*वृद्धाचार*, २८). तेथेच ह्यांचे निर्वाण झाले असावे. ह्यांच्या पाठीमागून पंथाच्या आचार्यपदी ह्यांचे शिष्य परशरामबास आले. पंथीय सुसूत्रतेचे गुरूंच्या हयातीत अपूर्ण राहिलेले कार्य ह्यांच्या शिष्यांनीच पूर्ण केले.

*शिशुपालवध* आणि *उद्धवगीता* किंवा *एकादशस्कंध* ह्या दोन काव्यग्रंथांनी कवी म्हणून कवीश्वरबासांना प्रसिद्धी मिळवून दिली असली तरी ह्याखेरीज अन्य बरीच रचना ह्यांच्या नावावर दिलेली आढळते. वि. ल. भावे ह्यांनी *महाराष्ट्रसारस्वता*त दिलेल्या यादीत *शिशुपालवध, एकादशस्कंधटीका, पूजावसर, ईशस्तुती, विरहाष्टक, चक्रपाणीचरित्र, दत्तात्रेयचरित्र, श्रीकृष्णचरित्र* व *गीताटीका* एवढे ग्रंथ भास्करांनी रचल्याचा उल्लेख केला आहे. *वृद्धाचार*कर्त्याने वरील दोन काव्यग्रंथ, *नरविलापस्तोत्र* (संस्कृत), *पूजावसर* (संस्कृत व मराठी) अशा ५ ग्रंथांचाच निर्देश केला आहे. *वृद्धान्वय*काराने एकूण १२ काव्यांचे कर्तृत्व भास्कराचार्यांना दिले आहे. *वृद्धाचारा*तील ५ ग्रंथांव्यतिरिक्त *निर्वचनस्तोत्र, गद्यचाली, प्रस्ताव* (श्लो. ३९), *ऋद्धिपूरच्या ओव्या, अवतारषट्क* व *विरहाष्टक, श्रियाष्टक, जयाष्टक* ह्या यादीत गद्यचरित्रग्रंथ घातले की भास्करांच्या ग्रंथांची संख्या वाढते. या यादीतून उपलब्ध पुराव्याच्या आधारे भास्करांचे ग्रंथ शोधून काढण्याचे काम महत्त्वाचे आहे. वि. ल. भावे व य. खु. देशपांडे ह्यांनी निर्देशिलेल्या गद्यग्रंथांपैकी एकही ग्रंथ भास्करांचा नाही. हे सर्व गद्यचरित्रग्रंथ म्हाइंभट्टांचे आहेत असे खात्रीपूर्वक सांगता येते (डॉ. कोलते : *भास्करभट्ट*, पृ. ५७).

भास्करांनी गीतेवर एक टीका लिहिल्याचा उल्लेख वि. ल. भावे करतात. य. खु. देशपांडे ह्यांच्या मते त्यांनी एक संस्कृत, एक मराठी अशा दोन गीताटीका लिहिल्या होत्या असे दिसते (ममवा., पृ. १४). नागदेवाचार्यांसमोर भास्करभट्टांनी गीतेवर व्याख्यान केल्याचा उल्लेख स्मृतीत आहे (स्मृ. स्थ. २१५), पण त्यांचे हे व्याख्यान ह्यांनी स्वत किंवा इतर कोणी लिहून ठेवल्याचा उल्लेख नाही. *स्मृतिस्थळ, वृद्धाचार* ह्यांत ह्या ग्रंथाचा उल्लेख नाही व *वृद्धान्वया*तील उल्लेख संदिग्ध आहे. भास्कर देत त्या प्रवचनांवरून शिष्यप्रशिष्यांचा तसा समज झाला असावा.

व्याकरणकार मो. स. मोने ह्यांनी संग्रहित केलेल्या पंडित भीष्माचार्यकृत *पंचवार्तिका*च्या आरंभी महानुभावीय व्याकरणकारांची माहिती देताना भास्करभट्टांना मराठी भाषेचे आद्य व्याकरणकार बनविले आहे. परंतु महानुभावीय पोथ्यांतून भास्करांनी व्याकरणावर निबंध लिहिल्याचा उल्लेख चुकूनही आढळत नाही, असे डॉ. कोलते सांगतात.

संस्कृत *नरविलापस्तोत्र* महानुभावीय उपासनेकरिता इ. स. १९०० च्या सुमारास श्रीदत्तलक्षराज ह्यांनी पेशावर येथून प्रसिद्ध केले होते. ह्या स्तोत्रांची रचनाशैली भास्करांच्या काव्यासारखी असून मुद्रित स्तोत्रात कविनामनिर्देश नाही. ह्याच्या उपलब्ध झालेल्या एका जीर्ण हस्तलिखित पोथीत मात्र शेवटी भास्कर कवींचा उल्लेख येतो. संस्कृत *पूजावसर* (श्लो. २७) भास्करांचाच आहे. मराठी *पूजावसरा*चा (ओ. ६०) उल्लेख *वृद्धाचारा*तील एका आख्यायिकेत येतो. भास्करभट्टांच्या *पूजावसरा*च्या दोन-तीन प्रती प्रत्यक्षात पाहून अंतर्गत पुराव्यावरून ह्या *पूजावसरा*चे कर्तृत्व डॉ. कोलते भास्करभट्टांकडे देतात. *वृद्धाचारा*तील उल्लेखिलेली *पूजावसरा*ची प्रारंभीची व अखेरची ओवी ह्या प्रतींतून सारखीच असल्याचे निदर्शनास आले आहे. *शिशुपालवध* व *पूजावसर* ह्यांच्यामध्ये कल्पनासाम्य आढळते. हा *पूजावसर* डॉ. कोलते ह्यांनी प्रसिद्ध केला आहे. त्यामध्ये श्रीचक्रधरांच्या दिनचर्येचे वर्णन येते. *पूजावसरा*चे स्वरूप वर्णनपर असले तरी भास्करांच्या प्रतिभने ते काव्यमय व रसाळ केले आहे.

*वृद्धाचारात* नसलेल्या पण *वृद्धान्वयात* उल्लेखिलेल्या इतर सात ग्रंथांपैकी *चालिसाख्यस्तोत्र* या नावाने प्रसिद्ध असलेल्या प्रकरणात भास्करकवींनी रचलेल्या श्रीकृष्णगुणवर्णनपर श्लोकांचा अंतर्भाव केला आहे. भास्करांच्या मृत्यूनंतर ह्यांच्या शिष्याने इतस्ततः विखुरलेले हे श्लोक एकत्रित केले असावेत असा तर्क वाहतो. हे श्लोक संस्कृत असून गोपीराज महानुभाव ह्यांनी छापले आहेत. *निर्वचनस्तोत्र*, *ऋद्धिपूर ओव्या* व *अवतारषट्क* ही काव्ये मात्र पाहण्यास सापडली नाहीत असे डॉ. कोलते म्हणतात (*शिशुपालवध*, प्रस्ता., पृ. ३२). डॉ. कोलते ह्यांनी पाहिलेल्या दत्तराजमहंतांनी नकललेल्या अष्टकात एकाच्याही शेवटी भास्करकवींचे नाव येत नाही. तरी *श्रियाष्टक* (संस्कृत), *जयाष्टक*, *विरहाष्टक* ही रचना भास्करभट्टांचीच आहे असा तपास महानुभावीय पोथ्यांतून लागतो असेही ते सांगतात. चार संस्कृत रचना व सहा मराठी अशा १० ग्रंथांचा समावेश भास्करभट्टांच्या वाङ्मयकर्तृत्वात निश्चितपणे होतो.

कवीश्वरांच्या रचनेपैकी *शिशुपालवध* (ओ. १०८७) हा काव्यग्रंथ अत्यंत महत्त्वाचा. पंडितांचे रसिक असे व्यक्तित्व त्यामधून आविष्कृत झाले आहे. संस्कृत महाकवी माघ ह्याच्या *शिशुपालवध* ह्या महाकाव्यास वाट पुसत भास्करभट्टांनी आपले *शिशुपालवध* लिहिले, ही गोष्ट अनेक अभ्यासकांनी आजवर तपशीलवार दाखवून दिली आहे. कवी स्वतः म्हणतो : "देखौनि महाकवीचा पंथू : मज होत असे मनोरथू : वर्णावया यादवनाथू : श्रीकृष्णराओ : ॥ ८ ॥" कवीश्वरांच्या प्रतिभेचा विलास *शिशुपालवधात* ठिकठिकाणी प्रत्ययास येतो. ह्या काव्यातील शिशुपालवधकथेतून श्रीकृष्णचरित्रगुणवर्णनाला प्राधान्य दिल्याने, पंथीयांना हा ग्रंथ आदरणीय वाटतो.

माघ कवीशी तुलना करता भास्कर कवीश्वर ह्यांच्या ग्रंथांतून काही साम्यस्थळे दाखविता येत असली तरी तंत्रदृष्ट्या विचार केल्यास भास्करांनी माघाचे अंधानुकरण केलेले नाही हे दिसून येते. ह्या काव्यात सर्ग नसून प्रकरणे आहेत. श्लोक नसून ओव्या येतात. कवीने चित्रबंधांचा वापर केलेला नाही. मात्र वसंतवर्णन, नगरवर्णन, उद्यानवर्णन, जलक्रीडा, युद्धवर्णन, विरहवर्णन इत्यादी महाकाव्यांतील संकेत पाळले आहेत.

*शिशुपालवध* ह्या नावावरून काव्य वीररसपरिप्लुत आहे असे वाटते, पण वीररसाचा प्रतिस्पर्धी जो शृंगाररस त्याचाच प्रभाव अधिकतेने सर्वत्र पडला आहे. हा ग्रंथ 'शृंघारिया प्रवृत्ताजोगा जाला' असा बाइदेवबासांनी दिलेला ग्रंथासंबंधीचा अभिप्राय विख्यात आहे. ह्याचे मूळ कवीच्या उक्तीतच सापडते. कवी म्हणतो : "साहित्याचेनि परिमळे : शृंगाराचेनि मेळें : प्रबंध होति मातावळे : कविजनांचे : ॥ १५ ॥" अलंकारादी साहित्य व शृंगाररस ह्यांमुळे काव्य श्रेष्ठ दर्जाचे होते ह्याची भास्करांना चांगलीच जाणीव आहे. भास्कर हे प्रतिभावंत कवी असल्याने संस्कृतातील परंपरांचा उचित प्रमाणात वापर करून त्यांनी शृंगाररसाने व भक्तिरसाने युक्त असे काव्य रचले. 'म्हणौनि शिशुपालवधी कथा : जै भक्तिरसाची त्रिपथा : किं सोनवैं कैवल्य पथा : पाजळिली : ॥ ३० ॥' अशा आध्यात्मिक व धार्मिक भूमिकेतून या कथेकडे कवी पाहतो. ह्या काव्यातील शृंगार मधुराभक्तिस्वरूप आहे, असे मत डॉ. द. भि. कुळकर्णी ह्यांनी *शिशुपालवधा*ची चर्चा करताना व्यक्त केले आहे ('शिशुपालवध', *युगवाणी*, नोव्हें.-डिसें. १९६९, पृ. ३४१).

पंडितांचा हा काव्यग्रंथ पंडिती थाटाचा असून प्रसंगानुरोधाने शृंगार, वीर, भक्ती अशा तीनही रसांचा ते लीलया आविष्कार करतात. महाकवीला आवश्यक अशी उच्च दर्जाची कल्पनाशक्ती कवीश्वरांजवळ निश्चितपणे आहे. मराठी सारस्वताच्या सुरुवातीच्या काळात अशा प्रकारचा रसाळ ग्रंथ स्वप्रतिभेतून पंडितांनी निर्माण केला व आपले कवीश्वर हे नाव सार्थ केले. [⇨ ३.]

कवीश्वरांचा दुसरा प्रसिद्ध ग्रंथ *उद्धवगीता* (ओ. ८२७). हा टीकाग्रंथ स्वतंत्र नसून व्यासरचित *भागवता*च्या *एकादशस्कंधा*वरील हे टीकानिरूपण आहे. *शिशुपालवधा*चे प्रायश्चित्त म्हणून ह्या ग्रंथाची रचना ह्यांनी केली असे म्हटले जाते. महानुभावपंथीय तत्त्वज्ञानाचे निरूपण हाच ग्रंथरचनेचा मुख्य उद्देश आहे. *एकादशस्कंधा*वरील मराठीतील प्रथम टीका म्हणून ह्या ग्रंथास महत्त्व आहे. ह्या ग्रंथाची प्रथमावृत्ती *एकादशस्कंध* ह्या नावाने भास्कर महानुभाव पुणेकर ह्यांनी १९१० साली प्रसिद्ध केली होती. *शिशुपालवधा*प्रमाणे रसांची विविधता ह्या काव्यात अर्थातच नाही. भास्करांच्या अष्टपैलू प्रतिभेचे दर्शन ह्या ग्रंथात तितकेसे घडत नाही.

*उद्धवगीता* हे ग्रंथाचे नाव खुद्द कवीनेच सांगितले आहे (ओ. क्र. ८२७). पण पंथीयांमध्ये *एकादशस्कंध* ह्या नावाने प्रस्तुत ग्रंथ ज्ञात आहे. ग्रंथाचे स्वरूप श्रीकृष्ण-उद्धव-संवादरूप असून मूळ *भागवत* ग्रंथ समोर ठेवूनच रचना केल्याचे कवी सांगतो. उदा., "पाहुनि तें तें प्रकरण : जें बोलिलें भक्तिज्ञान वैराग्यलक्षण : तें पांतु वीचक्षण : ग्रंथवेत्ते ॥ ८२५ ॥" असे असले तरी प्रत्यक्ष टीकालेखन करताना मुळातला काही भाग गाळला आहे, तर काही ठिकाणी मुळाहून अधिक विस्तार आपल्या भूमिकेला अनुसरून कवीने केला आहे.

*उद्धवगीते*तील ज्या विभागांना मूळ *भागवता*चा आधार नाही ती प्रकरणे स्वतंत्र मानावी लागतात. ह्यांपैकी पहिली १ ते १० प्रकरणे प्रास्ताविकाची म्हणून स्वतंत्रच आहेत. ६४ ते ८० प्रकरणांमध्ये जीवदेवताव्यावृत्ती, जीवब्रह्माच्या अभेदाचे खंडन व भेदाचे समर्थन, जीवाकडून होणारी प्रपंचरचना व जीवांच्या चतुर्विधकर्मफळांचे निरूपण एवढे विषय येतात. हे विवेचन प्रामुख्याने महानुभावी द्वैतवादी विचारसरणीस अनुलक्षून झाले आहे.

मुळातील विषय थोडक्यात आटोपल्याचे काही ठिकाणी दिसून येते. हा सर्व संक्षेप करताना अर्थ खेचून भरण्याचा प्रयत्न झालेला दिसून येतो. हे *एकादशा*चे केवळ भाषांतर नसून कविप्रतिभेचा तो एक उत्स्फूर्त नवा आविष्कार आहे. मुळातील अर्थाला धक्का न लावता हे अध्यात्मज्ञान सुंदर अशा आलंकारिक पद्धतीने अनेक ओव्यांतून व्यक्त होताना दिसते. मूलतः हे ज्ञान कितीही तेजस्वी व संग्राह्य असले तरी

साहित्याच्या सुगंधाखेरीज त्याचे सौंदर्य फुलत नाही ह्याची जाणीव कवीला स्पष्टपणे आहे असे दिसते. म्हणून कवी म्हणतो : " तया प्रमेयाची वोडवन : वरि दीजे साहित्याचें वोल्हावन : तरि कविता वशिकरण : कवणासि नव्हे ? ॥ १२ ॥ " किंवा " ऐसियें कविता-लते : ब्रह्मविद्येचीं फुलें दिसति फांकते : तरि पसरतेनि हातें : कवण न तोडी ? ॥ ३१ ॥ "

मूळ प्रमेय जिज्ञासूंना समजावून सांगण्यासाठी ज्ञानेश्वरांप्रमाणेच उपमादृष्टान्तादिकांचे साह्य प्रस्तुत ग्रंथात कवीश्वरांनी घेतले आहे. यादवकालातली प्रासमधुर भाषा हे ग्रंथाचे एक वैशिष्ट्य आहे. तत्त्वज्ञानाचे विवरण करणाऱ्या ह्या ग्रंथास कवीश्वरांच्या प्रतिभेने सहजसुंदर काव्याचे स्वरूप दिले आहे. [ ➪ ३. ]

*शिशुपालवधा*ची रचना करताना संस्कृत रचना करणाऱ्या महाकवींचा आदर्श भास्करांच्या समोर होता. संस्कृत कवींप्रमाणे काही मराठी कवींचेही ऋण त्यांनी घेतलेले आढळते. *रुक्मिणीस्वयंवर*कर्ता नरेंद्र व *मूर्तिप्रकाश*कार केसोबास ह्यांचे ग्रंथ भास्कराचार्यांच्या ग्रंथरचनेपूर्वीचे असल्याने ह्या काव्यांचा जो अभ्यास त्यांनी केला होता त्याचे पडसाद ह्या दोनही काव्यांतील कल्पनांवर उमटलेले दिसतात. विशेषतः नरेंद्राचे ऋण *शिशुपालवधा*ची रचना करताना कवीश्वरांनी बरेच घेतलेले दिसते. *उद्धवगीते*तील तत्त्वज्ञाननिरूपणास चक्रधरसिद्धान्ताचे साहाय्य झाले आहे. ह्याकरिता *सिद्धान्तसूत्रपाठ* हा महानुभावीय तत्त्वज्ञानाचा प्रमुख ग्रंथ ह्यांनी अनुसरला असावा. *मूर्तिप्रकाशा*चा प्रभाव *उद्धवगीते*वर पडलेला आहे. *मूर्तिप्रकाशात* नागदेवाला झालेले चक्रधरांच्या भावी वियोगाचे दुःख वर्णन केले आहे, तर *उद्धवगीते*त उद्धवाला झालेले श्रीकृष्णाच्या भावी वियोगाचे दुःख वर्णन केले आहे. महानुभावीय तत्त्वज्ञानाचे विवरण करणारे प्रमाणग्रंथ म्हणून महानुभावांच्या *साती ग्रंथांत* ह्या दोन ग्रंथांचा समावेश झालेला आहे. नरेंद्र, भास्कर, कवीश्वर ह्यांच्या रसाळ काव्यांचा परिणाम उत्तरकालात रचना करणाऱ्या पंथातील इतर कवींवर बऱ्याच अंशी झालेला दिसतो. महानुभावांचे हे काही काव्यग्रंथ (*साती ग्रंथ*) ज्ञानेश्वरोत्तर कालात रचले गेले असले तरी ते मराठी सारस्वतातले आद्यग्रंथच समजले जातात. त्यांचा अभ्यास केल्यानंतर, साहित्यकला ह्या दृष्टीने ते श्रेष्ठ दर्जाचे आहेत ह्याचा प्रत्यय येतो. भास्करभट्टांचे काव्यग्रंथही ह्या कसोटीस उतरणारे आहेत.

**रचना : मु.** – १. उद्धवगीता; टीका : प्रक. ११३; ओ. सं. ८२७; प्रआ. : संपा. भावे, वि. ल., ठाणे, १९२६; द्विआ. : संपा. कोलते, वि. भि.; अमरावती, १९३५. २. शिशुपालवध; प्रक. ६३; ओ. सं. १०८७; संपा. कोलते, वि. भि. (विवेचक प्रस्ता., पृ. १–३५); द्विआ. : मलकापूर–नागपूर, १९६०. **स्फुट** – १. गद्यचाली : सात पाच श्लोक मूर्तिवर्णन; संपा. गोपीराज महानुभाव; १९०७. २. पूजावसर (मराठी); ओ. सं. ६०; संपा. कोलते, वि. भि.; मसाप., ऑक्टो. १९३७; पृ. ११–१५. **अमु.** – १. जयाष्टक. २. विरहाष्टक. **संस्कृत रचना** – १. चालिसाख्य स्तोत्र (श्लो. ३९) (मु.). २. नरविलापस्तोत्र (मु.). ३. पूजावसर. ४. श्रियाष्टक.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. कुळकर्णी, द. भि. : शिशुपालवध; युगवाणी, नोव्हें.–डिसें. १९६९; पृ. ३३५–३४३. २. कोलते, वि. भि. : भास्करभट्ट बोरीकर : चरित्र व काव्यविवेचन; अमरावती, १९३५. ३. कोलते, वि. भि. : भास्करभट्ट बोरीकर यांचा मराठी पूजावसर; मसाप., ऑक्टो. १९३७; पृ. ५–११. ४. जोशी, व. स. : कवीश्वराचार्य भास्कर; नभामा., ऑग. १९६६; पृ. २१–२५. ५. देशपांडे, य. खु. : श्री भास्कर कवीश्वर व्यास; ममवा., पुणे, १९६०; पृ. ६–११. ६. राणे, श. रा. : शृंगारिया कवी कवीश्वर; महानु., ऑक्टो. १९७०; पृ. १३–२३.

**भास्करमुनि पारमांडल्य** [इ. स. चे १६ वे शतक] महानुभाव कवी. ह्यांनी *गुरुचरित्रा*ची (खं. ९, ओ. सं. १००६) रचना केली आहे (ममग्रंककासू., पृ. १८). तसेच *परसिद्धांत सूत्रपाठ* मराठीतून संस्कृतात अनुवादित केला आहे (ममवा., पृ. ५६).

**भास्करराव मंत्री** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० भिका** – पहा **भिक्षुकवि.**

**भिकाजी हरिदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – सासुरवास पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ७८. **अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० भिकामुनि** – पहा **भिक्षुकवि.**

**भिकु बाळा** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर] शाहीर. हा पुण्याचाच राहणारा असावा असे पोवाड्यातील उल्लेखावरून समजते. इ. स. १७६४ पासून १७९४ पर्यंत आनंदराव धुळप हा पेशव्यांच्या आरमाराचा प्रमुख होता. इ. स. १७८३ त बेदनुराकडे चाललेल्या इंग्रजांच्या लढाऊ जहाजाचा त्याने पाडाव करून जे शौर्य गाजविले त्या प्रसंगाचे वर्णन ह्याने रचलेल्या पोवाड्यात येते. रचना सामान्य असली तरी ह्यातील ऐतिहासिक तपशील प्रमाण मानला जातो. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये संग्रहित (पृ. ४५१–५४).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : आनंदराव धुळपाचा पोवाडा; ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. १; पुणे, १९२८; पृ. ४४९–४५०.

**भिमकसिंग** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भिक्षुकवि / ० भिका / ० भिकामुनि** [अंदाजे श. १६९६ / इ. स. १७७४] महानुभाव कवी. पंतसमकालीन कविमंडळातील कवींमध्ये हे भिक्षुकवी बरेच प्रसिद्ध आहेत (मसा., आ. ५, पृ. ५३७). चक्रधरास अनुलक्षून ह्यांनी जे *प्रार्थनास्तोत्र* केले आहे (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २८७). त्यात ह्यांच्या गुरूचे नाव आत्माराम असे येते. आपला संप्रदाय व गुरू ह्यासंबंधी कवीने *प्राणबोध* श्लोकशतकात पुढील माहिती दिली आहे : 'माझा हा दत्तसांप्रदायेक नीका । नीरंजन पंथ परमहंश देखा ॥ हा नीजमार्ग बरवा आती चांग । येथे नीर्गुण भक्तीचा ज्ञानयोग ॥ ९७ ॥ आत्माराम गुरु दीन दयाळ । त्याचा भिकामुनी लडिवाळ बाळ ॥ १०० ॥"

ह्यांच्या रचनेतील *भक्तिअनुभव* हा सर्वांत मोठा ग्रंथ असून त्याचे २० अध्याय व सुमारे २००० ओव्या आहेत. *उद्धवगीते*वरील ही मराठी टीका होय. ग्रंथाच्या शेवटी समाप्तिकाल दिला आहे : "स्वस्ति श्रीशक शालिवाहन । सोळा शत शहाण्णव जाण । जय नाम संवत्सर नामाभिधान । माघ शुद्ध प्रतिपदा ॥ बुधवार तिसरे प्रहरीं । सुरे ग्राम मुक्तामांतरीं । ग्रंथ समाप्त निर्धारीं । महिमा थोर गुरूचा ॥ " (मसा., आ. ५, पृ. ५३७).

ह्या आत्मारामशिष्य भिक्षु कवीचे काही कटिबंध आहेत व *द्रौपदीवस्त्रहरणा*वर २४ कडव्यांचे एक लावणीपर कवन आहे (मु. : अकलकामा., भा. १). *काव्यमाले*चे संपादक वा. दा. ओक ह्यांना ह्या काव्यातील कथाभाग पूर्ण वाटत नाही. अभंग व पदे इत्यादी स्फुट रचनाही ह्या कवीने केली आहे.

**रचना : मु.** – द्रौपदीवस्त्रहरण; कडवी २४; संपा. ओक, वा. दा.; अकलकामा., भा. १, मुंबई, १८९५; पृ. १११–१२१. **अमु.** – १. प्राणबोध; श्लो. सं. १००; २. प्रार्थना स्तोत्र; ओ. सं. १५२; ३. भक्तिअनुभव; अ. २०, ओ. सं. २०००; र. श. १६९६ / इ. स. १७७४; भाइसंमं.

चरित्र, चर्चा, अभ्यास : मुजुमदार, गं. ना. : भिका – भिक्षु – मुनि; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २८७–२८९.

० **भीम** – पहा **रामदास.**

**भीमचंद्र** [अंदाजे इ. स. १७८१] जैन कवी. लातूरच्या अनंतकीर्तीचे शिष्य. नंतर हे कारंजा भट्टारकांच्या शिष्यवर्गात सामील झाले. ह्यांनी रचलेली एकच आरती उपलब्ध आहे; पण ती भट्टारकांच्या पीठाचा इतिहास सांगणारी असल्याने महत्त्वाची ठरते. ही *गुरूची आरती* (६ कडवी), *प्राचीन मराठी जैन साहित्य* ह्या पुस्तकात डॉ. सुभाषचंद्र अक्कोळे ह्यांनी छापली आहे (पृ. ९६).

**भीमदास** [का. अनु.] कवी.

रचना : अमु. – कृष्णचरित्र कथा; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भीमराज** [का. अनु.] आरतीकार.

रचना : मु. – ज्ञानदेवाची व विष्णूची आरती; मआ., पृ. ३१३, ३३४.

**भीमराज गोस्वामी** [का. अनु.] पदकार.

रचना : मु. – शिवपर एक पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. २३.

**भीमराजदास** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. सू., यादी क्र. १.

**भीमराय** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**भीमसेन बऱ्हाणपुरी** [इ. स. चे १८ वे शतक, प्रारंभकाल] बखरकार. हे धर्माने मुसलमान होते. ह्यांनी लिहिलेली *बुंदेल्याची बखर* मुळात फारसी भाषेत असून तिच्या इंग्रजी रूपांतरावरून हा अनुवाद करण्यात आला आहे. औरंगजेबाने दक्षिणेत केलेल्या स्वारीचे व धुमाकुळीचे वर्णन ह्या मुसलमानी बखरनविसाने समक्ष पाहून केलेले आहे. बखरीचे लेखन अंदाजे इ. स. १७०७ नंतर झाले असावे.

हल्लीच्या दतिया संस्थानच्या अधिपतींचा पूर्वज दलपतराय बुंदेला हा औरंगजेब व शिवाजी ह्यांच्या लढायांत हजर होता; त्याचे पदरी भीमसेन बऱ्हाणपुरी हे गृहस्थ होते. ह्यांनी लिहिलेल्या फारसी बखरीचे नाव *नक्शेदिलकुशा* असे आहे. त्याचा अर्थ 'हृदयप्रसाद' असा होतो. हिचे इंग्रजी रूपान्तर इ.स. १७९४ त स्कॉट ह्याने केले. त्यावरून मराठी भाषान्तर पांडुरंग नरसिंह पटवर्धन [ ⇨ २ : **पटवर्धन, पां. न.**] ह्यांनी इ. स. १९२० मध्ये केले. ते मुंबई येथील *इंदुप्रकाश* दैनिकातून क्रमशः छापण्यात आले. केवळ नवीन माहिती म्हणून नव्हे तर इतिहासाची दुसरी बाजू म्हणून परकीयाने लिहिलेल्या या *बुंदेल्याच्या बखरी*चे ऐतिहासिक दृष्ट्या स्वतंत्र स्थान आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पटवर्धन, पां. न. : प्रस्ता., बुंदेल्याची बखर; मुंबई, १९२०; २. हेरवाडकर, र. वि.; मब., मुंबई, १९५७; पृ. १४३.

**भीमस्वामी–१** [श. १५६४ / इ. स. १६४२ – समा. श. १६६३, फाल्गु. शु. १ / इ. स. १७४२] समर्थचरित्रकार व कवी. भीमस्वामी हे रामदासी संप्रदायांपैकी तंजावर मठाचे अधिपती होते. हे मूळचे चाफळपासून सहा कोस दूर असलेल्या शहापूरचे (जि. सातारा) रहिवासी. येथील कमळाजीपंत नावाचे गृहस्थ ह्यांचे आजे. आजीचे नाव गंगाबाई ऊर्फ सतीबाई. हिने समर्थांचा उपदेश घेतला होता. ह्यांच्या बालपणी, वयाच्या सातव्या-आठव्या वर्षी ह्यांच्या आजीकडे एकदा समर्थ आले असता त्यांची दृष्टी ह्या भीमाकडे गेली. त्यांनी ह्यांना शहापूर मुक्कामीच उपदेश देऊन आपल्या शिष्यवर्गात सामावून घेतले. हा अनुग्रह श. १५६७ मध्ये मिळाला असे सांगतात. 'हा शक खरा मानल्यास ह्यांचा जन्मशक (१५६४) हा कदाचित चुकीचा असेल. कारण उपदेशाच्या समयी त्यांचे वय ३ वर्षांचे एवढे अल्प नसावे. सात-आठ वर्षांचे तरी असावे.' (शं. गो. तुळपुळे, मसा., आ. ५, पृ. ८८७) भीमस्वामींचा विद्याभ्यास समर्थांच्या नजरेखालीच पार पडला. भीमस्वामी गृहस्थाश्रमी होते.

समर्थ तंजावरास गेले असता व्यंकोजीराजे ह्यांनी त्यांचे शिष्यत्व पत्करिले. राजांनी त्यांना तेथेच राहण्याचा आग्रह केला. तेव्हा समर्थांनी तेथे मठस्थापना करून काही काळ वास्तव्य केले व नंतर भीमस्वामींची तेथील मठात श. १५९७ (इ. स. १६७५) च्या सुमारास कायमची योजना केली. तंजावर येथील रामदासी पाच मठांपैकी भीमस्वामींचा मठ हा मुख्य मठ असून त्यांचे प्रमुख शिष्य झोळीरामबावा, गोविंदबाळस्वामी, अण्णाजीबावा ह्या तिघांचेही मठ तंजावरातच आहेत. पाचवा मठ अनंतमौनींच्या परंपरेतील सेतुरामबावांचा. भीमस्वामींनी श. १६६३ च्या फाल्गुन शुद्ध प्रतिपदेस समाधी घेतली. ही तंजावर येथील त्यांच्या मठापासून दोन मैल दूर आहे.

भीमस्वामींची स्वतंत्र अशी ग्रंथरचना नाही. त्यांची स्फुट कवने मात्र श्रवणीय आहेत. त्यांच्या रचनेपैकी *समर्थांचे लघुचरित्र* व *समर्थांच्या अंतकालावरील ५० ओव्या* ह्या दोन महत्त्वाच्या रचना आहेत. समर्थांनी सज्जनगडावर समाधी घेतल्यानंतर तीनच दिवसांनी भीमस्वामी तेथे पोचले. त्यांच्या निर्याणासंबंधीची इत्थंभूत हकीकत ऐकून तो वृत्तान्त ह्यांनी ५० ओव्यांत वर्णन केला आहे (मुद्रण : श्रीसांप्रविवि., खं. १). ह्या ओव्यांचा उल्लेख हनुमंतस्वामींनी त्यांच्या बखरीत (हनुमंतस्वामीकृत *रामदास बखर*) केला आहे. ओव्यांची रचना गडावर करून पाठोपाठ तंजावर येथे आल्यावर भीमस्वामींनी समर्थांच्या चरित्राची रचना केली असावी. हे *लघुचरित्र* व ह्या *अंतकालवर्णनपर ओव्या* तत्कालीन आहेत म्हणून त्यांचे प्रामाण्य विशेष आहे. ह्या दोनही रचनांमधल्या चरित्रविषयक माहितीत बरेच साम्य आहे. समर्थांनी स्वतःच्या लग्नसमारंभातून पळ काढला तेव्हापासूनची हकीकत ह्या चरित्रात येते. समर्थांना लहान मुलांत मिसळून खेळण्याची आवड होती असे चरित्रकार सांगतो. सतीबाईचे व भीमस्वामींचे नाते प्रस्तुत चरित्रात दिलेले नाही. मात्र समर्थांनी अनुग्रह देण्यापूर्वी हिची कसून परीक्षा घेतल्याचे म्हटले आहे. चाफळास उत्सवात श्रीसमर्थ भजन–निरूपण करीत, अशी माहिती चरित्रकार देतो. शिवाजीमहाराजांनी समर्थांवरील भक्तिप्रेमाखातर त्यांची वस्ती सज्जनगडावर करविली असेही त्याने सांगितले आहे. श. १६०३ च्या वैशाखात राजाने गडावर बांधलेल्या विशालगृहात समर्थांचा प्रवेश झाला. येथून पुढे दहा महिन्यांनी माघ वद्य नवमीस आपण परंधामास जाणार अशी प्रतिज्ञा समर्थांनी केली. ह्यानंतर बाहेर जाणे, भेटीगाठी वर्ज्य केल्या. नंतर अन्नपाणी वर्ज्य केले आणि अखंड समाधी लावली. गडावरील रघुवीराच्या देवळातील मूर्ती माघ वद्य पंचमीस आल्या. त्यांची स्थापना करून त्यांनी आपल्या शिष्यसमुदायास खालील उपदेश केला : "माझी काया आणि वाणी । गेली म्हणाल अंतःकर्णी ॥ परि मी आहे जगजीवनी । निरंतर ॥ ४५ ॥ आत्माराम दासबोध । माझें स्वरूप स्वतसिध्ध ॥ असता न करावा हो खेद । भक्तजनी ॥ ४६ ॥" श. १६०३ माघ वद्य नवमी शनिवारी भर दुपारी दोन प्रहरी समर्थांनी समाधी घेतली. इत्यादी तपशील व समर्थांचा शिष्यवर्गास उपदेश हा समर्थांच्या चरित्रविषयक दृष्टिकोनातून महत्त्वाचा ठरतो.

चरित्रातील माहिती देखील ह्या दृष्टीने पाहता विश्वसनीय ठरते. ह्या चरित्राचे मुद्रण धुळे सत्कार्योत्तेजक सभेने केले असून त्याची पहिली काही व अखेरची काही पृष्ठे गहाळ झाल्याने हे चरित्र पूर्ण नाही असे म्हटले आहे. ह्यामध्ये पदे, ओव्या, श्लोक, कडाका छंदातली रचना, डफगाणे अशा विविध प्रकारांचे मिश्रण केलेले दिसते. छापील चरित्रातील एकूण कविता-संख्या १६८ आहे. समर्थांची आतापर्यंत उपलब्ध असलेली प्रकाशित चरित्रे ही समर्थनिर्याणानंतर लिहिली गेली

असल्याने श. १६०३ (इ. स. १६८२) च्या सुमारास लिहिले गेलेले हे चरित्र प्रमाणभूत मानता येण्याजोगे म्हणून महत्त्वाचे ठरते.

**रचना : मु.** – १. समर्थचरित्र (अपूर्ण); पदे, श्लोक, ओव्या, कडाका व डफगाणे मिळून अंदाजे ग्रं. सं. १६८; संपा. देव, शं. श्री.; समर्थांची दोन जुनी चरित्रे, धुळे, श. १८२८; उत्तरार्ध; पृ. १७३–१९२. २. समर्थांच्या अंतकालवर्णनपर ओव्या; ओ. सं. ५०; श्रीसांप्रविवि., खं. १; संपा. राजवाडे, वि. का.; धुळे, १९१७; पृ. १४५–१४८. **अमु.** – पदे, अभंग इ. स्फुट कविता; सवामं. हस्त. सू., खं. १, २; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**भीमस्वामी–२ / ० भीमाजीबुवा / ० यशवंतसुत** [अंदाजे श. १७१९ / इ. स. १७९७] समर्थचरित्रकार. रामदासांच्या शिष्यपरंपरेतील शिरगाव (जि. सातारा) मठाचे अधिपती. शिरगाव हे चाफळापासून दोन कोसांवर असून येथे समर्थशिष्य कल्याणस्वामींचे बंधू दत्तात्रेयस्वामी ह्यांचा वंश नांदला. शिरगाव मठात काही काळ श्रीसमर्थांचा प्रत्यक्ष वास होता. कल्याणस्वामी, दत्तात्रेयस्वामी व त्यांच्या मातोश्री असा त्रिवर्ग प्रथम ह्याच मठात होता. पुढे कल्याणस्वामी डोमगावी गेले व दत्तात्रेयस्वामी शिरगावीच राहिले. ह्या मठात बरेच कर्ते पुरुष होऊन गेले. उभयता बंधू कल्याणस्वामी व दत्तात्रेयस्वामी समर्थांचे ग्रंथ उतरून घेण्यासाठी शिरगावास आणीत असत अशी आख्यायिका आहे. भीमस्वामींनी समर्थचरित्राच्या अखेर आपली पितृपरंपरा दिली आहे, तीच गुरुपरंपरा असल्याचे ते सांगतात. ती अशी : दत्तात्रेय > राघव > यशवंत > भीमाजीबावा.

भीमस्वामींचा *भक्तलीलामृत* हा अभंगबद्ध ग्रंथ धुळे सत्कार्योत्तेजक सभेने प्रसिद्ध केला आहे. ग्रंथाचे लेखन श. १७१९ (इ. स. १७९७) श्रावण वद्य द्वितीया ह्या दिवशी पूर्ण झाले. ह्या *भक्तलीलामृता*च्या पहिल्या १२१ अभंगांत समर्थांचे चरित्र वर्णन केले आहे. समर्थचरित्र लिहावे असा प्रारंभी लेखकाचा हेतू असावा. नंतर रामदासी पंथातील, वारकरी संप्रदायातील व इतर काही संतांची सदतीस चरित्रे लिहून ग्रंथ पूर्ण केला व त्यास *भक्तलीलामृत* हे नाव दिले. बहुधा महिपतींचा ग्रंथ ह्यांच्या पाहण्यात आला नसावा. समर्थांच्या चरित्राबद्दल कवी म्हणतो : 'स्वामींचीं चरित्रें वाडवडिलीं श्रवण। जाली तितुकी जाण वर्णियलीं ॥'

परंपरेने ऐकण्यात आलेली माहिती, उदा., समर्थांचे पंचवटीत तप, तीर्थाटन, नंतर घेतलेली मातेची भेट, ठिकठिकाणी मारुतीची व मठांची स्थापना, त्यांच्या हातून घडलेले काही चमत्कार, आणि *दासबोध, रामकथा, मनाचे श्लोक* इत्यादी त्यांच्या रचनेचा निर्देश, ह्या सर्व तपशिलाचे लेखन साक्षेपाने केलेले दिसत नाही. दुसरी गोष्ट म्हणजे ते नीरस वाटते.

जी स्थिती समर्थचरित्राची तीच पुढील संतचरित्रांची झालेली आहे. वारकरी संप्रदायातील अनेक थोर संतांचा त्यांत समावेश झाला आहे. परंतु रामदासी संप्रदायाच्या मठाच्या अधिपतीने लिहिलेल्या ह्या ग्रंथात, त्यांच्या स्वतःच्या संप्रदायासंबंधी किंवा त्यातील अधिकारी पुरुषांसंबंधाने काहीही महत्त्वाची माहिती दिलेली नाही. खुद्द कल्याण व दत्तात्रेय ह्यांची चरित्रेही एक-दोन पानांवरच भागविली आहेत. चरित्रविषय झालेल्या भक्तांची विशिष्ट धोरणाने निवड केलेली नाही. शिवाय जी माहिती दिली आहे तिच्यात कालक्रम नाही आणि ती चौकसपणाने पारखून घेतलेली दिसत नाही.

भीमस्वामींनी त्यांच्या रचनेत यशवंतसुत हे आपले टोपणनाव निर्दिष्ट केले आहे. भीमस्वामींनी लिहिलेल्या *भक्तलीलामृतात* 'भीम म्हणे', 'भीम गाय वाचे' या कविनामनिर्देशाबरोबर 'यशवंतसुत', 'यशवंतसुत संतांच्या अंकित', 'यशवंतसुत संतलीला गाये' अशीही मुद्रा कवी वापरताना दिसतो. ह्या यशवंतसुत कवीने लिहिलेल्या *डांगवी आख्याना*ची (ओ. सं. १०७) एक प्रत धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिरात असून ही पोथी शिरगाव मठातील ग्रंथसंग्रहातून उपलब्ध झाली आहे. *डांगवी आख्यानात* शेवटी "यशवंतसुत अल्पमती। वर्णितसे कथा प्रीति। कृष्ण चेरणी ठेउनि रति। भीम भव तरावया ॥ १०७ ॥" असा उल्लेख आला आहे. ही रचना शिरगाव मठपती भीमस्वामींचीच असण्याची दाट शक्यता आहे असे मत प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांनी *डांगवी आख्याना*वरील त्यांच्या टिपणात व्यक्त केले आहे (मस्वासंप., १९७०, पृ. ५६). *डांगवी आख्याना*च्या ह्या पोथीत *हरिश्चंद्राख्यान, देवचरित्र, विक्रमाचा अभंग* इत्यादी ह्याच कवीची अन्य रचनाही आढळते.

यशवंतसुत कवीच्या नावावरील *सीतास्वयंवर* (८६) व *द्रौपदीस्वयंवर* (६५), अशा दोन काव्यांची नोंद गो. का. चांदोरकर करतात (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २९). *डांगवी आख्यान*कर्ता यशवंतसुत व वरील दोन आख्यानांचा कर्ता यशवंतसुत हे एकच की भिन्न हा वादाचा विषय आहे. ही काव्ये अप्रसिद्ध आहेत, त्यामुळे अंतर्गत पुरावा देता येत नाही, तरीही हे दोन यशवंतसुत म्हणजे एकच व्यक्ती असावी, असे प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांचे मत आहे. *डांगवी आख्याना*ची संहिता प्रा. कुळकर्णी ह्यांनी *मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिके*च्या १९७० च्या वार्षिक अंकात छापली आहे. दुर्वासमुनींनी शाप दिल्याने उर्वशी ही अप्सरा अश्विनी (घोडी) होऊन डांगवी राजाच्या देशात येते. ह्या अलौकिक अश्विनीपायी कृष्ण आणि कौरवपांडवांचे युद्ध होते व शेवटी उर्वशी कृष्णकृपेने शापमुक्त होते ही कथा १०७ ओव्यांच्या ह्या छोट्याशा आख्यानात कवीने रंगविली आहे.

**रचना : मु.** – १. डांगवी आख्यान : संपा. कुळकर्णी, व. दा.; मस्वासंप., अं. ५, १९७०; पृ. ६५–६९. २. भक्तलीलामृत; अभंग संख्या २५७; र. का. : श. १७१९; श्रीसमर्थांची दोन जुनी चरित्रे; संपा. देव, शं. श्री.; धुळे, १९०६; पृ. १–१७०. **अमु.** – १. देवचरित्र; २. विक्रमाचा अभंग; ३. हरिश्चंद्राख्यान; सवामं. **शंका.** – १. द्रौपदीस्वयंवर; २. सीतास्वयंवर; गो. का. चांदोरकर संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. कुळकर्णी, व. दा. : डांगवी आख्यान : एक अभिनव आख्यान काव्य; मस्वासंप., अ. ५, १९७०; पृ. ५५–५८; २. देव, शं. श्री.; श्रीसमर्थांची चरित्रे व उपसंहार; श्रीसमर्थांची दोन जुनी चरित्रे; रामदास आणि रामदासी, भा. २, धुळे, १९०६; पृ. १०–२२, ५१–५४.

**० भीमाजीबुवा** – पहा **भीमस्वामी–२.**

**भीमापौत्र** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – नृसिंहसरस्वतीची आरती; मआ., पृ. ३९४.

**भीमाशंकर** [ ?–समा. श. १६५३, आश्विन व. २ / इ. स. १७३१] कवी. ज्ञानेश्वर परंपरेतील कानडी संत. विजापूर जिल्ह्यातील सिंदगी येथे भीमाशंकर नावाचे एक थोर संतपुरुष होऊन गेले. त्यांचा मठ व शिष्यपरंपरा आजही तेथे चालू आहे. ह्यांचे मूळचे नाव संकप्पा. हे सिंदगीचे कुळकर्णी होते. ह्यांचे घराणे देशस्थ ऋग्वेदी, स्मार्त, विश्वामित्रगोत्री ब्राह्मणाचे. बदामीची बनशंकरी व सिंदगीचा संगमेश्वर ही ह्यांची कुलदैवते. वडिलांचे नाव गुरुनाथ, आईचे नाव सावित्री. गुरुप्पय्या हे ह्यांचे गुरू. त्यांची परंपरा ज्ञानदेवांच्या नाथपरंपरेची एक शाखा आहे, ह्याची फारशी माहिती कोणाला नाही. गुरुप्पय्यांनी बसवेश्वरांचा अनुग्रह घेतला होता. बसवेश्वरांचे मूळ नाव रामनाथ असून ते नाथसंप्रदायी होते. ते *ज्ञानेश्वरी*-निरूपण करीत असत. भीमाशंकरांच्या एका पद्यात पुढील परंपरा सापडते : निवृत्तिनाथ > ज्ञानदेव > सोपान > मुकुंदनाथ > अलक्ष्यनाथ > अचिन्त्यनाथ > अव्यक्तनाथ > भिक्षुकनाथ > रामनाथ > सद्गुरुनाथ (गुरुप्पय्या) >

भीमाशंकर. श. १६०२ (इ. स. १६८०) मध्ये संकप्पास रामतारक मंत्राचा उपदेश देऊन गुरूने ह्यांचे नाव भीमाशंकर असे ठेविले व समाधी घेतली. ह्या परंपरेतील मुकुंदनाथापासून पुढील मंडळी दक्षिणेत गेल्याने कानडी प्रांतात ज्ञानेश्वरवाङ्मयाचा प्रसार झाला.

संकप्पा ह्यांच्या घराण्यात परमार्थसाधना पाच-सहा पिढ्या अगोदरपासून चालत आलेली होती. त्यामुळे प्रथम जेव्हा संकप्पा गुरूंच्या भेटीस गेले, तेव्हा त्यांनी मोक्षमार्गाचीच वाट दाखवावी अशी गुरूला विनंती केली. बळगानुरास हे जकातवसुलीचे काम करीत. तेथेच ह्यांनी गुरूपासून दीक्षा घेतली. त्यानंतर काही काळ बळगानुरास राहून नंतर हे सिदगीस गेले व आपला सारा काळ ईशचिंतनात घालवू लागले. ह्यांनी वेद आणि शास्त्रे ह्यांचा चांगला अभ्यास केला होता. स्त्रीशूद्रादिकांस हे समभावाने वागवीत. त्यामुळे सत्पुरुष म्हणून लोकांमध्ये ह्यांचा लौकिक वाढला. ह्यांची पत्नी गिरिजा ही सात्त्विक होती; तसेच ह्यांचे पुत्र जकप्पय्या व शिवराम हे वेदशास्त्रसंपन्न होते. उत्तरवयात ह्यांनी सिंदगीस मठ स्थापन केला. मठाची सारी सूत्रे त्यांनी आपले ज्येष्ठ पुत्र जकप्पय्या ह्यांच्याकडे सोपवून श. १६५३ आश्विन वद्य द्वितीयेस गुहाप्रवेश करून जिवंत समाधी घेतली.

भीमाशंकरांनी काही कानडी पदे, मराठी पदे व आरत्या अशी रचना केली आहे. आज मात्र त्यातील फारच थोडी रचना उपलब्ध आहे. ज्ञान व भक्ती, तसेच अद्वैततत्त्वज्ञान आणि व्यवहार ह्यांची सांगड कशी घालावी हे ते उत्तम प्रकारे जाणत असत. सिंदगीच्या मठात ह्यांची परंपरानिदर्शक आरती नित्य म्हणण्यात येते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, ना. ब. : विजापूर जिल्ह्यातील एक ज्ञानेश्वर-परंपरा; इंद्रायणी, एप्रि. १९६३; पृ. २७–३१. २. जोशी, ना. ब. : ज्ञानेश्वर-परंपरेतील कानडी संत भीमाशंकर; इंद्रायणी, जून १९६३; पृ. ५१–५६.

**० भीष्ममुनी–१** – पहा **भीष्माचार्य–१.**

**० भीष्ममुनी–२** – पहा **भीष्माचार्य (चौथे) वाइंदेशकर–२.**

**भीष्माचार्य–१ / ० भीष्ममुनी–१** [अंदाजे श. १२६० / इ. स. १३३८] महानुभाव ग्रंथकार व व्याकरणप्रबंधकार. *पंचवार्तिक* ह्या व्याकरणग्रंथाचे कर्ते. हे उपाध्य आम्नायातील. ह्यांचे विद्यागुरू देवगिरीच्या रामदेवराव यादवांच्या दरबारातील प्रसिद्ध विद्वान पंडित बोपदेव हे असून धर्मदीक्षागुरू *हेतुस्थळ*कर्ते न्यायबास हे होते. ह्यांनी *धाराबिंब संज्ञिक भाष्या*मध्ये "महोपाध्यायाम्नाय दीक्षित विराटमुनि श्री बोपदेव महात्मे महदाचार्य शिष्य भीष्माचार्य मुनि" असा स्वतःचा उल्लेख केला आहे.

ह्यांनी संस्कृत व मराठी ह्या दोनही भाषांत बरीच रचना केली आहे. ह्यांचे *दिनकरप्रबंध, ब्रह्मोपनिषदावरील धाराबिंब संज्ञिक भाष्य* ही संस्कृत रचना व *श्रीक्षेत्रऋद्धपूरमाहात्म्य, लक्षणसारोद्धार, सिद्धांतसार, दत्तात्रेयप्रबंध* इत्यादी प्रमुख ग्रंथ उपलब्ध आहेत. ह्यांचे श्लोकबद्ध *मार्गमंजरीस्तोत्र* (मराठी) महंत दत्तराज ह्यांनी सांप्रदायिकांसाठी लाहोर येथे छापले होते.

भीष्माचार्यांनी आनेराज व्यासांच्या *लक्षणरत्नाकर* ह्या संस्कृतात रचलेल्या प्रकरणावर एक भाष्य रचले आहे. *बत्तीस लक्षणांची टीप* ह्या नावाचा *लक्षणरत्नाकरा*वरील जो एक मराठी टीकाग्रंथ सापडतो तो *पंचवार्तिक*कर्त्या भीष्माचार्यांचा असावा असे काही अभ्यासकांचे म्हणणे आहे. *लक्षणरत्नाकर* हे बत्तीस लक्षणांसंबंधीचे एक संस्कृत भाष्य आहे. त्यात चक्रधरांच्या वचनांचे म्हणजेच सूत्रांचे बत्तीस प्रकारे वर्गीकरण केले आहे. भीष्माचार्यांच्या *पंचवार्तिका*तील पाचवे वार्तिक व हा ग्रंथ ह्यांचा प्रतिपाद्य विषय एकच आहे. *लक्षणरत्नाकरा*ला जोडूनच *बत्तीस लक्षणांची टीप* हा ग्रंथ ह. ना. नेने ह्यांनी छापला आहे (नागपूर, १९३९). 'हा ग्रंथ एखाद्या महाभाष्यासारखा आहे. अनुवाद, भूमिका, आक्षेप, परिहार, उपपत्ति, उदाहरणे ह्या दृष्टीनें हें मराठी महाभाष्य अप्रतिम आहे' असे ह्या ग्रंथाविषयीचे मत नेने ह्यांनी व्यक्त केले आहे. पण प्रस्तुत ग्रंथाचा कर्ता निश्चितपणे बोपदेवशिष्य भीष्माचार्यच की दुसरा कोणी हे मात्र सांगता येत नाही, असे ते म्हणतात.

सूत्रलक्षणांचे स्पष्टीकरण करण्यासाठी भीष्माचार्यांनी *पंचवार्तिक* हा ग्रंथ रचला. ही पाच वार्तिके अशी : (१) सूत्रलक्षण, (२) सूत्रप्रकृतिलक्षण, (३) सूत्रकारकलक्षण, (४) सूत्रव्याख्यानलक्षण, (५) सूत्रस्वरूपलक्षण. पहिल्या वार्तिकात 'अल्पाक्षरमसंदिग्धम्' इत्यादी सूत्रलक्षण सांगून सूत्र, वचन, वाक्य, प्रकरण, महावाक्य ह्यांचा विचार केलेला आहे. ह्यामध्येच अनुषंगाने लिंग, वचन, समास, संधी, कृदन्ते, तद्धिते इत्यादी व्याकरणविषयक भागाचा अंतर्भाव होतो. दुसऱ्या वार्तिकात संज्ञा, परिभाषा, विधी, नियम, अतिदेश, अपवाद, विभाषा, निपात, प्रतिषेध, अधिकार अशी 'दशधा सूत्रप्रकृति' वर्णिली आहे. सूत्रप्रकृती समजून घेतल्याखेरीज सूत्रांचा अर्थ नीट समजणार नाही, असे ग्रंथकार म्हणतो. तिसऱ्या वार्तिकात सूत्रकारकाचा विचार स्पष्ट केला आहे. विभक्तिविचार आणि प्रयोग ह्याच संदर्भात चर्चिले आहेत. चोथ्या वार्तिकात सूत्रव्याख्यान म्हणजे काय ते सांगितले आहे. पदच्छेद, पदार्थोक्ती, विग्रह, वाक्ययोजना, आक्षेप व समाधान ह्या सहा प्रकारांनी सूत्रांचा अर्थ प्रकाशित होत असतो. हे सूत्रव्याख्यान होय. शेवटच्या पाचव्या वार्तिकात ज्या बत्तीस लक्षणांनी सूत्रांचे स्वरूप स्पष्ट केले जाते, सूत्रांतर्गत अशेष विशेष भाव उमटविण्याचे कार्य केले जाते, ती लक्षणे सांगून त्यांची उदाहरणे दिली आहेत. *लक्षणरत्नाकरा*त ह्या बत्तीस लक्षणांचा प्रपंच करून पंथीय शास्त्र दृढ करण्याचा प्रयत्न केलेला आहे. ही लक्षणे प्रतिज्ञा, प्रमाण, दृष्टान्त, उपपत्ती, व्याप्ती, विषयप्रदान, उत्सर्ग, अपवाद, निषेध, प्रतीती, विशेषण, प्रतिष्ठा इत्यादी आहेत. ही बत्तीस लक्षणे मुळात एखाद्या संस्कृत ग्रंथावरून घेतलेली असतील किंवा निरनिराळ्या संस्कृत ग्रंथांवरून संकलित केली असतील पण "त्यांचा उपयोग मराठी अर्थनिर्णय करण्याच्या कामी ६०० वर्षांपूर्वी केलेला आढळतो ही एक महत्त्वाची व अभिमानाची बाब आहे. . . . अर्थनिर्णयशास्त्राच्या दृष्टीने ह्या ग्रंथाचे (*लक्षणरत्नाकरा*चे) महत्त्व अजूनही कमी झाले नाही." (ह. ना. नेने, संलेसं., भा. २, पृ. १०–१३). *पंचवार्तिक* ग्रंथाचेही ह्या दृष्टिकोनातून असणारे महत्त्व ध्यानात घ्यायला हवे. पंथीय शास्त्राला दृढ स्वरूप प्राप्त करून देण्यासाठी महानुभाव पंडितांनी रचनेचे जे अनेक प्रयोग केले ते लक्षात घेता १३ व्या शतकात भीष्माचार्यांनी रचलेला हा व्याकरणावरील प्रबंध किती मोलाचा आहे ते समजू शकते. [⇨ ३.]

*नामविभक्ति* असा व्याकरणावरील आणखी एक प्रबंधही भीष्माचार्यांनी रचला आहे. त्याची फारशी माहिती उपलब्ध नाही. ह्या दोन व्याकरणग्रंथांमुळे मराठीतल्या आद्य व्याकरणप्रबंधकारांत भीष्माचार्यांची गणना केली जाते. महानुभावीय आद्य व्याकरणकार म्हणून ह्यांची माहिती व्याकरणकार मो. स. मोने ह्यांनी दिली आहे (*मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरणप्रबंधकार*, पृ. ७६–७८). *पंचवार्तिक* हा भीष्माचार्यांचा ग्रंथही त्यांनी ह्याच पुस्तकात छापला आहे (पृ. ८९–११८). *गद्यराज* नावाचे ह्यांचे एक प्रकरण वि. का. राजवाडे ह्यांनी *ग्रंथमाला* मासिकातून छापून प्रसिद्ध केले आहे (अ. ११५). हे काव्य व हयग्रीवाचार्यांचे *गद्यराज-स्तोत्र* ह्या भिन्न रचना आहेत. प्रस्तुत *गद्यराज* ग्रंथाचा कर्ता आद्य भीष्माचार्य नसून श. १५५३ च्या सुमारास होऊन गेलेला उपाध्य आम्नायातील दुसरा भीष्माचार्य आहे, असे मत ज. शा. देशपांडे ह्यांनी व्यक्त केले आहे (भीष्माचार्यांचा *गद्यराज*; मसंप., जाने. १९६८).

ह्यांच्या नावावरील *मार्गप्रभाकर* ह्या नावाचा जो दुसरा एक ग्रंथ आहे, त्याच्या शेवटी *छन्दःशास्त्रा*वर माहिती दिलेली आढळते. ह्या ग्रंथाच्या कर्तृत्वाबद्दल बरेच मतभेद आहेत. कांही अभ्यासकांच्या मते तो लक्षधीर कवीने लिहिला आहे. भीष्माचार्यांनी *धनंजयकोश, अंताक्षरी, गीतगोविंद* ह्या ग्रंथांवर गद्य टीका लिहिल्या आहेत. त्यात अन्वयपदे पाडून शब्दार्थ व एकंदर अर्थ सांगितला आहे.

भीष्माचार्यांच्या काळात महानुभाव मंडळी संस्कृत व मराठी ह्या दोन्ही भाषांत ग्रंथरचना करीत असे दिसते. पुढे ही रचना नागदेवाचार्यांच्या सूचनेनुसार मराठी भाषेतून होऊ लागली. पंथीय विचारसरणीचा महाराष्ट्रात अशिक्षित व अर्धशिक्षित अशा सामान्य जनतेत प्रसार करणे हा मूळ ग्रंथप्रवर्तकाचा व त्यांच्यानंतर त्यांचे अनुसरण करणाऱ्या महंतांचा प्रामुख्याने उद्देश असल्यामुळे लोकभाषेचे माध्यम स्वीकारणे हे स्वाभाविकच होते. हा दृष्टिकोन नजरेसमोर ठेवून भीष्माचार्यांनी पंथीय तत्त्वज्ञान विशद करणारी विविध प्रकारची रचना केली. ह्यापैकी काही रचनेचे स्वरूप भक्तिपर आहे.

**रचना : अमु.** – १. दत्तात्रयप्रबंध. २. दिनकरप्रबंध (संस्कृत); अ. २४. ३. धनंजयकोशावरील टीका. ४. धाराबिंब संज्ञिक भाष्य (ब्रह्मोपनिषदावरील संस्कृत भाष्य). ५. नामविभक्ति (व्याकरणशास्त्रावरील ग्रंथ). ६. नाममाला. ७. पंचकृष्णप्रातःस्मरण (संस्कृत). ८. पदार्थदीपिका. ९. प्रसादमाला. १०. महाराष्ट्रसुबोधिनी (जयदेव कवीच्या 'गीतगोविंद' काव्याच्या बाराही सर्गांवर टीका). ११. मुक्तामाला. १२. मूर्तिज्ञान. १३. लक्षणसारोद्धार. १४. श्रीक्षेत्रऋद्धपूरमाहात्म्य; अ. १०. १५. सिद्धान्तसार. १६. स्मरणमाला; ममग्रंककासू., पृ. १९. **शंका.** – मार्गप्रभाकर (भक्ति-ज्ञान-वैराग्य ह्यांचे विवेचन करणारा ८१० ओव्यांचा ग्रंथ).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, अ. ना. : प्रामवाइ., भा. २; पृ. २२३. २. नेने, ह. ना. : लक्षणरत्नाकर; संलेसं. २; नागपूर, १९५७; पृ. १–१३. ३. मोने, मो. स. : पंडित भीष्माचार्य : मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरणप्रबंधकार; पुणे, १९२७; पृ. ७६–७८.

**भीष्माचार्य–२ (लासूरकर)** [अंदाजे इ. स. १३८८] टीपग्रंथकार. भीष्माचार्य भिवबा लासूरकर हे श. १३२० च्या सुमारास पारमांडल्य आम्नायात होऊन गेले. ह्या आम्नायातील नागनाथांचे हे शिष्य. ह्यांची *गद्यराजा*वर आणि *अंताक्षरी*वर टीका असल्याचा वि. ल. भावे ह्यांच्या ग्रंथसूचीत उल्लेख येतो.

**रचना : अमु.** – १. गद्यराज ग्रंथावर टीप; २. सुभाषितअंताक्षरी ग्रंथावर टीप; ममग्रंककासू., पृ. १९.

**भीष्माचार्य–३ / ० वाइंदेशकर–१** [अंदाजे श. १४६० / इ. स. १५३८] महानुभाव ग्रंथकार. प्रामुख्याने संकलक. हे उपाध्य आम्नायातील वाइंदेशकर शाखेचे अनुग्रहित. *लीळाचरित्रा*तील सूत्ररूप लीळांचे विशिष्ट प्रकारे संकलन करून आपल्या ग्रंथास *निरुक्तशेष* असे नाव ह्यांनी दिले. प्रस्तुत ग्रंथ पंडित भीष्माचार्य ह्यांनी संकलित केल्याचे ग्रंथाच्या पूर्वार्धाच्या आणि उत्तरार्धाच्या शेवटी दिलेल्या संस्कृत श्लोकावरून दिसून येते. तो श्लोक असा : "निरुक्तशेषं बहुधा विशेषं लीळाविशेषं सकळावशेषम् ॥ घटापथं मुक्तपथं पदार्थं **भीष्मेण** सार्थं लिखितं हितार्थम् ॥" हा भीष्म किंवा हे भीष्माचार्य कोणत्या आम्नायातील, केव्हा आणि कोठे होऊन गेले, ह्याविषयी ग्रंथात वा इतरत्र स्पष्ट असा उल्लेख सापडत नाही. श. १३२५ मध्ये गुर्जरशिवबास व सिद्धान्ते हरिबास ह्यांनी तयार केलेल्या 'तिन्ही स्थळांच्या बांधणी'त या ग्रंथकाराचे नाव येत नाही. पण काही गोष्टींवरून अनुमाने काढायला जागा सापडते. *निरुक्तशेषा*ची पोथी उपाध्य आम्नायाच्या सुंदरी लिपीत सापडते. त्यावरून हे उपाध्य आम्नायातील असावेत असे अनुमान करता येते.

उपाध्य आम्नायाच्या वंशवृक्षात तीन भीष्माचार्य होऊन गेल्याचे दिसते. ह्या तिघांखेरीज चौथेही एक भीष्माचार्य (लासूरकर) पारिमांडल्य आम्नायात (नागनाथशिष्य) श. १३१० (इ. स. १३८८) च्या सुमारास होऊन गेले. उपाध्य आम्नायातील पहिले भीष्माचार्य हे बोपदेवशिष्य. त्यांचा काळ श. १२६० (इ. स. १३३८) दिला आहे. ह्या *निरुक्तशेष* ग्रंथातील लीळांचे संकलन करताना ज्या पाठांतून किंवा व्यक्तींकडून लीळा मिळविल्या त्यांपैकी बऱ्याचशा व्यक्ती ह्या श. १२६० नंतरच्या काळातल्या आहेत. त्यामुळे प्रथम भीष्माचार्यांनी *निरुक्तशेष* ग्रंथ रचला नाही हे निश्चित होते. राहता राहिले द्वितीय आणि तृतीय भीष्माचार्य. हे दोघेही वाइंदेशकर शाखेतील आहेत. त्यांपैकी दुसऱ्या भीष्माचार्यांचा काळ श. १४६० व तृतीय भीष्माचार्यांचा काळ श. १५५३ असा नमूद केला आहे. भीष्माचार्य वाइंदेशकर पहिले ह्यांचा *निरुक्त प्रकरणवश* ग्रंथ भावे ग्रंथसूचीत निर्देशिला आहे. कदाचित *निरुक्तशेषा*चेच हे दुसरे नाव असण्याची शक्यता आहे. चवथे भीष्माचार्य (वाइंदेशकर–२) हे बरेच अलिकडचे आहेत. त्यामुळे हा *निरुक्तशेष* ग्रंथ उपाध्य आम्नायातील भीष्माचार्य [–३] ह्यांचा मानायला हरकत नाही, असे य. खु. देशपांडे ह्यांना वाटते (प्रस्ता., *निरुक्तशेष*).

*निरुक्तशेष* ग्रंथाची संहिता डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी गोपीराज महानुभाव ह्यांच्याकडून प्राप्त झालेल्या सुंदरी लिपीतील एका जुन्या हस्तलिखित प्रतीवरून सिद्ध केली आहे (मुद्रण : नागपूर, १९६१). चक्रधरप्रभूंच्या *लीळाचरित्रा*ची रचना प्रथम म्हाइंभट्टाने केली होती. खालसेयाच्या धाडीत प्रस्तुत ग्रंथ भास्कराचार्यांच्या हातून चोरांनी लांबविला. हा पंथीय प्रमाणग्रंथ अशा तऱ्हेने नाहीसा झाल्यावर नागदेवाचार्यांच्या अनेक शिष्यांनी घोकलेल्या लीळांवरून ह्या चरित्रग्रंथाची पुनर्बांधणी केली. तशी ती करीत असता *लीळाचरित्रा*चे भिन्न भिन्न पाठ तयार झाले. चक्रधरोक्त सर्व सूत्रे एकाच ठिकाणी अंतर्भूत झाली आहेत, असा एकही पाठ उपलब्ध नव्हता. त्यामुळे भिन्न भिन्न पाठांतील चक्रधरांची सूत्ररूप वचने सांगणाऱ्या लीळा एकत्रित करून *निरुक्तशेष* ग्रंथ तयार करण्याची कल्पना वाइंदेशकर भीष्माचार्यांना सुचली. भिन्न भिन्न पाठ व अनेक व्यक्तींच्या वासना असलेल्या लीळा एकत्र करून ह्या ग्रंथाची बांधणी त्यांनी केली. *सूत्रपाठा*तील श्रींची वचने, त्यांचे कोठे वास्तव्य असताना, आपल्या कोणत्या शिष्यांस व कोणत्या प्रसंगी, कोणत्या पद्धतीने सांगितली, त्या सर्व लीळा *सूत्रपाठा*तील सूत्रांच्या क्रमाप्रमाणे ग्रंथकाराने दिल्या आहेत.

ह्या ग्रंथातील लीळांच्या संकलनाचे स्वरूप काय ह्याविषयीची माहिती ग्रंथातील पूर्वार्धात आणि उत्तरार्धात जो एक संस्कृत श्लोक उद्धृत केला आहे त्यात सापडते. *निरुक्तशेषा*च्या अभ्यासावरून असे स्पष्ट होते की, या लीळांमधील सूत्रवचने तेवढी चक्रधरांची व बाकीचा मजकूर म्हणजे श्रींचे कोठे अवस्थान होते, सूत्रवचने कोणा शिष्यास उपदेशिली, ही माहिती माहितगार अशा पंथीय विद्वानांकडून विचारणा करून घातलेली आहे. सूत्रवचनांखेरीज जी माहिती लीळेत आली ती 'निरुक्त' म्हणजेच चक्रधरांनी न सांगितलेली. ह्यावरूनच ग्रंथास *निरुक्तशेष* हे नाव दिले.

केशवराजसूरींनी सूत्रपाठाची रचना केल्यानंतर त्या सूत्रांचे स्पष्टीकरण करण्यासाठी व त्यांच्या अंतरंगाचे विविधांगी दर्शन घडावे म्हणून महानुभावीय पंडितांनी संस्कृत टीकाग्रंथांचा आदर्श पुढे ठेवून लक्षणग्रंथ, टीपग्रंथ, भाष्ये, महाभाष्ये, प्रमेये असे अनेक प्रकारचे ग्रंथ रचले. *सूत्रपाठा*तील सूत्रे स्वामींनी कधी, कोठे व कोणास सांगितली ह्याची माहिती देणारे तीन ग्रंथ आहेत. त्यांपैकी पहिला परशरामबासांचा

*प्रकरणवस* (मु. : १९६८) ग्रंथ, दुसरा वि. ल. भावे ह्यांच्या महानुभाव सूचीत नोंदलेला *निरुक्त प्रकरणवस* आणि तिसरा हा *निरुक्तशेष*. ह्यांपैकी दुसरा ग्रंथ कोणाच्या पाहण्यात नाही. कदाचित दुसरा व तिसरा हे दोन्ही ग्रंथ एकच असतील. जोपर्यंत *निरुक्त प्रकरणवस* पाहण्यास मिळत नाही तोपर्यंत ह्यासंबंधी निश्चित असे काहीच सांगता येणार नाही.

भीष्माचार्यांनी प्रस्तुत ग्रंथ परिश्रमपूर्वक तयार केला आहे. ह्याकरिता अनाम पाठ, मुनीबास पाठ, चक्रपाणी पाठ, नागनाथ पाठ, रामेश्वरपाठ, जाखोबा पाठ, हिरांबा पाठ, एल्होबा पाठ इत्यादी दहा महत्त्वाचे पाठ आचार्यांनी आधारास घेतले. भिन्न व्यक्तींकडे विखुरलेल्या लीळा गोळा करताना साळकर महादोबा, नातिनागाइसे, बाइदेवबास, कमळाइसे, ओंकारबास, दायांबा, मुरारीबा, रामदेव मुनी, पोमाइसे, धानाइसे, कामाइसे इत्यादी सुमारे ३७ व्यक्तींच्या नावांवरील लीळा ह्यांनी *निरुक्तशेषात* घातल्या आहेत.

सूत्रपाठ समोर ठेवून त्यांतील सूत्ररूप वचनाच्या क्रमाप्रमाणे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे भाग करून ग्रंथाची मांडणी केली आहे. पूर्वार्ध व उत्तरार्ध ह्यांमध्ये विषयानुरोधाने तीन तीन भाग केले आहेत. ते पूर्वभागात त्यागस्थळ, संन्यासस्थळ, जिज्ञासास्थळ असे व उत्तरभागात वेधस्थळ, शोधस्थळ व साध्यस्थळ असे आहेत. मुद्रित ग्रंथात वास्तविक ५०० लीळा यायला हव्यात, पण ४५३ च लीळा ग्रंथात आलेल्या आहेत.

*निरुक्तशेष* ह्या गद्य ग्रंथाची भाषा ही तत्कालीन मध्यमवर्गीय ब्राह्मणांची बोली-भाषा आहे. प्रस्तुत ग्रंथ महानुभावांच्या सांकेतिक लिपीत बांधल्याने त्या आम्नायाबाहेर तो फारसा प्रसिद्धी पावला नाही. चक्रधरसूत्रांचा अभ्यास करणारांस किंवा त्यांचे मनन करणारांस विशेष उपयुक्त असा हा ग्रंथ आहे.

**रचना : मु.** – पं. भीष्माचार्य-संकलित निरुक्तशेष; संपा. देशपांडे, य. खु.; विस्तृत प्रस्तावना; नागपूर, १९६१; पृ. १–३४.

**भीष्माचार्य–४ (वाइंदेशकर–२)** / ० **भीष्ममुनी–२** [अंदाजे इ. स. १६४१] महानुभाव ग्रंथकार. उपाध्य आम्नायातील वाइंदेशकर शाखेचे अनुग्रहित. भीष्माचार्यांच्या *गद्यराजाचे* १९ ते २५७ श्लोक 'एक जुनें महानुभाव काव्य' ह्या मथळ्याखाली ग्रंथमालेत (अं. ११५) वि. का. राजवाडे ह्यांनी छापले होते. आज ह्या काव्याची ३०० श्लोकांची संपूर्ण प्रत महंत आराध्य मुरलीधरशास्त्री ह्यांना उपलब्ध झाली आहे. ह्यात *गद्यराजाशिवाय* मराठी *विद्वांसस्तोत्र* (श्लो. सं. ३६), *प्रभुप्रार्थनास्तोत्र* (श्लो. सं. ३९) व काही संस्कृत स्तोत्रे अशी भीष्माचार्यांची रचना सापडते. *गद्यराजातील* बराचसा क्रम पूर्वी होऊन गेलेल्या हयग्रीवाचार्यांच्या *गद्यराजासारखा* आहे. कित्येकदा हयग्रीवाचार्यांच्या अनेक श्लोकांची भीष्माचार्यांनी नक्कल केलेली दिसते. प्राचीन *गद्यराजाच्या* मानाने हे काव्य अर्वाचीन वाटते. ज. शा. देशपांडे ह्यांच्या मते, ह्या काव्याच्या भाषेवरून, हा *गद्यराजकार* आद्य भीष्माचार्य नसून श. १५५३ च्या सुमारास झालेला दुसरा भीष्माचार्य हा असावा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, ज. शा. : भीष्माचार्यांचा गद्यराज; मसंप., जाने. १९६८; पृ. २८–३२.

**भुजंगनाथ** [? – समा. श. १७४५ / इ. स. १८२३] पदकार. पित्याचे नाव दादनाथ. आई काशीबाई. हा डौरी गोसावी असून नाथपंथी होता. ह्याचे वास्तव्य मोगलाईत असे, अशी माहिती अर्वाचीन कोशकार देतात. कवीची तीन पदे वा. दा. ओक ह्यांनी *पद्यसंग्रहात* छापली आहेत.

**रचना : मु.** – गुरुपर, विठ्ठलपर व शिवपर अशी तीन पदे; पदसंग्रह, भा. ३; मुंबई, १९०१; पृ. ८७–८८.

**भूपतिनाथ** [का. अनु.] कवी. *शतमुखरावणकथा* (१३४ ओव्या) ह्या काव्याचा कर्ता. *हनुमन्नाटकाच्या* आधारे कवीने ह्यातील कथाभाग सांगितला आहे. काव्यातील अखेरच्या दोन ओव्या अशा : "हे हनुमंत नाटकाची कथा। मऱ्हाष्ट्र भाषे यथार्थ उलथा। विश्वतोमुख झाला वक्ता। म्हणउनी सिद्धी पावली॥ १३३ ॥ संतांचेनि आज्ञाशब्दे। भूपतीनाथे कृपाप्रसादे। सुरस साहित्य वोविया प्रबंधे। निरोपण संपूर्ण ॥ १३४ ॥ इति हनुमंत नाटके शतमुखरावणकथा समाप्तमस्तु॥" भाषा साधी व प्रवाही आहे.

**रचना : अमु.** – शतमुखरावणकथा; ओ. सं. १३४; तंसम.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, वसंत स. : रामायणावरील उपलब्ध मराठी रचना : शतमुखरावणकथा : भूपतिनाथ; नभामा., जुलै १९७३; पृ. ५०–५१.

**भैरव** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – रसमंजिरी; श्लो. सं. २५३; महा. कवि ४–५; क्र. ३५, ३६, ३७ (श. १८२८, आषाढ, श्रावण, भाद्रपद) व क्र. ३८ (श. १८२८, आश्विन) क्रमशः.

**भैरव अवधूत ज्ञानसागर** [? – समा. श. १७६५, मार्गशीर्ष कृष्ण १३ / इ. स. १८४३] कवी. दत्तसंप्रदायी चैतन्यपरंपरेतील. कविरचित *ज्ञानसागर* ह्या अध्यात्मपर ग्रंथाच्या अखेरच्या भागात ह्यांनी आपले चरित्र सांगून गुरुपरंपराही दिली आहे. उद्धवचिद्घनांचे गुरू चिद्घनस्वामी ह्यांच्या भगिनी नीराबाई ह्यांच्या वंशात भैरव अवधूतांचा जन्म झाला. ह्यांचे उपनाव ज्ञानसागर. आश्वलायनशाखी, विश्वामित्रगोत्री, देशस्थ ब्राह्मण. ह्यांचे पूर्वज सातारा जिल्ह्यातील खानापूर तालुक्यातील विटे ह्या गावचे जोशी व कुळकर्णी होते. वडील ज्योतिपंत व आईचे नाव यमुनाबाई. भैरवबुवांचे आजे मुकुंदपंत व आजी नीराबाई. चुलते शिवाजीपंत ह्यांना संतान नसल्याने त्यांनी भैरवांस दत्तक घेतले. पिता व गुरू एकच. हे म्हणतात : " शिवचैतन्य ज्ञानसागर। जगद्गुरु पार्वतीवर। तेणें माझा अंगीकार। करोनी दीनोद्धार पैं केला॥ "

दत्तोपासना ह्यांच्या घराण्यात परंपरेने चालत आली होती. ही परंपरा सांगणाऱ्या ज्या १०–१२ ओव्या कवीने रचल्या आहेत, त्यांवरून पुढील परंपरा समजते : दक्षिणामूर्ति > दत्तात्रेय > शिवचैतन्य > गोपाळचैतन्य > आत्मारामचैतन्य > कृष्णचैतन्य > अद्वयचैतन्य > चिद्घन (पुत्र व शिष्य) > नागेशचैतन्य > शिवचैतन्य > भैरव अवधूत. भैरवबुवांनी विटे येथे दत्तमंदिर बांधून मठस्थापना केली. त्यांचा पुत्र दिगंबर हा उत्कृष्ट कीर्तनकार असून काव्यरचना करीत असे. बुवांनी श. १७५६ मध्ये मार्गशीर्ष कृष्ण त्रयोदशीस विटे येथे समाधी घेतली.

भैरवांची कविता हजाराच्या आसपास आहे. ह्या रचनेचे स्वरूप प्रायः अध्यात्मपर आहे. *ज्ञानसागर* ह्या ग्रंथात वेदान्ततत्त्वज्ञानाचे विवरण केलेले असून त्याचे १४ भाग व ३१५ ओव्या आहेत. ह्यांच्या संस्कारयुक्त, अभियुक्त आणि प्रासादिक वाणीचा हा ग्रंथ वाचीत असता प्रत्यय येतो. नमुन्यादाखल पुढील काही ओव्या पाहाव्या : "एकांती गायक गाय गाणें। तेथें श्रोता वक्ता आपण। रिझवणें रिझोनी प्रसन्न होणें। येक आपण आपणासी ॥ ५. ९ ॥ तेवीं अद्वैती द्वैत दावी। बहुरंगी अति लाघवी। हे किंचित चिच्छक्ति मिरवी। येकांशीं आघवी जगत्स्थिति॥ ५. १० ॥ " भैरवांनी रचलेल्या वेदान्त, भक्ती, उपदेश, अध्यात्म ह्या विषयांवरील पदांवर व अभंगांवर शिवदीनकेसरींच्या वाणीची छाप पडलेली दिसते.

**रचना : अमु.** – ज्ञानसागर; १४ रेषा; ओ. सं. ३१५ (वंशजांचा हस्तलिखित संग्रह); २. पदे, अभंग इ.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : भैरव अवधूत ज्ञानसागर; मकच., खं. २, मुंबई १९१३; पृ. १८०–१९६.

**भैरवनंदन** [का. अनु.] पदकार.
**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**भैरवसुत त्रिंबक** [का. अनु.] ग्रंथकार.
**रचना : अमु.** – चिदादित्यप्रकाश; नकल श. १८०० (इ. स. १८७८), बहुधान्य, आषाढ व. १२, शनिवार; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ९७.

**भोज** [का. अनु.] पदकार.
**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ७१.

**भोजराज** [का. अनु.] कवी.
**रचना : अमु.** – चंपू (अयोध्याकांड); सवामं. हस्त. सू., खं. २.

**भोजलिंग** [का. अनु.] कवी. ह्याचे एक पद शं. श्री. देव ह्यांनी प्रसिद्ध केले आहे (भाइसंमंइति., श. १८३८, पृ. ५७). पदातील 'भोजलिंग म्हणे सहजानंदाचा । वेगी देवाचा पंथ धरा' ह्या उल्लेखावरून सहजानंद हा कवीचा गुरू दिसतो. ह्या कवीच्या *महात्मसार* ग्रंथाचा उल्लेख *महाराष्ट्रसारस्वता*च्या द्वितीयावृत्तीत वि. ल. भावे ह्यांनी केला आहे.
**रचना : अमु.** – १ महात्मसार ग्रंथ; २. पदे व ओव्या; सवामं. हस्त. सू., खं. १.

**भोजलिंगस्वामी** [का. अनु.] पदकार.
**रचना : मु.** – घुसळण पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. २४.
**अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**भोवानबा** [का. अनु.] शाहीर.
**रचना : मु.** – शहाजी महाराज ऊर्फ बुवासाहेब यांजवरील पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. १०६–१०९.

**० भोसले शाहराज** – पहा **शाहराज भोसले.**

**भोळानाथ** [का. अनु.] पदकार.
**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**भोळाराम** [का. अनु.] कवी. हे रामदासांचे शिष्य होते. ह्यांनी रचलेला *प्रेमकळा* हा ग्रंथ वि. का. राजवाडे ह्यांस पैठणजवळील शेवगाव येथे सापडला. समाप्तीची ओवी अशी : "गुरुकृपा शते । च्यारी चौ आगळीं । पूर्ण करी भोळी । भक्ति राम ॥ ४ : १०४ ॥ इति श्री प्रेमकळा ग्रंथ चतुर्थ प्रसंग समाप्तमस्तु ।"
**रचना : अमु.** – प्रेमकळा; प्रसंग ४; ओ. सं. ४०४; भाइसंमं.
**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : भोळारामकृत प्रेमकळा ग्रंथ; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १७.

**० मॅकलेनॉन, जॉन** – पहा **जॉन मॅकलेनॉन.**

**० मखबा, महंमद इब्राहिम मुनशी** – पहा **महंमद इब्राहिम मखबा.**

**मंगलपुरी** [का. अनु.] पदकार.
**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मंगिश** [का. अनु.] कवी. *राधाविलास* (१७१ श्लोक) काव्याचा कर्ता. हे काव्य अनेकवृत्तात्मक असून पंडिती कवींच्या परंपरेतले आहे. राधेच्या मनात उद्भवलेल्या अनेक शंकांचे निवारण करून शेवटी कृष्ण तिच्याशी एकरूप होऊन तिचा उद्धार करतो अशी काव्याची कथा आहे. देवाच्या शृंगारचेष्टांचे मोठ्या भक्तिभावाने इतर अनेक कवींप्रमाणे ह्याही कवीने वर्णन केलेले आहे.
**रचना : मु.** – राधाविलास; विविध वृत्तांत श्लोकरचना : श्लो. सं. १७१; संपा. केळकर, ना. चिं.; अकलकामा., भा. ३; पृ. ३७–५७.

**० मंगीश** – पहा **पूर्णप्रकाशानंदनाथ.**

**मंगीशात्मज** [का. अनु.] आरतीकार. ह्याने रचलेल्या शांतादुर्गेच्या आरत्या पाहिल्यानंतर हा गोव्याकडील राहणारा असावा अशी कल्पना होते. जगदंबा, महामाया, शांतादुर्गा, दशावतार अशा देवतांवरील पाच आरत्या ह्याने रचलेल्या आहेत. प्रत्येक आरतीच्या अखेरीस कवीने आपले नाव उल्लेखिले आहे.

ब्रह्मस्वरूपाचे वर्णन हा मंगीशात्मजांच्या आरत्यांचा विशेष आहे. त्या दृष्टीने आरत्यात येणारे वर्णन पाहण्यासारखे आहे. जगदंबेच्या आरतीत विरोधी गुणांचा ब्रह्माच्या ठिकाणी झालेला समन्वय दाखवला आहे. उदा., 'ब्रह्म हें एक अद्वय साकारमय । असुनि निर्गुण तें सगुण आहे ॥' महामायेच्या आरतीत त्या मूलतत्त्वाचे सर्वव्यापकत्व व पृथक्त्व 'एक तूं अनेक झाली असता परती राहुनिया' ह्या ओळीत कवी स्पष्ट करतो. शांतादुर्गेच्या आरतीत 'स्वेच्छें ब्रह्म तूं स्फुरसी प्रगटसि मूळमाये' असे म्हणून स्वतःच्या प्रेरणेनेच मूळ निर्गुणावस्था सोडून ते सगुणावस्थेत येते असे कवी सांगतो. ह्या अवस्थान्तराच्या प्रक्रियेचे स्वरूप काव्यमय शब्दांत शांतादेवीच्या आरतीत व्यक्त केले आहे : 'स्वेच्छें ब्रह्म तूं कौतुकनट क्रीडनकामें । धरुनी सगुणरूपा रचिलीं त्रयधामें ॥' आरतीवाङ्मयाची जी एक परंपरा महाराष्ट्रात निर्माण झाली आहे तीमधील एक उल्लेखनीय रचनाकार म्हणून मंगीशात्मज कवीचे नाव स्मरणात राहते.
**रचना : मु.** – १. जगदंबेची आरती; २. महामायेची आरती; ३. दशावतार; ४. शांतादुर्गेच्या २ आरत्या; मआ.; पुणे, १९६७; पृ. ३१६, ३७८, ३९८, ४४३.
**चरित्र, चर्चा, अभ्यास :** गोखले, म. वि. : (आरत्यांतील) ब्रह्मस्वरूपाचे वर्णन; मआ., पुणे, १९६७; पृ. ४९–५६.

**० मंगेश कवी** – पहा **पूर्णप्रकाशानंदनाथ.**

**मचेंद्रकुमार** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] कवी. *शिवरात्रीकथन* (ग्रं. सं. १२४) काव्याचा कर्ता (मु. : अकलकामा., भा. ४). *लघुकाव्यमाले*चे संपादक नारायण चिंतामण केळकर व दामोदर केशव ओक म्हणतात : "ज्या पोथीतून आम्हीं हें प्रकरण उतरून घेतलें, ती पोथी श. १७०१ ह्या सालची म्हणजे सुमारें १२५ वर्षांची जुनी आहे. ह्यावरून प्रस्तुत कवी होऊन गेल्यास १२५ वर्षांपेक्षा जास्त वर्षें झालीं असलीं पाहिजेत, हे उघडच आहे." (तत्रैव, टीप, पृ. १६४).

ही कथा *लिंगपुराणा*तील असून उमामहेश्वरसंवादरूप आहे. उदा., "हें पुण्यकीर्तन वदे शिव पार्वतीतें, तें ऐकतां परम सौख्य दिसे सतीतें । जो थोर मुक्तिपथ 'लिंगपुराण'सिद्ध, त्याचीच हे 'शिवनिशी' पथिका प्रसिद्ध ॥ १२२ ॥"

*शिवरात्रीकथन* प्रकरणात एका निषादाच्या कथेच्या अनुषंगाने शिवरात्री व्रताचे महत्त्व सांगितले आहे. ह्या व्याधाला शिकार प्राप्त न झाल्याने शिवरात्रीचा उपास घडतो व जागरण होते, त्यामुळे आपाततः ह्या व्रताचे पुण्यफल प्राप्त होऊन त्याला मुक्ती मिळते. काव्य अनेक वृत्तांत रचलेले आहे. त्यामध्ये तीन-चार कथा एकत्र गुंफल्या आहेत. रचनेची धाटणी आकर्षक आहे. शेवटच्या ओळीत स्वतःचा मचेंद्रकुमार असा कवीने उल्लेख केला आहे.
**रचना : मु.** – शिवरात्रीकथन; ग्रं. सं. १२४; अकलकामा., भा. ४; मुंबई, १९०३; पृ. १६४–१७७.

**मच्कुंद / ० शिवसुत मच्कुंद** [अंदाजे शक १६०० / इ. स. १६७८] कवी. हा मच्कुंद कवी नव्याने ज्ञात झाला असून त्याचा *भार्गवचरित्र* हा ग्रंथ डोमगावी दत्तात्रयबुवांच्या मठात शं. श्री. देव ह्यांस सापडला. कवीचा काळ निश्चितपणे माहीत नाही. तथापि ते श्रीसमर्थांच्या काळात विद्यमान असावेत. ग्रंथाच्या मंगळाचरणाच्या पहिल्या अध्यायात सद्गुरुस्तवन आहे. पण गुरूचे नाव मात्र सांगितलेले नाही. प्रस्तुत ग्रंथाची उपलब्ध प्रत अपूर्ण असून तिच्यात ३२ प्रसंग व सुमारे ३००० ओव्या आहेत. आणखी एवढाच ग्रंथ असावा, असे मत देव ह्यांनी व्यक्त केले आहे.

ह्या ग्रंथात कवीने *भार्गवचरित्र* म्हणजेच विष्णूचा सहावा अवतार परशुराम ह्याचे चरित्र वर्णन केले आहे. ग्रंथास *स्कंदपुराणा*चा आधार असल्याचे कवी सांगतो. ह्यामध्ये वीररसाचाच प्रामुख्याने आविष्कार झालेला आहे.

**रचना : अमु.** – भार्गवचरित्र; प्रसंग ३२; ओ. सं. सुमारे ३०००; सवामं. बा. १५४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री.; शिवसुतमच्कुंदकृत श्रीभार्गवचरित्र; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ५९.

**० मंडळीक येल्हणसुत** – पहा **येल्हणसुत मंडळीक.**

**मणिराम नीळभट्ट भारद्वाज** [अंदाजे इ. स. १७५८] कवी. *शृंगारमंजरी* ह्या काव्याचा कर्ता. ह्या काव्याची पोथी जुन्या हस्तलिखित बाडात पुसद तालुक्यातील (विदर्भ) विडळीये गावी सापडली. काव्याच्या प्रशस्तीत "इति श्रीमत् काशिस्थ भारद्वाजोपनाम नीळभट्टोपसुत मणीरामकविविरचितियां शृंगारमंजरीयं प्रथम कुसुमं ॥" असा निर्देश येतो. ह्यावरून हा मणिराम कवी काशीचा रहिवासी होता हे समजते. भारद्वाज हे त्यांचे उपनाव. मणिराम नीळभट्ट भारद्वाज कोणत्या काळात होऊन गेले ह्याबद्दल प्रत्यक्ष पुरावा सापडत नाही. पोथीची भाषा, कागद आणि लेखनपद्धती ह्यांवरून ती इंग्रजी अमदानीच्या काही वर्षे अगोदरची असावी असे वाटते. ओफ्रेक्टच्या कॅटलॉगात Maniram, son of Nilkanth ह्याच्या नावावर इ. स १७५८ मध्ये लिहिलेल्या *ऋतुसंहारचंद्रिकेचा* उल्लेख येतो. प्रस्तुत *शृंगारमंजरी*कार व हा मणिराम एकच की काय हे निश्चयपूर्वक सांगता येत नाही. पण त्याचे नाव आणि लेखनकाळ मात्र जुळतो.

हे शृंगारशतक काव्य म्हणजे संस्कृतातील शृंगारिक काव्याची माहिती असणाऱ्या एका कवीने त्याच धर्तीवर रचलेले एक मराठी *शृंगारशतक* आहे. हे काव्य भाषान्तरित नाही. त्यातील शब्दयोजना, वाक्प्रचार व सामाजिक चालीरीती खास कविकालीन दिसतात. ७० श्लोक नायकोक्ती, २५ नायिकेच्या तोंडचे व उरलेले ६ श्लोक कव्युक्ती म्हणून गणले जातील अशा जातीतले आहेत. अक्षरगणवृत्ते योजून मुक्तक पद्धतीची रचना केली आहे.

रचना आणि भाषा ह्या दृष्टीने काव्य सामान्य असले तरी रमणीय अशा अर्थालंकारांची काही ठिकाणी योजना करून त्यात कवी खुलावट आणताना दिसतो. नायिकावर्णनात एके ठिकाणी "लाजे सुंदर चंद्र जाउनि सवें तो फीरतो अंबरीं। पाहूनी सखि रूप सुंदर तुझें, होतो खुशी अंतरीं ॥" असा नावीन्यपूर्ण व्यतिरेक साधला आहे. कवीची मराठी भाषा उत्तरेकडील प्रांतातील वास्तव्यामुळे हिंदीप्रचुर आहे.

पूर्वकालीन पारमार्थिक प्रयोजनापासून हे काव्य अलिप्त आहे. प्राचीन व आधुनिक मराठीच्या सीमारेषेवरील लौकिक शृंगार वर्णन करणारे म्हणून मराठी काव्येतिहासात हे काव्य लक्षणीय ठरण्यासारखे आहे.

**रचना : अमु.** – शृंगारमंजरी; अनेकवृत्तात्मक; श्लो. सं. १०१.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशमुख, मा. गो. : मणिरामविरचित शृंगारमंजरी; तरुणभारत; नागपूर; जून १९६५.

**० मतिविवेकनामा** – पहा **विष्णुदासनामा.**

**मदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मधुकर** [अंदाजे शके १५४५ / इ. स. १६२३] कवी. कृष्णयाज्ञवल्कींचा शिष्य. त्यांच्या पश्चात स्फूर्ती होऊन ह्याने गुरूचा *कथाकल्पतरु* हा अपूर्ण ग्रंथ शके १५४५ त पूर्ण केला. *कथाकल्पतरु* ग्रंथाचा उत्तरार्ध (ओ. सं. १८७००) पूर्ण करणाऱ्या ह्या कवीचे मूळचे नाव महादेव. आपण खैरकार सोमवंशातील शिवराम व चाहिजी ह्यांच्या पोटी जन्मलो व 'राज्यकाजीं प्रौढबुद्धि' ठेवून मोहरी गावी अखंड वास केला असे हा कवी सांगतो. तो राजाश्रित असल्याने त्याने *कथाकल्पतरु* ग्रंथात वर्णिलेल्या राजे लोकांच्या मौजा मनोरंजक वाटतात (मसा., आ. ५, पृ. ७८०–७८१). [➪ ३.]

**रचना : मु.** – कथाकल्पतरु : उत्तरार्ध : स्तबक १४६; ओ. सं. १८७००; र. का. : श. १५४५ / इ. स. १६२३; मुंबई, १८९३.

**मधुसूदन व्यास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – विक्रमचरित्र; भाषा जुनी; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ७२.

**मध्वनाथ** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक] कवी. ह्यांनी लिहिलेल्या *गुरुचरित्र* ह्या ग्रंथात योगाचे वर्णन असून येकाजनार्दनाचा गुरू म्हणून उल्लेख केला आहे, तो असा : "**येका जनर्दना** कथा रसाळ । ब्रह्मनिरोपण केलें सगळें । अमृतवल्लि फळें सुफळ । फळिली निजात्म निजफळीं ॥" स्वतःचा मध्वनाथ असा कवीने उल्लेख केला आहे. कवीचे गुरू एकनाथ असल्याने पदकार मध्वमुनींपेक्षा हे भिन्न असावेत, असे गो. का. चांदोरकर ह्यांना वाटते. *गुरुचरित्रा*त, प्रथम प्रणवाची उत्पत्ती, नंतर देहचतुष्टयविचार, चार वाचा, चार अवस्था सांगून षट्चक्रांचा विचार केला आहे. मग कुंडलिनीचे वर्णन व नंतर मुद्राप्रकरण येते. अशा रीतीने योगस्थ झालेला पुरुष कसा तर "ऐसा तो ब्रह्मपुरुष । परमात्मयाचा अंश । जिवा रहित विश्वेश । मध्वनाथ आनंदला ॥ ५९ ॥" असे सांगून योग्याची स्थिती वर्णिली आहे. राजवाडे ह्यांच्या कऱ्हाडसंग्रहातील बाडात मध्वनाथ कवीचे *कृष्णजन्म* नावाचे ५४ ओव्यांचे एक चटकदार प्रकरण सापडले आहे. ते ह्या मध्वनाथांचे किंवा मध्वमुनींचे ते समजण्यास साधन नाही (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २७५).

**रचना : अमु.** – गुरुचरित्र; वेदान्तप्रकरण; त्रु. पो.; भाइसंमं. **शंका.** – कृष्णजन्म; ओ. सं. ५४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : मध्वनाथकृत गुरुचरित्र; भाइसंमंइति., पृ. ३९–४०. २. पोतदार, द. वा.; मध्वनाथकृत कृष्णजन्म; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २७५.

**मध्वमुनीश्वर** [ ? – समा. श. १६५३, मार्गशीर्ष शु. १५ / इ. स. १७३१] संतकवी व कीर्तनकार. ह्यांचे मूळ गाव नाशिक. वडिलांचे नाव नारायणाचार्य व आईचे नाव द्वारावती. ह्यांचे घराणे ऋग्वेदी देशस्थ. हे माध्वसंप्रदायी कट्टे वैष्णव होते. नारायणाचार्यांनी वैष्णव असताही पुत्रप्राप्तीकरिता त्र्यंबकेश्वरी अनुष्ठान केले. त्र्यंबकाच्या प्रसादाने त्यांस पुत्र झाला. त्याचे त्यांनी त्रिंबक असे नाव ठेवले. हेच प्रसिद्ध संत मध्वमुनीश्वर होत. आपले गुरू शुकमुनी असे हे स्वतः सांगतात : "श्रीगुरु शुकमुनिचे पायीं । प्रेमें ठेविली म्यां डोई ॥ माझा केला अंगीकार । मस्तकीं दिधला अभयकर ॥" पुढील काळात, माध्वसंप्रदायाचे प्रमुख आचार्य नाशिक येथे एकदा आले असता त्रिंबकाचे वेदान्तविषयक ज्ञान, त्याची विरक्त वृत्ती, ज्ञान व भक्ती ह्यांचा मेळ घालून चाललेली आध्यात्मिक साधना पाहून त्याजवर संतुष्ट झाले. त्यांनी त्याचा सत्कार केला व त्याचे 'मध्वमुनीश्वर' असे नामकरण केले तेव्हापासून त्रिंबकाचे मध्वमुनीश्वर हे नाव रूढ झाले. ह्यांनी पुष्कळ तीर्थाटन केले. ठिकठिकाणी अनेक उत्सव सुरू केले. तीर्थयात्रा संपविल्यानंतर ह्यांनी नाशिक सोडले व हे शेंदुरवाडा (जि. औरंगाबाद) येथे स्थायिक झाले. तेथे त्यांनी आश्रम केला. त्या आश्रमाच्या जागी त्यांच्या शिष्यांनी मोठा मठ बांधला. मध्वमुनीश्वरांचा शिष्यपरिवार बराच मोठा असून अमृतराय, भोजराज, लक्ष्मणराव असे त्यांचे अनेक शिष्य नावाजलेले आहेत.

मध्वमुनीश्वर जसे वेदान्ती तसेच श्रेष्ठ दर्जाचे वक्ते होते. श्रीपांडुरंग त्यांचे आराध्य दैवत होते. वार्धक्यामुळे पंढरीस जाणे त्यांस जेव्हा

अशक्य झाले तेव्हा त्यांनी शेंदुरवाडा येथे श्रीपांडुरंगाच्या मूर्तीची स्थापना केली व आपले शेष आयुष्य तिच्याच जवळ राहून तिच्या आराधनेत घालविले. श. १६५३ मार्गशीर्ष शु. पौर्णिमेस मध्वमुनीश्वरांनी इहलोक सोडला व ते चैतन्यात विलीन झाले.

मध्वमुनीश्वर हे उत्तम कीर्तनकार होते. कीर्तनाच्या निमित्ताने ह्यांनी पदे व कवने रचली. "विविध गुणांनी युक्त अशी ही रचना आहे. त्यांत विनोद, स्पष्टोक्ति, नादमधुर शब्दरचना, शब्दचमत्कार, सामाजिक चित्रें, भक्ति, प्रेम इत्यादि अनेक चमत्कृति असून त्या फार रम्य उतरल्या आहेत." (द. वा. पोतदार : पुरस्कार, *मध्वमुनीश्वरांची कविता*, पृ. ९). त्यांची कविता गेय, यमक-प्रासयुक्त व मधुर चालीत रचलेली आहे. [ ⇨ ३. ] त्यांची प्रतिभा पदरचनेत प्रकर्षाने रमते. बांधीव आणि रेखीव अशी पदे ते लीलया रचताना दिसतात. 'उद्धवा शान्तवन कर जा', 'तूं माझा यजमान, रामा ! तूं माझा यजमान', 'मनमोहन वाजवि वेणू', 'कान्हा संभाल रे, संभाल अपुल्या गाई', 'याच्या हातिचा वेणु कुणि घ्या गे', अशी ह्यांची अनेक पदे प्रसिद्ध आहेत. 'माझें अचडें-बचडें छकडें वो', हे त्यांचे उत्कट वात्सल्यरसाने भरलेले पद आजही महाराष्ट्रात घरोघरी गायिले जाते. पदांबरोबर स्फुट श्लोक, आरत्या, अभंग आणि लावण्याही त्यांनी रचल्या आहेत. सामान्य जनतेला आपले मनोगत सांगताना प्रसंगी उचित अशा वेगवेगळ्या सरणीचा अवलंब त्यांना करावा लागला. ह्या दृष्टीने त्यांची शिशुगीतेही लक्षात ठेवण्याजोगी आहेत. मध्वमुनीश्वरांची हिंदी कवनेही मराठी कवनांप्रमाणेच मधुर व प्रासादिक आहेत.

**रचना : मु. –** १. मध्वमुनीश्वरांची कविता; संपा. गुब्बी, प्र. व्यं.; पुणे, १९३३. २. मध्वमुनीश्वरांची हिंदी पदे; सं. २७; हिंमसंदे.; संपा. शर्मा, विनयमोहन; पटना, १९५७; पृ. ३७५–३८४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : मध्वमुनीश्वर; गंगाजळी; पुणे, १९७२; पृ. ५४–६०. २. पोतदार, द. वा. : मध्वमुनीश्वरांची कविता : पुरस्कार; पुणे, १९३३; पृ. १–१२.

**मनोहर ऊर्फ आबामहाराज** [का. अनु.] कवी, ग्रंथकार. ग्वाल्हेर येथे रामदासी मठाची स्थापना करणाऱ्या लक्ष्मणमहाराज शिरगावकरांचे हे वंशज. ह्यांचे *रामायण*, *वाग्विलास* व *पंचीकरण* हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत (कृ. गं. कवचाळे, मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४२).

**मन्मथ शिवलिंग / ० मन्मथस्वामी** [श. १४८२, माघ शु. ५ / इ. स. १५६१ – समा. श. १५३५, भाद्र. शु. ३ / इ. स. १६१३] वीरशैव कवी. हे नेकनूर (जि. बीड) ह्या गावी एका शैव कुटुंबात जन्मले. ह्यांचे वडील शिवलिंगस्वामी कळंब (जि. उस्मानाबाद) येथील, व माता पार्वती ही निनगूर (नेकनूर) ह्या गावची. घरी व आजोळी शिवभक्तीचे वातावरण असल्याने मन्मथांवर बालपणापासूनच शैव संस्कार घडले. ह्यांचे वास्तव्य बीड जिल्ह्यातील कपिलधार ह्या निसर्गरम्य ठिकाणी असे. येथेच त्यांनी ग्रंथरचना केली. मन्मथस्वामींनी भाद्रपद शु. तृतीया, श. १५३५ ह्या दिवशी कपिलधार येथे संजीवन समाधी घेतली. प्रतिवर्षी कार्तिक शु. १५ ते वद्य ५ ह्या दिवसांत त्यांच्या पुण्यस्मृतीला वंदन करण्याच्या निमित्ताने कपिलधार क्षेत्री यात्रा भरते. ह्यांच्या शिष्यपरिवारात बीडचे शिवदास, धोतऱ्याच्या अष्टीचे (जि. परभणी) लक्ष्मणदास व हानेगाव (जि. नांदेड) येथील रामलिंग हे प्रसिद्ध आहेत.

नागेश हे मन्मथस्वामींचे गुरू असे सांगण्यात येते. डॉ. यू. म. पठाण ह्यांनी *नागेश संप्रदाय* ह्या पुस्तिकेत, वडवाळसिद्ध नागनाथांच्या ज्या अकरा शिष्यशाखा होत्या त्यांपैकी अकरावी शाखा मन्मथस्वामींची होती असे म्हटले आहे. *परमरहस्य* ह्या ग्रंथात शेवटी मन्मथस्वामींनी "यालागीं शिव तोचि हा नागेश्वरु। परंपरेंचि बसवराज श्रीगुरु। माणूरमठसिंहासनाधिकारु। असे जाण जयाशीं ॥" असा गुरूचा निर्देश केला आहे. ह्यावरून ह्या कवीच्या गुरूचे सांप्रदायिक नाव नागेश्वर होते, त्यांना बसवराजही संबोधीत असत व ते माणूरच्या (जि. बीड) वीरशैव मठाचे अधिपती होते, अशी कल्पना होते. मन्मथस्वामींच्या नागेश्वरगुरुसंबंधात रा. चिं. ढेरे ह्यांनी जे मत व्यक्त केले आहे ते असे : "माणूरचे नागनाथ व वडवळचे नागनाथ एकच होते. नागेशांचा गुरुबोध मन्मथस्वामींना अप्रत्यक्षपणे लाभला असावा. बसवराज हे नागेशगुरूचे प्रतिनिधी म्हणून परमार्थसंगोपक होत." (प्रामनधा., पृ. १२०). *ज्ञानबोधा*च्या उपसंहारात गुरूशी साधलेला एकात्मभाव व्यक्त करताना मन्मथशिवलिंगांनी "जैसें सागरीचें लवण। सागरीं गेलें विरोन। मग मीठ आणि जीवन। भेद कैचा ॥ तैसा नागेशाचा अंश जाण। मन्मथशिवलिंग आपण। तो नागेशाचा नागेशीं विरोन। नागेशचि जाला ॥" असे म्हटले आहे. ह्यावरून ढेरे ह्यांचे मत विचारार्ह आहे असे दिसते. नागेशपरंपरेतील एक थोर ग्रंथकार म्हणून ढेरे ह्यांनी मन्मथशिवलिंगांचा विचार केला आहे.

आपला परमानुभव आणि परमसिद्धान्त व्यक्त करण्यासाठी स्वामींनी अनेक ग्रंथ व शेकडो अभंग रचले. त्यांपैकी *परमरहस्यसारामृत* हा ग्रंथ महत्त्वाचा असून त्याचे १७ अध्याय व १३८६ ओव्या आहेत. *गुरुगीता* आणि वीरशैवांचे आचारविषयक धर्मग्रंथ ह्यांतील २६४ श्लोकांचे आधार घेऊन त्यांच्या अनुरोधाने वीरशैव आचारधर्म ह्या ग्रंथात प्रतिपादला आहे : "शिवपार्वतीसंवाद। वीरशैव आचारभेद। वर्णिला असे नानाविध। त्याचें सार कथिलेंसे ॥ १७.५१" ह्या 'आचार मार्गाचे ठायीं। रावरंक समानही' असे मन्मथस्वामींनी आपले मत व्यक्त केले आहे. त्याचमुळे 'मार्ग चुकता अग्रेसरही। नीचपदास येई' असा आचारभ्रष्टतेचा परिणाम ते सांगतात व 'धर्मे चाले तो पंचानन' असा आचारप्रवणाचा ते गौरव करतात. मन्मथस्वामींनी साधकांसाठी शिवयोगाचा क्रमोन्नतमार्ग उत्तम प्रकारे ह्या ग्रंथातून विवरिला आहे. [ ⇨ ३. ] मन्मथस्वामींनी रचलेल्या *गुरुगीते*च्या टीकेत मूळ १६३ संस्कृत श्लोकांचे विवरण ५६१ ओव्यांत येते. टीकेच्या मंगलाचरणात संतगौरव आहे. ही *गुरुगीता* सूत्ररूप असून कमीत कमी शब्दांत अधिकात अधिक आशय व्यक्त करणाऱ्या त्यांच्या प्रभावी शैलीचे दर्शन तिच्यात घडते.

स्वामींचे *ज्ञानबोध* हे प्रकरण केवळ १४३ ओव्यांचे असून त्यात ज्ञान, अज्ञान, वैराग्य, भक्ती, तत्त्वमसि, सत्संगमहिमा, संतलक्षणे असे विषय हाताळले आहेत. परमभक्तीचे रहस्य प्रकट करताना ज्ञानोत्तरभक्तीच श्रेष्ठ असे ते सांगतात. ग्रंथ गुरुशिष्यसंवादरूप आहे. *ज्ञानबोधा*ची संपूर्ण विचारधारा ज्ञानेश्वरप्रभावित आहे. *ज्ञानबोधा*तील अनेक ओव्या ह्याची साक्ष देतील. *मन्मथबोधामृत* हा त्यांचा अभंगसंग्रह प्रकाशित झाला आहे. हे अभंग वीरशैवांच्या भजनांत लोकप्रिय झाले असून मन्मथशिवलिंगांच्या परमार्थपटावरील हालचालींचा आलेख त्यांत स्पष्टपणे पाहता येतो. वारकरीपंथीयांच्या अभंगांत व्यक्त झालेल्या विचारधारेशी ह्या अभंगरचनेचे सादृश्य आहे.

मन्मथशिवलिंगांचे *अनुभवानंद* व *स्वयंप्रकाश* असे दोन ग्रंथ डॉ. पंडित आवळीकर ह्यांनी एकत्रित संपादून प्रसिद्ध केले आहेत (१९६६). *अनुभवानंद* हे २४६ ओव्यांचे एक प्रकरण आहे. त्यामध्ये अद्वयानंदाच्या अनुभवाचे वर्णन येते. ह्या प्रकरणास *बृहदारण्यकोपनिषद*, *गीता*, *विवेकसिंधु* ह्या ग्रंथांचा मुख्य आधार आहे. *स्वयंप्रकाश* ग्रंथावर तर *विवेकसिंधू*चा इतका प्रभाव आहे की ती *विवेकसिंधू*ची लघू आवृत्ती तर नव्हे ना, असा संभ्रम पडतो. ह्याची ७ प्रकरणे व ७३९ ओव्या आहेत. ह्या दोनही ग्रंथांत वीरशैव तत्त्वज्ञान न येता भागवतधर्मीयांची अद्वैतवादी विचारसरणी आली आहे. तात्त्विक

स्वरूपाची ग्रंथरचना, वीरशैवांची शिवभक्ती, योगसिद्धीचे सामर्थ्य व सात्त्विक वृत्ती अशा अनेक व्यक्तिवैशिष्ट्यांनी मन्मथस्वामींनी मराठवाड्यात आपला प्रभाव गाजविला.

**रचना : मु.** – अनुभवानंद, ओ. सं. २४६, व स्वयंप्रकाश, ओ. सं. ७३९; संपा. आवळीकर, पंडित; धारवाड, १९६६. २. गुरुगीता; ओ. सं. ५६१; संपा. जोशी, सुरेश, शान्तितीर्थस्वामी, ठुसे, कुंदा; नगर, १९७३; पुरस्कार : संगय्यास्वामी; पृ. १–२२. ३. परमरहस्यसारामृत; अ. १७; ओ. सं. १३८६; र. का. : श. १५२२, माघ व. १४; लातूर, १९३१, अहमदपूर, १९६१. ४. मन्मथगाथा ऊर्फ मन्मथबोधामृत; अभंगसंख्या ११०; सोलापूर, १९६५. ५. लावणी; पोतदार, द. वा.; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २७६–२७८. ६. विभूति; ओ. २१; कपिलधार मासिक; चाकूर, सप्टें.–ऑक्टो. १९६५. ७. ज्ञानबोध; ओ. सं. १४३; संपा. बडवे, अनिलकुमार; इंद्रायणी, नोव्हें.–डिसें. १९६३; पृ. ८४–९२. **अमु.** – १. महिम्न स्तोत्रावरील टीका (हस्त.); पुरंदरे, मदन; नागपूर. २. शिवगीताटीका (अनुपलब्ध). ३. स्फुट कविता – अर्जदास्त, पदे, भारुडे इ. **शंका.** – मन्मथबोध किंवा गुरुचरित्र.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : श्रीमन्मथशिवलिंगस्वामींचे वाङ्मय; इंद्रायणी, नोव्हें.–डिसें. १९६३; पृ. ५९–७३. २. ढेरे, रा. चिं. : मन्मथशिवलिंगस्वामी; नागेशपंथीयांचे मराठी वाङ्मय; प्रामनधा., कोल्हापूर, १९७२; पृ. ११६–१३३. ३. पठाण, यू. म. : नागेशसंप्रदाय; औरंगाबाद, १९६३; पृ. २५. ४. माणूरकर, शिवचंद्र : संतशिरोमणी मन्मथस्वामी; श्रीगुरुदेव, व. २६, मार्च १९६९; पृ. ९. ५. कपिलधार मासिक, नोव्हें. १९६४ (मन्मथस्वामी खास अंक). ६. ज्ञानप्रसाद मासिक, नोव्हें. १९६५ (खास अंक).

**० मन्मथस्वामी** – पहा **मन्मथ शिवलिंग.**

**मंबाजी बावा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० मयंकसुत मुरारीमल्ल** – पहा **मुरारीमल्ल–१.**

**० मयूरकवी** – पहा **मोरोपंत.**

**० मयूरपंडित** – पहा **मोरोपंत.**

**मरळसिद्ध** [का. अनु.] कवी. ह्यांचा *निरंजनभेदु* हा ग्रंथ गो. का. चांदोरकर ह्यांस उपलब्ध झाला असून त्याच्या ९० ओव्या आहेत. त्यात दशदेहांचे विवरण येते. "शांति निवृत्ति क्षमा। हे तव सद्गुरुची महिमा। परिस लागल्या पालटे दैन्या। मरळसिद्ध संपन्न मुक्तेश्वराचेनि॥ २०॥" ह्या ओवीवरून कवीचे गुरू मुक्तेश्वर हे स्पष्ट होते. पण हे मुक्तेश्वर म्हणजे शाहूछत्रपतींचे गुरु मुक्तेश्वर की एकनाथ पैठणकरांचे नातू मुक्तेश्वर ह्याचा नीटसा बोध होत नाही.

**रचना : अमु.** – निरंजनभेदु; ओ. सं. ९०; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, गो. का. : मरळसिद्धकृत निरंजनभेदु; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ६५–६६.

**मरी पिपाही** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – सातारकर छत्रपती व त्यांचे सरदार यांवर पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. ८६–८७.

**मरुतसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ७३.

**मलुकदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ७३.

**मलुका** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मल्लू शिताराम** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – शहाजीमहाराज ऊर्फ बुवासाहेब यांच्यावरील पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. १०२–१०५.

**मल्ल** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मल्हार कवी / ० मल्लारि–१** [अंदाजे श. १६२३ / इ. स. १७०१] कवी. *भरतभेट* (२१ – २३८३; मु. : अकलकामा., भा. ३) ह्या विस्तृत काव्यग्रंथाचा कर्ता. शेवटच्या चार पद्यांत कवीने आपली काही माहिती दिली आहे. त्यावरून चंदा व त्रिमल्ल ही कवीच्या मातापित्यांची नावे. बंधू अनंत. गुरू कोण ह्याचा बोध होत नाही. ग्रंथ रघुराजाला अर्पण केला आहे. वक्ता आणि श्रोता रघुनाथ असेही शेवटच्या श्लोकात सांगितले आहे.

कवीच्या *भरतभेट* ह्या काव्याचे जे हस्तलिखित समर्थवाग्देवतामंदिरात उपलब्ध आहे त्यातील ९ व्या अध्यायाच्या शेवटी येणाऱ्या निर्देशावरून कवी नाडोली (ता. कऱ्हाड) येथील राहणारे असे कळते. ह्या अध्यायाचे लेखन कृष्णाकाठी इचलकरंजीस झाले. शक, संवत्सर, मास, तिथी इत्यादी तेथे सापडणाऱ्या उल्लेखांवरून रचनेचा काळ श. १६२३ ठरतो. ह्यावरून कवीचा काळ समजतो (शं. श्री. देव; रासं., खं. १; पृ. २९५).

प्रस्तुत काव्यावर *काव्यसंग्रह*कार नारायण चिंतामण केळकर ह्यांनी दिलेला अभिप्राय असा : "हें काव्य मोठें असून बरेंच सरस आहे. हा कवि ऱ्हस्व, दीर्घ, संधि वगैरेचे नियम उद्धवचिद्घनांप्रमाणेंच अनेक वेळीं अगदीं गुंडाळून ठेवितो. याचें एक कारण त्याचा अस्खलित व जोरदार असा भाषेचा ओघ हें असावें. हा करुणरसप्रधान विषय पसंत करण्यांतच कवीचें चातुर्य दिसून येतें व जागजागीं त्याच्या प्रतिभेची साक्ष पटते." (अकलकामा., भा. ३, प्रस्ता.). रामरावणयुद्धप्रसंगातील रामाच्या चापातून सुटणाऱ्या बाणाचे कवीने केलेले वर्णन प्रलयदायी आहे. "वोढोनीयां बाण सोडी बळेंसी, देखोनीयां काळ कांपे जयासी॥ १७.३३॥ कल्पांतींचा मेघ गर्भी धडाडी, जैसी तेजें वीज नेटें तडाडी। सत्राणेंसी शैल शृंगासि फोडी, तैसा बाणें रावणालागि पाडी॥ १७.३४॥" हा बाण रावणाचा काळच ठरला आणि रावण धाडकन कोसळला तो कसा तर : "जैसा लोटे वृक्ष शैलावरूनी, झंजावातें जेंवि कां उन्मळोनी, तैसा जाणा निर्जरारी धरेसी, शैलाऐसा लोटला निर्जिवेसी॥ १७. ३६॥" ह्यांची काही स्फुट कविता समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथे संग्रहित.

**रचना : मु.** – भरतभेट, श्लोकबद्ध; प्रसंग २१; ग्रं. सं. २३८३; संपा. केळकर, ना. चिं.; अकलकामा., भा. ३; मुंबई, १९०२; पृ. १४६–२४३. **अमु.** – अष्टके व आरत्या; सवामं. हस्त. सू., खं. १.

**मल्लारदास** [इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर. ह्याने *त्रिंबकराव दाभाडयांचा पोवाडा* रचला आहे. पोवाड्याचे ४७ चौक आहेत. इ. स. १७३१ त गुजरातेत डभईजवळ बाजीराव पेशवा व सेनापती दाभाडे ह्यांच्यात जो संघर्ष झाला त्या प्रसंगावर हा पोवाडा रचला आहे. दाभाड्याने निजामाशी संगनमत करण्याअगोदरच बाजीराव त्याला डभईजवळ गाठतो व आपसांतील कलहाचा शेवट करणारे युद्ध होते. ह्या लढाईची माहिती देणारा हा *मल्हारदासाचा पोवाडा* पेशवे दप्तरातील उपलब्ध माहिती ताडून पाहता विश्वसनीय मानण्यास हरकत नाही असे दिसते. लढाई व पाडावासंबंधाने पेशवे दप्तरातील उल्लेख पोवाड्यातील माहितीशी जुळणारे असल्याने हा पोवाडा तत्कालीन ठरतो.

मूळ पोवाडा ४३ चौकानंतर पूर्ण झाला असावा. कारण तेथे शाहीराने आपले नाव उल्लेखिले आहे. शेवटचे चार चौक मागाहून

कोणी घुसडले असावेत असे य. न. केळकर अनुमान करतात (ऐतिपो., खं. १, पृ. ७६).

**रचना :** मु. – सेनापति त्रिंबकराव दाभाडे – डभईची लढाई; ऐतिपो., खं. १; पृ. ८०–९०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ओक, ग. ह.; दाभाडे यांचा पोवाडा व त्याचे सत्यत्व; भाइसंमंत्रै., व, १३, अं. ४, चैत्र १८५५; पृ. १२८–१३१. २. केळकर, य. न.; त्रिंबकराव दाभाड्याचा पोवाडा –ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. १; पुणे, १९२८; पृ. ७४–७८.

**० मल्लारि–१** – पहा **मल्लह कवी**.

**मल्लारि–२** [का. अन.] कवी. ह्या मल्लारि कवीची दशमस्कंधावरील समश्लोकी मराठी टीका उपलब्ध झाली आहे. हा ग्रंथ अपूर्ण आहे. पोथीवरून कवीच्या पित्याचे नाव अंबाजी असावे असे वाटते. कोल्हापूरची अंबाबाई व जेजुरीचा खंडोबा ही ह्यांची कुलदैवते आहेत.

ह्या भागवती टीकेचे लेखन कर्नाटकातील *विजयध्वजी* टीकेला अनुसरून झाले आहे. इकडील *भागवता*च्या प्रतीत सापडणारे १२, १३ व १४ हे अध्याय कर्नाटकातील प्रतीत नाहीत. कारण *विजयध्वजा*-कारांनी ते प्रक्षिप्त मानले आहेत. हा कवी मराठी व संस्कृत शब्दांचे संधी व समास करतो. कवितेचा मासला पाहिल्यास कवीची योग्यता काय हे समजू शकेल : 'गौविंदगान सरिता परिसोनि कामें । आवर्तलक्षण सुवेगनिरोधकर्मे ।। आलिंगिती मुदित उर्मिभुजीं मुरारी । तत्पाद पूजिति जलीं कमलापहारीं ।।' (*वेणुगीत*, अ. १९ : १६). कवीने प्रत्येक अध्यायाच्या शेवटी 'श्रीमद्भागवतांतस्थ दशमस्कंध अंतरीं । . . . अध्याय मल्लारि प्राकृते करी ।। " असा श्लोक घातला आहे.

**रचना :** अमु. – भागवतावरील मराठी समश्लोकी; त्रु. पो.; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आचार्य, कृ. वि. : भागवतावरील मराठी समश्लोकी; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ३, पौष १८५२; पृ. १२६–१२९.

**मल्लारि / मल्हारी रामराव चिटणीस / ० चिटणीस, मल्हार रामराव / ० मल्हार** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर व १९ व्या शतकाचा प्रथमपाद] बखरकार. ह्यांचे घराणे सातारा जिल्ह्यातील बोरगावचे. खंडो बल्लाळ चिटणीस ह्यांचे हे पणतू होत. पेशव्यांचे सरदार सखाराम हरि गुप्ते आंबेगावकर ह्यांचे मल्हार रामराव हे जावई. ह्यांचे बालपण जयतापूर येथे गेले. प्रथम हे पुण्यास पेशव्यांची चिटणिशी करीत. होळकरांनी अमृतरावास पेशवेपद देण्याचे ठरविले, त्यावेळी पेशव्यांची आज्ञापत्रे चिटणिसांकडून होण्यासाठी त्यांना पहाऱ्यात साताऱ्यास जावे लागले. नंतर होळकरांपासून सुटका करून घेऊन ते बोरगावी घरी येऊन राहिले.

मल्लारि रामराव हे सातारचे धाकटे शाहू छत्रपती ह्यांचे चिटणीस होते. 'पुरातन सेवक व लेखनाधिकारी' असे ते स्वतःचे वर्णन करतात. हे चिटणीस घराणे, थोरल्या छत्रपतींपासून चिटणिशीसारख्या मोठ्या हुद्द्याच्या व महत्त्वाच्या जागेवर असून साऱ्याच छत्रपतींच्या निकट सहवासात वावरणारे असल्यामुळे जुनी महत्त्वाची कागदपत्रे त्यांच्या ताब्यात होती व जुनी परंपरागत माहितीही अधिकारपरत्वे त्यांना असे. त्यामुळे चिटणीस घराण्यातील कोणताही पुरुष छत्रपतीचे चरित्र लिहिण्यास स्वयंसिद्ध अधिकारी ठरे. मल्लारि रामराव ह्यांनी भोसल्यांच्या घराण्यातील कर्त्या पुरुषांची शिवाजीमहाराजांपासून धाकट्या शाहूराजांपर्यंतच्या एकूण सहा छत्रपतींची चरित्रे त्याच अधिकाराने लिहिली आहेत. हे इ. स. १८२३ त मृत्यू पावले.

*शिवछत्रपतींचे सप्तप्रकरणात्मक चरित्र* [ ➪ ३ ], *श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज, थोरले राजाराम महाराज यांचे चरित्र* [ ➪ ३], *थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, श्रीमंत छत्रपती धाकटे रामराजे* व *धाकटे शाहू महाराज यांची चरित्रे*, मल्हार चिटणीस ह्यांनी लिहिली. *विष्णुपुराण, दंडनीति, राजनीति* इत्यादी ग्रंथ, त्याचप्रमाणे वडिलार्जित कारकीर्दी, दिनचर्या, पत्रे इत्यादी पाहून त्यांनी आपल्या बखरी सजविल्या. चिटणीसांची भाषा साधी कारकुनी वळणाची आहे. ती संस्कृत-फारसीमिश्रित असली तरी क्लिष्ट नाही. प्रसंग रंगविण्याचे कौशल्य व कथानकाची गतिमानता हे त्यांच्या लेखनाचे गुणविशेष ठरतात.

इ. स. १८११ साली लिहिलेल्या *शिवाजीराजांच्या चरित्रा*त धाकटे शाहूमहाराज ह्यांनी शिवाजीराजांचे चरित्र लिहिण्यास आज्ञा केली असे लेखक सांगतो. पण धाकटे शाहूमहाराज इ. स. १८०८ मध्येच निवर्तले. मृत्यूपूर्वी त्यांनी ही आज्ञा केली असावी व चिटणीसांनी इ. स. १८११ साली हे चरित्र लिहिण्यास घेतले असावे असे तज्ज्ञांचे मत आहे. ह्या चरित्राचे लेखन केव्हा संपविले अथवा ते कोणत्या स्थळी झाले, ह्याचा ग्रंथात उल्लेख नाही.

थोरले राजाराममहाराज ह्यांच्या चरित्रप्रकरणात संभाजीच्या वधानंतर राजारामाची नजरकैदेतून मुक्तता झाली येथपासून राजाराम व त्याचे सहकारी ह्यांची स्वराज्य वाचविण्याची धडपड, राजारामाचे देहावसान वगैरे हकीकत आली असून शाहूच्या सुटकेपर्यंतचा इतिहास (इ. स. १७०८) त्यात आला आहे.

*श्री छत्रपती थोरले शाहूमहाराज ह्यांचे चरित्र* बोरगाव (जि. सातारा) येथे श. १७३२ (इ. १८१०) मध्ये लिहिले गेले आहे. साताऱ्यास राहून शाहूमहाराज आपल्या प्रधानाकरवी कसे पराक्रम करवीत ह्याचे त्यात वर्णन आहे. श. १७१५ (इ. स. १७९३) मध्ये हनुमंतस्वामीकृत *श्रीसमर्थांच्या बखरी*ची चाफळ संस्थानचे अधिकारी रंगो लक्ष्मण ह्यांनी प्रत केलेली होती. तिचीच रंगो लक्ष्मण मेढे व मल्हार रामराव चिटणीस ह्यांनी वाढवून दुसरी आवृत्ती श. १७४० (इ. स. १८१८) मध्ये हनुमंतस्वामींच्या आज्ञेवरूनच तयार केली (र. वि. हेरवाडकर; मब., आ. २; पृ. १७०).

हा बखरकार कित्येकदा जुनी माहिती जशीच्या तशीच उतरून घेताना दिसतो. घटनांचा कालानुक्रम तो नीट ठेवत नसल्याने त्याची संगती बरोबर लागत नाही. कालनिर्देशही चुकीचे केलेले आढळतात. हे दोष मान्य करूनही केवळ माहितगार माणसाच्या माहितीच्या ह्या लेखनाचा इतिहासकाराला उपयोग होईल, असे मत वि. का. राजवाडे ह्यांनी व्यक्त केले आहे.

द. ग. गोडसे

**रचना :** मु. – १. शिवछत्रपतींचे सप्तप्रकरणात्मक चरित्र; प्रथम मुद्रण; विज्ञावि.; इ. स. १८८२; (१) संपा. हेरवाडकर, र. वि.; १९६७; (२) संपा. कुळकर्णी, भीमराव; १९६७. २. श्री छत्रपती थोरले शाहूमहाराज यांचे चरित्र; संपा. साने, का. ना.; काइसं., ९; श. १८०५ (इ. स. १८८३). ३. श्रीमंत छत्रपती धाकटे रामराजे व धाकटे शाहूमहाराज यांची चरित्रे, चतुरसिंग राजे ह्यांच्या हकीकती सुद्धा; संपा. साने, का. ना.; काइसं. : १३; श. १८०६ (इ. स. १८८४). ४. श्रीमंत छत्रपती संभाजीमहाराज आणि थोरले राजाराममहाराज यांची चरित्रे; काइसं., ९; इ. स. १८८३; संपा. साने, का. ना.; १९३०. ५. श्री हनुमंतस्वामीकृत रामदास स्वामीचे चरित्राची बखर, मुंबई, १८७०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जुवेकर, प्रमोदिनी (संपा.) : छत्रपति राजाराममहाराजांची बखर अर्थात थोरले राजाराममहाराज यांचे चरित्र; पुणे, १९६३. २. भट, भा. वा. : शिवाजीची राजनीति; १९४१. ३. राजवाडे, वि. का.; प्रस्ता., मइसा., खं. ३; धुळे, १९००. ४. शेजवलकर, त्र्यं. शं. : मल्हार रामराव चिटणीस शतसांवत्सरिक स्मृतिश्राद्ध; सहविचार; फेब्रु., १९२४. ५. हेरवाडकर, र. वि.; मब.; पुणे, १९५७; पृ. १२०–१२७.

**मल्लारी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – गणपतिपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. १०.

**मल्लेकोयाबास** [अंदाजे इ. स. च्या १५ व्या शतकाचा प्रथमपाद] महानुभाव कवी. उपाध्य आम्नायातील. गुरुपरंपरा : नागदेव > कमळाइसा > हिराइसा > पाटकुळे मालोबास > आबाइसे > मल्लेकोयाबास अशी आहे. हे *स्मृतिस्थळाचे* एक संस्करणकार आहेत. *स्मृतिस्थळाच्या* १०६ व्या स्मृतीत हे 'स्मृति मल्लेकोयाबा सांघति आण धर्मवार्ता करीति' असा निर्देश येतो. कृष्णमुनींच्या *अन्वयमालिकेत* 'मल्लेकोयाबासी 'पूजाअवस्वर'। केलें पैं सुंदर साट श्लोक॥ २२३॥' असा उल्लेख सापडतो. पुढील ओवीतील 'आचळबासाही रत्न वीकावया : पाठविलें तयां धारासीवा॥ २२४॥' ह्या उल्लेखावरून शिवबासांचे गुरू अचळ मुरारीबास ह्यांचा मल्लेकोयाबास हा विश्वासपात्र दिसतो. अचळ मुरारीबासांचे शिष्य गुर्जर शिवबास ह्यांचे मल्लेकोयाबास समकालीन असे वरील निर्देशावरून म्हणता येते. शिवबासांनी श. १३२५ (इ. स. १४०३) मध्ये *तिन्ही स्थळे* ह्या भाष्याची रचना केली. मल्लेकोयाबास हे त्यांचे समकालीन असल्याने त्याच सुमारास विद्यमान होते असे म्हणता येते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, वा. ना. (संपा.); प्रस्ता., स्मृतिस्थळ; पुणे, १९६८; पृ. ७–८.

**मल्ले चोरयाचक / ० अनंतमुनी चोरयाचक** [अंदाजे शा. श. च्या १४ व्या शतकात विद्यमान] महानुभाव टीपग्रंथकार. ह्यांची चरित्रविषयक माहिती किंवा गुरुपरंपरा उपलब्ध नाही. ह्यांनी टीपग्रंथ रचल्याची माहिती तृतीयशोधनी टीपकार दत्तराज मराठे देतात.

महानुभावीय वाङ्मयाचा एक स्पृहणीय विशेष म्हणजे त्यातील संतमहंतांनी गद्यपद्य वाङ्मयाबरोबर त्यावर टीकाटिप्पणीही लिहून ठेवल्या आहेत. ह्या टीकाग्रंथांना त्यांनी 'टीप' असे नाव दिलेले आहे. महानुभावांच्या *साती ग्रंथांवर* जे टीप तयार केलेले आहेत त्यांत पहिल्या शोधनीचा, दुसऱ्या शोधनीचा व तिसऱ्या शोधनीचा असे तीन टीपग्रंथ आज आढळतात. त्यांतील पहिल्या शोधनीचा म्हणून मानल्या गेलेल्या टीपग्रंथांचे मल्ले चोरयाचक हे कर्ते होत. दत्तराज मराठे ह्यांनी आपल्या तृतीयशोधनीच्या टीपेच्या शेवटी दिलेल्या समाप्तिलेखात टीपग्रंथांची पूर्वपीठिका दिली आहे त्यात येणाऱ्या "मल्ले ज्ञात सुचोरयाचक जयं व्याख्यान जीर्णान्वयं । तस्ये अन्वय ग्रन्थशोधनमहं अब्धीमिती संख्ययोः ।" ह्या निर्देशावरून असे दिसते की प्रथम टीप लिहिणाराचे नाव मल्लेजात चोरयाचक असावे.

ह्या टीपग्रंथाची एक जुनी पोथी महानुभाव महंत श्री गोपीराज ह्यांच्याजवळ होती. "१४ व्या शतकातील हा टीपग्रंथ आहे आणि प्रथम लेखणकार म्हणजे टीपा देऊन लेहेणारा हा प्रथमचा होय" असा निर्देश गोपीराज महानुभाव ह्यांनी पोथीवर करून ठेवला आहे. (दि. १–१–३२). ही पोथी कोणाची याचा उल्लेख गोपीराजांनी केलेला नाही. या टीपग्रंथाची अन्य प्रत सध्यातरी उपलब्ध नाही, अशी डॉ. वि. भि. कोलते माहिती देतात (*सह्याद्रिवर्णन*, प्रस्ता., पृ. ३८).

प्रस्तुत टीपग्रंथात फक्त *उद्धवगीता (एकादश स्कंध)*, *ज्ञानप्रबोध* व *ऋद्धिपूरवर्णन* ह्या तीनच ग्रंथांवर टीप आहेत. ह्याच्या आरंभीच्या व शेवटच्या पृष्ठांवरून उपर्युक्त टीपांखेरीज इतर ग्रंथांचे टीप त्यात असावेत असे वाटत नाही. ह्यातील टीपांवरून तो पहिल्या अवस्थेचा असावा असे निश्चित वाटते. कारण ह्या टीपांचे स्वरूप प्राथमिक आहे. केवळ काही शब्दांचे अर्थ त्यात दिले आहेत. ओव्यांचे आकडे नमूद केलेले नाहीत. मूळ ग्रंथाची प्रकरणशः विभागणी दिलेली नाही. संस्कृतातील अवतरणांचा त्यात फारसा आढळ होत नाही. दुसऱ्या अवस्थेच्या टीपग्रंथाची भूमिका मात्र त्याने तयार करून ठेवलेली आहे. कारण त्याच्याच आधारावर पुढील टीपग्रंथ तयार झाल्याचे दिसून येते आणि हेच प्रथम शोधनीच्या टीपग्रंथाचे महत्त्व होय.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कोलते, वि. भि. (संपा.); प्रस्ता., रवळोबासकृत सह्याद्रिवर्णन; पुणे, १९६४; पृ. ३७–४१.

**० मल्हार** – पहा **मल्हारि / मल्हारी रामराव चिटणीस.**

**मल्हार गणेश खांडेकर** [अंदाजे इ. स. १७७९] आत्मवृत्तकार. ह्यांनी आपले बंधू जगन्नाथ गणेश व माधव गणेश ह्यांस ३० मे १८०१ रोजी पत्र लिहून आपले आत्मवृत्त कळविले.

मल्हार गणेश हे गणेश संभाजी खांडेकरांचे पुत्र होत. गणेश संभाजी ही मराठ्यांच्या राजकारणातील एक अधिकारी व्यक्ती. गणेश संभाजींकडे सन १७४८ व १७५६ मध्ये माळव्यात काही परगण्यांची कमाविशीची कामे होती. पानिपतकाली बुंदेलखंड व अंतर्वेदीत गोपाळ गणेश बर्वे ह्यांच्याबरोबर सरकारतर्फे गोविंद बल्लाळ ह्यांच्या दिमतीस ते असत. ह्यावेळी गोविंद बल्लाळ व गणेश संभाजी ह्या उभयतांमध्ये वितुष्ट आले व ते वाढत गेले. सन १७७९ मध्ये गणेश संभाजींची छावणी माळव्यात नेवज नदीतीरी असताना दादा नारायण महाजनी ह्यांच्या आधिपत्याखाली बाळाजी गोविंदांच्या फौजेने त्यांच्यावर हल्ला केला. ह्यात गणेश संभाजी कामास आले. त्या प्रसंगी मल्हार गणेश रणक्षेत्रात हजर होते. ह्या घटनेपासून पुढील २२ वर्षांचा वृत्तान्त ह्या पत्रात लिहिला आहे. ह्या वृत्तान्तातील केवळ घरगुती मजकूर वगळून उरलेल्या उपर्युक्त भागाचे संकलन गणपतराव गोपाळराव खांडेकर ह्यांनी भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकात *मल्हार गणेश याचे आत्मवृत्त* ह्या नावाने प्रसिद्ध केले आहे. ह्या आत्मवृत्तात लेखकाचे वैयक्तिक वा कौटुंबिक जीवन अर्थातच व्यक्त होत नाही. तीर्थरूपांचा मृत्यू झाल्यापासून मल्हार गणेशांना उत्तर हिंदुस्थानात जी भ्रमंती करावी लागली त्याची त्रोटक हकीकत तेथे येते. आत्मचरित्रात मल्हार गणेशांची मूर्ती कोठेही साकार होत नाही. बंधूंना लिहिलेले पत्र म्हणून लेखन केल्याने आत्मवृत्ताचे काही गुण लेखनात उतरले आहेत.

**रचना :** मु. – मल्हार गणेश याचे आत्मवृत्त; र. का. : ३० मे १८०१; भाइसमंत्रै., व. २४, अं. २; पृ. १६–१८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. खांडेकर, ग. गो. : मल्हार गणेश याचे आत्मवृत्त; भाइसमंत्रै., व. २४, अं. २; पृ. १५–१८. २. ग्रामोपाध्ये, गं. ब. : मल्हार गणेश याचे आत्मवृत्त; मवाइ., खं. ३; संपा. जोग, रा. श्री.; पुणे, १९७३; पृ. ५३०–५३१.

**मल्हारदासु** [का. अनु.] कवी. ह्यांचा *पवनविजय* हा वेदान्तावरील ग्रंथ तंजावर सरस्वती महाल येथील संग्रहात आहे. पोथीच्या शेवटी अशी माहिती दिली आहे : "म्हणे मल्हारदासु...हें पार्वतीनें अभ्यासिलें ॥ श्रीशंभूनें उपदेशिलें ॥ सिद्धखूणबीज सांगीतलें ॥ ॥ श्रीगुरु गोरखनाथें ॥"

**रचना :** अमु. – पवनविजय; प्र. ४; ओ. सं. २३५; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**मल्हारसुत / ० मल्हारीसुत** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. गणेशस्तोत्र; श्लो. सं. २१; त्रु. पो.; भाइसमं. २. पद्मावतीविवाह – काव्य; नक्कल श. १७३७, युवा, आश्विन शु. १ (इ. स. १८१५); भाइसमं. हस्त. सू., पृ. १५३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पोतदार, द. वा. : मल्हारीसुत; भाइसमंइति., श. १८३५; पृ. ४२९.

**मल्हारी** [इ. स. च्या १८ व्या शतकाचो अखेर व १९ व्या शतकाचा प्रारंभ] शाहीर. *महादजी शिंद्यांवरील पोवाड्याचा* कर्ता. पोवाड्याच्या शेवटी ह्याने आपली जी माहिती दिली आहे तिजवरून हा जुन्नरच्या प्रसिद्ध गोविंदराव नामक शाहीराचा शिष्य होता व बहिरू

हा त्याचा साथीदार होता असे दिसते. ह्यांचा फड तुरेवाल्यांचा होता.

जुन्नरकर गोविंदरावांच्या लावण्यांचे एक जीर्ण बाड य. न. केळकर ह्यांच्या संग्रही असून त्यात शेदीडशे लावण्या, गण व पोवाडे आहेत. ही रचना प्रामुख्याने गोविंदराव आणि मल्हारी ह्यांचीच आहे.

प्रस्तुत पोवाड्यात महादजी शिंद्यांनी मोहरचा किल्ला सर केला त्याचे वर्णन येते. दक्षिणेत येताना मोंगलांच्या मुलुखातल्या खंडण्या वसूल करीतच हे आले. श्रीमंत सवाई माधवरावांवरील पाटीलबावांची निष्ठा कशी तर 'पायउतारा होऊन स्वामिचे चरणी मस्तक ठेवीत' अशी आहे. श्रीमंतांनी त्यांच्या अखेरच्या काळात आपली वस्त्रे देऊन महादजींचा गौरव केला. श्रीमंतांच्या आकस्मिक मृत्यूने पाटीलबावा अत्यंत कष्टी झाले. इत्यादी तपशील ठाकठिकीने पोवाड्यात मांडलेला आहे. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड* १ मध्ये संग्रहित (पृ. १०८–११७).

**मल्हारी शहाबा** [का. अनु.] महानुभाव आरतीकार. मल्हारी शहाबा ह्यांचे वास्तव्य फलटण येथे होते असा उल्लेख एका आरतीत येतो. काव्याच्या भाषेवरून हा शाहिरी काळातील असावा असे मत त्यांच्या आरत्यांचे संपादक नागराजबाबा ह्यांनी व्यक्त केले आहे. ह्यांच्या एकूण नऊ आरत्या प्रसिद्ध झाल्या आहेत. चार फलटण-माहात्म्य सांगणाऱ्या, दोन बाळकृष्णावरच्या, एक रासक्रीडेची, एक श्रीकृष्णाची व एक जीवास उपदेश, अशा त्या आहेत. फलटणच्या आरत्यांतून तेथील श्रीचक्रपाणी ह्या महानुभावांच्या ईश्वरावताराच्या लीळा वर्णन केल्या आहेत. कवीची श्रीकृष्णावरील अनन्यसाधारण भक्ती कृष्णपर आरत्यांतून प्रकट होते. चक्रधरांच्या महानुभावपंथीय तत्त्वज्ञानाचे निरूपणच कवीने ह्या आरत्यांतून केलेले आहे. 'मल्हु शाबा' असाही कवीने आपला उल्लेख केला आहे.

**रचना :** मु. – ९ आरत्या; महानु., फेब्रु. १९७३; पृ. १३–२७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** महन्त श्रीनागराजबाबा; कवी मल्हारी शहाबा; महानु., फेब्रु. १९७३; पृ. ९–१२.

**० मल्हारीसुत** – पहा मल्हारसुत.

**महतीसागर** [इ. स. १७७२–१८३२] जैन कवी. ह्यांचा जन्म वऱ्हाडात अंबनेर गावी सैतवाळ जैन ज्ञातीत श. १६९४ च्या सुमारास झाला. ह्यांचे गुरू कारंजा पीठावरील भट्टारक देवेंद्रकीर्ती हे होते. मागधी, संस्कृत, मराठी व हिंदी ह्या भाषा त्यांना येत होत्या. सातारा, नगर, सोलापूर, उस्मानाबाद येथे वसती करून राहिलेल्या गुजराती जैन समाजाचा लातूर आणि कारंजा येथील जैन पीठांशी त्यांनी जवळकीचा संबंध निर्माण करून वऱ्हाडापासून सोलापुरापर्यंत आपल्या प्रभावाने शिष्यवर्ग तयार केला. फलटण, दहिगाव, नातेपुते, मेडद येथे हे धर्मोपदेश करीत हिंडत. श. १७५४ च्या कार्तिक वद्य द्वितीयेस दहिगाव येथे ह्यांचे देहावसान झाले.

महतीसागरांचे बरेचसे वाङ्मय प्रकाशित झाले असून इ. स. १९०३ पासून ह्या प्रकाशनास सुरुवात झालेली दिसते. ह्या संकलनात अभंग, पदे, आरत्या, अष्टके, स्तोत्रे, देवेंद्रकीर्तींवरील लावणी अशी स्फुट रचनाच प्रामुख्याने दिसते. काही व्रतकथांची रचनाही कवीने केली आहे. ह्यापैकी जवळ जवळ सर्व साहित्य *महतीकाव्यकुंज* ह्या ग्रंथात संकलित केलेले आहे. त्यात *संबोधसहस्रपदी* (८ अधिकार) व *आदित्यवारकथा* (रिद्धपूर, श. १७२३ / इ. स. १८०१), *षोडशकारण व्रतकथा, दशलाक्षणिक व्रतकथा* अशी व्रतकथांवरील काव्यरचना सापडते. गुरूने आज्ञा केल्यावरून ह्यांनी चोवीस तीर्थंकर *पचकल्याणिकोत्सवा*ची रचना बाळापूर येथे श. १७३९ / इ. स. १८१७ मध्ये केली. जैन संप्रदायाच्या कारंजा पीठाच्या शिष्यपरंपरेतील महतीसागर हे शेवटचे श्रेष्ठ कवी.

**रचना :** मु. – महतीकाव्यकुंज : महतीसागरांच्या स्फुट कवितेचे संकलन; गांधी, वी. को.; फलटण, १९३५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : महतीसागर; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ९७–१००.

**महदंबा / ० महदाइसा / ० रूपाइसा** [अंदाजे इ. स. च्या १३ व्या शतकाचा उत्तरार्ध व १४ व्याचा प्रारंभकाल] महानुभाव कवयित्री. महानुभाव पंथाचे आद्याचार्य नागदेव ऊर्फ भटोबास ह्यांची ही चुलतबहीण. ह्यांचे पणजे वामनाचार्य हे देवगिरीचा यादवराजा महादेवराय ह्यांचे पुरोहित होते. त्यांच्या पत्नीचे नाव महदाइसा व पुत्र महेश्वरपंडित. महेश्वरपंडितांना माधवभट व वायनायक असे दोन मुलगे होते. त्यांपैकी माधवभट व आबाइसा ही नागदेवाचार्यांची मातापितरे, तर वायनायक आणि कामाइसा ही महादाइसेची मातापितरे होत. हिचे मूळ नाव रूपाई. महानुभावपंथीयांमध्ये महदाइसा ह्या नावाने ती प्रसिद्ध आहे. हे कुटुंब रावसगाव (जि. औरंगाबाद) येथे वास्तव्य करून होते. रूपाइसा ही बालवयातच हातरिती (विधवा) झाल्याने माहेरी परतली. नागदेवांचे वळण बिघडल्याने त्यांची आई आबाइसा ही, पुतणी महदाइसा आणि कन्या उमाइसा ह्या दोघींना घेऊन, रावसगाव येथील एका गुंफेत राहू लागली. तेथेच रामदेव उर्फ दादोस ह्या एका विद्यावंत महात्म्याशी त्यांची गाठ पडली. प्रथम दादोस ह्यांनीच नागदेव, आबाइसा, उमाइसा, महदाइसा ह्या सर्वांना चक्रधरस्वामींकडे नेले. पुढे स्वामींविषयी ओढ वाटल्याने ही मंडळी वारंवार तेथे जाऊ लागली. पंथानुसरण मात्र प्रथम नागदेवाचार्यांनी केले. महदाइसा व आबाइसा ह्यांनी ते बऱ्याच उशिरा केले.

महदाइसेवर पहिल्या भेटीपासूनच स्वामींची विशेष कृपा होती. ही प्रारंभी दादोस ह्यांची शिष्या होती. स्वामींच्या तेजस्वितेने वेधली गेल्यानंतर तिची स्वामींवर अधिकाधिक श्रद्धा बसू लागली. हे दादोस ह्यांना आवडले नसावे. त्यापासून परावृत्त करण्याच्या हेतूने ह्यांनी तिला प्रथम द्वारावतीच्या व नंतर वाराणसीच्या यात्रेस पाठविले. स्वामींनी तिने जाऊ नये म्हणून तिला 'तीर्थ क्षेत्रे अमोचके : ईश्वरसन्निधान मोचक :' हे नाना रीतींनी पटवून देण्याचा प्रयत्न केला. अखेरीस यात्रेला जाण्याचा निश्चयच तिने केला, तेव्हा तेथे कसे वागावे ह्याविषयी स्वामींनी तिला सुंदर उपदेश केला.

वाराणसीला गेल्यानंतर मनकर्णिका पाहताच आपण स्वामींच्या संनिधानास अंतरलो ह्याची तिला तीव्रतेने जाणीव झाली, आणि हे सर्व दादोसमुळे झाले असे मनात येऊन तिने 'हे तीलांजलि जातिगोत्रासि : हे दादोसासि :' असे म्हणून सर्वस्वत्याग केला व अंतःकरणाने ती स्वामींना अनुसरली.

महदाइसा जशी विरक्त होती तशीच जिज्ञासूही होती. स्वामींना नाना तऱ्हेने प्रश्न विचारून ती आपली जिज्ञासा तृप्त करीत असे. नागदेवाचार्यांच्या खालोखाल अधिकात अधिक दृष्टान्त स्वामींनी महदाइसेलाच निरोपिले आहेत. महदाइसेचे पूर्वाश्रमीचे नाव रूपै/रूपाई असे होते. हिची महदायिसा नावाची पणजी विदुषी असून तिने कन्हेरदेव, रामदेव ह्या यादव राजांच्या कारकीर्दीत अनेक मोठमोठ्या विद्वानांना वादांत जिंकले होते. रूपाईची बुद्धिमत्ता, चातुर्य आणि रसिकता पाहून पणजीचेच महदायिसा हे नाव चक्रधरप्रभूंनी तिला ठेवले. *रत्नमालास्तोत्रा*त केसोबासांनी हिला महदंबा म्हटले आहे. पुढे रूपाई हे नाव प्रचारातून गेले व महदाइसा, महदंबा हीच नावे रूढ झाली.

चक्रधरांचे पूर्वचरित्र त्यांच्या मुखातून आपल्याला उपलब्ध करून देण्यास महदाइसेची जिज्ञासाच कारण झाली आहे. पुराण ऐकल्यानंतर ही स्वामींशी नेहमी चर्चा करी. म्हणून स्वामींनी "म्हातारी जीज्ञासक : म्हातारी चर्चक : म्हातारी एथ काही पुसतचि असे :" असे तिच्याविषयी उद्गार काढले आहेत. स्वामींच्या प्रयाणानंतर नागदेव, केसोबास, म्हाइंभट्ट इत्यादिकांबरोबर ती चर्चा व धर्मवार्तालाप करीत असे. श्रीचक्रधरप्रभूंची ती मनापासून सेवा करी. चक्रधरांच्या

प्रयाणाअगोदरचे सहा महिने त्यांना फार क्लेश झाले. ते जातिभेद मानत नव्हते, त्यामुळे लोकांकडून त्यांना त्रास सहन करावा लागला. अशा अवस्थेत स्वामींच्या आरोगणेची व्यवस्था ही जातीने पाहात असे. स्वामी उत्तरेकडे निघून गेल्यानंतर रिद्धपुरास राहून गोविंदप्रभूंचीही त्याच निष्ठेने हिनें सेवा केली. चक्रधरांनी प्रयाण केल्यानंतर वेडेपिसे होऊन भानखेड्याच्या जंगलात पडलेल्या नागदेवांस हिने पाठकुळी घालून रुद्धिपुरास गोविंदप्रभूंकडे आणले. महानुभाव पंथाचा आद्याचार्य हा महदाइसेनेच पंथाला परत मिळवून दिला. ह्या गोष्टीची नागदेवाचार्यांनाही जाणीव होती. ' म्हातारी धर्मरक्षक : प्रीतिरक्षक : ह्या शब्दांत तिचा त्यांनी गौरव केला आहे.

स्वामींच्या चिंतनात आणि स्वामींनी स्थापन केलेल्या पंथाच्या प्रसारार्थ आयुष्य खर्च करून स्वामींचे स्मरण करीतच नौगाव येथे हिने देह ठेविला (स्मृ. स्थ. २५३). चक्रधरपरिवारातील एक बुद्धिवान व कर्तृत्ववान स्त्री असा तिचा लौकिक आहे. *इतिहास-प्रकर्ण, स्मृतिस्थळ* व *लीळाचरित्र* ह्या महानुभावीय ग्रंथांतून मिळणाऱ्या माहितीवरून हिच्या जीवनचरित्राचे थोडेफार रेखांकन वर दिल्याप्रमाणे महानुभाव साहित्याच्या पूर्वाभ्यासकांनी करून ठेवले आहे.

महदाइसेचे जन्ममृत्युशक उपलब्ध नाहीत. हिच्या अखेरच्या क्षणी नागदेवाचार्य संनिध असल्याचे *स्मृतिस्थळात* नमूद केले आहे. त्यावरून महदाइसा नागदेवांच्या काही काळ अगोदर गेली हे निश्चित. नागदेवाचार्यांचा मृत्युशक १२२४ (इ. स. १३०२) असा सांप्रदायिक रीत्या मानण्यात येतो. डॉ. वि. भि. कोलते व वा. ना. देशपांडे ह्यांनी काही प्रमाणांवरून हा श. १२३४ असा मानला आहे. नागदेवांच्या मृत्युशकासंबंधी एकवाक्यता नसल्याने अर्थातच महदाइसेचा मृत्युशकही निश्चित होऊ शकत नाही. *आद्य मराठी कवयित्री* (महदंबा) ह्या आपल्या पुस्तकात वा. ना. देशपांडे ह्यांनी महदाइसेचा काळ अंदाजे श. ११६४ ते १२३४ (इ. स. १२४२ ते १३१२) असा दिला आहे.

महदाइसेच्या स्फुट काव्यरचनेपैकी *धवळे* (पूर्वार्ध : ८३ कडवी; उत्तरार्ध : ६५ कडवी) व *मातृकी रुक्मिणीस्वयंवर* (११० ओव्या) अशी दोन काव्ये वा. ना. देशपांडे ह्यांनी पाठभेद, शब्दकोश, प्रस्तावना ह्यांसह प्रसिद्ध केली आहेत (आ. १, यवतमाळ, १९३५; आ. २, पुणे, १९५६). *गर्भकांड ओव्या* हे आध्यात्मिक प्रकरण बऱ्याच वर्षांपूर्वी *महानुभाव* मासिकातून मुद्रित झाले होते. 'स्फुट ओव्या' ह्या स्वरूपाची आणखी काही अप्रसिद्ध रचनाही हिच्या नावावर आढळते.

ह्यांपैकी *धवळ्यांची* रचना कशी झाली तो इतिहास मजेशीर आहे. एकदा गोविंदप्रभूंना विवाहप्रवृत्ती झाली. वधू हजर नसतानाही हा सोहळा मोठ्या थाटात पार पडला. ह्या वेळी कृष्णास नवरदेव समजून महदंबेला 'काइ गावो जी' असे प्रभू म्हणाले. महदाइसेला स्फूर्ती होऊन ती *रुक्मिणीस्वयंवर* गाऊ लागली. चार दिवस तिने हे गाणे गायिले व श्रीप्रभूंनी ऐकले. महदाइसेने गायिलेले हे गीत म्हणजेच *धवळे* होत. ह्यांतूनच पुढे *रुक्मिणीस्वयंवर* हे काव्य सिद्ध झाले. *धवळ्यांचा* पूर्वार्ध गोविंदप्रभूंच्या निर्वाणाअगोदर (श. १२०८–९ / इ. स. १२८६–८७) रचला गेला. उत्तरार्धाच्या कालासंबंधी मात्र निर्णायक मत देता नाही.

'धवळा–ळे' ह्यांतील धवळ हा शब्द मूळ धवल ह्या संस्कृत शब्दावरून आला आहे. लग्नात गावयाचे वर(धव)विषयक गीत असा त्याचा अर्थ आहे. 'महदंबेच्या धवळ्यांची परंपरा ही विवाह-गीतांतून आलेली आहे,' असे ना. ग. जोशी म्हणतात ('धवळ्यांविषयी आणखी काही थोडे' *सह्याद्रि*, जून १९५४, पृ. ३). त्यांचे स्वरूप लोकगीताशी जुळणारे आहे (उदा., स्त्रीगीते, ओव्या इ. रचना).

*धवळ्यांची* रचना सयमक असून त्यांत प्रत्येक कडव्यात चार चरण येतात. डॉ. ना. ग. जोशी ह्यांनी ह्या छंदातील मात्रिक आवर्तने शोधण्याचा प्रयत्न केला आहे. वा. ना. देशपांडे ह्यांच्या मते *धवळ्यांची* रचना मात्रिक रचनेपेक्षा छांदस आहे. कारण मराठी कवितेच्या सुरुवातीसुरुवातीचा काळ हा मात्रिक रचनेपेक्षा छांदस रचनेसच अधिक अनुकूल होता. कोठे आखूड चरण तर कोठे लांब चरण अशी अत्यंत शिथिल रचना असल्याने *धवळ्यांचा* निश्चित छंद ठरविणे दुष्कर वाटते. ह्यांतील ओव्या मुक्तओवीसदृश असून त्यांमध्ये एक प्रकारची सूक्ष्म लयबद्धता प्रतीत होते.

श्रीकृष्णविषयक भक्तिभाव ही ह्या उत्स्फूर्त काव्याची प्रेरक शक्ती आहे. रुक्मिणीपत्रिकेचा उल्लेख सोडल्यास कथानक मुळाप्रमाणेच (*भागवत-दशम*) आहे. *धवळ्यांची* रचना करताना महदंबेचे लक्ष कथा-निवेदनाकडेच प्रामुख्याने आहे. त्यामुळे त्यातील कथा आटोपशीर झाली आहे. शृंगाररसाविष्करणात संयम आणि औचित्य ह्या मर्यादा कवयित्रीने कटाक्षाने पाळल्या आहेत. रुक्मिणीची विरहावस्था व कृष्णमीलनविषयक उत्कंठा रेखून तिचे स्वभावचित्र परिणामकारी केले आहे. गतिमानता आणि प्रवाहिता हा तर *धवळ्यांचा* प्राणच आहे. भाषा सोपी आणि बोलण्याच्या सरावातली असून अलंकारजड नाही. उदा., 'सभा देखौनिया बहु उछावो मनी। तव वीप्रें देवासि घातलें लोटांगणी। राखैं राखैं प्रभुराया तूं स्वामि माझा मीं तुझा दासु।" इत्यादी. [ ➪ ३. ]

कृष्ण-रुक्मिणी-विवाहकथेवरील स्वयंस्फूर्त असे हे आद्य काव्य आहे. ह्याच विषयावर रचना करणाऱ्या पुढील कवींच्या पंडिती परंपरेहून महदंबेचे वेगळेपण नजरेत भरते, ते ह्या काव्यात शब्दवैभव, वृत्तप्रभुत्व आणि प्रौढ रचना ह्यांचा अभाव असूनही ते रसाळ आणि भावोत्कट झाले आहे म्हणून. नाथांच्या लोकप्रिय अशा *रुक्मिणीस्वयंवर* काव्याशी *धवळ्यांची* तुलना करताना अ. ना. देशपांडे म्हणतात की, ही गोड विवाहकथा आध्यात्मिक उपमानाचा अतिरिक्त वापर करून नाथांनी बोजड करून ठेवली आहे. नाथांचे उद्दिष्ट जीवशिवैक्यरूपी अद्वैतमहिमा पटविण्याकडे असल्याने कथानकाची गतिमानता व गोडी खंडित होते तसे महदंबेच्या काव्यात होत नाही.

महदंबेच्या विशुद्ध अशा भक्तिभावनेमुळे ही कथा, अध्यात्माची बैठक असूनही, रसाळ उतरली आहे. काव्य तिने अंतःकरणपूर्वक गायिल्याच प्रत्यय येतो. अशा या भावोत्कट काव्याचा परिणाम पुढील अनेक कवींवर झालेला दिसतो. श्रीकृष्णाच्या रूपसौंदर्याचे वर्णन करताना महदाइसा म्हणते : " सर्वांगीं न देखो तुमचा वो कांतु : देखियलें जे आंग तेथोनि न ढळतीची लोचन :". ह्यासारखी सुंदर कल्पना पुढे होऊन गेलेल्या संतोषमुनी कृष्णदास, सामराज इ. कवींनी उचललेली दिसते. महदाइसेच्या *धवळ्यांतील* काव्यपंक्तींचे मोठे साम्य वा. ना. देशपांडे ह्यांस नरेंद्राच्या *रुक्मिणीस्वयंवरात* आढळले.

*धवळ्यांचा* उत्तरार्ध हा पूर्वार्धानंतर बराच मागाहून रचलेला आहे. ह्या उत्तरार्धरचनेत हिने आपला नामनिर्देशही केलेला नाही. *स्मृतिस्थळातील* १९४ व्या स्मृतीच्या आधारे *धवळ्याच्या* उत्तरार्धरचनेचा अर्धा वाटा वा. ना. देशपांडे ह्यांनी म्हाइंभट व लक्ष्मींद्रभट ह्या पंडितद्वयाला दिला आहे. ह्या संदर्भात प्रा. वसंत जोशी ह्यांनी वेगळेच मत व्यक्त केले आहे : "*धवळे* ह्या वृत्तप्रकाराचे लोकगीताशी असणारे साधर्म्य उत्तरार्धाअखेर टिकून राहिले आहे. कथेचा अस्खलित प्रवाह दोहोंतही जाणवतो. रचनेचा साक्षेप, नेमके कथासूत्र भावपूर्णरीत्या मांडण्याची पद्धती पूर्वार्धात तशी उत्तरार्धातही आहे. वृत्तरचनेचा पंडिती काटेकोरपणा त्यात आढळत नाही. ओवीची लकबही पूर्वार्धा-प्रमाणे उत्तरार्धातही आहे." ह्यावरून हे दोनही खंड एकाच महदायिसेने रचले आहेत ह्याविषयी त्यांना शंका वाटत नाही.

यानंतरची काव्यरचना *मातृकी रुक्मिणीस्वयंवर* (ओ. ११०).

त्यामध्ये *धवळ्यां*चाच प्रतिध्वनी उमटला आहे. फक्त विस्ताराने लहान व छंद वेगळा एवढेच वैशिष्ट्य दिसते. ही रचना पंडिती वळणाची, ठाकठिकीची असून *धवळ्यां*तील जिवंतपणा त्यात दिसून येत नाही. यातील ओवी ग्रांथिक व बंदिस्त स्वरूपाची आहे. *मातृकी स्वयंवरा*च्या कर्तृत्वाबद्दल पंथीयांत मतमेद आहेत. *धवळे* लोकप्रिय झालेले पाहून कोणा पंडिताने त्यांस हे 'नागरवोवीबंधां'चे रूप दिले असावे असेही म्हटले जाते; पण बळकट असा विरुद्ध पुरावा उपलब्ध झाल्याखेरीज ह्या काव्याचे महदाइसेचे कर्तृत्व नाकारणे हे तर्कपद्धतीस धरून होणार नाही.

*मातृकी स्वयंवरा*मध्ये मातृकांत रचना केली आहे. पहिल्या १–८२ ओव्यांत **क** ते **क्ष** पर्यंतच्या मातृका व ८३–१०१ पर्यंत पुन्हा **अ** ते **उ** पर्यंतच्या मातृका येतात. नंतर **भ–ट–च–द–व–स–म–व** असा क्रम आहे. शेवटच्या ११० व्या ओवीत "वाखाणीलें गीत माहादाइ कींकरी ॥ असा कवयित्रीचा निर्देश येतो. "कांसे पीतांबरु । कंठीं कुंदमाळा । कांतु शोभे सांवळा । रुक्मिणीचा ॥ १ ॥ खांदावरि कावडि । पडिभरें चालतु । तो खेळे वनांतु । दत्तु सए ॥ २ ॥" अशी चित्तवेधक रचना महदंबेचीच असावी असे काव्य वाचून वाटते.

महदंबेच्या इतर रचनेपैकी *गर्भकांड ओव्या* हे आध्यात्मिक प्रकरण *मातृकी*च्याच छंदात आहे. ह्या ७५ ओव्या असून रचना उपदेशपर म्हणून नीरस वाटते. हिचीच *गर्भाष्टक* (ओ. सं. ७२) अशी रचना *महानुभाव* मासिकातून मुद्रित झाली आहे (ऑग. १९७०, पृ. १३–१५). पैठणला असताना सोजी कांडता कांडता काही स्फुट ओव्या हिनें गायिल्या आहेत : 'गोमतिए तीरी । निळे या गुढरा । राजेया गुजरा । कृष्णराया ॥ १ ॥ नीळा गुढरु । राजा गुजरु । माणिकी मंडपी । श्रीचक्रधरु ॥ २ ॥' स्वामींच्या प्रयाणानंतर त्यांचे आर्तचिंतन ती सतत करीत असे. "नागदेवाचेया खांदावरी करु । राजा चक्रधरु बीजे करी ॥ सोनेसळा सेला नेसला मालगंठी । म्हाइया आला भेटी प्रभूचीया ॥" अशी चक्रधरमूर्ती तिच्या डोळ्यांपुढे नेहमीच उभी राहते. चक्रधरस्वामींची एक आरतीही तिने रचली आहे. तो वा. ना. देशपांडे ह्यांनी छापली आहे (प्रस्ता., *आद्य मराठी कवयित्री*).

महदंबेची उपलब्ध रचना संख्येने अल्प असली तरी काव्यगुणांनी श्रेष्ठ आहे. उत्स्फूर्त कवित्व, रचनेतला साधेपणा व सोपी भाषा ही तिच्या कवितेची वैशिष्ट्ये आहेत. ह्या रचनेतून प्रत्ययास येणारे कवयित्रीचे व्यक्तित्व स्निग्ध आणि सात्त्विक असे आहे. चक्रधरप्रभूंवरची दृढ श्रद्धा व पंथावरील निष्ठा तिच्या व्यक्तित्वात एकरूप झालेली दिसते. तिच्या काव्यात महानुभावीय पंचकृष्णांना वंदन येते, पण पंथीय तत्त्वज्ञानाच्या निरूपणाचा अट्टाहास दिसत नाही. कवित्व हे तिच्या ठिकाणी स्वयंस्फूर्त असल्याने तिचे काव्य जिवंत वाटते. महदंबेच्या *धवळ्यां*ची रचना गोविंदप्रभूंच्या हयातीत झाल्याने हे काव्य *ज्ञानेश्वरी*पूर्वकालातील आहे. म्हणून आद्यकवयित्रीपदाचा मान डॉ. य. खु. देशपांडे, वा. ना. देशपांडे, ज. र. आजगांवकर व डॉ. वि. भि. कोलते इत्यादी विद्वानांनी महदंबेस दिला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : महदाइसा ऊर्फ महदंबा; मसंक.; मुंबई, १९३९; पृ. १–२३. २. आराध्य, मुरलीधरशास्त्री : आद्य मराठी कवयित्री; महानु., ऑग. १९५९. ३. खेरडे, सुनंदा : आद्य मराठी कवयित्री महदायिसा; महानु., नोव्हें. १९६६; पृ. ४३–४८. ४. गुप्ते, चारुशीला : महानुभाव कवयित्री महदंबा; समर्थ भारत, दीअं. १९६१; पृ. २९. ५. चौधरी, ल. शि. : आद्य मराठी कवयित्री : मुक्ताबाईच – महदंबा नव्हे; प्रसाद, फेब्रु. १९५८; पृ. २१–२३. ६. जोशी, ना. ग. : धवळ्यांविषयीं आणखी थोडें; सह्याद्रि, जुलै, १९५४; पृ. ३२०–३२२. ७. जोशी, ना. ग. : महदंबेच्या धवळ्यांची छंदोरचना; सह्याद्रि, एप्रि. १९५१; पृ. २४५–२४७. ८. जोशी, व. स. : आद्य मराठी कवयित्री : महदाइसा; नभामा., मार्च १९६६; पृ. ४६–५२. ९. जोशी, वसंत स. : महदाइसेचे 'धवळे'; नभामा., एप्रि. १९७२; पृ. ८३–९५. १०. देशपांडे, अ. ना. : महदंबेचे धवळे आणि नाथांचे रुक्मिणीस्वयंवर; युगवाणी, मार्च १९४६; पृ. २४–२८. ११. देशपांडे, य. खु. : धवळे (ढवळे); ममवा.; पुणे, १९६०; पृ. २–३. १२. देशपांडे, वा. ना. (संपा.) : महदंबा : आद्य मराठी कवयित्री; प्रस्ता.; यवतमाळ, १९३५; पुणे, १९५६ (नवी आवृत्ती). १३. देशपांडे, वा. ना. : महदंबेच्या धवळ्यांची छंदोरचना; सह्याद्रि, एप्रि. १९५१; पृ. २४७–२४८. १४. सोनटक्के, अंबुजा : सिद्धवाणीची आद्य मराठी कवयित्री महदाइसा ऊर्फ महदंबा; नभामा., जाने. १९६८; पृ. ८–१२.

० **महदाइसा** – पहा **महदंबा**.

**महंमद इब्राहिम मखवा** / ० **मखबा, महंमद इब्राहिम, मुनशी** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] व्याकरणकार. मराठी भाषेचे इंग्रजीत व्याकरण लिहिणारे एक शिक्षणप्रेमी गृहस्थ. कंपनी सरकारच्या मुंबईतील उच्च न्यायालयात हे 'दुभाषी' म्हणून काम करीत. इ. स. १८२२ त मुंबईस 'दि बॉम्बे नेटिव्ह स्कूल बुक ॲण्ड स्कूल सोसायटी' स्थापन झाली तिच्या चालक मंडळीपैकी हे एक होते. पुढे विद्याप्रसाराचे काम अधिक सुसूत्र व संघटित व्हावे ह्यासाठी ज्या 'बोर्ड ऑफ एज्युकेशन'ची स्थापना झाली तिच्या व्यवस्थापक मंडळीत ह्यांचा समावेश होता. मखबा हे तत्कालीन सुसंस्कृत व शिष्ट समाज, तसेच सरकार, ह्या दोहोंकडे वजन राखून होते. १८३४ साली कंपनी सरकारने मुंबई बेटात जे १३ जे. पी. प्रथम नेमले, त्यांपैकी हे एक होते. इ. स. १८२२ ते ५३ पर्यंत सतत ३१ वर्षे ह्यांचा मुंबईतील शैक्षणिक चळवळींशी निकटचा संबंध होता. १८५३ साली हे बोर्ड ऑफ एज्युकेशनमधून निवृत्त झाले. स्वतःच्या मुसलमान ज्ञातीत शिक्षणप्रसार व्हावा म्हणून त्यांनी ठिकठिकाणी शाळा स्थापन करून विद्यार्थ्यांसाठी *तालीमनामा, शहानामा, इंग्लिश बिगिनर* इ. उर्दू व इंग्रजी पुस्तके लिहून बराच प्रयत्न केला.

त्या काळी मराठी भाषेचे इंग्रजीत व्यवस्थित असे व्याकरण रचलेले नव्हते, त्यामुळे सनदी नोकरांना मराठी शिकणे जड जाई; ह्याखातर व्हान्स केनेडी ह्यांचे साह्य घेऊन *अ ग्रामर ऑफ द मराठी लँग्वेज* हे व्याकरणविषयक पुस्तक लिहून त्यांनी १८२५ साली स्वखर्चाने प्रसिद्ध केले. ह्याच्या बऱ्याच प्रती आपल्या नोकरांसाठी कंपनी सरकारने विकत घेतल्या होत्या.

मखबा ह्यांच्या पूर्वी श्रीरामपूर मिशनचे डॉ. कॅरे (१८०५), मुंबईतील अमेरिकन मिशन (१८१५) व ड्रमंड (१८१८) ह्यांनीही व्याकरणावरील पुस्तके लिहिण्याचे प्रयत्न केले होते. ह्या पुस्तकांतील त्रुटी ध्यानात घेऊन व सनदी नोकरांच्या भाषाज्ञानविषयक गरजा विचारात घेऊन मखबा ह्यांनी मराठीचे हे इंग्रजी व्याकरण तयार केले. पुस्तकाच्या आरंभी मखबा ह्यांनी विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. त्यावरून मराठी सारस्वताशी ह्यांचा अजिबातच परिचय नव्हता असे दिसते. कारण मराठी ही ग्रांथिक भाषा नसून व्यवहारभाषा आहे, असे डॉ. स्टीव्हन्सन इत्यादी तत्कालीन परदेशस्थ भाषाभ्यासकांप्रमाणेच मत ह्यांनी व्यक्त केले आहे. [⇨ ३.]

**रचना : मु.** – अ ग्रामर ऑफ द मराठा लँग्वेज (सुधारित – व्हान्स केनेडी); कुरियर छापखाना; मुंबई, १८२५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, कृ. भि. : महंमद इब्राइम मखबा : मराठी भाषेची व्याकरणे, आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती; मुंबई, १९५६; पृ. ७५–७८. २. खानोलकर, गं. दे. : अमवा., खं. ४; मुंबई, १९५७; पृ. १७६–१७९. ३. गावसकर, सु. आ. :

मराठी दीलामुद्रिते; मुंबई, १९६१; पृ. ३–४.

**महंमद (बाबा)** [का. अनु.] मुसलमान कवी.

रचना : अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ७४.

**महमदशा फकीर** [का. अनु.] मुसलमान शाहीर. ह्याने कलगी-तुऱ्याच्या शाहिरीची कवने रचली आहेत (रा. चिं. ढेरे; मुमसंक., पृ. १७४).

**महंमद हनीफ** [का. अनु.] मुसलमान कवी. ह्याने मराठीत रिवायती रचल्या आहेत (रा. चिं. ढेरे; मुमसंक., पृ. १७८).

**महाकीर्ती** [अंदाजे इ. स. १६८९] जैन कवी. ह्यांचे *शीलपताका* नावाचे एक कथाकाव्य उपलब्ध आहे. ह्या ग्रंथाच्या प्रशस्तीत अजितकीर्ती > विशालकीर्ती > महीचंद्र > महाकीर्ती अशी गुरुपरंपरा दिलेली आहे. चंद्रकीर्ती व अनंतकीर्ती ह्यांचा स्वतःचे शिष्य म्हणून महाकीर्ती उल्लेख करतात. "महीचंद्र माझी माउली । थोर कृपेची साउली । महाकीर्तिस ठेवणी दाविली । शीलपताकेची ॥५५१॥" असे कवीने आपल्या गुरूसंबंधी म्हटले आहे.

महाकीर्तींचा 'शीलपताका' ग्रंथ *शीलतरंगिनी पुराण* ह्या नावाने प्रकाशित झाला आहे. ब्रह्मजिनदासाने गुजरातीत लिहिलेली ही कथा महाकीर्तींनी मराठीत आणली आहे. ह्यात ब्रह्मचर्याचे महत्त्व सांगणारी सामाजिक कथा वर्णिली आहे.

**रचना : मु.** – शीलतरंगिनी पुराण (शीलपताका); प्रसंग ३; ओ. सं. ५५२; (संपा.) श्रावणे, जयचंद्र; वर्धा.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ७२–७३.

**महादजी शिंदे** [इ. स. १७२७–१७९४] कवी. मराठेशाहीतील थोर मुत्सद्दी सेनानायक व सरदार. शिंद्यांचे घराणे सातारा जिल्ह्यातील कण्हेरखेड गावचे. महादजींचा आजा जनकोजी व पिता राणोजी हे बाळाजी विश्वनाथ व बाजीराव ह्या पेशव्यांच्या पदरी होते. बहादरीसाठी ह्यांचे घराणे राजारामांच्या काळापासून प्रसिद्ध होते. राणोजींची पत्नी चिमाबाई ही रजपूत होती. पानिपतच्या संग्रामात महादजींचा एक पाय तुटला. पानिपतानंतरच माधवरावांनी महादजींस सरदारकी दिली. इ. स. १७८४ त खुद्द दिल्लीच्या बादशहास ताब्यात घेऊन महादजींनी त्याच्याकडून पेशव्यांस 'वकीली मुतलकी' देवविली. १७८५ च्या सुमारास बादशहाचा सल्लागार म्हणून महादजी मोठ्या वैभवात मथुरेत राहात होते. उत्तम सेनानी, कार्यतत्पर मुत्सद्दी व प्रजाहिततत्पर कुशल राजकारणी पुरुष म्हणून महादजीचा मराठेशाहीच्या इतिहासात गौरव केला जातो. ग्वाल्हेरला ह्यांनी स्वतःचे छोटे राज्यही निर्माण केले होते. पण हेच महादजी मोठे भाविक, संतभक्त, कवी होते हे सत्य कितीजणांना ठाऊक असेल ? ते कीर्तन व काव्यरचना करीत असत. त्यांना संस्कृत, उर्दू, पर्शियन भाषा उत्तम अवगत होत्या. उज्जैनीचे दत्तनाथ महाराज ह्या नाथपंथी सत्पुरुषाचा त्यांनी अनुग्रह घेतला होता. वारकरी संत मल्लप्पा वासकर, सोहिरोबा अंबिये आणि रामदासी शिरगावकर ह्या साधुसंतांचा त्यांचे ठायी लोभ असे. पाटीलबावा हे कलेचेही भोक्ते होते. अनेक कलाकारांना त्यांचा उदार आश्रय असे. पुत्रसंतान नसल्याने ह्यांनी पुतण्या दौलतराव ह्यास दत्तक घेतले. इ. स. १७९४ च्या प्रारंभी एकाएकी ते स्वर्गवासी झाले.

दत्तनाथांच्या उज्जैनी मठावर तसेच ग्वाल्हेरच्या आबामहाराजांच्या मठावर महादजींच्या कृपेचे छत्र होते. ह्या मठातूनच ग्वाल्हेरच्या राजपुस्तकालयाला महादजींची कविता भा. रा. भालेराव ह्यांनी उपलब्ध करून दिली. ही कविता सर्वप्रथम त्यांनीच प्रकाशात आणली.

महादजींचे कविनाम माधव असे आहे. म्हणून संपादकांनी काव्यसंग्रहाचे *माधवविलास* असे नामकरण केले आहे. गुरुप्रशंसा, कृष्णभक्ती व अध्यात्म हे त्यांच्या कवितेचे विषय आहेत. मराठी अभंग व पदे मिळून २६५ व हिंदी पदावली १४० अशी त्यांची काव्यरचना आहे. मराठी व हिंदी पदांत भावसाम्य दिसते. *माधवदासी* नावाची गीताटीका त्यांनी रचली होती, असे सांगितले जाते. पण ती उपलब्ध नाही. भा. रा. भालेराव ह्यांनी *दौलतवाग्विलास* व *नीतिग्रंथ* ह्या ग्रंथांचे महादजींकडे दिलेले कर्तृत्व शंकास्पद आहे.

गुरुकृपेच्या तीव्र तळमळीचा प्रत्यय ह्या साधक कवीच्या कवितेत ठिकठिकाणी येतो. गुरुरायाने दाखविलेल्या अद्भुत आनंदाच्या ठेव्याचे कवीच्याच शब्दांत वर्णन पहा : 'नवल श्रीगुरुरायें केलें । द्वैत तेंची अद्वय जाले ॥ सहजीं कर्माकर्म ठेले । माझें मी हे हिरले ॥ न बोलणें बोलुनि बोलें । माधव निजानंदें डोले ॥' कृष्णभक्तीचे तर कवीला वेडच लागले आहे. 'कृष्णमय जाली वृत्ति, कृष्णमय सदास्थिति' अशी कवीची अवस्था होऊन गेली आहे. कृष्णाच्या विविध लीलांचे वर्णन कवी तन्मयतेने करतो.

सद्गुरूच्या कृपेने भगवंताची प्राप्ती होते. भगवद्भजनाशिवाय मनुष्यजन्म व्यर्थ होय असा महादजींचा उपदेश आहे. महादजींची कविता भक्तिपर व सुबोध आहे. रूपकालंकाराने अनेक ठिकाणी त्यांनी आपली कविता मंडित केली आहे. केव्हा केव्हा शब्दचमत्काराच्या अट्टाहासाने ती बोजड होते. पण सहज अशा लयाने त्यांच्या अनेक पदांत गेयता आली आहे. त्यांची हिंदी रचना व्रज बोलीत असून ती कवने रसपूर्ण आहेत. उत्तम सेनानी म्हणून प्रसिद्ध असलेल्या ह्या पुरुषाच्या कवितेत वीररसाचा कोठेच आविष्कार कसा दिसत नाही असा प्रश्न पडल्यास धकाधकीच्या जीवनातून स्वतःच्या मनाला शांती मिळवून देण्यासाठी कवीने हा मार्ग शोधला असावा असे निश्चितपणे सांगता येते. त्यांची कविता ही त्यांच्या परमार्थप्रवण मनाचा सहजाविष्कार आहे.

**रचना : मु.** – 'माधवविलास', राजकवी महादजी शिंदे ऊर्फपाटीलबाबा आलीजाह बहादुरकृत कविता; संपा. भालेराव, भा. रा.; प्रस्ता. : भिडे, स. ब.; ग्वाल्हेर, १९२१. **अमु.** – माधवदासी – गीताटीका (अनुपलब्ध). **शंका.** – १. दौलतवाग्विलास. २. नीतिग्रंथ.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कामत, अ. प्र. : भक्तकवि महादजी; प्रसाद, ऑक्टो. १९६९; पृ. ३७. २. कामत, अ. प्र. : महादजी शिंदे ह्यांची काव्यरचना; स्वराज्य २२–३–१९६९; पृ. ४. ३. कामत, अ. प्र. : संतभक्त महादजी शिंदे; लोकराज्य, १६–८–१९६९; पृ. २७. ४. पोतदार, द. वा. : माधवविलास; भाइसमंत्रै., १९२२; पृ. १७२–१७३.

**महादा / ० नामयाचा महादा** [का. अनु.] कवी. प्रसिद्ध वारकरी संत नामदेवांचा हा पुत्र. ह्याचा एकच अभंग *नामदेव गाथे*मध्ये मुद्रित झाला आहे, तो असा : "यादवांचे कुळीं झोंड जें जन्मले । नाही ऐसे केलें मागें पुढें ॥ १ ॥ देईगा विठोबा आमुचें ठेवणें । लोकांचें तू ऋण नेदो पाहसी ॥ २ ॥ आमुचे साधु आहेत सज्जन । तुमचा जमान कोठे देवा ॥ ३ ॥ नामयाचा महादा बळकट झाला । विठोबा आणिला चौबारांत ॥" (*श्रीसकलसंतगाथा*, खं. १, पृ. ४६४).

**महादाजी विठ्ठल** [इ. स. चे १८ वे शतक] बखरकार.

**रचना : अमु.** – शालिवाहनाची बखर (काही पृष्ठे उपलब्ध); र. का. : इ. स. १७०० ते १८०० चा सुमार, र. स्थ. : पैठण; संग्रा. भाइसंम.

**महादु गोविंदा** [अंदाजे इ. स. १७८२] शाहीर. ह्याने मलकोजीबुवा नावाच्या वऱ्हाड प्रांतातल्या महार साधूवर पोवाडा रचला आहे. वऱ्हाडातील यवतमाळ जिल्ह्यातील आजंती गावच्या आसपास मलकय्या नावाचे थोर संत होऊन गेले. त्या पंचक्रोशीत त्यांचा किती लौकिक होता हे पोवाडेकाराने सांगितले आहे. भाम

येथील राजा कान्होजी भोसल्याने मलकय्यांचा बराच छळ केला असा पोवाडेकाराने उल्लेख केला आहे. ह्या उल्लेखामुळेच पोवाडचाला ऐतिहासिक महत्त्व आले आहे. पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड २* मध्ये संग्रहित (पृ. २६१–२६५).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : मलकोजीबुवाचा पोवाडा – ऐतिहासिक माहिती; केळकर, य. न.; ऐतिपो., खं. २; पुणे, १९४४; पृ. २५९–२६०.

**महादु विश्वनाथ** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर व १९ व्या शतकाचा पूर्वपाद] शाहीर. ह्यांच्या लावण्यांतून शृंगारा-बरोबर वीररसही आविष्कृत झाला आहे (सरस्वतीमंदिर, व. ८, अं. ८, कार्तिक, श. १८३१, पृ. १).

**महादेव–१** [अंदाजे श. १६०० / इ. स. १६७८ – श. १६६८ / इ. स. १७४६] कवी. भागवतातील श्रीकृष्णाच्या बाळक्रीडेवर ह्या कवीने आख्यान रचले आहे त्याची एक हस्तलिखित प्रत तंजावर संग्रहालयात आहे. राजाराम प्रासादींनी आपल्या *भक्तमंजरी* ग्रंथात वर्णन केलेला वामनस्वामींचा पट्टशिष्य महादेव तो हाच असावा असे म. रा. जोशी म्हणतात. काव्य वाचल्यानंतर कवीसमोर वामन-पंडितांचे आख्यान असावे असे वाटते. कारण हे काव्य त्यांच्या आख्यानाप्रमाणेच सुरस व रसाळ आहे. काव्यात एकनाथ व जनी-जनार्दन ह्यांचा उल्लेख येतो तो असा : 'ऐसा बाळक्रीडेचा सोहळा। जनीजनार्दन खेळे अवलीळा। येकनाथ उद्धव प्रसाद माळा। बाळलीला महादेवा ॥ ८९ ॥'

**रचना : अमु.** – कृष्णबाललीला; ग्रं. सं. ९०; प्र. ले. का. : क्षय संवत्सर (श. १६६८), कार्तिक शु. दशमी; प्रतलेखक : केशव जनार्दन; तंसम. बा. १४२६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : काही अज्ञात सारस्वत उपासक; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २३.

**महादेव–२** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – मूलस्तंभ (स्वतंत्र छापलेले पुस्तक); संककासू., पृ. ३७.

**महादेव–३ / ० माधव–११ / ० नृसिंहदास महादेव** [का. अनु.] कवी. ह्यांचा *बभ्रुवाहन* हा (अश्वमेधांतर्गत) विस्तृत काव्यग्रंथ रामदासी हस्तलिखित बाडात उपलब्ध आहे. एकूण ग्रं. सं. ९०८२ असे नमूद केले आहे. कवीने काव्यात स्वतःचा महादेव कवि, माधव, नृसिंहदास महादेव असा उल्लेख केला आहे.

**रचना : अमु.** – अश्वमेधांतर्गत बभ्रुवाहन; पत्रे ६९; प्रकरणे १७ ते २३; ग्रं. सं. ९०८२; सवामं. हस्त. यादी, क्र. २.

**महादेव–४** [का. अनु] कवी.

**रचना : अमु.** – तत्त्वशोधन; ग्रं. सं. १०३; र. का. : श. १७४७ / इ. स. १८२३, पार्थिवे ज्येष्ठ मास्यं; मसमं., हवना., पृ. ४५.

**महादेव–५** [का. अनु.] वीरशैव कवी. ह्यांनी अभंग रचले आहेत. एकूण अभंग ९७ आहेत (महादेव गाथा; प्रका. : शिवलिंग भाऊ; ओझर्डे, १९११).

**महादेव–६** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४६.

**महादेव–७** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**महादेव कवीश्वर** [का. अनु.] शाहीर. प्रभाकराचा समकालीन. ह्याच्या कवनातील काही ओळी वि. ल. भावे ह्यांनी उद्धृत केल्या आहेत (मसा., आ. ५, पृ. ५६९).

**महादेवदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – वैरागी ओव्या; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**महादेवपुत्र** [का. अनु.] कवी. ह्या कवीचे *नळदमयंतीविवाह* हे काव्य रघुनाथ पंडितांच्या *नलदमयंती आख्याना*ची आठवण करून देणारे आहे. तंजावरस्थ कवींचा हा आवडता काव्यविषय आहे.

**रचना : अमु.** – नळदमयंतीविवाह; तंसम, हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : तंजावर सरस्वती महाल : काही अज्ञात सारस्वत उपासक; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २४.

**महादेवभट्टात्मज श्रीनीळकंठगुरु** [का. अनु.] टीकाग्रंथकार. ह्यांच्या *पंचदशी* ग्रंथाचे फक्त प्रथम प्रकरण (सटीक) उपलब्ध असून टीका गद्यात आहे (सवामं. हस्त. सू., खं. १).

**महादेवसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**महादेवसुत पंतविठ्ठल** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रघुपतीचे कित्ताध्यान स्तोत्र; भाइसमं. हस्त. सू., पृ. २३१.

**महादेवात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० महामति** – पहा सच्चिदानंद–२.

**महालिंगदास / ० लिंगदास** [अंदाजे शके १४८६–८७ / इ. स. १५६४–६५] कवी. हे खानदेशातील गिरणा नदीच्या तीरी वाडे येथील राहणारे. *चाणक्यनीति* ह्या ग्रंथात कवीने पुढीलप्रमाणे आपली माहिती दिली आहे : "रामकृष्ण माझे गुरुदैवत। विक्रमदेव माझा पिता। महालिंगदासु करी कविता। सुत बंकदेवाचा ॥ वंशु कश्यपाचा। गोत्र भारद्वाजाचा। कुळ वासुकीचा। उपनाम अहिरदावो ॥" *पंचोपाख्याना*तही आपल्या रामकृष्ण गुरूला ह्याने वंदन केले आहे.

वर उल्लेखिलेल्या ग्रंथांव्यतिरिक्त *सिंहासनबत्तिशी, वेताळपंचविशी* व *शालिहोत्र* अशा आणखी काही ग्रंथांची ह्यांनी रचना केली आहे. *पंचोपाख्यानाची* रचना प्रत्यक्ष संस्कृत ग्रंथावरूनच केली असावी. *वेताळपंचविशी*चा उल्लेख *सिंहासनबत्तिशीत* येतो त्यावरून तो अगोदर रचला असावा. हे तीनही ग्रंथ ओवीबद्ध आहेत. ते तसे पद्यमय करण्याचे प्रयोजन *सिंहासनबत्तिशीत* कवीने स्पष्ट केले आहे. मुळात गद्य असलेल्या गोष्टी वाचण्यास आणि ऐकण्यास सुलभ व्हाव्या म्हणून गायनाला युक्त अशी पद्यरचना केली असे महालिंग-दास म्हणतो. त्या काळची समाजस्थिती जाणून घेण्याच्या दृष्टीने *सिंहासनबत्तिशी* हा ग्रंथ महत्त्वाचा ठरतो. हे सर्व ग्रंथ सुबोध असून ते सर्वसामान्य जनांसाठी लिहिले आहेत. कवीची भाषा सुभाषित-प्रचुर, सालंकृत व प्रौढ अशी आहे.

बहुजनसमाज बहुश्रुत व्हावा ह्या हेतूने केवळ ईश्वरोपासनेखेरीज व्यवहारचातुर्य व राजनीती ह्यांच्या बोधाकरिता लौकिक स्वरूपाच्या रूढ कथारचनेकडे त्या काळी लक्ष होते असे महालिंगदासाच्या ग्रंथावरून म्हणता येते.

**रचना : अमु.** – १. चाणक्यनीति. २. पंचतंत्र – सटीक : र. का. : श. १४९४; भाइसमं. ३. पंचोपाख्यान; ओ. सं. सुमारे ३०००; त्रु. पो.; भाइसमं. ४. बुद्धिबावन्नि; ग्रं. सं. ६०. ५. वेताळ-पंचविशी. ६. शालिहोत्र. ७. सिंहासनबत्तिशी (विक्रमबत्तिशी); त्रु. पो.; र. का. : श. १४८६ (इ. स. १५६४), समाधी संवत्सर; नाविग्रं. व भाइसमं. (टीप : सिंहासनबत्तिशीचा र. का. शं. गो. तुळपुळे श. १४८७, रक्ताक्षी संवत्सर असा देतात : तर पुष्पा चौधरी तोच श. १४८६ असा देतात.)

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चौधरी, पुष्पा वा. : सिंहासनबत्तिशी : काही स्वैरानवाद : साम्य-भेद-वैशिष्ट्ये; विसंमंवा., नागपूर, १९६६; पृ. ११६–१३५.

**महालिंग वाणी** [का. अनु.] वीरशैव कवी. गुरुपरंपरा : रामलिंग > सुजात > महालिंग वाणी. ह्यांचे पाच कडव्यांचे एक अध्यात्मपर रसाळ असे पद रा. चिं. ढेरे ह्यांच्या संग्रहात आहे. अग्निसंसर्गाने उसाच्या रसाची साखर होते, विरजण-मंथनाच्या प्रक्रियेने दुधाचे तूप होते, परिसाच्या स्पर्शाने लोहाचे सुवर्ण होते, त्याचप्रमाणे 'सुजातीं सुसंग जालिया उपरि' महालिंग वाणी शिवस्वरूप पावला आहे, अशा अर्थाचे हे पद आहे.

चरित्र, चर्चा, अभ्यास : ढेरे, रा. चिं. : वीरशैवांचे वाङ्मय; प्रामनधा., पुणे, १९७२; पृ. ६३–६४.

**महिदासखुत** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ७४.

**महिपतीबोवा ताहराबादकर / ० महीपती** [श. १६३७/इ.स. १७१५ – समा. श. १७१२, श्रावण वद्य १२ / इ. स. १७९०] संतचरित्रकार, कवी व साधुपुरुष. अहमदनगर जिल्ह्यातील राहुरी तालुक्यातील ताहराबाद ह्या गावचे रहिवासी, म्हणून हे ताहराबादकर ह्या नावाने ओळखले जातात. हे ऋग्वेदी वासिष्ठगोत्री ब्राह्मण. उपनाव कांबळे. वडिलांचे नाव दादोपंत व आईचे गंगाबाई. ही दोघेही भक्तिपरायण होती. दादोपंत पंढरीची वारी करीत. ह्या जोडप्याला वृद्धापकाळी श. १६३७ (इ. स. १७१५) मध्ये पुत्र झाला. त्याचे नाव महिपती ठेवण्यात आले. वयाच्या सोळाव्या वर्षी वडील निवर्तल्याने संसाराचा भार ह्यांच्यावर पडला. लहानपणापासून ह्यांना धर्माचे व विद्येचे शिक्षण त्यांचे गुरू मोरोबा तांभेरकर नावाचे एक सत्पुरुष देत असत. महिपतींचे शिक्षण फारसे झाले नव्हते. संस्कृताचा व्यासंग वाढविण्यास त्यांना संधीच मिळाली नाही. ते स्वतःच लिहितात : 'म्यां नाही पाहिला अमरकोश। गीर्वाण भाषा तीही निःशेष। नाना पुराणें विशेष। श्रवण सायासें न केलीं कीं॥' ह्या त्यांच्या लिहिण्यात विनय व सत्यताही आहे.

वडिलांच्या पश्चात महिपती ताहराबाद येथील कुळकर्णपणाची वृत्ती सांभाळत असत. हे गाव एका मुसलमानास जहागीर म्हणून मिळाले होते. महिपतींना दररोज जहागिरदाराच्या कचेरीत जावे लागत असे. एकदा काम आटोपून ते स्नानसंध्येच्या आन्हिकात गुंतले होते, तोच त्यांना जहागीरदाराचे बोलावणे आले. देवपूजा आटोपून येतो असा त्यांनी निरोप दिला. पण असाल तसे या असा पुन्हा निरोप आला. त्याप्रमाणे ते गेले. परत आल्यावर यवनसेवेपेक्षा विठ्ठलसेवा करावी हे बरे असे मनात येऊन त्याप्रमाणे ह्यांनी आपली लेखणी विठ्ठलचरणी ठेवली. पुढे ही चाकरी सोडून भजन-कीर्तन ह्या ईश्वरोपासनेचा मार्ग त्यांनी पत्करला. उपासनामार्गाचा अवलंब करून आयुष्यक्रमण होत असता, आपण ग्रंथरचनेचा प्रयत्न करावा असे त्यांच्या मनात आले. 'नामदेवांची शतकोटी अभंग करण्याची प्रतिज्ञा राहिली ती मीं पुरी केली. आता संतचरित्रे लिहिण्याचे काम त्वां करावें' अशी तुकोबांची आज्ञा दृष्टान्तातून झाली व त्यांनी संतचरित्रे लिहिण्यास प्रारंभ केला. महिपतीबोवांनी आपल्या उतारवयात *भक्तविजय, संतलीलामृत, भक्तलीलामृत* व *संतविजय* (अपूर्ण) असे चार संतचरित्र-ग्रंथ इ. स. १७६२ ते १७८९ ह्या काळात लिहिले. *पांडुरंगमाहात्म्य, तुळसीमाहात्म्य, गणेशपुराण, ऋषिपंचमीव्रत, कथासारामृत* इत्यादी लहान प्रकरणे त्यांनी रचली. महिपती वयाच्या ७५ व्या वर्षी श. १७१२ (इ. स. १७९०) श्रावण वद्य द्वादशीस मृत्यू पावले. त्यांच्या पश्चात त्यांचे दोन पुत्र विठोबा व नारायण असे होते. पैकी विठोबास पदे रचण्याचा नाद होता.

ईश्वरसंतोष आणि भगवद्गुणवर्णन ही काव्याची मुख्य प्रयोजने महिपतींना अभिप्रेत होती. ह्या प्रयोजनांच्या अनुषंगानेच त्यांनी संतांच्या व भक्तांच्या चरित्रांचे लेखन केले. अविद्येच्या अंधारात चाचपडणाऱ्यांना ज्ञानाचा प्रकाश देणारे संत सूर्याप्रमाणे आहेत, ते ईश्वरासमान आहेत' असे महिपतींनी संतांविषयी गौरवाने म्हटले आहे. भक्तांविषयी ते म्हणतात : मुलाला आईविषयी व आईला मुलाविषयी जसे प्रेम वाटते तसेच भक्त व ईश्वर यांच्यात प्रेम असते. "की पौर्णिमेचा चंद्र प्रकाश घन। मनीं उल्हासे सागर देखोन। तेची निजभक्तांची कीर्ती ऐकोन। तूं जगज्जीवन संतोषसी॥" म्हणून महिपतींनी संतचरित्राच्या व भक्तांच्या चरित्रांच्या अनुषंगाने परमेश्वराचे गुणगान केले, ईश्वराच्या कृपेची याचना केली. काव्य रसपूर्ण होण्यास ईश्वरकृपा पाहिजे. कारण, "प्रेमावाचोनि जैसे गायन। रंग न येचि त्या कारणें॥ की ईश्वरकृपेविण बोलणे। कवित्व जैसे निष्फळ॥" (*संतलीलामृत*, १–६३). काव्याची खरी प्रेरक शक्ती ईश्वरकृपा आहे. ईश्वराच्या कृपेने कवी काव्य करतो, त्यात दृष्टान्तादी अलंकार चातुर्याने घालतो व आपल्या कवितेला काव्यरूप देतो (*भक्तलीला.*, १०३–१०४). भक्तकथा व संतकथा वर्णन करताना होणारा काव्यानंद हा ईश्वरप्राप्तीपासून होणाऱ्या आनंदाच्या तोडीचा आहे. तो ब्रह्मानंदसहोदर आहे. महिपतींच्या मते आनंद हे काव्याचे महत्त्वाचे प्रयोजन. तो आनंद ईश्वरगुणवर्णनाप्रमाणेच भक्तांच्या कथावर्णनातूनही मिळू शकतो असे महिपतींना वाटते. प्रतिभा किंवा स्फूर्ती हे काव्यकारण पूर्वीच्या संतांनी मानले नाही. महिपतींच्या काव्यातही ह्या काव्यकारणाचा आढळ होत नाही. प्रत्येक कृती ईश्वरी प्रेरणेने होते, असे जेव्हा महिपती म्हणतात, त्यावेळी ते पूर्वकालीन कवींनी मानलेल्या ईश्वरप्रसाद व ईश्वरनिष्ठा ह्या काव्यकारणांचे अनुसरण करतात. अंतःस्थ परमेश्वर माझ्या मुखाने चरित्रलेखन करवून घेतो असे त्यांनी वारंवार म्हटले आहे. "प्रभंजनाचे योगें जाण। डोले तृणाचें बुझावण। तेवीं आमुचे बुद्धीस स्फुरण। तें तुझे सत्तेनें पांडुरंगा॥"

*भक्तविजय, संतलीलामृत; भक्तलीलामृत, संतविजय* (अपूर्ण) हे चार चरित्र-ग्रंथ महिपतींनी वरील दृष्टी ठेवूनच लिहिले. नाभाजींची *भक्तमाला*, उद्धवचिद्घनांची *संतमाला* व *भक्तकथामृतसार* आणि दासो दिगंबरांचा *संतविजय* ह्या ग्रंथांचा महिपतीबोवांनी आधार घेतला. *भक्तविजय* (इ. स. १७६२) हा त्यांचा पहिला ग्रंथ. ह्या ग्रंथासाठी संत नामदेवांच्या *तीर्थावळी* ह्या प्रकरणाचा त्यांनी उपयोग केला आहे. नाभाजी व उद्धवचिद्घन ह्या दोघांच्या ग्रंथांतील 'संमत एक करून। भक्तविजय आरंभिला', एकनाथ-तुकारामांच्या वंशजांकडून माहिती मिळविली. ह्या ग्रंथात नामदेव, ज्ञानदेव, दामाजी, भानुदास, एकनाथ, तुकाराम, बोधलेबुवा, गणेशनाथ इत्यादी संतांची चरित्रे व उद्धवाचे आख्यान ह्यांचा समावेश होतो. [ ⇨ ३.] ह्या चरित्रलेखनाच्या मागील दृष्टी भाविकाची आहे. ह्या भाविक वृत्तीमुळे पांडुरंगच आपणाकडून हे सर्व चरित्रलेखन करवून घेत आहे, असे त्यांना वाटे : "ग्रंथ वदविता रुक्मिणीपती। मी तो मंदमती अज्ञान॥ ७५.१॥" किंवा "वदविता श्रीरुक्मिणीकांत। महिपती त्याचा मुद्रांकित। पवाडे वर्णित संतांचे॥ २०९–३४॥" (*भक्तलीलामृत*).

ह्यानंतर महिपतींनी *संतलीलामृत* हा ग्रंथ शके १६८९ (इ. स. १७६७) मध्ये लिहिला. ह्या ग्रंथात अनेक संतांची चरित्रे आहेत. *भक्तविजयात* ज्या संतांची चरित्रे आली नाहीत त्या संतांच्या चरित्रकथा ह्या ग्रंथात वर्णिल्या आहेत. "आधील मागील कोणते संत। हे तरी मी नेणोचि सत्य" असे महिपती म्हणतात आणि ते सत्य आहे. चांगदेवचरित्रकथेला दहा अध्याय तर शेवटच्या दहा अध्यायात पन्नास संतांच्या चरित्रकथा असे ह्या ग्रंथाचे स्वरूप आहे. त्यामुळे ह्या ग्रंथात प्रमाणबद्धता राहिली नाही.

ह्यानंतरचा महिपतींचा ग्रंथ *भक्तलीलामृत*. हा ग्रंथ श. १६९६ (इ. स. १७७४) त लिहिला. त्यात चांगदेव, नानक, रोहिदास, एकनाथ, तुकाराम ह्यांची चरित्रे आहेत. ह्या ग्रंथातही प्रमाणबद्धतेचा

अभाव आढळून येतो. 'भक्तीं वाणिले तुजप्रती । मी गाईन संतांची कीर्ती' असा मनोरथ आहे तो पांडुरंगाने पूर्ण करावा अशी प्रार्थना महिपतींनी देवाजवळ केली आहे. [ ⇨ ३.]

*संतविजय* हा महिपतींचा ग्रंथ अपूर्ण आहे. ह्या ग्रंथात ग्रंथसिद्धीचा काल दिलेला नाही. पण तो इ. स. १७८९ म्हणजे *भक्तलीलामृत* (इ. स. १७७६) ह्या ग्रंथानंतरचा असावा. डॉ. प्रभाकर रामकृष्ण भांडारकर ह्यांच्या मते हा ग्रंथ महिपतींचा नसावा. त्याची कारणे देताना *भक्तविजय, कथासारामृत, संतलीलामृत* व *भक्तलीलामृत* ह्या महिपतींनी पूर्वी लिहिलेल्या ग्रंथांत व *संतविजयात* नमनाचा प्रकार, ओवीप्रकार ह्या बाबतींत अत्यंत भिन्नता दिसून येते. मोल्सवर्थच्या कोशाच्या आरंभी डॉ. वुइल्सन ह्यांचा जो लेख जोडला आहे, त्यात महिपतींच्या *संतविजयाचा* उल्लेख नाही. तसेच ह्या ग्रंथातील तुकाराम-रामदास-भेट ऐतिहासिक चिकित्सक दृष्टीला पटणारी नाही. सारांश, *संतविजय* हा महिपतींनी लिहिलेला ग्रंथ नव्हे. तो कोणा रामदासाभिमानी कवीने रचला आहे, असे डॉ. भांडारकर ह्यांनी आपले मत व्यक्त केले आहे (विज्ञावि., पु. ४०, ऑक्टो. १९०९, पृ. ३७३). रा. चिं. ढेरे ह्यांनी डॉ. भांडारकरांच्या ह्या मताचे खंडन केलेले असून हा ग्रंथ महिपतींनी आयुष्याच्या अखेरच्या कालात लिहिला असे ठरविले आहे. (*संतांच्या चरित्रकथा*, ६८–६९).

प्रस्तुत ग्रंथाचे सव्वीस अध्याय आहेत. त्यांत रामदास व बाबाजी गोसावी ह्यांचीच चरित्रे दिली आहेत. समर्थांच्या *दासबोधातील* उतारे व त्यांचे काही श्लोकही उद्धृत केले आहेत. वर उल्लेखिलेल्या चरित्रवाङ्मया-खेरीज, गोड अशा व्रतकथांच्या मिषाने लोकांचे चित्त परमेश्वराकडे वळावे म्हणून *कथासारामृत* ह्या ग्रंथाची रचना महिपतीबोवांनी केली. त्यात *कार्तिकव्रत, माघमाहात्म्य, वैशाखव्रत* आणि *एकादशीमाहात्म्य* अशी चार व्रते निवडून पुराणांचा आधार घेऊन विस्ताराने सांगितली आहेत.

*पांडुरंगमाहात्म्य* ह्या ग्रंथाचे शिवपार्वतीसंवादरूपाने निरूपण केले आहे, तर *पांडुरंगस्तोत्रात* पंढरीनाथाला पत्र लिहिले आहे व त्यात आत्मकथन केले आहे. *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांच्या मते मोरोपंतांच्या *संशयरत्नावली* ह्या काव्याचे बीज ह्या स्तोत्रात सापडते. स्फुट स्वरूपाच्या रचनेत अभंग, आरत्या, पदे, *सारांश ज्ञानेश्वरी* इत्यादी कवित्व त्यांनी केले. ही रचना अद्यापि अप्रकाशित आहे.

एकंदरीत आख्यानपर रचनेपेक्षा चरित्रात्मक ग्रंथलेखनाकडेच महिपतींचा कल होता हे निश्चित. कारण त्याशिवाय एवढ्या चरित्र-ग्रंथांचे लेखन होणे शक्य नव्हते. संतचरित्रे वर्णन करताना त्यांना उल्हासाचे विशेष भरते येते. अनेक दृष्टान्त देऊन विषय सोपा करून व खुलवून सांगण्याचे चातुर्य त्यांच्या ठिकाणी आहे. त्यांच्या चरित्र-लेखांत अनुभवाची समृद्धता आहे. "जैसे चित्त तैसी आकृती । भूमि ऐसे कोंब निघती ॥ बीजा ऐशी फळे येती । संशय चित्ती कासया ॥" (*संतलीलामृत* २५.१६४). जसे मन असेल तसे भाव आकृतीवर–चेहऱ्यावर उमटतात. जशी जमीन तसेच कोंब, अनुभव जितके समृद्ध तितकी काव्यनिर्मिती श्रेष्ठ, अशी महिपतींची काव्यनिर्मितिविषयक भूमिका आहे. नावीन्यपूर्ण दृष्टान्त देऊन योजनाचातुर्याच्या साहाय्याने त्यांनी काव्यविषयाला काव्यरूप दिले. महिपतींची निवेदनपद्धती प्रासादिक, रसाळ व साधी आहे. चरित्रलेखनात एवढी विस्तृत रचना करणारा हा एकमेव ग्रंथकार आहे. आजही ह्यांचे ग्रंथ आध्यात्मिक व धार्मिक दृष्टीने आणि भाविकतेने महाराष्ट्रात वाचले जातात.

महिपतींनी उत्तरेकडील हिंदी साहित्यातील पहिले चरित्रकार नाभाजी ऊर्फ नाभादास (इ. स. १५७३–१६४३) ह्यांच्या *भक्तमालेच्या* आधारे उत्तरेकडील संतांची चरित्रे वर्णिली असावीत.

महिपतींनी साऱ्याच संतांची चरित्रे सारख्याच भक्तिभावाने लिहिली आहेत. त्यामुळे त्यात त्यांची विभूतिपूजावृत्ती दिसून येते असे असले तरी चरित्रकार व भक्तिमार्गाचा शिक्षक म्हणून त्यांची योग्यता मोठी आहे. संतांच्या जीवनांतील घटना क्रमवार सांगून वास्तव व्यक्तिचित्रण करणे हा त्यांच्या काव्यरचनेचा हेतू नव्हता. ज्या घटना जनतेला आनंद देतील व ज्यांचा उपयोग भागवत-धर्माच्या पुरस्कारार्थ होईल त्या न चुकता महिपतींनी टिपल्या आहेत. 'भक्तीसि लागतील बहुजन' हे त्यांच्या काव्याचे प्रयोजन होते आणि ते त्यांनी उत्तम तऱ्हेने पार पाडले आहे ह्यात संशय नाही.

**रचना : मु.** – १. कथासारामृत; अ. ३६, ग्रं. सं. ७२००; र. का. : श. १६८७; मुंबई, १८८९. २. पांडुरंगस्तोत्र, मुंबई, १८३५ (शिळाछाप). ३. भक्तलीलामृत; अ. ५१, ओ. सं. १०७९४; र. का. : श. १६९६, फाल्गुन; मुंबई, १८७५; द्विआ. मुंबई, १९३५. ४. भक्तविजय; अ. ५७; ओ. सं. ९९१६; र. का. : श. १६८४, चित्रभानु, वैशाख व. २; मुंबई, १८६० (शिळाछाप); मुंबई, १८८३. ५. संतलीलामृत; अ. ३५; ओ. सं. ५२५९; र. का. : श. १६८९; मुंबई, १८८६. ६. संतविजय (अपूर्ण); अ. २६; ओ. सं. ४६२८; मुंबई, १८७१, १९२७.

**स्फुट रचना :** १. अपराधनिवेदन स्तोत्र. २. दत्तजन्म. ३. देहकांड-पुराण. ४. अभंग, आरत्या इ.; सं. ३६; ढेरे, रा. चिं.; इंद्रायणी, मार्च १९६३, पृ. ६०. **अमु.** – १. अनंतव्रतकथा; ओ. १८६. २. ऋषीपंचमी माहात्म्य; ओ. १४२. ३. गणेशपुराण; ओ. ३०४. ४. तुळसीमाहात्म्य; ओ. ७६३; ५. पांडुरंगमाहात्म्य; र. श. १६८८, भाद्रपद. ६. मुक्ताभरण स्तोत्र; ओ. १०१. ७. अभंग, पदे, आरत्या इ.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : महिपती; मकच., खं. २; १९१३; पृ. ४५–७२. २. आपटे, ब. द. : महिपती बुवा आणि मल्हारराव होळकर; इंद्रायणी, मे १९६३; पृ. ६२. ३. ढेरे, रा. चिं. : महिपतींची स्फुट रचना; इंद्रायणी, मार्च १९६३; पृ. ५७. ४. तुळपुळे, शं. गो. : महिपतीचे 'भक्तलीलामृत'; सह्याद्रि, ऑग. १९३८. ५. देशमुख, उषा : महिपतीचा रस-विचार; युगवाणी, डिसें. १९६६, जाने. १९६७; पृ. ३१४–३१८. ६. देशमुख, उषा : महिपतीला अभिप्रेत असलेले काव्यकारण; प्रसाद, जाने. १९६७; पृ. २५. ७. देशमुख, उषा : महिपतीला अभिप्रेत असलेले काव्यप्रयोजन; प्रतिष्ठान, सप्टें. १९६६; पृ. १८. ८. पंडित, भ. श्री. : महिपती आणि नाभाजी व प्रियादास; मसाप., ऑक्टो. १९४२. ९. भांडारकर, प्र. रा : संतविजय ग्रंथ; विज्ञावि., पु. ४०, ऑक्टो. १९०९; पृ. ३७३. १०. भावे, वि. ल. : महिपतीचे गुरू मोरोबा तांभेरकर; भाइसंमंइति., श. १८३४, पु. ४, भा. ३; पृ. ३०७–३०८. ११. भावे, वि. ल. : मोरोपंत व महिपती; भाइसंमंइति., श. १८३४; पु. ४, भा. ३, पृ. ३०८–३१०. १२. मेहेंदळे, खं. चिं. : महिपतीकृत संतविजय, अध्याय २७ वा; प्रस्ता., भाइसंमं., आषाढ व आश्विन, श. १८४९; पृ. ३–१४. १३. राजवाडे, वि. का. : नाभाजी-महिपती-वर्णित हिंदुस्थानी व महाराष्ट्री संत; सरस्वती मंदिर; चैत्र, श. १८२८. १४. राजवाडे, वि. का. : महिपती; बालबोध, सप्टें. १९०१; पृ. १२१. १५. शर्मा, विनयमोहन; महिपती; हिंमसंदे.; पटणा, १९५७; पृ. २०६–२०८.

**महीचंद्र** [इ. स. १६९६] जैन कवी. लातूरच्या बलात्कारगण भट्टारक पीठावरील आचार्य. गुरू : विशालकीर्ती. ह्या पीठावरील आचार्यांनी व त्यांच्या शिष्यमंडळाने मराठी साहित्यात बरीच भर घातली आहे. त्यांपैकी महीचंद्र ही एक विशेष उल्लेखनीय व्यक्ती मानली जाते. महीचंद्रांना गुरुस्थानी मानणारे महाकीर्ती, रामकीर्ती,

ब्रह्मचिंतामणी असे अनेक साहित्यिक शिष्य निर्माण झाले.

महीचंद्रांच्या रचनेत *आदिनाथपुराण* व *सम्यक्त्वकौमुदी* हे दोन मोठे ग्रंथ व व्रतकथा, आरत्या, गीते, स्तोत्रे इ. स्फुट काव्ये ह्यांचा समावेश होतो.

*आदिनाथपुराणाचे* १५ अध्याय असून ग्रंथसंख्या ३२५३ आहे. हा ग्रंथ ब्रह्मजिनदासाच्या *आदिनाथरासाच्या* आधारे रचला आहे. ग्रंथाचा रचनाकाल व मूलाधार ह्यांचा कवीने ग्रंथप्रशस्तीत खालीलप्रमाणे निर्देश केला आहे : " रास केली ब्रह्मजिनदासें। ती पाहून महिश्चंद्र उल्हासें। महाराष्ट्र केले सायासें। श्री गुरुप्रसादें ॥ १०.१४२॥ शके सोळासे अष्टादश। धाता नाम संवत्सर सुरस। माघ वद्य पंचमी तिथीस। रविवार तो ॥ १०.१४५॥" जैन पुराणात ह्या चरित्राचे माहात्म्य मोठे आहे म्हणून ह्या ग्रंथाची रचना केली असावी.

दयासागराप्रमाणे महीचंद्रांनीही एक *सम्यक्त्वकौमुदी* रचली आहे. मूळ संस्कृत ग्रंथाचे हे मराठी रूपांतर असून त्यात लोकांची धर्मावरील श्रद्धा वाढावी ह्या हेतूने अनेक कथा सोप्या करून सांगितल्या आहेत.

वरील रचनेव्यतिरिक्त *नंदीश्वरकथा (अष्टाह्निककथा)* (१५० ओ.), *गरुड-पंचमी-कथा* (९१ ओ.) ह्या व्रतकथा, *नेमिनाथ-भवांतर* (७१ कडव्यांचे काव्य), *शांतिनाथ स्तोत्र* (श्लो. सं. १७), *नेमीश्वर गीत* (कडवी १०), *महावीर पाळणा* (कडवी १६), *चूडचिंतामणी आरती*, *अरिहंत आरती* अशी स्फुट स्वरूपाची कविता आहे. एकंदरीत रचना भावपूर्ण आणि उत्कट आहे.

**रचना : मु.** – १. आदिनाथपुराण; अ. १५; ओ. सं. ३२५३; र. श. १६१८ / इ. स. १६९६; चवडे, जि. ना.; वर्धा. **अमु.** – सम्यक्त्वकौमुदी; प्रसंग १३; ओ. सं. १६८१; कारंजा पीठ हस्त. सं. **स्फुट** – आरत्या, गीते, व्रतकथा, स्तोत्रे इत्यादी जैन पीठातील हस्त. सं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र ; महीचंद्र; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ६९–७२.

**महींद्रभट / ० म्हाइंभट्ट / ० महीभट्ट / ० महीन्द्रव्यास** [अंदाजे इ. स. चे १३ वे शतक, उत्तरार्ध] महानुभाव पंथाचे संस्थापक श्रीचक्रधर ह्यांचे आद्य जीवनवृत्तलेखक. हे मूळचे मराठवाड्यातील औरंगाबाद जिल्ह्यातील सराळे गावचे गर्भश्रीमंत ब्राह्मण. हे नाणावलेले संस्कृत पंडित होते. ह्यांच्या वडिलांनी ह्यांची मुंज केल्यानंतर त्यांना त्यांच्या मामाजवळ विद्याभ्यासासाठी ठेवले होते. ह्यांचे मामा गणपती आपेयो हे एक विद्वान पंडित होते. विद्याभ्यासात म्हाइंभट्टांनी चांगलीच प्रगती केली. ह्या विद्यागुरूजवळ आरंभीचे अध्ययन करून हे पुढील शास्त्राभ्यासासाठी तेलंगणातील विद्यानगरीला गेले व तेथे 'प्रभाकर-दर्शन' नावाचे शास्त्र शिकून सर्वविद्यासंपन्न होऊन महाराष्ट्रात परत आले. गणपती आपेयोंनी ह्यांची तीव्र बुद्धी पाहून आपली कन्या देआंबा ह्यांस देऊ केली. विवाहानंतर हे दक्षिण देशात जाऊन राहिले. वादांत ह्यांनी कित्येक पंडितांवर जय मिळविले व अनेक सभा जिंकून जयपत्रे मिळविली. नंतर हे स्वदेशी परत आले. आपल्या विद्वत्तेचा असा काही गर्व ह्यांना चढला की ते दिवसा दिवट्या पाजळून चालत. 'आकाशात प्रभाकर सूर्य व पृथ्वीवर मी विद्यासूर्य' असे ते म्हणत. आपण इतरांना गवताप्रमाणे लेखतो याचे गमक म्हणून हे पायात तृणाची वाकी घालीत असत. विद्वत्तेचा अहंकार ह्यांच्या प्रत्येक कृतीगणिक, चालण्यापासून तो बोलण्यापर्यंत, व्यक्त होत होता.

ह्यांची वादपिपासा वाढत चालल्याचे गणपती आपेयोंच्या लक्षात येऊन ते म्हाइंभट्टास म्हणाले, " भट्टो। तुमचेया वाचलेयापणाचे फळ तैं होए जैं श्री चांगदेवो राउळां गोसावीया दरसन होए." अजूनही आपणास एक विद्वानाशी तोंड द्यावे लागेल, अशी वरील वाक्य ऐकताच ह्यांची खात्री झाली व उत्कंठा जागृत होऊन त्यांनी " ते काइ विद्वान : ना महात्मे : काही संस्कृत जाणति :" असे अधीरतेने विचारले. " ते संस्कृत जाणति का नेणति हे नेणो : ते मऱ्हाटी तव अनिवार बोलत असति :" असे आपेयोंनी उत्तर दिले. म्हाइंभट्ट ह्यावर म्हणाले, " तरि काइ मज म्हाइयासि बोलती : ते मऱ्हाटी बोलती : तरि मी संस्कृते बोलैन। हो कां : तुम्ही तयाचेया दर्शना जाल : तेव्हेळी माते घेऊनी जा : तया बोलावा।" सुदैवाने लवकरच चक्रधरांच्या भेटीची वेळ आली. ह्यावेळी डोमेग्रामी (डोंबेगावी) चक्रधरांचा मुक्काम होता. वाटेत जाताना म्हाइंभट्ट प्रत्यक्ष भेटीत होणाऱ्या वादविवादाची पूर्वतयारी करीत होते. शेवटी त्यांनी डोमेग्रामच्या राजमठात प्रवेश केला. सर्वज्ञांना ह्यांनी स्थिरकायाप्रणीत प्रणाम केला आणि नवल असे की मनन केलेली सर्व वादस्थळे ते विसरून गेले व स्तब्ध झाले (ली. च. १११). अखेर सर्वज्ञांची परावाणी बोलू लागली : " भट्टो। आत्यंतिक संसृतिछेदु होए ऐसी काइ प्रतीति आति " – अविद्याबंधन-(भवबंधन-)छेद होण्याची काही प्रचिती पर्यायाने माहिती आहे काय ? सर्वज्ञांच्या ह्या प्रश्नाला महींद्रांनी उत्तर दिले की, " कर्म। कर्मातच शुद्ध अंतःकरण होय : शुद्ध अंतःकरणे ज्ञान होय : अन् ज्ञानोदयाने मोक्ष होय :" ह्यावर स्वामींनी 'नित्य नैमितिके कर्मे तिये प्रतिदिनीचेया परीहारा' आणि 'कायिक कर्मे' फळांच्या उपयोगी जात असल्यामुळे कर्मांनी अंतःकरण शुद्ध होत नाही, मग कुठले वैराग्य आणि कुठले ज्ञान। असे म्हणून 'अविद्यायुक्त जीवा स्वता ज्ञान न संभवे': 'सृष्टीमध्ये जीव जेतुलेही करी तेतुलेनि काइसेनही मुचेना : एक वाचौनि' आणि ते म्हणजे श्रीकृष्ण, श्रीचांगदेवराउळ, श्रीगोविंदप्रभु किंवा आपण (म्हणजे चक्रधरस्वामी) ह्यांच्यासारख्या ईश्वरावताराचे दास्य. चक्रधरांनी संस्कृत आणि मराठीतून केलेल्या प्रभावी निरूपणाने म्हाइंभट्टांस अखेरीस बोध होऊन चक्रधरस्वामी 'हा ईश्वरु' अशी प्रतीती आली आणि त्यांनी स्वामींना दंडवत घातले.

काही काळ गेल्यानंतर आयुष्याची अशाश्वतता लक्षात येऊन ह्यांनी सर्वसंगपरित्याग केला. जवळपास असलेल्या चक्रधरांना अनुसरल्यास आपले सासरे आपणाला त्यांच्याजवळून काढून नेतील असे भय वाटल्यावरून ते रितपुरला (ऋद्धिपूरला) गेले व त्यांनी गोविंदप्रभूंजवळ अनुसरण केले. त्या दिवशी भावेची चतुर्दशी होती. म्हाइंभट्टांनी गूळ व 'सोनेसळा फुटा' (रेशमी वस्त्र) प्रभूंस अर्पण केले, त्यांना दंडवत घातले आणि दीक्षा घेऊन पंथप्रवेश केला (ली. च. ४७१). ह्यानंतर चक्रधर व गोविंदप्रभू ह्यांच्या सेवेत हे आपला सर्व काळ घालवू लागले. त्यांच्या अध्यात्मचिंतनिकेत ते रंगून गेले, तरीही आपले व्यक्तिमत्त्व, दर्प किंवा अहंकार मात्र ते विसरू शकले नाहीत. नागदेवाचार्यांना हे 'सुंटदेव' असे कुचेष्टेने म्हणत. एकदा चक्रधरांनी व नागदेवाचार्यांनी त्यांचा हा अहंकार चांगलाच ठेचला. महीन्द्रांना आपल्या बुद्धिमत्तेचा विशेष गर्व होता. त्यामुळे ते स्वतःला योगभ्रष्ट म्हणत असत. ह्यावर नागदेवाचार्यांनी त्यांना म्हटले होते : " योगभ्रष्ट तंव माझीये दसेचा नव्हे : मा तुमचीये दसेचा काई होईल" (स्मृ. स्थ. १९). अशी स्पष्टोक्ती ऐकून ते मनात वरमले व तेव्हापासून ते नागदेवांना मान देऊ लागले.

संसारनिवृत्त झाल्यानंतर ते श्रीप्रभूंजवळ राहिले. त्यावेळी त्यांना कदन्न व भिक्षान्न माहीत नव्हते. पहिल्या दिवशी भिक्षान्न त्यांच्या घशाखाली उतरेना. पण सवयीने हे अन्नही ते खाऊ लागले (ली. च. ४७१). रितपुर गावी ते सोन्याचांदीचा व्यापार करीत पण मिळालेल्या संपत्तीचा उपयोग त्यांनी गुरुसेवेसाठी केला. तिकडील प्रथेप्रमाणे कोणास शेला-पागोटे घ्यावयाचे असेल किंवा कोणा बाईस चिरचोळी द्यायची असेल तर ती म्हाइंभट्टच आणीत असत.

गोविंदप्रभूंचे शिष्यत्व स्वीकारल्यानंतर त्यांच्या सांनिध्यात ते राहात असत. ह्यांची पत्नी देमाइसा हिनेही पंथस्वीकार केल्याने

तीही तेथेच असे. म्हाइंभट्टांचा अधिकार चक्रधरांनीही जाणला होताच. म्हाइंभट्टांचे संस्कृत भाषेवर चांगलेच प्रभुत्व होते. त्यामुळे गोविंदप्रभू किंवा नागदेवाचार्य ह्यांना भेटण्यास येणाऱ्या चर्चोत्सुक लोकांशी चर्चा करण्यासाठी म्हाइंभट्टांचीच योजना होत असे.

श्रीगोविंदप्रभूंवर म्हाइंभट्टांची अपार श्रद्धा होती. नागदेवाचार्यांनी एकदा म्हटले होते, "म्हाइमभटातें श्री प्रभुदास्यावेगळे जो दाखवी तयांसि मी महावाक्य वाखाणिन" (स्मृ. स्थ. ६८). ह्यावरून हेच सिद्ध होते. म्हाइंभट्टांचा अधिकार मोठा होता. परंतु चक्रधरनिरूपित शास्त्रात त्यांना फारशी गती होती असे दिसत नाही (स्मृ. स्थ. ६८).

म्हाइंभट्टांनी आपले अखेरचे जीवन भ्रमणात घालविले. भ्रमण करीत असतानाच त्यांना अशक्तपणा आला. शेवटी वाटेत भेटलेल्या उमाइसाच्या मदतीने ते रितपुरला आले. नागदेवाचार्य त्या ठिकाणी होतेच. ते म्हाइंभट्टांना भेटण्यासाठी सामोरे आले. त्यांचे चरण कवळून म्हाइंभट्ट म्हणाले, "भटो मज देवो होईल।" तेव्हा नागदेवाचार्य म्हणाले, 'म्हाइंभट्टो तुम्हांसि दोहिं देवांचे सन्निधानदास्य:'. श्रीचक्रधरांनी देखील तुमची प्रशंसा केली होती. तेव्हां तुम्हाला जर देव होणार नाही तर होणार कुणाला ? हे ऐकून म्हाइंभट्टांना बरे वाटले. आपल्या अपराधांची सर्वांनी क्षमा करावी, मृत्यूनंतर श्रीगोविंदप्रभूंना जेथे पुरले होते, त्यांच्या सांनिध्यात आपणास पुरावे, अशी ह्यांनी सर्वांना प्रार्थना केली व देहत्याग केला.

संस्कृताचे गाढे पंडित असूनही म्हाइंभट्टांनी आपली सर्व रचना मराठीत केली. त्यांचे प्रमुख ग्रंथ दोन : *लीळाचरित्र* व *ऋद्धिपुरलीळा* किंवा *श्रीगोविंदप्रभुचरित्र*.

म्हाइंभट्ट हे मराठी भाषेतील आद्यचरित्रकार गणले जातात. ह्यांनी *लीळाचरित्रा*ची रचना शके १२०५ (इ. स. १२८३) च्या सुमारास व *गोविंदप्रभुचरित्रा*ची रचना गोविंदप्रभूंच्या मृत्यूनंतर म्हणजे शके १२१० (इ. स. १२८८) च्या आसपास केली. ही दोन्ही चरित्रे 'लीळां'-च्या किंवा आठवणींच्या स्वरूपाची आहेत. ह्या दोन्ही ग्रंथांचे एकंदरीत स्वरूप संकलनात्मक आहे.

*लीळाचरित्रा*त श्रीचक्रधरस्वामींचे विस्तृत चरित्र त्यांच्या आठवणी व आख्यायिका ह्यांच्या रूपाने आले आहे. ह्या सर्व आठवणी गद्यात, तत्कालीन बोली-भाषेत, लिहिलेल्या आहेत. *लीळाचरित्रा*चे एकांक, पूर्वार्ध, उत्तरार्ध असे तीन भाग पाडले आहेत. त्यांत अंदाजे ५०० लीळा येतात. चक्रधरांनी उत्तरापंथे गमन केल्यानंतर नागदेव-म्हाइंभट्टादी त्यांचा परिवार रिद्धपुरी गोविंदप्रभूंच्या आश्रयास आला. प्रारंभी चक्रधरवियोगाचे दुःख अत्यंत तीव्र होते. अशा स्थितीत स्वामींच्या लीळा आठवीत बसणे हा एकच विरंगुळा उरला होता. ह्या उद्योगातूनच पुढे संग्राहक आणि कल्पक अशा म्हाइंभट्टांना स्वामींचा चरित्रग्रंथ लीळांच्या रूपाने बांधावा अशी इच्छा झाली. ह्या लीळा गोळा करण्यासाठी पंडितांनी अपार कष्ट घेतले. नागदेवाचार्यांना मार्गदर्शक करून चरित्रग्रंथ बांधला व ग्रंथात प्रामाण्य आणण्याची पराकाष्ठा केली. सर्वज्ञ आणि ईश्वराचा एक अवतार म्हणून स्वामींच्या लोकोत्तर अशा व्यक्तित्वाचे दर्शन ह्या लीळांमधून सहजतया घडते. स्वामींच्या व्यक्तित्वाचे अनेक पैलू या लीळांमधून व्यक्त होत राहतात. ह्याच निवेदनांतून स्वामींच्या परिवारातील अनेक व्यक्ती जशाच्या तशा नजरेसमोर उभ्या राहतात. कथनपद्धतीमुळे ही व्यक्तिचित्रे अत्यंत स्वाभाविक अशी झाली आहेत.

चक्रधरचरित्र म्हणूनच नव्हे तर महानुभावीय तत्त्वज्ञानाचे निरूपण करणारा एक पंथीय प्रमाणग्रंथ म्हणून *लीळाचरित्रा*चे मोल अधिक आहे. लीळांमध्ये येणाऱ्या चक्रधरोक्त वचनांनी पुढील अनेक ग्रंथकारांना ग्रंथलेखनाची स्फूर्ती दिली आहे. *लीळाचरित्र* म्हणजे महानुभाव-पंथीयांच्या दृष्टीने सर्व काही. अशा ह्या प्रमाण-ग्रंथाची भाषा घरगुती स्वरूपाची आणि अर्थपूर्ण अशी आहे. म्हाइंभट्टांची लेखनशैली साधी आणि प्रासादिक आहे. त्यामुळे ग्रंथ पुनःपुन्हा वाचावा असे वाटते. [ ⇨ ३. ]

म्हाइंभट्टांचा दुसरा चरित्रग्रंथ *श्री गोविंदप्रभुचरित्र*. पां. ना. कुळकर्णी ह्यांच्या मते *गोविंदप्रभुचरित्रा*चे कर्तृत्व म्हाइंभट्टांकडे जाऊ शकत नाही. ही गोष्ट त्यांनी अंतर्बाह्य प्रमाणे देऊन सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या ग्रंथाचे कर्तृत्व म्हाइंभट्टांचे असते तर त्यांनी ग्रंथात स्वतःचा त्रयस्थपणे निर्देश केला नसता (स्मृति, क्रमांक २५०). ह्या स्मृतीत म्हाइंभट्टांचा जो गौरव केलेला आहे तो ते स्वतःचा स्वतः करून घेणे शक्य नाही. दुसरा मुद्दा असा की, ह्या दोन्ही कृती एकाच म्हाइंभट्टाच्या असत्या तर जी घटना दोन्हीकडे देणे आवश्यक आहे, तिची भाषा एकच राहिली असती. पण तसे होत नाही. उदाहरणार्थ, *लीळाचरित्रा*तील ४७१ व्या लीळेचा काही भाग व *गोविंदप्रभुचरित्रा*तली ९७ वी लीळा वस्तुतः एकच पण त्या निरनिराळ्या पद्धतीने लिहिल्या आहेत असे वाटते. ह्यावरून *लीळाचरित्र* आणि *गोविंदप्रभुचरित्र* ह्या ग्रंथांचे कर्तृत्व एकाच व्यक्तीकडे देता येत नाही. हा ग्रंथ बराच उत्तरकालीन असावा असे त्यात आलेल्या ज्ञानेश्वरोत्तरकालीन यावनी शब्दांवरून सिद्ध होते. पंथीय परंपरेप्रमाणे प्रभू विद्यमान असताना म्हाइंभट्टांनी आरत्यांच्या दशकाची रचना केली. काही सिद्धपदे योजली व कांही आपण गुंफली. "तया उपरि श्रीप्रभु गोसावियाचा वियोगी म्हाइंभटी आपुली सामुग्री ईश्वरी अर्पिली : भणौनि काइही बंध न करिती" ह्यावरून प्रभूंच्या वियोगानंतर त्यांनी स्वतंत्र पद्यरचना केली नसावी. गोविंदप्रभूंच्या निधनानंतर ग्रंथरचनेचा कोणताच प्रयत्न पंडितांनी केला नाही : मग ह्या चरित्र-ग्रंथाचे कर्तृत्व त्यांच्याकडे कसे जाईल? (नभामा., व. १९, अं. ७, एप्रि. १९६६, पृ. ५४–५५).

ह्या संबंधात विवेचन करताना डॉ. वि. भि. कोलते म्हणतात की, *श्रीगोविंदप्रभुचरित्रा*चा मूळ लेखक कोण असावा ह्याविषयी खुद्द महानुभावीय ग्रंथलेखकांतच एकमत दिसत नाही. ह्यासंबंधात *इतिहास-प्रकर्णा*त उल्लेख येतो तो असा : "मग श्रीप्रभु बीजें केलेया नंतरें महीभटीं भटातें पूसोनि श्रीप्रभुचीया लीळा लीहीलीया : भक्ताचीये अनूभवीचीया भक्ता पूसीलीया : जनाचीया अनुभवीचीया जनासि पूसीलीया : तयाचीया आदी केलीया : . . . . इ." त्यावरून श्रीप्रभूंच्या निर्वाणानंतर सहा महिन्यांच्या अवधीतच हे चरित्र लिहिले असे दिसते. *लीळाचरित्रा*चा पूर्वार्ध-उत्तरार्ध म्हाइंभट्टांनी रचल्याचे स्पष्ट म्हटले आहे, तसे *ऋद्धिपुरचरित्र*लेखनासंबंधी *अन्वयस्थळा*दी ग्रंथांत स्पष्टपणे म्हटलेले आढळून येत नाही. नायंबासाचा शिष्य दामोदरमुनी ह्याने टाचलेल्या *वृद्धाचारअन्वयात* हे चरित्र केसोबासांनी संकलित केल्याचा निर्देश येतो.

*अन्वयस्थळा*दी ग्रंथांत हे चरित्र केसोबांच्या नावावर नाही. सोंगोबासांच्या *अन्वयस्थळा*त 'आन तिन्ही रूपे चरित्रे म्हाइंभटी केली' असे म्हटले आहे. ही तिन्ही रूपे म्हणजे *लीळाचरित्रा*चा पूर्वार्ध, उत्तरार्ध व *ऋद्धिपूरचरित्र* हीच असावीत, *इतिहास-प्रकर्ण* व सोंगोबासकृत *अन्वयस्थळ* ह्यांतील निर्देशांवरून *ऋद्धिपूरचरित्रा*चा मूळ लेखक अथवा संकलनकार म्हाइंभट्टच ठरतो (*गोविंदप्रभुचरित्र*, प्रस्ता., पृ. १३–१५). ह्याचे दुसरेही एक पटण्याजोगे कारण पुढे करता येते ते म्हणजे गोविंदप्रभूंच्या आख्यायिका संकलित करण्यास म्हाइंभट्ट हाच एक योग्य पुरुष होता. त्यांनी पंथाची दीक्षा प्रभूंकडूनच घेतली होती. गोविंदप्रभूंच्या मृत्यूपर्यंत ते त्यांच्या सांनिध्यात होते. बऱ्याच लीळा त्यांनी अनुभविल्या होत्या, शिवाय एकंदर लीळासंकलनाचे कार्यच त्यांनी आपल्या अंगावर घेतले होते, त्यावरून हेच वरील चरित्रग्रंथाचे संकलक असे म्हणता येते.

गोविंदप्रभूंचे समग्र चरित्र मात्र ह्यात आलेले नाही. त्यांच्या आयुष्यातील नानाविध प्रसंगांचे चित्रण अद्भुत कथांच्या आधारे केलेले आहे. महानुभावांच्या पाच परमेश्वरांपैकी गोविंदप्रभूंचा अवतार हा 'आच्छादनीचा परदृश्यावतार' आहे. पण ह्या अवताराचे स्वरूप काय ह्याची फोड चरित्रग्रंथात करून सांगितलेली नाही. ईश्वरावताराला शोभेसे त्यांचे गुण, त्यांची तीव्र बुद्धी, त्यांचे उपजत ब्रह्मज्ञान, भूतभविष्याविषयीचे त्यांचे ज्ञान, सिद्धी वश असल्याने केले जाणारे अनेक चमत्कार, इत्यादी ज्या गोष्टींची सर्वसामान्य श्रद्धाशील माणूस अपेक्षा करतो त्या प्रस्तुत चरित्रात आलेल्या आहेत.

प्रभूंच्या एकंदर आकृतीचे, वेशाचे, उठण्याबसण्याचे, त्यांच्या रागलोभादी विकारांचे, त्यांच्या सवयींचे चित्र चरित्रकाराने नेटके चितारले आहे. गोविंदप्रभूंचा वेश, वागणे, खाणे हे सर्वच वेड्यापिशाला शोभणारे होते. लोकही त्यांना 'राउळ वेडे : राउळ पीसे :' असे म्हणत. प्रभूचा हा लोकविलक्षणपणा चरित्रकाराने अचूक टिपला आहे. वऱ्हाडातील घरगुती वातावरण आणि बोली-भाषा ह्यांचा ह्या चरित्रग्रंथात चांगलाच परिचय घडतो. ह्याचे कारण असे की गोविंदप्रभू हे रिद्धपूर-अमरावतीचा परिसर सोडून फारसे कोठे गेले व नाहीत. ह्या भाषेमध्ये अनेक सुंदर म्हणी व अर्थपूर्ण वाक्प्रचार ह्यांचा समावेश झालेला आहे. [ ➪ ३.]

*लीळाचरित्रा*प्रमाणेच गोविंदप्रभूंच्याही दैनंदिन जीवनात चमत्कार आहेत, निरनिराळ्या व्यक्तींच्या भेटीगाठीचे प्रसंग आहेत. भक्तपरिवाराला केलेले उपदेश, मठातले सामुदायिक जीवन, हास्यविनोद अशा अनेक गोष्टींचे वर्णन त्यात येते. मात्र *लीळाचरित्रा*प्रमाणे ह्या ग्रंथातील लीळा संकलनकाराने पारखून घेतल्या नसाव्यात असे दिसून येते. चरित्रनायकाचा गौरव जेणेकरून होईल अशी भूमिका घेतलेली असल्याने चरित्रग्रंथातील प्रत्येक लीळेला धार्मिक आणि पंथीय तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने महत्त्व आहे; त्य दृष्टिकोनातूनच ह्या चरित्रग्रंथातील आख्यायिका नोंदल्या गेल्या आहेत, हे ह्या ग्रंथाचे मूल्यन करताना लक्षात घ्यावे लागते.

अनेक व्यक्तींकडून जमविण्यात आलेल्या आख्यायिका पाहिल्या, की एक गोष्ट लक्षात येते ती ही की ह्या चरित्रग्रंथाचा लेखक एकच नसून अनेक आहेत. म्हाइंभट्टांना ह्या कृतीचे निर्माते म्हणायचे ते मर्यादित अर्थानेच. *गोविंदप्रभुचरित्रा*वर काही विचार मांडताना डॉ. पंडित आवळीकर म्हणतात : "गोविंदप्रभूंच्या परिवारांतील नागदेव, म्हाइंभट, महदाइसा, आबाइसा ही भक्तमंडळी त्यांचे स्वभाव, त्यांची प्रभूंवरील निष्ठा, त्यांची आपआपसांतील भांडणे यांतून देखील 'माणूस' उभा करण्याचा प्रयत्न करतांना दिसतात. हा 'माणूस'च *गोविंदप्रभुचरित्रा*ला वाङ्मयीन अर्थ प्राप्त करून देतांना दिसतो." *लीळाचरित्रा*त तर ह्याचा प्रत्यय मोठ्या प्रमाणात येतो.

लीळांचा संग्राहक व संकलक म्हणून म्हाइंभट्टांचे स्थान कोणते हे सांगताना डॉ. वि. भि. कोलते लिहितात : "म्हाइंभट्टांच्या या प्रचंड उद्योगाला लाभलेली मधुर फळे म्हणजे हे चरित्र-ग्रंथ होत. त्यामुळे तत्कालीन मराठी भाषा, व्याकरण व वाङ्मय ह्यांवरच नाही तर इतिहास, धर्म, समाज इत्यादिकांवर देखील फार मोठा प्रकाश पडतो. ह्या सर्वांचे श्रेय जर कुणाकडे असेल तर ते म्हाइंभट्टांकडे. सारांश आद्य मराठी संशोधक म्हणून जशी म्हाइंभट्टांची कीर्ति अजरामर राहील तशी ती आद्य चरित्रकार म्हणूनही राहील, हे निर्विवाद आहे." (म्हाइंभट्टसंकलित *श्रीगोविंदप्रभुचरित्र*, प्रस्ता. पृ. ५४).

महानुभाव संप्रदायातील श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय, श्रीचक्रपाणी, श्रीगोविंदप्रभु व श्रीचक्रधर ह्या प्रसिद्ध पंचकृष्णांची चरित्रे म्हाइंभट्टांनी बांधली आहेत, असे पंथीय परंपरा मानते. भीष्माचार्य पाठातील जुन्या पोथ्यांत जो इतिहास दिला आहे त्यावरून श्रीचक्रधरप्रभूंनी वेळोवेळी शिष्यांना सांगितलेल्या लीळांतून ही पंचकृष्णांची चरित्रे आली होती. तीच पुढे भटोबासांनी लीळा आठवून म्हाइंभट्टांना सांगितली व त्यांनी ती संकलित केली. त्यांपैकी *चक्रपाणीचरित्र* य. खु. देशपांडे ह्यांनी भीष्माचार्य-वाइंदेशकर पाठांपैकी एका पाठातून सुंदरी लिपीमध्ये लिहिलेल्या पोथीवरून छापले आहे (यवतमाळ, १९३६). *सह्याद्रि-लीळा* हा श्रीदत्तात्रेयचरित्राचा सात लीळांचा पिढीपाठ डॉ. कोलते ह्यांनी *सह्याद्रि-वर्णन* (पुणे, १९६४) ह्या काव्याच्या परिशिष्टात (क्र. २) प्रसिद्ध केला आहे. ह्या ग्रंथाचा दुसरा अधिक मोठा पाठ उपलब्ध असला तरी मुद्रित झालेला नाही. कारण महानुभाव वाङ्मयात पिढीपाठाला अधिक महत्त्व आहे.

म्हाइंभट्टांनी गद्यात लिहिलेले व लीळांच्या स्वरूपात बांधलेले *श्रीकृष्णचरित्र* (मसंम. प्रका., मुंबई, १९५९, अपूर्ण) उपलब्ध आहे पण ह्या ग्रंथाचे कर्तृत्व विवाद्य आहे. डॉ. य. खु. देशपांडे व वा. ना. देशपांडे ह्यांच्या मते ह्या *श्रीकृष्णचरित्रा*चे कर्तृत्व भास्करकवींकडे जाते. डॉ. वि. भि. कोलते ह्यांच्या मते हा ग्रंथ म्हाइंभट्टांचा आहे, कारण ह्या चरित्राची भाषा व त्याचे स्वरूप म्हाइंभट्टांच्या इतर चरित्रग्रंथांशी पूर्णपणे जुळणारे आहे. अ. का. प्रियोळकरांनी छापलेल्या अपूर्ण *श्रीकृष्णचरित्रा*ची संपूर्ण पोथी प्रा. सुरेश डोळके ह्यांना उपलब्ध झाली आहे. ह्या पोथीत *श्रीदत्तात्रेयचरित्र*, *श्रीचक्रपाणीचरित्र* ह्यांच्यामध्ये एकही ओळ न सोडता प्रस्तुत *श्रीकृष्णचरित्र* लिहिण्यात आले आहे. *श्रीकृष्णचरित्र*-संदर्भात प्रा. डोळके ह्यांनी जे मत व्यक्त केले आहे ते असे : 'ही श्रीकृष्णचरित्राची मूळ संहिता वाइंदेशकर पाठाची असल्यामुळे व हे पाठ महानुभाव पंथात अधिकृत नसल्यामुळे हा ग्रंथ म्हाइंभट्टांचा नसावा. म्हाइंभट्टकृत श्रीकृष्णचरित्र लहान आहे.' (मसंप., व. ६, अं. ४, चरित्रग्रंथ पुरस्कार). निरनिराळ्या ग्रंथांतील कृष्णकथांच्या आधारे वाइंदेशकर पाठाने हे *श्रीकृष्णचरित्र* लिहिले आहे. अर्थात ह्या पोथीचा कर्ता म्हाइंभट्टाहून वेगळा आहे हे निश्चित (सुरेश डोळके : *श्रीचक्रधरनिरूपित* (?) *संपूर्ण श्रीकृष्णचरित्र*; नभामा., मे १९७५; पृ. ३६–३८).

महदाइसेच्या नावावर प्रकाशित झालेल्या *धवळ्यांचा* उत्तरार्ध म्हाइंभट्टांनी व लक्ष्मीधरपंडितांनी रचला असे मानले जाते (स्मृ. स्थ., १७४). *अन्वयस्थळा*च्या अनेक पोथ्यांत *धवळ्यां*च्या उत्तरार्धाची रचना म्हाइंभट्ट ह्यांनी केल्याचा उल्लेख आहे. त्यावरून *धवळ्यां*च्या उत्तरार्ध-रचनेचे कर्तृत्व म्हाइंभट्टांकडे जाते. डॉ. कोलते ह्यांच्या मतेही *धवळ्यां*च्या उत्तरार्धाचे कर्तृत्व म्हाइंभट्टांकडेच जाते. पण हा मुद्दा विवादास्पद आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या रचनेखेरीज ह्यांचे 'चरणशरणपारं' इत्यादी श्लोक व दहा मराठी आरत्या महानुभावीयांत *जतीचा दशकु* म्हणून प्रसिद्ध आहेत. ह्यांनी केलेल्या आरत्यांची यादी हरिबास-सोंगोबास ह्यांच्या *अन्वयस्थळा*त दिली आहे. श्रीप्रभूंच्या देहावसानानंतर म्हाइंभट्टांनी स्वतंत्र ग्रंथरचना केली नसावी असे एका पोथीतील *वृद्धाचारा*त येणाऱ्या उल्लेखावरून वाटते. संस्कृत पंडित असलेल्या म्हाइंभट्टांनी टीकात्मक किंवा तत्त्वज्ञानपर एकाही ग्रंथाची रचना करू नये ह्या गोष्टीचे आश्चर्य वाटते. *गोविंदप्रभुचरित्रा*तील एका स्मृतीत गीतेवर भट्ट भाष्य करीत, अर्थ लावीत आणि संथा करीत असा उल्लेख सापडतो; पण प्रत्यक्षात ग्रंथरचनेचा निर्देश मात्र कुठेच येत नाही. डॉ. य. खु. देशपांडे सराळे येथील म्हाइंभट्टांच्या संस्कृत व मराठी गीताटीकांचा उल्लेख करून त्या उपलब्ध नाहीत असे सांगतात (ममवा, पृ. १४).

**रचना :** मु. – १. श्रीगोविंदप्रभुचरित्र : (म्हाइंभट्ट-संकलित) ऋद्धिपूरलीळा – गद्य; संपा. कोलते, वि. भि.; मलकापूर, १९५१ (विस्तृत विवेचक प्रस्ता., पृ. १–५७). २. श्रीचक्रधरनिरूपित श्रीकृष्णचरित्र – गद्य; संपा. गोपीराज महानुभाव; मुंबई, १९५९ (मसंमं; प्रका.). ३. श्रीचक्रपाणीचरित्र – गद्य : संपा. देशपांडे, य. खु.;

यवतमाळ, १९३६ (प्रस्ता., पृ. १–८). ४. श्रीलीळाचरित्र – भाग ३ – एकांक, पूर्वार्ध, उत्तरार्ध; लीळासंख्या ४८८; संपा. : (१) नेने, ह. ना.; नागपूर, १९३६–३७, (२) तुळपुळे, शं. गो.; एकांक, पुणे, १९६४; पूर्वार्ध, भाग १–२, पुणे, १९६६; उत्तरार्ध, भाग १–२, पुणे १९६७ (विस्तृत विवेचक प्रस्ता.). ५. सह्याद्रि-लीळा (श्रीदत्तात्रेयचरित्र) : रवळोबासकृत सह्याद्रि-वर्णन; कोलते, वि. भि.; पुणे, १९६४; परिशिष्ट–२; पृ. ३०७–३०९. **अमु.** – १. गीताटीका – मराठी व संस्कृत. २. स्फुट पदे, आरत्या इत्यादी. **शंका.** – धवळे (महदाइसाकृत) उत्तरार्ध; संपा. देशपांडे, वा. ना.; आद्य मराठी कवयित्री (महदंबा); यवतमाळ, १९३५; पुणे, १९५६ (सुधारित आ.).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : गोविंदप्रभु-चरित्र : काही विचार; मसंप., जाने. १९७०; पृ. २५–४४. २. आवळीकर, पंडित : गोविंदप्रभुचरित्रातील मनोविलास; नभामा., जाने. १९७०; पृ. ५५–६१. ३. कुळकर्णी, पां. ना. : श्रीगोविंदप्रभु-चरित्राचे स्वरूप आणि कर्तृत्व; नभामा., एप्रि. १९६६; पृ. ४८–५८. ४. जोशी, व. स. : आद्य मराठी चरित्रकार : महेंद्रभट; नभामा., डिसें. १९६५; पृ. २३–२९. ५. देशपांडे, य. खु. : महानुभावांचे चरित्रग्रंथ; भाइसमंत्रै., व. १३, अं. २, १९३२; पृ. ४५–५७. ६. पठाण, यू. म. : ऋद्धिपूर लीळेतून अवतरलेले श्रीप्रभू; महानु., नोव्हें. १९६६; पृ. ३१–३४.

० **महींद्रव्यास** – पहा **महींद्रभट.**

**महीधरअंकीत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**महीधर कान्हा** [का. अनु.] कवी. ह्यांचे एकच पद उपलब्ध झाले असून त्यावरून 'महीधर कान्हा' असे कवीचे नाव असल्याचे समजते. महीधर हे नाव ह्यांच्या गुरूचे की स्वतः कवीचेच, ह्याचा उलगडा ह्या पदावरून होत नाही. ह्या पदाचा प्रारंभ पुढीलप्रमाणे : 'कोणी आणा गे, बाई। आणा गे, । पंकजपाणी, पयाब्धीची खाणी, । मोतीयाचा दाणा ॥ ध्रु. ॥' हे पद भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकात मुद्रित झाले आहे (व. २३, अं. ४, पृ. ५२–५३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा.; आणखी एक कान्हा; भाइसमंत्रै., व. २३, अं. ४ : चैत्र १८६५; पृ. ५२–५३.

० **महीपति तात्याबा** – पहा **तात्याजी महीपति.**

**महीपतिनाथ** [ ? – समा. श. १७४५, पौष शु. १३ / इ. स. १४ जाने. १८२४] नाथपंथी कवी. ग्वाल्हेर येथे वास्तव्य. ह्यांचे घराणे मूळचे पैठणचे. हे एकनाथांचे (पैठणकर) गुरू जनार्दनस्वामी ह्यांच्या वंशातील होते. त्यांचे मूळ नाव सखाराम. उपनाव केरसुणे. देशस्थ ऋग्वेदी विश्वामित्रगोत्री ब्राह्मण. ह्यांच्या अल्पवयातच मातापितरांचे छत्र नाहीसे झाले. पुढे धर्मपत्नीचेही निधन झाले. ह्या आघातांनी विरक्त होऊन हे आळंदीस ज्ञानेश्वरांच्या समाधीपाशी जाऊन राहिले. ज्ञानेश्वरमहाराजांनी स्वप्नात दृष्टान्त देऊन पैठणला नरहरिनाथांजवळ जाण्याचा आदेश दिला. त्याप्रमाणे हे नरहरिनाथांकडे गेले. त्यांनी पंथदीक्षा देऊन ह्या शिष्यास जवळ ठेवून घेतले व त्याचे महीपति असे नाव ठेविले. नरहरिनाथांजवळ ह्यांनी योगाभ्यास केला. त्यांच्या मठात भजन-कीर्तन सतत चालू असे. त्यातून प्रेरणा घेऊन हेही कीर्तन करू लागले. योगाभ्यास पूर्ण झाल्यानंतर नरहरिनाथांनी महीपतीला यथाविधी नाथपंथाची दीक्षा दिली व एक ढोल दिला. त्यानंतर हे जेव्हा जेव्हा गावोगावी कथा करीत हिंडत तेव्हा तेव्हा गुरुप्रसाद म्हणून तो ढोल त्यांच्याबरोबर असे. त्यामुळे ह्यांचे ढोलीबुवा हे 'टोपणनाव' रूढ झाले. ज्ञानेश्वरशिष्य सत्यामळनाथांच्या परंपरेतील प्रमुख पुरुष म्हणून श्रीमहीपतिनाथांचे नाव घेतले जाते. ती परंपरा अशी : श्रीज्ञानेश्वर > सत्यामळ > गैनी > गुप्त > उद्बोध > केसरी > शिवदीन > नरहरि > महीपति.

काशीयात्रेसाठी महीपतिनाथ पैठणाहून उत्तरेस निघाले ते बडोदे, इंदूर, उज्जयिनी करीत उज्जैन येथे आपले पूर्वसुहृद दत्तनाथ ह्यांच्या सहवासात बराच काळ राहिले. पुढे काशीस न जाता ग्वाल्हेरास जाऊन तेथेच स्थायिक झाले. लक्ष्मीनाथ उज्जैनकर, अण्णामहाराज पैठणकर, यशवंतराव होळकर व दौलतराव शिंदे ह्यांच्याशी महीपतिनाथांचा विशेष संबंध होता. ह्यांची शिष्यशाखा बरीच मोठी आहे. श. १७४५ च्या पौष शु. त्रयोदशीस (इ. स. १८२४) ह्यांनी समाधी घेतली. शं. गो. तुळपुळे व रा. चिं. ढेरे ह्यांनी ही तिथी श. १७४४ ची पौष शु. १३ (इ. स. १८२३) दिली आहे. पण ग्वाल्हेर येथील त्यांच्या मठात म्हटल्या जाणाऱ्या महीपतिनाथांवरील नमनाष्टकात श. १७४५, पौष शु. त्रयोदशी अशीच ह्यांच्या पुण्यतिथीची नोंद आढळते.

महीपतिनाथांचे अधिकांश साहित्य हे स्फुट स्वरूपाचे आहे. त्यात पदे, लावण्या, कटाव, भजने, आरत्या, स्तोत्रे ह्यांचा अंतर्भाव होतो. ह्यांची दीर्घ रचना ज्ञात नाही. ह्यांनी हिंदी पदेही पुष्कळ रचली आहेत. मराठी संशोधन मंडळ, मुंबई ह्यांनी प्रसिद्ध केलेल्या त्यांच्या पदसंग्रहात (संपा. डॉ. बा. ना. मुंडी) २२६ मराठी व ५४ हिंदी पदे समाविष्ट केलेली आहेत.

महीपतिनाथांच्या साहित्यिक कर्तृत्वाला खरा बहर त्यांच्या उत्तरेतील वास्तव्यातच आला. ह्यांची बहुतांश रचना ही कीर्तन करता करता उत्स्फूर्तपणे तयार झालेली आहे. त्यामध्ये आत्मनिवेदनपर पदेच अधिक दिसतात. आत्माभिव्यक्ती हा त्यांच्या कवितेचा स्थायिभाव असल्याने वैराग्य, गुरूवरील श्रद्धा, आर्तता, स्पष्टवक्तेपणा, निःस्पृहता, ऋजुता, सर्वसामान्यांबद्दलची कळकळ अशा विविध वैयक्तिक पैलूंचे दर्शन ह्यांच्या पदांतून घडते. अंतर्मनातील तीव्र भावनाकल्लोळाचे तरंगही कवीने टिपलेले आहेत. अर्थवाही शब्दयोजना आणि गेयता ह्यांमुळे ह्या रचनेला भारदस्तपणा प्राप्त झाला आहे. भावानुभव व्यक्त करण्याची नामदेवतुकारामादी संतांची परंपराच महीपतिनाथांनी चालविली असली तरी अभंग व ओवी ह्या छंदांचा वापर मात्र फारसा केलेला नाही, त्या काळच्या श्रोत्यांमध्ये सर्वमान्य झालेल्या लावणी, कटाव, फटका, छंद ह्या विविध वृत्तप्रकारांचाच उपयोग केला आहे.

योगमार्गाच्या वाटेने पारमार्थिक प्रवास करीत असता आपल्या सहजसुंदर अशा अभिव्यक्तीने पुनःप्रत्ययाचा आनंद हा कवी प्राप्त करून देतो. ह्या दृष्टीने हे एक पद पाहण्यासारखे आहे. "निर्विकल्प राज्य आले। दरीद्र कल्पनेचें गेले ॥ १ ॥ गुरूकृपा पातशाई। जाली त्याला उणे नाही ॥ २ ॥ पाट त्रीवेणीचा पाहे। आमृताचा पुर वाहे ॥ ३ ॥ दासी बारा सोळा जणी। वाजे चौघडा आंगणी ॥ ४ ॥ महीपती जालो म्हणे। नाथ नरहारीचे देणे ॥ ५ ॥"

**रचना : मु.** – श्री महीपतिनाथ ढोलीबुवा (ग्वाल्हेरकर) यांची पदे; मराठी पदे : २२६; हिंदी पदे : ५४; संपा. मुंडी, बा. ना.; साहा. पिंगळे, का. गो. (मसंमं. प्रका.); क्र. ७५; मुंबई, १९७२. **अमु.** – १. रोहिदास चांभार चरित्र (अपूर्ण); ओ. सं. २६. २. संत श्री भानुदास चरित्र; ओ. सं. १२०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : नरहरि महीपति; मकच., खं. ६; मुंबई, १९२४; पृ. १८३–२१२. २. भालेराव, भा. रा. : महीपति उज्जयिनीकर; भाइसमंइति., श. १८३७; पृ. २५९. ३. मुंडी, बा. ना. : श्रीमहीपतिनाथ ढोलीबुवा (ग्वाल्हेरकर) यांची पदे (प्रस्तावना व प्रास्ताविक परिचय ह्यांसह) मुंबई, १९७२; पृ. १–२४.

० **महीपती** – पहा **महीपतीबोवा ताहराबादकर.**

० **महीभट्ट** – पहा महींद्रभट.
० **महेन्द्र पंडित** – पहा महेश्वर पंडित–१.
० **महेश्वर–१** – पहा महेश्वरभट्ट सुखटणकर.
० **महेश्वर–२** – पहा महेश्वराचार्य.
**महेश्वर पंडित–१ / ० महेन्द्र पंडित / ० महेश्वर व्यास** [इ. स. चे चौदावे शतक, प्रारंभकाळ] महानुभाव ग्रंथकार. हे चक्रधरांचे शिष्य नागदेवाचार्य ह्यांचे सुपुत्र. पिता हाच ह्यांचा दीक्षागुरू होय. ह्यांच्या आईचे नाव गंगाइसा. ह्यांना चार पुत्र होते. नागाइसा ऊर्फ नागांबिका ही ह्यांची कन्या.

ह्यांनी रचलेली *निर्वेदस्तोत्र* व *संकटस्तोत्र* ही स्तोत्रे महानुभावांच्या नित्य पठणात आहेत. ह्यांनी *ऋद्धिपूरमाहात्म्य* हा काव्यग्रंथ लिहिला आहे. ऋद्धिपूर हे महानुभावांचे महाक्षेत्र असल्यामुळे अनेक महानुभाव कवींनी त्याचे स्थलमाहात्म्य आपल्या रचनांतून वर्णिले आहे. कृष्णमुनि ऊर्फ कवि डिंभ, नारायणव्यास बहाळिये ह्या कवींची ह्याच विषयावरील रचना उपलब्ध आहे. महेश्वरपंडितांच्या प्रस्तुत रचनेतही विशिष्ट धार्मिक भावनेचा आढळ होतो. ग्रंथात सुरुवातीला चक्रधरांना व नागदेवाचार्यांना वंदन केलेले आहे. ज्ञानदेवांच्या शैलीचे वेधक वळण पंडितांनी गिरविले आहे. पहा : "जी तुमचेनि पसायदाने। ऋद्धिपूरमाहात्म्य अनुसंधाने। वोवुनि पुराण प्रबंधरत्ने। पदी प्रमेयाचा ॥. . . परि हे देवाचे स्तवन। सलगी केले अनुवादन। ते उपसाहावे तुम्ही संतजन। म्हणे महेश्वरू ॥" इत्यादी. काव्यरचना प्रौढ स्वरूपाची आहे. [ ➪ ३.]

**रचना :** अमु. – १. ऋद्धिपुरमाहात्म्य; प्रसंग ९; ओ. सं. ८२७; र. का. : श. १२२४ (इ. स. १३०२) ह्यातील काही उतारे पं. नारायणव्यास बहाळियेकृत 'ऋद्धिपुरवर्णन' ह्या ग्रंथात दिले आहेत (संपा. देशपांडे, य. खु.; यवतमाळ, १९२९; प्रस्ता., पृ. ११–१२). २. निर्वेदस्तोत्र ३. संकटस्तोत्र.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, अ. ना.; महेश्वरपंडितकृत ऋद्धिपुरमाहात्म्य; ग्रामवाङ., भाग २, पुणे १९७३; पृ. २८४–२८५.

**महेश्वर पंडित–२** [का. अनु.] टीकाग्रंथकार.

**रचना :** अमु. – गीतगोविंद : प्राकृत टीका; गद्य; त्रुटित; प्र. ले. का. : श. १७०८; मसंमं.; हवना., पृ. ४६.

**महेश्वरभट्ट सुखटणकर / ० महेश्वर–१ / ० सुखटणकर, महेश्वरभट्ट रामचंद्रभट्ट** [इ. स. १७१८–१८१६] टीकाग्रंथकार. वास्तव्य गोमंतकातील माशेल ह्या गावी असे. ऋग्वेदी आश्वलायनशाखी कौशिकगोत्री सारस्वत ब्राह्मण. गुरू : भारतीतीर्थ. महेश्वरभट्टांनी संस्कृतात व मराठीत बरेच टीकाग्रंथ लिहिले आहेत. *गीतगोविंदा*वरील मराठी टीका, *भगवद्गीता*, *वाक्यसुधा* ह्या संस्कृत ग्रंथांवरील मराठी टीका, मोरोपंतांच्या *मंत्रभागवता*वरील *संतोषिणी* ही संस्कृत टीका व *अमरकोशा*वरील टीका हे त्यांनी रचलेले प्रमुख ग्रंथ होत. *गीतगोविंदा*वरील मराठी टीका ही गद्यात असून तिच्या आदि-अंती पद्यरचना आहे. स्वत: लेखक तिला *मंगलदीपिका* किंवा *गीतगोविंदटिप्पण* असे म्हणतो. ती त्याने कोकणी बोलीत लिहिली आहे. आधारास कुंभकर्णकृत *रसिकप्रिया* ही टीका घेतलेली दिसते. ह्यांनी *सिद्धान्तचंद्रिका* असे *सिद्धान्तकौमुदी*चे पद्यमय भाषान्तर केले आहे.

हे महेश्वर व औफ्रेक्टच्या कॅटलॉगात निर्देशिलेले *अमरकोशविवेक* लिहिणारे महेश्वर एकच की काय हे सांगता येणे कठीण.

**रचना :** अमु. – १. अमरकोश टीका; र. का. : इ. स. १७५० (अनुपलब्ध). २. गीतगोविंद – सटीक; भाइसंमं., मसंमं., हवना., पृ. ४६. ३. भगवद्गीता – मराठी टीका. ४. वाक्यसुधा – टीका. ५. सिद्धान्तकौमुदी.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नायक, ना. भा. : आचार्य महेश्वरभट्ट सुखटणकर; गोमका.; रिवण (गोवा), १९६९; पृ. २०.

० **महेश्वर व्यास** – पहा महेश्वर पंडित–१.

**महेश्वराचार्य / ० महेश्वर–२** [का. अनु.] ज्योतिर्विद. मूळ संस्कृत ज्योतिषविषयक ग्रंथावर ह्यांनी मराठीत टीका केली आहे. ह्यांच्या *ज्योतिषवृत्तशतक* (प्रत श. १६०० / इ. स. १६७८) ह्या त्रुटित मराठी टीकेचे हस्तलिखित पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळात आहे (हस्त. सू., पृ. १०५).

**माणकेश्वर** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – हनुमंताष्टक; संककासू., पृ. ७५.

**माणकोजी बोधला / ० बोधलेबुवा** [अंदाजे श. १५१६ / इ. स. १५९४ – समा. श. १६१६, ज्येष्ठ व. ३ / इ. स. १६९४] संतकवी. माणकोजी बोधल्यांची चरित्रविषयक माहिती महिपतींच्या *भक्तविजय* आणि *संतलीलामृत* ह्या ग्रंथांत सापडते. ह्यांचे शिष्य जोतीराम ह्यांनी ह्यांचे ११ अध्यायांचे *बोधाख्यान* नावाचे चरित्र व *बोधकीर्ति* नावाचे चरित्रपर प्रकरण रचले आहे. त्यावरून जी माहिती मिळते ती अशी : माणकोजी जातीने मराठा होते. त्यांचे उपनाव जगताप. त्यांचे वडील भानजी जगताप हे मूळचे सासवडचे (जि. पुणे) राहणारे. तेथील अवर्षणाला कंटाळून त्यांनी सोलापूर जिल्ह्यातील धामणगावास स्थलान्तर केले. माणकोजींचा कल लहानपणापासून शिपाईगिरीकडे होता. पुढे उपरती होऊन ते विठ्ठलभक्त झाले. पत्नी, मुलगा व सून ह्यांसह पंढरीची वारी करू लागले. माणकोजींच्या पत्नीचे नाव ममताई व मुलगा यमाजी. विठ्ठलाने एकान्तात माणकोजींना बोध केला. पुढे लोक त्यांना बोधलेबुवा असे संबोधू लागले. जोतीराम व गोपाळनाथ हे माणकोजींचे शिष्य प्रसिद्ध आहेत. माणकोजींनी धामणगावासच समाधी घेतली. समाधीवरील खोलीत जी काही हस्तलिखिते सापडली, त्यातील एका जीर्ण बाडाच्या पृष्ठावर बोधराज, यमाजी, भगवंत बाबा ह्यांचे समाधिशक व तिथी दिल्या आहेत. त्यात "सके १६१६ भावानाम सवत्सरे जेष्ट मास वद्य पक्षी त्रितिया गुरुवारी ते दिनी बोधराज समाप्त ॥" अशी माणकोजींची मृत्युतिथी दिली आहे. वरील उल्लेखास दुसरा एक आधार सापडतो. तो म्हणजे बोधल्यांच्या सध्याच्या वंशजाकडून प्राप्त झालेल्या *बोधलीलांबरी* ह्या हस्तलिखित चरित्राचा. हे चरित्र शिवरामात्मजांनी लिहिले असून ते श. १७७३ (इ. स. १८५१) साली लिहिलेले आहे. त्यात माणकोजी शंभर वर्षे जगले व श. १६१६ च्या ज्येष्ठात समाधिस्थ झाले असे ते म्हणतात. हा ग्रंथ बोधल्यांचे वंशज प्रमाण मानतात. ह्यावरून माणकोजींचा निर्याणकाल ३१ मे १६९४ (खरे जंत्रीप्रमाणे) व जन्मकाळ अंदाजे इ. स. १५९४ मानण्यास हरकत नाही. इ. स. १७७४ साली लिहिल्या गेलेल्या *संतलीलामृता*त बोधल्यांचा त्यावेळचा वारस भोज (पणतू) ह्याचा जो उल्लेख केला आहे तो कालदृष्ट्या अगदी बरोबर आहे असे वरील प्रमाणावरून आता सांगता येते.

माणकोजी बहुश्रुत नव्हते. पण श्रीपांडुरंगकृपेने प्रासादिक अशी अभंगरचना करीत असत. आज त्यांचे ११० अभंग उपलब्ध आहेत. ते *श्रीसकलसंतगाथेत* (खं. १) छापलेले आहेत. गुरुभक्ती, नाममहिमा, विठ्ठलध्यास, ढोंगबाजीचा उपहास असे संतकवितेतले पारंपरिक विषय त्यांच्याही कवितेत दिसतील. श्रीपांडुरंगस्वरूपी विलीन होण्यातच जीवनाचे साफल्य आहे असे ते सांगतात. उदा., "भक्ति आनंद। मज करी गा नारायेणा। हेचि माझ्या मना आवडी मोठी ॥ १ ॥ देवा आवडी मनाची। तुझिये भेटिची। आणिक कोणाची। नाहीं चाड ॥ २ ॥ जनक जननी। तूं आमचा धणी। ठाव मज चरणीं। देईं बापा ॥ ३ ॥ बोधला म्हणे मज। आणिक नाहीं काज। तुझीया चरणीचा रज। होईन बापा ॥ ४ ॥"

**रचना :** मु. – अभंग; ११०; श्रीससंगा., खं. १; संपा. जोशी,

का. अ.; द्विआ., पुणे, १९६७; पृ. ११३–१२६. अमु. –पदपदांतरे; सवामं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पंडित, अ. ना. : माणकोजी बोधला यांचा कालनिर्णय; विज्ञावि., पु. ५०, अं. ६, पृ. ८९. २. मोरजे, गं. ना. : माणकोजी बोधले यांचा निर्याणकाळ; मसंप., जुलै १९६७, पृ. १९५–१९७. ३. मोरजे, गं. ना. : श्री पांडुरंगाचा भोळा भक्त माणकोजी बोधला; रवि. लोकसत्ता, १६–७–१९६७, पृ. ७. ४. शिवरामात्मज : 'बोधलीलांबरी'; अप्रसिद्ध; श. १७७३ (इ. स. १८५१).

**माणिकदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – गणपतीची आरती; मआ., पृ. ४३९. **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**माणिकनंदी** [अंदाजे इ. स. १७२४] जैन कवी. माणिकनंदींनी रचलेल्या अनंतनाथ, चंद्रनाथ व समवशरण अशा तीन आरत्या उपलब्ध आहेत. ह्या तीनही रचनांत देवेंद्रकीर्तींचा गुरू म्हणून ह्यांनी उल्लेख केला आहे. अनंतनाथांच्या आरतीत हा उल्लेख पुढीलप्रमाणे आढळतो : 'पंचमकाली केवलीसम यति। गुरु देवेंद्रकीर्ति। लघुशिष्य श्री माणिकनंदी । मंडलाचार्यपदी ॥ ५ ॥' हे देवेंद्रकीर्ति कारंजा पीठावर होते. *अनंतनाथ आरतीत* संस्कृत पद्धतीप्रमाणे श. १६४६ चा उल्लेख आला आहे त्यावरून कवीचा काळ इ. स. १७२४ च्या सुमाराचा ठरतो.

**रचना : अमु.** – १. अनंतनाथ आरती; कडवी ५. २. चंद्रनाथ आरती; कडवी ५. ३. समवशरण आरती; कडवी ४; जिंतुर हस्तलिखित संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : माणिकनंदी; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ८२–८३.

**माणीक** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – आत्मरूपप्रतीति; ग्रं. सं. १४४; त्रु. पो.; मसंमं., हवना., पृ. ४७.

**मातंगीगरद** [का. अनु.] पदकार. ह्यांनी रचलेल्या 'रमावरा सुंदरा दे उदारा पायि थारा' ह्या पदाची रचना सुश्लिष्ट व अनुप्रासयुक्त आहे. हे पद विठ्ठलास उद्देशून आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग.; कांहीं अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांचीं पदें; भाइसमंत्रै., व. २६, अं. ४; चैत्र १८६८; पृ. ४१.

**माथियश (पाद्री)** [का. अनु.] फ्रान्सिस्कन मिशनरी कवी. जन्म लिस्बन (पोर्तुगाल) येथे. हे फ्रान्सिस्कन पंथाच्या सांव तॉमें संघटनेचे आठवे प्रॉव्हिंशल होते.

ह्यांनी Symbolo da Fé (*ख्रिस्ती धर्माचे प्रतीक*) ह्या कार्दिनाल बार्लामीनच्या मूळ काव्याचे भाषान्तर केले होते. हे भाषान्तर सुमारे २००० ओव्यांचे असून ते गेय होते, अशी माहिती *बिब्लियॉतेक लुझितान* ग्रंथामध्ये सापडते. हे काव्य ग्रांथिक मराठीत असावे. दुसरे Vida de Christo (*ख्रिस्ताचें जीवन*) हे काव्य ब्राह्मणी भाषेत लिहिलेले होते. त्याला पुराण म्हणत असत. *दौत्रीन क्रिश्तां* हे त्याच काव्याचे दुसरे नाव आहे.

वरील दोन्ही ग्रंथ रचण्याच्या कामी माथियशला पाद्रो सांत आनने साहाय्य केले अशी माहिती सिल्व्ह रेगोच्या 'दॉकुमेंतसांव' च्या ५ व्या खंडात आढळते.

**रचना : अमु.** – १. दौत्रीन क्रिश्तां. २. ख्रिस्ती धर्माचे प्रतीक; भाषान्तरित काव्य.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा. : माथियश (पाद्री); सशगोबो.; मुंबई, १९६३; पृ. ३११–३१२.

० **माधव–१** – पहा माधवदास–१.

**माधव–२** [का. अनु.] रामदासी कवी. रामदासी परंपरेतील कण्हेरी (ता. वाई, जि. सातारा) मठाचे वासुदेव ह्यांचे शिष्य माधव व माधवांचे शिष्य पुरुषोत्तम, अशी ही परंपरा आहे. ह्या कवीचे 'वाल्मीक तरला रे तरला जन उत्धरिला' हे पद शं. श्री. देव ह्यांनी प्रसिद्ध केले आहे (रासं., खं. १, पृ. १७६). ह्यांच्या *हनुमंतचरित्राचा* उल्लेख देवांनी केला आहे. कवीने पदेही बरीच रचलेली आहेत. ही रचना समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील हस्तलिखित बाडात संग्रहित (सवामं. हस्त. सू., खं. २).

**माधव–३ (शैव)** [का. अनु.] कवी. ग्रंथावरून रत्नाकर हे ह्यांचे गुरू होत असे कळते.

**रचना : अमु.** – मूळस्तंभ; संककासू., पृ. ७५.

० **माधव–४** – पहा माधवदास–२.

**माधव–५** [का. अनु.] कवी. अमृतरायांच्या अनेक शिष्यांपैकी माधवांचे नाव नेहमी ऐकू येते. गुरूप्रमाणेच सुरस अशी कटावरचना करण्यात ह्यांची ख्याती होती (मसा., आ. ५, पृ. ४७१).

**माधव–६** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – नृहरीदर्पण; ग्रं. सं. १४९; मसंमं., हवना., पृ. ४६.

**माधव–७** [का. अनु.] पदकार. मराठीत माधव नावाचे अनेक कवी होऊन गेले. त्यांपैकी एका कवीच्या पदांचा निर्देश रा. ग. हर्षे करतात (रा. ग. हर्षे; भाइसमंत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४१–४२).

**माधव–८** [का. अनु.] कवी. ह्यांनी *श्रीरामहास्यवदन* हे २३ ओव्यांचे एक छोटेसे प्रकरण रचले आहे. त्यात श्रीरामाच्या हास्याचे आध्यात्मिक वर्णन येते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, वसंत स. : श्रीरामहास्यवदन – माधव; नभामा., जुलै १९७३; पृ. ५२.

**माधव–९** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. गजेंद्रमोक्ष (अपूर्ण); वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ७५. २. विष्णुलाघव (दशावतार कथा); भाइसमं. हस्त. सू., पृ. २६३.

**माधव–१०** [का. अनु.] पदकार. रोकडारामांचे शिष्य. रोकडारामांवरील आरत्या व पदे अशी रचना. पैकी दोन आरत्या मुद्रित (श्रीसांप्रविवि., खं. २; पृ. ७९–८०).

० **माधव–११** – पहा महादेव–३.

**माधव अनुचर** [का. अनु.] ग्रंथकार. हे स्वतःस 'श्रीनरहरी मालो संप्रदायकिंकर' असे म्हणवितात. ह्यांचा *तत्त्वबोधसार-वचनसुधा* हा ग्रंथ गद्यात्मक असून त्यात सद्गुरूंनी सच्छिष्याला आत्मस्वरूपाचा बोध केला आहे (सवामं. बा. ४६७, हस्त. सू., खं. १).

**माधवआत्मा** [का. अनु.] पदकार. ह्यांच्या नावावरील १७ पदांचा उल्लेख रा. ग. हर्षे करतात. त्यांमध्ये कृष्ण आणि विठोबा ह्यांच्यावरील पदे अधिक दिसतात. ही पदे अजून प्रसिद्ध झालेली नाहीत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग.; कांहीं अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांचीं पदें; भाइसमंत्रै., व. २६, अं. ४, चैत्र १८६८, पृ. ४१.

**माधव एकनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पाळणा; तंसम. हस्त. सू., यादी ३.

**माधव किंकर–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. रामध्यान; ओ. सं. ११८; २. शिवरात्रकथा; ओ. सं. १०३; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **माधव किंकर–२** – पहा राम पंडित.

० **माधवकुमार** – पहा राम पंडित.

**माधव केशव** [का. अनु.] कवी. ह्यांची पदे, श्लोक, अभंग, आरत्या

इ. रचना उपलब्ध आहे (सवामं. बा. ३८५, हस्त. सू., खं. १).

**माधवगुरु** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – देवीपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० माधवतनय** – पहा राम पंडित.

**माधवदत्त** [का. अनु.] आरतीकार. ह्यांनी रचलेली *मुकुंदराजांचा आरती* (कडवी ५) उपलब्ध झाली आहे (डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिटयूट, पोथीसंग्रह, क्र. ६८६८, १४ व्या प्रकरणाच्या शेवटी) माधवदत्तांनी मुकुंदराजांची गुरुपरंपरा देऊन मुकुंदराज व रामदास ह्यांना एकत्र आणले आहे. आरतीची सुरुवात व शेवट असा : 'जयजय गुरुराजा मुकुंदराजा। आरती ओवाळुनि। उभविली कीर्तिध्वजा। . . . . . . अनाथ मंदमति। माधव देवदत्तप्रीति। अनन्यभावे शरण। पंचप्राणे केलि आर्ति ॥ ५ ॥' (अ. ना. देशपांडे; मवाइ., पूर्वार्ध, भा. १; पुणे, १९६६; पृ. २९६.)

**माधवदास–१ / ० माधव–१** [अंदाजे श. १७३६ / इ. स. १८१४] चैतन्य परंपरेतील कवी. ह्यांची गुरुपरंपरा : उद्धवचिद्घन > आत्माराम शंकर > माधवदास अशी वि. ल. भावे देतात. ह्यांनी *अलक्ष्यनिधान* ह्या ग्रंथाची रचना केली आहे. उद्धवास चिद्घनांचा अनुग्रह श. १६११ (इ. स. १६८९) नंतर झाला, असे कवी आपल्या ग्रंथात सांगतो (मसा., आ. ५, पृ. ४७७).

शं. गो. तुळपुळे ह्यांनी *महाराष्ट्रसारस्वता*च्या पुरवणीत माधवदासांबद्दल पुढील माहिती दिली आहे : हे एक संतकवी असून त्यांचे वास्तव्य दिल्लीजवळील जेकार ह्या गावी असे. धापेवाड्यास (जि. नागपूर) ह्यांचे वारंवार जाणे होत असे. तेथे त्यांची शिष्यपरंपरा निर्माण झाली. ह्यांचा मठ झेंडेवाले बोवांचा मठ म्हणून धापेवाड्यास प्रसिद्ध आहे. ह्यांनी *विवेकसिंधू*च्या धर्तीवर श. १७३६ (इ. स. १८१४) त *अलक्ष्यनिधान* ह्या वेदान्तावरील ग्रंथाची रचना केली. मुकुंदराजांचा मोठ्या आदराने ह्यांनी आदिकवी असा उल्लेख केला आहे (मसा., आ. ५, पृ. ९९९–१०००).

**माधवदास–२ / ० माधव–४** [का. अनु.] कवी.

रचना : मु. – कृष्णाची आरती; मआ., पृ. ३७७. अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**माधवदास–३ (नारायणांकित)** [अंदाजे शके १५१४ / इ. स. १५९२] कवी आणि टीकाकार. मूळ नाव कृष्ण. मुद्गलगोत्रोत्पन्न. कुलस्वामिनी सप्तशृंगीची देवी. ह्यांचे गुरू नारायणस्वामी हे पैठणचे होते. माधवदासांचे मूळ गाव विदर्भातील अकोला जिल्ह्यातील पंचगव्हाण (पंचग्राम) आणि वास्तव्य पैठण येथे.

ह्यांची *योगवासिष्ठसार* ही रचना श. १५१४ त वराडदेशी पंचग्रामी पूर्ण झाली. तंजावर सूचीत ह्या ग्रंथाचे नाव *योगवासिष्ठसार टीका* (लघुवासिष्ठ टीका) असे दिले आहे. ग्रंथाची एकूण १० प्रकरणे असून दहाव्या प्रकरणाच्या शेवटी "शालिवाहन शक पंधराशत आगळी चतुर्दशी (१५१४) नंदन० आश्विनकृष्ण बुधवारी लघुवासिष्ठाची टीका समाप्त ॥" अशी नोंद आहे (बा. ३३०). ग्रंथातील दहा प्रकरणांची नावे अशी : १. वैराग्यप्रकरण, २. जगन्मिथ्या, ३. मुक्ति, ४. मनोलय, ५. वासनोपशम, ६. आत्मप्रकरण, ७. शुद्धब्रह्मनिरूपण, ८. आत्मदर्शन, ९. चिद्रूपनिरूपण, १०. ब्रह्मप्राप्ति. ह्या ग्रंथाची एक त्रुटित प्रत मराठी संशोधन मंडळ, मुंबई, येथे आहे (हवना., पृ. ४७).

ह्यानंतर माधवदासांनी शके १५२१ / इ. स. १५९९, विकारी नाम संवत्सरी, माघ वद्य १४ रोजी, गीतेवरील टीकेची बृहत्पूर ऊर्फ ब्ऱ्हाणपूर येथे समाप्ती केली. प्रस्तुत ग्रंथाला गुरुस्मरणार्थ *नारायणकीर्ती* असे नाव दिले. गीतेच्या ७०० श्लोकांपैकी ५७४ श्रीकृष्णाचे, ८४ अर्जुनाचे, ३२ संजयाचे, ९ दुर्योधनाचे व १ धृतराष्ट्राचा असे कवीने कोष्टक दिले आहे. ह्या ग्रंथात गीतेवर रूपक बसविले असून कुरुक्षेत्र हे केवळ धर्मसदन आहे, वैराग्यभूमिकेवर सत्साधनभाव पांडव राहतात, विषयभूमिकेवर विकारभाव कौरव राहतात, असे द्व्यर्थी कथानुसंधान कवीने मार्मिकपणे सांगितले आहे.

'उत्कट साधुनि शीळासेतू बांधोनी' ही श्रीरामाची आणि 'कडकडिला स्तंभ गडगडिलें गगन' ही नृसिंहाची अशा दोन लोकप्रिय भावपूर्ण आरत्यांचे कर्तृत्व माधवदासांचेच आहे.

रचना : मु. – १. योगवासिष्ठसार (लघुयोगवासिष्ठ); प्रक. १०; ओ. सं. २४२३; र. का. : श. १५१४; र. स्थ. : पंचग्राम (वऱ्हाड); 'श्रीसाधु माधवदासकृत योगवासिष्ठसार आणि श्रीसमर्थ रामदासस्वामीकृत अन्वय-व्यतिरेक'; मुंबई, १९०८. २. स्फुट रचना – नृसिंहाची आरती; श्रीरामाची आरती; मआ.; पृ. ३३०, ३३७. अमु.– १. गीताटीका. शंका. – १. भीमस्तवराज; गो. का. चांदोरकर संग्रह.

चरित्र, चर्चा, अभ्यास : १. जोशी, म. रा. : माधवदास; विसंमंवा.; नागपूर, १९७१; पृ. १३८–१३९. २. पटवर्धन, पां. न. : सहजानंद; भाइसंमंइति., श. १८३६, पृ. १८२. ३. पांगारकर, ल. रा. : गीताटीकाकार माधवदास; मवाइ., खं. २; पृ. ६०२-६०३.

**० माधवनंदन–१** – पहा राम पंडित.

**० माधवनंदन–२** – पहा कृष्ण पंडित.

**माधवनंदन–३** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. ह्यांचे गुरू श्रीकृष्ण हे 'राघव आत्मज' होते, असा उल्लेख ह्यांच्या कवितेत सापडतो.

ह्यांची काही स्फुट कविता – श्लोक, पदे आणि *दशरथकौसल्याविवाह आख्यान* ही रचना – उपलब्ध आहे. प्रस्तुत रचनेचे हस्तलिखित बाड भारत इतिहास मंडळ, पुणे, ह्यांच्या संग्रहात उपलब्ध.

चरित्र, चर्चा, अभ्यास : पोतदार, द. वा.; भाइसंमंइति., शके १८३७, पृ. २६६.

**माधवनंदन जोशी** [का. अनु.] कवी.

रचना : अमु. – मुरली आख्यान, 'शके १७०७ वैशाख बापु गो नीलंगे'; सवामं. हस्त. सू., खं. १.

**माधवनाथ** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ७६.

**माधवराज** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**माधवराय** [का. अनु.] कवी.

रचना : मु. – १. एक रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४६. २. तीन पदे; रासं., खं. २, पृ. ७. अमु. – १. लोपामुद्रा जानकी संवाद; २६ श्लोक; २. विभीचार आख्यान; २५ श्लोक; ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**माधवराव** [का. अनु.] शाहीर.

रचना : मु. – हरि रामोशाचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. ३१३–३१६.

**माधवराव मुनशी** [अंदाजे इ. स. १८१८ – १८३९] ग्रंथकार. ह्यांनी राजनीतीवरील भाषान्तरित ग्रंथ रचला आहे. माधवराव मुनशी हे साताऱ्याच्या प्रतापसिंह महाराजांच्या पदरी होते. ह्यांनी इ. स. १८१८ ते १८३९ च्या दरम्यान *सभारंजनी* नामक ग्रंथ लिहिला. ग्रंथाच्या प्रस्तावनेत लेखकाने म्हटले आहे की, मूळ ग्रंथ उर्दू भाषेतील असून तो हरगटन साहेबाने शेरअली मुनशी ह्यांजकडून *आरायेष मुहफील* ह्या नावाने करवून घेतला होता. परंतु ही भाषा सर्वांस समजण्याजोगी नसल्याने छत्रपतीस्वामी ह्यांनी माधवराव मुनशी ह्यांजकडून त्याचा मराठी तर्जुमा करून घेतला. *सभारंजनी* ग्रंथाची

१०६ पृष्ठे असून तो प्रथम *भारतवर्ष* मासिकातून प्रसिद्ध झाला. ग्रंथामध्ये अद्भुत व इतिहास ह्यांचे मिश्रण आहे. मुख्यत्वेकरून त्यात हिंदुस्थानचे वर्णन येते. दिल्ली, आग्रा, प्रयाग, अयोध्या, बिहार, बंगाल ओरिसा, औरंगाबाद, वऱ्हाड, बालाघाट, खानदेश, माळवा, अजमीर, गुजरात, मुलतान, लाहोर, काश्मीर, काबूल ह्या अठरा सुभ्यांचे संक्षिप्त ऐतिहासिक वर्णन आणि पांडवांपासून ते पिठोर ऊर्फ पृथ्वीराजपर्यंतच्या हिंदू राजांची कैफियत येते. तसेच वेदशास्त्रादी ग्रंथ व षड्दर्शने ह्यांचीही माहिती दिली आहे. हे लेखन सुमारे १७० वर्षांपूर्वी एका मुसलमान गृहस्थाने केले असल्याने ते हिंदुस्थानच्या इतिहासाचा अभ्यास करण्यास उपयुक्त व संग्राह्य ठरण्यासारखे आहे.

**रचना : मु.** – सभारंजनी; 'आरायेष मुइफील' ह्या उर्दू ग्रंथाचे भाषान्तर; भारतवर्ष, अं. ९, डिसें. १८९०.

**माधवराव मोरोजी** [ ? – इ. स. १८५० ] ग्रंथकार. ह्यांचे उपनाव त्रिलोकेकर. हे फ्री चर्च विद्यालयातील नामांकित विद्यार्थी होते. जमखिंडीच्या राजांना इंग्रजी शिकविण्याच्या कामावर सरकारने ह्यांना पाठवले होते. बाबा पदमनजींनी स्थापन केलेल्या 'सत्यशोधक' सभेचे ते सदस्य होते. माधवराव हे जातीने ब्राह्मण [पाठारे प्रभू] असून 'ते ख्रिस्ती धर्मावर गुप्त रीतीने विश्वास ठेवणारे होते', असे बाबा पदमनजींनी आपल्या *अरुणोदयात* (पृ. २०४) लिहिले आहे. ह्या काळातील प्रसिद्ध ख्रिस्ती मिशनरी डॉ. मरे मिचेल ह्यांच्या शिकवणीचा त्यांजवर बराच प्रभाव पडला होता. डॉ. मिचेल ह्यांच्या *लेटर्स टु इंडियन यूथ* ह्या प्रसिद्ध पुस्तकातील सर्व पत्रे प्रारंभी माधवरावांनाच धाडलेली होती. हे इ. स. १८५० मध्ये घोड्यावरून पडून मृत्यू पावले.

विद्यार्थ्यांना अनेक विषयांची एकदम ओळख करून देण्याच्या उद्देशाने ह्यांनी *विद्योपक्रमाचा ग्रंथ* तयार केला. ह्यासाठी त्यांना त्यांचे बंधू अव्वल इंग्रजीतील एक प्रसिद्ध मॅजिस्ट्रेट नाना मोरोजी ह्यांचे साहाय्य लाभले. "स्कॉटिश मिशनऱ्यांच्या *ज्ञानसंग्रह* नामक पुस्तकातील काही धडे व *दिग्दर्शन* ह्या मासिकातील काही उतारे ह्या पुस्तकात घेतलेले आहेत. मकलकच्या *कोर्स ऑफ एलिमेंटरी रीडिंग*-प्रमाणे ह्या पुस्तकाची रचना असावी म्हणून, कृतज्ञता, सत्य, सौम्यता, परोपकारबुद्धि इत्यादी नीतिविषयक धडे, सूक्ष्मदर्शक यंत्र, भूमिकंप, ज्वालामुखी, पर्वत, पृथ्वीचा आकार आणि परिमाण, पर्जन्य, उष्णतामापक, सूर्यमंडळ, ऋतु, भरती-ओहोटी इत्यादी शास्त्रीय विषयांवरील धडे ह्या पुस्तकात दिलेले आहेत."

**रचना : मु.** – वाचण्याकरिता मराठी भाषेत विद्योपक्रमाचा ग्रंथ (साहा. नाना मोरोजी); शिळाछाप, मुंबई, १८४८; आ. २, मुंबई, १८५५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** खानोलकर, गं. दे. : अमवा., खंड ५; पुणे, १९६२; पृ. १६३–१६४. २. गावस्कर, सु. आ. : माधवराव मोरोजी; मराठी दोलामुद्रिते; आ. २, मुंबई, १९६१; पृ. २८, ५७.

**माधव रोकडा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**माधव विठ्ठलदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ७५.

**० माधवसुत–१** – पहा राम पंडित.

**माधवसुत–२** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा उत्तरार्ध] शाहीर. माधवसुतांचे समकालीन म्हणून *महाराष्ट्रसारस्वतकार* वि. ल. भावे लहरी मुकुंदा, खंडु संतु, गोपीनाथ जनार्दन इत्यादी शाहीरांचा उल्लेख करतात. पेशवाईचा वैभवकाळ ह्या लोकांनी पाहिला होता. ह्याने सवाई माधवरावांवर कवन केले आहे. 'एकनाथ गुरु म्हणती प्रीतिचे छंद बिकट चांगले। माधवसुत कवन करी जशी मोत्याची सरी ॥' असे स्वत:विषयी कवीने उद्गार काढले आहेत. हे तऱ्हेतऱ्हेची कवने करीत असत (मसा., आ. ५, पृ. ५५४–५५५).

**माधवस्वामी (तिरुवेळंदूरकर)** [अंदाजे श. १५९०/ इ. स. १६६८ – श. १६८० /इ. स. १७५८] कवी. तंजावर येथे वास्तव्य. *महाभारत* व *रामायण* ह्या ग्रंथांधारे प्रामुख्याने रचना. हे आश्वलायनशाखी, अत्रिगोत्री, देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. उपनाव अद्वैती. ह्यांच्या मातापित्यांची नावे उमा व नागनाथ अशी होती. माधवस्वामींच्या वंशाची माहिती टी. बी. रामचंद्रराव ह्यांनी प्रथम १९३० साली करून दिली (तंसम. हस्त. यादी, खं. २, पृ. ५४०). त्यावरून संत एकनाथ महाराज (पैठणकर) ह्यांची कन्या उमा ही तंजावरच्या नागनाथांना दिली होती व तिचे पुत्र म्हणजेच हे माधवस्वामी होत, असा आजपर्यंत सर्वत्र समज झाला होता. डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांनीही हेच मत उचलून धरले, व *योगवासिष्ठ* ह्या माधवस्वामींच्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत त्यास दुजोरा दिला. ना. ब. जोशी ह्यांच्या मताप्रमाणे माधवस्वामींचे आजोबा एकनाथ, हे पैठणकर एकनाथ नसून कर्नाटकात ढवळ ह्या गावी दिलेल्या त्यांच्या गोदा ह्या मुलीचे पुत्र होत. ह्या एकनाथांची कन्या उमा ही नागनाथपत्नी व माधवस्वामींची आई होय. प्रा. द. सी. पंगु ह्यांनी ह्या संदर्भात वेगळेच प्रतिपादन केले आहे. ते म्हणतात : एकनाथ (पैठणकर) हे माधवस्वामींचे आजोबा मानल्यास, कवी मुक्तेश्वर हे संत एकनाथांच्या एका मुलीचे पुत्र म्हणजे माधवस्वामींचे मावसबंधू ठरतील. पण त्यांच्या व माधवस्वामींच्या काळात ६०–७० वर्षांचा फेर पडतो. ह्यावरून संत एकनाथ हे माधवस्वामींचे आजोबा असे मत मांडणे हा केवळ कल्पनेचा खेळ होय. माधवस्वामींचे आजोबा हे गोदातीराचे कृष्णभक्त एकनाथ असून पैठणकर एकनाथांपेक्षा ते भिन्न होत. प्रा. म. रा. जोशी ह्यांच्या अलिकडच्या संशोधनात त्यांनी जनीजनार्दनांचे शिष्य आणि जावई बीडकर एकनाथ हेच माधवस्वामींचे आजोबा असून ह्या एकनाथांची कन्या उमा तंजावरकर नागनाथांस दिली असल्याचे साधार ('एकनाथ आणि माधवस्वामी'; *ज्ञानेश्वरी संशोधन*, १९७३, पृ. ६–७७) दाखवून दिले आहे. त्यामुळे आजवरच्या अनेक शंकांचाही उलगडा झाला आहे.

बीड येथील जनार्दनस्वामींचे मामेभाऊ विसाजीपंत ह्यांच्या तीन कन्यांपैकी एक रेणुका ही सूर्याजीपंतांस (समर्थांचे वडील), दुसरी गंगा शहापूर येथील कमलाकरपंतांस व तिसरी (हिचे नाव अज्ञात) बीडकर एकनाथांना दिलेली होती. 'ह्या दांपत्याची कन्या उमा हीच ग्रंथकार माधवस्वामींची माता होय,' असे प्रा. जोशी ह्यांनी आपले मत बीड मठातील परंपरेचा अभ्यास करून व तंजावर येथील गोविंदबाळस्वामींच्या मठातील टिपणांचा शोध घेऊन मांडले आहे.

माधवस्वामी आपल्या पत्नी रमाबाई ह्यांच्यासह तिरुवेळंदूर येथे स्थायिक झाले. दोन पुत्र व एक कन्या असा त्यांचा परिवार होता. त्यांचे पुत्र रामपंडित ऊर्फ माधवसुत आणि कृष्णपंडित हे दोघे विद्वान असून काव्यरचना करीत असत. कृष्णपंडितांचा मुलगा वासुदेवपंडित हाही ग्रंथकार होता. त्यांची पत्नी मीनाक्षी ही देखील उत्तम कवयित्री होती. भागवत रचणारे अंबाजी पंडित हे मुलीकडून ह्यांचे पणतू लागत.

माधवस्वामी हे समर्थसंप्रदायी कोनूरमठाधिपती राघवस्वामी ह्यांचे शिष्य. परंपरेविषयी हे पुढीलप्रमाणे माहिती देतात : "रामदास राम उपासक। त्याचे आम्ही परंपरा लोक। गुरु राघवदास धार्मिक। ज्याची अत्यंतिक प्रीति रामी ॥ १३२ ॥ त्याचिया अभयहस्ते जळे। हृदय तटाकांतुनि बळे। निपजली हे प्रबंधकमळें। माधव सकळें म्हणतसें ॥ १३३ ॥" (*आदिपर्व*, क्र. ८०).

माधवस्वामींचे वास्तव्यस्थान तिरुवेळंदूर हे कावेरीच्या तीरावर वसले असून तेथील राममंदिरात ह्यांनी आपली सर्व रचना केल्याचे स्पष्ट उल्लेख त्यांच्या साहित्यात सापडतात. उदा., "प्रसिद्ध जे कां गौरी

मायोर । त्या समीपचि त्रिवंदुर । उभयग्रामामध्ये नीर । प्रवाहे सुंदर कावेरीचे ॥ तीचिये वामभागीं सुंदर । लघु देवालय मनोहर । माजि लक्ष्मण सीतेसी रघुवीर । वस्ती निरंतर करितसे ॥ त्याचिया दयेने...” (*महाभारत*).

माधवस्वामींची ग्रंथरचना विपुल असून तिच्यामध्ये विषयांची विविधता आहे. *ओवीबद्ध रामायण, महाभारत, योगवासिष्ठ* हे त्यांचे बृहद्-ग्रंथ. ह्याशिवाय *गणेशपुराण, मल्हारीमाहात्म्य, अनुगीता, विष्णुपुराण, श्लोकबद्ध रामायण, लघुरामायण–सुंदरकांड, भीष्मस्तवराज स्तोत्र, प्रबोधचंद्रोदय* – वेदान्तपर पद्य नाटक, अशी बरीच रचना तंजावर सरस्वती महाल ग्रंथालयाच्या हस्तलिखित संग्रहात उपलब्ध आहे. वरील रचनेपैकी *महाभारत विराटपर्व, श्लोकबद्ध रामायण, श्रीमद्भगवद्गीता – मराठी भाषान्तर* अशा तीन रचना तंजावर सरस्वती ग्रंथालय प्रकाशनातर्फे मुद्रित झाल्या आहेत. ह्यांची *समर्थांची आरती* (कडवी २) शं. श्री. देव ह्यांनी छापली आहे (रासं., खं. २, पृ. ३८८). तसेच ह्यांचा *योगवासिष्ठ, भाग १* (ओ. सं. ३७१५) हा ग्रंथ डॉ. शं. गो. तुळतुळे ह्यांनी प्रसिद्ध केला आहे. बारा हजारांहून अधिक ओव्या असलेले मोठे *योगवासिष्ठ* लिहिण्यापूर्वी त्याहून लहान असे एक *योगवासिष्ठ* माधवस्वामींनी लिहिले होते. ते तंजावरच्या आत्मारामबुवांच्या मठात डॉ. तुळपुळे ह्यांनी इ. स. १९४६ साली पाहिले होते. ह्या ग्रंथाची तीन प्रकरणे व सुमारे ७००० ओव्या असून त्यास *भावार्थयोगवासिष्ठ* असे नाव माधवस्वामींनी दिले होते. मूळ *योगवासिष्ठ* ग्रंथाची श्लोकवार टीका असे ह्या ग्रंथाचे स्वरूप नाही तर *योगवासिष्ठा*तील तत्त्वज्ञानाचे स्पष्टीकरण किंवा विवेचन ह्यामध्ये केले आहे. डॉ. तुळपुळ्यांनी छापलेल्या ह्या ग्रंथाच्या पहिल्या भागात फक्त ५ प्रकरणेच येतात. वेदान्त विषयाचा व्यासंग आणि कोणत्याही गहन अशा आध्यात्मिक प्रश्नांचे विवेचन हे कवी समर्थपणे करू शकतात, हे त्यांच्या *योगवासिष्ठा*वरून प्रत्ययास येते. [ ⇨ ३.]

माधवस्वामींच्या काव्यरचनेवर समर्थांच्या वाङ्मयाची बरीच छाप पडलेली दिसते. उदा., *आदिपर्वा*तील गणेशस्तवन हे *दासबोधात* येत असलेल्या गणेशवर्णनाचा संक्षेप असल्याचे जाणवते. ‘कडकड धनु मोडे’, ‘तडतड अवनीच्या’, ‘धडधडधड भेरी’, ‘टाळा दुटाळा पणवे’, ‘सरसर फुलबाज्या’ ह्या तऱ्हेची त्यांच्या श्लोकबद्ध रामायणातील रचना समर्थांच्या वाङ्मयीन शैलीची जाणीव करून देते. समर्थपरंपरेप्रमाणे प्रत्येक कांडारंभी गणेश-शारदा-वंदन, श्रोत्याने प्रश्न विचारल्यावरून वक्त्याने कथेस आरंभ केल्याचा थाट, कथनाच्या सलग ओघात व्याकरण-शुद्धतेकडे झालेले दुर्लक्ष, काव्यरचनेसाठी विशिष्ट वृत्तांचीच केलेली निवड आणि युद्धकांडास दिलेले अधिक महत्त्व हे ते विशेष होत. युद्धकांडातले रामरावण-युद्ध किंवा बालकांडातील मिरवणुकीचे वर्णन करताना कवीची प्रतिभा विशेष स्फुरण पावताना दिसते. एकंदर रचना प्रासादिक आणि ओघवती असली तरी कविकल्पनेने निर्माण होणारे काव्यसौंदर्य मात्र त्यात आढळून येत नाही. ठेक्यात आवेशाने म्हणता येण्याजोगी गद्यप्राय रचना असे ह्या रामायणाचे स्वरूप आहे. श्रीसमर्थांच्या *दासबोधात* अनेक ठिकाणी कंटाळा येईतोपर्यंत एखाद्या विशिष्ट पदबंधाची अथवा रचनेची पुनरावृत्ती होताना दिसते. माधवस्वामींच्याही काव्यात अशीच पुनरावृत्ती आढळते.

माधवस्वामींनी केलेले *भगवद्गीते*चे भाषान्तर हे शब्दशः केलेले नाही. उदा., १५ व्या अध्यायाच्या मूळ २० श्लोकांच्या कवीने ९१ ओव्या रचल्या आहेत. श्लोकांचा मुळातलाच अर्थ कवीने सोपा करून विस्ताराने सांगितलेला दिसतो. उदा., ‘ अहं वैश्वानरो भूत्वा ’ ह्या श्लोकाचे भाषान्तर पहा : “ मी वैश्वानर होउनी । प्राणियांचे देह आश्रयुनी। चतुर्विध अन्न पचनी । प्राणापानि आणीतसें ॥ ७३ ॥ ” रचना सहज समजण्याजोगी आणि प्रासादिक असून गीतेमधील तत्त्वज्ञानाचे आणि विचारधारेचे त्यांचे चांगलेच अध्ययन असावे हे त्यावरून कळून येते. *भगवद्गीता* ग्रंथाची सर्वसामान्य जनांतली लोकप्रियता लक्षात घेऊन तिचा अर्थ कळणे सोपे व्हावे ह्या भूमिकेने हे भाषान्तर केले आहे असे वाटते. तसेच वर्षानुवर्षे चालत आलेली धार्मिक साहित्याची परंपरा पाहता *भगवद्गीता* ग्रंथाचीच निवड कवीने का केली असावी हेही समजू शकते.

*मल्हारीमाहात्म्या*त म्लेंच्छांनाही आपल्यात समाविष्ट करून घेण्याची माधवस्वामींची विशाल दृष्टी दिसून येते. ते म्हणतात : “म्लेंछ होत्साता नीच जऱ्ही । अष्टविधा भक्ती करी । तऱ्ही तो विप्रयतीहूनी भारी । होय मज पढियंता ॥” (२१ : ५). माधवस्वामींच्या रचनेचा उल्लेख त्यांचे नातू वासुदेवपंडित ह्यांनी केला आहे. ते म्हणतात, “मल्हारी माहात्म्य गणेश पुराण । योगवासिष्ठ श्री विष्णु पुराण । आदि काव्य श्रीमद्रामायण । करी विचक्षण भाषाबद्ध ॥” (*भागवत* : स्कंध ९, १ : ५८).

*प्रबोधचंद्रोदय* हे रूपकात्मक मराठी नाटक माधवस्वामींनी श्रीकृष्ण मिश्र ह्यांच्या *प्रबोधचंद्रोदय* ह्या संस्कृत गद्यपद्यमिश्रित नाटकावरून अनुवादित केले आहे. मूळ नाटककाराचे भगवद्भक्ती हे प्रयोजन माधवस्वामींनी कायम ठेवले आहे. तसेच कृष्णमिश्रांच्या अद्वैतभक्तीचाही पुरस्कार केला आहे. नाटकातील रूपक यथार्थाने साधून रचना प्रासादिक केली आहे.

महाभारतावर रचना करताना माधवस्वामी शक्य तो भाण्डारकर प्रतीस अनुसरताना दिसतात. परंतु त्यांच्यासमोर प्राचीन संस्कृत महाभारताची, देवनागरीमधील मिश्र प्रतीतील D4 [तंजावर सरस्वती महाल ग्रंथालयातील संस्कृत हस्तलिखितांमधील क्र. ११२६ ची हस्त. प्रत] ही प्रत असण्याचा दाट संभव वाटतो. माधवस्वामी हे कुशल अनुवादकार आहेत. अर्थहानी होऊ न देता ते व्यास-महाभारतातील रचना मराठीत सार्थपणे उतरवितात. ते एक कुशल आख्यानकवी असल्यामुळे व्यास-महाभारतातील कथेची अस्पष्ट रचना, कथानकाचे विविध धागे जोडून, अधिक सुस्पष्ट करण्याचा प्रयत्न करतात, एकेका प्रश्नाची उकल करीत, श्रोत्यांचे शंकानिरसन करीत, त्यांना कथेच्या ओघाबरोबर घेऊन जातात. [ ⇨ ३.]

माधवस्वामी घटनास्थळांचे वर्णन आणि विविध प्रसंगांचे चित्रण उठावदाररीत्या करतात. त्यांना रसाविष्कार करण्याचेही उत्तम जमते. *युद्धपर्वा*तील वर्णनांवरून वीररसाची तर सुभद्रेने अभिमन्यूसाठी केलेल्या विलापातून करुणरसाची यथार्थनिर्मिती ते करतात. रणभूमिवर्णनातून त्यांनी बीभत्स रस निर्मिला आहे तर *स्थालीपाक* आख्यानातून विनोदाद्वारे हास्यरस साधला आहे. मुक्तेश्वरांप्रमाणेच ह्यांनीही अनेक ठिकाणी विविध पंचपक्वान्नांची वर्णने केलेली आढळतात. माधवस्वामींची व्यक्तिचित्रेही सरस झाली आहेत. परंतु समर्थ संप्रदायाच्या सीमांनी त्यांच्या प्रतिभेला बंधन पडत असल्यामुळे मुक्तेश्वरांच्या ‘ शृंगारप्रचुर ’ वर्णनांना त्यांनी वाव दिलेला दिसत नाही.

माधवस्वामींच्या काव्यात वरील गुणांबरोबर काही दोषही शिरलेले आढळतात. पहिला दोष म्हणजे पाल्हाळ. ह्या पाल्हाळिकतेमुळे विस्कळितपणा निर्माण होताना दिसतो. शब्दांच्या प्रयोजनाविषयी त्यांनी चोखंदळ वृत्ती दाखविली नसल्यामुळे अनेक ठिकाणी त्यांचे काव्य गद्यसदृश आणि नीरस झालेले आहे. मुक्तेश्वरांच्या काव्यरचनेत जे शब्दांचे लालित्य आणि नादमाधुर्य जाणवते ते माधवस्वामींच्या काव्यरचनेत नसल्यामुळे ही नीरसता अधिक भासते. उपमा, उत्प्रेक्षा, रूपक इत्यादी काव्यालंकारांना मुक्तेश्वर किंवा मोरेश्वर ह्यांनी आपल्या काव्यांत स्थान दिले असल्यामुळे तेथे एक प्रकारचे सौंदर्य निर्माण होते. ते माधवस्वामींच्या काव्यात दिसत नाही. अनेक ठिकाणी त्यांच्याकडून अतिशयोक्तीची अतिशयोक्ती झालेली दिसते. तसेच कालविसंगतीचाही

दोष जाणवतो. पण हा दोष सर्वच आख्यान-कवींत दिसून येतो. त्याच-प्रमाणे आणखी एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. ती म्हणजे उत्तम संस्कृत जाणणाऱ्या ह्या श्रेष्ठ ग्रंथकाराच्या ग्रंथातील मराठी भाषा मात्र फारच अशुद्ध वाटते.

मुक्तेश्वरी प्रतिभा ज्याप्रमाणे *आदिपर्वा*पासून पुढील पर्वांतून क्रमाने घसरताना दिसते, तसा प्रकार मात्र माधवस्वामींच्या प्रदीर्घ रचनेत होताना आढळत नाही हे विशेष.

व. वि. पारखे

**रचना : मु.** – १. योगवासिष्ठ भाग १; प्रकरण ८; सर्ग १२६; ओ. सं. १२३३९ – पैकी प्र. ५, स. ४०, ओ. सं. ३७१५ (एवढाच भाग मु.); र. श. १६१८; संपा. तुळपुळे, शं. गो. (विवेचक प्रस्तावनेसह); पुणे, १९५८. २. श्रीमद्भगवद्गीता – मराठी भाषान्तर; अ. १८; ओ. सं. २१०५; तंसम. त्रैमा. क्र. ७ : ३ – १९५२ ते क्र. १२ : १–१९५८ क्रमशः. ३. श्रीमन्महाभारत – विराटपर्व; अ. ४०; ग्रं. सं. अंदाजे ५०००; र. श. १६२५ ते १६२९; संपा. नागराजराव, गो.; तंजावर, १९६२. ४. श्लोकबद्ध रामायण; कांडे ६; श्लो. सं. ७२६; संपा. जोशी, पु. दि.; तंजावर, १९५२. **अमु.** – १. अनुगीता; अ. ७; ग्रं. सं. १०५०. २. ओवीबद्ध रामायण; ओ. सं. अंदाजे १९०००; र. श. १६१५. ३ गणेश-पुराण; अ. ८४; ओ. सं. ११०००; र. श. १६३५ विजयसंवत्सर. ४. प्रबोधचंद्रोदय नाटक – वेदान्तपर; अ. ५; ग्रं. सं. ६७०. ५. प्राकृत महाभारत – पर्वे २१; अ. ९२४; ओ. सं. अंदाजे १, १०, १७०; र. श. १६२५ ते १६२९. ६. भीष्मस्तवराज स्तोत्र; ओ. सं. १३२. ७. मल्लारी माहात्म्य; ओ. सं. १३००; र. श. १६१९. ८. लघुरामायण – सुंदरकांड (उपलब्ध). ९. विष्णुपुराण; अ. ८७; ग्रं. सं. ओव्या ८४११; श्लोक ३८ (प्रा. स्थ. : तंसम.).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, ना. ब. : (१) एकनाथमहाराज व तिरुवेळंदूरचे माधवस्वामी; (२) माधवस्वामीकाल व नाथसंबंध विचार; साहित्य संशोधन मंजिरी; बेळगाव, १९७३; पृ. ४३ ते ५२ आणि ५३ ते ५८. २. जोशी, म. रा. : एकनाथ आणि माधव-स्वामी : ज्ञानेश्वरी संशोधन : पाटांगण परंपरा : एक अध्ययन; नागपूर, १९७३; पृ. ६५–७७. ३. पंगु, द. सी. : मुक्तेश्वरकृत विराटपर्व; कोल्हापूर, १९५३; पृ. ३५–३७, ४९–५१. ४. पारखे, व. वि. : माधवस्वामी : कालनिर्णय व एकनाथ संबंध; नभामा., एप्रि. १९६०; पृ. २६–३३. ५. पारखे, व. वि : माधवस्वामींची आख्यानक कविता; डोंबिवली, १९७४. ६. पारखे, व. वि. : माधवस्वामींचे रूपकात्मक नाटक : प्रबोधचंद्रोदय; मराठवाडा संशोधन मंडळ वार्षिक, १९७५, पृ. १४१–१४७.

**० माधवात्मज** – पहा कृष्ण पंडित.

**माधवेंद्र** [का. अनु.] कवी. गुरू : अवधूत. हे दशनामपंथापैकी 'पुरी'-सांप्रदायी होते व ह्यांचे एक शिष्य आनंदपुरी म्हणून होते, अशी माहिति एका 'पुरी' मठातील मठपतीने दिली आहे. माधवेंद्रांचे दैवत दत्तात्रेय होते. ह्यांची समाधी खानदेशात शिरूड ह्या गावी असल्याचे समजते. *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी हे पेशवाईअखेरच्या काळातील असावेत, असे म्हटले आहे (आ. ५, पृ. ६३०). पण नक्की काल सिद्ध होण्यास पुरावा उपलब्ध नाही. हे आपला उल्लेख 'राव माधवेंद्र' असाही करतात.

कवीने *अनुभवोदय* हा गुरुशिष्यसंवादरूप वेदान्तपर ग्रंथ लिहिला आहे. तो ओवीबद्ध असून, प्रत्येक ओवी साडेचार-चरणी आहे. ह्या ग्रंथावर समर्थांच्या *दासबोधा*ची दाट छाया पडलेली आहे. ग्रंथातील भाषा सतराव्या शतकाच्या उत्तरार्धातील आहे, असे अनुमान होते. कवीने दत्तस्तवनपर बरीच स्फुट कविता रचली आहे. एका भूपाळीच्या शेवटी त्याने 'अवधूतस्वामीचा किंकर माधवेंद्र' असा आपला निर्देश केला आहे.

**रचना : अमु.** – १. अनुभवोदय; त्रुटित; पहिले संपूर्ण प्रकरण व दुसऱ्याच्या ७३ ओव्या उपलब्ध; २. स्फुट अभंग, भूपाळ्या, आरत्या; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, पां. मा. : अवधूत-स्वामीचा किंकर माधवेंद्र; भाइसंमंइति., श. १८३८; ; पृ. १०९. २. चांदोरकर, पां. मा.; माधवेंद्रकृत अनुभवोदय; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४; चैत्र १८६५; पृ. ४९–५१.

**माधोदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**माधोनंद** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. निर्गुणभूपाळी; गं. ना. मुजुमदार संग्रह; २. भामाविलास; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ७६.

**माधोनाथ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**माधो वासुदेव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मानपुरी** [अंदाजे इ. स. १६३० – १७३०] कवी. कान्यकुब्ज ब्राह्मण. हे उत्तर भारतातील रहिवासी होते. ह्यांच्या नावातील पुरी ह्या उत्तरपदावरून हे दशनामपंथी असावेत. डॉ. भालचंद्र तैलंग ह्यांच्या मते ह्या कवीचा योगाभ्यास हिमालयाच्या कुशीत सरस्वतीच्या काठी झाला (*प्रतिष्ठान*, मार्च १९५९, पृ. ३९). ते तीर्थयात्रा करीत शके १६०० मध्ये (इ. स. १६७८) महाराष्ट्रात देवगिरी येथे आले. औरंगा-बादजवळील दौलताबादच्या (देवगिरीच्या) पायथ्याशी मठ बांधून ह्या मठात त्यांनी बहुतेक सर्व काल व्यतीत केला व भाविकांच्या मनात अध्यात्मानुभवाची बीजे अंकुरित केली. देवगिरीच्या मानपुरी मठात ज्येष्ठ शु. ५ रविवार, साधारण संवत्सर, शके १६५२ रोजी ह्यांनी समाधी घेतली.

डॉ. तैलंगांनी खेमपुरी हे ह्यांचे गुरू असे म्हटले आहे, तर कन्नड (जि. औरंगाबाद) येथील संशोधक वि. बा. जोशी खेमपुरी ह्यांना मानपुरींचा गुरुबंधू मानतात. ह्यांच्या पदांच्या पुष्पिकांवरून ह्या कवीचा गुरू कोणी नाथपंथीय साधू असावा असे वाटते. एके ठिकाणी मानपुरी लिहितात : 'मानपुरी दीनानाथप्रसादें। भेटे निजसुख गोमटे'. रा. चिं. ढेरे ह्यांनी ह्या कवीची गुरुपरंपरा निश्चित केली आहे, ती अशी : आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ > गहिनीनाथ > निवृत्तिनाथ > ज्ञाननाथ (ज्ञानेश्वर) > सत्यामलनाथ > दीनानाथ > मानपुरी. ज्ञानेश्वरपरंपरेतील दीनानाथ हे मानपुरीचे गुरू असावेत असा तर्क आहे.

मानपुरींच्या शिष्यपरंपरेत ज्ञानपुरी, खेमपुरी, खेमपुरीचे शिष्य हिरापुरी व त्यांचे शिष्य हनुमानगिरी हे येतात. मानपुरी संप्रदायाचे पुढील मठ प्रसिद्ध आहेत : (१) मानपुरी मठ, दौलताबाद; (२) खेम-पुरी मठ, जोडबोरसर; (३) हिरापुरी मठ, वहिरगाव; (४) हनुमान-गिरी मठ, वेरूळ.

मानपुरींची बहुतांश पदरचना हिंदी आहे. त्या मानाने मराठी भाषेत त्यांनी रचलेली पदे अत्यल्प आहेत. त्यांच्या सर्व पदांत हृदयातील भावोन्मेष व विचारतरंग कलात्मक रीत्या व्यक्त झाले आहेत. पुढील पद त्या दृष्टीने उल्लेखनीय आहे : "श्रीहरि मागें पुढें दाटला। आनंद बहु मनीं वाटला ॥ धृ. ॥ जिकडे तिकडे आपणचि झाला। स्वयें सदोदित थाटला ॥ १ ॥ देखुनिया निजरूप गुरूचें। संशय समुळि आटला ॥ २ ॥ मानपुरीला अनुभव जाला। जन्ममरण रोखा फाटला ॥ ३ ॥" ह्यांची काही मराठी पदे *पदसंग्रह*, *सर्वसंग्रह* वगैरे मासिकांतून फार पूर्वी मुद्रित झालेली आहेत.

**रचना :** मु. – हिंदी पदे : ११२; मानपुरीपदावली; संपा. ढेरे, रा. चिं. व कामत, अ. प्र.; महत्त्वाची प्रस्ता., पृ. १–४७; पुणे, १९६७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कामत, अशोक; मानपुरींची मराठी कविता; भालचंद्र, जाने. १९६९; पृ. १७.

**मानपुरीप्रभु** [का. अनु.] पदकार.

**रचना :** मु. – गणपतिपर पदे; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. १०. अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**मानसिंग भोवाना रजपूत** [का. अनु.] शाहीर. करवीरकर छत्रपतींच्या ताब्यात असलेल्या अकीवाट ठाण्यास परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांनी वेढा घालून ते ठाणे सर केले, ही ऐतिहासिक माहिती मानसिंग भोवाना रजपूताच्या *अकीवाटच्या वेढ्याच्या पोवाड्यात* आली आहे (मु. : ऐतिपो., खं. २, पृ. ९८–१०१).

**मानसी आचार्य** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – उपदेश प्रकरण; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मानुएल द ओलिव्हैर (पाद्री)** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, उत्तरार्ध] भाषान्तरकार. गोमंतकीय कॅथॉलिक पाद्री. हे गोवा बेटातील बाटलेल्या सारस्वत ब्राह्मणांपैकी एक होते. १४ नोव्हेंबर १५५९ रोजी लुइस फ्रॉइस ह्यांनी गोव्याहून पाठविलेल्या पत्रात ह्या ब्राह्मणाची माहिती दिली आहे. तत्कालीन छापील दौत्रीनींच्या साहाय्याने ह्यांनी ख्रिश्चन धर्मतत्त्वांची स्वतःच माहिती करून घेतल्याचेही नमूद केले आहे.

ह्यांनी हिंदूंच्या जुन्या धार्मिक ग्रंथांचा पोर्तुगीज भाषेत अनुवाद केला. ह्या भाषान्तरांचा हिंदुधर्माच्या खंडणासाठी मिशनऱ्यांना खूपच उपयोग झाला. नामदेवकृत *अनादिपुराण* ग्रंथाचे (हे ज्ञानेश्वरसमकालीन नामदेव नसावेत) पोर्तुगीजमध्ये भाषान्तर मानुएल पाद्र्यांनी इ. स. १५५९ साली केले. ते रोम येथील जेजुइटांच्या दप्तरखान्यात संग्रहित.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा. : ओलिव्हैर, मानुएल द; सशगोबो.; मुंबई, १९६३; पृ. ७३, ८८, ८९, ९१.

**मानुएल, ज्याकिस् द नोरोञ (पाद्री)** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक] कवी. गोमंतकीय देशी पाद्री. ह्यांचे जन्मस्थळ गोवे बेटातील सांखवाळ. ह्यांचे वास्तव्य आरोसी ह्या गावी असे. ह्यांचा काळ किंवा ह्यांच्या काव्यरचनेचा काळ ह्यासंबंधी माहिती मिळत नाही.

ह्यांनी *क्रिस्ताचें यातनागीत* नावाचे काव्य रचले आहे. क्रिस्ताच्या वधप्रसंगाचे कथानक सुप्रसिद्ध आहे. ह्या कथाभागावर आणखीही काही काव्ये गोमंतकात रचली गेली आहेत. त्यांपैकी *ख्रिस्ताचे वधस्तंभारोहण* हे काव्य अ. का. प्रियोळकर ह्यांनी *मुंबई विद्यापीठाच्या* जर्नलमध्ये (सप्टें. १९४०) प्रसिद्ध केले होते. *क्रिस्ताचे यातनागीत* ह्या काव्याच्या दोन हस्तलिखित प्रतींपैकी एक प्रत गोवे येथे व दुसरी लिस्बन येथे उपलब्ध झाल्या. दोनही प्रती प्राचीन असून त्यांवरून प्रियोळकरांनी ह्या काव्याची संहिता सिद्ध केली आहे.

ह्या काव्याची भाषा अशुद्ध आहे. कारण मूळ काव्याची हस्तलिखिते रोमन लिपीत आहेत. ह्या लिपीच्या अपूर्णतेमुळे ह्या काव्याला अशुद्धत्व प्राप्त झाले आहे. तसेच ग्रांथिक मराठीशी संबंध सुटत चाललेल्या ख्रिस्ती लोकांच्या पठणात किंवा लेखनात आल्यामुळेही त्यास अशुद्धत्व प्राप्त झाले असावे. त्यामुळे व्यवहारातील स्थानिक बोलीचेही पुट त्यावर चढले. स्थानिक गोमंतकीय बोलीत आढळणारे पण महाराष्ट्राच्या इतर भागांत प्रचलित नसलेले काही शब्द ह्या ग्रंथात आढळतात. उदा., दुखां, मेडी, ख्यास्ती, कुपां, दवरिसी, खालुसां इत्यादी. ह्या काव्यात पोर्तुगीज शब्दांचाही निर्देश आढळतो. उदा., साल्वोदोर (तारणारा), तेंप्ली (देऊळ), मिरा (गंधरस) इ. स्टीफन्सच्या *क्रिस्तपुराणाची* छाया प्रस्तुत काव्यावर पडलेली आहे. [ ⇨ ३.]

**रचना :** मु. – क्रिस्ताचें यातनागीत; कडवी १६८; संपा. प्रियोळकर, अ. का.; मसंमं. प्रका., मुंबई, १९५९; प्रस्ता., पृ. १–८.

**मानुएल बान्हा (पाद्री)** [का. अनु.] कोशकार. फ्रांसिस्कन पाद्री. हा सांव तॉमें संघटनेचा कार्यकर्ता होता. ह्याने एतद्देशीयांच्या भाषेमध्ये एक मोठा शब्दसंग्रह तयार केला होता. हा हस्तलिखिताच्या स्वरूपातच शेवटपर्यंत होता.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा.; मानुएल बान्हा; सशगोबो.; मुंबई, १९६३; पृ. ३१२.

**मानुएल बॉपतिस्ता (पाद्री)** [अंदाजे इ. स. १६५४] ग्रंथकार. फ्रांसिस्कन पाद्री. सांव तॉमें संघटनेचा एक कार्यकर्ता. हा गोव्यातल्या बार्देश प्रांतात कोलवाल येथे रेक्टरच्या हुद्द्यावर होता. ह्याने देशी भाषेत एक बरीच मोठी प्रश्नोत्तरावली (Cathecismo) तयार केली होती. ती अप्रकाशितच राहिली.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा. : मानुएल बॉपतिस्ता; सशगोबो.; मुंबई, १९६३; पृ. ३१२.

**मानुएल द लादो (पाद्री)** [अंदाजे इ. स. १६६१ / ६२] लेखक. फ्रांसिस्कन पाद्री. हा इ. स. १६६१ आणि १६६२ मध्ये गोवे बेटात प्रांतिक धर्माधिकारी म्हणून काम करीत होता. ह्याने नव ख्रिस्त्यांच्या उपयोगासाठी एक लहान *प्रश्नोत्तरावली* रचली होती.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा. : मानुएल द लादो; सशगोबो.; मुंबई, १९६३; पृ. ३१२.

**माभळभट** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. सवाया; २१; २. स्वैयंवराच्या सवाया; १६; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मामा** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० मामा परमानंद** – पहा मामाप्रभु.

**मामाप्रभु / ० मामा परमानंद** [का. अनु.] कवी.

**रचना :** मु. – १. शिवपर पद व गणपतिपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. २३–२४ व ७–८; २. हमामा पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ८०.

**माया** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – अध्यात्मपर पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ३३.

**मारकीनाथ** [का. अनु.] नाथपंथी कवी. ह्यांचे वास्तव्य उमरावती जिल्ह्यात असे.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ७७.

**मार्गरेट विल्सन / ० विल्सन, मार्गरेट** [५ नोव्हेंबर १७९५–१८३५] मुंबईतील स्त्रीशिक्षणाच्या आद्य प्रवर्तिका व लेखिका. प्रसिद्ध ख्रिस्तीधर्मप्रचारक व ग्रंथकार डॉ. जॉन विल्सन ह्यांची पत्नी. ग्रीनोक (स्कॉटलंड) येथे ह्यांचा जन्म झाला. डॉ. विल्सन ह्यांच्याशी विवाह झाल्यावर इ. स. १८२९ मध्ये त्या मुंबईस आल्या. हर्णै (कुलाबा) येथे त्या वेळेस ख्रिस्ती मिशनऱ्यांचे मुख्य केंद्र होते. तेथे एक शिक्षक (पंडित) नोकरीस ठेवून त्यांनी मराठी भाषेचा अभ्यास केला. कोशकार मोल्सवर्थ ह्यांचेही त्यांस त्या कामी चांगले साह्य मिळाले. हर्णैहून मुंबईस आल्यावर स्थानिक मुलींना शिक्षण देण्यासाठी त्यांनी एक शाळा स्थापिली. त्यांनी मराठीत थोडेसे ग्रंथलेखनही केले आहे. त्यांच्या मृत्यूनंतर डॉ. विल्सन ह्यांनी *मेमॉयर्स ऑफ मिसेस विल्सन* ह्या नावाचे, त्यांचे जीवनकार्य कथन करणारे, एक विस्तृत चरित्र लिहून प्रसिद्ध केले आहे.

**रचना :** मु. – १. आशुरी आणि बाबेली लोकांचे वृत्तांतकथन; शिळाछाप; मुंबई, १८३५; २. ग्रेकी लोकांचें वृत्तांतकथन;

शिळाछाप; मुंबई, १८३८; ३. प्राचीन मिस्री लोकांचें वृत्तांत-कथन; शिळाछाप, मुंबई, १८३९; ४. मेदी आणि पार्शी लोकांचें वृत्तांतकथन; शिळाछाप; मुंबई, १८३८.

चरित्र, चर्चा, अभ्यास : पिंगे, श्री. म.; मिसेस विल्सन, युमअसे., मुंबई, १९६०; पृ. ३१४–३१५.

**मार्तंड बाजी** [का. अनु.] शाहीर. ह्याने रचलेल्या पोवाड्यातील 'गुरु धोंडी पाथरूट आमचा' ह्या शब्दपंक्तीवरून काव्यरचनेच्या क्षेत्रात, पाथरूटचा धोंडी हा ह्याचा गुरू होता असे दिसते. साताऱ्च्या छत्रपतींच्या स्वारीचे वैभव ह्या शाहीराने आपल्या पोवाड्यात वर्णन केले आहे.

रचना : मु. – शहाजी राजांचे स्वारीचा थाट (पोवाडा); ऐतिपो., खं. ३, पृ. ८५.

**मार्तंडबुवा** [का. अनु.] टीकाकार. नाभाजींच्या *भक्तमाले*वर त्यांच्या प्रियादास नामक शिष्याने *भक्तिरसबोधिनी* टीका केली. ह्या प्रियादासाचे टीकेवर मराठीत मार्तंडबुवांनी *भक्तिमाला / भक्तिप्रेमामृत* (संपा. बापुशास्त्री नंदुरबारकर; मुंबई, १८८९) नावाची टीका लिहिली आहे. ह्याच ग्रंथाला हल्ली *भक्तमाला* असे म्हणतात (मसा., आ. ५, पृ. ४७५).

**मालुकदास** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मालुचंद्र** [का. अनु.] ग्रंथकार.

रचना : अमु. – आदिपुराण; संककासू., पृ. १३६.

**० मालू(लो) नरहरि** – पहा नरहरि धुंडिराज मालू.

**मालो / ० मालोपंत** [का. अनु.] कवी. हे मूळचे वऱ्हाडातील देशस्थ ब्राह्मण. व्यापारधंद्याच्या निमित्ताने सपरिवार कर्नाटकात येऊन राहिले. उदरभरणासाठी काही व्यवसाय करीत असले तरी बहुतांश काल पांडुरंगनामस्मरणातच व्यतीत होई. पुत्र नरहरि. महिपतीने केलेल्या उल्लेखाखेरीज इतरत्र कोठेच कवीची माहिती मिळत नाही. त्यामुळे काळाचा अंदाज लागत नाही. ह्यांची स्फुट कविता भक्तिरसपूर्ण आहे.

रचना : मु. – नाथनामावलि (श्लो. सं. १७); अकलकामा., भा. ३, पृ. १३९–१४१. अमु. – मालूतारण ग्रंथ; अनुपलब्ध. २. अभंग, पदे इत्यादी; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

चरित्र, चर्चा, अभ्यास : आजगांवकर, ज. र. : मालो; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ३९५–९७

**० मालो धुंडिसुत** – पहा नरहरि धुंडिराज मालू.

**० मालोपंत** – पहा मालो.

**मालोबास** [इ. स. चे १४ वे शतक, अखेरचा काळ] महानुभाव कवी. पारमांडल्य आम्नायातील. गुरुपरंपरा : आणोबास > नागनाथबास > मालोबास. कवी मालोबास ह्यांनी दत्तोबास तळेगावकर (त्याच संप्रदायातील महानुभाव ग्रंथकार) विद्यमान असताना *स्मृति, वृद्धाचार, रत्नमालिकास्तोत्रातील तुटलेला दुवा, पंगुस्तोत्र, नामावळि स्तोत्र* इत्यादी ग्रंथ केल्याची माहिती पारमांडल्य आम्नायाच्या दामबासकृत *अन्वयस्थळा*त सापडते.

चरित्र, चर्चा, अभ्यास : नेने, ह. ना. : अन्वयस्थळ व वृद्धाचार; संलेसं., खं. १, पृ. १४१, १४५.

**मालो विठो** [का. अनु.] कवी.

रचना : अमु. – अभंग; सवामं. हस्त. सू., खं. १.

**माळा हरदास** [का. अनु.] ग्रंथकार. गो. का. चांदोरकर ह्यांनी माळा हरदासाच्या *पवनविजय* (अमु.) ग्रंथाची नोंद केली आहे. हा ग्रंथ तंजावर संग्रहात उपलब्ध आहे अशी माहिती ते देतात (संककासू., पृ. ७७).

**माळोबा गोसावी** [का. अनु.] कवी.

रचना : अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**मिगेल द आल्मैद (पाद्री) / ० आल्मैद, मिगेल द** [इ. स. १६०७ – १७ सप्टें. १६८३]. गोमंतकीय कॅथॉलिक पाद्री ग्रंथकार. जन्माने पोर्तुगीज. ह्यांचा जन्म पोर्तुगालमधील बैर प्रांतात गोव्हेय ह्या खेड्यात झाला. इ. स. १६२४ मध्ये त्यांनी जेजुइट पंथात प्रवेश केला. गोव्यात आल्यावर त्यांनी देशी भाषांचा अभ्यास केला आणि गोव्याच्या सांव पाब्ल कॉलेजचा रेक्टर व प्रॉव्हिसियाल ह्या मोठ्या धार्मिक हुद्द्याच्या जागांवर काम केले. वयाच्या सोळाव्या वर्षानंतरचे सारे आयुष्य गोव्यात गेल्यामुळे तेथील भाषेचा ह्यांचा अभ्यास चांगल्या तऱ्हेने होऊ शकला. ह्यांनी 'ब्राह्मणांच्या भाषे'त (गोमंतकी बोलीत) ग्रंथरचना केली. गोव्यामध्येच रायतूर येथे हे स्वर्गवासी झाले.

ह्यांच्या रचनेपैकी *वनवाळ्यांचो मळो* हा पाच खंडांचा ग्रंथराज प्रसिद्ध असून नवख्रिस्त्यांच्या दैनंदिन उपयोगासाठी धार्मिक प्रवचनांची रचना त्यात केलेली आहे. ग्रंथाचे मुद्रण इ. स. १६५८ (प्रथम खंड) ते १६५९ (५ वा खंड) च्या दरम्यान गोव्यातच झाले. सध्या मात्र त्यातील दोनच भाग उपलब्ध आहेत. पैकी तिसऱ्या भागाची छापील प्रत गोवे येथील सरकारी वाचनालयात असून पाचव्या भागाची एक प्रत लंडन युनिव्हर्सिटीच्या 'स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज' संग्रहात आहे. फादर स्टीफन्स, रिबैरु, सालदांज ह्यांच्या ग्रंथांपेक्षा प्रस्तुत ग्रंथातील प्रतिपादन हे वेगळ्या स्वरूपाचे आहे. सबंध ग्रंथ म्हणजे एक धार्मिक स्वरूपाचे रूपक असून ख्रिस्ती पुराणातल्या अनेक कथा ह्या विवेचनाला खुमारी आणण्यासाठी कवीने वापरल्या आहेत. ह्यांच्या भाषाशैलीचे जुन्या मराठीतील संस्कृतप्रचुर रचनेशी साम्य दिसते.

ह्यांनी रिबैरूचा *कोंकणी-पोर्तुगीज कोश* सुधारून वाढविला. ह्याशिवाय गोमंतकी बोलीत आणखी दोन ग्रंथ ह्यांनी रचले असल्याचे उल्लेख 'बिब्लियॉतेक लुझितान'मध्ये सापडतात.

चरित्र, चर्चा, अभ्यास : प्रभुदेसाई, वि. बा.; पाद्री, मिगेल द आल्मैद; सशगोबो.; मुंबई, १९६३; पृ. २४४–२६६.

**० मिचेल (रे.) जेम्स** – पहा (रे.) जेम्स मिचेल.

**मिनवेल डी आलमेडा (पाद्री)** [का. अनु.] लेखक. ह्याने सेंट लॉरेन्स ह्या ख्रिस्ती साधूचे एक गद्य माहात्म्य लिहिले होते. ते इ. स. १६५८ मध्ये गोव्यात छापले होते. ह्या ग्रंथाचा रचनाकाल माहीत नाही (मसा., आ. ५, पृ. २८१ टीप).

**मीनाक्षीअम्मा** [का. अनु.] कवयित्री. दक्षिण हिंदुस्थानातील तंजावरस्थ माधवस्वामींच्या नातवाची म्हणजे वासुदेवपंडितांची पत्नी. ही काव्यरचनेत नेहमी दंग असे. म्हणून हिला 'मंत्रवादीण' म्हणत. मोरोपंतांप्रमाणे ही कोळशाने भिंतीवर सहज सुचलेले काव्य लिहीत असे. ही स्वतःच्या कविता पतीच्या नावाने लिहीत असे. हिने रचलेली काही कृष्णपर गाणी व *हळदेउटन* नामक सौभाग्यगाणी उपलब्ध आहेत (मसा., आ. ५, पृ. ९९२).

**मुकुंद–१ / ० मुकुंदमुनि–१ / ० मुकुंदराजमुनि–१** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. पैठणपरिसरात गोदावरीतीरी वसलेल्या सायखेड गावचे हे राहणारे. ह्या मुकुंदांचे गुरू कोकिळ गंगाधर होते अशी *मुकुंदचरित्र*कार नृहरिसुत ह्यांनी माहिती दिली आहे. ह्यांचे चतुर्थाश्रम घेतल्यानंतरचे नाव ब्रह्मानंद होते. ह्यांनी श. १६९७ (इ. स. १७७५) त वैशाख वद्य प्रतिपदेस भौमवासरे जलसमाधी घेतल्याची माहिती *मुकुंदराजचरित्रा*त मिळते. हे चरित्र नृहरिसुत ह्यांनी त्याच शकाच्या ज्येष्ठात वर्णिले असल्याने ते विश्वसनीय मानण्यास हरकत नाही.

रचना : मु. – एकनाथचरित्र; संककासू., ग्रंथसूची. अमु. – १. रुक्मिणीस्वयंवर; १५३. २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**मुकुंद–२** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा पूर्वार्ध] कवी. हे कोल्हापूरकर ताराबाईचे आश्रित होते. ह्यांच्या पित्याचे नाव यादव पंडित.

गुरुपरंपरा एकनाथ (पैठणकर) > राघव > विठ्ठल > मुकुंद अशी. ह्यांनी रचलेली एक *संतमालिका*, दैवतांवरील स्तोत्रे व अष्टके इत्यादी रचना वि. ल. भावे ह्यांच्या संग्रही असल्याचा ते उल्लेख करतात (मसा., आ. ५, पृ. ३९०). *महाराष्ट्रसारस्वत*कारांच्या मते ह्यांनी 'छंदःशास्त्र' वर एखादा ग्रंथ रचला असल्याचा संभव आहे. ह्यांची रचना साधारण आहे.

**मुकुंद–३ / ० दीनदत्तपदांकित मुकुंद** [अंदाजे इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध व १८ व्या शतकाचा पूर्वार्ध]. संतकवी. हे स्वतःस 'दीनदत्तपदांकित' असेही म्हणवितात. भारद्वाजगोत्री, त्रिप्रवरी, यजुर्वेदी ब्राह्मण. जन्म नेमाडातील खांडवा येथे झाला. ह्यांच्या वडिलांचे नाव नारायण, आईचे नाव साखराबाई. वयाच्या पाचव्या वर्षी ह्यांचे मौंजीबंधन झाले व सातव्या वर्षी लग्न झाले. ह्यानंतर अल्पकाळातच वडील निवर्तले. त्यानंतर हे खानदेशात जैतापुरास गेले. तेथे दहा वर्षे राजसेवेत घालविली. प्रथमतः श. १६०८ (इ. स. १६८६) च्या आश्विन महिन्यात श्रीगुरुस्वप्नानुभव झाला व गुरूने कवित्व करण्याची आज्ञा दिली. पुढे श. १६२३ च्या पौष शुद्ध दशमीस प्रत्यक्षात गुरूचे दर्शन घडून, प्रसादप्राप्ती होऊन, गुरुमंत्र मिळाला. ह्यानंतरच ते तीर्थयात्रा करण्यास बाहेर पडले. उत्तरतीर्थांच्या यात्रा करण्याचे मनात असता औरंगजेबाचा मुलगा मोअज्जीम ह्याच्या पदरी काही दिवस नोकरी करून थोडीफार पुंजी जमविल्यानंतर परत ह्यांची तीर्थयात्रा सुरू झाली. तीर्थयात्रा करीत असता, त्या त्या तीर्थांची वर्णने मुकुंदांनी लिहिली आहेत. ही *तीर्थावली* आत्मचरित्रयुक्त असून, जशी यात्रा घडली तशीच ती कवीने लिहून काढली आहे असे दिसते. कविचरित्रविषयक वर आलेली माहिती ही गो. का. चांदोरकरांच्या संग्रही असलेल्या मुकुंदांच्या आत्मचरित्रात सापडते. कवीची काव्यरचना श. १६०५ ते १६३० (इ. स. १६९३ ते १७०८) च्या दरम्यानची आहे.

बऱ्याच प्रौढ वयात गुरूपदेश झाल्यानंतर ह्यांना कवित्व स्फुरले. आख्याने (पुराणातील), स्तोत्रसंग्रह व *छंदोरत्नाकर* अशी बरीच रचना कवीच्या नावावर सापडते. *तीर्थावली* हे आत्मचरित्र त्यामधील प्रवृत्तिप्राचुर्याने महत्त्वाचे ठरते. ह्या *तीर्थावली*वरून तत्कालीन देशस्थिती व लोकस्थिती ह्यांची चांगलीच कल्पना येते. हे प्रवासवृत्त चित्तवेधक आहे. भट्टकेदारविरचित *वृत्तरत्नाकरा*वरील टीका म्हणून रचलेल्या *छंदोरत्नाकर* ग्रंथावरून कवीची छंदःशास्त्रनिपुणता प्रत्ययास येते. चामरवृत्तात रचलेल्या सवायांत शब्दचमत्कृती आहे. ही चित्रकाव्यरचना दोषपूर्ण असली तरी चित्रकाव्यरचनेचा एक प्रयत्न म्हणून लक्षात घेण्याजोगी आहे. ब्रज, नेमाडी, अमीर, बागलाणी, मारवाडी इत्यादी भाषांतून रचलेल्या श्लोकांवरून ह्यांचे बहुभाषापटुत्व नजरेस येते. *दत्तजन्म, गुरुस्तवन, सुंदरकांड, अंकुशपुराण* अशा काही रचनांचा बऱ्यापैकी म्हणून उल्लेख करता येतो. ह्यांची वाणी अधिकारयुक्त किंवा सहजस्फूर्त नाही. ह्यांची कविता अद्यापि अप्रकाशित आहे.

**रचना : अमु.** – १. अंकुशपुराण; श्लो. सं. १६२५; र. श. १६१६/१७. २. अंगदशिष्टाई. ३. आत्मचरित्र : तीर्थावळी. ४. गुरुस्तुति; श्लो. सं. १००. ५. छंदप्रकाश; र. श. १६२५–२६. ६. छंदोरत्नाकर; र. श. १६२८. ७. दत्तजन्म; श्लो. सं. १६६; र. श. १६२८. ८. दानलीला; श्लो. सं. ३९; र. श. १६२८. ९. दूतिप्रेषण; श्लो. सं. १०१; र. श. १६३९. १०. बागलाणातील साधु. ११. यशोदा-गौळण-संवाद; कवित्ते ३४; र. श. १६२८. १२. रामायण–सुंदरकांड; प्रसंग १२; श्लो. सं. १२१४; र. श. १६२३. १३. सुदामचरित्र; र. श. १६२९. १४. स्तोत्रसंग्रह; संककासू., पृ. ७८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : दीनदत्तपदांकित मुकुंद; भाइसंमंइति., श. १८३४, पृ. १८२–१९६. २. चांदोरकर, गो. का. : मुकुंदांची कविता; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. १९६–२०५.

**मुकुंद–४** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. ह्यांनी रचलेल्या *सारीपाटकथा* ह्या काव्याच्या उपसंहारात हे स्वतःविषयी माहिती देतात. ती अशी : "ज्याची सत्कविता प्रसिद्ध मिरवे संतांचिया मंडळीं। तो गोविंद पिता पवित्र जननी सावित्रि नामें भली। त्याचा पुत्र मुकुंदनाम गिरिजाकांतास सद्भक्तिनें। पुजी सद्वचनावली सुकमळीं गुंफोनियां युक्तिनें ॥ ४९ ॥" कवित्वाचा वारसा कवीस पित्याकडूनच आलेला आहे. हे काव्य *अनेककविकृत लघुकाव्यमाले*तून मुद्रित झाले आहे (भा. १; संपा. वा. दा. ओक, पृ. ८१–८७). चूर्णिका, श्लोक, सवाया, गीती मिळून ग्रं. सं. ४९ आहे. शिवपार्वती सारीपाट खेळत असता नारदमुनींनी कळ फिरविल्याने त्यांच्यात जो कलह झाला, ती ब्रह्मोत्तरखंडात व्यासांनी सांगितलेली कथा ह्या काव्यात आलेली आहे. रचना अनुप्रासयुक्त व पंडिती काव्याच्या परंपरेत बसणारी.

**मुकुंद–५ / ० मुकुंदस्वामी** [ ?– समा. श. १७५२ / इ. स. १८३० ] रामदासी कवी. तंजावर येथील भीमस्वामींचे शिष्य श्रीगोविंदबाळस्वामी ह्यांचे हे पुतण्ये व शिष्य. मुकुंदस्वामींचा मठ तंजावरनजीक श्रीमणिमुक्ता नदीच्या उत्तरतीरावर आहे. त्यांची समाधीही तेथेच स्नानघाटावर असून त्यावर 'श. १७५२ विकृतिनाम संवत्सर माघ वद्य प्रतिपदा' असा समाधिशक कोरलेला आहे (तंसम. बा. ११३२, हस्त. यादी, क्र. १).

मुकुंदस्वामींनी रचलेला *श्रीरामकृपाविलास* ग्रंथ विस्तृत असून तो तंजावर सरस्वती महालाच्या हस्तलिखित संग्रहात उपलब्ध आहे (बा. ११२७ ते ११३२). ग्रंथाची रामायणी कथेवरील बाल, अयोध्या, अरण्य, किष्किंधा, सुंदर व युद्ध अशी सहा कांडे व १३९९४ एवढ्या ओव्या आहेत. कथानुषंगाने ब्रह्मज्ञानाचे निरूपणही ग्रंथात कवी करतो. कथेचे प्रयोजन भगवद्भजन हे असून, श्रीरामाशी कवी संवाद करीत आहे असे ग्रंथाचे स्वरूप आहे. कथेचे माहात्म्य कवीच्याच शब्दांत पहा : "श्रीरामा तव कथा जे सुरसाची। की तेच जाण चिद्गंगा पीयूषाची। तू बाप कृपाब्धि हे तरिता साची। माउली निजदासांची मुकुंद म्हणे ॥" (बालकांड, उल्लास १).

**रचना : अमु.** – १. श्रीरामकृपाविलास; कांडे ६; ओ. सं. १३९९४. २. देवभक्तानुवाद; उल्लास १–४०; ओ. सं. ४०५९; प्रत श. १७४७ / इ. स. १८२५; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, व. स. : सरस्वती महालातील रामायणावरील उपलब्ध मराठी रचना; नभामा., जुलै १९७३; पृ. ४९–५०.

**० मुकुंदमुनि–१** – पहा मुकुंद–१.

**० मुकुंदमुनि–२** – पहा मुकुंदराज–१.

**मुकुंदराज–१ / ० मुकुंदमुनी–२ / ० मुकुंदराज योगी / ० मुक्तनाथ** [अंदाजे इ. स. चे १२ वे शतक] अद्वैतवादी शिवोपासक कवी व योगी. ह्यांच्या जन्माचा किंवा समाधीचा निश्चित काल, विश्वसनीय ऐतिहासिक पुराव्याच्या अभावी, अद्याप सांगणे शक्य झालेले नाही. ह्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : हरिनाथ > रघुनाथ > मुकुंदराज. मुकुंदराजांनी रचलेल्या *विवेकसिंधु* ह्या ग्रंथाच्या काही हस्तलिखित पोथ्यांतून 'शके अकराशें दाहोत्तर। साधारण नाम संवत्सर। तैं राजा शार्ङ्गधर। ग्रंथ उभार तैं जाला ॥ १४२ ॥ ऐसा समयो सर्वोत्तम। तेथें मुकुंद दिजोत्तम। विवेकसिंधु ग्रंथ मनोरम। निर्मिता जाला ॥ १४३ ॥' किंवा 'वर्श शके अकरादाहोत्तर (१११०)। साधारण संवत्सर। राजा शारंगधर। राज्य करी ॥ १४० ॥ ऐसा समयो सर्वोत्तम। तेथें मुकुंद दिजोत्तम। विवेकसिंधु मनोरम। निर्मिता जाला ॥ १४१ ॥' ह्यासारख्या ज्या अखेरच्या ओव्या आढळतात, त्यांवरून मुकुंदराजांचा काळ इ. स. चे बारावे शतक हा

असावा, असे अनुमानाने मानले गेले आहे. ह्या अनुमानाला अनेक विद्वानांनी आक्षेप घेतला आहे. ह्या आक्षेपकांचे म्हणणे असे की, श. १११० ह्या वर्षी साधारण संवत्सर येत नाही, तेव्हा ह्या ओव्या क्षेपक असाव्या. *विवेकसिंधू*च्या अनेक जुन्या पोथ्या ताडून पाहून त्याची शुद्ध प्रत प्रसिद्ध (स. १९५२) करणारे गोपाळ रावजी गोगटे ह्यांनी हा आक्षेप रास्त मानून मुकुंदराज हे ज्ञानेश्वरपूर्वकालातील नसून ते त्यांचे समकालीन असावे, असे आपले मत व्यक्त केले आहे. पण, ह्या प्रतीलाच मा. श्री. अणे ह्यांचा जो 'पुरस्कार' जोडलेला आहे, त्यात अणे ह्यांनी त्याबाबत आपला मतभेद नोंदून ठेवला आहे. ते म्हणतात : "माझे मित्र *अंभोरेक्षेत्रमाहात्म्य* ह्या ग्रंथाचे कर्ते विठ्ठल रावजी ढोक ह्यांनीं *विवेकसिंधु* ह्या ग्रंथाच्या कालनिर्णयावर एक महत्त्वाचा लेख नागपूर येथें प्रसिद्ध होणाऱ्या *महाराष्ट्र* दैनिकाच्या ता. १७ डिसेंबरच्या अंकांत प्रसिद्ध केला आहे... कृष्णदयार्णवांसारख्या एका प्राचीन व सुप्रसिद्ध ग्रंथकर्त्यानें मुकुंदराज हे ज्योतिषशास्त्रपारंगत व सिद्धान्तवक्ते ज्ञानभास्कर होते म्हणून लिहिलें आहे ही गोष्ट ढोक ह्यांनीं वाचकांचे नजरेस आणून, अशा असामान्य ज्ञात्याच्या ग्रंथांतील ओवींत कालनिर्देश करतांना शकांक व संवत्सर ह्यांची विसंगती असणें संभवनीय नाहीं, असें सांगून त्यांनीं वरील ओवींत सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या विसंगतीचें निराकरण केलें आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, देशांत आतांप्रमाणेंच मुकुंदराजांच्या काळींही नर्मदेच्या उत्तरेस विक्रम संवत् आणि दक्षिणेस शालिवाहन शक प्रचारांत होता. पंचांग पाहणाऱ्यांस असें दिसून येईल कीं ह्या दोन शकांच्या अंकांत १३४–३५ वर्षांचें अंतर आहेच. पण त्याशिवाय दोन्ही शकांच्या संवत्सरगणनेंतही फरक आहे....

"तेव्हां एखाद्या विशिष्ट शालिवाहन शकांत विक्रमसंवत्-शकगणनेनुसार कोणतें संवत्सर असेल व त्याच्या उलट एखाद्या विक्रमसंवत् संवत्सराचे वर्षी शालिवाहन शकांतलें कोणतें संवत्सर असेल हें काढावयाच्या अनेक रीती आहेत. त्यांतील सर्वांहून सोपी रीत म्हणजे शालिवाहन शकाचे अंकांत १३४ मिळवून त्याला ६० नें भागावें व शेष जो उरेल तो प्रभवादि यादींतील विक्रम संवत्सराचा क्रमांक होय. ह्या क्रमांकावर जें संवत्सराचें नांव असेल तें संवत्सर विक्रमसंवत्-गणनेप्रमाणें दिलेल्या शालिवाहन शकांत होतें असें समजावें.. .ही कल्पना प्रथमतः मुकुंदराजांचे संप्रदायांतील व त्यांच्या ग्रंथांचा अभ्यास करणारे नागपूर येथील बाबाजी बोबडे ह्यांना सुचली व त्यांनीं वरीलप्रमाणें गणित करून श. १११० त विक्रमसंवत्सर 'साधारण' होतें हें सप्रमाण सिद्ध केलें, असें ढोक ह्यांनीं आपले लेखांत प्रांजलपणें लिहिलें आहे."

शकसंवत्सराचा मेळ घालण्याचा असाच एक कसोशीचा प्रयत्न नागपूरचे दुसरे एक संशोधक डॉ. सु. म. डोळके ह्यांनी यशस्वी रीतीने केलेला आहे ('विवेकसिंधूचा काल', *नवभारत* मासिक, ऑग. व नोव्हें. १९५५). ते लिहितात : "कालनिर्देशांत शकाबरोबर संवत्सराचाही उल्लेख करण्यांत येतो. संवत्सर शब्दाचा मूळ अर्थ वर्ष. परंतु हा जाऊन त्याला प्रभवादि साठ वर्षांच्या चक्रांतील विशिष्ट वर्ष असा अर्थ प्राप्त झाला... गुरूच्या एका युगांत सुमारें ६० वर्षे येतात. ह्या साठ वर्षांनाच संवत्सरें म्हणतात व त्यांनाच प्रभवादि नांवें आहेत. हीं संवत्सरें बार्हस्पत्य (गुरु) मानावरून निघालीं...कोणत्याही शकाचें संवत्सर काढावयाचें असल्यास त्या शकाच्या गतवर्षांत १२ मिळवून बेरजेस साठानें भागावें लागतें." डॉ. डोळके ह्यांच्या वरील विवेचनाच्या संदर्भात प्रा. कृ. पां. कुलकर्णी हे त्यांनी संपादिलेल्या *विवेकसिंधूच्या* प्रस्तावनेत (पृ. ७५–७६) लिहितात : "परंतु नर्मदेच्या दक्षिणेस प्राचीन काळीं (शके १२०० पर्यंत) बार्हस्पत्य गणनाच रूढ असल्यामुळें नेहमींच गतशकांत १२ मिळवून साठांनी भागून संवत्सर निघत नाहीं." ह्या संवत्सरांच्या मेळासंबंधी डॉ. डोळके यांनी दुसरीही एक पद्धत वराहमिहिराच्या (*बृहत्संहिता* ८.२०.२१) गणनेवर आधारलेली अशी सांगितली आहे. "शालिवाहन शकाच्या गतवर्षास ४४ नें गुणावें. गुणाकारांत ८५८९ मिळवून बेरजेला ३७५० नें भागावें. भागाकारांत शकाचीं गतवर्षे मिळवावीं व आलेल्या बेरजेस ६० नीं भागावें. जी बाकी राहील तो आंकडा प्रभवादि संवत्सराचा निदर्शक होय. त्यांत एक मिळविला कीं चालू संवत्सर येईल."

काही वर्षांपूर्वी प्राचीन मराठी वाङ्मयसमीक्षकांपैकी काहीजण *विवेकसिंधू*मधील कल्पना अनेक ठिकाणी ज्ञानदेवकालीन वाटतात, असे म्हणू लागले होते. उदाहरणार्थ, धुळे येथे प्रसिद्ध झालेल्या *विवेकसिंधू*चे संपादक गोगटे आपल्या प्रस्तावनेत (पृ. २२) लिहितात : "ज्ञानेश्वरांचा *अमृतानुभव* व मुकुंदराजांचा *विवेकसिंधु* हे दोन्ही ग्रंथ फार उच्च प्रतीचे आहेत. आमच्या मतें तर ज्ञानेश्वर व मुकुंदराज समकालीन असे होऊन गेले असें मानण्यास ह्या दोन ग्रंथांत अंतःस्थ अशीं दोन प्रमाणें आहेत. ज्ञानेश्वरांच्या *अमृतानुभवा*तील पहिलें 'शिवशक्ति समावेश' प्रकरण व मुकुंदराजांच्या *विवेकसिंधू*तील 'सर्व ब्रह्म' नांवाचें सातवें प्रकरण ह्यांत कांही ठिकाणीं इतकें विलक्षण कल्पनासाम्य आहे कीं, तें पाहून, ह्या दोघां कवींपैकीं कोणींतरी एकानें दुसऱ्याच्या कल्पना उचलल्या आहेत, असें म्हणण्याकडे कल होतो...*अमृतानुभवा*चे पांचवे प्रकरणांत 'सत्', 'चित्', 'आनंद' ह्या पदत्रयाचें विवरण केलें आहे. नेमक्या त्याच पदांचें विवरण मुकुंदराजांच्या *विवेकसिंधू*मध्येंहि प्रकरण १७ मध्यें आलें आहे." [*विवेकसिंधू*च्या गोगटे प्रतीत, त्याचप्रमाणे कृ. पां. कुळकर्णी प्रतीत ह्या सतराव्या प्रकरणाच्या (अ) व (ब) अशा दोन भिन्न संहिता छापल्या आहेत. त्यांपैकी (अ) ह्या संहितेतील तत्त्वज्ञान शांकरतत्त्वज्ञानाशी अगदीच विसंगत आहे. *अमृतानुभवा*तील तत्त्वज्ञानाशी तर त्याची तुलनाच होऊ शकत नाही. ह्यातील तत्त्वज्ञान महानुभावीय आहे, ही गोष्ट गोगटे किंवा कुळकर्णी ह्यांच्या ध्यानी आली नाही. हे तत्त्वज्ञान शांकरतत्त्वज्ञानाशी विसंगत आहे, ह्याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे 'चित् शब्दें माया कल्पिजे'. शंकराचार्य किंवा त्यांच्या नंतर आलेले सगळे शांकर संप्रदायाचे ग्रंथकार 'चित्' शब्दाचा 'माया' असा अर्थ करीत नाहीत. सत्, चित् आणि आनंद ह्या तिन्ही पदांचा अर्थ एकच निर्गुण ब्रह्म होय, हे तैत्तिरीय उपनिषद भाष्यात व शारीरक भाष्यात शंकराचार्यांनी सांगितले आहे; परंतु ह्या प्रकरणांतील "सत् पद तें निर्गुण। चित् पद बोलिजे सगुण। सगुण निर्गुण निर्माण। कीजे आनंदीं॥" हे वाक्य शांकर तत्त्वज्ञानाच्या सत्-चित्-आनंद ह्या पदांच्या विवरणपद्धतीशी अत्यंत विरुद्ध आहे. रा. चिं. ढेरे किंवा अन्य संशोधक जेव्हा मुकुंदराज हे महानुभवीय संत आहेत असा निर्णय करू लागतात, तेव्हा त्यांच्या हे लक्षात येत नाही की महानुभावी तत्त्वज्ञान व *विवेकसिंधू*तील शांकरतत्त्वज्ञान ह्यांत अत्यंत मौलिक भिन्नता आहे. गोगटे व कुळकर्णी ह्यांच्या प्रतींतील उपरिनिर्दिष्ट प्रकरण हे बाकीच्या *विवेकसिंधू*तील शांकर तत्त्वज्ञानाशी पूर्ण विसंगत आहे. हे प्रकरण प्रक्षिप्त आहे. ते कोणातरी महानुभावाने स्वतःच्या संप्रदायात मुकुंदराजांस बसविण्याकरिता घातलेले आहे. ह्या १७ व्या प्रकरणातील (ब) ही संहिता मात्र शांकरतत्त्वज्ञानाशी अत्यंत सुसंगत आहे.]

ह्या दोन्ही ग्रंथांतील कल्पनासाम्य दाखवून गोगटे लिहितात : "मुकुंदराजांच्या मनश्चक्षूंपुढें, ज्ञानेश्वरांचा *अमृतानुभव*च होता, ह्यात तिळमात्र शंका राहात नाही. अर्थात् *अमृतानुभवा*तील कल्पनासाम्यदर्शक ओव्या प्रथम जन्मास आल्या व नंतर मुकुंदराजांच्या ओव्या रचल्या गेल्या असें झालें असलें पाहिजे.. . राजवाडे ह्यांनीं जी जुनी *ज्ञानेश्वरी* छापली आहे ती त्यांनीं मुकुंदराजांनीं करवून घेतलेल्या एक सुंदर नकलेवरून तयार केली. तिला 'मुकुंदराजाची प्रत' असेंच, आपल्या *ज्ञानेश्वरी*च्या प्रस्तावनेंत नांव दिलें आहे व ती प्रत शके १२१२ पासून १२४० पर्यंतच्या काळांत केव्हांतरी लिहिलेली आहे असा राजवाड्यांचा त्या प्रतीबद्दल अभिप्राय आहे." (प्रस्तावना, पृ. ६९).

"वरील विवेचनावरून असा निष्कर्ष काढतां येतो कीं : (१) मुकुंदराज हे ज्ञानेश्वरांचे पूर्वी कांहीं वर्षे व नंतरही कांहीं वर्षे हयात असावे. (२) ह्या उभयतांच्या आयुष्यांत असा एक कालखंड संभवतो कीं, ज्यावेळीं दोघेही स्वतंत्रपणें काव्यरचना करीत होते. (३) मुकुंदराजांच्या वाचनांत, ज्ञानेश्वरांची सर्व कविता आली होती. ज्ञानेश्वरांच्या कांहीं कल्पना उचलण्यांत त्यांस हरकत वाटली नाहीं व जेथें मतभिन्नता आढळली तेथें तिचा निरास करण्यासही त्यांना संकोच वाटला नाहीं. ज्ञानेश्वरांच्या रचनेविषयीं त्यांचे मनांत आदरबुद्धि असावी, व म्हणूनच त्यांनीं *ज्ञानेश्वरी*ची सर्वोत्तम अशी नक्कल करून ठेवली असावी.

"राजवाडे ह्यांना जी *ज्ञानेश्वरी*ची मुकुंदराजांनीं करविलेली, सुंदर प्रत (बीड पाटांगण येथें) मिळाली, म्हणून वर एके ठिकाणीं सांगितलें आहे त्या प्रतींत ग्रंथाच्या शेवटच्या ९२ ओवीच्या खालीं एक संस्कृत श्लोक आहे तो असा : 'श्री सद्गुरु मुकुंदेन दत्ता ज्ञानेश्वरी शुभा । विद्याधराय शिष्याय स्वीये स्वत्वं न शोभते ॥' ह्या श्लोकावरून, राजवाडे असें निगमन काढतात कीं : 'मुकुंदराजांनीं तयार करविलेली सुंदर प्रत त्यांनीं विद्याधर नामक शिष्याला दिली. श्लोकांत आलेला 'मुकुंद' मुकुंदराज ज्यास म्हणतात तोच होय. दुसरा कोणी मुकुंद शक १२१२ ते १२४० पर्यंत हयात नव्हता.' (*ज्ञानेश्वरी*ची प्रस्तावना, पृ. ६८). शके १२१२ त झालेली *ज्ञानेश्वरी*, मुकुंदराज आपल्या शिष्याला जर देतात, तर ते शके ११११ त होते हें म्हणणें अगदींच विसंगत होतें, हें स्पष्ट आहे." (*विवेकसिंधु*, प्रस्तावना, भा. १, पृ. २७–२८). गोगटे ह्यांच्याप्रमाणेच अनेक विद्वानांचेही ह्या प्रकरणी असेच मत होते. पण त्यानंतर नवीन पिढीतील काही संशोधकांकडून अधिक संशोधन घडून जी माहिती प्रकाशात आली ती लक्षात घेता राजवाडे काय किंवा गोगटे ह्यांच्यासारखे संशोधक काय, ह्यांनी जे काही अंदाज बांधले ती निव्वळ तर्कविलसिते होती, असेच आज म्हणणे प्राप्त झाले आहे. राजवाडे ह्यांनी 'श्री सद्गुरु मुकुंदेन दत्ता ज्ञानेश्वरी शुभा' ह्या श्लोकाचा आधार घेऊन जो कल्पनेचा मनोरा उभा केला, तो किती कच्चा होता हे स्पष्ट झाले आहे. ह्याचे प्रत्यक्ष अप्रत्यक्ष श्रेय कानोले, ना. ब. जोशी व म. रा. जोशी ह्या तीन संशोधकांना आहे. "सद्गुरु मुकुंदाचा शोध घेण्याचा प्रयत्न नांदेडचे सुप्रसिद्ध संशोधक कानोले ह्यांनी केला. *योगमार्तंड* नावाचा चौदाव्या शतकातील ग्रंथ कानोल्यांना मिळाला. ह्याचा कर्ता मुकुंदराज ऊर्फ कविदास आहे. त्याच्या गुरूचे नाव त्र्यंबकनाथ आहे. कानोल्यांच्या मते ('मुकुंदराज व त्यांचा योगमार्तंड', भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४) ह्या ग्रंथकाराचा समय शके १३५० दरम्यान असून राजवाडे संशोधित *ज्ञानेश्वरी*चा संग्राहक हाच मुकुंदराज असावा. कानोल्यांनी सद्गुरु मुकुंद म्हणजे हा मुकुंदराज असावा अशी शक्यता बोलून दाखविली. कानोले ह्यांचे मत स्वीकारण्यात फार मोठी अडचण राजवाडे प्रतीवरील समाप्तिमुद्रेची आहे. 'साम्राज्य लक्ष्मीस्वरूपीश्वरा गुरुकृपालु नारायण पातु माम्' अशी समाप्तिमुद्रा आहे. ह्यात नारायण गुरूचा स्पष्ट उल्लेख आहे. *योगमार्तंड*कर्त्या मुकुंदराजाचे गुरु त्र्यंबकनाथ आहेत हे कानोल्यांनी दाखवून दिले आहे. . .

"कानोल्यांनंतर ह्या विषयावर महत्त्वपूर्ण विवेचन विजापूरच्या ना. ब. जोश्यांनी केले. त्यांनी राजवाडे प्रतीवरील सर्व उल्लेख तपासून व त्यांवर अभ्यास करून महत्त्वाचे निष्कर्ष मांडले. त्यांच्या मते (*संशोधन-मंजिरी*, पृ. १०) गंगाधर कोकीळ नावाचे योगनिष्ठ सत्पुरुष नृसिंह क्षेत्र (सायखेड) येथे होते. त्यांच्या मुकुंदराज नामक शिष्याने शके १६६७ (इ. स. १७४५) मध्ये गोदावरीत समाधी घेतली. हाच मुकुंदराज, सद्गुरु मुकुंद म्हणून राजवाडे प्रतीवर निर्दिष्ट झालेला आहे. परंतु सायखेडच्या मुकुंदाचा शिष्य नरहरी नावाचा होता. त्याने मुकुंदाचे चरित्र लिहिले आहे. त्यात *ज्ञानेश्वरी*चा नामनिर्देशही नाही. विद्याधर नावाचा शिष्य मुकुंदाला होता हेही स्पष्ट नाही.

"वास्तविक सद्गुरु मुकुंदाचा शोध घेण्यापूर्वी त्याच्या विद्याधर नामक शिष्याचा स्थलकालनिर्णय करणे आवश्यक आहे. राजवाड्यांना पाटांगण देवस्थानातून *ज्ञानेश्वरी*ची प्रत देणाऱ्या मथुरानाथ गोसावी यांच्या पूर्वपरंपरेत विद्याधर नाव आढळते. एवढेच नव्हे तर विद्याधराचे नातू मथुरादास गोसावी आहेत. विद्याधर व मथुरानाथ जनीजनार्दनांचे वंशज आहेत. . जनीजनार्दन वंशात विद्याधर नावाचा सत्पुरुष आढळतो. राजवाडे प्रत बीड पाटांगण देवस्थानात जनीजनार्दनवंशज मथुरानाथ गोसावींजवळ होती. बीड पाटांगण देवस्थानात मुकुंद नावाचे सत्पुरुष झाले असावेत असे नुकत्याच उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून दिसते. अकोल्याचे प्राध्यापक वि. वा. कुलकर्णींचा 'बीड पाटांगणचे मुकुंद' नावाचा महत्त्वपूर्ण लेख (*विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक*, १९७२, पृ. १७९) प्रसिद्ध झाला आहे. त्यात त्यांनी जनार्दन वंशावर एक षट्क दिले आहे. . .त्यात मुकुंदगुरूंना वंदन केले आहे. मुकुंदगुरूंच्या स्तवनपर पाच श्लोक बीड पाटांगणात म्हणण्यात येतात. . .त्या श्लोकांवरून सद्गुरु मुकुंदांना वंदन करणारे गोविंद ठरतात. गोविंद हे विद्याधराचे वडील आहेत हे वंशवृक्षावरून स्पष्ट होते. गोविंद विद्याधर पितापुत्र मुकुंदांच्या शिष्यमंडळीमधील होते असे यावरून सिद्ध होते. गोविंद विद्याधराचा समय शके १६५०–१७०० दरम्यानचा आहे. विद्याधरांना ज्या मुकुंदांनी *ज्ञानेश्वरी* दिली त्या मुकुंदांचा उल्लेख पाटांगण देवस्थानात येतो." (म. रा. जोशी : *ज्ञानेश्वरी संशोधन*, पृ. २८–३२).

वरील साधार व विश्वसनीय हकीकतीवरून राजवाडे, गोगटे व त्यांच्याशी सहमत असलेली मंडळी, वरील श्लोकाच्या आधारे मुकुंदराज हे ज्ञानेश्वरसमकालीन असावेत अशी जी कल्पना व्यक्त करीत असत ती भ्रांत होती, हे स्पष्टच होते.

मुकुंदराजाच्या काळाबद्दल जसे बराच काळपर्यंत विद्वान मंडळीत मतभेद उत्पन्न होऊन वादविवाद चालले, तसेच त्यांनी जेथे तपस्या केली व आपल्या *विवेकसिंधु* ग्रंथाचे लेखन केले त्या स्थळासंबंधीचे वादही कित्येक वर्षांपासून होत राहिले आहेत. ह्या वादांचे मूळ *विवेकसिंधू*च्या शेवटच्या अठराव्या प्रकरणातील, 'वैन्यगंगेचिये तीरीं । मनोहर अंबानगरी । तेथ प्रकटले श्रीहरी । जगदीश्वरू ॥ १८.३८ ॥' ह्या ओवीत आहे. एक पक्ष प्रतिपादितो की, मुकुंदराजांनी *विवेकसिंधु* भंडाऱ्याची सीमारेषा असलेल्या वैनगंगेच्या तीरावरील आंभोरे येथे लिहिला. त्यांची तपस्याभूमीही तीच. हे स्थळ झाडीमंडळ ह्या नावाने त्या काळी जो प्रदेश (नागपूर, चंद्रपूर, भंडारा व बालाघाट म्हणजे हल्लीच्या नागपूरपासून तो गोंदिया डोंगरगड स्टेशनपर्यंतच्या मुलुखास झाडी असे नाव आहे.) ओळखला जात होता तो प्रदेशच प्रामुख्याने मुकुंदराजांची तपस्याभूमी व कर्मभूमी. दुसरा पक्ष याउलट प्रतिपादतो की, अंबानगरी म्हणजे वैनगंगेच्या तीरावरील (नागपूर प्रांतातील) आंभोरे नसून बाणगंगेच्या तीरावरील (मराठवाड्यातील) आंबेजोगाई होय. पहिल्या पक्षात राजवाडे, अणे, ढोक, बोबडे, डोळके, कृ. पां. कुळकर्णी वगैरे विद्वान आहेत, तर दुसऱ्या पक्षात कानोले, डॉ. तुळपुळे वगैरे आहेत. आंबेजोगाईची मुकुंदराजांशी घालण्यात आलेली सांगड बहुधा पंधराव्या शतकापासून घालण्यात येऊ लागली असे वाटते. प्रा. कृ. पां. कुळकर्णी लिहितात :

"अंबेजोगाई पक्ष चक्रधरांच्या नंतर व कृष्णदयार्णवांच्या (शके १५९६–१६६२) अगोदर, तसेंच दासविश्रामधामातील आख्यायिकेवरून. . .रामदासांच्याही (शके १५७८) अगोदर उद्भवला असल्याचें दिसतें. मुकुंदराजा-जैतपाळ ह्या दोघांचा अंबेजोगाई स्थळाशीं संबंध असल्याचें कृष्णदयार्णवांच्या आरतींत व आत्मारामाच्या दासविश्रामधामांतील आख्यायिकेंत अभिप्रेत आहे. परंतु येथें एक गोष्ट खटकते आणि ती ही कीं, ह्या दोघांनीं अंबेजोगाईमधील मुकुंदराजाच्या समाधीचा उल्लेख केला नाहीं. कृष्णदयार्णवांनीं लिहिलेल्या *हरिवरदा* ग्रंथाच्या

आरंभींच्या गुरुनमनांत मुकुंदराजांचा निर्देश नाहीं. इतकें कशाला ? दासोपंत हे खुद्द अंबेजोगाईचे ना? परंतु त्यांच्या प्रचंड ग्रंथसंभारांत मुकुंदराज किंवा जयत्पाल किंवा *विवेकसिंधु* ह्यांचा कशाचाही उल्लेख नाही. . .असा ज्याअर्थी स्पष्ट निर्देशच नाहीं त्याअर्थी मुकुंदराज व अंबेजोगाई ह्यांची सांगड त्यांच्यानंतर घातली गेली असावी."

विश्वनाथ काशिनाथ राजवाडे ह्यांचा 'मुकुंदराजाचा एक संस्कृत ग्रंथ' हा टिप्पणवजा लेख 'भारत इतिहास मंडळ इतिवृत्त, शके १८३५' मध्ये (इ. स. १९१३, पृ. १११–११५) प्रसिद्ध होईपर्यंत, मुकुंदराजांचे तपस्यास्थळ व समाधिस्थळ मराठवाड्यातील जोगाईचे अंबे (मोमिनाबाद) हेच होय असे मानले जात असे. ही समजूत चुकीची असल्याचे राजवाड्यांनी आपल्या ह्या लेखाच्या शेवटी पुढील शब्दांत स्पष्टपणे पहिल्यानेच विद्वानांच्या निदर्शनास आणून दिले. ते लिहितात : "'वैनगंगेच्या तिरीं। अंबा नाम नगरी॥' असा चरण *विवेकसिंधू*त आहे. ही अंबानगरी म्हणजे भंडाऱ्याजवळील वैनगंगेच्या तीरचें अंभोरें हें तीर्थ आहे. येथें हरिनाथाची समाधि आहे. ह्या ठिकाणीं सध्यां वार्षिक-उत्सव मोठ्या थाटानें होत असतो. रामनाथाची (रघुनाथाची) समाधि छिंदवाडांत आहे व खुद्द मुकुंदनाथाची समाधि बैतुलजवळ खेडले ह्या गांवीं आहे. अर्थात् मुकुंदराज हा बैतुल, छिंदवाडा, अंभोरें ह्या वैनगंगेच्या भोंवतालील प्रांतांतील आहे. मुकुंदराजाच्या समाधीचा संबंध जोगाईच्या अंब्याशीं बिलकुल नाहीं. अंबा ह्या नांवावरून कोणी जोगेश्वरीचें अंबें (ऊर्फ मोमिनाबाद) म्हणून जें एकदां प्रचलित केलें तें तसेंच प्रचलित झालें. परंतु त्यांत कांहीं अर्थ नाहीं. आंबें म्हणजे अंभोरें, भंडाऱ्याजवळील नागपूर प्रांतांतील समजावयाचें आहे. ह्या प्रांतांत मुकुंदराजांची शिष्यपरंपरा अद्यापहि आहे." ह्यानंतर सन १९१६ मध्ये राजवाडे ह्यांची नागपूरच्या बाजूस संशोधनार्थ फेरी झाली तिचे वृत्त धुळे येथे निघणाऱ्या *इतिहास आणि ऐतिहासिक* मासिकाच्या पौष शु. १ शके १८३८ च्या अंकात (मलपृष्ठ क्र. ३ वर) दिले आहे. त्यात 'त्या प्रांतांत खेडला येथें मुकुंदराजशिष्य जयत्पाल राजा ह्याची गढी आहे व नागपूरच्या उत्तरेस मुकुंदराजांची समाधी आहे. ह्यावरून मोंगलाईत जोगाईच्या अंब्यास मुकुंदराज होते व तेथेंच ह्यांची समाधी आहे, वगैरे कथा अविश्वसनीय ठरूं पाहतात' अशी नोंद केली आहे. *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे व *मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास : मानभाव अखेर* कर्ते बा. अ. भिडे ह्यांनी आपापल्या ग्रंथांत राजवाडे ह्यांच्या मताचा पुरस्कार केला आहे व 'अंभोर' हीच अंबानगरी आणि बैतुलाजवळचे खेडले गाव हेच मुकुंदराजांचे समाधिस्थळ असे प्रतिपादिले आहे. 'ह्यावरून मुकुंदराज हे नागपूर प्रांताचे रहिवासी होते असा निःसंशय निकाल लागतो', असे त्यांनी म्हटले आहे. भिडे ह्यांनी राजवाडे व भावे ह्यांच्याशी किंचित पुढे जाऊन 'जोगाईचें आंबें येथें जी मुकुंदराजाची समाधि दाखविण्यांत येते, ती कोणातरी दुसऱ्या मुकुंदराजाची असावी' (पृ. ८१) असे आपले मत व्यक्त केले. ते आज खरेही ठरू पाहात आहे. अंबेजोगाईत गावापासून दोन मैल दूर अंतरावरील अश्वदरी येथील एका गुहेत असलेली व आद्य मुकुंदराजाची म्हणून मानलेली समाधी ही त्यांची नसून ती रामचंद्र केशव लंब नावाच्या सत्पुरुषाचा अंबेजोगाईतील मुकुंद नावाचा एक शिष्य शके १५३०–१६०० (इ. स. १६०८–१६७८) ह्या काळात होऊन गेला त्याची आहे. ह्या समाधीच्या किंचित खालच्या अंगास ज्ञानेश्वराच्या पादुका आहेत त्याही आद्य ज्ञानेश्वरांच्या नसून ह्या मुकुंदाचा ज्ञानेश्वर नावाचा शिष्य होता त्याच्या आहेत (पहा : म. रा. जोशी लिखित 'श्रीमुकुंदमुनी व ज्ञानदेव'; *युगवाणी*, जुलै–ऑग. १९७१; 'श्रीमुकुंदराज व अंबेजोगाई', *युगवाणी*, एप्रि. १९७१).

आंबेजोगाई (अंबाजोगाई) येथील समाधी आद्य मुकुंदराजांची नव्हे, तर त्यांच्यानंतर सुमारे चारशे वर्षांनी त्याच परिसरात वावरणाऱ्या अन्य मुकुंदाची आहे, हे स्पष्ट झाल्यावर ओघानेच पुढील गोष्टी मान्य कराव्या लागतात : मुकुंदराजांचे परमगुरू हरिनाथ ह्यांचे जन्मस्थळ व समाधिस्थळ अंबानगरी हेच अंभोरे; गुरू रघुनाथ ह्यांचे समाधिस्थळ अंभोरेच.

मुकुंदराजांचा जन्म, त्यांची समाधी, त्यांची साधना, त्यांचे वास्तव्यस्थान, त्यांच्या *विवेकसिंधु* ग्रंथाचा लेखनकाळ ह्यांच्यासंबंधीचा प्रश्न आजवर जितका गुंतागुंतीचा बनला होता तितकाच, त्यांनी ज्या जैतपाळ राजाला उपदेश करण्याच्या निमित्ताने *विवेकसिंधू*ची रचना केली तो कोण व कोठील हा प्रश्नही गुंतागुंतीचा बनून राहिला होता. *विवेकसिंधू*च्या सातव्या प्रकरणाच्या शेवटी मुकुंदराजांनी "नृसिंहाचा बल्लाळु। तेयाचा कुमरु जैतपाळु। तेणें करविला हा रोळु। ग्रंथरचनेचा ॥ १५५ ॥ भगीरथाचेनी दैवयोगें। विस्व सुइनातलें गंगें। तैसें जैतपाळाचेनि प्रसंगें। जग सुखिये होये ॥ १५६ ॥ मियां आपुली वाणी। पवित्र केली येहीं वचनीं। प्रीति पावो पीनाकपाणी। म्हणे मुकुंदराजु ॥ १५७ ॥" असे ह्या ग्रंथाच्या खटाटोपाचे निमित्त स्पष्ट केले आहे.

पूर्वोल्लिखित प्रश्नांवर मत देणारे असे दोन पक्ष निर्माण झाले, तसेच जैतपाळ हा कोण, कोठला, त्याला कोणत्या स्थळी उपदेश करण्यात आला ह्याही प्रश्नावर दोन पक्ष निर्माण झाले. एका पक्षाचे म्हणणे हा उपदेश अंबेजोगाईत केला, तर दुसऱ्या पक्षाचे म्हणणे तो झाडीमंडळात मोडणाऱ्या खेडल्याजवळील भोपाळ (भोपाळी) नगरीत केला. पहिल्या पक्षाचा मुख्य आधार *योगेश्वरीमाहात्म्य* ही ३० अध्यायांची व सुमारे २७०० श्लोकांची पोथी आहे. ह्या पोथीतील बाविसाव्या अध्यायात मुकुंदराज व जैतपाळ ह्यांसंबंधीची एक कथा आलेली आहे. कथेचा सारांश असा : जिनपाल ऊर्फ जैत्रपाल नावाचा एक दुराचारी, द्रव्यलोभी व भ्रष्ट राजा एकदा अंबाक्षेत्री आला. सिद्धीसाठी त्याने एक होम करविला. त्या होमातून एक तेजस्वी बालक प्रकट झाले व त्याने सिद्धी मिळविण्याचा मार्ग यज्ञ नसून साधुसेवा हा असल्याचे राजाला सांगितले. ह्या यज्ञासभोवती जैतपाळाने घोडे उभे केले होते, म्हणून ती जागा 'अश्वदरी' ह्या नावाने ओळखली जाते. आपल्या हातून साधुसेवा व्हावी म्हणून जैतपाळाने अन्नसत्र सुरू केले. अनेक साधू आले पण आपल्याकडे सिद्धी नसल्याचे त्यांनी सांगितले. राजाने चिडून साधूंचा छळ आरंभिला. साधू योगेश्वरीस शरण आले. देवीने मुकुंदराजांना साधूंच्या रक्षणार्थ अंबाक्षेत्री पाठविले. साधूंऐवजी आपण सिद्धी देतो असे मुकुंदराजांनी राजाला सांगितले. जैत्रपाळाने मुकुंदराजांची परीक्षा घेऊन आपली खात्री पटविली. राजा शरण आला. अशा वेळी जैत्रपाळाला मुकुंदराजांनी जो उपदेश केला त्यातूनच *विवेकसिंधु* जन्मला.

तथापि वरील कथा सांगणाऱ्या *योगेश्वरीमाहात्म्या*चा रचनाकाल निश्चित नाही. प्रा. म. रा. जोशी हे प्रतिपादतात त्याप्रमाणे अंबेजोगाई येथील मुकुंदराजांची समाधी रामचंद्र लंब ह्यांचे शिष्य मुकुंद (श. १५३०–१६००) ह्यांची आहे हे मान्य केल्यास उपलब्ध *योगेश्वरीमाहात्म्य* इ. स. च्या सतराव्या शतकात रचले गेले असावे असे म्हणावे लागते. मग अंबेजोगाई पक्षाने आद्य मुकुंदराज व त्यांचा *विवेकसिंधु* ग्रंथ ह्याविषयीचा रचलेला इतिहास एक काल्पनिक कथा ठरतो.

डॉ. यशवंत खुशाल देशपांडे ह्यांनी सन १९४९ मध्ये *मध्यप्रांत संशोधन मंडळ, निवडक निबंध, खंड १* ह्यातील एका लेखात (पृ. ७८) मुकुंदराज ज्या नृसिंह, बल्लाळ व जैतपाळ ह्या राजपुरुषांचा उल्लेख *विवेकसिंधु* ग्रंथात करतात ते, त्यांच्या गुरुपरंपरेतील मठ नागपूर प्रांती अधिक असल्याने, ह्या भागातील असण्याचा संभव अधिक आहे असा आपला तर्क व्यक्त केला होता. अलीकडेच प्रा. वाबगांवकर ह्यांनी खेडला येथील किल्ल्याच्या तटातील जो एक शिलालेख तपासून प्रसिद्ध केला आहे ('संशोधन व चिंतन'; १९७२; पृ. १–१०) तो पाहता डॉ. य. खु. देशपांडे ह्यांचा तर्क बरोबर होता असे म्हणावे लागेल.

प्रा. वाबगांवकर यांचे म्हणणे थोडक्यात असे आहे :

जैत्रपालाने साधूकडून खणवून घेतलेला तलाव, मुकुंदराजाची समाधी व त्याच्या घोड्याची समाधी आजही तेथे दाखवितात. हा शिलालेख लंबचतुष्कोण काळ्या पाषाणावर कोरलेला आहे. पाषाण ठिसूळ असल्याने लेख कोरतानाच अक्षरे स्पष्ट कोरता आलेली नाहीत. ह्या लेखात एकूण नऊ ओळी कोरल्या आहेत. पैकी पहिल्या ओळीतील खेरुल शब्द दिसतो. दुसऱ्या ओळीतील अक्षरे इतर सर्व ओळींतील अक्षरांहून बरीच मोठी असून त्यांच्या शिरावर तळाशी एक एक अलग रेषा आहे व त्यांची धाटणीही भिन्न आहे. बाकीच्या सर्व ओळींतील अक्षरे लहान आहेत, त्या प्रत्येकावर स्वतंत्र शिरोरेषा आहे व तळाशी रेषा नाही. त्यांची लेखनतऱ्हाही भिन्न दिसते. ह्यावरून दुसरी ओळ व तदितर ओळी हे प्रस्तुत लेखाचे दोन भाग भिन्नभिन्न काळी कोरलेले दिसतात. दुसरी ओळ कोरविणारा 'जिणानुसिद्धि' ह्या पदावरून जैनधर्मी असून 'लाड संप्रदायो' ह्या पदावरून तो लाड-संप्रदायी असावा. तो लाड देशातून आलेला असेल अथवा स्थानिक असून त्याच्या कुटुंबाने जैन धर्म स्वीकारला असण्याचा संभव आहे. ह्या ओळीत शक १०७९ आहे. ह्यानंतर नवव्या ओळीत शक १०९४ व त्या वर्षाचा संवत १२२८ दोन्ही आहेत. या दोहोंचा मेळ जमतो. ह्यावरून हा नंतरचा लेख (ओळ ३ ते ९ व ओळ १) पहिल्या लेखानंतर १५ वर्षांनी खोदलेला दिसतो. तिसऱ्या व चौथ्या ओळींतील फार थोडी अक्षरे लागतात. पाचव्या ओळीत जयतपाळ व नंतर राजश्री नरसौदेव (नृसिंह) आणि त्याचा पुत्र बल्हौदेव (बल्लाळ) ह्यांची नावे येतात. सातव्या ओळीचा भावार्थ 'खेटकपुर (खेरला) ह्याचे उत्तरेस देवालीपूरचा राजा वंकलनिर्मित वंकादित्य-मंदिराची दुरुस्ती करून वेरूर येथे प्रतिष्ठापना व त्यांनी योजिलेल्या यूपासहित' – असे राजाने निर्माण केले असा दिसतो. हा वंकल राजा म्हणजे एलिचपूरचा प्रसिद्ध जैन राजा श्रीपाळ ऊर्फ ईल ह्याच्यावर चालून येणारा महमद गझनवीचा भाचा जो अबदुर रहमान त्याला ईलाविरुद्ध मदत करणारा प्रसिद्ध 'वकद' राजा असण्याचा संभव आहे. हा ईल खेरल्याच्या किल्ल्यात राहात असे. खेडला, खेरला हे नावही त्याच्यावरूनच ह्या स्थानाला मिळाले असावे. ह्या ईल राजाच्या वंशात जैत्रपाल झाला.

ह्या शिलालेखाप्रमाणे पहिला लेख १०७९, दुसरा शके १०९४ व *विवेकसिंधू*च्या समाप्तीचा शक १११० म्हणजे पहिल्या लेखानंतर पंधरा वर्षांनी व दुसऱ्या लेखापासून *विवेकसिंधू*ची समाप्ती सोळा वर्षांनी असा एकूण एकतीस वर्षांचा काळ येतो. त्यात *विवेकसिंधू*च्या समाप्तीचे वेळी सारंगधर राज्य करीत होता व दुसरा लेख कोरला तेव्हा जयतपाळ राज्य करीत होता. हा शिलालेख जयतपाळाचाच असे निश्चित असल्याने तो इतकी वर्षे खेरला येथेच असल्यामुळे जयतपाळाच्या जीवनातील महत्त्वाच्या घटना खेरला येथेच घडल्या ह्याला निश्चिती येते. खेरला येथेच किल्ल्याच्या तटाच्या भिंतीत तो लेख असल्याने व त्यात जयतपाळ, त्याचा पिता बल्लाळ व पितामह नृसिंह यांचा उल्लेख असल्याने व त्यातील निर्दिष्ट शकावरून *विवेकसिंधु* लिहिण्याचा जो मान्य शक १११० त्याच्या फक्त सोळा वर्षे आधीचा हा लेख असल्याने खेरला येथे जयतपाळ राज्य करीत होता व तेथेच त्याला मुकुंदराजांनी ब्रह्मसाक्षात्कार घडविला ह्या अंभोरा खेडला पक्षाला समकालीन व तोही शिलालेखीय पुरावा मिळून जास्त बळकटी येते (म. शं. वाबगांवकर, 'संशोधन व चिंतन', नागपूर, १९७२; पृ. ३ ते ८). वरील पुराव्याला बाधक असा अन्य विश्वसनीय पुरावा पुढे येईपर्यंत वरील विवेचन मान्य केले पाहिजे.

जैत्रपाळ व मुकुंदराज ह्यांच्या संबंधात वरील विवेचनास साहाय्यक ठरणारा असा काही पुरावा र. मा. भुसारी ह्यांनी अलीकडेच 'मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर' ह्या त्यांच्या लेखातून (*ज्ञानेश्वर त्रैमा.*, ऑग. १९७५, पृ. २८–२९) सादर केला आहे. ह्याकरिता महानुभावपंथीय मेघचंद्रकृत *यक्षदेव-वृद्धान्वय* प्रकरणाचा ते आधार घेतात. प्रस्तुत ग्रंथावरून असे समजते की, जैत्रपाल हा राजोरा रोहिणखेड येथील ब्राह्मण संस्थानिक असून त्याचा बाप नृसिंह बल्लाळ हा होता. ह्या नरसिंह बल्लाळाचा भाऊ मुकुंदराज हा असून त्याने आपला पुतण्या जैत्रपाळ ह्याच्यासाठी *विवेकसिंधु* ग्रंथाची रचना केली हे सिद्ध होते. ज्या सारंगधराचा मुकुंदराज राजा म्हणून आपल्या ग्रंथात निर्देश करतात, त्याचा शोध आंध्र प्रांताच्या इतिहासात 'महाराष्ट्र सामंत सारंगु' म्हणून भुसारी ह्यांना लागला आहे. त्याचा बाप महादेवच होता. नेल्लोर येथील शिलालेखात, वरंगळचा आंध्र राजा काकतीय गणपतिदेव (इ. स. ११९९) ह्याचा मांडलिक जो मनुमसिद्धी त्याचा सारंगधर हा 'महाराष्ट्र सामंत' होता, अशी माहिती सापडते. त्यावरून हा सारंगधर इ. स. १२१० ते १२४७ पर्यंत राज्य करीत होता असेही समजते. *यक्षदेव-वृद्धान्वयात* वर्णिलेला सारंगधर तो हाच असावा. *विवेकसिंधू*त वर्णिलेल्या सर्व व्यक्तींचा शोध अशा तऱ्हेने लागल्यानंतर मुकुंदराजांनी श. १११० असा जो ग्रंथाचा काल दिला आहे तो योग्य वाटतो, असे आपले मत भुसारी ह्यांनी व्यक्त केले आहे ते विचारार्ह आहे.

मुकुंदराजांच्या संदर्भात ज्या काही वादांचे व परस्परभिन्न मतांचे आतापर्यंत दिग्दर्शन केले, त्यांच्यात आणखी एका वादाची व भिन्न मताची अलीकडे भर पडली आहे. मुकुंदराजांचे परमगुरू जे हरिनाथ ते महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर (पूर्वाश्रमीचे हरिपाल) हे तर नसतील? अशी एक शंका काही वर्षांपासून व्यक्त केली जाऊ लागली आहे, व तिच्या उद्भवाची कारणेही जुन्या ग्रंथांतील काही काही उल्लेख आधारादाखल देऊन चर्चेकरिता पुढे मांडण्यात येऊ लागली आहेत. डॉ. यशवंत खुशाल देशपांडे ह्यांनी *भाइसंमं. त्रैमासिकात* (वर्ष १२, अं. २) 'मेघचंदकृत यक्षदेव-वृद्धान्वय' ह्या शीर्षकाखाली एक लेख प्रसिद्ध केला. महानुभाव पंथाचे संस्थापक श्रीचक्रधर ह्यांच्या तेरा प्रमुख शिष्यांच्या ज्या तेरा परंपरा निर्माण झाल्या त्यांना 'आम्नाय' अशी संज्ञा आहे. अशा आम्नायांपैकी यक्षदेव हा एक आम्नाय. ह्या प्रत्येक 'आम्नाया'चा ज्यात इतिहास वर्णिलेला असतो त्या पोथीला 'वृद्धान्वय' म्हणतात. यक्षदेव आम्नाय ह्याच्या 'वृद्धान्वया'च्या मेघचंद कवीने लिहिलेल्या (श. १६००) डॉ. देशपांडे ह्यांना रीतपूर (वऱ्हाड) येथे मिळालेल्या पोथीतील काही ओव्यांवरून ते लिहितात :

"राजूर रोहीनखेड – जें मोर्शी तालुक्यांत आहे – येथील राजघराण्यांतील मुकुंदराज होते कसा कवीचा आशय दिसतो. मुकुंदराज हा जैतपाळाचा चुलता असून ह्यानें, जैतपाळानें राज्य सोडल्यावर आपला धाकटा भाऊ महादेव याचा पुत्र सारंगु (सारंगधर) ह्याला आपल्या मांडीवर घेऊन त्याला आपलें राज्य दिलें. मुकुंदराजाच्या गुरूचे गुरूची समाधी वैनगंगेचे तीरीं अंबावती (अंबजय) येथें जवळच आहे. नृसिंह बल्लाळाचा पुत्र जैतपाळ ह्याच्याकरितां *विवेकसिंधु* ग्रंथ लिहिला व तो ग्रंथ संपूर्ण झाला तेव्हां राजा सारंगधरु राज्य करीत होता हें *विवेकसिंधु* ग्रंथावरूनच दिसून येतें. खास रीतपूर येथे ब्रह्मज्ञानी नांवाच्या कुटुंबाच्या हस्तलिखित ग्रंथसंग्रहांत एक अत्यंत जीर्ण व प्राचीन अशी *विवेकसिंधू*ची प्रत सांपडली. तेव्हा मेघचंद ह्यानें लिहिलेलें अगदींच असत्य असेल असें म्हणतां येत नाहीं. . .

"मुकुंदमुनि, निवृत्ति आणि ज्ञानेश्वर ही मंडळी महानुभावीय यक्षदेवांच्या वृद्धाचारांत कशी आली ह्याचें आश्चर्य वाटेल. पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. कारण हरिनाथानें रामदेवास वेदान्त सांगून बोध केला व नागेन्द्राला सिद्धांत सांगून बोध केला. रामदेवापासून मुकुंदाची वेदान्तविषयक परंपरा चालत आली आणि नागेन्द्रापासून सिद्धांतविषयक म्हणजे जी पुढें महानुभाव पंथाच्या रूपानें प्रसिद्ध झाली ती परंपरा निघाली. ह्या नागेन्द्राच्या परंपरेंतच श्रीचक्रधराचा शिष्य यक्षदेव (हें

विधान बरोबर नाहीं. यक्षदेव हा चक्रधरांचा शिष्य नसून नागेन्द्रांचा होता.) हा होता आणि या यक्षदेवापासूनच १३ आम्नायांपैकी एक यक्षदेव आम्नाय निघाला आणि ह्या आम्नायाचाच वृद्धाचार कवि मेघचंद ह्यानें वर्णिला आहे.

"मेघचंदानें वर्णिलेला मुकुंदराजांचा संबंध महानुभाव लिखाणांत आणखी दोन ठिकाणीं आला आहे. यक्षदेव आम्नायाची एक आरती आहे. ती अशी : आरती आदिनाथा । माहाराजा अवधूता । दुजिया हरिनाथा । पर कैवल्य अनंता ॥ आरती० ॥ हिंडतां वैनतीरीं । अंबावतीं ए मुरारी । भेटला रामनाथा । दाना केलें मा वेदान्ता ॥ आरती० ॥ राघवें मुकुंदेंसी । तोची मार्गु निरोपीला । मुकुंदें जैतुपाळा । केला ज्ञानाचा सोहोळा ॥ आरती० ॥ मुकुंदापासोनिया । तेची निवृत्तीसी आले । निवृत्तें निरोपीले । ज्ञानोबासिया वहीले ॥ आरती० ॥...

"तसेंच भीष्माचार्यांचा भरड (हा त्याचा नसून कृष्णमुनि डिंभ याचा आहे. कृष्णमुनीचा काल अंदाजे इ. स. १४०३.) म्हणून एक गीत आहे." *ज्ञानसिंह* मासिकाच्या नोव्हें. १९२६ च्या अंकात महंत गोविंदराज दयाळराज ह्यांनी हे गीत प्रसिद्ध केले आहे. त्या गीताची सुरुवात अशी आहे :

कलयुगीं अंबापुरीं वेणुतिरीं । रामा भेट दिधली वो ॥
विवेकसिंधु ग्रंथ बोलिली । तेच अमुची माऊली वो ॥
नागा अंबिकेच्या भुवनीं । प्रगट झाली प्रत्येक स्थानीं ओ ॥ . . .

या भरडाखालीच महंत गोविंदराज ह्यांनी मुकुंदराज व चक्रधर ह्यांच्यातील संबंध दाखविला आहे. तसेच त्यांनी एका महानुभावीय ग्रंथातील 'वेदान्तमार्ग-सिद्धांतमार्ग-परंपराकथन' या मथळ्याखाली लिहिताना चक्रधर-हरिनाथ-ऐकात्म्य स्पष्टपणे उद्घोषिले आहे. महंत गोपीराज ह्यांच्या संग्रहातील *अन्वयसार* नामक ग्रंथात असे म्हटले आहे की, "आपण श्रीहरिनाथें महासिद्ध पुरुषें रघुनाथ शिष्य केला तो वडील. तदनंतरें सुरेन्द्रनाथ, भारतीनाथ, नागार्जुन एवमादि छप्पन शिष्य केले. त्यामाजी नागार्जुनभटासी आचार्यत्व देऊन महात्म मार्ग प्रकट केला." कृष्णमुनि डिंभकृत *ऋद्धिपूर माहात्म्य* ह्या ग्रंथात मुनिमार्गाच्या (महानुभाव पंथाच्या (कलियुगातील आचार्यांत 'हरिदेवा'चा समावेश आहे. मागे ज्या महंत गोविंदराज दयाळराज ह्यांचा उलेख केला आहे ते *ज्ञानसिंह* मासिकात (१.७) लिहितात :

". . .मुकुंदराजांचे परमगुरु भगवान श्रीचक्रधर असले पाहिजेत. तसें असल्याशिवाय महानुभाव लेखक व कवी त्यांना नमन वगैरे कधींच न करते. दुसरें असें कीं मुकुंदराजांविषयीं महानुभाव पंथांत जितकी माहिती सापडते, तितकी माहिती अन्य कोणत्याही समाजांत अगर इतरत्र सापडणे शक्य नाहीं. मुकुंदराजांचा महानुभाव समाजाशीं कांहींतरी आप्तसंबंध असल्याशिवाय वृद्धाचारांत, आम्नायांत त्यांचा नामनिर्देश करणें अथवा नमस्कारादि करणें केव्हांही शक्य नाहीं. महानुभाव पंथाच्या ग्रंथांत मुकुंदराज हा रामचंद्र (रामदेव/रघुनाथ) ह्या एकाच व्यक्तीचा शिष्य होता. रामचंद्र भगवान श्रीचक्रधरांचा (श्रीहरिनाथांचा) आद्य शिष्य होता. हरिनाथ हे आदिनाथ (श्री दत्तात्रेय) ह्यांचे शिष्य होते, असे *लीळाचरित्रा*वरून, *वृद्धाचारा*वरून अगर *अन्वयसारा*वरून स्पष्ट होतें."

महानुभावीय ग्रंथांत मुकुंदराजांचा श्रीचक्रधरशिष्य ह्यांच्याशी असलेल्या आप्तसंबंधाविषयी जे उल्लेख आढळतात ते लक्षात घेऊन मुकुंदराजांविषयी विशेष संशोधन व चिंतन ज्यांनी केले आहे ते रा. चिं. ढेरे *इंद्रायणी* मासिकात (वर्ष पहिले, जुलै १९६३, पृ. २१–४०) लिहितात :

"आतापर्यंतच्या सर्व आधारांचें ताटस्थ्यानें निरीक्षण केलें तर हरिनाथ म्हणजेच चक्रधर होय, हें कांहींसें विलक्षण वाटणारें आणि पारंपरिक समजुतीला धक्का देणारें सत्य डोकावूं लागतें, यांत संशय नाहीं. हें सत्य पत्करणें रूढ समजुतींना धाष्टर्याचें वाटतें, परंतु तें एकदां स्वीकारलें कीं, अनेक अज्ञात गोष्टी भराभर प्रकाशांत यायला लागतात आणि त्या सत्याच्या निखळपणाविषयींचें संशयजाल विरूं लागतें. हरिनाथ म्हणजेच चक्रधर, हें सत्य स्वीकारून आपण आनुषंगिक बाबींचा क्रमानें विचार करूं म्हणजे आपणांस त्या सत्याची प्रकाशदायी किमया प्रत्ययास येईल.

"(१) हरिनाथ हा नाथपंथी, तर चक्रधर हा महानुभाव पंथाचा संस्थापक हा पंथभेद प्रथमदर्शनींच नडल्यासारखा वाटतो. परंतु चक्रधरानें महानुभाव पंथाचें प्रवर्तन आपल्या उत्तरायुष्यांत (श. ११८०) केलें. त्यापूर्वी चक्रधराचें जीवन नाथपंथांत व्यतीत झालें होतें. त्याचे गुरु आणि परमगुरु हे दोघेही नाथ सिद्ध होते. खुद्द चक्रधराच्या व्यक्तिमत्त्वावर नाथ पंथाचा प्रभाव पडलेला होता आणि तो प्रभाव महानुभाव पंथाच्या प्रवर्तनानंतरहि त्याच्या वागण्या-बोलण्यावरून प्रकट होत असे. चक्रधराच्या चरित्रांतील या नाथपंथी पर्वाचा साधार उलगडा मीं माझ्या नाथ पंथाच्या इतिहासांत विस्तारपूर्वक केलेला आहे. चक्रधरचरित्रांतील ही वस्तुस्थिति ध्यानीं घेतली म्हणजे महानुभाव-पंथ-प्रवर्तनापूर्वीचा चक्रधर म्हणजेच नाथपंथी हरिनाथ होय, असें मानण्यास अडचण उरत नाहीं.

"(२) चक्रधराचें मूळ नांव हरिपाल असें होतें. नाथ पंथांत मूळ नांवाच्या आधारेंहि पंथीय नांवांची सिद्धि होत असे, हें महाराष्ट्रांतील नाथपंथीयांचीं चरित्रें पाहिलीं, म्हणजे ध्यानीं येईल. ज्ञानदेवांचें ज्ञाननाथ हें पंथीय नांव मूळ नांवावरूनच साधलेलें आहे. हरिपाल म्हणजे हरिनाथ आणि हरिपालाचा–चक्रधराचा महानुभाव पंथाच्या प्रवर्तनापूर्वीचा, म्हणजे नाथपंथांतील, शिष्य रामदेव म्हणजे रघुनाथ. मुकुंदराजांनीं *विवेकसिंधू*त आपले गुरु रघुनाथ यांचीं राम, रामचंद्र हीं नांवें वापरलेलीं आहेतच. खुद्द मुकुंदराजांचें मूळ नांव केवळ मुकुंद असावें. त्यांचें नाथ पंथांतील सांप्रदायिक नांव मुक्तिनाथ असें होतें, असें संस्कृत *विवेकसिंधू*च्या ('महाभाष्या'च्या) समाप्तिमुद्रेवरून दिसतें. 'मुक्तिनाथ' हें नांवहि मुकुंद या नांवावरूनच साधलेलें आहे. कारण मुकुंद या नांवाचें व्युत्पादन "मुक्तिं ददाति स मुकुंदः" असें केलें जातें. मुकुंदराज हें नांव महानुभावीय वळणाचें आहे. कारण, गोपीराज, हरिराज, गोविंदराज, दयाळराज हीं राजपदान्त नांवें महानुभावीय पंथांत विशेष प्रचलित आहेत. तसेंच मुकुंदराज हें नांव महानुभावीय परंपरेंत अनेक व्यक्तींचें असल्याचें दिसून येतें.

"(३) चक्रधर आणि रामदेव यांची प्रथम भेट वऱ्हाडांत अमरावती जिल्ह्यांतील अमरावती तालुक्यांत भुजंगाचें वडनेर या गांवाजवळ आंबजय या ठिकाणीं झाली. 'वैनगंगेतीरीं अंबावती पुरीं । भेटला मुरारी रामदेवा ॥' हा यक्षदेव-वृद्धान्वयांतील भेटीचा उल्लेख पाहतां आंबजय म्हणजे अंबावती, हें समीकरण जुळतें. हरिपाल–हरिनाथ, रामदेव–रघुनाथ, आंबजय–अंबावती हीं नामसाम्यें हातीं येणें हा केवळ योगायोग नव्हे. एक हरवलेलें सत्य हातीं आल्याचा तो पुरावा आहे.

"(४) 'भेटला मुरारी रामदेवा' या चरणांतील 'मुरारी' हें नांव हरिनाथांचें पर्यायनाम म्हणून आलेलें आहे. मुरारि म्हणजे कृष्ण. चक्रधर हे महानुभावांच्या पंचकृष्णांतील कलियुगाचे एक अवतारी पुरुष होत. हरिनाथ हे विष्णूचा अवतार आहेत, असें मुकुंदराजांनीं *विवेकसिंधू*त सांगितलेंच आहे. महानुभावांच्या तत्त्वज्ञानानुसार विष्णु ही देवता असून, कृष्णाचा विष्णूशीं कांहींही संबंध नसला, तरी आपल्याला विष्णुकृष्ण एकच होत.

"(५) म. गोपीराज संग्रहांतील *अन्वयसारांत* पुढील उल्लेख आहे : 'नारायणानें वेणुगंगेतीरीं अंबापुरीं प्रभव संवत्सरीं जेष्ठ वद्य षष्ठी सोमवारीं अवतार स्वीकारला.' ही हरिनाथांची जन्मतिथि आहे, असा भास होईल. परंतु 'वैनगंगेतिरीं अंबावती पुरीं । भेटला मुरारी

रामदेवा ॥' या वचनाचा आधार घेतला म्हणजे ही तिथि हरिनाथ-रामदेवांच्या (म्हणजे चक्रधर आणि रामदेव दादोस यांच्या) प्रथम भेटीची आहे, हें कळून येईल. चक्रधर आणि रामदेव दादोस यांची प्रथम भेट आंबजय येथें शके ११८९ च्या जेष्ठाच्या सुमारास झाली. शके ११८९ या वर्षी प्रभव संवत्सर येतें.

"(६) *लीळाचरित्रांत* चक्रधराची एकांककाळांतील बालोन्मत्तपिशाचवत् अवस्था अनेक लीळांतून वर्णिलेली आहे. *विवेकसिंधूंतील* हरिनाथांच्या बालोन्मत्तपिशाचवत् अवस्थेशीं तें वर्णन तंतोतंत जुळणारें आहे.

"(७) चक्रधरांजवळ दृष्टिपातासरशीं स्थित्यानंद देण्याची शक्ति असल्याचें वर्णन *लीळाचरित्रांत* वारंवार आढळतें. हरिनाथांच्या ठायीं 'अचिंत्या अनंता शक्ति' ओळगत होत्या आणि 'कृपादृष्टीसरसी समाधी प्रवर्तविण्याची' शक्ति त्यांच्या ठायीं होती, असें मुकुंदराजांनीं म्हटलें आहे (*विवेकसिंधु*, १८.१०१).

"(८) *विवेकसिंधूंत* हरिनाथांना 'सर्वज्ञ' हें संबोधन वापरलें आहे (१८.७७). चक्रधरांचें 'सर्वज्ञ' हें विशेषण महानुभावीय वाङ्मयांत प्रसिद्ध आहे. तसेंच पंथवाचक 'मार्ग' हा शब्द (१८.८०), गुरुवाचक 'राऊळ' हा शब्द (२.३०), साधुवाचक 'महात्मा' हा शब्द (७.७०, ८०) हे महानुभावीय वातावरणांतले शब्द 'विवेकसिंधू'त वापरलेले दिसतात.

"चक्रधर-हरिनाथ-एकात्म्याच्या बाबतींत हीं प्रमाणें इतकीं विपुल, स्पष्ट आणि रहस्यवेधी आहेत कीं, चक्रधर म्हणजेच हरिनाथ हें सत्य निरपवादपणें स्वीकारलें जावें."

ढेरे ह्यांनी, त्यांच्या दृष्टीने प्रतिपादिलेले सत्य निरपवादपणे स्वीकारण्याच्या बाबतीत बाधक अशा बाबी स्वतः ढेरे ह्यांनीच ह्याच लेखात खालीलप्रमाणे दिल्या आहेत :

"(१) मुकुंदराजांच्या *विवेकसिंधू*चा रचनाकाल श. १११० असा समजला जातो. हरिनाथ आणि चक्रधर एकच, असें मानलें तर मुकुंदराज हे चक्रधरांचे प्रशिष्य ठरतात. चक्रधराची आणि रामदेवाची (म्हणजे मुकुंदराजांचे गुरु, रघुनाथ यांची) प्रथम भेट श. ११८९ मध्ये झाली. अर्थात रघुनाथ-मुकुंदराजसंबंध श. ११८९ नंतर येणार आणि *विवेकसिंधू*ची रचना त्यानंतर झाली असणार. ही कालविसंगति दिसायला बाधक आहे.

"(२) दुसरी बाधक बाब म्हणजे लीळाचरित्रानुसार चक्रधर हे सामवेदी लाड ब्राह्मण आहेत, तर *विवेकसिंधु* हरिनाथांना माध्यंदिनशाखीय ठरवितो. हा भेद उपेक्षणीय नाहीं.

"(३) तिसरी बाधक बाब अंबानगरीसंबंधीची आहे. *विवेकसिंधु*काराच्या मतें हरिनाथ 'वैन्यागंगेच्या तीरीं मनोहर अंबानगरी' येथें प्रकटले म्हणजे जन्मले, तर *यक्षदेव-वृद्धान्वय*काराच्या मतें (जें मत *लीळाचरित्रांतील* घटनांशी सुसंगत आहे) 'वैनगंगे तीरीं अंबावती पुरी। भेटला मुरारी रामदेवा ॥' *विवेकसिंधु*कार अंबानगरीला हरिनाथांचे जन्मस्थान मानतात, तर महानुभावीय ग्रंथकार तें हरिनाथ-रघुनाथभेटीचें स्थल मानतात. तसेंच 'अंबानगरी'वर दावा सांगणारें 'आंबजय' हें गांव वैन्यागंगेच्या तीरावर आहे काय? – त्या गांवाचें वर्णन 'मनोहर अंबानगरी' या वर्णनाशीं जमेल काय?"

मुकुंदराजांचा काल, त्यांचे जन्मस्थल, त्यांचा जन्मकाल, त्यांचे साधनस्थल व कर्मस्थल, त्यांची गुरुपरंपरा व त्यांची तत्त्वसरणी ही ठरविताना ते स्वतः त्यासंबंधी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने काय सांगतात हे विचारात घ्यावयास हवे. अशा बाबतीत तर्कतरंग किंवा कल्पनाविलास ह्यांच्या आहारी जाऊन सत्य हातास तर लागत नाहीच, उलट ते दूर दूर जाते. ह्याची प्रचीती मुकुंदराजप्रकरणी दिवसेदिवस अधिकाधिक येत चालली आहे. ह्यासाठी ह्या प्रकरणीची आजवरची तुमुल वाग्युद्धे क्षणभर विसरून चर्चाविषय बनलेली व्यक्ती स्वतःसंबंधी व स्वतःच्या तत्त्वसरणीसंबंधी काय बोलते ते अवधानपूर्वक ऐकलेले बरे. तत्पूर्वी, ज्या चार गोष्टी अज्ञात किंवा अनिश्चित आहेत त्या ध्यानात वागवलेल्या बऱ्या. जन्मस्थल, जन्मकाल, पितृकुल व साधनास्थल, ह्या त्या चार गोष्टी. मुकुंदराज ह्याविषयी काहीही बोलत नाहीत. त्यामुळे त्यासंबंधी वाक्कुशल व तर्ककुशल पंडितांनी लढविलेले तर्क हे निव्वळ तर्कच ठरतात. ऐतिहासिक वास्तवतेपासून ते केव्हाही दूर राहणार.

मुकुंदराज हे आपली गुरुपरंपरा व प्रत्यक्ष गुरू ह्यांच्याबद्दल *विवेकसिंधू*च्या 'गुरुमाहात्म्यकथन' ह्या अठराव्या प्रकरणात जी हकीकत सांगतात ती थोडक्यात खालीलप्रमाणे : "आदीगुरु श्री आदिनाथु। तेथोनि श्रीहरीनाथु। तेयाचा शिष्य श्री रघुनाथु। जो गुणसींधु ॥३४॥" अशी आपली गुरुपरंपरा सांगितल्यावर आपले परमगुरू हरिनाथ ह्यांचे वर्णन १०२ पर्यंतच्या ओव्यांत केलें आहे. मुकुंदराजांनी *विवेकसिंधु* ह्या ग्रंथात आपले आजेगुरू श्रीहरिनाथ ह्यांच्यासंबंधी जी माहिती दिली आहे ती त्याव्यतिरिक्त अन्यत्र कोठेही दिलेली आढळत नाही. श्रीहरिनाथांचे आई-वडील कोण किंवा त्यांचा जन्मकाळ कोणता ह्यासंबंधी ते काहीच लिहीत नाहीत. शके १७७९ (इ. स. १८५७) मध्ये विठ्ठल कवीच्या *संतचरित्र* (श. १७५१ सुमारे) ह्या ग्रंथाच्या आधारे रचल्या गेलेल्या केशव जयराम ह्यांच्या *भक्तिरहस्य* ह्या ग्रंथात व श. १७३१ (इ. स. १८०९) मध्ये मुरहरमहाराज पाठक ह्यांना गोविंद रघुनाथ हळदे ह्यांनी धाडलेल्या एका पत्रात ह्यासंबंधीची माहिती पुढीलप्रमाणे आढळते :

"हरिनाथांच्या मातोश्रींचें नांव सरस्वती व पित्याचें नांव सत्यदेव (सत्यनारायण) असें होतें. त्यांचा जन्म शके १०६९ मध्यें झाला. पांचव्या वर्षीं मौंजीबंधन व नंतर वेदाभ्यास, नंतर बारा वर्षें पाशुपतव्रताचरण, नंतर यज्ञ व रघुनाथांना उपदेश ह्या त्यांच्या जीवनांतील प्रमुख घटना. शके १०९७ मार्गशीर्ष शुद्ध एकादशी ह्या दिवशीं त्यांनीं समाधि घेतली."

ही माहिती श्रीहरिनाथांच्या समाधीनंतर जवळ जवळ सहाशे वर्षांनंतर लिहिलेल्या पोथ्यांत व कागदपत्रांत नोंदली गेलेली असल्यामुळे, त्यांचे मौंजीबंधन, त्यांचा वेदाभ्यास व पाशुपतव्रताचरण ह्या दोन गोष्टी वगळल्यास बाकीच्या हकीकतीच्या वास्तवतेबद्दल शंकाच वाटते. मुकुंदराजांनी आपली श्रीहरिनाथांपूर्वीची गुरुपरंपरा सांगितलेली नाही. आदिनाथानंतर (श्रीशंकरानंतर) ते फक्त हरिनाथ व रघुनाथ ह्यांचीच तेवढी नावे उल्लेखितात. ही परंपरा कर्नाटकातील मुकुंदराजांच्या परंपरेतील मुडलगी मठातील गुरुनाथ नावाच्या ग्रंथकाराने शके १७०७ मध्ये रचलेल्या *देशिकचरित्र* ह्या ग्रंथात अशी वर्णिली आहे :

"मग शंकराचार्य जगद्गुरु। अनुक्रमें हरिनाथ थोरु।
रामचंद्र गुरुवरु। मग मुकुंद मुनेश्वरु विवेकसिंधुकर्ते॥"

डॉ. पंडित आवळीकर हे *मुडलगीचे स्वामी* (१९७१) ह्या ग्रंथात (प्रस्तावना पृ. १०–११) लिहितात : "ह्यावरून स्पष्ट होतें कीं, मुडलगी परंपरा ही मुकुंदराजांची परंपरा आहे आणि मुकुंदराज हे शंकराचार्यांच्या परंपरेंतील आहेत. मुडलगी परंपरेंतील ज्ञानबोध, हरिबोध व धुंडिराजेश्वर ह्यांनींही आपल्या परंपरास्तोत्रांतून ह्याला दुजोरा दिलेला आहे... मुकुंदराजांची 'शंकरोक्ति' शंकर परंपरेशीं अनेक दृष्ट्या निगडित आहे. त्यांची परंपरा ही शंकराचार्यांची आहे व तत्त्वज्ञानही त्या परंपरेला धरूनच आहे. हरिनाथांचे गुरु कोण ह्याचा नीट उलगडा होत नसला तरी शंकराचार्यांच्या 'भारती' संप्रदायाची ही शाखा आहे हें परंपरास्तोत्रांवरून सिद्ध होत आहे. ज्ञानबोध हरिनाथांचा 'हरीयोगी' असा उल्लेख करीत असला तरी धुंडिराजाने त्यांना 'हरीनाथभारती' म्हटलें आहे. 'औधूत यतीवर्य' हा ज्ञानबोधकृत निर्देश व 'औधुत' किंवा 'अवधुत भारती' हा हरिबोधकृत

उल्लेख हरिनाथांच्या गुरूवर प्रकाश टाकणारा आहे. आपल्या परंपरेतील सर्वांनाच धुंडिराजेश्वर 'सिद्ध' म्हणतो.

"*विवेकसिंधूत* आदिनाथ-हरिनाथ ह्यांच्या भेटीचें वर्णन करतांना मुकुंदराजांनी 'तैसें दोघे आनंदें फुंजीं। हरिशंकर ते ॥(१८.६१)' असें म्हटलें आहे. 'शंकर' ह्या शब्दाचा 'शंकराचार्य' असाही अर्थ असू शकेल. कोणातरी 'भारती' संप्रदायांतील शंकराचार्यांनी हरिनाथांना उपदेश दिला असण्याची शक्यता आहे.

"मुकुंदराजांना 'भारती' असें ज्ञानबोधानें म्हटलें आहेच. आणखी एका अनामकृत संस्कृत स्तोत्रांत 'मुकुंदभारती' असा उल्लेख आहे. धुंडिराजेश्वर व हरिबोधांचीही साक्ष तशीच आहे. मुकुंदराजांचे गुरुबंधु 'सुरेंद्र' भारतीच आहेत तर शिष्य-प्रशिष्य नृसिंहभारती व जगन्नाथभारती आहेत.

"मुकुंदराज हे शंकराचार्यांच्या शाखेंतील एखाद्या मठाचे पीठाधिपति असावेत हा माझा समज आतां दृढमूल होत आहे. रुक्मजदासाच्या *रुक्मांगदचरित्रांत* (८.६६) मुकुंदराजांचें असें वर्णन आहे : 'अनेका शिष्यांसहित । वस्त्रेंभूषणें अतिशोभत । शिबिकासनीं बसुनी त्वरित । चालिले निमित तीर्थयात्रा ॥' हा पीठाधिपतीचा थाट आहे, हें नक्की."

मुकुंदराजांचे गुरू रघुनाथ ह्यांच्याबद्दल विश्वसनीय अशी माहिती मिळत नाही. विदर्भातील चंद्रनगर (हल्लींचे चांदा) येथील रहिवासी असलेल्या बोबडे ह्या कौशिकगोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण घराण्यात ते जन्मले व पुढे विद्याभ्यासासाठी काही वर्षे काशी येथे राहिले. त्या काळात हरिनाथांशी भेट होण्याचा व त्यांजकडून अनुग्रह प्राप्त होण्याचा त्यांस योग आला. काही दिवसांनी हरिनाथ व रघुनाथ हे दोघेही अंबानगरीस आले.–अशी एक कथा सांगितली जाते. तिच्यात कदाचित काही सत्यांश असेलही. इतरत्र ज्या निरनिराळ्या कथा सांगितल्या आहेत त्या साऱ्या, त्यांतील काल, स्थल व व्यक्ती ह्यांच्या संबंधांतील विसंगती लक्षात घेता, केवळ दंतकथाच वाटतात.

रघुनाथ ऊर्फ रामचंद्र ह्यांनी अंभोऱ्यास समाधी घेतली. "हरिनाथांच्या समाधींतच त्यांचीही समाधी आहे. त्यांच्या समाधीचें प्रतीक म्हणून हरिनाथांच्या पावलाखालीं, समाधीच्या दगडी भिंतींतील कोनाडचांत, रघुनाथांच्या पादुकांची प्रतिष्ठापना झालेली आढळते." (डॉ. सु. म. डोळके, 'आद्य कवि मुकुंदराज', *नवभारत*, मे १९६०, पृ. ४२).

रघुनाथ ह्यांनी हरिनाथांच्या आज्ञेवरून मुकुंदराजांस सांप्रदायिक मंत्रदीक्षा दिली असे सांगितले जाते. त्यांच्याच इच्छेनुसार आपल्या संप्रदायाच्या आध्यात्मिक तत्त्वसरणीच्या प्रचारार्थ, राजा जैतपाळास उपदेश करण्याच्या निमित्ताने त्याच्यासाठी व 'जेया नाहीं शास्त्री प्रतीति । नेणति तर्कमुद्रेची स्थिति ।' अशा मऱ्हाटी लोकांसाठी मुकुंदराजांनी *विवेकसिंधूच्या* रचनेचा उद्योग हाती घेतला व तो शके १११० मध्ये पूर्ण केला. हा ग्रंथ रचण्यात आपल्या सद्गुरूची इच्छा पूर्ण करणे हा जसा त्यांचा एक हेतू होता तसाच सर्वसामान्य जनांना ईश्वरज्ञान होऊन त्यांना दिव्य जीवनाचा लाभ व्हावा हाही त्यांचा दुसरा आंतरिक हेतू होता. त्यासाठी 'वेदशास्त्राचा मथीतार्थु' स्वानुभवाच्या आधारावर जितक्या सहज व सुलभ रीतीने सांगता येईल तितका तो सांगण्याचा त्यांनी ह्या ग्रंथात प्रयत्न केला आहे. हा आपला प्रयत्न निश्चित यशस्वी झाला आहे असे त्यांना वाटत असावे. आणि म्हणूनच त्यांनी ह्या ग्रंथाच्या अखेरीस 'इये ग्रंथींचें हेंचि चातुर्य । जें रोकडें स्वानुभव सौंदर्य । म्हणौनि सेवीतु मुनिवर्य । विवेकसिंधु हा ॥ १८.१३१' असे उद्गार काढले आहेत.

हरिनाथ, रघुनाथ व मुकुंदराज हे नाथसंप्रदायी होते असे विधान आजवर अनेकांनी केलेले आहे पण ते *विवेकसिंधूतील* तत्त्वसरणी लक्षात घेता तितकेसे सयुक्तिक वाटत नाही. मच्छिंद्रनाथ, गोरक्ष ह्यांनी प्रवर्तिलेल्या नाथसंप्रदायाशी त्यांचा साक्षात संबंध होता असे म्हणण्यासारखा पुरावा आढळत नाही. "तथापि एकाच आदिनाथांना (शिवाला आदिगुरु मानणाऱ्या ह्या दोन परंपरा आहेत. दोन्ही वेदान्तानुसारी आहेत. दोन्ही ज्ञानमार्गी आहेत; तंत्र, राजयोग, हठयोग, उपासना ह्यांना दोन्ही जवळ करतात. हठयोगावर नाथपंथीयांचा भर अधिक असला तरी अखेर नाथपंथानें राजयोगाचा आश्रय करून उपासनेने ज्ञानमार्गद्वारे आपले ईप्सित साध्य करून घेण्यावरच भर दिला. योग किंवा हठयोगाचे अंतिम साध्य चित्तवृत्तींचा निरोध आहे. तर ज्ञानयोगाचे अंतिम लक्ष्य 'शिवो भूत्वा शिवं यजेत् ।' असे कैवल्यप्राप्तीनंतर ज्ञानोत्तर स्थितीत सगुणोपासना करण्यास देह धारण करीपर्यंत् सांगणारे आहे. लोकांनी 'इहीं रीतीं राहाटावें' व 'अलौलिका नोहावें जनाप्रति' ही लोककल्याणाची इच्छाही त्यामागे आहे. देवताविग्रहविशेषावर त्यामुळे अर्थातच भर नाही. आणि म्हणूनच नाथपंथी ज्ञानदेवांच्या *ज्ञानदेवीचे* तत्त्वज्ञान श्रीशंकराचार्यांच्या तत्त्वविचारांना प्राधान्याने अनुसरणारे आहे, हे लक्षात यावयास अडचण राहात नाही. विवर्त, अभ्यास, ज्ञानाची साधनरूपता व साध्यरूपता, स्वरूपानुसंधानरूप भक्ति म्हणजे अद्वैतभक्ति ह्यांच्या जोडीला नाथसंप्रदायात हठयोगविचारांनी येणारा ऐहिकातील अभ्युदयाचा – शक्तीचा विचार आहे. कारण तो शक्तीची उपासना सांगणारा, प्रवृत्तिपर व अन्ततोगत्वा कैवल्यपर संप्रदाय आहे; तर शंकराचार्यप्रणीत संप्रदाय चित्ताला चैतन्यरूप देऊ इच्छिणारा, निःश्रेयसाचा विचार करणारा, निवृत्तिपर, संन्यासपर, मोक्षपर आहे. एकाच मोठ्या प्रवाहाच्या स्वगतवैशिष्टयांनी, काही लक्षणांनी भिन्न दिसणारे, परंतु अंतरंग व अंतिम तत्त्व ह्यांच्या दृष्टींनी समांतर असे हे एकाच अद्वैतवेदान्ती परंपरेचे दोन सहोदर स्रोत आहेत." (प्रा. वि. वा. कुळकर्णी : 'मराठीतील शांकर परंपरा, मुकुंदराज आणि चार संप्रदाय'; विसंमंवा. १९७०; पृ. ९३–९४),.

प्रा. वि. वा. कुळकर्णी ह्यांनी वर गोरक्ष-मच्छिंद्र ह्यांचा संप्रदाय व मुकुंदराजांचा संप्रदाय 'हे एकाच अद्वैतवेदान्ती परंपरेचे दोन सहोदर स्रोत आहेत' असे जे म्हटले आहे ते काही अंशी खरे असले तरी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी 'मुकुंदराज' ह्या आपल्या लेखात (*नवभारत*, ऑग. १९५९, पृ. २८) "मुकुंदराजांचा गुरु संप्रदाय हा अवधूत नामक संन्यासी संप्रदाय आहे. त्यांनीं स्वतःचे परमगुरु हरिनाथ ह्यांचें *विवेकसिंधूच्या* शेवटी 'दत्तात्रेय मुनीश्वरु' (१८.४८) असें वर्णन केलें असून, 'म्हणौनि शिवादि गुरुपर्यंत । ते जाणावे अवधूत । ते अमूर्ति मूर्तिमंत । तयांचें महिमान विख्यात । लोकत्रयीं ॥' (१८.३२-३३)" असे जे लिहितात तेच अधिक स्पष्ट व स्वीकरणीय वाटते. विजापूरचे प्रसिद्ध संत व विद्वान कवी रुक्मांगद पंडित ह्यांनी मुकुंदराजांविषयी 'साक्षाद्दत्त मुकुंदराज मुनि तो जो आदि विद्वान्कवी । जेणें ग्रंथ विवेकसिंधु रचिला तत्संप्रदायार्णवीं ॥' असे जे एके ठिकाणी उद्गार काढले आहेत ते तर्कतीर्थ जोशी ह्यांच्या म्हणण्यास दुजोरा देतात. अवधूत परंपरा ही दत्तात्रेयावधूतापासून सुरू झाली. दत्तात्रेयाला ब्रह्मज्ञानाचा बोध आदिनाथ शिवाकडून मिळाला. ब्रह्मपुराणात अत्रीच्या आदेशानुसार दत्तात्रेयाने गौतमी नदीच्या तीरावर शंकराची आराधना करून ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेतले असे म्हटले आहे. तो योगविद्या व तंत्रविद्या ह्यांचा आचार्य मानला जातो. 'हा दत्तात्रेय मुक्त विहरण करणारा अवधूत दिगंबर योगी, योगविद्येचा उपदेष्टा आणि विश्वगुरु आहे,' असे त्याचे वर्णन त्याजविषयीच्या ग्रंथांत केलेले आढळते. *ब्रह्मनिर्वाणतंत्रात* ब्रह्मावधूत, शैवावधूत, वीरावधूत व कुलावधूत असे अवधूतांचे चार प्रकार सांगितलेले आहेत. त्यांपैकी शैवावधूत ह्या प्रकारात मुकुंदराज, त्यांचे गुरू व परमगुरू हे मोडत असावे. मुकुंदराजांच्या *विवेकसिंधु* ह्या ग्रंथाव्यतिरिक्त त्यांच्या नावावर *परमामृत, महाभाष्य* (संस्कृत), *मूळस्तंभ, पवनविजय*, हे ग्रंथ दाखविले जातात. परंतु त्यांच्या कर्तृत्वाबद्दल मतैक्य नाही. किंबहुना ते कर्तृत्व त्यांच्यानंतरच्या काळातील वेगवेगळ्या व्यक्तींकडे जाते असे अनेक संशोधकांनी साधार

दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, *महाभाष्य* (भाइसंमं. ने हे भाष्य महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक ह्यांच्या संपादकत्वाखाली प्रसिद्ध केले आहे त्याचे संपादन नीट झालेले नाही. ह्या ग्रंथाचे खरे नाव *विवेकसिंधु* हेच आहे. परंतु त्यातील एका प्रकरणाच्या समाप्ति-वाक्यात 'महाभाष्य' असे जे म्हटले आहे, ते त्या प्रकरणाचे नाव आहे. ह्या प्रकरणास 'महाभाष्य' असे म्हणण्याचे कारण त्या प्रकरणात 'तत्त्वमसि' ह्या वेदान्त-महावाक्याचे मुकुंदमुनीप्रणीत 'भाष्य' आहे; म्हणून त्यास संक्षेपाने 'महाभाष्य' असे म्हटले आहे.) ह्याची रचना सोळाव्या शतकाच्या प्रथमार्धात आंबेजोगाई येथे विद्यमान असलेल्या राम केशव लंब ऊर्फ रामचंद्रमुनी ह्यांचे शिष्य *विवेकामृत*कार मुकुंदमुनी ऊर्फ मुक्तिनाथ ह्यांनी आपल्या शिष्यांना *विवेकसिंधू*तील विषय सुलभ करून सांगण्याच्या हेतूने केली, असे प्रा. म. रा. जोशी ह्यांनी 'विवेकसिंधु आणि महाभाष्य' ह्या लेखात प्रतिपादन केले आहे.

आद्य श्रीशंकराचार्यांनी इ. स. च्या आठव्या शतकात पेटविलेल्या प्रखर ज्ञानज्योतीच्या प्रकाशात परतत्त्वविचाराची वाटचाल करून महाराष्ट्रीयांना स्वानुभवपूर्वक मुक्तीचा निश्चित मार्ग दाखविणारा *विवेकसिंधु* हा मराठी भाषेतील आद्यग्रंथ. [⇨ ३.] 'हा ग्रंथ विचारिता। नाहीं ज्ञानाची दुर्लक्षता। आणि मुक्ति सायुज्यता। रोकडीच होय॥ १.२९॥ येचि देहीं आपुला डोळां। जंव भोगीजे मुक्तिचा सोहळा। तरि वैराग्याच्या तातवेळा। कां सीणावें॥३०॥" अशा आत्मविश्वासपूर्ण प्रारंभ होणाऱ्या ह्या ग्रंथाने पुढील जवळजवळ पाच शतके मराठी मनावर समर्थपणे वैचारिक प्रभाव पाडला व साक्षात्कारमार्गाचे स्वच्छ व स्पष्ट दर्शन करून दिले. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास ह्यांच्यापासून तो त्यानंतरच्या अनेक पिढ्यांपर्यंतच्या परतत्त्वचिंतकांना तो मार्गदर्शक व प्रेरक बनला. महाराष्ट्रातील भिन्नभिन्न पंथांनी व संप्रदायांनी त्याला आपला असे मानले व थोर मान दिला. महाराष्ट्राच्या भौगोलिक मर्यादा ओलांडून तेलंगण व कर्नाटक ह्या प्रांतांत त्याने प्रवेश केला व आदराचे स्थान प्राप्त करून घेतले; आणि मराठी भाषेचे प्रातिभ व वैचारिक सामर्थ्य महाराष्ट्रीयेतरांच्या प्रत्ययास आणून दिले. अशा ह्या ग्रंथाच्या जनकाचा परतत्त्वाचा एक गाढा विचारक मराठी आदिकवी म्हणून अखंड गौरव होत राहावा ह्यात नवल ते कोणते?

**रचना : अमु.** – श्रीमुकुंदराजकृत श्रीविवेकसिंधु; अध्याय १८; ओ. सं. १६३६; संपा. कुळकर्णी, कृ. पां.; एकूण ८६ हस्तलिखित पोथ्या व ९ मुद्रित प्रती पाहून तयार केलेली पाठशुद्ध प्रत (विस्तृत आणि विवेचक प्रस्तावनेसह); पुणे, १९५७. **शंका.** – परमामृत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आगाशे, य. र. : मुकुंदराजविषयक संशोधन; नभामा., ऑक्टो. १९५५; पृ. ६१–६५. २. आजगांवकर, ज. र. : मुकुंदराज; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. १–२६. ३. आवळीकर, पंडित : मुकुंदराज परंपरा आणि महानुभव संप्रदाय; महानु., नोव्हें. १९६९; पृ. १५–१७. ४. आवळीकर, पंडित : मुकुंदराजांची परंपरा : मसाप., डिसें. १९५८. ५. करमरकर, अ. प. : मुकुंदराज आणि संस्कृत 'विवेकसिंधु'; सह्याद्रि, मार्च १९४५. ६. काटकर, तु. ना. : मराठीचे आद्यकवि मुकुंदराज; अमरावती, १९६७; पृ. ४०. ७. कानोले, वि. अं. : मुकुंदराज व तत्कृत योगविवेकमार्तंड नामक ग्रंथ; भाइसमंत्रै., चैत्र १८६५; पृ. ३७-४४. ८. कानोले, वि. अं. ; मुकुंदराजाची अंबानगरी कोणती? ; नांदेड, १९६१. ९. कानोले, वि. अं. : मुकुंदराजांच्या कालासंबंधी महिपतिबुवांचें मत; प्रतिष्ठान, एप्रि. १९५७; पृ. ३२–३४. १०. कानोले, वि. अं. : श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या परंपरेंतील एक अज्ञात कवि मुकुंदराज व तत्कृत योगविवेकमार्तंड नामक ग्रंथ; भाइसमंत्रै., एप्रि. १९४३; पृ. ३७–४४. ११. कुळकर्णी, वि. वा. : बीडपाटंगणचे मुकुंद; विसंमंवा., १९७२, पृ. १७९–१८८. १२. कुळकर्णी, वि. वा. : विवेकसिंधु ग्रंथाच्या हस्तलिखिताचे अध्ययन; विसंमंवा., १९७१; पृ. १६४–१७८. १३. कुळकर्णी, श्री. रं. : 'विवेकसिंधू'ची संहिता; मस्वासंप., मार्च १९६६; पृ. १९. १४. कुळकर्णी, श्री. रं. : 'विवेकसिंधु'तील प्रधान प्रतिपाद्य : राजयोग; नभामा., सप्टें. १९६९, पृ. ५७–६२. १५. गोगटे, गो. रा. : आद्य कवि कोण? मुकुंदराज कीं ज्ञानेश्वर? चित्रज., जून १९५०, पृ. २९७–२९९. १६. गोगटे, गो. रा. : परी., मुकुंदराजांचा विवेकसिंधु : संस्कृति-संरक्षण कसे होईल ? ; केसरी, २१ एप्रि. १९५३. १७. गोगटे, गो. रा. : प्रस्ता., विवेकसिंधु, १९५२. १८. जोशी, म. रा. : श्रीमुकुंदमुनी व ज्ञानदेव; युगवाणी, ऑग. १९७१; पृ. ८६–८९, ६१. १९. जोशी, म. रा. : श्रीमुकुंदराज व अंबाजोगाई; युगवाणी, फेब्रु., मार्च, एप्रि. १९७१; पृ. ५१४. २०. जोशी, लक्ष्मणशास्त्री : मुकुंदराज; नभामा., ऑग. १९५७. २१. डोळके, सुरेश म. : आद्यकवि मुकुंदराज; नभामा., मे १९६०; पृ. ३९–५१. २२. डोळके, सुरेश म. : मुकुंदराजांचा स्थल-निर्णय; मसाप., जून १९५३, सप्टें. १९५३, मार्च १९५४. २३. डोळके, सुरेश म. : प्रस्ता., विवेकसिंधु (संपा. बोबडे). २४. डोळके, सुरेश म. : 'विवेकसिंधू'चा कालनिर्णय; नभामा., ऑग. व ऑक्टो. १९५५. २५. डोळके, सुरेश म. : ग्रंथसमीक्षण, श्रीविवेकसिंधु; युगवाणी, ऑग. १९५७; पृ. १४. २६. ढेरे, रा. चिं. : अनुकूलतेचे आभास; इंद्रायणी, सप्टें., ऑक्टो. १९६३; पृ. २९. २७. ढेरे, रा. चिं. : आग्रहाची अभ्रे; इंद्रायणी, जुलै १९६३; पृ. ४७. २८. ढेरे, रा. चिं. : एका आरतीच्या निमित्ताने; महानु., नोव्हें. १९६८. २९. ढेरे, रा. चिं. : मुकुंदराज : कांही टिपणे; प्रसाद, मार्च १९७०. ३०. ढेरे, रा. चिं. : मुकुंदराज परंपरेची एक अज्ञात शाखा; प्रसाद, जाने. १९७०. ३१. ढेरे, रा. चिं. : मुकुंदराजशिष्य जयपाळाचा शोध; मसाप., ऑक्टो.–डिसें. १९६८; पृ. ३३–३९. ३२. ढेरे, रा. चिं. : मुकुंदराजांची गुरुपरंपरा; (पूर्वार्ध) इंद्रायणी, जुलै १९६३, पृ. २१; (उत्तरार्ध) ऑग. १९६३, पृ. १२. ३३. ढेरे, रा. चिं. : मृत्युंजय, सहजानंदस्वामी व विवेकसिंधु; इंद्रायणी, जाने. १९६३; पृ. ६६. ३४. ढेरे, रा. चिं. : योगविवेकमार्तंडदीप : कविदास मुकुंदराज : गोचप., पुणे, १९५९; पृ. १५६–१५९. ३५. ढेरे, रा. चिं. : रघुनाथ केशव लंब हा मुकुंदराजाचा गुरु नव्हे; इंद्रायणी, सप्टें.–ऑक्टो. १९६३; पृ. २६. ३६. ढेरे, रा. चिं. : विवेकसिंधूचा संस्कृत अनुवाद : विवेकामृत; इंद्रायणी, सप्टें.–ऑक्टो. १९६३; पृ. २२. ३७. ढेरे, रा. चिं. : 'विवेकसिंधु'ची रचना आणि मुकुंदराजांचे वार्धक्य; इंद्रायणी, दीअं. १९६२; पृ. ६२–६३. ३८. ढेरे, रा. चिं. : श्रीमुकुंदराज : कांहीं शोधशलाका; प्रसाद, मार्च १९७०; पृ. ३६. ३९. तुळपुळे, शं. गो. : आंबजोगाई आणि मुकुंदराज : मसाप., १९५१. ४०. देशपांडे, अ. ना. : आद्यकविकीर्ति मुकुंदराज; प्रामवाइ., भा. १, पूर्वार्ध; पुणे, १९६६; पृ. २५०–३१४. ४१. देशपांडे, प्र. म. : ज्ञानेश्वरी आणि विवेकसिंधु यांत मतविरोध नाही; तरुणभारत, नागपूर, ५ जून १९६७. ४२. देशपांडे, य. खु., व वाबगांवकर, म. शं. : मुकुंदराज जैत्रपालावर नवा प्रकाश : खेरला येथील शिलालेख; नभामा., एप्रि. १९६८; पृ. २५–३०. ४३. देशपांडे, य. खु. : हरिनाथाची समाधि; निवडक निबंध; पृ. ७८. ४४. नेने, ह. ना. : मुकुंदराजांचा काल व भाषिक दृष्टी; मसाप., १९५३; पृ. ३१–३३. ४५. परांजपे, य. वि. : विवेकसिंधु आणि योगवासिष्ठ; चित्रज., जून १९५३; पृ. १८९–१९४. ४६. पांगारकर, ल. रा. : आदिकवि मुकुंदराज; मवाइ., खं. १; मुंबई, १९२२; पृ. ३८०–४१२. ४७. पुणेकर, गो. द. : श्रीमुकुंद-

राज व श्रीज्ञानेश्वर ह्यांची गुरुपरंपरा; महानु., दीअं. १९६५; पृ. २१. ४८. बुटी, ताराबाई : मुकुंदराजांचा योगशास्त्रावरील विरोध; तरुणभारत, नागपूर, २१ मे १९६७. ४९. बोबडे, रा. वि. (संपा.) : आद्य कवि श्रीमुकुंदराजकृत श्रीविवेकसिंधु व श्रीपरमामृत; नागपूर. ५०. भावे, शिवाजीराव : 'विवेकसिंधू'च्या शुद्ध प्रतीची पूर्वतयारी; रामदास आणि रामदासी; ऑग. १९३७; पृ. २६–३९. ५१. भुसारी, र. म. : मुकुंदराज पुन्हां एकदां; साहित्य आणि संशोधन; १९५१; पृ. १३–१८. ५२. भुसारी, र. म. : मुकुंदराजांचा कालनिर्णय; साहित्य आणि संशोधन; १९५१; पृ. १–१२. ५३. भुसारी, र. म. : मुकुंदराजाची अंबानगरी कोणती?; पंचधारा. ५४. भुसारी, र. म. : 'विवेकसिंधु'कार मुकुंदराज; सह्याद्रि, जुलै १९३७. ५५. माडखोलकर, ग. त्र्यं. : मुकुंदराजांचे योगशास्त्रावरील आक्षेप; तरुणभारत, नागपूर, २१ मे १९६७. ५६. मुजुमदार, गं. ना. : विवेकसिंधु व गुरुचरित्र; भाइसंमंइति., श. १८३५, पृ. २८२. ५७. राजवाडे, वि. का. : मुकुंदराजांचा एक संस्कृत ग्रंथ; भाइसंमंइति., श. १८३५, पृ. १११. ५८. हर्षे, रा. ग. : मुकुंदमुनींचे 'गुह्यसप्तक'; मसाप., जाने.–मार्च १९५६.

**मुकुंदराज–२** / ० **कविदास** [अंदाजे इ. स. चे १५ वे शतक] श्रीज्ञानेश्वरपरंपरेतील योगी व टीकाकार. ह्यांची गुरुपरंपरा सोपानदेव > मुक्कुंदानंद > अव्यक्त > जनार्दन > अलक्ष > अचिंत्य > त्र्यंबकनाथ > कविदासु (मुकुंदराज) ह्याप्रमाणे दिलेली आहे. 'योगियांमाजि प्रसिद्ध महायोगी' असे त्यांनी आपले गुरू त्रिंबकनाथ ह्यांचे वर्णन केले आहे. गोरक्षनाथांच्या *योगविवेकमार्तंड* ह्या संस्कृत ग्रंथावर (श्लो. १८३) मुकुंदराजांनी *विवेकमार्तंडदीप* अशी मराठी टीका रचली आहे. ह्या टीकेवर *ज्ञानदेवी*चा व *अनुभवामृता*ची छाया प्रभूतपणे दिसून येते. राजवाडे-संशोधित *ज्ञानेश्वरी*चा संग्राहक मुकुंदराज किंवा मुकुंद हाच असावा असे वि. अं. कानोले ह्यांनी आपले मत व्यक्त केले आहे. नाथपंथीय तत्त्वज्ञानाच्या अभ्यासात हा ग्रंथ महत्त्वाचा आहे.

प्रस्तुत मुकुंदराज व त्यांचा हा ग्रंथ आजपर्यंत अज्ञात होता. ग्रंथावरून हे योगशास्त्रपारंगत, व्यासंगी व महान अधिकारी सत्पुरुष असावेत अशी कल्पना होते. ज्ञानेश्वरोत्तर अधिकारी पुरुषांच्या परंपरेतील असल्याने गोरक्षनाथांच्या योगशास्त्रावरील ग्रंथाची ह्यांनी केलेली टीका निःसंशय महत्त्वाची ठरते.

**रचना :** **अमु.** – १. योगविवेकमार्तंड; मराठी टीका; ओ. सं. ७७४ (त्रु. पो.); वि. अं. कानोले संग्रह; नांदेड.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कानोले, वि. अं.; मुकुंदराज व तत्कृत योगविवेकमार्तंड नामक ग्रंथ; भाइसंमंत्रै., एप्रि. १९४३, पृ. ३७–४३. २. ढेरे, रा. चिं. : कविदास मुकुंदराज; गोचप., मुंबई, १९५९; पृ. १५६–१५८.

**मुकुंदराज–३** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – अलेखस्तवन / अलक्षस्तवन; देशलेखक भानजी; ले. का. : आषाढ व. ९, श. १७९३ (इ. स. १८७१); भाइसंमं. हस्त. सू., पृ. १७.

**मुकुंदराज–४** [का. अनु.] टीकाकार.

**रचना :** **अमु.** – वाक्यसुधा (शंकराचार्यांच्या वाक्यसुधेवरील मराठी टीका); भाइसंमं. हस्त. सू., पृ. २५४.

**मुकुंदराज कारंजेकर** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध] महानुभाव कवी. कवीश्वर आम्नायाच्या कारंजेकर शाखेतील. हे मूळचे वऱ्हाडातील उमरखेड गावचे रहिवासी. आडनाव वांगे. ह्यांनी *कृष्णावली स्तोत्र, वनदेवस्तोत्र, देवदेवेश्वर स्तोत्र* इत्यादी श्लोकबद्ध स्तोत्रे मराठीतून केली आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, य. खु.; मुकुंदराज कवि कारंजेकर; ममवा.; पुणे, १९६०; पृ. ८३.

० **मुकुंदराजमुनि** – पहा **मुकुंद–१.**

० **मुकुंदराज योगी** – पहा **मुकुंदराज–१.**

**मुकुंद रामानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **मुकुंदसुत** – पहा **कमलाकर.**

० **मुकुंदस्वामी** – पहा **मुकुंद–५.**

**मुकुंदानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **मुक्तनाथ** – पहा **मुकुंदराज–१.**

० **मुक्ताई** – पहा **मुक्ताबाई.**

**मुक्ताबाई** / ० **मुक्ताई** [अंदाजे श. १२०१ / इ. स. १२७९–श. १२१९ / इ. स. १२९७]. संतकवयित्री. मुक्ताबाई ही ज्ञानेश्वरांची धाकटी बहीण. आपल्या भावाप्रमाणे ही विद्वान होती. मुक्ताबाईचा जन्म औरंगाबाद जिल्ह्यात पैठणच्या पूर्वेस चार कोसांवर, गोदावरीच्या उत्तरतीरी असलेल्या आपेगाव येथे शके १२०१ (इ. स. १२७९), प्रमाथिनाम संवत्सर, आश्विन शुद्ध १, मध्यान्ही झाला असे उपलब्ध पुराव्यावरून दिसते. ज्ञानेश्वरादी चारही भावंडांचे जन्मकाल व जन्मस्थल ह्यासंबंधी अनेक मतभेद आढळतात. त्यामुळे मुक्ताबाईचा जन्म शके ११९९ (इ. स. १२७७) मध्ये झाला, असे मानणारा दुसराही एक पक्ष आहे. पैकी पहिले मत भिंगारकरबुवा, बाळकृष्ण अनंत भिडे आणि गुरुदेव रानडे ह्यांचे असून दुसऱ्या मताचा आग्रह *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे आणि शं. वा. दांडेकर ह्यांनी धरलेला आहे. तर ज्ञानेश्वरादी चारही भावंडांचा जन्म आळंदीला झाला असावा असे मत ज. र. आजगांवकर ह्यांनी व्यक्त केले आहे.

ज्ञानेश्वरादी सर्व भावंडांत मुक्ताबाई लहान. आपल्या भावांप्रमाणेच शेवटपर्यंत ती विरक्तवृत्तीने राहिली. मुक्ताबाईला अध्यात्माचा उपदेश निवृत्तिनाथांनी दिला. मुक्ताबाईनेही नाथपंथाचीच दीक्षा घेतलेली होती. तिची गुरुपरंपरा : आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरखनाथ > गैनीनाथ > निवृत्तिनाथ > मुक्ताबाई, अशी आहे. चांगदेव वटेश्वरांना हिनेच अनुग्रहित केले असे मानले जाते. *तत्त्वसार*कर्त्या (र. का. १२३४) चांगदेवांची गुरू मुक्ताबाई ही ज्ञानेश्वरभगिनी मुक्ताई की भर्तृहरिशिष्या मुक्ताईयोगिनी हा प्रश्न अद्यापही सुटलेला नाही. ही दुसरी परंपरा गोरक्ष > भर्तृहरी > मुक्तादेवी > चांगदेव चक्रपाणी अशी दिली जाते. एवढे मात्र निश्चित की निवृत्तींची शिष्या मुक्ताबाई आणि भर्तृहरि-शिष्या मुक्ताई ह्या दोन भिन्न व्यक्ती आहेत.

परंपरेनुसार मुक्ताबाई शके १२१९ (इ. स. १२९७) च्या वैशाख वद्य १२ ला जळगाव जिल्ह्यातील एदलाबाद तालुक्यात एदलाबादेहून तीन कोसांवर व चांगदेव गावापासून दोन मैलांवर तापीतीरी महद्ग्राम ऊर्फ मेहुण येथे गुप्त झाली, असे समजतात. वि. ल. भावे ह्यांच्या मते एदलाबादेजवळील माणगाव येथे ती समाधिस्थ झाली. मुक्ताबाईचे समाधिस्थळ खुद्द एदलाबाद (जि. जळगाव) असल्याचे प्रतिपादन मुक्ताबाई संस्थानचे पुजारी विठ्ठलबुवा व्यवहारे ह्यांनी केले आहे. ते मुक्ताबाईच्या समाधीची तिथी वैशाख वद्य १० अशी मानतात. एदलाबादेजवळील कोथळी (Kothali) ह्या गावी तिची समाधी दाखविली जाते.

मुक्ताबाईच्या नावावर *सकलसंतगाथा, खंड १* मधील ४२, *ज्ञानेश्वरांची प्रभावळ*मधील ८ व ताटीचे ५ मिळून एकंदर पंचावन्न अभंग जमेस धरले जातात; अधिक संशोधनांती ही संख्या सव्वाशेच्या घरात जाण्याची शक्यता निर्माण झाली आहे. मुक्ताबाईची सर्वच रचना मधुर

असून ताटीच्या अभंगांवरून तिच्या संवेदनाशील मनाची आणि प्रगल्भ विचारांची कल्पना येऊ शकते. असे म्हणतात की कोणा एका टवाळाने ज्ञानेश्वरांना पाहून त्यांच्यासारख्या संन्याशाच्या मुलाच्या दर्शनाने मोठा अपशकुन झाला असे उद्गार काढले. ते कानावर येताच ज्ञानेश्वर मनात खिन्न होऊन झोपडीत जाऊन बसले व बाहेरील मुक्ताबाईस ते आत घेईनात. ह्या वेळेस मुक्ताबाईने झोपडीची ताटी किंवा दार उघडून आत घेण्याची ज्ञानेश्वरांना विनंती केली. त्या वेळेस ज्ञानेश्वरांशी तिने जो संवाद केला ते अभंग *ताटीचे अभंग* म्हणून प्रसिद्ध आहेत. एवढ्या लहान वयात विश्वाचे गूढ अनुभविण्याचा व ते उकलण्याचा प्रयत्न येथे केलेला दिसतो. ह्या *ताटीच्या अभंगांची* भाषा बरीच अर्वाचीन असल्यामुळे ते अभंग ज्ञानदेवभगिनी मुक्ताबाईचे नसावेत असे मत ज. र. आजगांवकर ह्यांनी व्यक्त केले आहे.

मुक्ताबाई ही अध्यात्म आणि काव्य ह्या दोन्ही बाबतींत अधिकारी व्यक्ती असल्याचे ह्या अभंगांवरून प्रत्ययास येते. मुक्ताबाई आपले आध्यात्मिक अनुभव चमत्कृतिपूर्ण वर्णनाने रंगविण्यात कशी कुशल आहे, ह्याची कल्पना पुढील अभंगांवरून येईल : "मुंगी उडाली आकाशीं। तिनें गिळिलें सूर्यासी। थोर नवलाव जाला। वांझे पुत्र प्रसवला। विंचू पाताळासी जाय। शेष वंदी त्याचे पाय। माशी व्याली घार जाली। देखुनि मुक्ताई हांसली॥" *ताटीच्या अभंगां*प्रमाणे मुक्ताबाईचा हरिपाठही प्रासादिक आहे. ज्ञानेश्वरांच्या आज्ञेने मुक्ताबाईने चांगदेवांस उपदेश दिला. ह्यावरून तिचा अध्यात्मक्षेत्रातील अधिकार स्पष्ट होतो. हा उपदेश तिने अभंगांद्वारे केला. हे अभंग रूपकात्मक आहेत व काव्य दृष्ट्या सुरस आहेत. त्यांतून ती चांगयास स्वतःचा बाळ कल्पून त्याला ज्ञानामृताने न्हाऊ घालते, अव्यक्ताने विणलेल्या अविनाशी पाळण्यात टाकते, त्याचे नामकरण करते, अनहत टाळी वाजवून त्याला 'स्व'स्वरूपी निजविते व मनपवनाची दोरी हाती घेऊन त्याचा डोळा अलक्ष्यी स्थिर करते. रूपकपद्धतीने अध्यात्मज्ञान व्यक्त करण्याची परंपरा नाथपंथीयांत विशेष रूढ होती. मुक्ताबाईने ती ज्ञानेश्वरांकडून उचललेली दिसते.

योगमार्गातील तिचा अधिकार जाणूनच एकनाथांनी तिचे 'मुक्तपणें मुक्त अशी योगियांची विश्रांति' म्हणून मोठे मार्मिक वर्णन केले आहे. तथापि योगविद्येत अधिकारी असूनही मुक्ताबाई जनसामान्यांसाठी भक्तीचा महिमा गाते : "नामबळें देही असोनियां मुक्त। शांति क्षमा चित्त हरिभजनें। दया धरा चित्तीं सर्वभूतीं करुणा। निरंतर वासना हरिरूपीं। माधव मुकुंद हरिनाम चित्तीं। सर्वत्र पैं मुक्ति नाम पाठें। मुक्ताईचें धन हरिनाम उच्चारु। अवघाचि संसारु मुक्त केला॥"

एकदा ती आपल्या भावांच्याबरोबर पंढरपूरला गेली असता विठोबाच्या समोर बसलेल्या नामदेवांचा भक्तीचा अहंकार पाहून सडेतोड शब्दांत तिने त्यांची कानउघाडणी केली त्यावेळी परमेश्वरसांनिध्य प्राप्त झाले तरी जोपर्यंत अहंकार नष्ट होत नाही, तोपर्यंत साधकाची आध्यात्मिक प्रगती होऊ शकत नाही, हेच तिने दाखवून दिले. पुढे ज्ञानदेवांच्या गुंफेत गोरा कुंभारांनी सर्व संतांची परीक्षा करावी असे ठरले. नामदेवांना गुरूपदेश देण्याचे घाटले, तेव्हा गोरोबांना बोलावण्याची कामगिरी मुक्ताबाईकडे आली. ह्या वेळेस मुक्ताबाईने नामदेवांस गोरोबा कुंभारांकडून अनुभवांचे प्रश्न विचारून त्यांच्यात पालट घडवून आणला. ह्या प्रसंगी वापरलेली साक्षात्काराची भाषा मुक्ताबाईचे व्यक्तिमत्त्व ठळकपणे दाखवून देते. ह्या प्रसंगाचे वर्णन करताना नामदेव म्हणतात : 'लहानशी मुक्ताई जैशी सणकांडी। केले देशोधडी महान संत'.

मुक्ताबाईच्या काव्यात गूढगुंजन आढळते. ह्यामुळे मनात निर्माण होणाऱ्या प्रतीकांना मूर्त स्वरूप देताना तिच्या काव्यात भावनाविष्काराचा आगळाच अनुभव येतो. ह्यास्तव गूढगुंजनातून अध्यात्माची छटा दर्शविणारी पहिली मराठी कवयित्री म्हणून मुक्ताबाईचे स्थान मोठे आहे.

मुक्ताबाईच्या काव्याचे समालोचन करताना सुशीला कुप्पुस्वामी म्हणतात : "मुक्ताबाईचे व्यक्तिमत्त्व केवळ कोणाच्या अनुकरणातून साकार झालेले नाही. ते पूर्णपणे स्वतंत्र आहे. मुक्ताबाई जणू स्वयंभू आहे. तिची ज्ञानावस्था इतकी पराकोटीला गेली आहे की, त्या अवस्थेत ती आपले स्त्रीत्वही विसरलेली आहे. तिच्या अभंगांत कुठेही स्त्रीभावाला प्राधान्य नाही. तिच्या अभंगांतून व्यक्त होत राहतो तो केवळ ज्ञानानुभव आणि ह्या तिच्या ज्ञानानुभवाच्या संदर्भात तिची खरी योग्यता कळते. सगुण भक्तीपेक्षा निर्गुणाच्या प्रतीतीला तिच्या कवितेत विशेष स्थान आहे."

मुक्ताबाईचे जीवनच एकंदर भव्य व विचारही तसेच उत्तुंग; परिणामी तिच्या काव्यातील काही स्थळी अर्थ लावणे थोडे कठीण होते. तिच्या काव्यात वेदान्ताचा पाट खळखळताना आढळतो. अद्वैत साक्षात्काराचे अनुभव आणि त्यांतून डोकावणारे आत्मज्ञान ह्यांचा मनोहर संगम ह्या कवितेत झालेला दिसतो. मुक्ताबाईचा आध्यात्मिक अधिकार फार मोठा. त्यास सहजस्फूर्त कवित्वाची जोड मिळाल्याने तिचे काव्य तर्ककर्कश न होता प्रासादिक झाले आहे.

ज. बा. कुळकर्णी

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : मुक्ताबाई; मसंक., १९३९; पृ. २४–४६. २. कुप्पुस्वामी, सुशीला : मुक्ताबाई : एक स्वरूपदर्शन; प्रतिष्ठान, जुलै १९६७, पृ. १२. ३. गुंजाळ, ना. रा. : श्रीमुक्ताबाईचे समाधिस्थल; भाइसंमंत्रै., चैत्र–ज्येष्ठ, श. १८५१, पृ. ५५–५६. ४. चांदोरकर, पां. मा. : श्रीमुक्ताबाईची अप्रसिद्ध कविता; भाइसंमंत्रै., चैत्र १८५४, पृ. १७९–१८१. ५. जोशी, म. रा. : नाथपंथ व भर्तृहरीनाथ; ज्ञाने. त्रैमा., फेब्रु. १९७६, पृ. १०–१६. ६. ढेरे, रा. चिं. : श्रीमुक्तादेवी योगिनी : आणखी काही माहिती; मसाप., जुलै–सप्टें. १९७०, पृ. ३८–४१. ७. तुळपुळे, ग. वि. : साक्षात्कारी स्त्रीसंत मुक्ताबाई; संतांच्या सहवासात, १९६१, पृ. १९–३७. ८. भिंगारकर, कृ. ज्ञा. : मुक्त जाहली मुक्ताई; प्रसाद, दीअं. १९६०, पृ. २९–३३. ९. महाजन, का. म. : 'निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई'; ज्ञाने. त्रैमा., नोव्हें. १९५४, मलपृष्ठ ३. १०. शर्मा, विनयमोहन : मुक्ताबाई; हिंमसंदे., पटणा, १९५७; पृ. ९३–९६.

**मुक्तेश्वर–१ / ० चिंतामणिसुत मुद्गल / ० मुद्गल, चिंतामणिसुत** [अंदाजे इ. स. च्या १६ व्या शतकाचा उत्तरार्ध – इ. स. च्या १७ व्या शतकाचा पूर्वार्ध] कवी. वास्तव्यस्थान पैठण. ह्यांच्या पित्याचे नाव चिंतामणी, मातेचे नाव गोदावरी. हे अत्रिगोत्री, आश्वलायनशाखी, ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. सोनारीचा भैरव (सोलापूर जिल्ह्यातील करमाळा तालुक्यातील प्रसिद्ध देवस्थान) व कोल्हापूरची महालक्ष्मी ही ह्यांची कुलदैवते. हे पैठणचे भागवतोत्तम संत एकनाथ ह्यांच्या एका कन्येचे पुत्र. मुक्तेश्वरांच्या जन्म-मृत्यु-कालाबद्दल निश्चित अशी माहिती मिळत नाही. त्यांचा जन्म श. १५३१ च्या (इ. स. १६०९) सुमारास झाला असावा असे मानले जाते. प्रा. द. सी. पंगु हे आपल्या 'मुक्तेश्वर' ह्या निबंधात (*प्राचीन मराठी कविपंचक*; १९४४; पृ. १९) तो शक १४९६ (इ. स. १५७४) असावा असे मानण्यास प्रत्यवाय नाही, असे लिहितात; त्याचप्रमाणे 'ते श. १५६७ / इ. स. १६४५–४६ च्या सुमारास स्वर्गवासी झाले असावे' (तत्रैव, पृ. २३) असे सुचवितात.

ह्या कवीच्या कालाप्रमाणेच त्यांच्या 'मुक्तेश्वर' ह्या नावाबद्दल व पारमार्थिक गुरूबद्दल वाद आहे. 'मुक्तेश्वर' हे ह्या कवीचे जन्मनाम की कविनाम ? काहींचे म्हणणे त्यांचे जन्मनाम मुद्गल हे असून 'मुक्तेश्वर' हे त्यांचे कविनाम आहे, तर काहींचे म्हणणे मुद्गल हे जन्मनाम नसून कुलनाम आहे. पहिल्या पक्षाच्या समर्थकांत वि. ल. भावे, बा. अ. भिडे, अ. का. प्रियोळकर हे मोडतात, तर दुसऱ्याच्या समर्थकांत वि. का.

राजवाडे, ल. रा. पांगारकर, ज. र. आजगांवकर वगैरे लोक मोडतात. मुक्तेश्वर आपल्या काव्यात गुरूचा 'लीलाविश्वंभर' असा उल्लेख करीत असतात. हा लीलाविश्वंभर कोण ? राजवाडे आणि पांगारकर ह्यांच्या मते, ही त्यांच्या माता-पित्यांची नावे होत. राजवाडे म्हणतात : विश्वंभर हे त्यांच्या वडिलांचे दुसरे नाव असून तेच त्यांचे गुरू होत. मुक्तेश्वरांच्या *महाभारता*च्या *आदिपर्वा*चे, अनेक हस्तलिखिते मिळवून व चिकित्सापूर्वक शास्त्रशुद्ध पाठसंशोधन करून, संपादन करणारे अ. का. प्रियोळकर ह्यांनी, 'लीलाविश्वंभर' म्हणजे मुक्तेश्वरांचे माता-पिता ही कल्पना खोटी तर आहेच, इतकेच काय ते अन्य कोणा मानवी व्यक्तीचे नावही नाही, असे आपले मत स्पष्टपणे व्यक्त केले आहे. ते 'श्रीमुक्तेश्वराचा शोध' ह्या आपल्या निबंधात लिहितात : "वास्तविक ज्या ओवीनें ह्या सगळ्या लोकांना गोंधळांत टाकलेलें आहे तिच्यांतील पाठच मुळीं चुकीचा होता. *सभापर्वा*च्या उपसंहारांतील ही ओवी 'तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात । व्यास भारतींचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ॥' अशी नसून 'तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभरानुग्रहीत । व्यास भारतींचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ॥' अशी आहे. . . ह्यावरून लीलाविश्वंभर हें चिंतामणीचें दुसरें नांव ह्या कल्पनेचा आधारच नष्ट होतो, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. लीलाविश्वंभर हा जर मुक्तेश्वराचा बाप नाहीं तर मग अन्य कोण ह्याचाहि येथें विचार करणें प्राप्त आहे. . . मुक्तेश्वर जेव्हां 'विश्वंभर' किंवा 'लीलाविश्वंभर' म्हणून नमन किंवा निर्देश करतो, त्यावेळीं त्याच्या पुढें कोणतीहि मानवी व्यक्ति होती असें वाटत नाहीं. स्वतः मुक्तेश्वरच ह्या लीलाविश्वंभरासंबंधी 'लीलाविश्वंभर ईश्वरु । दत्तात्रेय जगद्गुरु । ज्याचेनि नामें भवसागरु । मागां तरले असंख्य ॥' (*सभापर्व*, प्रा. ओ. ६); 'ॐ नमो जी विश्वंभरु । तो देव दत्तात्रय जगद्गुरु ।' (मुक्तेश्वरकृत *एकनाथचरित्र*); 'मुक्तेश्वराचा श्रीगुरु । दत्तात्रय परब्रह्मअवतारु ।' (मुक्तेश्वरकृत *स्फुट काव्ये*, पृ. १७९) असे सांगतो. (त्यावरून) त्रिमूर्तिस्वरूप (श्रीदत्तात्रेय) हाच मुक्तेश्वराचा खरा 'लीलाविश्वंभर' होय." हे दत्तात्रेयांचे सहाव्या अवतारातील नाव आहे. मुक्तेश्वरापूर्वी दासोपंतांनी 'लीलाविश्वंभर' किंवा 'विश्वंभर' ह्या नावांनी दत्तात्रेयांचा निर्देश केला आहे. मुक्तेश्वरांचे मातामह व त्यांना पूज्यस्थानी असणारे एकनाथ आणि त्यांचे गुरू जनार्दनस्वामी हे दत्तोपासक होते ही गोष्टही ह्या ठिकाणी लक्षात घ्यावी लागते.

'मुक्तेश्वर' हे मुद्रानाम धारण करण्यापूर्वी कवी 'चिंतामणिसुत मुद्गल' किंवा 'मुद्गल चिंतामणि' ह्या नावाने स्फुट कविता लिहीत असावा. ह्या नावाने लिहिलेल्या दोन कविता उपलब्ध आहेत. त्यांपैकी एक धुळे येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरातील चार बाडांत (१३२, २५०, २९५, ६८८) असून, दुसरी ('हनुमंताची आरती') तंजावरच्या सरस्वतीमहाल संग्रहात (यादी, क्र. ३, पृ. ११०) आढळते. कवीने पुढे, *महाभारता*च्या रचनाकालापासून, 'मुक्तेश्वर' हे नाव स्वीकारले असावे असे *आदिपर्वा*च्या प्रारंभीच्या एका ओवीवरून स्पष्ट होते. ती ओवी अशी : "मुक्तेश्वर जो मी अवधूत । माझेनि नामें मुद्रांकित । कथा विस्तारीं भारत । महाराष्ट्र पदबंधी ॥ ४५ ॥" ह्यावरून मुक्तेश्वर ही कोणी देवता आहे असे दिसते. 'मुक्तेश्वर' हे शिवाचेच अन्य नाव. ह्या मुक्तेश्वर देवतेची देवालये हैद्राबाद-नागपूरकडे व दक्षिण भारतात आहेत. कवी स्वतःचे आराध्य दैवत जे 'श्रीदत्त किंवा लीलाविश्वंभर' त्याला शिव-स्वरूपच मानी. ही गोष्ट अवधूतमूर्ती, पिनाकपाणी, शूळपाणी अशां-सारख्या त्याला दिलेल्या विशेषणांवरून दिसून येते.

मुक्तेश्वरांच्या ग्रंथांतील अनेक उल्लेखांवरून त्यांना वेद, व्याकरण, न्याय, मीमांसा, संस्कृत काव्ये, पुराणे इत्यादींचा उत्तम परिचय होता असे स्पष्ट होते. तत्कालीन पारंपरिक पद्धतीप्रमाणे त्यांचे अध्ययन सर्वांगीण झाले असले पाहिजे. मुक्तेश्वरांनी काशीयात्रेच्या निमित्ताने किंवा इतर कारणांनी सर्व भारतभर प्रवास केला होता. निरनिराळ्या प्रांतांतील चालीरीती व वैशिष्ट्ये ह्यांची मार्मिक उदाहरणे हे ग्रंथांतून अनेकदा देतात.

मुक्तेश्वरांच्या आयुष्याचा उत्तरार्ध कुरुंदवाडजवळील तेरवाड (ता. शिरोळ, जि. कोल्हापूर) येथे पंचगंगेच्या तीरी गेला. "मुक्तेश्वर हे दत्तभक्त असल्याने औदुंबर व नरसोबाची वाडी ह्या दत्तस्थानांच्या आणि करवीरच्या कुलदेवतेच्याहि जवळ अशा पंचगंगातीरी तेरवाडास राहण्यास उत्तर वयात गेले असावे" (ना. ब. जोशी : *साहित्य-संशोधन-मंजिरी*, १९७३, पृ. ६९). तेथेच त्यांचे देहावसान झाले. ह्या ठिकाणी त्यांचे वंशज विद्यमान असून त्यांच्या समाधीचे वृंदावन पाहण्यास सापडते. ह्या वंशजांकडून प्रतिवर्षी ज्येष्ठ शु. ५ ला मुक्तेश्वरांची पुण्यतिथी साजरी केली जाते.

मुक्तेश्वरांची आज उपलब्ध असलेली रचना पुढीलप्रमाणे : *संक्षेप-रामायण*; *भावार्थरामायण – उत्तरकाण्ड*; *भारता*ची *आदि*, *सभा*, *वन*, *विराट* व *गदापर्वांतर्गत सौप्तिक* ही पाच पर्वे; काही स्फुट प्रकरणे; काही आरत्या व पदे. त्यांनी रचलेल्या *भारता*च्या पूर्णते-अपूर्णतेसंबंधी विद्वान मंडळीत बरीच मत-मतांतरे आढळतात. काहींचे म्हणणे मुक्तेश्वरांनी *भारता*च्या अठराही पर्वांची रचना केली, तर कांही म्हणतात की, आज जी पाच पर्वे उपलब्ध आहेत तेवढीच त्यांच्याकडून रचना झाली. *सौप्तिकपर्व* १९०६ साली *काव्यसंग्रहा*तून प्रसिद्ध झाले. तत्पूर्वी हीच मंडळी मुक्तेश्वरांनी *चार*च पर्वे लिहिली असे प्रतिपादीत असे. हे लक्षात घेता, मुक्तेश्वरांची आणखीही काही पर्वे – निदान *सौप्तिक*पर्व हे ज्या 'गदापर्वा'तील आहे, त्या दहाव्या पर्वापर्यंतची तरी – सापडण्याची शक्यता आहे. ल. रा. पांगारकर आपल्या *मराठी वाङ्मयाचा इतिहास*, *खंड २* मध्ये म्हणतात : "*सौप्तिकपर्व* ज्या अर्थी सांपडलें आहे त्या अर्थीं त्या पूर्वींचीं पर्वं त्यांनीं लिहिलीं असलीं पाहिजेत व कदाचित् अधिक कसोशीनें संशोधन झालें तर ह्यापुढें तीं उपलब्ध होतील, नाहीं कोणीं म्हणावें ?"

मुक्तेश्वरांनी *भारता*ची अठराही पर्वे लिहिली होती किंवा नाही, ह्या प्रश्नाचा विचार करताना जी एक गोष्ट प्रामुख्याने लक्षात ठेवणे आवश्यक आहे ती ही की, हा ग्रंथ आज अपूर्ण स्थितीत का आढळतो ह्यासंबंधी ज्या दंतकथा प्रचलित आहेत, त्यांत पहिल्या चार पर्वांनंतरची पर्वे मुक्तेश्वरांनी लिहिलीच नाहीत असे सांगणारी एकही नाही. उलट, ती लिहिली होती असेच सर्व दंतकथा सांगतात. *सौप्तिकपर्व* सापडले ही घटना लक्षात घेऊन डॉ. स. ल. कात्रे ह्या संशोधक गृहस्थांनी आपल्या '*मुक्तेश्वरी भारता*चीं अवशिष्ट पर्वें' (विसंमंवा., १९६३; पृ. १५९ – १६६) ह्या निबंधात जो एक विचार मांडला आहे तो चिंतनीय आहे. ते लिहितात : "कवीस इतर सर्व पर्वें सोडून केवळ ह्या मधल्याच पर्वाकडे वेधून घेणारें कांहींच विशिष्ट आकर्षण *सौप्तिकपर्वां*त नाहीं, ह्या गोष्टी-कडे ह्या संशोधकांचें पूर्ण दुर्लक्ष झालें आहे. . . .अवशिष्ट पर्वांपैकीं निदान कांहींची रचना निश्चितपणें सूचित करणारीं सबळ अशीं थोडीं-फार प्रमाणेंही आपणांपुढें आहेत. 'ऐसे हे ययातीचे दौहित्र । चौघे माधवीचे सुपुत्र । याचें सविस्तर चरित्र । उद्योगपर्वीं परिसणें ॥' (*आदि-पर्व*, २०.१७३) इत्यादि दोन-तीन ठिकाणांत मुक्तेश्वरांनीं स्वतःच त्यांच्या *उद्योगपर्वा*चा उल्लेख केला आहे. ह्या स्थळांवरून भाव्यांना मुक्तेश्वरांनीं *उद्योगपर्व* अर्धेमुर्धे रचिलें असावें अशी मुरड स्वतःच्या मतास घालावी लागली आहे! 'मूर्खांचीं लक्षणें' हें १३३ ओव्यांचें प्रकरण *काव्यसंग्रहा*च्या 'मुक्तेश्वरकृत स्फुट काव्यें' (१९०६) ह्या भागात प्रसिद्ध झालें आहे. तें मूळ *महाभारता*च्या *उद्योगपर्वां*तील 'मूढलक्षण' दर्शक १० श्लोकांचा स्वैरविस्तारानुवाद असून *मुक्तेश्वर उद्योगपर्वा*तून उद्धृत झालेलें असावें, असा त्या भागाचे संपादक दामूअण्णा ओक ह्यांचा साधार तर्क आहे. त्याच भागात *मुक्तेश्वरी भगवद्गीता* कांहीं हस्तलिखितां-

वरून प्रकाशित झाली आहे. तिच्यावरून *मुक्तेश्वर आदिपर्व* रचलें गेलें असल्याचा स्पष्ट संकेत मिळतो. ही *ओवीबद्ध भगवद्गीता* प्रियोळकरांना तिच्या भाषासरणीवरून मुक्तेश्वरकृत वाटत नाहीं. दामूअण्णा ओकांनाही तिच्या मुक्तेश्वरकर्तृत्वाबद्दल प्रथमदर्शनीं शंका आली होती. पण सर्वांगीण मननानंतर शंकेचें निरसन होऊन ती मुक्तेश्वरकृतच असल्याबद्दल त्यांची पूर्ण निश्चितता झाली असें त्यांनीं नमूद केलें आहे. *सौप्तिकपर्वा*च्या उपसंहारांत मुक्तेश्वर लिहितात : 'यापरी जन्मेजया भूपति । सौप्तिक पावलें समाप्ति । पुढें स्त्रीपर्वाची स्थिती । कर्णनेत्रीं विलोका ॥ १ ॥' – ह्यावरून मुक्तेश्वर *सौप्तिकपर्व* संपतांच पुढील *स्त्रीपर्वा*च्या रचनेकडे वळत असल्याचें स्पष्टपणें लक्षांत येतें. याप्रकारें मुक्तेश्वरांनीं निदान *स्त्रीपर्वा*पर्यंतची *भारत*रचना केली होती आणि जरी त्या अकरापैकी सहा पर्वें कांहीं अदृष्ट कारणामुळें निश्चितपणें अद्याप समोर आलीं नसलीं तरी त्यांची मुळांत निर्मिती झाली असल्याबद्दल शंका काढण्यास कांहीं आधार नाहीं असें दिसून येईल. " *महाराष्ट्र-सारस्वत*कार वि. ल. भावे हेही 'अनंतसुत त्र्यंबक' ह्या आपल्या लेखात (*वारसा*, लेखसंग्रह; १९७१; पृ. १५६) मुक्तेश्वराने पुढील पर्वे रचली असावीत असे मत व्यक्त करतात.

*भारता*च्या पाच पर्वांव्यतिरिक्त मुक्तेश्वरांची मुद्रित कविता पुढीलप्रमाणे : *संक्षेपरामायण*; *भगवद्गीता*; *महाभारतातील* प्रकरणे; श्रीकृष्णचरित्रविषयक प्रकरणे; *भविष्योत्तर* पुराणातील प्रकरण; इतर पुराणांतील आख्याने; संतचरित्रे, पदे, आरत्या वगैरे. त्यांची ह्याहूनही बरीच कविता असावी असे काही विद्वानांचे मत आहे. अलीकडे, मुक्तेश्वरांनी लिहिलेले, त्यांचे मातामह पैठणकर एकनाथ ह्यांच्या *भावार्थरामायणा*तील २४८८ ओव्यांचे अठरा-अध्यायी *उत्तर-काण्ड* प्रकाशात (पुणे, १९६३) आले असून प्रा. वसंत स. जोशी ह्यांनी ते संशोधन संपादिले आहे.

मुक्तेश्वरांचा, तत्कालीन विद्वान ब्राह्मणवर्गातील तरुणांप्रमाणेच छंद, व्याकरण व अलंकार ह्या शास्त्रांचा, त्याचप्रमाणे प्रमुख संस्कृत काव्यनाटकादींचा चांगला अभ्यास होता. त्यांच्या मातोश्रींचे वडील एकनाथमहाराज ह्यांचा सहवास लाभल्यामुळे पूर्वकालीन मराठी कवींच्या काव्याशीही त्यांचा परिचय स्वाभाविकपणे घडून आला. त्यांचे उदाहरण नजरेसमोर असल्याने स्वभावेत काव्यरचना करण्याची त्यांना प्रेरणा होणेही तितकेच स्वाभाविक होते. शास्त्रग्रंथावलोकन, बहुश्रुतता, पंडितमंडळीचा सहवास, अनेक प्रदेशांतील प्रवास, मानवसमाजाचे व मनाचे सूक्ष्म निरीक्षण, चोखंदळ कलाभिरुची, अभिजात रसिकता ह्यांची जोड मिळाल्यामुळे त्यांच्या कविता-रचनेला पूर्वीच्या पिढीतील कवींच्या कवितेहून वेगळे व वैशिष्ट्यपूर्ण असे रूप क्रमाक्रमाने प्राप्त होत गेले. ह्या रूपाचा पूर्णविकास त्यांच्या *ओवी-भारतात* – विशेषत: *आदिपर्वात* – झाला.

मुक्तेश्वरांची प्रारंभीची कविता बरीचशी अनुकरणप्रधान आहे. त्यांचे अनेक वृत्तांत लिहिलेले पहिले काव्य जे *संक्षेपरामायण* ('कौतूहल रामायण') त्यात अनामिक व अनेककर्तृक *हनुमन्नाटक* व जयदेवकृत *प्रसन्नराघव* नाटक ह्यांचे त्यांनी बरेच अनुकरण केल्याचे आढळते. डॉ. के. ना. वाटवे ह्यांनी *प्राचीन मराठी पंडिती काव्य* (पृ. १००) ह्यात म्हटले आहे : "मुक्तेश्वरानें आपल्या *रामायणांत हनुमन्नाटका*चा प्रत्यक्ष उल्लेख केला नसला तरी आपली वाणी 'नानानाटकशावपद्यरचना-संदोहसान्द्रीकृता' (*बालकाण्ड*, *१*) आहे, असे म्हटले आहे. *मुक्तेश्वरी रामायणांत हनुमन्नाटका*तील श्लोकांच्या अर्थानुवादाचीं निदान पस्तीस-चाळीस तरी स्थळें मला सांपडलीं." बाळकृष्ण अनंत भिडे ह्यांनी 'मुक्तेश्वर' ह्या आपल्या निबंधात (पृ. २७–२८), मुक्तेश्वरांनी *संक्षेप-रामायणा*मध्ये *प्रसन्नराघव* नाटकामधील काही श्लोकांच्या केलेल्या अनुवादाची उदाहरणे दिली आहेत.

*संक्षेपरामायणा*ची ग्रंथसंख्या १७२५ आहे. ह्यातील प्रारंभीचे तीन संस्कृत श्लोक व शेवटचे *उत्तरकाण्ड* हे भाग मूळ *संक्षेपरामायणास* मागाहून जोडले असावेत, असे मत अ. का. प्रियोळकर ह्यांनी व्यक्त केले आहे. मुक्तेश्वर *युद्धकाण्डा*च्या उपसंहारात म्हणतात : "सकळ सुख सुखाचें राम हें नाम ऐसें, सुख भरतवसिष्ठा पौरजांलागिं जैसें । अगणित सुख तैसें नित्य हो श्रोतयांतें । विनउनि कवि मागे दान त्या सावचित्तें ॥ ४६५ ॥ 'संक्षेपरामायण' नाम यातें, संक्षेपता ये श्रवणीं भवातें । काशी निवासीजनताप हारी । तारी जगा केवळ नामधारी ॥ ४६६ ॥ . . . जिहीं सादरें शेवटा ग्रंथ नेला . . . ॥ ४६८ ॥" इत्यादी काव्यपंक्तींवरून मुक्तेश्वरांनी येथेच *युद्धकाण्डा*च्या शेवटी हा ग्रंथ समाप्त केला हे स्पष्ट होते. ह्यापूर्वीच्या प्रत्येक काण्डाच्या शेवटी कवीने त्या काण्डाची समाप्ती केली असल्याचे सांगितले आहे. परंतु *उत्तरकाण्डा*च्या शेवटी त्यांनी तसे केलेले नाही. समाप्तिनिदर्शक 'उपसंहार' असे शीर्षक घालून जे तीन श्लोक लिहिलेले आहेत ते प्रक्षिप्त असले पाहिजेत. *युद्धकाण्डा*तील उपसंहारातील श्लोकावरून आणखी दोन गोष्टी लक्षात येतात; त्या म्हणजे आपल्या *रामायण* ग्रंथाला त्यांनी *संक्षेपरामायण* म्हटले आहे. *रामायण* हे काव्य त्यांनी सर्वप्रथम लिहावयास घेतले असले पाहिजे. ते त्यांच्या अपरिपक्व प्रतिभेचे निदर्शक आहे; कारण त्यात गणमात्रांची ओढाताण, ऱ्हस्वदीर्घाकडे दुर्लक्ष, व्याकरणदुष्ट शब्दप्रयोग, रचनेतील ओबडधोबडपणा इत्यादी दोष मोठ्या प्रमाणात आढळून येतात आणि शब्दचमत्कृतीकडे विशेष ओढा दिसतो. अर्थात हे दोष असूनही कवीच्या प्रतिभेची पहिली झलक त्याच्या ह्या काव्यरचनेतही दिसून येते. त्यांच्या ग्रंथसंपदेचा दुसरा खंड *भारत*रचनेचा. ह्यात मुक्तेश्वरांच्या परिणत प्रज्ञेचे आणि उत्तुंग प्रतिभेचे सर्व पैलू दृष्टीस पडतात. शेवटचा तिसरा खंड म्हणजे त्यांची स्फुट प्रकरणे. ह्यांतील काव्यगुण संमिश्र स्वरूपाचे आहेत. अगदी अलीकडेच प्रा. वसंत स. जोशी ह्यांनी एकनाथांच्या *भावार्थरामायण* ह्या ग्रंथातील *उत्तरकाण्ड* हा भाग मुक्तेश्वरांनी लिहून पूर्ण केला आहे, असे सोदाहरण प्रतिपादन, त्यांनी छापून प्रसिद्ध केलेल्या ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत, केले आहे.

एकनाथ व त्यांचे गुरू जनार्दनस्वामी ह्यांच्या दत्तसंप्रदायात मुक्तेश्वर प्रविष्ट झाले असले तरी एकनाथ व तत्पूर्वीचे आणि तदनंतरचे संतकवी ह्यांच्याप्रमाणे त्यांनी भक्तिमार्गाचा म्हणजे भागवत पंथाचा पुरस्कार केलेला दिसत नाही. ज्ञानेश्वर व एकनाथ ह्यांच्याखेरीज ते कोणाचा उल्लेखही करीत नाहीत. मुक्तेश्वर हे स्वतंत्र प्रज्ञेचे काव्यकलोपासक होते. आपल्या पारंपरिक अध्ययनात त्यांनी वेदान्ताचा चांगला परिचय करून घेतला असला तरी त्यांचा दृष्टिकोण पारमार्थिक स्वरूपाचा नसल्यामुळे कालिदास, जयदेव, जगन्नाथपंडित, भर्तृहरी इत्यादी लालित्यप्रचुर संस्कृत कवींचा मुक्तेश्वरांच्या सौंदर्योपासक व कलालोलुप मनावर विशेष ठसा उमटलेला दिसतो; व ह्या कवींच्या काव्यवाचनाने व परिशीलनाने त्यांची स्वयंभू प्रज्ञा आणि प्रतिभा परिपुष्ट झालेली आढळते. *संक्षेपरामायणात* तर ह्याची जाणीव विशेषत्वाने होते. इतर संतकवी ईश्वरभक्ती व परमेश्वराचे गुणगान हेच काव्याचे अधिष्ठान, प्रयोजन व जीवन-साफल्य मानीत तसे मुक्तेश्वर मानीत नाहीत. तर ब्रह्मरसास्वादसहोदर असा काव्यकलानंद हाच आपल्या काव्यकलेचा प्रधान हेतू त्यांनी आपल्यासमोर ठेवला. त्याच अनुषंगाने पांडित्य-प्रदर्शन करून शब्दार्थचमत्कृतीने आपल्या वाचकांस चकित करून सोडणे ह्या जाणिवेचा प्रत्ययही त्यांच्या काव्यरचनेत आल्याशिवाय राहात नाही. *संक्षेपरामायणात* त्यांनी आपली ही हौस पुरी करून घेतली आहे. परंतु त्यांच्या तरल व सर्वस्पर्शी अशा उत्तुंग प्रतिभेला यथेच्छ स्वैर विहार करता येईल व कल्पना-विकासाला भरपूर वाव मिळेल असा ग्रंथ म्हणजे *महाभारत* होय. हाच मुक्तेश्वरांचा सर्वश्रेष्ठ ग्रंथ आहे. [ ⇨ ३. ]

व्यासांचे *महाभारत* हेच एक असे आर्ष महाकाव्य आहे की ज्यात कोणत्याही महाकवीला आपल्या प्रतिभेचे व कल्पनाशक्तीचे सर्व विलास व हव्यास पुरे करून घेण्याला भरपूर वाव मिळतो. *भारत*रचना करून मुक्तेश्वरांनी आपली ही हौस पुरी करून घेतली. मुक्तेश्वरांची प्रतिभा ही महाकवीच्या तोडीची होती हे कोणालाही कबूल करावेच लागेल. पण कालिदासादी ललितप्रधान महाकवींच्या अभिजात कलाकृतींमध्ये जी प्रमाणबद्धता, जो रेखीवपणा आणि जो संयम आढळतो तो मात्र मुक्तेश्वरांच्या काव्यरचनेत दिसून येत नाही. अभिजात कवी ह्या दृष्टीने मुक्तेश्वरांचा एक दोष असा की स्फूर्तीच्या सर्जनशील कृतीत बेहोश होऊन ते आपल्या उच्छृंखल प्रतिभेच्या आहारी जातात, तिला आपल्या ताब्यात ठेवू शकत नाहीत, तिला संयम व शिष्टाचार ह्यांची बंधने घालू शकत नाहीत. तथापि ह्या संदर्भात एक गोष्ट लक्षात आणली पाहिजे ती ही की *महाभारत* हा मूलतः इतिहास-ग्रंथ आहे; *कुमारसंभव*, *किरातार्जुनीय* किंवा *शिशुपालवध* ह्यांप्रमाणे एकसंध ललित महाकाव्य नव्हे. तेव्हा मुक्तेश्वरी *भारत*-रचनेत स्वयंपूर्णता अथवा एकसंधता आढळून न येणे स्वाभाविक आहे. मुक्तेश्वरांनी मुक्तमनाने मूळ *भारता*चा आपल्या अवखळ मनोवृत्तीला अनुसरून संक्षेप वा विस्तार केला आहे; व आपल्या अभिरुचीप्रमाणे मूळ *भारता*तील आख्याने निवडली आहेत. उपमा, उत्प्रेक्षा व रूपक ह्यांतून प्रकट झालेली मुक्तेश्वरांची प्रतिभा ज्ञानेश्वरांची आठवण करून देते. मराठी संतकवी आपल्या ग्रंथरचनेसंबंधी नम्रतेनेच बोलतात. ज्ञानेश्वर मात्र त्यांनी वापरलेल्या मराठी भाषेच्या समर्थनार्थ त्यांच्या भाषाशैलीतील सौंदर्याचा व माधुर्याचा अनेक ठिकाणी आवर्जून उल्लेख करताना दिसतात. मुक्तेश्वरांना आपल्या भाषाप्रभुत्वाची तीव्र जाणीव दिसते. आपल्या अलंकारिक भाषाशैलीबद्दल बोलताना ते म्हणतात : "व्यास ग्रंथगिरीचे सोने। संस्कृत घोटियें गाळुनि मनें। देशभाषा घडिले लेणें। साहित्य रत्न सुजडित ॥" म्हणजे *व्यास-भारता*च्या सोन्याला मी साहित्य-रत्नाच्या जडावाचे रूप दिले आहे, असा ते दावा करतात. 'मी सर्वज्ञ असा कविनायक' असे उद्गार काढायलाही ते कचरत नाहीत. "सगुण सुभद्रा यादवी। द्वारके धाडली स्नेहभावी। सांगो विसरला व्यास कवी। परि म्यां स्मरण दीधले ॥" असे सांगून व्यासांची चूकही मुक्तेश्वर काढून दाखवितात.

मुक्तेश्वरांच्या ठिकाणी कवित्वशक्ती उपजतच होती, तरी त्यांना ग्रंथलेखनाची स्फूर्ती आपले मातृजनक श्रीएकनाथ ह्यांच्यापासूनच झाली असल्याचे दिसून येते. नाथांनी जसे *भावार्थरामायण* लिहिले तसेच आपणही एक *रामायण* लिहावयास घ्यावे असे त्यांना वाटले असले पाहिजे. मुक्तेश्वरांनी *महाभारतात* सज्जन आणि दुर्जन, साधू आणि भोंदू, पतिव्रता आणि स्वैरिणी, तपस्वी आणि बकध्यानी, चतुर आणि मूर्ख इत्यादी तत्कालीन समाजांत आढळणारे मानवी नमुने एकनाथांच्या धर्तीवरच वर्णिले आहेत. फरक एवढाच की एकनाथ प्रत्येक सांसारिक व सामाजिक गुणदोषांचे वर्णन आध्यात्मिक भूमिकेवरून करतात, तर मुक्तेश्वर ही दृश्ये व्यावहारिक दृष्टिकोनातून चित्रित करतात. *भारत*-रचना करताना मुक्तेश्वरांनी प्राकृत कवींचेही ग्रंथ मार्मिकपणे वाचले होते. आपल्या ग्रंथात त्यांचा मोघम उल्लेख करून मूळ *व्यास-भारतात* आढळत नाहीत अशी आख्याने रचल्याबद्दल मुक्तेश्वरांनी त्यांस दोष दिला आहे. परंतु नवलाची गोष्ट अशी की, काही प्रसंग चटकदार करण्यासाठी व्यासांना बाजूस सारून आपली स्वतःचीच वर्णने घालण्याकडे त्यांचीही प्रवृत्ती दिसते.

मुक्तेश्वरांच्या परिणतप्रज्ञेचे व प्रज्वलित प्रतिभेचे यथार्थदर्शन त्यांच्या *भारतात* होते. त्यातही त्यांचे *आदिपर्व* म्हणजे त्यांच्या कलाविकास-मंदिराचा सुवर्णकळसच होय. *आदिपर्वा*तील दुष्यंतशकुंतलाख्यान, ययाति-आख्यान वगैरेसारख्या प्रसंगी त्यांची प्रतिभा विशेषत्वाने प्रत्ययास येते. *आदिपर्वा*ची गोडी पुढील *सभापर्वा*त नाही. *वनपर्वा*च्या घनदाट अरण्याला तर मुक्तेश्वरांनी उपवनाचेच स्वरूप दिले आहे. *विराटपर्व* अगदीच सामान्य दर्जाचे झाले आहे. आणि शेवटचे *सौप्तिकपर्व*ही त्यांनी कष्टानेच संपविल्यासारखे दिसते. *भारत*रचनेत मुक्तेश्वर जसे कालमानाने पहिले तसेच काव्यगुणांनीही प्रथम क्रमांकाचेच ठरतील. त्यांच्या आधी एकदोघांनी *भारत* रचले आहे पण ते नगण्य आहे. मुक्तेश्वरांची व्यक्तिवर्णने सर्वांगसुंदर, रेखीव, जिवंत वाटावी अशी रसरशीत व ठसठशीत झाली आहेत. त्यांची सृष्टिवर्णने व स्थलवर्णने नंदनवनातील निसर्गसौंदर्याने नटलेली आहेत. विविध रसांचा उत्कट आविष्कार व परिपोष करणे हे त्यांचे एक खास वैशिष्ट्य आहे. अतिशयोक्ती हा तर त्या वर्णनशैलीचा जणू स्थायीभावच आहे. शृंगारिक वर्णनांत मुक्तेश्वर कालिदासावरही ताण करतात. करुण, वीर व रौद्र ह्या रसांतही त्यांची गती अत्यंत प्रभावी आहे. त्यांच्या काव्यांत कल्पना आणि भावना ह्यांचे मोठे मनोज्ञ मिश्रण झालेले आढळून येते. मुक्तेश्वरांची भाषाशैली पल्लेदार व ओघवती आहे. कालविपर्यास आणि प्रमाणबद्धतेचा अभाव इत्यादी दोष जमेस धरूनही ह्यांची वाणी वाचकाला संमोहित करून स्वतःचे अस्तित्व विसरावयास लावते असे म्हणता येते. कलाकवी ह्या दृष्टीने मुक्तेश्वरांचे स्थान प्राचीन व अर्वाचीन कवींमध्ये स्वयंसिद्ध व अनन्यसाधारण आहे.

ऐतिहासिक कालदृष्ट्या मुक्तेश्वर हे तुकाराम-रामदासांपेक्षा एकनाथांच्या कालखंडाकडे अधिक झुकतात. त्यांच्या भाषापद्धतीवरूनही हेच सिद्ध होते. मुक्तेश्वरांच्या हयातीतच शिवाजीमहाराजांच्या अगदी सुरुवातीच्या स्वराज्यस्थापनाविषयक हालचालींना नुकतीच सुरुवात झाली होती. परंतु तत्कालीन भौगोलिक परिस्थितीमुळे महाराजांच्या वर्धिष्णू पराक्रमाचे पडसाद पैठणपर्यंत पोहोचावयाचे होते. एकनाथ-मुक्तेश्वरांच्या कालखंडात मुसलमानांचा अंमलच सर्वत्र जारी होता व त्यांची अस्मानी सुलतानी सगळीकडे चालू होती. एकनाथांचे गुरू जनार्दनस्वामी तर यवनांचीच नोकरी इमानेइतबारे करून स्वधर्माचे संरक्षण करीत होते. म्लेंच्छांच्या दुष्टपणाची मुक्तेश्वरांनी केलेली वर्णने ही तत्कालीन यावनी परकीयांच्या दुराचाराचीच निदर्शक आहेत. मराठी माणसांची अवनती व ऱ्हास हा त्यांच्या धर्म- व नीति-भ्रष्टतेचाच परिपाक आहे असे उद्गार मुक्तेश्वरांनी काढले आहेत. "महाराष्ट्र जे सर्व राष्ट्रांसि राजे। जयाच्या भये व्यापिले देव लाजे। सदाचार भंगे पळाली प्रतिष्ठा। प्रतिष्ठान त्यांना भिकारींत निष्ठा ॥" असे उद्गार त्यांनी *संक्षेपरामायणा*च्या *युद्धकाण्डा*च्या उपसंहारात काढले आहेत.

मुक्तेश्वरांनी *भारत* रचून पुढील वामन पंडित (इ. स. १७ वे शतक), विठ्ठल व रघुनाथ पंडित (इ. स. १७ वे शतक, उत्तरकाल), मोरोपंत (इ. स. १८ वे शतक) इत्यादी कवींना आख्यानककविता लिहिण्यास स्फूर्ती दिली. कवी श्रीधर नाझरेकर ह्यांचा *पांडवप्रताप* हा *मुक्तेश्वरी भारता*चा तर्जुमाच आहे. 'पांडवप्रताप' हा शब्दप्रयोगही मुक्तेश्वरांच्या ग्रंथातूनच उचलला असावा ('पांडवप्रताप पुरुष तरणा'–मुक्तेश्वर).

मुक्तेश्वरांच्या ग्रंथांतून त्यांचे जे व्यक्तिमत्त्व प्रकट होते ते मोठे विलोभनीय आहे. आनंदी, निकोप व मोकळ्या मनाचे, रसिक मनोवृत्तीचे व विनोदबुद्धी असलेले गृहस्थाश्रमी पुरुष त्यांच्या रूपाने आपल्या नजरेसमोर उभे राहतात. परंपरागत धार्मिक बुद्धीने पण कर्मठपणाचे स्तोम न माजविता आपली दैनंदिन कर्तव्ये आटोपून आपला इतर वेळ ते काव्यशास्त्रविनोदात, ग्रंथवाचनात आणि लेखनात घालवीत असले पाहिजेत असे अनुमान काढता येते. मुक्तेश्वर हे गायनकलेतही निपुण असावेत. अशा वाङ्मयीन व संगीतमय वातावरणात मुक्तेश्वरांचे आयुष्य गेले असल्यामुळे त्यांच्या मूळच्या रसिक व उल्हसित वृत्तीला अनुसरून व तिला अध्ययनाची जोड देऊन मुक्तेश्वरांनी आपली ग्रंथ-रचना केल्यामुळेच ती इतकी आकर्षक झाली आहे असा निष्कर्ष काढावा लागतो.

वि. ह. कुळकर्णी

**रचना : मु.** – १. महाराष्ट्र कविवर्य मुक्तेश्वरकृत महाभारत भाग १ ते ४. १. **आदिपर्व** – ओ. सं. ७१२३; (१) संपा. गोडबोले, प. न.; सर्वसंग्रह, शिळाछाप, मुंबई, १८६५; (२) संपा. ओक, बा. दा.; मुंबई, १८९३; (३) संपा. प्रियोळकर, अ. का.; प्रस्तावनेसह; खं. १ ते ४; मुंबई, १९५१ ते १९५९. २. **सभापर्व** – ओ. सं. २७००; (१) संपा. गोडबोले, प. ब.; सर्वसंग्रह, शिळाछाप, मुंबई, १८६३; (२) संपा. ओक, बा. दा.; मुंबई, १८९४; (३) संपा. कुळकर्णी, वि. म.; प्रस्तावनेसह; पुणे, १९४९. ३. **वनपर्व** – ओ. सं. २७६५; (१) संपा. मोडक, ज. बा.; काव्येतिहाससंग्रह–३, पुणे, १८७९; (२) संपा. ओक, बा. दा.; काव्यसंग्रह–३१; मुंबई, १८९८; (३) संपा. पंगु, द. सी.; कोल्हापूर, १९४१. ४. **विराटपर्व** – ओ. सं. ९९१; (१) माधव चंद्रोबा; शिळाछाप, मुंबई, १८६७; (२) काव्यसंग्रह–३२; मुंबई, १८९९; आ. २ री : संपा. ओक, दा. के., मुंबई, १९३९. ५. **सौप्तिकपर्व** – अ. ४, ओ. सं. ५००; मुक्तेश्वरकृत स्फुटकाव्ये, मुंबई, १९०६. २. महाराष्ट्र कविवर्य मुक्तेश्वरकृत **रामायण**; संपा. मोडक, ज. बा. व ओक, बा. दा.; मुंबई, १८९१. कविवर्य मुक्तेश्वरकृत भावार्थ-रामायण – उत्तरकाण्ड, अ. १८, ग्रं. सं. २४८८; संपा. जोशी, वसंत स.; प्रस्तावनेसह; पुणे, १९६३. ३. महाराष्ट्र कविवर्य मुक्तेश्वरकृत स्फुटकाव्ये; संपा. ओक, दा. के.; विस्तृत विवेचक प्रस्तावनेसह; मुंबई, १९०६ (यात भारती पर्वे व रामायणाखेरीज सौप्तिकपर्व व भगवद्गीतेसह इतर सर्व रचना समाविष्ट). **शंका.** – कुडीआत्म्याचे भांडण (ग्रं. सं. १८); प्रियोळकर, अ. का.; प्रस्तावना; मसंप., जाने. १९५४; पृ. १–५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : महाकवि मुक्तेश्वर; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ४४२–४९६. २. आवळीकर, पंडित : मुक्तेश्वरावर प्रकाश; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. ९०–१०४. ३. ओक, दा. के.; रामदास आणि मुक्तेश्वर; रामदास आणि रामदासी, व. २०, अं. २३१, ऑग. १९४१; पृ. ७०–७४. ४. ओक, वि. को. : मुक्तेश्वर आणि मोरोपंत; विज्ञावि., व. ११, १८७९; पृ. २४८–२५६. ५. कहाळेकर, भा. शं. : मुक्तेश्वरकृत हरिश्चन्द्र कथा; प्रतिष्ठान, व. ४, अं. ८, एप्रि. १९५७, पृ. ४२–४९; अं. ९, मे १९५७, पृ. ४१–४९; अं. १०, जून १९५७, पृ. ४१–४८. ६. कहाळेकर, भा. शं. : मुक्तेश्वरांचें हरिश्चन्द्राख्यान; पंचधारा, व. ९, अं. १, नोव्हें. १९६६ ते जाने. १९६७, पृ. ५. ७. कात्रे, स. ल. : मुक्तेश्वरी भारताचीं अवशिष्ट पर्वे (शांतिपर्व रचलें गेलें असल्याचा नवीन बोलका पुरावा); विसंमंवा., १९६३; पृ. १५७–१६६. ८. कुळकर्णी, पां. ना. : मुक्तेश्वरचरित्राविषयीं पुनर्विचार; संशोधन-धारा; पुणे, १९६७; पृ. ३२–६१. ९. कुळकर्णी, पां. ना. : मुक्तेश्वरांचें विराटपर्व; संशोधन-धारा; पुणे, १९६७; पृ. १६३–१८८. १०. जनार्दन रामचंद्रजी; कविचरित्र; मुंबई, १८६०; पृ. १७८. ११. जोशी, चिं. नी. : श्रीधर आणि मुक्तेश्वर; श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन; पुणे, १९५१; पृ. ३८०–४४०. १२. जोशी, ना. ब. : मुक्तेश्वरावरील प्रकाशावर प्रकाश; साहित्य-संशोधनमंजिरी; बेळगाव, १९७३; पृ. ५९–६९. १३. जोशी, रा. भि : मुक्तेश्वर; मराठी भाषेची घटना; पुणे, १९२३; पृ. २६६–२६९. १४. दीक्षित, द. गो. : मुक्तेश्वरांचें महाभारत (आदिपर्व) – टीकात्मक निबंध; धुळे, १९३०. १५. नांदापूरकर, ना. गो. : जनाबाई आणि मुक्तेश्वर; प्रो. पोतदार स्मारक ग्रंथ; पुणे, १९५०; पृ. १०९–११६. १६. नांदापूरकर, ना. गो. : मुक्तमयुराची भारतें; हैद्राबाद, १९५६. १७. पंगु, द. सी. : मुक्तेश्वर; प्राचीन मराठी कविपंचक; कोल्हापूर, १९४४; पृ. १–२५. १८. पंगु, द. सी. : मुक्तेश्वरी भारत – सभापर्व; विज्ञावि., मार्च–मे १९३१. १९. पटवर्धन, वा. ब. : मुक्तेश्वर (इंग्रजी लेख); फर्ग्युसन कॉलेज मॅगा., ९ : ४; पुणे, १९१९. २०. पंडित, अ. ना. : मुक्तेश्वरी भारत; बडोदे येथील साहित्य संमेलनाकरिता लिहिलेले दहा निबंध; मुंबई, १९०९. २१. परांजपे, भा. श्री. : मुक्तेश्वर : व्यक्ति आणि वाङ्मय; नागपूर. २२. पांगारकर, ल. रा.; मुक्तेश्वर व मोरोपंत; मोरोपंत : चरित्र आणि काव्यविवेचन; पुणे, १९०८; पृ. ३८१–३८४. २३. पांगारकर, ल. रा. : कविवर्य मुक्तेश्वर (चरित्र व काव्यविवेचन); पुणे, १९२२. २४. पारखे, वसंत : मुक्तेश्वराचें आदिपर्व, अध्याय पहिला; नभामा., सप्टें. १९५७. २५. पोतदार, द. वा. : मुक्तेश्वर व हंपी विरूपाक्ष; भाइसंमंत्रै, व. २३, अं. ४, चैत्र १९६५; पृ. ९४–९५. २६. प्रभुदेसाई, वि. बा. : मुक्तेश्वर आणि लीलाविश्वंभर; विसंमंवा., १९७२; पृ. १६७–१७८. २७. प्रियोळकर, अ. का. : मुक्तेश्वर; महाराष्ट्रीय संत : वाङ्मय व जीवन; १९५२; पृ. १२९–१३८. २८. प्रियोळकर, अ. का. : मुक्तेश्वराचा शोध; प्रस्ता., आदिपर्व; मुंबई, १९५१. २९. फाटक, न. र. : कवि मुक्तेश्वर; लोकमान्य, दीअं. १९५४; पृ. ३९. ३०. बर्वे, चंद्रशेखर : मुक्तेश्वराच्या बंडखोरीचें मूळ; सह्याद्रि, जून १९६६, पृ. १५. ३१. भिडे, बा. अ. : परी., कविवर्य मुक्तेश्वर (ल. रा. पांगारकर); मसाप., एप्रि. १९२२, पृ. २७९–२८५. ३२. भिडे, बा. अ. : मुक्तेश्वर; मुंबई, १९२६. ३३. मालशे, स. गं. : मुक्तेश्वराचे 'नलोपाख्यान'; आवडनिवड; मुंबई, १९५९; पृ. १६२–१७९. ३४. राजवाडे, वि. का. : मुक्तेश्वर : संकीर्ण लेखसंग्रह; कोल्हापूर; पृ. १–१४. ३५. वाटवे, के. ना. : मुक्तेश्वर : पंडित-कवि; १९५२; पृ. १–२१. ३६. वैद्य, चिं. वि. : मुक्तेश्वराचें वनपर्व : वैद्य यांचे निबंध आणि भाषणें; मुंबई, १९१५; पृ. १४३–१६२. ३७. सबनीस, पां. जि. : कविवर्य मुक्तेश्वर; पांगारकर स्मारक ग्रंथ, भा. १; पुणे, १९४९; पृ. २२५–२७५. ३८. साने, का. ना. : सात्र प्राकृत महाभारत – मुक्तेश्वर व विष्णुदासनामाकृत; भाइसंमंइति., श. १८३२, पृ. ३४–३६.

**मुक्तेश्वर–२** [का. अनु.] कवी. शाहूछत्रपतींचे गुरू.

**रचना : अमु.** – शाहूछत्रपत्यष्टक; संककासू., पृ. ८०.

**० मुक्तोजी** – पहा **मृत्युंजय.**

**मुंताई** [का. अनु.] कवयित्री.

**रचना : अमु.** – अभंगरचना; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० मुंतोजी** – पहा **मृत्युंजय.**

**मुंतोजी खलजी / ० मुंतोजी बजिरुल्मुल्क** [अंदाजे इ. स. १४३५ – १५५०] संगीतज्ञ कवी. आबासाहेब मुजुमदार ह्यांच्या मते मुंतोजी हा माळव्याच्या खिलजी घराण्यातील असावा. तो स्वतःला 'बजिरुल्मुल्क' किंवा 'खळचिवंशवर्धन' म्हणवितो. ह्याच्या पित्याचे नाव जिया दौलतखान, ह्याच्या गुरूचे नाव महेंद्राचार्य, असे *विजयभैरव* ह्या ग्रंथातील समाप्तिमुद्रेवरून दिसते. 'श्रीसकळविद्याविशारद-श्रीमन्महेंद्राचार्यचरणांबुजशिष्य' अशी ती मुद्रा आहे.

ह्याने *विजयभैरव* हा ज्योतिषविषयक गद्य ग्रंथ मराठीत लिहिला आहे. त्यात पंचांग, शकुन, अंगस्फुरणादी लक्षणांची शुभाशुभ फले, तसेच भूमी, बल, यात्रा, वृष्टी इत्यादींसंबंधीचे भविष्य हे विषय आले आहेत. *संगीतमकरंदा*वर एक मराठी ओवीबद्ध टीकाही ह्याने रचली आहे. हा कुठेतरी राजकीय महत्पदावर असावा असे *संगीतमकरंदा*वरील टीकेवरून दिसते. आपल्या साहित्य-संगीत-प्रावीण्याबद्दल हा अभिमानी होता.

**रचना : अमु.** – १. विजयभैरव; ज्योतिषग्रंथ; तंसम. हस्त. यादी, क्र. ४, बा. २५४२. २. संगीतमकरंद; ओवीबद्ध मराठी टीका;

भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं.; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १६९–७०. २. मुजुमदार, गं. ना.; संगीतमकरंद व त्यावरील मराठी ओवीबद्ध टीका; भाइसंमत्रै., व. २०, अं. २, आश्विन १८६१; पृ. ८७–९२.

**० मुंतोजी ब्रह्मणी** – पहा मृत्युंजय.

**० मुंतोजी बजिरुल्मुल्क** – पहा मुंतोजी खलजी.

**मुद्गल** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. रामस्तुति; पद्यमय मराठी अनुवाद; २. वाल्मीकिरामायण; त्रु. पो.; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २४०, २५६.

**मुद्गल (अनंतसुत)** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. टिटवीरक्षण (इ. स. १७३६). २. दशरथशाप; ३. नामदेवचरित्र; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ८०.

**० मुद्गल कृष्णदास** – पहा कृष्णदास मुद्गल.

**मुद्गल जोशी** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] कवी. हे सोलापूरचे रहिवासी. रामजोश्यांचे वडील बंधू. हे कथाकीर्तने करून व पुराण सांगून आपले वतन-इनाम संभाळून प्रपंच चालवीत. हे आपल्या पित्याप्रमाणेच व्युत्पन्न होते. ह्यांनी मराठी व संस्कृत ह्या दोन्ही भाषांत काव्यरचना केली आहे. ह्यांनी *रघुवंश* ह्या महाकाव्याच्या धर्तीवर *यदुवंश*नामक १९ सर्गांचे संस्कृत महाकाव्य रचल्याचे सांगतात; पण ते उपलब्ध नाही. मराठी सुभाषितांचा ह्यांचा संग्रह इतिहाससंशोधक शं. ना. जोशी ह्यांस उपलब्ध झाला होता.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. (संपा.); ऐतिपो., खं. १; पुणे, १९२८; पृ. ५९.

**० मुद्गल, चिंतामणिसुत** – पहा मुक्तेश्वर–१.

**० मुद्गल दादोसुत** – पहा दादोसुत मुद्गल.

**० मुद्गलदास** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे, संककासू., पृ. ८१.

**मुद्गलस्वामी** [का. अनु.] संतकवी. ह्यांचे ८७ अभंग *काव्यसंग्रहा*त छापले आहेत (क्र. १० : पृ. ११६–११७). संपादकांनी कवीची माहिती दिलेली नाही. मुद्गलस्वामी हे विठ्ठलोपासक आणि पंढरपूरच्या वारकरी संप्रदायाचे अनुयायी आहेत असे अभंगांवरून स्पष्ट होते. परंपरेने चालत आलेल्या भक्तिमार्गाच्या महिम्याचे निरूपण कवीने ह्या अभंगांतून केले आहे.

**० मुद्गलाचार्य** – पहा हरिराज शेंडे.

**मुधया** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० मुनिबास** – पहा मुनिव्यास (कोठी).

**मुनि भारती** [का. अनु.] पदकार. वेंचले येथील शक १८२३ त उतरून घेतलेल्या पदांच्या बाडात कवीची पदे संग्रहित (भाइसंमं.).

**मुनिव्यास (कोठी) / ० मुनिबास** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] महानुभाव ग्रंथकार. मुनिव्यास हे कुमर आम्नायातील होत. हे पूर्वाश्रमीचे पंडित कमळाकर अयाचित कोठी. पण हेच त्यांचे मूळ नाव असल्याचा निर्देश, स्पष्टपणे, महानुभावीय साहित्यातून सापडत नाही. हे कुमर आम्नायातील असे *चरित्र आबाब*मध्ये म्हटले आहे. 'कुमराम्नाय कोठी' असे ह्यांचे नाव पंथीयांत रूढ होते.

परंपरागत समजुतीप्रमाणे मुनि कमळाकर हेच मुनिव्यास होत. ह्यांच्या दोन परंपरा दिल्या जातात त्या अशा : (१) नागदेव > रेमाइसे > म्हाळाइसे > मुनि कमळाकर; (२) नागदेव > रेमाइसे > कृष्णोबास रामेकर > कानोबास > म्हाळाइसे > मुनि कमळाकर. पहिली परंपरा लक्षात घेता ह्यांचा काळ श. १२९४ (इ. स. १३७२) ठरेल. दुसऱ्या परंपरेप्रमाणे आचार्यांनंतर १०० वर्षांनी म्हणजे श. १३३४ (इ. स. १४१२) हा काळ ठरतो. ह्यांपैकी पहिल्या परंपरेने येणारा काळ डॉ. वि. भि. कोलते ह्यांना अधिक संभाव्य वाटतो. पंथीयांमध्येही प्रथम परंपरेलाच अधिक मान्यता आहे (*स्थानपोथी*, प्रस्ता., पृ. ७).

श. १२७५ (इ. स. १३५३) मध्ये मुनिबासांनी *स्थानपोथी* रचल्याचा निर्देश य. खु. देशपांडे करतात (ममवा., पृ. ३१). *महाराष्ट्रसारस्वता*च्या पहिल्या भागात *स्थानपोथी*चा उल्लेख नाही. कोणा मुसलमान राजाकडून पूर्वाश्रमींच्या पंडित कमळाकर अयाचित कोठी ह्या नावाच्या उद्योगी व पाताळयंत्री पुरुषाने आज्ञापत्र मिळवून त्या जोरावर महाराष्ट्रात अनेक ठिकाणी महानुभाव पंथाचे ओटे ऊर्फ पूजास्थाने बांधली अशी माहितीच तेवढी दिली आहे (मसा., आ. ५, पृ. ५८). ह्या माहितीस *सारस्वत*कारांनी *अन्वयस्थळा*चा आधार दिला आहे.

*स्थानपोथी*चे कर्तृत्व अनेक अभ्यासकांनी मुनिबासांना दिले असले तरी डॉ. कोलते ह्यांच्या मते हे कर्तृत्व शंकास्पद आहे. *स्थानपोथी*च्या उपलब्ध असणाऱ्या अनेक प्रतींतून लेखक म्हणून सामान्यतः पोथ्यांच्या शेवटी कोणत्याच लेखकाचे नाव येत नाही. काही पोथ्यांच्या शेवटी चिडले महानुभावांचा निर्देश येतो. *स्मृतिस्थळ, वृद्धाचार, अन्वयस्थळ* ह्या १३ व्या शतकातील सर्व महत्त्वाच्या महानुभावी ग्रंथांत *स्थानपोथी*चे नाव येत नाही, ही गोष्ट लक्षात ठेवण्याजोगी आहे. मुनिबासांनी महानुभावांचे ओटे बांधले असा जो समज प्रचलित आहे, त्यावरून डॉ. कोलते असा तर्क करतात की, चक्रधरस्वामींशी संबंधित असलेली सर्व स्थाने मुनिव्यासांनी पुन्हा शोधली असावीत व स्थानांच्या टाचणीत दुरुस्ती केली असावी. मुनिव्यासांच्याही पूर्वी नागदेवाचार्यांच्या आज्ञेने स्थानांची टाचणे तयार करण्याचे हे काम बाइदेवबासांनी हातात घेतले असावे असे *स्मृतिस्थळा*तील 'स्थान निर्देशे बाइदेवोंचा अटण सांधणें' (स्मृ. ११५) ह्या स्मृतीवरून म्हणावेसे वाटते. मुनिव्यासांच्या काळात ह्या टाचणांना पोथीचे स्वरूप आले, म्हणून तिचे कर्तृत्व मुनिबासांकडे दिले जाते. *स्थानपोथी*चे तिसरे संस्करणकार चिडले किंवा चिरडे महानुभाव होत. सध्या उपलब्ध असणाऱ्या *स्थानपोथ्यां*च्या अनेक प्रती चिडले / चिरडे महानुभावांच्याच दिसतात. हे चिडले / चिरडे कवीश्वर आम्नायाच्या कारंजेकर शिष्यशाखेपैकी होत.

*स्थानपोथी*त साधारणतः श्रीचक्रपाणी, श्रीचक्रधर, श्रीगोविंदप्रभू, ह्यांच्याशी संबंधित असलेली स्थाने येतात (डॉ. कोलते संपादित *स्थानपोथी*त फक्त श्रीचक्रधरस्वामींशी संबंधित स्थानांचाच निर्देश आला आहे). श्रीचक्रधरस्वामी हे महानुभावपंथीयांचे सर्वस्व होते. चक्रधरांना पंथीय परमेश्वरावतार मानत असल्याने त्यांनी जेथे जेथे क्रीडा केल्या ती स्थाने महानुभावांना वंद्य ठरली आहेत. " संबंध व्यक्त : व्यक्ते संबंधी अव्यक्त प्रसनता परमेश्वरु निक्षेपिती : मग आपुला संबंधु देती : म्हणौनि संबंधु वंद्य : " ह्यावरून प्रसन्नतापूर्वक परमेश्वरसंबंध ज्या ज्या स्थानांना झालेला असेल तीच स्थाने वंद्य होत. म्हणून ही स्थाने स्वतंत्र रीतीने वेगळी काढून *स्थानपोथ्या* बांधल्या. ह्यासंबंधी स्थानांचे भौगोलिक दृष्ट्या अचूक निर्देश पोथीत केलेले दिसतात. चक्रधरांच्या समग्र भ्रमणाचा आराखडा *स्थानपोथी*तून संपूर्णपणे आपल्या डोळ्यासमोर उभा राहतो. *स्थानपोथी*तील विविध स्थानांच्या वर्णनामुळे महाराष्ट्राच्या धार्मिक व सांस्कृतिक जीवनाची माहिती मिळते. तसेच महाराष्ट्राच्या तत्कालीन भौगोलिक माहितीचीही ते एक महत्त्वाचे साधन आहे. साहित्यकृती म्हणून *स्थानपोथी*चे महत्त्व नाममात्रच आहे. [ ⇨ ३.]

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कोलते, वि. भि. : प्रस्ता., स्थानपोथी; मलकापूर, १९५०; पृ. १–२३.

**मुनिव्यास नांदेडकर** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] महानुभाव भाष्यकार. कवीश्वर आम्नायातील. ह्यांचे घराणे नांदेडचे. उपनाव देशपांडे. हे निष्णात वेदविद्यापंडित होते. एकदा राजमठाच्या दर्शन-

वंदनासाठी नागांबा ऊर्फ नागाइसा नांदेडला गेल्या असता त्यांची व मुनिबासांची कर्मधर्मसंयोगाने गाठ पडली. महानुभावशास्त्राविषयी परस्परात चर्चा झाली. ह्यानंतर मुनिबासांनी नागांबेजवळून महानुभाव पंथाची दीक्षा घेतली. ह्या नवीन शास्त्रातही ते व्युत्पन्न झाले. नागदेव > कवीश्वर > नागांबा > मुनिबास अशी ही परंपरा आहे. 'परशरामबासांच्या मृत्यूनंतर कवीश्वर आम्नायाच्या आचार्यपदी (गादीवर) त्यांची प्रतिष्ठा झाली' अशी माहिती डॉ. वि. भि. कोलते *ज्ञानप्रबोध* ग्रंथाच्या प्रस्तावनेत देतात (पृ. १३). मुनिबासांचा आश्रम नांदेड येथे होता. तेथे राहूनच पंथीय शास्त्राध्ययन व शिष्यांना उपदेश देण्याचे कार्य ते करीत असत. कमळाकरमुनी कारंजेकर हे ह्यांच्या प्रमुख शिष्यांपैकी एक. कवीश्वर आम्नायाच्या गादीवर मुनिव्यासांनंतर ह्यांचीच प्रतिष्ठापना झाली. मुनिव्यासांनी *आचार-विचारसूत्रा*वरील भाष्याची रचना केल्याचे य. खु. देशपांडे ह्यांनी नमूद केले आहे (ममवा., पुणे, १९६०); परिशिष्ट : कवीश्वर आम्नाय वंशवृक्ष).

**मुनींद्र** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पुंसासत्तरी; अ. १–७१ (मधले ४ अध्याय नाहीत); ओ. सं. २८०५; तंसम. बा. १७६५, हस्त. यादी, क्र. २.

**मुरारनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मुरारमल्ल** / ० मुरारीमल्ल–२ [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना :** अमु. – श्रीकृष्ण बाळक्रीडा, ओ. सं. ७२५; ममग्रंककासू., पृ. २४.

**मुरारमल्ल महात्मा** [का. अनु.] महानुभाव कवी.

**रचना :** अमु. – श्रीकृष्ण बाळक्रीडा; अ. १७; ममग्रंककासू., पृ. २३.

**मुरारमल्ल विद्वांस** / ० मुरारीबास–२ [श. १४७६ / इ. स. १५५४ – श. १५२७ / इ. स. १६०५]. महानुभाव भाष्यग्रंथकार. कवीश्वर आम्नायातील चाहेव्यास ह्यांचे शिष्य. *गीताभाष्यादी* १२२ प्रमेयांची रचना ह्यांनी केली आहे (ममवा., पृ. ५३). ह्यांपैकी *पूर्वपिट, पूर्वीव्याख्यान, विद्यासार, महावाक्य, निर्वचन* इत्यादी प्रमेयांचा निर्देश *श्रीचक्रधरसिद्धान्तसूत्रे (लक्षणान्वयपाठ)* ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत ह. ना. नेने ह्यांनी केला आहे (प्रस्ता., पृ. ९). वि. ल. भावे ह्यांनी तयार केलेल्या *महानुभाव ग्रंथावलि*मध्ये ह्या प्रमेयांची व भाष्यग्रंथांची नावे दिली आहेत (पृ. २३).

मुरारीबासांनी रचलेल्या ह्या प्रमेयाचे स्वरूप टीकाग्रंथाप्रमाणे आहे. चक्रधरांच्या तत्त्वज्ञानाच्या स्पष्टीकरणार्थ जे अनेक प्रकारचे टीकाग्रंथ महानुभाव पंडितांनी रचले, त्यांत ही प्रमेयरचना महत्त्वाची ठरते. *सूत्रपाठा*तील सूत्रांसंबंधाने किंवा *दृष्टान्तपाठा*तील दृष्टान्तांवर काही तात्त्विक विचार ह्या प्रमेयामध्ये थोडक्यात मांडलेला असतो. प्रमाणादिकांचा आश्रय करून जाणावयाचे ते प्रमेय, असे प्रमेयाचे लक्षण प्रसिद्ध नैयायिक भासर्वज्ञ (*न्यायसार*कर्ते; अंदाजे इ. स. ९०० चा सुमार) ह्यांनी दिले आहे.

ह्यांची *लक्षणान्वयपाठा*वरची *पूर्वपिट, पूर्वीव्याख्यान* ही दोन भाष्ये महत्त्वाची आहेत. *निर्वचना*वरही भाष्याचा सुंदर साज ह्यांनी चढविला आहे. ह्यांची भाष्यसरणी वाखाणण्याजोगी आहे. *निर्वचना*त परमेश्वरस्वरूप वर्णिले आहे. त्यांतील पहिल्या सूत्रातील 'ब्रह्म' ह्या शब्दावर केलेले भाष्य पहा : "'ब्रह्म' – ऐसा जरी सुखरूप तर एकदेशी आन काइ । म्हणे ना । तो ब्रह्म की । ब्रह्म म्हणिजे आवघेया पासौनि थोर । बृहत्तर वृधौ म्हणजे थोर । सवति व्यापौनि वर्ते म्हणौनि।". . . प्रमेय धाटणीची ही विवेचनपद्धती संस्कृत न्यायपद्धतीस धरून आहे असे दिसते. महानुभावांच्या टीकाग्रंथातील प्रमेयरचना ही अगोदरची व स्थळ, बंध इत्यादी रचना नंतरची आहे. मुमुक्षू जनांस तत्त्वार्थ सुबोध व्हावा ही दृष्टी ठेवून विविध स्वरूपाचे भाष्यग्रंथ महानुभावांनी रचले व पंथीय शास्त्र पक्के केले. मुरारी विद्वांसांनी रचलेल्या ह्या प्रमेय- आणि भाष्य-ग्रंथांवरून त्यांनी पंथीय शास्त्राध्ययन किती खोलवर केले होते ह्याची कल्पना येते. पंथीय तत्त्वविचारांच्या दृष्टीने ह्या रचनेस अत्यंत महत्त्व आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, अ. ना. : महानुभावीय पंडितांची भाष्यपद्धती; प्रामवाङ्., भा. २; पुणे, १९७३; पृ. २२१–२२२; २. भवाळकर, नी. ब.; शैया-पालना प्रमेय; विज्ञावि., जाने. १९३६; पृ. २–३.

**मुरारसुत** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मुरारि हरिदास** [का. अनु.] पदकार. वेंचले येथील श. १८२३ त उतरलेल्या पदांच्या बाडात ह्या कवीची पदे संग्रहित (भाइसंमं.).

**मुरारी** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. हे कोल्हापूरचे राहणारे. ह्यांच्या मातापित्यांची नावे अनुक्रमे राधा व कृष्ण. हे शांडिल्यगोत्री, ऋग्वेदी, देशस्थ ब्राह्मण. ह्यांनी भारतांतर्गत *भीष्मपर्वा*ची रचना केली आहे. कवीची ही रचना सुबोध व रसाळ आहे. ह्यांनी आपल्या रचनेत संस्कृताभिमानी लोकांची दुराग्रही समजूत काढण्यासाठी पूर्वपरंपरेला अनुसरून मराठी भाषेची यथाशक्ती तरफदारी केली आहे.

**रचना :** अमु. – १. चेंडुफळी; र. का. : श. १६७६ / इ. स. १७५४; संककासू., पृ. ८१; गो. का. चांदोरकर संग्रह. २. भीष्मपर्व; ओवीबद्ध; अ. १८; ओ. सं. २३१२; र. का. : श. १६७६, भावनाम संवत्सर, माघ शु. ७; ल. रा. पांगारकर संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : मुरारि; मकच., खं. २; मुंबई, १९१३; पृ. ७३–७७.

**० मुरारीबास–१** – पहा अवळ मुरारीबास.

**० मुरारीबास–२** – पहा मुरारमल्ल विद्वांस.

**मुरारीमल्ल–१** / ० मयंकसुत मुरारीमल्ल [इ. स. चे सतरावे शतक] महानुभाव कवी. हे उपाध्य आम्नायातील बीडकर शाखेपैकी मयंकराज ह्यांचे शिष्य. कृष्णमुनी कवी डिंभांचे हे समकालीन. ह्यांनी इ. स. १६३८ च्या सुमारास *दर्शनप्रकाश* ग्रंथ लिहिला. ह्या ग्रंथात निरनिराळे धर्मपंथ व मते ह्यांची माहिती दिलेली आहे. ग्रंथाच्या शेवटी लेखकाने स्वतःचा नामनिर्देश करून ग्रंथाचा लेखनकालही दिलेला आहे. त्या ओव्या अशा : "पुष्प कोंवळे वृक्ष ग्रामानाम। हरीआहार सातन पूर्वजन्म। तीथ चंद्र जीववार उत्तम। तैं ग्रंथ संपूर्ण केला॥ ८९॥ मयंक सुत मुरारि ग्रंथकृत। शके पंधराशते नारद संतत। गो संवत्सरी संपूर्ण ग्रंथ। दर्शन प्रकाश हा॥ ११९॥' हा ग्रंथ 'निगम, आगम, वेदादी धांडोळून' लिहिला असे कवीने स्वतःच म्हटले आहे. ग्रंथ लिहिताना गीता, भागवत, भविष्योत्तरपुराण, श्रुती, नारदगीता, ब्रह्मविद्योपनिषद्, भारत, भविष्यपुराण, न्यायशास्त्र, सांख्यशास्त्र इत्यादी अनेक ग्रंथांतील शास्त्राधार घेतला आहे.

महानुभावांच्या सहा दर्शनांची माहिती ह्या ग्रंथात विवेचिली आहे. ती षड्दर्शने अशी : मुद्री, कुंची, लिंगी, जाटी, दंडी आणि मुंडी. *ऋद्धिपुरमाहात्म्यात* कृष्णमुनी कवि डिंभानेही ह्या षड्दर्शनांची माहिती दिली आहे. त्यातले मुंडीदर्शन हे खास महात्मापंथाचे / अच्युतपंथाचे दर्शन आहे. ग्रंथातील प्रतिपादनाचा आवाका केवढा होता हे ग्रंथात विवेचिलेल्या पुढील विषयांवरून लक्षात यावे. चार व्यासवर्णन; ॐकार; व्याकरण; पुरुषलक्षण; चहुयुगी अवताराचार्यनामकथन, अर्जुन विश्वरूपदर्शन, पृथ्वीदीपादिवर्णन, शून्यगणित, पर्वतवर्णन, युगरचनाकाळनेम, गृहस्थधर्मनीती हे ते विषय होत. ग्रंथात अनेक विषय आल्याने निश्चित असे एक सूत्र शोधता येत नाही. महानुभावांचा मुंडीमार्ग कसा अतिप्राचीन आहे हे संस्कृत अवतरणांच्या आधारे सविस्तर सांगितले आहे.

प्रस्तुत ग्रंथ म्हणजे महात्मापंथाच्या अध्यात्मविद्येचा संदर्भग्रंथच म्हणावयास पाहिजे. [ ➪ ३. ] कारण महानुभावपंथाची तात्त्विक बैठक समजून घेण्याच्या दृष्टीने ह्या ग्रंथास विशेष महत्त्व आहे. महानुभावांच्या ह्या दर्शनासंबंधी कृष्णमुनी कवि डिंभ आणि मुरारीमल्ल ह्यांनी जे विवेचन केले आहे, त्या अभिनव अशा षड्दर्शनाची कल्पना मुळात मयंकराजांचीही असण्याची शक्यता आहे. ह्याच स्वरूपाचा मुनि दिवाकरांचा *मतिरत्नाकर* प्रबंध इ. स. १५९७ त लिहिला गेला. त्यांतही श्रुती, स्मृती, गीता, भागवत इत्यादी ग्रंथांचा आधार घेऊन अन्यमतखंडन करून महानुभावी द्वैतवादी विचारसरणी आणि चक्रधरोक्त भक्तिमार्गच प्रतिपादला आहे. *मतिरत्नाकर* व *दर्शनप्रकाश* हे दोनही ग्रंथ ह्या संदर्भात अत्यंत महत्त्वाचे ठरतात. *दर्शनप्रकाश* ह्या नावाचे एक लहानसे महानुभावीय प्रकरण अलिकडेच डॉ. यू. म. पठाण ह्यांनी प्रसिद्ध केले आहे (मसंप., ऑक्टो., १९६७).

**रचना :** **अमु.** – दर्शनप्रकाश; प्र. ७६; ओवीबद्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, अ. ना. : दर्शनप्रकाश; प्राचवाङ्., भा. २; पुणे, १९७२; पृ. ३२७–३२९. २. देशपांडे, य. खु. : मुरारिमल्ल कविकृत दर्शनप्रकाश : ममवा., पुणे, १९६०; पृ. ६१–६३. ३. पठाण, यू. म. : महानुभाव दर्शनप्रकाश; मसंप., ऑक्टो. १९६७; पृ. ७–१२.

**० मुरारीमल्ल–२** – पहा **मुरारमल्ल.**

**मुरारीमुनी** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, उत्तरार्ध]. महानुभाव कवी. ह्यांनी *श्रीकृष्ण बाळक्रीडा* असा काव्यग्रंथ रचला आहे. ह्या काव्यात कवीचे स्थळ, काळ, गुरू किंवा वंश ह्यांचा काहीच निर्देश न आल्याने हा मुरारीमुनी कोण असा प्रश्न उपस्थित होतो.

श्रीकृष्ण हे महानुभावांच्या पंचकृष्णांतील ईश्वरावतार असल्याने *श्रीकृष्णाची बाळक्रीडा* हा पंथीयांच्या भक्तीचा व आदराचा विषय आहे. मुरारीमुनीकृत प्रस्तुत काव्याचे हस्तलिखित श्रीदेवदेवेश्वर संस्थान, माहूर येथे उपलब्ध झाले आहे. काव्यात स्वतःचा उल्लेख कवीने मुरारी किंवा मुरारीमुनी असा केला आहे. उदा., "या ग्रंथाचें महिमान। करावें श्रवण पठण। म्हणें कवी मुरारी॥ ६८५॥" महानुभाव कवींमध्ये मुरारी, मुरारीमुनी, मुरारीमल्ल, मुरारीबास असे अनेक मुरारी आहेत. बाळक्रीडेवर रचना करणारे (१) मुरारमल्ल जीवराज डोळस पाटवदेकर (*श्रीकृष्ण लीला*), (२) मुरारमल्ल महात्मा (*श्रीकृष्ण बाळक्रीडा*; अ. १७), (३) मुरारमल्ल (*श्रीकृष्ण बाळक्रीडा*; ओ. सं. ७२५) असे तीन मुरारी नावाचे कवी आहेत. हे काव्य ६८६ ओव्यांचे आहे. मुरारीमल्ल पाटवदेकर हा ह्या काव्याचा कर्ता असावा असे अनुमान व. दा. कुळकर्णी ह्यांनी केले आहे.

कवीने *भागवत* आणि *पद्मपुराण* ह्यांच्या आधारे ग्रंथरचना केली आहे. कथानकांत विस्कळितपणा दिसून येत नाही. कवीची स्वतंत्र पण तर्काधिष्ठित कल्पनाशक्ती व पृथगात्मता ह्यांमुळे हे काव्य रसपूर्ण झाले आहे. "जो न पविजे याग रागें। नानाव्रतें साधनें। तो पाविजे भावें भजनें। म्हणे मुरारी॥" असा भक्तीचा महिमा कवी वर्णन करतो. काव्याची भाषा सोपी आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कुळकर्णी, व. दा. : महानु. कवी मुरारीमुनीकृत श्रीकृष्ण बाळक्रीडा; महानु., डिसें. १९६७; पृ. ३४–४०.

**मुसळराम** [का. अनु.] कवी. हे समर्थशिष्य होते. ह्यांचा मठ गोदातीरी आंबडच्या दक्षिणेस गवराई येथे होता. ह्यांची काही अभंगरचना उपलब्ध आहे.

**रचना :** **अमु.** – अभंग; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मृत्युंजय / ० ब्रह्मणी मुक्तोजी / ० ब्रह्मी मुंतोजी / ० मुक्तोजी / ० मुतोजी / ० मुंतोजी ब्रह्मणी / ० शांत ब्रह्मणी** [अंदाजे इ. स. १५७५–१६५०]. संतकवी. हे पूर्वाश्रमीचे मुसलमान असून बेदर येथील बहामनी राज्यातील राजघराण्यांपैकी एक पुरुष होते. शहा मुंतोजी ब्राह्मणी, शहा महमद बमणी, शांत ब्रह्मणी, बेदरीचा बहमजी पादशा, शहा मुतबजी कादरी, मूर्तजा कादरी, ज्ञानसागरानंद, ज्ञानसागर अय्या अशा विविध नावांनीही हे ओळखले जातात. हे पूर्ववयात मोठे रंगेल व विषयलंपट होते. कालांतराने उपरती होऊन ह्यांनी राजवैभवावर पाणी सोडले व पंढरपूरची वाट धरली. तेथे ह्यांना *विवेकसिंधु* वाचावयास मिळाला व हे परमार्थप्रवण झाले. कल्याणीचे आनंदसंप्रदायी 'सहजानंदस्वामी' हे ह्यांचे गुरू. गुरुबोधानंतर सहजानंदांनी ह्यांचे नाव 'मृत्युंजय' ठेविले व 'ज्ञानसागरानंद' हे सांप्रदायिक नामाभिधान त्यांना दिले. त्यानंतर हे मुसलमान समाजात 'शहा मुतबजी कादरी' म्हणून ओळखले जाऊ लागले. गुरूच्या आज्ञेवरून हे नारायणपूर येथे राहू लागले. तेथील जंगम समाजाला ह्यांच्या आध्यात्मिक सामर्थ्याची प्रचीती येऊन तेही ह्यांना 'ज्ञानसागर अय्या' म्हणू लागले. ही चरित्रविषयक माहिती उद्धवचिद्घनकृत *मृत्युंजयचरित्र*, महिपतीकृत *भक्तविजय* व हनुमदात्मजकृत *पूर्णानंदचरित्र* ह्या ग्रंथांतून आढळते. मृत्युंजयांचे गुरुबंधू पूर्णानंद नारायण (शिवरामस्वामींचा पिता) ह्यांनी श. १५३२ / इ. स. १६१० च्या सुमारास रचलेली *अवधूतगीताटीका* मृत्युंजयांच्या आग्रहावरून रचलेली आहे. हे लक्षात घेता मृत्युंजयांचा काळ अंदाजे इ. स. १४९७ ते १५७२ (इ. स. १५७५ ते १६५०) असा ठरविता येतो (रा. चिं. ढेरे, मुमसंक., पृ. ३०–३१).

नारायणपूर येथील ह्यांचे समाधिस्थान 'मूर्तजा कादरी का दर्गा' ह्या नावाने ओळखले जाते. *दासविश्रामधाम* ग्रंथात आत्मारामस्वामींनी ह्यांना 'कादरी बेदरी बाच्छा' असे म्हटलेले आहे. त्यावरून मृत्युंजय हे सूफींच्या कादरी शाखेतील बेदरचे बादशहा असावेत असे एक मत व्यक्त केले जाते. सहजानंद हे वस्तुतः मृत्युंजयांचे गुरू. पण ह्यांनी आपल्या रचनेत सहजानंदांचा कोठेही उल्लेख केलेला नाही. ह्यांना 'ज्ञानसागर अय्या' म्हणत असत त्यावरून लिंगायत संप्रदायाशीही ह्यांचा संबंध जोडला जातो. शाह मुतबजी ब्रह्मणी ह्याने दखनी हिंदीत लिहिलेल्या *पंचीकरणात* हिंदु-मुस्लिम ह्यांचे ऐक्य साधण्याचा प्रयत्न केला असा उल्लेख येतो तो असा : "शाह मुतबजी ब्रह्मणी। जिनमें नहीं मनामनी। पंचीकरण का खोज किये। हिंदु-मुसलमान येक कर दिये॥" ह्यावरून रा. चिं. ढेरे म्हणतात की प्रारंभी हे सूफी पंथाचे अनुयायी असावेत. वि. अं. कानोले ह्यांच्या मते मृत्युंजयस्वामी हे मुकुंदराजांच्या परंपरेतील एक सत्पुरुष असून त्यांनी ही परंपरा चालू ठेवण्याचे व *विवेकसिंधूचा* महाराष्ट्रभर प्रचार करण्याचे कार्य केले. त्यांच्या ग्रंथावर *विवेकसिंधूचा* पडलेला प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो. मृत्युंजयांच्या ग्रंथरचनेतील वेदान्तावरील त्यांचा अधिकार पाहिला की हे मूळचे मुसलमान असतील असे चुकूनही वाटत नाही. मृत्युंजय व बहामनी शहा ह्या भिन्न व्यक्ती असाव्यात. ह्या मतास मृत्युंजयस्वामींच्या अनंतनामक शिष्यान आपल्या *पंचीकरण* ह्या ग्रंथाच्या अखेरीस मृत्युंजयांच्या गुरुपरंपरेची जी माहिती नोंदविली आहे तिचा ते आधार देतात. ही पोथी कानोले ह्यांच्याजवळील संग्रहात आहे. मृत्युंजयस्वामींच्या उपदेशाने व अनुग्रहाने हे शाह मुतबजी ब्रह्मणी आध्यात्मिक क्षेत्रात फार मोठ्या अधिकारास चढले असावेत. कानोले ह्यांचे हे मत ढेरे ह्यांना मान्य नाही. नारायणपूर, कल्याणी ह्या परिसरात ज्या सत्पुरुषाला मुसलमान 'मुंतोजी बमणी' ह्या नावाने ओळखतात त्यालाच हिंदू 'मृत्युंजयस्वामी' म्हणून ओळखतात ह्याची तेथे जाऊन प्रत्यक्षात आपण खात्री करून घेतली आहे, असे ढेरे सांगतात (मुमसंक., पृ. २७).

मृत्युंजयस्वामींनी वेदान्त-तत्त्वज्ञानाचे विवरण करणारे अध्यात्मपर ग्रंथच प्रामुख्याने रचले आहेत. त्यांच्या रचनेतील *सिद्धसंकेतप्रबंध* हा सर्वांत मोठा ग्रंथ *पद्मपुराणाधारित* असून त्यात रामाचा सीतेला उपदेश आहे. *अनुभवसार* अथवा *अमृतसार* ग्रंथात आत्मज्ञानाचे निरूपण

येते. परंपरागत ज्ञान ह्या ग्रंथात सुव्यवस्थितपणे कवीने मांडले आहे. तो सांगतो : "ऐसा पिंडब्रह्मांडीचा व्यापकु । साक्षरूप परमात्मा येकु । जाणतां तुटे कळंकु । सर्व पापाचा ॥ २९॥" *अद्वैतप्रकाश* ग्रंथाची चार प्रकरणे असून शांकर अद्वैत तत्त्वज्ञानाचा आविष्कार ह्या ग्रंथात झाला आहे. *प्रकाशदीप* व *स्वरूपसमाधान* ग्रंथांतही वेदान्तविवेचनच येते. *पंचीकरणा*त अज्ञानसिद्ध नागेशांचा उल्लेख आला आहे. वरील रचनेखेरीज *अमृतानुभव*, *जीवोद्धरण* इत्यादी ग्रंथ, भक्तिपर अभंग व पदपदांतरे अशी स्फुट कविताही त्यांनी रचली आहे.

ह्या सर्वच ग्रंथांतून वेदान्तोपनिषदातील गहन अशा विचारधारेचे विश्लेषण करीत असता मृत्युंजयस्वामींची विवेचनपद्धती स्पष्ट व नेमकी असते. श्रोत्यांच्या अनुनयासाठी ते विषयांतर करीत नाहीत. आशयाची दृढता व स्पष्टता हे ह्या ग्रंथांचे वैशिष्ट्य होय. त्यांच्या स्फुट कवितेतही हे सर्व विशेष आढळतात. परमानुभवाच्या ठेव्याचे नितांतसुंदर वर्णन त्यांच्या पदांतून व अभंगांतून केलेले पाहण्यास सापडते.

**रचना : मु.** – १. अमृतसार / अनुभवसार अथवा ज्ञानामृतसार; ओ. सं. ४२; कासं., क्र. १४; पृ. १७७; तंसम. त्रैमा., १९६६, क्र. १ व २. २. प्रकाशदीप; प्रक. ५; ओ. सं. ३९९; संपा. भावे, वि. ल.; महा. कवि क्र. २८ ते ३४ (क्रमशः); श. १८२७. ३. स्वरूपसमाधान; प्रक. ३, ओ. सं. ३९४; महा. कवि क्र. २७, २८, श. १८२७. **अमु.** – १. अद्वैतप्रकाश; प्रक. ४; ग्रं. सं. ६४०; तंसम. बा. ४, ५. २. अमृतानुभव / आत्मानुभव, त्रिपदाविवरण अथवा परमामृत; तंसम., सात प्रती; ओ. सं. ३००. ३. गुरुलीला; अनुपलब्ध. ४. जीवोद्धरण; प्रक. १३; ओ. सं. १४३०; तंसम. बा. १२७. ५. पंचीकरण; गद्य; सवामं.; गोदातीर इतिहास संशोधक मंडळ. ६. सिद्धसंकेत प्रबंध; प्रक. ९; ओ. सं. २२००; प्रत श. १७४५; तंसम. बा. ४१६–१७. ७. स्फुट : अभंग, पदपदांतरे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कानोले, वि. अं. : श्री मृत्युंजयस्वामीविषयीं कांहीं नवीन व उद्बोधक माहिती; भाइसंमत्रै., व. ३६, अं. १–४; १९५५–५६; पृ. ५५–५९. २. कुळकर्णी, वि. वा. : कवि मृत्युंजय यांचा अद्वैतप्रकाश; विसंमंवा., नागपूर, १९६९; पृ. १९८–२०५. ३. ढेरे, रा. चिं. : शहा मुंतोजी ब्रह्मणी; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १–३९. ४. जामखेडकर, रा. श्री. : राजवाडे मंदिरसंग्रहातील ग्रंथपरिचय : प्रकाशदीप; संशोधक, सप्टें. १९४१; पृ. १४८–१५०. ५. पोतदार, द. वा. : मृत्युंजय ब्राह्मणी; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. २६५. ६. राजवाडे, वि. का.; मृत्युंजयकृत अनुभवसार; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १८०–१८१.

**मृत्युंजयाचा मुधया** [इ. स. चे १७ वे शतक, पूर्वार्ध] कवी. हे मृत्युंजयस्वामींचे शिष्य. उद्धवचिद्घनाने ह्यांचा 'मृत्युंजय राजयोगी। मुधयासंगीं परब्रह्म ॥' असा गौरव केलेला आहे. परमानुभव व्यक्त करणारी ह्यांची दोन पदे रा. चिं. ढेरे ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत (मुमसंक., पुणे, १९६७, पृ. ३०, ३१). त्यांतील एक पद तुरीयावस्थेचा अनुभव व्यक्त करते तर दुसऱ्या पदात ब्रह्मानंदाचे वर्णन येते.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**मेघचंद्र** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक]. महानुभाव कवी. सूर्यवंशी क्षत्रिय. महानुभावांच्या तेरा आम्नायांपैकी यक्षदेव आम्नायाचा *वृद्धाचार* ह्यांनी ओवीछंदात वर्णिला आहे. ह्याचा रचनाकाळ इ. स. १६७८ हा मानला जातो. ह्या *वृद्धाचार*वर्णनात मेघचंद्रांनी महानुभाव पंथ व *विवेकसिंधु*कार मुकुंदराज ह्यांचा जो आत्मीय संबंध वर्णिला आहे त्यावरून मुकुंदराजांच्या गुरुपरंपरेसंबंधी एक नवीनच कुतूहल निर्माण होते. हे वर्णन पुढीलप्रमाणे : "गुरु आदनाथु शिष्य हरिनाथु । तेणे रघुनाथु बोधिएला ॥ १२० ॥ वैनगंगे तीरीं अंबावती पुरी । भेटला मुरारी रामदेवा ॥ १२१ ॥ रामासी वेदान्तु नागेंद्रा सिद्धान्तु । गुरु नागनाथु आम्हास ये ॥ १२२ ॥ नमो आदनाथा नमो हरीनाथा । वेदान्ता सिद्धान्ता निरोपकु ॥ १३९ ॥ नमो रामनाथा नमो श्रीमुकुंदा । खंडीले दुर्मंदा पाखंडिया ॥ १४० ॥" ह्या वर्णनावरून मुकुंदराजांचे जे परमगुरू हरिनाथ ह्यांच्या 'वेदान्त' व 'सिद्धान्त' अशा दोन वेगळ्या परंपरा चालविणारे राम (रघुनाथ, रामदेव, रामनाथ) आणि नागेंद्र (नागनाथ) असे दोन शिष्य होते, असे दिसते. ह्यांपैकी पूर्वोक्त राम हे मुकुंदराज ह्यांचे गुरू व उत्तरोक्त नागेन्द्र हे महानुभाव पंथाचे गुरू होत.

वरील वर्णनावर डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी केलेले भाष्य (भाइसंमत्रै., व. १२, अं. २, आश्विन १८५३) पुढीलप्रमाणे : "मुकुंद मुनि, निवृत्ति आणि ज्ञानेश्वर ही मंडळी महानुभावीय यक्षदेवांच्या *वृद्धाचारा*त कशी आली ह्याचे आश्चर्य वाटेल. पण तसे वाटण्याचे कारण नाही. कारण हरिनाथाने रामदेवास 'वेदान्त' सांगून बोध केला व नागेन्द्राला 'सिद्धान्त' सांगून बोध केला. रामदेवापासून मुकुंदाची वेदान्तविषयक परंपरा चालत आली आणि नागेंद्रापासून सिद्धान्तविषयक – म्हणजे जी पुढे महानुभाव पंथाच्या रूपाने प्रसिद्ध झाली ती – परंपरा निघाली. ह्या नागेंद्राच्या परंपरेतच श्रीचक्रधराचा शिष्य (वास्तविक यक्षदेव हे श्रीचक्रधरांचे शिष्य नसून नागदेवाचार्यांचे शिष्य होते) यक्षदेव हा होता."

*श्रीयक्षदेवकुळाचा वृद्धान्वय* ह्यावरून वाङ्मयेतिहासकारांना शोध व विचार करण्यास प्रेरणा देणारी एक गोष्ट लक्षात येते ती ही की, मुकुंदराजांचा वेदान्त पंथ व महानुभाव पंथ ह्यांचे उगमस्थान एकच असावे किंवा परस्परांचा परस्परांशी कोणत्याही स्वरूपाचा जवळचा संबंध असावा.

**रचना : मु.** – श्री यक्षदेव कुळाचा वृद्धान्वय; ओ. सं. ३५५; महानु., नोव्हें. १९६८; दीअं.; पृ. ४२–४५.

**मेघराज** – पहा **पंडित मेघा.**

**मेघश्याम** [का. अनु.] रामदासी कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मेरु** – पहा **मेरुस्वामी.**

**मेरु अनंत** – पहा **मेरुस्वामी.**

**मेरुस्वामी / ० अनंतमौनी मेरु / ० मेरु / ० मेरु अनंत** [इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध व १८ व्या शतकाचा पूर्वार्ध]. रामदासी कवी. समर्थांचे तंजावराकडील शिष्य अनंतमौनी ह्यांचे मेरुस्वामी हे शिष्य होत. कृष्णातीरी वसलेले मेरुलिंग नावाचे तीर्थस्थान हे ह्यांचे जन्मस्थान. तेथून ते फिरत फिरत व तीर्थयात्रा करीत मूळबागल येथे आले. तेथून निलगिरीजवळ आल्यावर अरुणाचलम् ह्या गावी अनंतमौनींशी ह्यांची गाठ पडली. त्यांनी मेरुस्वामींना आपल्याजवळ ठेवून घेतले. पुढे अनंतमौनींच्या पत्नीच्या मध्यस्थीमुळे मेरुस्वामींना मंत्रोपदेश मिळाला. त्याची आठवण त्यांनी कृतज्ञतेने लिहून ठेवली आहे. ते स्वतःच सांगतात : "सद्गुरु अनंताची पत्नी । परम स्नेहाळ ते माझी जननी ॥ मजकारणें स्वामीसी प्रार्थूनी । महावाक्य सांगितले श्रवणीं ॥ परम प्रीतीनें अंतःकरणीं । अर्थ प्रांजळ केला ॥" ह्यानंतर गुरू अनंतमौनी व शिष्य मेरुस्वामी असे दोघेही तीर्थयात्रा करीत दक्षिणद्वारकेस म्हणजे मन्यारगुडीस आले व येथेच ते मठ स्थापून यावज्जीव राहिले. येथे राहिल्यावर शके १६१५ (इ. स. १६९३) मध्ये गुरूंनी अवतारसमाप्ती केली. त्यामुळे मन्यारगुडीच्या मठाचे आधिपत्य मेरुस्वामींकडे आले. ह्यानंतर मेरुस्वामींनी भारतातील मुख्य मुख्य तीर्थस्थानांची यात्रा केली व ते मन्यारगुडीस परतले. तेथे श. १६५५ (इ. स. १७३३) आषाढ शुद्ध एकादशी सोमवारी ते समाधिस्थ झाले. समर्थपरंपरेपैकी तंजावरास सेतुरामबावांचा मठ प्रसिद्ध आहे. ते सेतुरामबावा मेरुस्वामींचे एकनिष्ठ शिष्य होत.

मेरुस्वामींनी *भीमोपदेश, आत्मसाक्षात्कार, भगवद्गीता, स्वानंदलहरी, मानसपूजा, अनुभवसार, मेरुबोध, तत्त्वपट, पूर्णामृतकरषोडशकला, रामसोहळा, अनंत वाल्मिकी, रामायण* ऊर्फ *हरिहर नाटक, समर्थाष्टक, श्रीरामपंचरत्न* आणि *संतमाळा* असे अनेक ग्रंथ रचले आहेत. ह्यांपैकी *भीमोपदेश* व *रामसोहळा* हे त्यांचे दोन मोठे ग्रंथ असून ते धुळे सत्कार्योत्तेजक सभेने छापून प्रसिद्ध केलेले आहेत. *भीमोपदेशा*चे बारा सूर्य व प्रत्येक सूर्याचे १२ किरण असे १४४ भाग आहेत. *श्रीरामसोहळा* ह्या ग्रंथाचे ११ रुद्र व प्रत्येक रुद्राचे ११ उल्लास मिळून १२१ उल्लास झाले आहेत. दोन्हीही ग्रंथ अध्यात्मपर आहेत. संतस्तवनाची एकही संधी ह्यात मेरुस्वामींनी दवडली नाही. ह्यातील काही भाग हृदयंगम आहे. समर्थांच्या भाषेचा व विचारांचा प्रभाव ह्या ग्रंथावर पूर्णपणे पडलेला आहे. ज्ञानदेवांची रूपकपद्धतीही कवीने उचलली आहे.

*रामसोहळा* ह्या काव्यग्रंथांत समर्थांचे चरित्र, वेदान्त, वर्णाश्रमधर्माचे स्मृतिविहित आचारवर्णन, तीर्थयात्रांची वर्णने, षड्दर्शनाचे सार, देवतास्तवन, गुरुवर्णन, भक्ती, माया इत्यादी विषयांचे काव्यरसपूर्ण दर्शन घडते. ग्रंथकार ह्या ग्रंथासंबंधी लिहितो : "सायुज्यतेचा जिव्हाळा। ग्रंथ अनुभवाचा आगळा । संभविसी रामसोहळा । रसाळ प्रमेय ।। १.१.६३ ।।" ह्या ग्रंथाचे स्वरूप कवीने सांगितले आहे ते असे : "समुद्रावगाहनीं तीर्थें। आतुडती फळें सुकृतार्थ। तैसा येकचि ग्रंथ सर्वार्थें। संपन्न होय ।। १.१.२४।। आणि हा अखंडैक रस। ग्रंथ द्राक्षापाक सौरस। दाशरथी राम हृदयास। होय उद्घाटिता ।। १.१.१००।।" ह्या कारणाकरिताच ग्रंथाला *रामसोहळा* असे नाव दिले आहे.

मेरुस्वामींचे संस्कृत ग्रंथांचे वाचन दांडगे होते. *भगवद्गीता, योगवासिष्ठ*, उपनिषदे, स्मृती, भागवतादी पुराणे इत्यादींचा आधार विविध विषयांच्या विवेचनाकरिता त्यांनी घेतला आहे. *रामसोहळा* ग्रंथाचे स्वरूप शिष्यांना वेळोवेळी दिलेल्या व्याख्यानासारखे आणि टिपणे एकत्र केली असावीत असे आहे. [⇨ ३.] दृष्टान्ताच्या मालिकेने ते विषय स्पष्ट करतात. ह्या विशदीकरणात अलंकारिक गूढता असल्याने विषय काही वेळा एकदम लक्षात येत नाही. तसेच त्यांच्या काव्यात वापरात नसलेल्या शब्दांची योजना असते. उदा., पावनी, अर्जमात, पाहळी, कंकाळी, पैसविहीन, कातराचि काचे इत्यादी.

मेरुस्वामींचे *सुगमबोध* व *वेदान्तप्रक्रिया* हे दोन गद्यग्रंथ (र. श. सुमारे १६१० / इ. स. १६८८) प्रा. चि. नी. जोशी ह्यांना परभणी जिल्ह्यात सनपुरी येथे (रं. ह. जोशी यांजकडील) जुन्या हस्तलिखित ग्रंथाच्या बाडात आढळले. *सुगमबोध* हा ग्रंथ त्रुटित असून गुरुशिष्यसंवादरूप आहे. ग्रंथावरून त्यावेळच्या गद्यभाषेची कल्पना येते. कठीण असा वेदान्तविषय ह्यात नव्या शिष्यांसाठी उदाहरणे व टीपा देऊन सुबोध केला आहे. 'हें सुगमबोधाख्य उपनिषद सार अपरोध ब्रह्मप्राप्तीचें साधन' असे शेवटी म्हटले आहे. *वेदान्तप्रक्रिया* हा ग्रंथ जे अव्युत्पन्न पण परमार्थप्रेमी आहेत, आत्मतत्त्वाचे जिज्ञासू आहेत, त्यांनी आत्मतत्त्वाच्या प्राप्तीचे अधिकारी व्हावे म्हणून रचला आहे.

मेरुस्वामींची *अनंतवाल्मीकि रामायण* किंवा *हरिहरनाटक* अशी एक रचना उपलब्ध आहे. ही रचना म्हणजे श्लोक, पदे, कटाव इत्यादींनी युक्त असे नाट्यकथानिरूपण आहे.

मेरुस्वामींची पदे, अभंगादी स्फुट कविता चित्तवेधक आहे. मेरुस्वामींच्या सर्वच रचनेत पुनरुक्ती, विषयात वाटेल तसा क्रम, क्रमातही परंपरा नाही असा ढिलेपणा इत्यादी दोष आहेत. तरीही अनेक ठिकाणी त्यांचे भाषाप्रभुत्व आणि वर्णनप्रभुत्व ह्यांचा प्रत्यय येतो.

**रचना :** **मु.** – १. मेरुस्वामीकृत श्रीभीमोपदेश; संपा. देव, शं. श्री.; धुळे, श. १८६०. २. मेरुस्वामीकृत श्रीरामसोहळा; ११ रुद्र; ओ. सं. ९४२७; संपा. देव, शं. श्री.; धुळे, श. १८४२. ३. शिवपर व रामपर पदे; पदगुच्छ; तंजावर, १९६९; पृ. २४–२७ व ४६.

**अमु.** – १. अनंतवाल्मिकी रामायण; सर्ग ६; विविधवृत्तात्मक; ग्रं. सं. ९५०. २. अनुभवसार. ३. अवधूतगीताटीका; ओवीबद्ध; ग्रं. सं. ३५००; ग्रंथ समाप्ति रुधिरोद्गारी संवत्सर, मार्गशीर्ष शु. ७; एक प्रत मसंम., हवना., पृ. ६०. ४. आत्मसाक्षात्कार; समास १–६; ग्रं. सं. २२५; प्रत श. १७४६. ५. तत्त्वपट (पंचीकरण); ओवीबद्ध; ग्रं. सं. १६८. ६. पंचरत्नमालिका; श्लो. सं. ९. ७. पूर्णामृतकरषोडशकळा; ओ. सं. ३००. ८. ब्रह्मसंवित्ति; ओ. सं. ३२००. ९. भगवद्गीता. १०. मानसपूजा. अभंग २८. ११. मेरुबोध. १२. रामदासस्तवन; श्लो. सं. ११. १३. संतमाला. १४. स्वानंदलहरी; ओ. सं. २०८. १५. समर्थाष्टक. १६. स्फुट – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २, ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, व. स. : सरस्वती महालांतील रामायणावरील उपलब्ध मराठी रचना; नभामा., जुलै १९७३, पृ. ४५. २. जोशी, चि. नी. : सुगमबोध व वेदान्तप्रक्रिया : दोन अज्ञात ग्रंथ; संशोधक, व. १६, अं. १ ते ४; पृ. ७–१३.

**मेहरदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे, तंसम. हस्त. सू., यादी क्र. ३.

**मैना** [का. अनु.] कवयित्री. रामदासी परंपरेतील चाफळ खोऱ्यातील बाळनाथांची शिष्या.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० मैराळ** – पहा **मैराळ संतिदास.**

**मैराळ संतिदास / ० मैराळ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. द्रोणपर्व; . त्रु. पो.; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १२९. २. विराटपर्व; संककासू., पृ. ८२. ३. हरिवंश; प्रसंग १३; ओ. सं. सुमारे १८००; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मोतीराम** [का. अनु.] शाहीर. दत्तानुयायी धोंशा नावाच्या शाहीराचा हा शिष्य. हा जातीने मारवाडी होता. ह्याची प्रसिद्धी जुन्नर प्रांतात फार होती. ह्याने दुसऱ्या बाजीरावावर रचलेला पोवाडा उपलब्ध आहे. दुसरे बाजीराव ब्रह्मावर्ती गेल्यानंतर पुणे शहर कसे बापुडवाणे दिसू लागले त्याचे वर्णन 'दक्षिणेचे मंगळसूत्र दडून बसावे', 'समुद्रात जहाज बुडावे', 'नलरायास वनवास यावा' अशा कारुण्यपूर्ण शब्दांत मोतीरामाने *दुसऱ्या बाजीरावाच्या पोवाड्यात* केले आहे. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये संग्रहित (पृ. ४०४–४०५).

**मोरतनय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ८२.

**मोरया** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**मोरया गोसावी** [इ. स. चे १७ वे शतक] गणेशोपासक कवी. ह्यांचे आईवडील मूळचे कर्नाटकातील शाली गावचे म्हणून ह्यांना शाळिग्राम म्हणत असत. वडिलांचे नाव वामनभट व आईचे नाव पार्वतीबाई. ह्या दांपत्याने गरिबीमुळे आपले मूळ गाव सोळाव्या शतकाच्या मध्यास सोडले आणि पुणे प्रांतातील भीमथडी तालुक्यातील मोरगाव येथे ते येऊन राहिले. येथे मयूरेश्वराच्या कृपाप्रसादाने ह्या दांपत्यास उतारवयात मुलगा झाला म्हणून त्यांचे 'मोरया' असे नाव ठेवण्यात आले. हे पुढे थोर गणेशभक्त झाले आणि त्यांनी महाराष्ट्रात गणेशभक्तीची परंपरा निर्माण केली.

मोरयांच्या तीव्र प्रज्ञेला परमेश्वरभक्तीची जोड मिळाली. ह्या साधकावस्थेत असता त्यांना एके दिवशी सिद्ध योगिराज नावाचे एक सत्पुरुष भेटले व त्यांनी थेऊर येथे जाऊन तपश्चर्या करण्यास ह्यांना सांगितले. त्याप्रमाणे हे थेउरास गेले. मोरयांची तीव्र उत्कंठा पाहून नेहमी चिंतनात असलेली गणेशाची मंगलमूर्ती ह्यांना ध्याना-

वस्थेत दृष्टीस पडली. ह्या गणेशसाक्षात्कारानंतर मोरयाचे ते 'मोरया गोसावी' झाले.

वृद्ध मातापित्यांच्या मृत्यूनंतर ह्यांनी मोरगाव सोडले व चिंचवड (पुणे जिल्हा) येथे पवना नदीच्या काठी पर्णकुटी बांधून ते परमार्थ-साधना करू लागले. परमात्म्याच्या मीलनाच्या उत्कंठेने ते व्याकुळ बनले. विरहिणीप्रमाणे त्यांची अवस्था झाली. "सुखें नांदत होतें मी संसारीं वो । तव अवचित जालि ये परी वो ॥ मज संचार जाला ये शरीरीं वो । मज नेउनी घाला मोरेश्वरी वो ॥" अशा दारुण अवस्थेत तुझिया भेटीची बहु आस रे मोरया' म्हणून दर्शनभेटीसाठी ते देवाची करुणा भाकू लागले. शेवटी त्यांच्या तीव्र भावभक्तीने देव संतुष्ट झाला व 'मोरया गोसावी योगी ध्यानस्थ । एकरूप होऊनि ठेलें अद्वैत' अशी आत्मानुभूती लाभली. त्यांचा प्रपंच अंतर्बाह्य परमेश्वरमय झाला.

ह्यांचे पुत्र 'चिंतामणी'. त्यांनीही प्रपंच मंगलमूर्तिप्रसादे मंगलमय करून टाकला होता. शेवटी मोरया गोसावी हे चिंचवड व मोरगाव येथे आलटून पालटून राहात. इ. स. १६३५ ते १६३९ च्या दरम्यान ह्यांनी सहकुटुंब काशीयात्रा केली. चिंचवड व मोरगाव येथील देव-स्थानास नित्यनैमित्तिक उपासनेसाठी दाने व इनामे मिळू लागली. असे कृतार्थ जीवन उपभोगल्यानंतर मोरया गोसावींनी मार्गशीर्षातल्या वद्य षष्ठीस जिवंत समाधी घेतली. त्यांचा समाधिकाल वा. सी. बेंद्रे श. १५७७ ते १५८० च्या दरम्यान मानतात.

मोरयांची कविता फारशी नाही. जी काही आहे, त्यात गजाननाची पदे व आरत्या ह्यांचाच प्रामुख्याने भरणा आहे. ही सर्व रचना पारमार्थिक आहे.

**रचना : मु.** – गजाननाची पदे व आरत्या; (१) श्रीमन्महासाधु मोरया गोसावी व श्रीचिंतामणी महाराज चिंचवडकर यांच्या पदांचा गाथा, भा. १ ला; आ. २; संपा. सुखेदार, कृ. बा.; पुणे, १९२३; (२) 'सद्गुरु श्रीमोरया गोसावी, श्रीचिंतामणी महाराज, श्रीनारायण महाराज, श्रीधरणीधर महाराज यांच्या पदांची गाथा' श्रीदेव संस्थान; चिंचवड, १९५९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. करंदीकर, ना. स. : चिंचवडचे महान गणेशभक्त सिद्धपुरुष मोरया गोसावी; स्वराज्य; दि. ७–१२–१९६८; पृ. ९. २. खेडकर, वि. बा. : चिंचवड येथील प्रसिद्ध साधु श्रीमन्मोरया गोसावी महाराज यांचें गद्य चरित्र; मुंबई, १९१३. ३. ढेरे, रा. चिं. : मंगलमूर्ति मोरया : मोरया गोसावी यांचे चिंच-वड; मुंबई, १९५८; पृ. ३१.

**मोरेश्वर–१** [इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर] कवी. पिता : धुंडिराज. ह्यांनी *चंद्रावळी*चरित ह्या शृंगारिक आख्यानाची रचना केली आहे. आख्यान गीतिवृत्तात असून त्याच्या १०१ आर्या आहेत.

**रचना : मु.** – चंद्रावळीचरित; आर्या १०१; अकलकामा., भा. १; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९५; पृ. २१२–२२१.

**मोरेश्वर–२** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – १. मंगेशाची आरती; २. अंबेची (महाशक्तीची) आरती; मआ.; पृ. ४०२, ३९४.

**मोरेश्वर दीक्षित** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – हनुमंतजन्म; श्लो. सं. २८; समामं. हस्त. सू., खं. १.

**मोरेश्वरसुत काशी** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : अमु.** – चंद्राची आरती; समामं. हस्त. सू., खं. १.

**मोरोपंत / ० मयूरकवी / ० मयूरपंडित** [श. १६५१ / इ. स. १७२९ – श. १७१६, चैत्र शुद्ध १५ / इ. स. १७९४] कवी. ह्यांचे संपूर्ण नाव मयूर ऊर्फ मोरेश्वर रामाजी पराडकर. हे कऱ्हाडे ब्राह्मण. ह्यांचे गोत्र जामदग्न्य. ह्यांचा कुलस्वामी सोलापूर जिल्ह्यातील सोनारी ह्या गावचा भैरवनाथ. ह्यांच्या पूर्वजांचे राहण्याचे मूळ गाव सौंदळ, प्रान्त राजापूर, जिल्हा रत्नागिरी. पराडकर घराण्याकडे वंशपरंपरेने डांगीपतकीचे (जमिनीवरील व समुद्रावरील जकात वसूल करण्याचे) काम असे व त्याबद्दल त्यांस सरकारातून वतन मिळाले होते. इ. स. १७१३ च्या सुमारास मोरोपंतांचे वडील रामाजीपंत हे गोळवलीच्या (जिल्हा रत्नागिरी) केशव पाध्ये व गणेश पाध्ये ह्या बंधूंबरोबर, सौंदळ सोडून, कोल्हापुरास आले. तेथून कोल्हापूरची त्यावेळची राजधानी पन्हाळगड येथे त्यांच्याबरोबरच राहावयास गेले. तेथे उभय कुटुंबांची घरे एक-मेकांस लागूनच असत. तेथे रामाजीपंतांना फडावर मुजुमदारीची लहानशी असामी मिळाली होती. मोरोपंतांचा जन्म पन्हाळगडावरच झाला. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मी. कोल्हापूरच्या किर्लोस्कर घराण्यात तिचा जन्म झाला. रामाजीपंत व लक्ष्मीबाई ही दोघे गणपति-उपासक होती. ह्या दैवताशिवाय श्रीरामचंद्र हे पराडकर कुटुंबाचे दुसरे एक आराध्य दैवत होते. गणपतीच्या प्रसादाने आपणास मुलगा झाला अशी रामाजीपंत व लक्ष्मीबाई ह्यांची भावना असल्यामुळे त्यांनी त्याचे नाव मयूर (मोर, मोरोबा) असे ठेवले. पन्हाळगडावर रामाजीपंतांचे वास्तव्य सुमारे पंचवीस वर्षे होते. त्यानंतर इ. स. १७५२ च्या सुमारास ते बारामतीस बाबुजी नाईक ह्यांच्या आश्रयास येऊन राहिले. बाबुजी हे पेशवाईतील एक नामांकित सरदार, जहागिरदार व कोट्यधीश सावकार होते. त्यांनी रामाजीपंतांची प्रथम पागेवर व नंतर कोठीच्या कामावर कारकून म्हणून नेमणूक केली होती.

मोरोपंतांची बुद्धी मोठी तीव्र असून त्यांना लहानपणापासूनच पुराण-कीर्तन-श्रवणाचा फार नाद होता. त्यामुळे अल्पवयातच भारत, भागवत, रामायण, पुराणे इत्यादी ग्रंथांची त्यांना चांगली माहिती झाली. त्यांचे अगदी पहिले शिक्षक त्यांचे वडील रामाजीपंत होत. त्यांच्याजवळच ते बाळपणी लिहिणे-वाचणे व रामरक्षादी स्तोत्रे शिकले व अंमळ मोठे झाले तेव्हा कारकुनांच्या फडावर वडिलांजवळ बसून त्या वेळच्या कारकुनास अवश्य तो सर्व जमाखर्ची हिशेब ते शिकले. पुढे ते कोल्हापूर प्रांती आपल्या विद्वत्तेबद्दल गाजलेले प्रख्यात पंडित केशव पाध्ये व गणेश पाध्ये ह्यांच्याजवळ पन्हाळगडी संस्कृत काव्यनाटकव्याकरणालंकारादी शिकण्यास राहिले. मोरोपंतांनी अगोदर थोडेसे संस्कृत व्याकरण शिकून मग संस्कृत काव्ये, नाटके व अलंकारशास्त्र वगैरे ग्रंथांचे अध्ययन केले. न्याय व वेदान्त ग्रंथांचेही त्यांनी थोडेबहुत परिशीलन केले होते. पंतांनी आपणास शिकावयास किंवा वाचावयास लागणारे चाळिसांवर ग्रंथ स्वतः हातांनी लिहिले असून काही इतरांकडून लिहून घेतले होते, असे त्यांच्या पंढरपूरच्या दप्तरावरून दिसते. पन्हाळगडी पाध्यांकडे त्यांनी बारा वर्षे अध्ययन केले व आपले विद्यागुरू पाध्येबंधुद्वय ह्यांचे प्रेम व कृपाही संपादन केली. पुढे बारामतीस गेल्यावर नवीन काव्ये रचली म्हणजे पंत ती गुरूंकडे प्रथम पाठवीत. त्यांनी ती पसंत करून दुरुस्त केल्यावर मग दुसऱ्यांस वाचावयास देत. मधून मधून ते पन्हाळ्या-सही गुरूंच्या भेटीकरिता जात असत. संस्कृत ग्रंथांचे पंतांनी अध्ययन केले होते तरी त्यांचे प्राकृत ग्रंथांकडे दुर्लक्ष नव्हते. *विवेकसिंधु, परमामृत, ज्ञानेश्वरी* ह्या ग्रंथांशी त्यांचा परिचय असून एकनाथ, नामदेव, रामदास, वामनपंडित, मुक्तेश्वर, विठ्ठल, आनंदतनय, अमृतराय, उद्धवचिद्घन, मध्वमुनीश्वर, रंगनाथ, जयराम, तुकाराम, तुलसीदास, निपटनिरंजन, बिहारीलाल, सूरदास, कबीर, रैदास इत्यादी मराठी व हिंदी कवींच्या ग्रंथांचे परिशीलन त्यांनी लक्षपूर्वक केले होते. प्रसिद्ध नाझरेकर श्रीधर कवी, त्याचप्रमाणे समकालीन संतभक्त महिपती ह्यांचे ग्रंथ व लावणीकार रामजोशी ह्यांची कविताही त्यांनी ऐकली व वाचली होती.

मोरोपंतांस ग्रंथवाचनाची व ग्रंथसंग्रह करण्याची मोठी आवड होती. त्यांनी आपल्या स्वतःस 'ग्रंथसंग्रहकारी विद्यार्थी' असे म्हटले आहे. ते पंढरपूर, वाई, सातारा, काशी ह्यांसारख्या दूरच्या ठिकाणांहून ग्रंथ संग्रहाकरिता आणवीत. काहींच्या नकला करून घेऊन व काही वाचून

परत करीत. त्यांच्या पत्रव्यवहारावरून *अमरकोशटीका मुकुट* त्रुटित, *हनुमन्नाटक* सटीक, श्रीहर्षकृत *रत्नावली* नाटकाची टीका *रत्नावलिच्छाया*, दण्डीकृत *दशकुमारचरित*, *भोजनकुतूहल*, *विद्धशालभंजिका*, *शालिवाहनाचार्यटीका*, भवभूतिकृत *मालतीमाधव* सटीक, *प्रबोधचंद्रोदय* सटीक, *भक्तिचंद्रिका* वगैरे पुष्कळ ग्रंथ त्यांनी वाचले होते असे दिसून येते. त्यांचा ग्रंथव्यासंग दांडगा होता. त्यांची वाचनाभिरुची उच्च व चोखंदळ होती.

मोरोपंतांचे वडील पन्हाळगड सोडून बारामतीस राहू लागले असले, तरी मोरोपंत विद्याभ्यासार्थ वयाच्या चोविसाव्या वर्षापर्यंत पन्हाळ्यासच, पाध्ये ह्यांजकडे, राहिले होते. शिक्षण समाधानकारक रीतीने पूर्ण झाल्यावर ' वडिलांना भेटून १२ वर्षे होत आल्यामुळे पुढे शास्त्रोक्त भेटीचा प्रसंग येईल ह्या भीतीने ' – ते वडिलांकडे बारामतीस इ. स. १७५३ साली गेले. तेथे गेल्यावर बाबुजी नाईक ह्यांच्या कानावर त्यांचे काव्यरचनाकौशल्य व त्यांचा विद्याव्यासंग ही पडल्यावरून त्यांनी त्यांची आपल्या वाड्यात पुराण सांगण्याच्या कामावर योजना केली व त्यांच्या प्रपंचाचा सर्व भार आपल्यावर घेतला. त्यापुढे मोरोपंत आपला वेळ कीर्तनपुराणश्रवणात, भक्तिपर ग्रंथ वाचण्यात, कविता रचण्यात, कीर्तन करण्यात व पुराण सांगण्यात घालवू लागले. यजमान बाबुजी नाईक वर्षातून आठ महिने स्वारीस जात व पावसाळ्यात चातुर्मास बारामतीस राहात. तेव्हा पंत त्यांस *भारत*, *रामायण*, *भागवत*, *हरिवंश* इत्यादी ग्रंथांचे पुराण सांगत. पंतांचे संस्कृतचे अध्ययन उत्कृष्ट असून ते फार चतुर, समयसूचक, मार्मिक, मितभाषी पण मुद्देशीर भाषण करणारे असल्यामुळे त्यांच्या कीर्तन-पुराणांस रंग येऊन श्रोत्यांची अतिशय दाटी होई व कीर्तन-पुराण ऐकून ते भक्तिसुखात तल्लीन होऊन जात.

पंतांची विद्वत्ता, त्यांचे सौजन्य व त्यांची सदाचरणप्रियता पाहून बारामतीकरांच्या कुटुंबातील माणसांचा, त्यांच्या आश्रितांचा व गावातील सर्व जातींच्या आबालवृद्धांचा त्यांच्यावर फार लोभ जडला होता. त्या काळी पंतांच्या संगतीने बारामती आर्यामय होऊन गेली होती. मुलाबाळांपासून वृद्धस्त्रीपुरुषांपर्यंत सर्वांच्या तोंडी पंतांच्या आर्या असत. शृंगारवीररसात पोहणारे स्त्रीपुरुष, पंतांच्या सहवासाने, त्यांचे कीर्तन-पुराण ऐकून सात्त्विक भावांनी रंगून जात.

मोरोपंतांस रघुनाथ, रामकृष्ण व काशीनाथ असे तिघे पुत्र असून तीन कन्या होत्या. पंतांच्या पत्नी रमाबाई मोठ्या पतिपरायण, प्रपंचदक्ष व प्रेमळ होत्या. संसाराचा सारा भार त्यांनी उत्तम प्रकारे सांभाळल्यामुळे पंतांस लेखनवाचनाकडे लक्ष देण्यास स्वास्थ्य व निवांतपण भरपूर लाभले. त्यांचा गृहस्थाश्रम फार नमुनेदार होऊन त्यांना परमार्थाकडे निर्वेधपणे लक्ष लावता आले. ते कर्मनिष्ठ होते पण कर्मठांच्या अंगी सामान्यतः आढळून येणारी भेदाभेद-वृत्ती त्यांच्या ठिकाणी नव्हती. त्यांचे वागणे समतेचे व विनम्रतेचे असे. ते श्रेष्ठ दर्जाचे कवी असूनही स्वतःस कविकिंकर म्हणवीत व ज्ञानी असूनही ते प्रेम-भक्तीचे पुरस्कर्ते होते. त्यांना सगुणोपासना प्रिय होती. त्यामुळे बारामतीतील श्रेष्ठांपासून कनिष्ठ खाटिकादिकांपर्यंत ते सर्वांना सारखेच प्रिय झाले होते. ह्याची साक्ष त्यांच्या *गंगावकिली* व *विष्णुपदवकिली* ह्या दोन स्फुट काव्यांत आढळून येते. पंतांचे मित्रही सज्जन व भगवद्भक्त असेच होते. पंढरपूरचे *धर्मसिंधु* ग्रंथाचे कर्ते बाबा पाध्ये हे पंतांचे मित्र होते व पुढे व्याही झाले. बाबांची मुलगी पंतांच्या थोरल्या मुलास दिली होती. त्याशिवाय विठोबादादा अनवेकर चातुर्मासे, त्यांचे पुत्र हरिदास मैराळ, विठोबादादा ताहराबादकर म्हणजे महिपतींचे पुत्र, कोल्हापूरचे दाजीबा पुजारी, पंढरीचे रामचंद्र बडवे, बाळंभट काजळे व पूर्ववयात रंगेल असून पंतांच्या आर्यासंगतीने निवळलेले सोलापूरचे प्रसिद्ध कवी राम जोशी हे सर्व पंतांचे मित्र होते. ह्यांपैकी विठोबादादा चातुर्मासे व त्यांचे पुत्र हरिदास मैराळ ह्यांच्याशी पंतांचे घनिष्ठ स्नेहसंबंध होते. त्यांच्याशी ह्यांचा परमार्थाविषयी व ते रचित असलेल्या काव्यांच्या रचनेच्या संदर्भात सतत पत्रव्यवहार होत राहिलेला असे. हे विठोबा थोर भगवद्भक्त व श्रेष्ठ दर्जाचे कीर्तनकार होते. पंतांनी त्यांना उद्देशून गीतिवृत्तात लिहिलेल्या *स्तुतीत* " श्रीविठ्ठल निजनिजजनसद्गुणकीर्तनसुखार्थ अवतरला । ज्याच्या सूक्तिश्रवणें जडही गोष्पद करूनि भव तरला ॥. . .प्रेमळ, रसिकशिरोमणि, दाता, मृदुहृदय, परमपटु, शान्त । कान्त मुखश्री, ज्याच्या उपदेशें बहुत जाहले दान्त ॥ " असे गौरवोद्गार काढलेले आहेत. आपल्या सर्व मित्रांबद्दलही ' प्रेमें सिंचित होते या कवनते सखे जसे वेला । ' असे त्यांचे ऋण ह्यांनी बोलून दाखविले आहे.

पंतांनी आपल्या उतारवयात पुष्कळ यात्रा केल्या हे त्या त्या ठिकाणच्या देवतांच्या स्तुतिपर त्यांनी ज्या कविता केल्या त्यांतील उल्लेखांवरून समजते. पंत आपल्या वयाच्या साठाव्या वर्षी शके १७१० (इ. स. १७८८) कार्तिकात, यजमानपुत्र पांडुरंगराय ह्यांनी पाठविल्यावरून, वडील भाऊ, आपली पत्नी रमाबाई, आईपेक्षा अधिक प्रेम करणारी आत्या, व इतर नातलग ह्यांना घेऊन इतिहासप्रसिद्ध धनाजी जाधवांचे नातू अमरसिंह जाधव ह्यांजबरोबर महायात्रेस गेले. काशीयात्रा म्हणजे काशी, प्रयाग व गया ह्या त्रिस्थळीची यात्रा होय. पंत काशीस चातुर्मास राहिले. तेथे असताना रोज सकाळी स्नानानंतर *भगवद्गीते*चे पद्यात्मक भाषान्तर रचून ब्राह्मणाला ते दान करून नंतर ते भोजन करीत असत, असे सांगतात.

मोरोपंतांनी आपल्या वयाच्या पंचेचाळिसाव्या वर्षापूर्वीच *कुशलवोपाख्यान*, *ब्रह्मोत्तरखंड*, *मदालसाचरित्र*, *हरिश्चंद्राख्यान*, *सप्तशती*, *सीतागीत*, *रुक्मिणीगीत*, *सावित्रीगीत*, *प्रल्हादविजय*, *मंत्ररामायण*, *कृष्णविजय*, *भीष्मभक्तिभाष्य*, *संजयरत्नावली*, *साधुसत्कार*, *आर्याकेकावली*, *नामसुधाचषक*, *नामार्या*, *आर्यामुक्तामाला*, *सन्मणिमाला*, स्तोत्रे, *नामरसायन*, *भारता*ची पहिली तीन-चार पर्वे वगैरेंची रचना केली होती. *कुशलवोपाख्यान* ही त्यांची पहिली दीर्घ काव्यकृती. ती त्यांनी इ. स. १७५०–५१ मध्ये बहुधा केली असावी. हे आख्यान रचण्यापूर्वी त्यांच्याकडून *रघुवंश* व *जैमिनीअश्वमेध* ह्या ग्रंथांचे जे वाचन झाले होते, त्यामुळे ते रचण्याची त्यांना स्फूर्ती झाली असावी. हे काव्य स्वतंत्र नाही. *जैमिनीअश्वमेधा*तील २५–३६ अध्यायांचे थोड्याफार फरकाने तेरा अध्यायांत केलेले ते जवळजवळ संक्षिप्त भाषान्तरच आहे. असे असले तरी त्यांच्या संस्कृत काव्यग्रंथांच्या वाचनाचा, साहित्यशास्त्राच्या अभ्यासाचा व प्रतिभेचा त्यावर प्रभाव पडलाच आहे. एकंदर श्लोकसंख्या ५०६ असून, स्रग्धरा, शार्दूलविक्रीडित, विबुधप्रिया, अमृतध्वनि, मंदाक्रांता, पृथ्वी, हरिणी, शिखरिणी, वसंततिलका, रथोद्धता, मयूरी इ. २८ गणवृत्तांची त्याचप्रमाणे पुष्पिताग्रा, माल्यधारा ह्यांसारखी अर्धसमवृत्ते, आर्यागीती, गीती, उद्गीती, उपगीती ह्यांसारखी मात्रावृत्ते, दोह्यासारखे हिंदी वृत्त, अनुष्टुभ छंद ह्यांची ठिकठिकाणी योजना केलेली आहे. विविध वृत्तांतील ह्या त्यांच्या रचनेत त्यांचे शब्दप्रभुत्व, वृत्त व अलंकार ह्यांविषयीचे त्यांचे ज्ञान व्यक्त होते. त्यांचे त्यावेळचे अल्पवय लक्षात घेता, त्याबद्दल कौतुक वाटते. ह्या काव्यात प्रसादगुण मात्र त्या मानाने कमीच.

*कुशलवोपाख्याना*नंतर मोरोपंतांनी लगेच त्याच्या पाठोपाठ रचलेला काव्यग्रंथ *ब्रह्मोत्तरखंड* हा बहुधा असावा. त्यांनी आपले गुरुपुत्र सदाशिव पाध्ये ह्यांच्या सूचनेवरून, पन्हाळगड येथे असता तो रचला. हा शिवकीर्ति ग्रंथ आहे असे कवी म्हणतो (२२, ७८). ह्या ग्रंथाचे २२ अध्याय असून, श्लोकसंख्या १२०० आहे. रचनेत फारसा रस नाही. त्यांच्या आर्येचा पुढील काळातील थाट लक्षात घेता *ब्रह्मोत्तरखंडा*तील आर्या अगदीच सामान्य वाटतात. ह्या ग्रंथाच्या अगोदर ३५ वर्षे रचले गेलेले श्रीधरांचे रसाळ *शिवलीलामृत* पाहता हा ग्रंथ अगदीच नीरस वाटतो.

मोरोपंतांनी वयाच्या पंचेचाळिशीनंतर, सतत सहा वर्षे परिश्रम करून *महाभारता*चे तत्पूर्वी आरंभिलेले काम यशस्वी रीतीने पूर्ण केले. 'व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ' अशी ज्याची प्रसिद्धी आहे, व ज्यात विविध विषय चर्चिले आहेत असा *भारत* हा प्रचंड ग्रंथ आहे. तो संस्कृत भाषेत लिहिला गेला असल्यामुळे सर्वसामान्यांकडून तो समग्र वाचला जाणे अशक्यच. ही अडचण लक्षात घेऊन मोरोपंतांपूर्वी होऊन गेलेल्या मुक्तेश्वर, विष्णुदासनामा, श्रीधर, माधवस्वामी, नरहरि मोरेश्वर, जिवाशिवा, मालुनाथ, कृष्णदास मुद्गल, गोपाळकवी इत्यादींनी समग्र *भारत* मराठीत आणण्याचा प्रयत्न केला; शुभानंत, चंद्रात्मज रुद्र, मोरेश्वर, मैराळ वगैरेंनी काही काही पदे रचली. पण ही सारी रचना जितकी आटोपशीर, सुबोध व सुटसुटीत असावी तितकी नाही. हे लक्षात आणून पंतांनी तो 'स्वल्पांत' आणण्याचे ठरवून, पूर्वकवींनी अवलंबिलेल्या ओवीवृत्ताचे अवलंबन न करता संस्कृत छन्दःशास्त्रात 'आर्या गीति' ह्या नावाने जे ओळखले जाते त्या वृत्ताचा अवलंब केला. मोरोपंतांनी हे *भारत* अथपासून इतिपर्यंत 'आर्ये'मध्ये रचले असल्यामुळे ते *आर्याभारत* ह्या नावाने ओळखले जाऊ लागले. [➪ ३.] ह्यातील आर्यांची एकूण संख्या १७१३६ आहे. मोरोपंत काशीस गेले त्यावेळी त्यांनी आपले हे *महाभारत* बरोबर नेले होते. तेथील पंडितांकडून त्याचे गुणग्रहणात्मक परीक्षण व्हावे अशी त्यांची इच्छा होती. एके दिवशी योग्य संधी पाहून त्यांनी आपला हा ग्रंथ पंडितांसमोर ठेवला. त्यांनी शलाकापरीक्षा (पोथीत मध्येच काडी शिरकवून जी पृष्ठे उघडतील ती वाचून केलेली ग्रंथपरीक्षा) करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे *विराटपर्वा*तील दोन आर्या असलेले पृष्ठ त्यांच्या नजरेस पडले. त्यावर पुढील आर्या (७.३६–३७) होत्या : "वदवि मयूराकरवीं श्रीराम विराटपर्व चवथें बा। स्वल्प म्हणोनि न सोडी अमृताची शक्ति सर्व चव थेंबा ॥ रामवन सत्प्रसादामृत जों जों बहु वळूनि वर्षतसे। तों तों भक्तमयूर स्वार्यांकेका करूनि हर्षतसे ॥" ह्या आर्या वाचून पंडितमंडळी खूष झाली आणि त्यांनी त्यांच्या काव्यकलेची वाहवा केली. श्रीधर विष्णु परांजपे हे आपल्या *मोरोपंतांचे चरित्र व काव्यविवेचन* ह्या ग्रंथात (पृ. २५–२७) लिहितात : "अशा रीतीनें पंतकविता काशीस्थ पंडितांना फार पसंत पडली व त्यांनीं पंतांची व्यासपूजा केली. ह्याच महायात्रेंत पंतांनीं अनेक पवित्र क्षेत्रांचें व तीर्थांचें दर्शन घेऊन त्यांवर स्तोत्रें रचलीं. काशींतल्या तर सर्व देवतांचें त्यांनीं पृथक् वर्णन केलें आहे. *गंगास्तुति*, *गंगाप्रार्थना*, *गंगावकिली*, *गंगास्तव* व *गंगाविज्ञप्ति* (संस्कृत), हीं पांच प्रकरणें गंगेसंबंधीं व *काशीप्रार्थना*, *काशीस्तुति* हीं दोन काशीसंबंधीं असून *विश्वेशस्तुति*, *काळभैरवस्तुति*, *अन्नपूर्णास्तुति*, *मणिकर्णिकास्तुति*, *द्विचत्वारिंशल्लिंगयात्रा* हीं काशीस्थ देवतांविषयीं आहेत. ह्या सर्वांत *विश्वेशस्तुति* व *गंगास्तव* हीं दोन प्रकरणें सरस उतरलीं आहेत. त्यांतही *गंगास्तव* हें तर अधिकच मधुर झालें आहे. त्यांचीं पद्यें एकूण ३७ असून त्यांतील पहिले सव्वीस श्लोक तर जगन्नाथराय पंडितकृत *गंगालहरी*च्या प्रसिद्ध शिखरिणी वृत्तात असून पुढील दोन २७–२८ पृथ्वीछन्दांत, २९ वा शार्दूलविक्रीडितांत, व ३० वा स्रग्धरा वृत्तांत आहेत. हींच वृत्तें पंडितांच्या *गंगालहरी*चीं असून क्रमही तोच आहे. फक्त *गंगालहरी*चे शेवटचे दोन श्लोक ('विभूषितानंगरिपूत्तमांगा...; इमां पीयूषलहरीं...') अनुक्रमें उपजाति व अनुष्टुभ् छन्दांत आहेत. तीं वृत्तें तेवढी *गंगास्तवां*त योजिलीं नसून त्यांच्या ऐवजीं सवाई, घनाक्षरी, दंडक व चामर हीं वृत्तें योजिलीं आहेत. हा *गंगास्तव* रचतांना पंतांना *गंगालहरी*चें खचित स्मरण असावें. पंतांचा *गंगास्तव* व पंडितांची *गंगालहरी* ताडून पाहिल्यास 'लहरीं'तील रसपुष्टी, करामत व माधुर्य *गंगास्तवां*त आढळून येणार नाहीं. तथापि पंतांनीं यमकाचें बंधन संभाळून *गंगास्तवां*त पुष्कळच सरसत्व, प्रसाद व भक्तिमत्त्व ओतलें आहे. लांब सामासिक पदें ह्यांत मुळींच घातलीं नाहींत. पुढील मासला पहा :

(श्लोक) समर्था तूं, चित्तीं भवभय धरूं का पतित मी ?।  
रवीच्या पार्श्वींचे, न, पडुनि कधीं, कांपति तमीं ॥  
जगन्माते ! गंगे ! अभयवर तो दे वसविता।  
त्वदंकीं, हृत्पद्मापति सुखद तो देव सविता ॥ ११ ॥  
तुझ्या तीरीं नीरीं हृदय रमतें दुःख शमतें।  
यशोगानें पानें कुमत गळतें, विघ्न टळतें ॥  
कळी भंगे गंगे ! षडरि झुरती, दोष नुरती।  
दिली रामें, नामें तशिच जगतीला निजगती ॥ २३ ॥

गंगा, गोदावरी, कृष्णा, इत्यादी देशावरील तीर्थांतच पंतांनीं स्नान केलें असें नाहीं, तर कोंकणांतील राजापुरच्या गंगेंतही त्यांना 'सत्संगतीनें एक वेळ अलभ्य मज्जन घडलें'. पंत 'भूमीवरची मोक्षपुरी पंढरी'सही पुष्कळ वेळां गेले होते. त्यांनीं पांडुरंगाची संस्कृत व प्राकृत अशा दोन्ही तऱ्हेचीं स्तोत्रें रचिलीं आहेत. . . पंतांची सर्व देवांविषयीं समबुद्धि होती तरी ते रामोपासक होते. आपल्या उपास्यदेवतेप्रीत्यर्थ त्यांनीं आपल्या उत्तर वयांत *१०८ रामायणें* रचिलीं. त्यांत त्यांनीं आपली चित्रकाव्याभिरुचि प्रकट केली आहे."

*आर्याभारत* पूर्ण झाल्यावर, उत्तरवयात, *मंत्रभागवत*, विविध वृत्तांतील विविध रामायणे, *मंत्रमय भागवत*, *मंत्रमय रामायण*, *भगवन्नाममाहात्म्ये*, *रामायण-महाभारत-भागवत* ह्यांतील प्रकरणे, संतस्तवने, साकीबद्ध आख्याने, *श्लोक केकावली* अशी अनेक प्रकारची रचना मोरोपंतांकडून घडली.

वर उल्लेखिलेल्या रचनांत *मंत्रभागवत* व *श्रीकृष्णविजय* ह्या रचना [➪ ३] महत्त्वाच्या व उत्कृष्ट ठरल्या आहेत. "विशेषतः त्यांच्या भागवती काव्यांमध्यें मुख्य जें *मंत्रभागवत* तें तर भाषेच्या, मांडणीच्या व काव्यकौशल्याच्या दृष्टीनें इतकें सुगम, इतकें आटोपशीर व रसाळ उतरलें आहे कीं, मराठींतून *भागवता*चा आस्वाद ज्याला घ्यावयाचा आहे असा रसिक वाचक तेंच प्रथम पसंत करील." (श्री. ना. बनहट्टी; *मयूरकाव्यविवेचन*; १९२६; पृ. १८). १३५२२ पद्यसंख्या असलेल्या मूळ *द्वादशस्कंधी भागवता*चा तेवढ्याच स्कंधांत पण ३५७५ पद्यसंख्येत रचून पूर्ण केलेला हा मराठी अवतार आहे. तो आर्यावृत्तात रचला असून 'नमो भगवते वासुदेवाय' हा एकादशाक्षरी मंत्र सर्वत्र आर्यांच्या आद्याक्षरांनी साधला आहे. भाषान्तरचातुर्य, संक्षेपविस्तारकौशल्य, पदलालित्य, अलंकारयोजकता, शुद्ध भक्ती हे त्यांच्यातील गुण ह्यात उत्तम प्रकारे प्रकट झाले आहेत. हे *मंत्रभागवत* रचण्याची प्रेरणा मोरोपंतांस, *महाभारता*वर टीका लिहिणारे नीलकंठ चतुर्धर ह्यांच्या *मंत्रभागवतव्याख्या* ह्या ग्रंथाच्या वाचनामुळे मिळाली असावी.

*मंत्रभागवता*नंतरचा मोरोपंतांचा दुसरा महत्त्वाचा व मोठा ग्रंथ *श्रीकृष्णविजय* ऊर्फ *बृहद्दशम* हा होय. ह्याची पद्यसंख्या ३६७५ आहे. *मंत्रभागवता*प्रमाणेच हाही *भागवता*च्या *दशम स्कंधा*वर पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग पाडून रचला आहे. काही जणांचे म्हणणे असे आहे की, हा ग्रंथ मोरोपंतांनी *मंत्रभागवता*च्या आधी रचला. कवीने काव्याचा लेखनकाल दिलेला नसल्यामुळे हे म्हणणे ग्राह्य की अग्राह्य हे ठरविणे कठीणच. *मंत्रभागवता*प्रमाणेच हा मूळ संस्कृत ग्रंथाचा जशाचा तसा मराठी अनुवाद नाही. मूळ ग्रंथातून अनेक ठिकाणी येणारी वेदान्तविषयक प्रकरणे ('वेदस्तुति' वगैरे) पंतांनी अजिबात सोडून दिली आहेत. कथासूत्र मात्र अगदी मुळाबरहुकूम राखले आहे. मुळातील प्रसाद किंवा अव्याजमनोहर रचना *श्रीकृष्णविजय* ग्रंथात पूर्वार्धामध्ये फारच थोडे ठिकाणी उतरली आहे. हा सर्व भाग पंतांनी आर्यागीति वृत्तात रचला आहे. उत्तरार्धात पहिले पाच अध्याय (५०–५४) आर्यागीति वृत्तात व बाकीचे विविध वृत्तांत रचिले आहेत.

*मंत्रभागवत* व *श्रीकृष्णविजय* ह्या दोन भागवती काव्यग्रंथांतील रस्य वर्णने, रसोत्कट हृद्य प्रसंग, सौष्ठवपूर्ण कल्पना, रचनाचातुर्याचे विविध

नमुने पाहूनच मोरोपंतांचे समकालीन, 'कविप्रवर' व 'अभिनव कालिदास' अशा गौरवपर उपाधींसह संबोधिले जाणारे थोर रसिक कविमित्र राम जोशी ह्यांनी "वाणी मयूरवदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी। पक्ष श्रीहरि धरि जरि काय न करि तरि अनंत मायावी।।" असा पंतांच्या कवितेविषयी आपला अभिप्राय व्यक्त केला असावा. जोशीबुवांनी शृंगारिक लावणी गाऊन बहुजनसमाजाचे रंजन करणारा तमासगिराचा पेशा सोडून जेव्हा कीर्तनकाराचा पेशा पत्करून डफ टाकून हाती वीणा घेतली, तेव्हा त्यांचा बराचसा भर बहुशः मोरोपंतांच्या आर्यांवरच असायचा. कीर्तनांतील कथाकथनाच्या प्रसंगी त्यांच्या गळ्यातून निघणाऱ्या आर्येवर सारा महाराष्ट्र त्या काळी लुब्ध होऊन गेला होता.

*मंत्रभागवत* व *श्रीकृष्णविजय* हे ग्रंथ पूर्ण झाल्यावर पंतांनी त्यांच्या यजमानांचे चिरंजीव पांडुरंग नाईक ह्यांनी वारंवार आग्रह केल्यामुळे *हरिवंश* हा ग्रंथ रचावयास घेतला. ह्यात कृष्णचरित्राचा उत्तरार्ध ५४ अध्यायांत व ५४०० आर्यांत कथन केला आहे. हा काव्यग्रंथ वाचल्यावर *आर्याभारत, मंत्रभागवत, श्रीकृष्णविजय* ह्यांसारखे ग्रंथ रचणाऱ्या कवीने तो रचला ह्यावर विश्वासच बसत नाही. पण तो त्यांनी रचला ही वस्तुस्थिती आहे. मग तो त्यांच्या कीर्तीला साजेल असा का न उतरावा ? ह्याचे मुख्य कारण असे दिसते की, 'यजमानांनी सांगितले आणि पुराणिकांनी लिहिले' असाच तो बव्हंशी प्रकार होता. रचनाकाराने मन घालून, अंतःकरण ओतून रचना केली नाही. आश्रयदात्याचा आग्रह मोडणे शक्य नव्हते म्हणून त्याला सारी लेखनकामाठी करावी लागली. तेव्हा काव्याच्या जनकाचेच मन जेथे फुलले नाही, तेथे वाचकाचे मन कसे फुलणार किंवा खुलणार ? ल. रा. पांगारकर लिहितात : "हा एवढा विस्तृत ग्रंथ थोडयांच्याच वाचण्यांत येत असेल. हा ग्रंथ कांहीं नीरस नाहीं, पण ह्यांतील बहुतेक कथाभाग *कृष्णविजय* व *मंत्रभागवत* ह्या ग्रंथांत येऊन गेल्यामुळें व त्या ग्रंथांसारख्या टापटिपीच्या आर्या ह्यांत नसल्यामुळें हा बराच मागें पडला आहे. काव्य ह्या दृष्टीनेंही ह्या ग्रंथाची मातब्बरी विशेष नाहीं." (*मोरोपंतचरित्र*; द्विआ., १९४३; पृ. ३८७).

*हरिवंश* पूर्ण केल्यानंतर त्यांचे चित्त, त्यांचे आराध्यदैवत जो श्रीराम त्याच्या चरित्रकथनाकडे उत्कटतेने वळलेले दिसते. आर्येच्या तंत्रावर त्यांनी आता पूर्ण प्रभुत्व संपादिले होते. त्यांत रचली जाणारी कवने रसिक बुधजनांना प्रमुदित करू लागली आहेत हे पाहून त्यांचा उत्साह व आत्मविश्वास वाढत चाललेला होता. ते म्हणू लागले : "रामाचें रचिलें चरित्र मुनिनें वाल्मीकिनें संस्कृतीं। नाहीं हानि कदापि अन्यकविहीं तें वर्णितां प्राकृतीं।। मुक्तांचा रचिलाचि हार पहिला जो रेशिमाच्या गुणें। तो कार्पासगुणेंकरूनि करितां काय प्रभेला उणें ? ।। केलें पात्र सुवर्णाचें, कीं विरूपशि खापरी।। लावितां तेथ संहारी तम, दीपशिखापरी।।" असे म्हणून ते थांबले नाहीत, तर "वाल्मीकिविप्रोत्तमकाव्यपद्म। श्रीरामलीलामकरंदसद्म।। तेथें मयूरेश्वर भृंग जाला। सेवावया नित्य सुखें रसाला।।" असे म्हणून श्रीरामलीलावर्णनांत त्यांची रसना रंगू लागली. *मंत्ररामायण* व विविध छन्दांत व आकृतिबंधांत त्यांनी शतकाहून अधिक जी लघुरामायणे सफाईने रचली ती त्याचे दृश्य फलित होय. 'भिन्न वृत्तांत रचलेलीं व विविध बंध साधलेलीं त्यांचीं हीं रामायणें वाचलीं म्हणजे पंत भाषानर्तकीला वाटेल तशी नाचवीत असें दिसून येतें.' *अष्टोत्तर रामायणे* ह्या नावाने ती ओळखली जातात. चित्रकाव्यांत मोडणारी अशी ही काव्ये आहेत. हा काव्यप्रकार काव्याचे उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे जे तीन प्रकार भारतीय काव्यशास्त्रात सांगितले आहेत त्यांतील 'चित्रकाव्य' ह्या तिसऱ्या प्रकारात मोडतो. ह्या प्रकारात प्रामुख्याने अर्थचमत्कृतिरहित शब्दचमत्कारिताच आढळते. काव्यशास्त्रकारांनी कनिष्ठ मानलेल्या ह्या प्रकारात मोडणारी *अष्टोत्तर रामायणांची* रचना मोरोपंतांसारख्या श्रेष्ठ दर्जाच्या कवीने केलेली पाहून अलिकडील काव्यरसिकांना जरा चमत्कारिकच वाटते. ह्या संबंधात न. चिं. केळकर ह्यांनी पराडकर-संपादित *अष्टोत्तरशत रामायणांस* जो उपोद्घात जोडला आहे त्यात केलेले स्पष्टीकरण विचारात घेण्यासारखे आहे. ते लिहितात : "संस्कृत वाङ्मयांत भाषेची जितकी कसरत केलेली दिसून येते, तितकी अन्यत्र दिसून येणार नाहीं. व आमच्या मतें हीच उणीव भरून काढण्याचें धोरण *अष्टोत्तरशत रामायणें* रचतांना पंतांनीं ठेविलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. चित्रकाव्यें हीं बहुधा कृत्रिम व म्हणूनच रसालंकाररहीन असल्यामुळें अधमकाव्यांत गणतात. साहित्यशास्त्रनिष्णात असलेल्या पंतांसारख्या महाकवीला चित्रकाव्यासंबंधीचें हें मत अपरिचित होतें असें तर मुळींच म्हणतां येणार नाहीं. चित्रकाव्य रचण्याचा हेतु त्यांच्या *आम्लानपंकजमाला* ह्या संस्कृत स्तोत्रांत प्राधान्येंकरून जसा व्यक्त होतो, तसा, लक्षणानें चित्रकाव्यांच्या सदरांत पडणाऱ्या त्यांच्या मंत्रबद्ध व नामबद्ध रामायणांत दिसून येत नाहीं. हीं रामायणें लक्षणानें चित्रकाव्यें असलीं तरी तीं चित्रकाव्यें म्हणून पंतांनीं रचलीं नाहींत. हीं रामायणें रचतांना चित्रकाव्यांच्या बाबतींत येणाऱ्या लौकिक दोषापेक्षां पंतांनीं आपल्या भक्तिप्रधान अंतःकरणाला रुचणाऱ्या देवदेवता, तीर्थक्षेत्रें, संतमहंत ह्यांच्या नामोच्चरणलालसेलाच अधिक महत्त्व दिलेलें दिसून येतें. ह्याशिवाय ह्या प्रश्नाला आणखी एक बाजू संभवते. ती अशी कीं, पंतांच्या वेळीं सार्वत्रिक अभिरुचीच अशा काव्यांना अधिक प्रोत्साहक असावी. शब्दचमत्काराकडेच तत्कालीन जाणत्या लोकांचा विशेष ओढा असावा. . . पंतांनीं केली आहे तशी चित्रकाव्यरचना आवडणाराच पक्ष त्या वेळीं प्रबळ होता. तसा तो प्रबळ नसता व उलट पंतांच्या ह्या चित्रकाव्याला नाकें मुरडणारा वर्ग जर निकट असता तर पंतांनीं आपलाच हेका चालविला असता असें आम्हांस वाटत नाहीं.

"मोरोपंतांच्या *मंत्ररामायणा* [ ⇨ ३] खेरीज विशेष निर्देश करण्याजोगीं रामायणें म्हटलीं म्हणजे *रामायणअभंग, श्रीगुरु, सीता* व *हनुमत्* हीं होत. पैकीं पहिलें *सीतागीत* ह्या नांवानें प्रसिद्ध असून त्याच्या लोकप्रियतेवरूनच त्याच्या महत्त्वाची साक्ष पटणार आहे. पुढील तीन रामायणांची भूमिका मात्र कवीनें फारच बहारीची कल्पिली आहे. 'श्रीरामासि पहावया जनक ये स्नेहें अशोका पुरा', असा *श्रीगुरुरामायणा*चा प्रसंग कल्पून सर्व मंडळी एकत्र जमविली असून श्रीगुरु वसिष्ठांच्या आज्ञेवरून रामांनीं सर्व वनवासवृत्त सांगण्यास प्रारंभ केला आहे; व पुढें रामायणांतील प्रमुख प्रमुख व्यक्ती शालीनतेनें स्वतःकडे कमीपणा घेऊन दुसऱ्याचा गौरव करीत करीत आपापली हकीकत सांगत आहेत असें ह्या रामायणाचें स्वरूप आहे. *सीतारामायण* हा विदग्ध काव्याचा आदर्शच आहे म्हटलें तरी चालेल. 'श्रीजनकसुता सीताप्रभृति सुखें भेटल्या स्वसा जावा। तत्संवाद वदावा, सज्जन पावुनि मह स्व साजावा।।' म्हणून कवीनें हें रामायण गाइलें आहे. ह्या रामायणाची भाषा मृदु व मधुर आहे. पंतांनीं कुलस्त्रियांसाठीं म्हणून जीं काव्यें रचिलीं आहेत त्यांतील *सीतारामायण* हें प्रमुख काव्य आहे. ह्यांत नानाविध वृत्तांची योजना केलेली असल्यामुळें स्त्रियांना त्यांच्याच बोलींत वृत्तांची ओळख करून देण्यास ह्याचा उपयोग होईल. . . *हनुमत् रामायणां*त पंत हनुमंताकडून त्याच्या मातेला रामकथा निवेदन करवीत आहेत. स्वमुखानेंच स्वपराक्रमाचा गौरव करण्याच्या बिकट प्रसंगांतून हनुमंत कसा शिताफीनें निसटला आहे, हें ह्या रामायणांत पहाण्याजोगें आहे."

मोरोपंतांची स्फुट कविता त्यांच्या दीर्घ व लघु काव्यांइतकीच विपुल आहे. तिचे विषय सामान्यपणे पुढीलप्रमाणे : १. देवादिकांच्या प्रार्थना, स्तुती, स्तव इत्यादी; २. संतवर्णने : सत्संगस्तव; रामदासगुणवर्णन; वामनादिकीर्तन; तुकारामस्तुती; महिपतिस्तुती; ३. पवित्र नद्यांची व

स्थलांची वर्णने; ४. भगवन्नाममाहात्म्य; ५. भागवतातील प्रकरणे : *अवतारमाला*; *ध्रुवचरित्र*; *प्रल्हादविजय*; *अमृतमंथन*; *वामनचरित्र*; *भक्तभूषण*; *गोपीप्रेमोद्गार*; *गोपीगोडवा*; *भृगुचरित्र*; *गिरित्रमोक्ष* [गिरित्र = शंकर; मोक्ष = सुटका. मूळ *भागवतात* ह्या प्रकरणाला 'रुद्रमोक्षण' असे नाव आहे. *काव्यसंग्रह*कार ह्यांनी ह्याला *भस्मसुराख्यान* असे शीर्षक दिले आहे.]; *भीष्मभक्तिभाग्य*; *मुरलीनवरत्नमालिका*; *रुक्मिणी-हरण-गीत*; *सुदाम-चरित्र – श्लोकबद्ध*; *पृथुकोपाख्यान* (साकी वृत्तात रचलेलें *सुदामचरित्र*); *शिवकीर्ती* ग्रंथ; *हरिश्चंद्राख्यान*; *अंबरीषाख्यान*; *नवदानकेली* (श्रीकृष्ण व राधा ह्यांमध्ये झालेला कोटिक्रमयुक्त असा विनोदी संवाद); ६. आत्मकथनपर; ७. अभंग व पदे; ८. स्त्रीगीते : *सीतागीत*, *सावित्रीगीत* इ.; ९. गीतार्या; १०. आरत्या.

ही स्फुट काव्ये, स्वतःच्या उन्नतीकरिता भगवंताच्या लीलांचे, संतांच्या महिम्यांचे, पवित्रस्थळात अनुभवास येणाऱ्या उद्दीपक आध्यात्मिक वातावरणाचे गान करावे म्हणून, व सर्वसामान्य व्यक्तींत सात्त्विक भावांचे सहज संचरण व्हावे असा हेतू मनात बाळगून, मोरोपंतांनी रचली असावीत असे वाटते. त्यांचे हे हेतू निश्चितपणे सफल झाले आहेत. त्यांची ही कविता वाचीत किंवा श्रवण करीत असता वाचकाच्या व श्रोत्याच्या अंतःकरणांत निर्भय, शांत वृत्ती जागी होते, पवित्र विभूती, स्थळे ह्यांचे दर्शन घडावे अशी तळमळ सुरू होते, भगवद्दर्शनासाठी उत्कंठा उदित होते.

मोरोपंत जातीचे कवी असले तरी त्यांचा व्यवसाय पुराणिकाचा होता. साहजिकच इतर वर्णनापेक्षा कथानिवेदनाकडे त्यांचे विशेष लक्ष असते. पाल्हाळ न लावता खुबीदारपणे, आटोपशीरपणे, नीटनेटके असे केलेले निवेदन व संक्षेपविस्तारकुशलता हे गुण येथे आढळतात. शब्दसौंदर्यापेक्षा किंवा काव्यसौंदर्यापेक्षा मोरोपंतांतील पुराणिक कथेच्या सौंदर्यात अधिक रंगून गेलेला दिसतो; आपल्या वाचकांनी व श्रोत्यांनी आपल्याप्रमाणेच त्यात रंगून जावे असे त्यांस वाटत असते. त्या वाटण्याबरोबरच आपल्या रचनेत कल्पनासौष्ठव, भाषेची कोमलता, भावाची प्रेमळता व अलंकाराची हृद्यता हे गुणही कथाकथनात उतरले पाहिजेत ह्याचे भान त्यांनी राखलेले असते. कविता बांधेसूद व्हावी, तिची अंगप्रत्यंगे सुंदर असावी; ह्यासाठी ते कौतुकास्पद काळजी बाळगतात. त्यांच्या स्फुट कवितेला जी रोचकता व आकर्षकता लाभली आहे ती ह्यामुळेच.

पंतांनी रचलेले शेवटचे काव्य *श्लोक केकावली* [⇨ २] हे होय. काशीयात्रेहून परत आल्यावर त्यांनी ह्या स्तोत्रकाव्याची निर्मिती केली. त्यांच्या सर्व स्तोत्रकाव्यांत ह्याच्याइतके श्रेष्ठ दर्जाचे काव्य नाही. अमर अशा मराठी स्तोत्रकाव्यांत त्याची गणना होते. भक्ती व करुण ह्या दोन रसांनी थबथबलेले असे हे आदर्श ध्वनिकाव्य आहे.

मोरोपंतांनी रचलेली कविता सुमारे सत्तर हजार पर्यंत भरेल. त्यांनी संस्कृत भाषेतही पुढीलप्रमाणे रचना केली आहे : *मंत्ररामायणम्* (पद्यसंख्या ३९९३), स्तोत्रे, प्रार्थना, अष्टके, शतके, स्फुट श्लोक वगैरे (पद्यसंख्या ९२६). संस्कृतात काव्यरचना करण्याकडे पंतांचा फारसा ओढा नव्हता. त्यांचे स्नेही बाबा पाध्ये ह्यांच्या आग्रहावरूनच केवळ त्यांनी ही रचना केली. *मंत्ररामायणा*तील प्रसादादी गुण व *मुक्तामाला*मधील अप्रस्तुतप्रशंसा, व्याजस्तुती, वक्रोक्ती वगैरे अलंकार लक्षात घेता, संस्कृत भाषेतील द्वितीय श्रेणीतील कवीत त्यांना स्थान देण्यास कोणी फारसा अनमान करील असे वाटत नाही.

मोरोपंत हे लोकप्रियतासंपादनाच्या दृष्टीने मोठे भाग्यवान मराठी कवी होते. "त्यांचे स्नेही, शिष्य आणि गुणग्राहक ह्यांनीं त्यांच्या आर्या मराठी भाषा बोलणाऱ्या सर्व प्रांतोपप्रांतांत पसरविल्या. कित्येकांनीं कीर्तनप्रसंगीं त्या गायिल्या, कित्येकांनीं त्यांचें अनेकार्थत्व व्यक्त करून दाखविलें, कित्येकांनीं त्या वऱ्हाडांत नेल्या, तर कित्येकांनीं इंदूर, ग्वाल्हेर, बडोदें आणि गोवा ह्या प्रांतांतही नेल्या. पंतांच्या आर्येचा जसा जनांत प्रसार झाला तसाच कवींच्या कवनांतही प्रवेश झाला. अनेक कवींनीं पंतांचें अनुकरण केलें. कित्येकांनीं आर्या वृत्त उचललें, कित्येकांनीं यमकानुप्रास उचलले आणि कित्येकांनीं त्यांची भाषाधाटणी उचलली. पुष्कळ कवींना पंतांच्या आर्यांपासून काव्यस्फूर्ति मिळाली. पंतकाळीं असलेल्या आणि त्यांच्यानंतर आलेल्या अनेक कवींनीं त्यांची स्तुति केली आहे. तुकाविप्र हे त्यांना 'प्राकृत काव्याचार्य' म्हणतात, विठोबा अण्णा दप्तरदार त्यांना 'नायक वीरकवींचा' असें संबोधितात, राजाराम प्रासादी त्यांना 'गणपतीचा अवतार' मानतात आणि परशुरामतात्या गोडबोले हे 'प्राकृत कवितेंत मोरोपंतांच्या कवितेसारखी कविता नाहीं', असा अभिप्राय देतात. 'श्रीमन्मयूरकविची देते संतोष मानवा कविता। जरि असता भूमीवरि सुरगुरु तरि तोहि मान वांकविता' अशी परमावधि ह्या प्रशंसेनें गांठली आहे.

"पंतांनीं आपल्या वाङ्मयसेवेनें जनतेस आकंठ पयःपान करविलें आणि अनेकांनीं त्यासाठीं त्यांना शतशः धन्यवादही दिले, पण त्यांची कविता जेव्हां छापून प्रसिद्ध होऊं लागली तेव्हां तत्कालीन कांहीं विद्वानांनीं तिजवर महान आघात केला. पंतांची कविता अगदीं कृत्रिम आहे, त्याला (मोरोपंताला) रसिक देखील म्हणवत नाहीं, मात्रा, यमक, अपरिचित शब्द ह्यांतच काय तो रस असें त्यास वाटत असे; कृत्रिम काव्यें रचून पंतानें आपल्या बुद्धीचा व आयुष्याचा अपव्यय केला; अशा प्रकारें एकंदर 'मूले कुठारः' ह्याप्रमाणें पंतांच्या काव्यकल्पनेवरच ह्या प्रतिकूल अभिप्रायांचा घाव होता. ह्या टीकाकारांत न्यायमूर्ति रानडे, डॉ. विल्सन इत्यादि मंडळी प्रमुख असून कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारखे विद्वान, रसिक, आणि स्वतः अभिजात कवि असलेलेहि सद्गृहस्थ होते.

"आरंभीं जरी चहूंकडून असें आभाळ उठलें तरी पण *निबंधमाले*च्या उदयानंतर लवकरच तें पांगलें. पंतांच्या कवितेच्या अभ्यासास प्रारंभ होऊं लागला. *माला*कारांनीं आक्षेपकांस सडेतोड उत्तरें देऊन त्यांचीं तोंडें बंद केलीं आणि *मालें*तच पंतकाव्याविषयीं अनेक विद्वानांकडून चर्चा होऊं लागली. त्याचप्रमाणें त्यांची कविताहि छापून निघूं लागली तसतसा तिचा प्रसार आणि अभ्यास जनतेंतहि होऊं लागला. पंतांच्या अभ्यासकांत आणि आक्षेपकांचें खंडण करणारांत पुढील मंडळी निघाली. विष्णुशास्त्री चिपळूणकर, मोडक, ओक, कानेटकर, परब, लेले, हंस इत्यादि पहिली मंडळी आणि त्यांच्या नंतरच्या काळांत श्री. वि. परांजपे, पांगारकर, प्रा. बनहट्टी इत्यादि. उपर्युक्त तिघांहि विद्वानांनी पंतांच्या काव्याचा स्वतंत्रपणें सखोल अभ्यास करून त्याजवर अधिकृत ग्रंथरचना केली आहे. ह्या सर्वांच्या मतें पंत हे श्रेष्ठ प्रतीचे कवि आहेत. मुक्तेश्वरांशीं त्यांची तुलना करतांना हंस हे पंतांना श्रेष्ठता देतात, तर पांगारकर कनिष्ठ लेखतात आणि प्रा. बनहट्टी पंतांच्या कल्पनावैभवाविषयीं पुढील निर्वाळा देतात : 'महाराष्ट्र वाङ्मयांत देखील व्यासवाल्मिकी सोडून दिल्यास इतर कवींमध्ये कालिदास व बाण हेच काय ते ह्या बाबतींत पंतांपेक्षां वरचढ ठरतील.' "(डॉ. ना. गो. नांदापूरकर : *मुक्त-मयूरांचीं भारतें*; पृ. १०–१२).

मोरोपंत हे निव्वळ भाषान्तरकार होते, ते स्वतंत्र प्रतिभेचे सर्जनशील कवी नव्हते; ते काव्यशास्त्रप्रवीण व भाषाप्रभू असले तरी द्रष्टा, नवसृष्टिनिर्माता, भूत, वर्तमान व भविष्य ह्यांतून आरपार पाहू शकणारा अशा महान कवीशी त्यांची बरोबरी होऊ शकणारी नाही, तेच तेच प्रसंग वेगवेगळ्या रूपांत मांडण्यात त्यांनी आपले भाषाप्रभुत्व व रचनाकौशल्य व्यर्थ खर्च केले आहे; शाब्दिक कसरत म्हणजेच काव्यकला असे ते समजतात आणि ती यशस्वी रीतीने पार पाडण्यातच ते धन्यता मानतात; असा अभिप्राय काही – विशेषतः महाराष्ट्रातील आंग्लविद्याविभूषित

पहिल्या दोन पिढ्यांतील – आधुनिक काव्यसमीक्षक व्यक्त करताना आढळतात. ह्या अभिप्राय कितपत वस्तुस्थितीस धरून आहे हे पाहणे येथे इष्ट ठरेल.

मोरोपंत हे निव्वळ भाषान्तरकार आहेत असे ज्यांनी म्हटले त्यांना 'भाषान्तर' ह्या संज्ञेची स्पष्ट कल्पना नसावी असे वाटते. भाषान्तरित लेखन तेच की, ज्याच्यात मूळ भाषेतील अर्थाचे प्रतिबिंब जशाचे तसे पाहावयास मिळते. मोरोपंतांचे काव्य भाषान्तरित आहे असे जे म्हणतात, त्यांना मूळ ग्रंथांच्या संस्कृत भाषेतील अर्थाचे यथातथ्य प्रतिबिंब मोरोपंतांच्या मराठी कवितेत पडलेले आहे असे सोदाहरण दाखवावे लागेल, ज्याला खरोखरच भाषान्तर म्हणता येईल असे पंतांनी दोनच ग्रंथ रचले. ते म्हणजे *गीतार्या* व *प्रश्नोत्तररत्नमाला*. पूर्वोक्त ग्रंथ भगवद्गीतेचे आर्याबद्ध भाषान्तर आहे. पण त्याचे कर्तृत्व त्यांना द्यावे किंवा न द्यावे ह्याबद्दल त्यांच्या कवितेचे संपादकच संशय व्यक्त करतात. ते म्हणतात : "ह्यामध्यें त्यांनीं आपल्या प्रतिभेची कांहींच चमक दाखविली नाहीं. हें अगदी साधें भाषान्तर आहे. शिवाय, ह्या कवितांतून मराठी कवितेचें सामान्य भूषण जें चरणांतीचें यमक तेंही नसल्यानें प्रस्तुत गीतेचें भाषान्तर वाचतांना अत्यंत रूक्ष वाटतें. कदाचित् हें पंतांचें नसावेंही. असें म्हणण्याची पाळी येते. तसेंच पंतदप्तरांत ह्या प्रकरणाची हस्तलिखित प्रतही उपलब्ध झाली नाहीं. ह्या कारणाने ह्या प्रकरणाच्या पंतकर्तृत्वासंबंधींही शंका वाटते." (अ. का. प्रियोळकर : *मोरोपंतांचे समग्र ग्रंथ, खं. १२*, तळटीप, पृ. ९९). उत्तरोक्त ग्रंथ हा शंकराचार्यांच्या *प्रश्नोत्तरमाला* ह्या प्रकरणाचे भाषान्तर आहे. अशी जर वस्तुस्थिती आहे तर 'मोरोपंत हे निव्वळ भाषान्तरकार आहेत' हे विधान कशाच्या आधारे केले गेले ? आधार नव्हताच. हे आक्षेपक मोरोपंतांच्या ज्या *भारत, भागवत, रामायण* ग्रंथांना भाषान्तरे म्हणून संबोधितात ते तसे नसून मूळ संस्कृत ग्रंथांचे स्वैर अनुवाद आहेत. "अनुवाद म्हणजे भाषान्तर नव्हे. संक्षेप-विस्तारांचा उपयोग करून स्वतःच्या शब्दांनीं सांगितलेली मूळ कथा म्हणजे अनुवाद होय." मोरोपंतांनी रचलेले वरील ग्रंथ ह्याच स्वरूपाचे आहेत. प्रा. श्री. वि. परांजपे *मोरोपंतचरित्रात* म्हणतात त्याप्रमाणे – "भारत, भागवत, रामायण ह्यांतील कथासूत्राप्रमाणें पंतांच्या ग्रंथांतील कथा प्रथमदर्शनीं दिसत असल्यामुळें, त्या ग्रंथांचें हें भाषान्तर आहे असें वाटतें; परंतु मूळ ग्रंथांतील कल्पना पंतांच्या ग्रंथांत कितपत घेतल्या आहेत हे जेव्हां पहावें तेव्हां समजतें कीं, जरी भारतादि ग्रंथांतील कथाच पंतांनीं घेतल्या आहेत, तरी मूळ ग्रंथांतील रचनेहून निराळीच रचना पंतांची झाली आहे; व कवितेंत जीवनभूत अशा ज्या कल्पना त्यांत आहेत त्या सर्व पंतांच्याच स्वतंत्र आहेत. तेव्हा एकच कथा अनेक कवींनीं निरनिराळ्या रीतीनें वर्णिली असतां ती प्रत्येकाची स्वतंत्र कविता म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. तसाच प्रकार मोरोपंतांच्या काव्याचा आहे."

मोरोपंत हे 'निव्वळ भाषान्तऱ्ये होते' असा सरधोपट अभिप्राय व्यक्त करणाऱ्या मंडळीस वर देण्यात आलेले उत्तर पुरेसे आहे. त्यानंतरचा दुसरा मुद्दा म्हणजे त्यांच्यात स्वतंत्र काव्यप्रतिभा नव्हती ह्यासंबंधीचा. त्याला प्राचीन व अर्वाचीन सारस्वताचा व साहित्यशास्त्राचा ज्याचा मार्मिक व्यासंग आहे अशा अलिकडील एका वाङ्मयपंडितानेच दिलेले उत्तर येथे उद्धृत करतो : "कवीच्या प्रतिभेच्या सारख्याच महत्त्वाच्या दोन शाखा ज्या कल्पना व भावना त्यांपैकीं पहिली कल्पना ही पंतांच्या काव्यांत सर्वत्र विलसतांना दिसून येते. पंतांचें कल्पनावैभव खरोखरी फारच मोठें होतें. वरवर पाहिलें असतां कोणासही असें वाटतें कीं, पुराणांतल्या गोष्टींचीं चऱ्हाटें वळीत बसणारे हे साधे पुराणीक; ह्यांच्या काव्यांत बहारीच्या कल्पना, सहृदयाल्हादक अलंकार, चमत्कृतिजनक अर्थवैचित्र्य वगैरे गोष्टी कोठून सांपडणार ? परंतु पंतांचें काव्य काळजीपूर्वक कोणी वाचूं लागल्यास ह्या बाबतींत त्याची हटकून फसगत होईल. वामन दाजी ओक, राजारामशास्त्री भागवत, हंस, पांगारकर वगैरे अनेक रसिकांनीं पंतकवितेची अलंकारांच्या बाबतींतली ही समृद्धता कंठरवानें निवेदन केली आहे. हंसांनीं आपल्या निबंधांत एके ठिकाणीं म्हटलें आहे : 'कवितेचा आत्मा जो रस तो ज्या मायेच्या आश्रयानें राहतो ती चमत्कारिक कल्पनाही मोरोपंतांच्या काव्यांत सर्वत्र भरलेली आहे. कोणत्याही विषयाचें वर्णन करतांना प्रत्येक गोष्टीचें स्वरूप दृष्टान्तादि अलंकारांनीं उत्कर्ष करून दाखविण्याचा प्रत्येक पद्यांत मोरोपंतांनी यत्न केलेला आढळतो. त्यांच्या बहुतकरून सर्व आर्यांचीं उत्तरार्धें अलंकारमय किंवा चमत्कारिक कल्पनामय असतात. कितीएक ठिकाणीं त्यांच्या कल्पना इतक्या उज्ज्वल व उदात्त आढळतात कीं, त्या कामांत ते नामांकित संस्कृत कवींची स्पर्धा करीत आहेत कीं काय असा भास होतो. लहान लहान प्रकरणापासून तों मोठमोठाल्या पर्वापर्यंत पहा, अनेक मनोरंजक कल्पनांनीं व निर्दोष शब्दार्थांनीं त्यांचें पद्य मोठें हृद्य झालेलें आहे." – प्रा. श्री. ना. बनहट्टी : *मयूरकाव्यविवेचन*; पृ. ३३४–३३५.

मोरोपंतांच्या काव्यावर जे प्रतिकूल व अनुकूल मत प्रदर्शित केले गेले ते थोडक्यात वर मांडले आहे. ह्या मताबरोबरच ज्याबद्दल दुमत फारसे नाही पण जे तितकेसे स्पष्टपणे लिहिले जात नाही तेही येथे सांगणे आवश्यक आहे. पंतांच्या कवितेचे निःपक्षपाती वृत्तीने समीक्षण करणाऱ्या विद्वानांस तिच्यात कमीजास्त प्रमाणात पुढील दोष आढळतात : क्लिष्टता व दुर्बोधता; अवघड व अपरिचित शब्दांचा वापर; दीर्घ समास; दूरान्वय; संदिग्धता; कृत्रिमता; बोजडपणा व बेडौलपणा; श्रुतिकटुता; औचित्यहानी; शब्दगत व दृष्टान्तगत ग्राम्यता व अश्लीलता; कालविपर्यास. हे दोष बऱ्याच अंशी संस्कृतीकरणाच्या व यमकरचनेच्या अतिरेकी हव्यासामुळे आलेले आहेत. अर्थातच ह्या दोषांची संख्या गुणांच्या संख्येच्या तुलनेने कमीच भरेल.

मोरोपंतांची काव्यरचनाविषयक भूमिका प्राधान्याने पारमार्थिक होती; 'काव्याकरिता काव्य' ही नव्हती. भगवद्यशोगान करणे व त्याद्वारे भक्तिसुख अनुभवून आनंद व शांती ह्यांचा लाभ करून घेण्याचा व देण्याचा प्रयत्न करणे हे त्यांचे लेखनध्येय होते. *आर्याभारता*च्या पहिल्या पर्वातील आठव्या आर्येत 'हरि ज्यांचा कैवारी, त्या पांडुसुतांसि वंदितों भावें। वाटे, चरित्र त्यांचें कांहीं आपण तरावया गावें' हा जो आपल्या अंतरीचा हेतू त्यांनी व्यक्त केला आहे तोच त्यांच्या काव्यरचनेतील प्रधान हेतू होता. कवित्व किंवा पांडित्यही ते गौण मानीत. संस्कृत काव्यांचा व काव्यशास्त्राचा त्यांनी जो व्यासंग केला होता त्याचा प्रभाव त्यांच्या रचनेवर दाट पडलेला असला तरी तो त्यांनी बुद्धिपुरस्सर पडू दिलेला नाही. तो स्वाभाविकपणे पडलेला आहे. संस्कृत साहित्यिक परंपरेत त्यांच्या काव्यप्रतिभेचे पोषण व वर्धन झालेले होते ही गोष्ट लक्षात घेता, तसा तो पडणे स्वाभाविकच होते. त्यांच्या काव्यात, वर उल्लेखिलेले दोष वगळले तर, मार्मिक शब्दयोजना, व्याकरणशुद्धता, अर्थगौरव, पदरचनाचातुर्य, सुंदर संवाद, कुशल स्वभावरेखन, हृदयंगम उपमा, मोहक व मोददायी उपमा, विविध भावच्छटांनी रंगलेल्या कल्पना, योग्य स्थली व प्रसंगी योजिलेल्या चटकदार म्हणी, श्रुतयोजनांचा व सुभाषितांचा मार्मिक वापर ही गुणवैशिष्ट्ये केव्हाही गौरवास्पद ठरतील. मराठी भाषेचे वैभव वाढविण्यास ती साहाय्यकच झाली आहेत.

मोरोपंत हे त्यांच्या पूर्वीच्या पिढ्यांतील ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास, ह्यांच्यापासून तो त्यांचा जन्म झाला त्याच वर्षी समाधिस्थ झालेले श्रीधर नाझरेकर येथपर्यंतच्या कवींहून अगदी वेगळ्या वर्गात पडतात. पूर्वोल्लिखित कविमंडळी भारतीय संस्कृती व आध्यात्मिक ज्ञान समाजाच्या अगदी खालच्या थरापर्यंत पोचून त्याचे उद्बोधन व उन्नयन होऊन त्याचे मन उत्तम प्रकारे संस्कारित व्हावे, त्याचे नैतिक व आत्मिक सामर्थ्य वाढावे हा हेतू प्रामुख्याने स्वतःच्या मनांत बाळगीत

असलेली दिसते. हा हेतू सिद्धीस जावयाचा तर सामान्यातील सामान्य माणसाच्या अंतःकरणाची पकड घेईल व सहज समजेल अशा भाषेत व छंदांत कविता रचली जाणे आवश्यक होते. ह्यासाठी ओवी व अभंग ह्या छंदांव्यतिरिक्त इतर छंदांचा आश्रय त्यांनी सहसा घेतला नाही. समाजातील एका मर्यादित वर्गाला चकित करून सोडणारे असे काव्य-शिल्प निर्मिण्यात धन्यता मानण्यापेक्षा समानधर्म, समान ध्येय, समान तत्त्वविचार, समान संस्कृती असलेला एकसंध समाज निर्माण करण्यात धन्यता व आपल्या जीविताची सार्थकता मानणारे हे कवी होते. त्यांची भूमिका लोकशिक्षकाची, नवसमाजनिर्मात्याची होती. ह्यामुळे लोकांना त्यांच्या उद्धारासाठी जे कांही सांगावयाचे ते त्यांच्या भाषेत व त्यांना परिचित असलेल्या छंदांत सांगणे आवश्यक होते. कोणताही नवीन विचार समाजाच्या शेवटच्या थरापर्यंत पोचवावयाचा झाल्यास तो लोकभाषेतून व्यक्त झाला पाहिजे हा भगवान बुद्धाने बाळगलेला कटाक्ष त्यांना पूर्णपणे पटलेला होता. इ. स. च्या १६ व्या शतकाच्या अखेर-पर्यंत कवीची ही बहुजनसमाजाभिमुखता अखंड चालू राहिलेली दिसते. सतराव्या शतकाच्या प्रथमार्धापासून ती थोडी थोडी कमी कमी होऊ लागली. ह्या काळात निरक्षर किंवा अल्पशिक्षित वर्गापेक्षा सुविद्य, सुसंस्कृत व सधन असा पांढरपेशा वर्ग नजरेसमोर ठेवून काव्यरचना होऊ लागली. अशी रचना करणाऱ्यांत वामनपंडित हे अग्रभागी आढळतात. संस्कृत विद्येचा कडवा अभिमानी व कर्मठ ब्राह्मण महापंडित म्हणून त्यांची प्रसिद्धी होती. 'ज्ञानमार्गाच्या दृष्टीने अद्वैत व उपासनेच्या दृष्टीने सगुणभक्ति म्हणजे ज्ञानयुक्त सगुणभक्ति' हा त्यांचा ठाम सिद्धान्त. त्यांच्या बऱ्याचशा रचनेमागील प्रेरक हेतू ह्या सिद्धान्ताचे प्रतिपादन व समर्थन हाच असावा असे म्हणावेसे वाटते. *यथार्थदीपिका* हे त्यांचे भगवद्गीतेवरील २२२२६ ओव्यांचे भाष्यही त्याच हेतूने रचले गेले. अनेक वृत्तांत यमकबद्ध श्लोक रचण्याचा आणि कवितेवर अलंकारांचा साजशृंगार चढविण्याचा प्रकार त्यांच्यापासूनच सुरू झाला. पंडित-मंडळीत पुढे त्यांचे सर्रास अनुकरण होत राहिले. मोरोपंत हे त्यांच्याच काव्यकला-परंपरेतील. त्यांनी त्यांची केलेली खालील स्तुतीच पहा :

रीति समश्लोकीची अतुला, साधेल काय नव्यास ? ।
या सुयशें होयिल कां रोमांचव्याप्तकाय न व्यास ? ॥ ६ ॥
वाटे सूक्तिश्रवणें मस्तक वाल्मीकिनेंहि डोलविला ।
प्रभुनें, भुलवाया मन, वामन हा वेणुसाचि बोलविला ॥ ७ ॥
याच्या सद्रसभवनें कवनें तो नाचलाचि नाकर्षी ।
हरिजन हरिजनहृदया, जैसा चुंबक अयास, आकर्षी ॥ ८ ॥
अन्यत्र नसे, कवनीं यावे रस सर्व, हा नियम कांहीं ।
केली, भाषाकवि जे, त्यांची तों गर्वहानि यमकांहीं ॥ ९ ॥
शोभवि भगवान् सुयशें, देवुनि वर, वामना सदा साचा ।
करितो प्रसाद, येतां प्रेमा बरवा मनास दासाचा ॥ १० ॥
वामन वामन साक्षात्, तरिच असा हा महातपा वेधी ।
बहु सुख हरिदासांची, ज्याच्या कृतितें पहात, पावे धी ॥ ११ ॥
निवतोचि वामनाच्या, मानुनि भगवंत वामना, कवनीं ।
न शिरे, गुरुसीं हरिसीं चित्तांत असोनि वाम, नाकवनीं ॥ १२ ॥
भक्तमयूरें स्तविला वामन हा मन विशुद्ध होयास ।
पंक प्रक्षाळाया प्रार्थावें प्रथम पूततोयास ॥ १३ ॥

वामनपंडितांनी जशी एक काव्यकलापरंपरा मराठीत सुरू केली तशीच तिला विविधतेची व विदग्धतेची जोड देण्याची जोरदार प्रेरणाही दिली. मोरोपंतांचे प्रगल्भ, प्रतिभासंपन्न, प्रभावी व परिणत स्वरूपाचे काव्य ह्याच प्रेरणेमुळे निर्माण झाले. अशा निर्मितीच्या बाबतीत मोरोपंतांनी गाठलेला उच्चांक त्यांच्यानंतर दुसरा कोणीही मराठी कवी गाठू शकला नाही.

महाराष्ट्रात मुद्रणकलेचा प्रवेश झाल्यावर केवळ कीर्तनकारांच्या व काही मयूरभक्तांच्या तोंडून प्रकट होणारी मोरोपंतांची कविता ग्रंथरूपाने प्रकट होऊ लागली. ती संपूर्ण स्वरूपात प्रसिद्ध करण्याचा पहिला मोठा प्रयत्न माधव चंद्रोबा डुकले ह्यांनी इ. स. १८६० पासून सुरू केला. तत्पूर्वी इ. स. १८४२-१८६० ह्या काळात *गीतार्था, दशमस्कंध-आर्या, केकावली, विराटपर्व, आर्या, द्रोणपर्व, मंत्ररामायण आर्या* वगैरे त्यांची कविता छोट्या ग्रंथांच्या रूपाने प्रसिद्ध झाली होती. माधव चंद्रोबा हे जुन्या मराठी कवितेचे चाहते व मार्मिक अभ्यासक होते. ह्या कवितेचा नीट संग्रह होऊन तो लोकांपुढे यावा ह्या हेतूने त्यांनी इ. स. १८६० च्या मार्च महिन्यामध्ये *सर्वसंग्रह* नावाचे मासिक प्रकाशन सुरू केले. *नवनीत*कार परशुरामतात्या गोडबोले व बाळ यज्ञेश्वर पाध्ये हे दोघे त्यांस कविता-संपादनाच्या कामी साह्य करीत असत. प्रारंभी ह्या मासिकाला सरकारी आश्रय होता. पण तो पुढे बंद झाला. डिसेंबर १८६७ पर्यंत ते चालू राहिले. एवढ्या काळात मोरोपंतांची *आर्याभारता*सह बरीच कविता प्रसिद्ध झाली. त्यानंतर दहा वर्षांनी, १८८९ साली, बाबाजी अनंत तेंडूलकर ह्यांनी श्रीमयूरकवी ह्या नावाचे मासिक सुरू करून त्यातून मोरोपंतांचे *भारत, रामायणे, बृहद्दशम, ब्रह्मोत्तरखंड, हरिवंश, सप्तशती* वगैरे ग्रंथ सटीप प्रसिद्ध केले. ह्याच वेळी निर्णयसागर छापखान्याने *काव्यसंग्रह* मासिक काढले. जनार्दन बाळाजी मोडक, वामन दाजी ओक, नारायण चिंतामण केळकर, बाळकृष्ण अनंत भिडे, दामोदर केशव ओक ह्यांसारख्या वाङ्मयविद्यापंडितांचे साह्य ह्या मासिकास मिळाले. ह्या मंडळीने ह्या मासिकातून अत्यंत श्रमपूर्वक व चिकित्सक दृष्टीने विपुल व विस्तृत टीपा देऊन मोरोपंतांची स्फुट कवितेखेरीज सर्व कविता छापून प्रसिद्ध केली. मोरोपंती काव्यप्रकाशनाचा त्यानंतरचा फार मोठा, महत्त्वाचा व सर्वोत्कृष्ट प्रयत्न म्हणजे पंतांनी स्वहस्ते लिहिलेल्या पोथ्यांवरून रामकृष्ण दत्तात्रय पराडकर ह्यांनी १९१२–१९१६ पर्यंत केलेला प्रसिद्धीकरणाचा प्रयत्न होय. त्यांनी *आर्याभारता*चे तीन खंड, *हरिवंश, मंत्रभागवत, कृष्णविजय, अष्टोत्तरशतरामायणे*, संस्कृत काव्ये असे नऊ खंड प्रसिद्ध केले. स्फुट काव्यांचे आणखी तीन खंड प्रसिद्ध करण्याचा त्यांचा संकल्प होता. पण त्यांच्या हयातीत तो पुरा होऊ शकला नाही. १९५६ साली ते निवर्तले. हा संकल्प, मुंबईतील 'मराठी संशोधन मंडळ' ह्या संस्थेने १९६१–६४ ह्या काळात अ. का. प्रियोळकर, बाळाचार्य खुपेरकर व दामोदर विनायक जोशी ह्यांच्या सहकार्याने उत्तम प्रकारे तडीस नेला. रामकृष्णपंत पराडकरांनी पहिले नऊ खंड प्रसिद्ध केल्याला पन्नास वर्षे लोटली होती. तेवढ्या काळात ते खपून दुर्मिळ झाले होते. हे पाहून मोरोपंतांचे एक परम भक्त दामोदरपंत जोशी ह्यांनी मुंबई विद्यापीठास पंचवीस हजारांची देणगी देऊन व प्रा. अ. का. प्रियोळकर, डॉ. मो. दि. पराडकर व स्वतः अशी त्रिसदस्यांची एक संपादक समिती नेमवून तिजकडून ह्या खंडांचे पुनर्मुद्रण १९६४–७२ ह्या काळात करविले. मोरोपंतांची बहुतेक सर्व कविता (पंतांच्या मुद्रित झालेल्या स्फुट कवितेहून आणखी बरीचशी कविता होती, पण ती नष्ट झाली असे बऱ्याच जणांचे म्हणणे आहे) महाराष्ट्रीयांस उपलब्ध होण्यास ह्या सर्व मंडळीने त्यासाठी निष्ठापूर्वक केलेले परिश्रम कारण झालेले आहेत.

**रचना : मु.** – कविवर्य मोरोपंतांचे समग्र ग्रंथ; खंड १ ते ९; प्रआ. : संपा. पराडकर, रा. द.; पुणे; १९१२ ते १९१६; द्विआ. : संपा. प्रियोळकर, अ. का., पराडकर, मो. दि., जोशी, दा. वि.; मुंबई विद्यापीठ प्रकाशन; मुंबई, १९६४ ते १९७१; **खं. १ ते ६ :** आर्याभारत; **खं. ७ :** हरिवंश; **खं. ८ :** मंत्रभागवत; **खं. ९ :** कृष्णविजय; **खं. १०–१२ :** स्फुट काव्ये; संपा. प्रियोळकर, अ. का., खुपेरकर, बाळाचार्य, जोशी, दा. वि.; मराठी संशोधन मंडळ प्रका.; मुंबई, १९६१ ते १९६४; **खं. १० :** (१) देवादिकांच्या प्रार्थना, स्तुति, स्तव इत्यादि, (२) संतवर्णनविषयक, (३) पवित्र

नद्यांचीं व स्थलांचीं वर्णनें; खं. ११ : (१) भगवन्नाममाहात्म्य, (२) रामायणांतील प्रकरण : अहिल्योद्धार, (३) महाभारतांतील प्रकरण : दुर्वासभिक्षा, (४) भागवतांतील प्रकरणें, (५) ऐतिहासिक व्यक्ति, (६) आत्मकथनपर, (७) अभंग व पदें; खं. १२ : (१) देवादिकांच्या प्रार्थना, स्तुति, स्तव इत्यादि, (२) संतवर्णनविषयक, (३) रामायणांतील प्रकरणें, (४) महाभारतांतील प्रकरणें, (५) भागवतांतील प्रकरणें, (६) आख्यानें, चरित्रें, स्तोत्रें इत्यादि, (७) आत्मोद्धारार्थ टाहो, (८) परिशिष्टें. (अष्टोत्तरशत रामायणें भा. १ व २ : रा. द. पराडकर संपादित 'समग्र ग्रंथा'त खं. ८ व ९ मध्ये ही आली आहेत).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अत्रे, प्र. के. : आर्यांचा ऐरावत; दै. मराठा, २-४-१९६९; पृ. २. २. आठवले, रा. म. : मोरोपंतांची स्फुट भागवती काव्यें; विज्ञावि., जुलै १९२५. ३. आठवले, रा. म. : मोरोपंतांचे मंत्रभागवत; विज्ञावि., जुलै १९२६; पृ. २७९. ४. आपटे, द. अ. : मोरोपंत कवि चरित्र, खं. २, भा. २; १९०७; पृ. ७७-९४. ५. ओक, वा. दा. : मोरोपंतांची कविता; विज्ञावि., पु. १२, पृ. २५५-२६८, आणि पु. १३, पृ. १३६-१४२. ६. ओक, वि. का. : मुक्तेश्वर आणि मोरोपंत; विज्ञावि., पु. ११, पृ. २४८. ७. कुळकर्णी, वा. ल. : मोरोपंतांची आर्यागीती; प्रतिष्ठान, फेब्रु. १९६६, पृ. ४-१०. ८. कुळकर्णी, श्री. मा. : कथाकवि मोरोपंत; युगवाणी, एप्रि. १९५९, पृ. १४-१९. गुंजीकर, रा. भि.; मोरोपंतांची कविता (विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांच्या 'निबंधमाले'तील 'मोरोपंत' ह्या निबंधाचा परामर्श); विज्ञावि., मे, जून, जुलै १८८०, पृ. ९७-१२७, ऑक्टो. ते डिसें. १८८०, पृ. २५५-२६८. १०. गोडबोले, के. वि. : महाकवि मोरोपंत विषयक एक नवीन प्रश्न; प्रसाद, जाने. १९६०, पृ. ३१-३२, मार्च १९६०; पृ. ९-१९. ११. गोडबोले, परशुराम : 'केकादर्श' (मयूरकविकृत केकावलीची टीका); मुंबई, १८८२, आ. ३. १२. चिपळूणकर, वि. कृ. : मोरोपंतांची कविता; निबंधमाला, पुणे, १९१७; पृ. ७५८-९०५. १३. जोशी, चिं. वि. : मोरोपंती विराटपर्वाचा अभ्यास; प्रमोद, चैत्र १८४५, पृ. २०-३६, वैशाख १८४५, पृ. ८०-८४. १४. ढेरे, रा. चिं. : संतपूजक पंत; भाइसंमत्रै., श. १८८८, पृ. ७३-८०. १५. दादोबा पांडुरंग : 'केकावलि' (यशोदा पांडुरंगी टीकेसहित); मुंबई, १८६५. १६. नांदापूरकर, ना. गो. : 'मुक्तमयूरांची भारते'; हैद्राबाद, १९५६. १७. परांजपे, श्री. वि. : महाराष्ट्र कविवर्य मोरोपंतांचे चरित्र व काव्यविवेचन; मुंबई, १९२५. १८. पांगारकर, ल. रा. : 'मोरोपंत – चरित्र आणि काव्यविवेचन'; मुंबई, १९०८. १९. पाटणकर, र. कृ. : मोरोपंतांचे मंत्रभागवत; विज्ञावि., ऑग. १९२६; पृ. ३३९. २०. पेंडसे, शं. दा. : कविवर्य मोरोपंत समाजविन्मुख होते काय ? ; 'मराठी संत : काव्य आणि कर्मयोग'; पुणे, १९६१; पृ. १२९-१३८. २१. पोतदार, द. वा. : पंतांच्या कर्णपर्वासंबंधी काही नवीन विचार; 'पोतदार विविध दर्शन'; पुणे, १९३९; पृ. २९०. २२. पोतदार, द. वा. : मंत्रभागवताचा उपोद्घात; 'पोतदार विविध दर्शन'; पुणे, १९३९; पृ. २६३-२८९. २३. फफे, य. ग. : महाकवि मोरोपंत विषयक एक नवीन प्रश्न; प्रसाद, नोव्हें. १९५९; पृ. ३१-३२. २४. फफे, य. ग. : मोरोपंत आर्येतील यतिभंग; मसाप., व. २२, अं. ४, पृ. २-५. २५. बनहट्टी, श्री. ना. : मयूरकाव्यविवेचन; पुणे, श. १८४८. २६. बनहट्टी, श्री. ना. : मोरोपंतांचे मंत्रभागवत व रा. आठवले; विज्ञावि., नोव्हें. १९२६; पृ. ४५३. २७. भागवत, भा. रा. : मोरोपंती भारत – मोरोपंती उतारे व संस्कृत मूळ; विज्ञावि., पु. २४, पृ. २१५, पु. २५, पृ. ४४. २८. भिडे, बा. अ. : कविवर्य मोरोपंत विरचित सुबोध 'केकावलि'; मुंबई, १९२६. २९. मोडक, गो. कृ. : कांही मोरोपंती वाग्विशेष; रत्नाकर, जून १९२६. ३०. मोडक, गो. कृ. : मोरोपंती व आजकालचे शुद्धलेखन; विज्ञावि., ऑक्टो. १९२५. ३१. राजवाडे, वि. का. : मोरोपंतकृत सन्मणिमाला; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १७१-१७२. ३२. लेले, ल. ग. : (परी.) 'मोरोपंत'; विज्ञावि., पु. ४१, पृ. ९९-१५९. ३३. वाटवे, के. ना. : मोरोपंत 'पंडित-कवि'; पुणे, १९५२; पृ. ८९-११३. ३४. हवलदार, ग. रा. : भारतामृत; विज्ञावि., व. ६६, अं. ४ ते ६, व. ६७, अं. १, ४ ते १२, व. ६८, अं. १ ते ५. ३५. हंस, वा. म. : 'मोरोपंत'; पुणे, १९३६; आ. २.

**मोरोपंत बाळाजीपंत आठवेले** [का. अनु.] कवी. वाईकर बाळाजीपंत आठवेले ह्यांचे पुत्र. वास्तव्य मावळात पौडगावी. ह्यांनी ब्रह्मेंद्रयतिकृत *पदबोधिनी* टीकेच्या आधारे *भगवद्गीतार्थबोधिनी* ह्या ग्रंथाची रचना केली.

**रचना : अमु.** – भगवद्गीतार्थबोधिनी; ग्रं. सं. ७०१; प्र. ले. का. : श. १७५१, ज्येष्ठ शु. १४; मसंम., हवना., पृ. ६४.

**मोरो बल्लाळ** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : अमु.** – तुळशीची आरती; मआ., पृ. ४१५.

**मोरो लक्ष्मण रानावडे** [का. अनु.] बखरकार. हे कुलाबेकर आंग्र्यांच्या पदरी होते. दौलतराव शिंद्यांच्या मातुश्री मैनाबाई ह्यांच्याबरोबर हे ग्वाल्हेरला आले. ह्यांनी लिहिलेली *तवारीख सिंधिया* ही बखर उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे; मभामबा.; इंदूर, १९३९; पृ. ४०).

**मोरो शाम** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अभंग; सवामं. हस्त. सू., खं. २.

**मोहनगीर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**मोहनदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पवनविजय; नक्कल श. १६०४ (इ. स. १६८२); भाइसंमं. हस्त. सू., १५५.

**मोहनविप्र** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**मौन** [का. अनु.] पदकार. वेंचले येथील शक १८२३ त उतरून घेतलेल्या पदांच्या बाडात पदे संग्रहित (भाइसंमं.).

**म्हाइंभट्ट** – पहा **महींद्रभट**.

**यदुमाणिक** [अंदाजे इ. स. १७२५] गणेशोपासक कवी. हे मूळचे नेवाशाचे राहणारे. उपनाव पाठक. हे यजुःशाखीय, भारद्वाजगोत्री ब्राह्मण. नेवाशाची मोहिनी (महालया) ही ह्यांची कुलदेवता. कवी आपल्या नावापुढे माणिक, माणिकेश किंवा माणिकेश्वर असे नाव जोडतात. त्यावरून ते माणिकेशाचे शिष्य किंवा पुत्र असावेत, कदाचित माणिकेश्वर ही त्यांची कुलदेवता किंवा ग्रामदेवता असावी, असे अ. का. प्रियोळकर अनुमान काढतात. परंतु हा माणिकेश्वर म्हणजे वेरूळच्या कैलास लेण्यातला शिव होय असे रा. चिं. ढेरे ह्यांचे मत असून ह्या वेरूळच्या माणिकेश्वराचा स्पष्ट उल्लेख *लीळाचरित्र* आणि *स्थानपोथी* ह्या महानुभावीय ग्रंथांत आला आहे (*लीळाचरित्र*, पूर्वार्ध, खं. १, पृ. २७ आणि *स्थानपोथी*, पृ. २७) असे ते सांगतात.

गो. का. चांदोरकरांनी यदुमाणिकांची जी वंशावळ व गुरुपरंपरा दिली आहे तिच्यात माणिकेशाला स्थान नाही. ही गुरुपरंपरा अशी : आदिनारायण > विधि > अत्रि > दत्त > जनार्दन > एकनाथ > बाळकृष्ण > बाबाजी. ही अपूर्ण असून तीमध्ये यदुमाणिकांचे खापरपणतू बाळकृष्ण ह्यांचे नाव आले आहे. त्यामुळे एकनाथ-परंपरेत यदुमाणिकांचे स्थान कोठे आहे, हे निश्चितपणे कळत नाही (संककासू., पृ. ८५). यदुमाणिकांनी रचलेल्या *संजीविनी* ह्या *गणेशपुराणा*वर आधारलेल्या टीकाग्रंथाच्या पहिल्या अध्यायात शेवटच्या चरणात त्यांनी स्वतःचा

'लक्ष्मीपद्माकरात्मज यदुमाणिकेश्वर' असा नामनिर्देश केला आहे.

यदुमाणिकांना *संजीविनी* ह्या ग्रंथलेखनाची प्रेरणा मध्वमुनीश्वरांचे शिष्य त्र्यंबक ह्यांकडून मिळाली होती, असे ग्रंथाच्या उपसंहारावरून स्पष्ट होते. "मध्वाचार्याचिया छात्रवरें । त्र्यंबकाचार्यें सुमनोहरें । मज क्षेत्रमहात्म आदरें । वदविलें बरें बोधुनी ॥ १० ॥" ह्यातील 'मध्वाचार्य' म्हणजे मध्वमुनीश्वर होत. यदुमाणिकांनी ही *संजीविनी टीका* श. १६४७ (इ. स. १७२५) मध्ये लिहिली. मध्वमुनीश्वरांचा निर्वाणकाल श. १६५३ किंवा श. १६५७ (इ.स.१७३१ किंवा १७३५) मानला जातो. ह्यावरून मध्वमुनीश्वर व यदुमाणिक हे समकालीन असून प्रत्यक्ष परस्परसहवासात येत असावेत. यदुमाणिकांनी *संजीविनी* ह्या टीकेचे लेखन वेरूळजवळील नागपूर ह्या गावी खन्नपूर्णेच्या तीरावर पूर्ण केले.

ह्यांनी अजंठ्याच्या डोंगरात उभ्या गणपतीजवळ तीन वर्षे तप केले व वेरुळास समाधी घेतली, असे *संजीविनी* टीकेवरून सांगता येते (संककासू., पृ. ८५). वेरूळच्या परिसरात पद्मालय, राजूर व रुद्रेश्वर अशी तीन गणपतींची स्थाने आहेत. त्यांपैकी यदुमाणिकांनी जेथे तपश्चर्या केली ते रुद्रेश्वर स्थान अजंठ्याच्या लेण्यापासून आठ मैलांवर पश्चिमेस डोंगराच्या अर्ध्या भागावर आहे. तेथील गणपतीची मूर्ती भव्य असून ती सहासात फूट ऊंच व चारपाच फूट रुंद आहे.

*संजीविनी टीका* ही *गणेशपुराणा*च्या क्रीडा-खंडातील अ. १२७ ते १३७ व अ. १३८ ते १४८ (अनुक्रमे *सिंदूराख्यान* व *गणेशगीता*) ह्या बावीस अध्यायांच्या आधारे रचली आहे. *गणेशपुराणा*तील मूळ संस्कृत श्लोक व त्याचा मराठी अर्थ असे ह्या टीकेच्या रचनेचे स्वरूप आहे. ह्या ग्रंथात ५०२ संस्कृत श्लोक असून त्यांवर १७५८ ओव्यांची सुबोध व प्रासादिक मराठी टीका आहे. ह्यांतील ओव्यांची रचना एकनाथी ओव्यांप्रमाणे साडेचार-चरणी आहे.

'सिंदूरवाडक' हे सिंदूर दैत्याचे मूलस्थान. हे स्थान म्हणजे वेरूळच्या परिसरातील घृष्णेश्वराजवळचा एक भूभाग आहे. मूळ *गणेशपुराणा*त ह्यास आधार मिळतो. "घृसृणेश्वरसांनिध्यात् सिद्धसिन्दूरवाडकम् । तत्रस्थः प्रशशासासौ सिन्दूरो भुवनत्रयम् ॥ १४ ॥" (*क्रीडाखंड*, अ. १३६). ह्यावर यदुमाणिकांची टीका : "घृसृणेश्वर जोतिर्लिंग । जें जगत्प्रसिद्ध निसंग । त्याचे संनिध अंतरंग । दक्षिणांग सिंदुरवाडें ॥ ४३ ॥ तेथें राहोनि धुरंधर । महाक्रूर सिंदुरासुर । करोनि नाना घोरंदर । भू तिरस्कार पावविली ॥ ४४ ॥" अशा प्रकारे सिंदुरासुराचा गजाननाने वध केला तेव्हा देव प्रसन्न झाले व त्यांनी गजाननाचे मंदिर उभारले, अशी कथा मूळ संस्कृत *गणेशपुराणा*त आहे. यदुमाणिकांनी ज्या अजंठ्याच्या डोंगरात उभ्या गणपतीजवळ तपश्चर्या केल्याचे गो. का. चांदोरकर सांगतात तोच हा गणपती आहे किंवा काय हे समजण्यास साधन नाही.

*संजीवनी टीके*खेरीज यदुमाणिकांनी *गीतगोविंद*, *देवीमाहात्म्य*, आरती व पदपदांतरे इत्यादी स्फुट रचना केली आहे.

**रचना : मु.** – १. यदुमाणिककृत गणेशपुराण – संजीविनी टीका; अ. १३, ओ. सं. १७५८; संपा. प्रियोळकर, अ. का.; मुंबई, १९५९; प्रस्तावनेसह. **अमु.** – १. गीतगोविंद; २. देवीमाहात्म्य; र. का. : श. १६२१ (इ. स. १६९९). ३. कृष्णाची आरती, पदपदांतरे अशी स्फुट रचना (गो. का. चांदोरकर संग्रह).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं.; थोडेंसें यदुमाणिकाविषयी; मसंप., एप्रि. १९६०; पृ. १६८–१७०. २. प्रियोळकर. अ. का. : एक अज्ञात मराठी गाणपत्य ग्रंथ; मसंप.; ऑक्टो. १९५९; पृ. १–८.

**यदुवीर** [इ. स. चे सतरावे शतक] कवी. रंगनाथस्वामींचे यादव म्हणून एक बंधू होते, तेच हे असल्यास नकळे. यदुवीर हे श. १६०६ (इ. स. १६८४) मध्ये समाधिस्थ झाले. 'मेघश्यामाची पाऊलें यदुविर वंदितसे सीरी' ह्या उल्लेखावरून मेघश्याम हे त्यांचे गुरु असावेत. त्यांचीही माहिती उपलब्ध नाही. ह्यांनी पदे रचली आहेत (रा. ग. हर्षे; भाइसमंत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४५).

**यमाजी** [का. अनु.] शाहीर. हा बाजी पासलकराचा आश्रित असावा असे पोवाड्यात शेवटी येणाऱ्या उल्लेखावरून वाटते. ज्या अनेक प्रमुख मंडळींचे शिवाजीला पाठबळ होते त्यांपैकी बाजी पासलकर हा एक होता. यमाजीने रचलेल्या *बाजी पासलकराच्या पोवाड्यात* सोनु दळवी, बाजीचा जावई मरकतराव आणि पासलकर ह्यांच्यामधील झटापटीचे वर्णन आले आहे. पोवाड्यातील हकीकत काल्पनिक नसून विश्वसनीय आहे. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये संग्रहित (पृ. ६७–७१).

**यमासा अर्जुनसुत** [अंदाजे इ. स. १७५१] जैन कवी. पित्याचे नाव अर्जुनसा व उपनाव रवने. वास्तव्य हिंगोली (जि. परभणी). सेनगणांपैकी भट्टारक शांतिसेन हे ह्यांचे गुरू. यमासांची *रविवार व्रतकथा* ही एकच रचना उपलब्ध आहे. मराठीत पुण्यसागर, जिनसागर, यमासा आणि महतीसागर ह्या चार कवींनी *रविवार व्रतकथा* किंवा *आदित्यवारकथा* लिहिली आहे. यमासांची रचना भारदस्त, प्रासादिक आणि रसाळ आहे. विविध वृत्ते आणि अलंकार ह्यांची योजना ह्या काव्यात त्यांनी केली आहे. तत्कालीन विवाहविधीचे समग्र वर्णन, तत्कालीन कापडाच्या पेठांचा उल्लेख ह्यांमुळे सामाजिक दृष्टयाही हे काव्य अभ्यसनीय झाले आहे.

ग्रंथात कवीने आपल्या गुरुपरंपरेचा, गावाचा व ग्रंथपूर्तीच्या शकाचा उल्लेख केला आहे (ओ. क्र. ३२५–२६). *आदित्यअभिधान रास* असे नाव असलेल्या ह्या काव्याची समाप्ती श. १६७३ (इ. स. १७५१) मध्ये वासीम (वत्सगुल्म) येथे झाली. सतुसा ह्या आपल्या शिष्याला कवीने ही कथा उपदेशरूपाने सांगितली आहे. अर्जुनसुतांच्या नावावर *गुरु आरती* अशी एक रचना उपलब्ध असून तीतील गुरुपरंपरा काष्ठासंघाची आहे.

**रचना : अमु.** – आदित्यअभिधान रास; श्लो. सं. ३२६; हिंगोली हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : प्रामजैसा.; नागपूर–पुणे; १९६८; पृ. ८८–८९.

**यशवंत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. कालियामर्दन; २. चेंडुफळी; ३. पुण्यतिथी; ४. आरत्या व स्तोत्रे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. २.

**यशवंतराव ऊर्फ बाळा महाराज** [का. अनु.] बखरकार. आबा महाराज ह्यांचे हे चिरंजीव होत. ह्यांनी लिहिलेल्या *श्रीचरित्र बखरी*त समर्थशिष्य कल्याणबंधू दत्तात्रेय ह्यांच्या वंशजांची व मुख्यत्वेकरून दत्तात्रेयांचे निपणतू मनोहर ऊर्फ आबा महाराज ह्यांची हकीकत दिलेली आहे. ह्यांची पदरचनाही उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४०).

**यशवंतराव निरखी** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार. ह्यांनी लिहिलेला *जालहनापूरचा हकीकतनामा* उपलब्ध झाला आहे. बखरवाङ्मयाची बहुतेक वैशिष्ट्ये प्रस्तुत हकीकतनाम्यात आढळतात. जालहनापूर ह्या नगरीची ऐतिहासिक 'हकीकत' ह्यात दिलेली असून निरखी घराण्याची माहितीही आली आहे. प्रस्तुत हकीकतनामा पारंपरिक माहितीच्या आधारे लिहिलेला दिसतो. क्वचित प्रसंगी कागदपत्रांचा आधार घेतलेला आहे. लेखन उत्तरकालीन असल्यामुळे त्यात ऐतिहासिक सत्याचे काटेकोरपणे पालन केलेले आढळत नाही. खर्ड्याच्या लढाईचा नुसता उल्लेख आहे, पण नक्की काळ दिलेला नाही; तर शिवाजीमहाराजांनी जालना शहर लुटले (इ. स.

१७६९ अखेर) ह्या इतिहासदृष्ट्या महत्त्वाच्या घटनेचा उल्लेखही नाही.

ह्या हकीकतनाम्याचे एका दृष्टीने विशेष महत्त्व आहे; ते म्हणजे कौल देऊन वतनांवर आणून बसवणे, वतनांसाठी होणारी भांडणे, वतने मिळविण्यासाठी मुसलमान धर्म स्वीकारण्याची तत्कालीन प्रवृत्ती, मुसलमानी अंमलात गावातील काजीचे महत्त्व इत्यादी त्या वेळच्या समाजस्थितीचे दर्शन घडविणाऱ्या बाबींवर प्रकाश टाकणारी सामग्री ह्यात आहे.

लघुवाक्यरचना, वाक्यरचनेतील शिथिलता, विरामचिन्हे व अनुस्वार ह्यांचा अभाव ही ह्या हकीकतनाम्याची काही भाषिक व लेखन-संबंधी वैशिष्ट्ये होत.

**रचना :** मु. – १. जालहनापूरचा हकीकतनामा; प्रतिष्ठान, जुलै १९६१, पृ. ५१–५६, व ऑग. १९७१, पृ. ४७–५६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** गऊळकर, शिवाजी; जालहनापूरचा हकीकतनामा; प्रतिष्ठान, जुलै १९६१, पृ. ४७–५०.

**यशवंत लक्ष्मण** [का. अनु.] पदकार. ग्वाल्हेर येथे रामदासी मठाची स्थापना करणाऱ्या लक्ष्मण महाराज शिरगावकर ह्यांच्या वंशातील. ह्यांची पद्यरचना उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४२.)

**० यशवंतसुत** – पहा भीमस्वामी–२.

**यशश्चंद्र** [अंदाजे इ. स. चे १२ वे शतक, पूर्वार्ध] जैन कवी. अकराव्या शतकाच्या उत्तरार्धात ह्या जैन कवीने रचलेल्या *राजीमतीप्रबोध* ह्या संस्कृत नाटकात एक मराठी भाषेतील उतारा आढळतो. ह्या नाटका-तील नायिका राजीमती ही असून तिच्या स्वरूपाचे वर्णन नाटककाराने एका 'महाराष्ट्रिका'कडून करविले आहे (मसा., आ. ५, पृ. ६४७) भाषेच्या प्राचीनतेच्या दृष्टीने वरील उताऱ्यास महत्त्व आहे.

**यक्षदेव / ० जाखदेव / ० निवृत्ति यक्षदेव / ० निवृत्तिदेव वाठोडेकर** [इ. स. चे चौदावे शतक, पूर्वार्ध]. महानुभाव गीताटीकाकार. नाग-देवाचार्यांचे शिष्य. महानुभावांच्या प्रसिद्ध तेरा आम्नायांपैकी यक्षदेव आम्नायाचे हे प्रवर्तक. विदर्भातील अमरावती जिल्ह्यातील दर्यापूर तालुक्यातील शुक्रेश्वर वाठोड्याच्या हरी नायकाचे हे पुत्र. ह्यांना श. १२०९ (इ. स. १२८७) मध्ये ऋद्धिपूर येथे नागदेवाचार्यांकडून दीक्षा मिळाली. नागदेवांनंतर परशरामबास आचार्यपदी असताना नागदेवाचार्यांच्या प्रमुख तेरा शिष्यांनी आपआपले स्वतंत्र संघ निर्माण केले. त्यांस आम्नाय असे म्हणतात. ह्या तेरा आम्नायांपैकी यक्षदेवांनी निर्माण केलेला हा दहावा आम्नाय होय. यक्षदेव आम्नायाची परंपरा सांगणारी एकूण तीन प्रकरणे आहेत. अवचितसुत काशीकृत *यक्षदेवा-म्नायमंजरी*, मेघचंद्रकृत *यक्षदेव वृद्धान्वय* आणि मुरारी यक्षदेवांचे *नरहरदेव गिजरे ह्यांचे त्यागानुसर्ण* ही तीनही प्रकरणे डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी *महानुभाव* मासिकाच्या (सप्टें. ते नोव्हें. १९६८) अंकांतून (क्रमशः) प्रसिद्ध केली आहेत. ह्या आम्नायाचा यक्षदेवांनंतरचा महंत भानुमुनी हा विद्यानगर (विजयनगर) येथील प्रधान होता. ह्याने सर्वसंगपरित्याग करून यक्षदेवांचे शिष्यत्व पत्करले. ह्याचाच पुत्र भीमसेन ह्यानेही प्रधानपद सोडून आपल्या पित्याकडून पंथाची दीक्षा घेतली. ह्या भीमसेनाची नात कमळांबा हिच्याकडून नरहरदेव गिजरे ह्याने पंथाची दीक्षा पैठणला घेतली (इ. स. १३९३) व तो पुढे यक्षदेव आम्नायाचा प्रमुख महंत झाला, इत्यादी महत्त्वाची आम्नाय-परंपरा वरील प्रकरणांतून सापडते. ह्या परंपरेचा मठ आजही रिद्धपूर येथे अस्तित्वात आहे.

ह्या यक्षदेवांनी किंवा निवृत्तिदेवांनी *गीताटीका* केल्याचा निर्देश डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी केला आहे. ती ओवीबद्ध असून तिची खंड प्रत उपलब्ध आहे असे हे सांगतात (ममवा., पृ. १४). *महाराष्ट्र-सारस्वत*कार भावे ह्यांनी मुरारीमल्ल ऊर्फ यक्षदेव ऊर्फ निवृत्तिदेव ह्यांनी गुरूच्या आज्ञेने *गीताटीका* केली आहे असे म्हटले आहे (मसा., आ. ५, पृ. १५४). ह्या टीकेचा रचनाकाल देशपांडे श. १२६१ देतात तर भावे ह्यांनी तो श. १२२४ दिला आहे. टीकेसंबंधात ह्यापेक्षा अधिक माहिती उपलब्ध नाही. ज्ञानेश्वरसमकालीन एवढेच फार तर तिचे वर्णन करता येईल.

*लीळाचरित्रा*चा दहावा जाखोबा पाठ ह्यांनीच तयार केला. भीष्मा-चार्य पाठातील *इतिहास प्रकर्णात* (*महानु. अन्वयस्थळ विशेषांका*त हे प्रकरण मुद्रित झाले आहे). जाखोबा पाठ सांगितला आहे तो असा : 'जाखदेव पंडित ते भटाचे शिष्ये : तेही भटापासून लीळा घोकीलीया : तेही आपल्या सीक्ष्या नरहरीवासी आणीका वासनेंया आचार्या वासनांतरे मेळवूनि आपुलेया घोकेंसि अन्वय पाहून पुस्तक केलें तो जाखोबा पाठ : ॥ १० ॥' ह्याप्रमाणे यक्षदेव पाठाची कथा आहे व तो पाठ संमत असणाऱ्या शिष्यप्रशिष्यांचा संघ तो यक्षदेव आम्नाय.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, य. खु. : यक्षदेव आम्नायाची अन्वयपरंपरा; महानु., सप्टें. १९६८; पृ. ३–४. २. देशपांडे, य. खु. : मुरारी यक्षदेवकृत नरहर गिजरे यांचे त्यागानुसर्ण आणि मेघ-चंद्रकृत यक्षदेव वृद्धान्वय, महानु., नोव्हें. १९६८; पृ. १९–२०.

**यादव** [श. १५३१ / इ. स. १६०९ – समा. श. १६०६ / इ. स. १६८४] कवी. समर्थांच्या आंबड मठ परंपरेतील. ह्यांची गुरुपरंपरा पुढील-प्रमाणे : श्रीसमर्थ > कल्याण > जगन्नाथ > यादव. हे नगर प्रांतीचे. ह्यांनी रचलेली पदे समर्थवाग्देवतामंदिराच्या हस्तलिखित संग्रहात आढळतात (सवामं. हस्त. सू., खं. १, २).

**यादवदास** [का. अनु.] आरतीकार.

**रचना :** अमु. – हनुमंतस्वामींची आरती; सवामं. हस्त. सू., खं. १.

**यादवप्रभु** [का. अनु.] पदकार. वेंचले येथील शके १८२३ मध्ये उतरून घेतलेल्या पदांच्या बाडात पदे संग्रहित (भाइसमं.).

**यादवबावा** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**यादवबुवा** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. हा रमावल्लभदासांचा पुत्र. काही कविता उपलब्ध (मसा., आ. ५, पृ. ८०१).

**यादव माणिक** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**यादववीर** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**यादवसुत** [इ. स. १७१८ नंतर] जैनकवी. ह्यांनी आपल्या गुरूचा उल्लेख 'गुणाब्धिकीर्ती' व 'गुणाब्धिराये' असा केला आहे. त्यावरून ह्यांच्या गुरूचे नाव 'गुणसागर' असे असावे. आपण आंधळे असल्याचा उल्लेख ह्यांनी वारंवार केला आहे.

आठ कर्मांच्या भेद-प्रभेदांचे वर्णन करणारे *अष्टकर्मप्रकृती* हे काव्य ह्यांनी रचले आहे. जैनांचा कर्मसिद्धान्त हा दर्शनशास्त्रातील महत्त्वाचा विषय असल्याने तत्त्वज्ञान म्हणून ह्या ग्रंथाचे महत्त्व आहे. जीवाला संसारात बद्ध करणाऱ्या ज्ञानावरणादी अष्टकर्मांचे ह्यात विवरण आहे. भाषा पंडिती थाटाची आहे.

**रचना :** अमु. – अष्टकर्मप्रकृती; अ. ८; श्लो. २२२; नागपूर हस्त. संग्रह, क्र. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र; प्रामजैसा.; नागपूर–पुणे; १९६८; पृ. ८१–८२.

**यादवेंद्रस्वामी** [? – समा. श. १६२९ / इ. स. १७०७] कवी. रामदासी पंथातील. प्रथम हे विजापूरच्या आदिलशाहीचे नोकर होते. नोकरीच्या संबंधात काही खटका उडाल्यामुळे सर्वसंगपरित्याग करून सागरेश्वरा-जवळ असलेल्या बेटात ह्यांनी तपश्चर्या केली. पुढे साक्षात्कारा-नंतर ह्यांनी पन्हाळगडी प्रयाण केले. पन्हाळगडाच्या पायथ्याशी

नेबापूर पेठेत ह्यांची समाधी आहे.

रचना : अमु. – १. गणपतीची आरती; २. सागरेशाची भूपाळी.

चरित्र, चर्चा, अभ्यास : आठवले, रा. म. : यादवेंद्रस्वामी; भाइसंमंत्रै., व. १६, अं. १, पृ. १४–१५.

**युधिष्ठिर** [का. अनु.] कवी. कृष्णदयार्णव परंपरेतील मुंगीमठाधिपती सनातन ह्यांचे हे शिष्य (मसा., आ. ५, पृ. ९१८).

रचना : अमु. – योगसार; ओ. सं. ३९७ (प्रा. स्थ. : मुंगी मठ).

**येका नारायण** [इ. स. चे अठरावे शतक] कवी. वडिलांचे नाव नारायण, आईचे नाव लक्ष्मी. परंतु ह्यांचे पालनपोषण दुसऱ्या कोणी केलेले दिसते. हे म्हणतात : 'रघुनाथाख्य तेयाने । केले पोशण कविचे'. उपनाव पांडागळे. कुलदेवता आंबेजोगाई येथील योगेश्वरी जगन्माता. हे राहणारे पार्थपुरीचे (पाथरी, जि. परभणी). ह्यांचे गुरू परळी-वैजनाथकडील कांतिपूरचे मोरजोशी. गुरुपरंपरा अशी : आदिनाथ > विश्वंभरनाथ > श्रीराम > मोरेश्वर > येका नारायण.

येका नारायणांनी गुरूंच्या आज्ञेने *ब्रह्मोत्तरखंडा*ची रचना केली. प्रस्तुत रचनेला हे 'उलथा' म्हणजे रूपान्तर वा भाषान्तर म्हणत असले तरी ह्यांनी मूळ संस्कृत *ब्रह्मोत्तरखंडा*च्या २०६२ श्लोकांचा ३०३७ असा विस्तारच केला आहे.

रचना : अमु. – ब्रह्मोत्तरखंड; ओ. सं. ३०३७; र. का. : श. १६७३ (इ. स. १७५१); र. स्थ. : पाथरी येथे ग्रंथारंभ व निंबगावी ग्रंथरचना पूर्ण.

चरित्र, चर्चा, अभ्यास : येका नारायण कृत ब्रह्मोत्तरखंड; प्रतिष्ठान, ऑग., सप्टें., ऑक्टो. १९६४; पृ. ३४–३६.

**येकासुत** [का. अनु.] पदकार. बाळकरामांचे शिष्य. बाळकरामांवरील एक पद मुद्रित (श्रीसांप्रविवि., खं. १, पृ. २९२).

o **येल्हण** – पहा एल्हण–१.

o **येल्हण किंकर** – पहा **येल्हणसुत मंडळीक.**

o **येल्हणनंदन** – पहा **येल्हणसुत मंडळीक.**

o **येल्हणसुत** – पहा **येल्हणसुत मंडळीक.**

**येल्हणसुत मंडळीक / o ओंकार / o मंडळीक येल्हणसुत / o येल्हण किंकर / o येल्हणनंदन / o येल्हणसुत** [इ. स. चे १७ वे शतक] महानुभाव कवी. ह्या कवीची माहिती मंडलिक एल्हण ह्या नावाखाली य. खु. देशपांडे ह्यांनी दिली आहे (मवाइ., खं. २, संपा. पांगारकर). गुरुपरंपरा : मुरारीमल्ल विद्वांस > येल्हण > येल्हणसुत. ह्यांनी आपल्या गुरूचा उल्लेख 'मुरारिमल्ल कुमर' आणि स्वतःचा निर्देश 'विद्वांस मुरारिमल्ल नातु' असा केला आहे. ह्यावरून ह्यांची गुरुपरंपरा व वंशपरंपरा एकच आहे असे वाटते पण तसे निश्चयाने सांगता येत नाही.

ह्या कवीच्या नावावर *बाळक्रीडा* व *रुक्मिणीस्वयंवर* असे दोन ग्रंथ दिलेले आहेत. *बाळक्रीडे*च्या शेवटी ह्यांनी म्हटले आहे : 'हा ग्रंथ तीन सहस्राधिक । दोन शतें एक सप्तक । यावेगळें कव्हणी क्षेपक । न घालावें कवित्वीं ॥ १५.१७१ ॥' कवीने ह्या ग्रंथाचा काल व रचनास्थल पुढील ओवीत दिले आहे. : " शके पंधरासे येसी । विलंबी संवत्सर श्रावणमासीं । शुद्ध पंचमीये पडतूर देशी । विडळीये सिद्ध झाला ग्रंथ ॥ २५.१७० ॥" डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी दिलेल्या ओवीत 'विडळीये' ऐवजी 'वडालीये' असा पाठ आहे.

*बाळक्रीडे*ची रचना करताना मंडळीक येल्हणसुताने *भागवत, हरिवंश* आणि मुरारिमल्लकृत *बाळक्रीडा* ह्या ग्रंथांचा आधार घेतला आहे. मुरारिमल्लांच्या आटोपशीर *बाळक्रीडे*चा ह्याने तिपटीने विस्तार केला आहे. मुरारिमल्ल कवीचे ऋण फार मोठ्या प्रमाणात येल्हणसुताने घेतले आहे, हे दोन्ही काव्यांचा तुलनात्मक अभ्यास केल्यानंतर विशेष जाणवते, असे रा. चिं. ढेरे ह्यांचे मत आहे. काव्य सुबोध व रंजक आहे. ह्या ग्रंथात आलेली काही माहिती ही लोकसंस्कृतीचा अभ्यास करण्यास उपयुक्त अशी आहे. ह्यांच्या *रुक्मिणीस्वयंवरा*चा काळ उपलब्ध नाही.

रचना : मु. – श्रीकृष्ण बाळक्रीडा; अ. २५; ओ. सं. ३२०७; र. श. १५८० (इ. स. १६५८); प्रका. आव्हाड, ल. ना. : ढंकाबे (जि. नाशिक); १९५६; अमु. – रुक्मिणीस्वयंवर; ओ. सं. ५२३; शारदाश्रम, यवतमाळ.

चरित्र, चर्चा, अभ्यास : १. ढेरे, रा. चिं. : येल्हणसुताची 'बाळक्रीडा'; गंगाजळी, पुणे, १९७२; पृ. ९१–९९. २. देशपांडे, य. खु.; कवी मंडलीक एल्हन; मवाइ., संपा. पांगारकर, ल. रा., खं. २; नाशिक, १९३५; पृ. ७४४–७७५.

**येसू लकूळा** [का. अनु.] शाहीर. ह्याच्या *अनुबाईचा पोवाडा* ह्या रचनेत इचलकरंजीचा राज्यकारभार पाहणाऱ्या अनुबाईची हकीकत येते. हिने कोल्हापूरच्या राजांच्या सैन्याशी 'करु म्हणतो धन्याचे नाव' अशा हिमतीने टक्कर दिली होती. प्रस्तुत पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये संग्रहित (पृ. ३०५–३०७).

**येसू लिंगू** [का. अनु.] शाहीर.

रचना : मु. – आबासाहेब छत्रपती बधाचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. ९८.

**योगानंद** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ८६.

**योगी नागा** [का. अनु.] पदकार. हे योगी नागेश कोण ते कळत नाही. ह्यांचे 'कायापुरीं भटी चढविली मद होतसे कैसा' हे एक योगमार्गीय पद मुद्रित.

चरित्र, चर्चा, अभ्यास : चांदोरकर, गो. का. : योगी नागाचें पद; भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २१.

**योगेश्वर** [का. अनु.] पदकार. रंगनाथस्वामी निगडीकर हे ह्यांचे चुलते असावेत. हे योगेश्वर रामभक्त दिसतात. ह्यांचे 'रावण गर्वे बोले' हे पद (अमु.) उपलब्ध.

चरित्र, चर्चा, अभ्यास : हर्वे, रा. ग. : काही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांची पदे; भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४, १९४६; पृ. ४५.

**रंक–१** [का. अनु.] कवी. रामदासी परंपरेतील. गुरुपरंपरा : रामचंद्रबोवा > आत्माराम > रंक. रंकांचे गुरू आत्माराम हे *दासविश्रामधाम*-कर्ते. ह्यांचा मठ येळेहाळीस होता. रंकांनी आपल्या गुरूचे – 'आत्मारामां'चे – ओवीबद्ध चरित्र लिहिले आहे. ह्यांनी अनेक पदे, अभंग व स्फुट प्रकरणे रचली आहेत. मराठीप्रमाणेच कानडीत व हिंदुस्थानीतही ह्यांची पदरचना उपलब्ध आहे.

रचना : अमु. – १. आत्मलीळा (आत्माराममहाराजांचे चरित्र); २. गणपतिजन्म; ३. दशरथलग्न; ४. लंकाप्राप्ती; ५. लक्ष्मणप्राणदान; ६. सद्गुरूस पत्र (पंचश्लोकात्मक); ७. सिद्धेश्वरांची स्तोत्रे, अष्टके, पदे, अभंग; ८. सुदामचरित्र; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रंक–२** [का. अनु.] कवी. गुरू : त्रिंबक.

रचना : अमु. – १. शिवपार्थदर्शन; श्लो. २९; २. हनुमंतार्जुनभेट; श्लो. ४३; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रंक–३** [का. अनु.] वीरशैव ग्रंथकार. महादेवांचे शिष्य. ह्या कवीच्या *शिवरहस्य* नामक ईश्वरपार्वतीसंवादात्मक ग्रंथात वीरशैव तत्त्वज्ञान सांगितले आहे. ३९ संस्कृत श्लोकांवर २९० ओव्यांत मराठीत भाष्य केलेले आहे. हा ग्रंथ अहमदनगर जिल्हा ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयाच्या हस्तलिखित संग्रहात उपलब्ध. महादेवाचे शिष्य रंक ह्यांच्या *विद्वत्संन्यास* (मु.) टीकेचाही निर्देश गो. का. चांदोरकर ह्यांनी सूचीत केला आहे (संककासू., पृ. ९३).

चरित्र, चर्चा, अभ्यास : १. जोशी, सुरेश, स्वामी, शान्तिकृतार्थ, व

ठुसे, कुंदा; प्रस्ता., 'श्रीमन्मथशिवलिंगकृत श्रीगुरुगीता'; अहमदनगर, १९७३; पृ. ९. २. ढेरे, रा. चिं.; रंकाचे 'शिवरहस्य' : वीरशैवांचे मराठी वाङ्मय; प्रामनधा.; कोल्हापूर, १९७२; पृ. ६१.

**रंक विप्र** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. ह्यांनी रचलेल्या *श्रियाळचरित्रात* श्रियाळाच्या वडिलांचे नाव बगळराय असे दिले आहे. ह्यांचा श्रियाळ जसा शैव तसा वैष्णवही आहे. ग्रंथाचा काल व गुरूची माहिती ग्रंथात नाही. भाषा जुनी आहे. कवी महानुभाव असावा असे पां. मा. चांदोरकर ह्यांना वाटते.

**रचना :** अमु. – श्रियाळचरित्र; ओ. सं. २२०; भाइसमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : रंक विप्रकृत श्रियाळचरित्र; भाइसमंइति., श. १८३८, पृ. ४८–५०.

**रखमाजी पंडित** / ० गंगाधरसुत–१ [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. ओंवीबद्ध *गजशास्त्रसार* ग्रंथाचा कर्ता. वास्तव्य तंजावर येथे. पिता गंगाधर पंडित. हे गंगाधर पंडित तंजावरच्या राजांच्या आश्रयास होते. हे विद्वान पंडित असून ह्यांनी *भागवता*च्या स्कंधांवर टीका केली आहे.

पूर्वीच्या काळात गजशास्त्र आणि अश्वचिकित्सा ह्या विषयांचा अभ्यास राजपुत्रांना करावा लागे. तंजावरच्या शिवाजी राजांकरिता रखमाजी पंडितांनी राजाज्ञेनेच हा *गजशास्त्रसार* ग्रंथ तयार केला (ओ. क्र. १४). पालकप्यय्या मुनींच्या मूळ संस्कृत ग्रंथाचा हा सारांश आहे. मुळातील ग्रंथ बराच विस्तृत आहे. पंडितांनी त्याचा मथितार्थ योग्य तऱ्हेने काढून तो सोपा केला आहे. गजशास्त्रासारख्या रूक्ष विषयावर रचलेल्या ग्रंथातील ओव्या आकर्षक आहेत. ह्यांनी रचलेली *पंचतंत्र, अमुक्ताभरणसप्तमीव्रतकथा*, भक्तिपर पदे इत्यादी रचना तंजावर येथील हस्तलिखित बाडांच्या संग्रहात आढळते. कवीने गंगाधरसुत असाही स्वतःचा नामनिर्देश केला आहे.

**रचना : मु.** – गजशास्त्रसार; ओ. सं. ११८; र. श. १७४४, चित्रभानु, माघ शु. १४/ इ. स. १८२३; तंजावर, १९५२; पृ. ५५. **अमु.** – १. अमुक्ताभरणसप्तमीव्रतकालपूजादि; गद्य; ग्रं. सं. २४०. २. पंचतंत्र; ओवी व श्लोक; ओ. सं. ९३५; श्लो. सं. ३८; श. १७४७/ इ. स. १८२५. ३. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पारखे, व. वि. : प्राकृत पंचतंत्राची वाटचाल; नभामा., नोव्हें. १९५८; पृ. २८–३१. २. (संपा.) महाडिक, कृष्णस्वामी : प्रस्ता., गजशास्त्रसार; तंजावर, १९५२; पृ. ४–११.

**रंग** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – भक्तिपर पद, गुरुपर श्लोक इ. स्फुट रचना; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रंगकृष्ण** [अंदाजे इ. स. १६४८ ते १७०८ च्या दरम्यान]. कवी. अश्वमेधांतर्गत *चंद्रहासकथा* कवीने रचली आहे. नामापाठककृत *अश्वमेध* पुढे ठेवून हे आख्यान लिहिले असावे असे वाटते. कारण नामा पाठकांचे *चंद्रहासाख्यान* व ही *चंद्रहासी कथा* ह्यांत विशेष साम्य आहे. ग्रंथाची समाप्तिमुद्रा अशी आहे : " रंगकृष्ण मनी मदीय वचनी। जो बोलवी तत्वता चंद्रहासी कथा। जे कां जैमिनी अश्वमेध कविताहे । छंदश्लोकगीरा मऱ्हाष्ट । सकळा हे ऐकिता वाचिता । कृष्णभक्ति घडो पापहि झडो । नाही पुनर्जन्मता । " ग्रंथाची भाषा रामदासांनंतरच्या कालातील आहे. तंजावर येथील बाडात प्रस्तुत ग्रंथाची ग्रं. स. ६७५ दिली आहे. प्रत्यक्षात मात्र ती तितकी नाही.

**रचना :** अमु. – चंद्रहासोपाख्यान; प्रसंग ११; ओ. सं. ३९२; तंसम. बा. ११८०–८१, हस्त. यादी, क्र. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : रंगकृष्ण; काही अज्ञात सारस्वत उपासक; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २३.

**रंग जोशी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – ज्ञानपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रंगनाथ–१** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. तंजावर प्रांतातील श्रीरंगपट्टणच्या जवळ राहणारे. *तुलामाहात्म्य* अथवा *कावेरीमाहात्म्य* हा ह्यांचा विस्तृत ग्रंथ. प्रस्तुत ग्रंथात ऐतिहासिक माहिती देण्याचा कवीचा हेतू नसून केवळ भोळ्याभाविकांमध्ये त्या स्थलाची महती वाढावी व त्यांनी भक्तिभावाने तेथे जाऊन दानधर्म करावा हा हेतू दिसतो. ह्यांनी *कार्तिकमाहात्म्य* हा एक ग्रंथ शरभेंद्र भूपाच्या आज्ञेने लिहिला आहे. ह्यांचा छंदशास्त्रावरही एक प्रबंध आहे. ह्यांचे एक रामपर पद तंजावर *पदगुच्छात* (१९६९) मुद्रित (पृ. ४९).

**रचना : अमु.** – १. कार्तिकमाहात्म्य; अ. ३०; ओ. सं. १६००; तंसम. बा. ५४४. २. छंदशास्त्रावरील प्रबंध; मसा., आ. ५, पृ. ३९९. ३. तुलामाहात्म्य; अ. १–३६; अपूर्ण; ओ. सं. ७०००; तंसम. बा. ९७१. ४. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रंगनाथ–२** [का. अनु.] कवी. मूळ नाव रामराय. सखाराममहाराज नावाच्या ब्रह्मनिष्ठाने ह्या कवीच्या ठिकाणी भक्तीची आवड उत्पन्न केली. कुलदैवत श्रीलक्ष्मी वेंकटेश. गुरुपरंपरा : नारायण > कमलासन > वसिष्ठ . . . . . . . . नीळकंठ > पुष्कराय > जयराम > शंकर (ह्यांचा मठ रामकुंड येथे) > बालकृष्ण (ह्यांचा मठ श्रीक्षेत्र इंदूर येथे) > रंगनाथ (रामराय).

कवीने *स्वानुभवामृत* हा ग्रंथ रचला आहे. ग्रंथ गुरुशिष्यसंवादात्मक असून ह्यात गुरूने मूळ उत्पत्तीपासून अखेरपर्यंत वर्णन करून शेवटी दिव्य दृष्टीने स्वस्वरूप शिष्यास दाखविले आहे. विवरण सरळ व सोप्या भाषेत केले आहे.

**रचना :** अमु. – स्वानुभवामृत; अ. ११; ओ. सं. ७०१; प्र. ले. : 'श्रावण वद्य ५, गुरुवार, प्रथमप्रहर : छ. ६, रमजान, सन १२६४ हिजरी'; गं. ना. मुजुमदार, पुणे यांचा संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : रंगनाथ (रामराय) कृत स्वानुभवामृत; भाइसमंइति., श. १८३७; पृ. ४०–४१.

**रंगनाथ–३** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – सुदामचरित्र; ग्रं. सं. १३६; महा. कवि, व. १, अं. ५, पृ. २८–३२, व व. १, अं. ११, पृ. ३३.

**रंगनाथकवि दुपट्टी** [का. अनु.] कवी. शरभेंद्र भूपांच्या *गणेशविजय* नाटकाच्या एका प्रतीतील मुखपत्रावर व शेवटच्या पानावर "*गणेशविजयनाटक* प्राकृत रंगनाथ कवि दुपट्टी कुप्पाचरेकृत' असा उल्लेख आहे. ह्यावरून ह्या नाटकाचा कर्ता शरभेंद्र नसून रंगनाथकवि दुपट्टी आहे. नाटक दोन-अंकी आहे (तंसम. बा. १७११).

**रचना :** अमु. – गणेशविजयनाटक; अं. २; ग्रं. सं. ५५०; तंसम. हस्त. यादी, क्र. २.

**रंगनाथ (नरहरी)** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – रामलीलामृत; संककासू., पृ. ९३.

**० रंगनाथ निजानंद** – पहा **रंगनाथस्वामी निगडीकर.**

**रंगनाथ नित्यानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अनु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २

**रंगनाथ मोगरेकर** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, पूर्वार्ध] संतकवी. हे मूळचे गोदावरी काठच्या मोगरे (जि. नाशिक) गावचे रहिवासी. वडिलांचे नाव 'आपेराज' ऊर्फ आप्पाराव. हे कपिलगोत्री ब्राह्मण. कुलदैवत : मोगरे गावचा नृसिंह. आपल्या घराण्यात पुष्कळ पिढ्यांपासून श्रीकृष्णोपासना चालू होती असे रंगनाथ सांगतात. ह्यांनी आपल्या ग्रंथात दिलेली स्वतःची गुरुपरंपरा अशी आहे : सिद्धानंद (ऊर्फ वासु-

देवानंद) > परमानंद > वैकुंठानंद > कृष्णानंद > रंगनाथ. गोदावरीच्या काठी धारेस असताना रंगनाथांना कृष्णानंदांनी गुरुमंत्र दिला.

रंगनाथांचे (१) *चित्सदानंदलहरी,* (२) *योगवासिष्ठसार टीका* व (३) *पंचरत्न* असे तीन ग्रंथ प्रकाशित झाले आहेत.

*चित्सदानंद* ह्या गीताटीकेच्या आरंभी ही गीताटीका रचताना कोणते आधार घेतले ते कवी सांगतो : " श्रीशंकर आणि मधुसूदन । आणिकही जे आचार्य सज्ञान । त्याहीं नाना अनेक क्लेश करून । गीता-व्याख्यान केलें असें ।। एकेका अक्षराचें व्याख्यान । केलें श्रुतिस्मृती मथून । तेंचि तयांचें सिद्ध अर्थान्न । पखडून काढीं श्रोतयां ।। " ह्या गीताटीकेत प्रत्येक अध्यायाच्या शेवटी अध्यायमाहात्म्य सांगणारी एकेक कथा दिली आहे ह्या संदर्भात *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे लिहितात : ' ही कवीची कृति म्हणण्यापेक्षां मागाहूनची कोणा कलमबहाद्दराची मखलाशी, असें वाटतें. ' ह्या टीकेवर *ज्ञानदेवी*ची छाया प्रभूतपणे दिसून येते.- [ ⇨ ३.] कवीची *पंचरत्न* टीका ही श्रीमत् शंकराचार्यांच्या *सोपान पंचका*तील पाच संस्कृत श्लोकांवर आधारलेली टीका आहे. ती अत्यंत बांधीव आहे. *योगवासिष्ठसार* हा ग्रंथ मूळ *योगवासिष्ठ रामायणा*पैकी सव्वादोनशे श्लोक वेगळे काढून त्यांच्या आधारे रचला आहे. ह्या ग्रंथाची दहा प्रकरणे असून त्याची ओवीसंख्या सुमारे सात हजार आहे. ग्रंथाचा रचनाकाल 'कीलक संवत्सर (श. १५३०) आश्विन शुद्ध अष्टमी गुरुवार ' असा दिला आहे.

*योगवासिष्ठसार* हा ग्रंथ रंगनाथ मोगरेकरांचा की रंगनाथस्वामी निगडीकर ह्यांचा? असा ह्या ग्रंथाच्या कर्तृत्वासंबंधी वाद आहे. *सारस्वत*-कार वि. ल. भावे हा ग्रंथ रंगनाथ मोगरेकरांचा आहे असे म्हणतात; ह्यावर ल. रा. पांगारकर लिहितात की, ' भावे ह्यांनी मूळ ग्रंथ न पाहता मत बनविले आहे; *योगवासिष्ठ* रंगनाथ मोगरेकरांचे नसून ते रंगनाथ-स्वामी निगडीकरांचे आहे. ' परंतु संशोधकांना पांगारकरांचे हे मत मान्य नाही. ग. चिं. देव ह्यांनी शके १८२७ (इ. स. १९०५) त ह्या टीकेची जी प्रत प्रसिद्ध केली आहे, त्या प्रतीतील ग्रंथाच्या भाषासरणीचा विचार करता ह्या ग्रंथाचे कर्तृत्व मोगरेकर रंगनाथ ह्यांजकडे जाऊ पाहते, असे ह्या प्रतीचे संपादक गोविंदस्वामी दातार ह्यांनी आपले मत व्यक्त केले आहे. तसेच ह्या ग्रंथाचे कर्तृत्व निगडीमठात 'बदलण्याचा खटा-टोप पुढे केला गेला असावा ' असा संभवही दर्शित केला आहे. म. द. वा. पोतदार ह्यांनी चिं. नी. जोशीकृत *श्रीधरचरित्रा*च्या (इ. स. १९५१) पुरस्कारात ह्या विषयावर मूलगामी संशोधन केले आहे (पृ. २३–२६). *योगवासिष्ठसारा*च्या मानकरी व जगदीश्वरी अशा दोन प्रती शके १८११ (इ. स. १८८९) मध्ये मुंबईत प्रसिद्ध झाल्या. दोन्ही प्रती तपासून पाहता त्यांतील पहिली नऊ प्रकरणे सारखी आहेत. दहाव्या प्रकरणात जगदीश्वर प्रतीत १५३ ओव्या निराळ्या आहेत. ह्या ओव्यांत रंगनाथ मोगरे ह्यांचे नाव, गुरू कृष्णानंदाचा उल्लेख, वडील म्हणून आपेराजांचा निर्देश, ग्रंथसमाप्तीचे स्थळ, ग्रंथसमाप्तीचा शक १५३०, इत्यादी रंगनाथ मोगरेकरांची माहिती आली आहे. निगडी मठातील मानकरी प्रतीत नेमक्या ह्याच वादाव्याच्या ओव्या आढळात येत नाहीत. तसेच रचनाशकही श. १५८४, शुभकृन्नाम संवत्सर असा दिला आहे व रचनास्थल निर्गुणग्राम (निगडी) असे म्हटले आहे. त्याच-प्रमाणे *योगवासिष्ठ* आणि *चित्सदानंदलहरी* ह्या दोन ग्रंथांत भाषासाम्यही आढळते. ह्या कारणांमुळे निगडीकर रंगनाथांपेक्षा मोगरेकरांकडेच *योगवासिष्ठा*चे कर्तृत्व द्यावे हे बरे, असे म. द. वा. पोतदार ह्यांनी मत दिले आहे (तत्रैव, पृ. २६). *योगवासिष्ठा*वरील ही टीका मूळ संस्कृत *योगवासिष्ठ* ग्रंथाच्या ३२००० श्लोकांपैकी फक्त २२५ निवडक श्लोकांवर केलेली टीका आहे म्हणून ह्या ग्रंथास *योगवासिष्ठसार* असे नाव दिले आहे. मूळ ग्रंथात वैराग्य, जगदुत्पत्ति, इ. सहाच प्रकरणे आहेत पण ह्या ग्रंथाची मात्र दहा प्रकरणे आहेत. मुळातील अनेक आख्याने व उपाख्याने ह्यांचा मात्र ह्या ग्रंथात समावेश नाही. सर्वसामान्यांना वेदान्तविषय कळावा म्हणून ही टीका केली असली, तरी त्यातील शास्त्रीय विषय हा सामान्यतः समजण्यास कठीण असाच आहे. ग्रंथाची दहा प्रकरणे एकमेकांशी संलग्न आहेत. एका श्लोकातून दुसरा श्लोक एका अर्थातून दुसरा अर्थ सहज निघावा अशा प्रकारची रचना कौशल्याने केली आहे. [ ⇨ ३.]

रंगनाथ हे आनंद-परंपरेतील एक अधिकारी सत्पुरुष होऊन गेले. दास-पंचायतनातील आनंदमूर्ती ब्रह्मनाळकर हेही ह्याच गुरुपरंपरेतील ठरतात. रंगनाथ (मोगरेकर) > काशिराज > आनंदमूर्ती अशी परंपरा ब्रह्म-नाळकर मठात पठित असल्याची माहितीही द. वा. पोतदार देतात. सांगलीचे ओक ह्यांनी इ. स. १९३५ त ब्रह्मनाळकर आनंदमूर्ती ह्यांचे शके १७७१ मध्ये लिहिले गेलेले *आनंदचरितामृत* नावाचे एक चरित्र प्रसिद्ध केले आहे. त्यात कृष्णानंदाचे शिष्य रंगनाथ ह्यांच्याविषयी माहिती दिली आहे. रंगनाथ मोगरेकर हे ह्यांचे पुत्र व शिष्य काशिराज ह्यांसह नाशिक प्रांती वाघरे येथे राहात, असे *आनंदचरितामृत*कर्ता म्हणतो. पहा : " तच्छात्र श्रीरंगनाथ । गौतमी तटीं जगविख्यात । नाशिका सन्निध वाघरे येथ । वास्तव केले स्वइच्छे ।। २६ ।। त्यांचे पुत्र काशिराज समर्थ । पित्याचा अनुग्रह घेत ।। " *आनंदचरितामृता*तच रंगनाथां-च्या *चित्सदानंदलहरी, योगवासिष्ठसार* व *पंचरत्न* ह्या तीन ग्रंथांचा स्पष्ट उल्लेख आला आहे. ह्यावरून *योगवासिष्ठसारा*ची रचना रंगनाथ मोगरेकरांनीच केली हे सिद्ध होते. रंगनाथ मोगरेकरांचे वसतिस्थान आणि समाधिस्थान श्रीक्षेत्र नाशिक हे होते असे त्यांच्या विश्वनाथ नावाच्या शिष्याने लिहिलेल्या *उपदेशरहस्य* ह्या ग्रंथातील पुढील उताऱ्यावरून म्हणता येते : ' कृष्णानंदाचा अनुग्रहीत । तो महा-प्रसिद्ध रंगनाथ । कपिल गोत्रोत्पन्न विख्यात । नाशिकी वसत, निजसुखें ।। '

**रचना : मु.** – १. चित्सदानंदलहरी अथवा श्रीमद्भगवद्गीतेवर श्रीरंगनाथस्वामिकृत प्राकृत टीका; ओ. सं. ११९३४; संपा. तेंडुलकर, बाबाजी अनंत; मुंबई, १८९१. २. योगवासिष्ठ; प्र. १०; ओ. सं. सुमारे ७०००; र. का. : श. १५३०, कीलकनाम संवत्सर, आश्विन शु. ८, गुरुवार; संपा. आत्माराम यशवंत; जगदीश्वर; मुंबई, १८८९. ३. रंगनाथ मोगरेश्वरकृत पंचरत्न; ओ. सं. २०६५; श्रीमत् शंकराचार्यांच्या 'सोपानपंचका'वरील टीका; संपा. भावे, वि. ल.; महाराष्ट्र काव्यग्रंथ, क्र. ७; मुंबई, १९०५. ४. रंगनाथो योगवासिष्ठसार टीका; ओ. सं. अंदाजे ६८४७; संपा. मानकर, मा. ना.; मुंबई, १८८९.

**रंगनाथशिष्य** [का. अनु.] कवी. गुरुपरंपरा : दत्त > जनार्दन > एकनाथ > नित्यानंद > कृष्णानंद > विसोबानंद > मुरारनाथ > रंगनाथ > रंगनाथशिष्य.

**रचना : अमु.** – गुरुगीता; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ९५.

**रंगनाथसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – श्रीरामाची आरती; मआ.; पृ. ४१०. **अमु.** – पद-पदांतरे; संककासू., पृ. ९५.

**रंगनाथस्वामी निगडीकर**/ ० रंगनाथ **निजानंद** [अंदाजे इ. स. १६१२ – समा. श. १६०६, मार्ग. व. १० / इ. स. १६८४] आनंद-संप्रदायी कवी. रामदासपंचायतनातील एक साधू. ह्यांच्या पितृपरंपरेतील मूळ पुरुष राघोपंत खडके वा घोडके. हे माध्यंदिन शाखेचे वासिष्ठगोत्री, ब्राह्मण. राघोपंत हे विजापूरकरांच्या दरबारात शिपाईगिरी करून असत. त्यांचे चिरंजीव दत्तात्रेय ह्यांनी उतारवयात संन्यासदीक्षा घेतली होती. दत्तात्रेयांचे चिरंजीव रंगोपंत. ह्यांस चार पुत्र होते. त्यांपैकी दुसरे पुत्र बोपाजी हे रंगनाथस्वामींचे वडील. रंगनाथस्वामींच्या आईचे नाव बयाबाई. ह्या जोडप्यास पूर्णानंदस्वामींच्या कृपेने यादव, रंगनाथ व विठ्ठल असे तीन पुत्र झाले. रंगनाथांस लहानपणापासून शिपाईगिरीची

आवड आणि ह्याच हौसेमुळे त्यांनी लग्न करण्याचे नाकारले. वयाच्या चौदाव्या वर्षी ह्यांनी घर सोडले व बद्रिकाश्रमी राहून अनेक विद्या संपादन केल्या. योगसाधन केले. उत्तरेकडील यात्रा संपल्यावर पंढरपुरास व नाझरे येथे काही दिवस ते राहिले. रंगनाथस्वामींचे वडील बोपाजीपंत ह्यांनीही ह्यानंतर श्रीक्षेत्र करहाटक ऊर्फ कऱ्हाड येथे जाऊन चतुर्थाश्रम स्वीकारला आणि निजानंद हे नाव धारण केले. निजानंदांनी रंगनाथादी त्रिवर्ग बंधूंना उपदेशदीक्षा दिली. रंगनाथस्वामींची गुरुपरंपरा अशी : विष्णु > विधि > अत्रि > दत्त > सदानंद > रामानंद > अमलानंद > गंभीरानंद > ब्रह्मानंद > सहजानंद > पूर्णानंद (नारायण) > निजानंद (बोपाजी) > रंगनाथ. निजानंदांनी मुलांच्या अनुमतीने शके १६५४ मध्ये मार्गशीर्ष महिन्यात (इ. स. १६४२ मध्ये) कृष्णा व कोयना ह्या नद्यांच्या संगमावर जिवंत जलसमाधी घेतली. ह्यावेळी रंगनाथस्वामी तीस वर्षांचे होते. वडिलांच्या पश्चात रंगनाथस्वामी घरी न राहता तीर्थयात्रा करीत फिरू लागले. एके दिवशी कृष्णातीरी जाण्याच्या उद्देशाने ते चालले असता कोरेगावच्या वाटेवर निर्गुडीचे बन लागले. रंगनाथस्वामींच्या घोड्याचा पाय ह्या बनातील ओढ्यात रुतला. घोडा पुढे चालेना. हीच परमेश्वराची आज्ञा असे मनात समजून त्यांनी तेथेच मुक्काम केला. त्यानंतर ह्या ठिकाणी त्यांनी आपला मठ बांधला. ह्या मठाला निगडीचा मठ व ह्या ठिकाणाला निर्गुणपूर अथवा निगडी असे अभिधान प्राप्त झाले. येथे ते समाधिस्थ होईपर्यंत राहिले.

रंगनाथस्वामी स्वरूपवान होते तसेच घोड्यावर बसण्याची त्यांना हौस होती, असे उल्लेख आढळतात. आमरणान्त ह्यांचा थाट ऐश्वर्याचा होता. कोठेही ते जात असत त्यावेळी ते आपल्या 'मनोहर' नावाच्या निळ्या घोड्यावर बसून कमरेला तलवार व मोठा शिष्यपरिवार बरोबर घेऊन जात असत. 'भागम्मा' व 'चंद्रम्मा' ह्या त्यांच्या शिष्यिणीही बरोबर असत. परंतु ह्या ऐश्वर्याच्या सुखाने ते कधीही बद्ध नव्हते. रंगनाथस्वामी वयाच्या ७२ व्या वर्षी शके १६०६ (इ. स. १६८४); रक्ताक्षी संवत्सरी, मार्गशीर्ष वद्य दशमीस समाधिस्थ झाले.

रंगनाथस्वामींचा व समर्थ रामदासस्वामींचा दाट परिचय होता. ह्यामुळे त्यांची गणना दासपंचायतनात झाली. जयरामस्वामी (इ. स. १५९९–१६७२), रंगनाथस्वामी निगडीकर (इ. स. १६१२–१६८४), केशवस्वामी भागानगरकर (इ. स. १६८२ समाधिकाल) आनंदमूर्ती ब्रह्मनाळकर (इ. स. १६२८–१६९६) आणि स्वतः रामदास मिळून हे रामदासपंचायतन सिद्ध होते. ह्या पुरुषांकरवी रामदासांनी महाराष्ट्राला जी चेतना दिली तिचा प्रत्यय रंगनाथस्वामींचे काव्य वाचीत असता पदोपदी येतो.

रंगनाथस्वामींची बरीचशी काव्यरचना निगडी मठ जळाला त्यावेळी अग्निमुखी पडली. जी काही रचना उपलब्ध आहे त्यापैकी *भानुदासचरित्र* व *योगवासिष्ठसारा*ची प्रकरणे ही रचना उपलब्ध असून उर्वरित काही रचना वि. ल. भावे ह्यांनी प्रसिद्ध केली आहे (*महाराष्ट्रकाव्यग्रंथ –४*). त्यापैकी *रामजन्म* ह्या त्यांच्या काव्यकृतीत रामचरित्राचे सारसर्वस्व आले आहे. सवाई वृत्तात रचलेले *गजेंद्रमोक्ष* हे काव्य तसेच *सुदामचरित्र, शुकरंभासंवाद, भानुदासचरित्र* इत्यादी आख्यान-कविता कीर्तनाकरिता म्हणून त्यांनी रचली. *पंचीकरण, बंधमोक्षविवरण, मिथ्यामायास्वरूप* अशी आध्यात्मिक प्रकरणेही रंगनाथस्वामींनी केली आहेत. 'तो मज आवडतो', 'मज तो मानेना मानेना', 'मग तूं रामरसायन सेवी' ह्यांसारखी त्यांची अनेक पदे महाराष्ट्रात विशेष परिचित आहेत. त्यांनी अष्टके व पंचकेही लिहिली आहेत. नीतिबोध व चित्तवेधक भाषा ह्यांमुळे ह्यांची पदरचना परिणामकारक झाली आहे. ह्यांच्या कवितेवर त्यांचे समकालीन रहिमतपूर येथील प्रसिद्ध पुरुष तुका विप्र, विष्णु विप्र, ह्यांचे विशेष प्रेम होते.

रंगनाथांच्या नावावर वि. ल. भावे ह्यांनी *योगवासिष्ठसार* (प्रक. १०, र. श. १५८४ / इ. स. १६६२) असा ग्रंथ दिला आहे. प्रस्तुत ग्रंथाचे कर्तृत्व रंगनाथ मोगरेकरांचे की निगडीकरांचे असा वाद उपस्थित झाला असता ह्या विषयावर मूलगामी संशोधन करून द. वा. पोतदार ह्यांनी *योगवासिष्ठसार* रंगनाथ मोगरेकरांचेच असे मत *श्रीधर : चारित्र आणि काव्यविवेचन* (चिं. नी. जोशी) ह्या पुस्तकास लिहिलेल्या पुरस्कारात व्यक्त केले आहे (विशेष विवेचनाकरिता पहा : **रंगनाथ मोगरेकर**). त्यामुळे आता हा ग्रंथ मोगरेकरांचाच मानला जातो.

**रचना : मु.** – १. गरुड सत्यभामागर्वहरण (डफगाणे – ओव्या); ओ. सं. १००. २. गजेंद्रमोक्ष; सवाईवृत्त; श्लो. सं. २४. ३. निजानंद साधने; श्लो. सं. ४८. ४. पंचीकरण; ओ. सं. ३५. ५. बंधमोक्षविवरण; ओ. सं. २५. ६. भानुदासचरित्र. ७. मिथ्यामायास्वरूप; ओ. सं. १७. ८. रामजन्म; अ. २; श्लो. सं. २०६. ९. शुकरंभासंवाद; ओ. सं. ८४. १०. श्रीएकाखडी ओव्या; ओ. सं. २१. ११. श्रीगुरुगीता; ओ. सं. १२२. १२. सुदामचरित्र; ओ. सं. १३६. १३. अष्टके २ (करुणाष्टक, मार्तंडाष्टक); पदे ५८ व श्लोकपंचक; महाराष्ट्र काव्यग्रंथ, क्र. ४, मुंबई, १९०५. १४. स्फुट पद्ये; पदसंख्या ६६५ व आरत्या इ.; श्रीरंगनाथस्वामीकृत पदसंग्रह; संपा. निगडीकर, गो. अ., निगडीकर, द. म., निगडीकर, अ. ग.; पुणे, १९०२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आपटे, द. अ. : रंगनाथस्वामी निगडीकर; कविचरित्र, खं. २, भा. २; मुंबई, १९०७; पृ. ३०–४२. २. परांजपे, य. वि. : रंगनाथकृत योगवासिष्ठसार; योगवासिष्ठ आणि संतवाङ्मय; पुणे, १९५५; पृ. ३०८–३५५. ३. भावे, वि. ल. : प्रस्ता., श्रीरंगनाथस्वामी निगडीकरकृत कवितासंग्रह; महाराष्ट्र काव्यग्रंथ, क्र. ४, मुंबई, १९०५. ४. प्रासादी, राजाराम; भक्तमंजरीमाला, खं. १, श्री भक्तमंजरीमालांतर्गत श्रीरामदास पंचायतन; धुळे, १९३०. ५. सीतातनय; श्रीरंगनाथस्वामी यांचे संक्षिप्त चरित्र, भा. १ ला; सातारा, १९२६.

**रंगबोध–१** [ ? – समा. श. १५८१ / इ. स. १६५९]. मुडलगी येथील मुकुंदराज परंपरेच्या शाखेचे मूळ पुरुष. गुरुपरंपरा : मुकुंदराज > नृसिंहभारती > जगन्नाथ > सहजबोध > रंगबोध. रंगबोधांचे गुरू सहजबोध हे मराठवाड्यातील कुंभकर्ण टाकळी (लालाईची टाकळी असेही दुसरे नाव) येथील मठात राहात. रंगबोधांचे वडील कोनेरीबोध. हे सहजबोधांचेच शिष्य होते. त्यांनी काशी येथे समाधी घेतली. रंगबोधांना गुरूंनी दक्षिणेत जाऊन लोकोद्धार करण्याची आज्ञा केली म्हणून ते टाकळी गाव सोडून कर्नाटकप्रांती प्रवास करू लागले. हे मुडलगीजवळ आले तेव्हा सहजबोधांनी एका सिद्धपुरुषाच्या रूपात ह्यांना दर्शन दिले. हाच गुरूचा आदेश समजून रंगबोधांनी मुडलगी येथे कायमचे वास्तव्य केले. मुडलगी हे बेळगाव जिल्ह्यातील गोकाकजवळील एक लहानसे खेडे आहे. रंगबोधांनी गोकाकच्या तटेश्वराजवळ तपश्चर्या केली. ह्यांचे अनेक चमत्कार (उदा., काष्ठाचा पिंपळ करून दाखविला इत्यादी) गुरुनाथांनी *देशिकचरित्रात* (मुडलगीच्या स्वामींची चरित्रे) वर्णिलेले आहेत. हे विठ्ठलभक्त असून पंढरीची वारी नेमाने करीत. रंगबोधस्वामी गृहस्थाश्रमी होते. ह्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई. त्यांनी पीतांबरावर कशिदा काढून सर्व गीता उतरवली होती असे सांगतात. ह्यांचे पुत्र अद्वयबोध. रंगबोधांनी श. १५८१ (इ. स. १६५९) मध्ये समाधी घेतली.

रंगबोधांनी दोन ग्रंथ लिहिले आहेत : *रंगबोधिनी-गीताटीका* व *योगवासिष्ठटीका*. हे संपूर्ण स्वरूपात मिळालेले नाहीत. ह्यांपैकी गीताटीकेचा एकच अध्याय उपलब्ध झाला आहे. हिचा रचनाकाल श. १५४८ (इ. स. १६२६) असावा असे डॉ. पंडित आवळीकरांनी अनुमान केले आहे. रंगबोध आपल्या टीकेला 'पदच्छेद टीका' म्हणतात.

ते प्रथम श्लोकांतील प्रत्येक पदाचा मराठीत अर्थ देऊन नंतर संस्कृत श्लोक व त्यावरील आपली श्लोकबद्ध टीका देतात. ही समश्लोकीच असल्यामुळे वामन पंडितांच्या *यथार्थदीपिके*पूर्वीची समश्लोकी म्हणून तिला विशेष महत्त्व आहे. प्रस्तुत टीकेत अनुष्टुभ, उपजाति, भुजंगप्रयात, शार्दूलविक्रीडित ही चार वृत्ते वापरली आहेत. ह्यातील अनेक संधी, उदा., निश्चीताम्ही, होईलाणिक, वदतार्जुन इ., कन्नड पद्धतीचे 'पदान्त-संधी' आहेत. टीका करताना रंगबोधांनी मुख्यतः श्रीधरस्वामींच्या *सुबोधिनी*चा आधार घेतला आहे. भावार्थापेक्षा 'यथार्था'बद्दलचे प्रेम प्रस्तुत टीकेत अधिक आढळते.

ह्यांचा दुसरा ग्रंथ म्हणजे *योगवासिष्ठा*वर लिहिलेली टीका. हे आपल्या टीकेला 'वशिष्टटीका', 'टिपण', 'टीका' अशाही नावांनी संबोधतात. ही *बृहद्योगवासिष्ठा*वरील टीका नसून *लघुयोगवासिष्ठा*वरील टीका आहे. टीका संपूर्ण उपलब्ध नाही. तिच्यातील उपलब्ध झालेले ९२४ ओव्यांचे *शांबरिकोपाख्यान*, *लघुयोगवासिष्ठा*तील ८ व्या सर्गातील ९० श्लोकांवर आधारलेले आहे. *लवणोपाख्याना*ची व *स्थिति* प्रकरणा-तील *भार्गवोपाख्याना*ची काही पानेच उपलब्ध आहेत. त्यांत अनेक आख्यानांचा उल्लेख येतो. त्यावरून रंगबोधांनी सर्व प्रकरणांवर टीका लिहिली होती असे वाटते. आतापर्यंत उपलब्ध झालेल्या *लघुयोग-वासिष्ठ*-टीकांत ही टीका कालदृष्ट्या पहिली ठरण्याची शक्यता आहे. श. १५४८ ते १५८१ (इ. स. १६२६ ते १६५९) ह्या काळात केव्हातरी हिचे लेखन झाले असावे, असे मत प्रा. आवळीकरांनीही व्यक्त केले आहे. ही टीकाही ओवीबद्ध 'पदच्छेदटीका'च आहे. परंतु *रंगबोधिनी*-मध्ये पदच्छेदासाठी स्वामींनी गद्याचा आश्रय घेतला होता. येथे सर्वत्र त्यांनी ओवीचाच वापर केला आहे. मूळ ग्रंथाचे नांव *योगवासिष्ठ*, *वासिष्ठरामायण*, *मोक्षोपाय* असे वेगवेगळ्या प्रकारे दिले आहे. तत्त्वज्ञान आणि काव्य ह्यांचे मनोज्ञ मिश्रण मुळातल्याप्रमाणे ह्या टीकेतही आहे.

रंगबोधांची पदे, आरत्या व अभंग ह्या प्रकारची स्फुट रचनाही आहे. ह्या रचनेची संख्या वीसच्या आसपास भरते. त्यात गुरुमहिमा गायिला आहे. राम, विठ्ठल, कृष्ण ह्या देवतांचे स्तवन आहे; 'हरिमय सर्व जग मज गे भासे' अशा आत्मानुभवाचाही प्रत्यय आहे.

**रचना : अमु.** – १. रंगबोधिनी; समश्लोकी गीताटीका; अ. १. २. निर्याणपत्रिका; ओ. ३४. ३. स्फुट रचना – पदे, आरत्या, अभंग, इत्यादी; सं. १९; मुडलगीचे स्वामी : संपा. आवळीकर, पंडित; धारवाड–पुणे, १९७१; पृ. १–३२. **अमु.** – योगवासिष्ठ-टीका – पैकी 'शांबरिकोपाख्यान' उपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित; 'देशिकचरित्र', 'रंगबोधिनी' : एक अध्याय, व रंगबोधस्वामीकृत 'योगवासिष्ठ-टीका'; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. ११६–१७१. २. आवळीकर, पंडित (संपा.); रंगबोध : मुडलगीचे स्वामी; धारवाड–पुणे; १९७१; प्रस्ता., पृ. १–३५.

**रंगबोध–२** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, अखेर] कवी. मुडलगी परंपरेतील (पहिल्या) शिवबोधांचे शिष्य. मूळ नाव संगमनाथ (किंवा संगमेश्वर). कुलस्वामिनी बनशंकरी. होसूर येथील कुळकर्ण्यांच्या भीमातीराहून आलेल्या आप्ताचा योग्याची लक्षणे असलेला हा मुलगा शिवबोधांनी आपला जावई करून घेतला. निर्याणापूर्वी त्यांनी संगमनाथास उपदेश देऊन त्याचे नाव रंगबोध असे ठेवले. त्यामुळे संगमनाथानंतरचे स्वामी वासिष्ठगोत्री झाले. त्यापूर्वीचे भारद्वाज-गोत्री होते. ह्यांच्या पत्नीचे म्हणजेच शिवबोधांच्या कन्येचे नाव काशीबाई. ह्यांना चार कन्या व एक पुत्र (शिवबोध दुसरे) होते.

ह्यांच्या नावावर बनशंकरीची आरती व इतर तीन पदे एवढीच रचना उपलब्ध आहे. आरतीत ह्यांनी आपल्या कुलस्वामिनीची स्तुती केली आहे. पदांतून मुडलगीचा व आपल्या गुरुवंशाचा महिमा वर्णिला आहे. ह्यांपैकी एका पदात कोनेरीबोध, रंगबोध, अद्वयबोध आणि शिवबोध ह्यांची एकेक लीळा उल्लेखिली आहे.

**रचना : मु.** – बनशंकरीची आरती व तीन पदे; मुडलगीचे स्वामी; संपा. आवळीकर, पंडित; धारवाड–पुणे, १९७१; पृ. ९९–१०२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : रंगबोध–२; प्रस्ता., मुडलगीचे स्वामी; पृ. ७–९; ३९.

**रंगराय** [का. अनु.] शाहीर. ह्यांनी पानपतच्या युद्धसंग्रामावर व त्या काळच्या इतर महत्त्वाच्या घटनांवर रचना केली आहे असे वि. ल. भावे म्हणतात (मसा., आ. ५, पृ. ५५३).

**रंगराव** [अंदाजे इ. स. १८६३–६६] शाहीर. *कृष्णाबाईच्या पुराचा पोवाडा* ह्या आपल्या रचनेत शेवटी ह्यांची स्वतःची माहिती दिली आहे. ती अशी : "जन्मलों, राहतों, नांदणी शहरांत। गांवास पांढरी देव भैरवनाथ ॥ लक्षुमी विठोबा दत्तगुरु हनुमंत ॥ करवीर इलाखा पेंठ रायबाग प्रांत ॥ जिवाची कृष्ण बा पिता भागीरथी आई ॥"

महाराष्ट्रात श. १७७५ / इ. स. १८६२ साली सर्वत्र जो प्रसिद्ध महापूर आला व म्हैसूरपर्यंत शेकडो गावे बुडाली, त्याचे तपशीलवार वर्णन ह्या पोवाड्यात येते. पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड ३* मध्ये संग्रहित (पृ. ३०९–१२).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. (संपा.) : ऐतिहासिक माहिती, टीका व टिप्पण्या; ऐतिपो., खं. ३; पुणे, १९६९; पृ. ६६५.

**रंगसहज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – गुरुपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रंगसहजबोधी** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : अमु.** – सहजबोधाची व पांडुरंगाची आरती इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रंगस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – रामपर पद, गोपीविरहपर पद, इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रंगाजी कोन्हेर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रंगानुज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

o **रंगानुजतनुज** – पहा **विठ्ठल (काशिराज).**

**रंगेशनंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रंगेशात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – तेराक्षरी मंत्रावर १४ श्लोक; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रंगोकृष्ण** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. २७. **अमु.** – बोधपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

o **रंगोजी बापूजी रोहिडखोरेकर गुप्ते देशपांडे** – पहा **रंगो बापूजी.**

**रंगोजीबावा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

o **रंगोपंत दादा** – पहा **रंगो लक्ष्मण मेढे.**

**रंगोबा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बोधपर पद; तंसम. हस्त. यादी., क्र. ३.

**रंगोबा गोसावी नाजीरकर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – भक्तलक्षणपद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रंगो बापूजी / o रंगोजी बापूजी रोहिडखोरेकर गुप्ते देशपांडे** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] गद्य-लेखक. साताऱ्याच्या प्रतापसिंहांच्या

कारकीर्दीत ब्राह्मण व प्रभू ह्यांमध्ये ग्रामण्यासंबंधीचा वाद उपस्थित झाला व त्यात प्रतापसिंहांना पदच्युत व्हावे लागले. तेव्हा त्यांचे म्हणणे ब्रिटिश पार्लमेंटपुढे मांडण्यासाठी जे विलायतेस गेले होते त्यांत रंगो बापू प्रमुख होते. ह्यांनी विलायतेतील सर्व हकीकत २२५ पृष्ठांत मोडी लिपीत लिहून तेथेच प्रसिद्ध केली. ह्या पुस्तकात प्रतापसिंहांचे चरित्र वर्णिले आहे. इ. स. १८५७ सालच्या स्वातंत्र्ययुद्धात रंगो बापूजी परागंदा झाले (मचको., पृ. ६८५).

**रचना :** मु. – रंगो बापूजी याची राजे प्रतापसिंह यांचे तर्फे कैफियत; शिळाछाप (मोडी लिपीत); लंडन, १८४७.

**रंगो लक्ष्मण मेढे** / ० रंगोपंत दादा [इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर व १९ व्याचा प्रथम पाद] बखरकार. हे चाफळ संस्थानचे कारभारी होते. हनुमंतस्वामींच्या आज्ञेवरून रंगो लक्ष्मण मेढे ह्यांनी मल्हार रामराव चिटणीसांच्या मदतीने हनुमंतस्वामींनी रचलेल्या *समर्थांच्या बखरी*चा विस्तार केला.

हनुमंतस्वामी हे समर्थांचे थोरले बंधू श्रेष्ठ ह्यांच्या नातवाचे नातू. ह्यांनी रचलेले *समर्थचरित्र* हे त्रोटक होते. त्याची श. १७११ / इ. स. १७८९ त झालेली मूळ मोडी लिपीतील प्रत उपलब्ध आहे (सवामं. बा. २६). श. १७१५ त ह्या बखरीची आणखी एक प्रत केली गेली. ह्याच प्रतीच्या आधारे रंगो लक्ष्मण व मल्हार रामराव ह्यांनी प्रत्यक्ष स्वामींनी सांगितलेली माहिती व अनेक कागदपत्र पाहून वरील बखरीचा श. १७३९ मध्ये विस्तार करावयास घेतला व चाफळ मुक्कामी श. १७४० मध्ये हे काम पूर्ण केले. ही बखर *हनुमंतस्वामींची बखर, श्रीसमर्थांची बखर, श्रीरामदासस्वामी समर्थांचे चरित्र* ह्या नावांनी प्रसिद्ध आहे. [ ⇨ ३. ]

**रचना :** मु. – रामदास स्वामींचे चरित्राची बखर; ले. हनुमंतस्वामी; मुंबई, १८७०; १८८८; १९१०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री.; बाडांक २५, २६; रासं., खं. १; धुळे, १९३३, पृ. ७६–७७.

**० रघु–१** – पहा रघुकवि.

**रघु–२** [का. अनु.] शाहीर.

**रचना :** अनु. – एक लावणी; अंधारातल्या लावण्या; केळकर य. न. (संपा.); पुणे, १९५६; पृ. २७०.

**रघु–३** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – तिरुमलराजपर ओवी; बोधपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रघुकवि** / ० रघु–१ / ० रघुवीर [इ. स. चे १८ वे शतक] कवी. ह्यांचे नाव राघो आप्पाजी कुळकर्णी. ह्यांनी चाफळनजीक माजगाव डेरवण येथे श. १६६४ / इ. स. १७४२ मध्ये *ब्रह्मोत्तरखंडा*ची रचना केली. ह्यात शिवमाहात्म्य वर्णन केले आहे. हा ग्रंथ म्हणजे श्रीधरी *शिवलीलामृता*ची वाढविलेली आवृत्तीच आहे.

**रचना :** अमु. – १. ब्रह्मोत्तरखंड; प्र. २५; समाप्ती श. १६६४; दुंदुभि, माघ वद्य चतोर्दशी शीवरात्री; भाइसमं. २. समर्थांची आरती; सवामं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, गो. का. : रघुकविकृत ब्रह्मोत्तरखंड; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २६–२८.

**रघु गोपाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रघुनाथ–१** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – संदेहहरण; त्रु. पो.; प्रत श. १७९९ (इ. स. १८७७); मसंमं., हवना., पृ. ६५.

**रघुनाथ–२** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. निजवैभव; वि. ल. भावे संग्रह. २. सोमवारकथा; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ८६.

**रघुनाथ–३** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – शुकाष्टक; अभंग १२; कासं. १०, क्र. ११९; पृ. ५०–५२.

**रघुनाथ–४** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. गजेंद्रोपाख्यानावर समश्लोकी टीका; २. पदे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रघुनाथ–५** [का. अनु.] समर्थसंप्रदायी कवी. परंपरा : समर्थ > वासुदेव > माधव > पुरुषोत्तम > भीम > रघुनाथ. वाईजवळील पसरणी ह्या गावी ह्यांचा मठ होता. ह्यांची समाधीही तेथेच आहे. ह्यांचे पणतू रंगनाथ ह्यांनी रघुनाथांचे *श्रीगुरुरघुनाथकथामृत* ह्या नावाचे चरित्र लिहिले आहे.

**रचना :** अमु. – १. गोपाळस्वामींचे चरित्र; २. पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रघुनाथ गणेश नवहस्त (नवाथे)** / ० रघुनाथ पंडितराय [इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] कवी व धर्मशास्त्रज्ञ. हे मूळ सातारा जिल्ह्यात राहणारे. वडील गणेशभट. उपनाव नवहस्त. गोत्र वासिष्ठ. हे रामदासांचे व चाफळच्या रघुनाथाचे उपासक होते. *प्रायश्चित्तकुतूहल* ग्रंथांच्या प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी हे 'अनंतदेवीय रघुनाथ विरचित' असा स्वत:चा उल्लेख करतात. म्हणजेच हे अनंतदेवांचे शिष्य. हे अनंतदेव मोठे विद्वान ग्रंथकार होते. त्यांचा *संस्कार-कौस्तुभ* असा प्रख्यात ग्रंथ आढळतो.

रघुनाथ नवहस्त हे रामदासस्वामींनी इ. स. १६४८ साली चाफळ येथे बांधलेल्या श्रीरघुपती मंदिराचे उपाध्याय व पुराणिक होते. ह्या कामगिरीकरिता श्रीशिवाजीमहाराजांनी त्यांना विळाशी गावी (शिराळे प्रांत) इनाम जमीनही दिली होती. रामदासस्वामींच्या निर्वाणानंतर ह्यांनी चाफळ येथील उपाध्येपण सोडले. आपल्या नावाची जमीन आपले जामात भैरवभट ह्यांच्या नावे करून उपाध्येपणही त्यांच्याकडे सोपवून हे काशीयात्रेस गेले. तेथून पुढे ते तंजावरास गेले.

तंजावरकर व्यंकोजीराजे (शिवाजीराजांचे सावत्र बंधू) ह्यांच्या पत्नी राणी दीपाबाई ह्यांच्या आश्रयास अनेक शास्त्री-पंडित व कवी होते. रघुनाथ नवहस्तही त्यांच्या आश्रयास जाऊन राहिले. ह्यांनी धर्मशास्त्राचे सखोल अध्ययन केले होते असे *प्रयोगरत्नभूषा* व *प्रायश्चित्तकुतूहल* ह्या ग्रंथांतील निवेदनास त्यांनी ज्या संस्कृत प्रमाणग्रंथांचा आधार घेतला त्यावरून दिसते. रामदासस्वामींनी त्यांची सर्वगामी बुद्धी पाहून त्यांस सर्वज्ञ असे म्हटले होते.

ह्यांनी अनेक संस्कृत ग्रंथ रचले. दीपांबिका राणीच्या सूचनेनुसा संस्कृत ग्रंथ समजण्यास कठीण म्हणून त्यांनी प्राकृतात (मराठीत) रचना केली. 'नरकवर्णन' ह्या भागवतांतर्गत प्रकरणात कवीने आपल्या संस्कृत-प्राकृत रचनेचा निर्देश केला आहे तो ह्याप्रमाणे : "पूर्वी केले ग्रंथ बहूत ॥ तयामाजी भोजनकुतूहल ॥ दुजे साहित्य कुतूहल ॥ चित्ररचनेसहिता निवल ॥ ५१ ॥ प्रायश्चितकुतूहल श्रौतस्मार्तपर केवल ॥ रचिलें प्रयोग, श्रोतानुष्ठान करावया ॥ ५२ ॥ जनार्दन महोदय आधीं ॥ आणि धर्मामृतमहोदधि रचिल्या ॥ जीर्ण निबंधीं विद्यमान अर्थ शोधुनिया ॥ ५३ ॥ ग्रंथ काशीमीमांसा . . ." अशी आपल्या संस्कृत ग्रंथाची माहिती दिल्यावर मराठी रचनेला सुरुवात कशी झाली ते कवी सांगतो : "सोडून संस्कृत परिपाटी ॥ धरिली प्राकृताची धाटी ॥ लोकोपकारासाठीं ॥ गोवर्धनोद्धरण रचियेलें ॥ ५७ ॥ मग दीपांबिकेच्या वचनें ॥ प्राकृत स्त्रीधर्म कथनें ॥ नरक विषय विवेचनें ॥ केली भागवतोक्तें ॥ ५८ ॥"

*नरकवर्णन* काव्याप्रमाणेच *पतिव्रताधर्म* ऊर्फ *पतिव्रतोपाख्यान* ह्या ओवीबद्ध प्रकरणाची रचनाही कवीने केली आहे.

संस्कृत रचनेपैकी *जनार्दनमहोदय* ग्रंथात प्रात:कृत्याद्यनुष्ठान, पूजन-

विधी इत्यादी विषय आले आहेत. रघुनाथ गणेश हे श्रौतस्मार्तादी संस्कृत वाङ्मयाच्या अनेक शाखांत पारंगत होते व त्यांच्या हातून अनेक उत्कृष्ट ग्रंथ निर्माण झाले आहेत.

*नलदमयंतीस्वयंवर*कर्ता तंजावरकर रघुनाथ पंडित व *श्रौतस्मार्तादी* ग्रंथाचा कर्ता रघुनाथ नवहस्त हे दोघे एक की भिन्न ह्याबाबत संशोधकांचे अद्यापि एकमत झालेले नाही.

**रचना : अमु. – मराठी –** १. गोवर्धनोद्धार / गोवर्धनवर्णन. २. नरकवर्णन; . ओ. सं. २००; तंसम. बा. ५७३. ३. स्त्रीधर्म / पतिव्रतामाहात्म्य; ओ. सं. १५०; तंसम. बा. ५७८. **संस्कृत –** १. काशीमीमांसा. २. जनार्दनमहोदय. ३. दशपूर्वमासप्रायश्चित / स्त्रीधर्मकथन. ४. धर्मामृतमहोदधि. ५. भोजनकुतूहल. ६. प्रयोगरत्नभूषा. ७. प्रायश्चितकुतूहल. ८. साहित्यकुतूहल. – रॉयल एशियाटिक सोसायटी; मुंबई; तंसम. ग्रंथसंग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पाटणकर, र. कृ. : नलोपाख्यानकर्ता शिवाजीचा प्रधान रघुनाथ पंडित चंदावरकर अथवा रघुनाथ गणेश नवहस्त; विज्ञावि., सप्टें. १९३१, पृ. ३३१. २. प्रियोळकर, अ. का. : रघुनाथ गणेश नवहस्त; विज्ञावि., जून १९३१, पृ. २२५–२२६. **इंग्रजी –** गोडे, पी. के. : १. रघुनाथ, ए प्रोटेज ऑफ क्वीन दीपाबाई ऑफ तंजोर ॲण्ड हिज वर्क्स; अ रेअर मॅन्युस्क्रिप्ट ऑफ जनार्दन महोदय बाय रघुनाथ गणेश नवहस्त. २. दि आयडेंटिफिकेशन ऑफ रघुनाथ, अ प्रोटेज ऑफ क्वीन दीपाबाई ऑफ तंजोर ॲण्ड हिज कॉन्टॅक्ट विथ सेंट रामदास – स्टडीज इन इंडियन लिटररी हिस्टरी, व्हॉ. २, मुंबई १९५४ (भारतीय विद्याभवन प्रका.).

**रघुनाथ दास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु. –** १. जन (जल) जसवंत चरित्र; संककासू., पृ. ८६. २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रघुनाथ दीक्षित बांधवकर** [का. अनु.] शाहीर. ह्यांच्या वेळी *सख्या* नामक विप्रलंभशृंगारिक काव्याचा लावणीसारखा प्रकार मध्यभारतात प्रचारात होता. ह्यांच्या अशा *सख्या* उपलब्ध आहेत. *मदनविलास* नावाचे ह्यांचे एक शृंगारिक काव्यही उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४४).

**रघुनाथदेव** [का. अनु.] पदकार. दौलतराव शिंद्यांच्या आग्रहानुसार ह्यांनी केलेले *मिताक्षरी*चे ओवीबद्ध भाषान्तर उपलब्ध आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४३).

**रघुनाथ नारायण हणमंते** – पहा परिशिष्ट.

**रघुनाथ पंडित** [इ. स. चे १७ वे शतक] पंडिती परंपरेतील कवी. तंजावर प्रांतात राहणारे. कर्नाटकांतील अरणी गावी राहणारे प्रसिद्ध कवी आनंदतनय ह्यांच्या मुलास ह्यांनी आपली मुलगी दिली होती. आनंदतनयांची कविता वाचून रघुनाथ पंडितांना काव्यरचना करण्याची स्फूर्ती झाली असावी, असे सांगण्यात येते. ह्यांच्या चरित्राविषयीची निर्णायक माहिती अद्यापही उपलब्ध झालेली नाही. ही व्यक्ती कोण ह्याविषयी गेल्या शतकभर अनेक विद्वानांनी अनेक तर्क लढविले व त्यांजकडून चर्चाही बरीच झाली. ह्या तर्कांपैकी काही तर्क पुढीलप्रमाणे : १. तो कारवार भागातील चंदावर ह्या गावचा सारस्वत ब्राह्मण असावा; २. शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकी पंडितराव (कोल्हापूर-सातारा येथील राजोपाध्ये घराण्याच्या पूर्वजांपैकी) असावा; ३. नवहस्त (नवाथे) ह्या उपनावाचा हा कऱ्हाडे ब्राह्मण असावा; ४. शिवाजीच्या पदरी असलेला रघुनाथ नारायण हणमंते हा तो असावा; ५. कुलाबा जिल्ह्यातील चौल ह्या गावच्या मनोहर कुळात जन्मलेला *वैद्यविलास*, *कविकौस्तुभ*, *छन्दोरत्नावली*, *चिकित्सामंजरी*, *नाडीज्ञानविधि* ही वैद्यक व साहित्यविषयक प्रकरणे संस्कृतात रचणारा जो रघुनाथ पंडित तो हा असावा. कवीच्या स्थळाबद्दल व काळाच्या अंदाजाबद्दल मात्र बहुतेकांचे एकमत आहे.

रघुनाथ पंडित ह्यांची *रामदासवर्णन*, *गजेंद्रमोक्ष*, *दमयंतीस्वयंवर* एवढीच रचना (मुद्रित) आज उपलब्ध आहे. *रामदासवर्णन* हे समर्थस्तुतिपर असे वसंततिलका वृत्तातील अकरा श्लोकांचे एक लहानसे कवन आहे. ह्या कवनावरून कवी रामदासांना आपले गुरू मानीत असे दिसते. त्यांचा त्यांस प्रत्यक्ष सहवासही मधून मधून घडला असावा असे त्यातील वर्णनावरून वाटते. काव्य ह्या दृष्टीने ह्यात विशेष उल्लेखण्यासारखे काही नाही. रामदासांना प्रत्यक्ष पाहिलेल्या व्यक्तीने केलेले वर्णन ह्या दृष्टीने मात्र ह्या कवनाला ऐतिहासिक महत्त्व आहे. त्याबरोबरच ह्या कवनातील गुरुविषयक प्रगाढ भक्ती, गुरूने रचलेल्या तत्त्वबोधात्मक कवितेबद्दल व निजबोधसुखासाठी निर्मिलेल्या *दासबोधा*बद्दल पंडितांना वाटणारा परम आनंद ह्याही गोष्टी नजरेस येतात.

रघुनाथ पंडितांनी ज्या समर्थ रामदासांना आपले गुरू मानले होते व जे त्यांच्या जीवनातील 'विसावा' बनले होते, त्यांनी कवित्वासंबंधी 'कवित्व असावें कीर्तिवाड । कवित्व असावें रम्य गोड । कवित्व असावें जाड । प्रतापविषई ॥ ३८ ॥ कवित्व असावें सोपें । कवित्व असावें अल्परूपें । कवित्व असावें सुळपें । चरणबंद ॥ ३९ ॥ मृदु मंजुळ कोमळ । भव्य अद्भुत विशाळ । गौल्य माधुर्य रसाळ । भक्तिरसें ॥ ४० ॥ अक्षरबंद पदबंद । नाना चातुर्य प्रबंद । नाना कौशल्यता छंदबंद । धाटी मुद्रा अनेक ॥ ४१ ॥' (*दासबोध*, द. १४, स. ४) असे आपले विचार व्यक्त केले आहेत. तेच रघुनाथ पंडितांनी कवनरचनेच्या वेळी आपल्या नजरेसमोर निश्चितपणे ठेवलेले दिसतात. *गजेंद्र-मोक्षा*ची रचना, हे विचार बाळगूनच, त्यांनी केलेली आहे.

*गजेंद्र-मोक्ष* हे ५८ श्लोक व ३ पदे असलेले एक लहानसे आख्यानक काव्य आहे. *श्रीमद्भागवता*तील गजेंद्र-मोक्षाच्या कथाप्रसंगाच्या आधारे ते रचले आहे. ह्या कथाप्रसंगावर रघुनाथ पंडितांपूर्वी वामन पंडितांनीही द्वादश श्लोकांचे एक छोटेसे कवन रचलेले आहे. पण त्यात काव्यात्मकतेपेक्षा संकटग्रस्त माणसाने श्रद्धापूर्ण अंतःकरणाने हरीला हाक मारली असता तो त्याच्याकडे धावत येऊन त्याला मुक्त करतो हा बोध मनावर ठसविण्याचा त्यांचा प्रधान हेतू दिसतो. रघुनाथ पंडित वामन पंडितांप्रमाणे उपदेशकाची भूमिका घेत नाहीत. ते खऱ्या कवीची भूमिका घेतात. ते त्यात जितकी काव्यात्मकता व नाट्यात्मकता आणता येईल तेवढी आणण्याचा प्रयत्न करताना दिसतात. हे काव्य वाचीत असता मोठ्या जनसमुदायापुढे कीर्तन करणाऱ्या हरिदासाला ह्या प्रसंगावरील आपले आख्यान रंगदार व रसपूर्ण करण्यास ते साहाय्यक व्हावे असा हेतू मनात धरून ते रचले असावे, असे वाटू लागते. रघुनाथ पंडितांनी 'प्राणविसाव्या रामा येसील कधीं', 'घोर रे उपेक्षा माझी आदरिली काय मुकुंदा', 'श्रीहर धरणिवरी देखिला' ही गजेंद्राच्या तोंडी आर्ततेने भारलेली हृदय हलवून सोडणारी जी पदे घातलेली आहेत, ती ह्या तर्कास पुष्टी देणारी आहेत. रघुनाथ पंडितांनी ज्या काळात ही रचना केली तो काळ कीर्तनसंस्थेच्या ऐन लोकप्रियतेचा होता.

वामन पंडितांसारख्या व्युत्पन्न व साहित्यशास्त्रनिपुण प्रतिभासंपन्न कवीने " संस्कृतांतील मोठमोठीं गणवृत्तें प्रचारांत आणून त्यांत निरनिराळ्या पौराणिक विषयांवर सुरस काव्यरचना केली होती. संस्कृतांतील महाकाव्यांचा थाट मराठींत उतरून देऊन जनमनोरंजनाचें व कीर्तनास रंग आणण्याचें सुंदर साहित्य निर्माण केलें होतें. " त्याचा उपयोग करून कीर्तनकार कीर्तनांत रमणीयत्व व वैचित्र्य आणण्याचा प्रयत्न करू लागले होते. त्यामुळे आबालवृद्ध त्यांजकडे फार मोठ्या संख्येने आकर्षित होऊ लागले होते. कीर्तनांत गायिली जाणारी निरनिराळ्या वृत्तांतील कवने व विविध रागांतील पदे घरोघरी गायिली जाऊ लागली होती. लेखनकला अवगत असलेले लोक ती लिहून घेऊन, किंवा मेहनताना देऊन लेखकांकडून लिहून घेण्याचे सामर्थ्य असलेले लोक

ती लिहवून घेऊन, आपापल्या संग्रही ठेवू लागले होते. ते पाहून, छापखान्यासारखे साहित्यप्रसाराचे साधन नसलेल्या त्या काळात, कवींना आपल्या कवितेच्या प्रसारार्थ कीर्तनासारख्या साधनाचे साह्य घेणेच प्राप्त होते. रघुनाथ पंडितांनी ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन *गजेंद्र-मोक्ष* काव्याची रचना केली असावी. [➪ ३.] त्यांचे गुरू रामदास हे तर कीर्तनसंस्थेचे फार मोठे अभिमानी होते. इतकेच काय पण ते स्वतः एक प्रभावशाली कीर्तनकार होते. कीर्तनात गावयास उपयोगी पडतील अशी सातआठशे पदे त्यांनी रचिली आहेत. त्यांना गाण्याचे अप्रतिम अंग होते. 'धन्य ती गायनी कळा' असे त्यांनी एके ठिकाणी उद्गारही काढले आहेत. आपल्या शिष्यांनाही ते अंग असावे व त्यांनी 'बंदप्रबंदें बहुविध छंदें । कीर्तनघमडि करावी ॥' असे ते अपेक्षित असत. रघुनाथ पंडितांसारख्या त्यांच्या निष्ठावंत शिष्याने त्यांच्या ह्या अपेक्षेनुसार कवितालेखन व कीर्तन केले असल्यास ते यथोचितच होते.

*गजेंद्र-मोक्षा*नंतर रघुनाथ पंडितांनी रचलेले काव्य *दमयंतीस्वयंवर*. श्रीहर्ष ह्या कवीच्या, संस्कृत पंचमहाकाव्यांत मोडणाऱ्या, *नैषधचरिता*च्या आधारे रचलेले पण अनेक दृष्टींनी स्वतंत्र असे हे काव्य आहे. ह्या काव्यात मुळातली *नैषधीयचरित्रा*ची विस्तृत कथा २५४ श्लोक-पदांच्या आटोपशीर मर्यादेत आणली आहे. ह्या संक्षेपात पंडितांची मुख्य कथेवरची पकड दिसून येते. त्याचप्रमाणे त्यांची अभिजात रसिकताही. विप्रलंभशृंगाराचा मनोरम आविष्कार मोठ्या कौशल्याने कवीने केला आहे. ह्या काव्यातील नलदमयंतीच्या प्रेमकहाणीत मध्यस्थी करणाऱ्या हंसाची व्यक्तिरेखा हा कविप्रतिभेचा अपूर्व विलास आहे. काव्यात योजलेल्या संवादात मार्मिकता आहे. मराठीतील हे एक सर्वोत्कृष्ट खंडकाव्य आहे. [➪ ३.]

वामन पंडितांनी मराठीत भावुक रसरम्य अशा आख्यानक कवितेचा नमुना निर्माण करून जो एक नवीन टप्पा गाठला होता, त्याच्या पुढे जाऊन कल्पनारम्य कलाविलासाने समृद्ध अशा एका आख्यानक काव्याची निर्मिती करून रघुनाथ पंडितांनी त्याच्या पुढचा एक अभिमानास्पद टप्पा गाठला. त्यांच्या *दमयंतीस्वयंवर* ह्या काव्याने मराठी काव्याच्या वैभवात डोळे दिपवून टाकणारी अशी भर घातली, व मराठी कवितेला एक थोर प्रतिष्ठा प्राप्त करून दिली.

**रचना : मु.** –१. रघुनाथ पंडित विरचित दमयंतीस्वयंवर, श्लो. सं. २५४; संपा. प्रियोळकर, अ. का.; मुंबई, १९३५, १९५९; विवेचक प्रस्ता.; सेजविक, लिओनार्ड प्रत, केंब्रिज, १९१२. २. रघुनाथ पंडितांचे काव्यग्रंथ : नलदमयंतीस्वयंवराख्यान, रामदासवर्णन, गजेंद्रमोक्ष; संपा. बापट, ह. त्रिं., पुणे, १९०९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कात्रे, स. ल. : दमयंतीस्वयंवरकार रघुनाथ पंडित; सह्याद्रि, जुलै १९५१. २. कानिटकर, प्र. धों. : दमयंतीस्वयंवरकार रघुनाथ पंडित व नैषध काव्य; विज्ञावि., १९३३; पृ. २१७–२२१. ३. पटवर्धन, मा. त्रिं. : रघुनाथ पंडिताची भाषाशुद्धि व पाठसंशोधन; (नवे) लोशि., १९३२. ४. प्रियोळकर, अ. का. : नलोपाख्यानाचा कर्ता शिवाजी प्रधान (चर्चा); विज्ञावि., मार्च–एप्रि. १९३१, पृ. १३३–१५०; डिसें. १९३१, पृ. ४५७; पाटणकर, र. कृ. : सप्टें. १९३१, पृ. ३३०–३३६; वर्दे, श्री. म. : एप्रि. १९३३, पृ. १११–१२३; मे १९३३, पृ. २५०–२७०; शणै गोंयबाब : फेब्रु. १९३३, पृ. ५७–७०; जुलै १९३१, पृ. २६५–२७५. ५. प्रियोळकर, अ. का. : रघुनाथ पंडित विरचित दमयंतीस्वयंवराच्या भाषेवर रामकवींनें पाडलेला प्रकाश; मसंप., एप्रि. १९६३, पृ. २५. ६. राजोपाध्ये, गो. रा., कात्रे, स. ल., फफे, य. ग. : नलदमयंतीस्वयंवराचा कर्ता कोण? ; सह्याद्रि, एप्रि. १९५२, पृ. १९२–१९६. ७. राजोपाध्ये, गो. रा. : पुस्तिका : पुनः एकदा रघुनाथ पंडित. ८. राजोपाध्ये, गो. रा. : रघुनाथ पंडित : व्यक्ति व काल; (नवे) लोशि.; एप्रि. १९३६.

**० रघुनाथ पंडितराय** – पहा **रघुनाथ गणेश नवहस्त (नवाथे).**

**रघुनाथपंत कावळे** [अंदाजे इ. स. १४७८]. बखरकार. *माहिकावतीची ऊर्फ माहीमची बखर* ा ग्रंथातील सहाव्या प्रकरणाचे कर्ते म्हणून आबाजी नायक व रघुनाथपंत कावळे ह्या दोघांचा निर्देश वि. का. राजवाडे करतात. हे प्रकरण 'वंशावळि'चे असून त्याचा काल श. १४००/इ. स. १४७८ चा सुमार असावा, असाही तर्क राजवाडे ह्यांनी केला आहे. – वि. का. राजवाडे (संपा.); प्रस्ता., *महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर*; पुणे, १९२४.

**रघुनाथपंत कोशे** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. संपूर्ण नाव रघुनाथ गणेश कोशे. राहणार पुण्याजवळ बारामती येथे. मोरोपंतांनी आपल्या *नामरसायनात* ह्यांचा उल्लेख केला आहे : "रघुनाथपंत कोशे संप्रति गेले समीप सेवेला । प्रेमें सिंचित होते या कवना ते सखे जसे वेला ॥" रघुनाथपंतांच्या कवितेचे एक बाड उपलब्ध आहे (मसा., आ. ५, पृ. ५२८).

**रघुनाथ पाथरू** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] शाहीर. अच्युताश्रमांचे शिष्य. मराठवाड्याच्या आंबडगोंदी परिसरातील रामानंदस्वामींचे शिष्य अच्युताश्रम ह्यांचा पोवाडा कवीने रचला आहे. त्याची सुरुवात 'अंबापुरचे श्रीस्वामी अच्युत दयेक्षमेचे तरू' अशी आहे. बालपणापासूनच हे विरागी होते. वेदान्ताचा अभ्यास करूनही ह्यांनी भक्तिमार्गाचाच उपदेश लोकांना केला, अशी त्यांची माहिती ह्या पोवाड्यात दिलेली आढळते. 'त्याचे मठी पायरी कृपेची रघुनाथ पाथरू' असा कविनामनिर्देश शेवटच्या ओळीत येतो. ह्यावरून पाथरू हा अच्युताश्रमांच्या शिष्यांपैकी एक असावा असे स्पष्ट होते. प्रस्तुत पोवाडा *श्रीस्वामीरामानंदविरचित संपादण्या* ह्या संग्रहात (औरंगाबाद, १९६३) समाविष्ट करण्यात आला आहे (परिशिष्ट क्र. २).

**रघुनाथ यादव चित्रे** / ० चित्रगुप्त [इ. स. चे १८ वे शतक] बखरकार. शिवाजीराजांचे चिटणीस बाळाजी आवजी ह्यांच्या दोन बंधूंपैकी एकाचे रघुनाथ यादव चित्रे हे वंशज होते. चित्रगुप्त हे त्यांनी घेतलेले टोपणनाव आहे. कोल्हापूर येथील थोरल्या राजाराममहाराजांचे पुत्र संभाजीराजे ह्यांच्या दरबारी हे होते. वयाच्या बाराव्या वर्षापासून पुढे चाळीस वर्षे रघुनाथ यादवांनी चिटणिसाचे काम केले. इ. स. १७०८ च्या सुमारास ह्यांचा जन्म झाला असावा व १७२० च्या सुमारास त्यांनी चिटणिशी करण्यास सुरुवात केली असावी. इ. स. १७६० मध्ये संभाजीराजे वारल्यानंतर रघुनाथ यादवांची चिटणिशी जाऊन त्यांना देशोदेशी भटकावे लागले. चिकोडी व मनोली ह्या भागात हिंडता हिंडता शाहूराजांच्या प्रांतात दंगा करणाऱ्या यशवंतराव शिंद्यांचा रघुनाथ यादवांस आश्रय मिळाला. त्यांच्या पदरी असतानाच ह्यांनी *शिवाजीमहाराजांची बखर* हा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ १७६० पासून १७७० पर्यंतच्या काळात लिहिण्यात आला असावा, असा संशोधकांचा अंदाज आहे. चित्रगुप्त आपल्या लेखनास *शिवाजीमहाराज छत्रपती जनेश्वर ह्यांचे चरित्र – शिव-आख्यान* असे म्हणतो. *चित्रगुप्ताची बखर* असेही ह्या बखरीचे एक नाव प्रसिद्ध आहे.

ही बखर म्हणजे कृष्णाजी अनंत सभासदाच्या बखरीचा विस्तार होय. प्रसंगी त्यात बखरकाराने काव्याचा भागही स्वतः तयार करून घातला आहे. बखरकार हा माहीतगार असल्याने प्रस्तुत बखर *सभासदाच्या बखरी*इतकीच विश्वसनीय समजणे इष्ट होईल. [➪ ३.]

द. ग. गोडसे

**रचना : मु.** – शिवाजी महाराजांची बखर; र. श. १६८३ / इ. स. १७४९ नंतर; र. स्थ : तोरगल-चिकोडी; काइसं., क्र. ८; १८८२; फेब्रु. १८८८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हेरवाडकर, र. वि. : चित्रगुप्ताची बखर /

शिवाजी महाराजांची बखर; मब.; पुणे, १९७५ (द्विआ.); पृ. ४६, १०१–१०३.

**रघुनाथशास्त्री दात्ये** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार. *शालिवाहन चरित्र* ह्या मुद्रित ग्रंथाचा कर्ता (र. का. : इ. स. १८४०). सदर ग्रंथाच्या कर्त्याने दिलेल्या माहितीप्रमाणे प्रस्तुत चरित्र, शालिवाहनाच्या इतिहासाचे जे पुस्तक पैठणास मिळाले व ज्या जुन्या बखरीही पाहण्यात आल्या त्यांवरून तयार केले आहे. शालिवाहनाची एक हस्तलिखित बखर (मोडी प्रत) उपलब्ध आहे. ही सर्वांत जुनी मराठी बखर असे वि. का. राजवाडे मानतात. ह्या बखरीची महादाजी विठ्ठलकृत प्रत पैठण येथे उपलब्ध झाली. ही हस्तलिखित बखर शालिवाहन चरित्र ग्रंथाचे मूळ असावे असे ग्रंथकर्त्याच्या म्हणण्यावरून वाटते.

हस्तलिखित प्रत व मुद्रित चरित्र ह्यांतील अनेक प्रसंग आणि व्यक्ती ह्यांत फरक आढळतो. कथेचे मूख्य सूत्र मात्र एकच आहे. बखर पौराणिक पद्धतीने लिहिली असल्याने तिच्यात अद्भुताचा भाग बराच दिसून येतो. शालिवाहनाविषयी अनेक असंभाव्य दंतकथा दिलेल्या आहेत. शालिवाहनाचे पैठणास वास्तव्य आणि त्याच्या नावे सुरू झालेला शक ह्या दोनच गोष्टी ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या आहेत. बखरीत शालिवाहनाची कथा मात्र रसाळपणे निवेदिली आहे.

**रचना : अमु.** – शालिवाहन चरित्र; र. का. : इ. स. १८४०; मुंबई, १८४०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हेरवाडकर, र. वि.; शालिवाहनाची बखर; मब.; पुणे, १९७५ (द्विआ.); पृ. ३९, ८५–८७.

**रघुनाथ (शिवात्मज)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – वैदेहीत्रिजटासंवाद; श्लो. सं. ११५; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रघुनाथ शेणवी** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. हे मूळचे सासष्टी (गोवा) येथील कौशिकगोत्री सारस्वत ब्राह्मण. पर्यटन करता करता गोमंतकातील तत्कालीन परिस्थितीने वेध घेतल्याने स्वयंस्फूर्तीने ह्यांनी *कोकणाख्यान* ह्या काव्यग्रंथास जन्म दिला. इ. स. १७१४ त स्मार्तवैष्णव व त्यांतील पोटभेद प्रकरणी जी चळवळ सुरू झाली तिला इ. स. १७२१ त विशेष जोर चढला. त्या सुमारास हे *कोकणाख्यान* काव्य रचले गेले. प्रारंभी ह्यांनी काही स्फुट रचनाही केली असावी.

**रचना : मु.** – कोकणाख्यान ऊर्फ 'दाक्षिणात्यसारस्वतब्राह्मणाख्यान'; पूर्वार्ध, अ. ८; उत्तरार्ध, अ. ८; एकूण अ. १६; र. श. : १६४३; र. स्थ. : शिवपूर (शिरोडे); संपा. नायक, रा. वा., करंडे शास्त्री; मुंबई, १९०९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नायक, ना. भा. : रघुनाथ शेणवी; गोमका.; रिवण (गोवा), १९६९; पृ. १९–२०.

**रघुनाथ शेष / ० रघुपति शेष / ० शेष रघुपति / ० शेष राघव** [इ. स. चे सतरावे शतक] कवी. उपनाव शेष. सुप्रसिद्ध कवी वामन पंडितांचे हे पुत्र. ह्यांचे घराणे नांदेडचे. महिपतींच्या *भक्तविजयात* ह्यांचा जो उल्लेख आला आहे, त्यावरून हे विद्वान पंडित होते व पेशाने कीर्तनकार होते, असे समजते.

ह्यांनी लिहिलेले *कृष्णकौतुक* हे काव्य उपलब्ध आहे. ग्रंथ संपूर्णपणे वामनी काव्याची प्रतिकृती आहे. हे काव्य *भागवताच्या दशमस्कंधा*च्या आधारे लिहिले आहे. ह्या काव्याच्या नांदेड, औंध व नागपूर ह्या ठिकाणी तीन हस्तलिखित प्रती उपलब्ध आहेत. ह्यांपैकी नांदेड व औंध ह्या दोन प्रतींत आदि-अंत नाही. प्रस्तुत त्रुटित काव्याचे संपादन ह्या दोन प्रतींच आधारास घेऊन वि. अं. कानोले ह्यांनी केले आहे. नागपूर (विद्यापीठ ग्रंथालय) प्रतीत आरंभीचे १ ल्या सर्गातील १ ते ४६ श्लोक, १० वा सर्ग संपूर्ण (श्लो. सं. १३०) व ११ व्या सर्गातील १३ श्लोक नव्याने उपलब्ध झाले आहेत. त्यामुळे आता ह्या काव्याची उपलब्ध श्लोकसंख्या ११३८ झाली आहे. समग्र काव्याची श्लोकसंख्या किती आहे, हे नक्की सांगता येत नाही.

तंत्राच्या दृष्टीने पाहता प्रस्तुत काव्याला 'महाकाव्य' म्हणता येईल. कवीही स्वतःचा उल्लेख 'कवीश्वर', 'कवींद्र वाग्विलासी' असा करतो आणि आपल्या रचनेस 'महाकाव्य' असे म्हणतो (सर्ग २, ५, ८).

*कृष्णकौतुका*च्या उपलब्ध सर्गांत भागवताच्या दशमस्कंधातील ९० अध्यायांपैकी ६६ अध्यायांतील कथानक संक्षेपाने आणले आहे. शकटभंग व तृणावर्तउद्धार येथून कथानक सुरू होते व बळरामाचे गोकुळात आगमन, काशीराजाचा कृष्णाने केलेला वध येथपर्यंतचे वर्णन त्यात येते. बालक्रीडेत व रासक्रीडेत त्या मानाने कवीने अधिक विस्तार केला आहे व आपल्या मनाने काही नवीन प्रसंगही घातले आहेत. ह्यांची वर्णनशैली कवी वामनासारखीच आहे. त्यामुळे विविध वृत्ते, अनुप्रास, यमकप्राचुर्य, शृंगारिक वर्णने इ. विशेष ह्या काव्यात आढळतात. हा एक नमुना पहा : "ज्या हाती लकुटी विशाल भ्रुकटी जो पातकाते कुटी । कासे पीतपटी स्वये अकपटी दैत्याशि जाता पटी ॥ कालिंदी निकटी उभा निजकटी जो ध्याइजे संकटी । त्याते नेत्रपुटी धरा पुरपटी होऊ नका हिंपुटी ॥" कवीची प्रसंगवर्णने ठसठशीत आहेत. उदा., कालिया दमनाच्या प्रसंगाचे वर्णन. कवीची कृष्णभक्ती काव्यातून ठिकठिकाणी प्रकट होते. 'मज हरिख हरिचे गोमटे गुण गाता ।' ही भावना काव्यरचनेमागे आहे. पंडितकवींच्या परंपरेतच ह्या कवीचे स्थान आहे. ह्यांची काही स्फुटरचनाही उपलब्ध आहे. ह्यांनी श्रीहर्षाच्या *नैषधकाव्या*ची नकललेली एक प्रत उपलब्ध आहे.

**रचना : मु.** – १. कृष्णकौतुक (भागवताच्या दशमस्कंधान्तर्गत) : १ ल्या सर्गाच्या ५२ व्या श्लोकापासून १० व्या सर्गाच्या ९१ व्या श्लोकापर्यंत (पैकी सर्ग २, श्लो. ५ ते १६ गहाळ); ग्रं. सं. १०१९; संपा. कानोले, वि. अं.; गोदातीर संशोधन मंडळ प्रकाशन; नांदेड, १९६५. **अमु.** – स्फुट पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कानोले, वि. अं. : प्रस्ता., कृष्णकौतुक; नांदेड, १९६५; पृ. १–१९. २. प्रभुदेसाई, वि. बा. : श्रीकृष्णकौतुक काव्यावर नवा प्रकाश; विसमंवा., नागपूर, १९६९; पृ. १४६–१५९.

**रघुनाथसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रघुनाथसुत गोपाळ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – कपिलगीता; भाइसमं. हस्त. सू., पृ. ५४.

**रघुनाथसुत त्र्यंबक** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – वियोग-विरह; श्लोकबद्ध; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रघुनाथांकित** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रघुनायक पंडित** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रघुपतिबावा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रघुपति महाराज** [इ. स. १७८५ – समा. इ. स. १८३४] कवी. हे मूळचे पुणतांबे (जि. अहमदनगर) येथील रहिवासी. पित्याचे नाव हरिशास्त्री व मातेचे नाव रुक्मिणीबाई. हे दोन वर्षांचे असतानाच ह्यांच्या वडिलांचे निधन झाले. योग्य समयी ह्यांचा विवाह झाला. ह्यांच्या

पत्नीचे नाव अंबाबाई. तिच्यापासून ह्यांना सतरा अपत्ये झाली. पण त्यांपैकी एकही जगले नाही. थोड्या दिवसांनी पत्नीही वारली. त्यामुळे रघुनाथ अगदीच विरक्त झाले व आपला काळ कीर्तन-भजनात घालवू लागले. बडोदासंस्थानाधिपती फत्तेसिंहराव ह्यांच्या पत्नी आनंदीबाई ह्यांच्या आग्रहावरून हे बडोद्यास कायमचे स्थायिक झाले. ह्याच वेळी कोल्हापूरचे सिद्धपुरुष नारायण महाराज हे बडोद्यास आले असता त्यांनी रघुपतींना तांडवमूर्ती (बाप्पाजी), वीणा, माळ व झोळी प्रसाद म्हणून दिली.

बाप्पाजींना आळविण्यासाठी रघुपति महाराजांनी भक्तिपर पदांची रचना केली. ह्यांनी एका पदात आपली गुरुपरंपरा दिली आहे ती अशी : 'आदिनारायण गुरु कृष्ण परब्रह्म। तयासी प्रणाम असो माझे ॥ ब्रह्मा, नारद, व्यास, शुक, मच्छनाथ। तया प्रणिपात असो माझे ॥ अमृत, सिद्ध, महाराज नारायण। तयासी नमन असो माझे ॥' रघुपति महाराजांनी आपल्या संस्थानची जबाबदारी आपला शिष्य विष्णुदास ह्याजवर सोपवून श. १७५६ च्या चैत्र शुद्ध षष्ठीस समाधी घेतली.

रघुपति महाराजांच्या नावावर मुख्यतः पदरचनाच आढळते. ही पदे रसाळ व प्रासादिक आहेत.

**रचना : मु.** – ९ पदे; संपा. आजगांवकर, ज. र.; मचक., खं. ४; मुंबई, १९१६; पृ. १३३–१३८. **अमु.** – पदपदांतरे; गो. स. सरदेसाई ह्यांचा संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र; रघुपति महाराज; मकच., खं. ४; मुंबई, १९१६; पृ. ११९–१३८.

**० रघुपति शेष** – पहा **रघुनाथ शेष.**

**रघुराज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० रघुवीर** – पहा **रघुकवि.**

**रघुवीरस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बोधपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रघुसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बोधपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रघोजी निंबाळकर** [अंदाजे इ. स. १६८९] कवी.

**रचना : अमु.** – संदेहहरण; र. श. १६११, प्रमोदनाम संवत्सर, आश्विन शु. १०, गुरुवार (इ. स. १६८९); नक्कल : देशलेखक त्र्यंबकसुत भानजी, श. १७९३, प्रजापति, आषाढ व. ६, शनिवार; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ३०५.

**रघोत्तम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बाळक्रीडेचे श्लोक; अपूर्ण; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रतनसा** [इ. स. १७६९ – ?] जैन कवी. सेनगणपरंपरेतील सिद्धसेन ह्यांचे हे शिष्य. ह्यांनी सिद्धसेनांवर एक दहा कडव्यांची आरती रचली आहे. सिद्धसेन करवीर-कोल्हापूरहून कारंजा (विदर्भ) येथे भट्टारक म्हणून गेले असा इतिहास ह्या आरतीत सांगितला आहे. आरतीची काही कडवी विवेचनाच्या ओघात डॉ. अक्कोळे ह्यांनी छापली आहेत (प्रामजैसा., पृ. ९१).

**० रत्नक** – पहा **रत्नसा.**

**रत्नकीर्ती** [इ. स. १८१३] जैन कवी. विदर्भाकडील राहणारे. भट्टारक सिद्धसेन हे ह्यांचे गुरू. आचार्य सकलभूषणकृत *उपदेशरत्नमाला* किंवा *षट्कर्मोपदेश रत्नमाला* (रचना : संवत १६२७) ह्या संस्कृत ग्रंथाचा रत्नकीर्तींनी मराठीत विस्तृत अनुवाद केला आहे. श्रावकाच्या देवपूजा, गुरूपास्ती, स्वाध्याय, संयम, तप, दान या षट्कर्मांचे वर्णन ह्या ग्रंथात आले आहे. स्वतःचा उल्लेख हे 'आचार्य रत्नाकर' असा करतात. ह्यावरून ह्यांचा अधिकार मोठा असावा हे सिद्ध होते.

**रचना : मु.** – उपदेशरत्नमाला; श्लोकबद्ध; अ. ३०; र. का. : श. १७३४ [चैत्र शु. ९, शुक्रवार]; र. स्थ. : आदिनाथ मंदिर; अमरावती; प्रामजैसा., पृ. २९५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. १००–१०१.

**रत्नराव** [का. अनु.] शाहीर. ह्याने *सोलापूरच्या लढाईचा पोवाडा* रचला आहे. १४ मे १८१८ रोजी इंग्रजांनी सोलापूरचा किल्ला जिंकला, त्याची हकीकत ह्या पोवाड्यात दिली आहे. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड २* मध्ये संग्रहित (पृ. १३४–१३७).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. (संपा.); सोलापूरच्या लढाईचा पोवाडा; ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. २; पुणे, १९४४; पृ. ११८–१३३.

**रत्नसा / ० रत्नक** [इ. स. १६८८ – ?] जैन कवी. मूळचे देऊळगावचे राहणारे. जातीने बघेरवाल व साहुलगोत्रीय. पित्याचे नाव अर्जुनसा व व आईचे येसाई. रत्नसा हे सेनगणपरंपरेतील होते. त्यांच्या वेळी कारंजा येथील पीठावर सेनगणभट्टारक जिनसेन हे होते.

दयाभूषण कवींचा अपूर्ण ग्रंथ *जंबूस्वामीचरित्र* रत्नसांनी पूर्ण केला. ह्या ग्रंथाचे १४ ते २४ असे दहा अधिकार (अध्याय) ह्यांनी लिहिले. ग्रंथाच्या इतर अधिकारांतही त्यांनी बदल केले. ग्रंथलेखक म्हणण्यापेक्षा पोथीलेखक म्हणून हे विशेष प्रसिद्ध असले पाहिजेत. ह्यांच्या हातच्या 'जिंतूर पोथी' (जिंतूर हस्त., क्र. १) व 'हिंगोली गुलाबसावजी पोथी' (हिंगोली हस्त., क्र. २) अशा दोन पोथ्या उपलब्ध आहेत. ह्या पोथ्यांत जैन-काव्यग्रंथ एकत्रित केले आहेत. पोथ्यांचे लेखन सुंदर तऱ्हेने केलेले असून प्रत्येक ग्रंथास पुष्पिका देऊन शकाचा निर्देश केला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : रत्नसा / रत्नक; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ६१, ६७.

**रत्नाकर–१** [ ? – समा. श. १६४१, आश्विन व. १३ / इ. स. १७१९]. ग्रंथकार. राहणारे गिरिजानदीच्या तीरी चंडीपूर गावी (ता. कळवण; जि. नाशिक). हे भार्गवगोत्री, यजुर्वेदी ब्राह्मण. उपनाव सदावर्ते. वडिलांचे नाव हरिहर. आईचे नाव अजुबाई. पत्नी सावित्री. गुरुपरंपरा अशी : मुक्ताबाई > चांगदेव > विमलानंद > जनकानंद > नृसिंहानंद > पुरुषोत्तम > मुक्तानंद > एकानंद > सिद्धानंद > रामानंद > रत्नाकर (*दीपरत्नाकर*, अ. ४). हे गृहस्थाश्रमी असून ह्यांनी प्रथम यवनांच्या पदरी शेकदारी, अमीनी वगैरे अधिकाराच्या नोकऱ्या केल्या. संवत १७६० सुभानु संवत्सर आषाढ वद्य ११ स ह्यांना रामानंदांनी उपदेश दिला. त्यानंतर ह्यांनी तीर्थाटन केले. कळवण येथे ह्यांच्या परंपरेतील मठ असून स्वामींची शिष्यपरंपरा जळगाव–धुळे येथे, गुजरातच्या मध्यवर्ती भागात व काही नाशिक जिल्ह्यात आढळते. श. १६४१ (इ. स. १६१९) आश्विन वद्य त्रयोदशीस ह्यांनी देह ठेवला. ह्यांची समाधी धुळे जिल्ह्यात पिंपळनेराजवळील पानखेडे येथे आहे.

रत्नाकरांचे अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत. ह्यांनी काही ग्रंथ आपल्या शिष्यांसाठी गुजराती भाषेतही केले आहेत. मराठीतील उपलब्ध महत्त्वाचे ग्रंथ पुढीलप्रमाणे : १. *दीपरत्नाकर*, २. *सिद्धान्तरत्नाकर*, ३. *वैराग्यरत्नाकर*, ४. *उपदेशरत्नाकर*, ५. *ज्ञानरत्नाकर*, ६. *भागवत*, ७. *समश्लोकी भगवद्गीता*, ८. *भिक्षुगीत* इत्यादी. ह्याशिवाय ह्यांची अभंग, पदे वगैरे स्फुट रचनाही बरीच आहे. ह्यांची एकंदर कविता सुमारे ४०,००० ओव्यांएवढी होईल. ह्यांचा गुजरातीत रचलेला *भागवत* ग्रंथ महत्त्वाचा असून *प्रकाशरत्नाकर* हा ग्रंथ त्यांनी ब्रिज भाषेत केला आहे.

ह्या रचनेपैकी *दीपरत्नाकर* व *उपदेशरत्नाकर* हे दोन ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. *दीपरत्नाकर* हा ग्रंथ वेदान्तपर असून त्याची मांडणी

दासबोधाच्या धर्तीवर केलेली दिसते. गुरू रामानंदस्वामी रत्नाकरांच्या प्रश्नांना उत्तरे देत आहेत अशी कल्पना करून ग्रंथाची रचना केलेली आहे. *दीपरत्नाकर* ग्रंथ रामानंदांचा आहे असे मत कृ. वा. पुरंदरे ह्यांनी आपल्या एका लेखात मांडले होते. (रामानंदाचा *दीपरत्नाकर*; भाइसंमंत्रै., व. २१, अं. २, पृ. ४७–४८). परंतु प्रस्तुत ग्रंथ हा रामानंदांचा नसून रत्नाकरांचाच आहे हे द. वा. पोतदारांनी निदर्शनास आणून दिले आहे ('दीपरत्नाकर रत्नाकराचाच – रामानंदाचा नव्हे!' भाइसंमंत्रै., व. २२, अं. २, पृ. ७२–७४).

प्रस्तुत ग्रंथात विषय समजावून सांगण्यासाठी सोपे दृष्टान्त योजले आहेत. अनुभवावाचून शाब्दिक ज्ञान व्यर्थ आहे, गुरुकृपेविना खरा ब्रह्मानुभव प्राप्त होणे शक्य नाही; ह्याचे विवरण करताना "स्वयें ब्रह्माची आहेती। नित्य ब्रह्मामाजीच असती। जैसे पक्षी गगनीच उडती। परी ते नेणती गगनाते॥" असा दृष्टान्त दिला आहे.

ह्यांची बहुतेक सर्व कविता अध्यात्मपर आहे. ग्रंथाची भाषा सोपी व सुबोध आहे. दृष्टान्त देण्याची हातोटीही चांगली आहे. ग्रंथरचनेवरून ह्यांचा पारमार्थिक अधिकार मोठा होता हे जाणवल्यावाचून राहात नाही.

**रचना : मु.** – १. उपदेशरत्नाकर; स्फुट प्रकरणे, भा. १, भाइसंमं. प्रका.; २. दीपरत्नाकर; अ. १५; ओ. सं. ३३७०; र. स्थ. : पानखेडे (जि. धुळे, ता. साक्री) येथे गुरू रामानंदांच्या समाधीसमीप; मुंबई, १८८५; द्विआ., मुंबई, १९२९; ३. समओवी भगवद्गीता; र. का. : श. १६२१ (इ. स. १६९९); श्रीमद्भगवद्गीता भा. १, अ. १ (अनेक संतकवींनी गीतेवर केलेल्या टीकांचा संग्रह); संपा. आजगावकर, आंबेवाडी, नाईक; बेळगाव, १९३१ ह्या ग्रंथात अंतर्भूत. **अमु.** – १. ॐकारवर्णन; २. अनुभवरत्नाकर; ३. अरळ; ४. अविचारपंचविशी; ५. एकादशीव्रतकथा; ६. गुरुपरंपरा; ७. जातरत्नाकर; ८. दळणाच्या ओव्या; ९. नमस्काराष्टक; १०. नामकरण; ११. निर्णयरत्नाकर; १२. निरंजनाष्टक; १३. निवृत्तिनामार्थ; १४. निश्चयपंचविशी; १५. निश्चयरत्नाकर; १६. निःसंदेहरत्नाकर; १७. प्रकाशरत्नाकर (ब्रिज भाषेत); १८. प्रसादरत्नाकर; १९. पूतनाशोषणाख्यान; २०. बुद्धिरत्नाकर; २१. ब्रह्मानुभवस्तोत्र; २२. भरताचे पद; २३. भिक्षुगीत; २४. भोजनकथा; २५. मनोबोध; २६. मानसपूजा; २७. मामळभट आख्यान; २८. रत्नमाळ; २९. रत्नाकरईडराज; ३०. रत्नाकर उपदेश; ३१. रत्नाकरबोध; ३२. विचारपंचविशी; ३३. विश्वरूपनमन; ३४. वैराग्यरत्नाकर; ३५. संगमचरित्र; ३६. सद्गुरुअष्टक; ३७. सिद्धान्तरत्नाकर; ३८. ज्ञानरत्नाकर; ३९. अभंगादी स्फुट रचना; गो. का. चांदोरकर संग्रह (निर्देश : संककासू., पृ. ८७); सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : रत्नाकर; मकच., भा. २; मुंबई, १९१३; पृ. १–७. २. कर्वे, चिं. ग. : दीपरत्नाकर कोणाचा ?; भाइसंमंत्रै., व. २२, अं. २, पृ. ७२. ३. चांदोरकर, गो. का. : रत्नाकरस्वामी; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. २३–२५. ४. ढेरे, रा. चिं. : महाराष्ट्रातील नाथसंप्रदाय : गोचप.; पुणे, १९५९; पृ. १६६–१६७. ५. देव, शं. श्री. : रत्नाकराची गीतेवरील टीका; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ११६–११८; ६. पुरंदरे, कृ. वा. : रामानंदाचा 'दीपरत्नाकर'; भाइसंमंत्रै., व. २१. अं. २, पृ. ४७–४८. ७. पोतदार, द. वा. : 'दीपरत्नाकर' रत्नाकरांचाच – रामानंदाचा नव्हे!; भाइसंमंत्रै., व. २२, अं. २, पृ. ७२–७४.

**रत्नाकर–२** [का. अनु.] कवी. हे स्वतःस नाथशिष्य म्हणवितात. *भागवताच्या दशमस्कंधांतर्गत एकादशीमाहात्म्या*ची कथा कवीने गायिली आहे. कवीचा काळ ठरविण्याचे साधन उपलब्ध नाही. काव्याची भाषा प्रौढ व प्रसन्न आहे.

**रचना : अमु.** – एकादशी-माहात्म्य; अ. ६; ओ. सं. ४९६; र. स्थ. : कनकावती; ग. ना. मुजुमदार संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, ग. ना.; नाथशिष्य रत्नाकर विरचित एकादशीमाहात्म्य; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ५१-५२.

**रत्नाकर–३** [का. अनु.] कवी. *गणेशगीता*कार नामलगावकर निरंजन कन्हाडकर ह्यांचे हे चिरंजीव. ह्यांनी काही स्फुट कविता केली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : भगवान कवि कन्हाडकर; भाइसंमंइति., श. १८३६, पृ. १५७.

**रत्नाकर–४** [अंदाजे श. १६४५ / इ. स. १७२३ – श. १६७० / इ. स. १७४८] पदकार. परंपरा : निरंजननाथ (श. १५५९–१६२०) > विश्वंभरनाथ (श. १६२०–१६४५) > रत्नाकर (श. १६४५–१६७० चा सुमार).

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ८७.

**रत्नाकरसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रेणुकाकथा व पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रत्नांगद** [का. अनु.] गद्यलेखक.

**रचना : अमु.** – नाटकप्रस्तावना (गद्य, अपूर्ण, पाने १–५, ग्रं. सं. ६०); तंसम. हस्त. यादी, क्र. २.

**रत्नू केरू** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] शाहीर. श. १७३९ / इ. स. १८१७ च्या खडकीच्या लढाईनंतर बाजीरावांना पुन्हा पुण्याचे दर्शन घडले नाही. ह्या महत्त्वाच्या ऐतिहासिक प्रसंगावर रत्नू केरू ह्यांनी *खडकीची व अष्टीची लढाई* हा पोवाडा रचला आहे. प्रस्तुत पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये संग्रहित (पृ. ३८९–३९३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. (संपा.); खडकीची व अष्टीची लढाई; ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. १, पुणे, १९२८; पृ. ३७३–३८२.

**रमणतनय** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – ७ पदे; पदसंग्रह, भा. २; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६; पृ. २९–३१.

**रमणात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रमातनया** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – मंगळागौरीची आरती; मआ., पृ. ४२२.

**रमापति** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रमामाधव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रमारमणदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – चंद्रप्रबोध; जु. पो.; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ९३.

**रमावल्लभ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रमावल्लभदास / ० लक्ष्मीवरदास** [अंदाजे इ. स. १६०९–१६६८] कवी व टीकाकार. हे देवगिरी ऊर्फ दौलताबादच्या राज्याचे कारभारी अंबाजीपंत ऊर्फ यमाजीपंत राळेरासकर ह्यांचे पुत्र असून त्यांचे तुकोपंत असे नाव होते. वयाच्या अठराव्या वर्षी हे वडिलांच्या जागी राजाचा कारभार पाहू लागले. लवकरच 'परसैन्याचा' राज्यावर हल्ला झाला असता राजाने अंबरखान ह्या आपल्या प्रधानास बोलावून शत्रुसैन्यास हटविण्यासाठी युद्धावर पाठवून दिले. त्यात तुकोजीपंतही होते. ह्या युद्धात 'परसैन्याची वाताहत' होऊन जी लुटालूट झाली तीत तुकोपंतांना एकनाथांच्या *श्रीभागवता*ची पोथी सापडली. "एवं

परसैन्य जिंकोन। मागे परतला अंबरखान। तंव रमावल्लभदासा जाण। सांपडले संपूर्ण श्रीभागवत ॥ ३९ ॥ एकादशस्कंध एकतीस अध्याय। 'एकाजनार्दनी टीका अन्वयें' ॥ ४० ॥" (राघवदासकृत *श्रीरमावल्लभदास विरुदावली*). ह्या ग्रंथाच्या मननचिंतनाने तुकोपंतांत विरक्ती उत्पन्न झाली. त्यांचे मन परमार्थाकडे वळले. काही दिवसांनंतर ते तीर्थयात्रेस निघाले. पंढरपुराहून ते करवीरक्षेत्री (कोल्हापुरास) आले असता त्यांना श्रीदत्तात्रेयप्रभूंचे दर्शन घडले, असा उल्लेख आढळतो. प्रभूंनी त्यांना गोदातटावर असलेल्या लक्ष्मीधर नामक सत्पुरुषाकडे जाण्याची आज्ञा केली. त्यास अनुसरून ते लक्ष्मीधरांच्या भेटीस गेले असता लक्ष्मीधरांनी प्रसन्न होऊन त्यांस मंत्रदीक्षा दिली व श्रीगोपाळविद्येची उपासना करण्यास त्यांस त्यांनी सांगितले. त्यांनी तुकोजीपंतांचे रमावल्लभदास हे नवे नाव ठेवले. आपल्या नावाचे स्पष्टीकरण करताना रमावल्लभदासांनी आपल्या *वाक्यवृत्ति* ह्या ग्रंथात म्हटले आहे : "दास देहास नाम स्वभावी। वल्लभ अंतरींचा गोसावी। रमा हे स्फूर्तीच प्रगट दावी। रमावल्लभदास म्हणे ॥" (*वाक्यवृत्ति*, पृ. ६९). गुरुबोधानंतर रमावल्लभदास कृष्णा गोसावी नावाच्या बालमित्राबरोबर दाभोळ, रत्नागिरी, सावंतवाडी, गोवा ह्या मार्गे कन्नड प्रांतात (आजचे कर्नाटक राज्य) कृष्णभक्तीचा प्रसार करीत हिंडले. आवडाबाई उभयकर ही त्यांची प्रमुख शिष्या होती आणि लक्ष्मीकांत, कृष्णदास व कान्हायी असे त्यांचे तीन शिष्य होते. ह्यांचा मठ व परंपरा कारवार जिल्ह्यात मौजे चंदावर येथे आजही पाहण्यास सापडतात. तसेच कर्नाटकातील शिराळी येथील राघवदास मठ, हेम्माडी येथील जोगनाडी मठ, हत्यंगडी येथील गोसावी मठ हे त्यांच्या ह्यातीपासून आजवर चालू आहेत.

*चमत्कारी टीका* (श. १५५०) हे रमावल्लभदासांचे गीताभाष्य प्रसिद्ध आहे. अनेक गीताटीका असताना ह्या *चमत्कारी टीके*चे प्रयोजन काय, हे सांगताना ते म्हणतात : 'ते अफाट ग्रंथ नेणती तेणे। काय घेणे कळेना'। म्हणून जनतेला श्रवणाचा लाभ घेऊन गीताप्रमेय सहज व थोडक्यात आकलन करता यावे ह्यासाठी ही टीका रचली. "चमत्कारी कैसी आहे। ऐकताचि जन अर्थ लाहे। आणि थोडियाच मध्यें आहे। प्रमेय राहे सकळिक ॥" (अ. १३:४). शंकराचार्यांच्या *बृहद्वाक्यवृत्ती*वर ह्यांनी *वाक्यवृत्ति* नावाची टीका लिहिली आहे. हिचा प्रारंभ त्यांनी वाई येथे केला व दाभोळ (जि. रत्नागिरी) मुक्कामी ही पूर्ण केली. *भागवता*च्या *दशमस्कंधा*च्या आधारे रमावल्लभदासांनी लिहिलेल्या *दशकनिर्धार* (श. १५५५) ह्या ग्रंथात कृष्णकथा निवेदन केली आहे. रमावल्लभदासांनी आवडाबाईस उद्देशून लिहिलेली अकरा ओवीबद्ध पत्रे म्हणजे त्यांचे *प्रबोधचंद्रिका* हे प्रकरण होय. *गुरुवळी* हे गुरुमहिमापर प्रकरण (श. १५५८) व *संतनामावळी* ह्यांनी रचली आहे. *वैष्णवगाति* नावाचा एक स्वतंत्र ग्रंथ त्यांच्या नावावर मोडतो. पण तो उपलब्ध नाही. ह्याखेरीज त्यांनी अनेक अभंग व पदे रचली आहेत. ह्यांची 'चिमणसें मूल, चिमणासा' किंवा 'कृष्ण आवडी देखेन केव्हां दृष्टी। कृष्ण आवडी देखिल्या प्रेमवृष्टी ॥' (*श्रीरमावल्लभदासांची गाथा*; पृ. ९, १५) अशी कृष्णभक्तिपर पदे मधुर आहेत. कृष्णचरित्रसंकीर्तन हा त्यांच्या कवितेचा अत्यंत आवडीचा विषय आहे. ह्यांनी श्रीकृष्णाची एक आरती रचली आहे (मु. : मआ., पृ. ३२५).

**रचना : मु.** – १. श्रीरमावल्लभदासकृत भगवद्गीता – चमत्कारी टीका; संपा. उभयकर, सु. गो. व कामत, रा. कृ.; माशेल, गोवा; १९२५; २. श्रीरमावल्लभदासाची गाथा; संपा. उभयकर, सु. गो.; हुबळी, १९२८ (स्फुट अभंग, पदे, किरकोळ वेदान्त-प्रकरणे इ.; बृहद्वाक्यवृत्ति टीका व प्रबोधचंद्रिका ह्या ग्रंथांसह).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पांगारकर, ल. रा. : रमावल्लभदास; मवाइ., खं. २; पुणे, १९७२ (द्विआ.); पृ. ४११–४२५.

**रवळोबास / ० रवळोव्यास / ० राघवोपाध्ये** [इ. स. चे १४ वे शतक, उत्तरार्ध] महानुभाव कवी. महानुभावांना पूज्य असणाऱ्या *साती ग्रंथां*पैकी *सैह्याद्रवर्णन* (*सह्याद्रीवर्णन*) हा काव्यग्रंथ रवळोबासांनी रचला आहे. रवळोबासांचे घराणे पाथरीचे. हे गाव हल्ली मराठवाड्यातील परभणी जिल्ह्यात मोडते. रवळोबासांची चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. वेगवेगळ्या *अन्वयस्थळां*तून फक्त त्यांच्या लेखनकर्तृत्वाची नोंद तेवढी सापडते.

रवळोबास हे उपाध्य आम्नायातील. काव्यारंभी ह्यांनी आपल्या पूर्वजांना वंदन केले आहे (ओव्या १६–१९) त्यावरून जनार्दन ऊर्फ जानोपाध्ये > कमळांबा > हिराइसा > रवळोबास अशी परंपरा निश्चित होते. काव्याच्या शेवटी स्वतःच्या नावाचा निर्देश करताना कवी म्हणतो : "तिए हिरांबिकेचा सुतु : राम एणें नामें विख्यातु : तेणें हा निर्मीला ग्रंथु : वितरागांसी ॥ ५१६ ॥" ह्यातील राम म्हणजेच रवळोबास असे टीपग्रंथात स्पष्टपणे म्हटले आहे. त्यावरून रवळोबास हे हिरांबिकेचे शिष्य ही गोष्ट निश्चित होते. राम आणि रवळोबास ह्यांतील मूळचे नाव कोणते व नंतर पडलेले कोणते, ह्याचा निर्णय करता येत नाही. ह्यांचे राघवोपाध्ये असे आणखी एक नाव *महाराष्ट्रसारस्वत*कार देतात. "पंडित विश्वनाथांप्रमाणेच नारायण पंडित व राघवोपाध्ये हे दोन ग्रंथकार एकाच वेळी होऊन गेले. त्यांपैकी महानुभाव पंथात पहिल्यास बाहाळे नारोबास व दुसऱ्यास रवळोबास असे म्हणतात." (मसा., आ. ३, भा. १, पृ. १८१–८३).

रवळोबासांच्या परंपरेतील जनार्दन ऊर्फ जानोपाध्ये हे बहळेग्राम (जि. औरंगाबाद) येथे राहणारे. पैठण येथे चक्रधरस्वामींची व त्यांची प्रथम भेट झाली. स्वामींच्या प्रयाणानंतर नागदेवाचार्यांकडून ह्यांनी पंथाची दीक्षा घेतली. कमळाइसा ही जानोपाध्यांची पुतणी. तिला बालवयातच वैधव्य प्राप्त झाल्याने जानोपाध्यांनी हिलाही नागदेवाचार्यांकडून पंथानुसरण करविले. हीच उपाध्य आम्नायाची प्रवर्तिका असे मानले जाते. कमळाइसा ज्ञानी आणि व्युत्पन्न होती. पंथप्रसाराचे फार मोठे कार्य आपल्या शिष्यांकरवी तिने केले. हिचीच शिष्या हिराइसा (दामोदर पंडितांची पत्नी नव्हे) ही अत्यंत बुद्धिमान व एकपाठी होती. (*लीळाचरित्रा*चा *हिराइसा पाठ* हा पंथीयांमध्ये श्रेष्ठ समजला जातो.) हिराइसेच्या चार प्रमुख शिष्यांपैकी रवळोबास व पाठकुळे मालोबास हे विशेष प्रसिद्ध आहेत. "हिराइसाचा रवळोबासीं सैह्याद्र वर्णन ग्रंथ : आन नामाचे दहा ठाए आन नागर लीप एसे केले" असा त्याच्या ग्रंथकर्तृत्वाचा निर्देश हरिबास आणि सोंगोबास ह्यांच्या अन्वयस्थळात येतो. *साती ग्रंथां*वरील तृतीय शोधनीच्या टीपकाराने व *अन्वयस्थळ*कार कृष्णमुनीनेही ह्या रचनेचा उल्लेख केला आहे.

रवळोबासांच्या काव्यग्रंथाची *सैह्याद्रवर्णन* व *सैह्याद्री-माहात्म्य* अशी दोन नावे प्रचारात आहेत. डॉ. कोलते ह्यांनी ग्रंथसंपादनासाठी स्वीकारलेली मूळ पोथी सकळा लिपीतील असून नक्कलकार गोविंदमुनिसुत व लेखनसमाप्तिकाल श. १५९० कीलक संवत्सर, आश्विन वद्य सप्तमी असा दिला आहे. काव्याच्या एकूण ओव्या ५१७ आहेत. ७२६ ओव्यांच्या *सह्याद्री-माहात्म्या*च्या काही पोथ्याही पाहण्यास सापडतात. महानुभाव *साती ग्रंथांत* मात्र ५१७ ओव्यांचेच काव्य आढळते.

प्रस्तुत काव्यात सह्याद्री येथे वास्तव्य करणाऱ्या श्रीदत्तात्रेयांचे वर्णन केलेले आहे. दत्तात्रेयचरित्राबरोबर श्रीचक्रधरप्रभूंचे चरित्र वर्णन करून त्याचे माहात्म्यही सांगितले आहे. किंबहुना ह्या दुसऱ्या विषयालाच अधिक स्थान मिळाले आहे. काव्यारंभी श्रीदत्तात्रेयांना वंदन न करता चक्रपाणी ह्यांनाच ते केले आहे. श्रीदत्तात्रेय > श्रीचक्रपाणी > श्रीगोविंदप्रभु > श्रीचक्रधर अशी ही परंपरा आहे. ह्यांपैकी शेवटचे तिघे दत्तावतारच मानले जातात. चक्रधरांनी 'या मार्गासि

श्रीदत्तात्रेय प्रभु आदिकारण' असे म्हटले आहे. ह्या दृष्टिकोनातून विचार केल्यास हे काव्य म्हणजे दत्तात्रेयांनी केलेल्या लीळांचे चरित्र-वर्णन असे म्हणायला हरकत नाही. *सैह्याद्रवर्णना*तून स्पष्ट होणारे दत्ताचे स्वरूप हे एकमुखी दत्ताचे आहे. महाराष्ट्रात प्रसिद्धी पावलेली नृसिंहसरस्वतींची दत्तपरंपरा (त्रिमूर्ती प्रतीक मानणारी) ही दत्त संप्रदायाची एक वेगळी शाखा आहे.

महानुभावांचा दत्त हा परब्रह्म परमेश्वराचा साक्षात अवतार दिसतो. *सैह्याद्रवर्णना*त 'जो चैतन्य विसांवा। सकळ देवतांचे परदैव। जो अवतरला जीवांचे या कणवा। ऋषीवंशी '॥ २१ ॥ जो परब्रह्म – चंपकाचा कळा। किं दीव्य प्रभेचा पुतळा। ना तो सर्व सूखाचा एकवळा। जीव देवतांसीं ॥२२॥" असे त्याचे वर्णन येते. दत्तात्रेयासंबंधीची – तो ब्रह्मा-विष्णुमहेशादी अवतार असल्याची – पौराणिक कल्पना महानुभावांना मान्य नाही.

ह्यातील सह्याद्री हे स्थान म्हणजे माहूरचा डोंगर. हा माहूरचा डोंगर अजिंठा पर्वताची एक शाखा आहे. पश्चिमघाटावरील सह्याद्री पर्वताशी ह्या सह्याद्रीचा काही संबंध नाही. माहूरच्या डोंगरास पूर्वी सह्य असे म्हणत. हेच दत्तात्रेयप्रभूंचे निवासस्थान. ह्या स्थानास मातापूर असेही संबोधले जाते.

स्थानमाहात्म्य वर्णन करणाऱ्या ह्या काव्याच्या पहिल्या २० ओव्या नमनाच्या, नंतर १८३ ओव्यांपर्यंत दत्तचरित्र व नंतरचा भाग चक्रधर-अवतारकार्यवर्णन ह्यांस वाहिलेला आहे. आपण पतित आहो, परित्यक्त आहो, आणि आपल्याला परमेश्वरप्राप्ती व्हावी ही भूमिका घेऊन आपली सुखदुःखे कवीने ह्या काव्यात निवेदिली आहेत. भक्तिभावनेची जी एक बैठक ह्या काव्याला प्राप्त झाली आहे तिच्यामुळे ते रसोत्कट झाले आहे. अंतर्मुख होऊन केलेल्या आत्मनिवेदनामुळे व स्वोद्धाराच्या तळमळीमुळे कवीचे अंतःकरण काव्यात सर्वत्र उत्कटतेने प्रतिबिंबित झालेले दिसते. वर्णनचातुर्य, प्रतिभासृष्टी आणि रसाविष्कार ह्या दृष्टीने विचार केल्यास रवळोबास हे एक प्रतिभाशाली कवी आहेत, असे हे काव्य वाचून प्रत्ययास येते. ह्या काव्याचा रचनाशक य. खु. देशपांडे श. १२५४ (इ. स. १३३२) असा देतात. डॉ. कोलते ह्यांच्या मते ही रचना अंदाजे श. १२७५ च्या सुमारास झाली असावी [ ⇨ ३].

'नामाचे दहा ठाय' हे महानुभावांच्या नित्यपूजेत अंतर्भूत झालेले रवळोबासांचे एक महत्त्वाचे गद्य प्रकरण. साकारापासौनि नाम मूर्ति। नीराकारा पासौनि लीळा चेष्टा। ह्याप्रमाणे प्रारंभ करून नामाचे दहा ठाय सांगून नंतर उदाहरणांसहित स्पष्टीकरण केलेले आहे. हे प्रकरण मुद्रित झाले आहे.

ह्याखेरीज रवळोबासांचे महत्त्वाचे कर्तृत्व म्हणजे 'नागरी लीप 'तयार करण्याचे. ह्या नागरी लिपीलाच सकळ लिपी म्हणतात. आपल्या शास्त्राचे रहस्य इतरांच्या हाती पडून ते शास्त्र भ्रष्ट होऊ नये ह्या हेतूने ही सांकेतिक लिपी तयार केली गेली. रवळोबासांनी आपली लिपी तयार का केली ह्याचा उल्लेख *अन्वयस्थळा*त सापडतो. त्यावरून ही करण्याची सूचना व प्रेरणा देणारे हे त्यांचे गुरुबंधू पाटकुळे मालोबास, तदनुसार नवी लिपी तयार करणारे रवळोबास, अशी माहिती मिळते. ह्यानंतरच महानुभावांच्या सुंदरी, ब्रज, अंक, मनोहर अशा आणखी काही सांकेतिक लिप्या तयार झाल्या. पण त्यांतील सकळ हीच लिपी विशेष रूढ झाली. त्यामुळे त्याच लिपीत महानुभावांचे बहुतांश वाङ्मय सापडते. रवळोबास कवी म्हणून प्रसिद्धीस आले ते मात्र *सैह्याद्रवर्णन* ह्या रसाळ अशा काव्यामुळेच.

**रचना : मु.** – १. रवळोबासकृत सह्याद्रिवर्णन; प्रक. ३१; ओ. सं. ५१७; संपा. कोलते, वि. भि.; पुणे, १९६४. २. नामाचे दहा ठाय; गद्य प्रकरण; संपा. नेने, ह. ना.; नित्यदिनीलीला; १९३६ (आ. १); पृ. ५७–६४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कोलते, वि. भि.; सह्याद्रि वर्णनाची विस्तृत विवेचक प्रस्ता.; पुणे, १९६४; पृ. १–८४.

**० रवळोव्यास** – पहा **रवळोबास.**

**रविदास** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – १. कुबेरलक्ष्मी गर्वहरण; (पदे, दिंड्या, श्लोक, इ.) ग्रं. स. १०९; अकलकामा., भा. ४, संपा. केळकर, ना. चिं. व ओक, दा. के.; मुंबई १९०३; पृ. १८१–१९६. २. स्फुट पदे; पदसंग्रह, भा. ३; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १९०१; पृ. १४१; ३. दोन आरत्या; मआ., पृ. ३३८–३४२.

**रविनंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; श. १८४३ त उतरलेल्या, वेंचले येथील पदांच्या बाडात संग्रहित (भाइसंमं.).

**राका कुंभार** [अंदाजे इ. स. १५००] संतकवी. जातीने परदेशी कुंभार. पत्नीचे नाव बंका. ह्यांना देऊबाई नावाची कन्या होती. हे कुंभारमंडळीत वैष्णव म्हणून प्रसिद्ध होते. ह्यांचे २७ अभंग *श्रीसकल-संतगाथा, खंड १* मध्ये संग्रहित. वारकरी परंपरेत जे अभंगवाङ्मय निर्माण झाले त्या रचनेचे विशेष राका कुंभारांच्या रचनेत आढळतात.

**रचना : मु.** – २७ अभंग; श्रीससंगा., खं. १; संपा. जोशी, का. अ.; पुणे, १९६७; पृ. ४१७–४१८.

**राघव–१ / ० राघवचिद्घन–१ / ० राघवरंक / ० राघवस्वामी–१** [इ. स. चे सतरावे शतक] कवी. *संदेहहरण* ह्या अध्यात्मपर ग्रंथाचा कर्ता. ग्रंथात 'वसिष्ठ कुळगोत्रीचा राघवरंक 'अशी स्वतःची माहिती कवी देतो. *महाराष्ट्रसारस्वता*च्या 'महीपती व इतर चरित्रकार' ह्या प्रकरणात वि. ल. भावे ह्यांनी ह्या कवीविषयी जी माहिती दिली आहे ती अशी : "उद्धवचिद्घनाचा गुरुबंधु राघवस्वामी यानें शके १६११ मध्यें (इ. स. १६८९) *संदेहहरण* नांवाचा एक ओवीबद्ध ग्रंथ केला आहे; व ह्या ग्रंथसमाप्तीनंतर उद्धवास चिद्घनाचा अनुग्रह झाला, असें याच परंपरेंतल्या माधवदास कवीनें आपल्या *अलक्ष्यनिधान* ह्या ग्रंथांत सांगितले आहे." (मसा., आ. ५, पृ. ४७७). हे राघव, उद्धवचिद्घनाचे गुरुबंधू म्हणजे चैतन्य परंपरेतील ठरतात. प्रत्यक्ष ग्रंथात निर्देशिल्या-प्रमाणे राघव हे त्रिमलनाथांचे शिष्य दिसतात. ही गुरुपरंपरा अशी आहे : रंगराम > गुरुनाथ > गिरिलाल > भवानी > त्रिमलनाथ > राघव (*संदेहहरण* १:१६५–१६७).

*संदेहहरण* ग्रंथाचा रचनाकाल पुढीलप्रमाणे आहे : "शके सोळाशें अकरावरी। प्रबोधनाम संवत्सरीं। आश्विन शुक्र गुरुवारीं। विजया-दशमी सुदीन॥" म्हणजे ह्या ग्रंथाची समाप्ती शके १६११ (इ. स. १६८९) मध्ये झाली. ग्रंथ ओवीबद्ध असून त्याच्या ४०४० ओव्या आहेत. ह्या ग्रंथाचे स्वरूप शंकरपार्वतीसंवादात्मक आहे, व ग्रंथाच्या तीन प्रती श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील हस्तलिखित संग्रहात आहेत. त्यांपैकी बाड क्र. १०४६ च्या जागी असलेल्या दोन प्रती अपूर्ण आहेत. फक्त बाड क्र. १८३४ ची प्रत पूर्ण आहे. हिची मूळ प्रत मराठवाड्यात केज येथील बाळाजी मठात शं. श्री. देव ह्यांच्या पाहण्यात आली होती. त्या प्रतीवरून नक्कल केलेली ही प्रत जोगाईच्या. अंब्यास शं. श्री. देव ह्यांना प्राप्त झाली. हिच्यावरून शं. श्री. देवांनी *रामदास* व *रामदासी* ह्या मासिक पुस्तकातून (वर्ष २८, अं. ३३० पासून पुढे क्रमशः) श्रीराघवकृत *संदेहहरण* ह्या ग्रंथास प्रसिद्धी दिली. पुढे हा ग्रंथ पुस्तकरूपाने स्वतंत्रपणेही छापण्यात आला. ग्रंथ प्रासादिक आहे दैनंदिन जीवनात परमार्थमार्ग आत्मसात करताना जे संदेह नेहमी निर्माण होतात त्यांचे निवारण ह्या ग्रंथात राघवांनी केले आहे. ग्रंथाची योग्यता ग्रंथकाराने पुढील शब्दांत वर्णिली आहे. "संदेहहरणाची ओवी। संसारकोडियातें उगवी। अनादि गुरुत्वें भेटवी। पराभवी

भवभया ॥ १८.११५ ॥" ह्या कवीच्या *अध्यात्मरामायणा*चा निर्देश वि. ल. भावे ह्यांनी *महाराष्ट्रसारस्वतात* केला आहे (मसा., आ. ५, पृ. ३८९, तळटीप). श्रीसमर्थवाग्देवतामंदिरातील संग्रहात राघव कवीच्या नावावर अनेक पदपदांतरे व लघुकाव्ये आढळतात. त्यांपैकी ह्या राघवांची रचना कोणती हे निश्चितपणे सांगता येत नाही.

**रचना : मु.** – १. संदेहहरण; अ. १८; ओ. सं. ४०४०; रामदास आणि रामदासी; धुळे; व. २८, अं. ३३० पासून क्रमशः (पुढे स्वतंत्र रीत्या छापले). २. अध्यात्मरामायण (शंका.).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देव, शं. श्री. : राघवकृत संदेहहरण; भाइसमंइति., श. १८३४, पृ. १६३–१६४. २. प्रियोळकर, अ. का. : राघवाचें 'संदेहहरण'; मसंप., ऑक्टो. १९६४, पृ. ८५–८८.

**राघव–२ / ० राघवस्वामी–२** [ ? – समा. श. १६८३, वृष नाम, माघ शु. २ / इ. स. १७६२] रामदासी कवी. शिरगाव मठपती कल्याणबंधू दत्तात्रेयबुवा ह्यांचे पुत्र. राघवस्वामी रामदासी शिरगावकर असाही ह्यांचा नामोल्लेख सापडतो. हे मोठे वैराग्यनिष्ठ व ब्रह्मसाक्षात्कारी होते. शिरगाव व डोमगाव येथील मठात उपलब्ध झालेल्या हस्तलिखित बाडांतून ह्यांची काही प्रकरणे, पदपदांतरे, आरत्या इत्यादी बरीच स्फुट कविता सापडते. 'सुंदरानना पिंगललोचन' हे प्रसिद्ध *भीमाष्टक* ह्यांनीच रचले आहे.

**रचना : मु.** – १. आरत्या ५ : (१) श्रीकृष्ण, (२) जगन्मोहिनी, (३) गणपति, (४) महारुद्रस्वामी, (५) देवी; मआ., पुणे, १९६७; पृ. क्रमशः ३१५, ३३१, ३८६, ४३०, ४३८. २. रामदासांवरील पद., सवामं; बा. २४४.

**अमु.** – १. कबीर आख्यान; २. गणपति आख्यान; ओ. ६३; ३. गरुडाख्यान; श्लो. ५४; ४. गोरक्षनाथचरित्र; ५. जालंधराख्यान; श्लो. व सवाया ९४; ६. दग्धबीजारोपण आख्यान; ओ. ५५; ७. दत्तात्रेय जन्मकथा; ८. ध्रुवचरित्र; ९. पांडुरंगाची आरती, १०. बोढना रजपूत चरित्र; ११. मारुती-अर्जुन-संवाद; १२. रामजन्म; श्लो. ७३; १३. शिवरात्री कथा; त्रु. पो.; प्रसंग २ रा; ओ. २७८; एकूण ओ. सं. ४१२ – प्रसंग पहिला गहाळ; १४. सुदामचरित्र; १५. पदपदांतरे; सवामं हस्त. सू. खं., १, २.

**राघव–३ / ० राघवमुनि–१** [अंदाजे इ. स. १७६०] महानुभाव कवी. ह्यांच्या ग्रंथातील उल्लेखावरून हे कुमर आम्नायापैकी केशिराज ह्यांचे पुत्र वा शिष्य दिसतात. *स्थानपोथी*कर्ते कुमर आम्नायाचे मुनिव्यास ह्यांच्याबद्दल थोडीफार माहिती उपलब्ध आहे. पण त्याच आम्नायातील केशिराज, राघव अथवा रामचंद्र ह्यांचा निर्देश पंथीय परंपरेत कोठेच आलेला नाही. राघवमुनीने *चरित्र-आबाब-अन्वय* हे १९२ ओव्यांचे काव्य 'श. १६८२ विक्रम संवत्सरी,पौषमासी,बुधवारी', श्रीगोंदे गावाच्या उत्तरेस असलेल्या वडाळी नगरी, पूर्ण केले. हे प्रकरण महानुभावीय सांकेतिक लिपीत लिहिलेल्या हस्तलिखितात आढळते. त्याचे मुद्रण *महानुभाव* मासिकाच्या 'अन्वयस्थळ विशेषांका 'तून झाले आहे.

ह्या प्रकरणाच्या नावावरून आतील मजकुराची कल्पना येणे कठीण. 'आबाब' ह्या शब्दाचा फार्शी कोशात सापडणारा अर्थ (आब = महिमा, प्रतिष्ठा, तेज, चमक इ.) मजकुराशी जुळणारा नाही. चवदाव्या ओवीत येणाऱ्या 'लीळाचरित्राचा : आबाब साधैन : नांवें भीन्न भीन्न : वेगळाली ॥' ह्या उल्लेखावरून चरित्रातील भिन्न भिन्न गोष्टी, विविध बाबींचा तपशील असा अर्थ घेतल्यास पोथीतील मजकुराशी तो सुसंगत दिसतो असे ह. ना. नेने ह्यांनी प्रस्तुत प्रकरणाचे विवेचन करताना म्हटले आहे, ते योग्य वाटते (संलेसं., भा. १, पृ. ६९). 'चरित्र' म्हणजे महानुभावीय पंचकृष्णांचे चरित्र. 'अन्वय' म्हणजे वंश किंवा परंपरा. लीळाचरित्राचा 'आबाब' सांगून झाल्यावर कवीने भटोबास ऊर्फ नागदेवाचार्य ह्यांची हकीकत सांगून त्यानंतर पुढील शिष्यपरंपरा व महानुभावीय ग्रंथकार ह्यांची माहिती दिली आहे. वृत्त ओवी असे दिले असले तरी अभंगाप्रमाणे वाटते.

श्रीचक्रधर व श्रीगोविंदप्रभू ह्या अवतारांनी केलेल्या लीळा, ग्रामसंख्या, तळी, विहिरी, लिंगाकृती आसने, वस्ती, संबंध, अवलोकन, प्रयाणशक, वर्ज्यावर्ज्य देवस्थाने, चोवीस पक्षकार, प्रमाणग्रंथ व त्यांचे कर्ते इ. माहिती राघवमुनी ह्यांनी प्रस्तुत प्रकरणात दिली आहे. म्हाइंभट्ट, परशरामबास, शिवबास व मुरारीमल्ल हे *लीळाचरित्रा*चे चार प्रसिद्ध शोधनीकार म्हणून वर्णन येते. चक्रधरांच्या निर्याणासंबंधीची जी ओवी कवीने दिली आहे ती फारच महत्त्वाची आहे : 'शके आकराशे। चौऱ्याण्णव देख। जाणावा श्रीमुख। संवत्सर ॥ १०९ ॥ आन माहां मासीं। शुद्ध चतुर्थीसीं। सोमवार दीसीं। बीज केलें ॥ ११० ॥' हे प्रकरण पंथीय दृष्टिकोनातून विचार करता महत्त्वाचे ठरते.

**रचना : मु.** – चरित्र आबाब; ओ. सं. १९२; महानु. जुलै–ऑग. १९६४; पृ. ९–१४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नेने, ह. ना. : एक महानुभावीय अप्रसिद्ध ग्रंथ; चरित्र-आबाब-अन्वय; संलेसं., भा. २; नागपूर, १९५७; पृ. ६९–७५.

**राघव–४ / ० राघवमुनि–२** [अंदाजे श. १७७६ / इ. स. १८५४] महानुभाव कवी. *वत्सलास्वयंवर*कर्त्या (र. श. १६७६) ह्या कवीची माहिती १७ व्या शतकातील कवी म्हणून प्रथम य. खु. देशपांडे ह्यांनी दिली (ममवा., पृ. ७७).

*वत्सलास्वयंवर* काव्याची एक पोथी नाणेगाव (जि. औरंगाबाद) येथे डॉ. यू. म. पठाण ह्यांना उपलब्ध झाली आहे. त्यावरून कवीचा आणखी शोध घेण्याचा प्रयत्न त्यांनी केला. पोथीतील कालनिर्देशाप्रमाणे ग्रंथाचा काळ 'सके सोळासे वरती एकसे स्याहात्तर वरुसा' म्हणजे श. १७७६ (इ. स. १८५४) हा *वत्सलास्वयंवर* काव्याचा लेखनसमाप्तिकाल असे सध्या मानता येईल. कारण प्रतीचा लेखनकाल श. १७९७ (इ. स. १८७५) असा प्रतलेखकाने वेगळा निर्दिष्ट केला केलेला आहे.

ह्या राघवमुनीचा गुरू दीपराज असे डॉ. य. खु. देशपांडे म्हणतात. पण दीपराज हा कवीचा गुरू नसून 'ताताजी दीपराज' असे १३ व्या अध्यायाच्या शेवटी कुळकथा देताना कवीने स्पष्टच म्हटले आहे. (ओवी ३५). काव्यात येणारा चक्रपाणी गुरूंचा किंवा चक्रधरांचा उल्लेख हा पंथीय आदरापोटी केला गेला आहे. कवीच्या गुरूचे नाव दीपराज किंवा चक्रपाणी नाही. 'वंदु त्या गुरु वाल्हेराज – कमळा घालोण लोटांगण' ह्या काव्यात येणाऱ्या निर्देशावरून वाल्हेराज हे त्यांच्या गुरूचे नाव दिसते. महानुभावांच्या विविध आम्नायाच्या परंपरांत मात्र ह्या नावाचा आढळ होत नाही.

*वत्सलास्वयंवर* हा ग्रंथ श्लोकबद्ध असून विविध वृत्तांत रचलेला आहे. त्याचे १३ अध्याय आहेत. ह्याच कवीने रचलेले एक *देवदेवेश्वरस्तोत्र*ही उपलब्ध आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पठाण, यू. म. : महानुभाव कवी राघव; मराठवाडा विद्यापीठ पत्रिका, पु. ३, क्र. १, ऑग. १९६२; पृ. १३–१८.

**राघव–५** [का. अनु.] वेदान्तग्रंथकार. ह्यांनी शंकराचार्य परंपरेतील विद्यारण्यस्वामींच्या संस्कृत ग्रंथावर टीका केल्या आहेत.

**रचना : अमु.** – १. कूटस्थदीपिका; ओ. सं. १४६; २. चित्रदीप; प्रथम प्रक.; ओ. सं. ४३०; ३. तत्त्वविवेक; ओ. सं. १२५; ४. द्वैतविवेक प्रकरण; ओ. सं. १२४; ५. पंचभूतविवेक; ओ. सं. ११४; ६. महावाक्यविवेक; ओ. सं. २४; ७. विद्यानंद प्रकरण; ओ. सं. ४०; तंसम. हस्त. यादी, क्र. १ व २.

**राघव–६** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**राघव–७** [इ. स. १७७०–१८१५] जैन कवी. नागपूरचे राहणारे. सिद्धसेन, पद्मकीर्ती, विशालकीर्ती आणि महतीसागर ह्या चौघांचा हे गुरू म्हणून उल्लेख करतात. ह्यांनी *वर्धासासेटिमाहात्म्य* हा पोवाडा, वर्धासा नावाच्या श्रीमंताने एक मंदिर बांधवून त्याची प्रतिष्ठा करविली त्या प्रतिष्ठेच्या निमित्ताने रचला (इ. स. १७८१). ह्या पोवाड्यात नागपूरकर भोसले घराण्यातील बापूसाहेब, नानासाहेब आणि आबासाहेब ह्या व्यक्तींचा उल्लेख व वर्धासाचे घराण्याचा इतिहास आला आहे.

**रचना : मु.** – १. वर्धासासेटिमाहात्म्य; ११ कडवी; २. सिद्धसेन-स्तुती; ३. पदपदांतरे; ७; सन्मति, सप्टें. १९६३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : राघव; ग्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ९२–९३.

**राघवकवि–१** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] अनेक शास्त्रपारंगत पंडित व कवी. संपूर्ण नाव रघुनाथपंडित मनोहर चंपायतकर. ह्यांचे *वैद्यविलास, चिकित्सामंजरी, नाडीज्ञानविधि* हे वैद्यकावरील, *वृत्तसिद्धान्तमंजरी* व छन्दोरत्नावली हे छंदःशास्त्रीय आणि *कविकौस्तुभ* हा साहित्यशास्त्रावरील ग्रंथ ही संस्कृतमधील रचना प्रसिद्ध आहे. जगन्नाथ पंडितांच्या संस्कृत *गंगालहरी*चा अनुवादही त्यांनी मराठीत केला आहे. ही रचना ह्यांनी पूर्ववयात केलेली असावी, असे ह्यातील पद्यरचनेवरून वाटते.

**रचना : अमु.** – गंगालहरी; 'गंगालहरी' (संकृत) चा समवृत्त, समश्लोकी अनुवाद; र. का. : अंदाजे इ. स. १६७०; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** फफे, य. ग. : राघवकविकृत गंगालहरी समश्लोकीवरून कळणारे गंगालहरीतील मूळ पाठ; भाइसंमंत्रै., व. ४४, अं. १–४; श. १८८८; पृ. २२-२३.

**राघवकवि–२** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक] कवी. ह्यांचा राहण्याचा गाव पथरिया (जि. जबलपूर). मूळचे नाव पांडोबा. वडिलांचे नाव व्यंकटेश. आईचे नाव रमाबाई. उपनाव करकरे. गुरू : बल्लाळ. ह्यांची अनेक आख्याने उपलब्ध असून ती *लघुकाव्यमाले*तून छापलेली आहेत (चरित्रविषयक माहिती : अकलकामा., भा. २, पृ. ८८ तळटीप).

मोरोपंतांच्या रचनेचा प्रभाव पडल्याने उत्तरकालात ज्या अनेक कवींनी पुराणातील विविध विषयांवर आख्याने रचली त्यांपैकी हाही एक कवी आहे. *महाभारता*तील शिबी राजाची कथा, विठ्ठलाचे परमभक्त असणाऱ्या दामाजीपंताचे चरित्र, *पद्मपुराणांतर्गत* पाताळखंडातील वीरमणीची कथा, *गजगौरीव्रत, सुरथसुधन्वाख्यान* अशा अनेककथा ह्यांनी पद्यात गुंफल्या आहेत. साक्यांची ह्यांना विशेष आवड दिसते. ओव्या, श्लोक, घनाक्षरी, गीती, दिंडी, अभंग असे इतरही अनेक छंद ह्यांनी आपल्या काव्यात योजले आहेत. *वीरमणी-आख्यानात* वरील छंदांच्या समवेत छपै, चौपाई, कवित्त, दोहा, कुंडरिया असे हिंदी भाषेत प्रचारात असलेले छंदही वापरलेले दिसतात. ह्या आख्यानांची अर्धी रचना हिंदीच आहे. *शिबी-चरित्रा*तही हिंदी कवने आढळतात. कवीचे वास्तव्य जबलपूर भागात झाल्यामुळे त्या भागात प्रचलित असणाऱ्या हिंदी बोलीभाषेवर ह्यांचे प्रभुत्व असावे.

*लघुकाव्यमाले*त (भा.१) बस्वलिंगाच्या नावावर छापलेले *गजगौरीव्रत* काव्य राघव आणि बस्वलिंग ह्या दोघांनी मिळून केलेले आहे असे स्पष्टीकरण संपादकांनी तळटीपेत केले आहे. प्रस्तुत कवीचे *सुरथसुधन्वाख्यान* (त्रुटित, अ. ५) *लघुकाव्यमाला*काराच्या संग्रही असल्याचे म्हटले आहे (भा. ४, टीप पृ. ११९). गो. का. चांदोरकरांनी *कृष्णचरित्रा*चा उल्लेख राघवांच्या नावावर केला आहे (संककासू., पृ. ८१). कवीच्या स्फुट रचनेपैकी चार पदे मुद्रित झाली आहेत. ह्यांपैकी एक विठ्ठलाची आरती आहे. 'उद्धवा ऐक कृष्णाची लीलारती' हे त्यांचे पद प्रसिद्ध आहे. रचना पंडिती परंपरेतील, प्रौढ आणि ठाकठिकीची आहे. भावप्रकटीकरणापेक्षा रचनेमधल्या कारागिरीलाच तेथे महत्त्व दिलेले दिसते.

**रचना : मु.** – १. गजगौरीव्रताख्यान (हे बस्वलिंगाच्या नावावर छापलेले असले तरी ह्यातील सर्व साक्या राघव कवीच्या आहेत. – मसा., आ. ५, पृ. ४१३ टीप); ग्रं. सं. ३९; अकलकामा., भा. १; संपा. ओक, बा. दा.; मुंबई, १८९५; पृ. ७५–८१. २. दामाजीपंतचरित्र; ग्रं. सं. १२; अकलकामा., भा. ४; संपा. केळकर, ना. चिं; ओक, दा. के.; मुंबई, १९०३; पृ. ११९–१२१. ३. वीरमणिकथा (पद्मपुराणांतर्गत); ग्रं. सं. ११२; अकलकामा., भा. १; पृ. १८७–२१०. ४. शिबिचरित्र; ग्रं. सं. ३१; अकलकामा., भा. २; संपा. ओक, बा. दा.; मुंबई, १८९६; पृ. ८८–९४. ५. ४ पदे; पदसंग्रह, भा. ३; मुंबई १९०१; पृ. ८१–८६. **अमु.** – १. सुरथसुधन्वाख्यान; अ. ५ (त्रुटित).

**० राघवचिद्घन–१** – पहा राघव–१.

**राघवचिद्घन–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम हस्त. यादी, क्र. ३; सवाम. हस्त. सू., खं. १, २.

**राघवचिन्मय** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध व १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] कवी. गुरुपरंपरा : ज्ञानेश्वर > सोपान > मुक्तदेवता > चांगदेव > केशव > राघव.

**रचना : अमु.** – रामगीता टीकाग्रंथ (अध्यात्मरामायण, उमामहेश्वरसंवादात्मक); ग्रं. सं. १०८३; र. श. "मातृकाषट्‌चक्राशय। एतदात्मक शक निश्चय। यासि व्यापक कीलक निजान्वय। संवत्सर तोचि ॥"; मसंमं., हवना., पृ. ६७

**राघवचैतन्य / ० राघवदराज आळंद शरीफ / ० हजरत लाडले मशायख** [अंदाजे इ. स. १४६० ते १५६०] कवी. ह्यांचे मूळ नाव रघुनाथ. गिरनार पर्वताच्या आसमंतातील भागात 'क्षात्रकुळी' ह्यांचा जन्म झाला. ह्यांच्या आयुष्याचा पूर्वभाग महाराष्ट्रात गेला; तर उत्तरभाग तीर्थाटनात व तेलंगणात गेला. सुरुवातीस हे दत्तोपासक होते. दत्तांनी आदेश दिल्याप्रमाणे जुन्नरजवळील ओतुरच्या डोंगरात ह्यांनी तप केले. त्यामुळे प्रसन्न होऊन ह्यांना व्यासांनी दर्शन दिले व त्यांचे परंपरेचे नाव 'राघवचैतन्य' ठेवून त्यांना 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' हा गुरुमंत्र दिला, अशी कथा प्रसृत आहे. मुसलमान लोक ह्या सत्पुरुषास हजरत लाडले मशायख व राघवदराज आळंद शरीफ ह्या नावांनी संबोधून आपलेच अवलिया मानतात. राघवचैतन्य हे आजन्म ब्रह्मचारीच राहिले. हे मोठे विद्वान व परमार्थाचे अभ्यासक होते. तत्कालीन आचारधर्मीय बंधनांमुळे आरंभी ह्यांना महानुभावी आचारांचा आश्रय घ्यावा लागला. हिंदू, मुसलमान, लिंगायत व जैन इ. अनेक पंथांतील लोक ह्यांना 'सद्गुरु' मानीत. ह्यांची चरित्रविषयक माहिती कृष्णदासांच्या *चैतन्यलीला* ग्रंथात मिळते. ह्यांच्याविषयी अनेक दंतकथाही प्रचलित आहेत. ह्यांची शिष्यपरंपरा अशी : राघवचैतन्य > केशवचैतन्य > बाबाजीचैतन्य > तुकाराम. ह्यांनी आळंद (जि. गुलबर्गा) येथे चैत्र शुद्ध त्रयोदशीस जिवंत समाधी घेतली असे मानले जाते. परंतु कुडची वीर ह्यांच्या *वेंकटेशविजय* (र. श. १७९३ / इ. स. १८७१) ह्या ग्रंथात त्यांनी आपली गुरुपरंपरा राघवचैतन्यांपासून दिली आहे व 'मूळ पुरुष राघव चैतन्य। जो ज्ञानियांमाजी चूडारत्न। इंद्रापुरी समाधिस्थ होऊन। अखंड वस्ती केली असे ॥' असा त्यांच्या समाधिस्थानाचा निर्देश केला आहे (रा. चिं. ढेरे : 'राघव चैतन्यांची शिष्यपरंपरा आणि समाधिभूमि'; इंद्रायणी, ऑग. १९६३; पृ. ४२–४३).

राघवचैतन्यांची परंपरा व्यासांपासून लावतात व ती स्वतंत्रपणे सुरू झाल्याचे सांगतात. उपलब्ध चरित्रविषयक माहितीनुसार दत्तात्रेयांनीच

ह्यांना शांभवी शक्तीच्या साहाय्याने चैतन्यमार्ग स्वीकारण्यास आज्ञा केली होती. पुढे व्यासांनी गुरुमंत्र दिला व हे रघुनाथांचे राघवचैतन्य झाले. राघव > केशव > बाबाजी ह्या चैतन्यत्रयीला कोणी आनंद-परंपरेतील मानतात तर काही ह्यांना वडवाळसिद्ध नागेशांच्या परंपरेत खेचतात. कोणी त्यांचा संबंध बंगाल्यातील गौरांगप्रभु चैतन्यांच्या शिष्यपरंपरेशी लावतात. राघवचैतन्यांचे चरित्र व त्यांची चैतन्य-परंपरा ह्यांची खात्रीलायक माहिती उपलब्ध नाही हेच ह्याचे कारण होय.

ह्यांनी बरीच ग्रंथरचना केली आहे. त्यापैकी काही रचना संस्कृतमध्ये आहे. त्यांतील *महागणपतिस्तोत्र*, *काव्यमाले*च्या प्रथम गुच्छात (मुंबई, १९२९) प्रसिद्ध झाले आहे. तसेच *ज्वालामुखी स्तोत्र*ही मुद्रित झाले आहे. ह्यांची प्राकृत ग्रंथरचनाही बरीच आहे. त्यातील काही रचनेचा निर्देश ह्यांचे चरित्रकार कृष्णदास बैरागी ह्यांनी केला आहे.

**रचना : अमु.** – १. इंद्रियदमन. २. ईशस्तवन. ३. जितेपणी मरण. ४. त्रिगुणलीला. ५. निराकार मन. ६. बुद्धिविकास. ७. ब्रह्मस्वरुप. ८. मायाविचार. ९. योगनिद्रा. १०. सनातनधर्मविचार.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : 'पद्मावता'त राघव चैतन्य; मसंप., एप्रि. १९६०; पृ. १७०. २. ढेरे, रा. चिं. : राघव चैतन्यांची संस्कृत रचना; इंद्रायणी, ऑग. १९६३; पृ. ४०–४२. ३. ढेरे, रा. चिं. : राघव चैतन्यांची शिष्यपरंपरा आणि समाधिभूमि; इंद्रायणी, ऑग. १९६३; पृ. ४२–४३. ४. बेंद्रे, वा. सी. : राघव चैतन्य – 'तुकाराम महाराज यांची गुरुपरंपरा'; मुंबई, १९६०; पृ. ६१–१३०.

**० राघवतनुज** – पहा **राघवसुत.**

**० राघवदराज आळंद शरीफ** – पहा **राघवचैतन्य.**

**राघवदास–१** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] रामदासी कवी. ऋग्वेदी, आश्वलायनसूत्री, विश्वामित्रगोत्री ब्राह्मण. कृष्णातीरावरील म्हैसाळ ह्या गावचे कुळकर्णी. गुरुपरंपरा : रामदास > अंबिकाबाई > भिमाक्का > मल्हारबोवा > गिरधर > राघवदास. अंबिकाबाईंच्या वाळवे मठाची ही परंपरा आहे. ह्या वाळवे मठात (सातारा जिल्ह्यातील कृष्णातीरावरील) राघवदासांनी *वेदमनोगत* ह्या ग्रंथाची रचना केली. ह्या ग्रंथातील पहिला अध्याय नमनाचा आहे, दोन ते चार असे तीन अध्याय कर्मकांडाचे आहेत, पुढचे तीन उपासनाकांडाचे, आठ ते दहा ज्ञानकांडपर आहेत व शेवटच्या अकराव्या अध्यायास 'पूर्ण अध्याय' असे नाव आहे (श्रीसांप्रविवि., खं. २, लेखांक ८९).

**रचना : अमु** – १. वेदमनोगत; अध्याय ११; ओ. सं. २६९९; दोन प्रती; वाळवे मठ. २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**राघवदास–२ (शिराळी)** [इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] गोमंतकीय कवी. रमावल्लभदासांच्या परंपरेतील. गुरुपरंपरा : रमावल्लभ > अमृत > नरहरि > गंगाधरस्वामी > निजानंद > राघवदास. ह्यांनी *बिरुदावळी* ह्या ग्रंथात आपल्या गुरूचे चरित्र सविस्तरपणे लिहिले आहे. सध्या त्यातील एकच अध्याय उपलब्ध आहे. ह्या राघवदासांची काही रचना कानडी भाषेतही आहे (मसा., आ. ५, पृ. ८०१).

**रचना : मु.** – बिरुदावळी; संपा. उभयकर, सु. गो.; हुबळी. **अमु.** – १. दत्तस्तुती, २. रमावल्लभदासमहिमा, ३. स्फुट पदे; संककासू., पृ. १३७–१३८.

**राघवदास–३** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – १. २ रामपर पदे; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४८. २. पांडुरंगाची आरती; मआ., पृ. ३८०. **अमु.** – आरत्या, श्लोक, ज्ञानपर, बोधपर पदे इ. स्फुट कविता; तंसम. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**राघवदास–४** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – अध्यात्मरामायण; अभंगबद्ध (युद्धकांडापर्यंत); जगद्धितेच्छु; पुणे, १८७८.

**राघवदास अनंत / ० राघवदासी अनंत / ० राघवभक्त** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – आरत्या व पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० राघवदासी अनंत**– पहा **राघवदास अनंत.**

**० राघवभक्त** – पहा **राघवदास अनंत.**

**० राघवमुनि–१** – पहा **राघव–३.**

**० राघवमुनि–२** – पहा **राघव–४.**

**० राघवरंक** – पहा **राघव–१.**

**राघव व्यंकटेश** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.**– सोळा सोमवार व्रतकथा; ले. श. १७८३; गा. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १३८.

**राघवसुत / ० राघवतनुज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० राघवस्वामी–१** – पहा **राघव–१.**

**० राघवस्वामी–२** – पहा **राघव–२.**

**राघवांकित** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**राघवात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. मारुतिजन्म; र. का. : श. १७२०; २. हनुमच्चरित्र; ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**राघवोपाध्ये** – पहा **रवळोबास.**

**राघुजी पाटील** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – पेशवाई व शिवशाही नाशाचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पुणे, १९६९; पृ. ७८–८०.

**राघू** [का. अनु.] शाहीर. ह्याने *बदामीचा पोवाडा* ह्या आपल्या रचनेत शेवटी स्वत:विषयी माहिती दिली आहे ती अशी : "आमचें राहणें मुंगवड्याला ॥ आम्ही म्हेमान पेठचे राहणार । आमची मिरास वाईची ॥"

इ. स. १७८५ त पेशवे, मोगल व भोसले ह्यांनी हैदरगुलाम टिपूकडील बदामीचा किल्ला काबीज केला, त्या प्रसंगाची हकीकत ह्या पोवाड्यात येते. प्रस्तुत पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये संग्रहित, पृ. १८१–१८६.

**राघो धौशा** [का. अनु.] महानुभाव शाहीर. नेवासे प्रांती राहणारा. ह्यांचे गुरू गोविंद हे विद्वांस घराण्यातील होते. दत्तानुयायी धौशा म्हणून हा शाहीरांत प्रसिद्ध आहे. ह्याचा फड पांचाळेश्वरास असे पांडोबा व मोतीराम हे ह्याचे शिष्य. ह्याच्या लावण्या त्याच्या गुरूपेक्षा वेगळ्या धर्तीच्या आहेत (मसा., आ. ५, पृ. ५८८).

**राघोनंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**राघो पंडित** [अंदाजे इ. स. १३१२] महानुभाव कवी. आनेराज व्यास ह्यांचे शिष्य. पारमांडल्य आम्नायाचे अनुयायी.

**रचना : अमु.** – दृष्टान्त विधायक (सूत्रपाठावरील भाष्य). २. प्रश्नोत्तरी. ३. संध्यारहस्य.

**० राघोबा** – पहा **रामदास.**

**राघोभट्ट** [इ. स. चे १४ वे शतक, प्रारंभकाल] महानुभाव कवी नागदेवाचार्यांचे शिष्य.

**रचना : अमु.** – पूजावसर; य. खु. देशपांडे, महानुभावीय कवि

आणि ग्रंथकार शिष्यपरंपरा – वंशवृक्ष; ममवा.; पुणे, १९६०.

**राघो मुशाफर** [का. अनु.] शाहीर. *अंधारातील लावण्या* (संपा. य. न. केळकर; पुणे, १९५६) ह्या संग्रहात ह्यांची एक लावणी प्रसिद्ध (पृ. २२६–२२७.).

**राज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – वस्त्रहरण; सवामं. हस्त. सू., खं. २.

**राजगोपाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णस्तुतिपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**राजाई** [इ. स. चे तेरावे शतक] कवयित्री. वारकरी पंथाचे अग्रणी संत नामदेव ह्यांच्या ह्या पत्नी. ह्यांची अभंगरचना *श्रीनामदेवांची अभंगगाथा* (मुंबई, १९७०; आत्मचरित्रपर अभंग) ह्यात समाविष्ट.

**राजाराम–१ / ० चिदंबरदास राजाराम** [श. १६९० / इ. स. १७६८ – श. १७६५ / इ. स. १८४३] संतकवी. गुर्लहोसूर (कर्नाटक) येथील अवतारी पुरुष चिदंबर दीक्षित ह्यांचे शिष्य. राजारामांचा जन्म औरंगाबाद जिल्ह्यातील वैजापूर तालुक्यातील बाभुळगावी श. १६९० फाल्गुन वद्य द्वितीयेस झाला. हे रजपूत वंशातील. वडिलांचे नाव हरिशिंग व आईचे नाव लक्ष्मी. बालवयातच ह्यांना देवाची ओढ लागली. बालपणी द्वारकादास नावाच्या त्यांच्याच गावातील सिद्धयोग्याकडे ते जात असत. राजाराम गृहस्थाश्रमी होते. त्यांना कृष्णा व राधा अशा दोन स्त्रिया होत्या. पुढे हे हुशंगाबादेस शिलेदारी करू लागले. पण ह्या नोकरीत त्यांचे मन रमेना. तेलंग देशातील कृष्णभट्ट नावाच्या एका ब्राह्मणाने कर्नाटकातील गुर्लहोसूरकर चिदंबरस्वामींची कीर्ती ह्यांच्या कानावर घातली.

एवढ्यात मातेचे निधन झाल्याने मन अधिक विरक्त होऊन राजाराम चिदंबरस्वामींकडे जाण्यास निघाले. बरोबर निंबाजी हा गुरुबंधू व पत्नी ह्यांना घेऊन ते श. १७२७ (इ. स. १८०५) च्या आषाढात आपल्या गावाहून निघाले. प्रवास करीत मंडळी पंढरपुरास आली. तेथे चिदंबरगुरूंचे दर्शन घडविण्याबद्दल राजारामांनी श्रीविठ्ठलाची प्रार्थना केली. तेथल्या एका बडव्याने बरोबर एक मनुष्य व हुंडी देऊन कुंदगोळास ह्या मंडळींची रवानगी केली. तो दिवस श. १७२७ (इ. स. १८०५) श्रावण वद्य चतुर्दशी होता. कुंदगोळास येऊन तीन दिवस झाले तरी स्वामींचे दर्शन घडले नाही. शेवटी तिसऱ्या दिवशी रात्री स्वामींनी स्वप्नात दर्शन देऊन त्यांच्या कानात मंत्र सांगितला. प्रत्यक्ष दर्शन मात्र त्यानंतर सात दिवसांनी झाले. हा दिवस राजारामांच्या जीवनातील अत्यंत महत्त्वाचा. पुढे गुर्लहोसूर येथे स्वामींची मूर्ती तयार करवून घेऊन ती ह्यांनी बाभुळगावास आणली. नंतर तेथेच काव्यग्रंथ-रचनेत राजाराम ह्यांनी आपले आयुष्य व्यतीत केले. 'बहुत ग्रंथ केले जग उद्धरीले' असे राजारामांची शिष्या व चिदंबरस्वामींची निष्ठावान भक्त विठाबाई सांगते. श. १७६५ (इ. स. १८४३) कार्तिक वद्य द्वितीयेस गुरुवारी प्रातःकाळी ह्यांनी शहापूरला (बेळगाव) आपला देह ठेवला.

स्वतः राजारामांनी त्यांच्या अभंगातून चरित्रविषयक माहिती विस्ताराने दिली आहे. विठाबाई (ही राजारामांची शिष्या असा समज आहे) राजारामांच्या दिंडीबरोबरच गुर्लहोसुरास चिदंबरस्वामींच्या दर्शनास गेली व त्यांच्या बरोबर तिलाही चिदंबरांच्या कृपेचा प्रसाद मिळाला. ह्या विठाबाईनेही राजारामांचे समग्र चरित्रवृत्त तिच्या अभंगांतून कथन केले आहे. त्यामुळे राजारामांचे उपलब्ध चरित्र वश्वसनीय मानायला हरकत नाही.

राजारामांनी अभंग व इतर काही ग्रंथ रचले आहेत. त्यांनी एकूण दीड लाख अभंग रचल्याचे त्यांची शिष्या विठाबाई सांगते. चिदंबर-वामींच्या लीला हाच त्यांच्या अभंगांचा मुख्य विषय आहे. भक्ताच्या संबंधात निजध्यासाचे महत्त्व राजाराम मार्मिकपणे सांगतात, कारण ह्या निजध्यासावाचून सांगणे किंवा ऐकणे ही बाष्कळ बडबडच ठरते. ते म्हणतात : 'दास म्हणे नीज ध्यास तो लागला । चिदंबर ह्याता येत असे ॥' निजध्यास हेच सगळ्यांचे सार असून 'धन्य तोची भक्त निज-ध्यास ज्यासी । तेणे अपणासी उद्धरीले ॥' ही स्वानुभवाची प्रचीती आहे.

उद्धरून जाण्यासाठी, गुरूशी एकरूपत्व पावण्यासाठी हे परमेश्वराचा धावा करतात : 'अशनी भोजनी शयनी । ध्यान करा निशिदिनी ॥' असे नाममाहात्म्य सांगतात. त्याने वैकुंठही ठेंगणे होईल, असे ते म्हणतात. सद्गुरुकृपेने जे आत्मज्ञान प्राप्त झाले त्यामुळे अंतःकरण अंतर्बाह्य शुद्ध झाल्यानेच स्वानंदसुखाचा ठेवा गवसला, अशा प्रकारचा अनुभव त्यांच्या अभंगांतून व्यक्त केलेला दिसतो. ह्यांच्या अफाट अभंग-रचनेपैकी काही अभंगच प्रसिद्ध झाले आहेत. इतर बहुतांश रचना अप्रसिद्ध असून बाभुळगाव येथील त्यांच्या वंशजांच्या संग्रही आहे, अशी माहिती ग. ह. खरे ह्यांनी दिली आहे (भाइसंमंत्रै., व. ४४, अं. १–४, पृ. ८४–८५).

अभंगरचनेखेरीज राजारामांची इतरही ग्रंथरचना सापडते. ही रचना बेळगाव येथून मुद्रित झाल्याचे ज. र. आजगांवकर ह्यांनी नमूद करून ठेवले आहे. पण हे ग्रंथ मात्र आज दुर्मिळ आहेत. त्यांपैकी *अद्वैतसार* ग्रंथात अद्वैत वेदान्त नित्य व्यवहारातील दृष्टान्तांच्या साहाय्याने समजावून देण्याचा प्रयत्न केला आहे. सद्गुरूकृपेने घडलेल्या ब्रह्मानुभवाचे वर्णन त्यांनी *ब्रह्मानुभव* ह्या ग्रंथात केले आहे. सद्गुरूपदेश ह्या छोट्याशा ग्रंथात सद्गुरुच्या अनुग्रहाने आत्मज्ञानाचा साक्षात्कार झाला असा स्वानुभव ते व्यक्त करतात. गुरुकृपेव्यतिरिक्त अन्य साधनांची व्यर्थता ते परत परत पटवून देतात. ह्यासाठी प्रपंच सोडून वनात जाण्याची जरूर नाही व योगसाधनेचा खटाटोपही आवश्यक नाही. हे कसे तर 'हृदयस्थ आत्माराम निरंतर । सबाह्य भरला चिदंबर । ज्ञानदृष्टि दिसे गोचर । अनुभव साक्षात्कार या ना ॥" *गुरुगम्यठेव* ह्या प्रकरणातही वरील स्वरूपाचेच विचार ते व्यक्त करतात.

राजारामांची रचना प्रासादिक आहे. वेदान्तामधील तत्त्वे सोप्या भाषेत ते सांगतात, एवढा अनुभवाचा अधिकार त्यांच्याजवळ आहे गुरुकृपेने प्राप्त झालेल्या अद्वैतानुभवाने त्यांचे जीवन अंतर्बाह्य उजळून गेले असल्याने गुरुकृपेची महती आणि आत्मसाक्षात्काराचा अनुभव हाच त्यांच्या रचनेचा स्थायिभाव झालेला दिसतो. विपुल आणि प्रासादिक अशी रचना करणाऱ्या ह्या ग्रंथकाराचे महत्त्व वाङ्मयेतिहासात मोठे आहे.

**रचना : मु.** – १. अद्वैतसार; ओ. सं. १५२; ले. का. : श. १७६१ (इ. स. १८३९); विकारी संवत्सर, आषाढ शुद्ध ७, गुरुवार; २. गुरुगम्यठेव; ओ. सं. ३७; ३. निजात्मबोध; ४. ब्रह्मानंदलहरी; ५. ब्रह्मानुभव; ओ. सं. ६७; ६. महानुभाव; ७. सद्गुरूपदेश; ओ. सं. ५३; नकल श. १८५५ (इ. स. १९३३); श्रीमुख संवत्सर, कार्तिक शु. १; ८. ज्ञानगर्भ; ९. अभंग; सं. ५२७; चिदंबरवर प्रसाद अभंगगाथा; रामतत्त्वप्रकाश, बेळगाव. **अमु.** – अभंग; बाभुळगाव येथील वंशजांचा खाजगी संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : राजारामाचे अभंग; प्रतिष्ठान, मार्च १९५८; पृ. २२–२५.; २. निखळ, म. वि. : चिदंबर-शिष्य राजारामाची ग्रंथसंपदा; भाइसंमंत्रै., व. ४४, अं. १–४, पुणे, १९६६; पृ. ८१–८५.

**राजाराम–२** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – पेशवाईनंतरच्या दीन स्थितीवर पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पुणे, १९६९; पृ. ६४.

**राजाराम प्रासादी** [ ? – समा. श. १७६९ / इ. स. १८४७] कवी. संतचरित्रकार. राहणारे चरेगावचे (जि. सातारा). रामदासी पंथातील श्रीसिद्धेश्वरमहाराजांचे शिष्य. ह्यांची समाधी जांबेजवळ

मौजे गुंज येथे नदीकाठी आहे.

ह्यांनी *भक्तमंजरी* हा ग्रंथ लिहिला आहे. संतचरित्रकार महिपतीने वर्णन न केलेल्या अशा साधुपुरुषांची चरित्रे गाण्याचा कवीचा मानस आहे. आरंभीच्या अकरा अध्यायांत समर्थ रामदासस्वामींचे चरित्र आहे. उरलेल्या ९७ अध्यायांत शिवराम, नवनाथ, निरंजन, वामन, गोपाळनाथ, दीननाथस्वामी, शंभुअप्पा, सिद्धेश्वरस्वामी, बाबा पाध्ये, मध्वनाथ, मैनाबाई, ज्योतिपंत, मुक्तनाथ, तुका विप्र, चिदंबरस्वामी, मोरोपंत, अमृतराय, आनंदतनय, अलर्क इत्यादी लहानमोठ्या जवळजवळ शेसव्वाशे संतांची चरित्रे वर्णन केली आहेत. स्वतःचे गुरू सिद्धस्वामी ह्यांचे चरित्र ९८ ते १०२ अध्यायांत दिले आहे. समर्थपंचायतनातील पाच सत्पुरुषांची चरित्रेही आली आहेत. 'साधुपरतें लोकत्रइं । आणिक गोमटें दुजें नाहिं ॥' ह्या भावनेने हे संतचरित्रे लिहितात.

हा ग्रंथ *भक्तलीलामृता*पेक्षा मोठा व व्यवस्थित आहे. माहिती बरीच परिश्रमपूर्वक मिळविलेली दिसते. ह्या ग्रंथात परंपरा, जन्ममृत्युकाल ही माहिती आपल्या समजुतीप्रमाणे चौकसपणाने दिली आहे. सिद्धस्वामींच्या चरित्रांत ह्यांनी स्वामींचे गणपतिस्तवन, काही अभंग, ओव्या इत्यादी वाङ्मयाचा भरपूर उपयोग करून घेतला आहे. तसेच तुकोबा, रामदास इ. संतांच्या वाङ्मयाचा उल्लेख मधून मधून केला आहे. ही माहिती कशी मिळविली तर "आधार नाहीं कोणता यातें । स्वमुखें येऊनि पंढरीनाथ । चरित्रें सांगत भक्तांचीं ॥" असे हे म्हणतात. [➪ ३.]

चरित्रवर्णन करताना हे अद्भुत कथांचा आश्रय घेतात पण फारसा पाल्हाळ लावीत नाहीत. ह्यांची वर्णनशैली रेखीव आहे. हे आपल्या पूर्वीच्या संतचरित्रकारांची चरित्रेही तन्मयतेने रंगवतात. ह्यांच्या मते शौनक ऋषीने नाभाजींचा अवतार घेतला व पांडुरंगाच्या कृपेने 'हिंदुस्थानी परम मिठी भाषेत' नाभाजींनी संतचरित्रे गायिली. परंतु नाभाजींची भाषा सर्वांना समजणार नाही म्हणून "देहवस्त्र टाकुनी जीर्ण । नाभाजीनें त्या घेतलें नूतन । महीपति नाम स्वीकारून । जाहाले उत्पन्न सद्विप्रकुळीं ॥"– नाभाजींनी महीपतींचा अवतार घेतला. ह्यांची पुष्कळ पदे प्रसिद्ध झालेली आहेत. पैकी काही चमत्कृतिजनक आहेत.

**रचना : मु.** – १. भक्तमंजरीमाला; अ. १०९; ओ. सं. १३०००; र. का. : श. १७५६; खं. १ ते ३; रामदास आणि रामदासी; भा. २७; धुळे, श. १८५२–१८५४ (इ. स. १९३०–३२). २. पदे ४५; कासं., क्र. ९४–९५; पृ. १११–१२६.

**राजू सुलतान** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – टिपूवरील स्वारीचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पुणे, १९६९; पृ. ६१–७३.

**राजे बापू** [का. अनु.] मुसलमान कवी.

**रचना : अमु.** – मराठी रिवायती; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १७८–१८०.

**राणू न्हावी** [का. अनु.] शाहीर. जुन्नरच्या गोविंदराव शाहीरांचे शिष्य. गोविंदरावो लावण्यापोवाड्यांच्या हस्तलिखित बाडात गोविंदरावांच्या कवनांबरोबर मल्हारी, बहिरू, राणू ह्यांचीही रचना उपलब्ध आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न.; ऐतिपो., खं. २; पुणे, १९४४; पृ. १०६.

**राणू सुतार** [का. अनु.] शाहीर. पुणे येथे राहणारा. ह्याने दुसरे *मल्हारराव होळकर* ह्यांच्यावर केलेला पोवाडा उपलब्ध आहे. त्यात तुकोजी होळकरांचे पुत्र मल्हारराव ह्यांना शिंदे ह्यांनी हल्ला करून ठार मारले, अशी माहिती हा देतो. हा पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये संग्रहित (पृ. ३२३–३२६).

**राणोजी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – रामनामपर पद व गणेशपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**राधाबाई (स्वामी)** [इ. स. चे १७ वे शतक] पदकार. मुडलगीच्या स्वामी-परंपरेतील अद्वयबोधांच्या ह्या पत्नी. ह्यांची समाधी मुडलगी येथील मठात आहे.

**रचना : मु.** – एक पद व अपूर्ण गंगामाहात्म्य; मुडलगीचे स्वामी; संपा. आवळीकर, पंडित; धारवाड–पुणे, १९७१; पृ. अनुक्रमे ३० व ४१.

**राधामाधव** [का. अनु.] पदकार. *पद्संग्रह, भाग ३* (संपा. वा. दा. ओक; मुंबई, १९०१) मध्ये *माधवकृत पदे* म्हणून दिलेल्या पदांतील 'चतुराकर नट हरी' (पद क्र. ४६९, पृ. १७५) हे पद राधामाधव ह्या कवीचे असावे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग.; काही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांची पदे; भाइसमंत्रै., व. २६, अं. ४, १९४६; पृ. ४२.

**राधाश्रीधर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रानडे ऊर्फ स्वच्छंदानंदस्वामी** [का. अनु.] कवी. ह्यांच्या नावावर *देवी भागवत* (मराठी) ह्या ग्रंथाचा उल्लेख आढळतो (कृ. गं. कवचाळे, मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४३).

**(रे.) रॉबर्ट डब्ल्यू. ह्यूम / ० ह्यूम, रॉबर्ट डब्ल्यू.** [? – इ. स. २६ नोव्हेंबर १८५४]. अमेरिकन ख्रिस्ती मिशनरी. *ज्ञानोदय* पत्राचे संपादक मुद्रक व प्रकाशक. हे १० ऑगस्ट १८३९ रोजी हिंदुस्थानात आले. मुंबईतील 'ट्रॅक्ट अ‍ॅण्ड बुक सोसायटी'चे इ. स. १८४५ ते १८५४ ह्या काळातील सेक्रेटरी. बायबलच्या मराठी भाषान्तर समितीचे हे एक महत्त्वाचे सभासद होते. ह्यांनी बायबल व ट्रॅक्ट्स ह्यांच्या अनुवादाचे अंतरंग, मराठी भाषेची शुद्धता राखण्याच्या दृष्टीने, परिश्रमपूर्वक सुधारले. ह्यासंबंधी *अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा इतिहास* ह्या पुस्तकात (पृ. ६३) म्हटले आहे : "या साहेबांचा कल पहिल्यापासून विद्याविषयक कामाकडे फार होता. ग्रंथ लिहिणें, वर्तमानपत्र चालविणें व तरुणांस शिक्षण देणें यांत त्यांस परम संतोष वाटत होता. पुस्तक किंवा ट्रॅक्ट याचें बाह्यांग सुंदर असण्याची त्यांस नेहमी आवश्यकता वाटत असे. त्याप्रमाणे ही पुस्तके शिळाछापावर न छापतां टाइपांनीं छापावीं हा प्रयत्न साहेबांनीं केला. या कामीं मदर ह्यूम यांची त्यांस मोठी मदत होती. मडमसाहेबांनीं सुंदर चित्रांचे नमुने स्वतां हातानें तयार करावे व साहेबांनीं ते कागदावर छापून घेण्याची व्यवस्था पहावी. अशा रीतीनें जसें आंत तसें बाहेरहि पुस्तक सुंदर होऊन लोकांचें मन त्याकडे धांवत असे. यापूर्वीं हीं पुस्तकें सोसायटी फुकट वांटीत असे, पण ह्यूम यांस तसें करणें आवडलें नाहीं. त्यांनीं माफक किंमत प्रत्येक पुस्तकावर ठेवली. असें जरी झालें तरी पुस्तकांच्या सुंदरपणावरून लोक आवडीनें तीं घेऊं लागले."

ह्यांचे वास्तव्य हिंदुस्थानात इ. स. १८३९–१८५४ पर्यंत होते. मिशनच्या कार्यातून निवृत्त होऊन ते अमेरिकेस परतले असता, वाटेंतच, बोटीवर मृत्यू पावले.

**रचना : मु.** – १. गुरू करण्याविषयी; मुंबई, १८५१; २. नारायणबावा; मुंबई, १८५१; ३. पशुज्ञानप्रकाश; मुंबई, १८५१; ४. मूर्तीचा उच्छेद; मुंबई, १८५०; ५. लेकरांकरितां चित्रांचें पुस्तक; मुंबई, १८५१; ६. विचारकथन; मुंबई १८५०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म. : रे. रॉबर्ट डब्ल्यू. ह्यूम; युमअसे., मुंबई, १९६०; पृ. २७३–७४.

**रॉबर्ट ड्रमंड** [? – १४ मार्च १८०९] व्याकरणकार व भाषान्तरकार. मुंबई प्रांतात मोडी लिपीमध्ये पहिल्यानेच टाइपात छापलेल्या मराठी-गुजराती भाषेतील व्याकरणाचे कर्ते. *इलस्ट्रेशन्स ऑफ द*

*ग्रॅमॅटिकल पार्ट्स ऑफ गुजराती, महरट्ट ॲंड इंग्लिश लॅंग्वेजिस* (मुंबई, कुरियर प्रेस, १८०८) हे ह्या पुस्तकाचे नाव.

ड्रमंड ह्यांचा व्यवसाय वैद्यकीचा होता. ते विलायतेहून मुंबईस १७९३ मध्ये आले. सरकारने पहिल्याने ह्यांची असिस्टंट सर्जन व पुढे १८०३ मध्ये सर्जन म्हणून नेमणूक केली. १८०९ मध्ये विलायतेस आगबोटीने जात असता ती वाटेतच बुडाल्यामुळे त्यांना मृत्यू आला.

डॉ. ड्रमंड ह्यांनी रचलेल्या व्याकरणाच्या पुस्तकाचे स्वरूप खालीलप्रमाणे आहे : ग्रंथाच्या सुरुवातीला ड्रमंड ह्यांनी गुजराती व मराठी वर्णमाला देऊन इंग्रजीतील अक्षरांनी उच्चार कसा करावयाचा ते इंग्रजी शब्द देऊन उदाहरणाने दाखवून दिले आहे. वर्णमालेनंतर बाराखड्या दिल्या आहेत. व्याकरणाचा प्रास्ताविक म्हणून एवढा भाग दिल्यानंतर त्यांनी नामे, त्यांच्या विभक्ती, सर्वनामे व त्यांच्या विभक्ती, क्रियापदे, अव्यये व अंक एवढा व्याकरणाचा भाग दिला आहे. ह्यापुढे काही वाक्प्रचार व सुभाषितवजा म्हणी दिल्या आहेत. ह्या पुस्तकाचा दोनतृतीयांश भाग शब्दसंग्रहाने व्यापला आहे. सार्थ व सटीप असा हा संग्रह आहे.

ह्या पुस्तकात तत्कालीन सामाजिक, धार्मिक व राजकीय परिस्थितीचे ज्ञान व्हावे असे धोरण राखून शब्दांची निवड केलेली दिसते. निरनिराळ्या धर्मांतील लोकांची माहिती दिल्यानंतर उद्योगधंद्यानिमित्त ज्या जाती व वर्ग पडले आहेत, त्यांचीही माहिती दिली आहे. उदा., बामण, धेड, धोबी, हजाम, यति, जोगी, जंगम, जंगली, बैरागी, रजपूत, खत्री, कोळी, सुतार, कुणबी, लोहार, महिवाशी, पंड्या, मिआनी, मोमिन असे बरेच शब्द विस्तृत अर्थासह देण्यात आले आहेत. महाराष्ट्र व गुजरात ह्या प्रदेशांत प्रवास करणाऱ्या युरोपियनांना, व्यवहारापुरता तरी, मराठी व गुजराती भाषेचा परिचय व्हावा हा ह्या पुस्तकाच्या रचनेचा डॉ. ड्रमंड ह्यांचा उद्देश असावा असे दिसते. ह्या पुस्तकाची एक प्रत मुंबईच्या एशियाटिक सोसायटीच्या ग्रंथालयात पाहावयास मिळते. डॉ. ड्रमंड ह्यांनी ह्याशिवाय ईस्ट इंडिया कंपनी सरकारच्या १७९९–१८०७ ह्या काळातील कायदेकानूंचे मराठीत भाषान्तर केले असे त्यांच्या लायब्ररी कॅटलॉगवरून आढळते. पण ते आज उपलब्ध नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म. : रॉबर्ट ड्रॅमंड; युमअसे.; मुंबई, १९६०; पृ. ३४४–३४६.

**(रेव्ह.) रॉबर्ट निस्बिट / ० निस्बिट, रेव्ह. रॉबर्ट** [इ. स. २२ मार्च १८०३ – २७ जुलै १८५५] ख्रिस्ती धर्मोपदेशक. मुंबईच्या 'फ्री चर्च विद्यालया'तील मराठी भाषेचे शिक्षक. ह्यांना संस्कृत, हिंदुस्तानी व हिब्रू ह्या भाषा उत्तम अवगत होत्या. शुद्ध व डौलदार मराठी भाषेत लेखन व वक्तृत्व करण्याबद्दल हे फार प्रसिद्ध होते. गोविंद नारायण माडगांवकर (चरित्र : पहा मवाको., खंड २) ह्यांनी आपल्या *उद्भिज्जन्यपदार्थ* ह्या पुस्तकाच्या (इ. स. १८५६) प्रस्तावनेत ह्यांच्या मराठी भाषेच्या नैपुण्याबद्दल व एतद्देशीय तरुण पिढीने तिच्यात नैपुण्य मिळवून तिची सेवा करावी ह्या हेतूने ते तिला जी प्रेरणा देत तिजबद्दल पुढील स्वानुभवाचे उद्गार काढले आहेत : "इंग्रजी शिकायास लागल्यापासून मला तर महाराष्ट्र भाषेचा तिरस्कार येत असे. असीच बहुतेक लोकांची स्थिती झाली होती. एकादा प्राकृत ग्रंथ वाचावा किंवा हातांत धरावा म्हटलें म्हणजे वाईट वाटे. जेव्हां मी फ्री चर्च विद्यालयांत गेलों तेव्हा डाक्तर विल्सन व मयत रेवरेंड रॉबर्ट निसबिट यांची मराठी भाषेवर श्रद्धा आणि एतद्देशीय मुलांमध्यें ती भाषा शुद्ध येण्याविषयींची उत्कंठा व श्रम पाहून मला तिचा थोडा अभ्यास करण्याचें आवश्यक पडलें ...... त्यावेळीं मलाहि त्या गोष्टीचा निदिध्यास लागल्यावरून मीहि तिजवर बरेच परिश्रम केले. तेव्हांपासून मराठी भाषेची गोडी लागून, जें कांहीं अल्पस्वल्प सध्यां त्या भाषेचें ज्ञान मला झालें आहे, त्याचा मी या गृहस्थाचा ऋणी आहें." मराठी मुलांना मराठी भाषा चांगली यावी ह्यासाठी निस्बिट किती श्रम घेत ह्याची कल्पना बाबा पदमनजी ह्यांनी (चरित्र : पहा मवाको., खं. २) आपल्या *अरुणोदय* ह्या पुस्तकात (इ. स. १८८८, पृ. २५४) "हे साहेब आम्हांस मराठी शिकविण्याविषयीं फार श्रम घेत. आम्हीं इंग्रजीवरून जीं भाषान्तरें करावीं, किंवा नवीन निबंध रचावे, ते घरीं नेऊन शुद्ध करून त्यावर स्वाभिप्राय लिहून आणून आम्हांस परत देत." असे जे लिहिले आहे त्यावरून येते.

निस्बिटच्या मराठी भाषानैपुण्याचा फायदा बायबलचे भाषान्तर करणाऱ्या मंडळीस चांगलाच मिळाला. त्यांनी *सेंट मार्कचें गॉस्पेल* मराठीत अनुवादित करून दिले. त्याचप्रमाणे मुंबई प्रांतातील बेनेइस्त्राएलांसाठी मूळ हिब्रूवरूनही मराठी भाषान्तर करून दिले. ह्या भाषान्तरित पुस्तकांव्यतिरिक्त 'बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी'साठी ह्यांनी पुढील पुस्तके स्वतंत्रपणे लिहून दिली : (१) *खरे प्रायश्चित्त*; १८३०; हे १८२७ साली लिहिले असे निस्बिटचा चरित्रकार मरे मिचेल म्हणतो. (२) *भगवद्गीतेचें सार* (*भगवद्गीता* खरी नाही असा शेवटी निष्कर्ष काढला आहे). (३) *हिंदुशास्त्रांत सांगितलेलें ब्राह्मणांचें महत्त्व*; १८३२. (४) *पृथिव्यादि भूतांचें भजन*; १८३५. (५) *होळीविषयीं उपदेश*; १८४७.

रेव्ह. निस्बिट ह्यांनी हिंदूंचे धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान ह्यांचा चिकित्सापूर्वक अभ्यास केलेला होता. ह्या अभ्यासाच्या बळावरच त्यांनी कर्नल व्हान्स केनेडी ह्यांच्या *एन्शन्ट ॲण्ड हिंदु मायथॉलजी* ह्या ग्रंथाच्या संदर्भात अनेक वादविवादात्मक लेख लिहिले.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म. : रॉबर्ट निस्बिट; युमअसे.; मुंबई, १९६०; पृ. ३०३–३०७.



**० राम–१** – पहा केशिराजव्यास–१.

**० राम–२** – पहा रामदास.

**० राम–३** – पहा **रामकवि–३.**

**रामकल्याण** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**रामकवि–१** [इ. स. चे सोळावे शतक] कवी. वडिलांचे नाव बाळकृष्ण. आईचे नाव गंगा. हे बैकारवंशातील कपिलगोत्री. पिताच ह्यांचा गुरू असे ग्रंथातर्गत निर्देशावरून कळते. ह्यांनी *प्रदोषव्रतमाहात्म्य* हे काव्य रचले आहे. नावावरून हे काव्य एखादे पौराणिक प्रकरण असावे असे वाटते. पण तसा प्रकार नाही. 'मराठीत जीं अनेक उत्तम काव्यें आहेत त्यांत मोडण्यासारखें आहे' असे ह्या काव्याबद्दल वि. का. राजवाडे ह्यांनी मत व्यक्त केले आहे.

**रचना :** अमु. – प्रदोषव्रतमाहात्म्य; प्रकरणे २३, ओ. सं. ३७३३; र. का. : श. १५६७ (इ. स. १३४५); प्रत श. १६२१, भाइसमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : रामकविकृत प्रदोषव्रतमाहात्म्य; भाइसंमंइति., श. १८३६, पृ. ३७–४०.

**रामकवि–२** [अंदाजे इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर व १९ व्या शतकाचा प्रारंभकाल] कवी व कोशकार. तंजावरकडे स्थिर झालेल्या महाराष्ट्रीय घराण्यातील असावा. कवी स्वतःस 'कोळे नृसिंहदेवाचा दास' असे म्हणवितो. एके ठिकाणी 'श्रीनृसिंहानुचर' असेही हे आपणास संबोधतात. ह्यावरून ह्यांचे कुलदैवत सातारा जिल्ह्यातील वाळवे तालुक्यात कृष्णाकाठी असलेल्या कोळे गावातील नृसिंह होते असे दिसते. आपण 'कर्नाटकी निवसलो' असे आपल्या ग्रंथात ह्यांनी स्पष्टच सांगितले आहे.

ह्यांनी *भाषाप्रकाश* नावाचा एक कोश-ग्रंथ रचला आहे. आपल्या-

प्रमाणे देशांतरित झालेल्या मराठी भाषिकांच्या उपयोगार्थ हा कोश आपण रचीत आहो अशी आपली भूमिका रामकवींनी प्रारंभीच स्पष्ट केली आहे. हा शब्दकोश असून तो पद्यात अनुष्टुभ वृत्तात रचलेला आहे. ह्यामध्ये सुमारे ४५०० शब्द घेतलेले दिसतात. ग्रंथ तेवीस वर्गांत विभागला असून ह्या वर्गांची नावे प्रार्थनावर्ग, संकेतवर्ग (संकेतांचे स्पष्टीकरण करणारा), शब्दादिवर्ग (ध्वनिवाचक शब्द), दानवर्ग (दानवाचक विविध शब्द), वाग्वर्ग, संख्यावर्ग इ. – ह्याप्रमाणे आहेत. म्हणजेच शब्दांचा संग्रह त्यांची वर्गवारी करून केला आहे. ग्रंथाची रचना इ. स. च्या १८ व्या शतकाच्या अखेरीस किंवा १९ व्या शतकाच्या सुरुवातीस झाली असावी.

ग्रंथास *ज्ञानेश्वरी*चा आधार घेतला असे 'ज्ञानेश्वर्यादिकाधारे वदतो स्वल्पही बहू' ह्या कव्युक्तीवरून वाटते. *ज्ञानेश्वरी*तले सुमारे ४५० शब्द कोशात सापडतात. कोशातील कानडी किंवा द्राविडी शब्दांचा भरणाही लक्षणीय आहे. फारसी शब्द मात्र फारसे नाहीत (अंदाजे १०० असावेत). भाषेतील शब्दांचे अनेक उच्चारपर्याय लेखक ठिकठिकाणी देतो. मराठी भाषेतील जुना शब्दसंग्रह, द्राविडीसारख्या निराळ्या भाषासंस्कृतीशी संबंध आल्याने काही प्रमाणात बदललेले तिचे स्वरूप, ह्यांवरही प्रकाश पाडण्यास हा कोश समर्थ आहे. काही ठिकाणी दिलेल्या शब्दांच्या व्युत्पत्तीवरून कोशकार प्रज्ञावंत असावा असे जाणवते. नानार्थ वर्गातील शब्द अकारविल्हेप्रमाणे अ-पासून ज्ञ-पर्यंत दिले आहेत. ह्या ठिकाणी कोशकाराची कल्पकता आणि वैशिष्ट्य दिसून येते.

मराठी भाषेचा एक जुना शब्दकोश म्हणून ह्या कोशास महत्त्व आहे. प्राचीन मराठीत शास्त्रीय पद्धतीने झालेल्या कोशरचनेत नाव घेण्याजोग्या अशा दोनच रचना आढळतात. एक हा *भाषाप्रकाश* (मु.) व दुसरा *अकारादि प्राकृत भाषेचा निघंटु* (अमु. : तंसम.). महानुभावीय *टीपग्रंथ* किंवा *ज्ञानेश्वरी परिभाषा* व *ज्ञानेश्वरी शब्दपर्याय* ह्यांसारखे ग्रंथही कोश म्हणून दखल घेण्याजोगे नाहीत. कारण *टीपग्रंथां*त स्पष्टीकरणात्मक टीपा दिल्या आहेत आणि *ज्ञानेश्वरीशब्दकोशां*चे स्वरूप अत्यंत जुजबी आहे. यामुळेच *भाषाप्रकाशा*सारख्या ग्रंथाची अपूर्वाई वाढलेली आहे, असे मत तुळपुळे-संपादित रामकविकृत *भाषाप्रकाशा*वरील परीक्षणात रा. चिं. ढेरे व्यक्त करतात (*इंद्रायणी*, मार्च–एप्रि. १९६४, पृ. २५) सांस्कृतिक इतिहासाच्या संशोधनक्षेत्रातही प्रस्तुत ग्रंथ महत्त्वाचा ठरतो. [ ⇨ ३. ]

ह्याच कवीने रचलेल्या *लक्ष्मीनृसिंहकल्पलता* व *सीतास्वयंवर* ह्या काव्यांची नोंद तंजावर सरस्वती महाल मराठी ग्रंथांच्या हस्तलिखित यादीत आढळते.

**रचना : मु.** – १. रामकविकृत भाषाप्रकाश; संपा. तुळपुळे, शं. गो.; पुणे, १९६२. **अमु.** – १. लक्ष्मीनृसिंहकल्पलता; ग्रं. सं. ३३१; २. सीतास्वयंवर; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, वि. म. : रामकविकृत 'भाषाप्रकाश'; मसाप.; ऑग. १९६३; पृ. ३७–३८. २. खरे, ग. ह. : डॉ. तुळपुळे व भाषाप्रकाश-कर्त्या रामकवीच्या स्थलकालांचा शोध; मसाप., एप्रि.–जून १९६८; पृ. ४६–४७. ३. ढेरे, रा. चिं. : भाषाप्रकाश; परी. (तुळपुळे-संपा. प्रत); इंद्रायणी, मार्च १९६४; पृ. २५; ४. प्रियोळकर, अ. का. : भाषेवर रामकवीने पाडलेला प्रकाश; मसाप., एप्रि. १९६३; पृ. २५–३६.

**रामकवि–३** / ० अच्युतसुत / ० राम–३ [का. अनु.] पदकार. ह्या कवीची साठ-पासष्ट पदे वा. दा. ओक संपादित पदसंग्रहात मुद्रित झालेली आहेत. राम, कृष्ण, विठ्ठल ह्या देवतांना आपल्या चरणी ठाव देऊन जन्ममरणाची वारी चुकविण्याची कळकळीची विनंती कवी करीत आहे, असा भाव पदांतून व्यक्त होतो. परमार्थमार्गातील सद्गुरूचे माहात्म्य जाणून 'गुरुचरणी लीन सख्या। होय लौकरि' असा उपदेश हे करतात. 'गुरु महाराजें महाराजें। अद्भुत ऐसें केलें ॥ ध्रु. ॥' किंवा 'अनन्य होई सद्गुरु चरणी रे ॥' ही पदे ह्याची साक्ष पटवतील. संसाराची क्षणभंगुरता व माणसाची विषयांकडे असलेली ओढ ठिकठिकाणी वर्णन करून 'भवपाशांतून मुक्त करणारे ब्रह्मज्ञान शीघ्र प्राप्त करून घे' असा उपदेशही हे सांसारिकास करतात. कवीचे आर्त अंतःकरण ह्या पदांतून प्रभावीपणे व्यक्त झाले आहे. रचना चित्तवेधक आहे. काही ठिकाणी अच्युतसुत असा आपला निर्देश कवी करतो.

**रचना : मु.** – १. पदे ६२; पदसंग्रह, भा. २; मुंबई, १८९६; पृ. ३६–५८. २. पदे ३; पदसंग्रह, भा. ३; मुंबई, १९०१; पृ. ८६, ८७.

**रामकवि–४** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – चिंतामणराव पटवर्धन सांगलीकर याजवरील पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. १६८–१६९.

**रामकिंकर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – प्रातः स्मरामि श्लोकपंचक; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रामकीर्ती** [का. अनु.] जैन कवी. गुरू : महीचंद्र. ह्यांनी रचलेली *पद्मावतीची आरती* (१४ कडवी) उपलब्ध आहे. जैन समाजात जिनदेवाशिवाय दुसरा देव पूजिला जात नाही. पण सामाजिक रूढीतून पद्मावतीपूजेला कसे महत्त्व मिळाले होते व तिची मूर्ती कशी पूजिली जात होती, हे प्रस्तुत रचनेतून लक्षात येते.

**रचना : अमु.** – पद्मावतीची आरती; कडवी १४; नागपूर हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ७३–७४.

**रामकृष्ण–१** [का. अनु.] कवी व टीकाकार. गुरू : विद्यारण्यभारतीतीर्थ. ह्यांचे ग्रंथ येळेहाळी व तंजावर येथील रामदासी मठांत आहेत. विद्यारण्यकृत *पंचदशी*वर ह्यांनी मराठीत गद्य टीका लिहिली आहे. ह्यात पुढील विषय येतात : चित्रदीप, तृप्तिदीप, कूटस्थदीप, ध्यानदीप, नाटकदीप, तत्त्वविवेक, द्वैतविवेक, भूतविवेक, पंचकोशविवेक, विवेकदीप, ब्रह्मानंद, आत्मानंद, अद्वैतानंद, विद्यानंद, विषयानंद (सवामं. बा. १०३९, हस्त. सू., खं. २).

**रचना : अमु.** – १. उपदेशग्रंथ (विद्यारण्यकृत 'ब्रह्मानंद' ग्रंथावर टीका); सवामं. बा. १३२१. २. पंचदशी / चित्रदीपपंचदशी; अ. १५; मराठी टीका – मूळ संस्कृत श्लोकांसह; मसंमं., हवना., पृ. ६७.

**रामकृष्ण–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. सगराची कथा (बालकांड); श्लोकबद्ध; ग्रं. सं. ६०; २. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २, ३.

**रामकृष्ण–३** [का. अनु.] ग्रंथकार. गोपिराज दैवज्ञ ह्यांचे पुत्र.

**रचना : अमु.** – गोत्रनिर्णय; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामकृष्ण–४** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – ३ पदे; पदसंग्रह, भा. २; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६; पृ. ३४–३६.

**रामकृष्ण कविपंडित** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – प्रतापसिंहेंद्रविजयप्रबंध (दोस्तअल्ली वगैरे मोंगलांचा पराजय करून प्रतापसिंह तंजनगरी राज्यारूढ झाले, त्याची हकीकत); श्लोकबद्ध; ग्रं. सं. १८२; तंसम. हस्त. यादी, क्र. २.

**रामचंद्र–१** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, अखेर] शाहीर. 'नूतन वय मुखचंद्र जसा पूर्ण तेज अंबरीं । धन्य हे कांता सृष्टींवरी ॥' ही लावणी व 'भली भलाई कर कांहीं मर्दा गुण ठेवुन जा रे' हा फटका ह्यांच्या नावावर उपलब्ध आहे (मसा., आ. ५, पृ. ५४१–५४३).

**रामचंद्र–२** [का. अनु.] कवी. समर्थशिष्य दिनकरस्वामींचे हे पुत्र.

ह्यांचा मठ तिसगावी असून समर्थांच्या चौदा प्रमुख मठांतील तो एक आहे. ह्यांची समाधी तिसगावानजीक ह्यांच्या वडिलांच्या समाधीजवळच आहे (मसा., आ. ५, पृ. ८८१).

**रचना : मु.** – रामदासांची आरती; मआ., पृ. ४०९. **अमु.** – १. श्रीसीतारामसंवाद; ओवीबद्ध; र. का. : श. १६४४ (इ. स. १७२२), चैत्र शु. १. २. आरत्या, श्लोक, पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामचंद्र–३** [अंदाजे इ. स. १४५०] टीकाग्रंथकार. रत्नपुरातील चतुर्वेदपारंगत कोणी 'कुंड' होते. त्यांनी केलेल्या *निर्माण* ग्रंथाची ह्यांनी टीका केली आहे.

**रचना : अमु.** – कुंडनिर्माण; र. श. १३७२; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ९०.

**रामचंद्र–४ / ० रामचंद्र गोस्वामी (तंजावरस्थ)** [अंदाजे इ. स. १८३९] कवी. रामदासी पंथातील झोळीराम ह्यांच्या तंजावर येथील मठाचे तिसरे अधिपती. झोळीरामांचे बंधू रामशेष गोस्वामी ह्यांचे हे पुत्र. गुरुपरंपरा : समर्थ रामदास > भीमराज > झोळीराम > रामचंद्र गोस्वामी. हे रामाचे व राजेश्वरी देवीचे उपासक होते. शिव-पार्वती-संवादरूप संस्कृत *गुरुगीते*चा ह्यांनी मराठीत अनुवाद केला आहे. ह्यांची इतरही काही स्फुट रचना उपलब्ध आहे. रामनवमीच्या उत्सवाकरिता जी कीर्तने होत त्यांकरिता ह्यांनी ती केली असावी.

**रचना : मु.** –श्रीगुरुगीता; ओ. सं. २२४; र. का. : इ. स. १८३९; संपा. गोस्वामी, टी. एन. भीमराव; तंसम. त्रैमा., क्र. १८ : ३, इ. स. १९६५, पृ. १ ते ८; व क्र. १९ : १ व २, इ. स. १९६६, पृ. ९ ते १८. **अमु.** – १. अभिमन्यु-विवाह; ग्रं. सं. ९१; २. चंद्रहासचरित्र; ग्रं. सं. १६८; र. का. : श. १७६० / इ. स. १८३८; सवामं. हस्त. सू., खं. २; ३. सुब्रह्मण्यविवाह ऊर्फ स्कंदविवाह; ४. हनुमंतजन्म : दोन आख्याने; ओवीबद्ध (अपूर्ण) व श्लोकबद्ध; सवामं. बा. १४४५, हस्त. सू., खं. २.

**रामचंद्र–५** [का. अनु.] महानुभाव कवी. ह्यांच्या श्रीकृष्णावरील कवनांचा उल्लेख आढळतो. 'अजि अजि खगावर शयन, कंसप्राणशमन' हे ह्यांचे कवन प्रसिद्ध व गमतीचे आहे (मसा., आ. ५, ६२४).

**रामचंद्र–६** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** –सुदामचरित्र; ३२ श्लोक; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रामचंद्र–७ / ० रामचंद्र दिवाकरात्मज** [का. अनु.] कवी. समर्थशिष्य. दिवाकरांचे पणतू.

**रचना : अमु.** – पदपदांतरे व श्लोक; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**रामचंद्र–८** [का. अनु.] कवी. मेवंकर नावाच्या गावी जन्म. गुरू : कौंडन्यस्वामी. गुरुपरंपरा : जगन्नाथ > भारती > रंगबोध > केशवस्वामी > गोपाळस्वामी > कौंडन्यस्वामी > रामचंद्र. हे स्वतःस कविकेसरी म्हणवितात.

**रचना : अमु.** – मुक्तमराळ; वेदान्तपर ग्रंथ; ग्रं. सं. १६–१६५६; ह्यात सगुणनिर्गुणनिर्णय, मोक्षनिश्चयप्रकटीकरण, वैराग्यनिर्णय, क्षुद्रसिद्धिनिराकरण, सिद्धिनिर्णय, भक्तिरहस्य, परलाभवर्णन, वन्याहारकथन, राजीवाक्षस्तोत्रवर्णन असे विषय आले आहेत (मसमं., हवना., पृ. ६९).

**रामचंद्र–९ (बुवा)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – महाभारत; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ९०.

**रामचंद्र कृष्ण लघाटे** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार. *गोविंदपंत बुंदेल्याची कैफियत* ह्या ग्रंथाचा कर्ता. गोविंदपंत बुंदेल्यांच्या कारकीर्दीत जी अनेक महाराष्ट्र-घराणी बुंदेलखंडात गेली त्यांपैकी सदाशिव केशव लघाटे हे एक होते. हे फार पराक्रमी होते व त्यांनी पंतांस वेळोवेळी साह्य केले. त्यांना अंतर्वेदीत फडणिशीही मिळालेली होती. ह्यांचे पुतण्ये कृष्णाजी रामचंद्र व त्यांचे पुत्र रामचंद्र कृष्ण. हेच प्रस्तुत कैफियतीचे लेखक.

बुंदेलखंडाचे पोलिटिकल एजंट असताना कर्नल स्लीमन ह्यांनी गोविंदपंत बुंदेल्यांचे वंशज व सागरचे राजे श्रीमंत बळवंतराव रघुनाथ ऊर्फ बाबासाहेब ह्यांस त्यांच्या घराण्याचा इतिहास मागितला. त्यांच्या विनंतीवरून सागर संस्थानातील पूर्ण माहितगार व जुने गृहस्थ श्री रामचंद्र कृष्ण लघाटे ह्यांनी *गोविंदपंत बुंदेल्याची कैफियत लिहून* दिली. हिचे लेखन संवत १८९७ / इ. स. १८४१ मध्ये झाले. लेखनस्थळ आंबे, श्रीक्षेत्र पंढरपूर. हिचे प्रथम मुद्रण *भारतवर्ष* मासिकातून इ. स. १८९७ साली झाले (अं. ६, पृ. १–३२). गोविंदपंतास श्रीमंत बाजीराव पेशवे ह्यांनी बुंदेलखंड प्रांताचा सुभेदार नेमल्याची माहिती बखरकार देतो. गोविंदपंतांनी उत्तर प्रांतात राजकारण करून मराठ्यांची सत्ता तिकडे प्रस्थापित केली. अशा महत्त्वाच्या ऐतिहासिक व्यक्तीसंबंधी हकीकत लिहिताना आवश्यक तो काटेकोरपणा व साक्षेप लेखकाने बाळगलेला नाही. काही वेळा चुकीची माहिती दडपून दिलेली दिसते. गोविंदपंत बुंदेल्यांचा अंत हृदयद्रावक रीतीने झाल्याचे बखरकाराने नमूद केले आहे. गोविंदपंतांनंतर त्यांच्या पुत्रपौत्रादिकांनी जे राजकारण केले त्याचीही थोडीफार माहिती देऊन ही कैफियत संपविली आहे. वाङ्मयीन दृष्ट्या ह्या कैफियतीस फारसे महत्त्व नाही. ऐतिहासिक तपशील काही प्रमाणात महत्त्वाचा आहे.

द. ग. गोडसे

**० रामचंद्र गोस्वामी (तंजावरस्थ)** – पहा रामचंद्र–४.

**० रामचंद्र दिवाकरात्मज** – पहा रामचंद्र–७.

**रामचंद्र दैवज्ञ** [अंदाजे श. १७४९ / इ. स. १८२७] *छंदोमंजरी*कार व ज्योतिषी. बेलवंडे (ता. कऱ्हाड, जि. सातारा) नावाच्या खेड्यातील ज्योतिषांच्या एका नामांकित घराण्यात रामचंद्र दैवज्ञांचा जन्म झाला. हे सातारच्याचे छत्रपती प्रतापसिंह ह्यांचे आश्रित होते. ह्यांची ज्योतिषशास्त्रावरील अपूर्व अशा काही ग्रंथांची जीर्ण हस्तलिखिते राजवाडे संशोधन मंदिर, धुळे येथे आहेत.

रामजोश्यांचा म्हणून ओळखला जाणारा *छंदोमंजरी* ग्रंथ (संपा. रड्डीशास्त्री) हा रामजोश्यांचा नसून रामचंद्र दैवज्ञांचा आहे. ग्रंथारंभीच "रामज्योतिषि करुनि रसज्ञ लोका" असे हे आपले नाव देतात. ग्रंथाच्या अखेरीस ह्यांनी "रामचंद्र गणके हरिलीला। वर्णुनी करि विसत्त्वकलीला" असे आपले नाव देऊन पद्यसंख्या सांगितली आहे.

हा ग्रंथ छंदःशास्त्रावरील आद्यग्रंथकार पिंगलमुनी ह्यांच्या सूत्रांस अनुसरून लिहिला आहे. ह्या ग्रंथात गणवृत्ते दिली आहेत. मात्रावृत्ते मात्र दिलेली नाहीत. एक अक्षरी 'उक्ता' वृत्तापासून 'उत्कृति' ह्या २६-अक्षरी वृत्तापर्यंत सुमारे ९२ वृत्तांचे ह्यात निरूपण केलेले आहे. 'पंक्ती' ह्या ५-अक्षरी वृत्ताचे उदाहरण पहा : " शेवति खालीं। तो वनमाली ॥ सांगुन युक्ती। बैसवि पंक्ती ॥" ह्या ग्रंथकाराने वृत्ताच्या गणांची संज्ञात्मक अक्षरे चरणारंभी प्रत्येक गणाच्या प्रारंभी योजिली आहेत आणि हे करताना अर्थाला बाध आलेला नाही. 'मालिनी' वृत्ताचे हे उदाहरण पहा : "*निजति / न घरिं / मार्गीं* बा/यका पा/यरीच्या। जवळ बसुनि माला गुंफिती मंजरीच्या ॥ शतदलकुसुमांच्या त्याहि नानापरीच्या। बहुत कुशल ऐशा मालिनी पंढरीच्या।' पिंगलाने न सांगितलेली पण इतर ग्रंथकारांनी दिलेली 'शशिवदना' व 'मनोरमा' इ. वृत्तेही हे देतात व पिंगलाने दिलेल्या नावाशिवाय त्या वृत्तास इतर प्रसिद्ध ग्रंथकारांनी दिलेली नावेही ह्यांनी दिली आहेत. उदा., पिंगलाने 'वसंततिलका' नाव दिलेल्या वृत्ताची काश्यपाने 'सिंहोन्नता' व सैतवाने 'उद्धर्षिणी' ही दिलेली नावेही हे सांगतात. प्रत्येक वृत्ताची ह्यांनी दोन-दोन उदाहरणे दिली आहेत.

निरंजन माधव, रंगनाथ (कावेरीकर), मुकुंद, विठ्ठल इत्यादी कवींचे छंदःशास्त्रावरील ग्रंथ उपलब्ध आहेत. त्या सर्व ग्रंथांमध्ये हा ग्रंथ फारच उत्कृष्ट आहे, असे मत वि. ल. भावे ह्यांनी व्यक्त केले आहे (मसा., आ. ५, पृ. ६२७–६३०).

**रचना : मु.** – छंदोमंजरी; संपा. रड्डोशास्त्री, रं. बा.; पुणे, १९१३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : रामचंद्रदैवज्ञविरचित मराठी छंदोमंजरी; भाइसमंइति., श. १८३६; पृ. १६८–१७०.

**० रामचंद्रनुत** – पहा **रामचंद्रवरद.**

**रामचंद्रनुत कृष्णसहोदर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामचंद्र पंडित** [अंदाजे श. १७४२/इ. स. १८२०] कवी. *भगवद्गीते*वरील *भावार्थबोधिनी* ह्या टीकेचे लेखक. हे रामचंद्र पंडित अथवा बाबामहाराज (पहिले), कोल्हापूर येथील 'गुरुमहाराज' घराण्याचे संस्थापक व मोरोपंतांचे समकालीन संत. पित्याचे नाव सिद्धेश्वर. तेच ह्यांचे गुरू. वडिलांचा ह्यांनी अनुग्रह घेऊन आत्मसाक्षात्कार करून घेतला होता. कोल्हापूरचे छत्रपती शिवाजीराजे ऊर्फ आप्पासाहेब (इ. स. १७६० ते १८१२) आणि युवराज आबासाहेब ह्यांचे हे आध्यात्मिक गुरू होते. आयुष्याच्या उत्तरार्धात छत्रपतींशी मतभेद झाल्याने ह्यांनी एका वस्त्रानिशी वडिलांच्या लाकडी खडावा घेऊन कोल्हापूर सोडले ते कायमचे. ह्यांची चरित्रवजा बखर त्यांचे नातू श्रीनिवास पंडित ह्यांनी इ. स. १८५२ मध्ये तयार केली. ती इ. स. १८८५ त त्यांचे पणतू रामचंद्र पंडित (दुसरे) ह्यांनी प्रसिद्ध केली. त्यावरून असे समजते की तत्कालीन राज्यकर्त्यांनी व पैठण आणि काशी येथील विद्वत्सभांनी रामचंद्र पंडितांच्या विद्वत्तेचा योग्य तो आदर केला होता.

ह्यांचा *भावार्थबोधिनी* हा ग्रंथ म्हणजे अभंग वृत्तातील टीका असून तिचे हस्तलिखित पंडितांचे विद्यमान वंशज यशवंतराव महाराज ह्यांच्या खाजगी संग्रहात आहे. माघ शु. १०, रविवार, शके १७४२ (इ. स. १८२०) रोजी करवीर मुक्कामी ग्रंथ पूर्ण केला असे म्हटले आहे. ह्या टीकेत प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभी मागील अध्यायाशी संबंध–संगती दाखविणारा प्रास्ताविक अभंग, नंतर प्रत्येक श्लोकावर अनुवादपर अभंग आणि शेवटी पुष्पिकेचा भावार्थ देणारा समारोपाचा अभंग असा क्रम असून हा भावार्थ संस्कृत न जाणणाऱ्या लोकांसाठी ग्रंथकाराने दिला आहे. ह्यांच्या घराण्यात *भावार्थदीपिके*चा (*ज्ञानेश्वरी*) नित्यपाठ परंपरेने चालत असे. *ज्ञानेश्वरी*च्या अध्ययनाच्या स्फूर्तीमुळे लिहिलेल्या आपल्या टीकेस पंडितांनी *भावार्थबोधिनी* असे नाव दिले.

गीतेच्या भक्तियोगातल्या (अ. १२) १३ व्या श्लोकाचा ('अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः...') ह्यांनी लावलेला अर्थ पहा : "सर्वही भुतांचा द्वेष नाहि मनीं ॥ ज्याची सर्व जनीं मैत्री कृपा ॥ १ ॥ ममता नाहि ज्या जो अहंकार हीन ॥ सुखदुःखीं समान वृत्ती ज्याची ॥ २ ॥ कोणे काळीं ज्याची क्षमा ते न ढळे ॥ वदिलें हे गोपाळें राम म्हणे ॥ ३ ॥"

*भावार्थबोधिनी*खेरीज ह्यांच्या नावावर *उपनिषदांवरील भाष्ये*, *रामायण-कथा*, *अष्टावक्रावरील समश्लोकी टीका*, पदपदांतरे अशा रचनेचा समावेश होतो. ह्यांपैकी *ईशोपनिषदा*वरील भाष्य पुण्याच्या आनंदाश्रमाने प्रसिद्ध केले आहे. इतर ग्रंथ मात्र अद्यापि अप्रकाशित आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** तगारे, ग. वा. : भावार्थबोधिनीतील भक्ति-योग; प्रसाद, दीअं. १९५३; पृ. १११-११५.

**रामचंद्रपंत नीळकंठ अमात्य बावडेकर** (अंदाजे इ. स. १६५०–१७१५) ग्रंथकार. *राजनीति* (*आज्ञापत्र*) ह्या ग्रंथाचे कर्ते. हे राजकार्यधुरंधर व राजनीतिनिपुण होते. ह्यांचे घराणे मूळचे कल्याण-भिवंडीकडील, कोकणातील. त्यांच्या घराण्याकडे तेथील देशमुखी वतन होते. ह्यांचे उपनाव बहुतकर. हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. गोत्र भारद्वाज, सूत्र आश्वलायन. ह्यांची आई व वडील ही दोघेही श्रीसमर्थरामदासांची अनुग्रहित होती. स्वतः रामचंद्रपंतही श्रीसमर्थांचे अनुग्रहित होते. त्यांचे वडील निळो सोनदेव हे श्रीशिवाजीमहाराजांच्या पदरी, इ. स. १६५७ पासून, मज्मू (वसुलीचे काम पाहणारा अधिकारी मुजुमदार) होते. ते इ. स, १६७२ मध्ये निधन पावल्यावर त्यांच्या जागी रामचंद्रपंतांचे थोरले बंधू नारो नीळकंठ ह्यांची नेमणूक झाली होती, परंतु त्या जागेची जबाबदारी पेलण्याची क्षमता त्यांच्यात न आढळल्यामुळे महाराजांनी, इ. स. १६७४ साली, आपल्या राज्याभिषेकाच्या वेळी ते स्थान रामचंद्रपंतांस अमात्य हा नवीन हुद्दा देऊन त्यांच्या स्वाधीन केले. महाराजांच्या सिंहासनाच्या उजव्या बाजूस उभे राहण्याचा मान त्यांस मिळाला होता. महाराजांचा त्यांजवर फार लोभ असे. ते म्हणत : "हा मोठा शहाणा, दैवाचा, बापापेक्षां लक्षगुणी थोर होईल." आपल्या पश्चात मराठी राज्य मोडण्याचा प्रसंग आल्यास जे सहा पुरुष आपल्या पराक्रमाने ते सावरतील असा त्यांना भरवसा वाटे त्यांपैकी रामचंद्रपंत हे एक होते. तो त्यांचा भरवसा अगदी वास्तव होता ह्याचा प्रत्यय महाराष्ट्रास संभाजी व राजाराम ह्यांच्या काळात आला.

ह्यांनी श्रीशिवाजीमहाराज भोसले, संभाजीमहाराज, राजाराममहाराज, राणी ताराबाई (शिवाजी राजे), ताराबाईंचे सावत्र पुत्र संभाजी राजे अशा पाच राजवटींचा कारभार पाहिला. तो पाहात असता कर्तबगार माणसांना प्रोत्साहन देऊन व राजपुरुषांना आपले स्पष्ट मत सांगून स्वाभिमानाने स्वतःचे व्यक्तित्व अबाधित ठेवून राज्याचा गाडा त्यांनी धीमेपणाने व चातुर्याने सुरळीत हाकला.

"शिवाजीच्या कारभारांत अनुभव मिळवून आपत्प्रसंगीं मराठी राष्ट्राचा सांभाळ करणारी रामचंद्रपंताइतकी मोठी व्यक्ती इतिहासांत बहुधा दुसरी मिळणार नाही. त्यानें लिहिलेला राजनीतीचा ग्रंथ मराठी राज्याचें हृद्गतच सांगतो. त्यांनीं स्वतःच या वेळच्या आपल्या कारभाराचें व परिस्थितीचें वर्णन केलें आहे तें असें : 'हें राज्य ईश्वरदत्त, ईश्वरप्रसादसामर्थ्यें या राज्याची अभिवृद्धि व्हावी असें समजून, त्या विस्खलित प्रसंगांत बरी सूक्ष्मबुद्धि चालवून, जे सेवक बुद्धिमंत, कृतकर्मे होते त्यांचें मनोधारण व समाधानें केलीं, विचारबुद्धि हळूहळू वाढवून सर्वही उद्योगतत्पर केले. सकल प्रजा निःसंशयपणें स्वामिकार्यास सादर जाहले. औरंगजेबासारखा सबल शत्रु चालोन आला, त्यानें या राज्यानिमित्त आपला संपूर्ण पराक्रम अर्थवैभवादि सर्व शक्ति वेंचली, तथापि श्रीकृपेनें सकळही निर्फळ जाहलें; परिणामीं हतोद्यम होत्साता, पराङ्मुख होऊन यमलोकास गेला.' सारांश शिवाजीनें जीं राज्यकारभाराचीं धोरणें बांधून दिलीं तीं प्राप्त परिस्थितींत अंमलांत आणण्याचा रामचंद्रपंतानें भरपूर प्रयत्न केला. रामचंद्रपंत हा बैठा मुत्सद्दी, अनेकांची मर्जी सांभाळून त्यांस कार्यप्रवण करणारा, दूरदर्शी व शांतवृत्तीचा होता. शत्रूचा पाडाव करून शिवाजीचें राज्य कायम राखणें एवढेंच त्याचें ध्येय होतें. महाराष्ट्र व कर्नाटक अशा दोनही ठिकाणीं बादशहाशीं झगडा करून त्यांत यश मिळविलें; आणि निरनिराळ्या पराक्रमी व्यक्तींस त्या उद्योगांत सामील करून घेतलें. पन्हाळ्याहून जिंजी पावेतों लष्करी पत्रांचें दळणवळण त्यानें अविच्छिन्न चालू ठेविलें होतें." – गो. स. सरदेसाई : स्थिरबुद्धि राजाराम; १९३६; पृ. ३३–३४.

राजाराममहाराजांच्या मृत्यूनंतर, शिवछत्रपतींच्या कुटुंबात गादीच्या वारसाप्रकरणी दुही माजली. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहूची सुटका होऊन तो महाराष्ट्रात आला आणि चार-दोन वर्षे ताराबाईशी झगडून त्याने आपले पद कायम केले. ह्या दोघांच्या झगड्यात रामचंद्रपंतांसारख्या सत्त्वशील मुत्सद्द्याची अत्यंत बिकट परिस्थिती झाली. शाहूचे आगमन झाल्यावर त्याचे हाती सर्व सूत्रे द्यावी आणि

दुहीचा प्रादुर्भाव होऊ देऊ नये अशी पंतांची इच्छा असताही ताराबाईने युद्धाचाच प्रकार मांडिला, तेव्हा पंतांनी तिला शक्य तोवर साह्य केले. बरेचसे प्रमुख पुढारी शाहूच्या पक्षास मिळाले, तेव्हा ताराबाईची बाजू हलकी पडली, तरी पंतांनी ती सोडिली नाही. पुढे इ. स. १७१४ त ताराबाईची सवत राजसबाई हिने आपला मुलगा संभाजी ह्यास गादीवर स्थापिले आणि ताराबाई व शिवाजी ह्यांस अटकेत ठेविले तेव्हां रामचंद्रपंत संभाजीचे ताबेदार बनले. त्यांचे शेवटचे राजकारणी काम म्हणजे संभाजीला उद्देशून लिहिलेले राजनीतीचे *आज्ञापत्र* होय.

*आज्ञापत्र* ह्या ग्रंथाच्या कर्त्याबद्दल वाद आहे. रियासतकार सरदेसाई, द. वा. पोतदार, का. ना. साने ह्या विद्वानांच्या मते *राजनीती* किंवा *आज्ञापत्र* ग्रंथाचे कर्ते रामचंद्रपंत अमात्य हेच आहेत. श्री. ना. बनहट्टी, डॉ. वि. भि. कोलते ह्यांच्या मते *राजनीती* अमात्यांची नाही. हे दोन्ही पक्ष विचारात घेऊन व खुद्द *आज्ञापत्रा*चा अभ्यास करून डॉ. व. दी. राव (आज्ञापत्राचे एक संपादक) ह्यांनी जे मत *आज्ञापत्रा*च्या प्रस्तावनेत व्यक्त केले आहे ते असे की, " जोपर्यंत ह्या ग्रंथाच्या कर्तृत्वाबद्दल नक्की पुरावा उपलब्ध होत नाहीं तोपर्यंत अंतर्गत पुराव्यावरून हा ग्रंथ रामचंद्रपंतांचाच होय, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. शिवाजीच्या हाताखाली शिक्षण मिळालेले आणि थेट शंभू छत्रपतींच्या काळापर्यंत राज्यकारभारांत प्रामुख्याने वावरत असलेले किती मुत्सद्दी होते याचा विचार केला तर रामचंद्रपंत अमात्याखेरीज दुसरे नाव पुढे येत नाही." (प्रस्ता., पृ. ७, १३). *आज्ञापत्रा*तील आरमारविषयक शेवटचे प्रकरण ह्या मतास बळकटी आणते. ह्या प्रकरणात आरमारविषयक अनेक बाबींचा ग्रंथकाराचा जो सखोल अभ्यास दिसतो तो रामचंद्रपंतांसारख्या मुत्सद्द्याने पूर्वी सिंधुदुर्गावर जे सबनिशीचे काम केले तेव्हा आरमाराशी त्यांचा संबंध आल्याने केला असावा. *आज्ञापत्रा*ची तारीख १९ नोव्हेंबर १७१५ अशी आहे. काळाचा निर्देश *आज्ञापत्रा*त सुरुवातीलाच येतो.

हे *आज्ञापत्र* दुसऱ्या संभाजीच्या (कोल्हापूरकर) आज्ञेने लिहिले गेले असले तरी शिवकालीन राजनीतीचेच प्रतिपादन त्यात केलेले आढळते. मराठी राज्याची उभारणी ज्या काही विशिष्ट धोरणांवर आधारलेली होती, त्या पद्धतीचे सांगोपांग दर्शन ह्या ग्रंथात घडते. शिवाजीराजांची सर्वांगपरिपूर्ण राजनीती लक्षात घेऊनच पुढील मराठी राजांनी राज्यकारभार करावा अशा हेतूने अमात्यांनी आपल्या उत्तरवयात प्रस्तुत ग्रंथ रचला असावा. अमात्यांचे अनुभव, सूक्ष्म दृष्टी आणि राज्यशास्त्रविषयक ज्ञान ह्या सर्वांचा प्रत्यय *आज्ञापत्रा*त येतो. शिवाजीराजांच्या राजनीतीची सूक्ष्म माहिती देणारा राज्यशास्त्रविषयक ग्रंथ म्हणून आज्ञापत्रास महत्त्व आहे. [ ⇨ ३. ]

**रचना :** मु.– आज्ञापत्र; विज्ञावि., १८७५–७६ (क्रमशः); पुनर्मुद्रण : विज्ञावि., नोव्हें.–डिसें. १८९० व फेब्रु.–एप्रि. १८९१ (क्रमशः); पुस्तकरूपाने : मुंबई, १९२३; प्रका. अनंत आत्माराम मोरमकर; प्रस्ता. : सरदेसाई, गो. स., पोतदार, द. वा., साने का. ना.; अरबी, फारसी व तुर्की शब्दांचा कोश; पटवर्धन, मा. त्रि.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कोलते, वि. भि. : राजनीति अमात्यांची कशी ?: सरदेसाई स्मारक ग्रंथ; संपा. टिकेकर, श्री. रा.; १९३८; पृ. ६५–७९. २. देशमुख, विजय : रामचंद्रपंत अमात्य; विसंमंवा., १९७२; पृ. २१६–२३६. ३. पवार, ए. जी. : ॲन एपिसोड इन द लाइफ ऑफ रामचंद्रपंत अमात्य; भाइसंमंत्रै., व. २८, अं. १, २; पृ. ७३–७७. ४. पवार, ए. जी. : टू लेटर्स ऑफ रामचंद्रपंत अमात्य; भाइसंमंत्रै., व. २२, अं. १, पृ. २४–३०. ५. पोतदार, द. वा. : राष्ट्रसंरक्षक रामचंद्र नीळकंठ; गर्जना, कोल्हापूर, २८–४–१९५०. ५. मांडवकर, भाऊ : आज्ञापत्रावर नवा प्रकाश; नभामा., एप्रि. १९६५; पृ. २८–३९. ७. राव, व. दी. (संपा.) : आज्ञापत्र; प्रस्ता. पृ. १–२४; धुळे, १९५५. ८. शेजवलकर, त्र्यं. शं. : इज द आज्ञापत्र ऑफ रामचंद्रपंत अमात्य स्पुरिअस ?; श्रीशिवछत्रपति; १९६४; पृ. ५८२–५८९. ९. सबनीस, के. गो. : श्री रामचंद्रपंत अमात्यांचे समाधीचा शोध; भाइसमंत्रै., व. २२, अं. १, पृ. ७–९.

**रामचंद्र परदेशी** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – पानपतचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. ११–१३.

**रामचंद्रप्रभु** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. यादी, क्र. ३.

**रामचंद्र बडवे** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. पंढरपूरच्या बडवे घराण्यातील. *अमृतानुभवा*चे भाषान्तरकार प्रल्हादबाबा बडवे ह्यांचे पणतू. पंतकवितेचे हे रसिक भोक्ते होते. पंतांच्या स्तुतिपर *मोरेश्वरवर्णन* असे ३४ आर्यांचे एक काव्य रामचंद्रपंतांनी रचले आहे. हे काव्य म्हणजे पंतकवितेला रसिक अशा समकालीनांकडून मिळालेले मार्मिक अभिप्रायपत्रच होय. ह्या कवीची 'मुश्लोक वामनाचा अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची । ओंवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंतांची ॥' ही आर्या विख्यात आहे (मसा., आ. ५, पृ. ५२७–५२८ व ९५२).

**रामचंद्र बाळकृष्ण** [का. अनु.] आख्यानकार. ह्यांनी लिहिलेली स्फुट आख्याने उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४३).

**रामचंद्र भोजराव देशपांडे** / ० देशपांडे, रामचंद्र भोजराव [श. १६९९ / इ. स. १७७७ – समा. श. १७७८, नल संवत्सर, आश्विन मास / इ. स. १८५६] कवी व बखरकार. गोत्र विश्वामित्र. कुलदेव श्रीविरूपाक्षेश्वर. ह्यांच्या घराण्याचे मूळ पुरुष थबरस हे दक्षिण महाराष्ट्रातील बेळगावजवळच्या पाच्छापूर येथील देशपांडे. थबरसांपासून आठव्या पिढीतील पुरुष रुद्रोपंत, नंतर भोजराव. त्यांचेच रामचंद्रपंत हे पुत्र. रामचंद्रपंतांच्या पत्नीचे नाव गंगाबाई. ह्यांना दोन पुत्र होते. रामचंद्रांनी पेशव्यांच्या पदरी बापू गोखल्यांच्या फौजेत नोकरी पत्करली होती. दुसरे बाजीराव आणि इंग्रज ह्यांच्यातील चकमकीच्या वेळी हे नेहमी बापू गोखल्यांबरोबर हजर असत. पाच्छापूर येथे राहणाऱ्या राम दीक्षित नामक सत्पुरुषास हे आपले गुरू मानीत. पेशवाई अस्तंगत झाल्यावर पाच्छापूरनजीक शीगेहोळी नावाच्या खेड्यात हे जाऊन राहिले. तेथे ह्यांनी एक वेदशाळाही काढली होती. वयाच्या ७९ व्या वर्षी ह्यांना देवाज्ञा झाली.

ह्यांनी काही ग्रंथ व स्फुट पदे केली आहेत. काही रचना संस्कृतमध्ये आहे. ह्यांनी त्यांचे गुरू राम दीक्षित ह्यांच्यावर एक संस्कृत स्तोत्र रचले आहे, तसेच बेळगावकडील चिदंबर दीक्षित नामक साक्षात्कारी पुरुषांवर संस्कृतमध्ये आरती व स्तोत्र रचले आहे. त्यांचेच *चिदंबरमाहात्म्य* असे संस्कृतात चरित्रही केले आहे. मराठी रचनेपैकी *गंगास्तव*, *वीरभद्रक्षेत्रवर्णन* व *श्रीगणेशचरित्र* ही काव्ये महत्त्वाची आहेत. ही कविता म्हणण्यासारखी रसवती नाही, असा अभिप्राय ज. र. आजगांवकर ह्यांनी दिला आहे.

ह्यांनी कैफियतरूपाने एक बखर लिहिली आहे. *सरदार गोखले यांची कैफियत* असे तिचे नाव आहे. सेनापती बापू गोखले गोपाळअष्टीच्या लढाईत गारद झाले. इंग्रजांशी त्यांची दोस्ती असूनही त्यांची दौलत बुडविली गेली म्हणून 'आनरेबल कुंपणी सरकारतर्फे "बुलटन" साहेब यांनीं केलेल्या हुकुमावरून कुंपणीस सरकारपाशीं पुढील योगक्षेम चालण्यासाठीं कांहीं साधन मिळावें' ह्या अपेक्षेने ही कैफियत लिहिलेली आहे.

ही *सरदार गोखले यांची कैफियत* म्हणजे मूळ पाच्छापूरकराच्या बखरीपैकी फक्त शेवटचा भाग आहे असे संपा. वि. ल. भावे म्हणतात. स्वतः लेखक सरदार गोखले ह्यांच्या सहवासातले असल्यामुळे ते प्रत्यक्ष

डोळ्यांनी पाहिलेल्या गोष्टी सांगत असल्याचे जाणवते. बापू गोखल्यांच्या पूर्वजांची हकीकत सांगताना पुराव्याचा पडताळाही त्यांनी घेतला आहे. कैफियतीच्या प्रथमार्धात धोंडोपंत गोखले कोणत्या प्रांताचे, त्यांचा रोजगार पेशवे ह्यांजकडे कसा लागला, नंतर स्वतः मेहनत करून दौलत व सरंजाम मुळूक कसे मिळविले, त्याचप्रमाणे पुत्रांनी दौलत कशी राखली वगैरेचे सविस्तर वर्णन केले आहे. उत्तरार्धात बापू गोखले नायक आहेत. लेखकाच्या मते गोखले हे इंग्रजांचे दोस्त होते आणि म्हणूनच महाराष्ट्राच्या ऐन आणीबाणीच्या वेळी सरदार बापू गोखल्यांना फितविण्याच्या उद्देशाने इंग्रज बहादूर ह्यांनी निरोप पाठविला. परंतु बापू गोखले ह्यांनी उत्तर पाठविले : 'ज्यांच्या पदरीं आपणांस ठेवलेले आहे त्याची इमान इतबारी चाकरीवर प्राण गेला तर चिंता नाही.' अखेर गोपाळअष्टीच्या लढाईत बापूंना वीरमरण आले. प्रस्तुत कैफियतीने गोखले-कुटुंबियांच्या पराक्रमावर जसा प्रकाश पडतो तसाच पेशवाईच्या अखेरीच्या काही प्रसंगांवरही प्रकाश पडतो.

**रचना : मु.** – १. सरदार गोखले यांची कैफियत; र. का. : इ. स. १८२५; संपा. भावे, वि. ल.; मराठी दप्तर; रुमाल २, लेखांक १; पुणे, १९२२. २. स्फुट पद (श्रीविरूपाक्षेश्वरावर लिहिलेले); मकच., भा. २; संपा. आजगांवकर, ज. र.; मुंबई, १९१३; पृ. २१४–२१५. **अमु.** – १. गंगास्तव (आर्या); अपूर्ण. २. वीरभद्रक्षेत्रवर्णन; ओ. सं ८६; र. स्थ. : श्रीक्षेत्र येडूर. ३. श्रीगणेशचरित्र; अ. १९; ओ. सं. १५३१. ४. स्फुट श्लोक, पदे इ.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : रामचंद्र भोजराव देशपांडे; मकच., खं. २; मुंबई १९१३; पृ. २१२–२२४. २. आवळीकर, पंडित : श्रीमच्चरित्र : ऐतिहासिक अंग; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. २०१. ३. ग्रामोपाध्ये, गं. ब. : बखर (प्रक. १२); मवाइ., खं. ३; संपा. जोग, रा. श्री.; पुणे, १९७३; पृ. ५५१–५५२.

**रामचंद्र मल्हार सुखटणकर / ० सुखटणकर, रामचंद्र मल्हार** [इ. स. १६७५ – ४ ऑक्टो. १७५४] गोमंतकीय कवी. ह्यांचे आजोबा सोळाव्या शतकाच्या आरंभी क्रिस्तीकरणाच्या जाचाला कंटाळून सावंतवाडीकडील आरवली गावी गेले. तेथे त्यांनी कुळकर्णी वृत्ती स्वीकारली. ह्यांचे थोरले पुत्र मल्हार रेगे हे रामचंद्ररावांचे वडील. आरवली येथेच रामचंद्रांचा जन्म झाला. ह्यांनी मराठी व संस्कृत भाषांचे शिक्षण घेतले व वडिलांची कुळकर्णी वृत्ती स्वीकारली. इ. स. १७१० त ही वृत्ती सोडून ते गोव्यात आले. कवळे येथे काही दिवस त्यांनी श्रीशांतादुर्गा मंदिरात मुक्काम केला. नंतर पुण्याला पेशवे सरकारात ते सामील झाले. शूर मुत्सद्दी म्हणून तेथे त्यांनी ख्याती मिळविली. शिंद्यांना राज्य स्थापन करण्याच्या व राज्यविस्ताराच्या कामी त्यांनी साहाय्य केले. नानासाहेब पेशवे व सदाशिवराव भाऊ ह्यांना राजनीतीचे धडे रामचंद्ररावांनीच दिले. इंदूर, कलदुर्गा, खेड, सांगोले ह्या प्रदेशातील लढाईत ह्यांनी विजय मिळविला. हे वृत्तीने मोठे धार्मिक होते.

*श्रीशांतास्तुती* हे ह्यांचे पहिले काव्य ओवीबद्ध आहे. कवळे येथे श्रीशांतादुर्गा मंदिरात त्यांनी हे रचले. नोकरी सोडलेल्या अवस्थेत हे त्या वेळी असल्यामुळे त्यात देवीची मनोभावे प्रार्थना केलेली दिसते. *सुभद्राहरण* ह्या कथाकाव्यात अनेक लहान लहान प्रकरणे आहेत. *सुदामचरित्र* हे काव्य प्रभूच्या भक्तवत्सलतेचे प्रतीक आहे, असे प्रतिपादन रचनेत आढळते. हे व *सुभद्राहरण* काव्य *भागवता*च्या आधारे रचलेले आहे. *कंसमर्दन* ह्या काव्यात आरंभी आध्यात्मिकतेचा संपर्क असला तरी पुढे पुढे त्याच्यावर राजकारणी छटा स्पष्ट दिसतात. *श्रीज्ञानेश्वरस्तुति* असेही ह्यांचे आणखी एक काव्य आहे.

**रचना : मु.** – १. सुदामचरित्र; ग्रं. सं. १५५. २. सुभद्राहरण (भागवताच्या दशमस्कंधातील ८६ व्या अध्यायांतर्गत); ग्रं. सं. ३१. ३. ज्ञानेश्वरस्तुति; ग्रं. सं. ११; 'रामचंद्र मल्हार सुखटणकर यांची कविता' – संपा. प्रियोळकर, अ. का.; महाराष्ट्र सारस्वत ग्रंथमाला, पुष्प ३; मुंबई, १९४१. **अमु.** – १. कंसमर्दन. २. श्रीशांतास्तुति (ओवीबद्ध); र. स्थ. : कवळे येथील शांतादुर्गा मंदिर.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नायक, ना. भा.; रामचंद्र मल्हार सुखटणकर; गोमका., रिवण (गोवा), १९६९; पृ. २१–२२.

**रामचंद्र यादव शिकेनवीस** [का. अनु.] बखरकार. ह्यांचे वडील दौलतराव शिंद्यांचे दिवाण होते. ह्यांनी लिहिलेल्या *शिवाजीमहाराजांची बखर* व शिवाजीमहाराजांच्या वेळेपासून तो पानिपत युद्धाच्या अखेरपर्यंतच्या काळावर लिहिलेली *मराठेशाहीची बखर* अशा दोन बखरी उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४०).

**रामचंद्रराव आर्काटकर** [का. अनु.] गद्यलेखक.

**रचना : मु.** – *मैसूर जिंतल्याचा प्रकार–टिपु सुलतानची पदच्युति*; मोडी लिपी; छापील पाने १–१४९; इ. स. १८५०. वरील पुस्तकातील माहिती मुरेच्या *ब्रिटिश इंडिया* ह्या पुस्तकातून घेऊन तिचे मराठीकरण रामचंद्रराव आर्काटकराने केल्याची माहिती सापडते (तंसम. हस्त. यादी, क्र. २, बा. क्र. १६२८–१६२९).

**रामचंद्र रेणुकोदर** [का. अनु.] गद्यलेखक.

**रचना : अमु.** – स्फुट गद्य लेखन; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रामचंद्रवरद / ० रामचंद्रनुत / ० रामचंद्रविभु** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पांडवांची कथा; आर्या, पदे, दिंडी, सवाया इ. मिळून ग्रं. सं. १३६; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० रामचंद्रविभु** – पहा **रामचंद्रवरद.**

**रामचंद्र सदाशिव जोशी** [इ. स. चे १९ वे शतक, मध्य] बखरकार.

**रचना : अमु.** – श्रीमत् भागवताची संक्षिप्त बखर; शिळाछाप; मुंबई, १८५४; दाते सू., खं. १, पृ. १८४.

**रामचंद्र सीवाजी** [का. अनु.] वैद्यकग्रंथकार.

**रचना : अमु.** – भावप्रकाश : वैद्यकावरील गद्य ग्रंथ; मसंमं., हवना. पृ. ६९.

**० रामचंद्रसुत** – पहा **रामचंद्रात्मज.**

**रामचंद्रात्मज / ० रामचंद्रसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २, तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रामजी अनंत** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार.

**रचना : अमु.** – गोपीचंदाची बखर; र. का. : श. १७५४ / इ. स. १८३२; भाइसमं.

**रामजी दादा शिंदे** [का. अनु.] आख्यानकार. ह्यांनी रचलेली स्फुट आख्याने उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४३.

**रामजोशी / ० कविराय** [अंदाजे इ. स. १७६२ – जून १८१३ नंतर] शाहीर व कीर्तनकार. ह्यांचे संपूर्ण नाव राम जगन्नाथ जोशी. यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. मूळ घराणे सोलापूरचे. ह्या घराण्याचे मूळ पुरुष पुतळ जोशी व धोंडभट जोशी हे दोघे भाऊ. त्यांना सोलापूरची जोशीपणाची वृत्ती मुसलमान राजापासून मिळालेली होती. रामजोश्यांचे वडील जगन्नाथ जोशी ह्यांचे मुद्गल जोशी हे ज्येष्ठ पुत्र व रामजोशी हे धाकटे. मुद्गल जोशी हे नावाजलेले शास्त्री व पुराणिक म्हणून प्रसिद्ध होते. ह्यांच्या घराण्यात संस्कृत भाषेची अभिरुची सर्वांसच होती. मुद्गल जोश्यांनी *यदुवंश* नामक काव्य संस्कृतात रचल्याची माहिती आहे. वडील लवकरच निवर्तल्याने रामजोश्यांच्या पालनाची जबाबदारी त्यांच्या वडील बंधूकडे आली.

रामजोश्यांना लहानपणापासूनच तमाशा पाहण्याचा छंद जडल्याने त्यांचे मन शिक्षणात रमेना. सोलापुरास धोंडिबा शाहीराचा फड त्यांच्या घरासमोरच होता. रामजोशी एकसारखे तेथेच जाऊन बसत. त्यामुळे लावण्या रचण्याचा व डफावर गाणी म्हणण्याचा छंद त्यांना जडला. जातीने ब्राह्मण असून आपला भाऊ तमासगीर बनला आणि वयाची विशी उलटली तरी संस्कृत भाषेचा ह्याला गंधही नाही, ही गोष्ट वडील बंधूंना रुचली नाही. त्यांनी रामजोश्यांना घराबाहेर काढले. रामजोशी नेसत्या वस्त्रानिशी धडाडीने पंढरपुरास गेले, तेथे वेदशास्त्रसंपन्न बाबा पाध्ये ह्यांचे शिष्यत्व पत्करून त्यांनी काव्यालंकार, व्याकरणशास्त्र ह्यांचा अभ्यास केला. बाबा पाध्ये ह्यांच्या अलौकिक बुद्धीची तारीफ करीत पण ह्यांचा चंगीभंगीपणा पाहून त्यांनीही ह्यांना घालवून दिले. ह्यानंतर काही काळ स्वारीने कर्नाटकात वास्तव्य केले. पुढे परत पंढरपुरास येऊन रामजोश्यांनी गुरूंचा राग काढला व गुरूंची अनुज्ञा घेऊन ते सोलापुरास आले. ह्याच वेळी रामजोश्यांचे वडील बंधू आजारी पडल्याने देवळातील त्यांच्या पुराण सांगण्याच्या कार्यात खंड पडला होता. ही संधी साधून रामजोश्यांनी पुराण सांगण्यास सुरुवात केली. पुराण सांगण्याच्या त्यांच्या अप्रतिम धाटणीने त्यांनी आपल्या नाराज झालेल्या वडील बंधूंची व त्याचबरोबर सोलापूरवासीयांची मर्जी संपादन केली.

तरुण वयात आपला तमाशाचा फड घेऊन रामजोशी गावोगाव फिरत, तेव्हा त्यांचा थाट बादशाही असे. बया आणि चिमा ह्या दोन तमासगिरणी त्यांच्याबरोबर असत. रेशमी काढण्यांचा झोपाळा, घोडा, कुत्री, माकडे, राघू वगैरे पाळलेले पशुपक्षी आणि तमाशाप्रिय विषयासक्त अनुयायांच्या झुंडी असा त्यांचा काफिला असे. जोशीबुवा शक्तिपूजा करीत, असे शं. तु. शाळिग्राम ह्यांनी म्हटले आहे (*रामजोशीकृत लावण्या*, प्रस्ता., पृ. १५). ल. रा. पांगारकर ह्यांना शाक्त म्हणतात. हे स्वतःस शाक्तपंथी समजत असल्याने मद्यपान, तंबाखू-गांजा ओढणे, बाया ठेवून ख्यालीखुशालीत राहणे ह्या गोष्टींचा त्यांना विधिनिषेध नसे. रामजोश्यांची कवने आणि वर उल्लेखिलेल्या स्त्रियांची नृत्यगानकुशलता ह्यामुळे त्यांचा फड पेशवाईअखेरच्या काळात फारच गाजला. बयाबाईच्या संबंधात प्रत्यक्ष रामजोश्यांचे उद्गार पाहण्यासारखे आहेत : 'दैव ही गांठ बयाबाईची। मज पडली साची॥ कविता इजसंगे रंगा आली। नानाविध चाली ॥' ह्या रूपसंपन्न स्त्रियांच्या सहवासात इष्काची लज्जत घेत काव्यदेवतेची आराधना ते मनापासून करीत. अशा उधळपट्टीने कितीही पैसा मिळाला तरी तो त्यांना पुराच पडत नसे आणि कर्ज होई. त्यांच्या रसोत्फुल्ल प्रतिभेने कित्येकदा सावकारांच्या जाचातून त्यांना सोडविले आहे. खुद्द पेशव्यांकडूनही रामजोश्यांना अनेकदा बिदाग्या मिळाल्याची माहिती पेशवेदप्तरातील कागदपत्रांतून सापडते. आयुष्याच्या उत्तरकालात थाटामाटाच्या राहणीचा त्याग करून आपले मन त्यांनी परमेश्वरसंकीर्तनाकडे वळविले. य. न. केळकर म्हणतात : इ. स. १७९३ पासून पुढील काळात उत्तम कीर्तनकार म्हणून रामजोश्यांचे नाव महाराष्ट्रात सर्वतोमुखी झाले. कारण कथा-कीर्तने करीत ते महाराष्ट्रात सर्वत्र हिंडत असत. कीर्तनकाराचा पेशा व त्यांचे खाजगी जीवन ह्यांचा मेळ मात्र कधीच बसला नाही.

असे सांगतात की, तमाशाचा फड घेऊन हिंडत असता एके रात्री बारामतीस बाबुजी नाइकांच्या वाड्यात ह्यांचा तमाशा झाला. त्या वेळी मोरोपंत तिथे होते. रामजोश्यांसारखा व्युत्पन्न आणि बुद्धिमान माणूस तमाशा करतो, म्हणून त्यांच्याविषयी पंतांच्या मनात एकप्रकारची अढी होती. पण 'भला जन्म हा तुला लाधला' आणि 'दो दिवसांची तनु ही साची' ह्या रामजोश्यांच्या दोन वैराग्यपर कवनांनी मोरोपंत संतुष्ट झाले. तेव्हापासून उभयतांमध्ये एकमेकांविषयी आदर व स्नेह निर्माण झाला व तो पुढे वाढत गेला. मोरोपंतांनी रामजोश्यांना 'कविप्रवर' अशी पदवी दिली, तर मोरोपंतांच्या आर्या आपल्या कीर्तनांतून रामजोश्यांनी लोकप्रिय केल्या. रामजोश्यांच्या रचनाशैलीवर मोरोपंतांची बरीच छाप आहे. त्यांच्या कवितेतील यमकानुप्रासांची खटपट, भाषेची सजावट, संस्कृत-प्राकृत शब्दांचे मिश्रण ह्या मोरोपंतांच्या लकबी पाहिल्यानंतर काव्यरचनाक्षेत्रात मोरोपंत हे रामजोश्यांचे गुरू असावेत असे स्पष्टपणे दिसून येते. पंतांच्या आर्यांचा जोशीबुवांचा व्यासंग फार मोठा होता. मोरोपंतांच्या *भागवता*वरील आपला अभिप्राय एका आर्येत त्यांनी नमूद करून ठेवला आहे तो असा : "वाणी मयूरवदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी। पक्ष श्रीहरि धरि जरि काय न करि तरि अनंत मायावी ॥"

संस्कृताध्ययन, शीघ्रकवित्व, समयसूचकता आणि चित्ताकर्षक प्रभावी वक्तृत्व ह्यांमुळे ह्यांची कीर्तने फार लोकप्रिय झाली होती. एकदा एका सावकाराने ह्यांचे कीर्तन ऐकून पाच हजाराचे रोखे त्यांना फाडून दिले. श्रीशंकराचार्यांनी रामजोश्यांना बहिष्कृत करावे, असा सोलापूर येथील कर्मठ मंडळींचा आग्रह होता. पण शंकराचार्यांसारख्या विद्वान पुरुषालाही आपल्या भाषणाने आणि काव्यरचनेने ह्यांनी संतुष्ट केले. दुसऱ्या बाजीरावाच्या वेळी पुण्यात नीळकंठशास्त्री थत्ते हे एक विद्वान पंडित होते. त्यांच्या विद्वत्तेचा लौकिक काशीरामेश्वरपर्यंत गाजत होता. रामजोश्यांचा मुक्काम पुण्यात असता त्यांची फजिती करावी ह्या हेतूने काही विघ्नसंतोषी शास्त्रीलोकांनी मुद्दाम नीळकंठशास्त्री असलेल्या सभेत ह्यांचे कीर्तन ठेवले. थत्तेशास्त्र्यांना याज्ञिक कर्माची फार आवड असे. हे जाणून रामजोश्यांनी प्रथम याज्ञिकप्रकरण कथेत गोवून त्यातील सर्व बारीकसारीक माहितीची यादी ज्यांत दिली होती अशा नवीन लावण्या करून कटिबंधाच्या चालीवर म्हटल्या. त्या ऐकून थत्तेशास्त्र्यांनी आपल्या अंगावरची शाल रामजोश्यांना देऊन त्यांचा गौरव केला. सांगली संस्थानचे अधिपती चिंतामणराव आप्पा ह्यांनाही जोशीबुवांच्या आचरणासंबंधात तिटकारा वाटत असे, पण त्यांची तान ऐकताच तो पार नाहीसा होऊन, त्यांचे कीर्तन पूर्ण ऐकून, आप्पासाहेबांनी त्यांचा सत्कार केला.

रामजोशी हे निर्भीड आणि स्पष्टवक्ते होते. एकदा इचलकरंजीकरांच्या वाड्यात ह्यांचे कीर्तन चालले होते. आश्रित मंडळीत ह्यांच्या मोठ्या बिदागीबद्दल वाटाघाट चाललेली असता, जोशीबुवांनी समयसूचकता दाखवून एक आर्या रचून तात्काळ म्हटली ती अशी : 'भोजासम कविताप्रिय, कर्णापरि दानशूर घोरपडे। ऐसें असतां माझ्या देणगिचा कां तुम्हांस घोर पडे ? ॥'

दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत रामजोश्यांनी पुणेकरांवर जबरदस्त मोहिनी घातली होती. आयुष्याच्या अखेरच्या काळात काशीयात्रा घडावी अशी इच्छा होती म्हणून ते इ. स. १८१२ साली पुण्यास बाजीरावाकडे आले. पण त्यांचा हेतू सफल झाला नाही व त्यांना हवी तशी मदत न मिळाल्याने काशीयात्रेचा योग आला नाही. इ. स. १८१३ च्या जूननंतर केव्हातरी त्यांचे देहावसान झाले (य. न. केळकर; ऐतिपो., खं. २; पृ. १४७).

रामजोश्यांची रचना प्रायः लावणीछंदात आहे. पेशवाई-काळात प्रसिद्धीस आलेल्या अनंतफंदी, प्रभाकर, परशराम, होनाजी, बापू कोन्हेर, सगनभाऊ अशा अनेक शाहीरांमध्ये आपल्या शीघ्रकवित्वशक्तीने व नादमधुर अशा रचनाशैलीने रामजोशी अग्रगण्य ठरले आहेत. रामजोशी हे तुरेवाल्यांच्या संप्रदायातले असले तरी ह्यांनी कलगीतुऱ्याच्या झगड्याची भेदिक कवने मात्र रचली नाहीत. संस्कृतज्ञ व व्युत्पन्न असल्याने भाषेची अशुद्धता त्यांच्या कवनात तितकीशी आढळत नाही. रचना प्रौढ आणि भारदस्त झाली आहे, अशा तऱ्हेचा अभिप्राय रामजोश्यांच्या कवितेच्या संदर्भात *निबंधमालेत*

दिला आहे (*निबंधमाला*, पुस्तक क्र. ६). रामजोश्यांना स्वतःच्या कवित्वशक्तीचा रास्त अभिमान होता. ते स्वतःस 'कविराय' असे मोठ्या अभिमानाने म्हणवून घेत असत.

रामजोश्यांच्या कवनात दैवतांची, तीर्थांची वर्णने, शृंगारिक लावण्या, कृष्णलीलावर्णनपर लावण्या, नीतिपर, उपदेशपर आणि वैराग्यपर कवने व तीन-चार पोवाडे, अशी रचना समाविष्ट झालेली आहे. प्रसंगोपात्त अनेक श्लोक, आर्या, कटाव व पदेही त्यांनी रचली आहेत. परंतु हे वाङ्मय आज उपलब्ध नाही. *मदालसा चंपू* हा संस्कृत ग्रंथ व *रामाष्टक* हे स्तोत्र अशी इतर रचनाही आहे. रामजोश्यांच्या नावावरील *छंदोमंजरी* हा ग्रंथ मात्र त्यांचा नसून कऱ्हाड येथील रामचंद्र दैवज्ञ ह्या ज्योतिष्याने रचला आहे असे आता संशोधनान्ती सिद्ध झाले आहे. रामजोश्यांना मराठीव्यतिरिक्त कानडी, हिंदी व संस्कृत अशा तीन भाषा अवगत होत्या. त्यांच्या काही रचनांमधून ह्याचा पुरावा सापडतो.

शृंगार हा शाहिरी कवितेचा स्थायिभावच आहे. 'सुंदरा मनामधि भरली', 'सुंदरी मूर्ति मदनाची' ह्यांसारखी रामजोश्यांची अनेक उत्कृष्ट शृंगारिक कवने आहेत. त्यांमधील 'राधा सखि संवादे' ही त्यांनी रचलेली छेकापन्हुती केवळ अपूर्व आहे. रामजोश्यांच्या ठिकाणचे सर्व काव्यगुण ह्या एकाच लावणीत एकवटलेले दिसतील.

'ब्राह्मणी राज्य जोरदार' ह्या पोवाड्यात पुणे ह्या पेशव्यांच्या राजधानीचे वैभव वर्णन केले आहे. 'लंकाच पुण्यामधि लेश न दारिद्र्याचे', 'पुणे शहर अमोलिक रचना अशी दुसरी नाही' किंवा 'जागोजाग मौज अनिवार, नसे अंतपार वर्णुं तरि काई।' ह्या प्रकारचे समर्पक वर्णन; किंवा दुष्काळाच्या पोवाड्यातील 'करितील काय हो अन्नाविण गांजली। ही दुनिया सारी जठराग्नित भाजली। नच माधुकरीला कोण तदा लाजली। वेंचिती शितें चिखलांत राड माजली।..... कैकांनीं कुटुंबें विष पाजुनी निजविलीं।' असे हृदयद्रावक चित्र; ह्या ठिकाणी अभिजात अशा कविप्रतिभेचे वर्णन-कौशल्य नजरेस पडते.

शृंगारिक कवनांपेक्षा वैराग्यपर कवनांनी रामजोश्यांची कवी म्हणून प्रतिष्ठा कळसास नेऊन पोचविली आहे. वैराग्याच्या नावावर माजलेले ढोंग व थोतांड ह्यांचा ते मनसोक्त समाचार घेतात. त्यांच्या उपदेशपर व नीतिपर कवनांनी मोरोपंतांसारख्या विद्वज्जनांनाही वेड लाविले होते. ह्या कवनांमधील काव्यमाधुर्य केवळ अवर्णनीय आहे. त्यांमध्ये विषयमग्न संसारी माणसाविषयी तुच्छतेचा भाव नसून वैराग्याकडे जाणारा मार्ग हा संसारसुखाची ओढ असणाऱ्याच्या दृष्टीने किती बिकट आहे ते मार्मिकपणे कविराय सागतात.

रामजोश्यांचे निरीक्षण सूक्ष्म व मार्मिक असे. रसनिर्मितीपेक्षा शब्दचमत्कृतीचीच हौस रामजोश्यांना अधिक होती व त्याचाच ठसा त्यांची लावणी वाचल्यानंतर मनावर उमटतो असे त्यांच्या रचने-संबंधात य. न. केळकरांनी जे आपले मत व्यक्त केले ते थोड्याफार प्रमाणात खरे आहे; तरीही त्यांच्या कवनातील पदलालित्य व अर्थगौरव इत्यादी काव्यगुण वाखाणण्याजोगे आहेत हे निश्चित. त्यांची कवने जगन्नाथ पंडित व जयदेव ह्या कवींची आठवण करून देतात. भाषेचा डौल आणि नखरा हा त्यांच्या लावणीवाङ्मयाचा खास विशेष मानता येईल. [⇨ ३.]

रामजोश्यांची विद्वत्ता, व्युत्पन्नता आणि शीघ्रकवित्व ह्यांमुळे त्यांच्या कवितेला समकालीनांतील मोरोपंत व उत्तरकालीन चिपळूणकर, भावे ह्यांच्यासारख्या पंडितांकडून मान्यता मिळाली आहे. समकालीन शाहीरांमध्ये रामजोश्यांच्या कवनांना किती मान्यता होती हे आज तरी आपल्याला निश्चितपणे सांगता येणार नाही. उत्कृष्ट कीर्तनकार व प्रख्यात हरिदास म्हणून महाराष्ट्रात सर्वत्र त्यांचा लौकिक होता, हे त्यांच्याविषयी ठाऊक असणाऱ्या अनेक आख्यायिकांवरून समजते. ह्या पेशामुळे कीर्तन ऐकणाऱ्या श्रोत्यांकरिता कथा रंगविण्याच्या हेतूने अनेक कृष्णलीलावर्णनपर तसेच परमार्थाची वाट दाखविणाऱ्या नीतिपर कवनांची रचना त्यांनी केली. म्हणूनच त्यांच्या कवनांमध्ये एकप्रकारची खुमारी व रचनेचा गोडवा आढळतो.

वि. ह. कुळकर्णी

**रचना : मु.** – १. रामजोशीकृत लावण्या, भाग १ व २; गोंधळेकर, रा. श्री.; पुणे, १८८९, १८९५. २. रामजोशीकृत लावण्या (लावणी सं. १३३); संग्रा. शाळिग्राम, शं. तु.; आ. ३ री, पुणे, १९०८. ३. पोवाडे – (१) पेंढाऱ्यांचा व दुष्काळाचा पोवाडा; संपा. केळकर, य. न.; ऐतिपो., खं. १; पुणे, १९२८; पृ. ३६२–३७०. (२) पेशव्यांच्या शुक्रवारवाड्याचा पोवाडा; ऐतिपो., खं. २; पुणे, १९४४; पृ. १५०–१५४. (३) पुण्याचा पोवाडा/ब्राम्हणी राज्य जोरदार; ऐतिपो., खं. १; पृ. ४२३–४२५. ४. सुभद्रेचा पोवाडा; संपा. केळकर, य. न.; तंतकवि तथा शाहीर; पुणे, १९५२; पृ. ७८–७९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. केळकर, य. न. : रामजोशी; तंतकवि तथा शाहीर; पुणे, १९५२; पृ. ६५–८१. २. केळकर, य. न. : रामजोशीचरित्रावर आणखी प्रकाश; ऐतिपो., खं. ३; पृ. १४४–१४९. ३. टिकेकर, श्री. रा. : रामजोशी आणि बया; हंस, मे १९४८; पृ. १९–२१. ४. पांगारकर, ल. रा. : रामजोशी सोलापूरकर, पंतांचे मित्रमंडळ, मोरोपंत चरित्र आणि काव्यविवेचन; मुंबई, १९४३; पृ. १२३–१३३. ५. रेगे, डी. डी., थत्ते, सी. पु. : लोकशाहीर रामजोशी; स्वराज्य, १७–१–१९७०. ६. वर्दे, श्री. म. : रामजोशी : मराठी शाहीर; मुंबई, १९३०; पृ. २३–९१. ७. वैद्य, शां. वि. : ध्रुव, सप्टें. १९४५; पृ. २७४.

**रामतनय** [का. अनु.] शाहीर. *अंधारातील लावण्या* (संपा. य. न. केळकर, पुणे, १९५६) ह्या संग्रहात ह्यांची 'बालकृष्णावरची' एक लावणी प्रसिद्ध (पृ. २५९–२६०). रामतनयांच्या नावावरील एक पद *पद्संग्रह, भा. ३* मध्ये मुद्रित (पृ. ११०).

**रामदास / ० कवि–२ / ० कीर्तिवंत / ० जयवंत / ० दास–२ / ० फकीर / ० बंदे / ० भीम / ० राघोबा / ० राम–२ / ० रामीरामदास–१ / ० विजय–१ / ० सज्जन / ० समर्थ** [श. १५३०, चैत्र शु. ९ / इ. स. १६०८ – श. १६०३, माघ वद्य नवमी / इ. स. १६८२] ज्ञानी व भक्तिमान कर्मयोगी संतकवी. मातापित्यांनी ठेवलेले नाव नारायण; परंतु स्वतः कविता करू लागल्यानंतर रामाचा दास किंवा रामदास, असा कवितेमध्ये रामदासांनी स्वतःचा निर्देश करण्यास सुरुवात केली. स्वतःच्या साहित्यासही ते *दासबोध* म्हणू लागले. प्रौढ वयात सिद्धपुरुष म्हणून ते जगापुढे आले तेव्हा लोक त्यांना समर्थ किंवा समर्थ रामदास असे म्हणू लागले.

रामदासांचा जन्म रामनवमीस रामजन्माच्या वेळी दुपारी मराठवाड्यातील जांब ह्या लहानशा गावी झाला. पिता सूर्याजीपंत व माता राणूबाई. मातापिता अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते. सूर्य व राम ह्यांची उपासना ते नित्य करीत. मूळ पुरुष कृष्णाजीपंत ठोसर हे बेदर प्रांतातून इ. स. च्या दहाव्या शतकात बीडच्या परिसरात जांब ह्या गावी आले. त्यांच्यापासून सूर्याजीपंत हे बाविसावे. ह्या घराण्याकडे जांब गावचे कुळकर्णीपद वंशपरंपरागत आले होते. रामदासांचे म्हणजे नारायणाचे वडील बंधू गंगाधर; ह्यांनाच श्रेष्ठ किंवा रामीरामदास म्हणून संबोधत. पिता, माता व ज्येष्ठ बंधू ही सर्वच रामभक्त असल्यामुळे रामभक्तीचे बीज रामदासांच्या मनामध्ये लहानपणीच पेरले गेले. राणूबाईंच्या माहेरची मंडळी एकनाथप्रवर्तित भक्तिसंप्रदायी होती; त्यामुळे *एकनाथी रामायणा*चेही लहानपणी रामदासांस सतत श्रवण घडले.

रामदासांची शरीर, मन व बुद्धी ही मुळातच सामर्थ्यशाली होती. त्यांच्या चरित्रकारांनी त्यांच्या अनेक अद्भुत बाललीला वर्णिल्या आहेत. त्यांतील वास्तविक सार असे निघते की, लहानपणीच त्यांना क्रीडापटुत्व प्राप्त झाले होते. लोक रामदासांना लवकरच हनुमंताचे अवतार मानू लागले ह्याचे कारण त्यांचे विलक्षण क्रीडापटुत्व व रामभक्ती होय.

रामदासांचे प्राथमिक शिक्षण फार लवकर पूर्ण झाले. त्यांचे शिक्षण एकंदरीत कसे झाले असावे, हे त्यांच्या *दासबोधा*तील शिक्षणविषयक विचारांवरून सहज लक्षात भरते. बालबोध व मोडी अक्षरांचे सुरेख लेखन आणि वाचन, अंकगणित इत्यादी गोष्टी ते झपाट्याने शिकले.

त्यांचे वडील सूर्याजीपंत अनेक मुमुक्षूंवर अनुग्रह करून मंत्रोपदेश देत असत. नारायणाने आपला मंत्रोपदेशाचा मनोदय वडिलांना कळविला. एवढ्या बालवयात मंत्रोपदेश कशाला हवा, म्हणून त्यांनी त्याकडे लक्ष दिले नाही. नारायणाच्या आठव्या वर्षीच त्याचे वडील निवर्तले. ज्येष्ठ बंधू गंगाधर ह्यांनी वडिलांचा संप्रदाय पुढे चालविला. त्यांनीही, एवढ्यात नको, म्हणून मंत्रोपदेशाचा अनुग्रह नारायणास नाकारला; परंतु नारायणाला लहानपणीच परमार्थाचा अनिवार ध्यास लागला. स्वप्नात प्रत्यक्ष रामचंद्राचीच त्यांना भेट झाली. 'श्रीराम जय राम जय जय राम' हा त्रयोदशाक्षरी मंत्र प्रभूंकडून मिळाला. ह्या क्षणापासून रामाचे दास्य पत्करून रामदास ही पदवी त्यांनी धारण केली. शके १५३८, श्रावण शुद्ध अष्टमीस मध्यरात्री हा अनुग्रह झाला. ह्या उपदेशप्रसंगाचा निर्देश रामदासांच्या एका अभंगामध्ये आलेला आहे.

वयाच्या बाराव्या वर्षी श्रेष्ठांनी (ज्येष्ठ बंधूंनी) व मातेने लग्नाचा आग्रह धरून रामदासांची नाखुषी असताच त्यांना लग्नमंडपात उभे केले. 'सावधान' हे पुरोहिताच्या तोंडचे इशाऱ्याचे शब्द ऐकताच वेदीवरून उडी ठोकून 'सदा सेवि आरण्य कारुण्य काळीं' असा दृढ, अचल निश्चय करून ते पळाले. नाशिक येथे गेले. नाशिक हे रामोपासनेस अत्यंत अनुकूल स्थान, म्हणून निवडले. वैदिक, शास्त्री, पंडित, पुराणिक, कीर्तनकार, गायक, कलावंत ह्यांचे त्या वेळच्या महाराष्ट्रातील विद्यापीठ नाशिक; तेच बारा वर्षे तपश्चर्येचे स्थान म्हणून निवडले. नाशिकजवळ टाकळी ह्या गावी गोदावरी व नंदिनी ह्या नद्यांचा संगम झाला आहे. रामदास टाकळीस एका गुहेत राहिले. त्रयोदशाक्षरी राममंत्राचा तेरा कोटी जप त्यांनी बारा वर्षांत पुरा केला. त्याबरोबर अनेक गायत्री-पुरश्चरणेही पुरी केली. वेदशास्त्रे, वेदान्त, काव्ये, पुराणे व इतर अनेक संस्कृत-प्राकृत ग्रंथ ह्यांचेही अध्ययन केले. उत्तम कथाकार व कीर्तनकार ह्यांचेही एकचित्ताने श्रवण केले. संगीतसाधना केली. ह्या बारा वर्षांच्या तपश्चर्येच्या काळात स्नान-संध्या आटोपल्यावर सकाळी कंबरभर किंवा गळाभर पाण्यात सहा तास उभे राहून रामदासांनी पुरश्चरण केले, असे त्यांच्या अनेक चरित्रकारांनी सांगितले आहे. त्याच्यावर मात्र विश्वास ठेवण्यास पंचाईत पडते. अशा तपश्चर्येला रामदासांनी तामस गुण व हेकाड वैराग्य म्हणून खरमरीत भाषेत त्याज्य ठरविले आहे. ह्या बारा वर्षांच्या काळात त्यांनी बहुश्रुतपणा मिळविला. त्यांना कवित्व प्राप्त झाले. त्यात निराशेचेही क्षण अनेक वेळा आले. त्यांच्या *करुणाष्टका*मध्ये अशा प्रासंगिक निराशेचे व उद्वेगाचे अत्यंत प्रामाणिक चित्र प्रतिबिंबित झालेले दिसते. परंतु अगाध श्रद्धेच्या जोरावर त्यांचा आत्मविश्वासही वाढला.

आता रामदासांच्या आयुष्यातील तिसरे म्हणजे यात्रापर्व सुरू झाले. त्यांनी शके १५५४ (इ. स. १६३२) फाल्गुनामध्ये अखिल भारताच्या यात्रेस प्रारंभ केला. अयोध्येस केव्हा जाईन, असे त्यांना झाले होते; हे त्यांच्या 'पांगुळ' ह्या कवितेवरून दिसते. प्रथम काशीच्या रोखाने ते निघाले. काशी, प्रयाग, गया करून अयोध्येकडे गेले. काशीत हनुमानघाटावर मुक्काम केला, तेथे हनुमानाची स्थापना केली. अयोध्येत सर्वांत जास्त वेळ म्हणजे अकरा महिने राहिले. पंजाबातही गेले, तेथे शीख धर्मगुरूंची भेट घेतली. काश्मीरात श्रीनगरलाही भेट दिली. हिमालयातील बद्रिनारायण व केदारनाथ येथपर्यंत मजल मारली. तेथे श्वेतमारुतीचे दर्शन घडले. हिमालयात त्यांना शैत्यबाधा झाली होती. श्वेतमारुतीने ती बाधा निवारली आणि एक नवी वेषदीक्षा दिली. टोप, वल्कले, हुर्मुजी वस्त्रे, मेखला, जपमाळा, खडावा व कुबडी देऊन त्यांना सजवून पाठविले. हा वेश अखेरपर्यंत कायम राहिला. मानससरोवरास प्रदक्षिणा करून स्वामी परत निघाले. जगन्नाथपुरीचीही यात्रा पुरी केली. तेथून नंतर ते दक्षिणेस गेले. सेतुबंधरामेश्वरापर्यंत त्यांनी मजल मारली. श्रीशैलमल्लिकार्जुन, शेषाचल, गोकर्ण महाबळेश्वर इत्यादी दक्षिणेतील अगणित तीर्थे संपवून करवीरक्षेत्री पोहोचले. तेथून कोकणात परशुरामक्षेत्राचे दर्शन घेऊन कृष्णेच्या उगमस्थानी महाबळेश्वरास आले. तेथून त्यांनी सर्व महाराष्ट्रात पर्यटन केले. मराठवाड्यात पैठण येथे काही दिवस राहिले. अखेर मातेचे दर्शन घेऊन त्यांनी तीर्थयात्रेची समाप्ती केली. मातेचे डोळे अंध झाले होते; पुत्राच्या भेटीने मातेच्या डोळ्यांतून आनंदाश्रुधारा वाहू लागल्या. आई म्हणाली, "नारायणा, अरे तुझें हें रूप पाहण्यास मला डोळे उरले नाहीत !" नारायणाने (रामदासांनी) आईच्या डोळ्यांवरून हात फिरवला. तत्क्षणी त्याचे नखशिखान्त स्वरूप तिच्या दृष्टीस पडले. त्याबरोबर ती चकित होऊन उद्गारली, "नारायणा ! तू भूतचेष्टा शिकलास काय ?" स्वामींनी उत्तर दिले, "आई, ही भूतचेष्टा नाहीं, ही प्रभु रामचंद्राची कृपा ! तेंचि भूत गे माय।"

ह्या बारा वर्षांच्या तीर्थयात्रेत व दक्षिणेत ठिकठिकाणी साधुसंतांच्या, महंतांच्या त्यांनी गाठीभेटी घेतल्या, त्यांच्याशी मैत्री केली, शिष्यशाखा वाढविल्या. रामाची व हनुमानाची मंदिरे व मठ ह्यांची स्थापना केली. फिरणे व विवरणे हे समर्थांचे जीवनसूत्र होते. भारताच्या लोकस्थितीचे विराट दर्शन घेणे, हा त्यांचा मुख्य हेतू होता. उद्ध्वस्त सामाजिक जीवन किंवा सामाजिक बेबंदशाही, असे ह्या लोकस्थितीचे दारुण लक्षण होते. ह्या स्थितीचे दारुण किंवा करुण चित्रण 'अस्मानी सुल्तानी' आणि 'परचक्रनिरूपण' ह्या प्रकरणांत रामदासांनी केलेले आढळते. सामाजिक व राजकीय जीवनाची इतकी प्रखर व तीव्र संवेदना रामदासांच्या पूर्वीच्या कोणत्याही श्रेष्ठ संताच्या साहित्यात प्रकट झालेली आढळून येत नाही.

तत्कालीन भारतातील सामाजिक बेबंदशाही नष्ट करून न्यायनीतीची स्थापना करण्याचा म्हणजे रामराज्याचा उपाय कोणता ह्यासंबंधीचे त्यांचे चिंतन त्यांच्या *दासबोधा*त प्रकट झालेले आहे. देवाधर्मांचे अराजक मोडायचे म्हणजे परमार्थाची स्थापना करावयाची व ऐहिक पुरुषार्थ साधणारी समाजव्यवस्था निर्माण करावयाची, हे दुहेरी साध्य सिद्ध करण्याकरता तीर्थयात्रा संपवून ते कृष्णातीरावर आले. येथे त्यांच्या आयुष्याचा चौथा भाग सुरू झाला. ह्या काळात कृष्णेच्या परिसरात, राजकारण म्हणजेच धर्मसंस्थापनेचे कार्य ते अखेरपर्यंत करीत राहिले.

कृष्णेच्या परिसरात राहून आणखी एक महत्त्वाची गोष्ट रामदासांना साधता आली ती म्हणजे शिवाजीच्या राज्यस्थापनेच्या प्रयत्नास अनुकूल अशी जनमनोवृत्ती निर्माण करणे. अगोदरच्या चारशे वर्षांच्या मुसलमानी राजवटीत राज्यकर्त्यांनी चालविलेल्या धर्मछळाच्या प्रचंड पोलादी रुळाखाली सापडलेली हिंदुधर्मव्यवस्था मोडकळीस येऊन दुर्बळ झाली होती. मुसलमानी सत्तेपुढे पडते घेऊन निमूटपणे तग धरणे, एवढेच कार्य हिंदू व हिंदु-धर्म ह्यांना शक्य झाले. मुसलमान राजसत्ता हिंदु-धर्माला जबरदस्त टोले वारंवार लगावत होती. हिंदुसमाजसंस्था, आधारभूत राज्यसंस्थेच्या अभावी, विस्कळित होऊन डबघाईस आली होती, ह्याची तीव्र जाणीव श्रीसमर्थ रामदासांना झाली होती. 'म्लेंच्छ दुर्जन उदंड। बहुता दिवसांचे बंड।।' ह्या निर्देशात हा सर्वत्र समदृष्टीचा, हिंदू व

मुसलमान ह्यांचा भेदभाव न पाहणारा संत, सात्त्विक संतापाने कसा जळत होता, ह्याची कल्पना सहज करता येते.

परमार्थाचा संस्थापक म्हणजे न्यायनीतीचा रक्षक, सज्जनांचा पक्षपाती, असा राजा समर्थांना पाहिजे होता. समर्थांच्या *मानपंचक* ह्या प्रकरणात रामराज्याचे विवरण प्रथम आले आहे. त्यात रामराज्याची जी व्याख्या आली आहे, त्यावरून समर्थांच्या *दासबोधात* वारंवार येणाऱ्या 'राजकारण' शब्दाच्या अर्थाचे उत्कृष्ट विवरण मिळते. त्या शब्दाचा अर्थ सुराज्यस्थापना व सुराज्यास अनुकूल व्यवहार असाच होतो. 'चातुर्य' ह्या पोकळ शब्दाने त्याचा अर्थ दडविण्याचा काही विद्वानांचा प्रयत्न व्यर्थ आहे. हे समर्थसाहित्याच्या समीक्षकाने लक्षात ठेवले पाहिजे. अशा रामराज्याची सांस्कृतिक पार्श्वभूमी निर्माण करणे, म्हणजे धर्मस्थापना करणे, हे समर्थ रामदासांचे अंगीकृत कार्य होते. महंताने संतमंडळी, भक्तमंडळी निर्माण करून परमार्थाचा आदर्श जनतेपुढे ठेवावा व महाराष्ट्रातील क्षत्रियांनी वीरधर्माचे आचरण करून सद्गतीस पावावे, असा रामदासांचा संकेत दिसतो. शिवाजीच्या राज्यविषयक उलाढालीत रामदासांचा प्रत्यक्ष हात नव्हता, हे जरी खरे मानले, तरी त्याबरोबरच राजकारणाचा अंतर्भाव धर्मकारणामध्ये जाणीवपूर्वक करणारे महाराष्ट्रातील संतमंडळामधील रामदास हेच एकमेव संत होते, हे मानलेच पाहिजे. हिंदूंची देवळे व धर्म ह्यांना ज्यात धोका होता अशा मुसलमानी राजवटीच्या सरहद्दीत धर्मप्रचारासाठी देवळे बांधून देवांचे सार्वजनिक उत्सव रामदासांनी सुरू केले. देवळे व मठ ह्या संस्था सामाजिक सुव्यवस्थेच्या प्रचारक संस्था होत्या. मुसलमान राज्यकर्त्यांच्या व अधिकाऱ्यांच्या भीतीने लोकांनी डोहात व नदीत बुडविलेली दैवते बाहेर काढून डौलाने स्थापणे, हे राजकारणच होय. राजकारणाचे खरे अंतरंग म्हणजे सामाजिक जीवनाची नैतिक परिशुद्धी हेच असते.

शके १५६६ (इ. स. १६४४) च्या वैशाखात रामदास कृष्णातीरी आले. प्रथम महाबळेश्वर येथे चार महिने राहून नंतर वाई व माहुली करून कराडजवळील शाहपूरच्या पर्वतावर राहावयास गेले. दोनप्रहरी मसूर येथे कोरडी भिक्षा मागून स्वयंपाक करून भोजन करीत. परमार्थाच्या मार्गास स्त्रिया व पुरुष सारखेच अधिकारी, असे स्वामी मानत. अनेक बालविधवा अनुग्रह करून परमार्थाच्या मार्गावर आणल्या. त्यांत अक्काबाई व वेणूबाई ह्यांची नावे सुप्रसिद्ध आहेत. समर्थशिष्यांत सर्व जातींचे व सर्व धर्मांचे स्त्रीपुरुष होते; मुसलमान फकीरही होते. उच्च धर्माच्या मर्यादेत त्यांच्या मते हिंदू व मुसलमान असा भेद खोटा ठरतो. अनेक विद्वान व कर्तृत्ववान मंडळी स्वामी समर्थांच्या शिष्यगणात समाविष्ट झाली होती. स्वामींचा पट्टशिष्य कल्याण. तो स्वामींचा मुख्य लेखक. कल्याणाच्या स्वाक्षरातले *दासबोधा*दी ग्रंथ मिळाले आहेत. कल्याणाचे मूळचे नाव अंबाजी. त्याचे स्मरण बळकट, शरीर दणकट व अक्षरवटी सुरेख होती. दमाचा व धीराचा गडी होता. जीव धोक्यात घालूनही काम करी. कल्याणस्वामींशिवाय दिनकरस्वामी, गिरिधर इत्यादी दुसरेही अनेक त्यांचे शिष्य म्हणून प्रसिद्धीस आले. स्वामींनी श्रीरामाची चाफळ येथे स्थापना केली; त्यामुळे त्यांना फार धन्यता वाटली. मनात फार दिवस घोळत असलेला तो कार्यक्रम होता. चाफळच्या देवस्थानास हिंदू सरदारांप्रमाणे विजापूरच्या मुसलमानी राज्याचीही इनामे मिळाली. शिवाजीमहाराजांकडून प्रथमपासून (इ. स. १६५९ पासून) दोनशे होन वार्षिक इनाम मिळू लागले. नंतर हळूहळू शिवाजीमहाराजांनी अनेक गावे इनाम म्हणून दिली.

शिवाजीमहाराजांनी स्वामी रामदासांचा उपदेश घेतला व ते स्वामींचे शिष्य झाले, ही गोष्ट सर्वमान्य आहे. परंतु महाराजांच्या राजकारणाशी म्हणजे राज्यस्थापनेच्या प्रत्यक्ष उद्योगाशी रामदासस्वामींचा काही संबंध होता की नाही, ह्याबद्दल प्रत्यक्ष आधार मिळत नाही. शिवाजी व रामदास ह्यांची प्रथमभेटच मुळी श. १५९४ (इ. स. १६७२) मध्ये झाली, म्हणजे स्वराज्यस्थापनेच्या पूर्वी दोनच वर्षे झाली, असे काहीजण म्हणतात. परंतु ज्या पत्रावरून हे साल प्रथम भेटीचे मानतात, ती प्रथम भेट म्हणजे त्या गावाची प्रथम भेट होय, असाही अर्थ होऊ शकतो. शिवाजीमहाराजांनी चाफळला दिलेल्या इनामाच्या सालावरून स्वराज्यस्थापनेच्या पूर्वी १६–१७ वर्षे तरी एकमेकांना एकमेकांची माहिती होती, हे निश्चित.

शिवाजीमहाराजांनी अनेक साधु-संत-महंतांचे धार्मिक उपदेश घेतले, त्यांतीलच हा एक होय, असे कोणी म्हणतात. परंतु ते साधुसंतमहंत सिद्धपुरुष असले तरी समर्थ रामदासस्वामींप्रमाणे श्रेष्ठ साहित्यकार व बौद्धिक तत्त्वज्ञानात पारंगत नव्हते, ही गोष्ट मान्यच केली पाहिजे. रामदासस्वामी हे तत्त्ववेत्ते पंडित होते; विचारवंत पंडित गुरू व अलौकिक पराक्रमी राज्यकर्ता ह्यांचा संबंध हा वैचारिक देवघेवीने अधिकच दृढ होतो, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. राज्य म्हणजे काय ह्याची चिकित्सा करणारा, असा हा विचारवंत गुरू होता. राज्यधारी परमार्थी असावा म्हणजे तत्त्ववेत्ता असावा, मनू, भरत, जनक इत्यादी चक्रवर्तींची न्यायनीती जाणणारा असावा, असे हाच गुरू म्हणतो. अशा स्थितीत, हे गुरुशिष्यांचे नाते अगदी वेगळे होते, हे काय सांगावयास पाहिजे ?

समर्थांनी *दासबोध* [ ⇨ ३ ] व *दोन खंडांचे रामायण* हे मोठे प्रबंध रचले. ह्याशिवाय स्वामींची मोठी ग्रंथसंपत्ती आहे. जुना *दासबोध* २१ समासी लिहिल्यानंतर, २० दशकी २०० समासी *दासबोधा*ची रचना झाली असे मानतात. समर्थांचे साहित्यलेखन केव्हा सुरू झाले ह्याबद्दल विशेषसा निश्चित पुरावा सापडत नाही. *दासबोधा*तील एक समास मात्र शके १५८१ (इ. स. १६५९) मध्ये रचला, असे त्यातील कालनिर्देशावरून मानतात. पट्टशिष्य कल्याण इ. स. १६४४ नंतर हाताखाली आला; तेव्हापासून ग्रंथरचनेला अधिक वेग आला असावा. स्फुट कविता, प्रासंगिक कविता, *आत्माराम* ह्यासारखी वेदान्त-प्रकरणे, आरत्या, भूपाळ्या, करुणाष्टके, अभंग, श्लोक, स्तोत्रे इत्यादी मोठाच समर्थांचा साहित्यविस्तार मिळतो. हे साहित्य अत्यंत लोकप्रियही झाले आहे. मराठी माणसाच्या देवपूजेच्या व देवतोत्सवांच्या प्रसंगी समर्थांच्या आरत्या व भूपाळ्या म्हटल्या जातात. समर्थांचे *मनोबोध* हे श्लोकात्मक प्रकरण अत्यंत लोकप्रिय आहे. स्वतःच स्वतःला शिकवावे, ही सुंदर कल्पना *मनोबोधा*च्या मुळाशी आहे. अशा प्रकारचे एक छोटेसे प्रकरण आद्य शंकराचार्यांच्या *उपदेशसाहस्री*त आहे.

समर्थशिष्य शिवाजीमहाराज इ. स. १६८० मध्ये इहलोक सोडून गेले, त्यानंतर श. १६०३ दुर्मती नाम संवत्सरी माघ वद्य नवमीस (२ फेब्रु., इ. स. १६८२) सज्जनगडावर समर्थांनी देह सोडून इहलोकाची यात्रा संपविली. सज्जनगडावर शेवटची चार-पाच वर्षे ते होते.

इंग्रजी राज्यापूर्वीच्या मराठी साहित्यात स्वामी रामदासांची जितकी चरित्रे उपलब्ध होतात तितकी इतर कोणाचीही उपलब्ध होत नाहीत. समर्थशिष्य तंजावर मठाधिपती भीमस्वामी, तिसगावमठपती दिनकरस्वामी, मेरुस्वामी, हरिहरस्वामी, उद्धवसुत, राजाराम प्रासादी व चोरेगांवकर आत्मारामबुवा ह्यांनी लिहिलेली छोटी, समग्र वा त्रुटित अशी चरित्रे उपलब्ध होतात. समर्थशिष्य गिरिधरस्वामी, हनुमंतस्वामी व महिपतीबुवा ह्यांनी लिहिलेली विस्तृत चरित्रे मिळतात. आत्मारामबुवा ह्यांनी लिहिलेला *दासविश्रामधाम* हा तर चरित्रसागरच आहे. ही सर्व चरित्रे पौराणिक पद्धतीची आहेत. त्यात अद्भुत कथा व वास्तव घटना ह्यांच्यातला तारतम्यविवेक दिसत नाही.

लक्ष्मणशास्त्री जोशी

**स्फुट कविता :** *दासबोधा*इतकेच लोकप्रिय असलेले रामदासकृत वाङ्मयातील *मनाचे श्लोक* हे एक प्रकरण आहे. त्याची एकंदर श्लोकसंख्या

२०५ आहे. कल्याणस्वामींच्या हातच्या बाडात २०५ श्लोक आढळतात. कल्याणस्वामींनी बाडाच्या शेवटी 'इति श्री मनाचे श्लोक संपूर्ण दोनीसें पाच समाप्त' असे लिहिले आहे. यशवंतस्वामीकृत आरतीत आणि शिरगावमठपती भीमस्वामींच्या चरित्रातही २०५ श्लोकांचा उल्लेख आढळतो. काही प्रकाशकांनी २१० श्लोक छापल्याचे आढळतात. पण त्यांपैकी ५ प्रक्षिप्त आहेत हे उघड आहे. हे प्रकरण *मनाचे श्लोक* म्हणून प्रसिद्ध असले तरी *मनोबोध, मनाची शते* ह्या नावांनीही ह्या प्रकरणांचे उल्लेख आढळतात. [➪ ३.] ह्यातील श्लोकांची निरनिराळी दशके, पंचके व इतर विषय पाहून त्यांची रचना वेळोवेळी होत राहिली आणि कालांतराने ते मनाला अनुलक्षून लिहिलेल्या पहिल्या २० श्लोकांस जोडण्यात आले असे वाटते. ह्या सर्व श्लोकांची रचना भुजंगप्रयात ह्या वृत्तात केलेली आहे.

रामदासांच्या इतर रचनेतील बरेचसे विषय ह्यात पुनरावृत्त आहेत. ह्यात जन्मदुःख, जरादुःख, संसाराची असारता, कर्मोपासनेचे अगत्य, सद्गुरुप्रताप, नाममाहात्म्य, सज्जनसंगती, स्वरूपसाक्षात्कार, रामाची उपासना, उत्तम पुरुषाची लक्षणे, 'मी'पणाचे अनर्थ, इत्यादी विषय आलेले आहेत. रामदासांचे विचार साररूपाने ह्यात प्रकट झालेले आढळतात. रामदासांच्या लेखनाची आवेश, उत्साह व प्रसाद ही ठळक वैशिष्ट्ये आहेत. त्यांचा प्रत्यय *मनाच्या श्लोकां*तही येतो. ह्यातील कित्येक श्लोक व श्लोकचरण नेहमीच्या संभाषणातील वाक्प्रचार होऊन बसले आहेत. उदाहरणार्थ, "जगीं सर्वसूखी असा कोण आहे। विचारी मना तूंचि शोधोनि पाहें।", "क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे।", "देह त्यागितां कीर्ति मागें उरावी।", "घडीनें घडी सार्थकाची करावी।"

सरळ, सोपी, स्पष्ट, मधुर आणि ह्याबरोबर मर्मग्राही अशी ही रचना आहे. गुरुदेव रा. द. रानडे ह्यांनी *मनाचे श्लोक* ही रामदासांची सुभाषिते होत असे म्हटले आहे, ते योग्यच आहे. सुमारे अडीचशे वर्षांमागे मद्रासकडील शहा तुराब चिश्ती ह्या मुसलमान कवीने *मनाच्या श्लोकां*चे मूळ वृत्तातच उर्दू भाषान्तर केले आहे. हे भाषान्तर डॉ. अबदुस्सत्तार दळवी ह्यांच्या संपादकत्वाखाली हैद्राबादच्या उस्मानिया विद्यापीठाने केले आहे.

*मनोबोधा*प्रमाणेच *करुणाष्टक* हे दुसरे एक लोकप्रिय व उत्कृष्ट प्रकरण आहे. सत्कार्योत्तेजक सभेच्या *करुणाष्टक*संग्रहात एकूण २५९ कविता आहेत. *करुणाष्टक* हे नाव स्वतः रामदासांनी, तसेच त्यांच्या कोणी जुन्या चरित्रकाराने योजिलेले आढळत नाही. तेव्हा *करुणाष्टक* हे नाव त्याला केव्हा मिळाले हे सांगता येत नाही. ह्यात पुढील विविध विषय आढळतात.

रामदासांच्या शंभराहून अधिक कविता रामचरित्र, रामराज्य, रामाची प्रार्थना, अहिल्योद्धार ह्या विषयांवर आहेत. रामकृष्ण ह्या अवताराची कथा, परशुराम, नृसिंह ह्यांच्या स्मृतीचे श्लोक, पांडुरंग, तुळजामाता ह्या देवतांची वर्णने, मारुतीचे स्तवनही ह्यांत आहेत. *महिम्नस्तोत्रा*च्या वृत्ताचे १००-श्लोकी एक प्रकरण असून त्यात एकूण २० पंचके आहेत – स्तवन, शारदाकथा, गायन, विष्णु, शंकर, भवानी, रघुनाथ, रवि, पंचमहाभूते, प्रवृत्ती, वैराग्य, विमल, निश्चळ, संहार, निराकार, ह्याशिवाय अंतरात्मा, जगज्जोती, संसारातील सुखदुःखे, दुर्जन व सज्जन, वर्षाकालीन वनश्री, स्फूर्ती इत्यादी विषय ह्यांत आलेले आहेत.

*करुणाष्टकात* जरी वरीलप्रमाणे अनेक विषय आले असले तरी त्यातील 'मुलांना शिकवण', 'उदासीन हा काळ कोठे न कंठे', 'तुजवीण रामा मज कंठवेना', 'रघूनायका मागणें हेंचि आतां', 'तुझा दास मी वेर्थ जन्मासि आलों', 'अनुदिन अनुतापें तापलों रामराया', ह्या कविता विशेष लोकप्रिय आहेत.

*करुणाष्टकें* म्हणजे 'रडवणारी कविता' ह्या देवांच्या व्याख्येनुसार त्यांत फक्त दहाबाराच तशी अष्टके आढळतात. स्वतःच्या दोषांची जाणीव होऊन बाहेर पडलेले उद्गार असे ह्या *करुणाष्टकां*चे स्वरूप आहे. त्यातील भावनेचा आवेग हा साधकाच्या अंतःकरणाला उत्कटतेने भिडतो. रामदासांच्या वाङ्मयातील काव्यसौंदर्याचा विचार करताना *करुणाष्टकां*चा [➪ ३] आवर्जून उल्लेख केला जातो.

*दासबोध, मनाचे श्लोक, करुणाष्टकें* ह्याव्यतिरिक्त रामदासांची पुढील प्रकरणे प्रसिद्ध आहेत : (अ) अभंगात्मक प्रकरणे : १. १४ ओवी शतके; २. स्फुट ओव्या. (ब) अष्टाक्षरी पाच लघु काव्ये : १. षड्रिपु; २. पंचीकरण योग; ३. चतुर्थमान; ४. मानपंचक; ५. पंचमान. (क) अष्टाक्षरी प्रकरणे : १. स्फुट प्रकरणे – आनंदवनभुवन, रामवरदायिनी माता इत्यादी आठ प्रकरणे; २. अष्टाक्षरी स्फुट श्लोक – ह्या श्लोकांची एकंदर ६१ प्रकरणे आहेत. (ड) रामायण : १. सुंदरकांड – १०१ श्लोक; २. युद्धकांड – १३ सर्ग. (ई) ओवीबद्ध अकरा लघुकाव्ये : १. पूर्वारंभ; २. जुनाट पुरुष; ३. अंतर्भाव; ४. आत्माराम; ५. पंचसमासी; ६. सप्तसमासी; ७. सगुणध्यान; ८. निर्गुणध्यान; ९. मानसपूजा; १०. एकवीससमासी म्हणजेच जुना दासबोध; ११. जनस्वभाव किंवा बहुधा गोसावी. (फ) पदपदांतरे : ह्यांत आरत्या, विठ्ठल, खंडोबा, भवानी इत्यादींची स्तवने, उपदेशपर व तत्त्वज्ञानपर पदे सुमारे ३७५ आहेत. (ग) अवांतर आणि प्रासंगिक प्रकरणे – ह्यांत शिवाजीमहाराजांना रामदासांनी लिहिलेली पत्रे, महंतांना उपदेश इत्यादी सहा प्रकरणे आहेत. *दासबोध, मनाचे श्लोक, करुणाष्टकें* आणि वरील वाङ्मय ह्यांत विचारांच्या बाबतीत वेगळेपणा नाही.

रामदासांची स्फुट कविता वाचीत असता त्यांचे संगीतप्रेम वारंवार जाणवते. रामदासांच्या गाथ्यातील काही काही पदे रागांत गुंफलेली आढळतात. काही पदांत तबल्याचे वा नृत्याचे बोल आले आहेत. त्यांच्या गाथ्यातील रागांची संख्या सुमारे ५० च्या वर आहे. त्यांतील काही प्रमुख रागांची नावे अशी : आसावरी, कल्याण, काफी, जोगी, केदार, पहाडी, बागेश्री वगैरे.

गेल्या शतकात १८३५, १८४८, १८५४ ह्या साली *मनाचे श्लोक*, इ. स. १८५९ मध्ये *दासबोध*, इ. स. १८६३ मध्ये रामदासांचे रामप्रशस्तिपर श्लोक प्रसिद्ध झालेले आढळतात. इ. स. १८७०–७१ मध्ये *हनुमंतस्वामींची बखर* प्रसिद्ध झाली.

इ. स. १८९४ मध्ये 'महाराष्ट्रधर्मा'विषयीच्या विचारास न्या. रानडे ह्यांनी चालना दिली. पुढे राजारामशास्त्री भागवत ह्यांनी (इ. स. १८९५) ह्यावर एक प्रबंध प्रसिद्ध केला. वि. का. राजवाडे ह्यांनी ही चर्चा आपल्या हयातभर चालू ठेविली. इ. स. १९०२ च्या सुमारास ग्रंथमालेत 'रामदासां'वर वि. का. राजवाडे ह्यांचा लेख प्रसिद्ध झाला. पुढील काळात रामदासांकडे पाहण्याची दृष्टी बदलली. रामदास हे राष्ट्रोद्धारक संत ठरले.

शंकर श्रीकृष्ण देव ह्यांचे रामदासांविषयीच्या संशोधनासंबंधीचे कार्य तर अपूर्व असेच आहे. त्यांनी समर्थसंप्रदायाच्या मठातून नाश पावत असलेल्या सांप्रदायिक व इतर हस्तलिखित वाङ्मयाचा संग्रह व्यवस्थितपणे श्रीसमर्थवाग्देवतामंदिर (१९३५) स्थापन करून तेथे ठेविला आहे. त्यानंतरच्या कालात ल. रा. पांगारकर, न. र. फाटक, शं. दा. पेंडसे ह्यांनी ग्रंथलेखन करून रामदासविषयक विचारांत भर टाकली.

रामदासांच्या साहित्यशास्त्रविषयक विचारांकडे प्रथम ज्ञानकोशकार केतकर ह्यांनी (इ. स. १९२८) आपल्या *महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण* ह्या ग्रंथात लक्ष वेधले. ह्या विचारांचा धागा पकडून पुढे डॉ. मा. गो. देशमुख व प्रा. भा. श्री परांजपे ह्यांनी आपल्या अनुक्रमे *मराठीचे साहित्यशास्त्र* (१९४०) व *रामदासांचे साहित्यशास्त्र* (१९७३) ह्या ग्रंथांत अधिक खोलात जाऊन आपला विचार मांडला.

रामदासांचे जीवन, त्यांचे तत्त्वज्ञान व वाङ्मय ह्यांचे संशोधन, प्रकाशन

व विवेचन करण्याच्या हेतूने पुढील काळात काही नियतकालिके निघाली. पुढील नियतकालिकांचा त्यांत प्रामुख्याने उल्लेख करावासा वाटतो : १. *(श्री) समर्थ रामदास* ह्या नावाचे मासिक बाबाजी अनंत प्रभू तेंडुलकर ह्यांनी, रामदासांचे चरित्र व समग्र ग्रंथ प्रकाशित करण्याच्या हेतूने इ. स. १८९० मध्ये सुरू केले. हे मासिक दोन वर्षे चालले. त्यात उद्धवसुत आणि आत्मारामबोवाकृत *रामदासचरित्र, जुना दासबोध, अभंग, कुबडी* इत्यादी साहित्य प्रसिद्ध झाले. २. *श्री रामदास आणि रामदासी* हे मासिक शंकर श्रीकृष्ण देव ह्यांनी इ. स. १९१५ मध्ये चालू केले. ह्या मासिकात समर्थसांप्रदायिक ग्रंथ, त्यांविषयीच्या विचारांचे विवेचन आणि संशोधनात्मक टिप्पणे प्रसिद्ध होत असत. इ. स. १९५३ पर्यंत हे मासिक चालू होते. ३. *श्री दासबोध* ह्या नावाचे मासिक ब्रह्मचर्याश्रम, मसूर (सातारा) ह्यांच्या तर्फे इ. स. १९२६ मध्ये चालू झाले. ह्यात *दासबोध*-विषयक चर्चा आणि त्याच्या अनुषंगाने येणाऱ्या विषयांवर लेख प्रसिद्ध होत असत. हे मासिक ५ वर्षे चालू होते. ४. *सज्जनगड* ह्या नावाचे मासिक समर्थ सेवा मंडळातर्फे साताऱ्याहून इ. स. १९५१ पासून प्रकाशित होत असते. ह्यात समर्थसंप्रदायाविषयी आणि पारमार्थिक विषयावरील लेख येत असतात.

वसंत देवधर

**रचना : मु.** – १. रामदासकृत अभंग; माधव चंद्रोबा; शिळाछाप; मुंबई, १८६८. २. रामदास वचनामृत; अध्यात्म ग्रंथमाला, नं. ४; रानडे, रा. द.; पुणे. ३. रामदासस्वामींचे समग्र ग्रंथ; (संपा.) माडगांवकर, रा. वि.; मुंबई, १८९०. ४. रामदासाचीं भजनें : बोधबिंदु आणि मनाचीं शतें; विनोबा; वर्धा, श. १८७९. ५. श्रीमत् दासबोध; देव, शं. श्री.; प्रकाशक, सत्कार्योत्तेजक सभा, धुळे; श. १८२७ (कल्याणस्वामींच्या हातच्या प्रतीवरून तयार केलेला दासबोध). ६ श्रीरामदासांची कविता, प्रथम खंड; (संपा.) देव, शं. श्री.; सत्कार्योत्तेजक सभा; धुळे, श. १८३०. ७. श्रीरामदासांची कविता; (संपा.) देव, शं. श्री.; द्वितीय खंड; धुळे, श. १८६१. ८. श्रीरामीरामदासांची कविता; सत्कार्योत्तेजक सभा; धुळे, श. १८३१ (रामदास आणि रामदासी, भा. ४ था). ९. श्रीसमर्थकृत करुणाष्टकें, धाटचा, सवाया, प्रास्ताविक श्लोक वगैरे; धुळे, श. १८४१ (रामदास आणि रामदासी, भा. १० वा). १०. श्रीसमर्थकृत पदपदांतरे; (संपा.) देव, शं. श्री.; धुळे. ११. श्रीसमर्थ ग्रंथभांडार; पांगारकर, ल. रा.; मुंबई, १९२७. १२. श्रीसमर्थ रामदासकृत समग्र ग्रंथ; (संपा.) तेंडुलकर, बाबाजी अनंत; मुंबई, १८९१. १३. श्रीसमर्थ रामदासस्वामींचे समग्र ग्रंथ; (संपा.) दातार, गो. ना.; मुंबई, १९०५. १४. श्रीसमर्थांचा गाथा; (संपा.) अनंतदास रामदासी; वाई, १९२८ (श्रीसमर्थचरित्राची ऐतिहासिक चर्चा आणि श्रीसद्गुरुसमर्थांचें राजकीय चरित्र ह्या निबंधासह). १५. समर्थ संजीवनी म्हणजेच रामदासी वेंचे; (संपा.) पांगारकर, ल. रा.; पुणे, १९२४. १६. सार्थ श्रीदासबोध; पांगारकर, ल. रा.; मुंबई १९२३ (कल्याणस्वामींचे बंधू दत्तात्रेयस्वामी ह्यांच्या हातच्या प्रतीवरून तयार केलेला दासबोध).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अनेक लेखक : दासबोधाचा कर्ता कोण ?; विज्ञावि., जुलै १९२१; पृ. १९३–२०३. २. आजगांवकर, ज. र.: श्रीसमर्थचरित्र; मुंबई, १९३५; पृ. ११२. ३. आठल्ये, कृ. ना. : समर्थांचें सामर्थ्य किंवा श्रीरामदासस्वामींचा लीलानुग्रह (पूर्वार्ध व उत्तरार्ध); मुंबई, १९२५. ४. आठल्ये, के. ग. : श्रीदासबोध-गूढार्थदीपिका; पुणे, १९३०. ५. आठवले, रा. म. : दासबोधांतील 'अप्रमाद' शब्द; मसाप., मार्च १९३३. ६. आठवले, रा. म. : समर्थांचीं चौदा ब्रह्में आणि वामनपंडित; लोकसत्ता, ५ नोव्हें. १९७२. ७. आळतेकर, स. खं. : श्रीसमर्थचरित्र; कऱ्हाड, १९३३. ८. आळतेकर, स. खं. : श्रीसमर्थ रामदास स्वामींचीं करुणाष्टकें; विज्ञावि., जुलै–नोव्हें. १९२५, मे–जून, ऑग. १९२६. ९. उद्धवसुत : रामदासचरित्र; र. श. १६९६. १०. ओक, दा. के. : रामदास आणि मुक्तेश्वर; रामदास आणि रामदासी; व. २०, अं. २३१, ऑग. १९४१; पृ. ७०–७४. ११. करंदीकर, ज. स. : श्रीसमर्थांची वाङ्मयगंगा; महाराष्ट्रीय संत : वाङ्मय व जीवन; मुंबई, १९५२; पृ. ५९–८६. १२. कारखानीस, गं. गो. : श्रीएकनाथ व श्रीसमर्थ ह्यांनीं केलेलें पंचप्रळयाचें निरूपण; रामदास आणि रामदासी; व. २१, अं. २४९; पृ. ८१, ८६, २९०. १३. कारखानीस, गं. गो. : श्रीसमर्थांच्या तत्त्वज्ञानावर माध्व सांप्रदायाची छाया कितपत पडली आहे ? रामदास आणि रामदासी; व. २२, अं. २६१–६२; पृ. ११३–१२६. १४. काळे, दि. वि. : श्रीसमर्थांची जन्मभूमी; रामदास आणि रामदासी; व. ८, अं. ८६, श. १८४५; पृ. ३०३–३१८. १५. कुळकर्णी, कृ. पां. : समर्थांचें रामायण – पूर्वार्ध; जीवनविकास; व. ६, अं. ५, जुलै १९६२; पृ. २६०. १६. कुळकर्णी, कृ. पां. : समर्थांचें रामायण – उत्तरार्ध; जीवनविकास; व. ६, अं. ६, ऑग. १९६२; पृ. ३००. १७. कुळकर्णी, श्री. मा. : समर्थांचें राजकारण; विसंमंवा., १९७२; पृ. १५७–१६६. १८. केतकर, श्री. व्यं. : महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण; पुणे. १९. कोलते, वि. भि. : दासबोधाची भाषिक पाहणी; प्राचीन मराठी साहित्य; पुणे, १९६८; पृ. १११–१२९. २०. गद्रे, ना. कृ. : श्रीसमर्थ रामदास स्वामींचीं करुणाष्टकें; विज्ञावि., नोव्हें. १९२५. २१. गिरिधर : श्रीसमर्थप्रताप; र. का. : अंदाजे इ. स. १७२२ ते १७२९ दरम्यान. २२. गोसावी, र. श. : पाच भक्तिसंप्रदाय; पुणे–कोल्हापूर, १९७४; पृ. १८३–२३०. २३. चौबळ, म. वि. : हनुमंतस्वामी; रामदासस्वामीचें चरित्र; ठाणे, १८७१. २४. ढेरे, रा. चिं. : समर्थ रामदास आणि श्रीचंद्राचार्य इंद्रायणी, डिसें. १९६२; पृ. ४२–४३. २५. ताटके, श्री. व. : दासबोधाचा कर्ता कोण ? – रामदासच; मसाप., जुलै १९२१; पृ. ३६–४३. २६. तुळपुळे, ग. वि. : संतांच्या सहवासांत; पुणे, १९६१; पृ. ५०–१४६. २७. तुळपुळे, शं. गो. : पांच संतकवि; आ. २ री; पुणे, १९६२. २८. तुळपुळे, शं. गो. : भक्तीचा मळा; पुणे, १९६०; पृ. ७४–११७. २९. तेंडुलकर, बा. अ. : आत्मारामबोवाकृत (र. का. : सु. इ. स. १८६७) समर्थ रामदासस्वामींचें चरित्र; मुंबई, १८९१. ३०. तेंडुलकर, बा. अ. : उद्धवसुतकृत श्रीसमर्थ रामदासस्वामींचे चरित्र; र. का. : १७७४ पूर्वं; मुंबई, १८९१. ३१. दत्त, चारुचंद्र : रामदास ओ शिवाजी (बांगला भाषेत); कलकत्ता युनिव्हर्सिटी, कलकत्ता. ३२. देव, ग. शं. : सत्कार्योत्तजक सभा – सुवर्णमहोत्सव ग्रंथ; धुळे, १९४३. ३३. देव, भय्याशास्त्री : दासबोधाचा कर्ता कोण ?; विज्ञावि., जाने.–फेब्रु. १९२१; पृ. ७५–८६. ३४. देव, शं. श्री. (संपा.) : आत्मारामकृत दासविश्राम धाम (र. का. : इ. स. १८१५), खं. १ ते ४; धुळे, १९१२, १९१४, १९१५, १९२३ अनुक्रमे. ३५. देव, शं. श्री. : (संपा.) भक्तमंजरीमाला; र. का. : इ. स. १८३४; अ. १ ते ११; खं. १ ला, धुळे, १९३०. ३६. देव, शं. श्री. : राजकारण म्हणजे राजकारण; रामदास आणि रामदासी; व. १०, अं. ११७, श. १८५१; पृ. ४९–५६. ३७. देव, शं. श्री. : श्रीमत् दासबोधाचे कर्ते दुसरे कोण असणार ? ; धुळे, श. १८४३. ३८. देव, शं. श्री. : श्रीरामदास संशोधन, प्रथम खंड, धुळे, श. १८५५, व द्वितीय खं., श. १८६०. ३९. देव, शं. श्री. : श्रीसमर्थ आणि उपनिषदे; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ५०–५३. ४०. देव, शं. श्री. : श्रीसमर्थ चरित्र; खं. १ ते ३; मुंबई, श. १८७१, १८६४ व १८६७. ४१. देव, शं. श्री. : श्रीसमर्थ संप्रदाय;

मुंबई, १९४५; ४२. देव, शं. श्री. : श्रीसमर्थप्रतापांतील शंकास्थानें; रामदास आणि रामदासी; व. १२, अं. १३३, मे १९३१; पृ. १–१६. ४३. देव, शं. श्री. : श्रीसमर्थहृदय, मुंबई, १९४२. ४४. देव, शं. श्री. : श्रीसमर्थांचें राजकारण; रामदास आणि रामदासी; व. १०, अं. १०९, श. १८५१; पृ. १–१६. ४५. देव, शं. श्री. : श्रीसमर्थांच्या नांवावर मोडणारें एक लघुकाव्य; भाइसंमंइति., श. १७३५; पृ. ३९. ४६. देव, शं. श्री. : श्रीसमर्थावतार; मुंबई, १९४९. ४७. देशपांडे, अ. ना. : श्रीसमर्थचरित्रासंबंधीं एक नवा विचार; सह्याद्रि, व. २३, अं. ३, मार्च १९५७; पृ. १६६. ४८. देशमुख, मा. गो. : संत रामदासांची कविता आणि त्यांचा प्रवृत्तिमार्ग; साहित्य तोलन; नागपूर, १९७४; पृ. १८८–२१४. ४९. धोंड, म. वा. : श्रीवनभुवनी; १९७०. ५०. परांजपे, भा. श्री. : रामदासांचें साहित्यशास्त्र; नागपूर, १९७३. ५१. पांगारकर, ल. रा. : मराठी वाङ्मयाचा इतिहास, खं. ३ रा; मुंबई, १९३९. ५२. पुजारी, प्रभाकर : समर्थांच्या 'राजकारण' मीमांसेचा पूर्वरंग (समर्थांच्या राजकारणाच्या व महाराष्ट्रधर्माच्या संदर्भात न. र. फाटक ह्यांनी केलेल्या विधानांचा परामर्श); नभामा., ऑक्टो. १९७२; पृ. ६४–८०. ५३. पेंडसे, शं. दा. : राजगुरु समर्थ रामदास; पुणे, १९७४. ५४. पेंढारकर, य. दि. : रामदास – एक अभ्यास; पुणे, १९६४. ५५. प्रियोळकर, अ. का. : श्रीसमर्थ रामदासांचें 'आनंदवनभुवन'; ज्ञानदूत, दीअं. १९६५. ५६. फाटक, न. र. : रामदास : वाङ्मय आणि कार्य; मुंबई, १९७०. ५७. फाटक, न. र. : श्रीसमर्थ : चरित्र, वाङ्मय आणि संप्रदाय (विविधज्ञानविस्तारातील लेख); पुणे, १९७२. ५८. बेडेकर, दि. के. : मनाचे श्लोक : काही शब्द व कल्पना; डॉ. कोलते गौरव ग्रंथ; १९६९; पृ. ३६–४५. ५९. भट, भा. वा. : दासबोधांतर्गत प्रळय; रामदास आणि रामदासी; व. १०, अं. ११५, श. १८५१; पृ. ६५–८०. ६०. भट, भा. वा. : कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे आणि समर्थ रामदास स्वामींचा सांप्रदाय; मसाप., व. १, अं. ४; पृ. ७३–७९, ३२७–३४१. ६१. भट, भा. वा. : श्रीसमर्थ रामदास व रामदासी सांप्रदाय; धुळे, १९५०. ६२. भट, भा. वा. : श्रीसमर्थ रामदासस्वामी आणि शिवाजी महाराज यांचा अन्योन्य संबंध; धुळे, १९२८. ६३. भट, भा. वा. : श्रीसमर्थांचें जन्मापासून समाधिकालापर्यंतचें अल्पचरित्र (भा. तिसरा); संशोधक, व. १७, अं. १–२; पृ. २७–२९. ६४. भागवत, रा. रा. : महाराष्ट्रधर्म; मुंबई, १८९५. ६५. भाटे, गो. चि. : सज्जनगड व रामदास; पुणे, १९१८. ६६. भीमस्वामी : श्रीसमर्थ चरित्र; र. का. : १६८१. ६७. भीमस्वामीकृत (शिरगावमठपति); श्रीसमर्थांचें अभंगात्मक चरित्र (भक्तलीलामृतग्रंथांतर्गत). ६८. महिपतीकृत भक्तविजय; अ. ४७; अभिनव भक्तविजय; संपा. दीनदास; शिवडाव (सं. सावंतवाडी); १९३०. ६९. महिपतीकृत संतविजय; मुंबई, १९२७. ७०. माटे, श्री. म. : एका ऐतिहासिक पुराव्याची छाननी : संत, पंत व तंत, १९५७; पृ. २५४–२६२. ७१. माटे, श्री. म. : 'आनंदभुवन' म्हणजे वाराणसी कीं महाराष्ट्र?; तत्रैव, पृ. २३७–२५३. ७२. माटे, श्री. म. : रामदासस्वामींचा जीवितहेतु व त्यांचे पारमार्थिक भक्त; तत्रैव, पृ. २२७–२३६. ७३. माटे. श्री. म. : रामदासस्वामींचें मनुष्यस्वभावाचें ज्ञान; तत्रैव, पृ. २१६–२२६. ७४. माटे, श्री. म. : रामदास हे भक्तिमार्गी संत होतेच होते; तत्रैव, पृ. १९३–२१५. ७५. माटे, श्री. म. : श्रीरामदासांचें प्रपंचज्ञानविज्ञान. ७६. मोकाशी, प. रा. : महाराष्ट्रातील पाच संप्रदाय; पुणे, १९५४; पृ. १४५–१७२. ७७. राजवाडे, वि. का. : एक रामदासी वाकेनिशी लेख; रामदास आणि रामदासी; व. २, अं. ४, श. १८३८; पृ. २४८–२५३. ७८. राजवाडे; वि. का. : भीमस्वामीकृत श्रीसमर्थांच्या अंतकालचें वर्णन; रामदास आणि रामदासी; व. १, अं. १०, श. १८३७; पृ. ११४–१५२. ७९. राजवाडे, वि. का. : श्रीमत् समर्थ रामदासस्वामी ह्यांनीं श्रीशिवछत्रपतीस अनुग्रह दिल्याचा नक्की काळ; रामदास आणि रामदासी; व. १, अं. ९, पृ. ११३–१२७. ८०. राजवाडे, वि. का. : श्रीसमर्थ रामदास; सातारा, श. १८४८. ८१. राजवाडे, वि. का. : श्रीसमर्थ रामदासस्वामी आणि यादव व जाधव; रामदास आणि रामदासी; व. १, अं. ११, श. १८३८; पृ. १५३–१६२. ८२. राजवाडे, वि. का. : श्रीसमर्थ सांप्रदायाचा अनुक्रम; रामदास आणि रामदासी; व. १, अं. १२, श. १८२८; पृ. १६९–१७४. ८३. राजवाडे, वि. का. : श्रीसमर्थांचा सांप्रदाय; रामदास आणि रामदासी; व. २, अं. ३, श. १८३८; पृ. २२५–२२८. ८४. राजवाडे, वि. का. : श्रीसमर्थसंप्रदायाचे हेतु : उगम व रूप; रामदास आणि रामदासी; व. २, अं. ५, श. १८३८; पृ. २५७–२७१. ८५. रानडे, रा. द. : मराठी संतवाङ्मयांतील परमार्थमार्ग, खं. २ (अनुवादक : गजेंद्रगडकर); मुंबई, १९६५; पृ. १९८–२८०. ८६ श्रीसमर्थांचीं लघुकाव्यें; श. १८६१, चैत्र शु. ९; प्रस्ता., रामदास आणि रामदासी; व. १७, अं. २०४; पृ. १–३२. ८७. श्रीहनुमंत स्वामीकृत श्रीसमर्थांची बखर; र. का. : इ. स. १८१८; प्रकाशक : सत्कार्योत्तेजक सभा; धुळे, १९५०. ८८. सत्कार्योत्तेजक सभा : श्रीरामदास आणि रामदासी मासिक पुस्तक रौप्य महोत्सव ग्रंथ; धुळे, १९४७. ८९. सरदार, गं. बा. : एकनाथ आणि रामदास; रामदास आणि रामदासी; रौप्य महोत्सव ग्रंथ; धुळे, १९४७. ९०. सरदार, गं. बा. : तुकाराम आणि रामदास; नभामा., फेब्रु. १९५०; पृ. ४०–५१. ८५. सरदार, गं. बा. : संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति; पुणे, आ. ३, १९७०; पृ. ८२–१२१. **इंग्रजी :** 1. Abbott, J. E. : Ramdas (Translation of Mahipati's Santavijay), Pune, 1932. 2. Apte, S. S. : Shree Samarth Ramdas, Life and Mission; Bombay, 1965. 3. Date, V. H. : Spiritual Treasure of Saint Ramdas; Delhi, 1975. 4. Deming, W. S. : Ramdas and Ramdasis; Calcutta, 1928. 5. Thackeray, K. S. : Life and Mission of Samarth Ramdas; Bombay, 1918. 6. Joshi, T. D. : Social and Political Thoughts of Ramdas; Bombay, 1976.

**रामदास (गोविंद)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – तत्त्वप्रकाश; वि. ल. भावे संग्रह, संककासू., पृ. ९१.

**रामदास (भद्राचल)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रामदासाचा किंकर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामदासाचा शामा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामदेवदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामनाथ** [का. अनु.] रामदासी कवी. तंजावर येथील भीमस्वामींच्या मठपरंपरेतील. *प्रल्हादचरित्रा*त ह्यांची पुढील माहिती मिळते : "तंजापुरींत तुळजेंद्रनृप आदरानें ॥ हे शार्वरी प्रथित वत्सरिं सन्मतीनें ॥ चिंतामणिप्रथमनंदन रामनाथें ॥ प्रल्हादसच्चरित्र पैं रचिलें शुभार्थें ॥ ४९ ॥" तंसम. बा. ८४८.

**रचना : अमु.** – १. प्रल्हादचरित्र; ग्रं. सं. १०५ (आर्या इ.); तंसम. हस्त. यादी, क्र. २. २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**राम पंडित / ० माधव किंकर–२ / ० माधवकुमार / ० माधवतनय / ० माधवनंदन–१ / ० माधवसुत–१** [अंदाजे श. १६५८/इ.स. १७३६] रामदासी कवी. हे तंजावर प्रांतातील राघवस्वामींच्या सांप्रदायिक मठाच्या परंपरेतील. परंपरा : राघवस्वामी > माधवस्वामी > राम पंडित. आडनाव अद्वैती. *भागवता*च्या *दशमा*वरील ह्यांनी लिहिलेल्या टीकेत ग्रंथारंभी पित्याला नमन करून 'श्रीमाधवनामा जनक गुरु' असा गुरू म्हणून पित्याचा उल्लेख केला आहे. ह्यांचे उपास्य दैवत श्रीराम. तंजावर प्रांतातील राघवांचा मठ हेच ह्यांचे निवासस्थान होते. वडिलांनी केलेल्या ग्रंथरचनेचा मोठ्या प्रेमादराने ह्यांनी उल्लेख केला आहे. राम पंडित हे तर्क, व्याकरण, मीमांसा, सांख्य, काव्य, नाट्यालंकार, संगीत इत्यादी अनेक शास्त्रांत प्रवीण असून लोक त्यांना अद्वैतकेसरी असे म्हणत.

ह्यांच्या मठाला व तेथील ग्रंथकर्त्यांना तंजावर नृपतींचा आश्रय होता. एके ठिकाणी कवी प्रतापनृपतींचा आदरपूर्वक उल्लेख करतो : "ऐसी भाषाप्रबंध रत्नमाळा ॥ प्रेमसूत्रे गुंफीत विशाळा ॥ श्रीप्रतापराम पदकमळा ॥ अर्पिली विमळा माधवसुते ॥" तंजावर दरबारांतील प्रमुख विद्वान मंडळीत ह्यांचे नाव घेतले जात असे.

पित्याप्रमाणेच माधवसुत कवीची ग्रंथरचनाही प्रचंड आहे. *भागवत, भारत, पुराण, वेदान्त* अशा विविध विषयांवर कवी लीलया रचना करतो. ह्यांनी स्तोत्रेही बरीच केली आहेत. *भागवता*च्या *दशमा*वरील कवीची टीका विस्तृत आहे. ह्या टीकाग्रंथाचे एकूण ९१ अध्याय असून ओ. सं. १२०६४ आहे. ग्रंथात निर्दिष्ट केलेला रचना-शक १६५८ / इ. स. १७३६ असा आहे. ह्या टीकेव्यतिरिक्त *आत्मविद्याविलास, मानसोल्लास, रामामृततरंग* हे वेदान्तविषयावरील, *त्यागराजपुराण, कालीविडंबन, विनायकमाहात्म्य, हरिश्चंद्रकथा, स्यमंतकोपाख्यान* हे पौराणिक, व *हरिवंश, शेषधर्म* हे भारतावरील, अशा अनेक ग्रंथांची रचना राम पंडितांनी केली आहे. ह्यांची *रामपंचरत्न, कृष्णपंचरत्नमालिका, दक्षिणामूर्ति, नामकल्पतरु* अशी स्तोत्रेही आहेत.

कवीचा *रामामृततरंग* हा ग्रंथ अद्वैत वेदान्त तत्त्वज्ञानाचे निरूपण करणारा आहे (प्रथम मुद्रण : बेळगाव, १८९७). तंजावर येथील पंडित नागराजराव ह्यांनी इ. स. १९५२ मध्ये ग्रंथ पुन्हा प्रसिद्ध केला. भवसागरातून तारून नेण्याचे म्हणजेच मुक्तिमार्गास लावण्याचे सामर्थ्य रामनामात निश्चित आहे, म्हणून ह्या ग्रंथास *श्रीरामामृततरंग* असे नाव कर्त्याने दिले आहे. ह्यामध्ये आत्मज्ञान, पंचीकरण, चिद्रूप आत्मा व जडरूपी माया, सूक्ष्मदेह, महाकारणदेह, प्रपंचस्वरूप, भक्तिलक्षण, आत्मबुद्धीचे स्वरूप व स्वानंदप्राप्ती असे अनेक विषय येतात. हे ब्रह्मज्ञानाचे विवेचन करीत असता, भक्तिमार्ग आणि भगवंताचे नामस्मरण ह्यांवरच कवीने भर दिलेला आहे. काव्यदृष्ट्या रचना नीरस व रुक्ष वाटते.

*श्रीरामामृततरंग* ह्या ग्रंथाखेरीज कवीची अन्य रचना अप्रकाशित असून तंजावर येथील ग्रंथसंग्रहात ती पाहण्यास सापडते. तंजावरच्या दरबारात मान्यता पावलेल्या राम पंडित, कृष्ण पंडित, वासुदेव पंडित ह्या पंडितमंडळीची रचना काव्यदृष्ट्या फारशी मान्यता पावलेली नाही. सातत्याने विपुल अशी ग्रंथरचना करण्यात आयुष्यातील बराच काळ राम पंडितांनी घालविला असावा असे ग्रंथांच्या संख्येवरून वाटते.

**रचना : मु.** –श्रीरामामृततरंग; र. का. : श. १६९६; तरंग १–१५; ग्रं. सं. १८००; बेळगाव, १८९७; तंजावर, १९५२. **अमु.** – १. अनुसूयाचरित्र; श्लो. सं. ३४. २. आत्मविद्याविलास; मूळ संस्कृत व टीका; ग्रं. सं. १६३. ३. आश्रमधर्म; ग्रं. सं. ५२. ४. कालिविडंबन; अध्याय १–५; ग्रं. सं. ७३०. ५. कृष्णपंचरत्नमालिका स्तोत्र; ग्रं. सं. ११. ६. त्यागराजपुराण; अ. १–६. ७. दक्षिणामूर्ति स्तोत्र. ८. दिवोदासचरित्र; अ. १–२१; ग्रं. सं. २३४३. ९. नामकल्पतरु स्तोत्र; ग्रं. सं. ३०. १०. नारदलीला; श्लो. ५–२१. ११. भागवत स्कंध १ व १०; स्कंध १, अध्याय १–१९ : ४०००; स्कंध १० : पूर्वार्ध, अ. १–४२ : ५५००, उत्तरार्ध, अ. ४३–९१ : ८५०००. १२. भामाविलास. १३. भीष्मस्तवराज. १४. मानसोल्लास; ७५. १५. रामपंचरत्न स्तोत्र; ३४. १६. विनायकमाहात्म्य; अ. १–५; ६४०. १७. शेषधर्म; अ. २०३–२५१; ग्रं. सं. ५५२०. १८. सीतादेवीचे फळशोधन; पदे ५०. १९. स्यमंतकोपाख्यान; ग्रं. सं. २५३. २०. हरिवंश; अ. १–२५१; ग्रं. सं. ३०९१०; र. श. १६७२. २१. हरिश्चंद्रकथा; अ. १–७; ग्रं. सं. २२२१; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २, ३.

**रामभक्त** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामभट** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – विठ्ठलाची लावणी; संककासू., पृ. ९१.

**रामरंग / ० रामाजी** [का. अनु.] कवी. समर्थशिष्य रंगनाथांचे (पालीमठपती) हे शिष्य. एका भूपाळीत कवीने गुरूचा उल्लेख केला आहे तो असा : "माझा स्वामी रंगनाथ। त्याणी केलें हो सनाथ। दाखविला मोक्षपंथ। केलें सत्य अभिन्न ॥ धृ. ॥" ह्यांचे मूळ नाव रामाजी असून आपल्या नावापुढे ह्यांनी गुरूचे नाव जोडले असावे असे वाटते (सवामं. बा. ३७७).

**रचना : अमु.** – ८३ पदे, अभंग इ. स्फुट कविता; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रामराय / ० रामाजी गंगाधर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – अभंग व हिंदी पदे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**रामराव हडप** [का. अनु.] शाहीर.

**रचना : अमु.** – बचाजी जिवाजी बापटाचा पोवाडा; ऐतिपो.; खं. ३; पृ. ५७–५८.

**रामलक्ष्मण** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – सामानगड बंडाचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. २०८–२१२.

**रामलिंग** [इ. स. चे १४ वे शतक] वीरशैव ग्रंथकार. १४ व्या शतकातील जंगम कवीत ह्यांचे स्थान बरेच वरचे आहे. ह्यांचा शिष्य सुजात. रामलिंगाच्या आध्यात्मिक अधिकाराची थोरवी त्यांच्या ह्या शिष्याने आपल्या पदांतून गायिली आहे.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामशेष / ० रामाजी शेषो / ० शेषसुत** [अंदाजे श. १७६६ / इ. स. १८४४ चा सुमार] कवी. तंजावर येथील रामदासी भीमस्वामींच्या गोविंदबाळांचे शिष्य शेष कवी, हे ह्यांचे वडील. हे तंजावरच्या अमरसिंह राजाच्या पदरी होते. ह्यांनी रचलेली *अमरसिंहाची आरती* व *द्रौपदीचा धावा* अशा रचना उपलब्ध आहेत.

**रचना : अमु.** – १. अमरसिंहाची आरती; सवामं. हस्त. सू., खं. २. २. द्रौपदीचा धावा; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १२९.

**रामसुत** [श. १७०१ / इ. स. १७७९ – श. १७६० / इ. स. १८३८ नंतर] संतचरित्रकार कवी. मूळ नाव सामराज. कविनाम रामसुत. उपनाव उंडे. विजापूरच्या बादशहाचे कारभारी मालो नरहरी, ह्यांच्या वंशात इंदापूर (जि. पुणे) ह्या गावी श. १७०१ मध्ये कवीचा जन्म झाला. मातुल घराणे नीरानरसिंगपूरचे डिंगरे. ही माहिती *साधुविलास*

ग्रंथात कवीने आपले जे अल्प जीवनचरित्र दिले आहे तेथे सापडते.

ह्यांनी *साधुविलास* ह्या ग्रंथाची रचना वृद्धापकाळी केली. ग्रंथ श. १७६०/इ. स. १८३८ मध्ये पूर्ण झाला. त्याचे एकूण २४ अध्याय असून अंदाजे २१०० ओव्या व ३०० आर्या एवढा विस्तार आहे. संत-चरित्रकार महिपतीबावांच्या ग्रंथात न आलेल्या सत्पुरुषांची जीवनचरित्रे लिहिण्याचा हेतू ह्या ग्रंथामागे आहे. *साधुविलास* ह्या शीर्षकाची समर्पकता ते पुढीलप्रमाणे मांडतात : "विठ्ठलपदी अर्पुनी मानस। सप्रेम करावे भजनास। न पाहावी दुनियाची वास। हाचि विलास साधूचा ॥ यापरि साधूचे अनेक विलास। अद्भुत कथेचा प्रेमरस। म्हणउनिया साधुविलास। या ग्रंथास नाम पै ॥"

ह्या ग्रंथात इंदापूरचा मुसलमान फकीर अवतलशा, रघोजीबाबा निंबाळकर, जयरामस्वामी वडगावकर, रावजीबाबा पैठणकर इ. सत्पुरुषांच्या जीवनातले विशेष प्रसंग २१ अध्यायात वर्णिले आहेत व शेवटी स्वतःचे जीवनचरित्रही थोडक्यात दिले आहे. पेशवेकाळातील काही प्रसिद्ध सत्पुरुषांचा चरित्रग्रंथ म्हणून ह्या ग्रंथास महत्त्व आहे. साधुपुरुषांच्या जीवनातील चमत्कारादिकांचे वर्णनही निष्ठेने करून ह्या चमत्कारांच्या आधारे कवीने संतपुरुषांचे मोठेपण स्पष्ट केले आहे. एकनाथांच्या घरची उष्टी पानेदेखील देवांनी उचलल्याचा चमत्कार, मुकुंदराजांविषयीचा चणे भरडण्याचा चमत्कार, बाळकृष्णबुवा रामायणे ह्यांना प्रत्यक्ष रामदर्शन कसे झाले ह्याची कथा, बाबा पाध्ये पांडुरंगाला पाठवीत असलेल्या साखरपाण्याचा चमत्कार, अशा प्रसंगांची वर्णने ह्या ग्रंथात विपुल आहेत.

मुकुंदराजांचे चरित्रवर्णन करताना कवीने मुकुंदराजांचा काळ फारच मागे नेला आहे. उदा., 'एकसहस्र दोनी शते। अब्दे जाहाली तयाते।' ह्या शब्दांत हे मुकुंदराजांचा काळ सांगतात. म्हणजे श. ५६० (इ. स. ६३८) हा मुकुंदराजांचा काळ ठरतो. तसेच मुकुंदराजांचा अवतार आंबेजोगाईत झाला, असेही हे म्हणतात. प्रस्तुत ग्रंथाला कवीने पुरवणी जोडली आहे. पुरवणीच्या ३ अध्यायांतील (२२ ते २४) ३०० आर्यांतून भागानगरचे मादण्णा, जगन्नाथ पंडित व शंकराचार्य ह्यांच्या आयुष्यातील प्रसंग येतात.

रामसुतांची ओवी एकनाथी पद्धतीची आहे. रचना ओघवती आहे. मुक्तेश्वर-मोरोपंतांच्या लेखनसरणीचा ह्यांच्यावर प्रभाव आहे. *गीता, भागवत, भारत* इ. ग्रंथांतील श्लोक वा सुभाषिते उद्धृत करण्याच्या ह्यांच्या पद्धतीतून ह्यांची व्युत्पन्नता लक्षात येते. ग्रंथलेखन वृद्धपणी केले असल्यामुळे वाचन-मननाने प्राप्त झालेली परिपक्वता ह्या ग्रंथात प्रत्ययास येते. ह्यांचा स्वतःचा विठ्ठलविषयक भक्तिभावही वेळोवेळी व्यक्त झाला आहे. प्रसंगानुसार कोठे कोठे आत्मचर्चा झाली आहे व ती वाचनीय आहे. उदा., भगवन्मायेचे व शाश्वतसुखदायी ब्रह्मज्ञानाविषयीचे विवरण बाराव्या अध्यायात दिले आहे.

ह्या ग्रंथाला आणखीही एका दृष्टीने महत्त्व आहे. ह्यात काही तत्कालीन सामाजिक चालीरीतींचे उल्लेख येतात. उदा., शिसे प्राशन करण्याचे प्रायश्चित्त : नागेश डिंगरे ह्यांना उन्मत्तवत वृत्तीने वागण्याबद्दल ग्रामबंधूंनी खापरात शिसे वितळवून त्यांची तीन आचमने करण्यास सांगितले, इ.

कवीची बारा पदे रा. ग. हर्षे ह्यांना उपलब्ध झाली आहेत. पैकी ११ पदे हरिभक्तिवर्णन व तदनुषंगिक उपदेश ह्यासंबंधी असून एक पद दत्तात्रेय नृसिंहसरस्वती ह्यांच्याविषयी आहे. ही सर्व पदे कीर्तनोपयोगी व हरिदासी थाटाची आहेत.

**रचना : मु.** – साधुविलास; अ. २१; ओ. सं. २११९; पुरवणी अ. ३; आर्या सं. ३१०; र. का. : इ. स. १८३८; संपा. कुळकर्णी, वि. म.; पुणे, १९६४; प्रस्ता., पृ. १–१७. **अमु.** – पदपदांतरे १२; भाइसमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग. : काही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांची पदे; भाइसमंत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४७.

**रामसुतात्मज (विश्वनाथ)** / ० **रामात्मज विश्वनाथ** [अंदाजे श. १५९४ / इ. स. १६७२ – श. १६६० / इ. स. १७३८] कवी. रामसुतात्मज हे ह्यांचे टोपणनाव. ह्यांच्या वडिलांचे नाव विनायक, आईचे नाव यशोदा. हे ऋग्वेदी देशस्थ त्रिप्रवरी ब्राह्मण. ह्यांच्या *गोपीचंदाख्याना*तील एका उल्लेखावरून सारस्वतकार वि. ल. भावे कवीचे नाव 'मुळाजी' असे देतात (मसा., आ. ५, पृ. ४१३). तो उल्लेख असा : 'ऋग्वेद वसुपुरी ग्रामतळी। अभिधान 'मुळाजी' नाम असे।' परंतु ह्यांच्या *चंद्रहास्यकथे*चे संशोधक वि. अं. कानोले ह्यांच्या मते 'मुळाजी' हा पाठ चुकीचा असून 'तुळाजी' असा पाठ असणे इष्ट होय. त्यांच्या मते हा कविनामाचा उल्लेख नसून ग्रामनामाचा उल्लेख आहे. कानोले ह्यांच्या मते कविनाम निश्चित करण्याच्या दृष्टीने पुढील उल्लेख महत्त्वाचा आहे. "कथा भारतीची मनोरम्य वाणी। असे भक्तिभावार्थ आनंदखाणी ॥ जने चिंतिला देव सारंगपाणी। असे तो कवी विश्वनाथाभिधानी ॥" (*चंद्रहास्यकथा*, १०.८६). ह्यावरून कवीचे नाव विश्वनाथ असे ते सांगतात. कानोले ह्यांनी अंदाजाने कवीचा काळ श. १५९४ ते १६६० असा ठरविला आहे.

कवीचे गुरू कोण हे निश्चितपणे सांगता येत नाही. *महाराष्ट्र-सारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांच्या मते कवी नाथपंथी असून विश्वंभरनाथ हे कवीचे गुरू होत. *चंद्रहास्यकथे*चे संपादक डॉ. ना. गो. नांदापूरकर ह्यांच्या मते कवी रामदासपंथातील असावेत. कानोले ह्यांना शाक्तपंथी समजतात; तर प्रस्तुत कवीच्या *हरिश्चंद्राख्यान* ह्या उपलब्ध झालेल्या काव्यावरून, हा कवी औंढ्या नागनाथाच्या परिसरातील असावा, ह्याच्या गुरूचे नाव 'चिदानंद आनंद अनंतनामा' ह्या शब्दांतून व्यक्त झाले आहे, असे मत उ. रा. मेथेकर ह्यांनी दिले आहे.

रामसुतात्मजांचे उपलब्ध ग्रंथ *द्रौपदीवस्त्रहरण, चंद्रहास्यकथा, गोपीचंदाख्यान, सती अनसूया सत्त्वपरीक्षा* असे आहेत. ह्याशिवाय उ. रा. मेथेकर ह्यांना शिरड येथे उपलब्ध झालेले *हरिश्चंद्राख्यान* हे काव्य *चंद्रहास्यकथे*शी असलेल्या त्याच्या साम्यावरून ह्या कवीचे ठरते असे मेथेकर ह्यांनी दाखविले आहे. ह्या कवींचे आणखी एक कृष्णचरित्रपर काव्य विद्याधर कानोले ह्यांना उपलब्ध झाले आहे. हे काव्य त्रुटित असून ह्याचे फक्त ३ रा व ४ था असे दोनच सर्ग उपलब्ध आहेत. 'कवि रामसुतात्मजे ग्रंथ केला।' असा उल्लेख त्यात येतो. ह्या ग्रंथांपैकी *द्रौपदीवस्त्रहरण* हे काव्य वि. ल. भावे ह्यांनी *महाराष्ट्र कवि* मासिकातून छापले व *चंद्रहास्यकथा* हे काव्य डॉ. नांदापूरकरांनी १९५५ त पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले.

*चंद्रहास्यकथा* ह्या काव्यात 'गिरा वदे रामसुतात्मजाची। कथा बरी सुंदर भारताची।' असा उल्लेख आढळतो. मुळात ही कथा *जैमिनी अश्वमेधात* आहे. श्रीधर कवी हे रामसुतात्मजांचे समकालीन पण त्यांच्याहून वयाने वडील. ह्यांच्या *चंद्रहास्यकथा* ह्या काव्यावर श्रीधरांच्या रचनेचा परिणाम झालेला दिसतो. कारण *जैमिनी अश्वमेधात* नसलेले पण श्रीधराने वर्णन केलेले काही प्रसंग ह्यात येतात. कधी श्रीधराच्या काव्यातले प्रसंग मागेपुढे केले आहेत. [⇨ ३.] ह्यांच्या *गोपीचंदाख्यान* ह्या काव्यात मराठी व व्रज अशा दोन्ही भाषांचा वापर केला आहे.

इतर पंडितकवींप्रमाणे ह्यांची आख्यानकाव्ये अनेकवृत्तात्मक आहेत. ह्यांच्या रचनेचे एक वैशिष्ट्य म्हणजे ह्यांची वर्णने आकर्षक व आटोपशीर आहेत. प्रसंगानुरूप समयोचित अशा रसांचा आविष्कार करून भावदर्शन चांगले साधले आहे. लेखनशैली सोपी व साधी असून अलंकारप्रचुरता व पाल्हाळ ह्यांपासून अलिप्त दिसते. रामसुतात्मजांची एकंदर रचना अभ्यासिली असता असे दिसते की, साम-

राज, विठ्ठल, नागेश ह्या पंडितकवींच्या मंडळात समाविष्ट होणारी अशी ही रचना आहे.

**रचना : मु.** – १. चंद्रहास्यकथा; सर्ग १०; श्लो. सं. ७५२; संपा. नांदापूरकर, ना. गो.; हैद्राबाद, १९५५. २. द्रौपदीवस्त्रहरण; श्लो. सं. २३४; महा. कवि : २; संपा. भावे, वि. ल.; क्र. २३, २४, २५; (श. १८२७, आषाढ, श्रावण, भाद्रपद); पृ. ९९–१२३. **अमु.** – १. कृष्णकथा (त्रु.); सर्ग ३ : श्लो. ११२; सर्ग ४ : श्लो. १०७. २. गोपीचंदाख्यान; सर्ग ६ (मराठी व व्रज ह्या भाषांत, मिश्र रचना); सवामं. बा. १२५४. ३. सती अनसूया सत्त्वपरीक्षा; श्लो. ५०. ४. हरिश्चंद्राख्यान.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कानोले, वि. अं. : रामात्मज विश्वनाथकृत चंद्रहास्यकथा; प्रतिष्ठान, ऑक्टो. १९५३. २. कानोले, वि. वि. : कवी रामसुतात्मजाची अज्ञात कृष्णकथा; प्रतिष्ठान, जाने. १९६६; पृ. २५–२७. ३. नांदापूरकर, ना. गो. (संपा.) : चंद्रहास्यकथा – रामसुतात्मज; संशोधक : कानोले, वि. अं.; हैद्राबाद, १९५५; प्रस्ता., पृ. १–५८.

**रामसुतानुज** [का. अनु.] पदकार. ह्यांचे 'अहो नंदनंदा' असे एक पद (अमु.) उपलब्ध असून त्याची चाल आधुनिक गजलाप्रमाणे आहे. अनुप्रासही चांगला साधला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग. : रामसुतानुज : काही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांची पदे; भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४७.

**रामस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रामहिमकर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – भारतातील कथाभाग; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **रामा** – पहा बाबु सबाई रामापाई.

**रामांकित** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४८. **अमु.** – १. किरात अर्जुन श्लोक. २. कबीर चरित्र; पदे २६; ग्रं. सं. ८२. ३. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. २ व ३.

**रामा गोंधळी** [का. अनु.] शाहीर. हा सगनभाऊंच्या फडात गाणारा होता. 'लावणी करावी सगनभाऊने व म्हणावी रामा गोंधळ्याने' अशी त्यावेळी म्हणच होती. ह्यानेही अनेक कवने रचली आहेत. त्यांपैकी २८ शृंगारिक कवने *अंधारातील लावण्या* (पुणे, १९५६) ह्या संग्रहात छापली आहेत (संपा. य. न. केळकर, पृ. २३६–२५९).

**रामा जनार्दन** [अंदाजे श. १५१० / इ. स. १५८८ – श. १५७० / इ. स. १६४८] कवी. एकनाथपंचकातील एक थोर सत्पुरुष. ह्यांच्या चरित्राबद्दल खात्रीची माहिती सापडत नाही. पुणे येथील आनंदाश्रमात रामाजी जनार्दन ह्यांच्या हस्ताक्षरातील श. १५६५ (इ. स. १६४३) मधील *ज्ञानेश्वरी*ची जी एक प्रत सापडली आहे तीवरून मिळणारी रामाजी जनार्दन ह्या पुरुषाची चरित्रविषयक माहिती अशी : संपूर्ण नाव रामा जनार्दन बहादुरपूरकर. हे पुणे जिल्ह्यातील दौंडजवळील पांडे पेडगाव येथील राहणारे, काश्यपगोत्री यजुर्वेदी ब्राह्मण. नामसादृश्य व रामा जनार्दनांची ज्ञानेश्वरभक्ती ह्यांमुळे हेच जनार्दनशिष्य रामा जनार्दन असे वाटले, तरी तसे म्हणण्यास सबळ असा पुरावा उपलब्ध नाही.

*श्रीमंत जनार्दनस्वामी चरित्रा*चे कर्ते वि. वा. जोशी (कन्नडकर) रामा जनार्दनांची जी माहिती देतात ती अशी : हे जनार्दनस्वामींचे स्वकुलगोत्रशिष्य व एकनाथांचे गुरुबंधू. उपनाव बहुकुले (बुर्कुले), यजुर्वेदी शाखेचे ब्राह्मण. जनार्दनमहाराजांनी आपली चाळीसगावची देशपांडेपणाची वृत्ती मोठ्या प्रेमाने आपण होऊनच रामा जनार्दनांना बहाल केली (श. १४९१ / इ. स. १५६९). तेव्हापासून चाळीसगावच्या देशपांडेपणाचा हक्क ह्यांच्या घराण्याकडे अबाधितपणे चालू आहे, असे वि. वा. जोशी ह्यांना रामा जनार्दनांपासूनची चाळीसगावच्या देशपांड्यांची जी वंशावळी उपलब्ध झाली आहे त्यावरून कळते.

रामा जनार्दन हे जनार्दनस्वामींचे शिष्य व एकनाथांचे गुरुबंधू अशी परंपरागत समजूत आहे. पण आनंदाश्रम मठातील रामा जनार्दनांच्या हस्ताक्षरातील *ज्ञानेश्वरी*ची जी एक प्रत (श. १५६५) डॉ. हर्षे ह्यांनी सादर केली आहे तीवरून हे जनार्दनस्वामींचे साक्षात शिष्य नसावेत (जनार्दनस्वामींचा समा. श. १४९७) असे म. रा. जोशी म्हणतात. वर निर्दिष्ट केलेल्या प्रतीअखेर 'हस्ताक्षर रामा जनार्दन येजुर्वेदी गुमास्ता देवाजी साबदेव शिष्य रामाजी गोसावी जनार्दन श. १५६५ सुभानु नाम संमछरे' असा उल्लेख येतो. पुढे गुरुपरंपराही दिली आहे ती अशी : श्रीदत्तात्रेय परंपरा श्री जनार्दन > श्री येकनाथ > श्री भिकाराजी रामजी अनवेकर > श्री रामा जनार्दन बहादुरपुरकर. ह्यावरून एकनाथपंचकातील रामा जनार्दन ते हेच असे मत प्रा. म. रा. जोशी ह्यांनी मांडले आहे.

रामा जनार्दनांची दोन सद्गुरुपर स्फुटे – "कायावाचा मने शरण गुरुपायी । कृपावंत आई जनार्दने ।।" व "जय जय सद्गुरुनाथा स्वामी श्रीजनार्दना । आरती ओवाळू पंचही प्राण ।।" प्रसिद्ध झालेली आहेत (*भगवानबाबा महाराज* : चंद्रकुमार डांगे, पुणे, १९५९, पृ. २०–२१). त्यांचे अंतरंग पाहून हे जनार्दनांचे शिष्य व एकनाथांचे गुरुबंधूच होत, असे मत रा. चिं. ढेरे ह्यांनी व्यक्त केले आहे व परंपरागत समजूतही अशीच आहे (*गंगाजळी* : पृ. ११६).

रामा जनार्दनांची रचना किती होती हे आज तरी कळण्याची साधने उपलब्ध नाहीत. सद्गुरूवरील दोन स्फुटांखेरीज *ज्ञानेश्वरांची आरती, संतलक्षणविषयक अभंग* व *विठ्ठलाची (अनंतभुजाची) आरती* एवढीच त्यांची रचना ज्ञात आहे. सद्गुरुपर आरतीत रामा जनार्दनांनी आपले गुरु जनार्दनस्वामी ह्यांच्या समाधिस्थानाचा उल्लेख केला आहे. हरिहरासन्निध धौम्य स्थानी ती आहे, असे ते म्हणतात. हा उल्लेख महत्त्वाचा असून ह्याला पुरावा एकनाथांच्या एका स्फुटातही सापडतो.

उपलब्ध रचनेवरून रामा जनार्दनांच्या पारमार्थिक उंचीची कल्पना येते. विठ्ठल त्यांना अनंतभुजाच्या विराट स्वरूपात दृष्टीस पडतो. त्यामुळे सकळ पूजोपचार त्यांना व्यर्थ वाटू लागतात व ते त्यांच्या मानसपूजेत व्यग्र होतात. ज्ञानेश्वरांच्या आरतीत 'प्रकट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केले' असा ज्ञानेश्वरांच्या अवतारकार्याविषयीचा आदरभाव व्यक्त केला आहे. "आरती ज्ञानराजा । महा कैवल्य तेजा ।। सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ।।" ह्या ज्ञानेश्वरांवरील एका आरतीने रामा जनार्दन ह्यांचे नाव सर्वांच्या परिचयाचे झाले आहे.

ह्यांची ज्ञानेशभक्ती ही त्यांच्या विठ्ठलभक्तीशी अनुरूप आहे. वारकरी संप्रदायातील ह्यांचे स्थान लक्षात घेता ह्यांची आणखीही काही रचना उपलब्ध होण्याचा संभव आहे.

**रचना : मु.** – १. अनंतभुजाची आरती; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २६३; २. संतलक्षणविषयक अभंग; ज्ञाने. त्रैमा., ऑग. १९७०; पृ. ११; ३. सद्गुरूची आरती; ४. सद्गुरुपर अभंग; गंगाजळी; ढेरे, रा. चिं.; पृ. ११४–११६; ५. ज्ञानेश्वरांची आरती; मआ., पृ. ४१३; **अमु.** – १. पदपदांतरे; सवामं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, म. रा. : रामा जनार्दन; ज्ञानेश्वर त्रैमा., ऑग. १९७०; पृ. १०–१४; २. ढेरे, रा. चिं.; रामा जनार्दन; गंगाजळी, पुणे १९७२; पृ. ११३–११९; ३. राजवाडे, वि. का.; रामा जनार्दनकृत आरती अनंतभुजाची; भाइसंमंइति.,

श. १८३७, पृ. २६३.

**० रामाजी** – पहा **रामरंग.**

**रामाजी अनंत दाभोळकर** [का. अनु.] बखरकार. हा 'शिंदेशाहीचा पहिला बखरकार' समजला जातो. ह्यांनी लिहिलेली *रोहिलखंडावरील मोहिमेची बखर* उपलब्ध आहे (कृ.गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ३९).

**० रामाजी गंगाधर** – पहा **रामराव.**

**० रामाजी शेषो** – पहा **रामशेष.**

**रामात्मज** [का. अनु.] कवी. कवीचे नाव नारायण असल्याचा एका पदात उल्लेख आहे. *हरिवंशा*वरून आपणास ग्रंथाची स्फूर्ती झाली असे हे *कृष्णदानकथा* ह्या रचनेत म्हणतात.

**रचना : मु.** – १. कृष्णदानकथा; ग्रं. सं. ४७; अकलकामा., भा. १; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९५; पृ. १४९–१५५; २. तुकाईदान; कासं. **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० रामात्मज विश्वनाथ** – पहा **रामसुतात्मज विश्वनाथ.**

**रामानंद–१** [अंदाजे श. १४९० / इ. स. १५६८] कवी. येहेळी येथील आत्मारामबोवांच्या मठात शं. श्री. देवांना ह्यांची रचना उपलब्ध झाली. ह्यांचे *ब्रह्मोत्तरखंड* (अ. २२) व *कार्तिकमाहात्म्य* हे दोन ग्रंथ ओवीबद्ध आहेत. ओवीसंख्या प्रत्येकी सुमारे दोन हजार आहे. इतर रचना श्लोकबद्ध आहे. त्यांत *भारत, भागवत, रामायण* (पुराणे), ह्यांतील श्लोकबद्ध प्रकरणे, *राधामाधवविलास* हा मोठा ग्रंथ व *थालिपाक, मुचकुंदचरित्र, संकटचतुर्थीकथा* अशी स्फुट प्रकरणे ह्यांचा समावेश होतो. ह्या श्लोकबद्ध रचनेत अधूनमधून पदेही योजलेली आहेत. ह्यांनी पदेही रचली आहेत. ही रचना समर्थवाग्देवतामंदिर, धुळे ह्यांच्या हस्तलिखित संग्रहात उपलब्ध आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : येहेळी येथील श्रीरामदासी विद्यापीठ; भाइसंमंप्रसंवृ., पृ. ३८.

**रामानंद–२ / ० रामानंदी** [का. अनु.] कवी. गुरू : सहजानंद. *दीपरत्नाकर* ग्रंथाचा कर्ता रत्नाकर हा ह्यांचा शिष्य. हा *दीपरत्नाकर* ग्रंथ रामानंदाचा आहे असे मत कृ. वा. पुरंदरे ह्यांनी आपल्या एका लेखात मांडले होते (रामानंदाचा 'दीपरत्नाकर', भाइसंमंत्रै., व. २१, अं. २, पृ. ४७–४८). परंतु प्रस्तुत ग्रंथ हा रामानंदांचा नसून रत्नाकराचाच आहे असे द. वा. पोतदारांनी निदर्शनास आणून दिले आहे. ('दीपरत्नाकर रत्नाकराचाच – रामानंदाचा नव्हे'; भाइसंमंत्रै., व. २२, अं. २, पृ. ७२–७४). रामानंदांनी काही स्फुट कविता केली आहे व तिचे स्वरूप अध्यात्मपर आहे.

**रचना : मु.** –१. सद्गुरूची आरती; मआ., पृ. ४२७; २. नवलपद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ४५. **अमु.** – आरत्या; अद्वैतपर, ज्ञानपर, बोधपर व गुरुपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३, सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**रामानंद–३** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. हे मराठवाड्याच्या आंबडगोंदी परिसरातील गोविंदपूर संस्थानचे राहणारे. हे गोविंदपूर म्हणजेच गोदावरीकाठचे औरंगाबाद जिल्ह्यातील गोंदी हे गाव होय. उपनाव लंके. सोळाव्या वर्षीच ह्यांना उपरती झाली व ह्यांनी एकवीस दिवसांचे अनुष्ठान केले. वासुदेवस्वामी आणि त्रिंबकस्वामी अशा सत्पुरुषांशी ह्यांचा संबंध आला. पैठणास आनंदाश्रमांकडून ह्यांनी संन्यासदीक्षा घेऊन योगबळाने अनेक चमत्कार केल्याच्या आख्यायिका सापडतात. योगसामर्थ्याच्या बळानेच ह्यांनी 'ऊर्ध्वगति' साधली असा ह्यांच्या निर्याणा विषयीचा उल्लेख सापडतो. पौष वद्य एकादशीस ह्यांचे निर्याण झाले. निर्याणशक उपलब्ध नाही. ह्यांची समाधी भीमातीरी 'पुंडलिकाचे समाधीसमोर' आहे. ही चरित्रविषयक माहिती, ह्यांचे शिष्य अच्युताश्रम ह्यांनी रामानंदांवर रचलेल्या पोवाड्यातून मिळते. "आदिनाथ ऐश्वर्य ठेवित सर्व पूर्णबोधि। प्रसाद तो रामानंदी आला राजयोगसिद्धि।" ह्या पोवाड्यात येणाऱ्या निर्देशावरून पूर्णबोध हे रामानंदांचे गुरू ठरतात. रामानंदांच्या संपादण्यांतूनही गुरू म्हणून पूर्णबोधांचा उल्लेख येतो. रामानंदांची नाथसंप्रदायी गुरुपरंपरा रा. चिं. ढेरे ह्यांनी दाखविली आहे ती अशी : आदिनाथ > हरिनाथ > रघुनाथ > मुकुन्दराज > नृसिंह भारती > जगन्नाथ > सहजबोध > रंगबोध > पूर्णबोध > रामानंद. (*इंद्रायणी*, जाने.–फेब्रु. १९६४; पृ. ४१). ह्या परंपरेतील पूर्णबोध हे मुडलगी येथील मुकुंदराज परंपरेच्या एका शाखेपैकी होत. पूर्णबोधांचा मराठवाड्यात संचार आणि वास्तव्य बराच काळ झाले. ह्या काळात केव्हातरी रामानंदांना त्यांनी मंत्रदीक्षा दिली असावी (*मुडलगीचे स्वामी*, पृ. ४२).

रामानंदांचे शिष्य अच्युताश्रम हेही औरंगाबाद जिल्ह्यातील आंबड गावचेच. ह्यांचा तेथील मठ हा समर्थसांप्रदायिक मठ आहे. अच्युताश्रमांची संन्यासपूर्व परंपरा समर्थसंप्रदायाची होती. अखंडाश्रम > रामाश्रम > अच्युताश्रम अशी ह्यांची शांकरपरंपराही रा. चिं. ढेरे ह्यांनी दाखविली आहे (*इंद्रायणी*, जाने.–फेब्रु. १९६४, पृ. ४२). अशा तऱ्हेने रामानंद आणि अच्युताश्रम ह्यांच्या संयुक्त परंपरेत नाथ, समर्थ आणि शांकर अशा तीन संप्रदायांचा त्रिवेणीसंगम झालेला दिसतो. रामानंदांची रामोपासना ही मुडलगी परंपरेशी सुसंगत अशीच आहे. रंगबोध > पूर्णबोध > रामानंद अशी परंपरा मानल्यास रामानंदांच्या काळावरही काही प्रकाश पडू शकतो. रामानंदांचे परमगुरू रंगबोध श. १५८१ (इ. स. १६५९) त समाधिस्थ झाले व व रामानंदांचे शिष्य अच्युताश्रम श. १७४५ (इ. स. १८२३) मध्ये समाधिस्थ झाले. ह्यावरून रामानंद श. १६०० ते १७०० (इ. स. १६७८–१७७८) च्या दरम्यान होऊन गेले असे अनुमान काढता येते. रामानंदांचे शिष्य अच्युताश्रम व त्यांचा शिष्यपरिवार ह्यांच्या शाखा आजही आंबडगोंदी भागात आढळतात.

संपादण्या हीच काय ती रामानंदांची काव्यसंपदा. ह्यापैकी काही रचना हिंदी आहे. 'विशिष्ट व्यक्तीची भूमिका वठविणे' ह्या अर्थी रामानंदांच्या संप्रदायात 'सोंग घेणे' वा त्या व्यक्तीची 'संपादणी करणे' असे शब्दप्रयोग उपयोजिले जातात. 'संपादणी' ह्या काव्यप्रकाराचे 'भारूड' ह्या काव्यप्रकाराशी बरेच साम्य आढळते. प्रयोगक्षमता हा ह्या संपादण्यांचा विशेष होय. वाघ्या, गोसावी, वासुदेव, भराडी, कानफाडा, बैरागी, गोंधळी इत्यादी विविध व्यक्ती ह्या संपादण्यांतून वावरतात. ही भूमिका वठवीत असतानाच तो व्यक्ती आपल्या विचारसरणीचेही प्रतिपादन करते. सर्वसामान्य समाजास आवाहन करावयाचे असल्याने रामानंदांनी ह्याच माध्यमातून आपले विचारानुभव मांडले आहेत.

रामानंदांच्या मुद्रित संपादण्या ५२ असून त्यांपैकी काही प्रक्षिप्त असण्याची शक्यता आहे. अध्यात्मपर, नमनपर व आख्यानपर असे त्यांचे स्वरूप आहे. कित्येक ठिकाणी आध्यात्मिक रूपके योजलेली आहेत. उदा., "सोहम् घोडा वर्णू किती । वरि बैसले महीपती । ज्ञानखंडा घेउनी हातीं । शांती-पताका झळकतो ॥ प्रेमभंडार उधळितो । अनुभवस्वान गुरगुरी मल्हारी । अनुहतवाद्याचे गजरी । येळकोट म्हणती नाना परी ॥" ह्या संपादण्यांतून कवीने ढोंगी साधूंवर टीकेचे प्रहार केले आहेत. तेथे ह्यांच्या वाणीचे तुकारामांच्या वाणीशी असलेले साम्य लक्षात येते. पहा : "कैसा गोसावी गोसावी रे, खाउनि इंद्रियें पोसावी."

नमनाच्या स्तोत्रसदृश संपादण्यांत गणेश, अंबा-भवानी, शिव, राम, मल्हारी इत्यादींच्या स्तुतिपर संपादण्यांचा समावेश होतो. रामपर संपादण्या अधिक असल्या तरी निरनिराळ्या देवतांत श्रेष्ठ-कनिष्ठ असा भाव कवीने ठेवलेला नाही. ह्या सगुणोपासनेतूनही शेवटी निर्गुणो-

पासनाच शिकवावयाची आहे, असे वाटते. 'आरूपी रूपी नटला। सगुणाचे सदनी बैसला ॥' हेच ह्या सगुणोपासनेचे मर्म आहे.

आख्यानपर संपादण्यांत रामजन्म, सीतास्वयंवर, शिवपार्वती अशा पौराणिक कथा गुंफलेल्या आहेत. त्यांतून मनोरंजन व उपदेश करणे हे दोन्ही हेतू साधले आहेत. प्रापंचिकांना खऱ्या भक्तीचा मार्ग दाखविणे व सुलभ करून देणे हेच रामानंदांच्या कवितेचे उद्दिष्ट आहे.

**रचना : मु.** – १. संपादण्या; सं. ५२; श्रीस्वामी रामानंद विरचित संपादण्या; पठाण, यू. म.; औरंगाबाद, १९६३; २. स्फुट – सद्गुरूची आरती; मुडलगीचे स्वामी; संपा. आवळीकर, पंडित, धारवाड–पुणे; १९७१; पृ. १०५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित (संपा.); प्रस्ता., मुडलगीचे स्वामी; धारवाड–पुणे, १९७१, पृ. ४२–४३; २. ढेरे, रा. चिं. : नवे ग्रंथ – नवे चिंतन; इंद्रायणी, जाने.–फेब्रु. १९६४; पृ. ३८–४४; ३. पठाण, यू. म. : प्रस्ता., श्रीस्वामी रामानंद-विरचित संपादण्या; औरंगाबाद, १९६३; पृ. १–१४.

**रामानंद–४** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पंचीकरण; पदे; ग्रं. सं. ३६; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**रामानंद–५** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – संगीतसंग्रह; ग्रं. सं. ८३; रामानंद आणि वरद-राज इ. कवींच्या पदांचा संग्रह. तालांचा निर्देश केलेला आहे. प्रत श. १७२० / इ. स. १७९८. मसंम., हवना., पृ. ७४.

**रामानंदतनय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामानंद माळो** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – वेदान्तपर पद, गुरुपर पद, इ. स्फुटे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रामानंद राम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रामानंदस्वामी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – गोपीगीतटीका – श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रामानंदज्ञान** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. गुरुमर्यादा; ग्रं. सं. ९५; २. पंचीकरण; ग्रं. सं. ३६; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**० रामानंदी** – पहा **रामानंद–२.**

**रामानुज** [का. अनु.] पदकार. श. १८२३ मध्ये उतरून घेतलेल्या वेंचले येथील पदाच्या बाडात ह्या कवीची पदे संग्रहित; भाइसंमं.

**रामा रंगारी** [इ. स. चे १८ वे शतक, अखेर] शाहीर. हे रामजोश्यांचे समकालीन. आपल्या कवनात हे स्वतःचे नाव 'राम' असे घालीत असत. त्यामुळे रामजोश्यांची व ह्यांची कवने एकमेकांत मिसळू लागली म्हणून पुढे रामजोशी आपले 'कविराय' असे नाव घालू लागले (मसा., आ. ५, पृ. ५६०).

**रामा सटवा / ० सटवाजी** [का. अनु.] शाहीर. ह्याने *पानपतच्या मोहिमे*वरील दोन पोवाडे रचले आहेत. हे दोन्हीही पोवाडे करुणरस-पूर्ण असून त्यांतील वर्णने चटका लावणारी आहेत. ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनेही ते महत्त्वाचे आहेत. ह्यांपैकी 'भाऊसारखा मोहरा । आम्हांवर का रुसला पंचीप्यारा ।' हा पोवाडा विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी प्रथम *निबंधमाले*त छापला होता.

**रचना : मु.** – पानपतचा दुसरा व तिसरा पोवाडा; ऐतिपो., खं. १, पृ. १२४–१३५.

**० रामीरामदास–१** – पहा **रामदास.**

**० रामीरामदास–२** – पहा **गंगाधरबाबा (श्रेष्ठ).**

**रामेश्वरभट** [का. अनु.] (तुकारामांचे शिष्य) पदकार.

**रचना : मु.** – तुकारामांची आरती; मआ., पृ. ४०९. **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रामेश्वर व्यास (बास)** [इ. स. चे १४ वे शतक, प्रारंभकाल] महानुभाव कवी. कवीश्वरबास ऊर्फ भास्करभट्ट बोरीकर ह्यांचे शिष्य. *लीळाचरित्र* या ग्रंथाचे एक पुनरुज्जीवनकार. आणखी काही लेखनही ह्यांच्या नावावर आढळते.

**रचना : अमु.** – १. आचारविचार मालिका; अनुपलब्ध; २. तोडे; ३. मंगळारती; ४. लीळाचरित्र (संशोधन, पुनर्लेखन, साहाय्य, परशरामबास); ५. वृद्धाचार; ६. सूत्रपाठ (संशोधन, पुनर्लेखन, साहाय्य, परशरामबास). (ममग्रंककासू., पृ. २६; कवीश्वर आम्नाय वंशवृक्ष; परिशिष्ट; ममवा., पुणे, १९६०; पृ. २६).

**राय** [अंदाजे इ. स. १६८४] जैन कवी. मल्लाजीचे पुत्र. ह्यांच्या नावावर *जिनवरविनती* (१६ कडवी; र. का. : श. १६०६) हे एक भक्तिपूर्ण स्तोत्र प्रसिद्ध आहे. 'विनती' हा हिंदीच्या संसर्गाने जैन कवींनी वापरलेला भक्तिपर रचनेचा प्रकार आहे. 'विनती' म्हणजे विनंती, विनयाने प्रभूजवळ आशीर्वाद मागणे होय. ही रचना शिरड येथील जैनांच्या हस्तलिखित संग्रहात उपलब्ध (*सुभाषचंद्र अक्कोळे*, प्रामजैसा., पृ. ६६).

**० रायजी** – पहा **अमृतराय.**

**राय हनुमंत मुख्य प्राण** [अंदाजे श. १६५० / इ. स. १७२८] कवी. ह्यांचे नाव राय हनुमंत मुख्य प्राण, असे ह्यांच्याच प्रमुख रचनांच्या पुष्पिकांतून नमूद केलेले आहे. *रामलहरी–पूर्वपीठिका* काव्यात कवी म्हणतो : "पूर्वी नाम स्वदेहाचे 'हनुमंत' पितामहें । धरिलें दैशिकाज्ञेनें 'मुख्यप्राण' द्वितीय हें ॥" म्हणजेच एक नाव कवीच्या जन्माच्या वेळी त्याच्या आज्याने ठेवलेले व दुसरे गुर्वाज्ञेवरून धारण केलेले. 'मुख्यप्राण' हे मारुतीचे नाव आहे, पण महाराष्ट्रात ते प्रचारात नाही. गोमंतकात व त्याच्या परिसरातील कानडी प्रदेशात मारुतीचे एक नाव म्हणून हा शब्द प्रचलित आहे. कवीचे जन्मकर्मस्थळ हे महाराष्ट्रात नसून तुंगभद्रेच्या काठी कोठे तरी असावे. याबद्दल *रामादर्श* ह्या त्यांच्याच ग्रंथातील एक उल्लेख पाहण्यासारखा आहे : "उत्तुंगवृजिनाद्रिदारणपटु श्रीतुंगभद्रातटीं। जाली रत्नसमान पद्यरचना ते बांधली वाक्पटीं ॥" *रामादर्शा*तील 'जालो दासकुळीं म्हणोनि म्हणसी सेवा करी श्रीविभो' – ह्या दुसऱ्या निर्देशावरून हे ब्राह्मणेतर कुळात जन्मले असावेत असे वाटते. गुरूच्या नावाचा स्पष्टपणे निर्देश ह्यांच्या रचनेत येत नाही. पण ह्यांच्या काव्यरचनेवर समर्थांच्या वाणीचा व त्यांच्या प्रतिपादनाचा परिणाम झालेला लक्षात येतो. रामभक्तिपर कवने रचण्यास ह्यांना रामदासपंथीयांकडून प्रेरणा मिळाली असावी.

*रामलहरी* ग्रंथाच्या समाप्तीचा, 'शके १६** कीलकनामसंवत्सरे वैशाख शुद्ध पौर्णमास्यायां रविवासरे स्वहस्ताक्षरेण हनुमंतेन लिखितं संपूर्णमस्तु ॥' असा काल कवीने दिला आहे. शालिवाहन शकाच्या गणनेच्या नियमाप्रमाणे श. १६०० ते १६९९ पर्यंतच्या काळात श. १६५० ह्या वर्षीच फक्त कीलकसंवत्सर येतो. म्हणजेच श. १६५० (इ. स. १७२८) मध्ये कवीने हे काव्य रचले.

कवीच्या स्वरचित आणि स्वहस्ते लिहिलेल्या भक्तिपर कवनांचे एक बाड 'नागपूर विद्यापीठ हस्तलिखितसंग्रह' विभागात आहे. त्यापैकी *रामलहरी* (र. श. १६५०) हे सात कांडांचे १८५ श्लोकांचे लघुरामायण असून त्याला *अध्यात्मरामायणा*चा आधार आहे. अंतिम कांडात ह्याच काव्याला *रामचंद्रोदय* म्हटलेले दिसते. ह्या *रामलहरी*स कवीने ७१ पद्यांची उपोद्घातपर रचना जोडलेली आहे. हिला पूर्वपीठिका

असे म्हटले आहे. ह्यात रामनाम, रामचरित्र व रामभक्ती ह्यांचा महिमा सांगणारी अनेक पद्ये आहेत व रामाष्टकासारखी स्तोत्रे आहेत. *रामादर्श* ह्या काव्यात निरनिराळ्या वृत्तांमध्ये बांधलेली ५५ पद्ये आहेत. बहुतांश रचना अक्षरगणवृत्तात्मक आहे. *रामादर्शा*तील अखेरच्या पद्यावरून *मनोरंजन*-नामक सर्गबद्ध किंवा उल्लासबद्ध मोठ्या काव्याचा हा एक सर्ग असावा असे दिसते. *स्वानुभवविंशति* ह्या २१ अभंगांच्या रचनेत कवीच्या मोक्षपिपासू अंतःकरणाची तळमळ व्यक्त होते. मारुतीची व रामाची अशा दोन आरत्यांची रचना कवीने केली आहे.

मुख्यप्राणांच्या कवितेतील भक्तिरसाच्या आविष्कारातून त्यांचे रचनापटुत्व आणि भाषासौष्ठव ह्यांचा प्रत्यय येतो. हा कवी संस्कृतचा चांगलाच जाणकार होता. संस्कृत स्वरसंधी संस्कृताप्रमाणेच मराठीत योजण्याच्या ह्यांच्या पद्धतीमुळे काही स्थळी ह्यांची कविता दुर्बोध झाली आहे. मराठी भक्तकवींत महाराष्ट्राच्या बाहेरील प्रांतात राहून मराठीत रचना करणारा कवी, ह्या दृष्टीने ह्या कवीचे स्थान महत्त्वाचे ठरते.

**रचना : मु.** – स्वानुभवविंशति; अभंग २१; विसंमंवा. १९६४; पृ. २७–३९. **अमु.** – १. रामलहरी; कांडे ७; श्लो.सं. १८५; २. रामलहरी; पूर्वपीठिका; ग्रं. सं. ७१; वृत्तबद्ध; ३. रामादर्श; ५५ पद्ये; वृत्तबद्ध; ४. स्फुट : २ आरत्या; नागपूर विद्यापीठ ग्रंथसंग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कात्रे, स. ल.; रायहनुमंत मुख्यप्राण : अडीचशे वर्षांपूर्वीचे एक मराठी भक्तकवि; विसंमंवा. १९६३; पृ. ३५–४६.

**राया** [का. अनु.] जैन कवी. ह्यांच्या 'राया' हे नाव शेवटी आलेल्या बऱ्याचशा आरत्या आहेत. ह्यांचे गुरू वा ह्यांचा काल ह्यासंबंधी माहिती मिळत नाही. हे जिनभक्त श्रावक असावेत. तीर्थक्षेत्रांची वंदना करून तेथील मूळ नायकाचे गुणवर्णन ह्या आरत्यांत केले आहे.

**रचना : अमु.** – १. गोमटस्वामी आरती; कडवी ३; २. नेमीश्वर आरती; ३. पार्श्वनाथ आरती; ३ कडवी; ४. माणिकस्वामी आरती; कडवी ५; ५. शांतिनाथ आरती; पहिली कडवी ३; दुसरी कडवी २; ६. क्षेत्रपाल आरती; कडवी ३; शिरड शहापूर जैन हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : राया; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. १११.

**रायाजीपंत** [अंदाजे इ. स. १७२६] बखरकार. ह्यांनी लिहिलेली *दाऊदखान पन्नीची बखर* (र. श. १६४७) उपलब्ध आहे. दिल्लीचे बादशहा फरुखसियर ह्यांनी दक्षिणच्या सहा सुभ्यांच्या कारभारावर इ. स. १७१५ च्या एप्रिल महिन्यात सय्यद हुसेनची नेमणूक केली व आधीचा कारभारी दाऊद पन्नी यास गुप्तपणे असा निरोप पाठवला की सय्यद हुसेन ह्यास कारभार न देता मारून टाकावे. हुसेन सय्यद नर्मदापार झाल्यावर बादशहाच्या आदेशाप्रमाणे दाऊदखान पन्नी त्याच्यावर चाल करून गेला. बऱ्हाणपूरनजीक लालबागच्या मैदानात दाऊदखान पन्नी व सय्यद हुसेन ह्यांची लढाई झाली. तीत दाऊदखान मारला गेला. ह्या लढाईची हकीकत प्रस्तुत बखरीत येते.

लेखक रायाजीपंत ह्यांनी बखरीचे लेखन संपूर्ण केल्याचा काल नमूद केला आहे तो असा : "शके १६*७ विश्वावसु संवत्सर पुसव ॥ अवस शनिवार ॥" शकसाल निश्चित दिलेले नाही. पण हा योग श. १६४७ / इ. स. १७२६ जानेवारी २२ ला येतो, म्हणजे दाऊदखानास मारल्यानंतर ११ वर्षांनी ही बखर लिहिली गेली आहे. प्रस्तुत बखर धुळे येथील *संशोधक* त्रैमासिकात प्रथम छापली गेली (व. १८, अं. ३–४, पृ. ११९–१२७).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** भट, भा. वा. : दाऊदखान पन्नीची बखर; संशोधक, व. १८, अं. ३–४; आश्विन–पौष, श. १८७१; पृ. ११३–१२७.

**रावलक्ष्मण** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

o **रावळ (सिद्धनाथ)** – पहा **सिदु राऊळ ऊर्फ सिद्धनाथ.**

o **(फा.) रिबैरो** – पहा **दियोगु रिबैरु (पाद्री).**

o **रुक्म** – पहा **रुक्मांगद पंडित.**

o **रुक्म गंगाधर** – पहा **गंगाधर–३ (रुक्मनंदन).**

**रुक्मजदास** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, उत्तरार्ध] संतचरित्रकार. विजापूर येथील रुक्मांगद पंडित ऊर्फ रुचिरानंद ह्या सत्पुरुषांचे शिष्य. रुक्मजदास कोण, कोठले ह्याबद्दलची माहिती उपलब्ध नाही. ह्यांनी रचलेल्या रुक्मांगदस्वामींच्या चरित्रात येणाऱ्या काही तपशिलावरून भीमातीरावरील सन्नति गावची चंदलांबा ही त्यांची कुलदेवता असल्याचे समजते. आधारग्रंथात *शक्तिमाहात्म्य* व *गीता* ह्यांचा समावेश हे करतात. तत्त्वज्ञानप्रतिपादनातले दृष्टान्त कवीचे *ज्ञानेश्वरी* आणि *विवेकसिंधु* ह्या ग्रंथांचे अध्ययन सूचित करतात. *रुक्मांगदचरित्रात* कवीने आपला उल्लेख रुक्मजदास ह्या नावाने केला आहे.

डॉ. पंडित आवळीकरांना उपलब्ध झालेल्या *गुरुमाळिका* ह्या महिपतीस्वामींच्या (काखंडकी येथील) चरित्राच्या एका अध्यायाच्या हस्तलिखितात कवीने आपले रुक्मजदास हेच नाव दिले आहे. उदा., 'ऐसे गुरुमाळिका ग्रंथ। वदला रुक्मजदास यतार्थी। जो श्रद्धायुक्त भागवति भावार्थ। यासि काळ यतार्थं न बाध॥ २२१ ॥' ह्याच अध्यायाच्या अखेर येणाऱ्या गद्य मजकुरात 'रुचिरानंद तच्छिष्ये' असा गुरूचा उल्लेख कवी करतो. रुचिरानंद हे रुक्मांगदस्वामींचेच नाव असून आनंद-परंपरेतील गौरानंदाचा उपदेश घेतल्यानंतर त्यांचे नवे नाव रुचिरानंद असे ठेवण्यात आले. ही परंपरा अशी : ज्ञानानंद > वासुदेवानंद > राघवानंद > सुरानंद > गौरानंद > रुचिरानंद > राजीवानंद. ही आनंद-परंपरेची एक वेगळीच शाखा आहे असे दिसते.

राजीवानंद हे रुक्मांगदांचे पट्टशिष्य. कर्नाटकातील काखंडकी येथील महिपतीस्वामींच्या एका कन्नड चरित्रात ह्या राजीवानंदांनी महिपतीचा मराठी चरित्राध्याय लिहिल्याचा जो निर्देश येतो, त्यामुळे वर निर्दिष्ट केलेल्या महिपतीस्वामींच्या चरित्राचे कर्तृत्व राजीवानंदांकडे दिले जाते. राजीवानंद म्हणजे रुक्मजदास असा चुकीचा समजही निर्माण झाला आहे तो ह्यामुळेच असावा. पण राजीवानंद आणि रुक्मजदास ह्या भिन्न व्यक्ती होत्या ह्याचे संदर्भ *रुक्मांगदचरित्र* किंवा *गुरुवंशावळी* ह्या ग्रंथांतून हवे तेवढे सापडतात. उदा., 'त्या चौघामाजी अग्रगणी । केवळ विज्ञानाची रत्नखाणी। राजीवानंद परम गुणी । गुणागुणी विरहित ॥' (रुक्मांगदचरित्र : १३:१३) असे उद्गार राजीवानंद स्वतःबद्दल काढणे शक्य नाही. राजीवानंदांच्या प्रयाणाबद्दलचा तपशीलवार कालोल्लेख ह्या चरित्राच्या १३ व्या अध्यायाच्या ९३ व्या ओवीत येतो. त्यात श. १६७९ हा त्यांचा समाधिशक दिला आहे. ह्यावरून *रुक्मांगदचरित्रा*ची रचना श. १६७९ नंतर किंवा त्या सुमारास झाली असावी असे म्हणता येते. ह्यावरून *गुरुमाळिका* ह्या रुक्मजदासांच्या दुसऱ्या ग्रंथाचा व त्यांच्या काळाचाही अंदाज येतो; व रुक्मजदास हे स्थूलमानाने इ. स. च्या १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात विद्यमान होते, असे अनुमान करता येते.

कवीच्या साहित्यापैकी *रुक्मांगदचरित्र* (मु.) व *महिपतीस्वामीचरित्र* (अमु.) अशी दोन संतचरित्रे सापडतात. पैकी *रुक्मांगदचरित्राचे* १३ अध्याय असून ते संपूर्ण आहे. *गुरुमाळिका* ग्रंथात येणारे महिपतीस्वामींचे (काखंडकींचे) चरित्र मात्र अपूर्ण असून त्याच्या एकाच अध्यायाचे हस्तलिखित डॉ. पंडित आवळीकर ह्यांना उपलब्ध झाले आहे.

*श्रीगुरुवंशावळी*, *श्रीरुक्मचरित्र*, *गुरुमाळिका*, *गुरुनामावली*, *गुरुमाहात्म्य*, एवढी नामे *रुक्मांगदचरित्र* ह्या ग्रंथात ग्रंथनामे म्हणून कवीने दिलेली आहेत. त्यातील *गुरुमाळिका* हे नाव सूचक आहे. हे नाव पाहिल्यानंतर व त्यातील दोन सत्पुरुषांची चरित्रे समोर असताना असे म्हणावेसे वाटते की, गुरुवत असलेल्या कर्नाटकातील अनेक संतांची चरित्रे सांगण्याचा लेखकाचा मानस असावा.

*रुक्मांगदचरित्र* प्रसिद्ध करणारे द. वें. केतकर ह्यांनी प्रस्तुत ग्रंथाकरिता लिहिलेल्या 'दोन शब्दां'त, ह्या ग्रंथाचे कर्तृत्व कोणा विठ्ठपैय्यास बहाल केले आहे. प्रत्यक्ष ग्रंथात विठ्ठपैय्या हे नाव येते ते राजीवानंदांच्या विठ्ठल नामक पुत्राचे आहे. ग्रंथकाराचे म्हणून येत नाही. ह्या चरित्रातील *विवेकसिंधू*च्या येणाऱ्या सारांशवजा भागावरून रुक्मांगदांचा मुकुंदराज-परंपरेशी संबंध होता ही महत्त्वाची गोष्ट स्पष्ट होते. ह्या चरित्रात रुक्मांगदशिष्य राजीवानंदांची वंशावळ दिलेली आहे (अ. १३). राजीवानंदांच्या प्रश्नांना उत्तर म्हणून ग्रंथातील तत्त्वज्ञान सांगितले गेले आहे. विजापूरच्या रुक्मांगदस्वामींचे हे जीवनचरित्र विस्तृत असले तरी ऐतिहासिक दृष्ट्या मात्र तितकेसे विश्वसनीय नाही.

महिपतीस्वामी ह्यांच्या चरित्रातील प्रारंभीच्या मंगलाचरणात विष्णूच्या अनेक अवतारांना कवी नमन करतो आणि शेवटी विष्णूने मस्तकी हात ठेवून 'संतचरित्रे लिहीत जा व मी साह्यकर्ता होईन' असे सांगितल्याने चरित्रलेखनाची स्फूर्ती झाल्याचे कवीने म्हटले आहे. महिपती हे विजापूरकडचेच राहणारे. त्यांच्या चरित्राच्या उपलब्ध झालेल्या एका अध्यायात कवीने त्यांच्या जन्मापासून गुरुकृपेचा प्रसाद होईपर्यंतचे लौकिक जीवन रंगविले आहे. महिपतींच्या जीवनचरित्राशी संबंधित विजापूरचा पातशहा किंवा महिपती ज्याच्याकडे अगोदर चाकरी करीत होते तो खवासखान, त्याचप्रमाणे नंगा फकीर, भास्करयती ह्या व्यक्तींविषयी म्हणावी तशी माहिती मिळत नाही. महिपतींच्या कुटुंबविषयक माहितीचे निवेदनही अचूक नाही.

पूर्वपरंपरेप्रमाणे संतांच्या अद्भुत चमत्कारांवर दोन्हीही चरित्रांत भर दिलेला आढळतो. असे असले तरी त्यांत येणारे अनेक उल्लेख चरित्रविषयक दृष्टिकोनातून महत्त्वाचे ठरतात. इतिहासाची साक्ष काढल्यास केवळ पुराणग्रंथाचे स्वरूप ह्या चरित्रग्रंथाला नाही हे ध्यानात येते. काव्य ह्या दृष्टीने यमकानुप्रास, दृष्टान्तादिकांचे सौंदर्य आणि प्रसंग व व्यक्तिचित्रण लक्षात ठेवण्याजोगे आहे. रुक्मजदास म्हणजे मराठीतील संतचरित्रकारांत पडलेली महत्त्वाची भर आहे.

**रचना :** **मु.** – रुक्मांगदचरित्र – रुक्मजदासकृत; १३ अध्याय; संपा. केतकर, द. वें.; सोलापूर, १९५४. **अमु.** – गुरुमाळिका – एक अध्याय; डॉ. पंडित आवळीकर संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : गुरुमाळिका – एक अध्याय; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. २३३–२५०. २. आवळीकर, पंडित : रुक्मांगदस्वामी व रुक्मजदास; इंद्रायणी, एप्रि. १९६३; पृ. २१–२६.

**० रुक्मणणापंत** – पहा रुक्मांगद पंडित.

**० रुक्मभूष** – पहा रुक्मांगद पंडित.

**रुक्मसुत** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – प्रल्हादचरित्र; श्लो. सं. ३२; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रुक्मांगद–१** [अंदाजे इ. स. १७ व्या शतकाची अखेर – १८ व्या शतकाचा प्रारंभ] स्तोत्रकार. मुडलगीच्या स्वामीपरंपरेतील पहिल्या शिवबोधांचे शिष्य. ही मुकुंदराजपरंपरेची एक शाखा आहे. *शिवबोध पंचरत्नमालिका* अशी एकच रचना ह्या कवीच्या नावावर सापडते. पहिल्या शिवबोधांचा 'सद्गुरुवरा' असा स्तोत्रकर्त्याने उल्लेख केला आहे.

हे स्तोत्र शिवबोधांच्याच (समा. श. १६२८/इ. स. १७०६) हयातीत रचले गेले. त्यामध्ये कोनेरीबोध, रंगबोध, अद्वयबोध, शिवबोध, रंगबोध (दुसरे) ह्यांचा व ह्यांनी केलेल्या चमत्कारांचा उल्लेख आहे. मुकुंदराजांना कवीने 'साक्षात दत्त' म्हटले आहे. स्तोत्राचे मुद्रण *इंद्रायणी* मासिकातून झाले आहे (एप्रि. १९६३, पृ. २२).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : रुक्मांगद; मुडलगीचे स्वामी; धारवाड–पुणे, १९७१; पृ. ५२–५३. २. आवळीकर, पंडित; रुक्मांगदस्वामी व रुक्मजदास; इंद्रायणी, एप्रि. १९६३; पृ. २२–२४.

**० रुक्मांगद–२** – पहा रुक्मांगद पंडित.

**रुक्मांगद पंडित** / ० रुक्म / ० रुक्मणणापंत / ० रुक्मभूष / ० रुक्मांगद–२ / ० रुक्मांगदस्वामी / ० रुक्मिणी पंडित / ० रुचिरानंद [अंदाजे श. १५३२ / इ. स. १६१० – समा. श. १६३२, फाल्गुन शु. १२ / इ. स. १७११] संतकवी. रुक्मांगदांचे सुव्यवस्थितपणे लिहिलेले चरित्र उपलब्ध नाही. विजापूर येथील कृष्णपंडित नावाच्या ईश्वरभक्त विद्वान सद्गृहस्थांचे हे पुत्र. कवीने 'विद्यापूरराजपूजित' असा आपल्या पित्याचा लौकिक सांगितला आहे. आईचे नाव लक्ष्मी. गोत्र वत्स. हे अल्पवयीन असतानाच मातापितरे निवर्तल्याने भागिरथी ह्या त्यांच्या भगिनींवर रुक्मांगदांना वाढविण्याची जबाबदारी पडली. त्यांत रुक्मांगद हे उनाड असल्याने बहिणीस त्यांची फार काळजी वाटे. पण योगायोगाने तुंगभद्रातीरी सप्तसागरग्रामी वास करणाऱ्या श्रीमच्छंकराचार्य परंपरेतील गौरानंद काशीयात्रेस निघाले असता वाटेत विजापुरास कृष्णपंडितांच्या घरी आले, व घरात कोणी वडील माणूस नाही हे पाहिल्यानंतर रुक्मांगदांच्या पाठीवरून हात फिरवून त्यांनी रुक्मांगदांना चार हिताच्या गोष्टी सांगितल्या. तेव्हापासून त्यांच्या आयुष्यास वेगळे वळण लागले. शास्त्राभ्यासाकडे व वैद्यक-संगीतादिकांकडे ते वळले. ईश्वरभजन व लोकोपकार ह्यांसाठी आपले आयुष्य खर्च करण्याचे त्यांनी ठरविले.

रुक्मांगदांची परंपरा शंकराचार्यांपासून सुरू होणारी आनंद-संप्रदायाची एक शाखा आहे. ती अशी : ज्ञानानंद > वासुदेवानंद > राघवानंद > सुरानंद > गौरानंद > रुचिरानंद (रुक्मांगद पंडित) > राजीवानंद > अमलानंद > ज्ञानानंद > भगवंत वगैरे. *बोधभक्तितरंगिणी* व *स्वानंदसुरद्रुम* ह्या दोन्ही ग्रंथांत ह्यांनी 'मल्लिकार्जुन' असा आपल्या गुरूचा उल्लेख केला आहे. उदा. 'ज्यांचा वास सप्तसागरीं । दक्षिणामूर्तिरूपधारी । मल्लिकार्जुन सोमाध्वरी । उदार सतुगुरु ते माये ॥ ४. ३४ ॥' (*रुक्मांगदचरित्र*). *गुरुमाळिका* ग्रंथात 'गौरानंद' असे गुरूचे नाव सांगितले आहे तेव्हा गुरूच्या नावामध्ये असा फरक का? ह्या संबंधात विवेचन करताना रुक्मांगदांच्या सद्गुरूचे सांप्रदायिक नाव गौरानंद आणि लौकिक व जास्त प्रचारातले नाव मल्लिकार्जुन असले पाहिजे असे मत संशोधक ना. ब. जोशी मांडतात. रुक्मांगदांचेही सांप्रदायिक नाव 'रुचिरानंद' हे फारसे कोणाला ज्ञात नाही.

रुक्मांगदांचा *विवेकसिंधू*चा अभ्यास चांगला होता. ते भजने, वेदान्तावरील प्रवचने व कीर्तने करीत असत. विठ्ठल हे त्यांचे उपास्य-दैवत होते. विजापुरास विजय विठ्ठलाच्या मूर्तीची स्थापना करून त्यांनी पंढरपूरच विजापुरास आणले. त्यामुळे पंढरपुरास जाण्याची आवश्यकता न राहिल्याने इतर भक्तमंडळीस त्यांच्या दर्शनाचा लाभ घडेना. म्हणून पांडुरंगानेच आपल्याला जलरोग झाल्याचे सोंग करून तो बरा करण्यास फक्त विजापूरचे रुक्मांगदच समर्थ आहेत असे सांगितले. तेव्हा भक्तमंडळींनी प्रल्हाद बडव्यांना निरोप देऊन विजापुरास धाडले व रुक्मांगदांना पंढरपुरास आणविले. त्यावेळी मंदिरात

तुकाराममहाराजांचे कीर्तन चालले होते. रुक्मांगदांच्या दर्शनाने सर्व भक्त संतुष्ट झाले. देवाच्या बेंबीवर बुक्का लावल्यानंतर देवाचा रोगही दूर पळाला. हा प्रसंग श. १५६८ व्ययनामसंवत्सरी आषाढ शु. एकादशी, सोमवार, ह्या शुभदिवशी घडल्याचे *गुरुमालिका* ग्रंथात नमूद केले आहे. ह्यानंतर रुक्मांगदांची विठ्ठलाच्या देवळात तीन दिवस कीर्तने झाल्याचेही *गुरुमालिका*कार सांगतात. ह्याच वेळी कल्याणीच्या पूर्णानंदांचे चिरंजीव व एकनाथांचे पणतू (मुलीकडून) शिवरामस्वामी रुक्मांगदांजवळ विद्याभ्यास करावा ह्या हेतूने त्यांच्याच बरोबर विजापुरास गेले. ही कथा *पूर्णानंदचरित्र* ह्या हनुमदात्मजांच्या अप्रकाशित ग्रंथात आली आहे. त्यातील हा शक (१५६८) शिवरामस्वामींच्या चरित्राशी बरोबर जुळणारा आहे. ह्यावरून स्वामींचा संतमंडळात किती मोठा अधिकार होता हे समजते.

असे सांगतात की, विजापूर येथील शहाच्या पदरी हे मोठे हुद्देदार होते. पण कागदोपत्री मात्र तसा पुरावा सापडत नाही. राजीवानंद हे ह्यांचे पट्टशिष्य. परंतु राजीवानंदांच्याही अगोदरचे 'लक्ष्मीपती' हे त्यांचे पट्टशिष्य असावेत. ते रुक्मांगदांच्या बरोबर शके १५६८ साली पंढरपुरास गेले असावेत, असे त्यांच्या एका पदावरून वाटते. लक्ष्मीपतींची हिंदी व मराठी दोन्ही भाषांत पद्यरचना आहे. त्यापैकी जी हातास लागली तिच्यातील मराठी, पदे तेवढी ना. ब. जोशी ह्यांनी भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या त्रैमासिकात १९७१ साली प्रसिद्ध केली आहेत. रुक्मांगदांनी अनेक शिष्य केले व संप्रदाय वाढविला. रुक्मांगदांचे पुत्र कृष्णपंडित हे विरक्त असल्याने संसारात पडले नाहीत. त्यामुळे रुक्मांगदांचा प्रत्यक्ष वंश हयात नाही. त्यांची आध्यात्मिक परंपरा मात्र त्यांच्यामागे अनेक वर्षे खंड न पडता चालू राहिली. पंडित हे तुकाराम व रामदास ह्यांचे समकालीन व समवयस्क होते. ह्यांनी श. १६३२ विकृति नाम संवत्सरी फाल्गुन शुद्ध द्वादशीस समाधी घेतली (निर्देश : रुक्मजदासकृत *गुरुमालिका* ग्रंथ). ही गावाबाहेर पूर्वेच्या बाजूस आहे.

रुक्मांगद पंडितांनी अनेक भाषांत काव्यरचना केली. त्यापैकी काही कानडी, हिंदी व मराठी पदे ना. ब. जोशी ह्यांना राजीवानंदांच्या मठातील जुन्या कागदपत्रांतून सापडली. त्यातील वीस पदे त्यांनी छापून प्रसिद्ध केली आहेत (*इंद्रायणी*, दीपावली १९६२, पृ. ७९–८५). ह्यानंतर आणखी चौदा पदे व जोशी ह्यांच्या संग्रहातील विठ्ठलाची एक आरती एवढी रचना विजापूर येथील त्यांच्या भक्तमंडळींनी १९६२ मध्ये प्रसिद्ध केली. ज्या बाडात ही दुसरी चौदा पदे सापडली त्याच बाडाची बारकाईने तपासणी करीत असता त्यात रुक्मांगदांचे दोन छोटे ग्रंथ उपलब्ध झाले. त्यांची नावे *बोधभक्तितरंगिणी* व *स्वानंदसुरद्रुम* अशी आहेत. ह्यांपैकी पहिला पौषात व दुसरा माघात रचल्याचा उल्लेख ग्रंथांतरी सापडतो. पण रचनाशक मात्र दिलेले नाहीत. वरील दोन्ही ग्रंथांत येणारी रुक्मांगदांची आत्मचरित्रविषयक माहिती सारखीच आहे. *बोधभक्तितरंगिणी* ग्रंथाचे चार तरंग व २७५ ओव्या आहेत. वैराग्य, बोध, उपासना व नामसंकीर्तन अशा चार विषयांवर निरूपण करून वेदान्तातील तत्त्वज्ञान ह्यात सांगितले आहे. प्रथम तरंगात मानवाच्या मनात अगोदर वैराग्य उत्पन्न व्हावयास हवे व ते झाले की तो गुरूपदेशास प्राप्त होतो असे कवी सांगतो. संसारबंधनातून सुटका फक्त सद्गुरूच करू शकतो असे *वैराग्यतरंगात* सांगून, उपदेशानंतरचा बोध पुढील तरंगात गुरू मुमुक्षूस करतो असे दाखवले आहे. ज्ञान, अज्ञान ह्यांचे संबंध कसे आहेत हे विशद करून 'तत्त्वमसि' महावाक्याचा उपदेश गुरू करतो व मोक्ष म्हणजे काय हे समजावून सांगतो. ह्यानंतरची पायरी उपासनेची. अर्थात ही सगुणाची की निर्गुणाची हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. शास्त्रात तर ध्यानाची महती गातात, तेव्हा हा संभ्रम दूर व्हावा म्हणून रुक्मांगदांनी केलेले विवेचन पाहण्यासारखे आहे. ते म्हणतात : 'अन्यासि अन्यत्त्वें चिंतन । यांसि म्हणती शास्त्रीं ध्यान । पण हें कर्त्यांचें अधीन । ज्ञानविषया सारिखें ॥ ५ ॥ प्रकृती ध्यानचि मन । यास्तव मोक्ष साधन । परंतु हेंही गहन । सगुण भक्तीवांचुनि ॥ ६ ॥ यालागि यमुनातीरिचें । सांवळे ब्रह्म जें आमुचें । जंववरि चित्तीं न नाचे । कांहीं नव्हे तंववरि ॥ ७ ॥ " असे सांगून अनन्यभावाने कृष्णभक्ती केली पाहिजे असे म्हटले आहे. हा श्रीकृष्णच विठ्ठलरूपाने पंढरपुरी भक्तांचा उद्धार करण्याकरिता विटेवर उभा आहे. म्हणून त्याची भक्ती करावी असे ते सांगतात. चौथा तरंग नाममहिमा वर्णन करणारा आहे.

*स्वानंदसुरद्रुम* ही एक-प्रकरणी १०६ श्लोकांची रचना असून त्यातील निम्मे-अधिक श्लोकच हाताशी लागतात. ह्या ग्रंथात आपण कोण, कोठून आलो, कोठे जाणार, पुढे काय, संसाराचे खरे स्वरूप कोणते इत्यादी प्रश्न मनापुढे उभे राहिल्यानंतर ते सोडविण्याची तळमळ ठेवल्यास सद्गुरू आपण होऊनच भेटतात असे सांगून सच्छिष्याची लक्षणे व गुरुकार्याचे माहात्म्य कवी सांगतो.

दोन्हीही ग्रंथ अध्यात्मपर असून त्यांची भाषा सोपी व विषय समजावून सांगण्याची हातोटी बालबोध असल्याने आकर्षक वाटतात. ह्यांची पदे रागांत बांधलेली आहेत. संतांच्या जीवनातले पारमार्थिक अनुभव त्यांमध्ये व्यक्त केलेले दिसतात. तसेच पंढरपूरच्या विठ्ठलावरच्या दृढ श्रद्धेने ती अंतर्बाह्य ओथंबलेली दिसतील. रचनेत एक प्रकारची सहजता आहे. पहा : ' माझ्या अज्ञानाच्या कुशीं । वाढलासी हृशीकेशी ॥ १ ॥ वोळखिलासी कीं देवा । आतां सोडी देवभावा ॥ धृ. ॥ जें कां माझें मूढपण । तेंचि जाहलें तुज कारण ॥ २ ॥ माझा उपकार तुजवरी । रुक्म म्हणजे गा श्रीहरी ॥ ३ ॥' *अभिनव बारामास* ही रुक्मांगदांची भारूडसदृश रचना तंजावरच्या *लोकगीत* (इ. स. १९५०) संग्रहातून मुद्रित झाली आहे (पृ. २–११). रुक्मांगद पंडितांनी ज्योतिष व वैद्यक ह्यांवरचे ग्रंथ रचल्याचे सांगितले जाते. मात्र ते कोणाच्या पाहण्यात नाहीत. ह्यांच्या परंपरेतील ज्ञानेश्वरीची एक प्रत विजापूर भागात सापडली आहे. तिच्यातील संहिता एकनाथपूर्वकालीन वाटते.

**रचना : मु.** – ३४ पदे व विठ्ठलाची आरती; विजापूर, १९६२. **अमु.** – १. बोधभक्तितरंगिणी; ४ तरंग; ओ. सं. २७५. २. स्वानंदसुरद्रुम; प्रकरण १; श्लो. सं. १०६ (ना. ब. जोशी संग्रह).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कारखानीस, ग. गो. : संत श्री रुक्मणापंडित यांच्या परंपरेतील ज्ञानेश्वरीची प्रत; रामदास आणि रामदासी, व. २५, अं. २९५; १९४६. २. केतकर, द. वें. (संपा.) : रुक्मजदासकृत श्री गुरुवंशावळी अथवा श्रीरुक्मांगदचरित्र; सोलापूर, १९५४. ३. जोशी, ना. ब. : रुक्मांगद पंडित व त्यांची कविता; इंद्रायणी, दीअं. १९६२; पृ. ७४–८६. ४. जोशी, ना. ब. : रुक्मांगद पंडिताचे दोन अज्ञात ग्रंथ; इंद्रायणी, मे १९६३; पृ. १२–१८.

**० रुक्मांगदस्वामी** – पहा **रुक्मांगद पंडित.**

**० रुक्मिणी पंडित** – पहा **रुक्मांगद पंडित.**

**रुक्मिणीसुत** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – विष्णूची आरती; मआ., पृ. ३६९.

**० रुक्मिणीसुत अनंत** – पहा **अनंतमुनी (तळेगावकर).**

**० रुचिरानंद** – पहा **रुक्मांगद पंडित.**

**रुद्र–१** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामादिवर्णनपर; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ४८.

**० रुद्र–२** – पहा **चंद्रात्मज रुद्र.**

**रुद्रदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रुद्रसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – रामवनवास पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रुपरामदास** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – बुद्धियोग; ओवीबद्ध; भाइसंमं.

**० रुपाइसा** – पहा **महदंबा**.

**रेणुका** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; बेंचले येथील श. १८२३ मध्ये उतरून घेतलेल्या पदांच्या बाडात संग्रहित; भाइसंमं.

**रेणुका तेलीण** [का. अनु.] कवयित्री. शेख महंमद ह्या कवीची शिष्या. हिने काही अभंग रचले आहेत (मसा., आ. ५, पृ. ८३३).

**रेणुकादास** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. ह्यांचा *श्रियाळाख्यान* ऊर्फ *श्रियाळचरित्र* (ओ. २५५, र. श. १६२५ / इ. स. १७०३) हा एकमेव ग्रंथ उपलब्ध आहे. गणेश, सरस्वती, गुरू ह्यांच्या वंदनानंतर एकनाथस्तुती केलेली आहे. प्रस्तुत काव्य तंजावर येथील हस्तलिखित ग्रंथसंग्रहात उपलब्ध (तंसम. बा. ८७७).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : रेणुकादास : काही अज्ञात सारस्वत उपासक; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २१–२२.

**रेणुकानंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – बोधपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० रेणुकानंदन विठ्ठल**– पहा **विठा रेणुकानंदन**.

**रेणुकानंदी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**रेलकर महंत** [इ. स. चे १८ वे शतक] महानुभाव कवी. ह्यांनी *भारतार्णव* (अ. १२०) नावाचा ग्रंथ लिहिल्याचे समजते (मसा., आ. ५, पृ. १००२).

**रेवणसिद्ध** – पहा **परिशिष्ट**.

**रोकडांकित** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**रोकडाराम** [ ? – श. १६८८, चैत्र व. १३ / इ. स. १७६६] रामदासी कवी. वऱ्हाडातील कारंजा येथे राहणारे. समर्थशिष्य बाळकराम ह्यांचे रोकडाराम हे पुत्र व शिष्य. कारंजा येथील मठात जी सांप्रदायिक बांधकामे झाली ती बहुतेक रोकडारामांनी केवळ भिक्षेच्या बळावर केली. कारंजा येथे चैत्र वद्य त्रयोदशीस ह्यांनी समाधी घेतली.

ह्यांची *रामनामावळी* पदे, आरत्या इ. स्फुट रचना उपलब्ध आहे. ही रचना समर्थसंप्रदायाच्या परंपरेत बसणारी, कडकडीत अशी आहे. ह्यांचे काही श्लोक ल. रा. पांगारकर ह्यांनी वाङ्मयेतिहासात विवेचनाच्या ओघात उद्धृत केले आहेत.

**रचना :** अमु. – १. गुरुपरंपरा. २. मेखलामंत्र. ३. रामनामावळी. ४. आरत्या, पदे वगैरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**रोहिदास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**लछीराम** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ९५.

**० लतीफ** – पहा **लतीफशाह**.

**लतीफशाह** / ० लतीफ / ० लथीप [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक] मुसलमान संतकवी. महिपतींनी *भक्तिविजयगाथेत* ' लतीबशाह मुसलमान । परमभाविक वैष्णवजन । ' असे ह्यांचे वर्णन केले आहे. मुसलमान असूनही रामभक्ती करणाऱ्या लतीफशाहांना तत्कालीन बादशहांकडून बराच त्रास झाला. ह्यांचा आश्रम उद्ध्वस्त करण्याची आज्ञाही देण्यात आली. परंतु ह्या कामासाठी पाठविलेले लोक लतीफशाहांचेच अनुयायी बनले व बादशहाचा रोष ह्यांनी भावबलाने नाहीसा केला. – अशी कथा महिपती देतात. रंगनाथस्वामी निगडीकरांच्या *संतमालिकेत* ह्यांचा उल्लेख येतो आणि स्वतः लतीफशाह आपल्या अभंगांत कबीर-मीराबाईंचा उल्लेख करतात, ह्यावरून ह्यांचा काळ इ. स. चे सोळावे शतक असावा, असा अंदाज व्यक्त केला जातो. ह्यांची समाधी मंगळवेढे येथे आहे.

ह्यांची चारच पदे उपलब्ध असून त्यांपैकी तीन हिंदी आहेत व एक मराठी आहे. "आता पूजा कोठे वाहू । पाहता देहीच जाला देवु ॥" ह्या एका पदात ह्यांचा सारा परमार्थानुभव साठून राहिल्याचा प्रत्यय येतो. ह्यांची रामभक्ती सांप्रदायिक मर्यादेने बंदिस्त राहिलेली नाही. राम, कृष्ण, विठ्ठल ही सर्व एकाच परमतत्त्वाची नावे आहेत, ह्याचे त्यांना भान आहे असे जाणवते. ह्यांचे प्रस्तुत एकमेव मराठी पद रा. चिं. ढेरे ह्यांनी आपल्या *मुसलमान मराठी संतकवी* ह्या पुस्तकात (पृ. १५४) विषयविवेचनाच्या ओघांत उद्धृत केले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं.; रामभक्त लतीफशाह; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १५०–१५५.

**० लथीप** – पहा **लतीफशाह**.

**ललितानंद** [का. अनु.] कवी. हे बडोद्याच्या फत्तेसिंग महाराज गायकवाडांचे आश्रित होते. ह्यांनी आपली परंपरा नित्यानंद > विठ्ठलानंद > ललितानंद, अशी दिली आहे.

**रचना :** मु. – लहरीसुंदर; ग्रं. सं. १०२; श्रीशंकराचार्यांच्या 'सौंदर्यलहरी ' ह्या स्तोत्रावरील टीका; महा. कवि; संपा. भावे, वि. ल.; श. १८२८ (इ. स. १९०६) (चैत्र ते ज्येष्ठ), पृ. ४७-४८ व श. १८२८ (आषाढ ते भाद्रपद), पृ. ४९–६४ क्रमशः.

**लल्लप (कृष्णसुत)** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना :** अमु. – बालचरित्र; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ९५.

**लहरी मुकुंदा** [अंदाजे इ. स. १९ वे शतक, पूर्वार्ध] शाहीर. *नारायणरावांच्या वधाचा पोवाडा* ही लहरी मुकुंदाची रचना प्रसिद्ध आहे. नारायणराव पेशव्यांच्या हत्येचे वर्णन पोवाड्यात समग्र आलेले आहे. ह्यांतील "दक्खनचा दिवा मालवला हिरा हरपला । काय गुपित घाला केला नारायणरावाला ॥ १ ॥" इत्यादी ओळी प्रसिद्ध आहेत. लहरी मुकुंदाचे ह्या एकाच विषयावरील दोन पोवाडे य. न. केळकर ह्यांनी *ऐतिहासिक पोवाडे, खंड १* मध्ये छापले आहेत (पृ. १५४–१७३). ह्यांपैकी सात-चौकी पोवाडा हा ऐतिहासिक सत्याचा शोध घेता अस्सल व शुद्ध दिसतो, असे मत य. न. केळकरांनी व्यक्त केले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : नारायणरावाच्या वधाचे पोवाडे; ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. १, पुणे, १९२८; पृ. १४९–१५३.

**लहरी सिद्राम** [का. अनु.] शाहीर.

**रचना :** मु. – पाच लावण्या; संपा. केळकर, य. न.; अंधारातील लावण्या; पुणे, १९५६; पृ. २२९–२३५.

**० लक्षधर** – पहा **लक्षधीर कवी**.

**० लक्षधरराव** – पहा **लक्षधीर कवी**.

**लक्षधीर कवी** / ० लक्षधर / ० लक्षधरराव / ० लक्षधीरपंडित [अंदाजे श. १५४४/इ. स. १६२२] महानुभाव कवी. ह्यांचे मूळ नाव बचराज. साल्हेर (जि. धुळे) येथील सोमवंशी कुळातील इंद्रसेन आभीरराव ह्यांचे हे पुत्र. य. खु. देशपांडे लक्षधीर कवीचे बचराज अभरराव असे दुसरे नाव देतात. *महाराष्ट्रसारस्वताचे* पुरवणीकार शं. गो. तुळपुळे ह्यांनी इंद्रसेन > अभीरराव > बचराज > लक्षधीर अशी ह्यांची वंशपरंपरा दिली आहे. ह्यांचे गुरू कवीश्वर आम्नायातील प्रमेयभाष्यकार मुरारमल्ल विद्वांस हे होत. कवीची गुरुपरंपरा ह्याप्रमाणे : भास्करभट्ट बोरीकर > परशरामबास > पेटे हरिबास > अचळ मुरारीमल्ल > गुर्जर शिवव्यास > वैद्य दत्तराजबास > संगेराज > देमाइसे > चाहेव्यास > मुरारमल्ल > लक्षधीर.

प्रथम *रुक्मिणीस्वयंवर*, नंतर *ज्ञानदर्पण*, *काव्यदीपिका* व शेवटी *ज्ञानमार्तंड* अशी काव्यनिर्मिती केल्याचे कवी स्वतःच सांगतो. *ज्ञानमार्तंड* ह्या ग्रंथाचा रचनाकाल शके १५४४ (इ. स. १६२२) असा दिला आहे. कवीने आपल्या ग्रंथसंपदेची व स्वतःविषयीची माहिती *ज्ञानमार्तंड* ग्रंथाच्या अखेरीस दिली आहे.

कवीने *रुक्मिणीस्वयंवर* ह्या आपल्या ग्रंथाचे नाव काव्याच्या प्रत्येक अध्यायाच्या समाप्तिमुद्रेत 'रुक्मिनी स्वयेंवर हरन काव्य' असे नोंदविले आहे. ह्या काव्याचा आधार म्हणून *भागवत* व *पद्मपुराण* ह्या दोन ग्रंथांची नावे कवीने दिली आहेत. तरी मुख्यतः नरेंद्र व संतोषमुनी ह्यांच्या *रुक्मिणीस्वयंवरा*वर ह्या ग्रंथ आधारलेला आहे असे दिसते. नरेंद्रांची भाषाशैली, उपमाने, विचारसाम्य इत्यादी सर्व गोष्टींत लक्षधीरांनी त्यांचे अनुकरण केले आहे. नरेंद्रांच्या काव्यातील किन्नरादी विशेष जसेच्या तसे लक्षधीरांनी टिपले आहेत. तरी जात्याच कवी असल्याने लक्षधीरांनी आपले वैशिष्ट्यही दाखविले आहे. ह्या दृष्टीने प्रस्तुत काव्यातील रुक्मिणीचे वर्णन उल्लेखनीय ठरते. राजकुलाची प्रतिष्ठा, स्त्रीसुलभ लज्जा व रुक्मिणीचे मुसमुसते तारुण्य ह्या गोष्टींचा उल्लेख एकाच ओवीत लक्षधीरांनी समर्पकपणे केला आहे: "तारुण्याचीया कसमसा। भुजा डोले चालती राजसा। अंचळु मुरडूनी सरीसा। घालती माया ॥" प्रस्तुत ग्रंथात कवीची विनोदी वृत्तीही जागोजागी दृग्गोचर होते. अनेक काव्यगुणांनी युक्त अशी ही रचना आहे. कवी श्रीकृष्णाचा भक्त असून त्याने आपल्या बुद्धिमत्तेचे सारे वैभव श्रीकृष्णाची वाक्पूजा बांधण्यात वेचले आहे.

*ज्ञानदर्पण* ग्रंथ ह्यांनी आपल्या पुत्राला अध्यात्मज्ञानाचे स्वरूप समजावून देण्यासाठी रचला. बालत्ववादी आख्यान, तारुण्यवृद्धत्वनिरूपण, नरकव्यवस्था, अभेदवाद, शृंगाररस, भक्तिभेट, ज्ञानवैराग्य व मुक्ती असे अनेक विषय ह्या ग्रंथात आले आहेत.

*महाराष्ट्र-काव्यदीपिका* हा छंदशास्त्रावरील ग्रंथ आहे. ग्रंथाला हे नाव देण्याचे कारण मराठी भाषेचा अभिमान. ह्या ग्रंथात ओवीछंदाचा विचार केलेला आहे. त्यात ओव्यांचे प्रकार व भेद सांगितले आहेत छंदशास्त्रावर आज जे प्राचीन ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांपैकी ओवीचे सूक्ष्मातिसूक्ष्म विवरण करणारा *काव्यदीपिका* हा एकमेव ग्रंथ असल्याचे आढळते. ओवीचे लघुचरणी, मुक्ता, दीर्घा, अतिदीर्घा व ह्या चार भेदांचे उत्तमा, मध्यमा व कनिष्ठा असे प्रत्येकी तीन तीन पोटभेद कवीने वर्णिले आहेत. लक्षात सुद्धा येणार नाही, अशा रीतीने पंथीय तत्त्वज्ञानाचा धागा कवीने ह्या काव्यात मोठ्या कौशल्याने गुंफून टाकला आहे, हे ह्या काव्याचे एक वैशिष्ट्य मानावे लागते. [ ⇨ ३. ]

लक्षधीरांच्या *ज्ञानमार्तंड* ह्या काव्यात संहारप्रकरण, शब्दसिद्धान्त रागनादभेदलक्षण आणि सिद्धान्तनिर्णय हे प्रतिपाद्य विषय आहेत.

ह्याखेरीज *कविलक्षणनिर्णय* हे छोटे प्रकरण ह्या कवीच्या नावावर उपलब्ध आहे. त्यात काव्यरचनेच्या दर्जावरून कवींचे वर्गीकरण केले आहे. देशवळु, आरिवु, उद्धटु, सरळु, बरळु, तस्करु, सामान्यु इत्यादी कवींचे दहा भेद कल्पिले आहेत.

**रचना : मु.** – १. कविलक्षण-निर्णय; ओ. सं. १३; संपा. नेने, ह. ना.; संलेसं., भा. २, नागपूर, १९५७; पृ. ३६–३७; २. महाराष्ट्र-काव्यदीपिका; ओ. सं. ५६; संपा. नेने, ह. ना.; संलेसं., भा. २, नागपूर, १९५७; पृ. १९–३८. **अमु.** – १. गुह्य-प्रकार निर्णय; २. रुक्मिणी-स्वयंवर; प्रसंग १७; ओ. सं. २००९; ३ ज्ञानदर्पण; उल्लास ६; ओ. सं. ७२९; र. श. १५४३ (इ. स. १६२१); ४. ज्ञानमार्तंड; ओवीबद्ध; प्रसंग ३; ओ. सं. ३००; र. श. १५४४ (इ. स. १६२२); ५. श्रीदत्तात्रय मूर्तिवर्णन; ६. श्रीमूर्ति वर्णन; ममग्रंककासू., पृ. २७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, अ. ना. : लक्षधीर; प्रामवाइ., भा. २; पुणे, १९७३; पृ. ३१२–३१५; २. नगरकर, रा. शं. : महानुभाव कवि लक्षधीर विरचित 'रुक्मिणी-स्वयंवर'; ज्ञानेश्वर त्रैमा. (पुनरुज्जीवित); व. १, अं. ४, नोव्हें. १९६९; पृ. १२–२०; ३. नेने, ह. ना. : लक्षधीरकृत महाराष्ट्र काव्यदीपिका: १ व २; संलेसं., भा. २; नागपूर, १९५७; पृ. १९–३८.

**० लक्षधीर पंडित** – पहा लक्षधीर कवी.

**लक्ष्मण-१** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक अखेर] कवी. शिवदीन केसरीचे पुत्र व शिष्य नरहरिनाथ ह्यांचे हे पुत्र. *भक्तमंजरी*कार राजाराम प्रासादी हे ह्यांच्यासंबंधी लिहितात की हे लक्ष्मणबावा लोलिंबराज साधूसारखे अत्यंत विषयी होते. ह्यांची राहणी चैनीची व थाटाची असे. आपल्या आतेच्या उपदेशाने ह्यांनी पूर्वीचे छंदीफंदी वर्तन टाकले व ते ईश्वरभजनाकडे वळले. ह्यांनी काही कविता लिहिली आहे.

**रचना : अमु.** – १. पदपदांतरे; मसा., आ. ५, पृ. ४५३; २. प्रीतिभूषण ग्रंथ; ३. गणेशाष्टक; संककासू., पृ. ९६.

**लक्ष्मण-२** [? – समा. श. १७४१, प्रमाथी, आषाढ वद्य पंचमी, सोमवार / इ. स. १८१९] रामदासी कवी व चरित्रकार. शिरगाव येथील कल्याणबंधू दत्तात्रेय ह्यांच्या मठपरंपरेतील. परंपरा : दत्तात्रय > राघव > यशवंत. यशवंताचे तीन पुत्र भीम, लक्ष्मण व मनोहर. ह्यांपैकी लक्ष्मण हे ग्वाल्हेरकडील परशराम महाराज व बडोद्याचे लक्ष्मणमहाराज ह्यांचे गुरू. समर्थांच्या दोन जुन्या चरित्रांपैकी एक चरित्र लिहिणारे भीमस्वामी शिरगावकर ह्यांचे थोरले बंधू.

लक्ष्मणांनी *श्रीसद्गुरुस्तवराज* हे समर्थांचे ओवीबद्ध चरित्र लिहिले आहे. ह्या चरित्राची त्रुटित पोथी धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिर ह्यांच्या संग्रही आहे (बा. ५५५). उपलब्ध अध्यायात शक, मिती, वार कुठेच दिलेले नाहीत. ह्याखेरीज कल्याण, दत्तात्रय, राघव, यशवंत ह्या सर्वांवर लक्ष्मणांनी रचलेल्या आरत्या सापडतात. घुसळण, चेंडूफळी, दळण, कांडण, फुगडी, अशा नामकरणांची कृष्णलीलेवरील बरीच पदेही ह्यांनी रचली आहेत.

**रचना : अमु.** – १. श्रीसद्गुरुस्तवराज – समर्थचरित्र; अपूर्ण; अ. १–१५ व १९ उपलब्ध, प्रत्येक अ. १२१ ओव्यांचा; २. आरत्या, पदे, भजने; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**लक्ष्मण-३** [अंदाजे श. १६०० / इ. स. १६७८ नंतर] वीरशैव कवी. हे बसवलिंगांचे पुत्र व शिष्य. ह्यांची परंपरा मन्मथस्वामी > लिंगेश्वर > बसवलिंग > लक्ष्मण अशी आहे. वास्तव्य परभणी जिल्ह्यातील अष्टी येथे. ह्यांनी सुमारे साडेचार हजार अभंग रचले अशी समजूत आहे. ह्यांपैकी फक्त ११० अभंगच प्रकाशित झाले आहेत. ह्यांची गुरुभक्ती अपार आहे. वीरशैवांचे उपास्य जो शिव त्यास ह्यांनी आर्ततेने आळविले आहे.

**रचना : मु.** – अभंग ११०; श्रीमन्मथस्वामी – गाथा; सोलापूर, १९६५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं.; मन्मथस्वामींची शिष्य-परंपरा; प्रामनधा., पुणे, १९७२; पृ. १३२–१३३.

**लक्ष्मण-४** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – एक लावणी; अंधारातील लावण्या; संपा. केळकर, य. न.; पुणे, १९५६; पृ. २०९–२१०.

**लक्ष्मण-५** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – पंचीकरण (प्राकृत अभंगात्मक, ले. श. १७५३); गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १४०.

**लक्ष्मण-६** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – सद्गुरुपर आरती; मआ., पृ. ४४२.

**लक्ष्मण चिंतामण धडफळे** [अंदाजे इ. स. १७४० ते १७७३] गद्य लेखक. ह्यांनी पुरंदरे रोजनिशीची मूळ स्मरणे लिहिली. ह्यांची *स्मरणे* पेशवे दप्तरात उपलब्ध आहेत. ह्यावरूनच पुढे *पुरंदरे रोजनिशी* लिहिली गेली. इ. स. १७४० ते ७३ पर्यंतची *स्मरणे* उपलब्ध असून त्यांतील नोंदी इतिहासाशी तंतोतंत जुळणाऱ्या आहेत. स्वयंस्फूर्तीने इतिहासलेखनाचा केलेला प्रयत्न ह्या दृष्टीने ही स्मरणे महत्त्वाची ठरतात (मचको., पृ. ७१६).

**लक्ष्मणनाथ** [का. अनु.] ग्रंथकार. वासुदेवकृत *उपदेशसार* ह्या ग्रंथात परंपरा दिली आहे, ती अशी : नीलकंठ > मारकीनाथ > गोविंद > लक्ष्मण > वासुदेव.

**रचना : मु.** – योगवासिष्ठसार; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ९६.

**लक्ष्मण पांडुरंग केंकरे** [अंदाजे इ. स. १८३५] टीकाग्रंथकार. *अमरकोशावरील महाराष्ट्री टीका* ह्या गद्य ग्रंथाची ह्यांनी रचना केली आहे. त्यात भागीरथी असा ह्यांच्या मातेचा उल्लेख एके ठिकाणी आला आहे.

*अमरकोश* संस्कृतात असल्याने त्याचा उपयोग मराठीभाषिकांस होऊन महाराष्ट्रभाषेच्या ग्रंथसंपत्तीत भर पडावी ह्या सद्धेतूने पंडित केंकरे ह्यांनी ही टीका केली असावी, असे आरंभीच्या मंगलाचरणाच्या श्लोकावरून वाटते. प्रस्तुत ग्रंथाचे उपलब्ध हस्तलिखित संपूर्ण असून, त्याची नकल करणारा लेखक आपले नाव 'लाला गणपति' असे देतो. ग्रंथाची भाषा प्रचलित भाषेहून भिन्न व पुराण सांगणाऱ्याच्या तोंडची वाटते. टीका दंडान्वयरूपे केलेली आहे. ग्रंथकार हा छंदशास्त्र, व्याकरण, वेदान्त व साहित्य ह्यांचा ज्ञाता असावा असे दिसते. ह्या ग्रंथाचे हस्तलिखित, *अमरकोशाची प्राकृत टीका*, हे मराठी संशोधन मंडळाच्या पोथीसंग्रहात उपलब्ध आहे (हवना., पृ. २३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आठले, नारायणशास्त्री; अमरकोशावरील महाराष्ट्री टीका; सह्याद्रि, जून १९३६; पृ. ५६४–५६७.

**लक्ष्मणात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**लक्ष्मी** [का. अनु.] कवयित्री.

**रचना : अमु.** – कामिनीसंग; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ९६.

**लक्ष्मीचंद्र** [अंदाजे श. १६५० / इ. स. १७२८] जैन कवी. हे मान (मानवत) येथे राहात असत. ह्यांचे संस्कृत भाषेचे ज्ञान व ग्रंथवाचन चांगले होते. आपल्या ग्रंथात हे गुरूला नमन करतात, पण गुरूच्या नावाचा मात्र निर्देश करीत नाहीत.

लक्ष्मीचंद्राच्या *मेघमालाव्रतकथा* व *जिनरात्रीव्रतकथा* अशा रचना उपलब्ध आहेत. ह्या दोन्ही रचना श. १६५० च्या सुमारास केल्या आहेत. जैनधर्मातील आचारकांड मोठे कर्मठ असल्याने व्रतकथा-साहित्य पुष्कळ कवींनी निर्माण केलेले दिसते. व्रतकथा असूनही आख्यानक कवितेची रसवत्ता लक्ष्मीचंद्रांनी रचनेत आणलेली आहे.

**रचना : अमु.** – १. जिनरात्रीव्रतकथा; ओ. सं. १५८; २. मेघमालाव्रतकथा; ओ. सं. ६९; जिंतूर हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र : लक्ष्मीचंद्र; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ८६–८७.

**लक्ष्मीधर** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – अद्वैतमकरंद दर्शन; त्रुटित; भाइसमं. हस्त. सू., पृ. ५.

**० लक्ष्मीधरदास** – पहा **रमावल्लभदास.**

**लक्ष्मीपती** [अंदाजे श. १५५० / इ. स. १६२८ – श. १६०८ / इ. स. १६८६] कवी. विजापूरचे प्रसिद्ध संत रुक्मांगद पंडित ह्यांचे हे शिष्य. हे आपल्या एका पदात म्हणतात : "अनंत जन्मांचें सुकृत। आजि वोढुनि आणी मातें ॥ विठोबाचे चरण देखिले । परमानंद जालें येण जाणें गेलें ॥" ह्यावरून ना. ब. जोशी असा अंदाज करतात की, रुक्मांगद पंडित श. १५६८ मध्ये पंढरपुरास गेले होते. त्याच वेळी लक्ष्मीपतींना रुक्मांगदांनी आग्रहाने बरोबर नेले असावे. त्यावेळी ह्यांचे वय १८–२० वर्षांचे असेल असे मानल्यास ह्यांचा काळ अंदाजे श. १५५० ते १६०८ हा ठरतो.

ह्यांनी हिंदीत व मराठीत पदरचना केली आहे. मराठी पदे २३ व हिंदी पदे ५१ असून ती बहुतेक सर्व रागदारीवर आहेत. हिंदी पदांत उर्दू शब्दांचा भरणा विशेष आहे. ह्यांच्या रचनेवर सूरदास, तुळसीदास व रुक्मांगद पंडित ह्यांचा प्रभाव आढळतो. ही रचना अध्यात्मपर आहे. प्रपंचातील विविध तापाने होरपळलेल्या मनाचे आर्तभाव त्यांतून व्यक्त होतात, कृष्णलीलांचा आध्यात्मिक आविष्कारही तेथे आढळतो. गुरुमहिमा गाणारी पदेही त्यात बरीच आहेत.

**रचना : मु.** – पदे; २३; भाइसमंत्रै., व. ५१, अं. १–४; पृ. २४–२८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, ना. ब. : विजापूरचा एक प्राचीन कवि : लक्ष्मीपति; भाइसमंत्रै., व. ५१, अं. १–४; पृ. २०–२८.

**लक्ष्मेंद्रभट देऊळवाडेकर / ० विरहे लक्ष्मेंद्रभट** [इ. स. चे १३ वे शतक, उत्तरार्ध] महानुभाव कवी. देऊळवाडा (ता. एलिचपूर, जि. उमरावती) येथे राहणारे. गोविंदप्रभूंचे समकालीन. ह्यांनी *भगवद्गीते*वर मराठीत ओवीबद्ध टीका केली आहे. ह्या टीकेतून *यक्षदेवी* ह्या गीताटीकेच्या नक्कलकाराने आपली पोथी ज्या ठिकाणी फाटली होती तेथे ती जागा भरून काढण्याकरिता ग्रंथपूरणार्थ काही ओव्या घेतलेल्या उपलब्ध आहेत (मसा., आ. ५, पृ. ८७ तळटीप).

*ज्ञानभास्करस्तोत्र* (श्लो. १२४; मु.) नावाची संस्कृत रचनाही ह्यांच्या नावावर आढळते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, य. खु.; ममवा., पुणे, १९६०; पृ. १४–१५ व पृ. ३३–३४.

**लक्ष्मेंद्रभट राजूरकर** [अंदाजे इ. स. १२७८] महानुभाव कवी. नागदेवाचार्यांचे शिष्य.

**रचना : अमु.** – आचारविचारादी नऊ प्रकरणे (निर्देश : देशपांडे, य. खु.; महानुभावीय कवि आणि ग्रंथकार शिष्यपरंपरा – वंशवृक्ष; ममवा., पुण, १९६०).

**लाडाई** [अंदाजे इ. स. १३५०] कवयित्री. संत नामदेवांची सून. 'पूर्वसंबंधें मज दिधलें बापानें' ह्या अभंगात हिने नामदेवांनी आषाढ वद्य १३ शके १२७२ (इ. स. १३५०) रोजी देवद्वारी समाधी घेतल्याचा उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे : "द्वादशबहात्तरीं कृष्ण-त्रयोदशी। आषाढ हें मासीं देवद्वारीं ॥५॥ सर्वांनीं हा देह अर्पिला विठ्ठलीं। मज कां ठेविलें पापिणीसी वेगळी ॥६॥ लाडाई म्हणे देह अर्पीन विठ्ठला। म्हणोनि आदरिला प्राणायाम ॥७॥" एवढा एकच अभंग लाडाईच्या नावावर सापडतो (श्रीससंगा., खं. १, पृ. ४८०).

**लालदास** [का. अनु.] कथाकार.

**रचना : मु.** – सोळासोमवारकथा; र. श. १६९१ / इ. स. १७६९; संककासू., पृ. १४०.

**० लिंगदास** – पहा **महालिंगदास.**

**० लिंगनाथ** – पहा **लिंगनाथ योगी.**

**लिंगनाथ योगी / ० लिंगनाथ** [अंदाजे इ. स. १७२४] ग्रंथकार. कर्नाटकातील चंदी-चंदावरच्या बाजूचे. नाथसंप्रदायी. गुरुपरंपरा : सोपानदेव > मुकुंदनाथ > अलक्षयोगी > अचिंत्यनाथ > अव्यक्त > जनार्दन > त्र्यंबक > कोनेरीनाथ > लिंगनाथ. आपले 'लिंगनाथ' हे नाव कोनेरीनाथ गुरूंनी ठेवले असे ह्यांनी म्हटले आहे. रा. चिं. ढेरे

ह्यांनी दिलेली गुरुपरंपरा काहीशी वेगळी आहे (गोचप., पृ. १५५). आपल्या ग्रंथात ह्यांनी शरभेंद्रनृपाची जी स्तुती केली आहे त्यावरून हे शरभेंद्र राजाचे आश्रित असावेत असे वाटते.

ह्यांनी *अमृतसार* नावाचा योगशास्त्राचे विवेचन करणारा ग्रंथ रचला आहे. ह्यांनी योगशास्त्राचे केलेले विवेचन पाहता त्यास स्वानुभवाचा आधार आहे असे दिसते. विवेचन सुबोध रीतीने करून परमार्थोपदेश केला आहे. ह्यांची स्फुट रचना 'लिंगनाथ' ह्या नावाने उपलब्ध आहे.

**रचना :** अमु. – १. अमृतसार; अ. १५; ओ. सं. १४००; र. का. : श. १६४५–४६ / इ. स. १७२४–२५; र. स्थ. : कावेरीतीरी चंदावर येथे; ल. रा. पांगारकर संग्रह; २. व्यासागमन पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : लिंगनाथ योगी; मकच., भा. ५; मुंबई, १९२०; पृ. ८१–८६. २. ढेरे, रा. चिं.; गोचप., मुंबई, १९५९; पृ. १५५–१५६.

**० लिंगय्या** – पहा लिंगेश्वर.

**लिंगेश्वर / ० लिंगय्या** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, अखेर] वीरशैव कवी. मन्मथशिवलिंगांचे शिष्य. ह्यांचे ४० अभंग उपलब्ध आहेत. संसाराचा वाढलेला पसारा व कौटुंबिक कलह ह्यांमुळे संसाराचा उबग येऊन सद्गुरूला आपण शरण गेलो असे हे एका अभंगात म्हणतात : "उबगोनी शरण गेलों सद्गुरूसी। तेणें कुटुंबासी निवारिलें ॥ ६ ॥ लिंगेश्वर म्हणे आपणां ऐसें केलें। बसविले निजपदीं अढळ ॥ ७ ॥"

मन्मथस्वामींप्रमाणे लिंगेश्वरांनीही भारुडे रचली आहेत. त्यांत सौवरी, लखोटा, फुगडी, पिंगा, पांगूळ असे विविध विषय दिसतात. सौवरीमधे हिंदी-मराठी अशी मिश्र रचना आहे. ह्यातून सर्वसामान्य जनांना ते परमार्थाची पारंपरिक वाट दाखवतात.

**रचना :** मु. – अभंग; ४०; श्रीमन्मथस्वामीगाथा; सोलापूर, १९६५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, अ. ना. : लिंगेश्वर; प्रामवाइ., खं. २; पुणे, १९७३; पृ. १९३.

**लिंबराजकवि** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अनु. – शृंगारपर श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**लिंबाई** [इ. स. चे १४ वे शतक] कवयित्री. संत नामदेवांची कन्या. हिचा एक अभंग *श्रीनामदेवगाथा* (मुंबई, १९७०) ह्या ग्रंथात समाविष्ट (पृ. ८७६).

**० लींग नागनाथ** – वडवाळसिद्ध नागनाथ.

**लीलाविश्वंभर** [का. अनु.] पदकार.

**रचना :** मु. – फुगडी – अध्यात्मपर पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ६२; अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**लुखनाथ (सोळांखी)** [अंदाजे श. १६२४ / इ. स. १७०२] ग्रंथकार. परंपरा : शहादत्त > सदानंद > लुखनाथ.

**रचना :** अमु. – तापिमाहात्म्य; र. का. : श. १६२४; र. स्थ. : चंपानगर (खानदेश – चोपडे); गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ९६.

**लोकनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना :** मु. – गोपीकृष्णाख्यान; ग्रं. सं. २५; अकलकामा., भा. २, संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६; पृ. ११३–१२१.

**लोलिंबराज** [इ. स. च्या १६ व्या शतकाची अखेर व १७ व्या शतकाचा प्रथमार्ध] कवी व वैद्यकीय ग्रंथाचे कर्ते. जुन्नर (जि. पुणे) येथील रहिवासी. वडिलांचे नाव दिवाकरभट्ट. तरुण वयात लोलिंबराज हे बरेच छंदीफंदी होते. विद्याभ्यासाकडे त्यांचे मुळीच चित्त नसे. पुढे उपरती होऊन शके १५५२ (इ. स. १६३०) मध्ये ते सप्तशृंगीस गेले व तेथे त्यांनी देवीची आराधना आरंभिली. *वैद्यजीवन* ह्या त्यांच्या ग्रंथाच्या एका जुन्या हस्तलिखितात ह्या व त्यानंतरच्या घटनांसंबंधी पुढील हकीकत वर्णिली आहे : "त्याच सालीं आश्विन शुद्ध ८ रोजीं आपले शरिराचें ते हवन करूं लागले तों देवी प्रसन्न होऊन 'वर माग' असें बोलतांच लोलिंबराजांनीं एक बिभत्स वर मागितला. तें देवीनें न ऐकून वर दिला कीं, भगभाग्य भागीरथी प्राप्त होईल; आणि आपले मुखांतील तांबूल त्यांचे मुखांत घातला. तेणेंकरून 'तुझे जिव्हाग्रीं सरस्वती वास करील' असा वर देऊन अंगावरून हात फिरवून दिव्य शरीर केलें. असें झाल्यावर देवी गुप्त झाली. मग लोलिंबराज आपले गांवीं येऊन त्यांनीं कांहीं अलौकिक कृत्यें केलीं. हें वर्तमान पाच्छा यास समजतांच मोठ्या आदरानें त्यास नेऊन प्रश्न केला कीं, माझी स्त्री गरोदर आहे तिजला कन्या किंवा पुत्र होईल ? मग लोलिंबराज बोलला : आपली कन्या आम्हांस द्यावी. तें पाच्छा यानें कबूल केलें. त्यावर लोलिंबराजानें 'पुत्र होईल', असें सांगितलें. तसें पाच्छा यास प्रचीत आल्यावर कन्या लोलिंबराज यांस देऊन तिचें नाव रत्नकला ठेवून (लोलिंबराज) उपभोग करूं लागला."

सिद्धेश्वर संप्रदायाचे प्रवर्तक व *बालबोध*कर्ते त्र्यंबकराज हे लोलिंबराजाचे गुरू असावेत. लोलिंबराजांच्या *हरिविलास* ह्या ग्रंथावरील *सुबोधिनी टीके*चे कर्ते रघुनाथ त्यांच्या गुरूचे त्र्यंबक असे नाव देतात. त्र्यंबकराजांच्या वृद्धापकाळी हे त्यांच्या सेवेत असावेत, कारण प्रौढपणी सप्तशृंगी देवीची हे आराधना करू लागले होते. कदाचित्, त्र्यंबकांच्या संप्रदायाचाही त्यांनी स्वीकार केला असण्याची शक्यता आहे. *वैद्यजीवन* ह्या लोलिंबराजविरचित वैद्यकग्रंथावरून हा दुवा अधिक भक्कम झालेला दिसतो, असे मत प्रा. म. रा. जोशी ह्यांनी 'त्र्यंबकशिष्य लोलिंबराज' ह्या लेखात व्यक्त केले आहे (विसंमंवा., १९७४, पृ. २०४–२०९).

*वैद्यजीवन* ग्रंथाच्या जुन्या हस्तलिखितात वर्णन केलेल्या हकीकतीतील 'पाच्छा' हा जुन्नरचा मुसलमान सुभेदार असून त्याच्याच मुलीशी लोलिंबराजाने लग्न केले असे वाङ्मयेतिहासकार सांगतात. रत्नकलेपासून "लोलिंबराजांस एक पुत्र झाला त्याचें नांव मेघनाद असें होतें. लोलिंबराजांच्या हयातींतच स्त्रीपुत्रांचा त्यांस वियोग झाला व नंतर ते विरक्त बनून पुढें महान साधू म्हणून प्रसिद्ध झाले. लोलिंबराजांच्या पूर्वायुष्यांतील भाग जगन्नाथ पंडितांप्रमाणेंच होता असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं." – प्र. धों. कानिटकर; लोलिंबराजकृत वैद्यजीवन ग्रंथ; मसाप., जाने. १९३१; पृ. १६९–१७०.

लोलिंबराज हे जसे जातिवंत कवी तसेच धन्वंतरी ही पदवी देण्यास योग्य असे होते. (स्वत: त्यांनी आपल्या *वैद्यजीवन* ह्या ग्रंथाच्या समाप्तिलेखात स्वत:संबंधी 'आयुर्वेदवचोविचारसमये धन्वन्तरिः केवलम्।' असे उद्गार काढले आहेत.) त्यांनी वैद्यकविषयावर संस्कृतात *चमत्कारचिंतामणी, वैद्यजीवन, वैद्यविलास, वैद्यावतंस, लोलिंबराजीय* असे पद्यात्मक पाच ग्रंथ लिहिले असून, *भागवता*च्या *दशमस्कंधा*च्या आधारे *हरिविलास* नावाचे एक काव्यही लिहिले आहे. संस्कृतातल्याप्रमाणेच त्यांनी मराठीतही रचना केली आहे. परंतु संस्कृत रचनेच्या तुलनेने ती अल्प आहे. *वैद्यजीवन* व *हरिविलास* ह्या दोन संस्कृत ग्रंथांचा त्यांनी स्वत: मराठी पद्यानुवाद केला आहे. *वैद्यजीवन*चा अनुवाद, लोलिंबराजांच्या *हरिविलास* ह्या संस्कृत काव्यावर टीका लिहिणारे भट्ट श्री रघुनाथ शर्मा ह्यांनीही केला असण्याचा संभव आहे, असे डॉ. प. कृ. गोडे ह्यांनी आपल्या *स्टडीज इन इण्डियन लिटररी हिस्टरी*, व्हॉ. २ मधील 'लोलिंबराज अ‍ॅण्ड हिज वर्क्स' ह्या लेखात (पृ. ८९, तळटीप क्र. १) म्हटले आहे. *वैद्यजीवन* ग्रंथाची रचना अनेकवृत्तात्मक श्लोकबद्ध आहे. ह्या ग्रंथांत आर्यवैद्यक पद्धतीची निरनिराळ्या रोगांवर औषधे सांगितली आहेत. बहुतेक श्लोकांची रचना संवादरूप (लोलिंबराज व रत्नकला ह्यांच्यामधील) आहे. बरेच श्लोक शृंगारात्मक असून काही वेदान्तपर आहेत. काही श्लोकांत

श्लेषालंकार साधले आहेत. *वैद्यजीवन* ग्रंथात शब्दालंकार व अर्थालंकार साधले असून त्यांतील प्रसाद व माधुर्य उच्च दर्जाचे आहे. ह्या वैद्यकशास्त्रावरील ग्रंथ एक छोटेसे काव्यच आहे (मसाप., जाने. १९३१, पृ. १७०).

लोलिंबराजांनी *रत्नकलाचरित्र* ह्या नावाचे ८५ श्लोकांचे एक मराठी काव्य लिहिले आहे. हे द. वा. पोतदार ह्यांस एका जुन्या बाडात पाहावयास मिळाले. त्यांनी त्यासंबंधीचे एक टिप्पण लिहून ते भारत इतिहास संशोधक मंडळाच्या श. १८३७ च्या इतिवृत्तात प्रसिद्ध केले (पृ. २६४–२६६). त्यातील माहितीप्रमाणे प्रस्तुत काव्य 'लोलिंबराज व रत्नकला ह्यांच्या वर्णनपर व हकीकतपर श्लोक : *रत्नकलाचरित्र*' ह्या नावाने मिळाले आहे. आरंभी 'लोलींबराज आख्यान' सुरू झाले असा निर्देश येतो. पहिल्या ११ श्लोकांत रत्नकलेची व्याकुळता वर्णन केली आहे. ह्यानंतर 'लोलींबराज उवाच' म्हणून १३ ते १७ श्लोक म्हणजे उलू लोलिमाचे उद्गार आहेत. २१ पासून पुढे ५८ व्या श्लोकापर्यंत आषुकमाषुकाच्या विरहलीला वर्णिल्या आहेत. श्लोक ५९ मध्ये 'विषय विषय कर्ता सर्व सौंसार गेला ॥ क्षणभरी परी नाहि मुक्तीचा यत्न केला ॥' असा विरक्तीचा उपदेश सुरू होऊन तो श्लोक ७४ अखेर टिकला आहे. येथेंच 'ईति रत्नकळाचरित्र जालें॥ सकळांहि कवीच्या मनांस आलें ॥ अमृताहुनि गोड पढावें ॥ पढवावे पुढिल्यांस प्रेमभावें ॥७५॥' असा शेरा असून लगेच पुढें संस्कृत, हिंदुस्थानी, मराठी असे मिळून श्लोकांची संख्या ८५ एकंदर काव्याची बाडांत गणून 'ईति रत्नकलाचरित्र संपुर्ण ॥' असा शेवट केला आहे. शेवटच्या म्हणजे ८५ व्या श्लोकांत 'त्वरित या न गमे मज येकले॥' अशी विनवणी आहे. 'बाडांतील हे ८५ श्लोक अत्यंत गचाळ व अशुद्ध लिहिलेले आहेत. . . .कित्येक श्लोकांत बाष्कळ चावटी आहे.' असा अभिप्राय त्यांनी ह्या टिपणीत दिला आहे.

लोलिंबराजांनी *भागवताच्या दशमस्कंधावर* टीका रचल्याचा जो उल्लेख *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांनी केला आहे (आ. ५, पृ. २७६) तो *हरिविलास* ह्या ग्रंथाचा असावा.

लोलिंबराजांनी मराठीत बरीच स्फुट कविता (पदे इ.) लिहिली असावी. प्राचीन कवितांच्या संग्रहातून, मधून मधून, त्यांतील काही प्रकटताना आढळते. ही पदरचना चित्ताकर्षक आहे. येथे एक गोष्ट आवर्जून सांगावीशी वाटते ती ही की, मराठी भाषेत वैद्यकासारखा शास्त्रीय विषय रसिकतेने रंगदार काव्यमय भाषेत मांडणारे वैद्यकवी लोलिंबराज हे एकच एक होऊन गेले.

**रचना : मु.** – रत्नकलाचरित्र; श्लो. ८५; भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २६४–२६६. **अमु.** – १. वैद्यजीवन व २. हरिविलास (हे दोन संस्कृत पद्यानुवाद). ३. पदपदांतरे. **संस्कृत ग्रंथ :** १. चमत्कारचिंतामणी; २. लोलिंबराजीय; ३. वैद्यजीवन; ४. वैद्यविलास; ५. वैद्यावतंस.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कानिटकर, प्र. धों. : लोलिंबराजकृत वैद्यजीवन ग्रंथ; मसाप., जाने. १९३१, पृ. १६९–१७०. २. जोशी, म. रा. : त्र्यंबकशिष्य लोलिंबराज; विसंमंवा., १९७४, पृ. २०४–२०९. ३. पोतदार, द. वा. : लोलिंबराज व रत्नकलाचरित्र; भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २६४–२६६.

**० वटेश चांगा** – पहा चांगदेव.

**वडवाळसिद्ध नागनाथ / ० आजीउ लींग नागनाथ / ० गुरुनागनाथ / ० गुरुनागनाथदेव / ० नागनाथ नीरंजन / ० नागा भुजेंग / ० नागेश श्रीगुरु / ० नागेश्वर / ० नीत्यलींग / ० पूर्णघन नागेश / ० लींग नागनाथ / ० वडवाळसोध नागेस्वरु / ० सीधनाथ / ० सीधेदेही नागेश्वर / ० सीधेश ईशनागेश / ० सीवसीधांत**–पहा **परिशिष्ट.**

**० वडवाळसीध नागेस्वरु** – पहा वडवाळसिद्ध नागनाथ.

**वत्सरा** [इ. स. चे १३ वे शतक] संतकवी. हे वाळवंटात अकरा दिवसांचे सापडले. पुढे संतसहवासात वाढले. ह्यांचा 'शरीर विनटलें सेवे तुझे। ध्यानीं रंगले मन माझें।'हा एकच अभंग वि. ल. भावे ह्यांनी *महाराष्ट्रसारस्वतात* छापला आहे (मसा., आ. ५, पृ. १४८)

**वरदराज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – संगीतसंग्रह; ग्रं. सं. ८३; वरदराज व रामानंद इ. कवींच्या पदांचा संग्रह; तालांचा नामनिर्देश; प्रत : श. १७२०; मसंमं., हवना., पृ. ७४.

**वरदरामस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – दत्तपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वरदसुत** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, मध्य] चरित्रकार.

**रचना : अमु.** – गुरुचरित्र; र. श. १६९० (इ. स. १७६८); वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ९७.

**वरदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – गजगौरीव्रत; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ९७.

**वल्लभ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**वल्लभदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – राम बाल्यपद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वल्लभानंदन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ९७.

**० वसमतकर श्रीशुकानंद** – पहा **शुकानंद.**

**वाकु बीडकर रीतपूरकर** [का. अनु.] महानुभावीय कवी. ऋद्धिपूर येथील राहणारे. ह्यांचा 'पदसंग्रह' उपलब्ध आहे. ईशस्तवन, छंद, पदे, लावण्या, कटाव, तुऱ्याचे गायन, छंद, आरत्या, यमपुरी इत्यादींचा समावेश त्यात आहे (ममवा., पुणे, १९६०, पृ. ८४; ममग्रंककासू., पृ. २७).

**० वादींद्र गोपाळदास** – पहा **गोपाळदास–१ (दर्यापूरकर).**

**० वामन–१** – पहा **वामन पंडित–१.**

**० वामन–२** – पहा **वामन पंडित–२.**

**वामन–३** [का. अनु.] कवी. *अनुभवलहरी* ग्रंथाचा कर्ता. **गुरू :** शंकराचार्य. असा निर्देश ह्यांच्या ग्रंथात येतो. ह्यांच्या *अनुभवलहरी* ग्रंथाची त्रुटित प्रत रा. म. आठवले (अंधेरी) ह्यांजकडे आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ओक, दा. के. (संपा.); परिशिष्ट : १; वामन पंडितकृत कवितासंग्रह, भा. २; मुंबई, १९४०; पृ. ५, २९१ २२२.

**वामन–४** [का. अनु.] कवी. *दानव्रतकथे*चा कर्ता. ह्या काव्याची त्रुटित प्रत (सर्ग २, ग्रं. सं. अनु. ४९, ६०) *काव्यसंग्रह*काराजवळ असल्याची त्यांनी नोंद केली आहे. काव्य एकनाथांच्या ग्रंथाधारे केले असे कवी सांगतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ओक, दा. के. (संपा.); परिशिष्ट : १; वामन पंडितकृत कवितासंग्रह, भा. २; मुंबई १९४०; पृ. २५, २९३–२९४.

**वामन गोसावी** [का. अनु.] रामदासी कवी. *हनुमंतस्तव, करुणाष्टक, रामस्तव, रामाचा धावा* अशी वामन पंडितांच्या नावावर मांडली जाणारी स्फुट रचना रामदासी संप्रदायातील वामन गोसावी ह्यांची असावी असे एक मत मांडण्यात आले आहे (मसा., आ. ५, पृ. ८७२).

**वामन देवराय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णपर, गंगामहिमा, गुरूपर, बोधपर, भक्तिपर, रामपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वामननाथ राजूरकर महाभारती** [अंदाजे इ. स. १९ वे शतक पूर्वार्ध] कवी. ग्वाल्हेरचे राहणारे. प्रसिद्ध वैदर्भीय कवी देवनाथ ह्यांच्या ग्वाल्हेरकडील परंपरेतील हे शिष्य. वामननाथांचे *आदिपर्व, पांडवप्रताप*

हे ग्रंथ उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४२). तसेच *पांडुरंगविजय* (अ. ८३, श. १७५३ मध्ये पूर्ण) व *प्राकृतगीता* ही रचना (अमु.) ह्यांच्या नावावर आढळते (भा. रा. भालेराव; अप्रसिद्ध कविमाला; *मुमुक्षु* नवे, व. २, अं. ४).

**वामन पंडित-१ / ० वामन-१ / ० वामनस्वामी** [श. १५२९ / इ. स. १६०७ – श. १६१७ / इ. स. १६९५] पंडित कवी. मराठी कवींत एकाहून अधिक वामन झाले आहेत. वामन पंडितांचे शिष्य किंवा त्यांच्या काव्यरचनेचे अनुकरण करणारे आणखीही काही वामन होऊन गेले. हे वामन पुढीलप्रमाणे : हरी वामन, साम्राज्य वामन, विश्वनाथ वामन, बापू वामन. ह्या वामनांची कविता, नामसादृश्यामुळे व श्लोक-रचनाशैलीच्या साम्यामुळे, आद्य वामन पंडितांची समजून ह्या चार वामनांच्या कवितेचा समावेश त्यांच्या काव्यसंग्रहात केला गेला. त्यामुळे त्या कवितेच्या कर्तृत्वासंबंधी तर्कवितर्क पसरले आहेत. एकीकडे त्यांच्या वेदान्तविषयक प्रकरणांत अध्यात्मप्रधान अशी रचना आढळते, तर दुसरीकडे कृष्णकथाकथनप्रसंगी ती शृंगारप्रधान बनलेली आढळते. काव्यातील ह्या स्वरूपभिन्नतेमुळे 'वामनानामनेकता' ह्या विषयावर साहित्यसमीक्षकांत अनेक वर्षे उलटसुलट चर्चा होत राहिली. 'वामन कवी एक की अनेक ?' ह्या लेखात बाळकृष्ण अनंत भिडे ह्यांनी तर वामन पाच असल्याचे प्रतिपादिले. पहिला *यथार्थदीपिका* लिहि-णारा प्रगाढ भाष्यकार, दुसरा स्वतःला वासिष्ठगोत्री म्हणविणारा, तिसरा शांडिल्यगोत्री नृसिंह लक्ष्मीसुत, चौथा शृंगारप्रिय, व पाचवा यमक्या (*श्री सरस्वती मंदिर*, व. ४, अं. ४, श. १८२८, पृ. १–१२). त्याच्या पुढील वर्षी त्याच नियतकालिकात वि. का. राजवाडे ह्यांनी एक लेख लिहून वामन पंडित 'एकच होते, अनेक नव्हते' हे सिद्ध केले. संतकविचरित्रकार ज. र. आजगांवकर ह्यांनी वामन दोनच आहेत असे ठरविले आहे. वासिष्ठगोत्री *यथार्थदीपिका*कार शृंगारप्रिय वामन शेष म्हणजे प्रसिद्ध वामन पंडित होत आणि शांडिल्यगोत्री लक्ष्मीनृसिंहसुत यमक्या वामन हा दुसरा. कदाचित हा दुसरा वामनच रामदासशिष्य असावा (मकच., १, पृ. १५८–१७५). वामन पंडितांच्या काव्यसंग्रहाच्या तिसऱ्या भागातील (निर्णयसागर; आवृत्ती १ ली) *मानसबोध, हनुमंतस्तव, करुणाष्टक, रामस्तव* व *रामाचा धावा* ही प्रकरणे ह्या रामदासशिष्य वामनाची असावीत आणि तोच शांडिल्यगोत्री रामदासी महंत वामन म्हणजे यमक्या वामन होय. ह्याखेरीज पाराशरगोत्री वामन हा गोत्रावरून वेगळा ठरणारा आहे. हा *श्रुतिकल्पलता*कार वामन असावा (म. अ. करंदीकर: 'महाराष्ट्राचा रसिक विरागी कवि वामन पंडित', लोकमान्य, दिवाळी अंक १९५४, पृ. १०९). भिडे ह्यांनी शृंगारप्रिय वामन कल्पिलेला आहे. वामनांनी *भागवता*चा प्रगाढ अभ्यास केला होता, ह्याविषयीचा उल्लेख राजाराम प्रासादींच्या काव्यात आढळतो. "भागवताचा नित्यनेम। प्रत्यहीं वाचिती धरुनि प्रेम। पठणकाळीं मेघश्याम। प्रकटे राम प्रत्यक्ष तेथें॥ अ. ४१." मोरोपंतांनी *सन्मणिमाले*त केलेला पुढील उल्लेख फारच उपयुक्त आहे. : "श्रीहरिचीं बहु रचिलीं देती जीं हर्ष नित्य नवचरितें। भक्तिज्ञान-रसभरित यत्कवन जयांत एक वच न रितें ॥ ४ ॥" ह्याशिवाय वामनांनी त्यांच्या *निगमसारा*तही *भागवती प्रकरणा*चा उल्लेख केलेला आहे (*निगमसार*, १.५९). तेव्हा शृंगारप्रिय वामन वेगळा करण्याचे कारणच उरत नाही. बा. अ. भिडे ह्यांच्या मते *समश्लोकी भगवद्गीता* वामनाने लिहिलेली नसावी, कारण त्यात प्रत्येक अध्यायाच्या शेवटी, "श्रीपार्थसारथी कर्ता जो वामन मनो-रथी" हा संकेतपाद येतो. बा. अ. भिडे ह्यांचे हे मत टिकू शकत नाही. कारण ह्या प्रकरणाच्या उपसंहारात्मक ओव्यांत *निगमसार* गुरु सच्चिदानंद यती इत्यादी उल्लेख येतात. ह्यावरून हे प्रकरण वामन पंडितांचे होय असे वरील अंतर्गत पुराव्यावरून स्पष्ट होते.

वामन पंडितांच्या चरित्रासंबंधी निर्णयात्मक अशी माहिती अगदी थोडी सापडते. राजाराम प्रासादी ह्यांनी वामन पंडितांचे विस्तृत चरित्र *भक्तमंजरीमाले*त (शके १७५६) लिहिले. ह्याखेरीज वामन पंडितांचा थोडाबहुत चरित्रवृत्तान्त समर्थसांप्रदायिक बखरकारांच्या लेखनांवरून उपलब्ध होतो. हे लेखक तितकेसे विश्वासार्ह नाहीत. त्यांनी दिलेले तपशील तपासून पाहावे लागतात. वामनांचे चरित्र साधार मांडण्याचा प्रयत्न वि. अं. कानोले (चिटणीस, गोदातीर इतिहास संशोधन मंडळ, नांदेड) ह्यांनी नांदेड येथील शेष घराण्यातील कागद-पत्रांच्या साहाय्याने मोठ्या परिश्रमाने इ. स. १९६६ मध्ये केला. तुकाराम-वामन ह्यांची भेट, तुकाराम-रामदास-वामन ह्यांचे एकत्र भोजन किंवा रामदास हे वामनांचे गुरू होत अशा काही अनैतिहासिक घटनांचा जो उल्लेख जुन्या रामदासी बखरकारांनी आपल्या ग्रंथांतून केला आहे तो चुकीचा आहे असे ते सांगतात (वि. अं. कानोले : 'कवि वामन पंडिताविषयी नवी माहिती').

नांदेड येथील शेष घराणे आपल्या विद्वत्तेसंबंधी अनेक शतके प्रसिद्ध होते. ह्या घराण्यात वामन पंडितांचा जन्म विजापूर शहरी झाला असे *भक्तमंजरी*कार राजाराम प्रासादी ह्यांनी नोंदून ठेविले आहे : विजापूरात पुण्यश्लोक। ऋग्वेदी ब्राह्मण परम भाविक। तया उदरीं जन्मले देख। ज्ञानदीपक भक्तराज ते॥ "(अ. ३९:२३). हे पंडित घराणे ऋग्वेदी, शाकलशाखाध्यायी, आश्वलायनसूत्री देशस्थ ब्राह्मण होते. शेष पंडित वासिष्ठगोत्री म्हणजे पाराशर आहेत. हे काशीतील विख्यात शेष घराणे आंध्र प्रदेशातील असावे असा इ. स. १९१२ साली एस. पी. व्ही. रंगनाथस्वामी नावाच्या लेखकाने *इंडियन अँटिकरी* ह्या मासिकाच्या नोव्हेंबरच्या अंकातील 'ऑन द शेष्याज ऑफ बनारस' ह्या लेखात प्रथम उल्लेख केला आहे. त्याकरिता, शेष घराणे मूळ गोदातीरचे होते हा आधार त्यांनी घेतला होता. हे शेष घराणे गोदातीरी असलेल्या नांदेडचे आहे, असा सिद्धान्त वि. अं. कानोले ह्यांनी प्रथम मांडला. शेष घराणे पंडित म्हणून अखिल भारतात विख्यात होते. विष्णु पंडित, कृष्ण पंडित, नृसिंह पंडित, वीरेश्वर, जगन्नाथ असे प्रमुख विद्वान पुरुष ह्या घराण्यात झाले होते. व्याकरण, न्याय, साहित्य आदी शास्त्रांवर ह्या पुरुषांनी ग्रंथरचना केली आहे. काशी क्षेत्रातील पंडितमंडळीकडून ते सन्मानिले गेले होते. शंकराचार्यांच्या पीठाकडून धर्मनिर्णयाच्या संबंधात त्यांनी अधिकार प्राप्त करून घेतले होते. मुसलमानी राजवटीत राहूनही वृत्ती, इनामे इ. चा लाभही त्यांना घडला होता. अशा ह्या संपन्न आणि विद्वान घराण्यात वामन पंडितांचा जन्म झाला.

शेषांचे मूळ पुरुष रामकृष्णपंत. ह्यांस विठ्ठल नावाचा एक मुलगा होता. विठ्ठलपंतांचे दोन पुत्र : एक अनंत व दुसरा मेघनाथ. ह्या अनंताला वामन व तिस्सो ह्या नावाचे दोन मुलगे होते. तिस्सोचा पुत्र शिव-पंडित पुत्रहीन वारला. त्यामुळे त्याचा वारसा वामन अनंताचा पुत्र तानाजी ह्याजकडे आला. हे तानाजीपंत म्हणजे प्रसिद्ध वामन पंडित ह्यांचे वडील. वामन पंडितांचे आजोबा वामन अनंत शेष हे विजापूर येथील अली आदिलशहाच्या शाही ग्रंथालयाचे ग्रंथपाल व बादशहाच्या समवेत राहणारे सन्माननीय दरबारी पंडित होते. त्या निमित्ताने वार्षिक एक हजार होनांची नेमणूक त्यांना करून देण्यात आलेली होती. ते फारसी भाषेत प्रवीण होते. वामन पंडित म्हणजे वामन अनंताचे नातू ह्यांच्या तर्फे शके १५२९ / इ. स. १६०७ च्या कागदपत्रांत अर्ज करण्यात आला आहे त्यावरून ते अल्पवयीन असावेत व त्यांचे वडील त्या वेळेस विद्यमान नसावेत. ह्या कागदपत्रांवरून वामन पंडितांचा जन्म शके १५२९ / इ. स. १६०७ च्या थोडा अगोदर निश्चित केला गेला आहे. ह्यानंतर वयाच्या १८–१९

व्या वर्षी, आदिलशाहीत आपल्यावर कदाचित धर्मांतर करण्याचा प्रसंग ओढवेल अशी धास्ती वाटून ते काशीक्षेत्री, पत्नी गिराबाई हिच्यासमवेत, विद्याभ्यासासाठी गेले. तेथे त्यांचे दीर्घकाल वास्तव्य असावे असे अनुमान करता येते. त्यांनी अनेक पंडितांशी वाद करून त्यांत जयपत्रे मिळविली असावीत. वामन पंडितांच्या तत्त्वज्ञानपर लेखनातील प्रतिपादन, पूर्वपक्ष-उत्तरपक्ष, खंडनमंडन, आक्षेप-परामर्श किंवा संस्कृत ग्रंथांतील आधार देण्याची त्यांची प्रवृत्ती हे सारे लक्षात घेता त्यांनी पंडितसभांमधून वाद केले असावेत असे वाटते.

ह्यानंतरच्या कागदपत्रांनुसार शके १५५३ ते १५८० (इ. स. १६३१–१६५८) ह्या कालात वामन पंडित आपली परंपरागत जायदाद मिळविण्याच्या कामात असल्याचे दिसून येते. त्यांच्या वयाच्या एकतिसाव्या-बत्तिसाव्या वर्षीचा हा काल असावा. येथून इ. स. १६५८ पर्यंत, वयाच्या साठीपर्यंत, ते संसारात रमलेले दिसतात. ह्या काळातील कागदपत्रांत त्यांचा उल्लेख वामन पंडित म्हणून केलेला आढळतो. वामन पंडितांना सहा अपत्ये होती. त्यांनी आपल्या *प्रियसुधा* ह्या काव्यात पत्नीचा – गिराबाईचा – उल्लेख केलेला आहे : "प्रियसुधा उपदेश गिराप्रती, करुनि वामन तीस म्हणे सती। परम आवडि आपलि आपणा, वळख तूं तुज टाकुनिमीपणा॥" (*प्रियसुधा*, १९). ह्या काव्यपंक्तीवरून वामन पंडित अत्यंत मृदू अंतःकरणाचे, स्त्रीदाक्षिण्यपूर्ण व प्रेमळ असे पती होते हे स्पष्ट होते.

वामन पंडितांमधील वैराग्यवृत्ती त्यांच्या वयाच्या साठाव्या वर्षी अती प्रखर होऊन संसारत्याग करण्याचा ते विचार करू लागले. तत्पूर्वी इ. स. १६६३ त आणि इ. स. १६६६ त त्यांनी आपल्या मुलाबाळांत परंपरागत घराच्या संदर्भात वाटणीपत्र केलेच होते. ह्यानंतर त्यांनी संन्यास घेतल्याची (गोषानशीनीची) सनद उपलब्ध आहे.

शके १५८८ / इ. स. १६६६ नंतर आत्मज्ञानसंपादनाची तीव्र तळमळ उत्पन्न होऊन त्यांनी स्वगृह सोडले व योग्य मार्गदर्शक गुरूच्या शोधार्थ दक्षिण भारतात ते भ्रमण करू लागले. ह्या भ्रमणकाळात एके दिवशी ते मलयपर्वतावरील मुक्कामात सत-चित्-पदांचा विचार करीत बसले असता भगवी वस्त्रे धारण केलेले एक यती त्यांच्यापुढे प्रकट झाले. 'दोन मुहूर्तमात्र' त्यांची भेट झाली. यतीच्या रूपाने प्रत्यक्ष परमेश्वरदर्शन झाले, असे वामन पंडितांनी *निगमसार* ह्या आपल्या ग्रंथात लिहिलेले आहे. ह्या यतिवर्यांचे नाव सच्चिदानंदयति असे होते व त्यांनी आपल्या ह्या भेटीत वामनांना भार्गवी विद्येचा उपदेश केला. वामनांनी ह्या प्रसंगाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे : "श्रीसच्चिदानंद गुरु। ब्रह्मविद्येचा कल्पतरु। करुणामृताचा सागरु। वेदान्तवेद्य गोविंद॥ ९॥ जो भेटला मलयाचळीं। मार्गीं पाक करिते काळीं। आधीं स्फुरला हृदयकमळीं। सच्चितपदार्थ विचारितां॥ १०॥ तुज विद्या भार्गवी वारुणी। उपदेशिली हे अंतःकरणीं। दृढ धरूनि गोविंद चरणीं। प्रीति धरणें आत्मत्वें॥ ११॥" (*निगमसार*; अ. १) येथे उल्लेखिलेली ही भार्गवी विद्या *तैत्तिरीय उपनिषदा*तील विद्या आहे. वामन पंडितांचे शिष्य साम्राज्य वामन ह्यांनी *अनुभूतिलेश प्राकृत टीका* ह्या ग्रंथात आपली गुरुपरंपरा सांगताना म्हटले आहे : "नारायण पद्मभव नारद व्यास शुकही। आचार्य जे गौड पद गोविंद भगवत्पद॥ यतींद्र शंकराचार्य पृथ्वीवरहि ते तसे। यति श्रीसच्चिदानंदरूपें परमहंस जे। तत्कृपें वामन स्वामी ज्यांहीं गुह्य प्रकाशिलें॥" रा. म. आठवले ह्यांनी *चित्रमयजगत्*, मार्च १९३२ मध्ये 'वामन पंडितांचे गुरु कोण?' ह्या विषयावर लिहिताना, वामन पंडितांना भार्गवी विद्येचा उपदेश देणारे यती सच्चिदानंद हे शृंगेरी पीठावरील शंकराचार्य होते, असे म्हटले आहे. *आचार्य संप्रदायाच्या इतिहासात* हे यती सच्चिदानंद सहाव्या नृसिंह भारतीनंतर शृंगेरी पीठावर आले होते (*शंकराचार्य व त्यांचा संप्रदाय*; म. रा. बोडस; पृ. ९४). त्यांनी नष्ट संप्रदायाला पुन्हा उजाळा आणला असे वामन पंडित आपल्या *अनभूतिलेश* ह्या ग्रंथात, 'नष्टप्राये संप्रदाये कालेनाल्पेन भूतले॥ सच्चिदानंदनाम्ना श्रीगुरुणायं प्रकाशितः॥ ३४॥' असा उल्लेख करतात. हा गुरूपदेश शके १५९० / इ. स. १६६८ च्या सुमारास झालेला दिसतो. गुरूपदेशानंतर वामनांचे संन्यासदीक्षेतील नाव 'पूर्णानंद' असावे असे, साम्राज्य वामनाने *महावाक्यनिर्णयटीका* ह्या ग्रंथात 'श्रीसद्गुरु पूर्णानंद साम्राज्य वामन प्रसन्न' असे गुरुवंदन केलेले आढळते त्यावरून, म्हणता येते. ही *महावाक्यनिर्णयटीका* नांदेड येथे शेष घराण्यात वि. अं. कानोले ह्यांना उपलब्ध झालेली आहे. ती अप्रकाशित आहे. परंतु स्वतः वामनांनी आपल्या ग्रंथात संन्यासाश्रमातील पूर्णानंद ह्या आपल्या नावाचा कोठेही उल्लेख केलेला नाही, हे लक्षात घेण्यासारखे आहे.

गुरूपदेशानंतर पुन्हा नांदेडला येऊन वयाच्या ७५ व्या वर्षी त्यांनी संन्यास घेतलेला दिसतो, असे दिलावरखानाच्या शके १५९९ / इ. स. १६७७ च्या फर्मानातील उल्लेखावरून म्हणता येते. संन्यास घेण्यापूर्वी केव्हातरी त्यांच्या पत्नीचे निधन झाले असावे व त्यानंतर ते उत्तर आयुष्यात करवीर-कोल्हापूर व वारणातीरावरील शिगाव-कोरेगाव येथे वास्तव्य करू लागले. शिगाव-कोरेगावच्या वास्तव्यासंबंधी निश्चितपणे काही म्हणता येत नाही. मराठवाड्यातून वामनांनी सातारा जिल्ह्यातील एका बाजूच्या खेड्यात का जावे, ह्याचा उलगडा होत नाही. वामन पंडितांनी कोरेगाव येथील नारायणाच्या मंदिरात नारायण व शेषशायी ह्यांच्या समोर *भगवद्गीते*वरील *यथार्थदीपिका* ही सुप्रसिद्ध टीका लिहिली. ह्यानंतर वामन पंडितांचे निर्याण शके १६१७ / इ. स. १६९५ मध्ये कोरेगाव येथे झाले. निर्याणकाली त्यांचे वय ८९ वर्षांचे होते. पंडितांच्या नंतर *यथार्थदीपिके*चे स्मारक म्हणून त्यांचा शिष्य महादेव ऊर्फ विश्वात्मक गोसावी ह्याने शके १६१७ / इ. स. १६९५ मध्ये त्यांच्या पादुकांचे वृंदावन बांधले. शके १६२० / इ. स. १६९८ सालच्या छत्रपती राजारामांच्या सनदेपर्यंत वामनांचे समाधिस्थळ कोरेगाव हे स्पष्ट होते. राजारामांच्या सनदेत कोरेगावला मठ आहे, वृंदावन आहे, तेच त्यांचे उपर्युक्त समाधिस्थळ आहे. ह्या समाधीप्रमाणेच वाई तालुक्यातील गुऱ्हेघर भूगाव ह्या ठिकाणी वामनांची म्हणून एक समाधी दाखविली जाते. ही बहुधा त्यांच्या एखाद्या शिष्याने, कोरेगावची समाधी पाहून, येथे प्रसाद-समाधी बांधली असावी.

वामनांची ग्रंथरचना विपुल व विविध आहे. त्यांनी तत्त्वज्ञानपर, अध्यात्मपर व आख्यानपर अशी तिन्ही प्रकारची कविता रचली. तिची संख्या सुमारे चाळीस हजार भरेल. वामन पंडितांची कविता म्हणून जी *काव्यसंग्रहा*च्या चार भागांत प्रकाशित केली आहे, ती सर्वच वामन पंडितांची म्हणजे वासिष्ठगोत्री, शेषे उपनामक *यथार्थदीपिका*कार वामनांची आहे असे म्हणता येणार नाही. पंडितांचे शिष्य किंवा भक्त ह्यांपैकी कोणा वामननामधारी व्यक्तीची ती असावी.

आद्य वामन पंडितांची कविता कशी ओळखावी ह्याविषयीचे काही निकष सांगता येतात : यमके, अनुप्रास ह्यांचे अस्तित्व, मंगलाचरणाची विशिष्ट पद्धती, भिन्नवृत्तात्मक रचना, वृत्तनामोल्लेख, द्रुतविलंबितात होणारे वृत्तांतर, वस्तुनिर्देश, काव्यप्रबंधाच्या नावाचा उल्लेख, वेदान्तीरूपकावशेष, संधीचा अभाव, व्याकरणाकडे दुर्लक्ष, मूळ ग्रंथातील श्लोकसंख्येचा निर्देश, काव्याच्या अखेरीस उल्लेखिलेला नामांकनाचा श्लोक असे वामनांच्या काव्याचे विशेष सांगता येतात. ह्या निकषांबरोबरच वामनांच्या तत्त्वज्ञानविषयक विचारांचे जे विशेष आहेत व जे त्यांच्या *यथार्थदीपिके*वरून प्राधान्याने निश्चित करता येतात, ते वामनांची रचना कोणती ह्याचा निर्णय करताना अधिक उपयोगी पडतात. त्यांमध्ये अद्वैताचा पुरस्कार, द्वैताचे खंडन, अद्वैताच्या विवेचनात येणारी अन्वयव्यतिरेकाची परिभाषा, निर्गुणापेक्षा सगुणावर दिलेला भर,

ज्ञानाहून भक्तीला दिलेले विशेष महत्त्व, अन्यदेवताभजननिषेधपूर्वक श्रीकृष्णभक्तीचा केलेला आग्रही पुरस्कार, ज्ञानाच्या प्राप्तीनंतर ते चित्तात बिंबविण्यासाठी अभ्यासाचे सांगितलेले महत्त्व, त्या अभ्यासास दिलेले हे नाव, हठयोगावर टीका, कर्मत्यागाचा आग्रह, भागवतावरील अपार निष्ठा, संस्कृत ग्रंथांतील आधार देण्याची पद्धती, स्वतःच्या नावाचा उल्लेख करताना आपल्या हातून हे भगवंतच लिहवीत आहे असे मानणे, अद्वैतपर वर्णन करण्याची लकब वगैरे वामनांच्या काव्याचे काही विशेष सांगता येतील.

ह्या विशेषांवरून त्यांच्या कवितेची निवड करता येते. ओंजळीतून पुढे केलेल्या खऱ्याखोट्या मोत्यांमधून खऱ्या मोत्यांची निवड करण्याइतकेच हे काम कठीण आहे. तरीही वरील कसोट्यांबरोबरच वामनांनी आपल्या काव्यकृतींचा उल्लेख इतरही त्यांच्या म्हणून समजल्या गेलेल्या व निर्विवाद मान्य झालेल्या ग्रंथांत केलेला आहे. त्यावरूनही वामनांची काव्ये निश्चित करता येतात. *यथार्थदीपिका*, *निगमसार*, *कर्मतत्त्व*, *ब्रह्मस्तुति*, *समश्लोकी भगवद्गीता*, *हरिनामसुधा*, *श्रुतिसार* (संस्कृत) *अनुभूतिलेश* (संस्कृत), *उपादान*, *चरमगुरुमंजिरी*, *गीतार्णवसुधा*, *प्रियसुधा*, *अपरोक्षानुभूति*, *विश्वासबंध*, *प्रेमसरी*, *सिद्धान्तविजय*, *सीतास्वयंवर*, *रामजन्म*, *द्वारकाविजय*, *भरतभाव*, *भागवती रामायण* व *भागवती प्रकरणे* ह्या सारा ग्रंथसंभार निःसंशय वामनांचा आहे. *यथार्थदीपिकेत* वेदान्त, भक्ती व अद्वैत ह्यांचे प्रतिपादन करणारे *कर्मतत्त्व* प्रकरण व ब्रह्मदेव श्रीकृष्णास शरण येऊन त्याने केलेली स्तुती म्हणजे *ब्रह्मस्तुति* प्रकरण ह्या दोहोंचा उल्लेख आहे (१६.९६१ व १५.२१८). *हरिनामसुधा* व *श्रुतिसार* ह्यांचा निर्देश *समश्लोकी भगवद्गीतेत* आढळतो (१२, ८४ व ८५) *गीतार्णवसुधेतील* श्लोकांत, *समश्लोकी भगवद्गीतेतील* श्लोक जसेच्या तसे आले आहेत. *कर्मतत्त्व* प्रकरणात चित्सुधेचा संदर्भ आढळतो. *उपादान* हे वेदान्तपर प्रकरण आहे. त्यात सच्चिदानंद गुरूंचा अनुग्रह झाल्यानंतरची रचना असून गुरूंकडून झालेल्या ज्ञानप्राप्तीचे वर्णन आलेले आहे. ह्या वर्णनात *चरमगुरुमंजरीतील* काही महत्त्वाचे श्लोक आहेत. *अनुभूतिलेश* व *सिद्धान्तविजय* ह्या दोन्ही संस्कृत ग्रंथांत वामनांचे नाव आणि त्यांना सच्चिदानंदांनी केलेला गुरूपदेश ह्यांचा संदर्भ सापडतो. *कात्यायनी व्रतात* गोपकन्यकांनी यमुना नदीत स्नान करून कात्यायनी देवीची पूजा केली व 'कृष्ण मला जन्मोजन्मी पती लाभो' अशी प्रार्थना केली आहे. ह्या प्रकरणाच्या इतरत्र येणाऱ्या निर्देशावरून ते वामन पंडितांचे ठरते. वामनांच्या काव्यासंबंधी मोरोपंतांनी *वामनस्तुतीत* स्पष्ट म्हटले आहे : "श्रीहरिचीं बहु रचिलीं देती जीं हर्ष नित्य नवचरितें। भक्तिज्ञानरसभरित यत्कवन जयांत एक वच न रितें ॥४॥" *अनुभूतिलेशात* पंडितांच्या *भागवतपुराणावरील* प्रेमाचे अनेक पुरावे देता येतात. वामन पंडित *अनुभूतिलेशात* म्हणतात : "सत्यत्वं चित्स्वरूपत्वादानंदं तत एव च । ततो द्वयोर्मध्यगतं संस्पृष्टं च पदद्वयम् ॥२१६॥ श्लिष्यत्युभयपार्श्वस्थं यथा गोपीद्वयं हरिः । कृष्णद्वयं वा मध्यस्था गोपीस्त्री रसमंडले ॥२१६॥" ह्या व इतर अनेक उल्लेखांवरून पंडितांचे भागवतावरील प्रेम स्पष्ट होते. ह्यावरून *रासक्रीडा*, *राधाभुजंग*, *राधाविलास*, *गोपीगीत*, *जलक्रीडा* ही भागवतावर आधारलेली प्रकरणे वामन पंडितांचीच होत. ह्या काव्यांत अश्लीलतेकडे झुकणारा असा शृंगारातिरेक आढळतो त्यावरून ती वामनपंडितांची नसावी असे काही अभ्यासकांनी मत व्यक्त केले आहे. परंतु वामन पंडितांची ही आख्यान-कविता वर वामनांच्या काव्याचे म्हणून जे निकष सांगितले आहेत त्यांस उतरणारी असल्याने ती वामन पंडितांचीच होय.

वामन पंडितांनी *नामसुधा* (हरिनामसुधा), *वेणुसुधा*, *वनसुधा*, *चित्सुधा*, *प्रियसुधा*, *गीतार्णवसुधा* अशी एकंदर सहा 'सुधां'ची रचना केली. *गीतार्णवसुधा* हा १०२ श्लोकांचा ग्रंथ आहे. ह्या काव्यातील तत्त्वज्ञानात्मक विचार संपूर्णपणे *यथार्थदीपिकेप्रमाणे* आहेत. *गीतासमश्लोकीतील* काही श्लोक *गीतार्णवसुधेत* आले आहेत; "टीका हा परिहार सारा" अशा ७ व्या श्लोकात गीतेतील १२.२० मधील 'यथोक्तम्' ह्या पदाच्या निमित्ताने जो उल्लेख येतो तो *यथार्थदीपिकेचा* असावा असे मानण्यास जागा आहे; शेवटच्या श्लोकात कवीने स्वतःच्या नावाचा जो उल्लेख केला आहे तो वामनांच्या इतर काव्यांमधील तशा उल्लेखाशी पूर्ण जुळणारा आहे. त्यामुळे *गीतार्णवसुधा* निःसंशय वामनांची वाटते. ह्या दृष्टीने पाहता त्यांच्या पंचसुधांचा *दासविश्रामधामात*, "पुंडलिक वरदें करितां आज्ञा । निर्मिले ग्रंथ पंच 'सुधा' ॥" हा जो उल्लेख आला आहे तो बरोबर नाही. ज्या काव्यरचनेत वडील नृसिंह, गोत्र शांडिल्य, देवरथ किंवा देवराय व वामन इत्यादी संदर्भ येतात ती कविता *यथार्थदीपिकाकार* वामनाची नाही असे शंकातीत मनाने म्हणता येते. रसानुकूल, नादवती, सहजानुप्रासात्मक वर्णरचना ही वामनांच्या *भागवती प्रकरणात* विशेषत्वाने आढळते. शृंगारातही भक्तीचे मिश्रण करून भागवती काव्य लिहिणारे व 'सुश्लोक वामनाचा' म्हणून कीर्ती असलेले वामन व *यथार्थदीपिकाकार* वामन हे एकच होत. आध्यात्मिक दृष्टिकोन व भाषा ह्या बाबतींत भागवती आख्याने, *यथार्थदीपिका* व इतर वेदान्तपर रचना ह्यांत सारखेपणा आढळतो. ह्या कारणामुळे शृंगारात्मक कृष्णाख्याने रचणारा वामन वेगळा करता येत नाही. *राधाविलास*, *भामाविलास*, *हरिविलास*, *रुक्मिणीविलास* आणि *मुकुंदविलास* हे ग्रंथ ह्या वामनांचे होत. *मुकुंदविलासात वनसुधेसारखे* श्लोकही आढळतात.

वामन पंडित स्वतः कृष्णभक्त होते. त्यांनी श्रीकृष्णाच्या कथा गाण्यात धन्यता मानली. लोकांमध्ये परमेश्वरभक्ती निर्माण होण्यासाठी त्यांचे तात्त्विक व गहन स्वरूपाचे वर्णन करून भागणार नाही. संसारी माणसाला त्याच्या अद्भुत लीला आकर्षित करू शकतात, त्या भक्ती निर्माण करू शकतात, म्हणून वामनांनी राम व कृष्ण ह्या अवतारांच्या लीलांचे संकीर्तन केले. विशेषतः श्रीकृष्णाच्या अलौकिक लीला *श्रीमद्भागवतात* वर्णिल्या आहेत. त्याच्या आधारे वामनांनी निवडक कथा घेऊन त्यांवर प्राकृत रचना केली. ही त्यांची स्फुट काव्ये परमेश्वराच्या अगाध लीलांचे वर्णन करतात. त्यांत वत्सल, शृंगार, वीर, करुण, अद्भुत ह्या रसांची निर्मिती करून परमेश्वराच्या अगाध सामर्थ्याचा त्यांनी प्रत्यय आणून दिला व श्रीकृष्णकथेची आवड निर्माण केली. परिणामतः लोकांत भक्ती उत्पन्न करणे व त्याबरोबर हरीचे गुणसंकीर्तन करणे हे दोन्ही हेतू साध्य झाले. *रासक्रीडेत* वामन लिहितात : "जो नेणे विषयांविणें रुचि तया आम्हा तुम्हा कारणें । केला गोपवधू-विलासरस हा विख्यात नारायणें ॥ त्याही ऊपरि काव्यनाटकमिषें शृंगार जो पाहणें । त्या या कृष्णकथामृतीं न रमणें धिक् धिक् तयाचें जिणें ॥" (*रासमंडळ*, २४) असे ह्या कृष्णकथा गाण्याचे आध्यात्मिक स्पष्टीकरण वामनांनी केले आहे. लौकिक सुराच्या जोडीने त्यात अध्यात्माचा सूरही छेडलेला आहे. अशी भागवती प्रकरणे पन्नासापेक्षा अधिक भरतील. ही आख्यान-कविता म्हणजे वामनांची मराठी भाषेला लाभलेली एक अमोल देणगी आहे. ही आख्यान-काव्ये का रचली ? ती रचण्यात हेतू कोणता ? ह्याचे उत्तर त्यांनी *भागवतपुराणाच्या* आधारे रचलेल्या *नृहरिदर्पण* ह्या काव्यातील पुढील उक्तीत मिळते : "कथिन दिव्य चरित्र कथा रती । तरति यांतचि जे जन भारती ॥" (श्लो. २) — "भगवंताच्या दिव्य चरित्रकथेची आवड उत्पन्न होऊन त्यात जे स्थिरावतात, रमतात, ते भवसागर तरून जातात; अशा चरित्रकथा मी वर्णन करीन." ह्यात वामनांचा काव्यहेतू स्पष्ट झालेला आहे. कारण हरिवर्णनाशिवाय काव्य अळणी होय असे ते, काहीशा धिक्काराने, ह्याच आख्यानात पुढे म्हणतात : 'वितां व्यर्थ काव्यें अलवण हरीवीण कविता' (श्लो.

३७). ह्या *नृसिंहाख्याना*तील त्यांच्या उक्ती लक्षात घेऊन भागवती प्रकरणांचा विचार व्हावयास पाहिजे. *राधाभुजंग*, *रासक्रीडा* ही काव्ये राधा व श्रीकृष्ण ह्यांच्या विलासाची जी वर्णने करतात, त्यांत तरी हा शृंगार अश्लीलतेच्या पातळीवर पोचला आहे, असे म्हणावे लागेल. आणि हे जर मान्य केले तर डॉ. श्री. व्यं. केतकरांच्या मते वामनांच्या मान्यतेला अशा अश्लील वर्णनांमुळे ढळ पोचला आहे असे म्हणणे अधिक बरोबर ठरेल. डॉ. श्री. व्यं. केतकर ह्या काव्यासंबंधी लिहितात : "वामनाचे *राधाविलास*, *राधाभुजंग* ह्या काव्यांपेक्षां होनाजी बाळाजीच्या लावण्या खास अश्लील नाहींत. उलट अनेक लावण्यांत उत्तम प्रकारचें काव्य सांपडतें. त्यांत जितके प्रेमीजनांच्या अंतःकरणांतील उमाळे व्यक्त केले आहेत तितके वामनांच्या *राधाविलास* किंवा *राधाभुजंगां*त नाहींत. त्यांत नुसतें संभोगशृंगाराचें वर्णन आहे. लावण्यांविषयीं तुच्छता दाखवावयाची आणि वामन पंडितादि कवींच्या श्लोकबद्ध शृंगारिक कवितेला प्रतिष्ठित वाङ्मय मानावयाचें हा समाजांतील सांपत्तिक दृष्ट्या व शैक्षणिक दृष्ट्या कनिष्ठ वर्गाच्या व गरीब जातींच्या तुच्छतेचा प्रकार आहे, दुसरें कांही नाही." (*महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण*, आ. १ ली, पृ. ११४). डॉ. केतकरांनी ही संभोगशृगाराची वर्णने आहेत असे जे म्हटले आहे ते खरे आहे. वामनांच्या काळाचा विचार लक्षात घेता त्या काळच्या कोणत्याही साहित्यशास्त्राचा अशी वर्णने करण्यास विरोध नव्हता. शिवाय *भागवतात* व पुराणांत वामनांना जे आढळले त्याचीच चित्रे त्यांनी ह्या काव्यांत मराठीत रेखाटली. वामनांनी आपल्या भागवती ग्रंथावर आपला अभिप्राय व्यक्त केला तोही ह्या संदर्भात विचार करण्यासारखा आहे. "म्हणोनि जे भागवतीं शुकानें। लीला तुझी वर्णिली कौतुकानें॥ टीका तिची मी क्षितीं लोकवाणी। करीन जेथें न सुखास वाणी॥" (*भागवती रामायण*, श्लो. ५).

वामनांची *रासक्रीडा*, *राधाविलास* व राधाभुजंग ही आख्याने त्यांतील शृंगाररसाच्या उत्कर्षामुळे लक्षणीय असली तरी त्यांतील उत्तानशृंगारिक व कामुक वर्णने अभ्यासकांनी काव्यदोषांत गणली आहेत. "नेले राजसराग ते अधरिचे श्रीवल्लभें चुंबनें। दृष्टींतील निरंजनें हृरपलीं जीं तामसें अंजनें॥ जें कां चंदनसत्व ही हृरि हृरी त्यांचें निजालिंगनें॥ केल्या निर्गुण त्या रतान्तसमयीं गोपी जगज्जीवनें॥" (*रासक्रीडा*, श्लो. १७४) किंवा "त्यानंतरें खचितरत्नपलंगशेजे, नानाविधी रतिविलास करीतसे जे। तेव्हां तिचें अधरचुंबन घे हृरी तो, मर्दी कुचांस, वसना स्वकरें हृरी तो॥ कामालया युवति झांकितसे करानें, तो काढिला कर करें कमळाकरानें। त्यानंतरें सुरतकार्य करी हृरी तो, राधेचिया सकळ वृत्ति अशा हृरी तो॥" (*राधाविलास*, श्लो. ३८–३९) ही अशा कामुक शृंगाराची काही वर्णने होत.

वामनांची *नामसुधा*, *वेणुसुधा* व *वनसुधा* ही तीन 'सुधा'-काव्ये लोकप्रिय झाली. ह्यांतील पहिल्या *नामसुधा* ह्या काव्याचे मूळ नाव *हरिनामसुधा* असे आहे. वामनांनी स्वतःच तसे म्हटले आहे : "हा ग्रंथ याचिकरितां अमृताभिधानी नामें प्रसिद्ध हरिनामसुधा म्हणोनि" (१.१.८). परंतु संक्षेपाने ह्या प्रकरणाला *नामसुधा* असेही म्हटले आहे. ह्यातील विषय नाममाहात्म्य आहे. भगवंताचे नामस्मरण पापमहावन जाळून टाकणारे आहे. ते उद्धार करणारे आहे. हा सिद्धान्त त्यांनी *सिद्धान्तविजय* ह्या संस्कृत ग्रंथातही सांगितलेला आहे : "सुताह्वाने श्रुत्वा सकृदपि च यन्नामनिनदं, यदीयाः संछिन्नाः सुदृढयमपाशा अथ ततः॥ (३३)" ह्या *नामसुधे*चे तीन अध्याय असून, प्रत्येक अध्यायात 'चरण' म्हणजे विभाग आहेत. एकूण श्लोकसंख्या ५३५ आहे. *श्रीमद्भागवत*, स्कंध ६, अ. १–३ ह्यांच्या आधारे हा ग्रंथ रचलेला आहे. ह्या ग्रंथातील प्रतिपाद्य विषय थोडक्यात असा : "श्रुतिस्मृतिपुराणादी सकल शास्त्रांचे मंथन करून व्यासांनी सार काढले ते सुधेप्रमाणे गोड असे हरिनाम होय. ज्ञानहीन नामोच्चाराने पापक्षालन होते पण चित्तशुद्धी होत नाही. ज्ञानयुक्त नामोच्चार पापबीजे भस्मसात करतो." हे नामाचे माहात्म्य विशद करण्यासाठी वामनांनी अजामिळाची कथा सांगितली आहे. महापातकी अजामिळाला त्याने ठेवलेल्या वृषालीपासून दहा मुले झाली. हा अजामिळ कनोजयपुरचा कनोजिया ब्राह्मण. त्याच्या सर्वांत धाकट्या मुलाचे नाव नारायण. तो पुत्र अजामिळाचा अत्यंत लाडका. वामनांनी ह्या नारायणावरील अजामिळाचे प्रेम वर्णन करताना म्हटले आहे : नारायणाची 'परिसतां वचनें मृदुबोबडीं, सुखमृगांबुमध्यें मन दे बुडी।' त्याच्या तोंडी 'नारायण', 'नारायण' असे नाव येत राहिले. प्रत्यक्ष अंत्यकाली स्थूल देहातून लिंगदेह निघण्याच्या वेळी अजामिळाचे मुखी नारायण हे विष्णुनाम आल्याने "नामाग्निनें अघकुळें जळतां अशेषें। संतोषला हरि तयावरि नामघोषें" आणि तो मोक्षाप्रत गेला असे कथानक आहे. ह्या आख्यानकाव्यात यमदूत व विष्णुदूत ह्यांचा संवाद, यमदूतांचे कर्तव्य, अजामिळ पश्चात्तप्त होऊन त्याने गंगातीरी देह ठेवणे व विष्णुरूप होणे, साक्षात्कार, ज्ञानयुक्त सगुणभक्तीचे माहात्म्य इत्यादी सांगून वामनांनी ह्या ग्रंथाची समाप्ती केली आहे.

ह्या काव्यातील अजामिळ, यमदूत, विष्णुदूत ह्यांची वर्णने चित्रदर्शी आहेत. विष्णुदूतांचे हे वर्णन पौराणिक असले तरी त्यांच्या रूपाची अभिव्यक्ती ठसठशीतपणे केली आहे : "अम्लाना कमळांचिया अळिकुळीं माळा गळां घालितां। चौघांहीं भुज चारि, पीन सरळे श्रीचंदनें चर्चिले। चौघे रत्नहिरण्यभूषणवरीं सर्वत्रही अर्चिले॥ शस्त्रास्त्रें धरितां समान, तरुणे, चौघे तुम्ही, सांवळे। डोळे भाळ विशाल पुष्ट बरवे रूपें बळें आगळें॥" (*नामसुधा*, १.४.२–३).

ह्या ग्रंथाच्या शेवटल्या श्लोकावरून हे प्रकरण पंडितांनी कोल्हापूर येथे लक्ष्मीच्या मंदिरात लिहिले असे अनुमान केले जाते : "सर्मपिला श्रीहरिपादपद्मीं पद्मालयेच्या अतिदिव्य सद्मीं."

*वनसुधा* व *वेणुसुधा* ही काव्ये वामनांनी *नामसुधे*नंतर लिहिली आहेत. *वनसुधा* ह्या काव्याची रचना *भागवत दशमस्कंधा*तील ११ ते १३ ह्या अध्यायांच्या आधारे केलेली आहे. ह्या काव्याचा विषय अघासुरवध हा आहे. श्रीकृष्णाच्या बालगोपालांना अघासुराने कसे घशात घातले व त्यांची मुक्तता श्रीकृष्णाने कशी केली ह्याचे वर्णन ह्या आख्यानात आहे. ह्यात वामनांनी रेखाटलेले बालगोपालांचे शब्दचित्र "वनीं खेळती बाळ हे बल्लवांचे, तुरे खोवती मस्तकीं पल्लवांचे" असे मनोवेधक आहे. गोपाळांच्या विविध चेष्टांचे वर्णन, वनात जाऊन श्रीकृष्णासह त्यांनी केलेल्या नाना प्रकारच्या क्रीडा, बगळा, मोर, हंस इत्यादी पक्ष्यांच्या चालीचे त्यांनी केलेले अनुकरण ह्याचे वामनांनी जे वर्णन केले आहे त्यात वत्सलरस व स्वभावोक्ती ही उत्तम खुलतात. श्रीकृष्णाचे चित्र त्या पुरुषोत्तमाला शोभेल असेच आहे. ही श्यामसुंदर कृष्णमूर्ती पाहावयास आकाशात देवांची, ऋषिमुनींची दाटी झाली होती. हे कृष्णमूर्तीचे अनुप्रासयुक्त वर्णन अर्थाची हानी होऊ न देता वामनांनी रसिकांच्या डोळ्यांसमोर उभे केले आहे. पंडितांचा हा श्लोक सुप्रसिद्धच आहे. "वंशी नादनटी, तिला कटितटीं खोवूनि पोटीं पटीं, कक्षे वामपुटीं स्वशृंगनिकटीं वेताटिही गोमटी। जेवीं नीरतटीं तरूतळवटीं, श्रीश्यामदेहीं उटी, दाटी व्योमघटीं सुरा, सुख लुटी घेती जटी धूर्जटी॥" (४.२९). अघासुराचा नाश, गोपाळांवरील प्रेम, वनभोजनाचा शेवटचा प्रसंग ही सर्व बहारीने वर्णिलेली आहेत. दुर्जनांना गती आहे ह्या *भागवता*तील सिद्धान्ताचे विवरण 'अघासुर व पूतना ह्यांना प्राप्त झालेल्या मोक्षाचे वर्णन' ह्या प्रकरणात केलेले आहे.

*वेणुसुधा* हे काव्य *भागवता*तील *दशमस्कंधा*च्या २१ व्या अध्याया-

च्या आधारे रचलेले आहे. ह्या प्रकरणाचा आरंभ मधुर वेणुरवाने होतो. (श्रीकृष्ण मधुवनात वेणु वाजवीत आहे त्यातून) अमृतासारखा गोड ध्वनी ऐकून चराचर विश्व मोहित झाले आहे. वेणुध्वनी श्रवणी पडताच गोपी हातातील कामे विसरून वनात धावत आल्या आहेत. त्यांची अवस्था विकल झाली. "ऐसिये हरिचिये मुरलीनें, कामतत्पर मनें स्मरलीनें । मोहिलीं सहवधू त्रिदशांचीं, आमुचीं न नवलें सुदृशांचीं।। (१.५)." अशी गोपांगनांची व वधूसह देवांची मने मोहित झाली. तेथे आमची मने मोहिली यात आश्चर्य ते कोणते ? "मोहती व्रजपशू मृगगाई, आमुचें नवल काय अगाई। स्तब्ध होति लिखितें जसि चित्रें, वेणुच्या ध्वनिरसेंचि विचित्रें ॥" (१.१५) हा तर स्तब्ध चित्रणाचा अप्रतिम नमुना आहे. मधुवनातील लतावृक्षांची मुरलीरवाने झालेली अवस्था त्यांच्यावर चेतनारोप करून वर्णिली आहे त्यामुळे मधुवनातील वातावरण कसे धुंद झाले होते हे सूचित केले आहे. श्रीकृष्णाने रासक्रीडेस आरंभ करण्यापूर्वी व्रजगोपिकांची मने कशी विकल झाली होती, तद्रूप्रमाणे त्या कशा स्तब्ध झाल्या होत्या व त्य लोकरीती कशा विसरल्या हे सुचविले आहे. त्यांची ही अवस्था पहा "शिरीं मोकळे केश, वस्त्रें गळालीं, मनें मोहिलीं येरिती वेगळालीं." (३.१३). ह्यापूर्वीच्या प्रसंगात श्रीकृष्ण मुरली वाजवीत असता मध्यान्हकाळ झाल्याने मेघाने त्याच्यावर छत्र धरले. हळूहळू तो गर्जू लागला. ह्यापुढे नवविधा भक्ती मेघाने कशी साधली हे दर्शविले आहे. गोपिकांचे वर्णिलेले हे प्रेम भक्तिस्वरूप आहे. ह्याशिवाय अन्य लोकवार्ता वृथा होत, असे वामनांनी आवर्जून म्हटले आहे : "करी धन्य गोपाळजी वामनातें, कथाछंद लावूनि त्याच्या मनातें। महाभाग्य हें अन्यथा काव्यरीती, वृथा ज्या कवी लोकवार्ता करीती।। (३.४४)" ह्या काव्यात संतसाहित्यातील प्रसाद व पंडिती कवितेतील पांडित्य ह्या दोहोंचा अपूर्व मिलाफ झालेला आहे.

वामनांचे *प्रियसुधा* हे श्लोकबद्ध प्रकरण सुप्रसिद्ध आहे. ह्या प्रकरणात, "प्रियसुधा उपदेश गिराप्रती, करुनि वामन तीस म्हणे 'सती !। परम आवडि आपुलि आपणा, वळख तूं तुज टाकुनि मीपणा'।। १८।।" असे वामनांनी आपली पत्नी गिराबाई हिला उद्देशून म्हटले आहे. गुरूपदेशानंतरची ही वामनांची रचना आहे; ह्यात त्यांनी पत्नीला जो उपदेश केला तो ह्या प्रकरणाचा प्रतिपाद्य विषय आहे.

*द्वारकाविजय* हे काव्य वामनांनी *भागवताच्या दशम स्कंधाच्या* आधारे रचले आहे. ह्या काव्यात श्रीकृष्णाच्या द्वारकेतील वैभवाचे वर्णन आले आहे. हे वर्णन त्यांनी पाच सर्गांत केले आहे. ह्यातील पहिला सर्ग विवाह-विजय. ह्यात श्रीकृष्णाने सोळा सहस्र स्त्रियांचे पाणिग्रहण एकाच वेळी कसे केले ह्याचे वर्णन आहे. दुसरा सर्ग हरिमंदिरविजय. ह्यात द्वारकेचे वर्णन आहे. तिसरा नारदातिथ्य-विजय. ह्यात नारदाचे आतिथ्य व कृष्ण बालकांशी करीत असलेल्या कंदुकक्रीडेचे रूपकात्मक स्पष्टीकरण आहे. चौथा सर्ग लीलाविनोद-विजय व युक्तिप्रद-विजय पाचवा. ह्यांत कृष्णाचे लोकरीतीने वागणे व नारदास उपदेश हे विषय अनुक्रमे आले आहेत. ह्या काव्यातील रचना "कोणी त्या शयनीं विचित्र सुमनीं कृष्णप्रिया कामिनी" अशी माधुर्यगुणयुक्त आहे. ह्या *द्वारकाविजयाच्या* निमित्ताने वामन पंडितांनी श्रीकृष्णाचा गौरव केला असून त्यात रूपकात्मकता बरीच दिसून येते.

ह्या काव्यात लौकिक जीवनात रमलेला श्रीकृष्ण आपल्या मुलाशी बोबड्या शब्दांत बोलतो, मुलाची समजूत व्हावी म्हणून त्याला ऊस, साखर, खोबरे आणून देईन म्हणतो, त्याला गरुडावर बसवून उंच नेईन व तेथून पतंग उडवू असे सांगतो आणि वात्सल्याने विचारतो, "तुझ्या आईपेक्षां मी तुला खरंच जास्त आवडतो ना ?" कृष्णपत्नी शेजारीच उभी आहे. तिला हा प्रश्न ऐकून धन्यता वाटते. ह्यातील वात्सल्य आणि किंचित शृंगार ह्या रसांची मांडणी अध्यात्माच्या पार्श्वभूमीवर उठून दिसते. ह्यातील भावना सांसारिकांच्या नित्य परिचयाच्या आहेत. वामन पंडितांच्या मते साऱ्या चराचराच्या रूपाने एक भगवान नटला आहे व हे विश्व म्हणजे त्याचा योग आहे. हा योग वामन पंडितांच्या दृष्टीने गीतेतील ऐश्वर्ययोगाशी समान आहे.

वामन पंडितांनी *रामायण, महाभारत* आणि *श्रीमद्भागवत* ह्या ग्रंथत्रयीचे सखोल अध्ययन केले होते. ह्या ग्रंथांच्या आधारे त्यांनी त्यांतील निवडक व चित्तवेधक प्रसंग घेऊन त्यांवर आख्याने रचली. *रामायणाच्या* आधारे रचलेल्या आख्यान-कविता पुढीलप्रमाणे *अहल्योद्धार, जटायुस्तुति, भरतभाव, रामजन्म, रामस्तव, सीतास्वयंवर* आणि *लोपामुद्रासंवाद*. वामन पंडितांच्या शृंगारप्रिय लेखणीला रामकथेत फारसा वाव नव्हता. त्यामुळे कृष्णकथेवरील भागवती आख्यानाइतक्या त्या चित्तवेधक झाल्या नाहीत. तरीही रामकथेतील ह्या आख्यानांत वामन पंडितांच्या काव्यगुणांचे दर्शन होते. *लोपामुद्रासंवादातील* सीतेचे वनवासातील श्रीरामसहवाससुखाचे रम्य वर्णन पहा. मार्ग आक्रमण करीत असता मागोमाग येणाऱ्या सीतेकडे श्रीराम परम अनुरागाने पाहात आहे, ह्याचे सुंदर व स्वाभाविक शब्दचित्र त्यात आहे. 'पथीं मागें मागें परमअनुरागें रघुपती। उभा राहे, पाहे; गुणहि मुनि हे हेचि जपती ॥ कृपापांगें अंगें निववि करि संसार दिवसा । धरा माता, भ्राता, शशिच सविता होय दिवसा ॥' (श्लो. १३). *भरतभाव* ह्या काव्यात भरताच्या रामविषयक अप्रतिम बंधुप्रेमाचे वर्णन गोड भाषेत केलेले आहे. ते अत्यंत सरस असून त्यात करुणरस भरून राहिलेला आहे. ते वाचीत असता सहृदय रसिकाचे अंतःकरण हेलावून गेल्याशिवाय राहात नाही. ह्या रामायणी आख्यानात वामन पंडितांच्या यमकयोजनेतील चातुर्य दिसून येते.

*निगमसार* हा वामन पंडितांचा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ आहे. ह्या ग्रंथाची रचना शके १५९५ किंवा इ. स. १६७३ मध्ये झाली. ह्या ग्रंथातच त्याचा रचनाकाल दिलेला आहे. 'शके पंधरा शतें पंचाणव। तो ग्रंथ प्रकटला अभिनव। जो अनादि अनुभव। सकळ संतांचा ।।९.१६३।।' वामन पंडितांच्या रचनेत सापडणारा हा कालोल्लेख आहे. ह्यावरून सारी आख्यानपर व काही स्फुट रचना त्यांनी ह्याच्या आधी केली असावी व *निगमसाराचा* काल वामनांच्या तात्त्विक रचनेचा काल असावा असे अनुमान करता येते. ह्या ग्रंथात वामन पंडितांना मलयाचलावर जो गुरूपदेश मिळाला व त्यांच्या गुरूने जे भार्गवी वारुणी विद्येचे विवेचन केले ते प्रारंभी अत्यंत हृदयंगम भाषेत वर्णन केले आहे. ह्या ग्रंथाचे अध्याय ९ आहेत. उपनिषदांच्या तात्पर्यानुसार ह्या ग्रंथाची रचना आहे. ह्या ग्रंथाच्या नावावरून त्यातील विषयाची कल्पना येते : 'सकळ निगमाचें सार। ब्रह्म अद्वैत निर्धार।। १.५।।' ह्या ग्रंथात भार्गवी विद्येचे महत्त्व वर्णिले आहे. ही विद्या 'पूर्वी भृगूसी वरुणें। कृपा केली सकरुणें. . . .याकरितां श्रुती । हे भार्गवीवारुणीविद्या म्हणती । ते आम्ही तुजप्रती । उपदेशिली ।। १.४९ ।। ग्रंथावें नाम 'निगमसार'। वेदांमाजी तोचि विस्तार। संक्षेपेंकरोनि तो प्रकार। बोलिजेल ।।१.६७।।' पहिल्या अध्यायात मंगलाचरण, दुसरा अध्याय कारणाध्याय, तिसरा तत्त्वसंख्याध्याय, चवथा पुरुषाध्याय, पाचवा विवेकाध्याय, सहावा उपदेशाध्याय, सातवा साधनासार सांगणारा अध्याय, आठवा आनंदमय कोश वर्णन करणारा व नववा आत्मवैभव विवरणारा अध्याय असून, एकूण ग्रंथाची ओवीसंख्या ११६८ आहे. ह्या ग्रंथाची मांडणी 'शब्द थोडे अर्थ फार' अशी आहे. ह्या ग्रंथाच्या श्रवणाने भवसागर मृगजळप्राय होतो ("ज्याच्या श्रवणें भवसागर। मृगजळप्राय"), अशी फलश्रुती वामनांनी सांगितली आहे. "आकृतीनें वामन। आणि आक्रमिलें त्रिभुवन । त्याचेंच हें संक्षेपवचन । अर्थ गंभीर ।। १.७० ।। "असे

आत्मविश्वासाने आपल्या ह्या ग्रंथासंबंधी वामन पंडित म्हणतात. पुरुष-प्रकृती, ब्रह्म-माया, जग-जगदात्मा हे विषय ह्या ग्रंथात विवेचिले आहेत. ही काव्यकृती रेखीव व नीटस आहे. त्यांनी ह्या ग्रंथात 'नेह नानास्ति किंचन ।', 'आदेश आत्मा ।' ह्यांसारख्या श्रुतिवचनांचा आधार घेऊन पांडित्यपूर्ण शैलीत विवेचन केले आहे. प्रतिपक्षाचे खंडन करण्याची, विशेषतः ज्ञानदेवांच्या दृष्टान्तांतील तार्किक दृष्ट्या त्यांना जो उणेपणा दिसला त्यावर टीका करण्याची, त्यांना फार हौस. परंतु अशी स्थळे एकंदरीत फारच कमी. आरंभी काही उदाहरणे देऊन ज्ञानदेवांच्या विवेचनपद्धतीवरील पुढील बोधक शब्दप्रहार पहा : " ..ऐसी कल्पना करावी । त्याणें अद्वैतवार्ता टाकावी । अद्वैत तेव्हां न म्हणावी । माया स्वतंत्र ॥ जयास शास्त्र ना अनुभव । कांहीं बुद्धि कविता वैभव । तें दांभिक ऐशा अभिनव । कल्पना करिती ॥ वेदशास्त्रें उडविती । आपण सिद्ध म्हणविती । ग्राम्यशिष्यांत मिरविती । आपले ग्रंथ ॥ (९. १४०–१४२)" ह्या अवतरणावरून त्यांच्या शब्दचिकित्सक व तार्किक लेखनपद्धतीची वाचकांना जाणीव होते. हे विवेचन सुगम असले तरी प्रतिपक्षावर घाव घालणारे आहे.

*निगमसारा*नंतर वामन पंडितांनी भक्ती आणि अद्वैत ह्यांचे विवेचन करणारा *कर्मतत्त्व* हा ग्रंथ लिहिला. ह्या ग्रंथाचे आठ अध्याय असून श्लोकसंख्या ५२४ आहे. *ब्रह्मस्तुति* हा ग्रंथ म्हणजे *भागवता*च्या *दशमस्कंधा*च्या आधारे रचलेली मराठी टीका. ह्यानंतरच्या कालातील ही रचना पुष्कळच मोठी आहे. वामन पंडितांच्या टीकापर रचनेचा अस्फुट प्रारंभ ह्या रचनेत व *नामसुधे*त झाला असावा असा तर्क करता येतो. ह्यापुढील *चित्सुधा* हे वेदान्तप्रकरण. चित्सुधारूपी दीप हाती घेऊन जे प्रपंचाकडे पाहतील त्यांना शुद्ध आत्मज्ञान आपाततः होईल हे ह्यात सांगितले आहे. *श्रुतिसारा*तील आध्यात्मिक प्रकरणांची रचना व *अनुभूतिलेश, सिद्धान्तविजय, श्रुतिकल्पलता* हे संस्कृत ग्रंथ ह्याच कालातले. मराठीप्रमाणे संस्कृत भाषेवर वामनांचे प्रभुत्व होते. त्यांनी *गीता* व *अपरोक्षानुभूति* ह्या संस्कृत ग्रंथांची उत्कृष्ट समश्लोकी भाषान्तरे केली. भाषान्तराचा नवा आदर्श निर्माण केला. ह्या *गीतासमश्लोकी*त वामन पंडितांनी स्वतःची अशी भर घातलेली असून तो 'सज्जनानंदकारक' आहे असे ते स्वतःच सांगतात. मोरोपंतांनी ह्या *समश्लोकी*चा गौरव करताना म्हटले आहे : " रीति समश्लोकीची अतुला साधेल काय तव्यास । या सुयशें होइल का रोमांचव्याप्त काय नव्यास ॥" भर्तृहरीच्या शतकत्रयाचे मराठी भाषान्तर वामन पंडितांच्या नावावर आहे. परंतु डॉ. मा. गो. देशमुख ह्या भाषान्तराचे कर्तृत्व वामनांचे शिष्य हरि दीक्षित ह्यांना देतात (*सह्याद्रि*, मार्च १९३८).

वामन पंडितांनी *योगवासिष्ठ* हे प्रकरण लिहिले आहे. त्या प्रकरणावर स्वतः वामन पंडितांचे काय मत होते हे सांगण्याच्या निमित्ताने पुढील अवतरण दिले आहे : " असा प्रश्न ऐकोनिया राघवाचा । वदे उत्तर श्रीवसिष्ठ स्ववाचा । वदों भाव त्याचा महाराष्ट्र वाणी । जरी शब्द थोडे न अर्थास वाणी ॥ " (*योगवासिष्ठ*, श्लो. ४). वरील श्लोकात वामनांचा महाराष्ट्रवाणीचा अभिमान व्यक्त झालेला आहे. जरी मराठी भाषेत शब्द थोडे आहेत, शब्दसंग्रह अल्प आहे तरी अर्थाची उणीव नाही. शब्दांच्या ठिकाणी अर्थ व्यक्त करण्याचे सामर्थ्य मोठे आहे. ह्या प्रकरणाची श्लो. सं. २३ आहे.

*कर्मतत्त्व* नावाने वामनांनी एक संस्कृत प्रकरणही रचले आहे. *चित्सुधा* व *निगमसार* ह्या ग्रंथांच्या रचनेनंतर ह्या *कर्मतत्त्वा*ची रचना झाली असावी असे ह्या ग्रंथातील त्या त्या ग्रंथांच्या उल्लेखांवरून दिसते. *कर्मतत्त्व* व *निगमसार* ह्या ग्रंथांच्या अनुरोधाने वामन पंडितांच्या तत्त्वज्ञानाची मुख्य सूत्रे लक्षात येतात.

*चरमगुरुमंजरी* हा वामनांचा सुविख्यात ग्रंथ आहे. त्याची रचना गुरूपदेशानंतरची आहे, असे 'अनुभव स्वजनासह वामनीं, गुरुमुखें फळला बरवा मनीं ॥' (३७) ह्या श्लोकचरणावरून स्पष्ट होते. ह्या ग्रंथाची श्लोकसंख्या १७४ आहे. श्रीकृष्ण हा मानवाचा श्रेष्ठ गुरू – तो भ्रांत जीवांची भ्रांती हरण करतो. त्याच्या कृपाकटाक्षाने आत्मज्ञान होते. ह्या तत्त्वज्ञानविषयक स्वतंत्र प्रकरणाचा वामनांनी उपसंहार केला आहे तो असा : "चरम गुरुपदाची कीर्ति लोकीं कळाया, परमपरमबोधें दाखवी तो कळाया । चरममुख जयाचें शेषशायी हरी तो, चरमकुमतवादा, वामनात्मा हरीतो ॥ " (१७४).

अध्यात्मपर म्हणजे वेदान्तपर ग्रंथांत *यथार्थदीपिका* हा स्वतंत्र ग्रंथ वामन पंडितांनी आयुष्याच्या अखेरीस लिहिला. ह्या ग्रंथाचा रचनाकाल शके १६१०–१६१६ (इ. स. १६८८–१६९४) च्या दरम्यान. ह्या गीताटीकेसाठी वामनांनी सातशे-श्लोकी गीतासंहिता उपयोगात आणलेली आहे. ही टीका ओवीबद्ध असून ग्रंथसंख्या २२२२६ आहे. म्हणजे *ज्ञानेश्वरी* ह्या गीताटीकेपेक्षा हा ग्रंथ अडीचपटीने मोठा आहे. गीतेने सांगितलेले तत्त्वज्ञान यथार्थपणे स्पष्ट करण्याच्या आग्रहाने ही टीका वामनांनी रचली. ह्या ग्रंथात त्यांनी अध्यात्मशास्त्राची मांडणी केलेली असून सर्वच विवेचन तर्कनिष्ठ आणि मुद्देसूद आहे. संस्कृत न्यायसरणीला अनुसरून हे विवेचन केले असल्याने त्याचे स्वरूप खंडन-मंडन करणाऱ्या टीकेसारखे झाले आहे. प्रतिपक्षाचे खंडन करणे हा वामनांचा एक विशेष ह्या गीताभाष्यात चांगलाच जाणवतो. ज्ञानदेवांच्या *भावार्थदीपिके*वर वामनांचा विशेष कटाक्ष दिसून येतो. त्यांच्या लेखनपद्धतीवर ते आक्रमक टीका करतात. ह्या टीकेवरून वामनांचे प्रगाढ पांडित्य, स्वतंत्र प्रज्ञा आणि भाषाप्रभुत्व ह्यांची चांगली कल्पना येते. वेदान्तातील विविध विषयांची त्यात सूक्ष्म व शास्त्रीय चिकित्सा आहे. गीतातत्त्वज्ञानाची मांडणी करणारा हा स्वतंत्र ग्रंथ आहे. [ ⇨ ३.]

*यथार्थदीपिका* हा ग्रंथ पंडित मंडळीत मान्य झाला खरा परंतु वामनांना खरी लोकप्रियता त्यांच्या रसाळ आख्यान-रचनेमुळे मिळाली. *भागवतां*तर्गत आख्यानातील शृंगाराला त्यांनी भक्तीचा रंग चढविला आणि भक्तीला शृंगाराची जोड दिली. राधाकृष्णांच्या काव्यकथांच्या निमित्ताने वामन पंडितांनी शृंगाराची बहार उडवून रसिकांचे अपार मनोरंजन केले. विविध अक्षरगणवृत्तांत वैचित्र्यपूर्ण यमकप्रचुर रचना, उपमा-उत्प्रेक्षांची हौस असणाऱ्या रसिकांना रिझवावे आणि हरि-संकीर्तनही व्हावे ह्या उद्देशाने भागवती आख्यानांची रसपूर्ण रचना, त्यांनी केली. त्यामुळे वामन सामान्य जनतेत लोकप्रिय झाले व काव्यरसिकांनी 'सुश्लोक वामनाचा' हे बिरुद त्यांना अर्पण केले.

वामन पंडितांच्या आख्यानपर व कलापूर्ण श्लोकरचनेने मराठी साहित्यात एक नवा संप्रदाय निर्माण केला. त्यांच्या कलात्मक कवितेचे अनुकरण त्यांच्या शिष्यांनी व इतरांनीही जे केले ते इतके हुबेहूब साधले की त्या कवितांचे कर्तृत्व वामनांचे नसतानाही ती अनुकरणात्मक कविता वामन पंडितांच्या काव्यसंग्रहात समाविष्ट झाली. त्यातील *भीष्मार्जुनयुद्ध, भीष्मभक्तिभाग्य, जयद्रथवध, विराटपर्व* ही भारती काव्ये हरी वामनांची आहेत. तसेच साम्राज्य वामनांचे *सुदामचरित्र, राजयोग, अनुभूतिलेश* (हा वामनांच्या संस्कृत ग्रंथरचनेचा मराठी समश्लोकी अनुवाद साम्राज्य वामनाने केला आहे) व *ब्रह्मोपदेश* ही प्रकरणे वामन पंडितांच्या काव्यसंभारात नामसादृश्याने मिसळून गेली आहेत. तीच गत विश्वनाथ वामनांच्या *पाताळखंड* व *नौकाक्रीडा* ह्या आख्यान-काव्यांची झाली. बापू वामनांची पुढील आख्यान-कविता *स्थालीपाक, पार्थभाग्य, गोरसविक्रय, रसनास्तुति, नाम-माहात्म्य, भक्तिमाहात्म्य* ही वामन पंडितांच्या काव्यसंग्रहात घुसडण्यात आली. वरील वामनशिष्यांखेरीज इतर अनेक कवींनी वामन पंडितांच्या शैलीचे अनुकरण करून जी श्लोकबद्ध रचना केली ती

*अनेककविकृत लघुकाव्यमाला* (संपा. ना. चि. केळकर व दा. के. ओक) ह्यांच्या संग्रहात आढळते. वामन पंडितांनी ह्या नवीन काव्यरचनेचा जो पायंडा घातला त्याचा हा प्रत्यक्ष पुरावाच आहे. आख्यान-कविता त्यांनी लोकप्रिय केली आणि तिचा उत्कर्ष वामनोत्तर काळातील रघुनाथ पंडित, सामराज, नागेश, विठ्ठल, आनंदतनय ह्या शिवकालीन कवींच्या रचनेत झालेला पाहावयास मिळतो. शिवकालातील काव्याचे सर्व बरेवाईट विशेष वामन पंडितांच्या आख्यानकाव्यांत बीजरूपाने आढळतात. वामन पंडितांचे भागवती काव्य म्हणजे आध्यात्मिक कथाकाव्याचे लौकिक काव्यात जे संक्रमण होऊ पाहात होते त्याची नांदीच होय.

वामन पंडितांचा काव्यकलेवरील अधिकार फारच मोठा होता. भाषाज्ञानाविषयी त्यांनी आपल्या ग्रंथांत कोठेही धिक्काराचे उद्गार काढलेले नाहीत. त्यांचे संस्कृत भाषेतील काव्याचे अध्ययन खोल व सर्वस्पर्शी होते. इतर शास्त्रांचे त्यांचे अध्ययनही चांगलेच होते. त्यामुळे त्यांच्या साहित्यात पांडित्य व कवित्व ह्यांचा सुंदर संगम झाला आहे. प्राकृत भाषेविषयीही त्यांनी योग्य आदर व्यक्त केला आहे. त्यांची सर्वच रचना विविध वृत्तांत आहे. त्यांची प्रसंगानुकूल वृत्तरचना कौशल्यपूर्ण व रसानुकूल असते. त्यात ते अग्रणी आहेत. यमक व प्रास ह्या दोहोंच्या हव्यासामुळे त्यांचे काव्य कित्येकदा कृत्रिम वाटत असले तरी त्यांच्या अंतरीचा जिव्हाळा, निवेदनातील रसाळपणा, त्यांचे भाषेवरील प्रभुत्व ह्या गुणप्रवाहात त्यांच्या काव्यातील दोष कुठल्याकुठे वाहून जातात आणि वाचकाचे मन ग्रंथातील विषयविवेचनात समरसून जाते. तत्त्वविचारांच्या प्रचंड लोंढ्यात, अध्यात्माची चर्चा, संदर्भप्राचुर्यामुळे येणारी दुर्बोधता, व्याकरणाचे शैथिल्य, काही ठिकाणी होणारा छंदोभंग इत्यादी दोष लुप्त झाल्यासारखे वाटतात. एकूण त्यांची काव्यकृती गोथिक शिल्पाप्रमाणे ओबडधोबड आहे, प्रमाणरहित आहे, पण ती भव्य आहे, रम्य आहे. आनंदाने तिचे दर्शन घेत राहावेसे वाटते.

तत्त्वज्ञ ह्या दृष्टीने वामन पंडित हे निश्चितपणे प्रथम श्रेणीतील आहेत. त्यांच्या रचनेत जेथे जेथे तात्त्विक विवेचन आले आहे तेथे तेथे ते सरस उतरले आहे. ते जसजसे काव्यविषयाकडून तत्त्वज्ञानमीमांसेकडे वळतात तसतसे त्यांचे आविष्कारसामर्थ्य वाढत जाते. त्यांच्या स्फुट रचनेतही ते जाणवते, आख्यानकाव्यांत ते आढळते आणि तत्त्वज्ञानपर लेखनात तर प्रकर्षाने दिसते. त्यांचे स्वतःचे असे तत्त्वज्ञान आहे. निरनिराळ्या सिद्धान्तांचा परस्परसंबंध व्यवस्थित स्पष्ट करणे आणि एक सुसंगत व सुसंबद्ध विचारप्रणाली उभी करणे हे त्यांचे विशेष आहेत. निर्गुणाहून सगुणाचा आदर, ज्ञानापेक्षा भक्तीवर भर, श्रीकृष्णभक्तीचा आग्रह, ज्ञानपरिपाकरूप योगाचा सिद्धान्त, अन्वय-व्यतिरेकाची भाषा हे त्यांच्या विचारांचे विशेष आहेत आणि आध्यात्मिक सिद्धान्ताच्या पायावर तर्कशुद्ध पद्धतीने उभी केलेली अद्वैताधिष्ठित भक्ती हे त्यांच्या तत्त्वज्ञानाचे सर्वांत महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

महाराष्ट्रात मुद्रणकला आल्यानंतर वामन पंडितांच्या काव्यकृतींचे प्रथम प्रकाशन गणपत कृष्णाजी ह्यांनी केले. त्यांनी वामनकृत *ब्रह्मस्तुतीची टीका* हा ग्रंथ शके १७६४ (इ. स. १८४२) मध्ये प्रसिद्ध केला. त्यानंतर मुंबईतील एक काव्यप्रेमी प्रकाशक माधव चंद्रोबा डुकले ह्यांनी वामन पंडितांचा *सीतास्वयंवर* हा ग्रंथ शिळामुद्रित करून प्रकाशित केला. ह्याच ग्रंथाची शिळाछाप आवृत्ती बापू हरशेट देवळेकर, मुंबई, ह्यांनी शके १७८६ मध्ये प्रकाशित केली. माधव चंद्रोबांनी वामनांच्या श्लोकसंग्रहाची शिळाछाप आवृत्ती १८६६ मध्ये *सर्वसंग्रह : वामन पंडितकृत श्लोक* ह्या नावाने काढली. वामनांची *यथार्थदीपिका* ही गीतेवरील सुप्रसिद्ध मराठी टीका. तिचे प्रथम प्रकाशन रत्नागिरी येथील जनार्दन हरि आठल्ये ह्यांनी शके १७८६ (इ. स. १८६४)त केले. हे भिन्न पृष्ठे देऊन त्यांनी पोथीच्या स्वरूपात जगन्मित्र (शिळा) छापखान्यात छापून घेऊन प्रसिद्ध केले.

महाराष्ट्र कविवर्य वामन पंडितकृत *यथार्थदीपिका*, भा. १ ला, अध्याय ३–४ (*काव्यसंग्रह*, क्र. २८)चे संपादन वामन दाजी ओक ह्यांनी १८९६ साली केले. ह्या ग्रंथाचा दुसरा भाग, अध्याय ५–९, चे संपादन ना. चि. केळकर ह्यांनी १९०३ मध्ये, तिसरा भाग, अध्याय १०–१४ चे संपादन बाळकृष्ण अनंत भिडे ह्यांनी अर्थनिर्णायक टीपांसह इ. स. १९११ मध्ये व भाग ४ था, अध्याय १५–१८ चे संपादन बा. अ. भिडे ह्यांनी इ. स. १९१७ मध्ये केले. ह्या ग्रंथाचे हे चारही भाग निर्णयसागर छापखान्याचे मालक तुकाराम जावजी ह्यांनी मुंबई येथे प्रकाशित केले. *वामनी ग्रंथ* ह्या नावाखाली *यथार्थदीपिके*चे प्रकाशन दोन भागांत मुंबई येथील बाळाजी आणि कंपनीने इ. स. १८९१ मध्ये केले. त्याच साली *वामनी ग्रंथ*, भा. ३ रा व भा. ४ था, ह्या कंपनीने प्रसिद्ध करून तिसऱ्या भागात वामन पंडितांच्या सर्व उपलब्ध काव्यप्रकरणांचा आणि चवथ्या भागात त्यांच्या वेदान्त प्रकरणांचा भाग महाराष्ट्ररसिकांना उपलब्ध करून दिला. ह्याखेरीज वामन दाजी ओकांच्या संपादकत्वाखाली *महाराष्ट्र कविवर्य वामन पंडितकृत कवितासंग्रह*, भाग १ ला (इ. स. १८९४); भा. २ रा (*स्फुट काव्यसंग्रह*) इ. स. १८९६; भा. ३ रा (स्फुट काव्ये, विशेषतः भाषान्तरे), *काव्यसंग्रह*, क्र. ३३, हे ग्रंथ निघाले. ह्यांचे प्रकाशन निर्णयसागर छापखाना, मुंबई, येथे तुकाराम जावजी ह्यांनी केले. बा. अ. भिडे ह्यांनी वामन पंडितकृत *नामसुधा* हा ग्रंथ, मूळसंहिता व अर्थनिर्णायक टीपांसहित संपादिला. त्याचे प्रकाशन अ. आ. मोरमकर ह्यांनी श्रीलक्ष्मीनारायण छापखान्यात छापून मुंबई येथे इ. स. १९२१ मध्ये कले. तसेच *द्वारकाविजय* ह्या वामनांच्या ग्रंथाचे संपादन महेश्वर अनंत करंदीकर ह्यांनी केले. ह्या ग्रंथाला विवेचक प्रस्तावना व विस्तृत टिप्पण्या जोडून त्यांचे प्रकाशन बेळगाव येथे करंदीकर ह्यांनी १९३८ साली केले. वामन पंडितांची सर्व कविता महाराष्ट्रीयांस उपलब्ध होण्यास वरील मंडळीने केलेले निष्ठापूर्वक प्रयत्न हेच प्रामुख्याने कारण झाले आहेत.

**रचना : मु.** – १. अपरोक्षानुभूति (समश्लोकी); श्लो. १४५. २. अहल्योद्धार; श्लो. ६५; रामायणातील आख्यान. ३. आरती भगवंताची; ग्रं. सं. ७. ४. उखळबंधन; भागवतातील दशमस्कंधाच्या आधारे रचलेले आख्यान; श्लो. ५४. ५. उपदेशमाला; वामनाने देवराज नावाच्या आपल्या मुलासाठी रचलेला ग्रंथ; प्र. २; ओ. सं. ८९ (६४ + २५). ६. उपादान; वेदान्तपर प्रकरण; श्लो. २७. ७. ऋषिपत्न्याख्यान/यज्ञपत्न्याख्यान; भागवती प्रकरण; श्लोक ७०. ८. कर्मतत्त्व; ह्यात वेदान्ताचे प्रतिपादन आणि अद्वैत व भक्ती ह्यांचे विवेचन आहे; प्र. ८; श्लो. ५२४; ह्याचे एक प्रकरण संस्कृतमध्येही आहे. ९. कंसवध अथवा नवरस; कंसवधाची घनाक्षरी वृत्तातील कथा; श्लो. २४. १०. कात्यायनीव्रत–१; भागवत दशमस्कंध अ. २२ च्या आधारे रचलेली कथा; गोपकन्यकांनी यमुनेत स्नान करून कात्यायनी देवीची पूजा करून कृष्ण हा जन्मोजन्मी पती लाभो म्हणून तिची केलेली प्रार्थना; श्लो. ९४; ह्यास गोपीवस्त्रहरण असे दुसरे नाव. ११. कात्यायनीव्रत–२; श्लो. १७; मत्तगयंद वृत्तात. १२. कृष्णचरित्र; त्रुटित. १३. कृष्णजन्म; भागवत दशमस्कंधावर आधारित; श्लो. २८. १४. गजेंद्रमोक्ष; श्लो. १२. १५. गोरसविक्रय; त्रुटित; श्लो. ५. १६. गोरसहरण; श्लो. २१. १७. चतुःश्लोक भागवत (समूळ); श्लो. ४. १८. चरमगुरुमंजरी; श्लो. १७४. १९. चित्सुधा; श्लो. ४३. २०. जटायुस्तुति; रामायणातील आख्यान; श्लो. ४८. २१. जलक्रीडा; श्लो. ३३. २२. तत्त्वमाला; कपिल महामुनि ह्याने आपली माता देवहूति

हिला प्रकृतीचे विकार म्हणून जी २४ तत्त्वे किंवा पुरुष धरून २५ तत्त्वे सांगितली त्या तत्त्वांचे वर्णन ह्या प्रकरणात आहे; भागवत तृतीय स्कंध अ. २६ च्या आधारे ही रचना; श्लो. १८. २३. दंपत्य-चरित्र किंवा अश्वस्नान; श्लो. १६. २४. दशावतारचरित्र; ग्रं. सं. १०. २५. द्वारकाविजय; सर्ग ५; श्लो. २६२. २६. ध्यानमाला; श्लो. १४; भागवत स्कंध ३ वर आधारित; यास भगवद्ध्यान किंवा कपिलस्तुति असेही म्हणतात. २७. नामसुधा; भागवती आख्यान; अ. ३; चरण प्रत्येक अध्यायात ४; श्लो. ५३३. २८. निगम-सार; मलयाचलावर वामनांना गुरुपदेश झाला त्याचे वर्णन व भार्गवी वारुणी विद्येचे महत्त्व ह्यात विवरिले आहे; अ. ९; ग्रं. सं. ११७६. २९. नृहरिदर्पण; घनाक्षरी व श्लोक एकूण १५४. ३०. नौकाक्रीडा; श्लो. १७. ३१. प्रियसुधा; पत्नीस उपदेश हा ग्रंथाचा विषय; श्लो. १८. ३२ ब्रह्मस्तुति; चरण ३; एकूण श्लो. ८१४. ३३. बाल-क्रीडा–१; श्रीकृष्णाच्या बाललीलांचे अतिशय चित्तवेधक वर्णन; भागवत दशम स्कंधावर आधारित; श्लो. १०२; बालक्रीडा–२; ७. ३४. भक्तिमहिमा; ह्यात मुक्तीपेक्षा भक्ती श्रेष्ठ ह्याचे रसाळ वाणीने स्पष्टीकरण केलेले आहे; ग्रं.सं. ६४. ३५. भरतभाव; रामा-यणी आख्यान; श्लो. ९७. ३६. भागवत रामायण; भागवताच्या नवम स्कंधातील अ. १० व १२ च्या आधारे रामकथा वर्णिली म्हणून भागवत रामायण ह्यासच 'संकलित रामायण' असे दुसरे नाव. ३७. भगवद्दास्य; कर्म ईश्वरार्पण करून निष्काम सेवा आचरावी ह्याचे विवरण; श्लो. २९. ३८. भामाविलास; श्लो. ४८. ३९. भूगोल वर्णन; भागवताच्या पंचम स्कंधातील अ. १६–२० मध्ये वर्णिलेल्या भुवनकोशाचे सार; श्लो. ३०. ४०. मुकुंद-विलास; भागवत दशम स्कंध, अ. ७०–७३ वर आधारित; श्लो. ६७; हे काव्य जरासंधवध या नावाने ओळखले जाते. ४१. मृत्तिकाभक्षण; भागवती आख्यान; श्लो. २२. ४२. यथार्थदीपिका; एकूण ग्रंथसंख्या २२ हजारावर. ४३. यज्ञपत्न्याख्यान (पहा : ऋषि-पत्न्याख्यान). ४४. योगवासिष्ठ; श्लो. २३. ४५. राधाभुजंग; श्लो. ५७. ४६. राधाविलास; श्लो. ७७. ४७. रामार्या टीका; मुद्गल-स्वामीच्या संस्कृत रामार्या टीकेचा मराठी अनुवाद; एकूण आर्या १०८; ह्याला आर्याटीका असेही म्हटले जाते. ४८. रासक्रीडा; भागवती दशम स्कंध रासपंचाध्यायीच्या आधारे; श्लोक व पदे मिळून संख्या १८४. ४९. रुक्मिणी पत्रिका – भागवती प्रकरण; श्लो. १६. ५०. रुक्मिणीविलास – भागवत दशम स्कंधाच्या आधारे श्रीकृष्णाने रुक्मिणीशी जो विलास केला त्याचे वर्णन; श्लो. १६०. ५१. वनसुधा; चार चरण; श्लो. १२०. ५२. वामनचरित्र १ आणि २; भागवतातील आठव्या स्कंधातील अ. १६–२३ च्या आधारे रचलेली कथा; श्रीविष्णूने वामनरूप घेऊन बळिराजाला पाता-ळात घातल्याची कथा. ५३. विश्वासबंध अथवा गुरुबोध; श्लो. २२. ५४. विष्णुध्यान; भागवताचा तिसरा स्कंध, अ. २८ मध्ये केलेली विष्णुस्तुती सवाई, मदिरा आणि उमा वृत्तांत ह्या काव्यात केली आहे; श्लो. १४. ५५. वेणुसुधा; श्लो. १२०. ५६. शुका-ष्टक; भागवताच्या दुसऱ्या स्कंधात अ. २ मधील ५ व ६ ह्या श्लोकांच्या आधारे १२ श्लोकांत लिहिलेले प्रकरण. ५७. संकलित रामायण (पहा : भागवत रामायण). ५८. सद्गुरूची आरती; ग्रं. सं. १०. ५९. समश्लोकी गीताटीका; अ. १८; श्लो. १३५०. ६०. सत्यभामाविलास ह्या काव्यात श्रीकृष्णाने सत्यभामा रुसली असता तिची समजूत घातली असा विषय; भागवत दशम स्कंधाच्या आधारे ही काव्यरचना; श्लो. ४८. ६१. सीतालोपामुद्रासंवाद; श्लो. ३८. ६२. सीतास्वयंवर; श्लो. ११५. ६३. हरिविलास भागवत दशम स्कंधाच्या सोळाव्या अध्यायावर आधारित; ह्या काव्याला कालियामर्दन असे म्हणतात; अ. ९; श्लो. ३९४. **शंकास्पद** – १. उषास्वयंवर. २. करुणाष्टक. ३. गंगालहरी. ४. चिल्लहरी. ५. तुकारामस्तुति. ६. दत्तात्रेयस्तवन. ७. ध्रुवचरित्र. ८. नाममहिमा. ९. नामार्थदीपिका. १०. पदपदांतरे. ११. पार्थ-भाग्य. १२. प्रेमसरी. १३. ब्रह्मज्ञाननिरूपण. १४. भगवत्स्तुति. १५. भर्तृहरीकृत शतके (शतकत्रयाचे मराठी भाषान्तर). १६. भस्मासुरवधाख्यान. १७. मनास बोध. १८. मातंगकेसरी. १९. रसनास्तुति. २०. राजयोग. २१. रामजन्म. २२. रामस्तव. २३. रामाचा धावा. २४. वामनबोध. २५. व्याधाख्यान. २६. शिवस्तुति. २७. सप्तश्लोकी गीता. २८. सप्तश्लोकी पत्रिका. २९. सिद्धान्त. ३०. स्फुट श्लोक. ३१. स्फुट सवाया. ३२. हनुमंत-स्तवन. **संस्कृत ग्रंथ** – १. अनुभूतिलेश. २. कर्मतत्त्व. ३. श्रुतिसार किंवा श्रुतिकल्पलता अशी एक रचना वामनांच्या नावावर आहे. ४. सिद्धान्तविजय. ५. **स्फुट** : भगवंताची आरती.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. आजगांवकर, ज. र. : वामन : मकच., भा. १, १९०७; पृ. १५८–२०८. २. आठवले, रा. म. : वामन पंडित : कांहीं नवीन प्रकाश; रत्नाकर, सप्टें. १९३२; पृ. ६४९. ३. आठवले, रा. म. : वामन पंडितांचे गुरू कोण ? चित्रज., मार्च–एप्रि. १९३२. ४. आठवले, रा. म. : वामन पंडितांच्या चरित्रसंबंधाचीं स्थळें; सचित्र करमणूक (नवीन), दीपावलि, १९२८; पृ. ३३–३८. ५. आठवले, रा. म. : वामनी समश्लोकी गीतेची नागेशात्मज विठ्ठल लिखित प्रत; भाइसंमंत्रै., पौष १८५८; पृ. ११३–११६. ६. आठवले, रा. म. : समर्थांची चौदा ब्रह्में आणि वामन पंडित; लोकसत्ता, ५ नोव्हें. १९७२, १२ नोव्हें. १९७२, १९ नोव्हें. १९७२. ७. आंबेवाडीकर, कल्याण-राव : गीतासमश्लोकी कोणत्या वामनाची ?; इंद्रायणी, सप्टें.–ऑक्टो. १९६३; पृ. ५०. ८. आंबेवाडीकर, कल्याणराव : दोन वामन; ज्ञानेश्वर त्रैमा., १९५२. ९. आंबेवाडीकर, कल्याणराव : वामन-स्वामी आणि वामनपंडित; इंद्रायणी, मे–जून १९६३; पृ. १९–२५, १८–२५ अनुक्रमे. १०. आष्टीकर, म. र. : वामन व ध्वनि; युगवाणी, डिसें. १९६२; पृ. ५. ११. करंदीकर, म. अ. : महाराष्ट्राचा रसिक विरागी कवि वामन पंडित; लोकमान्य, दीअं. १९५४; पृ. १०८. १२. करंदीकर, म. अ.; ज्ञानेश्वर, वामन पंडित आणि शंकराचार्य; साहित्य त्रैमा., फेब्रु. १९५०; पृ. ४२. १३. करंदीकर, वि. रा. : भगवद्गीतेचे तीन टीकाकार : संत ज्ञानेश्वर, वामन पंडित, लोकमान्य टिळक; पुणे, १९७४. १४. करंदीकर, वि. रा. : वामन पंडितांची यथार्थदीपिका; पुणे, १९६३. १५. कात्रे, स. ल. वामनी गंगालहरीचा खरा कर्ता – सखा कवि; मसाप., जाने. १९५३. १६. कानोले, वि. अं. : कवि वामन पंडिताविषयीं नवीन माहिती; गोदातीर इतिहास संशोधन मंडळ; नांदेड, १९६६; प्रस्ता., द. वा. पोतदार. १७. कानोले, वि. अं. : प्रस्ता., रघु-नाथशेषकृत 'कृष्णकौतुक'; गोदातीर संशोधन मंडळ; नांदेड, १९६५. १८. कानोले, वि. अं. : वामन पंडित; मुंबई १९. कारखानीस, ग. गो. : कविवर्य वामन पंडितांच्या काही प्रकरणांची भाषिक पाहणी; रामदास आणि रामदासी; नोव्हें. १९४५; पृ. ९२–१००. २०. केळकर, द. के. : वामन पंडितांची सुधात्रयी; लोकमान्य, दीअं. १९५५; पृ. ५४. २१. खरे, ल. ज. : यथार्थ-दीपिकाकार वामन पंडित व नीतिशतकाचा भाषान्तरकार एकच की भिन्न; युगवाणी, फेब्रु. १९६७; पृ. ३६०–३६२. २२. ग्रामो-पाध्ये, गं. ब. : वामन पंडितांच्या स्फुट आख्यानांतील शृंगारभक्ती; डॉ. कोलते गौरव ग्रंथ, १९६९; पृ. ९४–९८. २३. देशमुख, मा.

गो. : शतकत्रयकार वामन कीं हरि ?; सह्याद्रि, व. ४, अं. २; १९३८. २४. देशमुख, ल. गो. : मयूर-वामन-काव्य – अन्यदर्शन; पुणे, १९१४. २५. नवरे, नी. शं. : नीतिशतक – भर्तृहरीचें आणि वामनाचें; मौज, दीअं. १९४४; पृ. ५३–५४. २६. पठाण, यू. म. : कवि वामन पंडिताविषयीं नवी माहिती : कानोले ह्यांच्या प्रबंधाचें परीक्षण; प्रतिष्ठान, डिसें. १९६९; पृ. ४३. २७. पंडित, अ. ना. : वामन पंडितांचा समाधिकाल कोणता ?; विज्ञावि., ऑक्टो. १९१८; पृ. ३६७. २८. पंगु, द. सी. : वामन पंडित; प्राचीन मराठी कविपंचक; कोल्हापूर, १९४४. २९. पेंडसे, शं. दा. : भगवद्गीता – मराठी टीकाकार – ज्ञानेश्वर आणि वामन पंडित; सह्याद्रि, नोव्हें. १९३५; पृ. १००९–१०१९. ३०. बार्लिंगे, सुरेंद्र : वामनाचें काव्यशास्त्र : एक निरूपण; प्रतिष्ठान, डिसें. १९६०. ३१. भालेराव, भा. रा. : शतकत्रय – वामनाचें कीं हरीचें ?; मुमुक्षु; इ. स. १९२२. ३२. भिडे, बा. अ. : वामन पंडित (वृत्त व ग्रंथ); मुंबई, श. १८२७. ३३. मतकरी, रा. वि. : वामन पंडितकृत 'जटायुस्तुति'; सह्याद्रि; फेब्रु. १९४२; पृ. १६०–१६६. ३४. महाजन, जगन्नाथ; वामन पंडिताचा भागवत-धर्म; मसाप., जुलै–सप्टें. १९५६; पृ. ३८–३९. ३५. राजवाडे, वि. का. : वामन पंडित; श्रीसरस्वती मंदिर; व. ६, अं. ४, आश्विन श. १८२८; संकीर्ण लेख, पृ. १–९ (बा. अ. भिडेकृत 'श्रीसरस्वती मंदिर', व. ५ अं. १ मध्ये आलेल्या निबंधाचा परामर्श). ३६. राजवाडे, वि. का. : वामन पंडितकृत समश्लोकी गीतेची समाप्ति; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ४७–४९. ३७. लेले, वा. के. : वामन पंडितांच्या चरित्रासंबंधी टिपण; मसंप., ऑक्टो. १९६७; पृ. १–६. ३८. वाटवे, के. ना. : वामन पंडित, पंडित-कवि, १९५२; पृ. २२–४६. ३९. साकळे, रं. के. : वामन पंडित दोनच; महाराष्ट्र, १०–९–४४. ४०. हंस, बा. ना : वामन पंडित; मुंबई, १८८४; पृ. १२६.

**वामन पंडित–२ / ० वामन–२** [ ? – समा. शके १६७६, वैशाख शु. ६ / इ. स. १७५४] कवी. हे वामन पंडित *यथार्थदीपिका*कारांहून भिन्न. ह्यांचे गोत्र शांडिल्य. वामन पंडित आणि त्यांची रचना हा एक अतिशय विवाद्य आणि गुंतागुंतीचा विषय आहे. मराठीमध्ये एकूण किती वामन झाले ह्या प्रश्नाशी तो निगडित आहे. ('वामन एक कीं अनेक' – पहा : **वामन पंडित–१**). *यथार्थदीपिका*कार वामन पंडितांहून निराळ्या अशा शांडिल्यगोत्री वामनांचा पहिला स्पष्ट उल्लेख बा. अ. भिडे ह्यांनी केला आहे. शांडिल्यगोत्राचा उल्लेख *भीष्मयुद्ध* प्रकरणातील शेवटच्या श्लोकात येतो. तो श्लोक असा आहे : "ताताभिधा नृहरि पंडित माय लक्ष्मी । दे सर्वदा सुगुणयुक्त उदार लक्ष्मी ॥ शांडिल्यगोत्र कुळदेव नृसिंह ज्याचा । दासानुदास निज वामन हो अजाचा ॥"

शांडिल्यगोत्री वामन हाच यमक्या वामन असे ज. र. आजगांवकर म्हणतात आणि तोच रामदासी वामन असावा असा तर्क करतात. ह्या वामनांचे आडनाव पंडित असावे असे आजगांवकरांनी म्हटले आहे. श्लोकातील 'नृहरि पंडित' ह्या उल्लेखावरून त्यांना हे सुचले असावे. हे वामन *यथार्थदीपिका*कारांचे शिष्य असावेत असे त्यांचे अनुमान आहे. *विराटपर्व* त्यांचेच असावे असेही त्यांनी म्हटले असून *मुकुंदविलास*, *दंपत्यचरित्र*, *भीष्मप्रतिज्ञा* ह्या प्रकरणांची रचना थेट *यथार्थदीपिका*-कारांसारखी आहे असा आजगांवकरांचा अभिप्राय आहे.

वि. ल. भावे ह्यांनी वरील श्लोकातील चौथ्या चरणाचा एक भिन्न पाठभेद निर्दिष्ट केला आहे. *भीष्मयुद्धा*च्या काही हस्तलिखित पोथ्यांमध्ये ह्या वर दिलेल्या श्लोकातील चौथा चरण 'दासानुदास हरि तो सकळां द्विजांचा ।' असा आढळल्याचे त्यांनी *महाराष्ट्रसारस्वतात* नमूद केले आहे आणि असा निर्णय केला आहे की प्रस्तुत *भीष्मयुद्ध* हे काव्य वामनांचे नसून कोणा हरीचे असावे. *भीष्मशरपंजर* ह्या दुसऱ्या एका प्रकरणातील शेवटच्या श्लोकामध्ये "ऋषी बोलिला भूप पारिक्षतातें । कसा तुष्टला श्रीहरी दीक्षितातें ॥" असा एक उल्लेख येतो. त्यावरून ते प्रकरणही वामनांचे नव्हे तर हरीचे किंवा हरी दीक्षितांचे आहे, असे भावे म्हणतात. *भीष्मयुद्ध*कर्ता हरी *यथार्थदीपिका*कार वामनांचा शिष्य होता व त्याची अनेक प्रकरणे वामनांची म्हणून छापली गेली आहेत.

दा. के. ओक ह्यांनी *यथार्थदीपिका*कार वासिष्ठगोत्री आणि शांडिल्य-गोत्री असे दोनच वामन मानले आहेत. शांडिल्यगोत्री वामनांचे वडील नृहरी, आई लक्ष्मी, मुलगा देवराय, कुलदेव नृसिंह असावा – असा त्यांचा तर्क आहे. ह्या वामनांचे वडील नृहरी व मुलगा देवराय हे दोघेही रामदासी पंथातील असावेत, ह्या वामनांनीच वडिलांच्या सांगण्यावरून *उपदेशमाला* हे काव्य आपल्या मुलासाठी लिहिले असावे, संस्कृत-मधील *रामदासस्तोत्र* आणि 'शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें ।' हा रामदासप्रशस्तिपर सुप्रसिद्ध श्लोक ह्यांचा असावा, आणि *विराटपर्व* व *महाभारता*वरील स्फुट आख्यानेही ह्यांचीच असावीत असे ओकांनी म्हटले आहे. ओकांनी हे सारे केवळ एक अनुमान म्हणून दिले आहे. शं. गो. तुळपुळे ह्यांच्या मते *भीष्मयुद्ध*, *भीष्मशरपंजर*, *भीष्मभक्तिभाग्य*, *जयद्रथवध*, *विराटपर्व* ही भारती आख्याने *यथार्थदीपिका*कार वामनांची नाहीत. *मनास बोध*, *हनुमंतस्तव*, *रामस्तव*, *रामाचा धावा*, *करुणाष्टक* ही रचना रामदासी वामन गोसावी ह्यांची असावी, असे काही विद्वानांचे मत असल्याचेही तुळपुळे सांगतात; पण हा रामदासी वामन शांडिल्यगोत्री आहे का त्याहून निराळा आहे ह्याबद्दल ते स्पष्ट असे काही बोलत नाहीत.

कल्याणराव आंबेवाडीकर ह्यांना बेळगाव जिल्ह्यातील कालकुंद्री ह्या गावी हरिपंडितांचा *गीतार्थप्रकाश* हा ग्रंथ मिळाला. *भीष्मयुद्धा*च्या शेवटी आलेला श्लोक *गीतार्थप्रकाशा*च्या शेवटी आलेला आहे व त्याचा चौथा चरण 'दासानुदास हरि हा सकळां द्विजांचा ।' असा आहे, त्यावरून हा *गीतार्थप्रकाश* हरिपंडितांचा आहे असा निर्णय कल्याणराव करतात. त्याचप्रमाणे 'दासानुदास निज वामन हा अजाचा ।' हा जो चरण *भीष्मयुद्धा*च्या अखेरीस आहे, त्यावरून शांडिल्यगोत्री वामन हा हरिपंडितांचा नातू होय असे कल्याणराव ठरवतात. ह्याचा अर्थ असा की प्रस्तुत श्लोकाचे दोन्ही पाठ कल्याणराव स्वीकारतात आणि त्याच्या आधारे हरिपंडित व वामन पंडित ह्या दोघांचे एकमेकांशी असलेले नाते प्रस्थापित करतात.

राजाराम प्रासादींनी दिलेल्या चरित्रात *यथार्थदीपिका*कार वामन, हरिपंडित व त्यांचा नातू वामन ह्या तिघांच्या चरित्राची भेसळ झाली आहे, त्याचप्रमाणे *यथार्थदीपिका*कारांच्या नावावर सांगितल्या जाणाऱ्या ग्रंथांतही ह्या तिघांच्या रचनेची सरमिसळ आली आहे, असे कल्याणरावांचे मत आहे.

'दासानुदास निज वामन हा अजाचा ।' हा *भीष्मयुद्धा*मधील उल्लेखच शांडिल्यगोत्री वामनांचा सिद्धान्त उभा करण्यास उपयोगी पडणारा सर्वांत महत्त्वाचा आधार आहे. त्या उद्गारांत वामनांची आपल्या आजोबांवरील श्रद्धा दिसते असे कल्याणराव म्हणतात, पण त्या श्रद्धेची प्रचीती त्यांच्या इतर साठ-पासष्ट प्रकरणांमध्ये कोठे येत असल्याचे ते दाखवीत नाहीत. ह्या चरणातील 'अजाचा' ह्या शब्दाचा अर्थ 'परमेश्वराचा' असा न करता 'आजोबांचा' असा करताना बरीच ओढाताण करावी लागते. वि. का. राजवाडे ह्यांनी असाच अर्थ केला आहे हे खरे आहे, पण तो पटत नाही असे दा. के. ओक ह्यांनी म्हटलेले आहे. शांडिल्यगोत्री वामन हा हरिपंडितांचा नातू हे प्रस्थापित करण्यास प्रस्तुत चरणाव्यतिरिक्त दुसरा कोणताही विश्वासार्ह पुरावा अद्याप तरी मिळालेला नाही आणि म्हणून ते विधान बरेचसे संशयित राहते. वि. ल. भावे व प्रा. द.

सी. पंगु ह्या दोघांनी ह्या वामनांचे अस्तित्वच संशयास्पद असल्याचे मत स्पष्टपणे व्यक्त केले आहेच. अखेर शांडिल्य-गोत्री वामनांच्या बाबतीत निर्णायकपणे अद्याप काही बोलता येत नाही असेच म्हणावे लागते. रामदासी वामन निराळा असण्याची शक्यताही नाकारता येत नाही. वामन पंडित ह्या नावावर सांगितल्या जाणाऱ्या सर्व प्रकरणांचा सूक्ष्म अभ्यास होईल, तेव्हाच हरिपंडित, वासिष्ठगोत्री *यथार्थदीपिका*कार वामन पंडित, शांडिल्यगोत्री वामन पंडित आणि रामदासी वामन ह्या सर्वांची रचना कोणकोणती आहे ह्याचा निर्णय होऊ शकेल.

वि. रा. करंदीकर

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : वामन; मकच., खं. १; मुंबई, १९०७; पृ. १५८–२०८. २. आंबेवाडीकर, कल्याण-राव : वामनस्वामी आणि वामनपंडित; इंद्रायणी, मे १९६३; पृ. १९–२५; जून १९६३; पृ. १८–२५. ३. ओक, दा. के. : प्रस्ता., वामनपंडितकृत कवितासंग्रह, भा. २; द्विआ., मुंबई, १९४०. ४. पंगु, द. सी. : वामनपंडितांवरील प्रकरण; प्राचीन मराठी कवि-पंचक, १९४४. ५. भिडे, बा. अ. : वामनपंडित; श्रीसरस्वती मंदिर, व. ३, अं. २; आषाढ, शके १८२५.

**वामनपंडितशिष्य** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – १. ध्रुवचरित्र; आर्या व श्लोक; ग्रं. सं. १४६; संपा. केळकर, ना. चिं.; अकलकामा., भा. ३; मुंबई १९०२; पृ. ११०–१२३. २. गयेच्या विष्णुपदाची आरती; भाइसमंत्रै., व. २०, अं. २, आश्विन १८६१; पृ. ८२.

**वामनपार्थसारथी** [का. अनु.] टीकाग्रंथकार. वामन पार्थसारथी ह्या नावाने रचलेली *समश्लोकी गीताटीका* ही वामन पंडितांची समजण्यात येते. वामन पार्थसारथी ह्यांच्या नावावर तंजावर येथील हस्तलिखितसंग्रहात *गीतार्थबोधिनी* (बा. १०१–२) व *भगवद्गीता समश्लोकी* टीका (बा. २६२) असे दोन ग्रंथ दिले आहेत. *सम-श्लोकी*च्या समाप्तिमुद्रेत कर्ता वामन पार्थसारथी असा निर्देश स्पष्टपणे येतो. निश्चितपणे हा ग्रंथ कोणत्या वामनांचा ते समजत नाही.

**रचना : मु.** – गीतार्थबोधिनी (वामन पार्थसारथी, मोरोपंत, तुळसी-दास, मुक्तेश्वर, तुकारामकृत, टीकासंग्रह); श्लोक, आर्या, दोहरे, ओव्या, अभंग; ग्रं. सं. १०७५८; शिळाछाप; मुंबई. **अमु.** – भगवद्गीता समश्लोकी टीका; ग्रं. सं. १५००; प्रत श. १७२९ / इ. स. १८०७; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**वामन पुरुषोत्तम** [अंदाजे श. १७७८ / इ. स. १८२६] कवी. धुळ्यास होऊन गेलेल्या टीकाराम ह्या सत्पुरुषाचे शिष्य. ह्यांनी आपल्या गुरुवर्यांच्या ग्रंथाच्या प्रती केलेल्या आढळतात. हे स्वतः अधिकारी कवी होते.

**रचना : अमु.** – १. नाथप्रसादगुटिका लहरी; २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० वामनस्वामी** – पहा **वामन पंडित–१**.

**वालात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**वासुदेव–१** [का. अनु.] नाथपंथीय कवी. ह्यांच्या वडिलांचे नाव नारायण व आईचे नाव लक्ष्मी. ह्यांनी ग्रंथात दिलेली स्वतःची गुरुपरंपरा अशी : मारकीनाथ > गोविंद > लक्ष्मण > वासुदेव.

**रचना : अमु.** – १. आत्मबोध; २. उपदेशसार; ३. अभंग, इत्यादी; संककासू., पृ. ९६, ९९.

**वासुदेव–२ / ० वासुदेव गोसावी / ० वासुदेवस्वामी–२** [अंदाजे श. १५९३ / इ. स. १६७१] रामदासी कवी. समर्थांचे शिष्य. समर्थांचा निरोप घेऊन हे शिरवळप्रांती कण्हेरीस मठ स्थापून राहिले. शिवाजी-महाराजांनी ह्यांना श. १५९३ त सनद करून दिली होती असे समजते. मर्ढेमठाधिपती विदेहस्वामी हे वासुदेवांच्या शिष्यपरंपरेतील होते. ही परंपरा श्रीसमर्थ > वासुदेव > विदेहस्वामी > अमृतेश्वर > पावन अशी आहे. वासुदेवांच्या कण्हेरी मठाची परंपरा अशी : श्रीसमर्थ > वासुदेव > माधव > पुरुषोत्तम > भीम > रघुनाथ. ह्यांतील शेवटचे पुरुष रघुनाथ ह्यांनी वाईजवळ पसरणी येथे मठ स्थापला.

ह्यांच्या *आत्मबोध* म्हणून १५ ओव्या आहेत. गीतेच्या नवव्या अध्यायातील पहिल्या १५ श्लोकांवर ह्यांचे समश्लोक आहेत. ह्यांची स्फुट पदरचनाही उपलब्ध आहे. ही सर्व रचना अप्रकाशित असून धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिरात उपलब्ध (सवामं. हस्त. सू., खं. १, २).

**वासुदेव–३** [का. अनु.] आरतीकार. ह्यांच्या दहा आरत्या *मराठी आरती* संग्रहात प्रसिद्ध झाल्या आहेत. पिता मोरेश्वर. मोरेश्वरसुत वासुदेव असा काही आरत्यांत निर्देश येतो. गणपतीवर चार आरत्या ह्यांनी केल्या आहेत, त्यावरून हे गणेशभक्त असावेत असे दिसते. दत्ताची व भागवताची ह्या दोन आरत्या विस्तृत आहेत. रचना प्रौढ व भारदस्त आहे.

**रचना : मु.** – आरत्या : गणपतीच्या – ४, जगदंबा – १, दत्तात्रेय – २, भागवत – १, सत्यनारायण – १, सूर्यदेव – १; मआ., पृ. ३११, ३३२, ३६२, ३६८, ४०८, ४११, ४१४, ४३२, ४४०.

**वासुदेव आनंद देशपांडे व नाडगौडा** [इ. स. चे. १९ वे शतक, प्रथमपाद] बखरकार.

**रचना : अमु.** – पेशवे यांची बखर; र. श. १७४३ / इ. स. १८२१; र. स्थ. : तालुका कऱ्हाड; रासमं.

**० वासुदेवकवी** – पहा **गोसावीनंदन**.

**० वासुदेव गोसावी** – पहा **वासुदेव–२**.

**वासुदेव पंडित / ० कृष्णतनय वासुदेव / ० कृष्णात्मज–१** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध व १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] कवी. भागवत-टीकाकार. तंजावरकडील त्रिवंदूर येथे राहणाऱ्या समर्थप्रशिष्य माधवस्वामींचे हे नातू. वडील कृष्णपंडित. वास्तव्य कुंभकोणमजवळील तिम्मगुडी येथे. पत्नीचे नाव मीनाक्षीअम्मा. ही देखील पतीच्या नावाने कवने करीत असे. हे तंजावरच्या तुळजेंद्रभूपाचे आश्रित होते. वासुदेव पंडितांनी भागवताच्या आठव्या आणि नवव्या स्कंधांवर रचना केली आहे. नवमस्कंधाच्या तंजावर संग्रहातील पोथीत स्वतः कवीनेच आपल्या कुटुंबाची विस्तृत माहिती दिली आहे (तंसम. हस्त. यादी, क्र. २, बा. १४३९).

**रचना : अमु.** – १. भागवत – नवमस्कंध; ग्रं. सं. ५८००; समाप्ती : 'शके १७१६ (इ. स. १७१४) आनंदसंवत्सर श्रावणमास ॥ शुक्ल पक्ष भृगुवार पंचमीस ॥ हा ग्रंथ पावला समाप्तीस ॥' तंसम. बा. १४३९, १४४१, १४४३; २. भागवत – अष्टम स्कंध (अंबाजी पंडित ह्यांच्या साहाय्याने); अ. २४, ग्रं. सं. २४००; पैकी अ. १–६ : ओ. सं. सुमारे १२००; वासुदेवकृत आरंभ : 'श. १७४८, व्यय संवत्सर, माघ मास पौर्णिमेस ॥ समाप्ती श. १७५०, सर्वधारी संवत्सर, मार्गशीर्ष मास शुक्ल नवमी सोमवारास ॥' तंसम. हस्त. यादी, क्र. २; बा. १४३८, १४४०.

**वासुदेव माधवदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९५०; पृ. ५०. **अमु.** – बोधपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वासुदेवस्वामी–१** [का. अनु.] पदकार. पूर्वाश्रमीचे वाटेगावकर स्वामी. हे मामलतदार व गवई होते. पुढे वेदान्ताचा अभ्यास करून वाटेगावी (जि. सातारा) श्रीभगवान वासुदेवाचे संस्थान स्थापून ह्यांनी चतुर्था-

श्रम घेतला. पुढे वासुदेवस्वामी म्हणून हे ओळखले जाऊ लागले. ह्यांची शिष्यशाखा कऱ्हाड व रत्नागिरी ह्या ठिकाणी आहे. ह्यांनी पदे रचली आहेत. त्यात भक्तीचा महिमा गायिला आहे.

**रचना : मु.** – पदे ६; संपा. ओक, वा. दा.; पदसंग्रह, भा. ३; मुंबई, १९०१; पृ. १४९–१५१. (कवीची माहिती; तत्रैव; पृ. १४९ तळटीप.)

**० वासुदेवस्वामी–२** – पहा **वासुदेव–२**.

**वासुदेवात्मज** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शुकरंभासंवाद; अनेकवृत्तात्मक; त्रु. पो.; मसंमं., हवना., पृ. १३६.

**विजय–१** – पहा **रामदास**.

**विजय–२ (कृष्णशिष्य) / ० कृष्णांकित–२ / ० वैजनाथ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**विजयगोपाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विठा–१ / ० नामयाचा विठा** [इ. स. चे १४ वे शतक] कवी. संत नामदेवांचा हा धाकटा मुलगा. इतर कुटुंबीय मंडळींप्रमाणे हाही काव्यरचना करीत असे. ह्याच्या पत्नीचे नाव साखराई असे दिले आहे. विठाने रचलेले ८५ अभंग *श्रीसकलसंतगाथेत* (संपा. का. अ. जोशी, पुणे, १९६७, आ. २) छापले आहेत (पृ. ४६९–४८०).

नामदेवांच्या कुटुंबात सर्वांनाच जन्ममरणाचा फेरा चुकविण्याची व पारमार्थिक सुखाचा ठेवा प्राप्त करून घेण्याची ओढ लागलेली होती. विठाही त्याला अपवाद नाही. विठोबाच्या चरणांची सेवा करण्यासाठी पंढरपुरास आल्यानंतर परमेश्वराने दूर लोटू नये, दुजाभाव धरू नये म्हणून पित्याने पूर्वपुण्याईने जोडलेल्या ठेव्याची पांडुरंगाला आठवण करून देताना तो म्हणतो : "कायावाचामनें जोडिलें जें बापें । तें दिधलें तुज पैं ठेवावया । तें देगा आमुचें नको करुं विचारु ।" आम्हांला तुझ्या चरणावर आमच्या पित्याने वाहिले आहे तेव्हा तू आमचा स्वीकार करावास अशा प्रकारची विनवणी तो करताना दिसतो. पंढरी कशी आहे तर, "देखुनी पंढरीच्या सुखा । मोक्षपद आलें फुका ।" नंतर पंढरपुरच्या यात्रेची फलश्रुतीही तो सांगतो. विठाने लडिवाळपणे विठ्ठलाशी केलेल्या या हितगुजामध्ये राग, लोभ, खंत, चीड, प्रेमाचे उमाळे, रुसवा अशा विविध भावच्छटांचे सहजगत्या प्रकटीकरण झालेले आहे.

विठाच्या नावावर उपलब्ध असलेल्या अभंगांपैकी त्याचे स्वतःचे कोणते व प्रक्षिप्त कोणते ह्यासंबंधी वाद आहे. ह्याबरोबरच विष्णुदासनामयाचा विठा ह्या नावावर समर्थवाग्देवतामंदिरात *जनीचे चरित्र* (अभंग २४), *नामदेवचरित्र* (ओ. सं. ९८) व *संतमालिका* अशी जी रचना सापडते (सवामं. बा. क्र. ७०२) ती व नव्याने उपलब्ध झालेले *नामयाचा नैवेद्य* हे प्रकरण (संदर्भ : भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४, पृ. ९७) इत्यादी कविता ह्याच कवीची असावी असेही मत व्यक्त होताना दिसते.

**० विठा–२** – पहा **विठा रेणुकानंदन**.

**विठा–३** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक अखेर] पदकार. गुरु : श्रीसमर्थशिष्य त्रिंबकराज (भालगाव मठ). त्रिंबकराजांवरचे ह्यांचे एक पद शं. श्री. देवांनी छापले आहे (श्रीसांप्रविवि., खं. १, पृ. ९३).

**विठा जैन** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**विठाबाई** [श. १७१४ / इ. स. १७९२ – ? ] संतकवयित्री. हिने रचलेल्या आत्मचरित्रपर अभंगांतून हिची बरीच माहिती सापडते. गाव पंढरपूर. वडिलांचे नांव रामप्पा नायक व आई संतुबाई. जन्म श. १७१४ आषाढ वैद्य चतुर्दशीस मंगळवारी पहाटेस झाला. वयात आल्यावर ही नको नको म्हणत असता पित्याने हिचा विवाह केला. पण संसारात मन न रमल्याने ती विठ्ठलमूर्ती घेऊन घराच्या बाहेर पडली व रानावनांतून हिंडू लागली. तेव्हा विठ्ठलाचा तिला असा दृष्टान्त झाला की, 'चिदंबर नावाने मी कुंदगोळ येथे वास्तव्य करून आहे. माझा भक्त राजाराम तुला भेटेल, त्याच्याबरोबर तू तिकडे जावेस.' रात्री दृष्टान्त झाला व सकाळी पाहते तो राजारामांची दिंडी वाटेवर. ह्या दिंडीबरोबर गावोगाव फिरत असता दोन महिन्यांनी कार्तिकी एकादशीला तिला चिदंबरस्वामींचे दर्शन झाले. स्वामींच्या दर्शनाने 'देहांतुनी निघाले मीच जाणा' अशी तिची विदेही अवस्था झाली. भानावर आल्यानंतर तिला पूर्वजन्माचे स्मरण झाले. त्या जन्मी आपण जनाबाई होतो, चिदंबर होते विठ्ठल, तर राजाराम होते नामदेव, हे तिला आठवले. चिदंबर हे दैवत आणि भक्तराज राजाराम हे तिचे गुरू होते. तिने आपले सर्व आयुष्य स्वामींच्या सेवेत घालविले. विठाबाई किती वर्षे हयात होती किंवा तिचा अंत कोठे आणि केव्हा झाला ह्याची माहिती मिळत नाही. पण तिचा आध्यात्मिक अधिकार मोठा होता असे तिच्या अभंगांवरून व हरि, निळा ह्या शिष्यांना तिने केलेल्या उपदेशावरून वाटते.

हिने ४००० अभंग व काही पदे रचल्याची माहिती मिळते. त्यांपैकी फक्त ६०० च अभंग व ६–७ पदे हिच्या अभंगाचे संशोधक डॉ. पंडित आवळीकर ह्यांच्या पाहण्यात आली. चिदंबरस्वामी-विषयक भक्तिभावाने तिची सर्व रचना व्यापलेली आहे. स्वामींचे अखंड ध्यान करीत असल्याने शब्दांतून साहजिकच ते रूप सगुण-साकार झालेले पाहण्यास सापडते. चिदंबरस्वामींच्या भक्तांच्या कथा मुख्य विषयाच्या अनुषंगाने रंगवीत असता भक्तराज राजारामांचे समग्र चरित्र ती सांगते. चिदंबरांची भेट घडेपर्यंतचे आपले चरित्र तिने स्वतःच रंगविले आहे.

विठाबाईने शास्त्रे, पुराणे ह्यांचा अभ्यास केलेला नाही, पण त्यांचे रहस्य, त्यांतले आत्मतत्त्व तिला पूर्णतया समजलेले तिच्या अभंगांवरून जाणवते. सरतेशेवटी भवाच्या पैलथडीला नेणाऱ्या नामाचे माहात्म्य ती सांगते : 'कलीयुगी हो नामापेक्षा मोठे नाही। योगयागयज्ञ तृणतुल्य ॥ योगयाग वर्ज करी। नाम वीदेही हो धरी ॥' नामाचा महिमा हा योगापेक्षा अधिक आहे हे तिने जाणले आहे. भक्तीचे सामर्थ्य सांगताना तिला मीराबाई, चोखामेळा, सावतामाळी, रोहिदास, तुकाराम अशा अनेक भगवद्भक्तांचे स्मरण होते. भक्तिरसाचा आविष्कार करणारे तिचे अभंग हृदयस्पर्शी आहेत. घरगुती आणि लौकिक जीवनातले दृष्टान्त देऊन ती आपले म्हणणे ठसविते.

हिची अभंगरचना प्रेमळ व प्रसन्न आहे. मराठी संतकवयित्रींत हिच्या उपस्थितीने नवी भर पडली आहे. जनाबाई, बहिणाबाई ह्यांच्या भक्ति-परंपरेचा वारसाच हिने पुढे चालविलेला दिसतो. डॉ. पंडित आवळी-करांनी विठाबाईवरील त्यांच्या लेखात विवेचनाच्या ओघात जे अभंग छापले आहेत तेवढीच हिची रचना मुद्रित. अन्य रचना अप्रकाशित आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : आवळीकर, पंडित; विठाबाईचे अभंग; जुवानसं., धारवाड, १९६४; पृ. २१८-२३२.

**विठा रेणुकानंदन / ० विठा–२ / ० रेणुकानंदन, विठ्ठल** [अंदाजे इ. स. चे सोळावे शतक] एकनाथपंचकातील देवी-उपासक संतकवी. नगर जिल्ह्यातील अकोळनेर हे ह्यांचे मूळ गाव. हे शुक्लयजुर्वेदी, वत्सगोत्री ब्राह्मण. ह्यांच्या वडिलांचे नाव मनोहरपंत बडवे. ते अकोळनेरचे कुळकर्णी होते. माहूर येथील रेणुका ह्यांची उपास्यदेवता. ह्यांना रेणुकादेवीच्या उपासनेचा लहानपणापासूनच विलक्षण छंद जडलेला होता. औरंगाबाद जिल्ह्यातील गोलटगाव हे त्यांचे आजोळ. येथे वयाच्या चौदाव्या वर्षी गावातील गुराख्यांच्या संगतीने मामांची

गुरे राखीत असता रानातील एका टेकडीवर रेणुकादेवीचे मंदिर दिसले. तेथे देवीच्या दर्शनात हे तन्मय असता त्यांना असा आदेश झाला की, 'माहूरला जाण्याची आवश्यकता नाही. मी येथेच आहे. येथेच माझी उपासना कर.' ह्यानंतर विठ्ठलांनी अखंडपणे देवीची उपासना केली. त्यांच्या एकनिष्ठ भक्तीवर देवी प्रसन्न होऊन त्यांच्यापुढे साक्षात प्रकट झाली. तिच्या दिव्य तेजाने ते दिपले; त्यांचे देहभान हरपले. देहभान आल्यावर त्यांनी नैमित्तिक उपासना पार पाडली आणि आनंदनिर्भर स्थितीत ते सवंगड्यांच्या मेळाव्यात सामील झाले.

रेणुकेचा कृपाप्रसाद प्राप्त करून घेतल्यावर विठ्ठलपंत आपणास रेणुकानंदन असे म्हणवून घेऊ लागले. माता-पित्यांच्या अत्याग्रहामुळे ह्यानंतर ते विवाहबद्ध झाले. परंतु ते त्यांच्या अकोळनेर गावी न राहता गोलटगावी स्थायिक झाले. पुढे देवीच्या आदेशानुसार केलेल्या सहस्रचंडी होमातून अर्धनारीनटेश्वराची मूर्ती प्रकटली आणि देवीने त्यांना आज्ञा केली की, 'आता तू पूजेसाठी गावाबाहेर दूर येण्याची आवश्यकता नाही. ह्या मूर्तीची देवघरात स्थापना करून तिची पूजा-अर्चा करीत राहा.' त्याप्रमाणे ह्या मूर्तीची पौष शुद्ध पौर्णिमेच्या दिवशी त्यांनी आपल्या देवघरात प्रतिष्ठापना केली. ह्याच मूर्तीला ते 'आई-आदिपुरुष' असे म्हणत असत. 'आई' म्हणजे जगन्माता भवानी आणि 'आदिपुरुष' म्हणजे जगत्पिता शिव. आपल्या आचरणाने समकालीन समाजापुढे परमार्थाचा आदर्श त्यांनी निर्माण केला व अनेकांना सन्मार्गदर्शन केले. तेथेच त्यांनी वृद्धपणी समाधी घेतली. पौष शुद्ध चतुर्दशी हा त्यांचा समाधिदिन (रा. चिं. ढेरे : गंगाजळी, पुणे, १९७२; पृ. १२–१४).

विठा रेणुकानंदांची स्फुट कविता – दहा-बारा अभंग व काही पदे – गोलटगावी 'देवीच्या वाड्यात' राहणाऱ्या त्यांच्या वंशजांच्या संग्रही आढळते. आई-आदिपुरुषाला उद्देशून केलेला वीस कडव्यांचा धावा व त्याला एकवीस कडव्यांचे उत्तर अशीही एक रचना तेथेच आढळून आली. ह्या धाव्यात त्यांची उत्कट मुमुक्षुता प्रकटली आहे. अल्प अशा ह्या रचनेवर त्यांच्या पारमार्थिक वाटचालीतील काही पावलांचे ठसे उमटलेले दृष्टीस पडतात. गुरूने शिष्याकडे कृपादृष्टी वळविल्यानंतर परमात्म्याचे तेजोमय विराट स्वरूप विठा रेणुकानंदांना कसे दिसले ते त्यांच्याच शब्दांत पाहण्यासारखे आहे : "देखों गलों जी सहज। मन संतोषाचें भोज। जें जें चिंतीत होतों गज। तें प्रत्यक्ष मज दाविलें ॥ काये सांगों कासयासारिखें। नाना वर्ण नाना वेखें। नाना अनुपम्य सुखें। मज मी देखें मजमाजीं ॥" हे दर्शन घडल्यानंतर "विठ्ठलीं विठ्ठल भेदला। आदिपुरुषीं मीनला। रेणुकानंदन सुखिया जाला। मग राहियला नित्यसुखें ॥" असा नित्य सुखाचा सोहळा अनुभवून हे उपकारापुरतेच उरले. रा. चिं. ढेरे ह्यांनी विवेचनाच्या ओघात ह्यांच्या पदांची अनेक कडवी उद्धृत केली आहेत.

ह्यांच्या नावावर *सीतास्वयंवरा*चा उल्लेख आढळतो. पण आज तरी हा ग्रंथ कोठे उपलब्ध असल्याचे दिसत नाही. विठा रेणुकानंदनांची अत्यल्प अशी ही रचना त्यातील आत्मप्रत्ययाची दृढता आणि स्पष्टता लक्षात घेता बहुमोलाची ठरते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : विठा रेणुकानंदन; भाइसमंइति., श. १८३६, पृ. ९८–९९. २. ढेरे, रा. चिं. : विठा रेणुकानंदन; गंगाजळी; पुणे, १९७२; पृ. ९–१४.

**० विठू कानडा** – पहा **विठू कानड्या.**

**विठू कानड्या / ० विठू कानडा / ० कानडिया विठ्ठल** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १०२.

**विठो / ० विठ्ठलनाथ–३** [का. अनु.] कवी. हे विठो कल्याणीचे राहणारे. परंपरा : निवृत्ति > ज्ञानदेव > सोपान > मालो > नरहरि > माधव > विठो. ह्यांनी *गुरुगीते*वरील टीका रचली आहे. ग्रंथाच्या अखेरीचे कवीचे निवेदन असे : 'गडगंगेचिये तटीं। श्रीगुरुभक्ताचिये निकटी। पूर्ण जाली टीका म्हराटी। गुरुगीता घनवृष्टी सुखाची ॥ ७१८॥ मालो सखा नरहरिस्वामी। माधव श्रीगुरु अंतर्यामीं। विठोसी नांदवी कल्याणधामीं। गुरुगीता आरामी रमविता ॥ ७३१॥'

**रचना : अमु.** – गुरुगीता; मूळ श्लोक १३१; टीका ओव्या ७३४; सवामं. बा. १०६६; हस्त. सू., खं. २.

**विठोबा–१** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, अखेर] कवी. बहिणाबाईंचा पुत्र विठोबा ह्याची तुकारामावरील आणि बहिणाबाईंवरील आरती उपलब्ध आहे (मसा., आ. ५, पृ. ८६७ टीप). बहिणाबाईंच्या आरतीत त्यांचा समाधिशक 'शत शोडशवरी द्वाविंशत' श. (१६२२) असा दिला आहे.

**विठोबा–२** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. पूर्ण नाव विठोबा ताहराबादकर. महिपतीबुवांचे पुत्र. बंधूंचे नाव नारायण. विठोबांस पदे रचण्याचा नाद होता. ह्यांस पंतकाव्याची फार आवड होती (मसा., आ. ५, पृ. ४८८).

**विठोबा–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**विठो विश्वनाथ** [का. अनु.] स्तोत्रकार.

**रचना : अमु.** – गणपतिस्तोत्र; सवामं. हस्त. सू., खं. २.

**विठ्ठल–१** [का. अनु.] कवी. ह्या विठ्ठलाचे *नामदेवाचा नैवेद्य* असे लहानसे प्रकरण उपलब्ध झाले असून त्यांच्या १०३ ओव्या आहेत. ह्यापैकी ७५ ओव्या गहाळ. शेवटची ओवी खालीलप्रमाणे : "विख्यात दास नामयाचा विठा। सरत जाला पै वैकुंठा। भक्तीप्रेमे दिधलीया वाटा। हरिचेरणें सदा वंदितीं ॥ १०३ ॥ इतिश्री नैव्येद्य नामदेवाचा संपूर्णमस्तु ॥" हे नामदेवांचे शिष्य असावेत किंवा नामदेवपुत्र विठोबाही असण्याची शक्यता आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मिरीकर, ना. य.; विठ्ठलकृत नामदेवाचा नैवेद्य; भाइसमंत्रै., व. २३, अं. ४, पृ. ९७–९८.

**विठ्ठल–२** [अंदाजे श. १७५१ / इ. स. १८२९] संतचरित्रकार कवी. काटोल (जिल्हा नागपूर) येथील राहणारे. देवीदास व जयंती ह्यांचे पुत्र. ह्यांनी *मधुपुरीमाहात्म्य* व *धर्मपुरीमाहात्म्य* असे दोन संतचरित्रपर ग्रंथ रचले आहेत. *मधुपुरीमाहात्म्यात* मोहपा येथे होऊन गेलेल्या स्वामी सच्चिदानंदांचे चरित्र वर्णन केले आहे (र. श. १७५१, फणिपूर). त्याचे एकूण १० अध्याय व १८२३ ओव्या आहेत. ह्या खेरीज धापेवाडा (जिल्हा नागपूर) येथील दुसरे एक संत कोलबाजी महाराज ह्यांचे चरित्र सांगणारा *धर्मपुरीमाहात्म्य* असा आणखी एक ग्रंथही ह्या कवीने रचला आहे. ह्यांच्या नावावर काही स्फुट कविताही सापडते (मसा., आ ५, पृ. ९९८ टीप व ९९९).

**विठ्ठल–३** [का. अनु.] कवी. पिता : त्र्यंबक. ह्यांच्या ग्रंथावरून गुरुपरंपरा मिळते ती अशी : वासुदेव > विठ्ठल > रामचंद्र त्र्यंबक > विठ्ठल.

**रचना : अमु.** – सहजस्थितिविलास; गो. का. चांदोरकर संग्रह. संककासू., पृ. १०१.

**० विठ्ठल–४** – पहा **दत्तवरद विठ्ठल.**

**विठ्ठल–५** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] पदकार. कवी दत्तनाथ उज्जनीकराचे हे शिष्य. ह्यांची कविता संख्येने अल्प असून सरस आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४२).

**विठ्ठल–६** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – १. रामाची आरती; मआ., पृ. ३७४. २. कृष्णाची आरती; मआ., पृ. ३६७.

० **विठ्ठल अनंतसुत** – पहा **अनंतसुत विठ्ठल–२.**

० **विठ्ठल अनंत क्षीरसागर** – पहा **विठ्ठल बीडकर.**

**विठ्ठल कवी–१** [का. अनु.] कवी. गुरूचे नाव केशव. कवीची *सखूचरित्र, शबर्याख्यान, नौकाक्रीडन* व *भानुदासचरित्र* ही चार साकी वृत्तातील काव्ये *अनेककविकृत लघुकाव्यमालेतून* मुद्रित झाली आहेत. आख्यानकारांच्या परंपरेतील एक बऱ्यापैकी रचनाकर्ता म्हणून विठ्ठल कवीचे नाव घेता येईल.

**रचना : मु.** – १. नौकाक्रीडनाख्यान; ग्रं. सं. ३८; अकलकामा., भा. २; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६; पृ. ३२–३५. २. भानुदासचरित्र; ग्रं. सं. ५१; अकलकामा., भा. ४; संपा. केळकर ना. चिं., ओक, दा. के.; मुंबई, १९०३; पृ. २२६–२३०. ३. शबर्याख्यान; ग्रं. सं. २६; अकलकामा., भा. २; पृ. १३०–१३३., ४. सखूचरित्र; ग्रं. सं. ४६; अकलकामा., भा. ४; पृ. ५०–५४.

० **विठ्ठल कवी–२** – पहा **विठ्ठल बीडकर.**

**विठ्ठल कळपूरकर** / ० **कळपूरकर विठ्ठल** [अंदाजे श. १५३६ / इ. स. १६१४] कवी. गोत्र श्रीवत्स, शाखा आपस्तंब, वृत्ती व्यापारी, वऱ्हाडातील कळपूर येथे राहणारे. ह्यांनी लिहिलेल्या *रासक्रीडा* (पद्यसंख्या २३६; र. श. १५३६) काव्याची त्रुटित प्रत धुळे येथील राजवाडे संशोधन मंदिरात पाहावयास मिळते. ह्या काव्याच्या शेवटल्या श्लोकात ग्रंथातील पद्ये 'दर्शनाग्निनयन' म्हणजे २३६ आहेत असे कवी सांगतो. ग्रंथाचा रचनाकाल "कुमारवक्त्राग्निशरेंदुयोगें । शके गणावीं विपरीतमार्गे ॥ आनंदसंवत्सर माघमासीं । नीशीशवारी तिथिपौर्णिमेसी ॥२३३॥" ह्यात सांगितल्याप्रमाणे 'अङ्कानां वामतो गतिः' ह्या नियमाने हा श. १५३६ येतो. श्लोक अनेकवृत्तात्मक आहेत.

आपल्याला ठाऊक असलेल्या बीडकर विठ्ठलांच्या सुमारे ५० वर्षे अगोदर हे दुसरे विठ्ठलकवी होऊन गेले. ह्या काव्याचे *रासक्रीडा* हे नाव *सरस्वतीमंदिर* मासिकातील (इ. स. १९०९) राजवाड्यांच्या लेखात आहे; पण उपलब्ध श्लोकांवरून हे नाव का पडले ते बरोबर कळत नाही. उपलब्ध श्लोकांत कंसाने पूतनेला यशोदेकडे धाडले हा प्रसंग, राधा-कृष्ण ह्यांच्यातील भांडण, मग राधिकेची विरहव्याप्त अवस्था इ. प्रसंग वर्णिलेले आहेत. पंडित कवींच्या रूढ चमत्कृतियुक्त शैलीचाच कवीने अवलंब केलेला दिसतो. उदा., "दुरजनी रजनी सहकामिनी । करमिजे रमिजे सगुणी जनी ॥ कुहरिणी हरिणी हरिणा नवे। विचरती चरती अतिलाघवे ॥ २६॥" काही श्लोक मात्र सोपे व सरस उतरले आहेत.

'ज्याचा काळ निश्चित माहीत आहे अशा श्लोकरचनेत ह्या काव्याचा पहिला क्रमांक लागेल.' असे ह्या काव्याचे संपादक ज. शा. देशपांडे म्हणतात (प्रामक., खं. १, पृ. ६३). म्हणून ह्या काव्याला ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्व आहे.

**रचना : मु.** – रासक्रीडा; र. का. : श. १५३६; ग्रं. सं. २३६; त्रु.; संपा. देशपांडे, ज. शा.; प्रामक., खं. १; मुंबई, १९६२; पृ. १–१४; कविपरिचय : तत्रैव, परिशिष्ट १, पृ. ६३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : कळपूरकर विठ्ठल; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ३७३–३७४. २. राजवाडे, वि. का. : विठ्ठल कवी; सरस्वतीमंदिर, कार्तिक शु. १८३१; पृ. २–४.

**विठ्ठल (काशीराज)** / ० **रंगानुजतनुज** [अंदाजे श. १६०० / इ. स. १६७८ – श. १६५० / इ. स. १७२८] कवी. श्रीधर कवीचे चुलतचुलते आत्यास्वामी ह्यांचे हे पुत्र. ह्यांनी काही पदे रचली आहेत. पदांत हे आपणांस 'रंगानुजतनुज' म्हणवितात (मसा., आ. ५, पृ. ४३८).

**विठ्ठल किंकर–१** [अंदाजे श. १७१२ / इ. स. १७९० च्या अगोदर] कवी. *पाताळकांड रामायण* ह्या ग्रंथाचा कर्ता. विठ्ठल किंकर हे नाथसंप्रदायाच्या पाच प्रमुख शाखांपैकी एका शाखेतले. हे वऱ्हाडातील यवतमाळ जिल्ह्यातील पुसद येथील देशपांडे. मूळचे नाव भिकाजी. *पाताळकांडाच्या* १८ व्या अध्यायात आपल्या कुटुंबियांची ते माहिती देतात. पिता गोविंद, माता वेल्हाळ, पत्नी हंसाबाई व पुत्र दोन, वडील जयराम व धाकटा श्रीनिवास. विठ्ठलाची उपासना ह्यांना प्रिय होती, त्यामुळे स्वतःस ते विठ्ठल किंकर असे म्हणवून घेत. ह्यांची परंपरा अनंत > प्रल्हाद > नागया > एकनाथ > नाना > विठ्ठल किंकर > चिन्मयानंद > सहजानंद अशी असून ही शाखा चिन्मयानंदांची म्हणून प्रसिद्ध आहे. परंपरेचा मठ उमरखेड येथे आहे. विठ्ठल किंकरांचा मठ व समाधिमंदिर पुसद येथे आहेत. ह्यांच्या *पाताळकांड रामायणाची* प्रत श. १७१२ (इ स. १७९०) मधली आहे. त्यावरून ग्रंथकार श. १७१२ पूर्वी होऊन गेले असावेत असे अनुमान करता येते.

विठ्ठल किंकरांचा शिष्य नारायण ह्याने गुरूवर केलेल्या आरतीत, गुरूने केलेल्या *भारतावरील टिपणाचा* व *समओवी* गीतेचा उल्लेख केला आहे. पैकी *भारतावरील टिपण* उपलब्ध नाही. *समओवी गीतेचे* पाच अध्याय उमरखेडच्या मठात व उरलेले पुसद मठात आहेत. हिची प्रत, ह्यांचे पुत्र जयरामबावांच्या अनुमतीने केलेली (श. १७१२ तील), 'शिवराम, गोविंद देशपांडे' ह्यांच्या हस्ताक्षरातील, उपलब्ध आहे.

*पाताळकांड रामायण* ग्रंथ यवतमाळ जिल्ह्यातील फाळेगाव येथील भगवंतराव बोधनकर ह्या वृद्ध गृहस्थांच्या संग्रहात डॉ. य. खु. देशपांडे ह्यांना मिळाला. तो ओवीबद्ध असून त्याचे अठरा अध्याय आहेत. अधलामधला बराच भाग गहाळ झाला आहे. ह्या ग्रंथाची स्फूर्ती आपण कान्हो त्रिमलदासांच्या *पाताळकांड रामायण* ग्रंथावरून घेतली असे कवी सांगतो. ह्या कथेस गीर्वाण किंवा अन्य वाङ्मयात आधार दिसत नाही. सध्या उपलब्ध असलेल्या त्रुटित पोथीत १४०० च्या वर ओव्या आहेत. त्रिमलदासांचा १० अध्यायांचा ग्रंथ अनेक उपाख्यानांची भर घालून विठ्ठल किंकरांनी १८ अध्यायांचा केला आहे. प्रस्तुत ग्रंथ काव्य ह्या दृष्टीने उल्लेखनीय.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, य. खु. : विठ्ठल किंकर कृत पाताळकांड रामायण; भाइसंमंत्रै., व. २०, अं. १; पृ. १३.

**विठ्ठल किंकर–२** [का. अनु.] पदकार. रामदाससंप्रदायी रोकडाराम ह्यांचे हे शिष्य. 'गुरु रोकडाराम तो रामदासी । महा सिद्ध योगी स्वरूपी उदासी ॥' असे रोकडारामांवरचे ह्यांचे एक अष्टक मुद्रित (श्रीसांप्रविवि., खं. १; पृ. ७७–७८).

**विठ्ठल केरीकर** / ० **विठ्ठल नरसिंह तथा विठ्ठल नरसिंह साखळकर** [इ. स. १७१५-१७८९] कवी. ह्यांचे पूर्ण नाव विठ्ठल नरसिंह सांखोळकर. काश्यपगोत्री, गौडसारस्वत ब्राह्मण. गोव्यातील पेडणे महालामधल्या केरी गावचे रहिवासी म्हणून केरीकर ह्या नावाने ते ओळखले जातात. कुलदैवत मंगीश. सोहिरोबा आंबिये ह्यांचे समकालीन. हे विद्वान असून काशीच्या पंडितांकडून ह्यांनी मानपत्र मिळविले होते. पुढे सावंतवाडीच्या दरबारातही ह्यांना स्थान मिळाले. सावंतवाडीचे तिसरे राजे खेमसावंत (इ. स. १७५५ ते १८०३) ह्यांच्या काळात आंध्रकवि गोपाळ कुंदावोझ्झ ह्यांनी *सावंतविजय* नावाचे एक संस्कृत काव्य लिहिले आहे. त्याचे मराठी ओवीबद्ध भाषान्तर (ओ. सं. ९०७) इ. स. १७८१ साली ह्यांनी केले (*सावंतवाडीचा इतिहास*, पृ. ९४).

ह्यांची *वामनचरित्र, शक्रंभासंवाद, कबरिकथा, गजगौरीव्रत* इत्यादी आख्याने व पदे *काव्यसंग्रहातून* प्रसिद्ध झाली आहेत. ह्यांची स्फुट कविता ओवीबद्ध, आर्याबद्ध, तसेच श्लोक, पदे, आरत्या, दिंड्या, साक्या अशा स्वरूपाची आहे. पदांवरून हे प्रेमळ हरिभक्त होते आणि ह्यांनी गुरूपदेश घेतला होता हे स्पष्ट होते. गोव्यातील एका दप्तरात मिळालेल्या (इ. स. १८७३) हस्तलिखित संग्रहात विठ्ठल नरसिंहांची

पदे असून त्यांतील एक पद म्हणजे होनाजी बाळाच्या नावावर ओळखली जाणारी 'घनश्याम सुंदरा' ही प्रसिद्ध भूपाळी आहे. गोमंतकातील एक कवी दामोदर अच्युत कारे ह्यांनी केरीकर व होनाजी ह्यांच्या काव्यरचनेचे अंतरंग तपासून ह्या भूपाळीचा कर्ता विठ्ठल नरसिंह कवीच होय असे पुराव्यानिशी सिद्ध केल्याचे ना. भा. नायक सांगतात (गोमका., गोवा १९६९, पृ. १७–१८).

कवीची काव्यरचना सुबोध, सरस असून शब्दयोजना वेधक आहे. त्यांच्या काही आर्या मोरोपंती थाटाच्या आहेत. मात्र 'विद्वत्ता जितकी स्पष्ट दिसते, तितके कवित्व दिसत नाही' असा अभिप्राय ज. र. आजगांवकर ह्यांनी व्यक्त केला आहे.

**रचना : मु.** – १. कबीरकथा; २. गजगौरीव्रत; आर्या ७६; अकलकामा., भा. ४, पृ. १२१–१२७; ३. वामनचरित्र; आर्या ९५; ४. शुकरंभासंवाद; आर्या ४९; ५. पदे सुमारे ६०; कासं., क्र. २५. **अमु.** – सावंतविजय; ओ. सं. ९०७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : विठ्ठल नरसिंह; मकच., खं. २, १९१३; पृ. ११७–१२२.

**विठ्ठल गलंड** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] वैद्यक-ग्रंथकार. वैद्यकावर मराठीत ग्रंथरचना करणारा लेखक म्हणून विठ्ठल गलंडचे नाव विख्यात आहे. स्वतःचा उल्लेख विष्णु आणि विठ्ठल अशा दोन्ही नावांनी हे करतात. गलंड हे ह्यांचे उपनाव असून 'गलंडेया महादेव पंडिताचा पुत्र' असा ह्यांनी स्वतःचा निर्देश केला आहे. श. १२५०/इ. स. १३२८ च्या आसपास हे ग्रंथरचना करीत होते, असे नव्या संशोधनावरून सिद्ध झाले आहे.

ह्यांच्या नावावर *रसराजलक्ष्मी* व *रससिंधु* हे दोन संस्कृत ग्रंथ असून *वैद्यचंद्रचकोरिका*, *रसकौमुदी*, *वैद्यसारसंग्रह*, *हितोपदेश*, *रसरत्नप्रदीप* हे वैद्यकविषयातील मराठी ग्रंथही आहेत. शकाची १२–१३ वी शतके हा रसवैद्यकावरील ग्रंथनिर्मितीचा समृद्धिकाल होता. विठ्ठलांच्या वरील ग्रंथात, आयुर्वेदावरील त्यांचा अधिकार दिसून येतो. *रसकौमुदी*च्या श. १४५६ मधल्या ह्यांच्या पणतवाने केलेल्या प्रतीवरून डॉ. श्री. रं. कुळकर्णी ह्यांनी प्रस्तुत ग्रंथाचे संपादन केले आहे (हैद्राबाद, १९५७). [⇨ ३.] रामराजकृत *रसरत्नप्रदीप* ह्या संस्कृत ग्रंथाचे ह्यांनी केलेले भाषान्तर वि. का. राजवाडे ह्यांनी *भारत इतिहास संशोधक मंडळाच्या ग्रंथमाले*तून प्रसिद्ध केले होते. ह्यांच्या ग्रंथांतून भाषेचे यादवकालीन विशेष स्पष्ट होतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कुळकर्णी, श्री. रं. : विठ्ठल गलंड विरचित 'रसकौमोदि'; हैद्राबाद, १९५७.

**० विठ्ठल चित्रकवि** – पहा **विठ्ठल बीडकर.**

**विठ्ठलतनय / ० विठ्ठलतनयश्याम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – डफगाणे, रामपर पद, बोधपर पद इ. रचना; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. २.

**० विठ्ठलतनयश्याम** – पहा **विठ्ठलतनय.**

**विठ्ठलदास–१** [का. अनु.] कवी. यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्यांच्या *सखिपुस्तक* ह्या ग्रंथाच्या शेवटी 'इति श्री विठ्ठलदासकृत प्राकृत शृंगार हास्योत्कट सखि पुस्तकं संपूर्ण' असे म्हटले आहे. त्यावरून ही शृंगारप्रचुर रचना असावी.

**रचना : अमु.** – सखिपुस्तक; श्लो. सं. ३००; गरुडगर्वहरण, भक्तलक्षण, रामपर व ज्ञानपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. २, ३.

**० विठ्ठलदास–२** – पहा **विठ्ठल बीडकर.**

**विठ्ठलदास–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. जानकीस्वयंवर; श्लोकबद्ध, अपूर्ण, सर्ग ७, श्लो. सं. सुमारे ३००; २. रुक्मिणीस्वयंवर; प्रसंग १–४; ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**विठ्ठलदास–४** [का. अनु.] कवी. गुरू : धुंडी.

**रचना : अमु.** – रासक्रीडा; संककासू., पृ. १०१.

**विठ्ठलदास–५** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. ह्यांची स्फुट रचना जगनाडे ह्यांच्या वहीत उपलब्ध (मसा., आ. ५, पृ. ८०६).

**विठ्ठलदास सोम** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – एकादशीमाहात्म्य व पदे; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १०१.

**विठ्ठलदासी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ५०.

**विठ्ठल दीक्षित** [का. अनु.] कवी. समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहात कवीची *वल्लभाष्टक* आणि *सप्तश्लोकी* (संस्कृत) व *गीताकडके* (मराठी) अशी रचना सापडते. ह्यांच्या *काव्यसंग्रहा*तील मुद्रित कवितेचा वि. ल. भावे ह्यांनी उल्लेख केला आहे (मसा., आ. ५, पृ. ३८४ टीप).

**विठ्ठलदीक्षितसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**विठ्ठल नंदन** [का. अनु.] कवी व टीकाकार.

**रचना : अमु.** – १. सप्तशती टीका; भाइसमं. हस्त. सू., पृ. ३०८; चंडिकामाहात्म्य अथवा सप्तशती; प्रत श. १७५९; सवामं. बा. १७२१. २. श्लोक व पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० विठ्ठल नरसिंह तथा विठ्ठल नरसिंह साखळकर** – पहा **विठ्ठल केरीकर.**

**विठ्ठल नरसी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १०१.

**विठ्ठल नरहरी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – विठ्ठलपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विठ्ठलनागेशात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – संतलक्षणपद व इतर पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विठ्ठलनाथ–१** [अंदाजे इ. स. १६०० ते १७००] कवी. *अश्वमेध*-कर्त्या विठ्ठलनाथाची माहिती *महाराष्ट्रसारस्वत*कार देतात (मसा., आ. ५, पृ. १८७ टीप). ह्यांचे गुरू गणेशनाथ. हे सारसी (उज्जैन) येथील होते. "सद्गुरु माझा गणेशनाथ सारशात राहतो। ऐका रसाळ 'अश्वमेध' विठ्ठलनाथ गातो ॥" असा ह्यांनी आपल्या ग्रंथात गुरूंचा उल्लेख केला आहे. गो. का. चांदोरकरांनी *गजगौरीव्रत* हा काव्यग्रंथ ह्यांच्या नावावर दिला आहे (संककासू., पृ. १०१). ह्यांची पदरचनाही आढळते (सवामं. हस्त. सू., खं. १, २).

**विठ्ठलनाथ–२** [का. अनु.] कवी. सारस्वत ब्राह्मण. कोल्हापूरनजीक आजरे गावी राहात असत. ह्यांची आठ पदे प्रसिद्ध झाली आहेत. श्रीकृष्णावरील 'राधिकेचा रंग पाहुनी। कृष्ण दंग जाहला ॥' हे पद विशेष प्रसिद्ध आहे.

**रचना : मु.** – पदे – ८; संपा. ओक, वा. दा.; पदसंग्रह, भा. २; मुंबई, १८९८; पृ. ३२–३३.

**विठ्ठलनाथ–३** – पहा **विठो.**

**विठ्ठल पुरंधर** [का. अनु.] ग्रंथकार. ह्यांस कर्नाटकात नेमणूक होती, असे *अर्वाचीन कोश*कार म्हणतात.

**रचना : अमु.** – बारामास; शं. श्री. देव संग्रह; संककासू., पृ. १०२.

**विठ्ठल बीडकर / ० विठ्ठल अनंत क्षीरसागर / ० विठ्ठल कवी–२ / ० विठ्ठल चित्रकवि / ० विठ्ठलदास–२** [अंदाजे श. १५५०/इ. स. १६२८ – श. १६१२/इ. स. १६९०] कवी. संपूर्ण नाव विठ्ठल अनंत क्षीरसागर. आश्वलायन ऋग्वेदी ब्राह्मण. गोत्र कौशिक. धंदा व्यापाराचा. उपास्य दैवत पंढरीनाथ. हे पंढरीची वारी नेमाने

करीत असत. म्हणून स्वतःला काव्यात ते कोठेकोठे 'विठ्ठलदास' असे म्हणवितात. राहणार बीडजवळील गौरीपूर गावी. नव्याने उपलब्ध झालेल्या ह्यांच्या *कमला-शारदा-संवाद* ह्या काव्यात गोदाकाठीचे श्रीपूर (शट्टागा) येथे ह्यांचे वास्तव्य असल्याचा उल्लेख आहे.

ह्या विठ्ठल बीडकरांच्या नावावर १. *रुक्मिणीस्वयंवर*, २. *पांचालीस्तवन*, ३. *सीतास्वयंवर*, ४. *रसमंजरी*, ५. *द्रौपदीवस्त्रहरण*, ६. *विद्वज्जीवन*, ७. *बिल्हणचरित्र*, ८. *स्फुट पदे* (मु.), ९. *कमला-शारदा-संवाद* (अमु.) असे नऊ ग्रंथ आहेत. आपल्या सर्व ग्रंथांवर आपले नाव, गाव व इतर माहिती हे देतात, पद्यसंख्याही देतात. मुद्रित ग्रंथ *काव्य-संग्रह* आणि *काव्येतिहाससंग्रह* ह्यांतून छापलेले आहेत.

उपलब्ध काव्यात *पांचालीस्तवन* हे पहिले होय. ह्याचे २३ श्लोक आहेत. ह्यानंतर त्यांनी *रुक्मिणी-स्वयंवराची* रचना केली. ह्या काव्यावर एकनाथांच्या *रुक्मिणी-स्वयंवर* व *भावार्थरामायण* ह्या काव्यांची छाप आढळते. निरनिराळी वृत्ते, चमत्कृतिजनक यमके व अनुप्रासादी अलंकार ह्या काव्यांत फार योजलेले आहेत. चित्रकाव्याचे विविध बंधही ह्या काव्यांत आहेत. उदा., द्वादशकमलबंध (१:७), चामरबंध (४:२२). चमत्कृतिपूर्ण यमकांच्या रचनेतील हा एक प्रतिलोम यमकाचा नमुना पहा : "वीराजते मत्त उदार पाहें । वीरा घरीं शक्ति शराव साहे । हे सावरा शक्ति शरीं धरावी । हें पारदा उत्तम तेज रावी ॥"

ह्यांच्या *सीतास्वयंवर* ह्या काव्याची रचना संस्कृत महाकाव्याच्या धर्तीवर सर्गबद्ध आहे. "कांहीं 'श्रीहनुमंतनाटककथा', कांहीं 'रघूवंशि'-ची । कांहीं आदिकविप्रमेयरचना, कांहीं गिरा देशिची ॥" असे कवी म्हणतो. ह्या काव्यात संस्कृताप्रमाणे मराठीतील काव्यरचनेचाही आधार घेतला आहे. मुक्तेश्वर, नागेश ह्यांच्या रचनेचा परिणाम ह्या काव्यावर झालेला आढळतो. कवी आपल्याच आधीच्या *रुक्मिणी-स्वयंवरा*तील शब्द व चरणच्या चरण ह्या काव्यात उतरवितात. वस्तुनिष्ठतेमुळे काव्यातील वर्णने केवळ यादीवजा, निर्जीव वाटतात. त्यात व्यक्तित्वाचा ठसा उमटत नाही. घटनांचे निवेदन निर्विकारपणे झाल्याने भावनाविष्कार जाणवत नाही. व्यक्तिवर्णने सांकेतिक आहेत. [⇨ ३.]

*विद्वज्जीवन* ह्या ग्रंथाचा मूलाधार *भागवताच्या दशमस्कंधा*तील कृष्णकथा हा आहे. ह्यात कवी म्हणतो "न जाणें मी छंदें, विशद यमकें बंधरचना । न जाणें मी काव्यें, नवरसअलंकारसुचना ॥" प्रत्यक्षात मात्र, ही सर्व सामग्री कवीजवळ आहे व ह्या आपल्या साहित्यशास्त्रीय ज्ञानाचे त्यांनी येथे प्रात्यक्षिक दाखविले आहे. ह्या काव्यात वृत्ते, शब्दालंकार, अर्थालंकार विपुल स्वरूपात आहेत.

*रसमंजरी* हे भानुदत्ताच्या [हा मैथिली होता. ह्याच्या ग्रंथलेखनाचा काल तेराव्या शतकाच्या शेवटी किंवा चौदाव्याच्या आरंभी असावा.] साहित्यशास्त्रीय संस्कृत ग्रंथाचे भाषान्तर आहे. विठ्ठलकवींचे संस्कृत भाषेचे ज्ञान व त्यांची व्युत्पन्नता ह्या भाषान्तर-ग्रंथावरून सिद्ध होते.

*द्रौपदीवस्त्रहरण* ह्या काव्यात *पांचालीस्तवन* ह्या आधीच्या काव्यातले चरण येतात. ह्यांच्या नावावर *काव्यसंग्रह*कारांनी आणखी एक *द्रौपदीवस्त्रहरण* दिले आहे. पण त्यात कवीचा नामोल्लेख नसल्यामुळे त्याचे जनकत्व संशयित आहे. कानोले ह्यांना विठ्ठल कवीचे *कमला-शारदा-संवाद* हे ८१ श्लोकांचे काव्य नव्याने उपलब्ध झालेले आहे. ह्यात लक्ष्मी व शारदा ह्यांच्यातील वाद रंगविला आहे.

*बिल्हणचरित्र* हे ह्यांचे काव्य इतर रचनेपेक्षा वेगळे जाणवते. ही लौकिक विषयावरील रचना आहे. ११ व्या शतकातील बिल्हणकवीच्या *चौरपंचाशिका* ह्या संस्कृत काव्याचे हे भाषान्तर होय. ह्यात बिल्हण व त्यांची शिष्या राजकन्या शशिकला ह्यांचे प्रेमप्रकरण वर्णिले आहे. रचना वसंततिलका वृत्तात आहे. चित्ररचनेचा वापर केलेला नाही. कवीच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे कवीची सर्व माहिती आलेली नाही. फक्त नामोल्लेख येतो. ह्या कारणांमुळे *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांनी हे काव्य विठ्ठल कवींचे नसावे अशी शंका व्यक्त केली आहे (मसा., आ. ५, पृ. ३८४).

ह्यांनी शंकराचार्यकृत *सौंदर्यलहरी*चे श्लोकबद्ध भाषान्तरही केले आहे. ह्या टीकेचे १२२ श्लोक असून शेवटी विठ्ठलाचे नाव येते. त्यामुळे ह्याही काव्याचा कर्ता हाच विठ्ठल आहे की इतर कोण आहे हे खात्रीपूर्वक सांगणे कठीण ! ह्यांच्या नावावर *काव्यसंग्रह*कारांनी *कूटसंग्रह* (८ कडवी) ही एक रचना दिली आहे. ह्या रचनेचे जनकत्वही संशयास्पद आहे.

ह्यांच्या सर्व रचनेची एकूण वैशिष्ट्ये म्हणजे चित्रकाव्यरचना व छंदशास्त्रनैपुण्य. ह्यांनी आपल्या पांडित्याच्या बळावर संस्कृतातील नवी वृत्ते मराठीत आणली, शब्दकुसरीचे अनेक प्रकार हाताळले. ह्यांच्या अवघड बंधरचनेविषयी मोरोपंत *सन्मणिमाले*त म्हणतात : "विठ्ठल कविच्या भलता लंघू न शकेचि चित्रकूटातें ।" अशा चमत्कृतीच्या हव्यासामुळे ह्यांची रचना वाचकांपर्यंत पोहोचली नाही, तिला प्रतिसाद मिळाला नाही. त्यामुळे ह्यांना फारशी द्रव्यप्राप्तीही झाली नसावी. म्हणूनच ते "वाग्देवी ! उदरानिमित्य सदरा म्यां पाहिल्या सुंदरा । पैं नोहे जठराग्निशांति विधुरा आला कली पाहरा ॥" असे उद्गार हताशपणे काढतात. ह्यांच्या रचनेत सर्वत्र कारागिरी आहे, असे वाटते. त्यात कलेचा जिवंतपणा जाणवत नाही. भावोत्कट काव्याने निर्माण होणारा काव्यानंद ह्यातून मिळत नाही. *महाराष्ट्रसारस्वत*कारांचे विठ्ठलकवीविषयीचे पुढील उद्गार ह्यास पुष्टी जोडतात : "विठ्ठलाला कवित्वाचे अंगचे वारे दिसत नाही. तो थोडासा मारूनमुटकून बनलेला कवि आहे." (मसा., आ. ५, पृ. ३७६). समकालीनांपैकी रघुनाथपंडित, सामराज, नागेश ह्या पंडिती परंपरेतील कवींशी विठ्ठलाची तुलना केल्यास रचनेचे वैपुल्य हे विठ्ठलाजवळ अधिक असले तरी वस्तुनिष्ठ आणि विद्वज्जड रचनेमुळे सामराज, रघुनाथपंडित ह्यांच्यापेक्षा तो काव्यगुणात खालच्या पायरीवरचा ठरतो.

**रचना : मु.** – १. द्रौपदीवस्त्रहरण, क्र. १; र. श. १६०२; ग्रं. सं. २३१; २. पांचालीस्तवन; श्लो. सं. २३; र. श. १५९६; ३. रसमंजरी; भानुदासाच्या संस्कृत 'रसमंजरी'चा अनुवाद; र. श. १६०१; उल्लास ३, ग्रं. सं. १२२; ४. रुक्मिणीस्वयंवर; र. श. १५९६; स. ७, ग्रं. सं. ३५१; ५. विद्वज्जीवन; उल्लास ७, ग्रं. सं. २५६; कासं., काइसं.; ६. सीतास्वयंवर; र. श. १५९९; स. ७, ग्रं. सं. ३६३; संपा. पंगु, द. सी.; कोल्हापूर, १९५१. **अमु.** – १. कमला-शारदा-संवाद; र. श. १६०६; श्लो. सं. ८१; २. पदपदांतरे. **शंका.** – १. कूटसंग्रह; कासं.; २. द्रौपदीवस्त्रहरण, क्र. २; ग्रं. सं. ४३; ३. बिल्हणचरित्र : 'चौरपंचाशिका' ह्या संस्कृत काव्याचे भाषान्तर; ग्रं. सं. ५६; कासं. २५; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६; ४. सौंदर्यलहरी; शंकराचार्यकृत 'सौंदर्यलहरी'चे भाषान्तर; श्लो. सं. १२२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : विठ्ठल चित्रकवि; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ४००–४२४. २. कानोले, वि. अं. : विठ्ठल कवी बीडकर ह्यांचे एक अप्रसिद्ध काव्य : कमला-शारदा-संवाद; प्रतिष्ठान, मे १९७३; पृ. २३–३१; ३. जोग, रा. श्री. (संपा.) : मवाइ., खं. ३; मसाप., पुणे, १९७३; पृ. २२२–२२५. ४. पंगु, द. सी. : प्रस्ता., सीतास्वयंवर (पाठशुद्ध प्रत); कोल्हापूर, १९५१; पृ. १–३१.

**विठ्ठल ब्रह्मानंद** [का. अनु.] टीकाकार.

**रचना : अमु.** – चतुःश्लोकी भागवत टीका; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ९३.

**० विठ्ठल रंगमूर्ति** – पहा **आत्यास्वामी.**

**विठ्ठलराव शिंदे पिंगरेकर** [का. अनु.] शाहीर. ह्यांनी रचलेले शृंगाररसयुक्त ख्याल, टप्पे, ठुमऱ्या, छक्कड इ. उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४४).

**विठ्ठल रुद्र** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – तुळसीमाहात्म्य; वि. ल. भावे संग्रह, संककासू., पृ. १०२.

**विठ्ठलसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**विठ्ठलसुत बलवत्कवी** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – गणपती, दुर्गा, नृसिंह, माहेश्वरी, शंकर, श्रीराम, सत्यनारायण इ. सात आरत्या; मआ., पृ. ३६१, ३८०, ३८९, ४१६.

**विठ्ठलसुत शामा (रामदासी)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शिबीचक्रवर्तीची कथा; ओ. सं. १४०; सवामं. हस्त. सू., खं. २.

**विठ्ठलसुतात्मज** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – अंबेची आरती; मआ., पृ. ३२३.

**विठ्ठलहरिसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – रामाची आरती; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विठ्ठलात्मज** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – दत्त, तुळसी, शंकर, कृष्ण ह्यांच्या आरत्या; मआ., पृ. ३१३, ३६६, ३९५, ४०४.

**० विदेह** – पहा **विदेहस्वामी.**

**विदेहस्वामी / ० विदेह** [का. अनु.] रामदासी कवी. कण्हेरी मठाधिपती समर्थशिष्य वासुदेवस्वामींचे हे शिष्य. ह्यांचे एक आत्मचरित्रपर पद शं. श्री. देव ह्यांनी छापले आहे (सवामं. बा. १३०). त्यावरून ह्यांच्या पित्याचे नाव विनायक होते असे कळते. विदेह आणि विश्वंभर असे हे दोघे बंधू होते. त्यांचे वास्तव्य काशीक्षेत्री असे. विश्वंभर गृहस्थाश्रमी झाले व विदेह ब्रह्मचारीच राहिले. ह्यांनी बदरिकाश्रम अनुष्ठान केले होते. तेथे ह्यांना साक्षात्कार झाला की, दक्षिणप्रांती श्रीरामदासांनी अनेकांचा उद्धार केला; त्यांचे शिष्य वासुदेव ह्यांना प्रत्यक्ष श्रीगुरूचाच अधिकार प्राप्त झाला आहे; त्या वासुदेवांना शरण जा, म्हणजे ते तुम्हांला तुमच्या नावाप्रमाणे खरोखरच विदेही स्थितीला नेऊन पोचवतील. त्याप्रमाणे ह्यांनी वासुदेवांना गुरू केले. रामदासी परंपरेतील मर्डे मठाची स्थापना ह्यांनी केली. ह्यांचे शिष्य अमृतेश्वर हेही रामदासीपंथीयांत विख्यात आहेत. विदेहस्वामींनी पदरचना केली आहे.

**रचना : अमु.** – पदपदांतरे, सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**विदेही – बल्हो** [का. अनु.] महानुभाव टीकाग्रंथकार. ह्यांनी केलेली *सूत्रपाठा*वरील गद्य टीका महानुभाव वाङ्मयाचे संशोधक ह. ना. नेने ह्यांच्या पाहण्यात होती (निर्देश : ह. ना. नेने : संपा., दृष्टान्तपाठ; नागपूर, १९३७; पृ. ११७).

**विद्यादास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**विनायक–१** [का. अनु.] कटावकार. गोत्र अत्री. वडिलांचे नाव महादेव. ह्यांची नऊ कडव्यांची *नवरस* अशी एक रचना उपलब्ध आहे. 'विनायकाची अक्षरमाळा जप सर्वहि काळ' असे गणपतीवरील, आणि 'शंकरा शेषशशिधरा' हे शंकरावरील, अशी दोन पदे उपलब्ध आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग. : काही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांची पदे; भाइसंमत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४७.

**विनायक–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – गणेशलीलामृत; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १०२.

**विनायकराव औरंगाबादकर / ० औरंगाबादकर, विनायकराव** [अंदाजे इ. स. च्या अठराव्या शतकाची अखेर व एकोणिसाव्या शतकाचा प्रथमार्ध] मराठी मध्यप्रदेशातील पहिले इतिहाससंशोधक. हे गृहस्थ, नागपूरकर भोसल्यांच्या दरबारी १८०७–१८२७ पर्यंत ब्रिटिश रेसिडेंट असलेल्या रिचर्ड जेन्किन्स ह्यांचे आश्रित होते. हा साहेब मोठा चौकस असल्याने त्याने औरंगाबादकर ह्यांस चांदा, सिरपूर, रायपूर, रत्नपूर इत्यादी ठिकाणी पाठवून तेथील शिलालेखांची माहिती गोळा करण्यास सांगितली व ती बंगालच्या एशियाटिक सोसायटीस पुरवली. ही माहिती त्या संस्थेच्या *एशियाटिक रिसर्चेस* नामक संशोधनपर नियतकालिकाच्या १५ व्या खंडात छापली आहे.

औरंगाबादकरांनी एकत्रित केलेल्या ऐतिहासिक व इतर विषयांवरील माहितीचे कित्येक रुमाल असून ते लंडन येथें इंडिया ऑफिसच्या ग्रंथालयात आहेत. ह्यांनी ७ फारसी किताबी, दरबार, गुजाबादादा, सखाराम महिपत व बगाजी रघुनाथ (हा भोसल्यांचा इंग्रज दरबारी वकील होता) ह्यांच्या बखरी, १८१३ ची जेन्किन्सबरोबरच्या पुणे प्रवासाची हकीकत, मुत्सद्द्यांचे अहवाल, माहूर, छत्तीसगड व छिंदवाडा जिल्ह्यांची माहिती, सोभामलची बंगल्याची हकीकत, राजा गोविंदबक्षचा *राहात आफ्जा*, शिवाजीच्या व पेशव्यांच्या बखरी व पुण्याची कैफियत, धर्मादायाचे उतारे, परराष्ट्रीय पत्रव्यवहाराचे दोन खंड व वृद्धांच्या तोंडी हकीकती अशा माहितीच्या आधारावर १५ खंड लिहिले आहेत.

हे काम करण्यासाठी ते सन १८०९ पासून रात्रंदिवस खपत होते. "एक मराठीनवीस, एक फारशीनवीस, एक शास्त्री व एक लेखक" असे मिळून हे लेखनकार्य केले. "प्रथम गणेश सरस्वती व मुसदी यांस नमन करून प्रभुसाहेब अलीशान रजारद जेकीन्ससाहेब बहादुर पदकमलीं दृढभाव धरून सके १७३८ (इ. स. १८१६) धातानाम संवछर स. १२२६ फसलींत लेखनाडंबर आरंभून × × × × हे बखर तेरा वर्षांत (इ. स. १८२९) तयार जाहली।" हीत १८१८ पर्यंतची हकीकत आली आहे. ह्यांनी चिटणीस-दप्तरातून हुकूमनामे व तहांच्या नकला घेतल्या. अदालतीच्या कारवाईची टिपणे घेतली. ज्या ज्या स्थानास पुण्याच्या वाटेवर 'स्वामींनी' (जेन्किन्सने) पवित्र केले त्याचा त्याचा तपशील लिहिला व पोवाडे टिपले. ह्यांनी द्वितीय रघुजीस आलेल्या ११३ पत्रांची विल्हेवारी केली. चंद्रपूर, छत्तीसगड इ. ठिकाणचे शिलालेख पाहिले व नकला घेतल्या. ह्यांना इंग्रजी किंवा संस्कृत येत नसतानाही चौकस बुद्धीच्या बळावर त्यांनी हे लेखनकार्य केले.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. मिराशी, वा. वि. : मध्यप्रदेशांतील प्राचीन इतिहाससंशोधनाचें कार्य; मध्यप्रदेशांतील संशोधनकार्य; नागपूर, १९५६; पृ. १; २. लांडगे, दे. गो. : मध्ययुगीन व अर्वाचीन संशोधन; मध्यप्रदेशांतील संशोधनकार्य; मध्यप्रदेश संशोधन मंडळ ग्रंथमाला, क्रमांक ६; नागपूर, १९५६; पृ. २१.

**विनायकबास (व्यास)** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] महानुभाव कवी. गुरू : परशरामबास.

**रचना : अमु.** – १. ध्रुवा; २. वृद्धाचार; ममग्रंककासू., पृ. २७.

**विप्रकृष्ण** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – सीतास्वयंवर – ओव्या; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विप्र कोनेर** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – श्रीहरीवरील आरती; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. ४७.

**विप्रगिरी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. श्रीनावप्रकरण / रामगूहकसंवाद; ओ. सं. ३६; सवामं. बा. ५६४; २. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विप्र गोविंद** [इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] ग्रंथकार. ह्यांच्या शिल्पशास्त्रावरील ग्रंथाच्या पोथीची एकूण पाच पाने उपलब्ध झाली आहेत. ही पोथी महानुभावांच्या बऱ्याच पोथ्या जिथे आहेत, अशा एका मठात मिळाली. हा ग्रंथकार महानुभाव असावा. कारण बरेचसे महानुभावी ग्रंथकार आपल्या नावामागे मुनि, विप्र, कवि असे शब्द लावतात. ह्या पोथीतील द्वारकेच्या कृष्णाचा उल्लेखही ह्या दृष्टीने महत्त्वाचा ठरतो. पोथीचा विषय शिल्पशास्त्राशी संबंधित असल्याने मंदिराची मोजणी त्यात आली आहे. घरबांधणीबद्दलही, पाया खणण्यापासून ते घर बांधून पूर्ण होईपर्यंत कोणते महिने, तिथी, नक्षत्रे चांगली हे सांगितले आहे. प्रस्तुत पोथी ही ह्या ग्रंथाची त्रुटित प्रत आहे. पोथी समग्र उपलब्ध झाल्यास लेखकाच्या चरित्रावर काही प्रकाश पडेल.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : विप्र गोविंदकृत शिल्पशास्त्र; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४, चैत्र १८६५; पृ. ४५–४९.

**विप्र जनार्दन** [अंदाजे इ. १६५६ / इ. स. १७३३] कवी. कवीचे नाव जनार्दन. गुरु : महादेव. वडिलांचे नाव तुकाकृष्ण. रामोपासक असल्याने रघुनाथदास असा कवी स्वतःचा उल्लेख करतो. *हरिश्चंद्रकथा* ह्या ग्रंथाची रचना महादेवपट्टण येथे झाली असून ती 'आश्विन शुद्ध १० प्रमादि संवत्सरा'तील आहे. हा शक १६५५ (इ. स. १७३३) असा येतो.

**रचना : अमु.** – हरिश्चंद्रकथा; प्रसंग १३; ओ. सं. १६२२; तंसम. बा. ९०३; हस्त. यादी, क्र. १.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : विप्र जनार्दन; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २२.

**० विप्र तुका** – पहा **तुकाविप्र.**

**विप्रदादु** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – दत्तजन्मकथा; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विप्रदास** [अंदाजे श. १६६६ / इ. स. १७४४] कवी. विप्रदासकृत *श्रीयाळचरित्र* (ओ. सं. ९९) हे प्रकरण अप्रकाशित आहे. गुरू जनार्दन असावेत. काव्यातील रचनाकालाचा उल्लेख : "रक्ताक्षी नाम संवछर। उत्तम श्रावण रविवार। शुद्ध पक्ष प्रथम प्रहर। श्रीयाळचरित्र संपूर्ण ॥ ९१ ॥" ह्यात तिथी दिलेली नाही. ती प्रतिपदा मानल्यास हा शक १६६६ असा येतो. ९६ ते ९९ ह्या चार ओव्या कवीच्या चरित्रविषयक माहितीच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. पण ह्या ओव्यांवरून कवीच्या चरित्रावर नीटसा प्रकाश पडत नाही असे मत शं. श्री. देव ह्यांनी व्यक्त केले आहे (संदर्भ : सवामं. बा. २७०, हस्त. सू., खं. १).

**विप्रदास–२** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – अंबेची आरती; मआ., पृ. ४०५.

**विप्रनागेश** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३, सवामं. हस्त. सू., खं. २.

**० विप्रनाथ** – पहा **विप्र विश्वनाथ.**

**विप्रनारायण / ० नारायण विप्र** [अंदाजे श. १६०७/इ. स. १६८५] कवी. यजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मण. गोत्र वासिष्ठ. आपल्या *अश्वमेध* ग्रंथात 'हाताळे' असा स्वतःच्या गावाचा उल्लेख हे करतात. हाताळे नावाची तीन गावे धुळे जिल्ह्यातील सिंदखेड, हातधुई, चाळिसगाव तालुक्यात आहेत. ह्यावरून कवीचे वास्तव्य धुळे जिल्ह्यात होते असे अनुमान करता येते.

ज. र. आजगांवकर ह्यांनी विप्रनारायण म्हणजे महिपतीने वर्णिलेला नारायणभट्ट असे मत व्यक्त केले आहे. वसंत जोशी ह्यांनी विप्रनारायण म्हणजे 'नाभाजी' अशी जी कल्पना मांडली आहे, ती त्यांच्याजवळील कवीच्या *अश्वमेधा*च्या प्रतीतील "गोपजी दामोधराचा सुत। नाभाजी नामें विख्यात । तेणें प्रार्थुन यदुनाथ । केली माहाराष्ट्र टीका ॥ ५६.८४ ॥" ह्या ओवीवरून. त्र्यंबक गुरुनाथ काळे ह्यांच्याकडील *अश्वमेधा*च्या प्रतीत वरील ओवीचा 'नाभाजी' असा पाठ नसून 'नाथाजी' असा पाठ आहे. 'नाथाजी' म्हणजेच विप्रनारायण, ह्याला इतरही पोषक पुरावे काव्यात आढळतात. उदा., अनेक ठिकाणी विप्रनारायण स्वतःचा निर्देश 'कविनाथा' असा करतात (पहा : ५४ : १०८; ४९ : ३९). विप्रनारायणांनी दिलेली स्वतःची वंशावळ ह्याप्रमाणे : नागनाथ > दादाजी ऊर्फ दामोदर > गोपाजी ऊर्फ गोपीनाथ > विप्रनारायण.

महिपतींनी वर्णिलेला संत नारायणभट्ट हा तापीतीरवासी आहे. म्हणून तापीतीरवासी विप्रनारायण व तो एकच असे जे मत आजगांवकरांनी मांडले आहे त्याला नामसादृश्याखेरीज इतर पुरावा नाही.

विप्रनारायणांनी *अश्वमेध* ग्रंथाची रचना केली आहे. ग्रंथासंबंधात हा 'जेयमिनाचा वागवीलास', 'त्या जेयमीनी काव्याची टीका', असे निर्देश कवी करतो. म्हणजेच ग्रंथ मूळ संस्कृतास धरून लिहिला आहे. *अश्वमेधा*तील *दुंदुभी आख्यान* कथेबद्दल श्रीधर कवीने पूर्वीच्या ज्या कवींना दोष दिला आहे त्यात विप्रनारायणही येतात. पण "मुनि म्हणे भारता। ऐसी दुंदुभीची पवित्र कथा। अनुसंधान ऐक समर्था। वदता जयमुनि व्याससीष्ये ॥ ४१.९७ ॥" ह्या ग्रंथांतर्गत उल्लेखावरून जैमिनीची जी प्रत विप्रनारायणांस उपलब्ध झाली, त्यात *दुंदुभी आख्यान* असण्याची शक्यता गृहीत धरली पाहिजे असे मत प्रा. वसंत जोशी ह्यांनी मांडले आहे (*लोकसत्ता*, ९ फेब्रु. १९५८). 'थोड्या उपमा स्वतःच्या घातल्या वा क्वचित वर्णन पदरचे केले तर क्षमा करावी' असे कवी श्रोत्यांना विनवितो. ह्यावरून मूळ काव्यास काटेकोरपणे अनुसरण्याची कवीची प्रामाणिक इच्छा दिसून येते. म्हणून अध्याय ५४ च्या अखेरीस भोजनविधीचे वर्णन करताना ह्यांची लेखणी बंधनात पडते. मग हे वर्णन करण्याची इच्छा असूनही ते करता येत नाही. त्याचे कारण कवी स्पष्ट करतो ते असे : "पृथक् पृथक् सांगावे जरी वचनीं। (पृथक् पृथक्) जयमुनि वदला नाही ॥ ५ ॥" मुळांत साधे 'भोजन केले' असे शब्द असताना त्यावर वर्णनाचा पसारा घालणाऱ्या कवीश्वरांस ह्यांनी बोलही लावले आहेत.

काव्य म्हणून प्रस्तुत ग्रंथाची मौलिकता स्पष्टपणे नजरेत भरण्यासारखी आहे. 'नेणे काव्यरचना' असे जरी कवी म्हणत असला तरी त्याच्या हातून प्रसन्न व प्रासादिक अशी रचना झाली आहे. उपमा-दृष्टान्तांचा वापर करण्याची त्याची हातोटी लक्षणीय आहे. उदा., कृष्ण रागावून निघाला, तेव्हा द्रौपदीने केलेली विनवणी पहा : "तुजवाचोनि मंगळधामा। कोण राखेल आमुची महीमा। चकोरासी उबगला चंद्रमा। तरी ते कैसे जीततील ॥ चातका मेघोदका कारणें। अनुसरलासे जीवें प्रमाणें। मेघे त्याची उपेक्षा करणें। तेव्हां तो प्राणी केवि वाचे ॥ १.१२३–२४ ॥" एकंदरीत 'मग फुटले अंकुर जाणा। मतिस नाना रसाचे ॥ १.२७ ॥' ही कव्युक्ती विप्रनारायणांच्या संदर्भात वृथा नाही. [⇨ ३.]

*अश्वमेध* ग्रंथाचा काल निश्चित ठरविता येत नाही. पण जुन्यात जुन्या श. १६७६ (इ. स. १७५४) मधील उपलब्ध प्रतीवरून ह्यापूर्वी ग्रंथलेखन झाले असावे असे म्हणता येते. श्रीधर कवीने मूळ *अश्वमेधा*त नसलेले *दुंदुभी आख्यान* घातल्याबद्दल ज्या अनेक कवींना दोष दिला आहे त्यांत विप्रनारायण येतात, हे प्रा. जोशी ह्यांनी

निदर्शनास आणून दिले आहे. ह्यावरून हे श्रीधरापूर्वीचे ठरतात. प्रतीतील कालनिर्देशाच्या ओवीवरून ग्रंथ अंदाजे श. १६०७ (इ. स. १६८५) च्या सुमारास झाला असावा असे मत डॉ. पंडित आवळीकर व्यक्त करतात (जुवानसं., १९६४, पृ. ११३). भाषेवरून कवी शिवकालातील वा जरा त्याहीपूर्वीचे असावेत, असे द. वा. पोतदार म्हणतात (भाइसंमंत्रै., व. १४, अं. २, पृ २१).

वरील ग्रंथाशिवाय ह्यांचे *ज्ञानसागर* व *शिवमहिम्नस्तोत्र* असे दोन ग्रंथ आहेत. पैकी *शिवमहिम्नस्तोत्र* हे *काव्यसंग्रह* मासिकात मुद्रित झाल्याचा निर्देश चांदोरकरांनी केला आहे (संककासू., पृ. १३३).

**रचना : अमु.** – १. अश्वमेधाख्यान; प्र. १–५६; ग्रं. सं. ७४००; र. श. अंदाजे १६०७ (इ. स. १६८५); र. स्थळ : हाताळे, जि. धुळे; तंसम., मसंमं; २. ज्ञानसागर; ३. हनुमंताची आरती; मसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : विप्र नारायण; मकच., खं. ४, १९१६; पृ. २०–२७; २. आवळीकर, पंडित : पुन्हा एकदा विप्रनारायण; रविवारची लोकसत्ता, ९ मार्च १९५८; ३. आवळीकर, पंडित : विप्र नारायण; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. १०५–११५; ४. जोशी, वसंत स. : विप्रनारायणकृत अश्वमेध; लोकसत्ता, ९ फेब्रु. १९५८; ५. पोतदार, द. वा. : विप्रनारायणकृत ओवीबद्ध अश्वमेध; भाइसंमंत्रै., व. १४, अं. १, सप्टें. १९३३; पृ. १९–२१.

**विप्र प्रेमदास** [का. अनु.] कवी. एका हस्तलिखित बाडात ह्यांचे काही श्लोक सापडतात. भक्तिभाव न सोडता संतमार्गाचे आचरण करा, रामनामाचे ध्यान करा, असा उपदेश ह्यांनी श्लोकांतून केला आहे. विप्र ह्या नावावरून हे महानुभाव असण्याची शक्यता वाटते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : विप्र प्रेमदास; भाइसमंइति., श. १८३८; पृ. ५०.

**विप्ररामदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – नवरात्रावर पद व इतर पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १ व २.

**विप्रलिंग** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – अंबेची आरती; मआ., पृ. ४४१.

**विप्र विश्वनाथ** /० **कृष्णदास–९** /० **विप्रनाथ** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, पूर्वार्ध] कवी. ह्या कवीचा उल्लेख एकनाथांच्या वेळेच्या काही इतर कवींची माहिती देताना *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी कृष्णदास कवी असा केला आहे (आ. ५, पृ. २४६). कवीने रचिलेल्या *अभिमन्युविवाह* काव्यात 'विप्रा वीस्वनाथा', 'वीस्वनाथा' इत्यादी कविनामोल्लेख येतात. विप्र विश्वनाथांच्या काव्याच्या काही हस्तलिखित प्रती महानुभाव संग्रहात उपलब्ध झाल्या असल्या तरी महानुभाव पंथात ह्यांची परंपरा सापडू शकत नाही. हा कवी महानुभावपंथी आहे किंवा नाही ह्यासंबंधी संशोधकांत एकमत नाही. ह्यांच्या काव्यात महानुभाव तत्त्वज्ञानाचे विवरण आढळत नाही. काव्यात येणाऱ्या कृष्णसंकीर्तनामुळे महानुभावांनी ह्या पोथ्या संग्रहित केल्या असाव्यात किंवा काव्याचे लेखन अगोदर झाले असावे आणि मागाहून कवीने पंथाची दीक्षा घेतली असावी, अशी मते कवीच्या महानुभावीयत्वासंबंधात व्यक्त केली गेली आहेत.

काव्याची भाषा व शब्दांची रूपे ह्यावरून प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांनी कवीचा काळ शकाच्या १६ व्या शतकाचा पूर्वार्ध ठरवला आहे तर डॉ. वि. बा. प्रभुदेसाई ह्यांनी ह्या काव्याची रचना शकाच्या १५ व्या शतकाच्या पूर्वार्धात झाली असावी असा निष्कर्ष काढला आहे. शेख महंमदबाबा श्रीगोंदेकर (श. १४८२–१५७२) ह्यांच्या *संतनामावळी*त 'चोंभा विप्र विश्वा' असा उल्लेख येतो, तो विप्र विश्वा हाच कवी असावा. *उषाहरन*कथेचा कर्ता कविनंदन हा विप्र विश्वनाथांचा समकालीन असावा, असे ह्या दोन्ही काव्यांच्या भाषास्वरूपावरून वाटते, असे मत वि. बा. प्रभुदेसाई व्यक्त करतात.

कवीच्या *अभिमन्युविवाह* काव्याच्या एकूण आठ हस्तलिखित प्रती उपलब्ध असून त्यांपैकी देवदेवेश्वर संस्थान, माहूर ह्या महानुभाव मठातील प्रत (प्रसंग १२, ओ. १२३०) व भारत इतिहास मंडळातील प्रत (प्रसंग १४, ओ. १३९५) अशा दोनच प्रती संपूर्ण आहेत. काव्याच्या अनेक प्रतींमधील प्रसंग व ओवीसंख्या ह्यांमध्ये एकवाक्यता नाही. ह्यांतील माहूर प्रतीवरून प्रस्तुत काव्याची संहिता प्रा. व. दा. कुळकर्णी ह्यांनी तयार केली आहे. डॉ. वि. बा. प्रभुदेसाई ह्यांनी आदि-अंत असलेली भारत इतिहास संशोधक मंडळातील पोथी प्रमाण मानून, इतर पोथ्यांशी तुलना करून, पाठभेदांसह ह्या काव्याची संहिता सिद्ध केली आहे.

अर्जुनपुत्र अभिमन्यू व बळरामकन्या वत्सला ह्यांच्या विवाहाचे कथानक काव्यात आले आहे. पांडव वनवासास गेल्यानंतर दुर्योधनाने शकुनीला द्वारकेस पाठवून आपल्या लक्ष्मण नामक पुत्रासाठी बलरामाकडे त्याची कन्या वत्सला हिची मागणी केली. ही मागणी बलराम व त्याची पत्नी रेवती ह्यांनी मान्य केली पण ह्यापूर्वी कृष्णाने सुभद्रेस बलरामकन्या अभिमन्यूस देईन असे वचन दिले होते. त्यामुळे कृष्णाने त्या दोघांना गुप्तपणे द्वारकेस बोलावून घेतले. वाटेने येत असता ह्या दोघांना घटोत्कच राक्षस भेटला व त्याने ह्या प्रसंगात कृष्णाला साहाय्य दिले. घटोत्कचाने आपल्या राक्षसी मायेने लग्नाकरिता जमलेल्या कौरवांची व त्यांच्या सैन्याची दाणादाण उडवून त्यांस हस्तिनापुरास हाकलून दिले. इकडे अभिमन्यू आणि वत्सला ह्यांचा विवाह बलरामाचा राग शांत करून मोठ्या समारंभाने श्रीकृष्णाने घडवून आणला. – अशी काव्याची कथा आहे. ही कथा 'व्यास भारथीं कथीलें' असल्याचा बहुतेक सर्व प्रतीत निर्देश आढळतो. व्यास-भारताच्या कोणत्याही प्रचलित प्रतीत हे कथानक आढळत नाही. हे कथानक लोकप्रिय असल्याचे मात्र दिसते.

कवी मुक्तेश्वरांनी ह्या विषयावर काव्य रचल्याचे सांगितले जाते. त्र्यंबककवीकृत *अभिमन्युविवाह* हे तीन प्रसंगांचे काव्य *अनेककविकृत लघुकाव्यमाले*त प्रसिद्ध झाले आहे (भाग ४). राघवमुनी विद्वासांच्या *वत्सलाहरणा*चा (काल : श. १६७६ / इ. स. १७५४) परिचय य. खु. देशपांडे ह्यांच्या *महानुभावीय मराठी वाङ्मय* ग्रंथात करून दिलेला आढळतो. कृष्णयाज्ञवल्कीच्या *कथाकल्पतरू*तही हे कथानक वर्णिले आहे. *कथाकल्पतरु* ग्रंथाचा ९ वा स्तबक ह्या दृष्टीने पाहण्यासारखा आहे. *अभिमन्युविवाहा*चे कथानक वर्णन करण्यापूर्वी विश्वनाथाने जी *द्रौपदीवस्त्रहरणा*ची कथा सांगितली आहे तशीच कथा कृष्णयाज्ञवल्कींनीही वर्णन केली आहे. ह्यांनी रचलेल्या *द्रौपदीवस्त्रहरणा*च्या ३ व *अभिमन्युविवाहा*च्या ७ अध्यायांतून येणारा तपशील हा विप्र विश्वनाथाच्या काव्यातील तपशिलाशी तंतोतंत जुळणारा आहे.

काव्यात रसाविष्कार उत्तम साधला असून शृंगार, वीर, अद्भुत व करुण इत्यादी रस प्रामुख्याने दृष्टीस पडतात. कृष्ण, बळिभद्र, धर्म, भीम, द्रौपदी, सुभद्रा, अभिमन्यु, घटोत्कच ह्यांच्या व्यक्तिरेखा कलापूर्ण अशा रेखल्या आहेत. कवीची वर्णनशैली अनेक घटना व प्रसंग साक्षात उभे करते; उदा., द्वारकावर्णन, कौरवसेनेची घटोत्कचाने उडविलेली दाणादाण, इ. प्रसंग. काव्याच्या भाषेत एक स्वाभाविक असा गोडवा आहे. उदा., " ते साडेपन्हरेयाची साळाका। ते कनकाची कळिका। कापुराची पुतळिका। होए जैसी॥ ते कैसी सुकुमार। वेल्हाळ आणि सुंदर। रुणझणित भ्रमर। मस्तकावरीं॥ ४.८५–८६॥ " इत्यादी राजकन्यावर्णनाच्या ओव्या ह्या दृष्टीने पाहण्यासारख्या आहेत. कवीची आणखी काही रचना असल्याचे ज्ञात नाही. *अभिमन्युवीव्हाहो* ह्या एकाच काव्याने मराठी सारस्वताच्या इतिहासात विप्र विश्वनाथांना

विशिष्ट स्थान प्राप्त करून दिले आहे.

**रचना : मु.** – १. अभिमन्ये वीव्हाहो; प्रसंग १२; ओ. सं. १२३०; संपा. प्रा. कुळकर्णी, व. दा.; मसंमं., मुंबई १९६८ (प्रस्ता.; पृ. ३–७); २. अभीमन्येवीव्हावो; प्रसंग १४; ओ. सं. १३९५; संपा. प्रभुदेसाई, वि. बा.; नागपूर, १९७२; विवेचक प्रस्ता., पृ. १–३४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कानोले, वि. अं. : विप्र विश्वनाथकृत अभिमन्युविवाह; प्रतिष्ठान; नोव्हें.–डिसें. १९६३, जाने. १९६४; पृ. २१–३३. २. देशपांडे, ज. शा. : विप्र विश्वनाथकृत अभिमन्यु-विवाह; मसाप., जाने.–मार्च १९६६; पृ. ९०.

**विप्र सिदो गोविंद तावरा** [अंदाजे इ. स. १७००] कवी. नेवाश्याच्या सचिदानंदबाबांचे वंशज थावरे-कुळकर्णी ह्यांच्यापैकी हे असावेत, असा गं. ना. मुजुमदार ह्यांचा कयास आहे. ह्यांच्या *भैरवपुराण* ग्रंथाची पोथीही नेवासे बुद्रुक (जि. नगर) येथेच मिळाली. ग्रंथाचे तीन अध्याय व २६६ ओव्या आहेत. रचनाकाल अगर लेखनकाल दिलेला नाही. भाषेवरून हे प्रकरण इ. स. १७०० त किंवा थोडे त्यापूर्वी लिहिले गेले असावे, असे वाटते.

पृथ्वीवरील दैत्यांचा संहार करण्याची इंद्र व नारद ह्यांची विनंती मान्य करून सिद्धनाथ भैरव प्रथम पाताळातील सर्पांचा संहार करून वासुकीची कन्या जोगेश्वरी हिची प्राप्ती करून घेतात व मग दैत्यांचा संहार करतात असा कथाभाग ह्या काव्यात आला आहे. प्रस्तुत प्रकरण मूळ कोणत्या ग्रंथाधारे रचले त्याचा उल्लेख कवी करीत नाही. ग्रंथाचे हस्तलिखित भारत इतिहास संशोधक मंडळात संग्रहित.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : भैरवपुराण; भाइ-संमत्रै., व. १२, अं. ३, पौष १८५३; पृ. १३९–१४१.

**विमळानंद** [का. अनु.] कवी. चंद्रात्मज रुद्र कवीने आपल्या *उद्योग-पर्वात* जी गुरुपरंपरा दिली आहे तीमध्ये विमलानंदाचे नाव येते. ही परंपरा दत्तात्रयादी आहे. ती अशी : हंसानंद > अमृतानंद > ब्रह्मानंद > विमळानंद > चिदानंद > प्रसन्नानंद > रामानंद > व्यंकटेश > चंद्रात्मजरुद्र.

**रचना : अमु.** – १. शिवरात्री आख्यान; ओ. सं. ६५; प्रत श १६९५; सवामं. हस्त. सू., खं. २; २. विमलानंदी; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १०२.

**० विरहे लक्ष्मेंद्रभट** – पहा **लक्ष्मेंद्रभट देऊळवाडेकर.**

**विरा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अभंग; संककासू., पृ. १०२.

**विरूपाक्ष (शिवदास)** [अंदाजे श. १७४९/इ. स. १८२७] कवी. तंजावरच्या राजे शरफोजी ह्यांचे आश्रित. ग्रंथांतील उल्लेखानुसार ह्यांच्या आईचे नाव गोमती व वडिलांचे नाव मल्हारी होते असे दिसते. कवींनी आपले सर्व लेखन राजाज्ञेने केल्याचा उल्लेख प्रत्येक ग्रंथात आहे. स्वतःला हे ' शिवदास ' म्हणवितात.

ह्या कवींची ग्रंथरचना बरीच असून ती पुराणातील कथाभागांच्या आधारे केलेली आहे. ही रचना श. १७४८ ते १७५० (इ. स. १८२६ ते १८२८) च्या सुमाराची आहे.

शिवभक्त सरफोजींनी दक्षिणेतल्या शिवभक्तांची चरित्रे लिहावी अशी आज्ञा केल्याने विरूपाक्षकवींनी *भक्तविलास* हा ग्रंथ लिहिला. प्रस्तुत ग्रंथ *स्कंदपुराणा*चे जे *शिवभक्तविलास* नामे अगस्त्योक्त हर-दासकृत उपपुराण आहे, त्याचे मराठी भाषान्तर आहे. अध्यायसंख्याही मूळ ग्रंथाइतकीच म्हणजे ७९ आहे व ओवीसंख्या ६००० आहे. ग्रंथातील मुख्य प्रतिपादित विषय 'भक्तिमार्ग' असून निर्मळ व निष्ठा-युक्त भक्तीच्या योगाने मुक्ती मिळू शकते हे पटवून दिले आहे. ईश्वरभक्तीला कोणत्याही अटी नसतात. राजा–रंक, बळी–दुर्बळी, योगी–भोगी, सुज्ञ–अज्ञ अशा सर्वांसही भक्तिमार्ग सारखाच सोपा आहे, हे ह्यांनी वर्णन केलेल्या चरित्रांवरून समजू शकते. दक्षिण देशातील सुंदर, नीलकंठ, महाधन इत्यादी ६३ द्राविडीय शिवभक्त नायन्मारांची व इतर १२ शिवभक्तांची चरित्रे ह्यात दिली आहेत.

ग्रंथारंभी शिवस्तुती आहे. शेवटी सरफोजीराजांची स्तुती आढळते. उदा., " ज्या माय बाप म्हणती जन साच लोकीं ॥ तो भूप हाचि शरभेंद्र भला विलोकी ॥ विद्यासमस्त पढवी आणि पोषणातें ॥ प्रेमें करी म्हणुनि वानिति तेचि नातें ॥ " तसेच राजा शरफोजींनी केलेली १६ महादानें, तीर्थयात्रा, शिवालयांचे जीर्णोद्धारण, शिवलिंगप्रतिष्ठा, प्रजेच्या उत्तेजनार्थ काढलेल्या शाळा ह्यांचाही उल्लेख कवीने केला आहे. ह्या *भक्तविजय* ग्रंथाशिवाय *मत्स्यपुराण, अग्नीश्वरमाहात्म्य, आदिकैलासमाहात्म्य, पंचनदमाहात्म्य, माघमाहात्म्य* व *श्रावण-माहात्म्य* हे ग्रंथही ह्यांच्या नावावर प्रसिद्ध आहेत. *नागपंचमीव्रत, आदित्यवार* व *मंगळागौरी* अशा व्रतकथांचीही ह्यांनी भक्तिभावाने रचना केलेली आढळते.

**रचना : मु.** – भक्तविलास; अ. ७९; ग्रं. सं. ६०००; र. श. १७४९–१७५०; संपा. श्रीनिवासाचार्य; तंजावर, १९५२. **अमु.** – १. अग्नीश्वरमाहात्म्य; अ. १–१७; ग्रं. सं. १९००; भविष्यो-त्तरपुराणांतर्गत; २. आदिकैलासमाहात्म्य; अ. १–३०; ग्रं. सं. ४८००; र. का. : श. १७५०, सर्वधारी संवत्सर; ३. आदित्य-वारकथा; ग्रं. १२; ४. नागपंचमीव्रत; ग्रं. सं. ४५; ५. पंच-नदमाहात्म्य (गोविंद आणि विरूपाक्ष कृत); ओव्या ३४५०; अ. १६–४३ व ५२–५५; विरूपाक्षकृत; ब्रह्मकैवर्तांतर्गत; ६. मंगळागौरीव्रतकथा; ग्रं. सं. ११०; ७. मत्स्यपुराण; अ. १–२६, ग्रं. सं. ९००; ८. माघमाहात्म्य; अ. १–३०; ग्रं. सं. ४०००; र. श. १७४८, व्यय संव., माघ कृ. ६; पद्मपुराणांतर्गत; ९. श्रावणमाहात्म्य; अ. १–२५; ग्रं. १७००; र. श. १७४९.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** वे. श्रीनिवासाचार्य (संपा.); प्रस्ता., भक्तविलास; तंजावर, १९५२; प्रस्ता., पृ. १ ते ६.

**(डॉ.) विल्यम कॅरे / ० कॅरे (डॉ.) विल्यम** [१७ ऑग. १७६१–१ जून १८३४] अर्वाचीन मराठी गद्य मुद्रणाचा पाया घालणारा पहिला इंग्रज पंडित, कोशकार, व्याकरणकार व भाषान्तरकार. ह्याचा जन्म इंग्लंडमधील पॉलेंसपरी ह्या खेड्यात झाला. ह्याचा बाप पंतोजीगिरी करी. घरची गरिबी असल्यामुळे ह्याला फारसे शालेय शिक्षण मिळाले नाही. परंतु स्वावलंबनाने विद्याव्यासंग अखंड राखून तो बहुभाषी व बहुश्रुत बनला. वयाच्या सोळाव्या वर्षापासून ते अठ्ठाविसाव्या वर्षा-पर्यंत त्याला चर्मकाराचा व्यवसाय करावा लागला. जोडे शिवीत असताना समोरच्या ख्रिस्ताच्या चित्राकडे पाहून त्याने मिशनरी व्हावयाचे ठरविले आणि ख्रिस्ती धर्मग्रंथांच्या अध्ययनास सुरुवात केली. त्यासाठी ह्याने व्याकरण-ग्रंथांच्या साहाय्याने लॅटिन, ग्रीक, हिब्रू, फ्रेंच वगैरे भाषांचे ज्ञान उत्तम प्रकारे संपादन केले. धर्मग्रंथांचे अध्ययन व धर्मप्रचारकांची प्रवचने ह्यांचा मनावर परिणाम होऊन, व्यवसाय सोडून स्वदेशाबाहेर धर्मप्रसारार्थ आपले आयुष्य वेचावे अशी त्यास प्रेरणा झाली व तो १७९३ साली नोव्हेंबरच्या ११ तारखेस हिंदुस्थानात आला. प्रारंभी माल्टा येथे त्याने शेती सुरू केली, पण तीत नीट जम बसण्याचे चिन्ह न दिसल्यामुळे ह्याने निळीच्या मळ्यात आपला मुकाम हलवला. विलायतेतून येताना ह्याने जहाजात डॉ. थॉमस – ईस्ट इंडिया कंपनीचा शिप-सर्जन – ह्याच्याकडे बंगाली भाषेचा थोडासा अभ्यास केला होता, तो त्याने कलकत्त्यात आल्यावर रामराम बसु ह्या गृहस्थाच्या साहाय्याने वाढविला. हा रामराम बसु दुभाषी म्हणूनही ह्याचे काम करी. निळीच्या

मळ्यात कामगारांशी नित्य संबंध येत गेल्यामुळे बंगाली भाषा सुलभतेने बोलता येण्याएवढी ह्याची प्रगती झाली. ह्या भाषेबरोबरच ह्याने संस्कृत भाषेचाही अभ्यास आरंभिला. ही भाषा शिकल्याशिवाय आपणास बंगाली चांगले लिहिता-बोलता येणार नाही असे ह्याला आढळून आले. शिवाय ह्याला आपल्या प्रचारकार्याकरिता हिंदूंच्या वेद-पुराणादी ग्रंथांची माहितीही करून घ्यावयाची होती. त्या वेळेस हिंदुस्थानातील युरोपिअन मंडळीत संस्कृत भाषा अवगत असलेला कोलब्रुक विल्यम्स ह्या एकच पंडित होता. तो संस्कृतात अस्खलित भाषण करू शके. कोलब्रुक विल्यम्सप्रमाणेच आपणासही संस्कृत भाषा अवगत झालीच पाहिजे अशी कॅरेची महत्त्वाकांक्षा होती. व्याकरण व कोश ह्यांना गुरू करून संस्कृत भाषेचा अभ्यास सुरू केल्यापासून नऊ वर्षांनी वेद वाचण्याइतकी ह्याची तयारी झाली होती. त्या काळात वेदांची संहिता हिंद्वेतरांच्या हाती पडणे अशक्य असे. तशी ती देणे ब्राह्मण महत्पातक समजत. पण कॅरेने एका ब्राह्मणास बऱ्याच द्रव्याची लालूच दाखवून ती मिळविली.

कॅरे निळीच्या मळ्यात पाच-सहा वर्षे राहिला. एवढ्या मुदतीत त्याने बंगाली व संस्कृत ह्या भाषांचे ज्ञान साध्य केले, पण ते ज्या कामासाठी त्याला उपयोगावयाचे होते ते धर्मप्रचाराचे काम तेथे हाती घेणे शक्य नव्हते. त्या वेळेस इंग्रजांनी आपल्या मुलखात अशा तऱ्हेचे काम करण्यास बंदी केली होती. कॅरेच्या हेतूंचा इंग्रज राज्यकर्त्यांस थोडासा जरी संशय येता तरी त्यास हद्दपार करण्यास ते चुकले नसते. ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन कॅरेने त्या वेळेस कलकत्त्यापासून जवळच डॅनिश लोकांच्या ताब्यात असलेल्या श्रीरामपूर ह्या गावी ता. १० जानेवारी १८०० रोजी आपले ठाणे मांडले व दुसऱ्या दिवसापासूनच आपल्या धर्मप्रचारास प्रारंभ केला. तेथल्या गव्हर्नराने त्याच्या कार्यास सहानुभूती दाखवून त्यास पुष्कळ साहाय्यही केले. ह्याच सुमारास ज्या बॅप्टिस्ट मिशनचा प्रतिनिधी म्हणून तो हिंदुस्थानात आला होता त्या मिशनतर्फे मार्शमन, वॉर्ड वगैरे आणखी काही मिशनरी इकडे आले. त्यांना त्याने आपल्या कार्यात मदतीस घेतले.

श्रीरामपूर येथे थोडीशी स्थिरता येताच ह्याने एक प्रार्थनामंदिर, शाळा व छापखाना ही उभारली व आपले सहकारी वॉर्ड व मार्शमन ह्यांच्या सहकार्याने मुद्रण-प्रकाशनाचा उद्योग सुरू केला. हिंदुस्थानातील प्रमुख भाषांत बायबलाचे भाषान्तर करून 'शुभवर्तमाना'चा प्रसार करणे हे त्याचे मुख्य उद्दिष्ट असल्याने प्रांतिक भाषांचा अभ्यास व त्याला पोषक असे व्याकरण-कोशादी ग्रंथ तयार करणे हा कार्यक्रम ताबडतोब आखून तो पूर्ण करण्याच्या प्रयत्नास हा लागला.

आपला सहकारी वॉर्ड ह्याच्या देखरेखीखाली ह्याने छापखाना सुरू केला. त्यास लागणारे साहित्य त्याने प्रथमतः विलायतेहून आणले होते. पण प्रांतिक भाषांत पुस्तके छापावयाची तर त्या त्या भाषांच्या अक्षरांचे खिळे तयार करणे अगत्याचे होते. हे काम त्याने 'हिंदुस्थानातील कॅक्स्टन' असे ज्याला इतिहासकार संबोधितात त्या सर सी. विलकिन्स ह्याच्या हाताखाली तयार झालेल्या पंचानन कर्मकार नावाच्या लोहाराकडून पार पाडले. कॅरेने पुढे अक्षरांचे खिळे पाडण्याचा कारखानाच स्थापन केला त्यामुळे देशी भाषांचा फैलाव होण्यास फार मोठी मदत झाली. हा छापखाना पुढे 'श्रीरामपूर मिशन प्रेस' म्हणून ओळखला जाऊ लागला. निरनिराळ्या ४० भारतीय भाषांत तयार केलेली बायबले ह्यातून छापून बाहेर पडली. प्रारंभी ईस्ट इंडिया कंपनीची कायदेकानूंची पुस्तकेही येथेच छापली जात. श्रीरामपूरचा हा छापखाना नंतर बॅप्टिस्ट मिशन म्हणून कलकत्त्यात शंभराहून अधिक वर्षे चालू होता. गतवर्षीच तो बंद झाला.

श्रीरामपूरहून जी बायबले प्रसिद्ध झाली त्यांतील बंगाली, मराठी, संस्कृत, हिंदी व कोंकणी भाषांतील बायबले कॅरेने रामराम बसु, वैजनाथशास्त्री व मृत्युंजय विद्यालंकार ह्यांची मदत घेऊन स्वतः तयार केली व ती अनुक्रमे १८०१, १८११, १८०८, १८०९, १८१९ मध्ये छापून प्रसिद्ध केली. कॅरेचा बायबलच्या भाषान्तराचा उद्योग सतत ३४ वर्षे चालला होता (१८०० ते १८३४). भाषान्तर करणे हा कर्मठ ब्राह्मणाच्या जपजाप्याप्रमाणे त्याचा नित्यक्रमच बनला होता. सकाळी न्याहारी झाल्याबरोबर हा कामास सुरुवात करी. आपल्या सहकाऱ्यांस पहिल्याने इंग्रजीत अध्याय वाचून दाखवावयाचा व त्याचे पाठोपाठ भाषान्तर सांगावयाचे असा ह्याचा क्रम असे.

कॅरेचा मदतनीस वैजनाथशास्त्री हा नागपूरकर भोसल्यांच्या आश्रितांपैकी होता असे म्हणतात. मराठी बायबलमधील भाषा नागपुरी बोलीची आहे. त्यावरून ह्या भाषान्तरात वैजनाथशास्त्री ह्यांचा मोठा भाग होता असे दिसते. मराठी भाषेतील, देवनागरी लिपीतील आद्य मुद्रित पुस्तक म्हणजे बायबलमधील मॅथ्यूचे भाषान्तर हे इ. स. १८०५ मध्ये प्रसिद्ध झाले. मराठीतील हा पहिला छापील गद्य ग्रंथ होय. त्याच वर्षी कॅरेचे मराठी भाषेचे व्याकरण प्रसिद्ध झाले.

कॅरेने स्वतःच्या देखरेखीखाली मराठीत खालील खिस्ती धार्मिक वाङ्मय तयार करून घेऊन प्रसिद्ध केले :

सेन्ट मॅथ्यू (१८०५); मॅथ्यू – शुभवर्तमान (१८०७); बायबल – नवा करार (१८०७–१८२५ ह्या काळात ह्याच्या अनेक आवृत्त्या भागशः व संपूर्ण अशा प्रसिद्ध झाल्या); बायबल – जुना करार (१८२०,); कोकणी बायबल – सेन्ट मॅथ्यू (१८१५); कोंकणी बायबल – नवा करार (१८१८, १८१९); कोंकणी बायबल दि पेन्तातुश (१८२१). ईश्वराच्या अवघ्या गोष्टी, प्रथम पुस्तक (१८१०); धर्माचे पुस्तक (१८२१).

इ. स. १८०० साली लॉर्ड वेल्सले ह्याने कलकत्त्यास ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरांना देशी भाषा शिकविण्याकरिता फोर्ट वुइल्यम किल्ल्यात जे विद्यालय स्थापन केले, त्यात बंगाली, मराठी व संस्कृत ह्या भाषांचे शिक्षण देण्यासाठी कॅरे ह्याची प्रारंभी शिक्षक व पुढे प्रोफेसर म्हणून १८०१ साली नेमणूक करण्यात आली. इ. स. १८३१ पर्यंत तो ह्या कॉलेजात अध्यापनाचे काम करीत होता. कॅरेने आपल्याबरोबर आपले सहकारी रामराम बसु, मृत्युंजय विद्यालंकार व महाराष्ट्रीय पंडित वैजनाथशास्त्री (वैद्यनाथ) कानफाडे ह्यांसही घेतले.

विद्यालयात भाषा शिकवावयाची म्हणजे त्यासाठी व्याकरण, कोश, वाचन-पुस्तके ह्यांची आवश्यकता ही भासणारच. अध्यापनाबरोबरच तीही तयार करण्याची जबाबदारी विद्यालयातील अध्यापकमंडळीवर येऊन पडली. कॅरेने आपला वाटा मोठ्या आनंदाने उचलला व तो धडाडीने पार पडला. मराठी भाषेचे व्याकरण व कोश ही त्यातील त्याची विशेष महत्त्वाची कामगिरी होय. व्याकरण, 'ग्रामर ऑफ दि मऱ्हाठा लँग्वेज टु वुइच आर अॅडेड डॉयलॉग्ज ऑन फॅमिली सबजेक्ट्स' ह्या नावाने इंग्रजीत १८०५ साली व मराठी-इंग्रजी कोश, 'ए डिक्शनरी ऑफ मऱ्हाठा लँग्वेज', हा १८१० साली मोडी लिपीत प्रसिद्ध झाला. [ ➪ ३.]

कॅरेचा छापखाना व त्याचा भाषान्तराचा व पुस्तकप्रकाशनाचा उद्योग मराठीप्रमाणेच इतर भारतीय भाषांना त्याचप्रमाणे चिनी आणि इतर पूर्व आशियातील भाषांना प्रेरक झाला.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. नाईक, बापुराव : टायपोग्रॅफी ऑफ देवनागरी; महाराष्ट्र शासन, १९७१; पृ. २६९–२८१. २. पिंगे, श्री म. : कॅरे व श्रीरामपूर मिशन; कॅरे व फोर्ट विल्यम कॉलेज; युमअसे.; मुंबई, १९६०; पृ. अनु. ४६–६२ व ६३–८०. ३. प्रियोळकर, अ. का. : प्रिंटिंग प्रेस इन इंडिया; मुंबई, १९५८;

पृ. ५१–७०. ५. स्मिथ जॉर्ज : दि लाइफ ऑफ विल्यम कॅरे; लंडन, १८८५.

० **विल्सन मार्गरेट** – पहा मार्गरेट विल्सन.

**विवेक परमहंस** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – भक्तिरत्नावलि; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १०२.

**विशालकीर्ती–१** [अंदाजे श. १५९२/इ.स.१६७०] जैन कवी. लातूर येथील भट्टारक पीठावरील अजितकीर्ती हे विशालकीर्तीचे गुरू. त्यांच्यानंतर विशालकीर्ती ह्या पीठाचे भट्टारक झाले. श. १५९२ (इ. स. १६७०) च्या सुमारास ह्यांनी नंदीश्वर मूर्ती स्थापन केल्याचा उल्लेख (*भट्टारक संप्रदाय* पृ. ७९) मिळतो. ह्यांनी *रुक्मिणीव्रतकथे*वर काव्य रचले आहे. श्रेणिकाने भक्त महावीरास विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर म्हणून ही कथा सांगितली आहे. आपल्या पूर्वजन्मात दिगंबर मुनींची निंदा केल्याने रुक्मिणीस फार दुःख भोगावे लागले. त्याचा परिहार करण्यासाठी तिने जे व्रत केले त्या व्रताचा विधी १५२ ओव्यांत कवीने सांगितला आहे. प्रस्तुत काव्य हिंगोली येथील जैनांच्या हस्तलिखित ग्रंथसंग्रहात उपलब्ध. कवीची अन्य रचना उपलब्ध नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : विशालकीर्ती; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ६२.

**विशालकीर्ती–२** [अंदाजे इ. स १६८८ च्या अगोदर] जैन कवी. गुरू : देवेंद्रकीर्ती. हे कारंजा पीठावरील भट्टारक होते. विशालकीर्तीचा मात्र भट्टारक म्हणून पीठाच्या परंपरेत उल्लेख सापडत नाही. श. १६१० पूर्वी कारंजा पीठावर देवेंद्रकीर्ती ह्या नावाने दोन भट्टारक होऊन गेले. ह्यांपैकी विशालकीर्तीचे गुरू कोणते देवेंद्रकीर्ती व ते कोणत्या काळात विद्यमान होते ह्याचा नक्की बोध होत नाही. गुरूला ह्यांनी सुरेंद्रकीर्ती ह्या नावानेही संबोधले आहे. ह्यांच्या *धर्मपरीक्षा* ग्रंथाची शके १६१० (इ. स. १६८८) तील हस्तलिखित प्रत उपलब्ध आहे.

कवीच्या *धर्मपरीक्षा* ह्या काव्याचे ५ अधिकार व ९५८ ओव्या आहेत. ग्रंथ कवीने स्वहस्ते लिहिला नसून उपदेश केला किंवा तोंडी काव्यरचना केली व ज्ञानसागराने तो लिहून तयार केला. ग्रंथाचा मूलाधार स्पष्ट करताना कवी म्हणतो : "ब्रह्म जिनदास कविश्वर भला। तयानें धर्मपरिक्षा रास केला। तो म्या सुदष्टि पाहिला। मग कथा केली ॥९५४॥" सर्व धर्मांची परीक्षा केल्यानंतर जैन धर्मच श्रेष्ठ कसा हे ग्रंथात ठसविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. तत्कालीन लोककथा व लोकाचार ह्यांचा उपयोग करून घेऊन कथा लिहिली आहे. हिंगोली येथील जैन हस्तलिखित संग्रहात ग्रंथाची प्रत संग्रहित.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र; विशालकीर्ती; प्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ६४–६६.

**विश्वदास** [का. अनु.] पदकार

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. १०३.

**विश्वनाथ–१** [का. अनु.] कवी. ह्यांनी ओवीबद्ध *ब्रह्मांडपुराणा*ची रचना केली आहे. हा ग्रंथ ज्ञानेश्वरोत्तर आणि एकनाथपूर्वकालीन असून प्रतही तत्कालीनच आहे. ग्रंथाचे हस्तलिखित धुळे येथील सत्कार्योत्तेजक सभेकडे असून ते त्रुटित आहे. अधल्यामधल्या अशा एकूण ४५० ओव्या उपलब्ध आहेत.

काव्यात दिलेली माहिती मूळ *ब्रह्मांडपुराणा*वरून किंवा दुसरीकडून कोठून घेतली ते कळत नाही. प्रतीतील लेखन बरेच अशुद्ध आहे. भाषिक दृष्ट्या ह्या काव्यास महत्त्व आहे. म्हणून मूळ प्रतीत फारसे बदल न करता ज. शा. देशपांडे ह्यांनी ते प्रसिद्ध केले आहे.

**रचना :** मु. – विश्वनाथकविकृत ब्रह्मांडपुराण; त्रु.; सुमारे ४५० ओव्या; संपा. देशपांडे, ज. शा.; प्रामक., खं. १, मुंबई १९६२; पृ. ४०–५७; कविपरिचय, पृ. ६६.

**विश्वनाथ–२** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] आनंदसंप्रदायी कवी. प्रसिद्ध गीताटीकाकार *चित्सदानंदलहरी*कर्ते मोगरेकर रंगनाथ ह्यांचे गुरुबंधू जे काशिराज त्यांचा विश्वनाथ शिष्य होता. विश्वनाथांना अनेक संतमालिकांतून नमन केलेले आढळते. हे थोर गाणपत्य असून भागवतपुराण अत्यंत रसाळपणे सांगत. रामदासी गिरिधरांनी आपल्या *समर्थप्रतापा*त 'शुकासारखा भागवत सांगणारा' असा ह्यांचा गौरव केला आहे.

प्रा. म. रा. जोशी ह्यांनी कवीची दिलेली परंपरा अशी : शंकराचार्य > वासुदेवानंद > परमानंद > वैकुंठानंद > कृष्णानंद > काशिराज > विश्वनाथ. विश्वनाथांनी *उपदेशरहस्य* नावाचा ग्रंथ लिहिला आहे. ग्रंथ प्रकाशित झालेला नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : काही मराठी सारस्वत उपासक; विसंमंवा.; नागपूर, १९७१; पृ. १४४.

**विश्वनाथ–३** [का. अनु.] कवी. उपनाव आठवले. चित्तपावन ब्राह्मण. पिता दादंभट. माता माल्हनी, कृष्ण केशव ज्येष्ठ बंधू, भार्गवक्षेत्रस्थ.

**रचना :** अमु. – गणपतिआख्यान; त्रु. पो.; मसंमं., हवना., पृ. ८१.

**विश्वनाथ–४** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. गणपतिस्तोत्र; २. नौकानयन / नौकाक्रीडन; ३. महिषामर्दिनीस्तोत्र; ४. सुदामचरित्र; ५. हिंगलाजन्मकथा; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १०३.

**विश्वनाथ–५** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – नाममहिमा पदे; रामपर पदे इ. स्फुटे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विश्वनाथ–६** [का. अनु.] कवी. गुरू : वामनपंडित. ह्यांचा निर्देश *महाराष्ट्रसारस्वता*त आला आहे (आ. ५, पृ. ३७२).

**रचना :** अमु. – सुदामचरित्र; श्लो. सं. ५१; अकलकामा., भा. २; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६; पृ. १६–२२.

**विश्वनाथ–७ (कान्हडा)** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – रुक्मिणीस्वयंवर; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १०३.

**विश्वनाथ–८ (कृष्णदास)** [का. अनु.] कवी. ह्यांचे दुसरे नाव कृष्णदास असे होते.

**रचना :** अमु. – अभिमन्युविवाह; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १०३.

**विश्वनाथ–९** [का. अनु.] शाहीर.

**रचना :** मु. – एक लावणी; अंधारातील लावण्या; पुणे, १९५६, पृ. २०२–३.

**विश्वनाथतनय** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. १.

**विश्वनाथतनय नारायण** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – गजेंद्रमोक्ष; श्लोक व पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**विश्वनाथ पंडित फत्यापूरकर** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार.

**रचना :** अमु. – भारताची बखर (अनुशासन पर्व); र. का. : श. १७५४ / इ. स. १८३२; रासमं.

**विश्वनाथप्रभु** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – कृष्णपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

० **विश्वनाथ बास** – पहा विश्वनाथ बाळारपूरकर.

**विश्वनाथ बाळापूरकर** /० पंडित **विश्वनाथ बाळापूरकर** / ० **विश्वनाथबास** /० **विश्वनाथमुनि–२** /० **विसोबास** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] महानुभाव ग्रंथकार. आश्वलायन शाखेचे ब्राह्मण. पैठणच्या कमळाकरमुनींकडून ह्यांना बोध झाला होता. त्यावरून हे पैठणच्या परिसरातले असावेत. बिदर येथील लाड कामराज नावाच्या गृहस्थाकडे हे नोकरीस होते. पुढे काही बिनसल्यामुळे कामराजाने ह्यांना कैदेत टाकले. ही गोष्ट पैठण येथील कमळाकरमुनी कारंजेकर ह्यांना कळली. तेव्हा त्यांनी कामराजांचे गुरुबंधू गुर्जर शिवव्यास ह्यांच्यामार्फत मध्यस्थी करून ह्यांची सुटका करविली. सुटका झाल्यावर ह्यांनी नोकरी व संसार ह्या दोहोंचा त्याग केला व शिवव्यास ह्यांजकडून मंत्रोपदेश घेऊन संन्यास घेतला. प्रारंभीचा पारमार्थिक बोध ह्यांना कमळाकरमुनींनी दिला असावा. आपल्या *ज्ञानप्रबोध* ह्या ग्रंथात "तैसे पहिले मुनी कमळाकरु : लाउनि गेला बोधां ॥" असे हे म्हणतात. ह्याच ग्रंथात 'अचळ सिव', 'अचळ सिवराज' असा गुरूचा उल्लेख हे ठिकठिकाणी करतात. मुनी कमळाकरांच्या सांगीवरून कामराजांकडून ह्यांची सुटका केल्यानंतर विश्वनाथांची अनुसरणाची वासना पाहून व शास्त्राभ्यासासाठी त्यांचा होणारा उपयोग लक्षात घेऊन स्वयंस्फूर्तीने शिवबासांनी ह्यांना दीक्षा दिली असावी. ह्यांची गुरुपरंपरा अशी : नागदेवाचार्य > कवीश्वर > परशरामबास > पेठे हरिबास > अचळमुरारीबास > अचळ (गुर्जर) शिवव्यास > विश्वनाथ ऊर्फ विसोबास. गुर्जर सिवबासांच्या सांनिध्यात विश्वनाथांना पंथीय तत्त्वज्ञानाचा परिचय घडला : शास्त्रश्रवण, मनन व चिंतन घडले. आपल्या उत्तर वयात हे बाळापूर (वऱ्हाड) येथे राहात असत. तेथे त्यांची शिष्यपरंपरा वाढली त्यामुळे त्यांना 'बाळापूरकर' असे म्हणू लागले. ह्यांना 'पंडित' असेही संबोधिले जात असे.

पंथीय परंपरा पाहता आपले सर्व आयुष्य ह्यांनी गुरूच्या, गुरुकुळाच्या सेवेत, अटण-विजनात, शास्त्राध्ययनात, शास्त्रसंशोधनांत व नामस्मरणपूर्वक परमेश्वरप्राप्तीच्या आचारधर्मात तळमळीने घालविले असे दिसते. *ज्ञानप्रबोध* ग्रंथ हे ह्या सेवेचेच फळ होय.

ह्यांचा *ज्ञानप्रबोध* हा महानुभाव तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन करणारा ग्रंथ महानुभावांच्या *साती ग्रंथां*पैकी एक आहे. पंथीय परंपरेतील माहितीप्रमाणे नारायणबास व विश्वनाथबास ह्या दोघांनी 'स्वस्ति वाडेगावी' राहून काव्यरचना केली. ह्या ग्रंथाच्या रचनाशकासंबंधी संशोधकांत मतभेद आहेत. नारायणबासांचे काव्य *ऋद्धिपुरवर्णन* व विश्वनाथबासांची रचना म्हणजे प्रस्तुत *ज्ञानप्रबोध* ग्रंथ. श. १८२९ मध्ये महंत दत्तलक्षराज महानुभाव ह्यांनी छापलेल्या *ज्ञानप्रबोध* ग्रंथाच्या छापील प्रतीतील रचनाकाल दर्शविणारी ओवी पुढीलप्रमाणे : "शके बाराशे त्रेपन भीतरी। प्रजापती नाम संवत्सरी। माघे पंचमी प्रथम प्रहरी । तैं ग्रथन पूर्ण झाले ॥ १२०३ ॥" ह्यावरून हा ग्रंथ श. १२५३ मधला ठरतो. हा शक डॉ. य. खु. देशपांडे व ल. रा. पांगारकर ह्या दोघांनी मान्य केला आहे. परंतु डॉ. य. खु. देशपांडे संपादित *ऋद्धिपुरवर्णना*तील कालनिदर्शक ओवीवरून (ओ. क्र. ६४१) त्या ग्रंथाचा काल श. १२८५ येतो. *ऋद्धिपुरवर्णन* व *ज्ञानप्रबोध* एकाच वेळी लिहिले गेले असल्याची माहिती टीपकार दत्तराज मराठे देतात. त्यामुळे ह्या दोन्ही ग्रंथांचा काल नक्की कोणता हे निश्चितपणे सांगता येत नाही. श. १२५३ ते १२८५ (इ. स. १३३१–१३६३) च्या दरम्यान हा ग्रंथ लिहिला गेला असावा असे अनुमान *ज्ञानप्रबोध*चे एक संपादक पु. चं. नागपुरे ह्यांनी केले आहे. *ज्ञानप्रबोध* ग्रंथाचे दुसरे संपादक डॉ. वि. भि. कोलते ह्यांच्या मते वरील दोन्ही ग्रंथांतील कालनिदर्शक ओव्या प्रक्षिप्त आहेत. गुरुपरंपरेच्या मार्गाने ग्रंथाचा स्थूल कालनिर्णय श. १३३५ असा ते ठरवितात. तसेच विश्वनाथबासांची पिढी श. १३३४–१३५४ मधली असे मानतात (*ज्ञानप्रबोध*, मलकापूर, १९७३; प्रस्ता., पृ. ३१).

*ज्ञानप्रबोध* ग्रंथाची रचना करताना विश्वनाथबासांचा मुख्य उद्देश गुरूंनी दाखविलेल्या मोक्षमार्गाच्या निरूपणाचा आहे. हा मोक्षमार्ग म्हणजे ज्ञानवैराग्यभक्तिप्रधान चक्रधरोक्त मोक्षमार्ग होय. चक्रधरस्वामींचे आचारविचारशास्त्र संक्षेपाने पूर्णतया *ज्ञानप्रबोधा*त उतरले आहे. पंथीय तत्त्वज्ञानाबरोबर भक्तिरसाची बोणेवाटी परमेश्वराच्या आरोगणेसाठी अर्पण करण्याचा हेतू ग्रंथारंभीच कवीने बोलून दाखविला आहे. ग्रंथाची एकंदर ओवीसंख्या १२२५ आहे. ग्रंथात गीतेच्या १३ व्या अध्यायातील अमानित्वादी ज्ञानलक्षणे सांगणाऱ्या ५ श्लोकांचे स्पष्टीकरण १३७ ओव्यांत (ओ. क्र. ७२–२०९) येते. ह्या टीका-ओव्या सोडल्यास उरलेल्या १०७९ ओव्यांत स्पष्टीकरणाचा धागा सांभाळून वैराग्यभक्तिपर स्वतंत्र विचार कवी व्यक्त करतो. भगवद्गीतेवर टीका लिहिणे हा ह्यांचा प्रधान हेतू नसून ज्ञानलक्षणांच्या निरूपणासाठी गीतेतील श्लोकांचा उपयोग त्यांनी करून घेतला आहे असे दिसते.

ह्या अध्यात्मग्रंथात काव्य आणि तत्त्वज्ञान ह्यांचा सुंदर संगम झाला आहे. काव्याचे स्वरूप कसे असावे हे सांगताना भक्ति आणि भाव ह्यांनी ते परिपूर्ण असावे असे कवी सांगतो. काव्यातील भक्तीच्या प्रतिपादनावर 'साहित्याचे बीक' चढविल्याने ते रस-पदवीला पोचले आहे. हा ग्रंथ वाचताना ठिकठिकाणी *ज्ञानेश्वरी*ची आठवण होते. [⇨ ३.]

विश्वनाथबासांच्या नावावर डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी *ज्ञानचंद्रिका* ह्या गद्यग्रंथाचा निर्देश केला आहे (ममवा., पृ. २८). वि. ल. भावे ह्यांनी *महानुभाव ग्रंथावली कवि-काव्य-सूचीत* (पृ. २८) 'विसोव्यास – बाळापुर – विश्वनाथ' ह्या कवीच्या नावावर *परसिद्धान्त चंद्रिका* (गद्यपर), *दृष्टान्तस्थळ* व *गीतार्थज्ञान* असे ग्रंथ नमूद केले आहेत. सिद्धान्ते हरिबास व धाकटे सोंगोबास व कृष्णमुनी ह्यांच्या *अन्वयस्थळां*तून विसोबासांचा हा एकच ग्रंथ निर्देशित केला आहे.

**रचना : मु.** — ज्ञानप्रबोध; ओ. सं. १२२५; र. स्थ. : स्वस्ति वाडेगाव (जि. अकोला); (१) संपा. महन्त श्रीदत्तलक्षराज महानुभाव; पुणे, १९०७; (२) संपा. नागपुरे, पु. चं.; अमरावती, १९७१; (३) संपा. कोलते, वि. भि.; मलकापूर, १९७३; **शंका.** — १. दृष्टान्तस्थळ. २. ज्ञानचंद्रिका.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कोलते, वि. भि. (संपा.); प्रस्ता., ज्ञानप्रबोध; मलकापूर, १९७३; पृ. १–६८; २. देशपांडे, य. खु.; ममवा., पुणे, १९६०; पृ. २८–३०.

**विश्वनाथमुनि–१** [इ.स. चे १४ वे शतक, अखेर] महानुभाव कवी. पारमांडल्य आम्नायातील वामनबासांचे हे शिष्य. ह्यांच्या ग्रंथरचनेचा उल्लेख पारमांडल्य आम्नायाचे जे एक *अन्वयस्थळ* उपलब्ध झाले आहे त्यात येतो : "वामन बासाचे विश्वनाथमुनि : तेहीं पंडिताचीया चौपदीया सारीखीया साटी चौपदीया केलीया : तेथ अभंगीं पारमांडल्य हें चि नाम :" असे ह्या *अन्वयस्थळ*कर्त्याने म्हटले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नेने, हृ. ना. : अन्वयस्थळ व वृद्धाचार; संलेसं., भा. १; नागपूर, १९५७; पृ. १४१–४६.

**० विश्वनाथमुनि–२** — पहा **विश्वनाथ बाळापूरकर.**

**विश्वनाथ (विप्र)** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** — महाभारत; संककासू., पृ. १०३.

**विश्वनाथ व्यास बीडकर** [इ. स. चे सतरावे शतक] महानुभाव प्रमेय-प्रबंधकार व भाष्यकार. उपाध्य आम्नायातील रेवेराज ह्यांचे शिष्य. वाल्हन पंडित हे विश्वनाथ व्यासांचे विद्यागुरू. विश्वनाथबास हे महानुभाव पंथातील प्रमुख ग्रंथकारांपैकी एक व मुरारमल्ल विद्वांसांचे समकालीन. महानुभावीय तत्त्वज्ञानाचे ते प्रगाढ पंडित होते. पंथीय साही दर्शनांचे ते खोल अभ्यासक होते. पंथीय मतांची व विचारांची ते प्रभावीपणे मांडणी करीत. विश्वनाथबासांनी आचारदृष्टान्तादी

*स्थळग्रंथांवर* महाभाष्ये लिहिली. श्रीहयग्रीव व्यासकृत *गधराजस्तोत्र* आणि पंडित दामोदरकृत *चौपधा* इत्यादी प्रकरणांवर त्यांनी टीका लिहिल्या आहेत. ह्यांचा प्रसिद्ध ग्रंथ *ध्यानामृतस्तोत्र*. ह्या ग्रंथाची रचना शके १५६३ (इ. स. १६४१) मध्ये हिरवळीये ह्या गावी पूर्ण झाली. नंतरच्या काळात ह्या ग्रंथावर अनेक टीका झाल्या आहेत. *नामविभक्ति* व *पंचवार्तिक* ह्या नावाचे दोन व्याकरणग्रंथ ह्या बीडकरांचे असावेत असे महंत गोपीराज ह्यांनी दिलेल्या माहितीवरून मो. स. मोने म्हणतात (*मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरण-प्रबन्धकार*, पुणे, १९२७, पृ. ७९). पण ह्याविषयी अभ्यासकांत मतभेद आहेत. ह्यांची *संसरण-प्रमेय* ही रचना मुद्रित झाली आहे (महानु., ऑक्टो. १९७०).

विश्वनाथ व्यास बीडकरांनी प्रमेय-रचना विपुल प्रमाणात केल्याचे आढळते. हा महानुभावीय वाङ्मयातील एक गद्य रचनाप्रकार आहे. प्रमेय-प्रबंधाचा वा (प्रमेय-रचनेचा) आरंभ नागदेवांच्या मार्गदर्शनाखाली प्रथम केशिराजबास व दामोदर पंडित ह्यांनी ज्या वेळी महानुभाव पंथाची शास्त्रीय मांडणी केली त्याच वेळी झाला. चक्रधरोक्त सूत्रांच्या पाठांतील वचनांवर आणि *दृष्टान्तपाठा*तील दृष्टान्तांवर केलेली ही प्रमेये म्हणजे संक्षिप्त भाष्येच होत. संस्कृत न्यायपद्धतीला अनुसरून ह्या प्रमेय-रचनेचे स्वरूप आहे.

प्रमाणादिकांचा आश्रय करून जे जाणावयाचे ते ' प्रमेय ' होय असे त्याचे प्रसिद्ध नैयायिक भासर्वज्ञ (*न्यायसार*कर्ते; इ. स. ९०० चा सुमार] ह्यांनी लक्षण केले आहे. ज्याचे ज्ञान अन्यपदार्थांच्या विनिश्चयास – कीटकसंख्यादिवत् – उपयुक्त होत नसून, जे फक्त ' निःश्रेयससाधनं भवति तत्प्रमेयं, तदेव तत्त्वतो ज्ञातव्यं सर्वदा भावितव्यं च ', प्रत्यक्ष-अनुमानादि प्रमाणांच्या ज्ञानाने आत्मादी पदार्थांचे ज्ञान करावें व मोक्ष जवळ करावा. ह्यानंतर प्रमेय-विषयांची माहिती भासर्वज्ञांनी दिली आहे (नी. ब. भवाळकर : " शैया पालना प्रमेय "; विज्ञावि., जाने. १९३६; पृ. २–३).

*दृष्टान्तपाठा*वरील ह्यांचे *दृष्टान्तस्थळ* ह्या नावाचे भाष्य पंथात मान्यता पावले आहे. अवतारकार्यापासून तो जीवोद्धरणापर्यंत दृष्टान्तांची निरनिराळ्या प्रकरणांत ग्रंथकाराने विभागणी केली आहे. *दृष्टान्तपाठा*च्या प्रमाणित पाठाची चिकित्सा–चर्चा करून पाठ-निश्चितीही केली आहे. *दृष्टान्तपाठात* आलेल्या प्रत्येक शब्दवाक्याचे विविध संभाव्य अर्थ देऊन भाष्यकाराने शास्त्रान्वय केला व पूर्व आणि उत्तर दृष्टान्तांचा संदर्भ देऊन त्यांचा परस्परसंबंध निवेदन केला आहे.

दृष्टान्तातील आध्यात्मिक रूपक ह्यांनी विविध प्रकारे उकलून दाखविले आहे. पक्षोपपक्षांच्या अर्थांचेही विवरण त्यांनी केले आहे. *दृष्टान्तस्थळ*कारांच्याच भाषेत " दृष्ट पदार्थाचेनि अनुवर्तने अदृष्ट अर्थ जाणावया हें दृष्टान्तस्थळ प्रवर्तले असे : ". ह्या ग्रंथाच्या रूपाने पंथीय शास्त्र अधिक दृढ झाले. तात्त्विक विचाराची साधकबाधक चर्चा करणारा म्हणून हा *स्थळग्रंथ* होय. ज्या अर्थनिर्णयशास्त्राचा पाया तेराव्या शतकात घातला गेला, त्याचे १६ व्या शतकातील विकसित स्वरूप पंडित विश्वनाथबासांच्या दृष्टान्तस्थळाच्या रूपाने दृष्टोत्पत्तीस येते. हा ग्रंथ अद्यापि अप्रकाशित आहे (व. दा. कुळकर्णी : ' दृष्टान्त-स्थळ – एक विश्लेषण '; मस्वासंप., हैद्राबाद, १९७३; पृ. २८).

महंत बलदेवराज कवीश्वर मुसाफिर (महानुभाव, डेहराडून) ह्यांनी विश्वनाथबासांच्या अशा बावीस प्रमेयांच्या नावांची यादी दिली आहे. ती अशी : १. प्रथम गद्याची टीका, २. जिज्ञासा स्थळ, ३. त्याउपरी चौकडी स्थळ, ४. मग सिद्धान्त-भास्कर, ५. मग दृष्टान्त स्थळ, ६. मग अधिकार स्थळ, ७. मग प्रतीति पट, ८. विषयपटाचे बाधे निवारण साध्यपट, ९. करणीये प्रकर्णी वस्तुभजनीया वचनीं इष्टाचे अनुवर्तन, १०. जन्म जीवित परमेश्वरासि देयावें : तिये वचनीचा पक्षवाखानिला, ११. सबन्धे रजस्तमे उपजति तयाचा निरास, १२. पुरुषार्थ या बयाचे प्रकार किती, १३. सत्यपदार्थि अप्राप्तिस्थळ, १४. लक्षणांचे अन्वय संसरण, १५. पूर्वी पट, १६. आत्मतीर्थ प्रतिष्ठा, १७. लघु साध्यपट, १८. आशंकास्थळ, १९. विवेकपट, २०. विवेकसार, २१. आचारस्थळ, २२. आगम आयुष्य साध्य साधनी अनुवर्तन....एवं विश्वनाथ बासाची बावीस प्रमेय संपूर्ण ॥ (महानुभाव, जुलै–ऑग. १९६४, पृ. ३२).

**विश्वनाथसुत** [का. अनु.] कवी.

**रचना :** मु. – शिवपर पदें; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. २८. अमु. – १. कोकसागर (कामशास्त्र); अध्याय ६ वा; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ७०. २. नारायणस्तुति; सवामं. हस्त. सू., खं. २. ३. पदपदांतरे; तंसम हस्त. यादी, क्र. ३.

**विश्वंभर** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पिंगा, देवीपर पद, इ. स्फुटे; तंसम. हस्त यादी, क्र. ३.

**विश्वंभरनाथ / ० विश्वंभर प्रभुनाथ निरंजन** [अंदाजे श. १६३० / इ. स. १७०८] कवी. नाथसंप्रदायी. गुरू : निरंजननाथ. बहुधा, समर्थकालीन व ज्यांचा पंढरीस बराच काल वास झाला तेच हे असावेत.

विश्वंभरांचे *गोपीचंदाख्यान* काव्य हिंदी-मराठी-मिश्रित असून त्यात मराठी भाषेतील काही श्लोक, सवाया, पदे वगैरे आहेत. त्याचे ५ सर्ग आहेत. ही पोथी श. १७१९ (इ. स. १७९७) पिंगलसंवत्सरी केलेली आहे. ती गो. का. चांदोरकर ह्यांच्या संग्रही आहे. ह्या ग्रंथाव्यतिरिक्त कवीची पदे, अष्टके, आरत्या अशी स्फुट कविता समर्थ-वाग्देवतामंदिरातील बाडांतून विखुरलेली आहे (सवामं. हस्त. सू., खं. २).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, गो. का. : विश्वंभरनाथ; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ७०–७१.

**० विश्वंभर प्रभुनाथ निरंजन** – पहा **विश्वंभरनाथ.**

**विश्वलिंगाचा दास** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – सुलोचनाख्यान; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १०४.

**विश्वानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विश्वेश्वर (पंडित)** [का. अनु.] गद्य ग्रंथकार. हे एकनाथांचे समकालीन असावेत. विश्वेश्वरांचा अश्वचिकित्सेवरील ग्रंथ ही मूळ संस्कृत ग्रंथावरील महाराष्ट्र-टीका आहे. ग्रंथाचे हस्तलिखित उपलब्ध आहे (मसा. आ. ५, पृ. २३८, ६०६).

**विश्वेश्वरस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरें; सवामं. हस्त. सू., खं. २.

**विष्णु–१** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – कृष्णाचा पाळणा; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विष्णु–२** [का. अनु.] आरतीकार.

**रचना :** मु. – दोन शंकराच्या, एक गंगेची व एक कृष्णाची अशा चार आरत्या; मआ., पृ. ३६६, ४०४, ४२०, ४२२.

**विष्णु काशिनाथ** [का. अनु.] पदकार. गाणपत्य. गणेशयोगी ह्यांचे शिष्य.

**रचना :** अमु. – अभंग, ओव्या, पदे, श्लोक अशी विविध विषयांवर स्फुट स्वरूपाची रचना; उदा., मुंज्या, पांगुळ, कैकाडीण, जंगम, वासुदेव इ.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : विष्णु काशिनाथ (गणेशयोगीशिष्य); भाइसंमंइति., १८३७; पृ. ४५–४६.

० **विष्णुदास-१** – पहा **विष्णुदासपरिसोबा.**

**विष्णुदास-२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – कर्णपर्व; त्रु.पो.; प्रत श. १६९१/इ. स. १७६९; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ५४.

**विष्णुदास-३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अभंग, कृष्णपर ओव्या, बोधपर पदे, आरती, गजेंद्रमोक्ष ओव्या इ. स्फुट कविता; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**विष्णुदास नरसिंह** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शिबिकथा; ओ. सं. १६१; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

० **विष्णुदास नामदेव-१** – पहा **नामदेव-२.**

० **विष्णुदास नामदेव-२** – पहा **विष्णदास नामा.**

० **विष्णुदास नामा-१** – पहा **नामदेव-१.**

**विष्णुदास नामा-२ / ० नामा विष्णुदास / ० विष्णुदास नामदेव-२ / ० मतिविवेकनामा** [अंदाजे इ. स. च्या सोळाव्या शतकाचा उत्तरार्ध] मराठी भाषेत अठरा पर्वे भारत लिहिणारा आद्य *महाभारत*कार व कथाकाव्याचा प्रवर्तक. ह्यांची चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. *गोमंतकीय मराठी काव्य* ह्या पुस्तकात "हे कवी मध्यप्रांतात उदयास आले व जन्मस्थान निश्चित नाही. ह्यांच्या काव्याचा प्रसार गोवे प्रांतात सोळाव्या शतकात फार होता. ह्यांचे काव्य गोवे प्रांतात लोकप्रिय होते," अशी माहिती दिली आहे (पृ. ५). *महाराष्ट्रीय संत-कवि-काव्य-सूची*त (पृ. ५६) विष्णुदास नामा व कृष्णदास नामा हे एकच होत, असे गो. का. चांदोरकर ह्यांनी लिहिले आहे. त्यांच्या मते हे जातीने विप्र असून पंडित होते. ह्यांनी *कपोताख्याना*त आपल्या गुरूचे नाव 'रामभारती' असे दिले आहे असेही ते सांगतात. चांदोरकरांना विष्णुदास नामाकृत ओवीबद्ध *महाभारता*ची अठरा पर्वे धुळे व जळगाव ह्या जिल्ह्यात मिळाली. त्यांतील उल्लेखांवरून श. १५३५ पूर्वी हे *महाभारत* लिहिले गेले असावे असा त्यांचा तर्क आहे ('विष्णुदासनामा यांचे साग्र महाभारत', भाइसमंत्रै., १२ : ४). आज ही *महाभारता*ची पर्वे त्यांजकडे अगर इतरत्र उपलब्ध नाहीत. वि. का. राजवाडे ह्यांच्या मते *शुकाख्यान* ह्या त्यांच्याच काव्यातील उल्लेखांवरून विष्णुदास नामा शके १५१७ मध्ये होऊन गेले असावेत. *शुकाख्याना*तील प्रस्तुत कालोल्लेख असा : "मन्मथनाम संवत्सर पौष्य मासी। सोमवार अमावास्येच्या दिवशीं। पूर्णता आली ग्रंथासी। श्रोते सावकाशी परिसीजे॥ ३७१॥" (भाइसंमंइति., शके १८३३, पृ. १२२). वि. का. राजवाडे व शि. म. परांजपे ह्यांनी भक्त नामदेवांप्रमाणे विष्णुदास नामा जातीने शिंपी असावेत असे वेगळेच मत व्यक्त केले आहे (भाइसंमंइति., श. १८३४ व १८३८, ह्यांतील लेख).

तंजावर येथील सरस्वती महालामधील *कपोताख्याना*च्या प्रतीचा कर्ता विष्णुदास नरसिंह आहे. ह्यावरून विष्णुदास नामांचे गुरू कोण होते हाही एक वादग्रस्त प्रश्न आहे. त्यातील राम, श्रीराम किंवा रामभारती हा विष्णुदास नामांचा गुरू नव्हे हे स्पष्ट होते. तो प्रतलेखकाचा गुरू असावा. ह्यांचे गुरू चिंतामणी असाही तर्क त्यांच्या ग्रंथात येणाऱ्या पुढील ओवीवरून केला जातो : "आतां नमूं तो कुळगुरू। जो परंपारा वृद्धाचारू। तो चिंतामणी भवतारू। स्वामी माझा॥" (मसा., आ. ४, पृ. २८४). *शल्यपर्वा*त ह्यांनी आपल्या गुरूचे नाव 'गोपीनाथ' दिले आहे, असे सांगण्यात येते (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २०४). वस्तुतः रामभारती, गोपीनाथ किंवा चिंतामणी ही वेगवेगळी नावे वेगवेगळ्या प्रतीत आढळतात.

विष्णुदास नामांच्या ओवीबद्ध *महाभारता*च्या प्रती सर्वविख्यात आहेत. त्यांतील एका प्रतीची ओवीसंख्या २०००० सांगितली जाते. ह्या ग्रंथाच्या संदर्भात वि. ल. भावे लिहितात, "या नामा विष्णुदासांच्या नांवानें 'बुभ्रभावनी' व 'कपोत-आख्यान' अशीं दोन प्रकरणें आढळतात. हीं प्रकरणें *महाभारत*कार नामदेवाचीं नसण्याचा संभव बराच आहे. *महाभारत*कार दुसरा नामदेव, म्हणजे हा नामदेव, आपल्या उत्तरवयात महानुभाव-पंथात शिरलेला दिसतो. महानुभाव-ग्रंथकार नामदेवानें भटमार्ग (महानुभाव-पंथ) स्वीकारिल्याची हकीकत देतात. . . .आणखी एक बाब अशी कीं, *महाभारतां*त अनेक ठिकाणीं 'नामा विष्णुदास' असा उल्लेख आहे. 'कृष्णदास नामा' असा उल्लेख नाहीं. महानुभावांनीं आपणांला विष्णुदास म्हणविल्याचीं उदाहरणें नाहींत. ते (स्वतःस) नेहमीं कृष्णदास म्हणवितात." (म. सा., आ. ४, पृ. २८८). विष्णुदास नामा मानभाव असावेत आणि त्यांनी *महाभारत* लिहिले असावे, असा संशय चांदोरकरांनाही आला होता. *स्मृतिस्थळा*तील ज्या उल्लेखांवरून विष्णुदास नामा उत्तरवयात महानुभाव पंथात शिरले असे म्हटले जाते, तो उल्लेख संदिग्ध व शंकास्पद आहे, असे *स्मृतिस्थळ* ह्या ग्रंथास वा. ना. देशपांडे ह्यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेवरून स्पष्ट होते. त्यांनी संपादिलेल्या *स्मृतिस्थळा*त विष्णुदास नामांची स्मृती दिली आहे. पण *स्मृतिस्थळा*नुसार विष्णुदास नामांना महानुभाव पंथाची दीक्षा अगर उपदेश मिळालेला दिसत नाही. त्यामुळे विष्णुदास नामांनी महानुभाव पंथात प्रवेश केला त्यानंतर कृष्णदास नावाने काव्य केले, हा डॉ. व. वि. पारखे ह्यांनी काढलेला निष्कर्षही वरील उपलब्ध पुराव्यास विरोध करणारा आहे. परिणामतः विष्णुदास नामांनी महानुभाव पंथात प्रवेश केल्यानंतर *विराट* व *कर्ण* पर्वांची रचना केली असे समजणे योग्य होणार नाही. ह्या पर्वांच्या महानुभाव पंथाबाहेर इतरत्र ज्या प्रती उपलब्ध आहेत त्यांवर विष्णुदास नामा अशीच नाममुद्रा आहे.

धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिरात विष्णुदास नामा ह्यांच्या *चंद्रहास्याख्याना*ची एक जुनी हस्तलिखित प्रत आहे. कवीने ह्या पोथीतील तीन प्रसंग, अनुक्रमे ६५, ७५ आणि ५३ ह्या ओव्यांत वर्णिले आहेत. त्यात पहिल्या प्रसंगाचे शेवटी, 'ते सांगे नामा विष्णुदास' अशी नाममुद्रा दिली आहे. दुसऱ्या प्रसंगात 'म्हणे नामा पाठक' असा उल्लेख आहे. ह्यावरून नामा पाठक व विष्णुदास नामा हे एकच किंवा काय अशी शंका उत्पन्न झाली. ह्या शंकेचा परिहार करताना प्रा. म. रा. जोशी ह्यांनी पुढीलप्रमाणे मत व्यक्त केले आहे : "विष्णुदास नाम्याच्या *महाभारता*चा प्रसार सर्वत्र झाला व त्यामुळे प्रतलेखकांनी त्याच्या नकला करून घेत असताना त्यांत काही भर घातली. तसेच नामा पाठकाच्या *महाभारता*च्या पर्वातील काही भाग त्या पर्वात समाविष्ट करून संहितेत बदल केला असावा. ग्रंथकाराच्या मूळ संहितेत बदल करण्याचे प्रकार कृष्णदास मुद्गलकृत *युद्धकांडा*त सुद्धा आढळून येतात." अशा प्रकारे प्रतलेखकांनी विष्णुदास नामांच्या कृतीचे लेखन करीत असता इतर जो काही भाग त्यात समाविष्ट केला त्यामुळे विष्णुदास नामांच्या संहिता अपपाठयुक्त झाल्या.

विष्णुदास/कृष्णदास नामा, नामा पाठक ह्यांच्याप्रमाणेच *लहुकुशपुराण* लिहिणारा 'मतिविवेकनामा' आढळतो. ह्या पुराणाच्या पहिल्या चार प्रसंगांत, 'मतिविवेकनामा म्हणे' असे म्हटले आहे (रासं., खं. २, पृ. २७, २८). पाचव्या प्रसंगाच्या शेवटी 'विष्णुदासनामा' असा नामोल्लेख येतो. ह्या उल्लेखांवरून 'विष्णुदासनामा' तोच 'मतिविवेकनामा' असावा अशी समजूत होते (तत्रैव, पृ. ३८५, ४२४). ह्या संबंधात रामदासी संशोधनकारांनी नामदेव नावाचे अनेक संतकवी होऊन गेले, त्यांच्यापासून आपली निराळी ओळख पटावी म्हणून ह्यांनी आपणास 'मतिविवेकनामा' म्हटले आहे, असा उलगडा केला आहे.

डॉ. व. वि. पारखे ह्यांनी विष्णुदास नामांच्या नावावर मोडल्या जाणाऱ्या प्राकृत *महाभारता*च्या हस्तलिखितांच्या प्रतींचा अभ्यास

करून काही निष्कर्ष काढले आहेत. त्यांच्या मते भाषाभिन्नतेमुळे, कथासूत्रभिन्नतेमुळे, तसेच सर्व हस्तलिखितांत एकवाक्यता नसल्यामुळे ह्या सर्व हस्तलिखितांचे कवी वेगवेगळे विष्णुदास नामा ठरतात. त्यांपैकी एक महानुभावीय *महाभारत*कार 'विष्णुदास नामा' ऊर्फ कृष्णदास नामा असावा. दुसरा 'विष्णुदास नामा' अठरा हात कापड शुद्ध होऊन अठरा ब्राह्मण जिवंत होत असल्याचे कथासूत्र रचणारा, तिसरा विष्णुदास नामा मुंबई प्रतीचा व चवथा विष्णुदास नामा तंजावर प्रतीचा असावा असे त्यांना वाटते ('विष्णुदास नामा : मराठी साहित्यातील यक्षप्रश्न', मसाप., डिसें. १९६३, पृ. ३५).

डॉ. सरोजिनी शेंडे ह्यांनी 'विष्णुदास नामा व त्याचें वाङ्मय' ह्यावर एक संशोधनात्मक प्रबंध लिहिला आहे ('विष्णुदास नामांच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास'; सरोजिनी शेंडे (Ph. D. प्रबन्ध); Unpublished manuscript in the University Library, Bombay, N. 2591 A). डॉ. शेंडे ह्यांच्या मते कवीच्या *संपूर्ण महाभारत* ग्रंथाची ओवीसंख्या अंदाजे १३,५०० इतकी आहे. त्यात मूळ *भारता*तील अनेक कथा व उपकथा गाळून त्यांच्या जागी स्वतः रचलेल्या किंवा लोकांत रूढ असलेल्या नव्या कथा तो घालतो. मूळ *भारता*च्या संक्षेप-विस्ताराचे त्याचे निश्चित असे धोरण दिसत नाही. भारतीय कथांचे पौर्वापर्यही न पाहता निरनिराळ्या पर्वांत आलेल्या कथांचे मिश्रण करून त्याने नव्या कथा बनविल्या आहेत. कालविपर्यासाचा दोष पत्करून मूळ भारतीय कथेचा आराखडा कायम ठेवून त्याने स्वैरपणे बदल केले आहेत. त्याच्या इतर काव्यांची संख्या ४००० पर्यंत जाईल. त्यात *भारत* व *रामायणी* स्फुट काव्ये आहेत. त्यांपैकी *हरिश्चंद्राख्यान* व *शुकाख्यान* महत्त्वाचे. विष्णुदास नामा कोणत्याही संप्रदायाचा किंवा परंपरेचा अनुयायी वाटत नाही. ह्याच्या काही हस्तलिखित पोथ्या शके १५५० च्या सुमाराच्या आहेत. ह्याचा काळ साधारणपणे श. १५०२ ते १५५५ (इ.स. १५८० ते १६३३) पर्यंतचा असावा. ह्याच्या *महाभारता*ची काही पर्वे महानुभावांच्या सांकेतिक लिपीत लिहिलेली सापडतात. तथापि, तो महानुभाव होता असे मानण्यास सबळ पुरावा नाही. ह्याच्या *द्रौपदीस्वयंवर* काव्याचा परिचय करून देताना, ह. ना. नेने ह्यांनी म्हटलेच आहे की, 'कृष्णकथेच्या प्रेमाशिवाय महानुभाव तत्त्वज्ञानाचा अंशमात्रही त्यांच्या *महाभारतात* सापडणार नाही' (मसाप., व. २७, अं. १०९).

प्रा. म. रा. जोशी ह्यांनी विष्णुदास नामाकृत *नलोपाख्यान* संपादिले आहे. ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत विष्णुदास नामा ह्यांच्यासंबंधी आजवर झालेल्या चर्चेचा परामर्श घेऊन त्यांच्या स्थलकाल, गुरुपरंपरा ह्यांविषयी त्यांनी काही विचार मांडले आहेत. नामामुद्रांकित पदे व अभंग ह्यांतील 'बरवे गा शंकरा नाम तुझे' ह्या पदातील 'ऐसा सदा आनंद राउळी। विष्णुदास नामा पंढरपुरी ॥' ह्या चरणावरून हे पंढरपूरचे होते, असे म. रा. जोशी ह्यांना वाटते. ह्यांनी पंढरपूरतीर्थक्षेत्रवर्णनपर रचना केली आहे. केशव, केशिराज, विठ्ठल ह्यांना उद्देशून अभंगरचनाही केली आहे. त्यांच्या *हरिश्चंद्रपुराण* कथेत केशिराज, हरि ही विठ्ठलाची पर्यायी नावे येतात; पंढरपूरच्या बडव्यांचा उल्लेख येतो व स्वकालीन पंढरपूरचे वर्णनही येते. उत्तरकालीन कवींनी कबीर-नामदेव भेटीचा जो प्रसंग वर्णिला आहे त्याचे कारण विष्णुदास नामा हे पंढरपूरचे रहिवासी होते हेच आहे.

'सागराचें उदक जगा विनवीत ।......परसा भागवत हें सकळांचें जीवन । विष्णुदास नामा त्याचे चरणीचे रजरेण।' ह्या *सकलसंतगाथे*तील अभंगावरून (भा. १, अभंग क्र. ८४०) ह्यांचा संबंध आद्यनामदेवशिष्य परिसा भागवत ह्यांच्याशी गुरूच्या नात्याने आला असावा असेही प्रा. जोशी अनुमान काढतात. परसा भागवतांचा काल (श. १२१० / इ. स. १२८८ – श. १२७० / इ. स. १३४८) लक्षात घेता विष्णुदास नामांचा काल अंदाजे श. १२६०–१३३२ / इ. स. १३३८–१४१० च्या दरम्यानचा ठरविता येतो.

ज्ञानदेवसमकालीन (आद्य) नामदेवांनी भक्तीच्या भरात स्वतःस 'विष्णुदास' म्हणवून घेतले आहे. इतर तत्कालीन संतही त्यांना 'विष्णुदास' ह्या गौरवार्थी अभिधानाने संबोधीत असत. ह्या आद्य नामदेवांनी 'केशिराज', 'केशव', विठ्ठल' ह्या देवतांच्या उल्लेखाने आपले व्यक्तिमत्त्व स्पष्ट दर्शविले आहे. जसे, (१) असे आर्त मनीं 'विष्णुदासा'; (२) ज्ञानदेव म्हणे परियेसी 'विष्णुदासा'; (३) म्हणे खेचर विसा परियेसी 'विष्णुदासा'; (४) नामा म्हणें नेणें आन तुजवांचून; जनक जननी 'केशिराजा'. असे कितीतरी उद्गार आद्य नामदेवांच्या नावावर दाखवता येतील. तेव्हा प्रा. म. रा. जोशी ह्यांचे 'केशव, केशिराज व विठ्ठल ह्यांना उद्देशून विष्णुदास नामांनी अभंगनिर्मिती केली म्हणून ते पंढरपूरचे रहिवासी होते', हे म्हणणे दूरान्वयी पुराव्यावर आधारलेले आहे. शिवाय, परसा भागवताच्या अभंगरचनेचे संशोधन व छाननी अजून व्हावयाची आहे. तोपर्यंत वरील विधाने निःशंकपणे स्वीकारता येतील असे नाही.

मुक्तेश्वरपूर्व कालात भारती कथेची आवड विष्णुदास नामा मुद्रांकित काव्याने बरीच निर्माण केली होती. ह्या कवीने मूळ अठरा पर्वे महाभारत ग्रंथाचा आशय मराठीत सांगण्याचा प्रयत्न केला. हे करीत असताना व्यासांच्या *महाभारतात* जी आख्यानके व कथा आल्या आहेत त्याही त्यांनी रंगविल्या आहेत. संशोधकांनी ह्या कवीचे *साग्र अठरा पर्वे प्राकृत महाभारत* मिळविण्याचा प्रयत्न केला असून त्यांतील बरीच पर्वे उपलब्ध झाली आहेत. का. ना. साने ह्यांना उदापूर येथे विष्णुदास नामांची तेरा पर्वे उपलब्ध झाली होती ('साग्र प्राकृत महाभारत', भाइसंमं., श. १८३२). प्रा. म. रा. जोशी ह्यांना विदर्भात सूर्जी अंजनगाव येथे (दादम् भटजी ह्यांच्या मठात) विष्णुदास नामांची एकूण बारा पर्वे मिळाली. त्यांना मिळालेल्या *आदीपर्वा*वर पुढीलप्रमाणे समाप्तिशक दिला आहे : 'श्री संवत् १७१८ सके १६४३ पलव नाम संवत्सरे.. प्रतिपदायातदिने ग्रंथ समाप्तमस्तु ॥' उपलब्ध पर्वे अशी : आदीपर्व : ओ. सं. ५,११५; सभापर्व : ओ. सं. ७६०; अरण्यपर्व : ओ. सं. ९५७; विराटपर्व : ओ. सं. १,०००; उद्योगपर्व : ओ. सं. ३,७९३; भीष्मपर्व : ओ. सं. ४६९; द्रोणपर्व : ओ. ८०१; गदापर्व : ओ. सं. ६५०; शांतिपर्व : ओ. सं. २२२०; सौप्तिकपर्व : ओ. सं. ३८३; अनुशासनपर्व : ओ. सं. २३९; स्वर्गारोहणपर्व : ओ. सं. ६०३; एकूण ओव्या १६,९८३.

विष्णुदास नामांची जी आख्यानपर रचना आढळते ती *महाभारता*धिष्ठित असून प्रतलेखकांनी त्यांना जो भाग आवडला तो स्वतंत्रपणे लिहिला. *महाभारता*च्या उद्योगपर्वाच्या हस्तलिखितात *हरिश्चंद्राख्यान* व *कपोताख्यान* ह्या आख्यानकाव्यांचा समावेश आहे. *ऐरावताख्यान* आदिपर्वात, *कलियुगमहिमा* स्वर्गारोहणपर्वात, *चक्रव्यूहकथा* द्रोणपर्वात, *एकादशीकथा* शांतिपर्वात, *म्हाळसेनकथा* द्रोणपर्वात अशी आख्यानकविता विविध पर्वांत विखुरलेली आहे. मूळ *भारता*तील अनेक कथा व उपकथा गाळून विष्णुदास नामा त्यात स्वतःच रचलेल्या कथा घालतात. ह्यांच्या रचनेत कित्येकदा पाल्हाळ तर काही वेळा पांडित्यप्रदर्शन ह्या गोष्टी दिसून येतात. ह्यांनी रचलेले *द्रौपदीस्वयंवर* साध्या व बालबोध लिपीत आहे. ह्या *द्रौपदीस्वयंवरात* असा एक पण वर्णिला आहे : 'खाली कढईत तेल घातले असून वर वेगाने फिरणारा मासा लाविला आहे आणि उतू जाणाऱ्या ह्या तेलात पाहून वर फिरणाऱ्या माशाचा भेद बाणाने करावयाचा आहे.' ह्या 'पणास' अनुलक्षून आपल्या *महाभारता*चे कथन करताना मुक्तेश्वरांनी 'प्राकृत कवींचा वाग्जल्प' असा टोमणा मारला आहे तो बहुधा विष्णुदास नामांना उद्देशूनच असावा. मुक्तेश्वरांच्या म्हणण्यानुसार मूळ *भारतात*

'नलिकाछिद्रांतूनि पाहीं। यंत्र भेदोनि पाडिले' अशी कथा आहे. 'कढईंत तेल उकळत होते त्यांत पाहून' हे विष्णुदासांचे म्हणणे व्यासोक्तीला धरून नाही. ह्याच ग्रंथात तिसऱ्या प्रसंगात 'आपण *हरिवंशा*च्या इतिहासास धरून सांगत आहोत' असे म्हटले आहे. ह्या हरिवंशाचा आधार घेऊन पांचाळनगरात पांडव आले असता भेटून परत जाताना श्रीकृष्णाने मोठ्या किमतीची मुद्रिका पांडवांस दिली, त्या मुद्रिकेला उद्देशून विष्णुदास नामांनी एक विनोदकथा सांगितली आहे. ही मुद्रिका दाखवून भीम भिक्षेकऱ्याच्या रूपाने पोटभर जेवणासाठी कसा प्रयत्न करतो, मुद्रिका परत मागताना तो राजेरजवाड्यातील कर्त्या पुरुषाशी कसा भांडतो व श्रीकृष्ण हे भांडण कसे कुशलतेने मिटवितो इत्यादी वर्णन आले आहे. विष्णुदास नामांनी 'श्लेष' काढून ही आडकथा रंगविली आहे. त्या आडकथेस *महाभारतात* आधार नाही. अशा अनेक विलक्षण कथा त्यांच्या काव्यात येतात. ह्या आख्यानकाव्यात गंधर्वांची 'चाक्षुकी' विद्या पांडवांना कोणत्या रीतीने उपयोगी पडली हे 'विष्णुदास नामा' ह्यांच्या उपपत्तीवरून जितके स्पष्ट होते, तितके *मुक्तेश्वरी-भारता*वरून समजत नाही. विष्णुदास नामांची वर्णनशैली, त्यांची वर्णने व त्यांतील शब्दांचा उपयोग साधा आणि सरळ आहे. हा सामान्य जनतेचा कवी आहे. ह्या संदर्भात डॉ. व. वि. पारखे लिहितात, "विष्णुदास नामांचे *महाभारत* ही *व्यास-महाभारता*ची प्रतिकृती, अवतार, भाषान्तर वगैरे न समजता ती रचना संपूर्णपणे *महाभारते*तर असल्याने तिला लोककथा समजून त्या रचनेस 'भारत परिमंडळकथा' असे मानून विष्णुदास नाम्याचे नाव प्राकृत *महाभारत*कारांच्या सूचीतून वगळले जावे व त्याच्या *महाभारता*चा अभ्यास लोकसाहित्याच्या दृष्टीने केला जावा." ('विष्णुदास नाम्याचे महाभारत – काही विचार'; *युगवाणी*, मे–जून १९७२, पृ. ३७). विष्णुदासांच्या सरस व साध्या शैलीने त्यांचा भाव किंवा आशय सामान्य जनांच्या सहज लक्षात येतो. त्यांना आवडेल अशा ढंगाने हा कवी कथा सांगतो. त्याच्या कथानकाची भाषा जुनी व काव्यरचना भावनाप्रधान असून श्रोत्यांना त्यातील रसाळपणामुळे ती समाधान देणारी आहे. मुक्तेश्वर व श्रीधर ह्या थोर कवींनीही आपली काव्यरचना करताना, विशेषतः *हरिश्चंद्राख्यान* रचताना, मुख्यतः विष्णुदास नामांचीच कृती डोळ्यापुढे ठेविली. त्यांच्यावरही विष्णुदासांच्या कृतीचा खोलवर परिणाम झालेला आहे. संतोषमुनी कृष्णदास ह्यांच्या समोर *रुक्मिणीस्वयंवर* काव्य लिहिताना विष्णुदास नाम्यांचे *महाभारत* [ ⇨ ३ ] होते असे ना. ब. जोशी ह्यांनी दाखवून दिले आहे ('जनमेजयांच्या अठरा ब्रह्महत्या व विष्णुदास नामा', मसाप., अं. १४२).

विष्णुदास नाम्यांची लोकप्रिय आख्याने १६ व्या शतकाच्या उत्तरार्धात गोव्यातील ब्राह्मणांच्या वाचनात होती असे दिसते. ह्या कथांचे इ. स. च्या १७ व्या शतकाच्या सुरुवातीस कोकणी बोलीत अनुवाद झालेले आहेत. ब्राग (पोर्तुगाल) येथील सार्वजनिक ग्रंथालयातील क्र. ७७१–७७२ च्या दोन हस्तलिखित पुस्तकांमध्ये हे रोमन लिपीतील अनुवाद संग्रहित केलेले आहेत. ह्यांखेरीज आणखी तीस पौराणिक कथांचे रोमन लिपीत संकलित केलेले एक पुस्तक (क्र. ७७३) तेथे आहे. ह्यामध्ये विष्णुदास नाम्यांची १. *प्रल्हादचरित्र*, २. *हरिश्चंद्रपुराण कथा*, ३. *सुखदेव चरित्र कथा*, ४. *धर्माचा अश्वमेध*, ५. *कर्णपर्व* अशी आख्याने आढळतात. ह्या कथांचा कोकणीत अनुवाद करणारा कोण ह्या गोष्टीचा थांग लागत नाही. मिशनऱ्यांच्या उपयोगासाठी त्या काळी हे अनुवाद तयार केले गेले. हे काम गोव्यातील सारस्वत ब्राह्मणांपैकी कोणी केले असावे किंवा रोमन लिपीतील नक्कल करणारा हा लेखक लॅटिन भाषा उत्तम येणारा कोकणीचा अभ्यासक पाद्री असावा, अशी ह्या अनुवादांसंबंधीची माहिती डॉ. पां. स. पिसुर्लेकर ह्यांनी दिली आहे (*मांडवी*, जून–जुलै १९६९, पृ. २–३).

विष्णुदास नामदेवांची बरीचशी स्फुट आख्याने ज. शा. देशपांडे ह्यांनी *प्राचीन मराठी कविता* (खंड ३ व ५) मध्ये छापली आहेत.

**रचना : मु.** – १. अनंतव्रतकथा (वनपर्वांतर्गत); ओ. सं. ९४; संपा. देशपांडे, ज. शा.; मसंप., ऑक्टो. १९७०; पृ. २१–२६. २. एकादशी माहात्म्य; मुंबई, १८७१. ३. उपमन्युचे चरित्र; ओ. सं. ३१; नामदेव गाथेत समाविष्ट; संपा. आवटे, त्र्यं. ह.; मुंबई, १९०८; पृ. ५९६. ४. कथाभारती; ओ. सं. ३१; प्रतलेखनकाल : श. १६९१, कार्तिक शु. ९, विरोधी; संपा. देशपांडे, ज. शा.; मसंप., जुलै १९७३; पृ. ७८–८०. ५. कृष्णकथा; प्र. १; ओ. सं. १२३; प्रामक., खं. ५; मुंबई, १९६६; पृ. ६–१२. ६. गरुडाख्यान; ओ. सं. ७४; प्रामक., खं. ५; मुंबई, १९६६; पृ. ११६. ७. चक्रव्यूह कथा; प्रसंग ६; ओ. सं. ६२५; प्रामक., खं. ३; मुंबई, १९६६; पृ. ५७–८३. ८. तुळसी आख्यान; ओ. सं. ८३; प्रामक., खं. ५; पृ. ११०–११५. ९. नलोपाख्यान; ओ. सं. ६१११; 'विष्णुदासकृत नलोपाख्यान'; संपा. जोशी, म. रा.; नागपूर, १९७४. १०. नामदेवाची आदि; ओ. सं. ३२; संपा. देशपांडे, ज. शा.; मसंप., जुलै १९७३, पृ. ७५–७६. ११. बुधबावणी, भा. १ ते ३; ओ. सं. अनुक्रमे ८१, ६०, २१; प्रामक., खं. ५; पृ. ५३–६०. १२. मुळकासुरवध; प्रसंग १ ते ५; ओ. सं. ४५३; प्रामक., खं. ५; पृ. ६०–८२. १३. म्हाळसेनकथा (द्रोणपर्व); ओ. सं. २८२; नामदेव गाथेत समाविष्ट; संपा. आवटे, त्र्यं. ह.; मुंबई, श. १८३०; पृ. ५५७. १४. लवकुशाख्यान; अ. ७; ओ. सं. ४२२; प्रामक., खं. ५; पृ. ८२–१०३. १५. वस्त्रहरण; ओ. सं. १४५; प्रामक., खं. ५; पृ. १०३–११०. १६. शुकाख्यान; ओ. सं. ३७१; संपा. आवटे, त्र्यं. ह.; नामदेव गाथेत समाविष्ट; मुंबई, १९०८; पृ. ५३४. १७. संतावळी आख्यान (कमळाकर ब्राह्मणांची कथा); ओ. सं. ७३; प्रामक., खं. ५; पृ. १२०. १८. स्वर्गारोहणपर्व (महाभारतांतर्गत); अ. ७; मुंबई, १८९८. १९. हरिश्चंद्रपुराणकथा (हरिश्चंद्रोपाख्यान / हरिश्चंद्राख्यान); प्र. १ ते ४; ओ. सं. ४३७; प्रामक., खं. ५; पृ. १२–५३. **अमु.** – १. अभंग; भाइसंमं. २. अंगदशिष्टाई. ३. आरती (कामाईची). ४. आख्यानक संग्रह; भाइसंमं. ५. ऐरावती आख्यान. ६. कपोताख्यान. ७. चंद्रहास आख्यान (त्रुटित); भाइसंमं. ८. द्रौपदीस्वयंवर; प्रसंग ७; ओ. सं. ५५५; नेने, ह. ना. ह्यांच्या संग्रही; प्रतलेखनकाल : श. १६७३. ९. सीतास्वयंवर; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : विष्णुदास नामा; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. २५३–२५८. २. आवळीकर, पंडित : विष्णुदास नाम्याचें 'हरिश्चंद्रोपाख्यान'; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. १५–३०. ३. कानोले, वि. अं. : विष्णुदासनामाकृत 'कमलाकर आख्यान'; प्रतिष्ठान, सप्टें. १९५६; पृ. ३६–३८. ४. कानोले, वि. अं. : विष्णुदास नामाचें एक नवें शुकाख्यान; प्रतिष्ठान, जाने.-फेब्रु.-मार्च १९६५; पृ. १७–२३. ५. चांदोरकर, गो. का. : विष्णुदास नामा; भाइसंमं-इति., श. १८३६; पृ. ६९–७०. ६. चांदोरकर, पां. भा. : विष्णुदासनामा याचें साग्र महाभारत; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ४, चैत्र १८५४, पृ. १६९–१७०. ७. जोशी, ना. ब. : जनमेजयाच्या अठरा ब्रह्महत्या व विष्णुदासनामा; मसाप., १९६२; पृ. ५३. ८. देशपांडे, ज. शा. : विष्णुदासकृत शिबिकथा अथवा कपोताख्यान; मसंप., जाने. १९६७; पृ. ९७–१०२. ९. देशपांडे, ज. शा. : विष्णुदासनामाकृत संत कमळाकर-ब्राह्मण-चरित्र;

मसंप., एप्रि. १९७०; पृ. २३५. १०. देशपांडे, ज. शा. : विष्णुदास नाम्याची एकादशीकथा; भाइसंमंत्रै., व. ५१, अं. १–४, १९७२; पृ. ३२. ११. नायक, ना. भा. : विष्णुदास नामा; गोमका.; रिवण (गोवा), १९६९; पृ. ५. १२. नेने, ह. ना. : विष्णुदास-नाम्यांचें 'द्रौपदी-स्वयंवर'; मसाप., एप्रि.–जून १९५४; पृ. २७–३३. १३. पारखे, वसंत विठ्ठल : चंद्रहास्याख्यान; पत्र, नभामा., डिसें. १९६१; पृ. ६५–६६. १४. पारखे, वसंत विठ्ठल : विष्णुदासनामा : मराठी साहित्यांतील यक्षप्रश्न; मसाप., जुलै–डिसें. १९६३; पृ. २९. १५. पारखे, वसंत विठ्ठल : विष्णुदास नाम्याचे महाभारत : एक अभ्यास; मसाप., जाने. १९६२, पृ. ३१; ऑक्टो. १९६२, पृ. ३६; जाने. १९६३, पृ. १७. १६. पिसुर्लेकर, पां. स. : विष्णुदास नाम्याच्या पौराणिक कथांचा शिवपूर्वकालीन कोंकणी अनुवाद; मांडवी, जून–जुलै १९६९; पृ. २–३. १७. मुजुमदार, गं. ना. : विष्णुदासनामा; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ३४०. १८. मेहेंदळे, खं. चिं. : विष्णुदास नामा पाठककृत द्रोण व भीष्म पर्वे; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. ७८–८०. १९. राजवाडे, वि. का. : विष्णुदास नामा; भाइसंमंइति., श. १८३३; पृ. १२२. २०. राजवाडे, वि. का. : विष्णुदास-नामा-कृत बावणआक्षरी; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ७–८. २१. राजवाडे, वि. का. : विष्णुदासनामाकृत हरिश्चंद्राख्यान व तुळसीआख्यान; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १७२. २२. शेंडे, सरोजिनी : विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास; अप्रकाशित प्रबंध, मुंबई विद्यापीठ. २३. शेंडे, सरोजिनी : हरिश्चंद्रपुराण – विष्णुदासनामा; नभामा., जून १९५७.

**विष्णुदासपरिसोवा** / ० विष्णुदास–१ [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – परिसानामाकथा (ओवीबद्ध); तंसम. हस्त. यादी, क्र. २, ३.

**विष्णुदास मुद्गल** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – शिष्टाई; त्रुटित काव्य; भाइसंम. हस्त. सू., पृ. ३.

**विष्णुदास विठा** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**विसो अनंत** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**विसोबा खेचर** / ० खेचर विसा [?– समा. श. १२३१, श्रा. शु. ११ / इ. स. १३०९] संतकवी. ह्यांचा जन्मकाल, वास्तव्यस्थळ, व्यवसाय, गुरुपरंपरा व समाधिस्थळ ह्या बाबतींत अनेक मते मांडली गेली आहेत. विसोबा खेचर हे नामदेवांचे गुरू होते ही गोष्ट तेवढी सर्वमान्य असून त्याबाबत पारंपरिक एकवाक्यताही आढळते.

*संतविजय*कार दासो दिगंबर हे विसोबांना पैठणजवळील मुंगी गावचे मानतात, तर *संतचरित्र*कार महिपतीबोवा ह्यांचा रहिवास आळंदीस व व्यवसाय चाट्याचा (कापड व्यापारी) होता असे सांगतात. वाङ्मयेतिहासकार ल. रा. पांगारकर ह्यांनी दिलेल्या (मवाइ., खं. १, आ. २, पृ. ४१६) माहितीप्रमाणे हे परभणी (मराठवाडा) जिल्ह्यातील नरसी गावापासून पाच कोसावर असलेल्या आवंढ्या नागनाथ ह्या शिवक्षेत्री राहात असावे. हे शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण असून सराफीचा धंदा करीत.

विसोबांचे गुरू म्हणून सोपानदेव, ज्ञानदेव, मुक्ताबाई असा तिघांचा उल्लेख केला जातो. सासवडास सोपानदेवांच्या मठातील कागदपत्रांत गो. का. चांदोरकर ह्यांना खुद्द विसोबांचाच एक अभंग सापडला, तो असा : "माझी मुळ पीठिका सोपानसद्गुरु । तेणे माथा करु ठेवियला ॥ १ ॥ चांगयाचा अंगिकार मुक्ताबाईने केला । सोपान वळला मजवरी ॥ २ ॥ जन्ममरणाचे भय नाहीं आता । खेचरी तत्त्वता मुद्रा दिल्ही ॥ ३ ॥" ह्या अभंगावरून, तसेच खेचरांनी रचलेल्या सोपानदेवांच्या आरतीवरून सोपानदेव हेच विसोबांचे गुरू हे स्पष्ट होते. *ज्ञानेश्वरी*-लेखक सच्चिदानंदबाबांच्या *ज्ञानेश्वरविजयात* खेचरांना ज्ञानदेवांनी अनुग्रह दिल्याचा उल्लेख आढळतो. ह्याचा अर्थ एवढाच की सोपानदेव, ज्ञानदेव, मुक्ताबाई ही सर्वच भावंडे त्यांना गुरूसमान पूज्य होती. योगातील खेचरी मुद्रेची दीक्षा सोपानदेवांनी दिल्यानंतर हे विसोबा चाट्याचे विसोबा खेचर झाले. ह्यानंतर योगाची आणखी काही रहस्ये सांगून अद्वैत व भक्तिमार्ग ह्यांचा उपदेश ज्ञानदेवांनी त्यांना केला असा समज रूढ आहे. अलिकडेच विसोबांच्या *शडूस्छळ* (षट्स्थल) नावाच्या ग्रंथाची पोथी जुन्या हस्तलिखित संग्रहातून रा. चिं. ढेरे ह्यांना उपलब्ध झाली. ह्या ग्रंथात विसोबांनी निर्दिष्ट केलेली त्यांची गुरुपरंपरा पाहता आजवर ह्या संदर्भात जी पारंपरिक माहिती गोळा केली गेली आहे तिजवर नवाच प्रकाश पडतो, असे मत ढेरे ह्यांनी व्यक्त केले आहे. शडूस्छळ (षट्स्थल) ग्रंथाच्या शेवटी विसोबांनी दिलेली त्यांची गुरुपरंपरा ह्याप्रमाणे : "तो आदिनाथ इश्वरु । मिननाथ तो मचिंद्र । तयाचा होये कुमरु । गोरेक्षीनाथु ॥ ६७२ ॥ गोरेक्षीची दुहिता मुक्ताइ । चांगया वटेश्वरु पाहि । उन्मेषु रामकृष्ण तोहि । वैसु (वौसु) चांगयाचा ॥ ६७३ ॥ तोचि हा संप्रधारु आदिनाथांचा । श्रीगोरक्षीनाथें प्रगट केला साचा । तोचि विचारु कथीला योगाचा । कृष्णसुतें ॥ ६७४ ॥"

ह्यावरून आदिनाथ > मीननाथ किंवा मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ > मुक्ताई > चांगा वटेश्वर > रामकृष्णनाथ किंवा कृष्णनाथ > विसा खेचर अशी ग्रंथकाराची नाथसंप्रदायी गुरुपरंपरा स्पष्ट होते. ज्ञानेश्वरादी भावंडांचा निर्देशही ह्या ग्रंथात आलेला नाही. प्रचलित समजुतीप्रमाणे चांगा वटेश्वर हे ज्ञानेश्वरभगिनी मुक्ताबाईचे शिष्य मानले जातात. *षट्स्थलां*तील गुरुपरंपरेवरून गोरक्षशिष्या मुक्ताईचे ते शिष्य होते असे दिसते. ह्यामुळे विसोबांचे खरे गुरू कोण हा प्रश्न अनिर्णीतच राहतो. विसोबांनी नामदेवांना आवंढ्या नागनाथ क्षेत्री गुरूपदेश दिला. विसोबांचे आज जे अभंग उपलब्ध आहेत त्यांतील बरेचसे नामदेवांना उपदेश करण्याकरिताच रचलेले आहेत. खेचरांनी 'सौम्य संवत्सरी, श. १२३१, श्रावण शुद्ध एकादशीस' समाधी घेतली. ही आळंदीस की बार्शीला हाही एक वादाचा मुद्दा ठरला आहे.

विसोबांचे *हरिश्चंद्राख्यान* हे एक लहानसे प्रकरण, काही अभंग, पदे व नव्याने उपलब्ध झालेला *शडूस्छळ* (षट्स्थल) ग्रंथ एवढीच रचना उपलब्ध आहे. ज्ञानमार्ग व योगमार्ग ह्यांमध्ये निष्णात असलेल्या विसोबांचा त्यांच्या गुरूमुळे भक्तिमार्गातही प्रवेश झाला, ह्याचा प्रत्यय त्यांच्या अभंगांतून येतो. नामदेवांना केलेला उपदेश हेच त्यांच्या अभंगांचे स्वरूप आहे.

विसोबांनी त्यांच्या नामदेवांशी झालेल्या पहिल्या भेटीतच नामदेवांना उपदेश देऊन पदपिंडविवर्जित केले. (पद म्ह. ब्रह्म व पिंड म्ह. जीव, पदपिंडविवर्जित म्हणजे जीवभाव व ब्रह्मभाव हे दोन्ही घालवून ब्रह्म केले, कैवल्यपदावर बसविले.) हा प्रसंग चित्रित करणारा विसोबांचा एक सुंदर अभंग प्रसिद्ध आहे. ह्यांच्या रचनेत रूपके व लौकिकातील दृष्टान्त ह्यांची समर्पक योजना आढळते. विसोबांच्या उपलब्ध अभंगांपैकी प्रामाणिकपणे त्यांचे किती व प्रक्षिप्त किती ह्याविषयीही शंका आहे.

शडूस्छळ (षट्स्थल) ह्या नवोपलब्ध ग्रंथाचे तीन प्रसंग व ६७७ ओव्या आहेत. ग्रंथाचे नाव *शडूस्छळ* / *शडूस्छळी* असे ग्रंथकाराने दिले आहे. हे 'षट्स्थल' ह्या संस्कृत शब्दाचे मराठी रूप. ग्रंथाच्या अखेरीस 'मऱ्हाटी टीका वोविप्रबंधु । संपुर्ण जाला ॥ ६७६ ॥' असे म्हटले आहे. ह्यावरून हा ग्रंथ अन्य भाषेतील षट्स्थलसिद्धान्तविषयक एखाद्या

ग्रंथाचा किंवा अनेक ग्रंथांतील विवेचनाचा आधार घेऊन मराठीत केला असे दिसते. मुळात षट्स्थलसिद्धान्त वीरशैव पंथाच्या विचारधारेचे सारसर्वस्व असून त्यावर संस्कृत व कानडी ह्या दोन्ही भाषांत रचना झाली आहे.

ग्रंथाच्या तीनही प्रसंगांच्या अखेरीस 'खेचरु विसा' असे ग्रंथकाराचे नाव येते. 'कृष्णसुत', 'कृष्णाचा सुत', 'कृष्णकुमर', 'रामकृष्ण' – असे आपल्या गुरूचे नाव ग्रंथकाराने निर्देशित केले आहे. ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय शिवागमांतर्गत षट्स्थलविचार हा आहे. विसोबांची परंपरा नाथपंथी असून वीरशैवांच्या तत्त्वज्ञानाचे विवरण करणारा ग्रंथ ह्यांनी कसा केला असाही एक प्रश्न उपस्थित होतो. रा. चिं. ढेरे ह्यांनी आपल्या *चक्रपाणि* (१९७७) ह्या प्रबंध-ग्रंथात ह्या संदर्भात सविस्तर विवेचन केले आहे. यादवकाळात वीरशैव विचारधारेचा प्रभाव महाराष्ट्रावर होता. वीरशैव नेते अल्लमप्रभु व नाथपंथाचे धुरीण गोरक्षनाथ हे समकालीन असून त्यांची भेट झाल्याचे उल्लेख अल्लमप्रभूंच्या लिहिल्या गेलेल्या चरित्रात आढळतात. ह्यांपैकी *प्रभुलिंगलीला* ह्या संस्कृत चरित्रात हा भेटीचा प्रसंग विस्ताराने वर्णन केला आहे त्यावरून असे कळते की, प्रभूंच्या अलौकिकत्वाची प्रचीती येऊन त्यांच्या चरणी विनीत होऊन गोरक्षनाथांनी प्रभूकडून शिवदीक्षेचा स्वीकार केला. अशा तऱ्हेने गोरक्षनाथांच्या परंपरेत अल्लमप्रभूंचा शिवागमांतर्गत षट्स्थलसिद्धान्त आतमीयतेने स्वीकारला गेला.

विसोबांच्या ग्रंथातील षट्स्थलविचार ह्याच परंपरेतून आलेला आहे. विसोबांचे गुरू चांगदेव हेही शिव(वटेश्वर)भक्त होते. विसोबांची शिवभक्तीही 'मुळु वदनाचा अंगुळु हाताचा। उघानु नेत्राचा स्वामी माझा ॥' ह्या त्यांच्या अभंगात प्रत्ययास येते. *संतगाथे*तून समाविष्ट केलेल्या विसोबांच्या १५–२० अभंगांपैकी त्यांचे असे चारपाचच अभंग निघतील, असेही मत ढेरे व्यक्त करतात.

विसोबा खेचर आणि त्यांचा *षट्स्थल* ग्रंथ ह्यांवरील ढेरे ह्यांनी केलेले संशोधन मौलिक स्वरूपाचे असले तरी ते एका विशिष्ट भूमिकेवरून केलेले आहे. ते अधिक खोल संशोधन करण्यास प्रेरक झाले आहे, ह्यात संशय नाही.

**रचना : मु.** – १. स्फुट : अभंग १८; नामदेव गाथा; मुंबई, १९७०; पृ. २३६–२३९. २. काही अभंग; आजगांवकर, ज. र.; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ९३–९८. ३. अव्यक्तरूपाची आरती; मआ., पृ. ४११. **अमु.** – (१) शङ्स्छळ (ढेरे संग्रह); (२) हरिश्चंद्राख्यान.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : विसोबा खेचर; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ९३ ते ९८. २. ग्रामोपाध्ये, गं. ब. : विसोबा खेचर; संकास.; पुणे, १९३९; पृ. १–२०. ३. चांदोरकर, गो. का. : विसोबा खेचरांचा गुरु कोण?; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. ५१–५३. ४. ढेरे, रा. चिं.; चक्रपाणि; प्रक. २, ३, ४; पुणे, १९७७; पृ. ५७–११६. ५. देवधर, स. कृ. : ज्ञानेश्वरांचे शिष्य : विसोबा खेचर; पुणे, १९६४; पृ. २४.

**० विसोबास** – पहा विश्वनाथ बाळापूरकर.

**वीरदास** (पासकीर्ती) [अंदाजे इ. स. १६२७] जैन कवी. हे सोहितवाल ज्ञातीत जन्मले. कारंजा पीठावरील पट्टाधीश धर्मचंद्रांचे हे शिष्य. धर्मचंद्रगुरूंनी दीक्षा दिल्यानंतर ह्यांचे नाव पासकीर्ती असे ठेविले. ह्यासंबंधी *सुदर्शनचरित्र* ग्रंथाच्या प्रशस्तीत स्वतः कवीने पुढीलप्रमाणे लिहिले आहे : "पुढती दीक्षा महाव्रत। गुरु धर्मचंद्र समर्थ। मस्तकि ठेउनि स्वहस्त। पासकीर्ति नामना ॥ २५.५५ ॥" कारंजा येथील पीठाने औरंगाबादला जे नवे भट्टारक पीठ स्थापन केले तेथे पासकीर्ती ह्यांची पहिले भट्टारक म्हणून धर्मचंद्रांनीच योजना केली.

वीरदासांच्या *सुदर्शनचरित्र* ह्या काव्यग्रंथाचे २५ अध्याय व १६५० ओव्या आहेत. कवी म्हणतो : "ब्रह्मजिनदासें केला विस्तारु। तो मज जाह्ला आधारु। देसभासा केला प्रकारु। मुलाधारूप्रमाणें ॥ ३.३ ॥" वीरदासांनी *सुदर्शनरास* ह्या गुजराती ग्रंथाबरोबरच संस्कृतातील *सुदर्शनचरित्रां*चाही आधार घेतल्याचे ते लिहितात. ह्यापूर्वी लिहिल्या गेलेल्या कामराज कवीच्या *सुदर्शनचरित्रा*त व वीरदासांच्या ग्रंथात अतोनात साम्य आढळते. सुदर्शनाची कथा हा ह्या आख्यानकाव्याचा गाभा असला तरी जैन धर्माच्या पारंपरिक व तत्कालीन आचारधर्माचे स्वरूपही ह्या ग्रंथाद्वारा स्पष्ट केले आहे. ग्रंथ श. १५४९ (इ. स. १६२७) फाल्गुन वद्य दशमीस पूर्ण झाला. ह्या ग्रंथाशिवाय *बहुतरी, नवकारमंत्रप्रकृति, नेमिनाथ वऱ्हाड* अशा स्फुट रचना कवीने केल्या आहेत. ह्यांनी गुणकीर्तींच्या *बारा अनुप्रेक्षा* ह्या ग्रंथाची बनविलेली प्रत हिंगोली हस्तलिखित संग्रहात सापडते.

**रचना : अमु.** – १. सुदर्शनचरित्र; अध्याय २५; ओ. सं. १६५०; र. का. : श. १५४९. २. नवकारमंत्रप्रकृति; ओ. सं. २२. ३. नेमिनाथवऱ्हाड; ४० कडव्यांचे गीत. ४. बहुतरी; ओ. सं. ७२; नागपूर, जैन हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र : वीरदास; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ४४–४७.

**वीरेशात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. २९.

**वीरेश्वर दीक्षित** / **० वीरेश्वर वल्लभ दीक्षित** / **० नरसिंह नंदन** [श. १७०० / इ. स. १७७८ – श. १७४० / इ. स. १८१८] भाष्यकार. हे चन्नापट्टण (तंजावर) येथील नृसिंहदीक्षित व रमाबाई ह्यांचे पुत्र. ह्यांनी आपली गुरुपरंपरा नमूद केली आहे ती अशी : "आदिनाथाय देवाय नमो मत्स्येंद्ररूपिणे ॥ गोरक्षप्रभवे गैनीनाथाय निवृत्तये ॥ ज्ञानेश्वरं गुरुं ॥ आनंदब्रह्मणे नित्यं शिवाय ॥ नमः श्रीशंकराय गुरवे ॥ अद्वयानंदरूपाय शिवाय गुरवे नमः ॥"

ज्ञानेश्वरांच्या *अनुभवामृता*वर ह्यांनी *अनुभवामृत-व्याख्यान* (शके १७१७ / इ. स. १७९५) नावाचे भाष्य केले आहे. ह्यांचे व्याख्यान सोपे व सरळ आहे. संस्कृतात जशी मल्लिनाथाची टीका तसेच हे *अनुभवामृता*चे व्याख्यान आहे. अनेकांप्रमाणे हे व्याख्यान श्रीशंकराचार्यांच्या मतप्रणालीला धरून केलेले आहे. वीरेश्वर दीक्षित हे पण शंकराचार्यांची परंपरा पाळणाऱ्यांपैकीच एक होते. ग्रंथामध्ये वीरेश्वरांनी आपली नम्रता पुढीलप्रमाणे व्यक्त केली आहे : "ज्ञानेश्वरस्वामींचा आशय ॥ आम्हांसारिख्या ॥ अज्ञानांस काय कले ॥ यथामती अर्थ कथिला आहे ॥ संतीं क्षमा करावी ॥"

वीरेश्वरांच्या स्फुट रचनेत पदपदांतरे, प्रकरणे, चरित्रे इत्यादिकांचा समावेश होतो. ह्यांपैकी दहा प्रकरणे वि. ल. भावे ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत (*महाराष्ट्रकाव्यग्रंथ*, स्फुटप्रकरणे). ही रचना श्लोकबद्ध अनेकवृत्तात्मक आहे. पंडिती परंपरेतील कवितेत अनेकदा जाणवणारा रूक्षपणा तेथे आढळतो. ठिकठिकाणी शिवास केलेले वंदन व शिवचरित्रावरील आख्याने कवीची शिवभक्ती प्रकट करतात.

**रचना : मु.** – १. उपमन्युचरित्र; ग्रं. सं. ३९; महा. कवि २, क्र. २३, २४, २५; श. १८२७, आषाढ, श्रावण, भाद्रपद; पृ. १४८–१५२; २. गजमुखचरित्र; ग्रं. सं. ३२; महा. कवि ३, क्र. २६; श. १८२७, आश्विन; पृ. १–४; ३. चंडेश्वर कथा; ग्रं. सं. ३२; महा. कवि २, क्र. २३, २४, २५; श. १८२७, आषाढ, श्रावण, भाद्रपद; पृ. १४६–१४८; ४. पंचाक्षरीमाहात्म्य; ग्रं. सं. ३६; तत्रैव, पृ. १४३–१४५; ५. पारावतचरित्र; ग्रं. सं. १६; तत्रैव, पृ. १२५–१२६; ६. पुंडलीकचरित्र; ग्रं. सं. २८; तत्रैव, प. १२३–१२५; ७. प्रश्नमालिका; ग्रं. सं. १०१, महा. कवि ३;

क्र. २७; श. १८२७, कार्तिक; पृ. २१ ते २४; महा. कवि ३, क्र. ३२, ३३, ३४; श. १८२८, चैत्र, वैशाख, ज्येष्ठ; पृ. २५–२६; ८. रुक्मिणीस्वयंवर; ग्रं. सं. ४३; महा. कवि २, क्र. २३, २४, २५; श. १८२७, आषाढ, श्रावण, भाद्रपद; पृ. १३७–१४३; ९. सीताकल्याण; ग्रं. सं. ४७; तत्रैव, पृ. १३२–१३७; १०. सोमवारचरित्र; ग्रं. सं. ४९; तत्रैव, पृ. १२६–१३२; ११. गीतेची आरती; मआ., पृ. ३८५. **अमु.** – १. अनुभवामृत – व्याख्यान; र. का. : श. १७१७ (इ. स. १७९५), आनंदनाम संवत्सर, वैशाख शु. २; र. स्थ. : 'चन्नापट्टणास दक्षिणभागी वृंदारण्यक्षेत्री'; प्रक. १ ते १०; ग्रं. सं. ६४५०; तंसम. बा. १२; सवामं. बा. १०४१; २. कौसल्येचे डोहाळे; ग्रं. सं. २१; ३. चांगदेवपासष्टी (ग्रंथपंचषष्टी); गद्यविवरण; ४. त्रिपुरसंहार; ग्रं. सं. ३९; ५. नीलकंठचरित्र; श्लो. ३८, आर्या २, पदे ३ = ग्रं. सं. ४३; सवामं. हस्त. सू., खं. २. ६. भीष्मप्रतिज्ञा; ग्रं. सं. १००; तंसम. यादी, क्र. ३; ७. स्फुट रचना : अष्टके, आरत्या, दशके, पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** गोखले, वा. दा. : अनुभवामृताचे भाष्यकार – वीरेश्वर दीक्षित आणि भय्याकाका किबे; इंद्रायणी, व. १, अं. १, दीअं. १९६२; पृ. ४५–५०.

**० वीरेश्वर वल्लभ दीक्षित** – पहा **वीरेश्वर दीक्षित.**

**वीरेश्वरसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – गुरुपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वेंकटगिरिप्रभु** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – 'रामा, तू माझा यजमान' हे प्रसिद्ध पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ५०.

**वेंकटगिरी** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. २९. **अमु.** – गुरुपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वेंकटपति** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – शृंगारपद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वेंकट बल्लाळ** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] बखरकार. पेशवाईत स्थानिक वृत्तान्त सविस्तर लिहून कळविणारे अखबारनवीस असत. पेशवे दरबारप्रमाणे त्यावेळचे सरदार-दरखदार व मातबर सावकार ह्यांच्याकडेही अखबारनवीस असत. त्यांपैकी वेंकट बल्लाळ हा हरि विठ्ठल ह्यांचा अखबारनवीस होता. *पेशवाईच्या अखेरची अखबार* लिहिणारा वेंकट बल्लाळ ह्याने पुण्याबाहेर असलेल्या आपल्या मालकास, पुण्याचा इंग्रजांनी ताबा घेतला त्या वेळच्या गोंधळाची हकीकत लिहून कळविली आहे. बखरीचा लेखनकाल श. १७३९ (इ. स. १८१७) आहे. ह्या विश्वसनीय हकीकतीत त्या वेळच्या पुण्यातील गोंधळाचे वर्णन येते. लेखकाची भाषा साधी असून हे वर्णन प्रत्ययकारी उतरले आहे.

पुणे येथील रामाजी नाईक भिडे ह्यांच्या दप्तरातील हे प्रकरण असून ते *मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड ४* मध्ये प्रथम प्रसिद्ध झाले (इ. स. १९००).

द. ग. गोडसे

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का.; मइसा., खं. ४; १९००; पृ. ७०–१०९.

**वेंकटभट्ट** [का. अनु.] भाषान्तरकार.

**रचना : अमु.** – भगवद्गीता भाषान्तर; गद्य; अध्याय १–१० (६ वा सोडून); ग्रं. सं. १८४५; 'नरसिंहभट्टात्मज वेंकटभट्टेन गीतापठनार्थं लिखिता' अशी माहिती दिली आहे; तंसम. हस्त. यादी, क्र. १.

**वेंकटमाधव** [अंदाजे इ. स. १८२७] तंजावरकडील मराठी व्याकरणकार. दामल्यांच्या *शास्त्रीय मराठी व्याकरणा*वर लिहिलेल्या आपल्या समीक्षणात्मक लेखात पूर्वीच्या मराठी व्याकरण-ग्रंथांची संक्षेपाने माहिती देताना मराठीच्या एका सूत्रबद्ध संस्कृत व्याकरणाचा उल्लेख वि. का. राजवाडे ह्यांनी केला होता. हे व्याकरण मद्रास 'ओरिएंटल लायब्ररी'त आहे असे त्यांनी म्हटले होते. त्यानंतर कित्येक वर्षे ह्या व्याकरणाचा शोध घेण्याचा प्रयत्न कोणीच केला नाही. कु. श्री. अर्जुनवाडकरांनी मद्रास येथे जाऊन शोध घेतला व वेंकटमाधवाचे *महाराष्ट्रप्रयोगचंद्रिका* हे व्याकरण इ. स. १९७० मध्ये परिश्रमाने छापून काढले.

मद्रास राज्यशासनाच्या हस्तलिखितसंग्रहात मराठी व्याकरणावरील *महाराष्ट्रप्रयोगचंद्रिका, महाराष्ट्रशब्दमाला* व *महाराष्ट्रशब्दानुशासन* अशा तीन ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती सापडतात. ह्या तीनही प्रतींवर फोर्ट सेंट जॉर्ज कॉलेजचा शिक्का आहे. ह्या तिन्ही प्रतींमधील देवनागरी व मोडी अक्षरांचे वळण अगदी सारखे आहे. पहिल्या दोन ग्रंथांवर कर्त्याचा निर्देश नाही. तिसऱ्या *महाराष्ट्रशब्दानुशासन* ग्रंथाच्या प्रतीत वेंकटमाधव व भीम हे दोघे ग्रंथाचे कर्ते असल्याचा निर्देश सहा-श्लोकी संस्कृत प्रस्तावनेत चौथ्या श्लोकात येतो. ती संपल्यानंतर ७ व्या मराठी श्लोकात फक्त वेंकटमाधवाचेच नाव येते. ह्या ग्रंथावर रचनाकाळ जुलै १८२७ असा दिला आहे.

हा वेंकटमाधव मद्रास येथील फोर्ट सेंट जॉर्ज कॉलेजात मराठीचा अध्यापक होता. तामिळनाडू राज्याच्या सरकारी जुन्या कागदपत्रांच्या संग्रहात मराठी शिकविण्यास योग्य असा प्राध्यापक नसल्याने वेंकटराव नावाच्या माणसाची नेमणूक केल्याचे एक शिफारसपत्र आढळते. त्यानंतर सहा महिन्यांनी वेच्यांच्या नकला करण्याकरिता आणखी एका कारकुनाची नेमणूक केल्याचे आणखी एक पत्रही आढळते.

हे कॉलेज इ. स. १८१२ मध्ये सुरू झाले होते. कलकत्त्याच्या फोर्ट विल्यम कॉलेजमध्ये जसा वैजनाथपंडित, तसा मद्रास येथील फोर्ट सेंट जॉर्ज कॉलेजमध्ये हा वेंकटमाधव पंडित मराठी भाषेचे अध्यापन करीत असे. हा मूळचा कोठला हे कळावयास मार्ग नाही; पण तो मराठी मुलखातून तिकडे गेला असावा. वेंकटमाधवांच्या मराठीवर तंजावरी बोलीची छाप आहे. ह्यांनी फोर्ट सेंट जॉर्ज कॉलेजात वेच्यांच्या नकला करण्यासाठी नेमलेल्या भीमपंडितांच्या मदतीने मराठीचे व्याकरण संस्कृतात व मराठीत रचले.

वेंकटमाधव ह्यांनी *महाराष्ट्रप्रयोगचंद्रिका* हे आपले व्याकरण मुळात संस्कृत भाषेत लिहिले. त्यात पाणिनीच्या धर्तीवर आणि त्याच्याच परिभाषेत सूत्रे रचली असून त्यांवर संस्कृतात संक्षिप्त वृत्ती म्हणजे टीका आहे. तिच्या लगेच खाली तिचे मराठी विवरण व पुढे उदाहरणे व त्यांचे विवरण ही, अर्थातच फक्त मराठीत, दिली आहेत. सूत्रांतूनही साहजिकच मराठी शब्द येतात. एकूण २२७ सूत्रांचे सात गटांत विभाजन केलेले आहे.

पहिल्या गटात अधिकारसूत्रे येतात. गट २ ते ४ मध्ये संधिविचार येतो. पाचव्या गटात विभक्ति, सहाव्यात समास, तद्धितप्रत्यय व सातव्यात आख्यातरूपे व कृत् प्रत्यय इत्यादींचा विचार ग्रंथकाराने केला आहे. ह्यांतील विभाग तितकेसे व्यवस्थित पाडले गेले नसले तरी मराठी व्याकरणाचे बहुतेक सर्व मुख्य विषय त्यात आले आहेत. मराठीचे समग्र विवरण ह्या ग्रंथाच्यायोगे होत नाही व तसा व्याकरणकाराचाही हेतू नसावा. विभक्तिविचार, समासप्रकरण व आख्यानप्रकरण ह्यांचे विवेचन करताना ग्रंथकाराने पाणिनीचे व्याकरण नजरेसमोर ठेवल्याचे स्पष्ट दिसून येते. वेंकटमाधवांपुढे मराठी व्याकरणाचा नमुना नसल्याने आपल्याला परिचित असणाऱ्या व्याकरणग्रंथांपेक्षा त्यांचे व्याकरण वेगळे झाले आहे. संधिप्रकरणात ह्यांनी दिलेली

उदाहरणे उच्चारानुरोधी आहेत. सुमारे १५० वर्षांपूर्वी ज्यावेळी आधुनिक भाषाशास्त्राची पार्श्वभूमी नव्हती, त्यावेळी उच्चारानुरोधी शब्दांचा ह्यांनी व्याकरणदृष्ट्या विचार केला आहे. वेंकटमाधवांसमोर व्याकरण रचताना प्रमाण मराठीची कल्पना असावी असे जाणवते.

*महाराष्ट्रशब्दमाला* ह्या ग्रंथातील सामग्री *महाराष्ट्रचंद्रिका* ग्रंथाहून फारशी वेगळी नाही. तिची मांडणी फक्त वेगळी, म्हणजे इंग्रजी व्याकरणाच्या धर्तीवर, केली आहे. शब्दांचे आठ प्रकार सांगून पुढे त्यांवर स्वतंत्र टिपणे आणि याद्या ह्या स्वरूपात माहिती संकलित केली आहे.

*महाराष्ट्रशब्दानुशासन* हे पुस्तक छोटे आणि प्राथमिक स्वरूपाचे असले तरी त्याच्या आरंभी लिहून ठेवलेली माहिती महत्त्वाची आहे. त्यात मराठी वर्णमालेची मोडी चिन्हे, स्वरांच्या खुणा, बाराखड्या, जोडाक्षरांत येणारे व्यंजनांचे संक्षेप इत्यादी सविस्तर माहिती तक्त्याच्या स्वरूपात दिली आहे.

वरील व्याकरणविषयक आणि भाषाविषयक तीन ग्रंथ जरी लहानसे असले तरी मराठी भाषेच्या संदर्भात ते महत्त्वाचे ठरतात. त्यांच्यामुळे वेंकटमाधव ह्या मराठी भाषापंडिताचा नव्याने परिचय होत आहे.

**रचना : मु. –** वेंकटमाधवकृत 'महाराष्ट्रप्रयोगचंद्रिका'; संपा. अर्जुनवाडकर, कृ. श्री.; पुणे, १९७०; प्रस्ता., पृ. १–१५; परिशिष्ट, पृ. ५६–५७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** लड्डू, एस. डी. : रिव्ह्यू ऑन वेंकटमाधवकृत 'महाराष्ट्रप्रयोगचंद्रिका'; भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूट जर्नल; पुणे, १९७२; पृ. २६०–२६६.

**वेंकटाचलवासी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु. –** मराठी व हिंदी पदे, सद्गुरूची आरती, भवानीपर पद, इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वेंकटेश** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु. –** ओव्या, पंढरीवर्णन – पद, अद्वैतपर पद, इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वेंकटेशदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु. –** दुर्वासभोजनचरित्र; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० वेंकटेशसुत राघो** – पहा **दासलाल.**

**वेंका** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु. –** पदपदांतरे; मसंमं., हवना., पृ. २; सवामं. हस्त. सू., खं. २.

**वेंका कवि सरदार** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु. –** पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**वेंकाजी नारायण कुळकर्णी** [अंदाजे इ. स. १६१४] बखरकार. *विजयनगरचा विध्वंस किंवा राक्षसतागडीची बखर* ह्या कानडीवरून भाषान्तरित केलेल्या बखरीचा कर्ता. मूळ कानडी बखरीचा लेखक रामजी तिरुमल होय. ह्या बखरीची नक्कल वेंकटाद्री तकेल निसिदा ह्यांनी केली व त्या प्रतीवरून वेंकाजींनी 'अनंदनाम संवछरे फलगुण सुद बीज' म्हणजे शके १५३६ त (इ. स. १६१४) भाषान्तर केल्याचा उल्लेख बखरीच्या शेवटी आहे. प्रस्तुत मराठी बखरीचे कानडी वळण स्पष्ट दिसते.

शके १४८६ (इ. स. १५६४) रक्ताक्षी संवत्सरी, चैत्रवैशाखाचे सुमारास राक्षसतागडीचा घनघोर संग्राम होऊन, हिंदूंची राजसत्ता काही कालपर्यंत दक्षिणेतून लयास गेली. बखरीत ह्या रणसंग्रामाची हकीकत आली आहे. ती असावी तितकी विस्तृत नसली तरी उपलब्ध असलेल्या इतर कोणत्याही हकीकतीपेक्षा जास्त विस्तृत आहे. ह्या हकीकतीवरून प्रत्यक्ष रणसंग्रामाचे वेळी हिंदू राजाचा कसा विश्वासघात केला गेला हे समजते; शिवाय तत्पूर्वीचा हिंदी व महंमदी राष्ट्रांचा परस्पर संबंध आणि हिंदी राष्ट्राचे वैभव ह्यांवरही प्रकाश पडतो. ही बखर *भारत इतिहास संशोधक मंडळाच्या द्वितीय संमेलन वृत्तामध्ये* छापली आहे (पृ. १७०–१८२).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : विजयनगराचा विध्वंस; प्रास्ताविक, भाइसंमंद्विसंवृ., श. १८३६; पृ. १६८–१७०. २. हेरवाडकर, र. वि. : विजयनगरचा विध्वंस; मब., पुणे, १९५७; पृ. ४७–४९.

**वेंका मुंगी** [अंदाजे श. १६४२ / इ. स. १७२० नंतर] कवी. माध्वमताचे अनुयायी. ह्यांचे नाव वेंका व उपनाव मुंगी. स्वतःचा उल्लेख हे पुढीलप्रमाणे करतात : 'पिपिलिक (मुंगी) उपनामा व्यंकु तो उद्धरावा', 'मुंगी असोन वदतों बहु चापलें हो'. ह्यांचा गुरू सत्याधिराज हा माध्वयती असून मद्रास प्रांतात वेळूर येथे राही. वेंका मुंगीचे *सत्याधिराज प्रशस्ति* असे ३२ श्लोकांचे काव्य वि. का. राजवाडे ह्यांस उपलब्ध झाले.

प्रस्तुत काव्याच्या पहिल्या सात श्लोकांत कवीने सत्याधिराजांचा थाट वर्णन केला आहे. नंतर पूजाअर्चा, नैवेद्य इत्यादी वर्णन येते. उत्तरार्धात भोजनासाठी करण्यात येणाऱ्या अनेक पदार्थांचे वर्णन येते. खिरीत कापूर टाकणे किंवा मांडे बनविणे ह्या गोष्टी दक्षिणहिंदुस्थानात प्रचारात आहेत त्यांचा उल्लेख येतो. हे 'ळ' च्या ठिकाणी 'ल' वापरतात, आणि संस्कृतप्रमाणे स्वरसंधी करतात (उदा., तुलापिला). काव्य साधारणच आहे.

**रचना : मु. –** सत्याधिराज प्रशस्ति; श्लो. सं. ३२; त्रु.; भाइसंमंइति., श. १८३६, पृ. ३५–३६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : वेंका मुंगीकृत सत्याधिराज प्रशस्ति; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ३४–३७.

**वेंको गोविंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु. –** पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**वेंकोबा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु. –** भानसेचे वऱ्हाड; श्लोक सं. १३०; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वेडा** [का. अनु.] कवी, चरित्रकार.

**रचना : अमु. –** गोविंदबावाचे चरित्र; संककासू., पृ. १०४.

**वेडा नागनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु. –** संतमानसपूजा (तिसरा अध्याय); ओ. सं. १११; सवामं. हस्त. सू., खं. २.

**वेणाबाई / ० वेणी / ० वेणीस्वामी** [अंदाजे शके १५४९–५० / इ. स. १६२७–२८ – समा. श. १६००, चैत्र वद्य चतुर्दशी / इ. स. १६७८] कवयित्री. ह्या समर्थ रामदासांच्या शिष्या होत. समर्थांची लाडकी कन्या म्हणून ह्यांची ख्याती होती. ह्यांचे सासर मिरजेस व माहेर कोल्हापुरास होते. (*महाराष्ट्रसारस्वत*कारांनी ह्याच्या बरोबर उलट माहिती दिली आहे.) बालपणापासून ह्या शांत आणि विरक्त होत्या. वयाच्या दहाव्या वर्षीच वैधव्य आल्याने हे दुःख विसरण्यासाठी त्या *एकनाथी भागवता*चे पारायण करीत असत. एकदा सासरी *भागवता*चे पारायण करीत असता समर्थ ह्यांच्या घरी आले. त्यांनी बाईंना चार उपदेशाची वाक्ये ऐकविली. त्यांच्या उपदेशाने वेणाबाईंच्या मनावर जो संस्कार झाला त्यासंबंधी बाई सांगतात : 'देह माझे मन माझे । सर्व नेलें गुरुराजें.' त्यानंतर कोल्हापुरास ह्यांनी समर्थांकडून राममंत्रोपदेश घेतला. त्यांची ही पारमार्थिक वृत्ती सासूसासऱ्यांस व आईबापांसही आवडली नाही. छिद्रान्वेषी लोक त्यांच्या चारित्र्याविषयी संशय घेऊ लागले. समर्थांवरील भक्तीमुळे आप्तेष्टांनी केलेल्या विषप्रयोगाच्या दिव्यातूनही त्यांना जावे लागले. तरीही

समर्थांचा ध्यास मात्र त्यांनी सोडला नाही. गुरूपदेश व अनुग्रह घेतल्यावर समर्थांच्या मठात राहून त्या कीर्तन, श्रवण, अध्ययन करू लागल्या. 'तुझी तुझी तुझी तुझी पावना रामा ॥ धृ. ॥ भावें अभावें कुभावें, परि तुझी, पावना रामा ॥ १ ॥ सुष्ट हो दुष्ट हो नष्ट हो, परि तुझी, पावना रामा ॥ २ ॥ हीन दीन अपराधी, वेणी म्हणे परि तुझी, पावना रामा ॥ ३ ॥' ह्या पदावरून त्यांच्या रामभक्तीतील भावस्थितीची कल्पना येते.

समर्थांच्या शिष्यिणींपैकी फक्त वेणाबाईंनाच कीर्तन करण्याची समर्थांची अनुज्ञा होती. शके १५७८, दुर्मुख नाम संवत्सरे, श्रावण वद्य पक्षात (इ. स. १६५६) समर्थांनी ह्यांच्याकरिता मिरज येथे स्वतंत्र मठ स्थापन करून दिला. तेथेच वेणाबाईंनी आपला शिष्यसंप्रदाय व परंपरा वाढविली. ह्या कवयित्रीचे देहावसान सज्जनगडावर श. १६०० (इ. स. १६७८) च्या चैत्र वद्य चतुर्दशीस झाले. तेथेच त्यांची समाधी आहे. *समर्थप्रताप*कार गिरिधरस्वामी हे ह्यांच्याच परंपरेतील. वेणाबाईंच्या शिष्या बाइयाबाई ह्यांचे हे शिष्य होत.

वेणाबाईंची पदे, अभंग अशी स्फुट काव्यरचना असून तीन-चार ग्रंथही आहेत. वेणाबाईंनी *सीतास्वयंवर* हे ओवीबद्ध काव्य लिहिले आहे. त्याचे चौदा समास आहेत. 'हे सीतेचे सैंवर वाल्मिक बोलिला विस्तार' ह्या शब्दांत वाल्मिकी कवीने जे लिहिले तेच विस्ताराने सांगत आहे, असे वेणाबाईंनी म्हटले आहे. हीच त्यांची भूमिका *रामायण* ह्या काव्यातही दिसून येते. राम व सीता ह्यांचा विवाह हे परब्रह्माचेच स्वयंवर आहे, ह्या धारणेतून *सीतास्वयंवरा*ची रचना वेणाबाईंनी केली आहे. रामदर्शनाने निर्माण झालेल्या 'सीतेच्या चित्तवृत्तीचे' दर्शन पुढीलप्रमाणे घडविले आहे : 'सखिया हासती कौतुकें। पूजाफळ लाधलें निकें। सुंदर रामासारिखें। अक्षई वर जानकी ॥' यज्ञरक्षण करणाऱ्या व अखेरीस परशुरामगर्वहरण करणाऱ्या रामाच्या शौर्यभावाची वर्णनेही भावसंगतीने केली आहेत. काव्याची भाषा सुबोध, साधी व घरगुती वळणाची आहे. ह्या ग्रंथाविषयी अभिप्राय देताना शं. श्री. देव लिहितात : "सीतेचें स्वयंवर, वेणाबाईंच्या पूर्वी व नंतर, पुष्कळांनीं वर्णिलें आहे, पण वेणाबाईंच्या ग्रंथाची योग्यता कांहीं निराळी आहे. स्वयंवरासारख्या प्रसंगाची आवड स्वभावतः स्त्रियांना असावयाची; आणि म्हणून त्यांच्या लेखणींतून तो प्रसंग जसा उतरेल तसा इतरांच्या उतरणार नाहीं. वेणाबाईंच्या *स्वयंवरा*त प्रत्येक लहानमोठ्या प्रसंगाचें जसें यथासांग वर्णन आहे, तसें दुसऱ्या एखाद्या ग्रंथांत असल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं – श्रीएकनाथांचा *रुक्मिणीस्वयंवर* ग्रंथ वेणाबाईच्या *सीतास्वयंवरा*शीं ताडून पाहिला म्हणजे माझ्या म्हणण्याची सत्यता वाचकांस सहज पटेल . . . जें एकनाथांच्या ग्रंथांत नाहीं तें वेणाबाईंच्या ग्रंथांत आहे व उलटपक्षीं जें *सीतास्वयंवरां*त नाहीं तें *रुक्मिणीस्वयंवरां*त आहे." (*सीतास्वयंवर*, प्रस्ता.). असा स्वतंत्र व सुंदर ग्रंथ वेणाबाईंच्या अगोदर कोणा स्त्रीने रचलेला उपलब्ध नाही. [ ⇨ ३. ]

ह्या *स्वयंवर*ग्रंथाखेरीज *कौल* व *रामगुहकसंवाद* ही रामायणी प्रकरणे वेणाबाईंनी रचली आहेत. ही रचना चित्तवेधक असल्याचा निर्देश शं. श्री. देव करतात (*सीतास्वयंवर*, प्रस्ता., पृ. १५). समर्थवाग्देवतामंदिरातील (धुळे) हस्तलिखित संग्रहात ह्या कवयित्रीने रचलेली *रामायणा*ची पहिली पाच कांडे आढळतात (बाडांक ७४५). हे *वेणाबाईकृत रामायण* म्हणून प्रसिद्धही झाले आहे. ह्या दीड हजार श्लोकांच्या *रामायणा*त युद्ध व उत्तर ही दोन कांडे नाहीत. ह्यात *आदि*, *अयोध्या*, *अरण्य*, *किष्किंधा* व *सुंदर* इतकीच कांडे असून पुढील कांडांचा भाग आठ श्लोकांतच संक्षेपाने संपविला आहे. सीतापहरणानंतरचा रामाचा विरहालाप, अशोकवनातील सीता-मारुतिभेट, लंकादहन अशा प्रसंगांची वर्णने चित्रमयी शैलीने वेणाबाईंनी केली आहेत. *रामायणा*तील प्रत्येक शताच्या शेवटी वेणाबाईंचा नामनिर्देश आहे. *सिंहासन* व *उपदेशरहस्य* अशी आणखी दोन प्रकरणे त्यांनी रचल्याचे *दासविश्रामधाम*कार सांगतात. ह्याखेरीज *पंचीकरण* हे गद्यप्रकरण त्यांनी लिहिले आहे. हे प्रकरण म्हणजे वेदान्त-विषयावरील टिप्पण्याच आहेत.

**रचना : मु.** – १. वेणाबाईकृत रामायण – ५ कांडे; श्लो. सं. १५००; संपा. देव, शं. श्री.; प्रस्ता., देव, ग. शं.; धुळे, १९४३; २. सीतास्वयंवर; समास १४; ओ. सं. १५६८; र. श. १७६०; संपा. देव, शं. श्री.; प्रस्ता., पृ. १–२५; धुळे, १९१३. **अमु.** – १. उपदेशरहस्य; २. कौल; श्लो. सं. २६; ३. पंचीकरण; ४. रामगुहकसंवाद किंवा नावेचे श्लोक; श्लो. सं. ४४; ५. सिंहासन; ६. स्फुट – अभंग, पदे इत्यादी; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : वेणाबाई; मसंक., मुंबई, १९३९; पृ. १७१–२०३. २. कुळकर्णी, रा. वि. : मिरज मठाधिपती साध्वी वेणाबाई; सज्जनगड; व. १८, अं. ३, नोव्हें. १९६८; पृ. १३. ३. देव, शं. श्री. : वेणाबाईचा मिरजमठ; रामदासीची ऐतिहासिक टिपणे; पृ. ५३–५६. ४. देशपांडे, कमलाबाई : वेणाबाई : महाराष्ट्रीय संत : वाङ्मय व जीवन; १९५२; पृ. ९५–१२८. ५. पुरुषोत्तम : समर्थशिष्या वेणूबाई; विज्ञावि., नोव्हें. १९१७.

**वेणाराम** [का. अनु.] कवी. काशीचे दैवज्ञ 'राम' ह्यांचा पुत्र.

**रचना : अमु.** – शृंगारतरंगिणी; काव्य; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १०४.

**० वेणी** – पहा **वेणाबाई.**

**० वेणीगिरिधर** – पहा **गिरीधर–१.**

**० वेणीस्वामी** – पहा **वेणाबाई.**

**वेदसज(न)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – चूडालाख्यान; काव्य; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १०५.

**वैकुंठनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सारासारविवेकदर्शन; ग्रंथ; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १०५.

**० वैजनाथशर्मा, पंडित** – पहा **वैजनाथ शिवराम कानफाडे.**

**वैजनाथ शिवराम कानफाडे / ० कानफाडे वैजनाथ शिवराम / ० वैजनाथशर्मा पंडित** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा प्रारंभकाल] अर्वाचीन मराठी गद्यरचनेचे आद्यप्रवर्तक. वैजनाथशास्त्री हे नागपूरकडचे राहणारे. कलकत्ता येथे नागपूरकर भोसल्यांचे वकील म्हणून काम करणारे वेणीरामपंत नावाचे गृहस्थ होते त्यांच्या आश्रयाला हे प्रारंभी राहिले. हे संस्कृत, फारसी, हिंदुस्थानी, इंग्रजी व बंगाली ह्या भाषांत प्रवीण होते. त्यांचे बहुभाषित्व लक्षात घेऊन डॉ. कॅरेसारख्या धर्मप्रचारकाने त्यांचा भरपूर उपयोग करून घेतला. आणि मराठीतील आद्य कोश-व्याकरणकार असा लौकिक वैजनाथशास्त्रींनी मिळवला.

मराठीतील पहिले मुद्रित ग्रंथ – *मराठी भाषेचे व्याकरण* व *सेंट मॅथ्यू* – हे दोन्ही तयार करण्यात डॉ. विल्यम कॅरे ह्या मिशनरी गृहस्थाने वैजनाथशास्त्री ह्या महाराष्ट्रीय पंडितांचे साहाय्य घेतले. १८०५ साली कलकत्त्यानजीक असलेल्या श्रीरामपूर ह्या गावी त्याने ते प्रसिद्ध केले. श्रीरामपूर येथील मिशनच्या शैक्षणिक कार्यातील डॉ. कॅरेंचे वैजनाथशास्त्री हे साहाय्यक होते. बायबलचे मराठीत व हिंदुस्थानीत भाषान्तर करण्यात डॉ. कॅरेंना ह्यांचा फारच उपयोग झाला. फोर्ट विल्यम कॉलेजात डॉ. कॅरे संस्कृत व बंगाली शिकवीत असत. इ. स. १८०३ पासून मराठी शिकवण्याचीही जबाबदारी

त्यांच्यावर पडल्यानंतर त्यांनी वैजनाथशास्त्रींना आपल्याबरोबर मराठी शिकविण्याकरिता म्हणून नेमून घेतले. ह्या दोघांनी मिळून अकरा मराठी पुस्तके प्रसिद्ध केली.

एकोणिसाव्या शतकात प्रसिद्ध झालेल्या मराठी गद्य चरित्रात वैजनाथ पंडितांनी लिहिलेले *राजा प्रतापादित्याचे चरित्र* हे पहिले होय. मात्र हे स्वतंत्र नसून फोर्ट विल्यम कॉलेजातील बंगाली पंडित रामराम बसु ह्यांनी १८०१ साली बंगाली भाषेत लिहिलेल्या बंगाली भाषेतील पहिल्या मुद्रित गद्य पुस्तकाचा अनुवाद आहे. हा अनुवाद त्यांनी १८१६ साली केला.

**रचना : मु.** – १. पंचतंत्र; १८१५; २. बायबल – पाच भाग; १८०७–२१; ३. मंगल समाचार; १८११ (बंगालीवरून अनुवाद); ४. मराठी-इंग्रजी कोश (मराठी शब्द मोडी लिपीत); १८१०; ५. मराठी भाषेचे व्याकरण; १८०५; ६. रघूजी भोसल्याची वंशावली; १८१६; ७. राजा प्रतापादित्याचे चरित्र; १८१६; ८. सिंहासनबत्तीसी (मृत्युंजय विद्यालंकारलिखित 'बत्रिस सिंहासन' १८०२ चे भाषान्तर); १८१४; ९. सेंट मॅथ्यू; १८०५; १०. हितोपदेश (मृत्युंजय विद्यालंकारलिखित पुस्तकाचे भाषान्तर); १८१५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. खानोलकर, गं. दे. : कानफाडे, वैजनाथ शिवराम; अमवा., प्रथम खंड : भाग पहिला; पृ. १३९–१४१; २. जोग, रा. श्री. (संपा.); मवाइ., खं. ४, पुणे, १९७३; पृ. ५४, २०३–२०४, २५८, ५४५.

**वैजनाथस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – सुंदरकांड – पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वैदेशीस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – मुद्रिकाप्रदान – श्लोक व पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**वैद्यनाथ** [श. १६०० / इ. स. १६७८ च्या पूर्वी] कवी. कावेरीकाठचे राहणारे. ह्यांनी आपल्या *सिद्धांतचिदंबरी* ग्रंथातील एका ओवीत गुरूचे नाव 'ब्रह्मगिरी ताकभाते' असे दिले आहे. ह्यापुढील ओवीत 'त्रिंबक' असाही गुरूचा निर्देश केला आहे (संककासू., पृ. १०५). अलिकडे उपलब्ध झालेल्या ह्यांच्या *गीताटीके*तील माहितीनुसार ह्यांच्या गुरूचे नाव अमृतानंद आहे.

ह्यांनी *सिद्धांतचिदंबरी* नामक अष्टावक्रावर टीका लिहिली आहे. *चिदंबरजयंती* हे ह्यांचे स्तोत्रही उपलब्ध आहे. ह्या स्तोत्रात अंबर हुसेनांचे "मागे उदंड अवतार जाले । परि यवनांत नाहिं केले । म्हणोनि देवासि वाटो आलें । जें म्लेंच्छावतार धरू ॥ ४ ॥ अतयेव तो जगद्गुरु । धरि म्लेच्छकुळिं अवतारु । जेणें केला जगदोधारु । अंबरखानस्वरूपें ॥ ५ ॥" असे उल्लेख आले आहेत. ह्यावरून वैद्यनाथ ह्या परंपरेतले म्हणून मानता येतील. ह्यांनी लिहिलेली एक गीताटीका उ. रा. मेथेकर ह्यांनी उजेडात आणली आहे. तीमध्ये तत्त्वज्ञानाचा विषय व्यावहारिक दृष्टान्तांतून हाताळला आहे.

**रचना : अमु.** – चिदंबरजयंती – स्तोत्र; ओ. सं. ५६; मसंप., जाने. १९७०; पृ. ५४–५९; **अमु.** – १. सिद्धांतचिदंबरी (अष्टावक्रावर टीका); प्रकरणे २१; ओ. सं. ३८५०; र. श. १५७३, फाल्गुन वद्य १२, गुरुवार; र. स्थ. : चंजीनगर; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २ व सवामं. हस्त. सू., खं. १; २. श्रीमद्भगवद्गीतारूपिणी (गीताटीका); र. श. १५७७; ही पोथी पूर्णा जंक्शन (लाशीना) मराठवाडा येथे श्रीबुद्धिस्वामींच्या (लिंगायत) मठात सापडली.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, म. रा. : वैद्यनाथ; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २०. २. पारखे, व. वि. : वैद्यनाथकृत चिदंबरजयंतीस्तोत्र; मसंप., जाने. १९७०; पृ. ५०–५९. ३. मेथेकर, उ. रा.; एक नवी गीताटीका; प्रतिष्ठान, मार्च १९६३; पृ. २३–२७.

**वैद्य नारायण** [का. अनु.] कवी, नाटककार.

**रचना : अमु.** – प्रबोधचंद्रोदय – ओवीबद्ध नाटक; त्रु. पो.; भाइसमं. हस्त. सू., पृ. १६६.

**० वैद्याचा सुत** – पहा **कविनंदन.**

**व्यंकट कवि** [इ. स. चे १७ वे शतक] गोमंतकीय कवी. हे अंत्रुज महालातील राहणारे व ह्यांचे गोत्र कौंडिण्य. उपनाव : बद्री. कुलदेव : मंगेश. नाथपंथीय परंपरेतील गोव्यातील एक सत्पुरुष श्रीपूर्णप्रकाशानंदनाथ ह्यांचे हे प्रशिष्य. आत्मारामानंदनाथ ऊर्फ तुकोबा हे ह्यांचे गुरू. व्यंकट कवीचे गुरू आत्मारामानंदनाथ हे नक्की कोण ते सांगता येत नाही. ह्या कवीचा उल्लेख *महाराष्ट्र-सारस्वता*च्या द्वितीयावृत्तीत व गो. का. चांदोरकरकृत *संत-कवि-काव्य-सूची*त (पृ. १०५) 'व्यंकटेश' असा आलेला आहे तो बरोबर नाही. कारण हे स्वतःस नेहमी व्यंकट म्हणवितात. ह्यांनी बरीच ग्रंथरचना केली आहे.

*पंचपथानुभव* (र. श. १६८९ / इ. स. १७६७) हा ह्यांच्या उपलब्ध ग्रंथांतील सर्वांत मोठा ग्रंथ होय. *अन्वय* व *व्यतिरेक* असे ह्या ग्रंथाचे दोन भाग आहेत. "नाहीं मूळ ग्रंथाश्रय । परि हा मंत्रार्थसंप्रदाय ॥ कीं पूर्णप्रबोधचंद्रोदय । ग्रंथीं असे बोलिला ॥ ५१ ॥ तोचि आधार धरुनी । हा ग्रंथ पहावा सज्जनीं । पंचपथानुभव वाणी । हे प्रघटिली नाथें ॥ ५२ ॥" असा ग्रंथस्वरूपाविषयी उल्लेख कवीने केला आहे. *प्रबोधचंद्रोदया*खेरीज *शिवगीता, उत्तरगीता, योगवासिष्ठ* आणि *भगवद्गीता* आदी ग्रंथांचा कवी आधार घेताना दिसतो. ह्या ग्रंथात कवीने आपली गुरुपरंपरा विस्ताराने वर्णिली आहे (ओव्या २४९६–२५६१). नाथपंथाच्या इतिहासाच्या दृष्टीने तिला विशेष महत्त्व आहे.

*विवेकसिंधुटिप्पण* हा ह्यांचा ग्रंथ म्हणजे संस्कृत *विवेकसिंधू*चे भाषान्तर होय. *श्रीमन्मुकुन्दमुनिकृत महाभाष्यम्* ह्या नावाने श्रीधरशास्त्री पाठक ह्यांनी इ. स. १९१३ मध्ये संपादित केलेला संस्कृत *विवेकसिंधु* ग्रंथ व व्यंकट कवींनी ज्या संस्कृत *विवेकसिंधू*वरून मराठी टिप्पण लिहावयास घेतले तो ग्रंथ ह्यांचे (काही पाठांतरे सोडल्यास) मूळ एकच आहे.

ह्या ग्रंथांशिवाय व्यंकट कवींची स्फुट प्रकरणेही बरीच उपलब्ध आहेत. त्यांपैकी *ब्रह्मस्तुति* वा *ब्रह्मस्तुतिचंद्रिका* हे काव्य *श्रीमद्भागवता*च्या *दशमस्कंधा*तील चौदाव्या अध्यायाची समश्लोकी आहे तर *वेदस्तुती* प्रकरण *भागवता*च्या *दशमस्कंधा*तील ८७ व्या अध्यायाची समश्लोकी आहे. *मांगरीशस्तोत्र, शांतादुर्गास्तुति* (मु. : अकलकामा., भा. १) ही स्फुट काव्ये आणि *योगवासिष्ठसार* समश्लोकी टीका व *उत्तरगीता* समश्लोकी टीका अशी आणखी काही रचनाही उपलब्ध आहे. *अनेककविकृत लघुकाव्यमाले*च्या पहिल्या खंडात (पृ. १५६, तळटीप) व्यंकट कवीच्या १. *म्हाळसाकांतस्तुति* (ग्रंथसंख्या १०), २. *मैराळस्तुति* (ग्रं. सं. १३), ३. *मार्तंडस्तुति* (ग्रं. सं. १०), ४. *कुलदैवतस्तुति* (ग्रं. सं. १५), ५. *म्हाळसास्तुति* (ग्रं. सं. १७), ६. *वासुदेवस्तवराज* (ग्रं. सं. ९), इत्यादी कवितेचा निर्देश केला आहे.

गो. का. चांदोरकरांनी *संत-कवि-काव्य-सूची*त (पृ. १०५) ह्यांच्या नावावर *रुक्मिणीपत्रिकेस* उत्तर असे आणखी एक काव्य दिले आहे. परंतु ह्या काव्याचा कर्ता प्रस्तुत व्यंकट कवी नसावा. कारण ह्या काव्याच्या शवटी कवीने स्वतःचा निर्देश व्यंकटेश असा केला आहे (सवामं. बा. ११४९).

व्यंकट कवी हे तत्त्वज्ञ आहेत असे काव्यरचनेमधून जाणवते. त्यांचा भर प्रामुख्याने वेदान्तप्रतिपादनावर असून काव्यसौंदर्याचा उत्स्फूर्त आविष्कार तेथे प्रत्ययास येत नाही. उपमादृष्टान्तादींच्या आधारे

तत्त्वज्ञान सोपे करून सांगण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. उदा., "जेवीं इक्षुमाजि गुळ । अथवा तिळांत तेल । कां काष्ठामाजि अनळ । सापडे यत्नें ॥ १२७ ॥ किंवा लोह पाषाणांत । घृत लाभे धेनूआंत ॥ तैसा देहीं नित्यमुक्त । आत्मा लाभे गुरुभजनें ॥ २१८ ॥" (*पंचपथानुभव*).

**रचना : मु.** – १. उत्तरगीता; कासं. २. ब्रह्मस्तुति; श्लो. सं. ६१; मसंप., जुलै १९६३; पृ. १७–२६. ३. योगवासिष्ठसार; प्रक. १०; श्लो. ६८४; कासं. ११ : २, क्र. १२८–१३०; पृ. १६१–२१३. ४. शांतादुर्गास्तुती; ग्रं. सं. ९; अकलकामा., भा. १; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९५; पृ. १५६–१५७. ५. श्रीमांगरिशस्तोत्र; श्लो. ११; 'मांगरिशस्तवराज' ह्या पुस्तकात अंतर्भूत. **अमु.** – १. पंचपथानुभव; ओ. सं. ४७०६; र. का. : श. १६८९. २. विवेकसिंधुटिप्पण; पृ. १५०; मुंबई विद्यापीठ हस्त. संग्रह. ८. वेदस्तुति; ग्रं. सं. १४०; वि. ल. भावे संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नायक, ना. भा.; व्यंकटकवि; गोमका.; रिवण (गोवा), १९६९; पृ. २३. २. निमकर, श्री. तु.; व्यंकटकविकृत 'ब्रह्मस्तुतिचंद्रिका'; जुलै १९६३; पृ. १७–२६. ३. प्रियोळकर, अ. का.; महाराष्ट्रकवि व्यंकट व त्याची कविता; मसंप., जाने. १९६२; पृ. १-१६.

**व्यंकटरावदास** [अंदाजे इ. स. १७६०] शाहीर. ह्याने कोल्हापूरकर पहिले छत्रपती संभाजी ह्यांच्यावर पोवाडा रचला आहे. हा पोवाडा त्यांच्या मृत्यूनंतर लगेच रचलेला दिसतो. पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे*, खंड ३ मध्ये संग्रहित (पृ. ८८–८९). माहिती : तत्रैव, पृ. ४३७–३८.

**व्यंकटसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – श्रीकृष्णावरील एक पद; पदसंग्रह, भा. ३; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १९०१; पृ. ९६.

**व्यंकटेश** [अंदाजे शके १७६९/इ. स. १८४७] कवी. समर्थसंप्रदायी. व्यंकटेशाच्या पित्याचे नाव बहिरव व मातोश्रीचे भिमाबाई. कवीने स्वतः दिलेली गुरुपरंपरा अशी : श्रीरामदास > दत्तात्रय > राघव > यशवंत > लक्ष्मण > परशुराम > व्यंकटेश. ह्यांचे गुरू परशुराम ह्यांनी ग्वाल्हेर प्रांती संप्रदायाचा बराच व्याप वाढविला होता. व्यंकटेशांचा *दासप्रताप* हा समर्थचरित्रपर ग्रंथ असून त्याचे १३ अध्याय व २३३१ ओव्या आहेत. हे *समर्थचरित्र* हनुमंतस्वामींच्या बखरीच्या आधारे श. १७६९ त लिहिले, असा निर्देश चरित्राच्या शेवटच्या अध्यायात आहे (१३.२१८). ग्रंथसमाप्तीची ओवी पुढीलप्रमाणे : "सत्रासे येकुणहातरी । प्लवंग नाम गुरुवारी । पौष शुद्ध अष्टमी दोन प्रहरी । ग्रंथ झाला समाप्त ॥ " ग्रंथाची प्रत श. १७७२ (इ. स. १८५०), साधारण संवत्सर, आषाढ शु. २ ची आहे. ग्रंथ अद्याप अप्रकाशितच आहे. ह्यांनी लिहिलेले *श्रीकृष्णपत्रिका* हे २० श्लोकांचे काव्य द. वा. पोतदारांनी छापले आहे (भाइसंमंइति., श. १८३४, पृ. ५९–६०).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : दासप्रताप ग्रंथ; रामदास आणि रामदासी, व. ७, अं. ७७–७८; श्रीसांप्रदायिक वृत्तचर्चा इ.; लेखांक ८०; पृ. २५८.

**व्यंकटेशसुत** [का. अनु.] चरित्रकार व कवी.

**रचना : मु.** – रामाश्वमेध. **अमु.** – १. बोधलेबुवांचे चरित्र; ओ. सं. १३५; २. लालुबाईचे चरित्र; सवामं. हस्त. सू., खं. १. ३. शक्तिनिवारण कथा; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १०५.

**व्यंका** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – देवीचा पाळणा; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**व्यास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – ज्ञानपर व सुब्रह्मण्यपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

० **व्यास ढुंढिराज लक्ष्मण** – पहा ढुंढिराज लक्ष्मण व्यास.

**व्यासदेव** [का. अनु.] कवी व टीकाकार.

**रचना : अमु.** – गीताश्लोक टीका; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**व्यासात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**व्हान्स रॉबर्ट केनेडी / ० केनेडी, व्हान्स रॉबर्ट** [इ. स. १७८४–२९ डिसेंबर १८४६] कोशकार. केनेडींचे वयाच्या चौदाव्या वर्षापर्यंतचे शिक्षण इंग्लंडात एडिंबरो, बकम्स्टेड व मन्माउथ येथे झाले. नंतर एक वर्ष त्यांनी एडिंबरो येथे, हिंदुस्थानात जाण्यासाठी उपयुक्त भाषांचा व विषयांचा प्राथमिक परिचय करून घेतला आणि ईस्ट इंडिया कंपनीत नोकरी घेऊन १८०० साली मुंबईस प्रयाण केले. येथे आल्यावर सुरुवातीला ते लष्करी खात्यात नोकरीला होते. त्या अवधीत त्यांनी पौर्वात्य भाषांचा परिचय करून घेऊन त्यांतील वाङ्मयाच्या अभ्यासाला सुरुवात केली. १८०७ साली कमांडर कॉर्नवालिसचा फारसी दुभाषी म्हणून त्यांची नेमणूक झाली. मराठी, फारसी व संस्कृत ह्या भाषांचा त्यांचा चांगला अभ्यास होता. तसेच पौर्वात्य भाषांतील हस्तलिखिते व संस्कृतविषयक ग्रंथ ह्यांचा संग्रह करण्याची केनेडींना विशेष आवड होती. १८१७ साली मुंबई आर्मीचे जज व अॅडव्होकेट जनरल ह्या जागी त्यांची नेमणूक झाली. १८३५ पासून आयुष्याच्या अखेरीपर्यंत ते मुंबई सरकारचे ओरिएंटल टान्सलेटर म्हणून काम पाहात होते.

मुंबईतील 'बॉम्बे लिटररी सोसायटी' च्या कार्यात केनेडींनी खूप रस घेतला होता. ह्या सोसायटीच्या सभेत त्यांनी अनेक संशोधनात्मक निबंध वाचले. १८१९ ते १८३१ पर्यंत ते ह्या सोसायटीचे चिटणीस होते. ह्या काळात त्यांनी सोसायटीच्या विद्याविषयक कामांचा (ट्रॅन्झॅक्शन्स) अहवाल दोन खंडांत प्रसिद्ध केला. ह्या खंडांची युरोपात खूप स्तुती झाली. कलकत्त्याच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटी'ने १८२५ साली केनेडींकडून *क्वार्टर्ली ओरिएंटल रिव्ह्यू* ह्या नियतकालिकासाठी काही पुराणांची भाषान्तरे करवून घेऊन ती प्रसिद्ध केली. *रिसर्चेस इन्टु द ओरिजिन अॅण्ड अॅफिनिटी ऑफ द प्रिन्सिपल लँग्वेजेस ऑफ युरोप अॅण्ड एशिया* हा त्यांचा ग्रंथ १८२८ साली प्रसिद्ध झाला आणि *रिसर्चेस इन्टु द नेचर अॅण्ड अॅफिनिटी ऑफ एन्शियंट अॅण्ड हिंदु मायथॉलॉजी* हा ग्रंथ त्यानंतर तीन वर्षांनी प्रसिद्ध झाला. हिंदुस्थानात व परदेशांत ह्यांचा खूप गाजावाजा झाला.

केनेडी ह्यांनी *इंग्रजी-मराठी व मराठी-इंग्रजी* हा कोश तयार केला हे त्यांचे मराठी भाषेच्या दृष्टीने महत्त्वाचे कार्य होय ! कॅरेच्या कोशानंतर चौदा वर्षांनी, म्हणजे १८२४ साली, हा मराठीतील दुसरा कोश प्रसिद्ध झाला. कोशाची पृष्ठसंख्या २२५ असून त्यातील शब्दसंख्या आठ हजार आहे. 'जी भाषा सुशिक्षित एतद्देशिय लोक बोलतात व जिचा उपयोग सरकारच्या मुलकी व लष्करी खात्यात होतो' तिच्यातीलच शब्द त्यांनी गोळा केले. मराठी ही केवळ एक बोलीभाषा आहे अशी त्यांची कल्पना होती. त्यामुळे त्यांनी एका ब्राह्मणाकडून *अमरकोशा*चा मराठीत करून घेतलेला अनुवाद, आर्स्किन साहेबाने सरकारी अधिकाऱ्यांच्या उपयोगासाठी तयार करविलेले दोन हस्तलिखित इंग्रजी-मराठी कोश, कॅप्टन कॉक नामक गृहस्थाकडील हिंदुस्थानी-मराठी हस्तलिखित कोश आणि सरकारी दप्तरखान्यातील कागदपत्रे ह्या अल्प सामग्रीवरच कोशाची उभारणी केली. त्यामुळे साहजिकच त्यात अनेक त्रुटी राहिल्या. म्हणूनच, पुढे सात वर्षांनी डॉ. स्टीव्हन्सनने "I have no hesitation however in saying that Col. Kennedy's work does not in any degree answer the purpose of proper help to the students of Murathee language,....... not to mention – innumerable omissions of common and useful words and defective

explanations of many of those given. " अशी स्पष्ट शब्दात टीका केली. तरीही केनेडींच्या कोशाचे महत्त्व अशासाठी की स्वतंत्र रीतीने शब्द गोळा करून कोश रचण्याची सुरुवात येथून झाली. पुढे ह्याच मार्गाने मोल्सवर्थ, कँडी इ. कोशकार गेलेले आपल्याला आढळतात.

महमद इब्राहिम मखबा ह्यांनी लिहिलेल्या *ए ग्रामर ऑफ द मराठा लँग्वेज* (१८२५) ह्या पुस्तकास, केनेडी ह्यांनी बरेच साह्य केले होते.

**रचना : मु.** – ए डिक्शनरी ऑफ मराठा अँड इंग्लिश अँड इंग्लिश अँड मराठा, मुंबई, १८२४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. खानोलकर, गं. दे. : अमवा., प्रथम खंड, भाग दुसरा; पुणे, १९६६; पृ. १२७–१३३. २. पिंगे, श्री. म. : केनेडी, कर्नल व्हॅन्स; युमअसे.; मुंबई, १९६०; पृ. १४६–१५४.

**शंकर–१** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – नवरात्रीची एक आरती; मआ. : पृ. ४१७. **अमु.** – १. दामाजीपंताची रसीद (रसद); सवामं. हस्त. सू., खं. १. २. आरती, पदपदांतरे. ३. वनाभिगमनाचे श्लोक. ४. विश्वेश्वर-स्तवन (संस्कृत श्लोक); तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शंकर–२** [इ. स. च्या १८ व्या शतकाचा प्रारंभ] कवी. कटावकार अमृतरायांचे शिष्य. हे अमृतरायांप्रमाणेच कटाव रचीत.

**रचना : अमु.** – १. रामवनवास (अनेकवृत्तात्मक आख्यान). २. अभंग, पदे, श्लोकादी रचना; मसा., आ. ५, पृ. ४७१.

**शंकर–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे – समर्थाष्टक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शंकर–४** [का. अनु.] कवी. आपल्या *प्रल्हादचरित्रा*च्या शेवटी, " नृपामात्यें तोषें कविस चिखलें ग्राम दिधला। तये ठायीं ग्रंथ स्वमतिअनुमानें पुरविला। " अशी स्वतःविषयी माहिती देतात. ह्या माहितीवरून कवी केव्हा होऊन गेला, त्याला गाव इनाम देणारा नृपअमात्य कोण, ह्याचा उलगडा होत नाही. *प्रल्हादचरित्र* हे प्रकरण श्लोक व सवाया योजून रचले आहे (संककासू., पृ. ११०).

**रचना : मु.** – १. प्रल्हादचरित्र; ग्रं. सं. ५०; अकलकामा., भा. ४; संपा. केळकर, ना. चिं., ओक, दा. के.; मुंबई, १९०३; पृ. १५५–१६१. २. सुलोचनाख्यान; कासं.

**शंकर–५** [का. अनु.] टीकाग्रंथकार.

**रचना : अमु.** – कुंडार्क मराठी टीका; स्थापत्यविषयक ग्रंथ; प्रत श. १७१८ / इ. स. १७९६; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ६५.

**शंकरकिंकर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शंकरदास / ० शिवदास–८ / ० शिवलिंग–२** [अंदाजे इ. स. १७६१] कवी. गाणपत्य-संप्रदायी. ह्यांचे मूळ नाव काशिनाथ असे होते. ह्यांनी *निरंजनचरित्र* ग्रंथात आपली जी गुरुपरंपरा दिली आहे ती अशी : शंकराचार्य > भास्कर > लयानंद > विश्वेश्वर > सहजसिद्ध > परमानंद > काशीराज > निरंजन > रत्नाकर > भगवंत > शंकरदास.

*निरंजनचरित्र* ह्या ग्रंथात निरंजनांचे चरित्रवर्णन नसून अध्यात्मवर्णन आहे. मधून मधून एखाददुसरा संस्कृत श्लोक घेऊन त्याची टीकाही कवी देतो. हे वर्णन संपल्यानंतर श्रीशंकराचार्यांचे *निरंजनाष्टक* घेऊन कवीने त्यावर टीका केली आहे. पहिल्या १३५ ओव्या शंकराचार्यांच्या *ओंकाराष्टका*वर टीका आहे व पुढील सर्व ग्रंथ *निरंजनाष्टका*वरील टीका आहे. कवीने रचलेल्या *गणपति-स्वयंवरा*त रूपकात्मक स्वयंवरवर्णन आलेले आहे. *गणपतिकार्तिकस्वामीभांडण* ह्या रचनेतील पदांची चाल रम्य आहे.

शिवलिंगस्वामींच्या नावावर औंध येथील भवानी ग्रंथालयात *शिवरात्रकथा* अशी एक रचना आढळते. ती वीरशैव शिवलिंग कवीची असावी असे एक मत व्यक्त केले जाते (डॉ. पंडित आवळीकर; प्रस्ता., *विवेक-चिंतामणी*, पृ. ९३). शिवलिंगांच्या नावे उपलब्ध झालेल्या *डफगाण्यात* निरंजनांचा गुरू म्हणून उल्लेख येतो. *शिवरात्रकथा* हा काव्यग्रंथ शंकरदास ऊर्फ शिवदास ऊर्फ शिवलिंग ह्यांच्या नावावरही दिला जातो. त्यामुळे गाणपत्य शिवलिंग आणि वीरशैव शिवलिंग ह्यांच्या रचनेविषयी खात्रीपूर्वक असे काहीच सांगता येत नाही (विशेष माहितीकरिता पहा : **शिवलिंग–१**).

**रचना : अमु.** – १. गणपतिकार्तिकस्वामिभांडण; कडवी १३७. २. गणपतिस्वयंवराख्यान; ओ. सं. २८४; प्र. ६. ३. गणेशचरित्र; ओ. सं. २१; मसा., आ. ५; पृ. ६३०. ४. निरंजनचरित्र; ओ. सं. ३६८; र. का. : श. १६८२, विक्रम संवत्सर (हा ग्रंथ फाल्गुन वद्य एकादशी गुरुवारी जेजुरीस पूर्ण झाला). ५. शिवरात्रीकथा; ओ. सं. ३७; मसा., आ. ५, पृ. ६३०. ६. पदपदांतरे; तंसम.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : १. शंकरदासकृत निरंजन-चरित्र; शंकरदासकृत गणपतिस्वयंवर; शंकरदासकृत गणपतिकार्तिकस्वामिभांडण; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ३१, ३४, ३५–३६. २. चांदोरकर, गो. का. : शिवलिंगाचें डफगाणें; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १९–२०.

**शंकरदैवज्ञ** [इ. स. चे १८ वे शतक] ज्योतिषी. शं. बा. दीक्षित ह्यांच्या मते शंकरदैवज्ञ हे श. १६८८ (इ. स. १७६६) त हयात होते. ह्यांचा *तिथिनिर्णयरत्नमाला* हा मराठी गद्यात लिहिलेला ग्रंथ पैठणजवळील शेवगाव येथे सापडला. असंस्कृतज्ञ लोकांना, व विशेषतः ग्रामजोश्यांना, ह्या ग्रंथाचा उपयोग होत असावा.

**रचना : अमु.** – तिथिनिर्णयरत्नमाला; गद्यग्रंथ; त्रु. पो.; प्रत : श. १७०८, पराभव नाम संवत्सरे ॥ आश्विन व. १३ गुरुवासरे : नक्कलकार नारायणभट्टसुत आत्मारामभट्ट; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ११२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : शंकरदैवज्ञकृत तिथिनिर्णयरत्नमाला; मराठी गद्य; टिपण; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १७.

**शंकर निरंजन** [का. अनु.] पदकार. ह्यांच्या वडिलांचे नाव निरंजन.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ११०.

**शंकर पाटणकर** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, अखेर] कवी. कोकणस्थ ब्राह्मण.

**रचना : अमु.** – प्रल्हादचरित्र; मसा., आ. ५, पृ. ६२६.

**शंकर राम** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. मध्वनाथ चरित्र; २. मुनिविलास काव्य; सहावा व सातवा असे दोन उल्लास उपलब्ध; कॅटलॉग ऑफ मराठी मॅन्युस्क्रिप्ट्स; संपा. ब्लूमहार्ट–कान्हेरे; पृ. १४.

**शंकरसुत (तनय)** [का. अनु.] पदकार. हे आनंदतनयांचे नातू अशी समजूत आहे. *महाराष्ट्रसारस्वतात* आनंदसुताच्या मुलाचे नाव शंकर असे दिले आहे.

**रचना : मु.** – एक शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ३०; **अमु.** – पदपदांतरे, सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग. : शंकरसुत; काही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांची पदे; भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४२.

**शंकरस्वामी** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : अमु.** – खंडेरायाची आरती; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शंकरात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; वेंचले येथील श. १८२३ मध्ये (इ.

स. १९०१) उतरलेल्या पदांच्या बाडात ह्या कवीची रचना समाविष्ट; भाइसंमं.

**शंकरात्मजेन्द्र / शंकरात्मजेंद्र** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – आशीर्वाद पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शंभुदासभानु** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – १. महाभारत – उद्योगपर्व; त्रु.; २. शिवरात्रिकथा; संककासू., पृ. १११.

**० शंभुनृप** – पहा शंभुनृप शाहसुत.

**शंभुनृप शाहसुत / ० शंभुनृप** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – भक्तिशृंगारपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शंभुमहादेव** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – शंकरपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शंभु** [का. अनु.] शाहीर. ह्याने *बाबासाहेब व चिमणासाहेब छत्रपतींचा पोवाडा* रचला आहे. ह्यात " बाबासाहेब महाराज धणी चिमासाहेब, गुणी प्रसन्न भवानी आहे अंबिका । लहु अंकुशाची जोडी सकळ जन देखा ॥ " असे ह्या दोघांच्या स्वारीचे वर्णन येते. प्रस्तुत पोवाडा *ऐतिहासिक पोवाडे*, खंड ३ मध्ये संग्रहित (पृ. ११६–११७).

**शरफोजी / सरफोजी राजे भोंसले / ० शरभेंद्रनृप** [इ. स. १७७८ – १८३२] विद्याव्यासंगी ग्रंथकार, ग्रंथसंग्राहक, पहिले मराठी ग्रंथप्रकाशक व मुद्रक, विद्येचा प्रसार व वाङ्मयाभिवृद्धी ह्यांसाठी झटणारे राजपुरुष. तंजावराधिपती तुळाजी राजे भोसले ह्यांनी त्यांच्या मृत्यूसमयी (इ. स. १७८७) सरफोजींस दत्तक घेतले. सरफोजी हे भोसल्यांचे मूळपुरुष मालोजी भोसले ह्यांचे बंधू विठोजी ह्यांच्या वंशातील आठवे पुरुष. ह्यांची पितृपरंपरा पुढीलप्रमाणे : विठोजी > त्रिंबकजी > गंगाजी > उवाजी > गंगाजी > सुभानजी > शहाजी > शरफोजी.

शरफोजींस दत्तक घेण्याच्या वेळी तुळाजीराजांनी त्यांच्या विश्वासातील तंजावर येथील एक डॅनिश मिशनरी मित्र रे. श्वार्त्झ ह्यांस आपल्या पश्चात त्यांचे शिक्षण व हितरक्षण ह्यांकडे लक्ष देण्याविषयी विनंती केली होती. श्वार्त्झनी ती मान्य केली. पुढे, मद्राससरकारने शरफोजींचे दत्तविधान नामंजूर करून तुळाजीराजांचे एक बंधू अमरसिंह ह्यांस गादीवर बसविले आणि शरफोजींस अमरसिंह राजांच्या संरक्षणाखाली ठेविले. "शरफोजींचें वय त्या वेळीं नऊ वर्षांचें होतें. शरफोजींस व त्यांच्या मातोश्रींस अमरसिंह राजांनीं चांगल्या रीतीनें वागविलें नाहीं, अशी तक्रार श्वार्त्झ ह्यांनीं मद्राससरकारच्या कानावर घालून (इ. स. १७९३) शरफोजी व त्यांची आई ह्यांस मद्रासेस नेऊन ठेविलें. तेथें शरफोजींच्या शिक्षणासाठीं रे. जेरिक ह्या नांवाच्या एका पाद्री गृहस्थाची योजना केली. मद्रास येथें गेल्यानंतर, शरफोजींच्या आईनें, तंजावरच्या गादीवर आपल्या मुलाचा हक्क आहे म्हणून कलकत्त्याचे गव्हर्नर-जनरल लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांच्याकडे यादी पाठविली. श्वार्त्झ ह्यांचें चांगलें पाठबळ मिळाल्यामुळें त्यांचा पक्ष सबळ होऊन, तो उत्कृष्ट रीतीनें मद्राससरकार व हिंदुस्थानसरकार ह्यांच्यापुढें मांडण्यांत आला. श्वार्त्झ ह्यांनीं, शरफोजींचें दत्तविधान सशास्त्र झालें असून, अमरसिंह राजे ह्यांनीं तंजावरच्या पंडितांस लांच देऊन त्यांच्याकडून विरुद्ध अभिप्राय लिहून घेतला, व त्या वेळचे (१७८७) गव्हर्नर सर आर्चिबाल्ड कँबेल ह्यांचा गैरसमज केला, असा पुरावा त्याच पंडितांकडून गोळा केला; आणि लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांस ह्या प्रकरणाची योग्य चवकशी करून शरफोजींस तंजावरच्या गादीचा मालक ठरवावें अशी विनंती केली. ह्याच वेळीं राजे अमरसिंह ह्यांजकडील खंडणीची बाकी थकली व राज्यकारभारामध्यें पुष्कळ अव्यवस्था झाली, असा बोभाटा मद्राससरकारच्या कानावर गेला. त्यामुळें त्यांजविषयीं त्यांचा प्रतिकूल ग्रह झाला. श्वार्त्झ ह्यांच्या पत्रव्यवहाराचा वरिष्ठ सरकारावर तत्काल परिणाम होऊन त्यांनीं ह्या प्रकरणाची चांगली चवकशी केली; त्यांनीं बंगाल्यांतील त्या वेळचे सुप्रसिद्ध संस्कृत पंडित सर वुइल्यम जोन्स ह्यांची ह्या कामीं मदत घेऊन सर्व शास्त्रार्थाचें भाषांतर करविलें, आणि ह्या प्रकरणाचा यथायोग्य विचार करून तारीख ३० डिसेंबर १७९६ रोजीं आपला स्वतंत्र ठराव प्रसिद्ध केला. ह्या ठरावामध्यें सरफोजींचें दत्तविधान सशास्त्र ठरवून अमरसिंह राजे हे तंजावरच्या गादीस लायक नाहींत, असें हिंदुस्थानचे गव्हर्नर-जनरल सर जॉन शोअर ह्यांनीं आपलें मत दिलें. मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड होबर्ट ह्यांनीं वरिष्ठ सरकारच्या म्हणण्यास पुष्टि देऊन, हें प्रकरण कोर्ट ऑफ डायरेक्टर्स ह्यांच्या मंजुरीसाठीं विलायतेस पाठविलें. कोर्ट ऑफ डायरेक्टर्स ह्यांनीं इ. स. १७९८ मध्यें ह्या वादग्रस्त व महत्त्वाच्या प्रश्नाचा सरफोजींच्या वतीनें निकाल करून, अमरसिंह राजे ह्यांस तंजावरचे गादीवरून दूर करावें व त्यांच्या जागीं शरफोजींची स्थापना करावी असें फर्माविलें. त्याप्रमाणें मद्रास सरकारनें अमरसिंह राजांस पदच्युत करून, तंजावर येथील मराठ्यांच्या गादीवर शरफोजींची स्थापना (इ. स. १७९८) केली . . .

"शरफोजी राजे हे गादीवर आले, त्या वेळीं त्यांचें वय अवघें एकवीस वर्षांचें होतें. परंतु त्यांचें बालपण मिशनरी श्वार्त्झ व जेरिक वगैरे विद्वान यूरोपिअन लोकांच्या सहवासांत गेल्यामुळें, त्यांना त्यांच्या संसर्गानें पाश्चात्य विद्येचा चांगला संस्कार झाला. रे. श्वार्त्झ ह्यांनीं शरफोजी राजांच्या शिक्षणाबद्दल बरीच काळजी घेतल्यामुळें, त्यांना इंग्रजी भाषा, इतिहास, भूगोल, गणित इत्यादि विषय चांगले अवगत होऊन, त्यांच्या ठिकाणीं सुशीलता व विद्याचारसंपन्नता हे गुण उत्पन्न झाले. त्यामुळें तंजावरच्या लोकांस त्यांच्याविषयीं आदरबुद्धि व प्रेमभाव वाटूं लागून, ते तंजावरच्या राजमालिकेंतील एक अतिशय लोकप्रिय, रसिक आणि कीर्तिशाली असे राजपुरुष झाले . . .

"त्यांनीं आपली सर्व कारकीर्द (इ. स. १७९८–१८३२) विद्याप्रसार, ग्रंथसंग्रह, आणि विद्वत्समागम ह्यांमध्यें घालविली, असें म्हटलें तरी चालेल. त्यांनीं तंजावर येथें मोठमोठे विद्वान पंडित जमवून व त्यांना उत्तेजन देऊन, त्यांच्याकडून कित्येक संस्कृत ग्रंथ व काव्यें व नाटकें तयार करविलीं. तंजावर येथील बृहदीश्वराच्या देवालयामध्यें प्राचीन चोल राजांनीं लिहिलेल्या शिलालेखाप्रमाणें शरफोजीराजे ह्यांनीं आपल्या राजघराण्याचा इतिहास (*भोंसल-वंश-चरित्र*) मराठी शिलालेखामध्यें कोरून तयार केला आहे. तंजावरच्या राजवाड्यांत एक सरस्वतीमंदिर निर्माण करून, तेथें अनेक विषयांवरील प्राचीन ग्रंथ, ताम्रपत्रें, ताडपत्रें, भूर्जपत्रें इत्यादि जमवून, प्रत्यक्ष विद्यादेवीस तेथें सदैव विहार करावयास लाविलें आहे. शरफोजी राजांचा तंजावर येथील ग्रंथसंग्रह पाहून पाश्चात्य विद्वान थक्क होऊन जात. डॉ. बर्नेलसारख्या जर्मन पंडितांनीं वर्षेच्या वर्षें खर्च करून त्या ग्रंथांच्या नामावली तयार केल्या आहेत.

"शरफोजी राजे ह्यांस शिल्पशास्त्र व संगीतशास्त्र ह्यांचीही चांगली अभिरुचि होती. त्याचप्रमाणें त्यांस वैद्यशास्त्र, ज्योतिषशास्त्र इत्यादिकांची चांगली गोडी असून, त्यांवरील ग्रंथ त्यांनीं आपल्या संग्रहीं ठेविले असून त्यांचें चांगलें परिशीलन केलें होतें. अशा रीतीनें शरफोजी राजे ह्यांस अनेक विषयांचें उत्कृष्ट ज्ञान प्राप्त झाल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं बहुश्रुतता व गुणग्राहकता हे गुण चांगल्या तऱ्हेनें वास करीत होते. अर्थात् अशा विद्यासंस्कारामुळें त्यांच्या बुद्धीचा पूर्ण विकास होऊन, त्यांचे विचार अतिशय उदार आणि उदात्त असे झाले होते. त्यामुळें त्यांनीं पूर्वीच्या कित्येक अज्ञान व धर्मभोळ्या समजुती बाजूस ठेवून, आपल्या राज्यांत सामाजिक, धार्मिक आणि शिक्षणसंबंधीं पुष्कळ सुधारणा करण्याचा प्रयत्न केला होता. त्यांनीं हिंदु, मुसलमान व ख्रिश्चन ह्या सर्व जातींस समबुद्धीनें वागवून त्यांच्या प्रीत्यर्थ अनेक पाठशाला व विद्यालयें संस्थापित केलीं होतीं.

ह्याप्रमाणें शिक्षणप्रसारार्थ व लोकहितार्थ शरफोजी राज ह्यांनीं अनेक प्रयत्न केल्यामुळें त्यांची कीर्ति दूरवर पसरून, मोठमोठे नामांकित विद्वान लोक त्यांच्या भेटीसाठीं तंजावरास जात असत; आणि त्या सर्वांचा – मग ते हिंदी असोत अथवा यूरोपियन असोत – त्यांच्या योग्यतेप्रमाणें शरफोजी राजांकडून योग्य सन्मान होत असे. शरफोजी राजांच्या भेटीचीं वर्णनें एतद्देशीय विद्वानांनीं लिहून ठेवल्याचें आढळून येत नाहीं; परंतु पाश्चात्य विद्वानांनीं मात्र तीं उत्कृष्ट रीतीनें आपल्या चरित्रग्रंथांत नमूद केलीं आहेत. तीं वाचून कोणासही ह्या राजाविषयीं आदरबुद्धि उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाही."– द. ब. पारसनीस : तंजावरचें राजघराणें; १९१२; पृ. ११०–११७.

शरफोजी राजे हे इंग्रजी व फ्रेंच ह्या दोन भाषांचे चांगले ज्ञाते होते. दोन्ही भाषांत ते अस्खलित संभाषण करू शकत. शेक्सपिअरची नाटके व लॉर्ड बायरनची कविता त्यांनी अभ्यासपूर्वक वाचली होती. त्यांचे मार्मिक रसग्रहण ते करू शकत असा आपला अनुभव बिशप हिबर ह्याने आपल्या एका लेखात नमूद केला आहे. इतर इंग्लिश कवितेशीही त्यांचा चांगला परिचय होता. त्यांनी स्वतः इंग्रजीत कविता रचली होती. इंग्रजी व फ्रेंच अभिजात साहित्यातील निवडक ग्रंथांचे वाचन रुचिपूर्वक करणारे त्यावेळच्या हिंदी राजांत शरफोजी हे एकच एक होते. त्यांचा ग्रंथसंग्रह करण्याचा विलक्षण छंद वर निर्दिष्ट केलेलाच आहे. भारतातील निरनिराळ्या भागांतून विविध विषयांवरील दुर्मिळ ग्रंथ ते विकत घेत. काशीयात्रेस ते गेले असता सुमारे पाचशे प्राचीन ग्रंथांची हस्तलिखिते त्यांनी मिळविली व जी विकत मिळणे शक्य नव्हते त्यांच्या त्यांनी तेथील पंडितांकडून नकला करून घेतल्या. अव्याहत श्रम करून त्यांनी तंजावरचा ग्रंथसंग्रह अद्वितीय करून सोडला.

स्वदेशात विद्येचा प्रसार होऊन लोक सुशिक्षित, सुसंस्कृत व ज्ञानसंपन्न व्हावयाचे तर त्यासाठी युरोपातल्याप्रमाणे ग्रंथांची मोठ्या प्रमाणात निर्मिती होऊन ते अल्प मोलात लोकांना मिळण्याची व्यवस्था झाली पाहिजे, हा विचार शरफोजींच्या मनात येऊन त्यांनी त्यासाठी तंजावरमध्ये इ. स. १८०८–९ च्या सुमारास एक मुद्रणालय स्थापन केले. शरफोजी राजांनी १८०६ साली आपले कारभारी सुब्बाजी शेषो पंडित ह्यांजकडून इंग्रजीतील *इसापनीती*चे भाषान्तर करविले व ते *बालबोधमुक्तावलि* ह्या नावाने आपल्या मुद्रणालयात छापून घेऊन प्रसिद्ध केले. ह्या ग्रंथात ११० गोष्टी असून एकंदर पृष्ठसंख्या १९६ आहे. (प्रा. अ. का. प्रियोळकर ह्यांनी, त्या काळच्या मुद्रणाची कल्पना यावी म्हणून त्यांतील 'काहणी ॥ १॥ लांडगा आणि येडका यांची' ही ज्या पृष्ठावर आली आहे त्याचा मुळाबरहुकूम ठसा *मराठी संशोधन पत्रिका*, एप्रिल १९५४ ह्यात छापला आहे.) ह्या ग्रंथाची एकच प्रत ब्रिटिश म्यूझियममध्ये आहे. शरफोजींनी आपल्या छापखान्यात १८०९ व १८१२ ह्या काळात व्यंकटनाथकृत *युद्धकाण्ड*, माघकविकृत *शिशुपालवध*, *कारिकावलि*, असे आणखी ग्रंथ छापलेले आढळतात. शरफोजींचे मुद्रणालयाच्या वाढीकडे अखेरपर्यंत लक्ष होते असे दिसते. १८२१ साली काशीयात्रा करण्याच्या हेतूने ते निघाले असता त्यांचा काही दिवस कलकत्ता येथे मुक्काम होता. ह्या मुक्कामात त्यांनी लॉर्ड हेस्टिंग्स ह्यांच्या शिफारसीवरून डॉ. कॅरे ह्यांच्या श्रीरामपूर येथील मुद्रणालयास भेट दिली. ह्या प्रसंगाची नोंद डॉ. कॅरे ह्यांचा चरित्रकार जॉर्ज स्मिथ ह्याने *धि लाइफ ऑफ विल्यम कॅरे* ह्या पुस्तकात (पृ. २८०) पुढीलप्रमाणे केली आहे : "कॅरेच्या हातांत हात घालून ते सबंध आवारात हिंडले. त्यांनीं त्याचा छापखाना अगदीं बारकाईनें पाहिला. विशेषतः ज्या जागीं पंडितमंडळी भाषांतराचें काम करीत बसली होती त्या जागीं ते अधिक वेळ थांबले."

शरफोजी राजे व त्यांच्याचसारखी साहित्य, संगीत व कला ह्यांबद्दल अभिजात अभिरुची असलेले त्यांचे एक समकालीन त्रावणकोरचे महाराज श्री स्वाथी तिरुमल हे परस्परांचे गाढ स्नेही होते. श्री स्वाथी तिरुमल हे एक श्रेष्ठ दर्जाचे विद्याव्यासंगी, भाषाकोविद व संगीतशास्त्रज्ञ होते. शरफोजी राजांप्रमाणे त्यांनी भिन्न भिन्न शास्त्रशाखांतील विद्वानांस व कलावंतांस आश्रय दिलेला होता. ह्या विद्वानांच्या व कलावंतांच्या भेटीप्रतिभेटी ह्या दोन्ही राजांच्या दरबारांत होत असत व विद्वच्चर्चा चाले. हे दोघे राजे त्या काळांतील एक थोर तेलुगू संत व गायनाचार्य त्यागराज (इ. स. १७६७–१८४७) ह्यांचे अभिमानी भक्त व त्यांच्या संगीताचे भोक्ते होते. शरफोजींस संगीताप्रमाणेच चित्रकलेचाही नाद होता. त्यांनी काढलेली अनेक सुंदर सुंदर चित्रे त्यांच्या वाड्यात पाहावयास मिळतात.

शरफोजी राजांनी भारतातील तीर्थस्थळांच्या दोनदा प्रदीर्घ यात्रा केल्या. पहिली दक्षिण भारतात इ. स. १८०१ मध्ये, दुसरी उत्तर भारतात इ. स. १८२१ मध्ये. त्यांपैकी दुसरीचे वर्णन त्यांनी स्वतः *त्रिस्थळी यात्रेच्या लावण्या* (लावणी संख्या ६४) ह्यात केले असून, पहिलीचे वर्णन धुण्डीराज भट्टसुत शिव ह्या कवीने *शरभेंद्र तीर्थावळी* ह्या चौदा-अध्यायी ओवीबद्ध काव्यात केले आहे. शिवकवीने हे काव्य शरफोजी राजे यात्रेहून तंजावरनगरीस परतल्यावर लगेच लिहावयास घेतले व ते आठ दिवसांत पूर्ण केले. हा कवी बहुधा त्यांच्या यात्रेत त्यांच्या संनिध असावा असे वाटते.

शरफोजी राजे ह्यांचा विद्याव्यासंग, त्यांची संशोधनबुद्धी व त्यांनी विपुल द्रव्य खर्चून ग्रंथ व कलावस्तू ह्यांचा केलेला अमोलिक व अद्वितीय संग्रह, शास्त्र, साहित्य, कला व शिक्षण ह्यांच्या प्रसारार्थ त्यांनी चालविलेले प्रयत्न ह्यासंबंधीची कीर्ती केवळ भारतातच नव्हे तर युरोपातही ह्यावेळी पसरली होती, असे दिसते. त्यांचे हे कार्य पाहून इ. स. १८२४ मध्ये लंडन येथील 'रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ ग्रेट ब्रिटन' ह्या विद्वत्सभेने त्यांस आपले 'ऑनररी मेंबर' करून घेऊन (तंजावरचा एक भूतपूर्व ब्रिटिश रेसिडेंट बेंजामिन टूरिन ह्याने २० फेब्रुवारी १८२४ रोजी शरफोजी राजांस ह्यासंबंधी लंडनहून धाडलेले पत्र *धि जर्नल ऑफ धि तंजोर सरस्वती लायब्ररी*च्या व. १३, अं. ३ मध्ये प्रसिद्ध झाले आहे ते पहा) त्यांचा सन्मान केला. भारतातील कोणाही राजाचा किंवा नबाबाचा ह्यापूर्वी असा सन्मान झाला नव्हता. त्यांच्या झालेल्या ह्या सन्मानाच्या संदर्भात त्यांनी 'सोसायटी'चे त्यावेळचे अध्यक्ष सर अलेक्झांडर जॉन्स्टन ह्यांस धाडलेले आभारप्रदर्शक विस्तृत पत्र (*इतिहाससंग्रह* मासिक, नोव्हेंबर, डिसेंबर १९११, जानेवारी १९१२) वाचण्यासारखे आहे. त्यावरून त्यांच्या विचारसरणीची चांगली कल्पना येते.

शरफोजी राजांनी संस्कृत, तेलुगू व मराठी ह्या तीन भाषांत ग्रंथरचना केलेली आढळते. मराठी भाषेत *काव्य*, *व्रतकथा* व *नाटके* त्यांनी लिहिली. संस्कृत भाषेत त्यांनी *राघवचरित* ह्या नावाचे एक महाकाव्य लिहिले आहे. नाटकांची विशेष आवड असल्याने ह्यांनी *देवेंद्र कोरवंजी*, *मीनाक्षीपरिणय*, *सुभद्रापरिणय*, *विश्वातीतविलास*, *मोहिनी-महेश्वर-परिणय* [ ⇨ ३ ] अशी कित्येक नाटके लिहिली. ह्यांपैकी काहीच मुद्रित झाली आहेत.

**रचना : मु.** – १. देवेंद्र कोरवंझी नाटक. २. मोहिनी-महेश्वर-परिणय नाटक. ३. राधाकृष्णविलास नाटक. ४. श्रीशरभेंद्र वैद्य रत्नावळी; अनेक वैद्यांनी शोधून काढलेल्या औषधांच्या – त्यांच्या प्रक्रियांसह – याद्यांचे संग्रह. ५. गणपतीपर पद व शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९, पृ. १, ३१. **अमु.** – १ उमामहेश्वरव्रत (व्रतकथा); २. काव्यमय भूगोलवर्णन; ३. किरातार्जुनीय काव्य; ४. गंगाविश्वेश्वर

परिणय नाटक; ५. गजशास्त्रभाषा प्रबंध; ६. गणेशलीलार्णव नाटक; ७. गणेशविजय नाटक; ८. नीलकंठ कुलाल चरित्र (काव्य); ९. नील भिल्लचरित्र (काव्य); १०. पंचाक्षरी विभूति – शिवरात्री कथा (काव्य); ११. पक्षप्रदोष, शनिप्रदोष (व्रतकथा); १२. प्रभावतीपरिणय नाटक; १३. बंसीधरविलास नाटक; १४. बुधाष्टमीव्रत (व्रतकथा); १५. भौमवार व्रतकथा; १६. मीनाक्षीपरिणय नाटक; १७. मृत्युंजय चिरंजीव नाटक; १८. विविध कर्नाटक रागरागिणी (नृत्य-संगीत), १९. विश्वातीतविलास नाटक; २०. शिवरात्री उपाख्यान नाटक; २१. सुभद्रापरिणय ऊर्फ सुभद्राकल्याण नाटक; तंसम.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पारसनीस, द. ब. : 'सरफोजी राजे ह्यांची कारकीर्द' : तंजावरचे राजघराणे; १९१२; पृ. ११३–१२०. २. वाकसकर, वि. स. : तंजावरचे मराठे राजे; १९३३; पृ. ११६–१२४. ३. सरदेसाई, गो. स. : ब्रिटिश रियासत, उत्तरार्ध; १९३९; पृ. २१७–२२०.

**० शरभेंद्रनृप** – पहा **शरफोजी.**

**शहा अली कादर / ० शाअली** [अंदाजे इ. स. चे १८ शतक, अखेर] शाहीर. कलगीतुऱ्याच्या शाहिरीतील कलगी-पक्षाचा अर्थात शक्ति पक्षाचा अध्वर्यू. ह्यांचा शिष्यसंप्रदाय मराठवाड्यात आजही अस्तित्वात आहे. हे तुकनगीर तुरेवाल्याचे प्रतिस्पर्धी म्हणून विशेष ख्यातनाम. कलगीतुऱ्याच्या शाहिरीमुळे ह्यांचे नाव उत्तरेतही माहीत झाले आहे. नारूबापू नावाच्या शाहीराने शके १७९९ मध्ये रचलेल्या एका 'मुजऱ्या'त ह्यांचा उल्लेख येतो. शहा अलींच्या आध्यात्मिक शाहिरीवर सूफी मताचा विशेष प्रभाव आहे. त्यांची सर्वच कवने नादमधुर व आध्यात्मिक गूढतेने भारलेली आहेत. ह्यांनी पदपदांतरादी रचनाही केली आहे. ही रचना अप्रकाशित असून तिच्यापैकी काही समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील संग्रहात उपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : शहा अली कादर; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १६०–१७४.

**शहाजी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १०५.

**शहादत्त अलमा प्रभू** – पहा **परिशिष्ट.**

**शहा नवरंग** [का. अनु.] मुसलमान संतकवी. हे केशवस्वामींचे गुरू रंगबोध ह्यांचे प्रशिष्य आणि पूर्णबोधांचे शिष्य असावेत असे रा. चिं. ढेरे ह्यांचे मत आहे. ह्यांचे एक पद ढेरे ह्यांनी छापले आहे (मुमसंक., पुणे, १९६७, पृ. १४२). त्यात 'जेथे मी-तूं-पणाची वार्ता सरते', अशा विश्वव्यापक पूर्णब्रह्माच्या रंगात हा रंगलेला दिसतो.

**० शहा फकीर** – पहा **शहा हुसेन फकीर.**

**शहाबेग / ० शाहबेग** [इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] पदकार. हे केशवस्वामी भागानगरकरांचे मुसलमान शिष्य. ह्यांच्या पदांतून कठोर वैराग्य व अपार गुरुभक्ती हे भाव व्यक्त झालेले आहेत. ह्यांची मराठी रचना केशवस्वामींच्या कवितेच्या बाडात उपलब्ध झाली असून बाड हैद्राबादचे बॅ. श्रीधर वामन नाईक ह्यांच्या संग्रहात असल्याचे खरशीकरशास्त्री ह्यांनी लिहून ठेवले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : शहाबेग; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १४०–१४१.

**शहामुनी / ० शहासेन** [अंदाजे श. १६७० / इ. स. १७४८ – समा. अंदाजे श. १७३० / इ. स. १८०८] मुसलमान कवी. रजपूत घराण्यातील. ह्यांचे पूर्वज मूळचे प्रयागचे. हे घराणे काहीसे भटक्या वृत्तीचे होते. शहामुनींनी *सिद्धान्तबोध* ह्या ग्रंथात आपले कुलवृत्त दिले आहे. ह्यांची पितृपरंपरा अशी : शाहाबाबा (पत्नी अमीना) > जनाजी (मंडुबाई) > मनसिंग (आमाई) > शाहाबाबा. कवीचे वडील सिद्धटेक (ता. कर्जत, जि. नगर) येथे राहात असत. शहामुनींचा जन्म मात्र भीमातीरावर बसलेल्या पेडगावी (ता. श्रीगोंदे, जि. नगर) येथे झाला. कवीचे मूळ नाव शाह हुसेन. पण आपल्या गुरूच्या सन्मानार्थ त्यांनी शहामुनी असे नाव धारण केले. शहामुनींना सुदूर वाराणशी येथे गुरूपदेश दिला गेला. ह्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : दत्तात्रेय > मुनींद्रस्वामी > शहाबाबा. ह्यांनी श. १७३० (इ. स. १८०८) च्या सुमारास बीडजवळ शहागड येथे समाधी घेतली.

ह्यांचा *सिद्धान्तबोध* ग्रंथ ओवीबद्ध आहे. त्यात पहिल्या ३० अध्यायांत ज्या विचारांची विस्ताराने मांडणी केली आहे, त्यांना पूर्वपक्ष मानून पुढे (अ. ३१–५०) अखेरचा सिद्धान्त म्हणून अद्वैत सिद्धान्ताची मुक्तकंठाने स्तुती केली आहे. पहिल्या ३० अध्यायांत महानुभावीय तत्त्वज्ञान आले आहे. ग्रंथात जागोजागी गुरूविषयीचा कृतज्ञताभावही व्यक्त केला आहे. ल. रा. पांगारकरांच्या मते हा ग्रंथ मराठी भाषेतल्या पहिल्या प्रतीच्या ग्रंथांत मोडण्यासारखा आहे. ह्याउलट *महाराष्ट्रसारस्वत*कार म्हणतात, 'हा ग्रंथ म्हणजे एक अठरा धान्यांचे कडबोळे आहे.'

**रचना : मु.** – १. सिद्धान्तबोध; अ. ५०; सं. ९८५८; र. श. १७०० (पण जुन्या हस्तलिखितात ह्या ग्रंथाचा समाप्तिकाल श. १७१७ (इ. स. १७९५) दिला आहे; सातारा जिल्ह्यातील पठारी मंडण ह्या गावी हा ग्रंथ रचला); मुंबई, १९१४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : शहामुनि; मकच., खं. २; मुंबई, १९१३; पृ. ७७–९४. २. ढेरे, रा. चिं. : शहामुनि; मुमसंक.; पुणे, १९६७; पृ. ११९–१३६. ३. तोंडोळीकर, व. स. : सिद्धान्तबोध ह्या ग्रंथावर एक निरीक्षक दृष्टि; महानु.; नोव्हें. १९६९; पृ. ३९–४३. ४. देशपांडे, य. खु. : सिद्धान्तबोध; ममवा., आ. २, पुणे, १९६०; पृ. ८०–८२. ५. पंडित, ज. ना. : शहामुनीचा 'सिद्धान्तबोध' मानभावी आहे काय ?; लोशि. (जुने), व. ३, अं. ९, श. १८३७; पृ. ३४७–३४९. ६. प्रियोळकर, अ. का. : मुसलमानांची जुनी मराठी कविता; उत्तरार्ध (५); मसंप., एप्रि. १९६३; पृ. २१–२६.

**० शहासेन** – पहा **शहामुनी.**

**शहा हुसेन फकीर / ० शहा फकीर / ० शहा हुसेन फकीर अलावा / ० शाह हुसेन फकीर / ० शाहुसेन फकीर / ० शाहू फकीर** [का. अनु.] मुसलमान संतकवी. ह्यांचे एक मराठी गीत व दहा-बारा हिंदी पदे उपलब्ध आहेत. मराठी पद मुक्तछंदात असून बाळकृष्णाच्या क्रीडेवर केले आहे. ही रचना भावमधुर अशी आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : शहा हुसेन फकीर; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १४५–१४८.

**० शहा हुसेन फकीर अलावा** – पहा **शहा हुसेन फकीर.**

**० शाअली** – पहा **शहा अली कादर.**

**शांतचैतन्य** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० शांतनीलकंठ** – पहा **शांतलिंग.**

**० शांत ब्रह्मणी** – पहा **मृत्युंजय.**

**शांतलिंग / ० शांतनीलकंठ / ० शांतलिंग शिवयोगी / ० शांतलिंगाप्पा / ० शांतेश्वर** [अंदाजे श. १४७५ / इ. स. १५५३ – समा. श. १५४५ / इ. स. १६२३] वीरशैव (लिंगायत) संतकवी. ह्या सत्पुरुषांची चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. ह्यांचे वास्तव्य शिखर-शिंगणापुरी (जि. सातारा) असे. ह्यांच्या गुरूचे नाव नीलकंठ किंवा शंभू नीलकंठ. ह्यांची गुरुपरंपरा अशी : रेवणसिद्ध > धर्मचंद्र > रुद्रमुनींद्र > मुक्तमुनी > समाधिसोमेश्वर > चन्नसदाशिव > चतुर्दशविद्यापारंगतरेवणाचार्य > बोळ मल्लिकार्जुन > पडगदगीस्थापनाचार्य बसवेश्वर > भाळलोचन >

धातुर्वादी सोमेश्वर > पदडीकांतिदेव > चन्नमल्लिकार्जुन > चरतीगंगाधर > विश्वरूपदेव > सिंगळसिद्धेश > निराहारी सिद्धेश > समाधिसिद्ध > शांतमूर्ति सोमेश्वर > हुल्लिकांति सोमेश्वर > हुल्लिकांतीचन्नवीरस्वामी > चल्लूर शांतेश्वर > विद्यापारंगत शांत > काशीपति नीलकंठ > शांतलिंग. ही गुरुपरंपरा दशस्थ शांतांच्या *शांति प्रकरणात* व सुखबोधांच्या *परंपरापुरुष-आराधन प्रकरणात* दाखविली आहे. ही परंपरा एक वेगळीच परंपरा असून ती शांत-परंपरा म्हणून प्रसिद्धी पावली आहे, ह्याचा प्रत्यय वरील दोन प्रकरणांतून येतो.

ज. बा. मोडक संपादित *जयरामस्वामी वडगावकर यांच्या चरित्राची बखर* ह्या ग्रंथात जी माहिती मिळते, त्यावरून जयरामस्वामींचे गुरू आणि वडगाव (जि. सातारा) मठाचे संस्थापक कृष्णाप्पा हे शांतलिंगांचे मुख्य शिष्य असल्याचे कळते. त्यांनी श. १५०४ / इ. स.१५८२ मध्ये ह्या वडगाव मठाची स्थापना केली. पां. ना. कुळकर्णी ह्यावरून अनुमान काढतात ते असे की, वडगाव मठाच्या स्थापनेच्या मागेपुढे श. १५१० (इ. स. १५८८) च्या पूर्वी शांतलिंग ह्यांनी समाधी घेतली असावी (*संशोधन-धारा*, पृ. १५६). रा. चिं. ढेरे ह्यांना कुळकर्ण्यांचे हे मत सयुक्तिक वाटते. कृष्णाप्पांचा दर एकादशीस शिखर-शिंगणापुरी गुरुदर्शनास जाण्याचा जो क्रम होता तो श. १५०४ मध्ये त्यांनी मठस्थापना केल्यानंतर थंडावला. अर्थातच त्या सुमारास त्यांचे गुरू हयात नसण्याचाच संभव अधिक वाटतो (प्रामनधा., पृ. ४१–४२). ढेरे ह्यांनी अंदाजे श. १४५० ते १५०० हा शांतलिंगाच्या ग्रंथरचनेचा काळ मानला आहे. कृष्णाप्पा श. १५४५ त माघ शु. १५ ला समाधिस्थ झाले असे *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे म्हणतात (मसा., आ. ५, पृ. ३३७). डॉ. पंडित आवळीकरांच्या मते शांतलिंगांचा निधनशक १५४५ असून माघ शु. पौर्णिमा (श. १५४५) ही भावे ह्यांनी दिलेली निर्याणतिथी कृष्णाप्पांची नसून शांतलिंगांची आहे. शांतलिंगांनी समाधी घेतली त्यावेळी कृष्णाप्पास्वामी हजर होते व त्यानंतर काही दिवसांनी ते वडगावी आले असा निर्देश राजाराम प्रासादींच्या *भक्तमंजरीमाले*त (अ. १२, श्लो. ५९–६२) शांतलिंगांच्या समाधिसोहळ्याचे जे वर्णन केले आहे त्यात येतो. शांतलिंगकृत *विवेकचिंतामणि* ग्रंथाचा लेखनकाल (श. १५२६ / इ. स. १६०४), कृष्णाप्पांचा समाधिशक, एकनाथांचे गुरू जनार्दनस्वामी ह्यांच्या (श. १४२६–१४९७) व शांतलिंगांच्या शिखर-शिंगणापुरी होणाऱ्या भेटीगाठी, ह्यांच्या आधारे शांतलिंगस्वामींचा समाधिशक डॉ. आवळीकरांनी निश्चित केला आहे.

*विवेक-चिंतामणि*, *करण हसुगे* आणि *शांतबोध* ही शांतलिंगांची ग्रंथरचना. *विवेकचिंतामणी*चे पहिले दोन परिच्छेद *विवेकचिंतामणि-पूर्वभाग* ह्या नावाने सोलापूरच्या *लिंगीब्राह्मण ग्रंथमाले*तून (क्र. ३५) इ. स. १९०९ मध्ये प्रकाशित झाले होते. ह्यानंतर डॉ. पंडित आवळीकरांनी हा ग्रंथ संपविला व पुणे आणि कर्नाटक विद्यापीठांच्या सहकार्याने १९६३ साली तो प्रकाशित झाला. *विवेकचिंतामणि* हा ग्रंथ निजगुणशिवयोगी ह्या वीरशैव कन्नड कवीच्या *विवेकचिंतामणि* ग्रंथाचा मराठी अनुवाद आहे. मूळ ग्रंथ कानडी आहे असे डॉ. पंडित आवळीकर मानतात, तर प्रा. पां. ना. कुळकर्णी ह्यांच्या मते मूळ ग्रंथ संस्कृत आहे (*संशोधनधारा*, पृ. १४४–१६२). ' विवेकचिन्तामणि म्हणिजे तारक । संस्कृत शास्त्र ॥ १०.१४० ॥ ' असे शांतलिंगांनी स्पष्टपणे म्हटले आहे व मूळ संस्कृताच्या सापेक्षतेने आपण प्राकृत रचना करीत असल्याचे वारंवार म्हटले आहे, असा आधार ते देतात. निजगुणशिवयोगींचा *विवेकचिंतामणि* हा उपलब्ध ग्रंथ कानडी असून त्याचे दोन संस्कृत अनुवाद झाले आहेत. परंतु त्यांचा काल शांतलिंगोत्तर आहे. शांतलिंगांना आधारभूत ठरलेला संस्कृत ग्रंथ आजतरी उपलब्ध नाही, असे डॉ. आवळीकरांना वाटते. आंध्रमधील दत्तसंप्रदायी ग्रंथकार परमानंदतीर्थ ह्यांनी तेलुगू भाषेत *विवेकचिंतामणि*-नामक ग्रंथ रचला आहे. निजगुणशिवयोगींनी ह्या तेलुगू ग्रंथाच्या आधारे कानडीत *विवेकचिंतामणि* उतरला, असे प्रा. राव नामक अभ्यासकाचे मत आहे (*दत्त संप्रदायाचा इतिहास*, पृ. १८८–१८९). हा *विवेकचिंतामणि* ग्रंथ म्हणजे लिंगायतांच्या आचारविचारविषयक बाबींचा एक ज्ञानकोश आहे व तो साडेतीन-चरणी ओवीत बांधलेला आहे.

ग्रंथाचा प्रस्ताव करताना कवी म्हणतो : " तें विवेकचिंतामणिशास्त्र । प्राकृत भाषा सविस्तर । सांगितलें म्हणे शांतेश्वर । जगस्वहितनिमित्यें ॥ " ग्रंथाचे दहा परिच्छेद व ३८९३ ओव्या आहेत. परिच्छेदांवरील जी शीर्षके आहेत त्यांवरून ह्या ग्रंथाच्या स्वरूपाची कल्पना करता येण्यासारखी आहे. वेदान्तसकळशास्त्रनिर्णय, शिवागमवर्णन, नागलोकस्थितिवर्णन, देवलोकवर्णन, जंबुद्वीपस्थितिवर्णन, मृत्युलोकस्थितिवर्णन, ऊर्ध्वलोकस्थितिवर्णन, शुद्धभुवनस्थितिवर्णन, भुवनांतरप्राप्तिप्रकारवर्णन आणि सकळवेदान्तसिद्धान्तशास्त्रविवरण ह्या शीर्षकांखाली अनेक विषयांची चर्चा व तपशील त्यात आहे.

षट्स्थल, अष्टावरण आणि पंचाचार हे वीरशैव पंथाचे इतर शैवपंथीयांहून वेगळेपणा दाखविणारे विशेष असून ह्या तत्त्वज्ञानास षट्स्थलसिद्धान्त असे नाव दिले जाते. स्थल म्हणजे सर्व विश्व जेथे स्थिर होते, लय पावते ते ब्रह्म. त्याचे दोन भेद. लिंगायत (शिव) व अंगस्थल (जीव). षट्स्थलसिद्धान्तात लिंग सामरस्य हेच परमध्येय मानले गेले आहे. प्रारंभीच्या अवस्थेत लिंग व मंत्र ह्यांत भेद दिसला तरी अंतिम अवस्थेत अभेद किंवा अद्वैत असल्याने ह्या तत्त्वज्ञानास भेदाभेदात्मक किंवा शक्तिविशिष्टाद्वैत म्हणून ओळखतात. अंग-लिंग सामरस्याची ही क्रिया पायरीपायरीने सावकाश होत असते. त्या वाटेवरील मुक्कामाचे टप्पे म्हणजे स्थले होत. ह्यामध्येच वीरशैवांचा आचारधर्म अंतर्भूत झालेला आहे. लिंग ही शिवाची प्रतिमा नव्हे तर साक्षात शिवच अशी वीरशैवांची श्रद्धा आहे. दीक्षेच्या वेळी दिलेल्या लिंगाखेरीज दुसऱ्या कोणत्याही स्वरूपात शिवाची पूजा केली जात नाही. गुरू व लिंग ह्यांचा आदर सारखाच केला जातो. जंगम म्हणजे वीरशैवधर्मनीतीची शिकवण देणारा. वीरशैव तत्त्वज्ञानाचा *विवेकचिंतामणी* [ ⇨ ३] ग्रंथातील हा उपरिनिर्दिष्ट सविस्तर प्रपंच सांप्रदायिकांना कामधेनूसारखा ठरेल.

शांतलिंगांचा दुसरा ग्रंथ *कर्णहस्तकी* (खरे नाव *करणहसुगे*). ह्या ग्रंथाचे प्रकाशन *कर्णहंस* ह्या चुकीच्या नावाने झाले आहे (संपा. खरशीकरशास्त्री). '*करणहसुगे*' म्हणजे पंचीकरण. चन्नबसवेश्वरांनी अनेक शास्त्रग्रंथांतून संस्कृत श्लोक आधाराला घेऊन त्यांचे *करणहसुगे* ह्या ग्रंथात विवरण केले आहे. हा कानडी भाषेतील ग्रंथ आहे. शांतलिंगांनी मूळ ३७ संस्कृत श्लोकच आधाराला घेतले आहेत. चन्नबसवेश्वरांनी ह्या ग्रंथात सृष्ट्युत्पत्तीचा क्रम सांगितला आहे. पंचमहाभूते, सूर्य, चंद्र व आत्मा ही शिवाचीच रूपे होत. त्यांच्यापासून नंतर ब्रह्मांड निर्माण झाले. जे 'ब्रह्मांडी' ते 'पिंडी' ह्याप्रमाणे ब्रह्मांड व पिंडांड ह्यांची रचना सारखीच आहे. शरीर हे ७५ गुणांनी बनले आहे. त्याखेरीज आणखी २५ तत्त्वे आहेत व ती पंचमहाभूतांपासून निर्माण होतात. हेच तत्त्वज्ञान *करणहसुगे* ग्रंथात येते. ह्या ग्रंथाचा विचार जो गुरुमुखाने करील त्याला ब्रह्मसाक्षात्काराचा रोकडा अनुभव प्राप्त होईल, अशी ग्वाही ग्रंथान्ती कवी देतो (ओ. क्र. ३७५).

अनुवादासाठी *विवेकचिंतामणि* व *करणहसुगे* हे दोन ग्रंथ निवडण्यात शांतलिंगांनी मार्मिकता व फार मोठे औचित्य दाखवले आहे. वीरशैव-तत्त्वज्ञानातील दोन विचारधारांचे प्रतिनिधित्व करणारे दोन ग्रंथ निवडण्यातही ह्यांची समन्वयवादी दृष्टीच प्रत्ययास येते.

अनुवादाबाबत बोलायचे झाले तर असे म्हणता येते की मूळ ग्रंथापासून शांतलिंग फारसे दूर जात नाहीत. शांतलिंग हे स्वतः कन्नडभाषिक असले तरी त्या भाषेची छाप ह्या ग्रंथावर पडलेली आढळत नाही. भाषेचे वळण देशी नसून संस्कृतकडे झुकलेले आहे. वेदान्त व षड्दर्शने ह्यांचा हा प्रपंच समर्पक दृष्टान्तांच्या आधारे सोपा करून मांडला आहे. त्यांपैकी काही दृष्टान्त सांकेतिक असले तरी त्यांमुळे काव्यसौंदर्य वर्धित झाले आहे. एके ठिकाणी अहंकाराला चुंबकाचा दृष्टान्त दिला आहे. जसे : "जैसे चुंबकाचेनि। सन्निधाने करुनी। जड लोहालागूनी। चेष्टाहोय ॥ १.७७० ॥" अनुप्रासांचीही कवीला आवड आहे. ओवीची बांधणी मात्र अनेक ठिकाणी शिथिल झाली आहे. काव्यात विचार, कल्पना आणि मांडणी ह्यांचा सुरेख संगम झालेला आढळतो. एकंदरीत रचना प्रसन्न आहे.

*शांतबोध* ही शांतलिंगांची स्वतंत्र काव्यकृती आहे. ह्यातील विषय सृष्टिक्रमाविषयीचा आहे, असे प्रकरणांच्या समाप्तिमुद्रेत म्हटले आहे. निरूपणपद्धती गुरुशिष्यसंवादात्मक आहे. ह्या ग्रंथाच्या दोन अपूर्ण प्रती रा. चिं. ढेरे ह्यांस उपलब्ध झाल्या आहेत. ह्या उपलब्ध प्रकरणांची ओवीसंख्या ५१३ आहे. ढेरे ह्यांच्या मते हा ग्रंथ श. १४७५ (इ. स. १५५३) च्या सुमारास लिहिला गेला असावा. ह्या उपलब्ध प्रतीतील केवलब्रह्म, ब्रह्म मायेसी विवर्ते, महत्तत्त्वकुंडलब्रह्म, हिरन्ये ब्रह्मदंडका, ब्रह्मांडरचना, ब्रह्मांडस्थिति, कैवल्यदेह, ज्ञानदेह, माहाकारणदेह, आज्ञाणकारणदेह ह्या विषयांचे विवरण आहे. ग्रंथाच्या अंतरंगाचे दर्शन घेत असता शांतलिंगांनी परिचित दृष्टान्तांनी त्यातील विषयाचे विवरण केले आहे असे दिसते. ब्रह्म-मायासंबंधाचे स्पष्टीकरण करताना शांतलिंगांनी बीज-वृक्ष, सुवर्ण-अलंकार, कापूस-तंतू, गगन-अभ्र, घृत-पुतळी, दर्पण-बिंब, घंटिका-ध्वनि, रत्न-कीळ, सागर-लहरी इत्यादी सुपरिचित आणि सुलभ दृष्टान्तांची योजना केली आहे. ज्ञानदेवांच्या *अमृतानुभवा*तील शिवशक्तिसमावेशनाचे स्मरण करून देणाऱ्या चौथ्या प्रकरणातील पुरुष-प्रकृति-ऐकात्म्याचे वर्णन करणाऱ्या ओव्या वाचल्या की शांतलिंगांचा ह्या ग्रंथाचा अभ्यास असावा असे निश्चितपणे वाटते, असे मत ढेरे बोलून दाखवतात (प्रामनधा., पृ. ४७). ग्रंथ प्रासादिक असून भाषा सोपी व अलंकरण आशयाभिव्यक्तीस उचित असे आहे. ओवी साडेचार-चरणी आहे.

शांतलिंग हे जयरामस्वामी वडगावकरांचे परमगुरू म्हणून प्राचीन मराठी वाङ्मयाभ्यासकांस ज्ञात आहेत. शांतलिंगांचा पारमार्थिक अधिकार फार मोठा होता. मराठीत रचना करणारे हे पहिलेच लिंगायत परंपरेतील कवी. शांतलिंगांनी स्वतः वीरशैव पंथाचे तत्त्वज्ञान मांडले. पण त्यांच्या शिष्य-प्रशिष्यांनी ह्या तत्त्वज्ञानाचा प्रचार केला नाही. त्यामुळे जी एक विशिष्ट परंपरा निर्माण झाली ती शांतपरंपरा होय. हिने हरिहरैक्यसाधनेचा पुरस्कार केला. बहुधा शैव-वैष्णवांचे तंटे त्या काळात विकोपाला जाऊन कडवटपणा निर्माण होत असावा, कारण ह्याच सुमारास होऊन गेलेल्या सरस्वती गंगाधरांच्या *गुरुचरित्रा*तही शिव-विष्णु-ऐक्याचे प्रतिपादन सर्वत्र केलेले आढळते. समन्वयाच्या ह्या तत्त्वज्ञानामुळे शांतलिंगांच्या परंपरेत ब्राह्मणांचा व वीरशैवेतरांचाही अंतर्भाव होऊ शकला.

**रचना : मु.** – १. कर्णहंस (करणहसुगे); ओ. सं. ३७७; संपा. जोशी (खरशीकरशास्त्री), न. स.; खरशी, सातारा, १९४६; २. विवेकचिंतामणि; परिच्छेद १०; ओ. सं. ३८९३; संपा. आवळीकर, पंडित; पुणे–धारवाड, १९६३. **अमु.** – १. शांतबोध; उपलब्ध प्रकरणे ३ ते १०; ओ. सं. ५१३; रा. चिं. ढेरे संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : प्रस्ता., 'विवेकचिंतामणि'; पुणे, १९६३; पृ. १–९८. २. आवळीकर, पंडित : शांतपरंपरा : पुस्ती व दुरुस्ती; नभामा., मे १९६५; पृ. ४१–४२. ३. कुळकर्णी, पां. ना. : शान्त गुरुपरंपरा; संशोधनधारा; पुणे, १९६७; पृ. १३१–१४३. ४. कुळकर्णी, पां. ना. : शांतलिंगप्पा आणि विवेकचिंतामणि; संशोधनधारा; पुणे, १९६७; पृ. १४४–१६२. ५. चांदोरकर, गो. का. : शांतलिंगकृत कर्णहस्तिकी; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ३६–३९. ६. जोशी, ना. ब. : निजगुणशिवयोगीकृत 'विवेकचिंतामणि'; नवे ग्रंथ नवें चिंतन; इंद्रायणी, मार्च-एप्रि. १९६४; पृ. १९–२२. ७. ढेरे, रा. चिं. : निजगुणशिवयोगी : 'विवेकचिंतामणि' व 'विवेकसिंधु' : नवे ग्रंथ नवें चिंतन; इंद्रायणी, मार्च-एप्रि. १९६४; पृ. २२–२४. ८. ढेरे, रा. चिं. : मराठीतील पहिला लिंगायत संतकवी : शांतलिंग; प्रामनधा., कोल्हापूर, १९७२; पृ. ४१–५२. ९. ढेरे, रा. चिं. : शांतलिंगस्वामींचा 'शांतबोध'; इंद्रायणी, दीअं. १९६२; पृ. ८६–९१.

० **शांतलिंग शिवयोगी** – पहा शांतलिंग.

० **शांतलिंगाप्पा** – पहा शांतलिंग.

० **शांतेश्वर** – पहा शांतलिंग.

**शाम–१** [अंदाजे श. १६५९ / इ. स. १७३७] कवी. हे स्वतःला बाळकृष्णसुत म्हणवितात.

**रचना : अमु.** – ब्रह्मस्तुती; र. श. १६५९, पिंगल; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १०६.

**शामकल्याण** / ० **शामजी गोसावी जवळेकर** [का. अनु.] रामदासी कवी. हे कल्याणस्वामींचे शिष्य.

**रचना : मु.** – ४ पदे; श्रीसांप्रविवि., खं. २, लेखांक ६१, पृ. २२–२४. **अमु.** – भीमध्यान, आरत्या, पदपदांतरे, श्लोक इ. स्फुट रचना; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

० **शामजी गोसावी जवळेकर** – पहा शामकल्याण.

**शामजी गोसावी (पुणतांबेकर)** / ० **शामजी मरुद्गण** [अंदाजे श. १६६७ / इ. स. १७४५] चरित्रकार. उपनाव मरुद्गण. ह्यांनी रचलेल्या *चांगदेव चरित्रा*त त्यांचा दहावा पूर्वज जो चांगदेव मुधेश त्याची हकीकत येते. ज्ञानेश्वरकालीन चांगदेवांच्या परंपरेपैकीच आपले कुळ आहे अशा भावनेने ह्यांनी ही अवतारकथा लिहिली आहे. चांगदेवांपासून शामजींची पितृपरंपरा अशी : चांगदेव (वटेश्वर) > विठ्ठल > चांगदेव (मुधेश) > पिलोबा > नरहरि > जनार्दन > मुधोजी > गोपाळ > कोन्हेर > शामजी.

*चांगदेव चरित्रा*च्या मूळ पोथीत तिसऱ्या अध्यायापासून ग्रंथास सुरुवात केली आहे. म्हणजेच पहिले दोन अध्याय गहाळ झालेले आहेत. मुधेश चांगदेवांचा वेदशास्त्राभ्यास, गृहस्थाश्रम, पंचविशीत गयेस जाऊन केलेले मातापितरांचे वर्षश्राद्ध, त्यानंतर नारायणडोह ह्या त्यांच्या वृत्तीच्या गावी येऊन आपल्या कुळकर्णीपणाची व संचिताची भाऊबंदांत केलेली वाटणी, अशी चरित्रविषयक माहिती येते. पुढे गाव सोडून हे पंढरपुरास जातात. तेथे विठ्ठलाची सेवा केल्यानंतर त्यांना अनुग्रह होतो व ईश्वराज्ञेने जगदुद्धारार्थ ते गोदातीरी पुणतांबे येथे येऊन राहतात. येथे "काही देवपूजा। मजला सांगावी। कृपा करावी। दीनोद्धारा ॥" अशा प्रार्थनेद्वारा केशवाची चतुर्भुज मूर्ती प्रकट झाली व त्या मूर्तीची स्थापना करून तिची उपासना करण्याचे नित्यव्रत त्यांनी सुरू केले. तेव्हापासून स्वतःला ते चांगा केशवदास असे म्हणवून घेऊ लागले.

चांगा केशवदासांसंबंधीच आणखी एक आख्यायिका चरित्रकाराने सांगितली आहे. ही महाराष्ट्रातील धार्मिक व सांस्कृतिक इतिहासाचा विचार करता फार महत्त्वाची आहे. एकदा बेदरचा बादशहा पंढरपूरचे

विठ्ठलमंदिर उद्ध्वस्त करून त्या जागी मशीद बांधावयास निघतो. विठ्ठलाची मूर्ती मात्र राजाचे शिपाई मंदिर काढायला येण्याअगोदरच बडवे हलवून गुप्त ठिकाणी ठेवतात. ही वार्ता चांगदेवांना कळते तेव्हा त्यांचे चित्त उदास होते. ते आपल्या शिष्यपरिवारासह बेदरला जातात. ह्याच वेळी बादशहाची पत्नी सर्पदंशानं मरण पावलेली असते, म्हणून तो दुःखात असतो. तिला आपल्या तपःसामर्थ्याने चांगदेव नवे जीवन देतात. ह्यामुळे राजाची मर्जी त्यांच्यावर बसते. त्याचा फायदा घेऊन पंढरपूरचे विठ्ठलमंदिर ज्या ठिकाणी होते त्याच ठिकाणी ते मशीद मोडून परत उभे करण्याची व विठ्ठलमूर्तीला कोणाही यवनांचा उपद्रव न होईल अशी हमी देणारे राजाज्ञेचे पत्र लिहून घेऊन चांगदेव श्रीविठ्ठलमूर्तीची परत पूर्वीच्या जागेवर स्थापना करतात.

ह्यानंतर जगातील आपला कार्यभाग संपला असे समजून चांगदेवांनी विठ्ठलाजवळ समाधीकरिता आज्ञा मागितली. श. १४२७ / इ. स. १५०५, क्रोधन नाम संवत्सरी, ज्येष्ठ शुद्ध सप्तमी, रविवारी मोठ्या समारंभाने पुणतांब्यास त्यांनी समाधी घेतली. चरित्रात मात्र हा शक चुकून १२२७ असा पडला आहे. *ग्रंथमालेत* (क्र. ११४) वि. का. राजवाडे ह्यांनी 'मुधेश चांगा' नावाने जो लेख लिहिला आहे, त्यात १४२७ असा समाधिशक दिला आहे. मास, तिथी, वार, नक्षत्र, योग इत्यादींच्या अंतःप्रमाणावरून ह्राच शक गणितशुद्ध दिसतो.

महिपतीने आपल्या *भक्तलीलामृत* ग्रंथात नऊ व दहा ह्या अध्यायांत वर्णिलेले चांगदेवचरित्र शामजी गोसावींच्या चरित्राधारे लिहिले आहे.

**रचना : मु.** – चांगदेवचरित्र; अ. ४ ते ७; ओ. सं. ६४४; र. श. १६६७/ इ. स. १७४५; आश्विन शुद्ध १०; संपा. भावे, वि. ल.; महा. कवि; र. श. १८२६; पृ. १–२६ (प्रस्ता., पृ. १–४).

**० शामजी मरुद्रण** – पहा **शामजी गोसावी (पुणतांबेकर).**

**शामजीसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – दशावतार; श्लो. सं. १०; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शामजीसुत सूढ माधव** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सवाया; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शामदास–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – हनुमंतभेट; ओ. सं. ६८; सवामं. हस्त. सू., खं. १.

**शामदास–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – खेळपद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. १८.

**शामदास (मेल्या)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १०६.

**शामनंदन (श्यामनंदन)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शामनारायण (रामदासी)** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – गणेशस्तवन; संककासू., पृ. १०६.

**० शामभट आर्वीकर** – पहा **सामराज–१.**

**शामराज–१** [इ. स. चे सतरावे शतक, पूर्वार्ध] कवी. यजुःशाखीय ब्राह्मण. ह्यांचे गुरू गुरुनाथ म्हणजे एकनाथ होत. त्यांस कवीने ग्रंथारंभी नमन केले आहे. ह्यांनी *हरिचरित्र* हा ग्रंथ *भागवता*च्या *दशमस्कंधा*च्या आधारे लिहिला आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या उपलब्ध पोथीचे लेखन अशुद्ध आहे. ग्रंथाच्या रचनाकालाचा निर्देश लेखकाने कला आहे. ह्यांनी *भागवता*चा *नवमस्कंध*ही लिहिला असावा असे ह्या ग्रंथावरून अनुमान होते. ह्यांची काही पदे सापडतात.

**रचना : अमु.** – हरिचरित्र; अ. ९०, ओ. सं. ४३४६; र. का. : श. १६२६ (संवत सतराशे एकसष्ट, श्रावण वद्य सप्तमी).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** दिवेकर, स. म. : शामराजकृत हरिचरित्र व त्याचा काल; भाइसंमत्रै., व. १२, अं. ३, पौष १८५३, पृ. १३६–१३९.

**शामराज–२** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] पदकार. हे *स्वानुभवदिनकर*कर्त्या दिनकरांचे बंधू.

**रचना : अमु.**– आरत्या, पदपदांतरे इ.; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० शामराज–३** – पहा **सामराज–१.**

**शामराज–४** [का. अनु.] पदकार. गो. का. चांदोरकर ह्यांनी एका चांगदेववंशीय 'शामराजा'चा निर्देश करून त्याने 'पदे' रचल्याची माहिती दिली आहे (संककासू., पृ. १०६).

**शामराज–५** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – जगदंबेची, गणेशाची व मार्तंडाची अशा ३ आरत्या; मआ., पृ. ३४५, ३५३, ३६०.

**शामराज कवि–१ / ० शामाराध्य–२** [का. अनु.] कवी. हे राहणारे पंढरपूरचे असावेत.

**रचना : अमु.** – 'रेणुकामाहात्म्य'; श्लोकबद्ध; अ. ५; सवामं. हस्त. सू., खं. १.

**शामशंकर** [का. अनु.] टीकाकार.

**रचना : अमु.** – महिम्नस्तोत्राची समश्लोकी टीका; पुष्पदंतविरचित महिम्नस्तोत्रावरील टीका; श्लो. सं. ४०; सवामं. हस्त. सू., खं. १.

**शाम शिवरामतनय** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – प्रल्हादचरित्र; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० शामसुंदर रघुनाथ** – पहा **शामाराध्य–१.**

**शामा / ० शामारामदासाचा** [का. अनु.] रामदासी कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**शामाराध्य–१ / ० शामसुंदर रघुनाथ** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] कवी. उपनाव आराध्ये. गाणगापूर व पंढरपूर येथील दैवतांचे हे भक्त होते.

ह्यांनी *ज्ञानेश्वरी*तील कठीण शब्दांचा अर्थ स्पष्ट करणारी *पद्यमाला* नावाची टिप्पणी तयार केली आहे. *भारत, भागवत* व *रामायण* ह्या ग्रंथांतील आख्यानांवरही ह्यांनी रचना केली असून *भागवता*तील दुसऱ्या व दहाव्या स्कंधांवर ह्यांनी टीका केली आहे. गीतेवरील *पदार्थमाला* नावाची ह्यांची टीका उपलब्ध आहे. *आश्वलायनप्रश्नमाला, नित्यानित्यविचार, ज्ञानोदयसिंधु, कैवल्योपनिषद्भाष्य* हे वेदान्त-ग्रंथ ह्यांनी स्वभाषेत रचले. *कैवल्योपनिषद्भाष्या*त ह्यांनी म्हटले आहे की, 'विद्यार्णवस्वामीं'ची टीका पाहून, आणि गुरुमुखाने ऐकून, मी ही स्वभाषेत टीका करतो. गीतेवरील *पदबोधिनी* टीकेच्या शेवटी श.१६५९ (इ. स. १७३७) पिंगळनाम संवत्सरात प्रत झाल्याचा निर्देश येतो. त्यावरून कवी ह्या पूर्वीच्या काळात होऊन गेले असावेत, हे निश्चित. ह्यांची पदे, अभंग इत्यादी रचनाही वि. ल. भावे ह्यांच्या पाहण्यात होती. ह्यांनी एक दहा श्लोकांचे *श्रीअंबाभवानीचे स्तोत्र* रचले आहे. ह्या कवितेपैकी फक्त काही रचनाच उपलब्ध आहे व तीही अद्यापि अप्रकाशितच आहे. कित्येकदा आपला उल्लेख 'शामसुंदर रघुनाथ' असाही कवी करतो. रचना किंवा भाषाशैली ह्या दृष्टीने कविता विशेष मनात भरण्याजोगी नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** भावे, वि. ल. : शामाराध्य कवि; भाइसंमइति., श. १८३७, पृ. ३३९.

**० शामाराध्य–२** – पहा **शामराज कवि–१.**

**० शामारामदासाचा** – पहा **शामा.**

**शामा विठ्ठलदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शारंगधर** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – कालिकापुराण; ओ. सं. १७३४; संककासू., पृ. १४०.

**शारंगधर पुसदेकर** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] महानुभाव कवी व भाष्यकार. विदर्भातील अमरावती जिल्ह्यातील (शिराळे) पुसदे येथील राहणारे विद्वान व्युत्पन्न ब्राह्मण. हे व्याकरण, धर्म, न्याय, ज्योतिष इत्यादी शास्त्रात पारंगत होते. हे कोणत्या आम्नायातील ह्याचा निर्देश कोठेच येत नाही. त्यामुळे ह्यांची गुरुपरंपरा अज्ञात राहिली आहे.

ह्यांनी संस्कृत व मराठी अशा दोन्ही भाषांत ग्रंथरचना केली आहे. ह्यांच्या *कैवल्यदीपिका* नामक संस्कृत व मराठी अशा *भगवद्गीते*वर केलेल्या दोन टीका उपलब्ध आहेत. मराठी *कैवल्यदीपिका* गद्यात आहे. ह्या गीताटीकेच्या शेवटी पंडित शारंगधरांनी गीताध्यायांचे वर्गीकरण करून (अ. २ ते ६ : उपासनाकांड – 'आचारस्थळ'; अ. ७ ते १५ : ज्ञानकांड – 'विचारस्थळ'; अ. १६ ते १८ च्या ५० व्या श्लोकार्धापर्यंत : कर्मकांड) गीता त्रिकांडी मानली आहे.

ह्यांनी आनेराज व्यासकृत *लक्षणरत्नाकर* ह्या संस्कृत प्रबंधावर *द्वात्रिंशल्लक्षण टीप* नामक गद्य भाष्य रचले आहे. प्रस्तुत भाष्यात *लक्षणरत्नाकरा*तील व्याख्यांचा मराठी अनुवाद व उदाहरणांचे स्पष्ट उल्लेख दिले आहेत. *लक्षणरत्नाकरा*वरील दुसरा एक टीपग्रंथ *बत्तीसलक्षणाची टीप* असा उपलब्ध आहे. ह्या दोनही टीपा जुन्या मराठीत व सांकेतिक लिपीत आहेत. ह्या टीपा *द्वात्रिंशल्लक्षण* किंवा *लक्षणरत्नाकर* ह्या आनेराजांच्या ग्रंथांतील विषय-प्रतिपादन स्पष्ट करतात. पुसदेकरांच्या ग्रंथातील भाष्यावरून असे समजते की *लक्षणरत्नाकर* ग्रंथ लिहिण्यास चक्रधरांची प्रेरणा व नागदेवाचार्यांच्या मुखातून केलेले निरूपण हीच आनोबासांना मार्गदर्शक झाली. ह्या टीपेत अधून मधून चक्रधरांच्या तोंडची अवतरणे येतात. पंडितांनी दामोदर पंडितांच्या *चौपद्यां*वरही भाष्य लिहिले आहे. तसेच *सूत्रपाठा*तील आचारमालिका, विचारमालिका ह्यांवरही टीका केल्या आहेत.

ह्यांनी आणखीही काही स्फुट प्रकरणे लिहिली आहेत. ह्यांच्या *मुकुंदराजेंद्रकीर्तिवर्णन* (श्लो. ४४) ह्या रचनेचा निर्देश वि. ल. भावे महानुभाव ग्रंथकारांच्या सूचीत करतात, पण य. खु. देशपांडे करीत नाहीत. *काव्यचूडामणी* हा ह्यांचा संस्कृत ग्रंथ आहे. ह्यात संस्कृत ऋचा स्वतः रचून त्यावर त्यांनी संस्कृतातच टीका केली आहे.

**रचना :** अमु. – १. कैवल्यदीपिका (भगवद्गीतेवरील गद्य टीका); २. गीताप्रश्नावलि; ३. चौपद्या टीका; ४. द्वात्रिंशल्लक्षण टीप (आनेराज व्यासकृत लक्षणरत्नाकर ह्या संस्कृत प्रबंधावर गद्य भाष्य) : ह्यातील काही महत्त्वाची अवतरणे ह. ना. नेने संपादित 'लक्षणरत्नाकर' (१९३०) ह्या ग्रंथात शेवटी (पृ. १६९–१८४) दिली आहेत; ५. परमहंस धर्ममालिका स्तोत्र; श्लो. ८७; ६. रासक्रीडा स्तोत्र; श्लो. ३९; ७. श्रीकृष्णस्तवन; ममग्रंककासू., पृ. २९; ८. श्रीदत्तात्रेयवर्णन स्तोत्र.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, य. खु. : पंडित शार्ङ्गधर पुसदेकर; ममवा., पुणे, १९६०; पृ. ६३–६७; २. नेने, ह. ना. : लक्षणरत्नाकर; संलेसं., भा. २, नागपूर, १९५७; पृ. १–१४.

**शारंगधर भोजने** [अंदाजे इ. स. चे १५ वे शतक, पूर्वार्ध] महानुभाव स्तोत्रकार. उपनाव भोजने. हे उपाध्य आम्नायातील पंडित होते. *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे ह्यांनी नवरसनारायण असे टोपणनाव धारण करून *महाभारत* रचणाऱ्या शारंगधर भोजन्यांची माहिती दिली आहे (मसा. ४, पृ. २३४). डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी *तीर्थमालिका*कार शारंगधर भोजने ह्यांची माहिती प्रथम देऊन भावे ह्यांची माहिती 'नवरसनारायणाचे महाभरत' ह्या नावाखाली तेथेच उद्धृत केली आहे (ममवा., पृ. ४६). ह्यावरून नवरसनारायण हाच शारंगधर भोजने कवी होय असे अनुमानण्याकडे कल आढळतो. हे दोघे कवी भिन्न आहेत असे डॉ. यू. म. पठाण मानतात. कारण नवरसनारायणांचे शारंगधर भोजने हे गुरू असल्याचा पुरावा नवरसनारायणांच्या *शल्यपर्वा*त आढळतो. तेथे शारंगधर भोजने ह्यांचे 'अद्भुत ज्ञानशक्तीचा मेरु' असे वर्णन केले आहे. शारंगधर भोजने हे नवरसनारायणांचे गुरू असे नव्या संशोधनाने सिद्ध केले आहे (डॉ. पठाण, यू. म. : *शल्यपर्व*, प्रस्ता., पृ. ८).

*शल्यपर्वा*च्या हस्तलिखित पोथ्यांत सापडणाऱ्या परंपरेप्रमाणे शारंगधरांचे गुरू मुकुंदराज आहेत. डॉ. देशपांडे ह्यांनी दिलेल्या वंशावळीत हिरांबा > मालोव्यास > महळाइसा > चाहेव्यास > जानोव्यास > भोजने कृष्णव्यास > मुरारीव्यास > मुकुंदव्यास > शारंगधर अशी परंपरा सापडते. *तीर्थमालिका*कार भोजने हे खानदेशातील असून त्यांचा मठ धुळे जिल्ह्यातील लोणखेडे गावी आहे, तसेच त्यांचा प्रसिद्ध शिष्य 'नवरसनारायण' हा कोंडावळ गावचा असून तेथील एका बारवेवर त्याच्यासंबंधी शिलालेख आहे, अशी नवी माहिती महानुभाव परिषदेच्या जळगाव येथील अधिवेशनात केलेल्या स्वागताध्यक्षीय भाषणातून श्री भिरूड ह्यांनी दिली आहे (महानु., जाने. १९५७, पृ. १८). नवरसनारायणांच्या *शल्यपर्वा*ची भाषा शकाच्या १४ व्या शतकातली आहे, असे त्यातील भाषिक विशेषांवरून डॉ. पठाण ह्यांनी दाखवले आहे. ह्यावरून त्यांच्या गुरूचा काळही त्याच सुमाराचा ठरतो.

शारंगधर कवींची *तीर्थमालिका स्तोत्र* (श्लोक ९१) ही एकच रचना उपलब्ध आहे. इ. स. १८९५ व इ. स. १९१६ मध्ये पंथीयांसाठी प्रस्तुत स्तोत्राचे सोलापूर येथून मुद्रण झाले होते. तिसरी आवृत्ती अमरावती येथील महानुभाव आश्रमातून श्री आवेराजदादा दर्यापूरकर ह्यांनी काढली (डिसें. १९६१). *मराठी संशोधन पत्रिके*तून (जाने. १९७१, पृ. १३८–४) ह्या ९१-श्लोकी स्तोत्राची संहिता कांचनमाला हरमळकर ह्यांनी प्रसिद्ध केली आहे. हे हस्तलिखित महंत आराध्य मुरलीधरशास्त्री ह्यांजकडून त्यांना उपलब्ध झाले.

*तीर्थमालिका स्तोत्र* हे महानुभावांच्या नित्य पठणातील असून पंथीयांच्या दृष्टीने फार महत्त्वाचे आहे. श्रीचक्रधरस्वामींनी जेथे जेथे लीळा केल्या त्या त्या पवित्र तीर्थस्थानांचा ह्या काव्यात निर्देश येतो. स्वामींनी कोणत्या लीळा केल्या त्यांचेही वर्णन कवी करतो. शारंगधरांची ही पद्यमय रचना आटोपशीर आहे. समग्र *लीळाचरित्रा*चे मनन करणे कठीण असल्याने ती अडचण दूर व्हावी ह्या हेतूने ह्या आटोपशीर काव्याची रचना पंडित शारंगधरांनी केली असावी. *स्थानपोथी*त महानुभावांच्या लहान-थोर सर्व पूज्यस्थानांची माहिती येते; तर *तीर्थमालिके*त फक्त चक्रधरांच्या स्पर्शाने पुनीत झालेल्या तीर्थांचेच स्मरण केले आहे. *लीळाचरित्र* समोर ठेवून त्याप्रमाणे काव्याचे तीन भाग केले आहेत. (ते श्लोक १ ते १४ / १५ ते ५८ / आणि ५९ ते ९० असे आहेत.) *लीळाचरित्रा*तील एकांक, पूर्वार्ध व उत्तरार्ध ह्या तीन भागांतील लीळांशी संबंधित स्थाने त्या त्या भागात उल्लेखिली आहेत.

ह्या स्तोत्रातील तीर्थस्थानांच्या उल्लेखाने स्वामींच्या प्रवासाचा आराखडा समोर उभा राहतो. गोदावरीच्या उभयतीरांवरील अनेक स्थानांचे उल्लेख तेथे येतात. प्रस्तुत स्तोत्रात काही महत्त्वाच्या घटनांचे येणारे निर्देश फार महत्त्वाचे आहेत. उदा., (१) चांगदेव ऊर्फ चक्रपाणी ह्यांनी द्वारकेत 'कामाख्या' हठयोगिनीच्या छळास कंटाळून केलेला देहत्याग (श्लो. ३); (२) वरंगळ येथील कमलनायकाच्या हंसांबा ह्या मुलीशी स्वामींनी केलेला विवाह; (३) स्वामी व नागांबिका

ह्यांची प्रथम भेट श. ११८६ च्या कार्तिक मासी झाल्याचा स्पष्ट उल्लेख (श्लो. १३); (४) नागदेवांनी चक्रधरानुसरण केल्याची व स्वामींनी खेडकुळी (जि. औरंगाबाद) येथे त्यांना दीक्षा दिल्याची माहिती (श्लो. ५९); (५) चक्रधरांनी गंगातीर सोडून बदरीकेदाराकडे प्रयाण केले ती तिथी श. ११९४ माघ कृष्ण चतुर्थी असल्याचे म्हटले आहे.

ह्या स्तोत्रामधून चक्रधरस्वामी व त्यांचा महानुभाव पंथ ह्यांविषयी शारंगधरांचा आदरभाव व दृढनिष्ठा प्रकट झाली आहे. *तीर्थमालिके*ची रचना अनेक वृत्तांत केलेली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : शारंगधर भोजने आणि त्याचे तीर्थमालिकास्तोत्र; महानु., फेब्रु. १९६७; पृ. १–२. २. पठाण, यू. म. : नवरसनारायणविरचित शल्यपर्व, प्रस्ता.; औरंगाबाद, १९६४; पृ. ३–८. ३. हरमळकर, कांचनमाला, संपा. : तीर्थमालिका स्तोत्र; मसंप., जाने. १९६७; पृ. १३२–१३८.

**शारंगधरमुनी वाइंदेशकर** [का. अनु.] महानुभाव कवी. ह्याने रचलेल्या *श्रीकृष्णबाळक्रीडा* (अ. १०) ह्या ग्रंथाचा वि. ल. भावे ह्यांनी निर्देश केला आहे (ममग्रंककासू., पृ. २९).

**रचना : मु.** – श्रीकृष्णबाळक्रीडा; पद्यात्मक; संपा. रंगेराजबाबा महानुभाव; खानापूर, १९११.

**शारदानंद** / ० **शारदानंदु** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बुद्धिबावन्न ओव्या; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

० **शारदानंदु** – पहा **शारदानंद.**

**शालिगावन शाहीर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शाहजी (दुसरे)** / ० **भोसले, शाहराज** / ० **शाहराज भोसले** [इ. स. १६७१ – २७ सप्टें.. १७११] आद्य मराठी नाटककार व रंगभूमीचे प्रयोगशील प्रवर्तक, संगीतज्ञ, अनेक भाषाकोविद. छत्रपती श्रीशिवाजी-महाराजांचे सावत्रबंधू व्यंकोजी ऊर्फ एकोजी राजे (तंजावरकर) ह्यांचे हे ज्येष्ठ पुत्र. ह्यांच्या मातेचे नाव दीपांबिका तथा दीपाबाई. *अवधूतगीते*वर टीका लिहिणारे पूर्णानंद हे ह्यांचे पारमार्थिक गुरू.

शाहजींचा जन्म बंगलोर येथे झाला. एकोजी राजे ह्यांनी आपल्या हयातीतच, १६८४ साली, शाहजींस तंजावरच्या गादीवर बसविले. एकोजी इ. स. १६८५ साली निधन पावले. त्यांच्या पश्चात शाहजींनी आपल्या राज्याचा कारभार, प्रजाहितदक्ष राहून, चाणाक्षपणे व दूर-दृष्टी राखून चालविला. त्या कामी त्यांची माता दीपाबाई हिचे त्यांस उत्कृष्ट साह्य झाले. दीपाबाई ह्या विद्याप्रिय, धार्मिक वृत्तीच्या, मोठ्या कारभारकुशल व धोरणी बाई होत्या. शाहजींचा एक निष्णात सेनानी म्हणून लौकिक होता. साहित्य, संगीत व कला ह्यांचा भोक्ता व एक सर्जनशील विद्याव्यासंगी राजा म्हणून दक्षिण भारतात शाहजीराजांची ख्याती होती. नलदीक्षिताने आपल्या *धर्मविजयचम्पू* ह्या ग्रंथात शाहजींना 'अभिनवभोज' असे म्हटले आहे, ते समर्पकच आहे. त्यांनी आपल्या दरबारात ४६ पंडितांना आश्रय दिला होता. त्यात तमिळ, तेलुगू, कन्नड, मराठी, संस्कृत ह्या भाषांतील वरच्या दर्जाचे पंडित होते. त्यांच्या निर्वाहाची उत्तम प्रकारे कायमची सोय व्हावी ह्यासाठी शाहजीराजांनी इ. स. १६९३ मध्ये तिरुविशानाल्लूर नावाचे एक खेडे, 'शहाजीराजा-पुरम्' असे नाव देऊन त्यांस अग्रहार म्हणून दिले. त्यांचे जीवन व कार्य ह्यांचा परिचय श्रीधर व्यंकटेश ह्या संस्कृत कवीने रचलेल्या *शाहराजाविलास* ह्या ग्रंथात साग्र करून दिला आहे. इतिहाससंशोधक द. ब. पारसनीस ह्यांनी आपल्या 'तंजावरचे राजघराणे' ह्या लेखात शाहराजे ह्यांच्याबद्दल म्हटले आहे : "शहाजी स्वतः गुणज्ञ व रसिक राजे होते. त्यांनीं आपल्या राजवाड्यामध्यें संगीत व नृत्यशाळा स्थापन केल्या होत्या. त्यांनीं पुष्कळ ख्रिश्चन मुलें आपल्या राजवाड्यांत ठेवून त्यांस संगीतज्ञान शिकविण्याची सोय केली होती. त्यांच्यासंबंधानें त्या वेळचे ख्रिस्तपंथाचे फादर लोक ह्यांनीं अनुकूल उद्गार काढिले आहेत. त्यावरून ते सर्वप्रिय होते असें दिसून येतें. तंजावरचे इतिहासकार हिके हे लिहितात : 'शहाजी राजांनीं राजवाड्याची पुष्कळ सुधारणा केली; नवीन दरबारमहाल बांधिला; किल्ल्यांचे चारी दरवाजांजवळ चार धर्मशाळा बांधल्या. गरीब लोकांकरितां अन्नछत्रें व दवाखाने बांधले; आणि हैद्राबाद व अरबस्थान वगैरे लांब लांब ठिकाणांहून वैद्य व हकीम आणविले. त्यांनीं दिवाणी व फौजदारी कामासाठीं स्वतंत्र अदालती स्थापन केल्या.' ह्यावरून त्यांची कारकीर्द सर्व प्रजेस सुखदायक अशी झाली असली पाहिजे, हें उघड आहे." (*इतिहाससंग्रह*, फेब्रु. १९२०, पृ. ५३–५४).

शाहजीराजे ह्यांनी केलेली ग्रंथरचना विपुल आहे. "त्यांनी काव्य, नाटक, भाषाशास्त्र इत्यादी विषयांवर ग्रंथरचना केलेली आहे. त्यांची पद्यरचना विपुल असून, तंजावर येथील सरस्वतीमहालातील हस्त-लिखित वह्यांत ती संग्रहित केलेली आहे. शाहराजांनी *रसिककर्णामृत*, *शंकरकालीनटनसंवाद*, *श्रीत्यागराजविलास* व *रामनाटक* अशी चार प्रबंधकाव्ये (निरनिराळ्या रागांत व तालांत निबद्ध केलेली कथारचना) रचिली असून, ती राजांच्या विद्वत्तेची व कवित्वाची साक्ष देणारी आहेत. *रसिककर्णामृत* ह्या काव्यात भरताच्या *नाट्यशास्त्रा*तील अठ्ठावीस नायिकांचे वर्णन असून मुख्य रस शृंगार हा आहे. *शंकर-कालीनटनसंवाद* ह्या प्रबंधकाव्यात तंजावरच्या भोसल्यांचे कुलदैवत श्री त्यागराज ह्याच्या लीलांचे वर्णन असून त्या लीला विशिष्ट रागात नृत्याभिनयावर आधारित आहेत. ह्यात आध्यात्मिक कूटप्रश्नही आहेत. ह्या काव्यात संस्कृत, तेलुगू व मराठी अशा तीन भाषांचा वापर केलेला आहे. शाहराजांचे मराठी भाषेवरील प्रभुत्व व त्यांचा आध्या-त्मिक अधिकार, तसेच संगीत व नृत्य ह्या विषयांचा व्यासंग ह्यांचा प्रत्यय ह्या काव्यावरून येतो. हे काव्य महादेवपट्टनम् ऊर्फ तिरुवारुर येथे उत्सवप्रसंगी नृत्याभिनयपूर्वक गाइले जात असावे, असे त्याच्या अंतर्गत स्वरूपावरून दिसते. ह्यात मराठी पद्ये जास्त असून ती काव्य-दृष्ट्या चांगली आहेत." (माया सरदेसाई : प्रस्ता., *मराठी रंगभूमीचा उषःकाल*, पृ. १२).

शाहराज ह्यांच्या नावावर मराठी २० (ह्यांपैकी सध्या फक्त आठ उपलब्ध आहेत), तेलुगू २५, हिंदी २ व संस्कृत ४ असे ५१ ग्रंथ आढळतात. मराठी भाषेत लिहिलेली नाटके पुढीलप्रमाणे : (१) *गंगाकावेरी-संवाद*, (२) *लक्ष्मीनारायण-कल्याण*, (३) *लक्ष्मी-भूदेवी संवाद*, (४) *गोवर्धनोद्धारण*, (५) *पंचभाषाविलास*, (६) *हरिहरविलास*, (७) *सुभद्रापरिणय*, (८) *मृत्युंजय चिरंजीव*.

"ह्या नाटकांपैकी *लक्ष्मीनारायण कल्याण*, *पंचभाषाविलास* व *सुभद्रापरिणय* हीं तीन विवाह नाटकें आहेत; *गंगा-कावेरी संवाद* व *लक्ष्मी-भूदेवी संवाद* हीं अनुक्रमें शिव आणि विष्णु ह्यांच्या सपत्नी-श्रेष्ठत्वाबद्दल झालेले संघर्ष; *गोवर्धनोद्धारण* हा कृष्णचरित्रांतील कृष्णमाहात्म्यदर्शक प्रसंग; तर *हरिहरविलास* ह्या नाटकांत शिव आणि विष्णु ह्यांचें तुल्यबलत्व; *मृत्युंजय चिरंजीव* मध्यें शिवकृपेनें चिरंजीव झालेला मार्कंडेय दाखविला आहे. ह्या नाटकांपैकीं *सुभद्रा-परिणय* ह्या नाटकाच्या क्र. ५५३ (सरस्वतीमहाल, तंजावर) मध्यें कोणाही लेखकाचा नामनिर्देश नाहीं; परंतु क्र. २५७४ (तंसम.) मध्यें प्रथम 'भोसल शाहराज भूपतीस मंगळं' असा उल्लेख आढळतो; नंतर 'इति श्रीमती भोसलकुल। शरफराज विरचित' असा शरभेंद्र (सर्फोजी) राजाचा उल्लेख नाटककर्ता व लेखक म्हणून येतो. सुरुवातीच्या मंगलाचरणांतही *सुभद्राकल्याण नाटक* 'सरफोजी राजकृत महा-राष्ट्र भाषा लिख्यते' असा उल्लेख आढळतो. तरीही हें नाटक शाहजी राजांचेंच असावें असें अंतर्गत रचनेवरून निश्चित करतां

येतें. ह्याच्या उलट *सुभद्रापरिणया*प्रमाणेंच तेलगु लिपींत असलेलें *प्रभावतीपरिणय* हें नाटक शरभेंद्र (सर्फोजी) राजांचें असून सरस्वतीमहाल ग्रंथालयाच्या मुद्रित ग्रंथसूचीमध्यें तें शाहजी राजांच्या नांवावर घातल्याचें आढळतें. शाहजी राजांचीं हीं सर्व नाटकें आनंदपर्यवसायी आहेत. त्यांतील नायिकांचे प्रथम प्रवेश म्हणजे दर्शनीय शरीरसौंदर्याचें पुष्कळसें साचेबंद वर्णन आढळतें......शिव, विष्णु, अर्जुन हे नायक आणि पार्वती, गंगा, कावेरी, लक्ष्मी, राधा, सुभद्रा ह्यांच्यासारख्या जनमानसांत वंदनीय असलेल्या पात्रांमुळें लेखक त्यांचा परिचय वा व्यक्तिचित्रण करण्यांत शब्दव्यय करीत नाहीं. त्यांतील मुख्य रस परिपोष करण्यांतच तो रस घेतो. उदा., *लक्ष्मीनारायण-कल्याण*, *पंचभाषाविलास*, *सुभद्रापरिणय* ह्या स्वयंवर नाटकांत नायकनायिकांची विरहावस्था व परस्परानुराग ह्यांचेंच चित्रण आढळतें. *लक्ष्मी-भूदेवी संवाद* व *गंगा-कावेरी संवाद* ह्या नाटकांत सवतीमत्सर व एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढणाऱ्या व पतीला मोठ्या शृंगापत्तींत आणणाऱ्या स्त्रियांचें चातुर्यानें चित्रण केलें आहे. *गोवर्धनोद्धारण*, *मृत्युंजय चिरंजीव* ह्या नाटकांत कृष्ण-शंकराचें भक्तप्रेम व त्याला संकटमुक्त करण्याची त्याची आवड हीं दाखविली आहेत. तर *हरिहरविलास* ह्या नाटकांत शिव-विष्णूंच्या ईर्ष्येच्या भावनेंतून परिहास उत्पन्न झालेला दाखविला आहे. अशीं हीं सर्व नाटकें म्हणजे संगीत, नृत्य, मनोरंजक कथा ह्यांचें मिश्रण आहे. ह्या बहुतेक नाटकांत नारदाचें पात्र त्या त्या प्रसंगाची महत्ता वाढविणारें व हास्यविनोदाला रोचकता आणणारें ठरलें आहे. हीं सर्व नाटकें म्हणजे दरूची अर्थात् गीतांची व नृत्यांची मालिकाच होत. प्रमुख पात्रें कर्नाटकी रागदारीच्या पार्श्वभूमीवर नृत्यांतून अभिनय व भावदर्शन घडवितात. इतर पात्रांच्या तोंडीं श्लोक, वृत्तबद्ध रचना, चूर्णिका ह्या योजिल्या आहेत. त्यामुळें सबंध नाटक म्हणजे विनोद व घटनांची मांडणी गद्यांत आणि भावनात्मक प्रतिक्रिया लयबद्ध संगीत नृत्यांत अशा स्वरूपाचें जाणवतें." (सरोजिनी शेंडे : 'नाटककार शहाजी'; *मराठी संशोधन पत्रिका*; १९७१).

मराठी नाट्याचे मूळ प्रवर्तक सांगलीचे विष्णुपंत भावे होत, त्याचे प्रवर्तन त्यांनी १८४३ मध्ये केले, असे आतापर्यंत समजण्यात येत असे. पण ते वस्तुस्थितीस धरून नाही. मराठी नाट्यलेखनाचा व नाट्यप्रयोगाचा उपक्रम इ. स. १६८४ मध्ये तंजावरात शाहजी राजे भोसले ह्यांनी सुरू केला हे वरील हकीकतीवरून स्पष्टच होते. मराठी नाटकाचे मूल्यस्थान सांगली किंवा काही गोमंतकीय लेखक प्रतिपादितात त्याप्रमाणे गोमंतक हे नसून तंजावर हेच आहे, ही वस्तुस्थिती मान्य करणेच प्राप्त.

**रचना : मु.** – १. गंगाकावेरीसंवाद; २. पंचभाषाविलास; ३. लक्ष्मीनारायण कल्याण; ४. सुभद्रापरिणय; ५. हरिहरविलास; संपा. सरदेसाई, माया : मराठी रंगभूमीचा उषःकाल; हैद्राबाद, १९७२; ६. पदपदांतरे – उमान पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ११; ७. गणपतिपर व शिवपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. १, ३०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. डॉ. राघवन्, व्ही. (संपा.) : शाहेन्द्रविलास (संस्कृत); पं. श्रीधर व्यंकटेश : तंजावर सरस्वतीमहाल सिरीज, क्र. ५३. २. शेंडे, सरोजिनी : नाटककार शहाजी राजे; मसंप.; एप्रि. १९७१. ३. सरदेसाई, माया : प्रस्ता., मराठी रंगभूमीचा उषःकाल; हैद्राबाद, १९७२.

**० शाहराज भोसले** – पहा **शाहजी (दुसरे).**

**० शाह हुसेन फकीर** – पहा **शहा हुसेन फकीर.**

**० शाहबेग** – पहा **शहाबेग.**

**० शाहुसेन फकीर** – पहा **शहा हुसेन फकीर.**

**शाहू** [का. अनु.] कवी. गुरूचे नाव गोविंद. *सिद्धान्तबोध*कर्ते शाहामुनी किंवा शाहासेन ह्यांच्याहून हे शाहू कवी निराळे आहेत. ह्यांच्या *सिद्धान्तमतिप्रकाश* ह्या ग्रंथाची फक्त तीनच पाने उपलब्ध झाली आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : शाहूकृत सिद्धान्तमतिप्रकाश; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४; चैत्र १८६५; पृ. ५३.

**० शाहू फकीर** – पहा **शहा हुसेन फकीर.**

**शिखामणी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – रामकृष्णशिवपर पद व ज्ञानपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शिदरामा** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] शाहीर.

**रचना : मु.** – पेशवाईच्या नाशावरील पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. ६३.

**शिंपी नामा / ० नामा शिंपी** [अंदाज इ. स. चे १८ वे शतक] कवी व संतचरित्रकार. ज्ञानेश्वरसमकालीन संत आद्य नामदेवांहून वेगळे. ह्यांचे वडील सटवाजो शिंपी. मातोश्री जानकीबाई. हे मन्थाड नदीकाठी असलेल्या उंब्रज गावचे रहिवासी. दासगणूकृत *संतकथामृतात* (अ. ३८) ह्यांचे चरित्र आले असून त्यात शिंपी नामा ह्यांना आद्य नामदेवांचा अवतार मानले आहे; सटवाजी शिंपी ह्यांना दामाशेटी ह्यांचा अवतार मानले असून जनाबाई ह्यांनी पुन्हा जनाबाई होऊन जन्म घेतल्याचे वर्णन आले आहे.

ह्या नामदेवांनी आपले काव्य आद्य नामदेवांच्या काव्यात मिसळू नये म्हणून 'शिंपी नामा' ही संज्ञा वापरली. ह्यांनी लिहिलेली काही संतचरित्रे उपलब्ध आहेत. ह्यांची भाषा आधुनिक असून त्यांचा कल सोप्या भाषेत चरित्रे वर्णन करण्याकडे आहे. हे आद्य नामदेवांचे २२-मात्रक अभंगांचे गेयवृत्त वापरतात, पण आद्य नामदेवांसारखे खंड पाडीत नाहीत. ह्यांच्या संतचरित्रात दंतकथांना प्राधान्य आहे. तसेच बहुतेक सर्व अभंगांच्या शेवटी ह्यांनी "संतांचा तो दास बोले शिंपी नामा। अखंडित प्रेमा द्यावा ऐसा ॥" अशी संतांची कृपायाचना केली आहे.

रा. कृ. धोंगडे ह्यांच्या मते *नामदेवगाथे*तील मीराबाई, भानुदास, जगमित्र नागा, संताजी पवार, बोधले बाबा ह्यांची चरित्रे ह्या दुसऱ्या नामदेवांची असावीत. तसेच हरिश्चंद्र राजाचे चरित्र व श्रियाळचरित्र ही दोन चरित्रेही ह्याच नामदेवांची असावीत, असे त्यांना वाटते. घरत ह्यांच्या *तुकारामगाथेत* ह्यांच्या तुकारामचरित्राचे पाच अभंग आहेत.

**रचना : मु.** – १. जगमित्र नागा चरित्र; २ बोधले बाबा चरित्र; ३. भानुदास चरित्र; ४. मिराबाई चरित्र; ५. श्रियाळ चरित्र; ६. संताजी पवार चरित्र; ७. हरिश्चंद्र राजाचे चरित्र; श्रीससंगा., खं. १; संपा. जोशी, का. अ.; पुणे, आ. २; १९६७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. दासगणूकृत संतकथामृत; अ. ३८. २. धोंगडे, रा. कृ. : संत नामा शिंपी अर्थात दुसरे नामदेव; नामदेवहितवर्धक; सप्टें. १९६६; पृ. ६–९.

**शिव–१** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – अंबेची आरती; मआ., पृ. ३५३.

**शिव अनंत** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; वेंचले येथील श. १८२३ त उतरलेल्या पदांच्या बाडांत संग्रहित; भाइसंमं.

**शिवकल्याण / ० नित्यानंदसुत** [अंदाजे इ. स. १५६८ – १६३८] संतकवी व टीकाकार. मराठवाड्यातील जोगाईचे आंबे (मोमिनाबाद) हे ह्यांच्या घराण्याचे मूळ गाव. ह्यांचे घराणे नाथसंप्रदायी व विठ्ठलभक्त होते. पिता व गुरू : नित्यानंद. कमलाकर > चिंतामणी > त्रिमल उर्फ नित्यानंद हे ह्यांचे ज्ञात पूर्वज. ह्यांची आध्यात्मिक गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : आदिनाथ शंकर > मच्छेन्द्रनाथ

> गोरक्षनाथ > मुक्ताबाई > वटेश्वर चांगा > चक्रपाणी > विमळानंद > केशवदास चांगा > जनकराज > नृसिंह > हृदयानंद > विश्वेश्वर > केशवराज > हरिदासस्वामी > परमानंद > नित्यानंद > शिवकल्याण.

शिवकल्याणांच्या घराण्यात आध्यात्मिक साधनेची प्रवृत्ती शिवकल्याणांचे आजोबा चिंतामणी ह्यांच्यापासून विशेष बळावलेली दिसते. चिंतामणी ह्यांनी मातापूर येथील 'कैवल्याची रासी' असलेले श्रीहरिदासस्वामी ह्यांचे शिष्य परमानंद ह्यांच्याकडून मंत्रदीक्षा घेतली. ती त्यांजकडून त्यांचे चिरंजीव त्रिमळ ह्यांना व त्रिमळांकडून नंतर शिवकल्याण ह्यांना मिळाली.

शिवकल्याणांनी लिहिलेला पहिला ग्रंथ *श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधावरील विवरणात्मक टीका* हा होय (अध्याय संख्या ९०, ओवीसंख्या ४४१५३). वि. ल. भावे, ल. रा. पांगारकर वगैरे ग्रंथकारांनी व इतरांनी ही ओवीसंख्या एक लाख असल्याचे लिहिले आहे. ह्या ग्रंथाची एक हस्तलिखित प्रत डॉ. वि. म. कुळकर्णी ह्यांजकडे आहे. त्यांनीच आपल्याकडील प्रतीवरून वर दिलेली ग्रंथसंख्या एका लेखात (*इंद्रायणी*; जुलै १९६३) प्रसिद्ध केली आहे. ही टीका लेखकाने आपल्या आई-वडिलांच्या सूचनेवरून लिहावयास घेतली. ह्या टीकाग्रंथाच्या शेवटच्या नव्वदाव्या अध्यायात ग्रंथस्वरूप स्पष्ट करून ते ग्रंथरचनास्थलाचाही निर्देश करतात. "मी शिवनामांकित । नित्यानंदान्वयभूत । जनकहि प्रस्तुत । नित्यानंद त्रिमल नामा ।। नातरि जनक आणि जननि । नित्यानंदुचि दोन्हि । श्रीपांडुरंगचरणिं । रति दिधलि जेणें ।। तेणेंचि देउनि अनुमोदन । वर्णविले हे हरिगुण । ते म्यां निजमतिनें अनुसरोन । वर्णिले भाषाबद्ध ।। त्यामाजि कित्येक ग्रंथ । सान्वय पद पदार्थ । लाउनि यथावत । वाखाणिला असे ।। कित्येक ग्रंथ । वर्णिला संकळितार्थ । मनिं धरुनि पदपदार्थ । देशभाषा निखळ ।। असो निखळ आख्यायिकेचा ठायिं । विस्तार केला नाहिं । निरूपण प्रसंग जो कांहिं । तो वर्णिला सविस्तर ।। इये पद्धतिकरून । वाखाणिले हे हरिगुण । संपले निर्विघ्न । श्रीविठ्ठलापाईं ।। श्रीपंढरिनामें करुनि । श्रीविठ्ठलमहाराजधानी । हा ग्रंथ येथेंचि आरंभुनि । संपला येथेंचि ।। ४२८ ।।"

*श्रीमद्भागवत दशमस्कंधा*वरील हा टीकाग्रंथ शिवकल्याणांनी इ. स. १६०३–१६२८ ह्या काळात पंढरपूर येथे वास्तव्य करून, लिहून पूर्ण केला. ह्या ग्रंथातील *कृष्णजन्म* (अ. १–५), *रासपंचाध्यायी* (अ. १–५) व *वेदस्तुति* एवढाच भाग आजवर छापून प्रसिद्ध झाला आहे.

श्रीकृष्णजन्मकथा, त्याचप्रमाणे श्रीकृष्णाची रासक्रीडा अनेक कवींनी रसपूर्ण भाषेत लिहिली आहे; पण शिवकल्याणांनी गायिलेली कथा त्यांच्याहून वेगळ्या वैशिष्ट्याची आहे. कथाभागाचा रसरंग यत्किंचितही फिका पडू न देता त्यांनी चातुर्याने व कौशल्याने कथांची आध्यात्मिक तंतूंशी जी बेमालूम वीण साधलेली आहे, तशी इतर कोणीही कवी साधू शकलेला नाही. श्रीज्ञानदेवांचा आदर्श पुढे ठेवून शिवकल्याणांनी ह्या कथांवर काव्यालंकाराचा सुभग साज तर चढविलाच आहे, पण त्याबरोबरच अपूर्व अध्यात्मरसप्रवाहही त्यांच्यातून खेळविला आहे. शिवकल्याणांच्या परतत्त्वस्पर्शानुभवाचा प्रवाह देखील त्यांत पूर्णतया एकरूप झालेला आढळतो. विशेषतः *रासपंचाध्यायी* वाचीत असता ह्याची प्रचीती पदोपदी येते. ल. रा. पांगारकर लिहितात: "मूळ दशमांतल्या २९ ते ३३ ह्या पांच अध्यायांवरची ही टीका आहे. भाषा आणि प्रसंग शृंगारिक, पण आंतून सारा प्रवाह दिव्य भक्तिरसाचा आहे. मूळ भागवतग्रंथच भक्तिमहारसाचे भांडार आहे व त्यातही ही *रासपंचाध्यायी* निरुपम आहे. *रासपंचाध्यायी*वर शिवकल्याणांच्या इतकें बहारीचें व्याख्यान दुसरें आमच्या पाहण्यांत नाहीं. भक्तभाविकांना तर तें वेडच लावील! पण वाचक नास्तिक, तार्किक, संशयी कसाही असला तरी त्यालाही तें विचार करायला लावील व शेवटीं समाधानच देईल." (मवाइ., खं. २, १९३५; पृ. ५२९–३०). [⇨ ३.]

*श्रीमद्भागवता*च्या *दशमस्कंधा*वरील अशा ह्या वैशिष्ट्यपूर्ण व साहित्यगुणसंपन्न ग्रंथाच्या उपसंहारात कवीने जे मागणे मागितले आहे, ते वाचून त्याच्या ग्रंथरचनाकौशल्याइतकेच त्याचे व्यक्तित्वही अपूर्व व वैशिष्ट्यपूर्ण होते ह्याची खात्री पटते व त्याजबद्दल वाचकाच्या मनात असीम आदर उत्पन्न होतो. शिवकल्याण जे मागणे मागतात ते असे: "येणें मंगळाचें मूळ । संतोषो रमालीळ । सर्वत्र करू कुशल । प्रशांतिदाता ।। असो नित्यानंदिं मन । सर्वदा शिवकल्याण । करू विघ्नोपशमन । श्रवणपठणिं ग्रंथाचिया ।। आपुला पाईं माझें मन । ठेवूनि यावत्प्रारब्धावसान । न करून पराधिन । वर्त्तउ मातें ।। आपुलिया स्मरणाचा ठाइं । विशेष न करू काहिं । व्यवहार मात्र तोहिं । सुखरूप असो ।। आंगासि येउनि महंति । भगवंतिहुनि चित्तवृत्ति । न भंगो यावत्समाप्ति । सुखरूप असो ।। आणि म्यां संबंधनिर्मुक्त । असावें स्वस्थचित्त । नित्यानंद अखंडित । सुभारो आंगि ।।" (डॉ. वि. म. कुळकर्णी : 'शिवकल्याणांच्या दशमस्कंधाचा उपसंहार'; '*इंद्रायणी*, जुलै १९६३; पृ. ४१).

*श्रीमद्भागवता*वरील टीकेनंतर सात वर्षांनी, शके १५५७ (इ. स. १६३५) मध्ये ज्ञानदेवांच्या *अनुभवामृत (अमृतानुभव)* ह्या ग्रंथाचे शिवकल्याण ह्यांनी *नित्यानंदैक्यदीपिका* ह्या नावाने विस्तृत विवरण लिहून पूर्ण केले. ग्रंथसमाप्तीच्या पूर्वी काही काळ ते पंढरपुरात येऊन राहिले होते. श्रीविठ्ठल हे त्यांचे उपास्य दैवत होते. श्रीविठ्ठल हा सगुणही आहे आणि निर्गुणही आहे, तो प्रत्यक्ष सच्चिदानंद आहे, अशी त्यांची भावना होती. *वेदस्तुती*च्या प्रारंभीच्या नमनात ते म्हणतात: "जोडूनि समपदें साजिरी । दाविली त्वंपदैक्य-उजरी । मध्यदेश करद्वयें करी । या हेतु धरिला ।। ८ ।। जे सच्चिदत्वें करद्वंद्व । मध्य तो मुख्य आनंद । एवं कटीं धरूनि त्रैपद । येकत्र केलें ।। . . . एवं न मोडोनि निर्गुणता । निजभक्तोद्धारणार्था । सगुणतनूतें धर्ता । विठ्ठलवेश ।। १५ ।। सांडोनि पराङ्मुखपण । लोभलें प्रत्यगानंदीं मन । तैं मनाचें मनपण । हारपोनि गेलें ।। १८ ।। म्हणोनि भेद जरी नाहीं । तऱ्ही भज्यभजनप्रवाहीं । नांदतां यैक्यासी कांहीं । विपर्यास न घडे ।। २१ ।। सत्य ज्ञान अनंतता । हे निर्गुणाचे गुणचि पाहतां । एवं सगुणीं निर्गुणीं तत्त्वता । भेदुचि नाहीं ।। २७ ।।" अशा ह्या आपल्या इष्ट देवतेच्या कृपादृष्टीखाली *नित्यानंदैक्यदीपिका* हा ग्रंथ शिवकल्याणांनी 'युवनाम संवत्सरीं मार्गशीर्ष मासाच्या शिशिर पौर्णिमे'स लिहून समाप्त केला.

ज्ञानदेवांची आध्यात्मिक अधिकारसंपन्न धाकटी बहीण श्रीमुक्ताई हिच्या शिष्यपरंपरेतील परमानंद ह्या साक्षात्कारी सत्पुरुषाचा शिवकल्याणांचे आजोबा चिंतामणी ह्यांस अनुग्रह लाभल्या वेळेपासून ज्ञानदेव हे त्यांच्या कुळाचे 'मंडन' बनले होते. त्यांचे *ज्ञानदेवी* व *अमृतानुभव* हे ग्रंथ त्यांच्या आध्यात्मिक जीवनाचे मार्गदर्शक बनले होते. विशेषतः शिवकल्याणांचे वडील त्रिमल हे पूर्णपणे ज्ञानदेवमयच होऊन गेले होते. त्यांनी उत्तरवयात संन्यास घेऊन नित्यानंद हे नाव धारण केले व प्रखर आध्यात्मिक साधना करून 'सज्जनजना विश्रामपद' बनण्याएवढी योग्यता संपादन केली. शिवकल्याणांचे लौकिक व आध्यात्मिक शिक्षण त्यांच्याच नजरेखाली झाले. तेच त्यांचे विद्यागुरू व मोक्षगुरू. नित्यानंदांनीच त्यांना *ज्ञानदेवी* व *अमृतानुभव* हे ग्रंथ पढविले व त्यांतील रहस्य नीट उलगडून दाखविले. विद्यागुरू व मोक्षगुरू असलेल्या आपल्या ह्या अधिकारसंपन्न पित्याविषयी शिवकल्याण पुढीलप्रमाणे गौरवपूर्वक लिहितात : "माझा संभवही येथेंचि ।

पाळणही केलें तेणेंचि । आपल्याही रूपीं रुचि । लाविलें तेणें ॥ ३७६ ॥ ते गोडी मिया लाधोन । विसरोन गेलें देहभान । पिता होत्साता जाण । गुरुवर्य कीं ॥ ३७७ ॥ मुळींहूनि त्याचा विपाई । म्हणोनि कल्याण कधींचि नाहीं । यालागीं अभिधान पावलों पाहीं । शिवकल्याण हें ॥ ३७८ ॥ नातरी पावलों नित्यानंदावलोकन । येणें अवघेंचि शिवकल्याण । अकस्मात लाधलों खूण । अनुभवामृताची ॥ ३७९ ॥"

नित्यानंद ह्यांनी स्वत: *अमृतानुभवा*वर गद्यटीका लिहिली होती. पण त्या काळात सर्वसामान्य लोकांची प्रवृत्ती गद्यग्रंथ वाचण्यापेक्षा पद्यात्मक ग्रंथ वाचणे, त्याचे पठण व श्रवण करणे ह्याकडे अधिक असल्यामुळे नित्यानंदांनी लिहिलेली टीका विशेषशी प्रचलित झाली नाही. आज ही टीका उपलब्ध नाही.

नित्यानंद ह्यांनी आपले सत्पुत्र शिवकल्याण ह्यांस *अमृतानुभव*-रहस्य सांगितल्यावर त्यांस त्यांनी काही काळ देवगिरीजवळील धारागिरी पर्वतावर वास करून राहिलेले *कथाकल्पतरु* ह्या प्रसिद्ध ग्रंथाचे कर्ते कृष्णयाज्ञवल्कि ह्यांचे 'तपोयुगाचे अधिभूत', 'ज्ञानाधिष्ठान' असे असलेले पुत्र व स्वत:चे स्नेही गोपाळ ह्यांच्या सांनिध्यात ठेवले. ह्या सांनिध्याचा, *अमृतानुभवा*चे रहस्य अधिक स्पष्ट होण्याच्या कामी शिवकल्याणांस फार उपयोग झाला. आणि तेथेच त्यांस *अमृतानुभवा*चे आपण ओवीबद्ध विवरण करावे अशी 'हांव' झाली. ही 'हांव' गोपाळ ह्यांनीही जाणली असावी. त्यांनी एक दिवस शिवकल्याणांकडे "ओवीबद्ध होवावा ग्रंथ । जो कां श्रवणा पठणा उपयुक्त । प्रेमळां जनां ॥" अशी आपली इच्छा व्यक्त केली. ती ऐकून शिवकल्याण प्रोत्साहित झाले व त्यांनी 'विवरण'लेखनास प्रारंभ केला. त्यांच्याच शब्दांत सांगावयाचे तर 'शब्दवोवणी आरंभिली'. ते सांगतात : "तयाची गोडी फळा आली । म्हणोनि विवरणा हांव जाली । नाना तें हांव सामावली । विवरणीं इयें ॥ ३८४ ॥ असो तेणें मनोरथ केला । तो स्वामी माझेनि स्वीकारिला । स्वीकारूनि उलंडिला । हृद्भवनीं माझा ॥ ३८५ ॥ ते हृदिस्थात्म्यासि अर्पिलें । अर्पोन स्वामी तोषले । मग पसायदान दीधलें । विवरणव्याजें ॥ ३८६ ॥ नाना हा प्रसादतरणी । उदैला विवरणीं । येथें अधिकारभेदरजनी । हारपोनि गेली ॥ ३८७ ॥ यया विवरणकिर्णाचा स्पर्श । उरों नेदि राति दिवस । मुक्त मुमुक्षु बद्ध पक्ष । बुडाले स्वप्न ॥ ३८८ ॥ कां जे निद्राजागृतिची वाट । मोडोनि प्रकाश एक दाट । ना तरी चिदोदधीचा पाट । वाग्पंथासी आला ॥ ३८९ ॥ असो तयाचें अवधान उदेलें । तेणें तेजें वाग्पंथासी आलें । येऊनि वाखाणिलें । ग्रंथान्वयेंसी ॥ ३९० ॥"

शिवकल्याणांना ज्ञानदेव हे जीवकोटीतील पुरुष नसून शिवकोटीतील महान सिद्धपुरुष वाटत असत. "अगा कलिकालें आकलितां जन । ह्यातीं येऊनि ज्ञानखड्ग जाण । अवतरला आत्मा पूर्ण । ज्ञानेश्वरवेषें ॥ २५ ॥ अगा ज्ञानाज्ञानविहीन । निखळ ज्ञानमात्र संपूर्ण । म्हणोनि ज्ञानेश्वर ऐसी खूण । रूपा आली ॥ १२६ ॥" (*नित्यानंदैक्यदीपिका*, प्रथम प्रकरण) असे त्यांनी उद्गार काढिले आहेत. आजवर *अमृतानुभवा*चे रहस्य उकलून सांगण्याचा दहाबारा ग्रंथकारांनी प्रयत्न केला आहे; पण त्यांच्यापैकी एकालाही, शिवकल्याणांनी ज्ञानदेवाचे हृद्गत त्यांच्याशी पूर्ण समरस होऊन जसे केले आहे तसे करण्याचे साधले नाही. मूळ ग्रंथकाराचा अनुभव स्वत: विवरणकाराने पूर्णपणे अनुभवलेला असल्यामुळेच त्याच्याकडून ही अतुलनीय निर्मिती होऊ शकली. [ ⇨ ३. ]

शिवकल्याणांनी मराठीतल्याप्रमाणे संस्कृतातही रचना केली होती असे आढळते. वि. का. राजवाडे ह्यांस कारंजा येथे श्रीशंकराचार्यांच्या *अपरोक्षानुभूति* ह्या ग्रंथावर शिवकल्याणांनी संस्कृतात लिहिलेल्या टीकेची एक पोथी सापडली. ह्या पोथीचा परिचय गो. का. चांदोरकर ह्यांनी भा. इ. सं. मं. च्या शके (१८३६) च्या इतिवृत्तात (पृ. ११०–११२) करून दिला आहे. *अपरोक्षानुभूति*विवरणास लेखकाने 'हरिकीर्तन' म्हटले आहे. (उदा., 'स्मृत्वाथ सकलान् साधून् क्रियते हरिकीर्तनम्।') प्रथम मुळातील श्लोक देऊन त्याचे विवरण दिले आहे. त्यामुळे ग्रंथ समजण्यास अत्यंत सुगम झालेला आहे. शिवकल्याणांनी अंतिम श्लोकात आपल्या नावाचा मोठ्या खुबीने निर्देश केला आहे.

शिवकल्याण हे अध्यात्मशास्त्र व साक्षात्कारमार्ग ह्यांचे जसे उच्च दर्जाचे अनुभविक ज्ञाते होते तसेच मराठी व संस्कृत ह्या दोन्ही भाषांत अत्यंत निपुण होते, हे त्यांचे ग्रंथ व त्यांचे लेखन स्पष्टपणे प्रत्ययास आणून देते. महाराष्ट्रात सोळाव्या-सतराव्या शतकांत वेदान्त व भक्तियोग ह्यांचा समन्वय साधून ज्या काही थोड्या कवींनी मराठी मन उच्चशिक्षित करण्याचे महत्त्वाचे कार्य केले त्यात शिवकल्याणांचे स्थान फार मोठे आहे.

**रचना : मु.** – १. कृष्णजन्म (भागवतांतर्गत); अ. ५; संपा. मोडक, ग. ब.; मुंबई, १९०४. २. नित्यानंदैक्यदीपिका; ओ. सं. ६३१०; र. का. : श. १५५७, युवा संवत्सर, मार्गशीर्ष शिशिर पौर्णिमा; संपा. कुंटे, अ. मो.; मुंबई, १८८८. ३. रासपंचाध्यायी (भागवतांतर्गत); अ. ५; संपा. मोडक, ग. ब.; मुंबई, १९०४. ४. वेदस्तुती (भागवतातील ८७ व्या अध्यायांतर्गत मूळ श्लोक ५०; ओ. २६००); गो. का. चांदोरकर ह्यांच्या प्रभात व. १ मध्ये क्रमशः मुद्रित.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : शिवकल्याण; प्रामसंक., खं. १, मुंबई, १९५७; पृ. ३७५–३८२. २. कुळकर्णी, वि. म. : शिवकल्याणांच्या दशमस्कंधाचा उपसंहार; इंद्रायणी, जुलै १९६३, पृ. ४१–४४.

**शिवगुरु** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १०७.

**शिवगुरुदास पीतांबर** [का. अनु.] पदकार. ह्यांची दोन गुरुपर पदे शं. श्री. देव ह्यांनी छापली आहेत (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. १९७) ती भालगाव येथील रामदासी मठातील कागदपत्रांत उपलब्ध झाली.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री.; शिवगुरुदास पीतांबर; भाइसंमंइति., श. १८३७, पृ. १९६–१९७.

**शिवतनय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**० शिवदास–१** – पहा **शिवानंद–१**.

**शिवदास–२ / ० सीवदास** [इ. स. १७५९ च्या पूर्वी] कवी. ह्यांचे गुरू नीलग्रीव असावेत असा वि. का. राजवाडे ह्यांचा तर्क आहे. आपल्या गुरूंचा अपूर्ण ग्रंथ *वेताळपंचविसी* हा शिवदासाने पूर्ण केला. ह्या ग्रंथातील दोन कथा नीलग्रीवाने लिहिल्या व बाकीच्या तेवीस कथा शिवदासाने लिहिलेल्या आहेत. ग्रंथाची समाप्ती रत्नागिरी येथे शके १६८१ (इ. स. १७५९) त झाली. ग्रंथात एकही फारसी शब्द नाही.

**रचना : अमु.** – १. वेताळपंचविशी; कथा २५; ओ. सं. १९७७; र. का. : श. १५०० च्या आसपास; २. त्रु. प्रती; मसंमं., हवना., पृ. ९८, ११८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : नीलग्रीव व शिवदास ह्यांनी रचिलेली वेताळपंचविशी; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १८१.

**शिवदास–३** [अंदाजे इ. स. १७८२] वीरशैव कवी. हे राहणारे शिंगणापूरचे. ह्यांच्या वडिलांचे नाव कौंडिण्य. वारकरीपंथीयांकडून अपमानित झाल्याने ह्यांनी पुढे शैवमार्गाचा स्वीकार केला. ह्यांनी *शिवगाथा* व *सोमवारव्रतकथा* (र. श. १७०४/इ. स. १७८२) अशा रचना केल्या आहेत. पैकी *शिवगाथा* प्रसिद्ध आहे (निंबकर

आणि मंडळी, मुंबई).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, सुरेश, स्वामी, शांतितीर्थ, ठुसे, कुंदा (संपा.) : श्रीमन्मथ शिवलिंगकृत श्रीगुरुगीता; नगर : १९७३; प्रस्ता., पृ. ७.

**शिवदास-४** [का. अनु.] कवी. ह्यांनी गुरूवर रचलेल्या आरतीत (मु. : भाइसंमंइति., १८३७, पृ. २८६) भगवंत असा गुरूंचा उल्लेख केला आहे. इतर हस्तलिखित बाडांतून ह्या कवींची पदे, अभंग इत्यादी जी रचना उपलब्ध होते, तिच्यात कोठेही गुरूंचा उल्लेख येत नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुजुमदार, गं. ना. : भगवंतशिष्य शिवदास; भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २८६.

**शिवदास-५** [अंदाजे श. १७३४ / इ. स. १८१२] वीरशैव कवी. लौकिक नाव बाबा आकलकोटे. सोलापूरकडचे राहणारे. *शिवगाथा*कार शिगणापूरच्या शिवदासाहून हे शिवदास वास्तविक भिन्न होत. पण शिगणापूरकडील शिवदासांच्या *शिवगाथे*त ह्यांचा *शिवपाठ* चुकीने घातला गेला आहे.

**रचना : मु.** – १. सिद्धेश्वरपुराण; र. का. : श. १७३४; देवमाले, म. स.; १९११; २. शिवपाठाचे अभंग (सं. २९); शिवगाथा; निंबकर आणि मंडळी, मुंबई. **अमु.** – बसवपुराण; र. का. : श. १७५४; डॉ. ज. ब्र. शिवलिंग शिवाचार्यांच्या संग्रही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, सुरेश, ठुसे, कुंदा, स्वामी, शांतितीर्थ (संपा.) : सोलापूरचा शिवदास; प्रस्ता., श्रीमन्मथशिवलिंगकृत श्रीगुरुगीता; अहमदनगर, १९७३; पृ. ७.

**शिवदास-६** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सीताहरण (लवकुशाख्यान); प्रसंग १–३, ग्रं. सं. २८०; तंसम. हस्त. यादी, क्र. २.

**शिवदास-७** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – शंकराची आरती; मआ., पृ. ४१९.

**० शिवदास** – पहा **शंकरदास.**

**शिवदास कुंडेश** [इ. स. चे सोळावे शतक] कवी. हे विठ्ठलभक्त होते. ह्यांची कविता संताजी जगनाडे ह्यांच्या वहीत आढळते (मसा., आ. ५, पृ. ८०६).

**शिवदास गोमा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – काशीखंड; ग्रं. सं. ७७; मसंमं., हवना., पृ. ८४, ८५.

**शिवदासतनय** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – द्रौपदीवस्त्रहरण – पद; पदसंग्रह, भाग ३; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १९०१; पृ. १०८.

**शिवदास बीडकर** [का. अनु.] वीरशैव कवी. ह्यांची मन्मथस्वामीवरील आरती व काही अन्य रचना उपलब्ध आहे (श्रीमन्मथ शिवलिंगकृत *गुरुगीता*; नगर, १९७३; प्रस्ता., पृ. ७).

**शिवदासमल्लया** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – गुरुपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शिवदासात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – विष्णूचे व शिवाचे, अशी दोन पदे; पदसंग्रह, भा. ३; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १९०१; पृ. १४८.

**शिवदीन केसरी / ० शिवदीन केसरी उद्बोध / ० शिवदीननाथ / ० शिवदीनबाबा** [श. १६२०, वैशाख व. ७ / इ. स. १६९८ – समा. श. १६९६, माघ व. १३ / इ. स. १७७५] नाथपरंपरेतील कवी. पैठणचे रहिवासी. हे कौशिकगोत्री यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्यांच्या पित्याचे नाव कृष्ण यादव जोशी. मातोश्रीचे नाव सरस्वती. शिवदीननाथांच्या तीर्थरूपांची पैठण येथे जोशीपणाची वृत्ती होती. शिवदीननाथांचे मूळचे नाव सदाशिव. शिवदीनांचे गुरू केसरीनाथ. शिवदीन केसरींच्या बालवयातच त्यांच्या पित्याने त्यांना गुरूला अर्पण केले होते. ह्यासंबंधी एक आख्यायिका सांगितली जाते, ती अशी : हे पाच-सहा वर्षांचे असताना सवंगड्यांबरोबर गोदेच्या वाळवंटात खेळत होते. मुलांनी गमतीने ह्यांना वाळवंटात पुरले व त्यांच्यावर माती टाकली आणि हे विसरून मुले घरोघर निघून गेली. मुलगा वेळेवर घरी आला नाही हे पाहून वडिलांनी शोधाशोध सुरू केली. गावातील मुलांच्या खेळाची हकीकत चौकशी करता त्यांना समजली. त्यांनी पुष्कळ शोध केला पण तपास न लागल्याने अखेरीस ते पैठण येथेच राहणाऱ्या केसरीनाथ नावाच्या सिद्ध पुरुषाकडे गेले. मुलाचा तपास लावण्याविषयी कृष्णाजीपंतांनी त्यांना विनंती केली. तेव्हा केसरीनाथ त्यांना घेऊन वाळवंटावर गेले व शिवदीनांचे नाव मोठ्याने पुकारून त्यांनी हाक मारली. त्याबरोबर शिवदीननाथ वाळूतून वर आले. आपल्या मुलास पाहून कृष्णाजीपंतांस अत्यंत आनंद वाटला. त्यांनी त्यांस केसरीनाथांच्या पायावर घातले. नाथांनीही ह्यांना आपल्याजवळ ठेवून घेतले. श. १६२८ (इ. स. १७०६) त व्रतबंध झाल्यानंतर संप्रदायानुसारे कसरीनाथांनी त्यांना अनुग्रह दिला व सदाशिवाचे शिवनाथ असे नामकरण केले.

शिवदीनांची गुरुपरंपरा ही नाथसंप्रदायाच्या ज्ञानेश्वरोत्तर शाखांपैकी एक प्रसिद्ध अशी शाखा आहे : आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरखनाथ > गैनीनाथ > निवृत्तिनाथ > ज्ञाननाथ > सत्यामलनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ > शिवदीननाथ > नरहरिनाथ इ.

शिवनाथांचे शिवदीननाथ कसे झाले ह्याविषयीची एक कथा प्रसिद्ध आहे. घृष्णेश्वर ऊर्फ वेरूळ येथे एकदा शिवनाथांचे कीर्तन चालले असता जर्जरीबक्ष नामे एक मुसलमान अवलिया ते ऐकण्यास हजर होता. कीर्तनावरून हे मोठे अधिकारी पुरुष आहेत हे त्याने ओळखले. आपल्या डोक्यावरची टोपी त्यांच्या डोक्यावर घालून त्यांना 'दीन' (धर्ममुख्य) ही पदवी त्याने दिली. तेव्हापासून लोक त्यांना शिवदीननाथ म्हणू लागले. ह्यांचे समकालीन शहा दावल नावाचे अवलिया पैठणास होते. त्यांच्याशीही शिवदीनांचा फार स्नेह होता. शिवदीननाथ रूपाने देखणे होते. नरहरिनाथरचित शिवदीनांवरील आरतीत 'दिव्यमूर्ती अति सुंदर पाहता थक्कित अमरादि' असे त्यांचे वर्णन येते. मोरोपंतांनी *सन्मणिमाले*त त्यांचे जे वर्णन केले आहे, त्यावरून हे मोठे तेजस्वी पुरुष होते असे दिसते. नाथसंप्रदायातील इतर सत्पुरुषांप्रमाणेच ह्यांची गुरुनिष्ठा असामान्य होती. गुरूपदेशानंतर शिवदीननाथांना पार्थिवपूजेचा आदेश देण्यात आला होता. गुरूच्या आज्ञेवरून ह्यांनी श. १६४४ ते १६४८ (इ. स. १७२२ ते १७२६) पर्यंत भारतभर तीर्थयात्रा केल्या. तेथून परतल्यानंतर भजन-कीर्तनाच्या द्वारा लोकोद्धाराचे कार्य अंगिकारले.

ह्यांचा विवाह वयाच्या बाराव्या वर्षी झाला. त्यांच्या पत्नीचे नाव उमाबाई. ह्यांना दोन पुत्र होते. त्यांची नावे नरहरिनाथ व गदाधरनाथ. ह्या दोघांनीही तीर्थरूपांकडूनच उपदेश घेतला होता. शिवदीननाथांची नाथपंथीय परंपरा त्यांचे पुत्र नरहरिनाथ ह्यांनी चालविली. नरहरिनाथांचे पुत्र लक्ष्मीनाथ हे देखील मोठे अधिकारी पुरुष होते. त्यांची समाधी आळंदीस केसरीनाथांच्या समाधीजवळ आहे.

शिवदीननाथांचा मठ पैठणासच होता. शिवदीनांच्या मठास उत्पन्नही बरेच होते. त्या सर्वांचे एक संस्थान करून, त्याच्या द्वारे भजन-पूजनाची परंपरा चालू राहील अशी व्यवस्था करून ते पत्र त्यांनी आपल्या ज्येष्ठ पुत्राच्या स्वाधीन केले आणि श. १६९६ (इ. स. १७७५), माघ वद्य १३, शिवरात्रीस वयाच्या ७६ व्या वर्षी समाधी घेतली. त्यांची समाधी पैठणास गोदाकाठी आहे.

शिवदीन केसरी हे एक चांगल्यापैकी कवी आहेत. ह्यांची पदरचना विपुल आहे. पदांमधून सर्वत्र शिवदीन किंवा शिवदीन केसरी

असाच ते आपला उल्लेख करतात. पदांखेरीज *ज्ञानप्रदीप* हा मुद्रित ग्रंथ (संपा. द. वा. पोतदार, पुणे १९३४), *विवेकदर्पण* (हस्त.) आणि *भक्तिरहस्य* नावाचा आणखी एक ग्रंथ (संककासू., पृ. १०७) एवढी रचना कवीच्या नावावर दिलेली आढळते.

*ज्ञानप्रदीप* हा शिवदीनकेसरींचा अध्यात्मपर ग्रंथ १२५६ ओव्यांचा आहे. तो स्वतंत्र नसून त्यात मूळ संस्कृतावरून विवरण केले आहे. हा ग्रंथ श. १६९२ (इ. स. १७७०) मध्ये आषाढ वद्य चतुर्थीस त्यांनी संपविला. संस्कृत-प्राकृत-वाद पूर्वपरंपरेनुसार येथे आलाच आहे. एकनाथांप्रमाणेच 'वेदवाणि ईश्वराची। प्राकृत हें काय चोराची' असे म्हणून आक्षेपकांना हे हटकतात. त्यापुढेही जाऊन ज्ञान यावनी भाषेतही विटाळत नाही मग प्राकृतात कोठून, ह्यासारखी धीट विचारसरणी बोलून दाखवतात.

ग्रंथारंभी गणेशावर २६ ओव्यांचे पारमार्थिक रूपक करून त्यास वंदन केले आहे. ह्यानंतर ग्रंथातील मुख्य विषयास आरंभ होतो. मूळ ग्रंथास आधारभूत असलेल्या संस्कृत श्लोकांची संख्या २४ आहे. एकंदर सर्व श्लोकांचा विषय गुरुमहिमा असाच दिसतो. ग्रंथामधील तत्त्वज्ञान अद्वैतमतानुसारी व नाथपंथाचे अनुसरण करणारे आहे. ९०० ओव्यांपर्यंत मराठी टीका व पुढील भागात गुरुपरंपरेची सविस्तर माहिती दिलेली आहे. मात्र ती ऐतिहासिक दृष्ट्या विश्वसनीय वाटत नाही. प्रस्तुत ग्रंथ शिवदीनांच्या मठातील प्रतीवरून 'यथाप्रति' छापल्याने त्याची भाषा फार अशुद्ध वाटते. नाथसांप्रदायिकांच्या तत्त्वज्ञानाचे विवरण करणारा ग्रंथ म्हणून त्यास महत्त्व आहे. [➪ ३.]

कवी म्हणून शिवदीननाथांचे वैशिष्ट्य हे त्यांच्या पदरचनेत सापडते. त्यांच्या सुमारे ५०० पदांपैकी काही प्रसिद्ध झालेली पदे सोडली तर इतर कविता अप्रकाशित असून ती त्यांच्या वंशजांच्या संग्रही पैठणास आहे. पदांची रचना कीर्तनात म्हणण्यासाठी झाली असल्याने त्यांची भाषा सोपी, परमार्थविचार सुबोध रीतीने व्यक्त करणारी अशी आहे. लोकोद्धाराचे जे जीवनकार्य त्यांनी अंगिकारले होते, त्या दृष्टीने सन्मार्गाचा जनतेला उपदेश करण्यासाठीच ही काव्यरचना त्यांनी केली. ह्यांच्या अनेक पदांतून तत्कालीन समाजजीवनाचे, केव्हा केव्हा राजकीय जीवनाचेही, प्रतिसाद उमटलेले आहेत. इतर अनेक संतांप्रमाणेच गुरुभक्ती, आत्मशुद्धी, आत्मज्ञान, इंद्रियदमन, परमात्मप्राप्ती, ईश्वरभक्ती असे अनेक पारंपरिक विषय त्यांनी आपल्या पदांतून वर्णिले आहेत. भोवतालच्या समाजातील लोकांचे मार्गभ्रष्ट जीवन पाहिल्यानंतरची व्यथा ते "अहो तुम्ही ऐका। सखा सहोदर म्हणजे पैका" ह्या शब्दांत अभिव्यक्त करतात आणि हा मार्ग चुकीचा कसा तेही स्पष्ट करतात.

भारुडांतील पद्धतीप्रमाणे गूढ, आध्यात्मिक अनुभव लौकिक रूपकांद्वारे ते सुगम करतात. शृंगाराच्या माध्यमातून कूट तात्त्विक सिद्धान्त 'परपुरुषाची मी तो नोवरी' ह्यासारख्या पदांतून गोवलेले आहेत. ह्यांच्या पदरचनेमधील गेयतेवर लावणी, फटका, कटाव इत्यादी रचनेचा पडलेला प्रभाव जाणवतो. अनेकदा श्लेषयुक्त आणि प्रासप्रचुर रचनाही केलेली आहे. शिवदीनस्वामींची 'माझी देवपुजा बा देवपुजा', 'भाव धरा रे अपुलासा देव करा रे।' ही पदे लोकप्रिय झाली ती त्यांमधील उत्कट स्वरूपाच्या भावाविष्कारामुळेच होय. ह्यांनी जगदंबा, गणपती, मारुती, खंडोबा, पंढरपूरचा विठोबा, दत्त, भैरवनाथ इत्यादी अनेक देवतांवर पदे रचली आहेत. ह्यांची काही हिंदी रचनाही सापडते.

अमृतराय, निरंजनमाधव, सोहिरोबा आंबिये, मध्वमुनीश्वर, मोरोपंत इत्यादी कवी ह्यांचे समकालीन. ह्या काळात विशेष मान्यता पावलेल्या कीर्तनपरंपरेची कास धरून ज्ञानेश्वरांपासून परंपरेने चालत आलेला भक्तिसंप्रदायाचा वारसाच ह्यांनी पुढे चालविला. प्रासादिक आणि नादमधुर अशी ह्यांची पदे त्यांच्या कवित्वगुणांचे दर्शन घडवितात. पदांमधील आशय त्यांचा पारमार्थिक अधिकार पटवून देतो. भक्ती, परमार्थ ह्यांची काव्यरचनेशी घातली गेलेली ही सांगड विचारात घेऊनच ह्या कालखंडातील कवींच्या कवितेचे मूल्यमापन करावे लागते. ह्या दृष्टीने अंतःकरणाच्या तळमळीने त्यांनी केलेला भावाविष्कार हृद्यतेच्या कसोटीस उतरताना दिसतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : शिवदिन केसरी; मकच., खं. ३; मुंबई, १९१४; पृ. १५९–१७५. २. पटवर्धन, पां. न. : श्रीशिवदिन नाथांचा वंशवेल; भाइसमंइति., श. १८३७; पृ. १६०. ३. पांगारकर, ल. रा. : शिवदिन केसरी; मुमुक्षु, फेब्रु. १९२६; पृ. ३१–३७. ४. पाटील, बाळासाहेब : श्रीशिवदिन केसरी; प्रतिष्ठान, एप्रि. १९५८; पृ. १८. ५. शर्मा, विनयमोहन : शिवदिन केसरी; हिंमसंदे., पाटणा, १९५७; पृ. २००.

**० शिवदीन केसरी उद्बोध** – पहा **शिवदीन केसरी.**

**० शिवदीननाथ** – पहा **शिवदीन केसरी.**

**० शिवदीन बाबा** – पहा **शिवदीन केसरी.**

**शिवनाथ** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. ह्यांनी महाभारताची काही पर्वे रचली आहेत. ही त्यांची रचना वीररसपूर्ण आहे. गो. का. चांदोरकरांच्या मते ह्यांनी संपूर्ण भारत रचले असावे. पण त्यापैकी *द्रोणपर्व* व *भीष्मपर्व* (र. का. : श. १६८८) तेवढेच गो. का. चांदोरकर संग्रहात उपलब्ध (संककासू., पृ. १०८).

**शिवनाथराय** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – तिसऱ्या रघूजी भोसल्याचा पोवाडा; ऐतिपो., खं. २; पृ. २७७–२८०.

**शिवनाथभट्ट** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – पंचीकृत विवेक; र. का. : श. १५७६, जयनाम संवत्सरे, अधिक मासे, दक्षिणायने, शु. १, गुरुवार; रासंमं. हस्त. सू., पृ. ४१.

**शिवनिजानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – रामाची आरती; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शिवबोध (पहिले)** [ ? – समा. श. १६२८, वैशाख शु. दशमी, गुरुवार / इ. स. १७०६] कवी. मुडलगीच्या स्वामी-परंपरेतील. शिवबोध (पहिले) हे अद्वयबोधांचे पुत्र. त्यांच्या पत्नीचे नाव पार्वतीबाई. ह्यांची परंपरा : सहजबोध > रंगबोध > अद्वयबोध > शिवबोध (पहिले) > रंगबोध (दुसरे) > शिवबोध (दुसरे) अशी आहे. ह्यांना पुत्र नसल्यामुळे ह्यांनी आपली कन्या काशीबाई हिचे पती संगमनाथ ऊर्फ रंगबोध (दुसरे) ह्यांनाच उपदेश देऊन आपली परंपरा चालवण्यास सांगितले. रंगबोध असे जावयाचे नामकरण शिवबोधांनी उपदेश दिल्यानंतर केलेले आहे. दुसरे शिवबोध हे मुडलगी परंपरेतील पाचवे व शेवटचे स्वामी. ह्यांची रचना अद्याप हाती लागलेली नाही.

शिवबोधांची १६ पदे व एक ओवीबद्ध पत्र अशी रचना उपलब्ध आहे. स्फुटरचनेत स्व-स्वरूप आणण्याचा व स्वस्वरूपीच राहण्याचा बोध त्यांनी जनाला व मनाला केला आहे. गुरुभक्तीलाही तेथे प्रधान स्थान मिळाले आहे. 'शिवद्वय' असा गुरूच्या आणि स्वतःचा नावाचा एकत्र उल्लेख जवळजवळ प्रत्येक पदात ह्यांनी केला आहे. पदांच्या रचनेत सहजतची गोडी आहे.

शिवबोधांचे ओवीबद्ध पत्र म्हणजे गोकाकच्या सिद्धाराम देसायास लिहिलेली *निर्याणपत्रिका* होय. त्याच्या गुरुभक्तीवर प्रसन्न होऊन 'शंकराचार्य परंपरेत तुझी बहुत सत्कीर्ति होईल' असा वर त्याला शिवबोधांनी दिला. ह्याच पत्रिकेत ते आपली निर्याणतिथी 'आम्ही व्ययनाम संवत्सरी वैशाखमासी। प्रयाण करितो शुद्ध दशमी गुरवार दिवसी॥ २१॥' अशी सांगतात. आपली 'तुटी' होणार नसून 'ऐक्य'च झाले आहे हा विचार शिष्याच्या सांत्वनासाठी त्यांनी

मांडला आहे. जगात कसे राहावे, ह्यासंबंधीचा शिष्यास उपदेश करून आपल्या ठिकाणी पांडुरंगबोध (रंगबोध–२) ह्यांना गुरू मानून त्यांना भजावे असेही सिद्धारामास ते कळवितात. पत्रिकेच्या एकूण ६२ ओव्या आहेत.

**रचना : मु.** – १. निर्याणपत्रिका; ओ. सं. ६२; २. पदे १६; मुडलगीचे स्वामी; पुणे, १९७१; पृ. ८७–९८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : शिवबोध–१; मुडलगीचे स्वामी; पुणे, १९७१; प्रस्ता., पृ. ३८–३९.

**शिवमुनि** [अंदाजे इ. स. चे अठरावे शतक] महानुभाव कवी. गोपीराज विद्वांस ह्यांचे हे शिष्य. ह्या शिवमुनींनी *दानव्रतकथा* केली आहे. सत्यभामेने श्रीकृष्णाचे नारदाला दान केल्याचे गमतीचे कथानक ह्या काव्यात येते.

**रचना : अमु.** – दानव्रतकथा; श्लोकबद्ध; अनेकवृत्तात्मक; अ. ४; देशपांडे, य. खु.; ममवा., पुणे, १९६०; पृ. ७५–७६.

**० शिवराम–१** – पहा उद्धव–१.

**शिवराम–२** [इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] पदकार. श्रीसमर्थांचे शिष्य. ह्यांचा मठ तेलंगणात असल्याचा गिरिधरकृत *समर्थप्रतापात* उल्लेख आहे : "शिवरामनामा समर्थसंगें । कितेक दिवस अंतरंगें । पुढें पुढें जगदोद्धारण प्रसंगें । तेलंगण प्रांते आज्ञापिला ॥ १०.६९ ॥" सध्या मठ कोठे आहे ह्याचा अद्याप शोध लागलेला नाही. ह्यांची कविता समर्थशिष्य उद्धवस्वामींच्या परंपरेतील इंदुरबोधन मठात आढळली. यमयातना, संसार, सद्गुरूचा ध्यास, वाईट संगती, रामभक्ती इत्यादी विषयांवर ह्यांची १९ पदे आहेत. ह्यांत क्वचित विनोदी रचनाही आहे : "देवें लग्न केलें नाहीं । म्हणउनी पोर जालें नाहीं । पोरांचेंहि लग्न नाहीं । म्हणउनी बरें ॥ १ ॥" इत्यादी.

**रचना : मु.** – डफगाणे व पदपदांतरे; श्रीसमर्थांचे शिवराम; देव, शं. श्री.; रामदास आणि रामदासी; व. ४, अं. ४३; मार्गशीर्ष शु. १३, श. १८४०; धुळे; पृ. १४५–१५७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : श्रीसमर्थांचे शिवराम; श्रीसांप्रविवि., खं. २, लेखांक ८३.

**शिवराम–३** [अंदाजे श. १७०५ / इ. स. १७८३] कवी. वंशपरंपरा : सहजबोध > शिवकल्याण (आत्मकुमार) > गोपाळादि (मधली परंपरा) > शिवराम. हीच गुरुपरंपरा दिसते. *बंकटतरंगिणी* ह्या कविरचित काव्यातील गुरुपरंपरानिदर्शक ओव्या लक्षात घेता ही मुकुंदराजांच्या परंपरेची एक शाखा आहे असे लक्षात येते. सहजबोधांची कृपा म्हणून हा ग्रंथ झाला, असे उद्गार आढळतात. ह्यावरून सहजबोधांचे हे शिष्य असावेत असे अनुमान करता येते.

ह्यांच्या *बंकटतरंगिणी* ग्रंथात (अ. ११, ओ. सं. १७७९, र. का. : श. १७०५) प्रामुख्याने व्यंकटगिरी व बंकटेश ह्यांचे माहात्म्य वर्णिले आहे. हा ग्रंथ म्हणजे *वाराहपुराणा*च्या तीस अध्यायांचा संक्षेप आहे. देवाने अवतार घेऊन पृथ्वीवरील अनेक दुष्टांचे निर्दालन केले हे मुख्य कथासूत्र आहे. प्रस्तुत ग्रंथ ग्वाल्हेरच्या मातृभूमी कार्यालयातील हस्तलिखित ग्रंथसंग्रहात उपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** मुंडी, बा. ना. : शिवरामकृत बंकटतरंगिणी; भाइसमंत्रै., व. ४६, अं. १–४; १९६८; पृ. ५५–६१.

**शिवराम–४ / ० शिवरामकल्याण** [ ? – समा. श. १६४८ / इ. स. १७२६] रामदासी कवी. हे कल्याणस्वामींचे शिष्य. ह्यांची परंपरा अशी : समर्थ > कल्याण > शिवराम > आत्माराम. ह्यांचा मठ गुलबर्ग्याजवळ आपचंद गावी आहे. ह्यांनी *श्रीमत् दासबोधा*च्या कितीतरी प्रती लिहिलेल्या आहेत. समाधीपूर्वी अवघी दोनच वर्षे श. १६४६ त मोठ्या अक्षरात ह्यांनी लिहिलेली *दासबोधा*ची एक प्रत आपचंद मठात उपलब्ध आहे. ह्यांची समाधीही आपचंद मठात आहे.

**रचना : मु.** – १. समर्थचरित्रपर प्रकरण; ग्रं. सं. ११, २. कल्याणस्वामींची आरती, एक पद, इ. स्फुट रचना; श्रीसांप्रविवि.; प्रथम खंड; धुळे १८३९; पृ. ३२७–३२८. **अमु.** – स्फुट पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री.; शिवकल्याणरामदास; श्रीसांप्रविवि., खंड ८१; धुळे, १८३९; पृ. ३२५–२८.

**शिवराम–५** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – संतमालिका; महा. कवि; व. १, अं. ४; पृ. ९–१०.

**शिवराम–६** [इ. स. १८ वे शतक, उत्तरार्ध] शाहीर. संपूर्ण नाव 'शिवराम पिंपळगावकर'.

**रचना : मु.** – नानासाहेब पेशव्यांच्या मृत्यूवरील पोवाडा; ऐतिपो., खं. १; पृ. १३८–१४२.

**शिवराम–७ (देशिक)** [का. अनु.] टीकाकार.

**रचना : अमु.** – लघुपंचीकरणपद्धति; दर्शन; भाइसमं. हस्त. सू., पृ. ४८.

**शिवराम–८** [का. अनु.] कवी. ह्यांचे *शिवकथामृत* हे काव्य उपलब्ध असून त्यात *स्कंदपुराणा*तील *ब्रह्मोत्तरखंडां*तर्गत *शिवमाहात्म्या*ची कथा आली आहे. रचना मिश्र असून सवाया, आरत्या, पदे, श्लोक व क्वचित संस्कृत पद इत्यादींचा अंतर्भाव ह्यात आहे.

**रचना : मु.** – शिवकथामृत; अ. २२; महाराष्ट्र काव्यग्रंथ; ठाणे; श. १८२९.

**शिवराम–९** [का. अनु.] कवी. ह्यांचे एक लघुप्रकरण असून त्यात पतिराज दूर देशास गेले असता पत्नीने सणावाराचे दिवस कसे घालविले व तो आल्यानंतर प्रवासातल्या सुखदुःखाच्या गोष्टी, एकमेकांवर रागावणे इत्यादी कसे सुरू झाले ह्याचे मनोरंजक व अनुभवसिद्ध वर्णन कवीने केले आहे (मसा., आ. ५, पृ. ४६२).

**शिवराम–१०** [का. अनु.] बखरकार.

**रचना : अमु.** – बत्तिशीची बखर; मोडी प्रत, काल श. १७१५ (इ. स. १७९३); रासमं. हस्त. सू., पृ. ८६.

**शिवराम अकोलकर / ० भट्टभट्टात्मज** [इ. स. चे १८ वे शतक] कवी व टीकाकार. हे मूळचे विदर्भातील वडनेर-अकोल्याचे. भट्ट हे त्यांचे उपनाव. दादंभट्ट > महादेवभट्ट > भट्टंभट्ट अशी शिवरामांची पितृपरंपरा आहे. कुलदैवत व्यंकटेश. भट्टशिवराम हे एकनाथ परंपरेतील. ह्यांचे गुरू निंबराज. परंपरा : दत्तात्रेय > जनार्दन > एकनाथ > नरहरि > निंबराज > शिवराम. ह्यांचा उल्लेख कृष्णदयार्णवांनी त्यांच्या *हरिवरदा* टीकेत केला आहे. कृष्णदयार्णवांच्या काळात ह्या सत्पुरुषांचे वास्तव्य पैठणास होते (म. रा. जोशी, विसंमंवा., १९७५; पृ. १३०–३१.)

ह्यांनी आपल्या सर्व ग्रंथांची रचना पैठण येथील कालिका घाटावरील कालिका मंदिरात श. १६७३ ते १६९३ (इ. स. १७५१ ते १७७१) च्या दरम्यान केली. ह्यांनी लिहिलेला *चैतन्यचंद्रिका* हा टीका-ग्रंथ व *चिद्रत्न* हा ग्रंथ हे वेदान्तपर आहेत. ह्याशिवाय *अष्टावक्रटीका* व *प्रकाशयोगवासिष्ठसार* असे ह्यांचे आणखी दोन ग्रंथ आहेत.

**रचना : मु.** – चिद्रत्न; श्लो. सं. १३३; र. का. : पौष वद्य ५, सोमवार, श. १६७८; इंद्रायणी, डिसें. १९६२ ते एप्रि. १९६३; क्रमशः. **अमु.** – १. अष्टावक्र टीका; सटीक गद्य; र. श. १६७३; मसमं.; हवना., पृ. ८६. २. चैतन्यचंद्रिका; श्लोकबद्ध; श्लो. सं. ६४; र. श. १६७८; भाइसमं. ३. योगवासिष्ठसारप्रकाश; गद्य; र. श. १६८२; सवामं. बा. ४९६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. (संपा.) : शिवराम अकोलकरकृत चिद्रत्न; इंद्रायणी, व. १, अं. २, डिसें. १९६२; पृ. ६४–७२. २. मुजुमदार, गं. ना. : भट्टात्मज शिवरामकृत

चैतन्यचंद्रिका; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. १३०–१३१.

**० शिवरामकल्याण** – पहा **शिवराम–४.**

**शिवराम किंकर** [का. अनु.] महानुभाव कवी. वंश क्षत्रिय. ह्यांचा जन्म विदर्भातील यवतमाळ जिल्ह्यात पुसद तालुक्यात वेणा गावी म्हसके ह्या कुळात झाला. ह्यांचे मूळ दैवत सदाशिव. वाडवडिलांनी हे दैवत सोडून सुपदेवाला मानले. ह्यांच्या कुळाकडे मुकद्दमीची (ठराविक साऱ्याची) स्वतंत्र बारा गावे होती. ह्यांच्या वंशात 'भूमटपणा'ची वृत्ती होती. सावत्र आईच्या छळामुळे कंटाळून आत्याकडे येऊन राहिल्यानंतर, पूर्वीच गृहत्याग करून ब्रह्मयोगिनी बनलेल्या आईची व ह्यांची भेट झाली. ती ह्यांना महानुभावपंथीय आचार्यांकडे घेऊन गेली. महानुभाव आचार्य शारंगधर पंडितांनी ह्यांना दीक्षा दिली. दीक्षा घेतल्यानंतर शारंगधर तिसऱ्या वर्षी समाधिस्थ झाले. नंतर ह्यांचे चुलतेच ह्यांचे गुरू बनले. त्यांनी ह्यांच्याकडून विद्याभ्यास करवून घेतला. पण तेही लवकरच कालवश झाले. अखेर कुळाचार्य हरिराजांनी ह्यांना ज्ञानमार्ग दाखविला. पण त्यांचाही सहवास ह्यांना फार दिवस लाभला नाही. कविरचित *गोपिकासैंवरा*च्या समाप्तीच्या भागात ह्यांनी दिलेल्या आत्मचरित्रात वरील माहिती आढळते. कवीचे गुरू शारंगधर पुसदेकर अंदाजे इ. स. च्या १७ व्या शतकात विद्यमान होते. त्यावरून शिवराम किंकर हे इ. स. च्या १७ व्या शतकाच्या अखेरीस विद्यमान असावेत असे अनुमान करता येते. ग्रंथरचनाकालनिर्देशाच्या ओव्यांवरून मात्र कवीचा निश्चित काळ समजत नाही.

शिवराम किंकरांनी रचलेल्या *गोपिकासैंवर* काव्याचे ४० अध्याय असून ९०१६ ओव्या आहेत. प्रत्येक अध्यायाच्या सुरुवातीस परमेश्वरस्तवनपर बऱ्याच ओव्या आहेत. संपूर्ण ग्रंथात श्रीकृष्णाच्या विविध विवाहांची रसपूर्ण वर्णने आली आहेत. *भागवताच्या दशमस्कंधा*च्या आधारे ही रचना केली आहे.

ह्या ग्रंथाच्या संपूर्ण प्रती अमरावती, ऋद्धिपूर, माहूर येथील महानुभाव मठांत आढळतात. अशीच एक पूर्ण प्रत प्रा. भाऊ मांडवकर ह्यांना मिळाली असून त्या प्रतीच्या प्रारंभी "ही पोथी मुंबईत बापू सदाशिव सेटे यांचे छा. सीलायेंत्रे छा." असे लिहिलेले आढळते ह्यावरून ही प्रत शिळाछापखान्याच्या काळात झाली हे लक्षात येते.

ह्या काव्याचा फक्त दहावाच अध्याय *विजन माहात्म्य* म्हणून महात्मा भक्तराज बाबा औरंगाबादकर ह्यांनी श. १८३३/इ. स. १९११ मध्ये छापविला होता. सरस्वतीने म्हैशासुराशी आठ दिवस लढाई केली, तरी तो मरेना, तेव्हा नारदाने सांगितले की, त्याला सुकोंतीक ऋषीचा वर आहे, तो असा : 'साधु संत, ब्राह्मण इत्यादि उत्तम जातीदर्शनाने तू अजिंक्य होशील.' तेव्हा उत्तम लोक गावाबाहेर काढून मांग, महार इत्यादी हीन जातींच्या साहाय्याने नवमीला सायंकाळी अंबिकेने त्याला ठार केले अशी कथा ह्या दहाव्या अध्यायात आहे.

*गोपिकास्वयंवरा*च्या छापील प्रतीत शेवटी शार्दूलविक्रीडित वृत्तातील एक श्लोक आहे. ओवीसह ग्रंथात श्लोक गुंफण्याची कवीने स्वतःच कबुली दिली आहे, ती खरी असल्यास *गोपिकास्वयंवरा*च्या शेवटचा श्लोक शिवराम किंकराचाच आहे असे मानावे लागेल. तसा तो मानल्यास *गोपिकास्वयंवरा*ची रचना ही श. १७६८ (इ. स. १८४६) मधील आहे असे दिसते. हा श्लोक जर हस्तलिखित तयार करणाऱ्याचा असेल तर शिवराम किंकराचा काळ त्याही पूर्वीचा ठरू शकतो. पोथीत ह्याला अन्य पुरावा नाही (भाऊ मांडवकर; नभामा., जून १९६६; पृ. ३०). राजवाडे संशोधन मंदिरातील संपूर्ण प्रतीतील "शाके भुमुनि याम परवत पाराभवेमीति वत्सरे॥ मासे आश्वीन सुद्ध पक्ष प्रथमा प्राता भृगु वाशरे॥" ह्या कालनिर्देशाच्या श्लोकात कवीने पराभव संवत्सराचा उल्लेख केला आहे. हा संवत्सर श. १७०८ मध्ये येतो. परंतु त्यातील तिथी, वार व महिना श. १७०९ शी जुळतात (द. रा. भट; संशोधक, व. २६, अं. १–४, पृ. ६१). द. बा. महाजन ह्यांना ह्या ग्रंथाचे एक वेगळे हस्तलिखित प्राप्त झाले आहे. त्यातील अखेरीच्या कालनिर्देशाच्या ओवीवरून अंदाजे हा शक १७०७ असावा असे मत ते व्यक्त करतात (कवि शिवराम किंकरकृत *गोपिकासैंवर*, *तरुणभारत*, २३ नोव्हें. १९७५; पृ. २). भाषेच्या धाटणीवरून हा ग्रंथ शकाच्या १७ व्या वा १८ व्या शतकातील असावा असे डॉ. य. खु. देशपांडे मानतात.

कवीला प्रस्तुत ग्रंथ रचण्याची स्फूर्ती होण्याचे एक कारण म्हणजे महानुभावीयांचे परमदैवत जे श्रीकृष्ण त्याचे चरित्र वर्णन करण्याची आवड, असे सांगता येते. दुसरे म्हणजे कवीचे वास्तव्यस्थान पुसद म्हणजेच पूर्वीचे मंद्रपूर हे श्रीकृष्णपत्नी लक्ष्मणा हिच्या पित्याचे गाव होते, अशी माहिती कवीनेच दिली आहे.

कवीच्या लेखनशैलीवर श. १६०८ (इ. स. १६८६) मध्ये होऊन गेलेल्या *व्यंकटेशस्तोत्र*कर्त्या देवीदासांचा प्रभाव आहे. उदा., 'जसे उडदी स्याम ढवळे। काय निवडावे जी वगळे' ही कल्पना 'उडदामाजि काळेगोरे' ह्या काव्यपंक्तीवरून उचलली आहे. हा काव्यग्रंथ रसाळ आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, य. खु. : ममवा., पुणे, १९६०; पृ. ७४–७५. २. भट, द. रा. : गोपिका सैंवराचा कर्ता : महानुभाव कवि शिवराम किंकर; संशोधक; १९५७; व. २६, अं. १ ते ४, पृ. ५९–६४. ३. मांडवकर, भाऊ : कवी शिवराम किंकर; नभामा., जून १९६६; पृ. २८–३०.

**शिवरामगुरु (माधव)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बोधपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० शिवराम पूर्णानंद** – पहा **शिवरामस्वामी (कल्याणीकर).**

**शिवरामबाबा कहाते** [का. अनु.] कवी. राहणारे रामटेकचे. ह्यांचे नाव नागपूर प्रांतात भक्तकवी म्हणून ऐकू येते (मसा., आ. ५, पृ. १०००).

**शिवरामबुवा** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – १. मुद्रिका; काइसं.; २. रामजन्म; काइसं.; ३. शिवगाथा; स्वतंत्रपणे मुद्रित; ४. संतमालिका; महा. कवि;
**अमु.** – १. मार्तंडविजय; २. सत्योद्धार; संककासू., पृ. १०९.

**शिवराम मुनीश्वर** [अंदाजे इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] कवी. हे तापसी होते. रत्नागिरी जिल्ह्यातील वेंगुर्ले तालुक्यातील आचरे गावच्या रामेश्वराच्या देवस्थानात ह्यांचा रहिवास असे, अशी ह्यांच्याविषयीची माहिती *लघुकाव्यमाले*चे संपादक वा. दा. ओक देतात. (अकलकामा., भा. २, पृ. ९५ तळटीप).

*निःसन्देहदिवाकर* (ओ. सं. ९०) ह्या अध्यात्मपर ग्रंथाची रचना ह्यांनी केली आहे (मु. : अकलकामा., भा. २, पृ. ९५–१०१). शिवरामस्वामी कल्याणीकरांच्या नावावरही ह्याच ग्रंथाची नोंद झालेली आढळते. त्यामुळे हा ग्रंथ कोणत्या शिवरामांचा ते खात्रीपूर्वक सांगता येत नाही.

**शिवरामशास्त्री सुखठणकर** [का. अनु.] कवी. हे गोमंतक प्रांतातील माशेल गावचे राहणारे. ह्यांची सर्व ग्रंथरचना भारदस्त आणि प्रौढ आहे. ह्यांच्या काव्यग्रंथात *वेदान्तचूडामणी समश्लोकी* व *संध्यामंत्रार्थदीप* हे दोन अप्रकाशित ग्रंथ महत्त्वाचे आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नायक, ना. भा. : शिवरामशास्त्री सुखठणकर; गोमका., रिवण (गोवे); १९६९; पृ. २६.

**शिवरामस्वामी (कल्याणीकर) / ० शिवराम पूर्णानंद / ० पूर्णानंदानुचर** [अंदाजे श. १५५४/इ. स. १६३२ – श. १६११/इ. स. १६८९] संतकवी. पैठणकर एकनाथमहाराज ह्यांचे पणतू. एकनाथमहाराजांची

एक मुलगी गंगा (सासरचे नाव गोदावरी) ही गदगजवळील डंबळ ह्या गावचे रहिवासी व त्यांचेच अनुग्रहित बाळकृष्णपंत ह्यांस दिली होती. ह्या गोदावरीस लक्ष्मी नावाची एक मुलगी होती. तिचा विवाह गुलबर्गा जिल्ह्यातील, माणिकनगरापासून दक्षिणेस आठ कोस अंतरावर असलेल्या महागाव येथील काश्यपगोत्री, आश्वलायनशाखी, ऋग्वेदी ब्राह्मण ग्रामजोशी तिमण्णा दीक्षित ह्यांचे पुत्र नारायण ह्यांच्याशी शके १५१७–१८ च्या सुमारास करून देण्यात आला होता. तिमण्णा आपले बंधू रामभट ह्यांजकडे घरदार व जोशीपण ही सोपवून काशीक्षेत्री वास्तव्य करून असत. विवाहानंतर नारायण दीक्षित शके १५२१–२२ च्या सुमारास आपल्या आईवडिलांस भेटण्यासाठी काशीस गेले. (त्यांची पत्नी लक्ष्मीबाई डंबळासच राहिली.) तेथे आनंदसंप्रदायी सदानंदस्वामींच्या परंपरेतील ब्रह्मानंदस्वामी ह्यांच्या दर्शनास गेले असता त्यांचा आध्यात्मिक अधिकार पाहून ते प्रभावित झाले व त्यांचा अनुग्रह नारायणांनी घेतला. गुरूने त्यांचे नाव पूर्णानंद ठेवले. घरी, डंबळास, न परतता काशीसच राहून ते उपासनेत सर्व काळ कंठू लागले. "पुढें लक्ष्मी वयांत येऊन आपल्या पतीच्या भेटीची ती उत्कंठेनें वाट पाहूं लागल्यामुळें तिचे वडील बाळकृष्णपंत व पूर्णानंदांचे (नारायणाचे) चुलते रामभट काशीस गेले व पूर्णानंदांना (नारायणांना) घेऊन डंबळास आले. पूर्णानंद शके १५३२ च्या सुमारास डंबळास आले. ते शके १५३४ पर्यंत तेथें होते असें वाटतें. पुढें ते आपल्या गुरूचें दर्शन नेहमीं घडावें ह्या इराद्यानें रामेश्वर ते काशी अशा यात्रा करूं लागले. ह्या प्रकारें सात यात्रा झाल्या. लक्ष्मी त्यांच्याबरोबर सर्व यात्रांना होती." (ना. ब. जोशी; *साहित्यसंशोधन मंजिरी*, पृ. १६). लक्ष्मीबाईला तिम्मण, कृष्णाबाई, अनंत, विवेकम्मा, राम, गोदूबाई व शिवराम अशी सात अपत्ये होती. शिवराम हे सर्वांत धाकटे. शिवरामांच्या जन्मानंतर नारायण पूर्णानंद हे कल्याणी (ता. हुमनाबाद, जि. बिदर) येथे स्थिर झालेले दिसतात.

आनंदसंप्रदायाचे मूळ पुरुष किंवा प्रवर्तक जे सदानंदस्वामी त्यांची माहिती ह. शि. मंकाल ह्यांनी लिहिलेल्या *शिवराममहाराज चरित्रात* ह्याप्रमाणे दिली आहे. "निजाम इलाख्यांत गुलबर्ग्याजवळ कल्याण (कल्याणी) म्हणून एक वीरशैव लोकांचें क्षेत्र आहे. त्या ठिकाणीं सुमारें पांचशें वर्षांपूर्वीं (बहुधा शके तेराशेंच्या उत्तरार्धांत व चवदाशेंच्या पूर्वार्धांत) सदानंदस्वामी ह्या नांवाचे एक सुप्रसिद्ध योगी (उत्तर भारतांतील एक तपस्वी ब्राह्मण) होऊन गेले. हे योगीराज काशीविश्वेश्वराचे कट्टे भक्त असल्यामुळें ह्यांनीं बरेचसे दिवस काशीक्षेत्रीं श्रीविश्वनाथाच्या आराधनेंत व अनुष्ठानांत घालविले. ह्यांची कडकडीत तपश्चर्या, अढळ भक्ति व चिकाटी पाहून तो भोळा शंकर प्रसन्न होऊन 'वरं ब्रूहि' म्हणाला. सदानंद योग्यांनीं 'माझ्यावर अनुग्रह करा' अशी त्या भोलानाथ श्रीजवळ याचना केली. परंतु ह्या कलियुगीं प्रत्यक्ष अनुग्रह वर्ज असल्यामुळें 'तूं थेट कल्याणास जा व ज्या ठिकाणीं 'दत्त' असा आवाज तुझ्या कर्णरंध्रांत पडेल त्या ठिकाणीं प्रत्यक्ष अत्रिसुतच तुजवर अनुग्रह करतील' असें सांगून तो भोळा शंकर गुप्त झाला. श्रीविश्वनाथाचो आज्ञा शिरसावंद्य मानून सदानंदांची स्वारी कल्याणास जाण्यास निघाली. कांहीं दिवस मार्गक्रमण केल्यानंतर कल्याणीजवळच एके ठिकाणीं 'दत्त' असा आवाज त्यांच्या कर्णपटलावर पडतांच त्यांनीं मागें वळून पाहिलें; तों एक सर्प फूत्कार सोडीत आपणाकडेच येत असल्याचें त्यांना आढळून आलें. योगिराजांनीं त्या भयानक सर्पाचें खरें स्वरूप आपल्या अंतर्दृष्टीनें ओळखून त्याची करुणा भाकण्यास सुरुवात केली. स्वामींचा निर्मल भाव, शुद्ध अंतःकरण व निःसीम भक्ति पाहून त्या सर्पानें आपलें खरें स्वरूप (अवधूतरूप) व्यक्त करून स्वामींस उपदेश केला व कल्याणीस जावयास सांगितलें. कल्याणीस गेल्यावर 'रामानंद' ह्या नांवाचे एक परमप्रिय शिष्य त्यांना लाभले." —ह. शि. मंकाल; *शिवराममहाराज* ह्यांचें *संक्षिप्त* चरित्र; १९२३; पृ. ३–५.

शिवरामस्वामींची गुरुपरंपरा आनंदसंप्रदायी असून, त्यांनी ती आपल्या *गीताचंद्रिका* ह्या ग्रंथाच्या आरंभी पुढीलप्रमाणे दिली आहे: ईश (शिव) > दत्त > सदानंद > रामानंद > निर्मलानंद ऊर्फ अमलानंद > गंभीरानंद > ब्रह्मानंद > सहजानंद > पूर्णानंद > ब्रह्मानंद > नारायण ऊर्फ पूर्णानंद > सदानंद ऊर्फ शिवरामस्वामी. ह्याच ठिकाणी त्यांनी म्हटले आहे: "आदिनारायण गुरु अवतार दाहा रचुनि नटुनी। प्रकटला धरुनीच हा अवतार अकरावा ॥ २६ ॥" त्यापुढे शिवरामस्वामींनी आपल्या आईच्या माहेरचीही गुरुपरंपरा सांगितली आहे ती अशी: "...लक्ष्मी विराजित येकनाथ परंपरा ऐका ॥ २६ ॥ . . . मुख्य आदी शिवगुरु मग दत्त योगीराज बरवा। चन्द्र आश्रम या जनींच जनार्दनु जाणा ॥ २७॥ येक नायक तोचि जाला बालकृष्णचि होउनि। लक्ष्मीसि स्वपदीं ठेविलें नारायणाकार ॥ २८ ॥ तेचि लक्ष्मी माय हो स्वपरंपरा रूप चिन्हें। प्रत्यक्ष गोदा आपण जाली कन्यकारूपें। मेरु सहजानंद नारायण गुरु स्वपरंपरामंदार येकोबाचि लक्ष्मी संप्रदायाची ॥ २९ ॥ येकरूपा भूमिका तेथें सहज तें बीज पडतां। तेथ ह्या शिवराम अंकुर सूक्ष्म अंकुरला। भक्ति गोदेच्या जळें हा वाढता वाग्पुष्पमूळीं। सुफळ हा गीतार्थ कैसा सुफळितू फळला ॥ ३० ॥"

शिवराम ह्यांना त्यांच्या वयाच्या पाचव्या वर्षापर्यंत वाचा फुटली नव्हती. ती फुटावी ह्यासाठी त्यांच्या आईने पंढरपूरच्या पांडुरंगास नवस केला होता. पांडुरंग त्या नवसास पावला. पांडुरंगाच्या कृपेने लवकरच त्यांना वाचा फुटून ते विद्याभ्यास करू लागले. पुढे हा नवस फेडण्याच्या निमित्ताने पंढरपुरास ते आपली बहीण गोदावरी हिजबरोबर गेले असता त्या काळचे विजापूरनिवासी प्रसिद्ध विद्वान परमभागवत व साक्षात्कारी संत रुक्मांगदपंडित ह्यांच्या भेटीचा योग त्यांना आला. शिवरामांच्या आयुष्यातील ही एक महत्त्वाची घटना होय. रुक्मांगदपंडित हे विजयविठ्ठलाचे उपासक होते. विजापुरात आपल्या ह्या परमप्रिय दैवताची स्थापना करून तेथे त्यांनी जणू प्रतिपंढरपूर निर्माण केले होते. त्यांची भजने, वेदान्तावरील प्रवचने व कीर्तने ह्यांयोगे विजापूर नगर सदा दुमदुमून गेलेले असे.

शिवरामस्वामी व रुक्मांगदपंडित ह्यांच्या भेटीचा योग शके १५६८ च्या आषाढ शुद्ध एकादशीच्या शुभदिनी आला. पंढरीतील प्रल्हादबुवा बडवे व भक्तजन ह्यांच्या आग्रहावरून रुक्मांगदपंडित पंढरीस आले होते. एकादशीस पांडुरंगाचे दर्शन घेतल्यानंतर तीन दिवस त्यांनी देवळात कीर्तन केले. ह्या कीर्तनास शिवराम व त्याची बहीण गोदावरी ही दोघेही उपस्थित होती. ह्या वेळी शिवरामांचे वय चौदा असून ते विवाहित होते. वयाच्या दहाव्या वर्षी त्यांचा विवाह झाला होता. त्यांच्या पत्नीचे नाव पार्वती. हनुमदात्मज ह्या आनंदसंप्रदायी कवीने रचलेल्या *पूर्णानंदचरित्र* ह्या ग्रंथात (र. श. १७५३, खरनाम संवत्सर; अ. ११ व १२) शिवरामांच्या पंढरपुरातील ह्या वास्तव्यासंबंधीची जी हकीकत कथन केली आहे तिच्यात 'कीर्तनानंतर घरीं गेल्यावेळीं इकडे गोदावरीस शिवरामांस रुक्मांगदपंडितांच्याकडे विद्याभ्यासार्थ घेऊन जाण्याबद्दल व तिकडे रुक्मांगदांना शिवरामांना शिकविण्याबद्दल स्वप्नांत पांडुरंगानें सांगितलें होतें. त्याप्रमाणें गोदावरी शिवरामांना घेऊन रुक्मांगदांचे बरोबर विजापुरास आली' अशी एक आख्यायिका सांगितली आहे. तिच्यातील चमत्काराचा भाग वगळता शिवराम काही काळ विजापुरास रुक्मांगदांकडे शिक्षणार्थ राहिले होते ही वस्तुस्थिती आहे. मुकुंदराजांचा *विवेकसिंधु* व ज्ञानदेवांची *ज्ञानदेवी* ह्या ग्रंथांचे अध्ययन त्यांनी रुक्मांगद पंडितांच्या मार्गदर्शनाखालीच

केले. वेदान्तविषयाची गोडी रुक्मांगदांच्या सांनिध्यात त्यांना प्रथम लागली. श्रीशंकराचार्यांच्या ग्रंथांच्या अभ्यासाने ती पुढे अधिकाधिक वाढत गेली.

शिवराम विजापुरास रुक्मांगदपंडितांजवळ दोन वर्षे राहिले असावेत. तेथून कल्याणीस परत आल्यावर त्यांचा दुसरा विवाह कावेरी नावाच्या मुलीशी झाला. त्यानंतर ते कल्याणी येथे कायमचे वास्तव्य करून राहिले. आपल्या दोन भार्यांच्या सहकार्याने कल्याणी येथे प्रपंच व परमार्थ ही दोन्ही त्यांनी उत्तम साधली. *पूर्णानंदचरित्रा*चा कर्ता हनुमदात्मज ह्याने आपल्या ग्रंथात शिवरामांच्या भार्या जणू आदि-शक्तीच होत्या, "स्वानुभूती ते पार्वती । निजशांती ते कावेरी सती । ऐसे दोघी भार्या निश्चिती ॥" (अ. १५) असे त्यांच्याविषयी गौरवोद्गार काढले आहेत.

शिवरामांनी त्यांच्या द्वितीय विवाहानंतर लगेच केव्हातरी आपले वडील नारायण दीक्षित ऊर्फ पूर्णानंद ह्यांजकडून आनंदसंप्रदायाची मंत्रदीक्षा घेतली असावी. त्यांना सदानंद हे सांप्रदायिक नाव ठेवण्यात आले होते. पण ते त्यांनी आपल्या काव्यात न वापरता शिवराम पूर्णानंद हेच नाव वापरले आहे. पूर्णानंदांच्या समाधीनंतर त्यांचे सांप्रदायिक कार्य ह्यांनी धडाडीने चालविले व लेखनही विपुल केले. मराठी १३६ व संस्कृत ३ असे लहानमोठे अनेक ग्रंथ त्यांच्या नावावर आढळतात. त्यांतील बहुसंख्याक त्यांच्या कल्याणी येथील मठात व काही मराठवाडा विद्यापीठ व बिदर येथील मठ ह्यांत संग्रहित केलेले आहेत. ह्याशिवाय कल्याणीपासून पश्चिमेस पंचवीस कोसांवर असलेल्या येक्केहाळी मठात व दक्षिणेस पंधरा कोसांवर असलेल्या आपचंद मठात जो ग्रंथसंग्रह आहे त्यात शिवरामस्वामींची कितीतरी नवीन कविता आहे, असे रामदासी वाङ्मयाचे संशोधक शं. श्री. देव ह्यांनी लिहून ठेविले आहे. एवढ्या प्रचंड रचनेतून अवघ्या १३ रचनांना मुद्रणयोग लाभलेला दिसतो. शिवरामस्वामींच्या रचनेपैकी बहुसंख्य रचना श्रीशंकराचार्यांच्या रचनेचा अनुवाद किंवा तिजवरील टीका अशा स्वरूपाची आहे. आचार्यांचे तत्त्वज्ञान मराठीतून सांगणे हेच ते आपले जीवितकार्य मानीत. त्यांनी केलेली रचना विविध वृत्तांतील आहे. स्वामींनी पदेही विपुल रचलेली आहेत. त्यांनी काही पदे हिंदी व कानडी ह्या भाषांतही रचली. टीकात्मक रचनेखेरीज देवतांच्या जन्मकथा, त्यांची लीलावर्णने, स्तोत्रे, आरत्या अशी रचनाही त्यांनी विपुल केलेली आहे. ते कित्येकदा आपल्या काव्यात स्वतःचा उल्लेख 'नारायणानुचर', 'पूर्णानंदनारायणानुचर', 'पूर्णानंदानुचर' असा करतात.

शिवरामस्वामींनी ग्रंथरचनेस प्रारंभ कोणत्या वर्षापासून केला हे, *भागवत एकादशस्कंध* (श. १६०४), *गीताचंद्रिका* (श. १६०५), *अध्यात्मरामायण* (श. १६०७) ह्या ग्रंथांचे अपवाद वगळल्यास, कालोल्लेखाच्या अभावी, निश्चितपणे सांगता येत नाही. *पंचीकरण* ह्या एका ग्रंथाचा काल मात्र विशिष्ट घटना लक्षात घेऊन सामान्यपणे ठरविता येतो. श्रीसमर्थ रामदास शके १५८१ (इ. स. १६५९) मध्ये केशवस्वामी ह्यांच्या भेटीस भागानगर (हैद्राबाद) येथे गेले असता वाटेत त्यांनी कल्याणी येथे थांबून शिवरामस्वामी ह्यांची भेट घेतली. त्यावेळी त्यांनी श्रीसमर्थांस आपण रचलेले ग्रंथ दाखविले. त्यांत *पंचीकरण* हा गद्य ग्रंथ होता. तो पाहून श्रीसमर्थ शिवरामस्वामींस म्हणाले : "शिवराम ! पंचीकरण पांचचार प्रकारचीं असून बालबोध पंचीकरण करावें असा आमचा संकल्प होता. पण तुमचें पंचीकरण पाहून आमचा बहुत संतोष जाहला. अतःपर आम्ही पंचीकरण करीत नाहीं. तुम्हीं केलें तेंच आमचें आहे." – ल. रा. पांगारकर, मवाइ., खं. ३, पृ. ५२३–५२४. शिवरामस्वामी व श्रीसमर्थ रामदास ह्यांची ही भेट शके प्लवनाम संवत्सरी झाली. त्यावरून *पंचीकरण* (गद्य) ग्रंथ ह्या वर्षापूर्वी केव्हातरी रचला गेला असावा, एवढेच निश्चितपणे म्हणता येते. त्यावेळच्या मोगलाई प्रांतातील ह्या संतकवीची ख्याती सातारा प्रांतातील श्रीसमर्थ रामदासांसारख्या दुसऱ्या एका संताच्या कानापर्यंत पोचण्यास मोगलाईतील शिवरामस्वामींचे समकालीन संतकवी केशवस्वामी भागानगरकर व सातारा प्रांतातील रंगनाथ निगडीकर हे दोघे प्रामुख्याने कारण झाले असावेत. केशवस्वामी व रंगनाथ हे श्रीसमर्थांच्या अंतरंग-स्नेह्यांपैकी होते हे सर्वश्रुतच आहे. रामदासपंचायतनात हे दोघेही मोडत. केशवस्वामींप्रमाणेच रंगनाथ निगडीकर हेही शिवरामस्वामींचे जिव्हाळ्याचे स्नेही होते. ते शिवरामस्वामींचे गुरुबंधू बोपाजीपंत ऊर्फ निजानंद ह्यांचे पुत्र. बोपाजीपंतांनी शिवरामस्वामी ह्यांचे वडील नारायण पूर्णानंद ह्यांजकडून सांप्रदायिक मंत्रदीक्षा घेतलेली होती. रंगनाथांना त्यांच्या पित्याकडूनच आनंदसंप्रदायाची दीक्षा मिळाली होती.

शिवरामस्वामींना रुक्मांगदपंडित व वडील नारायण पूर्णानंद ह्यांचे सांनिध्य जेवढा काळ घडले तेवढ्या काळात त्यांनी उभयतांकडून आध्यात्मिक संपदा बहुत मिळविली. आध्यात्मिक संपदेबरोबरच त्यांना भौतिक संपदाही लाभली होती. पहिली संपदा त्यांनी आपल्या जीवनात मुरविली तर दुसरीचा त्यांनी अलिप्ततेने उपभोग घेतला. प्रपंचात राहूनही निरिच्छ, निःस्पृह व निर्लोभ वृत्तीने ते वागत असलेले आढळत. पुढील एकच घटना त्यांच्या ह्या वृत्तीची साक्ष देण्यास पुरेशी आहे : केशवस्वामींच्या आग्रहावरून ते एकदा भागानगरास गेले होते. त्यावेळेस, शिवरामस्वामींच्या आध्यात्मिक अधिकाराची हकीकत ऐकून गोवळकोंड्याचा अखेरचा पादशहा तानाशा त्यांच्या भेटीस गेला. ह्या भेटीचा त्याच्या मनावर फार मोठा परिणाम होऊन त्याने त्यांचा सन्मान करण्याच्या इच्छेने त्यांना कल्याणीसह दहा गावांची जहागीर प्रदान करण्याची आपली इच्छा व्यक्त केली. शिवरामस्वामींनी जहागीर स्वीकारण्याचे विनयपूर्वक नाकारले आणि म्हटले : 'तूं आम्हांसी देसी जहागीर । तरी तो गाव असे उर्वीवर । आमुचें जागीर चराचर । नेमिलासे श्रीहरि ॥ ७५ ॥ तुमचे जाहगिरीस असे आदि अंती । आमुच्या जाहगिरीस नाश नसे कल्पांतीं । ते अज अव्यय आम्हाप्रती । जाहागीर नेमिले सद्गुरु ॥ ७६ ॥ आम्ही केवल फकीर लोक । आमुचे जाहगीर भीक्षाच देख । त्याविन्हा काही हरिख । आम्हास नसे जी पादशा ॥ ७७ ॥' (हनुमदात्मजकृत *पूर्णानंदचरित*, अ. १५).

शिवरामस्वामींनी रचलेल्या ग्रंथांत *भागवत एकादशस्कंध टीका*, *गीताचंद्रिका* [⇨ ३], *अध्यात्मरामायण*, *पंचीकरण*, *शिवकथामृत*, *अष्टावक्रगीता* हे ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत.

*भागवत एकादशस्कंधा*वरील टीका त्यांनी आपले वडील व गुरू पूर्णानंद ह्यांच्या इच्छेवरून लिहावयास घेतली. मूळ संस्कृत श्लोकाचा मराठीत चार ओळींत श्लोकात्मक अनुवाद द्यावयाचा अशा पद्धतीने १४६८ श्लोक (मूळ संस्कृत *एकादशा*तील श्लोकसंख्या १३६७ आहे) रचले गेले आहेत. मात्र, हा अनुवाद शब्दशः केलेला नाही. किंबहुना तो स्वैर भावार्थ आहे असे म्हणणे वस्तुस्थितीस धरून होईल. उदाहरणार्थ, खालील संस्कृत श्लोक व त्यांच्या आधारे शिवरामस्वामींनी रचलेले मराठी श्लोक पहा : "विसृजति हृदयं न यस्य साक्षाद्धरिरवशाभिहितोऽप्यघौघनाशः । प्रणयरशनया धृताङ्घ्रिपद्मः स भवति भागवतप्रधान उक्तः ॥ २.५५ ॥" – "स्मरण सहज केल्या जो महादोष वारी । जिहिं हृदयिं हरी तो बांधिला प्रेमदोरीं ॥ अढळ मग निजेला त्यांचिया चित्तसेजे । म्हणुनि सकळ लोकीं धन्य ते योगिराजे ॥" किंवा, "तं तत्र तिग्मद्युभिरायुधैर्वृतं, ह्यश्वत्थमूले कृतकेतनं पतिम् । स्नेहप्लुतात्मा निपपात पादयो, रथादवप्लुत्य स बाष्पलोचनः ॥ ३०.३२ ॥" – "तो तेथें घनसांवळा चहुंभुजीं दिव्यायुधें शोधला । त्या अश्वत्थतरूतलीं झलकतू वीरासनीं बैसला ॥

प्रेमें देखुनिया रथींहुनि उडी घालूनि तो सारथी । नेत्रीं बाष्प शरीर कंप थरके तो वंदिला गोपती ॥ ४४ ॥". हा ग्रंथ 'भाद्रपद वद्य ११, क्षय नाम संवत्सर, शके १६०४' रोजी पूर्ण झाला. ह्या ग्रंथाच्या शेवटच्या अध्यायातील खालील श्लोक ग्रंथटीका व ग्रंथकार ह्यांसंबंधी बरेचसे काही सांगून जातात. हे श्लोक खालीलप्रमाणे : " . . . । श्रीयेकनाथ दिवटा त्रिजगीं उदेला ॥ ३९ ॥ येकादशाचा निज दाउनी दिवा । नेला स्वधामासि त्रिलोक आघवा । तो नातिच्या वाक्य अगत्य मानुनी । श्लोकोक्ति बोले शिवराम होउनी ॥ ४० ॥ मायेचा जो पाहतां आजि आजा । तो हा येका जाहला बाप माझा । आंगें येथें पालटी नांवरूपा । श्लोकीं श्लोकें दाखवी अर्थदीपा ॥ ४१ ॥. . कोणी म्हणे तो शिवराम टोणपा । पाहा अनुष्ठान बसेचिना जपा । उगेंचि नुस्तें मिळऊनि पोरटीं । नाचे उडे गाय करीत चाउटी ॥ ४५ ॥ कितेक येऊनि समीप वंदिती । भला जिवन्मुक्त म्हणोनि वानिती । निंदूनियां जाचिति वंदिती स्तुती । दोघे मला सद्गुरुरूप निश्चिती ॥ ४६ ॥ . . . क्षय करुनि विकल्पा भद्रपीठा विलक्षी । त्यजुनि सकल धंदा लागतां कृष्णपक्षी । अति अमल दिनीं हो पूर्ण येकादशीचें । निरुपण मग जालें जाण येकादशाचें ॥ ५२ ॥ कल्याणधानीं शिवराम योगी । हे संपवी भागवत प्रसंगीं । वक्तया जनाला श्रवणार्थ याला । कल्याण हो सर्वहि भाविकाला ॥ ५३ ॥ पूर्णानंदगुरूपतापचि दुजें साहेचिना बोलणें । मूकाला श्रुतिगम्य बोलवितसे अंधासि दिव्यांजनें । दावी आत्मनिधान ते प्रतितिसी आलें मला भाविका । बोले श्री शिवराम होउनि स्वयें येकादशाची टिका ॥ ५४ ॥"

"*गीताचंद्रिका* हा शिवरामस्वामींचा गीतेवरील टीकाग्रंथ असून त्यांनीं प्रत्येक श्लोकाखालील टीकेंत *ज्ञानेश्वरीं*तील शब्द व वाक्यें उतरलीं आहेत. प्रत्येक श्लोकाच्या टीकेंत *ज्ञानेश्वरीं*तील त्या त्या श्लोकाच्या टीकेंतील शब्द व उपमा दिल्या आहेत. हा ह्या टीकेचा विशेष आहे. प्रस्तावांतील नमन सुद्धां *ज्ञानेश्वरीं*तून घेतलें आहे. एकनाथी परंपरेत ज्ञानेश्वरीचा अर्थ कसा करीत असत, तें कित्येक स्थलीं प्रस्तुत टीकेवरून स्पष्ट कळतें. " (वि. का. राजवाडे, भाइसं-मंइति., श. १८३३, पृ. ५६). "*गीताचंद्रिके*चा सुरुवातीचा भाग म्हणजे *ज्ञानेश्वरीं*तील गणपती, शारदा वगैरेंचा भागच निराळ्या पद्धतीनें ज्ञानेश्वरांच्याच शब्दांत आहे. . . . पुढें पांचवे ओवींत आपला 'कुलपती' गणपती दशभुजांचा आहे असें म्हणून त्याचे आणखी चार हातांत निराळीं चार आयुधें दिलीं आहेत. नंतर शुंडाशुंड, द्वैताद्वैत कुंभ वगैरे सर्व *ज्ञानेश्वरीं*तील वर्णनाप्रमाणेंच वर्णन आहे. इतिहासाचार्य राजवाडेंनी ह्या वैशिष्ट्याकडे संशोधकांचें लक्ष वेधलें आहे. . . सबंध *गीताचंद्रिकाच ज्ञानेश्वरीं*तील शब्दांतच लिहिली आहे. वास्तविक शिवरामस्वामींनीं शंकराचार्यांच्या *गीताभाष्याचें* भाषान्तर करावयाचें, पण तसें न करतां त्यांनीं *ज्ञानेश्वरी*च्याच शब्दांत *गीताचंद्रिका* कां लिहिली अशी शंका येणें साहजिकच आहे. त्याचें उत्तर हें आहे – एकनाथमहाराजांनीं *ज्ञानेश्वरीं*ची शुद्ध प्रत भाद्रपद व. ६ शके १५०६ (इ. स. १५८४) स सिद्ध केली. शके १६०५ (इ. स. १६८४) भाद्रपद व. ६ स ९९ वर्षे पूर्ण होऊन १०० वें वर्ष लागतें, त्या निमित्तानें शिवराम पूर्णानंदांनीं *गीताचंद्रिका* लिहिण्यास सुरुवात करून मार्गशीर्ष व. ७ स गुरुवारीं पूर्ण केली. ह्या *गीताचंद्रिके*च्या विशिष्ट पद्धतीच्या रचनेनें शिवराम पूर्णानंदांचें नाथमहाराजांवरील प्रेम, शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार (ज्ञानेश्वरमहाराजांनी भाष्यकारांना वाट पुसली ती म्हणजे शंकराचार्यांनाच अशीच त्यावेळीं श्रद्धा होती), *ज्ञानेश्वरी*वरील श्रद्धा, *ज्ञानेश्वरी*च्या नाथकृत शुद्ध प्रतीचें शंभराव्या वर्षांत पदार्पण व गीतांचें मराठी रूपान्तर ह्या सर्वच गोष्टी ह्यांत साधल्या आहेत." – ना. ब. जोशी, 'शिवराम पूर्णानंदांची गीताचंद्रिका व ज्ञानेश्वरी'; साहित्य संशोधन मंजिरी, १९७३, पृ. २–४.

*अध्यात्मरामायण* हा *ब्रह्मोत्तरखंड पुराणा*तील उमा-महेश-संवादाचा ओवीबद्ध असा जवळजवळ अनुवाद आहे. ह्याची सात कांडे असून अध्याय पासष्ट आहेत. *अध्यात्मरामायणा*चे मूळ संस्कृत श्लोक सुमारे ४००० आहेत. शिवरामस्वामींच्या प्रस्तुत ग्रंथातील ओवीसंख्या ५४६८ आहे. सातव्या खंडात ग्रंथाचा शेवट त्यांनी पुढीलप्रमाणे केला आहे : "संत नामावळी बहुत । त्यांतही चित्तासी जे आवडत । ते ज्ञानदेव नामदेव येकनाथ । रंगीं रंगनाथ निजानंदीं ॥ ११० ॥ यास्तव ज्ञानेश्वर समर्थ । स्वयेंचि होऊनि कोनेरीनाथ । श्रीरामायण अस्ताव्यस्त । रूपा येथें आणिलें ॥ १११ ॥ शके १६०७ सोळाशहे सातोत्तर । तैं टीका केली शिवरामेश्वर । कोनेरीबाबा सादरें । जाला विचारलेखकु ॥ ११२ ॥"

शिवरामांनी पद्यात्मक रचनेप्रमाणे गद्यरचनाही केलेली आढळते. *पंचीकरण* हे गुरु-शिष्य-संवादात्मक प्रकरण त्यांनी गद्यात लिहिलेले आहे. ह्या प्रकरणातील शेवटच्या काही ओळी त्यांच्या गद्यलेखनाचा, त्याचप्रमाणे त्यांच्या काळातील लेखनसरणीचा एक नमुना म्हणून येथे देतो : "ते मूळमाया शुद्ध चैतन्यी मिळाली यावरी मगचि तु होवोनि र्निविकल्प स्फुरणातील स्फुरणे राहातोसि होय की ॥ तरि होय स्वामी ॥ स्वामीचे कृपेने माझे म्या आत्मस्वरूप वळखुन उत्पती स्थिति प्रळय प्रत्यक्ष म्या पाहिले ॥ आता स्वामीच्या उपकारासि काय उत्तिर्ण होऊ म्हणोनि प्रेमाचे निर्भरे सद्गदित होउनि साष्टांग प्रणिपात केला स्वामीनी त्यासी हृदयी धरुनि आलगिले ॥ म्हणू लागले कि बापा हे स्थिति जिरवावया काही येक सांगतो ऐक संमती शंकराचा याची वेदवचन येणेरीतीने जाणोनि राहणे ॥"

शिवरामस्वामींचे आराध्यदैवत श्रीशिव हे होते. *शिववेल* ह्या प्रकरणात त्यांनी म्हटले आहे : "नाहींच वियोग शिवाचा मजला । एकाकार झालों शिवरूप ॥ ९८ ॥ ऐसा कोणी नाहीं शिवजीसारखा । जेणें आत्मसखा भेटविला ॥ ९९ ॥ भेटता आणि भेटी भेटणें न दिसे । स्वयं शिव भासे आत्मरूप ॥ १०० ॥ आत्मा अंतरींचा जीवाचें जीवन । प्राणाचाही प्राण शिवदेवो ॥ १०१ ॥ . . . . . वेळोवेळां मज बोलतां चालतां । शिवरूपीं ममता लागली हे ॥ १०५ ॥ लागलें शिवसुख आवडी वाढली । ओळंगू लागली मोक्षलक्ष्मी ॥ १०६ ॥ लक्ष्मीचे कडीये नारायण पढिये । शिव आवडीचे वानूं किती ॥ १०७ ॥" अशा ह्या त्यांच्या आवडीच्या आराध्यदैवताची कथा *शिवकथामृत* ह्या नावानेही त्यांनी लिहिली आहे. *स्कंदपुराणां*तर्गत *ब्रह्मोत्तरखंडा*तील *शिवमाहात्म्या*वर बावीस अध्याय रचून केलेले हे शिवकीर्तन आहे. ग्रंथसमाप्तीच्या प्रसंगी ते लिहितात : " ब्रह्मोत्तरखंडींचें निरूपण । पूर्णानंद वक्ता जाण । शिवरामाचें निमित्त करून । चालवी असाधारण शिवकथा ॥ ७८ ॥ " ह्यात त्यांनी ओवी, पद, श्लोक इत्यादींचा भरपूर उपयोग केला आहे. शिवकथेवर इतका विस्तृत रचलेला हा मराठीतील पहिलाच ग्रंथ. त्यानंतर श्रीधरकृत ओवीबद्ध *शिवलीलामृत* (श. १६४०) व मोरोपंतकृत आर्याबद्ध *ब्रह्मोत्तरखंड* (श. १६७५) हे ग्रंथ रचले गेले. ह्या तीन ग्रंथांपैकी *शिवलीलामृत* ग्रंथाने त्यातील रसाळपणा, माधुर्य व वर्णनवैचित्र्य ह्या गुणांच्या योगे अपार लोकप्रियता मिळविली; पारायणास योग्य अशा ग्रंथांत त्याने स्थान मिळविले. शिवरामस्वामींच्या किंबहुना मोरोपंतांच्याही ग्रंथास तशी लोकप्रियता लाभली नाही.

शिवरामस्वामींनी *अष्टावक्रगीता* ह्या प्रसिद्ध अद्वैतवेदान्तपर ग्रंथाचा केलेला समश्लोकी अनुवाद (श्लो. सं. ३०२) वाखाणण्यासारखा आहे. संस्कृतातील श्लोकाचा सर्व अर्थ थोडक्यात व सुबोध रीतीने एकाच श्लोकात आणण्याची स्वामींची हातोटी किती विलक्षण आहे ह्याचा एक मासला पहा :

[संस्कृत] "सुखदुःखे जनामृत्यू दैवो देवेति निश्चियी ।

तृप्तः स्वस्थेंद्रियः नित्यं न वांछति न शोचति ॥
[म. अनु.] जे कां आपत्संपदें भासताति
प्रारब्धाच्या आश्रयें होत जाति।
हें जाणूनी स्वस्थ संतृप्त ना ना
प्राप्ताप्राप्ती मोह शोका शिवेना ॥
[संस्कृत] कृतं देहेन कर्मेदं न मया शुद्धरूपिणा।
इति चिंतानुरोधी यः कुर्वन्नपि न लिप्यते ॥
[म. अनु.] हें म्यां बरें कर्म अपूर्व केलें
पैं निंद्य तें कर्म म्हणोनि सांडिलें।
याही विकारासि मनासि नाणी
केलें तथापी न करीच तो मुनी ॥

शिवरामस्वामींची बहुसंख्य रचना संस्कृत ग्रंथांचे अनुवाद किंवा त्यांवरील विवरणे अशा स्वरूपाची आहे. निरनिराळ्या रागांत रचलेली भक्तिपर व अध्यात्मपर पदे हीच त्यांची अस्सल स्वतंत्र रचना. तीही विपुल आहे. *काव्यसंग्रह* ह्या मासिकात (*पदसंग्रह, भा. ३ मध्ये*) ह्यांची जी थोडी पदे छापलेली आहेत, त्यांतून नमुन्यादाखल दोन निवडून येथे दिली आहेत : "(१) आत्मा अनुभवी योगियां रे। भय कासयाचें ? ॥ ध्रु.॥ देहे अहंभाव त्यागें। मृत्यु सारोनियां आंगें। देव आपणचि झालिया। भय कासयाचें ? ॥ आत्मा० ॥ १ ॥ योग कर्माकर्म गाळी। ज्ञान संशयातें टाळी। आपुले ठायां आलिया। भय कासयाचें ? ॥ आत्मा० ॥ २ ॥ पूर्णानंद पूर्णपणीं। दुजयातें दृष्टी नाणी। शिवरामचि होउनि ठेलिया। भय कासयाचें ? ॥ आत्मा० ॥ ३ ॥ (२) संत दयाळ कसे ? । राजा रंक जया सरिसे ॥ ध्रु.॥ देउनि भेटी तोडिति माया। नेउनि दाविति निजपदठाया ॥ संत० ॥ १ ॥ श्रवणीं पाजुनि अमृतवाणी। नेउनि दाविति चिन्मयखाणी ॥ संत० ॥ २ ॥ शिवरामाचें अभिनव लेणें। लेवविलें मज पूर्ण कृपेनें ॥ संत० ॥ ३ ॥"

शिवरामस्वामींचा, त्यांच्या उत्तरकालात, तुकाराममहाराज देहूकर ह्यांचे चैतन्यसंप्रदायी गुरू बाबाजी ह्यांच्याशी केव्हातरी संबंध आला. योगविद्येतील त्यांचे नैपुण्य पाहून ते प्रभावित झालेले दिसतात. बाबाजींच्या देहावसानानंतर शिवरामस्वामी कल्याणीहून मान्यहाळ येथे जाऊन त्यांच्या समाधीपाशी काही काळ ध्यानधारणेत घालवीत असावे. त्या काळात त्यांना काही उच्चतर अनुभव आल्यामुळे बाबाजींच्या ह्या समाधीकडे ते बरेच आकर्षिले गेलेले दिसतात. बाबाजींना ते गुरुस्वरूप मानत होते त्यामुळे त्यांनी आपल्या आयुष्याच्या अखेरचे दिवस त्यांच्या समाधीच्या निकट राहून घालविले व समाधीही तेथेच घेतली. त्यांची समाधी कल्याणीऐवजी मान्यहाळ येथे भीमातटाकी आढळते ह्याचे रहस्य हेच असावे. शिवरामस्वामींची पुण्यतिथी वैशाख शु. तृतीयेस साजरी केली जाते. त्यांच्या समाधिकालाचे वर्ष मात्र ज्ञात नाही. त्यांच्या *अध्यात्मरामायणा*चा रचनाकाल इ. स. १६८५ आहे. ह्यावरून त्यांची समाधी त्यानंतरची असावी. शिवरामस्वामींच्या अप्रसिद्ध रचनेपैकी बरेच ग्रंथ मराठवाडा विद्यापीठ मराठी विभाग ह्यांच्या संग्रही आहेत. हे ग्रंथ विद्यापीठास सिद्धराज मठ महागाव (जि. गुलबर्गा), सदानंदमठ कल्याणी (जि. बिदर), हुताशनानंद महाराज, बिदर ह्यांजकडून उपलब्ध झाले आहेत.

**रचना : मु.** – १. अपराधस्तोत्र (समश्लोकी टीका); शंकराचार्यांच्या 'अपराधस्तोत्रां'चे समश्लोकी भाषांतर; कासं., क्र. ११७, सप्टें. १९०२; पृ. ३८–४०. २. अपरोक्षानुभव टीका; स्वतंत्रपणे मुद्रित. ३. अष्टोत्तरशतशिवबिल्वपत्री : शिवबेल; अभंगसंख्या ११०; रामतत्त्वप्रकाश छापखाना, बेळगाव. ४. गुरुगीताटीका. ५. पंचीकरण; संशोधक त्रैमा., व. ९, अं. १, पृ. १–८; अं. २, पृ. ९. ६. प्रबोधसुधाकर; मंकाल, शिवराम संगण्णा; पुणे, १९२२; ७. बोधामृत; श्लोकबद्ध; श्लो. सं. ५२; रामतत्त्वप्रकाश छापखाना, बेळगाव. ८. भक्तिमार्ग आह्निक; मंकाल, शिवराम संगण्णा; पुणे, १९२२. ९. भगवद्गीताचंद्रिका; संपा. भिडे, माधव गोविंद; पुणे, १९२४. १०. रामतुळशी; अभंगसंख्या ११०; प्र. रामतत्त्वप्रकाश छापखाना, बेळगाव. ११. लघुवाक्यवृत्ति टीका; श्लो. २०; कासं., क्र. १२७; पृ. १४८–१४९. १२. शिवकथामृत / शिवामृत (श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे कथाभागावरून); ओ. सं. १०६६; महा. कवि, क्र. २९, ३०, ३१. १३. संतमालिका; महा. काव्यग्रंथ ९, स्फुटसंग्रह भा. १; संपा. भावे, वि. ल.; ठाणे, श. १९०५; पृ. ९–१०. १४. स्फुट रचना – २५ पदे; अनेककविकृत पदे, कटाव, लावण्या वगैरे भाग – ३; मुंबई, १९०१, पृ. १८१–१८४, पृ. ४४–४८. **अमु.** – १. अद्वैत. २. अध्यात्मरामायण (ओवीबद्ध टीका); ७ कांडे, ६५ अध्याय, ओ. सं. ५४६८ (मूळ संस्कृत श्लोक ४०००); उपलब्ध : मराठ. वि. म. वि.; र. का. : "शके १६०७ सोळाशहे सातोत्तर। तैं टीका केली शिवरामेश्वर। कोनेरीबाबा सादरें। जाला विचारलेखकु ॥ ११२ ॥" (ह्या ग्रंथात शिवरामस्वामींनी ब्रह्मोत्तरखंड पुराणातील उमा-महेश-संवाद-रूपातील अध्यात्मरामायणाचा अनुवाद केला आहे). ३. अमृताष्टक. ४. अष्टावक्रगीताटीका (२० प्रकरणे). ५. अष्टोत्तरशत रामतुळशी. ६. आत्मबोध; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ७. आत्मबोधटीका. ८. आत्मसिद्धि. ९. आष्टावक्रगीता; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. १०. उत्तरगीताटीका (उत्तरगीता – पदे); तीन अध्याय उपलब्ध : हु. म., बिदर. ११. उद्बोधदीपिका; उपलब्ध : संककासू. १२. उपदेशक्रमपद्धति. १३. ऋग्वेदटीका (दोन अध्याय); उपलब्ध : हु. म., बिदर. १४. ऋषिपत्नी-आख्यान; उपलब्ध : हु. म., बिदर. १५. एकादशीकथा, द्वादशीकथा; उपलब्ध : हु. म., बिदर. १६. ॐकार. १७ कथाकामधेनु (अध्याय ६४, अठराही पुराणांचे ह्यात सार आहे); उपलब्ध : संककासू. १८. कपिलगीता; श्लोकबद्ध टीका. १९. कंसवध. २०. कालयवन. २१. कृत्यंकुर. २२. कृष्णकैशोरावस्थेवर पदे. २३. कृष्णकौमार्यावस्थेवर पदे. २४. कृष्णजन्म. २५. कृष्णतारुण्यावस्थेवर पदे. २६. कृष्णपौगंडावस्थेवर पदे. २७. कृष्णलीला. २८. गजगौरी. २९. गजेंद्रमोक्ष. ३०. गणपतिजन्म. ३१. गर्भगीताटीका. ३२. गीताचंद्रिका; र. श. १६०५ (येकेहाळी मठाच्या संग्रहात आहे); उपलब्ध : मराठ. वि. म. वि. (सत्कार्योत्तेजक सभा, धुळे ह्यांच्या संग्रही असलेली प्रत बेदरजवळील हसनाबाद येथील देशमुखाने श. १६७४ त केलेली आहे). ३३. गुरूची अष्टके – गुरुप्रशंसा. ३४. गुरुमहावाक्यपद्धति. ३५. गुर्विंशति. ३६. गुरुसांप्रदायपद्धति. ३७. गुर्वर्चन. ३८. गृहनिंदा. ३९. गोपाळकाला (स्फुट); उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ४०. गोपीगीत. ४१. चित्तनिंदा. ४२. जरासंधयुद्ध. ४३. दक्षिणामूर्तिस्तोत्र; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ४४. दक्षिणामूर्तिस्तोत्रटीका. ४५. देहनिंदा. ४६. दृक्दृश्यविवेक. ४७. द्रव्यनिंदा. ४८. धन्याष्टकसमश्लोकी; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ४९. नवरत्नमालिका; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ५०. नित्यविधिक्रम. ५१. निर्वाणदशक. ५२. निर्वाणदशकदीपिका; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ५३. निर्वाणषट्क. ५४. निःसंदेहदिनकर; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ५५. निःसंदेहदिवाकर. ५६. नृसिंहजन्म. ५७. पंचपदी प्रातःस्मरण. ५८. पंचीकरण; उपलब्ध : हु. म., बिदर. ५९. परशुरामजन्म. ६०. पुत्रनिंदा. ६१. प्रदोषपंचपदी. ६२. प्रबोधसुधाकर टीका – पदे; १२ अध्याय. ६३. प्रल्हादजन्म. ६४. बहुविध आरत्या. ६५. बाह्यविषयनिंदा. ६६. बोधपासष्टी; उपलब्ध : संककासू.

६७. बोधबासष्टी; ६२ श्लोकांचें प्रकरण. ६८. बोधामृतजनक; उपलब्ध : हु. म., बिदर; मसंमं. ६९. ब्रह्मैक्यवृत्ति टीका. ७०. ब्रह्मैक्यस्वरूप. ७१. ब्रह्मोत्तरखंड; २२ अध्यायांवर पदे, ओव्या, श्लोक, साकी, आर्या इ. ७२. भक्तिपर व अध्यात्मपर पदे; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ७३. भक्तिज्ञानवैराग्य ह्यावर पदे. ७४. भागवत एकादशस्कंध श्लोकबद्ध टीका; अध्याय ३१; श्लो. सं. १४६८; एका संस्कृत श्लोकास चार चरणांचा एक श्लोक अशी अनुवादात्मक रचना आहे; र. श. १६०४. ७५. भागवत दशमस्कंध; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ७६. भोजनश्लोक. ७७. मनीषापंचक; उपलब्ध : हु. म., बिदर. ७८. मनोनिग्रह. ७९. मायासिद्धि. ८०. मुद्गल आर्याटीका; उपलब्ध : हु. म., बिदर. ८१. मुद्रिकाख्यान. ८२. योगवासिष्ठसार टीका; १० प्रकरणे; उपलब्ध : संककासू. ८३. रसकल्लोळ; उपलब्ध : संककासू. ८४. रामजन्माख्यान (कटाव); उपलब्ध : हु. म., बिदर. ८५. रामार्याटीका. ८६. लघुगीताटीका. ८७. लिंगदेह. ८८. वंशावळी (अनुपलब्ध); नारायण पूर्णानंदाचा चरित्रकार हनुमदात्मज आपल्या ग्रंथात ह्याचा उल्लेख करतो. ८९. वाक्यवृत्तिटीका; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ९०. वामनजन्म. ९१. विद्यामृत. ९२. विरहगीता; उपलब्ध : संककासू. ९३. विरहगुरुगीता. ९४. वेणुगीत. ९५. वैराग्य. ९६. शंकराचा धावा; उपलब्ध : संककासू. ९७. शिवपंचाक्षरस्तोत्र – टीका. ९८. शिवमोहिनी. ९९. शिवरामगाथा; उपलब्ध : हु. म., बिदर. १००. शिवरामदशक. १०१. शिवरामपंचक; उपलब्ध : संककासू. १०२. शिवरामविंशति. १०३. शिवरामाष्टक. १०४. शिवषडाक्षरस्तोत्र – टीका १०५. शिवापराधक्षमापन स्तोत्र – टीका १०६. शिष्यस्वरूपप्राप्तिलक्षण. १०७. शुकाष्टक. १०८. श्रीकृष्णजन्मकथा : उपलब्ध : हु. म., बिदर. १०९. श्रीगुरुगीता; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. १११. श्रीरामहृदय; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ११२. श्रीशुकाष्टक. समश्लोकी; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ११३. षडाननजन्म. ११४. संतमालिका. ११५. संतलक्षणे. ११६. संदेहहरण; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ११७. समुद्रमंथन. ११८. साधनपंचक; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. ११९. साधनसोपान; उपलब्ध : हु. म., बिदर. १२०. सोपानपंचक. १२१. स्त्रीनिंदा. १२२. स्वरूपवर्णन समश्लोकी; उपलब्ध : मराठ. वि. म. वि. १२३. हस्तामलक टीका. **संस्कृत** – १. गुरुमर्यादा. २. गोपालकालापद्धति. ३. पादकाष्टक. ४. ललितपद्धति. **शंका.** – गंडिकाख्यान (श्लोक २३); अकलकामा., भा. १, संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९५; पृ. १८२–१८७; २३ व्या श्लोकात नाथगणश असा कर्त्याच्या नावाचा उल्लेख येतो व शिवरामांचेही नाव येते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : शिवरामस्वामी कल्याणीकर; मकच., खं. ३; मुंबई, १९१४; पृ. १०१–१११. २. कुळकर्णी, वा. ल. : अहंकारी, सुधाकर; कल्याणीचे शिवरामस्वामी; मराठवाडा विद्यापीठ पत्रिका; पु. ३, ऑग. १९६२; पृ. ३१–४७. ३. चांदोरकर, गो. का : शिवरामस्वामीचें अष्टावक्र; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ९३–९५. ४. जोशी, ना. ब. : शिवरामपूर्णानंदांची गीताचंद्रिका व ज्ञानेश्वरी; साहित्य संशोधन मंजिरी; बेळगाव, १९७३; पृ. १–२०. ५. जोशी, ना. ब. : श्रीधर व शिवराम पूर्णानंद पत्रव्यवहार; साहित्य संशोधन मंजिरी; बेळगाव, १९७३; पृ. २१७–२१८. ६. जोशी, म. रा. : एकनाथ संशोधन व शिवराम पूर्णानंद; प्रसाद, फेब्रु. १९७०; पृ. २२–२७. ७. देव, शं. श्री. : पूर्णानंदांचे शिवरामस्वामी; भाइसंमंइति., श. १८३४; पृ. १५४–१६०. ८. राजवाडे, वि. का. : शिवरामस्वामी कल्याणीकर; विश्ववृत्त, अं. २, नोव्हें. १९०७. ९. राजवाडे, वि. का. : श्रीशिवरामकृत गीताचंद्रिका; भाइसंमंइति., श. १८३३; पृ. ५५–७७.

**शिवरामाचा एका** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शिवरामात्मज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शिवलिंग–१** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, पूर्वार्ध] वीरशैव कवी. मन्मथस्वामींचे शिष्य. शिष्यपरंपरा : शिवलिंग > लिंगेश्वर > बसवलिंग. हे शिवलिंग कोण कोठले ते समजत नाही. ह्यांची समाधी बार्शी येथील उत्तरेश्वराच्या देवळाजवळील मठामध्ये असल्याचे सांगतात. ह्या परंपरेविषयी खात्रीची माहिती अद्यापि उपलब्ध झालेली नाही.

शिवलिंगस्वामीरचित *शिवरात्रकथा* असा काव्यग्रंथ औंध येथील भवानी ग्रंथालयात आढळतो, अशी माहिती डॉ. पंडित आवळीकर ह्यांनी दिली आहे (प्रस्ता., *विवेकचिंतामणी*, पृ. ९३). शिवलिंगांचे *डफगाणे* व फटके असल्याचीही नोंद सापडते (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. १९–२०). ह्या *डफगाण्यांत* शिवलिंगांनी आपल्या गुरूचे नाव निरंजन असे दिले आहे.

उपरिनिर्दिष्ट *शिवरात्रकथा* ही रचना वीरशैव शिवलिंग कवीचीच आहे की निरंजनशिष्य शंकरदास/शिवदास/शिवलिंग ह्या कवीची आहे ते समजण्यास साधन नाही. शंकरदास (शिवदास) व *डफगाणे*-कर्ता शिवलिंग ह्यांच्या नावावरील ग्रंथ एके ठिकाणीच उपलब्ध झाले आहेत. तसेच ह्या रचनेत साम्यही जाणवते. मात्र हे शिवलिंग म्हणजे शंकरदास किंवा शिवदासच असल्यास त्यांनी स्वतःस शिवलिंग असे का म्हणवून घेतले ते कळत नाही. *शिवरात्रकथा* हे प्रकरण शिवदासांच्याही नावावर आढळते त्यामुळे वीरशैव शिवलिंगांची रचना कोणती हा प्रश्न अनिर्णीतच राहतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : शंकरदासकृत निरंजनचरित्र, गणपतिस्वयंवर, गणपतिकार्तिकस्वामि भांडण, भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ३१, ३४, ३५–३६. २. चांदोरकर, गो. का. : शिवलिंगाचे डफगाणे; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. १९–२०. ३. जोशी, सुरेश, ठुसे, कुंदा, स्वामी, शांतितीर्थ, संपा. : प्रस्ता., श्रीमन्मथशिवलिंगकृत श्रीगुरुगीता; अहमदनगर, १९७३; पृ. १८.

० **शिवलिंग–२** – पहा **शंकरदास.**

**शिवशंकर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **शिवसुत** – पहा **शिवसुतप्रभु.**

**शिवसुतप्रभु** / ० **शिवसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – संतनामावली; ओ. सं. १४; संपा. देव, शं. श्री.; भाइसंमंइति., श. १८३८; पृ. १०–११.

० **शिवसुत मच्कुंद** – पहा **मच्कुंद.**

**शिवसुत मुनेश्वर** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**शिवस्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णलीलापद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शिवा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – एकवीरेची आरती, गोसावी पद इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शिवाजीराजे भोसले (तंजावरकर)** / ० **शिवेन्द्र** [श. ? – इ. स. १८५५] नाटककार. तंजावराधिपती सर्फोजीराजे (दुसरे) ह्यांचे चिरंजीव. ह्यांनी *नटेशविलास* (ग्रं. सं. ३५०) ह्या नावाचे एक नाटक तेलुगू लिपीत, पण मराठी भाषेत, ताडपत्रावर लिहिले आहे. ह्या नाटकाचा फक्त पहिला अंक तंजावर येथील सरस्वतीमहाल

ग्रंथसंग्रहालयात (बा. २५७७) पाहावयास मिळतो (तंसम. हस्त. यादी, क्र. ४).

**शिवाद्वयरंगी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शिवानंद-१ / ० शिवदास-१** [का. अनु.] गोमंतकीय कवी. उपनाव कायकिणी. शिवानंद कवींचा *गुरुडाची कथा* हा काव्यग्रंथ ब्रागच्या ग्रंथसंग्रहालयातील हस्तलिखितांच्या बाडात उपलब्ध असून (क्र. ७७३) त्याची लिपी रोमन व भाषा मराठी आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नायक, ना. भा. : शिवानंद; गोमकाऱ्रिण (गोवे), १९६९; पृ. ८.

**शिवानंद-२** [इ. स. चे १८ वे शतक, अखेर] कवी. ह्यांचे पूर्वाश्रमीचे नाव सदाशिवराव परमाळे व राहण्याचे मूळ ठिकाण उमरेडपासून वीस मैलांवरील भिसी हे गाव होय. ह्यांची समाधी उमरेड येथे आहे. ह्यांची परंपरेची आरती प्रसिद्ध आहे (मसा., आ. ५, पृ. १०००).

**शिवानंद-३** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शिवानंददास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अभंग; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १३.

**शिवानंदयोगेश्वर** [अंदाजे श. १६५७ / इ. स. १७३५] कवी.

**रचना : अमु.** – ह्यारास्ट वंशावळी; ओ. सं. २३४; र. का. : श. १६५७; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शिवार्य** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. पंचाक्षरी चरित्र; २. भद्रायुचरित्र; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शिवेंद्र** – पहा **शिवाजीराजे भोसले (तंजावरकर).**

**शिशुपाल** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – बारामास पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**शिशुमति** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – रामपर पद; पदसंग्रह, भा. ३; संपा. ओक, वा. दा. मुंबई, १९०१; पृ. ९४.

**शिशुमुनि** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १०९.

**शीवात्मज गीरी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – त्र्यंबकेश्वर माहात्म; मसंमं.; हवना., पृ. १३७.

**शुक** [का. अनु.] कवी. हे शाक्तपंथाच्या प्रचारकांपैकी एक होते. अरण्यात राहून ह्यांनी बरीच वर्षे ध्यान-धारणेत घालविली. नंतर भारतातील पवित्र स्थळी तीर्थयात्रा केल्या. दलितांची व निरक्षरांची उन्नती करण्यासाठी ह्यांनी आपले आयुष्य वेचिले. ह्यांनी गणेश, देवी व नारायण ह्या देवदेवतांची उपासना धार्मिक तत्त्वावर महाराष्ट्रभर प्रस्थापित केली. हे योगी होते. ह्यांनी मराठी व संस्कृत ह्या भाषांत अनेक ग्रंथ लिहिले. ह्यांची ग्रंथरचना (अमु.) परभणी जिल्ह्यातील बसमत मठात उपलब्ध आहे (संदर्भ : *गॅझेटीयर ऑफ इंडिया*, महाराष्ट्र राज्य, परभणी जिल्हा; १९६७, पृ. ५९९). ह्यांची श्लोकादी रचना तंजावर सरस्वतीमहाल संग्रहाच्या हस्तलिखित पोथ्यांत (हस्त. यादी, क्र. ३) उपलब्ध.

**शुकदेव-१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – आदिजन्मकथा; सवामं. हस्त. यादी, खं. १.

**शुकदेव-२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. रामपाठ; वि. ल. भावे, संग्रह २. स्यमंतकोपाख्यान; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १०९–१४१.

**शुकसागर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – त्वरिताख्यान; भावे, वि. ल.; संककासू., पृ. १०९.

**शुकानंद / ० बसमतकर श्रीशुकानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १०९.

**शुकानंदनाथतनय** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – गुरुपर पद; पदसंग्रह, भा. ३; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १९०१; पृ. ११०–१११.

**शुद्धबावा** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – २५–३० अभंग; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शुद्धानंद** [का. अनु.] नाथपंथीय कवी. ह्यांनी उपनिषदावर आधारित वेदान्ततत्त्वज्ञान आपल्या *संविद्रहस्य* ह्या ग्रंथात विवेचिले आहे.

**रचना : अमु.** – १. संविद्रहस्य; प्रक. ११; २. स्वप्रकाश प्रकरण; कडवी ५१; कॅ. ऑफ म. मॅन्यु.; ब्लूमहार्ट आणि कान्हेरे, पृ. ५; क्र. १०, ११.

**शुभराय** [श. १६५७ / इ. स. १७३५ – श. १७४२, भाद्र. व. ९ / इ. स. १८२०] संतकवी. मूळ नाव सुबराव. मद्रासकडील पसकोट प्रांतातील मालूर गावी श. १६५७ च्या सुमारास ह्यांचा जन्म झाला. जामदग्न्यगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण. आईचे नाव पन्नाम्मा व वडिलांचे नाव गिरधरराय. पत्नीचे नाव सुबाक्का. हे टिपू सुलतानाकडे मोठ्या हुद्द्यावर होते. तारुण्यावस्थेतच विरक्त होऊन नोकरी सोडून ते पंढरपुरास आले. तेथे त्यांनी काही काळ विठ्ठलाची सेवा केली. तेथून ते सोलापुरास आले व नंतर अखेरपर्यंत तेथेच राहिले.

पांडुरंगमूर्ती स्थापण्याविषयी ह्यांना पंढरपुरासच दृष्टान्त झाला होता. त्याप्रमाणे ह्यांनी सोलापुरास पांडुरंगमूर्तीची प्रतिष्ठापना केली. हे सगुणोपासक व अद्वैतभट्टभास्कर-संप्रदायी होते. हे मोठे कारागीरही होते. रांगोळ्या घालणे, श्रीचा रथ बनवणे, कागदाचे मंडप करणे इत्यादी गोष्टी हे हौसेने करीत. ह्यांनी श. १७०७ मध्ये सोलापुरास मठ बांधला. समकालीन शाहीर राम जोशी ह्यांना कीर्तनाला मठ देण्याचे शुभरायांनी नाकारल्यामुळे राम जोश्यांनी ह्यांच्या मठासमोर कीर्तन करून 'हटातटाने पटा रंगवुनि' ही लावणी ह्यांना उद्देशून म्हटली, अशी आख्यायिका आहे. ह्यांचा शिष्यसंप्रदाय बराच मोठा असून त्यात बाबा जाईल, शेषाप्पाशास्त्री अशा महत्त्वाच्या व्यक्ती होत्या.

मातृभाषा कानडी असूनही ह्यांनी वेदान्तासारख्या विषयावर मराठीत पदरचना केली. पदाच्या शेवटी स्वतःचे नाव न घालता हे 'श्रीगुरुदास्ये' वा 'श्रीगुरुदास्यप्रसादे' असा उल्लेख करतात. ह्यांची पदे हरिदासांना कीर्तनाकरिता उपयुक्त ठरली आहेत. ही पदरचना ह्यांच्याच सोलापूर येथील मठात उपलब्ध आहे. ह्यांची सुमारे ७७ पदे *पदसंग्रह, भाग ३* (संपा. वा. दा. ओक, मुंबई, १९०१) मध्ये मुद्रित झाली आहेत. त्यांवरून ह्यांचा पारमार्थिक अधिकार व कवित्वशक्ती ह्यांचा प्रत्यय येतो. वेदान्तातले पारंपरिक तत्त्वज्ञान सांगताना गुरुमहिमा व हरिभक्ती ह्यांचे माहात्म्य ह्यांनी ठिकठिकाणी वर्णन केले आहे. पद्यकलेइतकीच ह्यांना चित्रकलाही उत्तम अवगत होती. ह्यांनी काढलेली देवदेवतांची अनेक चित्रे ह्यांच्या मठात पाहावयास मिळतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : शुभराय; मकच., भा. २; मुंबई, १९१३; पृ. ९४–१०१. २. कुळकर्णी, शुभांगी : श्रीशुभराय; रविवारची लोकसत्ता, दि. ११–१०–७०. ३. जकल, वि. न. : श्रीशुभराय महाराज ह्यांचे चरित्र व पदे. ४. लेले, लक्ष्मणशास्त्री : श्रीशुभराय महाराज; मुमुक्षु (नवे), व. २, अं. ७–८; पृ. ७७–७९.

**शुभरायदास** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – भार्गवलीलावर्णन; भाइसंमं.

**शुभानंद / ० सुभानंत पकले / ० सुभानंतस्वामी** [अंदाजे श. १६८८

/इ. स. १७६६] कवी. महाभारतावर रचना. ह्यांचे नाव सुभा अनंत पिकळे. गोव्यातील गोकर्ण प्रांतातील अंकोले येथे राहणारे. कौंडिण्यगोत्री. ह्यांच्या पित्याचे नाव अनंत मांगिरीश. मातेचे नाव जानकी. गुरू : विश्वंभर. कुलदेव मंगीश. कुलस्वामिनी महालक्ष्मी (गोव्यातील बांदिवडे येथील देवी).

सर्व महाभारत प्राकृतात रचावे अशी ह्यांची महत्त्वाकांक्षा होती. प्रत्यक्षात ह्यांची *भीष्म* व *उद्योग* ही दोनच पर्वे उपलब्ध आहेत. ह्यांपैकी *भीष्मपर्व* सुभानंतस्वामी ह्या नावाने लिहिले आहे. हे सुभानंतस्वामी व *उद्योगपर्व*कार शुभानंद हे एकच होत. आपल्या *महाभारता*च्या *उद्योगपर्वा*त हे म्हणतात : "तैसें कथिलीं चारि पर्वें । त्या सर्वांचा सार सर्व। तें ऐका उद्योगपर्व । अपूर्वा अपूर्व भारतीं ॥ १ : ६३ ॥" ह्यावरून ह्यांनी *आदिपर्वा*पासून *भीष्मपर्वा*पर्यंत सहा पर्वे रचली होती, असे अनुमान करता येते.

*आदिपर्व* नक्की कधी लिहिले ते सांगता येण्याइतका पुरावा नाही; पण *भीष्मपर्वा*चा रचनाकाळ कोणता हे निश्चित सांगता येणे शक्य झाले आहे. कारण *भीष्मपर्वा*च्या [*काव्यसंग्रह*कारांना उपलब्ध झालेल्या] हस्तलिखित प्रतीत शेवटी अशा दोन ओव्या आहेत : "गौराष्ट्रदेशामाजारी । गोकर्ण पंचक्रोशाभितरीं । शके सोळाशें अठ्यायशी उपरी । मास सप्त लोटले ॥...व्यय संवत्सर आश्विनमासीं । मंदवार शुद्ध प्रतिपदे दिवशीं । पूर्ण केलें भीष्मपर्वासी । देवालयीं कलशाच्या ॥" ह्यावरून शुभानंदांनी भीष्मपर्वाची समाप्ती श. १६८८, व्ययनाम संवत्सर, शनिवार, आश्विन शु. १ रोजी केली. उपलब्ध पर्वावरून असे दिसते की शुभानंद ह्यांची रचना प्रासादिक नसून हे प्रसंगवर्णन विस्ताराने करतात. ह्यांनी *उद्योगपर्व* सामान्यतः मुळात फारसे बदल न करता लिहिले आहे. त्यात वापरलेले उपामादृष्टान्तादी अलंकार सांकेतिक आहेत. ह्यांच्या रचनेवर मुक्तेश्वरांच्या शैलीचा प्रभाव आढळतो. आपली भारतकथा सांगताना अनेक व्यक्तींच्या तोंडी ह्यांनी रामायणाचे दाखले घातले आहेत. *भीष्मपर्वा*त कौरवपांडवयुद्धाच्या वेळी श्रीकृष्णांनी मारुतीकरवी लंकेचा राजा बिभीषण ह्याचे सेनासाहाय्य मागितले अशी एक नवीनच कथा कवीने वर्णन केली आहे.

ह्यांच्या काव्यात कालविपर्यासाचा दोष आढळतो. उदा., *उद्योगपर्वा*च्या १२ व्या अध्यायात दुर्योधनास साहाय्य करण्यास आलेल्या सैनिकात "इंग्रज लंदेज दिंगमार । फ्रांसेज फिरंगी कास्तेल्यांवकर। वलंदेजादि परिकर । सप्त म्लेंच्छ या परीचे ।" ह्या सर्वांचा समावेश केलेला आहे.

*भीष्मपर्वा*त त्यांनी *भगवद्गीते*ची समपद्य टीका देण्याची प्रतिज्ञा केली आहे. मराठी भाषेची हे अभिमानपूर्वक तरफदारी करतात. ह्यांची वाक्यरचना मात्र बरीचशी शिथिल आहे. ह्यांची इतरही स्फुट कविता उपलब्ध आहे.

**रचना : मु. –** १. महाभारत – ५ : उद्योगपर्व; ओ. सं. ६३०२; कासं., ४०; संपा. केळकर, ना. चिं.; मुंबई, १९०२. २. महाभारत – ६ : भीष्मपर्व; ओ. सं. २२८७; र. का. : श. १६८८, शनिवार, आश्विन शु. १; कासं. ५१; संपा. भिडे, बा. अ.; मुंबई, १९०५. ३. श्रीमांगीशमहात्म (स्कंदपुराणांतर्गत); श्लो. सं. २०८; ओ. सं. ५२१; संपा. कार्नाविदे, भ. वि.; मुंबई, १८७३. **अमु. –** १. पंढरीनाथमाहात्म्य. २. महालयामाहात्म्य. ३. मल्हारीमाहात्म्य. ४. व्यंकटेशमाहात्म्य.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. केळकर, ना. चिं. (संपा.) : श्रीशुभानंदस्वामीकृत महाभारत – ५ : उद्योगपर्व; कासं., ४०; मुंबई, १९०२; प्रस्ता. १–४. २. भिडे, बा. अ. (संपा.) : श्रीशुभानंदस्वामिकृत महाभारत – ६ : भीष्मपर्व; कासं., ५१; मुंबई, १९०५; प्रस्ता., पृ. १–४.

**शेख दाजी ऊर्फ छोटुभाई** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] मुसलमान संतकवी. हे शेख सुलतानांचे धाकटे बंधू व त्रिपुटीच्या गोपाळनाथांचे शिष्य. हे उत्तम कीर्तन करीत. गोपाळनाथांचे पुतण्ये विठ्ठलनाथ ह्यांनी शेख दाजींवर एक आरती रचली आहे तीमध्ये "निष्काम देहलोभा । काव्यकार उत्तम । अभंगीं रूढविलें । निजबंधूचें नाम ॥" अशी माहिती दिली आहे. ह्यांनी आपल्या कवनांच्या समाप्तिमुद्रांत आपल्या बंधूचे म्हणजे शेख-सुलतानांचे नाव घातल्यामुळे ह्यांची रचना वेगळी काढणे अशक्य झाले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : मुमसंक; पुणे, १९६७; पृ. ६९–७४.

**शेखभाई** [का. अनु.] शाहीर, लावणीकार. ह्यांची एक लावणी *अंधारातील लावण्या* संग्रहात (पृ. २०४–२०५) मुद्रित.

**शेख महंमद** [इ. स. चे सतरावे शतक] मुसलमान संतकवी. 'कबीराचा अवतार' म्हणून ह्यांची ख्याती आहे. अहमदनगर जिल्ह्यात श्रीगोंदे म्हणून जे तालुक्याचे गाव आहे तेथून आठ कोसांवर असलेले रुईवाहिरे खेडे, हे शेख महंमदांचे मूळ ठिकाण. वडिलांचे नाव राजे महंमद. आईचे नाव फुलाई. ह्यांची सूफीपंथीय 'कादिरी गुरुपरंपरा' अशी : अब्दुल कादर जिलानी > सय्यद अब्दुल रजाक ताजोद्दिन कादरी > सय्यद महंमद गौस ग्वाल्हेरी कादरी > सय्यद चांदसाहेब कादरी > सय्यद महंमदसाहेब कादरी (शेख महंमद). शेख महंमदांचे गुरू सय्यद चांदसाहेब कादरी म्हणजेच जनार्दनस्वामींचे गुरू चांद बोधले होत, असे वा. सी. बेंद्रे ह्यांचे मत आहे. ह्याला पुरावा शेख महंमदांच्या *योगसंग्रामा*तील पुढील ओवीचा दिला जातो : "ॐ नमो जी श्रीसद्गुरु चांद बोधले। त्यांनीं जानोपंता अंगीकारिलें। जानोबानें एका उपदेशिलें। दास्यत्वगुणें ॥ १५. १ ॥" शेख महंमद हे गृहस्थाश्रमी होते. 'मज छळती दुर्जन। नानापरी बोलती मज अवलक्षण' अशी तक्रार ह्यांच्या कवनात आढळते. त्यावरून शेख महंमदांना अनेक पाखंडी दुर्जनांचा छळ सहन करावा लागला असे दिसते. मालोजीराजे भोसले ह्यांनी शेख महंमदांचे शिष्यत्व स्वीकारले होते व त्यांना श्रीगोंदे येथे इ. स. १५९५ च्या सुमारास मठ बांधून दिला होता. ह्याच मठातील गुंफेत इ. स. १६६० च्या सुमारास फाल्गुन शु. नवमीस शेख महंमदांनी देह ठेवला. शेख महंमदांचे पुत्र दावलजी हे त्यांचे शिष्य होते. त्यांच्या इतर शिष्यांपैकी मुधा पांगूळ, दयाळदास देवंग, रघुनाथ योगी, आजम असे अनेक शिष्य ज्ञात झाले आहेत.

शेख महंमदांनी मराठी, हिंदी, उर्दू, फारसी ह्या भाषांत बरीच रचना केली आहे. ह्यांपैकी मराठी रचनाच प्रधान आहे. *योगसंग्राम* हा त्यांचा अध्यात्मविषयक प्रमुख ग्रंथ. त्यात ह्यांनी एक व्यापक पारमार्थिक रूपक योजिले आहे. ह्या *योगसंग्रामा*त आत्मा हा योद्धा आहे. ह्या योद्ध्याने मनाच्या वारूवर स्वार होऊन अहंकाराशी युद्ध मांडले आहे. संकल्पविकल्प, काम, क्रोध, आळस इत्यादी अवगुणांनी युक्त असे अहंकाराचे सैन्य उभे आहे. ह्या सैन्यावर मात करून आत्म्याने ब्रह्मांडशिखर गाठले की हा *योगसंग्राम* संपतो. [⇨ ३.] ह्यांचा *पवनविजय* हा दुसरा ग्रंथ शिव-कार्तिक-संवादात्मक संस्कृत *शिवस्वरोदया*चा अनुवाद आहे. त्याचे *तत्त्वसार*, *पवनविजय* व *काळज्ञान* असे खंड असून शेवटचा खंड अपूर्णच उपलब्ध झाला आहे.

*निष्कलंकप्रबोध* हा ह्यांचा तिसरा ग्रंथ. शेख महंमद हे स्वभावतः चिंतक आणि प्रबोधक असल्यामुळे त्यांनी लोकजीवनातील अनिष्टांचे सूक्ष्म निरीक्षण करून ती सर्व अनिष्टे तितक्याच उघडपणे शब्दांतून व्यक्त केली आहेत. धर्माच्या नावावर चालणारे भावहीन कर्मकांड, शुद्ध परमार्थाशी विसंवादी असणारी आंधळी क्षुद्रदेवतोपासना आणि धर्मक्षेत्रातील दांभिकता ह्यांवर शेख महंमदांचा मुख्य कटाक्ष आहे.

ह्यांची *मदालसा* व *गायका* ही दोन छोटी प्रकरणे उपलब्ध

आहेत. *गायका* हे योगमार्गीय भक्तांची त्यांच्या इंद्रियादींच्या वृत्तिप्रवृत्तीमुळे कशी त्रेधा उडते त्याचे रूपक आहे. *मदालसा* प्रकरण हे भागवती कथेचा अनुवाद आहे. *ज्ञानसागर* हा ग्रंथही ह्यांच्या नावावर आढळतो. पण त्याची इतर माहिती उपलब्ध नाही.

ह्या ग्रंथरचनेशिवाय शेख महंमदांची बरीच स्फुट कविताही उपलब्ध आहे. तिच्यात रूपके, भारुडे, अभंग ह्यांचा समावेश होतो. 'ऐसें केलें या गोपाळें। नाहीं सोवळें ओवळें ॥' हा त्यांचा अभंग प्रसिद्ध आहे. उपासनेच्या बाबतीत 'भाव तैसी सिद्धि' हा त्यांचा सिद्धान्त आहे. "ज्यासी रूप नाहीं रेखा। तो अव्यक्त माझा सखा। भावभक्तीचिया सुखा। साकारला ॥" हे भक्तितत्त्वही ह्यांना मान्य आहे. भक्तिसाधनेत नामस्मरणाचा महिमा त्यांनी पूर्वपरंपरेनुसार गायिला आहे. ह्या साधनेमुळे शेवटी 'अद्वैतीं समरस। शेख महंमद।' ही अनुभूती त्यांना प्राप्त झाली होती. ही अवस्था त्यांनी 'शेख महंमद। हृदयीं गरोदर। गर्भी सर्वेश्वर। सामावला।' अशा शब्दांत व्यक्त केली आहे.

शेख महंमदांची भाषा विविध संस्कारांनी भारलेली आहे. मुसलमानी संस्कारांबरोबर ज्ञानेश्वरादी संतांच्या वाणीचे संस्कार जसे तीत जाणवतात तसेच लोकवाङ्मयाचे संस्कारही वेळोवेळी दिल्या जाणाऱ्या पौराणिक दृष्टान्तांतून व्यक्त होतात. ह्यांना अभिप्रेत असणारा श्रोतृवर्ग हा संमिश्र असल्यामुळे ह्यांची भाषा सरळ, साधी व क्वचित ग्राम्य शब्दांचा वापर करणारी अशी आहे.

जन्माने मुसलमान असूनही शेख महंमदांनी हिंदू साधनेचा स्वीकार केला. ती आत्मसात करून हिंदू-मुसलमान ह्या भेदाच्या पलीकडे जाऊन शुद्ध परमार्थाचा स्वतः अनुभव घेतला व समाजाला सन्मार्गोपदेश केला. हिंदूंच्या उच्चनीचतेच्या कल्पनांवर ज्याप्रमाणे त्यांनी हल्ला चढविला त्याप्रमाणे मुसलमानांच्या अनिष्ट आचारांवरही झोड उठविली. 'अज्ञान अविध ज्ञान हो ब्राह्मण' असे व्यापक स्वरूपाचे, निर्मळ विचार त्यांनी व्यक्त केले आहेत. महाराष्ट्रातील संतकवींच्या प्रभावळीत शेख महंमदांचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे.

**रचना : मु.** – १. योगसंग्राम; प्र. १८; ओ. सं. २५००; र. का. : श्रावण शु. १५, श. १५६७; (१) संपा. वागळे, शि. सी. ; मुंबई, १८८९; (२) संपा. बेंद्रे, वा. सी.; मुंबई, १९६१. २. शेख महंमदबाबा यांचा कवितासंग्रह; ह्यात पुढील रचना समाविष्ट : (१) पवनविजय – खं. ३, ओ. ४८२; अपूर्ण; (२) निष्कलंकप्रबोध – गीतओव्या ३००; अपूर्ण; (३) प्रकरणे – गायका, मदालसा; (४) रूपके, भारुडे इ. स्फुट कविता सुमारे ३००; (५) हिंदुस्थानी कविता : संपा. बेंद्रे, वा. सी.; मुंबई, जून १९६१; (प्रस्ता.). ३. स्फुट कविता : (१) १८ अभंग; संपा. मोरजे, गं. ना.; मसंप., जाने. व एप्रि. १९६८; पृ. ३३–४८, ४९–६२; (२) ६ अभंग; संपा. प्रियोळकर, अ. का.; मसंप., ऑक्टो. १९६२; पृ. १०–१२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : शेख महंमदबाबा; मकच., खं. १; मुंबई, श. १८२९; पृ. २३६–२४८. २. ढेरे, रा. चिं.; शेख महंमद; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. ८४–११७. ३. बेंद्रे, वा. सी. : शेख महंमदबाबा श्रीगोंदेकर – तुकाराममहाराज यांचे संतसांगाती; मुंबई, एप्रि. १९५८; पृ. ५०–८२.

**शेख मिराजी** [का. अनु.] मुसलमान कवी. ह्यांनी मराठी रिवायतींची रचना केली आहे (रा. चिं. ढेरे; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १७८).

**शेख वली वस्ताद** [का. अनु.] शाहीर.

**रचना : मु.** – सर्जेराव घाटगे यांचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. १३३–१३७.

**शेख सलीमहंमद** [का. अनु.] मुसलमान कवी. ह्यांचा एक कूटात्मक अभंग उपलब्ध आहे : "आम्ही जातीचे ब्राह्मण । आमचे सोयरे मुसलमान ॥ स्नानसंध्या बोळविली । महारासी सोयरिक केली ॥ शेख सलीमहंमद भला । सुन टाकुनि सासुसी गेला ॥ तिच्या पोटीं कन्या जाली । ते फिरून बाईल केली ॥" अशा प्रकारच्या कूटात्मक रचनेला मराठी संतसाहित्यात ज्ञानदेवांपासून तुकारामापर्यंत अनेक संतांची परंपरा लाभलेली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं.; शेख सलीमहंमद; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १४९–१५०. २. प्रियोळकर, अ. का.; मुसलमानांची जुनी मराठी कविता; उत्तरार्ध (१०); मसंप., एप्रि. १९६३.

**शेख सुलतान** [ ? – समा. श. १६९१, श्रावण व. ३० / इ. स. १७६९] मुसलमान कवी. त्रिपुटीच्या (जि. सातारा) गोपाळनाथांचे शिष्य. शेख सुलतानांचे मूळ गाव कऱ्हाडजवळील कार्वे. हे तुरेवाले शाहीर होते. सातारकर शाहू छत्रपतींचा त्यांना आश्रय होता. कलगीतुऱ्याच्या शाहिरीची भेदिक कवने रचण्यात ह्यांचा हातखंडा होता. आपल्या रचनेचा त्यांना गर्व होता. गोपाळनाथांच्या सहवासात शेख सुलतानांचे हे शब्दपांडित्य कुंठित झाले आणि हे जेव्हा त्यांच्या लक्षात आले त्याच क्षणी त्यांनी गोपाळनाथांचे शिष्यत्व स्वीकारले. गुरुकृपेने पुढे हे कीर्तन करू लागले. निरंतर गुरुसेवा घडावी म्हणून हे त्रिपुटीस राहू लागले. गोपाळनाथांच्या शिष्यपरिवारात वयाने ज्येष्ठ असल्याने त्यांना आदराने सर्वजण आबासाहेब म्हणत. ह्यांचे धाकटे बंधू शेख दाजी ऊर्फ छोटुभाई ह्यांनीही त्यांच्यामागून गोपाळनाथांचा अनुग्रह घेतला. शेख सुलतानांनी त्रिपुटीसच समाधी घेतली.

शेख सुलतानांची मराठी व काही हिंदी रचना आहे. मराठी रचनेत *सती अनुसूया, गणपतिजन्म, शिवरात्रीकथा* इत्यादी कथात्मक प्रकरणे, पदे व आरत्या ह्यांचा समावेश होतो. ह्यांचे बंधू शेख दाजी हेही उत्तम कवी होते. त्यांनी शेख सुलतानांच्या नावाने रचना केली असल्यामुळे ह्या दोघांची रचना वेगळी काढणे कठीण झाले आहे. ह्यांची उपलब्ध कविता ही लोकगीतात्मक सरणीची आहे. पूर्वायुष्यातील शाहिरी कवितेचे संस्कार तिच्यावर झालेले आढळतात. ह्यांची उपलब्ध असलेली मराठी तीन पदे, तुकाईची व पद्मावतीदेवीची अशा दोन आरत्या व हिंदी पदे इत्यादी रचनेत ह्यांनी आपला परमार्थानुभव व्यक्त केलेला आहे.

**रचना : अमु.** – १. अभंग; मसा., आ. ५, पृ. ६१८. २. कोल्हाव्याचे चरित्र; ३१ ओव्या. ३. गणपतिजन्म; ओ. सं. २८. ४. शिवरात्री कथा; ओ. सं. ४९. ५. सती अनुसूया; २२ कडवी; लावणी ढंगाची रचना. ६. हनुमंत जन्म; कथाकाव्य; ओ. सं. १७; हिंदी व मराठी पदे; त्रिपुटी येथील मठातील बाडात संग्रहित.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : महाराष्ट्रातील नाथ संप्रदाय; गोचप., मुंबई, १९५९; पृ. १८०. २. ढेरे, रा. चिं. : शेख सुलतान; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. ६६–८२. ३. प्रियोळकर, अ. का.; मुसलमानांची जुनी मराठी कविता, उत्तरार्ध (८); मसंप., एप्रि. १९६३; पृ. २९.

**० शेना न्हाऊ** – पहा **सेना न्हावी**.

**शेष / ० कोनेरीसुतशेष** [अंदाजे श. १७०८ / इ. स. १७८६ – श. १७२० / इ. स. १७९८] कवी. तंजावर येथील राहणारे. उपनाव मेदिनीकर. आजोबांचे नाव रुक्मांगद. वडिलांचे नाव गंगाधर. हे रामचंद्र व लक्ष्मीनृसिंह ह्यांचे भक्त होते. त्यांना योगी श्री शिवरामेंद्राचा अनुग्रह झाला होता. ही माहिती कवीच्या अद्भुतकांड रामायणातून मिळते. तंजावर येथील भीमस्वामींच्या रामदासी मठाच्या परंपरेतील गोविंदबाळांचे हे शेष कवी शिष्य होते व ते अमरसिंह राजांच्या पदरी होते अशी त्यांची माहिती *रामदासी संशोधन, खंड १* मध्ये शं. श्री. देव ह्यांनी दिली आहे (बा. १४९८). हे काही ठिकाणी

आपला उल्लेख 'कोनेरीसुत शेष' असा करतात.

तंजावर येथील सरस्वतीमहाल ग्रंथालयामध्ये तसेच धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिर हस्तलिखित संग्रहातही ह्या शेष कवीची विपुल रचना उपलब्ध आहे. ह्यांनी रचलेल्या ग्रंथांत पौराणिककथा, आख्याने, रामायणकथा, स्थलवर्णने, ह्याप्रमाणे वैद्यकशास्त्रविषयक रचनाही आहे. सुमारे चौदा हजार ओव्यांचा हा ग्रंथसंभार आहे. *बुल्बुलाचे लक्षण* हा वैद्यकशास्त्रावरील छोटासा ग्रंथ आहे. *तंजपुरीमाहात्म्य* हा ग्रंथ ह्यांचे तंजावर येथील वास्तव्य दर्शवितो. ह्यात कवीने तंजावर राज्याचे मूळ संस्थापक जे चोळ राजे, त्यांच्या वंशातील अनेक थोर व्यक्तींची माहिती दिली आहे. त्याचबरोबर ह्या राजांनी बांधलेल्या तंजावर येथील बृहदीश्वर मंदिराचे माहात्म्य सांगून त्याची शिवलिंग-प्रतिष्ठा, कुम्भाभिषेक इत्यादींचे भक्तिपूर्ण वर्णन केले आहे. ह्या ग्रंथात, तंजावरचे राजे प्रतापसिंह ह्यांचे पुत्र राजे अमरसिंह (श. १७०८ ते श. १७२०) ह्यांचा उल्लेख येतो.

एकनाथांच्या *भावार्थरामायणा*तील *उत्तरकांड* रचण्याचा प्रयत्न अनेक वेगवेगळ्या कवींनी केला त्यांपैकी शेष कवींचा *भावार्थ-रामायण : उत्तरकांड* हा ग्रंथ प्रा. वसंत जोशी ह्यांनी प्रकाशात आणला आहे. ह्यामध्ये प्रत्येक अध्यायाच्या अखेरीस 'एका जनार्दना शरण' अशी मुद्रा येते. चौथ्या अध्यायाच्या शेवटी 'शेष' अशी कविनाममुद्रा येते. ह्या *उत्तरकांडा*चे लेखन मुख्यत: *वाल्मीकि-रामायणा*च्या आधारे होत असले तरी ह्यांनी काही ठिकाणी *अध्यात्म-रामायण*, *शिवरामायण* अशा इतरही कृतींचा आधार घेतला आहे. क्वचित काही बदलही केले आहेत. मात्र त्या त्या ठिकाणी बदल करण्याचे कारण सांगितले आहे. मूळ कथाभाग साध्या, सोप्या व श्रद्धायुक्त भाषेत सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

मुळापेक्षा काही वेगळे सांगण्याची ह्यांची आवड ह्यांच्या *अद्भुतकांड रामायणा*तही आढळते. शतकोटी रामायणाची वाटणी त्रैलोक्यात झाल्यामुळे आपल्या शिष्यासाठी वाल्मीकि 'अद्भुतकांड रामायण। आठवे कांड हे पावन।' सांगत आहेत, अशी कवीने कल्पना केली आहे (मसा., आ. ५, पृ. ८९५–८९६). ह्या कवीचे *डोलोत्सव गीत* उपलब्ध आहे. विवाहानंतर वधूस डोल्यावर म्हणजे हिंदोळ्यावर बसवून झोके घेतात तेव्हा म्हणावयाची ही गाणी आहेत (मसा., आ. ५, पृ. ८९५-८९९). ह्यांच्या नावावर *हालास्य माहात्म्य* हे शिवभक्तिपर काव्य आहे. ह्यांची अग्र्याधानप्रयोग अशी संस्कृत रचना आढळते (सवामं., बा. १७८०).

**रचना : अमु.** – १. अद्भुतकांड रामायण; प्र. ३; ओ. सं. १९८. २. अमृतेश्वरपर श्लोक ९. ३. उपमन्युचरित्र; श्लो. २७. ४. गजेंद्र-मोक्ष. ५. गोपालकाला; श्लो. १९. ६. गोविंदबाळपर श्लो. १२. ७. तंजपुरी माहात्म्य; अ. ३०; ओ. सं. २२६३. ८. तारकब्रह्माष्टक; श्लो. ८. ९. दामाजीपंतांचे चरित्र; श्लो. ३१. १०. पांडुरंग माहात्म्य; अ. १२; ओ. सं. १४८८. ११. बुल्बुलाचे लक्षण; श्लो. सं. २४. १२. भावार्थरामायण : उत्तरकांड; अ. १६; ओ. सं. २०२६. १३. महाबलभट्टाची कथा; श्लो. २५. १४. शृंगारपर; श्लो. ३४. १५. श्रीतुलसी माहात्म्य; अ. १५; ओ. सं. ९००. १६. हालास्य माहात्म्य; ओ. सं. ७०००; तंजावर येथील महाराष्ट्र समाजाच्या संग्रही. १७. पदे, श्लो. वगैरे; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २, ३; सवामं. हस्त. सू., खं. २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, वसंत स. : तंजावरस्थ कवि शेषकृत भावार्थरामायणाचे चौथे अज्ञात उत्तरकांड; नभामा., जून १९६६; पृ. ३१–३९. २. जोशी, वसंत स.; भावार्थरामायण : उत्तरकांड – कवि शेष; नभामा., जुलै १९७२; पृ. ४७–४८.

० **शेष रघुपति** – पहा **रघुनाथ शेष**.

० **शेष राघव** – पहा **रघुनाथ शेष**.

० **शेषसुत** – पहा **रामशेष**.

**शेषा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णदर्शनपर पद; तंसम. हस्त., यादी, क्र. ३.

**शेषाद्रि (शेषाद्रिस्वामी)** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – १. गयाविष्णुपद आरती; तंसम. हस्त. यादी, क्र. २, ३. २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**शेषे** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – सद्गुरूची आरती; मआ., पृ. ४४१.

**शैल्य पंडित / ० साल कवि** [इ. स. चे तेरावे शतक] महानुभावपंथीय कवी. उपनाव अयाचित. हे *रुक्मिणीस्वयंवर*कर्ता नरेंद्र कवींचे बंधू. हे व ह्यांचे दोघे बंधू नरेंद्र व नरसिंह देवगिरीच्या रामदेवराव यादव राजांच्या आश्रयास होते. ह्यांनी *रामायण* ग्रंथ रचल्याची माहिती मिळते पण प्रस्तुत ग्रंथ उपलब्ध नाही (मसा., आ. ५, पृ. ९३).

**शैवमाधव** [का. अनु] वेदान्तग्रंथकार. रत्नाकरांचे शिष्य.

**रचना : अमु.** – मूळस्तंभ; त्रृ. पो.; रासंमं. हस्त. सू., पृ. ४३.

० **श्याम** – पहा **श्यामराज**.

**श्यामकवि** [का. अनु.] कवी. *स्यमंतकोपाख्यान* (श्लो. १२६) काव्याचा कर्ता. काव्यातील 'श्रीरामस्मरणाविना इतर ते श्यामा नसे कामना' ह्या अखेरच्या पंक्तिद्वारा कवीची रामभक्ती प्रकट झाली आहे. हे काव्य अनेक वृत्तांमध्ये बांधले आहे. स्यमंतक-मण्याच्या प्राप्तीसाठी श्रीकृष्णाने ऋक्षराज जांबुवंताशी २८ दिवस युद्ध केले. कृष्ण हा परमेश्वरावतार आहे हे ओळखून अखेरीस तो त्याला स्यमंतकासहित आपली कन्या जांबुवंती देतो, ती प्रसिद्ध कथा ह्या आख्यानात येते.

**रचना : अमु.** – स्यमंतकोपाख्यान; श्लो. सं. १२६; संपा. केळकर, ना. चिं.; अकलकामा., भा. ३; मुंबई, १९०२; पृ. ८३–९५.

० **श्यामकवींद्र** – पहा **श्यामराज**.

० **श्याम गुसाई** – पहा **सामराज**.

**श्यामदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्ण, गोपीविरह, रामपर, संतसंग, ज्ञानपर इ. पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. २.

**श्यामराज / ० श्याम / ० श्यामकवींद्र** [अंदाजे इ. स. १६८४–१७३३] कवी. तंजावर प्रांतात वास्तव्य. पित्याचे नाव खंडो त्र्यंबक. कवी गौतमगोत्रोत्पन्न असून दाक्षिणात्य पद्धतीप्रमाणे आपले उपनाव सांगत नाही. ह्यांचा जन्म वाराहवापी येथे झाला. एस. गणपति राव ह्यांच्या मते हे वाराहवापी म्हणजे तिरुनेलवेल्लीमधील वाराहनेरी किंवा कुंभकोणम् येथील वराहकुळम्‌ला अनुलक्षून असावे. ह्यांपैकी दुसरा पर्याय त्यांना अधिक संभाव्य वाटतो. कवी रामभक्त आहे. रामदासी परंपरेतील मन्नारगुडीच्या अनंतमौनींचे शिष्य मेघश्याम हे कवीचे गुरू. तंजावरकडील प्रसिद्ध रामदासी मेरुस्वामी हे मेघश्यामांचे गुरुबंधू. कवीची रामभक्ती ही परंपरेतून आलेली आहे.

आपल्या ग्रंथरचनेत कवीने लेखनकालाचा निर्देश केलेला नाही. कविरचित *दक्षिणद्वारकापरचूर्णिके*त तंजावरच्या शहाजीराजांचा (इ. स. १६८४–१७१०) उल्लेख येतो. *मेरुस्वामीस्तवन* ह्या रचनेतील 'शिव शिव बहु भाग्यें देखिला मेरुयोगी' ह्या काव्यपंक्तीवरून कवीने मेरुस्वामींना प्रत्यक्ष पाहिले असावे असे वाटते. मेरुस्वामी हे श. १६५५ (इ. स. १७३३) मध्ये समाधिस्थ झाले. त्यावरून श्यामराज इ. स. १६८४ ते इ. स. १७३३ च्या दरम्यान विद्यमान होते असे दिसते.

हा श्यामराज कवी *रुक्मिणीहरण*कर्ता शामराज किंवा सामराज, तसेच *भागवत दशमस्कंधा*वर टीका रचणारा शामराज, ह्यांच्याहून भिन्न आहे हे जन्मस्थल, गोत्र, काल ह्यांवरून स्पष्ट होते.

*राजगोपालविलास* हा प्रस्तुत श्यामराजांचा महाकाव्यसदृश प्रमुख काव्यग्रंथ. *दक्षिणद्वारकापरचूर्णिका, मेरुस्वामीस्तवन, ईश्वरभिल्लिणी-संवाद* (मु.) व *कृष्णपर पदे* (अमु.) अशी इतरही रचना कवीने केली आहे.

*राजगोपालविलास* हे एक आख्यानकाव्य असून त्याचे ९ उल्लास आहेत; अनेक वृत्तांत रचलेले हे ५७० श्लोक आहेत. राजगोपाल हे कृष्णाचे नाव असून तंजावर जिल्ह्यातील मन्नारगुडीच्या कृष्णास राजगोपाल म्हणतात. ह्या राजगोपालाच्या विलासाचे वर्णनच काव्यात येते.

हे काव्य पंडिती परंपरेतील महाकाव्यांचा आदर्श समोर ठेवून रचलेले आख्यानकाव्य आहे. कथावस्तूचा विचार करता ती परंपरेहून वेगळी असल्याचे जाणवते. कृष्णचरित्रात कोठेही न आलेली कथा कवीने ह्या ठिकाणी कल्पिली आहे. कवीने स्वतः कोणत्याही आधाराचा उल्लेख केलेला नाही. ह्या काव्यातील कृष्ण म्हणजे राजगोपाल मृगये-करिता बाहेर पडला असता गवाक्षातून पाहणाऱ्या मनोरमा ह्या लावण्यवतीचे दर्शन झाल्यानंतर तिच्या लावण्यावर लुब्ध झाल्याने तो खिन्न होऊन मृगयेस न जाता घरी परततो. त्याची ही उदासीन अवस्था पाहून त्याने पाळलेला शुक दूत होऊन मनोरमेकडे जातो व तिला घेऊन येतो. ह्या प्रेमरहस्याची चाहूल कृष्णसख्यांना लागते. त्या रुष्ट होतात. शुकाच्या चतुरोक्तीने त्यांचा कोप जातो. पण त्याच कारणाने बलराम युद्धास प्रवृत्त होतो. कारण असुराशी युद्ध झाल्याने कृष्ण घायाळ होऊन पडला आहे, ही बातमी त्याला त्याच्या गुप्तचरांकडून समजते. पुढे सख्यांचा राग काढण्यासाठी त्यांच्याशी जलक्रीडा वा विलास करीत असताना बलराम-विचित्रसेन ह्यांचे युद्ध द्वारकेच्या दाराशी येऊन ठेपते. शेवटी विचित्रसेनाला ठार मारून कृष्ण ह्या युद्धाचा शेवट करतो व सर्वत्र आनंदीआनंद होतो. अशी ही काव्यकथा चाकोरीपेक्षा वेगळी व कविकल्पित म्हणून स्वतंत्र आहे.

गतिमान कथानक व नाट्यात्मकता असे दोन प्रमुख घटक ह्या काव्यात दिसतात. कथावस्तू प्रमाणबद्ध असून विविध प्रसंगांची जोडणी चातुर्याने केली आहे. काव्यात शृंगाररसाला प्राधान्य असून वीररस हा आनुषंगिक आहे. वर्ण्यवस्तूंचे सूक्ष्म चित्रण कवी करतो. त्यामुळे त्या वस्तू प्रत्यक्षात साकार झालेल्या दिसाव्यात अशी दृश्यात्मकता प्रतीत होते. उदा., ९ व्या उल्लासातील वारवनितांचे नृत्य ह्याच पद्धतीने चित्रिले आहे. वस्तुनिष्ठ कथनापेक्षा संवादावर भर दिल्याने काव्यातील नाट्यात्मकता वाढली आहे. शुक–कृष्णस्त्रिया, कृष्ण–कृष्ण-स्त्रिया ह्यांच्या संवादांतून अनेकदा मिश्किल विनोदाची योजना कवी करतो. काव्य घटनाप्रधान असल्याने त्यात स्वभावरेखनाला फारसा अवसर नाही. त्यांतल्या त्यात शुकाचे चित्रच प्रामुख्याने कवीने रेखाटले आहे, असे म्हणता येते.

कवीच्या काव्यास प्रत्यक्षात इतर कोणत्याही कृतीचा आधार नसला तरी ७ व्या उल्लासातील जलक्रीडेच्या वर्णनावर *हरिवंशा*चा प्रभाव पडला आहे (*विष्णुपर्व* : अ. ८८–८९). ५ व्या व ६ व्या उल्लासातील युद्धवर्णनावर रामदासांच्या *रामायणयुद्धकांडा*ची छाप आहे. रामदासांच्या काही कल्पना व शब्दरचना ह्यांचेही अनुकरण कवी करतो. उदा., 'रणीं त्या खणाणा सणाणा दणाणा। ध्वनी ऊठती वीर आले स्फुराणा।' ह्या प्रकारची रचना.

काव्याची भाषा संस्कृतप्रचुर असून त्यामध्ये तत्सम शब्दांचा भरणा व प्रदीर्घ समास आढळतात. काही तेलुगू शब्दही जसेच्या तसे किंवा बदलून आलेले पाहण्यास सापडतात.

तंजावरकडील मराठी कवींच्या आख्यान-कवितेत पृथगात्मता येण्याचे एक कारण म्हणजे तेथील कवींवर तेलुगूतील प्रबंध-काव्याचा झालेला संस्कार. ज्याप्रमाणे तेलुगू साहित्यातून मराठी यक्षगान-नाटकाची निर्मिती झाली त्याप्रमाणे मराठी आख्यान-काव्याला तेलुगू प्रबंधकाव्याच्या सहवासाने नाट्यात्मक घाट प्राप्त झाला. *राजगोपाल-विलासात* ह्याचा प्रत्यय येतो. प्रस्तुत काव्याची संहिता तंजावर सरस्वतीमहाल ग्रंथालयातील हस्तलिखितावरून (बा. १५०२) प्रा. माणिक धनपलवार ह्यांनी सिद्ध केली आहे. ह्या पूर्वी तंजावर सरस्वती-महाल ग्रंथालयाच्या नियतकालिकातून ह्या काव्याचा २ रा व ५ वा उल्लास एस. गणपति राव ह्यांनी १९६६ साली प्रसिद्ध केला होता.

**रचना : मु.** – १. राजगोपालविलास; उल्लास १–९; ग्रं. सं. ५७०; संपा. धनपलवार, माणिक; हैद्राबाद, १९७४; विवेचक प्रस्ता., पृ. १–३९. २. ईश्वरभिल्लिणीसंवाद; ग्रं. सं. १०. ३. दक्षिणद्वारकापर-चूर्णिका. ४. मेरुस्वामीस्तवन; ग्रं. सं. ५; परिशिष्ट २ – राजगोपाल-विलास काव्य; हैद्राबाद, १९७४; पृ. १३२–१३४.

**श्यामराय** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. धनेश्वरचरित्र. २. भीष्मप्रताप; पदे ७, दिंड्या-आर्या ८, सवाई २, कडके २, श्लोक १५२; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**श्यामविठ्ठलसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – शिबिनिरूपण; ओवीबद्ध; अपूर्ण; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**श्यामसुत–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – वेताळपंचविशी; गं. ना. मुजुमदार संग्रह; संककासू., पृ. १११.

**श्यामसुत–२** [का. अनु.] कवी. हा स्वतःस मूढ माधव असे म्हणवितो.

**रचना : अमु.** – दशावतारवर्णन; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १११.

**श्यामसुंदर** [का. अनु.] पदकार,

**रचना : मु.** – तीन पदे; दोन रामपर (पैकी एक हिंदी) व एक भक्तिपर; पदसंग्रह, भा. २; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९६; पृ. ९–११.

**श्यामाकवि** [का. अनु.] कवी. ह्याचे *हंसध्वजाख्यान* (मु.) हे काव्य लावणी छंदात असून ओवीसंख्या ११ आहे (अकलकामा., भा. ४, पृ, ७०–७३).

**श्यामात्मज** [का. अनु.] कवी. ह्यांची १५ पदे *पदसंग्रह, भाग २* (मुंबई १८९६) मध्ये छापली आहेत. ह्यांत रामपर पदे अधिक आहेत. ह्या पदांतून स्वोद्धाराची तळमळ जाणवते. 'बाई ! मी पिशी झाली ग', 'दादला मिळाला करंटा' अशा काही पदांतून अध्यात्मविषयक गूढ अनुभव कवीने व्यक्त केला आहे. श्यामसुत, श्यामतनय असाही आपला उल्लेख पदांच्या अंती कवी करताना दिसतो. कवीची श्लोक व पदपदांतरादी बरीच अप्रसिद्ध रचना तंजावर येथील सरस्वतीमहाल हस्तलिखित संग्रहात सापडते. ती अशी : *किष्किंधाकांड श्लोक*, रामपर, विष्णुपर, पांडुरंगपर, कृष्णपर, करुणापर व बोधपर पदे इत्यादी स्फुट कविता (हस्त. यादी, क्र. ३).

**श्यामसुतांकित** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**श्रीकांत अवधूत** [अंदाजे श. १४८० / इ. स. १५५८ – श. १५३० / इ. स. १६०८] कवी. हे विप्रकुलोत्पन्न असून अवधूत ही त्यांची सांप्र-दायिक उपाधी आहे. गुरुपरंपरेत ग्रंथकाराने पुढील नावे दिली आहेत : शंकर > उमा > मत्स्येंद्र > गोरक्ष > आदिनाथ > दत्त > सदानंद > रामानंद > गंभीरानंद > ब्रह्मानंद > मुधेश > श्रीकांत. म्हणजेच ह्यांच्या गुरुपरंपरेत नाथ व दत्त असे दोन प्रवाह दिसतात. ह्यांपैकी गंभीरानंद श. १४०० (इ. स. १४७८), ब्रह्मानंद श. १४३० (इ. स. १५०८) मधील आहेत. श्रीकांताचे गुरू ब्रह्मानंद मुधेश ह्यांचा काल गुरुपरंपरेवरून १४५० ते १५०० मानल्यास हा ग्रंथकार अंदाजे

श. १४८० ते १५३० च्या दरम्यानचा मानता येतो.

*अद्वैत-मकरंद* (अमु.) ह्या श्रीकांत अवधूतांच्या ग्रंथाची ओवी-संख्या ६३० आहे. वेदान्ताचे सुबोध विवरण ग्रंथात येते. लक्ष्मीधर ह्यांच्या *अद्वैत-मकरंद* ह्या संस्कृत ग्रंथाहून प्रस्तुत ग्रंथ भिन्न आहे (तंसम. हस्त. यादी, क्र. १).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा.; श्रीकांत अवधूत; काही अज्ञात सारस्वत उपासक (तंजावर सरस्वती महाल); नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २१.

**श्रीकृष्णजयराम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पांडुरंगपर पद; तंसम. हस्त., यादी क्र. ३.

**श्रीदास** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – गणपतीची आरती; मआ., पृ. ३२४.

**श्रीधर–१ (नाझरेकर)** / ० **श्रीधर ब्रह्मानंद** / ० **श्रीधरस्वामी–२** [इ. स. १६५८–१७२९] लोकप्रिय मराठी आख्यानकवी. पंढरपुरापासून बत्तीस मैल अंतरावर असलेल्या नाझरे ह्या गावी श. १५८० मध्ये ह्यांचा जन्म झाला. ह्यांच्या वडिलांचे नाव ब्रह्मानंद व आईचे नाव सावित्री. उपनाव देशपांडे. हे देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण. मूळ मोंगलाईतले, खडकी गावचे. घराणे खडकी गावचे म्हणून लोक ह्यांना खडके ह्या नावाने ओळखीत असत. ह्या घराण्यातील एक पुरुष राघोपंत विजापुरास घोडदळावर अधिकारी होता. म्हणून त्याला सर्वजण घोडके ह्या नावाने संबोधू लागले. पुढे ह्या राघोपंतांस नाझरे महालाचे देशकुळकर्णीपणाचे वतन मिळाल्याने ते नाझरे येथे कायम राहू लागले. तेव्हापासून ते नाझरेकर झाले. ह्या राघोपंतांपासून श्रीधर कवी सहाव्या पिढीतले.

श्रीधर हे दत्त-परंपरेतील काशीच्या रामानंदांच्या आनंदसंप्रदायातील आठवे पुरुष होत. ह्यांचे वडील ब्रह्मानंद हेच त्यांचे गुरू. ह्यांचे आजे दत्तानंद ह्यांना पूर्णानंदांचा अनुग्रह होता. ते मोठे योगी व ज्ञानी होते. ब्रह्माजीपंतांचे हेच विद्यागुरू आणि मोक्षगुरू. श्रीधरांनी आपल्या गुरुपरंपरेचा मोठ्या आदराने उल्लेख करताना म्हटले आहे : "पूर्णानंदकृपापूर्ण दत्तात्रय महामुनि ॥ ७ ॥ दत्तात्रयसमुत्पन्नो ब्रह्मानंदमहायतिः । कैवल्यपददातारं महाराजं नमाम्यहम् ॥ ८ ॥" आपल्या ग्रंथातून श्रीधराने रामानंद > अमलानंद > सहजानंद > पूर्णानंद > दत्तानंद > ब्रह्मानंद > श्रीधर अशी त्यांची आनंदसंप्रदायाची गुरुपरंपरा सांगितली आहे. ज्ञानासहित भक्ती, सगुणोपासना आणि शेवटी अद्वैतावस्था हे ह्या संप्रदायाचे वैशिष्ट्य आहे.

*मल्लारि माहात्म्यात* श्रीधराने आपले सर्व पूर्वज योगीश्वर होते असे म्हटले आहे. दत्तानंद शके १५९० (इ. स. १६६८) मध्ये समाधिस्थ झाले. त्यानंतर किमान आठ-दहा वर्षे राहून ब्रह्मानंदांनी शके १६०० ते१६०३ च्या दरम्यान पंढरपुरास प्रयाण केले व तेथेच संन्यास घेऊन उर्वरित आयुष्य आश्रमधर्माचरणात व लोकोपदेशात घालविले. त्यांनी *आत्मप्रकाश* हा वेदान्तपर ग्रंथ शके १६०४ (इ. स. १६८२) मध्ये रचला. शके १६१५ (इ. स. १६९३) मध्ये ते भीमातटी समाधिस्थ झाले. अशा तऱ्हेने अध्यात्म व कवित्व पितृपितामहक्रमाने श्रीधरांना प्राप्त झाले होते. प्रसिद्ध साधुकवी रंगनाथस्वामी निगडीकर (श. १५३४ ते १६०६) हे श्रीधरांचे चुलतचुलते होत.

श्रीधरांचा जन्म भगवद्भक्त व विद्वान कुळात झाल्याने त्यांच्यावर बालपणापासून चांगले संस्कार झाले होते. प्रारंभीचा अभ्यास नाझरे गावी झाला. शके १६०० (इ. स. १६७८) मध्ये ते वडिलांबरोबर पंढरपुरास आले त्यामुळे त्यांचा पुढील अभ्यास पंढरपुरात झाला. श्रीधरांनी त्या काळच्या पद्धतीप्रमाणे संस्कृत ग्रंथांचे चांगले अध्ययन केले होते. *भारत, रामायण, भागवत* आणि *स्कंधपुराणातील ब्रह्मोत्तरखंड* ह्या संस्कृत ग्रंथांचे अध्ययन त्यांनी फार परिश्रमपूर्वक केले. त्याआधारे त्यांनी मराठी ग्रंथ लिहिले. ते लिहिताना त्यात *हरिवंश, ब्रह्माण्डपुराण, नारदपुराण, पद्मपुराण, अग्निपुराण, जैमिनी अश्वमेध, हनुमन्नाटक* ह्यांतील कथांचा समावेश केला. त्या त्या कथा कोठून घेतल्या हे त्यांनी सांगितले आहे. जेथे मूळ ग्रंथाशी विसंगती आहे, तेथे तिचे स्पष्टीकरण करताना श्रीधरांनी म्हटले आहे : "अनादिसिद्ध अवतार माळा । जगदीशे गुंफल्या अवलीला। जैसे तरंगा पूर्वी जळा । व्यापोनिया असणें की ॥" ह्याशिवाय "कवीची घडामोडी बहुत । युक्ति सागरींची रत्ने काढीत । एक गव्हांचे प्रकार बहुत । करी जैसी सुगरिणी ॥" हे एक कारण आहेच. पुराणग्रंथांखेरीज श्रीधरांनी पंचमहाकाव्ये, जयदेव, बिल्वमंगल, कालिदासादी कवींची नाटके, साहित्यग्रंथ ह्यांचाही चांगला अभ्यास केला होता. संस्कृतातील व्याकरण, न्याय, धर्म, ज्योतिष ह्या विषयांचे त्यांनी परिशीलन केल्याचे दिसते. वेदान्तशास्त्र हे त्यांच्या विशेष आवडीचे होते. *गीता, उपनिषदे, योगवासिष्ठ* ह्या ग्रंथांचा त्यांना परिचय होता. टीकाकारांत वेदान्तसूत्रांवर भाष्य करणारे शंकराचार्य ह्यांजविषयी त्यांना आदर व अभिमान वाटत होता. 'सकल मतवादी जंबुक जाण । शंकर सिंह गर्जतसे ॥' तसेच 'सकल मतवादी दरिद्री । शंकर श्रीमंत पृथ्वीवरी ॥' असा त्यांना आचार्यांचा अभिमान वाटत असे. ह्याशिवाय *भागवत*-टीकाकार श्रीधराचार्य व *गीता*-टीकाकार मधुसूदन सरस्वती ह्यांचाही व्यासंग श्रीधरांस चांगला होता.

संस्कृत ग्रंथकारांप्रमाणे मराठी कवींची कविताही श्रीधरांच्या परिचयाची होती. त्यांचे प्राकृत कवींच्या काव्यकृतींचे अध्ययन विस्तृत व सखोल होते. 'वेदांत क्षीरार्णवीचा मीन । जेणे सिंधू रचिला पूर्ण।' ते मुकुंदराज, गीतार्थकार ज्ञानदेव, प्रतिष्ठानवासी एकनाथ, चातुर्थ राजधानीचे कळस मुद्गलदास, मुक्तेश्वर, 'ज्याची लोकरचना या भूमीमंडळावरी अपूर्व' असे वामन, इत्यादी ग्रंथकारांचा श्रीधरांचा चांगला व्यासंग होता. त्यांच्या कल्पनांचे व विचारांचे सादृश्य श्रीधरांच्या काव्यात विपुलतेने आढळते. कृष्णस्वामींचे शिष्य जयरामस्वामी वडगावकर, ब्रह्मानंदस्वामींचे बंधू श्रीरंगनाथस्वामी निगडीकर, समर्थ रामदास ह्यांच्या ग्रंथांशी श्रीधरांचा दाट परिचय होता. तुकोबांच्या काव्यातील कल्पनाही श्रीधरांच्या वाङ्मयात सापडतात. श्रीधर बहुश्रुत होते. ते विद्वानही होते. त्यांनी वरील कवींच्या काव्यांतून जे जे ग्रहण केले, त्याचा प्रसंगानुरूप अत्यंत चतुरतेने आपल्या ग्रंथांत उपयोग केला आहे.

वडील समाधिस्थ झाल्यानंतर श्रीधरांनी पंढरपुरातच एक घर विकत घेतले व तेथेच ते स्थायिक झाले. ह्या घराचे खरेदीखत शके १६३९ (इ. स. १७१७) मधील आहे. त्यातील पुढील गोष्टी महत्त्वाच्या आहेत : 'महजर खत छ १ माहे १४ सफर शके १६३९ हेमलंबी नाम संवत्सरे पौष व ॥ १ सोमवार रोजी' (ता. ६ नोव्हेंबर इ. स. १७१८) 'अप्पाजी विठ्ठल काटे यांनी सव्वादोनशें रुपयांस श्रीधर ब्रह्मानंद देशपांडे ह्यांस विकत दिलें'. ह्या खतावर घरविक्रेते काटे व इतर पन्नास गृहस्थ ह्यांच्या साक्षी आहेत.

श्रीधरांच्या चरितार्थाचे साधन म्हणजे नाझरे येथील देशपांडेपणाचे वतन. त्यांचा सर्व काळ वाचन, मनन, कीर्तन, पुराण, ह्यांत आणि संत व विद्वान यांच्याशी चर्चा करण्यात जात असे. उत्तम व अलौकिक कीर्तनकार म्हणून त्यांची ख्याती होती. त्यांचे कीर्तन ऐकण्यास शास्त्रीपंडितांच्या उड्या पडत असत. मानपुरी गोसावी त्यांच्या कीर्तनाची प्रशंसा करताना म्हणतात : "कीर्तनकी तेरी ढाल लगी हे । श्रवतकरत हम रीझो ॥" त्यांचे घर भक्त व सज्जन ह्यांनी गजबजलेले असे. त्यांच्या पत्नीचे नाव पार्वतीबाई. त्यांचा उल्लेख श्रीधराच्या दोन्ही पुत्रांनी आपसात वाटणीपत्र केले त्यात आहे. ही फारकत 'शके १६५९ माघ व ॥ १०' ची आहे. त्यात "याखेरीज पार्वतीबाई मातोश्रीपासी तोळा व मासा आहे

तो तीमाबारा दोन ठाई करून घ्यावा" असे लिहिले आहे. श्रीधरांस तीन पुत्र झाले. त्यांची नावे दत्तात्रय, मनोहर व रंगनाथ. त्यांपैकी तिसरा मुलगा रंगनाथ श. १६५५ (इ. स. १७३३) पूर्वीच मयत झाला असावा. कारण, श. १६५५ मध्ये शाहूमहाराजांनी दिलेल्या सनदेत दत्तात्रय व मनोहर ह्या दोघांचाच उल्लेख आहे. त्याचप्रमाणे श. १६५९ (इ. स. १७३७) तील वाटणीपत्रातही उर्वरित मातृधन वरील दोन पुत्रांमध्ये वाटून घ्यावयाचे ठरले होते. श्रीधरांचा गृहस्थाश्रम अत्यंत सुखाचा होता. ज्ञानप्राप्तीनंतरही नित्यनैमित्तिक कर्माचे आचरण करीत राहावे असे श्रीधरांचे मत होते. त्यानुसार नित्य ब्राह्ममुहूर्तावर उठून ते भीमास्नान, स्नानसंध्यादी षट्कर्मे उरकीत. नंतर देवपूजा ह्या नित्यविधी-नंतर अध्ययन, अध्यापन, ग्रंथलेखन, भोजन, पुराण, देवदर्शन व रात्री भजन व कीर्तन असा त्यांचा दिनक्रम होता. त्यांचे उपास्यदैवत पंढरीचा पांडुरंग हेच होते. तरी त्यांनी सर्व देवदेवतांचा स्वीकार केला होता. 'अवघा एक ब्रह्मानंद' हे त्यांचे तत्त्व होते.

श्रीधरांनी *तीर्थमाला* हे एक चाळीस पद्यांचे काव्य लिहिले त्यावरून त्यांनी हिंदुस्थानातील पवित्र स्थळांचे दर्शन तीर्थयात्रेच्या निमित्ताने घेतले होते. ह्या तीर्थयात्रा ब्रह्मानंदांच्या समाधीनंतर शके १६१५ ते १६२० (इ. स. १६९३ ते १६९८) पर्यंतच्या चारपाच वर्षांतल्या असाव्यात असे प्रा. चिं. नी. जोशी ह्यांनी अनुमानिले आहे. ह्या तीर्थयात्रेत रामेश्वरादी बारा ज्योतिर्लिंगे, पंचप्रयाग, सप्तपुऱ्या, प्रभास, सोमनाथ, गडदामोदर (द्वारकेत) वगैरे अनेक महत्त्वाची तीर्थक्षेत्रे त्यांनी पाहिली. शेवटी 'कृतार्थ' झालेल्या श्रीधरांनी पंढरपूरक्षेत्री श. १६५१ (इ. स. १७२९) मध्ये आपला देह ठेवला.

श्रीधरांच्या आरतीत त्यांचा पुत्र मनोहर 'सव्वालक्ष काव्य सम्पूर्ण। कीर्ति झाली त्रैलोक्य भरून' म्हणजे श्रीधरांनी एकूण सव्वा लाख कविता रचल्याचे सांगतो. ह्या ग्रंथरचनेची सुरुवात त्यांनी *हरिविजया*पासून (श. १६२४/इ. स. १७०२) केली आणि तिची सांगता *शिवलीलामृत* ग्रंथाने (श. १६४० / इ. स. १७१८) झाली. *शिवलीलामृता*खेरीज बाकीची रचना त्यांनी पंढरपूर येथे केली. *शिवलीलामृत* हा ग्रंथ श्रीधरांनी बारामती येथे श्रीसिद्धेश्वराच्या म्हणजे शिवाच्या देवालयात लिहिला. श्रीधरांनी आपल्या ग्रंथांतच रचनाकाल व रचनास्थल ह्यांचे उल्लेख केले आहेत. परंतु त्यांची जी स्फुट प्रकरणे किंवा लघुरचना आहे त्याबाबत स्थलकाल काही निश्चित सांगता येत नाही. श्रीधरांनी *हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप, वेदान्तसूर्य, शिवलीलामृत* अशी प्रदीर्घ स्वरूपाची रचना केली. त्याचप्रमाणे *पांडुरंगमाहात्म्य, मल्लारिमाहात्म्य, व्यंकटेश-माहात्म्य*, अनेक स्फुट प्रकरणे, पदे, स्तोत्रे अशी स्फुट कविताही विपुल केली आहे. *जैमिनी अश्वमेध* हा ग्रंथ प्रा. चिं. नी. जोशी श्रीधराचा म्हणून सांगतात. परंतु ह्या ग्रंथातील अंतःस्थ प्रमाणांवरून तो त्यांच्या कोणातरी शिष्याने केलेला असावा, अशी शंका प्रा. श्री. वि. परांजपे ह्यांनी *मोरोपंत : केकावली, भाग* २ ह्या ग्रंथात व्यक्त केली होती. शि. ए. भारदे ह्यांनी *जैमिनी-अश्वमेध* ग्रंथ *हरिविजय* ग्रंथकर्त्या श्रीधरांचा नाही, असे मत स्पष्टपणे व्यक्त केले आहे (विज्ञावि., पु. ४५, मार्च १९१४, पृ. ११८). कारणे अशी : (१) अध्याय १, ओवी १३ मध्ये ह्या *जैमिनी-अश्वमेध*कर्त्याने आपले कुलदैवत ब्रह्मांडमंडपनगरीतील सिद्धनाथ होय असे म्हटले आहे. श्रीधर ब्रह्मानंदाचे कुलदैवत मल्हारी आहे; (२) *जैमिनी-अश्वमेध*काराने आपला मूळ मिरासीचा गाव कृष्णा-तीरावरील अष्टी होय असे म्हटले आहे; (३) तसेच त्याने बाप बिडाडी आणि आई लक्ष्मी असे सांगून (४) वडील लहानपणी निवर्तल्यामुळे वडील भाऊ त्र्यंबक ह्याने आपले संगोपन केले, त्यानेच विद्यादान केले असे म्हटले आहे; (५) हा ग्रंथ श. १६२१ पौष शुद्ध सप्तमी बुधवारी पाथरी गावी समाप्त झाल्याचे लिहिले आहे. म. म. द. वा. पोतदार ह्यांनीही *जैमिनी-अश्वमेध* हा ग्रंथ श्रीधरकृत नसावा असेच सूचित केले आहे (प्रा. चिं. नी. जोशीकृत 'श्रीधरचरित्र : पुरस्कार' पृ. २७-३३). स. ल. कात्रे ह्यांनी श्रीधरकवी नाझरेकर व श्रीधर-कवी पाथरीकर हे दोन कवी भिन्न असल्याचे एका वेगळ्याच स्वतंत्र पुराव्याच्या आधारे सिद्ध केले आहे. शिवराम पांडुरंग जोशी ह्यांनी इ. स. १८४४ च्या सुमारास *रामाश्वमेध* नावाचे १०० अध्यायांचे प्रचंड कथानककाव्य लिहिले (नागपूर विद्यापीठ, हस्त-लिखित ग्रंथ विभाग, आ. क्र. ३५२९). ह्या ग्रंथात शिवरामाने पूर्वसूरींचे प्रांजलपणे निर्देश केले आहेत. या पूर्वसूरींच्या नावांच्या कथनाच्या ओघात दोन परस्परभिन्न श्रीधरांचा तो निर्देश करून जातो : "ब्रह्मानंदस्वामी जया गुरुवर। परम पवित्र नामें श्रीधर। नागझर-नगरीं वसनार। ग्रंथ सुंदर तयाचे ॥ रामविजय हरिविजय पुन्यपावन। आनी पांडवप्रताप कथागहन। तेच सीवप्रतापी जान। भक्तीवर्नन ऐकिली ॥ आनी कृस्नातीरींचा वसनार। अश्वमेध ग्रंथ केला साचार। छयान्नव अध्याई परीकर। तो श्रीधर पुन्यमुर्ती ... (१.७५-७७)." ह्या स्वतंत्र पुराव्यात शिवरामाने *जैमिनी-अश्वमेधा*चे कर्तृत्व कृष्णातीरनिवासी त्र्यंबकानुज श्रीधरास दिले आहे (विसंमंवा., १९६१, पृ. १३५-१३६). ह्या सर्व उपलब्ध पुराव्यावरून *जैमिनी-अश्वमेध*कर्ता श्रीधर हा श्रीधर ब्रह्मानंद नाझरेकराहून निराळा आहे हे निश्चित होते.

श्रीधरांनी लिहिलेल्या स्फुट काव्याची संख्या जवळजवळ शंभराच्या आसपास आहे. महत्त्वाच्या प्रमुख ग्रंथरचनेपूर्वी ही स्फुट रचना पूर्वाभ्यास म्हणून त्यांनी केली. ह्या स्फुटरचनेत विविधता असून ती गणवृत्तात्मक आहे. ह्याच वेळी अक्षरगणवृत्तांपेक्षा ओवी ही पद्य-रचनेस सुलभ व सोईस्कर आहे म्हणून त्यांनी पुढील *हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप* व *शिवलीलामृत* ह्या दीर्घ काव्यरचनेत ओवी-छंदाचा वापर केला. ही स्फुट रचना *हरिविजय* ग्रंथ लिहिण्यापूर्वीची म्हणजे शके १६२४ (इ. स. १७०२) पूर्वीच्या पाच-सहा वर्षांतील आहे. ह्याखेरीज श्रीधरांनी अनेक देवता, पवित्र नद्या, वेदान्तसिद्धान्त ह्यांवर संस्कृत भाषेत स्तोत्रे रचली आहेत. काही विनोदी प्रकरणे, उदाहरणार्थ, *शिव-गौरी-विनोद, कुमार-गजानन-लीला, शिवगौरी-संवाद, भामाविनोद, भामा-वृति-संवाद* ही संस्कृत नाट्यवाङ्मयातील नांदीच्या मराठी अनुवादावर उभारलेली आहेत. ही सर्व रचना पंडिती वळणाची असून सुविद्य रसिकांना संतोषवील अशी आहे. स्वतःलाही तरून जाता यावे अशा हेतूने ती लिहिलेली आहे. *तत्त्वगीता, संस्कृत स्तोत्रे, प्रश्नोत्तरमालिका, गुरुमहिमा, महावाक्यपंचीकरणम्, अथातो महावाक्यविवरणम्, राघवाष्टकम्* इत्यादी नऊ प्रकरणे संस्कृत श्लोकांत व संस्कृत चूर्णिकेत लिहिली आहेत. ह्याही रचनेचा काल शके १६२४ पूर्वीचा म्हणजे शके १६१८ ते १६२४ मधील असण्याची शक्यता आहे.

श्रीधरांची प्रमुख रचना कालानुसार पुढीलप्रमाणे होय : *हरिविजय* (श. १६२४/इ. स. १७०२), *रामविजय* (श. १६२५/इ. स. १७०३), *पांडवप्रताप* (श. १६३४ / इ. स. १७१२) आणि *शिवलीलामृत* (श. १६४०/इ. स. १७१८). ह्यांपैकी *हरिविजय* हा त्यांचा पहिला व श्रीकृष्ण-प्रेमाने प्रेरित होऊन लिहिलेला ग्रंथ. हा ग्रंथ त्यांनी *भागवताचा दशम-स्कंध, हरिवंश* आणि *ब्रह्मांड, नारद, पद्म* इत्यादी पुराणांच्या आधारे रचला. श्रीकृष्णाने अनेक दैत्यांचा संहार करून, त्यांच्यावर 'विजय' मिळविला आणि साधूंचे रक्षण केले, हा ह्या ग्रंथाचा विषय आहे. श्रीकृष्णाच्या जीवनातील मनोवेधक प्रसंग एकत्र करून हा *हरिविजय* ग्रंथ सिद्ध केला आहे. सहजसुलभ भाषा, उत्कट प्रसंग-निर्मिती, सर्वपरिचित दृष्टान्त, श्रीधरांचे सात्त्विक व भक्तिपूर्ण जीवन ह्यांमुळे हा ग्रंथ सर्वसामान्य जनांच्या सहजपणे मनात ठसतो. [ ➪ ३. ]

*रामविजय* ग्रंथात प्रभू रामचंद्राने रावणाच्या आसुरी राज्याचा

नाश करून 'विजय' मिळविला त्याचे वर्णन आहे. ही कथा वाल्मिकीच्या काव्याधारे रचली असून कथेस आकर्षकता आणि नावीन्य आणण्यासाठी *हनुमन्नाटक, अग्निपुराण, आनंदरामायण* अशा अनेक ग्रंथांतील व संस्कृत सुभाषितांतील सुंदर कल्पना घेऊन ती सजविली आहे. भक्ति, ज्ञान व वैराग्य ह्या तीन गोष्टींचा ठसा वाचकांच्या मनावर ठसावा म्हणून ही कथा लिहिली आहे, असे कवी स्वतःच सांगतो. ह्या ग्रंथाचे वर्णन करताना कवी म्हणतो : 'श्रीरामविजय ग्रंथ सुंदर। भक्तज्ञान वैराग्य भांडार' (रा. वि., ९.२२९). [⇨ ३.]

*पांडवप्रताप* हा ग्रंथ श्रीधरांनी व्यासकृत *महाभारता*च्या आधारे रचला. ह्यात पांडवांच्या प्रतापाचे म्हणजे त्यांच्या पराक्रमाचे वर्णन आहे. पांडवांच्या कथेने श्रीधराला चांगलेच आकर्षून घेतले आहे. ही पांडवकथा सांगताना श्रीधराने *जैमिनीभारत, भागवत, हरिवंश* इत्यादी संस्कृत ग्रंथांतून काही प्रसंग घेतले आहेत. मुक्तेश्वराच्या *भारता*वरील उपलब्ध पर्वांचा कवीने सर्रास उपयोग करून घेतला. ह्या ग्रंथाचे नावही मुक्तेश्वराच्या पुढील ओवीवरून सुचले असावे असे दिसते : 'पांडव-प्रताप पुरुष तरणा। नववधू कौरवसेना।' (आदि. ४४. १४४). स्वतः श्रीधर ह्या ग्रंथाचे वर्णन 'पांडवप्रताप ग्रंथ सुंदर। सकळ साहित्याचे भांडार' असे करतात. ह्या *पांडवप्रतापा*त श्रीधराने पहिले ३५ अध्याय मुक्तेश्वराच्या *महाभारता*वरून सिद्ध केले आहेत. इतकेच नव्हे तर अनेकदा शब्द, कल्पना आणि वर्णने ही जशीच्या तशी त्यांनी मुक्तेश्वरांकडून घेतली आहेत. *जरासंध* प्रकरणातील मुक्तेश्वरी कल्पनांचा श्रीधरांनी केलेला उपयोग पुढील उताऱ्यांवरून सहज स्पष्ट होईल. उदा., मुक्तेश्वर : "सरला सुकृताचा तंतु। आयुष्य-तैला झाला अंतु। माझिये हस्ती व्यजन वातु। भीमरूपें उदेला ॥ तो झगटला सत्वर गती। प्राण-दीप पंच ज्योती। मालवोनी पडेल क्षितीं। गात्रपात्र पालथें॥" (सभा., ७.२, ४). श्रीधर : "आयुष्य-तैल सरलें पूर्ण। भीम म्या हातीं धरिला व्यंजन। प्राणज्योति जाईल विझोन। समय जवळी पातला। देह दीपपात्र रितें। पडेल येथेंचि पालथें। हें फळ रोकडेंच एथें। पावशील तूं आता॥". [⇨ ३.]

*शिवलिलामृत* हा ग्रंथ श्रीधरांनी बारामती येथील शिवाच्या देवालयात लिहिला. हा ग्रंथ संस्कृत *स्कंदपुराण-ब्रह्मोत्तरखंडा*च्या आधारे लिहिला असे श्रीधरांनी म्हटले आहे. ह्या ग्रंथाच्या श्रवण-पठणाने पातके नष्ट होतील, अपार आयुष्य लाभेल, आरोग्य, संतती व संपत्ती मिळेल असेही कवी सांगतो. शिवपंचाक्षरमंत्र हा सर्वांसाठी आहे. त्याने दारिद्र्य, दुःख, भय, शोक, काम, क्रोध इत्यादिकांचा संहार होतो. तो मंत्र मानव जातीला तारणारा आहे, अशी श्रीधर ग्वाही देतात. 'स्त्री शूद्र आदि करुनी। हाच जप मुख्य चहूं वर्णी। गृहस्थ ब्रह्मचारी आदि करोनी। दिवस रजनी जपावा॥' (शि.ली. १.५०). ह्या ग्रंथात चौदा अध्याय आहेत. पंधरावा अध्याय कोणा श्रीधरभक्ताने त्यास जोडला आहे. शिवमंत्रावरील भक्ती व सामान्यजनांच्या मनाची पकड घेणारी निवेदनशैली, ह्यांमुळे ह्या ग्रंथाची लोकप्रियता आजही कायम आहे. [⇨ ३.]

अशा विस्तृत आख्यानकवितेबरोबर श्रीधरांनी *पंढरीमाहात्म्य, ज्ञानेश्वरचरित्र, मल्हारीविजय* असे लहान लहान ग्रंथ लिहिले आहेत. *वेदान्तसूर्य* (श. १६२५ / इ. स. १७०३) ह्या ग्रंथात श्रीधरांचा वेदबाङ्मयाचा व्यासंग दिसून येतो. परंतु अशा लेखनात ते फारसे रमले नाहीत. श्रीधरांच्या स्फुट रचनेत ९४ स्फुटे, १२ नामावली, २ परंपरागतवर्णनपर रचना आणि ९ संस्कृत स्तोत्रे इत्यादी रचना समाविष्ट आहेत. ह्या स्फुट रचनेचे स्वरूपही त्यांच्या *रामविजय, हरिविजय* ह्या ग्रंथांप्रमाणे प्रामुख्याने आख्यानपर आहे.

श्रीधरांच्या स्फुट रचनेसंबंधी माहिती देताना चिं. नी. जोशी ह्यांच्या ग्रंथात *रागमाले*चा उल्लेख आहे. श्रीधर श्रेष्ठ प्रतीचे कीर्तनकार होते. कीर्तनकारांस संगीतसाधना आवश्यक असते. श्रीधरांनी *रागमाला* रचून ह्या क्षेत्रातले स्वतःचे प्रावीण्य सूचित केले आहे. त्याचप्रमाणे *रागरत्नाकर* आणि *संगीतरत्नाकर* ह्या संस्कृत ग्रंथांशी त्यांचा परिचय असल्याचेही *रागमाले*त सूचित केले आहे. *रागमाले*त पंचवीस ओव्या आहेत. त्यात अनेक रागांचे व त्यांच्या छत्तीस भार्यांचे (रागिणींचे) वर्णन केले आहे.

*महाराष्ट्रसारस्वत*कारांनी श्रीधरांचा पुढील शब्दांत यथोचित गौरव केलेला आहे : "श्रीधर जें लिहिणें तें स्वच्छ साध्या भाषेंत लिहितो. तो विद्वत्तेच्या भानगडींत न पडतां बहुजनसमाजाची नेहमींचीच भाषा प्रायः वापरतो. त्याचे शब्द, त्याचीं प्रमेयें व त्याच्या कथा आबालवृद्धांना, स्त्रियांना, मुलांना व शूद्रांनाहि सहज समजतील, अशा रीतीनें तो सांगतो. त्याचे ग्रंथ म्हणजे एक अवीट पक्वान्न आहे. चातुर्मासांत श्रावण महिन्यांत रोज संध्याकाळीं सभोवार असलेल्या शेतकऱ्यांना, मध्यें पाटावर बसून पोथी लावणारा (वाचणारा) वक्ता श्रीधरी ग्रंथ वाचतांना पाहून मनाला मोठें समाधान वाटतें. ती सर्व संकटांचा विसर पाडणारी, श्रमभाग हरणारी, अरसिकांनाहि गुंगवणारी, अनंत-रस-वाहिनी, दुःखदारिद्र्य-परिहारिणी अशी श्रोत्यांच्या कर्णसागराला भेटण्याकरितां प्रेमभरानें उचंबळून वाहत जाणारी गोड वाणी यथेच्छ कथागान करीत वाहत आहे, हा देखावा पाहून मन प्रसन्न होतें; व त्या देवादिकांच्या आणि भारतीय युद्धाच्या नितांत रम्य कथा ऐकून ते श्रोते डोलू लागले म्हणजे खरोखरच धन्यता वाटते." (मसा., आ. ५, पृ. ४३४). श्रीधरांच्या स्फुट व दीर्घ रचनांच्या मागील प्रेरणा व ह्या प्रेरणांनी वरील रचनांना प्राप्त झालेले विशिष्ट रूप हे एकच आहे. श्रीधर हे प्रथम भक्त आहेत. त्यांची भूमिका पुराणिकाची, कीर्तनकाराची आहे. रामकृष्णांच्या कथांतून सामान्य जनतेला परमार्थज्ञान मिळावे हा त्यांच्या काव्य-प्रपंचामागील हेतू आहे. सर्व घटना ईश्वरी कृपेने होतात अशी त्यांची श्रद्धा आहे. ईश्वरी कर्तृत्वाचा ठसा वाचकांच्या मनावर उमटावा ही त्यांच्या कर्तृत्वाची योजना आहे. ह्या योजनेत श्रोते सन्मार्गगामी व्हावेत म्हणून कथानिवेदन दृष्टान्त, उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, सुभाषिते इत्यादी अलंकार योजून त्यांनी रंजक केले आहे. श्रीधरांची ह्या बाबतीतली भूमिका स्पष्ट झाली आहे. ती अशी : "अमृताहून गोड अन्न। परि रुचि नये शाके विण। दृष्टांताविण ग्रंथ संपूर्ण। रसीं न चढे सर्वथा॥ रत्नवाणी मेरु पाठारीं। तैसे दृष्टांत कथेमाझारीं। कमला वाचोनि सरोवरीं। शोभा न ये सर्वथा॥ कीं क्षेत्र जैसें बीजाविण। दृष्टांताविण ग्रंथ तैसा॥" (*रामविजय*, अ. ९, ओ. ६ ते १२).

मुक्तेश्वर ते मोरोपंत ह्या स्वराज्यकालातील मराठी काव्य-परंपरेत श्रीधरांचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. श्रीधरांची कथारचना मुख्यतः *भावार्थरामायण, मुक्तेश्वरी भारत, कथाकल्पतरु* ह्या पूर्वकालीन प्राकृत ग्रंथांच्या अनुरोधाने झाली आहे. त्यांनी *रामायण-भारतां*तील कथांचे निवेदन कौशल्यपूर्ण संक्षेपाने केले आहे; आणि हेच त्यांच्या कथारचनेचे वैशिष्ट्य होय. क्वचित्प्रसंगी ज्ञानदेव, एकनाथ, वामन पंडित ह्यांच्या ग्रंथांचे त्यांनी अनुसरण केले आहे. त्यांनी पूर्वकालीनांची नक्कल केली नाही; पण आपल्या रचनेचा गाभा वरीलपैकी कोणाकडून तरी त्यांनी घेतलेला असतो. त्यांची मांडणी मात्र नीट-नेटकी, ठाकठिकीची, संक्षेपचातुर्याने व संयमाने केलेली असते. श्रीधरांच्या लेखनातील वेदान्त, सांसारिक दृष्टान्त, फलश्रुतीचे आकर्षण, गंगौघाप्रमाणे शांत कथाप्रवाह, शुद्ध भावमयता इतक्या विशेषांमुळे श्रीधरांचे ग्रंथ लोकमान्य झाले. सामान्य जनांची पारंपरिक श्रद्धास्थाने त्यामुळे बळकट झाली.

एकनाथांपासून पौराणिक कथारचनेची जी विशिष्ट परंपरा सुरू झाली तिचा उत्कर्ष श्रीधरांच्या कथारचनेत झालेला आढळतो. त्या

परंपरेचा श्रीधर हा ह्या कालातील प्रातिनिधिक कवी आहे.

**रचना :** अमु. – १. पंढरीमाहात्म्य, पोथी; पद्यात्मक; मुंबई, १९०३. २. पांडवप्रताप; संपा. मंडलिक, वि. ना. व फडके, गो. गं.; मुंबई, १८६८. ३. पांडुरंग माहात्म्य; पद्मपुराणांतर्गत पोथी; अ. १०; आ. ५ वी, प्रका. गणपत कृष्णाजी; मुंबई, १८८९; ४. मल्लारिमाहात्म्य; अ. २; ग्रं. सं. ३५५; अकलकामा., ४; मुंबई, १९०३; पृ. २५–४४. ५. महिम्नस्तोत्राचे श्रीधर-कविकृत प्राकृत समश्लोकी भाषांतर; संपा. काळे, या. मा.; उमरावती, १९२९. ६. रामविजय; अ. ४०; मुंबई, १८८४. ७. वेदांतसूर्य; संपा. राजाध्यक्ष, रा. स.; मुंबई, १९५२. ८. शिवलीलामृत; प्रका. गोडबोले, ना. आ.; पुणे, १८७०. ९. हरिविजय; प्रका. गोंधळेकर, रा. श्री.; पुणे, १८९९. **स्फुट प्रकरणे** – १०. जांबूळ कथा; ग्रं. सं. ३६; अकलकामा., ४; मुंबई, १९०३; पृ. २३१–२३३. ११. पारधीकथा; ग्रं. सं. ३६; अकलकामा., ४; पृ. १२८–१३०. १२. संतप्रताप; ग्रं. सं. ३८; महाकवि, क्र. २७; कार्तिक, श. १८२७; स्फुट प्रक. : पृ. १८–२१ १३. सावित्री आख्यान पोथी; मुंबई. १४. पदे : पदसंग्रह, भा. ३; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १९०१; पृ. ७९–८१. १५. व्यंकटेशमाहात्म्य; अ. १०; ग्रं. सं. ६५०. १६. ज्ञानेश्वरचरित्र; अ. २; ग्रं. सं. ३००. **अमु. – स्फुट रचना** – १. अनुभवसार; २५ श्लोक. २. उखाहरण; पद्ये ३४. ३. उपदेशपासष्टी; ओव्या ६६. ४. उपमन्युचरित्र; पद्ये १७. ५. उमारमासंवाद; पद्ये ३३. ६ एकादशी आख्यान; पद्ये १३७. ७. कपोतकथा; पद्ये २. ८. कपोत-कपोती-संवाद; ओव्या ४१. ९. कली आख्यान; ओव्या ५६. १०. कीर्तनमाहात्म्य; पद्ये ३०. ११. कुंभकर्ण-मतिपालट; पद्ये १५. १२. कुमार-गजाननलीला; पदे ११. १३. कृष्णनिंदा; पद्ये १३. १४. कृष्णलीला; पद्ये ३०. १५. कृष्णलीला; पद्ये ४६. १६. गजानन-षडानन-संवाद; पदे ११. १७. गोकुळलीला; पाच लीळा; पदे ९६. १८. गोपी-उद्धव-संवाद; पद्ये ३७. १९. गोरक्षण; पद्ये १६. २०. गोविंदविलास; पद्ये १६. २१. चक्रव्यूह प्रसंग; ओव्या २४५. २२. चतुर्भुज सावज; पद्ये ३९. २३. चंद्रहासाख्यान; पद्ये ४६. २४. चिन्मयमोती; पदे १८. २५. जडभरताख्यान; पदे ४३. २६. थालीपाक, पद्ये ७९. २७. दानव्रत; ओव्या २०. २८. दिलिपराव; पदे ६०. २९. दिव्य जानकीचे; पद्ये ४०. ३०. दीपकचरित्र; पदे २८. ३१. दुर्वासभोजन; पद्ये ४५. ३२. देवभक्तसंवाद; पद्ये ४६. ३३. द्रौपदीस्वयंवर; ओव्या १६१. ३४. द्रौपदीहरण; ओव्या ७७. ३५. ध्रुवाख्यान; श्लोक ४०. ३६. नलोपाख्यान; पद्ये १०६. ३७. नामावली; पद्ये ४९. ३८. नारद नामामृत; पद्ये २५. ३९. निजधामगमन; पद्ये ४७. ४०. परीक्षितीप्रसंग; ओव्या १३९. ४१. पांडुरंगमाहात्म्य; पद्ये ६०. ४२. प्रल्हादचरित्र; ओव्या १००. ४३ बकमर्दन प्रसंग; ओव्या ६७. ४४. बोधचौसष्टी; ओव्या ६४. ४५. भद्रसेनचरित्र; पद्ये ३२. ४६. भस्मासुरमर्दन; पद्ये २१. ४७. भामा आनंद; पद्ये ७. ४८. भामाकृष्णसंवाद; पद्ये २९. ४९. भामादूतीसंवाद; पद्ये २५. ५०. भामाविनोद; पद्ये २५. ५१. भारती युद्ध; पद्ये १०. ५२. भिल्लीशिवसंवाद; पद्ये २८. ५३. भीष्मप्रतिज्ञा; ओव्या ५४. ५४. भिक्षुगीत; ग्रं. सं. ५०. ५५. मंडुकोद्धार; पद्ये ८. ५६. मथुरागमन; पद्ये १९. ५७. मदालसा; पद्ये २१. ५८. मनोनुस्तंभकाकवत; पदे ९. ५९. मयूरध्वज आख्यान; पद्ये २५. ६०. 'यथा गंगायां प्रति, घोषा वसन्ति'; पदे ११. ६१. राधागर्वविमोचन; पदे १५. ६२. राधाचंद्रोदय; ओव्या ३०. ६३. राधाविलास; पदे ३१. ६४. रामकृष्ण उपासक; पद्ये ४३. ६५. रामकृष्णलीला; पद्ये २३. ६६. रुक्मिणीनिश्चय; पद्ये ९. ६७. रुक्मिणीविनोद; पद्ये २९. ६८. रुक्मिणीस्वयंवर; पद्ये १३४. ६९. रेणुकाचरित्र; पद्ये २७. ७०. रेणुकासैवर व परशुरामजन्म; पद्ये ४४. ७१. लाक्षासदन; पद्ये १०४. ७२. वनमालाचरित्र; पद्ये २०. ७३. वसिष्ठविश्वामित्रसंवाद; पद्ये २७. ७४. व्याघ्रगुरुवर; पदे ८. ७५. व्यापार; पदे ४३ व श्लोक ३. ७६. शिवरात्री; पदे ३२. ७७. शुकरंभाचरित्र; पदे ३८. ७८. शुभ्रसिवध्यान; पद्ये १३ व पदे ४. ७९. श्रियाळचरित्र; पद्ये २०. ८०. श्रीदत्तात्रय माहात्म्य; ओव्या २६. ८१. समुद्रमंथन; पद्ये ६४. ८२. सासुरवास; पदे १५. ८३. सिखीध्वजचरित्र; पद्ये १७. ८४. सिवगौरी लग्न; पद्ये ५५. ८५. सिवगौरीविनोद; पद्ये १३. ८६. सीताविलास; पद्ये ४२. ८७. सुदामचरित्र; पद्ये ३४. ८८. सुधर्मातारक चरित्र; पद्ये ३१. ८९. सुभद्राहरण; ओव्या ६९. ९०. स्वर्गारोहण; प्र. २; पद्ये ६८. ९१. स्त्रियांनी गुरु करावा; पद्ये २४ व पदे ६. ९२. हरिलीला; पद्ये ४८. ९३. हरिश्चंद्रोपाख्यान; पद्ये ३५०. ९४. हस्तगौरीव्रत; पद्ये ३२.

**संस्कृत रचना** – १. गुरुमहिमा; आर्या ११. २. गुरुमहिमा; आर्या ११ (पहिल्या आर्यांहून ह्या भिन्न). ३. परंपरा; श्लोक १३. ४. प्रश्नोत्तरमालिका (ह्या २४ आहेत). ५. महावाक्य; श्लोक १०. ६. महावाक्यपंचीकरणम्; श्लोक १०. ७. राघवाष्टकम्; श्लोक ९. ८. स्तोत्रचूर्णिका; शिव, रामकृष्ण, अंबिका, गणेश, सूर्य व महालक्ष्मी ह्यांच्या ध्यानावर स्तोत्रे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कात्रे, स. ल. : दोन श्रीधर : एक नवीन पुरावा; विसंमंवा., १९६१; पृ. १३०–१३६. २. चांदोरकर, पां. मा. : श्रीधरस्वामींचे शिवलीलामृत; भाइसंमंपंसंवृ., श. १८३९; पृ. २१–३०. ३. जोशी, चिं. नी. : श्रीधर – चरित्र आणि काव्यविवेचन; १९५१. ४. जोशी, ना. ब. : कांहीं अज्ञात प्राचीन कवि; भाइसंमंत्रै., श. १८८८; पृ. १८–२१. ५. जोशी, ना. ब. : श्रीधर व शिवराम पूर्णानंद; इंद्रायणी, फेब्रु. १९६३; पृ. ४९–५१. ६. दिवेकर, हृ. रा. : श्रीधर : महाराष्ट्रीय संत : वाङ्मय व जीवन; १९५२; पृ. २९–५८. ७. देऊळगांवकर, चंद्रकांत : रामविजय व भावार्थरामायण : एक अभ्यास; प्रतिष्ठान, जुलै १९६४; पृ. ३१. ८. देशपांडे, अशोक : शिवलीलामृतकार कवि श्रीधर; चरित्र व काव्यपरिचय; पुणे, १९६१. ९. देशमुख, उषा मा. : श्रीधर आणि साहित्य; युगवाणी, ऑक्टो. १९६७; पृ. २२२. १०. देशमुख, उषा मा. : श्रीधराचा रसविचार; युगवाणी, सप्टें. १९६८; पृ. १२३–१२६. ११. देशमुख, उषा मा. : श्रीधराचे काव्यविषयक विचार; युगवाणी, ऑग. १९६७; पृ. १४७–१५१. १२. पटवर्धन, प न. : श्रीधर स्वामी नाझरेकर ह्यांचा समाधीचा काल व परपरा; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ३०५–३०७. १३. परतुडकर : जैमिनी अश्वमेधकर्ता श्रीधर; प्रतिष्ठान, मे १९५५. १४. पांडवप्रताप : एक अभ्यास; आलोचना मासिक, एप्रि. १९७५; पृ. १४–१९. १५. पुरोहित, व. शि. : भावार्थदीपिका आणि एकाकार टीका; युगवाणी, जुलै १९६३; पृ. १५–२१. १६. पोतदार, द. वा. : श्रीधर कवि; भाइसंमंद्विसंवृ., श. १८३६; पृ. १८२. १७. पोतदार, द. वा. : श्रीधरकृत 'उखाहरण'; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २७१. १८. पोतदार, द. वा. : पुरस्कार : श्रीधर-चरित्र आणि काव्यविवेचन; १९५१. १९. प्रभुदेसाई, वि. बा. : श्रीधराच्या मराठी महिम्नस्तोत्रटीकेचें आणखी एक हस्तलिखित; युगवाणी, डिसें. १९६६; पृ. ३३७; जाने. १९६७; पृ. ३३७. २०. भारदे, शि. ए. : हा श्रीधर कवि कोणता ?; विज्ञावि., पु. ४५, मार्च १९१४; पृ. ११८. २१. बाटवे, के. ना. : श्रीधर : पंडितकवि; १९५२; पृ. ६८–८८. २२. वैद्य, ल. वि. :

'श्रीधरस्वामींचा मरणशक'; विज्ञावि., व. ४६, अं. ५; पृ. १८९. २३. साने, का. ना. : श्रीधरस्वामी; भाइसंमंइति., श. १८३३; पृ. १०७–११४. २४. साने, का. ना. : श्रीधरस्वामी; विज्ञावि., व. ४२, अं. ९, जाने. १९१४; पृ. ४१७. २५. साने, का. ना. : श्रीधरस्वामी पुन्हा एकदा; विज्ञावि., व. ४५, अं. १; पृ. १. २६. साने, का. ना. : श्रीधराचें 'श्रीधर' नांव कोणी ठेविलें ?; भाइसंमंत्रै., चैत्र १८५४; पृ. १५१–१५२. २७. साने, का. ना. : श्रीधरस्वामी नाझरेकरकृत संतमाला व संप्रदाय परंपरा; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. ३०८–३१३. २८. सावळापूरकर, पां. कृ. : श्रीशिवलीलामृत अध्याय १५ वा; विसंमंवा., १९६५; पृ. २१४–२२५. २९. हर्षे, निर्मला : श्रियाळचरित्राची पूर्वपीठिका; मसाप., ऑक्टो.–डिसें. १९४७.

**श्रीधर–२ (पाथरीकर)** [अंदाजे इ. स. १७१५] कवी. *जैमिनी-अश्वमेध* ग्रंथाचा कर्ता. हे श्रीधर *रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप* ग्रंथ रचणाऱ्या श्रीधर नाझरेकरांहून भिन्न अशी शंका गेल्या ५० वर्षांत अनेकांना आली होती. शि. ए. भारदे ह्यांनी *विविधज्ञान-विस्तार* मासिकात (मार्च १९१४) जो लेख लिहिला त्यात ही शंका प्रथम व्यक्त केली. त्यांना मिळालेल्या *जैमिनीअश्वमेधा*च्या प्रतीत ह्या ग्रंथाच्या कर्त्यासंबंधी जी माहिती मिळाली ती त्यांनी आपल्या लेखात विस्ताराने मांडली आहे. त्यांना सापडलेल्या प्रतीतील ग्रंथकाराचे कुलदैवत बिन्हाड सिद्धनाथ होते, तो कृष्णातीरी राहणारा होता व त्याच्या आईवडिलांची नावे लक्ष्मी व बिडाडी अशी होती. त्याचे आईबाप लहानपणी निवर्तल्यामुळे त्याचे पालनपोषण वडील बंधू त्र्यंबक ह्याने केले व त्याच्याकडूनच त्याला विद्येचा लाभ झाला.

*जैमिनीअश्वमेधा*चा समाप्तिकाल श्रीधराने दिला आहे तो असा : "इंदुकला शतांकित शक। मुनित्रयाब्दें जाण अधिक। वर्तमानाब्दें प्रतिनायक। मास पौष शुक्लपक्षीं॥ सप्तमीं सोमसुत दिवसांत। दक्षिणायनाचा असे प्रान्त। ते दिवशीं ग्रंथ समाप्त। पाथरीमाजी जालासे॥ ९६. ७८–७९॥" भारदे ह्यांनी ह्या ओव्यांच्या आधारे लेखनकाल श. १६२१ (इ. स. १६९९) किंवा श. १६३७ (इ. स. १७१५) सुचविला आहे. हा ग्रंथ परभणीजवळच्या पाथरी गावी समाप्त केल्याचा वरीलप्रमाणे इतरत्रही उल्लेख आहे. कुलदैवत निर्दिष्ट करणारी आणखी एक नमनओवी आहे : "आतां वंदूं कुलदैवत। जो नामें प्रसिद्ध *सिद्धनाथ*। *ब्रह्मांडकपित्थनगरीं* राहत। भक्तमनोरथ पुरवावया॥ १.९॥" ह्या एकंदर पुराव्यावरून त्र्यंबकानुज श्रीधर हा श्रीधर नाझरेकरांहून वेगळा आहे हे स्पष्ट होते.

हे दोन्ही श्रीधर समकालीन खरे, पण ते परस्परांहून वेगळे होते हे दाखविणारा स्वतंत्र पुरावा डॉ. स. ल. कात्रे ह्यांनीही त्यांच्या एका लेखात सादर केला आहे (विसंमंवा., १९६१, पृ. १३०–१३६). शिवराम पांडुरंग जोशी (तळोधीकर), शक १७६५–६६ (इ. स. १८४३–४४), ह्यांचा *रामाश्वमेध* डॉ. कात्रे ह्यांना नुकताच उपलब्ध झाला आहे. हा ग्रंथ शिवरामाने चांदा जिल्ह्यातील बाळापुरी-तळोधी गावी इ. स. १८४४ मध्ये रचला. ह्या ग्रंथात शिवरामाने दोन परस्परभिन्न श्रीधरांची प्रशस्ती गायिली आहे. त्या मूळ ओव्या येथे उद्धृत केल्या आहेत : "*ब्रह्मानंदस्वामी* जया गुरुवर। परम पवित्र नामें श्रीधर। नागझरनगरीं वसनार। ग्रंथ सुंदर तयाचे॥ रामविजय हरिविजय पुन्यपावन। आनी पांडवप्रताप कथागहन। तेच सीवप्रतापी जान। भक्तीवर्नन ऐकीली॥ *आनी कृस्नातीरींचा वसनार*। *अश्वमेधग्रंथ* केला सावार। छयान्नव अध्याई परीकर। तो श्रीधर पुन्यमुर्ती॥ . . . (१.७५–७७)." ह्यावरून विदर्भातील शिवरामाने हे दोन श्रीधर भिन्न मानले होते ही गोष्ट स्पष्ट होते.

व्यासशिष्य जैमिनी ह्याने रचलेल्या *भारताच्या अश्वमेधपर्वा*च्या आधारे त्र्यंबकानुज श्रीधराने *जैमिनी अश्वमेध* ही कथा रचली आहे : "नारायणावतार व्यासमुनी। तयाचा मुख्य शिष्य जैमिनी। तेणे अश्वमेध कृतकथा। ती महाराष्ट्र भाषेंत वर्णीन आतां॥" (११.५) असे जरी ग्रंथकाराने म्हटले तरी त्याने *अग्नि, भविष्य, पद्म, शक्ति, स्कंद* आणि *ब्रह्मांड* पुराण ह्यांमधील कथांची भर आपल्या ग्रंथात घातली आहे. मधुकर ज्याप्रमाणे अनेक पुष्पांतील रससार काढून घेतो त्याप्रमाणे आपण सकळ पुराणे धुंडाळून ही कथा सांगितली असे कवी निवेदन करतो (८८.८०). अशा अनेक कथांची भर घातल्याने हा ग्रंथ मूळ संस्कृत ग्रंथाच्या दुप्पट झाला आहे.

अश्वमेध यज्ञ हा दिग्विजयाचा निदर्शक आहे. भारतीय युद्धात पांडवांच्या हातून त्यांचेच नातेवाईक मारले गेले म्हणून व्यासांनी धर्मास कुलक्षय थांबविण्यास व पातकांचा क्षय होण्यासाठी अश्वमेध करण्यास सांगितले. त्यानुसार धर्माने हा यज्ञ केला. अश्वरक्षणासाठी अर्जुनाची योजना केली. वाटेत नीलध्वज, हंसध्वज, प्रमिला (स्त्रीराज्याच्या राणीचे नाव), बभ्रुवाहन, ताम्रध्वज, मयूरध्वज, वीरवर्मा, चंद्रहास वगैरे राजांनी घोडा थांबवून अर्जुनाशी युद्ध केले. कोणी युद्धात पराजित झाले, कोणी अर्जुनाशी सख्य केले. कोणी अर्जुनाचा पराभव करून घोडा परत केला. अशा प्रकारे एक वर्षभर भ्रमण करून घोडा परत आला. त्यानंतर यज्ञ पूर्ण झाला. अशी ही मूळ अश्वमेधकथा आहे. ती चित्तवेधक असल्याने अनेक कवींना ह्या कथेचे आकर्षण वाटून अश्वमेधावरील रचना झाल्या. श्रीधर कवी हे अशा अनेक कवींपैकी एक आहेत.

**रचना : मु.** – जैमिनि अश्वमेध; अ. ९६; ओ. सं. ९८७६; पोथी; १. हेगिष्टे, बा. स. (श. १७८६), २. दांडेकर, मा. ज., ठाकूर, के. बा. (श. १८०९), ३. गोपाळ नारायण आणि कंपनी (श. १८१० व १८८५), ४. पांडुरंग जावजी (निर्णयसागर) मुंबई, ५. चित्रशाळा प्रेस, पुणे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कात्रे, स. ल. : दोन श्रीधर : एक नवीन पुरावा; विसंमंवा., १९६१; पृ. १३०–१३६. २. भारदे, शि. ए. : हा श्रीधर कवि कोणता ?; विज्ञावि., पु. ४५, मार्च १९१४; पृ. ११८.

**श्रीधर–३** [का. अनु.] कवी. गोत्र वत्स.

**रचना : मु.** – कुंडार्णव हा ओवीबद्ध ग्रंथ; मचको., पृ. ७८४.

**श्रीधर–४** [का. अनु.] ग्रंथकार. ह्यांनी 'अवंतिका मोक्षपुरी। श्री महाकालेश्वराच्या मंदिरी।' लिहिलेला *तत्त्वामृत* हा ग्रंथ उपलब्ध आहे (कवचाळे, कृ. गं.; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४३).

**श्रीधर कवी–१** [अंदाजे इ. स. १७५०] कवी. श्रीधर कवीची कविता असलेले एक हस्तलिखित बाड द. वा. पोतदार ह्यांस तळेगाव-दाभाड्यास उपलब्ध झाले. हा कवी श्रीधर नाझरेकरांहून भिन्न आहे. ह्याने स्वतःची जी माहिती दिली आहे तीवरून ह्याच्या पित्याचे नाव रामकृष्ण व गोत्र अत्री असल्याचे कळते. कवीने आपली कुलदेवता श्रीक्षेत्रजा देवी हिच्यावर १० श्लोकांचे स्तोत्र रचले आहे. ह्याच स्तोत्रातील ९ व्या श्लोकात 'कोशाख्यद्विजसंततेः सुवरदां तन्निग्रहानुग्रहां' असा उल्लेख येतो त्यावरून कवीचे उपनाव कोशे असावे असे अनुमान होते.

संस्कृत, मराठी व हिंदी ह्या भाषांत श्लोक, पदे, अष्टके, ओव्या अशी रचना कवीने केली असून *तत्त्वबोध* नामक राममारुतिसंवादात्मक एक ५६ श्लोकांचे प्रकरणही रचले आहे. त्यातला शेवटचा श्लोक असा : "केला असा मारुतिला प्रबोध। म्हणोनि हा ग्रंथ हि तत्त्वबोध। श्रीराम आत्मा निज श्रीधराचा। हा ग्रंथ तेणे रचिला स्ववाचा॥" ह्याच बाडात समाविष्ट झालेली कविरचित 'नानासाहेब पेशव्यांची प्रार्थना' (श्लो. सं. ६; मु. : भाइसंमंद्विसंवृ., पृ. १८३) पाहिल्यानंतर हा नानासाहेब पेशव्यांचा समकालीन ठरतो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पोतदार, द. वा. : श्रीधर कवी (पेशवाईतला); भाइसंमंद्विसंवृ., श. १८३६; पृ. १८२–१८४.

**श्रीधर कवी–२** [का. अनु.] कवी. ह्या कवी श्रीधर नाझरेकरांहून भिन्न आहे. प्रस्तुत कवीची *नवरत्नमाला* (श्लो. सं. १०) अशी एक रचना *अनेककविकृत लघुकाव्यमालेत* मुद्रित (खं. ३, पृ. १४२-१४३). शेवटच्या श्लोकात 'श्रीपादसद्गुरु यतीश्वर' असा आपल्या गुरूचा उल्लेख कवी करतो.

**श्रीधर गुरुदास** [का. अनु.] पदकार.
**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**श्रीधरदास** [का. अनु.] ग्रंथकार.
**रचना : अमु.** – ज्ञानेश्वरचरित काव्य; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १०३.

**० श्रीधर ब्रह्मानंद** – पहा **श्रीधर–१ (नाझरेकर).**

**श्रीधर शिवराम** [का. अनु.] कवी.
**रचना : मु.** – नानासाहेबांस उपदेश : नऊ श्लोक; मसा., आ. ५, पृ. ९५५.

**० श्रीधरस्वामी** – पहा **श्रीधर–१ (नाझरेकर).**

**श्रीनाथ** [अंदाजे इ. स. च्या १७ व्या शतकाची अखेर] नाथसंप्रदायी ग्रंथकार. ह्यांचे वास्तव्य पैठण व आळंदी ह्या भागांत होते. ह्यांची गुरुपरंपरा : श्रीज्ञानेश्वर > सदाशिव > गणेश > उद्धव > केशव > बाळनाथ > श्रीनाथ. ह्यांनी श्रीज्ञानेश्वरांच्या *अनुभवामृता*च्या ओव्यांना सूत्र कल्पून त्यांचे 'सूत्रकल्प' तयार केले. त्यांत त्यांनी चिद्विलासाचा पुरस्कार करून अजात व विवर्त ह्यांचे खंडन केले. त्यांनी *अनुभवामृत* ह्या प्रकरणग्रंथाला सूत्रग्रंथाचे स्वरूप दिले. मराठी वाङ्मयेतिहासात, ह्या पद्धतीचे अतोनात महत्त्व आहे. प्रकरणग्रंथ, सूत्रग्रंथ, भाष्यग्रंथ असा क्रम ह्यांत आहे. श्रीनाथांच्या समाधीनंतर त्यांचे शिष्य हरिहर ऊर्फ हरिहरेंद्र ह्यांनी त्यावर *राष्ट्रभाष्या*ची रचना केली. श्रीनाथांच्या समाधीचे स्थान आळंदीस आहे.

म. रा. जोशी

**श्रीनिवास–१** [का. अनु.] कवी. हे तंजावरकडीलच असावेत. व्यंकटेश हे त्यांचे उपास्यदैवत दिसते. ह्यांची संस्कृत व मराठी बरीच रचना उपलब्ध आहे. जारणमारणस्तंभमोहनादिकांचे मंत्रही ह्या श्रीनिवास कवीने सांगितले आहेत असा उल्लेख सापडतो (सवामं. बा. १२८०). ते मंत्र अनुभवसिद्ध आहेत असा निर्वाळाही दिला आहे.
**रचना : अमु.** – १. कृष्णलीला. २. चंद्रमंजरी (भागवतांतर्गत) श्लोक व आर्या; ग्रं. सं. ३००; कृष्णयशवर्णन; तंसम. हस्त. यादी, क्र. २. ३. रामकीर्तन. ४. सुदामचरित्र. **संस्कृत** – १. गीर्वाणपदे. २. गोपीगीत; तारकावळी. ३. निरुपमनामावलि. ४. वेंकटेशनामवर्णनम्. ५. सुमनोरंजन; सवामं. हस्त. सू., खं. २.

**श्रीनिवास–२** [अंदाजे श. १७६४ / इ. स. १८४२] ग्रंथकार. विठ्ठल किंकराचा पुत्र.
**रचना : अमु.** – अष्टभावामृत ग्रंथ; र. का. : श. १७६४.

**श्रीनिवासनंदन** [का. अनु.] कवी.
**रचना : अमु.** – पदपदांतरे, कृष्णपर पद इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**श्रीनिवास भगवंत चंदावरकर** [का. अनु.] *भगवद्गीता*-टीकाकार. ह्यांचा *श्रीमत् भगवद्गीता व्याख्यान* (मूळ मराठी शब्दार्थासह) असा ग्रंथ आहे. लेखक व लेखनकालासंबंधी पोथीच्या अखेरीस खालील उल्लेख सापडतो : 'लिखितं श्रीनिवास भगवंत चंदावरकर॥ विक्रमनामसंवत्सरे चैत्रमासे शुक्लपक्षे प्रतिपदा गुरुवासरे कास्यां सर्वेश्वरसंनिधौ' म्हणजे बहुधा श. १७४२ (इ. स. १८२०) असावा. प्रत्येक अध्यायाच्या प्रथम पृष्ठावर 'रामचेंद्र गोसांवियाचे पुस्तक' असे म्हटले आहे. ग्रंथासंबंधी अधिक माहिती उपलब्ध नाही. समर्थवाग्देवतामंदिर बाड क्रमांक १३२५ मध्ये प्रस्तुत ग्रंथ संग्रहित.

**श्रीपत** [का. अनु.] कवी.
**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**श्रीपति–१** [का. अनु.] कवी.
**रचना : अमु.** – १. प्रल्हादचरित्र; श्लो. २१. २. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० श्रीपति–२** – पहा **श्रीपतिभट्ट.**

**० श्रीपति–३** – पहा **सवाई फंदी.**

**श्रीपति–४** [का. अनु.] आरतीकार.
**रचना : मु.** – व्यंकटेशाची आरती; मआ., पृ. ४२२.

**श्रीपतिदास /० नाथदास /० हरिदास–३** [अंदाजे श. १४६० / इ. स. १५३८] कवी. ज. र. आजगांवकरांनी श्रीपतिदासांचा उल्लेख नाथदास किंवा हरिदास असा केला आहे. कवीचे खरे नाव श्रीपतिदास असे आहे. ह्यांच्या गुरूचे नाव श्रीपती. ग्रंथकर्त्याचा काल व चरित्र ह्यांबद्दल निश्चित विधाने करण्यास पुरावा उपलब्ध नाही. ग्रंथकर्ता एकनाथपूर्वकालीन की एकनाथोत्तर ह्याविषयी अभ्यासकांत मतभेद आहेत.

श्रीपतिदासांनी *मनश्चंद्रबोध* असा काव्यग्रंथ रचला आहे. ह्या काव्याच्या अखेरचा प्रसंग संपल्यानंतर येणारा मजकूर असा आहे : 'ईती श्री प्रबोधचंद्र 'मनचरीत्र' कथाग्रंथ संपुर्णमस्तु॥' ग्रंथाच्या आरंभी "ज्ञानबोध मनचरीत्र।" असे म्हटले असून १३ व्या प्रसंगाच्या अखेरीस कवी लिहितो : "या ग्रंथा नाव प्रबोधचंद्र । ऐसें पुराणी बोलीले साचार। म्हणउनी 'मनाचे चरीत्र'। म्हणीजे यासी॥ ८२॥" ह्यावरून कवीला अभिप्रेत ग्रंथनामाचा बोध होतो. तंजावर ग्रंथालयाच्या हस्तलिखित ग्रंथांच्या सूचीत 'प्रवृत्तिनिवृत्तिसंवाद, मनचरित्र – श्रीपतिदासकृत' असाच उल्लेख येतो. समर्थवाग्देवतामंदिर बाडातही (बा. १२०७) 'श्रीपतिदासकृत प्रवृत्तिनिवृत्तिसंवादे मनाचें चरित्र – ओवी ७३२' असा निर्देश आहे.

पां. ना. कुळकर्णी ह्यांच्याजवळील प्रस्तुत ग्रंथाच्या हस्तलिखितामध्ये १३ प्रसंग व १११३ ओव्या आहेत. ग्रंथरचना करताना कृष्णमिश्र यतींच्या *प्रबोधचंद्रोदय* ह्या नाट्यग्रंथावरून कवीने स्फूर्ती घेतली असली तरी हा ग्रंथ भाषान्तर किंवा रूपान्तर नाही. वेगळ्या स्वरूपाचा, महत्त्वाचा आणि रसाळ असा हा एक ग्रंथ आहे. *प्रबोधचंद्राचा* पुराण म्हणून कवी उल्लेख करतो. कवीने हा ग्रंथ मुळातून वाचला असेल की नाही अशी शंका येते. त्याच्या आधारे रचलेला आपला ग्रंथ मात्र कवीने कल्पकतेने व बहुश्रुततेने सजविला आहे.

श्रीपतिदासांनी आपल्या ग्रंथास 'कथा' असे म्हटले आहे. उदा. 'तेची कथाकौतुक। ऐकता वाटे सुख' (प्र. २.१२२), 'रसाळ साजीरी कथा हे' (प्र. ३.८८). प्रथम प्रसंगात विनयाने गणेश, वाग्देवता, सद्गुरू व संतजन ह्यांस कवी वंदन करतो. कायापूरनगरवासी मन राजाचे संकल्प-विकल्प हे दोन प्रधान व प्रवृत्ति-निवृत्ति ह्या राण्या असे हे आध्यात्मिक रूपक सर्व ग्रंथभर खेळविले आहे. प्रवृत्तीच्या आहारी गेलेले मन निवृत्ति, ज्ञान, बोध, विवेक इत्यादींच्या प्रयत्नांनी ठिकाणी येऊन परमार्थाकडे कसे लागले हे मनराजाच्या कथेतून कवीने सांगितले आहे. काव्यांतून कवीचा आध्यात्मिक अधिकार व श्रेष्ठ असे काव्यगुण प्रतीत होतात. कवीचे *गर्भगीता* नावाचे आणखी एक प्रकरण उपलब्ध आहे.

ग्रंथातील भाषेचे स्वरूप पाहिल्यानंतर हा एकनाथपूर्व काळात होऊन गेला असावा असे निश्चितपणे वाटते. ओव्यांची रचना (बऱ्याच ओव्यांच्या चौथ्या चरणांमध्ये पहिल्या तीन चरणांप्रमाणे यमक येते), कथारोळ, वोव्हारे, अपैसे, सारोख, नेहटी, प्रहुडी इत्यादी शब्द, पोखीतु, हरीखे अशी क्रियापदे, न लाजसी, नवचे, नेंदावें अशी निषेधार्थी रचना, संस्कृत शब्दांऐवजी अस्सल देशी वळणाच्या शब्दांचे प्राचुर्य, ह्या

विशेषांवरून एकनाथपूर्वकालच सूचित होतो. तेराव्या प्रसंगातील भक्तिमाहात्म्यावर ज्ञानेश्वरांच्या नवव्या अध्यायातील ओव्यांची छाप दिसते. ह्या संदर्भात *सारस्वत-पुरवणी*कारांनी आपले वेगळे मत मांडले आहे. ते म्हणतात की, हे काव्य एकनाथपूर्व काळातील आहे असे जरी पां. ना. कुळकर्णी म्हणत असले तरी त्यातील पारंपरिक रूपकपद्धती एकनाथांच्या *रुक्मिणीस्वयंवरा*तून घेतल्यासारखी वाटते. भाषाही तेवढीशी प्राचीन दिसत नाही. त्यामुळे हे काव्य एकनाथोत्तर कालातले असावे.

**रचना : मु.** – मनश्चंद्रबोध / मनाचे चरित्र; प्रसंग १३; ओ. सं. १००० चे वर; मुंबई, १८७५; शिळाछाप. **अमु.** – गर्भगीता; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ७७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : श्रीनाथदास ऊर्फ हरिदास; प्रामसंक.; मुंबई, १९५७; पृ. ४२५–४२८. २. कुळकर्णी, पां. ना. : मनाचे चरित्र : एक आध्यात्मिक कथाकाव्य; संशोधन-धारा; पुणे, १९६७; पृ. ९९–१३०. ३. चांदोरकर, गो. का. : श्रीपतिदास; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ७७–७८.

**श्रीपतिभट्ट** / ० **श्रीपति–२** [अंदाजे श. ९२१ / इ. स. ९९९ – श. ९८० / इ. स. १०५८] ज्योतिर्गणितज्ञ. बहुधा विदर्भामधील रोहिण-खेड (ता. मलकापूर, जि. बुलढाणा) ह्या गावचे राहणारे. काश्यपगोत्री ब्राह्मण. ह्यांच्या आज्याचे नाव केशव व ह्यांच्या पित्याचे नाव नागदेव. हे महाराष्ट्री अपभ्रंश (जैन अपभ्रंश) भाषेतील (प्रारंभी शैव व पुढे दिगंबरपंथीय जैन बनलेले) प्रसिद्ध कवी व *महापुराण* ह्या काव्यग्रंथाचे कर्ते पुष्पदन्त ह्यांचे पुतण्ये असावेत असे जैनवाङ्मय-विद्यापंडित नथुराम प्रेमी ह्यांचे मत आहे. कवी पुष्पदन्त हेही रोहिणखेडचेच. त्यांचे गोत्रही काश्यप हेच होते.

श्रीपतिभट्ट ह्यांना आर्यभट्ट, लल्ल, वराहमिहिर, मुंजाल, भट्टोत्पल व ब्रह्मगुप्त ह्या विख्यात ज्योतिर्गणितज्ञांच्या बरोबरीचा मान देण्यात येतो. *धीकोटिकरण* (इ. स. १०३९), *सिद्धान्तशेखर, जातकपद्धति, पाटीगणित, श्रीपति-निबन्ध, ध्रुवमानसकरण, दैवज्ञवल्लभ, ज्योतिषरत्नमाला* असे ज्योतिषविद्याविषयक आठ ग्रंथ श्रीपतिभट्ट ह्यांनी संस्कृत भाषेत लिहिले आहेत. त्यांपैकी शेवटचा *ज्योतिषरत्नमाला* हा ग्रंथ मुहूर्तग्रंथ आहे. " मुहूर्तग्रंथांतले विषय सामान्यतः असे असतात : त्याज्यप्रकरण म्हणून एक सामान्य प्रकरण असतें. त्यांत कोणत्याही शुभ कृत्यास वर्ज्य अशीं तिथिनक्षत्रादिक असतात. पुढें तिथि, वार, नक्षत्रें, योग, संक्रांति, ह्यांचें शुभाशुभत्व सांगितलेलें असतें. पुढे गर्भाधानादि पंधरा संस्कारांच्या मुहूर्तांचा विचार असतो. त्यांत विवाहांत वधूवरांचें घटित हें एक मोठें प्रकरण असतें. त्याशिवाय वास्तु, यात्रा (गमन), राज्याभिषेक, व दुसरीं कांहीं किरकोळ प्रकरणें असतात." हेच विषय श्रीपतिभट्टांच्या ह्या ग्रंथात आलेले आहेत. ह्या ग्रंथावर संस्कृतात महादेव, वैद्यनाथ, रघुनाथ, माधव (महादेवाहून हा भिन्न आहे), परमकारण, पंडितवैद्य, कृष्णदैवज्ञ, उमापती ह्या आठजणांनी व स्वतः श्रीपतिभट्टांनी मराठीत अशा नऊ टीका लिहिल्या असून त्या प्रसिद्ध झालेल्या आहेत. श्रीपतींची मराठी टीका गद्यात असून ती त्यांनी इ. स. १०५० मध्ये लिहिली. हा टीकाग्रंथ मराठीतील प्राचीनांत प्राचीन असा पहिलाच (उपलब्ध) गद्य ग्रंथ आहे, असे आज तरी मानावयास हरकत नसावी. ह्यानंतरची प्राचीन मराठी पद्यरचना चालुक्यवंशीय राजा सोमेश्वर ह्यांनी रचलेल्या *मानसोल्लास तथा अभिलषितार्थचिंतामणि* ह्या इ. स. ११२९ मधील ग्रंथात आढळते. रागतालांची माहिती देताना सोमेश्वर खालील पद्य उद्धृत करितात : "जेणें रसातळ उणु मत्स्यरूपें वेद आणियले मनुशिवक वाणियेले तो संसारसायरतारण मोहंता रावो नारायणु ॥" (*मानसोल्लास*, भा. ३, अ. १६, पद्य ३४०; गा. ओ. सी., पृ. ३८). *विवेकसिंधु* (इ. स. ११८८), *लीळाचरित्र* (इ. स. १२७८), *सूत्रपाठ* (इ. स. १२८०), *दृष्टान्तपाठ* (इ. स. १२८०), *पूजावसर* (इ. स. १२८५), *धवळे* (इ. स. १२८५), *मूर्तिप्रकाश* (इ. स. १२८९), *ज्ञानदेवी* (इ. स. १२९०) ह्या सर्वांच्याही पूर्वीचा श्रीपतिभट्टांचा हा *ज्योतिषरत्नमाले*वरील गद्य टीकाग्रंथ असल्यामुळे प्राचीन ज्ञात मराठी ग्रंथांमध्ये त्याला आद्यस्थान प्राप्त झाले आहे. ह्या ग्रंथातील गद्यलेखनाची थोडीशी कल्पना यावी ह्यासाठी 'संवत्सर प्रकरण' ह्यातील पहिल्या दोन संस्कृत श्लोकांवरील टीका येथे देतो :

(१) "प्रभव म्हणिजे उत्पत्ति, मध्यम - स्थिति, विरति तो प्रळयो, ऐसा त्रिविधु कालु, तया काळाचा विषे ज्ञाने वंध्यें – निर्फळें जालि ॥ कोणांचि, जेहि जाणितिले परमतत्व तेयाचि ज्ञानें अतिसें निर्फळें जालि. उत्पत्ति, स्थिति, प्रळयो ऐंसें नेणति ऐंसा जो कालु ईश्वरु तेयासि नमस्कारु. पुनरपि सकळ - विश्वाचें जन्म, प्रतिपाळ, संहारु येथें कारण समर्थु । पुनरपि कैसा जाला, प्रत्यहि नक्षत्रि करूनु मानिजे – मविजे तेया ईश्वररुपा कालातें मि ग्रंथुकर्त्ता श्रीपति नमस्कारी तो ग्रंथ समाप्ति पावावया कारणें ॥६॥" (राजवाडे प्रत, श. १३६९).

(२) "टिका ॥ गर्गादि मुनीश्वरीं केलीं शास्त्रें, आणीक वाराहमिहरु लल्लादिकीं आचार्यी तेहीं केलीं जयें शास्त्रें, तियें समस्तें अवलोकूनि मग मी श्रीपति रत्नाची माला रचिते – बोविते ज्योतिष नावें रत्नें, तयांची माला दैवज्ञ जे ज्यो[ति]षी तयांचेया कंठीं अलंकारावेया कारणें ॥६९॥" (गोडे प्रत, श. १६४३).

*ज्योतिषरत्नमाला* ह्या ग्रंथावरील मराठी टीकेची आरंभीची फक्त ७४ पृष्ठे प्रथम वि. का. राजवाडे ह्यांस नेवासे येथे जोश्यांच्या पोथ्यांत सांपडली. ती त्यांनी भा. इ. सं. मंडळाच्या 'द्वितीय संमेलनवृत्ता'-मध्ये (श. १८३६) प्रसिद्ध केली. ही पोथी श. १३६९ मध्ये नकललेली होती. त्यानंतर डॉ. प. कृ. गोडे ह्यांस ह्या टीकेचे श. १६४३ साली नकलून काढलेले संपूर्ण हस्तलिखित परभणी येथील परतुडकर नावाच्या गृहस्थांकडे सापडले. डॉ. गोडे ह्यांनी ते पुण्याच्या 'डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिटयूट'च्या स्वाधीन केले. तेथे त्याचे जे लेखछायाचित्र (फोटोस्टाट) तयार करून ठेविले आहे त्यावरून डॉ. मु. गो. पानसे ह्यांनी मुद्रणप्रत तयार करून व ती राजवाड्यांच्या अपूर्ण प्रतीशी ताडून व तीही स्वतःच्या प्रतीत यथास्थानी देऊन संहिताचिकित्साशास्त्रास धरून तिचे संपादन केले. ही प्रत त्यांनी १९५७ साली, 'डेक्कन कॉलेज मोनोग्राफ सीरीज'मधून प्रसिद्ध केली.

"*ज्योतिषरत्नमाला* हा आद्य मुहूर्तग्रंथ असून श्रीपतीनें स्वतः त्याचें मराठींत भाषान्तर केलें आहे. ह्या मराठी गद्य टिकेला स्वोपज्ञ टीका म्हणण्यापेक्षां भाषान्तर म्हणणेंच योग्य होय. घरबांधणी, गृहप्रवेश, विवाह, उपनयन इ. प्रसंगीं सामान्य मनुष्याला हरघडी मुहूर्त पाहण्याची गरज भासते, हें ओळखून मराठी भाषिक जनतेस त्यानें हा महत्त्वाचा ग्रंथ उपलब्ध करून दिला. *ज्योतिषरत्नमाले*पासून पुढें मुहूर्त हा ज्योतिषशास्त्रांत एक स्वतंत्रच स्कंध मानला जाऊं लागल्यामुळें ह्या ग्रंथाला त्या शाखेंत मानाचें अग्रस्थान लाभलें आहे. सर्वोपयोगी ग्रंथ जनतेला सुलभ रीतीनें समजावा ह्या हेतूनें मराठींत लिहिण्याचा नवा पायंडा पाडावा लागला, तरी ती जबाबदारी पतकरून आपली विद्या लोकाभिमुख करण्याची श्रीपतीची तळमळ स्पष्ट दिसते." – डॉ. मु. ग. पानसे : यादवकालीन महाराष्ट्र; १९६१; पृ. १६३–१६४.

*ज्योतिषरत्नमाले*वरील वि. का. राजवाडे ह्यांस सापडलेल्या मराठी टीकेच्या पोथीसंबंधी ते लिहितात : "प्रस्तुत मराठी (मूळची) टिका श. ९६१ च्या (इ. स. १०३९) सुमाराची आहे. प्रस्तुत पोथी (नेवासें येथें सांपडलेली) ही मूळ मराठी पोथीची कितवी नक्कल आहे, न कळे. एवढें मात्र निश्चित कीं ही नक्कल शके १३६९ च्या सुमारास केव्हां

तरी केलेली आहे. कारण पोथीच्या चौथ्या पानाच्या पाठीवर बारीक अक्षरांत पंचसंवत्सरांच्या पुढें नकलकारानें १३६९ ते १३७३ पर्यंतचे पांच आंकडे लिहिले आहेत. श्रीपतीची मूळ मराठी टिका मोठ्या अक्षरांनीं लिहून नक्कलकारानें स्वतःचें लिहिणें बारीक अक्षरांनी लिहिलें आहे व त्यांत स्वतःच्या काळाचा सहजगत्या निर्देश करून ठेवला आहे. श्रीपतीच्या मूळ मराठी टिकेची कोण्या नकलकारानें शके १३६८ (इ. स. १४४६) त नकल केली. नकलकारानें संस्कृत श्लोक तसेंच मराठी टिका पण अशुद्ध लिहिली आहे. कित्येक स्थळीं शके ९६१ च्या सुमाराची भाषा दिसते तर कित्येकदा शके १३६८ च्या सुमाराचें आधुनिक स्वरूप देण्यास नकलकारानें कमी केलें नाहीं. नकलकार बहुदा नेवाश्याच्या ग्रामजोश्यांपैकीं एखादा असंस्कृतज्ञ असावा. ही पोथी लिहून ठेवल्याबद्दल त्याचे उपकार मात्र आहेत.

" नकलकारानें अर्वाचिनलेलीं रूपें बाद करतां, इतकें स्पष्ट होतें कीं, ह्या ग्रंथाची भाषा पाटण येथील भास्कराचार्याचा नातु जो चांगदेव त्याच्या शिलालेखांतील भाषेसारखी व *ज्ञानेश्वरी*च्या भाषेसारखी आहे. शके १२१२ (इ. स. १२९०)तली *ज्ञानेश्वरी*ची भाषा व शके ९६१ तील श्रीपतीची भाषा ह्यांत फरक असलाच तर तो फार अल्पस्वल्प आहे. ९६१ त जर श्रीपति इतकी चांगली व प्रौढ मराठी लिहितो, तर मराठीचें हें रूप असेंच निदान शंभर दीडशें वर्षें (मागचीं) असायला हवें, म्हणजे शके ८०० तील मराठी शके १२०० तील मराठीसारखेंच बहुतेक असलें पाहिजे." (भाइसंमसंवृ., श. १८३६, पृ. ८१–८४).

वि. का. राजवाडे ह्यांनी *ज्योतिषरत्नमाले*वरील हा लेख १९१४ साली लिहिला. त्या वेळेस प्रस्तुत लेखाच्या दुसऱ्या परिच्छेदात *विवेकसिंधु* व *ज्ञानदेवी* ह्यांच्या दरम्यानच्या काळात रचले गेलेले जे ग्रंथ उल्लेखिले आहेत ते किंवा तत्पूर्वीचे आज बऱ्याच मोठ्या संख्येने मुद्रित झालेले प्राचीन मराठी कोरीव लेख अभ्यासकांस फारसे उपलब्ध नव्हते. त्यामुळे त्यांना किंवा मराठी भाषेचे प्राचीन रूप समजून घेऊ इच्छिणाऱ्यांना मोठीच अडचण भासत होती. इ. स. च्या दुसऱ्या शतकातील हालाच्या माहाराष्ट्री-प्राकृतातील *गाहासत्तसई* (गाथासप्तशती) पासून तो अकराव्या शतकातील *ज्योतिषरत्नमाले*पर्यंत महाराष्ट्राच्या भाषेची महाराष्ट्री व अपभ्रंश ह्यांच्या द्वारा जी उत्क्रांती होत गेली तिचे स्पष्ट चित्र रेखाटण्याचे कार्य भाषासंशोधकांकडून किंवा वाङ्मयविद्यापंडितांकडून जितके शास्त्रशुद्ध व्हावयास पाहिजे होते तितके झाले नाही. इ. स. च्या चौथ्या शतकापासून प्राकृत भाषा लुप्त होऊन महाराष्ट्री अपभ्रंश भाषा जन्मली व तिच्यात ग्रंथरचनाही होऊ लागली. विशेषतः जैनधर्मीयांनी महाराष्ट्री अपभ्रंश भाषेचा आश्रय करून अनेक ग्रंथ रचले. ह्या महाराष्ट्री अपभ्रंश भाषेला 'जैन अपभ्रंश' असेही संबोधिले जाते. ही भाषा महाराष्ट्री प्राकृत व यादव-मराठी ह्यांच्यामधील दुवा आहे. दहाव्या शतकात राष्ट्रकूटकालीन कवी पुष्पदन्तकृत *महापुराण, णायकुमारचरिउ* व *जसहरचरिउ* त्याचप्रमाणे मुनि कनकामरकृत *करकण्डचरिउ* ह्यांसारखे उत्कृष्ट दर्जाचे ग्रंथ ह्या भाषेत निर्माण झाले. ह्या दोन कवींपैकी पुष्पदन्ताच्या ग्रंथांतील 'भाषेचें स्वरूप एका बाजूने माहाराष्ट्री प्राकृताशी व दुसऱ्या बाजूने प्राचीन मराठीशी जुळते आहे.' (शं. गो. तुळपुळे : *यादवकालीन मराठी भाषा*; द्विआ., १९७३; पृ. ४७). महाराष्ट्रात पाच-सहा शतके रूढ असलेल्या ह्या भाषेतून उत्क्रांत झालेली भाषा होच आजची मराठी. तिच्या घडणीला यादवकालापासून विशेष जोर मिळाला. अकराव्या शतकात लिहिल्या गेलेल्या *ज्योतिषरत्नमाला* ह्यासारख्या ग्रंथांतील मराठी भाषेच्या प्राचीनत्वाबद्दल विचार करताना, त्याच्याहीपूर्वी लिहिल्या गेलेल्या महाराष्ट्री अपभ्रंशातील ह्या ग्रंथांचा भाषेच्या दृष्टीने तौलनिक अभ्यास करणे अत्यावश्यक आहे. त्याबरोबरच अकराव्या शतकाच्या मध्यकाळातील *दिवेआगर ताम्रपटा*सारखे जे मराठी ताम्रपट उपलब्ध झाले आहेत, त्यांतील भाषेचा अभ्यास करणे हेही अत्यंत अगत्याचे व महत्त्वाचे आहे. असा अभ्यास करण्याची सोय डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांच्या *प्राचीन मराठी कोरीव लेख, यादवकालीन मराठी भाषा*, त्याचप्रमाणे डॉ. तगारेकृत *ए हिस्टॉरिकल ग्रामर ऑफ अपभ्रंश*, ह्या ग्रंथांमुळे आता झाली आहे.

श्रीपतिभट्टांचा *ज्योतिषरत्नमाला* ग्रंथ (अपूर्ण स्थितीत) १९१४ साली वि. का. राजवाडे ह्यांनी प्रसिद्ध केल्यावर, त्यांनी त्याचे कर्तृकत्व व त्याचा काळ ह्यासंबंधी आपल्या प्रास्ताविकात जी विधाने केली त्यांविरुद्ध हरि नारायण आपटे ह्यांनी १९१५ साली मुंबई विद्यापीठात जी *विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चर्स* दिली त्यांतून, व डॉ. पां. दा. गुणे ह्यांनी १९२२ साली *विविधज्ञानविस्तार मासिका*तील (ऑक्टोबर, पृ. ४५७) *कुलगुरु चिंतामण विनायक वैद्य व मराठी भाषेची उत्पत्ति (३)* ह्या शीर्षकाखालील आपल्या लेखात, कडाडून टीका केली. त्यांची विधाने 'स्वैर व ऐकांतिक आहेत' असे म्हणावयालाही हरिभाऊंसारख्यांनी मागेपुढे पाहिले नाही. "डॉ. गुणे ह्यांनीं 'प्रथम पुरुषी उल्लेखाच्या सुताने संस्कृत ग्रंथाचा व त्यावरील मराठी टीकेचा लेखक स्वतः श्रीपतीच होय ह्या सिद्धान्ताच्या स्वर्गाला जाणें सुतरां अशक्य होय' अशी घोषणा करून '*ज्योतिषरत्नमाले*वरील मराठी टिका श्रीपतीची नव्हे तर कोणा एका अनामिक लेखकाने केलेले भाषान्तर आहे' हें प्रमेय मांडलें." बाळकृष्ण अनंत भिडे ह्यांच्यासारख्या स्वतंत्रपणे विचार करणाऱ्या समीक्षकानेही आपटे व गुणे ह्यांच्या आवाजात आपला आवाज मिळविला. त्यांनी आपल्या *मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास* (१९३३) ह्यात (पृ. ५५) लिहून टाकले : "मराठी भाषेंतील उपलब्ध ग्रंथसंग्रह इ. स. बाराव्या शतकाच्या मागें जाऊं शकत नाहीं. श्रीपति नांवाच्या ज्योतिषाचा *रत्नमाला* नांवाचा ग्रंथ मराठी भाषान्तरासह रा. राजवाडे ह्यांनी प्रसिद्ध केला आहे. श्रीपति हा शके ९६१ च्या सुमारास हयात होता, आणि त्याच्या *रत्नमाले*चें भाषान्तर त्यानें स्वतःच केलें आहे, असें राजवाडे प्रतिपादितात. परंतु त्यांचें प्रतिपादन ज्या आधारावर उभारलें आहे, तो अगदींच लेचापेचा आहे." ह्यानंतर २४ वर्षांनी, डॉ. मु. गो. पानसे संपादित *ज्योतिषरत्नमाला* हा ग्रंथ पूर्णरूपात प्रसिद्ध झाला. तो प्रसिद्ध झाल्यावर बी. लक्ष्मीकान्त नावाच्या लेखकाने *प्रतिष्ठान* मासिकात (नोव्हेंबर, १९५३) 'मराठीतील पहिला ग्रंथ' ह्या शीर्षकाखाली एक परिचयात्मक लेख लिहून राजवाडे ह्यांच्या मराठी गद्याचा नमुना म्हणून *ज्योतिषरत्नमाले*तून एक उतारा दिला, त्याचप्रमाणे *महाराष्ट्रसारस्वता*च्या १९६३ च्या पुरवणीत (पृ. ६६५) "श्रीपतीचे ग्रंथ मराठी व संस्कृत ह्या दोन्ही भाषांत असून लल्लकृत *रत्नकोश* हा त्याचा आधार आहे. श्रीपतीचा काल श. ९२१ ते ९८० (इ. स. ९९९ ते १०५८) असा असल्यानें तो आद्य मराठी ग्रंथकार ठरतो. मात्र त्याच्या *ज्योतिषरत्नमाले*चीं उत्तरकालांतील हस्तलिखितें मिळत असल्यानें त्यांतील भाषा तितकी जुनी वाटत नाहीं." असे लिहिले. राजवाडे ह्यांनी *ज्योतिषरत्नमाले*विषयीचे जे मत मांडले ते आपटे, डॉ. गुणे व भिडे ह्यांच्या ह्या प्रश्नावरील मतानंतर, विशेषतः डॉ. गुणे ह्यांच्या सविस्तर विवेचनानंतर, 'निकालात निघाले', असे अनेकजणांप्रमाणे वाटणाऱ्या डॉ. कोलते ह्यांना, "डॉ. पानसे ह्यांनीं हा मराठी ग्रंथ प्रसिद्ध केला तो *श्रीपतिभट्ट ह्यांची ज्योतिषरत्नमाला* ह्या नांवानें. अर्थात्, श्रीपतिभट्टांच्या *ज्योतिषरत्नमाला* ह्या संस्कृत ग्रंथावरील प्रस्तुत मराठी टीका खुद्द श्रीपतीनेंच लिहिली आहे हें प्रमेय गृहीत धरूनच त्यांनी हें नामकरण केलेलें आहे ह्यांत संशय नाहीं. हें गृहीतकृत्य आपल्या प्रस्तावनेंत

त्यांनीं मांडलेलेंही आहे पण तें सिद्धान्त म्हणून स्वीकारण्यासारख आहे कीं नाहीं ह्याचा विचार झाला पाहिजे " असे वाटू लागून त्यांनी *विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९६३* ह्या नियतकालिकात *ज्योतिषरत्नमाले*वर एक लेख लिहिला. ह्या लेखात डॉ. कोलते ह्यांनी डॉ. गुणे ह्यांचे पूर्वोल्लिखित प्रमेय उचलून धरले आहे. डॉ. पानसे ह्यांनी ह्या लेखाचा विस्तृत परामर्श (*नवभारत मासिक,* जून १९६५, घेऊन प्रांजळपणे लिहिले : "डॉ. कोलत्यांनी आपले विधान ठाम समजुतीने केले असले तरी वस्तुस्थिती अशी आहे की निर्णायक पुरावा हाताशी नसल्यामुळे आनुषंगिक माहितीवरूनच अनुमान सिद्ध करावयाचे आहे. उपलब्ध माहितीप्रमाणे श्रीपतिभट्ट वऱ्हाडात राहणारा तेव्हा त्याची मातृभाषा मराठीच असली पाहिजे. . . सन १०३९ च्या सुमारास ग्रंथलेखनाच्या दृष्टीने मराठी भाषा अगदीच अप्रगल्भ दशेत होती. म्हणून या टिकेतील मराठी वाक्ये संस्कृतमिश्रित व त्रोटक बनली आहेत. पंडितांना पटवून देण्याकरिता शास्त्रचर्चा करणारी ही टिका नाही तर सामान्य जनतेला रोजच्या व्यवहारात लागणारी मुहूर्तासंबंधी आवश्यक तेवढी माहिती त्यांच्या भाषेत देणारी टिका आहे. त्यामुळे येथे पांडित्यप्रदर्शनासाठी वाढविलेला व्याप नाही तर गरज भागविणारा आटोपशीरपणा आहे. शिवाय मराठीत लिहिण्याचा हा अनोखा प्रयत्न असल्यामुळे महत्त्वाचा तेवढा भाग मराठीत देणे श्रीपतीला सोईचे वाटले असावे. उपलब्ध संपूर्ण मराठी टिका देणारी पोथी श. १६४३ (इ. स. १७२१) ची असली तरी त्याआधी चारशे वर्षांपूर्वी लिहिलेली एक अपूर्ण पोथी आजही राजवाडे संशोधन मंदिरात आहे. ज्या मराठी टिकेची नकल करून ठेवण्याची जरुरी ह्या चारशे वर्षांत लोकांना वाटली, तिची पूर्वपरंपरा श्रीपतीपर्यंत जाऊन पोचत नाही ह्याला डॉ. कोलत्यांच्या जवळ कोणता निश्चित पुरावा आहे ? शके १३६९ च्या सुमारची राजवाडे पोथी आणि श. १६४३ (इ. स. १७२१) ची मराठी टिका ह्यांच्यांत आशयाच्या दृष्टीने फरक नाही. बदल आहे तो शब्दांच्या रूपांत किंवा एखाद्या वाक्यरचनेत. ह्यालाच राजवाड्यांनी भाषेचा बदल मानला आहे. भाषेत घडून आलेल्या अशा बदलांचा शास्त्रीय अभ्यास केला तर मूळ ग्रंथकाराची संहिता सिद्ध करता येते. ह्या मराठी टिकेच्या कालनिर्देश असणाऱ्या पोथ्या उपलब्ध झाल्या तर ही संहितासिद्धी अशक्य नाही. परंतु श्रीपतीच्या संहितेबद्दल काही विधान करण्यास पुरेसा पुरावा आज आपल्यापुढे नाही. प्रत्यक्ष श्रीपतीची संहिता देणारी पोथी (ऑटोग्राफ-मॅन्युस्क्रिप्ट) मिळाली तर प्रश्नच नाही. शके ९६१ आणि १३६९ (इ. स. १०३९ आणि १४४७) ह्या दरम्यानच्या दोनतीन पोथ्या मिळाल्या तरी काम होईल. मराठी भाषेच्या घडणीचा तो काळ होता त्यामुळे अशा पोथ्या मिळाल्या तरी त्यांत नकलकारांच्या बोलीतली रूपे व उच्चार कळत नकळत भाषेत उतरलेली असणार. अशा प्रकारे पुराव्याची भाषाशास्त्रीय छाननी केल्याखेरीज टिकेतील भाषा श्रीपतिकालीन आहे किंवा नाही ते ठरविता येणार नाही, ह्याची जाणीव असल्यामुळे प्रस्तावनेतले निःसंदिग्ध विधान असे आहे : ' It is therefore necessary to investigate whether this claim of its being the earliest specimen of Marathi language is supported by the linguistic analysis of its contents.' ह्याचा अर्थ संपूर्ण मराठी टिकेची भाषा श्रीपतीची किंवा त्याच्या काळची आहे असे मी मानले किंवा सिद्ध केले असा होत नाही. पण नेमके हेच वाक्य डॉ. कोलत्यांनी लक्षात घेतले नाही. एका बाजूला प्राकृत अपभ्रंश आणि दुसऱ्या बाजूला सुरुवातीचे महानुभावीय गद्य ह्यांच्या तुलनेने भाषेचा – विशेषतः वाक्यरचनेचा – अभ्यास केल्याशिवाय ह्या प्रश्नाचा उलगडा होणार नाही. ग्रंथविस्ताराच्या व कालाच्या मर्यादेमुळे ह्या प्रस्तावनेत मी ते काम करू शकलो नाही. हे विधायक कार्य करून ही टीका श्रीपतीची नाही असे डॉ. कोलत्यांनी सिद्ध केले असते तर हा प्रश्न कायमचा निकालात निघाला असता. पुरेसा पुरावा मिळवून सांगोपांग अभ्यासानंतर ही टिका श्रीपतीची नाही असा निर्णय झाला तरी त्यात मला वाईट वाटण्यासारखे काही नाही."

श्रीपतिभट्टांच्या ह्या ग्रंथात मुहूर्तविषयक माहितीबरोबरच तत्कालीन समाजाच्या जीवनावर प्रकाश टाकणारे बरेच उल्लेख सापडतात. समाजजीवन, समाजाच्या शुभाशुभासंबंधीच्या समजुती, त्याचप्रमाणे भाषा व ज्योतिष ह्या विषयांच्या अभ्यासाच्या दृष्टीने उपयुक्त असा हा श्रीपतिभट्टांचा *ज्योतिषरत्नमाला* ग्रंथ आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, भा. रं. : श्रीपतीची ज्योतिषरत्नमाला; प्रतिष्ठान, व. ५, अं. १२, ऑग. १९५८; पृ. २१–२४. २. कोलते, वि. भि. : ज्योतिषरत्नमाला – मराठी टीका; विसंमवा., १९६३; पृ. १२२–१४६. ३. तगारे, ग. वा. : एक प्राचीन मराठी कवि; सह्याद्रि, एप्रि. १९४१; पृ. २५५. ४. पानसे, मु. ग. (संपा.) : प्रस्ता., ज्योतिषरत्नमाला; प्रका. डेक्कन कॉलेज; पुणे, १९५७. ५. पानसे, मु. ग. : 'संहिता संपादन, आणि डॉ. वि. भि. कोलते', नभामा., जून, १९६५, पृ. ८–१७. ६. प्रेमी, नथुराम : प्रस्ता., महापुराण (संपा. डॉ. प. ल. वैद्य), खं. ३, पृ. ४–५. ७. बी. लक्ष्मीकांत : मराठीतील पहिला ग्रंथ; प्रतिष्ठान, नोव्हें. १९५३. ८. राजवाडे, वि. का. श्रीपतिभट्टावरील टिपण; भाइसंमंद्विसंवृ., १९१४; पृ. ८१–८४.

**श्रीपाद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – रामपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**श्रीमज्जीवोत्तमतीर्थ (श्रीपाद वडेर स्वामी)** [अंदाजे इ. स. १५१७ – १५८८] कवी. श्रीगोकर्ण मठाचे संस्थापक आणि पीठाच्या परंपरेतील तिसरे स्वामी. पीठाचे आद्य संस्थापक श्रीमन्नारायणतीर्थस्वामी ह्यांचे शिष्य श्रीमद्वासुदेवतीर्थ ह्यांजकडून त्यांना इ. स. १५१७ त आश्रम मिळाला आणि इ. स. १५८८ साली ते वृंदावनस्थ झाले. आपल्या ७१ वर्षांच्या ह्या आयुष्यकालात त्यांनी द्वैतमत-प्रसाराचे फार मोठे कार्य केले. हे मोठे विद्वान, निग्रही, कर्तृत्ववान व तपोनिष्ठ होते.

श्रीमज्जीवोत्तमतीर्थ ह्यांनी भारतातील चारही धामांच्या विविध तीर्थक्षेत्रांचा आणि पवित्र स्थलांचा प्रवास केला. ह्या प्रवास-वर्णनाची सर्व माहिती त्यांनी आपल्या *तीर्थावळी* ह्या मराठी अध्यात्मपर काव्यग्रंथात ग्रथित केली आहे. श्रीविठ्ठलभक्त नामदेव ह्यांच्या *तीर्थावळी* काव्याप्रमाणे स्वामीजींचे काव्यही रसाळ आहे. ह्या ग्रंथाची प्रत श्रीगोकर्ण-पर्तगाळी मठाच्या 'श्रीमदिंदिराकांत ग्रंथ भांडार' ह्या ग्रंथसंग्रहालयात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नायक, ना. भा.; श्रीमज्जीवोत्तमतीर्थ श्रीपाद वडेर स्वामी; गोमका.; रिवण (गोवा), १९६९; पृ. ९.

**श्रीरंग** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**श्रीरंगनाथ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**श्रीरंग नारायण** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. कान्होपात्रा चरित्र; ओ. सं. ७२. २. शालीसुमन ह्यांचे चरित्र; ओ. सं. ४५. ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**श्रीरंगबोधी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – गुरुपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**श्रीरंगराजजोशी** [का. अनु.] कवी.
**रचना : मु.** – पिंगळा; अध्यात्मपर प्रकरण; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. ५६.
**० श्रीरंगानुजतनुज** – पहा **श्रीरंगानुजात्मज.**
**श्रीरंगानुजात्मज / ० श्रीरंगानुजतनुज** [का. अनु.] कवी.
**रचना : अमु.** – १. कृष्णमंजरी (त्रुटित); भाइसंमं. २. श्रीरंग-संतमाळा; ओ. सं. ६१. ३. सच्चिदानंदस्वरूपाचे वर्णन (गद्य). ४. संतमालिका / संतमाळा; ओ. सं. ५७. ५. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.
**श्रीराम** [का. अनु.] कवी.
**रचना : अमु.** – कृष्णमंजरी; त्रु. पो.; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ६९.
**श्री शुद्धानंदगिरी** [का. अनु.] टीकाकार.
**रचना : अमु.** – आत्मबोध (गद्य टीका); शंकराचार्यांच्या आत्मबोध प्रकरणावरील टीका; प्रत श. १७७६ (इ. स. १८५४); मसंमं., हवना., पृ. ८७.
**सखा–१** [का. अनु.] कवी. गुरू : जनार्दन. समर्थवाग्देवतामंदिरातील क्रमांक ५८१ चे जवळजवळ संपूर्ण बाड सखा ह्या कवीचे आहे. त्यात त्याचे अभंग व काही प्रकरणे आहेत. एकनाथांवर ह्यांनी आरती रचली आहे. कवीचे *मृगु-पराशर-संवाद* असे एक अपूर्ण प्रकरण (ओ. सं. १–७८) तेथेच सापडते.
**रचना : अमु.** – १. आत्मादर्शप्रकाश किंवा ज्ञानदीपिका प्रकरण; अपूर्ण; ओ. सं. ७९–१०४; २. शनिप्रदोष; ओ. सं. ८५; ३. शिवरात्रव्रतकथा; ओ. सं. ३६९; ४. अभंग, एकनाथांची आरती; द्रौपदीचा धावा, पाळणा व पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.
**सखा–२** [का. अनु.] कवी. बाळनाथ शिष्य. चाफळखोऱ्यात बाळनाथ म्हणून कोणी साधुपुरुष होऊन गेले. त्यांचे गुरू अनंत होते व शिष्यपरिवारात दया, सखा, मैना ही मंडळी होती. ह्यांनी काही पदे रचली आहेत (सवामं. हस्त. सू., खं. १).
**सखा कविराय** [का. अनु.] लावणीकार.
**रचना : अमु.** – वेदान्तपर लावण्यांची रचना; तंसम. हस्त. यादी, क्र. ३ व सवामं. हस्त. सू., खं. २.
**सखा कवी** [अंदाजे इ. स. १८०० – १८२५] कवी. रामदासी संशोधन बाडात दोन सखा कवींचा निर्देश करण्यात आला आहे. एक बाळनाथांचा शिष्य व दुसरा जनार्दनशिष्य. तंसम. हस्त. ग्रंथांची यादी, क्र. ३ मध्ये आणखी एका सखा कवीच्या कवितेचा निर्देश येतो. संशोधक स. ल. कात्रे ह्यांच्या मते वामन पंडितांच्या नावावरील *गंगालहरी*चा कर्ता हा सखा कवी असावा.

उज्जयिनीच्या सिंदिया ओरिएंटल इन्स्टिटयूटच्या हस्तलिखित ग्रंथालयात *गंगालहरी* काव्याची (संस्कृत मुळासह समश्लोकी असलेली) एक प्रत आहे. प्रतीत लेखनसमय दिलेला नाही. पण बाह्य व अंतर्गत प्रमाणांवरून ती अंदाजे १२५ वर्षांपूर्वीची वाटते. ह्या पोथीत कर्ता म्हणून वामनाचे किंवा दुसऱ्या कोणाचेच नाव येत नाही. शेवटच्या श्लोकातील शेवटच्या दोन ओळी अशा आहेत : 'जगन्नाथाचे तैं करि सकळ भावार्थ उघडे । तमोभ्रान्ता जेवी दिनकर सखा दृष्टिस पडे ॥' ह्या चरणातील 'सखा' हे पद कविनामनिर्दर्शक असावे असे कात्र्यांना वाटते. ते म्हणतात : वामनी *गंगालहरी*चा खरा कर्ता हा वामन पंडित नसावा कारण मूळ *गंगालहरी*तले अपपाठ हे जगन्नाथ पंडित ह्यांच्या निधनानंतर पुष्कळ वर्षांनी प्रचलित झाले असावेत. प्रायः समकालीन अशा वामन पंडितांकडून ते स्वीकारले जाण्याची शक्यता मुळीच नाही. तेव्हा ही तथाकथित वामनी समश्लोकी बरीच अर्वाचीन असावी.

सखा कवीने तंजावर येथील विवाहसमारंभ (श. १७३५–४० मधील) प्रत्यक्ष पाहून त्यांच्या संदर्भाने रचलेली पुष्कळशी मंगलाष्टके व काव्यात्मक वर्णने उपलब्ध आहेत. त्यावरून कवीचा काळ (इ. स. १८०० ते १८२५ च्या आसपासचा) लक्षात येतो. *समश्लोकी गंगालहरी* ह्याच सखा कवीने केली असावी अशी शक्यता वाटते. समश्लोकीकाराने आपल्या गुरूचा निर्देश केला नसल्याने तो नक्की कोण असावा हे समजण्यास साधन नाही.
**रचना : अमु.** – पदपदांतरादी स्फुट कविता; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.
**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कात्रे, स. ल. : वामनी गंगालहरीचा खरा कर्ता – सखा कवि; मसाप., जाने. १९५३.
**सखानंद** [का. अनु.] पदकार.
**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.
**सखाराम–१** [का. अनु.] लावणीकार. *अंधारातील लावण्या* (पुणे, १९५६) संग्रहात ह्याची "आम्ही राजहौस पक्षी । सहज आलो मुंबई शहरासी ॥" अशी एक लावणी प्रसिद्ध (पृ. २१७).
**सखाराम–२** [का. अनु.] कवी.
**रचना : अमु.** – अभंगात्मक रामगीता; सवामं. हस्त. सू., खं. २.
**सखाराम–३** [अंदाजे इ. स. १८५९–६० च्या अगोदर] रामदासी कवी. डोमगाव मठ परंपरेतील. सखारामांची परंपरा, श्रीसमर्थ > कल्याण > मुधावा > भिवाजी > महारुद्र > हनुमंत > सखाराम, अशी आहे (*श्रीरामदासी संशोधन*, खं. १, पृ. १०७). समर्थवाग्देवतामंदिरातील संग्रहात (बा. २०४) सखारामबावारचित पंचीकरणाची वही आढळते. त्यांनी हे पंचीकरण सुलभ करून सांगितलेले आहे. ह्यांनी काही पदेही रचली आहेत (सवामं. हस्त. सू., खं. १).
**सखाराम जगजीवन** [का. अनु.] कवी.
**रचना : अमु.** – गंगालहरी समश्लोकी; नक्कल : १७५३, खर, माघ व. ३; भाइसंमं., हस्त. सू., पृ. ७३.
**सखारामतनय / ० सखारामसुत** [का. अनु.] कवी. ह्यांचे आर्याबद्ध *रुक्मिणीस्वयंवर काव्येतिहाससंग्रहात* मुद्रित झाले आहे (संककासू., पृ. ११२). 'ये धावत माझे आई, कृष्णाबाई' हा द्रौपदीच्या वस्त्रहरणप्रसंगीचा ह्यांनी रचलेला धावा लोकप्रिय आहे. अन्य पदरचना सवामं. बाडात अंतर्भूत.
**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग. : कांही अप्रसिद्ध मराठी पद्यकार; भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४८.
**सखाराम त्र्यंबक गर्दे / ० नाना गर्दे** [अंदाजे श. १७२० / इ. स. १७९८ – श. १७४० / इ. स. १८१८] चरित्रकार. उपनाव गर्दे. गोत्र जमदग्नी, शाखा शाकल. वडिलांचे नाव त्र्यंबक. आईचे नाव आनंदी. कुलदैवत जेजुरीचा खंडोबा. कुलस्वामिनी गुहागरची दुर्गा. हे वेणुग्रामी (म्हणजे बेलगावास) कारागृहात असल्याचा निर्देश त्यांच्या ग्रंथात येतो. तेथून नारायण यतींनी ह्यांची मुक्तता केल्यानंतर ते हयातभर चिदंबरस्वामींकडेच (गुर्लहोसूर येथील अवतारी पुरुष चिदंबर दीक्षित ह्यांजकडे) राहिले असावेत असे दिसते. ह्यांच्या चरित्रविषयक माहितीत गुरूचा निर्देश नाही. कदाचित चिदंबरस्वामींनाच ह्यांनी गुरुस्थानी मानले असेल.

ह्यांनी चिदंबरस्वामींचे *श्रीमच्चरित्र* नावाचे एक चरित्र लिहिले आहे. चिदंबरस्वामींची आणखीही काही चरित्रे सापडतात. ह्यांपैकी एक सखारामांचे समकालीन चिदंबरस्वामींचे शिष्य राजाराम ह्यांनी लिहिले आहे. दुसरे चरित्र संस्कृतमध्ये असून ते रामचंद्र भोजराव देशपांडे ह्यांनी लिहिले आहे. तिसरे चरित्र स्वामींचे पणतू सांबदीक्षित ह्यांचे. ह्या सर्व चरित्रांत सखाराम कवीचे *श्रीमच्चरित्र* हे कालक्रमाने पहिले ठरते.

सर्व शब्दांत श्री शब्द श्रेष्ठ तसेच स्वामींचे प्रचारातले नाव श्री, म्हणून चरित्राचे *श्रीमच्चरित्र* हे नाव निवडले असे कवी सांगतो. स्वामींच्या सांनिध्यात राहून त्यांना दाखवून लिहिलेले हे स्वामींचे चरित्र आहे. आपल्या ग्रंथाला कर्ता *ब्रह्मगिरी, जान्हवी* अशीही नावे देतो. ग्रंथात एकूण ४ पाद आहेत. पहिल्यात २७, दुसऱ्यात ४९, तिसऱ्यात ४४ व चवथ्यात १९ अध्याय आहेत. निर्याणकथेचे ३ अध्याय शेवटी वेगळे केले आहेत. चरित्रलेखनाचा काल श. १७२२ ते १७३९ (इ. स. १८०० ते १८१७) पर्यंतचा निर्देशित केला आहे. ह्यातल्या सुरुवातीच्या काही भागाची जुळणी हे कारागृहात असता ह्यांनी केली. तिसऱ्या पादाचा उत्तर भाग व चवथ्या पादाचा सर्व भाग श. १७३९ (इ. स. १८१७) चैत्रानंतर म्हणजेच स्वामींच्या निर्याणानंतरचा (श. १७३७) आहे. तो म्हैसाळ येथे लिहिला.

चरित्रग्रंथात अधूनमधून *शिवरात्रीकथा, गुरुचरित्र, सुंदरकांड* इत्यादी 'इतिहास-कथा-आख्याने' सांगून हे स्वतःच्या बहुश्रुततेचे दर्शन घडवितात. संगीत, छंदशास्त्र, ज्योतिष, पत्रलेखन, उपनयन, वास्तुशास्त्र ह्यांबद्दल त्यांना असलेली माहिती ते देतात. स्वामींनी 'गुरुपूर' वसविले तेव्हाचे वर्णन करताना ह्यांनी घराचे नकाशेसुद्धा काढले आहेत. *गीता, योगवासिष्ठा*तील सप्तभूमिका, *अपरोक्षानुभूति* इत्यादींवरील ह्यांची टीका चरित्रात समाविष्ट आहे.

प्रस्तुत रचनेत मुख्य वृत्त शार्दूलविक्रीडित वापरले असून मधूनमधून आर्या, ओव्या, चूर्णिका, सवायाही येतात. क्वचित्प्रसंगी यमकप्राचुर्य आढळते. *श्रीमच्चरित्रा*त येणाऱ्या स्वामींच्या लीळा, त्यांचा संचार, ठिकठिकाणी झालेल्या वास्तव्याचा तपशील आलेखासारखा असून अधूनमधून येणारे कालोल्लेखही महत्त्वाचे आहेत. टिपूचा उल्लेख *श्रीमच्चरित्रा*त आहे. पण त्यांनी स्वामींच्या पत्नीस (सरस्वती) त्रास दिल्याची व त्यामुळे त्यांचे डोळे गेल्याची कथा देशपांडे व सांब दीक्षित सांगतात, तिचा आढळ *श्रीमच्चरित्रा*त होत नाही.

देवलापुरात स्वामींना भेटलेल्या नारायणयतींवरही ह्यातून थोडा प्रकाश पडतो. हे दत्तसंप्रदायी होते. चिदंबर व ते अभिन्न असे कवी म्हणतात. स्वामींच्या सांगीवरून ह्यांनीच कवीची कारागृहातून सुटका केली. वाघाचा काटा काढणे, राजापुरात गुप्त गंगा प्रकट करणे इत्यादी स्वामींच्या लीळा कवी सांगतो. ह्या चरित्रातील कथांचा क्रम सर्वत्र बरोबर आहे की नाही हा विषय वादग्रस्त आहे. अनेक ठिकाणी तो कालदृष्ट्या चुकीचा वाटतो. अप्पा देसाई निपाणकर, धोंडजी वाघ, बापू गोखले असे अनेक इतिहासप्रसिद्ध पुरुष ह्यांच्या शिष्य-परिवारात होते. बाजीराव पेशव्यांनीही नवलगुंद मुक्कामी स्वामींची भेट घेतली होती. ह्या दिलेल्या माहितीमुळे चिदंबरस्वामींच्या चरित्रातील ऐतिहासिक अंग महत्त्वाचे झाले आहे. ऐतिहासिक दृष्ट्या पाहता *श्रीमच्चरित्र* हे स्वामींचे अधिकृत चरित्र मानता येते. ह्या चरित्राचे सामाजिक अंगही महत्त्वाचे आहे (उदा., अनेक वस्त्रे, भूषणे, खाद्य पदार्थ इत्यादींची नावे ह्यात आलेली आहेत). चिदंबर दीक्षित (गुर्लहोसूरकर) ह्या कर्नाटकातील साक्षात्कारी सत्पुरुषाचे पहिले मराठी विस्तृत चरित्र म्हणून ह्या ग्रंथास महत्त्व आहे.

**रचना : अमु.** – श्रीमच्चरित्र; पाद ४; अ. १४२; र. का. : श. १७२१ ते श. १७३९ च्या दरम्यान; पंडित आवळीकर संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : 'श्रीमच्चरित्र' : ऐतिहासिक अंग; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. २००–२१७.

**० सखारामसुत** – पहा **सखारामतनय.**

**सखोबा नाईक** [इ. स. चे १८ वे शतक] कवी. मोरोपंतांचे समकालीन. गोव्याचे राहणारे. *काव्यसंग्रह*कारांच्या मते ह्यांचे गुरू नारायण. परंतु एके ठिकाणी ह्यांनी 'श्रीगुरुकाशि' असाही उल्लेख केला आहे. ह्यांनी आपल्या प्रबंधांत मधून मधून आर्या योजिल्या आहेत. गो. का. चांदोरकर ह्यांनी कवीच्या नावावर *गोपीचंदाख्यान, मयशक्तिचरित्र, ऊषास्वयंवर* आणि *महाबळभट्ट* अशी चार काव्ये दिली आहेत (संककासू., पृ. ११२). ह्यांपैकी फक्त *गोपीचंदाख्यान*च ह्यांच्या नावावर *लघुकाव्यमाले*त (खंड ४, पृ. ५४–६८) छापले आहे. सूचीत निर्देशिलेल्या इतर काव्यांचे कर्ते अज्ञात आहेत असे मालेचे संपादक ना. चिं. केळकर व दा. के. ओक म्हणतात. चांदोरकरांनी कोणत्या आधारावर ही काव्ये सखोबांच्या नावावर दिली ह्याचे स्पष्टीकरण मिळत नाही. प्रस्तुत *गोपीचंदाख्याना*चे ११८ श्लोक आहेत. राजा गोपीचंद आपली राजवस्त्रे जाळून नाथपंथाची दीक्षा घेऊन जोगी कसा होतो ती कथा कवीने ह्या आख्यानात रंगविली आहे. अधूनमधून हिंदी साक्या व पदे येतात.

**सख्खन पंडित / ० सुब्बराव बाबा / ० सुब्बाजी शेषो** [इ. स. च्या अठराव्या शतकाची अखेर, एकोणिसाव्या शतकाचा प्रारंभकाल] भाषान्तरकार. इंग्रजी इसापनीतीचे *बालबोधमुक्तावलि* हे सचित्र मराठी भाषान्तर तंजावरचे महाराजे श्रीमंत सरफोजी राजे ह्यांच्या आज्ञेवरून सुब्बाजी शेषो ऊर्फ सख्खन पंडित ह्यांनी केले व तेथेच ते श. १८०६ (इ. स. १८८४) मध्ये मुद्रित झाले. ह्या ग्रंथात ११० गोष्टी असून एकंदर पृष्ठे १९६ आहेत. ग्रंथावरून त्या काळच्या मुद्रणाची व भाषेची कल्पना येते. मुळात प्रत्येक अक्षर वेगवेगळे तोडले आहे.

अक्षरओळख झाल्यानंतर मुलांना नीतीचे शिक्षण मिळावे अशा हेतूने ह्या ग्रंथाचे लेखन करवून घेतलेले दिसते. प्रथम कहाणी, नंतर तिचे तात्पर्य, म्हणजे गर्भितार्थ, व शेवटी त्यासंबंधीचा संस्कृत श्लोक अशी रचना आहे. तात्पर्यार्थ काढण्याची कवीची पद्धती मोठी मार्मिक आणि विवेचक आहे. त्यामुळे कथेमधील नैतिक शिकवण मनावर पूर्ण ठसते.

सख्खन पंडित असा ह्या सुब्बाजी शेषोचा उल्लेख वाङ्मयेतिहासकार करतात. अर्वाचीन मराठीतील कथारचनेचा आरंभ श. १८०६ (इ. स. १८८४) साली सख्खन पंडितांकरवी रचल्या गेलेल्या *बालबोधमुक्तावली*ने झाला [⇨ ३]. हा ग्रंथ सुरुवातीच्या अनेक ग्रंथां-प्रमाणे शिळाछापावर मोडीत छापण्यात आला होता. ह्यापेक्षा अधिक माहिती ग्रंथासंबंधात उपलब्ध नाही. ह्या ग्रंथाची एक प्रत ब्रिटिश म्युझियममधील ग्रंथालयात आहे. सख्खन पंडित ऊर्फ सुब्बाजी शेषो ह्यांनी इंग्रजीत *भाषादीपक* (पृष्ठसंख्या ४४) ह्या नावाचे एक मराठी व्याकरण लिहिल्याचे आढळते. हे मद्रासच्या 'ओरिएंटल लायब्ररी'त (मराठी हस्त. क्र. ७२) संरक्षून ठेविलेले आहे. ह्यांच्या पद्यरचनेचा निर्देश गो. का. चांदोरकर करतात (संककासू., पृ. ११६).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. प्रियोळकर, अ. का. : बालबोधमुक्तावलि – सुब्बाजी शेषो; मसंप., एप्रि. १९५४, पृ. १४. २. भिंगारे, ल. म. : बोधकथा : 'कथा-कादंबरी' प्रकरण ७ वे; मवाइ. खं. ४ (संपा. जोग, रा. श्री.); पुणे, १९७३; पृ. २०३–२०४

**सगनभाऊ** [अंदाजे इ. स. १७७८ – १८४०] शाहीर व लावणीकार. जन्माने मुसलमान. शिकलगार जातीचे. धंदा हत्यारांना पाजळून धार देण्याचा. मुळगाव जेजुरी (जि. पुणे). पण ह्यांचे सारे आयुष्य पुण्यास गेले. होनाजीप्रमाणे दुसरे बाजीराव पेशवे ह्यांच्या सगनभाऊही मर्जीतले होते. पेशवाई बुडाल्यानंतर हे साताऱ्यास प्रतापसिंह महाराजां-च्या आश्रयास गेले. शाहीर सिद्धनाथ रावळांचे हे शिष्य म्हणून ह्यांना रावळांच्या फडातील शाहीर म्हणतात. रावळ व गवळी ह्या फडांत त्या काळी चुरस असल्याने हे होनाजीचे प्रतिस्पर्धी होते. एके ठिकाणी 'होना गवळ्याचा झाला चुना' असे अधिक्षेपाचे उद्गार काढून आपल्या कवित्वाबद्दलचा अभिमान सगनभाऊंनी व्यक्त केला आहे. अमृत फाजलखां हे सगनभाऊंचे शिष्य. सगनभाऊंच्या फडात बिबिजान, येमा,

बाळा, राघू व रामा गोंधळी असे गाणारे साथीदार होते. 'लावणी करावी सगनभाऊने व म्हणावी रामा गोंधळ्याने' अशी त्यावेळी म्हणच होती. मुसलमान असूनही मराठी राजसत्ता, मराठी समाज, महाराष्ट्रातले संत व हिंदू धर्मपरंपरा ह्यांविषयी त्यांना आदर होता.

सगनभाऊंच्या कवितासंग्रहात त्यांच्या लावण्या व पोवाडे (सुमारे साठ) समाविष्ट केलेले आहेत. पोवाड्यांमधील *पानपतचा पोवाडा* बराच विस्तृत आहे. काव्य ह्या दृष्टीने हा पोवाडा महत्त्वाचा असला तरी ऐतिहासिक दृष्ट्या त्याला फारसे मोल नाही असे य. न. केळकरांचे मत आहे (ऐतिपो., खं. १, पृ. १०२). मूळ घटना घडून गेल्यानंतर ६०-७० वर्षांनंतर पोवाडा लिहिल्याने वरील प्रकार घडला असावा. हा पोवाडा ह्यांनी *जंगनामा* नामक उर्दू पोवाड्याच्या आधारे रचला अशी माहितीही केळकर नमूद करतात.

सगनभाऊंचे दुसऱ्या बाजीरावावरील दोन पोवाडे महत्त्वाचे आहेत "गगन फडकडुन पडले, पार नाही दुःखाला अरे दुःखाला । श्री शैल्य मल्लिकार्जुना आम्ही अंतरलो सुखाला ।" असा प्रारंभ असलेल्या एका पोवाड्यात बाजीरावांनी पुण्यातून पळ काढल्यानंतर स्वराज्याची स्थिती कशी झाली त्याचे चित्र कवीने समर्पक शब्दांत काढले आहे : "जगन्निवासा का अंतरलो रेषिम गाठिला । आनंदात केले राज्य सोने बांधून काठिला । दुनिया बापुडी दिसती, पैसे असून गाठिला । दक्षिणचे सौभाग्य गळसरी कोण्या रोहकाला ॥" आत्मीयतेने लिहिलेला हा पोवाडा काव्य ह्या दृष्टीने उत्कृष्ट आहे (मु. : ऐतिपो., खं. १, पृ. ४१०–४१३). *खडकीची लढाई, प्रतापसिंह महाराजांची शिकार, प्रतापसिंह महाराजाची काशीस रवानगी* असे सगनभाऊंचे आणखीही काही पोवाडे उपलब्ध आहेत (मु. : ऐतिपो., खं. ३). सातारकर छत्रपती प्रतापसिंह ह्यांना पदच्युत करून इंग्रजांनी सातारा घेतल्याचे वर्णन *प्रतापसिंह महाराजांची काशीस रवानगी* ह्या पोवाड्यात येते.

मराठी संतांविषयीचा ह्यांच्या ठिकाणी असलेला आत्मभाव ह्यांच्या कवितेतून प्रत्ययास येतो. उदा., "सगनभाऊ म्हणे इष्कबाज हो या प्रीतिला जीवि धरा । संतांचो पायधूळ होऊन जन्माचे सार्थक करा" असे हे एके ठिकाणी म्हणतात. *रामायण, महाभारत*, मराठी संतकविता त्यांच्या ऐकण्यात-वाचण्यात होती. हिंदूंचे अध्यात्मवादी तत्त्वज्ञानही त्यांनी आत्मसात केले होते. पंढरपूरच्या विठोबाचे हे भक्त होते. ह्या साऱ्याचा प्रभाव त्यांच्या कथनांवर पडलेला आहे.

उत्तानशृंगारिक कवनांसाठी सगनभाऊंची ख्याती आहे तरीदेखील ह्या लावण्यांत शृंगाराबरोबरच प्रेमाच्या उदात्त भावनेलाही स्थान आहे असे दिसते. "मी आपुले सीरकमळ कापुन उभी हस्तकी धरुन । भरुन प्राण पारडे तुला मी अर्पण करिते तरुन ।" असे ह्यांची एक नायिका म्हणते. ह्यांच्या लावण्यांतील वर्णने मार्मिक असतात व उपमाही वैशिष्ट्यपूर्ण असतात. "पिवळे तेज कसे पिवळी कांती । प्रियकर माझा पती । पिवळे डागिने छब विलायती । पिवळेच कंकण हाती । पिवळे सूर्य तुम्ही मी प्रभा किती ॥" हे वर्णन किंवा 'मी नागिन घालिन झडा, तू एक केवडा' वा 'गोड साखरेचा लाडू तशी प्रीत आली की रसा' इत्यादी उपमा ह्याची साक्ष देतील.

सगनभाऊंच्या लावण्यांतील चाली, तान, ठेका हे गाण्याचे ढंग फार अवघड आहेत. ह्या लावण्या विलंबित लयीने गावयाच्या असल्याने त्या म्हणणे नवशिक्या तमासगिराला जमणार नाही. हिंदी-मराठी मिश्र अशा काही लावण्याही ह्यांनी केल्या आहेत. परशरामांची बहुश्रुतता सगनभाऊंजवळ नाही किंवा प्रभाकर होनाजींची प्रतिभेची झेपही नाही. असे असले तरी साध्या भाषेत सगनभाऊंनी जोमदार कवने रचली आहेत व ती अर्थवाही आहेत.

**रचना : मु.** – १. लावण्या – २९; अंधारातील लावण्या; संपा. केळकर, य. न.; पुणे, १९५६; पृ. १३४–१६७. २. सगनभाऊकृत लावण्या व पोवाडे, भाग १; लावण्या ५६, पोवाडे ३; संग्रा. जाहागिरदार, चिं. सि., अधिकारी, गो. गो.; पुणे, १९२४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. केळकर, य. न. (संपा.) : पानिपत येथील लढाई; ऐतिपो., खं. १; पुणे, १९२८; पृ. ९९–१०५. २. मोहरीर, भ. प्र. : लावणीकार सगनभाऊ; युगवाणी, डिसें. १९६२; पृ. १०. ३. वर्दे, श्री. म. : सगनभाऊ; मराठी शाहीर; मुंबई, १९३०; पृ. २२६–२३४.

**संगमसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – कृष्णपर व हरिभजनपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सगाजी** [का. अनु.] शाहीर, लावणीकार. *अंधारातील लावण्या* (पुणे, १९५६) संग्रहात ह्याची एक लावणी मुद्रित (पृ. २७०). 'दावा नयनी प्राणविसावा । भेट सख्याची घ्या ग सख्यानु ।' असे तिचे चरण असून लावणीकाराने स्वतःच्या नावाचा उल्लेख केला आहे. लावणी शृंगारिक आहे.

**सच्चित्सुख** [का. अनु.] कवी. ह्यांनी भक्तिपर, शृंगारिक व अध्यात्मपर पदांची रचना केली आहे. 'का राम म्हणाना हो' व 'उगली कां रुससी ललने न कळे' ही ह्यांची सुप्रसिद्ध पदे आहेत (हर्षे ह्यांना उपलब्ध झालेल्या बाडातील). ह्यांची अन्य पदरचना समर्थवाग्देवतामंदिर बाडात अंतर्भूत (सवामं. हस्त. सू., खं. २)

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग. : कांही अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांचीं पदें; भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४; चैत्र १८६८; पृ. ४८.

**सच्चिदानंद–१** / ० सच्चिदानंदतीर्थ / ० सच्चिदानंदस्वामी [का. अनु.] वेदान्तग्रंथकार. सदानंदशिष्य सच्चिदानंदांचे वेदान्तावरील दोन ग्रंथ वि. का. राजवाडे ह्यांना कऱ्हाड येथे सापडले. त्यांपैकी *अनुभवसार* ग्रंथातील एका ओवीत ग्रंथकाराने आपले व आपल्या गुरूचे नाव सांगून ग्रंथाचा उद्देश स्पष्ट केला आहे. ती ओवी अशी : "ग्रंथीं सच्चिदानंदाचा अनुभव। हे सदानंद कृपेचें वैभव। ज्यास पाहिजे ब्रह्मानुभव। तेणें चि विचारें अवलोकिजे ॥" श. १६३२ (इ. स. १७१०) त *आनंदप्रकाश* नामे ग्रंथ लिहिणारे एक सदानंद विद्यमान होते. दुसरे श. १७४३ (इ. स. १८२१) त समाधिस्थ झालेले म्हसवडचे सदानंद. ह्या दोघांपैकी सच्चिदानंदाचे गुरू हे बहुधा दुसरे असावेत असे मत वि. का. राजवाडे ह्यांनी व्यक्त केले आहे.

कवीच्या *अनुभवसार*ग्रंथाची चार प्रकरणे असून त्यात ब्रह्मानुभवाचे विवेचन केले आहे. दुसरा ग्रंथ *स्वात्मबोध* हाही अध्यात्मविषयकच आहे. त्याची सहा प्रकरणे व २६६ ओव्या आहेत. हे दोनही ग्रंथ भारत इतिहास मंडळाच्या हस्तलिखित संग्रहात उपलब्ध आहेत. सदानंदशिष्य सच्चिदानंदाचे *चैतन्यविवेक* व *समाधिप्रकरण* (योग) असे आणखी दोन ग्रंथ मराठी संशोधन मंडळ, मुंबई ह्यांच्या हस्तलिखित संग्रहात उपलब्ध. *समाधिप्रकरणा*ची एक पोथी भारत इतिहास संशोधक मंडळातही आहे (हस्त. सू., पृ. ३१०).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : सच्चिदानंदकृत अनुभवसार; भाइसंमंवाइति., श. १८३६; पृ. ६४. २. पोतदार, द. वा. : सच्चिदानंदांचा स्वात्मबोध; भाइसंमंवाइति., श. १८३७; पृ. २६९.

**सच्चिदानंद–२** / ० महामति [श. १६४३ / इ. स. १७२१ – समा. श. १७१८ / इ. स. १७९६] कवी. गुरू : अच्युतानंद. हे कवी मोहपा (जि. नागपूर, सावनेर तहसील) येथे होऊन गेले. कवीचा जन्म सावनेर येथे श. १६४३ त झाला. विठ्ठलकृत *मधुपुरीमाहात्म्य* (श.

१७५१) ह्या ओवीबद्ध ग्रंथात ह्यांचे चरित्र आले आहे. ह्या कवीचे जन्मनाव वासुदेव, व्यवहारातील नाव मनाजीपंत, गुरूंनी ठेवलेले नाव महामति व संन्यासदीक्षेतील नाव सच्चिदानंद. ह्यांचे गुरू अच्युतानंद हे एकनाथ-परंपरेतील. काव्यात हे 'महामति' असे आपले नाव योजतात. ह्यांचे बहुतेक सर्व आयुष्य मोहपा येथे गेले. त्यांची समाधी सच्चिदानंद देवस्थान, मोहपा येथे आहे. ह्यांची काव्यरचना भागवती कथांवर आधारलेली आहे. सच्चिदानंदांनी कांही पदे, अभंग व रूपके केली आहेत. ह्यांत सद्गुरूवरील वैद्याचे रूपक आढळते. ही रचना प्रसिद्ध झालेली नाही (मसा., आ. ५, पृ. ९९९).

**सच्चिदानंद–३** [का. अनु.] पदकार. ह्यांचे 'त्रागडधिलांग धिमिति धिमि धिमिति' हे पद अभिनव असून श्रीकृष्णाच्या विस्वरवादनातील चूक गोपिकांनी काढल्याचा सुरस प्रसंग त्यात वर्णिला आहे (भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४८).

**सच्चिदानंद–४** [का. अनु.] आरतीकार. कुळदैवत शांतादुर्गा.

**रचना : मु.** – शांतादुर्गेची आरती; मआ., पृ. ३४४.

**सच्चिदानंदकवि** [इ. स. चे १९ वे शतक] कवी. *कथारहस्य* नावाचा एक ग्रंथ ह्यांनी लिहिला आहे. श्रीविठ्ठल भक्तांना पावल्याच्या ३१ कथा ह्यात येतात.

**रचना : अमु.** – कथारहस्य; श. १७०७, विश्वावसु संवत्सर, आश्विन शु. ७; इ. स. १७८५; सवामं. बा. २०७८.

**० सच्चिदानंदतीर्थ** – पहा **सच्चिदानंद–१.**

**सच्चिदानंदबाबा** [अंदाजे श. १२१२ / इ. स. १२९०] सच्चिदानंदबाबा कवी म्हणून नव्हे तर *ज्ञानेश्वरी*चे लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. उपनाव थावरे. त्यांजकडे नेवासे गावचे कुळकर्णपण होते. ह्यांचे वंशज संगमनेरी आहेत. *ज्ञानेश्वरी*चे लेखन त्यांनी नेवासे मुक्कामी केले. *ज्ञानेश्वरी*च्या अखेरची काल-निदर्शक ओवी प्रतलेखकाची असावी असे मत आहे. 'शके बाराशे बारोत्तरे। तै, टीका केली ज्ञानेश्वरे। सच्चिदानंद बावा आदरे। लेखकु झाला ।।' ही ओवी मोठ्या आदराने ह्या *ज्ञानदेवी* ग्रंथाची प्रत लिहून झाल्यावर रचून तेथे घातली आहे. साधारणतः प्रचारात असणाऱ्या बऱ्याचशा *ज्ञानेश्वरी*च्या प्रतींत ती आढळते. *ज्ञानेश्वरविजय* नावाचा ज्ञानेश्वरांचा चरित्रग्रंथ (र. का. : श. १२१७) त्यांनी लिहिला असे म्हणतात. प्रत्यक्ष ग्रंथ मात्र उपलब्ध नाही. ह्यांनी केलेल्या अभंगरचनेपैकी चार-एक अभंग वि. का. राजवाडे ह्यांना जगनाड्याच्या वहीत उपलब्ध झाले आहेत.

**सच्चिदानंदसेवक** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० सच्चिदानंदस्वामी** – पहा **सच्चिदानंद–१.**

**संजीवन** [अंदाजे इ. स. १६८०–८१] कवी. गो. का. चांदोरकर ह्यांनी *संतकाव्यसूची*त संजीवन कवीची *डंगकथा* व *शकुनवंती* ग्रंथ (श. १६०३ / इ. स. १६८१) ह्या ग्रंथाची नोंद केलेली आहे (पृ. ११७). *शकुनवंती* ग्रंथाचा जो रचनाकाल दिलेला आहे त्यावरून कवी श. १६०३ च्या सुमारास होऊन गेला असावा. ह्याला निश्चित प्रमाण मात्र कोणतेच नाही. कवीच्या *डांगवीपुराणा*च्या हस्त-लिखित प्रती तंजावर सरस्वतीमहाल ग्रंथालयात आहेत. काव्याचे प्रसंग १–३ व ओ. सं १०३८ आहे. ग्रंथाची माहिती देताना भागवतांतर्गत कथेवरील रचना असे म्हटले आहे.

इंद्राच्या सभेत दुर्वासमुनींचा उपहास केल्याने अप्सरा उर्वशी शाप-भ्रष्ट होऊन पृथ्वीवर येते. तिला दिवसा घोडीचे आणि रात्री सुंदर स्त्रीचे रूप असेल असा शाप दिलेला असतो. ज्यावेळी औट वज्रांचे मीलन होईल तेव्हा मुक्ती मिळेल असा उःशाप असतो. अश्विनीच्या रूपाने ती डांगवी देशात फिरत असता डांगवी राजाकडे येते. पुढे नारदाच्या सांगीप्रमाणे कृष्ण राजाकडे अश्विनीची मागणी करतो. राजाने ती नाकारल्याने कृष्ण युद्धास सज्ज होतो. कृष्णाविरुद्ध लढण्यास इतर कोण तयार होणार ? शेवटी द्रौपदी ह्या राजाला आश्रय देते. पांडव, कौरवांचे साहाय्य घेऊन कृष्णाशी युद्ध करतात. कौरव-पांडव, श्रीकृष्ण-बळिराम असे युद्ध चालू असता आकाशात मारुती प्रकट होतो. तो युद्ध करणाऱ्या बळिराम व भीम ह्यांना वरचेवर उचलतो. श्रीकृष्ण, बलराम व मारुती हे तिघे पूर्ण वज्रदेही व भीम अर्धा वज्र अशी औट वज्रे एकत्र आल्यानंतर उर्वशी शापमुक्त होते. अशी ही डांगवी आख्यानाची कथा कवीने रंगविली आहे. ह्या आख्यानावर बऱ्याच मराठी कवींनी रचना केली आहे. विशेषतः महानुभाव कवींत हे आख्यान अधिक लोकप्रिय होते.

**रचना : अमु.** – १. डांगवीपुराण; प्रसंग १–३; ओ. सं. १०७८; तंसम. हस्त. यादी, क्र. १. २. शकुनवंती; र. का. : श. १६०३; संककासू., पृ. ११७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कुळकर्णी, व. दा. : डांगवी आख्यान : एक अभिनव आख्यान काव्य; मस्वासंप., व. ५, १९७०; पृ. ५३–६४.

**संजीवन अनंत प्रसादे** [अंदाजे श. १५६८–६९ / इ. स. १६४६–४७ च्या अगोदर] कवी. डांगवी आख्यानावर रचना करणाऱ्या यशवंतसुत, गोविंदसुत, संजीवन अशा अनेक कवींपैकी संजीवन अनंत प्रसादे हा एक होय. ह्या कवीच्या *डांगवी-पुराणा*च्या बहुसंख्य प्रती हस्तलिखित महानुभाव ग्रंथसंग्रहातून उपलब्ध झालेल्या आहेत. कवीचा काळ किंवा इतर माहिती खात्रीलायक रीत्या कळत नाही. पण ह्या काव्याची प्राचीनतम हस्तलिखित प्रत ही शके १५६८–६९ ची आहे.

काव्याचे पाच प्रसंग व ४५० ओव्या आहेत. कथेमधले अनेक पेचप्रसंग व बारकावे कवीने खुबीने रंगविले आहेत. श्रीकृष्णभक्ती हाच काव्याचा प्रमुख उद्देश दिसतो. एरव्ही महानुभाव तत्त्वज्ञानाचे निरूपण त्यात सापडत नाही. काव्याची गुंफण सुसूत्र आहे. प्रारंभी कवीने आपल्या रचनेबद्दल " जैसि गाए वोरसली । ते जिव्हाअग्रीं प्रवेसली । तैसि सरस्वति ओळली । अमृतधारीं ।। १९ ।। " असे म्हटले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, व. दा. : डंगवै-पुराण : एक परिचय; महानु., व. २५, मे १९७२; पृ. ३–१२. २. कुळकर्णी, व. दा. : डांगवी आख्यान : एक अभिनव आख्यान काव्य; मस्वासंप., अं. ५, १९७०; पृ. ५३–५४.

**सज्जदास / ० सहजदास** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – राधाकृष्णविरहादी पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० सज्जन** – पहा **रामदास.**

**सज्जनरंजन** [श. १६९८ / इ. स. १७७६ – श. १७२६ / इ. स. १८०४] पदकार. ह्यांचे मूळ नाव गोविंदा गोसावी. हे इंदापूरचे राहणारे. ह्यांनी सज्जनरंजन ह्या नावानेच रचना केली आहे. ह्या कवीची असंख्य पदे समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील बाडातून संग्रहित (सवामं. हस्त. सू., खं. १, २).

**सटवा** [अंदाजे इ. स. १७१८] जैन कवी. कवीने *कंसाच्या पदा*त आपल्या गुरूचा निर्देश केला आहे : 'महीभूषण रूप सटवा बोले अन्यवाचा'. हिंदी पदांतही गुरूचा निर्देश येतो. ह्यावरून सटवाचे गुरू महीभूषण होते. हे शके १६४० च्या सुमारास लातूर पीठावर भट्टारक होते.

ह्यांच्या *शिवानेमिसंवाद* आणि *कंसाचे पद* अशा दोन किरकोळ रचना व *गज छोड चलो गिरनारी* नावाचे हिंदी पद उपलब्ध आहे. *शिवानेमिसंवाद* ह्या गीतात नेमिनाथ विवाहमंडप सोडून दीक्षा घेण्यासाठी गिरनारला निघतात तेव्हा त्यांची माता शिवादेवी त्यांना अडवते, त्यावेळी त्या दोघांत झालेला संवाद रंगविला आहे. *कंसाचे*

पद हे कंस कृष्णास मारण्याचा प्रयत्न करतो, पण तो मरत नाही, त्या वेळचे त्याच्या तोंडचे पद आहे.

**रचना :** अमु. – १. कंसाचे पद; ८ कडवी; जोहरापूरकर संग्रह, नागपूर; २. शिवानेमि संवाद; २० कडवी; सोलापूर हस्त. संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अक्कोळे, सुभाषचंद्र; सटवा; प्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ८०–८१.

० **सटवाजी** – पहा **रामा सटवा.**

**संतगोपाळ** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – ज्ञानपर पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**संतदास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ११७.

**संतदेव** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, अखेर] कवी. केशवस्वामी भागानगरकर ह्यांचे शिष्य.

**रचना :** अमु. – १. सत्यबोध; श. १६१८; २. संतवैभव; श. १६३४; संककासू., पृ. ११७.

० **संत पुरोहित** – पहा **अनंतसुत तुकदेव.**

**संतबाबा** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सबामं. हस्त. सू., खं. २.

**संतराज** [अंदाजे इ. स. १६८७] कवी. रामदासपंचायतनापैकी केशवस्वामी भागानगरकर ह्यांचे हे शिष्य. *चिंतानिवारणग्रंथा*च्या पाचव्या प्रकरणात संतराजांनी आपली परंपरा दिली आहे. ती अशी : हरिनाथ > रामचंद्र > मुकुंदराज > नृसिंहभारती > जगन्नाथ > सहजबोध > रंगबोध > केशव. ह्यांचा *चिंतानिवारणग्रंथ* (मु.) अभंगबद्ध आहे. काव्याच्या अखेरीस येणाऱ्या कालनिर्देशाप्रमाणे ही रचना श. १६०९ (इ. स. १६८७) मध्ये झाल्याचे दिसते.

गुरूने केलेला आत्मज्ञानाचा उपदेश ऐकण्याने शिष्याची चिंता निवारण होऊन त्याला आत्मसाक्षात्काराचा अनुभव प्राप्त झाला हाच काव्याचा मुख्य आशय आहे. आत्मा हे एकच सत्य होय ह्या अद्वैत-सिद्धान्ताच्या प्रतिपादनासाठी उलट-सुलट प्रमाणे देऊन कवी निवेदन करतो. ग्रंथातील बराच भाग गुरुमहिमापर ओव्यांनी व्यापला आहे. गुरुशिष्याच्या एकरूपतेचे 'जगद्धान संतकेशवीं दिसेना। ऐक्य उमसेना ऐसें झालें ॥' असे कवी वर्णन करतो.

**रचना :** मु. – चिंतानिवारणग्रंथ; प्रक. ६; अभंग २८२; कासं., क्र. १२७; पृ. १५०–१६०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** करंदीकर, वि. रा. : संतराजकृत चिंतानिवारणग्रंथ; मवाइ., खं. ३; संपा. जोग, रा. श्री.; पुणे, १९७३; पृ. ८७–८८.

**संतसुत** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – राधाप्रेमपदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**संता** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ११७.

**संताजी** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – रामायणयुद्धकांड; १ ते ६ प्रसंग; ओ. सं. ९६९; भाषा रसाळ, काव्यावर एकनाथांचा प्रभाव; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**संताजी तेली जगनाडे चाकणकर** – पहा **परिशिष्ट.**

**संतिनारायण** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना :** अमु. – पंचीकरण; गो. का. चांदोरकर; संककासू., पृ. ११७.

**संतु अज्ञान** [का. अनु.] शाहीर.

**रचना :** मु. – विश्वासराव गायकवाड याचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. १२८–३२.

**संतुदास** [अंदाजे श. १७०४/इ. स. १७८२] कवी. पेशवाई-अखेरच्या काळातील ह्या नाथपंथीय कवीचा परिचय प्रा. सुरेश जोशी ह्यांनी नगर जिल्ह्यात बायजाबाईचे जेऊर येथे त्यांना प्राप्त झालेल्या हस्तलिखित बाडावरून करून दिला आहे. संतुदासांचा *सुबोध* ग्रंथ व काही अभंग ह्या बाडात उपलब्ध झाले आहेत.

संतुदास आपल्या गुरूचे नाव 'सुबान्नाथ' असे देतात.' सुबानाथ स्वामि गुरु निजदाता । तयाविण माझे आहे कोण आता । म्हणे संतुदास तया वेळोवेळ । सदोदित ध्यातो घडि पळपळ ॥' सुभाननाथांचा मठ व समाधी पुण्याला स्वारगेटाजवळ असल्याचे रा. चिं. ढेरे सांगतात (*श्रीगुरुगोरक्षनाथ : चरित्र व परंपरा*; पृ. १८२). सुभाननाथांच्या आज उपलब्ध असलेल्या परंपरा-शाखेत संतुदासांचे नाव आढळत नाही. ती परंपरा अशी : विसोबानंद > मल्हारनाथ > रंगनाथ > सहजनाथ > सुबाननाथ > गोपाळनाथ > गंगानाथ. गोपाळनाथाप्रमाणे संतुदास हेही सुभाननाथांचे एक शिष्य होते हे नव्याने ज्ञात होत आहे. आपल्या जातीचा उल्लेख ह्यांनी एका अभंगात केला आहे तो असा : 'आम्ही जातिचे कुणबट । शेत अमुचे धनवट।' संतुदासांचा मठ व समाधी बायजाबाईच्या जेऊरासच आहे. मात्र हल्ली तेथे परंपरा चालू नाही.

ह्या कवीचा *सुबोध* ग्रंथ छोटेखानी असून त्याच्या १२० ओव्या आहेत. त्याची समाप्ती शके १७०४ (इ. स. १७८२), श्रावण शु. ७, गुरुवारी झाली, असे समाप्तिमुद्रेत नमूद केलेल्या संवत्सराच्या उल्लेखावरून ठरते. ग्रंथात गुरुस्तवनानंतर देहाचे क्षणभंगुरत्व, सत्त्व-रज-तम-गुणयुक्त माणसाचे वर्णन करताना षड्रिपूंचा पराक्रम कवी सांगतो. विश्वनिर्मितीपूर्वीची स्थिती, मह्‌योग्याची लक्षणे व मूर्खाची लक्षणेही कवीने सांगितली आहेत. परब्रह्माचे वर्णन त्याने पुढीलप्रमाणे केले आहे : "नाही खोल ना उथळ । नाही दाट ना पातळ । नाही ठेंगणे विकाळ । परब्रह्म ते ॥ नाही रोड ना ठोसर । नाही कृष्ण ना ते गौर । नाही पार ना अपार । ऐसे जाणिजे ॥" त्याच्या प्राप्तीसाठी 'मी तु पण हे गळाले। अहंकर्तृत्व पळाले' अशी स्थिती प्राप्त व्हायला हवी. मग 'सद्गुरुकृपेने ते सहज । साधले मजलागी ॥' बाडातील संतुदासांच्या बारा अभंगांपैकी तीन योगप्रक्रियेची माहिती देणारे व इतर गुरुकृपेची महती सांगणारे आहेत. ह्यांचे एक पदही बाडात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, सुरेश : एक नाथपंथीय बाड व त्यातील काही अज्ञात कवी; इंद्रायणी, जुलै १९६३; पृ. ५०-५५.

**संतुबाई** [अंदाजे श. १७३१ / इ. स. १८०९] कवयित्री. ह्या संतुबाईला गंगानंदांनी स्वप्नात मंत्रबोध दिला. त्या उल्लेखावरून काळ श. १७३१ (इ. स. १८०९) हे निश्चित झाले. हिचा एक अभंग पसिद्ध झाला आहे (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २७४).

**संतू म्हार** [इ. स. च्या १८ व्या शतकाची अखेर] शाहीर. हा करवीरकर छत्रपतींच्या पदरी होता. बत्तीस शिराळ्याचा राहणारा. करवीरकर छत्रपती आणि सातारकर छत्रपती ह्यांच्या दरम्यान जे कलह चालत त्यांमधूनच *आळत्याच्या लढाई*चा प्रसंग उद्भवलेला आहे. आळत्याचे करवीरकरांनी जबरदस्तीने घेतलेले ठाणे परत ताब्यात घेण्यासाठी पेशव्यांचा सेनापती परशुरामभाऊ आपला पुत्र रामचंद्र आप्पा ह्यास पाठवतो, तो पराभूत होऊन परत आल्यानंतर स्वतः भाऊच लढाईस सिद्ध होतो व करवीरकरांचा पाडाव करतो, इत्यादी कथाभाग पोवाड्यात आलेला आहे.

पोवाडा १८ चौकांचा म्हणजे बराच विस्तृत असून शाहीर समकालीन असावा. हा *आळत्याच्या लढाईचा पोवाडा ऐतिहासिक पोवाडे,* खंड ३ मध्ये संग्रहित (पृ. २०–२४).

**संतोषमुनि कृष्णदास** [अंदाजे श. १४१६ / इ. स. १४९४] महानुभाव कवी. पारमांडल्य आम्नायातील. गुरुपरंपरा : नागदेवाचार्य > आनेराजव्यास > नागनाथमुनि > विरक्त > मल्लनाथ > भीष्माचार्य > बल्लाळमुनि > भिवबा > तुकेराज > भानो व्यास > संतोषमुनि कृष्णदास.

संतोषमुनींनी *रुक्मिणी सैंवर* हे काव्य लिहिले आहे. *सारस्वत*कार ह्या काव्याचा रचनाकाल श. १४७५–७६ देतात (मसा., आ. ५, पृ. ७८४). परंतु ह्या काव्याचे संपादक ना. ब. जोशी, प्रत्यक्ष हस्तलिखितात दिलेला वार, मिती, शकनाम ह्यांचा शोध घेऊन ह्या काव्याचा रचनाकाल श. १४१६ असल्याचे सांगतात (प्रस्ता., *रुक्मिणीसैंवर*, पृ. २०). ह्या *रुक्मिणीसैंवरा*चे २५ प्रसंग व ३२०२ ओव्या आहेत. संतोषमुनींनी आपण *पद्मपुराण* व *भागवत* ह्यांच्या आधारे ग्रंथ लिहीत असल्याचे म्हटले असले तरी, *हरिवंश* व स्वतः श्रीचक्रधरांनी निरूपण केलेले *श्रीकृष्णचरित्र* ह्यांचा बराच आधार घेतल्याचे दिसते. कवी नरेंद्र ह्याच्या *रुक्मिणीस्वयंवरा*चाही ह्या काव्यावर प्रभाव पडलेला आढळतो.

ह्या काव्याचा प्रारंभ गोदातीरी कुंकुमठाणे (जि. नगर) येथे व समाप्ति सिन्नर येथील भीलमठीत झाली असे कवी सांगतो. पुढे श. १६४१ (इ. स. १७१९) मध्ये पौषदाख्य गोपाळमुनीने ह्या काव्याचे शोधन करून त्यात आणखी ५३५ ओव्यांची भर घातली. हा 'वरदीग्रंथ' आहे असे गोपाळमुनी म्हणतात. संतोषमुनींनी आपले काव्य वाचणाऱ्यांस वा ऐकणाऱ्यांस त्याचे इच्छित फळ मिळावे अशी प्रार्थना केली व परमात्म्याने त्यांची इच्छा पूर्ण होईल असा वर दिला, अशी आख्यायिका आहे. ह्यामुळे हे काव्य वरदायी आहे, अशी पंथीयांची भावना होऊन ह्याचे घरोघरी पारायण होत असते.

काव्यात सुरुवातीला मराठीची प्रशस्ती केली आहे. त्यात पुढीलप्रमाणे चतुर कोटिक्रम आढळतो : "मऱ्हाटी स्त्रीलिंग वाइक्ये । आणि संस्कृत तंव नपुंसक । म्हणोनि बाळकत्व आइक । तेयासिचि साजे ।। १:४९।।" ह्यापुढे 'ऐसी हे सर्व भाषांची जननि । उत्तम पवीत्र मराष्टी वाणी ।' अशी तिची थोरवी कवी सांगतो. प्रस्तुत काव्यात अनेक ठिकाणी उत्प्रेक्षांच्या मालिका आढळतात. कवीची वर्णनशैली वेधक असून वर्णनाचा सहज ओघ कायम राहिल्यामुळे काव्य चित्तवेधक झाले आहे. ह्या काव्यावर अभिप्राय देताना अ. ना. देशपांडे म्हणतात, 'संतोषमुनींची काव्यदृष्टी ही सोज्वळ आहे, सात्त्विकतेचा संस्कार करणारी आहे.' श्रीकृष्णाचे गुणवर्णन हा तर काव्याचा गाभाच दिसतो. संतोषमुनींनी पंथीय तत्त्वज्ञानाचा एक धागा कथेत सहजपणे गुंफून टाकला आहे. [ ⇨ ३ ].

संतोषमुनींनी लिहिलेले ८५ ओव्यांचे एक लघु *रुक्मिणीस्वयंवर* प्रा. वसंत जोशी ह्यांनी प्रसिद्ध केले आहे. त्यात मोठ्या काव्याचे अध्यायवार सार आले आहे. वार्धक्यात भवताप असह्य झाल्यामुळे व्याधि-निवारणाचे औषध म्हणून नित्यपठण करण्यासाठी ह्या छोट्या स्वयंवराची रचना कवीने केली असा ओव्यांमधून पुरावा सापडतो.

**रचना :** मु. – १. रुक्मिणीसैंवर; प्रसंग २५; ओ. सं. ३२०२; प्रथम मुद्रण : २८ अध्यायाची पोथी, खामगाव, १८९१; द्विआ. : संपा. जोशी, ना. ब.; हैद्राबाद, १९६४; २. लघु रुक्मिणीस्वयंवर; ओ. सं. ८५; मसाप., एप्रि.–जून १९५८; पृ. १७–२७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, ना. ब. : प्रस्ता., रुक्मिणी-स्वयंवर; हैद्राबाद, १९६४; पृ. २०–२६; २. देशपांडे, अ. ना. : संतोषमुनी कृष्णदास; प्रामवाङ्., भा. २, पुणे १९७३; पृ. २४५–२५२.

**सत्यात्मज** [अंदाजे इ. स. १६९१] वीरशैव ग्रंथकार. सत्यापासेटींचे पुत्र म्हणून हे स्वतःस सत्यात्मज म्हणवितात. ह्यांचे मूळ नाव नेल्पाण्णा. उदा. 'श्रीरेवणा सिद्धेश्वरा वंदुन । समाप्त केले ग्रंथविवरण । सत्यपासेटीचा नंदन । नेल्पाण्णाने ।' (*वीरशैवधर्मनिर्णयटीका*, ५. ११०) रेवणसिद्धेश्वरांना ह्यांनी गुरू म्हणून अनेकवार वंदन केले आहे.

सत्यात्मजांनी वीरशैव सिद्धान्त आणि आचारधर्म ह्यांचे मराठीत सुगम विवरण केले आहे. ह्यांचे *वीरशैवधर्मनिर्णयटीका* आणि *अष्टावरणटीका* असे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. ही ग्रंथरचना त्यांनी १७ व्या शतकाच्या अखेरीस केली आहे. *वीरशैवधर्मनिर्णयटीका* पोथीचा लेखनकाल कार्तिक शु. ५, शुक्र., श. १६६४ (इ. स. १७४२) असा दिला आहे. *स्कंदपुराणा*तील *शंकरसंहिते*तले ८० ते ८४ हे पाच अध्याय आधारास घेऊन वीरशैव धर्माचे सिद्धान्त महाराष्ट्रीय सांप्रदायिकांना समजावून सांगितले आहेत. मूळच्या २४८ संस्कृत श्लोकांवरील १०९७ ओव्यांची ही टीका आहे. कवीच्या मते 'भक्तिमुक्तिदायक संपूर्ण शट्स्छल निर्णयज्ञान' असे हे वीरशैवधर्माख्यान आहे. सत्यात्मजांचा दुसरा *अष्टावरणटीका* हा ग्रंथ आठ प्रसंगांत विभागला असून ओवीसंख्या सुमारे २५० आहे. ग्रंथाचा र. का. श. १६१३ (इ. स. १६९१), चैत्र शु. १ असा दिला आहे. ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय गुरु, लिंग, जंगम, पादोदक, प्रसाद, रुद्राक्ष, भस्म (विभूती) आणि मंत्र ही वीरशैवांना प्रिय असलेली अष्टावरणे हा होय. ह्यांपैकी प्रत्येकाची महती कवीने भक्तिपूर्वक गायली आहे.

**रचना :** अमु. – १. अष्टावरणटीका; ओ. सं. २५०; प्रसंग ८; र. श. १६१३; कपिलधार मासिक; व. २ रे, १९६५; २. वीरशैवधर्मनिर्णयटीका; मूळ संस्कृत श्लोक २४८; टीका ओव्या १०९७; र. श. १६६४; सुरेश जोशी हस्त. सं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : सत्यात्मज; प्राचीन मराठीच्या नवधारा; पुणे, १९७२; पृ. ५८–६१.

**० सत्यानंद** – पहा **सत्यामलनाथ.**

**सत्यामलनाथ / ० सत्यानंद** [अंदाजे इ. स. च्या अठराव्या शतकाचा प्रारंभकाल] नाथपंथीय कवी. ह्यांची गुरुपरंपरा, आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरखनाथ > गैनीनाथ > निवृत्तिनाथ > ज्ञाननाथ > सत्यामलनाथ > गैबीनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ > शिवदीननाथ, अशी दिली आहे. ही परंपरा नाथपंथाच्या प्रख्यात अशा परंपरेपैकी एक असून ती सर्वपरिचित आहे. सत्यामलनाथांच्या कालाविषयी वाद आहे. ह्यांनी आपल्या ग्रंथरचनेत स्वतःचा किंवा ह्या रचनेचा काल दिलेला नाही.

परंपरेवरून सत्यामलनाथ हे ज्ञानेश्वरांनंतर होऊन गेले असे दिसते. ह्यांना ज्ञानदेवांचा साक्षात अनुग्रह होता, असे आपल्या *सिद्धान्तरहस्यात* ह्यांनी म्हटले आहे. तसेच एकनाथांच्या एका अभंगात 'ज्ञानराजे बोध केला सत्यामला' असा उल्लेख येतो. ह्यांचा काळ श. १२०० ते १२८० (इ. स. १२७८ ते १३५८) असा ल. रा. पांगारकर ठरवितात. पण ह्या अनुमानाला बाधक असा पुरावा म्हणजे सत्यामलनाथांच्या *सिद्धान्तरहस्यात* तुकाराम-रामदासांना केलेले वंदन हा होय. पांगारकर ह्यांच्या मते ह्या नमनाच्या ओव्या नकलकाराने पदरच्या घातलेल्या असाव्यात! ! (मवाइ., खं. २, ऑक्टो. १९३५; पृ. ६ ते १५).

*सिद्धान्तरहस्या*तील ज्ञानदेवांच्या रूपवर्णनावरून सत्यामलनाथांच्या जीवनाला ज्ञानेश्वरांचा सुवर्णस्पर्श झाला असावा असे अनुमान रा. चिं. ढेरे ह्यांनी काढले आहे. परंतु *सिद्धान्तरहस्या*तील रामदासादींना केलेले वंदन व *नवरत्नमाले*तील एकनाथ व केसरीनाथ ह्या ज्ञानेश्वरोत्तर कालातील कवींचा उल्लेख पाहून *सिद्धान्तरहस्य* व *नवरत्नमाला* ह्या ग्रंथांचा कर्ता ज्ञानेश्वरशिष्य सत्यामलनाथ नसून केसरीनाथशिष्य सत्यामलनाथ असावा असेही मत ते मांडतात (*श्रीगुरुगोरक्षनाथ*, पृ. १६९ ते १७२). वि. ल. भाव्यांच्या मतानुसार ज्ञानेश्वर सत्यामलनाथांचे साक्षात गुरू नसून दृष्टान्तगुरू होते (मसा., आ. ५, पृ. ४४८)

सत्यामलनाथांच्या गुरुपरंपरेप्रमाणे गैबीनाथ हे त्यांचे शिष्य ठरतात. गैबीनाथांचा काल गो. का. चांदोरकरांनी सूचीत श. १५२० ते १५८० (इ. स. १५९८ ते १६६८) असा दिला आहे (संककासू., पृ. २७). तेव्हा त्यांच्या गुरूंचा काल ५–१० वर्षे अलिकडे म्हणून श. १५०० ते १५७५ (इ. स. १५७८ ते इ. स. १६५३) मानण्यास हरकत नसावी, असे स. म. दिवेकर ह्यांचे मत आहे (भाइसंमंपसंवृ.; श. १८३९, पृ. ५५–५९). ह्यामुळे रामदासांचा उल्लेख खटकत नाही. दिवेकर पुढे म्हणतात की, ज्ञानेश्वर ते उद्बोधनाथांपर्यंतच्या ४०० वर्षांत एकंदर पाच पुरुष होतात. म्हणजे दर पुरुषास ८० वर्षे पडतात. हे म्हणणे सयुक्तिक वाटत नाही. तेव्हा ह्या मालिकेत कोठे तरी खंड आहे व तो ज्ञानेश्वर आणि सत्यामलनाथ ह्या दोघांच्या काळाच्या मध्यंतरी केव्हा तरी असावा.

ह्या लेखाच्या प्रारंभी सत्यामलनाथांची जी गुरुपरंपरा दाखविली आहे तिच्याहून भिन्न अशी परंपरा म. रा. जोशी ह्यांनी आपल्या '*अमृतानुभव : राष्ट्रभाष्य* व सूत्रकार श्रीनाथ' (*ज्ञानेश्वर* त्रैमासिक, फेब्रु. १९७५, पृ. १५). ह्या लेखात पुढीलप्रमाणे दाखविली आहे : श्रीज्ञानेश्वर > सदाशिव > गणेश > उद्धव > केशव > बाळनाथ > श्रीनाथ > सत्यामलनाथ. त्याप्रमाणे *नवरत्नमाला* ग्रंथात ज्या केसरीनाथांना सत्यामलनाथ नमन करतात त्यांचा काळ श. १५६५–१६४६ (इ स. १६४३–१७२४) हा असल्याने ह्यांचा कालही त्यांच्यानंतरचा असावा असे जोशी ह्यांचे म्हणणे आहे.

कवीचा *सिद्धान्तरहस्य* हा ग्रंथ एदलाबाद येथील दाजीसाहेब देशमुख ह्यांच्या संग्रहात उपलब्ध झाला. ह्या पोथीत ग्रंथाच्या दहा करणांपकी पहिली आठ व दहावे अशी नऊच प्रकरणे आहेत. नववे प्रकरण गहाळ झालेले आहे. ह्या ग्रंथाला पोथीत कोठे कोठे ललितप्रबंध म्हटले असले तरी शेवटी *सिद्धान्तरहस्य* असे नाव दिले आहे. ग्रंथातील ज्ञानेश्वरस्तुतिपर काही श्लोक वगळल्यास ग्रंथ अभंगवृत्तात लिहिला आहे. ग्रंथकार मात्र ह्या वृत्तास अभंग न म्हणता ओवी म्हणतात. उपलब्ध ग्रं. सं. १००४५ असून अनुपलब्ध प्रबंध सुमारे २००० ते २५०० ओव्यांचा असावा. ही पोथी ग्रंथकाराने स्वहस्ते लिहिलेली नसून ती नक्कल आहे. मात्र ती मुळाबरहुकूम तयार केलेली असावी. नक्कलकाराने ग्रंथाचे अर्वाचीनीकरण केलेले आढळत नाही. 'माझा हा ग्रंथ स्वतंत्र आहे, टीकारूप नाही', असे ग्रंथकार अभिमानाने सांगतो. "सोलीव शास्त्रार्थ। अनुभवसिद्ध। आत्मरस शुद्ध। ग्रंथपात्री॥ संस्कृत असोनि। वरी टीका केली। तैंसी नव्हे झाली। ग्रंथोत्पत्ती ॥ वेदांतवनीची। वेंचोनियां फुलें। दाहा हार केले। प्रकरणांचे ॥ ४२८५ ॥" असे उद्गार तो ग्रंथाच्या शेवटी काढतो. ग्रंथात अद्वैतवेदान्ताचे प्रतिपादन येते. ग्रंथ म्हणजे शुद्ध वेदान्तपर भाष्य असून ऐतिहासिक माहितीने पूर्ण भरलेला आहे.

सत्यामलनाथांच्या *नवरत्नमाला* ग्रंथाचा औंध प्रतीवरून डॉ. रा. ग. हर्षे ह्यांनी परिचय करून दिला आहे (*माउली*, व. १, अं. ३). ती माहिती रा. चिं. ढेरे ह्यांनी *श्रीगुरुगोरक्षनाथचरित्र* ह्या आपल्या पुस्तकात संग्रहित केली आहे (पृ. १६९). मूळ १२५७ ओव्यांच्या ह्या ग्रंथातील फक्त ९३२ ओव्यांचाच भाग उपलब्ध आहे. ह्या ग्रंथात एकूण नऊ 'रत्ने' (अध्याय) असून त्यापैकी 'वैडूर्य', 'पुष्पराग' व 'इंद्रनील' ही तीन 'रत्ने' (ओव्या ३२५) अनुपलब्ध आहेत. 'पद्मराग', 'गोमेद', 'वज्र', 'पाचू', 'प्रवाळ' व 'मंगळ' ही सहा रत्ने उपलब्ध आहेत. सर्व ग्रंथ अभंगओवी वृत्तात लिहिलेला आहे. उपलब्ध भागात प्रकृतिपुरुष-विवेक, दैवासुरसंपद्विभाग, योगविवरण, परब्रह्मस्वरूप, आत्मसाक्षात्कार इत्यादी विषय आले आहेत. सत्यामलनाथांची ग्रंथरचना संप्रदायाचे तत्त्वज्ञान विशद करणारी आहे. गुरूचे अनन्यसाधारण महत्त्व, पंथावरील दृढ निष्ठा आणि पंथीय तत्त्वज्ञानाचा व्यासंग इत्यादी नाथपरंपरेतील वैशिष्ट्ये त्यांच्या ग्रंथरचनेत आहेत.

**रचना : अमु.** – १. नवरत्नमाला; अ. ९, ओ. सं. १२५७; पैकी उपलब्ध – अ. ६, ओ. सं. ९३२; २. सिद्धान्तरहस्य; प्रकरणे १०, ग्रं. सं. सुमारे १२०००; पैकी उपलब्ध – प्रकरणे १ ते ८ व १०, ओ. सं. १००४५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. ढेरे, रा. चिं. : महाराष्ट्रातील नाथ संप्रदाय : गोचप.; मुंबई, १९५९; पृ. १६९–१७२. २. दिवेकर, स. म. : श्रीसत्यामलनाथकृत 'सिद्धान्तरहस्य' : ललितप्रबंध; भाइसंमंपसंवृ., श. १८३९; पृ. ५५–५९.

० **सदयानंद** – पहा **सदानंद–२.**

**सदयानंदी** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : अमु.** – गणेशाची आरती; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सदानंद–१** [अंदाजे श. १४२०/इ. स. १४९८ – श. १४८०/इ. स. १५५८] आनंदसंप्रदायी कवी. ह्या सदानंदांचा पद्मपुराणांतर्गत *जनकयोगिनीसंवाद* असा एक टीकाग्रंथ गो. का. चांदोरकरांना उपलब्ध झाला आहे. ही टीका सदानंदांनी केव्हा केली त्याबद्दलचा उल्लेख ग्रंथात कोठेही सापडत नाही. त्यामुळे हे सदानंद कोण असा प्रश्न उपस्थित होतो. सदानंदांनी ग्रंथात आपली परंपरा दिली आहे ती अशी : "ऐसा दत्तात्रय औशुमाळी । प्रगटला सदानंद हृदयकमळीं । तो परागु सेवितां आळी । केमयानंदु ॥ २० ॥ तें देखोनि विद्रद । पावले सज्जन षट्पद । माजी भोक्ता विलयानंद । विचक्षण ॥ २१ ॥ ना तो विलयानंदु मेघु । फेडावया मुमुक्षवसुधेचा दाघु । जाला तो वृष्टिप्रसंगु । सदानंदु भूमी ॥ २२ ॥"

*अवधूतगीता*कर्ते पूर्णानंदस्वामी किंवा त्यांचे शिष्य सदानंद ऊर्फ शिवरामस्वामी कल्याणीकर ह्यांनी दिलेली परंपरा पाहिल्यास ह्या सदानंदांचा काल स्पष्ट होण्यास मदत होईल. पहिल्या सदानंद ऊर्फ सहजानंदापासून परंपरेच्या दोन शाखा झाल्या : एक रामानंदांची व दुसरी केमयानंदांची. त्यांपैकी केमयानंदांची परंपरा वर दिली आहे. रामानंदांची परंपरा : रामानंद > गंभीरानंद > ब्रह्मानंद > सहजानंद (श. १५१४) > पूर्णानंद (श. १५३२) > सदानंद (शिवरामस्वामी) : अशी आहे. रामानंद-परंपरेतील पूर्णानंदांच्या *अवधूतगीते*चा रचनाकाल श. १५३२ (इ. स. १६१०) आहे. त्यांचे गुरू सहजानंद ह्यांच्या *योगवासिष्ठसारा*ची रचना श. १५१४ (इ. स. १५९२) नंदन संवत्सरी झाली. पूर्णानंदांचा काल स्थूलमानाने श. १५०० ते १५४० (इ. स. १५७८ ते १६१८) धरल्यास त्यांचे गुरू सहजानंद ह्यांचा काल १४८० ते १५२० (इ. स. १५५८ ते १५९८) गणता येणे शक्य आहे. सहजानंदाचे गुरू ब्रह्मानंद ह्यांच्या समपिढीतील सदानंदांचा चा काळ अंदाजे श. १४२० ते १४८० (इ. स. १४९८ ते १५५८) असा मानायला हरकत नाही. *जनकयोगिनीसंवाद*कर्ते सदानंद हे त्यांच्या परंपरेतील पहिले व रामानंदांच्या परंपरेतील आठवे असलेले सदानंद ह्यांच्याहून भिन्न आहेत हे निश्चित होते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : चांदोरकर, गो. का. : सदानंद; भाइसंमंइति., श. १८३५, पृ. १३२–१३६.

**सदानंद–२** / ० **सदयानंद** [का. अनु.] कवी. गुरू : पुरुषोत्तमस्वामी. समर्थवाग्देवतामंदिर, धुळे व सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर येथील हस्तलिखित बाडांतून ह्यांची रचना आढळते.

**रचना : अमु.** – गुरुपर, ज्ञानपर, कृष्णलीलापर पदे व बुद्धिभक्तिसंवाद.

**सदानंद–३** / ० **सदानंदस्वामी** [अंदाजे श. १५८६/इ. स. १६६४ – श. १६८२/इ. स. १७६०] आनंद-संप्रदायी कवी. ह्यांचे मूळ नाव सदाशिव. गुरूपदेश घेतल्यानंतर त्यांचे सदानंद असे नाव गुरूने

ठेवले. सदानंदांच्या पूर्वजांचे आडनाव उपासनी असे होते. हे चांद्याकडच (विदर्भातले हल्लीचे चंद्रनगर) असावेत. ह्यांचे पूर्वज महादेवभट उपासनी हे शके १४०० च्या सुमारास वाईस कृष्णातीरी जाऊन राहिले. त्यांना विद्वत्तेमुळे शृंगेरी मठाचे शंकराचार्य ह्यांजकडून धर्माधिकारित्वाचा अधिकार मिळाला होता म्हणून त्यांचे धर्माधिकारी असे उपनाव पडले. पुढे ते धरणगावी (जि. जळगाव) स्थायिक झाले. ह्यांचे घराणे माध्यंदिनशाखी, वत्सगोत्री, पंचप्रवरी ब्राह्मण. कुलदैवत गणपती. सदानंदांच्या पित्याचे नाव चिंतामणी. सदानंदांचा जन्म श. १५८६ च्या सुमाराचा असावा. वयाच्या विशीपर्यंत कडकडीत ब्रह्मचर्यव्रताचे पालन करून ह्यांनी स्वशाखोक्त संहिता, ब्राह्मणे, श्रौत, न्याय, मीमांसा, काव्यालंकार अशा अनेक शास्त्रांचे उत्तम अध्ययन केले. पुढे गृहस्थाश्रम स्वीकारला. माहुरास सर्वतीर्थावर अनुष्ठान करीत असता दत्तात्रेयांनी ह्यांना दर्शन दिले व सिंदखेडच्या (जि. धुळे) आत्मारामस्वामींकडे जाऊन उपदेश घेण्यास सांगितले. *आनंदसार* ग्रंथात ह्यांनी आपली परंपरा दिली आहे ती अशी : "भूम नगरीं। आनंद प्रभु आचार्यीं॥ स्थापिला उपदेशी निर्धारी। आनंद बोली ॥ ९५॥ आनंदप्रभुहि निश्चलानंद। निश्चलानंदें बालप्रभु केला प्रबुद्ध॥ बालप्रभुवरें अर्जुनानंद शुद्ध। प्रबोधिला ॥ ९६॥ अर्जुनानंदें निर्मळानंद आंगीकृत। निर्मळानंदें आत्माराम केला संस्कृत। आत्मारामें सदानंद उपदेशित। सदानंदें दयानंद ह्या ॥ ९७॥" (*आनंदसार*, अ. ४१). वयाच्या ६५ व्या वर्षी ह्यांनी चतुर्थाश्रम स्वीकारला. त्यानंतर ह्यांनी मठ, गादी व श्रींच्या पादुका स्थापन केल्या. दयानंद हे सदानंदांचे पुत्र व शिष्य होत. ह्यांचा मठ चोपडे (जि. जळगाव) येथे असून त्यांचा वंश व शिष्यपरंपरा तेथे अद्याप पाहण्यास सापडते. असे सांगतात की वयाच्या ९६ व्या वर्षी सदानंदांनी चोपडे येथे समाधी घेतली. समाधी मठातच आहे.

सदानंदांची परंपरा ही महाराष्ट्रातील आनंदसंप्रदायाची एक प्रसिद्ध शाखा आहे. शहादत्त अलमा प्रभू (दत्तात्रेयाचे अवतार) ह्यांनी सदानंदांच्या परंपरेतील प्रथम पुरुष आनंदप्रभू ह्यांना आनंदमार्गाचा उपदेश केला. ह्या परंपरेतील आत्मारामस्वामी व चोपड्याचे हे सदानंदस्वामी ह्यांनी प्रचंड ग्रंथरचना केली आहे. त्यांच्या ग्रंथांतून संप्रदाय शाखेविषयीची व शहादत्तांचे अवताररहस्य व गुह्य उपदेश ह्यांविषयीची अद्भुत माहिती सापडते. आत्मारामस्वामींचे दुसरे एक शिष्य शंकरगिरी नावाचे होते. त्यांचा मठ नांदेड जिल्ह्यात किवळ गावी होता.

सदानंदस्वामी हे विद्वान आणि व्यासंगी असून ह्यांनी संस्कृत व मराठी ह्या भाषांत विपुल ग्रंथरचना केली आहे. रचना ओवीबद्ध व प्रामुख्याने अध्यात्मपर आहे. त्यांपैकी संन्यासधर्म, गुरुमाहात्म्य, शहादत्तचरित्रमाहात्म्य, मायास्वरूप, मुक्तिस्वरूप, आनंदानुभव अशी काही प्रकरणे आहेत. ह्याशिवाय धर्मशास्त्र, श्रौतस्मार्त, वैद्यक, ज्योतिष, अलंकार, छंदशास्त्र अशा विषयांवर ह्यांचे लेखन आहे. ह्यांनी पदे, अभंग इत्यादी स्फुट रचनाही केली आहे. आपल्या मूळ पुरुषापासून २७ पिढ्यांची वंशावळी माहिती गुरुपरंपरा, मठाम्नाय ह्यांचे वर्णन *आनंदसारप्रकाश* ग्रंथात ह्यांनी केले आहे. ह्यांची एकूण कविता १। लक्षाच्या घरात आहे. ह्यांच्या ग्रंथास काशीस्थ विद्वानांनीही मान्यता दिल्याची संमति-पत्रे सापडतात. ही सर्व रचना अप्रकाशित असून समर्थवाग्देवतामंदिराच्या धुळे येथील हस्तलिखित संग्रहात आहे.

**रचना : अमु.** – १. अध्यात्मविचार (४६५); २. अपरोक्षानुभूतिः प्राकृत समश्लोकी; ३. आनंदप्रकाश; र. का. : श. १६३२ (२०००); ४. आनंदबोध (३५०); ५. आनंदसार (७०००); ६. गुरुगीता – टिपणी; ओव्या सुमारे ७०००; ७. पराविद्या; ८. भूगोलवर्णन; ९. योगवासिष्ठसार (३६०); १०. विज्ञानसागर (१५००); ११. वेदान्तसार (संस्कृत) (३००० श्लोक व टीका); १२. संतमालिका १३. अभंग, पदे इत्यादी; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : सदानंद–३; मकच., खं. ४, मुंबई, १९१६; पृ. ८४-१११.

**सदानंद-४** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – अनुभवसार; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ९.

**सदानंदतनय** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**सदानंद सरस्वती ऊर्फ मुनि** [का. अनु.] टीकाकार.

**रचना : अमु.** – जयदेवकृत अष्टपदीवर टीका; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० सदानंदस्वामी** – पहा **सदानंद–३.**

**सदाशिव-१ / ० तुकोद्धवचेला / ० तुकोद्धवदास / ० तुकोद्धवार्भक** [का. अनु.] कवी. सदाशिवकृत *आत्मानात्मविवेक* ग्रंथाची पोथी उपलब्ध असून ती अपूर्ण आहे. कवी स्वतःला तुकोद्धवदास, तुकोद्धवार्भक, तुकोद्धवचेला असे म्हणवून घेतो. ह्यावरून कोणी तुकोद्धव ह्याचे गुरू असावेत. ग्रंथात अध्यात्मतत्त्वज्ञानविषयक निरूपण केलेले असावे असे ग्रंथनामावरून वाटते.

**रचना : अमु.** – आत्मानात्मविवेक; त्रु. पो.; अ. ५–१३; सवामं. हस्त. सू., खं. १.

**सदाशिव-२ (अवधूतांकित)** [का. अनु.] कवी. समर्थवाग्देवतामंदिरातील १२७३ क्रमांकाचे बाड हे अवधूतांकित सदाशिव ह्यांच्या प्रकरणांचे व पदपदांतरांचे आहे. एक पदात 'कोनेरीनंदन सदाशिव रे। लाहुनि गुरुपद तरला भव रे॥' असा उल्लेख येतो. ह्या बाडातील बहुतेक प्रकरणे संस्कृत असून प्रत्येक संस्कृत श्लोकाचे मराठीत समश्लोक व समपद असे भाषान्तर केले आहे. *तारावळी* ह्या प्रकरणातील (श्लो. ४. २७) शेवटच्या श्लोकावरील ही रचना नमुन्याकरिता पाहावी.

**सं. श्लोक :** स्वयं मनोहराद्वैतं तारावळयुत्तमं। श्रद्धया धार्यते येन स ब्रह्मानंदमश्नुते ॥ २७॥

**टीका :** श्रीमत्छंकरवर्यवाक्मधुर हे अद्वैततारावळी। झाली रम्य म्हणोनि स्पष्ट रचिली त्याचीच टीकावळी॥ सद्भक्तीं नर आयके पठण ही जो कां करी सर्वदां। त्याला ऐक्य घडे सदाशिव सदा ब्रह्मत्व भावी तदां॥ २७॥

**पद :** तारावळी रम्य हे अद्वैत। श्रद्धाभक्ती वाची जो नेमस्त। तो चि ब्रम्हपदीं राहे स्वस्त। सदाशिव आत्मत्वीं नांदत॥ ऐसा जो कां गुरुपदीं तल्लीन। सहजीं तो ब्रह्मीं होय लीन॥ धृ.॥

वरील प्रकरणात गुणत्रय, ज्ञान, अज्ञान, समाधी, ईश्वर, जीवेश्वरैक्य, ह्यांची लक्षणे सांगितलेली आहेत.

ह्याशिवाय बाह्येंद्रियप्रकरण, मायानिंदा, द्रव्येषणा, कर्तृत्वभोक्तृत्व, स्वपरप्रकाश, द्विविधाभक्ति, प्रबोध, सगुणनिरोपण इत्यादिविषयक संस्कृत श्लोक व त्यांचे सदाशिवकृत समश्लोक व समपदे आहेत (सवामं. हस्त. सू., खं. २).

**सदाशिव-३** [का. अनु.] कवी. शंकराच्या नावावर श्लेष करून ह्याने *उमाविलास* (ग्रं. सं. ६१) नावाचे काव्य केले आहे. ते प्रथम *काव्येतिहाससंग्रहा*त प्रसिद्ध झाले (संककासू., पृ. ११३). देवांचे गुरू नारद शिव व पार्वती ह्यांच्यामध्ये निष्कारणच कळ लावून कलह निर्माण करतात. पुढे गिरिजेला टाकून शंकर गिरिकंदरात निघून जातात. तेथे नारदांच्या सांगीवरून गंगेशी लग्न लावतात. नारद पार्वतीकडे येऊन तुझ्या भ्रताराने तुला टाकून दुसऱ्या कामिनीशी लग्न केले अशी कळ फिरवतात व सर्व प्रकरण अंगाशी येणारसे वाटल्यावर गंगेला जटेत लपविण्याची युक्ती सुचवून शंकरांस गिरिजेकडे आणतात. पार्वती कांगावा करून 'तू कोण?' म्हणून शंकराला विचारते. त्याने आपले नाव सांगितले

की त्यावर श्लेष करून त्याचा भलताच अर्थ घेऊन त्यास उत्तर देते. अशा प्रकारे हे *उमाविलास* काव्य कवीने रंगविले आहे. काव्य रसाळ असून शेवटी कवीने आपल्या नावाचा उल्लेख केला आहे : उदा. 'झाली तीं शिवशक्ति एकचि तदा ना भाव दे दूसरा। यासाठीं पुजितो सदाशिव कवी श्रीपार्वतीशंकरा ॥' गो. का. चांदोरकरांनी *उमाशिवसंवाद* अशी जी एक रचना ह्या कवीच्या नावावर दिली आहे (संककासू., पृ. ११३) ते वर निर्दिष्ट केलेले काव्यच असावे. भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे ह्यांच्या हस्तलिखित संग्रहातील सदाशिव कवीच्या नावावरील *सोमवारकथा* (श. १६५६ / इ. स. १७३४) ही रचना कदाचित ह्याच कवीची असेल.

**रचना :** **मु.** – उमाविलास; ग्रं. सं. ६१; अकलकामा., भा. १; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९५; पृ. १६७–१७७.

**सदाशिव-४** [का. अनु.] पदकार. नारायणगाव येथील रामदासी मठपरंपरेतील.

**रचना :** **अमु.** – स्फुट कविता; सवामं. हस्त. सू., खं. १.

**सदाशिव अयाचितबुवा** [अंदाजे श. १७१५ / इ. स. १७९३ च्या अगोदर] कवी. नागपूर प्रांतात वास्तव्य.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; मसा., आ. ५, पृ. १००१.

**सदाशिव कवी** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – भक्तिविलास; भाइसमं. हस्त. सू., पृ. १८६.

**सदाशिव काशिनाथ छत्रे ऊर्फ बापू छत्रे / ० छत्रे, सदाशिव काशिनाथ** [इ. स. १७८८ – १८३०] अव्वल इंग्रजी कालखंडात शालोपयोगी बोधकथा व नीतिकथा भाषान्तरित करणारे गद्य लेखक. ह्यांचा जन्म मुंबईत वाळकेश्वरी इ. स. १७८८ त झाला. हे जातीचे कोकणस्थ ब्राह्मण. व्यंकोबा नाइकांनी (हे मुंबईला सरकारकडे इंजिनियर होते) छत्र्यांना उत्तेजन देऊन त्यांच्याकडून इंग्रजीचे अध्ययन करविले. आरंभी इंजिनियरच्या कार्यालयात हे 'रायटर' होते. १८२२ त स्थापन झालेल्या 'हैंदशाळा शाळापुस्तक मंडळी'च्या नेटिव्ह सेक्रेटरीच्या जागेवर त्यांची १८२३ मध्ये नेमणूक झाली. मराठी ग्रंथप्रकाशनाच्या कामी हे जर्व्हिस साहेबांचे मदतनीस होते. शाळातपासणीचे कामही त्यांना अधून मधून करावे लागे. पेन्शनात जाण्यापूर्वी 'नेटिव्ह स्कूल सोसैटी' चे ते नेटिव्ह सेक्रेटरी होते. १२ मे १८३० रोजी त्यांनी ह्या पदाचा राजीनामा दिला. मराठी भाषेच्या मार्मिक ज्ञानाबद्दल त्यांची ख्याती होती. शिक्षणसंस्थेचा संबंध सुटल्यानंतर ग्रंथरचनेचे आणखी काही कार्य करावे असे त्यांच्या मनात होते; पण दुर्दैवाने अल्प काळात इ. स. १८३० च्या डिसेंबरमध्येच ते मरण पावले.

"यावेळीं सदाशिव काशिनाथांप्रमाणें इंग्लिश भाषा जाणणारे या मुंबई इलाख्यांत एतद्देशीय लोकांत कोणीच नव्हते . . . त्यांनीं या परदेशी भाषेचें इतकें सूक्ष्म व शुद्ध ज्ञान केवळ आपल्या बुद्धिकौशल्यानें व श्रमानेंच संपादन केलें त्यांत अगदीं संशय नाहीं." असे दादोबा पांडुरंगांनी त्यांच्या आत्मचरित्रात उद्गार काढले आहेत. बापू छत्रे ह्यांनी राज्यकर्त्यांच्या तत्कालीन धोरणास अनुसरून लोकांच्या धार्मिक भावना दुखावल्या जाणार नाहीत अशा बेताने बालकांबरोबर मोठ्यांनाही व्यवहारज्ञान प्राप्त व्हावे म्हणून बोधकथा, नीतिकथा भाषान्तरित केल्या. *इसापनीती*, *वेताळपंचविशी*, *सिंहासनबत्तिशी*, *बोधकथा* व *बाळमित्र*, *भा. १* हे त्यांच्या कथांचे संग्रह. शालोपयोगी नीतिग्रंथ असेच प्रामुख्याने ह्या रचनेचे स्वरूप दिसते. क्रॉक्झलच्या *इसाप्स फेबल्स*वरून ह्यांनी इसापनीतिकथा भाषान्तरित केल्या. *बाळमित्र*, *भा. १* ह्या ग्रंथास बरीच प्रसिद्धी मिळाली. *बरक्वीन्स चिल्ड्रेन्स फ्रेन्ड* ह्या मूळ फ्रेंच ग्रंथाच्या इंग्रजी भाषान्तराचा हा तर्जुमा आहे. ग्रंथाची प्रस्तावना बरीच विस्तृत आहे. ह्या पुस्तकाच्या वाचनाने "लहान मुलांस लहानपणापासून अनायासाने बोलायचा अभ्यास होईल; त्यांचा शब्दसंग्रह वाढेल; त्यांस अनेक व्यवहार, अनेक रीतिनीति समजतील", असे प्रस्तावनेत लेखकाने नमूद करून ठेवले आहे. बापू छत्रे ह्यांची शिक्षणविषयक सशास्त्र दृष्टी, बालमनाचा सखोल अभ्यास व मानसशास्त्रदृष्ट्या मुलांच्या आवडीनिवडी ह्या व्यक्तिवैशिष्ट्यांवर प्रस्तावनेतून प्रकाश पडतो. व्यावहारिक नीतिनियम समजावून देण्यासाठी *मुलांकरिता बोधवचन* ही पुस्तिका ह्यांनी तयार केली. *बोधकथा* ह्या नावाने ताराचंद्र दत्तांच्या *प्लीजिंग टेल्स*चे त्यांनी भाषान्तर केले. त्यात मानवी सद्गुण व दुर्गुण ह्यांमुळे होणारे फायदे व तोटे सांगून मुलांना व त्याचबरोबर त्यांच्या पालकांनाही मार्गदर्शन केले आहे.

*बाळमित्र* ह्या एका शालेय पुस्तकामुळे बापू छत्र्यांचे नाव सर्वतोमुखी झाले. *बाळमित्रा*ची भाषा इंग्रजी वळणाची वाटते. संवादरूप कथन व कमीत कमी संस्कृत शब्दांचा वापर हे तिचे वैशिष्ट्य आहे. इंग्रजी ग्रंथाचा मराठीत सुबोध अनुवाद करणारा त्या काळातला एक आदर्श शैलीकार म्हणून छत्र्यांचा गौरव केला जातो. सुबोध मराठीची घडण त्यांनी प्रथम तयार केली. आरंभकालात मराठी भाषेची त्यांनी केलेली सेवा बहुमोल अशीच आहे. पुढल्या पिढीला शुद्ध आणि रसाळ अशा गद्यलेखनाचा धडा त्यांच्या कथाग्रंथांनी घालून दिला.

**रचना :** **मु.** – १. इसापनीतिकथा; मुंबई, १८२८, १८४७; २. बाळमित्र, भा. १; मुंबई, १८२८; ३. बोधकथा; १८३०; ४. मराठी बोधवचने; ५. वेताळपंचविशी; १८३०; पुणे, १८७२; ६. सिंहासनबत्तिशी; १८२४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, कृ. भि. : स. का. छत्रे; आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती; मुंबई, १९५६; पृ. १५४–१६०; २. जोग, रा. श्री. (संपा.) : मवाइ., खं. ४ (महा. सा. परि.); पुणे, १९६५; पृ. ३१, १०४–१०६; ३. देव, बा. ना. : सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे; विज्ञावि., व. ३१, अं. ९–१०; पृ. ३१७; ४. सरदार, गं. बा. : अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका; पुणे, १९७१; पृ. ३४.

**सदाशिव नाईक जोशी** [श. १६८५ / इ. स. १७६३ पूर्वी] ग्रंथकार. राहणार औरंगाबाद.

**रचना :** **अमु.** – नरहरिबोध; संककासू., पृ. १४२.

**सदाशिवब्रह्म** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**सदाशिव भट्ट** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – महाशिवरात्री कथा; ग्रं. सं. ३६०; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**सद्गुरुदास** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – १. प्रल्हादचरित्र (१४०); २. सीताकल्याण (२००); सवामं. हस्त. सू., खं. २.

**सद्गुरुदासानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**सद्गुरुनागेंद्र** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – मळाचूर्णिका; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सद्गुरुशंकर** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सद्गुरुशंकरअनंत** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**सनतीदास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**सनातन** [अंदाजे श. १६९९ / इ. स. १७७७] कवी. कृष्णदयार्णवांचे शिष्य. दयार्णवांच्या परंपरेतील सोळा शिष्यांच्या मठापैकी उमरखेड येथील उत्तमश्लोकांचा व मुंगी येथील सनातनांचा असे दोनच मठ प्रसिद्ध आहेत. मुंगी मठाची परंपरा : दयार्णव > सनातन > परमानंद > गोविंद > नरहरि > रंगनाथ अशी आहे. सनातनांचा *ज्ञानामृत* ग्रंथ (ओ. सं. ३१९, र. श. १६९९ / इ. स. १७७७) व तर स्फुट रचना आणि सनातनशिष्य युद्धिष्ठिर ह्यांचा *योगसार* असे ग्रंथ मुंगी मठात उपलब्ध आहेत.

**सन्नमेरु** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० सभासद, कृष्णाजी अनंत** – पहा **कृष्णाजी अनंत सभासद.**

**समयानंद** [इ. स. च्या १६ व्या शतकाचा पूर्वार्ध] गोमंतकीय संतकवी. हे सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धातील कृष्णदास शामा ह्यांचे समकालीन होत. कवीची व्यक्तिगत माहिती उपलब्ध नाही. ह्यांनी अनेक ग्रंथ रचले असून त्यांपैकी *रुक्मिणीस्वयंवर* हा ग्रंथ विशेष महत्त्वाचा आहे. ब्रागच्या (पोर्तुगाल) ग्रंथसंग्रहालयातील रोमन लिपीतील हस्तलिखित बाडात ह्यांचे *रुक्मिणीस्वयंवर* आणि *गुरुशिष्यसंवाद* असे दोन ग्रंथ आढळतात (बा. ७३३). *रुक्मिणीस्वयंवरा*ची ३० पृष्ठे आहेत. ही माहिती डॉ. पां. स. पिसुर्लेकर ह्यांनी संग्रहित केलेली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नायक, ना. भा. : समयानंद; गोमका., रिवण (गोवे); १९६९; पृ. ७.

**० समर्थ** – पहा **रामदास.**

**सॅम्युएल न्यूवेल** [? – ३० मे १८२१] अमेरिकन मिशनरी. गॉर्डन हॉल ह्यांचे एक सहकारी. ४ मार्च १८१४ मध्ये हे मुंबईस आले. ह्यांनी मराठी भाषेचा अभ्यास चांगला केला होता. ह्यांनी *शुभवर्तमान* ही पुस्तिका लिहिली. ती त्यांच्या मृत्यूनंतर १८२४ साली प्रसिद्ध झाली. ह्या पुस्तकाच्या एकूण नऊ आवृत्त्या व हजारो प्रती छापल्या. मोडी लिपीत व गुजरातीतही हे पुस्तक छापण्यात आले. ह्या पुस्तिकेत 'उद्धार प्राप्त होण्यासाठी आपण काय करावे' हे सांगून अखेरीस लोकांस ख्रिस्ती धर्माची व धर्मपुस्तके कोठे मिळतील ह्याची माहिती दिली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म.; सॅम्युएल न्यूवेल; युमअसे.; मुंबई, १९६०; पृ. २४४–४५.

**सय्यद महंमद** [का. अनु.] कवी. ह्यांचे एकमेव पद उपलब्ध आहे. पदात गोपीच्या भूमिकेतून कृष्णाच्या वेणूच्या प्रभावाविषयी तन्मयतेचा भाव व्यक्त केला आहे. "तुझ्या वेणुवाच्या नादें । मी भुललें रे कान्हा ॥ सारी रात्र वैरियाची । आजि सगुणनिधाना ॥ १ ॥ . . . . मावेचा कान्हया । आपणे झालासे दानी ॥ वीनवी सयद महंमद । अखंड कृष्ण चरणी ॥ ६ ॥" हे पद प्रसिद्ध झाले आहे. ह्यांची अप्रसिद्ध रचना धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिर बाडात संग्रहित.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं.; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १४८–४९.

**० सय्यद हुसेन** – पहा **जंगली फकीर (सैद हुसेन).**

**सय्यद शहा** [अंदाजे इ. स. च्या १६ व्या शतकाचा उत्तरार्ध] मुसलमान कवी. ह्यांची स्फुट पदरचना उपलब्ध आहे (सवामं. हस्त. सू., खं. २).

**सरस्वती गंगाधर** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक] दत्तसंप्रदायी कवी. दत्तसंप्रदायात प्रमाणभूत ठरलेल्या *गुरुचरित्र* ह्या प्रसिद्ध ग्रंथाचा कर्ता. उपनाव साखरे. आपस्तंबशाखी, कौंडिण्यगोत्री ब्राह्मण. गुलबर्गा जिल्ह्यातील कडगंची गावचे राहणारे. ह्यांची मातृभाषा कानडी. ह्यांचे पूर्वज सायंदेव हे कर्नाटकातून गाणगापुरी येऊन नृसिंहसरस्वतींचे शिष्यत्व पत्करून राहिले. शिष्यपरंपरेने नृसिंहसरस्वतींपासून हे पाचवे पुरुष. नृसिंहसरस्वती > सायंदेव > नागनाथ > देवराव > गंगाधर > सरस्वती. सरस्वती गंगाधर हे जोडनाव आहे. पैकी गंगाधर हे पित्याचे नाव व सरस्वती हे ग्रंथकाराचे नाव. ग्रंथकाराने *गुरुचरित्रा*त ठिकठिकाणी नामधारक असा आपला निर्देश केला आहे. "याचा अर्थ श्रीगुरूच्या नृसिंहसरस्वती नावापैकी अर्धे नाव 'सरस्वती' हे धारण करणारा असेही असण्याचा संभव आहे." (कामत, रा. कृ.; प्रस्ता., *गुरुचरित्र*; पृ. ७०७). *गुरुचरित्रा*च्या प्रथमाध्यायात (ओ. ४०–४७) ही चरित्रविषयक माहिती व परंपरा दिलेली आहे.

*गुरुचरित्र* ग्रंथात दत्तावतार नृसिंहसरस्वतींचे चरित्र विस्ताराने व त्यांचे पूर्वावतार श्रीपादश्रीवल्लभ ह्यांचे चरित्र संक्षेपाने वर्णिले आहे. श्रीगुरूंच्या आज्ञेवरूनच चरित्र रचण्याचे काम हाती घेतले व गुरुकृपेने ते तडीस गेले अशी चरित्रकाराची भावना व श्रद्धा आहे (अ. १, ओ. ५६). *गुरुचरित्रा*त वर्णन केलेले चमत्कार हे गाणगापूरच्या परिसरातच घडलेले आहेत. मृतास संजीवन, निपुत्रिका वृद्धेस पुत्रप्राप्ती, दारिद्र्यापहरण, व्याधिनाश, वांझ महिषीस दूध सुटणे, अशा कितीतरी कथा चरित्रनायकाचे विभूतिमत्त्व ठसविण्यासाठी चरित्रकार रंगवून सांगतो.

नृसिंहसरस्वतींचा समाधिकाल सांप्रदायिक रीत्या श. १३८०, माघ कृष्ण १ असा मानला जातो. ह्यानंतर सुमारे ६० ते ९० वर्षांच्या दरम्यान *गुरुचरित्रा*चे लेखन झाले असावे. म्हणजेच हा काळ श. १४४० ते १४७० (इ. स. १५१८ ते १५४८) च्या सुमारास येतो. 'अप्रबुद्ध' (*गुरुचरित्रा*चे एक साक्षेपी अभ्यासक) ह्यांना हा काळ मान्य नाही. त्यांच्या मते नृसिंहसरस्वतींनी श. १४४० (इ. स. १५१८) त अवतारसमाप्ती केली. म्हणून *गुरुचरित्रा*ची रचना श. १५०० (इ. स. १५७८) च्या सुमाराची असावी. कोलगाव सावंतवाडी येथे सापडलेल्या *गुरुचरित्रा*च्या सर्वांत जुन्या प्रतीवर श. १५०४ असा काळ नमूद केल्याचेही ते सांगतात.

*गुरुचरित्रा*चे अध्याय नक्की किती हा एक वादाचा मुद्दा आहे. कारण ४९, ५०, ५१, ५२, ५३ अशी वेगवेगळी अध्यायसंख्या असणाऱ्या पोथ्या उपलब्ध आहेत. रा. कृ. कामत ह्यांनी चोवीस जुनी हस्तलिखिते व दहा मुद्रित प्रती अभ्यासून तयार केलेल्या पाठशुद्ध प्रतीत ५२ अध्याय दिलेले आहेत. त्यांपैकी शेवटचा ५२ वा अध्याय अवतरणिकेचा आहे. हा अध्याय सरस्वती-गंगाधरांचा नसून मागाहून कोणीतरी तो रचला असावा, असे मत व्यक्त केले जाते. त्यामध्ये प्रत्येक अध्यायातील सारांश थोडक्यात सांगून *गुरुचरित्रा*चे सप्ताहपद्धतीने पठण कसे करावे हेही सांगितले आहे. ग्रंथाचे प्रथम मुद्रण रत्नागिरीस श. १७८३ (इ. स. १८६१) त झाले (दाते सू., पृ. ४९१).

महाराष्ट्रातील विविध धार्मिक संप्रदायांच्या इतिहासांत नृसिंहसरस्वती ह्या महापुरुषाचे स्थान विशेष आहे. [पहा : **परिशिष्ट–१**]. त्यामुळे परमार्थपर साहित्यात ह्या ग्रंथाला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले आहे. वारकरी संप्रदायाची जशी *ज्ञानेश्वरी*, रामदासी पंथाचा जसा *दासबोध*, तसा दत्तसंप्रदायाचा *गुरुचरित्र* हा पूज्य व प्रमाण ग्रंथ असून तो महाराष्ट्रीय जनतेच्या नित्यपठणातील एक ग्रंथ आहे. लोकशिक्षणाचा विशिष्ट हेतू नजरेसमोर ठेवून ह्या ग्रंथाचे लेखन झाले आहे. विशेषतः, यावनी सत्तेमुळे वैदिक धर्माचा ऱ्हास झाल्याने अधःपतित झालेल्या ब्राह्मण वर्गात चेतना-जागृती करून ब्राह्मण्यरक्षण, पर्यायाने चातुर्वर्ण्याधिष्ठित वैदिक सनातन धर्माचे रक्षण, करण्याच्या कामी त्यांना जोमाने लावण्याचे कार्य नृसिंहसरस्वतींनी केले होते. त्यांचे चरित्र लिहून चतुर्वर्णीयांना आचारसंपन्न बनविण्याचे धोरण *गुरुचरित्रा*ने अवलंबिले.

ज्ञानेश्वरांपासून चालत आलेल्या निवृत्तिपर पारमार्थिक वाङ्मयाची परंपरा *गुरुचरित्राने* मोडली आहे. "या संसारी जन्मोनिया। संतुष्टवावे सकळ इंद्रिया। मग पावे धर्मकाया। तरीच तरे भवार्णव॥" अशी सर्वसामान्य माणसास *गुरुचरित्राची* प्रवृत्तिपर शिकवण आहे. ग्रंथाचे विधिपुरःसर वाचन केल्यास भूतपिशाचबाधा, पाठकाची दुष्टग्रहबाधा, व्याधीची पीडा नाहीशी होते असा भक्तकामकल्पतरुत्वाचा वर श्रीगुरुदेवांनी ह्या ग्रंथास देऊन ठेवला आहे. "भुक्ति मुक्ति परमार्थ। जें जें वांछी मनीं आर्त। त्वरित होय साध्यन्त। गुरुचरित्र ऐकतां॥९॥" असे तिसऱ्या अध्यायात *गुरुचरित्राचे* महिमान सिद्धाने सांगितले आहे. *गुरुचरित्र*कारांनी नृसिंहसरस्वतींना दत्तगुरूंचे अवतार समजून त्यांची उपासना तीच दत्तोपासना असा उपदेश केला. नृसिंहसरस्वतींच्या अवतारकार्यातून जन्मलेल्या दत्तोपासनेला संप्रदायाचे स्वरूप व प्रतिष्ठा ह्याच ग्रंथाने प्राप्त करून दिली. [दत्तसंप्रदाय : ➪ ४.] ह्या संप्रदायाच्या महाराष्ट्रात फार मोठ्या प्रमाणात झालेल्या प्रसाराला हाच ग्रंथ प्रामुख्याने कारण झाला आहे.

*गुरुचरित्र* ग्रंथ ओवीबद्ध आहे. अद्भुतरम्यतेबरोबरच नावीन्य आणि रसाविष्कार ह्या साहित्यगुणांचाही त्यात आढळ होतो. ह्या आविष्कारात एकप्रकारची स्वाभाविकता आहे. फलश्रुती सांगणाऱ्या ह्या पारमार्थिक ग्रंथास काव्यग्रंथ म्हणून तितकेसे महत्त्व दिले जात नाही. तरीही ह्याच ग्रंथाने कवी म्हणून सरस्वती-गंगाधरांना प्रसिद्धी मिळवून दिली आहे. भाविक आणि सश्रद्ध जनतेच्या मनात अढळ स्थान प्राप्त करून घेतलेल्या ह्या ग्रंथाचे एक साहित्यकृती म्हणूनही काही मूल्य निश्चित आहे. [➪ ३.]

सरस्वती-गंगाधरांची गुरुपर दोन पदे, *गुरुचरित्राची आरती* व *नृसिंहसरस्वतींची आरती*, *गुरुचरित्राच्या* रा. कृ. कामत प्रतीत छापलेली आहेत. ह्या कवीची *शिवरात्रीमाहात्म्य* ही दुसरी एक रचना अनिलकुमार बडवे ह्यांना उपलब्ध झाली आहे. पोथीवर लेखकाचे नाव नाही किंवा लेखनकालाचाही उल्लेख नाही. परंतु शेवटच्या २५० व्या ओवीत "सरस्वतीगंगाधर। श्रोत्याते करी नमस्कार। जे मती दिली गुरुवर। तेणेपरी कथियले॥" असे म्हटले आहे. तसेच *गुरुचरित्र* व हा ग्रंथ ह्यांतील ओव्यांच्या रचनासाम्यावरून हे *शिवरात्रीमाहात्म्य* सरस्वती-गंगाधरांचेच असावे असे मत बडवे व्यक्त करतात (अनिलकुमार बडवे : 'सरस्वतीगंगाधरांचे शिवरात्री माहात्म्य'; इंद्रायणी, ऑग. १९६३; पृ. ४८). कवीची आणखी काही रचना असल्यास सध्या तरी ती ज्ञात नाही.

**रचना :** **मु.** – गुरुचरित्र; अ. ५२, ओ. सं. ७४९१; संपा. कामत, रा. कृ.; मुंबई, १९६८ (६ वी आवृत्ती); पुरस्कार : अप्रबुद्ध ऊर्फ पाळेकर, वि. के.; प्रस्ता. कामत, रा. कृ. (चंदगडकर); पृ. ६८१–७४८. **अमु.** – शिवरात्रीमाहात्म्य; ओ. सं. २५२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अप्रबुद्ध : श्रीगुरुचरित्राविषयीं कांही विचार; विसंमंवा., १९५८; पृ. १२६–१३७. २. आजगांवकर, ज. र. : सरस्वती-गंगाधर; प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. २७७–२७९. ३. करंदीकर, ज. स. : श्रीगुरुचरित्रांतील ऐतिहासिक माहिती; भाइसंमत्रै., व. ९, अं. २, आषाढ-भाद्र., श. १८५०; पृ. ६-१६.

**सराफ बायास्वामिणी** [का. अनु.] कवयित्री.

**रचना :** **अमु.** – पदे व रेणुकापर श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० सर्वज्ञ** – पहा चक्रधर.

**सवाई फंदी** / ० श्रीपति–३ [इ. स. चे १९ वे शतक] कवी. अनंतफंदींचा पुत्र. हे स्वतःस 'सवाई फंदी' म्हणवीत. माता म्हाळसाबाई. आपल्या वडिलांप्रमाणेच हेही कवने रचीत व कीर्तने करीत. 'फंदीमूल' असा शेवट असलेल्या लावण्या ह्यांच्याच आहेत. ह्यांनी रचलेला *मुंबईचा पोवाडा*, *ऐतिहासिक पोवाडे*, *खंड तीन* मध्ये संग्रहित (पृ. २६५).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न.; अनंतफंदी; तंतकवि तथा शाहीर; पुणे, १९५२; पृ. ६१–६२.

**सवाई माधवराव** [अंदाजे इ. स. च्या १९ व्या शतकाचा प्रथम पाद] शाहीर. प्रसिद्ध शाहीर हैबती पुसेसावळीकर ह्यांच्या परंपरेतील. हे कलगी पक्षाची कवने करीत असत. पेशवाईत गवळणींना उत्तान शृंगारामुळे जे बीभत्स रूप आले होते, त्याचा प्रतिकार करण्यासाठी ह्यांनी काही गवळणी रचल्या. एका गवळणीत ह्यांनी देह हे गोकुळ व श्रीकृष्ण हा आत्मा कल्पून रूपक रचले आहे. त्यातील काही ओळी अशा : "भावज्ञान-वैराग्य जमवुनी गोपाळ श्रीहरी। प्रेम पेंद्यास घेउनी चोऱ्या करी गौळ्याच्या घरी॥ इच्छा-वासनेची चेष्टा करी, कल्पनेची कुचे धरी। भ्रांतिकुबुद्धीचे पदर धरतो भररस्त्यावरी॥"

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, वि. कृ., परचुरे, द. दि.; शाहीर हैबती; संपा. थिटे, राजाभाऊ; पुणे, १९५६; पृ. ३२–३३.

**सवाई ब्राह्मण** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अमु.** – द्रौपदीवस्त्रहरण; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ११४.

**सहजचैतन्य** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **मु.** – रामपर पद; पदगुच्छ, तंजावर, १९६९; पृ. ५१. **अमु.** – रामपर व भक्तिपर तदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० सहजदास** – पहा सज्जदास.

**सहजनाथ** [का. अनु.] पदकार.

**रचना :** **अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**सहजबोध** [अंदाजे श. १५०० / इ. स. १५७८ – श. १५५० / इ. स. १६२८] कवी. मुडलगीच्या स्वामी-परंपरेतील रंगबोधांचे गुरू. मुडलगी परंपरेशी निगडित असणाऱ्या ह्या सहजबोधस्वामींचे चरित्र मुडलगीच्या स्वामींची चरित्रे लिहिणाऱ्या गुरुनाथाच्या *देशिक चरित्रात* नाही. 'वर्ते साचार ब्रह्ममूर्ति' असे त्यांचे वर्णन *देशिक चरित्रात* आढळते. सहजबोधांचा मठ टाकळी येथे होता. टाकळी हे गाव आंबेजोगाईच्या (मराठवाडा) जवळ आहे. सहजबोध हे जिंतूरजवळच्या भोगावच्या कुळकर्णी घराण्यातले. आईवडील : विठ्ठलपंत, रुखमाई. गोत्र : शांडिल्य. सहजबोधांच्या पत्नीचे मुडलगी परंपरेत येणारे नाव सजणाबाई. रंगबोध हे सहजबोधगुरूंच्या आदेशाप्रमाणे मठस्थापना करण्यास मुडलगीला आले ते टाकळी गावातूनच.

*देशिक चरित्रात* मुडलगीच्या स्वामींची जी परंपरा दिलेली आहे तिच्याप्रमाणे ही मुकुंदराजांची परंपरा ठरते. त्यापैकी काही ओव्या अशा : "मग शंकराचार्य जगद्गुरु। अनुक्रमें हरिनाथ थोरु। रामचंद्र गुरुवरु। मग मुकुंदमुनेश्वर विवेकसिंधुकर्ते॥ तयाचे जाण जगन्नाथ। द्राविडदेशिचे विरक्त। मग सहजबोध यथार्थ। वास टाकळींत गोदातीर॥" ह्यावरून सहजबोधांचे गुरू जगन्नाथ हे स्पष्ट होते. हे दक्षिणेतील असावेत असे 'द्राविडदेशिचे विरक्त' ह्या वर केलेल्या उल्लेखावरून वाटते. सहजबोधांची समाधी कुंभकर्ण टाकळी (जि. परभणी) येथे एका शेतात दाखवतात. कार्तिक पौर्णिमा ही त्यांची निर्याणतिथी मानली जाते.

मुडलगी मठाची स्थापना ज्यांच्या प्रेरणेने झाली त्या सहजबोधांचे, काही पदे सोडल्यास, अन्य वाङ्मय आज उपलब्ध नाही. त्यांच्या पदांपैकी एक पद डॉ. आवळीकर ह्यांनी छापले आहे ते असे : 'भुललासि तुं काय रे वाया॥ धृ.॥ गुणत्रये द्योतक साक्षि निरामये। तो तुं येयीं रे ठाया॥ १॥ अवस्था तीन्ही जाणुनि वाया। तो तुं असा येयीं रे ठाया॥ २॥ सहजबोध म्हणे रंगराया। सहजस्वरूपि सांडी माया॥ ३॥' परंपरेच्या तत्त्वज्ञानाचा अर्कच सहज-

बोधांच्या ह्या पदात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : सहजबोध; मुडलगीचे स्वामी; पुणे, १९७१; प्रस्ता., पृ. ३–४, १० व ५४.

**सहजबोधसिंह** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**सहजबोधी चांगा** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – रामकृष्णपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सहजानंद-१** [अंदाजे इ. स. च्या १६ व्या शतकाचा उत्तरार्ध] आनंद-संप्रदायी कवी. रामदासपंचायतनातील रंगनाथस्वामी निगडीकर ह्यांचे सहजानंद हे परात्पर गुरू. ह्या कवीची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : विष्णू > विधी > अत्री > दत्त > सदानंद > रामानंद > अमलानंद > गंभीरानंद > ब्रह्मानंद > सहजानंद. सहजानंदांचे शिष्य पूर्णानंद आणि ह्या पूर्णानंदांचे दत्तानंद; म्हणजेच रंगनाथस्वामींचा पिता निजानंद ऊर्फ बोपाजी; ह्या निजानंदांचे चिदानंद व सदानंद ऊर्फ शिवरामस्वामी (कल्याणीचे) असा शिष्यपरिवार आढळतो.

ह्यांनी लिहिलेल्या *योगवासिष्ठ*टीकेत अद्वैत तत्त्वज्ञानाचे निरूपण आहे. ह्या टीकेची रचना ओवीबद्ध असून ह्या ओव्या साडेतीन-चरणी आहेत. *सहजानंदी* ही ज्ञानदेवांच्या *अमृतानुभवा*वरील संस्कृत टीका होय. *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी उल्लेखिलेला *ज्ञानदीपिका* ग्रंथ ह्याच सहजानंदाचा की दुसऱ्या कोणाचा, हा वादविषय आहे. तो जयदेवशिष्य सहजानंदांच्या नावावर दिलेला आढळतो (मसा., पृ. ३३९–४० व ८०७).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : विसंमंवा., १९७१; पृ. १४६–१४७.

**सहजानंद-२** [इ. स. १७८८–१८३८] कवी. हे विदर्भातील पुसद गावचे राहणारे. ह्यांचे गुरू जयदेव. ह्यांचा *ज्ञानदीपिका* हा अध्यात्मपर ओवीबद्ध त्रुटित ग्रंथ उपलब्ध आहे. ह्या ग्रंथाचा रचनाकाल श. १७३० (इ. स. १८०८). त्यातील विषय योग व वेदान्त हे आहेत. ग्रंथात संस्कृत श्लोक देऊन त्यांवर मराठी टीका दिली आहे. ग्रंथकाराने आत्मचरित्रविषयक काही माहिती ग्रंथात दिली आहे. त्यात गुरूचा उल्लेख ह्याप्रमाणे केला आहे : " श्रीगुरु पूर्णानंद । जयदेव प्रसिद्ध ।। त्याने सहजानंद । नाम ठेउनि पूर्ण केले ।। १०८ ।। " किंवा " मुख्य सहजानंदासी कारण । श्री गणपति जाला प्रसन्न । जयदेवे कृपे करुन । नानदीपिक ग्रंथ जाला ।। ११० ।। " ह्या ग्रंथाची प्रकरणे नऊ आहेत. त्यात *कपिलगीते*चे संदर्भ वारंवार आढळतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : काही मराठी सारस्वत उपासक; विसंमंवा., १९७१, पृ. १४६–१४७.

**सहजानंद कोनेरी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २

**सहजानंददास** [अंदाजे श. १५३२ / इ. स. १६१०] कवी.

**रचना :** अमु. – अवधूतगीता (स्वात्मसंवित्त्युपदेश) ; र. का. : श. १५३२, साधारण, माघ शु. ५, सोम.; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १७.

**सहदेव** [का. अनु.] ज्योतिष-ग्रंथकार.

**रचना :** अमु. – मेघमाला – २ प्रती; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २२५.

**सहदेव भाडळी** [का. अनु.] ज्योतिष-ग्रंथकार. जातीने शूद्र. ह्यांची वचने मराठी व हिंदी ह्या भाषांत आहेत आणि ती अत्यंत लोकप्रिय आहेत (मचको., पृ. ७९९).

**रचना :** अमु. – १. ज्योतिषप्रकाश (सहदेव-भाडळी-मत) ; मुंबई, १८९४, १९१९. २. ज्योतिषरत्न (ले. नारो आप्पाजी गोडबोले) ; पुणे, १८९८. ३. ज्योतिषसंग्रह; मुंबई, १९३१. **अमु.** – जातकसार; नक्कल : अप्पा जोशी; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १०१.

**सांत आन (पाद्री)** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक] फ्रान्सिस्कन मिशनरी ग्रंथकार. इ. स. १३२० च्या सुमारास हिंदुस्थानात काही फ्रान्सिस्की-पंथीय पाद्री आले. पुढील काळात ज्या पंथीयांपैकी काही-जणांनी देशी भाषेचा अभ्यास करून मराठीत किंवा गोमंतकीय भाषेत ग्रंथरचना केली त्यांपैकीच सांत आन हा एक ग्रंथकार आहे.

ह्याने *Flos Sanctorum* नावाचा एक ग्रंथ भाषान्तरित केला. हा अनुवाद स्थानिक बोलीतच असावा अशी माहिती टिपून ठेवलेली आढळते. पाद्री माथियशने सांत आन ह्याचे साहाय्य घेऊन ख्रिस्ताच्या जीवनावर व तत्त्वप्रणालीवर दोन काव्ये रचली. ह्यांपैकी *ख्रिस्ती धर्मांचें प्रतीक* हे काव्य कार्दिनाल बालार्मीनच्या *Symbolo da Fè* ह्या मूळ काव्याचे भाषान्तर असून सहज गाता येण्याजोगी अशी ही रचना आहे, असा बिब्लियाँतेक लुझितानचा अभिप्राय आहे. काव्याची ओ. सं. सुमारे दोन हजार भरेल. *ख्रिस्तांचें जीवन* किंवा *दौत्रीन क्रिस्तां* हे त्याचे काव्य ब्राह्मणांच्या भाषेत लिहिलेले होते. त्याला 'पुराण' म्हणत असत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** प्रभुदेसाई, वि. बा.; परिशिष्ट २ – सशगोबो., मुंबई, १९६३, पृ. ३१०–३१२.

**साताप्पा** [अंदाजे इ. स. १७२०–१७६०] शाहीर, लावणीकार. जातीने नंदगवळी. मूळचे सासवडचे राहणारे असे सांगितले जाते. उपनाव शेलारखाने. साताप्पा गवळी हे खुद्द श्रीमंत पेशवे सरकारांच्या खाजगीतले एक चाकर किंवा आश्रित होते. ह्यांचा बाप बाळा गवळी असावा. त्याला बाळाजी विश्वनाथ पेशव्यांनी काही वतन इनाम करून दिले होते. बाळा गवळी गुरुभक्तिपरायण होते. त्यांचे पुत्र साताप्पा हे शिवाचे निस्सीम उपासक होते. पुढे वरदी सत्पुरुष म्हणून तमासगिरांत हे विख्यात झाले. साताप्पांचे तीन मुलगे. वडील बाळा, मधला कुशाबा व धाकटा सयाजी. ह्यांच्यापैकी बाळा हा बाळा बहिरू ह्या नावाने कवने रचून ती म्हणत असे. त्याचा तमाशाचा फड होता. सयाजीचा मुलगा होनाजी हाही लावणीकार म्हणून प्रसिद्धीस आला. अशा रीतीने ह्यांच्या घराण्याकडे कवित्वाचा पिढीजाद वारसाच होता असे दिसून येते. साताप्पांची समाधी पुणे येथे संगमाजवळ घाटावर आहे. समाधीवर पिंडी आहे. त्यास शांतलिंग म्हणतात. तेथे श्रावण महिन्यात सोमवारी पुष्कळ सांप्रदायिक गवळी हजेरी देत असतात.

साताप्पा भेदिक कवने करीत असत. ह्यांच्या लावण्याही अगणित होत्या. पण आज मात्र त्या उपलब्ध नाहीत. होनाजीच्या लावण्यांत साताप्पांच्या दोन-चार लावण्या प्रसिद्ध झाल्या आहेत. फडकऱ्यांतील साताप्पांची ख्याती ही त्यांच्या कवित्वगुणांनी वाढली. साताप्पा गवळ्याच्या नावावर 'राम राम घ्यावा' अशी एकच लावणी *अंधारातील लावण्या* ह्या संग्रहात (पृ. १६८–६९) मुद्रित झाली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : प्रस्ता., होनाजी बाळाकृत लावण्या (आ. ४ थी) ; पुणे, १९६३; पृ. १–१४.

**साधु** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. सू., क्र. ३.

**सांब** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – रुद्राक्षमहिमा काव्य; सवामं. हस्त. सू., खं. २.

**(पंत) साबाजी** [अंदाजे इ. स. १६६५] जैन कवी. लातूर भट्टारक पीठावरील *रुक्मिणीव्रतकथा* लिहिणारे विशालकीर्ती हे साबाजीचे गुरू होत. *सुगंधदशमी व्रतकथा* असा २६१ ओव्यांचा काव्यग्रंथ ह्या कवीने रचला आहे. ग्रंथाच्या प्रशस्तीत कवीने ग्रंथाच्या मूलाधाराचा, गुरूचा व स्वतःचा उल्लेख करून ग्रंथ श. १५८७ (इ. स. १६६५) त पूर्ण झाला, असे म्हटले आहे. ब्रह्मजिनदासांच्या गुजराती रासग्रंथावरून, अनेक जन्म अपार दुःख भोगणाऱ्या सीमंतीनी राणीने 'सुगंधदशमी व्रताची' सुदर्शन मुनींकडून दीक्षा घेऊन भाद्रपद दशमीस

ते व्रत करून स्वर्गप्राप्ती कशी करून घेतली, ती कथा ह्या काव्यात सांगितली आहे. काव्याचे हस्तलिखित जिंतूर येथील जैन ग्रंथसंग्रहात सापडते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अक्कोळे, सुभाषचंद्र : पंत साबाजी; ग्रामजैसा.; नागपूर–पुणे, १९६८; पृ. ६३–६४; २. जोहरापूरकर, वि. पां. : दामाजी व साबाजी; प्रतिष्ठान, मे १९६०; पृ. ३१–३५.

**० साबाजी** – पहा **चतुर साबाजी.**

**० साबाजी अनंत** – पहा **अनंतपंडितसुत साबाजी.**

**सामराज–१ / ० श्याम गुसाई / ० शामभट आर्वीकर / ० सामराज–३** [अंदाजे श. १५३५ / इ. स. १६१३ – श. १६२२ / इ. स. १७००] आख्यान-कवी. ह्यांचे घराणे ऋग्वेदी आश्वलायनसूत्री असून गोत्र शाकल्य होते. तुळजापूरची भवानी, जेजुरीचा मल्लारि व आर्वीचा मुद्गलेश्वर ही ह्यांच्या घराण्याची कुलदैवते. ह्या घराण्याचे मूळ पुरुष जे मुद्गलाचार्य गोसावी ते भोसले ह्यांचे घराणे उदेपुरास असता त्यांचे पुरोहित होते असे म्हणतात. गो रा. राजोपाध्ये ह्यांनी सामराज कवींच्या *मुद्गलाख्याना*च्या उपोद्घातात त्यांची वंशावळ दिलेली आहे. (ही माहिती कोल्हापूरचे शामभटांचे वंशज आप्पासाहेब राजोपाध्ये ह्यांच्याकडून त्यांनी मिळविली.) सामराजांचे थोरले बंधू मल्हारभट हे शिवाजीराजांचे न्यायशास्त्री पंडितराव होते. *भारतवर्ष* मासिकात प्रसिद्ध झालेल्या ह्यांच्या बखरीत (संपा. : रा. ब. पारसनीस) शामभट आर्वीकरांची माहिती सापडते. ह्यांतील शामभटांची वंशावळ व कोल्हापूरच्या राजोपाध्यांकडून उपलब्ध झालेली वंशावळ ह्या दोन्ही बरोबर जमतात. श्री मुद्गलाचार्य गोसावींपासून ह्या वंशपरंपरेतील १३ वे पुरुष लक्ष्मण. ह्यांचे दोन पुत्र. वडील स्त्रीचा मल्हारभट व धाकटीचा शामभट. ज्येष्ठ मल्हारभटापासून साताराची पंडितराव शाखा सुरू होते. कनिष्ठ शामभट हा कोल्हापूरच्या राजोपाध्ये घराण्याचा मूळ पुरुष असून तोच सामराज कवी होय. *मुद्गलाख्यान*कर्त्या सामराजाने काव्यात दिलेली आपल्यासंबंधीची माहिती ही शामभट आर्वीकरांस पूर्णतया लागू पडते.

जयराम पिंड्येकृत *राधामाधवविलासचंपूत* (श. १५७५ ते १५८०) श्याम गुसाई म्हणून ज्या एका प्राकृतभाषाकवीचा उल्लेख येतो तो हाच शामभट आर्वीकर असे मतही राजोपाध्ये ह्यांनी मांडले आहे (*मुमुक्षु*, जून १९२८). श्याम गुसाई हा *मुद्गलाख्यान*कर्ता शामभट आर्वीकर किंवा सामराज असे म्हणण्यास कोणताच पुरावा उपलब्ध नाही, असे प्र. धों. कानिटकर ह्यांनी राजोपाध्यांच्या मताचे खंडन केले आहे. एवढेच नव्हे तर *मुद्गलाख्यान*कर्ता सामराज व *रुक्मिणीहरण* काव्य करणारा सामराज ह्या दोन भिन्न व्यक्ती आहेत असे मत ह्या दोन काव्यांतील भिन्न भाषापद्धतीवरून प्र. धों. कानिटकर ह्यांनी व्यक्त केले आहे ('श्याम गुसाई, श्यामभट आर्वीकर व सामराज कवि'; *मुमुक्षु*, ऑग. १९२८, व. २१, अं. ८, पृ. १९).

शिवाजीराजांचे पणजे बाबाजी भोसले हे आर्वी, देऊळगाव, हिंगणी, वडगाव, पेडगाव इ. गावांचे मोकाशी व वतनदार पाटील होते. त्याच वेळी सामराजांचे आजे मल्हारभट व त्यांचे बंधू रामेश्वरभट हे वरील आर्वी गावाचे वतनदार जोशी, कुळकर्णी, मुद्गलेश्वर संस्थानचे वहिवाटदार व भोसले ह्यांचे उपाध्ये होते. पुढे रामेश्वरभट व त्यांचे पुत्र प्रभाकरभट हे बंगळुरास शहाजीराजांकडे पुरोहित म्हणून राहिले. सामराजांचे वडील लक्ष्मणभट हे मालोजी भोसल्यांच्या पदरी होते. हे मालोजींबरोबर कामाच्या निमित्ताने सातारा, खानदेश, नगर इकडे फिरत असता शामभट त्यांच्याबरोबर असत. सामराजांचे ज्येष्ठ बंधू-मल्हारभट हे शहाजींबरोबर कर्नाटकात गेले होते. पुढे शिवाजीराजांबरोबर दिल्लीआग्र्याकडेही गेले होते. राजांनी त्यांना 'पंडितराव' अशी पदवी दिली. मल्हारभट हे शेवटी आर्वीस राहात. कारण त्यांचे वंशज येथील पूर्वापार वतनदार होते. तेथेच श. १६०९–१० (इ. स. १६८७–८८) च्या सुमारास त्यांचा अंत झाला.

भोसले वंशातील बाबाजी, मालोजी, शहाजी ह्यांचे समकालीन व साधारणतः समवयस्क, त्यांच्या उपाध्यांच्या वंशातील मल्हारभट, लक्ष्मणभट व मल्हारभट हे अनुक्रमे होते, असे मानण्यास हरकत नाही, असे राजोपाध्ये म्हणतात. ह्यांचे भोसल्यांशी असलेले संबंध लक्षात घेऊन सामराजांचा काळ अंदाजे 'श. १५३५ / इ. स. १६१३ – श. १६२२ / इ. स. १७००' असा राजोपाध्ये ह्यांनी ठरविला आहे (*मुद्गलाख्यान* : उपोद्घात, पृ. ४).

*महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे सामराजांना शाहूकालीन मानतात, तर प्रा. द. सी. पंगु ह्यांनी सामराजांना शिवकालीन ठरविले आहे. सामराजांचा काळ ठरविताना प्र. धों कानिटकर व गो. रा. राजोपाध्ये ह्या पूर्वाभ्यासकांचा मागोवा द. सी. पंगु ह्यांनी घेतला आहे. प्रा. पंगु ह्यांच्या मते काव्यांतर्गत म्हणजे (भाषेच्या) पुराव्यावरून सामराज हे वामनपंडितांपेक्षा ज्येष्ठ अतएव थोडे पूर्वकालीन ठरतात (वामनांचा काळ : श. १५५० / इ. स. १६१६). सामराजांनी मुक्तेश्वर, लोलिंबराज, देवदास ह्यांची काव्ये पाहिली असली पाहिजेत कारण ह्या कवींचे ऋण काही प्रमाणात त्यांनी स्वीकारलेले दिसते. एकनाथांच्या वाङ्मयाची ज्यांच्या काव्यावर छाप पडली आहे त्या रामदास, तुकाराम, नागेश ह्यांचे ते समवयस्क असावेत. ह्यावरून ह्यांचा जन्म श. १५३० (इ. स. १६०८) च्या सुमाराचा असावा व राजोपाध्ये म्हणतात त्याप्रमाणे ह्यांना दीर्घायुषी समजल्यास ते श. १६१० (इ. स. १६८८) पर्यंत हयात होते असे म्हणता येते ('शिवकालीन महाकवि सामराज', कोल्हापूर, १९४१, पृ. १०८–१०९).

सामराजांनी *मुद्गलाख्यान* व *रुक्मिणीहरण* असे दोन काव्यग्रंथ रचले आहेत. *मुद्गलाख्यान* व *रुक्मिणीहरण* ह्या दोन काव्यांच्या एककर्तृत्वासंबंधी प्र. धों. कानिटकर ह्यांनी त्यांच्या स्वरूपभेदावरून शंका घेतली. गो. रा. राजोपाध्ये ह्यांनी त्यांच्या ह्या आक्षेपाचे खंडन करून ह्या दोन्ही काव्यांतील भाषापद्धतीच्या साम्यावरून ही काव्ये एकाच कवीची आहेत असा अस्तिपक्षी निर्णय घेतला व तो आता सर्वमान्य झाला आहे. *मुद्गलाख्याना*च्या शेवटच्या श्लोकात 'केली मुद्गलदैवतस्तुति पहा त्या सामराजे बरी' असा कर्त्याचा स्पष्ट उल्लेख येतो. *रुक्मिणीहरणा*च्या प्रत्येक सर्गाच्या शेवटी 'कविसामराजविरचिते' असा संस्कृतसमासयुक्त कविनामनिर्देश येतो.

*मुद्गलाख्याना*ची हस्तलिखित पोथी कोल्हापूरच्या राजोपाध्यांकडे सापडली. तीवरूनच साताराच्या गो. रा. राजोपाध्ये ह्यांनी इ. स. १९३० साली ह्या काव्याची सटीप आवृत्ती छापून प्रसिद्ध केली. *मुद्गलाख्याना*च्या २६१ श्लोकांपैकी शेवटचा श्लोक हा नक्कलकाराचा आहे. हे आख्यान कवीने (१) *जैमिनी अश्वमेधा*तील शेवटच्या प्रकरणातील *नकुलाख्यान*, (२) *महाभारत : वनपर्व*, अ. २६०–२६१ ह्यांतील *मुद्गलोपाख्यान* व (३) *पद्मपुराणांतर्गत भीमामाहात्म्या*तील *मौद्गलतीर्थवर्णन*, ह्यांमध्ये येणाऱ्या कथाभागांचा आधार घेऊन रचले आहे.

मुद्गलमुनी हा आंगिरस गोत्रातील वेदपारंगत विख्यात मुनी होऊन गेला. त्याची पत्नी जाबालिका ही महापतिव्रता होती. सोमयज्ञ केल्याने त्यास पुत्रप्राप्ती झाली. त्याचे नाव मौद्गल व पत्नी भागीरथी. मुद्गलमुनींनी अनक शिष्यांना विद्यादान केले, पुष्कळ अन्नदान केले व षट्कर्मे करीत आपले जीवन सार्थकी लावले. पुढे सहकुटुंब तीर्थयात्रा करून आल्यावर नारदाच्या सांगण्यावरून आर्वीस जाऊन त्यांनी तप करण्यास सुरुवात केली. त्यांच्या दानशीलतेमुळे व कडक तपामुळे इंद्रादी देवांना भीती उत्पन्न होऊन त्यांनी मुद्गलांची सत्त्वपरीक्षा

घेण्यास यमराजास पाठविले. ह्या कसोटीला त्यांचे सारेच कुटुंब उतरले. त्यामुळे यमधर्म संतुष्ट झाला. अशी ही कथा आहे.

काव्य आधारित असले तरी त्यात प्रथमतः येणारी देवांची प्रार्थना, तसेच मुद्गलांची दिनचर्या, तीर्थयात्रा, ईश्वराचा अवतार व सूत्रचालकत्व, आर्वीक्षेत्र व तपोवन ह्यांची वर्णने, अश्वत्थाच्या ठिकाणी सर्व देवतांचे अंशरूपाने राहणे इत्यादी प्रकरणे ही सामराजांनी स्वतंत्रपणे रचलेली आहेत. विशेष असा की हे भाग आख्यानात सहजतया समाविष्ट केलेले दिसतात. *मुद्गलाख्यान* ही कवीची प्रथम कृती असून त्यात कवीने आपल्या कुलस्वामीचे आख्यान गायिले आहे. भाषासौष्ठव आणि कल्पनावैभव ह्या दृष्टीने विचार करता ह्या काव्यापेक्षा नंतरच्या *रुक्मिणीहरणात* सामराजांच्या परिणत प्रज्ञेचा चांगलाच आविष्कार झालेला दिसतो.

*मुद्गलाख्याना*चा विषय हा राज्यव्यवहारापासून अलिप्त असून 'सुविमळनयसारा' अशी ही मुद्गलकथा सांगण्याचा कवीचा हेतू गृहस्थाश्रमी लोकांना नीती शिकविण्याचा दिसतो. सर्वसामान्य जनांना धर्माचरणाकडे प्रवृत्त करण्यासाठी हे मुद्गल दैवताचे स्तुतिपर आख्यान कवीने आदराने व मोठ्या भक्तिपूर्ण अंतःकरणाने गायिले आहे. काव्य जसे बोधप्रद तसेच प्रासादिक आहे.

*रुक्मिणीहरण* हा ह्या कवीचा महत्त्वाचा काव्यग्रंथ. त्याचे कृष्णजन्म, रुक्मिणीजन्म, मदनावस्था, पत्रिकालेख, द्वारकादर्शन, कुंडिनागमन, रुक्मिणीविलाप, रुक्मिण्युपदेश व रुक्मिणीहरण असे अनुक्रमे आठ सर्ग असून श्लोकसंख्या ११४० आहे. 'जे बोलिली भागवतीं पुराणीं। विस्तारिली जी पुरुषीं पुराणीं।' अशी *भागवता*तली आणि पूर्वकवींनी विस्ताराने लिहिलेली कथाच मी रचतो असे पूर्वसूरींचे ऋण कवीने व्यक्त केले आहे (१.३१). मूळ रुक्मिणीहरण-कथेतील अवश्य तेवढाच कथाभाग कवीने घेतला आहे. रुक्मिणीची मदनावस्था, श्रीकृष्णाच्या दरबाराचे वर्णन, रुक्मिणीच्या दागिन्यांचे तसेच तिच्या लग्नाला आलेल्या विप्रांचे वर्णन, आईचा रुक्मिणीस उपदेश असे कितीतरी प्रसंग कवीच्या स्वतंत्र प्रतिभेचा आविष्कार ठरतील. ग्रंथरचना करताना नाथांचे *रुक्मिणीस्वयंवर* आणि संस्कृत पंचमहाकाव्यांची वर्णनाची धाटणी, सुभाषितग्रंथ, ह्यांचे फार मोठे ऋण सामराजांनी स्वीकारले आहे.

ह्या काव्यातील बराचसा भाग हा संस्कृत काव्यांच्या धर्तीवर रचलेला आहे. काव्याची ठेवण, सर्गांची नावे, त्यांची मांडणी, निरनिराळ्या प्रसंगांची संस्कृत काव्यांतील त्या त्या प्रसंगाशी जुळणारी वर्णने, तसेच काव्यातील पुष्कळसे संस्कृत शब्द, संस्कृतप्रचुर दीर्घ समास, कवीने योजिलेल्या उपमा-दृष्टान्तादिकांतील संस्कृत काव्यकल्पनांशी सदृश अशा कल्पना, ह्या गोष्टी पाहिल्यानंतर कवीचा संस्कृत काव्यग्रंथांशी असलेला दाट परिचय पूर्णतया लक्षात येतो. संस्कृत काव्याचा आदर्श समोर ठेवून मराठीत जे पंडिती परंपरेतील काव्य निर्माण झाले त्याची काही वैशिष्ट्ये सामराजांच्या ह्या काव्यात आढळतात. ह्यापूर्वीच्या कवितेतील पारमार्थिक प्रयोजनाची पकड ह्या काळातही संपूर्णतया सुटू शकली नाही. पण ह्या ईश्वरभक्तीबरोबरच जाणीवपूर्वक काही निर्माण व्हावे अशी कलाविषयक दृष्टी वाढीस लागलेली दिसते.

प्रसादपूर्ण रचना हा सामराजांच्या काव्याचा प्रमुख गुण आहे. स्थल, काल, प्रसंग इत्यादिकांचे समयोचित वर्णन करण्याची हातोटी कवीस चांगली साधते. स्वभावचित्रणही तो प्रसंगानुरूप कौशल्याने करतो. ह्या काव्यात भक्ती व शृंगार हे रस प्रमुख असून वीर, वात्सल्य व हास्य हे रसही प्रसंगानुरूप आविष्कृत झाले आहेत. संस्कृत कवींप्रमाणे काव्यालंकारांचा सोस कवीला दिसतो. उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, दृष्टान्त, व्यतिरेक, अपन्हुती इत्यादी अलंकारांना कवी प्राधान्य देतो. पण ह्या सर्वांपेक्षा सामराजांचा अधिक आवडीचा अलंकार म्हणजे स्वभावोक्ती होय. कवीमधील सूक्ष्म निरीक्षणशक्ती व सहृदयता ह्या गुणांमुळे ह्या काव्यातील स्वभावोक्तिपूर्ण वर्णने उठावदार झाली आहेत (उदा., काव्यातील स्त्रियांची वर्णने).

प्राचीन मराठी काव्यात सामान्यतः आढळणारे दोष सामराजांच्या काव्यातही आढळतात. पण रचनासौष्ठव, भाषाप्रभुत्व, कल्पनास्वातंत्र्य, पदलालित्य आणि कथानुषंगाने केलेला भावाविष्कार इत्यादी काव्यगुणांपुढे हे दोष अनुल्लेखनीय ठरतात. ह्याचा प्रत्यय *रुक्मिणीहरण* काव्यात येतो. [⇨ ३.]

सामराजांचे घराणे राजपुरोहिताचे होते. आपल्या व्यवसायाची त्यांना पूर्ण माहिती होती. वर्णाश्रमधर्माचे ते कट्टे पुरस्कर्ते असून आपली नयनीतीची (धर्माचरणाची) आवड त्यांनी काव्यातून ठिकठिकाणी व्यक्त केलेली दिसते. आपले पौरोहित्य सांभाळून राजांना सल्ला देण्याचे कामही ह्यांच्या कुटुंबातील मंडळी करीत होती, असे ऐतिहासिक उपलब्ध पुराव्यावरून कळते. कवीने बरेच देशाटन केल्याचा पुरावा काव्यांतून आढळतो. एकंदरीत काव्यग्रंथांतून प्रत्ययास येणारे सामराजांचे व्यक्तिमत्त्व हे विद्वत्ता, रसिकता, बहुश्रुतता, व्यवहारकौशल्य, राजनीतिविषयक ज्ञान, अशा अनेक गुणांनी मंडित झालेले दिसून येते.

सामराजांनी संस्कृत पंचमहाकाव्यांच्या धर्तीवर रचना करावयाची ह्या अभिनिवेशाने काव्य रचले असून महाकाव्यविषयक बंधने फार कसोशीने पाळली आहेत. सामराजांच्या काहीशा समकालीन असणाऱ्या विठ्ठल, नागेश, रघुनाथपंडित इत्यादी कवींनी त्यांच्याच धाटणीने रचना केली आहे. पण महाकाव्यलक्षणांचा विचार करता सामराजच 'मराठी वाङ्मयातील आद्य व एकमेव महाकवी' होत, असे प्रा. पंगु ह्यांचे मत आहे.

संस्कृत कवींच्या आदर्श काव्यांप्रमाणे ज्ञानेश्वर-एकनाथादिकांच्या काव्याचे दृढ संस्कार सामराजांवर झाले आहेत. पूर्वकवींचे काही ऋण जसे सामराजांनी नकळत स्वीकारले तद्वतच त्यांच्या काव्याचा परिणामही समकालीन पण त्यांच्यानंतर होऊन गेलेल्या कवींवर झाला आहे. सामराजांच्या समकालीनांपैकी नागेशकवीने *सीतास्वयंवर* रचताना सामराजांचे खूपच अनुकरण केलेले दिसते. ह्या दोनही काव्यांतील आश्चर्यकारक असे वर्णनसाम्य व भाषासाम्य पाहिल्यानंतर *रुक्मिणीहरणा*वरूनच नागेशांना *सीतास्वयंवर* रचण्याची स्फूर्ती झाली असावी ह्याविषयी शंका उरत नाही. सामराजांच्या काव्याची भाषा मराठी, संस्कृत, कानडी, अपभ्रंश आणि फारसी अशा पंचविध शब्दांनी युक्त आहे. त्यांतल्या त्यात फारसी शब्दांचा भरणा अधिक दिसतो. शिवकालीन मराठी भाषेची ती निदर्शक ठरते.

सामराजांपूर्वीच्या मुक्तेश्वर, विठ्ठल कळपूरकर, लोलिंबराज आदी आख्यान-कवींनी आध्यात्मिक काव्यवाङ्मयाचा ओघ सगुण, सालंकार, सरस आणि स्वतंत्र अशा आख्यानपर काव्यरचनेकडे वळविला. पुढे हीच परंपरा जतन करून ठेवणारे सामराज, वामन पंडित, नागेश, विठ्ठल, रघुनाथपंडित, आनंदतनय असे अनेक कलाकवी निर्माण झाले. ह्यांना परमेश्वराची उपासना प्रिय असली तरी कोणत्याही आध्यात्मिक संप्रदायाची बंधने त्यांच्यावर नव्हती. संस्कृत साहित्यशास्त्र आणि काव्य ह्यांचा अभ्यास करून जाणीवपूर्वक ह्या परंपरेतील काव्य निर्माण झालेले आहे.

'ओजः प्रसाद मधुरादिक संपदांची। शोभा धरून विलसे रचना पदांची' ही सामराजांची उक्तीच त्यांच्या कवितेच्या वर्णनाला बरोबर लागू पडते. प्रा. पंगु ह्यांनी सामराजास महाकवी ठरविले आहे पण स्वयंसिद्ध प्रतिभेचा कवी म्हणून सामराजांची योग्यता ठरविणाऱ्या दोन पक्षांत ह्यासंबंधी वाद निर्माण झालेला आहे. रचनाकौशल्य, वर्णनकौशल्य, प्रसंगांच्या निवडीतला चोखंदळपणा, सहजरम्य मांडणी

आणि भाषाप्रभुत्व इत्यादी श्रेष्ठ दर्जाच्या कवींच्या काव्यात आढळून येणारे काव्यगुण सामराजांच्या कवितेत दृष्टीस पडतात व हे त्यांच्या समर्थ अशा प्रतिभेचे निदर्शक ठरतात. विशिष्ट अशी काव्यविषयक मूल्ये प्रमाण मानून रचना करणारा कवी म्हणून महाराष्ट्रकविमंडळात सामराजांचे निश्चित असे स्थान आहे.

**रचना :** मु. – मुद्गलाख्यान; श्लो. सं. २६१; संपा. राजोपाध्ये, गो. रा.; कोल्हापूर, १९३०; प्रस्तावना व उपोद्घात, पृ. १–४२. २. रुक्मिणीहरण; सर्ग ८; श्लो. सं. ११४०; (१) प्रथमावृत्ती – संपा. भावे, वि. ल.; महा. कवि; ठाणे, १९०५; (२) द्वितीयावृत्ती – तुळपुळे, गो. वि.; पुणे, १९२४ (नवी आवृत्ती, पुणे, १९६६); उपोद्घात, पृ. १–२७.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कानिटकर, प्र. धों. : 'रुक्मिणीहरण-निरीक्षण'; पुणे, श. १८५१. २. कानिटकर, प्र. धों. : सामराज कवीचा काल; लेखांक १ : मुमुक्षु, ऑक्टो. १९२८, नवे व. ८, अं. १०; पृ. ९–११; लेखांक २ : नोव्हें. १९२८, नवे व. ८, अं. ११; पृ. २०–२९; लेखांक ३ : डिसें. १९२८, नवे व. ८, अं. १२; पृ. ३७–४०. ३. पंगु, द. सी. : शिवकालीन महाकवि सामराज; प्रआ. : कोल्हापूर, १९३०; द्विआ. : मुंबई, १९४१. ४. राजोपाध्ये, गो. रा. : सामराज कवीविषयी चर्चा; मुमुक्षु, डिसें. १९२८, पृ. २६–३६; मुमुक्षु, मार्च १९२९, नवे व. ९, अं. ३; पृ. १७–२०.

**० सामराज–२** – पहा **सामराज कल्याण.**

**सामराज कल्याण / ० सामराज–२** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, अखेर] रामदासी कवी. कल्याणस्वामींच्या प्रमुख शिष्यांपैकी एक. स्वामींच्या डोमगाव येथील मठाच्या संग्रहात सामराजांच्या कवितेचे बाड उपलब्ध झाले आहे. ह्यांच्या कवितेत रामस्तवनपर व कल्याण-वर्णनपर भाग अधिक आहे. सांप्रदायिक वारसा आणि कुळाचे अधिदैवत ह्या दृष्टिकोनातून रामावरील भक्ती कवीने व्यक्त केली आहे. गुरुस्तुतिपर कवनात 'कल्याणध्यान नयनांबुजि दाटलें हो। माया-मृगांबु जग सर्वहि आटलें हो॥' अशी एकरूपता वर्णन केली आहे. सामराजांची रचना संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाने प्रभावित झालेली दिसते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : सामराज कल्याण; श्रीसांप्रविवि., खं. १, लेखांक ५२; धुळे, १९१७; पृ. ३०५–३१२.

**सामराज दीक्षित** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – रसकल्लोळ; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २३५.

**सामराजशिष्य** [अंदाजे इ. स. १७७१ कवी.]

**रचना :** अमु. – भगवद्गीता (र. श. १६९३); वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. ११४.

**साम्राज्य वामन** [श. १५७४, श्रावण व. ८ / इ. स. १६५२ – ?] कवी. गुरु : वामन पंडित. आपल्या *ब्रह्मोपदेश* ग्रंथात ह्यांनी स्वतःविषयी काही माहिती दिली आहे, त्यावरून हे कोल्हापूरजवळील हुपरी ह्या गावचे होते. श. १५७४ च्या गोकुळअष्टमीस ह्यांचा जन्म झाला. श. १५९९ (इ. स. १६७७) त वयाच्या पंचविसाव्या वर्षी ह्यांनी वामनस्वामींचा गुरूपदेश घेतला. साम्राज्य वामनांनी हे *ब्रह्मोपदेश* प्रकरण (१३४ ओ.) 'श. १६१८ (इ. स. १६९६) धाता संवत्सरी' वयाच्या ४४ व्या वर्षी रचले. ह्यांच्या इतर ग्रंथांवर कालनिर्देश नाही.

ह्यांचे *सुदामचरित्र* (मसा., पृ. ३७२), *अनुभूतिलेशाचे* भाषान्तर, *राजयोग* व *ब्रह्मोपदेश* असे चार ग्रंथ मुद्रित झालेले आहेत. श्लोकांची घडण वामनांच्या श्लोकांप्रमाणेच दिसते. श्लोकांतील यमकानुप्रास वामनांची आठवण करून देतात. *सुदामचरित्रा*तील संस्कृतप्रचुरतेमुळे हे काव्य क्लिष्ट झाले आहे (मसा., आ. ५, पृ. ३७२–७३).

**रचना :** मु. – १. अनुभूतिलेश टीका; ग्रं. सं. १५५; कासं.; २. ब्रह्मोपदेश; निर्देश : संककासू., पृ. १४२; ३. राजयोग; श्लो. १८; ४. सुदामचरित्र; श्लो. ११८; अकलकामा., भा. १; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १८९५; पृ. १४७–१४९ व २६–४०.

**सायरस स्टोन** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] अमेरिकन मिशनरी. हे २९ डिसेंबर १८२७ रोजी हिंदुस्थानात आले व २० जून १८३८ रोजी मायदेशी परत गेले. सन १८३१ ते १८३३ पर्यंत अमेरिकन मिशनचे सुपरिंटेंडेंट म्हणून ह्यांनी काम पाहिले. ह्यांच्या नावावर *आत्म्याविषयीं लेकरांची पहिली पोथी* (१८३६) ह्या नावाचे एक पुस्तक मुद्रित झालेले आढळते. हे *चाइल्ड्स बुक ऑन द स्टोन, भाग पहिला* ह्याचे भाषान्तर आहे. ह्यांनी धर्मशास्त्राशी संबंधित आणखी सहा पुस्तके लिहिल्याची माहिती डॉ. श्री. म. पिंगे देतात. ही पुस्तके सध्या उपलब्ध नाहीत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** पिंगे, श्री. म. : रे. सायरस स्टोन; युमअसे., मुंबई, १९६०; पृ. २५६.

**सारंगपाणी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – गोपीवस्त्रहरण – पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० साल कवि** – पहा **शैल्य पंडित.**

**० सालदांज (पाद्री) आंतोनियु द** – पहा **आंतोनियु द सालदांज.**

**सांवतामाळी** [अंदाजे श. ११७२ / इ. स. १२५० – समा. श. १२१७, आषाढ व. १४ / इ. स. १२९५] नामदेवसमकालीन संतकवी. पंढरपुराजवळील अरण गावचे राहणारे. पित्याचे नाव परसूबा व आईचे नाव नांगिताबाई. भेंड गावातील रुपामाळी भानवसे ह्याची कन्या जनाबाई ही सांवतामाळ्यांची पत्नी.

सांवतामाळी हे वृत्तीने विरक्त असून ईश्वरभजनात सदैव निमग्न असत. ते विठ्ठलभक्त होते. तत्कालीन भगवद्भक्तांत ह्यांना मोठा मान होता. "एका जनार्दनीं सांवता तो धन्य। तयाचें महिमान न कळे कांहीं॥" असे एकनाथांनी ह्यांच्याविषयी उद्गार काढले आहेत. ज्ञानेश्वरांबरोबर हे त्यांच्या तीर्थयात्रेतही होते, असे ज. र. आजगांवकर सांगतात. परंतु नामदेवकृत *तीर्थावळीत* ज्ञानेश्वर व नामदेव हे दोघेच यात्रेस गेल्याचा उल्लेख सापडतो. ज्ञानदेव-नामदेवादी संतांच्या संगतीचा लाभ वारंवार त्यांना घडे एवढे मात्र निश्चितपणे दिसते. सांवतोबांच्या समाधिकालाविषयी एक अभंग प्रसिद्ध आहे. त्यात समाधीचा शक व तिथी दिली आहे : "बारा शतें सतरा शालिवाहन शक। मन्मथ नामक संवत्सर॥४॥ ऋतु ग्रीष्म कृष्ण आषाढ चतुर्दशी। आला उदयासी सहस्रकर॥५॥ सांवता पांडुरंगस्वरूपीं मिनला। देह समर्पिला ज्याचा त्यासी॥६॥" (ज. र. आजगांवकर; प्रामसंक., खं. १, पृ. १८४).

सांवतामाळ्यांचे काही अभंग (सं. १२) *श्रीसकलसंतगाथा, खंड १* (आ. २) मध्ये छापले आहेत (पृ. ९८–९९). ह्यांचे कवित्व काशीबा गुरव लिहून ठेवीत असत. विठ्ठलाच्या परमभक्तीने सांवतोबांनी आपल्या कवितेत भक्तिभावाचा मळा फुलविला. हे अभंग भक्तिमार्गाचा महिमा वर्णितात. उदा., "नामाचिया बळें न भीऊं सर्वथा। कळिकाळाच्या माथां सोटे मारूं॥ वैकुंठींचा देव आणूं या कीर्तनीं। विठ्ठल गाऊनी नाचों रंगीं॥" आपण हीन जातीत जन्मल्याबद्दल त्यांना विषाद वाटत नसे. ते म्हणत : 'भली केली हीन याति। नाहीं वाढली महंती॥' माळ्याच्या जातीबद्दल व प्राप्त कर्तव्याबद्दल त्यांना समाधानच वाटे. 'आमुची माळियाची जात। शेत लावूं बागाईत॥' ह्या कामाचा त्यांना अभिमान वाटे. त्यांच्या अभंगांतील काही उपमा, रूपके ही त्यांच्या नित्य व्यवसायाच्या संदर्भातून येतात. उदा., 'कांदा मुळा भाजी। अवघी विठाबाई माझी॥' किंवा 'शांति शेवंती फुलली। प्रेम जाई जुई व्याली।' सांवतोबांना थोर दर्जाच्या संतांच्या संगतीत भक्तीचा सोपा पण निश्चित मार्ग सापडला होता, असे वाटते. म्हणूनच

ते म्हणतात : "मागणें तें आम्हां नाहीं हो कोणासी। आठवावें संतांसी हेंचि खरें ॥"

मळ्यांतही त्यांना सर्वत्र देव दिसे. 'कांदा मुळा भाजी। अवघी विठाबाई माझी ॥ लसूण मिरची कोथिंबिरी। अवघा झाला माझा हरी ॥' ही त्यांच्या पूर्णज्ञानाची प्रचीतीच होय. सर्वांभूती परमेश्वर दिसू लागला की ज्ञानी भक्ताचा आपपरभाव निघून जाऊन त्याच्यात सर्वात्मभाव उदय पावतो. त्यांच्या एका अभंगात परब्रह्माच्या भेटीचे वर्णन येते ते असे : "पैल पहाहो परब्रह्म भुललें। जगदीश कांहो परतंत्र जालें....सावत्याचा स्वामी परब्रह्म पुतळा। तनुमनाची कुरवंडी ओंवाळा॥" ह्यांची काही अप्रसिद्ध रचनाही उपलब्ध आहे.

सांवतोबांची कविता संख्येने अल्प असली तरी प्रासादिक रचना व उत्कटता ह्यांमुळे वैशिष्ट्यपूर्ण झाली आहे. ह्या भावाविष्करणावर त्यांच्या समाधानी व शांत वृत्तीचा ठसा सर्वत्र उमटलेला दिसतो.

**रचना :** मु. – १. अभंग; सं. १२; श्रीसकलसंतगाथा, खं. १; पुणे, द्विआ. १९६७; पृ. ९८–९९; २. अभंग; सं. ३५; १ गण छंद, १ पद; श्रीसांवताचरित्र; राऊत, गो. वि.; अमरावती, १९३०; पृ. ८३–९०. अमु. – १. कृष्णलीला; संककासू., पृ. ११५; २. अभंग; बाळासाहेब मिरजकर संग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : सांवतामाळी; ग्रामसंक., खं. १; मुंबई १९५७; पृ. १८३–१८५; २. ग्रामोपाध्ये, गं. ब. : सांवतामाळी; संकास.; पुणे, १९३९; पृ. ९२–१२३.

**साळी होना** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**साळ्या रसाळ** [का. अनु.] कवी. यजुर्वेदी ब्राह्मण. राहणारे पंढरपूरचे. हे विठ्ठलभक्त होते. ह्यांनी मूळ गीर्वाण भाषेतील ग्रंथ पाहून मराठीत ओवी छंदात संपूर्ण *रामायण* रचले. ह्यांची वाणी रसपूर्ण असल्याने ह्या ग्रंथास लोक 'रसाळ रामायण' म्हणू लागले.

*संतलीलामृतात* महिपतींनी *रामायण* रचणाऱ्या साळ्याची कथा वर्णिली आहे (अ. ३०, ओ. ९२–१८४). ह्या ठिकाणी साळ्याच्या *रामायण*रचनेची जी एक कथा महिपती सांगतात तीवरून हे रखमाईदेवीच्या विशेष लोभातले होते असे दिसते. सुंदरकांडापर्यंत *रामायण* पूर्ण झाल्यावर त्यात काही न्यून आहे असे वाटल्यावरून साळ्यांनी रखमाईचे ध्यान केले. तिने त्यांना हा ग्रंथ संत नामदेवांना दाखविण्यास सांगितले. ह्यावेळी आपण ब्राह्मण तर नामदेव हीन कुळातील, त्यांना हा ग्रंथ कसा दाखवावा, असा विकल्प साळ्यांच्या मनात आला. पुढे *रामायणा*ची उरलेली कथा त्यांना जेव्हा स्फुरेचना तेव्हा रखमाईमातेला त्यांनी पुन्हा पाचारण केले. तिने आपल्या मायाशक्तीने लंकानगरीचे दृश्य त्यांच्या दृष्टीसमोर उभे केले. ते पाहात असता नामदेव लंकेत कीर्तन करीत असलेले त्यांना दिसले. त्या दृश्याने नामदेवांची महती त्यांच्या लक्षात आली. ते नामदेवांना शरण गेले. त्यांचा *रामायण* ग्रंथ ह्या घटनेनंतर पूर्ण झाला.

वरील आख्यायिका लक्षात घेता साळ्या रसाळ हे नामदेवांचे (इ. स. चे १४ वे शतक) समकालीन असावेत असे म्हणावेसे वाटते. जनार्दन रामचंद्रजी ह्यांनी *कविचरित्र* ह्या आपल्या ग्रंथात (पृ. १९६) ह्यांचा काळ श. १६६०/इ. स. १७३८ असा दिला आहे.

*महाराष्ट्रसारस्वत*कार भावे आपल्या ग्रंथात (आ. ५, पृ. ९३, टीप) *रामायणा*वर रचना करणारे साळ्या रसाळ हे देवगिरीच्या रामदेवराव यादवाच्या पदरी असलेल्या नृसिंह, शैल्य, नरेंद्र ह्या कविबंधूंपैकी शैल्यपंडित तर नव्हेत अशी शंका व्यक्त करतात.

**सिदु राऊळ ऊर्फ सिद्धनाथ** / ० रावल (सिद्धनाथ) [का. अनु.] शाहीर. ह्यांची परंपरा नाथसंप्रदायी : नागेश > आदिनाथ > गोविंदनाथ > सिद्धनाथ ऊर्फ सिदु रावळ अशी आहे. शाहीर सगनभाऊंचे हे गुरू. ह्यांची कवने एके काळी फार प्रसिद्ध होती. लोकांना ती ऐकण्यात गंमत वाटे. श्रावणात मुळामुठेच्या संगमावर हौशी मंडळी जमली असता तेथे ह्यांच्या कवनांची बहार उडे. सिदु रावळांपेक्षा त्यांचा शिष्य सगनभाऊ हा पुढील काळात प्रसिद्धीस आला (मसा., आ. ५, पृ. ५८१).

**सिंधुमर्द** [का. अनु.] शाहीर.

**रचना :** मु. – आबासाहेब छत्रपतिवधाचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. ९५–९७.

**सिद्ध** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – ज्ञानपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सिद्ध कवी** [अंदाजे इ. स. १७०० – १७५०] कवी. ह्यांची चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. ह्यांच्या *कृष्णामृतनट* ग्रंथातील प्रत्येक अध्यायाच्या शेवटी "येका जनार्दन वरदें। चक्र भारथी प्रसादें। श्री दत्तात्रिया निजबोधे। सिद्ध आनंदे डुलतु॥" अशी ओवी येते. ह्यावरून हे सिद्ध कवी एकनाथांच्या परंपरेतील दिसतात. कवीच्या *कृष्णामृतनट* ग्रंथाची हस्तलिखित प्रत मराठवाड्यातील परभणीजवळच्या सनपुरी गावी प्राप्त झाली. ती 'श. १६६७ (इ. स. १७४५), क्रोधन नाम संवत्सर, श्रावण वद्य पंचमी'ची आहे. ग्रंथावरून कवीच्या काळाचा निश्चित अंदाज लागत नाही. ग्रंथाच्या पूर्वार्धाचे १८ व उत्तरार्धाचे १० असे २८ अध्याय असून एकूण ग्रं. सं. ३८७३२ आहे.

जवळजवळ नाथांच्या *भावार्थरामायणा*इतका प्रचंड असा हा ग्रंथ आजवर अज्ञात राहिला होता. ग्रंथाचे *कृष्णामृतनट* हे नामाभिधान नावीन्यपूर्ण आहे. ह्या संबंधात कवी म्हणतो : "ग्रंथा नाव 'कृष्णामृतनट'। श्रीकृष्ण नटांचाहि नट॥ सर्वे सवंगडे अति निकट। खेळे प्रगट वृंदावनि॥" (४. १७).

'ईश्वरपार्वतीसंवादे' असे ह्या ग्रंथाच्या कथानिवेदनशैलीचे स्वरूप आहे. ग्रंथविस्ताराची मीमांसा करताना व आधार सांगताना कवी म्हणतो : "आधीच हा कृष्णामृतनट जाण। गगनचुंबित विस्तार गहन। डळमळो लागेल आपण। तव टेकणे दिधले भागवताचे।" भागवतावर अनेक कवींची रचना सापडते. त्यापैकी *हरिवरदा*कार कृष्णदयार्णवांनी टीका रचताना *श्रीमद्भागवता*चा आधार कधीच सोडला नाही. वामनपंडितांनी अद्वैततत्त्वाच्या प्रतिपादनासाठी भागवती कथांचा उपयोग करून घेतला तर श्रीधरकवींनी सामान्य लोकांची अभिरुची व भक्तिभाव नजरेसमोर ठेवला. *कृष्णामृतनट*काराने श्रीधरांच्याच पावलावर पाऊल टाकून मूळ कथांना मोड देऊन आपल्या नव्या कल्पनांची भर घालून, सर्वसंग्राहक दृष्टीने 'नटांचाहि नट' असलेल्या श्रीकृष्णाच्या लीलांचा भव्य पसारा उभारला आहे. हेच ह्या ग्रंथाचे वैशिष्ट्य होय.

*वत्सहरणा*च्या कथासूत्राच्या अनुषंगाने कवीने गोपाळांचे खेळ, वनभोजन, ब्रह्मदेवाने केलेले वत्सहरण, गोपिकावस्त्रहरण, चेंडुफळी, गोवर्धनोद्धारण, ब्रह्मदेवाचे गाई व गोप परत देणे, कालियामर्दन व अघासुरवध ह्या कथा रंगविल्या आहेत. श्रीकृष्णाच्या चोऱ्यांच्या वर्णनातही कवीला मोक्षाचा लाभ दिसतो.

एकनाथांच्या *एकादशस्कंधा*वरील टीकेचा व *रुक्मिणीस्वयंवरा*चा सरळ अनुवाद ह्या ग्रंथात आढळतो. एकनाथी ग्रंथ वगळता इतर सर्व माहिती कवीने बहुश्रुततेने मिळविलेली आहे. तसेच सूक्ष्मावलोकन, अनेक कथांचा संग्रह आकर्षकपणे व्यक्त करण्याची हातोटी हे कवीचे गुण नावाजण्यासारखे आहेत. कवीजवळ विद्वत्त्व फारसे नाही; मनोरंजन करण्याचे कसब मात्र निश्चित आहे. तात्पर्य, हा ग्रंथ म्हणजे भागवतधर्माचा एक प्रकारे अपर *दासविश्रामधाम* किंवा *ज्ञानकोश*च आहे. मुसलमानी राजवटीची छाप ह्या काव्यातील

वर्णनांवर दिसते. फारसी शब्दांचा वापर सर्रास आढळतो.

श्रीधराच्या खालोखाल आख्यानकवी म्हणून ह्याला स्थान देण्यास हरकत नाही असे ह्या कवीच्या ग्रंथाचा प्रथम परिचय करून देणाऱ्या चिं. नी. जोश्यांनी आपले मत व्यक्त केले आहे.

**रचना : अमु.** – १. कृष्णामृतनट; पूर्वार्ध, अ. १८; ग्रं. सं. १४,१२२; उत्तरार्ध, अ. १०; ग्रं. सं. २४,६१०; एकूण अ. २८; ग्रं. सं. ३८,७३२; उस्मानिया विद्यापीठ ग्रंथसंग्रह.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कुळकर्णी, व. दा. : एका अप्रकाशित ग्रंथातील 'वत्साहरण'; मस्वासंप., मार्च १९६८; पृ. ५ ते १४; २. जोशी, चिं. नी.; एक अज्ञात ग्रंथ : कृष्णामृतनट; चित्रज., नोव्हें. १९४६; पृ. ६३२–६३५.

**सिद्धचैतन्य** / ० चैतन्यसिद्ध [का. अनु.] कवी. नागेशसंप्रदायानुयायी. ह्यांनी रचलेल्या *संतमालेत* कोनेर गंगाधर, प्राणगोपाळ, मृत्युंजय, वामन, अज्ञानसिद्ध ह्यांचा उल्लेख आढळतो. प्रस्तुत *संतमालिकेचे* मुद्रण *महाराष्ट्र कवि* मासिकामधून (संपा. : वि. ल. भावे) झालेले आहे.

**सिद्धतनय** / ० सिद्धात्मज [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – १. कृष्णपर पदे; २. द्रोणपर्वकथाभाग; ३. परशुरामाची आरती इत्यादी रचना; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सिद्धनागेश** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – घुसळण पद; लोकगीत, तंजावर, १९५०; पृ. २६; **अमु.** – सगुणपर ओव्या; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सिद्धनाथ–१** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सिद्धान्तसार; वि. ल. भावे संग्रह; २. स्फुट अभंगादी रचना; संककासू., पृ. ११५.

**० सिद्धनाथ–२** – पहा परिशिष्ट : सिद्धानंद.

**सिद्धनाथ डवरी** [अंदाजे इ. स. १८४३] शाहीर. ह्यांनी *सामानगडच्या बंडावरील पोवाडा* रचला आहे. सामानगड हा किल्ला गडहिंग्लजच्या दक्षिणेस आहे. कोल्हापूरकरांनी इंग्रजांशी केलेल्या तहानुसार कंपनीने कोल्हापूरचे दिवाण म्हणून दाजी कृष्णा पंडित ह्यांस कारभारी नेमले. त्यांनी लाचलुचपत मोडून काढल्याने सामानगडच्या व भूदरगडच्या गडकऱ्यांनी बंड पुकारले. त्यांच्याविरुद्ध बेळगावहून इंग्रज फौज बोलावण्यात आली. ह्या फौजेने अखेर बंडखोरांना जेर करून १३ ऑक्टो. १८४३ रोजी सामानगड जिंकला. ह्या बंडाची हकीकत प्रस्तुत पोवाड्यात आली आहे.

**रचना : मु.** – सामानगडचा चौथा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. २२३–२२८.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** केळकर, य. न. : सामानगड बंडाचे पोवाडे : ऐतिहासिक माहिती; ऐतिपो., खं. ३; पृ. ५९३ ते ५९९.

**सिद्धपालकेशरी** [अंदाजे श. १५०७ / इ. स. १५८५] ग्रंथकार. जातीने मराठा. आईचे नाव अंबिका, वडिलांचे नाव कुबेर, उपनाव कृदांत. हे स्वतःस मार्तंडभैरवाचा दास म्हणवितात. ह्यांनी *मल्लारिमाहात्म्य* हा ग्रंथ लिहिला आहे. ही कथा *ब्रह्मांडपुराणातून* घेतली आहे असे हे सांगतात. ग्रंथातील २१ व्या अध्यायात अष्टविधा भक्ती वर्णिली आहे.

**रचना : अमु.** – १. मल्लारिमाहात्म्य; अ. २२; र. का. : श. १५०७, पार्थिव संवत्सर : श्रावण व. ६, शुक्रवार; भाइसंमं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : सिद्धपालकेसरीकृत मल्लारिमाहात्म्य; भाइसंमंइति., श. १८३७; पृ. २५९–२६०.

**सिद्धराम** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – गुरुपर पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सिद्धलिंग** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० सिद्ध स्वानंद कल्याण** – पहा स्वानंदस्वामी.

**सिद्धा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ११५.

**० सिद्धात्मज** – पहा सिद्धतनय.

**सिद्धानंद** / ० सिद्धनाथ–२ – पहा परिशिष्ट.

**सिद्धांते हरिव्यास** / ० हरिबास–१ [अंदाजे श. १३२५ / इ. स. १४०३] महानुभाव भाष्यकार. हे उपाध्य आम्नायातील धाराशिवकर ओंकारबासांचे शिष्य. अचळ मुरारीबासांनी ह्यांचे नामकरण 'सिद्धांते हरिबास' असे केले. चक्रधरोक्त वचनांचे यथार्थ ज्ञान व्हावे म्हणून अचळ मुरारीबासांचे शिष्य गुर्जर शिवबास व धाराशिवकर ओंकारबासांचे शिष्य सिद्धांते हरिबास ह्या विद्वानांनी चक्रधरोक्त सूत्रांतील *आचार-विचार-लक्षण* ह्यावरील *तिन्ही स्थळांची* बांधणी शके १३२५ (इ. स. १४०३) च्या सुमारास पूर्ण केली. ही तीन स्थळे म्हणजे *सूत्रपाठावरील* तीन भाष्ये असून ती पंथीयांत सर्वमान्य झाली आहेत. *स्थळपोथी* हे ह्या ग्रंथाचे दुसरे नाव. पंथीयांचा हा एक प्रमाण-ग्रंथ आहे.

चक्रधरांच्या नंतर त्यांच्या वचनांचे झालेले वेगवेगळे पाठ, तेरा आम्नाय व त्यांतील अर्थभेदाने निर्माण झालेले चोवीस पक्ष भाष्य रचताना ह्यांच्या नजरेसमोर होते. म्हाइंभट, कवीश्वरबास, परशरामबास, हर्दमुनी, धाराशिवकर ओंकारबास, पाठकुळे मालोबास, पातुरकर ओंकारबास, कुमर मुनिबास इत्यादी व आपण दोघे मिळून चोवीस पक्षकारांची मते लक्षात घेऊन त्यातील भेदांची व पक्षांची तीव्रता कमी करून त्यांचा समन्वय साधण्यासाठी हा ग्रंथ रचला. पंथीय शास्त्र विशद करणाऱ्या ह्या ग्रंथाचे माहात्म्य *अन्वयस्थळकार* कृष्णमुनींच्या शब्दात पहा : "या वेगळे शास्त्र : अर्थ अर्थादिक : नव्हे प्रमाणिक : अविहित ॥ २९४ ॥". [⇨ ३.]

सिद्धांते हरिबास व धाकुटे सोंगोबास ह्या दोघांनी मिळून एक *अन्वयस्थळही* रचले आहे. त्यामध्ये चक्रधरस्वामींची शिष्यपरंपरा, ग्रंथनिर्मिती, संबंधित ग्रंथकर्त्यांची परंपरा, विशेष परंपरा, तत्त्वज्ञान सिद्धान्त परिचय, इत्यादी पंथीयांच्या दृष्टीने महत्त्वाची अशी ऐतिहासिक माहिती दिलेली आहे (मु. : *महानु. अन्वयस्थळ विशेषांक,* जुलै, ऑग. १९६४; पृ. २४–२९).

**सिद्धेश्वर** [ ? – समा. श. १७२३, वैशाख वद्य ६ / इ. स. १८०१] कवी. अमृतरायांचे शिष्य. वेरूळजवळील बावरे येथील रामभट व गोदावरी यांचे सिद्धेश्वर हे पुत्र. गुरुपरंपरा : नारायण > हंस > सनक > ब्रह्म > नारद > पूर्णानंद (नाशिकचे) > ज्ञानानंद > अमृतराय > सिद्धेश्वर. कवीने *अद्वैतसरणी* व *ज्ञानानुभव* (प्रत श. १७९२) अशा दोन ग्रंथांची रचना केली आहे. ह्यांच्या प्रवाही हिंदी रचनेचा विनयमोहन शर्मा निर्देश करतात (हिंमसंदे., पृ. २०४–२०५).

**रचना : अमु.** – १. अद्वैतसरणी; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ११५. २. ज्ञानानुभव; प्रत श. १७९२; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १०३.

**सिद्धेश्वर नारायण भिडे** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] बखरकार.

**रचना : अमु.** – लव आणि कुश यांची हकीकत; र. का. : श. १७६६ / इ. स. १८४४; रासंमं. हस्त. सू., पृ. ८५.

**सिमाव गॉमिश (पाद्री)** / ० गॉमिश सिमाव [इ. स. १६४७–१७२२] गोमंतकीय पोर्तुगीज मिशनरी ग्रंथकार. सिमाव गॉमिश ह्यांचा जन्म पोर्तुगालमधील व्हेर्मेल्य ह्या गावी इ. स. १६४७ मध्ये झाला. गोव्याच्या जेजुइट सोसायटीत ह्यांनी १६६१ साली प्रवेश केला. पुष्कळ वर्षे धर्मोपदेशक म्हणून सासष्टी (गोवे) येथे त्यांनी काम

केले व हे काम करता करता स्थानिक भाषेत प्रावीण्य मिळविले. १७०९ साली देशावर ह्यांनी ख्रिस्ती मिशनची स्थापना केली. १७२२ साली रायतूर (गोवे) येथे हे स्वर्गवासी झाले. ही माहिती अ. का. प्रियोळकर ह्यांना रोम येथील प्रसिद्ध जेजुइट संशोधक फादर जोसेफ विकी ह्यांनी सोसायटीच्या दप्तरात शोध घेऊन कळविली.

*सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश* हा देवनागरीत लिहिलेला प्रस्तुत लेखकाचा गद्य ग्रंथ सहा भागांत आहे. १७०९ साली देशावर मिशन स्थापन केल्यानंतर थोड्या अवधीतच स्थानिक लोकांच्या उपयोगासाठी सिमॉवने हा *ज्ञानोपदेश* ग्रंथ लिहिला असे दिसते. प्रस्तुत ग्रंथ पोर्तुगीज सत्तेबाहेरील मराठी लोकांसाठी लिहिल्याने रचना देवनागरीत करावी लागली. ग्रंथाच्या हस्तलिखितांची एकूण पृष्ठे ३५२ असून त्यांपैकी २८३ पृष्ठे ह्या ग्रंथाची आहेत. इतर पृष्ठे ख्रिस्ती प्रश्नोत्तरी, धर्मविधीचे मंत्र व स्तोत्रे ह्यांची असून त्यांचा कर्ता कोण ह्याचा उल्लेख नाही. हिंदुधर्मातील आचार-विचार, धर्मकल्पना, तत्त्वज्ञान ह्या सर्व गोष्टींचे खंडन करून ख्रिस्ती धर्माचा श्रेष्ठपणा जनमानसावर ठसविण्याचा ग्रंथरचनेमागचा लेखकाचा हेतू स्पष्ट दिसतो. ह्या ग्रंथाचे मुद्रण *नवभारत* ह्या मासिकातून झाले आहे. ग्रंथात ब्राह्मणेतर कुणबी, मराठा अशा लोकांमध्ये प्रचलित असलेले अनेक शब्द लेखकाने वापरलेले आहेत. ह्या ग्रंथाची मायक्रोफिल्म मराठी संशोधन मंडळ, मुंबई ह्या संस्थेत आहे.

**रचना : मु.** – सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश, भा. ६; गद्य; संपा. प्रियोळकर, अ. का.; नभामा., जाने. १९७३ ते ऑग. १९७३ (क्रमशः); महत्त्वाची प्रस्तावना, नभामा., जाने. १९७३, पृ. ५६–६८.

**सिवदास मल्ह्या** [का. अनु.] आरतीकार. रामदासोत्तरकालीन. ह्या कवीची एकच सद्गुरुपर आरती उपलब्ध आहे. आरतीची ६ कडवी आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा.; नभामा., ऑक्टो. १९६९, पृ. २५.

**सी. जी. बार्थ (रेव्हरंड)** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वकाल] बखरकार.

**रचना : मु.** – ख्रिस्ती मंडळीची बखर; र. का. : इ. स. १८५०; मुंबई, १८६०; रासमं.

**सीताराघव** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदे; सवामं. हस्त. सू., खं. १

**सीताराम–१ / ० सीतारामबावा** [अंदाजे श. १६३० / इ. स. १७०८] रामदासी कवी. *उत्तरगीता* ह्या आपल्या टीकाग्रंथात कवीने दिलेल्या परंपराविषयक ओव्या लक्षात घेता जी परंपरा समजते, ती अशी : श्रीसमर्थ > देवदास > श्रीहरिस्वामी > सीताराम. वर उल्लेखिलेले देवदास हे श्रीसमर्थांचे शिष्य व दादेगांवमठपती देवदास होत.

ग्रंथरचनेचे स्थळ सांगताना कवी म्हणतो : "अंबिकादेशीं पवित्र। वटग्राम जें कां सुक्षेत्र। ग्रन्थ संपूर्ण विचित्र। तया स्थळीं॥ ३.३३८॥" हेच वटग्राम किंवा वडगाव कवीचे राहण्याचे ठिकाण असावे. अंबिकादेश म्हणजे मराठवाड्यातील आंबेजोगाई मानले तर तेथून जवळपास वडगाव नक्की कोठे आहे, त्याचा निश्चित शोध लागलेला नाही.

मूळ *उत्तरगीता* ही *अश्वमेधपर्वां*तर्गत आहे असे म्हटले जाते. सीतारामांची *उत्तरगीता* ही ओवीबद्ध टीका असून तिचे ३ अध्याय आहेत. पहिल्या अध्यायाचे नाव 'ब्रह्मोपदेश' (मूळ श्लोक ५४ व टीकात्मक ओव्या ४८८). दुसऱ्या अध्यायाला 'अभ्यासयोग' म्हटले आहे (त्याचे मूळ श्लोक ५५ व टीका ३०२ ओव्या). तिसऱ्या अध्यायाला नाव नाही (मूळ श्लोक २७ व टीका ३४० ओव्या; एकूण ग्रं. सं. ११३०). श. १६३० च्या आषाढ शु. १५ स टीकाग्रंथ पूर्ण झाल्याचा निर्देश ग्रंथात येतो.

समर्थांच्या नावावर मोडले जाणारे *अन्वयव्यतिरेक प्रकरण* हे समर्थांचे नसून सीतारामांचे आहे, असे ठाम मत शं. श्री. देव ह्यांनी व्यक्त केले आहे (सवामं. बा. १०६०). उपलब्ध दोन हस्तलिखित प्रतींवर "अन्वयव्यतिरेक ग्रंथ। समर्थांचा सिष्य सीतारामबावा क्रत। समास अक्रा॥ ११॥ वोवीसं० ॥ ३५८॥" असे म्हटले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देव, शं. श्री. : उत्तरगीता; श्रीसांप्रविवि., खं. १; लेखांक ८; धुळे, १९१७; पृ. ३६–३९. २. देव, शं. श्री. : श्रीसमर्थांच्या नांवावर मोडणारें एक लघु काव्य; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. ३९.

**सीताराम–२** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे व गोंधळ इ. रचना; सवामं. हस्त. सू., खं. १.

**० सीतारामबावा** – पहा **सीताराम–१.**

**० सीधनाथ** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**० सीधेदेही नागेश्वर** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**० सीधेश ईशनागेश** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**० सीवदास** – पहा **शिवदास–२.**

**० सीवसीधांत** – पहा **वडवाळसिद्ध नागनाथ.**

**० सुखटणकर, महेश्वरभट्ट रामचंद्रभट्ट** – पहा **महेश्वरभट्ट सुखटणकर.**

**० सुखटणकर, रामचंद्र मल्हार** – पहा **रामचंद्र मल्हार सुखटणकर.**

**सुखबोध** [अंदाजे श. १७३५ / इ. स. १८१३] वीरशैव कवी. ह्या परंपरेतील दशरथ शांताचा हा शिष्य. शांतबोध > शांतेश्वर > बस्वलिंग > शांतलिंग > दशरथ शांत > सुखबोध अशी ही परंपरा आहे. रामदास पंचायतनातील एक सत्पुरुष जयरामस्वामी वडगावकर आणि बेळगाव जिल्ह्यातील संकेश्वर गावी होऊन गेलेले दशरथ शांत हे एकाच शांत परंपरेतील होत असे पां. ना. कुळकर्णी ह्यांनी त्यांच्या संग्रही असलेल्या *शान्तिपंचीकरणा*च्या पोथीत येणाऱ्या परंपरेवरून आपले मत व्यक्त केले आहे (*संशोधनधारा* : १९६७, पृ. १३१). सुखबोधाने आपल्या परंपरेतील सर्व सत्पुरुषांचे नामस्मरण करणारे *परंपरापरमपुरुष-आराधन* (ओ. सं. १२५) असे प्रकरण रचले आहे. हे समग्र प्रकरण पां. ना. कुळकर्णी ह्यांनी *संशोधनधारा* नामक लेखसंग्रहात (पृ. १३६–१४३) समाविष्ट केले आहे.

ह्या प्रकरणातील पहिल्या ६० ओव्यांत शांतपरंपरा क्रमाने कथन केली आहे. पुढे तो म्हणतो : "अवतार सांगितले आनान। परि तो येकचि श्रीभगवान।" म्हणून 'परंपरापरमपुरुषा'च्या जागी ह्या सर्व पुरुषांची स्थापना करून त्याने त्यांचे ध्यान वर्णिले आहे. शांतस्थितीचे कवीने केलेले वर्णन शांत संज्ञेच्या प्रतिष्ठेच्या दृष्टीने पाहण्यासारखे आहे : 'करावया शांतस्तवा। षडदर्शनां पडिला गोवा। तेथें प्राकृताचा कोण केवा। भक्तिभावा बोलत॥ शांत सद्गुरुनिधान। शांत पतितपावन। शांत स्वरूपाचे महिमान। वर्णावया ज्ञान मज नाहीं॥ शांत स्वरूपाचें श्रेष्ठपण। शांतस्थिति हें मंडण। शांतस्थिति हे बाणल्याविण। उणेपण देवभक्ता॥' ह्या परंपरेचा तितकासा शोध अद्यापि घेतला गेलेला नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : सुखबोधाचे 'परंपरापुरुष-आराधन'; प्रामनधा.; कोल्हापूर, १९७२; पृ. ५२–५३.

**सुखानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**सुजात** [अंदाजे इ. स. चे १५ वे शतक] वीरशैव कवी. रामलिंग > सुजात > महालिंगवाणी अशी ही परंपरा आहे. सुजातकवींनी पुष्कळ पदे रचली आहेत असे वि. ल. भावे सांगतात. ह्या पदांतून गुरू रामलिंगाचा उल्लेख येतो. उदा., "आता असो परतें नवल। सांगतां फार विस्तारेल।

सद्गुरु रामलिंग कोपेल। म्हणे सुजात ॥" आज ह्यांची दोन मराठी व एक हिंदी अशी केवळ तीनच पदे उपलब्ध आहेत. ह्यांचे 'नवल देखिलें । मात डोळियात ।' हे एक पद (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २०) व 'कैसे तुज दावूं, तुज दावूं । बोट कोठें तें लावूं ॥' असे दुसरे पद (प्रामनधा., पृ. ६३) मुद्रित झाली आहेत. ही दोन्ही पदे अध्यात्मविषयक गूढ अनुभव व्यक्त करतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : वीरशैवांचे मराठी वाङ्मय; प्रामनधा.; कोल्हापूर, १९७२; पृ. ६२–६३.

**सुंदर कवि** [का. अनु.] कवी. ह्या कवीच्या कवितेचे एक हस्तलिखित बाड श्रीगोंदे (जि. नगर) येथे उपलब्ध झाले आहे. ग्रंथांतर्गत उल्लेखांवरून कवी रामभक्त व रामदासी सांप्रदायाचा असावा असे निश्चित म्हणता येते. प्रत्येक पदाच्या आरंभी 'श्रीराम' किंवा 'श्रीरामसमर्थ' असे हे आवर्जून लिहितात.

ह्या बाडात सुंदर कवींची काही प्रकरणे, श्लोक, ओव्या, पदे व अभंग अशी स्फुट कविता सापडते. पहिले प्रकरण अध्यात्मपर ३७८ ओव्यांचे आहे. प्रकरणाच्या नावाचा उल्लेख नाही.

ह्यानंतर दत्तगोरखसंवादात्मक २२ ओव्यांची *गर्भगीता* लिहिलेली आहे. ह्यापुढील भागात सुंदरकृत ८१ कवने, टिपरी ४४, वासुदेव २३ जोगी १० अशी स्फुट कविता रूपकांनी अन्वित असून ती सर्व वेदान्तपर आहे. भाषा अशुद्ध वाटते. हे बाड भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे ह्यांच्याकडे संग्रहित.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, शं. ना.; भाइसंमंत्रै., व. १२, अं. ४, चैत्र १८५४; पृ. १७०–१७४.

**० सुंदरदास तुका** – पहा **तुका सुंदरदास.**

**सुंदर हरि** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**सुबराव कचरे** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – चार मंगळाष्टके; सवामं. हस्त. सू., खं. २.

**० सुब्बराव बाबा** – पहा **सखन पंडित.**

**सुब्बाजी** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० सुब्बाजी शेषो** – पहा **सखन पंडित.**

**सुभान** [का. अनु.] शाहीर, लावणीकार. *अंधारातील लावण्या* (पुणे, १९५६) ह्या संग्रहात (पृ. २२७) ह्यांची एक लावणी प्रसिद्ध.

**० सुभानंत पिकले** – पहा **शुभानंद.**

**० सुभानंत स्वामी** – पहा **शुभानंद.**

**सुभानराव** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – सीतारामविवाह; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ११६.

**सुमेरु** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सुरदास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १, २.

**सुरेश्वर** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – शिवपर श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सुलतान** [इ. स. चे १८ वे शतक, अखेर] शाहीर. पोवाड्यातील निर्देशावरून हा वेळापूरचा राहणारा असावा असे वाटते. नागपूरकर चिमणाबापू भोसल्याने इ. स. १७८० साली कटक-ओरिसावर जी स्वारी केली तिचे वर्णन ह्याने *नागपूरकर चिमणाबापू भोसल्याचा पोवाडा* ह्या रचनेत केले आहे. ह्या पोवाड्याचे १० चौक असून त्यात स्वारीच्या आराखड्याचा तपशील दिला आहे. 'नागपुरी पोवाडा केला बसुन गायाला ।' असा जो उल्लेख येतो त्यावरून हा शाहीर त्या काळात नागपूरला राहात असावा असे वाटते. प्रस्तुत पोवाड *ऐतिहासिक पोवाडे, खंड* २ ह्यात संग्रहित (पृ. ७६–७८).

**सुलतान (नाथ)** / **० नाथगोपाळ सुलतान** [का. अनु.] नाथपंथीय कवी. पां. मा. चांदोरकर ह्यांच्याजवळील एका (हस्त.) बाडात ह्या कवीचे एक पद सापडले आहे. त्यात 'नाथ गोपाळ निर्गुण बाही । केला सुलतान आक्षई ।' असा उल्लेख आढळतो.

आपणास ठाऊक असलेल्या चार गोपाळनाथांपैकी, म्हणजे (१) रंगनाथ शिष्य (१६८८), (२) देवनाथशिष्य, (३) देवनाथांचे परमगुरू (१६००), (४) आत्मारामशिष्य ह्यांपैकी, वर उल्लेखिलेल्या सुलतानाचे गुरू निश्चितपणे कोणते हे समजण्यास साधन नाही.

ह्यांच्या छापलेल्या पदांत (भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४, पृ. ५४–५५) नाथपंथाचा आवडता विषय जो पातंजलयोग तोच निरूपिलेला दिसतो. त्या पदातील शेवटचे कडवे : "जेथें शब्द वाचा नाहीं : तेथें अद्भुत कांहीं न बाई : नाथ गोपाळ निर्गुण बाही : केला सुलतान आक्षई : सद्गुरुकृपें सायोज्य भोगी : ५ : कोणी शुधी सांगा मजलागी : बाई कोठें तो निजयोगी : धृ. :" असे आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, पां. मा. : नाथगोपाळाच सुलतान; भाइसंमंत्रै., व. २३, अं. ४, पृ. ५५.

**सुलताना पाटील** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] शाहीर. कोल्हापूरजवळील शिरोली गावचा राहणारा, असा पोवाड्यात उल्लेख येतो. हा करवीरकरांच्या आश्रयास होता. ह्याच्या, *आळत्याच्या लढाईचा पोवाडा* आणि *कंपूचा पोवाडा* अशा दोन रचना प्रसिद्ध झाल्या आहेत. आळत्याच्या लढाईत प्रथम रामचंद्रआप्पाचा (परशुरामभाऊचा पुत्र) करवीरकरांनी पाडाव केला. त्याचा बदला परशुरामभाऊने लागलीच घेऊन करवीरकरांना जेर केले. पुढे पट्टणकुडीच्या लढाईत मात्र परशुरामभाऊ कामास आला. ह्या पराजयाचा सूड उगविण्यासाठी रामचंद्रआप्पाने पेशवे व शिंदे ह्यांच्यामागे निकड लावून ठिकठिकाणच्या सैन्याची जमवाजमव केली. त्यांत शिंद्यांची पाच पलटणे किंवा कंपू होता, म्हणून ह्या रचनेस *कंपूचा पोवाडा* असे म्हटले आहे. ह्या कंपूच्या मदतीने रामचंद्रआप्पाने पन्हाळ्याजवळ करवीरकरांचा पराभव केला, इत्यादी तपशील पोवाड्यातून येतो. *कंपूच्या पोवाड्या*तील पहिल्या तीन चौकांत पंचगंगेच्या तीरावरील करवीर क्षेत्राचे व विघ्नहर्त्या अंबेचे वर्णन कवीने भाविकपणे केले आहे.

**रचना :** मु. – १. आळत्याच्या लढाईचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३, पृ. १७–१९. २. कंपूचा पोवाडा; ऐतिपो., खं. १, पृ. ३४८–३५५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. केळकर, य. न. : पट्टणकुडीचे व कंपूचे पोवाडे; ऐति. माहिती; ऐतिपो., खं. १, पुणे, १९२८; पृ. ३२७–३३०.

**सुषेण** [इ. स. चे १३ वे शतक] वैद्यक ग्रंथाचा कर्ता. ह्याने आपला *आयुर्वेदमहोदधि* ग्रंथ १३ व्या शतकात केव्हातरी रचला. ह्या ग्रंथाची प्रत (पृष्ठमात्रायुक्त) मराठवाड्यात कन्नड ह्या गावी अलिकडेच मिळाली आहे (मसा., आ. ५, पृ. ७४५).

**सुहृद** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – गणपतिपर पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**सूरदासप्रभु** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सूरश्याम** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ११६.

**सूरिजन (पंडित)** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक, पूर्वार्ध] जैन कवी. *परमहंसकथा* ह्या ग्रंथाचा कर्ता. गुरु : ब्रह्मजिनदास. ईडर येथील सकल-

कीर्ती, ज्ञानकीर्ती इत्यादी ज्ञानभूषण भट्टारकांस कवीने गुरुस्थानी मानले आहे. त्यांत ब्रह्मजिनदासांस अग्रस्थान देऊन त्यांना प्रेमगुरू म्हटले आहे (*परमहंसकथा* १ : ४). ग्रंथाची शेवटची ओवी आहे : 'अइसें बोलिला ब्रह्मचारी जिनदासु । मग मनीं धरुनि संतोसु । मग कथिला परमहंसु । पंडित सूरीजनें ॥' ह्यावरून ब्रह्मजिनदासांचा ग्रंथ ह्याने आधारास घेतलेला दिसतो.

कवीचा *परमहंसकथा* ग्रंथ म्हणजे एक पारमार्थिक रूपककाव्य आहे. ही पारमार्थिक रूपककथा संस्कृत *प्रबोधचंद्रोदया*सारखी अथवा मराठीतील श्रीपतिदासाच्या *मनश्चंद्रबोधा*सारखी आहे. ह्या आध्यात्मिक रूपकातील कायानगरी, परमहंस राजा, चेतना राणी, माया सवत, मन पुत्र अशी काही रूपके आहेत. मोहाशी संग्राम करून शेवटी विवेकाने परमहंसास मुक्त करून चेतनेची प्राप्ती करविली असा हा कथाभाग आहे. तत्कालीन राजकीय संग्रामाचे प्रतिबिंबही तेथे पडलेले दिसते.

ह्या कथेची मांडणी ओवी छंदात असली तरी सूरिजनाने अधूनमधून चूर्णिकांचा (त्यांना तो वचनावली म्हणतो) वापर केला असल्यामुळे *परमहंसकथा* हे एक चंपूकाव्य बनले आहे. [⇨ ३.]

**रचना :** मु. – परमहंसकथा; ओ. सं. १०००; चंपूकाव्य; गद्यपद्यमिश्रित रचना; संपा. अकोळे, सुभाषचंद्र; सोलापूर, १९६०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** अकोळे, सुभाषचंद्र, पंडित सूरिजन, ग्रामजैसा., नागपूर–पुणे, १९६८; पृ. ३८–४०.

**सूरिहरीराज** [इ. स. चे १४ वे शतक] पारमांडल्य आम्नायातील महानुभाव टीकाकार. *अंताक्षरी*वरील *टीपग्रंथ* ह्यांनी रचला आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, य. खु. : पारमांडल्य आम्नाय वंशवृक्ष; ममवा., पुणे, १९६०.

**सूर्य** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – गुरुस्तुती प्रकरण व पदे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**सूर्यदास** [इ. स. चे १७ वे शतक] कवी. कविरचित ओवीबद्ध *द्रौपदीवस्त्रहरण* काव्याची एकच प्रत उपलब्ध आहे. ह्या प्रतीतील अक्षरे खराब व दुर्बोध आहेत. कथनपद्धती सामान्य आहे. हे काव्य अपूर्ण असून ह्याची हस्तलिखित प्रत तंजावर सरस्वतीमहाल ग्रंथसंग्रहात उपलब्ध.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा. : सूर्यदास; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २२–२३.

**० सेनाजी** – पहा सेना न्हावी.

**सेना न्हावी / ० शेना न्हाऊ / ० सेनाजी / ० सेना महाराज** [इ. स. चे १३ वे शतक, उत्तरार्ध] संतकवी. वारकरी संप्रदायानुयायी. ज्ञानेश्वर-नामदेव-काळातील एक प्रख्यात भगवद्भक्त. पंजाबात, राजस्थानात व मध्यप्रदेशाच्या काही भागातही ह्यांचे नाव फार ऐकू येते. उत्तरेतील समजुतीप्रमाणे सेना बांधवगड (कटनी-विलासपूर मार्गावरील स्थानक, म. प्र.) येथील राजाचे सेवक होते; राजाला त्यांच्या संतपणाचा साक्षात्कार झाला व त्याने सेनांना आपले गुरू केले. सेनाकवी हे उत्तरभारतीय हिंदीभाषिक की महाराष्ट्रीय, ह्याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. *पंजाबांतील नामदेव* ह्या पुस्तकात शं. प. जोशी ह्यांनी सेना न्हावी हा हिंदीभाषिकच होता, असे म्हटले आहे. उत्तरेकडे ह्यांचे मठ, मंदिरे, अनुयायी सापडतात. ह्यावरून डॉ. तुळपुळे ह्यांनीही ह्या मतास मान्यता दिली आहे (*महाराष्ट्रसारस्वत*, आ. ५, पृ. ७४४). रामानंदाचे प्रमुख शिष्य म्हणून उत्तरभारतात ह्यांची प्रसिद्धी आहे. पण रामानंदाच्या शिष्यपरिवारात ह्यांचे काव्य सापडत नाही. विनयमोहन शर्मा (हिंदी साहित्याचे अभ्यासक) ह्यांच्या मते सेना न्हावी उत्तरेकडील नव्हते. मराठी संतांच्या हिंदी साहित्यसेवेचा परिचय करून देताना ते म्हणतात, "हमारे मत से सेनानाई उत्तर भारत का नहीं है। उसने नामदेव के समान उत्तर भारत में यात्रा की होगी। सेन पंथ का उत्तर भारत में प्रचार नहीं है।" (हिंमसंदे., पृ. १३२). नाभाजींच्या *भक्तमाले*वरून महिपतीबोवांनी सेनांचे चरित्र मराठीत आणले.

ह्यांच्या नावावर हिंदी रचना फारशी उपलब्ध नाही. फक्त शीखांच्या *ग्रंथसाहेबा*त एकच हिंदी पद तेवढे आहे. सेनांची मराठी अभंगरचना लक्षात घेता असे वाटते की, पूर्वायुष्यात महाराष्ट्रात राहून नंतर ह्यांनी उत्तरेकडे प्रयाण केले असावे, आणि हेच अधिक तर्कसंगत दिसते. सेनांच्या मराठी रचनेत रामानंदांचा गुरू म्हणून कोठेच उल्लेख येत नाही; पण पंढरीचा पांडुरंग व ज्ञानदेव ह्यांच्याबद्दल उत्कट जिव्हाळा जागोजाग प्रकट झालेला दिसतो. ज्ञानेश्वरांच्या प्रभावळीतील संतांचा विचार करताना ल. रा. पांगारकर सेना न्हाव्याचा आवर्जून परिचय करून देतात : "सेनाच्या अभंगांवर ज्ञानेश्वरांच्या वाणीची छाया पडलेली स्पष्ट आहे. . . . निवृत्तिनाथांचे समाधिस्थळ त्र्यंबकेश्वर, ज्ञानेश्वरांची आळंदी, सोपानदेवांचे कन्हातीरी सासवड, यावर सेना न्हावी यांचे सुमारे २० अभंग असून वर्णने अचूक आहेत. त्यांत या त्रिवर्गाविषयी उत्कट प्रेम व्यक्त झाले." (मवाइ., खं. १, पृ. ३४२). अशा प्रकारे सेनाचे मराठीपण पांगारकर स्पष्ट करतात. ज्ञानेश्वरादी तीन भावंडांच्या निर्याणानंतर थोड्याच अवधीत हे झाले असावेत. प्रसंगपरत्वे हे बांधवगडच्या राजाच्या सेवेस रुजूही झाले असतील. रामानंदांच्या उत्तरेतील अवतारकार्याच्या वेळी सेना तेथे असल्याने त्यांच्या शिष्यपरिवारात ह्यांचे नाव गोवले गेले असावे.

*श्रीसकलसंतगाथे*त (भाग १) ह्यांच्या अभंग व गौळणी मिळून १४३ रचना छापल्या आहेत. त्यांमधून वारकरी संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाच्या धारेचे पूर्ण दर्शन घडते. गुरुविषयक अत्युत्कट आदरभाव, संतसहवासाची महती, पांडुरंगाचा ध्यास, नाम-माहात्म्य हे आत्मसाक्षात्काररूप भावदर्शनाचे अविभाज्य घटक तेथे प्रकट झाले आहेत.

आपल्या जातिविहित व्यवसायातून रूपकनिर्मिती करून हे "आम्ही वारिक वारिक करु हजामत बारिक बारिक । विवेकदर्पण दाऊ । वैराग्य चिमटा हालवू ।" अशा प्रकारचे वैशिष्ट्यपूर्ण अभंग लिहितात. भगवद्भक्तीचा प्रसार करण्यासाठीच परमेश्वराने आपल्याला पृथ्वीवर पाठविले अशी ह्यांची दृढ श्रद्धा आहे. एके ठिकाणी ते म्हणतात : "धन कोणा कामा आलें । पहा विचारुनी भलें । सखा पांडुरंगाविण । सेना म्हणे दुजा कोण ।" पंढरपूर आणि पांडुरंग हेच ह्यांचे परमदैवत आणि जीवितसाफल्य होते. "जाता पंढरीसी सुख वाटे जीवा । आनंदे केशवा भेटताचि । या सुखाची उपमा नाही त्रिभुवनीं । पाहिली शोधोनि अवघी तीर्थे ।" असेही ते सांगतात. संतांना ते 'मायबाप कृपावंत' म्हणतात. परमेश्वराच्या भक्तीचा मार्ग फारच सोपा आहे, कसा तर 'सोपें साधन आमुचें । नाम गाऊ विठोबाचें ।' सेनांचे भावविश्व हे इतर वारकरी अभंगकारांहून वेगळे नाही. सेना न्हावी ह्यांनी गौळणीही लिहिल्या आहेत. त्या भावोत्कट आहेत. संत सेनांचे व्यक्तित्व प्रभावशाली असावे. त्यामुळे दक्षिणेत व उत्तरेत त्यांच्या नावाचा बराच बोलबाला झाला.

**रचना :** मु. – अभंग; सं. १४३; श्रीससंगा., खं. १; संपा. जोशी, का. अ.; द्विआ., पुणे, १९६७; पृ. १००–११३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : सेना न्हावी; खं. १; मुंबई, १९५७; पृ. २३८; २. कामत, अशोक : मराठी संत कवि सेना न्हावी; प्रसाद; मार्च १९६८, पृ. २०; एप्रि. १९६८, पृ. २१; ३. गुर्जर, श्री. वि. : राजगुरु संत सेना; युगवाणी, ऑग. १९६६, पृ. १२१; ४. ग्रामोपाध्ये, गं. ब. : सेना न्हावी; संकास.; पुणे, १९३९; पृ. १५९–१७६; ५. शर्मा, विनयमोहन : सेना न्हावी; हिंमसंदे., पटणा, १९५७; पृ. १३१; ६. शिंदे, एल. एस. : संतरत्न सेना महाराज; प्रसाद, जाने. १९६२; पृ. २५.

० **सेना महाराज** – पहा सेना न्हावी.

**सेवक** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

० **सैय्यद चांदसाहेब कादरी** – पहा परिशिष्ट : चांद बोधले.

० **सोंगेराज व्यास** – पहा सोंगोबास.

**सोंगोबास** / ० धाकुटे सोंगोबास / ० सोंगेराज व्यास [इ. स. चे १५ वे शतक, प्रारंभ] महानुभाव कवी. गुर्जर शिवव्यास ह्यांचे पुतणे. गुर्जरशिवव्यास व सोंगोबास हे चक्रधरांच्या वंशातले अशी माहिती डॉ. य. खु. देशपांडे देतात. पण असे मानण्यास खात्रीचा पुरावा उपलब्ध नाही, असे मत डॉ. वि. भि. कोलते ह्यांनी *ज्ञानप्रबोधा*च्या प्रस्तावनेत गुर्जरशिवबासांची माहिती देताना मांडले आहे. ह्यांचे मूळचे नाव संगपाळ. हे आपले चुलते शिवव्यास (शिवपाळ) ह्यांच्याबरोबर पैठणास येऊन राहिले व त्यांचेच शिष्य बनले. गुरुपरंपरा : पेठे हरिबास > अचळ मुरारीबास > अचळ (गुर्जर) शिवबास > सोंगोबास. ह्यांचे शिष्य गोविंदराज विद्वांस. ह्यांच्यामागे ह्यांची गादी स्वतंत्रपणे चालू राहिली व गोविंदराजांमुळे ह्या गादीस विद्वांस असे नाव मिळाले. सोंगोबासांनी सिद्धान्ते हरिबासांचे साहाय्य घेऊन एक *अन्वयस्थळ* (पंथीय परंपरेचा इतिहास सांगणारा ग्रंथ) रचले आहे. ह्या *अन्वयस्थळा*त श्रीचक्रधरस्वामींच्या शिष्यपरंपरेची, महानुभावीय वाङ्मयग्रंथनिर्मितीची व संबंधित ग्रंथकर्त्यांची परंपरा, विशेष परंपरा, तत्त्वज्ञान सिद्धान्त परिचय, नाथ जोगिया परंपरा इत्यादी महत्त्वपूर्ण ऐतिहासिक माहिती मिळते.

**रचना :** मु. – अन्वयस्थळ (सिद्धान्ते हरिबास ह्यांच्या सहकार्याने); महानु., जुलै, ऑग. १९६४; पृ. २४–२९.

**सोन गुंडा सोमा** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**सोनुकवि** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सोनुसय्यदसोनु** [का. अनु.] पदकार.

रचना : अमु. – बोधपर पदे; तंसम. हस्त. सू., क्र. ३.

० **सोपान** – पहा सोपानदेव.

० **सोपान खेचर** – पहा सोपानदेव.

**सोपानदेव** / ० सोपान / ० सोपान खेचर [श. ११९९, कार्तिक शु. १५ / इ. स. १२७७ – समा. श. १२१८, मार्गशीर्ष वद्य १३ / इ. स. १२९६] संतकवी. ज्ञानेश्वरांच्या भावंडांपैकी एक. ह्या भावंडांचे चरित्र सर्वविश्रुतच आहे. ह्यांचे वडील विठ्ठलपंत हे यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. गोदातीरी आपेगावी त्यांची कुळकर्ण्याची वृत्ती होती. संन्याशाची मुले म्हणून ह्या भावंडांना फारच हाल सोसावे लागले. ह्यांचे वास्तव्य आपेगाव, पैठण, आळंदी ह्या ठिकाणी येऊन जाऊन असे. निवृत्तिनाथ हे चार भावंडांपैकी वडील. निवृत्तिनाथांनी नाथपंथीय सत्पुरुष गैनीनाथ ह्यांच्याकडून उपदेश घेतला होता तोच उपदेश त्यांनी आपल्या धाकट्या भावंडांस दिला. सोपानदेवांची गुरुपरंपरा : आदिनाथ > मच्छिंद्रनाथ > गोरक्षनाथ > गैनीनाथ > निवृत्तिनाथ > सोपानदेव अशी आहे. विसोबा खेचरांनी सोपानदेवांचा उपदेश घेतला होता, असे परंपरा मानते.

सोपानदेवांनी श. १२१८ मार्गशीर्ष वद्य त्रयोदशीस वयाच्या विसाव्या वर्षी समाधी घेतली. नामदेवकृत छापील गाथ्यातून ती संवत्सरग्रामी असल्याचा उल्लेख सापडतो. ह्या मुद्द्याची चर्चा करताना पां. न. पटवर्धन म्हणतात की, त्या काळी संवत्सर व सासवड अशी दोन निरनिराळी गावे होती. कालांतराने अंदाजे श. १४०१ (इ. स. १४७९) च्या सुमारास ही एकवटली. सोपानदेवांची समाधी मौजे संवत्सरच्या हद्दीत असल्याने संवत्सर असा त्यांच्या समाधिस्थळाचा उल्लेख अनेक ठिकाणी आला आहे. सासवडास सोपानदेवांचे मंदिर आहे.

सोपानदेवांची *पंचीकरण, नमन, हरिपाठ, प्राकृत गीता* इत्यादी प्रकरणे, *सोपानदेवी* ही गीतेवरील समश्लोकी टीका, अभंग व पदे अशी रचना सापडते. गो. का. चांदोरकरांना सोपानदेवांच्या *हरिपाठा*च्या दोन भिन्न प्रती एका जुन्या मठातील कागदपत्रे चाळताना सापडल्या. त्यांपैकी एक पूर्ण व दुसरी अपूर्ण आहे. अपूर्ण प्रतीत १३ अभंग असून १४ व्यातील दोनच चरण आढळतात. दुसऱ्यात २३ अभंग असून तो *हरिपाठ* पूर्ण आहे.

त्र्यं. ह. आवटे ह्यांनी श. १८३६ त *श्रीसोपानदेवी* ह्या नावाचा एक ग्रंथ प्रसिद्ध केला. त्याची पोथी सासवड येथील समाधिमंदिरात त्यांना मिळाल्याचे ते लिहितात. त्यांत ९, १०, १३, १५ ह्या अध्यायांत सोपान ह्या नावाचा उल्लेख आहे. नामदेवांनी निर्देशिलेला "सोपानदेवें ग्रंथ केला होता सार। ठेविला समोर निवृत्तिच्या।" असा सोपानकृत सारग्रंथ म्हणजे ही *सोपानदेवी* असावी. *सोपानदेवी* म्हणजे *भगवद्गीते*ची सारग्राही टीका होय.

सोपानदेवांचे अभंग *श्रीसकलसंतगाथा, भाग १* मध्ये छापले आहेत. निवृत्ति-ज्ञाननाथांच्या शिकवणुकीचे सार ह्यांच्या अभंगांतून पाहण्यास सापडते. सोपानदेवांचे बोल निर्भीड व परखड आहेत. प्रसंगी "मी नेणें ती भक्ति नेणें त्या मुक्ति। तुझ्या नामपंथी मार्गु मना ॥ १ ॥ तूंची माझें धन जोडी हे निजाची। जननी तूं आमुची जीवलगे ॥ ३ ॥" असा हळुवारपणाही प्रत्ययास येतो (श्रीससंगा., १.१४).

राम, कृष्ण, विष्णु, शिव हे सर्व देव एकच आहेत असा भाव सर्वत्र व्यक्त केलेला दिसतो. भक्त हरिरूपी लीन झाल्याच्या संबंधात एक फारच सुंदर अभंग रचलेला आढळतो तो असा : "आपरुप हरी आपणची देव। आपणची भाव सर्व जाला ॥ १ ॥ सर्व हरी हरी बाह्य अभ्यंतरीं। एक चराचरी आत्माराम ॥ २ ॥ सर्व काळ सम नाहीं तेथें विषम। आपणची राम सर्व ज्योती ॥ ३ ॥ सोपान तिष्ठत रामनामीं लीन। मन तेथे मौन्य एकपणें ॥ ४ ॥" (श्रीससंगा., १.४८). ज्ञानेश्वरादी सर्वच भावंडांचा आध्यात्मिक अधिकार फार मोठा होता. त्याचा प्रत्यय सोपानदेवांच्या अल्प कवितेतूनही अचूक येतो.

**रचना :** मु. – १. श्रीसोपानदेवी; र. श. १२१५; संपा. आवटे, त्र्यं. ह.; १९१४. २. अभंग – ४९; श्रीससंगा., खं. १, पुणे, १९६७; पृ. १५९–१६३. अमु. – १. नमन (र. श. १२११); २. पंचीकरण; ३. प्राकृतगीता; ४. हरिपाठ.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. चांदोरकर, गो. का. : श्रीसोपानदेवांचे हरिपाठ; भाइसमंइति., श. १८३६; पृ. ८७–८९; २. टाकी, रा. शं. : सोपान ज्ञानेश निवृत्तिनाथ; श्रीज्ञानेश्वर महाराज अथवा सद्भक्तिविजय; पृ. १; ३. पटवर्धन, पां. न. : कित्येक नवे शोध : संवत्सर येथील श्रीसोपानदेवांची समाधि; भाइसमंत्रै., व. ४, अं. १–४; जुलै १९२३ – जून १९२४; पृ. ६२. ४. मेहेंदळे, खं. चिं. : श्रीसोपानदेव यांचें संस्थान; भाइसमंइति., श. १८३८; पृ. १५६-१६४.

**सोभावदास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; संककासू., पृ. ११६.

**सोमदास** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**सोमनाथ–१** [ज्ञानेश्वरपूर्वकालीन] तेलुगू कवी. ह्याने लिहिलेल्या *मल्लिकार्जुन पंडिताराध्य चरित्र* ह्या तेलुगू काव्यात एक मराठी उतारा सापडतो. हा सोमनाथ कवी अष्टभाषाकवित्वविशारद म्हणून प्रसिद्ध होता. ह्याने कानडीतही काही ग्रंथ लिहिले आहेत. डॉ. सी. नारायणराव (अनंतपूर) ह्यांनी 'जर्नल ऑफ द आंध्र हिस्टॉरिकल

रिसर्च सोसायटी'च्या त्रैमासिकात (जाने.–एप्रि. १९३८, पु. ९, भा. ३–४) 'ॲन अर्लि मराठी पॅसेज फाउन्ड इन तेलुगू लिटरेचर' असा एक लेख लिहून वरील मराठी उताऱ्याची ३० हस्तलिखित पोथ्या पाहून पाठभेदांसह माहिती दिली आहे. मुळात हा मराठी उतारा तेलुगू लिपीत लिहिलेला आहे. "या उताऱ्यात कांहीं उत्तम काव्यगुण किंवा माहिती सांपडत नाहीं. भाषाहि फार जुनी वाटत नाहीं.... तथापि, जुन्या तेलुगु काव्यांतील मराठी, या एकाच दृष्टीनें याचें अति महत्त्व आहे" असे निवेदन 'ज्ञानेश्वरपूर्व तेलुगु काव्यांतील मराठी उतारा' हा लेख लिहिणाऱ्या चिं. ग. कर्वे ह्यांनी केले आहे (भाइसंमंत्रै., व. २२, अं. ३–४, पौष व चैत्र, श. १८६३–६४, पृ. ९४–९६).

**सोमनाथ-२** [का. अनु.] कवी. ह्यांच्या *तुकारामविजय* ग्रंथामध्ये गुरू लोकनाथांना वंदन आहे. ग्रंथाचे एकूण २८ प्रसंग व १४१० ओव्या आहेत. तंजावर सरस्वतीमहाल ग्रंथालयात ही प्रत उपलब्ध आहे. ग्रंथकारासमोर महिपतीचा आदर्श होता. तुकाराममहाराजांचे पूर्वज विश्वंभर ह्यांची हकीकत फक्त ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वाची आहे. ऐतिहासिक दृष्ट्या ग्रंथाची किंमत शून्य आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, म. रा.; नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २४.

**० सोयरा** – पहा **सोयराबाई.**

**सोयराबाई / ० चोख्याची महारी / ० सोयरा** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] संतकवयित्री. प्रसिद्ध भगवद्भक्त चोखोबांच्या धर्मपत्नी. चोखोबांच्या मृत्यूनंतरही सोयराबाई हयात होत्या, असे अनुमान त्यांच्या 'चोखा मेळविला रूपी। माझी आता कोण गती।' ह्या व इतर अभंगांतील काही उद्गारांवरूनही काढता येते. ह्यांच्या मुलाचे नाव कर्ममेळा. हाही भगवद्भक्त होता. सोयराबाई ह्या पतिसेवेत दक्ष असून पारमार्थिक वृत्तीच्या होत्या.

सोयराबाईंचे ६२ अभंग *श्रीसकलसंतगाथा, खंड १* (पृ. १४४–१४९) मध्ये मुद्रित झाले आहेत. सोयराबाई स्वतःचा उल्लेख 'चोख्याची महारी' असा करतात. काही अभंगांतून 'सोयरा' असाही निर्देश येतो. 'येई येई गरुडध्वजा। विटेसहित करीन पूजा।' हा त्यांचा अभंग नावाजलेला आहे. 'आमची तो दशा विपरीत झाली। कोण आम्हा घाली पोटामध्ये।' किंवा 'उदारा पंढरिराया नको अंत पाहू। कोठवरि मी पाहू वाट तुझी।' अशा प्रकारे त्यांनी आर्तता व्यक्त केली आहे. सोयराबाईंनी नामाचे माहात्म्यही अनेक अभंगांतून सांगितले आहे. उदा., 'नामापरते सार नाही हो निर्धारी। म्हणतसे महारी चोखियाची।' विठ्ठलाच्या दर्शनाने झालेला आनंद व्यक्त करताना 'अनंता जन्मांचें फिटलें सांकडें। कोंदाटलें पुढें रूप त्याचें।' असे म्हणून 'आनंद न समाये मनाचे अंतरी' ह्या प्रकारे स्वतःच्या मनःस्थितीचा आविष्कार घडवला आहे. त्यांची वाणी उत्कट असून स्पष्टोक्ती हा तिचा गुणविशेष आहे. देहाचा विटाळ मानणाऱ्या कर्मठांची कानउघाडणी त्यांनी आपल्या पतीप्रमाणेच परखडपणे केली आहे. अभंगात चोखोबांची बहीण निर्मळा हिच्यासंबंधीही उल्लेख आहेत. चोखोबांच्या समाधीच्या 'आनंदसोहळ्या'चे वर्णनही त्यांच्या अभंगांत येते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : सोयराबाई; मसंक.; मुंबई, १९३९; पृ. ६६ ते ७४.

**सोरटीबुवा** [का. अनु.] पदकार.

**रचना :** असु. – पदपदांतरे; कवचाळे, कृ. गं.; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४.

**० सोहिरा** – पहा **सोहिरोबानाथ आंबिये.**

**० सोहिरोबा** – पहा **सोहिरोबानाथ आंबिये.**

**सोहिरोबानाथ आंबिये / ० सोहिरा / ० सोहिरोबा** [श. १६३६, चैत्र शु. ९ / इ. स. १७१४ – समा. श. १७१४ / इ. स. १७९२] नाथसंप्रदायी संत व कवी. ह्यांच्या घराण्याचे मूळ गाव गोमंतकातीलपेडणे महालातील पालिये. हे गाव सोडून ह्यांचे वडील धंद्याच्या निमित्ताने सावंतवाडी संस्थानातील (त्या वेळच्या) बांदे ह्या गावी स्थायिक झाले. सावंतवाडी शहरापासून चार कोस अंतरावर सावंतवाडी-गोवा मार्गावर हे गाव वसलेले आहे. ह्या गावी सारस्वत ब्राह्मण कुलात ह्यांचा जन्म झाला. विद्याभ्यास आटोपल्यावर सावंतवाडी राज्यातील काही गावांचे कुळकर्णीपण सुमारे वीस वर्षे ह्यांनी केले. मुळापासूनच हे विरागी वृत्तीचे होते. प्रपंचाच्या पोषणासाठी कराव्या लागणाऱ्या सरकारी चाकरीतून त्यांस जो काही फुरसतीचा काळ लाभे तो ते भजनपूजनात, धार्मिक व आध्यात्मिक ग्रंथ वाचण्यात व त्यांचे मनन करण्यात घालवीत. प्रपंचापेक्षा परमार्थाकडे त्यांचा अधिक ओढा होता. पुढेपुढे हा ओढा तीव्रतर होत चालला. सरकारी सेवेच्या बंधनातून शक्य तेवढ्या लवकर मुक्त व्हावे हा विचार त्यांच्या मनात अधिकाधिक बळावत चालला. ह्याच सुमारास, एके दिवशी, ते देवपूजेस बसले असता त्यांच्याकडे सावंतवाडीच्या राजेसाहेबांकडून, ताबडतोब भेटीस येण्याबद्दलचा निरोप घेऊन एक शिपाई आला. पूजा आटोपल्यावर, भोजन न करता ते लगेच निघाले. 'देवसेवेत विक्षेप आणणारी ही राजसेवा आता बस्स झाली', हा विचार त्यांच्या मनात त्या वेळेस आल्याशिवाय राहिला नाही. अर्धाअधिक मार्ग आक्रमिल्यावर, त्यांना थकल्यासारखे वाटू लागले. ह्या मार्गावरील इनसुली गावाच्या जंगलातील एका ओढ्यापाशी ते विश्रांतीकरिता थांबले. क्षुधाशांतीकरिता त्यांनी स्वतःबरोबर एक पिकलेला फणस घेतलेला होता. ओढ्यावर हातपाय धुवून त्यांनी तो फोडला व त्यातील गरे खावयास ते प्रारंभ करणार, इतक्यात 'बाबु हमकू कुछ देता है?' अशी मधुरगंभीर वाणी त्यांना ऐकू आली. ती कुठून आली म्हणून ते मागे वळून पाहतात तोच त्यांच्या दिशेने येत असलेला एक तेजस्वी सिद्ध पुरुष त्यांच्या दृष्टीस पडला. तत्क्षणी, तो फणस घेऊन ते त्याच्याकडे धावत गेले. त्याच्या चरणापाशी तो आदरपूर्वक ठेवून त्यांनी त्याला साष्टांगप्रणिपात केला. त्या सिद्ध पुरुषाने त्याचा स्वीकार करून त्यातील पाच गरे सोहिरोबांस प्रसाद म्हणून दिले व बाकीचे स्वतः मोठ्या संतोषाने खाल्ले. त्याने सोहिरोबांच्या डोक्यावर वरदहस्त ठेवला व कानात मंत्र सांगितला; डोळ्याला डोळा भिडवून त्यांच्यात शक्तिपात केला. सोहिरोबांची तत्काळ समाधी लागली. ह्या प्रसंगी आपल्याला प्राप्त झालेल्या अवस्थेचे सोहिरोबांनी एका पदात खालीलप्रमाणे वर्णन केले आहे : "झाला ब्रह्मबोध लागली समाधी ॥ ध्रु. ॥ सुषुम्नेच्या छिद्रीं। स्थिरावलों ब्रह्मरंध्रीं। भेदोनिया नादबिंदु ॥ १॥ मना वाचे ना कळे। ऐसें देखिलें निराळें। रूपाविण हें अगाध ॥ २॥ सोहिरा म्हणे काय वानूं। हारपलें देहभानू। सद्गुरु भेटला हा सिद्ध ॥ ३ ॥" (*श्रीसोहिरोबानाथ पदसंग्रह*; पद क्र. ५७, पृ. ७४). सोहिरोबांना समाधी लागताच तो सिद्धपुरुष जो कोठे निघून गेला तो पुन्हा त्यांस कधी भेटलाच नाही. सोहिरोबांना मंत्रोपदेश (श. १६७१ / इ. स. १७४९) करणारे हे सिद्ध पुरुष कोण ह्याचा खुलासा आजवर कोणीच केलेला नाही. स्वतः सोहिरोबांनीही आपली गुरुपरंपरा कोठेच लिहून ठेविलेली नाही. सोहिरोबांनी आपल्या काही ग्रंथात गुरुमहिमा विस्ताराने वर्णिला आहे. अशा प्रसंगीही, इतर मराठी संतकवी करतात त्याप्रमाणे, ते आपल्या गुरूचा नामोल्लेख करीत नाहीत, हे केवढे नवल ! 'नव्हे नरनारी, गैबीसूत्रधारी', 'गैबीप्रसादें गैबच झालें। आप आपणामध्यें लपलें॥'; 'हरदमके उपर झमके गये गैबनाथ ज्योती।' ह्यांसारख्या, त्यांच्या पदांत आढळणाऱ्या उद्गारांवरून गैबीनाथ नाव धारण करणारे हे कोणी सिद्ध पुरुष असावे असा कोणी तर्क लढवितात, तर त्यांचे

काही भक्त हे सिद्ध पुरुष खुद्द गोरक्षनाथच होत असे सांगतात. काहींचे म्हणणे ज्ञानदेवांचे आजेगुरू जे गहिनीनाथ तेच हे गैबीनाथ ! पण गहिनीनाथ हे इ. स. च्या तेराव्या शतकातील तर सोहिरोबा अठराव्या शतकाच्या पूर्वार्धातील. ज्ञानदेवांच्या नाथपंथीय शिष्य-परंपरेतील सत्यामलनाथ ह्यांचा गैबीनाथ नावाचा एक शिष्य होता. त्याचाही काळ इ. स. १५९८–१६५८ असा आहे (पहा : रा. चि. ढेरेकृत *गोरक्षनाथ चरित्र*, पृ. १७०). तेव्हा, सोहिरोबांचे गुरू म्हणून सांगितले जाणारे गैबीनाथ हे केव्हाचे, कुठले, कोण हा प्रश्न अनिर्णीतच राहतो.

सोहिरोबा, समाधी उतरल्यावर, सावंतवाडीत गेले. त्यांनी राजे-साहेबांची भेट घेतली. 'ह्यापुढें आपली सेवा मजकडून होणें शक्य नाहीं' असे त्यांस सांगून ते लगेच माघारी फिरले.

राजसेवेच्या बंधनातून मुक्त झाल्यावर, जागृतीतील आपला सर्व काळ सोहिरोबा भगवद्भजनात, आध्यात्मिक ग्रंथांच्या वाचनात व चिंतन-मननात घालवू लागले. ते एका पदात म्हणतात : 'रंगलों या हरिरंगी लौकिक लाज सांडुनी ॥ धृ.॥ नगवत् जग मग मानुनि शुद्ध सुरंगीं ॥ १॥ सोडुनि संग निःसंग झालें चैतन्य सिंधु तरंगीं ॥ २॥' संस्कृत भाषेचा त्यांनी पायाशुद्ध अभ्यास केला होता. वेदान्तशास्त्र व योग-शास्त्र ह्यांचा त्यांचा व्यासंग प्रगाढ दिसतो. संस्कृत भाषेतील आध्यात्मिक वाङ्मयाप्रमाणेच मराठी संतवाङ्मयाचेही त्यांनी सखोल वाचन केले होते. त्यातल्या त्यात श्रीज्ञानेश्वरांच्या विचारांची व वर्णनशैलीची छाप त्यांच्या विचारांवर व लेखनावर विशेष पडली असल्याचे अनेकदा जाणवते. ज्ञानेश्वरांप्रमाणेच योग आणि भक्ती ह्यांच्या वर्णनात त्यांची काव्यप्रतिभा अधिक रमते. त्यातल्या त्यात हठयोगाचे वर्णन व विवेचन ते विशेष तन्मयतेने करताना आढळतात. *महदनुभवेश्वरी* ह्या त्यांच्या ग्रंथात ह्या गोष्टीचा ठायी ठायी प्रत्यय येतो.

सिद्ध पुरुषाचा अनुग्रह प्राप्त झाल्यानंतर सुमारे पंचवीस वर्षे सोहिरोबा स्वग्रामीच होते. मधून मधून आजूबाजूच्या प्रदेशात, विशेषतः गोवे प्रांतात त्यांचा बराच संचार होत असे. मुमुक्षू मंडळी भोवती जमली की स्वकृत पदे गाऊन तिला पारमार्थिक बोध करण्याचा त्यांचा रिवाज असे. ही त्यांची पदे लोक आत्मबोधासाठी लिहून ठेवीत. तशी ती लिहून ठेवली गेल्यामुळेच, त्यांनी रचलेल्या शेकडो पदांपैकी, थोडीशी का होईना, पुढील काळातील लोकांना लाभू शकली. सोहिरोबा स्वहस्ते क्वचितच काव्यलेखन करीत. त्यांचे सर्व ग्रंथ दुसऱ्यांनीच लिहून घेतलेले आढळतात. त्यांतील बहुतेक भाग सोहिरोबांच्या बहिणीच्या हातचा आढळतो. जी पदे किंवा ज्या कविता सोहिरोबा आत्मानंदात निमग्न असता म्हणत त्या ती उतरवून ठेवीत असे. त्यांतील पुष्कळशी नष्ट झाली. त्याची अनेक कारणे सांगितली जातात. त्या काळात कागद महाग व दुर्मिळ असे. गरिबीमुळे सोहिरोबांना कागद विकत घेणे परवडण्यासारखे नव्हते. त्यामुळे त्यांची बहीण झाडांच्या पानांवर कविता लिहून ठेवी. ही पाने एका खोलीत जमवून ठेवली जात. एके दिवशी त्यांच्या वृद्ध मातोश्रीने ती सर्व पाने पाचोळा समजून चुलीत घालून जाळून टाकली !

वयाच्या साठाव्या वर्षापर्यंत सोहिरोबांचे सावंतवाडी प्रांतात वास्तव्य होते. पुढे उत्तर-भारतात प्रवास करून प्रसिद्ध स्थळे व पवित्र तीर्थक्षेत्रे पाहावी अशी त्यांना इच्छा झाली. त्याप्रमाणे आपले दोघे मुलगे सोबतीस घेऊन ते इ. स. १७७४ च्या सुमारास प्रवासास निघाले. चार-पाच वर्षे प्रवासात घालविल्यावर इ. स. १७७९ साली ते ग्वाल्हेरीस गेले असता, महादजी शिंदे ह्यांचे त्यावेळचे सेनापती जिवबादादा बक्षी केरकर ह्यांनी त्यांना मोठ्या आदराने आपल्या वाड्यात ठेवून घेतले व त्यांची उत्तम बडदास्त राखली. जिवबादादा हे मूळचे गोव्यातील केरी गावचे. सोहिरोबांसारख्या स्वप्रांतातील एका थोर साधुपुरुषाची आपल्या धन्याशी – महादजींशी – भेट करून द्यावी असे त्यांच्या मनात साहजिकच आले. त्यांचे साधुत्व व कवित्व पाहून महादजी खूष होतील व त्यांजकडून त्यांस द्रव्यलाभही होईल असे त्यांस वाटले. ते सोहिरोबांना एक दिवस म्हणाले : "मी आज आपणास महादजी शिंदे ह्यांच्या दरबारी घेऊन जातो. तेथे आपला आदरसत्कार होऊन यथोचित संभावना होईल. महादजींनी स्वतः काही कविता रचली आहे ती ते, आपण कवी असल्यामुळे, आपणास दाखवितील. तेव्हा 'कविता चांगली आहे' एवढे आपण म्हणा, म्हणजे झाले." हे जिवबादादांचे बोलणे ऐकून सोहिरोबांस थोडेसे आश्चर्य वाटून ते म्हणाले : "जर शिंद्यांची कविता चांगली असली तरच मी ती चांगली आहे असे म्हणेन, परंतु जर ती वाईट असली तर तसे स्पष्ट सांगेन. हे आपणास कबूल असेल तर एकवार त्यांच्या दरबारी जाऊन शिंद्यांची भेट घेण्यास मी तयार आहे." उभयतांचे असे हे संभाषण चालले आहे इतक्यात महादजींकडून जिवबादादांस निरोप आला की, आपल्याकडून आलेल्या सत्पुरुषास बरोबर घेऊन आज दरबारास यावे. त्याप्रमाणे भोजनोत्तर सोहिरोबांस घेऊन जिवबादादा दरबारी गेले. तेथे महादजींनी सोहिरोबांचे आदरपूर्वक स्वागत करून त्यांस सिंहासनावर बसावयास सांगितले. परंतु सोहिरोबांस तसे करणे अति संकोचाचे वाटल्यामुळे ते इतर मंडळी बसली होती तीत जाऊन बसले. नंतर काही वेळ त्यांचे व महादजींचे भाषण झाल्यावर महादजींनी आपल्या कवितांची वही आणवून सोहिरोबांशी दिली व विनंती केली की, एवढ्या कविता वाचून पाहून त्या कशा काय उतरल्या आहेत ते सांगावे. सोहिरोबांनी त्या वहीतील काही कविता वाचून पाहिल्या व ते एवढेच म्हणाले की, 'ह्या कविता आहेत खऱ्या परंतु त्या प्रासादिक नाहीत.' सोहिरोबांची ही स्पष्टोक्ती महादजींस रुचली नाही, असे त्यांच्या मुद्रेवरून दिसून आले. सोहिरो-बांच्या ते ध्यानात आले. त्यांनी महादजींस उद्देशून खालील हिंदुस्थानी पद तेथल्या तेथे रचून म्हटले : "अवधूत । नहीं गरज तेरी ॥ हम् बेपरवा फकेरी ॥ धृ. ॥ तूं है राजा मैं हूँ जोगी । पृथक पंथका न्यारा ॥ छत्रपती सब तेरे सरिखे । पाँवन परे हमारा ॥ १ ॥ तैं ढालीबन हम झोलीबन् । चार खूट जहागिरी ॥ तीन तालमों दुवाय फिरती । घर घर अलख पुकारी ॥ २ ॥ सोना चांदी हमें नहिं चहिये । अलख भुवनके बासी ॥ महाल मुलुख सब झांट बराबर । हम् गुरुनाम उपासी ॥ ३ ॥ तैं बी डुबे हमे डुबाने । तेरा हम क्या लीया ॥ कहे सोहिरा सुनो महादजी । प्रकाश जोग कमाया ॥४॥" वरील पद म्हणून सोहिरोबा दरबारातून निघून गेले. महादजी व दरबारी मंडळी स्तिमित झाली. सोहिरोबा हे सर्वसामान्यपणे आढळणाऱ्या विषयलोभी तथा-कथित साधूंच्या वर्गातील नाहीत; अत्युच्च आध्यात्मिक अवस्था प्राप्त झालेले ते पुरुष आहेत, ह्याची जाणीव त्यांना झाल्याशिवाय राहिली नाही.

सोहिरोबांचे ग्वाल्हेरीस बरीच वर्षे राहणे झाले. तदनंतर ते उज्जैनीस राहू लागले. येथे त्यांचे सुमारे दहा वर्षे वास्तव्य होते. शिष्यसमुदाय बराच जमून त्यांच्यासाठी तेथे मठही बांधला गेला. इ. स. १७५९ च्या सुमारास एके दिवशी मठातून, कोणालाही वार्ता लागू न देता, ते जे बाहेर पडले ते पुन्हा परत आलेच नाहीत. त्यांच्या शिष्यमंडळीस त्यांच्या बिछान्यावर त्यांनी कागदावर लिहून ठेवलेले खालील पद आढळले : "दिसणें हें सरलें। अवघें प्राक्तन हें मुरलें॥ धृ. ॥ आलों नाहीं गेलों नाहीं, मध्यें दिसणें हे भ्रान्ति । जागृत होतां स्वप्नची हरपे । ना दिसणें हा मृत्यु म्हणा ॥ गैबिप्रसादें गैबचि झालें । आपआपणामधें लपलें ॥ २॥ म्हणे सोहिरा सत्रा चवदा । मधुमासाच्या नवम दिनीं । सगुण स्वरुपीं निर्गुण ठेले। अनुभव हरले स्वरुप कळ ॥ ४ ॥"

इ. स. च्या अठराव्या शतकात मराठी कवींकडून अध्यात्मपर असे

जे बरेच स्वतंत्र लेखन झाले त्यात सोहिरोबांच्या लेखनास प्रथम स्थान द्यावे लागेल. त्यांची कविता स्वानुभवयुक्त आहे. स्फुट कवितेखेरीज त्यांनी रचलेले ग्रंथ पुढीलप्रमाणे : १. *सिद्धान्तसंहिता*; २. *अक्षयबोध*; ३. *अद्वयानंद*; ४. *पूर्णाक्षरी*; ५. *महदनुभवेश्वरी*; ६. *चित्सुखानंद*. ह्यांपैकी पहिले पाच मुद्रित असून शेवटचा अमुद्रित आहे. तो सावंतवाडी येथील त्यांच्या वंशजाकडील संग्रही आहे असे कळते. हे सर्व ग्रंथ ओवीबद्ध आहेत. ह्याखेरीज, देहाच्या रचनेवर त्यांनी एक छोटी बखर गद्यात रचली (श. १६७२/इ. स. १७५०) ती *सोहिरोबांची बखर* ह्या नावाने प्रसिद्ध आहे.

सोहिरोबांच्या ग्रंथलेखनाला त्यांच्या वयाच्या ३४ व्या वर्षी प्रारंभ झाला असावा असे दिसते. *सिद्धान्तसंहिता* (पूर्वार्ध–उत्तरार्ध) हा पहिला ग्रंथ त्यांनी शके १६७० (इ. स. १७४८) मध्ये लिहिला. ह्यापुढे त्यांचे ग्रंथलेखन अखंडपणे चालले होते असे दिसते. *महदनुभवेश्वरी* हा त्यांचा शेवटचा ग्रंथ श. १६७२ (इ. स. १७५०) मध्ये लिहून झाला.

*सिद्धान्तसंहिता* हा ग्रंथ शके १६७० (इ. स. १७४८) मध्ये पूर्ण झाला. स्वतःच्या अनुभवाने प्रत्यक्ष अनुभविलेल्या संवित्-ज्ञानाचा सिद्धान्त ह्या ग्रंथात सोहिरोबांनी प्रतिपादिला आहे. प्रथम स्वरचित संस्कृत श्लोक व त्यावर स्वतःची मराठी टीका असे ह्या ग्रंथाचे मिश्र स्वरूप आहे. ग्रंथातील विषय वेदान्ताहून भिन्न नाही. ही मराठी टीका ओवीबद्ध आहे. संस्कृत श्लोक ७२९ व त्यांवर मराठी टीका ४९१७ ओव्यांची आहे. ग्रंथात संविदात्मस्वरूपयोग, भूतकर्मसंगम, त्रिविधतापकथन, आर्तजिज्ञास्वर्थार्थीमुमुक्षुलक्षणकथन, शमदमाभ्यासयोग इत्यादी विषय आले असून ते उपमादृष्टान्तांनी समजावून सांगितले आहेत. ग्रंथातील विवेचनात सर्वत्र सहजता आणि अलिप्तता आहे. सोहिरोबांनी ह्या रचनेत पराविद्यापारंगततेची परिसीमा गाठली आहे. [➪ ३.]

*अद्वयानंद*, *पूर्णाक्षरी*, *अक्षयबोध* असे तीन वेदान्तविषयावरील स्फुट ग्रंथ सोहिरोबानाथांनी लिहिले आहेत. ह्यांपैकी *अद्वयानंद* हा ८ प्रकरणांचा व ५५४ ओव्यांचा स्फुट ग्रंथ आहे. लेखनकाल शके १६७१ (इ. स. १७४९) आहे. पहिल्या 'विश्वरूप निजतत्त्वयोग' ह्या प्रास्ताविक प्रकरणात सगुण-निर्गुणाचा विचार आहे. कमलपुष्पात मकरंद आहे तसा देहात आत्मा आहे हे समजून घेण्याचा सोहिरोबा आग्रह करतात. 'स्थूलदेहनिरूपण' ह्या दुसऱ्या प्रकरणात मुख्य विषयाच्या निरूपणास आरंभ होतो. पुढील तीन-चार प्रकरणे पंचीकरणातील सिद्धान्तावर उभी आहेत. पाचव्या प्रकरणात निजतत्त्वाचे स्वरूप जाणून घेण्याने होणाऱ्या आनंदाचा महिमा वर्णिला आहे. ह्यानंतर त्यांनी हठयोग व राजयोग ह्यांतील भिन्नता स्पष्ट केली आहे. सहाव्या प्रकरणात 'सहजसमाधीच्या स्वरूपाचे' वर्णन आहे. सातव्या प्रकरणात माया-अविद्यादींचा विचार असून आठव्या प्रकरणात, सर्वत्र एक निजतत्त्व भरले आहे, अशा पूर्ण ज्योतीला जाणून घ्यावे व 'तेजी तेज देखोनि' स्वतःच्या ज्योतीत विरून जावे असे लिहून सोहिरोबानाथांनी हा ग्रंथ संपविला आहे.

*पूर्णाक्षरी* ह्या ग्रंथाची नऊ प्रकरणे असून ओवीसंख्या ४८९ आहे. ग्रंथाच्या आरंभी साक्षात्कारी साधू कसा ओळखावा असा प्रश्न करून त्याची उत्तरे दिली आहेत. बहुतेक ओव्यांच्या शेवटी 'असे तोचि साधु' असा चवथा चरण येतो. ही लेखनसरणी समर्थ रामदासांची आठवण करून देते. त्यातील आशयावर मात्र ज्ञानदेवांची छाप स्पष्ट उमटलेली आहे. दुसऱ्या प्रकरणात संसारात बुडालेल्या अज्ञानी पुरुषाचे वर्णन आहे. अशा अज्ञानी पुरुषाला, 'दांभिकपणाचा डोंगर', 'मोहकल्हारांचे सरोवर', 'कुतर्कांचा काका' असे म्हटले आहे. पुढील प्रकरणात भक्ती, ज्ञान, वैराग्य हे विषय आले असून त्यातील वर्णने दृष्टान्तयुक्त आहेत. जिथे ज्ञान आहे तिथे अज्ञान असू शकत नाही हे सांगताना सोहिरोबानाथांनी दृष्टान्तांचा अक्षरशः वर्षाव केला आहे. त्यावरून त्यांची कल्पनाशक्ती किती समर्थ होती ह्याची कल्पना येते. ह्यानंतर वैराग्य, विवेक, बोध व समाधी ह्या विषयांचे विवरण केले आहे. ज्ञानाने वैराग्य व वैराग्यानंतर विवेकाचा लाभ होतो हे जे त्यांनी म्हटले आहे ते चिंतनीय आहे. विवेकातून उत्पन्न होणारा बोध म्हणजेच अनुभव असे म्हणून ह्या प्रकरणाचा त्यांनी शेवट केला आहे. शेवटच्या प्रकरणात सद्गुरुमहिमा वर्णिताना सोहिरोबांच्या वाणीला भरते आले आहे. 'लेवुनि बोलाचा शृंगार' इत्यादी त्यांची काव्यचरणे ह्या दृष्टीने लक्षणीय आहेत.

ह्या ग्रंथात सावंतवाडीकडील भागात प्रचलित असलेले मराठी शब्द – ओंवणे, एकमुळा, शिवरु, देवारणे, पेणे इत्यादी – प्राचुर्याने आढळतात. सोहिरोबानाथांच्या सागरतीरावरील वास्तव्याची कल्पना देणारे दृष्टान्त पहा : 'की तारु चालते बंदरा। तोंचि सामिल झालिया वारा।' वा 'व्यापारा ना अगत्य। तरी द्वीपांतरा काय निमित्य ?।'

*अक्षयबोध* हा आठ प्रकरणांत विभागलेला व ४०८ ओवीसंख्या असलेला एक लघुग्रंथ आहे. आत्मस्वरूपाची प्राप्ती करून घेण्याचा साधनमार्ग दाखविण्याच्या उद्देशाने हा लिहिला आहे. स्वस्वरूपसमाधि राजयोग, स्वस्वरूप अद्वैतभाग, स्वस्वरूप ज्ञानयोग, सद्विवेक, स्वस्वरूपविवेक, स्वस्वरूपबोध लक्षण, मुक्तलक्षण निरूपण अशी ह्यातील प्रकरणांची नावे आहेत. त्यावरून ग्रंथाच्या स्वरूपाची कल्पना येऊ शकेल.

*महदनुभवेश्वरी* हा प्रचंड वेदान्तपर ग्रंथ गुरुशिष्यसंवादात्मक आहे. ग्रंथात स्वानुभवाचे रहस्य अठरा अध्यायांत कथन केले आहे. ग्रंथात पुढील विषय अध्यायानुक्रमाने आले आहेत : १ परमार्थयोग, २ परतत्त्वयोग, ३ स्वात्मप्रभादेवकीयोग, ४ महत्तत्त्वयोग, ५ गुणत्रययोग ६ पंचमहाभूयोग, ७ जीवेश्वरयोग, ८ कर्मयोग, ९ राजविद्याराजगुह्ययोग, १० ज्ञानयोग, ११ संन्यासयोग, १२ अभ्यासयोग, १३ राजयोग, १४ भक्तियोग, १५ वैराग्ययोग, १६ तत्त्वमसि महावाक्ययोग, १७ क्षराक्षर उत्तमपुरुषयोग, १८ पूर्वार्जित ईश्वरेच्छायोग. उपमा–दृष्टान्त देऊन विवेचन स्पष्ट करण्याची सोहिरोबांची पद्धती ह्या ग्रंथात प्रभूतपणे आढळते. अचलपदी राहून अद्वयसुखाचा सदोदित ब्रह्मानुभव घेणाऱ्या सोहिरोबांतील कवी, तत्त्वज्ञ, संत, ध्येयवादी साधक, योगारूढ सिद्ध, श्रद्धाशील उपासक, आत्मानुभवी महात्मा अशा अनेक रूपांचे दर्शन त्यांच्या ह्या काव्यग्रंथात घडते. [➪ ३.]

*सोहिरोबांची बखर* हा ग्रंथ म्हणजे देहाला किल्ल्याचे रूपक देऊन त्याचा धनी जो सच्चिदानंद परमात्मा त्याला धाडलेला खलिता आहे. ह्या खलित्याची सुरुवात पुढीलप्रमाणे : " करुणार्णव श्रीसच्चिदानंद स्वामींचे शेवेशीं, विज्ञापना वर्तमान आजतागायत स्वामिचरणातें सूचित समयीं स्वानुगतस्वहित भाव निजस्वामीचे कृपेकरून सेवकाच वर्तमान यायास्थित असे. यानंतर इकडील हकीकत. स्वामीची आज्ञा घेऊन निजसत्तेचा अंश शिरीं मुद्रा स्वीकारून असत्तेच्या ठायींहून गमनभावना केली, ते जर्जरा (जंजिरे) मुक्कामी येऊन पोंचलों. "

सोहिरोबांनी पाच हजारांहून अधिक पदे रचली होती असे सांगतात. त्यांची कविता श्लोक, सवाया, अभंग, आरत्या, कटिबंध अशा स्वरूपाची असून, पदे रागरागिणीने युक्त आहेत. त्यांचे पुढीलप्रमाणे वर्ग पडतात : (१) नामपर, (२) करुणापर, (३) उपदेशपर, (४) वेदान्तपर, (५) भगवत्स्वरूपपर, (६) संतमहिमापर, (७) सद्गुरुमहिमापर, स्फुट, (९) प्रासंगिक. कीर्तनकार, गवयी व गायिका सोहिरोबांच्या पदांचा आपापल्या कीर्तनात व गायनात पूर्वी फार मोठ्या प्रमाणात उपयोग करताना आढळत. ह्या कवितांचे काय किंवा पदांचे काय स्वरूप प्रामुख्याने पारमार्थिक आहे. त्यांना घडलेले सत्यदर्शन

व आलेला अनुभव त्यांत ओतप्रोत भरलेला आहे. त्यांचे एकेक परमार्थपर पद हा एकेक गीतबद्ध विचार आहे. त्यांची पदरचना ही चित्तरंजनासाठी नसून परमार्थबोधासाठी आहे; सद्गुरू आपल्या हृदयात घुसून जगदुद्धारासाठी बोध देववीत आहे अशी त्यांची भावना होती. 'म्हणे सोहिरा गुरुनाथ हा। माझ्या हृदयीं घुसून। जनांसि उद्धरावया कारणें। वचन सांगतो ठसून।' असे त्यांनीच आपल्या एका पदात म्हटले आहे. ह्या उक्तीस अनुसरूनच त्यांच्या कवितेचे मूल्यमापन करावे लागते.

**रचना : मु.** – १. अद्वयानंद; प्रक. १०, ओ. १००; र. श. १६७५; मुंबई, १९०७; २. अक्षयबोध; प्रक. ८, ओ. सं. ४८९; र. श. १९७१, र. स्थ. सावंतवाडी; ३. पूर्णाक्षरी; ओ. सं. ५००; मुंबई, १९०७; ४. महदनुभवेश्वरी, अ. १८, ओ. सं. ९०२२; र. श. १६७२; संपा. पै, भ. बा.; मुंबई, १९१०; ५ श्रीसोहिरोबानाथ; कवितासंग्रह; संपा. देशकुळकर्णी, वै. शि.; मुंबई, १९३३; ६. सिद्धान्तसंहिता; अ. १८, ओ. सं. सुमारे ५०००; र. का. : श. १६७०; मुंबई, १९०६; ७. स्फुट रचना – अभंग, पदे, सवाया, श्लोक, बखर इ. पारमार्थिक पद्यसंग्रह; भा. १, २, ३; मुंबई, १९०७; **अमु.** – चित्सुखानंद; पदसंख्या ४००० (अनुपलब्ध).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : सोहिरोबा आंबिये; मकच., खं. १; मुंबई, १९०७; पृ. ३७७–४०१. २. जोग, रा. श्री. : मवाइ., खं. ३; पुणे, १९७३; पृ. ६८–८१; ३. ढेरे, रा. चिं. : गोचप.; पुणे, १९५९; पृ. १८४–१८६. ४. पांगारकर, ल. रा. : सोहिरोबानाथ अंबिये; मुमुक्षु; सप्टें. १९२१; पृ. १२; ५. पै, रा. म. : योगीराज श्रीसोहिरोबानाथ, दीपावली, १९६०.

**० स्टीफन्स, फादर** – पहा **टॉमस स्टीफन्स.**

**० स्टीव्हन्सन, रे. डॉ. जॉन** – पहा **(रे. डॉ.) जॉन स्टीव्हन्सन.**

**स्वरूपानंद** [का. अनु.] कवी. गुरू : सच्चिदानंद. कवीचे पूर्वाश्रमीचे नाव वासुदेव होते.

**रचना : अमु.** – १. गीतासार; २. हरिहरसंवाद; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १४३.

**स्वात्मामृत रघुनाथ** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**स्वानंदस्वामी / ० सिद्ध स्वानंद कल्याण** [का. अनु.] कवी. समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील ७५७ क्रमांकाच्या बाडात ह्यांची काही पदे आहेत. त्यातील संतांची काळजी घेण्यासाठी देवास विनविणारे पद शं. श्री. देव ह्यांनी छापले आहे (रासं., खं. २, पृ. १२१). पदाच्या शेवटच्या ओळीत 'स्वानंदस्वामी' असे स्वतःचे नाव कवीने घातले आहे. ह्यांची २०–२५ पदे बाडात उपलब्ध आहेत. ह्यांच्या 'नमियेली रामदास माउली' ह्या एका पदाचा निर्देश डॉ. हर्षे ह्यांनी केला आहे (भाइसंमत्रै., व. २६, अं. ३, पृ. ४८).

**स्वामी** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**स्वामीदास / ० स्वामीदासी** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक अखेर] रामदासी कवी. कल्याणस्वामींचे शिष्य. ह्यांचा मठ तेलंगसी (जि. अहमदनगर) ह्या गावी होता. हा रामदासी मठ स्वामीदासांनी स्थापिला व तेथेच समाधी घेतली. ह्यांच्या कवितेपैकी श्रीरामस्तवनपर सवाया ३६, पाच आरत्या (पैकी १ समर्थांवर; मु. : सवामं. बा. ९५) व पदे अशी रचना समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील बाडात उपलब्ध आहे. कवीच्या रचनेत जे त्रोटक उल्लेख आले आहेत, त्यांवरून त्यांची रामोपासना व समर्थभक्ती प्रत्ययास येते.

**० स्वामीदासी** – पहा **स्वामीदास.**

**० हजरत लाडले मशायख** –पहा **राघवचैतन्य.**

**हनुमंत–१** [का. अनु.] पदकार.

**रचना : मु.** – कृष्णपर पद; पदसंग्रह, भा. ३; संपा. ओक, बा. दा.; मुंबई, १९०१; पृ. ९३–९४.

**हनुमंत–२** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – दुर्गेची व गणपतीची आरती; मआ., पृ. ३३०, ३३५.

**हनुमंतगिरी / ० हनुमानगिरी** [अंदाजे श. १७०२ / इ. स. १७८०] कवी. देवगिरीच्या (जि. औरंगाबाद) परिसरातील शिवालय ऊर्फ वेरूळ येथे राहणारे. तीर्थाच्या पश्चिमेकडे ह्यांचा मठ होता. गुरू : हिरापुरी. त्यांचा उल्लेख *शिवालय माहात्म्य* अ. २३ मध्ये पुढीलप्रमाणे आला आहे : "आचार्य सद्गुरु हिरापुरी, जो सच्चिदानंद ब्रह्मावतारी, निवास ज्याचा 'शिवनद' तीरीं, बोरसर-बहिग्रामीं ॥ ३०७ ॥" हिरापुरींचा समाधिकाल बहिरगांव येथील त्यांच्या समाधिशिळेवर श. १६७८ (इ. स. १७५६) असा दिला आहे. त्यावरून हनुमंतगिरी शा. श. १७ व्या शतकाच्या चतुर्थ पादात विद्यमान होते हे निश्चित होते. ह्यांचे आजेगुरू खेमपुरी हे ता. कन्नड (जि. औरंगाबाद) पासून पश्चिमेस १२ मैलांवरील जोडबोरसर गावी मठ बांधून राहिले होते. खेमपुरी हे स्वतः साक्षात्कारानुभवी होते. त्यांचेच ज्ञानवान शिष्य हिरापुरी होत. खेमपुरी > हिरापुरी > हनुमानगिरी अशी ह्यांची परंपरा आहे. हनुमानगिरींनी आपले परमार्थगुरू म्हणून जीवन्नाथ दौलताबादकर ह्यांचा व विद्यागुरू म्हणून हिरापुरींचा उल्लेख ग्रंथात केला आहे.

*शिवालय-वेरूळ-माहात्म्य* हा ग्रंथ हनुमानगिरींनी वेरूळ मुक्कामी आपल्या मठात पूर्ण केला. ह्या ओवीबद्ध ग्रंथाचे ३३ अध्याय असून भाषा प्रौढ व अलंकारिक आहे. ग्रंथात हिरापुरी, वेरूळ, घृष्णेश्वर व समातिशक ह्यांसंबंधी उल्लेख येतात ते असे : 'श्री गुरु हिरापुरी ब्रह्महिरा, मम अंतःकरण प्रकाशीं बरा, . . . श्रीगुरुजीवनतीरीं घृष्णेश्वरु। हनुमंतगिरीचा तो भवतरु। हरिहरगुरुरूपे ऐक्य विचारु। वेदश्रुती बोलती ऐसें ॥ शके सत्राश वरी दोन, श्रावण वद्य ५ रवीदिन, अश्विनी नक्षत्र शिवस्थान, तेथें ग्रंथपूर्णत्वें ॥ २०५ ॥' प्रस्तुत ग्रंथ अप्रकाशित असून त्याचे हस्तलिखित वि. बा. जोशी (कन्नडकर) ह्यांच्या संग्रही आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, वि. बा. : कांही ऐतिहासिक संतकवींची माहिती; विद्यासेवक, व. ५, अं. ३, जून १९२८; पृ. १७–२२.

**हनुमंतस्वामी** [इ. स. चे १८ वे शतक] बखरकार. हे रामदासांच्या वडील बंधूंच्या म्हणजे श्रेष्ठांच्या नातवाचे नातू. श. १७०५ (इ. स. १७८३) मध्ये चाफळ संस्थानचे मठाधिपतित्व ह्यांजकडे आले. ह्यांनी रचलेली *समर्थांची बखर* त्यांच्या नावावर प्रसिद्ध असली तरी ती त्यांनी स्वतः लिहिलेली नाही. त्यांच्या आज्ञेवरून चाफळ संस्थानचे कारभारी रंगो लक्ष्मण मेढे ह्यांनी जुनी सांप्रदायिक कागदपत्रे पाहून ती प्रथम श. १७१५ (इ. स. १७९३) मध्ये तयार केली व पुढे श. १७४० (इ. स. १८१८ मध्ये) मल्हार रामराव चिटणीस ह्यांच्या मदतीने ती सुधारून वाढविली. रामदासांचे नातू गंगाधरस्वामी ह्यांनी रचलेल्या *समर्थचरित्रा*धारे ही बखर लिहिण्यात आल्याचे बखरकार सांगतात. हिची एक जुनी मोडी प्रत उपलब्ध आहे (सवामं. बा. २६). 'हनुमंतस्वामींनी सांगितलेली मूळची बखर ती हीच होय' असे शं. श्री. देव सांगतात. *समर्थांच्या बखरी*चे प्रथम मुद्रण इ. स. १८७० मध्ये झाले. दुसरी आवृत्ती इ. स. १८८८ त मुद्रित झाली. धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेने ही बखर १९५० साली पुन्हा प्रसिद्ध केली. ही मुद्रित बखर म्हणजे वर निर्दिष्ट केलेली श. १७४० त तयार झालेली प्रत होय. ह्या प्रतीत श. १७११ तली मूळची बखर स्वतंत्र प्रसिद्ध केली आहे. प्रस्तुत बखरीस *श्रीरामदासस्वामी समर्थांचे चरित्र* असे नाव दिले आहे. पण *श्रीसमर्थांची* व विशेषतः *बखर हनुमंतस्वामींची बखर* ही बखरीची नावे अधिक रूढ आहेत.

ह्या बखरीतील शकतिथींची माहिती *समर्थवाकेनिशी* ह्या विश्वसनीय टिपणांवरून घेतलेली दिसते. इतर हकीकत चाफळ मठातील पूर्वपरंपरागत माहितीवरून व ऐकीव माहितीवरून घेतली आहे. बखरीमधील अतिशयोक्तीचा काही भाग सोडल्यास हे वृत्त विश्वसनीय आहे असे *समर्थचरित्रकार* स. खं. आळतेकर म्हणतात. ह्या चरित्रातील, शिवाजीने समर्थांचा निरोप घेतला तो प्रसंग व समर्थांच्या निर्वाणाचा प्रसंग हृद्य आहेत. वर्णनात बखरकाराचे निवेदनकौशल्य प्रत्ययास येते. भावनेचा जिव्हाळा आणि वर्ण्य विषयाशी तादात्म्य ह्या गुणांमुळे बखर वाचनीय झाली आहे. [ ➪ ३. ] ऐतिहासिक व सांप्रदायिक दृष्टयाही ती महत्त्वाची आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ग्रामोपाध्ये, गं. ब. : बखरवाङ्मय : श्रीरामदासस्वामीचे चरित्राची बखर; संपा. जोग, रा. श्री.; मवाइ., खं. ३; पुणे, १९७३; पृ. ५३१–३३. २. हेरवाडकर, र. वि. : श्रीसमर्थांची बखर; मव., द्विआ., पुणे, १९७५; पृ. १७०–१७३.

**हनुमदात्मज** [इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध] चरित्रकार. ह्यांचे मूळ नाव कृष्ण. ह्यांचा जन्म बेदर येथे झाला. वडिलांचे नाव हनुमंतराव. आईचे नाव काशीबाई. कुलदैवत प्रेमपूरचा म्हाळसाकांत. हे आनंदसंप्रदायी पूर्णानंद नारायणांच्या परंपरेतील अनुग्रहित असून, ह्यांचे वडील व आजोबा सुद्धा ह्याच परंपरेतील होते. ती परंपरा अशी : पूर्णानंद नारायण > शिवराम पूर्णानंद > राजमणी > वैकुंठबाबा > केशव > हनुमंतराव > कृष्ण तथा हनुमदात्मज. हनुमदात्मजांना व्यवसायानिमित्त भागानगरास जावे लागले. तेथेच पूर्णानंदांचे वंशज गुंडोबाबा ह्यांच्या प्रेरणेने हनुमदात्मजांनी *पूर्णानंदचरित्र* (ओ. २५३) लिहिले. ही चरित्रविषयक माहिती गुलबर्गा येथे उपलब्ध झालेल्या हनुमदात्मजविरचित *पूर्णानंदचरित्राच्या* संपूर्ण प्रतीत शेवटी आलेली आहे.

कल्याणी येथे होऊन गेलेले आनंदसंप्रदायी प्रख्यात सत्पुरुष पूर्णानंद नारायण आणि त्यांचे पुत्र व शिष्य शिवराम पूर्णानंद ह्यांची चरित्रे ह्या ग्रंथांत मुख्यत्वे येतात. ह्या चरित्रग्रंथाचे १८ अध्याय आहेत. हा ग्रंथ श. १७५३ (इ. स. १८३१) मध्ये पूर्ण झाला. कल्याणीच्या आनंदसंप्रदायाचा इतिहास त्यात संक्षेपाने आला आहे. स्वतः हनुमदात्मज हे ह्याच परंपरेतील असल्यामुळे सारे लेखन आपुलकीने केलेले आढळते. ऐतिहासिक दृष्टया महत्त्वाची अशी माहिती ह्यात मिळते. हनुमदात्मजांनी शिवराम पूर्णानंदांच्या ग्रंथाचा नीट अभ्यास केला होता असे ग्रंथातील उल्लेखावरून दिसते. शिवराम पूर्णानंदांच्या *वंशावळी* नामक अप्रसिद्ध ग्रंथाचा हनुमदात्मजांनी ह्या ग्रंथात उल्लेख केला आहे. ग्रंथाच्या भाषेवर कानडीचा बराच प्रभाव आढळतो.

हनुमदात्मजांनी लिहिलेला दुसरा ग्रंथ म्हणजे *दासोपंतचरित्र*. हे चरित्र *महाराष्ट्र कवि* ह्या मासिकात वि. ल. भावे ह्यांनी प्रसिद्ध केले होते. पण त्यात कर्त्याच्या नावाचा निर्देश नव्हता. प्रस्तुत चरित्राची बावगी (बेदर) येथे आणखी एक प्रत न. शे. पोहनेरकर ह्यांना मिळाली आहे. तीत वरील छापील प्रतीपेक्षा २११ ओव्या जास्त असून, ग्रंथ १२ अध्यायांमध्ये विभागला आहे. ह्या प्रतीत कर्ता म्हणून हनुमदात्मजांचे नाव येते.

दासोपंत आपल्या घरून निघाल्यानंतर माहूरला कसे गेले, तेथून साक्षात्कार झाल्यानंतर नांदेड वगैरे गावे करीत राक्षसभुवनाला कसे आले इत्यादी सर्व माहिती ह्यात दिलेली आहे. अर्थात पूर्वपरंपरेनुसार ह्या चरित्रात आख्यायिकांना स्थान आहेच. ह्या चरित्रासंबंधी आपले मत व्यक्त करताना *दासोपंतांची पासोडी* ह्या ग्रंथाचे संपादक न. शे. पोहनेरकर म्हणतात : "अद्भुततेचा भाग वजा केल्यानंतरही प्रस्तुतच्या चरित्राने दासोपंतांच्या व्यावहारिक जीवनाची आपणास पुष्कळच माहिती मिळते. अशा स्थितीत पांगारकरांनी ह्याला 'अविश्वसनीय आणि बनावट' का म्हणावे ते आमच्या लक्षात येत नाही." (प्रस्ता., पृ. ५–६). ह्या चरित्रावरून दासोपंतांचा जन्मकाळ श. १४७३, भाद्रपद वद्य ८ हा निश्चित होतो. मराठीतील चरित्रग्रंथांच्या परंपरेत हनुमदात्मजांचे स्थान वरील दोन महत्त्वपूर्ण अशा चरित्रांनी निश्चित केले आहे.

**रचना : मु.** – श्रीदासोपंतचरित्र; ओ. सं. ७७८; संपा. भावे, वि. ल.; महा. कवि, १९२७, क्रमशः (जस्टिन ई. ॲबट ह्यांनी *दि पोएट सेंट्स ऑफ महाराष्ट्र* ह्या मालेच्या ४ थ्या भागात ह्याचे इंग्रजी भाषान्तर छापले आहे). **अमु.** – पूर्णानंदचरित्र; अ. १८; ओ. सं. २८२१; र. का. : श. १७५३, खरनाम संवत्सर, चैत्र शु. १५; र. स्थ. : भागानगर.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, ना. ब. : एक प्राचीन संतचरित्रकार : हनुमदात्मज; इंद्रायणी, मार्च, एप्रि. १९६४; पृ. १३–१८. २. पोहनेरकर, न. शे. (संपा.) : प्रस्ता., श्रीदासोपंत : चरित्र आणि वाङ्मय; दासोपंतांची पासोडी; हैद्राबाद; पृ. ३–६.

**० हनुमानगिरी** – पहा हनुमंतगिरी.

**हयग्रीवाचार्य** [इ. स. चे तेरावे शतक] महानुभाव कवी. हे गोदावरीच्या काठी राक्षसभुवन येथे राहात असत. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. ह्यांचे मूळ नाव हिरण्यगर्भभट्ट. वडिलांचे नाव माधवभट्ट. आई कावेरी. वडिलांप्रमाणे हिरण्यगर्भभट्ट विद्वान होते. हे शास्त्रही उत्तम जाणीत. ह्यांचा जन्मसन डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी १२६५ व वि. ल. भावे ह्यांनी १२७५ असा दिला आहे. बालपणापासून ह्यांचा *भगवद्गीतेकडे* व श्रीकृष्णभक्तीकडे ओढा होता. *भागवताचा दशमस्कंध* नित्य पठणात असे. हिरण्यगर्भभट्ट हे काशीयात्रेस जात असता विदर्भात पार्श्वनाथांचे शिरपूर येथे गोपाळपंडित ऊर्फ आनेराज व्यास ह्यांची आणि त्यांची गाठ पडली. तेथे त्या दोघांची धर्मचर्चा झाली. देवताधर्मापेक्षा परमेश्वरधर्म श्रेष्ठ ही गोपाळपंडितांची धर्मदृष्टी हिरण्यगर्भभट्टांना पटली. त्यांनी गोपाळपंडितांचे शिष्यत्व इ. स. १३०९ मध्ये पत्करिले. गुरूपदेशानंतर हिरण्यगर्भपंडितांचे हयग्रीवाचार्य झाले. ह्यानंतर त्यांनी पैठणास वास्तव्य केले व तेथेच श. १२४६ (इ. स. १३२४) च्या सुमारास ते स्वर्गवासी झाले. वरील हकीकतीस *स्मृतिस्थळ* व *नागदेवाचार्यस्तुति* ह्या ग्रंथांतील लीळांचा आधार सापडतो.

*स्मृतिस्थळ*, *वृद्धाचार* ह्या ग्रंथांत ह्यांच्या *गद्यराज* (स्तोत्रकथा) ह्या श्लोकबद्ध रचनेचे निर्देश आढळतात. बोपदेवशिष्य भीष्माचार्यांनीही *गद्यराज* ह्या नावाचे एक काव्य लिहिले आहे. हे काव्य वि. का. राजवाडे ह्यांनी *ग्रंथमाला* ह्या मासिकातून प्रसिद्धही केले होते. ते *गद्यराज काव्य* व हे *गद्यराज स्तोत्र* ह्या दोन भिन्न रचना आहेत.

हयग्रीवाचार्यांनी पाठाकरिता *भागवताच्या दशम स्कंधाच्या* आधारे श्लोकबद्ध मराठी टीका (र. का. : अंदाजे इ. स. १३०९ ते १३२४) रचली तीस *गद्यराज* त्यांनी असे नाव दिले. ह्या स्तोत्राचे २३९ श्लोक (अनेकवृत्तबद्ध) आहेत. पहिल्या दोन श्लोकांत पंचकृष्णांना नमन येते. काव्याचा आरंभ वसंततिलका वृत्ताने होतो. शेवटचा श्लोक स्रग्धरा वृत्तातील असून कविता निर्यमक आहे. श्लोक ४ ते २३१ पर्यंत श्रीकृष्णचरित्र वर्णिले आहे. नंतर थोडक्यात दत्तात्रेयचरित्र, चांगदेव राऊळ, गोविंदप्रभू ह्यांच्या लीळा वर्णन केल्या आहेत. पुढील सर्व श्लोक चक्रधरप्रभूंच्या लीळा व मूर्तिवर्णन ह्यांचे आहेत. 'निर्वाणीचा क्षेमदाता' असे स्वामींचे वर्णन २७९ व्या श्लोकात कवी करतो. श्रीकृष्णचरित्रातील शृंगाररसापेक्षा वीररसाचे दर्शन प्रस्तुत काव्यात अधिक आढळते. ह्यात कंस-श्रीकृष्ण, रुक्मी-श्रीकृष्ण ह्यांच्यातील चटकदार संवाद व कवीने आवडीने रंगविलेले

मल्लयुद्धवर्णन ह्यांचा समावेश आहे. काव्याचे वळण संस्कृत परंपरेला अनुसरून आहे तरी त्यांत जुने शब्द, जुने वाक्प्रचार, जुनी रूपे विपुल आढळतात. पंथीयांमध्ये प्रस्तुत काव्यास बरीच मान्यता असून त्यावरचे दोन टीपग्रंथही सापडतात. एक जुने महानुभावी काव्य म्हणून वाङ्मयेतिहासात ह्या ग्रंथाचे स्थान महत्त्वाचे आहे. [ ⇨ ३.]

**रचना : मु.** – गद्यराज-स्तोत्र; श्लो. सं. २७९; (१) संपा. कानडे, बाळकृष्ण दादा; सोलापूर, १९०८; (२) संपा. देशपांडे, ज. शा. : कृष्णदास महानुभाव; प्रामक., खं. ४; मुंबई, १९६५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, ज. शा. : कृष्णदास महानुभाव; श्रीगद्यराज स्तोत्र; प्रामक., खं, ४; मुंबई, १९६५; प्रस्ता., पृ. १–६. २. नेने, ह. ना.; हयग्रीवाचार्यकृत 'गद्यराज'; संलेसं., भा. १; नागपूर, १९५७; पृ. १६८–१८३.

**हरदास** / ० **हरिहरदास–१** [अंदाजे श. १६२५ / इ. स. १७०३ – श. १६७५ / इ. स. १७५३] कवी. शिष्य पुरुषोत्तम. ह्यांच्या स्फुट कवितेचे एक बाड उपलब्ध झाले आहे. त्यात ह्यांची अजपा पिंडीची ९ पदे, अजपा ब्रह्मांडीची ११ पदे, पाची तत्त्वे ७ पदे व मुंगीचे पद ४ पदे उपलब्ध आहेत. *गोपीवस्त्रहरण* नामक ह्यांच्या लावणीच्या चालीच्या २९ पदांत चंद्रवदना गवळणीच्या वस्त्रहरणाची कथा आली आहे. *राधा-रुक्मिणीसंवाद* (पदे ११) ह्या रचनेत रुक्मिणी राधेचा संशय घेऊन तिला छेडते, हा प्रसंग वर्णन केला आहे. *अनुसयाआख्यानात* (१८ पदे) दत्तजन्मकथा आलेली आहे. ह्यांची रामायणावरील रचनाही उपलब्ध आहे. *अंगदशिष्टाई* काव्याचे दोन प्रसंग असून एकात २५ पदे व दुसऱ्यात ३२ पदे आहेत. शेवटी "एथन सुंदरकांड संपले । मग येउधाकांड आरंभलें । जे कां वाल्मीकें कथीलें । तें म्हणे हरिहरदास ॥ ३२ ॥" असे हे म्हणतात. त्यावरून ह्यांनी सबंध रामायण रचले असावे, असे अनुमान करता येते. *रामकीर्तना*तील ३० पदांमध्ये रामरावणयुद्धाची कथा येते. ह्यांनी रावणाचा वध न घडविता तो युक्तीने पळून गेला असे दाखविले आहे. ह्या आख्यानात *वाल्मीकिरामायणा*पेक्षा काही निराळी कथा आढळते. *निराकाराची खूण* (पदे ११) ह्या प्रकरणात स्थूल-सूक्ष्म-विचार सांगितला आहे. निराकाराची खूण दाखवता येत नाही, त्याचा फक्त अनुभव घेता येतो, त्याकरिता अहंकार नष्ट करावा लागतो – असा उपदेश, ह्या प्रकरणात, हे आपला शिष्य पुरुषोत्तम ह्यास करतात. ह्यांच्या *दिवा* (२ पदे) ह्या रचनेत ज्ञानाचा दिवा लावून निजवस्तू शोधा असे सांगितले आहे. ह्यांचे *सुलताण का सफर* (५४ पदे) नामक एक हिंदी प्रकरण उपलब्ध आहे. त्यात हे स्वतःचा उल्लेख 'बोले हरदास स्याहिर ।' अशा शब्दांत करतात.

हा कवी उत्तम लावणीकार वा शाहीर असावा. ह्यांच्या लावणी-वजा रचनेवरून १८ व्या शतकाच्या अगोदरही मनोरंजक शाहिरी वाङ्मय अस्तित्वात होते, हे लक्षात येते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, ना. ब. : एक अज्ञात कवि : हरदास; मसंप., जुलै १९६६; पृ. ७१–७४.

**हरि–१** (**अंगापूरकर**) [अंदाजे इ. स. १७५२ – ? ] नाथ-संप्रदायी कवी. अंगापूर (जि. सातारा) हे ह्यांचे मूलस्थान. पिता गोपाळ, माता यमुना, उपनाव देशमुख. गोत्र वासिष्ठ. गुरु : हरिनारायण. ह्यांची गुरुपरंपरा : श्रीसदानंद > सच्चिदानंद > ब्रह्मारण्य > नारायण-भट्ट > नारदाचार्य > आनंदाचार्य > सहजानंदाचार्य > हरिनारायण > हरि अंगापूरकर. ह्यांनी हरिनारायणांप्रमाणेच सदाशिवनंदाचार्य ह्या नावाच्या दुसऱ्या एक सत्पुरुषापासूनही उपदेश घेतला होता, असे हे स्वतःच लिहितात. उपदेश केव्हा व कुठे घेतला ह्याबद्दल माहिती मिळत नाही. स्वतःच्या श्रद्धेप्रमाणे गुरूच्या आज्ञे-नुसार बदरीकेदार येथे ते गेले असता त्यांनी *श्रीकेदारविजय* ग्रंथ लिहावयास घेतला व तो चार महिने दहा दिवस एवढ्या अल्प काळातच पूर्ण केला. ह्या ग्रंथाव्यतिरिक्त त्यांनी, आपल्या पित्याच्या इच्छेवरून, *उद्योग* व *भीष्म* अशी महाभारताची दोन पर्वे रचल्याचा उल्लेख प्रस्तुत ग्रंथाच्या प्रारंभीच्या अध्यायात आला आहे.

*केदारविजय* ग्रंथात 'केदारनाथ' नावाचा जो एक नाथसंप्रदायी अवतारी पुरुष होऊन गेला, त्याचे चरित्र *अग्निपुराण*, *भविष्योत्तरपुराण* इ. ग्रंथांच्या आधारे वर्णिलेले असून शिवाय नाथांचे चमत्कार, भक्तांचे उद्धार ह्यांची वर्णने आहेत. मुकुंदराजाच्या *विवेकसिंधु* ग्रंथाचा त्यांनी ठिकठिकाणी उल्लेख केला आहे. ह्याशिवाय *गुरुचरित्र*, *भावार्थरामायण*, *एकनाथी भागवत*, *दासबोध* ह्या ग्रंथांचे उल्लेख व अनेक सत्पुरुषांचे स्मरण कवीने केले आहे.

"कवीची वाणी प्रासादिक, प्रौढ व हृदयंगम आहे. विशेषतः प्राकृत कवि श्रीमत्कृष्णदयार्णव याच्या भाषेचें व रचनाशैलीचें या कवीनें अनुकरण करण्याचा प्रयत्न केला आहे." (ज. र. आजगांवकर; मकच., खं. १; पृ. ४०६). ह्यांच्या *केदारविजय* ग्रंथाचे मुद्रण झालेले आहे. *उद्योग* व *भीष्म* ही पर्वे मात्र उपलब्ध नाहीत.

**रचना : मु.** – केदारविजय; अ. ३५; ओ. सं. ६११०; बेळगाव, १८९४.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : हरि अंगापूरकर; मकच., भा. १; मुंबई, १९०७; पृ. ४०३–४०८.

**हरि–२** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. छन्दमालिका; २. सप्तश्लोकीगीता (सटीक); भाइसमं. हस्त. सू., पू. अनु. ९८, ३०९.

**हरि–३** [का. अनु.] आरतीकार.

**रचना : मु.** – यशवंत, जगदंबा ह्यांवरील एक एक व दत्तावरील दोन अशा चार आरत्या; मआ., पृ. ३२१, ३६४, ३६७, ३९७.

**हरि–४** [का. अनु.] पदकार. ह्यांचे 'सच्चित्सुखरूप पूर्ण सनातन पावना रामा' असे एक रामचरित्रकथा सांगणारे पद शं. श्री. देव ह्यांनी छापले आहे. कवी रामदासी परंपरेतील असावा (सवामं. बा. २०७, हस्त. सू., खं. १).

**हरि–५** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – प्रभाती पद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हरि कवि–१** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – १. आत्मनिरूपण; श्लो. २३; अकलकामा., भा. ३; संपा. केळकर, ना. चिं.; मुंबई, १९०२; पृ. १२९–१३२. २. एक पद; पदसंग्रह, भा. ३; संपा. ओक, वा. दा.; मुंबई, १९०१; पृ. ९१.

**हरि कवि–२** [इ. स. चे १९ वे शतक, प्रथम पाद] कवी. रामदासी परंपरेतील हरि कवि व त्यांचे शिष्य नरहरिदास हे कोरेगाव येथे पेशवाईअखेरच्या काळात होऊन गेले. ह्यांनी अभंगांत *रामायण* व *श्रीसमर्थचरित्र* वर्णिले आहे (सवामं. बा. १६४९, हस्त. सू., खं. २).

**हरि कवि–३** [का. अनु.] कवी. उपनाव महाजन.

**रचना : अमु.** – पतिव्रताधर्म; पृ. १६; श्लो. सं. १८५; तंसम. हस्त. यादी, क्र. १, २.

**हरि कवि–४** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. कनकपद्य. २. शुकरंभासंवाद. ३. पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. १.

**हरिकिंकर धुंडिराज पुरंदरे** [का. अनु.] कवी. ह्यांची भजने उपलब्ध आहेत (कृ. गं. कवचाळे; मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४३).

**हरि केशवजी** / ० **पाठारे, हरि केशवजी** [इ. स. १८०४ – ११ जुलै १८५८] भाषान्तरकार. हरि केशवजी हे अव्वल इंग्रजी कालखंडात

प्रामुख्याने भाषान्तरकार म्हणून प्रसिद्ध. सोमवंशी क्षत्रिय पाठारे ज्ञातीतील एक प्रसिद्ध विद्वान गृहस्थ. ह्यांचा जन्म इ. स. १८०४ साली मुंबईतील गिरगाव येथे झाला. गिरगावातील त्यांच्या जातीची जी काही प्रमुख जुनी घराणी होती, त्यांपैकी एक हरि केशवजी ह्यांचे होते. ह्यांच्या घराण्याचे उपनाव पुरव. ह्यांचे आजे गोपाळजी सोनजी हे धर्मनिष्ठ असून शामराज महाराज केसकर ह्यांस त्यांनी गुरू केले होते. गोपाळजींचे ज्येष्ठ चिरंजीव केशवजी. हेच हरि केशवजींचे वडील. ते वास्तुशास्त्रात प्रवीण असून घरे बांधण्याचे काम करीत. हरि केशवजींचे प्राथमिक शिक्षण शाळेअभावी त्यांचे आजोबा गोपाळजी व मामा त्रिंबकजी ह्यांच्याकडून घरातच झाले. पुढे स्कॉटलंडहून आलेल्या मिशनऱ्यांनी काढलेल्या रे. रॉबर्ट मनी ह्यांच्या इंग्रजी शाळेत हरि केशवजी गेले. ह्यांना जुनी मराठी कविता बरीच मुखोद्गत होती. ह्यांची तैलबुद्धी आणि विद्याव्यासंग पाहून रे. केनी ह्यांनी त्यांस उच्च प्रतीचे इंग्रजी शिक्षण दिले. शिक्षण पूर्ण झाल्यानंतर कॅप्टन जर्व्हिस ह्यांच्या देखरेखीखाली जी एक इंजिनिअरिंग शाळा निघाली तेथे इ. स. १८२९ मध्ये मुख्य कारकून म्हणून ह्यांची नेमणूक झाली. त्याच वेळी बाबा व्यास ह्या प्रसिद्ध शास्त्र्यांजवळ ह्यांनी नोकरी सांभाळून संस्कृतचा अभ्यास केला. ह्यानंतर काही काळ ठाणे, सोलापूर येथील कोर्टांत काम केल्यानंतर त्यांनी मुंबईच्या हायकोर्टात चीफ ट्रान्सलेटरचे काम पत्करले. अखेरपर्यंत ते ह्याच पदावर होते. आपला नित्याचा व्यवसाय व लेखन सांभाळून ते सार्वजनिक कार्यातही भाग घेत असत. इ. स. १८५८ च्या जुलैच्या ११ तारखेस वयाच्या ५४ व्या वर्षी हे निवर्तले.

मराठी व इंग्रजी ह्या दोनही भाषांचे ह्यांचे अध्ययन आणि प्रवीणता सारखीच असल्याने एक उत्कृष्ट भाषान्तरकर्ते म्हणून अव्वल इंग्रजी काळात ह्यांना प्रसिद्धी मिळाली.

एतद्देशीय लोकांत विद्याप्रसार व्हावा ह्या उद्देशाने ज्या योजना इंग्रज राज्यकर्त्यांनी आखल्या व त्यासाठी जे भाषान्तरित ग्रंथ तयार करण्यात आले, त्या कामगिरीत हरि केशवजींचा वाटा फार मोठा आहे. शालेय व अन्य शिक्षणासाठी उपयुक्त अशी पुस्तके 'नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी' ही संस्था भाषान्तरित करीत असे. ह्या संस्थेच्या व्यवस्थापक मंडळीत हरि केशवजी होते (इ. स. १८३१–५१). *सिद्धपदार्थविज्ञानशास्त्रविषयक संवाद, रसायनशास्त्र, इंग्लंडचा वृत्तान्त, यात्रिकक्रमण, नीतिग्रंथ, देशव्यवहारव्यवस्था* [ ⇨ ३ ] आणि *शास्त्रीय ज्ञानदर्शन* हे त्यांचे सर्वच ग्रंथ मूळ इंग्रजी ग्रंथांवरून भाषान्तरित केले गेले आहेत. ह्यांपैकी *यात्रिकक्रमण* व *नीतिग्रंथ* ही पुस्तके विशेष नावाजली जातात. ग्रंथांची भाषा सोपी आणि प्रौढ असून इंग्रजीवरून भाषान्तर केले हे न जाणवण्याइतकी सहजता त्यांत आहे, अशी ह्यांच्या ग्रंथांची स्तुती केली जाते. आजमितीस हे ग्रंथ दुर्मिळ झाले आहेत. अव्वल इंग्रजी कालखंडातील बापू छत्रे हे वगळल्यास हरि केशवजींच्या तोडीचा भाषान्तरकार झाला नाही.

**रचना : मु.** – १. इंग्लंडाचा वृत्तान्त; मुंबई, १८३८. २. चेंबर्सकृत शालोपयोगी नीतिग्रंथ यांचें महाराष्ट्र भाषान्तर; मुंबई, १८४६. ३. देशव्यवहारव्यवस्था; मिसेस मॅरेटकृत 'कॉन्व्हरसेशन्स' व मिलकृत 'पोलिटिकल इकॉनमी' यांचे आधारे; १८५४. ४. यात्रिकक्रमण : इहलोकापासून परलोकास; जॉन बनियनकृत 'पिलग्रिम्स प्रोग्रेस' चे भाषान्तर; मुंबई, १८४१. ५. रसायनशास्त्रविषयक संवाद; 'कॉन्व्हरसेशन्स ऑन केमिस्ट्री' या पुस्तकाचे भाषान्तर; मुंबई, १८३७. ६. शास्त्रीय ज्ञानदर्शन; संग्रा. संपा. भाटवडेकर, कृष्णशास्त्री; मुंबई, १८५६. ७. शिक्षालाभ – निबंध; १८५४; ८. सिद्ध पदार्थविज्ञानशास्त्रविषयक संवाद; मुंबई, १८३३.

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : १. खानोलकर, गं. दे.; पाठारे, हरि केशवजी; अमवा., खं. ३; मुंबई, १९४९; पृ. ९१–९८. २. रामचंद्र हरि : हरि केशवजी यांचे चरित्र; मुंबई, १९११.

**हरिजन** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – ब्रह्मसाक्षात्कार; ले. श. १६४८; कासं. **अमु.** – १. ब्रह्मप्रकाश. २. मगरीहनुमंत भेट (शं. श्री. देव संग्रह); संककासू., पृ. ११८.

**हरिदास–१** [का. अनु.] कवी. ह्यांनी 'हरे राम' हा चवथा चरण असलेले ५० श्लोक रचले आहेत. ह्यांच्या नावावर आरत्या, पदे, श्लोक इ. स्फुट रचना उपलब्ध आहे (तंसम. हस्त. यादी, क्र. ३; सवामं. हस्त. सू., खं. १, २).

**हरिदास–२** [अंदाजे श. १६१० / इ. स. १६८८] *योगवासिष्ठ*-टीकाकार ह्यांचे मूळ नाव रघुनाथ. हरिदास हे सद्गुरुदत्त नाम. गोदावरीकाठच्या वालिमकी नगरचे राहणारे. ह्यांचे गोत्र भारद्वाज. गुरु : शांतानंद. कवीने ग्रंथात आपली जी गुरुपरंपरा दिली आहे त्यात गुरू शांतानंद ह्यांना मानससरोवरनिवासी असे म्हटले आहे. ह्या परंपरेत वसिष्ठ, नारद, शुकयोगींद्रांपासून अनेक सत्पुरुषांची नावे येतात. प्रत्यक्ष परंपरा कोणती हे तितकेसे स्पष्ट होत नाही. शांतानंदांनी रामोपासनेचा तारक मंत्र दिल्याचा उल्लेख कवीने आवर्जून केला आहे (६.१७.३७९). कवी रामोपासक आहे.

ह्या कवीने *योगवासिष्ठा*वर टीका लिहिली आहे. मूळ *योगवासिष्ठ* ग्रंथ ३२००० श्लोकांचा आहे. त्यांतील ६००० श्लोक घेऊन त्यांवर कोणा एका काश्मीरस्थ पंडिताने भाष्य केले. त्या भाष्याच्या आधारे ही टीका करीत आहोत असे हरिदासांनी म्हटले आहे (ही टीका कोणती ते मात्र समजत नाही). ग्रंथलेखनाचा हेतू विशद करताना कवी सांगतो : 'गुरूच्या आज्ञेने व संतांनी प्रेरणा दिल्याने वसिष्ठ ग्रंथ लिहिण्यास आपण प्रवृत्त झालो. श्रीरामचंद्रांनी स्फूर्ति दिल्याने ग्रंथलेखन तडीस गेले.'

ह्या ग्रंथाची एकंदर सहा प्रकरणे असून त्यातील विषय वैराग्य, मुमुक्षू, उत्पत्ती, स्थिती, उपशम, निर्वाण असे आहेत. ह्या टीकाग्रंथ विस्तृत (१६६३१ ओव्यांचा) असून प्रासादिक आहे.

**रचना : अमु.** – योगवासिष्ठ, प्रकरणे ६; ओ. सं. १६६३१; र. का. : "वशाख शुद्ध सप्तमीं। भृगुवासर पूर्व यामीं। संवत्सोळा शत दशमीं। ब्रह्मत्व ब्रह्मीं प्रतिष्ठा॥" (६.१७.३९०). प्रस्तुत ग्रंथाची प्रत श. १६१९ (इ. स. १६९७) मधली, भागानगर येथील आहे (ह्या ग्रंथाच्या हस्तलिखिताचे पुस्तक चार भागांत बांधलेले असून ते धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिरात आहे – बा. १८१३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास** : देव, शं. श्री. : हरिदासांचा सोळा हजारांचा योगवासिष्ठ ग्रंथ; भाइसमंइति., श. १८३५; पृ. १८०–१८६.

**० हरिदास–३** – पहा श्रीपतिदास.

**हरिदास–४** [का. अनु.] कवी.

**रचना : मु.** – विमलमाहात्म्य; ओवीबद्ध; अध्याय २–१५; अपूर्ण; संपा. आठवले, का. ना.; मुंबई, १९०३.

**हरिदास–५** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – कुंभकर्णनीतिकथा (९९); मसंमं., हवना., पृ. ११९.

**हरिदास आचरेकर** [अंदाजे श. १६७२ / इ. स. १७५०] आनंदसंप्रदायी कवी. हे आचरे येथील राहणारे. ह्यांची कुलदेवता राशिनची दुर्गा. ह्यांची गुरुपरंपरा : दत्त > पूर्णानंद > नारायण > योगानंद > आत्माराम > हरिदास.

ह्यांनी *कपिलगीताटीका* हा ग्रंथ रचला आहे. सांख्य तत्त्वज्ञान सांगणाऱ्या कपिल मुनींच्या *कपिलगीता* ह्या संस्कृत ग्रंथावरील ही टीका ओवीबद्ध आहे. ह्या ग्रंथात (१ व २) राजराजेश्वरयोगकथन, (३) मंगलनमन, (४) पंचत्रिंशद्वाक्य, (५) हृदयस्थगुह्यनिरूपण असे पाच प्रसंग आहेत. ग्रंथसमाप्तीचा काळ पुढीलप्रमाणे : 'ग्रंथ जाहला तये

स्थली शक १६७२ (इ. स. १७५०) प्रमोदाब्द वर्षाकाळ, आषाढ शुक्ल द्वादशी गुरुवार टीका समाप्ता वृत्तिग्राम आवरे॥.' ग्रंथाचे हस्तलिखित तंजावर येथील हस्तलिखित संग्रहात उपलब्ध (तंसम. बा. ५११).

**रचना : मु.** – १. कपिलगीताटीका; प्रसंग ५; र. श. १६७२; पुणे, १८९५; २. विक्रमचरित्र. **अमु.** – योगवासिष्ठ, गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. ११८.

**हरिदास कान्हा / ० कान्हया–२** [अंदाजे श. १६५० / इ. स. १७२८ – श. १७०० / इ. स. १७७८] कवी. ह्यांचे नाव कान्हा. ह्यांच्या वडिलांचे नाव हरिदास व आईचे नाव काळाई. हे ब्राह्मणेतर जातीतले. आपल्या *भीष्मपर्वा*त ह्या कवीने ही आत्मचरित्रपर माहिती दिली आहे. कान्हाने लिहिलेल्या *भीष्मपर्वा*वरून व त्याच्याच शिष्यपरंपरेतील सहजानंदांच्या *सांप्रदायमालाचरित्रा*वरून ह्या कवीची गुरुपरंपरा ह्याप्रमाणे देतायेते : आदिनाथ > मच्छिंद्रनाथ > गोरक्षनाथ > मुक्ता > वटेश्वर > चक्रपाणी (चांगदेव) > जनार्दन > नरहरी > विश्वेश > केशवराज > बोपया > हरिदास कान्हा. कवीने पूर्वकालीन भारतकारांपैकी नामा (विष्णुदास नामा) व झाडकवी ह्यांचा नामनिर्देश केला आहे. मातेच्या सांगण्यावरून ह्यांनी *भीष्मपर्व* लिहिले असे हे वारंवार म्हणतात. उदा., 'ज्ञान आमुची मोड । जग चावटी म्हणती लड । पितयाचे नाम गोड । हरिदासु ॥ कान्हा मी प्रीतिपात्र पितयाचे । तेही अवलंबीले छान निजाचें । परि कोड पुरवावया मातेचें । केला हा ग्रंथु ॥ तो सद्गुरु आमुचा चिंतामणि । . . . ॥' *भीष्मपर्व*.

**रचना : अमु.** – १. भीष्मपर्व; अ. ६२; प्र. ले. का. : श. १६८९ / इ. स. १७६७, सर्वजित् संवत्सर; ही प्रत परतूड येथील रा. बा. पुराणिक ह्यांच्या संग्रहात आहे; २. पदपदांतरे (विठ्ठलपर पदे व श्लोक); तंसम. हस्त. यादी, क्र. ३. **शंका.** - अनुभवरामायण; मसा., आ. ५, पृ. ५३२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** बी. लक्ष्मीकांत : हरिदास कान्हाकृत भीष्मपर्व; प्रतिष्ठान, एप्रि. १९५४; पृ. १५–१७.

**हरिदास गुंड्या** [अंदाजे श. १७४० / इ. स. १८१८] कवी. ह्यांचे *तुळसी सत्यभामा संवाद* हे लहानसे काव्य रसाळ आहे (जोशी, म. रा., नवभारत, ऑक्टो. १९६९, पृ. २५). ह्यांनी काही पदेही रचली आहेत. रचना तंजावर सरस्वतीमहाल हस्तलिखित ग्रंथसंग्रहात उपलब्ध (तंसम. हस्त. यादी, क्र. ३).

**हरिदास गोविंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हरिदास विठ्ठल** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – रामकथापर पदे इ.; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हरिदाससुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**हरि दीक्षित / ० नरहरिपंडितसुत / ० हरि पंडित–१ / ० हरी वामन** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] कवी व टीकाकार. हे मूळ नागपूर-वऱ्हाडकडे राहणारे. दुष्काळामुळे ते तिकडून गदग (कर्नाटक) येथे राहावयास आले. नरगुंद हे त्या वेळचे दक्षिणेकडील धारवाड जिल्ह्यातील एक संस्थान. ह्या संस्थानातील सचिव रामराव दादाजी म्हणजे रामराव भावे ह्यांनी त्यांचे गुरू हरि यज्वा किंवा दीक्षित यांना नरगुंद येथे आणले. हा काल इ. स. १७३३–३६ च्या दरम्यानचा होता. ह्या रामराव भाव्यांनी त्यांना त्यांच्या योगक्षेमाकरिता एक गाव इनाम दिले. रामराव दादाजी (अर्थात रामराव भावे नरगुंदकर) ह्यांनी 'हरि दीक्षित पंडित बिन नरहरि पंडित, गोत्र शांडिल्य, शाखा आश्वलायन, वास्तव्य नरगुंद, ह्यांस मौजे कुरिगोवनकोप तर्फ कोण्णूर, मामले तोरगळ' हा गाव इनाम दिल्याबद्दल 'सुहूर सन ११३४ रबिलाखर २९ किंवा शक १६५५ प्रमादी संवत्सर, आश्विन शुद्ध प्रतिपदा, गुरुवार' ह्या दिवशी दिलेली एक सनद सापडल्याची माहिती पुणे येथील त्यांच्या वंशजाकडून मिळाली आहे. ह्या सनदेतील कविचरित्रविषयक निर्देश हे त्यांच्या काव्यातील माहितीशी बरोबर जुळतात. कवीने *भीष्मयुद्धा*च्या मंगलचरणात प्रथमच 'लक्ष्मीनृसिंहचरणद्वयसारसाचा' असा आपल्या कुलदेवतेचा आणि पर्यायाने आईवडिलांचा उल्लेख केला असून त्यांस वंदनही केले आहे. ह्याच ग्रंथाच्या शेवटी त्याने स्वतःचे कुलवृत्त ज्यात दिले आहे तो सुप्रसिद्ध श्लोक असा : "तातभिधा नृहरिपंडित माय लक्ष्मी । जे सर्वदा सुगुणयुक्त उदार लक्ष्मी ॥ शांडिल्य गोत्र, कुळदेव नृसिंह ज्याचा । दासानुदास निज वामन हो अजाचा ॥" ह्या श्लोकातील शेवटच्या चरणाचा दुसरा एक पाठ वि. ल. भावे ह्यांनी दिला आहे,तो असा :'दासानुदास हरि तो सकळा द्विजांचा ॥' (मसा., भा. २, आ. ३, पृ. ६८).

हरि दीक्षितांच्या आणि वामनपंडितांच्या काव्याची सरमिसळ झाल्याने, तसेच त्यांतील भाषासाम्यामुळे, ती वेगळी ठरविणे कठीण झाले आहे. *भीष्मयुद्धा*प्रमाणेच इतरही भारती आख्याने या हरि दीक्षितांनी रचली आहेत असे त्यांतील अंतर्गत पुराव्यावरून म्हणता येते. 'तातभिधा नृहरिपंडित' हाच श्लोक *जयद्रथवधा*च्या शेवटी वि. ल. भावे ह्यांना एका बाडात सापडला. त्या ठिकाणी अंतिम चरण 'दासानुदास हरि तो सकळा द्विजांचा' असा आहे. त्यामुळे ह्या काव्याचे कर्तृत्व हरि दीक्षितांकडे जाते. 'ऋषी बोलिला भूप पारिक्षिताते । कसा तुष्टला श्रीहरी दीक्षिताते' ह्या *भीष्मशरपंजर* ह्या काव्यातील २८ व्या श्लोकाच्या शेवटच्या चरणद्वयावरून, हे काव्य हरि दीक्षितांचे असे म्हणावयास हरकत नाही. *विराटपर्व* हेही हरि दीक्षितांचे. त्यातील वामनोल्लेख घुसडलेले दिसतात. हरि दीक्षितांच्या स्फुट रचनेतील पुढील उल्लेखांवरून *यथार्थदीपिका*कार वामन हे हरि दीक्षितांचे गुरू होते, असे स्पष्ट होते. "झाली कृपा सद्गुरु वामनाची । प्रसन्न वृत्ती बरवी मनाची । कथामृतीं तृप्त हरी विलासे । नीचात्मवृत्ती चिदचिद् विलासे ॥" वामनांच्या नावावर मोडणारे *शतकत्रय* ही रचना देखील या हरि दीक्षितांचीच असावी असे मा. गो. देशमुख ह्यांनी विडूळगावी (ता. पुसद, जि. यवतमाळ) त्यांना मिळालेल्या *शतकत्रया*च्या हस्तलिखितातील "इति श्री भर्तृहरिविरचिताया नीतिशतक समाप्तमस्तु ॥टिका॥ हरिदीक्षितकृत संपूर्णमस्तु ॥" ह्या पुष्पिकेवरून ठरविले आहे.

हरिपंडितांच्या नावावर असलेली *भागवता*च्या *एकादशस्कंधा*वरील समश्लोकी टीका चिं. नी. जोशी ह्यांना उपलब्ध झाली आहे. ह्या ग्रंथाचे नाव *भावबोधिनी* असे असून त्याचे फक्त पाचच अध्याय उपलब्ध झाले आहेत. ह्या ग्रंथाच्या आरंभाचा काल मार्गशीर्ष मास व मन्मथ संवत्सर असा दिला आहे, म्हणजेच रचनाकाल शके १६३७ आहे. हा ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ती वामनपंडितांपासून आपणास झाली, असे त्यांनी साभिप्राय विशेषणांची खुबीदार योजना करून सुचविले आहे. उदा., "सच्चित्सुखात्मक सुखानिधि मध्यवासी । योगी करी अभय चक्रपिनाक ज्यासी ॥ गौर त्रिनेत्र शिरिं शेष असे जयाला । स्फर्तिप्रद प्रथम तो मनिं रेखियेला ॥" संस्कृत टीकाकार श्रीधरस्वामी हे मला सेतूहेतु असे, असे या ग्रंथात हरि दीक्षितांनी म्हटले आहे. ह्या संस्कृत टीकाकाराने जेथे पदांचा अर्थ सोडलेला आहे तोही मी सांगेन असे त्यांनी आत्मविश्वासाने सांगितले आहे. श्लोकार्थ सोडून स्वैर टीका ही 'कांत टाकुनियां स्वैरा विहरे पुंश्चली जशी' असा इतर टीकाकारांना दोष दिला आहे. हरिपंडितांनी संत एकनाथांच्या *भागवता*चा "तयास हे समश्लोकी । जे मूळ ग्रंथ शोधक ॥ बाळे भोळे तयां आहे । माउली

एकनाथ तो ॥ ९॥" असा उपहास केला आहे. ही समश्लोकी लिहिताना हरिपंडितांनी श्लोकास श्लोक आणि वृत्तास वृत्त दिले आहे. मुळातील भिन्न भिन्न वृत्ते त्यांनी त्या त्या ठिकाणी घातली आहेत. कित्येकदा वाचकांस पूर्वापर संगती सांगण्यासाठी त्यांनी अपरिहार्यपणे काही श्लोक अधिक टाकले आहेत.

हरिपंडितांची ही समश्लोकी अत्यंत सरळ, सुबोध आणि सुरसही आहे. वामनाच्या ग्रंथातील भाषा व व्याकरणाची वैशिष्ट्ये ह्या ग्रंथात आली आहेत. ह्या पाच अध्यायांची ओवीसंख्या २३९ आहे.

ग. ह. खरे ह्यांनी मराठी रचनेप्रमाणे पंडितांनी संस्कृत रचना केल्याचे म्हटले आहे. हरि दीक्षितांनी *ब्रह्मसूत्रांवर ब्रह्मसूत्रवृत्ति*, *भगवद्गीतेवर मितभाषिणी*, *शिवगीतेवर बालानंदिनी* हे टीकाग्रंथ आणि *विवेकमिहिर* व *नृसिंह* ही नाटके केली आहेत (*सह्याद्रि*, जून १९३८, पृ. ४६१).

**रचना : अनु.** – १. अहल्योद्धार; २. कृष्णजन्म; ३. गीतार्थप्रकाश; ४. जयद्रथवध; ५. दशावतारविजय; ६. द्वारकाविजय; ७. भर्तृहरिकृत शतके; ८. ब्रह्मावली टीका; ९. भरतभाव; १०. भावबोधिनी; ११. भीष्मयुद्ध; १२. भीष्मशरपंजर; १३. मृत्तिकाभक्षण; १४. रुक्मिणीविलास; १५. लोपामुद्रासंवाद; १६. विराटपर्व; १७. शतकत्रय; १८. हरिनामसुधा; १९. ज्ञानेश्वरी-टिप्पण. **संस्कृत रचना** – १. नृसिंहनाटक; दोन अंक; पुरुषार्थ मासिक, माघ श. १८३१ पासून. २. ब्रह्मसूत्र-वृत्ति; ब्रह्मसूत्रांवर टीकाग्रंथ; र. का. : श. १६५८, अनल संवत्सर, ज्येष्ठ शु. १३; पुणे, श. १८३९. ३. मितभाषिणी (गीताटीका); २ ऱ्या अध्यायाच्या १४ श्लोकांपर्यंतचा भाग सहस्रबुद्धे ह्यांनी पुरुषार्थाच्या पहिल्या ४–१४ अंकांत मिळून प्रकाशित केला; शेवटी 'लक्ष्मीनरहरिसूनुहरिदीक्षतकृतायां' असा कर्तृनिर्देश आहे. ४. विवेकमिहिर, ३-अंकी नाटक; पुरुषार्थ मासिकाच्या पहिल्या तीन अंकांत. ५. शिवगीताटीका; श. १८३१ (निर्णयसागर प्रेस); *बालानन्दिनी* नावाची व्याख्या असलेली *शिवगीता* बा. रा. घाणेकर ह्यांनी प्रसिद्ध केली आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. खरे, ग. ह. : हरिपंडित – थोडा खुलासा; मसाप., एप्रि. १९४४, पृ. १०३; २. खरे, ग. ह. : हे हरि दीक्षित कोण ?; सह्याद्रि, जून १९३८; पृ. ४५९; ३. जोशी, चिं. नी. : हरिपंडितकृत भावबोधिनी; मसाप., जाने. १९४४; पृ. २७–३२; ४. देशमुख, मा. गो. : शतकत्रयाचा कर्ता वामन पंडित नव्हे; हरिदीक्षित – वाङ्मयीन व्यक्ती; १९६७; पृ. ८–२०; ५. भालेराव, भा. रा. : शतकत्रय – वामनाचें कीं हरीचें; मुमुक्षु, १९२२.

**हरिंद्रमुनि पुसदेकर** / ० हरिराज पुसदेकर [का. अनु.] महानुभाव टीपग्रंथकार. महानुभावांनी आपल्या प्रसिद्ध *साती ग्रंथांवर* टीप तयार केले आहेत ते पहिल्या शोधनीचा, दुसऱ्या शोधनीचा व तिसऱ्या शोधनीचा ह्याप्रमाणे आहेत. ह्यांपैकी दुसऱ्या शोधनीचा टीपग्रंथ हरिंद्रमुनि किंवा हरिराज पुसदेकर ह्यांनी तयार केला. ह्या टीपग्रंथाच्या डॉ. वि. भि. कोलते ह्यांना प्राप्त झालेल्या एका प्रतीच्या शेवटी लेखक, लेखनकाल ह्यांचा उल्लेख करणारे दोन श्लोक आहेत. त्यांवरून सीराढोन प्रांतातील कोथळ या गावी हरिराज पुसदेकर ह्यांनी सांगितलेला (*साती ग्रंथांचा*) अन्वय मुनिवर देपाल पुसदेकराने ऐकला वा जीर्ण टीपग्रंथाचे शोधन करून चार महिन्यांत तो लिहून काढला असे कळते. ह्यामधील उल्लेखिलेला लेखनशक मूळ टीपाचा की प्रतिलिपीचा ते कळत नाही (*सह्याद्रिवर्णन*, प्रस्ता., पृ. ३९). वरील थोडाफार तपशील सोडल्यास हरिराज पुसदेकरांची चरित्रविषयक माहिती व पंथीय परंपरा उपलब्ध नाही. टीपग्रंथाचा रचनाकालही निश्चितपणे न सापडल्याने, त्यांचा काळ कोणता हे समजू शकत नाही. तिसऱ्या शोधनीचा टीपकार दत्तराज मराठे हा आपणास हरिराजांचा शिष्य (सांप्रदायिक नव्हे) म्हणवून घेतो, असे दिसते.

महानुभावांच्या ह्या टीपग्रंथांपैकी पहिला टीप अपूर्ण आहे. दुसरा हरिंद्रमुनींचा व तिसरा उत्तरावस्थेचा दत्तराज मराठे ह्यांचा, असे दोन टीपग्रंथ पूर्ण आहेत. पहिल्या शोधनीच्या टीपग्रंथात *उद्धवगीता*, *ज्ञानप्रबोध* व *ऋद्धिपुरवर्णन* ह्या तीनच ग्रंथांवर टीप आहेत. ह्या टीपग्रंथांची एक जुनी पोथीच तेवढी उपलब्ध आहे. ह्यांतील टीपांचे स्वरूप प्राथमिक आहे. ह्यानंतरचा दुसऱ्या अवस्थेचा टीप हरिराज पुसदेकरांचा. दुसऱ्या शोधनीचा टीप हा पहिल्यापेक्षा अधिक विस्तृत असून बहुतेक कठीण शब्दांचे अर्थ त्यात देण्याचा प्रयत्न केला आहे. काही ठिकाणी व्युत्पत्ती दिली आहे. अधूनमधून संस्कृत श्लोक उद्धृत केले आहेत. अवश्य तेथे कथासंदर्भ उकलून दाखविले आहेत. मूळ काव्याप्रमाणे टीपग्रंथांतही प्रकरणे केलेली आहेत. टीपकाराने दिलेले सर्वच अर्थ बरोबर आहेत असे नाही. कित्येकदा ते चुकीचे वाटतात; त्यांत पुनरुक्ती आढळते. संस्कृत अवतरणेही सदोष आहेत. असे असले तरी पहिल्या शोधनीपेक्षा ह्या दुसऱ्या शोधनीच्या टीपांचे स्वरूप *साती ग्रंथांच्या* अभ्यासकांना अधिक मार्गदर्शक होणारे आहे. ह्यातील काव्यविषयक परिभाषेच्या स्पष्टीकरणाने 'मराठीच्या साहित्यशास्त्रा 'त मोलाची भर पडली आहे (उदा., *वच्छाहरणातील* उपमा–श्लेष–वर्णक ह्यांवरील टीप).

टीपग्रंथांच्या संदर्भात दत्तराज मराठे ह्यांच्या तिसऱ्या शोधनीच्या टीपग्रंथाचा समाप्तिलेख टीपग्रंथाची पूर्वपीठिका सांगणारा म्हणून फार महत्त्वाचा ठरतो. त्यांनी दिलेल्या पूर्वपीठिकेप्रमाणे 'मह्ले घराण्यात जन्मलेल्या चोरयाचकाने तीन ग्रंथांवर व्याख्यान केले होते. ते जुने झाले. त्या अन्वयानुरोधाने आणि हरिराज पुसदेकर यांचे व्याख्यान ऐकून त्यांचा शिष्य दत्तमुनीने आता सातही ग्रंथांचे (अब्धिसंख्येने) व्याख्यान केले आहे' असे दत्तमुनी म्हणतात.

य. खु. देशपांडे संपादित *ऋद्धिपुरवर्णनाच्या* प्रस्तावनेत जुन्या टीपग्रंथावर एक टिपण लिहिले आहे. त्यांत *साती ग्रंथांवर* सात टीप असल्याचे महंत गोपीराज महानुभाव ह्यांच्याकडून कळल्याचे सांगून हे टीपकार विश्वनाथ बीडकर, भीष्माचार्य, चाहेव्यास बागुडे, अनंतमुनि चोरयाचक, हरिंद्रमुनि पुसदेकर व दत्तराज मऱ्हाटे इ. असल्याचे सांगतात (पृ. ३९). डॉ. कोलते ह्यांच्या मते वरील तीन टीपांखेरीज इतरांचे टीप अजून तरी त्यांच्या पाहण्यात नाहीत.

काव्यांतील कठीण व दुर्बोध स्थळांचे अर्थ अभ्यासकांना कळणे, विशेषतः खुद्द महानुभाव महंत त्या त्या शब्दांचे सांप्रदायिक दृष्ट्या अर्थ काय काय करीत ही गोष्ट समजणे, अवश्य असल्याने, अशा ठिकाणी टीपग्रंथांचा उपयोग चांगला होतो. ग्रंथकर्त्यांचे खरेखुरे हृद्गत वाचकापर्यंत पोचविण्याची टीपग्रंथकारांची तळमळ आणि अभ्यासाच्या बाबतीतला त्यांचा आस्थेवाईकपणा हे टीपग्रंथांचे वैशिष्ट्य आहे. ह्या टीपग्रंथांचे स्वरूप संस्कृतातील मल्लिनाथादिकांच्या टीकांहून फारसे भिन्न नाही. ही टीकापद्धती केवळ अन्वयमुखाने व्याख्यान करणारी स्पष्टीकरणात्मक पद्धती आहे. हरिराज पुसदेकरांचा *सह्याद्रिवर्णनाचा* टीप डॉ. कोलते ह्यांनी प्रसिद्ध केला आहे. *ऋद्धिपुरवर्णनास* जोडून य. खु. देशपांडे ह्यांनी दिलेला टीप (टीपकाराचा निर्देश नाही) बहुधा हरिराजांचाच असावा, असे त्याच्या स्वरूपावरून वाटते (डॉ. शं. गो. तुळपुळे (संपा.) : *ऋद्धिपूरवर्णन*, प्रस्ता., पृ. ४०).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** कोलते, वि. भि. : टीपग्रंथ व त्यांचे स्वरूप – प्रस्ता., सह्याद्रि-वर्णन; पुणे, १९६४; पृ. ३७–४४.

**हरिनाथ** – पहा परिशिष्ट.

**हरिनारायण** [ ? – समा. श. १६४७ / इ. स. १७२५] संतकवी. हे तेरगावचे ऋग्वेदी ब्राह्मण. ह्यांचे मूळ नाव निराजी. नारायण देशपांडे व लक्ष्मीबाई ह्या धर्मसंपन्न व सात्त्विक दांपत्याच्या पोटी

ह्या कवीचा जन्म झाला. हे गृहस्थाश्रमी होते. पत्नीचे नाव अन्नपूर्णा. ह्यांच्या चुलत्यास पुत्रसंतान नव्हते, म्हणून निराजीला चुलत्यांच्या (अनंतपंतांच्या) मांडीवर दत्तक दिले. ह्यानंतर लवकरच अनंतपंतांना मुलगा झाला व त्यांनी निराजीस पूर्वगृही जाण्यास सांगितले. पूर्वगृही आल्यावर संसारदृष्ट्या मुलास अक्कल नाही असे पाहून वडिलांनी "तोंडाने 'हरिनारायण' म्हणत भिक्षाटण करीत जा" अशी निर्भर्त्सना केली. निराजींनी वडिलांचे हे परखड बोल हाच गुरूपदेश समजून 'हरिनारायण' हे नामामृत सदैव मुखात धारण केले. ह्यांची समाधी बेनवडी (बनहट्टी), ता. कर्जत, जि. नगर येथे आहे. श्रीशिवरायांचे नातू शाहूमहाराज ह्यांनी माहुलीस कृष्णा-वेण्या-संगमावर हरिनारायणाचे देऊळ बांधले. त्यात हरिनारायण व त्यांची पत्नी अन्नपूर्णा ह्यांच्या मूर्ती बसविल्या आहेत. ह्यांच्या संप्रदायात 'अन्नपूर्णापते हरिनारायण' अशी गर्जना करतात.

ह्या कवीने *नामामृतलहरी* ह्या ग्रंथात आपल्या अनुभवाचे सार दिले आहे. ह्यांचे अभंग व पदेही उपलब्ध आहेत.

**रचना : मु.** – नामामृतलहरी; अ. ६, ओ. सं. ३८७; मुमुक्षु, नोव्हें.-डिसें. १९२२; पृ. २२–४७. **अमु.** – अभंग व पदपदांतरे; सवामं.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : श्रीहरिनारायण; मकच., भा. ५; मुंबई १९२०; पृ. २३–४३; २. काळे, श्री. गो. : श्रीहरिनारायण साधूचे चरित्र; मुमुक्षु, नोव्हें.–डिसें. १९२२; पृ. ७–१७.

**हरिनारायणशिष्य** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] वेदान्तावरील *हंसनारायण* ह्या ग्रंथाचा कर्ता. हा ग्रंथ विजापूर येथे अत्यन्त विस्कळीत अशा अवस्थेत सापडला. प्रस्तुत ग्रंथ हरिनारायणांच्या कोणा शिष्याने रचलेला आहे. कर्त्याचे नाव ग्रंथात कोठेच आढळून येत नाही. ग्रंथकार आपणास फक्त 'हरिनारायणशिष्य' म्हणवितो. ह्याने ग्रंथाच्या शेवटी हरिनारायणांची जी माहिती दिली आहे त्यावरून हे हरिनारायण म्हणजे नगर जिल्ह्याच्या कर्जत तालुक्यातील बेनवडी येथे ज्यांचा मठ व समाधी आहे तेच ह्याची खात्री पटते. हरिनारायणांचा समाधिकाल ज. र. आजगांवकर ह्यांनी श. १६४७ / इ. स. १७२५ असा दिला आहे.

हरिनारायणशिष्याचा *हंसनारायण* हा ग्रंथ ओवीबद्ध, अद्वैतवेदान्तनिरूपणपर, सहा प्रकरणांचा आहे. स्तुती, नामनिर्देश, उपक्रम-उपसंहार, ज्ञानाज्ञान, स्वस्थितिज्ञान, गुरुपरंपरा-पूर्णबोध अशी ती सहा प्रकरणे आहेत. शिष्य आशंका विचारतो व गुरू त्याची निवृत्ती करतात अशी लेखनपद्धती दिसते.

एकंदर ओव्या ७१० आहेत. ग्रंथावर *ज्ञानेश्वरी*चा प्रभाव पडलेला स्पष्ट दिसतो. ह्या छोट्याशा ग्रंथात पंचीकरण, योग, वैराग्य, ज्ञान, भक्ती, नाममहिमा इत्यादी सर्व विषय कुशलतेने व समर्पकपणे मांडले आहेत. वेदान्तातील तत्त्वविचार थोडक्यात पण नीट समजेल अशा रीतीने सांगितला आहे. ग्रंथ ना. ब. जोशी ह्यांच्या खाजगी संग्रहात आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, ना. ब. : 'हंसनारायण' – अल्पपरिचय; इंद्रायणी, फेब्रु. १९६३; पृ. ५७–६०.

**० हरि पंडित–१** – पहा **हरि दीक्षित.**

**हरि पंडित–२** [इ. स. चे अठरावे शतक] गोमंतकीय कवी. वेर्लिंग (गोमंतक) येथील श्रीलक्ष्मी-नृसिंह ह्या दैवताचे उपासक. वेर्लिंग येथेच त्यांचे दीर्घकाळ वास्तव्य झाले. ह्यांनी *श्रीलक्ष्मी-नृसिंह स्तुति*, *लक्ष्मी-स्तोत्र* व काही अभंग लिहिले आहेत, पण त्यांचे सुप्रसिद्ध काव्य म्हणजे *मुक्तामाला* किंवा *सुवृत्त मुक्तामाला* (र. का. : इ. स. १७५०). हे काव्य त्यांनी वेर्लिंग येथील श्रीलक्ष्मी-नृसिंह देवालयाच्या चौकावर बसून लिहिले. पंडितांनी ह्या काव्यग्रंथात छंदशास्त्राचे विवेचन फार सुंदर केले असून त्या शास्त्रासंबंधीची माहिती सुबोध व सरळ रीतीने दिली आहे. ही रचना मुद्रित झालेली नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नायक, ना. भा.; गोमका.; रिवण (गोवे); १९७९; पृ. २०.

**हरिपुरुषोत्तम** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ११९.

**हरिबाळा** [का. अनु.] शाहीर. ह्यांनी रचलेले ख्याल, टप्पे, ठुमऱ्या, छक्कड उपलब्ध. सर्व रचना शृंगाररसपूर्ण आहे (कृ. गं. कवचाळे; मभामवा.; इंदूर, १९३९; पृ. ४४).

**० हरिवास–१** – पहा **सिद्धान्ते हरिव्यास.**

**हरिवास–२** [अंदाजे इ. स. चे १४ वे शतक] महानुभावीय ग्रंथकार. पारमांडल्य आम्नायातील आनोबासांच्या बाणाइसाचा शिष्य.

**रचना : अमु.** – बेलापूर चरित्र; २. मांडणी; ३. मूलसंचरण; ४. सिद्धान्तसाखळी.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नेने, ह. ना. : पारमांडल्य आम्नायाचे दामबासकृत 'अन्वयस्थळ'; संलेसं., खं. १; पृ. १४३ व १४५.

**हरिबुवा भोंडवे / ० हरिबुवा शिंपी / ० हरिस्वामी** [अंदाजे श. १६३० / इ. स. १७०८ – समा. श. १६९९, वैशाख शुद्ध १ / इ. स. १७७७] रामदासी कवी. अहमदनगर जिल्ह्यात पारनेर येथे हरिबुवांचा जन्म श. १६३० च्या सुमारास झाला. हे जातीने शिंपी. उपनाव भोंडवे. वडिलांचे नाव केरेश्वर. आईचे नाव बचाई. पत्नीचे नाव गोडाई. ह्यांना दोन कन्या होत्या. हरिबोवांचे पूर्वज मूळचे बिदरचे. बिदर, कलबुर्गा, कल्याणी, पुणतांबे असे स्थलांतर होत होत ते पारनेरास स्थायिक झाले. हरिबोवांचे गोत्र बकदाल्भ्य आणि कुलदैवते पुणतांब्याचा भैरव व तुळजापूरची तुकाई. हे वैष्णव असून पंढरीची वारी नेमाने करीत असत. त्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे : श्रीसमर्थरामदास > माधवदास > केशवदास > पुरुषोत्तम > शिवराम > हरिबोवा. ह्यांनी आपले गुरु शिवरामदास ह्यांचा उल्लेख अनेक ठिकाणी केला आहे. उदा., 'शिवरामसद्गुरुकृपेनें । ग्रंथ समाप्तीसि आला जाण ।' हे शिवरामस्वामी टाकळी येथील रामदासी मठाच्या परंपरेतील होत. ह्याच मठाचे शिष्य व अनुयायी बाळकराम हे हरिबुवांचे गुरुबंधू होते. त्यांचा मठ नारायणगावी (जि. पुणे) होता. ह्या परंपरेच्या ऋणानुबंधामुळेच उत्तरवयात हरिबोवा पारनेरहून नारायणगावी आले. ह्यांनी श. १६९९ (इ. स. १७७७) च्या वैशाख शु. प्रतिपदेस, गुरुवारी दोनप्रहरी मीना नदीच्या तीरावर संजीवन-समाधी घेतली.

हरिबुवांनी १,६०,००० इतके अभंग रचले, असे म्हणतात. पैकी ६८,००० अभंग उपलब्ध आहेत. उदा., " उंबरात जीव जाण । म्हणती आमुचें त्रिभुवन ॥ ऐसी परी जाली ज्यासी । ज्ञान कळेना तयासी ॥ " ह्या पद्धतीने ते आपल्या अंतरीचा भाव व्यक्त करतात. तथाकथित वाचाळ साधूंची बोळवण करताना मात्र त्यांच्या वाणीत समर्थांचा कठोर रोकडेपणा व तुकोबांचा फटकळपणा एकदम अवतरतो. 'देव भावाचा भुकेला', 'मोले घातले रडाया' असे तुकोबांच्या अभंगांचे चरणच्या चरण अल्प फरकाने हरिस्वामींच्या रचनेत घेतलेले आढळतात.

अभंगांबरोबरच त्यांनी *पंचीकरण*, *संसारतोंडा* व *स्वरोदय* ही प्रकरणे व *हरिबोध* आणि *ज्ञानसागर* हे दोन ग्रंथ रचले आहेत.

*हरिबोध* (र. का. : श. १६९० / इ. स. १७६८) हा हरिबुवांचा ग्रंथ सुमारे दोन हजार ओव्यांचा असून त्याचे १८ अध्याय आहेत. ह्याची रचना गुरुशिष्यसंवादरूप आहे. *ज्ञानसागर* हा सुमारे अठरा हजार ओव्यांचा प्रचंड ग्रंथ आहे. ह्याची रचना श. १६९५ / इ. स. १७७३ त पारनेर येथे पूर्ण झाली. हा ग्रंथ बुवांनी गुरुप्रसादप्राप्त

स्वानुभवाने लिहिला आहे. ह्याच्या शेवटच्या अध्यायात हरिबुवांनी आपल्या वंशाचा वृत्तान्त दिला आहे. त्यात आपला व आपल्या पत्नीचा 'हरि' आणि 'हरिची गोडी' ह्या शब्दांत उल्लेख केला आहे. ग्रंथाच्या आरंभी मंगलाचरण, त्यानंतर सद्गुरुस्तवन व संतस्तवन येते. ग्रंथात भक्तिमार्गाचे सौलभ्य व माहात्म्य हरिबुवांनी वर्णिले आहे. उदा., " सकळही देव असती। मानाव्या भगवंताच्या मूर्ति। भूतदया अंतरीं सर्वांभूतीं। तेंचि भक्तीचें लक्षण ॥" हा ग्रंथ नाना प्रकारच्या दृष्टान्तांनी आणि अध्यात्मज्ञानाने भरलेला आहे. *ज्ञानसागर* ग्रंथ म्हणजे *हरिबोध* ग्रंथाचा केलेला विस्तार होय. *ज्ञानसागरात* भक्तिमार्ग, गर्भावळी, त्रिगुणवर्णन, कर्ममार्ग, कर्मनिदर्शन, मायावर्णन, गुरुशिष्य-वर्णन, योगीवर्णन, मनवर्णन, ज्ञान व अज्ञान भेद, जीवशिव, धर्म-अधर्म, सगुणनिर्गुण, प्रवृत्तिनिवृत्ति, ज्ञानविज्ञान, समाधिवर्णन इत्यादी विषयांचे विवरण केले आहे. [➪ ३.]

हरिबुवांच्या एका पदात ग्रहणाविषयीची राहुकेतूची कल्पना मिथ्या आहे, असे स्वच्छ सांगितले आहे. सुमारे दीडशे वर्षांपूर्वीच्या श्रद्धायुगात, काही श्रद्धाळू मंडळीही यथाशक्ती चिकित्सा करीत होती हे ह्यावरून लक्षात येते. ह्यांच्या सर्वच स्फुट रचनेत 'हरि म्हणे' अशा शब्दांत स्वतःचा उल्लेख आढळतो. ह्यांची काही हिंदी पदेही उपलब्ध आहेत. शिवाय, ह्यांनी 'आयुर्वेदा'वर व 'ज्योतिषशास्त्रा'वर ग्रंथ लिहिले आहेत असे समजते.

हरिबुवांचे ग्रंथ सांप्रदायिकांत विशेष प्रसिद्ध आहेत. इतरत्र त्यांची फारशी प्रसिद्धी नाही. ह्यांची सर्वच रचना व्याकरणशुद्ध व अधिकार-संपन्न आहे. मानवी जीवनाची प्रतिष्ठा बाह्य आवरणात नसून आत्मसाक्षात्कारात आहे, हा सिद्धान्त ते पुन्हा पुन्हा बोलून दाखवतात. त्यांची वाणी बहुजनसमाजाला सहज समजणारी आहे. कुलपरंपरागत विठ्ठलभक्ती व गुरुपरंपरागत रामोपासना ह्यांचा मेळ त्यांनी आपल्या अद्वैतानुभूतीने साधला आहे.

**रचना : मु.** – १. हरिबोध; अ. १८, ओ. सं. २५९९; र. का. : श. १६९० (इ. स. १७६८); 'मीनांजली' मासिकातून क्रमशः प्रसिद्ध; २. ज्ञानसागर; अ. २८; ओ. सं. १७३५४; र. का. : श. १६९५; 'मीनांजली' मासिक; संपा. निखळ, म. वि.' पुणे; व. १, अं. १, जुलै १९६३ पासून क्रमशः प्रसिद्ध' 'ज्ञानसागर' ह्या ग्रंथाचा 'सुबोध-ज्ञानसागर' नामक गद्य अनुवाद : नेऊरगावकर, स. के.; तत्रैव, व. १, अं. ५ पासून क्रमशः प्रसिद्ध; ज्ञानसागर, खं. १, अध्याय १ ते ८ – स्वतंत्रपणे मुद्रित, पुणे, १९६६; ३. स्फुट अभंग रचना; 'मीनांजली' मासिक; संपा. निखळ, म. वि.; व. १, अं. १, जुलै १९६३ पासून 'हरि म्हणे' या शीर्षकाखाली क्रमशः प्रसिद्ध. **अमु.** – १. पंची-करण; २. संसारतोडा; ३. स्वरोदय.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : हरिबुवा भोंडवे; मकच., खं. २, मुंबई १९१३; पृ. ८–२५; २. ढेरे, रा. चिं. : हरिबावा भोंडवे; गंगाजळी; पुणे, १९७२; पृ. ४६–५३; ३. देव, शं. श्री. : हरिबुवा रामदासी; श्रीसांप्रविवि., खं. १, लेखांक ४८; धुळे, १८३९; पृ. २९५; ४. पोतदार, द. वा. : हरिबुवा : व्यक्ति आणि वाङ्मय; 'मीनांजली', जुलै १९६३; पृ. ३.

**० हरिबुवा शिंपी** – पहा **हरिबुवा भोंडवे.**

**हरिबोध** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक] कवी. मुडलगीच्या बोधपरंपरेतील दुसऱ्या शिवबोधांचे शिष्य. ह्यांचे ३२ ओव्यांचे एक *गुरुपरंपरास्तोत्र* उपलब्ध आहे. त्यामध्ये आदिगुरू आदिनाथ व हरिनाथ ह्यांच्यापासून परंपरा सांगण्यास सुरुवात करून दुसऱ्या शिवबोधांपर्यंत ती आणून ठेवलेली आहे. ह्यावरून दुसऱ्या शिवबोधांचे हे शिष्य ही गोष्ट स्पष्ट होते. आपल्या स्तोत्रात ह्यांनी मुडलगीच्या स्वामींच्या चमत्कारांच्या ज्या लीळा सांगितल्या आहेत, त्यांना परंपरेतील अन्य कवींकडूनही दुजोरा मिळतो.

**रचना : मु.** – श्रीगुरुपरंपरास्तोत्र; ओ. सं. ३२; मुडलगीचे स्वामी; (संपा.) आवळीकर, पंडित; पुणे, १९७१; पृ. ११७–११९ (संदर्भ : तत्रैव, हरिबोध; पृ. ४८–५०).

**हरिभक्त** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – प्रार्थनापर पद, इ. स्फुट रचना; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हरिभक्तकानया** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – पांडुरंगाची आरती; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हरिभक्तसखा** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णपर, बोधपर, करुणापर इत्यादी पदपदांतरे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हरिभक्तसहज** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – उपदेशपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हरिभक्त साळी** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – सुधन्वाख्यान – पुराण; भाइसंमं. हस्त. सू., पृ. ३२२.

**हरि भिकाजी** [का. अनु.] शाहीर. ह्यांनी रचलेले ख्याल, टप्पे, ठुमऱ्या, छक्कड उपलब्ध आहेत. सर्व रचना शृंगाररसयुक्त आहे कवचाळे, कृ. गं.; मभामवा., इंदूर, १९३९; पृ. ४४.

**हरिमोरेश्वर** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – चंद्रावळीआख्यान; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हरिरंग** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – फुगडी पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० हरिराज** – पहा **हरिराज शेंडे.**

**० हरिराज पुसदेकर** – पहा **हरिब्रह्ममुनि पुसदेकर.**

**हरिराज शेंडे / ० मुद्गलाचार्य / ० हरिराज** [अंदाजे श. १७००/इ. स. १७७८] कवी. उपनाव शेंडे. हा कोकणात राहणारा असावा. ह्या कवीची मुद्गलभट्टकृत *रामार्या*च्या भाषान्तराची एक हस्तलिखित प्रत कोकणातील राजापूरनजीकच्या धालवली गावी व दुसरी एक प्रत वऱ्हाडात कारंजे येथे मिळाली. धालवली प्रतीतील *रामार्यां*वर काकंभट्ट नावाच्या एका शास्त्र्याने संस्कृत टीका केलेलीही सापडते. मूळ ग्रंथ लिहिणारा मुद्गलभट हा कोण व कोठील ते समजत नाही. काकंभट्टांची *पदार्थद्योतिनी* टीका श. १६९२ च्या सुमाराची आहे. हरिराजांचा काळ त्याच्या ग्रंथावरून समजत नाही. काकंभट्टांच्या ग्रंथातील संस्कृत टीके-वरून हा काकंभट्टांचा समकालीन अंदाजे श. १७०० च्या सुमाराचा असावा. ह्याच कवीची *भस्मासुराख्यान* आणि *राधावर्णन* अशी दोन आख्याने *काव्यसंग्रह* व *काव्येतिहाससंग्रह* ह्यांतून मुद्रित झाली आहेत (संककासू., पृ. १४३).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** राजवाडे, वि. का. : हरिराज शेंडेकृत मुद्गलाचार्यांचे श्लोकबद्ध भाषांतरद्वय; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. २७६–७८.

**हरिवल्लभ** [का. अनु.] पदकार. ह्यांचे गुरू ब्रह्मानंद हे असावेत. ह्यांनी *संगीतदर्पण* व काही पदे लिहिल्याचा उल्लेख आढळतो (संककासू., पृ. ११९).

**हरि विठ्ठल** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – रासोत्सव – पदात्मक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हरिसुत** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. अभंगबद्ध गीता; अभंगसंख्या सुमारे २८००; २. छत्तीस-श्लोकी गीता; संककासू., पृ. १२०; ३. पंढरी-माहात्म्य; ओ. सं. १०६, संपूर्ण; सवामं. हस्त. सू., खं. २, ४. परशुराम-चरित्र; संककासू., पृ. १२०.

**हरिसुत त्र्यंबक** [का. अनु.] कवी.

**रचना :** **अनु.** – महाभारत – विराटपर्व; त्रु. पो.; दोन प्रती; भाइसंमं. हस्त. सू., पृ. २१०.

**० हरिस्वामी–१** पहा **हरिबुवा भोंडवे.**

**हरिस्वामी–२** [का. अनु.] कवी. हे हरिस्वामी कोण हे कळण्याचे साधन आज उपलब्ध नाही. ह्यांनी एक पद रचले आहे. रामदासी-संप्रदाय-विशिष्ट काही आचारांचा ह्या पदांत उल्लेख आल्याने ते महत्त्वाचे ठरते. पदांत ब्रह्मचर्य, हुर्मुजी वस्त्रे, विवेकवैराग्य, झोळीचा आश्रय, इंद्रियनिरोध इ. रामदासीयांची बारा लक्षणे वर्णिली आहेत (मु. : श्रीसांप्रविवि., खं. १; धुळे, १९१७; पृ. ४४–४५).

**हरिहर–१** [ ? – समा. श. १६८८, फाल्गुन व. ९ / इ. स. १७६७] रामदासी कवी. भालगाव येथील समर्थशिष्य त्रिंबकराज ह्यांच्या मठपरंपरेतील. श्रीसमर्थ > त्रिंबकराज > हरिहर > खंडेराव > रघुवीरस्वामी > अशी ही परंपरा आहे.

हरिहरांच्या कवितेपैकी अभंगात्मक *समर्थचरित्रा*ची तीन त्रुटित पत्रे, *श्रीरामनामावली* हे प्रकरण (ग्रं. सं. १२१) व त्रिंबकराजांवरच्या दोन आरत्या एवढी कविता शं. श्री. देव ह्यांनी *श्रीसांप्रदायिक विविध विषय*, खंड १ मधून प्रसिद्ध केली आहे. *समर्थचरित्रा*च्या तीन त्रुटित पृष्ठांवर प्रत्येकी दहा-बारा कडवी येतात. हे 'लघुचरित्र' असून त्यात समर्थांचे स्तवन येते. *श्रीरामनामावलीत* संपूर्ण रामचरित्र विशेषणांच्या आधाराने थोडक्यात रंगविले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देव, शं. श्री. : श्रीसमर्थशिष्य त्रिंबकराज, मठ भालगाव, 'हरिहरवर्णित श्रीचरित्र'; श्रीरामनामावली; श्रीसांप्रविवि., खं. १; धुळे, १८३९; पृ. ८७–१००.

**हरिहर–२ / ० हरिहरेंद्रस्वामी** [ ? – समा. श. १७४१, चैत्र शु. ६ / इ. स. १८१९] ज्ञानदेवरचित *अनुभवामृता*चे भाष्यकार. हरिहरांचे वास्तव्य प्रथम पैठणास होते. हे ज्ञानदेवांच्या सदाशिवनाथ शिष्यांच्या परंपरेतील आहेत. ह्यांची गुरुपरंपरा : ज्ञानेश्वर > सदाशिव > गणेश > उद्धव > केशव > बाळनाथ > श्रीनाथ > हरिहरेंद्र अशी आहे. हरिहरांचे गुरू श्रीनाथ हे पैठण व आळंदी येथे राहात असत. पैठण येथे असताना हरिहर *अनुभवामृता*च्या आधारे चिद्विलासावर प्रवचने करीत. डॉ. रा. ग. हर्षे ह्यांनी संपादिलेल्या *ज्ञानेश्वरी*च्या प्रस्तावनेत ह्या चिद्विलासी हरिहरांचा उल्लेख केला आहे. हर्ष्यांजवळ *ज्ञानेश्वरी*ची श. १६३६ (इ. स. १७१४) ची तंजावर-प्रत होती, ह्यावरून प्रा. म. रा. जोशी ह्यांनी हरिहरांचा काल श. १६१० ते १७३५ च्या दरम्यानचा असावा असे मत व्यक्त केले आहे (ज्ञाने. त्रैमा., व. ७, अं. १, पृ. १०–१४). ह्या कालात *ज्ञानसागर*कर्ते भैरव अवधूत ह्यांनी पैठण येथे हरिहरांची भेट घेतली. त्यावेळी त्यांच्याबरोबर शिवदीननाथांचे पौत्र व नरहरिनाथांचे पुत्र लक्ष्मीनाथ हे होते. ह्या दोघांना हरिहरांनी आपले गुरू श्रीनाथ ह्यांनी पुरस्कारलेल्या चिद्विलासाचा सिद्धान्त *अनुभवामृता*च्या आधारे विवरून सांगितला. हरिहर, भैरव अवधूत व लक्ष्मीनाथ ह्यांचे मित्रमंडळ पैठण भागात चांगलेच प्रसिद्ध होते आणि हे तिघेही *अनुभवामृत* ह्या ग्रंथाधारे चिद्विलासाचे विवरण करीत असत.

श. १७३३ (इ. स. १८११) च्या सुमारास हरिहर आळंदीस होते. तेथे त्यांना ज्ञानेश्वरांचा साक्षात्कार झाला. पुढे येथेच ते मठ स्थापून राहिले. तेथेही हे ज्ञानेश्वरांच्या *अनुभवामृता*वर प्रवचने करीत असत. हे श. १७४१ च्या चैत्र शु. षष्ठीस (इ. स. १८१९) समाधिस्थ झाले.

आळंदीस हरिहरेंद्रस्वामींच्या मठात सापडलेली हरिहरेंद्रस्वामींची शिष्यपरंपरा अशी आहे : श्रीहरिहरेंद्र > श्रीकृष्णेंद्र > श्रीपूर्णब्रह्मेंद्र > श्रीशंकरेंद्र > श्रीकेवलेंद्र > श्रीमाधवेंद्र > श्रीपद्मनाभेंद्र > श्रीराघवेंद्र. या शेवटच्या राघवेंद्रांनी इ. स. १९६० मध्ये समाधी घेतली.

हरिहरकृत *राष्ट्रभाष्य* म्हणजे *अनुभवामृत-राष्ट्रभाष्य*. ह्या टीकेचे विवरणासहित संपादन व प्रकाशन भा. पं. बहिरट, द. वा. पोतदार व बाळाचार्य खुपेरकरशास्त्री ह्यांनी इ. स. १९६६ मध्ये केले (श्रीसंत-वाङ्मय-उपासक-मंडळ, पंढरपूर). *राष्ट्रभाष्य* ह्या टीकेची पोथी विटे (जि. सातारा) येथील इनामदार ह्यांच्याकडे होती. ह्या पोथीचे लेखन विटे येथील बहिरो बढाळ महाराज ह्यांनी श. १७५५ (इ. स. १८३३) त केले होते. येथेच भैरव अवधूत ऊर्फ आप्पाजीबोवा ह्यांच्या *ज्ञानसागर* (श्लो. ३१५) ग्रंथाची प्रतही प्राप्त झाली. हरिहरांच्या भाष्यावरून त्यांची वैयक्तिक काहीच माहिती उपलब्ध होत नाही. *ज्ञानसागर* ग्रंथात हरिहर हे नाव दोनदा व हरिहरेंद्र असे नाव एकदा आले आहे. *ज्ञानसागर* ग्रंथाचा र. का. श. १७३४ (इ. स. १८१२) असा दिला आहे. हरिहरांची ही टीका चिद्विलासाच्या दृष्टीने लिहिली आहे. *ज्ञानसागरा*तही चिद्विलासाचेच वर्णन आहे. ह्यावरून *ज्ञानसागरा*त उल्लेखिलेले हरिहर किंवा हरिहरेंद्र हे *अनुभवामृत-भाष्य*कार होत, असे निश्चित म्हणता येते.

लेखकाचा निर्याणकाल श. १७४१ (इ. स. १८१९) आहे, तेव्हा ह्या भाष्याचे लेखन श. १७३३ ते १७४१ च्या दरम्यान केव्हा तरी झाले असावे, असे भा. पं. बहिरट ह्यांनी त्यांच्या टिपणात म्हटले आहे (*इंद्रायणी*, दीअं. १९६२, पृ. ५३). पण हरिहरेंद्रांनी श. १७३३ नंतरच भाष्यरचना केली, तत्पूर्वी नाही, ही गोष्ट त्यांच्या टिपणातील आशयावरून सिद्ध होत नाही. उलट आळंदीस येण्यापूर्वी म्हणजे श. १७३३ पूर्वी त्यांनी *राष्ट्रभाष्य* लिहिले असावे असे अनुमान अधिक सयुक्तिक वाटते. *ज्ञानसागर*कर्ते आप्पाजीबोवा "त्या श्रवणामृताचे तुषार। स्फुरते ते बोलिलें प्रकार।" ह्या ओवीखंडात *राष्ट्रभाष्या*च्या श्रवणामृताचे तुषारच माझ्या *ज्ञानसागरा*त प्रस्फुरित झाले असे जे सांगतात त्यावरून ही स्थिती हरिहरांच्या विवेचनपद्धतीच्या पूर्णपरिणत अवस्थेची निदर्शक मानली पाहिजे. भाष्यलेखन त्यावेळी पूर्ण झाले असावे. *ज्ञानसागर* ग्रंथ श. १७३४ (इ. स. १८१२) मध्ये रचला. त्यापूर्वीच म्हणजे हरिहर आळंदीला येण्यापूर्वीच *राष्ट्रभाष्य*-टीकेची रचना पैठणास झाली असावी. आळंदीच्या मठात ग्रंथाची प्रत सापडत नाही ह्याचाही अर्थ ह्या टीकेचे अन्यस्थळी लेखन झाले असावे, असा होतो.

ह्या टीकेस *हरिहरभाष्य* असेही नाव आहे. ग्रंथात जागोजाग त्यांनी पूर्वपक्ष-उत्तरपक्ष केला आहे. शंका व तिचे निरसन करून चिद्विलासाचा पुरस्कार केला आहे. ह्या भाष्यात विवर्त व अजात पक्षाचे निरसन आहे. दशप्रकरणात्मक *अनुभवामृता*ची मांडणी ही *ब्रह्मसूत्रां*प्रमाणे चार अध्यायांत विभागली आहे.

प्राचीन व अर्वाचीन टीकाकार *अनुभवामृता*चे दहा अध्याय आहेत असे मानून त्यावर टीका लिहितात. परंतु *अनुभवामृत-राष्ट्रभाष्य* ह्या ग्रंथाचे भाष्यकार तसे समजत नाहीत. ह्या ग्रंथातील ओव्यांना सूत्र समजून ह्या ग्रंथाचे चार अध्याय आहेत असे ते समजतात. बादरायणसूत्रांच्या चार-अध्यायी वेदान्तसूत्रग्रंथाप्रमाणे ह्या ग्रंथाची त्यांनी योजना केली आहे. ग्रंथाच्या चारही अध्यायांना वेदान्तसूत्रांत जी नावे क्रमाने दिली आहेत तीच नावे – समन्वयाध्याय, अविरोधाध्याय, साधनाध्याय व फलाध्याय – दिलेली आढळतात (पं. बाळाचार्य खुपेरकरशास्त्री; *अनुभवामृत-राष्ट्रभाष्य*, विवरण, पृ. ३२८). ह्या ग्रंथाचे एक संपादक भा. पं. बहिरट *अनुभवामृता*ची सूत्रात्मक मांडणी कोणी केली ह्या प्रश्नाचे उत्तर म्हणून पुढील खुलासा करतात : "हरिहरांनी मूळ *अनुभवामृता*च्या ओव्यांत सूत्रे कल्पून त्यांवर आपले विवरण म्हणजे भाष्य केले अशी कल्पना केली आहे" *अनुभवामृत-राष्ट्रभाष्य*; प्रस्ता., पृ. १०). परंतु संपादकांचे हे लिहिणे बरोबर नाही, असे प्रा. म. रा. जोशी ह्यांनी *राष्ट्रभाष्या*तील अनेक उतारे उद्धृत करून सिद्ध केले आहे.

बहिरट व खुपेरकरशास्त्री म्हणतात त्याप्रमाणे हरिहरांनी सूत्रे लिहिली नाहीत. ते ह्या सूत्रांचे केवळ भाष्यकार आहेत. म. रा. जोशी लिहितात, "*अनुभवामृता*च्या ओव्यांना सूत्र कल्पून त्याची सूत्रकल्पात विभागणी करणारा सूत्रकार, सूत्रावर व्याख्यान करणाऱ्याहून वेगळा आहे हे समजण्यास पुरावा *राष्ट्रभाष्यात*च आहे. उदा., पुढील ओवी व त्यावरील भाष्य : 'म्हणौनि ज्ञानदेव म्हणे । अनुभवामृतें एणें । सनू भोगिजे सनें । विश्वासेनि ॥'

"ह्या ओवीवर *राष्ट्रभाष्यात* पुढील मजकूर आढळतो : "सर्वान् प्रत्याशिषं ददाति **सूत्रकारः श्रीनाथः** या ग्रंथे साधकाने हि विश्व असतांच सकल अहमेव ब्रह्मादि हे ब्रह्मानंद सुखचि भोगावे **हे हरिहर व तू हि भोग, हे हरिहर इति ममापि वरदानम् दत्तम्.**"

"ह्यावरून श्रीनाथ हे सूत्रकार व हरिहर भाष्यकर्ते आहेत, हे स्पष्ट होते. श्रीनाथ व हरिहर हे गुरुशिष्य आहेत. श्रीनाथांनी *अनुभवामृता*च्या ओव्यांना सूत्र कल्पून त्यांचे *सूत्रकल्प* तयार केले. त्यांत त्यांनी चिद्विलासाचा पुरस्कार करून अजात व विवर्त ह्यांचे खंडन केले. त्यांनी *अनुभवामृत* ह्या प्रकरणग्रंथाला सूत्रग्रंथाचे स्वरूप दिले. 'मराठी वाङ्मयेतिहासात' ह्या पद्धतीचे अतोनात महत्त्व आहे. प्रकरणग्रंथ, सूत्रग्रंथ, भाष्यग्रंथ असा क्रम ह्यात आहे. श्रीनाथांच्या समाधीनंतर हरिहरांनी त्यावर *राष्ट्रभाष्याची* रचना केली." (ज्ञाने. त्रैमा., व. ७, अं. १, पृ. १३).

**रचना : मु.** – अनुभवामृत-राष्ट्रभाष्य; संपा. बहिरट, भा. पं.; पोतदार, द. वा. व खुपेरकरशास्त्री, पं. बाळाचार्य; पंढरपूर, १९६६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. जोशी, प्र. पं. : हरिहरकृत 'राष्ट्रभाष्या'-चा रचनाकाल; इंद्रायणी, डिसें. १९६२; पृ. ४७; २. बहिरट, भा. पं. : राष्ट्रभाष्यकार हरिहर; इंद्रायणी, दीअं. १९६२; पृ. ५०–५५.

**हरिहर–३** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – १. गणेशतांडव; २. रुक्मिणीसंवाद; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० हरिहरदास–१** – पहा हरदास.

**हरिहरदास–२** [का. अनु.] कवी. हरिहरदासकविकृत *पवनविजय* ग्रंथाची पोथी टाकळी येथील रामदासी मठ संग्रहातून प्राप्त झाली आहे (सवामं. बा. ३९). उपलब्ध ओव्या २०४. कवीची पदपदांतरेही आढळतात (सवामं. हस्त. सू., खं. २).

**हरिहरराय** [का. अनु.] कवी. ह्यांनी विद्यारण्यमुनी ह्यांच्या *पंचदशी*वर (अ. १५) ओवीबद्ध टीका केली आहे. तिचे तीन भाग आहेत : १. सत्तापंचक, २. चितीपंचक, ३. आनंदपंचक (संककासू., पृ. १४३).

**रचना : अमु.** – श्रीहरिगीता, भा. १; प्रक. ५; मुंबई, १९०२.

**हरिहरेंद्र** [का. अनु.] ग्रंथकार.

**रचना : अमु.** – वेदान्त; वि. ल. भावे संग्रह; संककासू., पृ. १२०.

**० हरिहरेंद्रस्वामी** – पहा हरिहर–२.

**हरी–१** [का. अनु.] पदकार. रंगनाथशिष्य.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. ११०.

**हरी–२** [अंदाजे इ. स. १७३०] कवी. कचेश्वरपुत्र. ह्यांची श्रीशाहू-छत्रपती, त्यांच्या राण्या सगुणाबाई व सकुवारबाई ह्यांच्यावर केलेली श्लोकरचना उपलब्ध आहे (संककासू., पृ. ११८).

**हरींद्रमुनी** [का. अनु.] महानुभाव ग्रंथकार. मुरारमल्ल विद्वांसांचे शिष्य. ह्यांच्या नावावर *ज्ञानचंद्रिका* नावाचा एक गद्यग्रंथ आढळतो. य. खु. देशपांडे ह्यांनी हा ग्रंथ विश्वनाथ बाळापूरकर ह्यांचा असे म्हटले आहे, पण ते चुकीचे आहे. डॉ. वि. भि. कोलते हे विश्वनाथ बाळापूरकर ह्यांच्या *ज्ञानप्रबोध* ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत लिहितात : "ज्ञानचंद्रिका या गद्य ग्रंथाची हस्तलिखित पोथी रितपुर येथील 'श्री गोपीराज ग्रंथसंग्रहालया'त मी पाहिली होती, पण तो ग्रंथ 'श्रीविद्वन्मुर-शत्रुसूनुहरिणा' म्हणजे विद्वान मुरारीचा शिष्य हरी याने लिहिल्याचा उल्लेख ग्रंथाच्या शेवटी दिलेल्या संस्कृत श्लोकात आहे." (*ज्ञानप्रबोध*; मलकापूर, १९७३; प्रस्ता., पृ. २७). ह्यांच्या अन्य ग्रंथरचनेची नोंद भावे ह्यांच्या महानुभाव ग्रंथसूचीत आढळते.

**रचना : अमु.** – १. आचारस्थळ प्रश्नभाष्य. २. चतुर्दशवाद. ३. दृष्टांत पक्षभेद. ४. प्रकरण प्रश्नभाष्य. ५. प्रश्नभाष्य उपलवन. ६. विचार प्रश्नभाष्य. ७. विवेक चिंतामणी. ८. समग्रदृष्टांत उद्धर्ण अनुवर्णन; ममग्रंककासू., पृ. ३२. ९. ज्ञानचंद्रिका; श्री गोपीराज ग्रंथालय; रिद्धपूर.

**० हरीपंत** – पहा हरीपुजदेव.

**हरीपुजदेव / ० हरीपंत / ० हरीपूजन** [का. अनु.] कवी. ह्या कवीच्या *कार्तिकमाहात्म्य* ह्या मराठी ग्रंथाची पोथी महानुभावांचे क्षेत्र जे ऋद्धिपूर तेथे मिळाली. ग्रंथावरून कवीची जी काही माहिती सापडते ती अशी : पिता वऱ्हाडप्रांतातील अळजपूर येथील पूजंभट ब्राह्मण. माता लक्ष्मी. कवीचा संप्रदाय किंवा गुरुपरंपरा तो स्पष्टपणे सांगत नाही. त्या संबंधात प्राप्त झालेली एक ओवी पुढीलप्रमाणे आहे : "काशिनाथपंत । दीक्षाग्रहणीं गुरु समर्थ । विद्याभ्यासीं हि सत्य । गिरमाजी उद्धव जाणीजे ॥"

*कार्तिकमाहात्म्य* ग्रंथाच्या एकतीस अध्यायांपैकी फक्त १०–३१ एवढे २२ च अध्याय उपलब्ध आहेत. ग्रंथात कार्तिकमासात करावयाची व्रतवैकल्ये व त्यांचे विधी सांगितले आहेत; उदा., कार्तिकव्रतीयास वर्ज्यावर्ज्य, दीपदानव्रत, स्नान-शौचविधि-कथन, कार्तिकस्नान उद्यापन इ. ह्याबरोबर *मत्स्यावतार, धनेश्वराख्यान, वामदेवाख्यान, जय-विजय आख्यान* अशी अनेक आख्यानेही घातली आहेत. काव्यदृष्ट्या ग्रंथ विशेष महत्त्वाचा नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** चांदोरकर, गो. का.; हरीपुजदेव; भाइसंमंइति., श. १८३६; पृ. ७१–७३.

**० हरीपूजन** – पहा हरीपुजदेव.

**हरीराम** [इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध] शाहीर. साताऱ्याच्या छत्रपती प्रतापसिंहावर ह्याने पोवाडा रचला आहे. महाराजांचे वर्णन कवीच्याच पुढील शब्दांत पाहावे : "शुभ्र शिरा पोशाख डौल साधा बांधा नामी आकृती । सांबरूप भोळे अवतार जसे कृष्ण गोकुळीं नांदती ।" ह्यांच्या स्वारीचा थाट मोठा अजब असे असेही कवीने वर्णन केले आहे.

**रचना : मु.** – प्रतापसिंह महाराजाचा पोवाडा; ऐतिपो., खं. ३; पृ. ७२.

**० हरी वामन** – पहा हरि दीक्षित.

**हर्षराय** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – चंद्रावरी तांब्राशीलढाई; श्लोक; अपूर्ण; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हंस** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – पदपदांतरे; संककासू., पृ. १२०.

**हंसनाथ** [का. अनु.] कवी.

**रचना : अमु.** – वैराग्यशतक; गो. का. चांदोरकर संग्रह; संककासू., पृ. १२०.

**हंसपरात्पर भारथिनायक** [का. अनु.] पदकार. ह्यांनी दत्तविषयक अनेक पदे केली आहेत. त्यातील काही मुद्रितही झाली आहेत. ह्यांचे 'श्रीपाद श्रीवल्लभ तारि तारि मजला' हे पद प्रसिद्ध आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** हर्षे, रा. ग.; कांहीं अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांचीं पदें; भाइसंमंत्रै., व. २६, अं. ४, पृ. ४९.

**० हंसराज** – पहा हंसराजस्वामी.

**हंसराजस्वामी** / ० नारायणतीर्थ / ० हंसराज / ० हंसस्वामी [९ ऑग. १८०५ – वैशाख शु. ८, शके १७७८ / १२ मे १८५५] संतकवी. जन्म मराठवाड्यातील परभणी ह्या गावी. ह्यांचे मूळचे नाव नारायण. ह्यांचे आजोबा रामचंद्रपंत हे सावकार होते. वडील गंगाधरपंत हे परभणी येथे पेशकारी (मुतालिकी) करीत. आईचे नाव रेणुकाबाई. नारायणाच्या जन्मापासून गंगाधरपंतांची ग्रहदशा फिरली. त्यांची नोकरी सुटली व उपजीविकेसाठी गावोगाव वणवण भटकण्याची पाळी त्यांजवर आली. अशा स्थितीत ते रेणुकाबाईंच्या माहेरी आले. तेथे एका कुळकर्ण्याच्या मुलीशी नारायणाचे लग्न बालपणीच लावून देण्यात आले. घरची परिस्थिती कठीण आहे हे पाहून एके दिवशी कोणासही न सांगता नारायण सुरतेला गेले. तेथून पुढे ते ग्वाल्हेरास गेले. धंद्याचे वा नोकरीचे कोठेच न जमल्याने ते पुन्हा परभणीला आले. तेथे त्यांना पागेचे काम मिळाले. प्रपंचापेक्षा ह्यांच्या मनाचा ओढा परमार्थाकडे असल्यामुळे ह्यांचे मन संसारात रमेना. पाथरी येथे एका संन्याशाने ह्यांना 'वसमतचे लक्ष्मणराव तुला गुरूपदेश देतील' म्हणून सांगितले. त्याप्रमाणे लक्ष्मणरावांकडे येऊन त्यांनी गुरुमंत्राची याचना केली. लक्ष्मणरावांनी त्यांना शेवाळे गावी नेले. त्यांची परमार्थसाधनेसंबंधीची तळमळ व पात्रता पाहून त्यांस त्यांनी उपदेश दिला. लक्ष्मणराव हे श्रीसमर्थ रामदासांपासून सहावे पुरुष होत. ही परंपरा अशी : श्रीसमर्थ रामदास > उद्धव > माधव > रुद्रराम > नागनाथ > लक्ष्मण > नारायण. *हंसपद्धति*कारांनी ह्या परंपरेविषयी म्हटले आहे की, आदिनारायणे हंसरूपाने ब्रह्मदेवाला उपदेश केला. ब्रह्मदेवाने वसिष्ठास व वसिष्ठांनी तो रामचंद्रास दिला. रामचंद्रांनी तोच उपदेश श्रीसमर्थांना केला. अशा तऱ्हेने आदि-हंसगुरूपासून सुरू झालेल्या ज्ञानपरंपरेचे समर्थ व उद्धव-माधवादी त्यांचे शिष्य-प्रशिष्य हे वारसदार ठरतात. ब्रह्मविद्येची ही अखंड परंपरा जोपासणाऱ्या संप्रदायाला 'हंससंप्रदाय' म्हणतात. हंसराजस्वामींच्या मूळच्या नारायण ह्या नावाऐवजी हंसराज हे नाव रूढ होण्याला हे कारण झाले, असे *हंसपद्धति*कार सांगतात.

गुरूपदेशानंतर हंसराजस्वामींनी काही काळ वहऱ्हाडात अनसिंग ह्या गावी सरदेशपांडे म्हणून नोकरी केली. पुढे ते शेवाळ्यास आपल्या पत्नीसह गुरुसेवा करीत राहिले. अल्पकाळातच त्यांचा नूतन पुत्र व पत्नी निवर्तल्याने प्रपंचाचा जो पाश नारायणरावांच्या गळ्यात अडकला होता तोही तुटून गेला. नंतर गुरूच्या अनुज्ञेने त्यांनी संचारास प्रारंभ केला. प्रथम ते माहुरास गेले पण तेथे लक्ष्मणहंसांच्या आजाराचे वृत्त ऐकून ते शेवाळ्यास परत आले. येथील वास्तव्यात त्यांनी *गुरुभक्तिसार* ह्या ग्रंथाची रचना केली. गुरूंची उत्कृष्ट सेवा करून पुन: ते संचारास बाहेर पडले. फिरत फिरत ते पंढरपूरला आले. तेथे जनार्दन उत्पात व सखारामबाबा डोमगावकर ह्यांच्याशी स्नेह जमला. पंढरपुरातच पूर्णाश्रमस्वामींचा व नारायणहंसांचा परिचय वाढला. पूर्णाश्रमस्वामी उत्तरेकडे जावयास निघाले; तेव्हा त्यांच्याकडून केव्हाही संन्यास घेता येईल असा विचार करून ह्यांनी प्रेषोच्चार [प्रेषमंत्राचा उच्चार. प्रेषमंत्र ह्याचा अर्थ मोक्षाप्रत पाठविणारा मंत्र. संन्यास घेतेवेळी तो घेणाऱ्याने हा मंत्र उच्चारावयाचा असतो.] लिहून घेतले होते. स्वामी गेल्यानंतर थोड्याच दिवसांनी ह्यांनी संन्यासाश्रम घेतला व ते नारायणाचे 'नारायणतीर्थ' बनले. त्यांच्या ह्या परमहंसदीक्षेमुळे त्यांना हंसराज म्हणू लागले. पंढरीहून डोमगावकर सखारामबाबा ह्यांनी त्यांस आपल्या गावी नेऊन ठेवले व त्यांची आठनऊ वर्षे उत्तम सेवा केली. पुढे सखारामबाबा हैद्राबाद येथे जाऊन समाधिस्थ झाले व हंसराजस्वामी परंडा येथे आल्यानंतर काही विकृतीने त्यांचे पाय लुळे होऊन त्यांची चालण्याची शक्ती कुंठित झाली. वयाच्या पन्नासाव्या वर्षी 'शके १७७८, वैशाख शु. ८' ह्या दिवशी हे परंडा येथे समाधिस्थ झाले.

हंसराजांची ग्रंथरचना प्रचंड असून तिच्यात कवीचा अध्यात्मावरील अधिकार, विद्वत्ता व दीर्घोद्योग ह्यांचा प्रत्यय येतो. ह्यांच्या ग्रंथरचनेवर *दासबोधा*च्या साध्या आणि ठसठशीत भाषेचा प्रभाव पडलेला दिसतो. ही ग्रंथरचना सुमारे ३५००० च्या घरात जाते. ह्यापैकी *सदाचार* हा ग्रंथ शंकराचार्यांच्या *सदाचार* नावाच्या प्रकरणावरील टीका आहे. *वाक्यवृत्ति* ही श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या *लघुवाक्यवृत्ति* ह्या १८ श्लोकांच्या छोट्या प्रकरणावरील टीका आहे; तर *चूडालाख्यान* हा *बृहद्योगवासिष्ठा*तील *चूडालाख्याना*चा भावानुवाद आहे. वेदाज्ञा हा ग्रंथ *ईशावास्योपनिषदा*वर केलेली टीका आहे. *संकेतकुबडी* हा ग्रंथ श्रीसमर्थांच्या *दासबोधा*चे सार सांगणारा ग्रंथ असून *पूर्वारंभगाथा* ही समर्थांच्याच *पूर्वारंभ* ह्या प्रकरणावरील टीका आहे. *गद्यरूप तत्त्वझाडा, आगमसार, कथाकल्पलता* इत्यादी वाङ्मय स्वतंत्र आहे.

त्यांच्या ह्या वैशिष्ट्यपूर्ण कृतीचे वर्णन न. र. फाटक ह्यांनी पुढीलप्रमाणे केले आहे : "या पुरुषाच्या ग्रंथरचनेचा विशेष हा की, ज्या जुन्या वेदान्तप्रदेशाची साधारणपणे पूर्वीच्या ग्रंथकारांनी उपेक्षा केली, त्याचा परिचय करून देण्याची कामगिरी हंसराजांनी बजाविली. उपनिषदे किंवा शंकराचार्यांची स्फुट प्रकरणे यांकडे कोणी लक्ष दिल्याचे आढळत नाही. हंसराजस्वामींनी अशा सामान्यत: उपेक्षित ग्रंथांचे नवे दालन उघडून मराठीच्या ग्रंथभांडारात नवी भर टाकली, असे म्हटल्यास अतिशयोक्तीचे भय नाही." (*वाक्यवृत्ती*ची प्रस्तावना). त्यांच्या ह्या सर्व ग्रंथरचनेकडे पाहता त्यांनी मराठी वाङ्मयात नवीन वाटा चोखाळण्याचा प्रयत्न केला, असे म्हणता येते.

**रचना : मु.** – १. अमृतानुभव (समओवीबद्ध टीका); २. आगमसार; ३. कथाकल्पलता (अपूर्ण; उपलब्ध ८ प्रकरणे) ४. चूडालाख्यान; ५. वाक्यवृत्ति; ६. वेद नावाची पदे; ७. वेदाज्ञा; ८. वेदेश्वरी; ९. संकेतकुबडी; १० सदाचार. **अमु.** – १. गद्यरूप तत्त्वझाडा (काही भागच उपलब्ध); २. गुरुभक्तिसार (अनुपलब्ध); ३. पूर्वारंभ गाथा; ४. भक्तिज्ञानवैराग्यपर स्फुट अभंग व पदे (अनुपलब्ध); ५. स्वात्मादर्श (संस्कृत; अनुपलब्ध).
**चरित्र, चर्चा, अभ्यास :** काळे, कल्याण; परंड्याचे हंसराजस्वामी; मराठवाडा संशोधन मंडळ वार्षिक; औरंगाबाद, १९७४; पृ. ४१–५५.

**० हंसस्वामी** – पहा हंसराजस्वामी.

**हाकीम** [अंदाजे इ. स. चे १७ वे शतक, उत्तरार्ध] मुसलमान कवी. शेख महंमद ह्या प्रख्यात संतकवीचे हे नातू. ह्यांची वंशपरंपरा अशी : शेख महंमद > दावलजी > हाकीम.

ह्यांनी शेख महंमदांवर लिहिलेली एक आरती उपलब्ध आहे. ही आरती परमानुभूतीच्या परिभाषेतील आहे. शेख महंमदांना त्यांचा पारमार्थिक वारसा जागविणारे पौरुष लाभले हे ह्या रचनेवरून लक्षात येते. प्रस्तुत रचना *शेख महंमदबाबा यांचा कवितासंग्रह* ह्या पुस्तकात 'शेख महंमद – चरित्रपर कविता' ह्या विभागात (पृ. १२८) मुद्रित झाली आहे (संपा. वा. सी. बेंद्रे; मुंबई, जून १९६१).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : शेख महंमद; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. ९६–९७.

**० हिराइसा** – पहा हिरांबा.

**हिरांबा** / ० हिराइसा [इ. स. चे १३ वे शतक, उत्तरार्ध] महानुभाव कवयित्री. ही *वछाहरण*कर्ते दामोदर पंडित ह्यांची पत्नी. ह्या दोघांनीही नागदेवाचार्यांचा अनुग्रह घेतला होता. पंथाची दीक्षा मात्र प्रथम हिराइसेने घेतली. उत्तर वयात दोघांनीही सर्वसंगपरित्याग करून संन्यास घेतला व ती दोघे नागदेवाचार्यांच्या सांनिध्यात राहू लागली. कडकडीत वैराग्य आणि शुद्ध आचरण ह्यांकरिता हिरांबेची ख्याती होती. नागदेवाचार्य हिराइसेला 'विरक्ताची कसवटी'च

मानत. 'इचां कसीं उतरला तो विरक्त' असा तिच्याविषयी त्यांचा अभिप्राय असे. हिच्या अंगी कवित्वशक्ती असून तिने *नाममाहिमावर्णन* काव्य रचले असल्याचा निर्देश येतो (ममग्रंककासू., पृ. ३२; मसा., आ. ५, पृ. ६९१–६९२).

**हिरुस्वामी धायूके / घाटते** [का. अनु.] कवी.

**रचना :** अमु. – शरभेंद्रस्तुतिपर आर्या व श्लोक; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**हुसेन अंबरखान** / ० अंबरहुसेन [श. १५२५, ज्येष्ठ शु. ११ / इ. स. १६०३ – अंदाजे श. १५७५ / इ. स. १६५३] मुसलमान संत-कवी. ह्यांची *अंबरहुसेनी* ही गीतेवरील समश्लोकी टीका उपलब्ध आहे. अंबरखान हे ह्यांच्या घराण्याचे उपनाव. *गीताटीके*च्या प्रारंभी ह्यांनी आपल्या पित्याचा व पितामहाचा उल्लेख केला आहे. अंबर अंबरखान > याकुत अंबरखान > हुसेन अंबरखान अशी ही कुलपरंपरा आहे. अंबरखान घराणे कोठे नांदत असावे, यासंबंधीची निश्चित माहिती उपलब्ध नाही. दौलताबादकडील निजामाच्या सेवेत असणारा अंबरखान हा *गीताटीका*कार हुसेनचा पिता याकुत अंबरखान असावा असे मत रा. चिं. ढेरे यांनी व्यक्त केले आहे. तंजावरकडील एक ग्रंथकार वैद्यनाथ ह्याने रचलेल्या *चिदंबरजयंतीस्तोत्र* ह्या प्रकरणात 'म्लेंछ अंबरखान हा कलियुगांत देवाचा अवतार आहे' व त्याचा अवतार 'शके १५२५ शुभकृत् नाम संवत्सर ज्येष्ठ शु. ११ मंगळवार दिवा १७ घटिकेस सिहलग्नीं झाला' अशी तपशीलवार नोंद केली आहे. अंबरखानांनी त्यांच्या गुरूचा ग्रंथात उल्लेख केलेला नाही. *काव्यसंग्रह*कार ओकांनी ह्यांना केशवस्वामी भागानगरकरांचे शिष्य मानले आहे, परंतु तसे मानण्यास निश्चित पुरावा उपलब्ध नाही.

हुसेन अंबरखानविरचित *गीताटीका* (ओ. सं. ८७१) ही जवळ जवळ समओवी आहे. आपण ही नवी टीका लिहिण्यास प्रवृत्त का झालो हे कवीने पहिल्याच अध्यायाच्या दोन ओव्यांत स्पष्ट केले आहे. 'अच्युताश्रम-निवृत्तिनाथादिकीं । गीतेचिये प्रतिश्लोकीं । केली वोवी येकियेकी । परि श्लोकार्थ संपूर्ण नसे ॥ १.११ ॥ येथें न लिहिणे अन्वयार्थ । आणि संपूर्ण पदांचा अर्थ । विचारुनिया वाक्यार्थ । तात्पर्यार्थ लिहिजे ॥ १.१४ ॥' कवीची दृष्टी केवळ तात्पर्यार्थाकडे म्हणजेच गीतेचा भावार्थ समजून घेण्याकडे आहे. त्यामुळे कवी आपल्या टीकेचे वर्णन *गीताभावार्थदीपिका* असे करतो. ह्या भूमिकेमुळे तो विस्तार मुळीच करत नाही. शंकराचार्यांचे भाष्य व श्रीधरस्वामींचे व्याख्यान ह्यावरून ही टीका महाराष्ट्रभाषेत रचल्याचे कवी सांगतो. तो संस्कृतज्ञ आणि व्युत्पन्न असावा असे वाटते. नेमक्या व मोजक्या मराठी शब्दांनी मूळ संस्कृत शब्दांचे अर्थ मराठीत आणण्याची कला हुसेनाला चांगली साधली आहे. 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं' ह्या श्लोकाचे पुढील भाषान्तर पहा : "मेलासि तरि स्वर्ग पावसी । जितोनि तरि पृथ्वी भोगिसी । म्हणौनि कौंतेया ऊठि युद्धासीं । कृतनिश्चयें ॥ १.४६ ॥" शब्दाला प्रतिशब्द देऊन मुळातला आशय सहजपणे सोप्या रीतीने मराठीत आणला, हे ह्या टीकेचे वैशिष्ट्य होय.

ही टीका श. १५७५ (इ. स. १६५३) च्या आश्विन शुद्ध दशमीस पूर्ण झाली अशी नोंद कवीने केलेली आहे (१८.८६), तसेच *अंबरहुसेनी* असे टीकेचे नावही तो देतो. टीका कोठे रचली ह्याचा उल्लेख मात्र ग्रंथात आढळत नाही. रचनेनंतर एक वर्षाच्या आतच तिची एक प्रत चंजी (तंजावर) येथे उतरली गेली. त्यावरून हा ग्रंथही तिकडेच रचला गेला असावा व अंबरखानांचे वास्तव्यही त्याच भागात असावे असे वाटते. काव्य आणि तत्त्वज्ञान ह्या दोनही दृष्टींनी कवी नवीन असे काही देऊ शकला नसला, तरी गीतेचा तात्पर्यार्थ इतरांना सुगमतेने समजण्याची सोय त्याने आपल्या या टीकेने करून ठेवली आहे. टीकेचे पहिले दोन अध्याय मुद्रित झाले आहेत (मसंप., ऑक्टो. १९५४, पृ. ९–१५).

**रचना :** अमु. –हुसेनांबरी; ओ. सं. ८१६; र. श. १५७५; प्रत श. १५७३; बाळाजी त्रिमल; तंसम. बा. ४९, हस्त. यादी, क्र. १.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : हुसेन अंबरखान; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. ४२–४९.

**हुसेनखान** [का. अनु.] शाहीर. कोणा हुसेनखान शाहीराची "नको जाऊं लष्करा सजणा, कैक गेले मरुन । घरीं राहूं मौजा करुन ॥ " अशी एक लावणी ढेरे ह्यांच्या पाहण्यात आली (भाइसंमं. संग्रहातील हस्तलिखित बाडांपैकी एका बाडात संग्रहित). हुसेनखानाने गायलेला हा 'ख्याल' पेशवाईतील वातावरणाशी सुसंवादी असाच आहे. अशा प्रकारचा भाव व्यक्त करणाऱ्या अनेक लावण्या शाहिरी कवनसंभारात आढळतात (रा. चिं. ढेरे, मुमसंक., पृ. १७४–७५).

**हेमाडपंत** / ० हेमाद्रिपंडित [इ. स. चे १३ वे शतक, उत्तरार्ध] धर्मशास्त्रकार व राजकारणकुशल पंडित. मुकुंदराजानंतरच्या काळात हेमाडपंत किंवा हेमाद्रिपंडित हे फार प्रसिद्ध पुरुष होऊन गेले. हे वत्सगोत्री, माध्यंदिनशाखी, पंचप्रवरी ब्राह्मण. ह्यांच्या आजोबांचे नाव वासुदेव असून पित्याचे नाव कामदेव होते. देवगिरीकर यादव वंशातला पाचवा पुरुष महादेव व सहावा पुरुष रामदेवराव ह्यांच्या पदरी मुख्य कारभारी म्हणून हेमाद्रिपंडित काम करीत असत. 'श्रीकरणाधिप' (दप्तरावरील प्रमुख) अशी ह्यांची पदवी होती. हे फार कर्तृत्ववान आणि बुद्धिमान होते. मोडी लिपी आणि हेमाडपंती शिल्प ह्या दोन नव्या गोष्टी त्यांनी महाराष्ट्रात आणल्या व रूढ केल्या. मोडी लिपीचा प्रसार ही गोष्ट मराठी भाषेच्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे. एकटाकी लिहिता येण्यासारखे वळण अक्षरांना देण्याची सुधारणा हेमाडपंतांनी घडवून आणली. देवनागरी अक्षरांना एकतऱ्हेची मोड किंवा लपेट देऊन ती लेखनासाठी सुलभ केली, म्हणून ती मोडी. तिच्यातील अक्षरांचे वळण बहुधा वर असल्याने ती सहज एकटाकाने लिहिता येते.

हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत ह्यांनी संस्कृत भाषेत *चतुर्वर्गचिंतामणि*, *कालनिर्णय*, *कालनिर्णयसंक्षेप*, *तिथिनिर्णय*, *कैवल्यदीपिका* (श्रीबोपदेवाच्या *मुक्ताफल* ग्रंथावरील टीका), *आयुर्वेद रसायण* (*अष्टांगहृदय* ह्या ग्रंथावर टीका), *दानवाक्यावलि*, *पर्जन्यप्रयोग*, *प्रतिष्ठा*, *लक्षणसमुच्चय*, *हेमाद्रीनिर्णय*, *त्रिस्थलविधि*, *अर्थकांड* असे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. ह्यांपैकी *चतुर्वर्गचिंतामणि* हा ग्रंथ विस्ताराने प्रचंड (ह्याची ६००० पृष्ठे भरतील अशी सहा पुस्तके छापली गेली आहेत) असून हिंदूंच्या धार्मिक बाबतीत तो आधारभूत व सर्वमान्य गणला जातो. ह्यात अनेक धार्मिक विषयांचे विस्तृत विवेचन केले आहे. मीमांसा व धर्मशास्त्र ह्या दृष्टींनीही हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. श्रुती, स्मृती, इतिहास व पुराणे ह्यांतील सकृद्दर्शनी परस्परविरोधी दिसणाऱ्या वाक्यांचा मीमांसाशास्त्रास अनुसरून समन्वय करण्यात हेमाद्रींनी बरेच कौशल्य दाखविले आहे.

राज्यहिताच्या विविध बाबींकडे लक्ष पुरवून, दीर्घ चिंतनाने स्वतःस पटलेल्या नव्या नव्या सुधारणा स्वतःच्या अधिकारात घडवून आणणारा हा बुद्धिमान आणि कर्तृत्ववान पुरुष मरण पावल्यावर त्याच्या पश्चात १३ व्या शतकातील मराठी सत्ता लयाला गेली.

हेमाडपंतांनी मराठीत (स्वतः) लिहिलेला किंवा लिहवून घेतलेला असा साक्षात एकही ग्रंथ उपलब्ध नाही. परंतु लेखन कसे करावे किंवा ते कसे असावे, जमाखर्च कशा पद्धतीने लिहावा, पत्रव्यवहार कोणत्या रीतीने करावा ह्या सर्वांसंबंधी नियम ठरवून एक *व्यवहार-कोश* ह्यांनी तयार केला असावा असे अनुमान करावेसे वाटते. इ. स. १८५३ साली गणपतराव मुनशी ह्यांनी *हेमाद्रिकृत लेखनकल्पतरु* ह्या नावाचा एक ग्रंथ मुंबईत प्रसिद्ध केला. ह्या ग्रंथाची रचना अनेकवृत्तात्मक, श्लोकबद्ध असून त्या श्लोकांवर पुढे गद्य टीका दिली

आहे. महाराष्ट्र देशातील लोकांस, वाडवडिलांपासून जे लेखन चालत आले आहे त्याची रीती व स्वप्रमाण लेखन कोणते हे कळण्यासाठी ह्या ग्रंथाची रचना झाली आहे. ह्यात पत्रोत्तराचे मायने, उत्तर लिहिण्याच्या अनेक रीती सांगितल्या आहेत. ह्या *लेखनकल्पतरू*शिवाय निरनिराळी अनेक मेस्तके किंवा जमाखर्चाच्या पद्धती हेमाद्रिकृत समजल्या जातात. ह्यावरून असे अनुमान बांधता येते की राज्यातील शिस्तीसंबंधात एखादा शासनग्रंथ ह्या फडनविसांनी आपल्या अधिकारयुक्त वाणीने लिहिला असावा. राज्यकारभाराखेरीज इतरही अनेक विषयांवरील ह्या विद्वानाचा अधिकार फार मोठा होता, असे त्यांच्या एकंदर चरित्रावरून दिसते. हेमाद्रि मराठी भाषेचे कट्ट अभिमानी असून तिच्या उत्कर्षासाठी ते सतत झटत असत. त्यांनी *रघुवंशा*वर *दर्पण* नावाची टीका लिहिली आहे, असे कांही विद्वानांचे मत आहे. ह्या टीकाग्रंथात संस्कृत पारिभाषिक शब्दांचे मराठी प्रतिशब्द त्यांनी जागोजाग दिले आहेत. देवगिरीकर यादवांच्या दरबारात संस्कृत भाषेच्या बरोबरीने मराठीला मान्यता मिळून तिच्यात लेखन करणाऱ्या ग्रंथकारांचा गौरव होऊ लागण्याचे बरेचसे श्रेय हेमाद्रींस आहे. महाराष्ट्रात एका विशिष्ट शिल्पपद्धतीने बांधलेल्या देवालयांमुळे त्यांचे नाव चिरकाल सर्वतोमुखी झाले.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. पाध्ये, के. आ. : हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत यांचे चरित्र; मुंबई, १९३१; २. पानसे, मु. ग. : यादवकालीन महाराष्ट्र; मुंबई, १९६३.

**० हेमाद्रिपंडित** – पहा **हेमाडपंत.**

**हैबतराव / ० हैबतराव पवार** [का. अनु.] कवी. ह्यांचे ३५ ओव्यांचे एक वेदान्तप्रकरण भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रही आहे. ह्या प्रकरणात कवीने आपल्या गुरूचे नाव किंवा रचनाकाल कोठेही दिलेला नाही. प्रकरणाच्या आरंभी देवास किंवा गुरूस नमन न करता एकदम विषयासच सुरुवात केलेली आहे. प्रख्यात वारकरी हैबतराव पवार हेच ह्या प्रकरणाचे कर्ते असावेत असे, गं. ना. मजुमदार ह्यांनी म्हटले आहे (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. ५२–५३). ह्यांचे *सोहंसुदर्शन* नावाचे आणखी एक प्रकरणही उपलब्ध आहे.

**० हैबतराव पवार** – पहा **हैबतराव.**

**हैबती** [का. अनु.] नाथपंथीय कवी. अहमदनगर जिल्ह्यात गर्भगिरीच्या डोंगरात नाथपंथीय साधूंची समाधिस्थाने आहेत. त्याच डोंगरातील इमामपूरच्या घाटाच्या तोंडाशी 'बायजाबाईचे जेऊर' नावाचे एक खेडे आहे. तेथे सापडलेल्या एका बाडात हैबतीचा *आत्मानुभवग्रंथसार* हा ग्रंथ उपलब्ध झाला आहे. ग्रंथकाराने १२ व्या अध्यायात गुरुपरंपरा दिली आहे ती अशी : आदिनाथ > पार्वती > मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ > गहिनीनाथ > निवृत्तिनाथ > सत्यामलनाथ > गैबीनाथ > गुप्तनाथ > उद्बोधनाथ > केसरीनाथ > मल्हारनाथ > रंगनाथ > हरिनाथ > हैबती. *ज्ञानप्रदीप* ग्रंथात शिवदीनकेसरींनी दिलेल्या परंपरेत शिवदीननाथांचे गुरुबंधू मल्हारनाथ ह्यांचा उल्लेख येतो. ह्या मल्हारनाथांचे प्रशिष्य हरिनाथ ह्यांचा उल्लेख मालोनाथाच्या *नाथनामावलीत* आहे. पुसेसावळीच्या नाथपंथीय शाहीर हैबतीची परंपरा वरील हैबतीच्या परंपरेहून भिन्न आहे.

हैबतीच्या ग्रंथाचे एकूण १२ अध्याय असून *अद्वयभाससांख्य* ग्रंथाच्या आधारावर ४२८ ओव्यांत टीका लिहिली आहे. पहिल्या अध्यायात गुरूचा महिमा व प्रभाव ह्यांचे वर्णन केले आहे. पुढे ब्रह्ममायेचे विवरण येते. अशा प्रकारे आत्मज्ञानाच्या चढत्या पायऱ्यांचे स्वरूप ग्रंथकाराने सोप्या भाषेत उदाहरणांसहित स्पष्ट केले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** जोशी, सुरेश; हैबतीचा 'आत्मानुभवग्रंथसार'; इंद्रायणी, जुलै, १९६३; पृ. ५४–५५.

**हैबती निरंजन** [का. अनु.] पदकार.

**रचना :** अमु. – पदपदांतरे; सवामं. हस्त. सू., खं. २.

**हैबती पुसेसावळीकर** [इ. स. १७९४ – १८५४] शाहीर व लावणीकार. ह्यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील खटाव तालुक्यात डिकसळ येथे झाला. उपनाव घाडगे. ह्यांची आई भोसले कुलातील होती. हैबती लहान असतानाच ह्यांचे कुटुंब डिकसळजवळच पुसेगाव-राजेगाव येथे राहण्यास आले. लहानपणी हे गुराख्याचे काम करीत असत. पुढे काही वर्षांनी कृष्णातीरी असलेल्या त्रिपुटी गावी ह्यांनी स्थलांतर केले. तेथे गोपाळनाथांना त्यांनी गुरू मानले. ह्यांची नाथपंथीय गुरुपरंपरा अशी : जनार्दन स्वामी > एकनाथ > कृष्णानंद > निजानंद > विसोबानंद > मल्हारनाथ > रंगनाथ > गोपाळनाथ > हैबती. हैबतींनी येथे दहाबारा वर्षे पुराणांचे व तत्वज्ञानाचे अध्ययन केले. कवने लिहिली. पुढे नाथांच्या अनुज्ञेने ह्यांनी कीर्तन करण्यास सुरुवात केली, तेव्हा ह्या अभ्यासाचा हैबतींना विशेष उपयोग झाला. ह्यानंतर पुन्हा एकदा हैबतींनी स्थलांतर केले. खटाव तालुक्यातील पुसेसावळी ह्या गावात ते राहण्यास गेले. तेथील अमृता कारंडे नावाचे वारकरी पंथातील हैबतींचे अनुयायी त्यांचा चरितार्थ चालवीत असत. येथेच हैबतींनी काव्यरचनेचा प्रपंच केला.

पेशवाईच्या उत्तरकाळात तमाशात बीभत्स शृंगाराला अधिक वाव मिळत होता. ह्या तमाशापद्धतीत बदल घडवून आणण्यासाठी हैबतींनी तमाशापद्धतीचे कलगी-कवन व इतर आध्यात्मिक कवने केली. शृंगाराचा थोडासा भाग करमणुकीकरिता घेऊन तमाशा रंगविण्याचे त्यांनी ठरविले. त्यासाठी एक तमाशाचा संच तयार केला. त्यासाठी दोन नाच्ये व दोन सुरत्ये (ज्योती, बाळा ह्या नावांचे) तयार केले. स्वतः हैबतीही नाचू लागले. अशा प्रकारे तमाशाला तमाशाच्याच भाषेत व स्वरूपात ह्यांनी आव्हान दिले. आपले तमाशाचे नवे तंत्र लोकांना दाखविण्यासाठी ह्यांनी आळंदीपर्यंत दौरे काढले. ह्यांचे हे नवे तंत्र विद्वन्मान्य झाले, पण लोकप्रिय झाले नाही. म्हणून ह्यांनी तमाशा सोडून दिला. तथापि कलगी पक्षाची कवने हे त्यापुढेही करीत राहिले. ती ते कलगी पक्षाच्या शाहिरांना म्हणण्यासाठी देत. त्याबरोबर हैबतींनी ज्योतिषशास्त्राचे अध्ययन व प्रचार करणे हे कार्य हाती घेतले. ज्योतिषशास्त्रावरील *सहदेव-भाडळी* मत फार प्रसिद्ध होते. त्या मताचा प्रचार ह्यांनी केला. त्यावर कवने केली. ह्यांनी इतरही अनेक शास्त्रांचा अभ्यास केला होता.

आयुष्याच्या उत्तरकालात हे अगदी विरक्त झाले व शुद्ध अध्यात्माकडे वळले. ह्या वेळी त्यांचे गुरू गोपाळनाथ हयात नसल्याने त्याच भागात राहणाऱ्या कैवल्यनाथ महाराज ह्या नाथपंथी सत्पुरुषांना ह्यांनी गुरू केले. हैबतींचा शिष्यपरिवार बराच मोठा होता. अमृता कारंडे, संभूराजू गुणी, बाळानाथ लहरी, हे त्यांतील प्रमुख शिष्य होत. हैबतींच्या परंपरेत मुसलमान शिष्यही होऊन गेले. हैबतींना इ. स. १८५४ साली देवाज्ञा झाली. अमृता कारंडे ह्यांनी त्यांची समाधी बांधली.

हैबतींनी रचलेली अनेक कवने उपलब्ध आहेत. हे 'शाहीरश्रेष्ठ' व 'कलगीसम्राट' ह्या नावांनी ओळखले जातात. तमाशाला आध्यात्मिक करमणुकीचा प्रकार बनविणे हे ह्यांचे उद्दिष्ट होते. तमाशाची लोकप्रियता, व प्रचाराचे साधन ह्या दृष्टीने तमाशाची उपयुक्तता, त्यांना पटली होती. म्हणून स्वतः अभ्यासलेल्या अनेक विषयांची माहिती ह्यांनी लावण्या, कटाव, फटके इ. तमाशातील काव्यप्रकारांमधून दिली. ह्यांचे प्रमुख आध्यात्मिक कवन *तूर्त बोध* नावाचे आहे. त्यात त्यांनी अद्वैतवेदान्ताचे निरूपण केले आहे. ह्यांचा तत्कालीन इतर शाहिरांपेक्षा अध्यात्मावर बोलण्याचा अधिकार मोठा होता. हे कवनांना शास्त्राधार देत असत. त्यामुळे ह्यांची कवने प्रभावी ठरली व कलगी पक्षाच्या समर्थकांचे हे प्रमुख आधार ठरले. कलगीवाले व तुरेवाले ह्यांच्या प्रश्नोत्तरांत हे अजिंक्य ठरत. ह्या प्रकारच्या कवनांना 'भेदिक कवन' म्हणतात कारण त्यात काही भेद (रहस्य) आहे वा प्रतिपक्षाचा भेद करणारी ती कवने आहेत. ह्यांचा मुख्य

प्रतिस्पर्धी ह्यांचाच शिष्य संभूराजू हा ठरला कारण त्याने ह्यांच्याशी प्रतारणा करून पुढे तुरेपक्ष स्वीकारला होता व हैबतींची कवनेही चोरली होती.

हैबतींनी ज्योतिष, गणित, स्थापत्यशास्त्र, प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, शरीरशास्त्र, कामशास्त्र, संगीतशास्त्र इत्यादी नानाविध शास्त्रांचे अध्ययन केले व त्या विषयांवर कवनेही केली. ज्या कवनांना गणिताचा आधार आहे त्या रचनांना ते 'गणित कविता' म्हणतात. उदा., "तुम्ही चतुर बैसला आता परिसावी गणित कविता । परिमाण सांगतो पहा चालतो किति सविता ॥" असे म्हणून हे सूर्याच्या गतीविषयी सूक्ष्म माहिती देतात आणि शेवटी *लीलावती* ग्रंथाचा आधार देतात. शिल्पशास्त्राची ह्यांना असलेली माहिती 'घराच्या आयांविषयी' ह्यांनी केलेल्या कवनावरून दिसते. ह्या कवनात घराला आठ आये असावेत. ते अमुक ठिकाणी असावेत असे हे शास्त्राधारे सांगतात. ह्यांची एकंदर कवनसंख्या एक लक्ष आठ हजार आहे, असे सांगितले जाते. ही रचना कवीने मोठ्या आत्मविश्वासाने केलेली दिसते.

**रचना : मु.** – शाहीर हैबती; संग्रा. व लेखक : जोशी, परचुरे; संपा. थिटे, राजाभाऊ; पुणे, १९५६; पृ. ४५–९८ (संदर्भ : तत्रैव, प्रस्ता., पृ. १–४३).

**होनाजी बाळा** [अंदाजे इ. स. १८ वे शतक अखेर व १९ व्या शतकाचा प्रथमपाद] शाहीर, लावणीकार. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत जे अनेक प्रसिद्ध शाहीर होऊन गेले त्यांच्यापैकी होनाजींवर दुसऱ्या बाजीरावाची विशेष मर्जी होती. होनाजी जातीने गवळी. उपनाव शेलारखाने. बापाचे नाव सयाजी. होनाजींच्या कुळात कवित्वशक्ती पिढीजाद होती. त्यांचा आजा साताप्पा आणि वडील चुलता बाळाबहिरू हे शाहीर म्हणून नावाजलेले होते. होनाजींचे जन्ममृत्युशक माहीत नाहीत. त्यांच्या लावण्यांत येणाऱ्या संस्कृत शब्दांवरून संस्कृत भाषेशी ह्यांचा परिचय असावा असे वाटते. सगनभाऊ, प्रभाकर ह्यांच्याबरोबर पेशव्यांच्या दरबारात होनाजींचाही बोलबाला होता. होनाजींच्या फडातील त्यांचा साथीदार बाळा कारंजकर हा जातीने शिंपी होता. कविता होनाजींची आणि स्वर बाळाचा असे हे समीकरण होते. होनाजींनीही त्यांच्या कवितेत स्वतःचा उल्लेख होनाजी बाळा असाच केला आहे. ह्या लोकप्रिय शाहिराचा अंत मात्र मारेकऱ्यांनी घाला घातल्याने दुःखद रीतीने झाला. ती तिथी भाद्रपद कृष्ण चतुर्दशी अशी आहे.

'घनःश्याम सुंदरा' ह्या एकाच भूपाळीवजा लावणीने होनाजींना अमर केले आहे. होनाजींनी ५ पोवाडे रचले आहेत. त्यांपैकी दुसऱ्या बाजीरावावर तीन, खर्ड्याच्या लढाईचा एक आणि रंगाच्या दरबारचा एक. पण कवी म्हणून होनाजींच्या प्रतिभेचा विलास ह्या त्यांच्या लावण्यांतूनच पाहावयास मिळतो. होनाजींच्या अंदाजे २५० च्या वर लावण्या शं. तु. शाळिग्राम व य. न. केळकर ह्यांनी संपादित केल्या आहेत. ह्या लावण्यांत विषयांचे वैचित्र्य भरपूर सापडते. देव-देवता, क्षेत्रवर्णने, पौराणिक आख्यानांवरील रचना, ह्याचबरोबर *भागवता*तल्या कृष्णकथाही ह्यांनी मोठ्या आवडीने गायिल्या आहेत. 'श्रीरंगा कमलाकांता हरि पदराते सोड', 'सांगा मुकुंद बाई कोणी हा पाहिला', 'कोणी घ्या रे मुरली करिची' अशा ह्यांच्या कितीतरी लावण्या रसिकांच्या मुखावर आजही घोळताना दिसतात.

शृंगारिक लावण्यांची रचना हे होनाजींचे वैशिष्ट्य मानले जाते. प्रेमभावनेच्या विविध प्रकारच्या नाजुक छटा हळुवारपणे रंगविताना ह्यांच्या प्रतिभेला जो बहर येतो तो पाहिल्यानंतर त्यांचे हे वेगळेपण लक्षात येते. जशी संभोगशृंगाराची उत्तानचित्रे प्रसंगी त्यांनी लावण्यांतून रंगविली आहेत त्याचप्रमाणे शृंगाराचे शुद्ध, सात्त्विक आणि उदात्त असे रूपही त्यांच्या कित्येक लावण्यांतून प्रकट झालेले दिसते. त्यांच्या अनेक नायिका ह्या केवळ पतिव्रता आहेत. एक नायिका आपल्या प्रीतीचे स्वरूप व्यक्त करताना म्हणते : "मी कुडी, तुम्ही आत्माराम । मंगळसूत्र गळीचे तुम्ही माझे मंगळधाम । मी तो तीर्थयात्रा, तीर्थी तुम्ही केवळ पुण्यग्राम । कल्पवृक्ष, मी तळिची शीतळ छाया । तव पदावरुन आपली कुरवंडी करीन काया।" ह्या ठिकाणी केवळ बाह्य सौंदर्यावर भर दिलेला नाही असे स्पष्ट दिसून येते. प्रेम व ईश्वरभक्ती त्यांच्या मते एकच आहेत. 'गुणिजन गुणमंडिता अहो सद्गुणरासी' लावणीत ह्या दिव्य प्रेमाचे दर्शन घडते. विवाहसंबंधाचे पावित्र्य सांगताना ही नायिका म्हणते : "भागीरथीत घडले स्नान मग कारण काय इतर जलासीं । प्रयत्नेविण अनायासे लाभले निजसुख प्राप्तीचे । मग कासया करावे साधन दैवतांचे । ब्रह्मानंद डोहात एक सद्भावे मी बुडाले।"

स्त्रीलावण्याचे चित्रण करिताना ह्यांच्या कवितेत नवे आणि जुने ह्यांचा सुंदर मिलाफ घडलेला दिसतो. ह्या दृष्टीने होनाजींचे हे वर्णन पाहण्यासारखे आहे : "सखे गुल अनार, गुल चमन, निशीचा रमण तसा गोजिरा तुझा मुखवटा । कंठामधि कोयाळ बोलणे रंग गोरटा । बांधीव बुचड्याची लकब, पदर अति सुबक खोविला तिपदरी वेणीचा । चंदन डहाळीस जसा लपेटा काळे नागिणीचा।" अशा लावण्यवतीच्या प्रीतीची आणि सहवासाची अभिलाषा धरणारा छबेला, जवान शिपाईगडी हा त्यांच्या लावण्यांचा नायक आहे.

होनाजींच्या साऱ्याच लावण्या साध्या चालीच्या व गोड सुराच्या आहेत. बैठकीच्या रागदारी लावण्या होनाजींनी त्या काळात प्रयत्नपूर्वक लोकप्रिय केल्या. ही परंपरा त्यांचे आजे साताप्पा ह्यांच्याकडून चालत आलेली. ह्यांच्या लावण्यांतले नवे छंद व नव्या धाटण्या आविष्करणातील प्रयोगक्षमतेचा विचार करता लक्षणीय ठरतात. कवीच्या कल्पनाशक्तीचा सुंदर आविष्कार 'भाळलोचना नागभूषणा' ह्या लावणीत झालेला दिसतो. बाजीरावाचा पराभव होऊन तो स्थानभ्रष्ट झाल्यानंतर होनाजीने केलेला पोवाडा करुणरसपूर्ण आणि अंतःकरण हेलावून टाकील असा आहे. बाजीरावाच्या अनुपस्थितीत मराठी राज्याची कशी दैना झाली त्याचे रेखीव चित्र 'दिन असता अंधार आकाशतळी पडला बाई । विश्वतरंगाकार प्रभुविण शून्य दिशा दाही । कुंकुमहीन दक्षिणवनितेचें वदन दैन्यवाणे – नकळे ईश्वरी सूत्र पाहा झाली पर्वताची राई' ह्या शब्दांत ते उभे करतात. अशा तऱ्हेचा कल्पनाविलास अगदी सहजगत्या काव्याचे अत्यावश्यक अंग बनतो, अर्थगांभीर्य निर्माण करतो आणि कवीच्या अभिजात अशा कवित्वशक्तीची साक्ष पटवितो. प्रभाकर किंवा सगनभाऊ ह्यांच्यापेक्षा होनाजींच्या लावण्यांवर पुणे प्रांतातील जनतेने अपार प्रेम केले. [⇨ ३].

**रचना : मु.** – पोवाडे व लावण्या, अंदाजे २५० च्या वर, संग्रहित : (१) होनाजी बाळाकृत लावण्या; संपा. शाळिग्राम, शं. तु.; आ. ४; पुणे, १९६३. (२) अंधारातील लावण्या; ७७ लावण्या; संपा. केळकर, य. न.; पुणे, १९५६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आजगांवकर, ज. र. : होनाजीबाळा; मकच., खं. २; मुंबई, १९१३; पृ. १४९–१६५. २. केळकर, य. न. : प्रस्ता., होनाजी बाळाकृत लावण्या; संपा. शाळिग्राम, शं. तु.; आ. ४; पुणे, १९६३. ३. वर्दे, श्री. म. : होनाजी – मराठी कवितेचा उषःकाल; आ. २; मुंबई, १९३०; पृ. १२४–२५२.

**० ह्यूम, रॉबर्ट डब्ल्यू.** – पहा (रे.) रॉबर्ट डब्ल्यू. ह्यूम.

**ज्ञानदेव–१ / ० बापविठ्ठलसुत / ० ज्ञानाबाई–१ / ० ज्ञानेश्वर** [श. ११९३ किंवा ११९७, श्रावण वद्य अष्टमी/इ. स. १२७१ किंवा १२७५ – श. १२१८, कार्तिक वद्य त्रयोदशी/इ. स. १२९६]. योगी, तत्त्वज्ञानी आणि संतकवी. महाराष्ट्रातील भागवत तथा वारकरी संप्रदायाचा तत्त्वज्ञ

प्रवर्तक. ज्ञानेश्वरीच्या अखेरीस ज्ञानदेवांनी स्वतःची नाथसंप्रदायी गुरुपरंपरा सांगितली आहे, ती अशी : आदिनाथ > मत्स्येंद्रनाथ > गोरक्षनाथ > गहिनीनाथ > निवृत्तिनाथ > ज्ञानदेव. *ज्ञानेश्वरी*, *अनुभवामृत*, *चांगदेवपासष्टी* व बहुतेक *अभंग-गाथा* ह्यांत ज्ञानदेव हे स्वतःच्या नावाचा निर्देश ज्ञानदेव असाच करतात. परंतु नामदेव, मुक्ताबाई, एकनाथ इत्यादी संतांच्या वाङ्मयांत ज्ञानेश्वर असाही उल्लेख अनेकदा येतो.

पैठणपासून चार कोसांवर गोदावरीच्या उत्तर तीरावरील आपेगाव हे ह्यांच्या पूर्वजांचे मूलस्थान. हे माध्यंदिन शाखेचे यजुर्वेदी ब्राह्मण. गोत्र पंचप्रवरान्वित वत्स. आज ज्ञात असलेले त्यांचे पहिले पूर्वज त्यांच्या पणज्यांचे पणजे हरिपंत कुळकर्णी हे शके १०६० (इ. स. ११३८) च्या सुमारास आपेगावचे कुळकर्णपण पाहात असत. रामचंद्र व केशव हे मुलगे व मोहना ही मुलगी अशी तीन अपत्ये त्यांना झाली. मोहना देवगडच्या नरहरपंत माचवे ह्यांना दिली होती. केशव उपनयन झाल्यावर एक वर्षाने वारला. वडिलांनंतर रामचंद्रपंत व त्यांच्यानंतर त्यांचे पुत्र गोपाळपंत ह्यांनी कुळकर्णपण चालविले. गोपाळपंतांचे पुत्र त्र्यंबकपंत यादव राजांच्या नोकरीस होते. त्यांनी पाच वर्षे बीड देशाच्या अधिकाऱ्याचे काम केले. गोविंदपंत व हरिपंत असे त्यांचे दोन पुत्र होते. सिंघण ह्या यादव राजाकरिता लढत असता हरिपंत धारातीर्थी पडले. त्यामुळे त्र्यंबकपंतांस वैराग्य उत्पन्न झाले. त्यांना गोरक्षनाथांचा अनुग्रह झाला. नामदेवांनी समाधि-प्रकरणातील अभंगांत त्र्यंबकपंत मूळ पुरुष व त्यांची समाधी आपेगावी आहे, असे म्हटले आहे. त्र्यंबकपंतांचे ज्येष्ठ पुत्र गोविंदपंत. गोविंदपंतांची पत्नी निराई पैठण येथील कृष्णाजीपंत देवकुळ्यांची भगिनी. गहिनीनाथांनी त्र्यंबकपंत व निराई ह्यांना उपदेश दिला होता. गोविंदपंतांस निराईपासून ५५ व्या वर्षी एक पुत्र झाला, त्याचे नाव विठ्ठल. हेच विठ्ठलपंत ज्ञानदेवांचे जनक होत. नामदेवांच्या *श्रीज्ञानेश्वरांची आदि* ह्या प्रकरणातील अभंगाप्रमाणे, गोविंदपंत व निराई ही दोघे वैराग्यसंपन्न व वेदान्तशास्त्रज्ञ असून विठ्ठलभक्त होती म्हणून त्यांनी आवडीने आपल्या पुत्राचे विठ्ठल हे नाव ठेवले. उपनयनानंतर विठ्ठलपंतांनी वेद, काव्य, व्याकरण व विविध शास्त्र ह्यांचे अध्ययन केले. ऐन तारुण्यातच वैराग्य, भक्ती व ज्ञान उत्पन्न होऊन पुष्करादी तीर्थांची यात्रा करावी म्हणून मातापित्यांचे वंदन करून त्यांनी तीर्थाटन केले. ते पिंडारक, द्वारका, सुदाम्याची पुरी, भालुकातीर्थ, प्रभास, सोरटी सोमनाथ, धवलपुरी करून परतले. वाटेत सप्तशृंग, त्र्यंबक, भीमाशंकर ह्या तीर्थांना भेट देऊन इंद्रायणीतीरी असलेल्या आळंदीस आले. तेथे थोर ब्राह्मण सिदोपंत ह्यांची भेट घेऊन, त्यांचे चरण त्यांनी वंदिले. विठ्ठलपंतांना सिदोपंतांनी नावगाव, कोठून आला, कोठे जाणार, मातापिता कोण, वगैरे पृच्छा केली. विठ्ठलपंतांनी स्वतःचे नाव सांगून आपेगाव, वृद्ध मातापिता इत्यादीसंबंधी हकीकत सांगितली. सिदोपंतांनी स्वतःच्या आश्रमात त्यांचे आदरातिथ्य केले. सिदोपंतांना त्याच दिवशी रात्री पंढरीनाथ स्वप्नात दिसला. पंढरीनाथाने सांगितले, 'ह्या तुमच्या तरुण अतिथीस सालंकृत कन्यादान करा.' प्रातःकाळी उठल्यावर त्यांनी विठ्ठलपंतांचे चरण वंदून स्वप्नवृत्तान्त कथन केला व 'कन्येचे पाणिग्रहण करा' अशी प्रार्थना केली. तेव्हा विठ्ठलपंतांनी स्मितमुखाने म्हटले की, 'भगवंताची तशी आज्ञा मला कोठे आहे?' हा प्रश्न त्यांच्या मनात घोळत राहिला. तुळशीवृंदावनाच्या कट्ट्यावर त्यांना झोप आली. स्वप्नात येऊन भगवंताने विठ्ठलपंतांना आज्ञा केली की, 'ह्या कन्येचे पाणिग्रहण कर. भक्ति-ज्ञान-वैराग्याच्या साक्षात चार मूर्ती हिच्या उदरी जन्मणार आहेत.' सिदोपंतांना विठ्ठलपंतांनी स्वप्न सांगितले. ३६ गुण जुळले. शास्त्रोक्त रीतीने लग्न झाले.

लग्नानंतर सिदोपंतांचे चरण वंदून विठ्ठल-रखुमाई ही दोघे पतिपत्नी पंढरपूरला यात्रा होती त्या यात्रेस सिदोपंतांबरोबर गेली; म्हणजे हे लग्न आषाढी एकादशीच्या यात्रेपूर्वी ज्येष्ठ महिन्यात उरकले, असे अनुमान सहज निघते. विठ्ठल-रखुमाई ह्या उभयतांनी पांडुरंगाच्या चरणी मस्तक ठेवले. आपेगावी येऊन गृहस्थाश्रम स्थिरपणे करावा की तीर्थाटन करीत देह झिजवावा, असा प्रश्न विठ्ठलपंतांच्या मनात घोळत होता. सिदोपंतांनी त्यांचा निरोप घेतला आणि ते स्वतःच्या गावी स्वतःच्या आश्रमात परतले. विठ्ठलपंत आपेगावी न परतताच नामसंकीर्तन करीत तीर्थाटनास गेले. श्रीशैल्य, व्यंकटाद्री, अरुणाचल, चिदंबर, मदुराई व कावेरीच्या तीरावरील अनेक क्षेत्रे करून ते रामेश्वरला पोहोचले. रामेश्वरच्या यात्रेचा संकल्प मनात होता तो त्यांनी पुरा केला. तेथून गोकर्ण, हाटकेश्वर, कोल्हापूर, कृष्णातीरची कऱ्हाड, माहुली इत्यादी तीर्थे पाहून परत आळंदीस येऊन ते सिदोपंतांस भेटले. सिदोपंतांची आज्ञा घेऊन अखेरीस त्यांच्याबरोबरच आपेगावी येऊन त्यांनी मातापित्यांचे दर्शन घेतले. मातापित्यांनी अत्यंत आनंदित होऊन सिदोपंतांचा सत्कार केला. सिदोपंत परतले. मातापिता दोघेही फार वृद्ध होती. स्वानंदपूर्ण स्थितीत ती दोघे वैकुंठवासी झाली. परंतु विठ्ठलपंत विरक्त होते. त्यांना संसाराची मुळीच चिंता नव्हती. विठ्ठलपंतांच्या ह्या उदासीन वृत्तीचे वर्तमान सिदोपंतांच्या कानी पडले. ते आपेगावी आले आणि विठ्ठल-रखुमाई ह्या दोघांना बरोबर घेऊन आळंदीस आले. विठ्ठलपंतांचे हरिकथा व नामसंकीर्तन नित्य चालायचे, पंढरीची आषाढी-कार्तिकी वारी व्हायची. परंतु अनेक वर्षे अपत्य झालेच नाही. त्यांनी कांतेस सांगितले की, वाराणसीस जाऊन संन्यास घ्यावासा वाटतो. रखुमाईने विठ्ठलपंतांचे हे बोलणे सिदोपंतांच्या कानावर घातले. संततीवाचून संन्यास घेऊ नये ही गोष्ट पतीस पटवा, असे पित्यास सांगितले; विठ्ठलपंतांचे मन वळले नाही. रखुमाई बेसावध असताना, मन दुश्चित म्हणजे त्रस्त असताना, विठ्ठलपंतांनी पुन्हा संन्यासाची आज्ञा मागितली. तिने त्रासून 'जा, जा' असे म्हटले. पत्नी निद्रेत असता विठ्ठलपंतांनी गृहत्याग केला, असे ज्ञानदेवादिकांना पैठणस्थ ब्राह्मणांनी दिलेल्या बोपदेवलिखित शुद्धिपत्रात म्हटले आहे. विठ्ठलपंत वाराणसीस गेले, आणि तेथील एका प्रसिद्ध संन्यासी महंतापासून त्यांनी संन्यासदीक्षा घेतली. ह्या संन्यासी महंतांचे नाव नामदेवांनी सांगितलेले नाही. श्रीपाद म्हणून त्यांचा निर्देश केला आहे. संन्यासी व्यक्तीचा श्रीपाद ह्या आदरार्थी अभिधानाने निर्देश करावा, असे *यतिधर्मसंग्रह* ह्या संन्यासाश्रमाच्या धर्मशास्त्राच्या संस्कृत ग्रंथात म्हटले आहे. ज्ञानदेवांनी संन्यासविषयक अभंगगाथेतही संन्यासी व्यक्तीचा श्रीपाद ह्या आदरार्थी सामान्य संज्ञेने निर्देश केला आहे. काही चरित्रकार (उद्धवचिद्घनकृत *श्रीज्ञानेश्वरचरित्र*) ह्या विठ्ठलपंतांच्या संन्यासी गुरूचा नृसिंहाश्रम असा, तर काही (बोपदेवलिखित शुद्धिपत्र) रामानंद असा, निर्देश करतात. अर्थात हे रामानंद कबीरकालीन प्रसिद्ध रामानंद नव्हते. विठ्ठलपंतांच्या संन्यासग्रहणानंतर त्यांना चैतन्याश्रम हे अभिधान गुरूंनी दिले.

इकडे आळंदीस रखुमाईने जीवित सार्थक व्हावे म्हणून अश्वत्थाची सेवा आरंभिली. तेथे कालांतराने वाराणसी येथील एक संन्यासी आले. योगायोगाने तेच विठ्ठलपंतांचे गुरू होते. रखुमाईने नमस्कार केला. महंतांनी 'पुत्रवती हो' असा आशीर्वाद दिला. तिला हसू आले, विनोद वाटला. महंतांनी विचारले, 'मिस्किलपणे का हसतेस?' ती म्हणाली, 'पतीने संन्यास घेतला आहे; मग आपले बोल खरे कसे होणार?' महंतांनी सगळी हकीकत विचारून घेतली. रखुमाईने मातापित्यांची महंतांशी भेट करविली. महंतांची अर्घ्यपाद्यपूजा व भोजन झाले. महंत रामेश्वरच्या यात्रेला निघाले होते. सिदोपंतांनी प्रार्थना केली की, दयावंत होऊन वाराणसीस लगेच परतून जावयांचे मन वळवा. महंतांना वाटले : आपण विठ्ठलपंतांस अवेळी म्हणजे पत्नी तरुण व संतती नाही अशा स्थितीत संन्यास दिला ह्याचा दोष

आपणासही लागतो, आपले पुण्य त्याला जाते. विठ्ठलपंतांनी, आपल्यामागे तसा पाश नाही इत्यादी खोटेच सांगून गुरूपासून संन्यास घेतला, असे काही चरित्रकारांनी ह्या संदर्भात सांगितले आहे; परंतु नामदेव तसा उल्लेख *आदि*मध्ये करीत नाहीत. हा अनुल्लेख गुरूंच्या ह्या उक्तीशी सुसंगत ठरतो. खोटे सांगून संन्यास घेतला असता तर गुरूंकडे दोष गेला नसता. महंतांनी लगेच वाराणसीस प्रयाण केले, व चैतन्याश्रमाला बोलावून घेतले. चैतन्याश्रमाने मान्य केले की, 'कांतेचा त्याग करून मी आलो आहे.' महंतांनी आज्ञा केली की, 'पुन्हा गृहस्थाश्रम स्वीकार. हे अवैध कर्म आहे, असे भय बाळगू नकोस. ईश्वर तुझ्या बाजूला आहे.' गुरूंनी आशीर्वाद देऊन चैतन्याश्रमास परत पाठविले.

चैतन्याश्रम स्वदेशी परतले. संन्यासाश्रम टाकून त्यांनी पुनश्च गृहस्थाश्रम पत्करला. त्यामुळे ब्राह्मणांनी वाळीत टाकले; लोक हसू लागले; जग विरुद्ध गेले. अशी बारा वर्षे निघून गेली. चार अपत्ये झाली; ती म्हणजे निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई. ही वेगळ्या प्रकारची नावे ऐकून लोक हसायचे. शंकर, गणेश, कृष्ण अशा प्रकारची नामकरणपद्धती ह्यात दिसत नाही; मोक्षापर्यंतच्या चार पायऱ्या किंवा अवस्था ह्या नावांनी सूचित होतात. मुलगे व्रतबंधाला योग्य झाले. विठ्ठलपंतांनी विचार केला की, बहिष्कारामुळे आपली वंशावळी जातिकुळावेगळी झाली असल्यामुळे प्रायश्चित्त घेणे अवश्य आहे. त्यांनी ब्रह्मसभा भरविली व त्या सभेत, 'ह्या दीनाला अपराधाची क्षमा करा' अशी प्रार्थना केली. धर्मशास्त्रनिबंधातील निर्णय द्विजांनी पाहिला व त्याप्रमाणे त्यांना देहान्त प्रायश्चित्त सांगितले. संस्काराने देह शुद्ध करा, असा त्यांनी आदेश दिला. 'अवश्य करीन, देह दंडीन, त्रिवेणीसंगमात देह घालीन' असे म्हणून भार्या, पुत्र व गृह ह्यांचा त्याग करून व द्विजवृंदाला नमस्कार करून विठ्ठलपंत परतून मागे न पाहता भराभरा निघून गेले. मुक्ताबाईच्या एका अभंगात मातापिता दोघेही सोडून गेली, असे म्हटले आहे. त्याग आणि वैराग्य हेच प्रायश्चित्त आचरून विठ्ठलपंत शुचिर्भूत झाले.

निवृत्ती ब्रह्मसभेला उद्देशून म्हणाले, 'आम्हांला मार्ग सांगा.' द्विजांनी सांगितले की, 'पैठणला जा, तिकडून शुद्धिपत्र आणा, ते मान्य होईल.' निवृत्ती म्हणाले, 'आमची परंपरा सगुण व निर्गुण ह्यांच्या पलीकडील आहे. जाती, कुळ, वर्ण किंवा विश्वातील पंचमहाभूते, विराट, महत् ह्यांपैकी आम्ही काही नाही, निजबोधस्वरूप आहोत.' ह्यावर ज्ञानदेव म्हणाले, 'आपली पावन अवस्था असली, तरी धर्मशास्त्राच्या पद्धतीने आपण चालले पाहिजे.' ह्यावर सोपान म्हणाले, 'पांडव, व्यास, वाल्मीकी, वसिष्ठ ह्यांचे तरी कुळ किंवा जाती शुद्ध कुठे आहे? तसेच आमची भक्ती हाच आत्मस्थितीचा उपाय होय, जाती किंवा कुळ नव्हे.' वरील घटना आळंदीची असे *आदि*वरून दिसते, परंतु कोणी ती आपेगावची असे म्हणतात.

द्विजांचे पत्र घेऊन, पैठण येथे ही मंडळी गेली. ब्रह्मसभा भरली. पत्र सादर केले. संन्याशाचे पुत्र आहेत असे कळल्यावर सभेने निर्णय दिला की, उभयता कुळभ्रष्ट आहेत, म्हणून प्रायश्चित्त नाही आणि उपनयनाधिकारही नाही. एकच उपाय उरला आहे: अनुतापपूर्वक ईश्वरभजन करावे; गाय, गर्दभ, श्वान, अंत्यज ह्यांच्याही ठिकाणी ब्रह्मभावना करून वंदन करावे. चारी भावंडे हे ऐकून संतुष्ट झाली. त्यांची लोकविलक्षण नावे ऐकून काही ब्राह्मण हसले. एकजण म्हणाला, 'तो जो पलीकडे पखाल वाहत आहे त्या रेड्यासही ज्ञाना म्हणतात.' ज्ञानदेवांनी म्हटले, 'बरोबर! तोही माझा आत्माच आहे.' त्या रेड्यावर आसूड मारले गेले. त्यांचे वळ ज्ञानदेवांच्या पाठीवर उठले. ब्राह्मण म्हणाले, 'ह्या रेड्याकडून वेद वदवा.' रेडा विधिपूर्वक ऋग्वेद म्हणू लागला. ब्रह्मवृंद चकित होऊन म्हणू लागला, 'हे तिघे साक्षात देवावतार असून मुक्ताई आदिमाया आहे; आम्ही फार चूक केली; देहबुद्धी व अहंकार ह्यांनी भरलेले आम्ही नुसते कर्मठ आहोत. ह्यांचा वंश व कुळ खरोखर धन्य आहेत.' सकल द्विजांनी नमस्कार करून त्यांचा जयजयकार केला. उलट ज्ञानदेव व निवृत्ती ह्यांनी त्या ब्रह्मवृंदाला संत समजून त्यांचे स्तवन केले; 'आपल्या दर्शनाने धन्य झालो' असे त्यांस म्हटले. ह्या पैठण येथील घटनेचे वर्णन नामदेवांनी अशा प्रकारे केले आहे. ह्यातील चमत्काराचा भाग वगळला तर असे सूचित होते की, ज्ञानदेवादिकांचे वर्तन, वृत्ती व कीर्तन-प्रवचन पाहून, त्यांचा परमार्थातील अधिकार तेथील ब्राह्मण-पंडितांना व त्यामुळेच एकंदरीत सर्व समाजालाही पटला; उपनयनाचा अधिकारही मान्य झाला. परंतु अगोदरच नाथपंथाची दीक्षा मिळाली होती; उपनयनाची आवश्यकताच नव्हती. तीन पिढ्यांची नाथपंथाची परंपरा होती. वंशपरंपरागत विद्वत्तेचा वारसा पित्याकडून त्यांना प्राप्त झाला होता. जन्मतःच विलक्षण बुद्धिमत्ता व प्रतिभा असल्यामुळे कौमारावस्थेतच त्यांची प्रज्ञा परिणत झाली होती. ह्या परिणत प्रज्ञेचाच प्रत्यय आल्यामुळे आणि वर्णाश्रमातील नाथसंप्रदायाचा प्रभाव त्यावेळच्या भारताच्या व महाराष्ट्राच्या संस्कृतीवर पडलेला असल्यामुळे वादविवाद, चर्चा दीर्घकाळ चालली. अखेरीस पैठणचा ब्रह्मवृंद व एकंदरीत सर्व समाज ह्या बालसंतांना शरण आला; ह्याचे प्रत्यंतर त्या प्रसंगानंतर लगेच *ज्ञानेश्वरी*चे लेखन झाले त्यावरून मिळते. *ज्ञानेश्वरी*त श्रोतृवृंदाच्या महत्त्वाची, प्रगल्भतेची व जाणकारपणाची जी वारंवार प्रशंसा आढळते, त्यावरून *ज्ञानेश्वरी*चे लेखन व प्रवचन चालू असतानाच विलक्षण लोकप्रियता ज्ञानदेवांना लाभली होती, ह्याबद्दल शंका राहात नाही. पुराण, हरिकीर्तन, वेदान्तव्याख्यान, हे सर्व पैठण येथील दीर्घकालीन मुक्कामात चालूच होते. नामदेव म्हणतात की, तेथील ब्रह्मवृंदावर त्यामुळे त्यांची विलक्षण छाप पडली. सामान्य जन वेधून घेतले गेले, आणि ह्या बालसंतांना घरी बोलावून त्यांनी पितृश्राद्ध केले त्यावेळी ह्यांनी मंत्र म्हटले व साक्षात पितर अवतरले, असे संत नामदेव म्हणतात. अखेरीस शुद्धिपत्र मिळाले. ब्राह्मणांना प्रदक्षिणा व साष्टांग नमस्कार करून चारी भावंडे नेवाश्यास आली. त्यांच्यामागून म्हैसाही आला. नेवाश्यात शिरले, तो एक सती मृतपतीजवळ बसून आक्रोश करताना दिसली. पतीचे नाव सच्चिदानंद होते; तो नेवाश्याचा कुळकर्णी होता. 'सच्चिदानंदाला मृत्यू नसतो' असे ज्ञानदेव उद्गारले, तोच तो मृत पुरुष एकदम उठून उभा राहिला व ज्ञानदेवांना शरण आला. तोच *ज्ञानेश्वरी*चा लेखक. त्याने पुढे *ज्ञानेश्वरविजय* नामक ओवीबद्ध रचनाही केली.

नेवाश्यास प्राकृत गीतादेवी म्हणजे *ज्ञानेश्वरी* रचली. त्यानंतर निवृत्तिदेवांच्या आदेशावरून स्वतंत्र *अनुभवामृत* ग्रंथही रचला. ग्रंथलेखन आटोपल्यावर नेवासे येथील आदिशक्ती माता म्हाळसा हिचे वंदन करून चौघे नेवाश्याहून आळंदीकडे निघाली. सकळ-कवित्व-कला असलेली ही भावंडे हरिनामकीर्तन करीत आळ्याच्या वनात उतरली. तेथे म्हैसा मेला. त्याची समाधी बांधून शेंदूर लावून पूजा केली, व नंतर सर्व भावंडे आळंदीला गेली. निवृत्तींनी तेथील सर्व लहानथोरांना नमस्कार केला व सर्वांनी तेथेच कायम वसती केली.

ही चारही भावंडे उपजताच ज्ञानी, परब्रह्मस्वरूपी, अशी कीर्ती पसरली. पैठणच्या विद्वान ब्राह्मणांशी शास्त्रार्थाचा वाद करून त्यांना जिंकले. संस्कृताच्या ग्रंथी मराठीत मोकळ्या करून मराठी गीता निर्माण केली. अध्यात्मविद्येचे रूप मराठीत प्रकट झाले. ब्रह्मानंदलहरी म्हणजेच *ज्ञानेश्वरी* असा प्रत्यय येऊ लागला. देशी भाषा गौरवसंपन्न झाली. दीर्घजीवी वृद्धयोगी चांगदेवांच्या कानी कीर्ती गेली.

महिपतीबावांनी ज्ञानदेव व चांगदेव ह्यांच्या भेटीचा वृत्तान्त दिलेला आहे. ज्ञानदेवांची *चांगदेवपासष्टी* हे पासष्ट ओव्यांचे प्रकरण चांगदेवां-

करिता ज्ञानदेवांनी लिहिले हे ह्या प्रकरणावरून सहजच लक्षात येते. ह्यात चांगदेवांचा चांगया व चक्रपाणी ह्या दोन नावांनी निर्देश केला आहे. वटेश्वर हे चांगदेवांच्या आराध्य शिवलिंगाचे नाव आहे. त्यावरून चांगा वटेश्वर असे त्यांचे नाव पडले. नाना विद्या, नाना कला त्यांना अवगत होत्या. पातंजलयोगामध्ये ते पारंगत होते. त्यामुळे त्यांना अष्टसिद्धी प्राप्त झाल्या होत्या; चौदाशे वर्षांचे आयुष्य योगसिद्धीच्या बळावर त्यांना प्राप्त झाले होते; परंतु ज्ञानदेवांची कीर्ती ऐकून भेटीची उत्कंठा लागली. त्यांनी पत्र पाठविण्याचे ठरविले; पत्रात प्रथम, ज्ञानदेव वयाने लहान म्हणून आशीर्वाद लिहावा, असे मनात आले; परंतु पुन्हा ज्ञानदेव ब्रह्मसाक्षात्कारी सिद्धपुरुष, आपणापेक्षाही अधिक उच्च कोटीला पोचलेले, साक्षात महाविष्णूचे अवतार, म्हणून प्रणामच लिहिणे बरे, असा विकल्प उत्पन्न झाला. निर्णय होईना. पांथस्थ ब्राह्मणाचे हाती तसेच कोरे पत्र पाठविले. ते पत्र मुक्ताबाईच्या हाती पडले. मुक्ताबाई म्हणाली, 'काय? चौदाशे वर्षे तप करून पुन्हा हा कोराचा कोराच राहिला आहे.' त्यावर सगळे हसले. निवृत्तिदेवांना करुणा आली. त्यांनी ज्ञानदेवांना सांगितले, 'अंतर बोधेल असे पत्र लिही.' ते पत्र म्हणजे *चांगदेवपासष्टी* होय. ह्या पत्रात ज्ञानदेवांनी प्रथम 'श्री वटेश्वर लपला आणि जगदाभास निर्माण केला; तो प्रकटला की जगदाभासाला ग्रासून टाकतो' असा शांकर मायावादाचा सिद्धान्त सांगून, नंतर चिद्विलासाचा अद्वैतवाद प्रतिपादिला आणि पुढे म्हटले की, 'सख्या, तुझ्या भेटीकरता माझ्या जीवाला उत्सुकता निर्माण झाली आहे; परंतु आपण दोघेही एकच आहोत, आत्मरूप आहोत; भेट ही सिद्धच आहे; म्हणून पुन्हा भेट कसली घ्यावयाची? भेदाच्या अतीत असलेल्या एकाच पदावर आपण दोघे विराजमान झालो आहो.' हे पत्र वाचून झाल्यानंतर चांगदेव भेटीस निघाले.

चांगदेव व्याघ्रारूढ होऊन हातात सापाचे चाबूक धरून आळंदीस निघाले. आपल्या सिद्धीचे सामर्थ्य दाखवीत चांगदेव आळंदीस पोचले तेव्हा ही चारी भावंडे एका भिंतीवर निवांतपणे बसली होती. व्याघ्रावर आरूढ असलेल्या चांगदेवांच्या म्हणजे अतिथीच्या स्वागतार्थ सामोरे जाण्याकरिता भिंतच चालू लागली. त्याबरोबर व्याघ्रावरून खाली उतरून चांगदेव ह्या चतुर्मूर्तींना शरण आले. नंतर ज्ञानदेवाच्या आदेशावरून चांगदेवांनी मुक्ताबाईचा अनुग्रह घेतला. चांगदेवांना उपदेश करणारे मुक्ताबाईचे अनेक अभंग व एक पदही प्रसिद्ध आहे आणि मुक्ताबाईचा गुरू म्हणून निर्देश करणारे चांगदेवांचेही अभंग आहेत.

तेव्हा विसोबा चाटी नावाचा एक कर्मठ ब्राह्मण आळंदीस राहात होता. जातींचा उच्चनीचभेदभाव विसरून सर्व जातींच्या माणसांना परमार्थाचा मार्ग दाखविणाऱ्या ह्या भावंडांचा तो द्वेष करू लागला. त्यांच्यावर बहिष्कार पडावा, अशी त्याची मनीषा होती. गावच्या कुंभारांनाही त्याने बजावले की, रांधण्याची मातीची भांडी ह्यांना देऊ नका. ही भावंडे अत्यंत विरक्त स्थितीत शरीरधारणेला जेवढे आवश्यक तेवढेच घेऊन जीवितयात्रा चालवीत होती. एकदा निवृत्तिनाथांना मांडे खाण्याची इच्छा झाली; परंतु कुंभाराने मांडे भाजण्याचे खापर दिले नाही. योगधारणा करून ज्ञानदेवांनी आपली पाठ मांडे भाजण्यास योग्य इतकी तापविली व मुक्ताबाईने तिच्यावर मांडे भाजले. हे ऐकून विसोबा चाटीस पश्चात्ताप झाला, अनुतापाने ज्ञानदेवांना तो शरण आला. ज्ञानदेवांच्या ताटातील उच्छिष्ट, प्रसाद म्हणून, त्याने उचलले. ज्ञानदेवांनी त्याला 'खेचरा, पलीकडे सर' असे म्हणून धुडकावले, परंतु त्याने ऐकले नाही. खेचर ह्या संबोधनात गूढार्थ होता. शुक्ल यजुर्वेदाच्या माध्यंदिन शाखेच्या *ईशोपनिषदा*तील अखेरचा मंत्र 'खं ब्रह्म' असा आहे. 'ख म्हणजे ब्रह्म' असा त्याचा अर्थ; खेचर म्हणजे ब्रह्मात संचार करणारा. ह्या आदेशातच विसोबांना ज्ञानदेवांचा उपदेश व अनुग्रह झाला. विसोबांनी म्हटले आहे, 'महाविष्णूचा अवतार। श्री गुरु माझा ज्ञानेश्वर।' विसोबा खेचरच नंतर नामदेवांचे गुरू म्हणून प्रसिद्धीस आले.

ज्ञानदेवांना तीर्थाटनाची इच्छा झाली. चारी भावंडे नामदेवांच्या भेटीकरता पंढरीस जाण्यास निघाली. मध्ये प्रथम चाकणास मुक्काम केला. चाकण येथील महिपतराव नावाच्या एका भाविक श्रीमान गृहस्थाचा पाहुणचार घेतला व नंतर पंढरीस नामदेवांच्या भेटीकरता आली. तीर्थयात्रा नामदेवांबरोबरच करावी, म्हणजे नामदेवांसारख्या श्रेष्ठ दर्जाच्या भक्ताचा सहवास काही काळ सतत लाभेल हाच त्यातील हेतू होता. नामदेवांना आलिंगन देऊन तीर्थयात्रेचा मानस ज्ञानदेवांनी प्रकट केला. नामदेवांनी म्हटले की, 'भगवंतांनी आज्ञा दिली तरच मी येतो.' दोघेही विठोबापुढे उभे राहिले. पंढरीनाथांनी सांगितले की, 'ज्ञानेश्वर प्रत्यक्ष परब्रह्ममूर्ती आहे. तुझ्या संगतीचा त्यांना आदर आहे. तू फार भाग्यवान आहेस. जा, स्वस्ति क्षेम असो.' देवांनी तीर्थयात्रेस संमती दिली व बोळवण करून देव परतले. मंगळवेढ्याचे चोखामेळा, आरणभिंडीचे सांवता माळी, नरहरी सोनार, परिसा भागवत, विसोबा खेचर इत्यादी अनेक संतांची प्रभावळ ह्या तीर्थयात्रेत सामील झाली. चालत चालत सर्व मंडळी कराडाजवळ येऊन पोचली. कराड हे कृष्णातीरचे आदिक्षेत्र म्हणून मानले जात होते. कऱ्हाडचा राजा रामराय हा चाकणच्या महिपतरावाचा जावई होता. सीताबाई ही महिपतरावाची कन्या त्याला दिली होती. रामराय संतमंडळींच्या विरुद्ध होता. सीताबाईला साधुसंतांचे प्रेम होते. त्याच वेळी रामरायाचा मुलगा फार आजारी होऊन मृत्यू पावला. ज्ञानदेवांनी त्या पुत्राला जीवदान दिले. त्यामुळे रामरायाही संतांचा भक्त झाला.

मार्गक्रमण करीत असता नामदेवांना पंढरीची आठवण व्हायची; पंढरीचा वियोग सहन होईना; विठ्ठलमूर्तीच्या भेटीकरता हृदय तळमळत होते. ही गोष्ट ज्ञानदेवांच्या लक्षात आली. ते म्हणाले, 'नामया, प्रेममूर्ती अद्वैत असा आत्मा सर्वांभूती आहे. तुला भक्तीचे भाग्य लाभले आहे; तो भक्तिमार्ग आम्हांस तूच सांगावा.' नामदेवाने ज्ञानदेवांच्या चरणांवर मिठी मारून सांगितले की, 'मी पंढरीरायाच्या कृपेने पोसलो आहे. ज्ञान देण्याचे भाग्य मला नाही. मी वैष्णवांचा नम्र दास आहे; तुम्ही ज्ञानाचे कल्पतरू किंवा कामधेनू आहात; माझ्यासारख्या कृपणाचे द्वारी याचक म्हणून तुम्ही का यावे?' ज्ञानदेव म्हणाले, 'असे बोलू नकोस. तू अनुभवी आहेस. तुझे बोलणे म्हणजे केवळ कवित्व नव्हे. व्युत्पन्न, बुद्धिवंत, चतुर वक्ते, आत्मज्ञानी, योगी, जीवन्मुक्त ह्यांचीही तुझ्याशी तुलना होऊ शकत नाही. तुझ्या कीर्तनाचा रस हा अद्भुत आणि निरुपम आहे.'

पश्चिमेकडची प्रभास, द्वारका इत्यादी तीर्थे ह्या मंडळीने उरकली. गिरनारची यात्रा संपवून मारवाडात शिरले. तेथे पाण्याचा खडखडाट! सर्व तृषाक्रांत झाले. वाटेत एक कूप खूप खोल होता. ज्ञानदेवांनी अणिमा-लघिमांसारख्या सिद्धींचा अवलंब करून खोल विहिरीतील पाणी पिण्याचा चमत्कार दाखविला. परंतु नामदेवांनी हृदयी केशिराजास आठवून नेत्र मिटले व प्रार्थना केली, "तंव गडगडीत कूप उदके ओसंडला। कल्पांती खवळला सिंधु जैसा॥" पाणी खळखळाट करीत वर आले. सर्वजण तृप्त झाले. अयोध्या, प्रयाग, काशी, गया इत्यादी तीर्थक्षेत्रांची यात्रा संपवून पुन्हा पंढरीस परतले.

ज्ञानदेवांनी तीर्थयात्रेची समाप्ती संतमंडळीसह पंढरीस केली. ज्ञानदेवांनी पंढरीनाथाला आळंदीस जाऊन अखेरची समाधी घेण्याचा आपला संकेत कळविला. अनुज्ञा मिळाली. देव आणि संत आळंदीस आले. विठोबांनी ज्ञानेश्वरांस समाधीस बसण्याची अनुज्ञा दिली. गुरू निवृत्तिदेवांच्या चरणावर ज्ञानदेवांनी लोटांगण घातले; त्यावेळी निवृत्तिदेव उन्मनी अवस्थेत होते. सोपानदेव व मुक्ताबाई ह्यांनी ज्ञानदेवांचे चरण

धरले. लगेच निवृत्तिनाथांची समाधी क्षणभर बाजूला झाली. ते म्हणाले, बाळपणी आईबाप सोडून गेले, तेव्हा झाले नव्हते इतके दुःख ह्या वेळी होत आहे. इंद्रायणीच्या तीरावर सिद्धेश्वराचे पुरातन स्थान आहे. तेथे सिद्धेश्वराच्या डाव्या बाजूस अजानवृक्षाच्या छायेखाली समाधिस्थान तयार करविले होते. शके १२१८, कार्तिक वद्य एकादशीला सर्वांनी हरिजागर केला. नामदेवांचे हरिकीर्तन झाले. द्वादशीला पारणे सोडले. तिसरे प्रहरी भक्त कान्हू पाठक हे केंदूरहून ज्ञानदेवांच्या दर्शनास आले. सर्व संतांच्या आग्रहावरून त्यांनी द्वादशीचे कीर्तन केले. त्रयोदशीला प्रातःकाळी तुळशी, बेल अंथरून आसन तयार झाले. समाधिस्थानाची शिळा तयार होती. ज्ञानदेव समाधीकडे जाण्यास उठले. अवघ्यांनी वंदन केले. भगवंतांनी ज्ञानदेवांच्या कपाळी केशरी गंध लावून गळ्यात पुष्पहार घातला. भगवंतांनी प्रेमाने निरोप दिला. आर्तस्वरांनी संतमंडळी भजन करीत होती. त्यांच्या नामघोषाने दशदिशा भरून टाकल्या. एक हात भगवंतांनी व दुसरा निवृत्तिनाथांनी धरून आसनावर बसविले. ज्ञानदेवांनी डोळे मिटले. संतांनी समाधीला शिळा लावली. नऊ दिवस कीर्तन-महोत्सव झाला.

ज्ञानदेवांच्या समाधीनंतर सोपानदेव, मुक्ताबाई व निवृत्तिनाथ ह्यांनी एका वर्षाच्या आतच देह ठेवले.

ज्ञानदेवरचित *ज्ञानेश्वरी*ची सांस्कृतिक व राजकीय पार्श्वभूमी फार संपन्न होती. ज्ञानदेवांच्या कालखंडात महाराष्ट्रातील भौतिक व आध्यात्मिक संस्कृतीचा उत्कर्ष होत होता. *ज्ञानेश्वरी* हे त्या उत्कर्षाचेच उत्कृष्ट फलित होय. सातशे वर्षे झाली; तरी धर्म, तत्त्वज्ञान व काव्य ह्यांची अनुपम परिणती म्हणजे *ज्ञानेश्वरी* असे अजून म्हणता येते. तत्पूर्वी सुमारे शंभर वर्षे मराठी भाषेतील साहित्य विकास पावत होते. हा काळ महाराष्ट्राच्या इतिहासात फार महत्त्वाचा आहे. स्वतः ज्ञानदेवांनीच श्रीरामचंद्र ह्या यादव राजाचे यदुवंश-विलास, सकळकळानिवास व न्यायाचा पोषक क्षितीश म्हणून वर्णन केले आहे. दोनशे-अडीचशे वर्षांच्या ह्या कालखंडात देवगिरीच्या यादवांचे राज्य विस्तारत व विकास पावत होते. भास्कराचार्य, हेमाडपंत, बोपदेव ह्यांच्यासारखे विद्वान ह्या कालखंडात झाले. भास्कराचार्य हे भारताच्या गणित व ज्योतिष विद्येचे शिरोमणीच होते. भास्कराचार्यांच्या वंशातील सात पिढ्या लागोलग चतुरस्र विद्वानांच्या झाल्या. ज्योतिष, वैद्यक, धर्मशास्त्र, न्याय, मीमांसा, वेदान्त व व्याकरण ह्यांचे अध्ययन विदर्भासह महाराष्ट्रातील निरनिराळ्या पाठशाळांमध्ये चालू होते. बोपदेवांनी व्याकरणावर दहा, वैद्यकावर नऊ, साहित्यशास्त्रावर तीन, *भागवता*वर चार व ज्योतिषावर एक असे २७ प्रबंध लिहिले होते. बोपदेवांचे *भागवता*वरील *हरिलीला*, *मुक्ताफळ*, *परमहंसप्रिया* व *मुकुट* हे चार ग्रंथ विद्वन्मान्य झाले होते. ह्याचा अर्थ असा की, महाराष्ट्रात *श्रीमद्भागवता*चा महिमा फार होता; पण नाथसंप्रदायाचाही प्रभाव होता, हे ज्ञानदेवांच्या तीन पिढ्यांवर नाथसिद्धांचा अनुग्रह होता ह्यावरून लक्षात येते. शांकर अद्वैताला महाराष्ट्रात फारच मोठी प्रतिष्ठा लाभली होती, हे *ज्ञानेश्वरी*वरून लक्षात येते. अजंठा, वेरूळ इत्यादी लेण्यांवरून महाराष्ट्रात ज्ञानदेवांच्या अगोदर सुमारे हजार-बाराशे वर्षे मूर्ती, चित्र व स्थापत्य ह्या कला अनेक अंगांनी विकसित होत होत्या ह्याचे प्रत्यंतर मिळते. महाराष्ट्रातील प्राचीन मंदिरे ही हेमाडपंथी शैलीची आहेत असे म्हणतात; म्हणजे असे की स्थापत्यकला ही फार लोकप्रिय झाली होती. *ज्ञानेश्वरी* हे त्या भव्य संस्कृतीचे सुंदर व पवित्र प्रतीक व प्रतिबिंबच आहे, असे म्हणावे लागते; इतक्या श्रेष्ठ साहित्यकृतीला श्रेष्ठ सांस्कृतिक पार्श्वभूमीच प्राप्त व्हावी लागते. त्याशिवाय ती निराधार ठरते, तिची सामाजिक उपपत्ती लागू शकत नाही.

*ज्ञानेश्वरी*नंतर चार-पाच वर्षांतच महाराष्ट्रावर भयानक परचक्र आले व महाराष्ट्राच्या राजकीय विनाशास प्रारंभ झाला. ह्याचे कारण म्हणजे परंपरागत हिंदू समाज हा राजकीय दृष्ट्या संघटित, बलवान व नित्यसावध राहिला नव्हता. सांस्कृतिक शक्ती मोठी होती; परंतु राजकीय शक्तीला उतरती कळा लागली होती. अशी विसंगती जगातील अनेक राष्ट्रांच्या इतिहासात आढळते.

बहिणाबाईने एका अभंगात म्हटले आहे की, भागवतधर्माचा म्हणजे वारकरी संप्रदायाचा पाया ज्ञानदेवांनी रचला. पाया रचला म्हणजे नेमके काय केले ? ज्ञानदेवांच्या अगोदर हजारो वर्षे भारतात व महाराष्ट्रात शैव व वैष्णव धर्म स्थिरावला होता. पाया होताच व इमारतही होती. नवा पाया कशाकरता घातला ? का घालावा लागला ? उत्तर : (१) तोपर्यंत धर्माची मुख्य भाषा किंवा माध्यम संस्कृत भाषाच होती. *भगवद्गीते*चा व *भागवता*चा प्रचार सर्वत्र होता; परंतु हे ग्रंथ संस्कृतमध्ये अडकले होते. जनसामान्यांच्या भाषेत प्रभावीपणे धर्मतत्त्व मांडण्याचे कार्य प्रथम ज्ञानदेवांनी *ज्ञानेश्वरी*च्या द्वारे पार केले. संस्कृत ही देववाणी होती व धर्मामृत ह्या देववाणीत बंद होते. ह्या अमृताला पैजेने जिंकणारी देशी भाषा ज्ञानदेवांनी निर्मिली; धर्म, तत्त्वज्ञान व साहित्यकला ह्यांचे सामान्यजनांपर्यंत पोचणारे माध्यम निर्माण केले. (२) संस्कृत साहित्यात जो रससिद्धांत सांगितला व जी नवरसांची काव्ये निर्माण झाली, त्यांत शृंगाररस हा रसराज म्हणून मान्यता पावला होता. स्त्रीपुरुषांच्या लैंगिक प्रेमाचे उज्ज्वल स्वरूप म्हणजे शृंगाररस होय. ह्या रसराजाला ज्ञानदेवांनी शांतरसाच्या पायाशी बसविले. कारण शृंगारिक साहित्याने वैषयिक प्रवृत्ती वाढते, भोगवासना उत्तेजित होते. भोगवासना प्रबळ झाली म्हणजे पराक्रमाला मर्यादा पडतात. इंद्रियांवर विजय मिळविणारी विवेकबुद्धी हीच पराक्रमाला खरीखुरी प्रेरक शक्ती ठरते. ज्ञानदेवांनी शांतरस हा रसश्रेष्ठ ठरविल्यामुळे विवेकबुद्धीला उजळा मिळाला. (३) तोपर्यंत वैष्णव भक्तिमार्ग, शैव पंथ वा नाथ पंथ ह्यांत वाममार्गीय आचार महतीस पावत होते. लैंगिक स्वैरसंभोगाला भक्तीचा पवित्र वेष चढविला होता. ज्ञानदेव नाथपंथी होते, परंतु त्यांनी नाथपंथातील लैंगिक स्वैराचाराची घृणा केली व भक्तिमार्गाला शुद्ध केले. (४) भगवान बुद्धापासून शंकराचार्यांपर्यंत संन्यासाश्रमच श्रेष्ठ असे परमार्थाचे साधन मानले गेले. ज्ञानदेवांपर्यंत संन्यासच श्रेष्ठ मानला जात होता. परंतु अनासक्तीचा गृहस्थाश्रमच परमार्थाचा श्रेष्ठ मार्ग म्हणून प्रथम ज्ञानदेवांनी दाखवून दिला. गृहत्याग न करताच अलिप्तपणे कर्मे करीत राहणे ह्यातच संन्यास व नैष्कर्म्य आहे असे त्यांनी प्रतिपादिले, आणि कर्मयोग म्हणजे ईश्वराची पूजा होय असे सांगून अद्वय भक्तीमध्ये कर्मयोगाचा अंतर्भाव केला. (५) शांकर मायावादाचे समर्थन त्यांनी एका मर्यादेपर्यंतच केले. विश्व हे परमेश्वराचे सत्य स्वरूपच होय, त्याचाच उल्हास होय, असे सांगून, सगुण व निर्गुण ह्या दोन्ही एकाच परमसत्याच्या बाजू होत, असे *भावार्थदीपिके*त, *अनुभवामृता*त, *चांगदेवपासष्टी*त आणि *अभंगगाथे*त वारंवार प्रतिपादिले.

तात्पर्य असे की, ज्ञानदेवांनी नवा पाया घातला म्हणजे लोकभाषेला परमार्थविचाराचे समर्थ माध्यम केले; शृंगाररसाच्या ऐवजी शांतरसाला रसराज ठरविले; शैव, वैष्णव व नाथ संप्रदायांतील लैंगिक आचार रद्द केले; संन्यासमार्गाऐवजी गृहस्थाचा भक्तिमार्ग उजळविला आणि मायावादापेक्षा चिद्विलासवादाला अग्रस्थान दिले.

ज्ञानदेवांची म्हणून निर्विवादपणे निश्चित ग्रंथरचना म्हणजे *भावार्थदीपिका* (*ज्ञानेश्वरी*), *अनुभवामृत*, *चांगदेवपासष्टी* व *अभंगगाथा* ही होय. [➪ ३.] *अभंगगाथे*त काही थोडे अभंग प्रक्षिप्त असावेत अशी शंका राहते.

ज्ञानदेवचरित्रविषयक काही विवाद्य मुद्दे आहेत. विठ्ठलपंतांच्या विवाहाच्या वर्णनात मातापित्यांच्या उपस्थितीचा निर्देश येत नाही. हा विवाह ज्येष्ठ महिन्यातील लग्नाच्या शेवटच्या मुहूर्तावर झाला, असे प्रा. शं. वा. दांडेकर ह्यांनी म्हटले आहे. नामदेवांच्या *आदि* प्रकरणावरून

दांडेकरांनी हे विधान केले आहे. कै. रा. ग. हर्षे ह्यांना हे मान्य नाही. परंतु वृद्ध मातापिता उपस्थित नसता विवाह झाला, ह्यावर विश्वास ठेवण्यास काही हरकत नाही. कारण विठ्ठलपंतांच्या एकंदर जीवन-पद्धतीशी असा प्रकार विसंगत ठरत नाही.

येथे हे चरित्र नामदेवाच्या *आदि, तीर्थावळी* व *समाधी* ह्या प्रकरणांवरून मुख्यतः दिले आहे. काही ठिकाणी महिपतीप्रभृती इतर चरित्रकारांचे चरित्रविषयक निर्देश मधूनमधून आवश्यक तेथे वापरले आहेत.

विठ्ठलपंतांचे गुरू नृसिंहाश्रम की रामानंद ह्याबद्दलची चर्चा चरित्र-कार करतात; पण त्याबद्दल कसल्याही निर्णयाप्रत येण्यास निश्चित प्रमाण सापडत नाही. ह्या संदर्भात हे ध्यानात ठेवले पाहिजे की, आनंद वा चैतन्य ह्या संज्ञांनी विशिष्ट संप्रदाय निश्चितपणे सूचित होत नाही; कारण संन्यासाचा योगपट्टविधी झाल्यावर तीर्थ, आश्रम, वन, अरण्य, गिरी, पर्वत, सागर, चैतन्य, सरस्वती, भारती, पुरी, आनंद इत्यादींपैकी सर्वांना म्हणजे गुरू व शिष्य ह्यांना संमत असलेले कोणतेही नाम स्वीकारावे असे संन्यासविषयक धर्मशास्त्र सांगते; त्याचप्रमाणे गुरूचे नाम आनंद असल्यास तो एक संप्रदाय होय असे ठरत नाही, व शिष्याचेही नाम आनंदच असावे असेही नाही. उदाहरणार्थ, माधवाचार्यांचे संन्यासाश्रमातील नाव विद्यारण्य होते आणि गुरूचे नाव आनंद व भारती होते. अशी शेकडो उदाहरणे मिळतात.

येथे रेड्याच्या तोंडून वेद वदविले, श्राद्धात प्रत्यक्ष पितर मंत्रद्वारे उपस्थित केले, मृत माणूस जिवंत केला, इत्यादी कथा दिल्या आहेत; कारण अशा प्रकारच्या अद्भुत कथा संतचरित्रात असतात. संतचरित्राचा किंवा धार्मिक कथांचा अद्भुत पुराणकथा हा आवश्यक असा भाग असतो. त्या कथांच्या संदर्भाने त्यानंतरचे साहित्य निर्माण झालेले असते. म्हणून वाङ्मयकोशात संतांच्या किंवा देवदेवतादिकांच्या चरित्रवर्णनात अशा कल्पित कथा, त्या मिथ्या आहेत हे समजूनही, देणे आवश्यक असते.

लक्ष्मणशास्त्री जोशी

**रचना : मु. – अभंग : स्वतंत्र ग्रंथ** – (१) आवटे, त्र्यंबक हरी (संपा.); ज्ञानेश्वर अभंग; पृ. ५९–३०९; गाथा पंचकातील पहिली गाथा; पुणे, १९०८. (२) गोडबोले, र. भा. (संपा.); ज्ञानदेवाचा गाथा; पुणे, १८७७. (३) गोंधळेकर, रा. श्री. (संपा.); ज्ञानदेवांची गाथा; पुणे, १९०८. (४) जोग, विष्णु नरसिंह (संपा.); ज्ञानदेवाची गाथा (ज्ञानदेवांचे विषयवार ९०३ अभंग – निवृत्ति, चांगदेव यांच्या अभंगांसह); पुणे, १९२७. (५) भावे, विनोबा; ज्ञानदेवांची भजने चिंतनिकेसह (साधना, भक्ति इत्यादी विषयांवरील ज्ञानदेवांची १५० भजने); वर्धा, १९४१. (६) रानडे, रा. द. (संपा.); ज्ञानदेव अभंग (संतवचनामृत – ज्ञानेश्वरांच्या अभंगातील निवडक वेचे); पृ. १६–५८. **अमृतानुभव (अनुभवामृत)** – (१) ऋषी, राजाराम केशव ऊर्फ राजारामबुवा धारपुडीकर; श्रीज्ञानेश्वरमहाराजकृत अनुभवामृतरहस्य; पुणे, १९१७. (२) कुंटे, आ. मो.; ज्ञानदेवकृत अमृतानुभव व त्यावरील शिवकल्याणकृत अमृतानुभव-विवरण : नित्यानंदैक्यदीपिका; श. १५१५ तील; मुंबई, १८८४, १८८८. (३) खानोलकर, गं. दे. (संपा.); श्रीशिव-कल्याण : श्रीअमृतानुभवविवरण : नित्यानंदैक्यदीपिका; मुंबई, १९७१. (४) गर्दे, खंडो कृष्ण ऊर्फ बाबा (संपा.); श्रीअमृतानुभव समआर्या टीका व प्रल्हादपंत बडवे यांची संस्कृत समश्लोकी; मुंबई, १९२९. (५) गोंधळेकर, रा. श्री. (संपा.); अमृतानुभव पोथी; पुणे; संपा. सापकर, गं. गो.; १८६५ (शिळाछाप पोथी). (६) जोग, विष्णु नरसिंह (संपा.); श्रीज्ञानेश्वरमहाराजकृत अमृतानुभव : सुबोध महाराष्ट्र अर्थविवरणासह; मुंबई, श. १८२७. (७) दासगणू (गणेश दत्तात्रय सहस्रबुद्धे); अमृतानुभव भावार्थमंजरी; नांदेड. (८) देशपांडे, पु. य.; अमृतानुभव रसरहस्य; नागपूर, १९६२. (९) पंडित, नारायण पैकाजी; अमृतानुभव कौमुदी; नागपूर, १९५६. (१०) बहिरट, भालचंद्र पंढरीनाथ; पोतदार आणि खुपेरकरशास्त्री (संपा.); अनुभवामृत – राष्ट्रभाष्य टीका; पंढरपूर, १९६६. **चांगदेवपासष्टी** – (१) कुळकर्णी, पांडुरंग ज्ञानेश्वर; चांगदेवपासष्टी (स्वानंदजीवन); पुणे, १९५५. (२) दासगणू महाराज; श्रीपासष्टीभावदीपिका; पुणे, १९३१. (३) सुबंध, प्रल्हाद सीताराम; पासष्टीप्रदीप अर्थात् श्रीज्ञानेश्वरमहाराजकृत चांगदेवपासष्टीचें सार्थ विवरण; मुंबई, १९३६. **भावार्थदीपिका / ज्ञानदेवी / ज्ञानेश्वरी** – (१) आगाशे, ग. कृ. (संपा.); भा. १ : कोल्हापूर, १९२४; भा. २ : सातारा, १९२६; भा. ३ : सातारा, १९२७; भा. ४ : सातारा, १९२९. (२) आठल्ये, कृष्णाजी नारायण (संपा.); सार्थ व सटीप ज्ञानेश्वरी; मुंबई, १९०२. (३) कुंटे, आ. मो. (संपा.); श्रीज्ञानेश्वरी; मुंबई, १८९७. (४) गणपत कृष्णाजी; ज्ञानेश्वरी; मुंबई, १८७४. (५) चाफेकर, व्यंकटेश त्र्यंबक (संपा.) : ज्ञानेश्वरी सटीप; पुणे, १९२४. (६) गोंधळेकर, रावजी श्रीधर; पुणे, १८७७. (७) तुकारामतात्या (संपा.); श्रीज्ञानेश्वरी; मुंबई, १८९७. (८) दांडेकर, शं. वा. (संपा.); सार्थ ज्ञानेश्वरी; पुणे, १९५३. (९) धनेश्वर, त्र्यंबक गंगाधर, (संपा.) : ज्ञानेश्वरी – पाठशुद्ध आवृत्ती; अहमदनगर, १९५३. (१०) पांगारकर, ल. रा. व पोतदार, बाबासाहेब (संपा.) : श्रीज्ञानेश्वरी; पुणे, १९३५. (११) बंकटस्वामी (संपा.); सार्थ ज्ञानेश्वरी; पुणे, १९२७. (१२) भिडे, बाळकृष्ण अनंत (संपा.); सार्थ ज्ञानेश्वरी सटीप; मुंबई, १९२८. (१३) माडगांवकर, रामचंद्र विष्णु (संपा.); श्रीज्ञानदेवकृत भावार्थदीपिका; मुंबई, १९०७. (१४) राजवाडे, वि. का. (संपा.); धुळे, १९०९. (१५) रानडे, पां. वि. (संपा.); ज्ञानेश्वरी – परिभाषायुक्त; पुणे, १८८६. (१६) शास्त्री, ग. वा. (संपा.); ज्ञानेश्वरी; मुंबई, १८६४. (१७) साखरे, नानामहाराज (संपा.); सान्वय व सार्थ श्रीमद्भगवद्गीतेसह ज्ञाने-श्वरी; १९०५. (१८) सोहोनी, ना. रा.; श्रीज्ञानेश्वरी; पुणे, १८९०. (१९) ज्ञानेश्वरी; शिळाछाप पोथी; प्रभाकर प्रेस; मुंबई, १८४५. (२०) (श्री) ज्ञानेश्वरी; वि. का. राजवाडे प्रतीचे पुनर्मुद्रण; महाराष्ट्र राज्य शिक्षण खाते, मुंबई, १९६० व मुंबई राज्य शिक्षण खाते, मुंबई, १९७७.

**शंकास्पद : ग्रंथ व प्रकरणे : एकूण ४५** –

**अद्वैतनिरूपण** (अमु.) : ओ. सं. १९८; बा. ३, तंसम. हस्त. यादी, क्र. १.

**अन्वयव्यतिरेक** (अमु.) : निर्देश : चांदोरकर, गो. का.; संककासू., पृ. २.

० **अपर अधिष्ठान – पंचमुद्रा** – पहा : **पंचमुद्रा.**

**अभंगगाथा** (मु.) : संपा. गोडबोले, र. भा.; १८७७; संपा. जोशी, प्र. न.; १९६९. १८७७ ते १९६९ पर्यंतच्या काळात प्रसिद्ध झालेल्या विविध गाथाग्रंथांत ह्या अभंगांचे संपादन फारसे चिकित्सक दृष्टीने झालेले नसल्यामुळे त्यांत अभंगांची भिन्न संख्या, अन्य कवींच्या नावावरील सरमिसळ, हिंदी-कानडी अभंग, इत्यादी गोष्टी आढळतात. त्यामुळे हे एकाच आद्य ज्ञानदेव ह्या व्यक्तीचे ग्रंथकर्तृत्व मानता येईल किंवा नाही अशी शंका चिकित्सकांच्या मनात आहे.

**अमृतसंजीवनी** (अमु.) : निर्देश : चांदोरकर, गो. का.; संक-कासू., पृ. २. हे प्रकरण उपलब्ध नाही. परंतु *अमृतानुभव* किंवा *नमनस्तोत्र* ह्या ज्ञानदेवांच्या नावावरील ग्रंथाचेच ते दुसरे नाव

असावे असे मत प्रा. के. वा. आपटे ह्यांनी मांडले आहे (मसंप., जुलै १९७२, पृ. १३२).

**अरूपप्रकाश /० कृत्या / ० तूर्याप्रकरण /० योगमार्ग / ० ज्ञानदेव तेहतिशी / ० ज्ञानदेव योगमार्ग** (मु.) : ओ. सं. ३६, संपा. सावंत, आ. रा; *ज्ञानेश्वरकृत मुद्राप्रकरण, मुकुटमणि व अरूपप्रकाश ग्रंथ,* द्विआ.; बेळगाव, १९०७. हा ग्रंथ योगातील मुद्रांचे वर्णन करणारा व तुरीयावस्था, परा, पश्यन्ती, मध्यमा, वैखरी ह्या योगमार्गाचे वर्णन करणारा आहे. ह्यातील योगप्रक्रिया ज्ञानदेवसदृश असली तरी भाषेच्या अर्वाचीनतेमुळे हे प्रकरण आद्य ज्ञानदेवांचे नसावे असे वाटते.

**० अर्जुनगीता** – पहा **प्राकृतगीता.**

**० आत्मपत्र** – पहा **स्वात्मानुभव.**

**० आत्मानुभव** – पहा **स्वात्मानुभव.**

**आनंदलहरी** (अमु.) : "अमृतानुभव आनंदलहरी। ग्रंथ सिद्ध केला ज्ञानेश्वरी। संस्कृत प्राकृत वैखरी। वदविली माझी" असा *आनंदलहरी*चा उल्लेख नामदेवांच्या एका अभंगात आढळतो. टाकळी येथील रामदासी मठात सापडलेल्या बाडातील एका अस्सल मोडी यादीत *आनंदलहरी ओ. १५४* असा एका ग्रंथाचा निर्देश आढळल्याचे शं. श्री. देव ह्यांनी नमूद करून ठेवले आहे (भाइसंमंइति., श. १८३८, पृ. ८०).

**आज्ञापत्र** (मु.) : ओ. सं. १६. श्रीदासराममहाराज (रा. गो. केळकर, सांगली) ह्यांच्या ओवीबद्ध टीकेसह हे प्रकरण *वायुलहरी* ग्रंथात समाविष्ट (सांगली, १९६९). खटावचे संत श्रीरामानंदमहाराज ह्यांच्या पठणात असणाऱ्या श्रीज्ञानदेव-*आज्ञापत्रा*तील १६ ओव्या रा. गो. केळकर ह्यांनी ऐकून आपल्या वहीत टिपून ठेवल्या होत्या. ओव्या सच्चिदानंदबावांस उद्देशून आहेत. 'भावार्थदीपिका शुद्ध। आवृत्ती करी॥' हे सांगण्यासाठी हे *आज्ञापत्र* आहे.

**उत्तरगीता** (मु.) : अ. ३, ओ. सं. ५८४; (१) संपा. गोंधळेकर, रा. श्री., १८८९; (२) संपा. कुळकर्णी, श्री. रं., हैद्राबाद, १९५९. ह्या गीतेमध्ये सिद्धमार्ग, ज्ञानविज्ञानविचार, योगमार्ग, शून्यवाद इत्यादी विषयांचे स्पष्टीकरण येते. हा ग्रंथ आद्य ज्ञानदेवांचा असावा असे ठाम मत डॉ. श्री. रं. कुळकर्णी ह्यांनी मांडले आहे. पण डॉ. शं. दा. पेंडसे, भा. पं. बहिरट व बा. म. हंस ह्यांना ते मान्य नाही.

**उत्तरपंचविसी /० उत्तरपत्रिका / ० देखणी पत्रिका / ० पंचविसी** (मु.) : ओ. सं. २७; संपा. कुळकर्णी, व. दा.; मसंप., जुलै १९७०. चांगदेवांच्या कोऱ्या कागदाला उत्तर म्हणजे ही *उत्तरपंचविसी.* संख्याधिष्ठित कूटरचना ह्या प्रकरणात आढळते. चांगदेवांच्या कोऱ्या कागदाला उत्तर म्हणून *चांगदेवपासष्टी* लिहिल्यानंतर पुन्हा *उत्तरपंचविसी* लिहिण्याचे प्रयोजन काय? त्यामुळे ही रचना उत्तरकालीन असावी असा समज होतो. शिवाय आद्य ज्ञानदेवांची प्रासादिक शैलीही तेथे आढळत नाही.

**० उत्तरपत्रिका** – पहा **उत्तरपंचविशी.**

**० कपिलगीतोक्त पंचमुद्रा** – पहा **पंचमुद्रा.**

**कमाल अठ्ठ्याहत्तरी** (मु.) : ओ. सं. ८०; संपा. सावंत, आ. रा.; बेळगाव, १९०४. कमाल नावाच्या आपल्या भक्ताला ज्ञानदेवांनी जो अद्वैतवेदान्तपर उपदेश केला, तो ह्या प्रकरणात समाविष्ट. 'निवृत्ति प्रसादे ऐकता बोध' असा ज्ञानदेवकर्तृत्वदर्शक एकदाच उल्लेख आलेला आहे. भाषेच्या स्वरूपावरून ग्रंथ आद्य ज्ञानदेवांचा नाही हे लक्षात येण्यासारखे आहे.

**० कल्याणपत्र** – पहा **लेखणी.**

**० कल्याणपत्रिका** – पहा **लेखणी.**

**० कृत्या** – पहा **अरूपप्रकाश.** हे प्रकरण स्वतंत्र छापलेले असले (मसंप., एप्रि. १९६६, पृ. ५९–६०) तरी हे प्रकरण व *अरूपप्रकाश* ग्रंथ एकच होय.

**खेळ / ० मोक्षपट / ० ज्ञानपट** (मु.) : आठवले, ज. ह., रत्नागिरी, १८६९. करमणुकीसाठी बनविलेला खेळ असे ह्या ग्रंथाचे स्वरूप आहे. ज्ञानदेवांनी रचलेल्या *ज्ञानपट* नावाच्या खेळाची माहिती ब. खं. पारख ह्यांनी त्यांच्या *ज्ञानेश्वर महाराजांचे चरित्र* (१९०६) ह्या ग्रंथात दिली आहे. ज्ञानेश्वरकृत *मोक्षपटा*चाही उल्लेख येतो तो हाच खेळ असावा. खेळाची कल्पना ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाला धरून असली तरी अशा खेळाचे कर्तृत्व ज्ञानदेवांपेक्षा त्यांच्या एखाद्या कल्पक भक्ताकडेच दिले पाहिजे.

**खेळ ज्ञानोबा** (अमु.) : पुणे विद्यापीठ जयकर ग्रंथालयात ज्ञानदेवांच्या नावावरील ह्या हस्तलिखितात ज्ञानदेवांच्या छापील पोथ्यांतील काही अभंगांचे संकलन आढळते. हे स्वतंत्र प्रकरण नव्हे.

**० गायत्रीटीका** – पहा **गायत्रीरहस्य.**

**० गायत्रीमंत्र** – पहा **गायत्रीरहस्य.**

**० गायत्रीचे श्लोक** – पहा **गायत्रीरहस्य.**

**गायत्रीरहस्य / ० गायत्रीटीका / ० गायत्रीमंत्र / ० गायत्रीचे श्लोक / ० गायित्रीरहस्य** (मु.) : श्लो. सं. २६, संपा. पांगारकर, ल. रा., *मुमुक्षु* मासिक, मे–जून, १९२४, पृ. १५–१६. ह्या प्रकरणात शेवटी आलेल्या 'इति श्रीज्ञानदेवविरचित गायत्री – अर्थरहस्य टीका संपूर्ण' ह्या उल्लेखावरून हे श्लोक ज्ञानदेवांचे मानले गेले. परंतु प्रकरणाची १८ व्या शतकातील भाषा पाहता ते आद्य ज्ञानदेवांचे नसावे असे वाटते.

**० गायित्रीरहस्य** – पहा **गायत्रीरहस्य.**

**गीताख्याची थोरी / ० गीतामहात्म्य ओव्या** (अमु.) : धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिरात उपलब्ध झालेल्या हस्तलिखिताच्या आधारे ज्ञानदेवांच्या ह्या प्रकरणाची माहिती ज. शा. देशपांडे ह्यांनी दिली आहे (*साहित्य सहकार*, एप्रि. १९६३, पृ. ४२–४४). अर्जुनास गीतेची थोरवी श्रीकृष्ण समजावून सांगतात, असे ह्याचे स्वरूप आहे.

**० गीतामहात्म्य ओव्या** – पहा **गीताख्याची थोरी.**

**० गीतासार** – पहा **प्राकृतगीता.**

**गुप्तधन** (अमु.) : निर्देश : आजगांवकर, ज. र., प्रामसंक., खं. १, मुंबई, १९५७, पृ. ६७.

**गुरुपट** (अमु.) : निर्देश : चांदोरकर, गो. का., संककासू., पृ. १२.

**गुह्यपंचक** (अमु.) : बा. २५२, सवामं. हस्त. सू., खं. १. ५ अभंग एकत्र देऊन त्यांना 'समाधि ज्ञानदेवाची' असे नाव संकलनकाराने दिले आहे. हे स्वतंत्र प्रकरण नाही.

**गुह्यसप्तक** (अमु.) : 'आदिनाथें बीज सांगितलें' इत्यादी ज्ञानदेवकृत सात अभंग एकत्र करून संकलनकाराने हे नाव दिले आहे. हे स्वतंत्र प्रकरण नाही.

**० चतुर्विधामुक्तिलक्षण** – पहा : **ज्ञानप्रकाश.**

**जोशी, जोहार** (अमु.) : अभंग संकलन, बा. १८७, सवामं. हस्त. सू., खं. १. हे स्वतंत्र प्रकरण नाही.

**० तत्त्वमसि** – पहा **पंचीकरण.**

**० तूर्याप्रकरण** – पहा **अरूपप्रकाश.**

**० त्रिपन्नाक्षरी लेखणी** – पहा **लेखणी.**

**० दिव्यनमन** – पहा **नमन.**

**० देखणीपत्रिका** – पहा **उत्तरपंचविसी.**

**द्रोणपर्व** (मु.) : प्र. ५, ओ. सं. १६२६; संपा. प्रियोळकर, अ. का.; मसंप., ऑक्टो. १९३०, एप्रि. १९६१, जुलै १९६१; पृ. १–७२. हा ग्रंथ विष्णुदास नामांच्या *महाभारत* बाडात उपलब्ध

झाला. *ज्ञानेश्वरीतले* शब्द ह्या ग्रंथात बरेच आढळतात, असे म्हणूनही "हा ग्रंथ आद्य ज्ञानदेवांचा असेल असे मला वाटत नाही" असे मत प्रियोळकर व्यक्त करतात. 'निवृत्ति प्रसादे' असा ग्रंथ-कर्तृत्वासंबंधी निर्देश आढळला तरी अन्य सर्व रचना तत्त्वज्ञानपर असता हाच ग्रंथ तेवढा कथनपर कसा अशी शंका उरतेच.

**धर्मगीता** (अमु.) : ओ. सं. १६८, बा. १६०, तंसम. हस्त. यादी, क्र. १. कृष्णाने युधिष्ठिराला केलेला उपदेश ह्या प्रकरणात ग्रथित केला आहे. 'ज्ञानदेव' असा कर्त्याचा निर्देश ६५–६६ ओव्यांत येतो.

**नमन / ० दिव्यनमन / ० नमनस्तुति / ० नमनस्तोत्र / ० प्राकृत विष्णुसहस्रनाम / ० विष्णुसहस्रनाम** (मु.) : ओ. सं. १०८, *श्रीनामदेवगाथा*, मुंबई, १९७०; पृ. ४१२–४१९. समाधीच्या वेळी ज्ञानदेवांनी हे *नमन* गायिले असे मानले जाते. शं. वा. दांडेकर ह्या नमनास ज्ञानदेवांचे शेवटचे वाक्पुष्प समजतात. शं. दा. पेंडसेही हे प्रकरण आद्य ज्ञानदेवांचे मानतात. हे प्रकरण नेहमी *नामदेवगाथ्यात* छापले जाते. ज्या संदर्भात ते तेथे येते त्यावरून ह्या प्रकरणाचे कर्तृत्व नामदेवांकडे दिले पाहिजे असे म्हणावेसे वाटते.

० **नमनस्तुति** – पहा **नमन**.

० **नमनस्तोत्र** – पहा **नमन**.

**नाममाळेचे अभंग** (अमु.) : अभंग संकलन, बा. ९०४, सवामं. हस्त. सू., खं. २. अन्यत्र उपलब्ध होणारे नामविषयक अभंग संकलित केलेले आहेत. हे स्वतंत्र प्रकरण नाही.

**पंचमुद्रा / ० कपिलगीतोक्त पंचमुद्रा / ० पंचमुद्रा रुद्रयामलयानि / ० पंचमुद्रा लक्षण / ० मुद्राक्रम / ० मुद्राप्रकरण / ० मुद्राप्रकाश** (मु.) : ओ. सं. ६६; संपा. प्रियोळकर, अ. का.; मसंप., एप्रि. १९५९; पृ. ३–५. ग्रंथाची मूळ संहिता तंजावर येथील मराठी हस्तलिखिताच्या बा. १८० प्रमाणे असून समर्थवाग्देवतामंदिरातील बा. १५१० प्रमाणे पाठभेद दिले आहेत. ह्यात चाचरी, भूचरी, खेचरी, अगोचरी, उन्मीलनी, अलक्षमुद्रा अशा मुद्रांचे वर्णन येते. हे नाथपंथीय तत्त्वज्ञानाप्रमाणे आहे. डॉ. श्री. रं. कुळकर्णी संपादित *कपिलगीतोक्त पंचमुद्रा* (ओ. ३४; मसंप., जुलै १९६८) व बा. ना. मुंडी संपादित *अपरअधिष्ठान – पंचमुद्रा* (ओ. २५; मसंप., एप्रि. १९७०) ही दोनही प्रकरणे म्हणजे थोड्याफार फरकाने *पंचमुद्रा* ग्रंथच होय. ग्रंथात ज्ञानदेवांचा कर्ता म्हणून निर्देश येतो. हा ग्रंथ आद्य ज्ञानदेवांचा असणे संभवनीय आहे असे शं. दा. पेंडसे मानतात (*ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान*, १९४१, पृ. ३९६–४००).

० **पंचमुद्रा रुद्रयामलयानि** – पहा **पंचमुद्रा**.

० **पंचमुद्रालक्षण** – पहा **पंचमुद्रा**.

० **पंचरत्नी अर्जुनगीता** – पहा **प्राकृतगीता**.

० **पंचविसी** – पहा **उत्तरपंचविसी**.

**पंचीकरण / ० तत्त्वमसि / ० पंचीकरण महावाक्य / ० महावाक्य ओवी / ० महावाक्यनिरूपण** (मु.) : (१) ओ. सं. १४८; संपा. गोंधळेकर, रा. श्री.; पुणे, शिळाछाप; (२) अ. ७, ओ. सं. १५२; संपा. ओक, वा. दा.; अकलकामा., भा. २, मुंबई, १८९६; पृ. ५९–७२. ह्या ग्रंथात ३६ तत्त्वे, चार शून्ये, अजपाजप ह्यांचे निरूपण असून *ज्ञानेश्वरीत* अप्रत्यक्षपणे व अभंगांत प्रत्यक्षपणे सांगितलेल्या पश्चिममार्गाची माहिती ह्यात दिली आहे. *तत्त्वमसि* व *पंचीकरण* ही एकाच ग्रंथाची नावे आहेत (*तत्त्वमसि*; ओ. सं. १४५; संपा. प्रियोळकर, अ. का.; मसंप., एप्रि. १९५९, पृ. ६–१२). ह्या प्रकरणाच्या ज्ञानदेवकर्तृत्वाची संभवनीयता शं. दा. पेंडसे व्यक्त करतात; पण भाषा, विषयमांडणी व शैली ह्यांवरून हा निश्चितपणे ज्ञानदेवांचा मानता येत नाही असेही मत ते व्यक्त करतात.

० **पंचीकरण महावाक्य** – पहा **पंचीकरण**.

**पंडुगीता** (अमु.) : ओ. सं. ३८५. नगरच्या पाठक ह्यांच्या हस्त-लिखितसंग्रहात ह्या ग्रंथाची पोथी उपलब्ध असून त्याचा कर्ता 'बापरखुमादेवीवर' असल्याचा उल्लेख त्यात येतो. भाषेवरून हा ग्रंथ अर्वाचीन काळातला असावा असे शं. गो. तुळपुळे मानतात (*पांच संतकवी*; १९६२; पृ. १५).

**पदपदांतरे** (मु.) : पदे ३६; संपा. ओक, वा. दा., *पद्संग्रह, भा.* १, २; ह्यापैकी २५ पदे ज्ञानदेवांच्या प्रकाशित गाथ्यांतून आढळत नाहीत. ५–६ पदे : *कैवल्यवैभव* ; संपा. कोटणीस, र. ह.; व १–२ पदे : *ज्ञानेश्वरांची प्रभावळ*; संपा. पांगारकर, ल. रा.

**परमप्रकाश** (अमु.) : निर्देश : मुंडी, बा. ना.; मसंप., एप्रि. १९७०.

**पवनविजय** (मु.) : ओ. सं. ४२९; संपा. पेठे, म. प.; मसंप., जाने., १९७७, पृ. १०१–१२६. ह्या ग्रंथाची एकमेव हस्तलिखित प्रत (श. १७८२ मधली) पुणे येथील नाथसंप्रदायी गंगानाथांच्या मठात रा. चिं. ढेरे ह्यांना मिळाली. ह्या हस्तलिखितावरून नकललेल्या प्रतीच्या आधारेच प्रस्तुत ग्रंथाचे मुद्रण झाले आहे. योग आणि ज्योतिष ह्या दोन साधनांनी मनुष्याने आपले जीवन सुखी कसे करावे ह्याचे विवेचन ग्रंथात पार्वती, कार्तिकेय व शिव ह्यांच्या संवादरूपाने सांगितले आहे. ग्रंथाची भाषा *ज्ञानेश्वरी*इतकी प्राचीन नाही. तसेच ग्रंथात येणारा रामदासांचा उल्लेख शंका निर्माण करणारा आहे.

**प्राकृतगीता / ० अर्जुनगीता / ० गीतासार / ० पंचरत्नी अर्जुनगीता / ० भगवद्गीता / ० भगवद्गीतासार / ० लघुज्ञानदेवीगीता** (मु.) : ओ. सं. अंदाजे ३५७–३७१; १८६८; १८७० (गोडबोले, ना. आ.); १८७९; शिळाछाप आवृत्त्या. सरकारी यादीवरून हा ग्रंथ 'सबस्टन्स ऑफ गीता' ह्या नावे तीन वेळा मुद्रित झाल्याचे दिसते. ग्रंथाच्या हस्त. प्रती धुळे येथील समर्थवाग्देवतामंदिरात व पुणे येथील भारत इतिहास मंडळात उपलब्ध. *भगवद्गीता, अर्जुनगीता, गीतासार, प्राकृतगीता* ही सर्व एकाच ग्रंथाची नावे होत असे विद्वानांचे मत आहे. ग्रंथनमनाच्या "त्या उपकारास्तव नमस्कारु॥ नमिला तो ज्ञानेश्वरु॥ आता नमू श्रीगुरु उदारु॥ जेणे अंधकार फेडिला॥" ह्या ओवीवरून हा ग्रंथ ज्ञानदेवांचा नाही हे स्पष्ट होते. ह्या ग्रंथातील तत्त्वज्ञान ज्ञानदेवांच्या एकूण तत्त्वसरणीशी विसंगत दिसते. त्यामुळे ही *प्राकृतगीता* आद्य ज्ञानदेवांची नसावी असे मत अ. का. प्रियोळकर व शं. दा. पेंडसे ह्यांनी मांडले आहे.

० **प्राकृत विष्णुसहस्रनाम** – पहा **नमन**.

**प्राणसाखळी** (अमु.) : ओ. सं. ११२; बा. २४३, तंसम. हस्त. यादी, क्र. १. 'निवृत्ति ज्ञानदेव संवादात्मक अध्यात्म' असे ह्या प्रकरणाचे वर्णन प्रतलेखक श्यामजी गोपाळ ह्यांनी केले आहे. ग्रंथकर्ता म्हणून ज्ञानदेवांचा उल्लेख येत असला तरी *योगवासिष्ठ* ग्रंथातील नववा अध्याय घेऊन त्यावर स्वतंत्रपणे लिहून ज्ञानदेवांच्या एखाद्या भाविक भक्ताने हे *प्राणसाखळी* प्रकरण बनविले असावे असे दिसते.

**भक्तराज / भक्तिराज** (मु.) : (१) ओ. सं. अंदाजे ३००–३०९; संपा. सावंत, आ. रा.; बेळगाव, १८९८; (२) ओ. सं. ३०९, संपा. केळकर, ना. चिं.; अनेककविकृत भक्तिपरमार्थपर कविता; मुंबई, १९०३, पृ. ६०–७७. 'शके बारा शते बारोत्तरी। अलंकापुरी दिव्यनगरी' असा ग्रंथातील ज्ञानदेवकालाशी जुळणारा उल्लेख व 'ज्ञानदेवविरचित भक्तिराज संपूर्ण' हा पाठ ह्यावरून हा ग्रंथ आद्य ज्ञानदेवांचा मानला गेला असावा. ग्रंथातील ज्ञानदेवांचा त्रयस्थपणे केलेला उल्लेख, भाषेवरील रामदासी थाटाचा प्रभाव, जनार्दनस्वामी-एकनाथादींचा उल्लेख ह्या गोष्टी पाहता ग्रंथातील तत्त्वज्ञान जरी ज्ञानदेवांच्या तत्त्वविचाराशी

जुळणारे असले तरी हा ग्रंथ ज्ञानदेवांनी लिहिला नसावा.

**० भगवद्गीता** – पहा **प्राकृतगीता.**

**भगवद्गीता सप्तश्लोकी टीका** (अमु.) : ओ. सं. १८९; हस्तलिखित संग्रह, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, दादर, मुंबई.

**० भगवद्गीतासार** – पहा **प्राकृतगीता.**

**० महावाक्यओवी** – पहा **पंचीकरण.**

**० महावाक्यनिरूपण** – पहा **पंचीकरण.**

**मुकुटमणि /० मुक्तामणि /० मुगुटमणि /० मुगूदमणि** (मु.) : ओ. सं. १४८, संपा. सावंत, आ. रा.; *ज्ञानेश्वरकृत मुद्राप्रकरण, मुकुटमणि, अरूपप्रकाश*, बेळगाव, १९०७. हे प्रकरण शिवपार्वतीसंवादरूप आहे. ह्यात विविध मुद्रांची लक्षणे, मुद्रा लावल्यानंतर येणारा योगानुभव, मृत्युकाल कसा जाणावा ह्यासंबंधीचे विवेचन ग्रंथात केले आहे. १३६ क्र. च्या ओवीत 'दामोरुड देव' असा लेखकाचा स्पष्ट उल्लेख. म्हणून हा ग्रंथ ज्ञानदेवांचा नसावा, असे वाटते.

**० मुक्तामणि** – पहा **मुकुटमणि.**

**० मुगुटमणि** – पहा **मुकुटमणि.**

**० मुगूदमणि** – पहा **मुकुटमणि.**

**० मुद्राक्रम** – पहा **पंचमुद्रा.**

**० मुद्राप्रकरण** – पहा **पंचमुद्रा.**

**० मुद्राप्रकाश** – पहा **पंचमुद्रा.**

**० मोक्षपट** – पहा **खेळ.**

**० योगमार्ग** – पहा **अरूपप्रकाश.**

**योगवासिष्ठ** (मु.) : ओ. सं. १२४, *श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे योगवासिष्ठ*, संपा. चांदोरकर, गो. का., धुळे, १९१४. हा ग्रंथ आद्य ज्ञानदेवांचा असे ग्रंथाच्या प्रस्तावनेत चांदोरकर ह्यांनी म्हटले आहे. सांप्रदायिकांनी तत्वज्ञानभेदावरून ग्रंथ आद्य ज्ञानदेवांचा नसल्याचे सांगून त्यावर बहिष्कार घातला. ह्या ग्रंथावर आजपर्यंत बरीच चर्चा झाली. ह्या सर्व मतांचा परामर्श घेऊन ह्या ग्रंथाचे ज्ञानदेवकर्तृत्व शं. दा. पेंडसे ह्यांनी अमान्य करून हा वाद निकालात काढला आहे.

**योगिनी** (अमु.) : निर्देश : चांदोरकर, गो. का.; संककासू., पृ. ३८.

**० रुद्रयामलयानि पंचमुद्रा** – पहा **पंचमुद्रा.**

**० लखोटा** – पहा **सप्तपदी.**

**० लघुज्ञानदेवीगीता** – पहा **प्राकृतगीता.**

**० लिखित** – पहा **लेखणी.**

**लेखणी / ० कल्याणपत्र / ० कल्याणपत्रिका / ० त्रिपत्राक्षरी लेखणी / ० लेखन / ० लिखित** (मु.) : ग्रं. सं. ५३ + ३, *श्रीज्ञानदेवकृत लेखणी ग्रंथ व गुरुखुणेचे अभंग*; संपा. कामत, रा. कृ., *प्रसाद*, नोव्हें. १९५४, पृ. ७०–७१; ह्यात *लेखणी*चे ५३ अभंग व *गुरुखुणे*चे ३ अभंग आहेत. ग्रंथात एकनाथमहाराजांचा उल्लेख येतो. त्यामुळे हा ग्रंथ आद्य ज्ञानदेवांचा नसावा.

**० लेखन** – पहा **लेखणी.**

**० विष्णुसहस्रनाम** – पहा **नमन.**

**शकुनावळि** (अमु.) : ओ. सं. ६५. ह्या प्रकरणाची श. १७१२ त धारवाड येथे केलेली ज्ञानदेवांच्या नावावरील प्रत नगर येथील ना. वि. पाठक ह्यांच्या हस्तलिखितसंग्रहात आहे. समर्थवाग्देवतामंदिर, धुळे येथील ३१६ क्र. च्या बाडात ६३ संस्कृत श्लोक असलेली अशीच एक प्रत असून तीमध्ये शेवटी 'ज्ञानदेवेन कथित नारायण प्रश्नावलि संपूर्ण' असा उल्लेख येतो. ह्याच बाडात कोणा गोविंदसुताने ज्ञानदेवकृत *शकुनवंती*चे केलेले मराठी रूपांतरही आढळते. हे बाड सुमारे २५० वर्षांपूर्वीचे असून त्यातील विषय ज्योतिष असल्यामुळे आद्य ज्ञानदेवांशी ह्या प्रकरणाचा संबंध पोचत नाही.

**शुकाष्टक / शुकाष्टकटीका** (मु.) : (१) *शुकाष्टक पोथी*; पृ. १०, मुंबई, शिळाछाप; (२) श्लो. ९, ओ. सं. ४९; *ज्ञानेश्वरमहाराजविरचित शुकाष्टकावरील टीका*; संपा. केळकर, ना. चिं.; *अनेककविकृत भक्तिपरमार्थपर कविता*; मुंबई, १९०३; पृ. १३६–१४०. ह्यांत शुकाचार्यांच्या आठ संस्कृत श्लोकांवर ज्ञानेश्वरांची प्राकृत टीका आहे. 'शके बाराशे सोळोत्तरी' ग्रंथ पूर्ण झाल्याचा उल्लेख येतो. ग्रंथात नमन नाही. खं. चिं. मेहेंदळे ह्यांना उपलब्ध झालेल्या ह्या ग्रंथाच्या हस्तलिखितात ७१ ओव्या आहेत. विसोबा खेचरांनीही ह्या ग्रंथाचा निर्देश केला आहे. त्यावरून तो आद्य ज्ञानदेवांचा वाटतो. मात्र ग्रंथाच्या अर्वाचीन भाषेमुळे ह्याबद्दल शंका निर्माण होते.

**सच्चिदानंदास लखोटा** – पहा **सप्तपदी.**

**सनद** (मु.) : अभंगसंकलन; *सन्मणिमाला* – मोरोपंत; ज्ञानदेवांनी मुक्ताबाईला केलेल्या बोधाचे अठरा अभंग ह्यात संकलित केले आहेत. हे स्वतंत्र प्रकरण नव्हे.

**सप्तपदी /० लखोटा /० सच्चिदानंदास लखोटा** (अमु.) : अभंग ७; बा. १५३७, सवामं. हस्त. सू., खं. २. कुणा एखाद्या ज्ञानदेवभक्ताने अन्यत्र उपलब्ध होणारे सात अभंग संकलित केले आहेत. हे स्वतंत्र प्रकरण मानता येत नाही.

**समास** (अमु.) : ह्या ग्रंथाची सहा प्रकरणे असून त्यात जगाच्या उत्पत्तीचा क्रम, जीवात्मभेदाचे कारण, विविध अहंकाराचे निरूपण इत्यादी विषय आले आहेत. ज्ञानदेवांच्या नावावरील ह्या ग्रंथाचा उल्लेख भिंगारकर, श्री. र. (*ज्ञानेश्वर संक्षिप्त चरित्र*, १९००) व दांडेकर, शं. वा. (*श्रीज्ञानदेव*, १९३२) ह्यांनी केला आहे.

**० स्वात्मपत्र** – पहा **स्वात्मानुभव.**

**० स्वात्मबोध** – पहा **स्वात्मानुभव.**

**स्वात्मानुभव / ० आत्मपत्र / ० आत्मानुभव / ० स्वात्मपत्र /० स्वात्मबोध / ० स्वात्मानुभवकथन / ० स्वानुभव / ० स्वार्थपत्र** (मु.) : (१) संपा. केळकर, ना. चिं.; *अनेककविकृत भक्तिपरमार्थपर कविता*; ओ. सं. २३०; मुंबई, १९०३; पृ. ७७–९०; (२) संपा. घाणेकर, बा. रा., ओ. सं. २३२; मुंबई, १९०९; (३) बेळगाव, १९१५; ओ. सं. २३२; (४) संपा. कुळकर्णी, व. दा.; ओ. सं. २३०; मस्वासंप., अं. ३, मार्च १९६८; पृ. ५९–७२. ह्या ग्रंथात चार अवस्था व पंधरा विकार इ. विषयांचे विवरण आढळते. प्रकरणात शेवटी "शके बाराशें बारा । तैं ग्रंथ केला उभारा। परिसावया चतुरा । म्हणू निवृत्तिदास ॥" असा काळाचा व कर्त्याचा उल्लेख येतो. उपमादृष्टान्त *ज्ञानेश्वरी-अमृतानुभवा*प्रमाणे असले तरी भाषेच्या अर्वाचीनतेमुळे त्याच्या आद्य ज्ञानदेवकर्तृत्वाची शंका येते.

**० स्वात्मानुभवकथन** – पहा **स्वात्मानुभव.**

**० स्वानुभव** – पहा **स्वात्मानुभव.**

**० स्वार्थपत्र** – पहा **स्वात्मानुभव.**

**हस्तामलक** (अमु.) : बा. १२००, सवामं. हस्त. सू., खं. २.

**० ज्ञानदेव तेहत्तिशी** – पहा **अरूपप्रकाश.**

**० ज्ञानदेव योगमार्ग** – पहा **अरूपप्रकाश.**

**० ज्ञानपट** – पहा **खेळ.**

**ज्ञानप्रकाश / ० चतुर्विधामुक्तिलक्षण** (मु.) : संपा. सावंत, आ. रा., बेळगाव, १८९८. ह्या ग्रंथात सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता अशा चार मुक्तीचे वर्णन केलेले आहे. प्रत्येक मुक्तिवर्णनाअखेरीस "इति श्रीज्ञानदेव विरचिते ज्ञानप्रकाश ग्रंथ संपूर्ण।" असा उल्लेख येतो. ग्रंथात शेवटी अंबाभवानीच्या कृपेचे आवाहन

करणारा हा ज्ञानदेव आद्य ज्ञानदेव नसावा असे ओव्यांच्या अर्वाचीनतेवरून वाटते.

ज्ञानदेवांच्या शंकास्पद ग्रंथ-प्रकरणांची उपलब्ध असलेली माहिती अभ्यासकांकरिता एकत्रित स्वरूपात ह्या ठिकाणी दिली आहे. तीवरून असे दिसते की ह्यांपैकी *ज्ञानदेवी*कर्त्या ज्ञानदेवांची ठरेल अशी ग्रंथरचना फारच अल्प आहे. एकाच प्रकरणाची अनेक नावेही आढळतात. *ज्ञानदेवी*कारानंतर ज्ञानदेव ह्या नावाचे आणखी चार-पाच कवी होऊन गेले असावेत असा तर्क संभवतो. त्यांचे चरित्र आणि वाङ्मय वेगळे काढणे व ह्या साहित्याचे चिकित्सक संपादन-मुद्रण होणे अत्यावश्यक आहे. त्याखेरीज ह्यासंबंधात कोणताही निश्चित निर्णय देणे शक्य होणार नाही (पेठे, म. प. : 'श्रीज्ञानेश्वरांचे शंकास्पद वाङ्मय' : *श्रीज्ञानेश्वर नवदर्शन* (जन्मसप्तशताब्दी लेखांजलीतील एक लेख), शासन प्रका., मुंबई, १९७७; पृ. १५६–१७२.

**ज्ञानदेव वाङ्मयाचे इतर भाषांतील अनुवाद :**

**१. ज्ञानेश्वरी. इंग्रजी :** १. ॲबट, जस्टिन ई : टू प्रेअर्स ऑफ ज्ञानदेव (ज्ञानेश्वरी अ. १२ : ओव्या १–१७ व अ. १८ : ओव्या १–२६ चे इंग्रजी भाषान्तर), स्तोत्रमाला, पुणे, १९२९, पृ. १–८. २. प्रधान, व्ही. जी. (इंग्रजी भाषान्तरकार) आणि लॅंबर्ट, एच. एम. (संपादक); ज्ञानेश्वरी : इंग्रजी भाषान्तर; खं. १ व २; युनेस्को प्रका. १९६७, १९६९. ३. भागवत, आर. के. : ज्ञानेश्वरी : इंग्रजी भाषान्तर, खं. १ व २; पुणे, १९५३, १९५४. ४. सुबेदार, मनु : गीता एक्स्प्लेन्ड बाय ज्ञानेश्वर महाराज; मुंबई, १९३२. **गुजराती :** परमार, र. दि. आणि अमीन गोवर्धनदास : श्रीज्ञानेश्वरी भगवद्गीता, भगवान् ज्ञानेश्वरविरचित भावार्थदीपिकानो अनुवाद, अहमदाबाद १९३३ (आ. ५); (क्र. ना. आठल्ये ह्यांच्या टीकेसहित साखरेप्रणीत ज्ञानेश्वरीचे गुजराती भाषान्तर). **बंगाली :** १. गोस्वामी प्राणकिशोर, कलकत्ता १९६२. २. सेन गिरीशचंद्र : ज्ञानेश्वरी; नवी दिल्ली, १९६३. **संस्कृत :** १. ओक, म. पां. : संस्कृत ज्ञानेश्वरी समूळ भा. १, पुणे १९२९ (पहिल्या सहा अध्यायातील ओव्यांचे प्रतिश्लोकात अनुवाद). २. खासनीस, अ. वि. : गीर्वाणज्ञानेश्वरी, भा. २, अ. ७–१२; मुंबई, १९३१ (समश्लोकी अनुवाद). ३. राजवाडे, वि. का : ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायातील मराठी ओव्यांचे संस्कृत प्रतिशब्दशः भाषान्तर; धुळे १९३४. **हिंदी :** १. अग्रवाल, गणेशप्रसाद : गीता-ज्ञानेश्वरी हिंदी; संपा. शास्त्री, वेणीशंकर; विलासपूर, १९५८. २. कुमठेकर. ३. चैतन्य मायानंद : ज्ञानेश्वरी : हिंदी भाषाटीका; पुणे, १९२० (साखरे प्रतीचा अनुवाद). ४. ब्रह्मानंदजी : हिंदी ज्ञानेश्वरी (गद्य अनुवाद). ५. वर्मा, बाबू रामचंद्र : हिंदी ज्ञानेश्वरी, बनारस.

**२. अमृतानुभव : इंग्रजी :** १. कुळकर्णी, के. आर. : अमृतानुभव : इंग्रजी अनुवाद, नागपूर, १९६७. २. खासनीस, अ. वि. : अमृतानुभव ऑर एलिक्झिर ऑफ लाइफ; विजापूर, १९३५ (अमृतानुभवातील प्रत्येक ओवीचे इंग्रजीत रूपांतर, शब्दकोशासह). ३. बहिरट, भा. पं. : अमृतानुभव : इंग्रजी भाषान्तर; द फिलॉसफी ऑफ ज्ञानदेव; १९५६, १९६१ (या ग्रंथात समाविष्ट). **हिंदी :** चैतन्य मायानंद : श्रीज्ञानेश्वरकृत अमृतानुभव भाषाटीका—संहिता; पुणे, १९१२ (साखरे प्रतीचे हिंदी भाषान्तर).

**३. चांगदेवपासष्टी : गुजराती :** ठक्कर : पासष्टीचा अनुवाद, १९१५ (जोग, वि. न. ह्यांच्या पासष्टीच्या अन्वयाचा गुजराती अनुवाद). **संस्कृत :** दिवेकर, स. अ. (संपा.); पासष्टीवरील संस्कृत समश्लोकी, भाइसंमंत्रै., व. १२, अं. ३; पौष, १८५३; पृ. १०९–१११ (प्रत्येक ओवीचे एका अनुष्टुभांत रूपांतर). **हिंदी :** सुबंध, प्र. सी. (संग्रा.) : पासष्टीप्रदीप अर्थात श्रीज्ञानेश्वरमहाराजकृत चांगदेवपासष्टीका सार्थ विवरण; पुणे, १९४२ (मूळ ओवी, अर्थ, विवरण हिंदीत).

**४. हरिपाठ : इंग्रजी :** ॲबट, जस्टिन ई. : हरिपाठ बाय ज्ञानेश्वर, एडवर्डस. जे. एफ. ह्यांच्या 'द आउटकास्ट ब्रॅह्मिन' मध्ये समाविष्ट, पृ. २७६–२८५. **गुजराती :** मेहता, रमणिक : हरिपाठ ज्ञानेश्वरकृत, अहमदाबाद, १९५९ (गुजराती रूपांतर). **संस्कृत :** काळे, वि. वा.; श्रीज्ञानेश्वर – हरिपाठ भावार्थात्मक पद्यमय संस्कृत रूपान्तरम्; पुणे, १९६३. **हिंदी :** पाटील, रा. गो. : हिंदी सार्थ हरिपाठ; संपा. जोग, वि. न., पुणे, १९५५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास –** १. अळतेकर, मा. दा. : श्रीज्ञानदेव : चरित्रात्मक निबंध; मुंबई, १९४०. २. आजगांवकर, ज. र. : प्रामसंक., खं. १; मुंबई, १९५७; पृ. ४९–९०. ३. आपटे, के. वा. : श्रीज्ञानेश्वर महाराजांची ग्रंथसंपदा; मसंप., जुलै १९७२; पृ. २५१–२६५. ४. उद्बोधनाथकृत ज्ञानेश्वरचरित्र; संपा. चांदोरकर, गो. का.; भाइसंमंइति., श. १८३४, पृ. १२५. ५. करंदीकर, वि. रा. : भगवद्गीतेचे तीन टीकाकार : संत ज्ञानेश्वर, वामनपंडित, लोकमान्य टिळक; पुणे, १९७४. ६. कुळकर्णी, पां. ज्ञा. : ज्ञानेश्वर महाराज व इतर तत्ववेत्ते; चित्रज., ऑग. १९२१ पासून क्रमशः लिहिलेली विचारप्रवर्तक व उद्बोधक लेखमाला. ७. कुळकर्णी, पां. ज्ञा. : ज्ञानेश्वरीचा अभ्यास; पुणे, १९५६. ८. कुळकर्णी, वा. ल. : ज्ञानदेव : अभंगवाणी; मुंबई, १९७२; पृ. १–१६; अध्यक्षीय भाषण, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, ब्याहत्तरावा वार्षिकोत्सव, दि. ५ फेब्रु. १९७२. ९. केळकर, वि. मो. : भाष्यकारांतें वाट पुसतु; मसाप., अं. १८०, जाने.–मार्च १९७२; पृ. १९–३२. १०. केळकर, वि. मो. : ज्ञानदेवीच्या दोन प्रती; मसाप., जुलै–सप्टें. १९६८; पृ. १६६. ११. कोलते, वि. भि. : हरिश्चंद्र गडावर ज्ञानदेव आणि नामदेव; महाराष्ट्र टाइम्स; ९ नोव्हें. १९६०. १२. खडकर, दि. शं. : ज्ञानदेव नामदेव : एक अभ्यास : युगवाणी, व. २४, अं. ९, जाने. १९७०; पृ. ४३१. १३. खुपेरकर, बा. मा. : श्रीज्ञानेश्वरांच्या वाङ्मयाभ्यासाचे दिग्दर्शन; मुंबई, १९६१. १४. गाडगीळ, वा. दा. : श्रीज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत; नभामा., जुलै १९७१; पृ. १७–२१. १५. घाटे, ब. गि. व जोशी, म. द. : ह. भ. प. श्रीधुंडा महाराज वेगलूरकर 'श्रीज्ञानेश्वरी – सेवा गौरव ग्रंथ'; पंढरपूर, १९६६. १६. छापखाने, केशव रामचंद्र (संपा.) : स्वाध्यायज्ञानेश्वरी; सांगली, १९३२. १७. जोशी, ना. ब. : गीताचंद्रिका व एकनाथ प्रतिशुद्ध ज्ञानेश्वरीसंबंध विचार; *प्रसाद*, ऑक्टो. १९६९; पृ. ४७. १८. जोशी, म. रा. : विदर्भातील मारकीनाथपरंपरेतील ज्ञानेश्वरी प्रत; प्रसाद, व. २२, अं. ११, जून १९६९; पृ. ३५. १९. जोशी, म. रा. : श्रीज्ञानदेव चरित्र संशोधन; अकोला, १९७४. २०. जोशी, म. रा. : ज्ञानदेव भावंडे व विसोबा खेचर; ज्ञाने. त्रैमा., नोव्हें. १९७१.; २१. जोशी, म. रा. : ज्ञानेश्वरी संशोधन : पाटांगण परंपरा : एकः अध्ययन, १९७३. २२. जोशी, (तर्कतीर्थ) लक्ष्मणशास्त्री, ज्ञानदेवे रचिला पाया; नभामा., ऑग. १९७६; पृ. १–१३. २३. ढेरे, रा. चिं. : ज्ञानदेवांच्या दोन शिष्यपरंपरा; गंगाजळी; पुणे, १९७२; पृ. १००– ११२. २४. तळवलकर, गोपीनाथ : ज्ञानेश्वरीतील सौंदर्यविश्व; पुणे, १९७१. २५. तुळपुळे, शं. गो. : पाच संतकवी (द्विआ.); पुणे, १९६२. २६. दांडेकर, शं. वा. : श्रीज्ञानदेव : चरित्र, ग्रंथ व तत्त्वज्ञान; पुणे : १९३२. २७. दांडेकर, शं. वा. : श्रीज्ञानदेवांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान; नागपूर, १९५५. २८.

दांडेकर, शं. वा. : ज्ञानदेव व प्लेटो; पुणे, १९६७. २९. देशपांडे, अ. ना. : प्रामवाङ्., भा. १, उत्तरार्ध; पुणे, १९६९. ३०. देशपांडे, अ. ना. : ज्ञानदेवांचा शिक्षक; डॉ. कोलते गौरव ग्रंथ; १९६९; पृ. १७९–१९३. ३१. देशपांडे, बा. ना. : ज्ञानेश्वरीतील पाठ 'ब्रह्मसूत्र' की 'बृहत्सामसूत्र'? ; नभामा., जाने. १९६८; पृ. ५६. ३२. देशमुख, उषा मा. : ज्ञानेश्वरीच्या अध्याय-प्रस्तावना; नभामा., जुलै, १९७७; पृ. ४१–५८. ३३. देशमुख, न. बा. (संपा.) : श्रीज्ञानेश्वर-दर्शन, भा. १; दर्शनप्रवेश व साहित्यखंड, भा. २, अध्यात्मखंड व शास्त्रीयादि विषय; नगर, १९३४. ३४. धोंगे, हरिहर चंद्रशेखर : ज्ञानदेव-समाधी; नभामा., नोव्हें. १९७४; पृ. १–२४. ३५. धोंगे, हरिहर चंद्रशेखर : ज्ञानदेवांच्या चरित्रांतील चमत्कार (पूर्वार्ध) (ज्ञानदेवांचा योग); नभामा., जून १९७४; १०–१८. ३६. नामदेव : ज्ञानदेवांची आदि, तीर्थावळी, समाधी; आळंदी, १९३०. ३७. नाभाजी : ज्ञानदेव कथा, भक्तमाला, भक्तिप्रेमामृत, १९२८ (ह्या कथाधारे ज्ञानदेव चरित्र प्रियादासकृत 'भक्तिरसबोधिनी' टीका). ३८. निरंजन माधव : ज्ञानेश्वर विजय, र. श. १६८७; निरंजन माधवांचा कवितासंग्रह, भाग २, १९२५. ३९. पांगारकर, ल. रा. : श्रीज्ञानेश्वरदर्शन, ज्ञानेश्वरीचे अंतरंग, ज्ञानेश्वरीसृष्टी; मवाङ्., खं. १; नाशिक, १९३२; पृ. ४९७, ६६९, ७३९ अनुक्रमे. ४०. पांगारकर, ल. रा. : श्रीज्ञानेश्वर महाराज चरित्र आणि ग्रंथ-विवेचन; १९१२, १९१४. ४१. पाटील, सुशीला : ज्ञानेश्वरीतील उदात्त अलंकाराचे स्वरूप; नभामा., ऑक्टो. १९७०; पृ. ३७. ४२. पारख, बळवंत खंडोजी : श्रीज्ञानेश्वर महाराजांचे चरित्र; मुंबई, १९०६. ४३. पेठे, म. प. : श्रीज्ञानदेव वाग्यज्ञदर्शन; पुणे, १९७३ (ज्ञानदेव व ज्ञानेश्वरीविषयक अभ्यासाचे ऐतिहासिक समालोचन). ४४. पेठे, म. प. : ज्ञानदेव वाङ्मयसूचि; मुंबई, १९६८. ४५. पेंडसे, शं. दा. : श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान; मुंबई, १९४२. ४६. पेंडसे, शं. दा. : श्रीज्ञानेश्वरीचा अभ्यास; १९५४. ४७. पेंडसे, शं. दा. : ज्ञानदेव आणि नामदेव; पुणे, १९६९. ४८. पोहनेरकर, न. शे. : श्री संत ज्ञानेश्वर : जन्म, स्थल, काल; प्रतिष्ठान, व. २०, अं. ११, १९७१; पृ. १८–२५. ४९. फाटक, न. र. : श्रीज्ञानेश्वर, चरित्र आणि कार्य; मुंबई, १९५२. ५०. बनहट्टी, श्री. ना. : एकनाथकृत प्रतिशुद्ध ज्ञानेश्वरी आणि राजवाडे ज्ञानेश्वरी; प्रसाद, मे १९६९; पृ. २३. ५१. भावे, वि. ल. व तुळपुळे, शं. गो. : महाराष्ट्र सारस्वत, पुरवणीसह आ. ५; पुणे, १९६३. ५२. भारदे, त्र्यं. शि. व इतर : श्री ज्ञानेश्वर नवदर्शन : जन्मसप्तशताब्दी लेखांजली; महाराष्ट्र राज्य शिक्षण विभाग, मुंबई, १९७७. ५३. भारद्वाज : ज्ञानदेव व ज्ञानेश्वर, पुणे, १९३१. ५४. भिंगारकर, श्री. र. : महासाधु श्रीज्ञानेश्वर-महाराज यांचा कालनिर्णय व संक्षिप्त चरित्र; १९००. ५५. भिंगारकर, श्री. र. : महासाधु श्रीज्ञानदेव चरित्र, पुणे, १८८६. ५६. भिडे, बा. अ. : सार्थ ज्ञानेश्वरी प्रस्तावना; मुंबई, १९२८. ५७. महिपती ताहराबादकर : ज्ञानेश्वर चरित्र; भक्तविजय (श. १६८४) व संतलीलामृत (श. १६८७) ह्यांत अंतर्भूत. ५८. रानडे, रा. द. : मराठी संत वाङ्मयातील परमार्थ मार्ग, खं. १; अनुवादक : गजेंद्रगडकर, कृ. वें.; मुंबई, १९६३. ५९. रानडे, रा. द. : ज्ञानेश्वरवचनामृत, पुणे, १९२६. ६०. रानडे, रा. द. : ज्ञानेश्वरी अंतरंग (मिस्टिसिझम इन महाराष्ट्र); अनु. : गजेंद्रगडकर, पुणे, १९४८. ६१. वेलिंगकर, रा. ना. : ज्ञानेश्वरीचे शब्दभांडार : शब्दकोश; मुंबई, १९५९. ६२. श्रीधरदास : ज्ञानदेवचरित्र; भाइसंमं. हस्त. सू., पृ. १०३. ६३. सत्यामलनाथ : ज्ञानेश्वरी चरित्र; ओ. सं. १५२५ ते १७००; सिद्धांतरहस्य ऊर्फ 'ललित प्रबंध' (अप्रकाशित). ६४. हंस, बाळकृष्ण मल्हार : श्रीज्ञानदेव (तत्त्वज्ञानासंबंधी, नीतिसंबंधी, ग्रंथासंबंधी विषयांवर निबंध); संपा. ऊर्ध्वरेषे, वा. गो.; मुंबई, १८८३, १९४२. **इंग्रजी ग्रंथ**–1. Apte, H. N. : Pre-Dnyaneshwar Period and Dnyaneshwar Period; Wilson Philological Lectures on Marathi, its Sources and Development, Lecture 4, Poona, 1922. 2. Bahirat, B. P. : Philosophy of Jnanadeva; Pandharpur, 1956; Bombay, 1961 (2nd Ed.). 3. Bhalekar, Asha : Dnyaneshwar for Whom a Buffalo Chanted the Vedas : Times of India : 1-8-1954. 4. Bhandarkar R. G. : Sanskrit and the Derived Languages, Wilson Philological Lectures, 1877, 1914 (Ref. to Dnyaneshwari). 5. Belwalkar, S.K. and Ranade, R.D. : Age of Dynanadeo : Intellectual Mysticism; 1933. 6. Dandekar, S. V. : Dynanadeo and his Philosophy, New Poona College Magazine; Jan. 1923. 7. Deshmukh, M. G. : The Concept of Rekha in Dnyaneshwari, Nagpur University Journal Magazine, Dec. 1941. 8. Dodrett, W. : Grammar of Dnyaneshwari, Bulletin of the School of Oriental and African Studies, Vol. 4. 9. Edwards, J. F. : Dnyaneshwar, The Out-Caste Brahmin; Poona, 1941. 10. Harshe, N. L. : Religious Faith and Personal Debt to Dnyaneshwari(included in : Dnyaneshwar, The Out-Caste Brahmin by Edwards, J. F.; pp. 328-335). 11. Jahagirdar, R. V. : Canarese Influence on Old Marathi with Special Reference to Dnyaneshwari; Annals of Bhandarkar Oriental Research Institute, Vol. 2 : 11-4; pp. 375-397. 12. Kulkarni, P. D. : Were Dnyaneshwar and Namdeo Contemporaries?; Annals of B.O.R.I., March 1925, Vol. 6 : 1, p. 67-74. 13. Nene, B. N. : Saint Dyaneshwar, His Life & Work, People's Raj, 1 Nov. 1963, Vol. 17 : 13. 14. Panse, M. G. : Linguistic Peculiarities of Dnyaneshwari, Deccan College Series, Poona, 1953. 15. Pendse, S. D. : Dnyaneshwar and his Philosophy; Nagpur University Journal, Humanities, April 1966; Vol. 16 : 2; pp. 177-202. 16. V. N. H. : The Study of Dnyanadeo, Subodha Patrika (Substance of Lectures given by N.R. Phatak in Prarthana Samaj).

**ज्ञानदेव–२** [का. अनु.] कवी. ज्ञानदेव नावाचे अनेक कवी होऊन गेले. आद्य ज्ञानदेवांच्या नावावरील शंकास्पद वाङ्मय ह्या विविध कालातील ज्ञानदेवमंडळीचे आहे. प्रियोळकरांनी *धर्मगीते*चा समावेश ज्ञानदेवांच्या शंकास्पद वाङ्मयात केला आहे. *धर्मगीतेत* एकूण १६८ ओव्या असून ग्रंथाची भाषा १७ व्या शतकातील आहे. हे ज्ञानदेव विठ्ठलभक्त असून वारकरी आहेत. ते म्हणतात : "पैल भीमातीरी पंढरी। पुत्र पितयाची सेवा करी। त्याच्या कैवारे मी श्री हरि। वैकुंटहुनि आला। कृष्ण धर्मासि निरोपीत। ज्ञानदेव म्हणत। धर्म गीतेचा प्रबंधु॥"

भा. पं. बहिरटांनी *इंद्रायणी* मासिकाच्या एका अंकात (सप्टें.-ऑक्टो. १९६३, पृ. ३३–३६) सिद्धनाथ परंपरेतील *ज्ञानदेवी* प्रतीचा परिचय करून दिला. ह्या प्रतीत अध्याय ८ च्या प्रारंभी ज्ञानदेवकृत इतर प्रतीत नसलेल्या ४० ओव्या दिल्या आहेत. ओव्यांची भाषा पाहता त्या आळंदीच्या ज्ञानदेवांच्या दिसत नाहीत. कारण रचना ओबडधोबड आहे. ह्या ओव्या वरील ज्ञानदेवांच्याच असण्याची शक्यता आहे असे मत म. रा. जोशी ह्यांनी व्यक्त केले आहे (म. रा. जोशी : नभामा., ऑक्टो. १९६९; पृ. २३).

**ज्ञानदेव–३** [का. अनु.] कवी. हे गोमंतकातील असावेत. ह्यांचे पोर्तुगालमधील ब्राग ग्रंथालयात रोमन लिपीत नकललेले चार ग्रंथ व दोन प्रकरणे उपलब्ध आहेत. हे ग्रंथ बहुधा हाताने नकललेले असावेत.

**रचना : अमु.** – १. कृष्णार्जुनाचा संवाद; २. द्रोणपर्व; महाभारतीय कथा; ३. रागु मल्लारू; ४. वसिष्ठयोगु (योगवासिष्ठ); अध्याय १०; ओ. सं. ११४४; ५. शुकाष्टक; ६. स्वात्मानुभव प्रा. स्थ. : ब्राग ग्रंथालय, बाड ७७३).

**ज्ञानदेव निरंजन** [का. अनु.] कवी. ह्यांनी रचलेला *अनुभवासिद्धि* हा ग्रंथ 'बाळा' रामदासी ह्यांचा आहे अशी समजूत आहे, परंतु ह्यातील १५२ व्या ओवीत कवीने आपला स्पष्ट उल्लेख केला आहे. पहा : "म्हणे ज्ञानदेव निरंजन। ज्ञानांकुशी हे अंजन। डोळियांत डोळा घालून। सुखसंपन्न तुवां केला॥" ग्रंथ गो. का. चांदोरकर ह्यांच्या खाजगी संग्रहात आहे (संककासू., पृ. १२१).

**ज्ञानदेव पंडित** [इ. स. चे १४ वे शतक] महानुभाव कवी. हे आपणास भीष्माचार्यशिष्य म्हणवितात. ह्यांचे *पंडुगीता* ह्या नावाचे एक छोटेसे ओवीबद्ध प्रकरण उपलब्ध आहे. ह्या प्रकरणाचा निर्देश भावे ह्यांच्या *महानुभावग्रंथावलिकविकाव्यसूचीत* आढळतो (पृ. ३२). प्रस्तुत प्रकरणाची ओवीसंख्या भावे ३८५ देतात. *पंडुगीता* हे प्रकरण (ओ. १६५) *महानुभाव* मासिकातून मुद्रित झाले (संपा. महंत श्रीनागराजबाबा; फेब्रु., मार्च १९७२, क्रमशः पृ. ३६–४४ व ३६–४१). ही *पंडुगीता* म्हणजे श्रीकृष्णाने पंडुसुत अर्जुनाला केलेला अध्यात्मपर उपदेश होय. वासनेच्या डोहात बुडालेल्यांना परमेश्वरप्राप्ती होत नाही व ते जन्ममरणाच्या फेऱ्यात सापडून पुनःपुन्हा जीवोत्पत्ती होते असे सांगून, हा फेरा चुकविण्यासाठी ब्रह्मविद्येचे यथार्थ ज्ञान झाले पाहिजे असे ह्या गीतेत श्रीकृष्ण सांगतात. देवतांचे निकृष्टत्व स्पष्ट करून ज्ञानयुक्त भक्तीच कशी श्रेष्ठ हे अनेक उदाहरणे देऊन ग्रंथकाराने स्पष्ट केले आहे. महानुभाव तत्त्वज्ञान अत्यंत सहजतेने व पटण्यासारख्या सोप्या भाषेत कवीने ह्या काव्यात मांडले आहे. कवीची भूमिका ही खास पंथीय तत्त्वज्ञानाच्या निरूपणाचीच दिसते.

**ज्ञानबोध** [अंदाजे इ. स. चे १८ वे शतक, पूर्वार्ध] कवी. मुडलगीच्या स्वामी-परंपरेतील. ज्ञानबोधांचे वडील गोविंदबोध हे मुडलगीच्या स्वामींपैकी रंगबोधांचे शिष्य. पिता हाच त्यांचा गुरू. गोविंदबोधांबरोबर रंगबोधांचा उल्लेख हे स्वामी म्हणून करतात. ह्यांनी आपल्या एका मराठी पदात रंगबोधांना 'गुरुराजा' असेही म्हटले आहे. ह्या पदात त्यांनी गुरूंच्या लीळा सांगितल्या आहेत. एवढे एकच पद ह्यांच्या नावावर उपलब्ध आहे. ह्यांनी *वैराग्यरत्नमाला* नावाचे एक पन्नास श्लोकांचे प्रकरणही रचले आहे. कवीला कानडी व संस्कृत भाषा चांगल्या अवगत होत्या.

*वैराग्यरत्नमाले*त कवीने वैराग्याची महती गाताना गोपीचंद व त्याची आई ह्यांच्यामधला जो संवाद दिला आहे त्यावरून मुडलगी परंपरेतील नाथपंथाच्या तत्त्वज्ञानाची धारा स्पष्ट होते. गोपीचंदाला गोरक्षनाथाने उपदेश दिला होता, अशी ही कथा आहे. वैराग्य आणि विवेक ह्या गोष्टींवर कवीने ह्या प्रकरणात भर दिला आहे. रचना इंद्रवज्रा ह्या वृत्तात केली आहे.

**रचना : मु.** – १. वैराग्यरत्नमाला; श्लो. सं. ५०; २. एक मराठी, एक संस्कृत व एक कानडी पद; मुडलगीचे स्वामी; पृ. १०५–१११.
**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आवळीकर, पंडित : ज्ञानबोध : मुडलगीचे स्वामी; पुणे, १९७१; पृ. ४४.

**० ज्ञानसागरेंद्र सरस्वती** – पहा अवधूत ज्ञानसागर.

**ज्ञानानंद** [का. अनु.] पदकार.

**रचना : अमु.** – कृष्णपर पदे; तंसम. हस्त. यादी, क्र. ३.

**० ज्ञानाबाई–१** – पहा ज्ञानदेव–१.

**ज्ञानाबाई–२** [का. अनु.] कवयित्री.

**रचना : अमु.** – केशवगुरुपर श्लोक; तंसम. हस्त. सू., क्र. ३.

**० ज्ञानेश्वर** – पहा ज्ञानदेव–१.

# परिशिष्ट – १

# पंथप्रवर्तक व इतर काही व्यक्ती

**गोविंदप्रभु / ० गुंडम राऊळ / ० गुंडोबा** [? – समा. श. १२०९, माघ व. ४ / इ. स. १२८८] महानुभावीय कृष्णपंचायतनापैकी एक विभूती. श्रीचक्रधरांचे गुरू. गोविंदप्रभूंचा अवतार हा 'आच्छादनीचा परदृश्यावतार' असे महानुभाव मानतात. महानुभाव तत्त्वज्ञानातील अवतार-कल्पनेनुसार परमेश्वर तीन प्रकारे मनुष्यावतार धारण करतो. एक 'परदृश्यावतार', दुसरा 'अवरदृश्यावतार' व तिसरा 'उभयदृश्यावतार'. परमेश्वराच्या शक्तीचे 'परशक्ति' व 'अवर शक्ति' असे दोन भेद आहेत. ह्या परावर शक्तींच्या स्वीकारानुसार हे अवतार घडतात. कित्येकदा परमेश्वर उभयशक्तींचा स्वीकार करूनही त्यांतील एक आच्छादतात व दुसरी प्रकट करतात. 'अवर' आच्छादून 'पर' प्रकट करतो तो 'आच्छादनीचा परदृश्यावतार' होय (वि. भि. कोलते : *महानुभाव तत्त्वज्ञान*, पृ. २२०). 'आच्छादनीचा परदृश्यावतार' म्हणजे काय ह्याचे दिग्दर्शन किंवा विवेचन *गोविंदप्रभुचरित्र* ह्या ग्रंथात केलेले नाही. गोविंदप्रभूंची खात्रीची माहिती उपलब्ध होण्याचे एकच ठिकाण आहे आणि ते म्हणजे वर उल्लेखिलेले म्हाइंभट्ट-संकलित *गोविंदप्रभुचरित्र* किंवा *ऋद्धिपूर-लीळा* हा ग्रंथ होय.

गोविंदप्रभू हे वऱ्हाडातील अमरावती जिल्ह्यातील रितपूर किंवा ऋद्धिपुरापासून जवळच असलेल्या काटसरे गावचे काण्वशाखीय ब्राह्मण. ह्यांच्या मातापित्यांची नावे अनंतनायक व नेमाइसा. ह्यांच्या मातापित्यांनी इहलोक लवकरच सोडला. मामा व मावशी ह्यांनी प्रभूंचा सांभाळ केला. ७ व्या वर्षी मुंज केली. नंतर रिद्धपुरास बोपद उपाध्ये ह्यांजकडे वेदाध्ययन सुरू झाले. ह्यांची स्मरणशक्ती अत्यंत तीव्र होती. शिक्षणसमाप्तीनंतर गोविंदप्रभू द्वारावतीस गेले. तेथे ह्यांनी संन्यास घेतला व पुढे चांगदेव राउळांकडून शक्तिस्वीकार केला. नंतर रिद्धपुरास येऊन जीवोद्धरणाचे कार्य सुरू केले. गोविंदप्रभूंचा जन्मशक ठाऊक नाही. वा. ना. देशपांडे ह्यांनी त्यांचा मृत्युशक १२०८ असा दिला आहे. सांप्रदायिक साहित्यामधून किंवा पंथीयांत प्रचलित असलेल्या इतर काही माहितीवरून श. १२०७ (भाद्रपद वद्य अष्टमी) व श. १२०८ (माघ ब. ४) असे दोन शक ह्यांचे समाधिशक म्हणून सांगितले जातात. ह्या दोनही ठिकाणी व्ययसंवत्सराचा उल्लेख केला आहे. महानुभाव पोथ्यांत चालू शकाकरिता गतशकाचा आकडा देण्याची पद्धत आढळते, ती विचारात घेता, गोविंदप्रभूंचे निर्वाण श. १२०९ (इ. स. १२८८) त झाले असे डॉ. कोलते मानतात.

श्रीचक्रधरांप्रमाणे पंथप्रसारासाठी गोविंदप्रभूंनी भारतभर भ्रमण केले नाही. *लीळाचरित्राचे* कर्ते म्हाइंभट्ट हे श्रीप्रभूंचे शिष्य होते. प्रभूंकडून पंथाची दीक्षा घेतल्यानंतर त्यांच्या मृत्यूपर्यंत हे त्यांच्याच सांनिध्यात राहिले. गोविंदप्रभूंचे मूळ नाव गुंडम. बालपणी ह्यांना गुंडो अशी हाक मारीत. मोठेपणी गुंडम राऊळ असे लोक त्यांना म्हणू लागले. गुंडम राऊळ ह्या नावाने एक नाथपंथी सिद्ध पुरुष होऊन गेले आहेत. त्यामुळे गोविंदप्रभू ऊर्फ गुंडम राऊळ हे देखील नाथपंथानुयायी होते की काय अशी शंका उत्पन्न होते. कारण नाथसंप्रदायाच्या प्रमुख शाखांपैकी 'रावळ' किंवा 'राऊळ' अशी एक शाखा प्रसिद्ध आहे. चांगदेवकृत *तत्त्वसारात* (र. श. १२३४ / इ. स. १३१२) 'अवधुतु गुंडम राऊळ' असा नाथसिद्धांच्या नामावळीत (ओ. क्र. ८७७) उल्लेख येतो. पण गोविंदप्रभू हे नाथपंथी म्हणून प्रसिद्ध नाहीत, तेव्हा ह्याच नावाचा दुसरा कोणी आणखी एखादा सत्पुरुष होता किंवा काय? गोविंदप्रभूंचे गुरू द्वारावतीकर चांगदेव राऊळ हे नाथपंथीय असावेत असे रा. चिं. ढेरे ह्यांना वाटते. कारण गोविंदप्रभूंचे चित्र 'बालोन्मत्त-पिशाचवत्' नाथजोग्याला साजेसे आहे. चांगदेव राउळांनी गुंडम राउळांना केलेले किंवा गुंडम राउळांनी श्रीचक्रधरांना केलेले शक्तिदान, तसेच स्थित्यानंदाचा प्रकार, हे अनेकांना नाथपंथाशी संबंधित आहेत असे वाटते. शिवाय चक्रधरांच्या व्यक्तित्वावर आणि विचारविश्वावर नाथसंप्रदायाचा असलेला प्रभावही जाणवतो. महानुभावपंथीयांतील देमाइसा, मुक्ताई, चक्रपाणी, नागार्जुन इत्यादी नावे नाथपंथीयांतही सापडतात. ह्या संबंधात अधिक संशोधन झाल्यास दोनही पंथांतील अन्योन्यसंबंध कळण्यास मदत होईल (*श्रीगुरुगोरक्ष : चरित्र आणि परंपरा*, पृ. १९०–१९९).

गोविंदप्रभूंचा वेश गबाळा, बोलणेचालणे, खाणेपिणे, वागणे इत्यादी सर्व गोष्टी वेड्यापिशासारख्या असत. लोकही त्यांना 'राऊळ वेडे', 'राऊळ पिसे' असे म्हणत. जन्मभर ते अनासक्त वृत्तीने राहिले. नैष्ठिक ब्रह्मचर्य त्यांनी आमरण पाळले. नीच-श्रेष्ठ हा भेद त्यांनी कधी मानला नाही. अंत्यजांच्या घरीही ते आरोगण (भोजन) करीत. श्रीप्रभू हे अनाथ आणि असहाय स्त्रियांचे माहेरच होते. म्हाइंभट्टांनी मोठ्या आदरभावाने श्रीप्रभूंच्या आयुष्यातील महत्त्वाच्या घटनाप्रसंगांची वर उल्लेखिल्या-प्रमाणे नोंद केली आहे. महानुभाव महंतही गोविंदप्रभू म्हणजे ईश्वराचा वेडापिसा अवतार असेच मानतात. ह्यांनी ग्रंथरचना अशी काहीच केलेली आढळत नाही. *लीळाचरित्रातल्या* लीळांचे संकलन होत असता म्हाइंभट्टांना नागदेवाचार्यांसमवेत श्रीप्रभूंचेही मार्गदर्शन असे. हा लोकोत्तर ग्रंथ गोविंदप्रभूंच्याही मार्गदर्शनाखाली तयार झाला आहे. चक्रधरांनी 'उत्तरापंथे बीजे' केल्यानंतर पंथाच्या प्रसारासाठी आणि पंथीय तत्त्वज्ञानाच्या निरूपणासाठी जे साहित्य निर्माण झाले त्यास गोविंदप्रभूंचे प्रभावी व्यक्तिमत्त्व हेच विशेषेकरून कारण झाले असावे. प्रभूंच्या चरित्रात, वादविवाद अगर तत्त्वनिरूपण ह्यांत गढलेले श्रीप्रभू आपल्या दृष्टीस पडत नाहीत. पण ह्यांच्या जीवनातील अनेकविध प्रसंग अत्यंत बोलके, सूचक व क्रांतिकारक आहेत. ह्यांच्या अंतरंगाचा शोध जेवढा अधिक आत्मीयतेने घ्यावा तितके ह्यांचे व्यक्तित्व अधिक प्रत्ययकारी वाटते. ह्यांचे वर्तन विदेही पुरुषाच्या आचरणास शोभणारे होते. त्या स्वभावधर्मानुसार त्यांचे जीवन घडत गेले आहे. त्यातूनच त्यांचे अलौकिकत्व सिद्ध होते. महानुभाव संप्रदायाच्या पंचकृष्णांमधील एक ह्या दृष्टीने ह्यांच्या जीवनकार्याला महत्त्व आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : गोविंदप्रभुचरित्र : काही विचार; मसंप., जाने. १९७०; पृ. २५–४४. २. कोलते, वि. भि. (संपा.) : श्रीगोविंदप्रभुचरित्र; मलकापूर, १९७१; प्रस्ता., पृ. १–३१. ३. जोशी, ब. स. : श्रीगोविंदप्रभु; नभामा., फेब्रु. १९६९; पृ. ४६–५६. ४. पठाण, यू. म. : श्रीगोविंदप्रभूंचे व्यक्तिमत्त्व; मराठवाडा, दीअं., १९६६; पृ. १०९. ५. पठाण, यू. म. : ऋद्धिपूर 'लीळे'तून अवतरलेले श्रीप्रभू; महानु., दीअं., १९६६; पृ. ३१–३४. ६. पोतदार, द. वा. : गुंडम राऊळ; भाइसमंत्रै. व. १९, अं. ३, जाने. १९३९; पृ. ९०–९१.

**चक्रधर / ० श्रीचांगदेव राऊळ / ० सर्वज्ञ** [अंदाजे श. ११४२ / इ. स. १२२० – श. ११९४ / इ. स. १२७२] महानुभाव पंथाचे संस्थापक आणि प्रवर्तक. गुजरात प्रांतातील भरवस (आजचे भडोच) गावच्या त्रिमल्लदेव राजाचे प्रधान विशालदेव व माल्हाइसा ह्यांचे पुत्र हरिपाळदेव हे चक्रधर-स्वामींचे पूर्वावतार होते, असे महानुभावपंथीय मानतात. हे श्रीकृष्णाचे परमभक्त होते. गोपाळ-मंत्राची दीक्षाही त्यांनी घेतली होती. हरिपाळ-देवांचा विवाह कमळाइसा नावाच्या सुंदर मुलीशी झाला. वयाच्या २५

ळ्या वर्षीच मृत्यूने हरिपाळदेवांवर अचानक घाला घातला. मृतदेह दहनाच्या तयारीने स्मशानात नेला असता, ह्या मृत हरिपाळदेवांच्या शरीरात परमेश्वराने प्रवेश केल्याने हरिपाळदेव पुन्हा जिवंत झाले. हा ईश्वराचा 'पतित' अवतार म्हणजेच श्रीचक्रधरप्रभू होत. [ 'पतित' अवतार म्हणजे एखाद्या जीवाच्या पतितात (मृत देहात) प्रवेश करून अवतार घेणे. त्या दृष्टीने चक्रधरस्वामींचा अवतार हा 'पतित' अवतार ठरतो.] पण तो सर्वस्वी नवीन अवतार नव्हता तर द्वारावतीकर चांगदेव राऊळ ह्या महात्म्याने त्यांच्या [हरिपाळदेवांच्या] शरीरात प्रवेश केला होता.

हरिपाळदेव फिरून जिवंत झाल्याने त्यांच्या कुटुंबियांना अत्यंत आनंद झाला. ईश्वरावतारी हरिपाळदेवांचा संसार परत पूर्ववत सुरू झाला. त्यांना जडलेल्या द्यूताच्या व्यसनामुळे पत्नीशी काही बिनसल्याने त्यांचे चित्त उदासीन झाले. मनःशांती मिळविण्यासाठी ते नंतर काही परिवार घेऊन रामटेकच्या यात्रेला निघाले. ह्या परिवारापैकी एकेकाला आपली खबर पोचविण्याचे निमित्त करून ह्यांनी भरवसला पाठवून दिले. देउळवाडा (ता. मोर्शी, जि. अमरावती) येथे मुक्काम असता उरलेल्या दोन निष्ठावंत सेवकांची नजर चुकवून एका वस्त्रानिशी हे तेथून निघाले. भटकत भटकत हे ऋद्धिपुरास आले. तेथे गोविंदप्रभूंशी त्यांची गाठ पडली. ह्याच वेळी हरिपाळदेवांनी श्रीप्रभूंपासून 'परावर' शक्तीचा स्वीकार केला. तळेगावकर पाठातील *लीळाचरित्रा*त येणाऱ्या एका लीळेवरून 'तव्हळि येणे परावर शक्ति स्वीकारिली : आन श्रीचक्रधर हे नाम स्वीकरिले :' अशी माहिती मिळते. म्हणजे गोविंदप्रभूंनीच हरिपाळदेवांचे नाव चक्रधर असे ठेवल्याचे दिसून येते.

प्रभूंकडून दीक्षा घेतल्यावर उन्मनस्क अवस्थेत आडवाटेने चालत हे सालबर्डीच्या डोंगरात येऊन पोचले. तिथे ह्यांनी बारा वर्षे तप केले. ह्याच ठिकाणी मुक्ताई नावाच्या तपश्चर्या करणाऱ्या वृद्धेशी ह्यांची गाठ पडली होती. विरक्तिपूर्ण मौनावस्थेत ही बारा वर्षे घालविल्यानंतर हे ठिकठिकाणी भ्रमण करू लागले. फिरता फिरता हे कांतिनगरास (सध्याचे काटोल, जि. नागपूर) आले. तेथे उधळिनाथ ह्या विद्यावंताकडून ह्यांनी वयस्तंभनी विद्येचा स्वीकार केला. जवळ जवळ अर्धनग्न स्थितीत, आध्यात्मिक विदेहावस्थेत भ्रमण करीत असता स्वामींचा द्वितीय विवाह वरंगळ येथील घोड्यांचे व्यापारी कमळ नाईक ह्यांच्या हंसांबा नावाच्या मुलीशी झाला. थोड्याच दिवसात ह्याही पत्नीचा त्याग करून भ्रमंतीखातर हे पुन्हा बाहेर पडले. ह्या परिभ्रमणाचा मुख्य हेतू 'ज्ञानाला व प्रेमाला पात्र झालेल्या अधिकारियांना उद्धरणमार्गाला लावणे' हा होता.

वरंगळहून भ्रमण करीत स्वामी महाराष्ट्रात आले. वाटेत त्यांना अळजपूरचा (एलिचपूर) रामदेव दारणा भेटला. तो त्यांना आपल्या गावी घेऊन गेला. त्यांच्या उमा नावाच्या कन्येशी स्वामींनी तिसरा विवाह केल्याची हकीकत 'वाइंदेशकर पाठा'त सापडते. स्वामींच्या ह्या विवाहासंबंधीची माहिती शंकास्पद आहे. पुढे वडनेरास जाऊन तेथून स्वामी पैठणास आले व तेथे ह्यांनी दीक्षा स्वीकारली, म्हणजेच संन्यास घेतला, अशी महानुभावीयांची समजूत आहे. *लीळाचरित्रा*च्या पिढीपाठात मात्र ह्या दीक्षाविधीचे वर्णन कोठेही येत नाही. दीक्षा घेतल्यानंतरच नागदेवाचार्यांनी अनुसरण केले. तोपर्यंतचा स्वामींच्या आयुष्यातील काल हा पूर्वार्ध आणि ह्यापुढील प्रयाणापर्यंतचा काळ हा उत्तरार्ध असे समजतात. ह्या काळात महाराष्ट्रात अखंड परिभ्रमण करून आणि जीवोद्धरणाचे कार्य करून नवीन संप्रदायाची संस्थापना व प्रसार चक्रधरांनी केला.

श्रीचक्रधरांची गुरुपरंपरा श्रीदत्तात्रेय > श्रीकृष्ण > श्रीचक्रपाणी ऊर्फ चांगदेव राऊळ > श्रीगोविंदप्रभू > श्रीचक्रधर अशी आहे. गोविंदप्रभूंखेरीज, उधळिनाथ ह्या नावाचे आणखी एक गुरू चक्रधरांनी केले होते. हे उधळिनाथ चांगदेव राउळांचे अनुग्रहित शिष्य असून 'वयस्तंभनी' विद्येवर त्यांचा अधिकार होता, अशी माहिती मिळते. त्यांच्याकडून 'वयस्तंभनी' विद्येचा स्वीकार केल्याने ह्यांची काया चिरतरुण राहिली. दत्तात्रेय हे परंपरेच्या दृष्टीने स्वामींचे आदिगुरू ठरतात. स्वामींनी उपदेशिलेल्या मार्गाचे मूळ प्रवर्तकही तेच होत. 'या मार्गासि श्रीदत्तात्रेयप्रभु आदिकारण' असे चक्रधरांनी म्हटले ते ह्याच अर्थाने. गोविंदप्रभूंविषयी चक्रधरांच्या अंतःकरणात अत्यंत आदर होता. कारण ते ह्यांचे साक्षाद्गुरू होते. गुरूंकडून स्वीकारलेली परावरशक्ती चक्रधरांनी निश्चित कोणत्या रीतीने स्वीकारली ह्याविषयी महानुभावांतच एकमत नाही. पिढीपाठाच्या मते द्वारावतीकर चांगदेव राऊळ हेच श्रीप्रभू होत. तळेगावकरांना मात्र हे मत मान्य नाही. तळेगावकरांच्या सूत्रपाठात पंचकृष्णांपैकी पाचवा अवतार म्हणून चक्रधरांचे नाव येते, तर पिढीपाठाच्या पोथ्यांतून चांगदेव राउळांचे नाव दोनदा येते. रा. चिं. ढेरे म्हणतात की, चक्रधरांची गुरुपरंपरा विचारात घेता चक्रधरांच्या व्यक्तित्वावर आणि विचारविश्वावर नाथसंप्रदायाचा फार मोठा प्रभाव आहे. चक्रधरांचे गुरू गुंडम राऊळ व आजेगुरू चांगदेव राऊळ ह्यांची नावे नाथसिद्धांच्या नामावळीत सापडतात. नाथपरंपरेची एक प्रमुख शाखा जी 'रावळ' किंवा 'राऊळ' तिच्याशी तर ह्या दोन राउळांचा संबंध नसेल ? गुरूकडून चक्रधरांना झालेले शक्तिदान व चक्रधरांच्या ठिकाणी असलेले स्थित्यानंद देण्याचे सामर्थ्य, ह्या गोष्टी नाथसंप्रदायाशी संबंधित असाव्या असे अनेक अभ्यासकांना वाटते. पंथप्रवर्तनापूर्वीचे ह्यांचे जीवन नाथपंथीय संस्कारांनी भारलेले असावे. अनेक नाथसिद्ध जोग्यांच्या कथा प्रसंगविशेषी आपल्या शिष्यांना ह्यांनी आदरपूर्वक सांगितल्या आहेत. चक्रधरांनी गायिलेली चौपदी पाहिल्यास नाथवाणीचे त्यांच्यावरील संस्कार व नाथवाणीवरचे त्यांचे प्रेम स्पष्ट होते (*श्रीगुरुगोरक्ष : चरित्र आणि परंपरा*, पृ. १९०–१९१). नाथपंथात शिरलेल्या विकृतींची जाणीव झाल्यामुळेच कदाचित नव्या पंथाची स्थापना ह्यांनी केली असावी.

गुरूच्या सांनिध्यात असता चक्रधर सर्व प्रकारे प्रभूंची सेवा करीत असत. प्रभूंचे वसतिस्थान असलेल्या रिद्धपुरास ते 'परमेश्वरपूर' म्हणून संबोधीत. आपल्या शिष्यांना ते वारंवार प्रभूंच्या दर्शनाला व सेवेला पाठवीत. अशी त्यांची गुरुभक्ती अनन्य होती.

आपल्या आयुष्याचा काळ ह्यांनी उभयगंगातीरांवरील (गोदावरीच्या दोन्ही काठांवरील) निरनिराळ्या गावी घालविला. ह्या परिभ्रमणात त्यांनी अनेक पंथानुयायी मिळविले. स्वामींचा शिष्यपरिवार फार मोठा होता. ह्यापैकी नागदेवाचार्य, आबाइसा, उमाइसा, रामदेव, नाथोबा, देमाइसा, आउसा इत्यादी अनेक व्यक्तींचा परिचय *लीळाचरित्रा*त घडतो. नागदेवाचार्यांना पट्टशिष्य करून पंथाची धुरा आपल्या पश्चात स्वामींनी त्यांच्यावर सोपविली. प्रयाण करण्यापूर्वीचे काही महिने स्वामींना फार कष्टात काढावे लागले. चक्रधर आणि त्यांचा परिवार ह्यांचे विक्षिप्त वर्तन हे सर्वसामान्य जनांच्या दृष्टीला मानवणारे नव्हते, त्यांच्या भूमिकेला पटणारे नव्हते. त्यामुळे समाजातील अनेक प्रतिष्ठितांचा कोप त्यांना सहन करावा लागला. अखेरीअखेरीस ह्यांचा शिष्यपरिवारही पांगला होता. ह्या दिवसांत त्यांच्या आरोगणेची व्यवस्था फक्त महदाइसा पाहात असे. कदाचित अशा वातावरणामुळे स्वामींना बीजे करण्याची प्रवृत्ती होऊन पैठणहून उज्जयिनीमार्गे स्वामी उत्तरापंथे हिमालयात निघून गेले. हा प्रयाणशक *लीळाचरित्रा*त निर्देशित केलेला नाही. शारंगधर भोजनेकृत *तीर्थमालिकास्तोत्रा*त 'श. ११९४, माघ वद्य चतुर्थी, अंगिरा संवत्सर' असा हा काल दिला आहे. निरनिराळ्या महानुभावीय पोथ्यांतून हा काळ श. ११९३, ११९४, ११९६ असा दिलेला आढळतो. चक्रधरांचा प्रयाणशक ११९४ हा वा. ना. देशपांडे ह्यांना मान्य आहे. *लीळाचरित्रा*तील ज्योतिषविषयक सूर्यपर्वनिर्देशाच्या आधारे (लीळा ३७१) तसेच पूर्वार्धाच्या प्रारंभापासून (श. ११८९) ते प्रयाणकालापर्यंत स्वामींनी आठ दिवाळ्या साजऱ्या केल्या असा उल्लेख अनेक

ठिकाणी आढळतो, त्यावरून डॉ. कोलते ह्यांनी हा काळ श. ११९६, माघ वद्य ३० असा ठरविला आहे.

एका नव्या संप्रदायाचे प्रवर्तक म्हणून चक्रधरांचे प्रभावी व्यक्तिमत्त्व आणि त्यांनी प्रतिपादलेले तत्त्वज्ञान ह्यांचा विचार महत्त्वाचा ठरतो. ईश्वरावतारी पुरुष म्हणून महानुभाव महंत चक्रधरांना सर्वज्ञ असे म्हणत. चक्रधरांचे रूप अत्यंत देखणे होते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची छाप तेव्हाच पाहणाऱ्यावर पडे. चक्रधरांचे दर्शन झाल्याबरोबर लोकांना 'स्थिति' [समाधि अवस्था] होत असे, ह्याची अनेक उदाहरणे *लीळाचरित्रा*त विखुरलेली दिसतील. महानुभावांच्या अवतारकल्पनेप्रमाणे पर आणि अवर अशा दोन शक्तींचा स्वीकार करणारे उभयदृश्यावतार स्वामी असल्याने सर्वांना स्थित्यानंद देण्याचे सामर्थ्य स्वामींच्या ठिकाणी होते. चक्रधरांना संस्कृत, मराठी, गुजराती ह्या भाषा उत्तम रीतीने अवगत होत्या. निरूपणपद्धतीवरून वेदोपनिषदांचे ह्यांचे अध्ययन सहज लक्षात येते. अनेक ठिकाणी भ्रमण करीत राहिल्याने नानाविध विषयांचे व व्यवहाराचे ज्ञान ह्यांना प्राप्त झाले. अध्यात्मशास्त्रातील गती, वादकुशलता, वक्तृत्व आणि रसिकता असे अनेक गुण ह्यांच्या ठिकाणी होते. ईश्वरावतारी साधुपुरुष किंवा महात्मे ह्यांच्या आयुष्यात अनेक अद्भुत घटनांचे चमत्कार सहजगत्या घडत असतात. ह्या दृष्टीने रोगपरिहार, मृतांना संजीवन देण्याची किमया, भुताखेतांची पीडा टाळणे, अशा नाना प्रकारच्या चमत्कार-लीळा *लीळाचरित्रा*त उद्धृत केलेल्या सापडतील. भक्तमंडळींना पंथीय तत्त्वज्ञानाचे निरूपण करणे व आचारविचारसंबंधात उपदेश करणे हा चक्रधरांच्या दिनचर्येचा महत्त्वाचा भाग होता. ह्यांच्या मठातील शिस्त कडक असे. आणि ती पाळली जावी असा त्यांचा कटाक्ष असे. शिष्यगणावर स्वामी फार प्रेम करीत. शिष्यमंडळीशी समरस होऊन त्यांच्याशी हास्यविनोदही करीत. ह्या शिष्यपरिवाराचीही स्वामींवर निरतिशय निष्ठा होती. चक्रधर हे अहिंसेचे पुरस्कर्ते होते, हिंसेची स्थाने ते त्याज्य मानीत. भूतमात्रावरील त्यांचे प्रेम, कडकडीत वैराग्य आणि निःस्पृहता इत्यादी गुण हे थोर विभूतीला साजेसे होते.

स्त्रीशूद्रादिकांसकट सर्वांना मोक्षप्राप्ती व्हावी ह्या हेतूने नव्या महानुभाव पंथाची स्थापना त्यांनी केली. श्रीकृष्ण आणि दत्त ही ह्यांची उपास्य दैवते. *गीता*, *भागवत* हे प्रमाणग्रंथ. वारकरी संप्रदायाप्रमाणे चक्रधरांच्या पंथानेही भक्तिमार्गाचाच पुरस्कार केला. श्रीकृष्ण हा त्यांचा परमेश्वर. तो अनादी, नित्य आणि स्वतंत्र असून देवतांहून सर्वस्वी भिन्न आहे असे महानुभाव मानतात. देवतांची भक्ती ही चक्रधरांनी कनिष्ठ दर्जाची मानली. कारण देवतांच्या भक्तीने मिळणारे फल हे अल्पकाळ टिकणारे, नाशवंत असते. म्हणून मोक्षप्राप्ती साधून देणाऱ्या परमेश्वराची उपासना ही श्रेष्ठ होय असे त्यांनी सांगितले. श्रीकृष्ण हा त्यांच्या मते विष्णूचा अवतार नसून साक्षात परब्रह्मपरमेश्वरावतार आहे.

चक्रधरांनी वेदांत सांगितलेला वर्णाश्रमधर्म मानला नाही; त्यातल्या फक्त संन्यासाश्रमाचाच तेवढा पुरस्कार केला. स्त्रीशूद्रादिकांनाही संन्यास देऊन ह्या मार्गाने जाण्याची वाट त्यांनी मोकळी करून दिली. चक्रधरांच्या विचारसरणीवर हिंसारहित, संगरहित, प्रवृत्तिधर्मकर्मरहित बौद्ध आणि जैन मतांचा प्रभाव पडलेला दिसून येतो. वर्णाश्रमधर्म न मानणारा म्हणून हा पंथ अवैदिक मानला जातो. महाराष्ट्रात तो अप्रिय होण्याचे कारणही तेच असावे.

चक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानाचे रहस्य समजून घ्यायचे झाल्यास त्यांनी जे चार पदार्थ गृहीत धरले ते लक्षात घ्यायला हवेत. हे चार पदार्थ म्हणजे 'जीव', 'देवता', 'प्रपंच' व 'परमेश्वर'. हे सर्व एकमेकांपासून वेगळे आहेत, ते स्वतंत्र, अनादी व अनंत असे आहेत व त्यांतील कोणत्याही दोहोंत ऐक्य संभवनीय नाही. ह्या दृष्टीने चक्रधरस्वामी हे पूर्ण द्वैती होते असे दिसून येईल (डॉ. वि. भि. कोलते : *चक्रधरचरित्र*, पृ. २१४). ह्यांतील देवता ह्या नित्यबद्ध म्हणून त्यांच्याकडून कायम स्वरूपाचे फळ मिळणे अशक्य. जीव हे बद्धमुक्त असून ते मायेच्या बंधनात जखडल्याने त्यांचे अधःपतन होत असते. अविद्येने बद्ध झालेले जीव मात्र मुक्त होऊ शकतात व ईश्वरानंद उपभोगू शकतात. ह्यासाठी परमेश्वराला ज्ञानाने किंवा भक्तीने प्रसन्न करून घेणे आवश्यक ठरते. ईश्वरस्वरूप मात्र अनंत म्हणजे अमर्याद आहे. परमेश्वर हा नित्यमुक्त असून सर्वातीत, केवल, ज्ञानमय व आनंदमय आहे. प्रपंच हा जड असून त्याच्याकडून ह्या आनंदाचा स्वीकार होऊ शकत नाही. मनुष्यदेहधारी जीव हे बद्धमुक्त असल्याने ह्या जीवांना ईश्वराचा आनंद प्राप्त करून देण्यासाठी, त्यांचा उद्धार करण्यासाठी, ईश्वर अनंतरूपांनी मनुष्यदेह धारण करून कर्मभूमीत अवतार घेतो. ह्यातही मार्ग दोन : ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग. चक्रधरांनी सहजसुलभ अशा भक्तिमार्गाचाच पुरस्कार केला. [**महानुभाव पंथ : ⇨ ४.**]

महानुभाव महंत चक्रधरांना ईश्वरावतार समजत. चक्रधरही स्वतःला ईश्वराचा अवतार मानीत असावेत असे काही निर्देश *लीळाचरित्रा*त सापडतात. 'आपण द्वापरीचे श्रीकृष्ण आहोत' असेही त्यांनी एकदोन वेळा सूचित केलेले आहे. ह्याच दृष्टिकोनातून स्वामी शिष्यांस उपदेश किंवा निरूपण करीत, आणि शिष्यमंडळीकडून आपली पूजाअर्चा करवून घेत. *भगवद्गीता* हा त्यांच्या तत्त्वज्ञानाचा प्रमाणभूत ग्रंथ असून त्यांच्या *सूत्रपाठात* गीतेतील अनेक वचने जशीच्या तशी आढळतात.

ग्रंथकार किंवा साहित्यिक ह्या नात्याने चक्रधरांची फारशी प्रसिद्धी नाही. चक्रधरांच्या नावावर वाङ्मयेतिहासात स्वतंत्र ग्रंथांची नोंद नाही. आपल्या अनुयायांना ग्रंथरचनेची प्रेरणा आणि स्फूर्ती देण्याचे फार मोठे कार्य ह्यांच्या प्रभावी व्यक्तित्वाने आणि तत्त्वज्ञाननिरूपणाच्या त्यांच्या पद्धतीने केलेले आहे, त्यामुळे ते ग्रंथकारांचे ग्रंथकार ठरतात. *श्रीचक्रधरसिद्धान्तसूत्रे* व चक्रधरनिरूपित *दृष्टान्तपाठ* ह्या दोन्ही ग्रंथांतील मजकुराचे कर्तृत्व हे सर्वज्ञांचेच आहे. [⇨ ३.] ह्या ग्रंथांचे संकलक ह्यांच्या शिष्यपरिवारापैकी असले तरी त्यांचे वाङ्मयीन कर्तृत्व हे चक्रधरांकडेच येते. हे दोन्ही ग्रंथ म्हणजे महानुभाव पंथाच्या तत्त्वज्ञानाचे सारसर्वस्व असून ह्यानंतर निर्माण झालेल्या पंथीय तत्त्वज्ञानाधारित साहित्याचे ते स्फूर्तिस्थान ठरतात.

धर्मप्रसाराच्या निमित्ताने चक्रधर महाराष्ट्रात भ्रमण करीत. आपल्या पंथाचे विशिष्ट तत्त्वज्ञान व आचारधर्म ह्यांचा उपदेश जनतेला करीत असतानाच त्यांनी पंथाकरिता अनुयायी मिळविले. ते मिळविल्यानंतर जिज्ञासूंना ह्यांनी प्रसंगोपात्त उपदेश केला. ह्या सर्व लीळा त्यांच्या प्रयाणानंतर नागदेवाचार्यांनी आठवून सांगितल्या व म्हाइंभट्टांनी स्वामींचे चरित्र तयार केले. हा ग्रंथ म्हणजे *लीळाचरित्र* होय. चक्रधरांनी प्रसंगपरत्वे श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेयप्रभू, द्वारावतीकर चक्रपाणी व गोविंदप्रभू ह्यांच्याही लीळा सांगितल्या होत्या. त्यावरून पंचकृष्णांची चरित्रे तयार झाली. चक्रधरांच्या प्रभावी मतप्रचारामुळे आकर्षित झालेले म्हाइंभट्ट, केशिराज, दामोदर पंडित, महेश्वर पंडित, नरेंद्र पंडित असे अनेक विद्वान संस्कृत पंडित पंथात प्रविष्ट झाले. मराठीतच ग्रंथरचना व्हावी हा स्वामींचा कटाक्ष असल्याने ह्या पंडितांनी अनेक उत्कृष्ट काव्ये आणि तत्त्वज्ञानपर ग्रंथ मराठी भाषेत रचून मराठी भाषा समृद्ध केली. ह्याचे श्रेय ज्ञानेश्वरांच्या अगोदर चक्रधरांकडे जाते.

केसोबासांनी *लीळाचरित्र* ग्रंथातून श्रीमुखीची लक्षण-विचार-आचारपर सूत्रे वेगळी निवडून काढली व *सूत्रपाठ* (प्रक. ११) तयार केला. स्वामींनी तत्त्वज्ञाननिरूपणासाठी निरनिराळे दृष्टान्त सांगितले होते. तेही केसोबासांनी वेगळे काढून सूत्रपाठाचे बारावे प्रकरण तयार केले. हाच आजचा *दृष्टान्तपाठ* ग्रंथ होय. ही सूत्रे व दृष्टान्त चक्रधरांचे असल्याने त्यांचे कर्तृत्व चक्रधरांचेच मानले पाहिजे. आजकाल महानुभाव साहित्याचे जे बरेच संशोधन झाले आहे, त्यामुळे सांकेतिक लिपीमध्ये बांधलेले त्यांचे अनेक गद्य व पद्य ग्रंथ ज्ञात होत आहेत.

त्यावरून चक्रधरांवरची आणि पंथावरची महानुभाव महंतांची निष्ठा ठिकठिकाणी प्रत्ययास येते.

चक्रधरांचा काळ हा ज्ञानेश्वरांच्या थोडा अगोदरचा. त्या वेळी महाराष्ट्रात भागवतधर्माचे प्राबल्य होते. विठ्ठलाला अधिदैवत मानणारा वारकरी पंथ हा ज्ञानेश्वरोत्तरकालातच भरभराटीला आला. चक्रधरांनी स्थापिलेल्या नव्या संप्रदायाची पाळेमुळे मात्र महाराष्ट्राच्या संस्कृतीत तितकीशी खोल रुजू शकली नाहीत व त्यांचा पंथ अप्रिय झाला. अर्थात ह्याचा संबंध चक्रधरांच्या लोकोत्तर व्यक्तिमत्त्वाशी नाही, तर त्यांनी प्रतिपादलेल्या तत्त्वज्ञानाशी आहे. तत्कालीन समाजात रूढ असलेल्या विचारधारेला स्पष्टपणे नकार देऊन एक वेगळ्या सामाजिक परिवर्तनाची क्रांतिकारी शिकवण त्यांनी आपल्या अनुयायांस दिली, तीच पंथाच्या अप्रियतेचे कारण ठरली. अशाही स्थितीत हिंदुधर्माचे एक अंग म्हणून आजही हा संप्रदाय अस्तित्वात आहे.

चक्रधरांच्या महानुभाव पंथाने मोक्षसाधनेसाठी संन्यासमार्ग पुरस्कारिला. सर्वसामान्य माणसाला हा मार्ग अर्थातच सुलभ नव्हता. वेदांनी प्रमाण मानलेला चतुर्वर्णाश्रमधर्म चक्रधरांनी मानला नाही व स्त्रीशूद्रादिकांनाही संन्यास सवंग केला. मूर्तिपूजा त्यांना मान्य नव्हती. कारण देवतांची भक्ती त्यांनी कनिष्ठ दर्जाची मानली. विठ्ठल ही देवता असल्याने विठ्ठलभक्तीचा त्यांनी कडकडीत निषेध केला आणि इथेच भागवतधर्मीयांशी त्यांचे वाकडे आले. वेदांत सांगितलेल्या आश्रमधर्मांपैकी संन्यासाश्रमाचा, जो फक्त ब्राह्मणांसच विहित असून ज्याचा उपयोग मर्यादितपणेच केला जात असे त्याचा, आपल्या पंथासाठी पुरस्कार करून हा अधिकार महानुभावांनी सर्व वर्णांना दिला. संन्यासातिरेक, चक्रधरांचा परकायाप्रवेश, त्यांची पंचकृष्णांची कल्पना आणि ईश्वरविषयक कल्पना, मूर्तिपूजेचा त्यांनी केलेला निषेध, त्यांच्या आचारविचारात अनेक ठिकाणी दिसून येणारी विसंगती, चक्रधरपरिवाराचे विक्षिप्त वर्तन, ह्या साऱ्याच गोष्टी बहुजनसमाजाला मानवणाऱ्या नसल्याने लोक त्यांना 'मानभाव' असे कुचेष्टेने म्हणत व त्यांच्यापासून दूर राहात. महानुभाव पंथ हे नाव ह्याच प्रकारे रूढ झाले असावे. चक्रधरांचा पंथ लोकप्रिय न झाल्याने त्यांना फारसे अनुयायी मिळाले नाहीत. समाजाच्या टीकेचे प्रखर हल्ले त्यांना सोसावे लागले. ह्या विरोधातून पंथ टिकविण्यासाठी त्यांच्या अनुयायांनी अट्टाहास केला व आपले साहित्य सांकेतिक लिपीत बद्ध करून ठेवले; त्यामुळे ह्या पंथाचे खरे स्वरूप आजवर अज्ञातच राहिले. आज मात्र चक्रधरांच्या क्रांतिकारक तत्त्वसरणीचा विचार केल्यास एक युगपुरुष व महात्मा म्हणून त्यांचा मोठेपणा पटतो. ज्ञानेश्वरांनी सांगितलेला भक्तिमार्ग आणि चक्रधरांचा भक्तिमार्ग ह्यांत फरक एकच की, ज्ञानेश्वरांनी वेदांनी प्रमाण मानलेल्या व सर्वसामान्य जनतेला रुचणाऱ्या अशा मार्गाने गीतेमधील तत्त्वज्ञान आणि भक्ती लोकांना समजावून दिली. *भगवद्गीताच* प्रमाण मानणाऱ्या चक्रधरांनी स्वतंत्र विचारसरणीने समाजाच्या कल्याणासाठी प्रतिपादलेले तत्त्वज्ञान तत्कालीन बहुजनमतास रुचणारे आणि मानवणारे ठरले नाही, त्यामुळे चक्रधरांचा पंथ मागे पडला, उपेक्षित राहिला. पंथप्रवर्तक म्हणून ते अप्रिय ठरले असले तरी गद्य मराठी साहित्याचे जनक आणि प्रेरक म्हणून मराठी वाङ्मयाच्या इतिहासात त्यांचे स्थान अद्वितीय ठरते. श्रेष्ठ दर्जाच्या अनेक महानुभाव गद्यग्रंथांचे आणि काव्यांचे स्फूर्तिदायित्व, हे त्यांच्या प्रभावी व्यक्तित्वात व तत्त्वज्ञाननिरूपणात शोधावे लागते.

**रचना : मु.** – १. दृष्टान्तपाठ – संकलन (केसोबास); संपा. भवाळकर, नी. ब. व नेने, ह. ना.; नागपूर, १९३७. २. श्रीचक्रधरोक्त सूत्रपाठ (मूल); संपा. नेने, ह. ना.; नागपूर, १९३५, १९३६ (आ. २), १९३९ (सटीप). ३. श्रीचक्रधरनिरूपित श्रीकृष्णचरित्र (अपूर्ण); संशोधक व संग्राहक : महंत गोपीराज महानुभाव; मुंबई, १९५९, १९७३ (न. आ.).

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आराध्य, मुरलीधरशास्त्री : श्रीचक्रधर स्वामींचे क्रांतिकारक सिद्धान्त; महानु., सप्टें. १९७०; पृ. ५. २. कोलते, वि. भि. : चक्रधराचा प्रयाणशक; नभामा., मार्च १९६६; पृ. १०–१३. ३. कोलते, वि. भि. : श्रीचक्रधर-चरित्र; मलकापूर, १९५२. ४. कोलते, वि. भि. : श्रीचक्रधर व ज्ञानदेव (पुस्तिका); मुंबई, १९५०. ५. जोशी, वसंत स. : सर्वज्ञ 'चक्रधर'; नभामा., मे १९५१; पृ. ३–१९. ६. डोळके, सु. म. : चक्रधरांचे चारित्र्य; सत्यकथा, जून १९५४; पृ. ३९. ७. देशपांडे, य. खु. : श्रीचक्रधर स्वामींचें अवतारकार्य; महानु., नोव्हें. १९६७; पृ. ९–१०. ८. देशपांडे, वा. ना. : चक्रधराचा प्रयाणशक; नभामा., मार्च १९६६; पृ. १०–१३. ९. नागपुरे, पुरुषोत्तम : सर्वज्ञ श्री चक्रधरस्वामी व प्राचीन महाराष्ट्र; महानु., सप्टें. १९६६; पृ. १८–२०. १०. नेने, ह. ना. (संपा.) : लीळाचरित्र, भा. १ ते ४; एकांक आणि पूर्वार्ध, नागपूर, १९३६, १९३७; उत्तरार्ध, नागपूर, १९५०. ११. पेंडसे, शं. दा. : श्रीचक्रधर आणि महानुभावपंथ; मराठी संत : काव्य आणि कर्मयोग; पुणे, १९६१; पृ. ६३–८३. १२. फाटक, न. र. : चक्रधरांच्या कार्याचे स्वरूप; सह्याद्रि, जुलै १९४८; पृ. ३४६–३५०. १३. फाटक, न. र. : चक्रधरचरित्र व महानुभाव; चित्रज., जुलै १९४८; पृ. ४६३–४७०. १४. भुसारी, र. म. : श्रीचक्रधरप्रभूंचे टीकाकार; साहित्य आणि संशोधन; हैद्राबाद, १९५१; पृ. ३८–५८. १५. (महंत) श्रीमुकुंदराज : श्रीचक्रधर-चरित्र; हिंदी. १६. सावळापुरकर, पां. कृ. : श्रीचक्रधर आणि गुजराथ; विसंमंवा., १९५८, पृ. ११८–१२५.

**चांगदेव राऊळ / ० चक्रपाणी–१** [अंदाजे इ. स. चे १२ वे शतक] महानुभावीय कृष्णपंचायतनापैकी एक विभूती. साक्षात श्रीदत्तात्रेय प्रभूंचे अनुग्रहित व गोविंदप्रभूंचे गुरू. ह्यांच्या लीळांवर आधारित *चक्रपाणीचरित्र* श. १२०३–४ (इ. स. १२८१–८२) च्या सुमारास लिहिले गेले आहे. त्यावरून चक्रपाणी ऊर्फ चांगदेव राऊळांची येणेप्रमाणे माहिती प्राप्त होते. ह्यांचे मूलग्राम फलटण. वडील जनक नायक. आई जनकाइसा. ह्यांच्या मातेला बरेच दिवस अपत्यलाभ झाला नाही. चाकणच्या चक्रपाणी देवतेला नवस बोलल्यानंतर पुत्रप्राप्ती झाली. त्यामुळे ह्यांची चक्रपाणी व चांगदेव अशी दोनही नावे ठेवली गेली. सातव्या वर्षी ह्यांचा मौंजीबंधनविधी केला. नंतर ह्यांनी वेद, शास्त्रे, पुराणे, काव्य, नाटक, संगीत, अलंकार इत्यादी विषयांचे अध्ययन करून बुद्धीची व्युत्पन्नता सिद्ध केली. मातापित्यांनी ह्यांच विवाह करून दिल्यानंतर वयाच्या २५ वर्षेपर्यंत ह्यांनी संसार केला. पुढे संसारत्याग करून साधना करण्याकरिता हे क्षेत्र माहुरास गेले. तेथे व्याघ्रवेशाने श्रीदत्तात्रेयप्रभूंनी ह्यांना दर्शन दिले. पुढे एक महान योगी म्हणून ह्यांची ख्याती झाली. ह्यांचे वास्तव्य द्वारावतीस असे. हे द्वारावतीस राहून निर्विकल्प क्रीडा करीत म्हणून 'द्वारावतीकर चांगदेव राऊळ' असेही ह्यांस संबोधले जाते. ह्यांच्याकडून पुढे गोविंदप्रभू व वाठोड्याचे शुक्लभट्ट आदींना अनुग्रह मिळाला. पुणे, चाकण, वाठोडे, शुक्लेश्वर, मेहकर, प्रतिष्ठान, द्वारावती, वाराणसी, ऋद्धिपूर, औदुंबर इत्यादी ठिकाणी ह्यांचा संचार झाला. ह्या ठिकाणांचा निर्देश ह्यांच्या चरित्रात आलेला आहे.

द्वारावतीस असताना गोमतीच्या तीरावरील एका गुंफेत हे राहात. उजव्या हातात खराटा व डाव्या हातात सूप घेऊन द्वारकेतील रस्ते हे झाडीत असता कोणी अधिकारी पुरुष जर दर्शनास आले तर त्यांना खराटा व सूप मारूनच हे शक्तिदान करीत, अशी एक आख्यायिका सांगितली जाते. अशा प्रकारे चक्रपाणी राऊळांनी अनंतमुनी, सारंगदेवमुनी, कमळदेवमुनी, नृसिंहमुनी इत्यादी ५२ पुरुषांना विद्यादान केले.

अनेकांचा उद्धार केला. ह्यांपैकी गोविंदप्रभू हे त्यांचे प्रमुख शिष्य होत. हे चातुर्वर्ण्य मानीत नसत. काउरळी गावची कामाख्या नावाची हठयोगिनी ह्यांना 'रतीचिये चाडा' विनवू लागली त्यामुळे कंटाळून जाऊन ह्यांनी देहत्याग केला.

चक्रपाणी राउळांनी ग्रंथरचना केल्याचे ऐकिवात नाही. ह्यांच्या चरित्रावरून ह्यांच्या अद्भुत दैवी सामर्थ्याची, तत्कालीन लोकस्थितीची, चालीरीतींची, ग्रामस्थळांची व महंत-महानुभावांची कल्पना येते. असे सांगतात की आपले धर्मसंस्थापनेचे अपुरे कार्य पुढे हरिपाळदेव ऊर्फ चक्रधर ह्यांच्या कुडीत प्रवेश करून ह्यांनी पूर्ण केले. श्रीचक्रधरांचे लोकोत्तर व्यक्तिमत्त्व आपल्या परिचयाचे आहेच.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. देशपांडे, य. खु. (संपा.) : श्रीचक्रपाणी-चरित्र; यवतमाळ, १९३६. २. मोहरीर, भ. प्र. : श्रीचक्रपाणी-चरित्र; महानु., नोव्हें. १९६८; पृ. २०–२५.

**चांगा मुधेश / ० चांगा केशवदास** [ ?– समा. श. १४२७, ज्येष्ठ शु. ७ / इ. स. १५०५ ] एक संत व सिद्धपुरुष. वडिलांचे नाव मुधोपंत. मातेचे नाव रुक्मिणी. उपनाव मरुद्गण. मुधोपंत हे यजुर्वेदी ब्राह्मण होते. ते नारायण डोह येथे राहात असत. त्या गावचे कुळकर्णीपण त्यांच्याकडे होते. ह्या ब्राह्मण जोडप्यास वृद्धापकाळात तापीपयोष्णी संगमावरील सिद्ध चांगदेवांच्या कृपेने पुत्र झाला, म्हणून मुलाचे नाव त्यांनी 'चांगदेव' ठेवले अशी समजूत आहे.

मुधेश चांगदेवांची पहिली चोवीस वर्षे वेदशास्त्राभ्यास करण्यात व गृहस्थाश्रमधर्म पाळण्यात उत्तम प्रकारे गेली. आईवडिलांच्या पश्चात आपले कुळकर्णीपण ह्यांनी चुलत्यास दिले व आपण पंढरपुरास जाऊन श्रीविठ्ठलाचे दर्शन, अनुग्रह आणि संजीवनी विद्या प्राप्त करून घेऊन लोकोद्धाराच्या हेतूने गोदातीरी पुणतांबे गावी येऊन राहिले. तेथे नैमित्तिक पूजेसाठी केशवाची चतुर्भुज मूर्ती त्यांना प्राप्त झाली. तेव्हा-पासून चांगा केशवदास अशा नावाने हे स्वतःस संबोधून घेऊ लागले.

महाराष्ट्र महोदयाचे धार्मिक स्थान जे पंढरपूर तेथील पांडुरंगाच्या दवस्थानास यवन राजाकडून उपसर्ग न पोहोचेल अशी चांगदेवांनी व्यवस्था केली; आणि नंतर त्यांनी विठ्ठलापाशी समाधिस्थ होण्या विषयी आज्ञा मागितली. नंतर पुणतांब्यास येऊन श. १४२७ (इ. स १५०५), क्रोधन नाम संवत्सरी, ज्येष्ठ शुद्ध सप्तमी, रविवार, पुष्यनक्षत्र व सिद्धियोग असता मोठ्या समारंभाने समाधी घेतली.

शामजी गोसावी (पुणतांबेकर) ह्यांनी चांगा मुधेशांचे चरित्र लिहिले आहे; त्यात चांगा मुधेशांना चांगा वटेश्वरांचाच अवतार मानले आहे : "चवदाशे वर्षांचे चरित्र हे केले। शरीर गुप्त झाले वटेश्वरी ॥ अयोनिसंभव पुन्हा जन्म। ऐसे अनुसंधान पुढे असे ॥" (*चांग-देवचरित्र*, ४. ४४–४५). शामजी मरुद्गण ऊर्फ शामजी गोसावी हे चांगा केशवदासाचेच वंशज. त्यांनी दिलेली पितृपरंपरा अशी आहे : चांगदेव > विठ्ठल > चांगदेव > पिलोबा > नरहरी > जनार्दन > मुधोजी > गोपाळ > कोन्हेर > शामजी गोसावी मरुद्गण (श. १६६७ / इ. स. १७४५ मध्ये विद्यमान).

महिपतीनें आपल्या *भक्तलीलामृतात* ९ व्या व १० व्या अध्यायांत वर्णिलेले *चांगदेवचरित्र* ह्या शामजी गोसावीकृत चरित्राचा आधार घेऊन लिहिले आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. गद्रे, ना. कृ. : मुधेश चांगदेव चरित्र : शामजी गोसावीकृत चरित्राच्या अनुषंगाने निरूपण : महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग; मुंबई, १९७१; पृ. १६८–१७८. २. शामजी मरुद्गण : चांगदेवचरित्र; श्लो. सं. ६४४; महा. कवि; श. १८२६ चैत्र ते श. १८२६ ज्येष्ठ व श. १८२६ मार्गशीर्ष; पृ. १–२६.

**चांदबोधले / ० चंद्रभट / ० चंद्रशेखर / ० सैयद चांदसाहेब कादरी** [अंदाजे इ. स. चे १६ वे शतक]. संतकवी. दौलताबादच्या परिसरातील फार मोठे सिद्धपुरुष म्हणून ह्यांचे नाव घेतले जाते. नाशिक-त्र्यंबकेश्वरजवळील चांदगिरी ऊर्फ चंद्रगिरी हे ह्यांचे राहण्याचे मूळ ठिकाण. सूफी पंथातील कादिरी ह्या उपपंथाचे पहिले प्रचारक महंमद गौस ह्यांचे शिष्य राजे महंमद कादिरी (शेख महंमदांचा पिता) हेच चांदबोधल्यांचे गुरू. शेख महंमदांच्या परंपरेतील 'शिजरा-इ-कादिरी'मध्ये ह्यांचे सांप्रदायिक नाव सैय्यद चांदसाहेब कादरी असे दिलेले आहे. शेख महंमदांनी चांदबोधल्यांकडूनच उपदेश घेतला होता.

चांदबोधले हे एकनाथ पैठणकरांचे गुरू जनार्दनस्वामी ह्यांचेही गुरू होते. ह्या समजुतीस शेख महंमद रचित *योगसंग्रामा*तील एका ओवीवरून दुजोरा मिळतो, असे मत वा. सी. बेंद्रे ह्यांनी मांडले आहे (शेखमहंमदबाबा श्रीगोंदेकर : *तुकाराम महाराज यांचे संत-सांगाती*; पृ. ५६–५७). ती ओवी येणेप्रमाणे : ॐ नमोजी श्रीसद्गुरु चांदबोधले। त्यांनीं जानोपंता अंगिकारिलें। जानोबानें एका उपदेशिलें। दास्यत्वगुणें ॥ १५.१ ॥

एकनाथांना दर्शन देणारा दत्तात्रेय म्हणजे दत्तावतार मानला गेलेला चांदबोधला होय असे प्रतिपादन रा. चिं. ढेरे करतात. ह्याला कृष्णदास जगदानंदनंदनांच्या *एकनाथचरित्रा*तील आधार ते देतात. ह्या ग्रंथाच्या पहिल्याच अध्यायात एकनाथगुरू जनार्दनस्वामींचा परिचय करून देताना कृष्णदासांनी चंद्रशेखर ऊर्फ चांदबोधले ह्यांना दत्तावतार म्हटले आहे व ह्यांचे पूर्णशिष्य जनार्दन होत असे सांगितले आहे (*प्रतिष्ठानचरित्र*, १.२८). – विशेष माहिती पहा : **एकनाथ–१ (पैठणकर).**

केशव व महिपती ह्या नाथचरित्रकारांनी चंद्रभट असा ह्यांचा निर्देश केला आहे. ह्या चंद्रगिरीच्या चंद्रभटांकडून जनार्दनस्वामींनी एकनाथांना *चतुःश्लोकी भागवता*वरील निरूपण ऐकविले (*चतुःश्लोकी भागवता*तही ह्या ठिकाणाचा व प्रसंगाचा निर्देश एकनाथांनी केला आहे). पुढे हे चंद्रभट आपले मूळ ठिकाण सोडून दौलताबादेस आले व तेथेच त्यांनी समाधी घेतली. जनार्दनस्वामींनी दौलताबाद येथील किल्ल्याच्या पायथ्याशी ह्यांची दर्गेवजा समाधी बांधली अशीही माहिती हे दोन चरित्रकार देतात. चांदबोधल्यांचा शिष्यपरिवार फार मोठा होता.

एकनाथशिष्य मुकुंदराज ह्यांचा एक परंपराविषयक अभंग वा. सी. बेंद्रे ह्यांनी प्रसिद्ध केला आहे. त्यात हे मुकुंदराज म्हणतात : "चंद्र बोधला मूळ जनार्दन खोड। शाखा पालव गोड एकनाथ ॥" ह्यावरून महंमद गौस > राजे महंमद > चांदबोधले > जनार्दनस्वामी > एकनाथ अशी एक परंपरा निश्चित होते.

ह्यांनी रचलेले कांही अभंग म. म. द. वा. पोतदार ह्यांच्या संग्रही असलेल्या बाडांत उपलब्ध आहेत. पण ह्यांच्या ग्रंथरचनेपेक्षा ह्यांनी केलेले आध्यात्मिक कार्य अधिक महत्त्वाचे आहे. मलंगवेशातील दत्तावताराच्या रूपाने महाराष्ट्रातील आध्यात्मिक जीवनात ह्यांनी हिंदु-मुसलमानांना समान सांस्कृतिक पातळीवर आणण्याचे फार मोठे कार्य केले, असे मानले जाते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. ढेरे, रा. चिं. : एकनाथांची गुरुपरंपरा; इंद्रायणी, जून १९६३; पृ. ५–१३. २. बेंद्रे, वा. सी. : शेख महंमद बाबा श्रीगोंदेकर : तुकाराम महाराज यांचे संतसांगाती; मुंबई, १९५८; पृ. ५०–८२.

**चिदंबर दीक्षित** [श. १६८०, कार्तिक वद्य षष्ठी, सोमवार / इ. स. १७५८ – समा. श. १७३७, पौष शु. ४ / इ. स. १८१६] कर्नाटकातील संत आणि सिद्ध पुरुष. वडिलांचे नाव मार्तंड मल्हार. आईचे नाव लक्ष्मीबाई. ह्यांचे घराणे मूळ विजापूर प्रांतातील गोठे ह्या गावचे. पूर्वीचे उपनाव जोशी. ह्यांच्या तीर्थरूपांनी एक सोमयाग केला, तेव्हापासून ह्यांना दीक्षित हे उपनाम प्राप्त झाले. योगशास्त्र-

संपन्न अशा मार्तंडांनी बारा वर्षे पुत्रप्राप्तीसाठी अनुष्ठान केले. त्यानंतर भगवान शंकराच्या आशीर्वादाने ह्या दांपत्याच्या पोटी चिदंबर जन्माला आले.

चिदंबरांची रचना प्रत्यक्षात उपलब्ध नसली तरी आपल्या शिष्योत्तमांकडून ह्यांनी पुष्कळ काव्य करविले. ह्यांचे शिष्योत्तम 'चिदंबरदास राजारामबुवा' ह्यांनी चिदंबरांचे विस्तृत चरित्र लिहिले आहे. चिदंबरमहाराजांनी आपणास काव्यस्फूर्ती देऊन आपल्याकडून काव्यलेखन कसे करविले ते राजारामांनी लिहून ठेवले आहे : "दृष्टांती स्वमुखें अभंग सांगून । वरप्रसाद देउनियां जाण । अभंग करविले लेखन । झाला प्रसन्न दिगंबर ॥" राजारामांच्या सर्व काव्याचा विषय एकच व तो म्हणजे चिदंबरस्वामी. ह्या चरित्राप्रमाणेच त्र्यंबक सखाराम गर्दे ह्यांचे *श्रीमच्चरित्र* व चिदंबरस्वामींचे पणतू सांब दीक्षित ह्यांचे *श्रीचिदंबरचरित्र* असे ह्यांच्यावरील आणखी दोन चरित्रग्रंथ आढळतात.

चिदंबर दीक्षितांनी बालपणीच अनेक चमत्कार दाखवून आपले अवतारित्व सिद्ध केले. परंतु आईबापांच्या इच्छेनुसार त्यांच्या देहावसानानंतर चिदंबरांनी आपले देवपण लोकांत प्रकट केले. ब्रह्मचर्याश्रम पूर्ण होताच हे गृहस्थाश्रमी झाले. सरस्वती व सावित्री ह्या दोन बायका आणि सहा मुलगे व एक मुलगी अशी सात अपत्ये ह्यांना होती. मुरगोड येथे मोठी पाठशाळा स्थापन करून अनेक प्रकारच्या लीला व ज्ञानदान करीत, देशोद्धार व धर्मसेवा कार्यात ह्यांनी काही वर्षे घालविली. नंतर तेथून बारा मैलांवर असलेल्या मलप्रभेच्या काठी हे जाऊन राहिले. त्या ठिकाणासच 'गर्लहोसूर' (कानडी 'गळ हास उस' – गुरुरायाचे नवे गाव) म्हणतात. रास्ते, गोखले इ. पेशव्यांचे सरदार चिदंबरांच्या सेवेस येऊन राहात. निपाणीकर, नरगुंदकर वगैरे संस्थानिकही ह्यांच्याशी शिष्यभावाने वागत. ह्यांची समाधी गुर्लहोसूर येथेच आहे. ह्यांच्या नावावरील *निजात्मबोध* ग्रंथाचा निर्देश गो. का. चांदोरकरांनी केला आहे (संककासू., पृ. ३४). ह्यांची काही पदरचना असल्याचेही ते सांगतात.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** आजगांवकर, ज. र. : मकच., खं. ५; पृ. १४५–१५०. २. आवळीकर, पंडित : श्रीमच्चरित्र : ऐतिहासिक अंग; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. २००–२१७.

**नागदेवाचार्य** / ० **भटोबास** [श. ११५८ / इ. स. १२३६ – श. १२२४, भाद्र. शु. १२ / इ. स. १३०२] महानुभाव पंथाचे आद्याचार्य व संवर्धक. ह्यांचा जन्म पुरी (हल्लीचे पांढरी, जि. बीड) येथे ब्राह्मण कुळात झाला. पणजे वामनाचार्य. त्यांची पत्नी महदाइसा व पुत्र महेश्वरपंडित. ह्या महेश्वरपंडितांच्या माधवभट आणि वायनायक ह्या दोन पुत्रांपैकी माधवभटांचे नागदेवाचार्य हे पुत्र. माता आबाइसा व पिता महादेवभट ही भक्तिमार्गी व सत्प्रवृत्त होती. नागदेवांच्या पत्नीचे नाव गंगाइसा. तिच्यापासून ह्यांना दोन पुत्र झाले. ह्यांच्या पित्याने फारच लवकर इहलोक सोडल्याने ह्यांचे कुटुंब देशोधडीस लागले. पंथप्रवेश करण्याअगोदर हे अनेक व्यसनांच्या आहारी गेलेले होते. अशा स्थितीत मातेच्या उपदेशाने त्यांना उपरती झाली.

नागदेव सिद्धनाथी दादोसांना प्रथम भेटले तेव्हा त्यांच्याकडून ह्यांना लाभलेला स्थित्यानंद व पुढे दादोसांनी श्रीचक्रधरस्वामींकडे नागदेवांची केलेली 'निरोवण' असे दोन टप्पे ह्यांच्या पारमार्थिक जीवनात प्रामुख्याने दिसतात. दादोसांप्रमाणे चक्रधरस्वामींविषयीही ह्यांच्या मनात श्रद्धा उत्पन्न झाली. स्वामी हे ईश्वरपुरुष आहेत असा अनुभव येऊन चक्रधरांच्या भेटीचा ह्यांनी ध्यास घेतला व ते स्वामींकडे एकसारखे जाऊ लागले. अनेक वेळा स्वामींची भेट झाल्यानंतर सहाव्या भेटीत नागदेवाचार्य अनुग्रहास पात्र आहेत असे समजून त्यांना स्वामींनी जोगेश्वरी येथील संगमेश्वराच्या देवालयात बोध केला. ह्यानंतर काही दिवसांनी खेडकुळी येथे नागदेव स्वामींना अनुसरले व स्वामींनी त्यांना पंथाची दीक्षा दिली. ह्यानंतर सहा महिनेपर्यंत श्रीगोविंदप्रभूंच्या सेवेसाठी रितपुरला (रुद्धिपूर) आपल्यापासून दूर पाठवून स्वामींनी नागदेवांची परीक्षा पाहिली व त्यांचे आर्त वाढविले. रितपूरहून परतल्यानंतर नागदेवाचार्यांनी निरंतर स्वामींच्या सेवेस स्वतःला वाहून घेतले.

नागदेवाचार्यांसमवेत स्वामींनी पंथाचा प्रचार, उपदेश, प्रवचने ह्यांत साडेतीन वर्षांचा काळ घालविला. ह्याच काळात चक्रधरांनी आपल्या पश्चात पंथाची धुरा वाहावी म्हणून हा एकनिष्ठ शिष्य तयार केला. पुढे आपला सर्व शिष्यसंप्रदाय नागदेवांना सांभाळण्यास सांगून आणि त्यांना आचार्य ही पदवी देऊन श्रीचक्रधरस्वामी उत्तरेकडे निघून गेले. स्वामींच्या वियोगाने वेडेपिसे होऊन त्यांचा शोध घेत नागदेवाचार्य भ्रमण करू लागले. भानखेड्याच्या जंगलातून महदाइसेने गोविंदप्रभूंच्या आज्ञेने त्यांना ऋद्धिपुरास आणले. ह्यानंतर ऋद्धिपूर येथे नागदेवाचार्य, म्हाइंभट्ट, महदाइसा इत्यादी मंडळी, इतर भक्तपरिवारासह गोविंदप्रभूंच्या सांनिध्यात राहू लागली. स्वामींच्या प्रयाणानंतर चौदा वर्षे ह्यांनी गोविंदप्रभूंची सेवा केली व भक्तांचा सांभाळ केला. ह्याच काळात आचार्यांच्या मार्गदर्शनाखाली म्हाइंभट्टांनी *लीळाचरित्रा*चे लेखन केले. ग्रंथाचा उत्तरार्ध तर जवळ जवळ आचार्यांनीच म्हाइंभट्टांस निवेदिला आहे. स्वामींच्या सर्व लीळा शिष्यवर्गाकडून गोळा करून आणल्यावर नागदेवाचार्यांनी स्वतः त्यांचे संशोधन केले व श्रीमुखीचे शब्द कोणते आहेत, कोणते नाहीत ह्याची शहानिशा करून त्यांना व्यवस्थितपणा आणला. *लीळाचरित्रा*प्रमाणे स्वामींच्या तत्त्वज्ञानाची मांडणी पद्धतशीरपणे करून घेण्याचे काम नागदेवांनी केसोबासांकरवी घडविले. महानुभावांच्या तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांची आज जी अत्यंत व्यवस्थित रचना आढळून येते तिच्या पाठीमागची प्रेरक शक्ती नागदेवाचार्यच आहेत. गोविंदप्रभूंच्या निधनानंतर त्यांचा शिष्यपरिवार धर्मतत्त्वांचा प्रचार करीत फिरत राहिल्याने पंथाचा प्रसार वाढला.

नागदेवाचार्यांच्या ठिकाणी व्यवहारचातुर्य व माणसे जोडण्याची अपूर्व कला होती. त्यावरूनच 'वेधवंती नागदेव' असे अभिधान त्यांना प्राप्त झाले. लोकसंग्रह करण्याच्या त्यांच्या ह्या वृत्तीनेच म्हाइंभट्ट, गोपाळपंडित, केसोबास, भास्करभट्ट अशा संस्कृतज्ञ विद्वानांना त्यांनी आपल्याभोवती गोळा केले. पंथाच्या प्रसारासही हीच वृत्ती पोषक ठरली. चक्रधरस्वामींवरची त्यांची आत्यंतिक निष्ठा व शिष्यांवरील प्रेमही असेच अपूर्व होते. चक्रधरांच्या प्रयाणानंतरचे आपले सारे आयुष्य धर्मप्रसार, धर्मरक्षण व धर्मवृद्धी करण्यातच आचार्यांनी वेचले.

आपले शेवटचे दिवस आचार्यांनी गोदातीरी मुद्गल निंब्यास घालविले. आपल्यामागे सर्वज्ञांचे धर्मकार्य चालू राहावे म्हणून बाइदेवबासांना ह्यांनी आचार्यपद दिले. नागदेवाचार्यांचा सांप्रदायिक निर्वाणशक १२२४ (इ. स. १३०२) असा मानला जातो. ह्या संदर्भात डॉ. वि. भि. कोलते ह्यांनी वेगळे मत व्यक्त केले आहे. रामदेवाची राणी कामाइसा हिच्या अग्निप्रवेशाची *स्मृतिस्थळा*त आलेली आख्यायिका अनेक महानुभावीय पोथ्यांत पाहावयास मिळते. वा. ना. देशपांडे ह्यांच्या मताप्रमाणे ती प्रक्षिप्त न मानता खरी मानल्यास रामदेवरावाच्या मृत्यूनंतर नागदेवाचार्य हयात होते असा पुरावा सापडतो. अलिकडच्या संशोधनावरून रामदेव यादवाची कारकीर्द श. १२३२ पर्यंत होती असे निश्चित ठरते. त्यावरून नागदेवाचार्यांच्या मृत्यूचा शक साधारणपणे १२३३–३४ (इ. स. १३११–१३१२) मानण्यास हरकत नसावी असे मत डॉ. कोलते व्यक्त करतात (*वछाहरण* : प्रस्ता., पृ. ३५).

श्रीचक्रधरांनी आदेश दिल्याप्रमाणे मराठी भाषेतच ग्रंथरचना व्हावी असा ह्यांचा कटाक्ष असे. पंथाचे अनुयायित्व पत्करलेल्या अनेक संस्कृत पंडितांना ह्यांनी मराठीतच ग्रंथरचना करण्यास भाग पाडले. अशा प्रकारे महानुभाव संप्रदायाला व साहित्याला प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचे व प्राचीन मराठी गद्य वाङ्मयाचे दालन समृद्ध करण्याचे श्रेय महानुभाव पंथाचे कुशल संघटक भटोबास ह्यांच्याकडे जाते. श्रीचक्रधरस्वामींची समता, अहिंसा, एकविधा भक्ती, अस्पृश्यतानिवारण ही कार्ये व मोक्षाचा मार्ग दाखविणारा संदेश खालच्या थरापासून ते राजघराण्यापर्यंत पोचविण्याचे अलौकिक कार्य आचार्यांनी केले. पंथीयांमध्ये नागदेवाचार्य भटोबास म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांनी केलेल्या पंथप्रसाराच्या अलौकिक अशा कार्यामुळे महानुभाव पंथ 'भटमार्ग' म्हणूनही ओळखला जातो.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. कोलते, वि. भि. : नागदेवाचार्य (चरित्र) – श्रीचक्रधर चरित्र; मलकापूर, १९५२; पृ. ६९–७८; २. ढेरे, रा. चिं. : एका आरतीच्या निमित्ताने; महानु., नोव्हें. १९६८; पृ. ९–१४; ३. जयत्कर्ण, मुरलीधर : श्रीमत् नागदेवाचार्य : जीवन व कार्य; महानु., जुलै १९६७; पृ. ५–७; ४. जोशी, वसंत स. : वेधवंती नागदेव; मसाप., ऑक्टो.–डिसें. १९६०; पृ. २४–३२; ५. देशपांडे, वा. ना.; स्मृतिस्थळ (प्रस्ता.); तृआ., पुणे, १९६८.

**नृसिंहसरस्वती** [अंदाजे श. १३०० / इ. स. १३७८ – श. १३८० / इ. स. १४५८) महान योगी व थोर सत्पुरुष. हे दत्तसंप्रदायाचे प्रवर्तक असे मानले जाते. नृसिंहसरस्वतींचा जन्म विदर्भातील कारंजा गावी ब्राह्मणकुळात झाला. उपनाव काळे. हे वासिष्ठगोत्री वाजसनेयशाखी. ह्यांचे मूळचे नाव नरहरी. पित्याचे नाव माधव, आईचे नाव अंबाभवानी. आठनऊ वर्षांचे असतानाच करंजनगर सोडून बदरीकेदारच्या यात्रेचे प्रस्थान नरहरींनी ठेवले. प्रथम हे काशीला आले. तेथील वास्तव्यात शृंगेरी मठातील विद्यारण्यांच्या परंपरेतील कृष्णसरस्वती ह्या संन्याशांच्या दृष्टिपथात हे आले. पुढे ह्या कृष्णसरस्वतींकडून नरहरींनी संन्यासदीक्षा घेतली. गुरुदेवांनी नरहरींचे दीक्षान्त नाव श्रीनृसिंहसरस्वती असे ठेवले. *गुरुचरित्रात* (नृसिंहसरस्वतींचे चरित्र) ह्यांची जी परंपरा आढळते ती अशी : आदिगुरु श्रीशंकर > श्रीविष्णु > ब्रह्मदेव; तेथून पुढे वसिष्ठ > शक्ति > पराशर > व्यास > शुक > गौडपाद > गोविंदपाद > श्रीशंकराचार्य > विश्वरूप > ज्ञानबोधगिरी > सिंहगिरी > ईश्वरतीर्थ > नृसिंहतीर्थ > विद्यातीर्थ > शिवतीर्थ > भारतीतीर्थ > विद्यारण्य > विद्यातीर्थ > मलयानंद > देवतीर्थसरस्वती > यादवेंद्रसरस्वती > कृष्णसरस्वती > श्रीनृसिंहसरस्वती.

दीक्षा घेतल्यानंतर काही काळातच हे बदरीकेदारच्या यात्रेस निघाले. ती पूर्ण करून तेथून परत गंगातटाकी प्रयागला आले. ह्या प्रवासात त्यांनी माधव, उपेंद्र, सदानंद, ज्ञानज्योती इत्यादी सहा शिष्यांना दीक्षा दिली. नंतर तीर्थयात्रा करीतच ते दक्षिणेकडे निघाले. करंजनगरास आपल्या घरी काही काळ वास्तव्य करून पुन्हा गोदातटाकाची यात्रा त्यांनी आरंभिली. ती पूर्ण झाल्यानंतर कृष्णातीरावरील भिलवडी येथे औदुंबरवनात काही दिवस वास्तव्य करून भीमा-कृष्णा-पंचगंगा-तीरावरील अमरापूर (नरसोबाची वाडी) येथे एक तप व भीमा अमरजा संगमावरील गाणगापूर गावी दोन तपे एवढा काळ त्यांनी व्यतीत केला. श्रीगुरूंचे अवतारकार्य हे प्रामुख्याने वरील तीन तपांच्या काळातच घडले आहे. *गुरुचरित्रा*तील श्रीगुरूंच्या निजानंदगमनाच्या दिलेल्या तपशिलाप्रमाणे (शक निर्दिष्ट नाही; पण हा शक. १३८० बहुधान्य संवत्सर असावा) माघमासी असित पक्षी, प्रतिपदेस शुक्रवारी श्रीगुरूंनी श्रीशैलाकडे गमन केले, म्हणजेच समाधी घेतली, असे म्हणता येते. अप्रबुद्ध ह्यांच्या मते श. १३८० (जन्म) ते श. १४४० (निर्वाण) ह्या काळात श्रीगुरूंचे अवतारकार्य घडले असावे.

नृसिंहसरस्वती ह्या सत्पुरुषाचे जीवनकार्य किंवा चरित्र समजून घेण्यास *गुरुचरित्र* हाच काय तो एकमेव आधार होय. स्वामींच्या अवतारकार्यातून प्रवर्तित झालेला दत्तसंप्रदाय हा सरस्वती गंगाधरांच्या *गुरुचरित्रा*नेच वेगळा केलेला दिसतो. *गुरुचरित्रात* नृसिंहसरस्वती आणि त्यांचे पूर्वावतार श्रीपादश्रीवल्लभ ह्यांची चरित्रे वर्णन केली आहेत. त्यांपैकी श्रीवल्लभांचे चरित्र थोडक्यात व नृसिंहसरस्वतींचे चरित्र विस्ताराने दिले आहे. ह्या दोघांना चरित्रकाराने दत्तावतार मानले आहे. त्यांची उपासना हीच दत्तोपासना असे *गुरुचरित्र*कार ठासून सांगतात. प्रत्यक्षात दत्तोपासनेचा उपदेश श्रीगुरूंनी कोठे केला आहे असे चरित्रावरून तरी दिसून येत नाही. प्रापंचिकांच्या अडचणी दूर करण्याचे व त्यांना सन्मार्गास लावण्याचे व्रत श्रीगुरूंनी घेतलेले होते. म्हणूनच *गुरुचरित्र*कारांनी प्रापंचिकांना आपले मनोरथ पूर्ण करून घेण्यासाठी व पारमार्थिक ऐश्वर्य संपादन करण्यासाठी गुरुदेवांचा कृपाप्रसाद हाच सुलभ मार्ग आहे असे वारंवार सांगितले आहे. वेदप्रतिपादित मार्गाप्रमाणे ऐहिक जीवनाचा यथाशास्त्र उपभोग घेऊनच मुक्ती मिळविली पाहिजे असे सद्गुरूंच्या तत्त्वज्ञानाचे सार *गुरुचरित्रात* सांगितले आहे. दत्तसंप्रदाय हा श्रीगुरूंनी स्वतः प्रस्थापित केलेला नवा संप्रदाय नव्हे. त्यामुळे संप्रदायाचे खास असे तत्त्वज्ञान मांडण्याची आणि त्याच्या प्रचाराची गरज त्यांना वाटली नसावी. त्यांच्या चरित्रावरून काही तत्त्वांवर त्यांनी भर दिला आहे असे दिसते. श्रीगुरु स्वतः नृसिंहभक्त होते. पण कोणत्याही विशिष्ट देवाच्या भक्तीचे प्रतिपादन त्यांनी केलेले नाही. शिव-विष्णु-ऐक्याचा त्यांनी पुरस्कार केला. 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः' ह्याप्रमाणे सर्वांनी चतुर्वर्णाश्रमधर्माचे परिपालन करावे असा त्यांचा कटाक्ष दिसतो. सद्गुरूंच्या चरित्रश्रवणाचे महिमान *गुरुचरित्र*कार सरस्वती गंगाधरांनी वाढविले.

नृसिंहसरस्वतींच्या काळात महाराष्ट्रात मुसलमानी सत्तेचे प्राबल्य वाढले होते. महाराष्ट्रवासीयांचे धार्मिक व सांस्कृतिक जीवन अस्थिर झाले होते. अशा वेळी सनातन वैदिक धर्माचे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी ब्राह्मणवर्गाला ह्यांनी जागृत केले व त्याच्या कर्तव्याची जाणीव करून दिली. आपल्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाने त्यांनी सर्वसामान्य जनतेला परमार्थाचा उपदेश केला. श्रीगुरूंचा अवतार घडण्यापूर्वी दत्तसंप्रदाय या नावाने दत्तोपासनेची परंपरा रूढ नव्हती. ती *गुरुचरित्र*कारांच्या श्रद्धेने निर्माण केली आहे. महाराष्ट्रातील इतर दत्तोपासक जनार्दनस्वामी, एकनाथ, दासोपंत ह्यांचे ह्या दत्तसंप्रदायाशी नाते कोणते हे समजून घेण्याची साधने आज तरी उपलब्ध नाहीत. माणिकप्रभू, अक्कलकोटकरस्वामी, वासुदेवानंदसरस्वती हे अर्वाचीन काळातील दत्तसंप्रदायाची परंपरा सांभाळणारे संतपुरुष असे दत्तसंप्रदायाचा इतिहास सांगतो. ह्यांनाही दत्ताचे अवतार मानण्यात येते. हे सत्पुरुष नृसिंहसरस्वतींच्या साक्षात शिष्यपरंपरेतील नव्हत, पण श्रीगुरूचा संप्रदाय पूज्य मानणाऱ्यांपैकी आहेत. गाणगापूर, नरसोबाची वाडी, औदुंबर ही ह्या संप्रदायाची तीर्थक्षेत्रे. स्वामींनी ग्रंथरचना केल्याचा निर्देश *गुरुचरित्रात* येत नाही.

प्रापंचिकांची दु:खे आणि पीडा दूर करणे ही श्रीगुरूंच्या अवतारकार्याची फलश्रुती. आजही नृसिंहसरस्वतीरूप दत्ताची उपासना केल्यास *गुरुचरित्रात* दिलेल्या फलश्रुतीप्रमाणे सकाम भक्ताच्या 'जे जे मनी वांछी आर्त त्वरित होय साध्यंत' अशा सर्व कामनांची परिपूर्ती होते, ही प्रापंचिकांची दृढ श्रद्धा दिसते.

महाराष्ट्रातील विविध धार्मिक संप्रदायांच्या इतिहासात दत्तसंप्रदाय [⇨ ४] व नृसिंहसरस्वती श्रीगुरु ह्यांचे स्थान महत्त्वाचे आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. अप्रबुद्ध / पाळेकर, विष्णु केशव : द्वितीय दत्तावतार नृसिंहसरस्वती; पुणे, १९५९; २. (संपा.) कामत,

रा. क्रु. : श्रीगुरुचरित्र : परिशिष्ट : (१) पुरस्कार : अप्रबुद्ध; श्रीदत्तावतार व श्रीगुरुचरित्र यांचे अपूर्व वैशिष्ट्य; (२) कामत : श्रीगुरुचरित्र : संशोधनाचे स्वरूप, सामग्री व इतिहास; मुंबई, १९६८; पृ. ६८१–७४९; ३. ढेरे, रा. चिं. : दत्तसंप्रदायाचा इतिहास; पुणे, १९६४.

**रघुनाथ नारायण हणमंते** [इ. स. चे १७ वे शतक] कोशकार. *राज्यव्यवहारकोशा*चा कर्ता. ह्यांचे घराणे मूळचे चिंचवडचे; तेथील हेरंब दैवताचे उपासक. हे मुद्गलगोत्री, अग्निहोत्री ब्राह्मण. मातोश्री राजाई. पत्नीचे नाव सीता. ह्यांना नारोबा व तिमप्पा असे दोन पुत्र होते. हणमंते घराणे भोसल्यांचे पिढीजाद सेवक होते. रघुनाथपंतांचे आजे त्रिमल हे भोसले घराण्याचे अमात्य असून शौर्याबद्दल व औदार्याबद्दल प्रसिद्ध होते. युद्धात अग्रभागी राहून पराक्रम गाजविणारे म्हणून हणमंते असे ह्यांचे उपनाव पडले.

शहाजीराजांनी ह्यांना आपल्या कर्नाटकातील जहागिरीचे दिवाण नेमले (इ. स. १६५३). त्यांनी ही दिवाणगिरी अखेरपर्यंत केली. व्यंकोजींच्या गैरवर्तनास कंटाळून काही काळ हे शिवाजीराजांकडे आले होते. कर्नाटकावर स्वारी करण्याचा सल्ला शिवाजीराजांना ह्यांनीच दिला व मदतही केली. ह्या कामगिरीचे पारितोषिक म्हणून शिवाजीराजांनी त्यांची नेमणूक जिंकलेल्या सर्व प्रांताचा मुख्य कारभारी म्हणून केली व त्यांचे बंधू जनार्दन हणमंते ह्यांस सुमंत हा अधिकार देऊन अष्टप्रधानांत त्यांची नेमणूक केली.

शिवाजीराजांच्या पश्चात स्वराज्यात अव्यवस्था व गोंधळ माजला. रघुनाथपंतांनी मात्र त्यांच्या अखत्यारातील कर्नाटकातील मुलुखात उत्तम बंदोबस्त ठेवला होता. संभाजीराजांच्या गैरवर्तनाची बातमी कळताच चार उपदेशाच्या गोष्टी त्यांना सांगण्यासाठी हे रायगडावर आले. पंतांसारख्या ज्येष्ठ व अनुभवी मुत्सद्द्याच्या उपदेशाचा परिणाम झाल्याने कैद केलेल्या प्रधानमंडळातील मंत्र्यांची मुक्तता झाली. त्यांत ह्यांचे बंधू जनार्दन हणमंते व पंतप्रधान मोरोपंत पिंगळे हे होते. संभाजीचा निरोप घेऊन परत कर्नाटकात जात असता वाटेतच हे मृत्यू पावले (इ. स. १६८२).

रघुनाथपंत हणमंते हे राजकारणधुरंधर, शूर, मुत्सद्दी पुरुष होते. ते संस्कृत, फारसी, अरबी ह्या भाषांत निष्णात होते. शिवाजीराजांच्या सांगण्यावरून रघुनाथपंतांनी *राज्यव्यवहारकोश* तयार केला अशी समजूत आहे. तंजावर येथे उपलब्ध असलेल्या ह्या कोशाच्या (हस्त.) प्रतीच्या उपसंहारात 'धुंडिराज लक्ष्मण व्यास' ह्यांचे नाव येते. त्यामुळे *राज्यव्यवहारकोशा*चा कर्ता रघुनाथ पंडित किंवा रघुनाथ हणमंते ह्यांपैकी कोणीच नसून *मुद्राराक्षस* ह्या नाटकावर संस्कृत टीका रचणारा धुंडिराज व्यास हाच होय असे मत अ. का. प्रियोळकरांनी *नलदमयंतीस्वयंवरा*च्या प्रस्तावनेत व्यक्त केले आहे (आ. २, १९५९).

प्रस्तुत कोशाचे लेखन स्वहस्ते करण्याइतका अवकाश ह्या राजकारणी अमात्यास मिळाला नसावा म्हणून लक्ष्मण व्यासाचे पुत्र धुंडिराज ह्यांजकडून तो लिहविला गेला असावा. कोश रचण्याच्या कामी ह्यांचे साहाय्य रघुनाथपंतांना झाले असावे, असे उपसंहारातील निर्देशावरून वाटते, असे मत ह्या कोशाच्या तिसऱ्या आवृत्तीचे संपादक रा. गो. काटे ह्यांनी प्रस्तावनेत व्यक्त केले आहे (पृ. १२).

सतराव्या शतकात राजाच्या खाजगी व राजकीय व्यवहारात नेहमी येणाऱ्या फारसी शब्दांचे अर्थासह स्पष्टीकरण संस्कृतात देणारा हा संस्कृत कोश आहे. कोशात अनुष्टुभ वृत्ताचे ३८४ श्लोक असून प्रत्येक श्लोकात चार चार शब्द दिले आहेत. शब्दांचे राजवर्ग, शस्त्रवर्ग, चतुरंगवर्ग, सामंतवर्ग, दुर्गवर्ग आदी दहा वर्ग केले आहेत. त्या काळात राजभाषा म्हणून अगोदर फारसीचे व नंतर उर्दूचे प्राबल्य होते. मराठी भाषेवर त्याचा परिणाम होऊन मराठीचे मूळ स्वरूप विकृत झाले होते. हे शिवाजीमहाराजांच्या लक्षात आल्याने स्वभाषेच्या संरक्षणार्थ व शुद्धीकरणासाठी हा *राज्यव्यवहारकोश* त्यांनी आपले अमात्य रघुनाथपंत हणमंते ह्यांजकडून तयार करविला.

ह्या कोशात कोशकाराने योजलेले संस्कृत प्रतिशब्द हे सुटसुटीत व मराठी भाषेलाही उपयोगी पडण्यासारखे आहेत. ह्या शब्दांचा प्रचार शिवकालात होऊ शकला नाही. पुढे पेशवाईकाळात मात्र मराठीतील परकी शब्द पुष्कळच कमी झाले.

ह्या कोशाची प्रथम मुद्रित आवृत्ती इ. स. १८८० मध्ये पुण्यास शिवाजी छापखान्यात छापून प्रसिद्ध करण्यात आली. ही आवृत्ती इ. स. १८०३ मधील एका हस्तलिखित प्रतीवरून तयार करण्यात आली होती. नंतर इ. स. १९२५ मध्ये *शिवचरित्रप्रदीप* ह्या भारत इतिहास संशोधक मंडळ पुरस्कृत ग्रंथमालेतील चौथ्या पुस्तकात हा कोश पुनर्मुद्रित करण्यात आला. तिसरी आवृत्ती १९५६ मध्ये रा. गो. काटे ह्यांनी संपादिली.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** काटे, रा. गो. (संपा.); प्रस्ता., राज्यव्यवहारकोश; आ. ३; हैद्राबाद, १९५६; पृ. १–१३.

**रेवणसिद्ध** [का. अनु.] वीरशैव ग्रंथकार. हे मोगलाईत होऊन गेलेल्या माणिकप्रभू नावाच्या सत्पुरुषांचे गुरू होते व त्यांचे राहण्याचे ठिकाण रेवगी हे होते. ह्या स्थानाचा निर्देश श्रीसद्गुरुमाणिकप्रभू ह्यांच्या पद्यमालेत येतो. उदा., "धन्य आज दिन झालो मी शुद्ध । स्वामी रेवणसिद्ध देखीयेला ॥ रेवगी ग्राम तेथे असे गिरि । स्वामी जयावरी वास करी ॥" ह्यांची समाधी सातारा जिल्ह्यात विट्यापासून तीन कोसांवर रेणावी ह्या गावी आहे. कर्नाटकात अथणीस व सोलापुरास ह्यांची देवळे आहेत (भाइसंमंइति., श. १८३७, पृ. २८२–२८३).

ह्यांच्या नावावर *परमरहस्य* हा ग्रंथ असल्याचा गो. का. चांदोरकर उल्लेख करतात (संककासू., पृ. ९३). *विवेकचिंतामणि* ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत (पृ. ९१) डॉ. पंडित आवळीकर म्हणतात : "रेवणसिद्ध नावाचा एक सिद्ध ज्ञानेश्वरकालीन असून तो नेवाशानजीक मर्मगिरीवर राहात होता. रेवगी येथे ह्याच नावाचा जंगम राहात होता. त्याची समाधी रेणावी (जि. सातारा) येथे आहे." डॉ. पंडित आवळीकर ह्यांच्या मते जंगम रेवणसिद्ध हा ह्या *परमरहस्या*चा कर्ता असावा. नाथसिद्ध संप्रदायातील रेवणसिद्ध व जंगम रेवणसिद्ध ह्या व्यक्ती एक की दोन ह्याचा निर्णय *परमरहस्य* हा ग्रंथ उपलब्ध झाल्यास करता येण्याची शक्यता आहे.

ह्या संबंधात *श्रीगुरुगोरक्षनाथ* ह्या ग्रंथात (पृ. २००) रा. चिं. ढेरे म्हणतात : "रेवणसिद्ध व मरुळसिद्ध हेही प्रथमतः नाथसिद्ध होते. नाथांच्या *नवनाथभक्तिसार* या ग्रंथात रेवणाचे चरित्र वर्णिले आहे. नवनाथांच्या श्लोकातही 'चौरंगिरेवणकभर्तृसंज्ञाः' असा रेवणाचा निर्देश आहे." रेवणसिद्ध हे गोरक्षसमकालीन. इ. स. १२६५ नंतर ते वीरशैव बनले असे साखरे ह्यांचे मत आहे. ज्याअर्थी नाथसंप्रदायात रेवणाची कथा गायिली जाते, त्याअर्थी तो नाथसिद्धच असला पाहिजे, असे रा. चिं. ढेरे ह्यांनी प्रतिपादन केले आहे. जुन्या मराठी संतमालिकांतून रेवणसिद्ध व मैराळसिद्ध ही नाथसिद्धांची नावे बहुधा जोडीने आढळतात. शेख महंमदांच्या 'महाआरती'त 'रवणमोराळ सिध' असा निर्देश आहे.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** देशपांडे, अ. ना.; प्रामवाइ., भा. २; पुणे, १९७३; पृ. १७६–१७७.

**वडवाळसिद्ध नागनाथ / ० आजीउ लींग नागनाथ / ० गुरु नागनाथ / ० गुरुनागनाथदेव / ० नागनाथ नीरंजन / ० नागा भुजेंग / ० नागेश श्रीगुरु / ० नागेश्वर / ० नीत्यलींग / ० पूर्णघन नागेश / ० लींग नागनाथ / ० वडवाळसीध नागेश्वरु / ० सीधनाथ**

/ ० सीधेवेही नागेश्वर / ० सीधेश ईशनागेश / ० सीवसीधांत [अंदाजे श. १२९० / इ. स. १३६८ – श. १३४० / इ. स. १४१८] नागेश संप्रदायाचे आद्य प्रवर्तक. ज्ञानेश्वरांच्या नंतर जे अनेक सिद्ध सत्पुरुष होऊन गेले, त्यांच्यापैकी वडवाळसिद्ध नागनाथ किंवा नागेश ह्यांचा लौकिक फार होता. हे मूळचे बालाघाटाकडे राहणारे असे *सारस्वत*कार म्हणतात. वडवाळ येथे राहात म्हणून त्यांचे वडवाळसिद्ध नागनाथ असे नामाभिधान पडले. डॉ. आवळीकर आणि डॉ. पठाण ह्यांनी अज्ञानसिद्ध कवीची जी नवी माहिती संशोधिली आहे, त्यानुसार अज्ञानसिद्ध हे नागनाथाचे पट्टशिष्य होते व म्हणूनच ते आपले नाव 'अज्ञानसिद्ध नागेश' लावित असे मत स्पष्ट केले आहे. श. १३१३ त (इ. स. १३९१) अज्ञानसिद्धांना गुरूपदेश झाल्याचा उल्लेख त्यांच्याच *संकटहरणी*-नामक ग्रंथात आला आहे. उदा., 'शके तेराशे तेरा । मार्गशीर्ष शुद्ध नवमी गुरुवारा । प्रकटला नागेश फणीवरा । डुलत डुलत ॥' ह्या ओवीवरून नागनाथांचा काळ स्पष्ट होतो. आपल्या गुरूला *वरदनागेश* ग्रंथातील अभंगात सिवयोगी, नागेश्वर, सिधलिंग, सिधराजा, सिध नागेश्वर, सिध नागनाथ असे म्हणून अज्ञानसिद्धांनी आळविले आहे.

नागनाथ ह्या नावाच्या अनेक व्यक्ती होऊन गेलेल्या दिसतात. शाहिरांचे कुलदैवत असलेला नागेश, *योगेश्वरी माहात्म्या*तला सिद्धनागनाथ व डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी महानुभावीय ग्रंथकार मेघचंद्रकृत *यक्षदेव वृद्धान्वय* पोथीची माहिती देताना उल्लेखिलेला नागनाथ, ह्या सर्व भिन्न व्यक्ती असून प्रस्तुत नागनाथांशी त्यांचा काहीही संबंध नाही. वडवाळसिद्ध ही संज्ञा नागेशसंप्रदायाच्या प्रवर्तकाचे व्यवच्छेदकत्व दर्शविते.

हे 'वडवळ' गाव कोणते ? वडवळ ह्या नावाची दोन गावे उस्मानाबाद व सोलापूर ह्या जवळच्या दोन जिल्ह्यांत आहेत. नागेशसंप्रदायविषयक साहित्य, संप्रदायाचे अनुयायित्व स्वीकारलेली घराणी, ही सोलापूर जिल्ह्यातील मोहोळजवळील वडवळच्या परिसरात आढळतात. संप्रदायविषयक साहित्य उस्मानाबाद जिल्ह्यातील लातूरजवळील वडवळ ग्रामी उपलब्ध झाले नाही. शिवाय नागेश संप्रदायाची माहिती देणाऱ्या *वरदनागेश* व *नागेशलीलामृत* ह्या प्रमाणग्रंथांत लातूरजवळच्या वडवळचा उल्लेख नाही. त्यामुळे सोलापूर जिल्ह्यातील वडवळ हेच नागेशांचे स्थान असे मानण्याकडे संशोधकांचा कल दिसतो.

उद्धवचिद्घनांनी एक *नागनाथचरित्र* लिहिल्याचा उल्लेख *महाराष्ट्रसारस्वत*कारांनी व गो. का. चांदोरकरांनी केला आहे. तसेच भास्कर कवीच्या *नागेशलीलामृत* ग्रंथात ह्यांची काही चरित्रविषयक माहिती सापडते. नागनाथांच्या स्वतंत्र संप्रदायाची माहिती देणारा अज्ञानसिद्धविरचित *वरदनागेश* आणि भास्कर ऊर्फ भानजी त्रिंबक देशपांडे ह्यांचा अलिकडेच उपलब्ध झालेला *नागेशलीलामृत* हे दोन प्रमाणग्रंथ आज उपलब्ध आहेत. ह्यांपैकी पहिला प्राचीन असून त्यात पंथाचे चैतन्याधिष्ठित तत्त्वज्ञान प्रतिपादले आहे. *नागेशलीलामृता*चा कर्ता भानजी त्र्यंबक ह्याच्या घराण्यात नागनाथांची भक्ती परंपरेने चालत आलेली आहे. ह्या ग्रंथाचा रचनाकाल इ. स. १८४८; म्हणजे ग्रंथ बराच अर्वाचीन आहे. असे असले तरी नागेशसंप्रदायाचे स्वरूप, तत्त्वज्ञान, शिष्यपरंपरा, स्थानमाहात्म्य व चैतन्यसंप्रदायाशी ह्या पंथाचा असलेला संबंध ह्या सर्व मुद्द्यांवर वरील ग्रंथात भरपूर प्रकाश टाकलेला आहे.

नागेशांच्या शिष्यपरंपरेत बहिरा जातवेद, कान्हो पाठक, उद्धवचिद्घन, हेंगरस, अज्ञानसिद्ध, अलमखान इत्यादिकांचा नेहमीच उल्लेख केला जातो. ह्यांची शिष्यपरंपरा खूप मोठी असून त्यांत धनगर, लिंगायत, मुसलमान, ब्राह्मण ह्या सर्व जातींचा समावेश झालेला दिसतो. नरंदे (कोल्हापूर), वखंड, किलारी, महागाव ह्या ठिकाणी व महाराष्ट्राबाहेरही ह्यांच्या शिष्यशाखा पसरलेल्या आहेत. नागनाथांचा स्वतंत्र संप्रदाय ह्या त्यांच्या शिष्यांनी वाढवून नावारूपास आणला व तो 'नागेशसंप्रदाय' म्हणून सर्वमान्य झाला. [⇨ ४.]

नागेश हे चैतन्यसंप्रदायाचे अनुयायी होते असे सांगण्यास *नागेशलीलामृत* व *वरदनागेश* ह्या सांप्रदायिक ग्रंथांतील अनेक आधार दाखविता येतात. *नागेशलीलामृत*कार एके ठिकाणी म्हणतात : "यातोनि चैतन्यसंप्रदाय । स्वीकारी श्रीनागेश पाहे । चैतन्यरूप सर्वदा आहे । विराजे सांप्रदाय ज्याचेनि ॥ अ. २८ : ३१ ॥" आदिनाथ > नागनाथ > केशवचैतन्य > राघवचैतन्य > बाबा चैतन्य > तुकाराम, अशीही एक परंपरा दिलेली आढळते. नागेशसंप्रदायात वरील चैतन्यत्रयीस फार महत्त्व आहे.

नागनाथ हे सदासर्वकाळ अयाचित वृत्तीने राहून, ह्या जगात सर्वव्यापी परमेश्वराखेरीज दुसरे काही नाही, असा सर्वांना उपदेश करीत. नाथ, चैतन्य, दत्त, वीरशैव इ. संप्रदायांच्या तत्त्वज्ञानांतील वैशिष्ट्यपूर्ण तत्त्वे ह्या संप्रदायात समाविष्ट केल्याने, ह्या संप्रदायाचे तत्त्वज्ञान समावेशक व व्यापक स्वरूपाचे झाले आहे. अद्वैतमताचे समर्थन तेथे येते. योगाचे विवरण केले असले तरी त्यावर फारसा भर दिलेला नाही. चैतन्यसंप्रदायाचा ह्या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानावरील ठसा विशेष लक्षणीय आहे. पंथात अभिप्रेत असणारा आचारधर्म हा सर्वसामान्य माणसास सहज पेलवण्यासारखा असून सामान्य जनतेला भक्तिप्रवण करणे हाच पंथाचा एकमेव उद्देश दिसतो. ह्याही संप्रदायाला वारकरी, नाथ, दत्त ह्या संप्रदायांप्रमाणेच महाराष्ट्राच्या धार्मिक आणि सांस्कृतिक जीवनात वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. ह्या संप्रदायासंबंधात आजवर फारशी माहिती कोणाला नव्हती. *नागेशसंप्रदाय* ही पुस्तिका प्रसिद्ध करून प्रथम ही माहिती डॉ. पठाण ह्यांनी करून दिली आहे. पंथाच्या अनुयायांनी बव्हंशी मराठी भाषेतच रचना केली आहे; पण अजूनही हे साहित्य तितक्या प्रमाणात उपलब्ध झालेले नाही.

नागनाथांनी स्वतः काही रचना केली असल्यास निश्चितपणे माहीत नाही. त्यांच्या पदांचा आणि अभंगरचनेचा उल्लेख *महाराष्ट्रसारस्वत*कार वि. ल. भावे करतात (मसा., आ. ५, पृ. १८६). पण ही रचना त्यांची नसून अज्ञानसिद्धांची किंवा इतर कोणाचीच असण्याची शक्यता अधिक आहे. 'ते कवी असल्याचा पुरावा आजतरी उपलब्ध नाही' असे डॉ. पंडित आवळीकर म्हणतात (जुवानसं., पृ. ३). पंथप्रवर्तक ह्या दृष्टीने नागेशांचे अवतारकार्य महत्त्वाचे म्हणून लक्षात घ्यावे लागते. हिंदु-मुसलमानांना एकाच पारमार्थिक पातळीवर आणण्याचे फार मोठे कार्य नागेशांनी केले.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. आवळीकर, पंडित : अज्ञानसिद्ध नागेश; जुवानसं.; धारवाड, १९६४; पृ. १–१५. २. देव, शं. श्री. : वडवाळसिद्ध नागनाथ; भाइसंमंइति., श. १८३५; पृ. ४०. ३. पठाण, यू. म. : नागेशसंप्रदाय (पुस्तिका); औरंगाबाद, १९६३.

**शहादत्त अलमा प्रभु** [अंदाजे श. १४०० / इ. स. १४७८ – श. १४६० / इ. स. १५३८] मराठवाड्यातील एक अवतारी सत्पुरुष. जन्माने मुसलमान असावेत. वास्तव्यस्थान देवगिरी ऊर्फ दौलताबाद. "कृतयुगी आले हंस । त्रेतायुगी देवदत्त । द्वापारी श्रीकृष्ण । कलीमध्ये शहादत्त ॥" ह्या उक्तीवरून ह्यांना दत्तावतार समजत असे दिसते. आनंदसंप्रदायाच्या एका शाखेत दत्तात्रेयाचे नाव शहादत्त अलमा प्रभू असल्याचे आढळते. ह्यांचे दोन प्रमुख शिष्य कान्हो कानडा व आनंदप्रभू. पैकी आनंदप्रभूंची शिष्यपरंपरा प्रख्यात आहे. ती अशी : शहादत्त > आनंदप्रभू > निश्चलानंद > बालप्रभू > अर्जुनानंद > निर्मळानंद > आत्माराम-

स्वामी > सदानंद इत्यादी. ह्या परंपरेपैकी आत्मारामस्वामी व सदानंद ह्यांच्या प्रचंड ग्रंथरचनेतून शहादत्तांचे अनेक निर्देश आढळतात. आत्मारामस्वामी एके ठिकाणी म्हणतात : "कलियुगींचा अवतार। पराविद्येचा दातार। परब्रह्म साचार। श्रीशहादत्त प्रभु ॥"; 'देवगिरी देवाचें सिंहासन होये', अशी माहितीही ते देतात. ह्या संप्रदायाचे मठ धुळे व जळगाव जिल्ह्यांत अनुक्रमे सिंदखेडे व चोपडे येथे आहेत, तसेच मराठवाड्यातील भूम व वऱ्हाडातील शिरपूर येथेही आहेत. शहादत्तांच्या उपासकांत आनंदमार्गी, लिंगायत, मुसलमान, गिरिगोसावी असे अनेक पंथांचे लोक होते, अशी माहिती आत्मारामस्वामी व सदानंदस्वामी हे गुरुशिष्य देतात. ह्या संप्रदायातील धारणेप्रमाणे कलियुगी दत्तात्रेयाने 'उभयदृश्यावतार' [पहा : **गोविंदप्रभु**] घेऊन पराविद्येचे गुह्य अवताररहस्य बसव, जंगम, बेदरचा पातशहा, जनार्दन, एकनाथ, आनंदप्रभू प्रभृति सद्भक्तांस सांगून आनंदमार्गाचा उपदेश केला.

जनार्दनस्वामींचे गुरू म्हणून शहादत्त अलमा प्रभूंचे नाव घेतले जाते (संककासू., पृ. ३७). जनार्दन हे शहादत्तांचे अनुग्रहित अशी परंपरा आनंदसंप्रदायात आढळते. शहादत्तांची ही शाखा दत्तोपासक असून तिचे प्रमुख केंद्र माहूर आहे. आनंदसंप्रदायी *हंसपद्धति* ग्रंथात (कर्ता अज्ञात) 'कली शहादत्त जाण । उद्धरिले अलर्क जनार्दन ।' हा उल्लेख शहादत्तांचा जनार्दनांना साक्षात्कार झाल्याचे सांगतो. "प्रथम कलिमध्ये येऊन । भेट दिधली जनार्दन । नाना ज्ञानबोध करून । बैसविले निजसुखा ॥" ह्यापुढील काही ओव्यात शहादत्त-जनार्दन-एकनाथ-भेटीचे वर्णन येते. जनार्दनस्वामींचे गुरू म्हणून शहादत्त, चांदबोधले, गिरिधरनाथ, नृसिंहसरस्वती अशा अनेक सत्पुरुषांची नावे पुढे येतात. ह्या शंकांचे निराकरण अद्यापि झालेले नाही.

शहादत्तांची आनंदसंप्रदायी शाखा व महानुभाव पंथ ह्यांचा काही ऋणानुबंध असावा. कारण आनंदमार्गीयांची 'उभयदृश्यावतारा'ची कल्पना ही महानुभावपंथीयांच्या अवतारकल्पनेशी जुळणारी आहे. ह्या अनुबंधाचा उलगडा झाल्यास अनेक शंकांचा निरास होईल, असे मत रा. चिं. ढेरे ह्यांनी व्यक्त केले आहे.

दत्तोपासनेच्या क्षेत्रातील शहादत्तांचे चरित्र हे एक गूढ असून त्या रहस्याचा उलगडा अजून झालेला नाही. अलमा प्रभू विद्यमान होते तो काळ व विशिष्ट परिस्थिती लक्षात घेता काही धागेदोरे हाताशी आल्यासारखे वाटतात एवढेच. त्यावेळचा हिंदुमुसलमानांमधील धार्मिक व सांस्कृतिक संघर्ष कमी करून त्यांचा समन्वय घडवून आणण्याकरिता दत्तात्रेयांना शहादत्तांचा अवतार घ्यावा लागला. मुसलमानांच्या बरोबर त्या काळात इकडे आलेल्या सूफी पंथातील मलंग हा विधिनिषेधातील अवस्थेत विचरण करणाऱ्या अवधूताचाच निदर्शक आहे. दत्तात्रेयांनी मलंगाच्या किंवा फकीराच्या वेशात अनेक भक्तांना दर्शन दिल्याच्या कथा ऐकू येतात. परमेश्वर हा सर्वांना पाहतो. जातीपातीचे बंधन त्याला नाही. म्हणूनच दत्तात्रेयांनी शहादत्त ह्या नावाने सूफी पंथातील मलंगावताराशी सदृश अशा अवतार घेतला असावा, असेही एक मत व्यक्त केले जाते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास**: १. जोशी, म. रा. : शहादत्त व आनंदसंप्रदाय; प्रसाद, व. २५, अं. ५, डिसें. १९७१; पृ. २५–२७; २. ढेरे, रा. चिं. : शहादत्त अलमाप्रभु; मुमसंक., पुणे, १९६७; पृ. १८१–१८२; ३. ढेरे, रा. चिं.; शहादत्त अलमा प्रभू; दत्त संप्रदायाचा इतिहास; पुणे, १९५८; पृ. २३१–२३५.

**संताजी तेली जगनाडे चाकणकर** [अंदाजे इ. स. १६५०–१७०८] तुकोबांच्या अभंगांचे संग्राहक. हे मूळचे चाकणचे (ता. मावळ, जि. पुणे) राहणारे, असे उल्लेख जगनाडे कुटुंबियांच्या अभंगांच्या वह्यांत सापडतात. संताजींची समाधी देहूजवळील भंडाऱ्याच्या डोंगराच्या पायथ्याजवळील सदुंबरे गावी आहे.

गोपाळबावांनी (तुकारामांचे पणतू) तुकारामांच्या निर्वाणप्रसंगी हजर असलेल्या मंडळीत संताजींचा उल्लेख केला आहे. वि. का. राजवाडेही ह्यांना तुकोबांचे शिष्य मानतात. रुक्मांगद राणोजी काळे ह्यांनी संताजींची एक वंशावळी छापून प्रसिद्ध केली आहे. पण ऐतिहासिक दृष्ट्या तिला फारसे महत्त्व नाही. जगनाड्यांच्या उपलब्ध झालेल्या वह्यांतील निरनिराळ्या शंकांच्या उल्लेखांवरून संताजींचा काळ इ. स. १६५० च्या मागे नेता येणार नाही, असे मत इतिहाससंशोधक वा. सी. बेंद्रे ह्यांनी व्यक्त केले आहे. बहुधा कचेश्वरांच्या सांनिध्यात संताजींना तुकोबांचा ध्यास लागला असावा असे आतापर्यंत तुकारामांचे चरित्रकार सांगत आले व लोकही मानत आले; हे खरे मानले तर हे तुकोबांचे टाळकरी शिष्य किंवा अभंगलेखक ठरत नाहीत, कारण त्यांचा जन्मच मुळी तुकारामांच्या वैकुंठगमनापूर्वी तीन-चार वर्षे अगोदर झाला, असे मत बेंद्रे ह्यांनी मांडले आहे (*तुकाराम महाराज यांचे संतसांगाती*, पृ. १५८).

तुकारामतात्या पडवळ ह्यांनी संपादिलेल्या *तुकाराम महाराजांच्या अभंग गाथ्यात* (मुंबई, १८९६) छापलेले घाण्याचे पंधरा अभंग (क्र. ३९५२ ते ३९६६) संताजींचे मानले जातात. संताजो व तुकोबा ह्यांच्या भेटीचा तपशील त्यात सापडतो. पण हे अभंग तुकोबा किंवा संतु तेली ह्यांपैकी कोणाचेच नसून क्षेपक आहेत, असे बेंद्रे मानतात.

तुकोबांच्या अभंगांचा संग्रह मात्र संताजींनी केला व त्यात त्यांचे पुत्र बाळाजी व नातू भागोजी ह्यांनी भर घातली. जगनाडे वह्यांतील तुकारामांच्या अभंगांची संहिता ही आज उपलब्ध असलेली तुकारामांच्या अभंगांची जुन्यांत जुनी संहिता असे मानले जाते.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** १. बेंद्रे, वा. सी. : संताजी तेली जगनाडे चाकणकर; तुकाराम महाराज यांचे संतसांगाती; मुंबई, १९५८; पृ. १५०–१५८; २. राजवाडे, वि. का. : संताजी जगनाडा; विश्ववृत्त; मार्च, १९०८; पृ. १–११.

**सिद्धानंद** / ० **सिद्धनाथ–२** [अंदाजे श. १२७२ / इ. स. १३५०] *ज्ञानेश्वरी*चे प्रतकार. ज्ञानेश्वरांचे शिष्य सच्चिदानंदबाबा ह्यांचे हे शिष्य. पहा : "ज्ञानेशशिष्य प्रसिद्ध। महायोगी सच्चिदानंद । त्याचा शिष्य सिद्धानंद । सिध्या प्रसिद्ध ज्यापुढें ॥" (*भक्तितत्त्वामृत*, उल्लास ४२.१७). नाथसंप्रदाय हा मूळचा आनंदसंप्रदाय म्हणून 'सिद्धानंद' हेच सिद्धनाथ, होत.

*ज्ञानेश्वरी*ची 'सिद्धनाथप्रत' म्हणून प्रचारात असलेली प्रत ह्यांनी तयार केली. ह्या प्रतीच्या श. १६१६ ते श. १७२६ (इ. स. १६९४ ते १८०४) पर्यंतच्या ४ नकला उपलब्ध झाल्या आहेत. ह्या प्रतींतील कालनिर्देश श. १२७२ (इ. स. १३५०), विकृतिनाम संवत्सरे, ज्येष्ठ शु. १२, रविवार असा आहे असे रा. ग. हर्षे ह्यांनी दाखवून दिले आहे. ह्या प्रतीत ९०६० ओव्या आहेत. ह्यावरून सिद्धनाथ प्रतीतील ओवीसंख्या फुकट प्रक्षेपांनी फुगलेली नाही असे म्हणता येईल. ह्या प्रतीचा विशेष म्हणजे तिची प्राचीनता व संप्रदायशुद्धता होय. सिद्धनाथप्रत हीच सच्चिदानंदबाबांची सांप्रदायिक प्रत असे निश्चितपणे मानण्यास हरकत नाही असे रा. ग. हर्षे ह्यांचे मत आहे (*श्रीभगवद्गीता-व्याख्यान : ज्ञानदेवी*, अ. पहिला, पुणे, १९४७; प्रस्ता., पृ. २८–३३ व ६२–६९.

**हरिनाथ** [अंदाजे श. १०८१ / इ. स. ११५९ – श. ११०८ / इ. स. ११८६] मुकुंदराज-परंपरेचे आद्य पुरुष. आईचे नाव सरस्वतीबाई व वडिलांचे नाव सत्यनारायण. नागपूर प्रांतातील वैनगंगेच्या तीरावरील अंभोरे (मनोहर अंबानगरी) येथे राहणारे. ह्यांनी १२ वर्षे पाशुपत व्रताचे आचरण केले. व्रताच्या सांगतेच्या वेळी अग्निकुंडातून प्रकटलेल्या 'स्वयंज्योती' आदिनाथाने ह्यांना आशीर्वाद दिला. नंतर ह्यांची बावीस दिवसपर्यंत निर्विकल्प समाधी चालू होती. त्यानंतर "जडचर्या आचरत । पिशाचवत् खेळत । निजानंदें डुल्लत ।

हरी योगीराज ॥" अशा 'बालोन्मत्तपिशाचवत्' स्थितीत ते काही काळ होते. ही स्थिती भंगल्यावर ह्यांनी यज्ञस्थली 'श्रीचैतन्येश्वर' शिवलिंगाची स्थापना केली व 'जे नेणती आपुली शुद्धी' अशांच्या उद्धाराचे कार्य हाती घेतले. ह्यांच्या शिष्यांत सुरेंद्रभारती, नागार्जुन, जनार्दन, रघुनाथ इत्यादी छप्पन शिष्य होते. पैकी रघुनाथ हे कवी मुकुंदराजांचे गुरू. ह्यांचीही चरित्रविषयक माहिती मुकुंदराजांच्या *विवेकसिंधु* ह्या ग्रंथात (अ. १८ : ३४–१०२) आली आहे. ह्यांच्या परंपरेतील अनेक मठ नागपूर प्रांतात आढळतात. ह्यांची ग्रंथरचना उपलब्ध नाही.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** ढेरे, रा. चिं. : गोचप., मुंबई, १९५९; पृ. १४२–१४४.

# परिशिष्ट – २

## अनाम रचना

**[अ] मु.** – प्राचीन मराठी वाङ्मयात वेगवेगळ्या वर्गांतील, लेखकांचे नाव नसलेले (अनाम), बरेच साहित्य आढळते. वाङ्मयाच्या विशिष्ट शाखेतील साहित्याचा संशोधनपूर्वक अभ्यास करणाऱ्यांना त्याचा उपयोग आहे. हे लक्षात घेऊन येथे ते वर्गशः दिले आहे.

[१] **आख्यान** – (१) उषास्वयंवर; ग्रं. सं. १५६; कासं. : ११.१; क्र. १२१, पृ. ७९–८४; क्र. १२२, पृ. ८५–१०१. (२) कपोताख्यान (अपूर्ण); ग्रं. सं. ९९; महा. कवि : १; क्र. ४, श. १८२५, पौष; पृ. १४–२६. (३) गणेशजन्मकथा; ग्रं. सं. ३४; अकलकामा., भा. ३; पृ. १२४–१२७. (४) द्वादशमासवर्णन; ग्रं. सं. ४०; कासं. : ८; क्र. ९४, पृ. ७९–८०; क्र. ९५, पृ. ८१–८२. (५) महाबळभट्ट-कथा; ग्रं. सं. १४; कासं. : ११.१; क्र. १२५, पृ. १५३–१५५. (६) राधाकृष्णसंवाद; ग्रं. सं. १६; अकलकामा., भा. १; पृ. २१०–२११. (७) शुकरंभासंवाद; ग्रं. सं. ४७; अकलकामा., भा. २; पृ. २२–२८. (८) सत्यभामाविनोद; ओ. सं. १४; अकलकामा., भा. २; पृ. ४९–५१.

[२] **चरित्र** – (१) मंत्रमयध्रुवचरित्र; ग्रं. सं. २७३; कासं. : ४; क्र. ४७, पृ. ८८; क्र. ४९, पृ. ८९–९६; क्र. ५०, पृ. ९७–१०४; क्र. ५१, पृ. १०५–११५. (२) मयशक्तिचरित्र; ग्रं. सं. २९; कासं : ११.१; क्र. १२१, पृ. ७३–७६.

[३] **बखर** – (१) इंग्लंड देशाची बखर; पुणे, १८३२; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ३४. (२) बखर बत्तीसपुतळ्यांची; मुंबई, १८३४; IOLCMM – ८९. (३) बाबाजीची बखर; मुंबई, १८४४; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ७.

[४] **वैद्यकग्रंथ** – (१) जरीमरीविषयी (कॉलरा); ब्रिम्युलाकॅ.; पृ. २५. (२) वैद्यक; संशोधक त्रैमा.; क्र. २१ / वै ३१ (७२५).

[५] **व्रतकथा** – (१) संकटहर पूजा व कथा; तंसम. बा. २४९०. (२) सोमवती पूजा; इ. स. १८७१; रासंमं. बा. ६१८/५ (९१४).

[६] **संकीर्ण ग्रंथ** – (१) परिभाषायुक्त ज्ञानेश्वरी टीका; ले. का. : श. १८१४; औंहसं.; अ. क्र. २८९०. (२) भूगोल आणि खगोलविषयक संवाद; पुणे, १८३२; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ३०. (३) महाराष्ट्र विदुरनीति; मुंबई, १८३४; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ६९. (४) विदुरनीति; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ६९. (५) सामुद्रिक; इ. स. १८३०; रासंमं. बा. ४७/ज्यो. १७ (६७९).

[७] **स्फुट रचना** – (१) आरत्या; मुंबई, १८४८; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ६. (२) पदे (पदसंख्या १२); पदसंग्रह, भा. ३; मुंबई, १९०१; पृ. १८६–१९०. (३) पाळणे; मुंबई, १८५५; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ८९. (४) माहात्म्य – १. तापी माहात्म्य; रासंमं. बा. ६१९/९ (९३६). २. त्र्यंबक माहात्म्य; रासंमं. बा. ६१९/१० (९३७). ३. पंढरीमाहात्म्य अपूर्ण); तंसम. बा. २४२३. ४. मल्हारी माहात्म्य; श. १७८१; रासंमं. बा. ६१९/१८ (९४५). ५. मुखमासित ब्राह्मण माहात्म्य; रासंमं. बा. ६१९/१९ (९४६). ६. रामनाम माहात्म्य; UCOM (१९३६); अ. ९६१, पु. ७९२. ७. रुद्राक्षमाहात्म्य; ग्रं. सं. ५९ (गीतिवृत्त); कासं. १०; क्र. ११६, पृ १९–२४. ८. शनिमाहात्म्य : ३; तंसम. (बा. २४६५); रासंमं. बा. ६१९/२४ (९५०); UCOM; १९४१ – Part II; अ. ६२४; पु. २९८८. ९. सप्तशती / देवीमाहात्म्य; ब्रिम्युलाकॅ.; पृ. १००. (५) स्तोत्र – दुर्गास्तोत्र; मुंबई, १८४६; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ३२. (६) इतर स्फुट रचना – १. अष्टक; काइसं.; सप्टें. १८८७; अं. ९; पृ. २२२. २. अष्टादशश्लोकी गीता; काइसं.; ऑक्टो. १८८७; अं. १०; पृ. २४१. ३. एकाक्षरी श्लोक; मुंबई, १८४८; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ३२. ४. गोपी-गीत; सातारा, श. १७८४; रासंमं. बा. ४१० / पु. २३ (४८४). ५. गोपीगीत; मुंबई, १८५४; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ९९. ६. गोविंदाष्टक; मुंबई, १८५६; ब्रिम्युलाकॅ.; पृ. ४३. ७. चतुर्मंत्ररामायण; ग्रं.सं. ९१; अकलकामा., भा. ३; पृ. ३०–३६. ८. देवीश्लोक (शिळाप्रेस); श्लो. सं. ९२; रासंमं. बा. ६१९/२९ (६४८). ९. नारदाचा व्यासास उपदेश (आर्या); काइसं.; ऑग. १८८७; अं. ८, पृ. २१५. १०. राधा-विलास; काइसं.; ऑग. १८८७, अं. ८, पृ. २१९–२२० व सप्टें. १८८७, अं. ९, पृ. २२१–२२२. ११. लघुचेंडूफळी; ग्रं. सं. ८; कासं. : ८; क्र. ९२, पृ. ५७–५८. १२. व्यंकटेशस्तुति; श्लो. सं. ११; अकल-कामा., भा. २, पृ. १३३–१३४. १३. शिवगीता; मुंबई, १८५६; ब्रिम्युलाकॅ.; पृ. १०१. १४. शिवस्तुति; मुंबई, १८५५; ब्रिम्युलाकॅ.; पृ. १३४. १५. श्रीरामदासलीला (लावणी); अकलकामा., भा. १, पृ. १६१–१६७.

**[आ] अमु.** – आख्यानकविता, चरित्रे, व्रतकथा, पदे, आरत्या, स्तोत्रे इ. स्फुट रचनेपुढे प्राप्तिस्थलाचा निर्देश केलेला नाही. कारण ही कविता संख्येने विपुल आहे. ह्या कवितेपैकी काही महत्त्वाच्या रचनांचाच तेवढा उल्लेख केला आहे. हस्तलिखितांच्या उपलब्ध असलेल्या ज्या प्रमुख याद्यांतून ही नोंद केलेली आहे, त्या याद्या ह्याप्रमाणे : (१) उविहे., (२) औंहसं., (३) केत्रिहसं., (४) गोपीग्रंसं., (५) ग्वाहसं., (६) तंसम., (७) दत्तग्रंसं., (८) नाविग्रं., (९) भाइसंमं., (१०) मसंमं., (११) मौरासं., (१२) रासंमं., (१३) वेंकासं., (१४) सवामं., (१५) IOLCMM, (१६) UCOM, (१७) SOI. (पहा : **संक्षेपसूची**.)

[१] **आख्याने** – (१) आख्यानसंग्रह – ४ (पैकी २ त्रुटित); (२) कचोपाख्याने – २; (३) कान्होपात्राख्यान – १; (४) कालिकाख्यान – १; (५) गोपीचंदाख्याने – ४; (६) द्रौपदीविषयक – ७; (७) ध्रुवाख्यान – १; (८) पंचोपाख्याने – ७ (इ. स. १८२२ ते इ. स. १८८९ च्या दरम्यान नकललेली; ४ त्रुटित); (९) पतिव्रतोपाख्याने – २; (१०) रुक्मिणीस्वयंवरे – ९ (पैकी १ संपूर्ण); (११) शिवलीलामृते – २५; (पैकी ८ त्रुटित, श.

१७१८ ते १७८४ च्या दरम्यान नकललेली); (१२) सावकार-आख्यान (मसा., पृ. ४६३ वर निर्दिष्ट); (१३) सावित्री आख्याने –२; (१४) सीतास्वयंवरे –२; (१५) सुधन्वाख्याने – २; (१६) हरिश्चंद्रोपाख्यान –१.

[२] **कामशास्त्रविषयक ग्रंथ** – संख्या ९ – (१) कामकला; भाइसंमं.; (२) कामशास्त्री; केत्रिहसं.; (३) कामशास्त्र (त्रुटित); SOI; (४) कोकशास्त्र; तंसम.; (५) कोकशास्त्र; रासंमं.; (६) प्रेमकला (त्रुटित); भाइसंमं.; (७) बाड कोकशास्त्र; नाविग्रं.; (८) रतिमंजरी; ग्वाहसं.; (९) रतिमंजरी; IOLCMM;

[३] **कोशग्रंथ** – संख्या ३६ – (१) अर्थपाठ तळेगावकरांचा (सांकेतिक लिपीत); मसंमं.; (२) अमरकोश (त्रुटित); भाइसंमं.; (३) अमरकोशदर्पण; तंसम.; (४) अमृतानुभवपरिभाषा; भाइसंमं.; (५) देशनामसंग्रह; भाइसंमं.; (६) परिभाषा-ग्रंथ; UCOM; १९४१ – Part II; (७) मराठी कोश (छंदःशास्त्रावरील ग्रंथ); रासंमं.; (८) वनस्पतिकोश; भाइसंमं.; (९) सुंदरलहरी तत्त्व परिभाषा; नाविग्रं.; (१०) ज्ञानेश्वरी परिभाषा – २७; श. १६८२ ते श. १७४१ च्या दरम्यान नकललेले ग्रंथ : १. ज्ञानदेवी परिभाषा – २; मसंमं.; २. ज्ञानदेवी परिभाषा पर्याय – ३; भाइसंमं.; ३. ज्ञानेश्वरी कोश – ३; रासंमं. – २, औंहसं. – १; ४. ज्ञानेश्वरी टिप्पणी – ४; भाइसंमं. – १, मसंमं. – ३; ५. ज्ञानेश्वरी परिभाषा – ५; औंहसं. – ४, रासंमं. – १; ६. ज्ञानेश्वरी भाषा – १; रासंमं.; ७. ज्ञानेश्वरी भाषापर्याय – १; मसंमं.; ८. ज्ञानेश्वरी विषमशब्दकोश (त्रुटित) – १; भाइसंमं.; ९. ज्ञानेश्वरी शब्दकोश – ६; मसंमं. – १, रासंमं. – १, भाइसंमं.– ४ (पैकी १ त्रुटित).

[४] **गणितविषयक ग्रंथ** – संख्या ६ – (१) अंकगणित प्रथम भाग; रासंमं.; (२) त्रिकोणमिती; रासंमं.; (३) पेशवाईतील मेस्तक; रासंमं.; (४) लीलावती – तंसम., भाइसंमं.; (५) वरावर्दी गणित; रासंमं.

[५] **चरित्रे** – (१) एकनाथ चरित्रे – २; (२) चरित्रसंग्रह – ५; (३) चोखामेळा चरित्र – १; (४) दाशार्ह चरित्र (काव्यबद्ध, त्रुटित) – १; (५) नळचरित्र (काव्यबद्ध) – २; (६) नामदेव चरित्र – २; (७) निरंजन चरित्र – १; (८) पुंडलिक चरित्र – १; (९) वामन चरित्र – १; (१०) वीरभोगवसंत चरित्र – २; (११) शालिवाहन चरित्र (मोडी लिपीत) – १; (१२) शुकदेव चरित्र – ४; (१३) समर्थ चरित्र – १; (१४) सुदाम चरित्र – ७.

[६] **ज्योतिषविषयक ग्रंथ** – संख्या ४१ – (१) खगोलज्योतिष – १; वेंकासं.; (२) गजसामुद्रिक – १; SOI; (३) ग्रलाटीका – ३; भाइसंमं.; श. १६२३ ते श. १८०५ च्या दरम्यान नकललेल्या : २ त्रुटित; (४) ग्रहविषयक ग्रंथ – ३; औंहसं., नाविग्रं., भाइसंमं.; (५) ज्योतिषप्रकरणे – १०; औंहसं., तंसम., भाइसंमं., मसंमं., रासंमं.; ४ त्रुटित; (६) ज्योतिषविषयक ग्रंथ – १२; १. ज्योतिषप्रश्न; रासंमं.; २. ज्योतिषरत्नाकर (त्रुटित); भाइसंमं.; ३. ज्योतिषसार (त्रुटित); भाइसंमं.; ४. नवरत्नचिंतामण (त्रुटित); भाइसंमं.; ५. नरहरिप्रश्नावळी (त्रुटित); भाइसंमं.; ६. नक्षत्र-जातक (त्रुटित); भाइसंमं.; ७. प्रश्नचिंतामणि; रासंमं.; ८. प्रश्नोत्तरमालिका; उविहै.; ९. यवनजातक; रासंमं.; १०. रमल; भाइसंमं.; ११. शनिचालि; रासंमं.; १२. सूर्यग्रहणकरणी; नाविग्रं.; (७) तिथिनिर्णय – ४; रासंमं.; (८) पल्लीपतन – ७; भाइसंमं., रासंमं.; श. १६९८ ते श. १८४३ च्या दरम्यान नकललेले ग्रंथ; १ त्रुटित.

[७] **बखर** – संख्या १६ – (१) 'उदेपूरची बखर'; रासंमं. बा. ४९/ब ३ (७६२). (२) 'कऱ्हाडच्या गणपतीची बखर'; रासंमं.; बा. ४९/ ब ७ (७६६). (३) 'काशीखंड बखर'; रासंमं. बा. ४९/ब १९ (७६९); (४) 'केदारलिंगाच्या पाटीलकीची बखर'; रासंमं. बा. ४९/ब १२ (७७१); (५) 'जंजिरेकर व हबशांची हकीगत'; नक्कल श. १८०५, आश्विन वद्य ९; रासंमं. बा. ४९/२५ (७८४); (६) 'भीमसिंग राजाच्या पुत्राची बखर'; रासंमं. बा. ४९/ब ६१ (८२०); (७) 'मानाजीपंताची बखर'; 'श्रीमंत सकलगुणैश्वर्य विराजमान राजश्री श्री सच्चिदानंदस्वामीचे सेवेशी आज्ञाधारक मानाजीपंताची बखर'; प्रस्तुत बखरीच्या भाषेवर व रचनेवर एकनाथी वाङ्मयाची छाप आढळते; कवचाळे, कृ. गं.; मभामवा.; इंदूर, १९३९, पृ. ४०; (८) 'मालवण किल्ल्याची बखर'; रासंमं. बा. ४९/ब (८२७); (९) 'यजुर्वेदी माध्यंदिनाची बखर'; कवचाळे, कृ. गं.; मभामवा.; इंदूर, १९३९, पृ. ४०; (१०) 'योगवासिष्ठाची बखर'; रासंमं. बा. ४९/ब ७२ (८३१); (११) 'रंजितसिंग लाहोरवाले यांची बखर'; IOLCMM, १६५ व १६६; (१२) 'रायगडची हकीगत'; रासंमं. बा. ४९/८७ (८४६); (१३) 'रास्ते यांची हकीगत'; रासंमं. बा. ४९/८८ (८४७); (१४) 'शुक बहात्तरी बखर'; रासंमं. बा. ४९/ब ११८ (८७७); (१५) 'श्रीगुरु दत्तात्रयस्वामी याची बखर', कलियुगाचा अवतार होण्यापूर्वी नारदाने धर्मराजाला सांगितलेल्या गोष्टी; नक्कल श. १७७०, कीलक संवत्सर; IOLCMM, १०६; (१६) 'हातमनामा'; SOI, क्र. ५८ (६०३३).

[८] **मंत्रवाङ्मय** – (१) अजपागायत्री; तंसम.; (२) अजपाजपगायत्री; भाइसंमं.; (३) अजपावर्णन; भाइसंमं.; (४) उच्छिष्ट गणपतिविधान व इतर श्लोक; भाइसंमं.; (५) ऋग्वेदसंहिता (मंत्रविभाग); ले. का. : श. १७७०; भाइसंमं.; (६) कर्णपिशाचमंत्र; नाविग्रं.; (७) दत्तात्रेय अजपा वर्णन; SOI; (८) परंप्रयोग मंत्र; भाइसंमं.; (९) ब्रह्माण्डअजपा; भाइसंमं.; (१०) मन्त्रतन्त्रप्रकरण; भाइसंमं.; (११) मन्त्रतन्त्रसंग्रह (मराठी, हिंदी); भाइसंमं.; (१२) मन्त्रमुक्तावलि; नाविग्रं.; (१३) यक्षप्रश्न; नाविग्रं.; (१४) यक्षिणीप्रयोग – २; भाइसंमं.; SOI – अपूर्ण; (१५) वशीकरणमंत्र (त्रुटित); ले. का : श. १६३२; भाइसंमं.; (१६) सप्तशती (त्रुटित); भाइसंमं.; (१७) सर्पमंत्र; भाइसंमं.

[९] **टीकाभाष्ये** – संख्या ४६ – (१) अनुभवामृत – १; तंसम.; (२) अपरोक्षानुभूति – १; नाविग्रं.; (३) अमरकोश – १; भाइसंमं.; (४) उत्तरगीता – २ (त्रुटित); भाइसंमं.; (५) गीतगोविंद – १; मसंमं.; (६) गीता – १६; रासंमं., भाइसंमं., उविहै., नाविग्रं., SOI, तंसम., मसंमं.; (७) गुरुगीता (सटीक); SOI, भाइसंमं., तंसम.; (८) ज्योतिषरत्न (टीका) – १; भाइसंमं.; (९) महावाक्यभाष्य – ४; दत्तग्रंसं., रासंमं., तंसम., मसंमं.; (१०) मुहूर्तमार्तंड – १; नाविग्रं.; (११) यमगीता – १; UCOM, १९३६; (१२) रामगीता – २; भाइसंमं.; (१३) विचारसंग्रह – १; भाइसंमं.; (१४) वेदस्तुति – २; मौरासं., मसंमं.; (१५) वैद्यकशास्त्रविषयक – ४; SOI, भाइसंमं., नाविग्रं.; (१६) वृद्धचाणाख्य – १; तंसम.; (१७) संगीतप्रकरण – १ (त्रुटित, संस्कृत-मराठी); भाइसंमं.; (१८) सूर्य सिद्धान्त – १; ग्वाहसं.; (१९) हस्तामलक टीका – २; मौरासं., SOI; पैकी १ पद्यटीका, १ स्तोत्रटीका.

[१०] **भूगोलविषयक ग्रंथ** – संख्या ४ – (१) भूगोल विचार; भाइसंमं.; (२) भूगोलवर्णन; तंसम.; (३) भूमगोलु (त्रुटित); रासंमं.; (४) भोगोळपुराण (त्रुटित); भाइसंमं.

[११] **राजधर्मविषयक ग्रंथ** – संख्या ३ – (१) राजधर्म; तंसम.; (२) राजधर्म; तंसम.; (३) राजनीतिश्लोक; तंसम.

[१२] **लोकसाहित्य** – (१) गोंधळाचे पद – १; (२) दशावतारश्लोक – १; (३) ललिताची पदे – १; (४) लोककथा – १ (लक्ष्मणा-

बाईची कहाणी).

[१३] **वैद्यकशास्त्रविषयक ग्रंथ** – संख्या ५२ – (१) गजवैद्य – १; तंसम. (२) त्र्यंबकी – २; रासंमं., नाविग्रं.; (३) विषवैद्यक – १; रासंमं.; (४) वैद्यकविषयक प्रकरणे बाड इ. – २६ (पैकी ६ त्रुटित); उविहै. – ४, तंसम. – १, नाविग्रं. – २, भाइसंमं. – ६, मसंमं. – १, रासंमं. – ९, SOI – २, UCOM (१९४१–Part II); (५) वैद्यकविषयक ग्रंथ – १५ – १. धातुशोधन – २; रासंमं.; २. भावप्रकाश – १; भाइसंमं; ३. रसराज – १; रासंमं.; ४. रसायन – १; रासंमं.; ५. रसायनप्रक्रिया – १; रासंमं.; ६. वैद्यकमहाराष्ट्र – १; रासंमं.; ७. वैद्यचिन्तामणि – १ (त्रुटित); भाइसंमं.; ८. वैद्यजीवन – ३; ग्वाहसं., भाइसंमं., UCOM (१९४१ – Part II); ९. वैद्यपलभसंहिता – १; उविहै.; १०. वैद्ययोग – १; केत्रिहसं.; ११. (श्री) कल्प – १; SOI; १२. सारसंग्रह – १ (त्रुटित); भाइसंमं.; (६) शालिहोत्र – ७; तंसम.; भाइसंमं. – ३, रासंमं. – १, नाविग्रं. – १.

[१४] **व्रतकथा** – (१) अनंतचतुर्दशीव्रतकथा – ९; (२) अमुक्ताभरणसप्तमीकथा – ४; (३) अरुंधती व्रतकथा – ४; (४) उपांगललिताव्रतकथा – ५; (५) उमामहेश्वर व्रतकथा – ९; (६) एकादशी कथा – ३; (७) ऋषिपंचमीकथा – ८; (८) केदारगौरीव्रतकथा – १२ (पैकी १ : लिपी तेलंगी, भाषा मराठी); (९) कोकिलाव्रतकथा – ३; (१०) कोजागिरीव्रतकथा – १; (११) गोकुलाष्टमीकथा – ५; (१२) गोपद्मव्रतकथा – ४; (१३) जयंतीव्रतकथा – १; (१४) ज्येष्ठाकनिष्ठाव्रतकथा – ५; (१५) दशाफलव्रतकथा – ५; (१६) पक्षप्रदोषव्रतकथा – ४; (१७) बुधाष्टमीव्रतकथा – ३; (१८) भौमवारव्रतकथा – १; (१९) महाशिवरात्रीव्रतकथा; (२०) रथसप्तमीकथा; (२१) वटसावित्रीव्रतकथा – ७; (२२) वरमहालक्ष्मीव्रतकथा – २; (२३) शनिप्रदोषकथा – ६; (२४) संकटहरचतुर्थीव्रतकथा – ४; (२५) सत्यनारायणकथा – १; (२६) सिद्धिविनायकव्रतकथा – १; (२७) सोमवारव्रतकथा – ७; (२८) सोमवारामावास्याव्रतकथा – ४; (२९) सोळासोमवारव्रतकथा – ९; (३०) स्कंदषष्ठिव्रतकथा – ४; (३१) स्वर्णगौरीव्रतकथा – ३; (३२) हरितालिकाकथा – २३ (पैकी ३ त्रुटित, ३ तेलंगी लिपीत).

[१५] **व्याकरणविषयक ग्रंथ** – संख्या ११ – (१) कारकप्रकरणम् (संस्कृत व मराठी); भाइसंमं.; (२) काव्यबोध (त्रुटित); ले. का. : श. १७७३; भाइसंमं.; (३) गणलक्षण; तंसम.; (४) छन्दःशास्त्र; भाइसंमं.; (५) पदतरण (संस्कृत-मराठी); भाइसंमं.; (६) पाणिनीव्याकरण (त्रुटित); भाइसंमं.; (७) महाराष्ट्र भाषेचे व्याकरण; IOLCMM; (८) वृत्तरत्नाकरादि; तंसम.; (९) व्याकरणप्रकरण (त्रुटित); भाइसंमं.; (१०) समासचक्र (संस्कृत-मराठी); भाइसंमं.; (११) समासप्रकरण; उविहै.

[१६] **संकीर्ण** – (१) गीता (समश्लोकी भाषांतर) – ३; रासंमं.; (२) गीतापदबोधिनी – ३; श. १६१६ ते १७३३; भाइसंमं., रासंमं.; (३) गीतासार – ३; भाइसंमं.; (४) गुरुगीता – ५; भाइसंमं., ग्वाहसं.; (५) चतुःश्लोकी भागवत – ५; ले. का. : श. १७२१; भाइसंमं., रासंमं., गोपीग्रंसं.; (६) नारदनीति – २ (पैकी १ अपूर्ण); SOI, UCOM, १९३६; (७) नीतिशतक (समश्लोकी) – ३; भाइसंमं., UCOM, १९३६; ले. का. : श. १७८२; (८) भर्तृहरीचे नीतिशतक – १ (त्रुटित); रासंमं.; (९) भवानीशतक – १; रासंमं.; (१०) भागवत – ८; भाइसंमं., रासंमं.; (११) महाभारत (पर्वे); नक्कल श. १६६० ते श. १७११; भाइसंमं., रासंमं.; (१२) मूलस्तंभ – ८; मसंमं., उविहै., भाइसंमं., रासंमं.; (१३) योगवासिष्ठ – ३; भाइसंमं., तंसम., नाविग्रं.; (१४) योगशतक – १; रासंमं. (१५) रामविजय – १२; ले. का. : श. १७०६ ते १७९४; भाइसंमं., IOLCMM; (१६) विदुरनीति – १; SOI; (१७) वैराग्यशतक – १; UCOM, १९३६; अपूर्ण; (१८) शृंगारशतक (समश्लोकी) – १; भाइसंमं., UCOM, १९३६.

[१७] **स्फुट रचना – (अ) आरत्या, पदे** – (१) आरतीसंग्रह – ३; (२) कैलासराणा – १ पदसंग्रह; (३) कृष्णभक्तिपर – १ पदसंग्रह; (४) गंगा – १ आरती, ४ काव्ये, १ पद; (५) गणपति – ५ काव्ये, १ पदसंग्रह; (६) देवीच्या आरत्या – २; (७) भूपाळ्या – २; (८) रामचंद्र – १ आरती, १ काव्य; (९) रामीरामदास – १ आरती; (१०) विठ्ठल – २ पदे; (११) सत्यनारायण – १ आरती.

**(आ) माहात्म्य** – (१) अश्वत्थ – १; (२) एकादशी – ३; (३) काशीयात्रा – १; (४) कृष्णा – १; (५) गया – १; (६) गीता – ३; (७) गुंडा – १; (८) तुळसी – १; (९) पंढरी – १; (१०) पांडुरंग – ७; (११) पांडुरंग – २ (त्रुटित); (१२) रामायण – १; (१३) रुद्र – १; (१४) विनायक – २; (१५) वेंकटगिरी – ४; (१६) शनि – २; (१७) शिवालय – १; (१८) काशीक्षेत्र – १; (१९) श्रीकृष्ण – १; (२०) श्रीमद्भागवत – १; इ. स. १९३६; (२१) सूर्यस्तुति – १.

**(इ) स्तोत्रे** – (१) अवधूतशतक – १; (२) आनंदलहरी – १; (३) एकाशिवराम सद्गुरुस्तोत्र – १; श. १६५६; (४) गणपति – ३; (५) गीता – १; (६) गुरु – २; (७) गुरुगीता – १; (८) गुरुपरम्पराष्टक – १; (९) त्रिवेणी – १; (१०) दशावतार – १; (११) दक्षिणामूर्ति – १; (१२) देवी – २; (१३) पांडुरंग – २; (१४) राम – ३; (१५) वेंकटेश – १६; (१६) शिव – १; (१७) श्रीकृष्ण – २; (१८) सूर्य – ३; (१९) सोमसुंदर – १; (२०) स्तोत्रें (तळेगावकर लिपी) – १; (२१) हस्तामलक – ५.

* * *

# पुरवणी

**तुकाराम (वाणी)** [पृ. ११४]

**रचना :**

१. **तुकारामकृत अभंग**; संग्राहक, माधव चंद्रोबा; मुंबई, १८६६–६८. मराठीतील पहिला छापील (शिळाछाप) गाथा. अभंगसंख्या ३३२९. १८६६ साल असलेली प्रत पुणे येथील फर्ग्युसन कॉलेजातील 'मंडलिक' संग्रहात आहे. "जिला समग्र गाथा म्हणतां येईल ती छापण्याचा पहिला उपक्रम माधव चंद्रोबा ह्यांनीं केला. ही त्यांच्या *सर्वसंग्रह* ह्या मासिकांत क्रमशः प्रसिद्ध झाली. पहिला भाग १८६२ सालीं, दुसरा १८६४ सालीं, तिसरा १८६६ सालीं व त्यानंतर पुढील दोन भाग मिळून पांच भागांत संपविलेली गाथा १८६८ सालीं स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली."

२. **तुकारामबावाच्या अभंगाची गाथा, भाग १**; संपा. विष्णु परशुरामशास्त्री पंडित व शंकर पांडुरंग पंडित; अभंग २२४७, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई, १८६९. **भाग २**; संपा. वि. प. पंडित व शं. पां. पंडित, अभंग २२४८–४५०३; शब्दकोश व वर्णानुक्रमणिका ह्यांसह; इंदुप्रकाश; मुंबई, १८७३.

"ही गाथा 'शंकर पांडुरंगी', 'पंडितांची', 'इंदुप्रकाश' किंवा 'सरकारी' ह्या नांवांनीं ओळखली जाते. ह्यापूर्वी प्रसिद्ध झालेले अभंग व गाथा ह्या मुख्यत्वें पंढरपुरांतील प्रचलित पाठांच्या परंपरेवर आधारलेल्या होत्या. पंडितांच्या गाथेंत प्रथमच तुकारामांच्या प्रदेशांतील म्हणजे देहूच्या परिसरांतील हस्तलिखितें तपासून संख्या, पाठ व क्रम ठरविण्यांत आले. देहू भागांतील व पंढरपूर परंपरेंतील असे दोन्ही पाठ तपासून गाथेचें संपादन केलें हेंच ह्या गाथेचें वैशिष्टय होय. आजतागायत हा असा एकच प्रयत्न झाला कीं संपादकांनीं महत्त्वाच्या सर्व उपलब्ध हस्तलिखितांतील पाठक्रमादि तपासून संशोधित संहिता तयार केली . . . जनार्दन सखाराम गाडगीळ ह्यांनीं लिहिलेलें तुकारामांचें इंग्रजी चरित्र व बहुधा त्यांनींच लिहिलेलें एक मराठी चरित्र अशीं दोन चरित्रें ह्या गाथेच्या पहिल्या आवृत्तीला जोडलेलीं होतीं."

ही गाथा पुष्कळ वर्षे दुर्मिळ झाली होती. तुकाराममहाराजांच्या निर्याणाला तीनशे वर्षे पुरी झाली (इ. स. १९५०) त्या प्रसंगी ती मुंबई सरकारने पु. मं. लाड ह्यांजकडून संपादित करून घेऊन प्रसिद्ध केली. त्यानंतर हिच्या तीन आवृत्त्या निघाल्या.

३. **तुकारामाची गाथा**; संपा. रामचंद्र विष्णु माडगांवकर, अभंगसंख्या ४५८३; विस्तृत चरित्र (हे वेगळेही छापले आहे); शब्दकोश, वर्णानुक्रमणिका; मुंबई, १८८६.

४. **श्रीतुकारामांच्या अभंगांची गाथा**; संग्राहक : शं. त्र्यं. सप्तऋषी व हरि गोविंद मोतीवाले, अभंगसंख्या ४५८२; मुंबई, १८९६.

५. **तुकाराममहाराजांची सांप्रदायिक गाथा**; प्रस्तावना : हरि नारायण आपटे; वर्णानुक्रमणिका; अभंगसंख्या ४०९२; बाबुराव हरी देवडीकर ह्यांच्या साहाय्याने पंढरपूर येथील गंगुकाका शिरवळकर ह्यांच्यापाशी असलेल्या प्रासादिक पोथीवरून तयार केलेली. ही वही श्रीक्षेत्र पंढरपूर येथे प्रल्हादबुवा बडवे ह्यांच्याकडे होती; सदर वहीवरून ही प्रत छापली आहे. 'आर्यभूषण प्रत' म्हणून ही उल्लेखिली जाते; पुणे, १९१३.

६. **तुकाराममहाराजांची गाथा** : संपा. माधव कृष्ण देशमुख व शं. वा. दांडेकर, अभंग ४५६६; तुकाराम, कान्होबा, रामेश्वर ह्यांचे व क्षेपक मिळून; श्रीगंगुकाका ह्यांच्या व पंढरपूरच्या माळ्यांच्या वहीवरून लिहून घेतले. ह्याला जोडलेल्या शब्दकोशात तो शब्द ज्यात आहे त्या अभंगाचा अनुक्रमांक दिला आहे हे ह्या गाथेचे वैशिष्ट्य आहे; चित्रशाळा; पुणे, १९२५.

**तुकारामांच्या अभंगांचे इतर भाषांतील अनुवाद :**

**इंग्रजी** : १. **फ्रेजर, जे. नेल्सन**; द पोएम्स ऑफ तुकाराम; खंड १; मद्रास, १९०९; पंडितांच्या गाथेचे के. बी. मराठे ह्यांच्या साह्याने केलेले भाषान्तर (तीन भागांत); ह्या पहिल्या भागात भाषान्तरित १२०८ अभंग आले आहेत; अभंगांचे क्रमशः भाषान्तर केले नसून मराठी व इंग्रजी अभंगांचे क्रमांक भिन्न आहेत; त्यांचा परस्पर संबंध दुसऱ्या भागांत दाखविला आहे. २. सदर, खंड २; मद्रास, १९१३; ह्यांत १३०९ ते २६४८ भाषान्तरित अभंग आहेत; पंडित प्रतीतील व ह्या इंग्रजी भाषान्तरित अभंगांचा परस्परसंबंध दाखविणारा तक्ता जोडला आहे. ३. सदर, खंड ३; मद्रास, १९१५; ह्यात २६४९ ते ३७२१ भाषान्तरित अभंग असून मूळ मराठी व भाषान्तरित अभंगांचे परस्परसंबंध दाखविणारा तक्ता जोडला आहे. ४. **हॉयलॅंड, जॉन एस.**; व्हिलेज सॉंग्स ऑफ वेस्टर्न इण्डिया; लंडन, १९३४; ह्यात काही निवडक अभंग अनुवादित करून दिले आहेत.

**गुजराती** : १. अनुवादक : **श्री सेवानंद**; श्री तुकाराम गाथा, ग्रंथ पहेलो, अमदाबाद; १९३९. २. सदर ग्रंथ बीजो; अमदाबाद; १९४०; विष्णुबुवा जोग ह्यांनी तयार केलेल्या गाथेचा हा अनुवाद आहे.

**इतर भाषांतील ग्रंथ :**

१. **ॲबट, जस्टिन ई.**; तुकाराम द पोएट सेण्ट ऑफ महाराष्ट्र, १९३०; महीपतीच्या भक्तलीलामृत, अध्याय २५ ते ४० चे इंग्रजी भाषान्तर. २. **मेहता, भरतराम भानुशंकर**; तुकाराम; गुजराती; बडोदे; १९१२. ३. **बसु, योगेन्द्रनाथ**; तुकारामचरित; बंगाली; १९१७. योगीन्द्रनाथांना तुकाराममहाराजांचा पहिला परिचय कलकत्त्यात ठाकूर कुटुंबाने चालविलेल्या 'भारती' ह्या बंगाली मासिकात प्रसिद्ध झालेल्या चरित्रात्मक निबंधामुळे झाला; तो लेख आणि त्यांची कविता ह्यांबद्दल विलक्षण जिज्ञासा उत्पन्न होऊन ते मराठी भाषा शिकले; सुप्रसिद्ध सखाराम गणेश देऊस्कर ह्या आपल्या महाराष्ट्रीय विद्यार्थ्याचे साह्य घेऊन तुकाराममहाराजांचे अभंग व त्यांजविषयीचे मराठीतील सर्व उपलब्ध वाङ्मय त्यांनी काळजीपूर्वक अभ्यासिले; ह्या अभ्यासाचे फळ म्हणजे 'दासी' ह्या आता अस्तंगत झालेल्या मासिकात आधी क्रमशः प्रसिद्ध झालेले व पुढे पुस्तकरूपाने मुद्रित झालेले 'तुकारामचरित' होय. हे चरित्र लिहीत असता योगीन्द्रनाथबाबूंची फार इच्छा होती की, आपण तुकाराममहाराजांची जन्मभूमी देहू, तिच्या बाजूने वाहणारी पवित्रसलिला इंद्रायणी, त्यांची इष्टदेवता पंढरपूरची विठाई माउली ही प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहावी, त्या भागवती वातावरणात काही काळ रमावे, काही नवी अनुभूती संपादावी; आणि मगच संस्कारित असे विस्तृत 'तुकारामचरित' लिहावे, त्यांच्या निवडक अभंगांचा पद्यात्मक अनुवाद करावा. पण अनेक अडचणींमुळे योगेन्द्रनाथबाबूंना ते शक्य झाले नाही. तेव्हा त्यांनी तुकाराममहाराजांच्या जीवनकथेला पोषक अशा अभंगांचाच तेवढा अनुवाद करून व जे मराठी साहित्य हाताशी आले त्याचा यथो-

चित उपयोग करून, 'तुकारामचरित' काही वर्षांनी पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले. ह्या पुस्तकाच्या दोन आवृत्त्या निघाल्या. द्वितीयावृत्ती वंगाब्द १३२४ मध्ये (इ. स. १९१७) प्रसिद्ध झाली. प्रथमावृत्ती केव्हा निघाली ह्याचा उल्लेख प्रस्तावनेत नसल्यामुळे ते कळण्यास मार्ग नाही. क्राउन षोडशपत्री साच्याच्या १२६ पृष्ठांचे हे पुस्तक आहे. सुललित भाषेत सहानुभूतिपूर्ण अंतःकरणाने ते लिहिले आहे. ४. **कामत, अशोक**; संत तुकाराम महाराजांची हिंदी वाणी; मांडवी, मे १९६९; व. ७, अं. ५; पृ १९–२४. ५. **दिवेकर, हरि रामचंद्र**; संत तुकाराम; हिंदी; इलाहाबाद: १९३७. ह्यांत (१) महाराष्ट्र भक्तिधर्म, (२) तुकाराम का जन्म, (३) तुकाराम का संसारसुख, (४) तुकाराम विरक्त कैसे हुए, (५) तुकाराम की साधना, (६) तुकाराम की कसौटी, (७) सिद्धावस्था और प्रयाण, (८) अभंगों का बहिरंग, (९) देवभक्त संवाद, (१०) आत्मपरीक्षण और अनुताप (११) आत्मानुभव, (१२) सदुपदेश, (१३) संतमाहात्म्य, (१४) ईश्वरभक्ति, (१५) तुकारामजी की हिंदी कविता, अशी प्रकरणे आली आहेत.

**चरित्र, चर्चा, अभ्यास:** १. एडवर्ड्स, जे. एफ. : तुकारामबोवांचा सेतु; पुणे, १९३२; निबंध; हे पुस्तक लिहिण्याचा पहिला उद्देश "विठोबाच्या पुष्कळशा भक्तांना तुकारामनिर्मित सेतूवरून ख्रिस्ताकडे पार जातां येतें" हें दाखविणें हा आहे. पुस्तक प्रचारात्मक असलें तरी माहितीपूर्ण आहे. २. केळकर, के. स., तुकाराममहाराजांचें आत्मचरित्र; पुणे, १९२८. ३. केळकर, मा. स.; साधुवर्य तुकाराममहाराज यांचें आध्यात्मिक चरित्र व शिकवण; पुणे, १९३५; प्रार्थनासमाजाच्या दृष्टिकोनातून लिहिलेले. ४. चित्रे, प. दि.; तुकाराममहाराजांचा दिव्य संदेश; मुंबई, १९३०; सार्थ व सटीप निवडक अभंग देऊन तुकारामाच्या चरित्राचा अर्थ सांगण्याचा प्रयत्न ह्या पुस्तकात केला आहे. ५. धुरंधर, बा. कृ;. श्री संतमुकुटमणी श्रीतुकाराममहाराज यांचें चरित्र; मुंबई, १९२८. ६. पारखे, द. वि. (मिरज); श्रीतुकाराम अर्थात् व्यवहारधर्म; निबंध; मुंबई, १९२७. ७. भिडे, बा. अ.; तुकारामबोवा; मुंबई, १९०८, १९१५, १९२१. ८. हंस, बाळकृष्ण मल्हार; साधुवर्य तुकाराम यांच्या धर्मसंबंधीं आणि नीतिसंबंधीं उपदेशावर निबंध; इंदूर, १८८०; हा निबंध फारच दुर्मिळ असून ह्याची एक प्रत पुणे येथील फर्ग्युसन कॉलेजच्या मंडलिक ग्रंथसंग्रहात रक्षून ठेविली आहे.

**महदंबा** [पृ. २३४]

**अनामिक :** *महदंबा शोकवर्णन*; संपा. प्रा. व. दा. कुळकर्णी; महानुभाव मासिक, जुलै १९७७, पृ. ९–११; हस्त. : ऋद्धिपूर येथील श्रीगोपीराज महानुभाव ग्रंथालयात सुरक्षित.

"श्रीचक्रधरांच्या देहावसानानंतर त्यांच्याबरोबर सावलीप्रमाणें वावरणारी महदायिसा ऊर्फ महदंबा हिची अवस्था कशी झाली, हे *लीळाचरित्र* किंवा *स्मृतिस्थळ* ह्यांपैकी कोणत्याही ग्रंथांत सांगितले गेलेले नाही. एका अनामिक कवी-कवयित्रीने प्रतिभेच्या बळावर हे गीत रचून 'दुजी सृष्टी' निर्माण केली आहे. ही रचना लोकगीताचा साज चढवून आली आहे. महदायिसाच्या शोकविव्हल अवस्थेचें हें मूर्तिमंत चित्रण आहे . . . करुण आणि भक्तिरसानें ओथंबलेलें हे गीत आहे. . . . लोकगीतात्मक रचना हें महानुभाव सारस्वताचें आणखी एक आगळें वैशिष्ट्य. महानुभाव वाङ्मयाची ही नवी बाजू अत्यंत विलोभनीय आहे."

* * *

# शुद्धिपत्र

## नोंदींची शीर्षके

(१) मुख्य नोंदीपुढील गळलेल्या पोकळ शून्य नोंदी; (२) गळून गेलेली किंवा नको तेथे पडलेली नोंदींच्या सुरुवातीची पोकळ शून्ये; (३) मुख्य नोंदीपुढच्या पोकळ शून्याच्या नोंदींचा अकारीचा क्रम व (४) नोंदींची नावे ह्या ठिकाणी झालेल्या चुका लक्षात घेऊन ही शीर्षके दुरुस्त केलेल्या स्वरूपात पुढे दिली आहेत.

**अचळ मुरारीबास** / ० मुरारीबास–१
**अच्युताश्रम–२** / ० चिदानंदानुचर
**अनंत–२** / ० अनंत कवी–२
**अनंत मौनी** / ० अनंत–९
**अनंत राघवदासी**
**अंबाई** / ० आंबाई
**अंबाजी–२**
**० अमृत–३**
**० अमृतानंद योगेश्वर**
**अमृतेश्वर ब्रह्मानंद**
**अरुणाद्रि**
**अवधूत–१** / ० अवधूत गोविंद
**० आत्माराम–१**
**आत्मारामस्वामी येकेहाळीकर** / ० आत्माराम–१
**० आत्यारामस्वामी**
**० आनंद–४**
**० आपारंगात्मज**
**उद्धव (मुल्हेरकर)** / ० शिवबा
**उद्बोध**
**एल्हण** / ० एल्हणा / ० येल्हण
**० एल्हणसुत विद्वांस**
**० ओंकार** – पहा येल्हणसुत मंडळीक.
**० औरंगाबादकर, विनायकराव**
**कल्याण** / ० अंबाजी–१
**० कान्हो पाठक–२**
**काशीराम–२** / ० काशीरामा
**० काशीरामा**
**० कृष्णदास–८**
**० कृष्णदास–९**
**कृष्णदास जयराम–१** / ० कृष्णदास–८
**० कृष्णदास ताना**
**० कृष्णदास बैरागी**
**० कृष्णदासु शामा**
**० कृष्णमुनि–३**
**० कृष्णसुत–२**
**केशिराजबास** / . . . / ० केशवराज सूरी / . . . / ० केशिराज-मुनि / . . .
**० कोनेरीबाबा**
**गरीब आबदुल**
**गाण**
**गावबा** / ० नित्यानंद–२
**गुंडाकेसरी**
**गुणदिन**
**गोपाळ कवी–२**
**० गोपाळ पंडित–१**
**० गोपाळसूनु** [ही नोंद **गोपाळसुत** ह्या नोंदीनंतर घ्यावी]
**० गोपाळस्वामी**
**० गोपीनाथ–१**–पहा गोपाळदास–५.
**० गोविंद कवि–३**
**गोविंद कवि–४**
**गोविंदप्रभु** / ० गुंडम राऊळ / ० गुंडोबा
**० गोविंद विध्वंश**
**० गोविंद (विप्र, वैद्य)**
**गोविंदा शाहीर** / ० गोविंदा भिवाजी भागवत
**० गोसावीसुत–१**
**० ग्रेव्हज, ॲलन**
**० चक्रपाणी–१**
**० चक्रपाणी–३**
**० चक्रपाणी–५**
**० चक्रपाणी बागुडे**
**चक्रपाणी व्यास वर्धनस्थ** / ० चक्रपाणी–३ / ० चक्रपाणी व्यास बीडकर / . . .
**० चक्रपाणी व्यास बीडकर**
**चांगदेव** / ० चक्रपाणी–५
**चिंतामणीसुत–१** / ० त्रिमल–३ / ० नित्यानंद–१
**० चिंतामणीसुत मुद्गल** – पहा मुक्तेश्वर–१.
**चिन्मयदत्त** / ० चिन्मय–२ / ० दत्तचिन्मय
**चैतन्यस्वामी**
**जगज्जीवन** / . . . / ० जगन्नाथ महाराज / ० जगन्नाथस्वामी (कल्याणशिष्य)
**जगमित्र नागा** / ० जगमैत्रनागया / ० नागा जगमैत्र
**० जगमैत्रनागया**
**० जयरामनाना**
**जयरामस्वामी (वडगावकर)** / ० कृष्णदास जयराम–२ / ० जयराम–१ / ० जयराम कृष्णदास–२
**(डॉ.) जॉन मॅकलेनॉन** / ० मॅकलेनॉन, जॉन
**० जीवराम**
**० जोजार नागेश** – पहा पूर्णब्रह्म जोजार.
**० टेलर, (डॉ.) जॉन**
**० डिक्सन, (रेव्ह.) जॉन**
**डिंभ मुनि कृष्णदास** / ० कवि डिंभ / ० कृष्णडिंभ विराट / . . .
**० तानाजी**
**० तुकोद्धव** [ही नोंद गाळावी]
**त्रिमल्लअद्वयी**
**० दास–२**
**दासनिरंजन** / ० निरंजनदास–३

दिवाकर कपाटे / ० कपाटे, दिवाकर
देवदास–३ / ० अमृत–३ / ० देवीदास / . . .
० नरहरि–२
० नाईकस्वामी [ही नोंद गाळावी]
नागांबिका / ० नागाइसा–१ / ० नागांबा
० नागेंद्र–३
० नानाजी
नामदेव–१ / ० केशवाचा नामा / ० नामया / . . . / ० विष्णुदास नामा–१
० नारायणेंद्र सरस्वती [ही नोंद गाळावी]
० नारो भिकाजी रत्नपारखी [ही नोंद गाळावी]
० नित्यानंद–२
निरंजनदास बल्लाळ / ० निरंजनदास–१ / ० बल्लाळ
० निरंजनस्वामी–१
० नृसिंह पंडित
न्यायबास / न्यायंबास
० पुंडलिक भट
पुंडलीक वेदाजीसुत
० पूर्णानंदानुचर
० ब्रह्मानंद गोविंदराज चिन्मयानंद – पहा गोविंद चिन्मयानंद.
० भोसले शाहराज – पहा शाहजी (दुसरे).
महादेव–३ / ० नृसिंहदास महादेव / ० माधव–११
महींद्रभट / ० महीन्द्रव्यास / ० महीभट्ट / ० म्हाइंभट्ट
मालोबास / ० कवि मालो
मुद्गलदास
मुनिव्यास (कोठी) / ० कमळाकर अयाचित कोठी
० मुनिबास
० मेघराज
० मेरु
० मेरु अनंत
० म्हाइंभट्ट
रंगनाथ कवि दुपट्टी / ० कवि दुपट्टी
० राघवोपाध्ये
रामकवि–२ / ० कविराम
रामचंद्रपंत नीळकंठ अमात्य
बावडेकर / ० बावडेकर रामचंद्रपंत अमात्य
लल्लप / ० कृष्णसुत–२
विठा रेणुकानंदन / ० रेणुकानंदन विठ्ठल / ० विठा–२
विठू कानडया / ० कानडिया विठ्ठल / ० विठू कानडा
विठ्ठल (काशीराज) / ० काशीराज–२
० विठ्ठलनाथ–३
वीरेश्वर दीक्षित / ० नरसिंहनंदन / ० वीरेश्वर बल्लभ दीक्षित
शंभू
० शिवदास–८ – पहा शंकरदास.
० शिवेंद्र
सिद्धपालकेसरी

अनवधानाने गळलेली नोंदींची शीर्षके वा इतर मजकूर पुढे निर्दिष्ट केल्याप्रमाणे घ्यावा.

| पृ. स्तं. ओ. | | मजकूर |
|---|---|---|
| १०.१.१० | नंतर | ० **अंबाजी–१** – पहा कल्याण. |
| २२.१.४५ | नंतर | ० **आंबाई** – पहा अंबाई. |
| २२.२.२ | नंतर | ० **आल्मैद, मिगेल द** – पहा मिगेल द आल्मेद (पाद्री). |
| ५३.२.७ | नंतर | ० **कुवा, एतियन-द-ला** – पहा एतियन-द-ला कुवा (पाद्री). |
| ८०.१.१३ | नंतर | ० **चंद्रशेखर** – पहा चांदबोधले. |
| ८३.१.४१ | नंतर | ० **चिंतामणी देव** – पहा चिंतामणी महाराज चिंचवडकर. |
| ८६.२.२१ | नंतर | ० **चोखोबा** – पहा चोखामेळा. |
| ११६.१.४१ | नंतर | ० **तुका वर्दे** – पहा तुकारामबाबा वर्दे. |
| ११८.२.३० | नंतर | ० **त्रिमल–३** – पहा चिंतामणीसुत–१. |
| १२१.२.१६ | नंतर | ० **त्र्यंबकराय** – पहा त्रिंबकराज. |
| १२५.२.५२ | नंतर | ० **दयाभूषण** – पहा दयासागर–१. |

| पृ. स्तं. ओ. | | मजकूर |
|---|---|---|
| १४७.२.३ | नंतर | ० **नरहरि कवी** – पहा नरहरि–५. |
| १६५.२.१७ | नंतर | ० **नामा पाठक किंकर** – पहा नामा पाठक. |
| १६५.२.३१ | नंतर | ० **नामा शिंपी** – पहा शिंपी नामा.<br>० **नामा स्वामी** – पहा नामदेव–१. |
| १७०.१.४९ | नंतर | ० **नित्यानंद–१** – पहा चिंतामणीसुत–१. |
| १७१.२.१७ | नंतर | ० **निरंजनदास–३** – पहा दासनिरंजन. |
| १८१.१.४९ | नंतर | दे. वा. धारपुरे |
| १८१.२.५२ | नंतर | ० **पंडित विश्वनाथ बाळापूरकर** – पहा विश्वनाथ बाळापूरकर. |
| २११.१.४९ | नंतर | ० **ब्रह्मणी मुक्तोजी** – पहा मृत्युंजय. |
| २७०.२.२६ | नंतर | ० **मोघम कवी** – पहा केशवराव. |
| ३५५.२.३२ | नंतर | ० **वैजनाथ** – पहा विजय–२ (कृष्णशिष्य). |
| ३७१.२.२९ | नंतर | ० **शिवबा** – पहा उद्धव (मुल्हेरकर). |

## इतर दुरुस्त्या

| पृ. स्तं. ओ. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १.१.१३ | **अखड** | **अखंड** |
| २.२.५१ | आंबडगोदी | आंबडगोंदी |
| ३.२.५२ | शिवबोध | शिवबोध–१ |
| ८.१.५२ | अम. | अमु. |
| ८.२.४७ | **अनंतसुतप्रभु** (गिरिधरनागर) | **अनंतसुतप्रभु** |

| पृ. स्तं. ओ. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ८.२.५१ | चांदोरकरानौ | चांदोरकरांनी |
| ११.२.५ | उद्योगपवकार | उद्योगपर्वकार |
| १२.२.३६ | अनुवादता | अनुवादला |
| १२.२.४९ | साक्षात्कारमार्गीच्या | साक्षात्कारमार्गाच्या |
| १५.२.१ | अनंत | अनंते |
| १७.१.५ | *वरदनागेश* | *वरदनागेश* [⇨ ३] |

